यांच्या नाण्यांवर लक्ष्मीची मूर्ती आढळते, कारण ते वैष्णव होते. नेपाळमध्येही त्याच पंथाचा प्रचार होता.

गुप्तकालीन नाण्यांवरून त्या काळातील सामाजिक जीवनाची कल्पना करता येते. त्या वेळी राजे अश्वमेध यज्ञ करीत. शिकार व वीणावादन या चित्रांवरून राजांच्या आवडीनिवडी समजतात. त्या काळातील वेषभूषा, वृक्ष, वनस्पती, पशू, पक्षी यांचीही कल्पना नाण्यांवरील चित्रांमुळे येते. मध्ययुगातील नाण्यांवर अश्वारूढ राजाचे चित्र दिसते. मुसलमानी आक्रमणामुळे राजा सदैव युद्धाला सिद्ध असल्याचे ते सूचक ठरते. सातवाहन वंशातील यज्ञश्री सातकर्णीच्या एका नाण्यावर गलबताचे चित्र आहे. यावरून त्याने समुद्रावरही आपले स्वामित्व प्रस्थापित केले असावे, असे अनुमान करता येते.

नाण्यांची विपुलता व्यापारातील वृद्धी व आर्थिक समृद्धी दर्शविते. त्यांतील धातूच्या प्रमाणावरून काही अनुमाने काढता येतात. तांब्याची नाणी व अशुद्ध नाणी बहुधा आर्थिक तंगीमुळे त्या त्या राजांना निर्माण करावी लागली असावी. शुद्ध धातूची नाणी चांगली स्थिती दर्शवितात.

याव्यतिरिक्त, नाण्यांमुळे भिन्न काळातील कलाविकासही कळून येतो. काही नाणी साधी आहेत, तर काही कलात्मक व सुंदर आहेत.

प्राचीन काळातील नाण्यांवर ब्राह्मी व खरोष्ठी लिपी, त्याचप्रमाणे संस्कृत, प्राकृत व अन्य भाषाही आढळतात. अशा त्या नाणकलेखांवरून भारतीय लिपीचे ज्ञान विद्वानांना झाले. परकीय राजांच्या नाण्यांवरील युनानी व खरोष्ठी अक्षरे पाहून पुरातत्त्ववेत्त्यांनी खरोष्ठी लिपीची वर्णमाला बनवली. काही नाण्यांवर खरोष्ठी व ब्राह्मी लिपीतली अक्षरे असल्यामुळे ब्राह्मी लिपीचे ज्ञान होऊ शकले.

राजतरंगिणी हा इतिहासग्रंथ लिहिताना कल्हणाने नाण्यांचे निरीक्षण करून काही माहिती मिळवली होती, असे म्हणतात. पूर्वी भारतात इतिहासलेखनाची प्रथा चालू नसली, तरी प्राचीन काळी बहुतेक सर्व राज्यकर्त्यांनी शिलालेख, ताम्रपट व नाणी ही इतिहासाची साधने निर्माण करून ठेवली, हे सुदैवच होय. काही भाग्यवंतांना गुप्त धनाचे साठे सापडल्याच्या कथा कधी कधी ऐकायला मिळतात; ते गुप्तधन म्हणजे बहुधा सोन्याचांदीची जुनी नाणीच असावी. ती स्वार्थी माणसांच्या हाती लागली, की ती वितळवली जात; कारण त्यांतील सोने–चांदी विकून धन मिळवता येई. सामान्य माणसाला नाण्यांवरील आकृती व अक्षरे दुर्बोध असल्यामुळे त्याच्या दृष्टीने निरनिराळ्या धातूंच्या त्या लहानमोठ्या वेड्यावाकड्या तुकड्यांना फारशी किंमत नसते. पण पुरातत्त्ववेत्त्यांनी त्या क्षुद्र तुकड्यांचा अभ्यास करून भारताच्या गतेतिहासावर पुष्कळच प्रकाश पाडला आहे. म्हणूनच प्राचीन नाण्यांचा संग्रह हा एक बहुमोल राष्ट्रीय ठेवा मानला जातो. [इं. गॅ. इं.; म. ज्ञा. को.; भारतीय सिक्के – श्री. वासुदेव उपाध्याय १९४८; प्राचीन मुद्रा – राखालदास बानर्जी, अनु. – पं. गौरीशंकर ओझा, १९२४; कॉइन्स ऑफ इंडिया – सी. जे. ब्राउन, १९२२; या. का. म.; पै. सा. रा.; वि. स्मा. ग्रं.; भा. कृ. क.; श्री. पी. मोहनदास – मार्च ऑफ इंडिया, जानेवारी १९५६; रा. दे. टा.; प्रा. अ. स. अळतेकर स्मृती खंड – ज. न्यु. सो. इं. १९६०; द स्टोरी ऑफ इंडियन कॉयनेज – पी. बी. रामचंद्र राव, १९५७; स्ट. इं. ३; सं. मु.]

## नाणेघाट

महाराष्ट्रातील एक प्राचीन मार्ग. हा पुणे जिल्ह्यात जुन्नर तालुक्यात, जीवधन किल्ल्याजवळच्या



नाणेघाट

डोंगरावरून जातो. प्राचीन काळापासून कोकण व देश यांना जोडणारा रस्ता या घाटातून जात आहे. हा घाट सातवाहन

राजानी निर्माण केला, असे म्हणतात ठाणे जिल्ह्यातील सोपारा–कल्याण हा मार्ग पुढे मुरबाडवरून, या घाटातून जुन्नर



जकातीचे रांजण – नाणेघाट

कडे जातो या घाटाचा पायथा कल्याणपासून सुमारे चाळीस मैलावर असून, माथा जुन्नरपासून वीस मैलावर आहे या घाटाची लांबी सुमारे तीन मैल आहे मात्र घाटाची रुंदी सुमारे अडीचशे फूट लांब व सात ते सोळा फूट रुंद आहे

घाटमाथ्यावर शिरूर नावाचे पठार असून, त्या पठारावर अनेक जुनी टाकी व मोठाले खोदीव रांजण आहेत त्याना जकातीचे रांजण म्हणतात जवळच दीडश फूट उंचीचा एक तुटलेला कडा आहे त्याला नानाचा आंगठा असे नाव आहे नाणेघाटाला चुकीने नानाघाट असे म्हणतात

या घाटाच्या दोन्ही बाजूना डोंगरात अनेक लहान मोठी प्राचीन लेणी आहेत त्यातील बऱ्याच लेण्याची आता पडझड झाली आहे एका लेण्याच्या विस्तीर्ण दालनात सातवाहनाचे देवकुल आहे त्याच्या एका भिंतीवर देवी नागनिकेचा शिलालेख असून, पार्श्वभितीत सातवाहन वंशातील काही राजाच्या व राजघराण्यातील अनेक व्यक्तींच्या प्रतिमा व नामलेख आहेत त्या प्रतिमा भग्न झालेल्या असल्या तरी काहींचे पाय मात्र उरले असून, सर्वांची नावे शाबूत आहेत नागनिकेचा लेख सनपूर्व दुसऱ्या शतकातला असून, त्यावरून सातवाहन वंशाची पुष्कळ माहिती मिळते [ म ज्ञा को , सह्याद्रि ]

## नातरायत राजपूत

राजपुताचा एक वर्ग याची वस्ती राजस्थानमधील वाली, पाली, जालोर, साचोर, मालवी, इ ठिकाणी आहे ज्या राजपुतानी निरनिराळ्या कारणानी विधवाविवाह केले, त्याना नातरायत अशी संज्ञा मिळाली काही ठिकाणी याना चौरासिया असेही म्हणतात लग्नात मुलीच्या वडिलाना चौऱ्यायशी रुपये देण्याची प्रथा याच्यात होती, त्यावरूनच त्याना हे नाव मिळाले आहे

नातरायत स्त्रियात पडद्याची प्रथा विशेषशी रूढ नाही राजपूत समाजात नातरायताची प्रतिष्ठा कमी लेखली जाते स्वत ला उच्च समजणार राजपूत याच्याबरोबर पंक्तिभोजन व हुक्कापाणी करीत नाहीत [ रा जा ]

## नाताळ

एक ख्रिस्ती सण व उत्सव नाताळ=जन्म त्यावरून येशू ख्रिस्ताच्या जन्मोत्सवाला हे नाव मिळाले हा उत्सव २५ डिसेंबरपासून ६ जानेवारीपर्यंत चालतो येशूचा जन्म नक्की केव्हा झाला, ते माहीत नसल्यामुळे पूर्वी निरनिराळ्या देशात निरनिराळ्या वेळी हा सण साजरा केला जात असे काही ठिकाणी डिसेंबर महिन्यात, काही ठिकाणी जानेवारीत, तर काही ठिकाणी मार्च, एप्रिल अगर मे महि-



नाताळवृक्ष

न्यातही नाताळ पाळला जाई इ स च्या चवथ्या शतकाच्या मध्यापर्यंत अनेक देशानी सहा जानेवारी हा येशूचा जन्मदिन

मानला होता, परंतु इ स ३५३ मध्ये रोमच्या धर्माध्यक्षाने पंचवीस डिसेंबर हाच येशूचा जन्मदिवस पाळावा, असा आदेश दिला व तेव्हापासून तो दिवस नाताळचा ठरला

प्राचीन काळी रोमन व इतर लोक पंचवीस डिसेंबरला एक मोठा सण करीत, त्याला अजितसूर्याचा सण म्हणत त्या दिवसापासून उत्तरायण सुरू होते व सूर्याचा जणू पुनर्जन्म होतो, म्हणून हा आनंदोत्सव केला जात असे त्या जुन्या सणाचेच नाताळच्या सणात रूपांतर करण्यात आले मध्ययुगापासून हा सण फार लोकप्रिय झाला

नाताळच्या दिवसांत ख्रिस्ती घरात आणि प्रार्थनामंदिरात काही दृश्ये मांडतात त्यात दगड, लाकड किंवा पुठ्ठा यांपासून बनवलेली एक गुहा किंवा गव्हाण असते या गुहेत किंवा गव्हाणीत गवतावर निजलेल्या बालयेशूची प्रतिमा असते त्याच्या एका बाजूला येशूची माता मेरी व दुसऱ्या बाजूला येशूचा पिता योसेफ आणि येशूच्या दर्शनाला आलेले मेंढपाळ व गाई, बैल, शेळ्या, मेंढ्या, इत्यादींच्या प्रतिमा असतात

रोमन कॅथलिक ख्रिश्चन नाताळच्या सकाळी ख्रिस्ताचा पाळणा तयार करून सजवतात नंतर मोठ्या समारंभाने तो पाळणा गावाबाहेरील एखाद्या गुहेत घेऊन जातात तिथे ख्रिस्त जन्म झाल्याची कल्पना करतात व ख्रिस्तप्रतिमा पाळण्यात घालून वाजत-गाजत परत येतात

चोवीस डिसेंबरच्या रात्री सर्व ख्रिस्ती स्त्री-पुरुष आपापल्या मुला-बाळांसह स्वच्छ कपडे करून जवळच्या प्रार्थनामंदिरात जातात त्या वेळी सर्वांच्या चित्तवृत्ती उल्हासाने व उत्साहाने बहरलेल्या असतात बरोबर बारा वाजता येशूच्या पूजा-प्रार्थनेला व भक्तिगीतांना प्रारंभ होतो वाद्यसंगीताच्या तालासुरावर जवळ जवळ दोन-तीन तास हा सोहळा चालतो

यानंतर पंचवीस डिसेंबरला संबंध दिवसभर प्रत्येकजण आपल्या मित्रमंडळींना, शेजाऱ्यांना व नातेवाईकांना भेटतो व नाताळ भेटी अर्पण करून शुभेच्छा व्यक्त करतो या वेळी एकमेकांना चहा-फराळही देतात सायंकाळी गावात नाताळविषयक नाटक अगर करमणुकीचा कार्यक्रम होतो नाताळगीते या दिवसांत घरोघर ऐकायला मिळतात परगावी असणाऱ्या मित्रमंडळींना अगर नातेवाईकांना नाताळच्या सणानिमित्त शुभेच्छा कार्डे पाठवण्याची प्रथा इ स १८४० साला सुरू झाली, ती आजतागायत चालू आहे

या दिवसात झोपलेल्या लहान मुलांना जागे करण्यासाठी नाताळवृक्षाची मांडणी करतात कुठल्यातरी झाडाची एक फांदी घरात एखाद्या कुंडीत रोवतात व तिला कागदाची चित्रे, पताका व दिव्यांच्या माळा लावून ती सुशोभित करतात या झाडावरच मुलांसाठी खेळणी लावून ठेवतात नंतर झोपलेल्या मुलांना उठवून ते झाड दाखवतात व त्यांना आनंदित करतात



सांताक्लाज

सांताक्लाज हा लहान मुलांचा आवडता संत आहे कारण तोच मुलांना नाताळनिमित्त खेळणी देतो, अशी समजूत आहे

या उत्सवात ख्रिस्ती लोक रंगीबेरंगी कपडे व उंच टोकदार टोपी घालून नाच करतात, गाणी म्हणतात, रंग उडवतात आणि सर्व प्रकारची अनिर्बंध मौज करतात [ क म , ए सा रि ए , श्री लोखंडे, चित्रमयजगत, डिसें १९६६ ]

**नाथद्वारा** एक वैष्णव क्षेत्र राजस्थानातील उदयपूरच्या वायव्येस बावीस मैलांवर बनास नदीच्या काठी हे क्षेत्र वसले आहे याच्या पूर्वेला अरवलीचा पर्वत व पश्चिमेला नदी असल्यामुळे त्याला नैसर्गिक संरक्षण आपोआप लाभले आहे या गावाला पूर्वी सिंहद असे नाव होते सांप्रतचे नाव तिथल्या श्रीनाथ या दैवतावरून पडले आहे

हे वल्लभ संप्रदायाचे क्षेत्र आहे सौराष्ट्रात जशी द्वारका, तसेच राजस्थानात नाथद्वारा इथला श्रीनाथ म्हणजे गोकुळात

दहीदूध खाणारा आणि गोवर्धन पर्वत उचलणारा श्रीकृष्णच होय. या मूर्तीचा इतिहास असा–

वल्लभाचार्य हे आपल्या पंथाच्या प्रचारासाठी झारखंड भागात हिंडत असता त्यांच्या स्वप्नात हा श्रीनाथ आला आणि त्याने त्यांना सांगितले, की ' तू गोवर्धन पर्वतावर जा आणि तिथे तुला माझी मूर्ती आढळेल, तिची आराधना कर.' त्या दृष्टान्तानुसार वल्लभाचार्य गोवर्धनावर गेले आणि त्यांना तिथे ही मूर्ती सापडली. मग त्यांनी तिथेच तिची स्थापना करून तिची अष्टयाम सेवा सुरू केली. त्यांनी आपल्या संप्रदायाचे तेच उपास्य दैवत मानले.

पुढे इ. स. च्या सतराव्या शतकाच्या उत्तरार्धात औरंगजेब दिल्लीच्या गादीवर येताच त्याने समस्त हिंदूंचा छळवाद आणि त्यांच्या देवस्थानांचा उच्छेद आरंभला. तेव्हा गोवर्धनावरच्या या देवालाही आपल्या स्थानाची शाश्वती वाटेनाशी झाली. त्याने आपल्या भक्तांना स्वप्नदृष्टान्त देऊन सांगितले, की ' मला इथून दूर कुठे तरी न्या.' त्या वेळी राणा राजसिंह हा उदयपूरच्या गादीवर होता आणि तो श्रीनाथाचा भक्त होता. त्याने मग त्या कामी पुढाकार घेतला. श्रीनाथांनी मूर्ती एका रथात बसवून भक्तमंडळीसह तो उदयपूरच्या मार्गाला लागला. वाटेत सिंहद या गावी तो रथ आला आणि त्याची चाके तिथे जमिनीत रुतून बसली. राण्याच्या मनात त्याला उदयपूरला न्यायचे होते, पण काही केल्या तो रथ जागचा हालेना. ते पाहून भक्तमंडळींना वाटले, की देवाला हे सिंहद गावच आवडले असावे, म्हणून त्याचा रथ हालत नाही. राण्याने मग तिथेच त्याची महोत्सवपूर्वक स्थापना केली, त्याचे मोठे मंदिर बांधले आणि त्या गावाचे उत्पन्न देवस्थानाला लावून दिले.



श्रीनाथाची मूर्ती

श्रीनाथाची ही मूर्ती काळ्या पाषाणाची व द्विभुज आहे. तिचा डावा हात वर उचललेला असून, त्या हाती लाल दुपट्टा आहे. याच हाताच्या करांगुळीने त्याने गोवर्धनपर्वत उचलला होता. दिवसातून आठ वेळा या देवाची वेगवेगळ्या प्रकारे पूजाअर्चा होते, तिला अष्टयाम सेवा असे म्हणतात. मंगल, शृंगार, ग्वाल व राजभोग हे सकाळचे उपचार असून उत्थापन, भोग, सायंकाळची आरती व शयन हे उपचार दुपारनंतरचे असतात. जन्माष्टमी, नंद महोत्सव, गोवर्धनपूजा, अन्नकूट, वसंतपंचमी, रासोत्सव हे मोठे उत्सव दरवर्षी इथे होतात. शिवाय लहान लहान उत्सव आणि सोहळे होतात, ते निराळेच.

श्रीनाथाच्या मंदिराचे आवार खूप मोठे असून, त्याभोवती कोट बांधलेला आहे. मंदिरात जाण्याचे तीन मार्ग असून, लाल दरवाजा हे त्याचे महाद्वार आहे. या मंदिराला मोठमोठी सात दालने आहेत. ती सात गोलोकांची प्रतिनिधी मानली जातात. मंदिराच्या भिंतीवर बालकृष्णाच्या लीलांची चित्रे काढलेली आहेत. ही भित्तिचित्रे तशा प्रकारच्या चित्रसृष्टीत महत्त्वाची मानलेली आहेत.

वल्लभ संप्रदायाचे लोक आपल्या देवस्थानाला मंदिर न म्हणता ' नंदजी का घर ' म्हणतात. त्यामुळे त्यांच्या मंदिरावर शिखर नसते. इथेही ते नाही. त्या जागी एक कौलारू छप्पर आहे. त्यावर एक सुदर्शन चक्र असून, तिथे सात ध्वजा फडकत असतात. बाहेरून पाहणाऱ्याने त्या ध्वजाखाली देव आहे, असे समजायचे. वल्लभाचार्यांच्या वंशातला पुरुष वंशपरंपरेने या देवस्थानाचा हक्कदार असतो.

हे देवस्थान खूप श्रीमंत आहे. गुजराती धनिक वर्गापैकी फार मोठा समाज या देवाचा भक्त असल्यामुळे त्या वर्गाने आपल्या देवाचे हे राजवैभव वाढवले आहे. इथला रोजचा खर्च पाच हजार रुपयांच्या वर आहे. इथल्या रोजच्या नैवेद्याला सगळे पदार्थ दुधातुपाचे असतात. नैवेद्य झाल्यावर मग तेच रबडी, मलई, इ. पदार्थ प्रसाद म्हणून बाजारात विकायला येतात. इथे तूप, दूध, साखर, केशर, कस्तुरी, इ. पदार्थांची भांडारे आहेत. केशर कस्तुरी दळायला सोन्या चांदीची जाती आहेत. इथल्या फूलघरात नाना जातींची सुवासिक फुले भरून ओसंडत असतात. शाकघरात फळफळावळ आणि शाकभाज्या यांचे ढीग पडलेले असतात. मेवाघरात मिठाईच्या मोठमोठ्या कढया चुलाणावर चढत उतरत असतात.

वल्लभ संप्रदायातल्या सुवासिनी या देवाला आपला एखादा तरी अलंकार अर्पण करतातच. अशा सुवर्णालंकारांनी देवाच्या आवारातली एक विहीर भरून गेली आहे, असे म्हणतात. श्रीनाथ नवसाला पावतो अशी भाविकांची श्रद्धा असते. त्यामुळे इथे रोज कोणाचे ना कोणाचे तरी नवस फिटतच असतात. बाराही महिने इथे भक्तांची व यात्रिकांची गर्दी असते. आयुष्याला विटलेले आणि संसारात बुडालेले कित्येक लोक इथे क्षेत्रवासासाठी येतात आणि इथेच देह ठेवतात.

या क्षेत्रात बाळकृष्ण, व्रनवारी, विग्णुनाथजी, नवनीतलाल, अशी अन्यही मदिरे आहत शिवाय सातस्वरुप नावाचा सान ल्हान मदिराचा एक समूह आहे मेत्राजवळच गिरिधरसागर नावाचे एक सरोवर आहे [ राजस्थान नाथद्वारादशन ]

**नाथमुनी** (इ स च्या ९ व्या शतकाचा उत्तराध) दक्षिण भारतातील एक वष्णव आचाय याचा जन्म वीरनारायणपुरम येथे झाला श्रीरगम यथे याचे वास्तव्य होते याला योगसिद्धी वश होत्या, त्यावरुन याला योगीद्र असेही म्हणत त्याचे मूळ नाव काय होते ते कळत नाही नाथमुनी हे त्याला सन्यास घेतल्यानतर मिळालेले नाव आहे

नाथमुनी हा सस्कृत व तमिळ या दोन्ही भाषाचा पडित होता आळवार सताच्या गीताचे सकलन आणि सपादन हे याचे सर्वात मोठे वाङ्मयीन काय होय याने ते काम अत्यत परिश्रम घेऊन पार पाडले या सकलनाला नालायिरन्दिव्यप्रबधम असे म्हणतात यात निरुमगई, नम्म, परिय, तिरुमलिश, आडाळ, इ बारा आळवाराची चार हजार पद सग्रहित आहेत

नम्माळवाराच्या शिष्य परपरेतील परागुशमुनी हा नाथ मुनीचा गुरू होता त्याच्याकडनच नाथमुनी ! आळवार साहि त्याचे सखोल ज्ञान मिळविले पुढ त्याने श्रीरगम यथील मदिरात नालायिरदिव्यप्रबधमच्या अध्ययन अध्यापनाची व्यवस्था करुन ठेवली आळवाराची ती पद गाण्याची विशिष्ट पद्धतीही त्यानच ठरवून दिली त्यासाठी त्याने श्रीरगमच्या मदिरात गायकवग निर्माण केला

नाथमुनीने भारतातील तीर्थांच्या यात्रा करुन सर्वत्र भक्ति सिद्धान्ताचा प्रचार केला त्याने भक्तीचे महाद्वार सर्वाना खुले केले व कम आणि भक्ती याम ये सामजस्य स्थापले नाथमुनीचे अकरा शिष्य होते पुडरीकाक्ष कुरुकनाथ व लक्ष्मीनाथ ह त्यातील प्रमुख होत त्यानीही आपल्या गुरूच्या तत्त्वज्ञानाचा प्रसार केला रामानुजाचार्यांच्या विशिष्टाद्वत मताचा पाया नाथमुनीनेच घातला वदान्तदेशिक हा आचाय तर नाथ मुनीलाच विशिष्टाद्वैत सप्रदायाचा सस्थापक मानतो

नाथमुनीने न्यायतत्त्व, पुरुषनिश्चय व योगरहस्य असे तीन सस्कृत ग्रथ लिहिल्याचे कळते त्यापकी न्यायतत्त्व हा विशिष्टाद्वत मताचा प्रथम ग्रथ मानला जातो याशिवाय नम्माळवार व परियाळवार याच्या स्तुतिपर काही पदेही त्याने तमिळ भाषेत रचली आहेत श्रीनिवासदास या पडिताने आपल्या ग्रथात नाथमुनीचा व्यास, बौधायन याच्या बरोबरीने उल्लेख केला आह रामानुजाचार्यांचे गुरू यामुनाचार्य हे नाथ मुनीचे नातू होते [ त्र प्र हिं इ , हिंदुत्व, क ह इ ]

**नाथसप्रदाय** एक योगप्रधान शव सप्रदाय या सप्रदायाचा आदिगुरू आणि उपास्यदेव आदिनाथ शिव असल्यामुळे याला नाथसप्रदाय असे प्रमुख नाव लाभले आहे नाथपदप्राप्ती म्हणजेच शिवत्वाची प्राप्ती हे या सप्रदायाच्या अनुयायाचे अतिम उद्दिष्ट आहे त्यासाठीच त आपल्या नावा-पुढे नाथ हे पद जोडतात हा सप्रदाय योगप्रधान असल्यामुळे, तसेच योगमार्गाने सिद्धावस्था अथवा अवधूतावस्था प्राप्त करणे हे याचे ध्येय असल्यामुळे, याला योगसप्रदाय, सिद्धसप्रदाय व अवधूतसप्रदाय अशी नावेही लाभली आहत

गोरक्षनाथ हा या सप्रदायाचा प्रवतक होय आदिनाथ – मत्स्येंद्रनाथ – गोरक्षनाथ अशी त्याची गुरुपरपरा आहे त्याचा गुरू मत्स्येंद्रनाथ हा कदलीबन नामक प्रदेशात योगिनीकौल नावाच्या स्त्री प्रधान तान्त्रिक सप्रदायात प्रविष्ट झाला होता गोरक्षनाथाला ही गोष्ट रुचली नाही आपल्या गुरुच्या पत नाच्या निमित्ताने त्याला अखिल भारताच्याच परमार्थसाध नेच्या अध पाताचे दशन घडले आणि त्याने अत्यत निग्रहाने गुरूला तान्त्रिकाच्या जाळ्यातून बाहेर काढले

ही घटना इ स च्या अकराव्या किंवा बाराव्या शतका-तील आहे या सुमारास भारतात बौद्ध धर्माला उतरती कळा लागलेली होती आणि तो धम अनेक विकृत तान्त्रिक साधनाच्या जाळ्यात गुरफटला होता बौद्धाच्या अनुकरणाने इतर पथातही तत्रसाधनचे प्रस्थ वाढले होते विक्रमशिला विद्यापीठात तर तत्रसाधनेचे आणि तत्रशास्त्राचे प्रकट अध्या-पनच सुरू झाले होत वदप्रामाण्याला विरोध न्हाचे साधनेतील माहात्म्य, बाह्याचाराची व्यथता शिव हे परम उपास्य, इ बाबी सव तान्त्रिक सप्रदायात समान होत्या परतु अधिकार-भेदाचा विवक सुटल्यामुळे त्या तत्रसाधनाना विकृती आली आणि परमार्थाच्या नावाखाली अनाचार बोकाळला गोरक्ष-नाथाला या परिस्थितीची भयानकता जाणवली आणि त्याने भारतीय परमार्थसाधनेच्या शुद्धीकरणासाठी नाथसप्रदायाचे प्रवतन केले

कदलीबनातील तान्त्रिक योगिनीच्या मेळाव्यात अडकलेल्या मत्स्येंद्रनाथाला गोरक्षनाथाने तिथन बाहेर काढले या घटनेत नाथसप्रदायाच्या उदयाचे बीज आहे गुरुबोधाशी एकनिष्ठ राहून त्या बोधापासून च्युत झालेल्या गुरुचाच उद्धार करण्यात गोरक्षनाथाने जे असामान्य परमार्थवभव प्रकट केले, त्यामुळेच नाथसप्रदायाचे प्रवतकत्व त्याच्याकड आले ही घटना ज्या कदलीबनात घडली ते कदलीबन कुठे आहे, याविषयी विद्वानात मतभेद आहत डॉ ग्रियसनच्या मते ते हिमालयाच्या पायथ्याशी असाव, तर डा हजारीप्रसाद द्विवेदीच्या मते हिमालयाच्या

पायथ्यापासून गंगेच्या मुखापर्यंत कुठे तरी असावे. पण महाराष्ट्रातील एक संशोधक श्री. रा. चिं. ढेरे यांनी मध्ययुगीन साहित्यातील अनेक उल्लेखांच्या आधारे असे सिद्ध केले आहे, की आंध्रमधील श्रीशैल मल्लिकार्जुनाचा परिसर म्हणजेच कदलीबन होय. श्रीशैल हे इ. स. च्या पाचव्या–सहाव्या शतकापासून तंत्रसाधकांचे एक महान केंद्र म्हणून गाजत होते, असे उल्लेख मध्यकालीन भारतीय साहित्यात अनेक ठिकाणी आढळतात. ही पार्श्वभूमी ध्यानी घेता गोरक्षनाथाने तांत्रिकांच्या बालेकिल्ल्यातच आपले महान आंदोलन उभारले आणि आपल्या असामान्य व्यक्तिमत्त्वाच्या बळावर ते यशस्वी करून दाखविले, हे आपल्या ध्यानी येते. गोरक्षनाथांच्या परंपरेतील ज्ञानेश्वरांनी ज्ञानेश्वरीच्या उपसंहारात 'योगाब्जिनी सरोवरु। विषयविध्वंसैकवीरु' या शब्दांत गोरक्षनाथाचा गौरव केला आहे. या गौरवात नाथसंप्रदायाचे ध्येय आणि कार्य स्पष्टपणे व्यक्त झाले आहे.

**सिद्धान्त** – नाथसंप्रदायाच्या विचारविश्वावर काश्मिरी शैव संप्रदायाचा परिणाम झालेला आहे. शिव–शक्तीच्या प्राणभूत कल्पनेचा समावेश या संप्रदायाच्या तत्त्वज्ञानात काश्मिरी परंपरेतूनच झाला आणि ज्ञानेश्वरांच्या अमृतानुभवात त्या कल्पनेचे परिणत आणि परिष्कृत रूप प्रकट झाले. गोरक्षनाथाचा सर्वमान्य संस्कृत ग्रंथ सिद्धसिद्धान्तपद्धती हा होय. या ग्रंथात संप्रदायाचे काही मूल सिद्धान्त सांगितले आहेत, ते असे —

(१) शक्तियुक्त शिव — सिद्धसिद्धान्तपद्धती या ग्रंथाच्य आरंभी गोरक्षनाथाने शक्तियुक्त अशा आदिनाथाला नमस्कार केला आहे. गोरक्षनाथाच्या मते आदिनाथ शिव हेच अंतिम सत्य आहे. ते स्वयंप्रकाश, स्वसंवेद्य, अनंत, अविनाशी, व्यक्ताव्यक्तविवर्जित व द्वैताद्वैतविलक्षण आहे. हे शिवतत्त्व शक्तियुक्त आहे. पण ही शक्ती शिवापेक्षा भिन्न नसून, ती तदन्तर्गतच आहे. तीच विश्वाच्या उत्पत्ति–स्थिति-लयाला कारणीभूत आहे. या शक्तीचे स्वरूप अखंड क्रियमाण आहे. हे क्रियमाण स्वरूप कधी स्थूल, तर कधी सूक्ष्म आणि कधी व्यक्त, तर कधी अव्यक्त असते. या शक्तीच्या विकासातून व संकोचातूनच हे विश्वचक्र चालू राहते. शक्तियुक्त शिवच पिंड–ब्रह्मांडाचा आधार असतो. शिवातील इकार हा शक्तिवाचक असून, शक्तीविना शिव हा केवळ शव आहे.

**शिवोऽपि शक्तिरहितः कर्तुं शक्तो न किञ्चन ।**
**स्वशक्त्या सहितः सोऽपि सर्वस्याभासको भवेत् ।।**

( सिद्धसिद्धान्तपद्धती ४·१३ )

अर्थ – शक्तीने वियुक्त असता, शिव काही करू शकत नाही. आपल्या शक्तीने युक्त असतो, तेव्हाच तो सर्व जगताचा प्रकाशक होतो.

शिव आणि शक्ती यांच्यांतला अभेद पुढीलप्रमाणे सांगितला आहे–

**शिवस्याभ्यन्तरे शक्तिः शक्तेरभ्यन्तरे शिवः ।**
**अन्तरं नैव जानीयात् चन्द्रचन्द्रिकयोरिव ।।**

(सिद्धसिद्धान्तपद्धती ४·२६)

अर्थ – शिवाच्या अंतर्भागी शक्ती असते आणि शक्तीच्या अंतर्भागी शिव असतो. चंद्र आणि चंद्रिका यांच्याप्रमाणे त्या दोघांतला अभेद जाणावा.

ज्याप्रमाणे दोन टिपऱ्यांचा नाद एकच, दोन फुलांचा गंध एकच, दोन ज्योतींचा प्रकाश एकच, दोन ओठांतील शब्दोच्चार एकच, दोन डोळ्यांतील दृष्टी एकच, त्याप्रमाणे या विश्वाच्या पसाऱ्यात शिव-शक्ती या नामद्वयान नटलेले तत्त्व एकच आहे, असे ज्ञानेश्वरांनी अमृतानुभवात सांगितले आहे ( १·१८–१९ ).

(२) पिंड ब्रह्मांड– जे जे ब्रह्माण्डात आहे, ते ते सर्व पिंडांत आहे, असा संप्रदायाचा दुसरा सिद्धान्त आहे. त्यामुळे पिंडज्ञानाला गोरक्षविचारात विशेष महत्त्व मिळाले आहे. पिंडात चर आणि अचर यांचा वास आहे, असे जो योगी जाणतो, तो पिंडज्ञानी होतो, असे गोरक्षनाथाने म्हटले आहे. या सर्व विचारप्रक्रियेचे सार त्याने पुढील शब्दांत सांगितले आहे –

**अत एवैकाकार एवानन्तशक्तिमान्**
**निजानन्दतयाऽवस्थितोऽपि नानाकारत्वेन**
**विलसन् स्वप्रतिष्ठां भजतीति व्यवहारः ।**

अर्थ – शिव हा एकाकार व अनंतशक्तियुक्त आहे. तो निजानंदात मग्न असूनही नाना आकारांत विलसतो आणि आत्मप्रतिष्ठा राखतो.

हे विश्वचक्र, हा चराचराचा व्यापार म्हणजे शिवाची आत्मरती आहे. आपणच आपणांला भोगण्यासाठी तो बहुत्व पावला आहे. आत्मरतीची ही कल्पना ज्ञानेश्वरांनी आपल्या काव्यात्म भाषेने खुलविली आहे, ती अशी–

**फुलेंचि जालीं भ्रमर । तरुणीचो जाली नर ।**
**जालें आपुलें शेजार । निद्राळुचि ।।**
**चूतांकुर जाले कोकील । आंगचि जालें मलयानिळ ।**
**रस जाले सकळ । रसनावंत ।।**
**तैसें भोग्य आणि भोक्ता । दिसे आणि देखता ।**
**हे सरलें अद्वैता– । अफुटामाजीं ।।**

( अमृतानुभव ९·४, ६,७ )

हा अमृतानुभव चाखणे आणि पिंड–ब्रह्मांडाच्या अंतर्यामी

वसणाऱ्या शिवाशी समरस होऊन अमरत्व साधणे, हेच नाथ-योग्याचे परमध्येय असते. यालाच जीवन्मुक्ती असे म्हणतात.

ही जीवन्मुक्ती साध्य करायची ती हठयोगाच्या मार्गाने करावी, असे गोरक्षनाथाने सांगितले आहे. मृत्युंजय होणे, मृत्यू दूर सारणे, ही गोष्ट हठयोगाने साध्य होते, असे तो म्हणतो.

नाथसिद्धांच्या मते जीवन्मुक्ती ही प्रथम सिद्ध देहात आणि नंतर दिव्य देहात मिळवायची असते. सिद्ध देह किंवा दिव्य देह म्हणजे अविनाशी असा आध्यात्मिक देह होय. तो अशुद्ध माये-पासून मुक्त असून, विशुद्ध मायेने युक्त असतो. देहाच्या या अवस्थेत सिद्ध हे गुरू म्हणून साधकांना मार्गदर्शक होतात. अमर आणि पक्व असा देह मिळवणे, ही सिद्धाची पहिली गरज आहे. कारण अशा देहामुळेच सिद्धाला परा मुक्ती मिळते.

हिलाच कायसिद्धी म्हणतात. ती प्राप्त करून घेण्यासाठी नाथसिद्ध जी साधना आचरतात, तिला उलटी साधना असे नाव आहे. ही साधना म्हणजे योगाच्याच प्रक्रिया असतात. नाथसिद्धांच्या योगप्रक्रिया या देहातील अधोगामी प्रवृत्तींना ऊर्ध्वगामी बनवितात आणि सिद्धाला त्याच्या अंतिम अवस्थेला अर्थात सिद्ध देहातील अमरत्वाला नेतात. सर्व इंद्रियांवर आणि त्यांच्या प्रवृत्तींवर विजय मिळवल्याने ही गोष्ट साध्य होऊ शकते. योगसाधनेच्या या उलटया प्रक्रियांमुळ ती साधनप्रक्रिया सांगणारी सांप्रदायिक पद्ये ही गूढ व विरोधाभासाने नटलेली असतात.

अशा रीतीने नाथसिद्धांचे कायसाधन चालते. यौगिक प्रक्रि-यांच्या द्वारे मंद गतीने पण सातत्याने चालणारी अशी ती शरी-राची शोधनक्रिया असते.

हठयोगात उल्लेखिलेले सूर्य–चंद्र म्हणज शरीरातील इडा-पिंगला या नाडया असून, त्यांचा संगम म्हणजे प्राण आणि अपान या वायूंचा संगम होय. पण या चंद्र–सूर्यांना गोरक्ष-नाथाच्या मते यापेक्षाही गूढ अर्थ आहे. सिद्धसिद्धान्तपद्धतीत सांगितले आहे, की कर्म, काम, चंद्र, सूर्य आणि अग्नी यांपासून देहाची उत्पत्ती होते. यांपैकी चंद्र हा रस किंवा सोम याचे प्रतीक असून, सूर्य हा अग्नी आहे. सोम हा उपभोग्य असून, अग्नी हा त्याचा भोक्ता आहे. पुरुषाचे शुक्र हे अग्निरूप असून, स्त्रीरज हे सोमरूप आहे. त्यांच्या संयोगाने पिंडाची उत्पत्ती होते. सोम किंवा चंद्र हे अक्षय आणि अविनाशी तत्त्व असून, ते शिवाच्या ठिकाणी राहते आणि सूर्य हे क्षयकारी आणि विनाशी तत्त्व असून, ते शक्तीच्या ठिकाणी वास करते.

सिद्धाची जीवन्मुक्तावस्था म्हणजे त्याला अद्रव्य किंवा शुद्ध शरीराच्या रूपाने मिळालेले अमरत्व होय. अशा शरीराने योगी पाहिजे त्या ठिकाणी जाऊ शकतो किंवा आपल्या मनाप्रमाणे वागू शकतो. हवेतून उडत जाऊनही तो आपल्या शिष्यांना मदत करू शकतो. तिबेटात अशा तऱ्हेचे काही सिद्ध आहेत, अशी सांप्रदायिक कल्पना आहे.

नाथसंप्रदायाची साधना ही रसायन पंथाच्या साधनेशी बरी-चशी मिळती-जुळती आहे. भारतातील रसेश्वरसिद्ध हे आपला देह अविकारी, अक्षय व्हावा, यासाठी विशिष्ट रसायनाचा प्रयोग करीत. नाथसिद्ध हेही अमर मानले जातात. त्या संप्र-दायात प्रत्यक्ष रसायनाचा कुठे उल्लेख आढळत नाही; पण रसेश्वरसिद्धाचा मात्र वारंवार निर्देश आढळतो. सहस्रार चक्रात चंद्रापासून स्रवणारे अमृत पिऊन नाथयोगी अमर झाले आहेत, असे त्यांच्या ग्रंथांत लिहिलेले आहे.

मानवी शरीरात कुंडलिनीरूपाने शक्ती सुप्त स्थितीत असते आणि मस्तकातील सहस्रार चक्रात शिवाचा निवास असतो. जन्मजन्मांतरीच्या संचित मलभाराने ती कुंडलिनी दबली जाते. जर साधकाने ध्यान–धारणेच्या साहाय्याने प्राण-वायूचे संयमन केले आणि षट्कर्मांच्या द्वारे नाडीशोधन साधले, तर कुंडलिनीचा सुषुम्नामार्ग खुला होतो आणि ती शिव-मीलनासाठी वर धावू लागते. अग्निचक्रात सुप्त असलेली ही शक्ती जेव्हा सहस्रार किंवा शून्य चक्रातील शिवाशी समरस होते, तेव्हा योग्यांना कैवल्यात्मक व परमानंदमय अशी सहज-समाधी प्राप्त होते. यालाच पिंड-ब्रह्मांडैक्य किंवा समरसी-करण अशी संज्ञा आहे.

सिद्धसिद्धान्तपद्धतीत गोरक्षनाथाने संक्षेपाने अष्टांग योग वर्णिला आहे. यमनियमादी ही योगाची आठ अंगे होत. याशिवाय नाना आसने, मूल बंध, जालंधर बंध, उड्डियान बंध आणि खेचरी, सहजोली, अमरी, इ. मुद्रा अशा नानाविध यौगिक क्रियांचे सूक्ष्म वर्णन हठयोगप्रदीपिकेसारख्या साधना-ग्रंथांत केलेले आहे.

याशिवाय, गोरक्षनाथाने आपल्या हिंदी रचनांत योग्याच्या आचारधर्माचाही विस्तृत विचार केला आहे. कठोर ब्रह्मचर्य, वाक्संयम, शारीरिक शौच, मानसिक शुद्धी, ज्ञाननिष्ठा, बाह्यावडंबराविषयी अनादर, मद्यादी मादक पदार्थांच्या व मांसाच्या सेवनाविषयी आत्यंतिक तिरस्कार, इ. गोष्टींवर गोरक्षनाथाने आपल्या उपदेशात भर दिला आहे. मुंडन, उप-वास, तीर्थयात्रा, अग्निहोत्र व संन्यास या गोष्टी नाथसंप्रदायात निषिद्ध आहेत.

नाथसंप्रदाय हा गुरुमार्ग आहे. या संप्रदायापूर्वीच्या सिद्ध संस्कृतीत गुरुमहिमा प्रकर्षाला पोचला होता. नाथसंप्रदायातही तो तसाच चढता–वाढता राहिला. ' गुरुस्तु सन्मार्गदर्शनशील: ' = गुरू हा सन्मार्ग दाखविणारा आहे, असा गोरक्षनाथाचा

सिद्धान्त आहे. नाथयोगी गुरूला नादबिन्दुकुलात्मा असे संबोधतात.

नाथयोगी जेव्हा सिद्धावस्थेला पोचतो, तेव्हा त्याची अवस्था कशी असते, ते हठयोगप्रदीपिकेत पुढीलप्रमाणे सांगितले आहे –

सर्वावस्थाविनिर्मुक्तः सर्वचिन्ताविवर्जितः ।
मृतवत् तिष्ठते योगी स मुक्तो नात्र संशयः ।।
खाद्यते न च कालेन बाध्यते न च कर्मणा ।
साध्यते न स केनापि योगी युक्तः समाधिना ।।
न विजानाति शीतोष्णं न दुःखं न सुखं तथा ।
न मानं नापमानं च योगी युक्तः समाधिना ।।

अर्थ – सर्व अवस्थांनी आणि सर्व चिंतांनी रहित, असा तो योगी मृताप्रमाणे राहतो. तो मुक्त असतो, यात संशय नाही. समाधीने युक्त अशा योग्याला काल भक्षण करीत नाही, कर्म त्याला बाधीत नाही आणि कोणीही त्याला आपल्या अंकित करून घेऊ शकत नाही. तसेच शीत व उष्ण, सुख व दुःख, मान व अपमान या द्वंद्वांच्या पलिकडे तो असतो.

हठयोगप्रदीपिकेने नाथसंप्रदायाच्या अनेक सिद्ध योग्यांची नावे दिलेली आहेत. ते जिवंत असून, हिमालयाच्या पहाडी प्रदेशात त्यांचे वास्तव्य आहे, अशी नाथपंथीयांची धारणा आहे. कधी कधी साधकांना त्यांचे दर्शन होते, असेही सांगतात.

सांप्रदायिक वेष – नाथसंप्रदायातील योगी काही ठराविक वेष व चिन्हे धारण करतात, ती अशी –

कर्णकुंडल – कुंडलधारणाच्या प्रथेविषयी अनेक दंतकथा प्रचलित आहेत. मत्स्येंद्रनाथाने शिवाच्या कानात कुंडले पाहिली आणि ती प्राप्त करून घेण्यासाठी कठोर तप केले, असे काही लोक मानतात, तर गोपीचंदाच्या प्रार्थनेवरून जालंधरनाथाने या पंथाच्या योग्यांना अन्य सांप्रदायिकांपासून भिन्न दर्शविण्यासाठी कुंडलधारणाची प्रथा सुरू केली, असे काही लोक समजतात. काहींच्या मते गोरक्षनाथानेच भर्तृहरीचे कान फाडून प्रथम त्याच्या कानात कुंडले घातली. अनेक नाथयोगी मातीची कुंडले धारण करतात, पण मातीची कुंडले फुटण्याची भीती असल्यामुळे बहुतेक संप्रदायी धातूची किंवा हरणाच्या शिंगाची कुंडले धारण करणे पसंत करतात. यालाच मुद्राधारण म्हणतात. संप्रदायातील विधवा स्त्रिया आणि गृहस्थ योग्यांच्या बायकाही मुद्राधारण करतात. एखाद्या शुभदिनी, विशेषतः वसंतपंचमीला, मंत्रसंस्कारपूर्वक कुंडले धारण करतात. कुंडलाच्या वजनाने कान फाटता कामा नयेत, असा त्यांचा संकेत आहे. त्यामुळे ज्या योग्याचा कान फाटेल, त्याला संप्रदायातून घालवून देतात.

कुंडल धारण न करणाऱ्या योग्यांना औघड असे नाव आहे. त्यांचा कर्णमुद्रासंस्कार झाल्यावर त्यांना कानफाटा योगी म्हणतात. कान चिरण्याच्या भीतीमुळे अनधिकारी लोकांनी पंथप्रवेश करू नये, यासाठी ही प्रथा रूढ झाली असावी, असे सुधारक योगी म्हणतात.

धंधारी – हे एक प्रकारचे चक्र आहे. हे लोखंडी वा लाकडी पट्ट्यांचे बनवून त्याच्या छिद्रातून मालाकार दोरा ओवतात व मंत्र म्हणून तो दोरा ओढून काढतात. हा दोरा काढणे फार कठीण असते. याला गोरखधंधा असेही म्हणतात. ज्याला हा दोरा काढता येतो, त्याच्यावर गोरक्षनाथाची कृपा होते व त्याला ईश्वर प्रसन्न होतो, अशी समजूत आहे.

रुद्राक्षमाला – नाथयोगी जी रुद्राक्षमाला धारण करतात, तिच्यात बत्तीस, चौसष्ट, चौऱ्याऐंशी किंवा एकशेआठ रुद्राक्ष असतात. त्यांना स्मरणी म्हणतात. अशा लहान माला अठरा किंवा अठ्ठावीस मण्यांच्या असतात. स्मरणी मनगटात बांधतात. रुद्राक्ष म्हणजे रुद्राचा किंवा शिवाचा डोळा समजतात. तंत्रशास्त्रात जपासाठी रुद्राक्षमाला प्रशस्त मानली आहे. रुद्राक्षात खरबुजाच्या फाकेप्रमाणे जे रेषात्मक भाग असतात, त्यांना मुख म्हणतात. जपात पंचमुखी रुद्राक्षाचे विशेष महत्त्व आहे. एकमुखी रुद्राक्ष घरात बाळगल्याने लक्ष्मी स्थिर राहते आणि तो गळ्यात बांधल्याने त्या देहावर शस्त्र चालू शकत नाही, असा योग्यांचा विश्वास असतो. गृहस्थ योगी जपासाठी द्विमुखी रुद्राक्षाची माळ घेतात.

किंगरी – हे एक प्रकारचे सारंगीसारखे वाद्य असते. याच्या साथीवर नाथयोगी भर्तृहरीची गीते गात हिंडतात.

मेखला – ही मोळाच्या दोरीची एक कटिबंधिनी असते. काही योगी काळ्या मेंढीच्या लोकरीचीही मेखला वापरतात. लंगोटी नेसण्यासाठी बहुधा तिचा उपयोग करतात. सर्वच योगी ही धारण करतात, असे नाही. हाल मटंगा नामक आणखी एक मेखला असते. ती धारण केल्यानंतर लगेच भिक्षेसाठी बाहेर पडावे लागते.

जानवे – औघड आणि योगी दोघेही काळ्या मेंढीच्या लोकरीचे जानवे वापरतात. काही ठराविक जाणकारांनाच हे जानवे बनवता येते. क्वचित कापसाच्या सुताचेही जानवे वापरतात.

शृंगी (शिंगी वा शिंगीनाद) – हरणाच्या शिंगापासून बनविलेली ही एक शिटी असते. ही जानव्यालाच बांधून ठेवतात. त्यामुळे त्यांच्या जानव्याला शिंगीनाद जानवे असेही म्हणतात.

कंथा – हे एक भगव्या रंगाचे वस्त्र असते. हे गळ्यात अडकवल्याने पाठीकडून अंग झाकले जाते. याला गूदरी (=गोधडी) असेही म्हणतात. गोधडा जुन्या चिंध्यांची शिवावी असा संकेत आहे. भगवा रंग ब्रह्मचर्यसाधक समजला जातो. पार्वतीने

आपल्या रक्तात रंगवून एक कंथा गोरक्षनाथाला दिली होती त तेव्हापासून लाल किंवा भगवा रंग हा योग्याचा पवित्र रंग बनला, अशी आख्यायिका ते सांगतात

दंडा – ही एक हात–दीड हात लांबीची काठी असते हिला गोरक्षनाथाचा दंडा किंवा भैरवनाथाचा दंडा असेही म्हणतात

खापरी – नाथयोगी पूर्वी फुटक्या मडक्याच्या एका तुकड्याचा भिक्षेसाठी वापर करीत, त्याला खापरी म्हणत सध्या खापरी नारळाच्या करवंटीची बनवतात अनेक योगी काशाची खापरी वापरतात तिला कांसा असे म्हणतात

अधारी – लाकडी दांडक्याला खाली वर फळ्या बसवून रटलासारखे ह आसनपीठ तयार करतात योगी लोक हे हातात घेऊनच फिरतात आणि हवे तेव्हा बसण्यासाठी त्याचा उपयोग करतात

**सांप्रदायिक प्रमाणग्रंथ** –– नाथसंप्रदायात सिद्धान्त आणि साधना सांगणारे सांप्रदायिक ग्रंथ अनेक आहेत या सर्वांत गोरक्षनाथाचा सिद्धसिद्धान्तपद्धती हा ग्रंथ प्रमुख आहे या शिवाय गोरक्षपद्धती हठयोगप्रदीपिका, सिद्धसिद्धान्तसंग्रह आणि गोरक्षसिद्धान्तसंग्रह हे ग्रंथही सांप्रदायिक ग्रंथ म्हणून मान्यता पावलेले आहेत

**उपास्य देवता** – नाथसंप्रदाय हा शैव संप्रदाय आहे त्यामुळे शिव हीच त्यांची प्रधान उपास्य देवता आहे परंतु शाक्त, कापालिक, इ अन्य सांप्रदायिकांचाही नाथ संप्रदायात समावेश झाल्यामुळे काली, अंबा, जगदंबा, दुर्गा, इ शक्तीची रूपे आणि भैरव, कालभैरव, नंदभैरव, एकलिंग, इ शिवाची रूपे पुढे त्या पंथात उपास्य ठरली शक्तीची उपासना तर खूपच वाढली

गोरक्षोत्तर काळात गोरक्षनाथाची मन्दिरे सर्व भारतभर उभारली गेली या मंदिरात गोरक्षनाथाबरोबर त्याचा गुरू मत्स्येंद्रनाथ व दत्तात्रय यांच्याही मूर्ती आढळतात बंगालमध्ये गोरक्ष–मत्स्येंद्रांबरोबर हाडिपाची मूर्तीही पूजतात अनेक ठिकाणी गोरक्षादी नवनाथ व चौऱ्याऐंशी सिद्ध यांच्या मूर्तींचीही पूजा करतात नेपाळमध्ये मत्स्येंद्रनाथाची अवलोकितेश्वराच्या रूपाने पूजा करतात

**पुण्यक्षेत्रे** – नाथ संप्रदायातले योगी प्रयाग, अयोध्या, त्र्यंबकेश्वर, द्वारका, हरद्वार, बद्रीनाथ केदारनाथ, वृंदावन, पुष्कर, रामेश्वर, नेपाळमधील पशुपतिनाथ, काश्मीरमधील अमरनाथ आणि हिंगलाज ही आपली पुण्यक्षेत्रे मानतात व त्यांची यात्रा करतात याशिवाय ते शिव, भैरव आणि शक्ती यांच्या मंदिरांतही दर्शनासाठी जातात नेपाळ ते काश्मीर व काश्मीर ते रामेश्वर इथवर सर्व भारतात त्यांची मठ मंदिरे विखुरलेली आहेत उ प्रदेशातील गोरखपूर हे संप्रदायाचे मुख्य केंद्र समजले जाते

महाराष्ट्रात नगर जिल्ह्यातील वृद्धेश्वराच्या डोंगराची रांग आणि त्र्यंबकेश्वराचा डोंगर ही ठिकाणेही नाथसंप्रदायात पुण्यप्रद ठरलेली आहेत देवगिरीवर जनार्दनस्वामींनी व चंद्रगिरीवर समर्थ रामदासांनी साधना केल्यामुळे ही दोन्ही स्थाने नाथसंप्रदायात आपली मानली जातात गोव्यातील चंद्रनाथ, मंगेशनाथ, ... नाथपंथातील शिवमंदिरेही नाथसंप्रदायाशी संबंधित असावी, असे श्री प्रियोळकरांचे मत आहे

**शाखाभेद** – नाथ संप्रदायाच्या अनेक शाखा आहेत ... शाखाभेद गोरक्षोत्तरकाळात निर्माण झाले असावे संप्रदायाच्या प्रमुख बारा शाखा ज्या पुरुषांच्या नावाने प्रचलित आहेत, त्यांतील काही गोरक्षनाथाच्या पूर्वीचे, काही समकालीन तर काही उत्तरकालीन आहेत भर्तृहरी हा गोरक्षनाथाचा शिष्य होता आणि पूरन भगत किंवा चौरंगीनाथ हा त्याचा गुरुबंधू होता जालंधरशिष्य कानिफा हा त्यांचा समकालीन होता

अशी आख्यायिका आहे की गोरक्षनाथानेच परस्पर विभक्त झालेल्या सांप्रदायिकांची संघटना करून त्यांना बारा पंथांत बसविले त्या पंथांची नावे अशी – (१) सत्यनाथी (२) धर्मनाथी, (३) रामपंथ, (४) नाटेश्वरी (५) कन्हड, (६) कपिलानी, (७) माननाथी (८) आईपंथ, (९) पागलपंथ, (१०) ध्वजपंथ, (११) गंगानाथी व (१२) वैराग या बारा पंथांच्या समूहातील योग्यांना बारहपंथी योगी असे म्हणतात प्रत्येक पंथाचा मूलप्रवर्तक त्याचे पवित्र स्थान व प्रवर्तनस्थळ यांची नावे कोष्टकात दिली आहेत

दुसरी एक आख्यायिका अशी आहे की पूर्वी साक्षात शिवाने चालवलेले बारा पंथ व गोरक्षनाथाने चालवलेले बारा पंथ असे दोन गट होते त्या दोन्ही गटांत सदैव संघर्ष चालायचा म्हणून मग गोरक्षनाथाने शिवाचे सहा आणि स्वतःचे सहा असे बारा पंथ नष्ट करून उरलेल्या बारा पंथांचे वैर शमवले व त्यांचे संघटन केले

प्राचीन मराठी भाषेत नाथपंथाच्या या शाखाभेदाची विशेष चर्चा कुठे आढळत नाही ज्ञानेश्वरपरंपरेतील नाथपंथियांशिवाय अन्य नाथयोग्यांची कानफाटा या निंदाव्यंजक शब्दानेच संभावना झाली आहे महानुभावांच्या आद्य ग्रंथात चोळीचा पंथ या नाथपंथीय शाखेचा उल्लेख येतो तसेच त्यांच्या पंचदर्शनविवरण या उत्तरकालीन ग्रंथात नाथपंथाच्या तीन शाखांचा व दर्शनप्रकाश या ग्रंथात बारा शाखांचा उल्लेख आढळतो यांपैकी काही शाखांचा माहिती अशी –

सतनाथी – सर्व पारंपारिक सूचीत हिचा समावेश आहे शिवप्रवर्तित पक या शाखेशी हिचा संबंध जोडला जातो या शाखेचा प्रमुख मठ पुरीला असून स्थानेश्वर, कर्नाल आणि

मेवा इथेही याचे मठ आहेत विभिन्न रगाच्या चिंध्याची टोपी धारण करणे, हे या लोकाचे वैशिष्ट्य आहे

रामनाथी – शिवप्रवर्तित शाखापैकी गोपाल शाखेशी या शाखेचा सबध आहे गैरसमजुतीने तो प्रभू रामचद्राशी जोडला जातो

दरियानाथी – भारताच्या सिंध वगैरे पश्चिम भागात या शाखेची पीठे आहेत दरियानाथी हे मूलत गोरक्षप्रवर्तित हठनाथी या शाखेतील होते सिधमध्ये दरवर्षी याचा महोत्सव होतो त्या वेळी हिंदू व मुसलमान या दोन्ही धर्माचे लोक त्यात भाग घेतात

| नाव | मूल प्रवर्तक | स्थान | प्रदेश | विशेष |
|---|---|---|---|---|
| (१) सत्यनाथी | सत्यनाथ | पाताल भुवनेश्वर | ओडिसा | सत्यनाथ हे ब्रह्मदेवाचेच नाव आहे म्हणून हे ब्रह्याचे योगी म्हणवतात |
| (२) धर्मनाथी | धर्मराज (युधिष्ठिर) | दुल्लु लक | नेपाळ | |
| (३) रामपथ | श्रीरामचद्र | चौकतप्प पचौरा | गोरखपूर | |
| (४) नाटेश्वरी | लक्ष्मण | गोरख टिल्ला | झेलम (पजाब) | दोन शाखा नाटेश्वरी व दरिया पथी |
| (५) कन्हड | गणेश | मानफरा | कच्छ | |
| (६) कपिलानी | कपिलमुनी | गगासागर | बगाल | सध्या डमडमजवळचे गोरखबसी हे याचे केंद्र आहे |
| (७) वैरागपथ | भर्तृहरी | रत ढोडा | पुष्कर जवळ (अजमेर) | |
| (८) माननाथी | गोपीचद | अज्ञात | | सध्या जोधपूरचा महामदिर मठ हे याचे स्थान आहे |
| (९) आईपथ | भगवती विमला | जोगी गुफा वा गोरसकुंई | बगालच्या दिनाजपूर जिल्हा | |
| (१०) पागलपथ | चौरगीनाथ | | | |
| (११) ध्वजपथ | हनुमान | | | |
| (१२) गगानाथी | भीष्म पितामह | जखबार | गुरुदासपूर (पजाब) | |

धर्मनाथी – सत्तनाथी परपरेतील धर्मनाथाने ही शाखा प्रवर्तित केली गोदावरीतीरावर याचे केंद्रस्थान असून, कच्छमधील याचा धिणोधर मठ प्रसिद्ध आहे

लक्ष्मणनाथी – गोरक्षनाथानतर लक्ष्मणनाथ हा पजाबच्या टिल्ला मठाचा महत बनला आणि त्याची ही शाखा निर्माण झाली याच शाखेतून नाटेश्वरी व दरिया या दोन शाखा उगम पावल्या लक्ष्मणनाथालाच बालानाथ म्हणतात

गगानाथी – ही शाखा कपिलशिष्य गगानाथ याने प्रवर्तित केली हिच्याशी कायानाथी व रतननाथी शाखाचा सबध आहे

वैरागी (भर्तृहरी) – उज्जयिनीचा राज्याधिकारी भर्तृहरी याने राज्यत्याग करून गोरक्षनाथाचे शिष्यत्व पत्करले होते त्याचीच ही शाखा आहे पेशावरचा रतननाथ हा त्याचा मुसलमान शिष्य होता या शाखेत मुसलमानाचा भरणा बराच असून, काबूलमध्ये याचे मुख्य पीठ स्थान आहे

रावल (नागनाथी) – नागनाथप्रवर्तित या शाखेत मुसलमान योग्यांचे आधिक्य आहे. रावळपिंडीत यांचे प्रमुख पीठ असून, पंजाब आणि पश्चिम भारत या प्रदेशांत त्यांचा विशेष संचार आहे. शिवप्रवर्तित तिसऱ्या शाखेशी ही शाखा संबद्ध असून, गादिया आणि गल किंवा पागलपंथ अशा हिच्या दोन शाखा आहेत.

जालंधरिपा – गोरक्षप्रवर्तित पाचव्या पावनाथ या शाखेशी ही शाखा संबद्ध आहे. नाथसंप्रदायातून फुटून जालंधराने ही शाखा प्रवर्तित केली, असे म्हणतात. कानिपा व गोपीचंद याच शाखेतले होते.

आईपंथ – गोरक्षशिष्या विमलादेवी ही या शाखेची प्रवर्तक होय. विमलामाईचा पंथ म्हणून त्याला माई पंथ किंवा आई पंथ म्हणतात. रोहतक व हरिद्वार येथे या शाखेचे मठ आहेत. त्यांच्या मठांत कोणतीही मूर्ती नसते.

कपिलानी – ही शाखा कपिलमुनिद्वारा प्रवर्तित असून, गंगासागर गावी या शाखेचा मठ आहे.

ध्वजनाथी – या शाखेचे योगी ध्वजधारी असतात व महावीर हनुमानाशी संबंध सांगतात. सिंहल, पेशावर व अंबाला येथे या योग्यांचा आढळ होतो.

कानिपा – जालंधरशिष्य कानिपाने या शाखेचे प्रवर्तन केले. हा वामाचारी पंथ होता, असे म्हणतात. आजही त्याला बामारंग असे दुसरे नाव आहे. यांत शक्तिपूजेला प्राधान्य आहे. गोपीचंद किंवा सिद्ध शृंगारी हा याच शाखेचा होय. बंगालमधील सेपला वा सापुडे ही जात यातूनच निर्माण झाली.

नाथसंप्रदायाचा प्रसार भारतात बहुतेक सर्वत्र झाला होता. त्यापैकी वज्रयानी व अन्य तांत्रिक या साधकांचा बंगालमध्ये बराच संचार होता. उज्जयिनीचा राजा भर्तृहरी हा राज्यत्याग करून गोरक्षशिष्य बनल्यामुळे भारताच्या पश्चिम दिशेला त्याचा प्रसार झाला. भर्तृहरीचा शिष्य रतननाथ व त्याचे अन्य सहकारी यांच्या द्वारा पंजाब, सरहद्द प्रांत व त्याच्या पलिकडे अफगाणिस्थानपर्यंत नाथसंप्रदायाची ध्वजा फडकली. गहिनीनाथ, अमरनाथ यांसारख्या शिष्यांनी महाराष्ट्र व्यापला. विदर्भात हरिनाथादींचे कार्य प्रभावी झाले. आंध्र–कर्नाटकात अनेक नाथपंथी साधूंनी संचार करून तिकडे त्या पंथाचे माहात्म्य वाढवले. बंगालमधून हा संप्रदाय पुढे नेपाळात गेला आणि तिथल्या लोकजीवनात समरस झाला.

वज्रयान, सहजयान, शाक्त, कापालिक, इ. वामाचारी तंत्रसाधनाविरुद्ध गोरक्षनाथाने आंदोलन उभे करून भारतीय धर्मसाधनेचे शुद्धीकरण केले, हे जरी खरे असले, तरी नाथसंप्रदायात शिरलेले अनेक वामाचारी साधक आपले पूर्वसंस्कार विसरले नव्हते. ते संस्कार पुढे हळूहळू नाथसंप्रदायाच्या साधनांतून विपासाराने प्रसृत होत राहिले. सांप्रत नाथसंप्रदायाच्या कक्षेतील अनेक योगीगणांत वामाचाराचे प्रचलन आहे. मद्य, मत्स्य, मांस, मुद्रा आणि मैथुन या तांत्रिक साधनेतील पंच मकारांचा आचार नाथयोग्यांतही नाही अशी चाल राहिला आहे. नाथपंथीय योगक्रियांत वज्रोली आणि सहजोली या दोन मुद्रा समाविष्ट झाल्या आहेत. स्वाधीन अशी स्त्री आणि प्रचुर दूध या दोन गोष्टी त्या मुद्रांसाठी त्यांनी आवश्यक मानल्या आहेत. गोमांस आणि अमरवारुणी यांचे सेवनही प्रचलित आहे. कानफाटे योगी योनि–लिंगाची पूजा करतात आणि कामवासना दडपून टाकणे हे साधनेला बाधक ठरते, असे त्यांचे समर्थनही करतात. गोरक्षनाथाचा खरा वारसा नाथपंथीय योग्यांनी सांभाळला नाही, तर तो चक्रधर, ज्ञानेश्वर, अल्लमप्रभु, कबीर, नानक, यांसारख्या महापुरुषांनी सांभाळला.

**प्रभाव आणि कार्य** – मध्ययुगीन भारतीय साधनेच्या इतिहासात नाथसंप्रदायाचे कार्य असाधारण आहे. या संप्रदायाने वाममार्गी तांत्रिकांचा प्रचंड पराभव केल्यामुळे भारतीय साधनेचे मोठ्या प्रमाणावर शुद्धीकरण घडून आले. आत्मप्रामाण्याची प्रतिष्ठा, बाह्यावडंबराला विरोध, चित्तशुद्धीवर भर, शरीराचे साधनेतील महत्त्व, लोकोद्धाराची तळमळ, त्यासाठी लोकभाषेचा आणि लौकिक सरणीचा स्वीकार, इ. वैशिष्ट्यांनी युक्त असलेला हा संप्रदाय सर्व भारतात प्रभावशाली ठरून उत्तरकालीन अनेक संतमहात्म्यांना प्रेरक ठरला. या संप्रदायाने आत्मप्रामाण्याचा उद्‌घोष करूनही शास्त्राची अप्रतिष्ठा केली नाही, चित्तशुद्धीवर भर देऊनही आचारधर्माची अवहेलना केली नाही, स्त्रीला साधनेचे स्वातंत्र्य देऊनही मठात अनाचाराचा प्रवेश होऊ दिला नाही, योगाचे माहात्म्य सांगूनही भक्तीला बहिष्कृत केले नाही, समन्वयाची दृष्टी ठेवूनही सबगोलंकार होऊ दिला नाही, आणि आपल्या सिद्धांतावर व साधनापद्धतीवर परमनिष्ठा ठेवूनही 'साधनानाम् अनेकता' या तत्त्वाचे विस्मरण होऊ दिले नाही.

या विशुद्ध, उदार आणि समन्वयशील स्वरूपामुळे नाथसंप्रदायाच्या प्रभावाच्या खुणा भारतात सर्वत्र आढळतात. भारतातील सर्व भाषांत नाथसिद्धांच्या गौरवगाथा उपलब्ध होतात. भारतीय लोकसाहित्यातही नाथसिद्धांच्या सिद्धिसंपन्न जीवनाचा महिमा व्यक्त झालेला दिसतो.

उत्तर भारतात कबीर आणि नानक या दोन महापुरुषांच्या विचारसरणीवर नाथसंप्रदायाचा विशेष प्रभाव आहे आणि त्यांच्या द्वारा उत्तरेतील समग्र निर्गुणोपासक परंपराच नाथसंप्रदायाने पोसली आहे. महाराष्ट्रात ज्ञानेश्वरांच्या द्वारा

नाथसंप्रदायाची विचारगंगा अधिक समृद्ध स्वरूपात प्रकट झाली आणि तिने सर्व मराठी लोकजीवन उजळून टाकले. गोरक्षनाथ – गहिनीनाथ – निवृत्तिनाथ – ज्ञानेश्वर अशी ज्ञानेश्वराची परंपरा आहे. ज्ञानेश्वरांनी युगसंदर्भ ध्यानी घेऊन योगाऐवजी भक्तीवर भर दिला आणि हरिहरैक्याचा पुरस्कार करून नाथसंप्रदाय भागवतसंप्रदायाशी एकरूप करून टाकला. ज्ञानेश्वरांच्या देदीप्यमान जीवनामुळे व उदात्त विचारामुळे महाराष्ट्रात नाथसंप्रदायाचे स्वरूप आजपर्यंत उज्ज्वल राहिले आहे. पाहा – गोरक्षनाथ, चौऱ्यायशी सिद्ध, नवनाथ [ गो च प , नाथ-संप्रदाय, आ रि क ]

**नाद** प्राण व अग्नी यांच्या संयोगाने उत्पन्न होणारे तत्त्व. नद = ध्वनी उत्पन्न होणे, यावरून हा शब्द आला आहे. नादतत्त्व बिंदूपेक्षाही सूक्ष्म आहे, असे योगशिखोपनिषदात सांगितले आहे. योग्याची कुंडलिनी जागृत झाल्यावर ती जेव्हा वर उठते, तेव्हा तिच्या ऊर्ध्वगतीने उत्पन्न होणाऱ्या स्फोटाला नाद असे म्हणतात. व्यापक दृष्टीने पाहता नाद हा अनाहत रूपाने सार्‍या ब्रह्मांडाला व्यापून राहिला आहे. जे पिंडी ते ब्रह्मांडी या न्यायाने तो पिंडातही आहे. मात्र अज्ञानी जीवांना तो ऐकू येत नाही. कारण त्यांचा सुषुम्नामार्ग बंद असतो. हठयोगाच्या साधनेत जेव्हा तो मार्ग मोकळा होतो, तेव्हा नाद ऐकू येऊ लागतो. तो कोणकोणत्या प्रकारे कसकसा ऐकू येतो, त्याचे वर्णन नादबिंदूपनिषदात केले आहे.

हाच नाद उपाधियुक्त झाला असता तो सात स्वरांत विभक्त होतो. त्याच्या निरुपाधिक अवस्थेत त्याला प्रणव किंवा ओंकार असे म्हणतात. यालाच शब्दब्रह्म अशीही संज्ञा आहे. संतांनी त्यालाच 'सोऽहं' ध्वनी असे नाव दिले आहे.

हा नाद शरीरातल्या अनाहत चक्रातून उत्थित होतो. नादाची गर्जना होऊ लागली, की प्रणवाची व नादचित्रांची सुंदर रूपे दिसू लागतात, असे ज्ञानेश्वरीच्या सहाव्या अध्यायात सांगितले आहे.

हा नाद निरंतर चालू असतो. त्याच्यापासून जशी वर्णांची उत्पत्ती होते, तशीच संपूर्ण विश्वाचीही उत्पत्ती होते. विश्वात हा नाद प्राण किंवा जीवनशक्ती या रूपाने राहतो. आगमवेत्ते याला हुंकार किंवा परम बीज असे म्हणतात.

या नादाची साधना कशी करावी, ते हठयोगात सांगितले आहे. आदिनाथ शंकराने सांगितलेल्या सव्वा कोटी लययोगांत नादानुसंधानालाच श्रेष्ठत्व दिलेले आहे. आरंभ, घट, परिचय व निष्पत्ती अशा चार नादभूमी आहेत. या प्रत्येक भूमीत साधकाच्या एकेका ग्रंथीचा भेद होतो व एकेका प्रकारच्या ध्वनीचा उगम होतो. निष्पत्ती अवस्था हीच सिद्धावस्था होय.

नाद व बिंदू यांचा घनिष्ठ संबंध आहे. ऊर्ध्वबिंदू सहस्रार चक्रात व अधोबिंदू मूलाधार चक्रात असतो. नाद हा त्या दोन्ही बिंदूंना जोडणारा आहे. याशिवाय, आज्ञा, विशुद्ध, अनाहत, मणिपुर व स्वाधिष्ठान या चक्रांतही बिंदू असतात. हे बिंदू गौण असतात. या गौण बिंदूंचा परस्पर योग नादाच्याद्वारेच होतो.

हठयोगप्रदीपिकेत नादाचे वर्णन पुढीलप्रमाणे केले आहे–

**नादानुसंधानसमाधिभाजां**
**योगीश्वराणां हृदि वर्धमानम् ।**
**आनन्दमेकं वचसामगम्यं**
**जानाति तं श्रीगुरुनाथ एकः ।।**

अर्थ – नादाच्या स्मरणामुळे चित्तैकाग्र्य प्राप्त झालेल्या योगीश्वरांच्या हृदयात वृद्धिंगत होणाऱ्या आनंदाचे वर्णन करणे हे वाणीच्या पलिकडचे आहे. तो आनंद एकट्या गुरूलाच कळतो.

नादाच्या अभ्यासाने पंधरा दिवसांत योग्याच्या चित्ताची एकाग्रता होते. त्याला प्रथम स्थूल व मग सूक्ष्म नाद ऐकू येऊ लागतात. त्यांतील एखाद्या घन किंवा सूक्ष्म नादाकडे चित्त प्रथम आकृष्ट झाले, की मग ते तिथेच स्थिर होते. योगसिद्धीची अभिलाषा असणाऱ्याने सर्व चिंता टाकून या नादाचेच अनुसंधान करावे, असे सांगितले आहे. काष्ठावर प्रज्वलित केलेला अग्नी ज्याप्रमाणे काष्ठाबरोबरच विझतो, त्याप्रमाणे नादाच्या ठिकाणी आसक्त झालेले मन नादाबरोबरच लय पावते.

नाथसंप्रदायात नादाला परम तत्त्व, परम ज्ञान, परम स्वभाव, किंबहुना माता, पिता सर्वच काही मानले आहे. ते लोक नादतत्त्वाच्या अभिव्यक्तीसाठी शिंग वाजवतात.

अनाहत नादाने दिशा भरून जातात व ब्रह्मरंध्राचे कपाट आपोआप उघडते, असे ज्ञानेश्वरांनी म्हटले आहे, तर नादानुभवातूनच ब्रह्मज्ञान प्राप्त होते, असे कबिराने म्हटले आहे.

नादाचा दुसरा प्रकार म्हणजे आहत नाद होय. हा आघाताने उत्पन्न होणारा असतो.

**आहतस्तु द्वितीयोऽसौ वाद्ये चाघातकर्मणा ।**
**तेन गीतस्वरोत्पत्तिः स नादो जायते भुवि ।।**

अर्थ – आहत नाद हा दुसरा असून, वाद्यावर आघात केल्याने तो उत्पन्न होतो. त्याच्यामुळे गीतस्वरांची उत्पत्ती होते. हा नाद भूमीवर उत्पन्न होतो.

सतारीची तार छेडली असता अगर मृदंग, तबला, इ. वाद्यांवर हाताने थाप मारली असता किंवा बासरीत फुंक मारली असता, जो आवाज होतो तो आहत नाद होय. संगीताचा

संबंध या नादाशी आहे हा आहत नाद देहातही कसा उत्पन्न होतो, ते पुढील श्लोकात सांगितले आहे

**हृदयऽनाहतचक्रेऽस्मिन्ननिलानलयोगत ।**
**आहतस्तत्र नाद स्यादिति शास्त्रेषु कीर्तित ॥**

अर्थ – ( प्राणिमात्राच्या ) हृदयप्रदेशात असलेल्या अनाहत चक्रात वायू आणि अग्नी यांच्या संयुक्त आघाताने आहत नादाची उत्पत्ती होते, असे शास्त्रात सांगितले आहे

प्राचीन संगीतविषयक ग्रंथात आहत नादाची प्रक्रिया दिली आहे, ती अशी –

**आत्मा विवक्षमाणोऽयं मन प्रेरयते मन ।**
**देहस्थं वह्निमाहन्ति स प्रेरयति मारुतम ।**
**ब्रह्मग्रंथिस्थित सोऽथ क्रमादूर्ध्वपथे चरन ।**
**नाभिहृत्कण्ठमूर्धास्येष्वाविर्भावयति ध्वनिम् ॥**

अर्थ – बोलण्याची इच्छा झाली असता आत्मा मनाला प्रेरित करतो मन देहातील अग्नीवर आघात करते अग्नी ब्रह्मग्रंथीत असलेल्या वायूला प्रेरणा देतो तो वायू मग ऊर्ध्व मार्गाने जाऊ लागतो नाभीपासून आरंभ करून हृदय, कंठ व मस्तक इथपर्यंत जाऊन तो मुखात येतो व तिथे आपला ध्वनी प्रकट करतो

नाभी, हृदय, कंठ, मुख व शिर या पाच स्थानी होणारा आहत नाद हा भिन्न भिन्न असतो नाभीपासून हृदयापर्यंतच्या प्रदेशातील नादाला मंद्र, हृदयापासून कंठापर्यंतच्या प्रदेशातील नादाला मध्य व कंठापासून मस्तकापर्यंतच्या प्रदेशातील नादाला तार अशी संज्ञा आहे मंद्रापेक्षा मध्य दुप्पट व मध्यापेक्षा तार दुप्पट उच्च असतो या तीन स्थानांच्या भेदानुसार स्वरांची तीन सप्तके होतात – हृदयदेशात मंद्र नादात्मक प्रथम सप्तक, कंठदेशात मध्य नादात्मक द्वितीय सप्तक व शिरप्रदेशात तार नादात्मक तृतीय सप्तक बनते

याशिवाय, व्यक्तीच्या कंठाच्या स्वाभाविक प्रवृत्तीला अनुसरून आहत नादाचे पुष्ट, अपुष्ट, सूक्ष्म, अतिसूक्ष्म व कृत्रिम असे पाच प्रकार समजतात आहत नादाचे महत्त्व सांगताना याज्ञवल्क्याने म्हटले आहे, ते असे –

**वीणावादनतत्त्वज्ञ श्रुतिजातिविशारद ।**
**तालज्ञश्चाप्रयासेन मोक्षमार्गं नियच्छति ॥**

(याज्ञवल्क्यस्मृती ३ ११५)

अर्थ – वीणावादनाचे तत्त्व जाणणारा, श्रुती व जाती यांचे मर्म जाणणारा आणि तालाचे ज्ञान असणारा, या सर्वांना विनासायास मोक्षाची प्राप्ती होते

पहा – बिंदू [ हिं सा को , सहजसाधना, पूजातत्त्व, हिं सा , आ स , श्री उत्तमराव शुक्ल – त्रिपथगा, जुलै १९६२ ]

## नादबिंदूपनिषद

एक लघु उपनिषद हे ऋग्वेदाशी संबंधित आहे यात एकूण ५६ श्लोक असून, त्यात प्रारंभी प्रणवाची पक्ष्याशी तुलना केली आहे अकार पक्ष्याचा उजवा पंख उकार हा डावा पंख, मकार ही शेपटी, अर्धमात्रा हे डोके, तसेच सत्त्व, रज, तम हे गुण म्हणजे त्याचे पाय, सत्य हे शरीर, धर्म हा उजवा डोळा, अधर्म हा डावा डोळा, भूर्लोक या पोटऱ्या, भुवर्लोक हे गुडघे, स्वर्लोक हे जघन, महर्लोक ही नाभी, जनलोक हे हृदय व तपोलोक हा त्याचा गळा होय

प्रणवाच्या मात्रांपैकी अकार ही अग्नीची, उकार वायूची, मकार बीजात्म्याची व अर्धमात्रा ही वरुणाची मानलेली आहे याशिवाय प्रणवाच्या घोषिणी, विद्युत, पतंगिनी, वायुवेगिनी, नामधेयी, ऐंद्री, वैष्णवी, शांकरी, महती, धृती, नारी आणि ब्राह्मी अशा आणखी मात्रा आहेत

योग्याला ऐकू येणाऱ्या विविध नादांचे वर्णनही या उपनिषदात केले आहे, ते असे–

**आदौ जलधिजीमूतभेरीनिर्झरसम्भव ।**
**मध्ये मर्दलशब्दाभो घण्टाकाहलजस्तथा ॥**
**अन्ते तु किङ्किणीवंशवीणाभ्रमरनि स्वन ।**
**इति नानाविधा नादा श्रूयन्ते सूक्ष्मसूक्ष्मत ॥**

अर्थ– प्रथम समुद्राची गर्जना, मेघाचा गडगडाट, भेरीचा आवाज, झऱ्याची झुळझुळ, यांसारखे आवाज, मग नगारा, घंटा, कासाळू यांच्या आवाजासारखे नाद आणि शेवटी क्षुद्र घंटा, वेणू, वीणा, भ्रमर यांच्या आवाजासारखे आवाज असे हे अनेकविध सूक्ष्मातिसूक्ष्म नाद आहेत

ज्या नादात मन प्रथम रमते, तिथे ते स्थिर होते व मग त्यातच विलीन होते नंतर सर्व बाह्य नाद विसरून मन चिदाकाशात विलीन होते व अशा योग्याला उन्मनी अवस्था प्राप्त होते मधुसेवन करणारा भ्रमर ज्याप्रमाणे सुगंधाची अपेक्षा करीत नाही, त्याप्रमाणे नादासक्त मन मग विषयांची आकांक्षा धरीत नाही ज्या ठिकाणी चित्ताचा लय होतो, तेच विष्णूचे परमपद होय जेव्हा योगी शब्दातीत ब्रह्मप्रणवाच्या नादात मग्न असतो, तेव्हा त्याचे शरीर मृतवत असते [श्री सी ग देसाई]

## नादस्वरम

एक सुषिरवाद्य याचा आकार सनईसारखा असतो द भारतात या वाद्याचा विशेष प्रचार आहे सनईला सात स्वरच्छिद्रे असतात, तर नादस्वरमला ती बारा असतात त्यातील सात छिद्रे स्वरासाठी आणि उरलेली पाच छिद्रे सप्तकाचे नियमन करण्यासाठी असतात हे वाद्य तार सप्तकात वाजवतात त्यामुळे काही वेळा त्याचा आवाज कर्णकटू वाटतो देवळात व लग्न, मुंज, इ शुभप्रसंगी नादस्वरम हे

वाद्य वाजविण्याची दक्षिणेत पद्धत आहे तिकडे श्रेष्ठ दर्जाच्या



नादस्वरम

नादस्वरम वादकाच्या भोवती श्रोत्यांची गर्दी असते

**नानक** (१४६९ ते १५३८ इ स) शीख संप्रदायाचा प्रवर्तक व आद्य गुरु याचा जन्म पंजाबातील तळवंडी नामक गावी कार्तिक पौर्णिमेला झाला, असे सर्व शीख लोक मानतात तळवंडी हे गाव लाहोरच्या दक्षिणेस चाळीस मैलावर आहे सांप्रत त्याला नानकानासाहेब असे म्हणतात ते आता पाकिस्तानात गेले आहे नानकाच्या वडिलांचे नाव काळूचन्द असे होते काही इतिहासकारांच्या मते ते कल्याणराय असे होते ते तळवंडी येथे शेती, व्यापार, इ व्यवसाय करीत नानकाच्या आईचे नाव त्रिप्ता असे होते नानकाच्या जन्मप्रसंगी योगी, योगिनी, सिद्ध व देव त्याला आशीर्वाद द्यायला आले होते, अशी आख्यायिका आहे हा मुलगा छत्रधारी आणि हिंदू व मुसलमान या उभय धर्मीच्या जनांना प्रिय होईल, अशी भविष्यवाणी काळूचंदाचे उपाध्याय हरदयाळ यांनी केली होती

रामपुत्र लव हा नानकाच्या कुळाचा पूर्वज होय या कुळातील एक पुरुष अमृतराय याने काशीला जाऊन वेदविद्या प्राप्त केली, म्हणून त्याला वेदी ही पदवी मिळाली व पुढे तेच त्याचे कुलनाम ठरले

**असामान्य बालक** – बालवयातच नानकाच्या अंगी काही तरी अलौकिकत्व दिसू लागले इतर मुलांत तो विशेष मिसळत नसे त्यांच्या खेळातही भाग घेत नसे तो एकटाच कुठे तरी स्तब्ध बसून राही पुढे पुढे गावी आलेल्या साधुसंतांच्याकडे जाऊन त्यांचा उपदेश ऐकण्याचा त्याला नाद लागला मग आसपासच्या अरण्यात जाऊन तो चिंतन करीत बसू लागला त्याची वृत्ती हळूहळू अंतर्मुख बनत चालली आणि अंतःकरणात भक्तिभाव वाढू लागला

पंडित गोपाळ पांडे नावाचे एक गृहस्थ नानकाचे शिक्षक होते ते त्याला लिहायला–वाचायला शिकवीत, पण नानकाला ते सर्व शिक्षण निरर्थक वाटे त्याने आपले त्याविषयीचे विचार एका आत्मबोधक पद्यात पुढीलप्रमाणे व्यक्त केले आहेत–

**जालि मोहु घसि मसु करि मति कागदु करि सारु ।**
**करि चितु लिखारी गुरु पुछि लिखु बिचारु ।**
**लिखि नामु सालाहु लिखु लिखि अंतु न पारावारु ।।**
**बाबा इहु लेखा लिखि जाणु**
**जिथै लेखा मंगिऐ तिथै होई सचा निसाणु ।।**

अर्थ – हे चित्तरूपी लेखका, मोहाला जाळून त्यागरूपी शाई बनव मग बुद्धिरूपी कागदावर प्रेमरूपी लेखणीने सत्याचे विचार लिही बाबा, असे लेखन केलेस, तर जिथे हिशेब मागितला जाईल तिथे तुझा खरेपणाच सिद्ध होईल

पुढे पंडित व्रजनाथ शर्मा यांच्याजवळ तो संस्कृत शिकू लागला असे सांगतात, की 'ॐ नमः सिद्धम्' या मंत्राचा खरा अर्थ गुरुजी त्याला सांगू शकले नाहीत, तेव्हा शिष्यानेच त्यातील ॐ या अक्षराचा अर्थ सांगून गुरूला चकित केले पुढे मौलाना कुतुबुद्दीन यांच्याजवळ नानकाने फारसी भाषेचाही अभ्यास केला

अकराव्या वर्षी त्याच्या वडिलांनी त्याचे उपनयन करण्याचे ठरविले पण उपनयन हा विधी म्हणजे केवळ उपचार बनला असून, यज्ञोपवीताचा अर्थ न समजता ते गळ्यात अडकवणे हे ढोंगीपणाचे ठरेल, असा विचार त्याच्या मनात जागृत झाला आणि त्याने मोठ्या धर्याने स्वतःचे उपनयन करून घेण्याचे नाकारले तो आपल्या पुरोहिताला म्हणाला–

**दया कपाहु संतोखु सूतु जतु गंढी सतु वटु ।**
**एहु जनेऊ जीअका हई ता पांडे घतु ।।**
**ना इहु तुटै न मलु लगै ना इहु जलै न जाइ ।।**

अर्थ – अहो, पांडे पुरोहित ! दयेचा कापूस, संतोषाचे सूत, संयमाची गाठ व सत्य हा मंत्र, यांनी युक्त असे जानवे तुम्ही मला घाला ते तुटणार नाही, मळणार नाही आणि जळणारही नाही

त्या लहान मुलाचे हे शब्द ऐकून कोणी त्याला अहमन्य म्हणू लागले, तर कोणी वेडा म्हणू लागले त्याचे वडीलही त्याच्यावर नाराज झाले पण त्याने मात्र आपला हट्ट सोडला नाही

मुलाने व्यापार करावा, नाव कमवावे व चागला ससार करावा अशी त्याच्या वडिलाची फार इच्छा होती, पण मुलाने बापाला प्रतिसाद दिला नाही तो स्वस्थ बसून सव वेळ चिंतनात घालवतो, ही गोष्ट तर त्याच्या चिंतेलाच कारणीभूत झाली मग त्यानी गायींना जगलात चरायला नेण्याचे काम त्याला सागितले नानकाने ते मात्र पत्करले तो गायी घेऊन रानात जाई व इतर गोपाळाना जमवून त्याना हरिकथा सागे घरातली एखादी वस्तू कोणी मागितली, तर नानक ती त्याला लगेच देऊन टाकी एकदा वडिलानी नानकाला वीस रुपये देऊन काही व्यापार करण्यास पाठवले वाटल त्याला काही फकीर भेटले ते बरेच दिवस उपाशी होते तेव्हा नानकाने ते सर्व पैसे त्याना देऊन टाकले आणि आपण मोठा सच्चा सौदा करून आलो, असे घरी येऊन वडिलाना सागितले

नानक नेहमी उदास असे तो लहर लागली तर जेवी, नाही तर उपाशी राही ह लक्षण ठीक नव्हे, असे जाणून त्याच्या वडिलानी शेवटी एका वद्याला बोलावले वद्याने नानकाची मन स्थिती जाणली आणि त्याच्या बापाला सागितल, की याला कोणताही रोग नाही देशावर आलेले सकट दूर करण्यासाठी परमेश्वराने याला धाडले आहे, म्हणून हा असा लोकविलक्षण वागत आहे त्यामुळे हळूहळू नानक हा अवतारी पुरुष मानला जाऊ लागला त्याच्याविषयी अनेक आख्यायिकाही प्रचलित झाल्या त्यापकी काही अशा –

गायींना घेऊन रानात गेल्यावर नानक एका झाडाखाली झोपला असता, त्याला ऊन लागू नये म्हणून नागाने त्याच्या मस्तकावर फणा उभारून छाया धरली

गायींनी शेतातील पिके खाल्ली, अशा तक्रारी जहागिरदाराकडे गेल्यावर जहागिरदार स्वत शेते पाहायला गेला आणि त्याला पिके चागली फोफावलेली दिसली हा चमत्कार पाहून जहागिरदाराची खात्री झाली, की नानक हा कोणी तरी असामान्य पुरुष असला पाहिजे

तळवडी गावापासून काही अतरावर पाकपट्टण नावाच्या गावी शेख फरीद याची समाधी आहे तिथे हजारो हिंदू व मुसलमान नेहमी यात्रेसाठी जमत एकदा नानक त्या यात्रेला गेला असता त्याने तेथील महत शेख इब्राहिम याच्याशी आध्यात्मिक चर्चा केली आणि त्यामुळे नानकाचा आध्यात्मिक अधिकार तिथल्या सर्वांना कळून आला

**ससार** – काही दिवसानी नानक सुलतानपूरला आपल्या बहिणीकडे राहायला गेला मेव्हण्याच्या ओळखीने त्याला तिथला सुभेदार दौलतखान याच्या मोदीखान्यात (धान्याच्या गुदामात) नोकरी मिळाली पण तिथे राहून तो सव फकिराना मुक्तहस्ताने धा य वाटू लागला त्यामुळे त्याची नोकरी सुटली पुढे इ स १४८८ साली, मुळचद नामक व्यापाऱ्याच्या सुलक्षणी नामक मुलीशी नानकाचा विवाह झाला सहा वर्षांनी त्याला एक मुलगा झाला हाच श्रीचद पुढे उदासी पथाचा सस्थापक बनला आणखी दोन वर्षांनी त्याला दुसरा मुलगा झाला त्याचे नाव त्याने लक्ष्मीचद असे ठेवले

**फकिरी** – अशा प्रकारे नानक जरी बाह्यत व्यवहारात गुरफटलेला दिसत होता, तरी ससारात त्याचे खरे लक्ष नव्हते साधुसताच्या सगतीत राहून दीन दु खी जनाना मदत करण्यात तो आपला दिवस घालवी हळूहळू त्याच्या सौज याची व साधुत्वाची कीर्ती सवत्र पसरली विद्वान माणसे त्याच्याशी धमचर्चा करण्यासाठी येऊ लागली इकडे त्याच्या ससारातील अडचणीही वाढू लागल्या जमाखर्चाला मेळ बसेना शेवटी एक दिवस ससाराचा त्याग करून नानक फकीर बनला इ स १४९४ साली त्याने घर सोडले पण तीन दिवस एकातात राहून तो घरी परत आला भाविक शीख असे मानतात, की त्या तीन दिवसात वैन नदीच्या तीरावर परमेश्वराने त्याला नामजपाचा सदेश दिला

**यात्रा** – या साक्षात्कारानतर नानक शक्य तेवढे मौन पाळू लागला व एकातवास करू लागला कोणी बोलण्याचा आग्रह केला, तर तो एवढेच बोले, की 'कोणी हिंदू नाही,



गुरु नानक

कोणी मुसलमान नाही, सवजण एकाच परमेश्वराची लेकरे आहेत ' परतु त्याचा हा मानवधर्माचा उपदेश कोणाला पटत

नसे पुढे लवकरच त्याने देशभ्रमणासाठी प्रस्थान ठेवले सुमारे तीस वर्षे त्याने भारतातल्या तीर्थयात्रा करून सव धर्माच्या मंदिराना व मठाना भेटी दिल्या या काळातच नानक हा गुरू ठरला गुरू नानकाच्या या यात्रेची पाच पर्वे होतात

पहिल्या पर्वात त्यानी लाहोर, एमनाबाद, सियालकोट, हरिद्वार, दिल्ली, काशी, पाटणा, गया, डाका, जगन्नाथपुरी, इ शहराना भेटी दिल्या त्यानतर ते बगाल, आसाम, मध्य प्रदेश व राजस्थान या प्रदेशात फिरून सुलतानपूरला परत गेले ही यात्रा इ स १४९९ ते १५०९ या काळात झाली त्याच सुमारास नानकानी आपला एक नवा धर्मपंथ स्थापन केला हा पथ प्रवृत्तिमार्गी व एकेश्वरी मताचा होता त्याना पहिला शिष्य मिळाला तो मर्दाना नावाचा एक मुसलमान नानक उपदेशपर पदे रचीत व मर्दाना ती रबाबच्या साथीवर गात असे एमनाबाद येथे त्याना लल्लू नावाचा एक सुनार भेटला व तो त्याचा शिष्य बनला मुलतान जिल्ह्यातील तुलुंब गावी सजन नावाचा एक ठगही त्याचा भक्त झाला पानिपत येथे शेख शरीफ नावाच्या अवलियाला उपदेश करून त्यानी त्याला पथात घेतले

त्या वेळचा दिल्लीचा सुलतान शिकदर लोदी याला सत व फकीर याच्याबद्दल मुळीच आदर नव्हता त्यामुळे त्याने दिल्लीत आल्यावर नानक व त्याचा शिष्य मर्दाना या दोघानाही कैदेत घातले तिथे त्याना त्याने दळण्याचे काम दिले नानकानी त्या जात्याना हातही लावला नाही व इतर कैद्यानाही दळण्याचे काम न करण्याचा आदेश दिला मग त्यानी मर्दानाला रबाब घेऊन आपले एक पद गायला सागितले त्याचे ते गाणे चालू झाले मात्र, सर्व जाती आपोआप फिरू लागली दळण चालू झाले ती वार्ता कळताच सुलतान धावत तिथे आला व त्याने नानकाची क्षमा मागून त्याच्या आज्ञेवरून सर्व कैद्याना मुक्त केले

या चमत्कारामुळे नानकाची कीर्ती दूरवर पसरली मग ते मथुरा, वृदावन, आगरा, अयोध्या, इ नगरावरून काशीला गेले तिथल्या वास्तव्यात सर्व धर्मांचे व पथाचे पडित त्याच्याशी चर्चा करण्यासाठी येत व समाधान पावून परत जात

पहिल्या यात्रेनंतर काही दिवस तळवडी येथे राहून नानक पुढे व भारताच्या यात्रेला निघाले वाटेत जोधपूर, अजमेर, उज्जयिनी, रामटेक, नागपूर या शहरात त्यानी मुक्काम केला असे थांबत थांबत प्रथम ते रामेश्वराला व तिथून लकेला गेले तिकडून परत येताना त्यानी म्हैसूर, शृंगेरी, पचवटी, त्र्यबकेश्वर, भडोच, बडोदे, अहमदाबाद, भावनगर, पालिताणा, अमरकोट, इ शहराना भेटी दिल्या सहा वर्षे त्याचा हा प्रवास चालला होता इ स १५१५ मध्ये ते तळवडीला परत आले

या यात्रेच्या काळात नानक हे कपाळी टिळा व गळा ही शव वैष्णवांची चिन्हे धारण करीत या यात्रेत त्यानी नामदेव आणि नरसी मेहता याचीही भेट घेतली अशी किवदती आहे

इ स १५१५ साली गुरू नानक गुरुदासपूर जिल्ह्यातील कलानौर या गावी गेले असता, तिथल्या करोडीमल खत्री नावाच्या माणसाने त्याना बरीच जमीन दिली नानकानी त्या भूमीवर करतारपूर नावाचे नवे गाव वसवले तिथे ते तीन वर्षे पत्नी व मुले यासह राहिले त्या काळात ते स्वत जमीन कसून आपला उदरनिर्वाह करीत

त्यानतरच्या दोन वर्षांत गुरू नानक व मर्दाना यानी कागडा, कुलू, गढवाल, गगोत्री–जम्नोत्री, नेपाळ, तिबेट व काश्मीर या प्रदेशात यात्रा केली नैनीताल जिल्ह्यात गोरखमठ नावाचे कानफाटा योग्याचे केंद्र होते तिथे जाऊन नानकानी त्या गोरखपथी सिद्धाना भक्तिमार्गाचा उपदेश केला तेव्हापासून त्या स्थानाला नानकमठ हे नाव मिळाले

त्यानतर लवकरच नानक व मर्दाना हे दोघे मक्केच्या यात्रेला गेले ही यात्रा सुमारे तीन वर्षे म्हणजे इ स १५२० ते १५२३ पर्यंत चालू होती वाटेत त्याना सिंध, बलुचिस्तान, इ प्रांतात आपल्या मताचा खूप प्रचार केला मक्केच्या मुक्कामात नानक काबाकडे पाय करून झोपलेले पाहून तिथल्या मौलवीला फार राग आला व तो त्याना अपशब्द बोलला. तेव्हा नानक त्याला शांतपणे म्हणाले, की 'ज्या दिशेला परमेश्वर नाही, त्या बाजूला तू माझे पाय ठेव ' ते ऐकून तो



गुरू नानक व त्याचा शिष्य

मौलवी निरुत्तर झाला नतर तिथल्या काजीबरोबर चर्चा करून नानकानी त्याला आपला मानवधर्म पटवून दिला पुढे नानक मदीना व बगदाद येथे गेले व तिथेही त्यानी आपल्या नवीन विचाराचा प्रभाव पाडला बगदादहून ते परत निघाले, तेव्हा

खल्फिान पोषाख देऊन त्याची रवानगी केली त्या पोषाखावर कुराणातील आयते लिहिलेले होते डेराबाबानानक येथील गुरुद्वारायात तो पोषाख अजूनही पाहायला मिळतो

या यात्रेत नानक व मर्दाना हे इटली, ईजिप्त, इराण, बुखारा, अफगाणिस्तान, काबूल, कंदाहार, इ प्रांतात फिरून शेवटी पेशावरमार्गे स्वदेशी परत आले

यानंतरही एक वर्षभर नानक पंजाबात भ्रमण करीत होते, असे म्हणतात ते अवडंबर व ढोंगीपणा यांचा निषेध करून लोकांना सद्वर्तनाचा उपदेश करीत

**अंतकाळ** – या दीर्घयात्रापर्वात त्यांना विविध प्रकारचे अनुभव आले त्यामुळे त्यांचा दृष्टिकोन विशाल झाला ते हळूहळू साधकावस्थेतून सिद्धावस्थेकडे जाऊ लागले त्यानंतर ते करतारपूर येथे स्थायिक झाले व तिथेच त्यांनी आपले उरलेले आयुष्य घालवले पत्नी व पुत्र यांच्यासह तिथे राहून त्यांनी आदर्श गृहस्थजीवन जगून दाखवले आणि प्रपंच व परमार्थ दोन्ही साधले त्या काळात त्यांना असंख्य शिष्य मिळाले व त्यांच्या संप्रदायाची वाढ जोमाने झाली आयुष्याच्या अखेरच्या दिवसात अनेक भक्त नित्य त्यांच्या सेवेत असत त्यात हिंदू, मुसल्मान, गरीब, श्रीमंत असे अनेक प्रकारचे लोक होते ते एकमेकांना भाई भाई मानीत नानकांनी तिथे लंगर (अन्नछत्र) उघडले होते त्यात सर्व भक्त एका पंक्तीला बसून भोजन करीत तिथे सर्वजण सहकारी पद्धतीने शेतीही करीत

नानक यांनी सर्व आयुष्यभर ज्या तत्त्वज्ञानाचा उपदेश केला, त्याच्या प्रसारासाठी त्यांना पुढे संघटनेची आवश्यकता वाटू लागली आपल्या संप्रदायाची अभिवृद्धी होऊन त्याला चिरसातत्य लाभावे, म्हणून त्यांना आपली आध्यात्मिक गादी निर्माण करणेही आवश्यक वाटले त्यांचे दोन्ही मुलगे कर्तृत्ववान होते पण त्यांपकी कोणालाही त्यांनी आपला वारस नेमले नाही, तर ल्हना नामक शिष्याची आपला धार्मिक वारस म्हणून निवड करून नानकांनी त्याला गादीवर बसवले, त्याला अंगद हे नवे नाव दिले व गुरू म्हणून त्याला स्वत प्रणाम केला

नानक यांचा अंतकाळ जवळ आला, हे समजल्यावर त्यांच्या देहाचे दहन करावे, की दफन, असा वाद सुरू झाला त्याबद्दल नानक यांनीच असा निर्णय दिला, की त्यांच्या मृत्यूनंतर दोन्ही धर्मांच्या लोकांनी मत देहावर फुले वाहावी आणि चोवीस तासानंतर ज्यांची फुले ताजी राहतील, त्यांनी देह ताब्यात घेऊन आपल्या पद्धतीने त्यांची उत्तरक्रिया करावी

इ स १५३८ साली आषाढ शुद्ध दशमीला नानकांनी देह ठेवला त्यांच्या आज्ञेप्रमाणे त्यांच्या देहावर हिंदु मुसलमानांकडून फुले वाहण्यात आली दुसऱ्या दिवशी आवरणवस्त्र दूर करून पाहतात तो सर्वच फुले ताजी होती आणि नानकांचा देह मात्र अदृश्य झाला होता मग भक्तांनी फुलांवरील त्या वस्त्राचे दोन भाग केले हिंदूंनी एका भागाचे दहन केले व मुसलमानांनी दुसऱ्या भागाचे दफन करून त्यावर कबर बांधली पुढे रावीच्या प्रवाहाने ती कबर नाहीशी झाली

**काव्यरचना** – गुरू नानक हे एक महान कवीही होते त्यांनी रचलेली सर्व पदे *गुरुग्रंथसाहेब या ग्रंथात संग्रहीत केलेली आहेत* जपुजी ही त्यांची सर्वांत मुख्य रचना होय तिच्यात त्यांचे सर्व उपदेश संकलित केलेले आहेत त्यामुळे शीख लोक जपुजीला श्रेष्ठ मानतात जपुजीच्या खालोखाल आसा दी वार या ग्रंथाचे स्थान आहे त्यात ईश्वराचे स्तवन असून, ते प्रात स्मरणासारखे म्हटले जाते त्यानंतर सोलिहा व रहिरास यांचा क्रम लागतो शीख लोक रात्री निजण्यापूर्वी सोलिहाचे पठण करतात याव्यतिरिक्त नानकांच्या सिद्ध गोष्टी, माझ दी वार, दखणी ओंकार, बारहमाह, इ रचनाही प्रसिद्ध आहेत

गुरू नानक यांना आपले विचार सर्वसामान्य लोकांना सांगायचे होते, म्हणून त्यांनी आपली पदे पंजाबी जनभाषेत रचली ते स्वत बहुभाषी होते ते जिथे जात तिथल्या लोकांच्या भाषेत उपदेश करीत त्यामुळे त्यांच्या पद्यरचनेत जागजागी खडी बोली, ब्रज भाषा, रेखता, सिंधी, लहंदा, इ भाषांतील शब्दप्रयोग आढळतात काही ठिकाणी फारसी शब्दही दिसतात त्यांची सर्व पदे, निरनिराळ्या रागरागिण्यांत रचलेली आहेत ते स्वत गायक होते व त्यांना रागांचे चांगले ज्ञान होते

गुरू नानकांची पदे *धार्मिक व लौकिक अशी उभयविध आहेत* धार्मिक पदांत परमात्मा, सृष्टिक्रम, अहंकार, माया, जीव, *आत्मा, मनुष्ययोनीची श्रेष्ठता, मानवाचे परमात्म्याशी मीलन,* ईश्वरप्राप्तीचे भिन्न मार्ग, सद्गुरू व नाम, इ विषय आहेत दुसऱ्या प्रकारात नीतिपर व व्यावहारिक पदे आहेत

नानकांची काव्यरचना बोधपर असली, तरी त्यांच्या पदांत अनेक काव्यगुणही आढळतात त्यांचे काव्य आंतरिक प्रेमातून उगम पावलेले असल्यामुळे ते भावपूर्ण व सरस झाले आहे त्यात मुख्यत शांत, करुण व वीर हे तीन रस स्वाभाविकपणे उत्पन्न झालेले आहेत त्यांच्या काव्यात निसर्गाचे चित्रणही चांगल्या प्रकारचे आढळते आपल्या मनातला आशय रूपकांच्या द्वारे व्यक्त करण्याची त्यांना फार आवड होती त्यांच्या काव्याचे एक उदाहरण असे–

**गगन में थाल रवि चंद्र दीपक बने ।**
**तारका मंडल जनक मोती ।**
**धूप मलि आनलो पवन चवरो करे ।**
**सगल बनराय फुलन्त जोती ।।**

**कसी आरती होय भवखंडना तेरी ।**
**आरती अनहदा शब्द बाजत मेरी ।**
**सहस तव नैन नन नैन हहि तोहे को ।**
**सहस मूरत नन एक तोही ।।**
**सहस पद बिमलनन एक पद गंध बिनु ।**
**सहस तब गंध इव चलत मोही ।।**
**सब महि जोति जोति है सोई ।**
**तिसदै चानन सब महि चानन होई ।।**
**गुरु साखि जोति परगटु है ।**
**जो तिसु भावसु आरती होई ।**
**हरचरन कोमल मकरन्द लोभित मनो ।**
**अनदिनो मोही आही प्यासा ।**
**कृपा जल देहु नानक सारग कउ ।**
**होय जाते तेरे नाय वासा ।।**

अर्थ – गगनरूपी तबकात सूर्य व चंद्र हे दिवे आहेत. तारे हे मोती आहेत. मलय पर्वतावरील चंदन हा धूप आहे. वायू चवरी ढाळीत आहे. सारी वनराजी हीच फुले आहेत. अनाहत शब्द हा शंख आहे. हे भवभयहारी परमेश्वरा, किती सुंदर तुझी आरती होत आहे. एकही नेत्र नसताना तू सहस्रनेत्री आहेस. एकाही प्रकारचे रूप नसताना तू महाकाय आहेस. एकही पाय नसताना तुला हजारो पायांची द्रुत गती आहे. ज्या ज्योतीने सारी सृष्टी प्रकाशित होते, ती ज्योती तू आहेस. असे कोणते स्थान आहे, की ज्या ठिकाणी तुझा प्रकाश नाही? म्हणून हे जगत्पते, माझे मन तुझ्या चरणकमली पोचविण्या साठी भ्रमराप्रमाणे मी उत्सुक झालो आहे. तुझ्या कृपारूप जलाने तू माझी तहान भागव.

**विचारधारा** – गुरु नानक यांनी ईश्वराच्या एकतेवर विशेष भर दिला आहे. अखिल विश्वाचा कर्ता व नियंता परमेश्वर एकच असून, त्याच्या दृष्टीने सर्व मानव समान आहेत. शुद्ध आचरण व अनन्य भक्ती हा परमेश्वरप्राप्तीचा खरा मार्ग होय. ईश्वर निर्भय, निर्वैर, कालरहित, जन्मरहित, स्वयंभू असा आहे व तो गुरुप्रसादाने प्राप्त होतो, असा मूलमंत्र त्यांनी जपुजीत सांगितला आहे. जपुजीच्या शेवटच्या श्लोकातील परमे श्वराचे वर्णन पुष्कळ अंशी वेदान्तातील ब्रह्माच्या स्वरूपाशी जुळणारे आहे. परंतु गुरु नानक यांनी परमेश्वराला सगुण, दयाळू, उपकारकर्ता, कर्माप्रमाणे पाप पुण्याचे फळ देणारा असेही मानले आहे. त्याला त्यांनी सत्य, परमतत्त्व, सच्चा साहब, सद्गुरू अशीही नावे दिली आहेत.

गुरु नानक स्वतःला ईश्वरप्रेषित म्हणत नाहीत किंवा गहन तत्त्वज्ञान सांगण्याचा ते आवही आणीत नाहीत. त्यांच्या काळी हिंदू व मुसलमान लोकांमध्ये नाना प्रकारच्या खुळ्या समजुती रूढ झाल्या होत्या व अर्थहीन आचाराचे स्तोम माजले होते. नानकांनी त्या दोन्ही धर्मांच्या विकृत स्वरूपाचा निषेध करून धर्माच्या शुद्ध स्वरूपाची लोकांना ओळख करून दिली. विशिष्ट धर्माची सुधारणा करणे हा त्यांचा उद्देश नसून, विश्वव्यापक मानवी धर्म सांगणे हा उद्देश होता. प्रत्येक मनुष्याला परमेश्वर भक्तीने मुक्ती मिळवता येते व गुरु हा केवळ मार्गदर्शक असतो. गुरूच्या साहाय्याने मनुष्य सांसारिक जीवनातून आध्या त्मिक जीवनात प्रवेश करू शकतो व त्याचा गर्व नष्ट होऊन तो मुक्त होतो, असे ते सांगतात. नानकांनी अंतःकरणातील भक्तिभावाचे व नामजपाचे विशेष माहात्म्य सांगितले आहे. ते म्हणतात—

**दीवा मेरा एकु नामु दुखु विचि पाइआ तेलु ।**
**उनि चानणि ओहु सोखिआ चूका जम सिउ मेलु ।।**
**पिंडु पितलि मेरी केसउ किरिआ सचु नामु करतारु ।**
**एथ ओथ आगै पाछै एहु मेरा आधारु ।।**

भावार्थ – ईश्वराचे नाम हाच एक माझा दीप आहे, त्यात दुःखरूपी तेल पडले आहे. त्या दीपाच्या प्रकाशाने ते दुःखरूपी तेल शोषून घेतले आहे व यमाची भेट टळली आहे (मृत्यूचे भय नाहीसे झाले आहे). केशव हाच श्राद्धाचे पिंड व जेवणाचे ताट होय (मृताला पिंड देणे किंवा ताट वाढून देणे हा मूर्ख पणा आहे). ईश्वराचे नाम हीच खरी अंत्यक्रिया होय. तोच सर्वत्र माझा आधार आहे.

व्रतवैकल्ये, योगसाधना यांवर गुरु नानकांचा विश्वास नव्हता. त्याविषयी ते म्हणतात –

**जोगु न खिंथा जोगु न डंडै जोगु न भसम चड़ाईऐ ।**
**जोगु न मुंदी मूंडि मुडाइऐ जोगु न सिंगी वाईऐ ।।**
**अंजन माहि निरंजन रहीऐ जोग जुगति इव पाईऐ ।।**

भावार्थ – कंथा किंवा दंड धारण करणे, भस्म लावणे, कानात मुद्रा धारण करणे, मुंडन करणे किंवा शिंग वाजवणे म्हणजे योग नव्हे, तर संसारात राहूनच त्यातील मायामोहा पासून अलिप्त राहणे (निरंजन हरीशी एकरूप होणे) हीच खरी योगसाधना होय व त्या मार्गानेच योग प्राप्त होतो.

ईश्वरप्राप्तीसाठी संन्यास किंवा वनवास पत्करावा लागत नाही, संसारात राहूनच त्याची भक्ती करायची असते. मात्र एखाद्या गोष्टीविषयी अंधश्रद्धा असू नये. ईश्वराची भक्ती करायची ती काही याचना करण्यासाठी नसून, ईश्वराशी तादात्म्य व्हावे, आपल्या मनावर विजय मिळावा, या हेतूने करायची असते, असे त्यांनी सांगितले आहे.

मानवांतील उच्चनीचता ही मूळची नसून, ती मानवानेच

निर्माण केली आहे, असे ते म्हणत इतर संतांनी परमार्थक्षेत्रा पुरता जातिभेदाचा निषेध केला, पण प्रत्यक्ष व्यवहारात जाति भेदाचे समर्थनच केले सहभोजन हे त्यांनी धर्महानीचे लक्षण मानले पण नानकांनी मात्र व्यावहारिक पातळीवरूनही जाति भेदाचा निषेध केला भक्ष्याभक्ष्य, सोवळेओवळे, स्पर्शास्पर्श हा बंधने त्यांनी कधीच मानली नाहीत या बंधनामुळेच हिंदूंना परदेशगमन निषिद्ध ठरले होते पण गुरू नानक यांना तो निर्बंधही पाळला नाही आयुष्यभर त्यांनी हे सर्व भेद नष्ट करण्याचाच प्रयत्न केला

श्रमाचे महत्त्वही नानकांनी फार सांगितले आहे आळशी व भीक मागून पोट भरणाऱ्या साधूचा त्यांना तिटकारा वाटे स्वतः कष्ट करून उदरनिर्वाह करण्याचा ते सर्वांना आग्रह करीत श्रम व दान ही परस्परपूरक आहेत, अशी त्यांची धारणा होती करतारपूर येथे ते आपल्या भक्तजनांसह शरीर श्रम करून शेतात धान्य पिकवीत होते तिथे त्यांनी साधेपणाचा, सहकाराचा व निःस्वार्थ सेवेचा महान आदर्श निर्माण केला होता

**धर्मक्रांती** – गुरू नानक यांनी जो संप्रदाय प्रवर्तित केला, त्याचे बाह्य स्वरूप भक्तिमार्गी संप्रदायासारखे असले, तरी तो प्रथमपासूनच वेगळा आहे, असे दिसून येते गुरू नानक हे प्रवृत्तिवादी होते त्यांनी निवृत्ती व संन्यास यांचा तीव्र निषेध केला आहे इतर भक्तिमार्गी साधुसंतांनी संसार, धनदौलत, वैभव यांची हेटाळणी केली आणि त्यामुळे हिंदू समाज ऐहिक उत्कर्षाविषयी उदासीन बनला नानकांनी मात्र संसारात राहूनच मोक्ष मिळविण्याचा उपदेश केला आहे संसारत्यागाला त्यांनी आपल्या पंथात स्थानच दिले नाही

गुरू नानक तत्कालीन भारताच्या परिस्थितीविषयीही उदासीन राहिले नाहीत मुसलमानी आक्रमणे जुलूम, अत्याचार यांचा इतर संत उल्लेखही करीत नाहीत त्यांना त्याबद्दल कसलीच खंत वाटत नव्हती पण गुरू नानक यांची वृत्ती तशी नव्हती त्यांनी मुस्लिम अत्याचाराचा अत्यंत जळजळीत शब्दांत धिक्कार केला आहे गुरू नानक यांनी केलेल्या धर्म परिवर्तनाचे हे विशेष लक्षण होय त्यांनी परदेशात जाऊन तिकडेही आपल्या पंथाचा प्रचार केला आणि मुसलमान लोकांनाही आपल्या पंथाची दीक्षा दिली, हे तर अलिकडच्या काळात एक अलौकिक कृत्यच समजावे लागेल या त्यांच्या विवेकनिष्ठ पुरोगामी वृत्तीमुळे गुरू नानक हे एक असामान्य संत ठरले [ सि इ , आजकल, मार्च १९५९, नानकवाणी– डॉ जयराम मिश्र १९६१, प हिं सा इ , शि इ , सू ग्र उ सा , स रा , हिं स स वि ]

## नानकशाही

शीख लोकांचा एक पंथ याला नानकपंथ असेही नाव आहे उदासी व जगियासा हे याचे उपपंथ आहेत पंजाबातील लढायांना कंटाळून जे शीख लोक सिंधमध्ये गेले त्यांनी हा वेगळा पंथ वाढवला त्यातील बहुतेक लोक लोहाणा जातीचे आहेत या लोकांत हिंदूंच आचारविचार



नानकपंथी साधू

व चालीरीती प्रचलित आहेत मात्र ते लोक मूर्तिपूजा करीत नाहीत व जातिभेदही मानीत नाहीत राजस्थानातही यांची वस्ती आहे नानकपंथी साधू भगवी वस्त्रे वापरतात व ब्रह्मचर्य पाळतात **पाहा** – शीख संप्रदाय, लोहाणा [ सिं क , रा आ ]

## नानालक्षविष्णुपूजा

एक काम्य व्रत बेल, दूर्वा, चाफा, तुलसी, इ पत्र किंवा पुष्पे अथवा धान्ये लक्षसंख्येने घेऊन विष्णूला वाहणे, असा याचा विधी आहे देवाच्या अग्रभागी पद्मे, स्वस्तिके, चक्रे इ चिन्हे ह्यांची लक्षसंख्येने रांगोळी काढणे, हेही या लक्षपूजेत बसते

ठरवलेल्या वस्तूंची लक्षसंख्या वाहून झाल्यावर मग त्या व्रताचे उद्यापन करतात त्यासाठी फुलांची गाडवी तयार करून तिच्यात एक वेदी बनवतात वेदीवर तांदळाची रास घालून

स्वतद्वीप बनवतात त्यावर कलश स्थापून त्यावरच्या पूर्णपात्रात सुवर्णाची विष्णुप्रतिमा स्थापतात आचार्यवरण करून तिल, आज्य, पायस व घृतमिश्र चरु यांचे दहा सहस्र हवन करतात तेवढेच तर्पण करतात मग ज्या वस्तूचा लक्ष वाहिला असेल, त्या वस्तूची सुवर्णप्रतिमा करून ती विष्णूला वाहतात नंतर ब्राह्मणभोजन घालून व्रत पूर्ण करतात फल – आरोग्य, विद्या, धन, पुत्र दीर्घायुष्य व अंती विष्णुलोक यांची प्राप्ती [ व्रतराज ]

## नानालक्षशिवपूजा

एक काम्य व्रत याचा प्रारंभ शिवरात्र, अष्टमी किंवा सोमवार या दिवशी करतात चंपक, मालती, तगर, कमळ, इ शिवागमोक्त फुले किंवा बिल्वदळे, नागवल्लीची पाने किंवा अखंड तांदूळ किंवा इतर धान्य किंवा रत्न, लक्ष संख्येने घेऊन शिवाला वाहणे व शिवाची पूजा करणे, हा या व्रताचा मुख्य विधी आहे जी वस्तू वाहायची, ती एकाच दिवशी वाहणे शक्य नसल्यास प्रत्यही ठराविक संख्या घेऊन लक्ष पुरा करतात दहा सहस्र संख्या वाहून झाल्यावर शिवाला एक सुवर्णपुष्प वाहून कापुराची आरती करतात लक्षपूजा पूर्ण झाल्यावर सुवर्णपुष्प समर्पून व तीन पुष्पांजली वाहून पुढील श्लोकाने प्रार्थना करतात –

**विरूपाक्ष, महेशान विश्वरूप महेश्वर ।**
**मया कृतां लक्षपूजां गृहाण वरदो भव ।।**

अर्थ – हे विरूपाक्षा महेश्वरा विश्वरूपा, मी केलेली लक्षपूजा स्वीकारून मला वर देणारा हो

उद्यापनाच्या वेळी देवाच्या वर ध्वज–पताका बांधतात आचार्यवरण करून तिलहोम करतात शिवलिंगाला पंचामृताने स्नान घालतात शिवाला दोन शुभ्र वस्त्रे समर्पण करतात नंतर यथाशक्ति ब्राह्मणभोजन घालून व्रत समाप्त करतात फल – आरोग्य, दीर्घायुष्य व शिवलोक यांची प्राप्ती [ व्रतराज ]

## नाभाक

एक सूक्तद्रष्टा ऋग्वेदाच्या आठव्या मंडलातील ३९ ते ४२ ही सूक्ते याच्या नावावर आहेत याने एका ऋचेत स्वतःचा स्पष्ट नामनिर्देश केला आहे (८ ४१ २) हा कण्व कुलातील असावा याने आपल्या सूक्तात मांधात्याचा उल्लेख केला असल्यामुळे तो मांधात्याचा उत्तरकालीन असावा वायु, भागवत व विष्णु या पुराणांतील वंशावळी-प्रमाणे हा श्रुताचा पुत्र होय मत्स्य पुराणात याला भगीरथाचा पुत्र म्हटले आहे

अग्निस्तुती व वरुणस्तुती हा त्याच्या सूक्तांचा विषय आहे नाभाकाच्या मते अग्नी हा काव्यस्फूर्तीची जोपासना करणारा आहे तो देवांमध्ये वास करतो तो सात ऋषिकुलाचा अग्रणी आहे नाभाकाने या अग्नीकडून दुष्टविनाशक शक्तीची मागणी केलेली आहे त्याबद्दलची त्याची एक ऋचा अशी –

**अग्ने नव्यसा वचस्तनूषु शंसमेषाम् ।**
**न्यराती रराव्णां विश्वा अर्यो अरातीरितो –**
**युच्छन्त्वामुरो नभन्तामन्यके समे ।।**

(ऋ ८ ३९ २)

अर्थ – हे अग्निदेवा, आमच्या अपूर्व प्रार्थनेने या (दुष्टां)चे शिव्याशाप त्यांच्या अंगातल्या अंगात जाळून टाक तसेच, दान शील भक्ताचे शत्रू आणि आर्यांचे सर्व शत्रू मूढ होऊन येथून पार निघून जावोत आणि सर्व दुष्ट नाश पावोत

याने आपली काव्य मननीय असल्याचा आत्मविश्वास एका ऋचेत व्यक्त केला आहे (ऋ ८ ३९ ३) [ प्रा च को ]

## नाभाजी

(१५७३– १६४३ इ स) एक संतचरित्रकार याचे मूळचे नाव नारायणदास असे होते याच्या जातीसंबंधी मतभेद आहेत याला कोणी नागर ब्राह्मण म्हण-तात, कोणी क्षत्रिय म्हणतात, तर कोणी डोम समजतात डोम शब्दाचा अर्थ मारवाडी भाषेत हनुमान असा होतो त्यावरून डोम म्हणजे अंत्यज नसून हनुमानवंशी ब्राह्मण होय

तेलंग देशात गोदावरीच्या तीरावर रामभद्राचल नावाचा एक पर्वत आहे तिथे रामदास नावाचा एक ब्राह्मण राहत होता त्याला हनुमंताचा अवतार समजत त्याच्या पोटी नाभाजी हा पुत्र निपजला याचे आई बाप हा लहान असतानाच व्यवसायाच्या निमित्ताने आपले गाव सोडून ग्वाल्हेर प्रांती गेले तिथे थोड्याच दिवसात त्याचा बाप मरण पावला दुर्दैवाची गोष्ट अशी, की नाभाजी हा जन्मांध होता बापाच्या मृत्यूनंतर आईने त्याचा कसाबसा सांभाळ केला पुढे त्या भागात मोठा दुष्काळ पडला त्यामुळे नाभाजीच्या आईला त्याचे पालन पोषण करणे अशक्य झाले मग ती एका झाडाखाली त्याला टाकून कुठेतरी निघून गेली

पुढे कील्हदास नावाचा साधू आपला शिष्य अग्रदास याच्या सह तिकडून जात असता या जन्मांध मुलावर त्यांची नजर पडली त्यांना नाभाजीची दया आली त्यांनी त्याला उचलून घेतले आणि जयपूरजवळच्या गलता या ठिकाणी नेले त्या साधूच्या कृपेने नाभाजीला थोड्याच दिवसात दृष्टी प्राप्त झाली मग अग्रदासाने याला उपदेश देऊन, त्याचे नारायणदास हे नाव बदलून, त्याला नाभादास हे नाव दिले नाभाजीने आपली गुरु-परंपरा रामानंद → अनंतानंद → कृष्णदास पयहारी → कील्ह-दास → अग्रदास अशी दिली आहे

अग्रदास हा रामोपासक होता त्यामुळे नाभाजीलाही तीच

उपासना मिळाली अग्रदासाच्या आज्ञेवरून त्याने भक्तमाल नावाचा ग्रंथ लिहिला या ग्रंथात अदमासे २०० संतांची चरित्रे वर्णिली आहेत त्याने हा ग्रंथ अत्यंत भाविकतेने रचला आहे हिंदी जगात तुलसीरामायणाच्या खालोखाल भक्तमालाला आदराचे स्थान आहे

त्याने आपल्या ग्रंथात रामानंद संप्रदायातील संतांचा व भक्तांचा विशेष परिचय घडवलेला आहे हा ग्रंथ रचताना नाभाजीने सांप्रदायिक क्षुद्रबुद्धी आड येऊ दिली नाही त्याने भिन्न पंथांच्या व मतांच्या संतांकडे सारख्याच आदराने व उदार तेने पाहिले आहे

हा ग्रंथ व्रज भाषेत आहे यात एकंदर १९८ छप्पय(षटपद्या) आहेत हिंदी साहित्यातील पहिला चरित्रकार म्हणून नाभा जीला विशेष मान दिला जातो या ग्रंथावर हिंदी भाषेत शेकडो टीका उपलब्ध आहेत त्यापकी प्रियादासरचित भक्ति रसबोधिनी टीका ही सर्वांत प्राचीन आहे आपण नाभाजीच्या आज्ञेनेच ही टीका लिहिली, असे त्याने म्हटले आहे या टीकेवर मातंडबुवा यांनी भक्तिप्रेमामृत या नावाची मराठी टीका लिहिली आहे

याशिवाय नाभाजीने दोन रामविषयक अष्टयाम रचले असून त्यापकी जो गद्यबद्ध आहे, तो व्रजभाषेत व जो पद्यबद्ध आहे तो अवधी भाषेत आहे त्याचा रामभक्तिपर असा एक पदसंग्रहही सांप्रत उपलब्ध झाला आहे

नाभाजी हा तुलसीदासाचा समकालीन होता तुलसीदासा विषयी त्याच्या मनात नितांत आदर वसत असे

मराठी संत चरित्रकारांनी याच्या भक्तमाल ग्रंथावरून अनेक संतांची नावे व चरित्रे घेतली आहेत [स स , भक्तनामावली, हिं सा को , ना भ –ए अ , भ च को ]

**नाभानेदिष्ठ** एक सूक्तद्रष्टा ऋग्वेदाच्या दहाव्या मंडला तील ६१ व ६२ ही सूक्ते याच्या नावावर आहेत विश्वेदेवांची प्रार्थना हा या सूक्तांचा विषय आहे हा मनूचा पुत्र होय याची कथा अशी—

हा विद्याजनासाठी गुरुगृही राहिला असता त्याच्या अनुपस्थि तीत त्याच्या तिघा भावांनी आपापसात पितृधनाची वाटणी करून घेतली पुढे नाभानेदिष्ठ घरी आला व त्याने आपल्या वाटणीबद्दल विचारले तेव्हा मनू त्याला म्हणाला 'मुला, वाटणीतच काय मोठे आहे ? तू चांगला शिकला सवरला आहेस कुठेही तुला संपत्ती मिळेल आता तुला संपत्ती पाहिजेच असेल, तर मी सांगतो तसे कर नवग्व अंगिरस इथे जवळच स्वर्गप्राप्तीसाठी यज्ञ करीत आहेत त्या यज्ञात सहा दिवस अनुष्ठान केल्यावर पुढे ते भ्रमिष्ठासारखे होतील तेव्हा तू तिथे जाऊन सव सूक्त म्हण म्हणजे त्यांचे कार्य पुरे होऊन ते तुला एक सहस्र गोधन देतील '

पित्याच्या सांगण्यावरून मग नाभानेदिष्ठ त्या यज्ञस्थळी गेला त्या यज्ञात सातव्या दिवशी गोंधळ झाला, ते हा नाभाने दिष्ठाने पुढे होऊन ' इदमित्था '(ऋ १० ६१) हे सूक्त म्हटले व त्यामुळे तो यज्ञ व्यवस्थित पार पडला नाभानेदिष्ठाच्या या विद्वत्तेवर अंगिरस प्रसन्न झाले व त्यांनी त्याला त्याच्या कामगिरीबद्दल एक सहस्र गायी दान दिल्या

नाभानेदिष्ठ गायी घेऊन घरी येत असता वाटेत त्याला वास्तोष्पती रुद्र भेटला तो रुद्र त्याला म्हणाला 'या गायी हा माझा भाग असल्यामुळे तू त्या मला देऊन टाक ' त्यावर नाभानेदिष्ठ म्हणाला 'माझ्या पित्याने त्या मला घ्यायला सांगितल्या आहेत म्हणून मी त्या तुला देणार नाही ' त्यावर रुद्र त्याला म्हणाला 'तू वडिलांना विचारून ये आणि मग मला उत्तर दे ' नाभानेदिष्ठ त्याप्रमाणे पित्याकडे गेला पित्याने त्याला सांगितले 'मुला, तो भाग रुद्राचाच आहे ' नाभानेदिष्ठाने रुद्राकडे येऊन पित्याचा निर्णय त्याला सांगितला नाभानेदिष्ठ सत्य बोलला, म्हणून रुद्र संतुष्ट झाला व त्याने त्याला त्या सव गायी बक्षीस दिल्या

याय व स य भाषण नाभानेदिष्ठाला प्रिय आहे, हे त्याच्या सूक्तावरूनही दिसते तो म्हणतो –

**मक्षू कनाया सख्य नवग्वा ऋत वदन्त ऋतयुक्तिमग्मन् ।**
**द्विबर्हसो य उप गोपमागुरदक्षिणासो अच्युता दुदुक्षन ।।**
( ऋ १२ ६१ १० )

अर्थ – याय्य भाषण करून आणि धर्माला अनुसरून योजना करणाऱ्या नवग्वांनी युवतीचे प्रेम तत्काळ संपादन केले ते जे सख्यसाची नवग्व रक्षक देवाकडे गेले, त्यांनी ऐहिक लाभाची आशा न धरता जे अचल, शाश्वत म्हणून (प्रसिद्ध) होते त्याचेच दोहन केले

याची कथा ऐतरेय ब्राह्मणाप्रमाणेच सांख्यायनब्राह्मणात व सांख्यायनश्रौतसूत्रातही आली आहे [ऋ द , प्रा च को ]

**नाभिक** भारतात सर्वत्र आढळणारी एक जात हिला न्हावी, हजाम, नाडिग, वारिक, क्षौरक, नापित, कारागीर, समुख, वालद, धायजी, मटको, केलासी, नायिंद, म्हाली, वावडी, चसकी, खवास, भंडारी, मंगल इ देशपरत्वे अनेक नावे आहेत

शिवाच्या मानेला वेढून राहिलेल्या सर्पापासून किंवा शिवा च्या नाभीपासून आपली उत्पत्ती झाली, अशी कथा ते सांगतात

हजामत करणे, नखे काढणे, तुंबड्या-जळवा लावणे व गळवे कापणे हे यांचे परंपरागत धंदे आहेत. यांच्या स्त्रिया सुईणपणा करण्यात कुशल असतात.

नाभिक जातीला संस्कृत भाषेत नापित असे नाव असून, शतपथ ब्राह्मण (३. १. २, २), कात्यायन श्रौतसूत्र (७. २. ८. १३) व आश्वलायन गृह्यसूत्र (१. १७) या ग्रंथांत ते नाव आढळते. ऋग्वेदात वप्ता हा शब्द त्या अर्थीच आलेला



नाभिक – जुन्या काळचा कारागीर

आहे (१०. १४२. ४). उशनसाने यांना ब्राह्मण व वेश्या यांची संतती आणि पराशराने ब्राह्मण पुरुष व शूद्र स्त्री यांची संतती मानले आहे.

नाभिक लोकांत अनेक पोटभेद असून, हिंदू व मुसलमान असाही एक मोठा भेद आहे.

महाराष्ट्रात यांना मुख्यत्वे न्हावी असे म्हणतात. सोलापूर–मराठवाडा भागात त्यांना वारिक व वऱ्हाडात म्हाली असे म्हणतात. न्हाव्यांची नावे, आडनावे, देवके व चालीरीती मराठ्यांप्रमाणेच आहेत. यावरून ते एकाच वंशातले असावे, असे वाटते. अजूनही काही ठिकाणी उच्च मराठ्यांच्या जेवणावळीत न्हावी पाणी वाढतो व नासिक आणि खानदेश या भागात मराठ्यांना त्यांच्या हातचा स्वयंपाक चालतो. यांच्यांत पंचायत असते. मामे बहिणीशी विवाह होतो. यांचे पुरोहित ब्राह्मण असतात. विश्वनाथ नावाच्या एका न्हाव्याने नापित पुराण नामक एक ग्रंथ रचला आहे.

महाराष्ट्रात न्हावी हा बलुतेदारांपैकी एक आहे. त्याला दर डोईमागे दोन ते चार पायल्या बलुते व हजामतीच्या दिवशी एक भाकरी मिळते. चौल, शेंडी राखणे, लग्नकार्य, इ. प्रसंगी त्याला खण, शिधा, ओटी व काही रोकड मिळते. दिवाळीच्या दिवसांत गावच्या सधन शेतकऱ्याच्या अंगाला मालिश करणे व आरसा पुढे धरणे, ही कामे न्हावी करतो आणि त्याबद्दल त्याला पैसे, कपडे वगैरे मिळतात.

सर्व बलुतेदारांत आर्थिकदृष्ट्या न्हाव्याची परिस्थिती बरी असते. शहरांत किंवा गावात काम मिळत असल्यामुळे बहुतेक गावांतील न्हावी बलुतेदारांची संख्या बेताचीच असते. त्यामुळे त्यांना पुरेसे कामही मिळते आणि बलुतेही चांगले मिळते. त्यामुळे पुष्कळ न्हाव्यांनी जमिनी खरीदल्या असून, ते शेतीही करतात.

न्हाव्यांकडे वहिवाटीने इतरही काही कामे आलेली आहेत. कोल्हापूर जिल्ह्यात देवाची पालखी वाहून नेण्याचे काम न्हाव्याचे असते. तसेच मराठवाड्यात सार्वजनिक कार्यांत मशाल धरण्याचे काम तोच करतो. गावच्या यात्रेच्या निमंत्रणपत्रिका व दिंड्या, भंडारा, इ. उत्सवाची निमंत्रणे शेजारच्या गावी तोच पोचवतो. सातारा जिल्ह्यात नागपंचमीच्या दिवशी तो मातीचे नाग करून घरोघर देतो व त्याबद्दल त्याला पसाभर धान्य आणि सणाची पोळी मिळते. नागाची सार्वजनिक पूजा तो करतो व त्याबद्दल त्याला पूजेचे उत्पन्न मिळते. प्रत्येक मोठ्या सणाला न्हावी बलुतेदार घरोघर सण मागतो.

कोल्हापूर, मराठवाडा, विदर्भ, इ.भागात लग्नाच्या निमंत्रणपत्रिका पोचवण्याचे काम तो करतो, त्याबद्दल त्याला लग्नात पटका बांधतात. जेवणाचे निमंत्रणही तोच देतो आणि त्याबद्दल त्याला जेवण व वाढणे देतात. खानदेशात लग्नप्रसंगी पाहुण्यांची ऊठबस करणे, जेवणाच्या पत्रावळी उचलणे अगर ताटे घासणे, इ. कामे न्हावी बलुतेदाराला करावी लागतात. त्याबद्दल यजमान त्याला बक्षीस म्हणून काही पैसे देतो. नागपूरकडे द्रोणपत्रावळी लावणे, अक्षता वाटणे, पानसुपारी देणे, पायावर पाणी घालणे, मशाल धरणे, इ. कामे न्हाव्याकडे असतात. त्याबद्दल त्याला कपडे व रोख पैसे मिळतात. नवरदेव बसलेला घोडा धरण्याचे व तो वेशीत आल्यावर त्याच्यासमोर आरसा धरण्याचे कामही तो करतो.

महाराष्ट्रात यांचे मराठा व कोकणी असे दोन भेद आहेत. त्यांच्यांत परस्पर रोटीबेटीव्यवहार होत नाही. मराठी न्हाव्यांचे पुन्हा गंगातीरकर किंवा गोदावरीकर, घाटी, जुनारी, कुणबी, मशालजी, वाजंत्री, इ. पोटभेद आहेत. यांपैकी कुणबी व घाटी यांच्यांत रोटीव्यवहार होतो, पण बेटीव्यवहार होत नाही. जुनारी हे जिनगर, मुसलमान, ख्रिश्चन अशा कोणाचीही हजामत करीत असल्याने कनिष्ठ प्रतीचे मानले जातात.

मराठी न्हाव्यांचा पोषाख, राहणी, खाणे-पिणे, चालीरीती व धार्मिक व्यवहार हे सर्व मराठ्यांप्रमाणेच असतात. पूर्वी हे सर्व मराठ्यांच्या लग्नात लोक जेवायला बसण्यापूर्वी व त्याचे जेवण झाल्यावर त्यांच्या हातावर पाणी घालण्याचे काम करीत आणि नववधू सासरी जाऊ लागली, की तिच्या पाठराखणी-साठी जात.

कोकणी न्हाव्यांचे मूळचे व दासीपुत्र शिंदे असे दोन भेद आहेत. सावंतवाडी भागात बंदे नामक आणखी एक न्हाव्यांचा पोटभेद आहे. हे लोक सुंता करण्याचे काम करतात व त्यामुळे ते हलक्या प्रतीचे मानले जातात. कोकणी न्हाव्यांत देवके असून एका देवकात लग्ने होत नाहीत. यांच्यांत विधवेच्या पुनर्विवा-हाची प्रथा आहे. या विवाहाचा विधी असा –

विधवाविवाहाला संमती देणाऱ्या पंचाला पाच ते दहा रुपये देतात. विधवेचा पिता गरीब असेल, तर त्याला विवाहखर्चा-साठी भावी जावई दहा ते पंचवीस रुपये देतो. नवरामुलगा लग्नाच्या आदल्या रात्री कासार, महार, पंच व काही विधवा



नाभिक – नव्या काळातील कारागीर

स्त्रिया यांना घेऊन वधुगृही जातो. तिथे तो वधूला साडी-चोळी, गळ्यातील हार, काही दागिने व तीन काळे रेशमी गोंडे देतो. मग वधू-वर एका पाटावर बसतात. दोघांपुढे एक केळीचे पान मांडतात. त्यावर तांदूळ, दुधाचा पेला व घट ठेवतात. वधू-वर घटाची पूजा करतात. कासार वधूला चुडा भरतो व एक विधवा तिच्या कपाळी कुंकू लावते. नंतर शेसविधी होतो. या वेळी वर आपले पागोटे डोक्यावरून काढून गुडघ्यावर ठेवतो. मग एक विधवा स्त्री त्याच्या गुडघ्याला कुंकू आणि अक्षता लावते. नंतर एक विधवा वधूची ओटी भरते. रात्रीच वरात वरगृही जायला निघते. वाटेत विधवेच्या मृत पतीच्या अंगणात धान्य, फळे, नारळ, तांदूळ इ. वस्तू कोणाच्या नकळत ठेवतात.

खानदेशातील न्हाव्याचे अहीर व तायदे असे दोन भेद असून त्यांच्यांत रोटीव्यवहार होतो; पण बेटीव्यवहार होत नाही. ते मशाल धरण्याचे काम करतात.

गुजरातमध्ये न्हाव्यांच्या बाबर किंवा मारवाडी, भाटिया, लिंबाचिया, मालू व मटको अशा उपजाती आहेत. यापैकी लिंबाचिया ही जात श्रेष्ठ समजली जाते. हे आपल्याला राजपूत समजतात आणि इतर जातीशी रोटीबेटी व्यवहार करीत नाहीत.

यांचा विवाहविधी कुणबी जातीच्याप्रमाणे असतो. ते कबीर, बीज, शैव, वैष्णव, इ. पंथांचे अनुयायी आहेत. तसेच ते गणपती, हनुमान, कृष्ण, महादेव व रामचंद्र या देवतांनाही भजतात.

हे मृतांना जाळतात. सौराष्ट्रात काही ठिकाणी पाच माणसे स्नान करून गळ्यात जानवी घालतात. त्यातले चौघ प्रेताची तिरडी उचलतात व एकजण पुढे मडके धरतो. बाराव्या दिवशी काही मातीची मडकी एकत्र रचून त्यांच्याभोवती दोऱ्या बांध-तात. नंतर कुंभार दोऱ्या तोडून ती मडकी मोकळी करतो आणि स्वत:ला घेतो. बाराव्या दिवशी मृताचा निकटचा आप्त रात्री आकाशात फुले उधळून चांदण्यांची पूजा करतो. इतर सर्व अंत्य-संस्कार कुणबी जमातीप्रमाणे होतात.

गुजरातेत राजपूत कुणबी जमातीत लग्ने जमवायचे व मध्य-स्थाचे काम न्हावी करतो. याशिवाय लग्नपत्रिका वाटणे, लग्नाचे अहेर पोचवणे; लग्नात द्रोण-पत्रावळी, केळीची पाने, शिधा, स्वयंपाकाची भांडी, इ. सामान गोळा करणे; प्रवेशद्वारा-वर तोरण बांधणे, जेवणानंतर पाहुण्यांना आचवण्यासाठी पाणी देणे, विडे वाटणे, दिवे पेटवणे, दिवटी धरणे, वाजंत्री वाजविणे, इ. कामे याच्याकडे असतात. या कामगिरीबद्दल त्याला नवे कपडे किंवा रोख रक्कम मिळते. एखाद्या घरी पहिला मुलगा झाला, तर न्हावी एका बाबूला कापड बांधून त्यावर मातीचे नवे मडके ठेवून त्यांच्या नातेवाइकांना ही सुवार्ता कळवतो व त्या-बद्दल बक्षिसी मिळवतो. मध्य गुजरातेत पाटीदार वर्गात अंत्य-विधीसंबंधीची सर्व व्यवस्था न्हावीच करतो. बोहरा जमातीत मेजवानीचे निमंत्रण करण्याचे काम याचेच असते.

महाराष्ट्रात आलेल्या तेलुगू न्हाव्याचे साजन व शिरबाज असे दोन भेद आहेत. याच्यात आपसात रोटीबेटीव्यवहार होत नाही. हे शैव किंवा वैष्णव असून, ब्राह्मणांच्या देव-देवताना भजतात. म्हैशम्म व येल्लम्म या यांच्या कुलदेवता आहेत. याचे धार्मिक विधी देशस्थ ब्राह्मण किंवा जंगम करतात.

मूल जन्मले, की त्याच्या डाव्याशी टोकाला लिंबू टोचलेला एक मजीर आणि छडी ठेवतात जननाशौच दहा दिवस पाळ तात मुलाचे नाव बाराव्या किंवा तेराव्या दिवशी ठेवतात

विवाहाच्या आदल्या दिवशी मारुतीच्या मंदिरात जाऊन त्याची आरती करतात विवाहाच्या दिवशी वधूच्या घरात सहा घटाची एक, अशा चार उतरडी ठेवतात नंतर काही सुवासिनी वधूला घेऊन वराच्या घरी जातात त्यांच्या बरोबर वाजंत्री किंवा पुरुषमंडळी नसतात वधू-वराना एका चटईवर एकमेकासमोर तोंड करून बसवतात व त्यांच्यामध्ये अंतरपाट धरतात मंत्रोच्चारानंतर अक्षता टाकल्या, की विवाहविधी पुरा होतो नंतर वधू-वर लहान असल्यास मुलाचा मामा मुलीला व मुलीचा मामा मुलाला आपल्या खांद्यावर घेतो व दोघेही लग्नघरापुढे नाचतात या वेळी दोघाच्या बहिणी थोडी कणिक व हळद हवेत उडवीत राहतात विवाहसमारंभात मद्यपान करतात

जातीत मृत्यू झाल्यावर ती गोष्ट सर्वांना कळवतात सध्या काळी सातनंतर मृत्यू झाल्यास सकाळपर्यंत अंत्यसंस्कार करीत नाहीत मृताला स्नान घालून घराबाहेर पाटावर बसवतात मृताला जाळतात किंवा पुरतात स्मशानातून घरी आल्यावर माणसे मृताच्या मृत्युस्थळी पेटत ठेवलेल्या दिव्यावर थोडे गवत टाकतात नंतर त्या घरच्या माणसाकडून त्याना मद्य मिळते चौथ्या दिवशी मृताचा वारस स्मशानात जातो मृताला पुरले असल्यास तो त्या जागेवरून हात फिरवतो आणि जाळले असल्यास पिंडदान करून पिंडाला कावळा शिवल्यावर घरी येतो पाचव्या दिवशी मृताला खांदा दिलेल्या माणसाना व बाराव्या किंवा तेराव्या दिवशी जातीला जेवण आणि मद्य देतात

म्हैसूर, बंगलोर व कोलार या भागातील न्हाव्याना नायिंद असे नाव आहे शिवाच्या नयनापासून आपली उत्पत्ती झाली, असे हे मानतात त्यामुळे त्याना नयनक्षत्रिय असेही म्हणतात शिवाने आपल्याला वाद्ये दिली, असे हे समजतात देवळात चौघडा सनई वाजवण्याचे काम हे करतात बहुतेक सर्व नायिं दाना तेलुगु व कानडी या भाषा येतात

थोरल्या बहिणीच्या, मामाच्या अगर आत्याच्या मुलीशी विवाह करता येतो लग्नसमारंभ शूद्राच्या पद्धतीप्रमाणे पाच सहा दिवस चालतो

हे शैव किंवा वैष्णव असून, मुनीश्वर, अक्काभाक व गंगम्म यानाही भजतात

हे मृताना बसलेल्या स्थितीत पुरतात सुतक दहा दिवस पाळतात

बंगालमध्ये न्हाव्याचा सामाजिक दर्जा बराच वरचा आहे विवाहसमारंभात ते ब्राह्मणाना मदत करतात बंगालमधील न्हावी आपल्याला सविप्र ब्राह्मण म्हणवून घेतात

सर्वसाधारणपणे हिंदू न्हावी कनिष्ठ जातीचे पौरोहित्य करतो न्हाव्याच्या हाती सर्व जातींचे डोके असल्यामुळे व सर्वांशी त्याचा निकटचा संबंध येत असल्यामुळे त्याला सर्वांचा वर्म माहीत असतात ही जात हुशार असल्याबद्दलचा तिचा प्राचीन काळापासून लौकिक आहे न्हाव्याच्या चतुराईबद्दल अनेक म्हणी व कथा अनेक भारतीय भाषात प्रचलित आहेत उदा० "पक्ष्यामध्ये जसा कावळा, तसा माणसात ये न्हावी", "सात न्हावी बहात्तर शिष्याशी तुल्यबल" इत्यादी

न्हाव्याचा संबंध उच्चवर्णीय हिंदूशी येत असला, तरी रक्त काढणे, नख कापणे, प्रेताचे नोके भादरणे, इ. गोष्टीमुळे तो कनिष्ठ दर्जाचा समजला गेला आहे त्यामुळे ब्राह्मण पुरुष हजामत केल्यावर स्नान करण्यापूर्वी घरातल्या वस्त्रप्रावरणाना शिवत नाहीत [ व इ , म इ जा , टा का बा , पुना गॅझे , म लो स , द्रा का से प्रॉ इ , म गा स ]

## नामकरण

सोळा संस्कारातील एक संस्कार ज्यात शिशूचे नाव ठेवण्याचा जो विधी व समारंभ करतात, त्याला नामकरण असे म्हणतात त्याचा विधी असा—

प्रथम यजमान आचमन-प्राणायाम करून पुढीलप्रमाणे संकल्प करतो—

**ममास्य शिशो बीजगर्भसमुद्भवैनोनिबर्हणायुरभिवृद्धिव्यव हारसिद्धिद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं नामकरणं करिष्ये ।**

अर्थ – माझ्या या शिशूच्या बीजगर्भसमुद्भव दोषाचे निरा करण होऊन त्याचे आयुष्य वाढावे व व्यवहार सिद्ध व्हावा, यासाठी आणि परमेश्वरप्रीतीसाठी मी त्याचे नामकरण करीत आहे

नंतर पुण्याहवाचन, नांदीश्राद्ध, मातृकापूजन या गोष्टी झाल्यानंतर यजमान मुलाची जी नावे ठेवायची असतील, ती तंडुलपात्रात सुवर्णशलाकेने ओळीने लिहून नामदेवतेची पूजा करतो त्या वेळी मुलाची माता मुलाला मांडीवर घेऊन यज मानाच्या उजव्या हाताला बसते मग यजमान ती लिहिलेली नावे त्या मुलाच्या कानाजवळ वाचतो मग जमलेले ब्राह्मण 'तदस्तुमित्रावरुणा ' इ मंत्र म्हणून 'अमुकनाम सुप्रतिष्ठित मस्तु' असे म्हणतात मग नाव ठेवल्याची साखर किंवा पेढे वाटतात त्यानंतर यजमान देव-ब्राह्मण व वाडवडील यांना नमस्कार करून यथाशक्ति ब्राह्मणभोजन घालतो

नामकरणात होम करण्याचीही पद्धती काही ठिकाणी आहे त्या वेळी प्रधानहोम करून मग मुलाचे नाव ठेवण्याचा समार

करतात आणि त्यानंतर अग्निमुखात सांगितल्याप्रमाणे विधी समाप्त करतात

अलिकडे नामकरणाचा धार्मिक विधी बहुधा करीत नाहीत त्याऐवजी आप्तेष्टांना व सवाष्णांना बोलावून पाळतिणीची ओटी भरतात व मुलाला पाळण्यात ठेवून त्याचे नाव ठेवतात

**नामकरणपद्धतीचा इतिहास** – मनुष्य जेव्हा एकलकोंडेपणा टाकून हळू हळू सामाजिक बनू लागला आणि आपल्या भोवती दैनंदिन व्यवहारात उपयोगी पडणाऱ्या वस्तू जमवू लागला, तेव्हा त्याला त्या त्या वस्तूचे नामकरण करण्याची गरज उत्पन्न झाली व्यक्तीचेही नामकरण केले नाही, तर व्यवहार अडतात, असे जेव्हा त्याला दिसून आले, तेव्हा त्याने माणसाचीही नावे ठेवण्यास सुरुवात केली नाव ठेवताच व्यक्ती व्यक्तीमधले व्यवहार सुरळीत होऊ लागले नावामुळे वर्णनाची गरज न उरता निश्चित व्यक्ती डोळ्यापुढे येऊ लागली हाक मारणे, बोलावणे या गोष्टी सुलभ झाल्या व्यक्तिगत नावाचे हे महत्त्व कळताच जन्मलेल्या प्रत्येक मुलामुलीला नाव ठेवणे ही गोष्ट अत्यावश्यक ठरून गेली त्यामुळे नाव ठेवणे व ते प्रसिद्ध करणे हा एक अपरिहार्य विधीच बनून गेला भारतात वदिक आर्यांनी त्या विधीला संस्काराचे रूप देऊन प्रतिष्ठित केले

शिशूला ठेवायचे नाव निश्चित करणे, ही गोष्ट त्या त्या समाजाच्या धार्मिक भावनांशी संबधित असते, असे दिसून आले आहे सामान्यत मुलाचे नाव कुलदेवतेशी किंवा आराध्यदेवतेशी संबंधित असावं, अगर प्राचीनांचा संकेत होता संत, ऋषी, मुनी, आचार्य यांच्यावरूनही नाव ठेवण्याची पद्धत होती नावे एकाहून अधिक ठेवीत लौकिक व्यवहारासाठी म्हणून एखादे लौकिक नाव ठेवले जाई आणि ते त्या व्यक्तीत अपेक्षित अशा विशिष्ट गुणाचा संकेत करणारे असे याशिवाय एखादे गुह्यनाम ठेवण्याचीही प्रथा होती,

एकाच व्यक्तीला कमीत कमी दोन नावे ठेवण्याची प्रथा वैदिक काळी व्यापक रूपात प्रचलित होती त्यांपैकी एक नाव व्यवहारासाठी व दुसरे नाव मातृक किंवा पितृक असे उदा० काण्व–मेधातिथी यांपकी पहिले नाव पतक म्हणजे कण्व या पितृनामावरून आलेले असून, मेधातिथी हे लौकिक नाव आहे भार्गव (भृगुपुत्र), मौद्गल्य (मुद्गलपुत्र), काश्यप (कश्यपपुत्र), ही नावे अशाच प्रकारची होत बृहदुक्थ वामनेय यात बृहदुक्थ हे लौकिक नाव असून, वामनेय हे वामनी या मातनामावरून निष्पन्न झालेले आहे लांबच्या एखाद्या पूर्वजावरूनही नाव ठेवण्याची प्रथा होती कौशांबेय (कौशांबी नगरीतून आलेला), गांगेय (गंगातीरावरून आलेला), काश्य (काशीचा रहिवासी), चैद्य (चेदी देशाचा रहिवासी), माथुर (मथुरेचा रहिवासी), ही स्थानदर्शक नामेही ब्राह्मणग्रंथात आढळून येतात

**नामविधान** – जन्मलेल्या शिशूचे नामकरण केलेच पाहिजे असे विधान पुढीलप्रमाणे आढळते –

**तस्मात्पुत्रस्य जातस्य नाम कुर्यात् ।**

(श ब्रा ६ १ ३ ९)

अर्थ – म्हणून मुलगा (किंवा मुलगीही) जन्मल्यावर त्याचे नामकरण करावे

पारस्कर गृह्यसूत्राच्या मते, शिशूला ठेवायचे नाव दोन अथवा चार अक्षरांचे असावे, त्याचा प्रारंभ व्यंजनाने व्हावा, त्यात अंतस्वर असावा आणि त्याच्या शेवटी विसर्ग किंवा दीर्घस्वर असावा (१ १७ १)

वसिष्ठाने दोन अथवा चार अक्षरांचेच नाव असावं आणि ते लकारान्त व रेफान्त असू नये, असे सांगितले आहे (वसिष्ठ सू ४) आश्वलायनाने नावाच्या दोन व चार अक्षरांचा कामनेशी संबंध जोडला आहे, तो असा –

**द्व्यक्षरं प्रतिष्ठाकामश्चतुरक्षरं ब्रह्मवर्चसकामः ।**

(आश्व गृ सू १ १५ ५)

अर्थ – मुलाला कीर्ती किंवा प्रतिष्ठा प्राप्त व्हावी, अशी इच्छा असेल, तर दोन अक्षरी आणि ब्रह्मवर्चस प्राप्त व्हावं अशी इच्छा असेल, तर चार अक्षरी नाव ठेवावे

मुलीचे नाव विषमाक्षरांचे व आकारान्त असावे, असे पारस्कर गृह्यसूत्रात सांगितले आहे (१ १७ ३) मुलींच्या नावाची अन्य वैशिष्ट्ये मनूने पुढीलप्रमाणे सांगितली आहेत –

**स्त्रीणां च सुखमक्रूरं विस्पष्टार्थं मनोहरम् ।**

**माङ्गल्यं दीर्घवर्णान्तमाशीर्वादाभिधानवत् ।।**

(मनु २ ३३)

अर्थ – कन्येचे नाव ठेवायचे ते उच्चारणाला सुलभ, सरळ, ऐकायला सौम्य, स्पष्टार्थक, मनोहर, मंगलसूचक, दीर्घवर्णान्त व आशीर्वादयुक्त असावे

नक्षत्र, वृक्ष, नदी, पर्वत, पक्षी व सर्प यांवरून मुलीचे नाव ठेवू नये व ते भीषण असू नये, असेही मनूने पुढे सांगितले आहे (३ ९) याशिवाय, मुलगी लग्न होऊन जेव्हा सासरी जाते, तेव्हा सासरची माणसे लक्ष्मीपूजन करून त्या नववधूचे नवे नाव ठेवतात हे तिचे दुसरे नामकरण होय

वर्णभेदाप्रमाणे नामाच्या पुढे कोणती उपपदे लावावी, ते व्यासाने पुढीलप्रमाणे सांगितले आहे –

**शर्मेति ब्राह्मणस्योक्तं वर्मेति क्षत्रियस्य तु ।**

**गुप्तदासात्मकं नाम प्रशस्तं वैश्यशूद्रयो ।।**

अर्थ – ब्राह्मणाच्या नावापुढे शर्म, क्षत्रियाच्या नावापुढे वर्म,

मूल जन्मले, की त्याच्या डोक्याशी टोकाला लिंबू टोचलेला एक खंजीर आणि छडी ठेवतात. जननाशौच दहा दिवस पाळतात. मुलाचे नाव बाराव्या किंवा तेराव्या दिवशी ठेवतात.

विवाहाच्या आदल्या दिवशी मारुतीच्या मंदिरात जाऊन त्याची आरती करतात. विवाहाच्या दिवशी वधूच्या घरात सहा घटांची एक, अशा चार उतरंडी ठेवतात. नंतर काही सुवासिनी वधूला घेऊन वराच्या घरी जातात. त्यांच्या बरोबर वाजंत्री किंवा पुरुषमंडळी नसतात. वधू-वरांना एका चटईवर एकमेकांसमोर तोंड करून बसवतात व त्यांच्यामध्ये अंतरपाट धरतात. मंत्रोच्चारानंतर अक्षता टाकल्या, की विवाहविधी पुरा होतो. नंतर वधू–वर लहान असल्यास मुलाचा मामा मुलीला व मुलीचा मामा मुलाला आपल्या खांद्यावर घेतो व दोघेही लग्नघरापुढे नाचतात. या वेळी दोघांच्या बहिणी थोडी कणिक व हळद हवेत उडवीत राहतात. विवाहसमारंभात मद्यपान करतात.

जातीत मृत्यू झाल्यावर ती गोष्ट सर्वांना कळवतात. संध्याकाळी सातनंतर मृत्यू झाल्यास सकाळपर्यंत अंत्यसंस्कार करीत नाहीत. मृताला स्नान घालून घराबाहेर पाटावर बसवतात. मृताला जाळतात किंवा पुरतात. स्मशानातून घरी आल्यावर माणसे मृताच्या मृत्युस्थळी पेटत ठेवलेल्या दिव्यावर थोडे गवत टाकतात. नंतर त्या घरच्या माणसांकडून त्यांना मद्य मिळते. चौथ्या दिवशी मृताचा वारस स्मशानात जातो. मृताला पुरले असल्यास तो त्या जागेवरून हात फिरवतो आणि जाळले असल्यास पिंडदान करून पिंडाला कावळा शिवल्यावर घरी येतो. पाचव्या दिवशी मृताला खांदा दिलेल्या माणसांना व बाराव्या किंवा तेराव्या दिवशी जातीला जेवण आणि मद्य देतात.

म्हैसूर, बंगलोर व कोलार या भागातील न्हाव्यांना नायिंद असे नाव आहे. शिवाच्या नयनापासून आपली उत्पत्ती झाली, असे हे मानतात. त्यामुळे त्यांना नयनक्षत्रिय असेही म्हणतात. शिवाने आपल्याला वाद्ये दिली, असे हे समजतात. देवळात चौघडा-सनई वाजवण्याचे काम हे करतात. बहुतेक सर्व नायिंदांना तेलुगू व कानडी या भाषा येतात.

थोरल्या बहिणीच्या, मामाच्या अगर आत्याच्या मुलीशी विवाह करता येतो. लग्नसमारंभ शूद्रांच्या पद्धतीप्रमाणे पाचसहा दिवस चालतो.

हे शैव किंवा वैष्णव असून, मुनीश्वर, अक्कागारू व गंगम्म यांनाही भजतात.

हे मृतांना बसलेल्या स्थितीत पुरतात. सुतक दहा दिवस पाळतात.

बंगालमध्ये न्हाव्यांचा सामाजिक दर्जा बराच वरचा आहे. विवाह-समारंभात ते ब्राह्मणांना मदत करतात. बंगालमधील न्हावी आपल्याला सविप्र ब्राह्मण म्हणवून घेतात.

सर्वसाधारणपणे हिंदू न्हावी कनिष्ठ जातीचे पौरोहित्य करतो.

न्हाव्याच्या हाती सर्व जातींचे डोके असल्यामुळे व सर्वांशी त्याचा निकटचा संबंध येत असल्यामुळे त्याला सर्वांची वर्मे माहीत असतात. ही जात हुषार असल्याबद्दलचा निचा प्राचीन काळापासून लौकिक आहे. न्हाव्यांच्या चतुराईबद्दल अनेक म्हणी व कथा अनेक भारतीय भाषांत प्रचलित आहेत. उदा० ‘पक्ष्यांमध्ये जसा कावळा, तसा माणसामध्ये न्हावी.’ ‘सात न्हावी बहात्तर शिंप्यांशी तुल्यबल’ इत्यादी.

न्हाव्याचा संबंध उच्चवर्णीय हिंदूशी येत असला, तरी रक्त काढणे, नखे कापणे, प्रेताचे डोके भादरणे, इ. गोष्टीमुळे तो कनिष्ठ दर्जाचा समजला गेला आहे. त्यामुळे ब्राह्मण पुरुष हजामत केल्यावर स्नान करण्यापूर्वी घरातल्या वस्त्राप्रावरणांना शिवत नाहीत. [ ये. इं.; मुं. इ. जा.; ट्रा. का. बा.; पुना गॅझे.; म. लो. सं.; ट्रा. का. सें. प्रॉ. इं.; म. ग्रा. स. ]

**नामकरण** सोळा संस्कारांतील एक संस्कार. नवजात शिशूचे नाव ठेवण्याचा जो विधी व समारंभ करतात, त्याला नामकरण असे म्हणतात. त्याचा विधी असा–

प्रथम यजमान आचमन–प्राणायाम करून पुढीलप्रमाणे संकल्प करतो–

**ममास्य शिशोः बीजगर्भसमुद्‌भवैनोनिबर्हणायुरभिवृद्धिव्यवहारसिद्धिद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं नामकरणं करिष्ये ।**

अर्थ – माझ्या या शिशूच्या बीजगर्भसमुद्‌भव दोषांचे निराकरण होऊन त्याचे आयुष्य वाढावे व व्यवहार सिद्ध व्हावा, यासाठी आणि परमेश्वरप्रीतीसाठी मी त्याचे नामकरण करीत आहे.

नंतर पुण्याहवाचन, नांदीश्राद्ध, मातृकापूजन या गोष्टी झाल्यानंतर यजमान मुलाची जी नावे ठेवायची असतील, ती तंडुलपात्रात सुवर्णशलाकेने ओळीने लिहून नामदेवतेची पूजा करतो. त्या वेळी मुलाची माता मुलाला मांडीवर घेऊन यजमानाच्या उजव्या हाताला बसते. मग यजमान ती लिहिलेली नावे त्या मुलाच्या कानाजवळ वाचतो. मग जमलेले ब्राह्मण ‘तदस्तुमित्रावरुणा…’ इ. मंत्र म्हणून ‘अमुकनाम सुप्रतिष्ठितमस्तु’ असे म्हणतात. मग नाव ठेवल्याची साखर किंवा पेढे वाटतात. त्यानंतर यजमान देव-ब्राह्मण व वाडवडील यांना नमस्कार करून यथाशक्ति ब्राह्मणभोजन घालतो.

नामकरणात होम करण्याचीही पद्धती काही ठिकाणी आहे. त्या वेळी प्रधानहोम करून मग मुलाचे नाव ठेवण्याचा समारंभ

करतात आणि त्यानंतर अग्निमुखात सांगितल्याप्रमाणे विधी समाप्त करतात.

अलिकडे नामकरणाचा धार्मिक विधी बहुधा करीत नाहीत. त्याऐवजी आप्तेष्टांना व सवाष्णींना बोलावून बाळंतिणीची ओटी भरतात व मुलाला पाळण्यात ठेवून त्याचे नाव ठेवतात.

**नामकरणपद्धतीचा इतिहास** – मनुष्य जेव्हा एकलकोंडेपणा टाकून हळू हळू सामाजिक बनू लागला आणि आपल्या-भोवती दैनंदिन व्यवहारात उपयोगी पडणाऱ्या वस्तू जमवू लागला, तेव्हा त्याला त्या त्या वस्तूचे नामकरण करण्याची गरज उत्पन्न झाली. व्यक्तींचेही नामकरण केले नाही, तर व्यवहार अडतात, असे जेव्हा त्याला दिसून आले, तेव्हा त्याने माणसांचीही नावे ठेवण्यास सुरुवात केली. नाव ठेवताच व्यक्ती-व्यक्तींमधले व्यवहार सुरळीत होऊ लागले. नावामुळे वर्णनाची गरज न उरता निश्चित व्यक्ती डोळ्यापुढे येऊ लागली. हाक मारणे, बोलावणे या गोष्टी सुलभ झाल्या. व्यक्तिगत नावाचे हे महत्त्व कळताच जन्मलेल्या प्रत्येक मुलामुलीला नाव ठेवणे ही गोष्ट अत्यावश्यक बनून गेली. त्यामुळे नाव ठेवणे व ते प्रसिद्ध करणे हा एक अपरिहार्य विधीच बनून गेला. भारतात वैदिक आर्यांनी त्या विधीला संस्काराचे रूप देऊन प्रतिष्ठित केले.

शिशूला ठेवायचे नाव निश्चित करणे, ही गोष्ट त्या त्या समाजाच्या धार्मिक भावनांशी संबंधित असते, असे दिसून आले आहे. सामान्यतः मुलाचे नाव कुलदेवतेशी किंवा आराध्यदेव-तेशी संबंधित असावे, असा प्राचीनांचा संकेत होता. संत, ऋषी, मुनी, आचार्य यांच्यावरूनही नाव ठेवण्याची पद्धत होती. नावे एकाहून अधिक ठेवीत. लौकिक व्यवहारासाठी म्हणून एखादे लौकिक नाव ठेवले जाई आणि ते त्या व्यक्तीत अपेक्षित अशा विशिष्ट गुणांचा संकेत करणारे असे. याशिवाय एखादे गुह्यनाम ठेवण्याचीही प्रथा होती,

एकाच व्यक्तीला कमीत कमी दोन नावे ठेवण्याची प्रथा वैदिक काळी व्यापक रूपात प्रचलित होती. त्यांपैकी एक नाव व्यवहारासाठी व दुसरे नाव मातृक किंवा पितृक असे. उदा० काण्व–मेधातिथी. यांपैकी पहिले नाव पैतृक म्हणजे कण्व या पितृनामावरून आलेले असून, मेधातिथी हे लौकिक नाव आहे. भार्गव (भृगुपुत्र), मौद्गल्य (मुद्गलपुत्र), काश्यप (कश्यप-पुत्र), इ. नावे अशाच प्रकारची होत. बृहदुक्थ वामनेय यात बृहदुक्थ हे लौकिक नाव असून, वामनेय हे वामनी या मातृनामा-वरून निष्पन्न झालेले आहे. लांबच्या एखाद्या पूर्वजावरूनही नाव ठेवण्याची प्रथा होती. कौशांबेय (कौशांबी नगरीतून आलेला), गांगेय (गंगातीरावरून आलेला), काश्य (काशीचा रहिवासी), चैद्य (चेदी देशाचा रहिवासी), माथुर (मथुरेचा रहिवासी), इ. स्थानदर्शक नामेही ब्राह्मणग्रंथांत आढळून येतात.

**नामविधान** – जन्मलेल्या शिशूचे नामकरण केलेच पाहिजे असे विधान पुढीलप्रमाणे आढळते –

**तस्मात्पुत्रस्य जातस्य नाम कुर्यात् ।**

(श. ब्रा. ६. १. ३. ९)

अर्थ – म्हणून मुलगा (किंवा मुलगीही) जन्मल्यावर त्याचे नामकरण करावे.

पारस्कर गृह्यसूत्राच्या मते, शिशूला ठेवायचे नाव दोन अथवा चार अक्षरांचे असावे, त्याचा प्रारंभ व्यंजनाने व्हावा, त्यात अर्धस्वर असावा आणि त्याच्या शेवटी विसर्ग किंवा दीर्घस्वर असावा (१. १७. १).

वसिष्ठाने दोन अथवा चार अक्षरांचेच नाव असावे आणि ते लकारान्त व रेफान्त असू नये, असे सांगितले आहे (वसि. ध. सू. ४). आश्वलायनाने नावाच्या दोन व चार अक्षरांचा कामनेशी संबंध जोडला आहे, तो असा –

**द्व्यक्षरं प्रतिष्ठाकामश्चतुरक्षरं ब्रह्मवर्चसकामः ।**

(आश्व. गृ. सू. १. १५. ५)

अर्थ – मुलाला कीर्ती किंवा प्रतिष्ठा प्राप्त व्हावी, अशी इच्छा असेल, तर दोन अक्षरी आणि ब्रह्मवर्चस प्राप्त व्हावे अशी इच्छा असेल, तर चार अक्षरी नाव ठेवावे.

मुलीचे नाव विषमाक्षरांचे व आकारान्त असावे, असे पारस्कर गृह्यसूत्रात सांगितले आहे (१. १७. ३). मुलीच्या नावाची अन्य वैशिष्ट्ये मनूने पुढीलप्रमाणे सांगितली आहेत –

**स्त्रीणां च सुखमक्रूरं विस्पष्टार्थं मनोहरम् ।**
**माङ्गल्यं दीर्घवर्णान्तमाशीर्वादाभिधानवत् ।।**

(मनु. २. ३३)

अर्थ – कन्येचे नाव ठेवायचे ते उच्चारणाला सुलभ, सरळ, ऐकायला सौम्य, स्पष्टार्थक, मनोहर, मंगलसूचक, दीर्घवर्णान्त व आशीर्वादयुक्त असावे.

नक्षत्र, वृक्ष, नदी, पर्वत, पक्षी व सर्प यांवरून मुलीचे नाव ठेवू नये व ते भीषण असू नये, असेही मनूने पुढे सांगितले आहे (३.९). याशिवाय, मुलगी लग्न होऊन जेव्हा सासरी जाते, तेव्हा सासरची माणसे लक्ष्मीपूजन करून त्या नववधूचे नवे नाव ठेवतात. हे तिचे दुसरे नामकरण होय.

वर्णभेदाप्रमाणे नामाच्या पुढे कोणती उपपदे लावावी, ते व्यासाने पुढीलप्रमाणे सांगितले आहे –

**शर्मेति ब्राह्मणस्योक्तं वर्मेति क्षत्रियस्य तु ।**
**गुप्तदासात्मकं नाम प्रशस्तं वैश्यशूद्रयोः ।।**

अर्थ – ब्राह्मणाच्या नावापुढे शर्म, क्षत्रियाच्या नावापुढे वर्म,

असलेल्या या भागाला मणिकूट असे म्हणतात. मणिकूट म्हणजे मूल्यवान वस्तूंचे भांडार होय. या मणिकूटात हस्तलिखित पोथ्या, उपकरणी भांडी, इ. मूल्यवान वस्तू ठेवलेल्या असतात. बहुतक नामघरात भागवताची पोथी पूज्य म्हणून ठेवलेली असते, तर काही नामघरात जगन्नाथाच्या मूर्तीची स्थापना केलेली असते. बारपेटा विभागातील नामघरातील मणिकूटाला नामघर (अत्यंत उतरत्या छपराचे घर) किंवा भारालघर (भांडार-गृह) अशीही नावे आहेत.

नामघरात दुपारी स्त्रिया आणि सायंकाळी पुरुष भजन आणि नामस्मरण करतात. तिथे एक दीप सतत तेवत ठेवतात. नाम-घरासमोरच्या प्रांगणात सभासमेलनेही होतात. नामघरे ही आसाममधील सांस्कृतिक जीवनातील एक महत्त्वपूर्ण संस्था आहे. ही नामघरे आसामात गावोगावी आहेत. वैष्णव साधूंनी स्वहस्ते बांधलेली, शोभाने स्वच्छ सारवलेली आणि शंकरदेव व माधवदेव यांच्यासारख्या महान वैष्णवाच्या कीर्तनघोषाने नित्य दुमदुमणारी ती नामघरे आसामी जीवनातील वैष्णव प्रभावाची ग्वाही देत आहेत. पाहा – सत्र. [ श. हि. टा. ]

## नामजप

नवविधा भक्तीतला तिसरा प्रकार. याला नाम-संकीर्तन व नामस्मरण असेही म्हणतात. भगवंताच्या ज्या रूपाविषयी प्रेम, आदर आणि भक्तिभाव असेल त्या रूपाचे नाम विशिष्ट संख्येने विशिष्ट वेळात जेवढे घडेल तेवढे किंवा अखंडपणे जपणे याला नामजप असे म्हणतात.

ईश्वरप्राप्तीचे रोकडे साधन म्हणजे नामस्मरण असे सकल संतांनी बाहू उभारून सांगितले आहे. त्या सांगण्यात त्यांचा स्वानुभवही आहे. चित्ताचा प्रवाह आत्म्याकडे वळवण्याची जी अनेक साधने आहेत, त्यात नामस्मरणाचे स्थान फार मोठे आहे. चित्ताला ज्याचे ध्यान होते, त्याचा आकार ते घेते, हा सिद्धान्त आहे. चित्ताचा प्रवाह विषयाकडे वळला, विषयांचेच चिंतन सुरू झाले, की चित्त विषयाकार होते. यामुळे दुःख व पाप यांची विषवल्ली फोफावते आणि देहबुद्धी प्रबळ होते. पण तोच प्रवाह ईश्वराकडे वळवला, ईश्वराचेच चिंतन सुरू झाले की देहबुद्धी गळून आत्मबुद्धी प्रभावी होते. त्या आत्मबुद्धीने आत्मानंदाची अमृतवल्ली वाढीस लागते.

रोज काही वेळ तरी ईश्वराचे नामस्मरण केले पाहिजे. त्यामुळे काही काळाने या नामस्मरणात गोडी वाटू लागते. हे सुख विषयेंद्रियसंयोगापासून उत्पन्न होणाऱ्या सुखापेक्षा श्रेष्ठ प्रतीचे असते. त्या सुखाची चव जसजशी वाढत जाते, तसतशी विषया-विषयी अप्रीती आणि आत्मसुखाविषयी ओढ वाटू लागते. आत्मसुखाची ही ओढ जसजशी वाढत जाते तसतसे त्या साधकाच्या हातून नामस्मरण अधिक आस्थेने होऊ लागते. त्यामुळे चित्त विषयातून बाहेर निघून ईश्वरात प्रविष्ट होण्याच्या मार्गाला लागते. ही प्रक्रिया वाढत्या वेगाने सुरू होऊन ती पूर्णतेला गेली की विषयांचा सर्वभावे त्याग होऊन, जीव पूर्णतः ईश्वरात प्रविष्ट होऊन ब्रह्मानंदाचा अधिकारी होतो. नामस्मरण, त्याचा आनंद, त्यामुळे विषयासंबंधी अरुची, त्यामुळे देहबुद्धीचा त्याग, त्या जागी आत्मबुद्धीची प्रतिष्ठा व शेवटी ब्रह्मानंदाचा लाभ अशी ही साधनप्रणाली आहे. नाम-स्मरणाची ही श्रेष्ठता ज्ञानेश्वरांनी सांगितली आहे (ज्ञाने. १२. १०५–१०९).

'आचारहीनं न पुनन्ति वेदाः' = आचारहीन मनुष्याला वेद पावन करीत नाहीत, असे एक वचन आहे. पण नामजप हा दुराचारी माणसाचाही उद्धार करू शकतो. केवळ वेदाधि-कारी लोकांनाच नव्हे, तर वेदबाह्य लोकांनाही पावन करण्याचे सामर्थ्य नामात आहे, असे सांगताना नारद पुराणात म्हटले आहे, ते असे–

**वेदमार्गबहिष्ठानां जनानां पापकर्मणाम् ।**
**मनःशुद्धिविहीनानां हरिनामैव निष्कृतिः ॥**

अर्थ– जे वेदमार्गाच्या बाहेर आहेत व ज्यांची मनःशुद्धी झाली नाही, अशा पापकर्मी जनांचा हरिनामानेच उद्धार होतो.

'*अक्षरं हन्त्यायुष्यं विस्वरं व्याधिपीडितम्*' = वेदाक्षर अशुद्ध उच्चारले तर आयुष्य कमी होते व स्वरहीन उच्चार त्यास व्याधी प्राप्त होतात, असे पाणिनीय शिक्षेत सांगितले आहे. पण नामाच्या बाबतीत हा नियम लागू नाही. ते अशुद्ध उच्चारले गेले, तरी पाप जाळून टाकते. याविषयी पंचरात्रा-गमात एक श्लोक आहे, तो असा–

**मूर्खो वदति विष्णाय बुधो वदति विष्णवे ।**
**नम इत्येवमर्थं च द्वयोरपि समं फलम् ॥**

*अर्थ – मूर्ख मनुष्य 'विष्णाय नमः' असे (अशुद्ध) म्हणतो* व विद्वान मनुष्य 'विष्णवे नमः' म्हणतो, पण दोघांचाही उद्देश नमनाचाच असल्यामुळे त्यांना फल सारखेच मिळते.

स्मरण व ध्यान या गोष्टीही नामजपाने घडू शकतात. शंकराचार्य याविषयी आपल्या विष्णुसहस्रनामाच्या भाष्यात लिहितात–

**मनसा वा अग्रे सङ्कल्पयत्यथ वाचा व्याहरति । यद्धि मनसा ध्यायति तद्वाचा वदति । इति श्रुतिभ्यां स्मरणं ध्यानं च नामसङ्कीर्तनान्तर्भूतम् ।**

अर्थ – (मनुष्य) मनाने प्रथम संकल्प करतो आणि मग वाणीने तो उच्चारतो. जे मनाने ध्यानात आणतो ते वाणीने बोलतो. या दोन श्रुतिवचनांवरून स्मरण व ध्यान या गोष्टी

नामसंकीर्तनात अंतर्भूत आहेत.

भारतातील सकल संत नामजपाचा अत्यंत विश्वासाने आणि आदराने पुरस्कार करतात. याविषयीची काही संत वचने अशी–

> **नित्य नैमित्तिक कर्म । जया न घडे हा धर्म ।**
> **तेणे उच्चारावे नाम । सत्य निर्धार जाणावा ।।**
> **नामे कर्माची सुटे उपाधि । नामे तुटे आधिव्याधि ।**
> **नामे शोकसंदेह बुद्धि । नासतसे हरिनामे ।।**
>
> –एकनाथ

> **नको कंठ शोषू बहू वेदपाठी**
> **नको तू पडू साधनाच्या कपाटीं ।**
> **कसा कोण तो नेणवे आजपारे**
> **'हरे नाम' हा मंत्र सोपा जपा रे ।।**
>
> –रामदास

> **उमगे वलबावल काम घटा गुरुग्यानका बाण समालो ।।**
> **कदलीबनसे हस्ती आया वे अंकुश फिर मारो ।।**
> **कहत कबीर सुनो भाइ साधो तुम जीती बाजी हरो ।।**
>
> –कबीर

भावार्थ– अंतःकरणात काम क्रोधाचे मेघ आयबून येत आहेत. गुरुग्यानाचा म्हणजेच नामाचा बाण सांभाळ. कदलीवनातून अहंकाराचा मस्त हत्ती अंगावर चालून येत आहे. नामस्मरणाचा अंकुश मारून त्याला परत फिरव. तुला अनेक वेळा या बाजीत अपयश येईल, पण कबीर म्हणतो, आपण खास जिंकणार या विजिगीषू वृत्तीने हे तात्पुरते अपयश सहन कर.

**कर्मसादगुण्याचा अभाव** – सादगुण्य म्हणजे सफलता. वेदोक्त कर्मातले दोष काढून टाकून त्याला सादगुण्य प्राप्त होण्यासाठी नामाची आवश्यकता असते. म्हणूनच कर्माच्या अंती विष्णुस्मरण करावे, असे सांगितले आहे. नाम सफल करण्याकरिता मात्र कर्माची आवश्यकता नाही. याविषयी गुलाबराव महाराज म्हणतात, ते असे–

> **आणि बोलिलें सर्व पुराणी । कर्मसादृगुण्य नाही नामालागुनी ।**
> **तो ही श्लोक एक श्रवणीं । मन करोनी सावध ।।**
> **करो न करो अन्य कर्म । जपयज्ञेंचि गति पावे परम ।**
> **महापातकीही जपेंचि धर्म । पावती हे तेथचि बोलिलें ।।**

भक्तिमार्गात श्रद्धा ही मूलभूत असते. जपतपहोमादि कर्मकांडातही श्रद्धेची आवश्यकता असतेच. श्रद्धाविरहित केलेली होम, दान, तप, इ. कर्मे असद्रूप ठरतात, असे गीतेत म्हटले आहे (१७.२८). नामजपात ही श्रद्धा असली तर तो दुग्धशर्करायोगच ठरेल, पण अश्रद्धेनेही केलेला नामजप विफल ठरत नाही, असे नारद पुराणात म्हटले आहे –

> **अश्रद्धयापि यन्नाम्नि कीर्तितेऽथ स्मृतेऽपि वा ।**
> **विमुक्त पातकैर्मर्त्यो लभते पदमव्ययम् ।।**
> **संसारघोरकान्तारदावाग्निर्मधुसूदन ।**
> **स्मरतां सर्वपापानि नाशयत्याशु सत्तम ।।**

*अर्थ – अश्रद्धेनेही भगवंताचे नामसंकीर्तन किंवा नामस्मरण केले तरी मनुष्य पातकातून मुक्त होऊन अविनाशी पद प्राप्त करून घेतो.* श्रीहरी हा संसाररूपी घोर अरण्याचा दावाग्नी आहे. तो सर्व श्रेष्ठ पुरुषोत्तम नामस्मरण करणाऱ्या मनुष्याची सर्व पापे नष्ट करतो.

नामात संकल्पापक्षय करण्याची व सर्व मनोरथ पूर्ण करण्याची स्वतंत्र शक्ती आहे. नाम हे ब्रह्मरूप किंवा भगवद्रूप असल्यामुळे त्याच्या ठिकाणी ही शक्ती आली आहे. नाम हा परमात्म्याचा अनध्यस्त विवर्त आहे. अधिष्ठानभूत अशा रज्जूवर भ्रमाने सर्परूप दुसरा पदार्थ दिसणे याला विवर्त म्हणतात. अधिष्ठानज्ञानाचा लोप होऊन त्यावर दुसऱ्या विजातीय वस्तूचा भास होणे म्हणजेच रज्जुज्ञानाचा लोप होऊन त्या ठिकाणी विजातीय सर्पाचा भास होणे याला अध्यस्त विवर्त म्हणतात. अधिष्ठानज्ञानाचा लोप न होता त्यावर दुसरी वस्तू भासणे याला अनध्यस्त विवर्त म्हणतात. सुवर्णावर अलंकाराचा भास हा अनध्यस्त विवर्त होय. यात सुवर्णज्ञानाचा लोप न होता त्यावर अलंकार दिसू लागतात. परमात्म्याचे अवतार *विग्रह (सगुणदेह) हे अनध्यस्त विवर्तच आहेत. कारण अव*तारामध्ये परब्रह्म वाच्या ज्ञानासहित अवताररूप भासते. त्याचप्रमाणे भगवंताची नामे ही ब्रह्माचे अनध्यस्त विवर्त होत. भगवंताची नामे भगवंताहून भिन्न नसून ती भगवद्रूपच आहेत, अशी गुलाबराव महाराजांनी नामब्रह्माची मीमांसा केली आहे.

नामजपाला देशकालाचे बंधन नाही, तसेच शुचित्व अशुचित्व किंवा सोवळे – ओवळे याचाही निर्बंध नाही. याविषयी वैश्वानरसंहितेत पुढील श्लोक आहे–

> **न देशकालनियमः शौचाशौचविनिर्णयः ।**
> **परं संकीर्तनादेव राम रामेति मुच्यते ।।**

अर्थ– नामसंकीर्तनाला देश कालाचा नियम व शौचाशौचाचा निर्बंध नाही. राम राम या (सार्वकालिक) नामसंकीर्तनाने मनुष्य मुक्त होतो.

नारद पुराणात विष्णूच्या नामसंकीर्तनाचे माहात्म्य पुढील प्रमाणे सांगितले आहे–

> **कालोऽस्ति यज्ञदाने वा स्नाने कालोऽस्ति सज्जपे ।**
> **विष्णुसङ्कीर्तने कालो नास्त्यत्र पृथिवीपते ।।**

अर्थ– यज्ञ, दान, स्नान, जप यांना कालशुद्धीची आवश्यकता असते. पण हे राजा, विष्णूच्या नामस्मरणाला मात्र कालाचे

कोणतेही बंधन नाही. ते सर्व काली जपले तरी चालते.

**ज्ञानी पुरुषालाही नामस्मरण आवश्यक**– मुमुक्षूला किंवा साधकाला नामस्मरण हे ज्ञान प्राप्त करून देणारे आहे; तसेच ते ज्ञानी पुरुषाला ज्ञानाचा परिपाक करून देणारे आहे. ज्ञानातही कोमल अपरोक्ष व दृढ अपरोक्ष असे दोन भेद आहेत. साधकावस्थेत गुरू व शास्त्र यांच्या द्वारे परोक्ष ज्ञान झाल्यावर ते अपरोक्ष होण्यासाठी चित्ताचे मलविक्षेपादी दोष घालवावे लागतात. याला कोमल अपरोक्ष म्हणतात. तसेच अपरोक्ष ज्ञानाचा उदय झाल्यानंतर ते दृढ होण्यासाठी पुनश्च नामस्मरणच करावे लागते. याला दृढ अपरोक्ष म्हणतात. ज्ञान परिपक्व झाल्यानंतर नामस्मरण करणे, ही मग त्या ज्ञानी पुरुषाची सहजलीलाच होऊन बसते. गुलाबराव महाराजांनी संप्रदायसुरतरूच्या दुसऱ्या अध्यायात हा विषय स्पष्ट केला आहे.

**नामापराध** – पद्म पुराणात सनत्कुमारांनी नारदाला नामविषयक अपराध पुढीलप्रमाणे सांगितले आहेत– (१) साधुनिंदा (२) हरिहरांच्या नाम-रूप-गुणांत भेद मानणे (३) गुरुजनांची अवज्ञा (४) वेद-शास्त्र-पुराणांची निंदा (५) नाममाहात्म्याला अर्थवाद समजण म्हणजे नामाची रुची उत्पन्न होण्यासाठी त्याचे अवास्तव वर्णन केले गेले आहे, असे म्हणणे (६) नामाच्या बळावर पापाचरण करणे (७) व्रतदानयज्ञादी शुभ कर्मांना नामाच्या तोडीची मानणे (८) भाव, श्रद्धा व श्रवणाची अभिरुची नसलेल्याला आग्रहपूर्वक नामाचा उपदेश करणे (९) नामाचे माहात्म्य समजूनही त्याच्या ठिकाणी श्रद्धा न धरणे व (१०) अहंता, ममता, इ. विकारांत गुरफटून जाणे (पद्म पु. ब्रह्म. २५).

वरील दहा अपराध म्हणजे नामस्मरणाची अपथ्ये होत. नामधारकाने ही अपथ्ये टाळावी आणि आपला नामसंकीर्तनाचा मार्ग निष्कंटक करावा.

**नामाची तात्त्विक भूमिका** – आधुनिक साक्षात्कारी सत्पुरुष प्रा. रा. द. रानडे यांचाही नामजपावर विशेष भर होता. त्याविषयींचे त्यांचे विचार प्रा. शं. गो. तुळपुळे यांनी पुढीलप्रमाणे मांडले आहेत–

'नामस्मरण परावाणीने (आंतरध्यान), एकाग्रतेने, दीर्घ काल, निरंतर व सत्कारपूर्वक करणे हे प्रा. रानडे यांच्या नामस्मरणविषयक क्रियेतील पंचशीलच होय. अशा रीतीने नामस्मरण केल्यास देवाचे रूप आपोआप प्रकट होईल, किंबहुना नाम आणि रूप या दोन्ही देवाच्याच उपाधी किंवा गुणधर्म असून, दोन डोळ्यांना एकच वस्तू दिसावी, किंवा दोन कानांना एकच नाद ऐकू यावा, याप्रमाणे या दोहींनी एकच आत्मतत्त्व व्यक्त होते. 'नाम तेचि रूप, रूप तेचि नाम। नामरूपां भेद नाही नाही' असे संतवचनही आहे. याच अभिप्रायाने जे नाम मुद्दाम स्मरावे लागत नाही, तर जे अनुभवाच्या रूपाने आपोआप प्रकट होते, ते खरे 'अजर, अमर' नाम होय, असे कबीर म्हणतात. आत्मसाक्षात्कारी पुरुषाकडून मिळालेले सबीज नाम आठवले असता देवरूपाने प्रकट होण्याचा हा 'सोनियाचा दिवस' खऱ्या साधकाच्या आयुष्यात निश्चितपणे उगवेल, असे आश्वासन प्रा. रानडे यांच्या नामस्मरणमार्गात आहे.

प्रा. ग. वि. तुळपुळे यांनी नामजपाचे शास्त्रीय विवेचन करताना पुढील विचार मांडले आहेत–

ईश्वराचे नामस्मरण व प्रपंचातील गोष्टींचे नामस्मरण यांत मानसशास्त्राच्या दृष्टीने बरेच साम्य आहे. एखाद्या मातेने आपल्या मुलाचे नाव उच्चारताच किंवा एकताच त्या पुत्राविषयी प्रेम, वात्सल्य, आनंद, चिंता, आकांक्षा अशा अनेक भावना तिच्या अंतःकरणात जागृत होतात. याचे कारण असे, की नामी जो पुत्र त्याच्याबद्दलच्या सर्व भावना नामाला चिकटलेल्या असतात व श्रवण किंवा स्मरण होताच त्या जागृत होतात. पुत्राचे स्मरण प्रयत्नाने करावे लागत नाही. ते सदा सर्वकाळ आपोआप होत असते. ते स्मरण ही तिच्या जीवनातली एक प्रभावी शक्ती बनते. एखादी माता पुत्रासाठी सर्वस्वाचा त्याग करायला सिद्ध होते, ती या प्रभावी शक्तीमुळेच होय. ईश्वराच्या नामस्मरणातली मानसिक प्रक्रियाही हीच आहे. नामस्मरण करणाऱ्या व्यक्तीत कळत नकळत ईश्वराविषयी काही भावना किंवा कल्पना असतात. त्याच्या गुणांचेही थोडेफार ज्ञान असते. ईश्वराच्या कृपेने आपले कल्याण होते व नामस्मरण हे त्याची कृपा संपादन करण्याचे साधन होय, याविषयी त्या व्यक्तीला श्रुतिज्ञान झालेले असते. त्यामुळे एवंगुणविशिष्ट ईश्वराचे नाम आपण स्मरत आहो, असा भाव त्या नामाशी निगडित होतो. या भावामुळेच ईश्वराविषयीच्या आदर, प्रेम, भक्ती, भीती, इ. भावना वाढत जातात. त्यामुळे तद्विरुद्ध असणाऱ्या भावना हळूहळू मंद होऊ लागतात. त्यामुळे त्या व्यक्तीच्या चित्ताची हळूहळू शुद्धी होते.

ईश्वराचे नामस्मरण म्हणजे त्याच्या उच्चतर सद्‌गुणांचे स्मरण व त्याचबरोबर ईश्वरविषयक आपल्या कर्तव्याचेही स्मरण होय. या कर्तव्यस्मरणातून नम्रता, निरहंकार, इ. गुण वाढत जातात व त्याबरोबरच कामक्रोधादी विकार कमी होतात. मात्र हे नामस्मरण योगसूत्रांत सांगितल्याप्रमाणे 'दीर्घकाल, निरंतर व सत्कारयुक्त' झाले पाहिजे. दीर्घकाल म्हणजे यावज्जीव, निरंतर म्हणजे एक श्वासही व्यर्थ जाऊ न देता व सत्कारयुक्त म्हणजे भक्तिभावपूर्ण, असा वरील तीन पदांचा अर्थ गुरुदेव रानडे यांनी केला आहे.

अंतरात सद्‌गुणांची वृद्धी होण्यासाठी अंतर्मुखता व अंतर्निरीक्षण या दोन गोष्टी आवश्यक आहेत. नामस्मरणाच्या प्रक्रियेत त्या दोन्ही वाढीस लागतात. अंतर्मुख झाल्यावाचून खरे नामस्मरण होऊच शकत नाही. आपले मन नाम घेत आहे की नाही, हे पाहायचे म्हणजे अतर्मुख झालेच पाहिजे. मन नामावर फार वेळ राहत नाही, ते दुसऱ्या कल्पना करू लागते, हे समजून येताच त्याला नामावर परत आणावे लागते. हे परत आणण्याचे काम करताना ते कोणत्या विचार-विकाराकडे धावले होते, ते समजते. यालाच अतर्निरीक्षण म्हणतात.

सद्‌गुणसंपादनाला वरील दोन गुण जसे आवश्यक आहेत, तशीच त्यासाठी प्रबल इच्छाशक्तीही आवश्यक आहे. तिच्या अभावी कळते पण वळत नाही, असा अनुभव येतो. नामस्मरणाने ही इच्छाशक्ती वाढते. तिच्या योगाने मन-बुद्धीचे ऐक्य निर्माण होते, मन ताब्यात राहते. नैतिक दृष्टीने नामस्मरणाचा हा अत्यत महत्त्वाचा लाभ आहे.

साक्षात्काराच्या साधनातही नामस्मरण हे श्रेष्ठ गणले गेले आहे. मात्र हे नाम आत्मदर्शी व पूर्ण साक्षात्कारी सद्‌गुरूकडून मिळवावे लागते. याला गुरुदेव रानडे यानी सबीज, दिव्य किंवा अजर-अमर नाम असे म्हटले आहे. या नामात दिव्य शक्ती असते व त्या शक्तीमुळेच त्याच्या स्मरणाने ईश्वराचा साक्षात्कार होतो. त्यात तेज, रूप, वर्ण, अनाहतनाद, अमृतरस, स्पर्श, सुगंध अशा रूपानी ईश्वराची अनुभूती घडू लागते. संतांच्या चरित्रात अशा प्रकारच्या अनुभूतीची चित्रे अनेक ठिकाणी आढळतात. अशा अनुभवाबद्दल कबिराचा एक दोहा उद्‌धृत करण्यासारखा आहे, तो पुढीलप्रमाणे —

**सून मंडलमें घर किया बाजत शब्द रसाल ।**
**रोम रोम दीपक भया प्रगटे दीनदयाल ।।**

अर्थ — शून्य मडळात म्हणजे कल्पनारहित मनात मी घर केले म्हणजे ध्यान केले, तेव्हा मधुर नाद वाजू लागले. रोमरोमात दीप उजळले आणि दीनदयाळ परमेश्वर प्रकट झाला.

नामाची ही अमृतसंजीवनी सकल संतांनी मनुष्यमात्रासाठी मुक्त हस्ताने वैरली आहे. नामाच्या सामर्थ्याबद्दल त्यानी स्वानुभवाची ग्वाही दिली आहे. संशय व भीती यांना थारा देऊ नका, अभ्यासाची कास धरा, नामस्मरण करा, म्हणजे तुमचे प्रपंच-परमार्थ सुखाचे होतील, असे त्यानी विश्वासपूर्वक सागितले आहे. नामस्मरणाने आत्मलाभासारखे किंवा ब्रह्मात्मैक्याच्या अनुभवासारखे प्रगतीचे उच्च शिखर सर्वानाच गाठता आले नाही, तरी प्रत्येकाला त्या बाबतीत थोडाफार मार्ग आक्रमिता येईल व तोही शुभकारकच ठरेल. [ नामजपाचे महत्त्व—श्री. रा. कृ. कामत, १९६३; प्रा. रा द. रानडे—चरित्र आणि तत्त्वज्ञान — श्री. शं. गो. तुळपुळे, १९५८; साधकाची वाटचाल— श्री ग वि. तुळपुळे, १९६४ ]

## नामतृतीया

एक तिथिव्रत. मार्गशीर्ष शुद्ध तृतीयेला या व्रताचा प्रारंभ करतात. व्रतावधी एक वर्ष. गौरी, काली, उमा, भद्रा, दुर्गा, कांती, सरस्वती, मंगला, वैष्णवी, लक्ष्मी, शिवा व नारायणी या गौरीच्या बारा नावांपैकी एकेका नावाने प्रत्येक महिन्याला तिची पूजा करतात. फल — स्वर्गप्राप्ती. या व्रताचे आणखी दोन पर्याय आहेत, ते असे —

अर्धनारीश्वर हे महेश्वराचे रूप समजून त्याची पूजा करणे किंवा केशवापासून दामोदरापर्यंतच्या बारा नावापैकी एकेका नावाने हरिहराच्या मूर्तींची एकेक महिना पूजा करणे. [ हि. ध. ]

## नामदेव

(१२७०–१३५० इ. स.) एक श्रेष्ठ मराठी संतकवी. याचा जन्म नरसी — बामणी जि. परभणी येथील एका शिपी कुळात पंढरपुरी झाला याच्या पित्याचे नाव दामाशेटी आणि मातेचे नाव गोणाई असे होते. नामदेवाच्या जन्मापूर्वी काही वर्षे त्याचे आई–वडील नरसी–बामणी सोडून पंढरपुरी राहायला आले होते. दामाशेटी विठ्ठलभक्त असल्यामुळे बालवयातच नामदेवाच्या मनावर विठ्ठलभक्तीचे सस्कार घडले. हाती टाळवीणा घेऊन आणि मुखी विठ्ठलनामाचा अखड गजर करून देवाच्या द्वारी नाचत राहण्यात बाल नामदेवाला विलक्षण सुख वाटू लागले. त्याच्या बालवयातील उत्कट भक्तीविषयी एक आख्यायिका रूढ आहे, ती अशी——

एकदा दामाशेटी काही व्यवसायानिमित्त परगावी गेला होता. त्यामुळे देवाला नैवेद्य घेऊन जाण्याचे काम नामदेवाकडे आले. नामदेव नैवेद्य घेऊन मंदिरात गेला आणि देवापुढे नैवेद्याचे ताट ठेवून त्याचा स्वीकार करण्यासाठी देवाला विनवू लागला. आपल्या पित्याने नेलेला नैवेद्य देव रोज खातो, अशी त्याची समजूत होती. परंतु पुष्कळ वेळ झाला, तरी देव नैवेद्य खात नाही, असे आढळल्यावर त्याने देवाला उद्देशून म्हटले, की ‘जर तू माझ्या हातचा नैवेद्य स्वीकारला नाहीस, तर मी तुझ्या पायावर डोके आपटून प्राण देईन.’ त्याचा हा निग्रह पाहून विठ्ठल हेलावला. आणि तो पाषाणाची खोळ टाकून नैवेद्य स्वीकारण्यासाठी साक्षात प्रकटला.

वयाच्या अवघ्या अकराव्या वर्षी गोविंदशेटी सदावर्ते याच्या राजाई नामक कन्येशी नामदेवाचे लग्न झाले. परतु लग्नानंतरही त्याचे चित्त ससारात रमेना. शिवण्या–टिपण्याच्या

द्रव्योपार्जन व्यवसायापासूनही तो दूर राहिला. सर्व लौकिक गोष्टींचा त्याग करून त्याने अलौकिकाची कास धरली. आई आणि पत्नी या दोघांनीही त्याला संसारात ओढण्याचे अनेक-वार प्रयत्न करून पाहिले, परंतु त्यांच्या प्रयत्नांना यश आले नाही. उलट घरातील विरोधामुळे त्याचा भक्ती अधिक उत्कट होत गेली. त्याच्या या संघर्षमय स्थितीचे वर्णन जनाबाईने केले आहे, ते असे—

**जनाची निंदणी । माझ्याची धोंगाणी ।**
**सोशी अंतःकरणी । नामदेव ।।**

अशा प्रकारे घराघरी चालणारी सर्व अवहेलना सहन करून नामदेवाने आपली भक्तिसाधना चालू ठेवली. परंतु त्याच्या भक्तीला काहीसा अहंकाराचा गर्व होता आणि सगुण-साकाराचे बंधन होते. या मर्यादा दूर करून आपल्या भक्तीला ज्ञानाचा लाभ प्राप्त करून देण्याची संधी त्याला ज्ञानदेवाच्या भेटीत मिळाली.

ज्ञानदेवाची कीर्ती कानावर आल्यानंतर तो त्याच्या भेटी-साठी इ. स. १२९१ च्या सुमारास गुरुदास आळंदीस गेला. नाम-देव 'निगुरा (गुरुहीन)' असल्यामुळे तिथे जमलेल्या संतमेळ्यात तो कच्चा ठरला. या घटनेने तो अत्यंत खिन्न झाला. परंतु ज्ञानदेवांनी त्याला योग्य मार्गदर्शन करून विसोबा खेचराकडे जायला सांगितले. विसोबा नागनाथाच्या मंदिरात आहेत, असे समजल्यावरून नामदेव तिथे गेला. पाहतो तो विसोबा शिवलिंगा-वर पादत्राणासह पाय ठेवून पहुडले होते. नामदेवाला ते खटकले आणि त्याने विसोबांना त्याबद्दल दोषही दिला. त्यावर विसोबा नामदेवाला म्हणाले, की 'मी वयाने थकलो आहे. मला माझे पाय उचलवत नाहीत. तेव्हा तूच माझे पाय उचल आणि जिथे शिव नाही, तिथे ठेव.' नामदेवाने विसोबांचे पाय उच-लून अन्यत्र ठेवायचा प्रयत्न करताच त्याला सर्वत्रच शिवलिंग दिसू लागले, असे सांगतात.

ही कथा खरी असो वा नसो, परंतु विसोबाच्या भेटीत नाम-देवाच्या भक्तीला ज्ञानाचे डोळे प्राप्त झाले आणि तो सगुण-साकाराच्या अतीत जाऊन परमेश्वराचे सर्वव्यापक स्वरूप अनुभवू शकला एवढे मात्र खरे. त्याने एका अभंगात या गुरुबोधाचे वर्णन केले आहे, ते असे—

**श्रवणी सांगितली मात । मस्तकी ठेविला हात ।**
**पर्वापर्वविवर्जित । केला नामा ।।**

गुरुबोधाने कृतार्थता प्राप्त केल्यानंतर नामदेवाने ज्ञानदेवांनी संतांच्या मेळ्याबरोबर तीर्थयात्रा केली. ज्ञानदेवाच्या समा-धीच्या वेळी (इ. स. १२९६) तो आळंदीस उपस्थित होता. त्यानंतर काही काळाने तो उत्तरेकडे गेला आणि पंजाबात वीस वर्षे राहून त्याने तिकडे भागवत धर्माचा प्रसार केला. आपल्या जीवनाची अखेर जवळ आली आहे, असे जाणवताच तो महाराष्ट्रात परतला आणि वयाच्या ऐंशीव्या वर्षी पंढरपूर येथे समाधिस्थ झाला.

नामदेवाने कीर्तनाच्या रंगात तन्मय होऊन हजारो अभंग रचले. 'नामदेव कीर्तन करी । कीर्तनी नाचे पांडुरंग ।।' असा त्याच्या कीर्तनाचा प्रभाव होता. नामदेवाच्या नावावर अडीच हजार अभंग छापले गेले आहेत. पण त्यांपैकी केवळ पाच-शेच अभंग त्याचे आहेत. बाकीचे अभंग नामदेव नामधारक अन्य संतांचे आहेत, अथवा त्याच्या नावावर दुसऱ्या कोणातरी आपली अभंगरचना खपविली आहे. मुद्रित गाथ्यात (१) अभंगात्मक आत्मचरित्र, (२) ज्ञानेश्वरासंबंधीची आदी, तीर्थावळी व समाधी ही तीन अभंगात्मक प्रकरणे, (३) अभंगात्मक संतचरित्रे आणि (४) स्फुट अभंग या रचना संकलित केलेल्या आहेत. परंतु यापैकी केवळ स्फुट अभं-गांच्या भागातच नामदेवाचे अस्सल अभंग आहेत. बाकीची रचना शंकास्पद मानली जाते. संतचरित्रांच्या भागात तर नामदेवानंतर अनेक शतकांनी होऊन गेलेल्या संतांचीही चरित्रे नामदेवाच्या नावावर आहेत. ज्ञानेश्वरचरित्रात्मक प्रकरणातही उत्तरकालीनांचे उल्लेख आहेत. जी रचना नामदेवाची नाही, असे संशो-धनाच्या अंती सिद्ध झाले आहे, अशा अभंगांची भाषा-ही गाथ्यातील आत्मचरित्रात्मक अभंगाशी संपूर्ण-पणे जुळती आहे. यावरून, अभंगा-त्मक आत्मचरित्र हे नामदेवाचे नसावे, असे वाटते.



संत नामदेव

अभ्यासकांनी अनेक प्रकारच्या कसोट्या लावून नामदेवाची जी अल्पस्वल्प रचना विश्वसनीय म्हणून मानली आहे, तिच्यावरूनही नामदेवाच्या

भक्तिजीवनाचे आणि कवित्वाचे सर्व असाधारण विशेष प्रकट होऊ शकतात

ज्ञानदेवाला गोरोबाची आळंदीस झालेली भेट, औंढ्या नागनाथाच्या मंदिरात विसोबा खेचरांकडून मिळालेला अनुभव आणि तीर्थयात्राप्रसंगी ज्ञानदेवाकडून ऐकलेले आत्मज्ञानाचे स्वरूप या तीन प्रसंगांनी सगुणोपासक नामदेवाला अंतर्मुख बनविले आणि त्याचे भोळे समाधान उधळून टाकले या असमाधानानेच त्याची वैचारिक जागृती होऊ लागली ती त्याच्या अभंगांत तीन प्रकारांनी व्यक्त झालेली दिसून येते— मानवी जीवनातील दोषदर्शन, स्वतःच्या दुर्गुणांची जाणीव व ईश्वरदर्शनाची उत्कट इच्छा या सर्वांचे मूळ त्याच्या भंगलेल्या समाधानात आहे

पंढरीच्या पांडुरंगाची मूर्ती त्याला अखेरच शाश्वत समाधान देईनाशी झाली मनाच्या या उणेपणाला व्यापून टाकणारे अविनाशी व व्यापक स्वरूप लाभण्याने नामदेवाच्या हृदयाची कासाविशी शिगेला पोचलेली दिसते सुगंधवेड्या भ्रमराप्रमाणे किंवा मधप्रेमी मक्षिकेप्रमाणे त्याचे चित्त देवाकडे ओढ घेऊ लागले होते

**तू माझी माउली, मी वो तुझा तान्हा ।**
**पाजी प्रेमपान्हा पांडुरंगे ।।**

अशा आर्ततेने त्याने विठाईमाउलीला हाक दिली आहे

**शिणले डोळुले पाहता वाटुली ।**
**अवस्था दाटली हृदयामाजी ।।**

अशी त्याची करुण अवस्था होऊन गेली आहे

या अवस्थेची अत्यंत उत्कट अभिव्यक्ती त्याच्या पुढील अभंगात दिसून येते—

**नेत्र माझे रोडले आठवे माहेर ।**
**क भेटेन निरंतर बाईयांनो ।।**
**चतुर्भुज विठ्ठलू क देखेन डोळा ।**
**भक्तांचा जिव्हाळा जीव माझा ।।**
**त्यासि आठवीता हृदय वो फुटे ।**
**तो क राजा भेटे पंढरीचा ।।**
**जव आठवती, तव उभड यती ।**
**कोणी न सांगती विठ्ठलासी ।।**
**नामा आतसे माहेरा एकसा पंढरपुरा ।**
**हरी बातारा ससारा वेगळें करी ।।**

आपली प्रभुदर्शनाची तळमळ इतकी उत्कट झाली, तरी प्रभू आपणास दर्शन देत नाही, हे पाहून नामदेवाने कधी स्वतःलाच दोष दिला तर कधी देवाला त्याच्या ब्रीदाची आठवण करून दिली एवढेच नव्हे तर, त्याच्यापुढे जाऊन,

**पतीतपावन नाम ऐकुनी आलो मी द्वारा ।**
**पतीतपावन न होसि म्हणुनी जातो माघारा ।।**

असा त्रागाही त्याने केला आणि अंबरीष रुक्मांगदादी दासांसारखी तरी नाम कोठे नेशी?' असे म्हणून नामाची कास धरली देवाजवळ त्याची एवढीच मागणी होती, की—

**नामा म्हणे देवा, तुमचे न लगे मज काहीं ।**
**प्रेम असो द्या हृदयीं आपुल्या लागतसें पायीं ।।**

मनाच्या अशा अगतिक स्थितीत, साक्षात्कार होवो वा न होवो, प्रभुनामावरची आपली प्रीती ढळू द्यायची नाही, या निग्रहाने नामदेवाची वाटचाल चालूच राहिली पारमार्थिक तळमळीची परमावधी होताच, त्याचा अहंकार समूळ गळून गेला आणि अखेरीस प्रभुसाक्षात्काराचा प्रकाशसोहळा त्याला अनुभवायला मिळाला या प्रकाशमय साक्षात्काराचे वर्णन त्याने केले आहे, ते असे—

**कोटिसूर्य प्रभादीप्ति । गगनीं झळकली अवचितीं ।।**
**संत नामया सांगाती । पैल आला कमलापती ।।**
**गरुडाचे धुधकारी । दाही दिशा आक्रमती ।।**
**सर्वे झाले सुदर्शन । भक्ता कराया रक्षण ।।**
**उघलोनि दोहीं बाहीं । नामा धरिला हृदयीं ।।**

या दिव्य अनुभूतीनंतर नामदेव धन्य झाला आणि त्याने ज्ञानदेवांचे ज्ञान आपल्या भक्तीत मुरवून घेतले

**नाचू कीर्तनाचे रंगीं । ज्ञानदीप लावू जगीं ।।**

अशा प्रतिज्ञेने त्याने कीर्तनरंग बहरास आणला आणि ज्ञानाचे अनेक दीप उजळले

सारे वातावरण आपल्या मंद सुगंधाने भारून टाकणाऱ्या आणि आपल्या सहज स्पर्शाने मातीलाही सुगंधित करणाऱ्या पारिजातकाच्या फुलांची कोवळीक त्याच्या वाणीत आहे या कोवळिकमुळेच त्याच्या शब्दांना शिळेतून चितळा फुलविण्याचे सामर्थ्य लाभले त्याची गीतमय वाणी प्राचीन मराठी काव्यसंभारात आपल्या भावगर्भ गुणविशेषांनी महनीय स्थान पावली आहे तुकारामाच्या अभंगवाणीचा स्फूर्तिस्रोत नामदेवाच्या अमृतवाणीतच आहे

नामदेवाने प्रभुदर्शनाचा सोहळा अनुभवला, अमृतासारखी मधुर कविता निर्माण केली, त्याचप्रमाणे त्याने भागवतधर्माच्या प्रसाराचे मोठे काम केले ज्ञानदेवांच्या हयातीत त्याच्या संगतीत त्याने महाराष्ट्रात भक्तिप्रचार केला आणि त्यांच्या समाधीनंतर सुदूर पंजाबात भागवतधर्माची ध्वजा फडकविली

पंजाबातील घोमान नावाच्या गावी गुरुद्वारा बाबा नामदेवजी, किंवा 'देहुरासाहेब' या नावाने त्याचे स्मृतिमंदिर आहे हे स्मृतिमंदिर त्याचा पंजाबी पट्टशिष्य बहोरदास याने बांधले,

असे सांगतात त्या ठिकाणी माघ शु द्वितीयेला मोठी यात्रा भरते पंजाबातील बहुतेक शिंपी समाज नामदेवाचा अनुयायी आहे

नामदेवाने पंजाबातील निवासकाळात हिंदीतही रचना केली आहे त्याची बासष्ट हिंदी पदे शिखांच्या ग्रंथसाहेबात समाविष्ट आहेत या हिंदी पदांवर मराठीचा संस्कार आहे, नामदेवाच्या चरित्रातील अनेक घटनांचा निर्देश त्यात आहे आणि विठ्ठल-च्या नामाचा जयजयकारही आहे विठ्ठलाच्या व्यापक दर्शनाचा अनुभव नामदेवाने हिंदी भाषेत व्यक्त केला आहे, तो असा–

**ईभ बीठलु, ऊभ बीठलु, बीठल बिनु ससार नहीं ।**

**थान थनतरि नामा प्रणव, पूरि रहिब तू सरब मही ।।**

अर्थ – विठ्ठल इथे आहे, तिथे आहे, विठ्ठलावाचून जगात दुसरे काहीही नाही तो सर्व विश्व व्यापून राहिला आहे म्हणून नव नामा त्याला स्थानस्थानांतरी नमन करीत आहे

हाच अनुभव नामदेवाने गूढ पारमार्थिक शैलीतही व्यक्त केला आहे, तो असा ––

**अणमडिआ मदलु बाजै ।**

**बिनुसावन घनहर गाजै ।**

**बादल बिनु बरखा होई ।।**

अर्थ – मादळ मढवल्यावाचूनच वाजत आहे, श्रावण नसताना ही मेघ गरजताहेत आणि मेघावाचून पर्जन्यवृष्टी होत आहे

नामदेवाची ही हिंदी वाणी आंतरिक सामर्थ्यामुळे उत्तरेत अत्यंत प्रभावशाली ठरली नानक कबीरादी श्रेष्ठ निर्गुणोपासक संतांवर नामदेवाच्या चरित्रचारित्र्याचा आणि वाणीचा अत्यंत प्रभाव आहे बहुतेक उत्तरकालीन श्रेष्ठ हिंदी संतांनी नामदेवाचे ऋण मुक्तपणे मानले आहे नामदेव हा उत्तरेतील निर्गुणोपासक संतपरंपरेचा अग्रणी समजला जातो ज्ञानदेवांनी ज्या भागवत धर्ममंदिराचा पाया घातला, त्याचा विस्तार नामदेवाने केला [ म सा , गा प २, प्रा म म ]

## नामद्वादशी

एक काम्य व्रत मार्गशीर्ष शुद्ध द्वादशीला या व्रताचा आरंभ करतात मार्गशीर्षात केशव, पौषात नारायण, माघात माधव यांप्रमाणे कार्तिकापर्यंत प्रति मासी विष्णूच्या चोवीस नावांपैकी पहिली बारा नावे क्रमाने उच्चारून विष्णूची पूजा करतात वर्षाच्या शेवटी एक सवत्स गाय, पादत्राणे, वस्त्रे, इ वस्तू बारा ब्राह्मणांना दान देतात फल – विष्णुलोकप्राप्ती

याच व्रताचा आणखी एक पर्याय असून, त्यात वरील पद्धतीनेच शिव पार्वतीची पूजा करतात फल – शिवलोक प्राप्ती व दंपतीचा अवियोग [ हि भ ]

## नामधारी संप्रदाय

शीख धर्माचा एक उपपंथ रामसिंह नामक एका शीख पुरुषाने हा पंथ सुरू केला रामसिंह प्रथम महाराजा रणजितसिंघाच्या सैन्यात होता रणजितसिंघाच्या मृत्यूनंतर त्याने नोकरी सोडली व बाबा बालकसिंघ नामक गुरूचे शिष्यत्व पत्करले बालकसिंघ हा उदासी पंथाचा अनुयायी होता नामधारी पंथाचे अनुयायी बाबा बालकसिंघाला अकरावा गुरू व रामसिंघ याला बारावा गुरू मानतात त्या दोघांच्या मनात ब्राह्मणाविषयी फार द्वेष उत्पन्न झाला होता शीख समाजात ब्राह्मणाविषयी असलेला आदरभाव नष्ट झाला पाहिजे, अशा ईर्ष्येने त्या दोघा गुरूंनी आपला प्रचार चालू केला त्यातूनच पुढे नामधारी पंथ उदय पावला या पंथाची नामजपावर श्रद्धा असल्यामुळे त्याला नामधारी हे नाव मिळाले या पंथाला देशात होणाऱ्या गोवधावद्दलही अत्यंत चीड होती या संप्रदायाचे लोक शुभ्र रंगवेशी वस्त्रे वापरीत याच्यात कीर्तनाच्या वेळी कूक असा जोरात आवाज करण्याची पद्धत होती, म्हणून यांना कूका हे नाव मिळाले पहा – कूका [ उ भा स प , सि इ ]

## नामनवमी

एक काम्य व्रत याचा प्रारंभ आश्विन शुद्ध नवमीस करतात व्रतावधी एक वर्ष दुर्गा ही या व्रताची देवता आहे प्रत्येक महिन्याला निरनिराळ्या नावांनी व फुलांनी तिची पूजा करतात कुमारींना भोजन घालतात समाप्तीच्या वेळी गोप्रदान करून ब्राह्मणभोजन घालतात फल – पापमुक्ती व दुर्गालोकाची प्राप्ती [ हि ]

## नामल

एक गणपतिक्षेत्र हे बीडच्या उत्तरेस चार मैलांवर आहे इथल्या गणपतीला आशापूरक असे म्हणतात नामा नावाचा एक कोळी इथल्या तीर्थस्नानाने मलरहित झाला, म्हणून या स्थानाला नमलाश्रम असेही नाव मिळाले आहे

यमाला एकदा त्याच्या सावत्र आईचा शाप झाला मग त्याने या ठिकाणी येऊन गणेशमूर्ती स्थापली व अनुष्ठानही केले त्यामुळे तो मातृशापातून मुक्त झाला, अशी कथा सांगतात

## नामशूद्र

एक जात या लोकांची वस्ती बंगाल व आसाम प्रदेशातील काही जिल्ह्यांत आहे यांची उत्पत्ती शूद्र पुरुष व ब्राह्मण स्त्री यांच्यापासून झाली, असे एक मत आहे नामशूद्र हे मूळचे चांडाळ होत परंतु त्यांना चांडाळ म्हटल्याचे आवडत नसल्यामुळे त्यांनी स्वतःला नामशूद्र अशी संज्ञा लावून घेतली आहे आता ते आपल्याला नामशूद्र ब्राह्मण असे म्हणवून घेत त्याविषयी मानववंशशास्त्र या ग्रंथात श्री दत्त म्हणतात–

नामशूद्र स्वत ला ब्राह्मण म्हणवून घेतात हा त्याचा दावा मानववंशशास्त्र, इतिहास आणि परंपरा यानुसार मान्य करता येत नाही कदाचित असे असण्याची शक्यता आहे, की कैवर्त, पोड आणि बागडी या जमातीप्रमाणे नामशूद्र हे बंगालमधील मूळचे आदिवासी असावे आणि पुढे ते हळूहळू आर्यकक्षेत आले असावे

यांच्यात हलिया, चासी, करटी व जलिया अशा चार पोट जाती आहेत काही ठिकाणी स्थानपरत्वे पोड, करळ, कोटल, नुनिया आणि वेरुया अशा पाच पोटजाती सांगतात जलिया खेरीज इतर तीन पोटजातीत परस्पर शरीरसंबध होतो इतर पोटजाती जलियाना हलके समजतात यांच्यात घटस्फोटाची चाल नाही पूर्वी विधवाविवाह होत असत आता ती चालही बद पडली आहे

हलिया आणि चासी हे लोक शेती करतात व करटी आणि *जलिया हे अनुक्रम सुतारकाम व मच्छीमारी करतात*

नामशूद्र हे वैष्णवपंथी असून, त्यांचे पौरोहित्य निकृष्ट ब्राह्मण करतात ते मनसा देवीला भजतात मध्यबंगालमधील नामशूद्र मसुरा देवीला मानतात [ म ज्ञा को , से इ १९५१ ]

**नाममंगीती** एक बोधिसत्त्व याचे मूर्तिध्यान असे– गौरवर्ण, त्रिमुख, चतुर्भुज प्रज्ञापारमिता ग्रथ खड्ग, धनुष्य व बाण धारण करणारा आणि वज्रपर्यकासनावर स्थित (साधनमाला) एकमुख व द्वादशभुज असाही पर्याय आढळतो याला वराचनाचा पुत्र आणि बौद्ध साहित्याची देवता मानतात याचे चित्र आढळते, पण मूर्ती आढळत नाही [ इ बु न ]

**नामसंमतकरण** बौद्धाचा एक समारभ एखाद्या भिक्षूचा किंवा भिक्षुणीचा उचित सन्मान करून त्याचे नाव प्रसिद्ध करणे, असे या समारंभाचे स्वरूप असे त्यामुळे हा समारभ बौद्ध सघात विशेष महत्त्वाचा मानला जाई एखाद्या दिवशी एखादा भिक्षू धर्मप्रवचन करताना जेव्हा आपल्या प्रगाढ *व्यासगाची साक्ष पटवी, त हा सघाकडून त्याची प्रशसा होई* मग सघ समारभपूर्वक त्याचे नाव प्रसिद्ध करी बुद्धाने अनेकाची नावे या पद्धतीने प्रख्यात केली होती [ पा वा न मि र ]

**नामसप्तमी** एक काम्य व्रत याचा प्रारभ चैत्र शुद्ध सप्तमी पासून करतात व्रतावधी एक वर्ष या व्रतात चैत्रादी मासक्रमाने सूर्याची धाता, अर्यमा, मित्र, वरुण, इ बारा नावानी षोडशोपचार पूजा करतात यात व्रताच्या दिवशी एक भुक्त राहून सूर्यनामाचा जप करायचा असतो व्रतकालात तलाला शिवण खाली निवा निळी वस्त्रे वापरणे तसेच आवळ्याच्या पाण्यात स्नान, मद्यपान कलह द्यूत, इ गोष्टी निषिद्ध सांगितल्या आहेत व्रताच्या दिवशी मग ब्राह्मणाना घृत युक्त भोजन घालून लाल वस्त्र दान द्यायची असतात फल– आयुष्य, आरोग्य व ऐश्वर्य याची वृद्धी [ हि ध , व्र प ]

**नायक राजे** विजयनगरच्या विशाल साम्राज्याचे अनेक विभाग केलेले होते उदयगिरी, पेनुगोंडा चद्रगुत्ती, तुळुव, मदुरा तजाऊर, जिजी, इक्केरी बसवपट्टण चित्रदुर्ग, बलम म्हैसूर, उमत्तूर, यलहाडू इ त्या विभागाची नावे होती या विभागाचा राज्यकारभार पाहण्यासाठी नायक, गौड व ओडेयर या नावाचे अधिकारी नेमले जात सम्राट त्यासाठी राजकुमार राजघराण्यातील अन्य कर्तबगार व्यक्ती, मत्री किंवा सेनाधिकारी याची निवड करीत असे कोणी नवीन प्रदेश जिंकला, की त्याला पारितोषिक म्हणून त्या प्रदेशाचा नायकी मिळत असे सम्राटाच्या मर्जीप्रमाणे ते अधिकारी बद लले जात त्याच्या अधिकारपदाला निश्चित कालमर्यादा न हती *अधिकारी लोकप्रिय व कर्तृत्ववान असल्यास दीर्घ कालपर्यंत* तो आपल्या पदावर राहत असे त्यामुळे असे नायक म्हणजे त्या त्या प्रदेशाचे राजेच मानले जात त्याना सपूर्ण प्रादेशिक स्वातंत्र्य होते व सैन्य उभारण्याचाही अधिकार होता युद्धाच्या प्रसगी केंद्र सरकारला ते सैनिकी साहाय्य देत भूमिकर तेच वसूल करीत व त्याचा तिसरा भाग सम्राटाला देत न्यायदानही त्याच्याच अधिकारातले होते हे नायकपद बहुधा वशपरपरेने चालू राही त्याना मन्नेश्वर ही पदवी दिली जात असे मदुरा, तंजाऊर, जिजी व केळदी येथील नायक राजे विशेष प्रसिद्ध आहेत

**मदुरेचे नायक राजे**– इ स च्या १६ व्या शतकात पाड्य व चोळ घराण्यातील राजे आपापल्या प्रदेशात विजयनगरचे मांड लिक म्हणून राज्य करीत होते विजयनगर येथे कृष्णदेवराय (इ स १५०९–२९) हा सम्राट असताना चोळ राजा वीर शेखर याने मदुरेवर आक्रमण करून पाड्य राजा चद्रशेखर याचा पराभव केला त्यामुळे त्या प्रदेशावर त्याची सत्ता स्थापन झाली ते समजताच कृष्णदेवरायाने नागम नायक नावाच्या पराक्रमी व विश्वासू सरदाराला तिकडे पाठवले त्याने मदुरेला जाऊन चोळ राजाचा पराभव केला आणि सर्व सत्ता स्वत कडे घेतली पाड्य राजाला पुन्हा गादीवर बसवायला तो तयार नव्हता त्यामुळे पाड्य राजाने सम्राटाकडे गाऱ्हाणे नेले

विश्वनाथ नायक (इ स १५२९–६४) – कृष्णदेवरायाला नागमाच्या त्या कृतीचा राग आला आणि त्याने नागमाचा पुत्र

विश्वनाथ नायक याला मोठे सैन्य देऊन तिकडे पाठवले. विश्वनाथाने शत्रूचा नाश करून त्या जिंकलेल्या राज्याची सर्व सूत्रे आपल्या हाती घेतली. त्याने पांड्य राजाला गादीवर बसवले खरे, पण सत्ता मात्र स्वतःच्या हातीच ठेवली. चंद्रशेखर पांड्य मरण पावल्यानंतर विश्वनाथ नायक हाच मदुरेचा राजा झाला. आर्यनाथ मुदलियार नामक पुरुषाला त्याने आपला मुख्य प्रधान व सेनापती नेमले आणि दळवई ही पदवी दिली.

विश्वनाथ नायक याने मदुरेच्या किल्ल्याची पुनर्रचना करून तो भक्कम बांधला आणि तिथे सुंदरेश्वर व मीनाक्षी यांची मंदिरे बांधली. तंजाऊरच्या चोळ राजाला वल्लम हे गाव देऊन विश्वनाथाने त्याच्या कब्ज्यातील त्रिचनापल्ली घेतले व तिथला प्रसिद्ध गड बांधला. त्याने राज्यात सर्वत्र कालवे खोदले, त्या पाण्याने पुष्कळ जमीन लागवडीखाली आणली, जंगले तोडून अनेक नवी गावे वसवली आणि अनेक देवालयेही निर्माण केली.

विश्वनाथाच्या राज्यात मदुरा, रामनाड, तिन्नेवेल्ली, तिरु-चिरापल्ली, कोइंबतूर, सेलम व त्रिवांकूरचा काही भाग समाविष्ट होता. त्या विस्तीर्ण राज्याचे संरक्षण करण्यासाठी विश्वनाथाने सरहद्दीवर व अंतर्गत भागातही अनेक गड बांधले.

अशा रीतीने सर्वत्र समृद्धी व शांतता निर्माण केल्या-नंतर विश्वनाथ व आर्यनाथ यांनी राज्याची सर्वांगीण सुधा-रणा करण्याच्या हेतूने सर्व राज्याचे ७२ भाग करून त्यांना पाळयम हे नाव दिले आणि त्यावर एकेक पाळेगार नेमला. पूर्वीच्या राजघराण्यातील असंतुष्ट पुरुष आणि स्वतःच्या हाताखालचे कर्तबगार पुरुष यांना विश्वनाथाने पाळेगार नेमले व त्यांना त्यांच्या भागापुरते बरेच अधिकारही दिले. या पाळे-गारांना आपल्या उत्पन्नाचा तिसरा भाग नायकाला द्यावा लागे व त्याला हरतऱ्हेचे साहाय्य करण्यासाठी सैन्यही बाळगावे लागे. पाळयममधील प्रजेच्या संरक्षणाची जबाबदारी त्या त्या पाळेगारावरच असे.

हे पाळेगार म्हणजे जहागीरदारच होते. त्यांनी नवीन वसा-हती व शांतता निर्माण करून आपापल्या विभागात सुव्यवस्थित कारभार सुरू केला. त्यांच्या जवळ सैन्य असल्यामुळे राज्याच्या संरक्षणासाठी त्यांचा पुष्कळ उपयोग झाला. पण काही दुर्गम प्रदेशांतले पाळेगार होते त्यांच्या मनात स्वतंत्रपणे राज्य कर-ण्याची वृत्ती उत्पन्न झाली आणि नायक राजे दुर्बल झाल्यावर त्यांनी ती संधी साधली.

विश्वनाथ नायक हा जसा पराक्रमी योद्धा व कुशल सेनापती होता, तसाच तो चतुर संघटक व थोर प्रशासकही होता. मात्र एवढी मोठी कर्तबगारी अंगी असूनही, तो शेवटपर्यंत विजय-नगरचा आज्ञाधारक सेवकच राहिला. त्याचा जन्म इ. स. १४९५ च्या सुमारास झाला. इ. स. १५६४ च्या प्रारंभी त्याने आपला पुत्र कृष्णप्पा नायक याला राज्यपद दिले आणि त्याच वर्षी तो मृत्यू पावला.

कृष्णप्पा नायक (१ ला) (इ. स. १५६४–७२)– लंकेचा राजा विजय गोपाल ऊर्फ दहनासा झाला, म्हणून कृष्णप्पाने लंकेवर स्वारी केली. त्या स्वारीत तो विजयी झाला.

कृष्णप्पा नायक पित्याप्रमाणेच पराक्रमी व उत्तम प्रशासक होता. त्याने बापाकडून मिळालेले राज्य खंबीरपणे सांभाळले. त्याचाही प्रधान आर्यनाथ हाच होता. त्याने राज्यकारभारात कृष्णप्पाला बहुमोल मदत केली.

वीरप्पा नायक (इ. स. १५७२–९५)– याची राजवट शांतिपूर्ण ठरली. तो विजयनगरच्या सम्राटाचा स्वामिभक्त सामंत म्हणूनच राज्य करीत होता. वीरप्पाने आपल्या दीर्घ राजवटीत राज्यामध्ये समृद्धी निर्माण केली. मंदिरांचा जीर्णो-द्धार, अग्रहारांचे दान व इतर धार्मिक कार्य यांत त्याने पुष्कळ द्रव्य खर्च केले. मीनाक्षीच्या मंदिरातील मंडपाच्या स्तंभावर त्याने सोन्याचा पत्रा बसवला.

कृष्णप्पा (२ रा) (इ. स. १५९५–१६०१) – हा वीरप्पाचा मोठा मुलगा होय. याच्या कारकीर्दीत इ. स. १६०० च्या सुमारास आर्यनाथ मरण पावला. विश्वनाथ नायकाच्या वेळेपासून शेवटपर्यंत तो प्रधान म्हणून मदुरेच्या राज्याची सेवा करीत होता. राक्षसतंगडीच्या लढाईनंतर विजयनगरचे कोस-ळणारे साम्राज्य सावरून धरण्यासाठी त्याने उदंड प्रयत्न केले, असे म्हणतात. आर्यनाथानंतर लवकरच कृष्णप्पाही मरण पावला (इ. स. १६०१).

मुत्तु कृष्णप्पा (इ. स. १६०१ – १६०९)– त्यानंतर कृष्णप्पाचा भाऊ विश्वप्पा याचा पुत्र मुत्तु कृष्णप्पा हा गादीवर आला. त्याने सर्व राज्यात सुव्यवस्था राखण्याकडे विशेष लक्ष दिले. इ. स. च्या १६ व्या शतकात रामनाड प्रदेशात परकीय लोकांना व्यापारासाठी मुक्तद्वार होते. पण त्याचा फायदा घेऊन पोर्तुगीज लोकांनी त्या भागात आपले वर्चस्व स्थापले. रामेश्वराकडे जाणारा रस्ता त्याच भागातून जात होता आणि पोर्तुगीजांच्या उपद्रवामुळे तो यात्रेकरूंसाठी सुरक्षित राहिला नव्हता. म्हणून मुत्तु कृष्णप्पाने त्या प्रदेशावर उडयन सेतुपती याची नेमणूक केली. त्याने त्या प्रदेशातल्या फिरंग्यांचा उपद्रव मोडून काढून शांतता व सुव्यवस्था निर्माण केली. पुढे नायक राजांना ठरा-विक खंडणी देऊन सेतुपती घराण्यातील राजे मालक म्हणून त्या भागावर राज्य करू लागले. मुत्तु कृष्णप्पा शेवटपर्यंत विजय-नगरच्या सम्राटाचा एकनिष्ठ सेवक राहिला.

याच्या काळात रॉबर्ट डि नोबिली याच्या चिकाटीच्या

प्रयत्नाना यश मिळाले आणि मदुरेच्या राज्यात ख्रिस्ती धर्माचा प्रसार करण्याची त्याना रीतसर परवानगी मिळाली

मुत्तु वीरप्पा (१ ला) (इ स १६०९ ते १६२३)– हा मुत्तु कृष्णप्पाचा पुत्र होय विजयनगरचा राजा वेंकट (१ ला) इ स १६१४ साली मृत्यू पावल्यानंतर त्याच्या राज्यगादी मिळविण्यासाठी अंतर्गत यादवी सुरू झाली ती संधी साधून मुत्तु वीरप्पाने विजयनगरला नियमितपणे खंडणी देणे बंद केले विजयनगरच्या खऱ्या वारसाची बाजू घेणा या यचम नायकाला मदत न करता विरुद्ध पक्षाच्या जग्ग नायकाला त्याने मदत केली इ स १६१३ मध्ये वीरप्पाने आपली राजधानी मदुरेहून त्रिचनापल्लीला नेली

तिरुमल (इ स १६२३–१६५९)– मुत्तु वीरप्पा याच्या नंतर त्याचा धाकटा भाऊ तिरुमल हा मदुरेचा राजा झाला त्याने राजधानी पुन्हा मदुरेला आणली आत्मसंरक्षणासाठी त्याने सैन्याची पुनर्घटना केली व नवीन किल्लेही बांधले रामप्पैया हा त्याचा सेनापती फार पराक्रमी होता इ स १६२५ साली म्हैसूरच्या राजाने मदुरेवर स्वारी केली पण रामप्पैयाने त्याचा पराभव केला आणि म्हैसूरवर प्रतिहल्ला करून त्यात विजयही मिळवला पुढे इ स १६३५ मध्ये तिरुमल याने त्रिवांकूरवर स्वारी केली कारण तिथला राजा त्याला खंडणी देईनासा झाला होता तिरुमल त्या स्वारीत विजयी झाला

तिरुमल नायक प्रारंभी विजयनगरच्या राजाविषयी निष्ठा बाळगून राजाला नजराणे पाठवीत असे पण ठरलेली खंडणी पाठवायला मात्र तो तयार नसे पुढे श्रीरंग (३ रा) विजयनगरच्या सिंहासनावर बसल्यानंतर तिरुमलाशी त्याचे संबंध फारच बिघडले आणि त्याने मदुरेवर स्वारी केली त्या वेळी तिरुमल याने तंजाऊर व जिंजी येथील नायकांचे साहाय्य मिळवण्याचा प्रयत्न केला, पण त्यात तो अयशस्वी ठरला तेव्हा त्याने गोवळकोंड्याच्या सुलतानाकडे मदत मागितली मग कुतुबशाहाने वेल्लोरवर स्वारी केली त्यामुळे श्रीरंगरायाला त्याच्या प्रतिकारार्थ तिकडे जावे लागले त्या लढाईत मुसलमानांनी श्रीरंगाचा पराभव केला मग तो म्हैसूरच्या आश्रयाला गेला त्यानंतर मुसलमान तंजाऊर व मदुरा या राज्यात घुसले त्यांनी तिथे नाना प्रकारचे अत्याचार आरंभले तेव्हा तिरुमलने कुतुबशाहाबरोबर तह केला पुढे म्हैसूरच्या कंठीरव नरसराजानेही मदुरेवर स्वारी करून खूप अत्याचार केले, पण सेतुपतीची मदत घेऊन तिरुमल नायकाने त्याला पराभूत केले इ स १६५९ साली तिरुमल नायक मरण पावला

तिरुमल नायकाने विजयनगरशी वैर करून मदुरेचे स्वतंत्र राज्य स्थापले त्या वेळी रामनाड, तिन्नवेल्ली, कोइमतूर, सेलम, त्रिचनापल्ली व त्रावणकोरचा काही भाग एवढा विस्तृत प्रदेश त्याच्या राज्यात समाविष्ट झाला तो पराक्रमी योद्धा होता व त्याने अनेक लढाया जिंकल्या हे खरे, पण विजयनगरची सत्ता नष्ट करण्यासाठी त्याने मुसलमानांची मदत घेतली हे त्याचे कृत्य दूषणीयच म्हणावे लागेल दक्षिणेत मुसलमानांची सत्ता प्रस्थापित करण्यास तिरुमल नायकच कारणीभूत झाला

मुत्तु वीरप्पा (२ रा)– तिरुमल नायकाचा पुत्र मुत्तु वीरप्पा याने एक वर्षभरच राज्य केले त्या अवधीत त्याने त्रिचनापल्लीचा किल्ला पुष्कळ मजबूत केला तो मुसलमान आक्रमणाचा प्रतिकार करण्यासाठी उभा ठाकला होता पण लवकरच त्याचा मृत्यू ओढवला

छोक्कनाथ (इ स १६६०–१६८२)– हा मुत्तु वीरप्पाचा पुत्र होय राज्य मिळाले तेव्हा तो अवघा सोळा वर्षांचा होता त्यामुळे त्याचा प्रधान व सेनापती यांनी सत्ता आपल्या हाती घेतली व काही काळ अनियंत्रित कारभार करून राजद्रव्याचा यथेच्छ लूटमार केली राजाला तर त्यांनी राजवाड्यात नजरकैदेतच ठेवले होते पुढे त्याला पदच्युत करून त्याच्या धाकट्या भावाला गादीवर बसवण्याचा कटही त्यांनी रचला पण छोक्कनाथाला तो समजला व त्याने काही राजनिष्ठ सेनाधिकाऱ्यांच्या साहाय्याने तो कट मोडून काढला आणि सत्ताही आपल्या हाती घेतली

इ स १६६३ मध्ये विजापूरच्या सैन्याने त्रिचनापल्लीच्या किल्ल्याला वेढा घातला किल्ला मुसलमानांना जिंकता आला नाही तरी त्यांनी आसपासच्या प्रदेशात विलक्षण अत्याचार, जाळपोळ व लूटमार केली शेवटी छोक्कनाथाने विजापूरकरांना जबर खंडणी दिली तेव्हा त्यांचे सैन्य परत गेले

इ स १६६६ च्या सुमारास छोक्कनाथाने आपली राजधानी त्रिचनापल्ली येथे नेली इ स १६७४ साली त्याने तंजाऊरवर स्वारी केली आणि विजयराघव नायकाला ठार मारून अळगिरी नायक याला तिथे आपला प्रतिनिधी नेमले

इ स १६७७ साली म्हैसूरच्या राजाने मदुरेवर स्वारी केली, तेव्हा प्रधानमंडळाने छोक्कनाथाला पदच्युत करून त्याचा भाऊ मुत्तु लिंगप्पा याला गादीवर बसवले मुत्तु लिंगप्पाने काही महिनेच राज्य केले त्या अवधीत याच्या राज्यात मोठा जलप्रलय होऊन त्यात अनेक गावे वाहून गेली मुत्तु लिंगप्पा व्यवस्थित राज्य करू शकला नाही त्या परिस्थितीचा फायदा घेऊन इ स १६७८ साली रुस्तुमखान नावाच्या सरदाराने मुत्तु लिंगप्पाला पदच्युत करून छोक्कनाथाला पुन्हा गादीवर बसवले तसे करून त्याने सर्व सत्ता मात्र आपल्या हाती ठेवली पुढची दोन

वय त्याने प्रजेवर इतके जुलूमजबरदस्तीचे प्रकार केले, की त्यामुळे प्रजा हैराण होऊन गेली. इ. स. १६८० मध्ये म्हैसूरच्या राजाने त्रिचनापल्लीला वेढा दिला, तेव्हा रुस्तुमखान किल्ल्याचे संरक्षण करण्यास असमर्थ ठरला. तेव्हा छोक्कनाथाच्या इतर सरदारांनी रुस्तुमखानाला ठार मारून छोक्कनाथाला त्याच्या पंजातून सोडवले. परिस्थिती गंभीर आहे असे पाहून छोक्कनाथाने राजनाथाच्या सेतुपती व विजापूरचे मराठे यांना मदतीला बोलावले. मग मराठ्यांचा सेनापती अरसुमलै याने म्हैसूरच्या सैन्याचा पराभव करून त्रिचनापल्लीभोवतीचा सर्व प्रदेश आपल्या ताब्यात घेतला. त्यामुळे छोक्कनाथाला फार धक्का बसला व त्यातच तो मरण पावला (इ. स. १६८२).

छोक्कनाथ सदा लढवय्या व कुशल सेनापती होता. आपले मातबर मंत्री व सेनापती यांना बाजूला सारून त्याने सत्ता स्वतःकडे घेतली. यात त्याचे धाडस दिसून येते. मुसलमानी आक्रमणाचा प्रतिकार त्याने धैर्याने व चिकाटीने केला. पण त्याच्या अंगी कारभारातील कुशलता व मुत्सद्दिगिरी नसल्यामुळे आणि विलासात मग्न राहिल्यामुळे शेवटी तो अपयशी ठरला आणि त्याचे राज्य हळूहळू कोसळण्याच्या पथास लागले.

मुत्तु वीरप्पा (३ रा) (इ. स. १६८२–१६८९)– याला रंग कृष्ण असेही नाव होते. हा गादीवर आला तेव्हा मदुरेच्या राज्याचे काही भाग त्याच्या शत्रूंना बळकावले होते. मदुरा नगरीही त्यांच्या ताब्यात गेली होती. पण लवकरच मराठे व म्हैसूर, तंजाऊर, रामनाड येथील राजे आपसात लढू लागले आणि रंग कृष्णाचा मार्ग सुकर झाला. त्याने ३–४ वर्षांत आपला सर्व प्रदेश परत मिळविला आणि मदुरा नगरीही परत घेतली. त्याने राज्यात सर्वत्र सुव्यवस्था निर्माण केली आणि स्वतःचे सामर्थ्य संघटित करून मुसलमानांचे वर्चस्व नष्ट केले.

रंग कृष्ण हा नीतिमान राजा म्हणून प्रसिद्ध होता. त्याने राजवाड्यातला जनानखाना बंद केला व स्वतः एकपत्नीव्रत पाळले. त्याने अनेक मंदिरे बांधली व अग्रहारांना दानेही दिली.

मंगम्माळ (इ. स. १६८९–१७०६)–रंग कृष्ण मरण पावला, त्या वेळी त्याची पत्नी गर्भवती होती. लवकरच तिला मुलगा झाला. त्याचे नाव विजयरंग छोक्कनाथ असे ठेवण्यात आले. तो तीन महिन्यांचा असतानाच त्याला राज्याभिषेक झाला. त्याच्या नावाने रंग कृष्ण याची माता मंगम्माळ ही कारभार पाहू लागली.

मंगम्माळने दूरदृष्टीने व शहाणपणाने राज्य चालवले. आपली दुबळता ओळखून तिने मोगल व मराठे यांना वेळोवेळी खंडणी देऊन स्वतःपासून दूर ठेवले. भोवतालच्या इतर शत्रूंना मात्र तिने आपल्या संघटित सामर्थ्याच्या बळावर नमवले. तिचा सेनापती नरसप्पय्या हा शूर व राजनिष्ठ होता. तोच तिचा आधारस्तंभ ठरला.

मंगम्माळने राज्यात रस्ते व तलाव बांधले व लोककल्याणाची अनेक कामे केली. तिने पुष्कळ दानधर्मही केला. ख्रिस्ती व मुसलमान नागरिकांना तिने उदारतेने वागवले.

विजयरंग छोक्कनाथ (इ. स. १७०६–१७३२)– मंगम्माळ इ. स. १७०६ मध्ये मरण पावली. तिच्या मागून विजयरंग गादीवर आला खरा, पण राज्याची सत्रसूत्रे मात्र त्याच्या मंत्रिमंडळाच्या हातीच राहिली. या मंत्रिमंडळाने भ्रष्टाचार माजवून राज्याला अवकळा आणली. प्रजेकडून जबर कर वसूल केले व स्वतःचे खजिने भरले. इ. स. १७१०–२० या काळात राज्यात दुष्काळ पडल्यामुळे तर प्रजेचे खूपच हाल झाले. या दुष्काळी परिस्थितीचा फायदा त्याच्या अनेक शत्रूंनी घेतला व राज्याचे लचके तोडले.

मीनाक्षी (१७३२ – ३६ इ. स.) – विजयरंग याला पुत्र नसल्यामुळे त्याच्या मृत्यूनंतर राणी मीनाक्षी हिने राज्यसूत्रे हाती घेतली. विजयकुमार नामक मुलाला तिने दत्तक घेतले. तिचा भाऊ वेंकट पेरुमाळ नायक याने तिला त्या कामी मदत केली. विजयकुमाराचा पिता बंगारू तिरुमल आणि दळवाई वेंकटाचार्य यांनी तिला पदच्युत करण्याचा घाट घातला होता. पण तो फसला. इ. स. १७३६ मध्ये अर्काटच्या नबाबाचा जावई चंदासाहेब याने मदुरेचे राज्य काबीज केले आणि त्या अपयशाने खचून जाऊन मीनाक्षीने आत्महत्या केली. तिच्या मृत्यूने मदुरेच्या नायक घराण्याचा अंत झाला.

दक्षिण भारतातील विस्तृत प्रदेशावर मदुरेच्या नायक वंशाचे सुमारे दोन शतके प्रभुत्व होते. त्यांचा बराचसा काळ दक्षिणेत शांततेचा व सुबत्तेचा ठरला. नायक राजांनी हिंदू संस्कृतीचे व धर्माचे रक्षण जागरूकपणे केले. त्या काळी ख्रिस्ती धर्मप्रसारकांनी धर्माच्या प्रसारासाठी दक्षिण भारतात आटोकाट प्रयत्न चालवले होते. नायक राजांनी त्यांना उदारपणे वागवले. पण हिंदू धर्माला धक्का लावू दिला नाही. मात्र त्यांची राज्यव्यवस्था टिकाऊ ठरली नाही. पाळेगार पद्धतीने कारभारी राज्याचे हित झाले असले, तरी तीच प्रथा शेवटी सत्तेला मारक ठरली.

**तंजाऊरचे नायक राजे**– सम्राट कृष्णदेवराय याचा सेनापती विश्वनाथ नायक मदुरेचा सत्ताधिकारी होता, तसाच तो तंजाऊरच्या चोळ राज्याचाही प्रशासक होता. कृष्णदेवराय मरण पावल्यावर त्याचा भाऊ अच्युतराय सम्राट झाला. त्याची राणी तिरुमलांबा हिची धाकटी बहीण मूर्तिमांबा ही शिवप्पा नायक याला दिली होती. तेव्हा शिवप्पाला राज्य मिळावे म्हणून अच्युतरायाने चोळ देश वेगळा काढून तो शिवप्पा नायकाच्या हवाली

केला शिवप्पा उत्तम प्रशासक होता त्याने तंजाऊर येथे शिवगंगा नामक मोठा किल्ला आणि त्याच्या जवळच एक विशाल तलाव बांधला तिरुवण्णमलै येथे त्याने एक मंदिर निर्माण केले त्या व्यतिरिक्त अनेक गोपुरे, मंडप व मंदिराचे प्राकार त्याने बांधले तो शैवपंथी असला, तरी इतर पंथ व धर्म यांना त्याने प्रोत्साहन व आर्थिक साहाय्य दिले शिवप्पाच्या मागून इ स १५८० च्या सुमारास त्याचा मुलगा अच्युतप्पा व त्याच्या नंतर त्याचा पुत्र रघुनाथ नायक गादीवर आला

रघुनाथ नायक (इ स १६००–१६३४)– हा पराक्रमी होता तसाच विद्येचा भोक्ता आणि पंडितांचा आश्रयदाताही होता गोविंद दीक्षित या आपल्या प्रधानाच्या सहकार्याने त्याने आपले राज्य विस्तृत व ऐश्वर्यसंपन्न केले त्याने विजयनगरचे वर्चस्व दूर सारून आपले स्वातंत्र्य स्थापित केले पण लवकरच विजापूरच्या सुलतानाने तंजाऊरवर स्वारी करून नायकाचा पराभव केला त्यामुळे सुलतानाला खंडणी देऊन रघुनाथ नायकाला त्याच्याशी तह करावा लागला

विजयराघव (इ स १६३४ ते १६७३)– रघुनाथ नायकानंतर त्याचा पुत्र विजयराघव गादीवर बसला तो फार धर्मनिष्ठ होता मदुरेचा राजा चोक्कनाथ नायक याने विजयराघवाच्या मुलीला मागणी घातली, पण विजयराघवाला ते पसंत पडले नाही त्याने ती मागणी अमान्य केली त्या अपमानाने चिडून चोक्कनाथाने तंजाऊरवर स्वारी केली (इ स १६७३) त्या युद्धात विजयराघव व त्याचा पुत्र हे दोघेही लढता लढता मृत्यू पावले त्यापूर्वीच राजघराण्यातील सर्व स्त्रियांनी आत्महत्या केली होती अशा रीतीने तंजाऊरचे राज्य हाती आल्यावर चोक्कनाथाने आपला भाऊ अळगिरी याला तिथे प्रशासक नेमले पुढे लवकरच अळगिरी हा चोक्कनाथाचे स्वामित्व झुगारून देऊन स्वतंत्रपणे राज्य करू लागला

वरील युद्धाच्या धामधुमीत विजयराघवाच्या घराण्यातील चेंगमलदास नावाचा एक मुलगा वाचला होता आणि तो नागापट्टम येथील एका सावकाराकडे आश्रय घेऊन राहिला होता अळगिरीचा एक अधिकारी वेंकण्णा नामक नियोगी ब्राह्मण होता तो मोठा कारस्थानी होता त्याने चेंगमलदासाला हाताशी धरून विजापूरकरांची मदत मागितली आदिलशाहाने एकोजी भोसले याला त्याच्या मदतीला पाठविले एकोजीने अळगिरीचा पराभव करून तंजाऊर जिंकले व चेंगमलदास याला गादीवर बसविले पुढे चेंगमलदास व वेंकण्णा यांचे बिनसले त्याही वेळी वेंकण्णाने एकोजीला पुन्हा मदतीला बोलाविले एकोजी आला व त्याने तंजाऊरवर स्वारी करून ते जिंकले पण चेंगमलदास व वेंकण्णा या दोघांनाही बाजूस सारून तिथे त्याने स्वतःचा अंमल प्रस्थापित केला (इ स १६७८)

मदुरा व तंजाऊर येथील नायक राजांच्या कारकिर्दीत, विशेषतः इ स च्या १७ व्या शतकात, शिल्पकलेची बरीच प्रगती झाली त्या काळात प्रचंड मंदिरे व गोपुरे बांधली गेली आणि त्या मंदिरांतच राजे व राण्या यांच्या भव्य व सुरेख मूर्तीही उभारल्या गेल्या त्या वेळची हस्तिदंतावरील कला कुसरही पुष्कळ पाहायला मिळते

**जिंजीचे नायक राजे**– जिंजी प्रदेश इ स च्या १४ व्या शतकातच विजयनगरच्या साम्राज्यात समाविष्ट झाला होता पुढे इ स १४६४ च्या सुमारास वेंकटपती नायक हा तिथे सम्राटाचा प्रतिनिधी म्हणून राज्य करू लागला इ स च्या १६ व्या शतकात विजयनगर येथे कृष्णदेवराय याची कारकीर्द सुरू झाली थोड्याच काळात त्याला असे आढळून आले की साम्राज्याच्या दक्षिण भागात साम्राज्यसत्ता ढिली पडून, तिकडील मांडलिक राजे साम्राज्याविरुद्ध उठावणी करण्याच्या उद्योगाला लागले आहेत हे समजताच कृष्णदेवरायाने आपला सरसेनापती वय्यप्पा नायक याच्यासह त्या भागावर स्वारी केली ती मोहीम यशस्वी करून साम्राज्यसत्तेला बळकटी आणल्यावर कृष्णदेवरायाने जिंजी प्रदेशावर तुबाकी कृष्णप्पा नायक याची नेमणूक केली हाच जिंजीचा पहिला नायक राजा होय त्याने नेल्लोरपासून कोलेरूनपर्यंतच्या किनारा प्रदेशावर इ स १५२१ पर्यंत राज्य केले, असे म्हणतात

तुबाकी कृष्णप्पाच्या नंतर अनुक्रमे अच्युत रामचंद्र नायक, मुत्तु नायक व वेंकटप्पा नायक हे जिंजीचे राजे झाले त्यांच्या राजवटीत (इ स १५७१ – १५५०) जिंजीचा किल्ला पुष्कळ मजबूत करण्यात आला

इ स १५७० ते १६२० या काळात कृष्णप्पा नायक जिंजी येथे राज्य करीत होता त्या वेळी वेंकट (१ ला) हा विजयनगरचा सम्राट होता इ स १५८६ मध्ये कृष्णप्पाने आपले स्वातंत्र्य जाहीर केले म्हणून वेंकटरायाने त्याला पकडून तुरुंगात टाकले तंजाऊरच्या रघुनाथ नायकाने त्याच्या वतीने रदबदली केल्यानंतर तो सुटला व परत गादीवर आला त्याने जिंजीचे वैभव पुष्कळ वाढविले कालांतराने त्याला पुन्हा स्वतंत्र होण्याची आकांक्षा निर्माण झाली त्यामुळे तो विजयनगरला खंडणी पाठविण्यात कुचराई करू लागला तेव्हा वेंकटरायाने जिंजीवर सैन्य पाठवून त्याला नमविले आणि त्यालाच पुन्हा जिंजीचे राज्य दिले (इ स १६०८)

इ स १६१४ मध्ये वेंकटराय मरण पावल्यानंतर विजयनगरच्या सिंहासनासाठी यादवी सुरू झाली श्रीरंग हा पुढच

साम्राज्याचा कायदेशीर वारस होता. यचम नायक हा त्याचा सेनापती होता. त्याने श्रीरंगाचा पक्ष घेतला, तर जग्गराय हा वेंकटरायाच्या अनौरस पुत्राचा पक्षपाती बनला. या वेळी जिंजीच्या कृष्णप्पा नायकानेही जग्गरायाचा पक्ष घेतला. या उभय पक्षांत जे यादवी युद्ध माजले त्यात श्रीरंग मारला गेला. पण शेवटी जग्गरायाचाही पराभव होऊन तोही त्या यादवीत मारला गेला (इ. स. १६१७). त्याचा साथीदार कृष्णप्पा नायक याचाही पराभव होऊन तो श्रीरंगरायाच्या मुलाला शरण गेला. त्यानेही कृष्णप्पाला जिंजीचे राज्य परत दिले व कृष्णप्पाने ते दीर्घ काळ पर्यंत उपभोगले. त्याच्यानंतर एक-दोघ नायक राजे होऊन गेले पण ते अगदी सामान्य होत. इ. स. १६४८ मध्ये विजापूरकरांनी जिंजीचे राज्य जिंकून त्यावर आपली सत्ता स्थापली.

कृष्णप्पा नायक हा पक्का वैष्णव होता. त्याने वैष्णव पंथाच्या प्रसारासाठी पुष्कळ साहाय्य केले. चिदंबरम येथील नटराजमंदिरात गोविंदराज याचे जे मंदिर आहे, त्याचा जीर्णोद्धार कृष्णप्पानेच केला.

**इक्केरीचे नायक राजे** – म्हैसूरच्या शिमोगा जिल्ह्यात कळदी नावाचे एक गाव आहे. तिथल्या बसप्पा नामक एका गरीब शेतकऱ्याचा मुलगा चौडगौड हा या घराण्याचा मूळ पुरुष मानला जातो. शेत नांगरीत असता त्याला एक गुप्त द्रव्यनिधी सापडला व त्याचे भाग्य उदयाला आले. त्याने काही मित्रांच्या साहाय्याने लहानसे सैन्य जमा करून आसपासचा प्रांत आपल्या ताब्यात घेतला व तो पाळेगार बनला. केळदीनृपविजय या ग्रंथावरून याचा जन्म इ. स. १४९९ च्या सुमारास झाला असावा असे कळते. त्याचा पुत्र सदाशिव हा खूप पराक्रमी निघाला. इ. स. १५४९ च्या सुमारास विजयनगरचा प्रधान रामराय याने त्याला कल्याणच्या स्वारीवर पाठवले व त्याने ती मोहीम यशस्वी करून कल्याण शहर जिंकले. त्याच्या पराक्रमाबद्दल रामरायाने त्याला रायनायक ही पदवी दिली. पुढे त्याने रामरायाच्या आज्ञेवरून बिदरवरही स्वारी केली. तुळू व केरळ या प्रदेशांतील पुंड पाळेगारांची बंडेही त्याने मोडून काढली. या कामगिरीबद्दल त्याला तुळू राज्याची सुभेदारी मिळाली. आरग, गुत्ती, छत्तीसकपाग, बारकूर व मंगळूर हे भाग त्याच्या सुभेदारीत होते. इ. स. १५६५ पर्यंत तो सुभेदार राहिला.

सदाशिव नायकाला दोड्ड संकण्णा व चिक्क संकण्णा या नावाचे दोन पुत्र होते. दोड्ड संकण्णाने सुमारे वर्षभरच राज्य केले. इ. स. १५५८ मध्ये रामरायाचा चुलत भाऊ विठ्ठल याच्याबरोबर तो पोर्तुगीजांवर स्वारी करण्यास गेला होता. त्याच्या नंतर चिक्क संकण्णाने इ. स. १५८० पर्यंत राज्य केले असावे. यानेच इक्केरी हे राजधानीचे नगर वसवले व तिथे राजवाडा बांधला. दोड्ड संकण्णाला रामराजय्या व वेंकटप्पा असे दोन पुत्र होते. चिक्क संकण्णा व रामराजय्या हे चुलते-पुतणे काही काळ संयुक्तपणे राज्य करीत असावेत. रामराजय्याने इ. स. १५८६ पर्यंत राज्य केले. त्याच्यानंतर वेंकटप्पा गादीवर आला. तो इ. स. १६१३ पर्यंत विजयनगरचा सामंत म्हणूनच राज्य करीत होता. तुळू व मलेही राज्य त्याच्या आधिपत्याखाली होती. त्याने पूर्वेकडे म्हैसूर, शिमोगा व कडूरपर्यंत आणि पश्चिमेला होनावर व मलबारपर्यंत आपले राज्य विस्तारले. इ. स. १६१३ नंतर तो स्वतंत्रपणे राज्य करू लागला. त्याने उत्तम राज्यकारभार केला. शृंगेरी, कमलदुर्ग, इ. जागी त्याने मठ बांधले.

वेंकटप्पानंतर त्याचा नातू वीरभद्र हा इ. स. १६२९ साली राज्य करू लागला. इ. स. १६३८ मध्ये रणदुल्लाखानाने इक्केरीवर हल्ला केल्यामुळे वीरभद्र याने आपली राजधानी बिदनूर येथे नेली. वीरभद्राला पुत्र नव्हता. त्यामुळे याच्यानंतर त्याचा चुलता शिवप्पा हा गादीवर बसला. तो पराक्रमी होता. त्याने इ. स. १६४५–१६६० पर्यंत राज्य केले. मुसलमानांनी वल्लोर घेतले होते, ते शिवप्पाने परत मिळवले. तो धुरंधर योद्धा होता व त्याची सेनाही मोठी होती. इ. स. १६५३ मध्ये त्याने डच लोकांची मदत घेऊन पोर्तुगीजांना होनावरच्या किल्ल्यातून हाकून लावले. त्याने इक्केरी, सोरब व उदगणी हे किल्ले परत मिळविले आणि काही नवे किल्लेही बांधले. इ. स. १६५७ साली त्याने पोर्तुगीजांपासून कुंदापूर, गंगोळी व मंगळूर ही ठाणी परत घेतली. कासरगोडपासून तद्री नदीपर्यंत याचे राज्य पसरले होते. त्याने जमीनमहसुलाची नवी व्यवस्था लावली. ती शिवप्पाची शिस्त या नावाने आळखली जाते. विजयनगरचा राजा श्रीरंग याला शिवप्पा नायकाने पुष्कळच मदत केली.

शिवप्पानंतर वेंकटप्पा, भद्रप्पा व सोमशेखर यांनी राज्य केले. सोमशेखर मनाने दुबळा असल्यामुळे त्याची राणी चेन्नम्मा हीच राज्य चालवीत होती. ती पराक्रमी व कुशल राज्यकर्ती होती. मुसलमान, मोगल व म्हैसूरचा राजा यांनी तिच्यावर आक्रमणे केली, पण तिने ती मोडून काढली. इ. स. १६९० मध्ये तिने छत्रपती राजारामाला आश्रय दिला. ते तिचे कृत्य सहन न होऊन मोगलांनी इक्केरीवर स्वारी केली. पण चेन्नम्माने त्यांचा पराभव केला.

चेन्नम्माला पुत्र नव्हता, म्हणून तिने बसवप्पा नावाच्या मुलाला दत्तक घेतले व त्याला उत्तम शिक्षण दिले. इ. स. १६९७ मध्ये तिने बसवप्पाला गादीवर बसविले. तो मुत्सद्दी होता, तसाच विद्वानही होता. त्याने शिवतत्त्वरत्नाकर नामक

एक ग्रथही लिहिला आहे कारकिर्दीच्या प्रारंभीच त्याला मराठे व म्हैसूरचा राजा यांच्याशी लढावे लागले बसवप्पाच्या नंतर इ स १७५७ पर्यंत चार–पाच राजे गादीवर बसले पण इंग्लिश, डच पोर्तुगीज व फ्रेंच यांच्या सत्तासंघर्षात सापडल्यामुळे इक्केरीची सत्ता कमकुवत झाली बसवप्पा (२ रा) हा नायक राजा इ स १७५५ साली वारला त्याचा दत्तक पुत्र चेन्नबसवप्पा हा लहान असल्यामुळे बसवप्पाची राणी वीरम्मा ही राज्यकारभार पाहू लागली चेन्नबसवप्पाचा इ स १७५७ साली वध झाला नंतर सोमशेखर नामक मुलाला दत्तक घेऊन वीरम्माने काही वर्षे राज्य चालविले पुढे इ स १७६३ साली हैदर अलीने तिच्यावर स्वारी करून इक्केरीचे राज्य जिंकले वीरम्मा इ स १७६४ मध्ये मरण पावली

इक्केरीच्या राज्यात पोर्तुगीज, डच व इंग्लिश व्यापारी यांच्या मिऱ्याच्या व्यापारासाठी स्पर्धा चालू होती त्या सर्वांना सांभाळून घेण्यासाठी व त्यांच्यावर नियंत्रण ठेवण्यासाठी नायक राजांना बरीच तारेवरची कसरत करावी लागली त्यात त्यांना बरेच यशही लाभले

इक्केरीचे सर्व नायक राजे हे वीरशैव पंथाचे असून, त्यांनी शृंगेरी, कूडली उडुपी वगैरे मठांना दानपत्रे दिलेली आढळतात त्या सर्व राजांत शिवप्पा नायक हा सर्वश्रेष्ठ प्रशासक ठरला चेन्नम्मा व वीरम्मा या दोन राण्यांनीही चांगला राज्यकारभार केला या राजांनी स्वतःची सोन्याची नाणी बनविली होती इक्केरी वराह म्हणून ती ओळखली जातात

नायक राजांच्या काळात द भारताची उन्नती झाली त्यांनी भाषा, विद्या व कला यांना उत्तेजन दिले पण त्यांची शासनव्यवस्था दृढ नव्हती सरदार सामंतांच्या स्वार्थी कारवायांमुळे व आपसातील यादवीमुळे ते मुसलमानी आक्रमणाचा प्रतिकार करू शकले नाहीत त्यांनी नाविक सामर्थ्याकडे दुर्लक्ष केल्यामुळे परकीय लोकांनाही तिथे प्रथम व्यापारी वर्चस्व आणि नंतर राज्य स्थापता आले [ हि ना म , वि स्गा ग्र , म ज्ञा को , हि जि रू , त्रि सा न , हि ट ]

## नायकी कानडा

एक राग हा काफी थाटातून निघाला याच्या आरोहावरोहात धैवत वर्ज्य असल्यामुळे याची जाती षाडव षाडव मानलेली आहे वादी– मध्यम संवादी– षड्ज आरोह– सा रे म प नि प सा अवरोह– सां नि प म प ग म रे सा गानसमय मध्यरात्र याच्या पूर्वांगात सुहा व उत्तरांगात सारंग हे राग श्रुतिगोचर होतात हा एक कानड्याचाच प्रकार असून, तो गोपाळ नायक या गायकाने प्रचलित केला, असे समजतात [ सु वि रो ]

## नायन्मार

द भारतातील शैव संत कवी यांना अरवत्तुमूवर अडियार किंवा नायनार असेही म्हणतात तमिळ भाषेत नायन्मार शब्दाचा अर्थ भक्त असा आहे नायन्मारांची संख्या त्रेसष्ट असून, समाजाच्या सर्व थरांतून ते आलेले आहेत ब्राह्मण शूद्र, राजे, रंक इ सर्व प्रकारचे लोक नायन्मार झाले आहेत साधारणपणे इ स च्या पाचव्या शतकापासून इ स च्या दहाव्या शतकापर्यंतचा काळ हा नायन्मारांचा काळ मानला जातो अप्पर, ज्ञानसंबंदर, सुंदरर व माणिक्क वाचकर हे त्यातील प्रमुख होत हे चौघ शैव समयाचार्य असून, दासमार्ग, सत्पुत्रमार्ग, सखामार्ग व सन्मार्ग या चार भक्तिमार्गांचे आदर्श आहेत

पहिल्या पाच शतकांत तमिळनाडमध्ये जैन आणि बौद्ध या धर्मांचे वर्चस्व होते त्यांच्या दडपणाखाली शैव संप्रदाय बराच दबून गेला होता मात्र पाचव्या शतकापासून ही परिस्थिती पालटली पुढच्या दोन तीन शतकांत तिथे अनेक शैव संत निर्माण झाले ते भक्तीने परिपुष्ट व ज्ञानाने चारित्र्यसंपन्न होते त्यांनी जैन व बौद्ध पंडितांशी शास्त्रार्थ करून तिकडील अनेक राजदरबारांत धर्मचर्चा गाजविल्या आणि त्यांत जैन बौद्धांचा सर्वस्वी पराभव केला तत्कालीन अनेक राजांना त्यांनी शिवाच्या सामर्थ्याची रोकडी प्रचीती दाखवली आणि त्यांना जैन बौद्धांच्या वर्चस्वातून परत शैव संप्रदायात आणले पल्लव राजा महेंद्रवर्मन (पहिला) व मदुरेचा पांड्य राजा ही त्याची उदाहरणे होत

बहुतेक सर्व नायन्मार हे कवी होते त्यांनी शिवस्तुतिपर अशी अनेक पद्ये रचली आहेत त्यांपैकी अप्पर, सुंदरर व ज्ञानसंबंदर या तीन शैव संतांची पदे तेवारम या नावाने संग्रहित केलेली आहेत

पेरियपुराणम या ग्रंथात या नायन्मारांची चरित्रे वर्णिली असून, त्यात नायन्मारांची पुढील नामावली उपलब्ध होते– तिरुनीलकंठ अय्यरपगई, इळयंकुडी मार, मय्पारुल, वीरनमिंद अमरनीती, येरीपथ, यनादिनाथ कण्णप्पार, कुंगिलियक्कलय, मनक्कंजर, अरिवत्तय्य, अनय, मूर्ती, मुरुग रुद्र पशुपती तिरुनाल, ईप्पवार तिरुकुरिप्पू थोंडा चंडेश्वर तिरुनवुक्करसु कुलचिरई, पेरुमिशलई कुरुंब, कारक्कल अम्मयार, अप्पुदि अडिगल, तिरुनीलनक्क, नमिनंदी अडिगल ज्ञानसंबंदर इयरकोन कलिकामर तिरुमूल, थंडिय अडिगल मूर्क, सोमसिमार, साक्किया, सिरप्पुली, सिरुथोंडा, चेरमान पेरुमाळ गणनाथ कुर्तव, पुगाळ्चोळ, नरसिंग मुनैयरैय्या, अधिपट्ट, कलिक्कंब कलिय सत्ती, अरयन्गिळ, कनमपुल्ला, करी, निन्रसिर नेडुमार वायिलार मुनइ अडुवार, कलर्चिंगा, इदानक्कुडी, सेरुथनाई पुगाळ

थनाइ, कोम्पुली पुसलर, नमि नंदि गटचोळ, नीलकंठ यळपान सदिय नसाइ व सदरमूर्ती.

इतर तमिळ ग्रंथ प्रथांत या नावांशिवाय काही वेगळी नावे आढळतात. तमिळनाडमध्ये नायन्मारांच्या कथा आख्यायिकांनी भरलेल्या आहेतच; शिवाय शेजारच्या आंध्र कर्नाटकांतही त्यांच्या कथा प्रगत झाल्या. १३ व्या शतकात तेलुगू कवी पालकुरिकी सोमनाथ याने अशा काही कथा बसवपुराणमु या आपल्या ग्रंथात दिल्या आहेत. त्याशिवाय तेलुगू भाषेत त्यांच्यावर शिवभक्त विलासमु हे रघुने नंजराजकवि एक मोठे काव्यही आहे. [नं. प्र. हि. क्षु. तमिळनाड, श्री आदिलक्ष्मी—जॉ. इ. जा. का., अनंतनगर, १९५५, स. का. रा. इ. इ. क.]

**नायर** केरळातील एक द्रविड जात. नायक या संस्कृत शब्दापासून नायर शब्द उत्पन्न झाला, असे सांगतात आणि विजयनगरच्या साम्राज्यातील नायकांशी त्यांचा संबंध जोडतात. केरळात नायर समाज बहुसंख्य असून मेनन, कुरुप, नंबियार आणि पणिक्कर या आडनावांचे नायर हे त्या जातीतील सर्व बाबतीत अग्रगण्य ठरले आहेत.

किरियम, इल्लत्तर, स्वरूपक्कर, पदमंगलम, वाधी किंवा वाट्टी, अट्टिकुरिच्ची, इटचेरी, कडवेलम, अग्निकुरवन, अकटट्टु चारण, वल्लियारन, कुडिन, इ. नायरांतील अनेक उपजाती असून, त्यांच्यात उच्च नीच असा भेदही आहे.

सेना हा नायरांचा प्रमुख व्यवसाय आहे. याशिवाय व्यापार करणे, शेतकी, नंबुद्री ब्राह्मणांच्या घरी काम करणे इ. उद्योगही ते करतात. काही नायर नापिताचा व धोब्याचाही व्यवसाय करतात. सांप्रत अनेक नायर सरकारी नोकऱ्यांत शिरले आहेत.

**इतिहास**— प्राचीन काळापासून नायर ही जात लढाऊ म्हणून समजली जाते. प्राचीन काळी नायर मुलाला वयाच्या सातव्या वर्षी व्यायाम आणि युद्धकला यांचे शिक्षण देणाऱ्या कलरी नामक संस्थेत पाठवीत असत. प्रत्येक मोठ्या वस्तीच्या विभागात एक तरी कलरी असेच. कलरीत अंगाला मालिश करून विद्यार्थ्यांचे शरीर लवचिक व पिळदार बनवीत आणि तलवार, धनुष्य बाण, इ. शस्त्रास्त्रे त्याला वापरायला शिकवीत. केरळात इंग्रजांची सत्ता प्रस्थापित होईपर्यंत तिथले लष्कर नायरांचेच होते.

प्राचीन काळी केरळ अनेक नाडूंमध्ये (म्हणजे प्रदेशांमध्ये) विभागलेला होता. या प्रत्येक नाडूचे संरक्षण नायरांकडेच असे. राजाशी एकनिष्ठ राहून ते आपापल्या प्रदेशाच्या संरक्षणाचे कार्य करीत. केरळच्या राजकीय इतिहासात या सैनिकी संघटनेने महत्त्वाची भूमिका बजावली आहे. इ. स. च्या सोळाव्या शतकात कालिकतच्या झामोरिन राजाच्या पदरी कित्येक हजार नायर योद्धे होते. कित्येक नायर, राज्यकर्तेही बनले होते. झामोरिन राजाचा असा एक नियम होता, की प्रत्येक राजाने फक्त बारा वर्षे राज्य करावे आणि त्यानंतर स्वतःच आपला शिरच्छेद करून मरून जावे. त्यासाठी मोठा समारंभ होत असे. त्या प्रसंगी सरदारांना व सैनिकांना राजा मोठी मेजवानी देत असे. काही वेळा हा झामोरिन राजा चार नायर योद्ध्यांकडे आपला शिरच्छेद करण्याचे काम सोपवीत असे. इ. स. च्या सतराव्या शतकापासून या पद्धतीत बदल झाला. बारा वर्षे राज्य केल्यानंतर राजा एक समारंभ करू लागला आणि स्वतःचा शिरच्छेद करण्याच्या ऐवजी तीस-चाळीस हजार सैन्याच्या पहाऱ्यात एका तख्तावर बसू लागला. अशा बंदोबस्तात जर एखाद्याने त्या राजाला ठार मारले, तर मग तो मारणारा पुरुष त्याच्या सिंहासनावर बसत असे.

नायर लोक हे केरळातील मूळचे रहिवासी समजले जातात. क्षत्रियांचा उच्छेद करीत परशुराम पश्चिम घाटावर आला असता या नायर लोकांशी त्याची गाठ पडली. त्यांचे व परशुरामाचे युद्ध झाले. त्या युद्धात नायरांचे युद्धकौशल्य पाहून परशुराम चकित झाला. पण ते क्षत्रिय असताही आपण त्यांच्याशी लढलो, याबद्दल परशुरामाला वाईट वाटले आणि त्याने नायरांना त्यांचे जानवे काढून टाकायला सांगितले, ही कथा केरळोत्पत्ती या ग्रंथात दिली आहे. पुराणांत ज्या नागलोकांचे वर्णन येते, तेच सांप्रतचे नायर लोक होत, असेही काही विद्वानांचे मत आहे.

**समाजव्यवस्था**— यासंबंधी इ. स. च्या १६ व्या शतकाच्या प्रारंभी बार्बोसा या प्रवाशाने लिहून ठेवले आहे, ते असे—

नायर लोक इतर नीच जातींच्या पासून दूर राहत. बाहेर जाताना त्यांच्या वाटेत कोणी शूद्राने वा शेतकऱ्याने येऊ नये म्हणून ते तशी आरोळी देत. पण तिचा अनादर करून जर एखादा शेतकरी त्यांच्या वाटेत आला, तर ते त्याला सरळ ठार करीत. त्यापेक्षा आश्चर्याची गोष्ट ही, की त्यांना त्या वधाबद्दल राजाकडून काहीही शिक्षा होत नसे. तसेच एखाद्या शेतकऱ्याने जर एखाद्या नायर स्त्रीला चुकून स्पर्श केला, तर तिचे नातेवाईक तिला ठार मारीत आणि त्या शेतकऱ्याला व त्याच्या नातेवाइकांनाही ठार करीत. शेतकऱ्याशी वर्णसंकर होऊ नये म्हणून ते एवढी काळजी घेत असत.

नायरांची कुटुंबपद्धती पितृप्रधान नसून मातृप्रधान आहे. या पद्धतीत स्त्री म्हणजे माता ही कुटुंबाचे केंद्र बनते. तिची संतती मातेचे गोत्र सांगते. मुलगी लग्न होऊनही माहेरीच राहते

तरवाडात दहा–बारा वर्षांनी एका पिढीतील अनेक मुलींना हा सामुदायिक समारंभ होतो. त्यासाठी खूप खर्च करतात.

या समारंभातला प्रमुख विधी म्हणजे नवऱ्या मुलाने मुलीच्या गळ्यात ताळी म्हणजे सौभाग्यतळी बांधणे हा होय. यासाठी कुणगूतून एखाद्या मुलाची निवड करतात. या नेमून केलेल्या वराला मनवाळन असे म्हणतात. ही निवड मोठ्या कसोशीने होत असते. त्यासाठी पत्रिकेतील ग्रह पाहणे, घटित जुळविणे, इ. गोष्टी आवर्जून करतात.

प्रथम घरापुढच्या मोकळ्या जागेत गावकऱ्यांच्या साहाय्याने मंडप उभारतात. त्याच्या आत चार खांबांवर एक लहानशी मंडपी तयार करतात. हे खांब भाताच्या लोंब्यांनी सजवतात. या लहान मंडपीत तांदळांनी भरलेले माप, साळी, नवे पांढरे वस्त्र, माडाचा फुलोरा, बाण, आरसा, दिवा व एक लहान लाकडी पेटी अशा आठ मंगल वस्तू ठेवतात.

ठरलेल्या दिवशी वीरवेष धारण करून व तलवार हातात घेऊन मनवाळन मिरवणुकीने मुलीच्या घरी येतो. मुलीकडील पुरुष मिरवणुकीने सामोरे जाऊन त्याला मांडवात घेऊन येतात. तिथे मुलीचा भाऊ त्याचे पाय धुतो. त्याबद्दल त्याला मुलाकडून दोन वस्त्रे मिळतात. मग तो आतल्या लहान मंडपीत जाऊन बसतो. मुलीचा भाऊ मुलीला घरातून घेऊन येतो आणि लहान मंडपीला तीन प्रदक्षिणा घालून तिला मुलाच्या डाव्या बाजूला पूर्वेकडे तोंड करून बसवतो. नंतर मुलीचा पिता त्या दोघांना नवे कपडे देतो आणि ती दोघे ते परिधान करतात. मग पुरोहित मनवाळनच्या हातात ताळी देतो आणि तो ती मुलीच्या गळ्यात बांधतो. त्या वेळी तो तलवार मांडीवर ठेवतो व मुलगी हातात बाण आणि आरसा धरते. त्या प्रसंगी ब्राह्मण स्त्री गीते गातात. नंतर त्या नूतन दांपत्याला घरातल्या एका सजवलेल्या खोलीत घेऊन जातात. तीन दिवस त्या दोघांनी घराबाहेर जायचे नसते. चौथ्या दिवशी त्या दोघांना मिरवणुकीने तळ्यावर स्नानासाठी नेतात. परत आल्यावर घरातील स्त्रिया त्या दोघांना मिठाई देतात. मग मुलगी त्याला जेवायला वाढते. दोघे एकाच पानात जेवतात. नंतर ती दोघे मांडवात येतात. तिथे अनेक लोकांसमोर त्यांच्या एका वस्त्राचे दोन तुकडे करतात आणि ते एकमेकांना देतात. याचा अर्थ त्या दोघांचा इथून पुढे संबंध संपला असा होतो.

एका मनवाळनने एका वेळी अनेक मुलींना ताळी बांधली तरी चालते. काही वेळा नंपूतिरी, निरमळपाद, एल्याद, इ. ब्राह्मण जातीतले तरुणही ताळी बांधण्याकरिता निवडतात. त्या वेळी त्याने जितक्या मुलींना ताळी बांधली असेल त्या प्रमाणात त्याला दक्षिणा मिळते. पण कुणगूतून निवडलेल्या मुलाला मात्र काही दक्षिणा मिळत नाही. कधी मुलीची आईच ताळी बांधते.

हा सर्व समारंभ मोठ्या उत्साहाने साजरा होतो. पहिल्या दिवशी सर्व आप्तेष्टांना आणि गावातील अनेक लोकांना जेवण



नायर स्त्रियांचे अलंकार

घालतात. सर्वजण कारणवराला अहेर करतात. या निमित्ताने कथकळी किंवा आट्टम थुळ्ळल या नृत्यांचे प्रयोग ठेवतात.

या समारंभानंतर मुलगी आपल्या पसंतीच्या मुलाशी किंवा योग्य वाटल्यास मनवाळनशीही संबंध करू शकते. काही ठिकाणी मनवाळनचा तिच्यावर पत्नी म्हणून हक्क मानला जातो आणि त्याच्या संमतीशिवाय तिला दुसऱ्याशी लग्न करता येत नाही. तसेच त्याच्या मृत्यूनंतर तिला पंधरा दिवस सुतक पाळावे लागते. पण ताळी बांधणारा ब्राह्मण असल्यास मात्र तिला तसे करावे लागत नाही.

स्थानपरत्वे या समारंभाच्या तपशिलात फरक आढळतो. काही ठिकाणी समारंभानंतर मुलगी ताळी काढून ठेवते, तर काही ठिकाणी ती शेवटपर्यंत गळ्यात ठेवते. काही वेळा मुलीची आईच तिच्या गळ्यात ताळी बांधते, तर काही वेळा ताळी बांधणाऱ्याचा प्रतिनिधी म्हणून तलवार किंवा मानाची

बाहुली जवळ ठेवली जाते गरीब नायर एखाद्या देवळात जाऊन हा समारंभ थोडक्यात करतात

**तेरवुकुळी** – मुलीला प्रथम ऋतुप्राप्ती झाली की तरदुवुळी किंवा तेरदुयल्याणम नावाचा समारंभ करतात त्यासाठी तीन दिवस तिला एका स्वतंत्र खोलीत ठेवतात तिच्याजवळ एक समई तेवत ठेवतात आणि भाताचा फुलोरा एका पात्रात खातून ठेवतात आपला नवा चेहरा पाहण्यासाठी तिला काशाचा एक आरसा देतात मग ऋतुप्राप्तीची बातमी सर्व नातेवाईकांना कळवतात जवळचे नातेवाईक तिला वस्त्रे देतात चौथ्या दिवशी तिला तळ्यावर स्नानासाठी नेतात व मिरवीत परत घरी आणतात साधन या समारंभाचा गाजावाजा करीत नाहीत

**संबंधम** – नायर स्त्रीच्या जीवनातील तिसरा महत्त्वाचा संस्कार म्हणजे संबंधम हा होय याला स्थानपरत्वे वरदानाम, पुडमुरी, पुडुवकाडमरम्, इ नावे आहेत तसेच स्थानपरत्वे त्याच्या विधिविधानातही थोडाबहुत फरक आहे उ मलबार मधील वस्त्रदानम या समारंभाचा विधी असा–

सुरवातीला वधूच्या घरी वधू वराच्या पत्रिका जुळतात की नाही, ते पाहतात त्या जुळतात असे ज्योतिष्याने सांगितल्यावर त्याच दिवशी वरदानाचा दिवस ठरवतात समारंभाचा मुहूर्त रात्री असतो नंतर दोन ताडपत्रावर तो दिवस लिहून एक ताडपत्र वधूच्या कारणवनाला आणि दुसरे वराच्या नातेवाइकांना देतात त्या दिवशी ज्योतिष्याला दक्षिणा किंवा वस्त्र देतात आणि जमलेल्या सर्व लोकांना मेजवानी देतात मुहूर्ताच्या आधी चार दिवस नवरा मुलगा त्याच्या कारणवनाला आणि इतर ज्येष्ठ नातलगांना भेटून पुडमुरीसाठी त्यांची संमती मिळवतो त्या वेळी तो त्यांना पान आणि सुपाऱ्या देतो समारंभाच्या दिवशी संध्याकाळी सूर्यास्तानंतर नवरा मुलगा इष्टमित्रांसह मिरवणुकीने वधूच्या घरी जायला निघतो वधूकडील मंडळी आपल्या घराच्या दारात त्या सर्वांचे स्वागत करतात नंतर नवरा मुलगा तिथे जमलेल्या ब्राह्मणांना दक्षिणा वाटतो मग जेवणावळ होते नंतर ज्योतिषी पुडमुरीचा मुहूर्त सांगतो मग सर्व मंडळी एका सजवलेल्या खोलीत जातात तिथे तांदूळ, साळी धान, आरसा, इ आठ मंगल वस्तू ठेवलेल्या असतात व समया तेवत असतात सजलेली वधू आपल्या आईबरोबर किंवा मामीबरोबर खोलीत प्रवेश करते वधू आणि वर पूर्वेकडे तोंड करून उभे राहतात मग नवरा मुलगा वधूला आपल्या ऐपती प्रमाणे नऊ, अकरा, सतरा किंवा एकवीस वस्त्रे अर्पण करतो मग सर्वजण वधू वराच्या मस्तकावर, खांद्यावर आणि समयांवर अक्षता टाकतात मग जमलेल्या आप्तेष्टांना नवरा मुलगा पान-सुपारी वाटतो वधू वर त्या रात्री त्या सजवलेल्या खोलीत झोपतात सकाळी उठून नवरा आपल्या घरी जातो जाण्यापूर्वी तो आपल्या उशाखाली काही रक्कम ठेवतो



नायर स्त्री

काही वेळा हा समारंभ अगदी त्रुटित स्वरूपात करतात आणि त्यात वरदानाचा विधी नसतोच पण अशा वेळी नवऱ्याला आपल्या पत्नीला स्वतःच्या घरी नेता येत नाही जेव्हा काही तो मुलीला वरदान करील तेव्हाच त्याला तशी परवानगी मिळते

संबंधम झाल्यावर स्त्री आपल्या तरवाडातच राहते आणि तिचा पती रोज रात्री तिच्याकडे येतो आणि सकाळी उठून आपल्या घरी निघून जातो संबंधम झाल्यानंतर काही दिवसांनी पतीच्या तरवाडातील वृद्ध स्त्री वधूला काही उंची वस्त्रे, पाने आणि तेल पाठवते दर सहा महिन्यांनी ती या वस्तू पाठवीत राहते ओणम, विषू व तिरु आतिरा या सणांच्या वेळी ती वधूला चार, आठ, सोळा, बत्तीस किंवा चौसष्ट रुपये आणि विड्याची पाने, सुपाऱ्या व तंबाखू पाठवते

संबंधम झाल्यानंतर थोड्या दिवसांनी चांगला मुहूर्त पाहून पतीच्या तरवाडातील दोन-तीन स्त्रिया वधूगृही जाऊन तिला आपल्या तरवाडात घेऊन येतात घरात आल्यावर तिच्या समोर साळी भरलेले माप, केळी आणि एक समई ठेवतात एक

ऱ्याला तीनदा प्रदक्षिणा घालतात. वधूच्या गळ्यात वर ताली बांधतो आणि तिला साडी देतो. दोघे एकमेकांना हार घालतात. नवरा मुलगा वधूच्या बोटात अंगठी घालतो. त्यानंतर रामायणातील काही श्लोकांचे पठन होते. त्या वेळी आप्तेष्ट नवदांपत्याला आहेर करतात व जमलेल्या लोकांना विडे वाटतात. हा सर्व कार्यक्रम वीस ते पंचवीस मिनिटांचा असतो. दुपारी जमलेल्या लोकांसाठी मेजवानी होते. मग वरपक्षाकडील सर्व मंडळी जातात. फक्त वर रात्रीसाठी तिथे राहतो. स्थलपरत्व या विवाहविधीत थोडा फरकही आढळतो. सांप्रत लग्न झाल्यानंतर वधू तरवाडात न राहता पतीच्या घरी जाते.

**प्रसूतिप्रथा** – गरोदरपणी स्त्रीला काही नियम पाळावे लागतात. सातव्या महिन्यापासून ती रोज सकाळी स्नान करून मंदिरात जाते व देवपूजा करते. तिथे पुजाऱ्याने मंतरून दिलेले थोडेसे लोणी खाते. नवव्या महिन्यात तिचा पुळिकुडी नामक एक समारंभ करतात. त्यासाठी चांगला दिवस व मुहूर्त पाहतात. त्या दिवशी रात्री चिंचेची एक फांदी आणून अंगणात पुरतात. मुहूर्ताच्या वेळी गर्भिणी स्त्रीला पूर्वेकडे तोंड करून बसवतात. तिचा मामा अंगणातल्या चिंचेच्या फांदीची काही पाने तोडून त्यांचा थोडा रस काढतो. हा रस तो गर्भिणीच्या भावाकडे देतो. त्याच्या हातात या वेळी सोन्याची अंगठी असावी लागते. नंतर तो सुरीच्या पात्याचे टोक तिच्या तोंडाशी धरतो. त्यावर तो रस ओततो. तो वाहत जाऊन तिच्या तोंडात पडतो आणि ती तो पिऊन टाकते. नंतर तिच्यापुढे धान्याच्या काही पुरचुंड्या ठेवतात आणि त्यांतली एक तिला उचलायला सांगतात. त्यात निघालेल्या धान्यावरून तिला मुलगा होणार की मुलगी होणार ते ठरवतात. काही ठिकाणी हा पुळिकुडी समारंभ सातव्या महिन्यात करतात.

हावीण किंवा वेलन स्त्री सुइणीचे काम करते. जननाशौच चार दिवस पाळतात. बाळंतीण रोज वण्णान स्त्रीने धुतलेले आणि दिलेले कपडे घालते. पंधराव्या दिवशी अट्टिकुरुमा जातीचा पुरुष तेल आणि पंचगव्य बाळंतिणीवर शिंपडतो. नंतर ती पुन्हा एकदा स्नान करते. अठ्ठाविसाव्या दिवशी कारणवन मुलाला सोन्याचे तुकडे व साखर घातलेले एकदोन चमचे दूध पाजतो आणि त्याचे नाव ठेवतो. सहाव्या महिन्यात मुलाचे अन्नप्राशन करतात. त्या वेळी त्याचा पिता अथवा कारणवन त्याला काही घास भरवतो. काही ठिकाणी या वेळीच मुलाचे नाव ठेवतात. या प्रसंगी मुलाला अलंकार घालण्याची पद्धत आहे. मुलाचे कान पाचव्या किंवा सहाव्या वर्षी टोचतात.

**मर्तिकप्रथा** – माणूस आसन्नमरण झाला, की त्याच्या तोंडात सोन्याच्या अंगठीवरून गंगाजल घालतात. मृत्यू झाला, की इष्टमित्रांना व नातेवाइकांना ती बातमी कळवतात. काही ठिकाणी इष्टमित्र आल्याशिवाय प्रेत हलवीत नाहीत. पितृप्रधान तरवाडात त्याच्या विधवेला प्रथम तिच्या तरवाडात धाडतात. प्रेत अंगणात नेऊन त्याला स्नान घालतात. त्याच्या अंगाला भस्म आणि चंदन लावतात. त्याला नवीन वस्त्र नेसवतात. सर्व इष्टमित्रही प्रेतावर नवीन वस्त्र घालतात. नंतर प्रेत शिडीवरून किंवा हातांनी उचलून आवाराबाहेर आग्नेय कोपऱ्यात नेतात. मृताचा भाऊ किंवा बहिणीचा मुलगा त्याचे और्ध्वदेहिक करतो. सांप्रत ते काम मोठ्या मुलाकडे असते. चितेला अग्नी देण्यापूर्वी तो गुंडाळलेल्या नव्या वस्त्राचा एक तुकडा फाडतो आणि त्यात किल्ली किंवा चाकू यांसारखी एखादी लोखंडी वस्तू गुंडाळून ती कमरेला बांधतो. प्रेत जळत असता लोक तळ्यावर जाऊन स्नान करतात. अंत्यसंस्कार करणारा एका सच्छिद्र मडक्यात पाणी भरून चितेला तीन प्रदक्षिणा घालतो आणि ते मडके फोडतो. नंतर सात दिवस मृताला पिंडदान केले जाते. सातव्या किंवा चौदाव्या दिवशी अस्थी गोळा करतात व त्यांचे एखाद्या तीर्थात विसर्जन करतात. जेव्हा अस्थी लगेच विसर्जन करायच्या नसतात, तेव्हा त्या धुऊन एका मडक्यात भरून ठेवतात. त्यावर दुसरे मडके ठेवून ती दोन्ही मडकी एखाद्या फणसाखाली पुरतात. मृताशौच चौदा दिवस पाळतात. पुरोहित पंधराव्या दिवशी सर्वांना थोडे तेल देतो, धोबीण वस्त्रे देते आणि मग सर्व संबंधित लोक स्नान करतात. आशौच चौदा दिवस असले तरी एकेचाळीस दिवस किंवा एक वर्ष शोक पाळतात. त्यासाठी तरवाडातील वयोवृद्ध पुरुष एका वर्षासाठी दीक्षा घेतो. त्या अवधीत तो नखे व केस कापीत नाही. या अवधीत त्याने पत्नीशी संबंध ठेवू नये, असाही संकेत आहे.

**देवधर्म** – नायर लोक हे सामान्यपणे धार्मिक वृत्तीचे असतात. रोज एकदा ते देवळात जाऊन देवाचे दर्शन घेतात. ते स्नान केल्याशिवाय अन्नग्रहण करीत नाहीत. भगवती ही त्यांची प्रमुख आराध्य देवता होय. ते तिची वार्षिक जत्रा करतात. कोट्टियूर येथे परुमाळ देवाची जत्रा भरते, त्या वेळी त्याच्यावर तुपाच्या आणि शहाळ्याच्या पाण्याच्या घागरींच्या घागरी ओततात.

अनेक नायर पळणी येथील सुब्रह्मण्याचेही भक्त असून त्याला ते कावडीचा नवस बोलतात. सुब्रह्मण्याच्या वार्षिक जत्रेच्या वेळी केशरी कपडे घालून आणि खांद्यावर कावड घेऊन ते चालत पळणीला जातात. त्यांच्यापैकी एकजण घंटा वाजवतो आणि दुसरा ढोलके वाजवीत चालतो. काही लोक शिव, विष्णू व शास्ता यांना पूजतात. त्यांच्यात पितृपूजाही प्रचारात आहे.

केरळात पाश्चात्य राष्ट्रांचा पायरव सुरू झाला आणि नायर लोकांना तरवाडची परंपरागत व्यवस्था रचनेशी झाली

त्याचा कल पितृसत्ताक कुटुंबपद्धतीकडे झुकू लागला. प्रत्येक तरवाडात संघर्ष सुरू झाले. आपले परंपरागत विवाह कायदेशीर व्हावे आणि पति–पत्नीच्या संसाराला स्वतंत्र अस्तित्व मिळावे, म्हणून समाजातल्या सुशिक्षित लोकांनी सरकारदरबारी प्रयत्न सुरू केले. शेवटी इ. स. १९१२ मध्ये त्रिवाकुर येथील संस्थानाधिपतीला लोकमतानुवर्ती असा नवा कायदा करावा लागला. त्या कायद्यानुसार नायरांचे विवाह सर्व बाबतीत कायदेशीर ठरले. तरवाडच्या उत्पन्नातून प्रत्येकाला स्वतंत्र वाटणी मिळण्याचा अधिकार प्राप्त झाला. पत्नीच्या पालनपोषणाची सर्व जबाबदारी पतीच्या शिरावर आली. पुरुषाचे बहुपत्नीकत्व आणि स्त्रीचे बहुपतिकत्व या दोन्ही चाली बेकायदा ठरल्या. या कायद्यामुळे नायर लोकांच्या समाजपद्धतीत क्रांतिकारक बदल झाला. कायदा अमलात येऊन पाच वर्षे लोटण्यापूर्वीच त्रिवांकुर संस्थानातील सुमारे चाळीस हजार तरवाडांनी आपल्या मालमत्तेची विभागणी केली. पूर्वी जिथे भाच्याला वारसा हक्क मिळायचा, तिथे तो पितृसत्ताक कुटुंबपद्धतीप्रमाणे मुलाला मिळू लागला.

हा कायदा म्हणजे मातृसत्ताक कुटुंबपद्धतीवर प्राणांतिक प्रहारच होता. कालांतराने नायर समाजाला उमगले, की या कायद्यामुळे आपले फार मोठे नुकसान झाले आहे. व्यक्तिवाद बळावला आणि फुटीर प्रवृत्तीला मोकळे कुरण मिळाले, ते या कायद्यामुळेच, असे जेव्हा त्यांना समजून आले, तेव्हा हा कायदा मागे घेतला जावा, म्हणून थोडी चळवळही झाली. पण तिला यश आले नाही. केरळातल्या खेड्यापाड्यात मातृसत्ताक कुटुंबव्यवस्थेचे काही अवशेष अजूनही आहेत. पण शहरातून आता ती जवळजवळ लुप्त झाली आहे. सांप्रत भारतीय घटनेनुसार हिंदू स्त्रीला पुरुषाच्या बरोबरीने हक्क मिळाले असल्याकारणाने आता मातृसत्ताक समाजपद्धतीची आवश्यकता उरली नाही, असे केरळातील विचारवंत मानू लागले आहेत. [ का. द्वा. ना. इ. , सा. चे. म. , प्रि. फा. , केरळ ]

## नायाडी

एक पूर्वास्पृश्य जमात. या लोकांची वस्ती केरळात प्राचीन काळापासून आहे. नायाडी हा शब्द नायटटू म्हणजे शिकार या शब्दापासून बनला आहे. कारण नायाडी हे उत्तम शिकारी व नेमबाज म्हणून प्रसिद्ध आहेत. नय म्हणजे कुत्रा. त्याचे मांस खाणारे ते नायाडी, अशीही कोणी त्या शब्दाची व्युत्पत्ती सांगतात.

नायाडी लोक ठेंगणे व बळकट असून, त्यांचे हात लांब व केस कुरळे असतात. त्यांच्या वर्णात सावळ्या रंगापासून काळ्या वर्णापर्यंत सर्व छटा आढळतात. नायाडी स्त्री पुरुषांच्या अंगावर कपडे फारसे नसतातच. स्त्रियांचे अलंकार म्हणजे मण्यांच्या माळा हेत. नायाडी लोक उंदीर, मुंगूस, उदके, खोकड्या माकड, मांजरे, कुत्रे या सर्व प्राण्यांचे मांस खातात. पूर्वी ते जंगलातील हिंस्र पशूंची शिकार करीत व त्यांचे मांस, कंदमुळे व फळे यावर निर्वाह करीत.

नायाडी मल्याळमची एक बोली बोलतात. तिच्यात काही तमिळ शब्दही आढळतात. नायाडांचा सामाजिक दर्जा अगदी खालचा मानतात. पूर्वी तर त्यांना अस्पृश्य म्हणूनच गणले जात. पूर्वी ते डोंगरमाथ्यावर झोपड्या उभारून राहत असत. काही वेळा एखाद्या जमीनदाराच्या शेताचे रात्री रक्षण करण्याचे काम त्यांना मिळे. अशा वेळी ते त्या शेताजवळच मुक्काम करीत. काही वेळा शेतीची इतर कामेही ते करीत.

एका विशिष्ट झाडाच्या सालीपासून ते दोरा तयार करतात. ओणम व विषू या सणांच्या वेळी त्यांच्या वाडीजवळच्या प्रत्येक नंपूतिरी इल्लममध्ये आठ वार लांबीचे चार दोर व प्रत्येक नायर तरवाडात दोन दोर, त्यांना द्यावे लागतात. याच्या बदल्यात त्यांना ठराविक भात मिळते. तसेच, प्रत्येक नायाडीला त्यांच्या जमातप्रमुखाने एक ठराविक प्रदेश नेमून दिलेला असतो. त्या प्रदेशातील घराघराकडे वाढदिवस किंवा वार्षिक कृत्य असल्यास त्या दिवशी आणि सणाच्या दिवशी त्याला वाढण मिळत असते. केरळातले लोक एखादा माणूस आजारी झाल्यास एका घोंगडीच्या चार टोकांना तीळ, मोहरी, हळकुंड व खोबरे बांधून ती घोंगडी त्या आजारी माणसावरून तीनदा ओवाळून ती एखाद्या नायाडीला देतात. त्याबरोबरच तांब्याची, छत्री व काठीही देतात. या प्रकाराला कालदान असे नाव आहे. या वस्तू स्वीकारल्यावर आजारी माणसाला दीर्घायुष्य लाभावे व त्याचा रोग आपल्या अंगात शिरू नये म्हणून नायाडी देवाची प्रार्थना करतो.



नायाडी पुरुष

पुष्कळसे नायाडी हे भटके आहेत. सांप्रत ते शिकारीसाठी

धनुष्यबाणाचा उपयोग करीत नाहीत, तर सापळे जाळी वगैरे लावून प्राणी व पक्षी पकडतात ते शिंकी व टोपल्याही विणतात भीक मागणे हा त्यांचा आवडता व्यवसाय आहे नाक्राधरणारे नायाडीही मजूर सापडेल तेव्हा भाक मागतात

**वेषधर्म** – नायाडी लोक मल्लन, मल्लवशी परकुट्टी व काली या देवतांना भजतात आणि त्यांना ताडी भात व मांसडाचे मास अर्पण करतात ते भुतेखेते व पितर यांचीही पूजा करतात एखाद्या व्यक्तीचा आकस्मिकपणे मृत्यू झाल्यास त्याची लाकडी किंवा धातूची प्रतिमा बनवून ती पुरतात व तिथे दिवा लावून ठेवतात

नायाडी लोकात मातृसत्ताक कुटुंबपद्धती असून, वारसा मुलाकडे न जाता भाच्याकडे जातो

**विवाहप्रथा** – सवसाधारणपणे मुलगी वयात आल्यावर तिचे लग्न करतात जेव्हा एखाद्या मुलीशी लग्न करण्यासाठी अनेक तरुण पुढे येतात तेव्हा ते पुढील पद्धत अवलंबितात– झाडाची पाने वापरून एक झोपडी उभारतात आणि तिच्यात उपवर मुलीला बसवतात मग ते उपवधू तरुण हातात काठ्या घेतात व झोपडीभोवती फेर धरून तासभर नाचतात नंतर प्रत्येक तरुण आपली काठी त्या झोपडीत खुपसतो आतली मुलगी ज्याची काठी पकडील त्याच्याशी मग तिचे लग्न होते

सांप्रत त्यांच्यामध्ये वधूशुल्क देऊन लग्न करण्याची पद्धत पडली आहे लग्नासाठी नवरा मुलगा आप्तेष्टांसह वधूच्या घरी जातो लग्नाचे काही विधी वधूच्या घरी तर काही वराच्या घरात होतात वधू–वरांनी एकमेकांना घास देणे हा लग्नातला मुख्य विधी असतो

दिराला विधवा भावजयीशी लग्न करता येते व्यभिचार हा मोठा गुन्हा मानतात आणि त्यासाठी अपराध्याला जातिबहिष्कृत करतात व्यभिचारी व्यक्तीला शिक्षा न केल्यास त्या कुटुंबावर संकटे येतात, अशी त्यांची समजूत आहे

घटस्फोट रूढ आहे तो झाल्यास व काही मुले असल्यास त्यातली मोठी मुले बापाजवळ व लहान मुले आईजवळ राहतात स्त्रीने घटस्फोटासाठी पुढाकार घेतल्यास तिला लग्नाच्या वेळी घेतलेले देज परत करावे लागते

मुलीला प्रथम ऋतुप्राप्ती झाली की तिला आठ दिवस दूर बसवतात या काळात तिने डोक्याला हात लावता कामा नये, असा नियम आहे

**प्रसूतिप्रथा** – सातव्या महिन्यात गर्भिणीचा पुळिकुडी नामक संस्कार करतात त्या वेळी तिला चिंचेच्या पाल्याचा रस प्यायला देतात आणि माकडाचे किंवा खारीचे मांस खायला घालतात भुताखेताच्या कारणामुळे गर्भपात होतो अशी त्यांची समजूत आहे व तसा तो होऊ नये म्हणून गर्भिणीच्या गळ्यात मंतरलेला दोरा बांधतात प्रसूतीसाठी एक स्वतंत्र झोपडी उभारतात स्त्रीला प्रसूतिवेदना सुरू झाल्या, की तिचा पती आपले पोट तेलाने चोळू लागतो आणि पत्नीच्या सुखप्रसूती-बद्दल देवाची प्रार्थना करतो जननाशौच दहा दिवस पाळतात आणि त्या अवधीत पती तिला पाहत नाही अठ्ठाविसाव्या दिवशी मुलाचे नाव ठेवतात पाचव्या वर्षी चुलता मुलाचे कान टोचतो

**मृतकप्रथा**– नायाडी लोक बहुधा प्रेते पुरतात त्यासाठी कुटुंबीय लोक छातीइतका खोल खड्डा खणतात भाचा किंवा त्याच्या अभावी पुत्र हा और्ध्वदेहिकाचा अधिकारी असतो मृताशौच पंधरा दिवस पाळतात दहाव्या दिवशी भाताचे सात पिंड मृताच्या थडग्याजवळ ठेवतात आणि और्ध्वदेहिकाचा अधिकारी असेल, तो नंतर ते पिंड भक्षण करतो काही मागसलेले नायाडी मात्र या महिन्यात मृताच्या अस्थी उकरून काढतात, त्यांचा सांगाडा बनवतात आणि मग तो जाळतात नंतर रक्षा मग एका मडक्यात भरतात आणि ते मृताच्या झोपडीजवळ टांगून ठेवतात जेव्हा प्रेत जाळतात तेव्हा त्याच्या अस्थी नदीत टाकतात [ द्रा के वा द्रा म द ]

## नारद

नारद हा शब्द ऐकताच भारतीयांच्या कल्पनासृष्टीत एक विशिष्ट मूर्ती उभी होते सदा हरिकीर्तनात निमग्न, गळ्यात वीणा, निरंतर भ्रमती विनोद ज्याच्या रोमरोमात भरलेला कळलावी लावणे ही ज्याची सहज लीला, असे ते व्यक्तिचित्र आहे नारद हा भगवंताची ब्रह्मांडातील लीला चालण्यासाठी मदत करतो जिथे मद, मान, दंभ व विक्षेप या आसुरी शक्तींचा अतिरेक होतो, तिथे योग्य वेळी प्रविष्ट होऊन तो त्या शक्तींचा धीमोड करतो नारदाला प्रवेश नाही असे स्थानच या त्रैलोक्यात नाही सप्तस्वर्गापासून सप्तपातालापर्यंत त्याचा अनिरुद्ध संचार असतो अनेक राजांच्या राजसभेत व अंतःपुरात कलहाग्नी पेटवून तो तिथे हाहाकार माजवतो, तर काही काळाने ती आग शमवून तिथे स्वर्गसुखाची पेठही उभारतो

नारदाच्या बुद्धीला समस्त ब्रह्मांडाचे राजकारण आणि समाजकारण अचूकपणे कळते देव, दानव व मानव या सर्वांची परिस्थिती तो स्वयंप्रज्ञेने जाणतो मानवांचा आणि राक्षसांचा गर्वभार तर तो हरण करतोच, पण देवांनाही गर्वाची बाधा झाल्यास तो त्यांचीही गय करीत नाही विष्णू शेषशय्येवर पहुडलेला असला, शिव समाधिस्थ असला किंवा इंद्र नृत्यरसपानात निमग्न असला, तरी तो नारदाची भेट नाकारू शकत

नाही. अखिल ब्रह्मांडाशी त्याचा संचार आणि देवलोकाशी घनिष्ठ परिचय असला, तरी त्याचे विशेष प्रेम मात्र मृत्यु *लोकावर आणि त्यातील विशेषतः मानवावर असते. तो भक्तांना* योग्य मार्गावरून पुढे नेतो आणि त्याचे-भक्तांचा संसारही जळवून देतो. इतके सारे लिहूनही नारदाच्या व्यक्तिमत्त्वातली रेषान् रेषा चित्रित झाली असे म्हणता येणार नाही. इतके ते व्यक्तिमत्त्व अनाकलनीय आहे.

नारदाला देवर्षी अशी संज्ञा आहे. तो ब्रह्मदेवाचा मानसपुत्र होय. त्याला विष्णूचा तिसरा अवतार मानतात. भागवत पुराणात त्याने स्वतःचे पूर्वजन्मवृत्त कथन केले आहे, ते असे —

मी पूर्वजन्मी एका दासीचा पुत्र होतो. ती दासी सत्पुरुष व विद्वान ब्राह्मण यांची सेवा करीत असे. तिने मला अत्यंत प्रेमाने लहानाचे मोठे केले. तिच्यामुळेच सत्पुरुष व विद्वान ब्राह्मण यांचा सहवास मला लाभला. त्यामुळे माझ्या मनात भगवंताची भक्ती उत्पन्न झाली. काही काळाने ते सत्पुरुष तिथून निघून गेले. मग मी आपल्या मातेसह निर्हेतुकपणे भटकत राहिलो. नंतर थोड्याच काळात माझी माताही मरण पावली. मला मातृवियोगाचे फार दुःख झाले. आता मला भगवंताचाच आधार असे मानून मी त्या भगवंताच्या प्राप्तीसाठी वनात एका ठिकाणी बसून ध्यान करू लागलो. योग्य काळी मला भगवंताचे मनोमय दर्शन झाले. कालांतराने माझाही मृत्यू झाला. मग ब्रह्मदेवाचा मानसपुत्र म्हणून मला हा जन्म मिळाला (भाग पु १ ५).



नारद

तो ब्रह्मदेवाच्या मांडीपासून जन्मला असेही म्हणतात.

निरनिराळ्या पुराणांत वर्णन होणारे नारदाच्या चरित्रातले प्रसंग असे —

दक्षाचे पुत्र हर्यश्व व शबलाश्व यांना दक्षाने प्रजा वाढविण्यास सांगितले होते. पण नारदाने त्यांना त्या गोष्टीपासून परावृत्त केले व वैराग्याचा मार्ग दाखवला. दक्षाला या गोष्टीचा राग येऊन त्याने नारदाला शाप दिला, की 'तू गृहहीन अवस्थेत सर्वत्र भटकत राहशील' (भाग पु ६ ५). 'तू नाश पावून पुनः पुन्हा गर्भवास पत्करशील' असा त्या शापाचा दुसरा पर्याय हरिवंशात आढळतो (१५). 'तुझा नाश होऊन तू पुनश्च गर्भवासी होशील व पुढील जन्मी माझाच पुत्र होशील' हा शापाचा तिसरा पर्याय देवी भागवतात (७ ८) सांगितला आहे.

दुसऱ्या एका ठिकाणी दक्षाने आपली मुलगी परमेष्ठीला दिली व तिला परमेष्ठीपासून नारद हा पुत्र झाला असे म्हटले आहे. म्हणजे या कथेवरून नारद हा दक्षाचा नातू ठरतो (वायू पु २४ १४५–१५०, ब्रह्मांड पु ३ २ १८). ब्रह्मदेवाच्या इतर मानसपुत्राप्रमाणे नारदही प्रजापती होता (वायू पु २ ८ ९).

वायू पुराणात याला कश्यप प्रजापतीचा पुत्र म्हटले आहे. पण *कश्यपाचा हा औरस पुत्र नसून, तो त्याला अर्पण केलेला* पुत्र होय, अशी कथा ब्रह्मवैवर्त पुराणात पुढीलप्रमाणे सांगितली आहे —

द्रुमिल नावाचा एक शूद्र होता. कलावती नावाची त्याची भार्या होती. तिला पुत्र होत नव्हता म्हणून तिने पतीच्या अनुमतीने कश्यपाचे वीर्य प्राशन केले. त्या वीर्याने कलावतीला गर्भधारणा झाली. ती गर्भवती असतानाच तिचा पती मरण पावला व ती एका ब्राह्मणाच्या घरी प्रसूत झाली. तिला जो पुत्र झाला त्याचे नाव तिने नारद असे ठेवले. पुढे तो मुलगा कश्यपवीर्याचा असल्यामुळे कश्यपाला अर्पण करून ती मोकळी झाली (१ १३).

**ज्ञानी नारद** – चित्रकेतू नामक राजाचा पुत्र मरण पावला. चित्रकेतू त्याबद्दल शोक करू लागला. अशा स्थितीत नारद अंगिरसाच्या बरोबर त्याच्या दरबारात गेला आणि त्याने त्याला त्याच्या मृत पुत्राचा आत्मा दाखवला. 'शरीर मर्त्य असते, आत्मा अमर असतो, अतएव तू शोक करू नको.' असा चित्रकेतूला उपदेशही केला. त्याने चित्रकेतूला जी अध्यात्म विद्या सांगितली, तिलाच नारद संहिता असे म्हणतात. नारदाला अशा सर्व विद्या अवगत होत्या. पण त्या सर्व विद्या मिळूनही त्याला समाधान नव्हते. त्याला सर्वश्रेष्ठ अशा ब्रह्मविद्येची तहान होती. ती मिळविण्यासाठी सनत्कुमाराकडे तो त्याचा शिष्य

म्हणून गेला (छां. उ. ७. १. १). सनकाने त्याला गोपालविद्या शिकवली. कलियुगात तारक असलेला षोडशाक्षरी विष्णुमंत्र याने ब्रह्मदेवाकडून मिळविला. ब्रह्मयानेच त्याला गारुडी विद्या व तुलसी उपनिषद सांगितले. ऊर्ध्व पुंड्र लावण्याचा विधी याला वासुदेवाने शिकविला.

मग प्राचीनबर्ही या राजाकडे जाऊन नारदाने त्याला पुरंजनाची कथा सांगितली व अध्यात्माचा उपदेश केला. पश्चिम समुद्रावर तप करणाऱ्या प्राचेतसांना भगवंताची प्राप्ती होण्याचा शीघ्र मार्ग सांगितला. सावर्णी मनूला पंचरात्रागमाचा उपदेश केला. शुकाला ब्रह्मज्ञान दिले. देवलाला सृष्टीची उत्पत्ति-संहारणी कशी होते ते समजावून सांगितले. वसुदेवाला भागवत धर्माची दीक्षा दिली. गालवाला धर्मशास्त्र व तत्त्वज्ञान शिकविले. पुंडरीकाला नारायणमाहात्म्य सांगितले. पांडवांना राजनीती कथन केली. अपमानित होऊन वनात निघून गेलेल्या ध्रुवबाळाला भगवत्कृपेसाठी द्वादशाक्षरी मंत्र उपदेशिला. तोच मंत्र प्रल्हादालाही शिकविला. व्यास महर्षीला भागवत पुराण व वाल्मीकीला रामायण रचण्याची प्रेरणा केली.

नारद हा वीतराग व ब्रह्मचारी असल्याचे काही ठिकाणी वर्णन आहे, तर काही ठिकाणी तो गृहस्थाश्रमी असल्याचेही सांगितले आहे. ब्रह्मयाने नारदाला लग्न न करण्याबद्दल उपदेश केला, पण ती गोष्ट नारदाला न रुचून त्याने आपल्या पित्याची म्हणजेच ब्रह्मदेवाची निर्भर्त्सना केली. तेव्हा ब्रह्मयाने त्याला शाप दिला, की 'तू स्त्रीच्या आधीन होऊन विषयलंपट बनशील.' तेव्हा नारदाने ब्रह्मयाला प्रतिशाप दिला, की 'तू स्वतःच्या कन्येचीच अभिलाषा धरशील आणि पूजेला अपात्र ठरशील.'

शिव पुराणात नारदाच्या लग्नाची कथा आली आहे, ती अशी –

एकदा नारद व त्याचा भाचा पर्वत हे दोघे संजय राजाचे पाहुणे म्हणून त्याच्याकडे काही दिवस राहिले. राजाने आपली कन्या दमयंती हिला त्यांच्या सेवेसाठी नेमले. ती त्यांची सेवा करीत असता नारदाचे मन दमयंतीवर जडले. ही गोष्ट नारदाने आपल्या मामापासून चोरून ठेवली. हे पर्वताला समजले व त्याने नारदाला शाप दिला, की 'दमयंती तुला मिळेल, पण तुझे मुख मात्र वानरासारखे होईल.' पुढे पर्वताने तो शाप परत घेतला व दमयंतीने नारदाला वरले.

हीच कथा महाभारतात थोड्या निराळ्या प्रकारे आली आहे. पुढे संजयाचा पुत्र मरण पावला असता, नारदाने आपल्या सासऱ्याला राम, भगीरथ, दिलीप अनेक पूर्व पुरुषांच्या गोष्टी सांगून त्याचा पुत्रशोक दूर केला व शेवटी त्याचा पुत्रही त्याला परत मिळवून दिला (म. भा. शांति. ३१; द्रोण. ५५-७१).

एकदा पुष्करक्षेत्री ऋषींचे सत्र चालले असता कलियुगात कुठल्याही कर्माचा फलप्राप्ती त्वरित होते, म्हणून त्यांनी कलियुगाची प्रशंसा चालविली होती. त्या वेळी नारद एका हातात शिश्न व दुसऱ्या हातात जीभ धरून त्या ठिकाणी प्रकट झाला व त्या ऋषींना म्हणाला, "ऋषिजनहो, कलियुगात ही दोन इंद्रिये अनिवार ठरतील. लोक पाखंडी बनतील. अतएव तुम्ही कलियुगाची प्रशंसा करू नका आणि हे सत्र संपवून इथून निघून जा" (स्कंद पु. २. ७. २२).

कृष्णाचा व नारदाचा अनेक वेळा संबंध आला आहे. कृष्णाच्या जन्माआधीपासूनच कृष्णचरित्राशी त्याचा संबंध आहे. एकदा तो नंदाच्या घरी आला असता त्याला कृष्णदर्शन झाले. कृष्ण हा विष्णूचाच अवतार आहे हे त्याने जाणले. त्याच वेळी त्याच्या मनात असाही विचार आला, की ज्या अर्थी विष्णूचा अवतार कृष्ण या ठिकाणी आला आहे त्या अर्थी विष्णुभार्या लक्ष्मी इथेच कुठेतरी जन्माला आली असावी. त्या दृष्टीने शोध करीत असता त्याला आढळले की भानुनामक गवळ्याच्या घरी राधा नावाने अशा स्थितीत लक्ष्मीने जन्म घेतला आहे (पद्म पु. ७१).

सुरुवातीला कंस हा देवकीची मुले मारीत नव्हता. पण नारदाने त्याला तसे करण्याचा उपदेश केला आणि मग कंसाने ओळीने तिचे सहा पुत्र मारले (भाग. पु. १०. १).

मोठ्या वयात कृष्णाने नरकासुराच्या बंदिशाळेतील सोळा सहस्र मुली सोडवल्या आणि त्या सर्वांचे विधियुक्त पाणिग्रहण केले. ही गोष्ट नारदाला समजली. एवढ्या सर्व स्त्रियांचा संसार श्रीकृष्ण कसा काय चालवीत असेल, याविषयी जिज्ञासा उत्पन्न होऊन नारद एके दिवशी द्वारकेत गेला. तो त्या प्रत्येक स्त्रीच्या घरी गेला आणि त्याला असे दिसले, की श्रीकृष्ण प्रत्येक स्त्रीच्या घरी असून, तो कोणत्या ना कोणत्या उद्योगात निमग्न आहे. श्रीकृष्णाच्या या अतर्क्य लीलेचा साक्षात्कार झाल्यावर नारदाच्या सर्व आशंका फिटल्या व तो श्रीकृष्णाला शरण गेला (भाग. पु. १०. ६९. ८२).

रुक्मिणी व सत्यभामा या श्रीकृष्णाच्या स्त्रियांमध्ये यानेच एकदा कलागत लावली आणि सत्यभामेकडून श्रीकृष्णाचे दान घेऊन तिचा गर्वभार उतरविला (पद्म पु. उ. ८८).

युधिष्ठिराचा राजसूय यज्ञ करण्याची इच्छा आहे, ही बातमी नारदाने कृष्णाला जाऊन सांगितली. बाणाने अनिरुद्धाला बंदिवासात ठेवल्याची बातमी कृष्णाला नारदाकडूनच मिळाली. शाल्व हा यादवांना समूळ नष्ट करण्याच्या विचारात आहे, ही बातमी कृष्णाला सांगून शाल्वाचा पराभव करणे

अत्यावश्यक आहे, तेही नारदानेच कृष्णाला पटवून दिले

नारद व तुंबरू ही जोडी पुराणात आढळते तुंबरूला गानविद्या अवगत होती, पण नारदाला ती नव्हती त्यामुळे लक्ष्मीने एकदा नारदाचा अपमान केला मग नारद हा तुंबरू कडे गायन शिकू लागला एके दिवशी ना गात असता सर्व रागिण्या त्याच्यापुढे प्रकट झाल्या त्या कृश व अतिनिस्तेज झालेल्या होत्या नारदाने त्यांना अशी स्थिती होण्याचे कारण विचारले, तेव्हा त्या म्हणाल्या 'तुझ्या अशुद्ध व कर्णकटू गायनामुळे आमची अशी दशा झाली आहे आता तुंबरू जेव्हा गाईल, तेव्हा ते ऐकून आम्ही आमच्या पूर्वदशेला प्राप्त होऊ'

ते ऐकून नारदाला लाज वाटली मग श्वेतद्वीपात जाऊन त्याने श्रीविष्णूची गानविद्येच्या प्राप्तीसाठी प्रार्थना केली त्यावर विष्णु त्याला म्हणाला की 'कृष्णावतारी मी तुला गायन शिकवीन' पुढे कृष्णावतारात रुक्मिणी सत्यभामा, जांबवती व स्वतः कृष्ण यांनी त्याला गायन शिकवून त्या विद्येत निष्णात केले

एकदा विष्णूची माया कशी काय आहे, ते पाहण्याची नारदाला इच्छा उत्पन्न झाली आणि त्याने 'तुमची माया मला दाखवा,' म्हणून विष्णूला गळ घातली तेव्हा विष्णूने नारदाला आपल्याबरोबर गरुडावर बसविले व कान्यकुब्ज देशात नेऊन त्याला एका सरोवरात स्नान करायला सांगितले स्नानासाठी नारदाने पाण्यात बुडी मारताच त्याला आढळले, की आपण पुरुष राहिलो नसून स्त्री झालो आहो काशिराज या राजाने मग या स्त्रीला आपली मुलगी मानून तिचे सुशीला असे नाव ठेवले काही कालाने काशिराजाने या सुशीलेचे विदर्भाचा राजा सुधर्मा याच्याशी लग्न लावून दिले पण पुढे काही कारणावरून काशिराज व सुधर्मा यांच्यात युद्ध होऊन त्यात दोघेही राजे ठार झाले पितृकुल व पतिकुल या दोघांचाही एकाच वेळी असा नाश झालेला पाहून सुशीलेला दुःख झाले व तिने चितेत उडी टाकली

वरील सर्व घटना नारद पाण्याखाली असतानाच घडलेल्या आहेत विष्णूची माया ती हीच होय पाण्यातून वर येताच नारदाला तिचा प्रत्यय आला त्या मायेची साक्ष म्हणून एक भाजल्याचा डाग त्याच्या मांडीवर राहिला पवळ्याच्या तीरावर असलेल्या विष्णूने दर्शन देऊन नारदाचे समाधान केले (ब्रह्म पु २२८)

हीच कथा नारद पुराण व पद्म पुराण यांत थोडी वेगळी दिलेली आहे वृद्धेने सांगितल्यावरून नारदाने सरोवरात स्नान केले व नारदाची नारदी बनली पुढे या नारदीचा कृष्णाशी समागम घडला आणि त्यानंतर तिने पुनश्च दुसरीकडे स्नान केल्याने नारदीचा पुरुष बनला, असे तिथे सांगितले आहे

नारदाच्या अशा अनंत लीला आहेत सर्व पुराणांत आणि उपपुराणांत नारदाचा अनेक प्रसंगी वावर होतो पुराणात ज्या अनेक बऱ्यावाईट घटना घडल्या त्यांच्या मुळाशी नारद होता, असे दिसून येते नारदाने अनेक संघर्ष माजवले आहेत युद्धे उभी केली आहेत व मोठमोठ्या लोकांच्या कुटुंबसंस्थेतही किल्मिष निर्माण केले आहे पण या सर्व वाईट कृत्यांचा शेवट मात्र चांगलाच झाला आहे तसा तो करण्यासही त्याचीच बुद्धी कारणीभूत ठरली आहे

नारदाची ही अशी कलहप्रिय भूमिका जरी सर्वत्र आढळत असली तरी नारद हा नारायणाचा परम भक्त म्हणूनच लोकांना परिचित आहे नारद त्याबाबत स्वमुखानेच सांगतो ते असे–

**देवदत्तामिमां वीणां स्वरब्रह्मविभूषिताम् ।**

**मूर्च्छयित्वा हरिकथां गायमानश्चराम्यहम् ।।**

अर्थ – देवाने दिलेली व स्वरब्रह्माच्या योगाने विभूषित झालेली ही वीणा घेऊन ती वाजवीत आणि तिच्या साथीवर हरिकथेचे गायन करीत मी त्रैलोक्यात भ्रमण करीत असतो

नारदाने अनेक ठिकाणी अनेकांना भक्तीचा उपदेश केला आहे भक्ती हे सर्व साधनांमध्ये उत्तमोत्तम साधन असून, माणसांनी निश्चित मनाने भगवद्भजन करावे आणि भगवत्कृपेला पात्र व्हावे, असेच त्याच्या सर्व उपदेशाचे सार आहे

नारद पुराण, नारद संहिता नारद पंचरात्र, नारद भक्तिसूत्रे असे काही ग्रंथ नारदाच्या नावावर आहेत पण पुराणातील नारद हाच त्या सर्वांचा कर्ता आहे, असे समजणे कठीण आहे हे ग्रंथकार वेगवेगळ्या काळी झालेले वेगवेगळे नारद असावे असे म्हटले पाहिजे [प्रा च को, प इ, पुरुषार्थ जाने १९६५]

## नारद काण्व

एक सूक्तद्रष्टा हा कण्वकुलोत्पन्न होता पौराणिक नारदाहून हा भिन्न आहे ऋग्वेदाच्या आठव्या मंडलातील तेरावे सूक्त याच्या नावावर असून, इंद्रस्तुती हा त्या सूक्ताचा विषय आहे इंद्र हा जसा बलाढ्य आणि सज्जनप्रतिपालक आहे, तसाच तो काव्याचाही स्फूर्तिदाता आहे, असे हा ऋषी म्हणतो त्याच्या सूक्तातली एक ऋचा अशी (८ १३ ३१) –

**वृषायमिन्द्र ते रथ उतो ते वृषणा हरी ।**

**वृषा त्वं शतक्रतो वृषा हवः ।।**

अर्थ– इंद्रा, हा तुझा रथ वीर्यशाली त्याचप्रमाणे तुझे अश्वही वीर्यशाली आहेत हे अपार कर्म करणाऱ्या देवा, तू स्वतः तर वीर्यशाली आहेसच, परंतु तुझे नामसंकीर्तनही तसेच वीर्यशाली आहे

याशिवाय नवव्या मंडलातील १०४ व १०५ ही दोन सूक्ते

पर्वतनारदौ या जोड नावावर आहेत सोमस्तुती हा त्या सूक्ताचा विषय आहे [प्रा च को , म ज्ञा को ]

## नारदपरिव्राजकोपनिषद

एक नव्य उपनिषद हे अथर्व वेदाशी संबद्ध आहे याचे नऊ भाग असून, त्या प्रत्येकाला उपदेश अशी संज्ञा आहे हे उप निषद नारदाने शौनकादी मुनींना सांगितले आहे याच्या पहिल्या उपदेशात ब्रह्मचर्य गार्हस्थ्य व वानप्रस्थ या तीन आश्रमांत जीवन कसे व्यतीत करावे, ते सांगितले आहे तीन ते पाच या उपदेशात संन्यासविधीचे वर्णन, संन्यासातील भेद व संन्याशाची कर्तव्य या गोष्टी सांगितल्या आहेत सहाव्या उप देशात ज्ञानी पुरुषाचे रूपकात्मक वर्णन, ते असे आहे –

ज्ञानी पुरुषाचे ज्ञान हे शरीर संन्यास हे जीवन, शांती आणि दांती हे डोळे मन हे मुख बुद्धी ही कला, पंचवीस तत्त्वे हे अवयव आणि कर्म व भक्ती किंवा ज्ञान व संन्यास हे बाहू होत

त्यानंतर याच उपदेशात हृदयावर निर्माण होणाऱ्या विविध भावनांच्या ऊर्मी कुठे कुठे उत्पन्न होतात, त्याचे वर्णन आहे

सातव्या उपदेशात यतीचे आचारनियम सांगितले आहेत आणि आठव्या व नवव्या उपदेशात संसारतारक अशा प्रणवाचे वर्णन आहे [श्री सी ग देसाई]

## नारद पुराण

अठरा उपपुराणांपैकी एक महत्त्वाचे उपपुराण सनत्कुमारांनी हे नारदाला सांगितले म्हणून याला नारद पुराण असे म्हणतात या पुराणात २५ हजार श्लोक आहेत, असे सांगितले असले तरी तेवढी श्लोकसंख्या सांप्रत उपलब्ध असलेल्या प्रतीत आढळत नाही तिच्यात १८ हजार ११० च श्लोक आहेत त्यावरून प्रस्तुत पुराणाचा काही अंश कालौघात लुप्त झाला असावा, असे वाटते याचे पूर्वभाग व उत्तरभाग असे दोन भाग असून, पहिल्यात १२५ व दुसऱ्यात ८२ अध्याय आहेत पूर्वभागात चार पाद असून उत्तरभाग हा सलग आहे

**नारद पुराणातील विषय**– गंगामाहात्म्य, भगीरथकृत गंगा वतरणाची कथा, धर्माख्यान, वापीकूपतडागादींची निर्मिती, तिथिव्रत, दाने, प्रायश्चित्त, युगचतुष्टयपरिस्थिती, नाममाहात्म्य, सृष्टिनिरूपण ध्यानयोग, मोक्षधर्मनिरूपण निवृत्तिधर्मवर्णन, मंत्रसिद्धी, मंत्रजप, दीक्षाविधी, गायत्रीविधान, महाविष्णुमंत्र जपविधान नृसिंहमंत्र, हयग्रीवमंत्र हनुमानमंत्र, महेश्वरमंत्र, दुर्गामंत्र, एकादशीमाहात्म्यप्रसंगात रुक्मांगद मोहिनीची कथा, पुरुषोत्तमक्षेत्रयात्रा, समुद्रस्नान, राम कृष्ण सुभद्रादर्शन, कुरु क्षेत्रमाहात्म्य, बदरिकाश्रमयात्रा, पुष्करक्षेत्रमाहात्म्य, नर्मदातीर्थ माहात्म्य, रामेश्वरमाहात्म्य मथुरा वृंदावनमाहात्म्य, इत्यादी

प्रस्तुत पुराणाचा काल इ स ६०० च्या पूर्वीचा मानतात पद्म पुराणात या पुराणाला सात्त्विक म्हटले आहे यात एकादशी व श्रीविष्णु यांचे माहात्म्य विशेष असल्याने प्रस्तुत पुराणाला वैष्णव पुराण समजतात अनेक विद्वानांनी या पुराणाला त्या तील विषयाच्या विविधतेवरून ज्ञानकोशच म्हटले आहे

हे पुराण ऐतिहासिकदृष्ट्या महत्त्वपूर्ण ठरले आहे कारण यात अध्याय ९२ ते १०९ एवढ्या भागात अठराही पुराणांची विस्तृत सूची दिलेली आहे या सूचीवरून प्रत्येक पुराणाचा मूळ भाग कोणता व त्यात पडलेली भर कोणती ते निश्चित पणे कळून येते

प्रस्तुत पुराणात दार्शनिक विषयाची जी चर्चा केलेली आहे (पूर्वभाग ४२ ते ४५), ती महाभारताच्या शांतिपर्वातील चर्चेला अनुसरून आहे यात बौद्धांची निंदा आढळते बौद्ध हे वेदनिंदक असल्यामुळे पाखंडी आहेत, त्यांच्या मंदिरात ब्राह्मणांनी जाऊ नये गेल्यास शेकडो प्रायश्चित्त केल्यानेही त्या पापाची निष्कृती होणार नाही, असे यात सांगितले आहे (पूर्वभाग १५ ५०–५२)

**नारद पुराणातील तत्त्वज्ञान** – नारायण हेच अंतिम तत्त्व होय त्यालाच महाविष्णू असे म्हणतात त्यापासून ब्रह्मा विष्णू महेश निर्माण होतात या महाविष्णूची शक्ती सत् व असत् अशा दोन्ही प्रकारची आहे तिला विद्या व अविद्या अशीही म्हणतात महाविष्णूहून जग निराळे भासते, ते अविद्येमुळेच होय विद्येमुळे ज्ञान व ज्ञेय यांमधील भेद नष्ट होतो ज्याप्रमाणे अखिल विश्वात श्रीहरी भरून राहिला आहे, त्याप्रमाणेच त्याची शक्तीही भरून राहिली आहे तिला श्रीहरीपासून वेगळी करता येत नाही ही शक्ती कधी व्यक्त रूपात तर कधी अव्यक्त रूपात राहते प्रकृती, पुरुष व काल ही तिची तीन व्यक्त स्वरूपे होत

प्राणिमात्राला त्रिविध दुःखे भोगावीच लागतात भक्ति योगाने त्याला ईश्वराची प्राप्ती झाली म्हणजे मात्र ही सर्व दुःखे नाहीशी होतात मनुष्याचे मन हेच बंध–मोक्षाचे कारण आहे मनुष्याची विषयासक्ती हा बंध होय तो नाहीसा झाला म्हणजे मोक्ष आपोआप प्राप्त होतो मनाचा ब्रह्माशी संयोग करणे म्हणजे योग होय योगाने ब्रह्मलय साध्य होतो भक्ती हे मानवी जीवनात अत्यंत आवश्यक असे तत्त्व आहे तिच्यामुळे ईश्वरीकृपा लाभते आणि मनुष्याचे इह–परलोक सुखरूप होतात [म ज्ञा को , पु वि , श्री कानिटकर रा गज्य, २७ ८ १९६६]

**नारदभक्तिसूत्रे** भक्तियोगाचे व्याख्यान करणारा एक सूत्र ग्रंथ यात एकूण ८४ सूत्रे आहेत 'अथातो भक्तिं व्याख्यास्यामः' – इथून पुढे भक्तीचे व्याख्यान करीत आहो, हे त्याचे पहिले सूत्र आहे पुढच्या दोन सूत्रांत भक्तीचे स्वरूप सांगितले आहे, ते असे–

**सा त्वस्मिन परमप्रेमरूपा । अमृतस्वरूपा च ॥**

अर्थ– भक्ती ही परमात्म्याच्या ठिकाणी परमप्रेमरूप आहे आणि अमृत (मोक्ष) स्वरूपही आहे

हे स्वरूप सांगून झाल्यावर पुढे इतरांची भक्तिलक्षणे प्रथम सांगून नारदाने स्वतःचे भक्तिलक्षण सांगितले आहे, ते असे–

**नारदस्तु तदर्पिताखिलाचारता तद्विस्मरणे परमव्याकुलतेति ।**

अर्थ– सर्व कर्मे भगवंताला अर्पण करणे आणि त्या भगवंताच्या विस्मरणाने परम व्याकुळ होणे, हे नारदाच्या मते भक्तिलक्षण होय

भक्ती हे सर्व ज्ञानाचेच नव्हे, तर सर्व धर्मांचे व सर्व योगांचेही अंतिम ध्येय आहे, भक्ती ही सगुण साकार परमेश्वरावर अधिष्ठित असते, भक्तीत वर्ण शिक्षण, कुल संपत्ती किंवा कर्म यांचा भेद मुळीच संभवत नाही, असे सांगून भक्ती प्राप्त करून घेण्याची साधने कोणती ती नारदाने पुढीलप्रमाणे सांगितली आहेत–

**तत्तु विषयत्यागात् सङ्गत्यागाच्च । अव्यावृतभजनात् ।**

**लोकेऽपि भगवद्गुणश्रवणकीर्तनात् ।**

**मुख्यतस्तु महत्कृपयैव भगवत्कृपालेशाद्वा ।**

अर्थ – विषयत्याग, संगत्याग, अखंड नामस्मरण, लोकांतही भगवंताच्या गुणकर्माचे श्रवण व कीर्तन, ही भक्तीची साधने होत पण (त्यासाठी) मुख्यतः संतसज्जनांची मोठी कृपा आणि भगवत्कृपेचा अंश (तरी) जोडला पाहिजे

भक्ताने एकांतवास करावा, योगक्षेमाची चिंता करू नये, धनाचा विचारही करू नये, दंभ व मद टाळावे, तसेच, अहिंसा, सत्य, पावित्र्य, दया व ईश्वरनिष्ठा या गुणांचा विकास आपल्या अंतःकरणात करावा, कोणाशी वादविवाद करू नये व दुसऱ्याच्या निंदेकडेही लक्ष देऊ नये, असे नारद सांगतो

ईश्वराचे गुणकीर्तन, त्याच्या दर्शनाची तळमळ, त्याच्या मूर्तीची पूजा, त्याचे ध्यान, सेवा, सख्य, प्रेम, पत्नी पतीवर करते तशा प्रकारची भक्ती, आत्मनिवेदन, परमेश्वराशी ऐक्य व परमेश्वरविरहाचे दुःख असे भक्तीचे अकरा प्रकार नारदाने सांगितले आहेत त्यानंतर याने प्रस्तुत विषयाचा समारोप केला आहे तो असा –

भक्तीमुळे पूर्ण समाधान होते व सर्व वासनांचा नाश होतो भक्त हा स्वतःचा व इतरांचाही उद्धार करतो इतर कोणत्याही गोष्टीत त्याला आनंद व उत्साह वाटत नाही त्याला आध्यात्मिक स्वास्थ्य व शांती लाभते [भ स प , नारदभक्तिसूत्रे]

**नारदशिक्षा** (१) संगीतशास्त्रावरील एक ग्रंथ हा इ स १० ते १२ या शतकांच्या दरम्यान निर्माण झालेला असावा मात्र नारद या पौराणिक व्यक्तीशी याचा काहीही संबंध नाही नाट्यशास्त्रात दिलेल्या रागपद्धतीपेक्षा प्रस्तुत ग्रंथातल्या रागपद्धतीत पुष्कळ सुधारणा दिसून येते संगीतरत्नाकर हा यानंतरचा ग्रंथ आहे त्याचा नारदशिक्षेशी काही बाबतीत मतभेद आहे [म ज्ञा को – प्रस्तावनाखंड]

(२) व्याकरणविषयक अनेक ज्या प्राचीन शिक्षा आहेत यांत एक नारदशिक्षाही आहे सामगान व लौकिक गान यांचे नियम या शिक्षेत दिले आहेत पाहा – सामवेद

**नारदस्मृती** एक स्मृतिग्रंथ धर्मशास्त्रकारांच्या यादीत याज्ञवल्क्याने व पराशराने नारदाचे नाव दिलेले नाही, पण विश्वरूपाने धर्मशास्त्रकारांच्या पहिल्या दहा ग्रंथकारांमध्ये नारदाचा उल्लेख केला आहे या स्मृतीचा प्रास्ताविक भाग गद्यमय असून पुढील सर्व भाग श्लोकात्मक आहे एकंदर श्लोक १०२८ आहेत त्यांपैकी ५० श्लोक नारद व मनू या दोघांचे सारखेच आहेत या स्मृतीतले सुमारे ७०० श्लोक निरनिराळ्या निबंधग्रंथांमध्ये उद्धृत केलेले आहेत विश्वरूपाने याचे सुमारे ५० श्लोक घेतले आहेत आचार श्राद्ध व प्रायश्चित्त या विषयांच्या विवेचनात हेमाद्रीचा चतुर्वर्गचिंतामणी स्मृतिचंद्रिका, पराशर माधवीय आणि इतरही अनेक निबंधग्रंथ यांमध्ये नारदाचे वचन उद्धृत केलेले आहेत

नारद व मनू यांचा फार निकटचा संबंध आहे हा संबंध श्री विल्यम जोन्स यांनी आपल्या मनुस्मृतीच्या प्रस्तावनेत दाखविला आहे नारद स्मृती म्हणजे मनुस्मृतीतील व्यवहाराध्यायाची (९ वा अध्याय) संक्षिप्त आवृत्तीच, असे म्हणायला हरकत नाही स्वायंभुव मनूने जो मूळ धर्मग्रंथ लिहिला, तोच पुढे भृगु, नारद, बृहस्पती आणि अंगिरस यांच्याकडून वाढवला गेला नेपाळात जी नारदस्मृतीची प्रत सापडली आहे, तिच्या पुष्टी इति मानव धर्मशास्त्र' असे शब्द सापडतात आणि मनुस्मृतीलाही मानवधर्मशास्त्र म्हणतात नारदस्मृतीच्या काही अध्यायांतील मजकूर जसाच्या तसा मनुस्मृतीत सापडतो ब्रह्मदेशात धम्मत्थत्त, म्हणून जे कायदे पाहतो ते मनुस्मृतीच्या आधारे बनवले आहेत असे म्हणतात पण त्यांतील विशेष कायदे मनुस्मृतीत न सापडता नारदस्मृतीत सापडतात

नारदाने आपल्या स्मृतीच्या प्रास्ताविक भागामध्ये व्यवहार-

**धर्मशास्त्रविरोधे तु युक्तियुक्तो विधि स्मृत ।**
**व्यवहारो हि बलवान् धर्मस्तेनावहीयते ।।**

**अर्थ**– जेव्हा धर्मशास्त्र आणि व्यवहार या दोहोंच्या मध्ये विरोध येईल, तेव्हा व्यवहाराप्रमाणे वागावे कारण व्यवहार **हाच बलवान** आहे आणि धर्म त्यापेक्षा गौण आहे

महाभारतात अनेक ठिकाणी नारदाची म्हणून काही मते उद्धृत केली आहेत व त्यातले एक वचन उल्लेखनीय आहे–

**स्वमांस परमांसेन यो वर्धयितुमिच्छति ।**
**नारद प्राह धर्मात्मा नियत सोऽवसीदति ।।**
(म भा अनु ११५ १८)

अर्थ –जो मनुष्य दुसऱ्याच्या मांसाने स्वत चे मांस वाढवण्याची इच्छा करतो त्याच्याविषयी धर्मात्मा नारद म्हणतो, की तो मनुष्य खात्रीने अधोगतीला जातो

**नारदस्मृतीचा काल** – नारदस्मृतीचा काल ठरवताना मनुस्मृतीचा काल लक्षात घ्यावा लागतो पण मनुस्मृतीचा काल ठरवण्यासाठी नारदस्मृतीचा काल प्रमाणभूत मानतात त्या दोहोंमध्ये बराच काळ लोटला असला पाहिजे, हे निर्विवाद होय मनुस्मृतीचा काळ सनपूर्व २ ऱ्या शतकापासून इ स च्या २ ऱ्या शतकापर्यंत कोणता तरी मानतात हे जर खरे असेल तर नारदस्मृतीचा काल इ स च्या ४ थ्या किंवा ५ व्या शतकापूर्वी येणे शक्य नाही, असे डॉ केतकर म्हणतात त्यांनी या बाबतीत जे पुरावे दिले आहेत, ते असे–

पुष्कळशा बाबतीत, विशेषत पुराव्याच्या कायद्यात नारदस्मृती ही याज्ञवल्क्य, विष्णू, व्यास, बृहस्पती आणि कात्यायन यांच्या स्मृतींशी जुळणारी आहे यापैकी शेवटच्या तीन स्मृती स्मृतिकालातील अगदी शेवटच्या असून, पहिल्या दोन इ स च्या ३ ऱ्या शतकाच्या नंतरच्या आहेत आणि म्हणून नारदस्मृती पहिल्या दोहोंपेक्षा काही बाबतीत पुढे आहे दुसरी गोष्ट अशी, की मृच्छकटिक नाटकात न्यायासनापुढील चौकशीचे जे वर्णन आले आहे, ते नारदस्मृतीशी तंतोतंत जुळते आता नारदस्मृती व मृच्छकटिक ही जर समकालीन मानली तर नारदस्मृतीचा काल इ स च्या ५ वे किंवा ६ वे शतक ठरतो याला आणखीही एक पुरावा देता येईल नारदस्मृतीत **दीनार** हा शब्द दोनदा आला आहे दीनार हे एक रोमन नाणे होते त्याच्या उल्लेखावरून त्या नाण्याचा प्रसार नारदस्मृतीच्या पूर्वीचा असला पाहिजे हे उघड होते दीनार या नाण्याचा प्रसार भारतात ३ ऱ्या शतकापासून सुरू झाला ६ व्या शतकात लिहिल्या गेलेल्या बाणाच्या कादंबरीत नारदस्मृतीचा उल्लेख सापडतो या सर्व प्रमाणांवरून इ स चे ५ वे किंवा ६ वे शतक हा नारदस्मृतीचा काल निश्चित मानता येतो

म म काणे मात्र नारदस्मृतीचा काळ इ स च्या १ ल्या व ३ ऱ्या शतकाच्या दरम्यानचा मानतात

मूलभूत मानलेल्या अशा नारदस्मृतीच्या प्रती अनेक आहेत पण श्री बेंडाल यांना नेपाळात ताडपत्रावर लिहिलेली जी प्रत सापडली आहे, तीच खरी समजली जाते तिच्यात एक नवीन अध्याय उपलब्ध आहे नारदस्मृतीवर असहाय या नावाच्या पंडिताने टीका लिहिली आहे ही टीका फार महत्त्वाची मानतात [हि ध म ज्ञा को हि स ]

**नारदोपनिषद**

एक नव्य उपनिषद हे नारद ओठाचे अपूर्ण असे उपनिषद असून, त्यात प्रह्लादाने नारदाला अमरत्वाविषयी ज्ञान सांगितले आहे त्याची सुरुवात वैष्णवांत ऊर्ध्वपुंड्र कसा लावावा या माहितीपासून झाली आहे [ श्री सी ग देसाई ]

**नारन देव**

हा वारली आदिवासींचा प्रमुख देव आहे याला ते पर्जन्यदेवता मानतात व त्याच्या कृपेने धान्य समृद्धी होते, असे समजतात या देवाच्या उत्पत्तीविषयी वारली लोकांत दंतकथा प्रचलित आहे ती अशी –

एकदा एक बाई विटाळाचे कपडे धुण्यासाठी नदीवर गेली व पाय घसरून नदीत पडली त्यामुळे तिचे कपडे खराब झाले ते तिने गाठ्याजवळ पुरले त्यातून एक नागचे झाड उगवले आणि त्याच्याच एका कोंबातून एक बालक जन्मले तोच हा नारन देव होय त्या बाईने त्या मुलाला आपला मुलगा म्हणून सांभाळले नारन देव मोठा झाल्यावर एके दिवशी बाईने त्याला त्याची जन्माची कथा सांगितली आपल्या आईला नदीने प्रवाहात पाडले, हे ऐकून नारन देव संतापला आणि त्याने नदी व समुद्र यांचा सूड घ्यायचे ठरविले त्याने मेघराजाला आज्ञा केली, की पाऊस पाडू नकोस त्याप्रमाणे पाऊस बंद झाला पुढच्या २४ वर्षांत पावसाचा एक थेंबही पडला नाही त्यामुळे सर्वत्र हाहाकार उठला मग सर्व लोक व देवसुद्धा नारन देवाला शरण गेले आणि त्याने पाऊस पाडला

वारली लोक पावसाळ्याच्या प्रारंभी आणि नवे धान्य हाती आल्यावर याचा उत्सव करतात या वेळी एका दगडाला किंवा सुपारीला शेंदूर माखून नारन देव मानतात मग एका टोपलीत तांदूळ घालून तिच्यात त्याची स्थापना करतात ती टोपली घराच्या मागील बाजूस भिंतीला टांगून ठेवतात मग नारन देवाची पूजा करून त्याच्यापुढे दिवा लावतात पुरुष मंडळी त्या वेळी फेर धरून नृत्य करतात व बायका गाणी म्हणून त्यांना साथ करतात [ज रा ]

**नारसिंहमंत्र** 'क्ष्रौं' असा हा एकाक्षरी मंत्र आहे. या मंत्राचा ऋषी अत्री, छंद गायत्री व देवता नरसिंह आहे. हा मंत्र मायाबीजाने किंवा प्रणवाने संपुटित करून त्याचे पुरश्चरण करतात. एक लक्ष जप झाल्यावर दशांश हवन, तर्पण, ब्राह्मणभोजन, इ. गोष्टी करतात. एवढे पुरश्चरण झाल्याने मंत्र सिद्ध होतो, असे सांगितले आहे. या मंत्राच्या प्रयोगाने विपत्ती दूर होते, वैऱ्याचा नाश होतो, निरनिराळे रोग बरे होतात, पुत्रप्राप्ती होते आणि मनुष्य अनेक विद्यांत पारंगत होतो, असे म्हणतात. [म. म.]

**नारळ** (सं. नारिकेल किंवा नालिकेर) याला श्रीफल असेही म्हणतात. हे एक शुभसूचक फळ असून, ते सर्जन शक्तीचेही प्रतीक मानलेले आहे. हिंदूंच्या धार्मिक आणि सामाजिक जीवनात नारळाला अत्यंत महत्त्वाचे स्थान आहे.

नारळ हा महाफल म्हणून देवाला अर्पण करतात. तसेच त्याही मंगलकार्याच्या प्रारंभी देवापुढे विडा नारळ ठेवतात. अशा कार्यांच्या वेळी गृहद्वारावर जे तोरण बांधतात, त्यात मध्यभागी नारळ गुंफतात. नववधू सासरी जायला निघाली, की तिच्याबरोबर एक अमोल नारळ देण्याची प्रथा जुन्या काळी होती. हा नारळ वर्षानंतर तिच्याच हस्ते रुजत घालीत. नारळाचे झाड बहुप्रसव असल्यामुळे घरात आलेली नववधूही पुत्रपौत्रसंपन्न व्हावी, अशी त्यामागची कल्पना होती. म्हणूनच संतानेच्छा बाळगणारी स्त्री एखाद्या देवाला नारळ फोडण्याचा नवस करते. नारळाचे तोरण बांधण्याचा नवस बोलून नवजात बालकाच्या नामकरणप्रसंगी एखाद्या नारळालाच कुंची घालून प्रथम पाळण्यात घालतात आणि मग मुलाला पाळण्यात ठेवतात. सुवासिनीच्या ओटीभरणात, पानसुपारीच्या किंवा अहेराच्या प्रसंगी इतर वस्तूंबरोबर नारळाचाही उपयोग करतात. धार्मिक कृत्यात कलशस्थापना होते, तेव्हा त्यावर पूर्णपात्र ठेवायचे नसल्यास नारळ ठेवतात. देवळांच्या गाभाऱ्यावरही सर्वांवर नारळाची आकृती बनवतात. श्रावणी पौर्णिमेला नारळी पौर्णिमा म्हणतात व त्या दिवशी समुद्रतीरावरचे लोक समुद्राला नारळ अर्पण करतात.



नारळाचे झाड

मारुती, ग्रामदेवता किंवा शक्तिदेवता यांच्यापुढे नारळ फोडण्याची प्रथा आहे. हा प्राचीन नरबलिप्रथेचा पर्याय आहे, असे तर्कतीर्थांचे मत आहे. नरबलिप्रथेत बळीचे शीर देवापुढे ठेवीत असत. नरबलिप्रथा बंद पडल्यावर त्याऐवजी सबंध नारळ किंवा तो फोडून त्याचा अर्धा भाग देवापुढे ठेवण्याची प्रथा पडली. नारळाला ब्राह्मण मानण्याचा संकेत आहे. म्हणून नारळ फोडते वेळी त्याची संपूर्ण शेंडी काढून त्याला 'शिखाहीन' करू नये, असा संकेत आहे. एखाद्या शुभ व यशाचा महत्त्व म्हणूनही नारळ फोडण्याची प्रथा आहे.

आर्यांच्या यज्ञसंस्थेत मात्र नारळाचा विनियोग सांगितलेला नाही. त्यावरून वैदिक आर्यांना नारळ माहीत नसावा असे दिसते. भारतात नारळाची लागवड वेदोत्तर काळात झाली असावी किंवा नारळाचे झाड असलेल्या प्रदेशात यज्ञसंस्थेच्या काळी आर्यांचा प्रवेश झालेला नसावा.

दक्षिण भारतात नारळाच्या झाडाला कडुनिंबाच्या व वडाच्या झाडाइतकेच पवित्र मानतात. नारळाचे झाड तोडले तर तोडणाऱ्याचा निर्वंश होतो, असेही समजतात. कोकणातील लोक नारळाच्या झाडाला कल्पवृक्ष मानतात.

**नारायण** (१) ऋग्वेदोत्तरकालीन देवता. नार = आप, अयन = स्थान, असा या शब्दाचा विग्रह आहे. आप तत्त्वाच्या ठिकाणी जो वास्तव्य करतो, तो नारायण होय, असा त्या शब्दाचा अर्थ होतो. नारायण शब्दाच्या काही व्याख्या पुढे दिल्या आहेत –

**आपो नारा इति प्रोक्ता आपो वै नरसूनवः ।**
**ता यदस्यायनं पूर्वं तेन नारायणः स्मृतः ।।**

(मनु. १. १०)

अर्थ – आप तत्त्वाला नारा असे म्हटले आहे. आप हे नर म्हणजे परमात्म्याचे अपत्य होय. ते ज्याचे पूर्व आश्रयस्थान आहे, त्याला नारायण असे म्हटले आहे.

हीच व्याख्या विष्णु पुराणातही दिलेली आहे.

महाभारताच्या वनपर्वात (१९२. ३) भगवान स्वमुखाने प्रस्तुत नावाची व्युत्पत्ती सांगत आहे, ती अशी –

**आपो नारा इति प्रोक्तास्तासां नाम कृतं मया ।**
**तेन नारायणोऽप्युक्तो मम तत्त्वयनं सदा ।।**

अर्थ – पाण्याला नारा असे म्हणतात. पाण्यांच्या तत्त्वाला ते नाव मी ठेवले आहे. त्यामुळे मला नारायण म्हणतात. ते माझे सार्वकालीन स्थान आहे.

**नराणामयनाच्चापि ततो नारायणः स्मृतः ।।**

(म. भा. उद्योग ७० १०)

अर्थ – मानवांचे आश्रयस्थान असल्यामुळेही त्याला नारायण म्हटले गेले आहे.

वरील व्युत्पत्तीमध्ये आप हा शब्द केवळ जल या स्वरूपाने घ्यायचा नाही. सृष्टीच्या पूर्वावस्थेत सर्व काही आपच होते. त्याच्यापासून पुढे सृष्टीची उत्पत्ती झाली. ज्याला आपण पाणी म्हणतो त्याची उत्पत्ती स्थूल प्रक्रियेने फार पुढे झाली आहे. मूळारंभीची व्यापक अशी जी शक्ती तिलाच या ठिकाणी आप म्हटले आहे. याविषयी शतपथातले वचन असे –

**सा इदं सर्वं आप्नोद् यदिदं किञ्च । यदाप्नोत् तस्मादापः ।।**

(श. ब्रा. ६ १ १ ९)

अर्थ – ती (मूळशक्ती) हे जे सर्व काही आहे ते व्यापून राहिली. जिने सर्वांना व्यापले त्याला आप अशी संज्ञा मिळाली.

ऋग्वेदात नारायण नामक एक ऋषी आढळतो. पुरुषसूक्त नावाचे सोळा ऋचांचे सूक्त त्याच्या नावावर आहे. हा नारायण ऋषीच पुरुषमेध नावाचा यज्ञ करून सर्वव्यापक असा देव (नारायण) ठरला, अशी कथा शतपथ ब्राह्मणात पुढीलप्रमाणे दिली आहे –

**पुरुषो ह नारायणोऽकामयत । अतितिष्ठेयं सर्वाणि भूतानि । अहमेवेदं सर्वं स्यामिति । स एतं पुरुषमेधं पञ्चरात्रं यज्ञक्रतुमपश्यत । तमाहरत् तेनायजत । तेनेष्ट्वा अत्यतिष्ठत् सर्वाणि भूतानि इदं सर्वमभवत् । अतितिष्ठति सर्वाणि भूतानि य एवं विद्वान् पुरुषमेधेन यजते, यो वा एतदेवं वेद ।**

(श. ब्रा. १३ ६ ८ १)

अर्थ – नारायण हा पुरुष, मी सर्व भूतांचे अतिक्रमण करून राहीन, मीच सर्व काही होईन, अशी इच्छा करता झाला. तो या पुरुषमेध नामक पंचरात्र यज्ञक्रतूला पाहता झाला. त्याचे आहरण करता झाला. त्याने यजन करता झाला. (अशा प्रकारे) त्या पुरुषमेधाने यजन करून तो सर्व भूतांना व्यापून राहिला. हे सर्व काही तोच झाला. जो विद्वान पुरुषमेधाने यजन करतो किंवा जो कोणी हे सर्व जाणतो, तो सर्व भूतांना व्यापून उरतो.

नर करनी करै तो नरका नारायण हो जाय । या लोकवचनाचे मूळ वरील कथेतच असावे, असे वाटते. याच विश्वव्यापक पुरुषाला (नारायणाला) पुरुषसूक्तामध्ये 'सहस्रशीर्षा पुरुषः' म्हटले आहे. याचे स्पष्टीकरण डॉ. वासुदेवशरण अग्रवाल पुढीलप्रमाणे करतात–

पुरुषसूक्तात जो सहस्रशीर्षा पुरुष आहे, तो आपल्या निरपेक्ष रूपात परात्पर अथवा गुणातीत आहे. ही त्याची पहिली कोटी होय. त्याला निर्गुण आणि अमृत असे म्हणतात. विश्वभुवनांना व्यापून करून उरणारे त्याचेच जे दुसरे रूप, ते सापेक्ष रूप होय. 'अत्यतिष्ठत् दशाङ्गुलम्' = दहा अंगुळे अधिक राहिला, हा सर्व त्याच्यामाठीच आहे. ही त्या पुरुषाची दुसरी कोटी होय. विराट् ही त्याची तिसरी कोटी आहे. विराट या तत्त्वालाच अव्यय आप, महत् किंवा योनी म्हटले आहे. यालाच सांख्यपरिभाषेत प्रकृती म्हणतात. या प्रकृतीच्या ठिकाणी विराटाकडून सृष्टीचे गर्भाधान केले जाते. मग हे विश्व व्यक्त भावाला प्राप्त होते. या विराट तत्त्वालाच ऋग्वेदात 'बृहती आपः' = बृहत् आप असे म्हटले आहे (ऋ. १० १२१ ७). हे आपतत्त्व म्हणजेच प्रकृती. ही पुरुषाच्या संसर्गाने गर्भ धारण करते आणि पुनश्च पुरुषालाच जन्म देते. हा जो जन्म घेणारा पुरुष त्यालाच अग्नी, यम, नारायण, विष्णू, सूर्य, हिरण्यगर्भ, ही नावे आहेत.

यावरून नारायण हा विश्वरूप, विश्वात्मक आणि विश्वातीत आहे, असे ठरते. वैदिक देवता विष्णू हाही याच स्वरूपाचा आहे. विष्णू व नारायण यांचे परस्पर घनिष्ठ साधर्म्य दिसून आल्यावर तैत्तिरीय आरण्यकात–

**नारायणाय विद्महे वासुदेवाय धीमहि ।**
**तन्नो विष्णुः प्रचोदयात् ।।**

या गायत्रीमंत्रात त्या दोघांचे अद्वैत दृढ करण्यात आले. विशेष म्हणजे नारायण आणि विष्णू यांच्या बरोबरच वासुदेव कृष्ण हाही त्यांच्याशी अभिन्न रूपाने दाखवला गेला.

गीतेमध्ये भगवान श्रीकृष्ण (विष्णूचा अवतार) आत्मतत्त्वाचे वर्णन पुढीलप्रमाणे करतात–

**अहं कृत्स्नस्य जगतः प्रभवः प्रलयस्तथा ।।**
**मत्तः परतरं नान्यत् किञ्चिदस्ति धनञ्जय ।**
**मयि सर्वमिदं प्रोतं सूत्रे मणिगणा इव ।।**

(गीता ७ ६–७)

अर्थ – मीच सर्व जगताचे प्रभव म्हणजे मूळ व प्रलय म्हणजे शेवट आहे. हे धनंजया, माझ्याहून पलिकडचे दुसरे काहीही नाही. दोऱ्यात मणी ओवावे त्याप्रमाणे माझ्या ठिकाणी हे सर्व ओवलेले आहे.

नारायणाला नराचा सखा म्हटले आहे. नार म्हणजे विश्वाचे मूलतत्त्व होय हे वर सांगितलेच आहे. या नार तत्त्वाचेच दोन भाग होऊन ते नर–नारायण झाले, असे

महाभारतात म्हटले आहे नर शब्द हाही नारायणाप्रमाणेच नार या मूळ शब्दापासून व्युत्पादिता येण्याजोगा आहे

अशा प्रकारे नारायण हा आर्यांच्या नंतरच्या वाङ्मयात विष्णूचे एक पर्याय नाम म्हणून प्रसिद्ध झाला असला तरी नारायण हा मुळात आर्येतराचा अर्थात द्रविडाचा देव होता, अशी कल्पना श्री लीलाधर शेणी यानी माडली आहे त्याचे त्या सबधीचे विवेचन असे–

नार, अय व अन हे तीन अश मिळून नारायण शब्द बनला आहे नार हा अश नीर = पाणी यावरून आलेला आहे वेदात नार हा शब्द पाणी या अर्थी आलेला नाही अय= पहुडण्याची जागा, हा अशही द्रविडच आहे अन हा तमिळ भाषेतला पुरुषवाचक प्रत्यय आहे यावरून नारायण हा द्रविडाचा सागराधिष्ठाता देव असल्याचे कळून येते ऋग्वेदातले पणी हेच साप्रतचे द्रविड होत अल्यन असे त्याच्या देवाचे जे नाव आहे तेही समुद्रसबधितच आहे अलय= लाट, समुद्र किंवा पाणी व अन= त्यात राहणारा पुरुष होय द्रविड हे मुळात सागरसचारी होते आणि त्याचे समग्र जीवन सागराशी जडलेले होते, तेव्हा त्याचा पाळिना पोशिता देवही सागरसबधीच असावा, हे तर्कसिद्ध होय

नारायण आणि सागर याचा घनिष्ठ सबध दर्शविणारी कथा अवदानशतकात आलेली आहे, ती अशी–

राजगृहाचा एक व्यापारी व्यापारासाठी समुद्रसफरीला गेला असता, त्याच्या पत्नीने नारायणाची पूजा करून त्याला नवस केला, की 'माझा नवरा सुखरूप परत येऊ दे, मी तुला सुवर्णचक्र वाहीन' व्यापारी परत आल्यावर त्याची पत्नी नवस फेडण्यासाठी समुद्रतीरावर नारायणाच्या मदिरात गेली

यावरून मगधातले लोकही नारायणाला समुद्रदेवता म्हणून ओळखीत होते, हे कळून येते शेषशायी हे नारायणाचे त्या पुढचे स्वरूप होय तो नागावर शयन करतो आणि नाग हा पाताळाचा राजा आहे 'पातालम्' या शब्दात आलम हा जो अश आहे, ताही तमिळ भाषेचा असून, त्याचा अर्थ पाणी असा आहे सस्कृतात पाण्याला आलम शब्द नाही नाग ही द्राविड जमात असून, शेष हा त्या जमातीचा प्राचीन काळचा राजा किंवा कुलदेव असावा पुढील काळात शेष व नारायण या दोहोचे सयोगीकरण होऊन आजची शेषशायी नारायणमूर्ती निर्माण झाली नारायण हा प्रलयानतर कल्पाच्या प्रारभी समुद्राच्या पष्ठभागावर बालरूपाने पहुडला होता अशी कथा आहे या कथेचा प्रलयाच्या कथेशी सबध आहे

ऋग्वेदीय आर्यांना प्रलयकथा माहीत नव्हती असे काही विद्वान म्हणतात मार्कंडेयाने नारायणाची कथा सागताना ती पुरावृत्त अर्थात प्राचीन इतिहासातील एक असल्याचे म्हटले आहे यावरून ती कथा आयपूर्व काळी घडली पाहिजे, असे सूचित होते त्याचा हा आशय म्हणता, की प्रलयकथा ही मूळ आर्यांची नसून, ती आर्यपूर्व भारतवासीयाची आहे त्यावरून नारायण हा देवही आर्येतराचा असावा आणि महाभारताच्या काळी त्याचे आर्यीकरण झाले असावे

महाभारतात व पुराणात नारायणाला देवाधिदेव म्हटले आहे वैष्णव सप्रदायात त्याला सृष्टीचा कर्ता, भर्ता व सहर्ता मानले आहे विष्णूचे जसे वैकुठ शिवाचे जसे कैलास, गोपालकृष्णाचे जसे गोलोक तसेच नारायणाचे निवासस्थान श्वेतद्वीप हे आहे या श्वेतद्वीपात जाऊन नारदाने नारायणाचे दर्शन घेतले नारद त्या द्वीपात गेला आणि त्याने नारायणाकडून एकान्तिक धर्म समजावून घेतला हा एकान्तिक धर्म हेच पुढील वैष्णव सप्रदायाचे मूळ होय महाभारतकाळी वासुदेवभक्ती विशेष प्रचारात आली तेव्हा त्या वासुदेवाचे नारायणाशी तादात्म्य कल्पिले गेले मार्कंडेयाने युधिष्ठिराला सागितले आहे, की 'तुझा नातलग वासुदेव कृष्ण आणि नारायण हे दोघे एकच होत' (म भा वन ८९) महाभारतातल्या नारायणीय आख्यानाचे तर नारायण वासुदेव हे पालुपदच दिसते

नर नारायण ही एक जोडदेवता मानलेली आहे ते दोघे परस्पर मित्र आहेत आणि एकाच तत्त्वापासून निर्माण झाले आहेत 'द्वा सुपर्णा' या श्रुतीवरून ही कल्पना सुचली असावी (ऋ १ १६४ २०) या श्रुतीचा अर्थ असा – एका वृक्षावर दोन पक्षी बसलेले आहेत ते सुदर पखाचे, एकत्र वास करणारे व परस्पर जिवलग मित्र आहेत त्यातला एक त्या वृक्षाच्या मधुर फळाचा आस्वाद घेतो, पण दुसरा मात्र स्वत काहीएक न खाता केवळ साक्षी या रूपाने राहतो

प्रस्तुत ऋचेतील फळ खाणारा पक्षी हा नर असून, साक्षी रूपाने असणारा तो नारायण होय दार्शनिक परिभाषेत पुढे याच नर नारायणाना जीवात्मा व परमात्मा ही सज्ञा लाभली महाभारतकाळी नर नारायणाची ही जोडी उपास्य बनली होती म्हणूनच व्यासमहर्षींनी प्रत्येक पर्वाच्या आरभी तिला नमन केले आहे महाभारतात एका ठिकाणी त्या दोघाना ऋषी म्हटले असून, कृष्णार्जुनाशी त्याचे तादात्म्य दाखवले आहे तिथेच त्याना पूर्वदेव असेही म्हटले आहे (म भा उद्योग ४९ १९) कृष्णार्जुन हे मूळचे नर नारायण आहेत, असे सागणारी आणखीही पुष्कळ स्थळे महाभारतात आहेत एका ठिकाणी स्वत श्रीकृष्णच अर्जुनाला सागतात –

> नरस्त्वमसि दुर्धर्ष हरिर्नारायणो ह्यहम ।
> काले लोकमिम प्राप्तौ नरनारायणावृषी ।।

अनन्य पार्थ मत्तस्त्वं त्वत्तश्चाहं तथैव च ।
नावयोरन्तरं शक्यं वेदितुं भरतर्षभ ॥
(म भा वन १२ ४६–४७)

**अर्थ** – हे अजिंक्य अशा अर्जुना, तू नर आहेस आणि मी हरी नारायण आहे आपण पूर्वी या नावाचे ऋषी होतो आणि सांप्रतकाली या लोकांत आलो आहो तू माझ्याहून, तसाच मी तुझ्याहून अनन्य आहे हे भरतश्रेष्ठा, आपल्या दोघांमधला भेद कळणे शक्य नाही

शांतिपर्वातल्या *नारायणीय या आख्यानाच्या* पहिल्या अध्यायात चार मूर्ती धारण करणाऱ्या सनातन विश्वात्म्याला धर्माचा पुत्र म्हटले आहे नर, नारायण, हरी व कृष्ण या त्या चार मूर्ती होत अहिंसा ही या चारही मूर्तींची माता आहे अशा प्रकारे धर्म व अहिंसा यांना नारायणाची मातापितरे मानण्यात काही विशेष अर्थ असल्याचे दिसते ही गोष्ट तत्कालीन धार्मिक स्थितीची निदर्शक असावी त्या काळात जैन व बौद्ध हे पंथ प्रभावी झाले होते यज्ञयागादी कर्मकांड आणि त्यातील पशुहत्या यांचे ते विरोधक होते यज्ञातील पशुहत्या आणि नीती व अहिंसा या तत्त्वांचा त्या काळी परस्पर संघर्ष चालू होता या संघर्षाच्या वेळीच नारायणीय धर्म उदयाला आला आणि त्याने जैन व बौद्धांप्रमाणेच हिंसाबहुल धर्माला विरोध दर्शविला पशुहिंसा न करता एकांतिक धर्मानेही मनुष्याला परमेश्वराचे दर्शन होते आणि त्याला परमपदाची प्राप्ती होते, असे नारायणीय धर्माचे सारभूत तत्त्व आहे वैष्णवांच्या सात्वत परंपरेत वासुदेव कृष्णाची उपासना प्रचलित होती ती परंपराही कालांतराने या नारायणीय धर्माला येऊन मिळाली अशा प्रकारे नारायणीय धर्म हा भागवत धर्म या रूपाने वाढला, विस्तारला आणि त्याने भारतीय समाजाच्या मनावरचा जैन बौद्धांचा प्रभाव दूर केला याच प्रयत्नात भागवत धर्माने बुद्धाला विष्णूचा अवतार मानून बौद्ध धर्माच्या अहिंसा तत्त्वापासून आपण दूर नाही व बुद्धही नारायणाहून वेगळा नाही, अशी घोषणा केली आणि बौद्ध धर्माच्या वर्चस्वाला मोठाच पायबंद घातला बौद्ध धर्माच्या प्रभावामुळे अहिंसा वृत्तीला श्रेष्ठ मानणारे सर्व समाज त्यामुळे भागवत धर्माच्या छत्राखाली आले

**पौराणिक माहिती** – नारायणासंबंधी पुराणांत पुष्कळ माहिती उपलब्ध होते त्यांपैकी काही अशी–नारायण हा पुरुष व महापुरुष असून तो प्राण्यांचा संरक्षक आहे नारायण आणि वेद हे एकच आहेत अदितीचा पुत्र म्हणून त्याने पुन्हा अवतार घेतला तो ऋषींचा ऋषी आहे (भाग पु १ ३ ६, ६ १ ४०–४१, ६ ६ ३८, ११ १६ २५) महाप्रलयाच्या अंधकारातून बाहेर येऊन त्याने ही नामरूपात्मक सृष्टी निर्माण केली (ब्रह्मांड पु २ ३५ १७०, मत्स्य पु ३ ७३–३७) नारायण हा सर्व विश्वाला आणि तीनही लोकांना व्यापून राहिला आहे (वायु पु १ ५०४) नारायण गणाचा अधिपती असून, स्वारोचिष मन्वंतरातला हरी आहे (ब्रह्मांड पु ३ ३ १७)

**नारायणमूर्ती** –द्रविड जातीत नारायण हा शिवाचेच एक रूप समजला जात होता नारायणाचे शिवाशी अभिन्नत्व ही कल्पना शिवसमुद्रम, श्रीरंगम आणि श्रीरंगपट्टणम येथील नारायणाच्या मूर्ती पाहिल्यावर कळून येते दक्षिणेत नारायणालाच श्रीरंग किंवा रंगनाथ असे म्हणतात वरील तीन क्षेत्रांतील शिवसमुद्रम हे क्षेत्र तर मुळात शैव क्षेत्रच आहे त्याच्या नावावरूनच ही गोष्ट ध्यानात येते तिथल्या मंदिरात रंगनाथाची शेषशायी मूर्ती आहे, त्याबरोबरच एक लिंग आणि त्याच्यापुढे नंदीही आहे श्रीरंगपट्टणम हे क्षेत्रही मुळात शैव क्षेत्र असावे आणि त्याच्या गाभाऱ्याची दारे मोठी करून मग त्यात रंगनाथाची मूर्ती स्थापली असावी श्रीरंगम हे वैष्णव क्षेत्र असून, ते कावेरीच्या दुभंगलेल्या व पुढे एकत्र आलेल्या प्रवाहाच्या मध्यभागी वसले आहे शिवसमुद्रम व श्रीरंगपट्टणम हीही नदीत निर्माण झालेली बेटेच आहेत नारायण देव जलावर पहुडला होता आणि त्याच्या सर्व बाजूंनी पाणी होते, या मूळ कथेला धरूनच चाहो बाजूंनी वेढलेल्या या बेटांत नारायणाची स्थापना झाली असावी नारायण व शिव यांच्या मूळ एकरूपतेची ही प्रात्यक्षिके आहेत, असे मानायला हरकत नाही

महाभारतातले नारायणीय आख्यान वाचल्यानंतर शिव व नारायण यांच्या अभिन्नत्वाची कल्पना येते श्रीकृष्णाने आपण व रुद्र–शिव एकरूप असल्याचे सांगितले आहे कृष्ण म्हणतो–मी सर्व लोकांचा आत्मा आहे आणि रुद्र शिव हा माझा आत्मा आहे मला जो जाणतो तो रुद्र–शिवाला जाणतो आणि जो रुद्र–शिवाला जाणतो तो मलाही जाणतो रुद्र आणि नारायण हे एकच तत्त्व असून, ते द्विविध झाले आहे (म भा शांति ३४१ २१ – ३७)

शिवाचे शेषशायी नारायणाच्या मूर्तीत रूपांतर होणे हा त्याच्या मूर्तिकरणातील पहिला टप्पा होय प्रारंभी नारायणाच्या मूर्तीबरोबर ब्रह्मदेवाची मूर्ती बनवीत नसत वरील तीनही क्षेत्रांतल्या नारायणमूर्तीं व उदयगिरीच्या गुहेतील मूर्ती यांत ब्रह्मदेव आढळत नाही पुढील काळात ब्रह्मा – विष्णू हे शिवाचे गण म्हणून त्याच्या डाव्या – उजव्या अंगी दाखवले जाऊ लागले सुरुवातीस नारायणाच्या मानाने त्यांच्या मूर्ती लहान असत कालांतराने आर्यांच्या प्रभावामुळे ब्रह्मदेवाला महत्त्व प्राप्त झाले आणि त्याला अनंतशयनाच्या वरच्या भागी मध्यवर्ती स्थान

लाभले अशाही काही मूर्ती आढळतात, पण त्या मूर्तीत ब्रह्म-देवाचा नारायणाच्या नाभीशी संबंध दर्शवलेला नाही शेषशायी



शेषशायी नारायण – देवगढ

नारायणाच्या नाभिकमलातून ब्रह्मदेवाची उत्पत्ती हा नारा-यणाच्या आर्यीकरणाचा शेवटचा टप्पा होय नारायणाचे शिवाशी असलेले अभिन्न वाचे नाते अस्पष्ट झाले आणि त्याचबरोबर नारायण व विष्णू यांचे अभिन्नत्व दृढ झाले

नारायणाच्या मूर्तीचे वैशिष्ट्य हे की ती नेहमी पहुडलेली असते पहुडलेली म्हणजे निद्रिस्त नव्हे, कारण तिचे डोळे अर्ध वट उघडे असतात इ स च्या ५ व्या शतकातले भितरगाम येथील लाल मातीचे शिल्प व ६ व्या शतकातील देवगढ येथील पाषाणशिल्प यात शेषशायी नारायणाची चित्रं आहेत त्यात नारायण हा शेषनागाच्या वेटाळ्यावर निजलेला असून, नागाच्या फणाचे छत्र त्याच्या मस्तकावर आहे त्याच्या नाभीतून, उगव लेल्या कमलावर ब्रह्मा आसनस्थ आहे लक्ष्मी त्याचे पाय चुरीत असून, दोन्ही अंगी मधू व कटभ हे दैत्य आहेत या मूर्तिकरणात नारायणाच्या आर्यीकरणाची प्रक्रिया पूर्ण झाली [ म ज्ञा को , पु इ , भा पु सा अ , वै वा भा वि , अ भा ओ रि इ – सिल्हर ज्युबिली व्हाल्यूम, ना भा ध भा वा शा प्र वि ]

(२) एक सूक्तद्रष्टा ऋग्वेदाच्या दहाव्या मंडलातील नव्व दावे सूक्त याच्या नावावर आहे या सूक्ताला पुरुषसूक्त असे म्हणतात विराट्पुरुषप्रस्तुती हा या सूक्ताचा विषय आहे

( ) (इ स च १४ व नतर) एक प्रसिद्ध गणिती याने गणितकौमुदी, पाटीगणित व बीजगणित हे ग्रंथ रचले आहेत शून्याच्या उपयोगासंबंधीचा सिद्धान्त, बीजगणितातील ' र ' इ अव्यक्त राशींचा उपयोग, आणि घन वर्ग यासंबंधीची उदाहरणे त्याच्या ग्रंथात आढळतात [ व वि शा प ]

(४) परधान आदिवासींचा देव हा मुळात दानवच आहे तो गावाचे मल न करता गावात रोगराई आणतो, अशी त्यांची समजूत आहे म्हणून त्याला प्रसन्न करण्यासाठी ते पशुबळी देतात कालांतराने हिंदू धर्माच्या प्रभावात आल्यावर त्यांनी आपली देवविषयक कल्पना बदलली आणि ते सत्यनारायण किंवा सत्यनारायण या स्वरूपात त्याला भजू लागले

## नारायणउत्तरतापिनी उपनिषद्

एक नव्य उपनिषद् हे अथर्ववेदाशी संबद्ध असून याचे तीन खंड आहेत यात प्रथम वासुदेव शब्दाची व्युत्पत्ती दिली असून, नारायणापासून सकल सृष्टी निर्माण झाल्याचे व तोच जीवात्मा व तोच परमात्मा असल्याचे सांगितले आहे दुसऱ्या खंडात ' ॐ नमो भगवते श्रीमन्नाराय णाय ' हा प्रदीर्घ नारायणमालामंत्र दिला असून, तिसऱ्या खंडात प्रस्तुत उपनिषदाच्या अभ्यासाने मिळणाऱ्या फलप्राप्तीचे वर्णन केलेले आहे [ श्री सी ग देसाई ]

## नारायण केसरी

(इ स चे १८ वे शतक) एक मराठी संतकवी हा वाजसनेयी शाखेचा यजुर्वेदी ब्राह्मण असून, याचे आडनाव हेलवडे असे आहे याचे मूलस्थान बीड जिल्ह्यातील उमड हे गाव होय सोमेश्वर–त्रिंबक–हरी–नारायण अशी आपली वंशपरंपरा याने नोंदविली आहे याचा निवास देऊळगाव राजा (जिल्हा बुलढाणा) येथे असे

याचा पिता हरी हा वृत्तीने पारमार्थिक असल्यामुळे याच्या मनावर लहानपणापासूनच परमार्थाचे संस्कार झाले होते ज्ञानेश्वराच्या नाथपंथी परंपरेतील प्रख्यात साधू केसरीनाथ हा याचा गुरू होता नारायण केसरी या जोड नावात केसरी हे त्याच्या गुरूच्या नावाचे संक्षिप्त रूप आहे आपला गुरुबंधू शिवदिन केसरी याच्याविषयी याने आदरभाव व्यक्त केला आहे

याने भागवताच्या दशमस्कंधावर रचलेली वीस बावीस हजार ओव्यांची टीका अप्रकाशित उपलब्ध झाली आहे या ग्रंथाची रचना त्याने बीड परगण्यातील वागा बुद्रुक या गावी वैशाख शु १०, शके १६६९ (इ स १७४७) या दिवशी पूर्ण केली या ग्रंथात

नारायण केसरीने कृष्णचरित्रकथा परमार्थरंगाने रंगवून टाकली आहे. त्याने आपल्या ग्रंथविषयाचे वर्णन करताना 'ब्रह्मरसाळ कृष्णकथा' असे शब्द वापरले आहेत. 'जरी हा ग्रंथ मराठी। परी अक्षरीं ब्रह्मत्वाची पुष्टी।' अशा शब्दांत त्याने मराठी भाषेचा गौरव केला आहे. ब्रह्मरसात भिजलेल्या नारायणाच्या वाणीची कल्पना यावी म्हणून या काही ओव्या अशा –

**हातीं धरोनि प्रेमदोरी। निःशब्द निर्गुण निराकारी।**
**गोपिका नाचविती सुंदरी। आत्मा श्रीहरी लक्षोनिया॥**
**जो न माये गगनोदरीं। विधि जन्मला नाभिविवरीं।**
**तोचि हा श्रीकृष्ण हृदयमंदिरीं। पालखीं सुंदरी हालविताती॥**
**वेदां न कळे ज्याचा अंत। स्वयंप्रकाश सर्वोदित।**
**ब्रह्मांडनायक पूर्णभरित। भक्तिस्नेहें बाळरूपें॥**
**तेथें सद्वासना नारी। त्याचि व्रजांगना सुंदरी।**
**घेऊनि हातीं प्रेमदोरी। परस्पर हरि निजविताती॥**

कथाकथनाचा ओघ अबाधितपणे वाहता ठेवून परमार्थविचाराची मांडणी करण्यात नारायण केसरी यशस्वी ठरला आहे. या दशमटीकेशिवाय त्याने सतमाळ नावाचे एक लघुप्रकरण (ओव्या ११९) आणि काही हिंदी–मराठी पदेही रचली आहेत.

[श्री. रा. चिं. ढेरे – प्रसाद, जून १९६५]

**नारायणगुरु** (१८५६–१९२८ इ. स.) केरळातील एक थोर धर्मसुधारक. त्रिवेंद्रमपासून सात मैल अंतरावर असलेल्या चेंपाषन्ती खेड्यात एळुवा या अस्पृश्य जातीत याचा जन्म झाला. याच्या पित्याचे नाव मातन आणि आईचे नाव कुट्टी होते. प्रथम चल्ल्या कडून आणि नंतर रामन पिल्लै नामक एका विद्वानाकडून त्याने संस्कृत भाषेचे शिक्षण घेतले. केरळात त्या काळीही अस्पृश्यांना संस्कृत शिकायची बंदी नव्हती, म्हणून त्याला ती गोष्ट शक्य झाली. यापुढील त्याचा तीन वर्षांचा काळ



नारायणगुरु

मुलांना शिकविण्यात आणि तमिळ व संस्कृत भाषेतील वेदांताच्या ग्रंथांचे अध्ययन करण्यात गेला. वेदांताचा अभ्यास करताना त्याला विरक्ती उत्पन्न झाली. याच अवस्थेत चट्टांबी स्वामी व तक्कर अय्युव नामक दोन योगी त्याला भेटले. त्यांच्या मार्गदर्शनाखाली त्याने योगाभ्यास सुरू केला. पुढे कन्याकुमारीजवळच्या मरुत्वामलै या ठिकाणी पिळ्ळत्तडम नावाच्या गुहेत राहून नारायणाने घोर तपस्या आरंभली. तपस्या संपल्यावर समाजजीवनाचे निरीक्षण करण्यासाठी त्याने तमिळनाडू व केरळ या प्रदेशांची यात्रा केली.

त्या काळी सवर्ण हिंदूंकडून अस्पृश्यांची अतीव अवहेलना होत होती. अस्पृश्य असल्यामुळे सतत तीस वर्षे नारायणगुरूने स्वतःही अनेक हालअपेष्टा सोसल्या होत्या. या गोष्टीचा फायदा घेऊन ख्रिस्ती व मुसलमान लोक अस्पृश्यांना आपल्या धर्मात ओढीत होते. विशेषतः कोळी आणि एळुवा या जाती ख्रिस्ती धर्मात ओढल्या जात होत्या. ही सर्व परिस्थिती लक्षात घेऊन नारायणगुरूने आपली भारतभ्रमणाची कल्पना सोडून दिली आणि समाजोद्धाराचे कार्य हाती घेतले. त्यासाठी त्याने अरुविप्पुरम या गावी आपले वास्तव्य स्थिर केले.

तो रोज ध्यानधारणा करी व उरलेल्या वेळात दीनदुबळ्यांची सेवा करी. तो आयुर्वेदाची औषधे गोरगरिबांना विनामूल्य देऊ लागला. त्याचा लोकांना गुणही येऊ लागला. त्यामुळे खालच्या बहुतेक वर्गातले लोक त्याच्यावर प्रेम करू लागले. अधिकार पाहून लोकांना तो परमार्थमार्गाचाही उपदेश करू लागला.

केरळातील विकृत झालेल्या धार्मिक आणि सामाजिक जीवनात सुधारणा करण्यासाठी त्याने प्रथम अस्पृश्योद्धाराचे कार्य हाती घेतले. अस्पृश्यांना स्पृश्यांच्या मंदिरात प्रवेशबंदी होती. त्या समाजाच्या अंतःकरणावर चांगले संस्कार घडवायचे तर त्यांच्यासाठी मंदिरे हवी होती. म्हणून नारायणगुरूने एक शिवमंदिर उभारले. अस्पृश्य माणसाने उभारलेले भारतातले हे पहिले देऊळ होय. त्यानंतर आणखीही काही मंदिरे त्याने बांधली. या मंदिरातील उपासनापद्धतीही त्याने स्वतंत्र निर्माण केली. त्याच्या जोडीला समाजात वेदांताचा प्रचार व्हावा म्हणून त्याने नवीन संन्यासी-मठही स्थापन केले. थोड्याच काळात ही मंदिरे व मठ ही हिंदू समाजाच्या संघटनेची आणि ज्ञानप्रचाराची प्रभावी केंद्रे बनली. त्याने सर्व जमातींना समान लेखून सर्वांना संन्यास घेण्याची परवानगी ठेवली. त्याने अस्पृश्य वर्गाला अद्वैताची शिकवण दिली आणि मद्यपानावर निर्बंध घातला. पशुबळीची प्रथाही बंद करून त्याने अनेक सामाजिक सुधारणांचा पाया घातला. 'सदाचार हाच सर्वश्रेष्ठ धर्म होय', 'जातिभेदाचा विचार करू नका. ब

त्याशी चर्चा करू नका '' या जगात फक्त एकच जात आहे आणि ती म्हणजे माणसाची परमात्माही एकच आहे ' अशा प्रकारच्या उपदेशाने त्याने लोकाची मने भारून टाकली त्यामुळे ख्रिस्ती धर्माकडे वळणारा केरळातील अस्पृश्य समाजाचा ओघ थाबला नारायणगुरू झाला नसता, तर केरळातील बहुसख्य हिंदू समाज ख्रिस्त्याच्या कळपात ओढला गेला असता, असे म्हणतात

हिंदू समाजात आतरजातीय विवाह व्हावे म्हणजे जातिहीन व वर्गहीन असा नवा समाज निर्माण होईल, असे त्याचे प्रतिपादन होते जो धर्म माणसाला वाईटापासून चागल्याकडे जाण्याची शिकवण देतो, तोच खरा धर्म होय, असे तो सागे या त्याच्या शिकवणुकीच्या प्रभावामुळे आणि त्याच्या विधायक कार्यामुळे म गाधी आणि रवींद्रनाथ टागोर याच्यासारखे श्रेष्ठ पुरुष त्याच्याकडे आकृष्ट झाले शिवगिरी येथील आश्रमात ते दोघेही नारायण गुरूला भेटत गेले

आत्मोपदेशशतकम या त्याने लिहिलेल्या मल्याळम भाषेतील काव्यात त्याच्या सर्व उपदेशाचे सार आहे याशिवाय सस्कृत व मल्याळम अशा दोन्ही भाषात त्याने विपुल वाङ्मय निर्माण केले आहे

केरळातील वरकाम या गावी त्याने देह ठेवला तिथ त्याची समाधीही बाधली आहे तिथल्या आश्रमात अनेक हीन यातीचे लोक सस्कृत व वेदान्त शिकले [ श्री ए अैयप्पा– म स , त्रिवेंद्रम गझेटियर, एकता, दीपावली अक १९६५ ]

## नारायणतीर्थ

(१) ( इ स चे १८ वे शतक ) मीमासा दर्शनाचा प्रख्यात विद्वान याचे गृहस्थाश्रमीचे नाव गोविन्दशास्त्री असे होते काशीतल्या नीलकठसूरीचा हा मुलगा होय पुढे याने शिवरामतीर्थ याच्याकडून सन्यासदीक्षा घेतली ही दीक्षा घेण्यापूर्वीच त्याने मीमासेवर भाट्ट परिभाषा नावाचा ग्रथ रचला होता या ग्रथात जैमिनीय सूत्राच्या १२ अध्यायाचा साराश सकलित केलेला आहे मीमासेप्रमाणेच वेदान्तावरही त्याने ग्रथ लिहिले आहेत हा त्याच्या काळातला एक प्रतिभाशाली विद्वान मानला गेला आहे [ मी द ]

(२) (इ स च्या १७ व्या शतकाचा पूर्वार्ध) एक सस्कृत कवी हा स्मार्त ब्राह्मण असून तजाऊर येथे राहत होता शिवरामानन्दतीर्थ हे याचे गुरू होत श्रीकृष्णलीलातरगिणी नामक काव्यात शिवरामानदतीर्थपादसेवक असा त्याने स्वत चा निर्देश केला आहे

याने जयदेवाच्या गीतगोविंदाचे सखोल अध्ययन केले होते, त्यामुळे त्याला जयदेवाचा अवतार मानतात

नारायणतीर्थ हे याचे सन्यासाश्रमातले नाव आहे ज्या एका प्रसगामुळे याला सन्यास घ्यावा लागला, तो प्रसग असा––

कृष्णा नदीच्या पलतीरावर त्याच्या सासऱ्याचे घर होते एकदा त्याची पत्नी माहेरी गेली असता हा तिच्या भेटीला निघाला होता वाटेत भरलेली कृष्णा नदी पोहून जात असता हा भोवऱ्यात सापडला त्यातून बाहेर येण्याचा त्याने खूप प्रयत्न केला, पण काही जमेना शेवटी जीविताची आशा सोडून त्याने आपत्सन्यास घ्यायचे ठरविले आणि जानवे तोडून व डोक्यावरील काही केस उपटून ते पाण्यात टाकले तेवढ्यात त्याला एका लाकडाचा आधार सापडला त्या आधाराने तो पलतीराला लागला मग सासुरवाडीस जाऊन त्याने घडलेली सर्व हकीकत आपल्या पत्नीला सागितली व तिच्या अनुमतीने यथाविधि सन्यासदीक्षा घेतली नतर तो तीर्थाटनाला निघाला फिरत फिरत आध्रप्रदेशातील चल्लपल्ली या ठिकाणी आला ते स्थान त्याला आवडले तिथे राहून त्याने वाङ्मयनिर्मितीला प्रारभ केला

श्रीकृष्णलीलातरगिणी हे त्याचे सस्कृत भाषेतले एक सगीत काव्य आहे त्यात बारा तरग आहेत हे काव्य भागवताच्या दशमस्कधावर आधारलेले असून, कृष्णजन्मापासून कृष्ण रुक्मिणी विवाहापर्यंतचा सर्व कथाभाग यात आलेला आहे प्रासादिक भाषेमुळे हे काव्य वाचनीय झाले आहे त्याला सगीताचीही जोड आहे एकदर छत्तीस राग या ग्रथात आढळतात मगलकाफी हा यातील सर्वस्वी नवीन असा राग होय [ ग्रे व ]

## नारायणपूर्वतापिनी उपनिषद

एक नव्य उपनिषद हे अथर्ववेदाशी सबद्ध आहे हे प्रल्हादवान सनत्कुमारादी मुनींना सागितले आहे याचे सहा खड आहेत

प्रथमखडात पृथ्वि यादी पचमहाभूते, चद्र, सूर्य व यजमान या नारायणाच्या अष्टमूर्ती असल्याचे सागून नारायणाची सृष्टी, स्थिती, सहार, तिरोधान व अनुग्रह ही पाच प्रमुख कृत्ये असल्याचे सागितले आहे

द्वितीयखडात अष्टाक्षरी मत्राचे वर्णन असून, नारायण म्हणजे परब्रह्म व महालक्ष्मी म्हणजे मूळप्रकृती असे म्हटले आहे

तृतीयखडात नारायणगायत्री दिली असून, वेदवचनाच्या आधारे नारायणाचे माहात्म्य प्रतिपादिले आहे यात नारायणाचे पाच, सहा, सात, बारा, तेरा व सोळा अक्षराचे मत्र दिले आहेत

चतुर्थखडात नारायणगायत्री, अनगगायत्री आणि लक्ष्मी गायत्री हे मत्र दिले आहेत

पचमखडात विष्णूच्या जरा, पालिनिका, शाती, इ दहा कलाची नावे देऊन दहा अवताराचे मत्र दिले आहेत पुढे

सांख्यपद्धतीशी मिळते जुळते असे विश्वोत्पत्तीचे वर्णन आहे.

या उपनिषदाच्या सहाव्या खंडात नारायणयज्ञाचे सविस्तर वर्णन केले असून, त्याच्या पूजनाने विविध ऐहिक कामना पूर्ण होतात, असे तिथे सांगितले आहे. [ श्री. सी. ग. देसाई ]

**नारायणबली** दुर्मरणाने मेलेल्या किंवा आत्महत्या केलेल्या माणसाचे क्रियाकर्मांतर न झाल्यामुळे जर त्याची प्रेतत्वनिवृत्ती झाली नसेल आणि त्यामुळे जर कुलाच्या संततीला प्रतिबंध होत असेल, तर नारायणबली करावा, असे सांगितले आहे. त्याचा विधी असा—

एखाद्या शुद्ध एकादशीला नदीतीरासारख्या पवित्र जागी नारायणबलीचा संकल्प करावा. दोन कलशांवर विष्णू व वैवस्वत यम यांच्या सुवर्णप्रतिमा स्थापून त्यांची षोडशोपचारे पूजा करावी. नंतर त्या कलशांच्या पूर्वेस दर्भाने एक रेघ ओढून दक्षिणाग्र कुश पसरावे. त्यांवर 'शुंधतां विष्णुरूपी प्रेत' या मंत्राने दहा वेळा उदक घ्यावे. नंतर दक्षिणेस तोंड करून अपसव्याने विष्णुरूपी प्रेताचे ध्यान करावे. त्या पसरलेल्या कुशांवर मध, तूप व तीळ यांनी युक्त असे दहा पिंड 'काश्यपगोत्र अमुकप्रेत विष्णुदैवत अयं ते पिण्ड' असे म्हणून द्यावे. पिंडांची गंधादी उपचारांनी पूजा करून मग त्यांचे नदीत किंवा जलाशयात विसर्जन करावे. पूर्व दिवसाचा हा विधी झाला.

दुसऱ्या दिवशी माध्याह्नकाली विष्णूची पूजा करावी. नंतर एक, तीन किंवा पाच अशा विषम संख्येच्या ब्राह्मणांस बोलावून एकोद्दिष्ट विधीने त्या विष्णुरूपी प्रेताचे श्राद्ध करावे. हे श्राद्ध ब्राह्मणांच्या पादप्रक्षालनापासून तृप्तिप्रश्नापर्यंत मंत्ररहित करावे. विष्णू, ब्रह्मा, शिव व सपरिवार यम यांना नाममंत्रांनी चार पिंड द्यावे. विष्णुरूपी प्रेतासाठी पाचवा पिंड द्यावा. पिंडपूजा करून त्यांचे विसर्जन झाल्यावर ब्राह्मणांना दक्षिणा द्यावी. एका ब्राह्मणाला वस्त्रालंकार, गाय व सुवर्ण या वस्तू द्याव्या. मग प्रेताला तिलांजली देण्याबद्दल ब्राह्मणांची प्रार्थना करावी. ब्राह्मणांनी कुश, तिल व तुलसीपत्र यांनी युक्त असे उदक आंजळीत घेऊन ते प्रेताला द्यावे. मग कर्त्याने स्नान करून भोजन करावे. या विधीने प्रेतात्म्याला स्वर्गप्राप्ती होते, असे सांगितले आहे. (सं. कौ.)

बौधायन गृह्यशेषसूत्रामध्ये (३. २०) नारायणबलीचा विधी वरच्याहून निराळा सांगितला आहे, तो असा—

प्रथम अग्निस्थापना करावी. मग पुरुष या देवतेची स्थापना करावी. शिजवलेल्या अन्नाने विष्णूसाठी अग्नीत आहुती द्यावी. केशव, नारायण, इ. बारा नावांनी आज्याच्या आहुती द्याव्या. भातात गूळ, पायस व तूप मिसळून, तो पुरुष देवतेला निवेदन करावा. ब्राह्मणांना बोलावून त्यांची यथाविधि पूजा करावी. नंतर त्यांच्या हातांवर अन्नाच्या आहुती द्याव्या. शिल्लक राहिलेल्या अन्नाने विश्वेदेव, विष्णू, नारायण, ब्रह्मा, शिव, यम, इ. बारा देवतांना बली द्यावे.

स्मृतिग्रंथांमध्ये नारायणबली व नागबली हे एकाच कामनेसाठी सांगितले असल्याने वरील दोन्ही विधी बरोबर करण्याची प्रथा आहे. नारायणनागबली असे या विधीचे जोडनाव यामुळेच रूढ झाले आहे. पाहा – नागबली. [ श्री. विद्याधरशास्त्री भिडे ]

**नारायणभट्ट** (१) (जन्म १५१३ इ. स.) एक मीमांसक व धर्मशास्त्रज्ञ पंडित. हा विश्वामित्रगोत्री देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण असून मूळचा पैठणचा राहणारा होता. कोल्हापूरची महालक्ष्मी ही याची कुलदेवता होती. याचा पिता रामेश्वरभट्ट याने पुत्रप्राप्तीसाठी महालक्ष्मीला साकडे घातल्यानंतर तिच्या प्रसादाने याला जो पुत्र झाला, तोच हा नारायणभट्ट होय, असे सांगतात.

नारायणभट्टाने आपल्या वडिलांजवळच सर्व शास्त्रांचे अध्ययन केले. त्याची राजा तोडरमल्ल याच्याशी मैत्री होती. त्याने तोडरमल्लाच्या दरबारात बंगालच्या व मिथिलेच्या पंडितांना वादविवादात जिंकले होते, असे गाधिवंशानुचरित व भट्टवंशकाव्य या ग्रंथांत सांगितले आहे. नारायणभट्टाच्या विद्वत्तेमुळे काशीक्षेत्रात दाक्षिणात्य पंडितांचे वर्चस्व स्थापन झाले. त्याने काशीमध्ये महाराष्ट्रीयांची एक वसाहतच स्थापन केली. विद्वत्ता व सदाचरण या गोष्टींमुळे नारायणभट्टाला जगद्गुरू अशी पदवी मिळाली होती. यामुळे मंत्रजागराच्या बैठी सर्व वैदिकांमध्ये त्याच्या घराण्याला अग्रपूजेचा मान मिळू लागला. हा मान अजूनही या घराण्याकडे चालू आहे. याच्या वंशजांनी याला प्रत्यक्ष विष्णूचा अवतार असे म्हटले आहे. निर्णयसिंधुकार कमलाकरभट्ट म्हणतो, की 'वेदांचे उद्दिष्ट जो धर्म त्याचे रक्षण करण्याकरिता नारायणभट्ट या नावाने श्रीहरीने मनुष्यरूप धारण केले अशा त्या माझ्या पितामहाला मी वंदन करतो.'

मोगलांनी उद्ध्वस्त केलेले काशीतील विश्वेश्वराचे मंदिर यानेच बांधले, असे सांगतात.

याची ग्रंथरचना विपुल आहे. याने पार्थसारथीमिश्रांच्या शास्त्रदीपिका या ग्रंथाच्या एका भागावर टीका लिहिली व दुसऱ्या भागावर त्याचा पुत्र शंकरभट्ट याने टीका लिहिली. याची वृत्तरत्नाकरावरील टीका प्रसिद्ध आहे. मुहूर्तमार्तंड, अंत्येष्टिपद्धती, त्रिस्थलीसेतू आणि प्रयोगरत्न हे याचे उल्लेखनीय ग्रंथ होत. प्रयोगरत्न या ग्रंथात गर्भाधानापासून विवाहापर्यंतचे सर्व संस्कार त्याने विस्ताराने वर्णिले आहेत.

नयननिर्णय, आरामोत्सर्गपद्धती, आतुरसंन्यासविधी, जीवच्छ्राद्धप्रयोग, आहिताग्निमरणाग्न्याहादी पद्धती, महारुद्रपद्धती किंवा रुद्रपद्धती, काशीमरणमुक्तिविवेक, गोत्रप्रवरनिर्णय, तिथिनिर्णय, तुलापुरुषदानप्रयोग, दिव्यानुष्ठानपद्धती, मानमीमांसा, कालनिर्णयकारिकाव्याख्या, वृषोत्सर्गपद्धती, लक्षहोमपद्धती व विष्णुश्राद्धपद्धती हे त्याचे धर्मशास्त्रावरील इतर ग्रंथ होत [ म. च. को , शिवाजी–निबंधावली भा १, मी द ]

(२) ( इ स चे १६ वे शतक ) एक वैष्णव भक्तकवी याचा जन्म मदुरेत एका भृगुवंशी दीक्षित ब्राह्मण कुळात झाला बालपणापासून नारायणभट्टाला कृष्णभक्ती जडली होती पुढे हा वास्तव्यासाठी व्रजमंडळात गेला तिथे त्याने कृष्णदास ब्रह्मचारीकडून दीक्षा घेतली याने व्रजमंडलाचे माहात्म्य खूपच वाढविले भागवतात आणि वराहादी पुराणात श्रीकृष्णलीलेच्या ज्या स्थळांचा उल्लेख आहे, ती स्थळे कालप्रवाहात विस्मृत झाली होती नारायणभट्टाने त्यांचा शोध लावला व्रजमंडलातील वने उपवने, तीर्थे व देवदेवता यांचे माहात्म्य वाढवण्यासाठी आणि कृष्णभक्तीच्या प्रसारासाठी त्याने अनेक ग्रंथांची रचना केली त्याचप्रमाणे कृष्णलीलेचे भक्तांनी अनुकरण करावे, म्हणून त्याने रासनृत्याचा प्रसार केला त्यासाठी व्रजमंडलात त्याने अनेक ठिकाणी रासमंडळे स्थापन केली

याने संस्कृत भाषेत व्रजभक्तिविलास, व्रजोत्सवचंद्रिका, व्रजोत्सवाह्लादिनी, भक्तभूषणसंदर्भ, बृहत्व्रजगुणोत्सव, भक्तिविवेक, साधनदीपिका, इ साठ ग्रंथ लिहिले आहेत

गोवर्धन पर्वताजवळच्या राधाकुंडाच्या तीरावर बारा वर्षे वास्तव्य केल्यावर तो व्रजमंडलातील ऊंचेगाव या ठिकाणी राहायला गेला तिथे त्याने आपल्या गृहस्थजीवनाला प्रारंभ केला ऊंचेगावात त्याने बलदेवाची आणि बरसाना गावी लाडलीलालाची पूजाअर्चा सुरू केली ती वृत्ती त्याच्या वंशजांकडे अजूनही चालू आहे ऊंचेगावातच त्याचे देहावसान झाले तिथे त्याची समाधी आहे [ चै म ब्र सा , ब्र सा इ ]

## नारायणमंत्र

' ॐ नमो नारायणाय ' या अष्टाक्षरी मंत्राला नारायणमंत्र असे नाव आहे याला मंत्रराज असेही म्हणतात नारायणमंत्राला विष्णूच्या आठ दृश्य रूपांचे म्हणजे पंचमहाभूते, सूर्य, चंद्र आणि यज्ञकर्ता यजमान यांचे आणि त्याचप्रमाणे आकाराच्या आठ मात्रांचेही प्रतीक समजतात या मंत्राची शक्ती अद्भुत असल्याचे मानले आहे याच्या केवळ श्रवणाने जीव मायाजालातून मुक्त होतात, अशी वैष्णवांची श्रद्धा आहे वैष्णव संत रामानुजाचार्य यांनी याच मंत्राची दीक्षा घेतली होती [ क्रि स्ट ले उ ]

## नारायण यंत्र

नारायणाच्या पूजेसाठी आवश्यक असे यंत्र या यंत्रात ' ॐ नमो लक्ष्मीनारायणाय ' असे मध्यभागी लिहून त्याच्याभोवती एक त्रिकोण काढतात त्रिकोणाच्या तीन बाजूंना प्रभा, आवरण आणि विमर्श या शक्तींची नावे लिहितात त्रिकोणाच्या भोवती षट्कोन काढतात आणि त्याच्या सहा रेषांच्या आतील बाजूला महोल्का, वीरोल्का, वह्न्युल्का, पर्युल्का, विद्युदुल्का ज्वलदुल्का अशी नावे लिहितात या षट्कोनाच्या भोवती एक वर्तुळ काढतात व त्यात अष्टदल कमल रेखाटतात अष्टदलात सनक, सनंदन, सनत्सुजात सनत्कुमार, सनातन, नारद, तुंबरू आणि समत ही नावे लिहितात या आकृतीभोवती आणखी एक वर्तुळ काढून त्यात सोळा पाकळ्यांचे कमळ काढतात या सोळा पाकळ्यांत दशावतारांची नावे, शंकराची पाच नावे व परमेश्वर हा शब्द लिहितात या आकृतीभोवती पुन्हा आणखी एक वर्तुळ काढून, त्यात चोवीस पाकळ्यांत विष्णूच्या चोवीस वस्तूंची नावे लिहितात या आकृतीभोवती आणखी एक वर्तुळ काढून त्यात बत्तीस पाकळ्यांचे कमळ काढतात व त्या पाकळ्यांत विष्णूची तितकी नावे लिहितात या सर्व आकृतीभोवती आठ दिशांना अष्टदिग्गजांची नावे लिहितात [ क्रि स्ट ल उ ]

## नारायण सरोवर

एक तीर्थस्थान कच्छमधील भूज शहरापासून ८१ मैलांवर कोरी नदीच्या मुखाजवळ याच नावाचे एक खेडे असून तिथे हे सरोवर आहे

या गावात सात मंदिरे आहेत नारायण सरोवराजवळ पूर्वी आदिनारायणाचे एकच मंदिर होते व ते कानफाटे बैराग्यांच्या ताब्यात होते ते एका साधूने इ स १५५० मध्ये कानफाट्यांकडून विकत घेतले आणि या सरोवराला घाट व पायऱ्या बांधल्या त्यानंतर कच्छची राणी महाकुंवर ( इ स १७१८–४१ ) हिचे द्वारकेच्या पुजाऱ्यांशी भांडण झाले, तेव्हा तिने या स्थानाचे माहात्म्य वाढविण्यासाठी तिथे अनेक मोठी मंदिरे बांधली आदिनारायण, गोवर्धननाथ, द्वारिकानाथ आणि लक्ष्मी अशी त्यांची नावे आहेत सर्वांत शेवटी तिने कल्याणरायाचे मंदिर बांधून त्याला संस्थानाकडून बरीच जमीन व गावे इनाम म्हणून लावून दिली

या सरोवराच्या तीरावर दक्षाचे पुत्र हर्यश्व व शबलाश्व यांनी तप केले होते, अशी कथा भागवतात आहे (भाग पु ६ ५ ३ व २५) [ वि मु रा प , हिं घ ]

## नारायणस्वामी

भारतातील एक देव हा सर्पविषाची बाधा दूर करतो, अशी समजूत आहे

याच्याविषयी एक कथा प्रचलित आहे, ती पुढीलप्रमाणे–

एक मुलगा एकदा मित्रासह रानात लाकडे आणायला गेला होता तिथे एक वारूळ होते ते पाहून त्याच्या अंगात कोणत्यातरी दैवी प्रेरणेचा संचार झाला आणि तो त्या वारुळात शिरला बरोबर असणाऱ्या मित्रांनी घरी येऊन ही हकीकत त्याच्या आईबापांना सांगितली ती दोघ वारुळाजवळ येऊन त्याला हाका मारीत तीन दिवस तिथे धरणे धरून बसली तेव्हा तो मुलगा वारुळातून बाहेर आला, तेव्हा त्याच्या हातांना सर्पाचे विळखे होते मग तो गावात आला लोकांना त्याने सांगितले, की कोणाला साप चावला तर त्याने एक दगड डोक्यावर घेऊन वारुळाजवळ यावे आणि 'नारायणस्वामी' अशी हाक मारावी, म्हणजे विष उतरेल एवढे सांगून पुन्हा तो वारुळात अदृश्य झाला काही दिवस गेल्यावर तो गावातल्या मुलाच्या अंगात येऊन त्यांना त्रास देऊ लागला मग लोकांनी त्याचे देऊळ बांधले आणि त्याची पूजा सुरू केली [द्र गा मों हि ]

**नारायणास्त्र** ज्याची देवता नारायण आहे असे अस्त्र हे अमोघ मानलेले आहे हे अवध्याचाही वध करू शकते याचा प्रयोग केल्यावर लगेच आकाशात सुटतो, पृथ्वीचा थरकाप होतो व समुद्रावर प्रचंड लाटा उठतात याला प्रतिरोध करील असे दुसरे अस्त्र नाही युद्ध सोडून नारायणाला सर्वभावे शरण जाणे, हाच या अस्त्रापासून संरक्षण मिळविण्याचा एकमेव उपाय होय (म भा द्रोण २०२)

द्रोणाचार्यांनी नारायणाचे स्तवन करून त्याच्याकडून हे अस्त्र प्राप्त केले होते शत्रूला मारल्यावाचून हे अस्त्र परत येत नाही, म्हणून त्याचा प्रयोग संयमाने करावा, असे नारायणाने द्रोणाचार्यांना सांगितले होते पुढे द्रोणाचार्यांनी आपला पुत्र अश्वत्थामा याला ते अस्त्र दिले भारतीय युद्धात धृष्टद्युम्नाने द्रोणाचार्यांचा वध केला, तेव्हा अतिशय संतप्त होऊन अश्वत्थाम्याने पांडवांच्या सैन्यावर हे अस्त्र सोडले, मग श्रीकृष्णाच्या आज्ञेवरून सर्व पांडव आणि सैनिकांनी शस्त्रे खाली ठेवून त्या अस्त्राला शरण गेले, तेव्हाच ते शांत झाले, अशी कथा आहे

**नारायणी** (१) दुर्गेचे एक नाव या शब्दाची निरुक्ती ब्रह्मवैवर्त पुराणात पुढीलप्रमाणे दिली आहे–

**यशसा तेजसा रूपैर्नारायणसमा गुणै ।**
**शक्तिर्नारायणस्येयं तेन नारायणी स्मृता ॥**

(ब्रह्मवै पु प्रकृती ४५)

**अर्थ**– यश तेज, रूप व गुण यांनी नारायणाशी तुल्य असणारी ही नारायणाची शक्ती त्यामुळे नारायणी मानली गेली

सुपार्श्व नामक पीठाच्या ठिकाणी हिची मूर्ती असल्याचे देवी भागवतात सांगितले आहे (७ ३० ६६) मार्कंडेय पुराणात हिचे माहात्म्य विस्ताराने वर्णिले आहे **पाहा** – महालसा

(२) एक राग हा खमाज थाटातून उत्पन्न होतो याच्या आरोहात गंधार व निषाद आणि अवरोहात गंधार वर्ज्य असल्यामुळे याची जाती ओडव षाडव आहे वादी ऋषभ संवादी पंचम गानसमय दिवसाचा दुसरा प्रहर याचे स्वरूप काहीसे सारंगासारखे भासते पण सारंग रागात धैवत वर्ज्य असतो आणि प्रस्तुत रागात त्यालाच महत्त्व असते

**नारायणीय धर्म** भागवत धर्म किंवा वैष्णव धर्म याचे उगमस्थान या धर्माचे विवरण महाभारतात आले आहे (शांति अ ३३४ ते ३५१) भारतीय युद्धाच्या समाप्तीनंतर युधिष्ठिराच्या मनात निर्माण झालेला विषाद दूर करण्यासाठी प्रस्तुत पर्वात हा विषय सांगितलेला आहे भीष्माचार्यांच्या मुखातून राजधर्म आणि आपद्धर्म ऐकल्यानंतर युधिष्ठिराने पुढील दोन प्रश्न केले आहेत–

(१) गृहस्थाश्रमी लोकांचा श्रेष्ठ धर्म कोणता ?

(२) संसारात अनेक आपत्ती प्राप्त झाल्यानंतर साह जिकच दु ख–शोक निर्माण होतात ते निर्माण न व्हावे अशी बुद्धी सांगणारा धर्म कोणता ?

या दोन्ही प्रश्नांना भीष्माचार्यांनी नारायणीय धर्म असे एकच उत्तर दिले आहे

**परंपरा** – हा नारायणीय धर्म साक्षात भगवंताने नारदाला सांगितला नारदाने तो व्यासांना व व्यासांनी वैशंपायन ऋषीला सांगितला अन्य युगात हाच धर्म भगवंताने सूर्याला, सूर्याने मनूला व मनूने इक्ष्वाकूला सांगितला होता ही दुसरी परंपरा गीतेत दिलेल्या परंपरेशी जुळणारी आहे (गीता ४ १–३) नारायणीय आख्यानात ही परंपरा वेगवेगळ्या कथांच्या द्वारे दिलेली आहे एवढेच गीतेतील सांख्य, योग कर्म, क्षराक्षरविचार, विभूतिदर्शन, विश्वरूपदर्शन यासारखे विषयही प्रस्तुत नारायणीय धर्मात आलेले आहेत या विषयाच्या विवेचनावर गीतेची दाट छाया आहे व्यास म्हणतात–

**एवमेष महान् धर्म स ते पूर्व नृपोत्तम ।**
**कथितो हरिगीतासु समासविधिकल्पित ॥**

(म भा शांति ३४८ ११)

अर्थ – हे नृपश्रेष्ठ युधिष्ठिरा, हाच महान धर्म तुला पूर्वी हरिगीतेच्या ठिकाणी थोडक्यात कथन केलेला आहे

नारायणीय धर्म हाच आद्य धर्म असून, या धर्मानेच सृष्टिकर्त्या विधात्याने नारायणाची पूजा केली, असेही सांगितले

आहे (म भा शाती ३४८ ३४–३५) नारायण ऋषीने सागितलेला हा धर्म प्रवत्तिलक्षणात्मक आहे यज्ञात होणारी पशुहिंसा नारायणीय धर्माला मान्य नाही यज्ञात पशुहिंसा न करता यज्ञाच्या सत्र भागाच्या ठिकाणी भगवताची कल्पना करावी असे तिथे उपरिचरवसूच्या कथेच्या द्वारे सागितले आहे ही कथा थोडक्यात अशी–

उपरिचरवसू हा पुरुवशातला राजा होता याने यादवाच्या कडून चेदी देश जिंकून घेतला होता याला अतराळातून भ्रमण करण्याचे सामर्थ्य होते हा नारायणाचा भक्त होता व नित्य नारायणमत्राचा जप करीत होता हा बृहस्पतीचा शिष्य होता याने अश्वमेध यज्ञ केला असता बृहस्पतीने त्या यज्ञात होतत्व स्वीकारले होते या यज्ञात पशुवध झाला नाही त्यामुळे त्याला नारायणाने प्रत्यक्ष दर्शन दिले व मृत्यूनतर तो परम पदाला प्राप्त झाला (म भा शाति ३३५–३३७)

शतपथ ब्राह्मणातील पुरुषमेध यज्ञातदेखील सव जातीच्या पुरुषाच्या ठिकाणी परमेश्वराची कल्पना करावी व पुरुष सूक्ताच्या द्वारे त्याची पूजा करावी, असे सागितले आहे (श ब्रा १३ ६ १ १) त्यावरून पुरुषमेध हा भागवत धर्माचा मुळारभ ठरतो नारायणीयापाख्यानात ही वेदोपनिषत्कालीन परपरा अबाधित ठेवण्यात आली असून, पुरुषसूक्त हे वेदाचे सार असल्याचा निर्वाळाही दिला आहे यावरून ऋग्वेदातील पुरुषसूक्त, ब्राह्मणग्रथातील पुरुषमेध, गीततील पुरुषोत्तम आणि नारायणीय धर्मातील नारायण (विशेषत वासुदेव) यात परपरेची सुसूत्रता अबाधितपणे चालू असल्याचे प्रत्ययास येते

**माहात्म्य** – सृष्टी निर्माण करण्याची पात्रता ब्रह्मदेवाला या नारायणीय धर्माच्या याानेच प्राप्त झाली विश्वाचा उत्पत्ती झाल्यानतरदेखील विश्वाला आधारभूत असा हाच धर्म आहे ब्रह्मदेवाने सष्टिरचना करताना वेदवेदागयुक्त ज्ञान, पचभूते, अष्टधाप्रकृती आणि एकादशरुद्र याना निर्माण केले ही सव मडळी आपले अधिकार कोणते व सामर्थ्य कशा प्रकारचे, हे विचारण्यासाठी ब्रह्मदेवाकडे गेली ब्रह्मदेव त्या सर्वांना घेऊन क्षीरसागरावर गेला तिथे त्याने महापुरुष नारायणाची प्रार्थना केली या वेळी नारायणाने आकाशवाणीच्या द्वारे त्याना आदेश दिला 'यज्ञ करू नका यज्ञाचे सव भाग माझ्या ठिकाणी कल्पा, म्हणजे मी तुमचे कल्याण करीन' पुढे देवानी त्या आदेशानुसार यज्ञ केला त्या यज्ञाच्या वेळीही आकाशवाणी झाली तिच्याद्वारे भगवताने पुन्हा आदेश दिला 'प्रवत्तिगुण कल्पित अशी मी तुमची निर्मिती केली आहे तुम्ही लोकहिताचे चिंतन करा प्रवृत्तिधर्मासाठी सप्तर्षी आणि निवत्तिधर्मासाठी सनकादिक याची मी निर्मिती केली आहे या दोहोपैकी जो ज्या मार्गात रमेल, त्याला तदनुसार फल मिळेल या कृतयुगात पशुयज्ञ वर्ज्य आहे तुम्ही स्वाधिकाराने चिंतन करा, कर्म करा व लोकाना कर्माचा आदेश द्या' (म भा शाति ३४०)

नारायणीय धर्माच्या विवरणात साख्य योग, पाशुपत, इ भिन्न मताचाही उल्लेख केलेला आहे ही भिन्न मते भिन्न भिन्न ऋषीनी सागितलेली आहेत नारायणीय, पाचरात्र, सात्वत किंवा एकातिक हा धर्म मात्र साक्षात भगवताने उपदेशिला असल्याने तोच प्रमाण मानावा, असे सागितले आहे साख्य व योग हे भिन्न नसून एकच आहेत असे जसे गीतेने सागितले आहे, तसेच ते नारायणीय धर्मानेही सागितले आहे मात्र साख्याचे पुरुषबहुत्व व्यासाना मान्य नाही ते म्हणतात, की पुरुष एकच आहे वेदविद्येचे सार पुरुषसूक्त हे असून, त्याचेही सार पुरुष-कत्व हे आहे (म भा शाति ३५०) हा पुरुष सवसाक्षी, विश्वभुज आणि विश्वमूर्धा असून, तोच सर्वात्मा आहे (म भा शाति ३५१ १४)

विश्व आणि समस्त देवता या नारायणात्मकच आहेत असे असूनही कित्येक पुराणानी हरिहरामध्ये भेद कल्पिला आहे व्यासानी मात्र तो भेद न मानता हरिहर एकरूप असल्याचे सागितले आहे शातिपर्वाच्या ३५० व्या अध्यायात आपल्या नारायण या नावाची निरुक्ती सागताना श्रीकृष्ण म्हणतात –

ब्रह्मा आणि रुद्र हे प्रसादज व क्रोधज असे मी निर्माण केले रुद्र उग्र व्रताचे आचरण करणारा योगी असून, नारायणात्मक आहे त्याची पूजा केल्याने माझी पूजा केल्यासारखे होते मी सव लोकाचा आत्मा आहे, म्हणून माझा आत्मा असलेल्या रुद्राची मी पूजा करतो जर शिवाची मी पूजा केली नाही, तर आत्मपूजन केले असे होणार नाही मला जो जाणतो तो रुद्राला जाणतो जो रुद्राला जाणतो तो मलाही जाणतो रुद्र आणि नारायण म्हणजे एकच सत्त्व असून ते द्विविध झालेले आहे विष्णु स्वत च्या आत्म्याव्यतिरिक्त कोणाचीच पूजा करीत नाही म्हणूनच मी रुद्राची पूजा करतो

**व्यूहसिद्धान्त** – गीतेत नसलेला पण नारायणीय धर्माच्या विवेचनात वारवार आलेला सिद्धान्त म्हणजे व्यूहसिद्धान्त होय याची माडणी पुढीलप्रमाणे केलेला आहे – वासुदेव हा निर्गुण क्षेत्रज्ञ असून त्याच्यापासून सकर्षण नामक जीव उत्पन्न झाला सकर्षणापासून प्रद्युम्न नामक मन निर्माण झाले आणि प्रद्युम्ना पासून अनिरुद्ध सज्ञक अहकार निर्माण झाला वासुदेव (निर्गुण परमेश्वर), सकर्षण (जीव), प्रद्युम्न (मन) आणि अनिरुद्ध (अहकार) अशी ही चतुर्व्यूहाची रचना आहे यालाच मूर्ति चतुष्टय किंवा चतुर्विभक्त वासुदेव असे म्हणतात

रामानुजाचार्यांनी या व्यूहकल्पनेला फारच महत्त्व दिले आहे

मात्र शंकराचार्यांनी या व्यूहकल्पनेचे खंडन केलेले आहे. व्यूह कल्पना ही वेदविरोधी असल्याचे शंकराचार्य मानतात (ब्रह्मसूत्र २.२.४३–४५ या सूत्रावरील भाष्य). भागवतधर्मियांची व्यूह कल्पना अशा शब्दांनी शंकराचार्य तिचा उल्लेख करतात. त्या वरून शंकराचार्यांच्या काळी चतुर्व्यूहात्मक भागवत धर्म प्रचलित असावा, असे वाटते. सनपूर्व २ या शतकातला एक शिलालेख नाणेघाटात उपलब्ध आहे. त्यात संकर्षण व वासुदेव या दोन देवतांचा उल्लेख आढळतो. त्यावरून त्या काळातही व्यूहकल्पना रूढ होती, असे अनुमान करता येते. कदाचित त्या काळी दोनच व्यूह प्रचलित असावे. त्यानंतरच्या काळात प्रद्युम्न व अनिरुद्ध हे समाविष्ट होऊन व्यूहकल्पना चतुरस्र झाली असावी.

नाथांचा भागवत धर्म या ग्रंथात नारायणीय धर्माचे विवेचन करून प्रा. श्री. र. कुलकर्णी यांनी त्याचा समारोप पुढीलप्रमाणे केला आहे –

गीतेत उपदेशिलेला धर्म आणि नारायणीय धर्म हे एकाच परंपरेतून निर्माण झाले असले, तरी नारायणीय धर्माने गीतेपेक्षा काही अधिक सांगितले आहे. गीतेत निष्काम कर्मयोगावर विशेष भर दिलेला असून, त्याच्या अनुषंगाने भक्तीची महती वर्णिली आहे. नारायणीय धर्मात भक्तीच्या अनुषंगाने निष्काम कर्मयोगाची थोरवी गायिली आहे. गीता व नारायणीय धर्म या दोहोनाही कर्मयोग आणि भक्तियोग हे अभिप्रेत असले, तरी निष्काम कर्मयोगाचे महत्त्व कमी झाल्याच्या काळात गीतेची रचना झाली असल्याने गीतेत निष्काम कर्मयोगावर अधिक जोर दिलेला आहे. तर भक्तीची महती कमी झाल्याच्या काळात नारायणीय धर्म सांगण्यात आल्यामुळे त्यात भक्तीवर विशेष भर देण्यात आला आहे. नारायणीय धर्म उपदेशिला गेला त्या काळात यज्ञयागादी कर्मकांड बरेच मागे पडले असावे, असे अनुमान करता येते. कारण समाजात यज्ञयागादी विधींना गीतेच्या काळाइतकी मान्यता राहिली असती, तर पशुहिंसेचा उघड निषेध न करता गीतेप्रमाणेच तारतम्य स्वीकारून यज्ञ आणि उपासना यांचा उपदेश नारायणीय धर्मात आला असता. उपनिषदांच्या काळातच यज्ञादी कर्मकांडाचे गौणत्व ऋषींना जाणवत होते. अहिंसेविषयीचा ओढा त्या काळापासूनच वाढावत चालला होता. ही प्रवृत्ती नारायणीय धर्माच्या काळात बरीच स्थिर झाल्याचे दिसून येते. वेदाविषयी संपूर्ण आदराची भावना बाळगूनही नव्या मताचा पुरस्कार करताना हे नवे विचार पूर्वपरंपरेतूनच उदयास आले आहेत, हे दाखवण्याचा प्रयत्न नारायणीय आख्यानात दिसून येतो. ही गोष्ट पटवण्यासाठी ब्रह्मदेवाच्या अनेक जन्मांच्या वेळी नारायणाने हा धर्म त्याला उपदेशिला होता, असे तिथे साक्षेपाने सांगितले आहे. वासुदेव या शब्दाची व्युत्पत्तीसुद्धा तिथे विष्णू या शब्दाच्या व्युत्पत्तीशी जुळणारी आणि उपनिषदातील तत्त्वज्ञानाशी सुसंगत अशीच देण्यात आली आहे. त्याविषयीचा श्लोक असा–

**सर्वभूताधिवासश्च वासुदेवस्ततो ह्यहम् ।।**

(म. भा. शांति. ३४१.४१)

**अर्थ–** मी सर्व भूतांच्या ठिकाणी अधिवास करणारा आहे, म्हणून मी वासुदेव आहे.

नारायणीय धर्माला आधारभूत असलेले पुरुषसूक्त हे वेदांचे सार असल्याचे सांगून नारायणीय धर्माचा संबंध वेदोपनिषदांशी अधिक दृढ केलेला आहे. थोडक्यात सांगायचे तर परमेश्वराची एकांतिक भक्ती आणि भक्तीच्या क्षेत्रात अहिंसेला दिलेले प्राधान्य हे नारायणीय धर्माचे विशेष म्हणून सांगता येतील.

**नारायणोपनिषद** एक नव्य उपनिषद. हे कृष्ण यजुर्वेदाशी संबंधित आहे. यात नारायण म्हणजे ब्रह्म आणि तेच सर्व काही आहे, असे सांगितले असून, 'ॐ नमो नारायणाय' हा अष्टाक्षरी मंत्र दिला आहे. नारायणाच्या साक्षात्काराने मायेवर विजय मिळवता येतो, असा या उपनिषदाचा संदेश आहे. [श्री. सी. ग. देसाई]

**नारोपा** चौर्यायशी सिद्धांपैकी एक. नाडपा, नाडकपा, नरोपंत अशीही याची नावे मिळतात. श्री. राहुल सांकृत्यायन यांच्या मते हा महीपाल राजाच्या कारकीर्दीत होऊन गेला, तर श्री. तारानाथाच्या मते हा नयपाल राजाच्या (१०३८–१०५५ इ. स.) कारकिर्दीत झाला. नारोपाचा जन्म मगधातील एका ब्राह्मणकुलात झाला. याने वडील मूळ काश्मीरमधले होते. हा तिलोपाचा शिष्य होता.

नारोपाने भिक्षू बनून नालंदा विद्यापीठात अध्ययन केले. त्याने अनेक विद्यांचा अभ्यास केला होता. प्रथम फुल्लारी मठाचा आचार्य व नंतर विक्रमशिला विद्यापीठाच्या पूर्वद्वारावरील महापंडित म्हणून त्याची नियुक्ती झाली. पुढे तो तिबेटी लोकांच्या निमंत्रणावरून तिकडे गेला. स्तन्‌ग्युरमध्ये नारोपाच्या नावावर तेवीस ग्रंथ मिळतात. त्यातील नाडपंडित गीतिका व वज्रगीती हे दोनच जुने हिंदीत आहेत. तिलोपा आणि नारोपा यांनी चक्रसंवर, हेरुक व हेवज्रतंत्र यांवर बरेच लेखन केले व सहजयान मताचा साऱ्या भारतभर प्रचार केला.

चौऱ्यायशी सिद्धांत याचे स्थान विसावे आहे. ज्ञानपाद, दीपंकर, तिबेटचा कवी मर् वा, प्रज्ञारक्षित, कनकश्री व मणकश्री (माणिक्य) हे याचे शिष्य मानले जातात. महापंडित राहुल

शाङ्कृयायन याच्या मतानुसार इ स १०३९ मध्ये याचा मृत्यू झाला [ हिं मा वि , पु न नि , न्‍ ओ ]

## नार्मदीय ब्राह्मण

ब्राह्मणांची एक पोटजात या लोकांची वस्ती मुख्यत्वे मध्य प्रदेशातल्या निमाड जिल्ह्यात आढळते याना नर्मदातीरी प्रथम वसाहत केल्यामुळे याना नार्मदीय ब्राह्मण हे नाव मिळाले याच्यात स्मार्त व वैष्णव असे भेद आढळतात हे माध्यंदिन वाजसनेयी शाखेचे आहेत विदर्भातही याची वस्ती आहे [ भा भि वि ]

## नालडियार

प्राचीन तमिळ साहित्यातला एक सुप्रसिद्ध नीतिग्रंथ नाल=चार या ग्रथातले प्रत्येक पद्य चार चरणाचे असते, म्हणून याला नालडियार अशी सज्ञा मिळाली आहे या ग्रंथाची एकूण पद्यसंख्या चारशे आहे सुमारे दोन हजार वर्षापूर्वीचा हा ग्रंथ असून, विद्वानानी याची मुक्त कठाने प्रशसा केली आहे यातले प्रत्येक पद्य एकेका जैन साधूने रचले आहे याविषयी एक दतकथा प्रचलित आहे, ती अशी –

दोन हजार वर्षापूर्वी आठ हजार जैन साधू विंध्य, नीलगिरी, इ पर्वतावर राहत होते एकदा त्यांच्या प्रदेशात दुष्काळ पडल्यावर ते दक्षिणेतल्या पाण्ड्य देशात गेले तिथल्या राजाने त्याना आदरपूर्वक आपल्या अतिथिशाळेत ठेवून घेतले काही कालाने त्यांच्या प्रदेशातला दुष्काळ सपल्याची खबर त्याना मिळाली मग ते परत स्वस्थानी जाण्याचा विचार करू लागले राजाला हे समजले त्याने विचार केला, की हे साधू सभ्य व पडित असल्यामुळे याना जाऊ दिल्यास राज्याची हानी होईल म्हणून त्याने साधूना जाण्याची परवानगी नाकारली शेवटी एका रात्री ते सारे गुपचूपपणे पाड्य देशातून पसार झाले

दुसऱ्या दिवशी तपास करता असे दिसून आले, की त्या प्रत्येक साधूच्या आसनाखाली भूर्जपत्रावर एकेक पद्य लिहून ठेवलेले आहे नोकरानी ती चिठोरी राजापुढे नेऊन ठेवली राजाने ती वाचली, पण त्यातल्या एकाचा दुसऱ्याशी मेळ बसेना हे सगळे निरुपयोगी आहे, असे म्हणून राजाने ती सर्व पद्ये नदीत फेकायला लावली त्यानतर एक आश्चर्य घडले ! त्या सभारातील चारशे चिठोरी पाण्यात न बुडता तिरावर येऊन लागली ती गोष्ट राजाला कळली मग ती चिठोरी त्याने परत आणवली राजाला वाटले, की ही दैवी देणगी आहे त्याने त्या पद्याची वर्गवारी करून त्याचा संग्रह केला आणि त्याला नालडियार असे नाव दिले

धर्म, अर्थ व काम या त्रिविध पुरुषार्थांचा उपदेश करणे हा या संग्रहाचा उद्देश आहे चौथा मोक्षरूपी पुरुषार्थ हा वाणी आणि मन याच्या पलिकडचा असल्यामुळे त्याबद्दल प्रस्तुत संग्रहात काही लिहिलेले नाही या ग्रथात सन्यासाला मोक्षाचे साधन मानले असून, त्याला पहिले व गृहस्थाश्रमाला दुसरे स्थान दिलेले आहे या ग्रंथाचे सव्वीस अधिकार असून, पहिल्या सातात सन्यास, पुढच्या सहात कौटुंबिक गोष्टी आणि त्या पुढच्या तेरात आर्थिक विषय याच्याबद्दल निरूपण आहे त्यातली काही पद्ये नमुन्यादाखल पुढे दिली आहेत

> **तुकळतीर पेरुञ्चेल्वम तोन्रियक्काल तोट्टुप ।**
> **पकडु नडन्द कूष पल्लारोडुणक ।**
> **अकडुर यार माट्टुम निल्लाबु शल्वम ।**
> **शकटक्काल पोलवरुम् ।।**

अर्थ– पवित्र कृषिकर्मांनिकांच्या द्वारे मिळवलेली संपत्ती हीच श्रेष्ठ संपत्ती होय या संपत्तीतून प्राप्त झालेले अन्न आपल्या मित्रबांधवाना वाटून मगच त्याचा स्वत उपभोग घ्यावा संपत्ती ही कोणाजवळही कायमची राहत नाही रथ-चक्राप्रमाणे संपत्ती आणि विपत्ती याचा क्रम चालू असतो

> **तोररम् शाल आयिय नाषिया वट्टुलुम ।**
> **कूररम अळक्कुनुम नाळुण्णु, आरर**
> **अरम शेरवकळुदरि आगुमिन, यारम**
> **पिरन्दुम् पिरवादारिल ।।**

अर्थ– तारुण्यात केवळ विषयभोगातच बुडून राहाल तर त्याचे परिणाम वाईट होतील बाधवाचे स्नेहपाश तुटतील सतसज्जन दूर जातील अशा जीवनाचा मग काय उपयोग ? या गोष्टीचा मनाशी विचार करा पाहता पाहता तुमचे शरीर फुटक्या होडीप्रमाणे कालसागरात बुडून जाईल

> **आटपारत्तुवलुम अरुळिल कूररुणमयाल**
> **तोट कोप्पककालत्ताल कोण्डुयुमिन–**
> **पीटपिडुक्किलताय् अलरककोडलान मररवन**
> **कळळम कडप्पिढिल्लल नमन ।।**

अर्थ– काल हा प्रबल आहे तो रोज कोणाचे ना कोणाचे तरी जीवित हरण करतो माता आक्रोश करीत असतानाही तिच्या प्रिय अपत्याला ओढून नेण्याइतका तो निर्दय आहे कधी कधी तर तो गर्भगत जीवालाही खाऊन टाकतो मृत्यूची ही अपरिहार्यता जाणून योग्य समयी पुण्यकर्म आचरावे पुण्य हीच परलोकमार्गातली शिदोरी असून यौवन हाच ती शिदोरी बनवण्याला उपयुक्त असा काल आहे

> **तान कॅडिनुम तक्कार केडणूणरक, तन उडमबिन ।**
> **ऊन कॅडिनुम् उणणार कततुणरक, वान्कविनद ।**
> **वयहमॅल्लाम परिनुम् उरयरक,**
> **पाय्योडिड मिडेनद् शोल ।।**

अर्थ– जो सज्जन असेल, तो स्वत वर आपत्ती कोसळल्या, तरी दुसऱ्याचे वाइट चिंतीत नाही भुकने व्याकूळ झाला, तरी अभोज्य पदार्थांनी सेवा करत नाही आणि ब्रह्मांडाएवढे ऐश्वर्य मिळत असल, तरी असत्यमिश्रित वचन बोलत नाही

**नालंदा** एक प्राचीन नगर आणि विद्यापीठ बिहारमध्ये पाटण्यापासून चाळीस मैल अंतरावर आग्नेय दिशेला गंगेच्या काठी असलेल्या बडगाव नामक खेड्याच्या परिसरात हे नगर होत तिथे या नगराचे अनेक अवशेष मिळाले आहेत फा हियान या चिनी प्रवाशाने (इ स चे पाचवे शतक) या स्थानाचे नाव नाल असे दिले आहे असे म्हणतात, की या ठिकाणी पूर्वी एक आम्रवन होत, त्यात एक विशाल सरोवर होते आणि त्या सरोवरात नालंद नावाचा एक नाग राहत असे या नालंद नावावरूनच या स्थानाला नालंदा म्हणू लागले नालंदा नावाविषयी आणखीही एक आख्यायिका रूढ आहे, ती अशी – बुद्धाने एका पूर्वजन्मात इथे दीर्घ काल तपाचरण केले त्या काळात त्याच्याकडे जे जे दुःखीकष्टी लोक येत, त्यांना तो शक्य ते सर्व साहाय्य करी परंतु तेवढ्याने त्याचे समाधान होईना बुद्धाच्या या असमाधानावरूनच या जागेला नालंदा (न + अलम् + दा = पुरेसे देऊ न शकणारी) असे नाव प्राप्त झाले बुद्धशिष्य सारिपुत्र हा आपल्या ऐंशी हजार शिष्यांसह इथे राहत असे, असे म्हणतात महावीर वर्धमानानेही इथे चौदा चातुर्मास वास्तव्य केले होते, असे जैन परंपरा सांगते

अशा प्रकारची पुरातन परंपरा लाभलेली असल्यामुळे आणि गंगेच्या सान्निध्यात तिथे नगरविकासाला वाव असल्यामुळे बौद्ध आचार्य नागार्जुन याने आपला शिष्य आर्यदेव याला इथे विहार स्थापण्याची आज्ञा केली आर्यदेवाने इ स च्या चौथ्या शतकाच्या अखेरीस इथे विहाराची उभारणी करून काही मोजक्या शिष्यांसह बौद्ध दर्शन आणि साधनापद्धती यांच्या अध्ययन अध्यापनास प्रारंभ केला

आर्यदेवाने लावलेले रोपटे पुढील दोन–तीन शतकात फुली–फळी बहरले आणि सातव्या शतकात युआन च्वांग जेव्हा इथे आला, तेव्हा नालंदा विहाराच्या ज्ञानवैभवाने त्याचे डोळे दिपले या विहाराची जागा प्रशस्त होती विद्यापीठ विहाराच्याच जागेत होते इथे एक विशाल उद्यान होते त्यामध्ये सदैव फुलाफळांनी बहरलेल्या वृक्षवेली होत्या उद्यानात अनेक जलाशय आणि जलप्रवाह होते त्या जलाशयात विविध रंगांची कमळे फुललेली असत अशा रमणीय वातावरणात इथे अध्ययन अध्यापनाचे कार्य चालत असे

गुप्तकुलातील राजपुरुषांनी इथे आचार्य आणि विद्यार्थी यांच्यासाठी विशाल व उत्तुंग अशा अनेक इमारती बांधून



विहाराचे अवशेष – नालंदा

दिल्या होत्या त्या इमारतींच्या गगनचुंबी मनोऱ्यावरून सूर्यास्ताची रमणीय शोभा पाहाता येत असे इमारतींचे स्तंभ आणि भिंती कलात्मक चित्रांनी व कोरीव कामांनी सजविलेल्या होत्या प्रारंभी गुप्त राजांचा आणि नंतर कनोजच्या हर्षवर्धन, जावा–सुमात्रातील बालपुत्रदेव, मौखरी कुलातील पूर्णवर्मा व पूर्व भारतातील पाल राजे यांचा उदार आश्रय लाभल्यामुळे नालंदा विद्यापीठाचे सर्वांगीण वैभव सतत आठ शतके टिकून राहिले आणि त्याने भारतीय संस्कृतीच्या इतिहासात महनीय स्थान प्राप्त केले

युआन च्वांग आणि इत्सिंग यांनी केलेल्या वर्णनानुसार नालंदा विद्यापीठात १० ००० भिक्षू राहत होते या सर्वांना निवास, जेवणखाण, कपडालत्ता, औषधोपचार व शिक्षण विनाशुल्क देण्याची सोय होती भिक्षूंच्या निवासासाठी इथे ४००० खोल्या होत्या आणि अभ्यासासाठी १००० मोठाल्या खोल्या होत्या निवासाच्या खोल्यात झोपण्यासाठी एक-दोन ओटे असत आणि दिवा ठेवण्यासाठी कोनाडा असे या खोल्यांचे वितरण दरवर्षी नव्याने होत असे

या ठिकाणी १५०० च्या वर अध्यापक अध्यापनाचे कार्य करीत या अध्यापकांची कीर्ती केवळ भारतातच नव्हे, तर भारताबाहेरही गाजत होती या अध्यापकांपैकी १००० आचार्य दहा निरनिराळ्या विषयात पारंगत होते ५०० आचार्य तीस विषयांचे अधिकारी होते दहा जण ५० विषयांवर प्रभुत्व असणारे होते, तर कुलपती शीलभद्र हा सर्वज्ञ होता धर्मपाल, चंद्र

पाल, गुणमती, स्थिरमती, प्रभामित्र, ज्ञानचद्र, शीलभद्र इ महान आचार्यांची नामावली यआन च्वागने दिली आहे याशिवाय नागार्जुन, आर्यदेव वसुबधू, दिङ्नाग या महापडिताचा नालदा विद्यापीठाशी अत्यत सबध होता चारित्र्य आणि विद्वत्ता या बाबतीत इथल्या आचार्याची परपरा शतकानुशतके टिकल्यामुळे जगाच्या कानाकोपऱ्यातील ज्ञानपिपासू या विद्याकेद्राकडे सतत आकर्षले जात इथल्या आचार्यांशी धर्मचर्चा करण्यासाठी परदेशातूनही अनेक आचार्य इथे येत इथल्या आचार्यांनाही वारवार परदेशाची निमत्रणे येत शातरक्षित व कमलशील हे तिबेटी बौद्धांच्या खास निमत्रणावरून तिबेटात गेले आणि त्यांनी तिथे विझून चाललेल्या बौद्ध धर्माला पुन्हा उजळा दिला

नालदा विद्यापीठात उच्च शिक्षणाचीच सोय होती या विद्यापीठात प्रवेश मिळण्यासाठी प्रथम प्रवेशपरीक्षा द्यावी लागे ही परीक्षा घेण्यासाठी विविध विषयावर अधिकार असलेले द्वार पडित नेमलेले असत ही प्रवेशपरीक्षा फार कठीण असे आणि द्वारपडित विद्यापीठाच्या प्रतिष्ठेला बाध येऊ नये यासाठी दक्ष असत त्यामुळे कुणाही अपात्र व्यक्तीला इथे प्रवेश मिळत नसे आशिया खडातील सर्व देशातून प्रवेशार्थी येत असत, परतु त्यापैकी अनेकाना निराश होऊन परत जावे लागे युआन च्वाग आणि इत्सिंग हे चिनी यात्रिक या विद्यापीठाचे विद्यार्थी म्हणून अनुक्रमे सात व दहा वर्षे राहिले होते इथले



विद्यापीठाचे द्वारस्तभ – नालदा

वातावरण सर्वच दृष्टींनी इतके प्रसन्न होते, की युआन च्वागला हे विद्यापीठ सोडून परत जाणे जिवावर आले

हे विद्यापीठ महायानपथी बौद्धांचे होते, तरीही इथे हीनयानपथी बौद्ध धर्म, जैन धर्म, इ धर्मांच्या वाङ्मयाचा अभ्यास होत असे व्याकरण, साहित्य, तर्कशास्त्र, ज्ञानकोश, ब्राह्मण



भग्नावशेषातील स्त्रीमूर्ती – नालदा

धर्म, योगविद्या, बौद्ध दर्शने, इ विषयाचा इथल्या अभ्यासक्रमात समावेश होता तसेच चित्रकला, शिल्पशास्त्र, मत्रविद्या, दडनीती, वेदविद्या, गणित, वैद्यक, ज्योतिष, इ विषयाच्या अध्यापनाचीही व्यवस्था होती इथले विद्यार्थी भिन्नभाषिक देशातून येत असल्यामुळे त्याना शिकविण्यासाठी बहुभाषाकोविद अध्यापकाची योजना केलेली असे

नालदा हे विद्यापीठ वसतिगृहयुक्त असल्यामुळे त्यातील गुरु-शिष्याचे सबध घनिष्ठ असत इथले गुरू शिष्याची काळजी स्वतःच्या मुलाप्रमाणे घेत आणि विद्यार्थी गुरूचा मान प्राणपणाने राखीत गुरु शिष्याचे आचरण आणि त्याचे परस्पर सबध याचे नियम ठरलेले असत आणि त्याचा कोणी भग केल्यास त्याला विद्यापीठातून बहिष्कृत केले जाई अध्ययनाच्या विषयाची विविधता असे आणि विषय निवडण्याचे स्वातत्र्य विद्यार्थ्याला असे विद्यार्थ्याने निवडलेला विषय अध्यापक वैयक्तिक पद्धतीने शिकवीत असे सर्वसामान्य ज्ञानाच्या वृद्धीसाठी इथे रोज शभर व्याख्याने होत असत आणि विद्यार्थी आपापल्या आवडीप्रमाणे त्या व्याख्यानाचा लाभ घेत

समृद्ध ग्रंथभांडार हा विद्यापीठाचा प्राण होय, ह्यत्यांही काळी मान्य आहे नालंदा विद्यापीठातील ग्रंथभांडार धर्मगंज या नावाने प्रख्यात होते धर्मगंजाच्या तीन प्रशस्त व उत्तुंग इमारती होत्या त्यापैकी एक इमारत नऊ मजली होती आणि बाकीच्या दोन सहा सहा मजली होत्या या तीन इमारतींतील ग्रंथसंग्रहांना रत्नसागर, रत्नोदधी, आणि रत्नरंजक अशी नावे होती या संग्रहात नाना विषयांचे शेकडो हस्तलिखित ग्रंथ संग्रहित करून होते नवनव्या ग्रंथांच्या लेखनाचे काम अध्यापक व विद्यार्थी सतत करीत असत एकट्या इत्सिंगने आपल्या देशातील लोकांसाठी इथल्या चारशे संस्कृत ग्रंथांचा चिनी अनुवाद करून नेला यावरून या संग्रहाची समृद्धी व विद्यार्थ्यांची चिकाटी ध्यानी येते

नालंदा विद्यापीठाने ज्ञानाच्या विकासात महनीय वाटा उचलला आहे इथल्या आचार्यांनी अनेक ग्रंथ लिहिले, हजारो बुद्धिमान विद्यार्थ्यांना ज्ञानाच्या विविध शाखांत पारंगत बनविले आणि ज्ञान व चारित्र्य यांचा आदर्श निर्माण करून आशियातील विविध देशांतील प्रज्ञावंतांना नवनव्या प्रेरणा दिल्या ज्ञानाच्या व धर्माच्या प्रसारासाठी इथल्या आचार्यांनी भारताच्या बाहेर जाऊनही प्रयत्न केले एकट्या न्यायशास्त्राचा इतिहास पाहिला, तरी नालंदा विद्यापीठाचे कार्य आपल्याला समजून येईल

न्यायशास्त्राच्या क्षेत्रात नालंदा व मिथिला या दोन विद्याकेंद्रांत सतत सातशे वर्षे स्पर्धा चालू होती मिथिलेचा न्याय सूत्रकार गौतम याने बौद्ध अनित्यवादाचे खंडन केले, तर नालंदेच्या आचार्य नागार्जुनाने आपल्या ग्रंथांतून त्या खंडनाचे खंडन करून मिथिलेचा न्यायभाष्यकार वात्स्यायन याने नागार्जुनाच्या विवेचनातील त्रुटी दाखविल्या, तर दिङ्नागाने आपल्या प्रमाण समुच्चयात वात्स्यायनाचे खंडन केले मिथिलेचा प्रख्यात दार्शनिक उद्योतकर याने न्यायवार्तिक नामक ग्रंथ लिहून दिङ्नागाचा धुव्वा उडविला तर नालंदेच्या धर्मकीर्तीने प्रमाण वार्तिकात उद्योतकरावर टीका केली मिथिलेच्या वाचस्पति मिश्राने आपल्या तात्पर्यटीका नामक ग्रंथात धर्मकीर्तीचे खंडन केले, तर नालंदेच्या ज्ञानश्रीने वाचस्पतिमिश्राला निरुत्तर केले या शतकानुशतकांच्या विवादांतून भारतीय न्यायशास्त्राने विकासाची चरमसीमा गाठली

श्रेष्ठ राज्यकर्त्यांचा भक्कम आश्रय, चारित्र्यसंपन्न व बुद्धिमान अध्यापक कुशल व्यवस्थापन, व्यापक अध्ययनाची सोय, निसर्गरम्य वातावरण आणि उदार दृष्टिकोन या वैशिष्ट्यांमुळे नालंदा विद्यापीठ सतत आठ शतके वैभवाच्या शिखरावर नांदत राहिले आणि त्याने ज्ञानजगतात अपार कीर्ती मिळविली

मध्यंतरी हूण राजा मिहिरकुल आणि वंगदेशाचा बौद्धविरोधी राजा शशांक यांनी नालंदेला उपद्रव देण्याचा प्रयत्न केला, परंतु त्या आघातांतूनही हर्षवर्धन व बालादित्य यांच्या आश्रयाने नालंदा निभावून गेली इ स ८०० च्या सुमारास नालंदा महाविहारातल्याच काही आचार्यांच्या पुढाकाराने नालंदेच्या निकट विक्रमशिला विद्यापीठाची स्थापना झाली त्यामुळे मात्र नालंदेच्या एकाधिकाराला काहीसा धक्का बसला विक्रमशिलेचा जसजसा विकास होऊ लागला, तसतशी नालंदेला उतरती कळा लागली अखेरीस इ स च्या तेराव्या शतकाच्या प्रारंभी बख्त्यार खिलजीने माजविलेल्या भयंकर उत्पातात नालंदेसह अनेक ज्ञानपीठे नष्टभ्रष्ट होऊन कायमची अस्ताला गेली सतत आठ शतके जगाला ज्ञानाचा प्रकाश देणारे हे महान विद्यापीठ आसुरी वृत्तीच्या एका आघातात नाहीसे व्हावे, ही गोष्ट सहृदय मनाला कायमची जखम करून गेली बख्त्यार खिलजीने इथले विहार जाळले, धर्मगंजातील संचित ज्ञानराशीच भस्म केले मूर्ती फोडल्या व स्तूप छिन्नभिन्न केले आणि हाती सापडलेल्या असंख्य



बुद्धमूर्ती – नालंदा

विद्वान भिक्षूंना ठार मारले

नालंदेच्या सर्वनाशानंतर भारतात सर्वत्र इस्लामी सत्ता दृढमूल झाली आणि भारतीय परंपरेचे वैभव विस्मृत होऊन गेले नालंदा विद्यापीठाचे भग्नावशेषही कालक्रमाने मातीच्या थराखाली गाडले गेले ही स्थिती इंग्रजांच्या उदयापर्यंत टिकली पाश्चिमात्य पंडित भारतीय विद्यांकडे आकर्षित झाल्यानंतर या विद्यांचा विकास साधणाऱ्या नालंदा विद्यापीठाच्या संशोधनाकडे त्यांचे लक्ष वेधले युआन च्वांग, इत्सिंग, लामा तारानाथ, इ विदेशी व्यक्तींनी लिहून ठेवलेली नालंदेची वर्णने प्रथम पाश्चिमात्य पंडितांना अतिशयोक्त वाटली, परंतु कनिंगहॅमच्या नेतृत्वाखाली पाटणा जिल्ह्यातील बडगावनजीक केलेल्या उत्खननात जे अवशेष प्रचंड प्रमाणात उजेडात आले,

त्यांच्या दर्शनाने पाश्चिमात्य पंडितांना नालंदेच्या वैभवाविषयी खात्री पटली.

इथल्या उत्खननात अनेक प्रचंड विहार, स्तूप, शिलामूर्ती, धातुमूर्ती, नाणी, ताम्रपट, शिलालेख, खापराच्या वस्तू आणि अन्य अनेक प्रकारच्या मूल्यवान वस्तू उपलब्ध झाल्या आहेत. तिथे विहार व स्तूप यांच्या समांतर रांगाच आहेत. विहार



मुख्य स्तूपाचे अवशेष – नालंदा

प्रशस्त आहेत. मुख्य स्तूप आहे, तो विशाल व उत्तुंग आहे. त्याची बांधणी एखाद्या किल्ल्यासारखी आहे. त्याच्या माथ्यावरून कित्येक मैलांचा परिसर दृष्टिपथात येतो. विटा आणि चुना यांच्या उपयोगाने निर्माण केलेले सुंदर शिल्प या स्तूपात पाहायला मिळते. चुन्याची झिलई आजही ताजी वाटते. विहाराच्या भग्नावस्थेत 'पत्थर घट्टी मंदिर' या नावाने ओळखली जाणारी एक वास्तू असून, तिच्यामध्ये २११ लहानमोठे कलासुंदर शिलापट्ट आहेत. ही वास्तू म्हणजे मगधराज बालादित्याने उभारलेला भव्य प्रासाद होय.

या अवशेषांपैकी जे हालवता येण्यासारखे होते, त्यांचे एक संग्रहालय उभारण्यात आले आहे. भग्नावशेषांच्या प्रचंड पसाऱ्यात पटलेल्या अनेक मूर्ती छिन्नभिन्न स्थितीतही आपल्या मूळच्या असाधारण सौंदर्याची कल्पना देतात. नालंदेच्या परिसरातील अज्ञ लोक मात्र या मूर्तींना लोकदेव समजून त्यांची पूजा करतात.

पावसाळ्यानंतर माती वाहून जाऊन उघड्या पडणाऱ्या कित्येक ऐतिहासिक महत्त्वाच्या वस्तू अनधिकृतपणे नाहीशा झाल्या आहेत. तसेच भोवतालच्या मालकीच्या शेतातून अनधिकृत उत्खनने होऊन त्यात उपलब्ध झालेली ऐतिहासिक सामग्रीही विदेशी गेलेली आहे.

इथल्या अवशेषांचे हे एक वैशिष्ट्य आहे, की त्यात केवळ बौद्ध धर्मीचेच नव्हे, तर जैन आणि वैदिक परंपरांचेही प्रभुत्व जाणवते. उपलब्ध अवशेषांच्या पाहणीतून एक गोष्ट स्पष्टपणे दिसते, की नालंदेच्या विकासाच्या निमित्ताने गुप्त आणि पाल युगांतील कलापरंपरा इथे विकसित झाल्या आणि त्यांनी भारतातच नव्हे, तर आशियातील अनेक देशांत आपला प्रभाव गाजवला.

भारत स्वतंत्र झाल्यानंतर नालंदेच्या परंपरेचे पुनरुज्जीवन करण्याचे ठरले. त्यासाठी बिहार सरकारच्या सहयोगाने इथे 'नवनालंदा महाविहार' (नालंदा पाली प्रतिष्ठान) या नावाची संस्था १९५१ मध्ये स्थापन झाली आहे. या संस्थेत पाली भाषा व साहित्य, बौद्ध धर्म, संस्कृत व इतिहास या विषयांचे उच्चतम अध्ययन व संशोधन चालते. या संस्थेची कीर्ती नजिकच्या सर्व बौद्धधर्मीय देशांत पोचली असून आशियातील सिलोन, सयाम, जपान, व्हिएटनाम, तिबेट, लाओस, कंबोडिया आणि युरोपातील फ्रान्स, जर्मनी, ऑस्ट्रिया, इ. देशांतील अनेक विद्यार्थी इथे अध्ययनार्थ येत आहेत. [ प्रा. भा. वि., ए. सि. ए. हि., बि. डि. ग्या., हि. त्रि., खो. प., हिं. वि. को. ]

## नावडा

एक जात. या लोकांची वस्ती मुख्यत्वे मध्य प्रदेशातील निमाड जिल्ह्यात आढळते. नाव (होडी) या शब्दावरून या जातीला हे नाव मिळाल्याचे सांगतात. ओंकारेश्वर येथे हे यात्रेकरूंना नर्मदेच्या पार नेतात. यांच्याविषयी एक दंतकथा आहे ती अशी– पूर्वी एकदा या जातीच्या पुरुषाने राजाच्या मुलीचे नर्मदेत बुडालेले प्रेत वर काढून दिले आणि तेव्हापासून त्यांना नर्मदेत नावा चालवण्याचा हक्क मिळाला.

यांच्यात गाटे नावाचा एक पोटजात आढळते. हे स्वतःला राजपुतांचे वंशज समजतात. यांच्यात सोळंकी, रावत व मोरी अशी आडनावे आहेत.

नवरा मुलगा विवाहाला निघण्यापूर्वी त्याची आई मुसळ, गवत, रवी व सूप या वस्तू त्याच्यावरून ओवाळून टाकते. विधवाविवाह रविवारी किंवा मंगळवारी करतात. मुलीचे लग्न योग्य वेळी न जमल्यास कित्येकदा तिचे पिंपळाशी लग्न लावतात. चार माणसांसमोर बायकोला घरातून बाहेर काढून लावले, की यांचा घटस्फोट होतो.

भैरव हा यांचा कुलदेव होय. त्याची ते पूजा करतात. तसेच त्याच्या नावाने हे लोक आपल्या होडीला एक खिळा मारतात आणि दसऱ्याच्या दिवशी त्याची पूजा करतात. त्याला मद्यही देतात. हे गाय, कुश व चिंचेचा वृक्ष यांना पवित्र मानतात. [ म. ज्ञा. को., ट्रा. का. से. प्रा. इं. ]

**नावरस** (सं नामराशी) जन्मकाली जे नक्षत्र व त्याचा जो चरण चालू असेल त्याच्या दर्शक अशा अक्षरा वरून मुला-मुलीचे जे नाव ठेवले जाते त्याला नावरशीचे नाव असे म्हणतात उदा० 'चू चे चो ला' ही अश्विनी नक्षत्राच्या चार चरणांची दर्शक अक्षरे आहेत त्या अक्षरापुढे देव किंवा ईश्वर असे शब्द जोडून हे नाव तयार करतात मुलींच्या बाबतीत देवी किंवा ईश्वरी असे नच शब्द स्त्रीलिंगवाचक जोडतात उदा० चन्द्रेश्वर–चूलेश्वरी लोमेश्वर–लोमदेवी इत्यादी नक्षत्राच्या प्रत्येक चरणाची ही अक्षरे पंचांगातील अवकहडाचक्रात दिलेली असतात या नावरशीच्या नावावरून त्या व्यक्तीचे जन्मनक्षत्र, त्याचा चरण आणि त्यावरून रास एवढ्या गोष्टी कळतात ज्यांची जन्मपत्रिका केलेली नसल, अशा मुलामुलींची लग्ने जमविण्यासाठी या नावाचा उपयोग होतो

**नासत्य** सूर्याला संज्ञा या स्त्रीपासून झालेले दोन पुत्र अश्विनीकुमार त हेच होत 'सत्यौ एव नासत्या वित्यौर्णवाभ ' = सत्य म्हणजेच नासत्य अशी याची व्युत्पत्ती और्णवाभाने सांगितली आहे 'न असत्यौ '= जे असत्य नव्हेत ते नासत्य होत, अशी त्याची व्युत्पत्ती पाणिनीने दिली आहे 'नासत्यौ सत्यस्य प्रणेतारौ '= सत्याचे उत्पादक किंवा सत्याप्रत नेणारे ते नासत्य, अशी व्युत्पत्ती आग्रायणाने दिली आहे सूर्य पत्नी संज्ञा हिने घोडीचे रूप धारण केले असता तिच्या नाक पुडयातून हे दोघे जन्माला आले म्हणून त्यांना नासत्य हे नाव मिळाले अशी आणखी एक व्युत्पत्ती असून, महाभारतात तीच मानली आहे (अनु १५० १७) नासत्य हे दोन तारे असावे आणि ते एकाच वेळी उगवत असल्यामुळे त्यांचा उल्लेख नासत्यौ असा द्विवचनी केला असावा, असे श्री ना गो चापेकर यांचे मत आहे

नासत्य सूर्याच्या आणि उषेच्याही आधी उगवतात, कारण त्यांना सूर्यकिरण आणण्याविषयी प्रार्थना केली आहे (ऋ १ ८७ ७९) सूर्याची कन्या त्यांचा रथ ओढते ऋभूंनी नासत्या साठी रथ तयार केला होता, असे ऋग्वेदात सांगितले आहे (ऋ १ २० ३) पाहा–अश्विनौ [ पा का मा ]

**नासत्यपूजाचक्षुर्व्रत** नेत्रव्रत पाहा

**नासदीय सूक्त** ऋग्वेदाच्या १० व्या मंडलातील १२९ वे सूक्त 'नासदासीत' या शब्दाने याचा प्रारंभ होत असल्यामुळे याला हे नाव मिळाले आहे याच्या ७ ऋचा आहेत याचा ऋषी परमेष्ठी प्रजापती, देवता परमात्मा व छंद त्रिष्टुप आहे हे सूक्त उपनिषदांतील ब्रह्मविद्येला आधारभूत ठरले आहे सृष्टीचे मूळ तत्त्व काय आणि त्यापासून ही विविध दृश्य सृष्टी कशी निर्माण झाली असावी, याविषयी या सूक्तात जे विचार मांडले आहेत ते प्रगल्भ, स्वतंत्र व मूलगामी आहेत अशा प्रकारचे 'तत्त्वज्ञानाचे मार्मिक विचार दुसऱ्या कोणत्याही धर्मांच्या मूलग्रंथात आढळून येत नाहीत, इतकेच नव्हे, तर 'अशा प्रकारच्या' अध्यात्मविचाराने भरलेला याच्या इतका प्राचीन लेखही अद्याप कोठेच उपलब्ध झालेला नाही,' असे लो टिळक म्हणतात हे समग्र सूक्त पुढीलप्रमाणे–

**नासदासीन्नो सदासीत्तदानीं नासीद्रजो नो व्योमा परो यत ।**
**किमावरीव कुह कस्य शर्मन्नम्भ किमासीद् गहन गभीरम ॥**
**न मृत्युरासीदमृत न तर्हि न रात्र्या अह्न आसीत प्रकेत ।**
**आनीदवात स्वधया तदेक तस्माद्धान्यन्न पर किं चनास ॥**
**तम आसीत्तमसा गूळहमग्रेऽप्रकेत सलिल सर्वमा इदम ।**
**तुच्छ्येनाभ्वपिहित यदासीत तपसस्तन्महिनाजायतैकम ॥**
**कामस्तदग्रे समवर्तताधि मनसो रेत प्रथम यदासीत ।**
**सतो बन्धुमसति निरविन्दन हृदि प्रतीष्या कवयो मनीषा ॥**
**तिरश्चीनो विततो रश्मिरेषामध स्विदासीदुपरि स्विदासीत ।**
**रेतोधा आसन्महिमान आसन स्वधा अवस्तात प्रयति परस्तात ॥**
**को अद्धा वेद क इह प्र वोचत् कुत आजाता कुत इय विसृष्टि ।**
**अर्वाग्देवा अस्य विसर्जनेनाथा को वेद यत आबभूव ॥**
**इय विसृष्टिर्यत आबभूव यदि वा दधे यदि वा न ।**
**यो अस्याध्यक्ष परमे व्योमन्त्सो अङ्ग वेद यदि वा न वेद ॥**

अर्थ–तेव्हा (म्हणजे मुळारंभी) असत नव्हते आणि सत्‌ही नव्हते अंतरिक्ष नव्हते आणि त्यापलिकडचे जे आकाश तेही नव्हते (अशा स्थितीत) कोणी (कोणाला) आवरण घातले (म्हणावे)? कुठे? कोणाच्या सुखासाठी? अगाध व गहन पाणी (तरी) होते काय? (१) तेव्हा मृत्यू म्हणजे मृत्युग्रस्त नाशवंत दृश्य सृष्टी नव्हती व म्हणून (दुसरा) अमृत म्हणजे अविनाशी नित्य पदार्थ (हा भेद)ही न हता (तसेच) रात्र आणि दिवस यांचा भेद कळण्यास काही साधन नव्हते (जे काय होते) ते एकले एकच स्वधेने म्हणजे आपल्या शक्तीने वायूशिवाय श्वासोच्छ्वास करीत म्हणजे स्फुरत होते त्याखेरीज किंवा त्यापलिकडे दुसरे असे काहीच नव्हते (२) अंधकार होता, आरंभी हे सर्व अंधकाराने व्याप्त (आणि) भेदाभेद विरहित पाणी होते, (किंवा) आभू म्हणजे सर्वव्यापी ब्रह्म (आरंभीच) तुच्छाने म्हणजे फोल मायेने आच्छादिलेले होते असे जे, ते मूळ एक (ब्रह्म)च तपाच्या महिम्याने (रूपांतराने पुढे) प्रकट झालेले होते (३) (याच्या) मनाचे जे रेत म्हणजे बीज प्रथमत निघाले तेच आरंभी काम (म्हणजे

सष्टी निर्माण करण्याची प्रवत्ती किंवा शक्ती) झाला (हाच) असतामध्ये म्हणजे मूळ परब्रह्मात सताचा म्हणजे विनाशी दृश्य सृष्टीचा ( पहिला ) सबध होय, असे ज्ञात्यानी अत करणान विचार करून बुद्धीने निश्चित केले आहे (४) ( हा ) रश्मी म्हणजे धागा किंवा किरण यांच्या (मध्ये) आडवा पसरला, आणि खाली होता म्हटले तर वरही होता (याच्यातल काही) रेतोधा म्हणजे बीजप्रद झाले व (वाढून) मोठेही झाले त्या पीच स्वशक्ती अलिकडे व प्रयती म्हणजे प्रभाव पलिकडे (व्यापून) राहिला (५) (सताचा) विसग म्हणजे पसारा कशापासून किंवा कोठून आला, हे (यापेक्षा) विस्ताराने इथे कोण साग णार ? कोण निश्चयात्मक जाणता ? देवही या (सतसृष्टीच्या) विसर्गानंतरचे मग ती जिथून निघाली ते कोण जाणणार ? (६) (सताचा) हा विसग म्हणजे पसारा जिथून झाला किंवा तो निर्मिला गेला अगर न गेला, ते परम आकाशात असणारा या जगाचा जो अ यक्ष ( हिरण्यगभ ) तो जाणीत असेल किंवा नसेलही ! (कोणी सांगावे ?) (७)

या सूक्ताचे आध्यात्मिक रहस्य लो टिळकानी उलगडून दाखवले आहे, त्याचा साराश असा – इंद्रियगोचर विकारी व विनाशी अशा नामरूपात्मक देखाव्याच्या जाळ्यातच गुतून न राहता, त्यापलिकडे नाहीतरी एक व अमृत असे तत्त्व आहे, हे ज्ञानदृष्टया ओळखणे, हेच वेदान्तशास्त्राचे रहस्य असून, वरील सूक्ताच्या ऋषीने याच रहस्याचा उलगडा करण्याचा प्रयत्न केला आहे त्यावरून त्याचे अतर्ज्ञान किती तीव्र होते ते स्पष्ट होते सृष्टीतले नाना पदाथ अस्तित्वात येण्यापूर्वी जे काही होते, ते सत का असत, मत्यू का अमृतत्व, आकाश का पाणी, प्रकाश का अधार, इ नानाविध प्रश्न करणाऱ्या लोकाशी वाद करीत न बसता त्या सर्वांच्या पुढे धाव घेऊन हा ऋषी विचारतो, की सष्टीतील ही द्वद्वे उत्पन्न होण्यापूर्वी म्हणजे एक व दुसरा हा भेदच जेव्हा नव्हता त्या वेळी कोण कोणाला आच्छादित करणार ! त्या वेळी जे काय होते ते या सर्व पदार्थांहून विलक्षण होते व ते एकटे एकच आपल्या अपरपार शक्तीने स्फुरत होते 'स्वे महिम्नि प्रतिष्ठित '= आपल्याच महिम्याने म्हणजे दुसऱ्या कोणाची अपेक्षा न ठेवता एकलाच राहणारा (छादो ७ २४ १) इ परब्रह्माची जी वणने उपनिषदात आढळतात, ती याच अर्थाची अनुवादात्मक होत सव सृष्टीच्या प्रारभी जे हे अनि वाच्य तत्त्व सवत्र स्फुरत होते, तेच सव दश्य सष्टीचा प्रलय झाल्यावरही शिल्लक राहणार, हे उघड आहे म्हणूनच गीतेत 'सर्व पदार्थांचा नाश झाला तरी ज्याचा नाश होत नाही ' (८ २०) असे या परब्रह्माचे थोडक्या पर्यायाने वणन केले आहे व 'ते सत् नाही आणि असत्‌ही नाही ' असे या सूक्ताला धरू नच पुढे स्पष्ट म्हटले आहे (१३ १२) पण निर्गुण ब्रह्मावेरीज मुळारभी जर दुसरे काहीच नव्हते, तर मुळारभी 'पाणी, अध कार किंवा आभू व तुच्छ याची जोडी होती ' इ जी वणने वेदात आहेत, त्याची व्यवस्था कशी लावायची अशी शका येते म्हणून तिसऱ्या ऋचेत हा ऋषी सागतो, की 'जगाच्या आरभी अधकार होता किंवा अधकाराने झाकलेले पाणी होते किंवा आभू (ब्रह्म) व त्याला आच्छादणारी माया ( तुच्छ ) ही दोन्ही पहिल्यापासूनच आहेत, इ जी वणने आहेत ती सव एकल्या एक मूळ परब्रह्माची, त्याच्या तपोमाहात्म्याने पुढे विविध पसारा निर्माण झाला त्यानतरची वणने होत, मुळारभीची नव्हेत या ऋचेत तप या शब्दाने मूळ ब्रह्माची ज्ञानमय विलक्षण शक्ती विवक्षित असून तिचेच वणन चौथ्या ऋचेत केलेले आहे या चौथ्या ऋचेत मूळ ब्रह्माला असत असे म्हटले आहे पण त्याचा अथ 'काही नाही' असा घेता येत नाही कारण दुसऱ्याच ऋचेत 'ते आहे ' असे स्पष्ट विधान आहे

या सूक्तातच नव्हे, तर इतरत्रही दृश्य सृष्टीला यज्ञाची उपमा देऊन यज्ञासाठी लागणारी तूप, समिधा वगरे सामग्री प्रथम कुठून आणली किंवा घराचा दृष्टा त घेऊन मूळच्या एका निर्गुणापासून डोळ्याना प्रत्यक्ष दिसणारी आकाश पथ्वीची ही भव्य इमारत उभी करण्यास लाकूड (मूल प्रकृती) कुठून आणले, असे गूढ प्रश्न व्यावहारिक भाषा स्वीकारून ऋग्वेद (१० ३१ ७) व वाजसनेयी सहिता (१७ २०) यामध्ये केले आहेत त्या अनिर्वाच्य, एकटे एक असलेल्या ब्रह्माच्या मनानच सष्टी निर्माण करण्याचे कामरूपी तत्त्व कसे तरी उदभवले आणि वस्त्रातल्या धाग्याप्रमाणे किंवा सूयकिरणाप्रमाणे त्याच्याच शाखा चटकन सवत्र पसरून आकाश–पथ्वीची भव्य इमारत निर्माण झाली, असे जे या सूक्ताच्या ४ थ्या व ५ व्या ऋचेत म्हटले आहे, त्यापेक्षा या प्रश्नाला जास्त उत्तर देणे शक्य नाही म्हणून या सूक्तातल्या अर्थाचाच उपनिषदात 'सो ऽकामयत । बहु स्या प्रजायेयेति । ' = त्या परब्रह्मालाच बहुजिनसी होण्याची इच्छा झाली, असा अनुवाद केला आहे (त उ २ ६, छादो ६ २ ३) निर्गुणापासून सगुणाच्या, असतापासून सताच्या, निर्द्वंद्वापासून द्वद्वाच्या किंवा असगापासून सगाच्या उत्पत्तीचा हा प्रश्न मानवबुद्धीला अगम्य आहे म्हणून साख्याप्रमाणे निव्वळ तकवश होऊन मूलप्रकृतीसारखे दुसरे स्वयभू व स्वतत्र तत्त्व न मानता जे कळत नाही ते कळत नाही म्हणा, पण त्यासाठी आत्मप्रतीतीने निश्चित केलेल्या अनिर्वाच्य ब्रह्माची योग्यता दृश्य सष्टिरूप मायेला देऊन, परब्रह्माबद्दलची अद्वैतबुद्धी सोडून देणे याग्य नव्हे, असे हा ऋषी प्रतिपादन करीत आहे मानवबुद्धीलाच काय पण देव-

बुद्धीलादेखील मूळ सताची उत्पत्ती कशी झाली, ते कळणे शक्य नाही. कारण देवही दृश्य सृष्टीला प्रारंभ झाल्यावर पुढे उत्पन्न झालेले आहेत. त्यांना मागचे काही ठाऊक असणे शक्य नाही. पण देवांपैकीही हिरण्यगर्भ हा पुरातन आणि श्रेष्ठ असून, तो एकटाच आरंभी 'भूतस्य जातः पतिरेक आसीत' ( ऋ. १०.१२१.१) = सर्व सृष्टीचा पती म्हणजे राजा किंवा अध्यक्ष असा कोणी एकमेव होता, असे ऋग्वेदातच म्हटले आहे. मग त्याला मूळ सताच्या उत्पत्तीची ही गोष्ट माहीत नसेल कशी वरून ? आणि जर त्याला माहीत असेल तर ती दुर्बोध कशी म्हणता ? असे कोणी विचारील, म्हणून या प्रश्नाला या ऋषीने 'होय, तो ही गोष्ट जाणत असेल' असे प्रथम औपचारिक उत्तर देऊन लागलीच 'अथवा नसेलही, कोणी सांगावे ?' अशी आशंका व्यक्त केली आहे.

वरीलप्रमाणे या सूक्ताचे विवेचन करून लो. टिळक त्याचा पुढीलप्रमाणे उपसंहार करतात — अचिंत्य वस्तूच्या गहन रानात मनुष्याची बुद्धी सात्त्विक श्रद्धेच्या व निर्मल प्रतिभेच्या जोरावर सिंहाप्रमाणे निर्भयपणे संचार करून त्यातील अतर्क्य गोष्टी यथाशक्ति कशा निश्चित करीत असते, याचे हे उत्कृष्ट उदाहरण असून, ऋग्वेदात हे सूक्त आढळून येते, हे खरोखरीच आश्चर्यकारक होय ! या सूक्तातील विषयाचे पुढे ब्राह्मण, उपनिषदे व त्यानंतरचे वेदान्तशास्त्रावरील ग्रंथ यांत आमच्याकडे आणि अर्वाचीन काळी पाश्चिमात्य देशांत कांट वगैरे तत्त्वज्ञानी पुष्कळ सूक्ष्म परीक्षण केले आहे. परंतु ऋषीच्या शुद्ध बुद्धीस या सूक्तात ज्या परम सिद्धान्ताचे स्फुरण झालेले आहे तेच सिद्धान्त प्रतिपक्षास विवर्तवादासारखी योग्य उत्तरे देऊन अधिक दृढ, स्पष्ट किंवा तर्कदृष्ट्या निःसंदेह करण्यापलिकडे अद्याप कोणाचीच मजल गेलेली नाही व जाण्याची फारशी आशाही नको. [ गी. र. ; हिं. ध. ]

## नासिक

एक पुण्यक्षेत्र. हे महाराष्ट्रात गोदावरी नदीच्या तीरावर वसले आहे. भारतातल्या पाच प्रमुख महातीर्थांतच याची गणना होते. याला पश्चिम काशी असेही म्हणतात. या नावाची व्युत्पत्ती दोन प्रकारांनी सांगतात— (१) इथे लक्ष्मणाने शूर्पणखा या राक्षसीचे नाक-कान छेदून तिला विरूप केले म्हणून या क्षेत्राला नासिक्य असे नाव पडले व त्याचेच नासिक झाले. (२) हे क्षेत्र ज्या टेकडीवर वसले आहे, तिला नऊ शिखा म्हणजे नऊ शिखरे आहेत. त्यावरून त्याला नवशिख असे नाव पडले व त्याचेच अपभ्रंशाने नासिक झाले. या दुसऱ्या व्युत्पत्तीला धरून 'नासिक नवटेकावर (शिखर) वसवले,' असा तिथे वाक्प्रचार रूढ आहे. हे नऊ टेक असे— दुर्गा टेक, गणेश टेक, चित्रघंटा टेक, हिंगळाआळी टेक, म्हसरूळ टेक, जोगवाडा टेक, पठाणपुरा टेक इत्यादी.

नासिक क्षेत्राच्या चतुःसीमा अशा — दक्षिणेस त्रिरश्मी (पांडव लेण्यांचा डोंगर), उत्तरेस रामशेज डोंगर, पूर्वेस सप्तशृंगी व चांदवडचे डोंगर आणि पश्चिमेस गावर्धन (गंगापूर).

नासिक व पंचवटी मिळून नासिक क्षेत्र बनते. या दोन स्थळांच्या मधून गोदावरी नदी वाहते. तिच्या दक्षिण तीरावरच्या भागाला नासिक व उत्तर तीरावरील भागाला पंचवटी म्हणतात. इथे गोदावरीच्या दोन्ही तीरांवर देवालये आहेत. यात्रेकरू बहुधा पंचवटीत उतरतात व रामकुंडावर तीर्थविधी करतात.

**पूर्वेतिहास** — नासिक ही ऋषींची तपोभूमी, सिद्धांची योगभूमी व मानवांची मोक्षभूमी म्हणून युगानुयुगे प्रसिद्ध आहे. कृतयुगात ब्रह्मदेवाने इथे पद्मासन घालून तप केल्यामुळे याला पद्मनगर असे नाव मिळाले. खर, दूषण व त्रिशिर हे रामप्रभूच्या काळातले तीन कंटकासारखे राक्षस होते. हे राक्षस या प्रदेशात राहून ऋषिमुनींच्या तपात व यज्ञात विघ्न करीत. त्रेतायुगात रामाने या तीन कंटकांना मारले, या घटनेवरून याला त्रिकंटक असे नाव मिळाले. द्वापरयुगात याला जनस्थान अशी संज्ञा प्राप्त झाली (जनस्थान पाहा) आणि कलियुगात याला नासिक म्हणू लागले. पंचवटी येथे वास्तव्याला आल्यावर रामाने वटवृक्षरूपी पाच ऋषिकुमारांचा उद्धार केला, म्हणून त्या स्थळाला पंचवटी असे म्हणू लागले.

सनपूर्व दोनशे वर्षे या काळात जवळपासच्या भरतपूर गावी काही लेणी खोदली गेली. त्या लेण्यातल्या ब्रह्मस्तूपावर नासिकचा उल्लेख आहे. इ. स. १५० मध्ये भारतात आलेल्या टॉलेमी या इजिप्शियन प्रवाशाने नासिक हे त्या काळी एक धर्मपीठ असल्याबद्दल त्याचा गौरव केला आहे. इ. स.च्या पाचव्या शतकात खोदलेल्या पांडवलेण्यातील एका गुहेत नासिकजवळच्या गावर्धन गावाचा उल्लेख असून, ते गौळी राजाची राजधानी असल्याचे म्हटले आहे. जिनप्रभसूरी याच्या ग्रंथात नासिकबद्दल एक स्वतंत्र प्रकरण असून, जैनांचा आठवा तीर्थंकर चंद्रप्रभस्वामी हा नासिक येथे राहत असल्याचा उल्लेख आहे.

आंध्रभृत्यांच्या राजवटीपासून नासिकच्या राजकीय इतिहासाचा धागादोरा सापडू लागतो. त्यानंतर नासिक भागाची सत्ता आभीरांच्या हाती आली. सहाव्या शतकाच्या प्रारंभी हा प्रदेश चालुक्यांनी हस्तगत केला. त्यानंतर राठोडांची सत्ता सुरू झाली. त्यांनी आपली राजधानी नासिक जिल्ह्यातील मयूरखंडी येथे उभी केली. त्यानंतर हा प्रदेश १३ व्या

शतकाच्या अखेरीपयन देवगिरीच्या यादवाच्या सत्तेखाली होना

इ स च्या चौदाव्या शतकाच्या प्रारभी नासिक हे देव गिरीच्या सुलतानाच्या ताब्यात होते इ स १५३० मध्ये ते बहमनी सुलतानाने ताब्यात घेतले सोळाव्या शतकात त्यावर अहमदनगरच्या सुलतानाचा अमल बसला सतराव्या शतकात ते मोगली अमलाखाली गेले मोगलानी त्याचे नाव गुल्शनाबाद असे ठेवले व ते सुभ्याचे मुख्य ठिकाण बनवले त्यानी इथली अनेक मदिरे पाडून त्याच्या दगडानी औरग दरवाजा, दिल्ली दरवाजा, जुम्मा मशीद, इ वास्तू बाधल्या सतराव्या शतकाच्या अखेरीस मराठ्यानी नासिकच्या काही भागावर अमल बसवला व इ स १७०५ साली नासिकवरची मुसलमानी सत्ता जवळ जवळ नष्ट केली इ स १७४७ साली नासिक प्रदेशावर मराठ्याचा पूर्ण अमल झाला

प्राचीन काळापासून नासिक हे एक मोठे औद्योगिक व व्यापारी केंद्र होते पेशवाईत नासिक हे पेशव्यानी आपले एक प्रमुख ठिकाण बनवले तिथे त्या काळी अनेक व्यापारी पेढ्या होत्या पेशव्यानी सरस्वतीपुलाच्या पलिकडे नवापुरा वसवला मुसलमानानी पाडलेली मदिरे पेशव्यानी पुनश्च उभी केली, गोदावरीच्या पात्रात अनेक कुडे बाधली आणि नासिक व गगापूर येथे मोठमोठे वाडेही निर्माण केले

मोगलाच्या काळात पछमष्ट होऊन अवकळा प्राप्त झालेल्या नासिक क्षेत्राचे मुख उजळ केले ते मुख्यत्वे पेशव्यानीच थोरले माधवराव पेशवे याच्या मातुश्री गोपिकाबाई नासिक येथे वास्तव्य करून राहिल्या होत्या राघोबादादानी नासिकच्या पश्चिमेला दोन मलावर चौधस या गावी आपला वाडा बाधून त्याला आनदवल्ली असे नाव ठेवले होते इ स १८०३ साली राघोबादादाचा मुलगा अमतराव पेशवे याने नासिक शहर सर करून आपल्या ताब्यात घेतले

**नासिकची वाङ्मयीन कामगिरी–** शहाजहान बादशहाच्या कारकिर्दीत विद्यानिधी कवीद्राचार्य सरस्वती नामक एक तेजस्वी पुरुष नासिक येथे जन्मला त्याने बरेच सस्कृत ग्रथ लिहिले शहाजहानाच्या दरबारात हिंदूची वकिली करून काशी व प्रयाग येथे जाणाऱ्या यात्रेकरूवर त्याने लादलेला अन्याय्य कर माफ करून घेणे ही या पडिताची महनीय कामगिरी होय

इ स च्या सोळाव्या शतकात कृष्ण याज्ञवल्क्य याने आपला सुप्रसिद्ध कथाकल्पतरू हा ग्रथ नासिक येथेच रचला त्याच काळातल्या रगनाथ या कवीने नासिकमध्ये राहून बराच ग्रथरचना केली मध्वमुनी व त्याचा शिष्य अमतराय हे कवीही नासिकचे रहिवासी होत

**क्षेत्रमाहात्म्य –** ही भूमी दाशरथी रामाच्या वास्तव्याने पुनीत झालेली असल्यामुळे इथे सदैव यात्रा असते या क्षेत्राची पाच प्रमख क्षेत्रात गणना होते, हे दर्शविणारा श्लोक असा–

**नासिक च प्रयाग च पुष्कर नमिष तथा ।**
**पञ्चम च गयाक्षेत्र षष्ठ कुत्र न विद्यते ।।**

अर्थ– नासिक, प्रयाग, पुष्कर, नमिषारण्य व गया मिळून पाच क्षेत्रे होतात सहावे कुठेही नाही

रेवातीरी तपाचे, गगातीरी मरणाचे आणि कुरुक्षेत्री दानाचे पुण्य मोठे असते, पण वरील तीनही गोष्टी गोदावरीच्या तीरी घडल्यास त्या सारख्याच मोक्षप्रद होतात, असे सागितले आहे गोदावरीचा दक्षिणवाही प्रवाह दुर्लभ व मोक्षदायक असून, तो नासिक क्षेत्रात यात्रेकरूना भेटतो त्यामुळे या क्षेत्री केलेल्या दान–पुण्याचे फळ अमाप मिळते, असे क्षेत्रमाहात्म्यात म्हटले आहे

**क्षेत्रविधी–** नासिक क्षेत्रात येणाऱ्या यात्रेकरूने प्रथम गोदावरीची पूजा करावी नतर स्नान क्षौर, पुन्हा स्नान व उपवास करावा दुसऱ्या दिवशी पितराचे श्राद्ध करावे तिसऱ्या दिवशी गगापूजन व दसदणन करून त्र्यबकेश्वरी जावे तिथल्या सर्व तीर्थविधी व त्र्यबकेश्वराचे दर्शन करून नासिक क्षेत्रात परत यावे नतर रामचद्राचे दर्शन घेऊन यात्राविधी पूर्ण करावा

**प्रमुख तीर्थ–** नासिक क्षेत्रातील काही प्रमुख तीर्थ अशी –

(१) नदिसगम व ब्रह्मतीर्थ – इथे ब्रह्मदेवाने सृष्टी निर्माण करतेवळी आपल्या हातून काही चूक होऊ नये, म्हणून परमेश्वराचे ध्यान केले त्या वेळी शिव व विष्णू हे ब्रह्मदेवा जवळ राहण्यास आले शिव पचवटीत कपालेश्वररूपाने व विष्णू नासिकात सुदरनारायण या रूपाने राहू लागला

(२) अस्थिविलयतीर्थ – हे गोदावरीच्या प्रवाहात रामकुडाच्या पश्चिमेला आहे यात प्रत्यही शेकडो मताच्या अस्थीचे विसर्जन केले जाते इथे टाकलेल्या अस्थीचे साडेतीन घटकात पाणी होते, असे सांगतात

(३) अरुणासगमतीर्थ – अरुणा नावाची एक नदी गोमुखातून रामकुडात येऊन पडते त्या ठिकाणी केलेले स्नान पुण्यप्रद तर आहेच, शिवाय ते स्त्रीचे वाझपणही दूर करते, असे सागितले आहे त्यामुळे पुत्राची आकाक्षा करणारी जोडपी इथे एका वस्त्राने स्नान करतात

(४) रामगयातीर्थ – हे नारोशकर मदिरासमोर आहे या ठिकाणी प्रभू रामचद्राने दशरथाचे श्राद्ध केले, असे सागतात

(५) रामकुड – यात्रेकरूनी मुख्यत्वे याच कुडात स्नान करायचे असते हे कुड सातारकर चित्राव यानी इ स १६९६ साली बाधले अरुणा व गोदा याचा सगम होतो, तो याच कुडात म्हणूनच इथे स्नान करणे पुण्यप्रद असते

(६) लक्ष्मणकुंड – हे कुंड इ स १७२८ साली काकडे आडनावाच्या एका गृहस्थाने बांधले

**प्रसिद्ध मंदिरे**– या क्षेत्रात खूप मंदिरं आहेत त्यातल्या काही मंदिरांची माहिती पुढीलप्रमाणे–

(१) कपालेश्वरमंदिर – हे पंचवटीत रामकुंडासमोर असून, याचा आतला भाग इ स १७३८ साली कोळी लोकांनी व बाहेरचा भाग जगजीवनराम पवार याने बांधला नासिक क्षेत्रात येणाऱ्या यात्रेकरूने कपालेश्वराचे दर्शन घेतलेच पाहिजे असा नियम आहे या मंदिराचे वैशिष्ट्य असे, की इथल्या शिवलिंगापुढे नंदी नाही त्याविषयीची कथा क्षेत्रमाहात्म्यात पुढीलप्रमाणे दिली आहे –

एकदा शिव आणि ब्रह्मदेव यांचा वाद चालू असता शिवाने रागाच्या भरात ब्रह्मदेवाचे एक मस्तक तोडले त्यामुळे शिवाला ब्रह्महत्या लागली ही ब्रह्महत्या शिवाच्या दंडावर कवटीच्या रूपाने येऊन बसली ती महून जावी म्हणून शिवाने बारा वर्षे अनेक तीर्थयात्रा केल्या अशाच यात्रेच्या भ्रमंतीत एकदा शिव नासिकजवळच्या गोवर्धन गावी भिक्षेसाठी आला तिथे एका ब्राह्मणाच्या गोठ्यात गाय व तिचा पाडा यांच्यातला संवाद त्याने ऐकला पाडा आपल्या आईला म्हणत होता 'माझा मालक दुष्ट आहे आणि म्हणून मी त्याला शिंग खुपसून मारणार आहे ' त्यावर गाय त्याला म्हणाली 'अरे त्यामुळे तुला ब्रह्महत्या लागेल' हे ऐकून पाडा म्हणाला 'मला त्याची चिंता नाही मी मालकाला मारीन आणि गोदावरीच्या अरुणासंगमतीर्थात स्नान करीन, म्हणजे माझी ब्रह्महत्या दूर होईल ' या संवादावरून शिवाला अरुणासंगमाचे माहात्म्य कळले व त्याने तिथे जाऊन स्नान केले त्या क्षणी त्याची ब्रह्महत्या दूर झाली मग सर्व देवांनी तिथे प्रकट होऊन विष्णूच्या हस्ते कपालेश्वर नावाचे लिंग स्थापले गायीचा पाडा म्हणजे नंदी याच्या मुखाने क्षेत्रमाहात्म्य समजल्यामुळे शिवाने त्याला गुरू मानून आपल्या सेवेतून मुक्त केले

सांप्रतही दर सोमवारी कपालेश्वराच्या रौप्य मुकुटाचे रामकुंडावर महास्नान होते नंतर त्याची पालखी पंचवटीतून मिरवली जाते कपालेश्वर हे बारा ज्योतिर्लिंगांचे एक उपज्योतिर्लिंग मानले जाते

(२) सुंदरनारायण – हे मंदिर मोठ्या पुलाजवळ आहे मुसलमानांनी या जागेवर असलेले पूर्वीचे मंदिर पाडून तिथे स्मशानभूमी केली होती इ स १७५६ साली चंद्रचूड नावाच्या गृहस्थाने ते पुनश्च बांधले या मंदिरात श्रीविष्णूची मूर्ती असून, तिच्या डावी-उजवीकडे वृंदा व लक्ष्मी यांच्या मूर्ती आहेत या मंदिराविषयीची कथा क्षेत्रमाहात्म्यात दिली आहे, ती अशी –

पुराणकाली जालंधर नावाचा एक दैत्य होता शिवाच्या वराने तो माजला स्थान देवांचा पराभव करून अखेरीस वर-



सुंदरनारायणमंदिर – नासिक

दात्या शिवावरही चाल केली दोघांचे युद्ध सुरू झाले बरेच दिवस ते चालले, पण तरीही जालंधर मरेना कारण त्याची पतिव्रता पत्नी वृंदा हिच्या पुण्याईचे त्याला पाठबळ होते ही गोष्ट समजल्यावर विष्णूने जालंधराचे रूप घेऊन तिच्या पातिव्रत्याचा भंग केला व त्यामुळे शिवाला जालंधराचा वध करणे शक्य झाले मग विष्णूने वृंदेपुढे आपले सत्यस्वरूप उघड केले वृंदेला विष्णूचा राग येऊन तिने त्याला 'तू कृष्णवर्ण होशील व तुला कधीही मन शांती लाभणार नाही,' असा शाप दिला तो शाप विष्णूला बाधला त्यानंतर विष्णूने नासिक क्षेत्री येऊन बद्रिकाश्रमतीर्थात स्नान केले त्यामुळे त्याचा तो शाप दूर झाला

कपालेश्वर व सुंदरनारायण ही दोन्ही मंदिरे गोदावरीच्या दक्षिणोत्तर समोरासमोर असून, एका देवळातून दुसऱ्या देवाचे दर्शन घेता येते सुंदरनारायणाचे मंदिर दिशासाधन करून बांधलेले असून, विषुवदिनी सूर्योदयाच्या वेळी त्याचे किरण सरळ सुंदरनारायणाच्या पायांवर पडतात सुंदरनारायणाचे मंदिर सुंदर व कोरीव नक्षीने खचून भरलेले आहे तिथल्या नक्षीतला रेखीवपणा व समतोलपणा प्रशंसनीय आहे

(३) गंगामंदिर – रामकुंडाजवळचे हे मंदिर इ स १७०० साली गोपिकाबाई पेशवे यांनी बांधले हे सिंहस्थ पर्वात वर्षभर उघडे ठेवतात

(४) रामेश्वरमंदिर – याला नारोशंकरमंदिर असेही म्हणतात हे सरदार नारोशंकर यांनी इ स १७४७ साली बांधले याच्या समोर टांगलेली घंटा नारोशंकराची घंटा म्हणून प्रसिद्ध आहे चिमाजी अप्पाने वसईचा किल्ला फिरंग्यांकडून सर केल्या-

नतर तिथून ही घटा नारोशकरांनी आणली व देवापुढे टागली ही घटा पोतुगीजानी इ स १७२१ साली पोर्तुगालमध्ये ओतली असल्याचा तिच्यावर उल्लेख आहे

(५) राममदिर – पचवटीतले हे प्रमुख मदिर असून, रगराव ओढेकर यानी इ स १७९० साली त्याचा जीर्णोद्धार



राममदिर – नासिक

केला या मदिराला लागलेला दगड रामशेज येथून आणलेला आहे या मदिरावर कलाकुसर नाही आह तो भव्यपणा आणि डोळयात भरण्यासारखा नितळपणा मदिराभोवती चिरेबदी कोट असून, त्याच्या आतल्या अगाला चारही दिशाना यात्रेकरू साठी अग्रशाला बांधलेल्या आहत

(६) सीतागुफा – वरील राममदिराच्या उत्तरेला भूगर्भात एक गुफा आह निरुद अशा सात पायऱ्या उतरून खाली गेल्या वर तिथे राम, सीता व लक्ष्मण याच्या मूर्ती दृष्टीस पडतात तिथून दक्षिणेस कोनाड्यासारखा एक माग असून, त्याच्या पायऱ्यावरून सरपटत खाली उतरावे लागते तिथे आणखी एक छोटी गुहा असून, त्या गुहेत शिवलिंग आहे

याशिवाय बालाजी, मुरलीधर, गोराराम, तिळभाडेश्वर, एकमुखी दत्त, नीलकठेश्वर, विठ्ठल, तिळ्यागणपती, इ बरीच मादरे नासिक आणि पचवटी या दोन्ही ठिकाणी मिळून आहेत इथे काही सत सत्पुरुषाचे मठ व गोसावी बैरागी याचे आखाडेही आहेत

नासिक क्षेत्रात रामनवमीचा उत्सव, गगा गोदामहोत्सव, त्रिपुरी पौर्णिमेची दीपाराधना असे बरेच उत्सव असतात

सिंहराशीला गुरू आला म्हणज तो सुमारे एक वषभर त्या राशीला राहतो त्या कालाला सिंहस्थपर्व असे म्हणतात या कालात गगानदी गोदावरीच्या घरी वास्तव्य करायला येते अशी कथा आहे त्यामुळे सिंहस्थपर्वात या ठिकाणी वषभर मोठी यात्रा असते त्या कालात गोदावरीचे स्नान करताना गगेचेही स्नान घडते, अशी भाविकाची श्रद्धा असते नासिकपासून आठ मलावर चक्रतीर्थ नावाचे एक स्थान आहे अमृत कुंभावरून देव आणि दानव यांच्यात जे पहिले युद्ध झाले, ते याच जागी झाले, असे म्हणतात म्हणून या क्षेत्रात कुभ यात्रा जमते

**तपोवन** – नासिकपासून पूर्वेस एक मल अतरावर तपोवन नावाची भूमी लागत इथली चिच व वड याची झाडे राम कालाइतकी पुरातन असल्याचे सागतात या प्रदेशात उपद्रव करणाऱ्या राक्षसाना रामाने मारले व ही भूमी निर्भय केली त्यामुळे ऋषीमुनी इथे येऊन तपश्चर्या करू लागले, अशी कथा आहे इथे लक्ष्मणाचे एक मदिर असून, ते इ स १८१७ साली बाधलेले आहे रामाने मारीच मृगाचा वध केला, तो इथेच आणि लक्ष्मणाने शूर्पणखेचे नाक, कान छेदले तेही इथेच, असे सागतात इथे जवळच अकरा गुफा असून, त्या लक्ष्मणगुहा या नावाने ओळखल्या जातात या गुहा जैननिर्मित असाव्या, असे दिसते या तपोवनाजवळच कपिला नदी गोदावरीला मिळते

**पांडवलेणी** – नासिकच्या नैऋत्येस अजनगिरी पवताच्या रांगेत शकूच्या आकाराचे तीन डोगर दिसतात त्याना त्रिरश्मी असे नाव त्यामुळेच पडले आहे त्यातील मधल्या



पाडवलेणी – नासिक

डोगरावर पूर्वाभिमुख अशी काही लेणी कोरलेली आहेत ही लेणी सनपूव एकशे दहा वर्षे कृष्ण किंवा कान्ह या राजाच्या कारकीर्दीत खोदली गेली क्रमाक चार ते चौदा या गुहा इ स पाचपयत हकुश्री, गौतमीपुत्र सातकर्णी व वासिष्ठीपुत्र पुळुमायी याच्या कारकीर्दीत निर्माण झाल्या एक, दोन, तीन,

आठ व वीस या गुहा इ स पन्नासपर्यंत निर्माण केल्या गेल्या इ स ४०० ते ६०० पर्यंतच्या काळात दोन, पधरा, सोळा, वीस व तेवीस या गुहांमध्ये बदल करण्यात आला या लेण्यात काही शिलालेखही आहेत क्रमांक वीसच्या लेण्यात पुढील शिलालेख आहे–

नासिककाना धार्मिक ग्रामस्य दान ।

अर्थ– नासिकच्या लोकानी दिलेले धार्मिक या गावाचे दान बाव्वीस क्रमांकाच्या लेण्यात पुढील शिलालेख आहे–

शालिवाहनकुले कृष्णे राजनि नासिककेन
श्रमणेन महामात्येन लयनं कारितं ।

अर्थ– शालिवाहन कुलात कृष्णराजा राज्य करीत असता नासिक येथे राहणाऱ्या (त्याच्या) श्रमण महामात्याने लेणे करविले

क्रमांक तीनच्या लेण्यात सातकर्णीची माता गौतमी व सातकर्णी या दोघांचे वर्णन आहे क्रमांक दहाच्या लेण्यात उषवदात या क्षत्रप राजाचा शिलालेख असून, त्यात त्याने तीन लाख गायींचे दान केल्याचा उल्लेख आहे क्रमांक चौदाच्या लेण्यात त्यानेच सहस्रभोजने घातल्याचा उल्लेख आहे

ही सर्व बौद्ध लेणी असून, ती हीनयान पंथातल्या भद्रयानी या उपपंथाची आहेत भिक्षूंच्या निवासासाठी ती बनवण्यात आली होती या लेण्यातील मूर्ती बुद्ध व बोधिसत्त्व यांच्या आहेत, पण त्याची ओळख न पटल्यामुळे लोकांना त्या पांडवांच्या मूर्ती वाटल्या व ते या लेण्यांना पांडवलेणी म्हणू लागले

**गजपंथ टेकडी** – नासिकच्या उत्तरेस पाच मैलांवर म्हसरूळ गावाजवळ गजपंथ नावाची टेकडी आहे या टेकडीत जैनांनी खोदलेली काही लेणी आहेत त्यांना चांभारलेणी असेही म्हणतात या लेण्यात पार्श्वनाथाची मूर्ती आहे ही लेणी इ स च्या अकराव्या शतकात निर्माण केली गेली

**उत्खनन** – पुणे विद्यापीठ व डेक्कन कॉलेज रिसर्च इन्स्टिट्यूट या दोन संस्थांच्या वतीने नासिक येथील गाडगेमहाराजांच्या धर्मशाळेजवळच्या जुन्या गढीचे उत्खनन करण्यात आले या उत्खननात प्राचीन काळी नासिक येथे पक्की वसती असल्याचा पुरावा उपलब्ध झाला आहे इथे सापडलेल्या घराची बांधणी पक्क्या विटांची व उत्कृष्ट होती वाळू व करड्या रंगाचा चिखल यांच्या मिश्रणाने घरातली जमीन बनवलेली दिसली इथे सनपूर्व तीनशे ते चारशे वर्षे या काळातली काही मातीची भांडी व काही लोखंडी शस्त्र सापडली आहेत त्याचप्रमाणे इ स दोनशेच्या सुमाराची सातवाहनकालीन कौलेही सापडली आहेत सातवाहनकाळातलाच नारळाच्या आकाराचा एक चबूही गवसला आहे इथे गोमेद, इ मणी, प्राण्याचे दात, काचेच्या वस्तू, शिवाजीमहाराजांचा एक होन व सर्वांत वरच्या थरात व्हिक्टोरिया राणीच्या छापाचे रुपये अशा वस्तू मिळाल्या आहेत यावरून या क्षेत्राचे पुरातनत्व कळून येते

**नासिक क्षेत्राचे महान यात्रेकरू** – नासिक येथील तीर्थोपाध्यायांच्या वह्यांत समर्थ रामदास व शिवाजीमहाराज यांच्या हातचे लेख आहेत त्यावरून या महापुरुषांनी नासिकची विधिपूर्वक यात्रा केली होती, असे कळते गागाभट्ट, मिर्झाराजा जयसिंग, धनाजी जाधव व संताजी घोरपडे या मातबर मंडळींची नावही क्षेत्रोपाध्यांच्या वह्यांत आढळतात

स्वातंत्र्यवीर सावरकर यांनी नासिक येथे अभिनव भारत ही संस्था स्थापन केल्यामुळे नासिक हे क्रांतिकारकांचे एक महान केंद्र बनले आणि अनेक क्रांतिकारकांच्या वास्तव्यामुळे व बलिदानामुळे हे स्थान पावन झाले [ नासिक त्र्यंबक दीपिका– सौ कमलाबाई शुक्ल व श्री सारोळकर, १९५५ ; २००० वर्षांपूर्वीचे नासिक– श्री भि रा देवमानकर, १९४९ ]

## नासिरुद्दीन महमूद (शेख)

(१२७६ – १३५९ इ स) भारतातील चिश्ती संप्रदायाचा संघटक याचा जन्म अवधमध्ये झाला याचा बाप लोकरीचा व्यापार करीत असे वयाच्या ४३ व्या वर्षी हा दिल्लीस आला आणि शेख निजामुद्दीन औलिया याचा शिष्य बनला इ स १३२३ मध्ये त्याच्या गुरूने त्याला आपला उत्तराधिकारी नेमले गुरूच्या मृत्यूनंतर पंथाच्या अनुयायांना आध्यात्मिक मार्गदर्शन करण्याची जबाबदारी याच्यावर पडली मुहंमद बिन तुघलक या दिल्लीच्या सुलतानाने याला दिल्ली सोडून दौलताबादला जाण्याची आज्ञा दिली परंतु ' आपल्या गुरूचा तसा आदेश नाही ' असे सांगून त्याने सुलतानाची आज्ञा अमान्य केली त्यावरून सुलतानाने त्याचा बराच छळ केला, परंतु त्याने तो सर्व आपल्या गुरूसाठी मोठ्या धैर्याने सोसला याच्याच प्रयत्नामुळे चिश्ती संप्रदायाची एकजूट आणि प्रतिष्ठा टिकून राहिली पुढे हा ' चिरागे देहली ' या नावाने प्रसिद्धी पावला दिल्लीत याची कबर आहे याचा शिष्य हमीद कलंदर याने याच्या प्रवचनांचा संग्रह केला आहे खरुल मजालिस या नावाने तो ओळखला जातो [ हिं वि को ]

## नास्तिक व नास्तिकवाद

नाही असे म्हणणारा तो नास्तिक होय ' नास्ति परलोकस्तत्साधनमदृष्टं तत्साक्षीश्वरो वा इति मतिर्यस्य ' = स्वर्ग, त्याचे साधन अदृष्ट किंवा त्याचा साक्षी ईश्वर या गोष्टी जो

मानीत नाही तो नास्तिक होय, अशी नास्तिक शब्दाची व्याख्या केलेली आहे. 'अस्ति नास्ति दिष्टं मतिः' = परलोक नाही, असे जो मानतो, तो नास्तिक होय, अशी पाणिनीने त्याची व्याख्या दिली आहे. सर्वदर्शनसंग्रहकार माधवाचार्य यांनी वेदप्रामाण्य न मानणाऱ्यांना नास्तिक म्हटले आहे. तर 'नास्तिको वेदनिन्दकः' = वेदांची निंदा करणारा तो नास्तिक होय, अशी मनूने त्याची व्याख्या केली आहे. या सर्व व्याख्या विचारात घेता नास्तिक शब्द पुढील तीन अर्थांनी प्रयुक्त होतो–

(१) वेदप्रामाण्य न मानणारा. या व्याख्येनुसार बौद्ध, जैन व लोकायत मताचे अनुयायी हे नास्तिक ठरतात. या तीन्ही दर्शनांना नास्तिक दर्शने असे म्हणतात.

(२) जे लोक परलोक व मृत्यूनंतरचे जीवन यांवर विश्वास ठेवीत नाहीत, ते नास्तिक होत. या व्याख्येनुसार चार्वाकाचे अनुयायी तेवढेच नास्तिक ठरतात. आणि

(३) ईश्वराच्या अस्तित्वावर विश्वास न ठेवणारा. सांप्रत बहुतेक सर्व जगात ईश्वराच्या अस्तित्वावर विश्वास ठेवणाऱ्यांना आस्तिक व न ठेवणाऱ्यांना नास्तिक म्हटले जाते. व्यापक अर्थाने, संदेहवादी, भौतिकवादी व प्रत्यक्षवादी लोकांनाही नास्तिक म्हणतात.

भारतीय दर्शनात वेदनिंदक हेच खरे नास्तिक होत, असे मानले आहे. त्यामुळे अनीश्वरवादी सांख्य हे नास्तिक ठरत नसून, वेदप्रामाण्य न मानणारे जैन व बौद्ध हे तेवढे नास्तिक ठरले आहेत. मनुष्य हा स्वभावतः ईश्वरवादी आहे. आदिम मानवसमूहापासून सुधारलेल्या मानवसमाजापर्यंत प्रत्येक मानवसमाजात कोणत्या ना कोणत्या तरी देवतेवर श्रद्धा व तिची पूजा, उपासना चालू असलेली दिसते. ईश्वरावर मुळीच श्रद्धा न ठेवणारा समाज मिळणे कठीण आहे. पण त्याचबरोबर प्रायः सर्व देशांत व सर्व संस्कृतींत ईश्वरावर अविश्वास प्रकट करणारेही काही विचारवंत निर्माण झाले व त्यांनी ईश्वरवाद त्याज्य ठरवला, हेही खरे आहे. भारतासारख्या ईश्वरवादी व अवतारवादी देशातही अनीश्वरवादी विचारवंत निर्माण झाले, हे विशेष होय. ऋग्वेदात देवतांचे अस्तित्व न मानणाऱ्या लोकांचे वर्णन आहे. ईश्वर व देवता हीही एक कल्पना आहे, असा विचार उपनिषदांतही काही लोकांनी मांडला आहे. शंकराचार्यांच्या अद्वैत वेदान्तातही ईश्वराची सत्ता मायिक व अयथार्थ मानलेली आहे. सांख्य दर्शनाचे प्राचीन रूपही निरीश्वरवादी आहे. अनेक प्रमाणे उभी करून सांख्यांनी ईश्वराचे खंडन केले आहे. जगताच्या सृष्टीसाठी त्यांना ईश्वराची आवश्यकता वाटत नाही, तशीच ती मोक्ष मिळविण्यासाठीही वाटत नाही. वैदिक कर्मकांडावर पूर्ण विश्वास असणारे पूर्वमीमांसादर्शनही अनीश्वरवादीच आहे. कुमारिल भट्टाने विविध तर्क देऊन असे सिद्ध केले आहे, की अनेक असीम शुभ गुणांनी युक्त अशा ईश्वराचे अस्तित्वच संभवत नाही. जगत हे स्वाधिष्ठान व स्वतःमध्येच पूर्ण असून, त्याच्या सृष्टीसाठी कोण्या ईश्वराची आवश्यकता नाही.

वेदप्रामाण्य न मानणाऱ्या चार्वाक, जैन व बौद्ध या दर्शनांनीही ईश्वराचे खंडन केले आहे. ईश्वराचे प्रत्यक्ष दर्शन होत नसल्यामुळे त्याचे अस्तित्व नाही, असे चार्वाक मानतात. जगत हे सृष्टच नसल्यामुळे सृष्टिकर्त्या ईश्वराची आवश्यकता नाही, असे जैन म्हणतात, तर बुद्ध ईश्वरविषयक सर्व जिज्ञासा निरर्थक असल्याचे सांगतो. माध्यमिक, योगाचार, सौत्रांतिक व वैभाषिक हे बौद्ध धर्माचे भेदही नास्तिकच आहेत.

भारतीयांच्या आस्तिक तत्त्वदर्शनाचा उगम नास्तिकांच्या आक्षेपांनी झाला आहे. उदा० बृहदारण्यकोपनिषदात आत्म्याचे मरणोत्तर अस्तित्व असू शकत नाही, असा पूर्वपक्ष मांडून नंतर अमर आत्म्याचा सिद्धान्त सांगितला आहे.

वेद अप्रमाण मानणे हे महापातक असून, याज्ञवल्क्याने ते ब्रह्महत्येइतके भयंकर मानले आहे. गौतमाने नास्तिकांचा पतितांत अंतर्भाव केला आहे. समाजात अशा माणसाला स्थान देऊ नये, असे मनूही सांगतो.

आस्तिकवाद्यांची अशी धारणा आहे, की जगताची सृष्टी, स्थिती व लय यांना कारण एक अप्राकृत चेतनाशक्ती आहे आणि ती शक्ती प्राकृत नियम म्हणजे सत्य व नैतिक नियम म्हणजे ऋत यांचेही नियमन करणारी आहे. पण नास्तिकवाद्यांना अशा चेतनाशक्तीचे अस्तित्व मान्य नाही. ते प्रकृतिवादी आहेत. त्यांच्या मते परमाणूंचा फक्त संयोग वा वियोग होतो आणि एक विशेष स्थिती प्राप्त झाली, म्हणजे प्रकृती सजीव होते आणि कालांतराने तिच्यात चेतना प्रकट होते. व्यक्त जगताचे रूप धारण करण्याची क्षमता प्रकृतीत आहे. बाह्य जगताचे एक विशिष्ट रूपच आपल्याला दिसते. परमाणूंच्या संयोग–वियोगाने जगताचे हे वर्तमान रूपच का धारण केले, असा आक्षेप यावर घेतला जातो. त्यावर प्रकृतिवाद्यांचे उत्तर असे, की हा केवळ योगायोग आहे आणि योगायोगानेच जगताला हे रूप प्राप्त झाले आहे. काही प्रकृतिवादी सांगतात की या जगताचे रूप नियत करण्याच्या कामी कोण्या बाह्य शक्तीचा हात नसून, हा प्राकृत वस्तूंच्या स्वभावाचाच परिणाम आहे. पाहा–दर्शने [म. ज्ञा. को., हिं. सा. को., श्री. लक्ष्मणशास्त्री जोशी– नवभारत मार्च १९५९, श्री. रामप्रताप त्रिपाठी शास्त्री– रेडिओ संग्रह, ऑक्टो.–डिसेंबर, १९५३]

**नाहरखान** उ भारतातील एक देव याच्या उत्पत्तीविषयी कथा आहे, ती अशी– मारवाडच्या जसवतसिंह राजाने आपल्या एका सरदाराच्या मुलीवर बलात्कार केला पुढे त्या राजाला एका भुताने पछाडले त्यामुळे राजा वेडा झाला राजाला बरे वाटावे म्हणून नाहरखान नावाच्या एका माणसाने त भूत स्वत वर ओढवून घेतले नाहरखान हा कुपावत जमातीचा प्रमुख होता राजा बरा झाला त्यामुळे नाहरखानची कीर्ती झाली आणि तो मेल्यावर लोक त्याची देव म्हणून पूजा करू लागले [ फो लो नॉ इ ]

**नाक्षत्रकाल** एक प्राचीन कालगणना नाक्षत्रकाल हा सूर्याच्या दनिक गतीवरून घरलेला नसून, नक्षत्राच्या दनिक गतीवरून घरलेला आहे या दोन कालात ३ मिनिटे ५५ ९ सेकद इतके अतर पडत एक नक्षत्र याम्योत्तर वृत्त ओलाडून पुनश्च त्या ठिकाणी येण्यास २३ तास ५६ मिनिटे व ४ १ सेकद इतका वेळ लागतो या कालाला नाक्षत्र दिवस असे म्हणतात या कालगणनेचा प्रारभ मेष सपातापासून धर-तात मेष सपातबिंदू याम्योत्तर वृत्तावरून गेला म्हणजे ठरा-विक वेळेच्या अतराने प्रत्येक तारका याम्योत्तर वत्तावरून जाते हे अतर म्हणजेच तारकाचे विषुवाश होत प्राचीन काळी या वरून नाक्षत्र घटिकायत्र तयार करीत व त्यावरून आकाशा तील विशिष्ट वेळेची नक्षत्रस्थाने निश्चित करीत

**नाक्षत्रवर्ष** सवत्सराचा एक प्रकार अश्विनीपासून रेवती-पयत सत्तावीस नक्षत्रातून भ्रमण करण्यास चद्राला जो काळ लागतो, त्याला नाक्षत्रमास म्हणतात असे बारा नाक्षत्रमास झाले, की एक नाक्षत्रवष होते धमशास्त्रात याला फारसे महत्त्व नाही पाहा– सवत्सर [ नि सि ]

**निंदा** एखाद्याविषयी वाईट बोलणे किंवा एखाद्याची निभ त्सना करणे म्हणजे निंदा होय ' दोषवत्तया प्रख्या पनम् ' = एखादा माणूस वाइट आहे अशी त्याची प्रसिद्धी करणे, म्हणजे निंदा अशी त्या शब्दाची व्याख्या आहे निंदा करणे हे अप्रशस्त मानलेले आहे मनू म्हणतो–

गुरोयत्र परीवादो निन्दा वापि प्रवर्तते ।
कर्णा तत्र पिधातव्यौ ग तव्य वा ततोऽन्यत ॥
(मनुस्मृती २ २००)

अर्थ–ज्या ठिकाणी गुरूच्या दोषाविषयी बोलले जात असेल किंवा त्याची निंदा चालली असेल, तिथे एक तर कान झाकून घ्यावे किंवा तिथून उठून दुसरीकडे जावे

देवाचे भक्त, ब्राह्मण, गुरू, पतिव्रता, यती, ब्रह्मचारी व देव याची जे लोक निंदा करतात, ते अधोगतीला जातात ते रात्रदिवस मलमूत्रात लोळत पडतात तिथले कृमिकीटक त्याना दश करतात ब्रह्मा, शिव, दुर्गा, लक्ष्मी, सरस्वती, सीता, तुळस, गगा, वेद, व्रत, पूजा, मत्र इत्यादीची जे निंदा करतात, ते अधकूपात खितपत पडतात आणि तिथे त्याना सदैव सप दश करीत राहतात जे कोणी विष्णू, राधा व गोपी याची निंदा करतात, ते उलटे टागले जातात साप त्याना वेटोळे घालतात यमदूत त्यांच्यावर दडप्रहार करतात आणि त्याना मलमूत्र भक्षण करायला लावतात, असे ब्रह्मवैवर्त पुराणात सांगितले आहे

वेदाची, देवाची व ब्राह्मणाची निंदा करणाऱ्याचे कधी स्मरण करू नये आणि परनिंदा कधी करू नये, असे कूम पुराणात सागितले आहे

गुरुजनांची व वडीलधाऱ्या माणसाची निंदा ही त्याचा अशस्त्र वधच असतो, असे म्हटले आहे या सबधी महाभारता तील एक प्रसग असा – अर्जुनाचे आपल्या गाडीव धनुष्यावर फार प्रेम होते आणि त्या धनुष्याविषयी जो अनादराचे उद्गार काढील, त्याचा मी शिरच्छेद करीन, अशी त्याची प्रतिज्ञा होती महायुद्धात कर्णाने युधिष्ठिराचा पराभव केल्यावर आणि अर्जुन कर्णाला न मारता शिबिरात परत आल्यावर युधिष्ठिर अर्जुनाला चिडून बोलला 'तुझे गाडीव धनुष्य दुसऱ्याला देऊन टाक ' ते ऐकून अर्जुनाला आपली प्रतिज्ञा आठवली तो युधिष्ठिराचा वध करायला निघाला कृष्णाने त्याला अडवले व तसे करू नको म्हटले अर्जुन म्हणाला ' मग माझ्या प्रतिज्ञेतून मी मोकळा होइन असा काही माग साग ' त्यावर कृष्ण म्हणाला ' तू युधिष्ठिराची निंदा कर मोठ्या माण साची निंदा करणे, हे त्याचा वध करण्यासारखेच आहे '

निंदा करण्याने निंदकाच्या मनावर निरतर वाईट सस्कार होतात निंदक हा दुसऱ्याचे काही वाईट करीत नाही, तर तो स्वत चाच घात करतो असे समजावे

**निंबरगी** एक प्राचीन नगर हे गाव विजापूर जिल्ह्यात पढरपूरच्या दक्षिणेस सुमारे चाळीस मैलावर आहे इथे गावापासून थोड्या अतरावर नदीच्या काठी मारुतीचे एक प्राचीन देवस्थान आहे देवालयात रामचद्राची मूर्ती व तिच्या उजव्या बाजूस स्वयभू शिवलिंग आहे या मूर्तीना हरिहर असेही मानतात इथे एक आख्यायिका प्रचलित आहे, ती अशी–

इथली राममूर्ती व शिवलिंग या एकाच पाषाणाच्या मूर्ती असून, त्या अनादी कालच्या आहेत या ठिकाणी हरि हराच्या दशनासाठी हनुमताने दीर्घ काल तप केले त्याच्या तपावर

प्रसन्न होऊन उभय देवांनी त्याला दर्शन देऊन असा वर दिला, की 'तुझ्या नावाने हे स्थान प्रसिद्धीस येईल' माघ व चैत्र महिन्यात इथे मोठी यात्रा भरते [स भा प्र व]

**निंबराज** (इ स चे १७ वे शतक) एक मराठी संतकवी हा दठणचा राहणारा म्हणून याला दैठणकर असे म्हणत याचे घराणे मूळचे नीरानरसिंगपूरचे होय हा आश्वलायनशाखी देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण होता याच्या वडिलांचे नाव मुरारबोवा आणि उपनाम दडवते असे होते मुरारबोवा हे नरसिंहाचे पुजारी असून, नरसिंह हे त्यांचे कुलदैवत होते

निंबराजाच्या नावासंबंधी एक आख्यायिका सांगतात, ती अशी– मुरारपंताने पुत्रप्राप्तीसाठी दठणच्या पश्चिमेस असलेल्या शिरूर (घोडनदी) नावाच्या गावाजवळील रत्नागिरी नामक पर्वतावर बारा वर्षे तप केले या कालात तो स्वत व त्याची पत्नी नररोज निंबाचा पाला खात असत निंबसेवनाने हा पुत्र झाला म्हणून त्याचे नाव निंबराज असे ठेवण्यात आले

सातव्या–आठव्या वर्षी निंबराजाचे उपनयन झाले पुढे मोठा झाल्यावर त्याने कुळकर्णीपणाची वृत्ती सुरू केली

निंबराजाला दोन बायका होत्या दठणाला असताना कुलकर्णी वृत्तीवर त्याचे भागेना म्हणून तो देशांतर करून गुजरातमध्ये गेला तिथे त्याने एका मुसलमान अधिकाऱ्याकडे नोकरी पत्करली पण ती नोकरी करीत असतानाच त्याच्या मनात विरक्तीचे विचार घोळू लागले थोड्याच काळात त्याने ती नोकरी सोडली व कुटुंबीय मंडळींची परवानगी घेऊन तीन वेळा काशी रामेश्वराची यात्रा केली यात्राप्रसंगाने तो माहूरला रेणुकेच्या व दत्ताच्या दर्शनास गेला असता तिथे त्याला आकाशवाणी ऐकू आली, की 'गुरूवाचून मोक्षप्राप्ती नाही' त्यामुळे तो गुरूचा शोध करीत हिंडू लागला पुढे सिद्धनदी येथे एकनाथशिष्य नरहरी हा सत्पुरुष त्याला भेटला निंबराजाने त्याला गुरू करून त्याच्याकडून उपदेश घेतला नंतर तो गुरूच्या आज्ञेने घरी परत आला

प्रत्यक्ष भगवंताने निंबराजाला पताका दिली होती आणि तो कीर्तन करू लागला, की श्रीकृष्ण बालरूपाने ते ऐकण्यासाठी येत असे, अशा प्रकारच्या अनेक आख्यायिका निंबराजाच्या बाबतीत सांगितल्या जातात

निंबराजाने बरीच पद्यरचना केली आहे त्याचे विठ्ठलाच्या वर्णनाचे एक पद असे–

**पादांबुजे गोजिरे विटेवरि ।**
**शामसुंदर नागर भीमातिरि ।।**
**मालगटी बावन कटावरी ।**
**कर गोमटे शोभति कटावरी ।।**
**रूप सावळे देखिले आजि डोळा ।**
**जन्म साजिरा देखा किती वेळा ।।**
**डोले माळतुळसि वजयंति ।**
**भाली चंदनाची निळि शोभे कांति ।।**
**करि कंकण कौस्तुभमाळ कंठीं ।।**
**रत्नखचित मेखळा कटि किंकणि ।**
**मकराकार कुंडले दिव्य कर्णी ।।**
**मयुरपिच्छ मस्तकि शूळपाणि ।**
**निंबया कुबडि करि पद्मप्राणि ।।**

श्री वि ल भावे यांच्या मते ज्ञानबोध व जपमाळ ही काव्ये निंबराजाने रचली आहेत जपमाळेतील एकेक मणी म्हणजे एकेक संत होय [म सा, संतराज श्रीनिंबराज महाराजांचे संक्षिप्त चरित्र व काव्य– श्री आबासाहेब मुजुमदार, १९५९]

**निंबसप्तमी** एक काम्य व्रत या व्रताचा आरंभ वैशाख शु सप्तमीला करतात व्रतावधी एक वर्ष या व्रताचा विधी पुढीलप्रमाणे– अष्टदल कमळावर खखोल्क या नावाने सूर्याची मूर्ती ठेवून तिची पूजा करावी सूर्याच्या मूर्तीपुढे बारा आदित्य, जय, विजय, शेष, वासुकी, विनायक, इ देवदेवता ठेवाव्या व्रतकाळात कडुलिंबाची पाने खावी सूर्याच्या मूर्तीसमोर शयन करावे फल– रोगमुक्ती [हि ध]

**निंबसाडा** एक कुलधर्म महाराष्ट्रात सातार्‍याच्या बाजूला देशस्थ ब्राह्मणात हा कुलधर्म आहे माघ पौर्णिमा ही त्याची तिथी होय त्या दिवशी पुरुषाने देवीची रीतीप्रमाणे पूजा केल्यावर तांब्याचा कलश गव्हाच्या राशीवर ठेवून त्यावर कुळदेवीची प्रतिमा स्थापतात घरातील प्रमुख आणि सर्वांत ज्येष्ठ सुवासिनी रात्री निंबाच्या पानांची साडी नेसते व हातात दिवटी घेऊन त्या कलशाला तीन प्रदक्षिणा घालते नंतर लुगडे आणि चोळी देऊन घरातील स्त्रिया तिची समावना करतात ती मग ते नवे लुगडे नेसते मग ब्राह्मण सुवासिनींना भोजन घालतात [सु वि को]

**निंबार्क** द्वैताद्वैत दर्शनाचे प्रमुख आचार्य याचे नाव, जन्मस्थान व जन्मतिथी याबद्दल विद्वानात मतभेद आहेत सांप्रदायिक आचार्यांच्या मतानुसार निंबार्क हे भक्तिसूत्रप्रणेत्या नारदमुनीचे शिष्य होते व त्याचे मूळ नाव आरुणी असे होते प्रख्यात गणिती व ज्योतिषी जे भास्कराचार्य ते हेच

होत, अशीही काहींची समजूत आहेत द भारतात गोदावरीच्या तटी पडरपूर गावी राहणारा अरुणमुनी व त्याची पत्नी जयंती ही त्यांची मातापितरे होत, असे एक मत आहे निंबार्क हे ब्रह्म सूत्रकार बादरायण व्यास याचे समकालीन होत, असेही काही विद्वान मानतात डॉ भाडारकर यानी हैदराबादजवळील बेलारी जिल्ह्यातील निंबपूर हे याचे जन्मस्थान मानले आहे त्याच्या मते इ स ११६२ च्या सुमारास याचा मृत्यू झाला

याचे मूळ नाव नियमानद असे होते ते दिसायला अत्यत सुदर असल्यामुळे लोक त्याना सुदर्शन असेही म्हणत याचा ज म दक्षिणेत तेलगण प्रदेशात झाला असला, तरी त्याची कर्म भूमी व्रजमडळ ही होती याना निंबार्क हे नाव कसे मिळाले, त्याबद्दल पुढील आख्यायिका प्रसिद्ध आहे –

नियमानदाने गोवर्धन पर्वताजवळ एका निंबाच्या म्हणजे कडुलिंबाच्या वृक्षाखाली आपला आश्रम उभारला होता त्या काळात मथुरा हे जैनाचे प्रधान क्षेत्र होते एक दिवस जैनांचा एक प्रमुख आचार्य शास्त्रविषयक वादविवाद करण्यासाठी नियमानदाच्या आश्रमात गेला वादात ज्याचा पराभव होईल,



निंबार्काचार्य

त्याने व्रजमडळ सोडून जावे, अशी त्या वादाची प्रतिज्ञा ठरली मग उभयपक्षी खडन–मडनात्मक शास्त्रार्थ सुरू झाला तो सूर्या- स्तापर्यत रात्र झाली व त्यात जैन आचार्याचा पराभव झाला नतर नियमानदाने त्याला आपल्याकडे भोजन करण्याविषयी आग्रह केला जैन आचार्याने त्या आग्रहाचा अनादर केला नाही, पण सूर्यास्तानतर जेवायचे नाही, हा जैन धर्मातला नियम त्या गोष्टीच्या आड आला त्या वेळी नियमानदाने कोटिसूर्यसम आत्मतेजाने निंब वृक्ष प्रकाशित केला आणि जैन आचार्याची ती अडचण दूर केली त्या वेळेपासून नियमानदाला निंबार्क (निंबवृक्षावर प्रकाश पाडणारा अर्क – सूर्य) हे नाव पडले व्रजमडलात नीमगाव म्हणून जे एक गाव आहे, तिथली ही घटना असून, तिच्यावरूनच त्या गावाला नीमगाव असे नाव मिळाल्याचे सागतात

निंबार्काचार्यांनी ज्या स्वतत्र दर्शनाचा पाया घातला, त्याला द्वैताद्वैत दर्शन असे म्हणतात त्यानी वृदावन, गोवर्धन, नीमगाव, इ ठिकाणी हिंडून आपल्या सिद्धान्ताचा प्रचार केला आपल्या दर्शनाच्या विवेचनासाठी त्यानी वेदान्तपारिजातसौरभ, दश श्लोकी, श्रीकृष्णस्तवराज, मत्ररहस्यषोडशी, प्रपन्नकल्पवल्ली, इ ग्रथाची रचना केली वेदान्तपारिजातसौरभ या ग्रथात ब्रह्मसूत्रावर व्याख्या आहे दशश्लोकीत निंबार्क सप्रदायाचे उपास्य दैवत जे राधाकृष्णयुगल त्याचे वर्णन आहे व बाकीच्या ग्रथात युगलउपासनेचे रहस्य प्रकाशित केलेले आहे

निंबार्काचार्यांना श्रीविष्णूच्या सुदर्शन चक्राचा अवतार मान तात त्याच्या पूर्वी जगन्नाथपुरी ही बौद्धाची विहारभूमी होती तिला वैष्णवाचे केद्र बनविण्याचे महत्कार्य निंबार्कांनीच केले जगन्नाथमदिराच्या शिखरावर जे चक्र आहे, ते निंबार्काचार्यां चेच प्रतीक मानतात व भक्त लोक त्याचे दर्शन घेतात भग वताच्या सान्निध्यात निरतर राहत असल्यामुळे निंबार्कांना रगदेवी नामक कृष्णसखीचा अवतार समजतात

गौरमुख, उदुबर, लक्ष्मणभट्ट व श्रीनिवास हे निंबार्कांचे चार शिष्य होते त्यापकी श्रीनिवासाचार्य हे प्रमुख होत

निंबार्क सप्रदायाची अनेक मदिरे उ भारतात असून, राज स्थानातील सलेमाबाद येथे सप्रदायाची सर्वश्रेष्ठ गादी आहे त्याचप्रमाणे वृदावन, मथुरा, राधाकुड, गोवर्धन व नीमगाव या ठिकाणीही सप्रदायाची मदिरे आहेत

निंबार्क सप्रदायाचे अनुयायी कपाळावर गोपीचदनाचा नाम लावतात व त्यामध्ये बुक्क्याचा टिळा देतात ते शुभ्र वस्त्रे नेसतात, गळ्यात तुळशीची माळ घालतात व आपल्या नावापुढे दास किंवा शरण हे उपपद लावतात एकमेकाना अभिवादन करताना 'जय सर्वेश्वर' असा घोष करतात मठप्रमुखाला महत म्हणतात या सप्रदायाच्या अनुयायांचे विरक्त व गृहस्थ असे दोन भेद आहेत निंबार्कांचा एक शिष्य हरिव्यास हा गृहस्थ अनुयायाचा प्रमुख होता मथुरेजवळ ध्रुवसेन या ठिकाणी त्याचे मुख्य केंद्र आहे

निंबार्क हे रसिक भागवत सप्रदायातील आद्य आचार्य आहेत त्यानी रागात्मक भक्तीचा प्रियावत्‍भाव तत्त्वाच अगीकारला

होता मात्र त अत साधक असल्यामुळे त्यानी बाह्य स्त्रीवेष वगरे स्वीकारला नव्हता निंबार्कानी व्रजमडळात वैष्णव भक्तीचा जो प्रवाह सुरू केला, त्यानेच पुढे सव उत्तर भारत व्यापून टाकला पाहा– द्वताद्वत दर्शन [ हिं वि को , त प्र हिं क्षृ , द वि , म सा अ , व्र कृ मा भ , वे पा सौ ]

## निकाय

(१) पुज, राशी किंवा समूह असे निकाय शब्दाचे अथ आहत बौद्ध वाङ्मयात हा शब्द गट किंवा सप्र दाय या अर्थाने आला आहे बुद्धाच्या निर्वाणानतर बौद्ध शासन हे निकायात विभक्त होऊ लागले ही गोष्ट बुद्धाच्या निर्वाणा नतर शभर वर्षानी घडली असे चुल्लवग्गात म्हटले आहे वशा लीचे भिक्षू हे नियम पालनात शिथिल होते काही गोष्टीविषयी त्याचा इतराशी मतभेदही होता हा मतभेद हळूहळू वाढला आणि पूर्वचे भिक्षू व पश्चिमेचे भिक्षू असे त्याच्यामध्ये दोन तट पडले त्या दोहात भाडणही जुपली ती भाडणे सपावी म्हणन ७०० भिक्षूची एक सभा भरली आणि त्या सभत धमशासना साठी आठ स्थविराची एक परिषद निवडली गेली या परिष देत पूव सघाचे चार व पश्चिम सघाचे चार असे प्रतिनिधी घेतले गेले

त्यानतर भारतात वशाली, कौशाबी व मथुरा ही तीन बुद्ध शासनाची कद्रे निर्माण झाली वैशालीत नियमपालनाविषयी शथिल्य होते, मथुरेत त्याविषयी कडकपणा होता आणि कौशा बीत मध्यम वत्ती होती कौशाबीचा निकट सबध दक्षिणा पथाशी असल्यामुळे तिकडेही मध्यम वत्तीच होती

सव निकाय प्रथम स्थविर व महासाघिक या दोन महा निकायात समाविष्ट होत स्थविराच्या अतगत दहा व महा साघिकाच्या अतगत आठ निकाय होते स्थविराचा निकाय महासाघिकाच्या विरुद्ध होता

वसुमित्राच्या मते स्थविर व महासाघिक हा भेद अशोकाच्या कारकीर्दीत पाटलिपुत्र येथे झाला त्या वळी सगीतीचे (धम-परिषद) आचाय चार समूहात विभागले गेले स्थविर किंवा भदत, नाग किंवा महाजनपद, प्राच्य किंवा प्रत्यतक आणि बहुश्रुत अशी त्या चार समूहाची नावे होती यापकी स्थविर निकाय हा दक्षिणकडे पसरला व पुढे लकेतही पोचला मही शासक हा निकाय माहिष्मती नगरीत निर्माण झाला तो स्थविर निकायापकीच एक होता तोही लकेत पोचला होता सिंहली आम्नायावरून कळते, की सर्वांत प्रथम हा महीशासकाचा समूह स्थविर निकायापासून विभक्त झाला काश्मीरमध्ये जो निकाय होता, त्याला प्रथम सर्वास्तिवादी निकाय म्हणत या निकायात कित्येक विद्वान आचार्य होऊन गेले आणि त्यानी संस्कृत भाषेत अनेक ग्रथ निर्माण केले या निकायाचे क्षेत्र अत्यत विस्तृत होते गगा यमुनाच्या परिसरापासून पश्चिमे कडे मध्य आशियापर्यंत तो पसरला होता हैमवत नावाचा निकाय हिमाचलाच्या प्रदेशात काम करीत होता वज्जिपुत्र गोत्रातला एक स्थविर त्याचे नेतृत्व करीत होता महासांघिक निकाय मगध आणि त्याच्या पूर्वचे जनपद यात पसरला होता सर्वास्तिवादी निकाय उत्तर भागात जम बसवून राहिला होता सम्मितीय निकाय लाट व सिंधू या प्रदेशात धमप्रचार करीत होता वात्सीपुत्रीय निकाय कौशांबी व तिच्या आस पासचा विभाग यात चालत होता धर्मगुप्तक हा निकाय भारताबाहेर चीन देशात जाऊन तिथे धर्मप्रचार करीत होता

निकाय हे १८ या सख्येने विशेष प्रसिद्ध आहेत आचार्य वसुमित्र याने अष्टादशनिकायशास्त्र नावाचा ग्रथ लिहिला असून, त्यात या अठरा निकायाची नावे दिली आहेत, ती अशा–

(१) स्थविरवादी (२) हमवत (३) वात्सीपुत्रीय (४) धर्मोत्तरीय (५) भद्रयाणीय (६) सम्मितीय (७) षाण्णा गरिक (८) सर्वास्तिवादी (९) महीशासक (१०) धर्मगुप्त (११) काश्यपीय (१२) सौत्रान्तिक (१३) महासांघिक (१४) शि–चि–तुन (प्रज्ञप्तिवादी), (१५) चैतीय (१६) लोकोत्तरवादी (१७) एकव्यावहारिक व (१८) गोकुलिक

कथावत्थुच्या अट्ठकथेत अष्टादश निकायाची यादी थोडी वगळी आहे

बौद्ध धमाचा प्रसार जसाजसा वाढत गेला तसतसे निकायही वाढले त्याच्यातले तात्त्विक मतभेदही त्या प्रमाणात वाढत गले कालान्तराने या सार्‍या निकायाचे स्वतत्र अस्तित्व लोपून त महायान सप्रदायात विलीन झाले [ बौ द मी ]

(२) बुद्धाचा उपदेश सुत्तपिटकात ग्रथित केलेला आहे या ग्रथाचे दीघ, मज्झिम इ विभाग केलेले आहेत त्यानाही निकाय अशी सज्ञा आहे [ बौ द मी ]

## निकाह

मुसलमानाचा विवाहसस्कार हा सस्कार धार्मिक नसून, त्याचे स्वरूप सामाजिक करारासारखे असते याला काजीची उपस्थिती आवश्यक असतेच असे नाही कुराणा तील मत्र म्हणून कोणीही विवाहविधी पार पाडू शकतो

प्रथम खाजगी रीतीने विचारपूस झाल्यावर नवर्‍या मुलाचे आईबाप मुलीला मागणी घालण्यासाठी तिच्या घरी जातात याला मगनी म्हणतात वधूपिता ही मगनी आपल्या आप्तेष्टाना जाहीर करतो तो सबध मान्य झाल्यास मग विवाहाचा दिवस निश्चित करतात लग्नाआधी चार दिवस वधू वराना त्याच्या घरी पिठी लावतात गहू व मूग याच्या पिठात तिळाचे तेल व

हळद मिसळून केलेल्या मिश्रणाला पिठी म्हणतात या वेळी जमलेल्या स्त्रिया गाणी म्हणतात मग त्यांना खजूर वाटतात

नवरा मुलगा वधूगृही जाण्यापूर्वी वधूला वरी (वेणगी) पाठवतात वराने आपल्या ऐपतीप्रमाणे वधूला काही रक्कम हुंडा म्हणून द्यायची असते, तिला मिहर अथवा मेहर म्हणतात ती तिची वैयक्तिक संपत्ती समजली जाते मग वधूपक्षीय मंडळी वराकडे येऊन त्याच्या हाता पायांना मेंदी लावतात व त्याला सुताच्या नाडयाचे कंकण, रुमाल व पागोटे देतात मग वराला मिरवीत वधूगृही आणतात या मिरवणुकीला सबगस्त म्हणतात

नवरा मुलगा वधूच्या मांडवात पोचल्यावर वरपक्षाचा पुढारी तीन इसम निवडतो त्यांपैकी एक वकील व दुसरे दोन साक्षीदार असतात त्यांच्यातर्फे प्रस्तुत लग्नाला वधूनी व वधूच्या आईबापांची संमती आहे की नाही, याची चौकशी होते वराकडूनही तशीच मान्यता घेतली जाते हा रुकार तीन वेळा घ्यावयाचा असतो या वेळी मुल्ला वराकडून कुराणातील पाच कलमे म्हणवून घेतो नंतर 'खुत्बा ए निकाह' (विवाह-मंत्र) म्हटले जातात मुल्ला वधू वरांना आशीर्वाद देतो उपस्थित असलेले सगळे लोक हात वर करून या आशीर्वादात भाग घेतात

नंतर वधू वराकडून कुराणातील सहा कलमे (पवित्र मंत्र) वदवून घेतल्यानंतर खारका वाटण्यात येतात मग काजी आपल्या दप्तरात त्या लग्नाची नोंद करतो यानंतर वधूकडची मेजवानी होते नंतर जुलवाचा सोहळा होतो या वेळी वधू वरांना समोरासमोर बसवतात व त्यांच्या हातात सूत्रकंकणे व सुपाऱ्या बांधतात उभय पक्षांतील स्त्रिया वधू वरावरून रोकड पैसे किंवा आंगठ्या उतरून जवळच्या घागरीत टाकतात एका भांड्यात पाणी घालून त्यात सोन्याची किंवा चांदीची आंगठी टाकतात व ती सात वेळा वधू वरांना काढायला सांगतात हा सोहळा झाला, की वऱ्हाडी मंडळीबरोबर वधूची सासरी पाठवणी करतात तिसऱ्या अथवा दहाव्या दिवशी कांकणे सोडली, लग्नसमारंभ पुरा होतो

हा लग्नसमारंभ सर्वसामान्य आहे, पण मुसलमानांत जाति-भेद असल्याने प्रत्येक जातीच्या लग्नविषयक आचारात थोडा फार फरक असतो भारतातील मुसलमान समाजात तेल हळद लावणे, वरात काढणे, नाचगाणे करणे, इ हिंदूंचे अनेक रीतिरिवाज प्रचलित आहेत

इस्लामी कायद्याप्रमाणे प्रत्येक मुसलमानाला जास्तीत जास्त चार बायका करता येतात, परंतु सर्वसाधारण मुसलमान मनुष्य एकच बायको करतो तिला मूल होत नसले किंवा ती सतत आजारी असली, तर मग दुसरी बायको केली जाते

प्रत्येक मुसलमानाने लग्न केलेच पाहिजे, असे धार्मिक वचन आहे कारण मुहंमद पैगंबराने ब्रह्मचर्य हे निषिद्ध मानले आहे पाहा – इस्लाम [ल वि सा, डि इ, श्री श्रीपाद जोशी–अमृत, जून १९५५, मु स स ]

## निकुंभपूजा

एक व्रत निकुंभ हा पिशाचावर नियंत्रण ठेवणारा एक देव असून, पिशाचापासून रक्षण व्हावे, म्हणून त्याचे व्रत सांगितले आहे या व्रताचे दोन पर्याय आहेत, ते असे–(१) आश्विन पौर्णिमेला पुरुष दिवसा उपवास करतात आणि गृहद्वाराजवळ अग्नी ठेवून त्याची व पूर्णचंद्र, रुद्र, उमा, स्कंद, नंदीश्वर व रेवंत यांची पूजा करतात त्याबरोबर निकुंभाची तीळ, तांदूळ व उडीद यांनी पूजा करतात रात्री ब्राह्मण भोजन घालून मग भोजन करतात नृत्य गायनाने ती रात्र जागवतात दुसऱ्या दिवशी सकाळी पुरुष अंगाला चिखल माखतात आणि पिशाचवत वर्तन करतात त्याचप्रमाणे दुसऱ्याच्याही अंगावर चिखलफेक करून अश्लील भाषा बोलतात या खेळात जो कोणी भाग घेत नाही, त्याला पिशाचबाधा होते, अशी समजूत आहे (२) चैत्र वद्य चतुर्दशीला शंभू आणि पिशाचांसहित निकुंभ यांची पूजा करतात रात्री वारांगनांचे नृत्य पाहतात [ हि ध ]

## निकोबार

बंगालच्या समुद्रात, अंदमान द्वीपसमूहाच्या दक्षिणेला सुमारे ९० मैल अंतरावर जो वेगळा द्वीपसमूह आहे, त्याला निकोबार असे म्हणतात त्याचे पूर्वीचे नाव 'नकावरम'= नग्न लोकांचे स्थान, असे होते पण तिथले लोक नग्न राहत नाहीत आणि ते जंगलीही नाहीत मात्र तिथल्या अत्यंत उष्ण हवामानामुळे ते अगदी थोडे कपडे वापरतात फार प्राचीन काळी हे लोक आग्नेय आशियातून या प्रदेशात आले श्री कृष्णमोहन गुप्त यांच्या मते ते मंगोल वंशाचे आहेत ते लोक मात्र चौरा बेट हे आपले मूळ स्थान असल्याचे सांगतात चौरा बेटातील सर्व माणसांची बुद्धी व शक्ती अलौकिक असते, अशी त्यांची समजूत आहे

निकोबारी लोक पूर्वी चाचेगिरी करून जहाजे लुटीत व तसे करताना क्रूरपणे वागत, असे म्हणतात पण सांप्रतच्या निकोबारी लोकांकडे पाहिल्यास ते एकंदरीत सुस्वभावी, प्रामाणिक, परोपकारी व अतिथ्यशील दिसतात त्यांचे जीवन शांत व साधे असते त्यांना स्पर्धा व धावपळ आवडतच नाही उष्ण हवामानामुळे ते सुस्त व आळशी बनले आहेत मद्यपान, खाणे-पिणे, गाणे बजावणे व मौज करणे हे त्यांना फार प्रिय आहे

**सामाजिक जीवन** – या लोकात जातिभेद नाही केवळ सुटक वसाहतीमुळे त्याच्या भिन्न भिन्न गटात वेगळेपणा दिसतो तेवढाच याच्या ग्रामप्रमुखाला माह असे म्हणतात गावकऱ्यावर त्याचे बरेच वचस्व असते पण तो त्याच्याशी फडकपणे न वागता सामोपचाराने सव कामे करून घेतो त्यानी शासन व्यवस्था लोकशाही पद्धतीची असत

याच्यात पितप्रधान कुटुबव्यवस्था प्रचलित आहे व्यापारा मुळे या लोकाचा अनेक देशातील लोकाशी सबध आल्याने त्यानी मलायी, चिनी, पोर्तुगीज, डॅनिश, जमन, इंग्लिश इ अनेक भाषा अवगत केल्या आहेत इंग्लिश, बर्मी, हिंदी व तमिळ या भाषात तर त्यानी बरीच प्रगती केली आहे



निकोबारी घर

त्याची स्वत ची भाषा लिपिबद्ध नसली, तरी ती अत्यत विक सित असून, व्याकरणाच्या दृष्टीने इंग्लिश भाषेशी जुळणारी आहे

या लोकात सामाजिक नियमाचे पालन करण्याची प्रवृत्ती आहे स्त्री पुरुषाचा सामाजिक दर्जा समान असतो सव सामा जिक प्रश्नात स्त्रियांच्या मताला मान दिला जातो गहकृत्यां बरोबरच नावा चालवणे, डुकरे पाळणे, शेती करणे इ सर्व कामात त्या पुरुषाच्या बरोबरीने भाग घेतात त्या बर्मी पद्ध तीचा सारग व ब्लाऊज घालतात पुरुष पायजमा व जाकिट वापरतात त्याचे कपडे साधे असून, त्यात कसलीहि विविधता नसते त्याचे अन्न म्हणजे नारळ, केळी, केवडीचा फळे, मासे व सणावारी डुकराचे मास, हे पदार्थ होत

याच्या गावाची रचना सुरेख असून घरेही लाकडाच्या खाबावर, जमिनीपासून सुमारे दहा फूट उच, घुमटासारखी व्यवस्थित बाधलेली असतात घरामोवती नारळी-पोफळीच्या मोठ्या बागा असतात

**व्यवसाय** – शेती हा याचा मुख्य व्यवसाय होय नारळ व सुपारी यापासूनही त्याना पुष्कळ उत्पन्न मिळते नारळ हा तर त्याचा कल्पवृक्षच आहे व्यापारात नारळ हेच त्याचे चलन असते नारळाच्या झापाच्या चटया व टोपल्या विणणे, लाकूड, वेत व लोखड याच्या वस्तू घरगुती उपयोगासाठी बनवणे, मासेमारी करणे इ उद्योगही हे लोक करतात ते आपला शेतमाल गावातील सहकारी सस्थेला देऊन त्याच्या बदली कापड वगैरे पदार्थ घेतात

**देवधर्म** – हे लोक भूतपूजक आहेत त्याचे सर्व सण समारभ भूताखेताना पळवून लावणे किंवा काबूत आणणे यासाठी होत असतात भूतपूजेचे विधिविधान बहुधा रात्री केले जाते सैता नाचा नाश करणे, हे अशा विधीचे मुख्य उद्दिष्ट असते चोरी, खून, इ अपराध करणाऱ्याला भूतबाधा झाली आहे, असे सम जून ते लोक त्याला हाल हाल करून ठार मारतात

प्रत्येक व्यक्तीचे शरीर व आरोग्य हे भुते व चेटकिणी याच्या वर अवलबून असते, असे या लोकाना वाटते त्यामुळे मत्रतत्र व जादूटोणा याना त्याच्या जीवनात महत्त्वाचे स्थान मिळाले आहे छायेला हे लोक भूताची खूण मानतात व तिला खाऊ घालण्याचा एक विशेष समारभ करतात

मृत पूवज, सूर्य व चद्र याच्याविषयी या लोकाच्या मनात पुष्कळ अधश्रद्धा आहेत त्याचा देव म्हणजे भूतपिशाचांचा राजा होय तोच सर्वांत बलिष्ठ असतो त्याला युरोपीय कप्ता नाचा वेष घातलेल्या मनुष्याचे रूप देतात दुष्ट शक्तींना शांत करण्यासाठी घरांच्या भिंतीवर किंवा इतरत्र अनेक ठिकाणी मनुष्य, पशु पक्षी, वक्ष, झोपडी, मासे, मगर, सूर्य, चद्र व जल देवता याच्या आकृती काढण्याची प्रथा या लोकात आहे

निकोबारी लोक सनातनी वृत्तीचे असल्यामुळे त्याच्यांत खिस्ती धर्माचा प्रसार फारसा झाला नाही

**विवाहप्रथा** – मुली वयात आल्यावर त्या आवडत्या तरुणाशी लग्न करू शकतात एखाद्या तरुणाला विशिष्ट मुलगी आव डली असल्यास तो तिच्या आइवडिलाशी स्नेह सपादतो व त्याना मदत करून त्या मुलीचे मन जिंकतो मग त्याचा विवाह अगदी साध्या पद्धतीने होतो वधूचा हात वराच्या मनगटावर ठेवला की, त्याचा विवाहसस्कार पूण होतो

या लोकात घटस्फोटही सहज मिळू शकतो त्यासाठी त्याना कसलाही विधी करावा लागत नाही

**मतिकप्रथा**— या लोकांचे अंत्यसंस्कार सोपस्कारयुक्त असून, पुष्कळ नियम चालतात. मृताचे भूत निरुपद्रवी व्हावे व ते अरण्यातूनच राहू येऊ नये, अशी व्यवस्था करणे हा त्यातील हेतू असतो. प्रेत पुरण्यापूर्वी ते ३–४ दिवस



निकोबारी कुटुंब

समुद्रकिनारी मोकळ्या हवेत ठेवून देतात. दक्षिण भागातील लोक प्रेत पुरल्यानंतर काही दिवसांनी ते बाहेर काढून त्यांचा सांगाडा स्वच्छ करतात व तो पुन्हा पुरतात. उत्तर भागातील लोक अनेक प्रेते उकरून काढून त्यांची हाडे एकत्र करतात व मग ती पुन्हा पुरून टाकतात. असे केल्यामुळे भुते निरुपद्रवी होतात, अशी त्यांची समजूत आहे. मृताचे नातेवाईक त्याच्या नावाने काही खाद्य पदार्थ वर्ज्य करतात. मृत मनुष्याचे नाव अनेक वर्षेपर्यंत नात्यातील मुलांना ठेवीत नाहीत.

इ. स. १८ व १९ व्या शतकात या द्वीपसमूहावर अनुक्रमे डच, ऑस्ट्रेलियन, इंग्रज व फ्रेंच यांची सत्ता होती. इ. स. १८६९ पासून तिथे ब्रिटिश राज्य सुरू झाले. दुसऱ्या महायुद्धात इ. स. १९४२ ते ४५ या काळात ही बेटे जपानच्या ताब्यात होती. आता ती भारतीय संघराज्यात समाविष्ट झाली आहेत. [एन्सा. ब्रि. ए., भारती, मार्च १९५९, हिं. वि. को.]

**निगद** यजुर्मंत्रांचा समूह. यज्ञामध्ये वेळोवेळी होता नामक ऋत्विज उच्च स्वराने हे निगद मंत्र म्हणतो. दर्शपूर्णमासेष्टीत प्रयाज होमाच्या अगोदर निगद म्हणून होत्याने अध्वर्यूला पुढील कर्माचे सूचन करावे, असे आश्वलायन श्रौत सूत्रात सांगितले आहे (१.४.९). प्रैष हेही एक प्रकारचे निगदच होत. यज्ञातील एखादे कर्म दुसऱ्याला करायला सांगणे, याला प्रैष म्हणतात. निविद म्हणजे एखाद्या देवतेच्या वर्णनपर विशेषणांचा समूह. निविद हेही निगदच होत. देवतेच्या स्तुतिपर गद्य मंत्र असतात, असे निगद म्हणायचे असतात. [हिं. ध.]

**निगम** (१) व्यापारी व कारागीर यांचा संघ. धर्मशास्त्रे व स्मृती या ग्रंथांत अशा संघांना नैगम म्हटले असले, तरी निगम या शब्दाचाही त्या अर्थी उपयोग पुष्कळ ठिकाणी केलेला आढळतो. श्रेणी, पूग, गण, व्रात व संघ हे शब्दही त्याच अर्थी वापरले जात होते. मात्र स्थलकालभेदानुसार त्यांच्या अर्थात थोडा फरक होता. श्रेणी हा शब्द आर्थिक संघटनेचा द्योतक असून, तो मुख्यत्वे एकाच प्रकारच्या कारागिरांच्या संघटनेसाठी वापरला जात असे. व्यापाऱ्यांच्या संघटनेला नैगम म्हणतात. पाहा– श्रेणी. [हिं. वि. को.]

(२) नगराचा एक प्रकार. प्राचीन काळी व्यवसायानुरूप वेगवेगळ्या वसाहती निर्माण होत असत. उदा., रथकारांची वसाहत, अशा अर्थाने निगम शब्द जैन साहित्यातही आला आहे. बसाढमध्ये सापडलेल्या एका मुद्रेवर 'कुलिक निगम' असे शब्द खोदलेले आहेत. डॉ. भांडारकर व मुजुमदार यांच्या मते त्या ठिकाणी मुख्य वस्ती कुलिकांची (शिल्पकार) असावी. शिल्पशास्त्रात निगम हा शब्द कारागिरांचे किंवा व्यावसायिकांचे नगर या अर्थी वापरला आहे. शिल्परत्नातही 'निगमा'मध्ये कारागीर राहत असल्याचे सांगितले आहे. एका जातककथेत वाराणसीजवळच्या एका विशाल वस्तीचे वर्णन असून, तिथे एक हजार सुतार राहत, असे म्हटले आहे. व्यवसायाचे केंद्रीकरण होत होत अशा नगरांच्या वसाहती बनत, असे दिसते. दुसऱ्या एका जातकात कारागिरांच्या अशा वसाहतींची अनेक नावे मिळतात. [प्रा. भा. न. न. जी.]

**निघंटु** वेदांतील कठीण शब्दांचा संग्रह किंवा कोश. यास्कानं याला समाम्नाय म्हटले आहे. प्रजापती कश्यप हा याचा कर्ता असल्याचे महाभारतावरून कळते (शांति. ३४२.८६–८७). निघंटूचे पाच अध्याय आहेत. यांतल्या पहिल्या तीन अध्यायांना नैघंटुक कांड म्हणतात. यात एकार्थवाची शब्दसंग्रह आहे. चौथ्या अध्यायाला नैगम कांड असे म्हणतात. यात अनेकार्थवाची शब्द आहेत. पाचव्या अध्यायाला दैवत कांड असे म्हणतात. यात अग्नीपासून देवपत्नीपर्यंत वैदिक देवतांची नावे दिलेली आहेत. यास्काचे निरुक्त या निघंटूवरच आधारलेले आहे.

निघंटूवर निघंटुनिर्वचन नावाची एकच टीका उपलब्ध

आहे देवराज यज्वा हा दाक्षिणात्य पंडित हा तिचा कर्ता होय त्याने नैघंटुक शब्दांचेच निर्वचन विस्ताराने केले आहे त्या मानाने अन्य कांडांचे निर्वचन अत्यल्प आहे या भाष्याचा उपोद्घात वेदावरच्या भाष्यकारांचा इतिहास जाणण्याच्या कामी अत्यंत उपयुक्त ठरला आहे

देवराज यज्वा याच्या कालाबद्दल मतभेद आहे कोणी त्याला सायणाच्या पूर्वीचा तर कोणी नंतरचा मानतात पण त्याला सायणाच्या पूर्वीचा मानणेच योग्य ठरते असे श्री बलदेव उपाध्याय यांचे मत आहे

भास्करराय नावाच्या प्रसिद्ध तांत्रिकाने एक छोटासा ग्रंथ लिहून निघंटूतले सगळे शब्द अमरकोशाच्या धर्तीवर श्लोकबद्ध केलेले आहेत पाहा– निरुक्त [ वै सा , आ सा मा , हिं सा को , भा भा सा , वे णा दी ]

## निजगुणशिवयोगी

एक वीरशैव कानडी संतकवी याचे मठ नाव निजगुणराय असे होते हा पूर्वी राजा होता व म्हैसूर प्रांतात शंभुलिंगन बेट्ट येथे राज्य करीत होता कोणी त्याला क्षत्रिय मानतात, तर कोणी तो लिंगायत जातीत जन्मल्याचे सांगतात

कालांतराने त्याच्या मनात वैराग्य उत्पन्न झाले आणि त्याने शिवयोगसाधनेचा मार्ग धरला शंभुलिंग हे त्याचे आराध्य दैवत असून, त्याने आपल्या प्रत्येक ग्रंथात त्याचा उल्लेख केला आहे शंभुलिंगाच्या डोंगरावर त्याच्या नावाने एक गुहा दाखवतात तिथे तप करूनच त्याला शिवयोग प्राप्त झाला असे सांगतात

निजगुणाच्या कालाविषयी बरीच मतांतरे आहेत कोणी त्याला इ स च्या १२ व्या शतकातला तर कोणी १३ व्या शतकापासून १६ व्या शतकापर्यंतच्या काळातला मानतात त्याच्या ग्रंथातील भाषेवरून त्याचा काल १२ वे शतक नसल्याचे कन्नड संशोधक श्री नरसिंहाचार्य यांनी सांगितले आहे श्री त्री शिवमूर्तींच्या मते हा १३ व्या शतकात होऊन गेला श्री गोविंद पै हे इ स १२५० ते १६५४ असा स्थूल मानाने त्याचा काल सांगतात विवेकचिंतामणी या त्याच्या ग्रंथाचा मराठी अनुवाद शांतलिंगस्वामीने इ स १६०४ मध्ये केला यावरून निजगुण हा १६ व्या शतकापूर्वी झाला, एवढे मात्र निश्चितपणे म्हणता येते

कालाप्रमाणेच त्याच्या गुरूविषयीही पंडितांत बरेच मतभेद आहेत शंभुलिंग हे त्याच्या देवाचे नाव नसून गुरूचे नाव असावे, असे मत श्री ना व जोशी यांनी मांडले आहे वीरशैव लोक गुरू व लिंग यांच्यात भेद मानीत नसल्यामुळे शंभुलिंग हे एखाद्या देहधारी गुरूचे नाव असणेही शक्य आहे काहींच्या मते चन्नसदाशिव, भुर्जलिंग हे निजगुणाचे गुरू होत, पण तसा लेखी पुरावा मात्र आढळत नाही

निजगुणाने अरवत्तमूवर त्रिपदी, परमार्थ प्रकाशिके, परमार्थ गीता, परमानुभव बोध, अनुभवसार, कैवल्यपद्धती व विवेकचिंतामणी, हे ग्रंथ कन्नड भाषेत रचले आहेत त्याने अनेक पदेही रचली आहेत त्या पदांची भाषा ही सामान्य जनांची भाषा असून, त्यांना संगीताचा साज आहे यामुळे आजही कर्नाटकात खेडोपाडी ती पदे आवडीने गायली जातात

विवेकचिंतामणी या वेदांतपर ग्रंथाचे वेदांतसिद्धांत, शिवसिद्धान्त व ब्रह्मांडप्रपंचभुवनकोशरचनासिद्धांत असे तीन भाग आहेत त्याने ७५० पेक्षा अधिक विषय या ग्रंथात हाताळले आहेत त्यातून निजगुणाच्या विद्वत्तेची व षट्शास्त्रसंपन्नतेची साक्ष पटते तो केवळ शब्दज्ञानी नव्हता, तर महान अनुभवी व शिवयोगी होता

याशिवाय दशनसार व आत्मनकचिंतामणी हे संस्कृत ग्रंथ त्याने लिहिल्याचे श्री ना व जोशी यांनी म्हटले आहे त्याच्या विचारसरणीवर विवेकसिंधू व अमृतानुभव या दोन मराठी ग्रंथांचा विशेष प्रभाव दिसतो त्याने आपल्या ग्रंथात शिवानुभव व शिवयोग यांवर पुष्कळच अधिक भर दिलेला आहे [ विवेकचिंतामणि, हिं क भ तु अ , क द , ग्रंथपरीक्षण– इंद्रायणी, मार्च–एप्रिल, १९६४ ]

## निजाम राजवंश

मराठवाड्यावर राज्य करणारे एक मुसलमान घराणे या घराण्याचा मूळ पुरुष ख्वाजा आबिद हा मध्य आशियातील समरकंद बुखाराकडील होता शहाजहान बादशहाच्या कारकीर्दीत इ स १६५४ ५५ मध्ये तो हिंदुस्थानात आला पुढे त्याने औरंगजेबाचा पक्ष घेतला औरंगजेब बादशहा झाल्यावर ख्वाजा आबिदचे प्रस्थ बरेच वाढले नंतर त्याने आपला मुलगा शहाबुद्दीन याला बुखाऱ्याहून बोलावून घेतले पुढे शहाजहानाचा सुप्रसिद्ध वजीर सादुल्लाखान याच्या मुलीशी शहाबुद्दिनचा विवाह झाला इ स १६७१ साली त्याला जो मुलगा झाला, त्याचे नाव मीर कमरुद्दीन निजामुल्मुल्क आसफजहा असे ठेवले

निजामुल्मुल्क हा इ स १६८२ पासून औरंगजेबाच्या मोहिमेत सामील झाला होता त्यामुळे त्याला दक्षिणेची चांगली माहिती झाली होती पुढे इ स १७१३ मध्ये त्याला दक्षिणेची सुभेदारी मिळाली ती दोन वर्षे सांभाळल्यानंतर तो माळव्याचा सुभेदार झाला पुढे सय्यद बंधूंनी त्याच्या विरुद्ध कारस्थाने केल्यामुळे तो इ स १७१९ मध्ये माळवा सोडून

दक्षिणेत आला व त्याने सय्यद बंधूंच्या सरदाराचा पराभव करून दक्षिणेची सुभेदारी पुनश्च मिळवली पुढे सय्यद बंधूंच्या वधानंतर इ स १७२२ मध्ये त्याला दिल्ली दरबारात वजिरीही मिळाली वजिरी मिळूनही त्याने दक्षिणेची सुभेदारी सोडली नाही माळवा व गुजरात हे सुभेही त्याने आपल्या कडेच ठेवले होते पुढे दिल्ली दरबारातील कारस्थानाना कटाळून त्याने दिल्ली सोडली व इ स १७२४ साली तो दक्षिणेत परत आला बादशहाचा सरदार मुबारिजखान याने त्याच्या आगमनाला विरोध केला साखरखेडा येथे त्या दोघांची लढाई झाली तिच्यात मुबारिजखान मारला गेला मग निजामुलमुल्काने दक्षिणेत आपले स्वतंत्र राज्यच स्थापले मोगल बादशहाचे वर्चस्व ता नावापुरतच मानी आणि स्वतंत्रपणे कारभार करी


निजामुलमुल्क

दक्षिणेचा सुभा त्या काळी खूपच विस्तृत होता सध्याचा विदर्भ, हैदराबाद, औरंगाबाद, बीदर, खानदेश, नासिक, नगर, सोलापूर, विजापूर, धारवाड, बेळगाव व रायचूर हे जिल्हे, सगळा आंध्र प्रदेश, त्रिचनापल्लीपर्यंतचा तमिळ प्रांत आणि म्हैसूरचा बराच भाग एवढा फार मोठा भू प्रदेश निजामाने आपल्या अंकित केला होता त्याला प्रबळ प्रतिस्पर्धी भेटले ते मराठे त्यांना नामोहरम करण्यासाठी निजामाने साम, दाम, दंड, भेद हे सब उपाय करून पाहिले पण बाजीरावाच्या पुढे त्याचे काही चालले नाही बाजीरावाने इ स १७२८ मध्ये पालखेड येथे त्याच्याशी झुंज देऊन त्याचा पराभव केला आणि त्याच्याकडून चौथाई सरदेशमुखीचा हक्क मान्य करून घेतला

निजामाने बादशहाकडून गुजरात, माळवा, आग्रा हे सुभेही आपल्या नावाने करून घेतले होते पण इ स १७३६ त बाजीरावाने माळवा जिंकला व इ स १७३७ त दिल्लीवरही स्वारी केली त्या वेळी बादशहाच्या बोलावण्यावरून निजाम दिल्लीला गेला व तिथून मोठी फौज घेऊन परत निघाला पण बाजीरावाने त्याला भोपाळ येथे कोंडून त्याचा पुनश्च पराभव केला याच सुमारास नागपूर, चांदा, भंडारा, वर्धा हे जिल्हे नागपूरकर भोसल्यानी त्याच्याकडून जिंकून घेतले इ स १७४० मध्ये मराठ्यानी खानदेशातील काही भागही जिंकून घेतला

इ स १७४८ साली निजामुलमुल्क मरण पावला, तेव्हा त्याचा दुसरा मुलगा नासिरजंग हा निजाम झाला त्याचा भाचा मुजफ्फरजंग याने अर्काटच्या चंदासाहेबाची व फ्रेंचांचा मदत घेऊन नासिरजंगविरुद्ध मोठे बंड केले ते मोडण्यासाठी नासिरजंग दक्षिणेत गेला असता इ स १७५० मध्ये त्याच्या सैन्यातील पठाण सरदारानी त्याचा खून केला मग फ्रेंचानी मुजफ्फरजंगाला निजाम बनवले, पण पठाण सरदारानी त्यालाही ठार मारले (इ स १७५१) त्यानंतर फ्रेंचानी निजामुलमुल्काचा तिसरा मुलगा सलाबतजंग याला निजामाच्या गादीवर बसवले व गादी त्याच्या वंशात चालू केली

इ स १७५१ ते १७५८ या काळात फ्रेंच सेनापती बुसी याचे निजामावर जबरदस्त वजन होते पण इ स १७५२ मध्ये मराठ्यानी भालकी येथे सलाबतजंगाचा पराभव करून त्याच्याकडून खानदेश, जालना, संगमनेर, नासिक, त्र्यंबक हे प्रदेश घेतले त्याच सुमारास फ्रेंचांनी निजामाकडून पूर्व किनाऱ्यावरील विशाखापट्टण, राजमहेंद्री, मछलीपट्टण हे जिल्हे मागून घेतले पुढे अर्काट प्रांतात इंग्रज फ्रेंचांचा संघर्ष होऊन त्यात फ्रेंचांचा पराजय झाला आणि निजामाचा तिथला सुभेदार महमदअली पूर्णपणे इंग्रजांच्या आहारी गेला अशा रीतीने निजामाच्या दरबारातून फ्रेंचांचे वजन नाहीसे होताच मराठ्यानी निजामावर हल्ला करून उदगीरच्या लढाईत त्याचा पराभव केला (इ स १७६०) त्यामुळे अहमदनगर, बुऱ्हाणपूर, असीरगड, सोलापूर, विजापूर, दौलताबाद हे भाग मराठ्यांच्या ताब्यात आले

इ स १७६२ मध्ये निजामुलमुल्काचा चौथा मुलगा निजामअलीखान याने सलाबतजंगाला कैदेत टाकून स्वत गादी बळकावली त्यापुढील वर्षी सलाबतजंगाचा खून झाला पानिपतवरील मराठ्यांच्या पराजयाचा आणि पेशवाईतील भाऊबंदकीचा फायदा घेण्याचा प्रयत्न अलीखानाने करून पाहिला पण इ स १७६३ मध्ये मराठ्यांनी राक्षसभुवनच्या लढाईत त्याचा पराभव करून पानिपतोत्तर काळात त्याने बळकावलेला प्रदेश परत घेतला

त्यानंतर इ स १७७२ पर्यंत निजामअलीचे राजकारण सर्वस्वी मराठ्यांच्या तंत्राने चालले होते या काळात निजामअलीने अर्काटवरील हक्क सोडून दिला कर्नाटकात हैदरअलीची सत्ता प्रस्थापित झाल्यावर त्याने निजामाचे बल्लारी, अनंतपूर, कडप्पा, कर्नूल हे जिल्हे जिंकले पुढे मराठे व निजाम यानी टिपूवर स्वारी केली (इ स १७८५ ८७) नंतर मराठे, इंग्रज

व निजाम यानी मिळून टिपूवर चढाई केली (इ स १७९२) त्या वेळी हैदरअलीने घेतलेले प्रदेश निजामाला परत मिळाले इ स १७९५ साली मराठ्यानी खर्ड्याच्या लढाईत निजामाचा पराभव करून त्याच्याकडून मराठवाडा घेतला, पण सवाई माधवरावाच्या मृत्यूनतर झालेल्या गोधळात निजामाला मराठवाडा परत मिळवता आला

पुढे इग्रजाच्या आक्रमक राजकारणामुळे निजामाची सत्ता हळूहळू कमी होत चालली इ स १८०० मध्ये त्याने इग्रजाबरोबर तनाती फौजेचा तह केला व त्याचे स्वातत्र्य सपले

चाळीस वर्षे राज्य करून निजामअलीखान इ स १८०३ मध्ये वारला त्याच्या मागून त्याचा मुलगा सिकदरशहा हा गादीवर आला त्याची कारकीर्द (इ स १८०३ १८२९) व त्याचा मुलगा नासिरुद्दौला याची राजवट (इ स १८२९ १८५७) या कालखडात हैदराबादच्या राज्यात सर्वत्र अदाधुदी माजली राजा तोडरमल याच्या वशातील राजा चदूलाल हा इ स १८०८ पासून १८४३ पर्यंत हैदराबादचा जवळ जवळ सर्वाधिकारी होता त्याने राज्यकारभारात मुळीच लक्ष घातले नाही इग्रजाना खूष ठेवून, त्याच्याकरवी राज्यातील बडे मोडून काढणे याशिवाय त्याने दुसरे काहीही केले नाही

इग्रजाच्या तैनाती फौजच्या खर्चासाठी त्यानी निजामाकडून अनतपूर, बल्लारी, कडपा व कर्नूल हे जिल्हे घेतले होते त्यानी निजामाच्या सैन्यातही आपले अधिकारी घुसवले आणि आपल्या मनाप्रमाणे सैन्यभरती करून घेतली त्यामुळे ते सैन्य नावालाच निजामाचे राहिले त्यावर इग्रजाचा पूर्ण ताबा चालू झाला त्याचा खर्च मात्र निजामाला करावा लागे पण त्यासाठी त्याच्या खजिन्यात द्रव्य तरी होते कुठे ! म्हणून मग चदूलालने खूप कर्ज काढले व त्यासाठी राज्यातले काही सुपीक प्रदेश कर्जदाराना तोडून दिले इग्रजाप्रमाणे राज्यातील रोहिले, पठाण, इ सरदाराकडूनही त्यान कर्ज काढून त्याना भिन्न भिन्न तालुके लावून दिले मग ते लोक आपल्या हस्तकाकरवी शेतकऱ्याना बेसुमार लुटू लागले

इ स १८४३ मध्ये चदूलाल याला बडतर्फ करण्यात आले पण तरीही राज्यातील बजबजपुरी सपली नाही पुढे निजामी सैन्याच्या खर्चासाठी इग्रजानी निजामाकडून वऱ्हाड आणि रायचूर व उस्मानाबाद हे जिल्हे घेतले (इ स १८५३) लवकरच सालारजग हा निजामाचा मुख्य प्रधान झाला त्याने इ स १८८३ पर्यंत प्रधानकी चालवली इग्रजाशी सलोखा ठेवून त्याने राज्यात पुष्कळ सुधारणा केल्या तालुके, जिल्हे, सुभे असे त्याने राज्याचे व्यवस्थित भाग पाडले, कर्जापायी दिलेले प्रदेश सोडवले, मोजणी, महसूल, बाधकाम, न्याय, शिक्षण, इ खाती सुरू करून ती चालविण्यासाठी परप्रातातून तज्ञ माणसे आणली व अशा प्रकारे आधुनिक हैदराबाद सस्थानाचा पाया घातला त्याच्या धोरणीपणामुळे इ स १८५७ च्या क्राति-युद्धातून हैद्राबाद सस्थान वाचले

नासिरुद्दौला याच्या नतर त्याचा मुलगा अफजलुद्दौला (इ स १८५७–६९) आणि त्याच्या नतर त्याचा मुलगा महबूब अलीखान (इ स १८६९ – १९११) हे निजामाच्या गादीवर बसले इ स १९११मध्ये गादीवर बसलेला मीर उस्मान–अलीखान हा शेवटचा निजाम होय इ स १९४७मध्ये भारत स्वतत्र झाल्यावर हैदराबाद सस्थानात रजाकारानी प्रजेवर अत्याचार सुरू केल्यामुळे १९४८ मध्ये भारत सरकारने पोलिस कारवाई करून ते सस्थान भारतीय सघराज्यात समाविष्ट केले आणि निजामाची सत्ता कायमची समाप्त केली या कामी सरदार पटेल यानी खबीर धोरण स्वीकारून भारतीय सघराज्याच्या हृदयातले हे शल्य कायमचे काढून टाकले



शेवटचा निजाम मीर उस्मान अलीखान

वेरूळ, अजटा, तुळजापूर, पैठण, आबे जोगाई, माहूर, समर्थांचे जाबगाव, इ प्रसिद्ध स्थळे निजामाच्या राज्यात होती मराठ्यानी पजाब, दिल्ली, बगाल, गुजरात, तजाऊर, त्रिचनापल्ली येथपर्यंत प्रदेश पादाक्रात केले, पण त्यानी महाराष्ट्राच्या या मूलस्थानावर निजामाचे राज्य कसे चालू दिले, याचे सामान्य माणसाला आश्चर्य वाटते त्या बाबतीत कोणी मराठ्याच्या दयाबुद्धीला दोष देतो, तर कोणी निजामाच्या वतबगारीला श्रेय देतो पण ही दोन्ही कारणे खरी नाहीत मराठ्यातील भाऊबदकी हेच त्याचे कारण आहे निजामाने कोल्हापूर व सातारा या दोन्ही मराठी सत्ताशाखातील कलहाचा पुरेपूर फायदा घेतला थोरले बाजीराव, सदाशिवराव भाऊ व थोरले माधवराव यानी निजामाचा प्रत्येक वेळी पराभव

करून त्यांच्या ताब्यातील प्रदेश परत मिळवला होता पण राघोबादादा, नागपूरकर भोसले वगैरे मराठे सरदार हेच अनेकदा निजामाला मिळाल्यामुळे निजामाचे बळ कमी न होता वाढतच गेले पुढे हैदरअली हा प्रबळ शत्रू निर्माण झाल्यामुळे मराठ्यांना निरुपायाने निजामाशी सख्य करावे लागले माधवरावाच्या अकाली मृत्यूमुळेही निजामाचे चांगले फावले खर्ड्याच्या लढाईत निजामाचा पराभव होऊन जवळजवळ सगळा मराठवाडा मराठ्यांना मिळाला होता पण सवाई माधवरावाच्या मृत्यूने महाराष्ट्रात पुन्हा बेबंदशाही माजली आणि त्यामुळे मराठ्यांनी जिंकलेला बराच प्रदेश निजामाला परत करणे नाना फडणविसाला भाग पडले पुढे तर इंग्रजांनीच निजामाचे रक्षण केले त्यामुळे वऱ्हाड व मराठवाडा हे प्रदेश मराठ्यांना परत घेता आले नाहीत अशा प्रकारे निजामाचे सुदैव आणि मराठ्यांतील दुही या कारणांमुळेच निजामाचे राज्य दक्षिणेत टिकून राहिले [ महाराष्ट्र आणि मराठे – श्री सेतुमाधवराव पगडी, १९६३ ]

## निजामुद्दीन अवलिया

(१२३८ – १३२४ इ स ) एक मुसलमान धर्मप्रचारक सुल्तानुल मशाइख, महबूबे इलाही या अन्य नावांनीही याला ओळखतात



निजामुद्दीन अवलिया

याचा जन्म उत्तर प्रदेशात बदायू येथे झाला लहानपणीच याचा बाप निवर्तला त्यानंतर वयाच्या सोळाव्या वर्षी शिक्षणासाठी तो दिल्ली येथे ख्वाजा शमसुद्दीन ख्वारिज्मी याच्याकडे गेला त्यानंतर तो फरीदुद्दीन गंज ए शकर याचा शिष्य झाला आमरणपर्यंत तो दिल्लीतच राहिला

निजामुद्दिनाने हजारो धर्मप्रचारक तयार केले व त्यांना चिश्ती संप्रदायाच्या प्रचारासाठी भारतात सर्वत्र पाठवले त्याने स्वत ही बंगाल, बिहार माळवा व दक्षिण भारत या भागात धर्मप्रचार केला हजारो हिंदूंना त्याने बाटवून मुसलमान केले याने दोन प्रकारची ईश्वरोपासना सांगितली आहे पहिली उपासना व्यक्तिगत असून तिचे फल केवळ भक्तापुरतेच मर्यादित असते त्या उपासनेत प्रार्थना, नमाज पढणे, उपवास, यात्रा यांचा समावेश होतो दुसरी उपासना परमार्थपर असून, दुसऱ्यांना आर्थिक साहाय्य करणे व सूनमार्गावर त्या करणे या गोष्टी तिच्यात अंतर्भूत होतात

निजामुद्दिनाची धर्मवचने पुढील चार ग्रंथांत आढळतात– (१) ख्वाजा हसन सजरीचे फवायिदुल फुवाद (२) अमीर खुसरोचे फुवाद (३) एका अप्रसिद्ध ग्रंथकाराचे राहतुल मोहब्बीन आणि (४) ख्वाजा सय्यद महमद मुबारकचे सरूल अवलिया त्यात चिश्ती संप्रदायाची तत्त्वे चर्चिली आहेत हा उपदेश संग्रह अत्यंत पवित्र मानला जातो [ सू स , हिं वि को ]

## निजामुद्दीन औरंगाबादी (शाह)

(१६५०–१७२९ इ स ) चिश्ती संप्रदायातील एक विख्यात संत याचा जन्म उत्तर प्रदेशात काकोरीजवळ सिरका येथे झाला तिथे प्राथमिक अध्ययन पूर्ण झाल्यावर तो दिल्लीला गेला व तिथे शाह कलीमुल्ला याचा अनुयायी बनला पुढे तो धर्मप्रचारासाठी दक्षिणेत आला व औरंगाबाद येथे स्थायिक झाला त्याने ते चिश्ती संप्रदायाचे केंद्रच बनवले याने रहस्यवादावर निजामुलकुलब नावाचा ग्रंथ लिहिला आहे याच्या धर्मप्रवचनाचा संग्रह अहसानुल शमाईल या नावाने प्रसिद्ध असून, त्याची हस्तलिखित प्रत हैदराबाद येथील सालारजंग म्युझियममध्ये ठेवलेली आहे [ हिं वि को ]

## नितुंद

पिशाचाचा एक वर्ग विष्णू पुराणात यांना नितुंदक म्हटले आहे यांचे पोट दोंदिल, नाक लांब व शरीर ठेंगणे असते हे पिशाच तीळ खातात [ पु इ ]

## नित्यकर्म

' करणे चित्तशुद्ध्यतिरिक्तफलाननुबन्धित्वे सति अकरणे प्रत्यवायानुबन्धित्वम ' = केले असता ज्याचे फल चित्तशुद्धीहून अधिक मिळत नाही, पण न केल्याने मात्र दोष लागतो, ते नित्यकर्म होय, असे त्याचे लक्षण सांगितले

आहे उदा० ब्राह्मणाला संध्या व गायत्रीजप ही नित्यकर्मे आहेत नित्यकर्मे प्रातःकालापासून रात्रीपर्यंत काही ना काही करायची असतात दिवस व रात्र यांचे आठ प्रहर कल्पिले असून, त्या प्रत्येक प्रहरात कोणतेतरी नित्यकृत्य सांगितलेले असते ब्राह्म मुहूर्तावर शयनस्थानावरून उठणे इथपासून नित्यकर्मांचा प्रारंभ होतो मग प्रातःस्मरण, शौचादी कृत्ये, स्वाध्याय, पंचमहायज्ञ, भोजन, अध्ययन, लोककार्य अशी त्यांची नामावली आहे काही नित्यकर्म सर्वसामान्य असतात, तर काही वर्णविशिष्ट व आश्रमविशिष्ट असतात नित्यकर्मांत पंचमहायज्ञांचाही समावेश होतो संध्या, अग्निकार्य इ ब्राह्मणाची नित्यकर्मे असून, ती केल्याने मनुष्याच्या रोजच्या पापाचा क्षय होतो व ती न केल्याने मनुष्य पापी व पतित होतो, असेही म्हटले आहे आजारी असता व आशौचात असता मात्र नित्यकर्मे करायची नसतात पाहा – कर्म

## नित्यप्रलय

चतुर्विध प्रलयांपैकी एक प्रलय विष्णु पुराणात (१ ७) याची व्याख्या दिली आहे, ती अशी– 'नित्य सदैव जातानां यो विनाशो दिवानिशम । ' = जन्मलेल्या प्राण्यांचा रात्रदिवस जो सातत्याने ह्रास चालू असतो, त्याला नित्यप्रलय असे म्हणतात

सृष्टी जशी नित्य आहे, त्याचप्रमाणे प्रलयही नित्य आहे, असे पुराणात सांगितले आहे सृष्टीतील सर्व प्राणी किंवा पदार्थ क्षणाक्षणाला जन्म घेत असतात आणि क्षयही पावत असतात अशा रीतीने या जगात सृष्टी व प्रलय हे नित्य होत राहतात सृष्टीतले हे परिणाम पावणारे पदार्थ नदीच्या प्रवाहाप्रमाणे किंवा दीपशिखेप्रमाणे प्रतिक्षण बदलत असतात पण हे परिवर्तन अत्यंत सूक्ष्म असल्यामुळे आपल्या दृष्टीला कळत नाही आकाशातील तारे सतत फिरत असतात, पण त्यांची गती जशी स्पष्टपणे प्रतीत होत नाही, तसेच प्राण्यांमधले परिवर्तनही स्पष्टपणे कळत नाही भगवंताची स्वरूपभूत असलेली अनादी आणि अनंत अशी कालशक्ती ते परिवर्तन घडवीत असते [ श क , पु वि ]

## नित्यरसी व्रत

एक जैन व्रत व्रतावधी एक वर्ष रविवारी मीठ, सोमवारी हिरवे फळ, मंगळवारी गोड, बुधवारी तूप, गुरुवारी दही, शुक्रवारी दूध आणि शनिवारी तेल वर्ज्य करणे असा याचा विधी आहे व्रतकाळात ' ओं ऱ्हीं श्री अर्हं नमः ' या मंत्राचा त्रिकाल जप करतात एक वर्षभर हे व्रत करणे शक्य नसल्यास, एक महिनाभर, दोन महिने किंवा अधिक काळ ते केले तरी चालते [ जै व्र वि स ]

## नित्यविहार

वैष्णवांच्या रसिक संप्रदायात नित्यविहार हा शब्द फार प्रसिद्ध आहे हा नित्यविहार म्हणजे श्रीकृष्णाचा राधेसह वृंदावनातला विलास होय श्रीकृष्णाचा हा विहार अखंड अविच्छिन्न चालू आहे, अशी रसिक भक्तांची धारणा आहे म्हणून त्याला त्यांनी नित्यविहार असे नाव दिले आहे, हा सफल होण्यासाठी राधावल्लभ संप्रदायात नित्यकिशोरी राधा, नित्यकिशोर कृष्ण, नित्यकिशोरी सहचरी व नित्यधाम वृंदावन अशी चार तत्त्वे आवश्यक मानलेली आहेत

नित्यविहार म्हणजे केवळ कृष्णाची रतिक्रीडा नसून ते दिव्य आनंदाचे उद्घाटन करणारे रूपक आहे असे रसिक संप्रदायातले तत्त्वज्ञ मानतात उच्च मनोभूमिकेवर आरूढ होऊन करायची ती एक मधुर साधना आहे ती एक अनिर्वचनीय अशी रसदशा आहे या दशेला प्राप्त झाल्यावर जीवात्म्याला अपरिमित आनंद मिळतो, त्याला अन्यत्र कोठे चैन वाटत नाही आणि त्याला कधी रसनिधान श्रीकृष्णाचा वियोगही होत नाही [ रा स सि सा ]

## नित्यश्राद्ध

एक श्राद्धप्रकार हे श्राद्ध नित्य करायचे असते रोज सहा किंवा निदान एका ब्राह्मणाला तरी भोजन घालणे, एवढाच याचा विधी आहे यात क्षण देणे, स्वधाकरण पिंडदान, होम, दक्षिणा, वैश्वदेव, इ कृत्ये नसतात सर्वसाधारणपणे रात्रीच्या वेळी श्राद्ध करीत नाहीत, पण दिवसा न जमल्यास मात्र हे श्राद्ध रात्रीही केले तरी चालते नित्य करायचे असल्यामुळे यात विधीची जटिलता न ठेवता, हे अगदी सोपे केले असावे [ ओ वे रि अँ इ ]

## नित्या

एक तांत्रिक देवता हिचे ध्यान पुढीलप्रमाणे आहे– अर्धचंद्रयुक्त मुकुट धारण करणारी, देवांना वंदनीय, कमल, पाश, खड्‌ग व पूर्ण कपाल धारण करणारी, रक्तचंदनाची उटी लावणारी, कमरपट्टा घालणारी, त्रिनेत्र आणि मदाने जिची अंगे विव्हल झाली आहेत, अशी जी नित्या नामक शिवपत्नी तिचे ध्यान करावे (तंत्रसार) हिच्या नावाचे एक तंत्रही आहे पाहा – तंत्रशास्त्र [ श क ]

## नित्या क्लिन्ना

एक शाक्त देवता हिचे वर्णन असे – रक्त वस्त्रा, त्रिनेत्र, शशिकलाधारिणी, चतुर्भुज व पाश, अंकुश, चषक धारण करणारी, चौथ्या हाताची अभयमुद्रा आणि कमलावर बसलेली [ श्रीविद्यार्णवतंत्र ]

## नित्यानंद

(इ स चे १७ वे शतक) एक ज्योतिषशास्त्रज्ञ हा कुरुक्षेत्राजवळच्या इंद्रपुरी नामक गावी राहत

असे तो मुद्गलगोत्री गौड ब्राह्मण होता, असे सांगतात.

याने सिद्धांतराज हा ज्योतिषशास्त्रावरचा ग्रंथ रचला असून, त्याचे गणिताध्याय व गोलाध्याय असे मुख्य दोन भाग आहेत. पहिल्या भागात मीमांसा, मध्यम, स्पष्ट, त्रिप्रश्न, चंद्रग्रहण, सूर्यग्रहण, शृंगोन्नती, भग्रहयुती व छाया असे नऊ अधिकार आहेत. गोलाध्यायात भुवनकोश, गोलबंध, यंत्र असे अधिकार आहेत. हा ग्रंथ सायनमानाचा आहे. यात ग्रहांचे बीजसंस्कारही सांगितले आहेत. पंचांगादी गणितात या ग्रंथाचा प्रत्यक्ष उपयोग कधी होत असे, की काय हे समजत नाही, असे श्री. शं. बा. दीक्षितांचे म्हणणे आहे. [ भा. ज्यो. शा., भा. ज्यो. इ. ]

## नित्यानंदप्रभू

(१४७३–१५४२ इ. स.) बंगालमधील एक वैष्णव संत. यांचे संक्षिप्त नाव निताई असे होते. याचा जन्म वीरभूम जिल्ह्यातील एकचक्रा गावी झाला. हा चैतन्यप्रभूंचा मोठा भाऊ होता. याचे पहिले नाव विश्वरूप असे होते.

वयाच्या १६ व्या वर्षीच विरक्त होऊन याने घर सोडले. अनेक वर्षे तो तीर्थयात्रा करीत हिंडला. शेवटी माधवेन्द्रपुरी नावाच्या माध्व संन्याशाकडून त्याने दीक्षा घेतली. पुढे तो जेव्हा नवद्वीपात पोचला, तेव्हा त्याची व चैतन्याची भेट झाली व तो त्याचा सहकारी बनला. या दोघांची जोडी इतकी एकरूप झाली, की गौडीय वैष्णव संप्रदायात ते दोघे बलराम व कृष्ण यांचे अवतार मानले गेले. दोघांच्या जोडनावाचा निताई–गौर असा जयजयकार होऊ लागला.

चैतन्यप्रभू नीलाचलावर गेला, तेव्हा नित्यानंदही त्याच्याबरोबर होता. त्या वेळी चैतन्याने त्याला विनंती केली, की 'तू गृहस्थ बनून कामरूप देशात वैष्णव धर्माचा प्रचार कर.'

चैतन्यप्रभूंची ती आज्ञा नित्यानंदाने मानली. मग सूर्यदास पंडिताच्या दोन कन्या वसुधा व जान्हवी यांच्याशी त्याने विवाह केला. बंगालमध्येच राहून त्याने वैष्णव भक्तीचा महिमा वाढवला. चैतन्याच्या पश्चातही त्याने बंगीय वैष्णवांची संघटना बळकट केली. या दोघांच्या परिश्रमाचे फळ म्हणून नवद्वीप हे गौडीय भक्तांचे प्रमुख तीर्थस्थान बनले.

नित्यानंदाच्या मृत्यूनंतर त्याची पत्नी जान्हवीदेवी व पुत्र वीरचंद्र यांनी बंगीय वैष्णवांचे नेतृत्व केले. **पाहा** – चैतन्य महाप्रभू. [ चै. म. श्र. सा. ]

## निदानकथा

पाली भाषेतील गौतम बुद्धाचे चरित्र. बद्ध किंवा सुसंगत असा निदान शब्दाचा अर्थ होतो. निदानकथा या तशा आहेत. जातककथांच्या भाष्यावरील प्रास्ताविक भाग, या स्वरूपात त्या ग्रथित केलेल्या आहेत. परंतु कथांच्या लेखकाचा उल्लेख मात्र कुठेच आढळत नाही. गौतम बुद्धाने सुमेध ब्राह्मणाच्या रूपाने घेतलेल्या पहिल्या जन्मापासून त्याला बुद्धत्व प्राप्त होईपर्यंतच्या कथा यात आलेल्या आहेत.

निदानकथांचे दूरे निदान, अविदूरे निदान व संतिके निदान असे तीन विभाग आहेत. दूरे निदानाला सुमेध ब्राह्मणाच्या कथेने आरंभ होतो. ती कथा अशी –

फार फार पूर्वीची गोष्ट. त्या काळी गौतम बुद्ध हा अमरावती नगरीत एका ब्राह्मणकुलात जन्मला. सुमेध हे त्याचे नाव होते. तो ल्हान असतानाच त्याचे आईबाप निवर्तले. त्या दुर्दैवी घटनेमुळे सुमेधाला वैराग्य उत्पन्न झाले. त्याने गृहत्याग करायचे ठरवले. त्याची वडिलार्जित जी संपत्ती होती, ती गोरगरिबांना वाटून त्याने अकिंचन अवस्थेत हिमालयाचा मार्ग धरला. तिथल्या धम्मिक नामक शिखरावर पर्णकुटी बांधून तो तिथे ध्यान चिंतनात निमग्न झाला. तो विचार करू लागला 'जगात दुःख आहे, तसेच त्याला विरोधी असे सुखही आहे. उष्ण आहे. त्याप्रमाणे त्याचा उपशम करणारे शीतही आहे. मग भवाचा (जन्म) प्रतिपक्षी असा विभव (मोक्ष) तरी का असू नये? असलाच पाहिजे. मी त्याचा मार्ग शोधून काढीन.'

सुमेधाने त्या विचाराने उग्र तप आरंभिले. त्या तपाने त्याला गगनसंचाराची सिद्धी प्राप्त झाली. मग तो लोकस्थिती पाहण्यासाठी गगनमार्गाने संचार करू लागला. अशा एका संचारात त्याला एका नगरात काही तरी गडबड व धावपळ सुरू असल्याचे दिसले. जिज्ञासेने तो खाली उतरला. तिथले लोक रस्ते झाडत होते, त्यावर सडा घालत होते, पताका लावत होते, रस्त्यावर लाह्या व फुले उधळत होते आणि पूर्ण कलश आपापल्या घरापुढे स्थापत होते. तिथल्या आबालवृद्धांना अपार आनंद झाला होता. सुमेधाने त्यांपैकी एकाला विचारले, की 'ही सारी नगरशोभा कशासाठी आहे?' त्यावर तो गृहस्थ म्हणाला 'आज दीपंकर बुद्ध या नगरीत येणार आहे आणि त्याच्या स्वागतासाठी आम्ही हे सर्व करीत आहोत.'

एवढ्यात आपल्या शिष्यांसह दीपंकर बुद्धाचे आगमन झाले. सर्व लोकांनी त्याचा जयजयकार केला. दीपंकर बुद्धाची ती प्रसन्न मूर्ती पाहून सुमेधाच्या मनात त्याच्याविषयी भक्तिभाव जागृत झाला. तो आपल्या जटा खोलून दीपंकराच्या मार्गात आडवा पडला. हेतू हा, की त्या बुद्धाचे पवित्र चरण आपल्या देहाला लागावे. ती त्याची इच्छा पूर्ण झाली. सुमेधाला पाहून दीपंकर बुद्धाच्याही मनात काही दिव्य स्फूर्ती प्रगटली. त्याला भविष्यार्थ दिसला. तो लोकांना म्हणाला 'लोकहो, पाहा या

सुमेध तापसाकडे हा बुद्धबीज आहे, हा बुद्धांकुर आहे, भावी काळात हा बुद्ध होणार आहे '

लगेच सर्व लोकांनी सुमेधाचाही जयजयकार केला त्याच क्षणी सुमेधाच्या पुढे दहा पारमिता प्रकट झाल्या त्यांना पाहून सुमेध म्हणाला ' मी या पारमिता आत्मसात करीन भावी काळात बुद्ध होईन आणि भवतापतप्त जीवांना खऱ्या सुखाचा मार्ग दाखवीन मला आता दीपंकर बुद्धाचा आशीर्वाद मिळाला आहे '

यानंतर तो तुषित नामक स्वर्गात बोधिसत्त्व म्हणून जन्म घेतो, या ठिकाणी हा भाग संपतो

अविदूरे निदानात प्रारंभी बोधिसत्त्व हा तुषित स्वर्गाचा स्वामी असल्याचे सांगितले आहे तिथे देवांनी त्याला बुद्ध म्हणून पृथ्वीवर जाण्याविषयी प्रार्थना केली बोधिसत्त्वाने त्यांच्या विनंतीचा स्वीकार केला मग तो आपले माता पिता, परिवार, आयुमर्यादा स्थान आणि समय यांची स्वतःच निवड करून गौतम या रूपात भूतलावर अवतरला त्या जन्मात त्याने बोधी (ज्ञान) मिळवून बुद्धत्व प्राप्त करून घेतले एवढा भाग अविदूरे निदानात आला आहे

संतिके निदानात बुद्धाला बुद्धत्व प्राप्त झाल्यानंतरच्या सात आठवड्यांतील घडामोडी दिलेल्या आहेत बुद्धत्व प्राप्त झाल्यानंतर बुद्धाने एक आठवडा चिंतनात घालवला प्रथम तो आपल्याला झालेल्या ज्ञानाचा लोकांना उपदेश करावा का नाही, या संभ्रमात पडला होता पण नंतर त्याने तसा उपदेश करायचे ठरवले त्यानंतर वाराणसीत जाऊन त्याने धम्मचक्रप्रवर्तन केले, इथपासून, अनाथपिंडिक नावाच्या व्यापाऱ्याने त्याला जेतवन विहाराचे दान केले, इथपर्यंतचा भाग संतिके निदानात आला असून, तिथेच निदानकथा विराम पावली आहे

निदानकथेत एकामागून एक अशा चोवीस (काहींच्या मते एकवीस) बुद्धांच्या कथा दिलेल्या आहेत

सनपूर्व पहिले शतक ते इ स चे पहिले शतक एवढा निदानकथाचा रचनाकाल आहे

बुद्धवंश, चरियापिटक, महावग्ग, जातके, सुत्तनिपात, दीघनिकाय, धम्मपद, इ ग्रंथांवर या निदानकथा आधारलेल्या आहेत [ निदानकथा, आजकल वार्षिक अंक, डिसेंबर १९५६ ]

## निदानसूत्र

सामवेदाचे एक सूत्र, याचे दहा प्रपाठक असून, त्यामध्ये सामगानात येणाऱ्या छंदाविषयीचा विचार केलेला आहे सायणाचार्यांच्या मते हे सूत्र पतंजलीने रचले असावे पतंजलीच्या नावावर सामवेदाची एक शाखाही आहे कदाचित हे सूत्र त्या शाखेचे असावे निदानसूत्राप्रमाणेच उपनिदानसूत्र म्हणूनही एक सूत्र उपलब्ध आहे [ श्री भिडे ]

## निदिध्यासन

आत्मज्ञानाचे एक साधन 'आत्मा वा अरे श्रोतव्यः मन्तव्यः निदिध्यासितव्यः ' = आत्म्याचे श्रवण, मनन व निदिध्यासन करावे, असे बृहदारण्यक उपनिषदात सांगितले आहे

निदिध्यासनाची व्याख्या अशी–' विजातीयप्रत्ययतिरस्कारेण सजातीयप्रत्ययप्रवाहीकरणं निदिध्यासनम्' = विजातीय वृत्तीचा तिरस्कार करून सजातीय वृत्तीचा प्रवाह एकसारखा चालू ठेवणे, हे निदिध्यासन होय देहादिकांच्या ठिकाणी आत्मभावना करणे, ही विजातीय वृत्ती असून मी ब्रह्म आहे, अशी भावना ही सजातीय वृत्ती होय निदिध्यासनाने देह हाच आत्मा आहे, ही विजातीय भावना नष्ट होते [ वे शा अ ]

## निद्रा

योग 'मेध्यामनःसंयोग ' = मेध्या नामक नाडी व मन यांचा संयोग म्हणजे निद्रा होय, असे तिचे लक्षण सांगितले आहे

प्राचीन ऋषींनी निद्रेबाबत काही विचार प्रगट केले आहेत उपनिषदात एके ठिकाणी निद्रेची जी मीमांसा दिली आहे, ती अलिकडच्या शारीरशास्त्रात दिलेल्या श्रमवादाशी तंतोतंत जुळणारी आहे गृध्र अथवा दुसरा एखादा पक्षी आकाशात संचार करून दमला, की तो आपले पंख मिटून विश्रांतीसाठी आपल्या घरट्याकडे धाव घेतो, तद्वतच हा पुरुष (दिवसभराच्या श्रमाने दमला–भागला, की) गाढ निद्रेचा आश्रय करतो त्या गाढ निद्रेत तो कोणत्याच विषयाची इच्छा करीत नाही व त्याला कसले स्वप्नही पडत नाही

सर्व इंद्रिये मनात लीन झाली असता झोप येते आणि त्या वेळी माणसाला ऐकू येत नाही, दिसत नाही व कशाचा वासही येत नाही, असे प्रश्नोपनिषदात निद्रेविषयी सांगितले आहे याच उपनिषदात पुढे ' मन प्रकाशसागरात निमग्न झाल्यामुळे मनुष्याला निद्रा येते ' असे म्हटले आहे

छांदोग्य उपनिषदात निद्रेचे एक निराळेच कारण दिले आहे, ते असे– जेव्हा मनुष्याला गाढ झोप लागते व स्वप्न पडत नाही, तेव्हा त्याचा आत्मा नाडीमध्ये प्रविष्ट झालेला असतो निद्रेची हीच मीमांसा बृहदारण्यकात थोड्या विस्ताराने सांगितली आहे प्राचीन ऋषींच्या मताप्रमाणे शारीरशास्त्रदृष्ट्या झोप कशी येते, ते तिथे सांगितले आहे प्रत्येक मनुष्याच्या शरीरात हृदयापासून पुरीतत नाडीकडे वाहणाऱ्या ७२००० रक्तवाहिन्या असून, मनुष्याचा आत्मा जेव्हा हृदयातून निघून रक्तवाहिन्यांच्या द्वारे पुरीततामध्ये येतो, तेव्हा

त्याला गाढ झोप येते हीच कल्पना याय दशनात अधिक स्पष्टपणे माडली आहे ज्या वेळी आत्मा पुरीतत नाडीत प्रवेश करतो, त्या वेळी त्या अवस्थेस सुषुप्ती असे म्हणतात ज्या वेळी तो हृदय व पुरीतत याच्यामध्ये अखड फिरत राहतो, तेव्हा त्या अवस्थेला जागृतावस्था असे म्हणतात, असे नैयायिकाचे मत आहे

मन जेव्हा प्राणाच्या ठिकाणी म्हणजे श्वासात लीन होते, तेव्हा मनुष्याला झोप येते, असेही छादोग्य उपनिषदात सागितले आहे

निद्रा ही ब्रह्मदेवाचे स्त्रीरूप असून, समुद्रमथनातून तिची उत्पत्ती झाली, असे तिच्याविषयी पौराणिक मत आहे

निद्रेविषयी काही विधि निषेध सागितलेले आहेत, ते असे— पाय ओले असताना, डोके उत्तरेला किंवा पश्चिमेला करून, मुळईच्या खाली, उघड्या जागी, पलाश वृक्षाच्या किंवा वडयाली पाणी घालून वाढविलेल्या वृक्षाच्या पलगावर, देवळात, रिकाम्या घरात, स्त्रियाच्या घोळक्यात, लोकाच्या समुदायात, धान्याच्या राशीवर, गाईच्या गोठ्यात, घाणेरड्या जागी, पर्वतमाथ्यावर स्मशानात आणि विवस्त्र अवस्थेत झोपू नये, असे विष्णुधर्मसूत्रात सागितले आहे याचप्रमाणे एकादशी, श्रावणी सोमवार, श्रावणपौर्णिमा, गोकुळाष्टमी, दसरा, इ दिवशी दुपारी, तसेच तीर्थस्नानापूर्वी, पुराण ऐकताना, गुरूची सेवा करताना आणि दिवसा झोपू नये, असेही शास्त्रवचन आहे

झोपण्यापूर्वी आराध्य देवतेला नमन करावे आणि अथरुणालगत काठी ठेवावी असे स्मृत्यर्थसार सागते मस्तकाजवळ पूर्णकुभ ठेवावा आणि रात्रिसूक्त म्हणून झोपी जावे, असे रत्नावलीत म्हटले आहे

> अगस्तिर्माधवश्चैव मुचकुदो महाबल ।
> कपिलो मुनिरास्तीक पञ्चैते सुखशायिन ॥

अर्थ— अगस्ती, माधव, महाबळी मुचकुद, कपिल व आस्ती कमुनी हे पाच सुखशायी आहेत

या सुखशायीचे स्मरण करून निजावे, असे सागितले आहे साधू, ब्रह्मचारी, वानप्रस्थ व विधवा यांनी पलगावर न झोपता जमिनीवर मृगाजिन अथरून त्यावर झोपावे, असे वृद्ध हारीताने म्हटले आहे

निद्रेच्या काळात मनुष्याच्या नाक डोळे, इ इद्रियातून मलोत्सर्ग होत असतो म्हणून निद्रावस्था ही अशुद्ध मानली जाते त्यासाठी झोपेतून उठल्यावर हात, पाय, तोड वगैरे अवयव स्वच्छ धुवाव, असे सागितले आहे

शरीराच्या निरनिराळ्या क्रिया करणाऱ्या इद्रियाना विश्रातीची गरज असते आणि ती विश्राती त्याना निद्रेत मिळते कारण त्या वेळी कुठल्याही विषयाचे भान होत नाही याच कारणामुळे निद्रेला मृत्यूचे धाकटे भावड असे म्हटले आहे [उ र, हि च, श र]

**निधिवन** एक प्राचीन नगर हे वृदावनात असून, हरिदासी सप्रदायाचे प्रमुख स्थान म्हणून प्रसिद्ध आहे गायनाचार्य तानसेन याचा गुरु स्वामी हरिदास याच गावी राहत होता त्याचे देहावसानही इथेच झाले मोगल सम्राट अकबर हा स्वामीच्या दर्शनासाठी व त्याचे गायन ऐकण्यासाठी तानसेन बरोबर इथे आला होता हरिदासी सप्रदायाच्या अनेक आचार्यांच्या समाध्या या नगरात आहेत [भ सा इ]

**निधी** धनसचयाला निधी म्हणतात कुबेर हा धनाधिपती असून, सर्व निधीवर त्याची सत्ता असते लक्ष्मी ही सर्व निधीची अधिष्ठात्री देवता होय मार्कडेय पुराणात पद्मिनी नामक विद्येचे वर्णन केलेले असून त्यात पद्म, महापद्म, मकर, कच्छप, मुकुद, नदक, नील व शख या अष्ट निधीची माहिती दिली आहे सोने, चादी, इ मूल्यवान धातूचा व्यापार केल्यामुळे प्राप्त झालेल्या धनाला पद्मनिधी म्हणतात हा निधी पिढ्यानपिढ्या कायम राहतो, असा सकेत आहे माणिक, मोती, इ रत्नाचा क्रयविक्रय करून मिळविलेल्या सपत्तीला महापद्मनिधी म्हणतात ही सपत्ती सात पिढ्यापर्यंत पुरते विविध प्रकारची शस्त्रे विकून आणि शौर्य गाजवून मिळवलेल्या द्रव्यनिधीला मकरनिधी म्हणतात हा निधी तो मिळविणाऱ्या व्यक्तीलाच पुरतो अनेक उद्योग करून खूप पैसा मिळवला, तरी त्याचा स्वत उपभोग न घेता किंवा दुसऱ्या कोणाला न देता तो जर जमिनीत पुरून ठेवला तर त्याला कच्छप निधी म्हणतात हा निधीही एकाच व्यक्तीला पुरतो पूर्वजानी सचित केलेल्या आणि पैतृक दायभाग म्हणून मिळालेल्या निधीला मुकुद हे नाव आहे मित्रासह खाऊन पिऊन मौज करणे व बाला वताना मदत करणे यात अशा धनाचा विनियोग करावा, असे सागितले आहे सामत किंवा जहागिरदार याच्याजवळ जे सोन्याचादीचे व रत्नाचे भाडार असत, त्याला नदक महानिधी म्हणतात अशा निधीच्या मालकाला त्याचा खूप अभिमान वाटतो तो त्यातून आपल्या बाधवाचे पालन पोषण करतो व सर्व लोक त्याची स्तुती करतात, अशी त्याविषयीची धारणा आहे हा निधी सात पिढ्याना पुरतो, असे म्हणतात धान्य, लाकूड, इ पदार्थ आणि विविध वस्तूचा क्रयविक्रय करून मिळालेल्या सपत्तीला व मोती, शख, इ वस्तूच्या द्वारा प्राप्त धनाला नील निधी म्हणतात या निधीच्या मालकाने विहिरी, तळी, उद्याने

इ. निर्माण करावी व स्वत ही त्याचा उपभोग घ्यावा ही संपत्ती तीन पिढ्यांना पुरते जव्हा धनाचा मालक एकटाच त्याचा उपभोग घेतो, दुसऱ्या कोणाला, इतकेच नव्हे, तर पत्नी, पुत्र, भाऊ, स्नेही यानाही काही देत नाही, तव्हा त्या धनाला खर्व-निधी असे म्हणतात

या अष्ट निधीची कल्पना गुप्त काळात विकसित झाली कालांतराने खर्व नामक आणखी एका निधीची त्यात भर पडून नवनिधीची कल्पना लोकात व साहित्यात प्रचलित झाली

गुप्त धनाचा शोध लावण्याच्या कलेला निधिविद्या असे नाव आहे छांदोग्योपनिषदात तिचा निर्देश आहे ( ७ १ २ ) नारदाला ती विद्या अवगत होती या विद्याविषयी निधिप्रदीप नामक एक संस्कृत ग्रंथ असून, त्यात शकराला या विद्येचा प्रवर्तक मानले आहे

जमिनीत कुठे धन पुरलेले आहे, हे समजण्यासाठी असामान्य दृष्टीची आवश्यकता असते अशी दृष्टी प्राप्त होण्यासाठी एका विशिष्ट अंजनाचा उपयोगही सांगितलेला आहे गुप्त धन सापडले असता त्याचा चौथा भाग गुरूला द्यावा, असा त्या काळी दडक होता

असा निधी एखाद्याला मिळाल्यास त्याची कायदेशीर व्यवस्था कशी करावी, याविषयी मनूने पुढीलप्रमाणे सांगितले आहे—

एखादा भूमिगत निधी हा आपल्या मालकीचा आहे, असे एखाद्याने शपथेवर सांगितल्यास राजाने त्यातला सहावा किंवा बारावा भाग घेऊन उरलेला सर्व निधी त्याला द्यावा एखाद्याने सांगितलेली मालकी खोटी ठरल्यास राजाने त्याच्या जवळच्या धनापैकी अष्टमांश धन दंड म्हणून घ्यावे विद्वान ब्राह्मणाला असा निधी सापडल्यास त्याने तो सगळाच्या सगळा घ्यावा राजाला असा निधी सापडल्यास त्याने त्यातले अर्धे द्रव्य ब्राह्मणांना द्यावे आणि अर्ध आपल्या भांडारात जमा करावे विद्वान ब्राह्मणाव्यतिरिक्त एखाद्याला असा निधी मिळाल्यास राजाने त्यातले अर्ध धन घ्यावे (मनु ८ ३५ – ३९) [ प्रा गा लो घ , नवनीत (हिंदी), वर्ष ३, अंक १० ]

## निध्रुव काण्व

एक सूक्तद्रष्टा ऋग्वेदाच्या नवव्या मंडलातील त्रेसष्टावे सूक्त याच्या नावावर असले, तरी संबंध सूक्तात त्याचे नाव मात्र आढळत नाही हा कश्यप वंशातील अवत्साराचा मुलगा होय याच्या पत्नीचे नाव सुमेधा असे होते सोमस्तुती हा याच्या सूक्ताचा विषय आहे सोमाची स्तुती करीत असतानाच निध्रुवाने त्याच्याकडे अनेक गोष्टींची मागणी केलेली आहे या संबंधीच्या काही ऋचा अशा—

पुनान सोम धारयेन्दो विश्वा अप स्रिध ।
जहि रक्षांसि सुक्रतो ।।
अपघ्नन्त्सोम रक्षसोऽभ्यर्ष कनिक्रदत ।
द्युमन्त शुष्ममुत्तमम ।।

(ऋ ९ ६३ २८–२९)

अर्थ – हे पावन सोमा, हे आल्हादप्रदा तू यच्चयावत घातकी दुष्टांना पार उधळून लाव हे महापराक्रमी सोमा, राक्षसांना ठार मार राक्षसांचा निःपात करून हे सोमा, तू गर्जना करीत तेजस्वी व उत्कृष्ट अशी धडाडी तुझ्या प्रवाहाने आम्हांकडे आण

सोमरसात सर्व जग आयधर्मी करून टाकण्याची शक्ती आहे, असे याने सांगितले आहे [ प्रा च को ]

## निन्रसिर नेडुमार

तमिळनाडमधील त्रेसष्ट नायन्मार सतांपकी एक हा शूर आणि कर्तबगार राजा असल्याने याची कीर्ती सर्वत्र पसरली होती त्यातच त्याच्या उत्कट ईश्वरभक्तीचीही भर पडली आणि तो एक संत ठरला याच्या पाठीला कुबड होते ते कुबड तिरुज्ञानसंबंधर या प्रख्यात संताच्या कृपेने बरे झाले आणि हा नायन्मार बनला, असे परिय पुराणात सांगितले आहे

## निपट निरंजन

(१६२३–१७३८ इ स ) एक हिंदी संत कवी याचा जन्म बुंदेलखंडातील चंदेरी नामक गावात जिझोतिया जातीच्या गौड ब्राह्मण कुलात झाला याच्या मनावर लहानपणापासूनच धार्मिक संस्कार झाले होते लहानपणी संत दादू दयालाची भजने हा आवडीने गात असे याचे वडील याच्या लहानपणीच निवतले असावे इ स १६६३ मध्ये हा आपल्या वृद्ध मातेला बरोबर घेऊन बऱ्हाणपुरमार्गे औरंगाबादला आला आणि तिथेच राहू लागला याच सुमारास बुंदेलखंडातल्या ओरछाचा राजा महाराजा पहाडसिंह याने औरंगाबादेत पहाडपुरा नावाचा एक भाग वसविला होता आणि गावाबाहेर सोनेरीमहाल या नावाचा एक सुंदर वाडाही बांधला होता कदाचित या संबंधामुळेच निपट निरंजन बुंदेलखंड सोडून औरंगाबादला आला असावा

औरंगाबादला आल्यावर प्रारंभी त्याने औरंगपुऱ्यात एकनाथमंदिराजवळ चिलखते वगैरे बनविण्याचा छोटासा व्यवसाय सुरू केला परंतु चार दोन वर्षांतच त्याला हा व्यवसाय गुंडाळावा लागला नंतर त्याने बेगमपुऱ्यात एक लहानसे घर घेतले आणि तिथे पंचवीस तीस मजूर कामाला लावून एक लहानसा कारखाना चालू केला परंतु तोही फार काळ चालला नाही त्यामुळे निपट निरंजन निराश झाला

त्याच्या आईने मरणसमयी त्याला जवळ बोलावले आणि त्याला अखेरचा उपदेश केला 'देह नश्वर आहे, जीवन क्षणभंगुर आहे, म्हणून मानवाने आपले जीवन सार्थकी लावावे.'



निपट निरंजन

त्यानंतर लौकरच (इ. स. १६७७ मध्ये) त्याची आई मृत्यू पावली. पण आईच्या अंत्य क्रियेसाठीही निपट निरंजनाजवळ पैसे नव्हते. अशा वेळी शेजारीपाजारी यांची जी स्वाभाविक मदत मिळते, तीही निपट निरंजनाला मिळाली नाही. मग त्याने घराची लाकडे काढून हनुमान टेकडीजवळ चिता रचली आणि स्वतः च्या पाठीवरून आईचे शव वाहून नेऊन तिला अग्निसंस्कार केला. या घटनेचा निपट निरंजनावर विलक्षण परिणाम झाला. त्याने आईच्याच शवाची राख अंगाला फासली आणि त्या क्षणा पासून संपूर्ण विरक्त जीवन सुरू केले. या घटनेचा उल्लेख त्याच्या एका पद्यात आढळतो, तो असा–

> मालाका उपदेश भया, हमने फकिरी लिया,
> शहरको छोडके जंगल मन भाई है।
> राखे न पास छदाम, जपना अलख नाम,
> ये मालेमें चारो धाम गोकुल दिखाई है ॥

अर्थ – मला मातेने उपदेश केला आणि त्याला अनुसरून मी फकिरीचा स्वीकार केला व शहरात राहणे सोडून दिले. मला शहराऐवजी जंगल आवडू लागले आहे. मी द्रव्याचा संपूर्ण त्याग केला आहे. प्रभूच्या नावाचा जप सुरू केला आहे. त्यामुळे मला या माळेतच चारी धामांचे व गोकुळाचे दर्शन घडत आहे.

संपूर्ण विरक्तीचा स्वीकार केल्यानंतर निपट निरंजनाने योगसाधना सुरू केली. काही काळ केवळ दूध पाणी घेऊन, त्यानंतर काही काळ केवळ निंबाच्या पाल्याचा रस प्राशन करून आणि शेवटी तर काही काळ निराहार राहून त्याने योगाभ्यास केला. तीन वर्षेपर्यंत अशा प्रकारे कठोर योगसाधना केल्यानंतर त्याला मठाच्या जागेतच दत्तदर्शन झाले.

दत्तदर्शन झाले, तरी निपट निरंजनाचे मन स्वस्थ बनले नाही. गुरुबोधावाचून परमार्थ विफल आहे, याची त्याला जाणीव झाली आणि तो गुरुप्राप्तीच्या इच्छेने देवगिरीच्या परिसरातील संतांच्या संगतीत राहू लागला. त्या काळी देवगिरीच्या पायथ्याशी संत मानपुरी बाबाचा मठ होता. या मठात मानपुरी, हिरापुरी, गोपाळनाथ, उदासीबाबा इ. संतमंडळींचा मेळा नेहमी जमत असे. या मेळ्यातच निपट निरंजनाला गुरू लाभला. कोणा चर्पटनाथ नामक नाथपंथी साधूने त्याला देवगिरी येथे गुरुबोध केला. निपट निरंजनाने पुढील पदात या गुरुबोधाचे वर्णन केले आहे –

> देवगिरी देव पाया, सन्तन जमाव जहाँ,
> महाप्रसाद खाया, जो जगसे निराला है।
> संतनमें बारी बारी, सबको चढी खुमारी,
> भयभूलको निवारी, चरपट मोला है।
> निपटके पर खुले, निपट लियो है सब,
> गुरुकृपा भई जब, तीन लोकमें उजाला है।

अर्थ – मला देवगिरी येथे संतांच्या मेळ्यात देवाचा लाभ झाला. तिथे मला संतांबरोबर जगावेगळा महाप्रसाद मिळाला. सर्व संतांनी या प्रसादाचे वारंवार सेवन केल्यामुळे सर्वांनाच त्याची धुंदी चढली. चरपट नामक महात्म्याने माझे भवभय नष्ट केले, माझ्या दृष्टीवरील भ्रमाचे पटल दूर केले आणि माझे सर्व अनिष्ट निपटून टाकले. या अशा गुरुकृपेचा लाभ होताच मला सर्व त्रिभुवनात प्रकाश दिसू लागला.

गुरुबोधानंतर निपट निरंजनाच्या योगसाधनेला परम सिद्धीचे फल प्राप्त झाले. अष्टमहासिद्धी त्याच्या दासी बनल्या होत्या, असे त्याच्या चरित्रातील सिद्धिसामर्थ्याच्या अनेक कथांवरून दिसते. स्वतः औरंगजेब बादशहा त्याची कीर्ती ऐकून त्याला भेटण्यासाठी त्याच्या बागेत सपरिवार गेला होता आणि त्याचे योगसामर्थ्य पाहून आश्चर्यचकित झाला होता, असे सांगतात. या घटनेचे प्रत्यंतर निपट निरंजनाच्या रचनेतही मिळते. त्याने औरंगजेबाला केलेला प्रदीर्घ उपदेश उपलब्ध आहे. औरंगजेबाने निपट निरंजनाला काही नजराणा देऊ केला असता, त्याने दिलेले उत्तर पुढील पद्यात ग्रथित केलेले आहे –

दिल तो दरयाव ह, लाखो जहाँ मूगा मोती,
ऐसी दिन रन खेती, क्या लावे ले जावेगा ?
देनवाला एसा दता, जाता नहीं जो समेटा,
तेरा देना सारा खोटा, तू क्या हमें देवेगा ?
जिसने तुझे बनाया, उसीकाही माँग लाया,
भिखारी यहाँ भिखारी आया, कौन किसे देवेगा ?
कह निपट निरजन, सुनो आलमगीर !
बून्से जो गई वह, हौदसे न आवेगा ।।

अथ – हे आलमगीर, ऐक हृदय हा समुद्र आह त्यान लाखो माणिक–मोती पिकतात ही असली शेती रात्रदिवस पिकत असल्यावर मानव त्यातले किती घेऊन जाऊ शकेल ? तो देणारा प्रभू इतके देतो की ते आपल्या पात्रात सामावून घेणे अशक्य आहे अशा स्थितीत तुझे देणे खोटे आहे तू आम्हाला काय देणार ? ज्याने तुला बनविले आहे त्याच्याकडून तर तू हे सारे मागून घेतले आहेस भिकाऱ्याकडे भिकारी आल्यावर कोण कुणाला काय देणार ? बिदूने गेलेली प्रतिष्ठा पुढे हौदभर खर्च करूनही परत येत नाही

निपट निरजनाची वाणी ही अशी परखड आहे आलमगिराला केलेल्या उपदेशाशिवाय त्याने रचलेली अनेक पदे आणि थोडे दोहे प्रकाशित झाले आहेत त्याच्या सव रचनेत अनुभूतीची प्रगाढता आणि अभिव्यक्तीची स्पष्टता सहज जाणवून जाते [ निपट निरजन – प्रा भालचद्रराव तलग ]

## निपुण

पिशाचाचा एक वर्ग त्याचा वर्ण गडद पिंगट असून कान व नाक लोंबते असतात हे पिशाच दृश्य किंवा अदृश्य स्थितीत सचार करतात [ पु इ ]

## निबंध

नि + ब ध = बाधणे, यावरून हा श द बनला आह एखाद्या रचनाबद्ध लेखाला हे नाव आहे एखाद्या विषयाची विविध अगे सागून व त्यावरील भिन्न भिन्न मताचे खडन–मडन करून, त्यातून काही निष्कर्ष काढणे याला निबधरचना म्हणतात तथापि निबध या वाङ्मयप्रकाराची निश्चित व्याख्या करणे कठीण आहे, कारण त्याची विविध रूपे आहेत त्यातील कथात्मक, वणनात्मक आणि विवेचनात्मक ही रूपे प्रमुख होत पहिल्या प्रकारच्या निबधात पौराणिक, ऐतिहासिक किंवा काल्पनिक कथाचा उपयोग केलेला असतो दुसऱ्या प्रकारात निसर्गाचे किंवा एखाद्या प्रसगाचे वणन केलेले असते विवेचनात्मक निबधाचे विषय असख्य असतात अभ्यास, चिंतन, विश्लेषण व निगमन या गोष्टींना अशा निबधात विशेष महत्त्व असते

निबध हा अत्यत प्रभावी असा वाङ्मयप्रकार आहे समाजाच्या जीवनाशी व राष्ट्राच्या उत्कर्षापकर्षाशी त्याचा फार निकटचा सबध आहे इथे निबध हा शब्द व्यापक अर्थाने वापरलेला आहे तर्कशुद्ध रीतीने केलेली, बुद्धीला आवाहन करणारी, सव सिद्धात साधार व सप्रमाण माडणारी आणि इतिहास, अनुभव व अवलोकन याच्या पायावर उभारलेली विचारप्रधान रचना असा अर्थ इथे अभिप्रेत आह निबध दीघ असल, तर त्याला प्रबध म्हणतात

प्राचीन भारतीय साहित्यात निबधाचा उदय झाला होता की नाही, असल्यास त्याचे स्वरूप काय होते आणि त्याचा आपल्या राष्ट्रीय जीवनावर काय परिणाम झाला होता यासबधी डॉ पु. ग सहस्रबुद्धे यानी आपल्या 'निबधरचना व राष्ट्ररचना' या लेखात जे विवेचन केले आहे, ते असे–

प्राचीन सस्कृत वाङमयसागराकडे दृष्टी वळवताच हे ध्यानात येते, की निबधरचनेला अवश्य अशी जी अभ्यासपद्धती, ती निर्माण करण्यात सस्कृत पडितानी यश मिळवले होते प्रत्यक्ष अवलोकन करून ज्ञानकणाचे सकलन व वर्गीकरण करणे, तर्काने व कार्यकारणपद्धतीने त्याचा सबध निश्चित करून त्याची सुबद्ध रचना करणे व मग त्यावरून निर्णय करणे ही शास्त्रशुद्ध पद्धती भारतीय पडितानी शोधून काढून ज्ञानाच्या सर्व क्षेत्रात तिचा अवलब केला होता या अभ्यासपद्धतीमुळेच भाषाशास्त्र, व्याकरणशास्त्र, अर्थशास्त्र, राजनीतिशास्त्र, समाजशास्त्र आणि रसायन, पदार्थविज्ञान, गणित, ज्योतिष, वैद्यक, इ वस्तुशास्त्रे त्याना निर्माण करता आली साख्य योगादी दर्शनात प्रारभी ज्ञानप्राप्तीच्या साधनाचा विचार केलेला आढळतो आणि त्या साधनानी प्राप्त झालेल्या ज्ञानकणाचे वर्गीकरण केल्याचेही दिसून येते उपनिषदातील भिन्न विचार घेऊन त्याची शास्त्रशुद्ध माडणी दर्शनकारानी केली, त्याना तर्काचे अधिष्ठान प्राप्त करून दिले आणि त्यावर सूत्रे रचली ही भारतीय साहित्यातील प्राचीन निबधरचना होय

महाभारतातही अनेक ठिकाणी प्राचीन निबधाचे दर्शन घडते महाभारत हा ग्रथ स्वतत्र प्रज्ञेने रचलेला आहे शातिपर्वातील राजधर्म हे प्रकरण म्हणजे प्राचीन निबधरचनेचा एक चागला नमुना आहे त्यात परिस्थितीचे अवलोकन आहे, अनेक राजाचे अनुभव सागितले आहेत व पडिताची मते दिली आहेत वर्गीकरण, कार्यकारणभाव, तुलना, आक्षेप, खडन, मडन, आधार, प्रमाण हे सव काही त्यात आहे महाभारतातली श्रीकृष्ण, अर्जुन, भीम, द्रौपदी, भीष्म याची अनेक भाषणेही अशाच प्रकारची आहेत त्यात त्यानी आपले विचार रेखीव पद्धतीने माडलेले दिसतात

कौटिल्याचा अर्थशास्त्र हा ग्रंथ तर निबंधरचनेचे उत्तम उदाहरण होय. राज्यशास्त्र या संपूर्ण विषयाचा व्याप मनात आणून व त्याची सर्व अंगोपांगे निश्चित करून तो निबंध रचलेला आहे. त्यात राजनीतीच्या अंगोपांगांची मीमांसा आहे व त्यांचे पृथक्करणही आहे. त्यात कित्येक ठिकाणी कौटिल्याने आपल्या गुरूचे मत देऊन पुढे त्याचे खंडन आणि स्वतःच्या मताचे समर्थन केले आहे. मात्र त्याच्या या निबंधात तात्त्विक विवेचन फारसे आढळत नाही.

त्यानंतरच्या दोन सहस्र वर्षांत भारतात अशा प्रकारचा निबंधग्रंथ निर्माण झाला नाही. त्या काळातील सर्व ग्रंथरचना प्राचीन ग्रंथांवरील भाष्य, टीका, दीपिका अशा स्वरूपाचीच आहे. भाष्यकार हे मूळच्या तत्त्ववेत्त्याचे शिष्य व भक्त होते व आपल्या गुरूचा शब्द प्रमाण मानणारे होते. त्यामुळे सूत्राचा अर्थ समजावून सांगणे एवढेच काय त्यांनी केले. आद्य शंकराचार्यांनीही उपनिषदांवर केवळ भाष्य केले, स्वतंत्र ग्रंथ रचले नाहीत. लोकांच्या बुद्धीला आवाहन करावे व तर्काच्या आधारे प्रतिपादन करावे, ही वृत्तीच त्या काळातल्या लेखकांची नव्हती. धर्मशास्त्रातले सिद्धांत ठरलेले आहेत, ते फक्त लोकांना समजावून द्यायचे, अशीच तत्कालीन आचार्यांची व पंडितांची भूमिका होती. त्यांनी तर्काची, बुद्धीची पदोपदी अवहेलनाच केली आहे. शब्दप्रामाण्याची वृत्ती कोणीही सोडली नाही. 'एष धर्मः सनातनः ।' हे समर्थन प्रत्येक विधानाला पुरेसे असल्यामुळे, अधिक विवेचन करण्याची त्यांना आवश्यकताच वाटली नाही. जीवन हे पापपुण्याच्या चौकटीत बसवून टाकल्यामुळे त्यांच्या भौतिक साधनांची कारणमीमांसा कोणी केली नाही आणि त्यामुळे निबंध ही वस्तूच निर्माण झाली नाही. निबंध ही एका स्वतंत्र, चिंतनशील, साक्षेपी, तर्कनिष्ठ, ज्ञानसंपन्न अशा प्रज्ञेतून निर्माण झालेली रचना असल्यामुळे ती एक फार मोठी शक्ती असते, पण तिची उपासना त्या काळी कोणी केली नाही. शेतीची दुर्दशा, व्यापाराला आलेली अवकळा, परकीय आक्रमणे, जुन्या परंपरा व विद्या यांचा ऱ्हास, समाजाची विघटना या समस्यांचा अभ्यास करून त्यांची ऐहिक दृष्टीने कारणमीमांसा करणे व पूर्वेतिहास पाहून भावी काळात त्या सर्वांवर उपाययोजना सुचविणे आणि हे सर्व लोकांना समजावून देण्यासाठी निबंधग्रंथ लिहिणे हे घडलेच नाही. त्याचा परिणाम म्हणजे संपूर्ण समाजाला आलेली अवकळा आणि मरगळ ! विद्वान आचार्य सोडून तत्कालीन संतांकडे पाहिले तरीही हेच दृश्य दिसून येते. संत हे ऐहिक उत्कर्षापकर्षांविषयी नितांत उदासीन राहिले. त्यांनी परमार्थाविषयी सिद्धांत सांगितले, पण ऐहिक प्रपंचाची चिंता मात्र मुळीच वाहिली नाही.

एकोणिसाव्या शतकात पाश्चात्त्यांच्या संपर्काने भारतात पाश्चात्त्य विद्येचा प्रसार झाला आणि त्यानंतरच खरा निबंध उगम पावला. पाश्चात्त्य विद्येच्या परिचयामुळे काही पंडितांच्या मनात बदल झाला. कलियुग सुरू झाल्यामुळे अनाचार माजला व त्यामुळे धर्म बुडाला आणि म्हणून सगळा नाश झाला, ही रूढ कारणमीमांसा त्यांना पटनाशी झाली. म्हणून मग ते प्रचलित अवनतीची भौतिक कारणमीमांसा करायला प्रवृत्त झाले. अशा प्रकारचे समाजस्थितीविषयाचे भौतिक विचार राममोहन राय, जांभेकर, लोकहितवादी यांच्या लेखनात आढळतात. निबंध निर्माण झाला तो त्यांच्या विचारातून व चिंतनातूनच ! पापाचरणामुळे अवनती झाली आणि पुण्याचरणाने उन्नती होईल, या श्रद्धेवर त्यांनी प्रथम घाव घातला. आपली अवनती झाली ती आपल्या दोषांमुळे, अज्ञानामुळे आणि उन्नती होईल, ती नव्या ज्ञानाच्या उपासनेमुळे, हा नवा विचार त्यांनी धीटपणे सांगितला. आपला हा विचार लोकांच्या बुद्धीला पटवून दिला पाहिजे ही जाणीवही त्या प्रत्येक लेखकाला होती. याच लेखन पद्धतीचा पुढे विकास होऊन विष्णुशास्त्री, लो. टिळक, इ. विद्वानांच्या निबंधात त्या जाणिवेची परिणती झाली. प्रत्येकाने स्वतंत्र बुद्धीने विचार केला आणि शब्दप्रामाण्य कोणीही स्वीकारले नाही. शब्दप्रामाण्यामुळे मनुष्याची विचारशक्ती पांगळून जाते व स्वतः निर्णय काढण्याचे त्याचे सामर्थ्य नष्ट होते, असे त्यांचे मत होते.

गेल्या शतकात भारतात जी निबंधरचना झाली तशी ती पूर्वी झाली असती, तर पाश्चात्त्य आक्रमणाला आपण तोंड देऊ शकलो असतो. इथे पराक्रम होता, पण तो रांगडा होता. त्यामुळे मुसलमानी सत्ता आपण नष्ट करू शकलो, पण राष्ट्रनिष्ठा, बुद्धिप्रामाण्य, विज्ञाननिष्ठा व लोकसत्तेच्या सामर्थ्याची जाणीव ही सामर्थ्ये ज्यांच्याजवळ होती, त्या इंग्रजांच्या पुढे आपला निभाव लागला नाही. ऐहिक प्रपंचाची चिंता वाहणारे व उन्नती-अवनतीची भौतिक मीमांसा करणारे निबंधग्रंथ आपणाजवळ नसल्यामुळे आपण पारंपरिक अज्ञानात गुरफटून राहिलो व त्यामुळे अयशस्वी झालो. आपले राज्य गेले, ते यामुळेच ! यावरून निबंधरचनेचे राष्ट्ररचनेच्या कार्यात केवढे स्थान आहे, हे ध्यानात येईल.

इंग्रजीत निबंधाचा जन्म झाला तो एक ललित वाङ्मयाचा प्रकार म्हणून. विषय किंवा विवेचन यांहून अधिक महत्त्वाचे असे एक अंग नव्या निबंधाला असते, ते म्हणजे लेखकाची वृत्ती, भावना व भूमिका हे होय. आपल्या आवडत्या विषयावर वाचकाशी आपण हितगुज करीत आहो, अशी त्या लेखकाची वृत्ती असते. निबंध हा आत्मनिष्ठ असला पाहिजे व त्या दृष्टीने त्याची

तुलना भावगीताशी करता येईल, असे डॉ श गो तुळपुळे म्हणतात मराठी निबंध हे इंग्रजीचे देणे असले, तरी प्रारंभी त्याचे स्वरूप इंग्रजी निबंधाहून वेगळे होते सर्व निबंधकार लोककल्याणासाठीच लिहीत होते त्यामुळे त्यांच्या निबंधात आत्मनिष्ठा नव्हती पण ध्येयनिष्ठा मात्र निश्चित होती इंग्रजी निबंधाचे आत्मनिष्ठ, खेळकर व अवखळ स्वरूप मराठी निबंधाला अलिकडेच प्राप्त झाले आहे [ हि सा का , पराधीन सरस्वती – डा पु ग सहस्रबुद्धे, म नि वा ]

## निमाड

एक देशविभाग मध्य प्रदेशातल्या खांडवा आणि खरगोन या दोन जिल्ह्यांना निमाड अशी संज्ञा आहे उत्तरेस विंध्य पर्वत आणि दक्षिणेस सातपुड्याच्या रांगा यांच्यामध्ये निमाड वसला आहे माळव्याच्या खालच्या अंगाला असल्यामुळे हा भाग निम्न (= खालचा) समजला जाई त्यालाच पुढे घाड हा प्रदेशवाचक शब्द लागला निम्नघाडचे पुढे निमाड झाले

महाभारतकाळी याला अनूपदेश म्हणत हे एक जनपद होते इथे राहणाऱ्या लोकांना अनूप असेच नाव होते माहिष्मती ही अनूपदेशाची राजधानी होती माहिष्मतीलाच आज महेश्वर म्हणतात अतिप्राचीन काळी इथे नागांचे राज्य असून, त्यांचा राजा कर्कोटक हा माहिष्मतीलाच राहत असे कालांतराने या प्रदेशात हैहय नावाची एक लढाऊ जमात घुसली व तिने नागांना इथून हुसकावून लावून तिथे आपले राज्य स्थापले त्या जमातीच्या प्रमुखाचे नावही हैहय असेच होते विष्णु पुराणाच्या मते हैहय हा यादवांचा वंशज होता, तर महाभारताच्या मते तो मनुपुत्र शर्यातीचा वंशज होता अठरा पुराणांपैकी बारा पुराणांत हैहयकुलाचा महिमा येते यावरून त्यांच्या प्रचंड सामर्थ्याची कल्पना करता येईल

कार्तवीर्य सहस्रार्जुन हा त्यांच्यापैकी एक बलदंड पुरुष होय त्याने तर लंकेच्या रावणालाच इथे कैद करून ठेवले होते पुढे तो अत्यंत मातला व त्याने जमदग्नीच्या कामधेनूचे अपहरण केले त्यामुळे जमदग्नीचा पुत्र परशुराम खवळला व त्याने सहस्रार्जुनाचा वध केला

कोरकू, भिल्ल व बंजारी या निमाडमधल्या आदिवासी जमाती होत यांपैकी कोरकू लोकांच्या शरीराची ठेवण व डोक्याचा आकार यांवरून ते मुंड वंशाचे असावे, असे संशोधक मानतात काही विद्वान यांना महाभारतकालीन राजा कौम याचे वंशज मानतात ते मात्र स्वतः आपली उत्पत्ती चौहान वंशापासून झाली असल्याचे सांगतात काही कोरकू आपला मूळ पुरुष रावण असल्याचे सांगतात कोरकू हा कौम शब्दाचा अपभ्रंश असावा यांचे आचारविचार गोंडासारखेच असतात (कोरकू पाहा )

आदिवासी सोडले, तर या भागातले अन्य वसाहतकार म्हणजे राजपूत होत यांच्यापैकी मोरी हे चितोडहून, चौहान हे अजमिराहून, तोमर दिल्लीहून व अन्य काही राजस्थानाच्या विविध भागांतून इथे आले व स्थायिक झाले चौहान आणि परमार या राजपूत जातींना जमीनदार, तालुकदार अशासारखी सन्मानाची स्थाने या प्रदेशात पटकावली

राजपुतांच्या नंतर नामदेय, नागर आणि उत्तर भारतीय ब्राह्मण इथे आले आणि स्थायिक झाले या सर्वांना तिथे पौरोहित्याचे अधिकार मिळवले

ब्राह्मणांच्या पाठोपाठ परवार, लाड, जैन, अग्रवाल यासारख्या व्यापारी जाती इथे आल्या व त्यांनीही इथे आपला जम बसवला नंतर बडगुजर, रेवे यादव केवटे, इ गुजरांच्या पोटजातीही इथे येऊन वसल्या

निमाडमधले एकमेव पुण्यक्षेत्र म्हणजे ओंकार मांधाता हे होय हे बारा ज्योतिर्लिंगांपैकी एक असून, नर्मदेच्या तीरावर आहे याचा आकार ओंकारासारखा असल्याने याला प्रणवक्षेत्र असेही म्हणतात युवनाश्वपुत्र मांधात्याने इथे तप केल्यामुळे या क्षेत्राला ओंकारमांधाता असे नाव पडले आहे ओंकारेश्वरासारखेच अमलेश्वर नामक आणखी एक शिवस्थान नर्मदेच्या दुसऱ्या तीरावर असून दोघांचा मिळून बारा ज्योतिर्लिंगांत गणना होते (ओंकार मांधाता पाहा )

ओंकारेश्वराजवळच एक डोंगर असून, त्यावर एक जुनाट किल्ला आहे लोक सांगतात की तो पुराणकाळी मुचकुंदाने बांधला पण ते खरे नाही बाराव्या शतकापर्यंत इथे राज्य करणाऱ्या कोण्या भिल्ल राजाचा तो किल्ला असावा कारण आत त्याचा राजवाडाही पाहायला मिळतो [ नि उ सा ]

## निमाडी भाषा व साहित्य

मध्य प्रदेशातल्या निमाड भागात बोलल्या जाणाऱ्या भाषेला निमाडी भाषा असे म्हणतात डा ग्रियर्सन यांनी आपल्या ग्रंथात तिला राजस्थानीचे दक्षिणी रूप मानले आहे परंतु डॉ कृष्णलाल हंस यांनी तिला राजस्थानी भाषापरिवारात स्थान न देता पश्चिमी हिंदीच्या बोलीमध्ये समाविष्ट केले आहे या बोलीचे साहित्य इ स च्या १५ व्या शतकाच्या अखेरीपासून मिळू लागते त्यापूर्वीही ती बोली बोलली जात होती, पण त्या कालातली साहित्यिक रचना उपलब्ध होत नाही

निमाडीतली सर्वांत प्राचीन रचना ब्रह्मगिर या कवीची आहे संत सिंगा हा निमाडीचा एक सुप्रसिद्ध लोककवी इ स च्या १६

व्या शतकातला आहे त्याच्या कवितेचा एक नमुना असा –

**निरगुन ब्रह्म ह न्यारा कोई समजो समजनहारा ।।**
**खोजत ब्रह्म जलम सिरानो, मुनिजन पार न पावे ।।**
**खोजत-खोजत सिवजी थाके, ऐसो अपरपारा ।।**

अर्थ – निर्गुण ब्रह्म हे लोकविलक्षण आहे जाणता असेल त्याने जाणावे ब्रह्माचा शोध करता करता जन्म संपला मुनि जनानाही त्याचा पार लागला नाही ब्रह्माचा शोध घेता घेता शिवसुद्धा थकला असे ते अपरंपार आहे

संत रकनाथ हा इ स च्या १८ व्या शतकातला अखेरचा निमाडी कवी होय रकनाथाच्या कवितेत शेकडा ९० शब्द संस्कृत दिसतात, तर शेकडा १० शब्द अरबी – फारसीचे आढळतात तसेच निमाडी बोलीत राजस्थानी व गुजराती शब्द पहिल्याप्रथम रकनाथाच्या कवितेतच आढळतात

संत सिंगा व रकनाथ यांच्या मधल्या काळात दलूदास, धनजी दास, इ कवी निमाडमध्ये होऊन गेले

पद्याबरोबरच निमाडीची काही गद्य रचनाही उपलब्ध आहे त्या गद्याचा विचार करता त्यात शेकडा ८४ संस्कृत शब्द आढळतात या कालात (१८ वे शतक) गद्य व पद्य या दोहो-चेही रूप पश्चिमी हिंदीचे आढळते गद्यात शेकडा ९६ तर पद्यात शेकडा ९८ शब्द पश्चिमी हिंदीचे दिसतात

मुद्रित व अमुद्रित अशा दोन्ही स्वरूपात निमाडी साहित्य उपलब्ध आहे दृढ उपदेश, सिंगाजीकी परिचरिया, सलिता नौ याव, श्रीरामविनय, रकनाथ पदावली, दीनदास पदावली, अनामी संप्रदायके भजन, ही निमाडीची लहानमोठी मुद्रित पुस्तके होत

संत सिंगा या कवीने भागवत महापुराण द्वादस स्कंध, महिम्नस्तोत्र, पद्रतीत, आठवार, सिंगाजीका आतम ध्यान, जाप, नरान इ लहानमोठे ग्रंथ लिहिले आहेत सिंगाचा शिष्यपरिवार मोठा होता या शिष्यांपैकी दलूदासाने दलूदासके भजन व सिंगाजीकी परचुरी ही दोन पुस्तके लिहिली आहेत हालू नामक कवीने अठरा पर्व महाभारत लिहिले आहे निमाडीचा हा सर्वांत मोठा पद्यबद्ध ग्रंथ होय अभिमन्यूका ब्याह, सुभद्रा हरण, लीलावती, सेठ तारनसा महाजनकी कथा ही पुस्तके धनजीदासविरचित आहेत याशिवाय माधवदासाने नरसिंग कथा लिहिली आहे फकीरनाथाने गऊलीला, घिलनी चरित्र, कथामेती लीला, कथा बिंदा ही पुस्तके लिहिलेली आहेत नानकदासाने समनकथा लिहिली आहे

इ स च्या १९ व्या शतकाच्या अखेरपर्यंत निमाडी भाषेत जे साहित्य निर्माण झाले ते पद्यबद्ध व संतरचित आहे हे बहुतेक सर्व संत निर्गुण विचारधारेचे समर्थक व प्रचारक होते संत सिंगा हा या सर्व कवींतला अग्रगण्य कवी होय तो निमाड प्रदेशातला कबीरच होय

**निमाडीचे लोकसाहित्य** – या साहित्याचे विभाजन पुढील प्रकारात करता येते (१) संस्कारगीते – यात जन्मोत्सव, उपनयन, विवाह, इ शुभ प्रसंगाची गीते येतात (२) ऋतु गीते – यात कजली (श्रावण मासाची गीते), शरद ऋतूची गीते, फाग व बारहमासा ही गीते येतात (३) जीवनगीते – कौटुंबिक, सामाजिक व धार्मिक स्थितीवर प्रकाश टाकणारी गीते या विभागात येतात (४) धार्मिक गीते – यात देवी, गोधन, तीर्थयात्रा, गणगौर यांची गीते व भजने येतात (५) ऐतिहासिक गीते – यात समस्त लोकगाथा समाविष्ट आहेत (६) संकीर्ण गीते – यात प्रकृतिवर्णन, भौगोलिक चित्रण, शिशुगीते, इ प्रकार येतात

कौटुंबिक गीतांपैकी एका गीतात बाप आपल्या मुलीला नीतीचा उपदेश करतो, ते गीत असे –

**पिताजी की गोदी बठी रनुबाई विनवा ।**
**कवो तो पिताजी हम, वा रमवा जावां ।।**
**जाओ बेटी रनुबाई, रमवा जाओ ।**
**लम्बो बजार देखि दौडी मत चलजो ।।**
**उच्चो वडलो देखि, जाइ मत चढजो ।**
**पराया पुरस देखि, हँसी मत बोलजो ।**
**नीर देखिन बेटी, आडी मत धसजो ।**
**परायो बालो देखि, हाय मत करजो ।।**
**सम्पत देखि बेटी, चढी मत चलजो ।**
**विपत देखि बेटी, रडी मत बठजो ।।**
**जाओ बेटी रनुबाई रमवा जाओ ।।**

अर्थ – बापाच्या मांडीवर बसलेली रनुबाई बापाला म्हणते 'बाबा, मी खेळायला जाऊ का ?' त्यावर बाप तिला म्हणतो 'जा बेटी, खेळायला जा पण बाजार लांब आहे, असे पाहून पळत जाऊ नको उंच वडाचे झाड पाहून त्याच्यावर चढून बसू नको परका पुरुष पाहिल्यावर त्याच्याशी हसून बोलू नको पाणी पाहिल्यावर विहिरीत उतरू नको परका तरुण पाहिल्यावर त्याच्याकडे आसक्तीने पाहू नको संपत्ती आल्यावर चढून जाऊ नको विपत्ती आल्यावर रडत बसू नको जा बेटी रनुबाई, खेळायला जा '

लग्न झाल्यावर मुलगी सासरी जायला निघत, त्या वेळी जी गीते म्हटली जातात, त्याना बिदागीते असे म्हणतात त्यांपैकी एक गीत असे–

**फुलड़ा टोवण ख तू गई वो लाड़कली,**
**अपना बाबाजी की बाग मंड ।**

**कई टोच्या कई टोचण लाग्या,**
**एतरा म आया वुल्लव राज जी ।।**
**उठो लाडकली तम बठो पालकडी,**
**चालो ते वेस हमारा जी ।**
**कायन कारण बाबुल पाली व पोसी,**
**कायन पाया काचा दूद जी ।**
**सजना सारू बाबुल पाली रे पोसी,**
**वर राजा सारू पाया काचा दूद जी ।।**

*अर्थ* – हे लाडक्या मुली, तू आपल्या बापाच्या बागेत फुले तोडायला गेली होतीस तू काही फुले तोडलीस आणि काही तोडीत होतीस, एवढ्यात तुझा दूल्हे राजा (नवरदेव) तिथे येऊन पोचला तो तुला म्हणाला 'लाडके, तू या पालखीत बस आणि आमच्या देशाला चल त्यावर तू त्याला म्हणालीस 'असे जर करायचे, तर माझ्या बापाने माझा सांभाळ करून मला मोठे का केले ? त्याने दूध मला का पाजले ?' त्यावर दूल्ह राजाने उत्तर दिले 'राणी तुझ्या या प्रियकराला तू मिळावीस म्हणूनच तुझ्या बापाने पाळून पोसून तुला मोठे केले आणि त्यासाठीच तुला कच्चे दूध पाजले '

**निमाडी लोककथा** – निमाडी भाषेत पशुपक्षी, परी-अप्सरा, जादू टोणा, साधू फकीर, व्रत वैकल्ये, वीरत्व आणि इतिहास, इ विषयावरच्या अनेक लोककथा आहेत या कथात सैली सातव (शीतला सप्तमी) ही एक कथा आहे भाद्रपद कृष्ण सप्तमीला निमाडमध्ये स्त्रिया सली सातवचे व्रत करतात त्या दिवशी शीतला मातेची पूजा करायची आणि शिळे अन्न खायचे असा नियम असतो ती कथा अशी–

सली सातवचा दिवस होता गहिणीने पूजा केली होती त्या दिवशी ती शिळे अन्न खाणार होती पण त्याच दिवशी नेमका तिचा भाऊ घरी आला तिला वाटले, की भावाला शिळे कसे वाढायचे ? म्हणून तिने ताजा स्वयपाक केला आणि त्याला वाढला आपणही त्याच्याबरोबर जेवली जेवून उठून पाळण्या कडे जाते, तो तिचा मुलगा पाळण्यात मरून पडलेला त्या रात्री शीतळा मातेने गहिणीच्या सासूला स्वप्नदृष्टात देऊन सांगितले 'आज तुझ्या सुनेने गरम अन्न खाऊन माझ्या अंगाचा दाह केला तू तिला घालवून दे अन्यथा मी तुझ्या कुटुंबाचा नाश करीन ' सासूने तसे केले सून आपल्या मृत मुलाला घेऊन शीतळा मातेच्या चबुतऱ्यावर जाऊन बसली एवढ्यात शीतला मातेची पूजा करायला एक स्त्री तिथे आली तिच्या ओल्या केसातून एक पाण्याचा थेंब त्या मृत बालकाच्या मुखात पडला आणि आश्चर्याची गोष्ट म्हणजे ते मूल जिवंत झाले

निमाडी भाषेत उखाणेही बरेच आहेत त्यातील काही हिंदीतून घेतलेले आहेत त्यापैकी एक उखाणा असा–

**अल्लो सो मनीराम, अल्ली बडी पूछ**
**ऊ गयो मनीराम, पकड लाओ पूछ ।**

*अर्थ* – छोटासा मणीराम आणि त्याची खूप लांब शेपटी मणीराम पळून गेला, पण त्याची शेपटी पकडून त्याला परत आणले

या उखाण्याचे उत्तर 'सुईदोरा' असे आहे

निमाडीमध्ये लोकोक्तीही खूप आहेत त्यातील काही लोकोक्ती हिंदी भाषेतून घेतलल्या आहेत [ नि उ सा ]

**निमेष** कालाचे सूक्ष्म परिमाण डोळ्याची पापणी लवते तेवढ्या कालाला निमेष म्हणतात विष्णूचा एक निमेष = शिवाचा १०० वर्षे, असे सांगितले आहे [ पु इ ]

**नियम** (१) अष्टांगयोगाचे दुसरे अंग पातंजल योगसूत्रात याचे लक्षण दिले आहे, ते असे–

**शौचसंतोषतपःस्वाध्यायेश्वरप्रणिधानानि नियमाः ।।**

(पात यो सू २ ३२)

*अर्थ* – शौच, संतोष, तप, स्वाध्याय व ईश्वरप्रणिधान हे नियम होत

शरीर व मन स्वच्छ आणि पवित्र राखणे हे शौच, प्राप्त परिस्थितीत मनाचे समाधान राखणे हा संतोष, जिभेवर ताबा ठेवून शीतोष्णादी द्वद्वे सहन करणे व इंद्रिय स्वाधीन ठेवणे हे तप, वेदशास्त्राध्ययन नियमित करणे हा स्वाध्याय आणि सर्व कर्मे ईश्वरार्पण बुद्धीने करणे हे ईश्वरप्रणिधान होय

वरील पाचही नियमांचे श्री कृ के कोल्हटकर यांनी विवेचन केले आहे, ते असे–

शरीर मलिन असेल आणि मन रज-तमानी दूषित असेल, तर चित्तवृत्तिनिरोधरूप योग साध्य होणार नाही म्हणून त्या दोहोंच्या शुद्धतेविषयी प्रयत्नशील राहिले पाहिजे योग साधकाने स्नानादी उपायांनी शरीर स्वच्छ ठेवावे व सर्व मल द्वारे स्वच्छ राखावी मलिन वस्तूंचा किंवा मलिन माणसाचा संपर्क टाळावा स्पर्शदोष जडल्यास आवश्यकतेप्रमाणे हात, पाय, तोंड धुवून व आचमन प्राणायाम करून अंतर्बाह्य शुचिता संपादावी मात्र या शौचप्रयत्नात तारतम्यबुद्धी सोडू नये अन्यथा त्यातच पुष्कळसा वेळ खर्ची पडून योगाभ्यासाला पुरेसा वेळ मिळणार नाही यासाठी देश, काल व परिस्थिती यांचा विचार करून आरोग्याला आणि योगाभ्यासाला उपकारक होईल इतक्या मर्यादेतच बाह्य शौच आचरावे

चित्तात उत्पन्न होणाऱ्या रज-तमोमूलक वृत्ती हा चित्ताचा

मल होत असलेल्या काम–क्रोध–लोभादी रजोमूलक वृत्तींना घोर वृत्ती म्हणतात; आणि अज्ञान, आळस, जडत्व, इ. तमोमूलक वृत्तींना मूढवृत्ती म्हणतात. या दोन्ही वृत्तींमुळे मनाला मालिन्य येते. सात्त्विक आणि परिमित आहाराच्या सेवनाने वरील वृत्तींचा उपशम होण्यास मदत होईल. त्याच्या जोडीला साधु–संतांचा संग आणि ज्ञान–वैराग्यपर वाङ्मयाचे श्रवण केल्यास त्या गोष्टीही रज–तमाच्या लहरी शमवण्याला साहाय्यभूत ठरतील.

यदृच्छेने आपणास जी अनुकूल साधने मिळाली असतील आणि त्यामुळे जो जो जितका लाभ होत असेल, त्याचा अधिकात अधिक उपयोग करून घेणे आणि मनाचे समाधान ठेवणे हा संतोष होय. असंतोष ही मनुष्याच्या चित्तातली त्याला मार्गाकडे वळवणारी महान प्रेरक शक्ती आहे. तिच्यामुळे मनुष्य नव्या नव्या विषयाकडे पुन पुन्हा आकृष्ट होतो आणि सदैव असंतुष्ट राहतो. संतोषवृत्ती ही या असंतोष वृत्तीची विरोधी आहे. म्हणून तिचा अभ्यास सतत करीत राहिले पाहिजे. साधकाने या बाबतीत असा विश्वास बाळगावा, की परमेश्वर मला योग्य वेळी योग्य ती साधने उपलब्ध करून देईलच. तोवर मी प्राप्त साधनांचा अधिकात अधिक उपयोग करून घेईन.

तप, स्वाध्याय व ईश्वरप्रणिधान हे पुढील तीन नियम होत. या तिहींना मिळून क्रियायोग अशी संज्ञा आहे. समाधीचा अभ्यास करीत असताना चित्तातील अविद्यादी क्लेश हे त्या अभ्यासाला प्रतिबंधक होत असतात. त्यामुळे चित्त वारंवार बहिर्मुख होते. तसेच व्युत्थानावस्थेत (व्यवहारात वागताना) देहाचे आणि मनाचे जे व्यापार घडतात, त्यामुळेही अविद्यादी क्लेश अधिकाधिक दृढ होत जातात. ही वस्तुस्थिती बदलून व्युत्थानावस्थेत घडणारे सर्व व्यापार समाधीच्या अभ्यासाला उपकारक ठरण्यासाठी वरील क्रियायोग सांगितला आहे. त्यातील तपाच्या योगाने तन–मनातले मल झडून जातात, नियमितपणाने केलेल्या जपाने व अध्ययनाने सत्त्वगुण वाढीस लागतो आणि सर्व शुभाशुभ कर्म ईश्वरार्पण केल्याने अविद्यामूलक अहंता, ममता हे भाव कमी कमी होत जाऊन चित्तातले क्लेश दूर होतात.

हठयोगात वरील पाचांपैकी शौच या नियमासाठी धौती, बस्ती, नेती, त्राटक, नौली व कपालभाती ही षट्कर्मे आचरण्यास सांगितले आहे. हठयोगप्रदीपिकेत वरील पाच नियमांच्या जागी दहा नियम सांगितले आहेत, ते असे– तप, संतोष, आस्तिक्य, दान, ईश्वरपूजा, सिद्धान्तवाक्यश्रवण, लज्जा, मती, जप आणि होम. [भा. मा. शा., योगविद्या]

(२) एखाद्या दोषाबद्दल प्रायश्चित्त करण्यासाठी काही विधिनिषेधात्मक गोष्टी धर्मशास्त्राने सांगितलेल्या असतात. त्यांतील विध्यात्मक गोष्टींना अर्थात ज्या गोष्टींचे आचरण करावे, असे सांगितलेले असते, त्यांना नियम असे म्हणतात. याज्ञवल्क्याने प्रायश्चित्त प्रकरणात व्रताच्या अंगभूत धर्मांचा निर्देश करताना पुढील श्लोक लिहिला आहे–

**स्नानमौनोपवासेज्यास्वाध्यायोपस्थनिग्रहाः ।**
**नियमा गुरुशुश्रूषा शौचाक्रोधाप्रमादता ॥**

(याज्ञ. ३. ३१३)

अर्थ– स्नान, मौन, उपवास, पूजा, स्वाध्याय, उपस्थेंद्रियाचा निग्रह, गुरुशुश्रूषा, शौच, अक्रोध व अप्रमादता (चूक घडू न देणे) हे नियम होत.

उपवासादी पुण्यप्रद व्रताचे आचरण करणे यालाही नियम असे म्हटलेले आहे. [हि. न.]

## नियोग

प्राचीन भारतातील एक सामाजिक प्रथा. एखाद्या स्त्रीचा पती क्लीब, प्रव्रजित (संन्यासी किंवा परागंदा) किंवा मृत असेल अथवा अन्य काही कारणामुळे वंश खंडित होण्याचा प्रसंग आला असेल, तर पतीच्या अथवा पती मृत असल्यास अन्य वडीलधाऱ्या माणसांच्या संमतीने त्या स्त्रीला आपल्या दिराशी अथवा तत्सम नात्याच्या अन्य व्यक्तीशी अथवा तपस्वी ब्राह्मणाशी विधिपूर्वक शरीरसंबंध करून एका पुत्राची प्राप्ती करून घेता येत असे. या प्रथेमध्ये पुत्रप्राप्तीसाठी पतीशिवाय अन्य व्यक्तीची तात्कालिक नियुक्ती होत असल्यामुळे या प्रथेला नियोग अशी संज्ञा लाभली होती. 'अपुत्रभ्रातपत्नीपुत्रार्थ नियोजनम्' = मृत भावाच्या पुत्रहीन पत्नीला पुत्रलाभ करून देण्यासाठी होणारी नियुक्ती म्हणजे नियोग अशी एक नियोगाची व्याख्या मिळते. या व्याख्येनुसार नियोगात केवळ दीरच नियुक्त पुरुष ठरतो. परंतु या प्रथेची प्राचीन उदाहरणे पाहता दिराशिवाय अन्य व्यक्तींचीही नियुक्ती होत असे, असे स्पष्टपणे दिसून येते.

नियोग प्रथेचा प्रारंभ ऋग्वेदकाळातच झाला होता. एका पुत्रहीन विधवेने पुत्रप्राप्तीसाठी आपल्या दिराशी पत्नीप्रमाणे संबंध ठेवल्याचा उल्लेख ऋग्वेदात आहे (ऋ. १०. ४०. २). ऋग्वेदातच अन्यत्र (१०. ८५. ४४) स्त्रीला 'देवृकामा' (दिराची इच्छा बाळगणारी) म्हटले आहे.

श्री. एस्. सी. सरकार यांच्या मते पूर्व आनव (अंग देश), ऐक्ष्वाक (कोसल देश) आणि पुरूरवस (दोआब व कुरुक्षेत्र) यांच्या कुळात नियोगप्रथा रूढ होती. गौतम (आंगिरस) आणि वासिष्ठ या पुरोहित कुळाचा या प्रथेशी संबंध होता. पांचाल,

कान्यकुब्ज व यादव यांच्यामध्ये मात्र नियोगाची उदाहरणे अत्यल्प आढळतात तुर्वसु द्रुहयू पश्चिम आनव हैहय यांनी, वशालेय आणि नन्ह यांच्यामध्ये अशी उदाहरणे मुळीच आढळत नाहीत याचा अर्थ असा होतो की या प्रथेचा उगम पूर्वेकडील राज्यात झाला तिचा प्रसार आंगिरस, वासिष्ठ व अन्य पुरोहित कुळांच्या द्वारा क्रमाने पश्चिमेकडे होत गेला

नियोगप्रथेचा प्रवर्तक म्हणून वेन राजाचा उल्लेख मनूने केला आहे (मनु ९ ६६) महाभारतात नियोगाची अनेक उदाहरणे आढळतात नियोगद्वारा दोन अथवा तीन पुत्रांपेक्षा अधिक पुत्र मिळवण्याची अनुज्ञा नसतानाही बलीने सतरा आणि व्युषिताश्वाने सात पुत्र प्राप्त केले होते शंतनूचा पुत्र विचित्रवीर्य मरण पावल्यानंतर विचित्रवीर्याची माता सत्यवती हिने आपला, विवाहपूर्व जीवनातला, पराशरापासून जन्मलेला पुत्र व्यास याला आपल्या सुनांशी नियोग करण्याचा विनंती केली आणि व्यासापासून अंबा, अंबिका व (अंबालिकेने आपल्या ऐवजी पुढे केलेली) एक दासी यांना अनुक्रमे धृतराष्ट्र, पंडू व विदुर हे तीन पुत्र झाले किंदम ऋषींच्या शापामुळे पंडू आपल्या पत्नीशी संबंध ठेवू शकत नसल्यामुळे कुंती व माद्री यांनी देवतांना मंत्राने आवाहन करून त्यांच्यापासून युधिष्ठिर, भीम, अर्जुन आणि नकुल सहदेव असे पाच पुत्र प्राप्त केले हाही नियोगाचाच एक प्रकार होय

महाभारत, मनुस्मृती व याज्ञवल्क्यस्मृती यांच्या आधारे प्राचीन काळच्या नियोगप्रथेचे स्वरूप स्पष्ट होते, ते असे–

(१) एखाद्या सधवा स्त्रीला आपल्या पतीपासून संतती होणे अशक्य आहे, असे निश्चित झाल्यानंतर तिला परपुरुषापासून पुत्रोत्पत्ती करून घेता येत असे

(२) पुत्रप्राप्तीपूर्वीच पती निधन पावला तर विधवेला परपुरुषापासून पुत्रप्राप्ती करून घेता येत असे

(३) नियोगासाठी सधवेने पतीची आणि विधवेने अन्य वडीलधाऱ्या मंडळींची अनुज्ञा घेणे आवश्यक असे

(४) नियोगद्वारा केवळ एकच पुत्र प्राप्त करून घेता येत असे क्वचित दोन किंवा तीन पुत्र प्राप्त करून घेण्याची सवड दिली जात असे या नियमाचे उल्लंघन करणारी स्त्री व्यभिचारिणी मानली जात असे

(५) नियोगासाठी निरोगी, गुणी व तपस्वी पुरुषाची निवड होत असे

(६) नियुक्त पुरुष प्राधान्याने स्त्रीचा दीर असे ते शक्य नसेल, तर रक्तसंबंधातील पुरुष, गोत्रज पुरुष अथवा तपस्वी ब्राह्मण नियुक्त होत असे

(७) प्रत्यक्ष नियोगापूर्वी देव, ब्राह्मण, पितर व अतिथी यांना विधिपूर्वक भोजन घालून नियोगाचा विचार प्रकट केला जात असे

(८) नियुक्त पुरुषाने ठरलेल्या स्त्रीशी तिच्या ऋतुसमयी रात्रीच्या वेळी एकांतात समागम करावा, समागमापूर्वी आपल्या सर्वांगाला तूप चोपडावे, समागमाच्या वेळी मौन पाळावे आणि समागमानंतर त्या स्त्रीला आपली सून समजावी, असे नियम होते

(९) नियोगापूर्वी स्त्रीला एक वर्षभर व्रतस्थ राहावे लागे उन्मत्त, अवश रुग्ण व प्रौढ स्त्री नियोगासाठी अयोग्य मानली जाई

(१०) नियुक्त पुरुष हा केवळ निमित्तमात्र मानला जाई नियोगाने होणारी संतती ही स्त्रीच्या पतीची मानली जात असे अशा संततीला 'क्षेत्रज संतती' अशी संज्ञा होती

श्री सरकार यांनी नियोगाच्या सर्व प्राचीन उदाहरणांचा अभ्यास करून असा निष्कर्ष काढला आहे, की विचित्रवीर्याच्या पत्नींचे एकमेव उदाहरण सोडले, तर अन्य सर्व नियोग पतीच्या हयातीतले आहेत आणि त्यातही पतीची अक्षमता सर्वच ठिकाणी स्पष्टपणे दिसत नाही

नियोगप्रथा प्राचीन असली, तरी त्या प्रथेला प्रारंभापासूनच अनेक जाणत्यांचा विरोध असल्याचे दिसून येते आपस्तंबाचे म्हणणे असे आहे, की नियोगद्वारा पुत्रप्राप्ती करून घेणारे दांपत्य नरकात जाते कारण नियोगी पुरुष हा परपुरुषच होय आणि परपुरुषाशी संबंध ठेवणे हे नरकात लोटणारे पापच आहे आपस्तंबानुसार क्षेत्रज पुत्र हा नियोगी पुरुषाचाच पुत्र होय म्हणून त्या पुत्राला त्याच्या आईच्या पतीसाठी कसलेही धार्मिक कृत्य करण्याचा अधिकार प्राप्त होऊ शकत नाही बौधायनानेही असेच मत मांडले आहे ज्येष्ठ दिराला भावजय ही सुनेप्रमाणे आणि कनिष्ठ दिराला गुरुपत्नीप्रमाणे असल्यामुळे नियोगासाठी तिच्याशी संबंध ठेवणे हे अत्यंत गर्हणीय आहे, असे मनूचे मत आहे त्याने नियोगाचा निषेध अत्यंत तीव्र शब्दांत केला आहे, तो असा–

> **अयं द्विजैर्हि विद्वद्भिः पशुधर्मो विगर्हितः ।**
> **मनुष्याणामपि प्रोक्तो वेने राज्यं प्रशासति ।।**
>
> (मनु ९ ६६)

अर्थ– नियोग हा पशुधर्म असल्यामुळे विद्वान ब्राह्मणांनी तो अत्यंत निंद्य मानला आहे परंतु वेन राजाच्या शासनकाळात हा पशुधर्म मनुष्यांतही रूढ झाला

वेन राजाची बुद्धी कामाने भ्रष्ट झालेली असल्यामुळे त्याने नियोगप्रथा सुरू करून वर्णसंकर केला, असे मनूचे म्हणणे आहे

अशा प्रकारे, अनेक धर्मशास्त्रकारांनी विरोध केल्यामुळे आणि लोकांच्या नीतिनिष्ठेला अनिष्ट वाटल्यामुळे नियोगप्रथा

कमी कमी होत जाऊन अखेरीस नाहीशी झाली [ भा सा इ , म व्य द , श न , स आ अ सा हि इ ]

## निरंकारी संप्रदाय

शिखांचा एक संप्रदाय या संप्रदायाचे लोक शुद्ध निरंकाराची उपासना करतात म्हणून त्याला निरंकारी असे नाव पडले पशावर येथील देयाल्दास खत्री हा या संप्रदायाचा संस्थापक होय

निरंकाराचे उपासक प्रत्येक महिन्याचा पहिला दिवस पवित्र मानतात आणि त्या दिवशी ग्रंथसाहेबाचा पाठ करतात त्यांची गुरू नानक यांच्यावर विशेष श्रद्धा असते रावळपिंडी हे या संप्रदायाचे प्रमुख केंद्र असून, त्याच्या नजीकच त्यांचे स्वतंत्र अमृतसरही आहे देयाल्दासाच्या मृत्यनंतर त्याचा भाऊ इ स १८७० मध्ये त्या पीठावर बसला [ श्री इश्वरसिंघ ठाकूर ]

## निरंग

पारश्यांच्या धार्मिक विधीत लागणारे एक द्रव्य बलाचे मूत्र पाण्यात मिसळून काही मंत्रांनी त्याचे अभिमंत्रण केल्यावर हे द्रव्य तयार होते विवाह, नवजोत, इ धार्मिक विधीत याचा उपयोग करतात आत्मशुद्धीसाठी व मार्जनासाठी हे वापरतात शुद्धीकरणासाठीही त्याचा उपयोग करतात एखाद्या माणसाला जर प्रेताचा अगर मेलेल्या कुत्र्याचा विटाळ झाला, तर त्याला शुद्ध होण्यासाठी निरंगाने सचैल स्नान करावे लागते भूतबाधा दूर करण्यासाठीही निरंगाचा उपयोग करतात भुताने पछाडलेला माणूस ज्या वेळी निरंगाने नखशिखांत आंघोळ करतो, तेव्हा भूत त्याच्या शरीरातून माशीच्या रूपाने पळ काढत, अशी त्यांची समजूत आहे

हॉग या जर्मन पंडिताच्या मते निरंगाचा उपयोग फार प्राचीन काळापासून प्रचलित होता काही रोगांवर ते औषध म्हणूनही दिले जात असे [ पा दे रि ]

## निरंजन

निर् + अंजन = कलंकरहित, दोषरहित असा त्याचा अर्थ आहे निरंजन हे परब्रह्माला लावले जाणारे एक विशेषण आहे अज्ञानरहित किंवा अंधकाररहित असाही या शब्दाचा अर्थ आहे सिद्धसाहित्यात हा शब्द शून्यरूप या अर्थाने वापरलेला आढळतो वज्रयानी सिद्ध आदी बुद्धाला निरंजन म्हणतात सरहपाद याने परमपदाला शून्य निरंजन म्हटले आहे धर्मसंप्रदायाचा मुख्य ग्रंथ जो शून्य पुराण, त्यात शून्य पुरुष म्हणजे परब्रह्म यापासून धर्म–निरंजन उत्पन्न झाला व त्यापासून सृष्टी निर्माण झाली, असे सांगितले आहे

निरंजनी साधू निरंजन हेच निर्गुण, निराकार परमतत्त्व मानतात मात्र निर्गुणपंथी कबिराने निरंजनाला परब्रह्म न मानता त्याचा अंश मानले आहे, असे त्याच्या पुढील वचनावरून दिसते–

**अछय पुरुष एक पेड है । निरंजन वाकी डार**

अर्थ– अक्षय पुरुष हा एक वृक्ष असून, निरंजन ही त्याची फांदी आहे

कबिराने निरंजनाला ज्योतीरूपही मानले आहे

**जोत निरंजन नाम धराई, सरगुन धूल पसारा है ।**

भावार्थ – ज्योत म्हणजेच निरंजन होय इतर सर्व सगुण सृष्टी म्हणजे धुळीचा पसारा (माया) आहे

निरंजन व माया यांना ब्रह्मा, विष्णू, महेश हे तीन पुत्र झाले व मग सृष्टी निर्माण झाली, असे कबीरपंथी मानतात

निराकार निरंजन हे बहिस्तातून अवतीर्ण झाले, असे शून्य पुराणात सांगितले आहे मध्ययुगातील संतांच्या काव्यरचनेत हिंदू व मुस्लिम यांच्या ऐक्याची जी भावना आढळते, ती या निरंजनकल्पनेमुळे उत्पन्न झाली असावी [ नि स तु नि , हिं सा को , म सा अ , श क ]

## निरंजनदास वल्लाळ

( इ स चे १८ वे शतक ) एक मराठी संतकवी व गणेशभक्त भगवत देवाने निरंजनस्वामी कऱ्हाडकराच्या चरित्रात याची थोडी माहिती दिली आहे, ती अशी –

निरंजनदास वल्लाळ हा मूळचा बीडचा असावा त्याचे मूळ नाव बाळाजीपंत असे होते त्याला दोन बायका होत्या त्या दोघीही अकाली मरण पावल्या आणि निरंजनाचे मन संसारातून उडाले तशा मनःस्थितीतच त्याने निरंजनस्वामी कऱ्हाडकर यांना आपले गुरू केले गुरूच्या कृपेने तो परमार्थाचा मोठा अधिकारी बनला गुरूच्याच आज्ञेनुसार त्याने गणेश गीतेवर एक टीका लिहिली या टीकेचे अकरा अध्याय असून, मुळातील चारशे दहा श्लोकांवर ६३२३ ओव्यांचे सुरस व सरळ असे व्याख्यान त्याने केले आहे तिच्यातल्या प्रसादगुणामुळे ती टीका गणेशभक्तांच्या आदराला पात्र झाली आहे

निरंजनाने आपल्या ग्रंथाची सांगता करताना गणेशाजवळ जे पसायदान मागितले, ते ज्ञानेश्वरीच्या पसायदानाचे बव्हंशी अनुकरण आहे त्याच्या त्या ओव्या अशा–

**तरी सद्‌गुरु गजानन । वागयज्ञें सुखसंपन्न ।**
**होऊन द्यावे दान, प्रसन्न । मज होऊनिया ।।**
**दुष्टांचें दुष्टपण मोडो । अंतरीं सद्भाव जडो ।**
**परस्परें प्रीति घडो । अभिमान उडो सरळ हा ।।**
**ब्रह्मानंदें सकळ सृष्टि । हेलावो ही अमृतवृष्टि ।**
**जीव भवसंकटीं । न पडोत कोणी ।।**

*नित्य नूतन महामंगळी । नांदा आनंदकल्लोळीं ।*
*भगवद्वरें सर्व काळीं । कल्लाळ देव म्हणे ।।*

निरंजनदासाने आपला हा ग्रंथ अमलाश्रम येथे (नामल गावी) इ. स. १७२९ मध्ये पूर्ण केला. [म. भा. रा. वि.]

## निरंजनमाधव

(१७०३–१७९० इ. स.) एक मराठी भक्तकवी व मुत्सद्दी. दक्षिणेतील वाचा क्षेत्री हा जन्मला. याचे मूळ नाव वनाजी असे होते. याव्यतिरिक्त माधवात्मज, कविनिरंजन, निरंजनयोगी इ. अन्य नावांनीही हा ओळखला जातो. याच्या पित्याचे नाव माधव व आईचे भागीरथी असे होते. हा विश्वामित्रगोत्री देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण होता.

पहिल्या बाजीराव पेशव्याच्या कारकिर्दीत वनाजी साताऱ्याला आला व तिथे याने बाजीरावाच्या आश्रयाला राहून लक्ष्मीधर वर्वे नामक एका पंडिताकडे संस्कृताचे अध्ययन केले. लक्ष्मीधरानेच त्याला महामंत्राचा उपदेश करून दत्तसंप्रदायाची दीक्षा दिली. दीक्षेनंतर थोड्याच काळावधीत म्हणजे वयाच्या बाविसाव्या वर्षी त्याला महाविद्या प्राप्त झाली. पुढे बाजीरावाने तंजाऊर प्रांती वकील म्हणून त्याची नेमणूक केली. वनाजीने धंद्याची ही कामगिरी चोख बजावली. त्याचा मन पिंड अध्यात्मवादी होता. त्यामुळे तंजाऊरच्या वास्तव्यात त्याला मनःस्वास्थ्य मिळू शकले नाही. पण तरीही दैनंदिन राजकारणातून सवड मिळेल, तेव्हा तो ध्यानधारणा व जपजाप्य करीत असे. त्यामुळेच त्याची साक्षात्कारपथावर प्रगती होत राहिली. तेरा–साडेतेरा वर्षांच्या या तंजाऊरच्या वास्तव्यात त्याच्या ठायी सुप्त रूपात असलेले समयसूचकता, निर्भयता, कवित्व, इ. गुण चांगलेच विकास पावले. दक्षिणेकडील राजाच्या दरबारात त्याला मानसन्मान मिळत गेला. याच काळात त्याने नाट्य, संगीत, व्याकरण, इ. शास्त्रांचे अध्ययन केले. संस्कृत मराठीव्यतिरिक्त कन्नड, हिंदी, गुजराती, याही भाषा त्याने आत्मसात केल्या.

इ. स. १७२७ च्या सुमारास वनाजी पुण्यास आला असता, त्याला आपला गुरू लक्ष्मीधर याच्या निधनाची वार्ता कळली व त्यामुळे तो उदास झाला. यानंतर मनःस्वास्थ्यासाठी तो साताऱ्याला जाऊन राहिला. सतत सात दिवसांच्या जागरणानंतर त्याला एके दिवशी झोप लागली. या झोपेत त्याच्या गुरूने लक्ष्मीधराने — त्याला स्वप्नदर्शन दिले व सांगितले, की 'शोक करू नका. आजपासून सातव्या दिवशी आमची विभूती तुला भेटेल.' त्याप्रमाणे खरोखरच घडून आले. बापजी पंडित नामक एक सिद्धयोगी बाजीरावाचा स्नेही असून, तो वकिलीच्या कामातही कुशल होता. गुरूच्या स्वप्नदृष्टांतानंतर सातच दिवसांनी वनाजीची व बापजीची भेट झाली. प्रथम भेटीतच बापजीचा वनाजीवर लोभ जडला व त्याने वनाजीला आपले शिष्यत्व देऊन योगविद्येच्या द्वारे त्याच्या आतिथ्याची दृष्ट केल्या. बापजी पंडित सिद्धेश्वरसंप्रदायी होता. त्यानेच वनाजीला दीक्षा देऊन त्याचे निरंजन असे नाव ठेवले.

यानंतर निरंजनमाधव पुनश्च बाजीरावाच्या आज्ञेने पातुगीनाकडे वकील म्हणून गेला. इ. स. १७४० च्या सुमारास बाजीराव मरण पावल्यानंतर त्याचा मुलगा बाळाजी बाजीराव ऊर्फ नानासाहेब हा पेशवा झाला. बाजीरावाप्रमाणेच नानासाहेबानेही निरंजनमाधवाला दक्षिणेतील कामगिरीवर नियुक्त केले. परंतु थोड्याच दिवसांत काही दुष्ट जनांच्या सांगण्यावरून नानासाहेबाची त्याच्यावर गैरमर्जी झाली. निरंजनाला यामुळे थोडा मनस्ताप झाला, पण ती इष्टापत्ती समजून तो सरळ तीर्थयात्रेला निघून गेला. दक्षिण देशात त्याचे तीर्थाटन चालू असता बेलूर मुक्कामी एका अद्भुत दैवी चमत्काराने त्याला सत्यनारायणाच्या मूर्तीचा लाभ झाला. या मूर्तीची त्याने पुढे पुण्याला आपल्या राहत्या घरात स्थापना केली.

यात्रेहून आल्यावर नानासाहेबाने निरंजनास मोठ्या सन्मानाने परत बोलावले व श्रीरंगपट्टणास वकील म्हणून पाठवले.

निरंजनाचा चिद्बोध रामायण हा ग्रंथ सप्तकांडात्मक होता, परंतु आज मात्र त्याचे बालकांडच उपलब्ध आहे. ज्ञानेश्वरविजय या ग्रंथात त्याने आरती समाधी अभंगाच्या आधारे ज्ञानेश्वरचरित्र वर्णिले आहे. सुभद्राचंपू हे मराठी भाषेतले एकमेव चंपूकाव्य असून, त्याचा विषय महाभारतातील सुभद्रार्जुनविवाह हा आहे. वृत्तमुक्तावली, वृत्तवनमाला व वृत्तावतंस हे तीन ग्रंथ वृत्तविषयक आहेत. संप्रदायपरिमळ हा ग्रंथ निरंजनाचे आत्मचरित्र म्हणून प्रसिद्ध आहे, परंतु अलीकडील संशोधकांच्या मते ते निरंजनाचे चरित्र असून, त्याच्या निरंजनदास नामक शिष्याने ते लिहिले आहे. निरंजनाची पत्नी त्याला काही प्रश्न विचारते व निरंजन तिला उत्तरे देतो, अशी त्या ग्रंथाची संभाषणात्मक रचना आहे.

निरंजनमाधवाची भाषा संस्कृतप्रचुर व लालित्यपूर्ण आहे. त्याने केलेली स्थलवर्णने, ऋतुवर्णने व प्रसंगवर्णने सुरेख व प्रत्ययकारी उतरली आहेत. सुभद्राचंपू या काव्यातील शरद ऋतूच्या वर्णनाचा नमुना असा—

**वर्षाकाळ समस्तही निरसला आला शरत्साजिरा ।**
**झालें अंबर शुद्ध मंदगतिनें वायू फिरे गोजिरा ।।**
**तत्काळोद्भव सत्फळें सुकुसुमें भारें तरू डोलती ।**
**सस्यें शोभित दीसते वसुमती संफुल्लल्या मालती ।।**

> झालीं निमळ तें सरोजसहितें पद्माकरें पावने ।
> येती दिव्य मरालवृद मरिती सेवावया धावने ।।
> पर्वी पूणशशी चकोरकगणा योजी सुधापारण ।
> आले षटपद स परागपर ते सत्पक्ष प्रकारणें ।।

पेशव दप्तरात प्रसिद्ध झालेल्या त्याच्या पत्रावरून त्याने दक्षिणेतील राजकारणात केलेल्या उलाढालीचा व त्याच्या मुत्सद्देगिरीचा जसा प्रत्यय येतो, तसाच प्रसगविशेषी प्रत्यक्ष आपल्या स्वामीसही चार गोष्टी परखडपणे सुनावण्याच्या सडेतोड वृत्तीचाही येतो [ प्रा म क , प्रा म वा स्व , म सा , निरजनमाधवाची कविता——सपा ल रा पागारकर, १९१९ ]

**निरजन रघुनाथ** (इ स १७८२ – १८५५) एक मराठी सतकवी निरजन रघुनाथाचे मूळ नाव अवधूत असे होते हा कौशिकगोत्री आश्वलायनशाखी देशस्थ ब्राह्मण होता याच्या पित्याचे नाव श्रीधर व आईचे लक्ष्मी होत *श्रीधरपत कळव गावचे कुळकर्णी होते तिथेच निरजनाचा* जन्म झाला माहूरची रेणुका ही त्याची कुलस्वामिनी होती घरची परिस्थिती गरिबीची असल्यामुळे निरजनाला नोकरीसाठी पुण्याला यावे लागले पुण्यात आल्यावर नष्टे नामक हुडेकऱ्याकडे कारभारी म्हणून त्याने नोकरी पत्करली त्या वेळी पुण्यातील बेलबागेत ठाकुरदासबाबा नावाच्या साधूची कीतने होत असत ठाकुरदासाची भावपूण कीतने ऐकून निरजनाची वृत्ती पालटली त्याने आपल्या वृत्तीतला तो पालट ठाकुरदासाला निवेदन केला त्यावर ठाकुरदास एवढेच म्हणाला ‘तू होशील रे नारायण !’ ते शब्द हाच प्रसाद समजून निरजन तिथून जो बाहेर पडला, तो पुन्हा आपल्या घरी गेलाच नाही दुसऱ्या दिवशी त्याने पायीच चिंचवड गाठले चिंचवडहून तो देहूला गेला तिथे इद्रायणीच्या पात्रात स्नान करीत असताना त्याने प्रतिज्ञा केली ‘आजपासून एक वष आणि सात दिवसाच्या आत जर मला दत्तदर्शन झाले नाही, तर मी देहत्याग करीन’

इथून पुढे तो हळूहळू साधनमाग अनुसरू लागला पुढे घोडेगाव, जुन्नर, *अशी यात्रा करीत तो अकोले मुक्कामी* जाऊन पोचला तिथेच त्याला दत्तात्रेयाचा स्वप्नदृष्टा त झाला

*तिथल्या मुक्कामात त्याच्यावर* एक विलक्षण सकट कोसळले एका तरुण मुलीचा पती कित्येक वष तिला सोडून निघून गेला होता एक दिवस त्या तरुणीने निरजनाला पाहिले तिच्या नवऱ्याच्या चेहऱ्या–मोहऱ्याशी निरजनाचे साम्य होते त्यामुळे तिला तो आपला नवराच वाटला तिने आपल्या बापाला सांगितल, की ‘माझा नवरा जोगडा बनून आला आहे’ मग तिच्या माहरच्या लोकानी त्याला घेरले ‘मी तो नव्हे !’ असे त्याने परापरीन सांगितले, पण कोणी त कबूल करीना अखेरीस त्याने आपली ज मापासूनची कथा त्या लोकाना सांगितली ती ऐकल्यावर मग त्या लोकाची खात्री पटली, की हा तो नव्हे मग त्यानी त्याची सुटका केला

त्यानतर तो सिन्नरमार्गे नासिक यथे गेला तिथे त्याला रघुनाथ स्वामी नामक एक सत्पुरुष भेटला त्यालाच निरजनाने आपला गुरू केले मग त्याने गुरूच्या मठातच दत्तजयतीचा उत्सव साजरा केला आणि तिथे राहूनच आपल्या चरित्राचा पूर्वार्ध काव्यबद्ध केला नतर पुनश्च तो यात्रेला निघाला



निरजन रघुनाथ

त्र्यबकेश्वर करून तो कोकणात उतरला तिथून त्यान गुजरात गाठले धमपूर, सुरत, बडोदा या ठिकाणाहून तो पुढे काठियावाडात गेला तिथून तो गिरनारला पोचला गिरनार हे दत्ताचे स्थान पण तिथे काही काळ राहूनही त्याला दत्तदशन झाले नाही मग तो तिथून द्वारकेला गेला या सव भ्रमतीत त्याची दत्तदर्शनाची ओढ सारखी वाढत होती प्रतिज्ञेची मुदतही *सपत आली होती द्वारकेतही इष्ट गोष्ट साध्य होत* नाही, असे पाहून तो पुनश्च गिरनारवर गेला व तिथल्या दत्तपादुकासमोर त्याने धरणे धरले इतके करूनही दत्तदशन झाले नाही, तेव्हा त्याने गुरूचे स्मरण करून, जवळच्या एका धोंड्यावर आपले डोके आपटण्यास प्रारभ केला आपल्या या अवस्थेचे त्याने स्वत च वणन केले आहे, ते असे—

जसें श्रीफळ देवाप्रती । नवस करुनि फोडिती ।
शकलें वेगळालीं होतीं । क्षण एक न लागता ।।
तयावरी मस्तक उचलून । पाषाणावरी मारिलें जाण ।
भडभडा रुधिर आंतून । यावयासी लागलें ।।

निरंजनाची ही अढळ निष्ठा पाहून दत्तात्रेयाने त्याला दर्शन दिले मग तो कृतार्थ होऊन गिरनारवरून खाली उतरला त्यानंतर प्रभास, सोमनाथ, इ तीर्थांच्या यात्रा करून तो पुनश्च नाशिक येथे आला तिथे आपल्या गुरूचे दर्शन घेऊन त्याने घडलेला सर्व वृत्तांत गुरूला निवेदन केला

पुढे थोड्याच दिवसांत मिरजेचे अधिपती श्रीमंत बाळासाहेब पटवर्धन यांनी निरंजनाला मिरजेला नेऊन त्याच्याकडून अनुग्रह घेतला यानंतर एके दिवशी मिरज येथेच कृष्णेच्या पात्रात निरंजनाने जलसमाधी घेतली मिरज येथील किल्ल्यात निरंजनाने स्थापन केलेली एकमुखी दत्तमूर्ती आजही पाहायला मिळते

याने आत्मचरित्र लिहिले असून प्राचीन मराठीतील अपवादात्मक आत्मचरित्रांत याच्या आत्मचरित्राची गणना होते आत्मचरित्राशिवाय अनुभवामृतपदबोधिनी आत्मबोधप्रकाशिनी, रघुनाथचरित्र, केशवचैतन्यकथाकल्पतरू इ ग्रंथ निरंजनाने अखेरच्या दहा वर्षांत लिहिले आहेत याखेरीज काही मराठी व हिंदी स्फुट पदेही त्याने रचली आहेत [द स इ , निरंजन रघुनाथाचे ग्रंथ– संपादक श्री य व्यं कोल्हटकर, १९३५ ]

## निरंजनस्वामी कऱ्हाडकर

(१६३७–१७२७ इ स ) एक गणेशभक्त हा कऱ्हाड येथील पाठक घराण्यात जन्मला याचे मूळ नाव येल्होबा असे होते निरंजनाला बालपणापासूनच गणेशभक्ती जडली होती एकदा समर्थ रामदासस्वामी कऱ्हाडला आले असताना जगन्नाथबावा रामदासी याने छोट्या निरंजनाला त्यांच्याकडे नेले, आणि त्यांना विनविले, की 'या मुलाला एक मंत्र सांगावा ' तेव्हा समर्थ निरंजनाला म्हणाले 'तू सीतालक्ष्मणयुक्त कोदंडपाणी श्रीरामाच्या सावळ्या मूर्तीचे ध्यान कर, म्हणजे मग मंत्र सांगतो ' निरंजनाने श्रीरामाचे ध्यान करण्यास प्रारंभ केला, पण ध्यानात गणेशच पुढे उभा राहू लागला समर्थांना त्याने ही वस्तुस्थिती सांगितली मग समर्थ त्याच्या डोक्यावर हात ठेवून म्हणाले 'तू साक्षात गणपती आहेस गणपतीच तुला उपदेश करील । '

त्यानंतर निरंजनाने गणेशाची आराधना आरंभिली त्याचे उपनाम पाठक असूनही देवतुल्य चारित्र्यामुळे लोक त्याला (आणि त्याच्या वंशजांनाही) देव म्हणून संबोधू लागले पठणचे काशीराजस्वामी नामक गणेशभक्त हे देवाचे गुरू होत शंकराचार्य → हस्तामलक → भास्कराचार्य → लयानंद → सहजसिद्ध → लक्ष्यानंद → परमानंद → काशीराज → निरंजन अशी ती गुरुपरंपरा आहे

निरंजन हा गृहस्थाश्रमी होता त्याच्या अनेक अपत्यांपकी रत्नाकरदेव याला प्रसिद्ध संत कृष्णदयार्णव याची उमा नावाची कन्या दिली होती रत्नाकराचा पुत्र भगवंत देव याने आपल्या आजोबाचे गद्य–चरित्र लिहिले आहे

निरंजनाच्या चारित्र्याचा भक्तभाविकांवर केवढा प्रभाव होता, याचे प्रत्यंतर भगवंत देवाने केलेल्या समाधिवर्णनावरून कळून येते ते वर्णन असे–

" महाशोके दीर्घस्वरं आक्रोश करिते वेळे कित्येकांचे हृदय स्फोट होऊं पाहाति कोणी भूमीवर लोळती कोणी वक्ष–मुखें पिटती, मूर्छा पावती कित्येक देहभान विसरले कित्येक गिळाचक्रत जाहले, वस्त्रयज्ञोपवीत गेलें ते नकळे कोणी म्हणे दिवस की रात्री ? कोणी म्हणे हे स्वप्नसंपत्ति जो विश्वाचा मायबाप तो कसा आम्हासी मोकलील ? कोणी म्हणे, आम्हासी मरनाचि भले कोणी म्हणे, जळी देह टाकावे, की पर्वती कवती घालावे की विषप्रयोगें नाशावे किमर्थ वाचाव या दु खी ' "

निरंजनाने काशीयात्रेसह अनेक गणेशस्थानांची यात्रा केली त्याने अनेकांना गणेशभक्तीची दीक्षा दिली पुढे पंढरपूर मुक्कामी त्याने गणेशगीतेवर टीका लिहून गणेशभक्तिपर अशी काही स्फुट पदेही रचली

अमलाश्रमक्षेत्र या नावाने गाणपत्यांना प्रिय असलेल्या नामलगावी निरंजनस्वामींची समाधी असून, तिथेच त्याचा पुत्र व नातू यांच्याही समाध्या आहेत [म म रा वि ]

## निरंजनी संप्रदाय

एक प्रसिद्ध संतपरंपरा निरंजन भगवान नामक साधूने याचे प्रवर्तन केले, असे मानले जाते पण त्या साधूविषयी काहीही माहिती उपलब्ध नाही तो निर्गुण ब्रह्माचा उपासक होता, एवढेच कळते निरंजनी संप्रदाय हे वेदान्ताने प्रभावित असा नाथपंथाचे विकसित रूप आहे निरंजनी संत निर्गुण व निराकार परब्रह्मालाच निरंजन म्हणतात आणि ते अज, अविनाशी, अगोचर, नित्य, अचल व अखिल चराचराला व्यापणारे आहे, असे मानतात त्यांच्या मते इतर सर्व देव व अवतार गौण असून, त्यांची पूजा करण्याची आवश्यकता त्यांना भासत नाही त्यांचा राम निर्गुण ब्रह्मरूपी असून, त्या परमात्म्याच्या ठायी चित्त लावावे, असा उपदेश त्यांनी केला आहे अखिल विश्वाला

मुख्यत कनक, कामिनी ह्य वस्तूना ते मायेचा पसारा मानतात

राघवदास याने आपल्या भक्तमाल नामक ग्रथात या सप्रदायातील बारा प्रमुख प्रचारकाची नाव दिली आहत, ती अशी– जगन्नाथदास, श्यामदास, का हडदास, ध्यानदास, खेम दास, नाथ, जगजीवन, तुरसीदास, आनददास, पूरणदास, मोहनदास व हरिदास याच्याशिवाय निपट निरजन, भगवान दास, सेवादास मनोहरदास, निरजनदास व रामप्रसाद ह निरजनी सतही प्रसिद्ध आहेत

हा पथ प्रथम ओडिसात उगम पावला आणि तिथून पूर्वेकडे पसरला कबिराच्या पूर्वी काही शतके हा पथ सुरू झाला होता, असे म्हणतात ह म च्या ९–१० व्या शतकातील सिद्धाच्या वचनात निरजनी उपासनेचा उपदेश आढळतो कबीर व इतर काही सत याच्या वचनावरून असे अनुमान करता येते, की ही निरजनी उपासना राजस्थानात व पजाबात बरीच लोक प्रिय झाली होती नाथपथाप्रमाणच निरजनी पथ अद्यापही पजाब, राजस्थान, कच्छ, सिंध, ओडिसा व बगाल या प्रदेशात काही ठिकाणी प्रचलित आह

निरजनी सप्रदायात शू य मडळ व उलटी साधना याना प्राधान्य आह ज्ञान, भक्ती व रहस्यवाद या बाबतीत निर्गुण व निरजनी सप्रदायात साम्य दिसते अवतार, मूर्तिपूजा, कर्म काड वर्णव्यवस्था या कल्पना निरजनी सताना अमान्य असल्या, तरी त्यानी त्याचा कडक निषेध मात्र केला नाही त्याची वृत्ती उदार व सहिष्णू होती सगुणोपासकाविषयी ते सहानुभूती दाख वितात सामान्य मनुष्याला उपासनेसाठी ईश्वराची मूर्ती आवश्यक वाटते हे जाणून हरिदास व तुरसी यानी निरजनी पथाच्या लोकाना मूर्तिपूजेला विरोध न करण्याविषयी उपदेश केला आहे तुरसी म्हणतो–

> **मूर्ति में अमूरति बसै, अमल आतमा राम ।**
> **तुरसी भरम बिसारि कै, ताही को ल नाम ।।**

अर्थ– मूर्तीमध्ये अमूर्त वसते राम हाच निर्मल आत्मा होय तुरसीदास म्हणतो की (यासबधी मनात असलेले) भ्रम विसरून जा व त्याच रामाचे नाव घ्या

रामानदाच्या प्रभावामुळे निरजनी सप्रदायात प्रेम व योग याना स्थान मिळाले असावे रामानदाच्या शिष्याप्रमाणेच तुरसीदासाने प्रेमाभक्ती या दहाव्या भक्तीचे वर्णन केले आहे त्याने नवविधा सगुण भक्तीचा नवा अर्थ अद्वैत दृष्टीने लावला असून, त्यात हृदयस्थ ब्रह्मज्योतीचे ध्यान करावे, असे सागितले आहे प्रेमाभक्ती ही सर्वश्रेष्ठ असून, निवृत्तिमार्ग दाखवणारी नवविधा भक्ती पूर्ण झाल्यानतर तिची साधना करायची असते, असे त्याचे प्रतिपादन आहे

या सप्रदायाच्या मतप्रणालीवर सिद्धनाथ आणि कबीर पथी सत याच्या विचाराचा बराच प्रभाव पडलेला दिसतो

हरिदास निरजनी हा या पथातला सर्वश्रेष्ठ कवी होय त्याची काव्यरचना श्रीहरिपुरुषजी की वाणी या नावाने प्रसिद्ध आहे निपट निरजन हा महान सिद्ध पुरुष होता त्याचे शात सरसी व निरजन सग्रह हे दोन ग्रथ प्रसिद्ध आहत भगवानदास निरजनी याचे अनक ग्रथ असून, त्यातील अमन धारा, प्रेमपदार्थ व गीतामाहात्म्य ह विशेष उल्लेखनीय आहत सेवादासाची रचना सर्वांत जास्त आह त्याने कबिराला आपला गुरू मानले होते तुरसीदास निरजनी हा उच्च श्रेणीचा कवी असून, त्याचीही काव्यरचना विपुल आहे [ हिं सा को , नि स तु नि , हिं स बौ प्र ]

**निरंजनीसाधू** एक जात हे लोक राजस्थानात आढळतात नागोर जिल्ह्यातला एक जाट हरिदास हा याचा गुरू होता त्याने घालून दिलेल्या नियमानुसार हे वाग तात या लोकाना निरजनी असे नाव का मिळाले, त्यासबधी एक आख्यायिका सागतात, ती अशी –

एकदा हरिदासाने एका गर्भवती हरिणीची शिकार केली त्या शिकारीमुळे त्याला इतका पश्चात्ताप झाला, की त्याने आपल्या अगावरचे कपडे फाडून फेकून दिले आणि तो विवस्त्र होऊन निरजनाच्या उपासनेसाठी अरण्यात निघून गेला तिथे त्याने बारा वर्षे निरजनाची उपासना केली, म्हणून त्याच्या अनुयायाना निरजनी असे म्हणू लागले

हरिदासाने बावन्न शिष्य केले होते त्या प्रत्येक शिष्याने आपली एकेक शाखा निर्माण केली

या जातीतील काही लोक ब्रह्मचारी असतात, तर काही गृहस्थ असतात ब्रह्मचारी लोकाना निहग साधू असे म्हणतात व ते आपल्याजवळ सतत खाकी गोधडी बाळगतात

हे मासाहार करीत नाहीत व कादा–लसूणही खात नाहीत याच्या स्त्रिया शुभ्र घागरा वापरतात त्यांना ओळखण्याचे हेच एकमेव साधन आहे हे मृताना जाळतात [ रा जा ]

**निरडे** एक जमात याना निरढी किंवा निरढे असेही म्हणतात हे लोक भिल्ल असून मुसलमान बनलेले आहेत याची वस्ती महाराष्ट्रातील सातमाळा व अजटा डोंगराच्या पायथ्याशी जामनेर व पाचोरे या तालुक्यात आहे याचे व तडवी भिल्लाचे आचार विचार सारखे असले, तरीही त्याच्यात लग्नसबध होत नाही [ महाराष्ट्राचे जिल्हे– जळगाव ]

**निराकारी** एक ग्रामदेवता निराकारी म्हणजे आकाररहित अथवा प्रतीकावाचून कल्पिलेली देवता हिला निरकारी असेही म्हणतात कोकणात या देवीची अनेक स्थाने आहेत या स्थानाभोवती जी झाडे असतात, त्यांची कवळकाठी कोणी तोडायची नसते निराकारीला गावातर्फे वार्षिक पूजा महानैवेद्य होतो मग तिला ब्राम्हणी घालतात मुले फार रडू लागली, म्हणजे निराकारीला लहानसा पाळणा बांधण्याचा नवस बोलतात आणि देवी नवसाला पावली म्हणजे एका झाडाला पाळणा बांधतात [ चित्पावन ]

**निरातमत** एक पंथ गुजरातमध्ये या पंथाचे अनुयायी आहेत निरात नावाच्या एका साधूने या पंथाची स्थापना केली, म्हणून या पंथाला निरातमत अशी संज्ञा मिळाली आहे निराताचा दर पौर्णिमेला डाकोरवासी रणछोडच्या दर्शनाला जाण्याचा नियम होता जाताना तो बरोबर तुलसीपत्र घेऊन जात असे एके दिवशी वाटेत त्याला एका मुसलमानाने विचारले 'अरे, परमेश्वर तुझ्याजवळ असताना तू हातात तुलसीपत्र घेऊन कुणाला शोधतोस ?'

मुसलमानाच्या त्या प्रश्नाने निरात अंतर्मुख बनला व तेव्हा पासून त्याचे मन वेदान्ताकडे वळले त्याने त्या मुसलमानालाच आपला गुरू केले इ स १८४३ मध्ये निरात मरण पावला

कोळी लोक या पंथाचे अनुयायी आहेत या पंथाच्या प्रभावामुळे त्यांच्यात रूप सुधारणा झाली, असे सांगतात हे लोक गुरूच्या गादीची पूजा करतात, भजने म्हणतात आणि गळ्यात माळ धारण करतात [ भा म द ]

**निरालंब उपनिषद** एक नव्य उपनिषद हे यजुर्वेदाशी संबंधित असून गद्यात आहे इथे निरालंब या शब्दाचा अर्थ ब्रह्म असा आहे यात प्रारंभी जीव, ईश्वर व प्रकृती यांच्याविषयी प्रश्न उपस्थित करून त्या सर्वांचे उत्तर निरालंब ब्रह्म असे दिले आहे या ब्रह्मापासूनच जगाची उत्पत्ती होते प्रकृती ही परमात्म्याची शक्ती आहे ईश्वर एक असून अनेक शरीरांच्या आश्रयामुळे तो बहुरूप दिसतो सुख म्हणजे ब्रह्मज्ञानानंतर येणारी आनंदाची स्थिती होय विषयांची इच्छा म्हणजे दुःख विषयसुखात बुडालेल्या लोकांची संगत म्हणजे नरकवास 'मी जन्मलो' ही अनादी अविद्येमुळे निर्माण होणारी भावना म्हणजे बंध नित्यानित्यवस्तुविवेक व मोहपाशाचे छेदन म्हणजे मोक्ष चिदात्मक ब्रह्माकडे नेणारा तो गुरू बाह्य जगाचे आकर्षण ज्याचे सुटले, तो खरा शिष्य प्राणिमात्रांच्या हृदयात निवास करणाऱ्या शुद्ध ज्ञानाचे प्रतीक असणारा, तो विद्वान कर्तेपणाच्या अभिमानाने पछाडलेला तो मूढ उपासतापासांनी शरीर कष्टविणारा व विषयवासना प्रदीप्त असलेला, तो आसुर कामनेची बीजे जाळून टाकणे म्हणजे तप आणि सच्चिदानंद ब्रह्म हे परमपद होय [ श्री रा ग देसाई ]

**निरालंबासन** एक यौगिक आसन या आसनात हात पाय वगैरे अवयव विशिष्ट पद्धतीने ठेवण्याचा नियम नसतो, म्हणून याला निरालंबासन म्हणतात शरीर सहजपणे अधिकात अधिक वेळ ठेवता येईल त्या स्थितीत ठेवून निरालंबाचे (परमेश्वर) 'सोऽहं' मंत्राने ध्यान व चिंतन करणे याला निरालंबासन योग म्हटले आहे [ सुबोध स्तोत्रसंग्रह ]

**निराला** (इ स १८९६–१९६१) एक प्रसिद्ध हिंदी कवी याचे नाव सूर्यकांत त्रिपाठी असे होते याचा जन्म बंगालमधील महिषादल नामक संस्थानात मेदिनीपूर येथे इ स १८९६ च्या वसंत पंचमीला झाला उ प्रदेशातील उन्नाव जिल्ह्यामधील गढकोला हे याचे मूळ गाव होते याचे वडील पं रामसहाय हे नोकरीनिमित्त मेदिनीपूर येथे जाऊन स्थायिक झाले होते

सात आठ वर्षांचे असतानाच निराला हे बंगाली भाषेत काव्यरचना करू लागले होते बंगालमध्ये वास्तव्य झाल्यामुळे बंगाली ही त्यांची मातृभाषा झाली होती वडिलांच्या आकस्मिक मृत्यूमुळे त्यांना आपले शिक्षण अर्धवट सोडून द्यावे लागले मग त्यांनी महिषादल संस्थानातच छोटीशी नोकरी मिळवली पण तिथे ते फार दिवस राहू शकले नाहीत

वयाच्या १४ व्या वर्षी त्यांचे लग्न झाले पत्नीचे नाव मनोहरादेवी होते तिनेच त्यांना खडीबोली हिंदीचा अभ्यास करायला उद्युक्त केले त्यापूर्वी त्यांना हिंदीचे ज्ञान मुळीच नव्हते पण मग त्यांनी हिंदी शिकण्यासाठी अतिशय परिश्रम केले हिंदी शिकत असतानाच त्यांना हिंदी भाषेत लेखनही सुरू केले जुही की कली ही त्यांची रचना त्याच काळातली आहे

निराला हे बावीस वर्षांचे होतात, तोच त्यांची पत्नी अचानक मरण पावली त्यामुळे त्यांच्या मनावर दारुण आघात झाला त्यानंतर लवकरच त्यांच्या कुटुंबातील इतरही अनेक माणसे शीतज्वराच्या साथीमुळे एकदम मृत्युमुखी पडली केवळ सहा लहान मुले तेवढी जिवंत राहिली सारे घर सुने झाले व त्या मुलांचा भार या कवीवर पडला

तारुण्य, भव्य शरीर, असामान्य रूप आणि छाप पाडण्याजोगे व्यक्तिमत्त्व लाभलेले असूनही, निराला पुन्हा विवाहाच्या फंदात पडले नाहीत त्यानंतर काही वर्षे त्यांनी वृत्तपत्रांच्या

संपादकीय विभागात काम केले. त्या काळातील त्यांच्या कविता अनामिका व परिमल या काव्यसंग्रहांत समाविष्ट आहेत. याच काळात चरितार्थासाठी म्हणून त्यांनी कथा व कादंबऱ्याही लिहिल्या व त्या पुष्कळ लोकप्रिय झाल्या.

निराला हे हिंदीतील युगप्रवर्तक कवी मानले जातात. रीतिकालीन छंदोबद्ध काव्यरचना त्यांना कृत्रिम वाटे, म्हणून त्यांनी मुक्तच्छंद रचना सुरू केली. त्यांच्या काव्यातील भाषा, भाव आणि छंद सर्वच काही स्वच्छंद आहे. त्यांच्या काव्यरचनेवर बंगाली साहित्याचा पुष्कळ प्रभाव दिसून येतो. गीतिका या संग्रहातील गीतांचे स्वर, ताल व लय बंगाली गीतांप्रमाणे इंग्रजी पद्धतीचे वाटतात. काव्यरचनेचे विविध प्रयोग त्यांनी निर्भयपणे केले. त्यांच्या काव्यातील ओज, उन्मेष व आत्मविश्वास यामुळे त्यांना असामान्य कीर्ती लाभली.

निराला यांचे सारे जीवन संघर्षातच गेले. त्यांना सतत प्रतिकूल परिस्थितीला तोंड द्यावे लागले. त्यांचे धैर्य असामान्य होते. त्यांच्यावर अनेक संकटे आली, पण ते कधी डगमगले नाहीत. परिस्थितीपुढे वाकून किंवा मोहवश होऊन त्यांनी आपल्या उच्च तत्त्वांना कधीही मुरड घातली नाही. त्यांनी आपले संघर्षमय जीवन आणि त्याविषयीची सहनशीलता या गोष्टी पुढील काव्यपंक्तींत व्यक्त केल्या आहेत–

**मैं जीर्ण साज बहु छिद्र आज तुम मधुल सुरंग सुवास सुमन,**<br>**मैं हूं केवल पदतल आसन तुम सहज विराज महाराज !**<br>**ईर्ष्या नहीं, मुझसे, यद्यपि मैं ही वसंत का अग्रदूत !**

अर्थ – माझा वेष जीर्ण व बहुच्छिद्र आहे. तू कोमल सुरंग सुवासिक असे फूल आहेस. मी केवळ तुझ्या पदतलाचे आसन आहे. तू महाराज बनून त्यावर लीलया विराजमान झाला आहेस. असे असले, तरी माझ्या मनात तुझ्याविषयी ईर्ष्या नाही, मत्सर नाही, कारण आगामी वसंताचा मीच अग्रदूत आहे.

सांप्रतचे जग भौतिक विज्ञानाच्या बाबतीत वेडे बनले आहे. प्रतिदिनी नवे नवे वैज्ञानिक शोध लागत आहेत, पण त्यामुळे बरेच मानवाचे मन मात्र आहे तसेच स्वार्थी, संकुचित, द्वेषी, दुरभिमानी असे राहिले आहे. अशा स्थितीत केवळ वैज्ञानिक विकासाने जगाचे भले होणार नाही, उलट त्याच्यावर प्रलयकारी अनर्थच कोसळेल, अशी त्यांची धारणा होती. ते एका कवितेत लिहितात –

**आज सभ्यता के वैज्ञानिक जड विकास पर**<br>**गर्वित विश्व नष्ट होने की ओर अग्रसर**<br>**स्पष्ट दिख रहा, सुख के लिए खिलौने जैसे**<br>**बने हुए वैज्ञानिक साधन, केवल पैसे**<br>**आज लक्ष्य में मानव के, स्थल जल अंबर**<br>**रेल-तार बिजली, जहाज नभयानों में भर**<br>**वर्ग कर रहे हैं मानव, वर्ग से वर्गगण**<br>**भिडे राष्ट्र से राष्ट्र, स्वार्थ से स्वार्थ विचक्षण ।**

अर्थ – विश्वाला वैज्ञानिक पण जड विकासाचा गर्व झाला आहे. ते आज विनाशाच्या मार्गानेच जात आहे, हे स्पष्ट दिसते. मनोविनोदनासाठी जशी खेळणी, तसे आजचे वैज्ञानिक (सत्ताधाऱ्यांच्या हातची) खेळणी बनले आहेत. केवळ पैसा हेच आजच्या मानवाचे लक्ष्य बनले आहे. जल, स्थल, आकाश, या ठिकाणी आगगाडी, तारायंत्र, वीज, आगबोटी, विमाने असे सगळे निर्माण करून मानव गर्विष्ठ बनला आहे. एका वर्गाशी अनेक वर्गांचा समुदाय, राष्ट्राशी राष्ट्र आणि स्वार्थाशी स्वार्थ विग्रह करायला सिद्ध झाला आहे.

निराला यांनी तत्कालीन सामाजिक, धार्मिक, साहित्यिक, इ. भिन्न क्षेत्रांतील जुन्या रूढी, अंधश्रद्धा व निर्जीव संस्कार यांवर प्रखर टीका करून समाजाला सुधारण्याचा खूप प्रयत्न केला. समाजकल्याण हेच त्यांचे उद्दिष्ट होते. मात्र त्यांचे विचार असे क्रांतिकारक असले, तरी त्यांना आपल्या प्राचीन संस्कृतीचा व परंपरांचा पूर्ण अभिमान होता.

निराला यांना प्रथम महाप्राण निराला म्हणत. पुढे त्यांच्या काव्यातील असामान्य गुणांमुळे ते महाकवी ठरले. त्यांच्या काव्यरचनेत वास्तववादाप्रमाणेच स्वप्नरंजनही आहे. त्यांच्या अनिर्बंध काव्यरचनेमुळे ते स्वच्छंदवादी कवी मानले जातात.



महाकवी निराला

जीवनातील सर्व क्षेत्रांत त्यांच्या कवितेचा विलास झालेला आढळतो. त्यांची प्रतिभा सर्वस्पर्शी होती. ते अद्वैतवादी होते,

त्यांना परब्रह्म मान्य होते, पण मायावाद मान्य नव्हता. सर्व धर्मांवर निष्ठा असूनही ते मानवतावादी होते.

निराला यांच्या काव्यात क्रांतीचा आवेश भरपूर दिसतो. क्रांतीवाचून जनता मुक्त होणार नाही आणि तिच्यातले दैन्य, दारिद्र्य, ढोंग, दुर्गुण हे सारे हीण जळून जाणार नाही, अशी त्यांची दृढ श्रद्धा होती. म्हणून महिषासुरमर्दिनी, चंडमुंडघातिनी अशा श्यामा देवीला पुन्हा एकदा ते आपले असुरनिर्दालनाचे नृत्य करायला सांगतात–

**एक बार बस और नाच तू श्यामा ! सामान सभी तयार**
**कितने ही हैं असुर, चाहिए कितने तुझ को हार ?**
**कर मेखला मुंडमालाओं से बन मन अभिरामा ।**
**एक बार बस और नाच तू श्यामा ।। लेगी खड्ग और तू खप्पर,**
**उसमें रुधिर भरूंगा माँ मैं अपनी अंजलि भर भर ।**
**बंद हो जाएंगे कितने कोमल छंद, सिंधु राग का होगा तब आलाप।।**

अर्थ – हे श्यामादेवी, तू पुन्हा एकवार नृत्य कर. त्यासाठी सर्व सामग्री तयार आहे. तुला असुरमस्तकांचे हार हवे तेवढे मिळतील. तू मुंडमालांची मेखला कमरेला बांध आणि मनोभिराम बन. तुझ्या एका हाती खड्ग आणि दुसऱ्या हाती खापर असेल. मी माझ्या ओंजळी भरभरून हे माते, त्या खापरात रक्त भरीन. सारे कोमल छंद त्या वेळी बंद होतील आणि सिंधु रागाचा आलाप सुरू होईल.

एका जातीकडून दुसऱ्या जातीचे शोषण होत असलेले त्यांना पाहवत नव्हते. समाजातल्या धनकनकसंपन्न व्यक्तींच्या मावती साऱ्या सुखसोयी, आनंदविलास, हर्षउल्हास कसे रुंजी घालीत असतात, त्याचे उपरोधिक वर्णन त्यांनी आपल्या दाना या कवितेत केले आहे.

**चूंकि यहाँ दाना है, इसीलिए दीन है, दीवाना है।**
**लोग हैं, महफिल हैं, नग्मे हैं, साज हैं, दिलदार हैं और दिल हैं**
**शम्मा है, परवाना है, चूंकि यहाँ दाना है ।**

अर्थ – इथे दाणा आहे म्हणून सारे काही आहे. दीन आहे, मूर्ख आहे, लोक आहेत, बैठकी आहेत, साज शृंगार आहेत, दिल आहे आणि दिलदारही आहेत, दीपज्योत आहे आणि पतंगही आहे, कारण इथे दाणा आहे.

राम की शक्तिपूजा हे निराला यांचे एक उत्कृष्ट खंडकाव्य असून, त्यात अभिजात विदग्ध वाङ्मयातील विशेष गुणांप्रमाणेच स्वच्छंदवादी वाङ्मयातीलही गुणविशेष आढळतात. रावणावर विजय मिळविण्यासाठी रामाने देवीची आराधना केली ही देवी–भागवतातली कथा कवीने या खंडकाव्यात सांगितली आहे. तिचा सारांश असा– एकशे आठ कमळे देवीला वाहून तिची पूजा करण्याचे रामाने ठरवले. आठव्या दिवशी आराधना पूर्ण करताना एक कमळ कमी झालेले दिसले. आयत्या वेळी दुसरे कमळ आणणे शक्य न झाल्यामुळे राम आपले एक नेत्रकमल देवीला अर्पण करायला उद्युक्त झाला. त्या क्षणी शक्तिदेवी प्रकट झाली व रामाच्या देहात प्रविष्ट झाली. नेत्रकमल अर्पण करण्याची ही कल्पना शिवमहिम्न स्तोत्रावरून कवीने घेतलेली आहे. निरालांनी आपल्या कल्पनाशक्तीने हा कथा सुरेख रंगवली असून शक्तिपूजेमुळे वीरता, विनय व त्यागवृत्ती हे गुण निर्माण होतात, असे त्या काव्यात दाखवले आहे. या खंडकाव्याची भाषा अत्यंत ओजस्वी आहे.

कथालेखक, कादंबरीकार व समीक्षक म्हणूनही निराला हे ख्यातनाम ठरले. त्यांच्या कथा सामान्य जनांच्या जीवनाचे उत्तम दर्शन घडवणाऱ्या असून, त्या सत्यावर आधारित आहेत. ते साहित्यातील विविध विचारांचे गाढे अभ्यासक होते. त्यांचे शब्दज्ञान व व्याकरण पक्के होते. संस्कृत, बंगाली, इंग्रजी, उर्दू इ. भाषांतील साहित्याचेही त्यांना चांगले ज्ञान होते. त्यामुळे त्यांचा साहित्यपरीक्षणाचा अधिकार मोठा मानला जात होता. ते लेखकाच्या वैयक्तिक जीवनाकडे लक्ष न देता, त्याच्या लेखनाचे निःस्पृहपणे परीक्षण करीत. विरोधकाच्या गुणांची ते जशी प्रशंसा करीत, तशीच मित्राच्या दोषांवर कडक टीका करायलाही ते कचरत नसत.

निराला हे जसे महाकवी होते, तसेच ते संतप्रवृत्तीचेही होते. त्यांना भारतीय स्वातंत्र्याबद्दल आस्था होती. राष्ट्रातल्या दुर्गुणांचे किल्मिष नष्ट व्हावेसे वाटत होते. त्यांच्या अंतःकरणात दीनदुःखितांविषयी अपार कळवळा होता. परमेश्वराकडे त्यांनी जे वरदान मागितले आहे, ते त्यांच्या स्वभावाचे आणि आकांक्षांचे निदर्शक ठरते–

**वर दे वीणावादिनी वर दे।**
**प्रिय स्वतंत्र रव अमृत मंत्र नव भारत में भर दे ।**
**कलुष भेद तम हर प्रकाश भर जगमग जग कर दे ।**
**जला दे, जीर्ण शीर्ण प्राचीन क्या करूंगा तन जीवनहीन ।**
**दलित जन पर करो करुणा**
**दीनता पर उतर आए प्रभु तुम्हारी शक्ति अरुणा ।**

भावार्थ – हे वीणावादिनी, मला वर दे. भारत देशात स्वातंत्र्याचा अमृतमंत्र भरून टाक. भेद आणि किल्मिष यांचा अंधार नष्ट कर. सर्वत्र प्रकाशाची दिवाळी कर. प्राचीन, जीर्णशीर्ण असेल ते जाळून टाक. प्राणहीन शरीर काय करायचे आहे ! दलित जनांवर करुणा कर. प्रभो, तुझ्या अरुणवर्ण शक्तीने सारे दैन्य नष्ट करून टाक.

आचार्य क्षितिमोहन सेन यांनी यांच्या सर्व साहित्याचे मंथन करून म्हटले आहे की कबीर, रवींद्रनाथ आणि निराला हे

एकाच परंपरेत वसणार सतपुरुष आहेत [त्रिपथगा, निराला-संस्मरण – अव, फेब्रु १९६२, हिं वि को, श्री वेंकटेश नारायण तिवारी–आजकल, जाने १९६२, श्री गोविंद सीताराम गुळे–साप्ता हिंदु, १८ ऑक्टो १९६४]

**निराहारव्रत** व्रजमंडलातील स्त्रियांचे एक काम्य व्रत पुत्र प्राप्तीच्या इच्छेने हे करतात ती इच्छा पूर्ण झाल्यावर स्त्रिया आपल्या नवजात पुत्राला घेऊन नगरकोटच्या देवीच्या यात्रेला जातात व्रत करणारी स्त्री यात्राकालात निराहार उपास करते यात्रेच्या वेळा जी गीते म्हटली जातात, त्यानाही निराहार गीते असेच म्हणतात दुर्गेची सखी सीयल देवी ही या गीतांची मुख्य देवता असते त्यातले एक गीत असे –

**ए म ठाढी रे ठाढी सीयल द्वार तेरो मांधर बाजत म सुनौं।**
**ए म चली भगत । तेरे संग, तब सिर धरि लियौ पालनौ।**
**ए म पहुंची कोस पचास, तब डेरा वयौ हरियल बाग में।**

अर्थ – हे सीयल देवी, मी तुझ्या दारी येऊन ठाकले आहे तुझ्या मंदिरातली वाजंत्री मला ऐकू येत आहे मी तुझी भक्त तुझ्याकडे आले आहे डोक्यावर पाळणा घेऊन आले आहे पन्नास कोस चालून आल्यावर मी हरियाल बागेत मुक्काम केला आहे

अशी अनेक गीते आहेत [ब्र जा प्र श]

**निरुक्त** एक संस्कृत ग्रंथ ऋग्वेदी दशग्रंथी ब्राह्मणाला जे दहा ग्रंथ पाठ करावे लागतात त्यात निरुक्ताचा अंतर्भाव होतो निरुक्त ही निघंटूवरचा टीका आहे पण निरुक्त व निघंटू या दोन्ही ग्रंथांना निरुक्त अशी संज्ञा पूर्वीपासूनच पडली आहे

यास्क हा निरुक्ताचा कर्ता आहे दुर्गाचार्य म्हणतो, की अर्थाचे परिज्ञान घडवीत असल्यामुळे निरुक्त हे इतर वेदांगे व शास्त्रे यामध्ये श्रेष्ठ आहे अर्थ मुख्य असतो व शब्द गौण असतो शब्द आणि अर्थ यांचे निर्वचन कसे करावे, याचे ज्ञान निरुक्ताच्या द्वारेच होऊ शकते म्हणून वेदार्थ जाणण्यासाठी निरुक्ताची नितांत आवश्यकता आहे निरुक्त हे व्याकरण शास्त्राचे पूरक आहे

निरुक्ताचे चौदा अध्याय आहेत परंतु त्यातील तेरा व चौदा हे अध्याय यास्करचित नसून दुसऱ्या कोणाचे तरी असावे, म्हणून त्या दोहोना परिशिष्ट असे म्हणतात निरुक्त तीन कांडात विभक्त आहे–

**आद्यं नैघण्टुकं काण्डं द्वितीयं नैगमं तथा।**
**तृतीयं दैवतं चेति समाम्नायस्त्रिधा स्थितः ॥**

अर्थ – निरुक्ताची तीन कांडे असून पहिल्या कांडाला नैघंटुक, दुसऱ्याला नैगम व तिसऱ्याला दैवत असे म्हणतात अशा प्रकारे निरुक्ताचे तीन प्रकार होतात

निरुक्त शब्दाचे निर् + उक्त असे दोन भाग होतात निर् म्हणजे निःशेषेकरून जे उक्त म्हणजे म्हटलेले किंवा सांगितलेले ते निरुक्त होय निरुक्तात शब्दाचा सामान्याने विचार केला जातो त्यात शब्दांचे केवळ अर्थ दिलेले नसतात, तर त्या अर्थाशी जुळणारी अशी त्यांची व्युत्पत्ती केलेली असते म्हणजेच प्रत्येक शब्दाची बारकाईने छाननी केलेली असते याविषयी निरुक्तकाराचा सिद्धांत श्री व का राजवाडे यांनी दिला आहे, तो असा–

नामात दिसणाऱ्या धातूचा अर्थ आणि त्या नामाचा अर्थ हे जर एकच असतील तर, व दिसणाऱ्या धातूपासून व्याकरणाच्या नियमांनी ते नाम जर बरोबर सिद्ध होत असेल, तर त्या धातूपासून त्या नामाची व्युत्पत्ती करावी गम्, रम्, नम्, यम, दा, पा या धातूपासून व्याकरणनियमांनी गती, गमन, रती, रमण, नती, नमन, यम, यती, नियम, नियमन, दान, पान अशी नामे तयार झाली आहेत मूळ धातूचा अर्थ त्या नामात आहे पण अशा नामांची संख्या फारच थोडी आहे नामात दिसणाऱ्या धातूचा अर्थ व नामाचा अर्थ हे जेव्हा भिन्न असतात व नामाचा अर्थ ज्यात आहे अशा धातूपासून व्याकरणनियमांनी जेव्हा ते नाम बनवता येत नाही, तेव्हा व्युत्पत्ती कशी करावी, हा प्रश्न होतो पण निरुक्तानी तो पुढीलप्रमाणे सोडवला आहे – जेव्हा धातू व नाम यांच्यात कोणताही मेळ नसतो, तेव्हा व्युत्पत्ती करणाऱ्याने त्या नामाचा अर्थ लक्षात घ्यावा व अर्थावर भिस्त ठेवून (अर्थनित्य) तदर्थक धातू शोधून काढून त्या धातूचे नामाला जवळ असणारे रूप कोणते ते पाहून त्या नामाची व्युत्पत्ती करावी उदाहरणार्थ वधू हा शब्द या शब्दात वध धातू दिसतो, पण वधूचा ठार मारण्याशी काही संबंध नसल्याने दुसरा जवळचा धातू शोधून काढला पाहिजे असा धातू वह् हा आहे कारण वधू माहेराहून सासरी व सासरहून माहेरी नेली जाते, वह् + ऊ = वहू = वधू पण अशीही स्थिती जिथे नसेल तिथे तदर्थक धातूच्या रूपात व नामात एखादे समान व्यंजन असले म्हणजे झाले उदा० अग्नी शब्दाच्या व्युत्पत्ती पाहा इथ अग्नी शब्दाने जे जे अर्थ सूचित होतात, त्या त्या अर्थांना अनुलक्षून व्युत्पत्ती दिल्या आहेत अग्नीसंबधाने आपल्या मनात कोणकोणते विचार येतात? तो यज्ञात एका कुंडातून दुसऱ्या कुंडाकडे नेला जातो किंवा आहुती म्हणून जे काही त्याच्या तावडीत सापडते ते तो आत्मसात करतो, त्या वेळी आला पदार्थ आपला ओलावा

टाकून देता, शिवा अग्नी देवाचा सेनापती असल्याने तो त्याना आघाडीवर घेऊन जातो या सर्व अर्थांच्या अनुरोधाने अग्नी शब्दाचे तुकडे पाडून व्युत्पत्ती केल्या आहेत शब्द कितीही कठीण असो, त्याची अशा रीतीने व्युत्पत्ती केलीच पाहिजे अशी निरुक्तानी आग्रहाची आज्ञा केली आहे तदर्थक धातू पासून व्याकरणनियमानी असा शब्द जरी सिद्ध होत नसला, तरी त्यामुळे घाबरू नका, व्याकरणाच्या नियमाना झुगारून द्या, नामाने सुचविलेल्या अर्थावर भिस्त ठेवा, असे ते ठामपणे सांगतात ही आज्ञा शिरसावंद्य मानून यास्काने व त्याच्या पूर्वीच्या निरुक्तकारानी शब्दाच्या व्युत्पत्ती केल्या आहेत वैदिक शब्दाचा अर्थ संदर्भावरून ठरवा जिथे जिथे त्या अर्थी तो शब्द आला असेल, तिथे तिथे त्याची तीच व्युत्पत्ती द्यावी, पण जेव्हा शब्द अनेकार्थ असतो, तेव्हा भिन्न भिन्न व्युत्पत्ती विनदिक्कन कराव्या

निरुक्तात पुढील विषयाचे प्रतिपादन आहे– नाम, आख्यात, उपसर्ग व निपात याचे लक्षण, भावविकारलक्षण, पदविभाग परिज्ञान, देवतापरिज्ञान, अथर्वप्रशसा, वेदवेदागव्यूहलाप, उपधा-विकार, वर्णलोप, वर्णविपर्यय याचे विवेचन, सप्रसार्य आणि असप्रसार्य धातू निर्वचनोपदेश, शिष्यलक्षण मत्रलक्षण, आशी र्वाद, शपथ, अभिशाप, अभिख्या, परिदेवना, निंदा, प्रशसा, इत्यादीच्या द्वारे मत्राभिव्यक्तीसाठी उपदेश, देवताचे वर्गीकरण इत्यादी

यास्काची विवरणपद्धती अशी– (१) तो वेदाच्या ऋचेतील शब्दाचा क्रम जसाच्या तसा ठेवतो (२) उपसर्ग व क्रियारूपे एकत्र आणतो (३) वैदिक शब्दाचे अर्वाचीन पर्याय देतो (४) अर्वाचीन संस्कृतात असलेले शब्द जसेच्या तसे ठेवतो आणि (५) जाता जाता शब्दाच्या व्युत्पत्ती करतो ही पद्धती निरुक्तात सर्वत्र दिसून येते काही थोड्या ठिकाणी मात्र त्याने कारण नसताना ऋचातील शब्दाचा क्रम बदललेला आहे याविषयी वि का राजवाडे म्हणतात–

शब्दाच्या व्युत्पत्ती देणे हाच यास्काचा मुख्य उद्देश आहे 'समाम्नाय समाम्नात स व्याख्यातव्य ' या शब्दात तो उद्देश स्पष्ट दिसतो काही ठिकाणी व्युत्पत्ती देण्यामुळे ऋचेच्या अर्थाचा उलगडा करण्यास कोणतीच मदत होत नाही व व्युत्पत्ती दिल्या नसत्या तर बरे झाले असते, असे वाटते सायणाचार्य ऋचेतील शब्दाचा अन्वय देतात, पण यास्क त्या भानगडीत पडत नाही त्यामुळे ऋचेचा अर्थ त्याच्या मनात काय होता, ते समजत नाही

दुसऱ्या अध्यायाच्या पहिल्या तीन खडातील लोप, धातूत होणारे बदल, धातूना लागणारे आगम व त्याना होणारे सप्रसारण व त्यासबधीचे नियम हे विषय आणि त्याची उदाहरणे यास्काने व्याकरणातून घेतली आहेत तसेच काही शब्द धातूच्या अक्षराची उलटापालट केल्याने सिद्ध होतात, हे वैयाकरणाचे मतही त्याने दिले आहे

ब्रह्मांडात तीनच देवता आहेत, असे यास्क मानतो (७५) या मताला अनुसरून त्याने पृथ्वी, अतरिक्ष व द्युलोक यातील देवाचा एकेक गट केला आहे आणि प्रत्येक गटातील देवता एकाच देवतेची भिन्न भिन्न रूपे होत, असे म्हटले आहे पण हे मत वैदिक ऋषीचे नसावे, असे वाटते अश्विनौ, त्वष्टा, भग, विष्णू, वरुण, यम, हे वैदिक ऋषीच्या मते स्वतत्र देव होत ते सर्व एका सूर्याची भिन्न रूपे मानणे अस्वाभाविक होय असख्य देवाचे तीन देव, तिहीचा एक देव, तोही परब्रह्म किंवा परमात्मा असा विचार उपनिषत्कालात पुढे आला त्याची अल्पशी चुणूक ऋग्वेदातील काही ऋचात दिसत खरी, पण बहुतेक ऋचात देवनाबहुत्वच दृष्टोत्पत्तीस येते अतएव तशा रीतीनेच त्या ऋचाचे विवरण केले पाहिजे देवतात्रयपर अर्थ केल्याने ऋचाच्या अर्थाची ओढाताण होते व तशी ओढाताण निरुक्तात काही ठिकाणी झाली आहे

ऋचाचे सृष्टिवर्णनपर केलेले अर्थही असेच ओढाताणीचे आहेत सूर्यतापामुळे पृथ्वीवरील पाण्याची वाफ होऊन तिचे मेघ बनतात व त्या मेघातून पाऊस पडतो, ही नैसर्गिक घटना वैदिक ऋषीनी उपमा–रूपकानी दर्शवली आहे, असे इतर नैरुक्ताप्रमाणे यास्काचेही मत होते वृत्र कोण ? असा प्रश्न विचारून व नैरु क्ताच्या मते वृत्र म्हणजे मेघ असे सागून पाणी व वीज याच्या सयोगाने पाऊस पडतो, अशी पावसाची उपपत्ती यास्काने दिलेली आहे (२१६) वैदिक ऋषीच्या मनात हा शास्त्रीय अर्थ होता की नाही ते सागता येत नाही

माणसात असलेले आई, बाप, भाऊ, बहीण, नवरा, बायको, इ नातेसबध देवाना लागू नाहीत, असे इतर नैरुक्ताप्रमाणेच यास्काचेही मत होते त्यामुळे जिथे जिथे माता, पिता, भ्राता, स्वसा, इ शब्द वेदात येतात, तिथे तिथे त्या शब्दाचे रूढ अर्थ न घेता व्युत्पत्तीच्या द्वारे यास्काने त्याचे निराळे अर्थ केले आहेत उदा० उषेला रुशद्वत्सा (= सूर्य जिचा वत्स आहे अशी) असे म्हटले आहे पण यास्काला हा नातेसबध मान्य नसल्यामुळे 'सूर्य उषःकाली पृथ्वीवर पडलेले दव वाफेच्या रूपाने शोषून घेतो किंवा वासरू जसे गाईबरोबर असते, तसा सूर्य उषेबरो बर असतो, म्हणून लक्षणेने सूर्याला उषेचा वत्स म्हटले, अशी त्याची वेगळी व्युत्पत्ती यास्काने सांगितली आहे (२२०) ऋग्वेदात इद्रादी देवाना वृष किंवा वृषभ व स्त्री देवताना गौ म्हटलेले आढळते पण नैरुक्ताना अशा प्रकारे देवदेवताना बैल,

गार्ग्य म्हणणे पसंत नसल्यामुळे त्यांनी त्या शब्दाचे व्युत्पत्तीच्या आधारे निराळे अर्थ केले आहेत. उदा० वृषभ = जलाचा वर्षाव करणारा.

सर्व नामे धातूंपासूनच उत्पन्न होतात, हा निरुक्ताचा मुख्य सिद्धांत आहे. वैयाकरणांमध्ये केवळ एका शाकटायनाचेच हे मत होते. या मताचे गार्ग्य नामक कोण्या प्राचीन आचार्याने युक्तिवादाला धरून खंडन केले होते. पण यास्काने त्याहून प्रबलतर अशा युक्तींचा अवलंब करून गार्ग्याचे ते मत खोडून काढले. उदा० क्रियेला अनुसरून वस्तूचे नाव ठेवल्याने अनेक वस्तूंची एक क्रिया होत असताना अनेक वस्तूंचे एकच नाव होऊ शकेल, हा गार्ग्याचा आक्षेप. यावर यास्काचे खंडन असे-तुल्य कर्म करणाऱ्या लोकांमध्येही त्याच कर्मावरून व्यक्ति-विशेषाचे किंवा श्रेणीविशेषाचे नाम निर्दिष्ट होते, सर्वांचे होत नाही. लोकव्यवहाराची हीच तर मोठी गमत आहे, असे तो म्हणतो. तक्षण (तासणे) व परिव्रजन (चोहोंकडे फिरणे) या क्रिया अनेक व्यक्ती करीत असल्या तरी सुताारालाच तक्षा म्हणतात व संन्याशालाच परिव्राजक म्हणतात. दुसऱ्या कोणा लाही नाही. शब्दाचा स्वभावच असा आहे, की तो एखाद्या क्रियेच्या द्वारे कोणत्या तरी एकाच वस्तूचे प्रतिपादन करतो, सर्व वस्तूंचे नाही.

शाकटायनाने पदाच्या निरुक्तीसाठी एका अभिन्न पदाची व्याख्या अनेक धातूंच्या योगाने निष्पन्न होते, असे सांगितले आहे. उदा० सत्य शब्द घ्या. हा शब्द शाकटायनाने सत् । य अशा दोन अंगांत विभक्त केला आहे. यातला प्रथम अंश अस्ति याच्यावरून निष्पन्न होतो व द्वितीय अंश इण् धातूच्या आययति रूपावरून निष्पन्न होतो आणि मग त्या शब्दाची व्याख्या होते, ती अशी- 'सन्तमेव अर्थम् आययति गमयतीति सत्यम्' = जे विद्यमान पदार्थाच्या खऱ्या अर्थाचे ज्ञान करून देते, ते सत्य होय. गार्ग्याचा या सिद्धान्तावरही आक्षेप आहे. तो म्हणतो, की असे करण्याने शब्दाची उगाच मोडतोड होते. पण यास्काने या बाबतीतही शाक टायनाचा पाठपुरावा केला आहे. यास्काचे मत असे, की अशी शब्दाची मोडतोड झाली तरी शाकटायनाची निरुक्ती अनुगतार्थ ठरते.

परभाविनी (पुढे होणाऱ्या) क्रियेच्या द्वारे पूर्वजात (मागे घडलेल्या) वस्तूचे नामकरण करणे उचित नव्हे, हा गार्ग्याचा आणखी एक आक्षेप. यावर यास्क म्हणतो, की लोकांमध्ये पर-भाविनी क्रियेच्या द्वारे पूर्वजात वस्तूला संज्ञा देणे किंवा तिचा व्यपदेश करणे ही गोष्ट अनेक ठिकाणी दिसून येते. भविष्य कालीन योगाच्या किंवा संबंधाच्या आश्रयाने एखाद्या व्यक्तीचे नामकरण लोक करतात. उदा० बिल्वाद व लंबचूडक ही नावे घ्या. शिशूची ही नावे ठेवतेवेळी तो बिल्वाद (बेलफळ खाणारा) आणि लंबचूडक (लांब शेंडीचा) नसतो. तरीही त्याचे भविष्य कालीन संबंधाच्या आश्रयाने तसे नाव ठेवले जाते. मीमांसा दर्शनानेही हा सिद्धांत मान्य केला आहे. गार्ग्याच्या मते रूढ शब्दाची व्युत्पत्ती अनावश्यक आहे, पण यास्काच्या मते हेही म्हणणे बरोबर नाही. वेदांत रूढ शब्दाची व्युत्पत्ती अनेक ठिकाणी दिसून येते. उदा० सर्पिस (तूप) हा शब्द घ्या. 'यद् सर्पत् तत् सर्पि' = जे पघळते ते सर्पी म्हणजे तूप होय. इथे हा शब्द गमनार्थक सृप् (सरपटणे, पसरणे) या धातूपासून निष्पन्न झालेला आहे.

यास्काने अशा प्रकारे अनेक युक्ती प्रयुक्तींचा अवलंब करून स्पष्टपणे प्रतिपादन केले आहे, की समस्त नामे ही धातुज (धातू पासून उत्पन्न होणारी) असतात. वर्तमान भाषाशास्त्रानेही हा सिद्धांत मान्य केला आहे. या संदर्भात ज्ञानकोशकार पुढील परि च्छेद लिहितात--

यास्काच्या निरुक्तात निरनिराळ्या व्याकरणकाराचे व व्याकरणसंप्रदायाचे जे उल्लेख आहेत, त्यावरून व्याकरण शास्त्राची प्रगती त्या काळात बरीच झालेली होती, असे दिसते. नाम, आख्यात, उपसर्ग आणि निपात या शब्दांच्या चार जाती शोधून काढण्यास युरोपात ॲरिस्टॉटल जन्मास यावा लागला. परंतु आमच्या इकडे यास्कास ही गोष्ट पूर्वीच माहीत होती. कालवाचक प्रत्यय, पुरुषवाचक प्रत्यय व कृदंत प्रत्यय यांच्या तला भेदही यास्काच्या वेळी माहीत होता. इतकेच नव्हे, तर प्रत्येक नाम धातुसाधित आहे, ही उपपत्तीही त्यानेच बसवली होती. सध्याच्या व्युत्पत्तिशास्त्राचा हाच मूळ पाया होय.

यास्क हा पाणिनीच्याही पूर्वी होऊन गेला, असे आता सिद्ध झाले आहे. पाणिनीचा काल सनपूर्व ७०० च्या अलीकडे येऊ शकत नाही. यावरून यास्काचा काल सनपूर्व ८०० ते १००० या सुमाराचा ठरेल. यास्काच्याही पूर्वी वेदार्थ निश्चित कर ण्याचे प्रयत्न चालू झाले होते. यास्काने अशा संप्रदायांची नावे दिली आहेत, ती अशी – आधिदैवत, आध्यात्म, आख्यानसमय, ऐतिहासिक, नैदान, नैरुक्त, परिव्राजक आणि याज्ञिक.

यास्काच्या निरुक्तात त्याच्या पूर्वीच्या बारा निरुक्त काराची नावे दिली आहेत, ती अशी – आग्रायण, औपमन्यव, औदुंबरायण, और्णवाभ, कात्थक्य, क्रौष्टुकी, गार्ग्य, गालव, तैटीकी, वार्ष्यायणी, शाकपूणी व स्थौलष्ठिवी.

यास्क हा या मालेत तेरावा येतो. 'निरुक्तं चतुर्दश-प्रभेदम्' = निरुक्ताचे चौदा प्रभेद आहेत असे दुर्ग म्हणतो (दुर्गवृत्ती १ १३). पण हा चौदावा निरुक्तकार कोण याचा मात्र पत्ता लागत नाही. वरील सर्व निरुक्तकारांत यास्काने

बऱ्याच ठिकाणी शाकपूणीला मान्यता दिली असून, त्याची मतेही उद्धृत केली आहेत पण यास्कानंतर बाकीचे सगळे निरुक्तकार मागे पडले पुढील वेदभाष्यकारावर प्रभाव पडला, तो यास्काचाच सायणाचार्यांनी यास्काला अनुसरून आपली वेदभाष्ये रचली निरुक्तविषयक वाङ्मयात यास्काचा ग्रंथ अप्रतिम आणि शेवटचा ठरला आहे

वेद केवळ पाठ करणारा पण अर्थज्ञान नसलेला मनुष्य हा स्थाणू किंवा भारवाहक होय ज्याला अर्थज्ञान झाले, त्याचे इहपर कल्याण होईल अर्थज्ञानरहित असा शब्द प्रकाश देऊ शकत नाही लाकूड कितीही कोरडे असले तरी ते जर अग्नीत टाकले नाही तर त्याचा काय उपयोग ! हे यास्काचे उद्‌गार आहेत त्यावरून त्याचा परिणत प्रज्ञा कळून येते तो म्हणतो, 'अर्थ वाचः पुष्पफलम्' = अर्थ हे वाणीचे पुष्प आणि फलही आहे (१ २०) त्याने निरुक्त हा ग्रंथ लिहून वेदज्ञानाचा मार्ग सुकर केला व वेद हे अर्थरहित आहेत, हे कौत्साचे वचन वेदाचा अर्थ लावून खोडून काढले कौत्साला कोपरखळी देताना तो म्हणतो (निरुक्त १ १६)–

**नैष स्थाणोरपराधो यदेनमन्धो न पश्यति ।**

**पुरुषापराधः स भवति ।**

अर्थ– आंधळ्याला खांब दिसत नाही हा काही खांबाचा दोष नव्हे, तो त्या मनुष्याचा दोष होय

निरुक्ताच्या गुर्जर व महाराष्ट्र अशा दोन प्रती सांप्रत उपलब्ध आहेत निरुक्तात वेळोवेळी भर घातली गेली आहे ती एकाच व्यक्तीने घातलेली नसून अनेक व्यक्तींनी घातली आहे, असेही म्हणावे लागते त्यामुळे मूळ निरुक्त किती व केवढे होते, ते ठरवणे कठीण झाले आहे निरुक्ताच्या विस्ताराच्या बाबतीत दुर्गाचार्यांची प्रत, गुर्जर प्रत व महाराष्ट्र प्रत असा अनुक्रम लावावा लागतो

**निरुक्ताचे टीकाकार –** निरुक्तावरील सर्व टीकाकारात दुर्गाचार्यांचे नाव पहिले येते पण दुर्गाचार्य हा काही पहिलाच टीकाकार नव्हे कारण त्याने आपल्या वृत्तीत प्राचीन टीकाकाराचा उल्लेख व त्यांच्या मताचे समीक्षणही केले आहे दुर्गाचार्यांच्या वृत्तीत निरुक्ताचे व त्यात उल्लेखिलेल्या मंत्राचे विस्तारपूर्वक विवेचन केलेले आहे

निरुक्ताचा दुसरा टीकाकार स्कंदमहेश्वर हा होय स्कंद स्वामी या नावानेही तो ओळखला जातो हा गुजरातमधील वलभीचा राहणारा होता याचा काळ इ स चे ७ वे शतक हा मानतात याची निरुक्तावरची टीका पांडित्यपूर्ण आहे

वररुची नावाच्या आणखी एका विद्वानाने निरुक्तनिचय नावाचा ग्रंथ लिहिला आहे व्याकरणकार वररुचीपेक्षा हा निराळा आहे याने समग्र निरुक्तावर टीका लिहिली नाही, तर निरुक्ताच्या सिद्धांताचे प्रतिपादन करणारे सुमारे १०० श्लोक लिहिले आहेत [निरुक्ताचे मराठी भाषांतर– व का राजवाडे १९३५, व सा स , हिंदुत्व, म ज्ञा को ]

## निरुक्तोपनिषद

एक नव्य उपनिषद हे अत्यंत छोटे असे उपनिषद आहे याच्या प्रारंभी, गर्भावस्थेत शरीराचे विविध अवयव कसे निर्माण होतात, ते सांगितले आहे गर्भोपनिषत्प्रमाणेच अर्भकाच्या वाढीचा क्रम सांगणारे हे उपनिषद आहे [श्री सी ग देसाई]

## निरूढपशू

आहिताग्नीने इंद्राग्नी देवतेला उद्देशून करायचा पशुयाग हा याग दर सहा महिन्यांनी करावा असा संकेत आहे या पशुयागाला यजमान व यजमानपत्नी यांच्याशिवाय अध्वर्यू, ब्रह्मा, होता, आग्नीध्र, मैत्रावरुण व प्रतिप्रस्थाता असे सहा ऋत्विज लागतात पशुयागाचे सर्व तंत्र इष्टीसारखेच असते फक्त हवीच्या ठिकाणी वपा, पशुपुरोडाश व अंगे (पशूच्या शरीरातील विशिष्ट भागातील काढलेले व शिजवलेले मांस) हे पदार्थ द्यायचे असतात हवीचा निर्वाप करायच्या वेळी उत्तरवेदीच्या पूर्वेस वेदीला लागून पुरलेल्या यूपाला (खांब) पशू बांधतात मग देवतेला उद्देशून त्याचे उपाकरण करतात नंतर पर्यग्निकरण झाल्यावर पशूला शामित्र शाळेत (पशू मारण्याची जागा) नेतात तिथे शमिता नामक ऋत्विज त्या पशूला (शस्त्र वगैरे न लावता) मारतो नंतर अध्वर्यू, यजमान व यजमानपत्नी हे पशूच्या शरीरावर उदक सेचन करतात अध्वर्यू पशूच्या नाभीच्या वरील भागाला सुरीने चीर पाडून त्याच्या शरीरातील वपा व विशिष्ट ठिकाणचे मांस भाग काढतो हे मांसभाग शिजत ठेवतात व त्याच वेळी वपेची आहुती देतात प्रत्येक यागाच्या वेळी मैत्रावरुण हा ऋत्विज हातातला दंड जमिनीवर टेकून आणि त्यावर शरीराचा भार टाकून उभा राहतो व होत्याला प्रैष देतो होता बसूनच याज्या म्हणतो वपायागानंतर पशुपुरोडाशाचा याग होतो मग यजमानासह ऋत्विज पुरोडाश इडा भक्षण करतात नंतर अंगयाग व सूक्तवाकादी कर्मे केली जातात [वे शा दी ]

## निरोध

बौद्ध तत्त्वज्ञानातील एक संज्ञा निरोध म्हणजे विरोध किंवा विनाश होय प्रतिसंख्यानिरोध व अप्रतिसंख्यानिरोध असे दोन निरोध बौद्धांनी मानले आहेत प्रतिसंख्या म्हणजे प्रतिकूल बुद्धी होय विद्यमान पदार्थाला मी अविद्यमान करतो, अशा प्रकारची भावना यात असते या

भावनेमुळे कार्यांचा जो नाश होतो, त्याला प्रतिसंख्यानिरोध असे म्हणतात. घटावर दगड मारून तो फोडणे, पुस्तक फाडणे ही प्रतिसंख्यानिरोधाची उदाहरणे आहेत. पदार्थांचा प्रतिक्षणी आपोआप होणारा जो नाश त्याला अप्रतिसंख्यानिरोध असे म्हणतात. हे दोन विनाश व आकाश मिळून तीन पदार्थ केवळ अभावमात्र व निःस्वरूप आहेत. [ भा. द. सं. ]

**निरोधसमापत्ती** बौद्धांनी मानलेला समाधीचा एक प्रकार. या अवस्थेत संज्ञा व वेदना यांचा पूर्ण निरोध होतो. ही उच्च व सूक्ष्म अशी समाधी आहे. या समाधीत योगी सात दिवसांपर्यंत राहू शकतो. या समाधीत व मृत्यूत फरक एवढाच, की हिच्यात कायसंस्कार, वाक्संस्कार व मानससंस्कार यांचाच फक्त निरोध असतो, तर मृत्यूत आयुष्य व उष्णत्व यांचाही निरोध होतो. [ पा. वा. ते. भि. र. ]

**निर्ऋती** (१) एक वैदिक देवता. अथर्ववेदात (६.२९) व मैत्रायणी संहितेत (२.२५) निर्ऋतीबरोबर यमाचाही उल्लेख आलेला आहे. ही पापदेवता होती, असे म्हणतात.

(२) एक दिक्पाल. हा नैर्ऋत्य दिशेचा स्वामी आहे. तो राक्षसांचा अधिपती असून, रक्षकूट नामक पर्वतावर राहतो. तो महाकाय, खड्गहस्त, जटाजूटधर व द्विभुज असून, गाढव हे त्याचे वाहन आहे. त्याची पूजा केल्याने राक्षस, पिशाच व वेताळ यांच्यापासून भय राहत नाही, असे कालिका पुराणात सांगितले आहे. भागवत पुराणात निर्ऋतीविषयी थोडी जास्त माहिती दिली आहे, ती अशी– हा अनपत्य असल्यामुळे याने



निर्ऋती दिक्पाल

अधर्माचे जुळे पुत्र दत्तक घेतले होते. श्रीकृष्ण पारिजाताचे हरण करतो आहे, हे पाहून तो त्याच्याबरोबर लढाई करायला निघाला होता, पण कृष्णाशी लढाई करणे सोपे नाही, हे ध्यानात येऊन तो परत फिरला.

काही ठिकाणी निर्ऋतीचे वाहन पुरुष असल्याचे सांगितले आहे. त्याच्या स्त्रीशक्तीचेही देवताकरण केलेले असून, तिलाही निर्ऋती असेच नाव दिलेले आहे. विष्णुधर्मोत्तर पुराणात निर्ऋतीला राक्षसाधिपती विरूपाक्षाची पत्नी मानले आहे.

हॉविंग्म येथे या दिक्पालाची मूर्ती आहे. तिच्यात तो एका पुरुषाच्या खांद्यावर आरूढ असून, त्याच्या उजव्या हातात दंड दाखवलेला आहे. बंगालमधील एका शिल्पात तो खड्गधारी दिसतो. [ श. क., पु. इ., क्रि. स्ट. ले. उ., डे. हिं. इ. ]

**निर्गुणतत्त्व** निर् + गुण = गुणरहित, असा हा शब्द बनला आहे. चराचर सृष्टीच्या प्रारंभी एकमेवाद्वितीय असे आत्मतत्त्व होते. त्यालाच पुढे 'बहु स्याम' = पुष्कळ होण्याची इच्छा झाली, हा वेदान्त शास्त्राचा प्रमुख सिद्धान्त आहे. हे एकमेव आत्मतत्त्व अनादी, एकजिनसी, मर्यादारहित, स्वतंत्र, सर्वव्यापी, निरंतर व अमृत आहे. त्यालाच वेदान्तात परमात्मा किंवा परब्रह्म म्हटले आहे. जगाच्या उत्पत्ति–स्थिति-लयाला तेच कारण आहे.

या परमात्मतत्त्वाची व्यक्त व अव्यक्त अशी दोन रूपे आहेत. जे इंद्रियांना गोचर होते, ते रूप व्यक्त होय. त्यालाच सगुण असे म्हणतात. इंद्रियांना अगोचर असलेले ते अव्यक्त होय. त्यालाच निर्गुण म्हणतात. गुण या शब्दाने इथे मनुष्याला केवळ त्याच्या बाह्य इंद्रियांनीच नव्हे, तर मनानेही ज्याचे ज्ञान होते, ते सर्व गुण विवक्षित आहेत. या गुणांनी रहित किंवा गुणातीत ते निर्गुण समजावे.

उपासना म्हणजे चिंतन, मनन व ध्यान या साधनांनी देवाच्या जवळ जाणे, राहणे किंवा त्याची भक्ती करणे होय. या उपासनेला रूपाची गरज असते. रूप नसेल, तर निदान उपास्याचे कोणते तरी गुण मनाला प्रतीत व्हावे लागतात. त्याशिवाय चिंतन मननाची प्रक्रियाच सुरू होत नाही. हे जाणून औपनिषदिक ऋषींनी अव्यक्त अशा परमात्म्याच्या उपासनेसाठी त्याला सगुण कल्पिले आहे. परमेश्वराच्या ठिकाणी कल्पिलेले हे गुण उपासकाच्या अधिकाराप्रमाणे कमीजास्त व्यापक किंवा सात्त्विक असतात. उपनिषदांत परमेश्वराची अशी अनेक सगुण वर्णने आहेत. उदा० 'स उत्तमः पुरुषः' = तो परमात्मा उत्तम पुरुष आहे (छां. उ. ८.१२.३), 'एष भूताधिपतिः' = हा सर्व भूतांचा अधिपती आहे (बृहदा. उ. ४.४.२२), 'विश्वतश्चक्षुरुत विश्वतो मुखो विश्वतो बाहुरुत विश्वतस्पात्'

= या परमात्म्याला विश्वभर डोळे, विश्वभर मुख, विश्वभर बाहू आणि विश्वभर पाय आहेत (श्वेताश्वतर उ ३ ३), इत्यादी

उपनिषदात वर्णिलेली परमात्म्याची अनेकविध रूपे ही *उपासनेसाठी प्रतीक म्हणून घेतलेली आहेत* असे म्हटले, तर ती गौण आहेत परब्रह्म हे वास्तविक तसे सरूप सगुण नाही ते दर्शन, श्रवण मनन आणि वर्णन याच्या कक्षेत येणारे नाही (केन उ १ २ ८) ते सच्चिदानन्दस्वरूप आहे शेवटी, सर्व नामरूपात्मक मूल किंवा असत पदार्थांच्या पलिकडे असलेले जे अवर्णनीय, ते परब्रह्म होय, असे म्हटले आहे (बृहदा उ २ ३ ६) त्याचे अव्यक्त व निर्गुण स्वरूप दाखविण्यासाठीच 'नेति नेति' = हे नव्हे, अशा प्रकारचे नव्हे असे सूत्र केले आहे (गी र)

*महाभारताच्या शांतिपर्वातील नारायणीय आख्यानात* परमेश्वराच्या व्यक्त रूपापेक्षा अव्यक्त रूप श्रेष्ठ मानले असून, ते सगुण, सगुण निर्गुण व केवळ निर्गुण अशा तीन प्रकारांना वर्णिले आहे त्यातील सगुण-निर्गुण असे जे म्हटले उभयात्मक रूप आहे, ते सगुणातून निर्गुणात जाण्याची पायरी होय असे म्हटले आहे प्रथम सगुणरूपाचे ज्ञान झाल्यानंतर हळूहळू त्यातला एकेक गुण सोडून निर्गुणाच्या अनुभवाकडे जायचे असते अशाच प्रकारची *चढत्या श्रेणीची निर्गुणब्रह्मोपासना* तैत्तिरीय उपनिषदातही सांगितली आहे (३ २-६)

निर्गुणाचे गुणबोधक विशेषणानी वर्णन करणे कधीच शक्य होत नाही त्यामुळे परस्परविरोधी विशेषणानीच त्याचे वर्णन करणे भाग पडते म्हणूनच उपनिषदानी सत तेच, असत तेच, दूर तेच, जवळही तेच, अशा प्रकारे त्याचे वर्णन केले आहे

*परब्रह्म या निर्गुण व सर्वव्यापी तत्त्वापासून सगुण अशी ही* चराचर सृष्टी कशी उत्पन्न झाली, याबद्दल उपनिषदात अत्यंत सयुक्तिक असे प्रतिपादन पुढीलप्रमाणे केले आहे –

निरनिराळ्या पदार्थांची भिन्न रूपे व त्यावरून त्यांना *दिलेली नावे म्हणजे नामरूप होत* इतर गुणांचाही त्यातच समावेश आहे ही नामरूपे क्षणोक्षणी पालटत असली, तरी *त्यांच्या मुळात कधीही न पालटणारे असे द्रव्य असते* सागराच्या पृष्ठभागावर ज्याप्रमाणे लहानमोठे अनेक तरंग उठत असतात, त्याप्रमाणे या मूलद्रव्यावर नामरूपाचे अनेक तरंग उठत असतात मूलद्रव्य मात्र नित्य, अव्यय आणि अविकारी असते तेच सत होय अध्यात्मदृष्ट्या नित्यतत्त्व व नामरूपे असे जगातील सर्व वस्तूंचे दोन वर्ग होतात त्यापैकी नामरूपात्मक *वर्गाला सगुण, माया किंवा प्रकृती म्हणतात* नामरूपाचा वरचा लेवण बाजूला काढल्यावर त्याखाली जे द्रव्य असते, ते नित्य व निर्गुणच असते तेच परब्रह्म होय मनुष्याच्या दुर्बल इंद्रियाना या निर्गुण परब्रह्मातच सगुण माया उद्भवलेली दिसते

सगुण व निर्गुण या दोन भेदावरून सगुणोपासना व निर्गुणोपासना *असे उपासनेचेही दोन भेद पडले आहेत सगुणोपासना* म्हणजे षड्गुणैश्वर्यसंपन्न भगवंताची त्याच्या विशिष्ट रूपाला धरून केलेली पूजा, *उपासना किंवा स्तुती* होय सर्वसामान्य मनुष्याला देव हा कोणत्या तरी आकारातच पुढे असावा लागतो त्याशिवाय त्याला उपासना करता येत नाही व त्याचे समाधानही होत नाही आकारातल्या देवाशी त्याला बोलता येते आणि सुखदुःखही निवेदिता येतात निर्गुणोपासनेत तशी शक्यता नसते पण सगुणोपासनेपेक्षा निर्गुणोपासना ही श्रेष्ठ आहे, हे मान्य करावे लागते सगुणोपासक मनुष्य समोरच्या *उपास्य मूर्तीतच अडकून राहतो मर्यादितच राहतो, तर निर्गुणो*पासक मनुष्य चिंतनाने आणि ध्यानाने विश्वाएवढा व्यापक होऊ शकतो मात्र परमात्म्याची ही निर्गुणोपासना किंवा अव्यक्तोपासना ही सगुणोपासनेपेक्षा अधिक क्लेशकारक असते गीतेत श्रीकृष्णानेही तिचा कठिणपणा सांगितला आहे (गीता १२ ५) निर्गुणोपासना ही कशी खडतर आहे, त्याविषयी ज्ञानेश्वर लिहितात –

**पाहें पां लोहाचे चणे । जे बोचरिया पडती खाणें ।**
**ते पोट भरणें कीं प्राणें । शांती म्हणों ॥**
**म्हणोनि समुद्र बाहीं । तरणें आथि केंही ।**
**कां गगनामाजीं पाइं । खोलिजतु असे ॥**
**वळघलिया रणाची थाटी । आंगीं न लगतां कांठी ।**
**सूर्याची पाउटी । कां होय गा ॥**
**या लागीं पांगुळा हेवा । नव्हे वायूसि पांडवा ।**
**तेवीं देहवंता जीवा । अव्यक्तीं गति ॥**

(ज्ञाने १२ ७०-७३)

निर्गुणोपासनेतले हे क्लेश जाणून व ती सामान्य जनांच्या आवाक्यातली नव्हे, हे लक्षात घेऊन भक्तीची पहिली पायरी या *नात्याने बहुतेक संत संतानी व आचार्यांनी सगुणोपासनेला* मान्यता दिली व तिचाच पुरस्कार केला आहे

**निर्गुणपा** (इ स चे ११ वे शतक) चौऱ्यायशी सिद्धांपैकी एक याला सत्तावन्नावा सिद्ध समजतात हा पूर्वदेशाचा रहिवाशी होता श्री राहुल सांकृत्यायनाच्या मते पूर्वदेश म्हणजे भागलपूर आणि पुंड्रवर्धन होय निर्गुणपा जातीने शूद्र होता शरीरनाडिकाबिंदुसमता या नावाचा ग्रंथ याने रचला असून, त्याची भाषा अपभ्रंश हिंदी आहे [ हिं सा बि ]

**निर्गुण संप्रदाय** निर्गुण परब्रह्माची उपासना करणाऱ्या लोकांचा वर्ग. मुसलमान लोक भारतात येऊन स्थायिक झाल्यानंतर इस्लाममधील एकेश्वरवादाला मिळतीजुळती अशी उपासनापद्धती सुरू करण्याच्या इच्छेने सगुणोपासनेहून भिन्न अशी निर्गुण ब्रह्माची उपासना काही लोकांनी अंगीकारली. स्वामी रामानंद व त्यांचे गुरू राघवानंद यांच्या काव्यात या निर्गुण मताची बीजे आढळतात. मात्र या पंथाचे सिद्धांत उपनिषदांतील तत्त्वज्ञानावरच आधारलेले आहेत. त्यात नवीन असे काहीही आढळत नाही. सूफी संप्रदायाचा मात्र त्यावर प्रभाव दिसतो. कबिराला या पंथाचा प्रवर्तक मानतात. कबिराच्या पुढील पद्यात त्याने निर्गुण परब्रह्माचे वर्णन उपनिषदांच्याच भाषेत केले आहे, ते असे–

**अलख निरंजन लखै न कोई ।**
**निरभै निराकार है सोई ।।**
**सुनि असथूल रूप नहीं रेखा ।**
**द्रिष्टि अद्रिष्टि छिप्यो नहीं पेखा ।।**

अर्थ – तो अलख, निरंजन आहे. कोणी त्याची कल्पना करू शकत नाही. ते निर्भय व निराकार आहे. ते शून्यही नाही व स्थूलही नाही. त्याला रूपरेषाच नाही. ते दृश्यही नाही व अदृश्यही नाही. त्याला गुप्तही मानता येत नाही आणि प्रकटही म्हणता येत नाही.

कबिराच्या कवितेवर सूफी संतांचेही काही संस्कार आहेत. ज्यामुळे धार्मिक भेदभाव उत्पन्न होतात, अशा बाह्योपचारांचा त्याग आणि शुद्ध ईश्वरभक्ती व सात्त्विक जीवन यांवर कबिराने भर दिला आहे. तसेच मनाचा सच्चेपणा व स्वानुभूती यांचे महत्त्व तो प्रतिपादितो. मात्र निर्गुणाकडे ओढा असूनही कबिराने त्या नावाचा एखादा वेगळा संप्रदाय सुरू केला नव्हता. त्याच्या नंतरही तशा संप्रदायाची कोणी स्थापना केलेली दिसत नाही. निरनिराळ्या संप्रदायांतील निर्गुणोपासक आणि सगुणोपासक लोकांत भेद दाखवण्यासाठीच निर्गुण संप्रदाय हे त्या विचारसरणीला नाव मिळाले. निर्गुनिया, निर्गुणवादी किंवा संतमत हे शब्दही त्याच अर्थी वापरले जातात.

**निर्गुण संतकाव्य** – इ. स. च्या १५ व्या शतकापासून भक्तिकाव्यात सगुण व निर्गुण हे दोन भिन्न काव्यप्रवाह सुरू झाले. पुढे निर्गुण काव्याच्या शुद्ध ज्ञानाश्रयी व शुद्ध प्रेममार्गी अशा दोन शाखा निर्माण झाल्या. निर्गुणभक्ती ही भावनात्मक प्रवृत्ती असून, संतकवींच्या भक्तिगीतांप्रमाणेच सूफी कवींच्या प्रेमगाथांतही तिचा आढळ होतो. बौद्धपंथी सिद्ध पुरुष व नाथपंथी योगी यांच्या पदांचाही निर्गुण काव्यावर प्रभाव आहे.

डॉ. संपूर्णानंद यांनी 'संतमत में साधना' या लेखात उत्तर भारतीय निर्गुण संतांविषयी विचार प्रकट केले आहेत. ते असे–

भारताच्या धार्मिक इतिहासात संतमताला एक विशेष स्थान आहे. संतमत हा इतर संप्रदायांसारखा संप्रदाय नसून, तो एक विचारप्रवाह आहे. तो प्रवाह सुमारे ५०० वर्षांपूर्वी सुरू झाला असून, आजपावेतो चालू आहे. कबीर, नानक, दादू, दरिया, चरणदास, सहजाबाई, गरीबदास, पलटूदास, मलूकदास, इ. संतांच्या काव्यरचनेमुळे तो प्रवाह पुष्ट झाला आहे. त्यांनी एकाच ईश्वराची भक्ती शिकवली, दुष्ट आचाराचा निषेध केला व मद्यवृत्तीला विरोध केला. हिंदू लोकांची अवनती झालेली असताना या संतांनी भक्तीचे अमृत पाजून त्यांना सजीव केले, क्रियाशील बनवले व त्यांच्यात आत्मविश्वास निर्माण केला.

कबिराच्या ज्या पदांत निराकार ईश्वराची उपासना करण्याचा उपदेश केला आहे. त्यांना 'कबीरदास की बाणी' असे म्हणतात. ती पदे निर्गुन या नावानेही प्रसिद्ध असून, भक्तिपूर्ण आहेत. भजने व निर्गुन गीते यांचा वर्ण्य विषय एकच असला, तरी निर्गुन गीत एका वेगळ्या लयीत गायिली जातात.

कबिराप्रमाणे अनेक भोजपुरी संत कवींनीही निर्गुन पदे रचली आहेत. त्यांत रहस्यवादी भावना भरलेल्या आढळतात. त्यांत ईश्वराला कधी महाजन म्हटले आहे, तर कधी छयल म्हटले आहे. आत्मा व परमात्मा यांच्यासंबंधी सुंदर रूपके त्या गीतांत आहेत.

अनेक लोककवींनी निर्गुन पदे रचली असून, त्यांची प्रतिष्ठा वाढवण्यासाठी त्यांत कबिराचे नाव गोवले आहे. पण ती सर्व पदे कबिराने रचलेली नसावी.

निर्गुन गीते अत्यंत मधुर असतात. त्यांचे एक वैशिष्ट्य असे, की त्यांतील दुसरी ओळ 'आहो रामा' किंवा 'कि आहो मोरे रामा' या शब्दसमूहाने सुरू होते आणि 'हो राम' या या शब्दांनी संपते. याचे एक उदाहरण असे–

**पाँच के पचीस कोसे बसेले महाजन हो ।**
**कि आहो मोरे रामा, कवना अवगुनवा हरि**
**मोरे रुसेले हो राम ।।**

मराठी संत कवींना निर्गुण भक्तीचे महत्त्व मान्य नव्हते असे नाही, पण त्यांनी सगुणभक्तीला अधिक महत्त्व दिले. एकनाथांनी सगुण निर्गुण एकच असल्याचे सांगितले आहे–

**माइने स्वरूप निज निर्गुण ।**
**अथवा वकुंठीचें सगुण**
**दोन्ही एकचि निश्चयें जाण ।**
**सगुण निर्गुण समसाम्य ।।**

महाराष्ट्राच्या जनमनावर भागवत संप्रदायाचा सर्वाधिक प्रभाव आहे आणि विठ्ठल हे त्या संप्रदायाचे परम उपास्य

आहे त्यामुळे महाराष्ट्रात निर्गुणोपासना कधीच प्रभावी झाली नाही [ हि रा को , हिं म नि स , उ भा स प ]

**निर्ग्रंथ** एक जैन मताचा पाली ग्रंथामधून महावीराला निगंठ नातपुत्त (निग्रंथ ज्ञातपुत्र) असे म्हटले आहे निग्रंथ हा शब्द जैन सप्रदायापैकी दिगबर संप्रदायातल्या लोकांना लागू होतो असतो निग्रंथ साधूंची परंपरा ऋग्वेदात उल्लेखिलेल्या वातरशना मुनीपासून चालू असल्याचे डा हीरालाल जैन यानी म्हटले आहे पाहा – जैन धर्म [ द चि , भा सा इ ]

**निर्जरपंचमी व्रत** एक जैन व्रत या व्रतात आषाढ शुद्ध पंचमी आणि श्रावण, भाद्रपद, आश्विन व कार्तिक या महिन्यांच्या शुद्ध व कृष्ण पंचमी या दिवशी उपवास करायचे असतात हे एकूण नऊ उपवास होतात सेठपुत्री नागश्रीने हे व्रत केले व तिला सर्व प्रकारचे सुख मिळाले

**निर्जला एकादशी** एक काम्य व्रत ज्येष्ठ शुक्ल एकादशीला निर्जला किंवा भीमसेनी एकादशी असे नाव आहे सबध वर्षात दुसरी कोणतीही एकादशी न करता या एकादशीचे व्रत विधिपूर्वक केल्यास सर्व एकादशीव्रताचे पुण्य मिळते, असे सांगितले आहे या व्रताचा विधी असा–

एकादशीला आचमनाव्यतिरिक्त पाणी न पिता व काहीही न खाता उपवास करावा रात्री विष्णूच्या सुवर्णमूर्तीची षोडशोपचारे पूजा करावी नृत्यगायनाने ती रात्र जागवावी दुसऱ्या दिवशी सकाळी विष्णूची यथाविधि पूजा करून ब्राह्मणभोजन घालावे व जलकुंभ, सुवर्ण, छत्र, वस्त्र व पादत्राणे या वस्तू दान द्याव्या फल – दीर्घायुरारोग्य व स्वर्ग याची प्राप्ती

या व्रताची कथा अशी– पाच पांडवांपैकी भीमाला फार भूक लागत असे त्यामुळे त्याला उपवास करणे जमत नसे म्हणून त्याने व्यासांना एखादे बहुफल व्रत सुचवायला सांगितले व्यासांनी त्याला निर्जला एकादशीचे व्रत सांगून म्हटले, की ही एकादशी पुण्य, धनधान्यसंपत्ती व पुत्र देणारी आहे विधिपूर्वक ही एकादशी केल्याने अंतकाळी यमदूताऐवजी शखचक्रधारी विष्णुदूत येतात व व्रतकर्त्याला विष्णुलोकात घेऊन जातात व्यासांच्या सांगण्याप्रमाणे भीमाने हे एकादशीचे व्रत केले

**निर्झरदान** संक्रांतीच्या दिवशी वाहत्या झऱ्याच्या पाण्यात एक शेर तांदूळ धुऊन ते एका वस्त्राच्छादित पात्रात ठेवतात व ते पात्र ब्राह्मणाला दान देतात याला निर्झरदान असे म्हणतात याचा दानमंत्र असा–

प्रवहन्निर्झरविमलतण्डुलप्रस्थपूरितम् ।
वस्त्रच्छन्नं ददे पात्रं वंशवृद्धयन्नपूर्तिदम् ॥

अर्थ – वाहत्या झऱ्यात धुतलेले एक प्रस्थ (एक माप) भर तांदूळ वस्त्राच्छादित अशा पात्रात घातले आहेत मी ते पात्र दान देत आहे यामुळे माझा वंश वाढो व मला अन्नधान्याची समृद्धी होवो

**निर्णेजक** एक प्राचीन जात हिला चलनिर्णेजक असे दुसरे नाव आहे निर्णेजन याचा अर्थ धुणारा असा आहे मराठीत या जातीला धोबी किंवा परीट असे म्हणतात विष्णुधर्मसूत्रात निर्णेजक व रजक असे वेगळे उल्लेख आहेत त्यावरून या दोन जातींत फरक असावा हारीताने रजक म्हणजे कपडे रंगविणारा आणि निर्णेजक म्हणजे कपडे धुणारा, असा तो फरक सांगितला आहे परंतु पुष्कळ वेळा रजक शब्द धोबी या अर्थानेही वापरतात पाहा– धोबी, परीट [ हि ध ]

**निर्दोषसप्तमीव्रत** एक जैन व्रत व्रतावधी सात वर्षे या व्रतात भाद्रपद शुद्ध सप्तमीला उपवास करतात फल – स्वर्गप्राप्ती पृथ्वीपाल नावाच्या राजाला मुनी राजाने या व्रताचे माहात्म्य सांगितले [ ज व्र वि म ]

**निर्मल पथ** निर्मल म्हणजे विशुद्ध हा शिखांचा एक उपपंथ आहे इ स च्या सतराव्या शतकात वीरसिंघ नामक पुरुषाने या पंथाची स्थापना केली असे काही लोक मानतात, तर काही लोक गुरू गोविंदसिंघालाच त्या पंथाचा संस्थापक समजतात या पंथाच्या अनुयायांचे वास्तव्य मथुरा, वृंदावन, हृषिकेश इ पुण्यक्षेत्रात असते

हे लोक कडवे धर्मनिष्ठ व नैष्ठिक ब्रह्मचारी असतात भौतिक जीवनाविषयी त्यांना कसलाही अनुराग नसतो ते आपल्या देहाकडेही फारसे लक्ष देत नाहीत क्वचित प्रसंगी ते नग्नावस्थेतही आढळतात बहुशी ते धूतवस्त्रे वापरतात

या पंथाचा दीक्षाविधी फार साधा असतो साखर घातलेले पाणी लोकांच्या भांड्यातून प्राशन केल्यानं दीक्षाविधी पुरा होतो या पाण्याला ते अमृत समजतात पाण्यात साखर घालून ठेवल्यावर पाच साधू ग्रंथसाहेबाचे पठण करतात तसे केल्याने ते पाणी अभिमंत्रित होते या समारंभाला ते अमृतप्राशन असे म्हणतात

हे लोक बहुधा कायमचे मठात राहतात पण त्यांच्यापैकी काहीजण पावसाळा सोडून आठ महिने भ्रमंती करतात ते एका गावाहून दुसऱ्या गावी निघाले, म्हणजे जवळचे कपडे टाकून देतात व इतर वस्तू लोकांना वाटून टाकतात

त्यांच्या मठप्रमुखांना महंत असे म्हणतात. हे महंत भगवी वस्त्रे वापरतात. महंतच मठाचा कारभार पाहतात. त्यांच्या मदतीला एक मंडळ असते. या मंडळाचे जे नियम आहेत, त्यांना दस्तुर उल अमल असे म्हणतात. महंताची निवड करणे, त्याची योग्यता ठरविणे, लंगराची (अन्नछत्र) व्यवस्था पाहणे, इ. गोष्टींचा या नियमांत समावेश असतो.

हे शास्त्राभ्यास करतात. योगसिद्धीवर त्यांचा विश्वास नसतो. देव म्हणून ते ग्रंथसाहेबाची पूजा करतात. त्याचप्रमाणे अन्य देवतांनाही मानतात. यांचा बराचसा आचार मुसलमानां-प्रमाणे असतो. यांची प्रार्थना सामुदायिक असते. निर्मलपंथी साधूंना काहीजण सुधारक साधू म्हणतात. [ ईश्वरसिंघ ठाकर ]

**निर्मळ** महाराष्ट्रातील एक पुण्यक्षेत्र. हे ठाणे जिल्ह्या-तील वसई गावापासून सुमारे सहा मैलांवर आहे. या भागाला परशुरामभूमी असेही म्हणतात. इथे एक शिवलिंग, शंकराचार्य विद्याशंकर भारती यांची समाधी आणि विमल व निर्मल असे दोन तलाव आहेत. या तलावांना ही नावे का मिळाली, यासंबंधी एक पौराणिक आख्यायिका आहे, ती अशी—

लोमहर्षण ऋषीची मुलगी वतरणी नदीच्या तीरावर तप-श्चर्या करीत होती. तुंगार पर्वतावरून विमलासुर नामक दैत्याने तिला पाहिले. तिच्या सौंदर्यावर तो मोहित झाला. त्याने तिला आपल्याशी लग्न करण्याचा आग्रह केला. पण ऋषिकन्या त्याच्या म्हणण्यास कबूल होईना. तेव्हा त्याने तिच्यावर सरळ हात टाकला. तो तिचे केस धरून ओढून नेऊ लागला. त्या प्रसंगी राक्षसाच्या हातून सुटण्यासाठी तिने शिवाचा धावा केला. तिचा तो धावा ऐकून शिव द्रवला. त्याने भार्गवरामाला तिथे जाऊन त्या दैत्याचा वध करण्यास सांगितले. शिवाज्ञेनुसार परशुरामाने त्या दैत्याचा वध केला. त्याचे शिर हसत हसत वैतरणेच्या काठी पडले. परशुरामाने त्या शिराला विचारले, की 'तू का हसतोस?' त्यावर त्या शिराने परशुरामाची खूप स्तुती केली. परशुराम त्या स्तुतीने प्रसन्न होऊन त्याला 'वर माग' म्हणाला. 'माझा देह ज्या ठिकाणी पडला, त्या ठिकाणी एक तीर्थ निर्माण होऊन त्याला माझे नाव मिळावे,' असा त्याने वर मागितला. परशुरामाने 'तथास्तु' म्हटले.

तेव्हापासून त्या तलावाला विमलतीर्थ असे नाव पडले. अशीच एक आख्यायिका निर्मळतीर्थासंबंधीही सांगतात.

निर्मळ तलावाच्या थोडे पुढे सुळेश्वर महादेवाचे व सुळेश्वरी देवीचे मंदिर आहे. ही देवी नवसाला पावते, अशी तिथल्या लोकांची श्रद्धा आहे.

इथे एक प्राचीन अश्वत्थवृक्ष आहे. त्या वृक्षाच्या बुंध्यात एक पिंडी आहे. ही पिंडी दिवसादिवस वाढत आहे, असे लोक मानतात. त्यामुळे पितरांसाठी पिंडदान करण्यास हे क्षेत्र पवित्र मानले जाऊ लागले. श्रीशंकराचार्य यांच्या पुण्यतिथीनिमित्त इथे कार्तिक वद्य एकादशीला मोठी यात्रा भरते. ही यात्रा एक आठवडाभर चालू असते. बाटून ख्रिस्ती झालेल्या अनेक हिंदू लोकांना परत स्वधर्मात घेण्याचे काम इथल्या तलावाच्या काठी चालू आहे, अशी इतिहासाची साक्ष आहे. [ श्री. अनंतराव नाईक—पुरुषार्थ, डिसेंबर १९६ ]

**निर्माणकाय** बुद्धाचा एक देह. धर्मपिपासू व ज्ञानदाता यांच्यासाठी बुद्ध हे शरीर धारण करतो. या शरीराच्या द्वारे तो जनांना काय, शील, समाधी, इ. गोष्टींचा उपदेश करतो. निर्माणकाय हा कर्मामुळे उत्पन्न होत नाही. त्या शरीरामध्ये अस्थी व रक्त या गोष्टी असत नाहीत. केवळ सत्त्वाचा परिपाक या स्वरूपात त्याचे दर्शन होते. करुणावतार सूत्राच्या मते बुद्ध हा असंख्य निर्माणकायाच्या रूपात अवतरित होऊन अज्ञानी जनांना धर्मदेशना देतो. याच सूत्रात बुद्धाचे पाच निर्माण या रूपाने पाच निर्माणकाय मानले आहेत. धर्म-बुद्धापासून निष्यंद आणि निष्यंदापासून निर्माणबुद्ध अशी ही परंपरा चालते.

सरहपादाच्या दोहाम ये निर्माणकायाची चर्चा करताना सांगितले आहे, की हे नाना निर्माणकाय बुद्धाचे निजस्वभाव-रूप आहेत. सिद्धांनी निर्माणकायाला मायोपम मानले असून, तो विविध रूपांचा अवतारक असतो, असे म्हटले आहे.

तिबेटी लामामतात मात्र पुनरवतार नामक निर्माणकायाचे एकच रूप प्रचलित आहे. लामाच्या मते दिव्यलोकनिवासी बुद्ध धर्मप्रचारासाठी लामाच्या मठात अवतरित होतो. मठाचे प्रवर्तक हे कोणत्या ना कोणत्या तरी बुद्धाचे अवतार मानले जातात. त्यांची परंपरा दलाई लामापासून सुरू होते, असे म्हणतात. [ बौ. द. मी., म. रा. अ. ]

**निर्माल्य** देवाने उच्छिष्ट केलेल्या पुष्पादी वस्तूंना निर्माल्य असे म्हणतात. 'देवस्वत्वनिवृत्तिविशिष्ट देवदत्त वस्तु' = देवाला दिलेली, पण त्यानंतर देवाने जिच्यावरचे स्वत्व (मालकी) निवृत्त केले आहे, अशी वस्तू म्हणजे निर्माल्य होय, अशी त्या शब्दाची व्याख्या आहे. देवावर आदल्या दिवशी वाहिलेल्या पानाफुलांचा दुसऱ्या दिवशी निर्माल्य होतो. विशिष्ट कालापुरती ज्या देवतांची पूजा केली असेल, त्या देवतांचे विसर्जन झाल्यावर त्यांना अर्पिलेल्या पुष्पादी वस्तू मात्र लगेच निर्माल्य होतात. याविषयी गरुड पुराणातील श्लोक असा—

अर्वाग्विसर्जनाद् द्रव्यं नैवेद्यं सर्वमुच्यते ।
विसर्जिते जगन्नाथे निर्माल्यं भवति क्षणात् ।।

अर्थ – देवाचे विसर्जन होण्यापूर्वी त्याला जे द्रव्य अर्पण केले असेल, ते सर्व नैवेद्य म्हटले जाते. त्याचे विसर्जन झाल्यावर एका क्षणात ते निर्माल्य होते.

देवावरचा निर्माल्य काढून टाकायचा तो ईशान्य दिशेस मंडल करून त्यावर टाकावा, असे कालिका पुराणात सांगितले आहे.

कोणत्या वस्तू किती कालाने निर्माल्य होतात, या विषयी योगिनीतंत्रात सांगितले आहे, ते असे–

मणी, मोती, सुवर्ण व ताम्रपात्र ही बारा वर्षांनी निर्माल्य होतात, वस्त्र व छत्री ही सहा महिन्यांनी, मोदक व तिलमिश्र भात हा अर्ध्या प्रहराने, खीर निवाल्यावर आणि नैवेद्य दाखवल्यावर लगेच निर्माल्य होतो.

विष्णूचा निर्माल्य काढतेवेळी मस्तकी धारण करावा, पण शिवाचा तसा धारण करू नये, असा नियम आहे. प्रातःकाळी देवावरचा निर्माल्य काढावा. त्या कामी उशीर झाल्यास तो देवाला मद्यासारखा टोचतो. निर्माल्य काढायला खूप उशीर झाल्यास त्याबद्दल विष्णुमंत्राचा जप करावा, असे हरिभक्तिविलासात सांगितले आहे. [ शा. क. ]

## निर्युक्ती

जैन आगमावरील टीकांचा एक प्रकार. निर्युक्ती शिवाय भाष्य, चूर्णी व टीका या स्वरूपाच्या अशा इतरही आगमावरच्या व्याख्या उपलब्ध आहेत. या सर्व रचना आगमांचेच अंग मानल्या जातात. त्यापैकी निर्युक्ती या भाषा, शैली व विषय या तीन्ही दृष्टींनी श्रेष्ठ दर्जाच्या व सर्वांत प्राचीन आहेत. त्या प्राकृत पद्यात लिहिलेल्या असून, त्यांत मूळ विषयाचे प्रतिपादन संक्षेपाने केलेले असते. प्रसंगानुसार त्यांत कथा व दृष्टान्तही दिलेले असतात. मात्र ते अगदी त्रोटक असतात. निर्युक्ती या काही ठिकाणी क्लिष्ट असतात. त्यामुळे त्यांचा अर्थ लागत नाही. आचारांग, सूत्रकृतांग, सूर्यप्रज्ञप्ती, व्यवहार, कल्प, दशाश्रुतस्कंध, उत्तराध्ययन, आवश्यक व दशवैकालिक या नऊ आगमांवर निर्युक्ती उपलब्ध असून, त्या भद्रबाहूने रचलेल्या आहेत, असे मानतात. दहाव्या ऋषिभाषित निर्युक्तीचा उल्लेख मिळतो, पण ती उपलब्ध नाही. निर्युक्तीतील पिंडनिर्युक्ती व ओघनिर्युक्ती ही प्रकरणे मुनींच्या आचाराच्या दृष्टीने फार महत्त्वाची असल्यामुळे आगमसाहित्यात स्वतंत्र रूपाने त्यांचा अंतर्भाव केलेला आहे. [ भा. स. ज. यो. ]

## निर्वाण

एक दार्शनिक संज्ञा. निर्वाण हा शब्द मोक्ष या शब्दाशी समानार्थक आहे. गीतेत ब्रह्मनिर्वाण असा शब्द आला आहे (५.२४, २५), तिथे याचा अर्थ मोक्ष असाच आहे. पण जरी मोक्ष व निर्वाण हे समानार्थक असले तरी सांख्य, योग, वेदान्त इ. दर्शनांनी मोक्ष शब्द स्वीकारला आणि जैन बौद्धांनी निर्वाण शब्द स्वीकारला.

निर्+वान (=इच्छा, वासना) = सर्व प्रकारच्या इच्छा किंवा वासना दूर होणे, नष्ट होणे, अशी त्याची एक व्युत्पत्ती आढळते. बौद्ध धर्मानुसार आम्याचे विझून जाणे, शांत होणे म्हणजे निर्वाण होय. बौद्ध पिटकात 'नाम निब्बाण' असे वाक्य आहे. ते याच अर्थाचे आहे. पण निर्वाणकल्पनेच्या संबंधात बौद्धांमधल्या हीनयान व महायान या संप्रदायांत मतभिन्नता आढळते. बौद्धांचा प्रत्येक संप्रदाय निर्वाणविषयक वेगवेगळी मते मानताना दिसतो. निर्वाण भावरूप आहे का अभावरूप आहे, इथपासून या मतभेदाला प्रारंभ होतो.

**हीनयानी विचार** – हीनयानी संप्रदायाच्या मते व्यक्ती तीन दुःखांनी पीडित असल्याचे मानले आहे– (१) दुःखदुःखता– भौतिक व मानसिक कारणांनी उत्पन्न होणारा क्लेश. (२) संस्कारदुःखता– उत्पत्तिविनाशशाली जगतातल्या वस्तूंपासून उत्पन्न होणारा क्लेश व (३) विपरिणामदुःखता– सुख दुःख रूपात परिणत झाल्याने उत्पन्न होणारा क्लेश. मनुष्याची या तीन क्लेशांपासून कधीही सुटका होत नाही. त्यातून सुटका करून घ्यायची, तर बुद्धाने उपदेशिलेल्या आर्य अष्टांगिक मार्गाने गेले पाहिजे. साधकाने त्या मार्गाचा अवलंब केल्यास त्याची वरील तीन्ही क्लेशांतून सुटका होते. यालाच निर्वाण म्हणतात. हीनयान संप्रदायाचे हे सर्वसामान्य मत आहे. निर्वाणाच्या अवस्थेवर प्रकाश टाकताना बुद्ध म्हणतो–

'भिक्षूंनो, ते आयतन आहे, तिथे नाही पृथ्वी, नाही जल, नाही तेज, नाही वायू, नाही आकाश'. निर्वाणावस्थेत इहलोकही नाही व परलोकही नाही. तिथे चंद्र नाही की सूर्य नाही. त्याला मी अगती म्हणत नाही, की गती म्हणत नाही. त्याला मी उत्पत्ती म्हणत नाही, स्थिती म्हणत नाही, की च्युती म्हणत नाही. निर्वाण कुठे थांबले नाही, की कुठे प्रवर्तितही झाले नाही. त्याला कसला आधारही नाही. निर्वाण हा केवळ दुःखाचा अंत आहे' (उदान पृ. ११९).

बुद्धाचे हे निर्वाणकथन सर्वथा अभावरूपच आहे आणि नागसेनाने मिलिंदप्रश्नात या कल्पनेला उचलून धरले आहे. तो म्हणतो, की निर्वाणानंतर व्यक्तित्वाचा सर्वथा लोप होतो. ज्या प्रमाणे अग्नीची ज्वाळा विझून गेल्यानंतर ती दाखवता येत नाही, त्याप्रमाणे निर्वाण प्राप्त झाल्यानंतर ती व्यक्ती, व्यक्ती म्हणून दाखवता येत नाही. कारण ज्या गोष्टीमुळे व्यक्तित्व सिद्ध होते, अशी कोणतीही गोष्ट निर्वाणानंतर शिल्लक नाही

निर्वाण प्राप्त झालेला मनुष्य उत्पन्न होत नाही, जाण होत नाही, मरत नाही, की पुनर्जन्मालाही प्राप्त होत नाही तो जिथल्या तिथे शांत होतो हाच आशय महाकवी अश्वघोषाने पुढील श्लोकात दृष्टान्ताच्या आधारे सांगितला आहे –

**दीपो यथा निर्वृतिमभ्युपेतो**
**नैवावनिं गच्छति नान्तरिक्षम् ।**
**दिशं न काञ्चित् विदिशं न काञ्चित्**
**स्नेहक्षयात् केवलमेति शान्तिम् ।।**
**तथा कृती निर्वृतिमभ्युपेतो**
**नैवावनिं गच्छति नान्तरिक्षम् ।**
**दिशं न काञ्चित् विदिशं न काञ्चित्**
**क्लेशक्षयात् केवलमेति शान्तिम् ।।**

(सौंदरानंद १६ २८–२९)

अर्थ– ज्याप्रमाणे विझलेला दिवा पृथ्वीवर जात नाही, अंतरिक्षात जात नाही, कुठल्या दिशेला जात नाही, कुठल्या विदिशेला जात नाही, तर केवळ तेल संपल्यामुळे जिथल्या तिथे शांत होतो, त्याचप्रमाणे निर्वाणाला प्राप्त झालेला ज्ञाता पुरुष पृथ्वीवर जात नाही, अंतरिक्षात जात नाही, कुठल्या दिशेला जात नाही, कुठल्या विदिशेला जात नाही, तर क्लेशांचा क्षय झाल्यामुळे जिथल्या तिथे केवळ शांत होतो

निर्वाण अनिर्वचनीय आहे, म्हणूनच अर्हत पुरुषाला विशुद्ध ज्ञानाच्या द्वारे त्याचा अनुभव किंवा साक्षात्कार घडत असतो निर्वाणाचा साक्षात्कार करण्यासाठी उपाय आहे, पण निर्वाण उत्पन्न करण्याचा मात्र कोणताही उपाय नाही याचे कारण हे, की निर्वाण हे निर्गुण आहे निर्गुण असल्यामुळेच ते उत्पाद-रहित आहे त्याचा साक्षात्कार अवश्य होतो, पण तो स्वयं अनिर्वचनीय पदार्थ आहे

मिलिंदाने या निर्वाणावस्थेवर एक आक्षेप घेतला आहे तो म्हणतो, की 'निर्वाणामध्ये काही ना काही दुःख राहतेच, कारण निर्वाणाचा शोध करणारे लोक नाना प्रकारच्या नेम धर्मांनी आपले शरीर, मन आणि इंद्रिये यांना ताप देत असतात, इंद्रिये आणि मन यांच्या वारांना दडपून टाकीत असतात त्यामुळे शरीरालाही कष्ट होतात आणि मनालाही होतात तेव्हा निर्वाणात दुःख नाही असे म्हणणे योग्य वाटत नाही' त्यावर नागसेनाने उत्तर दिले, ते असे– 'तपस्या, इंद्रियजय, इ उपायांमध्ये क्लेश असतीलच, पण निर्वाणावस्थेत त्यांचा मागमूसही राहत नाही निर्वाण हे महासागरासारखे अनंत-अपार आहे तळ्यातल्या कमलाप्रमाणे ते क्लेशापासून अलिप्त आहे जलाप्रमाणे ते क्लेशांचा ताप शमवणारे आहे कामतृष्णा, भवतृष्णा आणि विभवतृष्णा या तीन्ही तृष्णांचे शमन करणारे आहे

हीनयानी संप्रदायांपैकी थेरवादी संप्रदाय निर्वाणाला मान सिक व भौतिक भावांचा चरम निरोध मानतो तृष्णादी क्लेशांचा विराम झाल्यानंतर जेव्हा भौतिक जीव आपल्या शवटच्या अवस्थेला प्राप्त होतो तेव्हा त्याला निर्वाण म्हणावे, असे त्या संप्रदायाचे मत आहे त्यांच्या दृष्टीने निर्वाण हे अभावात्मक आहे निर्वाणानंतर कोणताही प्रकारचे जीवन शिल्लक राहत नाही आणि कोणत्याही प्रकारची चेतना अवशिष्ट राहत नाही

हीनयानी लोकांची ही निर्वाणकल्पना न्याय–वैशेषिक दर्शनातील मुक्तीच्या कल्पनेशी मिळतीजुळती आहे 'तदत्यंत विमोक्षोऽपवर्गः'= तत म्हणजे दुःख दुःखाचा ज्यामध्ये अत्यंत विमोक्ष म्हणजे नाश असतो, त्याला मुक्ती म्हणावे असे गौतमाचे सूत्र आहे (न्या सू १ १ २२) ज्याच्या योगे वर्तमान जन्माचा परिहार होतो व भविष्यकालीन जन्माची उत्पत्ती होत नाही, अशा स्थितीला अत्यंत विमोक्ष म्हणतात या दोन्ही गोष्टी सिद्ध झाल्यावर आत्म्याची सर्व प्रकारच्या दुःखांपासून आत्यंतिक निवृत्ती होते या मुक्त दशेत आत्मा आपल्या विशुद्ध स्वरूपात प्रतिष्ठित होतो व अखिल विशेष गुणांनी रहित होतो तहान, भूक, लोभ, मोह शीत व उष्ण या सहा ऊर्मी होत मुक्त आत्मा या सहाही ऊर्मींच्या प्रभावातून सुटतो व सुखदुःखादी सांसारिक बंधनांपासूनही मुक्त होतो या अवस्थेत दुःखाचा तर अभाव असतोच, पण सुखाचाही अभाव असतो

**महायानी मत–** महायान पंथातले लोक निर्वाण हे अभावरूपही मानीत नाहीत आणि भावरूपही मानीत नाहीत त्यांच्या मते आत्म्यावर दोन आवरणे असतात एक क्लेशावरण व दुसरे ज्ञेयावरण केवळ क्लेशावरण दूर झाले, अर्थात सुखदुःखादी सांसारिक बंधनाचे क्लेश नष्ट झाले, की तेच निर्वाण होय, ही हीनयानी लोकांची कल्पना महायानींना मान्य नाही त्यांच्या मते क्लेशावरणाप्रमाणेच जेव्हा ज्ञेयावरणही दूर होते, तेव्हाच निर्वाणाची अनुभूती घडू शकते शून्यतेचे ज्ञान होणे म्हणजेच ज्ञेयावरण नष्ट होणे होय निर्वाणाला सर्वज्ञतेची आवश्यकता असते आणि ती ज्ञेयावरण दूर झाल्यावाचून प्राप्त होऊ शकत नाही या सर्वज्ञतेलाच शून्यतेचे ज्ञान असे म्हणतात (त्रिंशतिकाविज्ञप्तिभाष्य)

हीनयानीच्या मताप्रमाणे अर्हत्पदाची प्राप्ती हे जीवनाचे उद्देश्य आहे, तर महायानींच्या मते बुद्धत्वाची प्राप्ती हे जीवनाचे उद्देश्य आहे या मूलभूत मतभेदामुळेच वरील दोन्ही संप्रदायांच्या निर्वाणकल्पनेत फरक पडला आहे

हीनयानी व महायानी ग्रंथांच्या अनुशीलनातून दोन्ही संप्रदायांची निर्वाणविषयक सामान्य कल्पना काय आहे, ते समजते

प. बलदेव उपाध्याय निर्वाणाची रूपरेषा पुढीलप्रमाणे सांगतात–

(१) निर्वाण हे निष्प्रपंच आहे. ते शब्दाच्या द्वारे प्रकट करता येत नाही. ते असंस्कृत धर्म आहे. त्यामुळे त्याला उत्पत्ती, विनाश व परिवर्तन हे धर्म नाहीत.

(२) निर्वाणाची अनुभूती जीवनामध्ये होते व ती अनुभूती स्वतःच घ्यायची असते.

(३) निर्वाण सर्वही ज्ञानी बुद्धांच्यासाठी असते व ते एक आणि सम असते.

(४) निर्वाणामध्ये व्यक्तित्वाचा सर्वथा निरोध होतो.

(५) अष्टांगिक मार्गाच्या द्वारे निर्वाणाची प्राप्ती होते.

वरील दोन प्रमुख पंथांमधील हीनयान संप्रदायानुसार निर्वाणविषयक मत पुढीलप्रमाणे आहे–

(१) निर्वाण हे सत्य, नित्य, दुःखाभावरूप व पवित्र आहे.

(२) निर्वाण ही प्राप्त करण्याची वस्तू आहे.

(३) निर्वाण हे भिक्षूंच्या ध्यान–ज्ञानासाठी आलंबन आहे.

(४) निर्वाण ही लोकोत्तर दशा आहे. प्राणिमात्रासाठी सर्वोन्नत अवस्था हीच आहे.

(५) निर्वाणाची दोन रूपे आहेत–सोपधिशेष व निरुपधिशेष. याच देहात निर्वाणाच्या ज्या सुखाचा अनुभव घडतो, अर्थात राग, द्वेष, मोह, इ. विकारांचा क्षय झाल्यानंतर याच जीवनात ज्या निर्वाणसुखाची अनुभूती घडते, ते सोपधिशेष होय. निर्वाण प्राप्त केल्यावर पंचस्कंध शिल्लक राहूनही ज्या अजर, अमर, शिव, अच्युत, परमशांत अशा सुखाचा अनुभव घडतो, त्याला अनुपधिशेष म्हणतात. बुद्धाला उरुवेला येथे बोधिवृक्षाच्या तळी ज्या निर्वाणाचा साक्षात्कार झाला, ते सोपधिशेष होते. अनुपधिशेष निर्वाण त्याला कुशीनारा येथे महापरिनिर्वाणाच्या समयी प्राप्त झाले.

(६) निर्वाण व संसार यांचे धर्म समान नाहीत.

(७) जगतातल्या पदार्थांना सत्ता आहे. जगही निर्वाणाइतकेच सत्य आहे.

महायानी संप्रदायानुसार निर्वाणविषयक मत असे–

(१) निर्वाण केवळ दुःखाभावरूप नसून ते सुखरूप आहे.

(२) निर्वाण अप्राप्त आहे.

(३) ज्ञाता–ज्ञेय, विषय–विषयी, निर्वाण–भिक्षू यांमध्ये कोणत्याही प्रकारचा भेद नाही.

(४) निर्वाण ही लोकोत्तर दशा. त्याहूनही एक उच्चतम दशा असते. तिला लोकोत्तरतम म्हणतात. निर्वाणात सर्वज्ञतेची प्राप्ती होते.

(५) निर्वाणाचे दोन भेद आहेत–प्रकृतिसिद्ध व अप्रतिष्ठित. श्रावक व प्रत्येकबुद्ध हे मैत्रीभावनेने रहित असल्यामुळे ते आपले चित्त निर्वाणाच्या प्राप्तीतच लावतात. त्यांच्या निर्वाणाला प्रकृतिसिद्ध म्हणावे. पण बोधिसत्त्व हे (जनांच्या) मैत्रीने युक्त असल्याने ते निर्वाणामध्ये आपले चित्त कधीही लावीत नाहीत. जनांची दुःखे दूर करण्याच्या पुढे त्यांना निर्वाणाची मळीच पर्वा नसते. याला अप्रतिष्ठित निर्वाण म्हणतात. ही अवस्था अर्हतावस्थेपेक्षाही श्रेष्ठ आहे. या अवस्थेत बुद्ध हा संसार व निर्वाण या दोहोंही कल्पनांपेक्षा फार उच्च स्थानी गेलेला असतो, असे विज्ञप्तिमात्रतासिद्धी या ग्रंथात सांगितले आहे.

(६) माध्यमिकांच्या मते निर्वाण हे निराकार आणि परमार्थरूप आहे. त्याचीच एकमात्र सत्ता आहे. अन्य पदार्थ केवळ चित्ताचे विकल्पमात्र होत. म्हणून निर्वाण व संसार यांत अभेद समजा असतो. त्या दोहोंचा संबंध समुद्र व त्यावरील तरंग यांच्यासारखा आहे.

(७) माध्यमिक व योगाचार या दोहोंच्या मते निर्वाण अद्वैत असते. त्यात ज्ञाता–ज्ञेय, विषय–विषयी इ. द्वैत कोणत्याही प्रकारे राहू शकत नाही. तत्त्व एकमेव तत्त्व असून, जगताचा पसारा हा मायिक व मिथ्या आहे.

**मुक्ती व निर्वाण** – बौद्धांचा निर्वाणकल्पना सांख्य व वेदान्त यांच्या मुक्तिकल्पनेशी ताडून पाहण्याजोगी आहे. प्रथम वरील दोन दर्शनांतला मुक्तिविषयी मतभेद विचारात घ्यायला हवा. सांख्यमतात पुरुष व प्रकृती ही दोन तत्त्वे आहेत. त्यांपैकी पुरुष हे चेतनतत्त्व असून प्रकृती हे जडतत्त्व आहे. अविवेकामुळे चेतनाचे बिंब प्रकृतीत पडत राहते आणि प्रकृती जड असूनही त्या बिंबाच्या संपर्काने चेतनासारखी कार्य करू लागते. मग बिंबाने प्रभावित झालेल्या प्रकृतीच्या गुणांचा आरोप पुरुषावर पडतो आणि त्यामुळे स्वभावतः निर्लेप असूनही पुरुष स्वतःला कर्ता, भोक्ता, इ. मानू लागतो. विवेकबुद्धीच्या द्वारे या दोन्ही तत्त्वांचा परस्पर आरोप नाहीसा होतो. प्रकृती व पुरुष यांच्या पृथक्पणाच्या ज्ञानाला विवेकबुद्धी म्हणतात. ती प्राप्त झाल्याने पुरुष आत्मस्वरूप ओळखतो व त्यानंतर तो पुनश्च प्रकृतीच्या बंधनात पडत नाही. हीच त्याची मुक्ती होय. सांख्य मतात मुक्ती म्हणजे दुःखाची आत्यंतिक निवृत्ती मानलेली आहे. प्रकृती ही मिथ्या असून ब्रह्म हे एकमात्र सत्य आहे. ब्रह्माचे जेव्हा ज्ञान होते तेव्हा समस्त मायाजाल नष्ट होते. त्या समयी साधकाला ब्रह्माच्या सच्चिदानंद स्वरूपाचा साक्षात्कार होतो व त्याला आत्यंतिक सुखाची प्राप्ती होते. सांख्य व नैयायिक हे मुक्तीला दुःखाची आत्यंतिक निवृत्ती मानतात, तर वेदान्ती तिला आनंदरूप मानतात. यावरून निर्वाणाची हीनयानी कल्पना सांख्यांच्या मुक्तीसारखी आहे, तर महायानी कल्पना वेदान्त्यांच्या मुक्तीसारखी आहे, हे कळते.

**जैन निर्वाण** – आत्म्याचे विझणे, जिवंतपणी निर्वाण होणे ही बौद्धांची निर्वाणकल्पना जैनांना मान्य नाही. जैन मते आत्मा कधी विझत नाही, तर सर्व कर्मांचा क्षय झाल्यानंतर तो एक नवेच रूप धारण करतो. निर्वाण म्हणजे विझणे ही क्रिया आत्म्याला लागू नसून ती संसार व कर्म यांना लागू आहे. निर्वाण पावलेला आत्मा एका अशा चिरंतन सुखात निमग्न होतो, की ते सुख सोडून त्याचे पुनरपि संसारात पतन घडत नाही. 'सुखी भव अनंतसुखं प्राप्तः' = निर्वाण पावलेला आत्मा सुखरूप होतो. ज्याला अंत नाही, असे सुख प्राप्त करून घेतो. असे त्या विषयी जिनसहस्रनामात म्हटले आहे. म्हणूनच तीर्थंकर आणि उच्च श्रेणीचे वीतरागी यांच्या निधनाला निर्वाण म्हणतात. जैन शास्त्रात निर्वाण व मोक्ष हे दोन शब्द पर्यायवाची असले, तरी त्यांच्या व्युत्पत्तीत थोडे वेगळेपण आहे. सर्व प्रकारच्या कर्मापासून सुटका होणे म्हणजे मोक्ष आणि सर्व कर्मच विझून जाणे म्हणजे निर्वाण होय.

जैन शास्त्रात निर्वाण शब्द अन्यही काही अर्थांनी वापरलेला आढळतो. त्यांपैकी काही अर्थ असे –

(१) निर्वाण = आत्मस्वरूपाची प्राप्ती, या अर्थाने दिगंबर व श्वेतांबर या दोन्ही आचार्यांनी त्याचा प्रयोग केला आहे.

(२) कर्मजन्य विकारांचा नाश होणे. 'कृत्स्नकर्मविप्रमोक्षो मोक्षः' = समस्त कर्मांचा क्षय होणे म्हणजे मोक्ष होय (तत्त्वार्थसूत्र).

(३) जन्म, जरा, मरण, इ. दुःखांपासून निवृत्ती होणे.

(४) सर्व प्रकारच्या दुःखांची निवृत्ती होऊन आत्यंतिक सुखाची प्राप्ती होणे.

(५) अष्टकर्मांच्या नाशापासून उत्पन्न होणाऱ्या केवल्यादी गुणांची प्राप्ती होणे. ही प्राप्ती सिद्धत्वाच्या प्राप्तीनंतर होते.

पाहा – मोक्ष [बौ. द. मी., ज. म. पृ., श्री विमलकुमार कादेय – ज. गि. भा., डिसेंबर १९६९, उ. प्र. बौ. वि., हिं. सा. बौ. प्र., हिं. सा. को. क. ह. इ.]

## निर्वाणकल्याणकव्रत

एक जैन व्रत. हे व्रत बहात्तर दिवसांनी पुरे होते. यात चौवीस बेला व चौवीस पारणा असतात. व्रतकालात 'ॐ ह्रीं वृषभादिचतुर्विंशति जिनाय नमः' या मंत्राचा त्रिकाल जप करतात. व्रतावधी पूर्ण झाल्यावर उद्यापन करतात. [ज. व्र. वि. स.]

## निर्वाणी

जैन देवतामंडळातली एक यक्षिणी व शांतिनाथाची सेविका. हिचे वर्णन असे –

**तत्तीर्थजन्मा निर्वाणी गौराङ्गी कमलासना।**
**पुस्तकोत्पलसंयुक्तौ बिभ्रती दक्षिणौ करौ**
**सकमण्डलुकमलौ वामौ च दधती करौ ॥**

अर्थ – शांतिनाथाची सेविका निर्वाणी ही गौरवर्णाची, कमलासनावर बसणारी, उजव्या दोन हातांत पुस्तक व कमल आणि डाव्या दोन हातांत कमंडलू व कमल धारण करणारी (दिगंबरांच्या मते मयूरवाहना व चक्र, फळ, ... आणि वरदमुद्रा धारण करणारी) अशी आहे.

या वर्णनावरून हिचे पौराणिक सरस्वतीशी सादृश्य दिसते. लखनौ येथील वस्तुसंग्रहालयात हिची मूर्ती आढळते. [जै. इ. ]

## निर्वाणोपनिषद

एक नव्य उपनिषद. हे ऋग्वेदाशी संबंधित असून, अवधूत संन्यासी, हा त्याचा वर्ण्य विषय आहे. या उपनिषदात निर्वाण शब्दाचा अर्थ वासुदेव असा दिला असून, अवधूत संन्याशाने त्याची पूजा करावी, असे तिथे सांगितले आहे. कर्मनिर्मूलन हा त्या अवधूताची कंथा, काठिण्य हे त्याचे कौपीन, ब्रह्म हाच त्याचा विवेक व ज्ञान हेच त्याचे स्मरण होय. त्याने काशीवास करावा, एकांतात राहावे, आनंदभिक्षेचे सेवन करावे, सत्य ज्ञानाने भाव व अभाव या दोहोंनाही जाळून टाकावे. असे केल्याने तो निरालंब पदावर विराजमान होतो. [श्री. शी. ग. देसाई]

## निर्वाप

यज्ञप्रसंगी देवतेसाठी हविर्द्रव्य मोजून घेणे, याला निर्वाप असे म्हणतात. प्रत्येक देवतेसाठी चार मुठी धान्य घ्यायचे असते. श्रौतयज्ञामध्ये अर्ध्वर्यू धान्य मोजून घेताना मंत्र म्हणतात आणि त्या त्या देवतेचा निर्देश करतात. उदा० 'अग्नये जुष्टं निर्वपामि' = अग्नीला आवडणारे धान्य मी मोजून घेतो. सुपामध्ये पवित्रक ठेवून त्यावर हा निर्वाप करतात. [श्री. विद्याधरशास्त्री भिडे]

## निर्विकृतिव्रत

एक जैन व्रत. या व्रतात विकार उत्पन्न करणाऱ्या भोजनाचा परित्याग करायचा असतो. दूध, तूप, दही, तेल, गूळ, इ. पदार्थ इंद्रियांत विकृती उत्पन्न करणारे असून, ते धर्मशास्त्रात त्याज्य ठरविले आहेत. म्हणून ज्या व्रतात हे पदार्थ वगळून भोजन करायचे असते, त्या व्रताला हे नाव दिले आहे. [वसुनंदि–श्रावकाचार]

## निवडुंग

एक काटेरी वनस्पती. निवडुंगाचे निधारी, फड्या, फणेर असे तीन प्रकार आढळतात. पाठारे प्रभू जातीत मुलगे दिवाळीच्या दिवशी निवडुंगाचे दिवे बनवून ते आपल्या जवळच्या इष्ट अशा घरात नेऊन ठेवतात. त्या घरा-

तील मुलगी आपल्याला मिळावी, असा त्यामागे हेतू असल्याचे



फड्या निवडुंग

सांगतात बंगालमध्ये मनसादेवीचा प्रतिनिधी म्हणून निवडुंगाची पूजा करतात ही वनस्पती औषधी आहे [ हिं ह्य ]

## निविद

एखाद्या देवतेच्या वर्णनात्मक विशेषणाच्या समूहाला निविद म्हणतात ऋग्वेदाच्या परिशिष्टामध्ये एक निविदाध्याय असून, त्यामध्ये निरनिराळ्या देवतांच्या निविदा आहेत यज्ञाच्या वेळी सूक्त म्हणताना होता निविदांचा उच्चार करतो निविदा गद्यात असतात प्रजापतीने प्रथम निविदा निर्माण केल्या आणि मग सर्व सृष्टी निर्माण केली, असे सांगितले आहे ऐतरेय ब्राह्मणात निविदांना सौर्य देवता असे म्हटले आहे (३ ११), तर जैमिनीय उपनिषदांत आदित्यालाच निविद असे म्हटले आहे त्याचप्रमाणे अन्न, चक्षू, अंतरात्मा व क्षत्र या सर्वांनाच निविद अशी संज्ञा दिली आहे

यज्ञामध्ये देवतांच्या स्तुतीसाठी शस्त्रे म्हटली जातात त्यामध्ये काही सूक्तांत निविदांचा समावेश करतात अशा सूक्तांना निविद्धानीय सूक्त असे म्हटले जाते ही निविद स्वर्गाच्या शिडीचे काम करते यजमान या शिडीच्या साहाय्याने स्वर्गाला जातो

निविद या यजमानाचे प्राणच होत म्हणून होत्याने निविद म्हणताना त्यातली एखादी पंक्ती गाळू नये, कारण त्यामुळे यजमानाचा श्वासोच्छ्वास थांबल्यासारखे होईल त्याचप्रमाणे होत्याने निविदांतील वाक्यांचा क्रम बदलू नये किंवा त्यातली दोन वाक्ये जोडू नयेत

निविदच यजमानाला उत्पन्न करते आणि त्याच्यात प्राण घालते अशी कल्पना आहे [श्रा एन जा शेंडे– दि होतृ ॲण्ड अदर प्रीस्ट्स इन दि ब्राह्मणाज आफ दि ऋग्वेद, दि जर्नल आफ दि युनिव्हर्सिटी ऑफ बॉम्बे, मार्च १९६३ ]

## निरीत

माळसारंग जातीचे पाहा– तणण

## निवृत्तिनाथ

(१२७३–१२९७ इ स ) एक मराठी संत कवी, ज्ञानेश्वरांचे गुरू व ज्येष्ठ बंधू यांचा जन्म पैठणपासून आठ मैलांवर गोदावरीच्या काठी असलेल्या आपेगावच्या कुलकर्णी घराण्यात झाला विठ्ठलपंत व रुक्मिणी ही त्यांच्या मातापित्यांची नावे होत निवृत्तिनाथ हे नाथ संप्रदायी होते त्यांची गुरुपरंपरा अशी – मत्स्येंद्रनाथ→गोरखनाथ→गहिनीनाथ→निवृत्तिनाथ निवृत्तिनाथांच्या गुरुबोधासंबंधी एक आख्यायिका सांगतात, ती अशी –

निवृत्तीनाथादी चारही भावंडे आपल्या पित्याबरोबर ब्रह्मगिरीची प्रदक्षिणा करीत असताना त्यांना एक वाघ आडवा आला वाघाच्या भीतीने सारेजण सैरावैरा पळत सुटले या गडबडीत निवृत्तिनाथांनी नजीकच्या एका गुहेत आश्रय घेतला त्याच गुहेत गहिनीनाथांचा निवास होता निवृत्तिनाथांना पाहून गहिनीनाथांना योग्य शिष्य मिळाल्याचा आनंद झाला व त्यांनी परंपरेने स्वतःला प्राप्त झालेले गुह्य ज्ञान निवृत्तिनाथांना उपदेशिले 'या ज्ञानाचा प्रसार करून तू कलिग्रस्त जीवांचा उद्धार कर', असा त्यांनी निवृत्तिनाथांना आदेशही दिला

निवृत्तिनाथांनी बरेच अभंग रचले आहेत त्यांची भाषा फार जुनी आहे त्यांतील एक अभंग असा–

> **पुंडलिकाचे भाग्य वर्णावया अमरीं ।**
> **नाहीं चराचरीं ऐसा कोणी ।।**
> **विष्णुसहित शिव आणिला पंढरीं ।**
> **केले भीमातीरीं पेखणें जेणें ।।**
> **ब्रह्मादिकां अंत न कळे ज्या रूपाचा ।**
> **एवढी कीर्ति वाचा बोलों काय ।।**
> **निवृत्ति सांगे मातु विठ्ठल उच्चार ।**
> **वैकुंठ उतरे एक्या नामें ।।**

याशिवाय निवृत्तेश्वरी या नावाची एक गीताटीकाही त्यांनी रचली होती, असे सांगतात

ज्येष्ठ वद्य द्वादशीला निवृत्तिनाथांनी त्र्यंबकेश्वरी जीवंत समाधी घेतली त्यांच्या पुण्यतिथीसाठी दरवर्षी तिथे मोठी

यात्रा भरते पाहा– ज्ञानेश्वर [प्रा म सा , म रा ]

**निवेदिता** (१८६७–१९११ इ स) स्वामी विवेकानंदांची मानसकन्या व हिंदू धर्माची थोर प्रचारिका निवेदितेचे पूर्वाश्रमीचे नाव मार्गारेट असे असून, ती जन्माने आयरिश होती आयर्लंडमधील अल्स्टर नामक गावी एका सुसंस्कृत आणि धार्मिक वळणाच्या घरात ती जन्मली तिचे वडील सॅम्युअल रि एफ नामांकित ख्रिश्चन धर्मोपदेशक होते निवेदितेची आई मेरी इसॅबेला हिने प्रथम प्रसूतीच्या वेळी आपल्याला प्रसूतीच्या यातना होऊ नयेत, यासाठी एक नवस केला होता ती देवाला म्हणाली होती ' माझी प्रसूती सुलभ तेने पार पडू दे होणारे अपत्य मी तुझ्या सेवेला समर्पण करीन ' मेरीची ही प्रार्थना देवाने ऐकली ती सुखरूप प्रसूत होऊन तिने एका सुंदर मुलीला जन्म दिला मेरीने तिचे नाव मार्गारेट (= ईश्वराच्या कामी समर्पित झालेली) असे ठेवले

पहिली काही वर्षे मार्गारेटने आपल्या सुशील माता पित्यांच्या सान्निध्यात शिक्षण घेतले, पण पुढे वडील निवर्तल्यामुळे १८८०–१८८४ इ स च्या दरम्यान तिला लंडनला जाऊन शिक्षिकेचा व्यवसाय करावा लागला तेव्हापासून ती समोवतालच्या धार्मिक, सामाजिक व राजकीय अशा विविध चळवळींमध्ये जाणतेपणाने लक्ष घालू लागली त्यातच दिनांक २२ ऑक्टोबर १८९५ या दिवशी मार्गारेटची स्वामी विवेकानंदांशी भेट झाली स्वामीजींच्या पहिल्याच दर्शनाने ती प्रभावित झाली स्वामींनाही तिच्यातील अदृश्य कर्तृत्वगुणाचा साक्षात्कार झाला व त्यांनी तिच्या सार्‍या आशंकांचे निरसन करून तिला आपल्या शिष्यपरिवारात दाखल करून घेतले भारतातील स्त्रीजातीच्या उद्धाराच्या काही कल्पना स्वामीजींच्या मनात घोळत होत्या त्यांना मूर्तस्वरूप देण्यासाठी मार्गारेटचा उपयोग करून घेण्याचे स्वामींनी ठरविले

इ स १८९७ च्या आरंभी स्वामी विवेकानंद परदेशातून भारताला परतले थोड्याच दिवसांत त्यांनी मार्गारेटलाही भारतात बोलावून घेतले मात्र त्यापूर्वी त्यांनी तिला आपल्या नव्या कार्याची आणि त्यासाठी तिला कराव्या लागणार्‍या महान साहसाची परिपूर्ण कल्पना दिली अखेर सर्व प्रकारचा साधकबाधक विचार केल्यावर इ स १८९८ च्या जानेवारीत मार्गारेटने भारतात पाऊल टाकले

इकडे आल्यानंतर दुसर्‍याच दिवसापासून मार्गारेटच्या साधनेला प्रारंभ झाला आरंभी आरंभी काही निग्रह कलकत्त्यातल्या अनेक स्त्री पुरुषांनी आणि क्वचित प्रसंगी विवेकानंदांच्या सहकार्‍यांनीही तिला प्रत्येक बाबतीत विरोध केला एका परधर्मी स्त्रीला हिंदुधर्मसाधनेचा अधिकार नाही व तिने हिंदूंच्या मंदिरात प्रवेशही करता कामा नये, अशी त्यांनी विरोधी विचा



भगिनीनिवेदिता

रांची वादळे उठवली, पण अल्पावधीतच स्वामींनी सर्वांची समजूत पटवून ती शमवली

स्वामीजींची कल्पना अशी होती, की मार्गारेटला प्रारंभी काही दिवस आपल्या स्वतःच्या आईकडे– भुवनेश्वरीदेवींकडे– ठेवावे व तिथे तिने हिंदू कुटुंबातले आचार– विचार, व्यवहार, व्रतवैकल्ये, धार्मिक रूढी रीती आत्मसात केल्यावर मग तिला हिंदुत्वाची दीक्षा द्यावी, पण भुवनेश्वरीदेवी तेव्हा तिथे नसल्यामुळे ते साधले नाही त्यामुळे रामकृष्णांचे शिष्य, स्वामीजींच्या अन्य पाश्चात्त्य शिष्या, तसेच रामकृष्णांच्या पत्नी श्रीशारदामाता यांच्याकडेच प्रारंभी मार्गारेटला काही काल राहावे लागले या

सर्व ठिकाणी राहून मार्गारेटने हिंदुत्वाचे नानाविध संस्कार प्राप्त करून घेतले

दिनांक ११ मार्च १८९८ रोजी कलकत्त्याच्या 'स्टार' नामक रंगगृहात स्वामी विवेकानंदांनी एक सभा आयोजित केली या सभेत त्यांनी आपल्या पाश्चात्त्य शिष्यवर्गाचा एतद्देशीय लोकांना परिचय करून दिला या प्रसंगी केलेल्या भाषणात मार्गारेटने आपल्या हिंदुस्थानातील आगमनाचे उद्दिष्ट पुढील शब्दांत व्यक्त केले –

सहा सहस्र वर्षांची अक्षुण्ण परंपरा तुम्हा सर्वांच्या पाठीशी आहे आणि या सनातन परंपरेतून तुम्हाला जगद्वंद्य अशी आध्यात्मिक विचाररत्ने लाभली आहेत मी आज या भारत-भूमीत आले आहे मनात एकच तीव्रतम वांछा आहे, की या भूमीची सेवा करावी ! मी इथे शिकण्यासाठी आले आहे एखाद्या लहान मुलीप्रमाणे मला धर्मशिक्षणाचा ज्ञानामृत करायचा आहे मला आपण सर्व साहाय्यभूत व्हा जेव्हा मला अडचणी येतील, तेव्हा ज्या उत्कट मनाने आपण आज माझे स्वागत केलेत, त्याचे मी स्मरण करीन आणि आलेल्या अडचणी पार करीन श्रीरामकृष्णांचा विजय असो !

यानंतर लौकरच म्हणजे २९ मार्च १८९८ या दिवशी स्वामीजींनी मार्गारेटला विधिपूर्वक ब्रह्मचारिणी व्रताची दीक्षा दिली व तिचे नाव निवेदिता ठेवले यानंतर स्वामीजी निवेदितेला म्हणाले–

हिंदुस्थानासाठी कोण्याही युरोपियनाला काम करायचे असेल तर त्याने पूर्णपणे हिंदू झाले पाहिजे तिला हिंदू स्त्रियांच्या शिक्षणाचा भार उचलायचा आहे, तिने ब्रह्मचारिणीचे आयुष्य पत्करले पाहिजे स्वतःचा भूतकाळ पूर्णपणे विसरून आणि दुसऱ्यांनाही त्याचा विसर पाडून, बंधनात असलेली पतिव्रता हिंदू स्त्री ज्याप्रमाणे कुटुंबसौख्याकरिता सर्व कष्ट सहन करते, त्याप्रमाणेच ब्रह्मचारिणीने देशकार्याकरिता निरासक्त बुद्धीने आपले प्राण वेचले पाहिजेत

असा उपदेश करूनच स्वामीजी थांबले नाहीत, तर त्यांनी निवेदितेला खरोखरीच अंतर्बाह्य हिंदू बनविले त्यासाठी त्यांनी निवेदितेला हिंदुस्थानचा समग्र धार्मिक आणि सामाजिक इतिहास निवेदन केला, हिंदू समाजाचे मर्मबिंदू स्पष्ट केले, हिंदूंच्या इतिहासातील महापुरुषांची जीवनचरित्रे ऐकवली आणि अखेर तिला बरोबर हिंडवून या देशाच्या तसू तसू भूमीचे तीर्थरूपत्व तिच्या प्रत्ययाला आणून दिले

दिनांक १२ नोव्हेंबर १८९८ रोजी दीपावलीचा दुसरा दिवस होता बंगालमध्ये हा दिवस कालीपूजनाचा म्हणून मानला जातो या दिवशी निवेदितेने एका बालिका विद्यालयाची स्थापना करून आपल्या कार्याचा शुभारंभ केला पहिल्या दिवशी विद्यालयात मुलींची संख्या अवघी तीन होती, पण विवेकानंद आणि शारदामाता यांच्यासारख्या महात्म्यांचे आशीर्वाद पाठीशी असल्यामुळे थोड्याच काळात ही संख्या तिसांवर गेली निवेदितेच्या या विद्यालयाचे नाव जरी बालिका विद्यालय असे होते, तरी त्यात नवविवाहिता आणि विधवा यांनाही प्रवेश होता शाळा कशी चालवावी, याविषयी विवेकानंदांनी निवेदितेला जे मार्गदर्शन केले, त्यात त्यांनी मुलांना चित्रकला भरतकला, नृत्यकला, इ. कला शिकवाव्या हे जसे सुचविले, तसेच त्यांच्यात स्वदेश स्वधर्म व स्वभाषा यांच्याविषयी प्रेम व अभिमान निर्माण करावा, हेही सुचविले निवेदितेनेही स्वामीजींच्या मार्गदर्शनाप्रमाणेच आपल्या शिष्यांना तयार केले एका प्रसंगी तिने मुलींना प्रश्न केला 'हिंदुस्थानची राणी कोण ?' त्यावर एक मुलगी पटकन उत्तरली हिंदुस्थानची राणी व्हिक्टोरिया ! निवेदितेला त्या उत्तराने वाईट वाटले, पण ती रागावली नाही शांतपणे तिने सर्व मुलींना सांगितले 'हिंदुस्थानची राणी सीता आहे, व्हिक्टोरिया नव्हे !' त्या बालिकाविद्यालयातले सगळेच शिक्षण असे राष्ट्रीय स्वाभिमानाने रसरसलेले असे

इ. स. १८९९ च्या फेब्रुवारीत कलकत्त्यात प्लेगने थैमान घातले विवेकानंदांच्या नेतृत्वाखाली निवेदितेने आणि त्यांच्या अन्य शिष्यांनी या प्रसंगी सर्व प्रकारे लोकसेवेत अग्रभाग घेतला आजाऱ्यांची शुश्रूषा करण्यापासून प्रत्यक्ष गलिच्छ वस्त्या झाडून-पुसून स्वच्छ करण्यापर्यंत प्रत्येक कामात निवेदिता अहर्निश राबत होती या आणि अशाच अन्य प्रसंगांतून निवेदितेची लोककल्याणाची कळकळ दिसून आल्यावर स्वामी विवेकानंदांनी २५ मार्च १८९९ या दिवशी तिला नैष्ठिक ब्रह्मचारिणीची दीक्षा दिली मागच्या दीक्षेहून ही दीक्षा वरच्या दर्जाची होती या दीक्षाप्रसंगी यज्ञाग्नी प्रज्वलित केला होता त्या अग्निनारायणाला साक्षी ठेवून, वेदमंत्रांच्या पवित्र घोषात निवेदितेने पुढील आशयाची प्रतिज्ञा घेतली–

'मी दारिद्र्याला वरले आहे मी तनमनाने पवित्र राहीन, अहंकार व बुद्धी यांसह मी आज्ञांकित राहीन मृत्युसुद्धा या व्रतापासून मला परावृत्त करू शकणार नाही '

या दीक्षाग्रहणानंतर अवघ्या तीन-साडेतीन वर्षांतच म्हणजे ४ जुलै १९०२ या दिवशी स्वामी विवेकानंदांचे निर्याण झाले त्यामुळे निवेदितेचा आधारवडच उन्मळून पडला पण ती डगमगली नाही आपल्या ब्रह्मीभूत गुरूचे कार्य पुढे चालविण्याचे आणि त्यांचे हिंदुराष्ट्रोद्धाराचे स्वप्न व्यवहारात आणण्याचे उत्तरदायित्व आता आपल्यावर आहे असे तिने मानले

जुन्या आणि नव्या थाटातील सर्व उपयुक्त आचार-विचारांचा समन्वय करणारे असे समर्थ आणि संघटित हिंदुराष्ट्र हे स्वामीजींचे अंतिम ईप्सित होते. त्यासाठीच हिंदुराष्ट्राचे स्वातंत्र्य हा त्यांना अपेक्षित होते. स्वामीजींच्या या ईप्सितपूर्तीच्या दृष्टीनेच निवेदितेने यापुढचे आपले ध्येय ठरवण आखले. यानंतर तिने देशभक्त आणि स्वार्थत्यागी वृत्तीच्या तरुणांत मध्ये आपल्या भावनेने जमा केले व त्यांना सशस्त्र क्रांतियुद्धाची दीक्षा देऊन त्यांच्या द्वारा देशभर राष्ट्रीय स्वातंत्र्याचा महामंत्र घुमविला. बडोद्याहून तिने अरविंदबाबूंना बोलावून घेतले. अरविंदांचे बंधु बारींद्र, विवेकानंदांचे बंधू भूपेंद्र, लो. टिळक, ना. गोखले, रवींद्रनाथ ठाकूर, जगदीशचंद्र बोस, इ. लहान-थोर नेत्यांशी तिने घनिष्ठ संपर्क साधला.

इ. स. १९०५ साली लॉर्ड कर्झनने बंगालची फाळणी करण्याचे ठरवले आहे. त्या वेळी त्याला कडवा विरोध करणाऱ्या नेत्यांत निवेदिता अग्रभागी होती. आपल्या राजकीय कार्याची झळ रामकृष्ण मठाला लागू नये, यासाठी तिने अमृतबझार पत्रिकेत जाहीर खुलासा करून मठाचे व आपले कार्यक्षेत्र सर्वस्वी वेगळे असल्याचे स्पष्ट केले. अशा प्रकारे सर्व मिळून त्यांच्या वर तीं इंग्रजी साम्राज्यावर एखाद्या विजेसारखी कोसळून पडली. निवेदितेच्या या कर्तृत्वाची इंग्रज सरकारला चांगली कल्पना होती, पण निवेदितेने उचललेले पाऊलच असे होते, की जंग जंग पछाडूनही ती सरकारी सापळ्यात सापडू शकली नाही. भूपेंद्र दत्त यांच्यावर झालेल्या एका खटल्यात तिने स्वतःच थोड्या तारांत वीस सहस्र रुपये उभे करून त्यांना जमिनावर सोडवले.

अशा प्रकारे हिंदुस्थानातल्या क्रांतिचक्राला गती देऊन ती युरोपातील भारतीय बांधवांना इंग्रजी राजवटीविरुद्ध उभे करण्यासाठी तिकडे गेली, पण दुर्दैव असे, की तिच्या पश्चात खुद्द हिंदुस्थानातलेच क्रांतिकुंड विझले. सरकारने दडपशाहीचा वरवंटा फिरवून काही काळापुरती का होईना, शांतता प्रस्थापित केली. निवेदिता भारतात परतली, तेव्हा तिला ही शांतता असह्य झाली. पुन्हा एकदा सारा देश ढवळून काढावा अशा योजना ती आखू लागली. तापूर्वी आपल्या चळवळीला दैवाचे अधिष्ठान प्राप्त करावे, म्हणून ती यात्रेसाठी निघाली. पण त्याच वेळी दैवगती उलटली. यात्रा करीत असतानाच तिची प्रकृती बिघडली आणि १३ ऑक्टोबर १९११ या दिवशी ती दार्जिलिंग येथे निधन पावली.

निवेदितेचे जीवनचरित्र म्हणजे स्वामी विवेकानंदांनी निसर्गावर मात करून घडविलेला एक अद्‌भुत चमत्कार होय. जन्माने ख्रिश्चन असलेल्या, इतकेच नव्हे, तर ख्रिश्चन धर्माचा, राष्ट्राचा व संस्कृतीचा अभिमान जिच्या रोमरोमांत प्रस्फुरित झाला आहे अशा सर्वस्वी परकीय स्त्रीला त्यांनी अंतर्बाह्य हिंदू बनवून टाकले. एवढेच नव्हे, तर तिच्याच द्वारा आसेतुहिमाचल हिंदुराष्ट्रात हिंदुत्वाचे नव जागरण घडवले. स्वतः स्वामीजींना संन्यासधर्मामुळे ज्या स्वातंत्र्याच्या चळवळीत प्रत्यक्ष भाग घेता येत नव्हता, त्या चळवळीचे नेतृत्व करण्याची प्रेरणा त्यांनी निवेदितेला दिली आणि ती प्रेरणा कार्यान्वित करून निवेदिता कोटी कोटी भारतीय लोकांची भगिनी ठरली.

भगिनी निवेदितेने काही पुस्तके लिहिली आहेत. त्यांपैकी काली दी मदर, दी मास्टर अॅज आय सॉ हिम, हिंट्स ऑन नॅशनल एज्युकेशन इन इंडिया, केदारनाथ अँड बद्रीनारायण, फूटफॉल्स फ्रॉम इंडियन हिस्टरी, शिव अँड बुद्ध, इ. काही प्रसिद्ध आहेत. [विवेकानंदांच्या निवेदिता-डॉ. वि. वि. पेंडसे]

## निशाभार्गव व्रत

एक काम्य व्रत. या व्रताला प्रारंभ चैत्र, श्रावण किंवा मार्गशीर्ष महिन्यातील पहिल्या शुक्रवारी करतात. लक्ष्मीनारायण ही या व्रताची देवता होय. व्रतावधी एक वर्ष, पाच वर्षे अथवा आमरण. या व्रताचा विधी असा–

दिवसभर उपवास करून प्रदोषकाळी स्नान करावे व शुभ्र वस्त्रे परिधान करावी. मग लक्ष्मी-नारायणाची पूजा करावी. शेरभर तांदूळ व भरलेले घृतपात्र ब्राह्मणाला दान द्यावे, तसेच सुवासिनीची पूजा व यथाशक्ति संभावना करावी. उद्यापनाच्या वेळी लक्ष्मी-नारायणाची प्रतिमा कलशावर पूर्णपात्रात ठेवून तिची पूजा करावी. त्या दिवशी रात्री जागरण व दुसऱ्या दिवशी प्रातःकाळी तिलहोम करावा. मग सौभाग्याष्टक, सप्तधान्ये व छत्र यांच्यासह या मूर्तीचे आचार्याला दान द्यावे. फल– कीर्ती, प्रज्ञा, आयुरारोग्य, संतती व कांती यांची प्राप्ती. [व्रतराज]

## निश्चलदास

(१७०२-१७६३ इ.स.) उ. भारतातील एक विद्वान ग्रंथकार. हा जातीने जाट असून पंजाबमधील हिसार जिल्ह्यातील कुंगड येथील रहिवासी होता. लहानपणीच याने दादू पंथाची दीक्षा घेतली. त्याला संस्कृत शिकण्याची तीव्र इच्छा होती. पण तो जाट जातीत जन्माला आल्यामुळे कोणीही ब्राह्मण पंडित त्याला संस्कृत शिकवीना. शेवटी तो काशीत गेला. तिथे त्याने आपण ब्राह्मण असल्याचे सांगून तिथल्या पंडितांकडून सांख्य, न्याय, वेदांत व व्याकरण या शास्त्रांचे अध्ययन केले व तो गाढा पंडित बनला.

याने विचारसागर, युक्तिप्रकाश आणि वृत्तिप्रभाकर हे ग्रंथ लिहिले आहेत. त्यांपैकी विचारसागर या ग्रंथाने मराठी,

बंगाली व इंग्रजी या भाषांमध्ये अनुवाद झाले आहेत गल्या तीन शतकांतील एक प्रभावी ग्रंथ म्हणून स्वामी विवेकानंद यांनी त्याचा गौरव केला आहे दिल्लीपासून ३६ मैलांवर असलेल्या किहडौला या गावी निश्चलदासाचा मठ आहे
पहा– विचारसागर [ उ मा स प, प हि सा इ ]

**निश्चलपुरी** (इ स चे १७ वे शतक) एक ग्रंथकार हा गागाभट्टाच्या समकालीन असावा. यांनी राज्याभिषेकाविषयी तत्त्व या नावाचा ग्रंथ संस्कृत भाषेत लिहिला आहे गागाभट्टाने शिवाजीमहाराजांना जो राज्याभिषेक केला, त्यांतील अनेक दोषस्थळे निश्चलपुरीने आपल्या या ग्रंथात दाखविली आहेत छत्रपतींनी राज्याभिषेकाच्या प्रसंगी जे विवाह केले, ते आपल्या जुन्या स्त्रियांशीच केले व ती गोष्ट निषिद्ध होती, असे त्याने या ग्रंथात म्हटले आहे

हा उत्तम ज्योतिषी असावा असे वाटते, कारण याने शिवाजी महाराजांना असे बजावले होते, की 'राज्याभिषेकानंतर तेराव्या, बाविसाव्या व पंचावन्नाव्या दिवशी तुमच्यावर काही संकटे कोसळतील ' त्याची ती भविष्यवाणी खरी ठरली त्यामुळे शिवाजीने निश्चलपुरीला बोलावून घेतले आणि त्याच्याकडून तांत्रिक पद्धतीने पुन्हा राज्याभिषेक करवून घेतला [ मु वि को ]

**निश्वाससंहिता** एक शिवप्रणीत शास्त्र बाभ्रव्य व शाण्डिल्य या शिवभक्तांनी विनंती केल्यावरून शिवाने ही संहिता निर्माण केली हा वेदक्रियायुक्त असून, तिच्यात पाशुपतयोग व पाशुपतदीक्षा हे विषय सांगितले आहेत ही संहिता प्राप्त झाल्यावर या दोघांनीही मोठ्या श्रद्धेने तिचा स्वीकार केला, असे वराह पुराणात सांगितले आहे [ शा क ]

**निश्शल्यअष्टमी व्रत** एक जैन व्रत व्रतावधी सोळा वर्षे या व्रतात भाद्रपद शुद्ध अष्टमीस उपवास व अर्हताची पूजा करतात फल– मोक्षप्राप्ती दक्षिण देशातील शूर्पारक नगरात नंद नावाचा एक शेठ राहत होता त्याला लक्ष्मीमती नावाची मुलगी होती तिने हे व्रत केल्यामुळे तिला मोक्ष प्राप्त झाला, अशी याची कथा आहे

**निषध** (१) एक प्राचीन जनपद गिरिप्रस्थ ही या जनपदाची राजधानी होती निषधाचा राजा नल याचा उल्लेख शतपथ ब्राह्मण (३ ३ २ १–२), महाभारताचे वनपर्व आणि पुराणे यांत आला आहे महाभारताच्या वनपर्वातील नलोपाख्यानावरून, नल राजाचा निषध देश विंध्याचल व अवंती यांच्या उत्तरेला होता, असे दिसते

नल राजाने नलपूर नावाचे नगर वसवले होते, अशी जनश्रुती आहे मध्य प्रदेशातल्या शिवपुरी जिल्ह्यातील सांप्रतचे नरवर म्हणजेच प्राचीन नलपूर होय, असे समजतात प्राचीन काळी त्याच्या आसपासचा प्रदेश निषध जनपद या नावाने प्रसिद्ध होता

अलकापुरी ही निषध देशाची राजधानी होती, असे बृहत्कथेत सांगितले आहे [ हि जा ए इ, म भा इ ]

(२) हिमालयातील एक पर्वत याच्याजवळ विष्णुपद सरोवर असून, त्यातून सरस्वती नदीचा उगम झाला आहे, असे महाभारतात म्हटले आहे (वन १८८ ११२)

**निषाद** प्राचीन भारतीय समाजातील एक वर्ग 'निषद्यत ग्रामश्वपसीमायाम् । ' = जो गावशिवेवर राहतो तो निषाद होय, अशी त्या नावाची व्युत्पत्ती मिळते पंचजनांनी बनलेल्या भारतीय समाजाचा चातुर्वर्ण्यबाह्य सर्व भाग निषाद या नावाने ओळखला जात असावा, असे पुढील वचनावरून दिसते

**चत्वारो वर्णा पञ्चमो निषाद ।**

अर्थ– चार वर्ण आणि पाचवा निषाद होय (अशा पाच घटकांनी भारतीय समाज बनला आहे)

बौधायन आणि महाभारत यांच्या मतानुसार ब्राह्मण पुरुष व शूद्र स्त्री यांच्या संबंधातून निषाद जाती निर्माण झाली आहे गौतमाच्या मते निषाद ही ब्राह्मण वैश्यांची संतती होय

निषादाचा सर्वप्रथम उल्लेख तैत्तिरीय संहितेत मिळतो (४ ५ ४ २) निषाद हे क्रूरकर्मे असून, ते चोरीवर आपली उपजीविका करीत, असे ऐतरेय ब्राह्मणाचे म्हणणे आहे (३७ ११) परंतु काही प्राचीन उल्लेखांवरून असे दिसते, की निषादांना आपल्या समाजव्यवस्थेत नीचतम स्थान दिलेले असूनही त्यांना काही धार्मिक अधिकार होते निषादस्थपतीला इष्टीचा अधिकार होता, असे पूर्वमीमांसासूत्रावरून दिसते (६ १ ५१–५२) रुद्रप्रीत्यर्थ गावधुका प्रदान करण्याचा अधिकारही त्याला असतो, असे कात्यायन श्रौतसूत्रात म्हटले आहे (१ १ १२–१४) मात्र मंत्रपूत अग्नीत आहुती देण्याचा अधिकार निषादांना नव्हता

निषाद समाज मृगया आणि मासेमारी यांवर आपली उपजीविका करीत असे मत्स्यघातो निषादानाम् ' = मासेमारी हा निषादांचा व्यवसाय होय, असे मनूने म्हटले आहे क्रौंच मिथुनापैकी एकाचा वध केल्याबद्दल वाल्मीकीने निषादाला ज्या श्लोकाने शाप दिला, त्यावरूनही निषाद हे पारधी असल्याचे समजते रामायणातील सुरवातीचा तो श्लोक असा–

**मा निषाद प्रतिष्ठां त्वमगमः शाश्वतीः समाः ।**
**यत्क्रौञ्चमिथुनादेकमवधीः काममोहितम् ।।**

*अर्थ*– हे निषादा, तू काममोहित क्रौंचमिथुनापैकी एकाचा वध केलास (या पापकर्मामुळे) तू अनंत काळपर्यंत अप्रतिष्ठा पावशील

बौद्ध जातकांत निषादांचे उल्लेख वारंवार आढळतात त्या उल्लेखांवरूनही मृगया हाच निषादांचा व्यवसाय असल्याचे दिसून येते राहुलसिंग जातकात निषादांचा व्यवसाय (नेसाद कम्म) हे पापकर्म मानले आहे (३ ५१) अस्सलायन जातकात निषादांची गणना चंडाल, वेण, रथकार, पुक्कुस, इ हीन जाति–जमातींबरोबर केली आहे मोर जातकात (२ ३६) वाराणसी पासून जवळच असलेल्या निषादग्रामात राहणाऱ्या निषादांचा उल्लेख आहे या उल्लेखावरून निषादांच्या स्वतंत्र वस्त्या गावाबाहेर असत, ही गोष्ट कळून येते

प्राचीन काळी निषाद हे जलवाहतुकीचा व्यवसायही मोठ्या प्रमाणावर करीत असत, असे काही उल्लेखांवरून दिसते वन-वासासाठी निघालेल्या रामचंद्राला गंगापार करविणारा रामायणातला गुहक हा एक निषादच होता या त्याच्या व्यवसायावरून काही विद्वानांनी असा तर्क बांधला आहे, की मुळचे खलाशी असलेले द्रविड लोक आणि निषाद लोक एकच असावे [मु वि को, हिं वि को, बु भा स, रा र, गा मा इ ]

## निष्क
वेदकालातील एक सुवर्णालंकार अमरकोशात निष्काचे चार अर्थ दिले आहेत, ते असे – (१) १०८ सुवर्णनाणी (२) वक्षावर रुळणारा एक सोन्याचा अलंकार (३) एक पल किंवा ४ तोळे सोने व (४) एक दीनार ऋग्वेदात आणि अथर्ववेदात निष्काचा उल्लेख अनेक वेळा आला असून, निष्ककंठ आणि निष्कग्रीव अशी देवांची विशेषणेही आली आहेत त्यावरून निष्क हा गळ्यात घालायचा अलंकार होता, असे कळून येते कक्षीवानाला भाव्य राजाकडून शंभर निष्क आणि शंभर घोडे मिळाले होते, असा निर्देश ऋग्वेदात आहे (१ १२५ २) त्यावरून निष्क हे एक प्रकारचे चलन असावे, असा निष्कर्ष काही पाश्चात्त्य पंडितांनी काढला आहे निष्क हे सुवर्णाचे नाणे असून, अशा नाण्यांच्या माळेलाही निष्क असेच म्हणत, असे डॉ भांडारकर मानतात पण डॉ वासुदेवशरण अग्रवाल यांच्या मते वेदांतील उल्लेखांवरून निष्क हे त्या काळातील एक चलनी नाणे होते, असे निश्चितपणे म्हणता येत नाही

नंतरच्या काळात मात्र निष्क हे एक सुवर्णाचे नाणे ठरले महाभारतात कीचक सैरंध्रीला म्हणतो, की 'तू मला वश झालीस तर मी तुला शंभर निष्क देईन' (म भा विराट ३६ ३९) सूत्रांत निष्क शब्द अलंकार आणि नाणे अशा दोन्ही अर्थी वापरला आहे गळ्यात निष्क घातलेल्या दासी उपायन म्हणून दिल्याचा उल्लेख श्रौतसूत्रात आढळतो अश्वमेध यज्ञातील प्रमुख चार ऋत्विजांना प्रत्येकी एक हजार निष्क दक्षिणा द्यावी, असे आपस्तंबाने सांगितले आहे जातके, महाभारत आणि पाणिनीची अष्टाध्यायी यांत निष्काला सुवर्णाचे एक नाणे मानले आहे महाभारतात १०८ सुवर्णमुद्रा म्हणजे एक निष्क, असे त्याचे कोष्टक दिले आहे

पतंजलीच्या काळी निष्क हे श्रीमंती मोजण्याचे प्रमाण होते शंभर निष्क बाळगून असणाऱ्या माणसाला नैष्कशतिक व हजार निष्क असणाऱ्याला नैष्कसहस्रिक असे म्हणत असत

निष्क देऊन विकत घेतलेल्या वस्तूला नैष्किक असे नाव होते दोन, तीन किंवा पुष्कळ निष्क देऊन घेतलेल्या वस्तूंना अनुक्रमे द्विनिष्क किंवा द्विनैष्किक, त्रिनिष्क किंवा त्रिनैष्किक आणि बहुनिष्क किंवा बहुनैष्किक असे म्हणत असत

कालमानाने निष्काच्या परिमाणात बदल होत गेला निष्क कधी सोळा माषांच्या बरोबर होता, तर कधी चार किंवा पाच पल सोन्याबरोबर होता कधी त्याचे वजन चार माषे तर कधी सोळा द्रम्म असे मनुस्मृतीत निष्क म्हणजे चार सुवर्ण किंवा ३२० रत्ती, असे त्याचे कोष्टक दिले आहे पतंजलीच्या काळी निष्काचा प्रचार खूपच वाढला होता त्याच्या चवथ्या भागाचाही उपयोग केला जात असे पादनिष्क किंवा पादनिष्क असे त्याचे नाव असून, तसे स्वतंत्र नाणेही होते [ नेइ , पा का भा , प का भा , इ ये क सू ]

## निष्कुळानंद
(१७६६–१८४८ इ स ) एक गुजराती संतकवी हा काठियावाडातील गढडा गावचा रहिवासी होता याचे पूर्वाश्रमीचे नाव लालजी सुतार असे होते हा स्वामीनारायण संप्रदायाचा अनुयायी होता

निष्कुळानंदाने सुमारे वीस काव्यग्रंथ व तीन हजार पदे रचली आहेत त्याच्या काही ग्रंथांची नावे अशी – भक्तचिंतामणी, यमदंड, वचनविधी, कल्याणनिर्णय, शिक्षापत्री, अर्जीविनय, हरिस्मृती, हरिचरण, स्नेहगीता, हृदयप्रकाश, चिन्हचिंतामणी, मनगंजन, चौसष्टपदी, सारसिद्धी, हरिबाळगीता, पुरुषोत्तमप्रकाश, चातुर्यगुणग्राहक, धीरजाख्यान आणि भक्तिनिधी त्याचे सारे ग्रंथ गुजराती भाषेत आहेत

याची वैराग्यविषयक पदे गुजरातेत फार लोकप्रिय आहेत ती आजही खेडोपाडी म्हटली जातात याच्या पदांची भाषा सरळ व ओजस्वी आहे [ वि मु रा प , म च को ]

**निष्क्रमण** एक संस्कार. हा सोळा संस्कारांपकी सहावा संस्कार आहे. जन्मलेल्या मुलाला चौथ्या महिन्यात देवदर्शनासाठी घराबाहेर नेणे, याला निष्क्रमण असे म्हणतात. हा सूर्यदर्शनसंस्कारही असावा. याचा विधी असा –

प्रथम पुण्याहवाचन करून आचार्यवरण करतात. आचार्य अग्निमुख करून लोकपाल, दिशा, सूर्य, चंद्र, वासुदेव व आकाश या देवतांची पूजा करतो. मग अग्नी, इंद्र, प्रजापती या देवतांना उद्देशून आज्याहुती देतो. मग मुलाची आई वस्त्रालंकार लेवून मुलालाही वस्त्राभरणे घालते व वाद्यांच्या गजरात घरातून निघून बालकासह देवळांकडे जाते. तिथून परतताना ती प्रथम आप्तांच्या घरी थोडा वेळ थांबून मग घरी येते. नंतर आचार्य अग्निमुख संपवतो.

या संस्कारासाठी शुक्लपक्ष शुभ समजतात. शेवटचे पाच दिवस वर्ज्य करून कृष्ण पक्षही प्रशस्त मानतात. रिक्ता तिथी आणि षष्ठी, अष्टमी, द्वादशी व अमावास्या या तिथी वर्ज्य व बुधवार, गुरुवार आणि शुक्रवार हे वार शुभ होत. [ सं. कौ. , वै. शा. दी. , हिं. सं. , गा. सा. इ. ]

**निसर्गपूजा** निसर्गातील शक्तींची पूजा म्हणजे निसर्गपूजा. मनुष्य अडाणी, साधाभोळा किंवा सुसंस्कृत कसाही असो, त्याच्या जीवनात निसर्गाला महत्त्वाचे स्थान असते. किंबहुना मनुष्याचे सर्व जीवन बहुतांशी निसर्गाच्या चक्रनेमिक्रमानुसार चालते. माणसाला प्रत्येक नैसर्गिक घटनेविषयी कुतूहल वाटते. हे कुतूहल अनेक लोककथा व पुराणकथा यातूनही स्पष्ट दिसते. त्यात निसर्गातील दृश्ये व घटना यांना कधी व्यक्तिरूप दिलेले असते, तर कधी त्यांचा संबंध देवांशी जोडलेला असतो. निसर्गाच्या घडामोडींच्या मागे जी अद्भुत शक्ती आहे, तिचा मनुष्याच्या जीवनावरही पुष्कळ प्रभाव पडतो हे दिसून आल्यानंतर तो त्या शक्तीची म्हणजेच निसर्गाची पूजा करू लागला. काही वेळा निसर्गपूजा भक्तीने केली जाते, तर कधी भीतीमुळे ती केली जाते.

निसर्गपूजा फार प्राचीन काळी सुरू झाली असून, बहुतेक सर्व धर्मांत तिचा अंतर्भाव आहे. निसर्गपूजा हेच सर्व धर्मांचे मूळ रूप होय, असे काही पंडितांचे मत आहे. पण ते सयुक्तिक वाटत नाही. कारण निसर्गपूजा सुरू होण्यापूर्वीही मनुष्याच्या मनात भिन्न धार्मिक भावना असाव्या व तो भिन्न भिन्न देवतांची उपासना करीत असावा, असे वाटते. रानटी अवस्थेतील मानव निसर्गपूजा करीत नसे किंवा त्याला सर्वश्रेष्ठ देव निसर्गातून उगम पावलेलाही नसे. काही जमाती अमूर्त देवाला विश्वनिर्माता मानीत, तर काही एखाद्या थोर पूर्वजाला मानव जातीचा निर्माता समजत. काही मानवी समूह निसर्गाविषयी भुताखेतांची पूजा करीत.

पाऊस, भरती–ओहोटी, भूकंप इ. निसर्गातील घटना व हालचाली, नदीचा प्रवाह, वारा, इ. पदार्थांची गती आणि मनुष्याचे चलनवलन या सर्व गोष्टी एकाच प्रकारच्या प्रेरक शक्तीमुळे म्हणजे प्राणशक्तीमुळे होतात, अशी प्राचीन मानवाची कल्पना होती. ज्या ठिकाणी अशा शक्तीचे अफाट व अद्भुत रूप दिसून आले, त्या ठिकाणी निसर्गपूजा भक्तिपूर्वक किंवा भीतिपूर्वक केली जाऊ लागली. प्रारंभी मनुष्य हा पशू, पक्षी, वस्तू इ. भिन्न रूपांत निसर्गाची पूजा करीत असे. कालांतराने या व्यक्त रूपाहून भिन्न अशा चिन्मय देवतांची कल्पना उगम पावली. मनुष्याने स्वतःच्या देहात आत्मतत्त्वाची कल्पना केली. त्याचप्रमाणे भोवतालच्या वस्तूंतही ते आहे, असे मानले. निसर्गातील विलक्षण घटनांवरून त्याने त्यांच्या भव्य व दिव्य रूपाची कल्पना केली आणि अशा या शक्तीला प्रसन्न करण्यासाठी प्रार्थना, समर्पण, बळी, इ. उपाय त्याने शोधून काढले. कालांतराने त्या उपायांना इतके महत्त्व प्राप्त झाले, की ते केल्यावाचून निसर्गाचे कार्य व्यवस्थित चालणार नाही, अशी मनुष्याची दृढ समजूत झाली. [ ए. सा. रि. ए. ]

**निसामंगळवार** एक व्रत. हे ओडिसात प्रचलित आहे. आश्विनातील मंगळवारी सुवासिनी स्त्रिया उपवास करून हे व्रत करतात. फल – पुत्रपौत्रादिकांचा लाभ व सौख्यप्राप्ती. या व्रताची कथा अशी –

एका व्यापाऱ्याच्या हातून राजाच्या गाईची हत्या झाली म्हणून राजाने त्याला तुरुंगात टाकले. परंतु व्यापाऱ्याच्या पत्नीने हे व्रत केल्यामुळे त्याची तुरुंगातून सुटका झाली. राजाने पुन्हा त्याला पकडले व त्याचा शिरच्छेद करविला. पण व्रताच्या प्रभावाने तो पुन्हा जिवंत झाला. [ स्ट. ओ. फा. ]

**निहंग** (१) वैष्णव साधूंचा एक वर्ग. या लोकांची वस्ती ओडिसात आढळते. तिथे त्यांचे मठ आहेत. हे लोक भिक्षेवर उदरनिर्वाह करतात. हे गहू व तांदूळ खात नाहीत.

निहंग वैष्णव मेल्यावर त्याचा देहनिधी मठाच्या आवारात करतात. मग तिथे त्याची समाधी बांधून तिच्यावर तुळशीचे झाड लावतात. [ त्र. श. म. व. ]

(२) शिखांचा एक उपपंथ. पाहा – अकाली.

**निहाल** एक जात. या लोकांची वस्ती मुख्यत्वे मध्य प्रदेशात आढळते. भिल्ल व कोरकू यांच्या संबंधापासून बन

लली ही संमिश्र जात असल्याचे सांगतात. या जातीत अनेक कुळे आहेत. नागवेल या कुळाचे लोक नागाला व विड्याच्या पानाला पूज्य मानतात. सूरज कुळातील लोक सूर्याची पूजा व तन्निमित्त उपवास करतात. भवरीया कुळाचे लोक मध खात नाहीत. कास कुळाचे लोक कासवाची पूजा करतात व काशाच्या ताटातच जेवतात.

निहाल लोक गुरे चारतात व गावात जागल्याचे काम करतात. बिब्यापासून तेल काढण्याचाही त्यांचा व्यवसाय आहे.

**विवाहप्रथा** – यांच्यात मुलामुलींची लग्ने प्रौढपणी करतात. लग्नात वधू–वर एका रोवलेल्या बाबुळा पाच प्रदक्षिणा घालतात. झारखंडी ही यांची कुलदेवता असून, चैत्रात ते तिची पूजा करतात.

**मृतिकप्रथा** – हे मृतांना जाळतात किंवा पुरतात. मृताच्या जागेवर चार दिवस अन्न ठेवतात. [ट्रा. का. से. प्रा. इं.]

## निहालचंद

(इ. स. चे १८ वे शतक) एक हिंदी जैन कवी आणि ग्रंथकार. याच्या चरित्रासंबंधी फारशी माहिती मिळत नाही. त्याने आपले बहुतेक आयुष्य बंगालमध्ये घालवले, असे सांगतात. गुजराती ही त्याची मातृभाषा होती, म्हणून तो मूळचा गुजरातचा असावा, असे अनुमान आहे. निहालचंदाचे पाच ग्रंथ उपलब्ध आहेत– माणिकदेवीरास, जीवनविचारभाषा, नवतत्त्वभाषा, बंगालकी गजल आणि ब्रह्मबावनी.

ब्रह्मबावनी ही त्याची प्रसिद्ध रचना आहे. यात बावन्न पद आहेत. या ग्रंथात जैन परंपरेनुसार निराकार, अदृश्य अशा भगवान सिद्धांची उपासना सांगितली आहे. तिच्यातील ओंकार-मंत्राची प्रशंसा करताना कवी म्हणतो, की 'हा मंत्र म्हणजे सिद्धांची सिद्धी, संतांची ऋद्धी, महंतांचा महिमा, योग्यांचा योग, देवांची आणि मुनींची मुक्ती आणि भोगवाद्यांचा भोग आहे. हा चिंतामणी, कल्पवृक्ष आणि कामधेनू यांच्या समान आहे. विशुद्ध ज्ञानदृष्टीही या मंत्रामुळे प्राप्त होते.' ब्रह्मबावनी या ग्रंथामुळेच याला महाकवी असे म्हणू लागले. [हिं. ज. म. क.]

## निळारी

एक जात. या लोकांची वस्ती मुख्यत्वे दक्षिण महाराष्ट्रात आढळते. यांना निराळी, रंगारी, निळगर अशीही अन्य नावे आहेत. निळारी म्हणजे निळीचा रंग देणारा असा त्याचा अर्थ होतो. हे लोक उत्तर भारतातील क्षत्रिय रंगाऱ्यांना आपले पूर्वज समजतात. यांच्या उत्पत्तीविषयी एक दंतकथा आहे. ती अशी–

दोन क्षत्रिय जुळे भाऊ होते. एकदा परशुरामाने त्यांचा पाठलाग केला, तेव्हा ते अंबाबाईच्या देवळात जाऊन लपले. त्या ठिकाणी त्यांनी देवीची आराधना केली. देवी प्रसन्न होऊन तिने त्या दोघांपैकी एकाला सुईदोरा दिला व त्याला शिवण्यास सांगितले. दुसऱ्याला तिने रंगाऱ्याचे काम दिले. त्या दोघा क्षत्रिय बंधूंना स्वतःच्या ताब्यात देण्याबद्दल परशुरामाने देवीला पुष्कळ विनवले; पण देवीने ते मानले नाही. शेवटी परशुराम निराश होऊन तिथून निघून गेला. तेव्हापासून ते जुळे बंधू रंगारी व शिंपी म्हणून ओळखले जाऊ लागले.

यांच्यात क्षत्रिय व लिंगायत असे दोन प्रमुख पोटभेद असून, त्यांच्यात परस्पर रोटी बेटी व्यवहार होत नाही.

**विवाहप्रथा** – लग्ने लहान वयात करतात. मामेबहिणीशी लग्न होऊ शकते. विवाहसमारंभ मराठा कुणब्यांप्रमाणेच असतो. घटस्फोट घेतलेल्या स्त्रीशी प्रथमवराला विवाह करायचा झाल्यास प्रथम त्याचे शमीशी लग्न लावतात. व्यभिचारी स्त्रीला जातिबहिष्कृत करतात. यांचे पौरोहित्य ब्राह्मण किंवा जंगम करतात.

निळारी हे स्मार्त असून काही वारकरी पंथाचेही आहेत. कालकादेवी, बहिरोबा, खंडोबा, भवानी ही यांची कुलदैवते होत. नागनाथ हा यांचा गुरु असून, तो त्यांच्याच जातीचा असतो.

**मृतिकप्रथा** – हे मृतांना जाळतात किंवा पुरतात. अंत्यसंस्कार करताना मृताचे तोंड पूर्वेकडे करतात. दहा दिवस सुतक पाळतात व तेराव्या दिवशी जातिभोजन घालतात. हे श्राद्धही करतात. [मु. इं. जा.; ट्रा. का. बॉं.; म. ज्ञा. को.]

## निळोबा

(इ. स. चे १७–१८ वे शतक) एक मराठी संतकवी. याचा जन्म शिरूर येथे मकासरे उपनामक आश्वलायनशाखीय देशस्थ ब्राह्मण घराण्यात झाला. या घराण्याकडे शिरूरच्या जोस कुलकर्णीपणाची वृत्ती होती. याच्या पित्याचे नाव मुकुंद असे होते. अठराव्या वर्षी याचे मैनाबाई नामक मुलीशी लग्न झाले. लग्नानंतर लौकरच याचा पिता मृत्यू पावला आणि घरच्या जोस कुलकर्णपणाचा भार याच्यावर पडला.

वयाच्या पस्तिशीच्या सुमारास निळोबा यात्रेच्या निमित्ताने वारकऱ्यांबरोबर पंढरपूरला गेला आणि त्या प्रसंगी त्याच्या मूळच्या सात्त्विक मनःपिंडावर भक्तीचा संस्कार उमटला. शिरूरपासून जवळच असलेल्या रांजणगाव सांडस येथे राहणाऱ्या सताजी पवाराकडूनही त्याला भक्तीची प्रेरणा लाभली. या भक्तिप्रवणतेमुळे त्याचे मन प्रपंचासक्तीतून मुक्त झाले.

आणि त्याने आपले जोशी कुलकर्णपण आपल्या भाऊबंदावर सोपविले हे इ. स. १७१३ च्या सुमारास घडून आले.

तुकारामाच्या साधुत्वाची कीर्ती त्याने ऐकली होती व त्याच्या अभंगवाणीची गोडीही चाखली होती. त्यामुळे निळोबाला तुकारामाच्या दर्शनाचा ध्यास लागला. परंतु त्या वेळी तुकारामाचे निर्याण होऊन साठ पासष्ट वर्षे लोटली होती. तरीही निळोबाने तुकारामाच्या दर्शनाचा ध्यास धरला. त्याने तुकारामाचा पुत्र नारायणबावा याची भेट घेतली, तुकोबांची मिळेल तेवढी अभंगवाणी प्राप्त केली आणि तुकारामाचे दर्शन घडावे म्हणून देहू येथे इंद्रायणीकाठी अनुष्ठान मांडले. निळोबाच्या या आत्यंतिक इच्छेला तुकोबाच्या स्वप्नसाक्षात्काराचे फळ लाभले आणि त्याची भक्ती कृतार्थ झाली. गुरुबोधाच्या या अनुभवाचे वर्णन निळोबाने एका अभंगात केले आहे, ते असे –

> येऊनिया कृपावंते । तुकयास्वामी सद्गुरुनाथे ।।
> हात ठेविला मस्तकीं । देऊनि प्रसाद केले सुखी ।।
> माझी वाढविली मती । गुण वर्णावया स्फूर्ती ।।
> निळा म्हणे मी बोलता । दिसे परी हे त्याची सत्ता ।।

अशा रीतीने परमार्थ सफळ झाल्यावर त्याने शिरूर सोडले आणि जवळच पिंपळनेर येथे निवास केला. या ठिकाणी मल्लोजी गाजरे पाटील नामक भक्ताने त्याची सर्व व्यवस्था लावून दिली. तिथे त्याने निळोबासाठी विठ्ठलमंदिर बांधले, पिंपळनेरचा मोकासा त्याला देवविला आणि त्याला पिंपळनेर गावी सुस्थित



निळोबा व त्याचा पुत्र भिवबा यांच्या समाध्या

केले. तिथेच त्याने आपले उर्वरित जीवन भजन संकीर्तनात व्यतीत करून इ. स. १७५३ च्या सुमारास देह ठेवला. पिंपळनेर येथे आजही हे विठ्ठलमंदिर उभे असून, जवळच प्रवरा नावाच्या लहानशा नदीकाठी त्याची व त्याचा ज्येष्ठ पुत्र भिवबा याची समाधी आहे. त्याला भिवबाशिवाय काशीनाथ आणि चंद्रभागा अशी आणखीही दोन अपत्ये होती.

निळोबाची बहुतेक कविता स्फुट स्वरूपाची आणि अभंगबद्ध आहे. स्वरूपानंदाच्या ७६० अभंगांमध्ये रचलेले चांग देवचरित्र आणि ३३३ श्लोकांची तुकारामस्तुती या दोन रचना सोडून बाकी सर्व कविता वेळोवेळी स्फुरलेल्या स्फुट अभंगांनी व गौळणींनी व्यापलेली आहे.

निळोबाच्या स्फुट अभंगांत पंढरी, विठ्ठल, सद्गुरु, संत यांचा महिमा, तसेच नामस्मरण, संकीर्तन, देव भक्तसंबंध, देवाचे भक्तवात्सल्य, जनास उपदेश, इ. विषय आलेले असून, स्वतः निळोबाच्या पारमार्थिक विकासाचा आलेखही व्यक्त झालेला आहे. भक्ती व ज्ञान वैराग्य यांचा उत्कृष्ट संगम तिथे पाहायला मिळतो. परमेश्वराशी अनन्यभावाने समरस होणाऱ्या भक्ताचा महिमा गाताना निळोबाने म्हटले आहे, ते असे–

> चित्ताचे चिंतनीं मनाचे मननीं ।
> जीवाचे जीवनीं कृष्ण त्यांचा ।।
> बुद्धीचे बोधनीं श्रोत्राचे श्रवणीं ।
> आमोद घेतां घ्राणीं कृष्णीं मन ।।
> देहीं देहभावा नेणती स्वभावा ।
> इंद्रियांच्या धांवा कृष्णरूपी ।।
> निळा म्हणे त्यांचा वर्तता व्यापार ।
> अवघा सारंगधर होवोनि ठेला ।।

निळोबाच्या गौळणी आणि विरहिणी मराठी वाङ्मयात अत्यंत प्रसिद्ध आहेत. श्रीकृष्णाच्या ध्यासामुळे गोकुळातील गोपी स्त्रिया कशा व्याकूळ झाल्या होत्या, त्याचे सुरेख वर्णन निळोबाने केले आहे. मात्र रासक्रीडा, गोपीवस्त्रहरण, राधाविलास, उत्तान शृंगार यांचे वर्णन निळोबाच्या काव्यात सापडत नाही. [ म. वा. इ. ३, तु. स. सा., म. सा. म., गा. प. ५ ]

## निक्षुभार्कचतुष्टय व्रत

एक निर्विघ्न. निक्षुभा ही सूर्याची पत्नी असून, तिच्या प्रीत्यर्थ हे व्रत आहे. याचे पुढील चार प्रकार आहेत–

(१) मार्गशीर्ष शुद्ध षष्ठी व सप्तमी या दिवशी उपवास.

(२) मार्गशीर्ष कृष्ण सप्तमीला उपवास व सूर्यपूजा.

(३) मार्गशीर्ष शुक्ल सप्तमीला उपवास व पिठाचा हत्ती बनवून पूजा.

(४) मार्गशीर्ष किंवा माघ कृष्ण सप्तमीला उपवास.

व्रतावधी एक वर्ष. उद्यापनाच्या वेळी सूर्यपूजा व दान करून ब्राह्मणभोजन घालतात. फल – सूर्यलोकप्राप्ती. [ व्र. प. ]

## निक्षेप

ठेव. निक्षेप म्हणून ठेवलेले द्रव्य मोजलेले व मोहरबंद केलेले असावे, असे नारदाने सांगितले आहे. निक्षेपाची व्याख्या नारदस्मृतीमध्ये (५.१) केलेली आहे ती अशी–

**स्वद्रव्यं यत्र विस्रम्भान्निक्षिपत्यविशङ्कितः ।**
**निक्षेपो नाम तत्प्रोक्तं व्यवहारपदं बुधैः ॥**

अर्थ – आपले द्रव्य विश्वासाने जो दुसऱ्याकडे ठेवण्यासाठी देतो, त्याच्या त्या द्रव्याला विद्वानांनी निक्षेप असे नाव दिले आहे. जो कोणी निक्षेप परत देत नाही किंवा जो निक्षेप न ठेवताच परत मागतो, त्या दोघानाही चोर समजून शासन करावे किंवा त्या रकमेएवढाच दंड करावा असे सांगितले आहे. निक्षेपाची चोरी करणाऱ्यालाही तेवढाच दंड करावा, असे मनू सांगतो (८.१९१–१९२). पाहा – ठेव [श. क.]

## नीतिकथा

भारतीय कथासाहित्याची जी वर्गवारी केली जाते, तिच्यात नीतिकथा हा एक प्रमुख वर्ग आहे. माणसाला लौकिक व्यवहारात चतुर बनविणे, सदाचारी बनविणे, दुष्ट व धूर्त लोकांचे अंतरंग समजण्याइतकी त्याची बुद्धी तीक्ष्ण करणे आणि पर्यायाने त्याचे धर्मार्थकाम सिद्ध व्हायला मदत करणे, एवढा नीतिकथांचा व्यापक उद्देश असतो. कोरड्या नीतिप्रवचनापेक्षा इष्ट ते नीतितत्त्व कथेच्या द्वारे उपदेशिल्यास त्याचा परिणाम खोल व चिरकालिक होतो हे समजून आल्यामुळे नीतिवेत्त्यांनी त्यासाठी कथेचा आश्रय केला. हितोपदेश या ग्रंथाच्या प्रारंभी यासंबंधी स्पष्टच म्हटले आहे –

**कथाच्छलेन बालानां नीतिस्तदिह कथ्यते ।**

अर्थ – कथेच्या मिषाने इथे बालांना (अज्ञानां) नीती सांगितली जाते.

नीतिकथांच्या निर्मात्यांनी त्यांचे क्षेत्र माणसापुरतेच मर्यादित ठेवलेले नाही. पशु – पक्षी, वृक्ष – वल्ली, नदी – पवन, देव – देवता किंबहुना सारे विश्वच त्यात सामावून टाकले आहे. अशा कथांत पशुपक्षी माणसासारखे बोलतात आणि मानवी व्यवहार जाणतात. देव – देवता माणसाशी साक्षात संपर्क करतात. जड पंचमहाभूतेही नैतिक विचार सांगतात. याविषयीचे एक उदाहरण असे –

एकदा समुद्र नद्यांना म्हणाला, 'तुम्ही मोठमोठे वृक्ष पाळामुळासह उपटून मजकडे वाहून आणता, पण आकाराने सारी कसा असलेला वेत मात्र कधीही आणीत नाही असे का?' त्यावर गंगेने समुद्राला उत्तर दिले, 'मोठे वृक्ष आपल्या जागेवर ताठ उभे असतात, त्यामुळे जेव्हा आम्हाला पूर येतो तेव्हा आमच्या प्रवाहमार्गातला त्यांचा अडथळा दूर करण्यासाठी आम्ही त्यांचे उन्मूलन करतो. पण वेताचे तसे नाही. आमच्या प्रवाहाचा वेग वाढत आहे, असे दिसताच वेत नम्र होतो आणि पूर ओसरून गेल्यावर पुनश्च पूर्ववत उभा राहतो.'

वरील गोष्ट नम्रता या गुणाचे महत्त्व पटवण्यासाठी सांगितलेली आहे. अशा विनम्र वृत्तीला वासी वृत्ती असे सांकेतिक नावच पडले आहे.

नीतिकथांत पशु, पक्षी वगैरे प्राणी येत असले तरी प्राणिकथा या नीतिकथांहून भिन्न आहेत. प्राणिकथांचे जग प्राण्यापुरतेच मर्यादित असते. सिंह म्हणजे शूर व वनाचा राजा, लांडगा म्हणजे क्रूर, कोल्हा म्हणजे धूर्त, अजगर म्हणजे आळशी, साप म्हणजे डूख धरणारा, गाय म्हणजे निरागस, गाढव म्हणजे मूर्ख, इ. प्राण्यांचे जे स्वभावविशेष संकेताने ठरलेले असतात, त्यांना अनुसरून प्राणिकथांतील पात्रे वावरत असतात. अद्भुत कथा किंवा परीकथा यांत चमत्काराला प्राधान्य असते आणि त्यामधून एखादा नीतिविषयक सिद्धांत प्रस्थापित झालाच पाहिजे, असा आग्रह नसतो.

नीतिकथा ही मात्र एखादे नीतितत्त्व मनाशी धरूनच रचलेली असते. कथेच्या शेवटी ते नीतितत्त्व प्रच्छन्न किंवा प्रकट अशा तात्पर्याच्या रूपाने व्यक्त होत असते. काही कथेच्या शेवटी तात्पर्यदर्शक सुभाषित दिलेले असते, तर काही प्रथम एखादा दृष्टान्तश्लोक सांगून मग त्याच्या स्पष्टीकरणासाठी कथा सांगितलेली असते. हितोपदेशातील व्याघ्र-ब्राह्मण ही कथा ज्या दृष्टान्तश्लोकाने सुरू झाली आहे, तो श्लोक असा –

**कङ्कणस्य तु लोभेन मग्नः पङ्के सुदुस्तरे ।**
**वृद्धव्याघ्रेण सम्प्राप्तः पथिकः स मृतो यथा ॥**

अर्थ – एक दुबळा पथिक (ब्राह्मण) कंकणाच्या लोभाने खोल चिखलात रुतून बसला आणि एका म्हाताऱ्या वाघाने त्याच्यावर झडप घालून त्याला खाल्ले.

ती कथा अशी – एकदा एक म्हातारा वाघ हातात सुवर्णकंकण घेऊन एका सरोवराच्या तीरावर बसला आणि जाणा-येणाऱ्या वाटसरूंना त्या कंकणाचे दान घेण्याबद्दल प्रार्थना करू लागला. पण कोणी त्या वाघावर विश्वास ठेवायला तयार होईना. थोड्या वेळाने एक गरीब ब्राह्मण वाघाची तीच प्रार्थना ऐकून धनलोभाने ते कंकण घेण्यासाठी प्रवृत्त झाला. वाघाने त्याला सांगितले, की 'तू प्रथम या सरोवरात स्नान कर आणि मग कंकणाचे दान घे.' ब्राह्मण त्याच्या सांगण्यावर विश्वास ठेवून सरोवरात उतरला आणि त्याच क्षणी निसरड्या चिखलात रुतला. प्रयत्नांची शिकस्त करूनही त्याला वर येता आले नाही. मग वाघाने सावकाशपणे त्याला पकडून खाऊन टाकले. मरताना तो ब्राह्मण म्हणाला, की 'मी द्रव्यलाभाने या हिंस्र प्राण्यावर विश्वास ठेवल्यामुळे मृत्युमुखी पडलो.'

यावरून एक गोष्ट स्पष्ट होते. ती ही की नीतिकथा ही लोकसमाजाची निर्मिती नाही. शिक्षित व सुसंस्कृत लोकांच्या कल्पनेतूनच ती निर्माण झाली आहे. तसे नसते, तर इतके उच्च

लोकांचे नीतिज्ञान अशा कथांतून निष्पन्न झाले नसते आणि त्यांना बाजेसूद आकार तो प्राप्त झाला नसता.

नीतिकथांचा आढळ पहिल्या प्रथम होतो, तो उपनिषदांत. बृहदारण्यकात (५.२) पुढील नीतिकथा आढळते – एकदा देव, मनुष्य व असुर हे प्रजापतीकडे जाऊन 'आम्हाला उपदेश करा' असे त्याला म्हणाले. तेव्हा प्रजापतीने मेघगर्जनेतून दवी वाणीने त्या तिघानाही 'द' हे अक्षर उपदेशिले. अक्षर एक असून तरी जातिपरत्वे त्याचे अर्थ भिन्न झाले. देवांनी 'द' अक्षराचा अर्थ इंद्रियांचे 'दमन' करा, असा घेतला; मनुष्यांनी त्याच अक्षराचा अर्थ 'दान' करा असा घेतला आणि असुरांनी त्याच अक्षराचा अर्थ 'दया' करा असा घेतला.

या छोट्याशा कथेत दमन, दान व दया या लोकव्यवहाराला पोषक व आत्मकल्याणसाधक अशा नीतितत्त्वांचा पुरस्कार केलेला आहे. छांदोग्यातली सत्यकाम जाबालाची कथाही याच धर्तीची आहे. जबालेचा पुत्र सत्यकाम हा विद्याध्ययनासाठी गौतम ऋषींकडे गेला. गौतमाने त्याला गोत्र विचारले, पण सत्यकामाला ते ठाऊक नव्हते; म्हणून तो ते आपल्या आईला विचारायला गेला. आई त्याला म्हणाली, 'मला तुझा पिता कोण हे माहीत नाही. तारुण्यात इतस्ततः भटकत असता तू (कोणाकडून तरी) माझ्या पोटी आलास. त्यामुळे तुझे गोत्र मला सांगता येणार नाही.' सत्यकामाने ते ऐकले आणि जसेच्या तसे गौतमाला जाऊन सांगितले. ते ऐकून गौतम म्हणाला, 'तू ब्राह्मणपुत्रच आहेस. अब्राह्मण इतक्या धीटपणे सत्य सांगू शकणार नाही. म्हणून मी शिष्य या नात्याने तुझा स्वीकार करतो.'

इथे माता आणि पुत्र दोघेही सत्याला स्मरून बोलल्यामुळे या कथेत सत्य या नीतितत्त्वाची प्रतिष्ठा द्विगुणित झाली आहे.

महाभारत हे तर नीतिकथांचे भांडारच आहे. वन, शांती, अनुशासन, इ. पर्वांत त्या कथा सांगितलेल्या आहेत. व्यवहार धर्म, राजकारण व उच्चतम श्रेय या तीन गोष्टींना धरून त्या कथा आहेत. त्यांपैकी काही उदाहरणे अशी –

कणिक हा धृतराष्ट्राचा मंत्री होता. धृतराष्ट्राने पांडवांशी लुच्चेगिरीने वागून त्यांचा नाश करावा, यासाठी तो पुढील गोष्ट सांगतो– एक होता कोल्हा. त्याला लागली होती भूक. त्याला एक भक्ष्य मिळाले, पण ते त्याला खाता येण्याजोगे नव्हते. म्हणून त्याने त्या कामी वाघ, घोडा, लांडगा व मुंगूस यांचा उपयोग करून घेतला व नंतर लुच्चेगिरीने त्या चौघांनाही फसवून ते सर्व भक्ष्य एकट्यानेच खाल्ले.

दुसऱ्या एका ठिकाणी शिशुपालाने भीष्माला म्हातारा या हंसाची उपमा देऊन त्यांची निर्भर्त्सना केली आहे. त्या उपमेचे स्पष्टीकरण पुढील गोष्टीत आढळते – एक म्हातारा हंस होता. तो नेहमी धर्मावर प्रवचन करी. त्यामुळे त्याच्या बरोबरीच्या सर्व पक्ष्यांनी त्याच्यावर विश्वास ठेवला आणि आपली अंडी सांभाळण्यासाठी त्याच्या स्वाधीन केली. मग त्याने ती अंडी थोडी थोडी खाण्याचा क्रम चालू केला. अशा रीतीने बरीचशी अंडी नाहीशी झाल्यावर पक्ष्यांच्या ते निदर्शनास आले. मग त्यांनी आपली फसवणूक केल्याबद्दल त्या ढोंगी हंसाला ठार मारले.

विदुरही नीतिकथा सांगण्यात कुशल होता. महाभारतात त्याच्या तोंडी व्यवहारज्ञानाची अनेक वचने घातलेली आहेत. त्याने एका प्रसंगी धृतराष्ट्राला पुढील कथा सांगितली – एका व्याधाने पक्षी पकडण्यासाठी जाळे पसरले होते. त्या जाळ्यात दोन कपोत सापडले. आपला जीव वाचवण्यासाठी ते जाळ्यासकट वर उडाले. परंतु काही वेळाने आपसात भांडल्यामुळे ते दोघेही खाली पडून व्याधाच्या हाती सापडले.

कौरव–पांडवांत कलह माजला, तर त्यात दोघांचाही विनाश होईल, हे नीतितत्त्व वरील गोष्टीच्या द्वारे धृतराष्ट्राला पटवण्याचा प्रयत्न विदुराने केला आहे.

कुठल्याही गोष्टीला त्या त्या व्यक्तीचे पूर्वकर्म हे कारण असते, हा विचार उपनिषदांत दृग्गोचर होतो. यालाच कर्मवाद असे म्हणतात. महाभारतानेही अनेक स्थानी या कर्मवादाचा पुरस्कार केला आहे. त्यांपैकी एक कथा अशी –

गौतमी नावाची एक वृद्ध ब्राह्मणी होती. एके दिवशी तिच्या पुत्राला एक नागीण डसली आणि तो मरण पावला. गौतमी पुत्रशोकाने विव्हळ झाली. एवढ्यात एका पारध्याने या नागिणीला पकडले आणि गौतमीला म्हटले, 'या नागिणीला मी आता ठार करतो.' एवढ्यात ती नागीण गौतमीला म्हणाली, 'मी तुझ्या पुत्राला मारले यात माझा दोष नाही. मी मृत्यूच्या प्रेरणेने ते काम केले.' एवढ्यात मृत्यू या ठिकाणी अवतरला. तो म्हणाला, 'दोष माझ्याकडे नसून कालाकडे आहे. काल हा आपल्या इच्छेनुसार मृत्यूला म्हणजे मला प्रेरणा देत असतो.' एवढ्यात काल तिथे अवतीर्ण झाला व म्हणाला, 'गौतमी, तुझ्या पुत्राच्या निधनाला मी जबाबदार नाही. कर्माच्या प्रेरणेने मी ते काम केले. कर्म हेच तुझ्या पुत्राच्या मृत्यूचे एकमेव कारण होय.'

याशिवाय उंदराचा विश्वास संपादून त्यांना खाऊन टाकणारा बोका, सोन्याची अंडी घालणारा हंसी, कावळा व घुबड यांचे वैर, इ. अनेक नीतिकथा महाभारतात प्रसंगाप्रसंगाने आल्या आहेत.

बौद्ध व जैन यांच्या वाङ्मयातही नीतिकथांचा बराच

गरणा आहे. कर्म व पुनर्जन्म हे सिद्धान्त त्या दोघानाही मान्य असल्यामुळे, त्याना अशा कथांची निर्मिती करण्यास अवसर मिळाला आहे. बुद्ध व महावीर या दोघानीही आपल्या धर्माच्या उपदेशासाठी नीतिकथांचा मोठ्या प्रमाणात उपयोग करून घेतला आहे. परपरेने चालत आलेल्या कथा त्यानी त्या त्या कामी निवडल्या व त्याना बोधवादी स्वरूप दिले. बौद्धांच्या जातककथा व अवदानकथा, तसेच जैनांच्या चूर्णी या तीनी, धर्म, पुनर्जन्म आणि कर्म याचा प्रचार करण्यासाठीच निर्माण झाल्या आहेत.

पचतत्र, हितोपदेश, वेताळपंचविंशति, सिंहासनद्वात्रिंशिका व शुकसप्तती हे कथासंग्रहही नीतिकथा सांगण्यासाठीच प्रवृत्त झाले आहेत.

पचतत्र व हितोपदेश यांची कथनशैली गद्यपद्यमिश्रित आहे. त्यातला कथाभाग गद्यात असतो आणि त्यातील तत्त्वकथनाच्या आधारासाठी जवळ जवळ महाभारत, मनुस्मृती, इ. ग्रंथातले श्लोक घेतलेले असतात. पंचतत्राला जागतिक कीर्ती लाभली आहे. जगातल्या सर्व प्रमुख भाषांत त्याचे अनुवाद झाले आहेत. पंचतत्रातल्या कथा भारतातून अरबस्तान, इराण, ग्रीस मार्गे युरोपात गेल्या आणि तिथून जगभर पसरल्या. इसापच्या नीतिकथावर पचतत्राचा फार मोठा प्रभाव आहे.

सिंहासनबत्तिशीतल्या कथा विक्रमाच्या सिंहासनाला जडवलेल्या सुवर्णपुतळ्यांनी भोजराजाला सांगितल्या आहेत. उदात्त नैतिक गुण त्या कथामध्ये प्रकर्षाने प्रतीत होतात. शुकसप्तती मधल्या कथा एका वियोगिनी स्त्रीला पोपटाने कथन केल्या आहेत.

भारतीय नीतिकथांचे सामान्यपणे दोन भाग पडतात, त्यातला एक राजनीतीचा असून, दुसरा सामान्यनीतीचा आहे. राजनीतीचा उपदेश करणाऱ्या कथांचा मुख्य उद्देश राजाने मित्राचे साहाय्य संपादून व शत्रूवर विजय मिळवून आपले राज्य बलवत्तर करावे, हे प्रतिपादण्याचा असतो. अशा कथात साम, दाम, दड, भेद हे चारही उपाय प्रशस्त मानलेले असतात. त्यात साधनापेक्षा साध्याला महत्त्व दिलेले असते. सामान्य नीतीच्या कथात सत्य, अहिंसा, दया, दान, ऋजुता, कृतज्ञता, परोपकार, सदाचरण, इ. मानवी सद्गुणांची मलावण असते.

## नीतिमंजरी

एक नीतिपर संस्कृत ग्रंथ. उत्तर गुजरातमधील आनंदपूरचा निवासी असलेला द्याद्विवेद नामक शुक्लयजुर्वेदीय ब्राह्मण या ग्रंथाचा कर्ता होय. द्याद्विवेदाने या ग्रंथाची रचना इ. स. १४९४ मध्ये केली. या ग्रंथात अनुष्टुप छंदातील १६६ श्लोक असून, त्यांची आठ अष्टकात विभागणी केलेली आहे. या ग्रंथाचा विषय असा आहे, की ग्रंथातील प्रत्येक श्लोकाच्या पूर्वार्धात नीतिवचन ग्रथित केलेले असून, उत्तरार्धात त्या वचनाच्या पुष्टीसाठी ऋग्वेदातील कथेचा आधार दिलेला आहे. चतुर्विध पुरुषार्थांच्या संदर्भात ऋग्वेदाचा नैतिक संदेश स्पष्ट करणारा हा ग्रंथ नीतिपर संस्कृत साहित्याच्या समारात मानाचे स्थान पावला आहे. यात धर्माविषयी ८४, अर्थाविषयी ८, कामाविषयी ५३ आणि मोक्षाविषयी १ असे श्लोक आहेत.

या ग्रंथावर स्वतः द्याद्विवेदानेच संस्कृत गद्यात टीका लिहिली आहे. या टीकेत प्रथम प्रत्येक श्लोकाचा अन्वयार्थ देऊन, पुढे श्लोकात आलेल्या ऋग्वेदीय कथेशी संबद्ध मंत्र आणि ब्राह्मण ग्रंथातील तत्संबद्ध अंश उद्धृत केले आहेत. द्याद्विवेदाने आपल्या टीकेत यास्कसायणादी पूर्वाचार्यांना अनुसरले असले, तरी अनेकदा त्यांच्याशी असणारे आपले मतभेदही नोंदविले आहेत.

या ग्रंथामुळे वैदिक साहित्यातील नानाविध कथांचा परिचय घडून त्यांचे नैतिक महत्त्व प्रत्ययास येते. [ हि. वि. सा. ]

## नीतिशास्त्र

नी ( नय् ) = नेणे, पुढे चालवणे या धातूवरून नीती हा शब्द बनला आहे. सत्प्रवृत्ती, सदाचरण, सारासार विवेक अहिंसा, सत्य, अस्तेय, इ. गुण व अंतिम श्रेयाकडे नेणारा मार्ग इ. गोष्टी नीती या शब्दाने दर्शित होतात. अर्थशास्त्र, राज्यशास्त्र, समाजशास्त्र, जीवनशास्त्र आणि अध्यात्मशास्त्र या शास्त्राशी नीतीचा घनिष्ठ संबंध येतो. त्यामुळे नीतीचा विचारही तितकाच व्यापक होतो. अशा या व्यापक नीतिविचारालाच नीतिशास्त्र असे म्हणतात.

**व्याख्या** – नीतिशास्त्र म्हणजे कर्माकर्मविवेक. समाजामध्ये व्यक्ती, कुटुंब, जाती, वर्ग, राष्ट्र असे भिन्न भिन्न घटक असतात. याशिवाय सामाजिक, आर्थिक, राजकीय, धार्मिक अशा क्षेत्रात अनेक संस्था लोकांनी निर्माण केलेल्या असतात. या सर्वांचा उत्कर्ष साधावा, त्यांचे त्यांचे इष्ट हेतू सिद्धीस जावे, सर्वांना सुखसमाधान मिळावे, म्हणून समाजातील व्यक्तींनी, जातींनी, संस्थांनी कसे वागावे यासंबंधी काही नियम केलेले असतात. लोकांच्या वागण्यासंबंधीचे हे नियम म्हणजेच नीतिशास्त्र होय. यावरून नीतिशास्त्र हे वर्तनशास्त्र ठरते. समाजाच्या सर्व घटकांचा, सर्व समाजाचा आणि त्यातून अखिल मानव्याचा उत्कर्ष साधावा, यासाठी त्याची प्रवृत्ती झालेली आहे.

**महत्त्व** – नीतिशास्त्र हा धर्मशास्त्राचा एक भाग आहे. तत्त्वज्ञान, नीती आणि आचार असे धर्मशास्त्राचे तीन भाग प्राचीन काळापासून सर्व धर्मांनी मानलेले आहेत. सत्य, अहिंसा, दया, परोपकार, अस्तेय, औदार्य, मातृभक्ती, गुरुभक्ती, पातिव्रत्य,

बंधुभाव, मनोनिग्रह, जितेंद्रियता, निर्लोभ वृत्ती, निर्ममत्व, वचन पालन, समबुद्धी, सहिष्णुता ही जी नीतीची तत्त्वे आहेत, त्यांनाच तत्त्वज्ञान व आचार या इतर विभागापेक्षा सर्व धर्मांनी ज्यास्त महत्त्व दिलेले आहे. जीव, जग आणि परमेश्वर यांच्या विषयीचे सिद्धांत ते तत्त्वज्ञान होय. यासंबंधी प्रत्येक धर्मांची मते निराळी आहेत आणि एका धर्मातही याविषयीच्या मतभेदामुळे अनेक पंथ निर्माण झालेले असतात.

पण या तत्त्वज्ञानातील विशिष्ट मतामुळे मनुष्याला निंद्य किंवा पूज्य सहसा कोणी मानीत नाही. कोणी अद्वैती असतो, कोणी द्वैती असतो, कोणी आत्मा मानीत नाहीत, कोणी परमेश्वर मानीत नाहीत, तर कोणी जग मिथ्या आहे, असे म्हणतात. त्यामुळे पंथभेद होऊन परस्परविद्वेषही निर्माण होतो. पण समाजातली विचारी माणसे आणि एकंदर जनताही त्यावरून त्या माणसाची योग्यता ठरवीत नाही. आचारधर्माला तत्त्वज्ञानापेक्षा जास्त महत्त्व आहे. पण त्यातही ज्यांचा नीतीशी संबंध नाही असे स्नानसंध्या, टिळेमाळा, उपासतापास हे जे आचार, त्यांना साधुसंत महत्त्व देत नाहीत. इतकेच नव्हे, तर अंतरीची शुद्धता नसताना या आचाराचे स्तोम माजविणाऱ्यांचा ते धिक्कारच करतात. या आचारासंबंधीच्या मतभेदाचा तर कोणी फारसा विचारही करीत नाही. पण नीतीचे तसे नाही. त्याग, संयम, दया, क्षमा, शांती, सत्यनिष्ठा, इ. सद्गुणांनी संपन्न असलेल्या मनुष्यालाच समाजाने नेहमी वंद्य मानिले आहे. लोभ, व्यभिचार, मातद्रोह, वचनभंग, क्रौर्य यांचा नेहमीच निषेध केला आहे. नीतिहीन मनुष्याला विचारी माणसे व साधुसंत कधीही धर्मनिष्ठ म्हणत नाहीत. नीतीच्या या मूलतत्त्वांशी कोणी प्रतारणा केली, तर समाज जितका प्रक्षुब्ध होतो तितका तत्त्वज्ञान किंवा आचार या विषयीच्या मतभेदाने होत नाही. समाजाच्या उन्नति-अवनतीचा विचार करणाऱ्या तत्त्ववेत्त्यांनी नीतिहीन समाज निश्चित अधोगतीला जातो असा निर्वाळा दिला आहे. पण तत्त्वज्ञान किंवा आचार याविषयी तत्त्ववेत्ते कटाक्षाने असे सांगत नाहीत. यावरून धर्मामध्ये नीतीलाच सर्वांनी अग्रमान दिला आहे, असे स्पष्ट दिसते.

याचे कारण असे, की नीतीवाचून समाज क्षणभरही जगणार नाही, हे सर्व तत्त्ववेत्त्यांनी व पंडितांनी प्राचीन काळापासून जाणलेले आहे. भारतात प्राचीन काळी नीती या अर्थी 'धर्म' हाच शब्द वापरीत असत. नीती हा शब्द राजनीतिशास्त्राला लावीत आणि आज ज्याला आपण नीतिशास्त्र म्हणतो त्याला पूर्वी धर्मशास्त्र म्हणत. हे धर्मशास्त्र म्हणजे त्या काळचे समाजशास्त्रच होते. परमार्थाचे जे शास्त्र त्याला मोक्षधर्मशास्त्र असे निराळे नाव तेव्हा रूढ होते. धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष असे चार पुरुषार्थ मानले जातात. त्यांत धर्म आणि मोक्ष निराळे उल्लेखिलेले आहेत. यावरून धर्म शब्दाने नीतिधर्मच विवक्षित होता, हे स्पष्ट होते. राजाने धर्माने राज्य मिळवावे व धर्मानेच त्याचे रक्षण करावे, असे म्हटले आहे (म. भा. उद्योग. ३४.३१). त्यातील धर्म शब्दाचा अर्थ मोक्ष किंवा परमार्थ असा होणे शक्य नाही. धर्म हा राजाच्या आश्रयाने राहतो (म. भा. शांति. ९०.५), असे म्हटले आहे. तिथेही नीतीचीच विवक्षा आहे. धर्मशास्त्र याचा प्राचीन काळी कर्तव्यशास्त्र किंवा समाजव्यवस्थाशास्त्र असा अर्थ होता, हे लोकमान्य टिळकांनी गीतारहस्यात अनेक अवतरणे देऊन स्पष्ट केले आहे. त्यांनी नीतिशास्त्र हा शब्द धर्मशास्त्र या विवक्षेनेच उपयोजिला आहे. व्यासांनी शुकाला उपदेश करताना धर्म म्हणजे जितेंद्रियता असे सांगितले आहे. सत्यापेक्षा श्रेष्ठ धर्म नाही, ब्रह्मचर्य हाच श्रेष्ठ धर्म होय, वृत्त (चारित्र्य) हाच धर्म होय, अशी वचने जुन्या धर्मग्रंथांत पदोपदी आढळतात. त्यावरून धर्म या शब्दाची नीती हीच विवक्षा आहे, हे स्पष्ट होते.

नीतीवरच (धर्मावर) समाज आधारलेला असतो व नीतीवाचून समाजसंघटना टिकणे अशक्य आहे. या अर्थाची अनेक वचने जुन्या ग्रंथांत दिसून येतात, त्यावरूनही नीतिशास्त्राचे महत्त्व स्पष्ट होईल. 'धारणात् धर्ममित्याहुः। धर्मो धारयते प्रजाः।' हे वचन तर प्रसिद्धच आहे. नीतिनियम हे समाजाच्या उत्कर्षासाठीच केलेले असून, ज्यामुळे समाजाचा उत्कर्ष होतो त्याच तत्त्वांना नीती म्हणावे, असा प्राचीनांचा सिद्धांत आहे. 'प्रभवार्थाय भूतानां धर्मप्रवचनं कृतम्। यः स्यात् प्रभवसंयुक्तः स धर्म इति निश्चयः।' 'लोकयात्रार्थमेवेह धर्मस्य नियमः कृतः।' या वचनांचाही तोच अर्थ आहे.

नीतीचे असे आणि एवढे महत्त्व असल्यामुळे राजदण्ड सतत जागृत ठेवून प्रजेमध्ये नीतिनियमांचे पालन यथायोग्य रीतीने घडवून आणणे हे राजाचे प्रधान कर्तव्य होय, असे शास्त्रकार निक्षून सांगतात. 'राजा जेव्हा दंडनीती उत्तम चालवितो तेव्हा कृतयुग निर्माण होते', 'राज्यात दंड नसेल, तर प्रजा नाश पावतील, पाण्यातील माशाप्रमाणे बलवान लोक दुबळ्यांना खाऊन टाकतील', 'दंडच प्रजेला वळण लावून तिचे रक्षण करतो, म्हणून दंड हाच धर्म होय, असे ज्ञानी लोक म्हणतात', 'दंडाने लोकांचे रक्षण केले नाही, तर ब्रह्मचारी वेदाध्ययन करणार नाहीत, धेनू दूध देणार नाहीत व मुलींचे विवाह होणार नाहीत', असे दंडाचे माहात्म्य शास्त्रकार कां सांगतात? त्यामुळे समाजात नीतिनियमांचे पालन होते म्हणून.

**नीतिशास्त्र व इतर शास्त्रे** – प्राचीन काळी धर्मशास्त्रातच बहुतेक सर्व शास्त्रांचा अंतर्भाव होत असे. मनू, याज्ञवल्क्य, इ.

स्मृती पाहिल्या तर समाजशास्त्र, अर्थशास्त्र, शिक्षण, न्याय, इ शास्त्रांत आज ज्या विषयांची आपण गणना करतो, ते सर्व विषय त्या स्मृतींत आलेले दिसतात आज या व इतर अनेक शास्त्रांचा प्रपंच स्वतंत्र झालेला आहे, तसाच नीतिशास्त्राचाही झाला आहे पण त्यामुळे त्यांचे परस्पर संबंध तुटले आहेत असे मात्र नाही नीतिशास्त्राचे विवेचन करतानाप दोपदी त्याचा संबंध येत असतो या विश्वाची रचना कशी होते, त्याचा नियंता कोण आहे, त्याचे मानवाशी संबंध कशा प्रकारचे आहेत, याविषयी मनुष्यांचे जे विचार असतील, त्यावरच त्याचे नीतिविषयक विचार अवलंबून असतात जीवशिवाविषयीचे जे तत्त्वज्ञान, त्यावरून माणसाचे व समाजाचे अंतिम प्राप्तव्य ठरते, ध्येय ठरते आणि मग त्याच्या अनुरोधानेच समाज नीतिनियमरचना करतो राव धर्म अर्थमूल आहे, असे ज्यांचे मत आहे, ते तत्त्ववेत्ते मोक्षधर्म श्रेष्ठ मानणाऱ्या तत्त्ववेत्त्यांपेक्षा निश्चितच नीतिनियम निराळे सांगतील ते हा अर्थशास्त्राचा विचार नीतिशास्त्रात अपरिहार्य ठरतो सर्व धर्मांत राजधर्म श्रेष्ठ, असे महाभारतकार म्हणतात अर्थातच त्यांचे नीतिशास्त्र भिन्नरूप होणार आजकाल मानसशास्त्रावाचून कोणत्याच शास्त्राचे पान हलत नाही मानवाला वर्तनस्वातंत्र्य आहे की नाही, हा जो नीतिशास्त्रातला आद्य प्रश्न, त्याचे उत्तर मानसशास्त्राच्या अभ्यासावाचून देणे आज केव्हाही युक्त ठरणार नाही समाजाच्या भिन्न घटकांचे संबंध कसे असावे, त्यांचे सहकार्य कसे साधावे, त्यांच्या विरोधी हितसंबंधांचा समन्वय कसा साधावा, इ प्रश्नांचा विचार समाजशास्त्रात केलेला असतो प्रारंभी नीतिशास्त्राची जी व्याख्या दिली आहे व त्याचे जे स्वरूपवर्णन केले आहे, त्यावरून नीतिशास्त्राचा तो एक प्रधान भाग आहे असे ध्यानात येईल पदार्थविज्ञान, रसायन, डार्विनचा विकासवाद, जीवशास्त्र, अनुवंशशास्त्र यांचे सिद्धान्तही मानवाच्या कर्मस्वातंत्र्याचे स्वरूप निश्चित करताना विचारात घ्यावे लागतात आणि आजचे नीतिशास्त्रज्ञ तसे ते घेतातही तेव्हा नीतिशास्त्राने आज आपला प्रपंच निराळा थाटला असला, तरी तो केवळ व्यवहाराच्या व अभ्यासाच्या सोयीसाठीच होय एरवी मानवी जीवनाविषयीच्या सर्व शास्त्रांशी त्याचा प्राचीन काळापासून असलेला संबंध आजही अविभाज्य आहे, हे ध्यानात ठेविले पाहिजे

**नीतिनियमांची सापेक्षता** – नीतिशास्त्राचा हा व्याप पाहून एक शंका मनात सहज येईल, की हा एवढा खटाटोप कशासाठी ? वर म्हटलेच आहे की सत्य, अहिंसा, दया, क्षमा, परोपकार ही जी नीतीची मूलतत्त्वे ती जगातल्या सर्व धर्मांनी व तत्त्ववेत्त्यांनी मान्य केली आहेत असे जर आहे, तर नीतिशास्त्राचा एवढा दीर्घ ऊहापोह करण्याचे कारण काय ? प्रथम दर्शनी ही शंका अगदी खरी वाटते आणि नीतीची ही तत्त्वे निरपवाद असती, त्रिकालाबाधित असती, ती स्थलकाल व्यक्तिसापेक्ष नसती, तर नीतिशास्त्राची एवढी व्यापक चर्चा करण्याचे काहीच कारण नव्हते सत्य बोलावे, हिंसा करू नये, धनाचा व कीर्तीचा लोभ धरू नये, मनोनिग्रह करावा इ वचने सर्वांकडून पाठ करून घ्यावी की काम झाले शाळेच्या भिंतीवर अशा तऱ्हेची साधुवचने लावून ठेवण्याची चाल आहेच '*बोले तैसा चाले त्याची वंदावी पाउले*' हे साधुवचन प्रसिद्धच आहे पण राजकारणामध्ये अनेक वेळा एक बोलून दुसरीच कृती करावी लागते तसे न केले तर सर्वनाश होण्याची वेळ येते या नीतीचा श्रीशिवछत्रपतींनी अनेक वेळा अवलंब केला, म्हणूनच त्यांना स्वराज्यस्थापना करता आली राजकारणात व युद्धात असेच वागले पाहिजे, असे श्रीकृष्णानीही महाभारतात सांगितले आहे

तेव्हा नीतिनियम निरपवाद, निरपेक्ष असे असूच शकत नाहीत, हे आपण जाणले पाहिजे सध्याच्या काळची काही उदाहरणे घेऊन हा विचार स्पष्ट करू पित्याची जमीन पुत्राला मिळावी, हा आतापर्यंत नियम होता पण यात अन्याय होतो असे जाणून, आता लोकांनी कसेल त्याची जमीन हे तत्त्व स्वीकारले आहे पण त्यानेही भरपूर पीक येत नाही, कष्टकरी आळस करतात, असे दिसून आल्यामुळे आता जो उत्तम पिकवील त्याची जमीन, असे नवीन नीतितत्त्व पुढे येत आहे भ्रूणहत्या हे पूर्वी महाभयंकर पाप गणले जात असे पण सध्या लोकसंख्या अमर्याद वाढली आहे, त्यामुळे उद्या सर्वांना अन्न मिळणार नाही, राहायला जागा मिळणार नाही व माणसे माणसांना खाऊ लागतील, अशी भीती उत्पन्न झाली आहे म्हणून जपानने गर्भपाताला कायद्याने मान्यता देऊन ही आपत्ती टाळली आहे भारतसरकारही त्याचा विचार करीत आहे संततिनियमन हे तर अमलात आलेच आहे जुन्या काळी ते पाप होते अजूनही कॅथॉलिक पंथ ते पापच मानतो पण लोकसंख्या अमर्याद वाढली, तर अन्नान्नदशा होईल, अराजक माजेल आणि सगळा धर्मच उत्सन्न होईल तेव्हा ते महापाप टाळण्यासाठी हे स्वल्पपाप करावे असा हा विचार आहे पाप पुण्य, नीति अनीती स्थलकालसापेक्ष आहे, हे यावरून कळेल

दुसऱ्या महायुद्धाच्या काळात हजारो, लाखो सैनिक ब्रिटन फ्रान्स आणि अमेरिका, कॅनडा, ऑस्ट्रेलिया या देशांतून आले होते तेच पुढे लढाया जिंकीत जर्मनी, इटली या देशांत गेले परत जाताना ते हजारो लाखो बालकांना जन्म देऊन गेले ही सर्व अनौरस संतती ! एवढ्या बालकांना अनौरस म्हणून

बहिष्कृत मानले असते, तर अनर्थच झाला असता हिंदूंनी धनकानुशनी तसे करून परधर्मीयांची संख्या वाढवून ठेविली आणि स्वतःला गळफास लावून घेतला पण त्या पाश्चात्त्य देशातल्या जामनानी कायदा करून या सर्व बालकाना औरस म्हणून मान्यता दिली आणि पुढली भयानक आपत्ती टाळली

सत्य, अहिंसा, वचनपालन याचेही असेच आहे महात्मा जीच्यापेक्षा या तत्त्वाचा दुसरा मोठा पुरस्कर्ता अर्वाचीन काळात झाला नाही पण त्यानाही पदोपदी अपवाद करावे लागले मुसलमान गोळीबार करण्यास त्यानी संमती दिली, काश्मीरात सैन्य धाडण्यास अनुमती दिली, काळ्या कायद्यास पाठिंबा दिला, पाकिस्तान होऊ देणार नाही अशी प्रतिज्ञा करून ती पाळली नाही केली, बजाज याच्या मारवाड्याच्या धनाच्या जोरावरच आपले सर्व राजकारण त्यानी केले भाड वलदाराचे त धा त्याची पदोपदी निंदा करूनही त्यानी वर्ज्य मानले नाही या सर्वाचे कोणत्या नीतीने समर्थन करता येईल आणि महात्माजीची कार्याकार्यनिर्णय करण्याची कोणती कसोटी होती याचा आपण विचार केला पाहिजे असाच प्रसंग पावला पावली येतात म्हणून नीतिशास्त्राची जरूर भासते कारण हा कर्माकर्मविवेक फार सूक्ष्म असून, सामान्याना त्याचे आकलन होत नाही

**कार्याकार्याची कसोटी** – पण कर्माकर्मविवेक, कार्याकार्य चिकित्सा कितीही अवघड असली तरी वैयक्तिक व राष्ट्रीय जीवनात ती पदोपदी करणे भाग पडते कारण काही तरी निर्णय केल्यावाचून मनुष्याचे पाऊल पुढे पडणारच नाही तेव्हा हा निर्णय कशाच्या आधारे करायचा व कार्याकार्यनिर्णयाची खरी कसोटी कोणती, याचा नीतिशास्त्राला प्रथम विचार करावा लागतो आणि हा विचार करू लागताच मानवी जीवनाचा आतापर्यंतचा सर्व इतिहास डोळ्यापुढे उभा राहतो

**प्राथमिक अवस्था** – कोणत्याही देशातला मानवसमाज घेतला तरी तो प्रथमपासूनच सुसंस्कृत होता, असे म्हणता येणार नाही आज सर्वांगानी सुधारलेले समाज प्रारंभी रानटी अवस्थेतच होते आणि पृथ्वीच्या पाठीवर आस्ट्रिया आफ्रिका, लॅटिन अमेरिकेतील काही देश येथे आजही त्याच अवस्थेत असलेल्या अनेक जमाती आहेत त्याच्यात नीतिशास्त्र कोणत्या स्वरूपात आहे हे पाहिले, तर कार्याकार्यनिर्णयाचा कोणता निकष प्रारंभापासून मानव मानीत आला आहे, याची कल्पना येईल

रानटी जमातीचा अभ्यास करणाऱ्या काही पंडिताचे असे मत आहे, की त्याच्यात प्रारंभी कसलेच नीतिनियम नव्हते नीती ही कल्पनाच त्याच्यात उद्भूत झालेली नव्हती त्या जमातीना शासनाची कल्पना नव्हती आणि म्हणून शिस्त आज्ञापालन, विनम्रता हे गुणही त्याच्यात नव्हते त्याचा स्त्री पुरुषसबंध पशूसारखाच अनिर्बंध होता यामुळे वैवाहिक नीतीचा प्रश्नच नव्हता सर्व समाज भ्रमणावस्थेत होता म्हणून भूमी, धन, संपत्ती याविषयी काही नियम असण्याचे कारणच नव्हते त्याप्रमाणे कसलाही समाजरचना नसल्यामुळे व्यक्ती व्यक्तीचे संबंध, स्त्री पुरुष संबंध पिता पुत्र संबंध हे उप जत प्रवृत्तीनेच राहत नियंत्रित होत असत यामुळे मनोनिग्रह इंद्रियदमन, वासनाक्षय याचा त्या अवस्थेत पूर्ण अभाव होता

पण हे मत आता फारसे कोणी मानीत नाही नीतीचा इतका अभाव कोणत्याच जमातीत नाही व नव्हता, असे आजचे संशोधक म्हणतात आणि तेच सयुक्तिक वाटते कारण दोन माणसे कोणत्याही अवस्थेत एकत्र आली, की नीतिनियमाची आवश्यकता निर्माण होतच होते कोणत्याही अवस्थेत, अगदी मटक्या जमातीच्या अवस्थेत सुद्धा, समाज नीतिशास्त्रावाचून जगूच शकणार नाही शिवाय विकासवादाने असे दाखवून दिले आहे की अनेक पशुपक्ष्यात व कीटकातही कळपाने समूहाने राहण्याची पद्धत आहे आणि त्याच्यातही बरे–वाईट योग्य अयोग्य, ग्राह्य–त्याज्य याविषयी काही बंधने, म्हणजेच नीति-शास्त्र असल्याचे दिसून येते नायकाची आज्ञा त्याना पाळावी लागते, श्रमविभागणी असल्यामुळे नेमलेले काम करावे लागते, गटागटात आणि भिन्न पशुपक्ष्यात नित्य लढाया चालू असल्या-मुळे शिस्त सांभाळावी लागते, बापपरभाव असल्यामुळे काही निष्ठाही जोपासाव्या लागतात आणि काही प्राण्यात स्त्रीपुरुष प्रेम आणि तज्जन्य असूया–मत्सरादी भाव निर्माण झालेले असल्यामुळे ढोबळ रूपाची वैवाहिक नीतीही त्याच्यात असावी, असे वाटते हे पशुपक्षी व कीटक याचे झाले मग विकासाच्या वरच्या पायरीवर असलेल्या मानवाच्या जमातीत नीतिनिय-माचा संपूर्ण अभाव असेल, हे शक्य नाही आणि आजच्या रानटी जमाती पाहता तशी वस्तुस्थिती नाही, हे कळते

प्राथमिक अवस्थेतल्या कोणत्याही समाजाचा विचार केला तरी धर्माज्ञा हीच कार्याकार्यनिर्णयाची कसोटी सर्वत्र होती व असते, असे दिसून येते अशा समाजात धर्मग्रंथ असण्याची शक्यता नसते तेव्हा मंत्रतंत्र जाणणारे, अंगारे धुपारे करणारे, देवदेवता अंगात येणारे, थोडे काही भविष्य सागू शकणारे असे दैवी अधि कार असलेले समाजातले लोक याचा शब्द अशा समाजाचा धर्म होतो याशिवाय प्राचीन काळी रूढी संकेत, चालीरीती, परंपरा, आचार याची बंधने फार कडक असत धर्मग्रंथाच्या अभावी या रूढी म्हणजच कर्माकर्मविवेकाचा निकष मानला जाई त्यातूनही तात्कालिक प्रसंगात पेच पडेल किंवा कर्तव्या

कर्तव्याचा घोळ निर्माण होइल, त्या वेळी वरील दवी पुरुषांची आज्ञा ही निर्णायक समजली जाई जमातीच्या नायकाच्या शब्दालाही असेच प्रामाण्य असे पण पुष्कळ वेळा हा नायक आणि ना धमगुरू ह एकच असत तसे नसल, तेव्हा धमगुरूच्या शब्दाला प्रामाण्य असे आणि नायक बहुधा कार्यकारी असे

या प्राथमिक अवस्थेनतर समाजाचा जमजसा विकास होत गेला, तसतशी त्याची नीतिनियमनेही विकसित गेली समाज भ्रमती सोडून एका ठिकाणी स्थिर झाल्यावर मनुष्य थोडा चिंतनशील झाला आणि मग तत्त्वज्ञान उदयास येऊ लागले सष्टीच काही ज्ञान त्याला होऊ लागले तिच्यावर हळूहळू त्याला नियंत्रणही ठसविता येऊ लागले सद्धर्मनेची काही नवी तत्त्व त्याला कळू लागली त्याच्या मनातील कुटुब व जमात यांविषयी असलेले प्रम, स्नेह, सहानुभूती, औदार्य, इ गुण विकसित होऊ लागले आणि यामुळच सस्कृतीच्या वरच्या वरच्या पायरीवर चढत जाऊन तो प्रगल्भ दशेस पोचला त्याचे नीतिशास्त्र केवळ धर्माज्ञा व केवळ शब्दप्रामाण्य याच्या अधीन न राहता तेही विकसित होऊन प्रगल्भ दशेला प्राप्त झाले आणि त्याचबरोबर त्याची कार्याकार्यनिर्णयाची कसोटीही सुसस्कृत बनली

प्राचीन भारत – हिंदुसमाजाच्या दृष्टीने विचार करता तो वेदकाळीच मोठ्या उन्नत व परिणत अवस्थेत पोचला होता, असे दिसत प्राचीन काळी भारतात केवळ शब्दप्रामाण्य होत आणि वदाज्ञेपलिकडे कोणाला रेसभरही जाण्यास परवानगी नव्हती, असा एक समज आह पण हा समज सर्वथा भ्रममूल आह प्रत्यक्ष, अनुमान व विविध शास्त्रे हा धर्मनिर्णयाचा म्हणजच कार्याकार्यनिर्णयाचा आधार होय, असे मनूने सांगितले आहे (१२ १०५) वद, स्मृती, सज्जनाचा आचार व स्वत च्या मनाला प्रिय असेल ते हीथ र्माची चार मूल तत्त्वे होत, असेही त्यान म्हटल आहे (२ १२) 'विद्वानाने या जगात बुद्धीचा अवलब करून धर्माधर्म निश्चय करावा (शाति १४१ १०२), परिस्थिती व आपले बलाबल पाहूनच निर्णय करावा (वन २८ ३२), धर्माधर्मनिर्णय नेहमी तारतम्य, गुरुलाघव पाहूनच करावा (वन १३१ १३), अशी अनेक वचने महाभारतात सापडतात पुरुषबुद्धीला महत्त्व देण्याची व बुद्धिप्रामाण्याची ही परपरा पुढे मीमासकानी नष्ट केली जमिनी हा या मीमासा दर्शनाचा कर्ता तो इ स च्या पहिल्या शतकात होऊन गेला पुढे सहाव्या सातव्या शतकात कुमारिल भट्टाने मीमासादर्शनाचा अत्यत प्रभावी पुरस्कार करून वेदप्रामाण्य हीच कार्याकार्याची कसोटी होय हे मत प्रस्थापित केले त्यामुळच भारताची अवोगती सुरू झाला या विषयाचे उत्तम विवेचन धर्मस्वरूपनिर्णय या आपल्या ग्रथात तर्कतीर्थ रघुनाथशास्त्री कोकजे यानी केले आहे श्रीधरशास्त्री पाठक, विद्वद्रत्न के ल दप्तरी, इ थोर मनेत्यानी लेखही त्याना जोडले आहत त्यावरून प्राचीन भारतीयाचे नीतिशास्त्र– धर्मशास्त्र– किती प्रगल्भ अवस्थस पोचले होते याची कल्पना येइल गेल्या तीन–चार शतकात पाश्चात्य देशात कार्याकार्य निर्णयाच्या कसोटीसबधी कोणते वाद निर्माण झाले आहेत व तिकडल्या पडितानी यासाठी कोणते निकष स्वीकारले आहेत, याचा आता विचार करू

पाश्चात्य देशातील वाद — सुखवाद हा यातील पहिला वाद आहे मनुष्याला नित्य सुख हवे असते त्यासाठीच त्याचे सव उद्योग असतात ह ध्यानात घेऊन काही ग्रीक पडितानी व्यक्तीला सुख प्राप्त करून देणारे कर्म ते नैतिक व दुःख देणारे कर्म ते अनैतिक असा सिद्धात माडला भारतात प्राचीन काळी चार्वाकाने याच सुखवादाचा पुरस्कार केला होता पण या वादाला कुठल्याही समाजात केव्हाच मान्यता मिळाली नाही हा सुखवाद अगदी निराळ्या रूपात गेल्या शतकात पाश्चात्य देशात पुन्हा उदयास आला होता त्याला लोकमान्य टिळकांनी आधिभौतिक सुखवाद असे म्हटल आहे हा ज, बेंथाम हे याचे पुरस्कर्ते होत ग्रीक सुखवादी केवळ वैयक्तिक सुख हीच नीतीची कसोटी मानीत, तसे याचे नाही व्यक्तीला समाजावाचून राहणे शक्य नाही, हे त जाणतात, समाजाचे रक्षण, भरण व पोषण झाल्यावाचून व्यक्तीला वैयक्तिक सुख साधणार नाही, हेही ते मानतात आणि म्हणूनच कोणत्याही व्यक्तीने समाजाच्या सुखाचा व अभिवृद्धीचा विचार केला पाहिजे, असे त्याचे सागणे असत दया, परोपकार, औदार्य हे गुण त्याना इष्ट वाटतात त रा, तर त्यानी अती स्वत ला सुख मिळते म्हणून ! दया, परोपकार, इ गुणानी समाजाची प्रगती होऊन व्यक्तीचा स्वार्थ चागला साधतो म्हणूनच त्याची महती, त्या केवळ सद्भावना आहेत म्हणून नव्हे अशा सरणीने बेंथामप्रभती सुखवादी विद्वान कर्माचे फल पाहूनच नीती अनीती ठरवावी असे म्हणतात कर्त्याच्या बुद्धीचा त विचार करण्यास तयार नाहीत ती बुद्धी कृपण असो किंवा उदार असो, तिच्यावर कोणत्याही कार्याची नैतिकता अवलबून नाही परिणामी ते कर्म सुखद असेल तर ते नैतिक आणि सुखद नसेल तर नैतिक नाही, असे ते प्रतिपादितात या पथाचे दुसरे लक्षण असे, की तो सुखासुखात भेद करीत नाही शारीरसुख ( मद्यपान, समागम, मिष्टान्न सेवन) आणि मानसिक सुख – (काव्यानद, ज्ञानानद, परोपकार) असा भेद या आधिभौतिकवाद्याना मान्य नाही सव सुखाची जाती ते एकच मानतात याचा अर्थ व्यभिचार, अपथ्याहार, पाशवी वृत्ती ही त्याना ग्राह्य वाटतात असे नाही त्या

गोष्टीचा ते निषेधच करतात, पण त्यामुळे समाजस्वास्थ्य मगेल व व्यक्तीला मुरा लागणार नाही म्हणून त्या गोष्टी अग्राह्य होत, असे ते म्हणतात

मिल्ल व स्पे सर ही आधिभौतिक सुखवाद्याची पुढली पिढी परोपकार, दया हा एक स्वार्थाचाच प्रकार आहे ह त्याना मान्य नाही आणि शारीरसुख व मानसिक सुख ही दो हा सुखे सार खीच, हही त्याना मान्य नाही निष्काम बुद्धीने केलेल्या जन सेवेचे सुख आणि काव्य कला, तत्त्वचिंतन यापासून मिळणारे सुख ह त्याच्या मते श्रेष्ठ दर्जाचे होय ही भूमिका घेऊन पुष्क ळाचे पुष्कळ सुख, जनहित अथवा बहुसख्याचे सुख ही त्यानी कार्याकार्यनिणयाची कसोटी ठरविली सुख हा शब्दही त्यानी टाकून दिला व त्याऐवजी हित हा श ब्द स्वीकारला श्रेष्ठ सुखा साठी मनुष्य हीन सुखाचा त्याग करतो, त्याने तो करावा, इत केच नव्हे, तर लोककल्याणासाठी हालअपेष्टा व दु खही तो सोसतो आणि त्याने ते सोसावे, असे ह सुखवादी म्हणतात 'सतुष्ट पशूपेक्षा असतुष्ट साक्रटीस होण मला पत्करल,' असे मिलन म्हटले आहे त्याचप्रमाणे व्यक्ती व्यक्ती मिळून समाज होत असला तरी सव समाज ही एक निराळी कोटी आहे असे सागून, त्या समाजाचे प्रकृतिस्वास्थ्य आपल्या सुखाच्या आधी पाहिले पाहिजे, त्याची चिंता आधी वाहिली पाहिजे, असे स्पे सरने प्रतिपादिले आहे मिल व स्प सर यानी उपयुक्ततावादावर आधारलेली बेंथामची मूळ भूमिकाच टाकून दिल्यामुळे त्याचा सुखवाद फार श्रेष्ठ पातळीवर आला, सर्व धर्मानी प्रतिपादि लेल्या सवभूतहिताच्या भूमिकवर ता आला ह खरे, पण अजूनही त्यात एक फार मोठा दोष राहिला आह, तो म्हणजे त्यात कर्त्याच्या बुद्धीचा विचार होत नाही, केवळ बाह्य परिणामा वरूनच कर्माची नतिकता ठरविली जाते आणि सख्यवरून निणय केला जातो, हा होय

हा दोष जाणून लो टिळकानी ज्याला आधिदैवत पक्ष म्हटले आहे, त्या पक्षाने सदसद्विवेकबुद्धी ही कार्याकार्यनिणयाची कसोटी मानली आह कोणत्याही पचप्रसगी या विवेकबुद्धीला देवतेला कौल लावावा, म्हणजे ती तत्काळ योग्य तो निर्णय देईल, असे या पक्षाच्या मार्टिनोसारख्या पडिताचे मत आहे सदेहपद निर्माण झाले तर सज्जनाच्या अत करणप्रवृत्तीचा निणय मानावा, असे कालिदासानेही म्हटले आह मनूनेही मन पूतता, आत्म्याचा सतोष हे प्रमाण मानले आहे पण अन करण प्रवृत्तीची साक्ष ही कसोटी सवत्र उपयुक्त ठरणार नाही हीन बुद्धी व दुष्ट लोकाच्या हाती ते साधन गेले तर अनथ होईल, शिवाय प्रत्येकाची साक्ष वेगवगळी येण्याचाही सभव आह ह आक्षेप या पक्षावर येतात कित्येक वेळा ही विवेकबुद्धी एकच एक ठाम निणय देत नाही व सदेह कायमच राहतो, असाही आक्षेप अनेकानी घेतला आहे शिवाय मनुष्याला सदसद्विवेक- बुद्धी नावाची निराळी शक्ती आहे, हेच पुष्कळाना मा य नाही त्यामुळे हा पक्ष मागे पडला आह

आधिभौतिक सुखवादी पक्ष कर्त्याच्या बुद्धीला मान देत नाही, यामुळे तो सवथा त्याज्य मानून ग्रीन कट, इ पडितानी अध्या त्मवादाचा स्वीकार केला आणि कर्त्याच्या बुद्धीची शुद्धता ही नीतिनिणयाची कसोटी ठरविली याच विचारसरणीची परिणती करून कँटने सागितले, की ससारातील वासनानी व फलाशेन आत्मा जोपर्यंत बद्ध आहे, तोपयत त्याला खरे ज्ञान, खरे स्वा तन्त्र्य प्राप्त होणे शक्य नाही यापुढचा युरोपातील तत्त्ववेत्ता म्हणजे फ्रेच पडित बर्गसान हा होय विश्वाच्या रहस्याचे, पर मात्म्याचे ज्ञान तर्काने होणे शक्य नाही, ते अत स्फूर्तीनेच होणे शक्य आहे असा त्याने सिद्धात माडला आणि कार्याकाय निणय तर्कातीत करून ठेवला

मिल व स्पे सर यानी कर्त्याच्या बुद्धीला महत्त्व आह ह उघड पणे, सरळ रीतीने मान्य केले नसले तरी आडवळणाने पर्या याने मान्य केलेच होते शिवाय परोपकार मनुष्याने का करावा याचे उत्तर देताना स्पेन्सरने विकासवादाच्या आश्रयाने असे सागितले, की सजीव सृष्टीत अगदी निकृष्ट पातळीवरच्या पशु पक्ष्यामध्येसुद्धा परोपकार, स्वार्थत्याग ही वृत्ती दिसून येते आणि तीच पुढे विकसित गेललीही दिसते तेव्हा सजीव सष्टीचा शिरोमणी जो मनुष्य त्याने परार्थातच स्वार्थ पाहण्याचे सष्टीचे हे चढते धोरण पूर्ण विकसित करण, यातच त्याची सफलता आहे लो टिळकानी हा युक्तिवाद मा य करून पुढे असे म्हटले आहे, की सजीव सष्टीच्या विकासाचा न्याय पाहता परोपकार बुद्धी या एकाच सदगुणाचा विकास झालेला नसून, न्यायबुद्धी, दया, शहाणपणा, तर्क, धती, क्षमा इद्रियनिग्रह, इ इतर सद- गुणाचीही वाढ झालेली आहे आणि या सद्गुणानी सपन्न असा मनुष्याच्या देहातील क्षेत्रज्ञाला– स्वामीलाच आत्मा असे भार तीय शास्त्रकार सबोधतात पाश्चात्त्य देशातील ग्रीन, कँट हे तत्त्ववेत्तेही आधिभौतिक सुखवाद त्याज्य मानून कार्याकार्याच्या निणयासाठी अध्यात्मवादाचाच आश्रय करतात म्हणून त्या अध्यात्मवादाची ज्या वेदान्तात परिणती झालेली आह, त्या- तला सर्वश्रेष्ठ अधिकारी जो भगवदगीतेतील स्थितप्रज्ञ पुरुष, त्याच्या शुद्ध व्यवसायात्मक बुद्धीने दिलेला निणय हीच कार्या कार्याची अतिम कसोटी मानली पाहिजे, असा सिद्धात लो टिळकानी गीतारहस्यात माडला आहे वामनराव जोशी यानीही आपल्या नीतिशास्त्रप्रवेश या ग्रथात हेच मत माडले आहे ते म्हणतात, स्थितप्रज्ञाचे आरशाप्रमाणे स्वच्छ मन जे सागेल, त

खरे, ही भगवद्‌गीतेतील कसोटी बिनचूक आहे कारण स्थित प्रज्ञाला सव गोष्टींचे ज्ञान असते त्याची इद्रिये त्याला मोह घालू शकत नाहीत ता आत्मवचना करणे शक्य नसते त्याची बुद्धी सम असून विश्व हच त्याला कुटुब वाटत तेव्हा पूणत्वाला गेलेल्या अशा माणसाचा आत्मा ज्या योगे प्रसन्न हाईल ताच माग श्रेयस्कर हाय, ही कसोटी अगदी बिनचूक आहे

स्थितप्रज्ञाच्या निमम, निरहकार, समबुद्धीने दिलेला निणय हाच नीतिदृष्ट्या योग्य हाय, असा जा सिद्धात तोही कितपत सयुक्तिक आहे याचाही थोडा विचार केला पाहिजे पण त्याआधी नीतिनियमाच्या कुल, राष्ट्र, अखिल विश्व अशा ज्या भिन्न भिन्न कक्षा आहेत, त्याचा विचार करणे अवश्य आहे वरील सिद्धाताची सयुक्तिकता पडताळण्यास त्याचा उपयोग होईल

नीतीच्या भिन्न कक्षा – नीतिनियम निरपवाद नाहीत त स्थलकालप्रसगसापेक्ष आहेत त्याच दृष्टीने आणखी विचार केला तर कुल, जाति, वग, पथ, धम (एका धर्माचे अनुयायी), राष्ट्र व अखिल विश्व याच्या दृष्टीनही ते सापेक्ष आहेत असे दिसून येईल

स्थितप्रज्ञ साधुसत हे सर्वभूतहितरत असतात, ते समबुद्धी असतात, त्याना शत्रुमित्र सम वाटतात, अमगळ असा भेदाभेद भ्रम त्याना मोह घालीत नाही 'दया करणे जे पुत्रासी तेच दासा आणि दासी,' ह त्याचे व्रत असते, त्याच्या विभूती जगाच्या कल्याणासाठी असतात, असे सव धमवेत्ते, सव साधुसत आणि सव तत्त्ववेत्ते नेहमी सागतात पण प्रत्यक्ष व्यवहारात या तात्त्विक वचनाना ज्या अनेक मर्यादा पडतात, त्या न पाहता केलेला कर्माकर्मविवेक योग्य ठरणार नाही, असे त्यानीच सागितले आहे वृक्षवल्लीनाही सोयर म्हणणारे तुकाराम 'नाठाळाच्या माथा काठी' मारणारच ! सर्वभूती सम असावे असे त्यानी म्हटले असले तरी काही लोकाना पजारा मारल्या पाहिजेत, हे त्याना मा यच आहे स्थितप्रज्ञतेचे कौतुक करणाऱ्या महाभारतकारानी ज्या पुरुषाला चीड किंवा सताप येत नाही, तो तृतीय प्रकृती होय, असे म्हटले आहे दया, क्षमा हे मोठे सद्गुण खरे, पण 'तस्मान्नित्य क्षमा तात पण्डितरपवादिता' – म्हणून नित्य क्षमा ही पडितानी निंद्य ठरवली आहे, असे प्रल्हादानेही बळीला सागितले आहे सव भूताशी निर्वैर व्हावे हे खरे पण मायावी पुरुषाशी मायावीपणे व साधूशी साधूपणे वागणे योग्य होय, असा उपदेश भीष्मानीही अनेक वेळा केला आहे

या बाह्यत दिसणाऱ्या विसगतीचे कारण असे, की वर सांगितलेल्या भिन्न कक्षामध्ये भिन्न नीतीचा अवलब केला नाही तर अनवस्था प्रसग येईल साधुपुरुषाच्या औदार्याचा दुष्ट, गुड लोक फायदा घेऊन समाज उद्ध्वस्त करून टाकतील, सवत्र अराजक माजेल आणि त्यामुळे धम, नीती, साधुत्व, सौजन्य, सत्य या सर्वांचाच नाश होईल या भिन्न भिन्न कक्षामधल्या राष्ट्र या कक्षेचा प्रथम विचार करू

आज आतरराष्ट्रीय वृत्तीचा, विश्वराष्ट्राचा विश्वशातीचा सवत्र गौरव ऐकू येतो प्रत्येक राष्ट्राने आपल्या सावभौमत्वाचा आग्रह धरल्यामुळे जगात युद्धे पेटतात व त्यात मानवी सस्कृतीची व शातंतेची आहुती पडते, तेव्हा राष्ट्रनिष्ठा ही त्याज्य मानावी, असे जगातले मोठमोठे पण्डित व तत्त्ववेत्ते सागत आहेत सव राष्ट्रानी ही जागतिक पातळीवरची नीती मान्य केली तर खरोखरच जगाचे कल्याण होईल आणि त्या दृष्टीने मग राष्ट्रनिष्ठा त्याज्य मानणे सयुक्तिक होईल लो टिळक या बाबतीत प्रतिपादितात, ते असे–

" भोवतालची राष्ट्रे खालच्या पायरीवर असताना एखादे राष्ट्र एकाकीच जर सदैव वरच्या पायरीवर राहू म्हणेल तर ते सिद्धीस जाणे शक्य नाही कारण परस्पर व्यवहारात 'जशास तसे' या न्यायाने अन्यायाचा प्रतिकार करणे प्रसगी जरूर पडते सर्वांनी सव भूतात्मक्य ओळखावे हे खरे, पण आत्मोन्नतीची ही परमावधीची स्थिती सर्वास जोपर्यंत प्राप्त झाली नाही, तोपर्यंत इतर राष्ट्रे किंवा समाज याची स्थिती लक्षात आणून साधुपुरुषानी आपापल्या समाजास तत्तत्काली श्रेयस्कर होईल असा देशाभिमानादी धमच त्याग उपदेशिला पाहिजे असे यावत च सिद्ध होत "

या विचारसरणीप्रमाणे देशाभिमान एकदा मा य केला तर देशाच्या कक्षेतील नीतिशास्त्र निराळे व त्या कक्षेबाहेरील नीतिशास्त्र निराळे गृहनीती निराळी व परनीती निराळी, हे मान्य करावेच लागते चालून येणारा शत्रू हा पर असतो तो आपला सवनाश करण्यास उद्युक्त झालेला असता अशा वेळी जगणे, राष्ट्ररक्षण, हा सवश्रेष्ठ धम व ही सवश्रेष्ठ नीती होय त्यामुळे सत्य, अहिंसा, औदार्य, आत्मौपम्यबुद्धी याचा बळी देऊन ज्या ज्या उपायानी शत्रूचा नाश करणे शक्य असेल, त्या त्या सव उपायांचा अवलब करणे हेच कार्य होय हे केवळ आक्रमण करणाऱ्या, चालून येणाऱ्या शत्रूविषयीच नव्हे, तर कोणी आक्रमण करील असे दिसू लागताच आपणच त्याच्यावर आधी आक्रमण करणे हाही धमच होय

पण राष्ट्र या कक्षेसबधी या नीतीचा अवलब केला तर एका राष्ट्राच्या अभ्यतरात कुल, जाती, वग, धर्म (एका धर्माच्या अनुयायाचा समूह) हे जे विभाग असतात, त्यानी आपल्या कक्षेबाहेरच्या विभागाशी वागताना वरीलप्रमाणेच परनीतीचाच अवलब करायचा का काय, अशी शका येईल

पण ही शंका अगदी अस्थानी व अयुक्त आहे. सर्व राष्ट्र ही आपली मातृभूमी मानल्यानंतर त्याच्या अभ्यंतरात कसेही भिन्न विभाग असले तरी ते एकमेकांना 'पर' नाहीत. अर्थातच त्यांच्याशी वागताना परनीतीचा अवलंब करणे म्हणजे राष्ट्र या तत्त्वाशी द्रोह करण्यासारखे आहे. राष्ट्रातील एक समूह दुसऱ्या समूहाशी वैर धरून त्याचा समूळ उच्छेद करण्याचेच धोरण अवलंबीत असेल, तर मात्र गोष्ट निराळी. अमेरिकेत अनेक गोरे लोक निग्रोंना शत्रू मानून त्यांचा समूळ नाश करण्याचे जणू व्रतच घेऊन राहिले आहेत. अशा वेळी त्यांच्याशी वागताना निग्रोंनी परनीतीचा अवलंब केला, तर ते युक्तच आहे. जर्मनीत हिटलरने ज्यूंवर अशीच धार धरली होती. अशा वेळी हिटलर व त्याचा नाझी पक्ष (जर्मनी नव्हे) यांना हाडवैरी मानून त्यांच्याशी तसे वागणे ज्यूंना प्राप्तच होते. पण असे प्रसंग सोडले तर कुलाभिमान, धर्माभिमान यांचा परिपोष करीत असतानाही ते अभिमान राष्ट्राभिमानाला पोषक होतील, असे धोरण ठेवणे हीच श्लाघ्य नीती होय.

मनुष्य हा समाजाशिवाय राहणे शक्य नाही. कुल, जाती, वंश, वर्ग, धर्म हे त्याने जगण्यासाठी निर्मिलेले लहानमोठे समाजच आहेत. हळूहळू लहान विभाग मोठ्या विभागात विलीन होऊन समाज मोठा होत जातो. या प्रत्येक वेळी समाजाची जी कक्षा मनुष्याने स्वीकारली असेल, तिच्याशी एकनिष्ठ राहून तिच्या अभ्यंतरातील लहान अभिमानांची जोपासना ते अभिमान त्या कक्षेच्या निष्ठेला संवर्धक होतील, अशाच रीतीने केली पाहिजे. मोठ्या कक्षेत मनुष्य गेला तरी लहान कक्षेतील अभिमान त्याज्य समजण्याचे कारण नाही. याविषयी लो. टिळक *गीतारहस्यात* म्हणतात—

"मनुष्य सर्वभूतहिताच्या शेवटच्या पायरीवर पोचला तरी देशाभिमानाचीच नव्हे, तर कुलाभिमानाचीही आवश्यकता नाहीशी होत नाही. कारण समाजसुधारणेच्या दृष्टीने पाहिले, तर कुलाभिमान जे विशिष्ट काम करतो ते केवळ देशाभिमानाने होत नाही आणि देशाभिमानाचे कार्य निव्वळ सर्वभूतात्मैक्य दृष्टीने सिद्ध होत नाही. अर्थात समाजाच्या पूर्णावस्थेत सुद्धा साम्यबुद्धीप्रमाणेच देशाभिमान व कुलाभिमान इ. धर्मांचाही नेहमीच जरूरी राहते."

फ्रान्स, इटली, जर्मनी, इ. राष्ट्रे इतके दिवस पूर्ण अलग होती. त्या काळी त्यांना एकमेकांशी वागताना परनीतीचाच आश्रय करावा लागे. कारण एक दुसऱ्याच्या जिवावरच उठलेला असे. पण आता या राष्ट्रांनी सहा राष्ट्रांचा मिळून, आर्थिक दृष्टीने का होईना, पण एक देश केला आहे आणि तो रशियासारख्या बलाढ्य शत्रूपासून आत्मरक्षण करण्यासाठी केला आहे. तेव्हा अशा स्थितीत या बृहद्राष्ट्राच्या निष्ठेशी जर्मनी, फ्रान्स, इ. अल्पनिष्ठा अविरोधाने जोपासणे हीच श्रेयस्कर नीती होय. ती मानली नाही, तर त्यांचे कॉमन मार्केट उत्सन्न होईल. अरबांनी सर्व अरबांचा एक मोठा अखंड देश करण्याचे योजिले होते. पण त्याला अवश्य ती नीती त्यांनी सांभाळली नाही. त्यामुळे लहानशा इस्रायल राष्ट्राने त्यांचा रणात धुव्वा उडविला. भारताच्या अभ्यंतरात कुल, जाती, वर्ग, धर्म, त्याचप्रमाणे महाराष्ट्र, बंगाल, गुजरात यांसारखे प्रदेश, असे विभाग आहेत. या सर्वांनी भारत हे बृहद्राष्ट्र राजीखुषीने, स्वेच्छेने निर्माण केले आहे. ते टिकवायचे असेल, तर या सर्व लहान विभागांनी भारतनिष्ठेच्या परिपोषाचीच नीती अवलंबिली पाहिजे. अन्यथा भारतावरच आपत्ती येऊन त्यांचे स्वातंत्र्यही धोक्यात येईल. उलट ज्यांनी हे बृहद्राष्ट्र आपले मानले नाही, त्या पाकिस्तानसारख्या प्रदेशाशी परनीतीनेच वागले पाहिजे. तसे न केले, तरी भारतावर आपत्ती येईल. उद्या विश्वराष्ट्र खरोखरच अस्तित्वात आले, तर आज महाराष्ट्राने भारताशी जी नीती अवलंबायची तीच भारताने विश्वराष्ट्राशी वागताना अवलंबिली पाहिजे. कुलापासून प्रारंभ करून मानव हळूहळू समाजरचनेच्या वरच्या पातळीवर, वरच्या कक्षेत जात आहे. अशा वेळी जी बृहत्कक्षा त्याने स्वीकारली असेल, तिच्या अभ्यंतरात गृहनीती व तिच्या बाहेर परनीती असे धोरण त्याने ठेविले पाहिजे. यात प्रमाद झाला, तर त्याचे जीवित उद्ध्वस्त होण्याची आपत्ती येण्याचा संभव असतो. नीती कधी अनीती ठरते व अनीती नीती ठरते याविषयी महाभारतात म्हटले आहे ते असे—

> अधर्मरूपो धर्मो हि कश्चिदस्ति नराधिप।
> धर्मश्चाधर्मरूपोऽस्ति तच्च ज्ञेयं विपश्चिता॥
>
> (म. भा. शांति ३३.३०)

अर्थ— हे राजा, कधी कधी धर्म (नीती) हा अधर्मरूप होतो, तर कधी कधी अधर्म (अनीती) हा धर्म ठरतो हे विद्वानाने (विचारपूर्वक) जाणून घ्यावे.

स्थितप्रज्ञ-प्रामाण्य— नीतिनियमांची सापेक्षता व नीतीच्या भिन्न कक्षा यांचा हा सर्व विचार मनापुढे उभा राहिल्यावर कार्याकार्यनिर्णय कसा अवघड आहे, हे ध्यानात येईल. या बाबतीत स्थितप्रज्ञ, समबुद्धी पुरुष जो निर्णय देईल तो प्रमाण मानावा, असे लो. टिळक व वा. म. जोशी यांनी जे प्रतिपादिले आहे, त्याचा आता विचार करणे जरा सुलभ होईल.

कर्माकर्मांचा जटिल प्रश्न पुढे आल्यावर स्थितप्रज्ञ जो निर्णय देईल तो निःस्वार्थी बुद्धीने देईल, त्यात लाभदृष्टी असणार नाही, हे खरे. पण अगदी निर्लोभ वृत्तीने दिलेला निर्णय समाजाला उत्कर्षकारक होईलच असे म्हणता येणार नाही. स्थितप्रज्ञ

पुरुषाच्या ठिकाणी निर्ममत्व व निरहंकारवृत्ती या गोष्टी असल्या म्हणजे वरच्यासारखे कूटप्रश्न सोडवायला अवश्य ती बुद्धिमत्ता, प्रज्ञा, अवलोकन, जगाच्या राजकारणाचा अभ्यास व अर्थशास्त्रीय प्रवाहाचे ज्ञान या गोष्टी त्याच्याकडे असतीलच असे ठरत नाही तिबेट चीनला द्यावा की नाही, इस्रायलची बाजू घ्यावी की ईजिप्तची, गोवा व हैदराबाद यावर लष्कर धाडावे की नाही, या प्रश्नाची उत्तरे देण्यास जगातले भिन्न देशांचे राजकीय बलाबल, आपले बलाबल, आर्थिक व सामाजिक स्थिती, तेथील जनतेच्या भावना, या सर्वांचे उत्तम ज्ञान असले पाहिजे मनुष्य निर्मम किंवा निर्लोभ असला म्हणजे त्याला हे ज्ञान असेलच असे नाही लो टिळकांच्या मते अर्जुन हा स्थितप्रज्ञ होता, जीवन्मुक्त होता, समबुद्धी होता, तरी त्याला कौरवांशी लढावे की लढू नये याचा निर्णय स्वत करता आला नाही त्याने केलेला निर्णय चुकीचा, घातक व अनर्थकारक होता आणि श्रीकृष्णाचे मत त्याच्या बरोबर उलट पडले असे असताना स्थितप्रज्ञाचा निर्णय अखेरचा मानावा, असे कसे म्हणता येईल ?

न्या मू रानडे, महात्मा गांधी हे स्थितप्रज्ञ होते पण त्यांचे कितीतरी निर्णय चुकीचे होते ब्रिटिशांचे राज्य कल्याणकारक आहे, ब्रिटिश भांडवलाचे आपण स्वागत केले पाहिजे, असे रानडे यांना वाटे, पण त्यावर लो टिळकांनीच टीका केली आहे *आपण हिमालयाएवढ्या चुका केल्या,* असे महात्माजी अनेक वेळा म्हणाले होते स्वत चेच निर्णय त्यांनी अनेक वेळा फिरविले आहेत अनेक वेळा त्यांचे निर्णय परस्पर विसंगतही असत सुभाषबाबू, हिंदुमुसलमानांचा प्रश्न, साखरेचे विनियंत्रण, याविषयीचे त्यांचे निर्णय अत्यंत प्रामादिक व घातक ठरले आहेत असे असताना केवळ समबुद्धी, वसुधैवकुटुंबकवृत्ती, निर्ममत्व एवढ्या बळावर साधुपुरुषांना स्वसमाजाचे हित कशात आहे, सर्वभूतहित कशाने होईल हे जाणता येते, असे समजून त्यांचे निर्णय प्रमाण मानावे, हे सयुक्तिक वाटत नाही शंकराचार्य, रामानुज, मध्व, इ आचार्यांनी गीतेचा अर्थ चुकीचा करून समाजाला जो संन्यासमार्गाचा, निवृत्तीचा उपदेश केला त्याने आपले अहित झाले, असे लो टिळकांनीच दाखवून दिले आहे ज्ञानेश्वर-तुकारामादी महाराष्ट्र संतांनी भागवत धर्माचा योग्य अर्थ केला नाही, असेही त्यांनी म्हटले आहे हे सर्व पुरुष स्थितप्रज्ञ होते, निर्मम होते, जीवन्मुक्त होते, याविषयी कोणाला अणुमात्र शंका घेता येणार नाही संतांविषयी लिहिणाऱ्या सर्व विद्वानांनी व लो टिळकांनीही तशी शंका घेतलेली नाही तरी त्यांचे निर्णय हिंदू समाजाच्या हिताला तितकेसे पोषक झाले नाहीत, हे खरेच आहे तेव्हा स्थितप्रज्ञ पुरुषांनी दिलेले निर्णय, ही कार्याकार्यनिर्णयाची कसोटी मानता येईल असे वाटत नाही

गीतेतील कार्याकार्यनिर्णयाची कसोटी अगदी बिनचूक आहे असे वा म जोशी यांनी म्हटले आहे पण त्यांनीच या संबंधात एक उदाहरण देऊन, हा पक्ष कसा लंगडा पडतो ते दाखविले आहे एक सेनापती आहे आपल्या क्षेत्रात तो अत्यंत निष्णात, कुशल व समर्थ आहे पण तो मद्यपी आहे, व्यभिचारी आहे दुसरा नीतीने शुद्ध आहे पण सेनानायकाच्या गुणात पहिल्या इतका समर्थ नाही अशा वेळी निर्णय कोणाचे मानावे, लष्कराचे आधिपत्य कोणाकडे द्यावे, असा प्रश्न आल्यास ते पहिल्याकडे दिले पाहिजे हे उघड आहे वामनराव म्हणतात, अशा वेळी नीतिमान सेनापतीला बळी देऊन चतुर सेनानीला आधिपत्य देणे राष्ट्रनीतिसंरक्षणाच्या दृष्टीने प्राप्त आहे कारण तसे न केले तर राष्ट्रावर दास्याचा प्रसंग येऊन सर्वांचीच नीतिमत्ता ढासळण्याचा प्रसंग येईल याचा अर्थ असा, की नीतिमान पुरुषाचे निर्णय किंवा त्याचे नेतृत्व, राष्ट्रहिताचे होईलच असे म्हणता येत नाही

आता हे खरे, की ज्या सेनापतीकडे आधिपत्य द्यावयाचे त्याची राष्ट्रनिष्ठा म्हणजे स्वजनविषयक नीती शुद्ध असलीच पाहिजे नाहीतर तोच शत्रूला जाऊन मिळेल म्हणजे नीतीचे महत्त्व निर्विवाद आहे पण या सेनापतीकडे आधिपत्य द्यावे की नाही, हा निर्णय देण्यास स्थितप्रज्ञता लागत नाही चर्चिल, रूझवेल्ट, स्टॅलिन यांसारखे *व्यवहारपंडित तो देऊ शकतात* आणि आयसेनहोअर, मॉंटगॉमेरी, मॅक आर्थर हे सेनापती स्थितप्रज्ञ नसले, तरी राष्ट्राला हितकारक असे युद्धाबाबतीचे निर्णय ते घेऊ शकतात लो टिळकांनी म्हटल्याप्रमाणे असे निर्णय घेण्यास पांडित्य व तर्कशक्ती पुरी पडत नाही, यात शंकाच नाही पण स्थितप्रज्ञताही पुरी पडत नाही, हेही ध्यानात घेतले पाहिजे

स्थितप्रज्ञाच्या बाबतीतला आणखी एक भ्रामक समज समाजाने टाकून देणे अवश्य आहे ' निस्त्रैगुण्ये पथि विचरतां को विधि को निषेध । ' = त्रिगुणातीत जो झाला, जो समबुद्धी झाला त्याला नीतिनियमांच्या बाबतीत कसलाच विधिनिषेध असत नाही, असे एक वचन आहे हा अर्थ शब्दश घेऊ नये हे खरे, पण तसा घेतला जातो आणि स्थितप्रज्ञाचे वागणे ' बालोन्मत्तपिशाचवत् ' असते, असे गौरवाने सांगितले जाते हा गौरव अत्यंत घातक आहे गीतेला तो मान्य नाही श्रेष्ठ पुरुष जे आचरण करतो, त्याचेच अनुकरण लोक करतात, तो जो कित्ता घालून देतो तोच लोक गिरवतात, म्हणून त्याने लोकांना अनुकरणीय व आदर्शभूत असेच वर्तन ठेविले पाहिजे, असा गीतेचा अभिप्राय आहे भारताच्या मागल्या इतिहासात अनेक वेळा

याकडे दुर्लक्ष झाले आहे आणि अलिकडेही ‘महाराज’ जातीच्या अनीतिमय वर्तनाचे या तत्त्वावरच समर्थन केले जाते श्रीकृष्णाने गोपींशी जे विलास केले, ते त्याच्या चरित्रात मागून कोणीतरी घुसडले आहेत हेच मत आपण मान्य केले पाहिजे भागवतकारांनी थोर पुरुष नीति अनीतीच्या पलिकडे असतात, असे म्हणून त्याचे समर्थन केले आहे पण गीतेतील ‘यद्यदा चरति श्रेष्ठ ।’ या वचनावरून असले समर्थन श्रीकृष्णाला मान्य नव्हते, असे स्पष्ट दिसते ‘न देवचरितं चरेत ।’ असे एक जुने सुभाषित आहे देवाच्या आचरणाचे अनुकरण करू नये, ते त्याचे त्यालाच शोभते, असा त्याचा अर्थ केला जातो पण हे धोरण घातक आहे देवाचे तसे आचरण असेल तर ते निंद्य म्हणून अननुकरणीय असेच समाजाने ठरविले पाहिजे पुरुष स्थितप्रज्ञ झाला, तरी क्वचित तो मोहवश होऊ शकतो हे सत्य आहे म्हणून नीतिनियमांच्या अतीत कोणीही असू शकत नाही, असेच समाजाने मानले पाहिजे

लोकप्रभव – मग कार्याकार्यनिर्णयाची कसोटी तरी कोणती ? महाभारतकारांनी याचा निर्णय दिला आहे लोकहित, सर्वभूतहित, लोकांचा प्रभव ( उत्कर्ष ), समाजाचे धारण पोषण हाच खरा धर्म होय, कार्याकार्याचा हाच निकष होय, असे महाभारतात अनेक ठिकाणी सांगितले आहे आता अमके लोकहितकारक की लोकघातक, हे कसे ठरवायचे हा प्रश्न येईल गेल्या शंभर वर्षांत जातिभेद, अस्पृश्यता, स्त्रीशिक्षण, प्रौढविवाह, विधवाविवाह पतितपरावर्तन, संन्यास, कर्मयोग, ब्रिटिश राज्याचे इष्टानिष्टत्व, व्यक्तिस्वातंत्र्य, मुद्रणस्वातंत्र्य, संपत्तीचे विभाजन, या समस्यांचे हिताहितत्व ज्या पद्धतीने आपण ठरविले त्याच पद्धतीने सर्व गोष्टींचे ठरविले पाहिजे, हे त्याला उत्तर आहे राजा राममोहन राय, लोकहितवादी, दादोबा पांडुरंग, ज्योतिबा फुले, रानडे, विष्णुशास्त्री, आगरकर, भांडारकर, लो टिळक रामकृष्ण परमहंस, स्वामी विवेकानंद, लाला लजपत राय, मदनमोहन मालवीय, या थोर पुरुषांनी आपले विचार समाजाला शिकविले, समाजमनावर संस्कार केले आणि समाजमनालाच अंती हिताहिताचा निर्णय करण्यास शिकविले यात चुका होण्याचा संभव असतो पण याला दुसरा कुठला इलाज नाही स्थितप्रज्ञाचे निर्णय प्रमाण मानणे हा उपाय नव्हे असे स्थितप्रज्ञ पुरुष कोण हे ठरविणेच आधी अवघड आहे राममोहन, रानडे, टिळक, आगरकर, विवेकानंद, महात्माजी पंडितजी यांच्यासारख्या सर्वस्वाचा त्याग करणाऱ्या पुरुषांना त्यांच्या काळी कोणी स्थितप्रज्ञ तर मानले नाहीच, उलट पक्षपात, विषमता, स्वार्थ, अनीती, अहंमन्यता, संधिसाधूपणा, स्वजनद्रोह या पापांचे त्यांच्यावर सर्रास आरोप केले या महापुरुषांची ही स्थिती मग याच्या पलिकडे स्थितप्रज्ञाला शोधायला कुठे जायचे ? तेव्हा समाजाचा उत्कर्ष, प्रभव, प्रगती, उन्नती हा कर्माकर्माचा निकष ठरवून, त्या त्या काळच्या ऋषींनी समाजावर आपल्या मतीप्रमाणे संस्कार करून लोकशिक्षणाचा अवलंब करून समाजहितकारक तत्त्वामागे लोकशक्ती उभी करणे आणि तिलाच निर्णय करू देणे हाच मार्ग श्रेयस्कर होय या कसोटीने कर्त्याच्या बुद्धीचा विचार होत नाही, असे नाही केवळ फलावरून निर्णय करावा, असा याचा अर्थ नाही कर्त्याच्या मनात समाजहितबुद्धी असेल, तर ते कृत्य जास्त उदात्त, पवित्र व नैतिक होय यात शंकाच नाही पण त्या कृत्याचे फल हाही निकष विचारात घेतला पाहिजे कारण सद्बुद्धी असूनही समाजघातक कृत्य मनुष्याच्या हातून घडू शकते, हे आपण वर पाहिलेच आहे समाजातील सर्व व्यक्तींना अन्न, वस्त्र, घर, शिक्षण, आरोग्य हे हक्काने मिळाले पाहिजे व्यक्तिस्वातंत्र्य समता, बंधुता या तत्त्वांचा आचार समाजात होत राहिला पाहिजे स्वातंत्र्य, समृद्धी व सामर्थ्य टिकविण्यास समाज समर्थ असला पाहिजे समाजात कवी, शास्त्रज्ञ, धर्मवेत्ते तत्त्ववेत्ते सेनापती राजनीतिनिपुण, कारखानदार शौर्यधैर्यसंपन्न नेते, असे थोर पुरुष अखंड निपजत राहिले पाहिजेत समाजाचे हेच वैभव आणि हेच ऐश्वर्य होय हे प्राप्त करून देणारे व तशी बुद्धीने केलेले कार्य ते नैतिक व याची हानी करणारे कार्य ते अनैतिक असे ढोबळ मानाने सांगता येईल

आत्मस्वातंत्र्य – कार्याकार्यनिर्णयाचा निकष ठरविल्यानंतर नीतिशास्त्राला आणखी एका महत्त्वाच्या प्रश्नाचा विचार करावा लागतो तो प्रश्न म्हणजे आत्मस्वातंत्र्याचा कार्याकार्य कोणते ते समजल्यानंतर कार्य ते करण्याचे व अकार्य ते न करण्याचे स्वातंत्र्य मानवी मनाला किंवा बुद्धीला किंवा आत्म्याला म्हणजेच मानवाला आहे की नाही असा हा प्रश्न येतो ते नसेल तर सारे नीतिशास्त्रच व्यर्थ ठरेल दगडाला, धोंड्याला किंवा पशुपक्ष्यांनाही कार्याकार्याचे कसलेच स्वातंत्र्य नसते म्हणून त्यांना कोणी नीतिशास्त्राचा उपदेश करू जात नाही वीज, वाफ, उष्णता या शक्तीही जड आहेत अमके करावे, अमके करू नये, सज्जनांना रक्षावे दुर्जनांना संहारावे, अशा प्रकारचा विवेक त्यांना नसतो अर्थातच त्यांच्या कृतिस्वातंत्र्याचा प्रश्न येतच नाही पशुपक्ष्यांना अगदी अल्प प्रमाणात विवेक असतो पण, ‘विवेके क्रिया आपुली पालटावी,’ हे स्वातंत्र्य त्यांना नसते म्हणून नीति अनीतीची बंधने त्यांना नाहीत त्यांना नीतिशास्त्राचा उपयोग नाही आजपर्यंत नीति अनीतीचा उपदेश केला गेला तो मानवाला नीतिशास्त्र रचले गेले ते त्याच्यासाठी कारण त्याला सदसद्विवेक आहे व आपली क्रिया पालटण्याचे

स्वातंत्र्य आहे ती शक्ती त्याच्या ठायी आहे हे गृहीत धरलेले आहे. हे गृहीत कितपत यथार्थ आहे ते नीतिशास्त्राने नेहमीच तपासून पाहावे लागते.

कर्मविपाक – हिंदू तत्त्वज्ञानात कर्मसिद्धान्ताला फार महत्त्व दिलेले आहे. पुनर्जन्माचा सिद्धान्त यावरच आधारलेला आहे. मनुष्य जी जी कर्मे करतो, त्याची त्याची फळे त्याला भोगावीच लागतात. ती या जन्मी भोगून झाली नाहीत, तर त्यासाठी पुन्हा जन्म घ्यावा लागतो. पूर्वीच्या जन्मी मागल्या जन्मीच्या कर्मांची फळे भोगत असताना नवी कर्मे हातून घडत असतातच. त्याची फळे त्या जन्मी भोगून संपत नाहीत. त्यासाठी पुन्हा जन्म घ्यावा लागतो. यालाच कर्मचक्र किंवा जन्ममरणाचा फेरा असे म्हणतात. मनुष्याच्या मागल्या जन्मीचे कर्म त्याच्या प्रत्येक गोष्टीवर सत्ता चालविते. तो श्रीमंत होईल की गरीब, शूर की भित्रा, बुद्धिमान की मंद, सद्गुणी की दुर्गुणी, हे सर्व त्या कर्मामुळे ठरते. याचाच अर्थ असा, की मनुष्याचा आत्मा कर्माने बद्ध आहे. मनुष्य जन्मतःच श्रीमंत किंवा गरीब, बुद्धिमान किंवा मूर्ख निपजतो यावरूनच कर्मवादाचा सिद्धान्त उभारलेला आहे. मागल्या जन्मीच्या कर्माचे ते फळ असे गृहीत धरल्यावाचून या विषमतेची उपपत्ती लागत नाही. मात्र मनुष्याचा आत्मा प्रथमच या कर्मचक्रात कशामुळे सापडला याला कर्मसिद्धान्त उत्तर देत नाही. ते त्याला सांगता येत नाही. पण एकदा त्यात सापडल्यावर मात्र त्याने तो पुरा बद्ध होऊन पुन्हा पुन्हा जन्म घेतो, हे निश्चित. या कर्मबंधातून ज्ञानामुळे मोक्ष मिळतो, सुटका होते, असा कर्मवादाचा दुसरा सिद्धान्त आहे. हे ज्ञान म्हणजे भौतिक ज्ञान नव्हे. आत्मा-परमात्मा याच्या अद्वैताचे ज्ञान आणि तेही अनुभवात्मक ज्ञान होय. केवळ शाब्दिक ज्ञान नव्हे. जे द्वैत मानतात ते परमेश्वरी कृपेने मोक्ष मिळतो असे म्हणतात. ते ज्ञान किंवा ती ईशकृपा तपश्चर्या, भक्ती, इंद्रियनिग्रह यांनी प्राप्त होते. तेव्हा कर्मचक्रातून सुटण्याचा आत्म्याला हा एकमेव मार्ग उपलब्ध आहे.

पण यावर शंका अशी येते, की तपश्चर्या करावी, भक्ती करावी हे तरी स्वातंत्र्य मनुष्याला आहे काय? 'बुद्धिः कर्मानुसारिणी' असा आणखी एक सिद्धान्त आहे. मनुष्याला भक्ती करण्याची बुद्धी होणे न होणे हे सुद्धा त्याच्या हाती नाही. मागल्या कर्मावर ते अवलंबून आहे. या सिद्धान्तामुळे कोंडी निर्माण होते. मागल्या कर्मामुळे तपाची बुद्धी होणार नाही व तपाशिवाय ज्ञान नाही. म्हणजे आत्मा पूर्ण परतंत्र ठरतो व नीतिशास्त्राच्या उपदेशाचा त्याला काही उपयोग नाही, असा अनवस्था प्रसंग येतो. पण वेदान्त शास्त्र सांगते, की आत्मा कर्मांनी बद्ध असला, तरी तो मुळात चिद्रूप ब्रह्माचा अंश असल्यामुळे तो स्वतः त्या ठिकाणी तपश्चर्येला अनुकूल अशी प्रवृत्ती निर्माण करू शकतो. यालाच आत्म्याचे प्रवृत्तिस्वातंत्र्य असे म्हणतात. आत्मा मूळचा निर्गुण व अकर्ता असताना मनुष्याच्या मनात काही प्रवृत्ती निर्माण करण्याचा गुण त्याच्या ठायी असणे शक्य नाही, असा यावर आक्षेप येईल. तत्त्वतः तो आक्षेप खरा आहे. पण व्यावहारिक दृष्ट्या नाशवंत देहात कोंडल्यानंतर आत्म्याकडून तसे स्फुरण मिळते असा अनुभव आहे. म्हणून त्याला स्वातंत्र्य असले पाहिजे, असे वेदान्ती मानतात. एवंच हिंदू तत्त्वज्ञानात असे हे आत्मस्वातंत्र्य मान्य केलेले आहे.

पाश्चात्त्य नियतिवाद – गेल्या शतकात डार्विनच्या विकासवादाने जुन्या कर्मवादासारखाच सिद्धान्त मांडला होता. जड सृष्टीच्या पलिकडे काही चेतन सृष्टी आहे, आत्मसृष्टी आहे हे हेगेलसारख्या पंडितांना मान्य नाही. जड सृष्टीचे नियमही दुर्लंघ्य आहेत. तेव्हा मनुष्य स्वतःच्या कर्मांनी नव्हे, तर पूर्वजांच्या कर्मांनी व गुणावगुणांनी बद्ध असतो व त्याला कसलेच स्वातंत्र्य नसते, असेच सिद्ध होते.

याच्या जोडीला आनुवंशवादी व फ्रॉइडसारखे कामप्रेरणावादी लोक पूर्वजांच्या रक्तातील वारशाने व मनुष्याच्या अंतर्मनावर जन्मापासून झालेल्या संस्कारामुळे तो बद्ध असतो, त्याला स्वातंत्र्य असे फार थोडे असते असे म्हणतात आणि मनुष्याला जास्तच बद्ध करून टाकतात. पण गेल्या पंधरा साठ वर्षांत याविषयी फार मतभेद निर्माण झाले आहेत. 'डिटरमिनिझम अँड फ्रीडम इन दि एज ऑफ मॉडर्न सायन्स' या नावाचा एक ग्रंथ १९६१ साली प्रसिद्ध झाला आहे. न्यूयार्क विद्यापीठाचे प्रा. सिडने हूक त्याचे संपादक आहेत. त्या विद्यापीठात या विषयावर जगातल्या अनेक विद्यापीठांतील तत्त्ववेत्त्यांचा एक परिसंवाद १९५७ साली झाला होता. त्याचे सर्व वृत्त या ग्रंथात आहे. त्यावरून या विषयावर अद्यतन मत काय आहे, ते कळून येते.

मिल व स्पेन्सर हे विकासवादी होते. पण तरी ते मानवाचे अल्पसे स्वातंत्र्य मान्य करीत. विल्यम जेम्स याने त्यांचा 'मवाळ नियतिवादी' (सॉफ्ट डिटरमिनिस्ट) म्हणून उपहास केला आहे. तो म्हणतो जुने लोक धीट होते. नियती म्हणजे नियती, असे सांगायला ते भीत नसत. पण हे नवे नियतिवादी आपल्या मताची जबाबदारी टाळू पाहतात आणि धरसोड करतात. पण पॉल एडवर्ड्स हा पंडित म्हणतो, की विल्यम जेम्सला या विकासवादी पंडितांचे सिद्धान्त नीटसे समजलेच नाहीत. ब्रूकलिन कॉलेजचे प्राध्यापक जॉन हास्पर्स हे नियतिवादी आहेत. मनुष्याने हेतुपूर्वक, बुद्धिपुरस्सर, योजून केलेल्या कृतीच्या मागेसुद्धा अंतर्मनावरील पूर्वसंस्काराचे नियंत्रण असते,

तो त्यानी बद्ध असतो, असे ते म्हणतात पण गोष्ट अशी, की हा नियतिवाद नीतिशिक्षणाला किंवा मनुष्याला त्याच्या कृती बद्दल जबाबदार धरण्यास प्रतिकूल नाही. जरीही ते म्हणतात येल विद्यापीठाचे ब्रँड ब्लॅनशार्ड हे ही नियतिवादी आहेत पण मनुष्याला प्रतिस्वातंत्र्य आहे हे त्याना मान्य आहे

विकासवाद हा जड सृष्टीच्या नियमावर म्हणजे विज्ञानावर अवलबून आहे पदार्थधर्मांच्या शृंखलाना मनुष्य बद्ध आहे, असे विकासवादाचे म्हणणे पण आज जड सृष्टी ही कार्यकारणाच्या नियमानी बद्ध आहे हेच मत ढासळू पाहत आहे हे मबग, एडिंग्टन, जीन्स, इ शास्त्रज्ञ सागत आहेत, की अणूचे विभजन करून त्यातील इलेक्ट्रॉन–प्रोटॉन पाहिले, की त्याना कार्य कारणाचा नियम लागू नाही, असे दिसून येते यामुळे नियतिवादाचा वैज्ञानिक पायाच ढासळला आहे असे कोणी म्हणतात पण रसेल, प्लँक व आइन्स्टाइन या शास्त्रज्ञाना त्या पहिल्या शास्त्रज्ञाचे मत मान्य नाही जड सृष्टी कार्यकारणाच्या कैचीतून सुटली आहे, असे त्याना वाटत नाही अशा रीतीने पाहता आज मार्क्स, फ्राइड, डार्विन याच्या आधारे एक पक्ष नियतिवाद माडीत आहे, तर अर्वाचीन मानसशास्त्र व आइन्स्टाइनसारखे शास्त्रज्ञ याच्या आधारे दुसरा पक्ष त्याला विरोध करीत आहे

पण हिंदू तत्त्वज्ञानातील कर्मसिद्धात व अर्वाचीन पंडिताचा नियतिवाद किंवा स्वातंत्र्यवाद पाहता एक गोष्ट स्पष्ट दिसते, की या सर्वांच्या मागे कल्पनेशिवाय कसलाही आधार नाही पुरावा कोणाजवळही नाही पूर्वज मीच्या कर्मानी आत्मा बद्ध आहे हा आपला एक युक्तिवाद आहे आणि त्यालाही प्रथम जीव कर्मचक्रात का सापडला, हे सागता येत नाही शिवाय निर्गुण आत्म्याच्या ठायी प्रेरणा देण्याचा गुण असतो, असे त्याला केवळ व्यावहारिक दृष्ट्या मानावे लागते अर्वाचीन शास्त्रज्ञाचेही तेच आहे सृष्टिघटनाच्या विषयीच्या त्याच्या सिद्धान्ताना भरपूर पुरावा असतो पण त्या आधारे ते मानवाचे दास्य किंवा स्वातंत्र्य या विषयी बोलू लागले, की अनुमान म्हणण्याइतक्या प्रतिष्ठेचसुद्धा विचार ते माडू शकत नाहीत प्रत्येकजण आपा पली कल्पना स्वाधीन असतो वर उल्लेखिलेल्या 'डिटर्मिनिझम अँड फ्रीडम' या पुस्तकात पानोपानी हेच दिसून येते हा असे मानतो व तो तसे मानतो एवढेच !

इतिहासप्रमाण – पण नीतिशास्त्राला यामुळे चिंता करण्याचे कारण आहे, असे वाटत नाही कारण मानवाला उपदेश कर ण्याला काही अर्थ आहे की नाही, हा जो त्याच्यापुढे प्रश्न आहे, त्याचे निश्चित उत्तर 'आहे' असे आहे आणि त्याला अनु भवाचा व इतिहासाचा भरभक्कम आधार आहे गेल्या शतकात पाश्चात्त्य विद्या या देशात आल्यानतर राजा राममोहन राय, रानडे, टिळक, इ भारताच्या पुढाऱ्यानी सर्व धार्मिक, सामा जिक राजकीय, आर्थिक प्रश्नावर नवे विचार सिद्ध करून त्याचा भारतीय समाजाला उपदेश केला व त्या समाजाने तो स्वीकारून आपुल्या क्रिया विचाराने पालटली ती इतकी, की दीडशे वर्षांपूर्वीचा भारत हाच काय, असा सदेह पडावा जपान मध्ये हेच झाले मार्क्सवाद समाजवाद या तत्त्वज्ञानानी युरोप अगदीच आमूलाग्र पालटून गेला आहे तेव्हा साधुसत, तत्त्ववेत्ते, अर्थवेत्ते राजकारणी, समाजशास्त्रज्ञ, मानसशास्त्रज्ञ याचा उपदेश ऐकून त्याप्रमाणे आचरण करण्याचे किंवा न करण्याचे स्वातंत्र्य मानवाला आहे याबद्दल सन्देह धरण्यास अवकाशच नाही तसे स्वातंत्र्य असल्याचा इतिहासाने पानोपानी निर्वाळा दिला आहे अर्थशास्त्राच्या आधाराने मार्क्सने केलेला सर्व भविष्ये रापशेल चुकला हे मानवाला स्वातंत्र्य असल्याचेच द्योतक आहे नियतिवाद व भविष्यनिश्चिती ही अविभाज्य आहेत मानव जर कर्म जय, सृष्टी, अतर्मन याचा दास असेल, तर समाजाचे भविष्य निश्चित सागता आले पाहिजे तसे अजून कोणालाही सागता आलेले नाही त्यावरून मानव हा या बाह्य शक्तीचा दास आहे, असे म्हणता येत नाही तो स्वत च स्वत चा शत्रु किंवा मित्र असतो हेच खरे याचेच नाव आत्म स्वातंत्र्य

**हिंदूचे नीतिशास्त्र** – नीतिशास्त्राचे हे सर्वसामान्य विवेचन झाल्यानतर आता हिंदूच्या नीतिशास्त्राचे स्वरूप पाहायचे आहे

हिंदू धर्मशास्त्राने नीतिनियमाना पराकाष्ठेचे महत्त्व दिलेले असून वेद, उपनिषद, रामायण, महाभारत, स्मृती, पुराणे यात अत्यत थोर व उदात्त अशी नीतितत्त्वे सागितलेली आढळतात प्राचीन शास्त्रकाराच्या मते धर्म व नीती याचे अद्वैतच आहे आणि धर्माने सागितलेला कोणताही पुरुषार्थ नीतीच्या परि पालनाखेरीज साध्य होणार नाही, असा त्याचा सिद्धान्त आहे सत्य, अहिंसा, दया, क्षमा, परोपकार, दान, मनोनिग्रह हेच सर्व धर्माचे सार आहे, असे वरील ग्रथात वारवार सागितलेले आहे भारताला प्राचीन काळी अत्यत मोठे वैभव आणि ऐश्वर्य जीव नाच्या सर्व क्षेत्रात प्राप्त झाले होते, ते या परमोदात्त नीति तत्त्वाच्या आचरणामुळेच होय, यात शका नाही व्यास वाल्मिकीसारखे महाकवी, राम-कृष्णासारखे अवतारी पुरुष, सीता सावित्रीसारख्या महापतिव्रता, जनक, रघू पृथू पुरू, बळी यासारखे थोर राजर्षी, ध्रुव प्रल्हाद यासारखे भगवद् भक्त, कपिल, पतजली यासारखे तत्त्ववेत्ते, बुद्ध, महावीर यासारखे धर्मसंस्थापक, याची चरित्रे म्हणजे प्राचीन भारता तील नीतीचे आदर्शच होत या महापुरुषाचे पथ निराळे

असतील, तत्त्वज्ञान निराळे असेल, त्याच्यात मतभेद असतील, क्वचित संघर्षही असतील, पण त्याचे नैतिक आचरण गंगाजलाप्रमाणे पवित्र असून, ते भारताला कायमचे ललामभूत होऊन राहतील यात शंका नाही.

मोक्ष – हिंदू समाजातील कोणताही पंथ असो, मोक्ष हेच मानवाचे अंतिम प्राप्तव्य होय, असेच त्याने सांगितलेले आहे. संसारातून, जन्ममरणाच्या फेऱ्यातून मुक्तता याचे नाव मोक्ष. मागे एके ठिकाणी सांगितल्याप्रमाणे कर्मांनी माणूस बद्ध झालेला असतो आणि त्यामुळेच त्याला पुनःपुन्हा जन्म घ्यावे लागतात. या बंधनातून मनुष्य परमार्थज्ञानामुळे किंवा परमेश्वरी कृपेमुळे मुक्त होतो. ते ज्ञान वा ती कृपा बौद्धिक ज्ञानाने किंवा तर्काने किंवा कर्मकांडातील आचारांनी प्राप्त होत नाही. त्यासाठी योगाभ्यास, तपश्चर्या, मनोनिग्रह, वासनाजय व वैराग्य यांची आवश्यकता असते आणि योगाभ्यास, वासनाजय हाच सर्व नीतीचा पाया आहे. चित्तवृत्तीचा निरोध हीच मुळी योग शब्दाची व्याख्या आहे. हा निरोध अभ्यासाने व वैराग्याने साध्य होतो, असे योगदर्शनात प्रारंभीच सांगितले आहे.

**इंद्रियाण्येव संयम्य तपो भवति नान्यथा ।**

(म. भा. वन २११.१८)

अर्थ – इंद्रियांचे संयमन केल्यानेच तप घडते, अन्यथा नाही.

**इंद्रियाण्येव तत्सर्वं यत्स्वर्गनरकावुभौ ।**
**निगृहीतविसृष्टानि स्वर्गाय नरकाय च ।।**

(म. भा. वन २११.१९)

अर्थ – स्वर्ग व नरक म्हणून जे काही आहे, ते सर्व इंद्रियेच होत. कारण इंद्रिये आवरून धरल्याने ती स्वर्गाला आणि मोकळी सोडल्याने नरकाला कारण होत असतात.

**इंद्रियाणां प्रसङ्गेन दोषमृच्छत्यसंशयम् ।**
**संनियम्य तु तान्येव सिद्धिमाप्नोति मानवः ।।**

(म. भा. शांति ३२३.८)

अर्थ – मनुष्य इंद्रियांच्या नादी लागला, म्हणजे त्याच्या हातून निःसंशय पापाचरण घडते. पण तीच ताब्यात ठेवल्याने त्याला सिद्धी किंवा मोक्ष मिळतो.

या वचनांवरून हिंदू धर्मशास्त्रात इंद्रियनिग्रह व वासनाजय यांना किती महत्त्व आहे, हे ध्यानी येईल.

मनुष्यसमाज हा रानटी अवस्थेतून विकसित होत आला असून, दीर्घकालाने धर्म व नीती यांच्या आश्रयाने तो सुसंस्कृत बनला, हे वर सांगितलेच आहे. हिंदू समाजही कोणे एके काळी प्राथमिक रानटी अवस्थेत असला पाहिजे, हे उघड आहे. पण त्याच्या ज्ञात इतिहासाच्या प्रारंभकाळापासून मात्र तो आपल्याला संस्कृतीच्या उच्च पातळीवर आरूढ झालेला दिसतो. या समाजाचा प्रारंभीचा इतिहास त्याच्या वेदग्रंथांतून उपलब्ध होतो. तेथपासून नीतीची कोणती तत्त्वे या समाजाने स्वीकारली व आचरली, ते आता क्रमाने पाहू.

वेदग्रंथ – त्या अत्यंत प्राचीन काळीसुद्धा कुटुंब आणि राष्ट्र या संस्था नीतिनियमांनी बद्ध असल्यावाचून टिकणार नाहीत, हे ध्यानी घेऊन उपदेश केलेला आढळतो.

**अनुव्रतः पितुः पुत्रो मात्रा भवतु संमनाः ।**
**जाया पत्ये मधुमतीं वाचं वदतु शन्तिवाम् ।।**
**मा भ्राता भ्रातरं द्विक्षन् मा स्वसारमुत स्वसा ।**
**सम्यञ्चः सव्रता भूत्वा वाचं वदत भद्रया ।।**

(अथर्व. ३.३०.२–३)

अर्थ – पुत्राने पित्याच्या व्रताचे पालन करावे आणि मातेची आज्ञा पाळावी. पत्नीने पतीशी मृदू व मधुर वाणीने बोलावे. भावाने भावाचा, तसेच बहिणीने बहिणीचा द्वेष करू नये. एकमेकांविषयी प्रेम धरून आणि समान व्रत धारण करून भद्र वाणीने बोलावे.

या वचनांवरून मातृभक्ती, पितृभक्ती व पातिव्रत्य हा कुटुंबसंस्थेचा पाया होय, हे त्यांनी जाणले होते, असे दिसून येईल. समाजाच्या दृढीकरणासाठी सत्कार्य, संघटना, समता यांचा उपदेश वैदिक ऋषींनी सतत केलेला आहे.

**संगच्छध्वं संवदध्वं सं वो मनांसि जानताम् ।**

(ऋ. १०.१९१.२)

अर्थ – तुम्ही मिळून चला, एकसाथ होऊन स्तोत्र म्हणा. तुमची मने एकरूप होवोत.

**समानी व आकूतिः समाना हृदयानि वः ।**

(ऋ. १०.१९१.४)

अर्थ – तुमचा अध्यवसाय (निश्चय) एक असू दे. तुमची हृदयेही एक असू देत.

**सहनाववतु । सह नौ भुनक्तु । सह वीर्यं करवावहै ।।**

(कठ. १.१)

अर्थ – परमात्मा आम्हा दोघांचे रक्षण करो. आम्हा दोघांचे पालन करो. आम्ही दोघांनी एकाच वेळी सामर्थ्य संपादन करावे.

अशा अर्थाची अनेक वचने वेदवाङ्मयात आढळतात. कुटुंब, स्वसमाज व स्वराष्ट्र यांवरून पलिकडे दृष्टी फेकून अखिल मानवांशीही आपण प्रेमाने वागावे, सर्व भूतांशी मैत्री करावी, असा अत्यंत विशाल व उदार मनोभावही ऋषींनी प्रकट केलेला आहे. सर्व प्राणिमात्राकडे मी मित्रभावानेच पाहतो व सर्व अपवित्र विचार माझ्या मनातून नष्ट होवोत, आमच्या मनात कोणाबद्दलही शत्रुभाव नसो, थोर असो, हीन असो, मात्र

त्याच्यावर प्रेम असो, अशी वैदिक ऋषी नित्य प्रार्थना करीत
कुटुंब व राष्ट्र या संस्था अखंड राहून सर्व समाजाचे कल्याण व्हायचे, तर त्यासाठी प्रेम, सहकार्य, संघटना, समता यांबरोबरच सत्य, चारित्र्य, दान व मनोनिग्रह यांची आवश्यकता आहे हे जाणून त्यांनी या गुणांची महती गायिली आहे–

**प्राणो ह सत्यवादिनमुत्तमे लोक आ दधत्**

( अथर्व ११ ४ ११ )

अर्थ–सत्य बोलणाऱ्या पुरुषाला प्राणाने उत्तम लोकात ठेवले

**सा मा सत्योक्ति परि पातु विश्वत ।**

( ऋ १० ३७ २ )

अर्थ–ती सत्य वाणी माझे सर्व बाजूनी रक्षण करो

'हे अग्ने, असत्याचा त्याग करून सत्याचा आश्रय करण्याची मला शक्ती दे ' दान हे दाता व स्वीकारणारा या दोघानाही धन्य करते ' 'श्रीमंतानी गरीबाना अन्नदान करावे ' 'धन हे चक्र नेमिक्रमाने आज एकाजवळ तर उद्या दुसऱ्याजवळ जाते ' 'हे अग्ने, आम्हाला सन्मार्ग दाखव ' 'अग्ने, दुर्बुद्धी, दारिद्र्य, दौर्बल्य, मत्सर, द्वेष, इ दुर्गुणाचा नाश कर ' 'शापाला प्रतिशाप देऊ नका आघाताला प्रत्याघात नका आघात व शाप याना प्रेमानेच उत्तर द्या या वचनावरून जगातल्या सर्व धर्मांनी पुढील काळात प्रतिपादलेली थोर नीतितत्त्वे अत्यंत प्राचीन काळी वैदिक ऋषींनी प्रदिपादली होती आणि आचरली होती, याविषयी संदेह राहणार नाही

उपनिषदे – उपनिषदे म्हणजे अशा नीतिसूत्रांची खाणच आहे त्यातील सर्व वचने इथे देणे शक्य नाही तैत्तिरीय उपनिषदात विद्या पूर्ण करून घरी परत जाणाऱ्या विद्यार्थ्यांना गुरूनी जो उपदेश केला आहे, तो असा ' सत्य वद । धर्म चर । स्वाध्यायान्मा प्रमद ' = खरे बोल, धर्माचे आचरण कर स्वाध्याय चुकू नको '

'समाजाचे कुशल राहण्यासाठी जे अवश्य कर्तव्य, त्यापासून च्युत होऊ नका संपत्तीचा गर्व धरू नका देव आणि ऋषी यांची सेवा करा मातृदेवो भव, पितृदेवो भव, आचार्यदेवो भव, अतिथिदेवो भव अनिंद्य व पुण्यकारक अशीच कर्मे करा इतर त्याज्य माना आमच्या सदाचाराचेच अनुकरण करा इतर आचाराचे नको दान श्रद्धेने, प्रेमाने, सहानुभूतीने द्यावे, विपुल द्याव अशी आज्ञा आहे, असा उपदेश आहे ' यात सर्व नीतितत्त्वाचे सार आले आहे

कठोपनिषदात पुढील नीतिवचन आहे 'प्रेयाचा मार्ग इंद्रिय सुखाचा आहे श्रेयाचा मार्ग कठीण आहे धीर पुरुष प्रेय टाकून श्रेयाचा मार्ग अनुसरतात ' 'हा मार्ग वस्तऱ्याच्या धारेइतका दुर्गम आहे तरी तोच अनुसरावा, असे पंडित सांगतात '

मनुयाज्ञवल्क्यादी स्मृती, रामायण व महाभारत या ग्रंथात अनेक प्रसंगानी नीतीचा असाच उपदेश केला आहे मनूच्या पुढील श्लोकावरून श्रुतिनिर्दिष्ट मार्गानेच ते तत्त्ववेत्ते जात होते, हे कळून येईल–

**धृति क्षमा दमो ऽस्तेयं शौचमिंद्रियनिग्रह ।**
**धीर्विद्या सत्यमक्रोधो दशकं धर्मलक्षणम् ॥**

( मनु ६ ९२ )

अर्थ – धैर्य, क्षमा, मनोनिग्रह अनपहार, पावित्र्य, इंद्रियनिग्रह, शुद्ध बुद्धी, विद्या, सत्य आणि अक्रोध ही धर्माची दहा लक्षणे होत

वर जी नीतीची म्हणून लक्षणे सांगितली, तीच मनूने धर्माची लक्षणे म्हणूनही सांगितली आहेत त्याच्या मनातील धर्म व नीती यांच अद्वैत यावरून स्पष्ट होईल

**औदार्याचा लोप**–हिंदूची नीतिनिरत्न अशी अत्यंत उदात्त असल्यामुळे व ती आचरणात आणली जात असल्यामुळे प्राचीन काळी या देशाला ज्ञान, विद्या कला व्यवसाय सुखसमृद्धी, वैभव, ऐश्वर्य यांचा विपुल लाभ झाला होता, हे वर सांगितले आहे पण उत्तर काळामध्ये, म्हणजे साधारण इ स च्या दहाव्या शतकापासून ही उदात्त तत्त्वे ग्रंथातच राहिली आणि या देशातील कर्तृत्वाचा लोप होऊन हळूहळू त्याचा ऱ्हास होऊ लागला उदात्त नीतितत्त्वे जशीच्या तशी बहुधा प्रत्यक्षात कधी येत नाहीतच पण भारतामध्ये या उदात्तपणाला तात्त्विक रीत्याच मुरड घातली गेली मनाचा विशालपणा धर्मशास्त्रांनीच नष्ट करण्यात आला यामुळे भारताचा 'न भूतो' असा अधःपात झाला

विषमता – उदार नीतितत्त्वाचा संकोच करणारी ही धर्मतत्त्वे म्हणजे वर्णव्यवस्था, जातिभेद, अस्पृश्यता, स्त्रीविषयक अनुदारता, निवृत्ती आणि कर्मकांड ही होत प्राचीन काळी भारतात वर्णभेद नसून वर्गभेद होता, असे पंडिताचे मत आहे पुढे वर्ण जन्मावरून ठरू लागले व त्यातूनच हजारो जाती निर्माण झाल्या व त्याच क्रमातून अस्पृश्यताही निर्माण झाली आणि मग प्रारंभी उदार असलेली हिंदू नीती अनुदार बनत चालली सर्व मानवजातीच्या मैत्रीची, बंधुतेची, समतेची भाषा बोलणारी हिंदू नीती स्त्रिया, शूद्र व अस्पृश्य यांच्या संबंधात क्रूराहून क्रूर, निष्ठुर व निर्दय बनली शूद्राच्या उत्कर्षांना मार्ग तिने खुटविला व अस्पृश्याना तर माणुसकीतून उठविले दया, माया याना जातिबंधने पडली अस्पृश्याचे वाळवंटात तडफडणारे पोर उचलून घेणारे वास्तविक हजारो असावे प्रत्यक्षाचेच ते नैतिक कर्तव्य होय असा धर्म असावा पण तसे करणारे एखा-

देच एकनाथ या भूमीत निंद्य मानले जाऊ लागले आणि त्यांच्या ठायी दैवी शक्ती होती म्हणून त्यांनी तसे केले आपण तसे करू नये, तो अधर्मच होय, असे धर्मज्ञ सांगू लागले अशा रीतीने दया, क्षमा हा पूर्वी धर्म होता, तो आता अधर्म झाला 'दया करणे जे पुत्रासी तेचि दासा आणि दासी' असे संत सांगत पण हे सर्व औदार्य जातिभेद व अस्पृश्यता यांनी सीमित झाले होते त्यांच्या बाबतीत निर्दयपणा, निष्ठुरपणा हीच नीती ठरली शूद्र व अस्पृश्य यांच्याबरोबर स्त्रीच्या बाबतीतही समाज असाच हळूहळू क्रूर व नीतिशून्य होऊ लागला एकंदर स्त्रीजातीलाच त्याने शूद्र ठरवून टाकले त्यामुळे तिच्यावर किती बंधने घालावी, तिची किती निंदा करावी, अवमान करावा याला तारतम्यच राहिला नाही विधवा स्त्रीपेक्षा जास्त दयनीय व्यक्ती कोणी नसेल पण तिच्या बाबतीत समाज सैतानापेक्षाही जास्त क्रूर झाला आणि तिचे जीवन त्याने नरकापेक्षाही जास्त दुःसह करून टाकले प्राचीन काळचे सर्वभूतहित हे नीतितत्त्व ग्रंथात अजून तसेच मिरवत होते, पण प्रत्यक्षात ते अभावानेच दिसत होते

निवृत्ती – निवृत्ती या दुसऱ्या धर्मतत्त्वाने हिंदू समाजाची नीतिमत्ता अशीच ह्रास पावू लागली पूर्वी धर्म प्रवृत्तिपर होता आणि प्रत्येक व्यक्ती समाजाची ऋणी आहे, हे नीतितत्त्व प्रभावी होते देवऋण, पितृऋण व ऋषिऋण ही तीन ऋणे प्रत्येकाने फेडलीच पाहिजेत, असे बंधन होते निवृत्तिवादाने धर्म, अर्थ व काम या पुरुषार्थांचे महत्त्व नाहीसे झाले व त्याबरोबरच ते बंधन नष्ट झाले आणि हा समाज मोक्षाकडे डोळे लावून बसू लागला हा संसार, त्यातील स्त्रीपुत्र, धनवैभव, विद्याकला या सर्वांची निवृत्तिमार्गाने इतकी निंदा केली, की त्याविषयीच्या कर्तव्यभावनेचा लोप झाला आणि हिंदू समाज व्यक्तिधर्मी बनला स्वतःच्या स्त्रीपुत्रांचेसुद्धा आपण काही लागत नाही, असे मानणारा मनुष्य जातीचे, वर्णाचे, एकंदर समाजाचे किंवा मानव्याचे ऋण कितपत मानील, हे दिसतेच आहे कोणताही मानवसमूह हा समाज होतो, तो परस्परांतील दृढ सहानुभूतीमुळे, परस्परांविषयीच्या कर्तव्यबुद्धीमुळे, दया, प्रेमादी भावनामुळे, म्हणजेच नीतिबंधनामुळे होय पण जो समाज वैयक्तिक धर्मापलिकडे काही जाणीनासा झाला, त्या समाजात काही नीती आहे असे म्हणणे कठिण आहे मागे सांगितलेच आहे की रानटी अवस्थेतही नीतिबंधने निर्माण होतातच कारण त्यावाचून जमाती जगूच शकणार नाहीत तेव्हा सामाजिकता, समाजबुद्धी हाच नीतीचा पाया आहे ती समाजबुद्धीच जिथे लोपली तिथे नीती कशी राहणार आणि भूतांच्या प्रभवार्थ, लोकयात्रार्थ, धारणार्थ, ज्या धर्माचा जन्म तो धर्म तरी कसा जगणार ! त्यामुळे हिंदू समाजाची फार हानी झाली

कर्मस्वातंत्र्यलोप –– निवृत्तिवादामुळे समाजाच्या आत्मस्वातंत्र्याचा व कर्मस्वातंत्र्याच्या भावनेचाही लोप होतो कारण जगाची दुःखमयता, धनवैभवाची असारता, क्षणभंगुरता ही निवृत्तिवाद मनावर इतकी ठसवितो की त्यातून दैववाद निर्माण होणे अपरिहार्यच असते धर्मार्थकामांसाठी मनुष्याने कधीही प्रयत्न करू नयेत, कारण ते दैवाने प्राप्त होतात व दैवानेच लुप्त होतात, असा भागवत पुराणाचा सिद्धान्त आहे या दैववादाचा प्रभाव हिंदू समाजावर हळूहळू वाढत वाढत गेला आणि कर्माने मनुष्य बद्ध आहे, याचा, त्याला कसलेही स्वातंत्र्य नाही, असा अर्थ होऊन हा समाज लुळापांगळा होऊन गेला मोक्ष, भक्ती, संन्यास या बाबतीत मनुष्याला स्वातंत्र्य आहे एवढे त्या वेळी मान्य होते त्यामुळे त्या बाबतीतच फक्त उपदेश करण्याला अर्थ उरला होता इतर बाबतीत कर्मस्वातंत्र्य नाही, मग उपदेशातही तात्पर्य नाही, असे तत्त्व रूढ झाले त्यामुळे ग ग च्या दहाव्या शतकानंतर राजनीती, स्वातंत्र्य, विज्ञान, विद्या, कला याविषयीचे साहित्य भारतात निर्माणच झाले नाही राजकीय संघटना, व्यापार, भौतिक शास्त्रे, या विषयी कोणी लिहिलेच नाही, कारण एकतर ते पुरुषार्थ निंद्य ठरले होते आणि त्या बाबतीत मानवाच्या हाती काही नव्हते त्याला कर्मस्वातंत्र्यच नव्हते निवृत्तिवादाने आत्मस्वातंत्र्य हा जो नीतीचा पाया तोच मुळी अशा रीतीने निखळून टाकला

नवी नीती – गेल्या शतकात पाश्चात्त्य विद्येचे या भूमीत आगमन झाले आणि मग राममोहन, रानडे, आगरकर, टिळक, विवेकानंद, दयानंद सरस्वती, महात्माजी, यांसारखे थोर धर्मवेत्ते ऋषी पुन्हा इथे अवतीर्ण झाले आणि त्यांनी वर्णभेद, जातिभेद, अस्पृश्यता, स्त्रीविषयक अनुदारता, निवृत्तिवाद, दैववाद, वैयक्तिक धर्म या सर्व सामाजिक नीतीला घातक असलेल्या तत्त्वांचा निषेध करून नवी सामाजिक नीती प्रस्थापित केली त्यामुळेच हिंदू समाज पुन्हा समाज या पदवीला पात्र होऊन त्याचे लोपलेले कर्तृत्व पुन्हा उदयास आले

नीतीचा महिमा हा असा आहे अत्यंत रानटी अवस्थेतल्या जमातीसुद्धा शिस्त, आज्ञापालन, बंधुभाव, न्यायबुद्धी, सत्य, सहकार्य, संघटना, चारित्र्य, यांवाचून जगू शकत नाहीत मग ज्यांना अनेक जमाती एकजीव करून राष्ट्र निर्माण करायचे आहे, ते बलशाली व ऐश्वर्यसंपन्न करायचे आहे आणि अंती अखिल मानवता एकरूप करायची आहे, त्यांना नवीन नीतिनियमांची अनन्य उपासना केली पाहिजे, याविषयी दुमत होणार नाही या कर्तव्याची जाणीव होणे, हेच नीतिशास्त्राच्या अभ्यासाचे फल आहे [ डॉ पु ग सहस्रबुद्धे ]

**नीपातिथी** एक सूक्तद्रष्टा ऋग्वेदाच्या आठव्या मंडलातील चौतिसावे सूक्त याने रचले असले, तरी संबंध सूक्तात त्याच्या नावाचा कुठेही उल्लेख नाही हा कण्व कुलातील असावा याच सूक्ताच्या पहिल्या व चौथ्या ऋचेत कण्वाचा उल्लेख आहे इंद्रस्तुती हा या सूक्ताचा विषय आहे यातील दोन ऋचा अशा–

**आ नो गव्यान्यश्व्या सहस्रा शूर दर्दृहि ।**
**दिवो अमुष्य शासतो दिवं यय दिवावसो ।।**
**आ नः सहस्रशो भरायुतानि शतानि च ।**
**दिवो अमुष्य शासतो दिवं यय दिवावसो ।।**
(ऋ ८ ३४ १४–१५)

अर्थ – (हे इंद्रा) इकडे ये हजारो गोधने हजारो अश्व अशा प्रकारचे ऐश्वर्य आमच्या स्वाधीन कर (आणि) नंतर दिव्य लोकी गमन कर शेकडो हजारोच काय, पण असंख्य वरदाने आमच्यासाठी आण (आणि नंतर) दिव्यलोकी गमन कर

इंद्राने एकदा याचे संरक्षण केल्याचा दाखला प्रस्कण्वाने दिला आहे (८ ४९ ९) दुसऱ्या एका ठिकाणी श्रुष्टिगृने याच्या घरी इंद्राने सोमरस प्राशन केल्याचा उल्लेख केला आहे (८ ५१ १) याने एक सामही रचले असल्याचे पंचविंश ब्राह्मणात म्हटले आहे (१४ १० ८) [प्रा च को , म ज्ञा को –प्रस्तावना खंड, उद्धव जग ]

**नीया** मुसलमानी धर्मातील एक संज्ञा नीया म्हणजे संकल्प होय उपवास, प्रार्थना किंवा यात्रा सुरू करण्यापूर्वी संकल्प करून मंत्र म्हणणे आवश्यक असते, असे मुसलमान मानतात या संकल्पानंतर सुरू केलेला विधी परमेश्वराने स्वीकारण्यास योग्य होतो, अशी त्यांची श्रद्धा आहे [ डि इ ]

**नीराजन द्वादशी** एक तिथिव्रत कार्तिक शुद्ध द्वादशीच्या रात्री विष्णू चार महिन्यांच्या झोपेतून जागा होतो, अशी कथा आहे म्हणून त्या दिवशी या व्रताला प्रारंभ करतात हे व्रत पाच दिवस चालते त्या वेळी विष्णू, शिव सूर्य, गौरी इ देवतांना आणि त्याचप्रमाणे आईबाप, गायी घोडे, हत्ती यांना निरांजनाने ओवाळतात त्या दिवशी राजाने आपल्या राजवाड्यात सत्तेच्या व सामर्थ्याच्या सर्व प्रतीकांची पूजा करायची असते त्यानंतर पतिव्रता स्त्री किंवा एखादी वेश्या राजाला तीनदा ओवाळते हे व्रत म्हणजे एक प्रकारची शांतीच आहे अजापाल नामक राजाने हे व्रत प्रथम केले, अशी कथा आहे फल – रोगनिवारण व समृद्धी प्रत्येक वर्षी हे व्रत करावे असे सांगितले आहे [ हि ध ]

**नीराजना** एक शांतिकर्म प्राचीन काळी राजे स्वारीवर निघण्यापूर्वी हत्ती घोडे ध्वज व सेना यांना ओवाळीत असत या ओवाळण्याला नीराजना असे नाव होते हा विधी फार पुरातन असून अग्नी पुराणात (२६ ८ २१) व नषधीयचरितात त्याचे वर्णन आहे कौटिल्याच्या अर्थशास्त्रात (२ ३०–३२) हा विधी आश्विन शुद्ध नवमीला करावा आणि स्वारीवर जाण्यापूर्वी व नंतरही करावा, असे सांगितले आहे कालिका पुराणात हा विधि दिला आहे, तो असा–

आश्विन शु तृतीयेपासून सात दिवस एका सुंदर व तोरणवान घोड्याची गंधपुष्पादिकांनी पूजा करावी आणि दशमीला त्याला यज्ञमंडपात आणावे त्या वेळी तो ज्या हालचाली करील, त्यांवरून बाह्य शुभाशुभ गोष्टी ठरवलेल्या आहेत घोडा जर पळाला, तर शत्रुराष्ट्राचा उच्छेद होईल त्याने अश्रू ढाळले, तर राजपुत्राचा मृत्यू होईल, त्याला नेत असता जर तो आड येऊ लागला तर राणीचे मरण ओढवेल ज्या दिशेकडे तोंड करून तो तोंड व नाक यातून आवाज काढील त्या दिशेकडच्या शत्रूवर राजाला जय मिळेल, अशा प्रकारचे हे संकेत आहेत

दशमीला शक्य न झाल्यास द्वादशीला किंवा तेही न जमल्यास कार्तिक पौर्णिमेला हा नीराजनाविधी करावा, असे सांगितलेले आहे

पूर्वी या विधीसाठी राजे त्यांच्या शहराच्या ईशान्येला एक मंडप उभारीत त्यात एक यज्ञवेदी तयार करीत वेदीच्या उत्तरेला एक अश्ववेदी बनवीत आणि तिथे अश्वाची स्थापना करून पुरोहिताकरवी त्याची पूजा करीत मग राजा त्याच्या गळ्यात बिल्वाची सूर्य वरुण, प्रजेश इंद्र व विष्णू यांना उद्देशून सात दिवस एकेकासाठी आज्य, तिल व पुष्पे यांचे सहस्र किंवा एकशे आठ हवन करीत सातव्या दिवशी सूर्यपुत्र रेवत याची पूजा करीत मग अश्व आणि गज यांना शृंगारून त्यांची पूजा करीत होमकुंडाच्या ईशान्येला तयार केलेल्या अश्ववेदीवर घोड्याला नेत आणि राजपुरोहित त्याला सुगंधी भाताचा पिंड देई तो जर त्याने लगेच हुंगला तर राजाचे कल्याण होईल आणि हुंगला नाही, तर अकल्याण होईल, असे समजत नंतर औदुंबराची शाखा कलशजलात बुडवून घोडे, हत्ती, सैनिक व रथ यांच्यावर शांतिमंत्रांनी व पौष्टिकमंत्रांनी अभिषेक करीत शत्रूची मृण्मय प्रतिमा बनवून अभिचारमंत्रांनी त्याच्या हृदयावर शूलाने प्रहार करीत आणि तलवारीने या प्रतिमेचा शिरच्छेद करीत नंतर राजाची वाड्यावरून ईशान्य दिशेकडे मिरवणूक निघे ऋत्विज, पुरोहित, आचार्य वगैरे मंडळी त्याच्या मागून जात एक कोसभर जाऊन ती मिरवणूक पूर्वद्वाराने नगरात येई नंतर पुरोहित व ऋत्विज

याना त्या दक्षिणा दिली जाई फल समृद्धी व आरोग्य याची प्राप्ती

आश्विन वद्य द्वादशीपासून कार्तिक शुद्ध प्रतिपदेपर्यंत पाच दिवस राजाने हे व्रत करावे किंवा सूर्य स्वाती नक्षत्रात असेपर्यंत हा विधी करावा आणि सूर्य विशाखा नक्षत्रात प्रविष्ट होता त्या दिवशी सव सैन्यासह मिरवणुकीने या यज्ञ मंडपातून राजवाड्याकडे जाय व तिथे प्रजाजनांचा सन्मान करावा आणि या पाच दिवसांत पूर्वरात्री स्त्रियांनी देव, ब्राह्मण, गायी व घोडे यांना ओवाळावे, असे नारदवचन ज्योतिर्निबंधात आहे

मुळात हा विधी राजकीय असून तो सेनादलाशी संबद्ध होता पण कालौघात हळूहळू त्याचा सैन्याशी असलेला संबंध दुरावला आणि आरती किंवा एखाद्याला झालेला दृष्टबाधा दूर व्हावी म्हणून करायची ओवाळणी, एवढेच त्याचे स्वरूप राहिले [श क, नि व, नि सिं]

## नीरा-नरसिंहपूर

महाराष्ट्रातील एक पुण्यक्षेत्र हे भीमा नीरा संगमावर वसले आहे इथे एक नरसिंहाचे मंदिर असून, त्यात एक वाळूची व दुसरी दगडाची अशा दोन नरसिंहमूर्ती आहेत वाळूची मूर्ती प्रल्हादाने स्थापिलेला असून, दगडी मूर्ती ब्रह्मदेवस्थापित असल्याचे सांगतात

या दोन्ही मूर्तींसंबंधी दोन कथा प्रचलित आहेत, त्या अशा—

(१) एकदा हिरण्यकशिपू नामक दैत्याने बरीच वर्षे तप केले तपकाळात त्याच्या अंगावर वारुळे वाढली व त्यातल्या मुंग्यांनी त्याचे रक्तमांस खाऊन टाकले त्यामुळे हिरण्यकशिपू मरण पावला असा समज होऊन इंद्रादी देवांनी त्याच्या राजधानीवर हल्ला चढवला सव दैत्यांना पराजित करून ते हिरण्यकशिपूच्या कयाधू नामक पत्नीला धरून नेऊ लागले मार्गात त्यांची नारदाशी भेट झाली स्त्रीला कैद करून नेण्याबद्दल नारदाने त्यांची निर्भत्सना केली तेव्हा इंद्राने सांगितले, की 'हिच्या गर्भात आमचा शत्रू आहे तो उपजताच मी त्याला ठार करीन व हिला मुक्त करीन' हे ऐकून नारद म्हणाला 'हिचा पुत्र मोठा भगवद्भक्त होणार आहे त्याच्या वधाला तू कारण झालास, तर तुझाच नाश ओढवेल' मग इंद्राने नारदवचन प्रमाण मानून कयाधूला सोडून दिले पुढे ती नारदाश्रमात राहिली नारदाने तिला भागवतधर्म उपदेशिला पुढे तिला पुत्र झाला त्याचे नाव प्रल्हाद ठेवले गेले प्रल्हादाने मोठेपणी भीमेजवळ कोटितीर्थात वास केला तिथे तो प्रतिदिवशी स्नानोत्तर नरसिंहाच्या वालुकामूर्तीची पूजा करीत असे एके दिवशी त्या मूर्तीतून साक्षात नरसिंह प्रगटला व त्याने प्रल्हादाला 'वर माग' म्हटले तेव्हा प्रल्हादाने वर मागितला, की 'या मूर्तीत तुझे निरंतर वास्तव्य असावे व जे या मूर्तीचे दर्शन घेतील वा पूजन करतील, त्यांचे सव मनोरथ पूर्ण व्हावेत' नरसिंहाने तथास्तु म्हटले ही मूर्ती द्विभुज व वीरासनस्थ आहे

(२) महाप्रलयाच्या अंती विष्णूच्या नाभिकमलापासून ब्रह्मदेव उत्पन्न झाला पुढे त्याने सृष्ट्युत्पत्तीसाठी तप केले तेव्हा विष्णू त्याला प्रसन्न झाला व 'वर माग' म्हणाला ब्रह्मदेवाने सृष्ट्युत्पत्तीचे सामर्थ्य मागितले व आपण निर्माण केलेल्या पाषाणमूर्तीत तुझे सदैव वास्तव्य राहावे, अशी इच्छा व्यक्त केली

हे सव क्षेत्रच नरसिंहाचे शरीर मानले आहे इथले खडे गोटे या नरसिंहमूर्ती, वृक्ष हे देव पक्षी हे ऋषी व सर्व मनुष्ये ही चित्स्वरूप असल्याचे पुराणात म्हटले आहे इथे नदीच्या घाटावर एक गणपतिमंदिर असून, त्याच्यापुढे एक दीपमाळ आहे दीपमाळेजवळ असलेल्या अश्वत्थाला 'अनादी नरसिंहरूपी अश्वत्थ' म्हणतात

संगमाच्या पश्चिमेस पद्मतीर्थ आहे इथे लक्ष्मीच्या हातातले कमल पडले असे सांगतात त्याच्या पश्चिमेस शंखतीर्थ असून, तिथे नृसिंहाचा शंख राहतो, अशी समजूत आहे

या क्षेत्रासंबंधी आणखी एक आख्यायिका अशी—

एकदा या स्थानी किल्ला बांधावा या हेतूने विजापूरचा बादशहा इथे आला आल्या आल्या त्याचे अंग सुजून त्याला वेदना होऊ लागल्या तेव्हा सर्वांनी त्याला सांगितले, की इथे हिंदूंचे देवालय आहे व इथेच तू किल्ला बांधायचे ठरविल्याने तुला रोग उद्भवला' हे ऐकून बादशाहाने आपला बेत रद्द केला व त्यामुळे त्याची प्रकृतीही ठीक झाली

पुढे या क्षेत्रावर औरंगजेबाचा हल्ला आला त्या वेळी इथल्या पुजाऱ्यांनी नरसिंहाच्या मूर्ती देवालयाच्या आवारातील तरडीच्या झाडाखाली लपवून ठेवल्या व बादशहा गेल्यावर त्या पुनश्च देवळात स्थापन केल्या

यानंतर काही वर्षांनी विठ्ठल शिवदेव विंचूरकर यांनी आपले गुरू अमृतस्वामी यांच्या आज्ञेवरून हे मंदिर मोठ्या आकारात बांधण्यास प्रारंभ केला मंदिराचा पाया बांधून काढायलाच अडीच लक्ष रुपये खर्ची पडले हे बांधकाम सतत वीस वर्षे चालले होते याला चार दरवाजे असून, त्याची रचना यंत्राकार आहे

इथे प्रतिवर्षी दसरा, दिवाळी कार्तिक शुद्ध एकादशी, मकरसंक्रांतीचा पूर्व दिवस व नरसिंहजयंती अशा पाच दिवशी मोठ्या जत्रा भरतात व त्या वेळी देवाची पालखीतून मिरवणूक निघते

मुख्य मंदिराच्या सभोवती लक्ष्मी, प्रल्हाद, भीमाशंकर, विठ्ठल रखुमाई, काळभैरव, इ अन्य देवतांचीही मंदिरे आहेत देवस्थानाच्या व्यवस्थेसाठी सालिना सहा हजारांचे उत्पन्न आहे

शिवाजी महाराजांनी बजाजी निंबाळकर या मुसलमान झालेल्या हिंदू सरदाराचे शुद्धीकरण याच क्षत्रात केले, असे सांगतात [ती प्र , म ज्ञा को , म जि – पुणे]

**नील** एक रत्न हे कुरुंद जातीच्या पाषाणापासून निर्माण होते याच्या खाणी हिमालयाच्या वायव्य भागात व पंजाबात आहेत सयाम व लंका या देशांत सापडणारे नील मणी अधिक मोठे व तेजस्वी असतात ब्रह्मदेश, बोहेमिया व सायलेशिया या देशांतही उत्तम नील मिळतात

या रत्नाच्या इंद्रनील, महानील, जलनील, इ भिन्न जाती आहेत इंद्रनीलाचा रंग इंद्रधनुष्यासारखा असतो असा खडा दुर्मिळ असतो महानीलाचा रंग गडद निळा असून तो दुधात टाकला, तर सर्व दूध निळे दिसू लागते इतर जातींचे नील निळ्या रंगाच्या भिन्न छटा दर्शवितात गुरुता, स्निग्धपणा रंगाढ्यता, पार्श्वरंजनता व नृणग्राहित्व हे या रत्नाचे पाच गुण रत्नशास्त्रात सांगितलेले आहेत

शनी ही या रत्नाची अधिष्ठात्री देवता मानली जाते आणि म्हणून शनीची बाधा टाळण्यासाठी या रत्नाची अंगठी वापरण्याची प्रथा आहे [ल र प , मे गु अ ग्र ]

**नीलकंठ** (१) शिवाची एक संज्ञा शिव हा नीलग्रीव असल्याचा उल्लेख शतरुद्रियात आढळतो (तै स ४ ५ ११–१) समुद्रमंथनातून निघालेले हालाहल त्याने प्राशन केले आणि त्या विषाच्या प्रभावाने त्याचा कंठ निळा झाला, अशी एक पौराणिक कथा प्रसिद्ध आहे

(२) एक शिवाचार्य हा इ स च्या पंधराव्या शतकात होऊन गेला याने वीरशैव पंथासंबंधी क्रियासार नामक एक संस्कृत ग्रंथ लिहिला आहे याशिवाय कन्नड भाषेतही याने एक ग्रंथ रचला आहे याच्या मते वीरशैवागम हाच तेवढा वैदिक असून अन्य आगम अवैदिक आहेत याने आपल्या ग्रंथात शक्तिविशिष्ट अद्वैतब्रह्मरूपी शिवाचे माहात्म्य वर्णिले आहे [ हिं वि को ]

(३) अनेक अप्रसिद्ध पुराणे आणि तंत्रग्रंथ यांचा कर्ता हा इ स च्या १८ व्या शतकाच्या उत्तरार्धात महाराष्ट्रात होऊन गेला आपल्या ग्रंथात याने स्वतःविषयी फारच थोडी माहिती दिली आहे एका शैव कुटुंबात याचा जन्म झाला काशीनाथ व श्रीधर ही त्याच्या आचार्यांची नावे होत कोण्या रत्नाजी नामक व्यक्तीच्या सांगण्यावरून आपण देवीभागवतावर टीका लिहिल्याचे याने सांगितले आहे

नीलकंठ हा तंत्रशास्त्राचा मोठा पंडित होता त्याच्या सुमारे बारा ग्रंथांचा उल्लेख आढळतो यांपैकी देवीभागवतावरची व कात्यायनी तंत्रावरची टीका आणि शक्तितत्त्वविमर्शिनी व कामकलारहस्य हे ग्रंथ तंत्रविषयक आहेत देवीभागवतावरील टीकेत देवी ही मायाविशिष्टब्रह्मरूप असल्याचे याने सांगितले आहे देवीला पशुबळी आवडतो असे हा मानतो [ त स्ट रि लि ]

(४) तमिळनाडमधल्या त्रेसष्ट नायन्मार संतांपैकी एक याची पत्नी महापतिव्रता होती तारुण्यात याच्या हातून काही आगळीक घडली तेव्हा त्याच्या पत्नीने त्याला बजावले, की 'आजपासून मला स्पर्श करू नका ' या घटनेने त्याला उपरती झाली व त्याने त्या दिवसापासून स्त्रीसंग वर्ज केला त्याच्या या निर्धाराची कसोटी पाहण्यासाठी शिव एका योग्याचे रूप घेऊन त्याच्याकडे आला त्याने आपली एक कटोरी त्याच्याजवळ ठेवायला दिली आणि नंतर मायाबळाने ती गुप्त केली पुढे काही काळाने योगी परत आला आणि आपली कटोरी मागू लागला नीलकंठाने ठेवलेल्या जागी कटोरी पाहिली पण ती तिथे नव्हती नीलकंठ त्या योग्याला म्हणाला, की 'तुझी कटोरी हरवली ' योगी म्हणाला, 'हे खरे असेल तर मुलाची अगर पत्नीची शपथ घे ' त्यावर नीलकंठ उत्तरला की 'मला मुलगा नाही आणि मी पत्नीशीही संबंध तोडला आहे ' अखेर सर्वांच्या आग्रहास्तव त्याने शपथ घ्यायचे ठरवले त्यासाठी एका काठीचे एक टोक त्याने पत्नीला धरायला सांगितले व दुसरे टोक आपल्या हाती घेऊन शपथ घेतली शपथेनंतर लगेच त्या दोघांनी नजीकच्या एका कुंडात उडी मारली ती दोघे वर येताच त्यांना नवतारुण्याचा लाभ झाल्याचे सर्व लोकांना दिसले त्या क्षणी त्यांच्यावर पुष्पवृष्टी झाली आणि अखेर नीलकंठाला ईश्वरी कृपेचे वरदान मिळाले शिवाची लीलागीते गात गावोगाव फिरणे, हा याचा छंद होता शिवाने मदुरेच्या विद्वानांच्या स्वप्नात जाऊन त्यांना नीलकंठाच्या श्रेष्ठतेची कल्पना दिली होती त्या विद्वानांनी मग त्याची भेट घेऊन त्याचा गौरव केला पुढे त्याने उ भारताची यात्रा केली आयुष्याच्या अखेरीस तो तिरुज्ञानसंबंदर या संताजवळ राहिला

(५) (इ स चे १६ वे शतक) एक प्रसिद्ध ज्योतिषी तोडरानंद नावाचा त्याचा एक प्रसिद्ध ग्रंथ होता सांप्रत तो पूर्ण उपलब्ध नाही त्याचे वर्णन इतरत्र आढळते त्यावरून त्या ग्रंथात गणित मुहूर्त आणि होरा हे तीन स्कंध असावे, असे वाटते या ग्रंथाचा जो भाग उपलब्ध आहे, त्याची श्लोकसंख्या एक हजार आहे अकबराचा प्रधान तोडरमल्ल याच्या नावावरूनच त्या ग्रंथाला तोडरानंद हे नाव दिले असावे

नीलकंठ हा मोठा मीमांसक व सांख्यशास्त्रज्ञही होता अकबर बादशाहाच्या दरबारात त्याला पंडितेंद्र अशी उपाधी मिळाली

होती, असे त्याचा मुलगा गोविंद याने लिहून ठेवले आहे
ज्योतिषाच्या ताजिकपद्धतीवर नीलकठाचा समातत्र ( वर्षतत्र ) म्हणून एक ग्रथ आहे त्याला ताजिक नीलकठी असेही म्हणतात हा ग्रथ निरनिराळ्या टीकासह छापलेला आहे या ग्रथावर विश्वनाथाची सोदाहरण टीका आहे नीलकठाने एक जातकपद्धती रचली असून, तिचे साठ श्लोक आहेत ती मिथिलेत प्रसिद्ध आहे याशिवाय त्याने तिथिरत्नमाला, प्रश्नकौमुदी अथवा ज्योतिषकौमुदी आणि दैवज्ञवल्लभा हे ज्योतिषग्रथ लिहिले असून, जमिनीसूत्रावर सुबोधिनी नावाची टीकाही लिहिली आहे याशिवाय ग्रहकौतुक, ग्रहलाघव, मकरद या ग्रथावरही नीलकठाने टीका रचल्या आहेत, असे ऑफ्रेचसूची-वरून कळते [ भा ज्यो शा , म च को ]

(६) ( इ स चे १७ वे शतक ) एक धर्मशास्त्रकार याचा पिता शकरभट्ट हा प्रकाड पडित व महान मीमासक होता याचा मोठा भाऊ कमलाकर भट्ट याने निर्णयसिंधू हा प्रसिद्ध ग्रथ रचला आहे, तर पुत्र शकर याने कुडभास्कर नामक निबध लिहिला आहे याचा नातू दिवाकरभट्ट यानेही आचारार्क नामक ग्रथ लिहिला आहे असा त्याचा सर्व परिवार धर्मशास्त्रज्ञ होता

यमुना व चबळ या नद्यांच्या सगमाजवळील भरेह प्रदेशाचा राजा भगवन्तदेव याचा नीलकठाला आश्रय होता त्याच्यासाठीच नीलकठाने भगवदभास्कर नामक एक मोठा ग्रथ रचला हा ग्रथ म्हणजे धार्मिक आणि दिवाणी कायद्याबाबतचा जणू ज्ञानकोशच आहे या ग्रथाचे सस्कारमयूख, कालमयूख, श्राद्धमयूख, नीतिमयूख, व्यवहारमयूख, दानमयूख, उत्सर्गमयूख, प्रतिष्ठामयूख, प्रायश्चित्तमयूख, शुद्धिमयूख, इ बारा भाग असून, त्यात धर्मशास्त्रातील विविध विषयांचे विवेचन केलेले आहे यातील व्यवहारमयूख हे प्रकरण फार महत्त्वाचे आहे ते गुजरात, महाराष्ट्र, इ राज्यात वरिष्ठ न्यायालयात प्रमाणभूत मानले जाते मिताक्षरेच्या खालोखाल याला मान आहे याशिवाय याने व्यवहारतत्त्व व दत्तकनिरूपण हे ग्रथही रचले आहेत व्यवहारतत्त्व हा ग्रथ व्यवहारमयूख आणि दत्तकनिर्णय या दोन ग्रथांची सक्षिप्त आवृत्ती आहे, असे मानले जाते व्यवहारतत्त्व या ग्रथाची रचना इ स १६४४ च्या सुमारास झाली

राजधर्मावरील निबधात नीलकठाचा नीतिमयूख हा ग्रथ श्रेष्ठ मानतात भारतीय राज्यशास्त्रावरील हा मूल्यवान ग्रथ आहे देश, काल व परिस्थिती याना अनुसरून राजधर्माचे स्वरूप या ग्रथात वर्णिलेले आहे राजधर्मासबधीच्या जटिल कर्मकाडाकडे लक्ष न देता त्याने फक्त राज्याभिषेकाच्या कृत्याचे तेवढे सविस्तर वर्णन केले आहे त्यासाठी विष्णुधर्मोत्तर पुराण व देवी पुराण यातून त्याने माहिती घेतली आहे राज्याभिषेक प्रकरणानतर राज्याच्या स्वरूपाचे सक्षिप्त वर्णन केलेले असून, पुढे राज्याची सात अगे सांगितली आहेत राजा हा दैवी अश असून, लोकांच्या परिपालनासाठी राजाची आवश्यकता आहे असेही तो म्हणतो त्यानतर राजकृत्यप्रकरण, अमात्यप्रकरण राष्ट्रप्रकरण, दुर्गप्रकरण व दूतचारप्रपचप्रकरण ही प्रकरणे आहेत ही प्रकरणे लिहिताना तो अनेक वेळा मनु, याज्ञवल्क्य, कामदक, वराहमिहिर महाभारतकार, चाणक्य, इ पूर्वसूरींना अनुसरला आहे त्याने राजनीती ही धर्मशास्त्राच्या अतर्गत मानली आहे त्याच्या भगवदभास्कर या ग्रथावरून धर्मशास्त्रासबधीचे त्याचे अध्ययन किती खोल व व्यापक होते, त्याची प्रचीती येते हा ग्रथ लिहिताना त्याने मीमासाशैलीचा वापर केला आहे ही शैली सरल व सुबोध आहे त्याचे सर्व लेखन सक्षिप्त व सारगर्भ आहे प्रत्येक बाबतीत तो दोन्ही बाजू पाहून विचारपूर्वक आपला निर्णय देतो

नीलकठ हा निबधकार म्हणूनही प्रसिद्ध आहे मीमासा शास्त्राची तत्त्वे आणि नियम धर्मशास्त्राला लागू करण्याच्या कामात याने फार तीक्ष्ण बुद्धिमत्ता प्रकट केली आहे याने शास्त्रदीपिकेवर भाष्य, विधिरसायनदूषण, मीमासाबालप्रकाश, द्वैताद्वैतनिर्णय आणि सर्वधर्मप्रकाश असे अन्य ग्रथही लिहिले आहेत [ हि ध , मी द , म च को , भा रा प्र ]

(७) बौद्धांचा एक अवलोकितेश्वर हा पीतवर्ण व रक्त कमलासन आहे याने जटाजूट बाधला असून त्यात अर्धचंद्र शोभतो आहे आणि वर अमिताभाची प्रतिमा आहे हा वज्रपर्यकासनावर समाधि मुद्रा धारण करून बसलेला असतो त्याच्या दोन्ही अगी दोन सर्प असतात रत्नपूर्ण कपाल (परळ) हे त्याचे अभिज्ञानचिन्ह आहे याने व्याघ्रचर्म परिधान केलेले असते, याच्या देहावर कसलेही वस्त्रालकार नसतात


नीलकठ – सारनाथ

सारनाथ येथील मठातली मूर्ती किंचित निराळी आहे त्या मूर्तीत सर्पांच्या जागी दोन मानवाकृती असून, त्यांच्या हातातही कपाले दिसतात

या बौद्ध अवलोकितेश्वराची कल्पना हिंदूच्या नीलकठ शिव

या देवतेवरून घेतलेली असावी, असे दिसते [इ बु इ ]

**नीलकंठ चतुर्धर** (इ स चे १७ वे शतक) महाभारताचा एक टीकाकार याच्या पित्याचे नाव गोविंद आणि मातेचे नाव फुल्लाम्बिका असे होते हा गौतम गोत्री होता गोदावरीच्या तीरावरील कर्परनगरात (कोपर गाव) हा राहत होता काही काल याचा निवास काशीक्षेत्री तही होता महाभारताची टीका आपण काशीतच लिहिली, असे याने म्हटले आहे त्या टीकाग्रंथाचे नाव भारतभावदीप असे आहे याशिवाय त्याने मंत्रकाशीखंडटीका, मंत्रभागवत, मंत्ररामायण, वेदान्तकतक, शिवताण्डवव्याख्या, पटतंत्रीसार, गणेशगीता टीका, हरिवंशटीका सौरपौराणिकमतसमर्थन विधुराधान विचार, इ ग्रंथही रचले आहेत [स्ट इ लि हि २]

**नीलकंठमूर्ती** शिवमूर्तीचा एक प्रकार हिला श्रीकंठमूर्ती किंवा विषापहमूर्ती असे म्हणतात कारणा गमात हिचे वर्णन पुढीलप्रमाणे आहे – त्रिनेत्र, जटाधारी व चतुर्भुज वरच्या दोन हातात परशू व हरिण आणि खालच्या उजव्या हातात *विषपात्र आणि डाव्या हाताची वरदमुद्रा* वामांगी पार्वती उभी असून, ती आपल्या दोन्ही हातांनी शिवाचा गळा दाबून धरते आहे शिवाने प्राशन केलेले विष त्याच्या शरीरात खाली उतरू नये, असा पार्वतीचा हेतू तसे करण्यात असतो [शा इ इ गो गा ]

**नीलज्येष्ठा** एक काम्य व्रत हे व्रत श्रावण महिन्यात ज्येष्ठा नक्षत्रयुक्त अष्टमीला करतात सूर्य ही या व्रताची देवता असून, तिची पूजा करणे हा या व्रताचा विधी आहे त्या दिवशी रविवार असल्यास तो विशेष योग मानतात फल – आरोग्य व दीर्घायुष्य याची प्राप्ती [हि ध ]

**नीलदेवी** एक विष्णुपत्नी वैकुंठाचा अधिपती म्हणून जेव्हा विष्णूची मूर्ती बनवतात, तेव्हा विष्णूच्या डाव्या अंगी भूदेवीबरोबर नीलदेवीचीही मूर्ती असते तमिळनाडच्या आळवारांमधील आंडाळ हिला नीलदेवीचा अवतार मानतात

**नीलनक्क** तमिळनाडमधील त्रेसष्ट नायन्मारांपकी एक हा नित्य शिवपूजा करी व त्या वेळी त्याची पत्नी त्याला मदत करी एकदा तिला शिवलिंगावर एक कोळी बसलेला दिसला त्याला तिथून घालविण्यासाठी तिने लिंगावर फुंकर घातली पत्नीने आपल्या तोंडाची वाफ शिवलिंगावर टाकली म्हणून नीलनक्क संतापला आणि त्याने पत्नीचा त्याग केला त्याच रात्री त्याला स्वप्नदृष्टान्त झाला, की 'ज्या ठिकाणी फुंकर घातली गेली नाही त्या ठिकाणी आपल्या शरीराचा दाह होत आहे ' त्या दृष्टान्तामुळे नीलनक्काला आपल्या पत्नीच्या भक्तीची श्रेष्ठता समजली दुसरा दिवस उजाडताच त्याने मंदिरात जाऊन शिवाची क्षमा मागितली पत्नीचीही क्षमा मागून त्याने तिला सन्मानाने घरात घेतले

**नीलमत पुराण** एक संस्कृत ग्रंथ नीलमुनी हा त्याचा कर्ता आहे या ग्रंथात त्याने काश्मिरी हिंदूंसाठी अनेक धर्मकृत्ये, व्रते, सण व समारंभ सांगितले आहेत त्याचप्रमाणे काश्मीरमधील पुण्यक्षेत्रांची माहितीही या ग्रंथात विपुल दिलेली आहे या ग्रंथाला पुराण म्हटले असले तरी तो स्वतंत्र पुराण ग्रंथ नसून एखाद्या पुराणाचा तो एक भाग असावा, असे वाटते

कल्हणाच्या राजतरंगिणीत या ग्रंथाचा उल्लेख असून, तो सनपूर्व १२व्या शतकात निर्माण झाला असावा, असे तिथे म्हटले आहे पण राजतरंगिणीच्या पहिल्या भागात दिलेला कालक्रम *विश्वसनीय नसल्यामुळे वरील अनुमान बरोबर असेलच, असे* म्हणता येत नाही ग्रंथातील अंतर्गत पुराव्यावरून मात्र तो इ स च्या ६ व्या शतकापूर्वीचा असणे शक्य नाही, एवढे निश्चित कळते

या पुराणात सांगितलेले बहुतेक सण व विधी इतर पुराणांप्रमाणे आणि भारताच्या इतर भागात प्रचलित असलेल्या विधीप्रमाणेच आहेत नवहिमोत्सव आणि बुद्धजन्म हे दोन सण मात्र अगदी वेगळे आहेत

वैशंपायन व जनमेजय यांच्या संवादाच्या रूपाने प्रस्तुत ग्रंथाला प्रारंभ झाला आहे त्यात वैशंपायन जनमेजयाला गोनंद राजा व त्याचे पांडवकालीन वंशज यांची कथा सांगतो त्यानंतर त्याने काश्मीरचे माहात्म्य वर्णिले आहे त्यात काश्मीरची भूमी कशी निर्माण झाली, त्याची आख्यायिका सांगितली आहे सतीसरोवरातील पाणी काश्यप मुनीने बाहेर काढून टाकल्यानंतर तिथे राहणाऱ्या जलोद्भव राक्षसाचा नाश झाला आणि त्याच क्षेत्रात काश्मीर प्रदेश निर्माण झाला मग आसपासच्या सखल प्रदेशातील लोकांना तिथे आणून वसविण्याची कल्पना काश्यपाला सुचली पण ती तिथल्या नागांना मान्य होईना त्यामुळे काश्यप रागावला व त्याने शाप दिला, की *'तुम्हा नागांना पिशाचांचा सहवास करावा लागेल'* नाग जातीचा प्रमुख नील नावाचा एक नाग होता तो काश्यपाचाच पुत्र होता त्याने मग काश्यपाचा राग शांत केला व

त्याच्याकडे उःशाप मागितला. त्यावर कश्यप बोलला, ' की चार युगे सत्ययुग दरवर्षी कार्तिक ते चैत्र या मुदतीच्या दिवसांत तिथे पिशाच वस्ती करतील आणि तेवढ्या काळात नागांना त्यांचा सहवास करावा लागेल. उरलेल्या सहा महिन्यांत तिथे माणसे येऊन शेती करतील.'

चार युगे पूर्ण झाल्यानंतर नील मुनींना चंद्रदेव नामक ब्राह्मण आला. त्या प्रदेशातील पिशाच व यक्ष यांच्या त्रासातून मुक्त होण्यासाठी विविध व्रत आणि विधि–विधाने सांगितली तीच या पुराणात दिली आहे. [नीलमतपुराणम् – संपादक प. रामलाल कंजीलाल व प. जगद्धर झडू, १९२४]

## नीलरुद्रोपनिषद

एक नव्य उपनिषद. हे शैव उपनिषद असून, ते तीन खंडांत विभागलेले आहे. नीलरुद्र ही या उपनिषदातली देवता आहे. परमगुरुही तोच आहे. या नीलरुद्राने अत्याश्रम संप्रदायाचे प्रवर्तन केले, असे तिथे सांगितले आहे. या उपनिषदाच्या द्रष्ट्याला नीलरुद्र स्वर्गातून पृथ्वीवर येताना दिसला. प्रस्तुत उपनिषदाच्या पहिल्या व दुसऱ्या खंडात त्याचेच वर्णन आहे. हे वर्णन ऋग्वेदातल्या रुद्रसूक्ताला अनुसरून आहे.

तिसऱ्या खंडात महिषरूप केदाराचे स्तोत्र आहे. महिषरूप केदार म्हणजे या स्वरूपातला रुद्रच होय. त्याचे काही अवयव पिंगट, काही काळे व काही पांढरे आहेत. 'नीलशिखंडाय नमः' हा त्याचा मंत्र आहे. [श्री. सी. न. देसाई]

## नीलव्रत

एक काम्य व्रत. व्रतावधी एक वर्ष. यात नक्त पद्धतीने एक दिवसाआड अन्न सेवन करायचे असते. उद्यापनाच्या वेळी सुवर्णाचे नीलकमल, साखरेने भरलेले पात्र आणि एक बैल दान देतात. फल – विष्णुलोकप्राप्ती. [हि. ध.]

## नीलसखी

(इ. स. चे १८ वे शतक) चैतन्य संप्रदायातला एक भक्त व कवी. याचे मूळ नाव अमरजू असे होते. हा चैतन्यानुयायी भक्तांबरोबर सखीभावाने वागत असे, म्हणून याला नीलसखी असे नाव मिळाले. हा बुंदेलखंडातील सतारी नामक गावी जन्मला. भक्तिमार्गाकडे आकर्षित झाल्यावर याने आपले बहुतेक सर्व आयुष्य वृंदावनात घालवले.

नीलसखीने हिंदी भाषेत दहा पदे रचली आहेत. ती सर्व पदे यांनी या नावाने ओळखली जातात. मात्र ती सर्वच उपलब्ध नाहीत. याने आपली प्रारंभीची काही कविता अमरेश या मुद्रेने लिहिली असली, तरी भक्तिपर पदे मात्र नीलसखी या मुद्रेने लिहिली आहेत. [चै. सं. नं. मा.]

## नीलसरस्वती

एक तांत्रिक देवता. ती शशिकलाधारिणी, पशूच्या पाठीवर पाय ठेवणारी व चतुर्भुज आहे. तिच्या हातांत घटा, कपाल, शल व खड्ग ही आयुधे आहेत. अन्यमते ती नौकारूढ व नागाभरण असून तिने आपल्या हाती कात्री, कपाल, चषक व त्रिशूल ही आयुधे धारण केली आहेत. ती त्रिनेत्र असून, तिच्या गळ्यात मुंडमाला आहे.

'ॐ श्री ह्रीं सौ हूं फट् नीलसरस्वत्यै स्वाहा' हा तिचा चौदा अक्षरी मंत्र होय. याचा ऋषी ब्रह्मा व छंद गायत्री आहे. वादविवादात विजय प्राप्त होण्यासाठी साधक हा मंत्र सिद्ध करतात. [श्रीविद्यार्णवतंत्र, मंत्रमहोदधि]

## नीलसाधन

एक प्रकारचे अभिचारकर्म. याचा अभ्यास स्मशानात बसून एकट्याने करायचा असतो. वृद्धाकर्ने याचे वर्णन दिले आहे, ते असे– साधक स्मशानात जाऊन एखादे न जळालेले प्रेत पालथे (तोंड खाली करून) ठेवतो व आपण त्या प्रेताच्या पाठीवर बसून एक यंत्र काढतो. नंतर त्याची मंत्रोच्चारपूर्वक पूजा करतो. साधकाचा हा विधी फलद्रूप झाला, तर मृत मनुष्य सजीव होऊन उताणा होतो व साधकाला त्याची इच्छा विचारतो. या वेळी त्या मृत मनुष्याच्या मुखाने देवीच बोलते, अशी समजूत आहे. साधक या साधनाकाळात सर्वस्वी निर्भय राहिला, तरच त्याचा हा प्रयोग यशस्वी होतो व त्याचे ईप्सित पुरे होते. [रि. इ.]

## नीलांबरदास

(इ. स. चे १५ वे शतक) ओडिशातला एक भक्त कवी. तो राधा–कृष्ण युगलमूर्तीचा उपासक होता. त्याने जमिनीभारत, पद्मपुराण, रुद्रस्तुती व देउल तोला हे ग्रंथ रचले आहेत. त्याच्या काव्य–साहित्यात राधा–कृष्णांच्या लीलांचेच मुख्यतः वर्णन आहे. [उ. सा. इ.]

## नीलांबरशर्मा

(१८२३– १८८३ इ. स.) एक ज्योतिषी. हा मैथिली ब्राह्मण असून, पाटणा शहरात राहत होता. याने काही दिवस आपला ज्येष्ठ बंधू जीवनाथ याच्याजवळ व काही दिवस काशीच्या पाठशाळेत ज्योतिषशास्त्राचे अध्ययन केले. शिव नामक एका राजाच्या दरबारी हा मुख्य ज्योतिषी होता.

याने पाश्चात्य पद्धतीनुसार गोलप्रकाश नावाचा एक ग्रंथ संस्कृत भाषेत रचला आहे. यात पाच अध्याय असून, ज्योत्पत्ती, त्रिकोणमितिसिद्धांत, चापीयरेखागणितसिद्धांत, चापीयत्रिकोणमितिसिद्धांत असे विषय त्यात आहेत. इंग्रजी भाषा न जाणणाऱ्याला हा ग्रंथ फार उपयुक्त आहे. [भा. ज्यो. इ.]

**नुंदऋषी** (१३७७–१४४० इ स ) एक काश्मीरी कवी श्रीनगरपासून पचवीस मैलावर खमुह नावाच्या गावी याचा जन्म झाला त्याची आई शारदामा ही मोठी विदुषी होती नुदऋषी हा बालपणापासूनच मनाने विरक्त होता त्याने अनेक व्यवसाय केले, पण त्याला एकातही यश मिळाले नाही पुढे त्याचा जयदेन नावाच्या मुलीशी विवाह झाला परतु ससारात त्याचे मन रमेना मग एक दिवस तो ससार सोडून वनात निघून गेला तिथे त्याने बारा वर्षे तपश्चर्या केली त्यानतर तो कविता करू लागला त्यामुळे त्याची ख्याती दूरवर पसरली काश्मीरी जनतेत त्याची पदे लोकप्रिय ठरली आपल्या सयमी जीवनाचे वर्णन करताना तो एका पदात म्हणतो–

> **गीफ हा वन्दै स्वग लरि, जन्दा हा वल पटियकी,**
> **गरगर जन राजि शोक यन जन गिन्व,**
> **घरीह हा वनै घरि डाई ।**

अर्थ– गुहा हाच माझा स्वर्ग आहे फाटके, जीर्ण कपडे हेच माझे रेशमी कपडे आहेत उदराच्या सगतीत मी क्रीडा करतो, त्यामुळे मला एक वर्षाचा कालावधी जणू अडीच घटकाप्रमाणे भासतो

याची बरीचशी कविता रहस्यवादी आहे त्याच्या मते परमेश्वरप्राप्तीसाठी शेख, मुल्ला व पडित याची मध्यस्थी नको त्याच्या भेटीसाठी मदिरात किंवा मशिदीत जाण्याचीही आवश्यकता नाही प्रत्येकाच्याच ठिकाणी परमेश्वरी अंश आहे त्याला जाग आणली म्हणजे सहजपणे ईश्वरप्राप्ती होते [ म व ]

**नुकलम्म** द भारतातील एक ग्रामदेवता ही मुख्यत्वे कनूल व काकिनाडा या भागात आढळते हिची पुजारीण कोळी स्त्री असते हिची जत्रा एक महिनाभर चालते त्या वेळी पितळेच्या भाड्याना लुगडी नेसवून त्याच्या गळचात नकली सर्पाची आकृती घालतात व ती भाडी पुरुषाच्या डोक्यावर घेऊन मिरवणूक काढतात जत्रेच्या शेवटच्या दिवशी रेड्याचा बळी देतात मग त्याचे रक्त एका भाड्यात धरून व त्यात विविध प्रकारचे धान्य घालून ते देवीच्या गाभाऱ्यात तीन दिवस ठेवतात चौथ्या दिवशी ते धान्य धुतात त्यातल्या ज्या दाण्याना कोंब आले असतील, त्याचे पीक त्या वर्षी चागले येईल, असे समजतात [ व्हि गो सा इ ]

**नुर्से** एक जात या लोकाची वस्ती मध्य प्रदेशात आहे हे द्रविडवशीय लोक म्हणजे मुडाची एक पोटशाखाच होय याची भाषाही मुडवर्गातलीच आहे याच्यात उडिया व डोम याच्या रक्ताचे मिश्रण आहे, असे सागतात सिंगबोगाने (सूर्यदेव) आमच्या पूर्वजाला निर्माण केले, असे हे सागतात देवकाच्या भेदावरून याच्यात बरेच भेद निर्माण झाले आहेत

**विवाहप्रथा** – याच्यात लग्ने प्रौढपणी होत असून, वाङ्निश्चय काव्यमय भाषेत होतो देवकाच्या खाबाभोवती सात प्रदक्षिणा घातल्यावर लग्नविधी पुरा होतो विधवेला आपल्या दिराबरोबरच लग्न करावे लागते तिने जर दुसऱ्याबरोबर लग्न केले, तर दुसऱ्या नवऱ्याला तिच्या पहिल्या लग्नाचा खर्च तिच्या दिराला द्यावा लागतो

याचा दर्जा निम्नस्तर मानलेला आहे हे लोक शेतकी व टोपल्या विणणे हे व्यवसाय करतात [ म ज्ञा को ]

**नुलिया** ओडिशा प्रदेशातील एक आदिवासी जमात या लोकाना नोलिया, नोरिया, नाहारिया अशीही अन्य नावे आहेत हे द्रविड वशाचे आहेत याचा बाधा मध्यम आणि वर्ण काळा आहे त्याचे डोके लाबट व केस काळे कुरळे असले, तरी नाक सरळ असते डोळचात चमक असते आणि चेहरा तरतरीत असतो ते नेहमी आनदी दिसतात त्याचा पोशाख साधाच असतो बहुधा ते उघडेच राहतात त्याच्या कमरेला फक्त एक लगोटी असते कधी कधी ते अगात बडी



नुलिया पुरुष

घालतात थडीच्या दिवसात एखादी चादर घेतात माडाच्या झावळ्याची किंवा वेताची बनवलेली निमुळती टोपी डोक्यावर

ठेवतात कधी कधी ती टोपी रंगीत असते स्त्रिया साडी नेसतात व कथलाचे अनेक अलंकार घालतात पुरुषाप्रमाणे स्त्रियाही कामसू व काटक असतात भात व मासे हे त्यांचे मुख्य अन्न असते

यांची वसती पुरी व गोपाळपूर या भागात समुद्रकिनाऱ्यावर आहे मासेमारी हा त्यांचा मुख्य व्यवसाय होय त्यांच्यातील काही लोक पूर्वी खलाशीही होते

हे लोक ओडिया भाषेप्रमाणेच तेलुगू, बंगाली व हिंदी या भाषाही बोलतात

नुलिया कोळी होडी बनविण्यासाठी लोखंडाचा उपयोग करीत नाहीत होडीच्या फळ्या बांधण्यासाठी ते दोरखंड वापरतात लोखंडाचा उपयोग केल्यास, समुद्रात असताना संकटे येतात, अशी त्यांची समजूत आहे

नुलियांची घरे ल्हान व साधी असून, त्यांच्या मातीच्या भिंतीवर शाकारणीचे किंवा केंबळाचे छप्पर असते त्यांची रचना रेखीव नसते मात्र झोपड्यांच्या भिंतींवर व दारांवर ते सुंदर चित्रे काढतात त्यात समुद्र होडी, पक्षी, मासे, फुले यांना स्थान मिळते चित्रे काढण्याचे काम स्त्रिया करतात चित्रासाठी त्या विविध रंग वापरतात

**विवाहप्रथा** – मुले व मुली वयात आल्यानंतर त्यांची लग्ने करतात आई-बाप लग्न ठरवताना प्रथम वधू वरांची संमती घेतात लग्नविधी तेलुगू पद्धतीप्रमाणे होतो, पण त्यात ओडिसातील चालीचाही समावेश झालेला दिसतो गावाचा प्रमुख पुरुष लग्नमंडपात येऊन वधू वरांना आशीर्वाद देतो व मग त्यांना नवीन घरी जाण्याची आज्ञा करतो

**देवधर्म** – महादेव, विष्णू व नरसिंह हे त्यांचे मुख्य देव आहेत हे लोक भूत पिशाच्चांनाही भजतात त्यांच्या कोपामुळे संकटे व रोग उद्भवतात, म्हणून त्यांना संतुष्ट करण्यासाठी नवस बोलण्याची व बळी देण्याचीही प्रथा यांच्यात आहे यांच्या घरात, गावात, गावाबाहेर व समुद्रकिनाऱ्यावर नाना प्रकारचे गोल दगड, मातीचे गोळे किंवा लाकडाचे ठोकळे देव म्हणून मांडलेले दिसतात मासे मारायला जाताना हे त्या देवांची प्रार्थना करतात [मार्च आफ इंडिया, मार्च १९५७]

**नूरमुहंमद** (इ स चे १८ वे शतक) एक सूफी प्रेमाख्यान कवी हा जौनपूर जिल्ह्यातील जौनपूर-आजमगढच्या सरहद्दीवर असलेल्या सबरहद गावचा रहिवासी होता त्याचे फारसी व हिंदी या भाषांवर प्रभुत्व होते त्याने फारसीत रौगतुल हकायत, दीवान, इ ग्रंथ लिहिले होते, पण ते सांप्रत उपलब्ध नाहीत इंद्रावती व अनुरागबांसुरी हे त्याचे दोन ग्रंथ प्रसिद्ध आहेत इंद्रावती हे आख्यानकाव्य असून त्यात कलिंजरचा राजपुत्र राजकुंवर आणि आगमपूरची राजकुमारी इंद्रावती यांची प्रेमकथा वर्णिली आहे पाच चौपायानंतर एक दोहा अशी या काव्याची एकंदर रचना आहे या ग्रंथाला सूफी पद्धतीचा अखेरचा ग्रंथ मानतात अनुरागबांसुरी हा ग्रंथ फारसी लिपीत लिहिलेला आहे या ग्रंथावर वजहीच्या सबरस या ग्रंथाची छाप आहे अनेक प्रकारांनी या ग्रंथाचे महत्त्व सांगतात पहिली गोष्ट म्हणजे याची भाषा संस्कृतप्रचुर आहे या भाषेमुळे कवीला आपल्या जातिबांधवांकडून खूप निंदा एकावी लागली त्याने शरीर, जीवात्मा आणि मनोवृत्ती यांचे विवरण एका मोठ्या रूपकाद्वारे त्यात केले आहे त्यातील पात्रांची नावे जीव, अंतःकरण, बुद्धी, चित्त, अहंकार संकल्प, विकल्प अशी असून गावांची नावे मूरतीपूर, स्नेहनगर अशी आहेत चौपायांच्या अधून मधून दोह्यांची रचना न करता त्याने छंदाचा वापर केला आहे कुठे कुठे व्रजभाषेतील शब्द आणि वाक्प्रयोगही वापरले आहेत

हा कवी सूफी प्रेमाख्यानकारांच्या परंपरेतील शेवटचा दुवा मानला जातो [हिं सा इ, हिं सू प्रे, भा प्रे प, म प्रे]

**नृत्त** एक कलाप्रकार 'नृती गात्रविक्षेपे' = शरीरावयवांची हालचाल करणे या अर्थी असलेल्या नृत् धातूवरून नृत्त शब्द बनला आहे 'नृत्तं ताललयाश्रयम्' = नृत्त हे ताल व लय यांच्या आश्रयाने अभिव्यक्त होते असे त्याचे लक्षण दशरूपकावरील धनिक नावाच्या टीकाकाराने दिले आहे नृत्तातले ताल-लयबद्ध अंगविक्षेप हे शोभात्मक अर्थात दृष्टीला आल्हाद देणारे असावे, असेही त्याने सांगितले आहे नृत्तात ताल व लय यांचा लय सांभाळून फक्त नाचायचे असते, त्यात रस किंवा भाव अपेक्षित नसतो अशी कल्पना दशरूपककर्त्या धनंजयानंतरच्या बहुतेक नृत्यशास्त्रज्ञांनी करून घेतलेली दिसते पण ती बरोबर वाटत नाही कारण भरतार्णवाचा कर्ता नंदिकेश्वर यांनी नृत्तातील नेत्रक्रिया सांगताना रसदृष्टी, स्थायीभावदृष्टी अशा काही दृष्टी सांगितल्या आहेत त्यावरून नंदिकेश्वराला नृत्तात रस व भाव अजिबात अग्राह्य वाटत होते, असे दिसत नाही

नाट्यात भावव्यक्तीसाठी अतिनाजूक अशी शारीरिक हालचाल करायची असते, म्हणून त्याला दृश्य व श्राव्य असे उभयविध मानतात नृत्तात शरीराच्या तालाश्रित हालचाली करायच्या असल्यामुळे त्याला केवळ दृश्य समजतात नाट्य हे वाक्यार्थाभिनयात्मक (अभिनयाने वाक्याचा अर्थ अधिक स्पष्ट करणारे) असते, तर नृत्य हे पदार्थाभिनयात्मक

(त्या त्या पदार्थाची अभिनयाच्या द्वारे अभिव्यक्ती करणारे) असते धनिकाने हा मत सागून म्हटले आहे, की नृत्य व नृत्त यात अगविक्षपाच्या दृष्टीने फारसा फरक नाही नृत्तामध्ये कोणाच्याही कृतीचे अनुकरण नसते हे नृत्ताचे नृत्याहून वेगळेपण होय नृत्तात शारीरिक हालचाल असते, पण अभिनय नसतो, म्हणून त्यातून रसनिष्पत्ती होत नाही, असे धनिक मानतो त्याला अनुसरून काही आचार्य तर नृत्त हा देशी अतएव अधम किंवा हीन दर्जाचा कलाप्रकार आहे असे म्हणायलाही कमी करीत नाहीत

मध्ययुगात कलाविदाची नृत्ताकड पाहण्याची दृष्टी कशा प्रकारची होती हे वरील विवेचनावरून कळून येईल पण त्याची ही दृष्टी बरोबर आहे, असे मात्र म्हणता येत नाही तसे पाहिले तर नृत्त ही फार वरच्या दर्जाची कला आहे प्राचीन नृत्तातूनच पुढ नृत्यकला निर्माण झाली नृत्ताने भारतीय शिल्पकाराना शोभादायक अगविक्षेपाचे अनेकविध आदर्श पुरविले आहेत याविषयी श्री गोदावरी केलकर लिहितात– गाणे व नाचणे या कला पूर्वीपासून जोडीजोडीने वाढत आलेल्या आहेत नाचणे जितके स्वाभाविक, तितकेच गाणेहि मनुष्यास स्वाभाविक आहे पण त्यातल्या त्यात डावे उजवे पाहावयाचेच म्हटले, तर नृत्त हे जास्त स्वाभाविक व सहज असल्याने प्रथम अस्तित्वात आले असावे व त्याच्या पाठोपाठच गाणे अस्तित्वात आले असावे कारण नृत्तातील काही क्रिया वरून गायनकलेच्या आरभावस्थेतील छदाची वरीचशी नावे पडलेली दिसून येतात उदाहरणार्थ, कवितेतील चरण, पाद, हे शब्द तसेच मयूरसारिणी, रथोद्धता हरिणीप्लुता, शरभप्लुता, वृषभचेष्टित, शार्दूलविक्रीडित, अश्वललित, क्रौंचपादी भुजगप्रयात, विलबित गती, ही वृत्ताची नावे त्या त्या प्रकारच्या गतीवरूनच पडली असावी, असे अगदी उघडउघड दिसून येते ग्रीसमध्यही ह्या दोन कलाच्या वाढीची अशीच सगती दिसून येते व त्याच्यातही कवितेतील 'foot' वगैरेसारखे शब्द हेच सुचवितात नृत्तकलेच्या प्रथमावस्थेत नुसत्या अगविक्षेपक्रिया एवढच त्या कलेस महत्त्व असल, पण पुढे जेव्हा गायनकलेशी या कलेची सगती झाली, तेव्हा गायनातील तालाप्रमाणे शब्दास अनुसरून ह्या कलेत चलनवलनाची भर पडत ही कला पूर्णतेस गेली असावी ही पूर्णतेस पोचलेली कला म्हणजेच नृत्त होय

नृत्ताचे तपशीलवार विवेचन करणारा महत्त्वाचा ग्रथ म्हणजे भरतार्णव हा होय नदिकेश्वर हा त्याचा कर्ता आहे यालाच तडू असे दुसरे नाव होते हा नटराज शिवाचा पहिला शिष्य होता तडूने भरताला ज्या नृत्याचे धडे दिले, तेच पुढे ताडव नृत्त (किंवा नृत्य) या नावाने प्रसिद्ध झाले भरतापासूनच पुढे नर्तनकला नृत्त व नृत्य अशा उभय रूपात प्रवर्तित झाली भरतार्णव हा ग्रथ मुळात चार हजार श्लोकाचा होता एवढा मोठा ग्रथ वाचायला व अभ्यासायला अवघड ठरल्यास त्यात नवल नाही म्हणून मग नदिकेश्वरानेच तो सक्षिप्त स्वरूपात तयार केला त्याला एक तात्कालिक कारण घडले, ते असे–

एकदा शुक्राचार्यांच्या तालमीत तयार झालेल्या असुरानी देवाना नाट्यस्पर्धेचे आव्हान दिले देवानी ते आव्हान स्वीकारले मग त्यानी सुमती नामक एका पुरुषाला ती विद्या हस्तगत करण्यासाठी नदिकेश्वराकडे पाठविले नदिकेश्वराने आपला भरतार्णव ग्रथ सक्षिप्त स्वरूपात त्याला पढवला सुमतीला बोध केल्याच्या कारणावरून त्या सक्षिप्त ग्रथाला सुमतिबोधक असे दुसरे नाव पडले

**पादकर्म** – नृत्ताचा प्रारभ पायापासून केला जातो नृत्तात पाय ठेवण्याचे विविध प्रकार आहेत, त्याचे मुख्यत पाच प्रकार पाश्चात्त्य शास्त्रज्ञ श्री ब्यूचॅम्प यानी मानले आहेत ते असे -

(१) टाचा एकत्र (२) उजवा पाय त्याच बाजूला दूर करणे (३) उजवी टाच डाव्या पायाला टेकवून पोकळी तयार करणे (४) उजवा पाय पुढे घेणे व (५) उजवी टाच डाव्या पायाच्या चवड्याला टेकवणे पाश्चात्य नृत्त या पाच प्रकारच्या नृत्तपादावर उभारलेले आहे

भारतीय नृत्ताचे या पाचाहूनही सूक्ष्म भाग पडतात त्यात पाय उचलण्याच्या क्रियेपासूनच फरक पडतो वरील पाच नृत्तपादापैकी दुसऱ्या नृत्तपादात तो पाय कसा व किती उचलावा, जमिनीसमरपाट न्यावा की इतर प्रकारे, ह्या गोष्टीचा विचार पाश्चात्यानी केलेला नाही, पण तो नदिकेश्वराने केला आहे त्याने पायाच्या हालचालीचे आणि अवस्थाचे जे सहा प्रकार सागितले आहेत, ते असे–

(१) समपाद – जमिनीवरून दोन्ही पायाचा कोणताही भाग न उचलता नेहमी जसे पाय असतात तसे ते ठेवणे याविषयी भरतार्णवाने सागितले आहे ते असे (४ ३१३)–

**यथास्थानस्थित पाद समाभिध इतीरित ।**
**नाट्यारम्भे स्थानके च पुष्पाञ्जल्याविनर्तने ॥**

अर्थ – यथास्थानी असलेला पाय याला सम असे म्हटले आहे समपाद हा नाट्यारभी उभे राहत असताना व पुष्पाजली, ह नर्तन करताना उपयोगात आणला जातो

(२) उद्घट्टितपाद – याचे लक्षण भरतार्णवात दिले आहे ते असे (४ ३११)–

**चलितकपदा भूमि पार्ष्णिना चेन्निहन्यते ।**
**तदुद्घट्टितमित्याहु विचाय चतुरानन ॥**

अर्थ – एक पाय जाग्यावर स्थिर ठेवून दुसऱ्या पायाच्या टाचेने भूमीवर आघात करणे, याला ब्रह्मदेवाने विचार करून उद्घट्टित असे म्हटले आहे

(३) अग्रतलसंचर पाद – याचे लक्षण असे—

**अङ्गुलीभिस्समाङ्गुष्ठ प्रसार्य स्थापितो भुवि ।**
**पार्ष्णेरुत्क्षेपणात्पाद स्यादग्रतलसञ्चर ।**

(भरतार्णव ४ ३१०)

अर्थ – टाच उचलून अंगठा जाग्यावर ठेवून व बाकीची पायाची बोटे पसरून जमिनीवर ठेवणे याला अग्रतलसंचर म्हणावे

नृत्याच्या अनी केल्या जाणाऱ्या आकाशचारी या नृत्त प्रकारात या अवस्थेचा उपयोग करतात

(४) अंचित पाद – याची क्रिया अशी—

**अङ्गुल्य कुञ्चितोत्क्षिप्ता पार्ष्णिभूभागसंस्थित ।**
**ऊर्ध्वाङ्गुष्ठो यदि भवेत् स पादोऽञ्चितसंज्ञक ।।**

(भरतार्णव ४ ३०५)

अर्थ – पायाची बोटे वाकवून, आगठे उंच करून व टाचा जमिनीवर ठेवून पुढचा पाय उचलणे याला अंचित म्हणतात

याचा उपयोग मुखचाली व पाय आणि हात यांच्या हालचालीमध्ये केला जातो

(५) कुंचित पाद – याची क्रिया अशी—

**अङ्गुल्य पृष्ठसंस्पृष्टा भुव पार्ष्णिरुदञ्चित ।**
**आभुग्नो मध्यभागश्चेत् स पाद कुञ्चितो मत ।।**

(भरतार्णव ४ ३०६)

अर्थ – टाच उचलायची बोटे जमिनीवर पण आकुंचित करायची आणि मधला भागही आवळून घ्यायचा याला कुंचित म्हणतात

(६) सूचीपाद – याची क्रिया अशी—

**अङ्गुष्ठ स्पृष्टभूमिश्चेत पार्ष्णि किञ्चिदुदञ्चित ।**
**स्वभावस्थोऽपर पादस्सूचीसंज्ञ स इष्यते ।।**

(भरतार्णव ४ ३०८)

अर्थ – एका पायाची टाच किंचित उचलून बाकीची बोटेही वर करून नुसत्या अंगठ्याचा अग्रभाग तेवढा जमिनीवर टेकून ठेवणे व दुसरा पाय सम अवस्थेत राहू देणे, याला सूचीपाद असे म्हणतात

याचा उपयोग तप आणि धर्मस्थापना याचे सूचन करण्यासाठी होतो

भरतानेही नृत्तपादाचे हेच सहा प्रकार सांगितले आहेत (ना शा ९ २३४–२३५) पाय हालायला सुरवात झाली, की मांड्या व पोट्या यांच्या स्थितीतही फरक होतोच हा फरक पादकर्माला अनुरूप असला पाहिजे, अन्यथा, ते नृत्त वेडेवाकडे दिसेल, असे भरताने म्हटले आहे (ना शा ९ २४५)

**जंघाकर्म** – याचे पुढील चार प्रकार भरताने सांगितले आहेत

(१) क्षिप्त – पाय अग्रतलसंचर ठेवून टाच आतल्या बाजूने घेणे व त्याबरोबरच मांड्या व पोट या बाहेरच्या बाजूस फेकणे

(२) परिवृत्त – टाच बाहेरच्या बाजूने घेऊन मांड्या व पोट या आतल्या बाजूने वळवणे

(३) उद्वाहित – सूचीपाद करून मांडी वर उचलणे

(४) नत – अंचितपाद केल्याने टाचेवर भर पडतो त्या वेळी मांडी किंचित खाली वाकविणे

**कटिकर्म** – जंघाकर्मानंतर कटिकर्म येते याचे पाच प्रकार भरताने सांगितले आहेत, ते असे—

(१) कंपित – एकदा या पायावर व एकदा त्या पायावर भार टाकून व ही क्रिया जलद करून त्याबरोबरच कंबर कंपित करणे

(२) छिन्न – एका पायावर तोल सांभाळून कमरेचा भाग मागे पुढे झोक्यासारखा हालवणे

(३) विवृत्त – एका पायावर तोल सांभाळून व त्याही पायाचा नुसता चवडा जमिनीवर टेकवून डोके व खांदे फिरविले की कमरेपासून वरचा भाग आपोआपच फिरू लागतो या फिरतीत कमरेचा मागील भाग पुढे व पुढील भाग मागे येतो

(४) उद्वाहित – दोन्ही पायांच्या चवड्यावर उभे राहून कंबर उचलणे

(५) रेचित – दोन्ही पाय अंचित करून कंबर खाली करणे

त्यानंतर नत उन्नत, प्रसारित, विवर्तित व अपसृत अशी उदरकर्मे भरताने सांगितली आहेत त्यापुढे उराची कर्मे सांगितली आहेत निरनिराळ्या अवस्थेत उराची स्थिती कशी होईल, ते सांगताना सम, निर्भुग्न, आभुग्न, प्रकंपित व उद्वाहित हे प्रकार त्याने सांगितले आहेत उर सम स्थितीत ठेवणे, पुढे काढणे, आत नेणे, वरखाली करणे आणि वर उचलणे अशा त्या क्रिया असतात

**शिर कर्म** – उराभागानंतर मानेचा किंवा शिराचा विचार येतो नर्तनात शरीराच्या विविध अवस्था दाखवीत असता मान जर ताठ ठेवली, तर त्यांना शोभा येणार नाही म्हणून नृत्त सर्वांगसुंदर होण्यासाठी मानेचीही अनुरूप हालचाल करावी लागते भरताने मानेच्या हालचालीचे समा, नता, अंचिता, कुंचिता, रेचिता, पार्श्वोन्मुखी, विवृत्ता, त्र्यस्रा व उन्नता असे नऊ भेद सांगितले आहेत

नंदिकेश्वराने याचेच चौदा प्रकार सांगितले आहेत, ते असे–

(१) धूत – शिर मंद गतीने वेगवेगळ्या बाजूंना वळवणे विनियोग – विस्मय, विषाद, अस्वस्थता, अनिष्ट, इ. भावनांचे निदर्शन

(२) विधूत – वरील क्रिया द्रुत गतीने करणे विनियोग शीत, ज्वर, भीती व मद्यपान यांचे निदर्शन

(३) आधूत – एका बाजूला मस्तक वर उचलणे विनियोग गर्व व स्वतःच्या शक्तीचा अभिमान या गोष्टींचे निदर्शन

(४) अवधूत – मस्तक खाली करणे विनियोग – स्थल निर्देश आणि लपवलेल्या अर्थांचे सूचन

(५) कंपित – मस्तक खाली वर द्रुत गतीने कापविणे विनियोग – घाईचा प्रश्न, क्रोध, वितर्क, इ. भावनांचे निदर्शन

(६) आकंपित – आळसटलेपणे दोनदा मस्तक हालवणे विनियोग – एखाद्या गोष्टीचे कौतुक, प्रश्न, सूचना इ. गोष्टींचे निदर्शन

(७) उद्वाहित – मस्तक वर उचलणे विनियोग – आत्मविश्वासाचे निदर्शन

(८) परिवाहित – मस्तक वर्तुळ गतीने सर्व बाजूंनी फिरवणे विनियोग–विस्मय, स्मित, हर्ष, खेद, अनुमोदन विचार, या भावनांचे निदर्शन

(९) अंचित – एका बाजूला मस्तक किंचित वाकवणे विनियोग – दुःख, चिंता, मोह, मूर्च्छा या भावांचे निदर्शन

(१०) निहुंचित – खांदे वर उचलून मान त्यामध्ये बुडवून टाकणे विनियोग – विलास, गर्व, मान, रोग प्रणय, इ. भावनांचे निदर्शन

(११) परावृत्त – मस्तक मागे वळवणे विनियोग – क्रोध, लज्जा, इ. भावांचे निदर्शन

(१२) उत्क्षिप्त – चेहरा वर उचलणे विनियोग – उच्चस्थ किंवा आकाशस्थ पदार्थांचे दर्शन सूचित करणे

(१३) अधोमुख – चेहरा खाली करणे विनियोग – लज्जा, दुःख, प्रणाम या भावांचे निदर्शन

(१४) लोलित – डोळे शिथिल करून मस्तक निरनिराळ्या दिशांना फिरवणे विनियोग – निद्रा, आळस, भूतबाधा, मद्यप्रभाव व मूर्च्छा यांचे निदर्शन

यानंतर दृष्टीचा विचार करताना नंदिकेश्वराने आठ रस दृष्टी, आठ स्थायीभावदृष्टी आणि छत्तीस व्यभिचारीभाव दृष्टी सांगितल्या आहेत

**हस्तकर्म** – नृत्तामध्ये हातांचा व बोटांचा उपयोग फार असतो शरीराच्या निरनिराळ्या अवस्थांची शोभा बऱ्याच हातांच्या ठेवणीवर अवलंबून असते शरीरात चलनवलन सुरू होऊन त्याचा गुरुत्वमध्य ढळला, की हात शरीराचा तोल सांभाळण्यासाठी आपली स्वाभाविक स्थिती सोडून धावू लागतात या इतस्ततः धावणाऱ्या हातांना योग्य वळण लावून नृत्ताला शोभा आणायची असते हे अत्यंत कौशल्याचे काम आहे नाट्य व नृत्य या शास्त्रावरील ग्रंथांत अशा अनेक हस्तक्रिया दिलेल्या असतात या हस्तकर्मात बाहू, मनगट, हात व बोटे एवढ्या अवयवांचा समावेश असतो या सर्व प्रकारात हाताची बोटे ही फार महत्त्वाची असतात भिन्न भिन्न वस्तूंचा अभिनय दाखविण्यासाठी बोटांइतकी दुसऱ्या कशाचीही मदत होत नाही या बोटांच्या विशिष्ट ठेवणीवरून होणारे २४ हस्त प्रकार भरताने सांगितले आहेत, ते असे–

(१) पताक – हाताची सर्व बोटे पसरून अंगठा किंचित आखडणे विनियोग – शौर्य, धैर्य, गांभीर्य, इ. गुणांचे निदर्शन

(२) त्रिपताक – पताकहस्त तयार करून त्यातील अनामिका वाकविणे विनियोग – विरह, मूर्च्छना, स्वप्न, चिंता, इ. गोष्टींचे निदर्शन

(३) कर्तरीमुख – याचा अर्थ कात्रीचे तोंड असा आहे त्रिपताक करून तर्जनी व मध्यमा मागच्या बाजूस वळविल्याने हा हस्त होतो विनियोग – स्त्री व पुरुष यांचा वियोग दर्शविणे

(४) अर्धचंद्र – सर्व बोटे एका बाजूस व अंगठा दुसऱ्या बाजूस पसरून हात धनुष्याकार करणे विनियोग गचांडी देणे, प्राकृत माणसांना नमस्कार, इ. गोष्टींचे निदर्शन

(५) अराल – अंगठा आकुंचित करून तर्जनी मध्यभागी धनुष्याकार वाकविणे व बाकीची बोटे सरळ पसरणे विनियोग वादळ, विषपान, इ. गोष्टींचे निदर्शन

(६) शुकतुंड – याचा अर्थ पोपटाचा चोच असा आहे अरालहस्त करून अनामिका आकुंचित करणे विनियोग – बाण सोडणे, भाला फेकणे, मर्मोक्ती, इ. गोष्टींचे निदर्शन

(७) मुष्टी – सर्व बोटे तळहातास चिकटवून त्यावर अंगठा वाकवून ठेवणे विनियोग स्थैर्य, केशग्रहण इ. गोष्टींचे निदर्शन

(८) शिखर – मुष्टीतला अंगठा बोटांवर ठेवण्याऐवजी उचलून धरणे विनियोग – स्थैर्य, मदन, धनुष्य, शरीराला एकदम आलेला स्तंभ, इ. गोष्टींचे निदर्शन

(९) कपित्थ – याचा अर्थ कवठ असा आहे शिखरहस्तातील तर्जनी तळहाताला न टेकवता वाकडी करून उभ्या असलेल्या अंगठ्याभोवती तिचा वेढा घालणे विनियोग – धूप दीपार्चन, लक्ष्मी व सरस्वती यांचे निदर्शन

(१०) कटकामुख – कपित्थहस्तातील करंगळी व अनामिका तळहाताला न लावता वर उचलून वक्र करणे विनियोग – लगाम खेचणे, घोड्यावर बसणे, इ. गोष्टींचे निदर्शन

(११) सूीमख – रत्नामुख करून तजनी अगठ्याभोवती न फिरवता समोर करून ठेवणे विनियोग – परब्रह्म, शतक, विश्व, इ भावनाचे निदशन

(१२) पद्मकोश – हात उताणा करून अगठ्यासह सव बोटे एकमेकापासून दूर पण किचित वक्र करणे विनियोग – कमल, वाटोळ, घटा, चेडू, नतुळ, इ वस्तूचे निदशन

(१३) अलपल्लव – पदमकोशातील बोटे अधिक वाकवणे याला उपपद्मक असही म्हणतात विनियोग – सौंदर्य, कुचमडल प्रशसा, इ वस्तूचे व गोष्टीचे निदशन

(१४) ऊणनाभ – ऊणनाभ म्हणजे कोळी होय अलपल्ल वाची बोटे पहिल्या पेरात किचित मोडणे भरतार्णवात याचा उल्लेख नाही

(१५) मुकुल – म्हणजे कळी सव बोटे टोकाशी एकमेकास जुळवून उभी ठेवणे विनियोग – दान, द योक्ती, पचसख्या, इ गोष्टीचे निदशन

(१६) सर्पशीष – हाताची सव बोटे एकमेकास चिकटवून थोडी वाकवणे व हात उभा ठेवणे विनियोग– सर्प, चदनाचा शिडकाव, ठेंगू पुरुष, इ गोष्टीचे निदर्शन



हस्तक्रिया – पहिली ओळ – १ पताक, २ त्रिपताक, ३ अर्धचद्र, ४ कतरीमुख, ५ अरल दुसरी ओळ – १ शुकतुड, २ मुष्टी ३ शिखर ४ कपित्थ ५ कटकामुख तिसरी ओळ – १ पद्मकोश, २ ऊणनाभ, ३ मुकुल, ४ सपशीष ५ चद्रकला

(१७) मृगशीर्ष – सर्पशीर्षहस्ताची अंगठा व करंगळी ही दोन बोटे बाजूला करून सरळ उंच पसरणे व मधली तीन बोटे सर्पशीर्षाहून अधिक वाकवणे विनियोग – स्त्री, छत्रधारण, निवास, वस्त्र, मित, युद्ध, त्रिपुंड्र, इ गोष्टींचे निदर्शन

(१८) चतुरक – मृगशीर्षातला अंगठा बाजूला ठेवण्याऐवजी आखडल्या केलेल्या तीन्ही बोटांखाली ठेवणे विनियोग – कस्तूरी, किंचिदर्थ, सुवर्ण, ललाट, इ गोष्टींचे निदर्शन

(१९) हंसपक्ष – मृगशीर्षाप्रमाणे अंगठ्याशिवाय सर्व बोटे ठेवून अंगठा वाकडा करून कोणत्याही बोटाला न चिकटेल असा दूर ठेवणे विनियोग – मर्यादा, सेतुबंध, आच्छादन, एखाद्या दूर जाणाऱ्याला जवळ आणणे, इ गोष्टींचे निदर्शन

(२०) हंसमुख – अंगठा, तर्जनी व मध्यमा यांची अग्रे जुळवून अनामिका व कनिष्ठिका उभ्या ठेवणे विनियोग – चित्रकला, हार अंगावर वागवणे, देवताध्यान, इ गोष्टींचे निदर्शन

(२१) भ्रमर – मधले बोट व अंगठा यांची अग्रे एकमेकांजवळ आणणे तर्जनी वाकडी करणे व अनामिका आणि कनिष्ठिका उभ्या ठेवणे विनियोग – योग मौन, व्रत, भ्रमर इ गोष्टींचे निदर्शन

(२२) लांगूल – हंसमुख करून अंगठा, तर्जनी व मध्यमा यांची अग्रे एकत्र आणणे अनामिका किंचित वाकडी करणे व करंगळी उभी ठेवणे भरतार्णवात याचा उल्लेख नाही

(२३) संदंश – संदंश म्हणजे सांडशी; अरालहस्त करून अंगठा व तर्जनी यांची अग्रे जवळ आणणे बाकीची बोटे उभी पसरणे व तळहात खोलगट करणे विनियोग – माती रोमांच, जलबिंदू, रुद्राक्ष तिलाहुती इ गोष्टींचे निदर्शन

(२४) ताम्रचूड – ताम्रचूड म्हणजे कोंबडा अंगठा व मधले बोट यांची अग्रे जवळ आणणे, तर्जनी वाकवणे व हात खोलगट करून बाकीची बोटे त्याला लावणे विनियोग – तीन वेद, त्रिभुवन इ गोष्टींचे निदर्शन



हस्तक्रिया – पहिली ओळ – १ ताम्रचूड २ संदंश ३ हंसपक्ष, ४ हंसमुख, ५ भ्रमर
दुसरी ओळ – १ मृगशीर्ष, २ चतुरक, ३ सिंहमुख ४ अर्धपताक, ५ त्रिशूल

वरील हस्त भरताच्या नाट्यशास्त्राप्रमाणे दिले आहेत व विनियोग भरतार्णवावरून सांगितले आहेत भरताने दिलेल्या हस्तांपैकी काही हस्त नन्दिकेश्वराने दिलेले नाहीत व काही अधिक दिलेले आहेत हे सर्व हस्त करीत असता दुसरा हात हृदयावर ठेवावा, असे भरताने सांगितले आहे

वर दिलेल्या हस्तक्रिया या एका हाताच्या आहेत तशाच दोन्ही हातांच्या मिळून काही क्रिया नृत्तशास्त्रात सांगितल्या

आहेत त्याना सयुक्त हस्त म्हणतात हे हस्त भरताने तेरा दिलेले असून, त्याची नावे पुढीलप्रमाण आहेत – अजली, कपोतक, ककटक, स्वस्तिक, कटकावधमानक, उत्सग, निषेध, दोला, पुष्टपुट, मकर, गजदत, अवहित्थ व वर्धमान



सयुक्त हस्तक्रिया

पहिली ओळ– १ मकर, २ कपोतक, ३ कर्कटक, ४ अजली
दुसरी ओळ– १ स्वस्तिक, २ कटक वधमानक, ३ वर्धमान

←निषेध

पुष्पपुट→

**चारी** – यानतर चारीचा विचार येतो चारी म्हणजे पायानी केली जाणारी क्रिया होय चारीचा विचार बहुतेक नृत्तशास्त्र ज्ञानी केलेला आहे चारीचे दोन प्रमुख भाग होतात एक भौमीचारी व दुसरा आकाशचारी पुढील सोळा भौमीचारी भरताने दिल्या आहेत–

(१) समपादा – दो ही पावलात अतर न ठेवता ती एकमेकास चिकटून व एका रेषेत ठेवणे

(२) स्थितावर्ता – एक पाय भुईसरपट मागे घेऊन आणि वतुळगतीने फिरवून जाग्यावर ठेवणे

(३) शकटास्या – पाय शक्य तितका पुढे पसरून कबरेच्या

वरील शरीराचा भाग मागे खाली वाकवणे व छाती वर घेणे

(४) अधिक्रा – डावा पाय उजव्याच्या माग ओढून घेणे

(५) चाषगती – उजवा पाय पसरून परत मागे घेणे व डावा पाय उजव्या पायाजवळ आणून ठेवणे

(६) विच्यावा – समपाद ठेवून चाषगती करणे व ती करीत असता पायाचा अग्रभाग वक्र करून हळू हळू जमिनीवर आघात करणे

(७) एलकाक्रीडित – अग्रतल पायावर उभे राहून उच उडी मारणे व परत तसेच उभे राहणे

(८) बद्धा – एका पोटरीवर दुसरी पोटरी ठेवून स्वस्तिक करणे व माड्या हालवणे

(९) ऊरूद्वृत्ता – अग्रतलसचर पाय टाच बाहेरच्या बाजूने येईल, अशा त हने ठेवून मांडी वाकडी करून फिरविणे

(१०) अड्डिता – उजवा पाय नुसत्या बोटावर उचलून तो एकदा पुढे व एकदा मागे असा दुस या पायाला चिकटवणे

(११) उत्स्यन्दिता – पाय पुढे टाकताना कनिष्ठिकेच्या बाजूने वाटोळा फिरवून पुढे टाकणे व अगठ्याच्या बाजने वाटोळा फिरवून परत मागे घेण

(१२) जनिता – मुष्टिहस्त छातीवर ठेवून त्याच बाजूचा पाय अग्रतलसचर करणे

(१३) स्कदिता – एक पाय दुस या पायापासून पाच ताल पुढे पसरणे ताल म्हणज अगठा व मध्यमा यामधील अतराहून थोडे अधिक अतर होय

(१४) अपस्कदिता – वरील पाय पुढे करण्याऐवजी पाच ताल मागे घेणे

(१५) समोत्सरितवल्ली – तलसचर पाय क्रमाक्रमाने आतल्या बाजूने वतुलाकार फिरवीत मागे मागे टाकणे

(१६) मतल्ली – पायाचे स्वस्तिक करून एकेक पाय वाटोळा फिरवून मागच्या अगाने स्वस्तिक होईल अशा रीतीने घेणे

आकाशचारीचेही सोळा प्रकार होतात, ते असे –

(१) अतिक्राता – पाय कुचित करून एकदम वर उचलून पुढे पसरणे व परत उच करून खाली आणणे

(२) क्राता – पाय उचलून तो पुढे टाकण्याचा आविर्भाव करणे व तो परत जाग्यावर टाकणे

(३) अपक्राला – कुचितपाद करून गुडघा छातीइतका उच नेणे व दुसरा पाय उद्घट्टित करणे

(४) ऊर्ध्वजानू – अपक्रातेतील पाय उद्घट्टित न करता तसाच ठेवणे

(५) नूपुरपादिका – उजवा पाय पाठीमागे नेऊन अचित करणे व त्याची टाच जमिनीला न लावता तो अग्रभागाने जमिनीवर टेकवणे ही चारी पैजणातील घुगरू वाजवायला फार उपयोगी पडते

(६) सूची – उजवा पाय कुचित करून गुडघ्याहून वर जाईल असा पुढे फेकणे व तो केवळ अगठ्याच्या अग्राचा आधार घेऊन खाली टेकवणे

(७) दोलापाद – एक पाय कुचित करून वर करणे व तो झोक्याप्रमाण हाल्वून अचित करून खाली टाकणे

(८) क्षिप्ता – उजवा पाय कुचित करून वर उचलणे व तो दुस या पायाच्या डाव्या बाजूस पोटऱ्याचे स्वस्तिक बनेल अशा रीतीने टाकणे

(९) आविद्धा – माड्यात स्वस्तिक करून कुचित पाय पुढे पसरणे व तो खाली आणताना त्याचा चवडा दुस या पायात अडकविणे

(१०) उद्वृत्ता – पाय अचित करून दुस या पायात अडकविणे व मग मांडीला टाच लागेल अशा त हने दुसऱ्या मांडीला त्या पायाने विळखा घालणे याच स्थितीत शरीर वर उचलून वरच्यावर गिरकी घेतल्याने दुसरा पायही आपोआप फिरतो

(११) विद्युद्भ्राता – पाय पाठीकडे वळवून डोक्याला लावणे व अशा स्थितीत एका पायावर गिरकी घेणे

(१२) अलाता – पाय पाठीमागच्या बाजूला वळवून व चोहोकडे फिरवून टाचच्या आधारावर टेकवणे

(१३) भुजगत्रासिता – पाय कुचित करून व वर उचलून दुस या पायाच्या मांडीच्या मागे ठेवणे

(१४) हरिणीप्लुता – अतिक्रातेतील पाय सम करून पोटरी वाकवणे, टाच मांडीस लावणे व उडी मारून पाय खाली टाकणे

(१५) दडपादा – नूपुरपाद पुढे पसरून क्षिप्त करणे असे केल्याने दुस या पायाच्या बाहेरील बाजूला पोटऱ्याचे स्वस्तिक होईल मग तो स्वस्तिकाचा पाय उचलून पसरणे व खाली टाकताना अचित करून दुस या पायात अडकवणे

(१६) भ्रमरी – पाय अतिक्रात करून मग सम करणे व कमरेखालचा भाग वळवून दुसऱ्या पायावर गिरकी मारणे

या सव हस्त पादक्रिया निष्णात गुरूकडून शिकायच्या असतात व चिकाटीच्या अभ्यासाने साध्य करायच्या असतात वाचकाल्याही नुसत्या शाब्दिक वणनावरून त्या नेमकेपणे समजणार नाहीत

वर दिलेल्या चारीपैकी दोन चारी एका वेळी करणे याला करण म्हणतात अनक करणे एकत्र करणे या गोष्टीला खड म्हणतात आणि एकामागून एक तीन किंवा चार खडे करणे याला मडल म्हणतात युद्धनृत्तात याचा उपयोग होतो

भ्रमर, आस्कन्दित आवर्त, अड्डित, शकटास्य, अध्यर्ध पिष्टकुट्ट व चाषगती ही भौम मंडल असून अतिक्रांत, वामविद्ध, विचित्र, सूचिविद्ध, दंडपार्श्व, विवृत्त, ललितसंचर, अलात, ललित, क्रांत, भ्रमरक, आस्कंदित ही आकाशिक मंडले होत. भरताने नाट्यशास्त्रात यांचा तपशील सांगितला आहे.

करणांच्या संबंधात श्रीमती गोदावरी केतकर लिहितात—

नाट्यशास्त्रात या एकशेआठ करणांची जरी नामावळी दिली असली, तरी लक्षण देताना स्वस्तिक, दंडपक्ष, भुजंगत्रस्त रेचित, नूपुर, वशाखरेचित, परिच्छिन्न आणि ललित या सात करणांचा लक्षण दिलेला आढळत नाहीत. कदाचित ती गहाळ झाली असावीत. नटराजाच्या देवळातील चित्राखाली जी करणांची लक्षणं दिली आहेत, त्यात स्वस्तिक, दण्डपक्ष, भुजंगत्रस्तरेचित, नूपुर व वशाखरेचित यांची लक्षणे सापडतात. परंतु परिच्छिन्न आणि लोलित यांची लक्षणे सापडत नाहीत. ही दोनही अभिनवगुप्ताने आपल्या टीकेत दिली आहेत. नाट्यशास्त्र, नटराजाचे देवालय व अभिनव भारती यांपैकी कोठेही सारी लक्षणे सापडत नाहीत. पण या तिहींचे एकीकरण केले असता सर्व प्रकारची लक्षणे आढळतात.

काही महत्त्वाच्या करणांची नावे अशी—तलपुष्पपुट, वर्तित, वलितोरु, अपविद्ध, समनख, लीन, स्वस्तिकरेचित, मंडलस्वस्तिक, निकुट्टक, इत्यादी.

वर दिलेल्या हस्त पादादी क्रिया, चारी, करणे, मंडले, इ. प्रकार हे एकेकट्या व्यक्तीने करायचे नृत्तप्रकार होत. याशिवाय अनेक व्यक्तींनी मिळून करायचेही काही नृत्तप्रकार भरताने सांगितले आहेत. पाश्चात्त्य पद्धतीची बहुतेक नृत्ते स्त्री-पुरुष संमिश्र असतात. पण भरताने तशा प्रकारचे नृत्त कुठेही सांगितलेले नाही.

समूहनृत्ताचे भरताने पिंडी, शृंखला, लता व भेद्यक असे चार बंध सांगितले आहेत (ना. शा. ४.२७०). प्राचीन काळच्या युद्धात चक्रव्यूह, शकटव्यूह, सुपर्णव्यूह, इ. नावांनी जशी सैन्यरचना करीत, तशाच प्रकारची रचना पिंडीबंधात करायची असे. मयूरपिंडी, त्रिशूलपिंडी, कमलपिंडी, गरुडपिंडी, इ. त्यांची नावे आहेत. नावाप्रमाणे त्या बंधाचा आकार समजावा. शृंखलाबंधात नर्तकांनी एकमेकांच्या हातात हात घालून उभे राहायचे असते. लताबंधात नर्तकांनी वेलीच्या जाळ्याप्रमाणे आपली रचना करायची असते. भेद्यकबंधात पिंडीबंधाप्रमाणे एखादी आकृती बनवली असता प्रत्येक व्यक्तीला विविध हस्ताभिनय व अंगविक्षेप करायची मुभा असते.

नृत्तातील हावभाव, अंगविक्षेप व हस्तपादादी क्रिया यांचा नृत्यातही उपयोग करतात. त्यामुळे नृत्य शिस्तबद्ध, सुघटित आणि सुंदर दिसते. पहा—नृत्य. [ भरतार्णव, भ. ना. शा. ]

**नृत्य** एक ललित कला. नृत् = नाचणे या धातूवरून नृत्त, नृत्य, नर्तन, इ. शब्द बनले आहेत. नृत्याची व्याख्या अभिनयदर्पणात दिली आहे, ती अशी—

**रसभावव्यञ्जकादियुतं नृत्यमितीर्यते ।**

अर्थ—रस, भाव आणि व्यंजक (अभिनय), इत्यादींनी युक्त असलेले ते नृत्य म्हटले जाते.

ताल, अभिनय आणि लालित्य या तीन्ही कलांचा मनोहर संगम म्हणजे नृत्य होय. विविध प्रकारचे पदन्यास, हस्तमुद्रा, अंगविक्षेप, नेत्रविक्षेप, भ्रूविक्षेप आणि अभिनय यांच्या द्वारे नृत्यात रस आणि भाव यांची अभिव्यक्ती करायची असते. नृत्य हे एखाद्या विषयावर, संकेतावर किंवा कथानकावर आधारलेले असते. स्वीकृत विषय किंवा कथानक कोणत्याही शब्दाचा अवलंब न करता केवळ अभिनयाच्या आधारावर प्रेक्षकांच्या अंतःकरणापर्यंत नेऊन पोचवणे, हे नृत्याचे कार्य असते आणि तेच त्याचे वैशिष्ट्य असते. नृत्त हे याच्या उलट आहे. नृत्ताला एखादा विषय नसतो. त्यात केवळ पदविन्यास, हस्तमुद्रा करणे, चारी, इ. प्रकारांनी विविध अवयवांची मनोज्ञ हालचाल दाखवायची असते आणि पदन्यासादी हालचाली मृदंगाच्या बोलांच्या अनुषंगाने करायच्या असतात. नृत्त व नृत्य यातला प्रायोगिक फरक श्री. नटराज रामकृष्ण यांनी दाखवला आहे, तो असा—



नर्तकी — अमरावती शिल्प

नृत्त—पडदा वर जाण्यापूर्वी त्याच्या मागे नाजूक पदाघात व मृदंगावर 'ताम् थै ताम् थ' असे बोल ऐकू येतात. मग हळूच पडदा बाजूला होतो. एक नृत्यांगना शुभ्र वस्त्र परिधान करून आणि झगमगीत अलंकार घालून रंगभूमीवर प्रवेश करते. गुरू तालाचे बोल म्हणू लागताच त्या नृत्यांगनेच्या तनुलतेत थरक निर्माण होते. प्रथम तिचे नेत्र डावीकडून उजवीकडे आणि खालून वर असे हालू लागतात. नंतर मुखमुद्रेवर हळूच स्मित अवतरते. मान हळुवारपणे हालू लागते. 'ताम् थै तक् थै' बोल

चालूच असतात मग त्या बोलावरच तिचे हात हालायला सुरु वात होते पायातली घुगरे नाजूकपणे झकारू लागतात हळू हळू पायात गती सचारते सब शरीर लयीत भारले जाते हात, पाय, मान, डाळे याच्या हालचाली मृदगाच्या लयीला धरुन चालू होतात या सब हालचालीना शास्त्रशुद्ध बन्दिस्तपणा असता लय साभाळणे, सत्र शारीरिक हालचाली लयीच्या ठवयात करणे, हे या प्रकाराचे खास वैशिष्ट्य होय

नत्य – नर्तकी नटून थटून आणि ओजळीत फुले घेऊन रग भूमीवर प्रवेश करते रगभूमीच्या बाजूला दिग्दर्शनासाठी बस लेल्या गुरूच्या चरणी ती पुष्पाजली वाहते मग गुरु तिला दुसरी फुले देतो त्याची ओजळ ती देवाला वाहते हे करीत असताना तलपुष्पपुट ही तिच्या हाताची मुद्रा असते ही मुद्रा नत्यप्रार भाची असते १०८ करणामध्ये त्या मुद्रेला पहिले स्थान आहे मग राम, कृष्ण, शकर याच्यापैकी एखाद्या देवाच्या स्तवनाचे गीत सुरू होत हे गीत नतकीचा गुरू आणि त्याचे साथीदार गातात त्याला वाद्याची साथ असते मग त्या गीतातल्या आश याला अनुसरून नर्तिका अभिनय करू लागते स्तवनानतर एखादे कृष्णलीलेचे गीत सुरू होते ते बहुधा शृगारिक असते उदा गोकुळातल्या गोपी यमुनेवर स्नानाला जातात वस्त्रे उतरून तीरावर ठेवतात आणि पाण्यात उतरतात इतक्यात कुठूनतरी तो लीलानाटकी कृष्ण त्या हळूच तिथे येतो आणि त्या गोपीचा वस्त्रे कवळासून कदब वृक्षावर चढून बसतो गोपीना ते कळते त्या घाबरतात अगतिक होतात आणि पाण्यात राहूनच वस्त्रे देण्याबद्दल कृष्णाची विनवणी करू लागतात त्या विनवणीत थोडी वटावणी, थोडा रुसवा, थोडे कौतुक, थोडी भीती, असे समिश्र भाव असतात

नर्तकी नाचत, मागे पुढे होत, ते सब भाव आपल्या मुख मुद्रेवर दाखवू लागते हा सर्व अभिनय करीत असता तिची पावले तालावर पडत असतात पदन्यास, अगविक्षेप, हस्तमुद्रा, नजरेच्या फेकी, इ क्रियाच्या द्वारे ती गीतातला सगळा आशय आविष्कृत करते

जेव्हा एखादे कथानक नत्यासाठी स्वीकृत केले जाते, तेव्हा त्या कथानकातली पात्रे भूमिकेला योग्य असा पोषाख करून रगभूमीवर येतात आणि पदन्यास व विविध मुद्रा याच्या साह्या य्याने ते कथानक उभे करू लागतात त्यांच्या त्या अभिनयाला सगीताची साथ असते हा अभिनय मूक असतो फक्त तो नृत्या सह केला जातो, हे त्याचे वैशिष्ट्य अशा स्वरूप कथाकथनाला नृत्य – नाट्य म्हणतात कथकळी नृत्यात नत्यापेक्षा नाट्यालाच प्राधान्य दिलेले असते

**रस आणि भाव** – अभिनयादी कृतीच्या द्वारे रस आणि भाव अभिव्यक्त करणे म्हणजे नृत्य, ही व्याख्या वर सागितली हे रस आणि भाव कोणते आणि कसे व्यक्त करायचे ते आता सागायचे

भारतीय सौंदर्यशास्त्रात रसाला महत्त्वाचे स्थान आहे शृगार, वीर, करुण, अद्‌भुत हास्य, भयानक, बीभत्स व रौद्र असे आठ रस मानलेले आहेत क्वचित शात नावाचा नववा रसही मान तात प्रत्येक रसाचा वेगवेगळा स्थायीभाव असतो उदा० शृगाराचा रती, वीराचा उत्साह, इत्यादी स्थायीभावाप्रमाणच प्रत्येक रसाचे विभाव आणि अनुभाव असतात या विभावानु भावासह स्थायी भावाचा परिपोष केल्याने रसनिष्पत्ती होते काव्यात ती रसनिष्पत्ती शब्दाच्या साह्याने होते, तर नत्यात ती हस्तपादादि विन्यास मुखमुद्रेतले बदल आणि विविध प्रका रचे अभिनय, याच्या साह्याने होते चाल मद, जलद, वक्र किंवा अडखळणारी, हात ताठ सल, लवते, बोटाची रचना अवा स्तव, उभे राहण्याची ढब सरळ, ताठ, पाक आलेली, तोल बिघडलेली, या गोष्टीनी वेगवेगळ्या रसाची अभिव्यक्ती होत असली, तरी मुखचर्या ही सर्वांत अधिक भावदर्शी असते चर्ये वरून त्या त्या माणसाची तत्कालीन मनोवृत्ती समजू शकते म्हणून नत्यविशारदानी विविध रसाच्या चर्या सागितल्या आहेत, त्या अशा—

शृगारचर्या – उत्साही, निमळ आकर्षक व प्रिय व्यक्तीकडे किंवा त्या दिशेकडे टक लावून पाहणारी विप्रलभ शृगारात झुरणीस लागल्याचा भाव दर्शविणारी

वीरचर्या – गभीर, स्थिर व स्तिमित

करुणचर्या – दृष्टी अर्धमीलित, नासाग्राकडे लागलेली व बाहुल्या निस्तेज

अद्‌भुतचर्या – उत्साही, पण सकोचीत व डोळे अर्धोन्मीलित

हास्यचर्या – डोळ्यातल्या बाहुल्या अर्ध्या झाकलेल्या, पण तरल क्वचित स्थिर, क्वचित चचल

भयानकचर्या – चेहरा अस्वस्थ व भेदरलेला पापण्या क्वचित ताठ, क्वचित खाली पळून जाण्याचा भाव

बीभत्सचर्या – डोळे अर्धोन्मीलित, बाहुल्या अस्वस्थ दृष्टी वारवार आजूबाजूस पाहणारी दृष्टीचा वारवार सकोच

रौद्रचर्या – दृष्टी अस्वस्थ, चेहरा लाल, कठोर आणि उग्र भृकुटी आकुचित

**भाव** – इथे भाव म्हणजे स्थायीभाव समजायचे नाही, तर भाव शब्दाने सचारीभाव किंवा तरल मनोवस्था विवक्षित आहे शरीरज, अयत्नज व स्वभावज असे तीन प्रकारचे मुख्य भाव मानलेले असून त्याचे पोटभेदही सागितले आहेत

शरीरज – शरीराशी सबध ठेवणारा भाव याचे तीन पोट

भेद पुढील प्रमाणे होतात – (१) हाव – मनातल्या भावछटांना अनुसरून डोळे आणि भुवया वदलणे (२) भाव – राजस व तामस विकारांनी मनात होणारा क्षोभ हा भाव बाह्य नसून आंतरिक असतो (३) हेला – शृंगारदर्शक चेष्टा किंवा लीला

अयत्नज – सहजपणे किंवा उत्स्फूर्तपणे होणारे किंवा दिसणारे तनमनावरचे परिणाम याचे सात पोटभेद सांगितले आहेत – (१) शोभा – सौन्दर्य, तारुण्य व प्रियमीलन यांचा शरीरावर पडणारा सौम्य प्रभाव (२) कांती – शरीरशोभेवर मनोविकारांची छाया (३) माधुर्य – भावाचा सौम्य प्रभाव (४) दीप्ती – कांतीचा विकास (५) प्रागल्भ्य – मनातला गोंधळ दिसू न देणे (६) धैर्य व (७) औदार्य – मनाची विशालता

स्वभावज – परिस्थितीला अनुसरून न कळत किंवा सहजपणे होणाऱ्या क्रिया किंवा गोष्टी याचे दहा भेद मानलेले असून, ते मुख्यत्वे स्त्रीसुलभ भाव आहेत ते भाव असे – (१) लीला – प्रियकराचे अनुकरण उदा० राधेने कृष्णाप्रमाणे मुरली वाजवण्याची नक्कल करणे (२) विलास – प्रेमिकाची भेट होताच शरीरात व आवाजात उत्पन्न होणारा कंप (३) विच्छित्ती – कांतीचा प्रभाव आकर्षक वेषभूषेमुळे अधिक गहिरा करणे (४) विभ्रम – प्रियकराच्या दर्शनाची लगबग



नत्यातील विविध अवस्था – अमरावती शिल्प

होणे व त्या गडबडीत वस्त्र व अलंकार योग्य ठिकाणी न घालता भलत्याच ठिकाणी घालणे (५) किलिकिंचित – क्रोध, अश्रू व हर्ष हे भाव एकत्र दर्शवणे (६) मोट्टायित – प्रियकराच्या किंवा तत्संबंधी वस्तूच्या नावाचा उल्लेख होताच लाजणे (७) कुट्टमित – प्रियकर जवळ येताच खोटा राग दाखवणे (८) बिब्बोक – मनात अभिमान नसताही प्रियकराशी रुसवा धरणे (९) ललित – हातापायांच्या हालचाली सुंदर करणे व (१०) विहृत – प्रियकराचे दर्शन होताच मूक राहून फक्त लज्जा व्यक्त करणे

**अभिनय** – नाट्यातील रस आणि भाव हे प्रेक्षकाच्या अंतःकरणापर्यंत ज्याच्या योगे पोचवले जातात, तो अभिनय होय हे काम नाट्यातली पात्रे शारीरिक आणि मानसिक हावभावांच्या द्वारे करीत असतात अभिनयाचे लक्षण अभिनयदर्पणात सांगितले आहे, ते असे –

> **अभिव्यञ्जन् विभावानुभावादीन् नाटकाश्रयान् ।**
> **उत्पादयन् सहृदये रसज्ञानं निरन्तरम् ।।**
> **अनुकर्तुं स्थितो योऽर्थोऽभिनयः सोऽभिधीयते ।**
>
> (अभि द ४९–५०)

अर्थ – नाटकाला (नत्याश्रित कथावस्तूला) अनुकूल अशा विभाव व अनुभाव यास प्रकट करणारा व सहृदयाच्या अंतरात अखंड रसज्ञान उत्पन्न करणारा, असा नर्तकाच्या ठिकाणी असलेला जो अर्थ (गुण) त्याला अभिनय म्हटले जाते

अभिनयाचा संबंध नाट्याशी जोडलेला असला, तरी त्याचा अर्थ तेवढ्याचपुरता मर्यादित नाही सूचक अनुकरण म्हणजे अभिनय असे त्याचे एका वाक्यात वर्णन करता येईल असा अभिनय हे नृत्याचे एक महत्त्वाचे अंग असते अभिनयाचे आंगिक, वाचिक, आहार्य व सात्त्विक असे चार प्रकार मानलेले आहेत (अभिनय पाहा) नत्याला खरा अर्थ प्राप्त होतो, तो अभिनयामुळेच

**नृत्याचा सरंजाम** – नर्तक किंवा नर्तकी रंगभूमीवर नाचतात, तेव्हा त्यांच्या बाजूला कोणी कसे असावे, त्याविषयी पुढील संकेत सांगितलेला आहे —

> **रङ्गमध्ये स्थिते पात्रे तत्समीपे नटोत्तमः ।**
> **दक्षिणे तालधारी च पार्श्वयोस्तु मृदङ्गिकौ ।।**
> **तयोर्मध्ये गीतकारा श्रुतिकारास्तदन्तरे ।**
> **एवं तिष्ठेत् क्रमेणैव नाट्यादौ रङ्गमण्डपे ।।**
>
> (अभि द २६–२७)

अर्थ – पात्रे रंगभूमीवर आली असता समोर मुख्य नट (नर्तक), दक्षिणेकडे तालधारी, दोन्ही बाजूस पखवाजी, त्यांच्यामध्ये गाणारे लोक आणि त्यांच्या जवळ श्रुतिकार (सुषिरवाद्ये वाजवणारे) अशा क्रमाने नत्याच्या आरंभी सर्वांनी उभे राहावे

**नर्तक व नर्तकींचे रूप-गुण** – प्राचीन काळी नृत्य करणाऱ्या स्त्रिया या मुख्यत्वे देवदासी. परंतु ही नर्तकी कशी असावी, त्या विषयी अभिनयदर्पणात सांगितले आहे ते असे —

> तन्वी रूपवती श्यामा पीनोन्नतपयोधरा ।
> प्रगल्भा सरसा कान्ता कुशला ग्रहमोक्षयो ।।
> चारताललयाभिज्ञा मण्डलस्थानपण्डिता ।
> हस्तज्ञा स्थाननिपुणा कणपू च विलासिनी ।।
> विशाललोचना गीतवाद्यतालानुवर्तिनी ।
> पराध्यभूषा संपन्ना प्रसन्नमुखपङ्कजा ।।
> नातिस्थूला नातिकृशा नात्युच्चा नातिवामना ।
> एवंविधगुणोपेता नर्तकी समुदीरिता ।।
>
> (अभि द २८-३१)

*अर्थ* – नर्तकी ही सुंदर देहयष्टीची, रूपवती, पुष्ट व उन्नत स्तनांची, प्रगल्भ, कांतिमती, कमनीय, ग्रहण करणे व सोडणे यांत चतुर, चारी, ताल व लय जाणणारी, मंडले करण्यात पंडित, हस्तमुद्रांत प्रवीण, स्थानज्ञ, करणे दाखविण्यात कुशल, विशाललोचना, गीत, वाद्य व ताल यांना अनुसरून नाचणारी, वरअलंकारमंडित, प्रसन्नमुखी, अति स्थूल नव्हे, अति ठेंगू नव्हे अशा मध्यम बांध्याची असावी.

> रूपवान् मधुराभाषी कुली वाग्मी पटुस्तथा ।
> कुलाङ्गनासुतश्चैव शास्त्रज्ञो मधुरस्वर ।।
> गीतवाद्यादिनृत्यज्ञ सिद्धक प्रतिभाववान ।
> एतादृशगुणयुक्तो नट इत्युच्यते बुध ।।

*अर्थ* – रूपवान, मधुरभाषी, कुशल युक्तीने बोलणारा, चतुर, कुलस्त्रीचा पुत्र, शास्त्र जाणणारा, गोड आवाजाचा, गीत, वाद्यादी नृत्यांगे जाणणारा, सिद्ध, अभिप्रायकुशल अशा प्रकारचा गुणी पुरुष हा नट (नर्तक) होय, असे ज्ञाते लोक म्हणतात.

नृत्याचे बहि प्राण व अंत प्राण म्हणून काही गुण सांगितले आहेत, ते असे–

> मृदङ्गश्च सुतालश्च वेणुगीतिस्ततः श्रुतिः ।
> एकवीणा किङ्किणी च गायकश्च सुविश्रुत ।।
> इत्येवम् वयज्ञश्च पात्रप्राणा बहि स्मृता ।
> जव स्थिरत्व रेखा च भ्रमरी दृष्टिरश्रम ।।
> मेधा श्रद्धा वचोगीतिस्त्वन्त प्राणा दश स्मृता ।।
>
> (अभि द ३९-४१)

*अर्थ* – मृदंग, टाळ, बासरी, श्रुती (पुंगी), घुंगरू, तंबोरा व गायक लोक हे सात नृत्याचे बाह्य प्राण होत. गती, स्थैर्य, मर्यादा, गिरकी, दृष्टी, थकवा न येणे, मेधा, श्रद्धा, निर्दोष वाणी व गाता येणे हे दहा नृत्याचे अंत प्राण होत.

**नृत्यभेद** – तांडव (पुरुषांनी करायचे व प्रमाथी) आणि लास्य (स्त्रीने करायचे व नाजूक) असे नृत्याचे दोन प्रमुख भेद आहेत (अभि द ३२). तांडव आणि लास्य या दोन नृत्यप्रकारांचा उगम कसा झाला, त्याविषयी जी कथा सांगितली आहे, ती अशी–

ब्रह्मदेवाने भरताला नाट्यवेद शिकवला. त्या वेदाला अनुसरून भरताने एक नाट्यप्रयोग बसवला व तो कैलासावर शिवापुढे करून दाखवला. शिवाने त्रिपुरासुराचा संहार केला, ते कथानक भरताने नाट्यासाठी निवडले होते. तो प्रयोग पाहून शंकर प्रसन्न झाला. शंकराने मग भरताला म्हटले–

"*तुझा नाट्यप्रयोग फार छान झाला. पण त्यात एक उणीव राहिला आहे. तुझ्या नाट्याला नृत्याची जोड नाही. ती तू दे. निदान नाट्याच्या पूर्वांगात तरी नृत्याचा समावेश हवाच.*"

पण भरत ती गोष्ट करू शकत नव्हता. कारण त्याला नृत्यकला अवगत नव्हती. शिवाला ती गोष्ट समजल्यावर त्याने आपला परम शिष्य तंडू याला आज्ञा केली की 'तू भरताला नृत्य शिकव.' तंडूने त्याप्रमाणे भरताला नृत्य शिकवले. तंडूने दिले म्हणून त्याला तांडव हे नाव पडले. पण शिवाचे तेवढ्याने च समाधान नव्हते म्हणून त्याने पार्वतीला प्रेरणा दिली. पार्वतीला लास्य नामक सुकुमार नृत्यकला अवगत होती. ती मग तिने भरताला शिकवली. अशा प्रकारे भरत हा तांडव आणि लास्य या दोन्ही प्रकारच्या नृत्यांत तरबेज झाला. तिथून पुढे हे दोन्ही नृत्यप्रकार परंपरेने भारतात प्रसार पावले.

**नृत्याची प्रेरणा** – नृत्यकलेचा जन्म मानवाच्या जन्माबरोबरच झालेला आहे. प्राथमिक किंवा अनियमित स्वरूपात नृत्य हे माणसामध्ये उपजतच असते. अर्भकावस्थेतले मूल आपल्याला जे हवे नको असेल, ते शब्दांच्या माध्यमातून सांगू शकत नाही. म्हणून ते आपला आनंद हातापायांची हालचाल करून व्यक्त करते. एखादी गोष्ट जेव्हा त्याला प्रतिकूल वाटते, नकोशी असते, तेव्हाही ते आपली ती नाराजी रडून व हातपाय झाडून प्रकट करते. चालते बोलते मूलही आपला आनंद नाचून, उड्या मारूनच प्रकट करते. सुसंस्कृत माणसाचे हर्षामर्ष संयत असतात, पण अशिक्षित रांगड्या माणसांना आपल्या हर्षामर्षांवर नियंत्रण ठेवता येत नाही. म्हणून आनंदाच्या क्षणी ते उत्स्फूर्तपणे नाचू लागतात. त्यांचे हातपाय स्थिर राहतच नाहीत. याचाच अर्थ नृत्य हे माणसाच्या जीवनात उपजतच आहे, असा होतो.

निसर्गातून आणि पशु-पक्ष्यांच्या जीवनातूनही त्याला नृत्याची प्रेरणा मिळते. वायुलहरींच्या आघाताने लता, वेली

आणि तृणपर्णे नाचू लागतात वर्षाऋतूत जलधारांचे व बिज लीचे नृत्य सुरू होते अळवासारख्या पानावर जलबिंदू नाचत राहतात सागराच्या पृष्ठभागावर लाटांचे अखंड नृत्य सुरू



नृत्य शिकणाऱ्या मुली

असते मेघगर्जना सुरू होऊन पावसाचा संभव निर्माण झाला, की उद्यानातला मोर आपला पिसारा फुलवून नृत्याचा फेर धरतो त्याच्या या पदन्यासाची नक्कल करणे नर्तकालाही अव घड वाटते सरोवरातला राजहंस ज्या डौलदार गतीने इकडे तिकडे हिंडतो, त्या गतीचीही नृत्यातच गणना करावी लागेल साधे साधे पक्षीही जेव्हा जमिनीवरून चालतात, तेव्हा त्यांच्या चोचीचे आणि पिच्छाग्राचे नर्तन पाहत राहावेसे वाटते

अशा प्रकारे निसर्गात सर्वत्र भरून राहिलेल्या या नर्तन-क्रियेने माणसाला या कलेविषयी गोडी व ओढ निर्माण केली या नाचत्या निसर्गाचे अनुकरण करता करता माणूस त्या कलेचा हळूहळू विकास करू लागला प्रथम त्याविषयी काही अलिखित विधिनिषेध निर्माण झाले, काही संकेत रूढ झाले आणि मग त्या सर्वांचे मिळून नृत्यशास्त्र बनले शास्त्राने नृत्यकलेचे नियम केले, संकेत सांगितले आणि त्या कलला मनोज्ञ आकार दिला गायन, वादन आणि नाट्य या तीन पूरक कलांची जोड देऊन ती नृत्यकला शास्त्रपूत व नयनमनोहर केली त्यातून पुढे गुरु–शिष्य परंपरा निर्माण झाल्या, अनेक संप्रदायही उत्पन्न झाले आणि त्या सर्वांच्या अवस्थेतून आणि प्रयत्नातून नृत्यकलेला ललितकलांच्या समूहात श्रेष्ठ दर्जाचे स्थान प्राप्त झाले मनुष्याचा जसजसा सांस्कृतिक विकास होत गेला, तसतशी त्याची नृत्यकलाही प्रगत व परिष्कृत होत गेली

भारत हा एकच असा देश आहे, की त्याने आपली नृत्यकला केवळ मनोविनोदनासाठी न वापरता तिला ईश्वराच्या सेवेत साधकी लावले ईश्वरोपासनेचे एक अंग म्हणून त्याने मंदिर संस्थेत नृत्यकलेला जागा दिली आणि मंदिराच्या आश्रयाने आणि देवाच्या साक्षीने एक धार्मिक अंग म्हणून तिची जोपा-सना केली त्याचबरोबर पुत्रोत्सव, देवोत्सव देवाची नित्य पूजा, पालखीचा सोहळा, नैमित्तिक सण समारंभ, यज्ञसंस्था, राजदरबार, इ अनेक ठिकाणी नृत्यकलेची पावले झंकारली आणि आजही झंकारत आहेत त्या दृष्टीने नृत्यकलेचा इतिहास पाहणे बोधप्रद ठरेल

**नृत्याचा इतिहास** – नृत्य, गायन आणि वादन या तीन्ही कलांचा संस्कृत वाङ्मयात एकत्र उल्लेख आढळतो वेदकाली या तीन्ही कला आर्य लोकांना माहीत होत्या उषा ही नृत्य करीतच अवतरते, असा एक उल्लेख उषासूक्तात आहे (१ ९२ ५) वैदिक काळात नृत्यादी कलांना शिल्प म्हणत 'त्रिवृद्वै शिल्पं नृत्यं गीतं वादितमिति' = नृत्य, गीत, व वाद्य असे तीन प्रकारचे शिल्प आहे, असे कौषीतकी ब्राह्मणात म्हटले आहे (२९ ५) यज्ञविधीत वरील तीन्ही कला आवश्यक व उपयुक्त ठरल्या होत्या गवामयन सत्राच्या



पुडापट्टा नृत्य ( कथकळी )

शेवटी मार्जालीय धिष्ण्याभोवती दासींचे फेर धरून नृत्य होत असे, असे तैत्तिरीय संहितेवरून कळते (७ ५ १० ३२) यज्ञसंस्थेप्रमाणेच उपासनामार्गातही शिव, विष्णू, इ देवतांना

संतुष्ट करण्यासाठी नृत्यादी गोष्टी अवश्य कराव्या, असे पुराणात वारंवार सांगितलेले आढळते या संबंधात शिव पुराणात बाणासुराचे उदाहरण दिले आहे, (२ ५ ५२ २) ते असे—

**पुरा बाणासुरो नाम दववोषाच्च गर्वित ।**
**कृत्वा ताण्डवनृत्य च तोषयामास शङ्करम ।।**

अर्थ – पूर्वी बाणासुर दवदोषाने गर्विष्ठ झाला होता त्याने तांडव नृत्य करून शंकराला संतुष्ट केले

कोणत्याही महोत्सवाची परिपूर्ती नृत्य, गायन आणि वादन यांच्याशिवाय होतच नसे यज्ञविधीत जे महत्त्व गाथागायनाचे, तेच महत्त्व उत्सवात नृत्य गायनाचे कृत्यकल्पतरूत कौमुदी महोत्सवाचे जे वर्णन आहे, त्यात नृत्य आवश्यक मानले आहे पुराणात देवयात्राविधी वर्णिला आहे, त्यात पौरजनांनी नृत्य करावे, असे म्हटले आहे देवपूजा झाल्यावर देवाला राजोपचार म्हणून नृत्यगीतांनी रिझवावे, असे उल्लेख तर स्मृती आणि पुराण यांत जागोजाग आहेत कोणत्याही अशुभ गोष्टीची शांती करताना मंगल म्हणून गीत नृत्य करावे, असे मत्स्य पुराणात म्हटले आहे (२३२ १५) हेमाद्रीने आपल्या चतुर्वर्गचिंतामणीच्या व्रतखंडात जी व्रते दिली आहेत, त्यात नृत्य गीत हे आवश्यक मानले आहे याविषयी त्याने पुराणातून उद्धृत केलेले दोन श्लोक असे –

**देवताग्रे द्विजाग्रे च यो नित्य नृत्यमाचरेत ।**
***विनोदयति त स्वर्गे नित्यमप्सरसां गणा ।।***
**यो गीतवाद्यनृत्यानि मूल्य दत्त्वा तु कारयत ।**
**स शक्रभवने तिष्ठेद्यावदाहूतसम्प्लवम् ।।**

अर्थ – जो कोणी देवा–ब्राह्मणाच्या समोर नित्य नृत्य करील, स्वर्गात अप्सरांचे गण मनरंजन करतील जो गीत, वाद्य, नृत्य *या गोष्टी (देवासाठी) मूल्य देऊन करून घेईल तो कल्पांता*पर्यंत इंद्रभवनात वास्तव्य करील

रामायण व महाभारत यांतही नृत्यकलेचे उल्लेख वारंवार आढळतात त्या काळी राजेरजवाड्यांमध्ये जन्म, विवाह, इ मंगल संस्कार नृत्य–गायनाने साजरे केले जात अयोध्येत राम जन्माचा महोत्सव नटनर्तकांच्या आणि गायकांच्या नृत्यगायनाने साजरा झाला, असे वर्णन आहे ( वा रा बाल १८ ) उत्सव आणि समाज ( मेळावा ) हे प्रकार राष्ट्रवर्धन ( राष्ट्राची उन्नती करणारे ) असतात, असेही रामायणात म्हटले आहे (वा रा अयो ६७ १५) अशा उत्सवात नृत्य–गायन यांना धार्मिक कृत्यांच्या बरोबरीचे स्थान दिले जाई रामभेटीसाठी जात असता भरत जेव्हा भरद्वाजाच्या आश्रमात आला, तेव्हा *त्याच्या दरबारी स्वागतासाठी भरद्वाजाने अप्सरांना व गंधर्वां*ना नृत्य गायन करण्यासाठी पाचारले होते

विराट राजाच्या राजवाड्यात नृत्यशाळा होती आणि तिच्यात अनेक कुलकन्या नृत्यगायन शिकत होत्या राजकन्या उत्तरा हीही त्यात होती पाशुपतास्त्रप्राप्तीनंतर अर्जुन स्वर्गात गेला असता, तिथे त्याने नृत्यकला शिकून घेतली आणि अज्ञात वासात बृहन्नडा या रूपात वावरत असता त्याने ती उत्तरेला शिकवली, असे महाभारताच्या विराट पर्वात सांगितले आहे त्या काळी नृत्य गायन या कला श्रीमंतांच्या आणि राजेरजवाड्यांच्या मुलींना आवर्जून शिकवल्या जात कालिदासाच्या मालविकाग्निमित्र या नाटकात याचा पुरावा मिळतो अग्निमित्राच्या नृत्यशाळेत हरदत्त आणि गणदास या नावांचे दोन नृत्यशिक्षक होते आणि त्यांच्यात सदैव स्पर्धा चालत होती

पुराणातील स्वर्गवर्णनात नृत्य गायनाचा आणि त्या अनुषंगाने अप्सरा आणि गंधर्व यांचा हमखास उल्लेख आढळतो इंद्राच्या दरबारात नर्तिका म्हणून अनेक अप्सरा होत्या त्या नाचू लागल्या, की गंधर्व त्यांना गायन वादनाची साथ करीत एखाद्या ऋषि मुनीचा तपोभंग करण्याच्या कामी इंद्र अप्सरांचीच योजना करी व त्या अप्सरा तपोधन मुनींच्या पुढे हावभावयुक्त नृत्य करूनच त्यांना भुरळ घालण्याचा प्रयत्न करीत



राजनर्तकी– एक शिल्प

देवदासी या ऊर्वशी नामक अप्सरेच्या वंशज समजल्या जातात देवांना संतुष्ट करण्यासाठी देवालयात नृत्य करण्याच्या कामी देवदासींची नेमणूक केलेली असे देवस्थानातला पालखीचा सोहळा, रथयात्रा, महापूजा, नैमित्तिक उत्सव, या सर्व प्रसंगी देवापुढे देवदासींचे नृत्य चाले अजूनही काही ठिकाणी ते चालते पुरीच्या जगन्नाथाच्या देवळापासून दक्षिणेतल्या बहुतेक मोठ्या देवस्थानात देवदासींची नेमणूक केलेली आढळते

नर्तक देवता– कित्येक देव आणि देवता नृत्य करतात व त्यात प्रवीण असतात, असे पुराणावरून कळते अशा नर्तक देवमंडळीत

शिवाचे नाव प्रथम घ्यावे लागते शिव हा विश्वातला आदि नर्तक आहे नृत्यकलेतल्या त्याच्या प्रावीण्यामुळे भक्तांनी आणि नृत्याचार्यांनी त्याला नटराज किंवा नटनशिखामणी अशी पदवी दिली आहे व भारतात शिवाचे नटराज हेच रूप लोकप्रिय आहे शिवाच्या अष्टमूर्ती सांगितल्या आहेत, त्याचप्रमाणे वेगळ्या संदर्भात चार मूर्ती सांगितल्या आहेत संहारमूर्ती, दक्षिणामूर्ती, अनुग्रहमूर्ती आणि नृत्तमूर्ती अशी त्याची नावे आहेत नृत्तमूर्ती म्हणजेच नटराज होय अभिनयदर्पणात या नटराजाला नमन करताना त्याच्या नृत्याचे विश्वव्यापकत्व वाणले आहे, ते असे—

> आङ्गिकं भुवनं यस्य वाचिकं सर्ववाङ्मयम् ।
> आहार्यं चन्द्रतारादि तं नमः सात्त्विकं शिवम् ।।

*अर्थ* – त्रिभुवन हे ज्याचा आंगिक अभिनय, सर्व वाङ्मय हे ज्याचा वाचिक अभिनय आणि चंद्रतारादी (सर्व नभागण) हे ज्याचा आहार्य अभिनय अशा सत्त्व (अभिनय) रूप शिवाला नमस्कार असो

सृष्टी, स्थिती, संहार, तिरोभाव आणि अनुग्रह या पंचक्रिया तो नृत्याच्या द्वारेच करीत असतो शिवाचे हे नृत्य उत्तरेस कैलासावर आणि दक्षिणेत चिदंबरम या ठिकाणी चालते शिवाच्या या विश्वनृत्याचे वर्णन नाट्य नृत्यशास्त्रात आवर्जून केलेले असते त्याचबरोबर पुराणातही अनेक ठिकाणी शिव नृत्याची सुरस वर्णने केलेली आढळतात पुराणकारांच्या मते शिव हा पार्वतीला संतुष्ट करण्यासाठी नृत्य करीत असतो या विषयी स्कंद पुराणात पुढील श्लोक दिलेला आहे—

> कैलासशैलभवने त्रिजगज्जनित्रीं
> गौरीं निवेश्य कनकाञ्चितरत्नपीठे ।
> नृत्यं विधातुमभिवाञ्छति शूलपाणौ
> देवाः प्रदोषसमयेऽनुभजन्ति सर्वे ।।
>
> (स्कंद पु ३ ३ ६ ७६)

*अर्थ* – प्रदोषसमयी कैलासावरच्या भवनात नृत्य करण्याची इच्छा झाली, की शिव आपल्या पत्नीला सुवर्णखचित रत्नपीठावर बसवतो *(आणि तिच्या पुढे नाचू लागतो)* *(मग ते नृत्य* पाहण्यासाठी व त्याला साथ करण्यासाठी) सर्व देव त्याच्यापाशी येतात

एकदा तर मंदरपर्वतावर त्याने आषाढ शुद्ध चतुर्दशीला नृत्य सुरू केले, ते कार्तिक शुद्ध चतुर्दशीला समाप्त केले शिवाचा तो नृत्योत्सव पाहण्यासाठी नारद, देवल, व्यास, शुक, द्वैपायन, मरीची, कश्यप, इ महर्षी व इंद्रादी समस्त देव तिथे उपस्थित झाले होते (स्कंद पु नागर २५४)

सांप्रत उपलब्ध असलेल्या नाट्य नृत्यशास्त्राच्या ग्रंथात तांडव नृत्याचे पुढील सात प्रकार आढळतात –(१) आनन्दताण्डव (२) संध्याताण्डव (३) कालिकाताण्डव (४) त्रिपुरताण्डव (५) संहारताण्डव (६) गौरीताण्डव आणि (७) उमाताण्डव

शिवाच्या ज्या मूर्ती दक्षिणेत आढळतात, त्यांत संध्याताण्डव करणारा शिव द्विभुज असतो, तर गौरी–उमाताण्डव नृत्यातला शिव दशभुज असतो नटराजमूर्ती ही चतुर्भुज असते

अशा प्रकारे नृत्यशास्त्राने आणि पुराणांनी शंकरासारख्या देवाधिदेवाला नृत्यप्रिय व नृत्यनिष्णात बनवून नृत्यकलेला मांगल्य आणि पावित्र्य प्राप्त करून दिले देव ऋषी, मुनी, सिद्ध, इ सर्वांनी ज्या नृत्याची आवड दाखविली, ते नृत्य मानवांना पवित्र आणि स्वीकार्य वाटलेच पाहिजे, असा या सर्व प्रतिपादनाचा आशय दिसतो

*शिवभार्या उमा हीही नृत्यचतुर आहे लास्य या सुकुमार* नृत्यात ती प्रवीण आहे तिने ते नृत्य बाणासुरकन्या उषा हिला शिकवले, उषेने ते वृंदावनातल्या गोपींना शिकवले, तिथून ते



शिवपार्वती–नृत्य

यादवस्त्रियांसंगे द्वारकेत आले आणि तिथून देशभर पसरले

पार्वतीने एकदा शिवाबरोबर नृत्यस्पर्धा लावली होती, अशीही एक कथा आहे त्या नृत्यस्पर्धेत शिवाने तिला हरवण्यासाठी अनेक कठीण कठीण नृत्यप्रकार केले, पण तरीही ती हरेना शेवटी शिवाने आपला एक पाय मस्तकाला लावून ऊर्ध्वताण्डव सुरू केले पार्वतीला स्त्रीसुलभ लज्जेने तो प्रकार करणे अवघड झाले आणि त्यामुळे तिचा पराभव झाला

पार्वतीचेच एक उग्र रूप म्हणजे काली कालालाही नृत्याचे प्रेम असते, पण तिचे नृत्य मात्र लास्यपद्धतीचे नसून उग्र भयकर असते काली हा महाकालाच्या अर्थात शिवाच्या हृदयावर उभी राहून थयथया नाचते, असे तिचे वर्णन तंत्रग्रथात केले आहे छिन्नमस्ता हेही कालीचेच दुसरे रूप होय त्या रूपात ती आपलेच मस्तक तोडून व ते हातात घेऊन नृत्य करते बौद्ध मूर्ति चित्रकलेतही उमा व काली या दोघी नृत्य करीत असलेल्या दाखवल्या आहेत

शिवाची ही नृत्याची आवड त्याच्या सर्व परिवारातही उतरली आहे शिवाच्या नृत्यात गणपतीही भाग घेतो त्याच्या काही स्तोत्रात त्याला विकटसचतुर म्हटले आहे ते त्याची कला मक्ती लक्षात घेऊनच भारतीय शिल्पकलेनेही नाचणारा गणपती आढळतो व तो नृत्यगणपती म्हणून आळखला जातो

कार्तिकेय हा शिवाचा दुसरा पुत्र दक्षिणेत त्याला सुब्रह्मण्य म्हणतात तो शौर्यशाली देव आहे सूर पद्मासुराचा वध केल्यावर त्याने स्वत च ढोल वाजवून विजयनृत्य केले, अशी तमिळ वाङ्मयात कथा आहे शिवाचे गण आणि भैरव हेही आनदाच्या क्षणी उन्मुक्त नृत्य करतात, असे उल्लेख आहेत

विष्णूने मोहिनीरूप घेतल्यावेळी नृत्य केले होते, असे पुराणावरून कळते पण त्याच्या पुरुषरूपात त्याने नृत्य केल्याच प्रसिद्ध नाही त्याचा अवतार श्रीकृष्ण याला मात्र बालपणी नृत्याची आवड होती आणि ती कलाही अवगत होती, असे पुराणात



राधाकृष्ण–नृत्य

म्हटले आहे यमुनेच्या डोहात राहून गोकुळाला उपद्रव देणाऱ्या कालियनागाच्या फणावर कृष्णाने नृत्य केले, अशी कथा भागवत पुराणात आहे कृष्णाच्या या नृत्यातूनच नटवरीकथक या विशिष्ट नृत्यप्रकाराचा जन्म झाला आहे तमिळ पुराणातही ही कथा आढळते याशिवाय त्याने यमुनातटाकी शारद पौर्णिमेच्या रात्री गोपीसगे रासनृत्य केले, ही कथाही लोकविश्रुत आहे कृष्णाच्या या नृत्यप्रसगाची चित्रे आणि शिल्प भारतात विपुल आहेत

अजटा, वेरूळ, खजुराहो, इ ठिकाणी शिल्पकारानी नृत्य करणाऱ्या देवाच्या आणि विशेषत देवागनाच्या शेकडो मूर्ती कोरल्या आहेत नृत्यकलेतल्या विविध मुद्रा आणि अवस्थाने त्या मूर्तींच्या ठिकाणी दिसून येतात त्या मूर्तिकाराना नृत्यकलेतील हस्तमुद्रा, करणे, चारी, इ प्रकार सूक्ष्मपणे अवगत होते, हे त्या मूर्तसभारावरून कळून येते नृत्यकला, मूर्तिकला व चित्रकला या अन्योन्याश्रयी कला आहेत, असे विष्णुधर्मोत्तर पुराणात म्हटलेच आहे

**ग्रथ आणि ग्रथकार** – वैदिक काळात नृत्याचा प्रचार असला, तरी त्या कलेवरचा तत्कालीन ग्रथ मात्र उपलब्ध नाही या विषयावरचा सर्वांत प्राचीन ग्रथ म्हणजे नटसूत्र हा होय याचा काल ख्रिपूर्व ५०० वर्षाच्या सुमाराचा आहे शिलाली हा या ग्रथाचा कर्ता या ग्रथात नृत्याचे हावभाव, अवस्थाने, पद्धती, इ गोष्टीचा विचार केला आहे, असे कळते त्यानतरचा दुसरा महत्त्वाचा ग्रथ म्हणजे नदिकेश्वराचा भरतार्णव हा होय अभिनयदर्पण ही त्याचीच सक्षिप्त आवृत्ती आहे या ग्रथात पादभेद, स्थानक सकरहस्त, १०८ ताल, चारी, अगहार, नानार्थ हस्त, शगनाट्य, सप्तलास्य व पुष्पाजली या नृत्त–नृत्यप्रकाराचा ऊहापोह केलेला आहे

भरताचे नाट्यशास्त्र हा ग्रथ मुख्यत्वे नाट्यविषयक असला तरी त्याने त्याच्या अनुषगाने नृत्ताचे तपशीलवार विवेचन केले आहे हाही ग्रथ प्राचीन आहे त्यानतर अग्नी पुराण व विष्णुधर्मोत्तर पुराण याचा क्रमाक लागतो ही दोन्ही पुराणे असली, तरी त्यात नृत्य-नाट्याचा खूप विचार केला आहे ही दोन पुराणे इ स ५०० ते ८०० या कालातली आहेत शार्ङगदेव या काश्मिरी पडिताने इ स च्या १३ व्या शतकात सगीतरत्नाकर नावाचा व धनजयाने दशरूपक नावाचा ग्रथ लिहून प्रस्तुत विषयाचा ऊहापोह केला मात्र हे दोन्ही ग्रथ स्वतत्र प्रज्ञेने लिहिलेले नाहीत विविध ग्रथातील माहितीचे सकलन करून ते तयार केलेले आहेत हे सर्व ग्रथ सस्कृत भाषेत आहेत

तमिळ भाषेतला या विषयाचा प्रपच करणारा ग्रथ म्हणजे शिलप्पधिकारम हे महाकाव्य होय इळगो अडिगळ या नावाच्या

एका राजपुत्राने ते महाकाव्य इ स च्या दुसऱ्या शतकाच्या सुमारास लिहिले वस्तुत हा नाट्यशास्त्रावरचा ग्रंथ नाही पण तरीही त्यात नृत्याचा बराच विचार केला आहे त्या महाकाव्याची नायिका माधवी ही एक देवदासी नर्तिका होती त्यामुळे त्या महाकवीला या काव्यप्रधान नृत्याचा विचार करायला अवसर मिळाला आहे राजसभेतले नृत्य कसे असावे, नृत्याला गीताची साथ कशी असावी, गुरुने शिष्याला कसे शिकवावे, देवालयातली नृत्ये कोणती, वगैरे विषय त्यात आले आहेत नृत्यशास्त्रावरची अशी ही अल्पशी ग्रंथरचना आहे

अलिकडे मात्र अनेक नृत्यकारांनी व नृत्यसमीक्षकांनी या कलेवर पुस्तके लिहिले आहे व अजूनही लिहिले जात आहे आज नृत्याचा विचार केवळ भारतीय संदर्भात केला जात नसून, तो जागतिक संदर्भात केला जातो

**नृत्यज्ञ व नृत्याचे आश्रयदाते** – भारतातल्या अनेक प्राचीन व अर्वाचीन राजांनी नृत्यकलेला आश्रय व प्रोत्साहन दिले चोळ राजे या कलेचे मोठे भोक्ते होते राजराज चोळ याची याविषयी एक गोष्ट सांगतात, ती अशी—

तंजाउरमध्ये गोविंदाचारी नावाचा एक शिल्पकार होता त्याला कल्याणी नावाची एक नृत्यनिपुण मुलगी होती तिच्या बापाला असे वाटे, की तिने देवदासी बनून देवाची नृत्यसेवा करावी एके दिवशी वेषांतर करून हिंडत असता राजराज चोळाने कल्याणीचे नृत्य पाहिले व तो प्रसन्न झाला त्याने तिला दरबारातली नर्तिका म्हणून आश्रय द्यायचे ठरवले पण गोविंदाचारी म्हणाला, की माझी मुलगी फक्त देवापुढेच नाचेल चोळ राजाला त्याचे ते म्हणणे मान्य करावे लागले मग त्याने कल्याणीसाठी बृहदीश्वराचे मंदिर बांधून तिथे तिची योजना केली

क्षेत्रज्ञ हा आंध्रातल्या मुव्वा नावाच्या खेड्यात जन्मलेला कवी होय तो तिथल्या गोपालस्वामी या देवाचा भक्त होता त्याने त्या देवावर सुमारे चार हजार गीते रचली आहेत तो आपली ती गीते नृत्यात बसवून गोपालस्वामीपुढे नृत्य करीत असे दक्षिणेत तो एक महान नृत्यकार समजला जातो भरतनाट्यममधील पदम हा प्रकार त्याच्या गीतांवरच आधारलेला असतो

आंध्रामधला आणखी एक नृत्यगुरू म्हणजे सिद्धेंद्र हाही श्रीकृष्णाचा परमभक्त होता कुचिपुडी येथे तो राहत असे त्याने पारिजात हे नृत्यनाट्य लिहून ते तिथल्याच कलाकारां कडून रंगभूमीवर आणले आंध्रात नृत्यकलेची वाढ करण्यात याचा फार मोठा हात आहे

आंध्रातल्याच काकतीय राजाच्या दरबारात जयपसेन नावाचा एक सेनापती होता हा नृत्यकलेचा मोठा मर्मज्ञ होता त्याने नृत्यरत्नावली नावाचा एक ग्रंथ लिहून, त्यात तत्कालीन प्रचलित असलेल्या नृत्यप्रकारांचे सविस्तर वर्णन केले आहे



श्री रामगोपाल– भरतनाट्यम

पालमपेठ येथील रामप्पाच्या मंदिरावर ज्या नृत्यमूर्ती आहेत, त्या जयपसेनाच्या ग्रंथावरूनच आकाराला आणलेल्या आहेत

वरंगळचा राजा प्रतापरुद्र हाही नृत्य–गीत–शिल्प या प्रकारांचा भोक्ता व आश्रयदाता होता माचलदेवी नावाची एक प्रसिद्ध नर्तकी त्याच्या दरबारी होती ती शिवाचा गुणगौरव करणारी अनेक नृत्ये करीत असे यक्षगान या नृत्यनाट्यप्रकाराला माचलदेवीचा बराच हात लागलेला आहे

विजयनगरचा सम्राट कृष्णदेवराय हा तर ललित कलांचा मोठाच आश्रयदाता होय त्याच्या कारकिर्दीत दक्षिणेत नृत्यादी कलांचा खूप उत्कर्ष झाला त्याने केवळ नृत्यासाठी एक रंगमंदिर बांधले होते या रंगमंदिरावर निरनिराळ्या नृत्याकृती कोरलेल्या आहेत नृत्याचा अभ्यास करणारी मंडळी विविध अवस्थाने, हस्तमुद्रा, इ नृत्यातल प्रकार या मूर्तींवरून शिकत

राजा कुमरगिरी हा कोंडविडु येथील रेड्डी वंशाचा राजा होता त्याने वसंतराजीयम या नावाचा नृत्यकलेवर मोठा ग्रंथ लिहिला आहे त्याच्या काळी प्रचलित असलेल्या आंध्रमधील नृत्यांचे त्यात विवेचन केलेले आहे पेडकोमती नावाचा त्या राजाचा मेहुणा होता तो त्या दरबारात लकुमादेवी या दरबारी नर्तकि-

करून कालिदासाची नाटके नृत्यरूपात करवून घेत असे

स्वातीतिरुनल हा त्रिवांकुरचा राजा होता ता नत्यनाटयात प्रवीण हाता संस्कृत, तमिळ तलुगु व मल्याळम या भाषावर त्याचे प्रभुत्व होत त्याने हिंदुस्थानी व दक्षिणी या दोन्ही सगीत पद्धतीचा अभ्यास केला होता त्याने नत्यावरही काही ग्रथ लिहिल आहत

उत्तरेतला सत हरिदास हा कथक नत्याचा जनक मानला जातो याने कथक नृत्याची उत्तम जोपासना करून त्याला नवे रूप दिले जयदेव जसा कवी होता, तसाच तो नृत्यकारही होता त्याची पत्नीही त्या कलेत प्रवीण होती त्याने आपल्या गीत गोविंदातल्या अष्टपद्या नृत्यात बसवल्या होत्या हे जयदेवप्रणीत



श्री शाता राव– भरतनाटयम

नृत्य आजही केरळात अष्टपदीआट्टम या नावाने प्रसिद्ध आहे बगालमधले चैतन्यमहाप्रभु हे तर राधा कृष्णाचे परमभक्त होते ते आपल्या भक्तगणासह कृष्णगीते गाऊन नत्य करीत असत बगालमध्ये प्रचलित असलेले कीर्तनिया नृत्य हे एक प्राचीन लोकनृत्य असले तरी त्याचे साप्रतचे स्वरूप चैतन्यमहाप्रभूनीच त्याला दिले आहे भावो मत्त असे हे नृत्य आहे

शकरदेव हे आसाममधले एक श्रेष्ठ सत होत त्याना ज्या एका नृत्यप्रकाराला जन्म दिला,त्याचे नाव अकियानट असे आहे उत्तरेच्या व दक्षिणेच्या नृत्यातली वैशिष्ट्ये एकत्र करून त्यानी ते नत्य आकाराला आणले त्यासाठी त्यानी स्वत अनेक नत्य नाटके लिहिली आणि अनेक नर्तक शिष्यही तयार केले आसामी नृत्याला ईश्वरोपासनेचे रूप देऊन त्यात उदात्तपणा आणला तो त्यानीच त्याच्याच प्रेरणेमुळे आसाममधल्या प्रत्येक मोठ्या मदिराशेजारी नत्यमदिर निर्माण झाल

याशिवाय नत्याच्या क्षेत्रात बाळसरस्वती रुक्मिणीदेवी अरुडेल, पद्मिनी, शाता राव, यामिनी कृष्णमूर्ती, अमला शकर, मृणालिनी साराभाई, जव्हेरी भगिनी, गोपीकृष्ण, बिरजूमहाराज, राम गोपाल, इ काही नाव रव्यातिप्राप्त आहेत

**नत्यसप्रदाय** – भारतात कथक, कथकळी, भरतनाटयम आणि मणिपुरी हे चार शास्त्रीय नृत्यसप्रदाय प्रचलित आहत



कथक नृत्य– श्री तारा चौधरी

याशिवाय यक्षगान, वीथीभागवतम, कूटियाट्टम, ओडिसी, कुचिपुडी, गरबा, रास इ उपसप्रदायही आहेत याशिवाय उदयशकर नत्य सप्रदाय व रवींद्रनाथ ठाकूर नत्य सप्रदाय असे दोन नृत्यसप्रदाय अलिकडे निर्माण झाले आहेत वरील मुख्य सप्रदायाचे वाङ्मयात दिग्दर्शन असे –

कथक – कथक म्हणजे कथा सागणारा या नत्यात एखादी कथा किंवा एखादा प्रसग नृत्याच्या द्वारे सागितला जातो, म्हणून त्याला कथक म्हणतात या सप्रदायाचा उत्कर्ष आणि पुढे अपकर्षही झाला तो मोगलाच्या दरबारात मोगल हे शृगारप्रिय असल्यामुळे कथक नृत्यालाही शृगारिक आणि विलासी वळण लागले

पंजाब, राजस्थान व लखनौ या भागांत कथक नृत्य विशेष प्रचारात आहे. अलीकडे भारताच्या सर्व भागांत त्याचा प्रचार झाला आहे. कथक नृत्यांत तोंडाने तबल्याचे बोल बोलून मग ते पदन्यासातून व्यक्तविले जातात. तत्कार हा या नृत्याचा विशेष होय. हे नृत्य पूर्णपणे ताल आणि लय यांवर आधारलेले असते. वाजाच्या पेटीवर किंवा तंतुवाद्यावर लेहरा चालू असता तबल्याच्या बोलाप्रमाणे विविध प्रकारचे तोडे घेऊन ठसकेबाजपणे समेवर येणे, अत्यंत द्रुत लयीत नाचणे अशी अवघड कामे या नृत्यात करून दाखवायची असतात. राधाकृष्ण हे कथक संप्रदायाचे दैवत आहे. यात कृष्णाच्या गोकुळातील जीवनावर आधारलेलीच नृत्ये बहुधा दिसतात.



कथकली नृत्यात शिवपार्वती

जयपूर, लखनौ व वाराणसी अशी कथक नृत्याची तीन घराणी विशेष प्रसिद्ध आहेत. हे नृत्य पूर्वी भक्तीचे एक साधन म्हणूनच निर्माण झाले होते. पण पुढे मोगली दरबारात त्यात छिल्लरपणा आणि पाचकळपणाही शिरला. ते हलक्या दर्जाच्या कलावंतांच्या हाती गेले आणि त्यामुळे त्याला समाजात प्रतिष्ठा उरली नाही. अलीकडे मात्र या संप्रदायाचे शुद्ध स्वरूप लोकांच्या पुढे येऊ लागले आहे. (कथक पाहा).

कथकळी – या नृत्यसंप्रदायाची निर्मिती व वाढ केरळात झाली. कथकळी याचा अर्थ नृत्यनाट्य असा आहे. यातही नृत्याच्या द्वारे एखादी कथाच सांगितली जाते. नंपूतिरी ब्राह्मण हे या संप्रदायाचे प्रवर्तक होत. कुचिपुडी व कथकळी ही दोन्ही नृत्ये नृत्यनाट्याच्या सदरात येतात. फरक असा, की कथकळीत गाणारे लोक वेगळे असतात, तर कुचिपुडीतले नर्तक इच्छा असल्यास स्वतःही गाऊन नृत्य करू शकतात. दोन्ही प्रकारात पुरुषच भाग घेतात. स्त्रियांच्या भूमिकाही पुरुषच करतात. कथकळीत वीर व रौद्र या रसांना प्राधान्य असते. याचे प्रयोग रात्रभर चालतात. कथकळी हे नृत्याच्या तांडवशैलीपैकी आहे. ताकद व जोम ही त्याची वैशिष्ट्ये होत. ते नेहमी गतिमान असावे लागते. यातले सर्व भाव डोळे, चेहरा आणि हस्तमुद्रा यांच्या द्वारेच व्यक्त करावे लागतात. आर्य व द्रविड या दोन संस्कृतींतील विविध कलांचा मिलाफ कथकळीमध्ये झालेला आढळेल. हेही नृत्य देवतार्चनपरच आहे. पुडापट्टा, नोटकलासम, नीलपदम, मेलपदम, तिरानोक्कू इ. प्रकारांनी या नृत्याचा विस्तार केला जातो. याही नृत्यप्रकाराला अवनत दशा आली होती, पण केरळीय महाकवी वळ्ळतोळ यांनी इ. स. १९३० साली केरळकलामंडलम नावाची संस्था स्थापून या संप्रदायाला पुनश्च ऊर्जित दशा आणली. (कथकळी पाहा).

भरतनाट्यम – तमिळनाडमध्ये निर्माण झालेला व देवदासींनी पिढ्यानपिढ्या जोपासून ठेवलेला असा हा नृत्यसंप्रदाय आहे. पूर्वकाळी या नृत्याला अलारिपू व केलिका अशी नावे होती. पण भरताच्या नाट्यशास्त्रावर हे आधारलेले असल्यामुळे याला पुढे भरतनाट्यम असे नाव पडले. भरतनाट्यम हे नृत्तप्रधान आहे. नृत्ताला भरतनाट्यामध्ये कथकळीपेक्षा अधिक महत्त्व आहे. हे नृत्य मुख्यत्वे स्त्रियाच करतात. यात एका वेळी एकच नर्तकी, फार तर दोघी नाचू शकतात. यात अलारिप्पू, जातीस्वरम, तिल्लाणा, वर्णम, शब्दम, पदम, इ. प्रकार येतात. अलारिप्पू हे पुष्पसमर्पणाचे पहिले नृत्य असते. जातीस्वरम व तिल्लाणा हे दोन प्रकार नृत्त या स्वरूपात मोडतात. ते मृदंगाच्या तालावर आधारलेले असतात. वर्णम हा भरतनाट्यमचा गाभा होय. हा भाग संगीतपूर्ण असून, त्यातल्या गीत, पदन्यास, गीताच्या अर्थाचा अभिनय इ. गोष्टी एकमेकांत मिसळून एकमेकांचे सौंदर्य वाढवतात. शब्दम व पदम या पुढच्या दोन प्रकारांत अभिनयाला प्राधान्य असते. पदममध्ये शृंगारिक अभिनयाचा आविष्कार असतो. हा प्रकार राधाकृष्ण, शिवपार्वती

कृष्ण रैन्मेना याच्या लीलाविलासावर आधारलेला असतो ( भरतनाट्यम पाहा )

मणिपुरी – मणिपूर, त्रिपुरा आसाम, बंगाल या प्रदेशात या नृत्याचा प्रचार आहे अर्जुन हा या नृत्याचा प्रवर्तक मानला जातो त्याने ते नृत्य चित्रांगदला शिकवले आणि तिने त्याचा मणिपूरमध्ये प्रचार केला, अशी त्याच्या विषयी आख्यायिका आहे इ स च्या बाराव्या शत कात तथील राजकुमार खंबा व राजकुमारी थोइबी यांनी त्या नृत्याचा विशेष प्रचार केला त्या दोघांना तिकडे शिव पार्वतीचे अव तारच मानतात



भरतनाट्यम– एक मुद्रा

मणिपुरी नृत्य हे सांघिक व स्त्री पुरुषमिश्र असते इ स च्या १८ व्या शतकात भाग्यचंद्र नावाचा एक राजा मणिपूरमध्ये होऊन गेला तो नृत्यकलाप्रवीण होता त्याने वैष्णव धर्म स्वीकारल्यामुळे मणिपुरी नृत्यावर वैष्णव संप्रदायाचा विशेष प्रभाव पडला त्यामुळेच मणिपुरी नृत्यात रासनृत्याला प्राधान्य आले वसंतरास, महारास, कुंजरास आणि नित्यरास असे त्या रासाचे चार भेद आहेत नृत्त–नृत्याच्या काटेकोर नियमात हे नृत्य बसत नाही त्याचे स्वरूप काही अंशी लोकनृत्यासारखे आहे त्यात हस्त, मुद्रा, पदन्यास, इ गोष्टींपेक्षा नाजूक हावभाव, काव्यात्मक सौन्दर्य आणि बहुरंगी वेषभूषा यांवरच अधिक भर असतो शरीराचा प्रत्येक अवयव सौंदर्यपूर्ण, लयबद्ध पण नाजूकपणे हालवून भावनांचा आविष्कार करणे, हे या नृत्यातले कसब मानतात

मणिपुरी नृत्याला खोल नावाच्या वाद्याची साथ असते हे ढोलक्यासारखेच वाद्य असते पुरुषवर्ग हे खोलवादक नर्तका पेक्षाही कुशल असतात खोल वाजवताना ते स्वतः ही अत्यंत तालबद्ध असे नृत्य करतात हा प्रकार मणिपुरीखेरीज दुसऱ्या कोणत्याही नृत्यात आढळत नाही

वरील सर्व नृत्यप्रकार भरतादी ग्रंथकाराच्या शास्त्रीय नियमांवर आधारलेले आहेत नृत्यप्रसंगी पायांत नूपुरे बांध ण्याची पद्धत, नृत्त व नृत्य असे विभाग पार्श्वसंगीतात अनुभूत होणारी व अभिनयाला पोषक अशी देवादिकांची गीते आणि नृत्यासाठी घेतले जाणारे पौराणिक व लौकिक विषय या सर्व गोष्टी वरील चारही नृत्यपद्धतींत समान आहेत

नृत्याच्या प्रारंभीचे पूर्वरंगादी शास्त्रीय विधी कथकळीने विशिष्ट स्वरूपात अजून कायम ठेवले आहेत कथकमध्ये त्या सर्व विधींचे एकत्रीकरण थाट या स्थायी लयीच्या शास्त्रीय नृत्यात झाले आहे कथकळीला ताल देण्यासाठी चेंडा व मद्दल म ही वाद्ये असतात भरतनाट्यमच्या साथीला मृदंग असतो कथकनृत्य तबल्याच्या साथीवर होते मणिपुरी नृत्याला खोल या वाद्याची साथ असते एक कथक नृत्य सोडून बाकीच्या तीनही पद्धतीत मंजिरीची साथ अवश्य असते भरतनाट्यम व कथकळी या नृत्यामध्ये उपयोजिले जाणारे ताल, कर्नाटक संगीतपद्धतीतले असतात त्यांच्या आदिताल अदडा, मूपदडा, पचारी, झंपा, इ तालांच्या मात्रा हिंदुस्थानी संगीतातल्या अनु क्रमे त्रिताल, दीपचंदी, रूपक, दादरा, झपताल या तालांच्या मात्राइतक्याच असल्या, तरी समकाल, टाळी इ चे संकेत अगदी वेगळे असतात

नाट्यनृत्य – हा प्रकार बॅले नृत्य या नावाने पाश्चात्य देशांत प्रचलित असला, तरी तो भारतालाही अपरिचित नाही



लायहरोबा– मणिपुरी नृत्य

भारतात तो फार जुन्या काळापासून चालू आहे मात्र त्याचे व पाश्चात्य बॅलेचे तंत्र अगदी भिन्न आहे कथकळी, मणिपुरी,

छाऊ, इ. काही नव्हे तर भारतीय बॅलेच होत. युरोपात भारतीय बॅलेचा पहिला प्रयोग रूथ सेंट डेनीज हिने केला. तिच्या नंतर अॅना पाव्हलोवा या नर्तकीने उदयशंकराच्या साहाय्याने राधा कृष्णाच्या जीवनावरचे बॅले नृत्य युरोपात सादर केले व ते यशस्वीही झाले.

उदयशंकर संप्रदाय — आधुनिक भारतीय नर्तकांनी पाश्चात्त्य बॅलेच्या आदर्श डोळ्यांपुढे ठेवून त्यात पुष्कळ सुधारणा केली आहे व यांत नावीन्यही आणले आहे. या कामी उदयशंकर यांचे नाव प्रथम घ्यावे लागेल. त्यांनी बॅले पद्धतीची नवी नृत्ये



जीवनाची लय – एक नाट्यनृत्य

निर्माण केली आहेत. ती जशी पौराणिक आहेत, तशी भावात्मक व आधुनिक जीवनावरचीही आहेत. र्‍हिदम ऑफ लाइफ हे त्यांचे बॅले नृत्य म्हणजे त्यांच्या असाधारण प्रतिभेचा एक गंभीर आविष्कार आहे. त्यात आधुनिक राजकीय, सामाजिक व आर्थिक प्रश्नांवर नृत्याच्या द्वारे काही अभिप्राय व्यक्त केलेला आहे. प्रस्तुत नृत्याचे ग्रीन टेबल या पाश्चात्त्य बॅलेशी बरेच साम्य असल्याचे सांगतात. ग्रीन टेबल हे नृत्य पहिल्या महायुद्धानंतर स्थापन झालेल्या राष्ट्रसंघाच्या अपयशावर आधारलेले असून, त्यात शास्त्रीय सावळागोंधळ दाखवला आहे.

उदयशंकर हे प्रथम चित्रकार होते. त्या दृष्टीने ते भारतातील लेण्यांतील शिल्पांच्या मूर्तींचा अभ्यास करीत असताना त्या मूर्तिकलेचा त्यांच्या मनावर विलक्षण परिणाम झाला. मग त्यांनी त्या मूर्तींच्या विविध अवस्थानांचा, अंगभंगांचा आणि मुद्रांचा अभ्यास सुरू केला आणि आश्चर्याची गोष्ट ही, की त्यातून ते चित्रकार म्हणून पुढे न येता नृत्यकार म्हणून पुढे आले. त्यांनी अजंठा, वेरूळ, सित्तन्नवासल, इ. लेण्यांतल्या त्या दगडी मूर्ती जणू स्वतःच्या जीवनात सजीव केल्या. हळूहळू त्यांनी मग स्वतःची नवी नृत्ये निर्माण करायला प्रारंभ केला. त्यांची कोणतीही नृत्यरचना ही एक नवी व वेगळी अभिव्यक्ती असते. नृत्याच्या द्वारे एखादा विषय ते पूर्णत्वाने उभा करतात. त्या त्या नृत्याला संगीताची आणि विविध वाद्यांची साथ असते. शिवतांडव, शिव-पार्वतीचे द्वंद्व नृत्य, र्‍हिदम ऑफ लाईफ (जीवनाची लय), अमर संगीत, श्रम आणि यंत्र, अर्जुन व प्रमिला, बुद्धाचे महाभिनिष्क्रमण, इ. दीर्घ नाट्यनृत्ये उदयशंकरांनी रचली आहेत. कल्पना या नावाचा एक चित्रपटही त्यांनी

निर्माण केला आहे. त्याच्या लौकिक विषयावरील नृत्यरचने पैकी ग्राम आणि यंत्र या नृत्याचे कथानक थोडक्यात असे—

*एक खेडेगाव होते. त्यातले साधे भोळे शेतकरी दिवसभर* शेतात कष्ट करून सुखासमाधानाने जगत. त्या खेड्यात एक म्हातारा होता. तोही त्या लोकांच्या आनंदात व सुखी जीवनात सहभागी असे. पण त्या खेडुतांचे ते सुख एक नफेबाज व्यापारी, एक कारखानदार व एक भोंदू पुरोहित यांना पाहवेना. त्या तिघांनी त्या खेडुतांची पिळणूक करण्याचा घाट रचला. त्यांनी एका तरुणाला जवळ केले व यंत्र आणि *यंत्रापासून तयार होणारा माल, याचे महत्त्व त्याला पटवून* दिले. त्यांनी त्या तरुणाला असेही सांगितले, की 'यंत्र हाच या जगाचा देव आहे.' त्या तरुणाला ते पटले. त्याने खेडुतांना कारखान्यात कामाला जाण्यासाठी प्रवृत्त केले. म्हाताऱ्याला मात्र ती गोष्ट आवडली नाही. त्याने विरोध केला. पण नव्या कल्पनेने भारलेल्या त्या खेडुतांनी तो विरोध जुमानला नाही. ते कारखान्यात नोकरी धरून यंत्रदेवाची पूजा करू लागले. *परिणाम असा झाला, की हळूहळू त्यांचे स्वातंत्र्य संपुष्टात आले* व ते यंत्राचे गुलाम बनले. तरुणाला या गोष्टीची काही कालानंतर जाणीव झाली. आपण आपल्या बांधवांना यंत्राच्या दास्यात लोटले, याबद्दल त्याला पश्चात्ताप झाला. तो मग त्यांची तिथून मुक्तता करण्याच्या प्रयत्नास लागला. पण ते काम त्याला जमले नाही. वरील त्रिकूटाने अनेक मूल्यांना देऊन त्या तरुणाला आपल्या कह्यात ठेवले. मग तो म्हातारा *पुढे सरसावला. पण त्यालाही यश आले नाही.* पुढे कारखानदार आपल्या कामगारांना अनेक प्रकारे छळू पिळू लागला. मग त्यांनी अन्यायाविरुद्ध चळवळ उभारली, पण कारखानदाराने कायद्याच्या बळावर ती दडपून टाकली. चळवळ मेली, पण तिचा आत्मा मात्र मेला नाही. शेवटी त्या तरुणाच्या पुढारी-पणाखाली त्या खेडुतांनी विजय मिळवला. ते लोक मुक्त झाले व परत आपल्या खेड्यात आले. पण आता त्यांच्या सवयी *बदलल्या होत्या. त्यामुळे खेड्यात त्यांचा जीव रमेना.*

मग कारखानदार, व्यापारी आणि पुरोहित हे तिघेही पुनश्च त्या खेड्यात आले आणि कारखान्यात कामाला येण्याबद्दल खेडुतांना आमिषे दाखवू लागले. म्हाताऱ्याने मग विचार केला. त्याने खेडुतांना व वरील तिघांना एकत्र आणून त्यांच्यात समझोता केला. व्यापाऱ्याने नफेबाज होऊ नये, कारखानदाराने कामगारांना पिळू नये आणि कामगारांनी मन लावून काम *करावे, अशा प्रकारचा तो समझोता होता.* तदनुसार पुनश्च यंत्रे सुरू झाली. कामगार श्रम करू लागले. कामगार आणि मालक यांच्यात श्रद्धा, न्याय आणि समता या गोष्टी निर्माण झाल्या. त्यामुळे सर्वांनाच आनंद झाला. मग त्यांनी तो आनंद नाच गाण्यांनी साजरा केला.

*उदयशंकरांच्या सर्व नृत्यांत ठळकपणे नजरेत भरणारा* विशेष म्हणजे नृत्यातील प्रत्येक घटकाच्या हस्तपादादी विक्षेपात आढळून येणारी समता हा होय. त्यांची नृत्यरचना हा एक धाडसी प्रयोग असून भावनांचे अभिनयाच्या द्वारे प्रकटीकरण या गोष्टीला त्यांनी विशेष महत्त्व दिले आहे. ते आपल्या नृत्यांमध्ये दक्षिण भारतीय मुद्रा उपयोगात आणतात. या बाबतीत त्यांना त्यांचे गुरू श्री. नंबुद्री यांची फार मदत झाली *आहे.*

रवींद्रनाथ ठाकूर संप्रदाय — श्री. रवींद्रनाथ ठाकूर यांनीही नव्या पद्धतीची काही नाट्यनृत्ये निर्माण करून त्यांचे यशस्वी प्रयोग केले. रवींद्रनाथ एका ठिकाणी म्हणतात, की जीवन हे आशा आकांक्षांचे नृत्य आहे आणि सृष्टीची स्वतःची अशी अभिव्यक्तीची भाषा आहे. ही भाषा चित्रातून आणि नृत्यातून अभिव्यक्त होत असते.

*ठाकुरांच्या नृत्यरचनेत नेहमीच परस्परविरोधी दोन गोष्टी* दिसतात. एका अंगाने त्यांच्या नृत्यावर परंपरा व चालीरीती यांचा प्रभाव दिसतो, तर दुसऱ्या अंगाने पूर्ण स्वातंत्र्यही दिसते आणि म्हणूनच त्यांच्या नृत्यांना नेमके काय म्हणावे आणि कोणत्या शब्दांनी त्या नृत्यपद्धतीचा निर्देश करावा, तेच समजत नाही. त्यातला स्वर हलका फुलका असतो, भाव खेळकर असतो, पण हेतू गंभीर आणि संदेश मूलगामी असतो. ही नृत्ये *सर्वसाधारणपणे गाननृत्ये आहेत.* त्यातली गाणीही त्यांनीच रचलेली आहेत. ही गाणी एक किंवा अनेक व्यक्तींनी गायची असतात आणि नर्तक-नर्तिकांनी आपल्या अंगविक्षेपातून त्या गीतातील भावना, संवेदना व तत्त्वज्ञान ही व्यक्त करायची असतात. कित्येकदा त्या गाण्याचे शब्द नर्तनावर मात करून जातात. त्यांची ही नृत्यनाट्ये किंवा नाट्यनृत्ये भारतीय रंगभूमीला अनोळखी आणि अपरिचित अशी होती. ती जेव्हा *प्रयोगात आली, तेव्हा रसिक प्रेक्षकांना त्यात नृत्य, गीत व* अभिनय या सर्वांचा उत्कृष्ट मिलाफ झालेला दिसून आला.

चित्रांगदा, चंडालिका, नटीरपूजा, तासेर देश, *अशी नृत्ये* ठाकुरांनी रचून ती रंगभूमीवर आणली. ही सर्व नृत्ये कोणत्या तरी कथानकावर आधारलेली आहेत. त्यांतील चित्रांगदेचे कथानक असे—

मणिपूरच्या राजाला चित्रांगदा नावाची कन्या होती. ती नेहमी पुरुषी पोषाखात असे व शिकारीलाही जात असे. अर्जुन तीर्थयात्रेच्या निमित्ताने भारतात हिंडत असता मणिपूरमध्ये गेला व एका अरण्यात चित्रांगदेची व त्याची भेट झाली.

प्रथमदर्शनाच ती अर्जुनावर आसक्त झाली तिने आपल्या प्रेमाचा स्वीकार करण्याविषयी अर्जुनाला गळ घातली पण अर्जुनाने त्या विनवणीचा अव्हेर केला तो म्हणाला, की ' मी याही कालासाठी ब्रह्मचारी व व्रतस्थ आहे आणि त्यामुळे मला तुझ्या प्रेमाचा स्वीकार करता येत नाही ' त्याच वेळी मदन तिथे आला आणि त्याने चित्रांगदेला एका वर्षाच्या अवधीचे अप्रतिम सौंदर्य दिले त्या नव्या रूपात तिचे दर्शन होताच अर्जुन तिला भाळला, भुलला पण या वेळी चित्रांगदा तटस्थ राहिली

एवढ्यात काही खेडूत लोक तिथे आले आणि अर्जुनाला म्हणाले, की आमच्या गावात चोर शिरले आहेत आणि गावाचे रक्षण करणारी देवी गावात नाही तरी तुम्ही आमचे रक्षण करावे ' ते ऐकून अर्जुनाने चित्रांगदेला ' ती देवी कोण ' असे विचारले त्यावर चित्रांगदा म्हणाली ' त्या देवीच्या अंगी धनुर्भंग करण्याचे सामर्थ्य आहे, पण दुर्दैवाची गोष्ट अशी, की ती आपल्या प्रियकराच्या हृदयाचे काही विधान करू शकली नाही ' हे उत्तर ऐकून अर्जुन संभ्रमात पडला त्याला चित्रांगदा ही कोण आहे हे जाणून घेण्याची उत्कंठा लागली मग चित्रांगदेने त्याला आपली पुरती ओळख करून दिली त्यामुळे अर्जुनाला आनंद झाला तो तिला म्हणाला की ' तुझी भेट झाल्यामुळे माझ्या जीवनाला पूर्णता आली '

**लोकनृत्य** – ग्रामीण समाजात जी नृत्ये प्रचलित आहेत, त्यांना लोकनृत्ये म्हणतात ही नृत्ये त्या लोकांत परंपरेने



लोकनृत्य

आलेली असतात ती शिकविण्यासाठी त्यांना नर्तकशिक्षकाची किंवा कलावंताची गरज नसते त्या नृत्यांना रंगमंचाचीही आवश्यकता नसते ती उघड्या जागी कुठेही चालतात

लोकनृत्य आणि शास्त्रीय नृत्य यांमध्ये एक मोठा फरक आहे लोकनृत्यांचा हेतू लोकांची करमणूक करण्याचा किंवा लोकांपुढे आपल्या कलेचे प्रदर्शन करण्याचा नसतो नृत्यात भाग घेणारे लोक स्वतःच्या करमणुकीसाठी त्यात भाग घेत असतात दुसरा फरक म्हणजे शास्त्रीय नृत्याचा भावना विष्कार कृत्रिम असतो व तो अभ्यासाने साध्य केलेला असतो, तर लोकनृत्यातला भावनाविष्कार हा नैसर्गिक असतो

लोकनृत्यांना जातीय आणि राष्ट्रीय असे उभयविध मूल्य असते एखाद्या जातीचे विशेष गुणधर्म तिच्या नृत्य–नाट्यातून प्रतीत होत असतात त्या नृत्यात त्या जातीच्या आणि ती जात ज्या प्रदेशात वास्तव्य करते त्या प्रदेशाच्याही स्वभाव संस्कृती, वातावरण, सामाजिक दर्जा, काव्य आणि श्रद्धा यांचे प्रतिबिंब पडलेले दिसते

भारतीय लोकनृत्ये ही सामान्यतः स्त्रियांची व पुरुषांची वेगवेगळी असतात काही आदिवासी जमाती सोडल्यास बाकीच्या लोकांत संमिश्र नृत्यांची पद्धत नाही लोकनृत्यांचे सामान्यपणे तीन वर्ग पडतात, ते असे–

(१) लढाऊ किंवा शौर्यपूर्ण नृत्ये – शिकारीची नृत्ये, दशावतारातील युद्धनृत्ये, मुखवटे घालून केलेली नृत्ये लेझीम व ढोल यांच्या साथीवर केली जाणारी नृत्ये, शिमग्यातले रोमट नृत्य, काठीनृत्य, गालानृत्य, इ नृत्ये या वर्गात येतात

(२) सामाजिक नृत्ये – पेरणीच्या व कापणीच्या वेळी होणारी नृत्ये, तसेच नागपंचमी, गौरी–गणपती, नवरात्र, दसरा, होळी, इ सणांच्या वेळची नृत्ये ही या वर्गात येतात

(३) धार्मिक व सांस्कारिक नृत्ये – रथापुढे आणि पालखी पुढे केली जाणारी नृत्ये, ग्रामदेवतेच्या उत्सवात होणारी नृत्ये, तसेच गरबा, रास, कजरी, धालो, कातन, नौटंकी, इ नृत्ये व जन्मसोहळा, लग्नसोहळा, इ प्रसंगीची नृत्ये ही या सदरात येतात

आदिवासी लोकांच्या जीवनात नृत्याला फार मोठे स्थान असते नृत्य ही त्यांच्या आनंदाची परिसीमा असते आदिवासींची बहुतेक नृत्ये ही लढाऊ प्रवृत्तीची असतात त्यांचा त्यांच्या देव–धर्माशी संबंध असतो किंबहुना नृत्य हा त्यांच्या देवकार्यातला एक अपरिहार्य भागच असतो [ डान्सिंग नेत्र – श्री नटराज रामकृष्ण, अनुवादक– सौ सुचेता जोशी, डान्स ऑफ इंडिया – श्री प्रोजेश बॅनर्जी, १९५६, प्रा भा क , छंद मे–जून १९५६, श्री चैतन्य देसाई – छंद, जाने –फेब्रु १९५९ कला डा का इ , ना नृ न , श्री केशवचंद वर्मा– संमेलन पत्रिका – कलांक, १९५८, रा रा ना , भरनाणव ]

**नृत्यगणपती** नृत्याच्या मुद्रेत असलेला गणपती. याची एक अत्यंत सुरेख मूर्ती आडिरातील विभिन्न येथे सापडली आहे. हा गणपती द्विदल पद्मावर उभा राहून आवेगपूर्ण नृत्य करीत आहे. त्याला आठ भुजा असून, त्याचा पुढचा उजवा हात दंडहस्त या अवस्थेत आहे. त्याच्या एका हातात स्वदंत, दुसऱ्या हातात अक्षसूत्र व तिसऱ्या हातात लड्डूपात्र आहे. नृत्याच्या आवेगामुळे त्याचे सर्पयज्ञोपवीत सैल झाले आहे. दोन पायांची व हातांची ठेवण आणि अतिभंग मुद्रा यामुळे त्याची भ्रमणगती स्पष्ट दिसते. गंगैकोंडचोळपुरम येथेही नृत्यगणपतीची एक सुंदर मूर्ती आहे. [ डे. हिं. इ. ]



नृत्यगणपती – गंगैकोंडचोळपुरम

**नृत्यदेवता** बौद्ध वज्रयान पंथाच्या चार नृत्यदेवता आहेत. त्या सर्व भीषण असून, गळ्यात मुंडमाला धारण करतात. त्यांची नावे अशी– (१) लास्या – रक्तवर्ण. दोन्ही हातांनी लास्य दर्शविते. (२) माला– रक्तवर्ण. हातांत रत्नमाला. (३) गीता – तांबुसा पांढरा रंग. हातात वीणा (झांज). (४) नृत्या– विश्ववर्ण. हातात वज्र. या सर्व देवता प्रत्यालीढ अवस्थेत नृत्य करीत असतात. (निष्पन्नयोगावली) [ इं. बु. इ. ]

**नृमुंड** उत्तर भारतातील एक पुण्यक्षेत्र. सिमल्याहून तिबेटकडे जाणाऱ्या रस्त्यावर रामपूर बुशहर हे स्थान आहे. तिथून सात मैल अंतरावर हे ठिकाण आहे. परशुरामाची ही तपोभूमी असल्याचे सांगतात. त्याने येथे अंबिका देवीची स्थापना केली. ही मूर्ती द्विभुज आहे. परशुरामाने इथे यज्ञ केला होता. त्यासाठी त्याने जे ब्राह्मण आणले, त्यांची इथेच वसाहत करून दिली, असे सांगतात. या क्षेत्राच्या परिसरात लक्ष्मी नारायण, विश्वेश्वर महादेव, चंडी, दक्षेश्वर, इ. देवांची मंदिरे आहेत.

इथल्या एका गुहेत परशुरामाची रौप्य मूर्ती आहे. ही मूर्ती कालकामपरशुराम या नावाने ओळखली जाते. इथे हिडिंबेचीही एक मूर्ती असून ती उग्र आहे. हे स्थान एक सिद्धपीठ म्हणून ओळखले जाते. [ प. जी. मा., कल्याण–तीर्थांक ]

**नृमेध** एक सूक्तद्रष्टा. ऋग्वेदाच्या ८ व्या मंडलातील ८९–९०, ९८–९९ व ९ या मंडलातील २७ व २९ ही सूक्ते याच्या नावावर आहेत. मात्र त्या सूक्तांमध्ये त्याचे कुठेही नाव आढळत नाही. हा आंगिरस कुलातील असून, काही सामांचाही द्रष्टा होता. (पं. ब्रा. ८.८.२१). अग्नीने याला संतती दिली असा ऋग्वेदात उल्लेख आहे (ऋ. १०. ८३. ३). शकपूत नावाचा याचा एक मुलगा असून, तोही सूक्तद्रष्टा होता. एकदा मित्रावरुणांनी नृमेधाचे रक्षण केल्याचा उल्लेख ऋग्वेदात आला आहे (१. १३२. ७). हा ऋषी परुच्छेपाचा शत्रू होता, असे दिसते.

इंद्राची व सोमाची स्तुती हा त्याच्या सूक्तांचा विषय आहे. सोमस्तुतीसंबंधीच्या त्याच्या काही ऋचा अशा—

> **एष सूर्येण हासते पवमानो अधि द्यवि ।**
> **पवित्रे मत्सरो मदः ।।**
> **एष शुष्म्यसिष्यदवन्तरिक्षे वृषा हरिः ।**
> **पुनान इन्दुरिन्द्रमा ।।**

(ऋ. ९.२७.५–६)

अर्थ – हा आनंद उत्पन्न करणारा, हर्षवर्धन आणि शुद्ध पवित्रावर स्वच्छ होणारा सोम, सूर्यानेच आकाशातून सोडून दिला आहे की काय असे वाटते. अशा या प्रतापी, वीराग्रणी, हरिद्वर्ण आणि आल्हादप्रद सोमाने पवित्रातून स्वच्छ होऊन अंतरिक्षात इंद्राभिमुख आपल्या रसाचा वर्षाव केला.

नृमेधाच्या मते सोम हा काव्यवृत्तीला प्रेरक आणि पापनाशक आहे. [ प्रा. च. को., म. ज्ञा. को. ]

**नृसिंह** (१) (इ स चे १४ वे शतक) एक महानुभावीय मराठी कवी चाल्हेराज उर्फ चाल्हण पंडित हा याचा गुरू होय याची गुरुपरंपरा अशी–नागदेवाचार्य→ शास्त्राचार्य→नागाबा→मुनी कमळाकर→सीताबा→चाल्हण

नृसिंहाने आपल्या गुरूच्या नावाने चाल्हणभक्त अथवा मकेनगीता या नावाची गीतेवर टीका लिहिली आहे ही टीका ओवीबद्ध असून, ओवीसंख्या १३८९ इतकी आहे हा कवी आपल्या ग्रंथकर्तृत्वासंबंधी लिहितो (६ ७२)–

> चाल्हराजाचा वंशीं । मंत्र जाले नर्सिहासी ।
> तो विणवितसे संतासी प्रबंधकरणी ।।
> कवित्वाचेनि मिषें । गाईन देवाची चरित्र सुरसें ।
> जं का भागवती शुकव्यासें । कथन केलीं ।।
> न बोलों कथेविरहितु । पसरु नेघचि बहुतु ।
> महाकवीचेनि मतु । प्रबंधीं वदों ।।
> परी आपुलेया मतीसारिखें । काहीं एक बोलन मुखें ।
> बोबडा बोलीं बाळकें । रजवीतु जसे ।।
> आता असो हे रकवृत्ती । श्रोते असलगें भावितीं ।
> भजति वेडेयासि मती । कैची स्फुरल ।।
> आता आरंभु कथा । मान देवौनि समस्तां ।
> कां जे जर्‍ही जाला जाणता । तर्‍ही नेणीव हे निकी ।।

या गीताटीकेचा एक विशेष असा, की कवी स्वत महानुभाव असूनही, पंथाबाहेरील टीकाकार त्याने विचारात घेतले आहेत या टीकेशिवाय त्याने रुक्मिणीस्वयंवरही ओवीबद्ध रचले आहे न त्या ग्रंथाची ओवीसंख्या २३१७ इतकी आहे या ग्रंथाची रचना इ स १४०३ मध्ये झाली [म वा इ]

(२) (इ स चे १६ वे शतक) एक ज्योतिषशास्त्रज्ञ गोदावरीच्या तीरावरील गोलग्रामस्थ दिवाकराच्या विद्वान कुळात याचा जन्म झाला त्याने आपला बाप व चुलता यांच्याजवळ अध्ययन केले

नृसिंहाने सूर्यसिद्धांतावर सौरभाष्य नावाचा एक ग्रंथ रचला आहे त्याची श्लोकसंख्या ४२०० आहे

याशिवाय सिद्धांतशिरोमणीवरही याची वासनावार्तिक किंवा वासनाकल्पलता नावाची टीका आहे श्लोकसंख्या ९,५०० आहे हा मीमांसकही होता, असे सांगतात [भा ज्यो शा]

(३) (इ स चे १६ वे शतक) एक ज्योतिषशास्त्रज्ञ सुप्रसिद्ध ग्रहलाघवकार गणेश दैवज्ञ याच्या भावाचा हा पुत्र होता याने मध्यग्रहसिद्धी नावाचा ग्रंथ रचला, असे सुधाकराने लिहिले आहे त्या ग्रंथात केवळ मध्यमग्रह दिलेले आहेत कृष्णशास्त्री गोडबोले यांच्या मते नृसिंहाने ग्रहकौमुदी नावाचाही दुसरा एक ग्रंथ रचला होता ग्रहलाघवावरही त्याची टीका होती असे विश्वनाथी टीकेवरून दिसते [भा ज्यो शा]

(४) (१८२१–१८९० इ स) एक प्रसिद्ध ज्योतिषी आणि गणितज्ञ याला बापूदेव असेही म्हणत हा ऋग्वेदी चित्पावन ब्राह्मण असून, मूळचा नगर जिल्ह्यातील गोदावरी काठच्या टाके गावचा रहिवासी होता नागपूर येथे त्याचे प्राथमिक शिक्षण झाले आणि तिथेच त्याने ढुंडिराज नामक एका कान्यकुब्ज ब्राह्मणापाशी भास्कराचार्यांच्या लीलावती व बीजगणित या ग्रंथाचे अध्ययन केले नृसिंहाची गणित विषयातील गती पाहून विल्किन्सन नावाच्या एका इंग्रजी अधिकाऱ्याने त्याला सिहूर येथील संस्कृत पाठशाळेत अध्ययनार्थ नेले तिथेच त्याने सेवाराम नामक एका गुरूपाशी रेखागणिताचा अभ्यास केला

इ स १८४१ मध्ये तो काशीस एका संस्कृत पाठशाळेत रेखागणिताचे अध्यापन करू लागला पुढे तो त्या पाठशाळेत गणितशास्त्राचा मुख्याध्यापकच बनला

इ स १८६४ मध्ये ग्रेट ब्रिटन व आयर्लंड येथील रॉयल एशियाटिक सोसायटीचा व १८६८ मध्ये बंगालच्या एशियाटिक सोसायटीचा तो सन्माननीय सभासद झाला पुढे इ स १८६९ मध्ये तो कलकत्ता व अलाहाबाद विश्वविद्यालयाचा 'फेलो' झाला इ स १८८७ साली सरकारने त्याला महामहोपाध्याय अशी पदवीही दिली होती

रेखागणित, प्रथमाध्याय, त्रिकोणमितीचा काही भाग, सायनवाद, ज्योतिषाचार्याशयवर्णन, अष्टादशविचित्रप्रश्नसंग्रह सोत्तर, तत्त्वविवेकपरीक्षा, मानमंदिरस्थ यंत्रवर्णन आणि अंकगणित असे ग्रंथ त्याने लिहिले असून, ते सर्व संस्कृत भाषेत आहेत याशिवाय त्याचे काही लहानमोठे अप्रसिद्ध लेखही आहेत त्यांची नावे अशी – चलनकलनसिद्धांतबोधक वीस श्लोक, चापीयत्रिकोण मितिसंबंधी काही सूत्रे, सिद्धांतग्रंथोपयोगी टिपणे यंत्रराजोपयोगी छेद्यक व लघुशंकुच्छिन्नक्षेत्रगुण याच्या काही ग्रंथांचे हिंदी व इंग्रजी अनुवाद प्रसिद्ध झाले आहेत पौरस्त्य व पाश्चात्य गणितशास्त्र व ज्योतिषशास्त्र या दोन्ही शाखांवर नृसिंह पंडिताचा चांगला अधिकार होता [भा ज्यो शा]

**नृसिंहउत्तरतापिनी** एक गद्य उपनिषद हे अथर्ववेदाशी संबंधित असून, याचे नऊ खंड आहेत त्या सर्वांत नृसिंह हाच परब्रह्म असल्याचे सांगितले आहे पुढे तीन गुण, तीन अवस्था, तीन देह, तीन ताप, तीन चैतन्ये, तीन ईश्वर अशा त्रिविधतेचे वर्णन आहे त्यापुढे नृसिंहाच्या सगुण–निर्गुण रूपाचे निदर्शन आहे [श्री सी ग दसाई]

**नृसिंहनवरात्र** देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मणांपैकी ज्यांचे कुलदैवत नरसिंह आहे त्यांच्या घरी वैशाख शुद्ध अष्टमीपासून पौर्णिमेपर्यंत नृसिंहनवरात्र असते. नवरात्रकालात नित्य पूजा, अभिषेक, पुराणवाचन, ब्राह्मणसंतर्पण, इ. विधि-विधाने होतात. [ दे. ऋ. ब्रा. प. ]

**नृसिंहपूजा** एक काम्य व्रत. याचा विधी असा – श्रावण महिन्यातील प्रत्येक शनिवारी पाटावर अथवा भिंतीवर नृसिंहाचे चित्र काढतात. नंतर तिळाचे तेल आणि घृत यांनी त्यावर मार्जन करतात. दोन प्रकारची हळद, चंदन, तसेच तिळी, तांबडी अथवा पिवळी फुले, इ. पूजाद्रव्यांनी त्या चित्राची पूजा करतात. त्यावेळी कारळी व कुजरा नामक वनस्पतींची भाजी आणि तांदळाची खिचडी यांचा नैवेद्य दाखवतात. ब्राह्मण भोजनालाही याच अन्नाचा समावेश करतात. फल – संतती, संपत्ती व धनधान्य यांची समृद्धी. [ व्रतराज ]

**नृसिंहपूर्वतापिनी** एक नव्य उपनिषद्. हे अथर्ववेदाशी संबंधित आहे. हे वैष्णवमताचे असून त्याचे आठ अध्याय आहेत. या अध्यायांनाही उपनिषद असेच म्हटले आहे. ब्रह्मज्ञानाची जिज्ञासा व तद्विषयक निर्णय हा याचा उद्देश आहे. ब्रह्मा व इतर देव यांच्यातील संवादाच्या रूपाने त्याचे निरूपण झाले आहे. प्रारंभी ज्या नृसिंहमंत्राची चर्चा आहे, तो मंत्र असा —

> **उग्रं वीरं महाविष्णुं ज्वलन्तं सर्वतोमुखम् ।**
> **नृसिंहं भीषणं भद्रं मृत्युमृत्युं नमाम्यहम् ।।**

दुसऱ्या उपनिषदात देव जेव्हा मृत्युभयाने प्रजापतीकडे गेले, तेव्हा त्याने त्यांना अमरत्वासाठी नृसिंहमंत्राचा जप करण्यास सांगितले, अशी कथा आहे. तिसऱ्या उपनिषदात मंत्राच्या सर्व तांत्रिक अंगांचे निरूपण आहे. चौथ्या उपनिषदात प्रणव, सावित्री, यजुर्लक्ष्मी व नृसिंह गायत्री हे अंगमंत्र आहेत. पाचव्या उपनिषदात नृसिंहचक्राचे सविस्तर वर्णन आहे. त्याचप्रमाणे बत्तीस पाकळ्यांचे कमळ काढून त्यात नृसिंहमंत्र कसा लिहावा याचा तेही सांगितले आहे. अखेरच्या तीन उपनिषदांत नृसिंह चक्राच्या पूजेची महती वर्णिली आहे. [ श्री. सी. ग. देसाई ]

**नृसिंहप्रसाद** धर्मशास्त्रावरचा एक ग्रंथ. या ग्रंथातील प्रत्येक विभागाच्या आरंभी नृसिंहदेवतेला आवाहन केलेले असल्यामुळे या ग्रंथाला नृसिंहप्रसाद ( नृसिंहाच्या कृपेचे फल ) असे नाव दिले आहे. हा ग्रंथ म्हणजे धर्मशास्त्रावरचा एक ज्ञानकोशच आहे, असे म्हटले तरी चालेल.

या ग्रंथाचे बारा भाग आहेत. त्या प्रत्येक भागाला सार असे नाव आहे. संस्कार, आह्निक, श्राद्ध, काल, व्यवहार, प्रायश्चित्त, कर्मविपाक, व्रत, दान, शांती, तीर्थ व प्रतिष्ठा हे ते बारा सार होत. उपनयन, विवाह, चारही आश्रमांतील लोकांचा कर्तव्ये, दिनमानाचे आठ भाग, व्रत, दानाचे प्रकार, तीर्थे इ. विषय या ग्रंथात आले आहेत.

हा ग्रंथ इ. स. च्या १५–१६ व्या शतकात निर्माण झाला. याच्या कर्त्याचे नाव दलपती किंवा दलाधीश असे आहे. मात्र ते त्याचे खरे नाव का हुद्दा, हे निश्चित कळत नाही. तो शुक्ल यजुर्वेदी भारद्वाजगोत्री होता. दलपती हा निजामशाहीतील दप्तराचा प्रमुख असून, तो उत्तम धर्माचा चांगला जाणकार होता. सूर्य पंडित या गुरुजवळ त्याने अध्ययन केले. सूर्य पंडित म्हणजे संत एकनाथ महाराज यांचे वडील असावे, असे विद्वानांचे मत आहे. दलपतीला मातुलकन्याविवाह संमत आहे. तो वेदांनीही मान्य केला आहे, असे तो म्हणतो. त्याचप्रमाणे एखाद्या गोष्टी विषयी श्रुती व स्मृती यांच्यात विरोध आल्यास ती गोष्ट वैकल्पिक मानावी, असे तो सांगतो. [ हि. व. ]

**नृसिंहमत** प. भारतातील एक संप्रदाय. या संप्रदायाचे अनुयायी विशेषकरून गुजरातमध्ये आहेत. नृसिंहरामजी नावाच्या एका नागर ब्राह्मणाने हा संप्रदाय प्रवर्तित केला, म्हणून या संप्रदायाला नृसिंहमत असे नाव मिळाले. या नृसिंहरामजींचे वास्तव्य बडोदे शहरात होते. हा एक सिद्ध योगी होता, असे म्हणतात.

या संप्रदायाचे तत्त्वज्ञान वेदांताला अनुसरून आहे. आचाराच्या बाबतीत या संप्रदायाचे लोक वर्णाश्रमधर्म पाळणार आहेत. ते मूर्तिपूजा व श्राद्धादी विधीही करतात. ते पुनर्जन्म-कल्पना मानतात. सुरत शहरूच, इ. ठिकाणी या संप्रदायाचे मठ असून, बडोदे हे त्यांचे मूळ पीठ आहे. [ भा. ग. द. ]

**नृसिंहपट्चक्रोपनिषद** एक नव्य उपनिषद. हे अथर्ववेदाशी संबंधित आहे. यात अचक्र, सुचक्र, महाचक्र, सकललोकरक्षणचक्र, द्युतचक्र व असुरान्तचक्र या नृसिंहाच्या सहा चक्रांचे वर्णन आहे. त्यापुढे त्या चक्रांची अंत बाह्य वलये सांगून ही सहा चक्रे मानवशरीरात कोणत्या ठिकाणी असतात, ते सांगितलेले आहे. [ श्री. सी. ग. देसाई ]

**नृसिंहाश्रम** (इ. स. चे १६ वे शतक) एक आचार्य व ग्रंथकार. हा प्रथम दक्षिणेत व नंतर काशीत राहत होता. गीर्वाणेंद्रसरस्वती व जगन्नाथाश्रम हे त्याचे गुरू होत.

याच्या संपर्कात आल्यावरच अप्पय्य दीक्षितांनी शांकरमताची दीक्षा घेतली, असे सांगतात. वेदान्ततत्त्वविवेक, तत्त्वबोधिनी, भावप्रकाशिका, अद्वैतदीपिका व भेदधिक्कार हे याचे ग्रंथ असून, त्याव्यतिरिक्त पंचपादिकाविवरण व प्रकाशिका या नावाच्या दोन टीकाही त्याने रचल्या आहेत. [ शंकराचार्य ]

**नेक्कार** ढाळ्याचा एक वर्ग. यांची वस्ती द. रत्नागिरीमध्ये आहे. यांच्या केवळ स्त्रियाच कपडे धुण्याचे काम करतात आणि पुरुषवर्ग भगतगिरी किंवा देवऋषीपणा अशा सारखे व्यवसाय करतात. [ का. ट्रा. सा. इ. ]

**नेजा** राजस्थानातील खरवाडा व डुंगरपूर या भागातील मीण व भिल्ल लोकांचा एक खेळ. होळीच्या तिसऱ्या दिवशी ते हा खेळ खेळतात. त्यासाठी गावाबाहेर एखाद्या मंदिराच्या जवळ जमिनीत एक खांब पुरतात आणि त्याच्या डोक्यावर एक नारळ बांधतात. या नारळाचे स्त्रियांनी रक्षण करायचे आणि पुरुषांनी तो पळवून न्यायचा, असा हा खेळ असतो. त्यासाठी बायका हातात छड्या घेऊन खांबाभोवती कडे करतात आणि खांबावर चढून नारळ पळवण्याचा प्रयत्न करणाऱ्या पुरुषांना झोडपून काढतात. सहा वेळा पुरुष त्या खांबाजवळ येतात आणि सहाही वेळा स्त्रिया त्यांना पिटाळून लावतात. सातव्या वेळी मात्र स्त्रिया आपण होऊन बाजूला होतात आणि मग तो नारळ हस्तगत करण्यासाठी पुरुषा–पुरुषातच स्पर्धा लागते. ज्या पुरुषाला तो मिळतो, त्याची शूर म्हणून प्रशंसा होते. [ लोककला – त्रैमासिक, रा. लो., श्री ज्ञान भारिल्ल – संयुक्त राजस्थान, मार्च १९५७ ]

**नेट्टिकोटल** द. भारतातील एक जात. कपाळ फोडून घेणे असा नट्टिकोटल शब्दाचा अर्थ आहे. त्यावरून जे लोक आपले कपाळ फोडून घेतात, त्यांना नेट्टिकोटल अशी संज्ञा मिळाली असावी. तमिळ प्रदेशातील कल्लडी सिद्धन या लोकांशी यांचा निकट संबंध सांगतात. गवर कोमटी लोकांकडे हे भिक्षा मागतात. भिक्षेबरोबरच हे थोडी फार सावकारी करतात. त्यांनी मागितल्याबरोबर त्यांचे कर्ज चुकते झाले नाही, तर ते ऋणकोपुढे आपले कपाळ फोडून घेतात. हा एक धाग्याचाच प्रकार आहे. [ का. ट्रा. स. इ. ]

**नेती** हठयोगाच्या षट्कर्मांपैकी एक कर्म. याची कृती अशी– वीतभर लांब सूत घेऊन त्याला तूप अथवा मेण लावून ते मऊ करावे. नंतर त्याचे एक टोक बारीक करून एका नाकपुडीत घालावे. दुसरी नाकपुडी दाबून धरावी. मग सूत घातलेल्या नाकपुडीने खूप श्वास घ्यावा, म्हणजे सुताचे टोक घशात येईल. हे टोक अंगठा व तर्जनी यांच्या साहाय्याने तोंडातून बाहेर काढावे. नंतर नाकपुडीच्या बाहेर असलेले व तोंडातून काढलेले अशी दोन्ही टोके धरून हळूहळू आत–बाहेर ओढावे. या क्रियेमुळे दिव्यदृष्टी प्राप्त होते. तसेच नाक, कान, हनू व मस्तक यांचे सर्व आजार दूर होतात.

एका नाकपुडीने पाणी आत घेऊन दुसऱ्या नाकपुडीतून बाहेर सोडणे, असाही नेतीचा दुसरा प्रकार आहे. त्याला जलनेती असे म्हणतात. जलनेतीमुळेही कफदोष नाहीसे होतात. [ यो. सो. पू., श्रीगुरुचरित्रयोग ]

**नेनोत्सव** ओडिशातील एक उत्सव. पंडा जातीच्या कुमारिका व जगन्नाथाच्या मंदिरातील आचारी लोकांच्या मुली हा उत्सव साजरा करतात. भाद्रपद पौर्णिमेपासून पुढे एकवीस दिवस हा उत्सव चालतो. या उत्सवात उमामहेश्वर म्हणून दोन सुपाऱ्या स्थापून त्यांची पूजा करतात. शेवटच्या दिवशी सर्व मुली मार्कंडेश्वराची पूजा करण्यासाठी जातात. अनुरूप वरप्राप्तीसाठी हा पूजोत्सव असतो. [ स्ट. ओ. फो. ]

**नेत्तिपकरण** पाली भाषेतला एक बौद्ध ग्रंथ. याला नेत्ती किंवा नत्तिगंथ असेही म्हणतात. त्रिपिटकांतर्गत बुद्धवचनाचा अर्थ समजण्याच्या कामी याचा चांगला उपयोग होतो. वेदांचे जसे निरुक्त तसेच त्रिपिटकाचे हे निरुक्त होय. यातील वर्ण्य विषय व शैली ही अभिधम्मपिटकाशी मिळती जुळती आहे. कच्चान नामक एका भिक्षूने इ. स. च्या प्रारंभाच्या आगेमागे या ग्रंथाची रचना केली. [ पा. सा. इ. ]

**नेत्र** (१) एक प्रकारचे नाजुक रेशमी वस्त्र. हर्षचरितात या वस्त्राचा पाच ठिकाणी उल्लेख आला आहे. हे वस्त्र शुभ्र असून, त्यावर पानाफुलांची नक्षी काढलेली असते. उज्ज्वल मधुकुमार असे बाणाने त्याचे वर्णन केले आहे. हर्ष स्वतः या वस्त्राची मेखला वापरीत असे. बंगालमध्ये इ. स. च्या १४ व्या शतकापर्यंत नेत्र नामक एक प्रकारचे चिवट रेशमी कापड तयार होत असे. [ ह. च. मा. अ., प्रा. भा. वे. भू. ]

(२) डोळा. याचे लक्षण असे– 'रूपोपलब्धिसाधनमिन्द्रियम्' = रूपाच्या उपलब्धीचे साधन असे इंद्रिय म्हणजे नेत्र होय (तर्कभाषा). सूर्य ही नेत्राची अधिष्ठात्री देवता मानलेली आहे. नेत्र हे तैजस असल्याने न्यायशास्त्राने मानलेले आहे. नेत्रात अनुद्भूत शुक्ल हा गुण असतो. [ न्या. को. ]

**नेत्रदान** डोळयाच्या आकाराचे सोन्याचे आरसे दान देणे, असा याचा विधी आहे हे दान संक्रातीच्या दिवशी देतात त्याचा मंत्र असा–

**सर्वार्थदर्शन पुण्य रूपकीर्तिविवर्धनम ।**
**क्षेमप्रद प्रयच्छामि निर्मल दर्पणद्वयम ।।**

अर्थ – सर्व पदार्थ दाखवणारे, पुण्यकारक, रूप व कीर्ती वाढवणारे आणि निर्मल असे दोन आरसे मी दान देत आहे

**नेत्रव्रत** एक काम्य व्रत चैत्र शुद्ध द्वितीयेला हे व्रत करतात व्रतावधी बारा वर्ष सूर्य व चंद्र यांच्या स्वरूपात अश्विनीकुमारांच्या मूर्ती पुजणे, हा या व्रतातील प्रमुख विधी होय व्रतकर्त्याने त्या दिवशी ब्रह्मचर्य पाळायचे असते त्या दिवशीच्या ब्राह्मणभोजनात गायीचे दही तूप वाढायचे असते फल – दृष्टीची सुधारणा [ व्र प ]

(१) तिबेटी भाषेत ने चा अर्थ घर निवासस्थान आणि पाल चा अर्थ लोकर असा आहे या देशात लोकरीची विपुलता असल्यामुळे याला नेपाल हे नाव मिळाले

(२) पार्वतीय वंशावळीत ने मुनीची आख्यायिका आढळते तो मुनी विष्णुमती व बागमती या नद्यांच्या संगमावर तप करीत असे त्या काळातील राजे या ने मुनीच्या आशीर्वादाने व आज्ञेप्रमाणे राज्य चालवीत ने मुनीच्या तपाने पालित देश, म्हणून नेपाल हे नाव याला मिळाले

(३) तिबेटी लोक याला नेपा म्हणतात ने = मध्य व पा = देश, यावरून नेपा = मध्य देश असा त्याचा अर्थ होतो

**स्वाभाविक विभाग** – नेपाळचे तीन स्वाभाविक विभाग पडतात, ते असे –

(१) तराई – दक्षिणेकडील सखल व दलदलीचा प्रदेश याची रुंदी १० ते ३० मैल असून, बराच भाग घनदाट जंगलांनी व्यापलेला आहे या जंगलात नानाविध वृक्ष आणि असंख्य जंगली पशू आढळतात तराईतली पुष्कळ जमीन अत्यंत सुपीक असून, गहू, तांदूळ, ऊस, नीळ अफू, ताग, तंबाखू व कापूस ही तिथली मुख्य पिके आहेत

(२) मध्यभाग – तराई व हिमालयाची उच्च शिखरे यांच्या मध्ये असलेला दहा हजार फूट उंचीपर्यंतचा डोंगराळ प्रदेश या भागातही घनदाट अरण्ये व सुपीक जमीन पुष्कळ आहे अनेक पर्वतराजींमुळे पुष्कळ दऱ्या इथे निर्माण झाल्या आहेत चंद्रगिरी व महाभारत या पर्वतांच्या मधली बागमती नदीची दरी सर्वांत मोठी व महत्त्वाची आहे हिला नेपाळची किंवा




**नेपाळ** भारताच्या उत्तरेला हिमालयाच्या पर्वतराजीत असलेला एक देश याची पूर्व पश्चिम लांबी ५०० ते ५५० मैल असून, दक्षिणोत्तर रुंदी ९० ते १४० मैल आहे याच्या उत्तरेला तिबेट, पश्चिमेला कुमाऊ, दक्षिणेला उत्तर प्रदेश व बिहार आणि पूर्वेला बंगाल व सिक्किम हे प्रदेश आहेत या प्रदेशाचे क्षेत्रफळ सुमारे ५४५०० चौ मैल असून, लोकसंख्या जवळ जवळ एक कोटी आहे

नेपाल या शब्दाचा उल्लेख सर्वप्रथम कौटिल्याच्या अर्थशास्त्रात आढळतो त्या शब्दाची व्युत्पत्ती अनेक भिन्न भिन्न प्रकारांनी केली जाते, त्यातील काही प्रकार असे–

काठमांडूची दरी म्हणतात गहू, तांदूळ, मका, हळद, बार्ली, ओट व बटाटे ही या भागातली मुख्य पिके आहेत त्याशिवाय इथे संकरचंद वगैरे फळे, फुले व भाज्या पुष्कळ होतात पूर्व भागात वेलचीची लागवड मोठ्या प्रमाणात केली जाते

(२) हिमाच्छादित प्रदेश– हिमालयाची अनेक दुर्गम शिखरे नेपाळच्या या भागात आहेत त्यांची नावे अशी – एव्हरेस्ट हे सर्वोच्च शिखर (२९,२४१), कांचनजुंगा (२८,१४०′), मकालू (२७७९०), धवलगिरी (२६,८००′), गुसाईनाथ (२६ ३०५) मनसालू (२६,६९८′), हिमालचुली (२५-८०१) व गौरीशंकर (२३,४४०) हा हिमाच्छादित प्रदेश तिबेटपर्यंत पसरला आहे

या प्रदेशात शिवपुरी, फलचोक, नागार्जुन महादेव पोखरी, मणिचूड, चंपादेवी, फुरफिंग इ अनेक लहानमोठी पर्वतशिखरेही आहेत

या पर्वतराजीतून ज्या नद्या वाहतात, त्यातील पुढील तीन नद्या मुख्य मानल्या जातात –

(१) पश्चिम नेपाळातील गोग्रा – काली (शारदा), सरजू कर्णाली व राप्ती या सर्व नद्यांची मिळून गोग्रा नदी बनते व ती गंगेला मिळते

(२) मध्य नेपाळमधील गंडकी – धवलगिरी व गुसाईनाथ या शिखरांच्या मध्ये उगम पावलेल्या सात नद्या मिळून ही नदी बनते तिच्या खोऱ्याला सप्तगंडकी असे म्हणतात

(३) पूर्व भागातील कोसी – गुसाईनाथ व कांचनगंगा यांच्यामधून उगम पावलेल्या सात नद्या मिळून कोसी नदी बनते व पुढे ती गंगेला मिळते या भागाला सप्तकोसी म्हणतात

यांव्यतिरिक्त नेपाळमध्ये बडी गंडक छोटी राप्ती, बागमती, कुमला रुद्रमती मणिमती, हनुमती, भद्रमती, विष्णुमती, प्रभावती, कमनाशा, त्रिशूलगंगा, इ अनेक नद्या आहेत त्यातील बागमतीचे खोरे सप्तगंडकी व सप्तकोसी यांच्या मध्ये आहे हीच नेपाळची मुख्य भूमी होय पूर्वी एवढ्याच भूभागाला नेपाळ हे नाव होते

**प्राचीन काळ** – नेपाळमध्ये काही वंशावळी उपलब्ध आहेत, त्यावरून प्राचीन नेपाळची पुष्कळ माहिती मिळते पण ती सर्व माहिती सुसंगत नसल्यामुळे ऐतिहासिक दृष्टीने त्या वंशावळीचे मूल्य थोडे आहे त्यात स्थल–कालाचीही विसंगती आहे पण प्राचीन कालातील नेपाळ देशाची माहिती मिळवण्याचे दुसरे कोणतेच साधन उपलब्ध नसल्यामुळे या वंशावळींना महत्त्व देणे प्राप्त झाले आहे प्रस्तुत वंशावळीवरून जी माहिती हाती लागते, ती अशी –

नेपाळ देशाच्या जागी पूर्वी एक विशाल सरोवर होते त्याला नागह्रद असे म्हणत त्रेतायुगात मंजुश्री बोधिसत्त्व चीन देशातून इथे आला व त्याने आपल्या खड्गाच्या एकाच घावाने एका पर्वताला खिंडार पाडून त्या सरोवरातील पाण्याला वाट करून दिली तिथूनच बागमती नदीचा उगम झाला ते स्थान आजही कोटबार या नावाने प्रसिद्ध आहे नागह्रद कोरडा पडल्यानंतर मंजुश्रीने आपल्या अनुयायांना तिथे आणून वसवले व धर्माकर या आपल्या शिष्याला त्या प्रदेशाचा राजा केले त्यानंतर तिथे अनेक वंशांचे राजे होऊन गेले काही वंश वंग



पशुपतिनाथाचे मंदिर – नेपाळ

देशातून तिथे गेले व राज्यकर्ते झाले पुढे धर्मदत्त नावाचा कांचीवरमचा राजा प्रचंड सेना घेऊन नेपाळात गेला व तिथे त्याने चारही वर्णांच्या हिंदूंची वसाहत स्थापली त्यानेच पशुपतिनाथाचे मंदिर निर्माण केले

त्यानंतर सुमारे पाच हजार वर्षे गेली आणि ने मुनी भारतातून नेपाळमध्ये गेला त्याने आपल्याबरोबर अनेक गोपाल लोक तिथे नेले व त्या गोपाल वंशातील राजांनी तिथे सुमारे पाच शतके राज्य केले पूर्वीचे पशुपतिमंदिर भग्न होऊन त्यातील ज्योतिर्लिंग जमिनीत लुप्त झाले होते, ते या कालात पुन्हा प्रकट झाले व त्यावर नवे मंदिर बांधण्यात आले

त्यानंतर नेपाळवर काही काळ अहिर लोकांचे राज्य होते पुढे लवकरच पूर्वेकडील किरात लोकांनी या देशावर स्वारी करून तो जिंकला आणि त्यांचा नेता यल्बर हा नेपाळचा राजा झाला या किरात वंशाचे २९ राजे नेपाळात झाले त्यातील एका राजाच्या राजवटीत मौर्य सम्राट अशोक याने नेपाळची यात्रा केली होती तिथे त्याने चार स्तूप बांधले, असे सांगतात लुंबिनी या बुद्धाच्या जन्मस्थानी अशोकाने बांधलेला एक स्तंभ

आता सापडला आहे अशोकाची कन्या चारुमती हिने देवपाल नामक नेपाळी सरदाराशी विवाह केला व ती तिथेच राहिली तिने एक विहार बाधला व दवपाटण नगर वसवले

**इतिहास** – किरात वशानतर सामवशी राजा निमिष याने नेपाळवर सत्ता स्थापली त्याच्या वशातील एका राजाने पशुपतिनाथमदिराचा जीर्णोद्धार केला त्या वशातील शवटचा राजा भास्करवर्मा कलियुगाच्या १२३४ व्या वर्षाच्या सुमारास राज्य करीत होता, असे म्हणतात त्यानतर नेपाळवर लिच्छवी वशाचे राज्य सुरू झाले या लिच्छवींचा वशालीच्या लिच्छवींशी काय सबध होता, ते स्पष्ट कळत नाही पशुपतिमदिरातील शिलालेखात लिच्छवी कुळातील सुपुष्प नामक पुरुषाचा या वशातील पहिला राजा म्हणून उल्लेख आढळतो त्याच्या नतरचा चोविसावा राजा जयदेव आणि छत्तिसावा राजा वृषदेव हे विशेष



स्वयभूनाथाचे मदिर – नेपाळ

प्रसिद्ध होते वृषदेव हा बौद्ध धर्माचा अनुयायी असून, त्याने नेपाळात अनेक विहार बाधले त्याचा पुत्र शकरदेव मात्र शिवभक्त होता त्याने आपली कारकीर्द वैभवशाली केली त्याचा पुत्र धर्मदेव याचे राज्यही मोठे होते पशुपतिमदिरानला प्रचड नदी यानेच बसवला, असे म्हणतात त्याबरोबरच त्याने स्वयभूनाथाचीही प्रतिष्ठापना केली

धर्मदेवाचा पुत्र मानदेव याचा राज्यकाळ इ स ४६० ते ५०५ हा मानला जातो आणि त्यावरून या वशाचे राज्य इ स च्या पहिल्या शतकात सुरू झाले असावे, असे अनुमान निघते गुप्त सम्राट चद्रगुप्त (१ ला) याचा विवाह ज्या लिच्छवी राजकन्येशी झाला होता, तिचा नेपाळी लिच्छवी राजकुलाशी सबध होता किंवा नाही, हे सागता येत नाही मात्र नेपाळी लिच्छवी राजानी समुद्रगुप्ताचे प्रभुत्व मानले होते पुढे गुप्त साम्राज्य दुबळे झाल्यानतर लिच्छवी राजवशाने सपूर्ण नेपाळवर आपली सत्ता प्रस्थापित केली गुप्ताच्या प्रभावामुळे नेपाळात वैदिक धर्म व सस्कृत भाषा याना खूपच महत्त्व प्राप्त झाले

मानदेवाने मानविहार व मानगृहनामक प्रासाद निर्माण केला मानाक नावाचे नेपाळी नाणे व मानेश्वरी पथ याचा सबध याच मानदेवाशी जोडला जातो त्याच्या नतर काही दिवस महीदेव आणि नतर वसतदेव याने इ स ५३० पर्यत राज्य केले एका नेपाळी वशावळीवरून कळते, की वसतदेवानतरच्या राजाचा आभीरानी पराभव केला व तीन आभीर राजानी नेपाळवर राज्य केले मग लिच्छवी वशातील शिवदेव याने आभीराचा पराभव करून आपले राज्य परत मिळविले या विजयाचे बहुतेक श्रेय शिवदेवाचा महासामत अशुवर्मा याला दिले जाते त्याच्या या पराक्रमामुळे तोच नेपाळचा खरा शासक झाला त्याने एका लिच्छवी राजकन्येशी विवाह करून आपले पद दृढ केले असेही म्हणतात तो ठाकुर वशाचा सस्थापक मानला जातो

अशुवर्म्याचे राज्य सुरू होण्यापूर्वी कनोजचा सम्राट हर्षवर्धन याने नेपाळ जिंकून तिथे आपली कालगणना सुरू केली होती, असे वशावळीवरून कळते त्या कालगणनेप्रमाणे इ स ६३८ ते ६५१ हा अशुवर्म्याचा राज्यकाल ठरतो पण नेपाळात शक कालगणना चालू होती असे मानले, तर इ स ६१० ते ६२३ हा त्याचा राज्यकाल ठरेल त्या कालखडात तिबेटच्या राजाने नेपाळ व आसाम हे प्रदेश जिंकले होते आणि नेपाळच्या राजा अशुवर्मा याने आपली कन्या त्याला दिली होती अशुवर्मा हा विद्वान असून, त्याने एक व्याकरण रचले होते, असे म्हणतात

अशुवर्मा याच्या मृत्यूनतर (इ स ६२३) जिष्णुगुप्त नावाच्या राजाने इ स ६३७ पर्यत नेपाळवर राज्य केले असे शिलालेखावरून कळते तो अशुवर्मा याच्या कुळातला नव्हता त्याच्या वेळी लिच्छवी वशातील उदयदेव व भीमार्जुनदेव हे नेपाळचे राजे होते जिष्णुगुप्त त्याचे नाममात्र प्रभुत्व मानून स्वत च सत्ताधीश बनला होता जिष्णुगुप्तानतर त्याचा पुत्र विष्णुगुप्त हा राजा झाला त्याने इ स ६४२ पर्यत राज्य केले असावे कारण इ स ६४३ च्या सुमारास लिच्छवी राजा नरेंद्रदेव याने नेपाळवर आपले वर्चस्व स्थापल्याचे कळते त्यासाठी त्याने तिबेटच्या राजाचे साहाय्य घेतले आणि त्यामुळेच त्याला तिबेटच्या राजाचा सामत बनावे लागले तो

मत्स्येंद्रनाथाचा अनुयायी होता त्याने इ स ६८७ पर्यंत राज्य केले असावे त्यानंतर त्याचा पुत्र शिवदेव याने इ स ७०३



ठाकुर जातीचा तरुण

पर्यंत आणि त्याचा पुत्र जयदेव याने इ स ७३७ पर्यंत राज्य केले शिवदेवाची राणी वत्सदेवी ही मौखरी भोगवर्मा याची कन्या होती जयदेवाची राणी राज्यमती ही गौडाधिपती हर्षदेव याची कन्या होती त्या कालखंडात नेपाळ हे तिबेटचे अंकित राज्यच होते मात्र त्या काळातही नेपाळचा भारताशी सांस्कृतिक संबंध दृढ होता वैदिक व बौद्ध या दोन्ही संप्रदायांचे नेपाळ हे महान केंद्र होते

जयदेवाच्या मृत्यूनंतरचा सुमारे दीडशे वर्षांतील नेपाळचा इतिहास नीट समजत नाही वंशावळीतली माहिती सुसंगत नाही व त्या काळातील शिलालेखही उपलब्ध नाहीत मात्र काही वंशावळीवरून त्यानंतरचा इतिहास जुळवता येतो ठाकुर वंशातील राघवदेव नामक राजाने इ स ८७९ मध्ये नेवारी कालगणना सुरू केली, असे काही संशोधकांचे मत आहे त्या वर्षी नेपाळवरील तिबेटचे प्रभुत्व नष्ट झाले असावे राघवदेव याने इ स ९२६ पर्यंत राज्य केले त्याच्या नंतर तीन राजांनी सुमारे २० वर्षे राज्य केले आणि मग गुणकामदेव हा सिंहासनावर आला याने पूर्वेकडे आपल्या राज्याचा बराच विस्तार केला त्याने अगणित संपत्ती मिळवली आणि ती दानधर्मात खर्चही केली काठमांडू नगर त्यानेच वसविले, असे म्हणतात त्याच्या राजवटीत व्यापार वाढला, नवी नगरे वसली, उद्योगधंद्यांची वाढ झाली व सारे राज्यच समृद्ध झाले गुणकामदेवाने इ स १००० पर्यंत राज्य केले त्याच्या नंतर पाच सहा राजांनी नेपाळवर सत्ता चालवली शेवटचा राजा जयकाम हा निपुत्रिक मरण पावल्यानंतर नयकोटच्या ठाकुर लोकांनी भास्करदेव नावाच्या आपल्या नेत्याला नेपाळचा राजा म्हणून निवडले त्याच्या नंतर बलदेव, पद्मदेव, नागार्जुनदेव व शंकरदेव यांनी नेपाळवर राज्य केले पण इ स १०८० च्या सुमारास पाटणच्या ठाकुर कुळातील वामदेव नामक पुरुषाने नेपाळचे राज्य नयकोटच्या ठाकुर राजाकडून जिंकून घेतले इ स १०९० च्या सुमारास हर्षदेव गादीवर आला त्याने इ स १०९८ पर्यंत राज्य केले त्यानंतर नयकोटच्या ठाकुर कुळातील शंकरदेवाचा पुत्र शिवदेव याने ते राज्य परत मिळविले त्याने कीर्तिपूर नामक नगर वसवले आणि पशुपतिनाथमंदिरावर सोन्याचा पत्रा बसवला, असे म्हणतात त्याने तांबे व लोह यांच्या मिश्रणाचे एक नवे नाणे बनवले होते आणि त्यावर सिंहाचा छाप होता

इ स १२०० पर्यंत या वंशातील आणखी सहा राजांनी नेपाळवर राज्य केले त्यानंतर इ स १२०१ पासून मल्ल



मगर पुरुष

वंशाचे राज्य सुरू झाले त्या वंशातील दहा राजांनी इ स १३२६ पर्यंत राज्य केले या कालखंडात नेपाळमध्ये अनेक

भूकंप झाले व अनेकदा दुष्काळही पडला अनंतमल्ल (इ स १२७९–१३०७) याच्या कारकिर्दीत पश्चिमेकडील पाल्पा नामक डोंगरी प्रदेशातील खस व मगर या टोळ्यांनी नेपाळवर हल्ले करून खूप लुटालूट व जाळपोळ केली मुकुंदसेन हा त्यांचा नेता होता

कर्णाट वंशातील नान्यदेव नामक पराक्रमी पुरुषाने मिथिलेवर स्वारी करून तो प्रदेश जिंकला होता पुढे त्या वंशातील राजांनी नेपाळवरही प्रभुत्व मिळविले इ स १३२४ च्या सुमारास त्या कर्णाट वंशातील हरिसिंह याने नेपाळवर स्वारी करून तिथे आपली सत्ता दृढ केली त्याच सुमारास गियासुद्दीन तुघलक याने मिथिलेवर आक्रमण करून तो प्रदेश जिंकल्यामुळे हरिसिंह मिथिला सोडून नेपाळात गेला व भाटगाव येथून नेपाळवर राज्य करू लागला तिथे त्याने २८ वर्षे राज्य केले त्याच्यानंतर मतिसिंह, शक्तिसिंह व श्यामसिंह या राजांनी ५० ते ६० वर्षे राज्य केले त्या काळात मल्लवंशी राजे कर्णाट वंशाचे प्रभुत्व मान्य करून व त्यांचे मांडलिक म्हणून निरनिराळ्या ठिकाणी राज्यकारभार करीत होते

इ स १३२६ मध्ये जयरुद्रमल्ल मरण पावल्यानंतर ५०–६० वर्षे मल्ल वंशातील भिन्न शाखांची वेगळी राज्ये नेपाळात चालू होती इ स १३५० च्या सुमारास बंगालचा सुलतान इल्यास शाह याने नेपाळवर स्वारी करून अनेक मंदिरांचा विध्वंस केला व खूप लुटालूट केली इ स १३८२ पासून जयस्थितिमल्ल याने सर्व राज्यांचे संघटन करून तिथे आपली सत्ता स्थापली तो एक समर्थ शास्ता ठरला त्याने नेपाळात शांतता व सुव्यवस्था निर्माण केली तो विद्येचा पुरस्कर्ता आणि विद्वानांचा आश्रयदाता होता त्याने देशात अनेक आर्थिक व सामाजिक सुधारणा घडवून आणल्या जयरुद्रमल्लाची कन्या नायकदेवी हिला कर्णाट वंशातील जगतसिंह नामक पुरुषापासून झालेली कन्या राजल्लदेवी ही जयस्थितिमल्लाची राणी होती

इ स १३९५ च्या सुमारास जयस्थितिमल्ल मरण पावला त्यानंतर त्याचे तीन पुत्र क्रमाने राजे झाले, असे कळते तिसरा पुत्र जयज्योतिर्मल्ल याने इ स १४२७ पर्यंत राज्य केले त्याने कर्णाट वंशाचे प्रभुत्व नष्ट करून नेपाळवर आपली सार्वभौम सत्ता स्थापली त्याचा पुत्र जययक्षमल्ल याने ५० वर्षांहून अधिक काळ राज्य केले, असे कळते त्याने मिथिला, मगध, वंग व तिबेट या प्रदेशांवर स्वाऱ्या करून विजय मिळवले, असे म्हणतात संपूर्ण नेपाळवर त्याची सत्ता दृढ झाली होती, एवढे मात्र खरे तो इ स १४८० मध्ये मरण पावला तत्पूर्वी त्याने आपल्या राज्याचे चार भाग करून ते आपले तीन पुत्र व एक कन्या यांना वाटून दिले अशा प्रकारे काठमांडू, भाटगाव, पाटण व बनेपा ही स्वतंत्र राज्ये निर्माण झाली काठमांडूचा राजा रत्नमल्ल पराक्रमी होता त्याने मुसलमानांचे आक्रमण परतवून लावले लवकरच काठमांडू व पाटण ही राज्ये एक झाली बनेपाचे राज्य सुमारे शंभर वर्षे चालले आणि नंतर ते भाटगावच्या राज्यात विलीन झाले



गुरखा अधिकारी

इ स च्या १७ व्या शतकाच्या प्रारंभी काठमांडू व पाटण ही राज्ये पुन्हा विभक्त झाली त्यानंतर १००–१५० वर्षे मल्ल वंशाच्या त्या तीन राज्यांची आपसांत भांडणे सतत चालू होती

**गुरखा राजवंश** – मुसलमानांच्या आक्रमणामुळे भारतातून अनेक राजपूत व ब्राह्मण लोक नेपाळात जाऊन वसले होते त्यांचा मगर, गुरुंग, खस वगैरे वन्य जमातींच्या स्त्रियांशी शरीरसंबंध झाल्यामुळे जे लोक उत्पन्न झाले, ते स्वतःला क्षत्रिय मानतात या लोकांची ४६ लहान लहान राज्ये नेपाळच्या पश्चिम भागात होती त्यांचे चौबिसी व बाइसी या नावांचे दोन गट पडले होते जुमलाचे राज्य सर्वांत मोठे होते बाकीची राज्ये जुमलाच्या राजाचे नाममात्र आधिपत्य मानीत त्यांतील लामजुंगचे राज्य मगरांचे होते व गोरखाचे राज्य खसांचे होते लामजुंगचा राजपुत्र द्रव्य शाह याने इ स १५५९ मध्ये गोरखावर स्वारी करून ते नगर जिंकले व तिथे आपले राज्य स्थापले

गोरक्षनाथाची गुहा ज्या टेकडीवर आहे, त्या टेकडीवर गोरखा शहर वसलेले आहे त्यावरूनच त्या भागाला गोरखा म्हणू लागले व तिथल्या लोकांना गोरखाली हे नाव मिळाले मात्र ब्रिटिश सरकारने नेपाळमधील सर्वच लढाऊ जमातींना गुरखा हे नाव दिले

इ स च्या १८ व्या शतकात द्रव्य शाहाच्या गोरखा वंशातील नववा राजा नरभूपाल याने नवकोट जिंकले आणि नेपा

ळच्या दरीवर स्वारी केली पण जगतजयमल्ल याने त्याचा पराभव केला इ स १८४२ साली नरभूपाल मरण पावला व



पृथ्वीनारायण शाह

त्याचा पुत्र पृथ्वीनारायण शाह हा बाराव्या वर्षी राजा झाला त्याने प्रथम चाविसी राज्यापैकी काही राज्ये आपल्या राज्यात समाविष्ट करून घेतली आणि मग काठमांडूकडे मोर्चा वळवला इ स च्या १८ व्या शतकात भाटगाव, काठमांडू व पाटण येथील राजांची यादवी विकोपाला गेली भाटगावच्या राजाने गुरखा राजा पृथ्वीनारायण शाह याच्याकडे साहाय्य मागितले पृथ्वीनारायणाने त्या संधीचा फायदा घेतला व नेपाळमध्ये आपली सत्ता वाढवली प्रथम त्याने पाटण राज्यातील कीर्तिपूर घेतले व मग पाटणकडे मोर्चा वळवला तेव्हा पाटणच्या राजाने ब्रिटिश लोकांकडे मदत मागितली तदनुसार किनलाकच्या नेतृत्वाखाली ब्रिटिश सैन्याची एक तुकडी पावसाळ्यात नेपाळात घुसली पण तराईतल्या रोगराईमुळे हैराण होऊन तिला परत यावे लागले मग पृथ्वीनारायण याने काठमांडू, पाटण व भाटगाव ही तीन्ही नगरे जिंकून घेतली व इ स १७६९ मध्ये संपूर्ण नेपाळवर आपली सत्ता स्थापली

त्यानंतर पृथ्वीनारायण याने पूर्वेकडील किरातांचे राज्य जिंकून घेतले आणि पश्चिमेकडील सर्व चोविसी राज्यांवरही आपली सत्ता स्थापिली अशा प्रकारे नेपाळचे एकसंध राज्य अस्तित्वात आले इ स १७७२ मध्ये पृथ्वीनारायण मरण पावला त्याला प्रतापसिंह व बहादुर शाह या नावाचे दोन पुत्र होते प्रतापसिंहाला सिंहासन मिळाले, पण तो इ स १७७५ मध्ये मरण पावला त्याचा पुत्र रणबहादुरशाह लहान होता, म्हणून राजमाता राजेन्द्रलक्ष्मीदेवी ही पुत्राच्या वतीने राज्यकारभार पाहू लागली इ स १७८६ मध्ये राजमाता निवर्तल्यानंतर बहादुरशाहाने कारभार हाती घेतला त्याने १७९५ पर्यंत राज्यधुरा सभाळली तोपर्यंत त्याने नेपाळच्या सीमा भूतानपासून काश्मीरपर्यंत व तिबेटपासून भारतापर्यंत वाढवल्या तिबेटातही गुरखा सेनेने आक्रमण सुरू केले तेव्हा इ स १७९१ मध्ये चीनच्या राजाने सत्तर हजार सैन्य नेपाळवर पाठवले मग इ स १७९२ साली नेपाळच्या राजाने ब्रिटिशांशी व्यापारी तह केला व सेनासाहाय्य मागितले लॉर्ड कार्नवालिस याने कर्नल किर्कपॅट्रिक याला नेपाळात पाठवले, पण तत्पूर्वीच गुरखा राजाने चीनशी तह करून चीनचे प्रभुत्व मान्य केले होते

इ स १७९५ साली रणबहादुर शाहाने आपल्या चुलत्याला बाजूला सारून राज्यसूत्रे स्वतःच्या हाती घेतली त्याने सेनापती दामोदर पांडेय याला प्रधान मंत्री नेमले रणबहादुर शाहाने एका मैथिली ब्राह्मण कन्येशी विवाह करून तिला महाराणी बनवले तिला एक पुत्र झाला, तोच राजपुत्र पुढे गीर्वाणयुद्ध शाह या नावाने प्रसिद्ध झाला

काही दिवसांनी मैथिली महाराणीने आत्महत्या केल्यामुळे



भीमसेन थापा

राजा भ्रमिष्ट झाला आणि त्याने थोरल्या महाराणीचा पुत्र रणोद्दीप व इतर काही माणसे यांची हत्या केली त्यामुळे

प्रजेने इ स १८०० मध्ये रणबहादुर शाहाला पदच्युत करून गीर्वाणयुध्द शाहाला सिंहासनावर बसविले पुढे इ स १८०४ मध्ये रणबहादुर शाहाने ब्रिटिशांच्या मदतीने पुन्हा सिंहासन मिळवले व भीमसेन थापा याला प्रधानमंत्री नेमले त्याने दोन तीन वर्षांत गढवाल कुमाऊ, कांगडा व पाल्पा हे प्रदेशही आपल्या राज्याला जोडले व प्रथमच राज्याची सुवर्णमुद्रा सुरू केली

इ स १८०७ मध्ये रणबहादुराचा पिता प्रतापसिंह याचा अनौरस पुत्र शेरबहादुर याने रणबहादुराचा खून केला त्यानंतर गीर्वाणयुध्द शाह गादीवर आला त्याचाही प्रधान मंत्री भीमसेन थापा हाच होता हा अत्यंत कुशल शासक होता त्याने राज्य कारभार सुनियंत्रित करून सैन्यही संघटित केले महाराष्ट्र, म्हैसूर, हैदराबाद, पंजाब, अवध, भूतान, ब्रह्मदेश येथील ब्रिटिश विरोधी राजांना संघटित करून ब्रिटिशांचा पाडाव करण्याची महत्त्वाकांक्षा त्याने बाळगली होती इ स १८१३ च्या सुमारास त्याने चीनच्या राजालाही आपल्या संघटनेत घेण्याचा प्रयत्न केला होता

इ स १८१४ साली इंग्रजांनी नेपाळवर स्वारी केली गुरखा सेनेने त्यांचा पराभव केला मग इंग्रजांनी भेदनीतीचा अवलंब करून कुमाऊ, गढवाल व सिक्किम हे प्रदेश मिळवले त्यानंतर इंग्रजांच्या सैन्याने इ स १८१६ मध्ये नेपाळी सैन्याचा पराभव केला तेव्हा गीर्वाणयुद्ध शाहाला इंग्रजांशी तह करावा लागला तदनुसार नेपाळ व ब्रिटिश भारत यातील सीमा निश्चित करण्यात आली व नेपाळमध्ये ब्रिटिश रेसिडेंट नेमण्यात आला

लवकरच गीर्वाणयुद्ध शाह मृत्यू पावला व त्याचा तीन वर्षांचा पुत्र राजेंद्र वीर विक्रमशाह सिंहासनावर बसला राजमाता त्रिपुरसुंदरीदेवी राज्यकारभार चालवू लागली त्या वेळीही भीमसेन थापा हाच मुख्य मंत्री होता त्याने नेपाळचे बळ वाढवण्याचा पुन्हा प्रयत्न आरंभला पण राजेंद्र वीर विक्रमशाह हा वयात आल्यावर त्याने भीमसेन थापाला इ स १८३७ साली तुरुंगात टाकले व रणजंग पांडेय याला मंत्री केले इ स १८३९ मध्ये भीमसेन मरण पावला

राजेंद्र वीर विक्रमशाह याच्या दोन राण्या होत्या त्या दोघींची आपसात स्पर्धा होती रणजंग पांडेय याने थोरल्या राणीचा पक्ष घेतला त्या दोघांनी भारतातील निरनिराळ्या राजसत्तांशी संगनमत करून ब्रिटिशांना हुसकून देण्याची योजना केली होती पण इ स १८४१ मध्ये महाराणीवर विषप्रयोग होऊन ती मरण पावली आणि तिच्या जागी धाकटी राणी राज्यलक्ष्मी ही सत्तेवर आली तिने इ स १८४३ मध्ये भीमसेन थापाचा पुतण्या माथुरसिंह याला प्रधान मंत्री व सेनापती म्हणून नेमले त्यानेही भारतीय राजांशी मैत्री करून



माथुरसिंह

इंग्रजांविरुद्ध उठाव करण्याचे कारस्थान रचले पण त्याच सुमारास राणीच्या अनैतिक वर्तनामुळे राजेंद्रशाहाने तिचे सर्व अधिकार काढून घेतले मग तिने आपल्या सावत्र मुलांना मारण्याची कामगिरी माथुरसिंहाकडे सोपविली पण त्याने या गोष्टीला नकार दिला तेव्हा तिने माथुरसिंहाविरुद्ध कारस्थान रचून त्याचा वध केला

**राणाशाही** – पृथ्वीनारायण शाहाचा प्रधान अहिराम कुंवर हा खस राजपूत होता त्याच्या घराण्यातील जंगबहादुर हा माथुरसिंहाचा भाचा होता माथुरसिंहानेच त्याला पंजाबातून बोलावून आणले होते पण त्यानेच माथुरसिंहाला मारण्यात राणीला मदत केली राजेंद्रशाह नालायक होता महाराणी राज्यलक्ष्मी ही आपला सावत्र मुलगा युवराज सुरेंद्र वीर विक्रम याला मारायला टपली होती राजा व युवराज हे दोघे राणीचा प्रियकर गगनसिंह याला मारण्याच्या खटपटीत होते या गोंधळात जंगबहादुर हा इ स १८४६ मध्ये स्वतः पंतप्रधान व सेनापती झाला मग त्याने युवराज सुरेंद्र वीरविक्रम शाहाचा पक्ष घेऊन राजाला पदच्युत केले इ स १८४७ साली

सुरेंद्र वीर विक्रमशाह नेपाळच्या गादीवर बसला, पण त्याची सत्ता नाममात्रच होती जगबहादुर हाच खरा सत्ताधीश होता त्याने स्वत ला राणा ही पदवी घेतली तेव्हापासून नेपाळमधील राणाशाही सुरू झाली

जगबहादुर शान्तताप्रिय होता इ स १८५० मध्ये तो इग्लडला जाऊन आला त्यानतर त्याने नेपाळमध्ये अनेक सुधारणा करण्याचा प्रयत्न केला इ स १८५६ मध्ये त्याने तिबेटवर स्वारी केली त्याच्या सैन्याने तिबेटचा पराभव केला व तिबेटला नेपाळशी तह करायला भाग पाडले त्या



महाराज जगबहादुर राणा

नतर जगबहादुर याने आजारीपणाच्या निमित्ताने पतप्रधानकीचा राजीनामा दिला त्याने आपला भाऊ बमबहादुर याला पतप्रधान बनवले पण सर्व सत्ता मात्र आपल्या हातीच ठेवली त्याच सुमारास सुरेंद्र वीर विक्रम शाहाने जगबहादुर याला महाराज ही पदवी दिली

लवकरच बमबहादुर मरण पावला मग जगबहादुर याने पतप्रधानपद पुन्हा स्वत कडे घेतले इ स १८५७ साली भारतात इग्रजाविरुद्ध बड सुरू झाले, त्या वेळी जगबहादुराने ब्रिटिशाना खूप मदत केली त्याबद्दल नेपाळला गगा नदीपासून पूर्वेस गोरखपुरपयन्तचा तराईचा दलदली मलाचा पट्टा इग्रजाकडून परत मिळाला

इ स १८७७ मध्ये जगबहादुर मरण पावला तो समर्थ शासक व थोर मुत्सद्दी असून, कडक शिस्तीचा भोक्ता होता त्याच्या कारकीर्दीत राज्यातली लाचलुचपत पुष्कळ कमी झाली त्याने देशात टपालव्यवस्था सुरू केली, सैन्यात सुधारणा करून त्याची कार्यक्षमता वाढवली आणि कायद्यात सुधारणा करून अनेक क्रूर शिक्षा रद्द केल्या

महाराज जगबहादुराच्या मृत्यूनतर त्याचा भाऊ रणोद्दीपसिंग हा पतप्रधान झाला व त्याचा भाऊ धीर शमशेर हा सरसेनापती झाला धीर शमशेराच्या साहाय्यामुळेच रणोद्दीपसिंग पतप्रधानपद साभाळू शकला जगबहादुराचे नालायक पुत्र आणि त्याचे जुने वैरी हे सतत रणोद्दीपसिंग याच्याविरुद्ध कारस्थाने करीत होते पण धीर शमशेर होता तोपर्यन्त त्याना यश मिळाले नाही रणोद्दीपसिंगाच्या कारकीर्दीत जमीनमहसुलाच्या बाबतीत पुष्कळ सुधारणा झाल्या, व्यापाराला व उद्योगधद्याना प्रोत्साहन मिळाले आणि शिक्षणाकडेही अधिक लक्ष देण्यात आले

इ स १८८१ मध्ये महाराजाधिराज सुरेंद्र शाह व त्याचा पदच्युत पिता राजेंद्र शाह दोघही मरण पावले सुरेंद्र शाहाचा पुत्र आधीच मरण पावला होता मग त्याचा पुत्र (सुरेंद्राचा नातू) पृथ्वी वीर विक्रमशाह हा सहा वर्षांचा बालक असताना, त्याला गादीवर बसवण्यात आले

इ स १८८५ साली रणोद्दीपसिंगाचा खून त्याच्या पुतण्यानीच केला त्यानतर धीर शमशेरचा पुत्र वीर शमशेर हा पतप्रधान झाला त्याने इ स १९०१ पर्यन्त ते पद साभाळले त्याच्या नतर त्याचा भाऊ देव शमशेर हा पतप्रधान झाला तत्पूर्वी तो सरसेनापती होता तो वृत्तीने वाईट नव्हता, पण फार चैनी होता त्याच्या अगी कर्तबगारीही नव्हती म्हणून त्याच्या भावानी त्याला राजीनामा द्यायला लावले मग त्याचा धाकटा भाऊ चद्र शमशेर याला पतप्रधानकी मिळाली हाच पुरुष सर्व पतप्रधानात श्रेष्ठ व कर्तबगार निघाला त्याच्या कारकीर्दीत नेपाळमध्ये अनेक सुधारणा झाल्या सतीची चाल व गुलामगिरी त्यानेच बद केली त्याने अनेक शाळा स्थापल्या, त्रिभुवनचद्र कॉलेज सुरू केले, नव रस्ते बाधले सर्वत्र वीज खेळवली व पाणीपुरवठ्याचीही सोय केली महाराज वीर शमशेर पतप्रधान असताना चद्र शमशेर हा त्याचा उजवा हात होता त्या वेळी त्याला पुष्कळ अनुभव मिळाला तो उत्तम शासक, निश्चयी व प्रामाणिक होता त्याचे भाऊ भीम शमशेर

( सरसेनापती ) व युद्ध शमशेर (सेनापती) यानी त्याला पुष्कळ साहाय्य केले



महाराज चंद्र शमशेर

ब्रिटिश सत्तेशी सलोखा हे चंद्र शमशेर याच्या परराष्ट्र नीतीचे मुख्य सूत्र होते १९१४ च्या महायुद्धात त्याने आपले पुष्कळ सैन्य इंग्रजांच्या मदतीसाठी पाठवले होते

महाराजाधिराज पृथ्वी वीर विक्रमशाह याच्या मृत्यूनंतर इ स १९१३ च्या २० फेब्रुवारीला त्रिभुवन वीर विक्रमशाह याला राज्याभिषेक करण्यात आला इ स १९२० साली ब्रिटिश सरकारने नेपाळची सार्वभौम सत्ता मान्य करून नेपाळात रेसिडेंटच्या जागी एन्व्हॉय नेमला

इ स १९२९ मध्ये चंद्र शमशेर मरण पावल्यानंतर भीम शमशेर हा पंतप्रधान झाला पण तीन वर्षांनी तो कालवश झाला व युद्ध शमशेर याला पंतप्रधानकी मिळाली ती त्याने १९४५ पर्यंत सांभाळली त्याच्या कारकिर्दीत ब्रिटिश सरकारने काठमांडूच्या दरबारात एन्व्हॉयच्या जागी आपला वकील नेमला

महाराज जंगबहादुर व त्याचे बंधू यांच्या राणावंशाचा आता खूप विस्तार झाला होता पण त्यात उच्च नीच भेद फार झाले होते राणा पुरुष व राणा स्त्री यांच्या मुलांचा अ वर्ग, राणा पुरुष व इतर जातीची स्त्री यांच्या मुलांचा ब वर्ग आणि ठेवलेल्या बायकांच्या अनौरस मुलांचा क वर्ग असे तीन वर्ग बनवले गेले ब आणि क वर्गातील लोकांना कसलेही अधिकार नव्हते त्यांना राज्यातील उच्च पदही मिळत नसे त्यामुळे ते अ वर्गातील राणा लोकांविरुद्ध जळू लागले वीर शमशेर व भीम शमशेर यांनी आपल्या अनौरस पुत्रांना मात्र मोठी अधिकार पदे दिली होती या प्रकारामुळे तर असंतोष फारच वाढला

राणाशाहीत य राजेसाहेबांना पाच सरकार आणि पंतप्रधानांना तीन सरकार म्हणत सर्व देशाचे मोठे विभाग पाडलेले असून, प्रत्येक भागावर बडा हाकिम नावाचा अधिकारी असे त्याच्या नंतर जिल्हाधिकारी मालगुजारीचे काम मुखिया म्हणजे गावाचा मुख्य करीत असे



महाराजाधिराज त्रिभुवन वीर विक्रमशाह

**नेपाळी प्रजापरिषद**—इ स १९३६ साली या संस्थेची स्थापना नेपाळच्या राजसाहेबांचे व्यायामशिक्षक धर्मभक्त यांच्या घरी गुप्तपणे झाली तिला राजेसाहेबांचे आतून साहाय्य होते

टंकप्रसाद आचार्य हे तिचे अध्यक्ष होते गुप्त पत्रके वाटून जनतेत राणाशाहीविरुद्ध जागृती करण्याचे कार्य त्या संस्थेने आरंभिले पण १९४० साली संस्थेच्या पुढाऱ्यांना पकडून राजद्रोहाच्या आरोपावरून फाशी देण्यात आले

राणावंशातील प्रधानमंत्री हेच खरे नेपाळचे सत्ताधीश होते महाराज युद्ध शमशेर तर हुकुमशहाच होता त्याचा लोकशाहीवर विश्वासच नव्हता मात्र तो अतिशय कुशल असा शासक होता त्याने नेपाळची पुष्कळ औद्योगिक प्रगती केली १९४५ साली त्याने मुख्यमंत्रीपदाचा राजीनामा दिला नंतर तो भारतात येऊन स्थायिक झाला त्याने तीर्थक्षेत्रात वास्तव्य करून पुष्कळ दान धर्म केला १९५१ साली तो डेहराडून येथे मरण पावला त्याच्या जागी भीम शमशेरांचा पुत्र पद्म शमशेर हा मुख्यमंत्री झाला

**नेपाळी राष्ट्रीय काँग्रेस** – श्री विश्वेश्वर प्रसाद कोइराला यांनी इ स १९४६ साली वाराणसी येथे या संस्थेची स्थापना केली पुढे तिचे कार्य नेपाळातही सुरू झाले १९४७ मध्ये नेपाळ सरकारने विश्वेश्वर प्रसादांना पकडून तुरुंगात टाकले, पण सहा महिन्यानंतर सोडून दिले

१९४८ मध्ये कलकत्ता येथे नेपाळी प्रजातंत्र काँग्रेसची स्थापना झाली महाराजाधिराज त्रिभुवन शाहाचा पुत्र महेंद्र विक्रमशाह हा तिचा संस्थापक होता राणाशाही नष्ट करून राजेसाहेबांचे वर्चस्व पुन प्रस्थापित करणे, हा तिचा उद्देश होता १९५० मध्ये या दोन्ही संस्था एक होऊन नॅशनल काँग्रेस बनली

नेपाळच्या खोऱ्यातील नेवार लोक, पूर्वेकडील किरात लोक व तराईतील लोक हे साधारणपणे राणाशाहीच्या विरुद्ध होते लोकातील असंतोष वाढत चाललेला पाहून महाराज पद्म शमशेर याने राज्यकारभारात अनेक सुधारणा करण्याचे लोकांना आश्वासन दिले या सुधारणात दोन विधिमंडळे निर्माण व्हायची होती मात्र त्यांना विशेष अधिकार मिळणार नव्हते पण मंत्रिमंडळातील इतर सभासदांच्या विरोधामुळे त्या सुधारणा अमलात आल्या नाहीत मग १९४८ मध्ये पद्म शमशेर याने पंतप्रधानपद सोडले त्याच्या जागी चंद्र शमशेर यांचा पुत्र महाराज मोहन शमशेर हा आला त्याने तीन वर्षांत सर्व सुधारणा अमलात आणण्याचा निश्चय जाहीर केला पण त्यापूर्वीच नेपाळमध्ये क्रांती झाली

नेपाळमधील चळवळीला भारतातील राजकीय पक्षांचा पाठिंबा होता, त्याचप्रमाणे भारत सरकारचाही असावा उ प्रदेशात काही असंतुष्ट नेपाळी लोकांनी नेपाळवर स्वारी करण्याची तयारी केली होती ३१ जुलै १९५० रोजी नेपाळ व भारत यांचा शांतता व मैत्री यांचा तह झाला पण ९ नोव्हेंबर रोजी नेपाळी काँग्रेसच्या मुक्तिसैनिकांनी सरसीमा ओलांडून नेपाळमध्ये प्रवेश केला प्रथम त्यांना यश मिळाले पण तो हे बरअखेर नेपाळी सैन्याने त्या बंडाचा मोड केला डिसेंबर मध्ये बंडखोरांनी पुन जोर केला पण त्यातही त्यांना फारसे



महाराज मोहन शमशेर

यश लाभले नाही मात्र राजे त्रिभुवन व युवराज महेंद्र हे भारत सरकारच्या साहाय्याने भारतात निघून आले मग महाराज मोहन शमशेर याने राजे त्रिभुवन यांचे नातू ग्यानेंद्र यांना गादीवर बसवले पण भारताप्रमाणेच ब्रिटन व अमेरिका यांनीही त्यांना मान्यता दिली नाही, उलट राजे त्रिभुवन यांना परत बोलावण्याचाच आग्रह धरला तेव्हा मोहन शमशेर याने त्यांना परत बोलावले राजे त्रिभुवन यांनी परत गेल्यावर जानेवारी १९५१ मध्ये क्रांतिकारकांना माफी दिली व राजकीय पक्षांना स्वातंत्र्य दिले मग त्यांनी नवे मंत्रिमंडळ

बनवले त्यात निम्मे मत्री राणापक्षाचे व निम्मे नेपाळी काग्रेसचे होते या घटनेत मातकाप्रसाद कोईराला ह नेपाळ कॉंग्रेसच्या मत्र्याचे नेते झाले

एप्रिल १९५१ मध्ये राजे त्रिभुवन यानी प्रधानमत्रीपदावरील राणावशाचा हक्क नष्ट करून ते पद व सरसेनापतिपदही स्वत कडे घेतले अशा प्रकारे नेपाळमधील राणाशाहीचा अस्त झाला

तथापि राजकीय पक्षात एकजूट नसल्यामुळे त्याचे बळ वाढल नाही कॉंग्रेसचे मत्री हुकुमशाही करू लागले व राणा मत्री लोकाच्या हक्कासाठी प्रयत्न करू लागले विश्वेश्वर प्रसाद कोईराला गहमत्री होत त्यानी सावजनिक सुरक्षा कायदा करून आपल्या राजकीय विरोधकाना स्थानबद्ध केले त्यानी सभाबदी व भाषणबदीही जारी केली त्यामुळे नेपाळात दगली झाल्या व त्या शमवण्यासाठी सरकारला गोळीबार करावा लागला त्या सबधात विश्वेश्वर प्रसादाना राजीनामा देणे भाग पडले भक्तिसनिकानी खूप अत्याचार केले मग राजेसाहेबानी पहिले मत्रिमडळ बरखास्त करून नवे मत्रिमडळ नेमले त्यात मातकाप्रसाद कोईराला ह मुख्यमत्री झाले मोहन शमशेर नेपाळ सोडून भारतात आला आणि नेपाळचे राजकारण ब्राह्मण व नेवार या लोकाच्या हाती गल

पुढे आपसातील भाडणे व पुढाऱ्याची नालायकी यामुळे नेपाळमध्ये बबदशाही सुरू झाली त्यातच कम्युनिस्ट पक्षाने उठाव करून क्रातीचा प्रयत्न केला पण त्यात त्या पक्षाला यश आले नाही १९५५ मध्य राजे त्रिभुवन यानी सयुक्त मत्रिमडळ स्थापले व टकप्रसाद याची पतप्रधान म्हणून नेमणूक केला

१९५६ मध्ये राजे त्रिभुवन शाह मृत्यू पावले व महेद्रवीर विक्रम ह महाराजाधिराज झाले १९५९ साली त्यानी नवी राज्यघटना जाहीर केला आणि निवडणुका घेतल्या त्यानतर विश्वेश्वरप्रसाद कोईराला पतप्रधान झाले त्यानी लोकशाही समाजवादावर भर दिला पण १९६० मध्ये राजेसाहेबानी त्या मत्रिमडळाला रजा दिली व स्वत च एक मत्रिमडळ नेमून सव कारभार आपल्या हाती घेतला ग्रामपचायतीमधून लोकशाही सुरू करावी आणि क्रमाक्रमाने ती वरच्या थरात आणावी, असे त्यानी ठरवले त्याप्रमाणे ग्रामपचायती, जिल्हा पचायती व राष्ट्रीय पचायत याच्या निवडणुका झाल्या तदनुसार आता राष्ट्रीय पचायतीची सभा सहा महिन्यानी भरते याव्यतिरिक्त एक राजसभाही आहे तिचे ६९ सभासद राजे साहेबानी नियुक्त केलेले असतात

**लोक** – नेपाळात अनेक जाती जमाती वसलेल्या असून त्याच्यात द्रविड, मगोल, आर्य, तिबेटी, ब्रह्मी, इ अनेक वशाचे मिश्रण झालेले आढळते नेपाळच्या मध्य भागात वसलेले नेवार लोक हे तिथले सर्वांत प्राचीन रहिवासी होत काही



महाराजाधिराज महेद्र वीर विक्रमशाह

पडिताच्या मत ते तिबेटातून आलेले आहेत, तर काहीच्या मत त मूळचे किरातच आहेत आर्य लोकाशी सघर्ष झाल्यानतर जे किरात नेपाळच्या दरीत जाऊन वसले त्याना नेवार हे नाव मिळाले आणि जे पूवभागात वसले, ते किराता या नावाने ओळखल जाऊ लागले कालातराने तिबेटमधून व ईशान्य दिशेकडून जे लोक नेपाळात घुसले, ते या नेवार लोकात मिसळून गेले साप्रतच्या नेवारात मगोल वशाची लक्षणे पुष्कळ दिसतात लिच्छवी व मल्ल याच्याशी सबध आल्यामुळे नेवार लोकात आर्य वशाचेही रक्त मिसळले आहे नेपाळच्या प भागात राहणारे गुरुग व मगर हे लोकही मगोल वशाचे असून, ते तिबेटातून आलेले आहेत मध्यभागात गोरखाली व मुरमी हे लोक राहतात गोरखाली लोकात अनेक जातीचा समावेश होतो त्याच्यात मगोल व आर्य या वशाचे पुष्कळ मिश्रण झालेले आहे ते लोक सर्वांत देखणे आहेत खस लोक आर्यपूर्व काळात हिमालयात वसलेल होते नेपाळातील मूळचे अनार्य खस आणि भारतातून गेलेले आर्य ब्राह्मण

यांच्यापासून उत्पन्न झालेले सध्याचे खस लोक क्षत्रिय मानले जातात त्यांना नेपाळात बरेच वरचे स्थान मिळालेले आहे



किराती युवक

काठमांडूच्या पूर्वेला एव्हरेस्टच्या उतारावर खुंभू, फरक व सोलू या भागात शेरपा लोक वसलेले असून, ते तिबेटातून आलेले



गुरुंग जातीच्या मुली

आहेत तराईत कुम्हा, थारू व अउलिया या जमाती आहेत त्या मोन-ख्मेर वंशाच्या आहेत किराती लोकांत लिंबू व लाचा यांचा समावेश होतो नेपाळात अशा पुष्कळ जाती आहेत

नेपाळात जातिभेद पुष्कळ आहेत भारतातून तिकडे गेलेल्या ब्राह्मण व क्षत्रिय लोकांनी आपला वंश शुद्ध राहावा, म्हणून हे उच्च नीच भेद कायम राखले तेथल्या समाजात ब्राह्मण पुरोहिताचे स्थान श्रेष्ठ आहे ज्योतिषी आणि वैद्य यांनाही पुष्कळ मान मिळतो ठाकुर व गोरखा हे मुख्यत क्षत्रिय बाण्याचे आहेत, तर नेवार हे पुष्कळ अंशी वैश्य वृत्तीचे आहेत नेपाळचा बहुतेक सर्व व्यापार नेवारांच्या हाती आहे नेवारांत कलाकौशल्यही पुष्कळ आढळते सुती व लोकरी कापड, कागद, अलंकार, धातूची व मातीची भांडी ते बनवतात शेती हा नेपाळी लोकांचा मुख्य व्यवसाय होय गोरखा, मगर, लिंबू हे लोक लष्करी पेशाचे आहेत

**देवधर्म**– नेपाळात बौद्ध व शैव उपासनेप्रमाणे भूतपूजा व निसर्गपूजाही प्रचलित आहे गौतम बुद्धाच्या काळापासून त्याच्या शिष्यांनी नेपाळात बौद्ध धर्माचा प्रसार केला एके काळी तिथे बौद्ध धर्माला अत्यंत मानाचे स्थान होते पण नंतर त्यात भूतपूजा व तांत्रिक आचार शिरल्यामुळे त्याची अवनती झाली पुढे शंकराचार्यांनी तिथे जाऊन तिथल्या बौद्ध धर्माचा प्रभाव कमी केला, असे म्हणतात सांप्रत तिथे बौद्ध व शैव हे दोन्ही पंथ अत्यंत सामंजस्याने नांदत आहेत इतर सर्व लोक तांत्रिक पद्धतीने उपासना करताना आढळतात

पर्वतशिखरे, घाट, खिंडी, झरे यांची पूजा करणारे लोकही नेपाळात आहेत नागाची व गायीची पूजा सर्वत्र केली जाते नेवार लोक बेडकाला जलदेवता मानतात व पाऊस पडावा, म्हणून त्याची प्रार्थना करतात

शैव पंथाच्या प्रभावामुळे लिंग व योनी ही प्रतीके बौद्ध लोकही पूजनीय मानतात भैरव आणि भैरवी या नावांनी शिव पार्वतीची उपासना केली जाते कीर्तिपूर येथे शंकराची पूजा वाघाच्या रूपाने होते, त्याला वाघ भैरव म्हणतात चंडेश्वरी या नावाने दुर्गेची पूजा केली जाते तिला नेपाळची संरक्षक देवता मानतात

**सण व उत्सव**– नेपाळमध्ये हिंदू व बौद्ध लोकांचे सण समारंभ सारखेच असतात सामान्य लोकांना त्या सणांचे धार्मिक महत्त्व माहीतच नसते आनंद व मौज करण्याचे दिवस एवढीच त्यांना सणासुदीची कल्पना असते त्यामुळे प्रार्थना, पूजा व धार्मिक विधी यांचे स्थान गौण असते सनातनी लोक, विशेषत स्त्रिया, मात्र धार्मिक विधींना फार महत्त्व देतात नेपाळमधील मुख्य सणांची माहिती थोडक्यात पुढीलप्रमाणे–

भैरवजत्रा – नेपाळमध्ये भैरव हा शिवाचा अवतार सर्वांत लोकप्रिय आहे बौद्ध लोकही या हिंदूंच्या देवतेला भजतात या

जत्रेत रात्री नृत्य व रेडा बळी देणे, हा विशेष कार्यक्रम होतो



नागदेवता—नेपाळ

गायजत्रा— हिंदू लोक एकच दिवस हा सण करतात, पण बौद्ध लोक मात्र पधरा दिवस हा सण पाळतात बोधिवृक्षाचे



नेपाळी स्त्री

प्रतीक म्हणून मेणाचे लहान वृक्ष घरात ठेवणे आणि विहारात जाऊन बुद्धाला वंदन करणे, असा त्याचा कार्यक्रम असतो

वज्रजत्रा — हा सण श्रावणात येतो नेवारी बौद्ध भिक्षूंना दानधर्म करणे हा जत्रेतला मुख्य कार्यक्रम असतो त्या वेळी अमिताभ बुद्धाचे शिरोभूषण लोकांच्या दर्शनार्थ देवळाबाहेर आणून ठेवतात

स्वयंभूमल— स्वयंभू बुद्धाचा जन्मदिवस म्हणून आश्विनी पौर्णिमेला हा सण पाळतात त्या दिवशी सर्वत्र बौद्ध विहारात प्रार्थना केली जाते

शिवरात्र— या दिवशी शिवभक्तांप्रमाणे बौद्ध लोकही उपवास करतात

मच्छिंद्रजत्रा— हा नेपाळी बौद्ध लोकांचा सर्वात मोठा उत्सव आहे तो बागमती या गावी वैशाख शुद्ध प्रतिपदेला सुरु होतो त्यात मच्छिंद्रनाथाच्या मूर्तीला स्नान घालून तिची रथातून मिरवणूक काढतात सुमारे ७ ८ दिवसांनी ही मिरवणूक पाटणला पोचते तिथे महिनाभर ती मूर्ती ठेवतात व मग स्वस्थानी परत आणतात

दसरा— हा नेपाळचा राष्ट्रीय उत्सव होय तो अत्यंत उत्साहाने व थाटाने साजरा केला जातो त्यात दुर्गादेवीला पशुबळी दिले जातात लोक खूप मौज मजा करतात सातव्या दिवशी लष्कराची भव्य कवायत होते ती पाहायला हजारो लोक जमतात

दिवाळी— हा उत्सव पाच दिवस चालतो त्यातील पहिल्या तीन दिवसात लोक खूप जुगार खेळतात नंतरचे दोन दिवस धार्मिक विधी होतात त्या दिवसात कुत्रे, गायी व बैल यांना फुलांच्या माळांनी सजवून गोडधोड खाऊ घालतात लक्ष्मीची पूजा करतात व घरांवर दिव्यांची आरास करतात

होळी — हा सण आठ दिवस चालतो त्यासाठी एक लाकडी खांब उभारून तो शुभ्र व लाल वस्त्रांनी सजवतात आणि त्यावर खूप गुलाल उधळतात रात्री तो खांब जाळून टाकतात पूर्वी या सणात लोक अतिशय बेतालपणे वागत पण राणा जंग बहादुर याने त्या बेतालपणावर निर्बंध घातले

इंद्रजत्रा— भाद्रपद महिन्यात हा उत्सव होतो पहिल्या दिवशी राजप्रासादासमोर एक उंच लाकडी स्तंभ उभा करतात व त्याच्या भोवती लोक नृत्य करतात त्या वेळी ते विविध प्रकारचे विचित्र व भेसूर मुखवटे घालतात तिसऱ्या दिवशी कुमार मुलींची पूजा करून त्यांची मिरवणूक काढतात ती मिरवणूक राजवाड्यासमोर येताच राजा बाहेर येतो व सर्व जण त्याला नजराणे देतात पृथ्वीनारायण शहाने काठमांडूचे राज्य जिंकले, त्या दिवसाच्या स्मरणार्थ हा समारंभ केला जातो, असे म्हणतात

याव्यतिरिक्त वज्रयोगिनीजत्रा, वाघजत्रा, घोडाजत्रा, राखी

पौर्णिमा, नागपंचमी, जन्माष्टमी, भाऊबीज, गणेशचतुर्थी वसंतपंचमी, इ. अनेक सण नेपाळात साजरे केले जातात.



पूर्व नेपाळमधील युवक

**तीर्थस्थाने आणि प्रेक्षणीय स्थळे** – नेपाळ हा देवतांचा प्रदेश आहे. अनेक देवतांची मंदिरे तिथे आहेत. हिमालयाची उच्च शिखरे आणि त्यांत उगम पावलेल्या नद्या ही सर्व तिथली तीर्थक्षेत्रेच होत. त्यांतील पशुपतिनाथ हे सर्वांत श्रेष्ठ तीर्थस्थान मानले जाते. ते काठमांडू नगरापासून तीन मैल अंतरावर, बागमतीच्या तीरावर वसलेले आहे. पशुपतिनाथाचे मंदिर उंच चौथऱ्यावर बांधलेले असून, त्याला सर्व बाजूंनी पायऱ्या आहेत. गर्भगृहात चार साडेचार फूट उंचीची पिंडी असून, तिच्या चारही बाजूंवर चार मुखवटे बसवलेले दिसतात. या मंदिराचे शिखर पगोडा पद्धतीचे आहे. दरवाजे चांदीचे असून, त्यांवर विपुल कोरीव काम आढळते. मंदिराच्या महाद्वारासमोर एका चौथऱ्यावर खूप मोठा नंदी आहे. तो पितळेच्या पत्र्याने मढवलेला आहे.

पशुपतिनाथापासून सुमारे ४ मैलांवर चंगुनारायण आणि त्याच्या जवळच शंकुनारायण, शिखरनारायण व एचंगुनारायण या नावांची चार गावे आहेत. तिथे नारायणाची मंदिरे आहेत. एका दिवसात त्या चारही मंदिरांतील नारायणाचे दर्शन घेणे विशेष पुण्यप्रद असते, अशी समजूत आहे.

गोकर्ण–पशुपतिनाथापासून सुमारे २ मैलांवर हे क्षेत्र आहे. हे बागमतीच्या तीरावर असून, नेपाळी परंपरेप्रमाणे अत्यंत पवित्र मानले जाते.

काठमांडू – ही नेपाळची राजधानी होय. हे शहर नेपाळच्या दरीत, बागमती व विष्णुमती नद्यांच्या संगमावर वसलेले आहे. राजा गुणकामदेव याने हे नगर स्थापन केले, असे म्हणतात. याचे पूर्वीचे नाव कांतिपूर असे होते. त्याचा आकार देवीच्या खड्गाप्रमाणे आहे, अशी कल्पना आहे. तिथल्या काष्ठमंडपामुळे पुढे त्या नगराला काठमांडू नाव मिळाले. हा मंडप मल्लवंशातील राजा लक्ष्मीनरसिंह याने बांधला. त्याच्या जवळच मल्ल वंशाचा राजप्रासाद आहे. त्याच्या एका दरवाज्याजवळ हनुमानाची भव्य मूर्ती आहे. त्या मूर्तीमुळेच त्या भागाला ' हनुमान ढोका दरबार ' असे नाव पडले असावे.

नगराच्या मध्यभागी भव्य आणि विस्तीर्ण राजप्रासाद आहे. त्यातील जुना भाग पगोडा पद्धतीचा असून, त्यावर विपुल नक्षीकाम केलेले दिसते. समोरच्या चौकात अनेक सुंदर मंदिरे आहेत. त्यांतील सर्वांत मोठे मंदिर तुळजाभवानीचे असून ते राजवाड्याजवळ आहे. इ. स. १५४९ मध्ये राजा महेंद्र मल्ल याने ते बांधले. ते केवळ राजघराण्यातील व्यक्तींसाठीच आहे.



पशुपतिनाथमंदिराचे एक द्वार

तुळजाभवानी ही राजघराण्याची रक्षकदेवता मानली जाते. काठमांडूमध्ये असंख्य लहान–मोठी देवळे दिसतात. त्यांतील

बहुतेक लाकडाची आहेत एका चौकात एक लहान स्तूप असून, त्याच्या कोनाड्यात बुद्धाच्या प्रतिमा आहेत इथले महाकाल मंदिर फार प्राचीन आहे हिंदू लोक तिथे शिवाची पूजा करतात, तर बौद्ध लोक त्यातली मूर्ती अवलोकितेश्वराची आहे असे समजतात

काठमांडूच्या पश्चिमेला सुमारे दीड मैल अंतरावर, एका टेकडीवर स्वयंभूनाथाचे मंदिर आहे मंदिरापर्यंत चढून जायला



इंद्रवज्र – स्वयंभूनाथ

सुमारे ४० पायऱ्या आहेत पहिल्या पायरीजवळ शाक्यसिंहाची प्रचंड मूर्ती असून, शेवटच्या पायरीजवळ एका वेदीवर पाषाणाचे इंद्रवज्र आहे, त्यावर पितळी पत्रा आहे टेकडीवर एक मोठा स्तूप असून, त्याच्यावर उंच शिखर आहे शिखराच्या खालच्या भागावर चारही बाजूंना खूप मोठाले डोळे काढलेले दिसतात तिथून जवळच दक्षिणी पद्धतीचे शिखर असलेले शीतळा देवीचे सुंदर मंदिर आहे

स्तूपापासून काही अंतरावर एक बौद्ध मठ असून, त्यात मध्यभागी उंच जागी ध्यानस्थ बुद्धाची भव्य प्रतिमा आहे हा मठ तिबेटी पद्धतीने बांधलेला आहे

काठमांडूपासून ८–९ मैलांवर दक्षिणकाली देवीचे स्थान आहे तिथे तिचे देऊळ नाही मूर्तीवर लहानसे छप्पर आहे देवीचे रूप उग्र असून, ते टेकडीच्या खडकात कोरलेले आहे तिची पंचबली–पूजा केली जाते

पाटण – काठमांडूच्या आग्नेय दिशेला सुमारे दोन मैलांवर पाटण हे नगर वसलेले आहे त्याला ललितपट्टण असेही म्हणतात हे राजा वीरदेव याने इ स २९९ साली वसवले पूर्वी येथे एक राजधानी होती सध्या या नगरात असंख्य जुनी, भग्न मंदिरे आहेत त्यातील कृष्णाचे मंदिर प्रेक्षणीय आहे उत्तरेकडे एक भव्य बौद्ध चैत्य मंदिर असून, आसपासही असलीच पुष्कळ मंदिरे दिसतात

कीर्तिपूर – ही एका स्वतंत्र राज्याची राजधानी होती इथला पहाडी किल्ला बळकट आहे इथल्या भैरवमंदिरात व्याघ्रमूर्ती असून, त्याच्या वार्षिक उत्सवाच्या वेळी मोठी यात्रा भरते शहराच्या उत्तरेस एका पहाडावर गणेशमंदिर असून, त्यात अष्टमातृकांच्या सुबक मूर्ती आहेत

भाटगाव – काठमांडूच्या पूर्वेला सुमारे ९ मैलांवर हे गाव असून, त्याचा आकार डमरूसारखा आहे हे आनंदमल्ल याने वसवले त्याचे पूर्वीचे नाव भक्तपूर असे होते त्याला धर्मपट्टण असेही म्हणत इथेही पूर्वी राजधानी होती इथला जुना राजवाडा भव्य असून, त्याच्या दरवाज्यावर सुंदर कोरीव काम आढळते समोरच्या चौकात अनेक मंदिरे आहेत त्यातील दत्त मंदिर प्रेक्षणीय आहे यतपोलमंदिर पाच मजली असून, पगोडा पद्धतीचे आहे ते कोणत्या देवतेचे आहे, ते मात्र कळत नाही त्याच्या द्वाराजवळ प्रचंड व भयानक अशा प्राण्यांच्या मूर्ती आहेत या नगराजवळ अनेक मोठे तलाव आहेत भाटगावपासून जवळच एका टेकडीवर सूर्यविनायकाचे स्थान आहे तिथे उघड्यावर गणपतीची मूर्ती आहे उगवत्या सूर्याचे किरण मूर्तीवर पडतात, म्हणून त्याला सूर्यविनायक म्हणतात



बुद्धमूर्ती – काठमांडू

बोधनाथ – काठमांडूपासून सुमारे साडेतीन मैलांवर हे गाव आहे त्याची रचना वर्तुळाकार असून, त्याच्या मध्य

भागी एक भव्य बुद्धमंदिर आहे. त्यावर एका चौथऱ्यावर विटांचा घुमट आणि त्याच्यावर एक मनोरा आहे. चौथऱ्याला



यतपाळ मंदिर – भातगाव

अनेक कोनाडे असून, त्यात प्रार्थनाचक्रे ठेवलेली आहेत. प्रदक्षिणेच्या वेळी भाविक लोक ती फिरवतात. हे मंदिर तिबेटी व मोंगल लोकांचे श्रद्धास्थान आहे.

गोदावरी– फुलचोक पर्वताच्या उतरणीवर हे तीर्थस्थान आहे. इथल्या झऱ्याच्या तीरावर बारा वर्षांनी एकदा, एक महिनाभर मोठी स्नानयात्रा जमते. दक्षिणेतील गोदावरीशी या झऱ्याचा भूगर्भातून संबंध आहे, अशी समजूत आहे. या भागात अनेक मंदिरे व सरोवरे आहेत.

नीलकंठ – शिवपुरी पर्वताच्या पायथ्याजवळ या नावाचे सरोवर आहे. त्याच्या मध्यभागी एक मोठा निळा, अंडाकृती खडक आहे, त्यालाच महादेव मानून लोक त्याची पूजा करतात. या तलावाच्या उत्तरेकडील तीन पर्वत–शिखरावरून तीन जलप्रवाह खूप उंचीवरून दुसऱ्या एका तलावात पडतात. त्यांना त्रिशूलधारा अशी संज्ञा आहे.

बुढा नीलकंठ या ठिकाणी मात्र एका तळ्यात शेषशायी विष्णूची मूर्ती आहे.

स्कंद पुराणात चौसष्ट शिवतीर्थांचे माहात्म्य विस्ताराने वर्णिलेले आहे. त्या तीर्थांची परिक्रमा करण्याचा विधीही तेथे सांगितला आहे. ही परिक्रमा नागचंड पर्वतावरील फणीश्वरापासून सुरू होते व पशुपतिनाथाजवळ संपते. त्यातील काही तीर्थांची नावे अशी– भीमेश्वर, कश्यपेश्वर, चंडेश्वर, धनेश्वर, इंद्रेश्वर, रामेश्वर, कालेश्वर, व्याघ्रेश्वर, नंदिकेश्वर, कोटेश्वर, भैरवेश्वर, ब्रह्मेश्वर, शतरुद्रेश्वर, नारायणेश्वर, वागीश्वर, मंगलेश्वर, विमलेश्वर, सोमेश्वर इत्यादी. या सर्व ठिकाणी निरनिराळ्या वेळी यात्रा जमतात.

तराईत लुंबिनी (बुद्धाचे जन्मस्थान), जनकपूर, वराहक्षेत्र, त्रिवेणी आणि पश्चिम नेपाळच्या पहाडी प्रदेशातील रीडी, मताडा, व जौल्जिबी ही पवित्र स्थाने आहेत. तिबेटी भाविक लोक यात्रेसाठी जातात.

नवकोट – काठमांडूच्या पूर्वेला २५ मैलांवर हे गाव आहे. इथे भैरवी देवीचे मंदिर आहे. या शहरात दोन राजवाडेही आहेत.

**नेपाळी कला** – नेपाळी वास्तुकलेत चिनी, तिबेटी व भारतीय अशा विविध पद्धतींचे सुंदर मिश्रण झालेले दिसून येते. तिथली अनेक मंदिरे पगोडासारखी आहेत. नेपाळी लोकांची घरेही दुरून चैत्यमंदिरासारखी वाटतात. नेपाळी शिल्पकलेचा विकास तिथल्या नेवार लोकांनी केला आहे. ते मुख्यतः बौद्ध असल्यामुळे त्यांचे शिल्पकाम बौद्ध पद्धतीचे आहे. सम्राट अशोकाने नेपाळात असंख्य स्तूप निर्माण केले, त्यांपैकी दोन



अखंड पाषाणाचा स्तंभ– पशुपतिनाथ

स्तूप काठमांडूजवळ आहेत. त्यांची रचना, विशेषतः घुमटावरील शिखरे, अगदी विलक्षण व वेगळी आहेत. इ. स. च्या

८ व्या ते १२ व्या शतकाच्या कालखंडात नेपाळमधील शिल्प कलेवर उत्तर भारतीय कलाकारांची छाप पडलेली दिसते पुढे मल्ल घराण्याच्या राजवटीत या कलेचा खूपच विकास झाला त्या काळातील राजप्रासाद व मंदिर यावरील कला कुसर ही नेवारांच्या कलाकौशल्याची उत्कृष्ट साक्ष आहे त्यांनी उभे केलेले अखंड पाषाणाचे उंच उंच स्तंभही प्रेक्षणीय आहेत त्या स्तंभावर कमलाकृती पीठ असून, त्यावर एखाद्या राज पुरुषाची प्रतिमा असते

नेपाळमधील मूर्तिकलेचा व चित्रकलेचा विकास बौद्ध पंथाच्या अनुषंगानेच झालेला आहे तिथे बौद्ध देवतांच्या असंख्य मूर्ती व त्यांची सुंदर चित्रेही उपलब्ध झाली आहेत नेपाळी चित्रकलेवर प्रारंभी प भारतीय शैलीचा प्रभाव होता, पण इ स च्या ९ व्या शतकानंतर तिच्यावर बंगालमधील पाल चित्रशैलीचा प्रभाव पडला अशा प्रकारची पुष्कळ चित्रे बौद्ध हस्तलिखित पोथ्यांवर काढलेली आढळतात

**भाषा** – *नेपाळी म्हणून जी भाषा सामान्यत ओळखली* जाते, ती संस्कृतोद्भव आहे तिच्यात पाली व प्राकृत शब्द पुष्कळ आहेत नेपाळमधील आदिवासी खस लोकांच्या भाषेला खसकुरा म्हणतात ग्रियर्सन यांच्या मते खसकुरा हे प्राकृतचेच अपभ्रष्ट रूप आहे गोरखा लोकांच्या भाषेला पर्वतिया म्हणतात ती नेपाळी भाषेची एक बोली आहे नेवारांची भाषा तिबेटी चिनी कुलातली आहे, पण त्यांनी भारतीय वर्णमालाच स्वीकारली आहे पहाडी भागातील गुरुंग, मगर, लेपचा, सुनवर, लिंबू, हे लोक ज्या बोली वापरतात, त्या तिबेटी व ब्रह्मी भाषांना जवळच्या आहेत

**नेपाळ आणि भारत** – सांस्कृतिक दृष्टीने नेपाळ हा भारताचाच भाग आहे प्राचीन काळापासून भारताचा नेपाळशी घनिष्ट संबंध आहे नेपाळात शैव व बौद्ध संप्रदायांची पवित्र क्षेत्रे पुष्कळ आहेत नेपाळमधील राजवंश भारतीय आहेत तिथल्या जीवनावर ब्राह्मण व क्षत्रिय यांचे वर्चस्व आहे नेपाळ व भारत यामधील धार्मिक विधी, चालीरीती व आहारपद्धती यांतही पुष्कळ साम्य आहे भौगोलिक व आर्थिक दृष्टीने नेपाळचे हितसंबंध भारताशी निगडित आहेत

बिहार व बंगाल या प्रदेशांवर मुसलमानांनी जेव्हा आक्रमणे करून तिथली विद्यापीठे व ग्रंथालये नष्ट केली, तेव्हा असंख्य पंडित व भिक्षू आपापली पोथ्या–पुस्तके घेऊन नेपाळ व तिबेट या देशांत पळून गेले त्या पोथ्या नेपाळात अजूनही सुरक्षित आहेत भारताचा प्राचीन इतिहास व संस्कृती यासंबंधीचे पुष्कळ ज्ञान त्या ग्रंथावरून उपलब्ध होते ते ग्रंथ केवळ बौद्ध पंथाचे नसून, तांत्रिक व ज्योतिषविषयकही आहेत सांप्रत त्या ग्रंथाचे संशोधन नेपाळ सरकार व भारत सरकार यांच्या सहकार्याने सुरू झाले आहे त्याचप्रमाणे नेपाळमध्ये लुंबिनी पासून जवळच तिलउराकोट येथे उत्खनन सुरू आहे त्यात बुद्ध काळातील मूळ अवशेष मिळण्याचा संभव आहे त्यामुळे नेपाळ व भारत यांच्या सांस्कृतिक संबंधावर अधिक प्रकाश पडेल, अशी अपेक्षा आहे [नेपाळ, ए सा रि ए, स भा प्र व, नेपाल की कहानी – श्री काशीप्रसाद श्रीवास्तव, १९५५, हिस्टरी आफ नेपाल – संपादक श्री डॅनिएल राइट, १९५८, गोरखा – सर फ्रॅन्सिस टुकर, १९५७, एनशंट नेपाल – श्री डी आर रग्मी, श्री ब्रजकिशोर 'नारायण' – आजकल, एप्रिल १९६०, श्री बाबासाहेब खापर्डे – स्वराज्य, १६ एप्रिल ते २८ मे १९६०, श्री वाचस्पति गरोला – आजकल, नोव्हेंबर १९६३, हि क इ पी, परिसंवादपत्रिका, एप्रिल १९६५, भा शे ने]

## नेपाळ संवत

एक प्रादेशिक कालगणना हा संवत दुसऱ्या ठाकुर वंशातील राजा जयदेवमल्ल किंवा पहिल्या ठाकुर वंशातील राजा राघवदेव याने सुरू केला, अशी दोन मते आहेत अनेक पुराव्यांच्या आधारे आज दुसरे मत गृहीत धरले गेले आहे एका वंशावळीत शके ८११ (इ स ८८९) श्रावण शुद्ध सप्तमीला नेपाळ संवत १ हा होता, असे सांगितले आहे यावरून शक व नेपाळ संवत या दोहोंतील अंतर ८०२ वर्षे इतके येते नेपाळात नवरत्नम नावाचा एक ग्रंथ मिळाला आहे त्या ग्रंथाच्या शेवटी शके १६०७ च्या जोडीला नेपाळ संवत ८०६ दिला आहे या आधाराचा विचार केल्यास शक व नेपाळ संवत यांतील अंतर ८०१ इतके येते डॉ किलहॉर्न याने या सर्व गोष्टींचा विचार करून असे म्हटले आहे, की या संवताचा आरंभ इ स ८७९ ऑक्टोबर २० किंवा शके ८०१ कार्तिक शुद्ध प्रतिपदा या दिवसापासून झाला असला पाहिजे याला नेवारी संवत असेही म्हणतात ग्रंथकार अजूनही याचा उपयोग करतात [स मि]

## नेपाळी भाषा व साहित्य

नेपाळी ही सांप्रत नेपाळची राष्ट्रभाषा आहे नेपाळशिवाय भारतातील डेहराडून, दार्जिलिंग, कलकत्ता, आसाम या भागात आणि सिक्कीम, भूतान व ब्रह्मदेश या प्रदेशांतही नेपाळी कमी अधिक प्रमाणात बोलली जाते

हिंदीच्या पहाडी वर्गातील 'पूर्वी पहाडी' वर्गात नेपाळी भाषेचा समावेश होतो नेपाळीला पर्वतिया, गोरखाली व खसकुरा अशीही नावे आहेत हिचे शुद्ध रूप नेपाळच्या तराई भागात बोलले जाते नेपाळी भाषेत कुरा शब्दाचा अर्थ बोली असा आहे

त्यावरून खसकुरा म्हणजे खसाची बोली असा अर्थ निघतो नेपाळी ही खस लोकांचीच बोली आहे नेपाळच्या पूर्व भागात आणि कुमाऊ व गढवाल या प्रदेशांत प्राचीन काळापासून खस लोकांची वस्ती आहे इ स च्या १८ व्या शतकात नेपाळच्या तराई प्रदेशावर गुरख्यांची सत्ता स्थापन झाली आणि नेपाळी ही तिथली राजभाषा बनली गुरख्यांच्या संबंधामुळे तिला गोरखाली असे म्हणू लागले पुढे इ स १९३२ पासून गोरखाली ऐवजी नेपाळी हे नाव प्रचारात आले

नेपाळी भाषेच्या उत्तरेला तिबेटी, पूर्वेला भूतानी, दक्षिणेला बंगाली, मैथिली, भोजपुरी व अवधी आणि पश्चिमेला कुमाउँनी या भाषा बोलल्या जातात या सर्व भाषांचा नेपाळी भाषेवर थोडाबहुत प्रभाव पडला आहे

नेपाळी भाषेत तिचे स्वतःचे असे थोडे शब्द आहेत तिच्यातील बरेचसे शब्द व्रज, अवधी व खडीबोली या भाषामार्फत संस्कृत भाषतून घेतलेले आहेत याशिवाय कुमाऊँनी, गढवाली, पश्चिम पहाडी बोली, भोजपुरी, मैथिली यांतूनही काही शब्द नेपाळीत गेलेले आहेत सपादलक्षातील खसलोकांनी जेव्हा नेपाळ जिंकला, तेव्हा त्यांच्या बरोबर तिथले राजपुत व गुजरही तिकडे गेले होते त्यामुळे नेपाळी भाषेचे राजस्थानीशी साम्य निर्माण झाले आहे

नेपाळी भाषेत क्रियेच्या शेवटी येणारे छ, छनू व हुन हे प्रत्यय वर्तमानकाळ दर्शवितात राजस्थानीच्या जयपुरी बोलीतही हा छकार आढळतो या दोहोंच्या वाक्यरचनेतही साम्य आहे तसेच नेपाळीतला कर्तृवाचक प्रत्यय ले हा हिंदीतला ने आहे कर्माचा विभक्ती प्रत्यय को हा हिंदीच्या का चेच रूपांतर आहे बहुवचनाचा हरू हा प्रत्यय अवधीच्या हरे शब्दाची आठवण करून देणारा आहे भोजपुरीतील काही शब्द व्यंजनविपर्यय होऊन नेपाळीत आले आहेत उदा० बिरामी (बीमारी), बिसना ( बिसरना ), बेग्ला ( बिलग ), निम्ती ( निमित्त ), इत्यादी

अरबी व फारसी या भाषांतील शेकडो शब्द हिंदुस्थानीच्या द्वारा नेपाळीत गेले आहेत नेपाळीत संस्कृत शब्दांची संख्याही पुष्कळ आहे काही वेळा हे शब्द जसेच्या तसेच, तर अनेकदा काही बदल होऊन नेपाळीत दाखल झालेले आहेत उदा० ईस्वालू ( ईर्ष्यालू ), कदम् ( कदंब ), दसे ( दशमी ), पोस्तक ( पुस्तक ), इत्यादी संस्कृत भाषेप्रमाणे नेपाळीतही तीन लिंगे आहेत सामान्यपणे ओकारान्त शब्द पुलिंगी, इकारान्त स्त्रीलिंगी व उकारान्त नपुसकलिंगी असतात वचने मात्र एकवचन व बहुवचन अशी दोनच आहेत एकवचनी नामे व सर्वनामे यांना हरू प्रत्यय लावल्याने त्यांचे बहुवचन व क्रियापदाला न् लावल्यास त्याचे बहुवचन तयार होते

नेपाळीच्या पूर्वी नेपाळी, केंद्रीय नेपाळी, गादी व पश्चिमी नेपाळी अशा चार मुख्य उपभाषा आहेत नेपाळी भाषेचा एक नमुना असा--

**यो महोत्तरी जिल्लामा रहे को एक प्रमुख धार्मिक स्थान हो । यहाँ श्रीरामजानकी दुइ अति राम्रा मंदिर छन । जानकी-मंदिर टिकमगढका राजा ले लाखों रुपैया खच गरी बनाए का हो । यहाँ अनेक पवित्र कुडहरू छन ।**

अर्थ – हे महोत्तरी जिल्ह्यात असलेले एक प्रमुख धार्मिक स्थान आहे इथे श्रीराम–जानकीची दोन अतिसुंदर मंदिरे आहेत जानकीमंदिर टिकमगढच्या राजाने लाखो रुपये खर्च करून बांधले आहे इथे अनेक पवित्र कुंडे आहेत

**नेपाळी साहित्याचा आरंभ व विकास** – नेपाळी भाषेतील सर्वांत प्राचीन लेख इ स १५४३ मधला आहे आणि तो महाराज द्रव्यशाहाच्या लाल मुहर ताम्रपत्रावर लिहिलेला आहे काठमांडूचा राजा प्रतापमल्ल याने सुमारे तीनशे वर्षांपूर्वी नेपाळी भाषेत एक शिलालेख कोरलेला आढळतो पण नेपाळी साहित्याचा खरा प्रारंभ इ स च्या १८ व्या शतकातच होतो नेपाळचा प्राचीन लेखक प्रेमनिधी पंत हा होय त्याचे लेख मात्र उपलब्ध नाहीत आपल्या प्रायश्चित्तप्रदीप नामक ग्रंथात त्याने काही ठिकाणी नेपाळी भाषा वापरली आहे गुमानी नामक कवीने आपल्या श्लोकातील तीन चरण संस्कृतात व चौथा नेपाळीत रचला आहे गुमानीच्या नंतर वीरशाली पंत, रघुनाथ, वसंत, इंदिरस, विद्यारण्य केसरी, यदुनाथ पोखरैल व पतंजली गजुर्याल हे कवी व लेखक झाले त्यांनी मुख्यत्वे खंडकाव्ये रचली आणि काही ग्रंथांचे नेपाळीत अनुवाद केले वीरशाली या वैष्णव कवीने द्रौपदीविलाप व गोपिकास्तुती ही काव्ये रचली असून, ती भक्तिरसाने परिप्लुत आहेत रघुनाथाचे सुंदरकांड, वसंताचे कृष्णचरित, विद्यारण्याचे द्रौपदीस्तुती, गोपिकास्तुती व युगलगीत, यदुनाथाचे कृष्णचरित आणि पतंजलीचे मत्स्येंद्रनाथ कथा, हरिभक्तमाला व गोपालवाणी हे ग्रंथ प्रसिद्ध आहेत इंदिरसाचे ग्रंथ मात्र उपलब्ध नाहीत

यानंतरचा प्रसिद्ध कवी म्हणजे भानुभक्त (जन्म इ स १८१४) हा होय याने अध्यात्मरामायणाचा नेपाळीत अनुवाद केला आहे त्यामुळे त्याला नेपाळीचा तुलसीदास असे म्हणतात हा अनुवाद वर्णिक छंदात आहे शिवाय त्याने भक्तमाला व वधूशिक्षा या नावाचे आणखी दोन ग्रंथ रचले आहेत त्याची स्फुट कविताही बरीच आहे जिवंतपणी भानुभक्ताच्या कवितेची नेपाळी जनतेने विशेषशी कदर केली नाही, पण त्याच्या पश्चात मोतीराम भट्ट या कवीने त्याचे चरित्र

लिहून आणि त्याचे रामायणही प्रकाशित करून त्याला लोक प्रसिद्ध केले मोतीरामाने नेपाळीच्या विकासासाठी पुष्कळच



भानुभक्त

प्रयत्न केले त्याने नेपाळीत प्रथमच एक नियतकालिक सुरू केले पण दुर्दैवाची गोष्ट ही, की वयाच्या अवघ्या एकतिसाव्या वर्षी त्याचा मृत्यू झाला त्याच्या समकाली लक्ष्मीदत्त, गोपीनाथ तीर्थराज, मरीचिमानसी व वीरेंद्रकेसरी हे लेखक झाले

त्यानंतरच्या काळात शिखरनाथ हा प्रसिद्ध कवी नेपाळात होऊन गेला याची काव्यरचना प्रौढ असून, ती अर्थालंकारानी नटलेली आहे रामाश्वमेध, तीर्थयात्रावर्णन, इ याची पुस्तके नेपाळात चांगलीच लोकप्रिय आहेत शंभुप्रसाद हा शीघ्रकवी याचाच समकालीन होता याने रत्नावली या संस्कृत नाटकाचा नेपाळीत अनुवाद केला असून, त्याची काही भजनेही प्रसिद्ध आहेत

**आधुनिक काल** – दुसऱ्या महायुद्धानंतरच्या काळात नेपाळी साहित्यात आधुनिकतेचा प्रवेश झाला राणाशाहीच्या काळात तिच्या विरुद्ध आवाज उठविणारे अनेक लेखक व कवी होऊन गेले त्यांमध्ये लेखनाथ पौडेल हा श्रेष्ठ होता याच्या कवितेत पदलालित्याला प्राधान्य आहे याने बुद्धिविनोद, ऋतुविचार, लक्ष्मीपूजानाटक, सत्यकलिसंवाद, लालित्य, तरुणतपस्वी, गीतेचा संक्षिप्त पद्यानुवाद, पंचतंत्र, पिंजरा को सुगा, इ ग्रंथ लिहिले व काही स्फुट कविताही रचली याने शार्दूलविक्रीडित या पारंपरिक वृत्ताऐवजी वसंततिलका व अनुष्टुभ या छंदात आपली पद्यरचना करून नेपाळीत एक नवीन पायंडा पाडला बुद्धिविनोद या ग्रंथात नवीन विचार मांडलेले असून, तरुण तपस्वी हा ग्रंथ आध्यात्मिक विचारानी भरलेला आहे त्याच्या सत्यकलिसंवाद या ग्रंथात राष्ट्रीय विचाराचे प्रतिपादन आहे पिंजरा को सुगा या कवितेत राणाशाहीच्या गुलामगिरीत दयनीय जीवन कंठणाऱ्या नेपाळी जनतेचे हृदयस्पर्शी चित्र त्याने रेखाटले आहे त्याच्या काव्याची शैली भावमधुर आहे त्याला नेपाळीचा कविसम्राट असे म्हणतात

पंडितराज सोमनाथ याने आदर्शराघव हे उच्च प्रतीचे काव्य लिहिले आहे हेमराजाने चंद्रिका नामक व्याकरणग्रंथ लिहून तो चार भागात प्रकाशित केला आणि लोकाना विना मूल्य वाटला

बालकृष्ण 'सम' हा प्रसिद्ध कवी व नाटककार असून, त्याला नेपाळीचा शेक्सपियर असे म्हणतात मुटुको कथा, ध्रुव, मुकुंद, इंदिरा, प्रल्हाद, इ पद्यमय व ऊनी मरेर्थी देनन्, भक्त भानुभक्त, म, इ गद्य नाटके त्याने लिहिली आहेत याशिवाय, त्याने अनेक कथाही लिहिल्या आहेत गद्य आणि पद्य या दोहोंतही प्रभावीपणे संचार करणारा हा सव्यसाची लेखक आहे त्याचे सर्व लेखन विचारपरिप्लुत असते त्याने चीसो चुलो ( थंड चूल ) नामक एक महाकाव्यही लिहिले आहे

धरणीधराच्या काव्यात आधुनिकता व राष्ट्रोन्नतीची प्रेरणा यांचा संगम झाला आहे याचे नैवेद्य हे काव्य व काही स्फुट कविता प्रसिद्ध आहे

सिद्धिचरण श्रेष्ठ या कवीने प्रथमच नेपाळीत उन्मुक्त काव्य लिहायला सुरवात केली त्याचे अनुकरण पुढे अनेक लेखकानी केले वर्तमान लेखकात भवानी भिक्षू हे बहुश्रुत व प्रतिभासंपन्न लेखक असून त्याच्या काव्यात अस्तित्ववाद व समाजवाद याचा आढळ होतो ते प्रथम श्रेणीचे कथाकारही आहेत

लक्ष्मीप्रसाद देवकोटा या महाकवीने सुलोचना नामक एक महाकाव्य रचले असून, स्फुट कविताही पुष्कळच लिहिली आहे त्यानी बरीच पुस्तके लिहिली, पण त्यातली थोडीच प्रकाशित झाली त्याच्या उपदेशमाला नामक कवितेचा काही भाग असा –

> कति बसे कुल माथि उबे कति
> कति चढे गिरि माथि लडे कति
> उदय भो कति को र डुबे कति
> तिमि र हामि यहाँ रहुँला कति
> तन गुलाब भए र डुब दिन
> मन मगाउनु सौख लियो कन ।

अर्थ– (या मानवी प्रपंचात) काहीजण वृक्षाच्या शेंड्यावर बसले, तर काही उडून गेले काही डोंगरमाथ्यावर चढले तर, काही खालीही पडले काहींचा पुन्हा उदय झाला, तर काही बुडूनच गेले तुम्ही आणि आम्ही इथे किती दिवस राहणार? दोन दिवस गुलाब होऊन राहा आणि त्याचा सुगंध पसरवा



महाकवी देवकोटा

राणाशाहीच्या काळात तिच्याविरुद्ध लिहिणारे लेखक, कवी, कथाकार हे अन्योक्तीच्या द्वारे किंवा प्रतीकरूपाने लिहीत असत कधी कधी परिस्थितीनुरूप त्यांच्या लेखनावर निराशेचीही छाया पडत असे पण एकंदरीत नेपाळी काव्यावर आशा, प्रेम, त्याग, पुरुषार्थ आणि जीवनातील आनंद यांचीच छाप अधिक आहे

नेपाळी भाषेत नाटकाचा आरंभ संस्कृत नाटकांच्या अनुवादाने झाला शंभूप्रसाद, केसर शमशेर, जीवेश्वर रिमाल, झमकलाल मिश्र व वीरेंद्र केसरी अर्ज्याल हे नेपाळीचे प्रसिद्ध नाटककार होत लेखनाथ, बालकृष्ण 'सम' व भीमनिधी तिवारी यांनी कित्येक पौराणिक नाटके लिहिली आहेत लक्ष्मीप्रसाद देवकोटाचे सावित्री सत्यवान, रुद्रराज पांडेयाचे प्रेम, हृदयचंद्र सिंह प्रधानाचे छेड लागेर, श्यामदास वैष्णवाचे चेतना, पसल, फुटेको बाध, इ नाटके फार लोकप्रिय आहेत

नेपाळी साहित्यातील पहिली मौलिक कादंबरी सुमती ही इ स १९३४ मध्ये प्रकाशित झाली विष्णुचरण हे तिचे लेखक आहेत त्यानंतर प रुद्रराज पांडेय यांच्या रूपवती, प्रायश्चित्त व चंपाकली या कादंबऱ्या प्रसिद्ध झाल्या सामाजिक विषय हाताळण्यात हे फार कुशल आहेत रूपनारायणांची भ्रमर, भवानीप्रसादाची यौवनकी अंधी आणि बागदेलांच्या काही कादंबऱ्या लोकप्रिय झाल्या हृदयसिंह प्रधान यांची स्वास्नी मान्छे ही कादंबरी आधुनिक तंत्राने लिहिलेली आहे

नेपाळीत कथासाहित्यही विपुल आहे परिमाणाच्या दृष्टीने काव्याखालोखाल कथेचाच क्रमांक लागतो कृष्ण बममल हा नेपाळीतील पहिला कथाकार होय त्याच्यानंतर सम, भवानी भिक्षु विश्वेश्वरप्रसाद, गुरुप्रसाद मैनाली, भीमनिधी तिवारी, हृदयचंद्र सिंह प्रधान, विश्वेश्वर प्रसाद कोइराला, विजय बहादुर मल, पुष्करशमशेर, इ लेखकांनी नेपाळी कथासाहित्यात मोलाची भर घातली आहे बममलाची कथा मार्मिक आणि संवेदनाशील आहे, विजयबहादुर मलांनी स्त्रीजीवनाचे मानसशास्त्रीय दृष्टिकोणातून चित्रण केले आहे, तर हृदयचंद्र सिंह प्रधानांनी सामाजिक विषमतेतून निर्माण झालेल्या दैन्याचे चित्र रेखाटले आहे

निबंध आणि टीकावाङ्मय या क्षेत्रातही काही लेखकांनी बरीच प्रगती केली आहे पारसमणी प्रधान, रुद्रराज पांडेय, सूर्यविक्रम ज्ञवाली, बाबुराम आचार्य, लक्ष्मीप्रसाद देवकोटा, बालकृष्ण 'सम,' बालचंद्र शर्मा, राजेश्वर देवकोटा, निरंजन भट्ट, राई, ढुंढिराज भंडारी, धमरत्न यमी, बालकृष्ण पोखरैल, इ निबंधकार विशेष प्रसिद्ध आहेत रामराज पौडेल यांची प्रवासवर्णने आणि रामराजपंत व प्रिंसेप शाह यांचे ललित निबंध वैशिष्ट्यपूर्ण आहेत रामकृष्ण शर्मा यांनी नेपाळीत प्रथमच टीकात्मक निबंधलेखनाला प्रारंभ केला त्याच्या नंतर प्रा यदुनाथ खनाल यांनी समालोचना को सिद्धान्त नामक समीक्षात्मक ग्रंथ लिहिला हृदयचंद्र सिंह प्रधानांनी साहित्य–एक दृष्टिकोण, केही नेपाळी नाटक, इ टीकात्मक पुस्तके लिहून त्या वाङ्मयात भर घातली याशिवाय रत्नध्वज जोशी, माधवलाल कर्माचार्य, तारानाथ शर्मा, ईश्वर बराल हेही वाङ्मयीन टीकाकार म्हणून प्रसिद्ध आहेत

आधुनिक काव्याच्या क्षेत्रात अनेक कवी काव्यरचना करीत आहेत भीमदर्शन रोका, एम् बी बि शाह, श्यामदास वैष्णव, धर्मराज थापा, पोषण प्रसाद पांडेय, वासुशशी, जनार्दन सम, जगतबहादुर बुढाथोकी, नीर विक्रमप्यासी, भूपीशेरचन, तुलसी दिवस, कालीप्रसाद रिसाल, प्रेमाशाह, ही त्यांपैकी काही विशेष उल्लेखनीय नावे आहेत

**नेपाळी लोकसाहित्य** – नेपाळी लोकसाहित्यही चांगले समृद्ध आहे त्यात गद्य लोककथा व लोकोक्ती यांबरोबरच लोकगीते व लोकगाथा यांचाही बराच भरणा आहे नेपाळी लोकगीतांत मुख्यत्वे पुढील प्रकार आढळतात––(१) श्रमगीते (२) नृत्य गीते (३) ऋतुगीत (४) मेलागीते (५) उत्सवगीते (६) संस्कारगीते (७) प्रेमगीते (८) बालगीते व (९) विविधगीते

श्रमगीते – काम करताना शीण येऊ नये, म्हणून गीते गाण्याची पद्धत सब जगात आहे पण नेपाळात ही गीते फार चांगल्या रीतीने गाइली जातात आषाढ'त लावणी करताना व आश्विनात धान्याची कापणी करताना स्त्रिया व पुरुष जी गीते गातात, त्यांना असारे व दँवाई गीते असे नाव आहे अशा काही गीतात सवाल जबाबही असतात शेतात डोलणारी धान्यलक्ष्मी पाहून शेतकरी कसा आनंदित होतो, त्याचे वर्णन काही गीतांत आढळते, त्याचा एक नमुना असा––

**कती राम्रो मेरो ई पाँगरो गोरु कती राम्रो मेरो हल**
**कती राम्रो मेरो उबजाऊ बारी राम्रो छ मेहनत को फल**

अर्थ – माझे रंगीबेरंगी बैल किती सुंदर आहेत माझा नांगरही कसा छान आहे माझे सुपीक शेत किती सुंदर आहे माझ्या मेहनतीचे हे फळ किती सुंदर आहे बरे !

काम संपवून घरी जाताना जी गीते गातात, त्यांना रसिया असे नाव आहे गवत कापताना, गायी चारताना किंवा डोंगर चढता–उतरताना गायल्या जाणाऱ्या गीतांना घाँसे असे नाव आहे

नृत्यगीते – सोरठी नृत्याच्या वेळी स्त्री–पुरुष जी गीते गातात, त्यांनाही सोरठी म्हणतात मादले नृत्य हे नेपाळी लोकांचे अत्यंत प्रिय नृत्य आहे या वेळी मादळाच्या साथीवर स्वरात स्वर मिसळून तरुण–तरुणी जी गीते गातात, त्यांना मादले गीते म्हणतात नेपाळातील तमंग जातीचे लोक डफू (डमरू) नृत्य करताना डफू गीते गातात जागरण उत्सवाच्या वेळी किंवा पशुपतिनाथाच्या देवळात महादीप लावताना बालन नावाचे नृत्य करतात व मंद लयीत बालन गीते गातात त्यात देवदेवतांची स्तुती केलेली असते

ऋतुगीते – माघी पौर्णिमेला किंवा सरसू (मोहरी) पिकण्याच्या वेळी लोसर नामक गीते गातात बारहमासा गीते बाराही महिने वेगवेगळ्या ढंगात गातात

मेलागीते – यात्रांच्या वेळी तरुण–तरुणी एकमेकांची हृदये जाणून घेण्याच्या उद्देशाने देउडा गीते गातात यात सवाल-जबाब असतात

उत्सवगीते – श्रावणातील तिजेच्या दिवशी स्त्रिया एकत्र जमून तीजगीते गातात दिवाळीच्या रात्री त्या भलोगीते म्हणतात भाऊबिजेच्या दिवशी गरीब मुले टोळ्या करून दारोदार मिठाई मागत हिंडतात त्या वेळी ती जी गीते गातात, त्यांचा एक नमुना असा—

**येस घरको माता री ले छुगा छुवा द्रव्य हुउन**
**माटो छुवा अन्न हुउन पातो छुवा पीतांबर हुउन**
**पानी छुवा तेल हुउन येसै घर माँ लछमी ले**
**सदा सर्वदा बास गर्है येसै घरको लाला बाला, बूढा–बूढी**
**केरा जस्तो गांगी रहुन दूबो जस्तो मौली रहुन**
**बर पीपल जस्तो तपी रहुन**
**मदेल को लसा कपडा घरै भरुन**
**भोट को नून, लसा को सून भंडारै भरुन**
**येसै घरको दुखनु पीरनु**
**गंगाजी ले बगाई लगुन**
**ऊभो हिमाल चूली बतासै ले उडाई लगुन**
**दिये को आसीस लागी आउन**
**देउसे भाई आसीस दियेर घरै जाऊन**

अर्थ–या घरातील माता ज्या वस्तूला स्पर्श करील, त्याचे द्रव्य बनू दे, मातीला स्पर्श करील, त्याचे अन्न होऊ दे, पानांना स्पर्श करील, त्यांचा पीतांबर होऊ दे, पाण्याला स्पर्श करील, त्याचे तेल बनू दे या घरात लक्ष्मी सदैव निवास करो या घरातील मुले, मुली, स्त्री, पुरुष व वृद्ध यांना केळ्यांप्रमाणे खूप फुले फळे येवोत दूर्वांप्रमाणे त्यांचा खूप प्रसार होवो वड आणि पिंपळ यांच्याप्रमाणे ती तपस्वी बनोत मैदानी प्रदेशातील वस्त्रांनी घर भरून जावो तिबेटातील मीठ व ल्हासातील सुवर्ण यांनी भांडार भरून जावो या घरातील सर्व दुःख गंगा वाहून नेवो हवा त्यांना हिमालयाच्या शिखराच्या पलिकडे घेऊन जावो दिलेला आशीर्वाद सफळ होवो देउसी गाणाऱ्या साथिदारांनी, आशीर्वाद देऊन आपण आपापल्या घरी जाऊ या

नवरात्रात नऊ दिवस दुर्गेच्या पूजेच्या वेळी स्त्रिया मालसिरी नामक गीते गातात त्यात देवीचे वर्णन केलेले असते

संस्कारगीते–विवाहादी संस्कारांच्या वेळी ही गीते गाण्याची पद्धत आहे

प्रेमगीते – जत्रा व उत्सव या प्रसंगी तरुणतरुणी ही गीते गातात यात विरहगीतांचाही समावेश होतो

बालगीते– यात मुलांची खेळांची गाणी व अंगाई गीते यांचा समावेश होतो

विविधगीते – नेपाळी लोकगीतात त्यांचा वेश, सैनिक, पक्षी, नणंद–भावजय, सासू–सून, इ विषयांवर अनेक लोकगीते आहेत एका गीतात खाष्ट सासू आपल्या सुनेशी दुष्टपणाने कशी वागते, त्याचे वर्णन केले आहे, ते असे—

सासु भन्छे बुहारी, बुहारी भन्छे जीऊ,
सिंगमाग मा राखेको कसले खायो घीऊ ।
देखनु न सुननु मले कहां खायें,
ओंठ तेरा पिछा छन थाह मले पायें ।
खोका जती बंद गर्छु झ्याल जती खोलछु,
घीऊ चोरने बुहारी का ओठ तेरो पोलछु ।

अर्थ– सासू म्हणते 'सूनबाई' सून म्हणते 'काय?' 'लाकडी पाळधान ठेवलेले तूप कोणी खाल्ले ?' 'मी ते पाहिले नाही, ऐकले नाही, मी कुठे खाल्ले ?' 'तुझे ओठ ओशट दिसतात मला पत्ता लागला आहे ' 'सगळी दारे मी बंद करत आणि सगळ्या खिडक्या उघड्या ठेवते तू तूप चोरणारी सून आहेस तुझ्या ओठाना मी डाग देईन '

म्हणी हे कोणत्याही भाषेचे चलनी नाणे असते नेपाळीतही म्हणी पुष्कळ आहेत त्यापैकी काही अशा– ' अल्छी तिघ्रो, स्वादे जिम्रो ' = कामात आळशी, पण खायला तेवढा पुढे 'इंद्र को अगाडि स्वर्ग को कुरा' = इंद्रासमोर स्वर्गाच्या गोष्टी 'एकै माघले जाड़ो जांदैन' = एका माघाने थंडी सपत नाही )

वीर व देवता याचे कित्येक पोवाडे नेपाळात गायिले जातात इ स १८५५ मध्ये नेपाळी सैन्याने तिबटवर स्वारी केली होती, तिच्या सबधीचा भोट को सवाई हा पोवाडा नेपाळात फार प्रसिद्ध आहे नेपाळी लोकसाहित्यासबधी रोदीघर, नेपाली लोकगीत सवाई पचीसा, नेपाली दतकथा, मनमा, नेपाली सामाजिक कहानी, इ पुस्तके प्रकाशित झालेली आहेत, तरी अजून पुष्कळच लोकसाहित्य सकलित व प्रकाशित व्हायचे आहे [ हिं सा को , हिं सा ब इ , षोडश भाग, हिं वि को , मा भा स , धरती गाती है, युगप्रभात–जून, १९६२ ]

## नेम भार्गव

एक सूक्तद्रष्टा ऋग्वेदाच्या ८ व्या मडलातले १००वे सूक्त याच्या नावावर आहे या सूक्तात त्याने इंद्राची स्तुती केली आहे ती करीत असतानाच त्याने वाणीविषयी जे विचार व्यक्त केले आहेत, ते असे–

देवीं वाचमजनयन्त देवास्तां विश्वरूपा पशवो वदन्ति ।
सा नो मन्द्रेषमूर्जं दुहाना धेनुर्वागस्मानुप सुष्टुतैतु ।।
( ऋ ८ १०० ११ )

अर्थ – ज्या दिव्य वाणीला देवानीच जन्माला घातले कोणत्याही स्वरूपाचा प्राणी असो, तो वाचा बोलतोच (मग स्पष्ट उमटो किंवा न उमटो) ती उल्लसित दिव्य वाणी एक धेनूच आहे ती उत्साह व ओजस्विता याचे भरपूर दूध देते तर अशी ती मनःपूर्वक स्तविलेली दिव्य वाणी आमच्या सन्निध येवो

## नेमिचंद्र

(१) (इ स चे १०वे शतक) एक जैन आचार्य हा मदुरेचा रहिवासी होता जैनाच्या सिद्धान्त साहित्यात नेमिचद्राला प्रथम क्रमाकाचा आचार्य म्हणून मान्यता मिळाली आहे जैन पडित याला 'सिद्धान्तचक्रवर्ती' अशा उपाधीने गौरवतात याने द्रव्यसग्रह त्रिलोकसार, गोम्मटसार, लब्धिसार, क्षपणसार, प्रतिष्ठापाठ, इ अनेक लहान मोठे ग्रथ लिहिले आहेत याची एकत्र रचना सुमारे साडेतीन हजार श्लोक भरतील एवढी आहे

अभयनदी, वीरनदी, इद्रनदी, कनकनदी व अजितसेन या पाच गुरूंच्या जवळ नेमिचद्राने अध्ययन केले श्रवणबेळगोळ येथील गोम्मटेश्वराची महामूर्ती स्थापित करणारा चामुडराय हा याचाच शिष्य होय [ जैनबोधक, २६ सप्टें १९६६ ]

(२) (इ स चे ११ वे शतक) एक जैन टीकाकार याने महाभारताचे जैन रूपातर केले, उत्तराध्ययनावर टीका लिहिली व सवंवैराग्यशतक हा स्वतत्र ग्रथ निर्मिला [ म च को ]

## नेय्यल

एक जात या लोकाची वस्ती मुख्यत आध्रातील विशाखापट्टणम आणि ओडिसातील गजाम या जिल्ह्यात आढळते मच्छिमारी हा याचा प्रमुख व्यवसाय आहे

याचे पौरोहित्य ब्राह्मण करतात विवाहाच्या वेळी हे जानवे घालतात

ही जात नागपूजक आहे याना केवळ ब्राह्मणाच्या हातचे अन्न चालते हे लोक मृताना जाळतात [ का ट्रा स इ ]

## नेवार

नेपाळमधील एक आदिम जात काठमाडूच्या दरीत याची बहुसख्य वस्ती आहे या लोकाना नेवार हे नाव कसे मिळाले, त्याबद्दल निश्चित माहिती मिळत नाही या प्रदेशात दाट लोकर असलेल्या मेंढ्या खूप पाळल्या जात तिबेटी भाषेत लोकरीला पाल असे नाव आहे नेपाळला पूर्वी ने असे नाव होते त्यावरून या प्रदेशाला नेपाल असे नाव पडले नेपालमधील प चा व आणि ल चा र होऊन तिथल्या रहिवाशाना नेवार असे म्हणू लागले ही व्युत्पत्ती डॉ सुनीतिकुमार चटर्जी यानी दिली आहे

नेवार लोक सवसाधारणपणे प्रसन्नमुख असून, त्याच्या स्त्रिया सुदर असतात नेवार लोकात शिवमार्गी म्हणजे हिंदू व बुद्धमार्गी म्हणजे बौद्ध असे दोन प्रमुख भेद असून, त्यात पुन्हा अनेक जाती व उपजाती आहेत शिवमार्गी नेवाराच्या ब्राह्मण पुरोहित वर्गाला देवमजू ब्राह्मण व लाखे आणि बुद्धमार्गी नेवाराच्या पुरोहित वर्गाला वज्राचार्य, बौंडा किंवा बरे असे म्हणतात देवमजू ब्राह्मणाना उपाध्या, राजोपाध्या, देवब्रह्म व गुरुब

जे अशाही पदव्या आहेत ब्राह्मणाच्या खालोखाल छथरिया श्रेष्ठ, पचथरिया श्रेष्ठ व उरास हे उच्चवर्णीय लोक यनात आणि त्याच्या खाली क्रमाने पहाडी ज्यापू, हले, माली, चित्रकार, छीप, मनवर, कौ, दुर्गीय, ग्रलमी, सग, भा, कसाई, कुसले शिवा जोगी, पारे, भुल्लू, च्यामे, हर हुरु इ जातीचा क्रमाक लागता त्यातही पुन्हा अनेक पोटभेद आहतच या लोकाच्या भाषेला नेवारी असे नाव आहे



श्रेष्ठ नेवार

व्यापार आणि शेती हे नेवाराचे मुख्य व्यवसाय आहेत काठमांडू खोऱ्यातील शेती सर्वस्वी पावसावर अवलंबून असते आषाढाच्या सुरुवातीला जर पाऊस सुरू झाला, तर पिके चागली येनात श्रावण पौर्णिमेपर्यंतच भाताची लावणी करायची, असा त्याचा नियम आहे कारण त्यानतर ती केल्यास शेतकऱ्यावर सकटे येतात, असे ते समजतात त्यामुळे पाऊस वेळेवर सुरू झाला नाही, तर तो व्हावा, यासाठी ते एक पर्ज यात्सव करतात

नेवार लोक शेतीसाठी नागर वापरीत नाहीत एखाद्याने तो वापरल्यास त्याला जातिबहिष्कृत करतात उत्तम शेतकरी म्हणून नेवार लोकाची ख्याती आहे भात हे याचे मुख्य पीक असते त्याशिवाय ते मका व निरनिराळ्या भाज्याही पिकवतात

नेवार लोक धातुकाम, सुतारकाम कुंभारकाम, गवडीकाम, विणणे, तेल गाळणे इ व्यवसायही करतात तेल गाळण्याच्या घाण्यालाही भुताखेताची बाधा होते, अशी त्याची समजूत आहे म्हणून घाण्याच्या दरवाज्यावर ते रेड्याची कवटी टागून ठेवतात आणि दसऱ्याच्या दिवशी घाण्याला रेडा बळी देतात

नेवाराच्या प्रत्येक वसाहतीत किंवा गावात एक सार्वजनिक विश्रातिगृह आणि तळे असते जत्रा, उत्सव अशा प्रसगी गावात येण्यापूर्वी देव थोडा वेळ विश्रातिगृहात विसावतात त्याच्या प्रत्येक वसाहतीत गणेश, सरस्वती, भैरव, नारायण व माई याची मंदिर असतात

**गृहरचना** – नेवाराची घरे सर्वसाधारणपणे तीन–चार मजली असून ती विटा आणि कौले याची असतात ती चौकोनी नसून, त्याच्या मजल्याची उंची फार कमी असते पुढच्या भिंतीतच फक्त मोठ्या खिडक्या असतात प्रत्येक मजल्याचे काही विशिष्ट उपयोग असतात तळमजल्यावर दुकान, गोठा आणि साठवणीची जागा असते श्राद्ध करायचे ते तळमजल्यावरच करतात दुसऱ्या मजल्यावर अनेक खोल्या असतात त्यात पाहुण्याची आणि भेटायला येणाऱ्या माणसाची व्यवस्था करतात तिसऱ्या मजल्यावर अनेक खोल्या असून, त्यात विवाहित स्त्री–पुरुष झोपतात चौथ्या मजल्यावर स्वयपाकगृह आणि देवघर असते स्वयपाकगृहात बाहेरच्या लोकाना प्रवेश नसतो घराच्या छपराला खिडकीसारखे एक दार असते प्रत्येक घराच्या दारावर गणेशमूर्ती कोरलेली असते

घर बांधताना त्याना अनेक विधिविधाने करावी लागतात घरासाठी जागा पसत केल्यावर त्या भूमीचे पूजन करतात त्या वेळी बकरा किंवा बदक बळी देतात एखाद्या शुभदिनी पायाचा दगड बसवतात त्या वेळी बदकाचे अंडे, नारळ, वारमर कापड व पाच सुपाऱ्या देवाला देतात मुख्य गवंडी पाच पितळी भांडी घेऊन त्यापैकी एकात चादीचे कासव ठेवतो व त्या भांड्याच्या तोंडावर विटा ठेवून ती जमिनीत पुरतो नतर भुतेखेते सतुष्ट व्हावा, म्हणून तिथे एका मडक्यात उडीद, काळे वाटाणे वगैरे घालून ठेवतात

तळमजला बांधून झाला की द्वारपूजा करतात त्या वेळी बकरा बळी देतात तसेच प्रत्येक मजला पुरा झाला, की छताला आधार देणाऱ्या खांबाची पूजा करतात घरावर कौले घालण्याच्या वेळी जो विधी करतात, त्या वेळी घरमालकाच्या विवाहित मुली आणि इतर मुले व त्याचे नातेवाईक हजर असावे लागतात विवाहित मुली व मुले तांदुळाची दारू, उकडलेली अंडी, मास, मासे व नव्या साड्या, इ वस्तू घेऊन येतात प्रत्येक मुलगी घराला साडी बांधते आणि आईवडिलाना मद्य देते नतर मेजवानी होते शेवटी मुलगी वडिलाना पागोटे व आईला पालके देते व हा विधान सपते मग घर बांधणारे गवंडी व सुतार त्या साड्या घेऊन जातात, काही वेळा साड्या मालक घेतो व गवंड्याना त्याच्या मोबदल्याचे पैसे देतो

घर बांधून पूर्ण झाल्यावर नवग्रहांच्या शातीसाठी एक विधी करतात मातीच्या नऊ थाळ्यात उडीद, लसूण, रेड्याच्या फुफ्फुसाचा तुकडा, बाबूच्या फाद्या वगैरे पदार्थ ठेवून त्याची पूजा करतात आणि बकरा बळी देतात या थाळ्या म्हणजे भैरव आणि अष्टमातृका याची प्रतीके असतात पूजा झाल्यावर त्या गावातल्या नऊ चौकात ठेवतात मग मोठी जेवणावळ होते त्यात घर बांधणारे कामगारही असतात

**पोषाख** – नेवार पुरुष कुडता व विजार घालतो आणि डोक्याला पागोटे बांधतो श्राद्धादी प्रसंगी तो धोतर नेसतो नेवार स्त्री साडी नेसते व लांब बाह्यांचे पोलके घालते त्यावर शाल पांघरते किंवा ओढणी घेते आणि कमरेभोवती पटका



नेवार स्त्रिया

बांधते त्यांची साडी बरीच लांब असून पुढच्या, बाजूला तिच्या पुष्कळ निऱ्या येतात साडीचा पदर खांद्यावर न घेता, तो कमरेलाच खोवतात हा सर्व परंपरागत पोषाख असून, उदास स्त्रिया अजूनही तो घालतात ज्यापू स्त्रियांची साडी मात्र आखूड असून ती गुडघ्यापर्यंतच पोचते तिचा रंग नेहमी काळा असून ती घरी विणलेली असते

नेवार स्त्रियांना दागिन्यांचा फार सोस असतो मस्तकावर, गळ्यात, कानात व हातात त्या तऱ्हेतऱ्हेचे अलंकार घालतात त्यांच्या कानाच्या पाळीला अनेक छिद्रे असतात व त्यात त्या कर्णभूषणे घालतात त्या नाकात मात्र काहीही घालीत नाहीत

ज्यापू स्त्रियांना गोंदून घेण्याची फार आवड असते त्या पोटऱ्यांवर गोंदून घेतात मृत्युनंतर परलोकात हे गोंदण देऊन जीवाला त्याऐवजी अन्न घेता येते, अशी त्यांची समजूत आहे

पूर्वी उच्चवर्णीय नेवार स्त्रिया नायर स्त्रीप्रमाणे मस्तकावर जटाजूट बांधीत असत पण सांप्रत त्या अंबाडा, दोन वेण्या किंवा एक वेणी अशी केशरचना करतात

भात, गाज्या, मांस, मासे हा त्यांचा आहार असतो मद्याचे तीन चार प्रकार त्यांच्यात प्रचलित आहेत

नेवार लोक रोज आंघोळ करीत नाहीत उन्हाळ्यात त दर शनिवारी आणि हिवाळ्यात महिन्यातून एखाद्या वेळी स्नान करतात धार्मिक सणाच्या दिवशी मात्र ते आवर्जून स्नान करतात विवाहित स्त्रियांनी पतीची पूर्वपरवानगी घेतल्याशिवाय स्नान करू नये, असा या लोकांत नियम आहे

नेवार लोक स्थापत्यशास्त्रात फार प्रवीण आहेत त्यांनी बांधलेली नेपाळमधील तल्लेजू, पशुपती, वज्रजोगिनी इत्यादी मंदिरे अप्रतिम कलाकौशल्याचे नमुने आहेत

**विविध संस्कार** – हे लोक मुलाच्या नामकरणाचा समारंभ करीत नाहीत मुलाच्या जन्मपत्रिकेवरून जोशी त्याला सुवर सपण्याच्या आतच एक नाव ठेवतो दुसरे नाव हाक मारण्यासाठी असते आणि ते दोन वर्षांपर्यंत केव्हाही ठेवतात

पाचव्या किंवा सहाव्या महिन्यात मुलाचा अन्नप्राशनाचा संस्कार मोठ्या समारंभाने करतात या वेळी मुलाच्या मामाला मुलासाठी, त्याच्या आईसाठी व समारंभासाठी बऱ्याच वस्तू पाठवाव्या लागतात तीन ते अकरा या वर्षांच्या दरम्यान मुलाचा चूडाकर्माचा संस्कारही थाटामाटाने करतात

यीहीमके – नायर मुलींच्या तालिकेट्टुकल्याणम या विधी सारखाच नेवार मुलींचा यीही किंवा यीहीमके नामक एक संस्कार करतात यीही म्हणजेच विवाह होय देवभजू आणि कृषीय नेवारांशिवाय सर्व नेवार हा संस्कार करतात यात चार ते अकरा वर्षांच्या दरम्यानच्या मुलींचा नारायणाशी विवाह करतात त्या वेळी नारायणाच्या प्रतिमेजवळ बेलफळ ठेवतात मुलीला रजोदर्शन होण्यापूर्वी हा संस्कार करावा लागतो नेवार लोक या संस्काराला अत्यंत पवित्र मानतात

अनेक मुलींचा मिळून एकदम हा संस्कार करतात गणेश मंदिर किंवा चैत्य या ठिकाणी तो साजरा होतो मुलींच्या आईवडिलांना त्यासाठी फार खर्च येतो म्हणून एखाद्या श्रीमंत मुलीच्या यीहीच्या वेळी गरीब बाप आपल्या मुलीचा हा संस्कार उरकून घेतो काही वेळा अनेक जातींच्या मिळून तीन-चारशे मुलींचा हा संस्कार होतो काही वेळा एखादा धनाढ्य नेवार आपण होऊन या समारंभाचा सर्व खर्च करतो तसे केल्याने पुण्य लागते, अशी त्यांची समजूत आहे हा समारंभ पाहण्यासाठी दूरदूरच्या ठिकाणाहून लोक येतात आणि त्या मुलींना नवे कपडे देतात

या संस्कारासाठी शुभ दिवस पाहतात नातेवाइकांना निमंत्रणे जातात मोठा मांडव घालतात घरातील जमिनी तांबडी माती आणि शेण यांनी सारवून स्वच्छ करतात

मुहूर्ताच्या दिवशी पहाटे मुली स्नान करतात त्या दिवशी त्या उपवास करतात प्रथम गणेशाला बदक किंवा बकरा बळी



यीही सस्कारासाठी सजलेल्या मुली

देतात बुद्धमार्गी नेवार बहुधा बलिदान करीत नाही नतर वेगवेगळया देवताना उद्देशून पीठपूजा करतात पीठाची म्हणजे देवताची प्रतीके म्हणून ध्वज घेतात व नतर ते नदीत बुडव- *तात मग नादीमुखश्राद्ध होते नतर सत-श्रदिका नामक एक* विधी होतो त्यासाठी मुलीला अग्नीसमोर उभी करतात आणि १०८ वेळा तिला आपादमस्तक पिवळ्या दोऱ्याने मोज तात मग तो दोरा गुडाळून तिच्या माडीवर ठेवतात नतर तिच्यावर फुले आणि अक्षता उधळतात

यानतर मुलीच्यासमोर ८४ पदार्थ ठेवतात त्याचे पाच घास मुलीने खायचे असतात मुलगी प्रथम उजव्या हाताच्या एकेक बोटाने व नतर पाचही बोटानी ते घास खाते खाण्या पूर्वी थोडे पदार्थ मताखेतासाठी एका पानावर काढून ठेवते पहिल्या दिवसाचा कार्यक्रम एवढयाने सपतो

दुसऱ्या दिवशी न्हावीण मुलीची नखे काढते आणि बोटे रगविते त्याबद्दल तिला थोडे कच्चे मांस व मोहरीचे तेल मिळते मुलीची आत्या एका ताब्याच्या पात्रात ती नखे गोळा करते व त्याबद्दल तिलाही काही द्रव्य मिळते नतर मुलीला नवे कपडे व दागिने देतात

घरातील वडीलधारी स्त्री मग मुलीच्या कपाळावर शेदूर लावते व भागातही भरते त्यानतर कन्यादानाचा विधी होतो नतर पुरोहिताची पूजा *करून त्याला नवी* वस्त्रे *देतात त्या-* नतर जेवणावळ होते व समारभ पूर्ण होतो

यीही सस्काराने मुलीच्या सामाजिक प्रतिष्ठेत बदल होतो एकदा मुलीचे नारायणाशी लग्न झाल्यानतर पुरुषाशी होणाऱ्या तिच्या विवाहाला सरकाराचे स्वरूप न राहता करा राचे राहते तिचा मानवी पती मरण पावला तरी, ती विधवा होत नाही कारण तिचा देव पती अमर असतो त्यामुळे प्रत्यक्षात एक मानवी पती वारल्यानतर तिला हव्या तितक्या वेळा पुनर्विवाह करता येतो त्याचप्रमाणे तिला हव्या तितक्या वेळा घटस्फोटही घेता येतो

ऋतुसस्कार—नेवार मुलीच्या प्रथम रजोदर्शनाच्या सबधी दोन विधी प्रचलित आहेत ज्या मुलीचा यीही सस्कार झाला आहे आणि ज्याचे वय पाच ते तेरा वर्षाच्या दरम्यान आहे, अशा अनेक मुलीचा रजोदर्शनापूर्वी हा विधी एकदम करतात त्या प्रसगी त्याना अकरा दिवस एका अधाऱ्या खोलीत ठेव तात दुसऱ्या प्रकारात मुलीना प्रथम ऋतुप्राप्ती झाल्यानतर हा विधी केला जातो त्या वेळी बाहाऱ्या नामक एका स्त्री-भुताची कापडी प्रतिमा तयार करतात आणि ती त्या मुलीच्या खालीतील भितीवर टागतात हे भूत अशा ऋतुमती मुलीना पछाडते, अशी समजूत असल्यामुळे घरातील मुख्य स्त्री बारा दिवस त्या भुताची पूजा करते आणि रोज मुलीच्या अन्नातला थोडा भाग त्याला देते सहाव्या दिवशी नातेवाईक तिला वाढणे आणतात बाराव्या दिवशी मुलीला विधिपूर्वक शुद्ध *करतात त्या अकरा दिवसात घरच्या मडळीनाही आशौच* असते बाराव्या दिवशी स्नान झाल्यावर मुलीचे डोळे बाधून तिला गच्चीवर नेतात आणि डोळे सोडून तिला सूर्य दर्शन घडवतात त्या दिवशी तिचा मामा तिला नवे कपडे आणि खाद्यपदार्थ पाठवितो



कैटपूजा

कैटपूजा — नेवार मुलाचा पाच ते चौदा वर्षाच्या दरम्यान उप नयनासारखा कैटपूजा नामक एक सस्कार होत असतो कैट म्हणजे लगोटी या सस्कारात *मुलाचे क्षौर करतात* पुरोहित यजमानाच्या हातात लगोटी देतो आणि तो ती बटूला

देतो बटूने ती नेसल्यावर यजमान तिची पूजा करतो यजमान पत्नीही तसेच करते मग बटूला नवी वस्त्रे देतात आणि त्याच्यावर फुले व अक्षता उधळतात नंतर त्याला मृगाजिन व धनुष्यबाण देतात मग बटू भिक्षा मागतो त्यानंतर जेवणावळ होते

**भीमरथारोहण** – काही कनिष्ठ नेवार जातीत पुरुषाला सत्याहत्तर वर्षे, सात महिने सात दिवस, सात घटी व सात पळे पूर्ण झाल्यावर भीमरथारोहण नामक एक संस्कार करतात त्या दिवशी तो पुरुष उपवास करतो आणि तांदूळ व साळी यांच्या ढिगावर पाट ठेवून त्यावर पुरोहिताच्या उजव्या हाताला बसतो त्याच्या शेजारी एक केरसुणी, चटई, छत्री व जोडे ठेवतात नंतर होम होतो सर्वजण त्या वृद्ध पुरुषावर फळे, फुले आणि गुलाल उधळतात नंतर नातेवाईक स्वत त्याचा रथ ओढून त्याला गावातील गणपतीच्या दर्शनाला नेतात अशा पुरुषाला काही दैवी अधिकार प्राप्त होतो, अशी समजूत आहे त्याने एखाद्याला शाप दिल्यास तो खरा होतो, असे समजतात

असेच दोन समारंभ त्या व्यक्तीला ब्यायशी वर्षे चार महिने, चार दिवस, चार घटी व चार पळे पूर्ण झाल्यावर आणि नव्याण्णव वर्षे, नऊ महिने, नऊ दिवस, नऊ घटी व नऊ पळे पूर्ण झाल्यावर करतात त्यांना अनुक्रमे अश्वरथारोहण आणि स्वर्गरथारोहण अशी नावे आहेत

**विवाहप्रथा** – सर्वसाधारणपणे मुलामुलींचे विवाह सोळा ते वीस वर्षे या वयात होतात सगोत्र विवाह करीत नाहीत सामान्यत जवळपास राहणारी मुलगी वधू म्हणून पसंत करतात तशी आढळलीच नाही, तर मग इतरत्र शोध घेतात नेवार लोकांत विवाहाचे तीन प्रकार रूढ आहेत – (१) पारंपरिक पद्धतीचा विवाह, (२) स्वयंवर आणि (३) वधूला पळवून नेऊन लग्न लावणे

पारंपरिक पद्धतीचा विवाह मध्यस्थामार्फत ठरतो वधूवराच्या पत्रिका जुळल्या आणि मुलीच्या घरच्या सर्व नातेवाइकांना तो संबंध पसंत असला, तरच विवाह होतो विवाह मुहूर्त ठरला की वधूच्या घरचे लोक पोहे आणि मद्य तयार करतात हे पदार्थ तयार करण्यासाठी काही महिने लागतात मद्याचे मातीचे मोठमोठे रांजण भरून ठेवतात लग्नाच्या आधी साखरपुडा करण्याची पद्धत आहे त्या दिवशी मुलाकडची मंडळी मध्यस्थामार्फत मुलीच्या आईवडिलांना मखमली पिशवीतून दहा सुपाऱ्या आणि पूजासाहित्य, तसेच वधूला नवी वस्त्रे, शेंदूर पेटी पितळी आरसा, इ वस्तू पाठवतात या पूजासाहित्याने वधूकडचा पुरोहित गणेश, सूर्य, चंद्र, अष्टमातृका, भगवती, इ देवतांची पूजा करतो साखरपुड्यानंतर मुलगी वराच्या कुटुंबातील समजली जाते

लग्नापूर्वी दोन दिवस एक समारंभ करून वराचे आईवडील वधूगृही मिठाई पाठवतात काही वेळा त्याबद्दल पैसेही देतात ही मिठाई वधूच्या सर्व नातेवाइकांना वाटतात नंतर वरातीचा दिवस ठरवतात त्या दिवशी वरपक्षाकडे नातेवाइकांना रेड्याच्या मांसाचे पदार्थ, पोहे, गोड पदार्थ, मुळे, भाजलेले काळे सोयाबीनचे दाणे आणि विविध उसळी यांचे भोजन घालतात सर्व साधारणपणे कुटुंबाच्या जावयाकडे वाढण्याचे काम असते

सध्याकाळी वधूला आणण्यासाठी वाजतगाजत मिरवणूक निघते यात बहुतेक वेळा वराचा समावेश नसतो मिरवणूक वधूगृही पोचल्यावर काही वेळाने वराची वडीलधारी नातेवाईक मंडळी वगळून बाकीची माणसे परत येतात

यानंतर वधूगृही देवतापूजन भोजन, वधूला आहेर देणे, इ कार्यक्रम पार पडतात वधूला नव्या वस्त्राबरोबर दोन तोळे



नेवार जोडपे

सोने, आठ तोळे चांदी, एक मोठी लाकडी पेटी व चरखा या वस्तू देतात मग वधू सर्वांना सुपाऱ्या देऊन त्यांचा निरोप घेते वधूपिता तिला डोलीत बसवतो नंतर मिरवणूक सुरू होते ती वरगृही आल्यावर वधू वर अग्निस्थंडिलापुढे बसून हवन करतात व कुलदेवतांची पूजा करतात नंतर ती दोघे एकाच पानात भोजन करतात लग्नातला हा महत्त्वाचा विधी असतो त्यानंतर

वधू वर ग्रामदेवतेला नमस्कार करायला जातात त्या वेळी वदर किंवा बकरा बळी देतात त्यानंतर वधू वराना पति पत्नी म्हणून मान्यता मिळते

नेवाराच्या लग्नविधीत वराचे स्थान गौण असते त्याच्या लग्नात जेवणावळीवर फार खर्च होतो म्हणून नेवारानी अलि कडे स्वयंवर पद्धतीचा स्वीकार केला आहे या पद्धतीत वधू–वर गणेशाच्या मदिरात जातात आणि तिथे वधूने वराच्या गळ्यात माळ घातल्यावर विवाहविधी पुरा होतो

तिसरा प्रकार म्हणजे मुलगा मुलीला घेऊन पळून जातो आणि चार दिवस तिला लपवून ठेवतो चार दिवसानतर ती दोघे प्रकट होतात आणि मग त्याना पति–पत्नी म्हणून कायदेशीर मान्यता मिळते गरीब लोकात ही पद्धत अधिक प्रचारात आहे

कायदेशीर घटस्फोटाशिवाय, स्त्री आपल्या प्रियकराबरोबर पळून गेली, म्हणजेही घटस्फोट मिळतो त्याबद्दल तिला आपल्या पतीला नुकसानभरपाई द्यावी लागते, पण तिचे स्त्रीधन मात्र तिलाच मिळते अशा वेळी तिची मुले बापाकडेच राहतात पुरुषाला जेव्हा घटस्फोट घ्यावयाचा असेल, तेव्हा तो बायकोला माहरी पाठवून देतो आणि तिला परत बोलावीतच नाही त्यामुळे तिला सासरी येता येत नाही व त्यामुळे ती आपोआपच घटस्फोट घ्यायला तयार होते

काही वेळा नवरा चागला वागवीत नसला, तर स्त्री एक निर्वाणीचा उपाय करते, तो असा – पतीवरील आपले प्रेम व्यक्त करण्यासाठी ती श्रावण किंवा कार्तिक महिन्यात आदि नाथ, पशुपती, इ प्रसिद्ध मदिरांत जाऊन उपवास करते या काळात ती रोज फक्त तीन ओंजळी पाणी पिते आणि जमिनी वर झोपते सहाव्या दिवशी तिचा पती येऊन तिला मिरव णुकीने घेऊन जातो आणि नातेवाइकाना मोठी मेजवानी देतो पती न आल्यास तिचे आईबाप तिला मिरवत आपल्या घरी नेतात आणि लोकाना मेजवानी देतात त्यानतर त्या स्त्रीला दुसऱ्या कोणत्याही पुरुषाबरोबर लग्न करता येते

**प्रसूतिप्रथा** – सर्वसाधारण स्त्रियांप्रमाणे नेवार स्त्रीलाही आपल्याला मूल व्हावे अशी इच्छा असते आणि लग्नानतर बरेच दिवस मूल न होता गेले, तर ती त्यासाठी व्रतवकल्ये सुरू करते मगळवारी गणपतीची पूजा करून उपवास करण आणि महिन्यातले पहिले अकरा दिवस रोज सत्यनारायण करणे ही दोन व्रते नेवारानी त्यासाठी फलदायी मानलेली आहेत या व्रतातील पूजेचा प्रसाद पतीने खायचा असतो याशिवाय अशा बायका अनेक ग्रामदेवतानाही भजतात

स्त्रीची प्रसूती नेहमी तिच्या सासरीच होते, माहेरी नाही प्रसूतीपूर्वी काही दिवस तिच्या माहेरच्या स्त्रिया तिच्या घरी जाऊन तिला पोटभर दहीपोहे खायला देतात तसे न केल्यास मूल जन्माला यायचेच नाकारत किंवा ते अधाशी बनत, अशी त्याची समजूत आहे या समारभानतर माहेरचे कोणीही लोक ती प्रसूत झाल्याशिवाय तिला भेटत नाहीत

सुइणीला आजी असे म्हणतात मूल जन्मल्यानतर आजीमा या देवीची पूजा करण्याचे काम तिच्याकडे असते

मूल जन्माला आल्याबरोबर ती बातमी त्याच्या मामाकडे एका माणसाकरवी कळवतात मुलगा झाल्यास सबध सुपारी आणि गुळाची सबध ढेप आणि मुलगी झाल्यास अर्धी सुपारी आणि अर्धी ढेप मामाकडे पाठवतात मामा त्या निरोप्याला मेजवानी देतो आणि त्याने आणलेल्या थैल्यात तवढीच भर घालून ते त्याच्याबरोबर परत पाठवतो

मुलाच्या जन्माबरोबर त्याच्या नातेवाइकाना सुवेर लागू होत नाही, तर तो नाळ कापल्यापासून लागू होतो सर्व साधारणपणे मूल जन्मल्यावरोबर किंवा चौथ्या दिवशी नाळ कापतात पण त्या दिवसात नातेवाइकाच्या घरी काही सण–उत्सव असल्यास, तो पार पडल्यावर मग मुलाची नाळ काप तात कसाई जातीची स्त्री नाळ कापते आणि ती भात, उकड लेले अडे, लाह्या काळे वाटाणे थोडे रेड्याचे मास, इ पदार्थां सह एका मडक्यात घालून गावातल्या छवासा नामक अमगल वस्तू टाकण्याच्या ठिकाणी ठेवून देते

प्रसूतीनतर दोन–तीन दिवसानी मुलाच्या मामाकडील स्त्रिया बाळतिणीला भेटायला येतात आणि नवजात शिशूला काही नाणी देतात मुलाला दिली त्याच्या निम्मी नाणी त्याच्या आईला देतात मुलाची रक्कम सुइणीला मिळते या मामा कडच्या लोकाना त्या दिवशी त्या घरी मेजवानी मिळते दुसऱ्या दिवशी त्या स्त्रिया पुन्हा बाळतिणीसाठी पोहे, रेड्याचे मास, तादळाची दारू आणि मद्य घेऊन येतात

सुवेर सर्वसाधारणपणे पहिल्या मुलाच्या वेळी सहाव्या दिवशी आणि नतरच्या वेळी चौथ्या दिवशी सपतो त्या दिवशीच्या विधीला लागणारे सर्व सामान मामाने द्यायचे असते नवजात शिशूसाठी एक टोपी, सदरा, सोन्याची व चादीची एकेक अगठी, मोहरीचे तेल, नेपाळी अर्धा रुपया, पाढरे व पिवळे कापड एक काळया मोहरीच्या दाण्याची व एक कापसाची उशी, चटई, मुलाच्या आईला साडीचोळी, शाल व चटई आणि जेवणावळीचे सामान, रेड्याचे मस्तक, पूजा साहित्य, फळे, इ वस्तू घेऊन मामाकडचा एक माणूस येतो तो परत जाताना मामासाठी मीठ घेऊन जातो पहिल्या मुलाच्या वेळीच मामाने या वस्तू पाठवायच्या असतात

सुनेर सपायच्या दिवशी पति–पत्नीना शेजारी बसवतात मुलाला नटवून प्रथम आईच्या मांडीवर ठेवतात मग सुईण त्याला तिथून उचलून पित्याच्या मांडीवर ठेवते या कृतीने मुलाचे पितृत्व स्त्रीच्या पतीकडे आहे, असे मान्य केले जाते नंतर पुन्हा एकदा सुईण आजीमाची पूजा करते व त्यानंतर नातेवाइकांना मेजवानी होते

एक्वीरा दिवसानंतर मुलीचे आईवडील तिच्यासाठी एक डोली पाठवतात आणि तिच्यात बसून ती माहेरी जाते त्या वेळी डोलीच्या मागे मूल हातात घेऊन ज्याए स्त्री चालत जाते

**देवधर्म** – बुद्धमार्गी नेवार आदिबुद्धाला भजतात ते त्याला स्वयमू म्हणतात आणि ज्वालेच्या रूपात त्याची पूजा करतात याशिवाय अमिताभ, पद्मपाणी, शाक्यसिंह व मंजुश्री याबरोबरच ते ब्रह्मा, विष्णू व महेश यानाही भजतात हिंदू नेवार शिवाला सर्वश्रेष्ठ देव मानतात त्यामुळेच त्याना शिवमार्गी असे नाव मिळाले आहे नेपाळातील पशुपतीचे मंदिर हे त्याना अत्यंत पवित्र स्थान वाटते कोटेश्वर येथील महादेवाचे मंदिरही प्रसिद्ध आहे याशिवाय ते विष्णू, कृष्ण, गणेश, आकाशभैरव, कालभैरव, बाघभैरव इ भैरव, तसेच सरस्वती, लक्ष्मी, पार्वती, दुर्गा, तुळजा व काही ग्रामदेवता याना भजतात

नेवार लोक कुमारी म्हणून एका मुलीची पूजा करतात प्रत्येक वसाहतीत, जिच्या अंगावर एसलेही डाग किंवा व्रण नाहीत, अशी एक मुलगी निवडतात आणि कालीचे सजीव रूप म्हणून तिची पूजा करतात प्रत्येक घरगुती समारंभापूर्वी तिची पूजा केली जाते याशिवाय सर्व राज्याची म्हणून एक कुमारी असते ही राज्यकुमारी वज्र जातीतून निवडतात नवरात्रातील नवमीच्या रात्री तिला एकटीलाच एका खोलीत ठेवतात त्या खोलीत बळी दिलेल्या रेड्याची शेकडो शिरे ठेवलेली असतात त्यावरून मग तिला चालायला सांगतात तिला जर भीती वाटली नाही तर ती कुमारी व्हायला योग्य समजतात या कुमारीला उद्देशून दरवर्षी एक उत्सव करतात त्या वेळी तिची रथातून मिरवणूक काढतात त्यानंतर नेपाळचा राजा तिला नमस्कार करायला येतो नेवाराची अशी श्रद्धा आहे, की नेपाळ खोऱ्यावर कुमारीची सत्ता आहे म्हणून राजाने दरवर्षी तिच्याकडून राज्य करण्याबद्दल आदेश घ्यायचा असतो नवरात्रात रोज तिची पूजा केली जाते कुमारी वयात येण्याच्या सुमारास, दुसऱ्या कुमारीची निवड करतात पहिल्या कुमारीला लग्न करता येते पण तिचा पती फार काळ जगत नाही, अशी समजूत असल्यामुळे तिच्याशी लग्न करायला कोणी तयार होत नाही

नवनाथापैकी मत्स्येंद्रनाथाला हे लोक फार मानतात तो पाऊस पाडतो आणि पिके चांगली पिकवितो, अशी त्याची समजूत आहे तो कधीही लोकाना उपाशी राहू देणार नाही, असेही त्याना वाटते याच्यात नाग व बेडूक याची पूजा प्रचलित आहे नागापकी कर्कोटकाला ते भजतात भाताची लावणी झाल्यावर नेवार शेतकरी शेतात जाऊन भात व नऊ प्रकारची कडधान्ये बेडकाना खाण्यासाठी ठेवतात यानंतर चार दिवस ते शेतात जात नाहीत बेडकाच्या ओरडण्यामुळेच पाऊस पडतो, अशी त्याची धारणा आहे कार्तिक वद्य चतुर्थीला कुत्र्याच्या गळ्यात माळा घालून आणि त्याच्या डोक्याला शेंदूर फासून त्याची पूजा करतात

**सण व उत्सव** – नेवार लोक उत्सवप्रिय आहेत दरवर्षी ते भैरवजत्रा, भैरवीजत्रा, पर्जन्योत्सव, गायजत्रा, व्रजजत्रा, इंद्रजत्रा,



आकाशभैरव– भैरवाचे एक रूप

कुमारीजत्रा, मच्छिंद्रजत्रा, नारायणजत्रा, गणेशजत्रा, इ अनेक जत्रा भरवतात त्या वेळी सर्वसाधारणपणे देवतेला पशुबळी, मद्य, तांदळाची दारू, इ पदार्थ अर्पण करतात व तिची रथातून मिरवणूक काढतात

**भैरव–भैरवीजत्रा** – भैरव व भैरवी या देवतांच्या नावाने चैत्र वद्य चतुर्दशीला एक उत्सव करतात त्या वेळी पुरुष

निरनिराळ्या देवतांचे मुखवटे घालून देवापुढे नाचतात त्यांपैकी चौघेजण देवाला बळी दिलेल्या रेड्याचे रक्त पितात आणि मग ते ओकून टाकतात ती ओकारी प्रसाद म्हणून गोळा केली जाते

पजयोत्सव – पोरे जातीचा एक पुरुष गावात झांज वाजवीत फिरतो आणि उत्सवाचा दिवस जाहीर करतो मग प्रत्येक घरातून काही पोहे आणि अर्धा रुपया वर्गणी म्हणून जमा करतात उत्सवाच्या दिवशी दुपारी गावातले सर्व पुरुष मुख्य चौकात जमतात आणि मिरवणुकीने वाजत गाजत मच्छिंद्रनाथाच्या देवळाकडे जायला निघतात वाटेत ते गणपतीच्या मंदिरात जातात आणि गणपतीची पूजा करून त्याला मेंढा किंवा बकरा बळी देतात मग ते पाच जथ्यात विभक्त होऊन पाच ग्रामदेवतांची पूजा करून परत एकत्र होतात आणि मच्छिंद्रनाथाच्या मंदिरात जाऊन त्याची पूजा करतात त्या वेळी त्याला एक सदरा अर्पण करतात मग सर्वजण त्याच्यावर पाणी शिंपडतात परततांना ती मिरवणूक एका तळ्यावर जाते या तळ्यात कर्कोटक नाग राहतो, अशी त्यांची श्रद्धा आहे बौद्ध पुरोहिताने त्याची पूजा केल्यावर सोने आणि चांदी यांच्या दोन नागप्रतिमा तळ्यात सोडतात हे नाग लगेच जिवंत होतात, अशी नेवारांची श्रद्धा आहे नंतर सगळे लोक ' महादेवा, पाऊस दे ' असे म्हणत निघतात गावात पोचल्यावर स्त्रिया गच्चीतून व माड्यांतून मिरवणुकीवर पाणी टाकतात लोकही उलट त्या स्त्रियांवर पाणी फेकतात संध्याकाळी मोठी मेजवानी होते

गायजत्रा – हा नेवारांचा एक खास उत्सव आहे भाद्रपद वद्य प्रतिपदेला तो होतो यामागची कल्पना अशी – ज्येष्ठ शु दशमीपासून यमाच्या राज्याचे दरवाजे बंद होतात त्यामुळे या काळात मरणाऱ्यांना स्वर्गात जाता येत नाही त्यावर उपाय म्हणून हा उत्सव असतो या गायजत्रेच्या दिवशी गाय आपल्या शिंगाने यमराज्याचा किंवा स्वर्गाचा एक दरवाजा उघडते, अशी त्यांची श्रद्धा आहे

ज्यांच्या घरात वरील काळात मृत्यू झाला आहे, असे लोक या दिवशी दोन लहान मुलांना गाईचे कागदी मुखवटे चढवतात आणि त्यांची पूजा करतात नंतर ती मुले तशाच इतर मुलांच्या मिरवणुकीत सामील होतात मिरवणुकीच्या पुढे वाद्ये वाजत असतात ज्यांच्या घरात मृत्यू झाला असेल, असे लोक या मुलांना उसाचे तुकडे, सत्री, इ फळे देतात मिरवणूक संपल्यावर मुखवटे उतरवून जवळच्या देवळात ठेवतात काही ठिकाणी सर्व गावकरी या मिरवणुकीत भाग घेतात स्थानपरत्वे या उत्सवात काही फरकही असतो

वज्रजत्रा – हा बुद्धमार्गी नेवारांचा उत्सव आहे सिद्धार्थाने घरादाराचा त्याग करून परिव्राजकदीक्षा घेतली, या घटनेच्या स्मरणार्थ श्रावण शु अष्टमी व भाद्रपद वद्य त्रयोदशी या दोन दिवशी हा उत्सव करतात या दिवशी लोक स्वयंभू आणि मच्छिंद्रनाथ यांच्या मंदिरात जाऊन त्यांचे दर्शन घेतात त्या दिवशी ते वज्र लोकांना भिक्षा घालतात व जेवणही देतात

इंद्रजत्रा– ही भाद्रपद शु द्वादशीला सुरू होते व ती चार दिवस चालते या जत्रेसंबंधी काही आख्यायिका प्रचलित आहेत, त्यातली एक अशी–

एकदा इंद्र अशोकाची फुले चोरीत असताना काठमांडू खोऱ्यातील लोकांनी त्याला पकडले व शिक्षा म्हणून त्याला जिवंत पुरले इंद्राची माता त्याला शोधीत तिथे आली आणि तिने आपल्या मुलाला सोडून देण्याविषयी तिथल्या राजाला विनविले आपल्या राज्यात असे काही घडले आहे, हे राजाला ठाऊकच नव्हते त्यामुळे झाल्या प्रकाराबद्दल त्याने पश्चात्ताप व्यक्त केला, इंद्राला मुक्त केले व त्याची थाटाने मिरवणूकही काढली तेव्हापासून नेपाळात इंद्रजत्रा सुरू झाली

इंद्रजत्रेचा संबंध भैरव आणि कुमारी यांच्याशीही मानलेला आहे इंद्रध्वज म्हणून एक लिंग ध्वजासहित वर उचलतात व एका साल वृक्षावर ठेवतात वृक्षाच्या मुळाशी इंद्राची मूर्ती असलेला एक लहान पिंजरा ठेवतात या वेळी देव–दैत्यांचे मुखवटे घालून लोक युद्धनृत्य करतात

कुमारीजत्रा – ही भाद्रपद पौर्णिमेला सुरू होते आणि दोन दिवस चालते जयप्रकाश मल्ल नामक काठमांडूच्या एका राजाने हा उत्सव सुरू केला, असे समजतात व त्यासंबंधी पुढील आख्यायिका सांगतात–

एकदा एका वज्र मुलीने आपल्या अंगात तुळजा देवीचा संचार झाल्याचे सांगितले, पण राजाला ते खोटे वाटले आणि त्याने त्या मुलीला कुटुंबियांसह शहरातून हाकलून दिले त्याच रात्री जयप्रकाशाच्या राणीच्याही अंगात त्या देवीचा संचार झाला तेव्हा राजा घाबरला मग त्याने त्या वज्र मुलीला देवी मानून तिची पूजा केली आणि तिच्या सन्मानार्थ वार्षिक जत्राही सुरू केली तेव्हापासून नेपाळात कुमारी म्हणून वज्र जातीतील मुलींचीच निवड होऊ लागली

मच्छिंद्रजत्रा – ही दोन महिने चालते आणि त्यात खूप लोक भाग घेतात शेवटच्या दिवशी वज्र पुरोहित मच्छिंद्राचा सदरा आपल्या हातात घेतो आणि तो जमावापुढे दर्शनासाठी धरतो मग त्याचे दर्शन घेण्यासाठी लोकांची झुंबड उडते त्यानंतर बंदुकीचे बार उडवले जातात

मर्तिकप्रथा – माणूस आसन्नमरण झाला, की वैद्य त्याच्या जवळ थांबतो एका जलपूर्ण भांड्यात तीन चांदीची नाणी टाकतात आणि त्या मरणोन्मुख माणसाचा थोरला मुलगा

त्यातील पाण्याची सततधार त्याच्या पायावर धरतो माणसाचा प्राण गेला, की वैद्य तसे जाहीर करतो नतर मताच्या भोवती तुपाचे दिवे लावून ठेवतात व सव नातवाइकाना मृत्यूची बातमी कळवतात प्रेत तिरडीवर ठेवण्यापूर्वी त्याचे तोड धुतात आणि त्याच्या कपाळावर शेंदूराचा टिळा लावतात नतर त्याची पत्रिका त्याच्या गळयात बाधतात प्रेत जाळण्यापूर्वी मृतात्म्याला पिंडदान करतात घरातील लग्न झालेली मुलगी त्याला तीन प्रदक्षिणा घालते आशौच दहा किंवा बारा दिवस पाळतात

सातव्या दिवशी एका मडक्यात थोडे दही पोहे घालून ते मृत्यू झालेल्या जागी ठेवतात असे न केल्यास मृताचे भूत त्या जागी येत राहते, अशी समजूत आहे नतर मताच्या और्ध्वदेहिकाचा अधिकारी स्मशानात जाऊन लाकडी शिडीची एक प्रतिकृती, नेढे नसलेली सुई व एक घोंगडी तिथे ठेवतो याचा उद्देश तो माणूस खरोखरीच मृत झाला असून, त्याच्या आत्म्याने पुन्हा त्या घरी येण्याचे कारण नाही, असे त्याला ठसवण्याचा असतो तेराव्या दिवशी मताचे श्राद्ध करतात [दि नेवास – श्री गोपालसिंह नेपाळी, १९६५, हिं वि को ]

**नेवासे** एक पुण्यक्षेत्र हे महाराष्ट्राच्या नगर जिल्ह्यात प्रवरेच्या काठी आहे इथे महालया व मोहिनीराज या नावाच्या देवतांचे मदिर आहे या देवताविषयी एक पौराणिक कथा सागतात, ती अशी–

पूर्वी हे स्थान क्षीरसागराच्या तीरावर होते देव–दत्यांनी मिळून या ठिकाणीच समुद्रमथन केले त्या मथनातून जे अमृत निघाले, ते असुराना फसवून देवाना वाटून देण्यासाठी विष्णूने मोहिनीरूप घेतले त्या वेळी राहू देववेष घेऊन चद्र सूर्यांच्या मध्ये जाऊन बसला त्याच्याही हातावर नकळत मोहिनीने अमृत घातले एवढयात तो देव नसून दैत्य आहे हे चद्र–सूर्यांनी तिच्या लक्षात आणून दिले मग तिने सुदर्शन चक्राच्या साहाय्याने राहूचा शिरच्छेद करायचे ठरवले पण मोहिनीरूपात तिला सुदर्शन चक्राचे आवाहन करता येत नव्हते विष्णुरूप प्रकट करावे, तर दैत्य खवळले असते व देव–दैत्यात मोठा संग्राम झाला असता म्हणून मोहिनीने अर्धे रूप विष्णूचे म्हणजे नराचे आणि अर्धे रूप नारीचे करून चक्र बोलावले व राहूचा शिरच्छेद केला पुढे ती त्या दोन्ही रूपात म्हणजे महालया व मोहिनीराज या रूपात नेवासे येथे वास्तव्य करून राहिली

राहूचा शिरच्छेद होत असता त्याच्या हातातले अमृत प्रवरेत पडले, अशी आख्यायिका असल्यामुळे नेवासे येथील प्रवरेला अमृतवाहिनी असे म्हणतात इथले तिचे पाणी तिच्या इतर ठिकाणच्या पाण्यापेक्षा गोड लागते, असे सागतात 'गोदा-स्नान आणि प्रवरापान' अशी एक म्हणच रूढ झाली आहे, ती त्यामुळेच

ब्रह्मदेवाच्या वरामुळे उन्मत्त झालेल्या तारकासुराने देवाना स्वर्गातून हाकलून दिले तेव्हा त्या सव निर्वासित देवाना विष्णूने या क्षेत्रात वसते केले, अशी कथा स्कद पुराणातगत महालयमाहात्म्यात आहे त्यात नेवाशाचा उल्लेख महालय आणि निधिनिवास या दोन नावानी आणि प्रवरेचा उल्लेख वरा व पापहरा या नावानी केला आहे मोठमोठया देवाचे वास्तव्य स्थान झाल्यामुळे या क्षेत्राला महालय असे नाव पडले आणि कुबेर या ठिकाणी आपले नवनिधी घेऊन वास्तव्याला आला, म्हणून त्याला निधिनिवास असे नाव मिळाले इथल्या जलप्रवाहाने या ठिकाणच्या अधिष्ठात्री देवतेची प्रार्थना केली, की 'तू माझे जल मधुर, शुद्ध आणि जीवनाला हितावह असे कर' त्यावरून या नदीला प्रवरा व पापहरा अशी नावे मिळाली निधिनिवास या नावाचीच पुढे निवास व नेवासे अशी रूपे झाली रामायणात या क्षेत्राचा शिवस्थान म्हणून उल्लेख आहे पूर्वी हा सव भाग शिवलिंगानी व्याप्त होता म्हणून भाविक वृत्तीचे लोक या क्षेत्रात पाऊल ठेवताच पादत्राणे हातात घेऊन चालत असत

अर्वाचीन कालात नेवाशाची प्रसिद्धी ज्ञानेश्वरीची जन्मभूमी म्हणून आहे इथे एका खाबापाशी टेकून ज्ञानेश्वरानी आपली ज्ञानेश्वरी निर्माण केली तो खाब आजही त्या ठिकाणी दाखवतात मोहिनीराजाचे मदिर भव्य असून, ते इ स १७७३ मध्ये सरदार चद्रचूड यानी बाधले चद्रचूड हे अहल्याबाई होळकर याचे दिवाण होते आणि नेवासे ही त्याना जहागीर मिळाली होती मदिर बाधण्यासाठी चार हजार कामगार चार वर्षे खपत होते, अशी नोद आहे या मदिराचा पाया प्रवरेच्या पाण्यात असून, त्याचे शिखर सुमारे सत्तर फूट उच आहे मदिराचे दोन भाग असून, आतल्या बाजूला उच्चासनावर पश्चिमाभिमुख देवाच्या मूर्ती आहेत मोहिनीराजाची



ज्ञानेश्वरी–स्तभ

अधनारी मूर्ती चतुर्भुज असून, तिच्या हातात शख, चक्र, गदा व अमृतकुपी या वस्तू आहेत पायाखाली राहू असून, शजारी लक्ष्मीची बैठी मूर्ती आहे मदिराचा बाहेरचा सभामडप अष्टकोना आहे

मोहिनीराजाची मोठी यात्रा माघ महिन्यात भरते माघ शु अष्टमीपासून चतुर्दशीपर्यंत इथे भागवत सप्ताह होतो माघी पौर्णिमेला कुलधर्म व गोंधळ होतो वद्य प्रतिपदेला देवाच्या पचरसी भोगमूर्तीची मिरवणूक काढतात मग ती मूर्ती देवस्थानाच्या पाकशाळेत नेऊन पचमीपर्यंत तिथेच ठेवतात या पाच दिवसात इथे मोठ्या प्रमाणावर अन्नसत्र चालू असते



मोहिनीराज व लक्ष्मी– नेवासे

फाल्गुन वद्य एकादशी ते अमावास्यापर्यंत ज्ञानेश्वरस्तभाची यात्रा असते त्या वेळी स्तभाला मुकुट घालतात या स्तभावर एक मदिर बाधलेले आहे, त्याला ज्ञानेश्वरमदिर असे म्हणतात या मदिराच्या मागे दुसरी एक लहान इमारत आहे पैठणहून आल्यावर ज्ञानेश्वरादी चार भावडे त्या जागी विसावली होती, असे सागतात

पुराणवस्तुसशोधनविभागातर्फे इ स १९५४ ते १९५६ या दोन वर्षांत या ठिकाणी उत्खनन झाले श्री शा भा देव आणि श्री साकलिया यानी त्यासबधी पुढील माहिती दिली आहे–

ज्ञानेश्वरमदिराच्या उत्तरेस अर्ध्या फर्लांगावर लाडमोड नामक एक टेकाड आहे ते उत्खननाचे ठिकाण होय त्या उत्खननाच्या अनुषगाने प्रवरा नदीच्या काठाच्या दरडीचीही तपासणी करण्यात आली नदीच्या काठावर प्राचीन अश्मयुगातील हातकुऱ्हाड, रापी, अशी अनेक प्रकारची निरनिराळ्या पद्धतीने घडवलेली दगडी हत्यारे सापडली ती हत्यारे खडकाच्या लगत वर असलेल्या अत्यत घट्ट व वज्रलेप झालेल्या वाळूच्या आणि दगडगोट्याच्या थरात सापडली याशिवाय सध्या अस्तित्वात नसलेल्या जनावराची काही हाडे व जबडे अशाही वस्तू मिळाल्या या जनावराच्या अस्तित्वाचा कालखड सनपूर्व दोन लक्ष वर्षे इतका प्राचीन असून, या कालातील मानव रानटी अवस्थेत होता व भटक्या अवस्थेत केवळ शिकारीवर निर्वाह करीत होता

याच्या वरच्या वालुकामय थरात यापेक्षा भिन्न पद्धतीची हत्यारे सापडली आहेत ती लहान असून, रगीत दगडाची बनवलेली आहेत त्याचा आकार पिंपळाच्या पानासारखा टोकदार व त्रिकोणी आहे आणि त्यातही रापी, लाब पाती असे विविध प्रकार आहेत ही हत्यारे बनवणाऱ्या लोकाचा काल सनपूर्व ५० हजार वर्षे इतका प्राचीन असावा

लाडमोड टेकाड आहे, त्या जागेवर ताम्रपाषाणयुगीन लोकानी सनपूर्व १५०० च्या आसपास वस्ती केली असावी पुढे त्याच्या अस्तित्वाचा लोप झाला आणि पुन्हा सातवाहनकालात या टेकाडावर विस्तृत प्रमाणावर वस्ती झाली सनपूर्व पहिले शतक ते इ स चे तिसरे शतक, या कालात नेवाशाची फार मोठ्या प्रमाणावर भरभराट झाली या काळात नेवाशाचा बाह्य जगताशी आणि विशेषत रोमन साम्राज्यातर्गत प्रदेशाशी सबध आला सर्वांत शेवटची वस्ती इ स च्या १४ – १५ व्या शतकात झाली

लाडमोडावरील उत्खननात जोरवे बनावटीची खापरे, उत्तरेकडील झिलईची खापरे, काळी व तांबडी खापरं, सातवाहन राजाची नाणी, रोमन खापरे, मध्यभागी निमुळता उचवटा असलेली ताब्याची थाळी, मातीचे अर्चनाकुड, सातवाहन



ताम्रपाषाणयुगातील हत्यारे– नेवासे

कालाच्या उत्तरार्धातील नाणी, झिलईची भांडी, नहुरंगी बांगड्या व चिनीमातीची खापर सापडली आहेत

या सर्व सामग्रीवरून नेवाशाचा सांस्कृतिक कालक्रम पुढील प्रमाणे लावण्यात आला आहे –

१ ताम्रपाषाण–कालखंड– सनपूर्व सुमारे १५०० त्यानंतर मानवी वस्तीत खंड पडला

२ सातवाहन–कालखंड (पूर्वार्ध) – सनपूर्व ३ रे शतक ते सनपूर्व १ ले शतक

३ सातवाहन–कालखंड (उत्तरार्ध) – सनपूर्व १ ले शतक ते इ स चे ३ रे शतक

४ मुसलमानी–कालखंड – इ स चे १४–१५ वे शतक

ताम्रपाषाणयुग – या कालात काळ्याभोर चिकणमातीच्या थरावर मानवाने वस्ती केली होती हे लोक जमीन करण्यासाठी चुन्याचा मुबलक वापर करीत होते ते भटके नसून एका ठिकाणी वस्ती करून राहत असावे स्थायिक झाल्यामुळे त्यांना साठवणीकरता हरत हच्या मडक्यांची जरुरी भासली असावी त्यांनी बनविलेल्या मडक्यांची तांबडी, घट्ट लेपावर



ताम्रपाषाणयुगातील हरणाची चित्रे असलेला वाडगा

काळ्या रंगात नक्षी काढलेली खापरे, तपकिरी रंगावर गडद काळ्या रंगात नक्षी काढलेली खापरे, गुळगुळीत अंगाची राखी रंगाची खापरे व हातबनावटीचे मोठे रांजण सापडले आहेत एका खापरावर कुत्र्याचे व दोन खापरावर एकामागून एक धावणाऱ्या हरणाचे हुबेहूब चित्रण केलेले आहे

राखी गुळगुळीत मडकी बहुधा लहान मुलांच्या दफनाकरता वापरलेली आहेत बहुतेक मृतकुंभ तोंडाला तोंड लावून जोडीने जमिनीवर आडवे ठेवलेले आढळले तर काही वेळा मृताच्या दफनासाठी एकच घट वापरलेला व त्यावर झाकण म्हणून मातीचा वाडगा ठेवलेला आढळला

त्या काळातील लोक गारगोटीची, दगडाची आणि तांबे व ब्राँझ या धातूची हत्यारे वापरीत त्यांत अनेक प्रकारची पाती, कुऱ्हाडी व छिन्नी ही हत्यारे आहेत

ताम्रपाषाणयुगाची संस्कृती नष्ट झाल्यावर लाखमोड टेकाडावर वस्ती फारशी नसावी व तिथे दाट झाडी माजली असावी, असे निरागहत थरावरून म्हणता येते

सातवाहन पूर्वार्ध – या कालातील लोकांची संस्कृती बऱ्याच प्रगत अवस्थेत असावी हे लोक घरे करून राहत असत ते



ताम्रपाषाणयुगातील मृतकुंभ– नेवासे

तीन ते चार इंच व्यासाचे वासे जमिनीत पुरून त्यावर कौलांची छपरे टाकीत ही कौले लोखंडी खिळ्यांनी पक्की बसवलेली असत कौले लांबट चौकोनी असत घराच्या जमिनी दोन प्रकारांनी करीत पहिला प्रकार म्हणजे चुना व कुटलेली अबाडी यांचे मिश्रण करून तो लगद्या जमिनीवर ओतणे व चोपून जमीन करणे दुसरा प्रकार काळा चिखल व चुना एकत्र भाजून जमीन बनवणे अशी जमीन फार टणक होते व भाजलेला पृष्ठभाग थोडा खडबडीत राहतो

घरे केवळ वासे व छप्पर यांची पडळीसारखी असावी याशिवाय विटांचे बांधलेले कूपही उघडकीला आलेले आहेत यांपैकी एकाची खोली साडेदहा फूट व व्यास पाच फूट आहे

या कालातील खापरांचे प्रकार, पोत, आकार व बनावटीचे तंत्र ताम्रपाषाणयुगीन खापरांपेक्षा भिन्न आहे या काळातील झिलईची मौर्यकालीन खापरे, काळी आणि तांबड्या रंगाची खापरे आणि रांजण सापडले आहेत तसेच सातवाहन कालातील काही नाणी आणि अकीक, जास्फर, कार्नेलियन, स्फटिक, काच, ओपल, हस्तिदंत इत्यादींच्या मण्यांचे अलंकार आणि दगडी पाटेवरवंटे मिळाले आहेत या कालातील लोक लोखंड वापरीत होते व ते लोहकामात कुशल होते

सातवाहन उत्तरार्ध – या कालात नेवाशाची आणखी प्रगती झालेली दिसते या कालात भारताबाहेरील देशांचा पैठणशी व्यापार जोरात चालू होता नेवासे पैठणच्या मार्गावरील एक प्रमुख ठिकाण असल्याने, या गावाशीही परदेशी व्यापाराशी

संबंध असावा या काळात विटांची घरे मोठ्या प्रमाणावर बांधली गेली याशिवाय, साठवण्याकरता विटांचे व भाजलेल्या मातीच्या गोल कड्यांचे कूपही बांधले गेले होते या कालातील अनेक प्रकारची खापरेही सापडली आहेत

नेवाशाशी आलेल्या पार्थियन संपर्काचे काही पुरावेही अव शेषरूपाने मिळाले असून, त्यात दळणाची तीन जाती, एक तांब्याची थाळी व एक अचनाकुंड यांचा समावेश आहे अचना कुंड मातीचे असून, ते लांबट चौकोनी आहे त्याला सात पायऱ्या असून, त्यात जलदेवतेची पूजा करण्याची कल्पना अभिप्रेत आहे

इ स चे तिसरे शतक व मुसलमान काल यामधील कालात लाडमोड टेकाडावर फारशी वस्ती नसावी

मुसलमानी कालखंड – या कालातील घरांची बांधणी ओबड धोबड होती खापरे सापडली आहेत, ती हलक्या दर्जाची आहेत या कालातील लोकांचा प्रमुख व्यवसाय म्हणजे काचेच्या बहुरंगी बांगड्या, अंगठ्या व मणी तयार करणे, हा होता बांगड्या करण्याची एक घरातली भट्टी इथे सापडली आहे काचेचे मणी व बहुरंगी बांगड्या पुष्कळ सापडल्या आहेत एकंदरीत या कालखंडात पूर्वीचे वैभव नाहीसे झाल्याचे दिसते [ श्री र रा देशपांडे – ज्ञानेश्वर २० फेब्रु १९५२, श्री दा ना यावरे – पुरुषार्थ, जून जुलै १९६३, श्री ह धी सांकलिया व श्री शा मा देव– पुणे विद्यापीठपत्रिका ज्ञानखंड, १९५६ ]

## नेष्टा

सोमयागात आवश्यक असणाऱ्या सोळा ऋत्विजांपैकी एक अध्वर्युगणामध्ये याचे तिसरे स्थान आहे सोम कुटण्याच्या कामी हा अध्वर्यूला मदत करतो यज्ञ चालू झाल्या-पासून संपेपर्यंत ज्या ज्या वेळी यज्ञकर्मात यजमानपत्नीची आवश्यकता लागेल, त्या त्या वेळी तिला पत्नीशाळेतून बोलावून आणणे आणि तिला स्वस्थानी परत नेऊन पोचवणे, हे कामही याचेच असते त्यासाठी अध्वर्यू याला वेळोवेळी 'नेष्ट पत्नी मुदाय' असा प्रैष देत असतो काही वेळा, त्याला याज्याही म्हणाव्या लागतात सोमपानासाठी याचा स्वतंत्र चमस असतो [ श्री विद्याधरशास्त्री भिडे ]

## नेहरू, पं जवाहरलाल

(१८८९ – १९६४ इ स ) भारतीय स्वातंत्र्यसंग्रामाचे अग्रगण्य सेनानी, स्वतंत्र भारताचे पहिले पंतप्रधान आणि जागतिक कीर्तीचे थोर विचारवंत

**पूर्ववृत्त –** नेहरूंचे घराणे काश्मिरी पंडितांचे औरंगजेबाच्या मृत्यूनंतर त्यांचा एक पूर्वज दिल्लीला येऊन स्थायिक झाला तिथे तत्कालीन मोगल बादशहा फरुखसिअर याने त्याला थोडी



जहागिरी दिली त्या आधी त्या घराण्याचे आडनाव राजकौल असे होते, परंतु दिल्लीला त्यांचा हा पूर्वज एका कालव्याच्या काठी राहिला होता पर्शियन भाषेत कालव्याला नहर



जवाहरलाल– वय ५ वर्षे

म्हणतात या नहरच्या सान्निध्यामुळे त्याला लोक नेहरू म्हणू लागले आणि तेच पुढे त्या घराण्याचे आडनाव झाले इ स १८५७च्या स्वातंत्र्य-संग्रामाच्या वेळी जवाहरलालांचे आजोबा पंडित गंगाधर हे दिल्लीहून आग्र्याला गेले आणि तिथे जवाहरलालांच्या वडिलांचा– मोतीलालांचा जन्म झाला

मोतीलाल वयात आल्यावर अलाहाबाद येथे गंगाकाठी राहायला गेले ते अत्यंत देखणे आणि हुशार होते कानपूर व अलाहाबाद या शहरी त्यांचे शिक्षण झाले वकिलीच्या परीक्षेत ते सुवर्णपदक मिळवून प्रथम क्रमांकाने उत्तीर्ण झाले अलाहाबादच्या महाविद्यालयात असताना त्यांच्यावर तिथल्या इंग्रज प्राध्यापकांच्या आचारविचारांचा विलक्षण प्रभाव पडला व त्यांनी अंतर्बाह्य इंग्रजी वळण स्वीकारले कानपूर येथे वकिलीला प्रारंभ केल्यावर अल्पावधीतच यशस्वी व महत्त्वाकांक्षी वकील म्हणून त्यांचा लौकिक झाला सरस्वतीच्या बरोबरीने लक्ष्मीही आता नेहरूंच्या घरी पाणी भरू लागली

मोतीलालाच्या पत्नीचे नाव स्वरूपराणी असे होते लाहोरच्या एका ब्राह्मण कुटुंबात ती जन्मली मोतीलालाशी तिचे लग्न झाले, तेव्हा ती अवघी पंधरा वर्षांची होती

**जन्म व बालपण** – अशा सधन आणि संस्कारशील कुटुंबात १४ नोव्हेंबर १८८९ या दिवशी अलाहाबाद येथे जवाहरलालाचा जन्म झाला या वेळी नेहरू कुटुंबाचे वास्तव्य एका अरुंद गल्लीत होते जवाहरच्या जन्मानंतर अकरा वर्षांनी मोतीलालांनी आनंदभुवनात स्थलांतर केले आनंदभुवनाची ही वास्तू मूळ एका न्यायाधीशाची होती व तिची उभारणी रामायणकालातील भरद्वाज-आश्रमाच्या जागेवर झाली असल्याची लोकसमजूत होती मोतीलालांनी त्या वास्तूचे रूपांतर अद्ययावत सुखसोयींनी युक्त अशा राजमहालात केले

मोतीलालाचा स्वभाव हौशी आणि दिलदार होता ते उद्यानप्रिय होते, तसेच कुस्तीचेही शौकी होते त्यामुळे सर्वांना त्यांचा फार दरारा वाटे अत्यावश्यक अशा कोणत्याही गोष्टीची उणीव ते कुटुंबातल्या लोकांना भासू देत नसत त्याचप्रमाणे त्यांना चैनीची चटक लागू नये यासाठीही दक्षता घेत जवाहर तर त्यांचा लाडका मुलगा होता त्यामुळे त्याच्या मानसिक, शैक्षणिक आणि सांस्कृतिक विकासाकडे त्यांनी तत्परतेने लक्ष दिले ज्या वेळी व्यवसायमग्नतेमुळे जवाहरकडे लक्ष देणे त्यांना जमत नसे, त्या वेळी जवाहरची आई, काकू आणि त्याचे वृद्ध शिक्षक मुन्शी मुबारकअली ही मंडळी त्यांची उणीव भरून काढीत



आनंदभुवन– अलाहाबाद

आई आणि चुलती यांच्याकडून जवाहरला रामायण, महाभारत व पुराणे यांतील गोष्टी ऐकायला मिळाल्या, तर मुबारकअलीने त्याला अरेबियन नाईट्स मधल्या कथा सांगितल्या मोकळा वेळ मिळाला, की जवाहर बहुधा मुबारकअलीच्याच सहवासात असे प्रतिवर्षी जवाहरचा वाढदिवस साजरा केला जाई त्या वेळी सुवासिक उष्णोदकाने स्नान, उंची पोषाख, मिष्टान्नभोजन, खाद्यपदार्थांचा तुला, इ प्रकारे त्याचे खूप कोडकौतुक होई शिवाय आप्तेष्टांकडून आहेर व देणग्या मिळत, त्या निराळ्याच या सर्व प्रकारामुळे आपण कोणी राजपुत्र आहो, असा बालबुद्धीच्या जवाहरचा समज होऊ लागला परंतु वाढत्या वयाबरोबर त्याला योग्य ती जाण आली आणि तो त्या स्वप्नसृष्टीतून जागा झाला

**शिक्षण** – अकराव्या वर्षी जवाहरच्या इंग्रजी शिक्षणाला प्रारंभ झाला त्यासाठी मोतीलालांनी फर्डिनंड टी ब्रुक्स या ख्रिश्चन शिक्षकाची नेमणूक केली ब्रुक्स थिऑसॉफिस्ट होता त्याच्यामुळे जवाहरवरही त्या विचाराची छाप पडली ब्रुक्सने त्याला इंग्रजी शिकवले इंग्रजी वाचनाचे वेड लावले, तसेच ॲनी बेझंट या बाईचे व्याख्यान ऐकवून त्याला थिऑसफीची दीक्षाही देवविली आरंभी जवाहर त्या विचारांनी भारावला, परंतु जुनी थिऑसफिस्टांची सुखासीन राहणी व गूढ विचारसरणी यांचा त्याला उबग आला थोड्याच दिवसांनी त्याने थिऑसफीचा नाद सोडून दिला या काळात त्याने इंग्रजीबरोबरच संस्कृत व पर्शियन या भाषांचेही अध्ययन केले सतारवादन, गायन, इ अन्य कला यांतही त्याला रस वाटे ब्रुक्सने त्याला विज्ञानाची ही गोडी लावली होती ती वाढावी या हेतूने मोतीलालांनी त्याच्यासाठी आनंदभुवनात एक छोटीशी प्रयोगशाळाही निर्मिली होती

जवाहरने शालेय अभ्यासाव्यतिरिक्त अवांतर वाचनही खूप केले गीता–उपनिषदांच्या वाचनाने त्याच्या मनात अध्यात्मभावनेचा उदय झाला, त्याचप्रमाणे रशिया–जपानयुद्ध, बोअरयुद्ध या विषयावरील ग्रंथवाचनाने त्याच्या विचारांना वीरश्रीची झलक आली भारताचा इतिहास वाचल्यावर तर त्याच्या नसानसांतून देशभक्तीचा प्रवाह सळसळू लागला नेहरू आपल्या आत्मचरित्रात लिहितात–

राष्ट्राभिमानाच्या विचारांनी माझे अंतःकरण भरून येऊन हिंदुस्थान आणि आशियाखंड युरोपच्या दास्यशृंखलांतून कशी मुक्त होतील या विचाराचे चक्र माझ्या डोक्यात फिरू लागले

वीरोचित कामे मी करीत आहे, हातात तल्वार घेऊन मी हिंदुस्थानसाठी लढत आहे, त्याला मुक्त करीत आहे, अशी स्वप्ने मला पडू लागली

अर्थात अशा विचारांनी भारलेल्या नेहरूना त्या काळीही इंग्रजाचा द्वेष किंवा तिटकारा वाटत नसे त फक्त त्याच्या जुलमी राजवटीचे शत्रू होते जगामध्ये कोणीही कुणाला गुलामीत डाबून ठेवू नये, माडणे आणि वरे कुठे असू नयेत व सव



जवाहरलाल– बटुवेपात (१९०२)

समाज सुखाने नांदावा, अशी त्याची साधी विचारसरणी असे भावी आयुष्यात त्यांनी ज्या जागतिक शांततेचा परम ध्यास घेतला, त्याचा प्रथमांकुर एवढचा लहान वयात त्याच्या मनोभूमीत उमलला होता

वयाच्या तेराव्या वर्षी जवाहरलालचे उपनयन झाले

**उच्च शिक्षण** – इ स १९०५ सालच्या मे महिन्यांतर म्हणजे वयाच्या पधराव्या वर्षी जवाहर आपल्या कुटुंबियासह इंग्लडला गेला हॅरो येथील ब्रिटिश पब्लिक स्कूल हे उत्तम शिक्षणाचे केंद्र म्हणून तत्कालीन जगात फार गाजत होते जगातल्या बहुतेक राजेरजवाड्याची मुलं त्या सस्थेतच शिकत मोतीलालानी जवाहरला त्याच शाळेत घातले प्रथम काही दिवस जवाहरला तिथे गाधळल्यासारखे झाले, परतु पुढे लवकरच तो त्या वातावरणाला सरावला जवाहर त्या शाळेत असताना हिंदुस्थानातील कपुथळा व बडोदा या सस्थानाचे राजपुत्र तिथे शिकायला होते, परतु त्यापैकी कोणाशीही जवाहरची मत्री जमली नाही बाल्पणापासूनच तो थोडा एकलकोडघा वृत्तीचा होता आणि ती त्याची वृत्ती नियेही कमी झाली नाही त्या शाळेत असताना इतर मुलापेक्षा त्याचे लटिनचे ज्ञान कच्चे होते, परतु सामान्यज्ञानात मात्र तो इग्रज विद्यार्थ्यांनाही भारी होता मैदानी खेळातही त्याची विशेष गती होती अभ्यासाव्यतिरिक्त उरलेला वेळ तो पुस्तके व वत्तपत्रे याच्या वाचनात घालवी हॅरो येथील दोन वर्षांच्या वास्तव्यात त्याने सैनिकी शिक्षण घतले व गिर्यारोहणातही भाग घेतला विमानविद्येचा त्या वेळी नुकताच जन्म झाला होता जवाहरला त्या विद्येचे फार कुतूहल होते थोड्याच दिवसात मोठ्या हिकमतीने त्याने विमानातून भ्रमण करण्याची सधी साधली

अशा प्रकारे इग्लडमध्ये जवाहरच्या भावी जीवनाची सर्वागानी घडण चालू असतानाच भारतात क्रातीचे वारे वाहू लागले या क्रातीचा सिंहनाद दूरदवी राहिलेल्या त्याच्याही कानावर जाऊन आदळला याच वेळी त्याला ट्रॅव्हिलिन लिखित गॅरिबाल्डीचे चरित्र मिळाले या चरित्राच्या वाचनाने तर जवाहर पुरताच भारावून गेला नेहरू आपल्या आत्मचरित्रात लिहितात––

हिंदुस्थानात स्वातंत्र्यासाठी अशीच शौर्याची कृत्ये, शर्थीचे लढे चालले आहेत, अशी चित्र माझ्या डोळ्यापुढे उभी राहिली माझ्या डोक्यात हिंदुस्थान आणि इटली देश जणू काही एकजीव झाले होते

हिंदुस्थानात या वेळी स्वदेशी चळवळ जोरात होती जवाहरला स्वदेशीचे विचार मनोमन पटले होते आपला देश दारिद्र्यात आणि पारतंत्र्यात खितपत पडला असताना ज्यानी स्वदेशाला गुलाम बनविले त्यांच्याच देशात आपण शाही इतमामाने राहावे, हे शल्य त्याच्या मनाला सलू लागले त्याने आपली व्यथा मोतीलालांना कळवली याचा परिणाम एवढाच झाला, की मोतीलालानी इ स १९०७ साली त्याला केंब्रिज येथील ट्रिनिटी महाविद्यालयात पाठवले

केंब्रिजला गेल्यावर मात्र त्याला एकदम मोकळे मोकळे वाटले इथेही त्याच्या सहाध्यायांत तो एकदम चमकून उठला गोरापान सुंदर चेहरा, उंची पोषाख आणि सफाईदार इंग्रजी

भाषा, इ गुणविशेषामुळे तो तिथल्या लोकांना जणू एखादा राजपुत्र वाटू लागला नेहरूंच्या सबंध जीवनात इथला तीन वर्षांचा काळ हा अत्यंत सुखाचा, आनंदाचा आणि आरामाचा गेला त्या विद्यापीठात अनेक वादमंडळे होती भारतीय विद्यार्थ्यांचेही मजलिस नामक एक मंडळ होते, पण जवाहरने त्यात कधी भाग घेतला नाही शालेय आणि महाविद्यालयीन शिक्षणात जवाहरचे यश बेताचेच असे मात्र शॉ, वेल्स आइन्स्टाइन, हार्डी, फ्रॉईड, इ ज्ञानवंतांच्या विचारांचा मात्र त्याने या काळात चांगलाच अभ्यास केला ऑडन, वाल्टर, मरे, स्पेंडर, इलियट, कीटस, इ कवी त्याला अत्यंत प्रिय झाले तिथल्या अध्ययनकालात भारतीय देशभक्तांच्या आणि त्यांच्या अनेकदा भेटी होत, पण शिक्षण अपुरे सोडून स्वातंत्र्यलढ्यात उडी घ्यावी, असे मात्र त्याला कधी वाटले नाही

केंब्रिजच्या पदवीपरीक्षेनंतर जवाहरलाल दोन वर्षे इंग्लंडात राहिले १९१२ सालच्या ऑगस्टमध्ये त्यांनी बॅरिस्टरची परीक्षा दिली बॅरिस्टर झाल्यावर प्रथम देशसेवा की वकिली, असा एक पेच त्यांच्या पुढे पडला त्यात त्यांनी प्रथम वकिलीच करायची, असा निर्णय घेतला अलाहाबाद येथे त्यांनी आपल्या वकिलीला प्रारंभ केला परंतु दोन अडीच वर्षांच्या अवधीतच त्यांना त्या व्यवसायाचा कंटाळा आला त्यांची स्वातंत्र्योर्मी त्यांना बेचैन करू लागली, हे त्याचे कारण होय मग एके दिवशी त्यांनी आपली वकिली सोडून दिली

**राजकारणात पदार्पण** – इ स १९१२ सालच्या डिसेंबर महिन्यात बिहारमधील बांकिपूर या शहरी राष्ट्रीय सभेचे अधिवेशन भरले होते जवाहरलाल नेहरू या अधिवेशनाला एक सामान्य प्रतिनिधी म्हणून उपस्थित राहिले इथेच त्यांनी ना गोखल्यांचे भाषण ऐकले त्यांच्या शालीन व्यक्तिमत्त्वाने ते प्रभावित झाले म गांधींचे नावही त्यांनी प्रथम इथेच ऐकले इ स १९१६ सालच्या लखनौच्या राष्ट्रीय सभेला गेले असताना जवाहरलालांची म गांधींशी प्रथम भेट झाली त्या वेळी म गांधींनी नेहरूंना आपल्या प्रभावाखाली मारून टाकले

इ स १९१८ ते १९२० ही नेहरूंच्या जीवनातील सहा वर्षे राजकीय क्षेत्रात उमेदवारी करण्यात गेली इ स १९१५ साली वृत्तपत्रांची मुस्कटदाबी करणाऱ्या कायद्याचा धिक्कार करणारी एक सभा अलाहाबादेत भरली या सभेत नेहरूंनी आपल्या आयुष्यातले पहिले जाहीर भाषण केले त्यानंतर म गांधींनी कुप्रसिद्ध रौलट ॲक्टवर बहिष्कार घालण्याचा आदेश दिला या बहिष्कारापाठोपाठ सरकारची दडपशाही चालू झाली जवाहरलाल त्यामुळे प्रक्षुब्ध झाले त्यांनी त्या चळवळीत भाग घेऊन तुरुंगात जाण्याचे ठरविले पण अकारण तुरुंगभरती करण्याचे हे धोरण मोतीलालांना अमान्य होते यामुळे जवाहरलालांपुढे पेच निर्माण झाला या वेळच्या मानसिक संघर्षाचे वर्णन करताना नेहरू आपल्या आत्मचरित्रात लिहितात–

कित्येक दिवस मनाची ही तगमग चालू होती आमच्या जीवनाची उलथापालथ करून टाकणारा प्रचंड संगराम आपणापुढे उभा आहे, याची आम्हा दोघांनाही जाणीव असल्यामुळे आम्ही एकमेकांशी वागताना शक्य तितक्या सौजन्याने वागत होतो वडिलांचे दुःख शक्यतो कमी करावे अशी माझी इच्छा होती, पण सत्याग्रहाचा मार्ग हाच आता आपला मार्ग या विषयी मनात शंका राहिली नाही तो काळ दोघांनाही कष्टप्रद वाटला रात्रीमागून रात्री मी एकट्यानेच हिंडण्यात घालवल्या त्या वेळी मनाचे हाल होत मी चाचपडत मार्ग शोधीत होतो मला मागाहून कळले, की प्रत्यक्ष अनुभव असावा म्हणून



मोतीलाल व जवाहरलाल नेहरू

वडिलानी जमिनीवर निजूनही पाहिले त्याना वाटे, की तुरुगात मला जमिनीवर निजाव लागेल

यानतर मोतीलालानी म गाधींना अलाहाबादला बोलावून घेतले व त्याच्या द्वाराच जवाहरलालाची समजूत काढली अशा प्रकारे तो पिता–पुत्रातील सघर्ष सपला त्याच वेळी पजाब येथील जालियनवाला बागेत रौलट अक्टच्या निषेधाथ भरलेल्या सभेवर जनरल डायरने बेछूट आणि अमानुष गाळीबार केला जवळ जवळ चारशे माणसे या हत्याकाडात ठार झाली त्यामुळे सौम्य स्वभावी मोतीलालही सतप्त झाले या हत्याकाडाची चौकशी करण्यासाठी राष्ट्रीय सभेने जी समिती नेमली तीत श्रद्धानद, मोतीलाल, मालवीय आणि चित्तरजन दास हे प्रमुख सदस्य होते त्या समितीत जवाहरलालाचा समावेश चित्तरजन दासाचे मदतनीस म्हणून झाला होता

याच वेळी मोतीलालानी आपले नेमस्त विचारसरणीचे लीडर नामक नियतकालिक बद करून इडिपेंडट नावाचे दुसरे नियतकालिक चालू केले जवाहरलाल त्यात लिहू लागल्या मुळे त पत्र जहाल गणले जाऊ लागले पहिली दोन वर्षे हे वत्त पत्र फार जारात चालले, पण पुढे नेहरू पिता पुत्र एकाच वेळी तुरुगात गेल्यामुळे त कायमचे बद पडले या पत्राच्या अस्ता बरोबर नहरूची सपादकीय कारकीर्दही सपली

**विवाह** – मध्यतरी दिनाक ८ फेब्रुवारी १९१६ या दिवशी जवाहरलालाचा विवाह झाला त या वेळा सत्तावीस वर्षांचे होते, तर त्याची पत्नी कमला ही सोळा वर्षांची होती काश्मी रच्या कौल घराण्यात तिचा जन्म झाला होता कमलेचे शिक्षण बेताचेच झाले असले, तरी ती दिसायला मात्र खूप देखणी व नाजूक होती स्वभावानेही ती प्रेमळ अन लाघवी होती आपल्या पतीने राजकारणात पदार्पण केले, तेव्हा तिनेही त्याना विरोध न करता त्याची पुरती सहधर्मचारिणी बना यचे ठरविले विवाहोत्तर काही महिने जवाहर आणि कमला काश्मीरात जाऊन राहिले वर्षभरातच प्रियदर्शिनी इदिरा जन्मली यानतर जवाहरलालाची सरासरी अडीच–तीन वर्षे सुखाची गेली आणि १९२० सालापासून पुढचे जवळजवळ सगळेच आयुष्य सत्याग्रह, तुरुगवास, पतप्रधानपदाची जबाब दारी यासारख्या व्यापतापात गेले

**स्वातत्र्यसमराचे सेनानी** – इ स १९२० साली राजकार णाचे रणरगण चालू झाल्यावर नेहरू पितापुत्र अत्यत साधेपणे वागू लागले त्याच्या मागोमाग सगळ्या कुटुबानेच हे देश भक्तीचे वाण घेतले याच सुमारास प्रतापगढ भागातून आलेल्या २०० शेतकऱ्याच्या अडचणी निवारण्याचे काम जवाहरलाला कडे आले आणि त्यात त्यांनी कमालीचे यश मिळविले या नतर काही महिने त्यानी शेतकऱ्याच्याच प्रश्नाचा सामग्रचा अभ्यास केला व जागोजागी शेतकऱ्याना सघटित केले त्यानतर



जवाहरलाल व कमला नेहरू – विवाहप्रसगी

हे सघटित शेतकरी आणि खेडुत आपापल्या अडचणीची दाद मागण्यासाठी गावोगाव सभा भरवू लागले, मोर्चे काढू लागले व सत्याग्रहालाही सिद्ध झाले त्यामुळे सरकार चवताळले व त्याने दडपशाहीचा माग अवलबिला सरकारने शेतकऱ्याच्या सभावर लाठीमार व गोळीबार सुरू केले, शेतकऱ्याच्या नेत्यावर खटले भरले आणि त्याना सश्रम कारावासाच्या शिक्षाही दिल्या इ स १९२१ सालच्या जुल महिन्यात रायबरेली येथे जवाहर लाल अशाच एका शेतकऱ्याच्या मोर्चाचे नेतत्व करीत होते त्या वेळी पोलिसानी अचानक त्या मोर्चावर गोळीबार चालू केला पण जवाहरलालानी पूर्ण सयम राखून त्या मोर्चाचे नेतृत्व केले व शेतकऱ्याकडून कोणतीही अनुचित कृती होऊ दिली नाही अशा छोटचा छोटचा आदोलनातून जवाहर लालाना सामान्य माणसाच्या हालअपेष्टाची कल्पना आली व

त्याचे मन हळूहळू मोठ्या आन्दोलनासाठी तयार होऊ लागले
इ स १९२१ सालच्या अखेरीस प्रिन्स आफ वेल्स भारतात आले काँग्रेसने त्यांच्या स्वागतावर बहिष्कार घातला



प्रियदर्शिनी इंदिरा

त्यामुळे चिडून जाऊन सरकारने काँग्रेसच्या वरिष्ठ नेत्याना तुरुगात डाबले आणि त्यातून नेहरू पिता-पुत्रही सुटले नाहीत त्या उभयताना सहा सहा महिन्याची शिक्षा देऊन लखनौच्या तुरुगात धाडण्यात आले या सरकारी दडपशाहीने ती चळवळ थाबली तर नाहीच, उलट भडकतच गेली अवघ्या सहा महिन्यात तीस हजारावर लोक तुरुगात गेले

इ स १९२२ साली म गाधीनी देशाला अहिंसक सत्याग्रहाचा आदेश दिला ती चळवळ म गाधीच्याच नेतृत्वाखाली सुरू होणार होती पण त्याच वेळी चौरीचुरा नामक गावी सतप्त जनसमुदायाने पोलीसचौक्या जाळल्या व त्या जळितात १०–२० माणसे मृत्युमुखी पडली लोकाच्या या हिंसात्मक कृतीमुळे म गाधीना दु ख झाले व त्यानी अनपेक्षितपणे सत्याग्रहाची चळवळ थाबवली प नेहरूना या गोष्टीचा राग आला देशात कुठे थोडीफार हिंसा घडली म्हणून नियोजित चळवळ एकाएकी थाबवणे म्हणजे एक प्रकारचा भेकडपणाच होय, असे त्याचे मन पडले पण त्या वेळी ते तुरुगात असल्यामुळे त्याना काही करता आले नाही चळवळ थाबली तशी अचानक एक दिवस पुढा याची मुक्तताही झाली त्यात नेहरू पिता पुत्रही सुटले तुरुगाबाहेर येताच जवाहरलालानी स्वदेशी चळवळीत भाग घेतला आणि त्यामुळे अवघ्या दीडच महिन्यात त्याना पुनश्च पकडण्यात आले त्या वेळी याना पावणेदोन वर्षांची शिक्षा झाली परतु १९२३ सालच्या जानेवारीत सव राजबद्यासह तेही सुटले हीही सुटका त्यानी अल्पकाळच भोगली कारण तुरुगातून मुक्त होताच पजाबातील नाभा संस्थानात प्रवेशबदी जारी असताना त्यानी तिथे प्रवेश केला त्यामुळे त्याना पुनश्च दीड वर्षांची शिक्षा झाली या वेळी नेहरूना प्रथमच शृखलाबद्ध करण्यात आले पण ती शिक्षाही काही तरी कारणाने तत्काळ रद्द झाली

सभा भाषणे, मार्च, हरताळ, धरपकड, शिक्षा असे स्वातत्र्यसग्रामाचे चक्र फिरतच राहिले होते आणि प नेहरू त्यात सक्रिय भाग घेत होते तशातच मधून मधून त्याना काही मानसन्मानही प्राप्त होत राहिले प्रातिक काँग्रेसचे चिटणीसपद त्याना याच वेळी मिळाले याच काळात ते अलाहाबाद नगरपालिकेचे अध्यक्षही झाले दोन वर्षे हे पद भूषविल्यावर जवाहरलालानी आपल्या अधिकारपदाचे त्यागपत्र दिले व पूर्ण वेळ काँग्रेसच्या कामाला वाहून घेण्याचे ठरविले परतु या वेळी काँग्रेसमध्ये फार मोठ्या प्रमाणावर मतभेदाच्या आणि वादाच्या वावटळी उठल्या आणि त्याचा परिणाम दासबाबू, मोतीलाल, लजपतराय, इ नेत्यानी स्वराज्यपक्ष नामक नवा पक्ष स्थापण्यात झाला सरकारशी सहकार्य करून कौसिलात प्रवेश मिळवावा आणि सनदशीर मार्गाने स्वराज्याची मागणी करावी, असे या नव्या पक्षाचे धोरण होते परतु म गाधीनी मात्र आपले असहकाराचे धोरण सोडले नाही जवाहरलाल हेही त्याच्याच गोटात राहिले यामुळे पुनश्च नेहरू पिता–पुत्रामध्ये मतभेदाचे व सघर्षाचे ढग जमा झाले पण जवाहरलालानी या वेळी सयमाचे आणि सामोपचाराचे धोरण ठेवून पित्याशी होणारा वैचारिक झगडा टाळला

**देशाटन** – तशातच १९२५ साल उजाडले राष्ट्रीय सभेतील मतभेदानी पुनश्च एकदा उग्र रूप धारण केले म गाधीच्या चळवळीतही त्या वेळी काहीसे वैफल्य आणि शैथिल्य आले होते जवाहरलाल त्या सर्व प्रकाराला वैतागले होते त्याना थोडी स्वस्थता मिळाली तर हवी होती त्याची पत्नी कमला बरेच दिवस आजारी होती आणि या वेळी तिचा आजार बळावला होता त्यामुळे तिला हवापालट व्हावा

आणि आपल्यालाही थोडी शांतता मिळावी, या हेतूने १९२६ साली तिला घेऊन ते युरोपला गेले. त्यांच्या समवेत कन्या इंदिरा व अन्य काही कुटुंबीय मंडळीही होती. तिकडे गेल्यावर जिनीव्हा येथील मांटेना आरोग्यधामात त्यांनी आपला मुक्काम ठेवला. प्रारंभीचे काही महिने पत्नीच्या शुश्रूषेत घालविल्यानंतर जवाहरलाल फ्रान्स, जर्मनी, इंग्लंड, इ. राष्ट्रांना भेटी देऊन आले. या देशाटनाने त्यांना आंतरराष्ट्रीय राजकारणाची जशी ओळख झाली, तशीच समाजवादी तत्त्वज्ञानाचीही महती पटली. त्याच वेळी जगभर पसरलेल्या भारतीय शस्त्राचारी क्रांतिकारकांशी त्यांच्या भेटी झाल्या. जिनीव्हात शामजी कृष्णवर्मा, स्वित्झर्लंडमध्ये राजा महेंद्रप्रताप, पॅरिसमध्ये मादाम कामा, बर्लिनमध्ये चंपकरमण पिळ्ळै व बरकत उल्ला, इटलीत मौलवी ओबेदुल्ला, रशियात मानवेंद्र राय आणि अन्यत्र कुठे तरी वीरेंद्रनाथ चट्टोपाध्याय, इ. क्रांतिकारक नेत्यांशी त्यांनी प्रत्यक्ष संभाषण करून त्यांचे स्वातंत्र्ययुद्धविषयक दृष्टिकोन समजावून घेतले. परंतु त्यांच्या विचारांनी ते प्रभावित मात्र झाले नाहीत. क्रांतिकारकांप्रमाणेच त्यांनी रोमां रोलाँ, जर्मन कवी अर्नेस्ट टोलर यांसारख्या श्रेष्ठ साहित्यिकांच्याही भेटी घेतल्या. युरोपातल्या मजूर चळवळीनेही त्यांचे लक्ष वेधून घेतले व त्यामुळे त्यांनी तिचा बारकाईने अभ्यास केला.

इ. स. १९२७ च्या फेब्रुवारीत ब्रुसेल्स येथे पददलित राष्ट्रांच्या प्रतिनिधींची एक परिषद भरली. साम्राज्यशाही आणि भांडवलशाही यांविरुद्ध आवाज उठवणारे अनेक साम्यवादी व कामगार नेते या परिषदेला आले होते. भारतीय काँग्रेसचे प्रतिनिधी म्हणून जवाहरलालही तिथे गेले. या परिषदेत साम्यवादी विचारसरणीशी त्यांचा परिचय झाला. त्यातच १९२७ च्या नोव्हेंबरात रशियन राज्यक्रांतीच्या दहाव्या वर्धापनदिनानिमित्त सन्मान्य पाहुणे म्हणून जवाहरलालांना रशियन सरकारचे आमंत्रण आले. जवाहरलालांनी ते तत्काळ स्वीकारले आणि सर्व कुटुंबियांसह ते मास्कोला गेले. रशियन सरकारने 'भारतीय स्वातंत्र्यसमराचे सेनानी' म्हणून त्यांचे स्वागत केले. मास्कोच्या लाल चौकातील रशियन सैनिकांची क्वायत, क्रेमलिन राजवाड्याचा भव्य थाट, लेनिनची समाधी आणि रशियाची दिवसादिवसाने होत असलेली प्रगती, हे सारे पाहून जवाहरलाल भारावून गेले.

**भारतात परत** – अशा प्रकारे एक नवी आंतरराष्ट्रीय दृष्टी घेऊन आणि साम्यवादी विचारांनी प्रस्फुरित होऊन जवाहरलाल भारतात परतले. या वेळी मद्रास येथे काँग्रेसचे बेचाळिसावे अधिवेशन भरणार होते. जवाहरलाल तिचे सरचिटणीस होते. अधिवेशनात मांडल्या जाणाऱ्या ठरावाचा आराखडा तयार करण्याचे काम त्यांच्याकडे आले होते. तो आराखडा करताना साम्यवादाने भारलेल्या जवाहरलालांच्या लेखणीतून अत्यंत जहाल शब्द उतरले. पण म. गांधींना ती जहाल भाषा आवडली नाही. त्यांनी तो ठराव अत्यंत सौम्य करून मांडला. साहजिकच जवाहरलालांना म. गांधींचा राग आला, पण त्या रागाने फारसे वाईटवळण मात्र घेतले नाही. १९२८ साली संयुक्त प्रांत, गुजरातेतील बार्डोली, इ. ठिकाणी शेतकऱ्यांच्या प्रश्नांनी उग्र स्वरूप धारण केले. त्यातच राष्ट्रीय सभेने सायमन कमिशनवर बहिष्कार घालण्याचा आदेश दिल्यामुळे सर्वत्र असंतोषाचा आगडोंब उसळला. जवाहरलालांनी तो लोकक्षोभ अधिक जाज्वल्य करण्याचे काम हाती घेतले. ठिकठिकाणी प्रांतिक काँग्रेसची खास अधिवेशने घेत ते देशभर फिरले व सर्व सभांतून 'सायमन, गो बॅक' ही घोषणा त्यांनी दुमदुमवून टाकली. त्याच वेळी त्यांनी हिंदू–मुस्लिम ऐक्य व भारतीय राज्यघटनानिर्मिती या दोन गोष्टींसाठी नेमलेल्या सर्वपक्षीय समितीचे चिटणीस म्हणूनही काम केले. समितीने आपला अहवाल प्रसिद्ध केला व त्याच्या मान्यतेसाठी लखनौला सर्वपक्षीय परिषद बोलावली. त्या परिषदेत प्रथम संपूर्ण स्वातंत्र्याची मागणी करावी, असा जवाहरलाल व सुभाषचंद्र यांच्या तरुण गटाने हट्ट धरला. या मुद्यावर म. गांधी तटस्थ राहिले, तर मोतीलाल नाराज झाले. अखेर उभयपक्षी समझोता होऊन वसाहतीच्या स्वराज्याची मागणी करणारा ठराव संमत झाला.

यानंतर देशातील युवकांना संघटित करण्यासाठी जवाहरलालांनी सुभाषचंद्र बोस यांच्या सहकार्याने 'इंडिपेंडन्स फॉर इंडिया लीग' या पक्षाची स्थापना केली. दरम्यानच्या काळात लाहोर येथे सायमननिषेधप्रकरणी निघालेल्या मिरवणुकीवर लाठीमार झाला व तिच्या अग्रभागी असलेल्या लाला लजपतरायांवरही लाठीचा तडाखा बसला. त्या दुखण्यात लालाजी लवकरच मरण पावले. त्यामुळे देशभर प्रक्षोभाची मोठी लाट उसळली. त्यातूनच लाहोरकट व भगतसिंहादींची क्रांतिकृत्ये यांचा उद्‌भव झाला. मीरत येथील साम्यवादी क्रांतिकारकांची कृत्ये व मानवेंद्र रॉय यांच्यावरील खटला ही प्रकरणेही याच वेळी घडली. जवाहरलालांनी त्या सर्व प्रकरणांत फार बारकाईने लक्ष घातले व त्या देशभक्तांना शक्य ते सर्व साहाय्य केले. त्याच सुमारास लखनौ येथे निघालेल्या सायमनविरोधी मिरवणुकीत जवाहरलालांच्यावरही जोराचा लाठीमार झाला. त्यामुळे ते काही दिवस आजारी पडले, पण त्यातून लौकरच बरे झाले.

या वेळी नागपूर येथे अखिल भारतीय ट्रेड युनियन काँग्रेसचे अधिवेशन भरले त्याच्या अध्यक्षपदाची माळही नेहरूंच्याच गळ्यात पडली शेतकरी आणि कामकरी हे समाजाचे दोन मोठे आधारस्तंभ असल्याचे जवाहरलाल नेहमी सांगत त्यामुळे त्यांनी ही जबाबदारी आनंदाने स्वीकारली या अधिवेशनामुळे त्यांना कामगारांच्या अनेकविध अडचणी उमगल्या व त्यावर उपाययोजना करण्यासाठी त्यांना तत्काळ एक आराखडा तयार केला पण अशा कामासाठी ती वेळ योग्य नव्हती सरकार आणि जनता यांच्यातील संघर्ष विकोपाला गेला होता लाहोर कटातील जतींद्रनाथ हा क्रांतिकारक सरकारी वागणुकीच्या निषेधार्थ उपोषण करताना तुरुंगातच मरण पावला होता त्याच्या मरणाने खवळलेल्या अन्य क्रांतिकारकांनी पंजाब व बंगाल या प्रांतात सरकारची झोप उडवली होती, व्हाइसरॉयच्या गाडीवर बॉम्बगोळेही फेकले गेले होते

**संपूर्ण स्वातंत्र्याचा महामंत्र —** अशा क्रांतिकारक पार्श्वभूमीवरच एन थंडीच्या कडाक्यात काँग्रेसने चव्वेचाळिसावे अधिवेशन लाहोरला घेण्याचे ठरले या वेळी मावळते अध्यक्ष होते मोतीलाल आणि उगवते अध्यक्ष होते त्यांचे सुपुत्र जवाहरलाल पित्याने भूषविलेल्या पदावर त्याच्या पाठोपाठ पुत्राने आरूढ होणे अशी ती एक अभूतपूर्व आणि अविस्मरणीय घटना होती दिनांक ३१ डिसेंबर १९२९ या दिवशी रावीच्या तीरावर भरलेल्या या अधिवेशनात संपूर्ण स्वातंत्र्याचा उद्घोष करताना जवाहरलाल म्हणाले—

स्वातंत्र्य की वसाहतीचे स्वराज्य असल्या शब्दासाठी आता भांडण नको आम्हाला सत्ता हवी आहे खरी सत्ता म्हणजे सैन्य व तिजोरी यावर परकीयांचा ताबा नसणे ही होय या दोन सत्ताकेंद्रावर आपली नजर खिळली पाहिजे म्हणून आज आपण संपूर्ण स्वातंत्र्यासाठी सिद्ध होऊ या आता आजवे पुरते सर्व जगाला आम्ही जाहीर करीत आहोत, की यापुढे हिंदुस्थान पारतंत्र्यात राहण्यास तयार नाही

जवाहरलालाच्या या भाषणामुळे लाहोर अधिवेशनापासून संपूर्ण स्वातंत्र्य हे काँग्रेसचे ध्येय ठरले व ध्येयाच्या पूर्तीसाठी चळवळही अटळ झाली त्यानंतर कौन्सिल बहिष्कार, स्वदेशी, करबंदी आणि अहिंसामय प्रतिकार अशा चतुर्विध आयुधानिशी जनता स्वातंत्र्ययुद्धाला सज्ज झाली आणि तिचे सेनापतिपद जवाहरलालाच्याकडे आले दिनांक २६ जानेवारी १९३० हा स्वातंत्र्यदिन म्हणून निश्चित झाला नेहरू आणि जनता यांचे अतूट नाते रावीच्या साक्षीने या दिवशी जोडले गेले या दिवसापासून नेहरू जनतेच्या हृदयाचे सम्राट झाले आणि त्यांच्या 'आनंद भुवना'ला जनताराज्याच्या राजधानीचे स्वरूप प्राप्त झाले



प जवाहरलाल नेहरू— राष्ट्रीय सभेचे अध्यक्ष, १९२९

लाहोर अधिवेशन संपल्यावरोबर म गांधींनी सरकारपुढे स्वातंत्र्याच्या ध्येयाला अनुरूप अशा अकरा मागण्या मांडल्या, पण सरकारने त्या अमान्य केल्या त्यामुळे म गांधींनी कायदेभंगाचा लढा पुकारला त्यानंतर १९३० सालचा सुप्रसिद्ध मिठाचा सत्याग्रह सुरू झाला म गांधी दांडीयात्रेसाठी बाहेर पडले जबुसरला नेहरू पिता पुत्रांनी त्यांचे स्वागत केले जवाहरलालाची पत्नी कमला आणि भगिनी कृष्णा या युवतींनी या मिठाच्या सत्याग्रहात स्वयंसेविका म्हणून भाग घेतला खुद्द जवाहरलालांनीही अलाहाबाद येथे मीठ बनवले व 'मिठाचा कायदा तोडा' अशा आशयाची पत्रके वाटली

मीठसत्याग्रहापाठोपाठ दारूगुत्त्यावर निरोधने करण्याचा

वायव्रग पुढे आला जवाहरलालांनी त्यातही भाग घेतला त्यामुळे १४ एप्रिल १९३० रोजी रायपूरच्या एका परिषदेला निघाले असताना त्यांना अटक करण्यात आली, त्यांच्यावर खटला झाला व त्यात त्यांना सहा महिन्यांची सजा झाली त्यांना नैनीच्या तुरुंगात पाठविण्यात आले ५ मे १९३० रोजी म. गांधींनाही अटक झाली आणि त्यानंतर देशभर छापे, धाडस्या, अटका, शिक्षा, लाठीमार, अश्रुधूर, गोळीबार, याचे दमनचक्र फिरू लागले मुंबई येथे एका सभेच्या प्रसंगी मोतीलाल आपली पत्नी व सून यांच्यासह प्रक्षुब्ध जमावात सामील झाले पोलिसांनी लाठीहल्ला केला त्याचा प्रखर शब्दात निषेध करून लोकांना भडकवल्याबद्दल मोतीलालही पकडले गेले सहा महिन्यांची सजा देऊन त्यांनाही नैनीच्या तुरुंगात धाडण्यात आले अशा प्रकारे नेहरू पिता पुत्र एकत्र आले आपल्या कुटुंबियांनी या स्वातंत्र्याच्या लढ्यात केलेल्या कामगिरीविषयी जवाहरलाल लिहितात—

मिरवणुकी, लाठीहल्ले, गोळीबार, प्रमुख पुढाऱ्यांच्या अटकेनिमित्त अनेकदा पाळण्यात आलेले हरताळ, पेशावरदिन, गढवालदिन वगैरे रोमांचकारी बातम्यांची त्या काळी रेलचेल होती परदेशी व ब्रिटिश मालावर काही दिवस अगदा कडकडीत हरताळ पडला माझी वयोवृद्ध आई माझ्या बहिणी समवेत भर उन्हात निरोधनासाठी दुकानासमोर उभी राहत असल्याचे वृत्त मी ऐकले, तेव्हा माझे मन उचंबळून गेले कमला निरोधन करीत होतीच पण त्या व्यतिरिक्त आणखीही बरीच कामे ती उरकीत होती

यानंतर जवाहरलालांनी संयुक्त प्रांतातील करबंदीच्या चळवळीचे नेतृत्व केले त्यानिमित्त १९ ऑक्टोबर १९३० ला शेतकऱ्यांचा एक मेळावा भरविण्याचे ठरले, पण त्याच दिवशी सरकारने त्यांच्यावर भाषणबंदीची नोटीस बजावली जवाहरलालांनी ती बंदी मोडल्यामुळे त्यांना अटक होऊन दोन वर्षांची शिक्षा झाली या वार्तेने वृद्ध मोतीलालांच्यावर मोठाच आघात झाला त्यांनी लगोलग येणारा जवाहरलालांचा वाढदिवस राष्ट्रीय पातळीवर साजरा करण्याचा लोकांना आदेश दिला त्या दिवशी जवाहरलालांची आक्षिप्त भाषणे जागोजाग वाचली गेली त्यामुळे सरकार संतापले व पुनश्च दडपशाहीस प्रारंभ झाला

दि. १ जानेवारी १९३१ रोजी कमलेलाही पकडण्यात आले मोतीलालांनी ती वार्ता ऐकून हायच खाल्ली तातडीने ते जवाहरलालना भेटण्यासाठी नैनीच्या तुरुंगात गेले त्यांची मुद्रा पाहून जवाहरलालांच्या मनाला चरकाच बसला आपले तीर्थरूप मृत्यूच्या छायेखाली काळवंडत चालले आहेत, हे त्यांना त्या वेळी कळून चुकले सुदैवाने जानेवारीच्या २६ दिनांकाला गांधी व नेहरू अकल्पितपणे सुटले कारण सरकारने थोडे नमते घेण्याचे धोरण आखले होते

इ. स. १९३१ च्या कराची अधिवेशनानंतर जवाहरलाल आपल्या कुटुंबियांसह दक्षिणेच्या प्रवासाला गेले प्रवासाहून परत आल्यावर जवाहरलालांनी संयुक्त प्रांतातील शेतकऱ्यांच्या चळवळीला तीव्र स्वरूप दिले पाठोपाठ बंगाल, कर्नाटक, महाराष्ट्र या प्रदेशांतही त्यांनी दौरा काढला परंतु अलाहाबादला परतण्यापूर्वीच त्यांच्या लेखन, भाषण, संचार, इत्यादींवर बंदी घालण्यात आली जवाहरलालांनी ती मानली नाही व ते मुंबईवर निघाले परिणामी २६ डिसेंबर १९३१ च्या सकाळी त्यांना अटक झाली दिनांक ४ जानेवारी १९३२ ला खटला होऊन त्यांना दोन वर्षांची शिक्षा झाली गांधी पटेलांनाही त्याच दिवशी पकडण्यात आले जवळ जवळ एक लाख लोक तुरुंगात डांबले गेले त्यात कृष्णा व विजयालक्ष्मी या नेहरूंच्या दोन्ही बहिणी, मेहुणा रणजित पंडित आणि चुलत भाऊ ही मंडळीही होती ६ एप्रिल १९३२ पासून देशभर राष्ट्रीय सप्ताह पाळण्यात आला जवाहरलालांच्या मातेवर त्याच वेळी पोलिसांचा लाठीहल्ला झाला तिच्या मृत्यूच्या अफवेने तर चळवळीला हिंसात्मक वळण लागण्याची शक्यता निर्माण झाली प्रत्यक्ष जवाहरलालांनाही क्षणकाल सत्य अहिंसेचा वीट येऊन शस्त्राचारी मार्गाचा मोह झाला अखेर बरेली तुरुंगात त्यांची आणि मातेची भेट झाली तिची जखमी, जराजीर्ण काया पाहून जवाहरलाल फार दुःखी झाले

या वेळी नैनी, बरेली, देहरादून अशा निरनिराळ्या तुरुंगात त्यांना ठेवण्यात आले शेवटी ३० ऑगस्ट १९३३ या दिवशी ते मुक्त झाले परंतु पुढे दीडच वर्षात बिहार व कलकत्ता येथे राजद्रोही भाषणे केल्याच्या आरोपावरून त्यांना पुनश्च पकडण्यात आले आणि दोन वर्षांची शिक्षा देण्यात आली याही वेळी अलिपूर, देहरादून, नैनी, अल्मोरा अशा विविध तुरुंगातून त्यांच्या बदल्या करण्यात आल्या

सामान्यपणे कोणताही बंदी तुरुंगात स्वस्थचित्त व सुखी असत नाही जवाहरलालही त्याला अपवाद नव्हते तुरुंगातला सारा वेळ ते लेखन वाचनात घालवीत असले, तरी त्याही स्थितीत त्यांना दोन चिंता नेहमी ग्रासून असत एक पत्नीचा सतत वाढत जाणारा आजार आणि दुसरी स्वातंत्र्यचळवळीच्या चालत्या गाड्याला वारंवार खीळ घालणारी म. गांधींची उपोषणादी कृत्ये अनेक वेळा जवाहरलालांना म. गांधींचा कमालीचा संताप येई आणि म. गांधींना पूर्णपणे दूर करून सर्व चळवळीची सूत्रे आपल्या हाती घ्यावी, असेही त्यांना वाटे

अर्थात असे असले, तरी म. गांधींचे सर्वश्रेष्ठत्व आणि जनमानसावर असलेले प्रभुत्वही ते जाणून होते. त्यामुळेच म. गांधींच्या राजकारणाविषयी किरकोळ कुरकूर करण्यापलिकडे ते काही करू शकले नाहीत.

मध्यंतरी कमला एकाएकी अत्यवस्थ झाली. त्यामुळे अकराच दिवसांसाठी जवाहरलालांना मुक्त करण्यात आले. कमला या वेळी भोवाली कारागृहात होती. तिची वारंवार भेट घेणे सुलभ व्हावे, म्हणून सरकारने जवाहरलालांना अल्मोरा तुरुंगात नेऊन ठेवले. परंतु कमलेची प्रकृती अधिकच ढासळली. अशा स्थितीत तिला तुरुंगातच मृत्यू आला, तर लोकक्षोभाचा वणवा भडकेल, हे ओळखून सूत्र सरकारने तिची अचानक मुक्तता केली. इ. स. १९३५ सालच्या मे महिन्यात कमलेला स्वित्झर्लंड येथील बॅडेन विलर आरोग्यधामात पाठवण्यात आले. याच सुमारास जवाहरलालांची आईही मुर्छेला अर्धांगवायूने आजारी असल्याची वार्ता अल्मोरा तुरुंगात जवाहरलालांना मिळाली. या घटनांनी जवाहरलालांचे काळीज कातर झाले. आई आणि पत्नी या दोघींची शुश्रूषा करण्याऐवजी आपण असे बंदिखान्यात अडकून पडलेले, या गोष्टीचे त्यांना मनस्वी दुःख झाले.

इ. स. १९३५ सालच्या ऑगस्टमध्ये कमला अत्यवस्थ शय्येवर असल्याची वार्ता येऊन धडकली आणि सरकारने तातडीने जवाहरलालांची मुक्तता केली. तुरुंगातून बाहेर येताच ते तडक स्वित्झर्लंडला गेले. कमलेच्या त्या भेटीत ती आता फार दिवसांची सोबतीण उरली नाही, हे त्यांना कळून चुकले. नंतरचे चार सहा महिने ते कमलेच्या उशापायथ्याशी बसून राहिले. परंतु कोणत्याही उपायाचा उपयोग न होता दि. २८ फेब्रुवारी १९३६ या दिवशी पहाटे कमलेची जीवनज्योत मालवली. तिच्या निधनाने जवाहरलालांच्या कौटुंबिक जीवनाचा एक मोठा भाग अंतर्धान पावला आणि लहानगी इंदिरा पोरकी झाली.

इ. स. १९३६ सालच्या ११ मार्चला जवाहरलाल अलाहाबादला परतले. आल्याबरोबर लखनौच्या राष्ट्रीय सभेच्या अध्यक्षपदाची जबाबदारी त्यांच्या गळ्यात पडली. त्या वेळी भारताच्या राजकीय जीवनाचे चित्र हृदय विदीर्ण करणारे होते. राष्ट्रीय सभेत डावे उजवे, साम्यवादी समाजवादी, पुरोगामी-प्रतिगामी, राष्ट्रवादी जातिवादी, इ. अनेक गट पडले होते आणि त्यामुळे तिच्या अभेद्य तटाला भगदाडे पडू लागली होती. लोकमानसावर प्रचंड प्रभुत्व असणारे म. गांधीही या वेळी स्वस्थ बसले होते. जवाहरलालांना ही परिस्थिती अत्यंत धोक्याची वाटली. काँग्रेसमध्ये अशा गटबाजीने ठाण मांडले, तर देशाच्या स्वातंत्र्ययुद्धाचे अतोनात नुकसान होईल, या काळजीने ते ग्रस्त झाले. पण ते लढाऊ वृत्तीचे असल्यामुळे केवळ काळजी करीत बसले नाहीत. सर्वप्रथम त्यांनी देशातल्या समाजवादी तरुणांचे संघटन केले आणि त्यांच्या द्वारा काँग्रेसमधल्या प्रतिगामी शक्तींशी मुकाबला केला. अगदी प्रारंभीच त्यांना राजाजी, पटेल, राजेंद्रबाबू यांच्यासारख्या मातबर योद्ध्यांशी झगडण्याचा प्रसंग आला. पण हे धर्मयुद्ध ते यशस्वीपणे लढले. म. गांधींनीही जवाहरलालांची झेप आळखली. पण ते मुत्सद्दी होते. त्यांनी जवाहरलालांशी विशेष विवाद न करता दूरदृष्टीने फैजपूरच्या अधिवेशनाचे अध्यक्षपद त्यांना बहाल केले आणि नेतृत्वाची सूत्रे मात्र स्वतःच्या हाती सुरक्षित राखली.

याच सुमारास यूरोपात महायुद्धाचे वारे वाहू लागले होते, तर भारतात सार्वत्रिक निवडणुकांचे नगारे वाजू लागले होते. काँग्रेसचा निवडणूक जाहीरनामा म्हणजे तो केवळ जवाहरलालांचाच जाहीरनामा होता. अन्य सदस्यांच्या फक्त सूचना उपसूचना त्यात समाविष्ट होत्या. या निवडणुकांच्या निमित्ताने जवाहरलालांना देशभर दौरा करावा लागला. या संचारात त्यांनी बैलगाडीपासून विमानापर्यंत सर्व वाहनांचा वापर केला. इतकेच नव्हे, तर प्रसंगी पायी चालूनही सभास्थाने गाठली. अक्षरशः लाखालाखांच्या सभा त्यांनी गाजवून आणि गजवून सोडल्या. जवाहरलालांच्या या अफाट लोकप्रियतेने गांधीप्रभृती पुढारी, ब्रिटिश राज्यकर्ते आणि विरोधी पक्षांतील मातबर लोक हे सारे स्तिमित झाले. नेहरूंच्या या अपार परिश्रमामुळे सार्वत्रिक निवडणुकीत काँग्रेस बहुमताने विजयी झाली. एकूण अकरा प्रांतांत लोकप्रतिनिधींची सरकारे सत्तेवर आली.

यूरोपात या वेळी मोठेच थैमान चालले होते. हिटलरचा नाझीझम आणि मुसोलिनीचा फॅसिझम या दोन विखारी तत्त्वज्ञानांच्या रूपाने हुकूमशाहीचे एक जबरदस्त आक्रमण मानवी स्वातंत्र्याचा ग्रास करीत झपाट्याने पुढे येत होते. भारतासारख्या स्वातंत्र्याच्या उंबरठ्यात उभ्या असणाऱ्या अनेक नवागत राष्ट्रांना या संहारक तांडवाचा चांगलाच फटका बसण्याची शक्यता होती. म्हणूनच संघर्षकालीन यूरोपचे 'चक्षुर्वै सत्य' दर्शन घेण्यासाठी १९३८ च्या उत्तरार्धात प. नेहरू यूरोपकडे रवाना झाले. स्पेन, इंग्लंड, फ्रान्स, झेकोस्लोव्हाकिया, जिनिव्हा, कैरो, इ. विविध ठिकाणी जाऊन त्यांनी परिस्थितीचे साक्षात अवलोकन केले. झपाट्याने घडणाऱ्या या जागतिक संक्रमणाचा भारताच्या स्वातंत्र्यलढ्याच्या दृष्टीने काय लाभ घेता येईल, हाही विचार त्यांच्या या देशाटनामागे होता. प्रत्यक्ष परिस्थितीचे दर्शन आणि त्यावर केलेले चिंतन मनन यांच्या आधारे त्यांनी काही निष्कर्ष काढले व त्यानुसार स्वातंत्र्याच्या

लढ्याला वळण द्यायचे असे ठरवून ते भारताकडे परतले.

इ. स. १९३९ च्या सप्टेंबरात युरोपमध्ये दुसरे महायुद्ध सुरू झाले. हिटलरने पोलंडविरुद्धही युद्ध पुकारले, तरी शेवटी इंग्लंडही त्यात ओढले जाणार आणि मग युद्धसाहाय्यासाठी ते भारतालाही त्यात खेचणार, असा नेहरूंचा कयास होता. त्यासाठी भारताला संपूर्ण स्वातंत्र्य देण्याच्या अटीवर सरकारला साहाय्य करावे, असा प्रस्ताव काँग्रेसमध्ये मांडला व तो संमत करून घेतला. सरकारने स्वातंत्र्याची मागणी मानली तर



पं. नेहरू व म. गांधी

ठीकच, न पेक्षा देशव्यापी असहकाराची चळवळ उभारायची, हा त्यांच्या पुढचा पर्याय होता. परंतु सरकारने काँग्रेसचा हा डाव ओळखला आणि सक्तीच्या लष्कर भरतीला प्रारंभ केला. आता लढा अटळ होता. म. गांधींनी त्यासाठी प्रथम वैयक्तिक सत्याग्रहाची मोहीम हाती घेतली. प्रथम आचार्य विनोबा आणि पाठोपाठ जवाहरलाल यांनी तिच्यात भाग घेऊन चळवळीचा शुभारंभ केला. जवाहरलालांना चार वर्षांची शिक्षा झाली. त्यामुळे देशभर हरताळ पडला व तत्कालीन काँग्रेस मंत्रिमंडळांनी आपल्या अधिकाराची त्यागपत्रे देऊन असहकार पुकारला.

भारतात असे वादळ चालू असताना तिकडे युरोपातले युद्धही चांगलेच रंगले. जपानने तर ब्रह्मदेशापर्यंत मुसंडी मारून भारताच्या दारातच युद्ध आणून ठेवले. जपानच्या या दणक्यामुळे भारतातले इंग्रज सरकार हादरून गेले. मग त्याने काँग्रेसशी समझोता करायचे ठरवले. बाहेर युद्ध खेळत असताना अंतर्गत शांतता प्रस्थापित व्हावी, या हेतूने टाकलेले हे मुत्सद्दीपणाचे पाऊल होते. सलोख्याला प्रारंभ म्हणून जवाहरलालांची मुक्तता करण्यात आली. पाठोपाठ सत्तादानाच्या चर्चेसाठी क्रिप्सचे शिष्टमंडळ इंग्लंडमधून भारतात आले. काँग्रेसच्या वतीने जवाहरलाल या मंडळाशी बोलले. परंतु ऐन वेळी मुस्लिम लीगने पाकिस्तानाची मागणी पुढे आणली. सरकारने आतून त्या मागणीचा पाठपुरावा केला आणि मग काहीच निर्णय न होता, क्रिप्स मंडळ परत गेले. अशा प्रकारे सरकारची

शिष्टाई असफल झाली आणि लढाई अटळ ठरली

यानंतर भारताच्या स्वातंत्र्यलढ्यातील अंतिम पर्व सुरू झाले क्रिप्सशिष्टाई अयशस्वी झाल्यामुळे सरकार आणि जनता परस्परांवर खवळून गेली होती दो ही बाजूनी डावाप्रतिडावाची योजना चालू होती थोड्याच काळात ब्रिटिश सत्तेच्या उग्र दमनसत्राला प्रारंभ होणार असल्याची ही चिन्हे होती

७ ऑगस्ट १९४२ या दिवशी मुंबई येथे गोवालिया टँक च्या मैदानावर अंतिम लढ्याचा निर्णय घेण्यासाठी अखिल भारतीय काँग्रेसच्या महासमितीची बैठक भरली या बैठकीत इंग्रज सरकारला 'चले जाव 'चा आदेश देणारा क्रांतिकारक प्रस्ताव पुढे आला या प्रस्तावाची भाषा जवाहरलालाची होती आणि जवाहरलालच तो ९ ऑगस्टच्या खुल्या अधिवेशनात मांडणार होते परंतु सरकारने ९ ऑगस्टच्या पहाटेच गांधी, नेहरू, पटेल, इ वरिष्ठ नेत्यांची धरपकड केली सरकारच्या या कृतीचा लोकांवर अत्यंत विपरीत परिणाम झाला



प जवाहरलाल – १९४२

सेनापती पडलेल्या सैन्याने जसा दाही दिशांना मनसोक्त धिंगाणा घालावा, तशी जनता सुचेल त्या मार्गाने सरकारी दडपशाहीचा प्रतिकार करू लागली साहजिकच सर्वत्र रेल्वे पाडणे, तारायंत्रे तोडणे, सरकारी कार्यालये जाळणे किंवा त्यांचा विध्वंस करणे, बाँब उडवणे, इ प्रकारच्या घातपाती चळवळींना उधाण आले आणि त्यांच्या दमनार्थ सरकारने गोळीबार, लाठीमार, तुरुंगभरती यासारखे जालिम उपाय जारी केले जवळ जवळ वर्ष-दीड वर्ष हे आंदोलन चालू होते पुढे त्याला हळू हळू उतार पडत गेला सरकारनेही मग आपले उग्र दमनतंत्र आवरते घेतले व काही काळाने देशात शांतता प्रस्थापित झाली

इ स १९४५ सालाच्या मध्याला युरोपातले युद्ध संपले व त्यात दोस्त राष्ट्रे विजयी झाली अर्थातच भारतीय स्वातंत्र्याचा यक्षप्रश्न पुन्हा एकदा सरकारपुढे उभा राहिला परंतु आता सरकार अधिक शहाणे झाले होते दडपशाहीने हा प्रश्न सुटत नाही, हे आता ब्रिटिश नोकरशाहीला पुरते कळून चुकले होते त्याचप्रमाणे युरोपातल्या युद्धात ब्रिटनची 'जान' वाचली असली, तरी 'शान' लोपली होती मुजोरी आणि शिरजोरी करायला जे सामर्थ्य लागते, तेही आता अपुरे होते आणि जे उरले होते ते विश्वासू राहिले नव्हते अशा स्थितीत काँग्रेसच्या नेत्यांना बंधमुक्त करून त्यांच्याशी चर्चा करणे आणि या प्रश्नाची तड लावणे एवढाच एक मार्ग सरकारपुढे उरला होता

या नव्या सरकारी धोरणानुसार दि १५ जून १९४५ या दिवसापासून राष्ट्रीय नेत्यांच्या मुक्ततेला प्रारंभ झाला मुक्त होताच जवाहरलालांनी या नव्या धोरणाबद्दल सरकारला धन्यवाद दिले आणि युरोपच्या युद्धात इंग्लंड अमेरिकादी लोकशाहीनिष्ठ राष्ट्रांचा विजय झाल्याबद्दल समाधान व्यक्त केले अर्थात असे असले तरी प्रत्यक्ष स्वातंत्र्य प्राप्त होईपर्यंत काय काय अडचणी येतील त्याविषयी जवाहरलालांचे चित्त व्यग्रच होते पण एक गोष्ट त्यांनाही पटली होती, की आता पूर्वीचे चित्र पालटले आहे स्वातंत्र्याचा सूर्योदय झाला नसला, तरी

दिशा फाकत आहेत म्हणूनच ते अदम्य उत्साहाने पुनश्च कर्तव्याला सामोरे झाले



प नेहरू– नगरच्या बंदिवासात, १९४५

याच वेळी इंग्लंडमधे सार्वत्रिक निवडणुका झाल्या आणि भारतीय स्वातंत्र्याला अनुकूल असणारा ॲटलीचा मजूरपक्ष तिथे सत्तेवर आला त्यामुळे भारतीय स्वातंत्र्याच्या प्रश्नाला अधिकच गती मिळाली थोड्याच दिवसात व्हाइसरॉय लॉर्ड वेव्हल यानी काँग्रेसच्या आणि मुस्लीम लीगच्या नेत्याना चर्चेसाठी बोलावून घेतले परंतु लीगच्या नेत्यानी पाकिस्तान प्राप्तीशिवाय अन्य कोणत्याही योजनेला संमती देण्याचे नाकारले जवाहरलाल आणि जीना यानी सलोख्यासाठी लंडनचीही वारी केली, परंतु काही जमले नाही बॅ जीना पाकिस्तानसाठी तटूनच बसले या फोड झोडीला आणि द्विराष्ट्रवादाला गांधी व नेहरूंचा प्रारंभापासून विरोध होता म्हणूनच ते नेहमी मुस्लीम लीगला थोडे झुकते माप देऊन चुचकारीत असत पण जीना आता थोडक्या लाभावर संतोष मानणारे उरले नव्हते त्याना आता संपूर्ण भारतावर साम्राज्य गाजविण्याची महत्त्वाकांक्षा उत्पन्न झाली होती आणि सरकारही त्याना आतून प्रोत्साहन देत होते गांधी व नेहरूंना हे सगळे दिसत होते, परंतु त्याचे काही चालेनासे झाले होते अखेर बहुसंख्य मुस्लीम वस्तीचे प्रांत पाकिस्तान म्हणून तोडून द्याव व उवरित भूभागावर हिंदूचे राज्य राहावे, अशी योजना पुढे आली जवाहरलालाना हेही अमान्य होते, पण लॉर्ड मौटबॅटन यानी त्याची समजूत काढून त्याना ही योजना मानायला लावली या योजनेची अधिकृत घोषणा ३ जून १९४७ रोजी करण्यात आली या योजनेनुसार १९४८ सालापर्यंत इंग्रजाचे या देशावरचे आधिपत्य नष्ट होणार होते परंतु मुस्लीम लीगला तेवढाही दम नव्हता तिने त्यापूर्वीच सिंध, पंजाब, बंगाल या भागात सरसकट हिंदूची कत्तल आरंभली जवाहरलाल वगैरे राष्ट्रीय नेत्याना हे सगळे अनपेक्षित होते त्यामुळे लौकरात लौकर भारत व पाकिस्तान या राष्ट्राची निर्मिती व्हावी, अशी योजना पुढे मांडावी लागली व तिला अनुसरून १४ ऑगस्टला पाकिस्तान व १५ ऑगस्टला भारत अशी दोन राष्ट्रे निर्माण होऊन इंग्रजाच्या पारतंत्र्यातून हिंदुस्थान मुक्त झाला जवाहरलाल नेहरू स्वतंत्र भारताचे पहिले पंतप्रधान झाले पधरा ऑगस्ट १९४७ च्या रात्री लाल किल्ल्यावर स्वतंत्र भारताला उद्देशून जवाहरलाल म्हणाले –

आज मध्यरात्री सारे जग ज्या वेळी शात झोपलेले असेल त्या वेळी भारतात स्वातंत्र्याचा उदय होऊन भारताला नवे चैतन्य प्राप्त होईल दीर्घ काळपर्यंत दडपणाखाली राहिलेले राष्ट्र जागे करणारा आणि एका युगाचा अंत होऊन नवे युग सुरू करणारा असा दिवस राष्ट्राच्या इतिहासात क्वचितच उगवत असतो तो दिवस आता भारताच्या इतिहासात उगवणार आहे अशा या मंगलप्रसंगी भारताची, भारतीय जनतेची आणि त्याहूनही श्रेष्ठ अशा मानवतेची सेवा करण्याची आज आपण पुन्हा प्रतिज्ञा घेऊ या

जवाहरलाल या वेळी अठ्ठावन वर्षाचे होते खरे म्हणजे त्याने हे वय आता विश्रांतीचे होते, पण जवाहरलालाना तसे कधीच वाटले नाही अद्यापि ते मनाने तरुण होते त्याची प्रकृतीही सुदृढ होती म्हणून त्यानी देशविभाजनाचे आणि मागोमाग झालेल्या कत्तलीचे दुःख बाजूला सारून स्वतंत्र भारताच्या पंतप्रधानपदाची अवघड जबाबदारी लीलया स्वीकारली त्याच्यापुढे पहिला प्रश्न होता, पाकिस्तानातून हाकलल्या गेलेल्या लक्षावधी निर्वासिताच्या पुनर्वसनाचा स्वतःचे सर्वस्व गमावून बसलेली ती अभागी माणसे भिऊन भांबावून गेली होती त्याचे अश्रू पुसणे, त्याच्या जीवित–वित्ताची पुनर्मांडणी करणे आणि त्याना अभय देणे, हे जवाहरलालाच्या शासनाचे प्रथम कर्तव्य होते हे कर्तव्य त्यानी नेकीने आणि निष्ठेने पार पाडले साऱ्या भारताचाच या वेळी

एका वेगळ्या प्रकारे कायापालट घडत होता आणि या नव्या मनूचे प्रधान शिल्पकार होते जवाहरलाल नेहरू I परिस्थिती त्याना नवी नवी आव्हाने नेत होती आणि ते ती आव्हाने स्वीकारीत होते

स्वातंत्र्याच्या आगमनाबरोबरच अनेकविध संकटाची परंपराच या देशावर कोसळली त्यातले पहिले संकट होते, काश्मीरवरील पाकिस्तानी आक्रमणाचे स्वातंत्र्य देताना इंग्रज सरकारने सर्व संस्थानाना स्वायत्तता देऊन टाकली होती त्यामुळे काश्मीर संस्थान एखादे वेळी भारतात सामील होईल, अशा कल्पनेने ते तलवारीच्या जोरावर जिंकून घ्यावे हा पाकिस्तानचा डाव होता परतु जवाहरलालजीच्या शासनाने तो उधळून लावला काश्मीरच्या संस्थानी सेनेला भारतीय सेनेची साथ मिळाली आणि ते पाकिस्तानी आक्रमण मोडून काढले गेले स्वातंत्र्याच्या जन्मकालीच उद्भवलेल्या या संकटावर जवाहरलालानी केवळ युद्ध हा एकच उपाय केला नाही, तर हे प्रकरण संयुक्त राष्ट्रसभात माडून पाकिस्तानच्या अनूचे धिडवडे काढले काश्मीरची ही समस्या कशीबशी मार्गाला लावून जवाहरलाल मुक्त होतात, तोच म गाधींचा वध झाला जवाहरलाल त्यामुळे काही काळ हादरून गेले पण थोड्याच काळात त्यानी पुनश्च बळ बाधले आणि ते देशाच्या सामाजिक, आर्थिक, औद्योगिक समस्या सोडवण्याच्या मार्गाला लागले

हैद्राबाद आणि जुनागड या संस्थानाचे विलिनीकरण सुखासुखी होत नाही, असे दिसताच थोड्या नाखुशीने का होईना, पण नेहरूनी तिथे सैन्यलाचा वापर करायला परवानगी दिली या प्रकरणात कणखर निर्णय घेताना ते थोडे कचरत होते, पण गृहमंत्री सरदार वल्लभभाई हे त्याच्या मागे एखाद्या लोहपुरुषासारखे खबीरपणे उभे राहिले

यानतर दि २६ जानेवारी १९५० या दिवशी स्वतंत्र भारताचे सार्वभौम प्रजासत्ताक राज्य अस्तित्वात आले प्रजासत्ताकाची ही कल्पना साकार करण्यात मुख्य वाटा जवाहरलालाचा होता वयात आलेल्या प्रत्येक स्त्री-पुरुष व्यक्तीला मतदानाचा अधिकार देऊन, त्यांनी भारतात खऱ्याखुऱ्या लोकशाहीचा पाया तर घातलाच, शिवाय आपल्या पहिल्या मंत्रिमंडळात हिंदुसभेचे नेते डॉ मुखर्जी, हरिजनाचे नेते डॉ आबेडकर, इ काँग्रेसबाहेरच्या मातबर व्यक्तींना स्थान देऊन सर्वपक्षीय लोकशाहीचा एक अभिनव प्रयोग केला या प्रयोगाला फारसे यश मिळाले नाही हे खरे, पण त्यामुळे जवाहरलालजीच्या मूळ हेतूला बाध येत नाही

१५ ऑगस्ट १९४७ पासून २७ मे १९६४ पर्यंत, म्हणजे अगदी मृत्यूच्या अतिम क्षणापर्यंत जवाहरलाल नेहरूनी भारताचे पंतप्रधानपद भूषविले या सतरा वर्षांच्या काळात त्याना जसे अनेक आपत्तींना आणि दुर्धर समस्याना तोड द्याव लागले, तसेच राष्ट्रीय व आतरराष्ट्रीय मान स मानही त्यांना लाभले प्रधानमंत्रिपदावर येताच त्यानी आपल्या राष्ट्रीय आणि आतरराष्ट्रीय वागणुकीविषयी काही ध्येयधोरणे निश्चित करून टाकली आणि त्याला अनुसरूनच मृत्यूच्या घटकेपर्यंत त्यानी आपली पावले टाकली एवढ्या खडप्राय राष्ट्राची सर्वांगीण उन्नती करण्याची जबाबदारी त्यानी स्वीकारली होती या देशात असख्य धर्माचे, पथाचे, जातीजमातींचे आणि मत मतातराचे लोक राहतात त्यातल्या कोणाही एकाला न दुखवता, सर्वांना सारख्याच ममतेने बरोबर घेऊन जायचे आणि शातीने, सुखाने, समाधानाने त्याचे जीवन भरून टाकायचे, हे नेहरूचे एक रम्य स्वप्न होते सतरा वर्षांच्या त्याच्या शासनकाळात त्यांनी आपले तन मन या एकाच स्वप्नाच्या पूर्तीसाठी समर्पण केले दुर्दैवाने त्याना त्यात सपूर्ण यश प्राप्त झाले नाही, पण त्यामुळे त्याचा हेतू व त्याचे प्रयत्न अप्रामाणिक होते, असे मात्र म्हणता येणार नाही



शांतिदूत नेहरू

भारतीय जीवनात सुख समृद्धी यावी यासाठी त्यांनी बुद्धिवादाची आणि विज्ञाननिष्ठेची कास धरली सा या शेजारी

राष्ट्रांना प्रसन्न राखावे व त्यांच्याकडून मिळेल त्या सर्व प्रकारच्या साहाय्याला आपल्या प्रयत्नाची जोड देऊन स्वदेशाचा उत्कर्ष साधावा, असे त्यांचे साधे सरळ धोरण होते. यातूनच त्यांच्या सर्व वयशील परराष्ट्रनीतीचा उगम झाला. कोरिया, हंगेरी, तिबेट, इंडोचायना, लाओस, सुवेझ, क्यूबा, काश्मीर, भारतातील चिनी आक्रमण, इ. जागतिक युद्ध भडकवणाऱ्या प्रत्येक प्रश्नाच्या संदर्भात त्यांनी शांततामय सहजीवनाविषयीची धोरणे बऱ्याच प्रमाणात यशस्वी ठरली. तथापि जागतिक राजकारणाला त्यांनी दिलेली मोठी देणगी म्हणजे पंचशील ही होय. पंचशील ही प्रथम गौतमबुद्धाने दिलेली धार्मिक शिकवण होती. प. नेहरूंनी आंतरराष्ट्रीय सलोख्याच्या आणि सहकार्याच्या संबंधात तिचा पुनरुच्चार करून भारतीय परंपरेला अफलिपनपणे उजळा दिला.

या पंचशीलात पुढील तत्त्वांचा समावेश होतो–

१. सर्व राष्ट्रांनी एकमेकांचे सार्वभौमत्व मान्य करणे.

२. प्रत्येक राष्ट्राला स्वातंत्र्य व स्वायत्तता असणे.

३. कोणत्याही राष्ट्राने अन्य राष्ट्रावर आक्रमण न करता समानतेच्या भूमिकेवरून परस्परांचा मान राखणे.

४. कोणत्याही राष्ट्राने अन्य राष्ट्राच्या अंतर्गत कारभारात हस्तक्षेप न करणे.

५. शांततामय सहजीवनाला अनुकूल अशी मनोवृत्ती व परिस्थिती यांचा विकास करणे.

या पंचशीलासमवेतच त्यांनी तटस्थता, युद्धनिरोध, वाटाघाटी आणि शांततामय सहजीवन या चतुःसूत्रीचीही घोषणा केली.

स्वातंत्र्य मिळाल्यानंतर लगेच नेहरूंनी भारताच्या औद्योगीकरणावर भर दिला. मोठमोठ्या धरणांचे व कारखान्यांचे प्रकल्प पुरे करण्यासाठी त्यांनी पद्धतशीर योजना आखल्या. पंचवार्षिक योजना हे त्यांच्याच कल्पनेचे दृश्य स्वरूप होय. शेतीचा उत्कर्ष, जीवनावश्यक वस्तूंचे उत्पादन, साहित्य, संगीत–नृत्य–शिल्पादी कलांचे संगोपन आणि विकसन, इ. अनेक गोष्टींविषयी प्रसंगपरत्वे ते आपले विचार व्यक्त करीत आणि त्यातून त्या त्या विभागात काम करणाऱ्या मंडळींना मार्गदर्शन आणि स्फूर्ती मिळे. 'आराम हराम है' हा नवा तेजस्वी मंत्र त्यांनी देशाला दिला होता.

बेकारी, अज्ञान, अनीती, अनारोग्य, स्वार्थलोलुपता, दंभ, लाचलुचपत, वशिलेबाजी, फंदफितुरी, प्रांतीय आणि जातीय वृत्ती, आळस, अल्पसंतुष्टता, इ. असाध्य दुर्गुणांनी या देशाचा देह पोखरून काढला आहे. नेहरूंनी आपल्यापरीने या सर्वांवर उपाय शोधण्याचा आणि उपचार करण्याचा प्रयत्न केला. ते स्वतः दिवसाचे १८–१८ तास राबत. या सगळ्या धबडग्यात त्यांचे दुर्लक्ष झाले ते फक्त देशाच्या संरक्षणव्यवस्थेकडे. कोणत्याही देशाला सुखासमाधानाने जगायचे आणि स्वतःचा उत्कर्ष करून घ्यायचा तर त्याला स्वतःची समर्थ संरक्षणव्यवस्था निर्माण करावी लागते. तिच्याकडे कोणीही दुर्लक्ष करून चालत नाही. भारतासारख्या नवस्वतंत्र राष्ट्राच्या बाबतीत तर हे दुर्लक्ष धोकादायक ठरते. पण तसे ते घडले, हे खरे. शांततेसाठीही हिंदुस्थान सामर्थ्यसंपन्न हवा, हे साधे तत्त्व नेहरूंना कळले नसेल, असे कोण म्हणेल? पण चिनी व पाकिस्तानी राज्यकर्त्यांच्या बाबतीत त्यांचे सारे आडाखे चुकले. त्या या आपल्या शेजारी देशांच्या सद्भावनेवर विसंबले आणि त्यांनी प. नेहरूंच्या पंचशीलावर वज्राघात केला.



त्रिमूर्ती– प. नेहरूंचे दिल्लीतील निवासस्थान

प. नेहरूंना या गोष्टीचे अपार दुःख झाले. एरवी वाटेल त्या वाऱ्या–वादळाला हसतमुखाने तोंड देणारे नेहरू, चिनी आक्रमणाच्या संदर्भात मात्र मनाने खचले. स्वतःची अगतिकता बाहेर दाखविण्याचा त्यांचा स्वभाव नव्हता, पण चिनी राज्यकर्त्यांनी केलेला विश्वासघात त्यांच्या जिव्हारी झोंबला हे निश्चित! कारण त्यानंतर अवघ्या वर्ष–दीड वर्षातच त्यांची प्रकृती ढासळली आणि दि. २७ मे १९६४ रोजी दिल्ली येथे त्यांच्या त्रिमूर्ती नावाच्या बंगल्यात त्यांना मृत्यू आला. त्रिमूर्ती हे त्यांचे निवासस्थान आता एक राष्ट्रीय स्मारक मानले जाते.

प. नेहरूंच्या मृत्यूने भारताच्या इतिहासातील एका महान पर्वाची समाप्ती झाली. लो. टिळक, म. गांधी आणि प. नेहरू या तिघांच्या जीवनचरित्रांनी आधुनिक भारताचे एक क्रांतिकारक पर्व पुरे होते. वस्तुतः टिळक व गांधींच्या पाठोपाठ

पुढे सरसावून भारतासारख्या खंडप्राय राष्ट्राचे नेतृत्व करणे, ही सामान्य गोष्ट नव्हती. विशेषतः लोकमान्यांच्या ठायी असणारी दूरदृष्टी आणि महात्माजींजवळ असणारे सर्व समाजाला तत्काळ आकर्षित करणारे अलौकिक साधुत्व या दोन्ही गोष्टींचा त्या प्रमाणात अभाव असताना नेहरूंनी केलेले भारताचे नेतृत्व ही गोष्ट विशेष श्लाघनीय ठरते. नेहरूंच्या या यशस्वितेचे गमक म्हणजे त्यांचे प्रभावी व्यक्तिमत्त्व हे होय. सतत चाळीस-पंचेचाळीस वर्षे ते या देशाचे कर्णधार होते. या अवधीत त्यांच्या हातून अनेक वेळा राजनैतिक चुका झाल्या, पण तरीही ते आपल्या नेतृत्वाच्या सिंहासनावरून यत्किंचितही ढळले नाहीत. या चमत्काराचे सारे श्रेय त्यांच्या अलौकिक व्यक्तिमत्त्वालाच आहे.

**व्यक्तिमत्त्व** – निसर्गाने नेहरूंना देखणे सौम्य व निकोप शरीरयष्टी दिली आणि परिस्थितीने त्यांना उच्च, विशाल आचार-विचारांची देणगी बहाल केली होती. नेहरूंचा वर्ण तांबूस गोरा होता. त्यांच्या हालचालींत बिजलीची चमक आणि चपलता होती. वयाची सत्तर वर्षे उलटल्यावरही ते पाणीदार तलवारीच्या पात्यासारखे लवलवत. डोक्यावर शुभ्र स्वच्छ गांधी टोपी, अंगात नेहरूशर्ट आणि त्यावर जाकीट किंवा फिकट पिवळी अचकन, पायात सुरवार आणि बूट अशा सुरेख पेहेरावात नेहरू नेहमी वावरत असत. अचकनीच्या डाव्या बाजूला छातीवर गुलाबाचे फूल खोचले, की नेहरूंच्या वेषभूषेला पूर्णता येत असे. स्वभावाने ते प्रेमळ, स्वप्नाळू आणि काव्यात्म होते. आपल्या भोवतालचा सारा परिसर चैतन्याने रसरसून टाकण्याची एक अनोखी किमया त्यांना साधली होती.

आधुनिक युगातील बुद्धिवादाचे आणि विज्ञाननिष्ठेचे संस्कार होऊनही मनाने ते पुष्कळसे भावुकच राहिले. जगात सर्वत्र आनंदाची कारंजी उडावी, समाधानाची उद्याने फुलावी आणि सुखाचा स्वर्ग निर्माण व्हावा, हे त्यांचे आवडते स्वप्न होते. त्यामुळेच वास्तवाच्या ओंगळ दर्शनाने ते कित्येकदा चिडखोर बनत. पण असे असले, तरी ते केवळ चैनी आणि विलासी वृत्तीचे बादशहा नव्हते. उणे-पुरे पाव शतक ते स्वातंत्र्याच्या रणांगणावर झुंजत होते. या झुंजीत त्यांच्या तन-मनावर असंख्य घावही बसले होते. आळस, ऐषआरामी वृत्ती, बेशिस्त, उथळपणा, भ्रष्टपणा, वाचाळपणा, स्वार्थी आणि संकुचित आचार-विचार, इ. दुर्गुणांचा त्यांना मनस्वी तिटकारा होता.

**वक्तृत्व** – नेहरूंच्या सुडौल, मोहक आणि आकर्षक व्यक्तिमत्त्वाचा परिणाम त्यांच्या वक्तृत्वावरही झाला होता. ते नुसते व्यासपीठावर येऊन उभे राहिले आणि त्यांनी श्रोतसमुदायाला एकदा सस्मित वदनाने अभिवादन केले, की तेवढ्यानेच लाखोलाखांचा श्रोतृसमाज जिंकला जाई. त्यांचा आवाज कर्णमधुर नव्हता, मोठाही नव्हता. मैदानी सभेला तर तो बिलकूल अनुकूल नव्हता. पण तरीही त्यांचे व्याख्यान परिणामकारक होत असे. कारण त्यांच्या बोलण्यात विलक्षण तळमळ असे. अन्य कोणत्याही राष्ट्रनेत्यांच्या वाट्याला आले नसतील, एवढे नाट्यात्मक प्रसंग नेहरूंच्या वाट्याला आले. अशा प्रसंगी त्यांच्या वक्तृत्वाला एक आगळाच रंग भरे. रावीच्या तीरावरील लाहोर अधिवेशनात संपूर्ण स्वातंत्र्याचा ठराव बोलताना आणि स्वातंत्र्याच्या जन्मप्रसंगी लाल किल्ल्यावर उभे राहून भाषण करताना नेहरूंच्या वक्तृत्वविलासाचे एक अपूर्व दर्शन देशाला घडले.

**साहित्य** – वक्तृत्वाप्रमाणेच नेहरूंचे साहित्यही मनोरम आणि आकर्षक झाले आहे. नेहरूंनी मोठे असे तीन-चारच ग्रंथ लिहिले. पण तेवढ्यानेच त्यांचे साहित्यिक श्रेष्ठत्व सर्वमान्य झाले. जागतिक इतिहासाचे ओझरते दर्शन आणि भारताचा शोध या दोन ग्रंथांनी त्यांना इतिहासकार व तत्त्वचिंतक म्हणून कीर्ती मिळवून दिली. वरील दोन ग्रंथ खरे म्हणजे एकाच विषयावरच्या पुस्तकाचे दोन भाग म्हणता येतील. पहिल्या ग्रंथात नेहरूंनी जगातील सर्व देशांच्या इतिहासाचे ओझरते समालोचन केले आहे, तर दुसऱ्या ग्रंथात केवळ भारताच्या इतिहासावरून नजर फिरवली आहे. हे दोनही ग्रंथ इतिहासासारख्या काहीशा रूक्ष विषयावरच असूनदेखील, नेहरूंनी आपल्या काव्यात्म आणि मनोरम शब्दकळेने ते जिवंत केले आहेत. जागतिक इतिहासाचे ओझरते दर्शन हा ग्रंथ नेहरूंनी आपल्या कन्येला लिहिलेल्या पत्रांचे संकलन आहे. त्यात त्यांची इतिहासाकडे पाहण्याची शास्त्रशुद्ध दृष्टी व्यक्त होते.

हे ओझरते दर्शन घेताना त्यांनी मानवाच्या प्रगतीच्या, वैभवाच्या व वीरश्रीच्या गौरवशाली कालखंडाबरोबरच त्याच्या हिंस्रतेच्या, अधोगतीच्या आणि म्हणूनच काळ्याकुट्ट अशा कालखंडावरही सारख्याच अभ्यासूपणे प्रकाश टाकला आहे आणि तो टाकताना वर्तमानकाळी स्वतःच्या मार्गक्रमणात काही धडे घेण्याचा हेतू कधीही दृष्टिआड होऊ दिला नाही. त्यासाठी त्यांनी एकदम भूतकाळाला प्रारंभ न करता प्रथम वर्तमानकाळाचा आढावा घेतलेला आहे. आपण आज कोण या अवस्थेत आहोत, याची पूर्ण कल्पना असल्याशिवाय इतिहासातून आपणाला काहीही शिकता येणार नाही, अशी त्यांची ठाम श्रद्धा होती. म्हणून प्रथम भारताची सांप्रतची अवस्था, त्यानंतर पुढील काळात त्याला व आशिया खंडाला प्राप्त होणारे महत्त्व आणि मग भूतकाळाच्या तीन हजार वर्षांच्या इतिहासावर दृष्टिक्षेप, अशा प्रकारे हा ग्रंथ साकारला

आहे या ग्रंथात नेहरूंनी इतिहासाबरोबरच त्या त्या देशातील कला, विज्ञान, व्यक्ती, संस्कृती, इ बाबींचा साकल्याने परामर्श घेतला आहे

प्रधान मंत्री भवन
PRIME MINISTER'S HOUSE
NEW DELHI

सरकट हाउस
देहरादून
मई २५ १९६४

प्रिय प्रकाशवीर जी

आपका १६ मई का पत्र मुझे मिला था। मैंने श्री मेहरचन्द खन्ना को इसके बारे में लिखा था और यह तजवीज की थी कि कोई जमीन दिल्ली में प्रवासी भारतीय भवन के लिए अलग दे सके तो अलग कर दें। उसका जवाब मेरे पास अभी तक नहीं आया है। उनके लिखने पर मैं आपको सूचना दे दूंगा।

आपका
जवाहरलाल नेहरू

पं जवाहरलाल नेहरूंचे हस्ताक्षर

भारताचा शोध या ग्रंथात त्यांनी भारताच्या वेदकालापासूनच्या सांस्कृतिक, सामाजिक, ऐतिहासिक, कलात्मक, इ विविध बाबींचा आढावा घेतला आहे

नेहरूंचा तिसरा महत्त्वाचा ग्रंथ म्हणजे आत्मचरित्र हा होय १९३६ सालापर्यंतची नेहरूंच्या जीवनाची माहिती यात आली आहे या ग्रंथात नेहरूंनी आपल्या माता, पिता, भगिनी, इ कुटुंबियांविषयी जसे लिहिले आहे, तसेच तुरुंगातल्या पशुपक्ष्यांविषयी आणि जीवनभर भेटलेल्या सन्मित्र–सुहृदांविषयीही लिहिले आहे पत्नीविषयी लिहिताना तर नेहरू कमालीचे भावविवश आणि हळुवार झालेले दिसतात तिच्या सहवासात घालवलेल्या अनेक सुखद क्षणांची स्मृती त्यांच्या मनात उचंबळून आलेली दिसते म गांधींविषयी किंवा राजेंद्रबाबू, पटेल, सुभाषचंद्र यांसारख्या सहकाऱ्यांविषयी लिहितानाही ते प्रेमादराने भारावून जातात परंतु आप्तस्वकीयांची शब्दचित्रे आणि व्यक्तिगत जीवनाच्या हकिकती हा नेहरूंच्या आत्मचरित्राचा प्रधान हेतू नाही ही सारी माहिती पहिल्या तीन–चार प्रकरणांत आटोपून ते आपल्या मुख्य प्रतिपाद्य विषयाकडे वळले आहेत हा मुख्य विषय म्हणजे नेहरूंनी ज्या भारतीय स्वातंत्र्यसंग्रामाचे सेनापतिपद भूषविले, त्याचा इतिहास हा होय हा इतिहास लिहिताना नेहरूंनी प्रत्येक घटनेचे सूक्ष्म विवेचन केले आहे या संग्रामाचे आपण एक सैनिक आहो व त्यामुळे त्याच्या भल्याबुऱ्या वळणावाकणांची आणि परिणामांची जबाबदारी आपल्यावर आहे, तसेच यशस्वी झालेल्या लढायांचे यश आणि चुकलेल्या धोरणांचे अपयश, या दोन्हींचे दायित्वही आपल्यावर आहे, याची त्यांना कुठेही विस्मृती घडलेली नाही त्यांनी प्रत्येक घटनेचे यथायोग्य मूल्यमापन करून सर्वांना न्याय देण्याचा प्रयत्न केला आहे व्यक्तीच्या अंतरंगात जो झगडा सतत चाललेला असतो, तोच कोणत्याही चरित्राचा किंवा आत्मचरित्राचा महत्त्वाचा घटक असला पाहिजे, अशी नेहरूंची आत्मकथेकडे पाहण्याची दृष्टी आहे आणि त्या दृष्टीने त्यांचे आत्मचरित्र यशस्वी झाले आहे

आपल्या भोवतालच्या विशाल जीवनातील बहुविध अनुभव घेताना त्यांच्या भावनाक्षम मनात होणाऱ्या प्रतिक्रिया व विविध भावभावनांचे कल्लोळ यांनी त्यांचे आत्मचरित्र काठोकाठ भरून गेले आहे निसर्गाच्या मनोहर सान्निध्यात ते कधी भारावतात, अवखळ बनतात, कधी स्तिमित होतात, तर कधी अल्लडही बनतात मानवजातीला कलंक लावणाऱ्या घटनांनी ते जसे कातर बनतात, तसेच संतापूनही जातात अन्याय, दास्य, दैन्य, भेद, इ मानवजातीच्या दोषांनी त्यांना माणसाची चीड येते, परंतु स्वकर्तव्यात सदा तत्पर असल्याने ते तत्काळ शांतही होतात

नेहरूंनी आपले सारे साहित्य तुरुंगाच्या गजाआड लिहिले लेखनाला लागणारी शांतता त्यांना तुरुंगाच्या बाहेर कधीच मिळाली नाही परंतु तुरुंगात गेल्यावर मात्र त्यांचे मानसमंथन अहोरात्र चालत असे त्यातून निघणारे नवनीत म्हणजे नेहरूंची ही ग्रंथसंपदा होय [राष्ट्रनायक नेहरू– श्री दा न शिखरे, भारतरत्न नेहरू– श्री म श्री दीक्षित, पंडित नेहरू – सांस्कृतिक दर्शन – श्री ल ना भावे, सूर्यास्त– आचार्य प्र के अत्रे]

**नैगमेष** जैनांचा एक देव हा देव नायगमेष, नमेष, हरिणैगमेष नेजमेष, इ नावांनी ओळखला जातो जैनांच्या चित्रशिल्पकलेत याचा अनेक ठिकाणी आढळ होतो याला बकरा, मेंढा किंवा हरिण यांचे मुख असते व याचे बाकीचे शरीर माणसाचे असते हा इंद्राच्या पायदळावरचा मुख्य होता महावीराचा गर्भ याने ब्राह्मण स्त्री देवनंदा हिच्या उदरातून काढून क्षत्रिय स्त्री त्रिशला हिच्या उदरात घातला त्या दिवसापासून तो संतती देणारा देव ठरला सुलसा नावाच्या स्त्रीलाही याच्याच कृपेने गर्भसंभव झाला, अशी जैन कथा आहे

या देवाची कल्पना पौराणिक दक्ष प्रजापतीवरून केलेली

न्दिरात दक्ष हाही प्रजापती म्हणजे प्रजननाची देवता असून, वीर भद्राने त्याचे मस्तक तोडल्यावर शिवाने त्याला बोकडाचे मस्तक लावून पुनश्च जिवंत केले होते

कर्निगहॅमला या देवाच्या चार मूर्ती सापडल्या असून, त्याची तोंडे बैलाची आहेत

मथुरा येथील संग्रहालयात नैगमेय या देवतेच्या अनेक मूर्ती आहेत त्यापैकी कुषाणकालीन एक मूर्ती एक फूट साडेतीन इंच उंच असून तिचे मुख बकऱ्यासारखे आहे तिने डाव्या हातात दोन मुलांना धरले आहे तिच्या खांद्यावरही मुले असावी कारण त्यांचे पाय तेवढे दिसतात बाकीची आकृती भग्न झाली आहे नैगमेयाच्या इतरही मूर्तींच्या अंगाखांद्यावर मुले दाखवलेली असतात काही मूर्ती अजामुख असून त्यांच्या गळ्यात हार आहेत काही मूर्ती मात्र स्त्रीमुखी आहेत

या सर्व मूर्ती नेमिनाथचरित्रातील एका आख्यानाशी संबंधित आहेत, असे डॉ ब्यूह्‌लरने सांगितले आहे ती आख्यायिका अशी– सत्यभामेला प्रद्युम्नासारखा भाग्यवंत पुत्र हवा होता तेव्हा कृष्णाने नैगमेयाची आराधना केली नैगमेय प्रसन्न झाला आणि त्याने सत्यभामेसाठी कृष्णाकडे एक हार दिला सत्यभामेने तो गळ्यात घातला आणि कालांतराने तिचे मनोरथ पूर्ण झाले

त्या मूर्तींच्या गळ्यात जो हार असतो, तो बहुधा वरील कथानकातील हाराचे प्रतीक असावा डॉ वासुदेवशरण अग्रवाल यांच्या मते संतानोत्पत्तीच्या संबंधात देवापेक्षा देवीची उपासना अधिक औचित्यपूर्ण ठरते त्यामुळे पुढे मूळ पुरुषरूप असलेल्या त्या देवाचा स्त्रीरूपात कल्पना करण्यात आली असावी पूर्वी तिचे तोंड बकरीचे होते त्या जागी तिला स्त्रीमुख देण्यात आले आणि नंतर तिच्या अंगाखांद्यावर लहान मुलेही दाखवण्यात येऊ लागली [भा स ज यो , वासुदेवशरण अग्रवाल– ज सि भा, मार्च १९३७, ज म प , जै इ ]

**नैणसी** (१६१०–१६७० इ स ) एक राजस्थानी इतिहासकार हा ओसवाल महाजन होता नैणसी हा शूर व शासनपटू म्हणून प्रसिद्ध होता या गुणांच्या जोरावरच तो जोधपूरचा जसवंतसिंह (पहिला) याचा काही काळ दिवाण झाला होता एकदा जसवंतसिंह हा नैणसी व त्याचा धाकटा भाऊ सुंदरदास यांच्यासह औरंगाबादला गेला असता काही कारणाने त्या बंधुद्वयावर जसवंतसिंह रुष्ट झाला आणि त्याने त्या दोघांना कैदेत टाकले जोधपूर येथील कैदखान्याच्या अधिकाऱ्यांनी केलेल्या जाचाला कंटाळून त्यांनी आत्महत्या केली

नैणसी जसा स्वाभिमानी आणि वीर होता, तसाच तो विद्यानुरागी व इतिहासप्रेमीही होता त्याला अनेक लोक राजस्थानचा अबुल फज़ल म्हणत 'मूता नैणसी री ख्यात' हा त्याचा प्रमुख इतिहासग्रंथ होय या ग्रंथात त्याने राजस्थानचा विस्तृत इतिहास लिहिला आहे त्याशिवाय त्याने गुजरात, काठियावाड, कच्छ, बुंदेलखंड, मध्यभारत या देशांच्या इतिहासासंबंधीही बरेच लिहून ठेवले आहे याचा दुसरा ग्रंथ म्हणजे जोधपूर राज्याचा स्थलकोश हा होय या दोन्ही ग्रंथांना ऐतिहासिक मूल्य आहे हा डिंगल भाषेचाही सिद्धहस्त लेखक होता [रा भा

**नैनागिरी** मध्य प्रदेशातील एक जैन क्षेत्र हे मध्यरेल्वेच्या सागर स्टेशनापासून ३० मलावर आहे या गावात मंदिरे आणि एक धर्मशाळा आहे जवळच रेशंदी नावाचा एक पर्वत आहे तिथून श्रीवरदत्त हे जैन मुनी मोक्षाला गेले असे सांगतात या पर्वतावर पंचवीस मंदिरे असून, त्यातले एक मंदिर तलावात आहे प्रतिवर्षी कार्तिक शुद्ध ८ मी पासून पौर्णिमेपर्यंत इथे जत्रा भरते [जै ध ]

**नैनी** सिंधी समाजात कुमारिकेला नैनी अथवा देवी या नावाने संबोधतात एक कुमारिका ही शंभर ब्राह्मणांच्या समान असते, अशी त्यांची समजूत आहे त्यांच्या समाजात पुरोहित वर्गाचे ब्राह्मण कमी असल्यामुळे अनेक धार्मिक विधींच्या वेळी ब्राह्मणाची जागा अविवाहित मुलींना देण्यात येते कुमारिका ही शक्ती म्हणून त्यांच्या समाजात मानली जाते एखाद्याचे जानवे तुटले, तर ते कुमारिकेकडून गळ्यात घालून घेतात विवाहानंतरच्या विधीत वधू–वराची वस्त्रगाठ बांधण्याचे व सोडण्याचे काम कुमारिका करते मुलाला पाळण्यात घालण्याच्या वेळीही कुमारिकेला बोलावतात एखादा माणूस आजारी पडला, तर तो बरा व्हावा म्हणून गावातल्या कुमारिकांना खाऊ वाटतात बागेत पिकणारे पहिले फळ कुमारिकेला अर्पण करतात, तत्पूर्वी तिचे पाय धुतात सर्वांच्या आधी जेवायला बसण्याचा अधिकार तिचा असतो [सिं क ]

**नैमित्तिक प्रलय** प्रलयाचा एक प्रकार एक हजार चतुर्युग किंवा युगचौकड्या झाल्या म्हणजे ब्रह्मदेवाचा एक दिवस होतो यालाच कल्प असेही म्हणतात कल्पाच्या शेवटी, तेवढ्याच कालापुरता हा प्रलय होतो ब्राह्मी रात्री असेही नाव आहे या वेळी भू , भुव स्व या तीन लोकांचा प्रलय होतो, पण त्यांच्या वरचे महः, जनः, तप व सत्यम् हे चार लोक मात्र कायम राहतात या प्रलयाच्या वेळी ब्रह्मरूपधारी नारायण सर्व विश्व आपल्यात

वरून झोपी जातो. ब्रह्मदेवाच्या शयनाचे निमित्त धरून हा प्रलय होतो, म्हणून त्याला नैमित्तिक प्रलय असे नाव पडले, असे विष्णु पुराणात सांगितले आहे. [ पु. वि. ]

**नैमिषारण्य** एक प्राचीन अरण्य. उत्तर प्रदेशात गोमती नदीच्या डाव्या किनाऱ्यावरील सीतापूर गावापासून वीस मैलांवर हे लागते. या अरण्याला सांप्रत निमसार असे म्हणतात. याला नैमिषारण्य असे नाव का पडले, याविषयी तीन कथा आहेत, त्या अशा –

( १ ) इथे श्रीविष्णूने एका निमिषात दानवांची समस्त सेना नष्ट केली, म्हणून या अरण्याला नैमिषारण्य असे नाव पडले. ( ब्रह्मांड पु. १.८, वायू पु. २.८ )

( २ ) महर्षी शौनकाच्या मनात एकदा दीर्घकालीन सत्र करण्याची इच्छा उत्पन्न झाली. कोणत्या पुण्य स्थळी ते सत्र सुरू करावे, म्हणून त्याने ब्रह्मदेवाकडे पृच्छा केली. ब्रह्मदेवाने



विष्णुमूर्ती – नैमिषारण्य

त्याला एक चक्र देऊन सांगितले, की 'हे चक्र चालवीत तू त्याच्या मागे जा. जिथे या चाकाची धाव (नेमी) गळून पडेल, ते स्थान सत्रासाठी योग्य समज.' शौनक मुनीने ते चक्र सोडले व तो त्याच्या मागून जाऊ लागला. अनेक प्रदेश हिंडून गौतमी-



यज्ञकुंड – नैमिषारण्य

गंगेच्या तीरावर येताच त्या चक्राची नेमी गळून पडली व चक्र थांबले. त्यामुळे त्या स्थानाला नेमितीर्थ असे नाव मिळाले. हे नेमितीर्थ ज्यात आहे, ते नैमिषारण्य होय.

( ३ ) एकदा ऋषींच्या तपात दैत्य वारंवार विघ्न उत्पन्न करू लागले. मग ऋषींनी आपल्याला सुरक्षित तपोभूमी मिळावी, म्हणून विष्णूची प्रार्थना केली. विष्णूने आपले चक्र फेकून ऋषींना सांगितले, की 'या चाकाची नेमी जिथे रुतून बसेल ते स्थान तुम्ही तपाला योग्य समजा. तिथे तुम्हाला दैत्यांचा त्रास होणार नाही.' त्याप्रमाणे जिथे ती नेमी रुतून बसली तेच नैमिषारण्य होय.

काठक संहिता ( १०.६ ), कौषीतकी ब्राह्मण ( २६.५, २८.४ ), छांदोग्य उपनिषद ( १.२.१३ ), तांड्य महाब्राह्मण ( २५.६.४ ), जैमिनीय ब्राह्मण ( १.३६३ ), ह्या ग्रंथांत या स्थानाचा उल्लेख आहे. रामचंद्राने याच अरण्यात अश्वमेध यज्ञाचा मंडप उभारला होता, असे रामायणात म्हटले आहे. ( वा. रा. ७.९१ ) सीतेचे दुसरे दिव्य याच अरण्यात याच यज्ञमंडपात झाले. ( वा. रा. ७.९६–९७ )

लोमहर्षणाचा पुत्र उग्रश्रवा सौती याने याच अरण्यात शौनकादी ऋषींना महाभारत सांगितले. (म. भा. आदि. १. २३) शौनक ऋषीचे दीर्घकालीन सत्र चालले असता बलराम तीर्थयात्रेच्या निमित्ताने इथे आला होता. (म. भा. शल्य. ३७) त्याला पाहताच लोमहर्षणाखेरीज इतर सर्व ऋषींनी त्याला उत्थापन दिले. लोमहर्षण मात्र बसूनच राहिला. त्या गोष्टीचा बलरामाला राग आला आणि त्याने लोमहर्षणाचा तत्काळ वध केला.

या प्राचीन परंपरेमुळे या स्थानाला तीर्थाचे पावित्र्य प्राप्त

आले आहे तलिंगुगान सर्व तीर्थ इथे वास करतात, अशी समजूत आहे. कूर्म पुराणात याचे माहात्म्य पुढीलप्रमाणे वर्णिले आहे–

> इदं त्रलोक्यविख्यातं तीर्थं नमिषमुत्तमम् ।
> महादेवप्रियकरं महापातकनाशनम् ।।
> अत्र दानं तपस्तप्तं श्राद्धमागाविकं च यत् ।
> एकैकं नाशयेत पापं सप्तजन्मकृतं तथा ।।
> (कूर्म पुराण उत्तर ४२ १, १४)

अर्थ – हे नमिषारण्य नावाचे तीर्थ तिन्ही लोकात प्रसिद्ध आहे हे स्थान शंकराला प्रिय असून, महापातकांचा नाश करणारे आहे इथे केलेले तप, श्राद्ध, यज्ञ, दान, इ एकेक क्रिया सात जन्मांच्या पापांचा विनाश करते

या स्थानाला एकाने पितृस्थानापैकी एक मानतात सामयता अमावस्येला इथे मोठी यात्रा भरते या क्षेत्राचा परिक्रमा करण्याचीही पद्धत आहे चक्रतीर्थ, व्यासाची गादी,



चक्रतीर्थ – नमिषारण्य

ललितादेवीचे मंदिर, ही इथली प्रमुख पुण्य स्थळे होत इथल्या गादीवर बसून व्यासांनी महाभारत सांगितले, अशी जनश्रुती आहे याशिवाय इथली गोघाट, चरणकुंड, गोदावरीकुंड भूतनाथमंदिर, इ स्थानेही पवित्र मानली जातात

नमिष क्षेत्रात शाहाबुज नामक टेकडीवर काही मूर्ती आहेत मूर्तिविज्ञानाच्या दृष्टीने या मूर्तींचे महत्त्व फार आहे त्यातील काही मूर्ती मण्मय आहेत त्या मूर्ती सुंदर, सुघटित व सजीव वाटतात त्या गुप्त कालात किंवा कुषाण कालात घडवलेल्या असाव्या, असे मूर्तिशास्त्रज्ञाचे मत आहे याशिवाय इथे एक विहीर असून, ती पांडवांची विहीर म्हणून ओळखली जाते इथे एक किल्लाही आहे

या क्षेत्राच्या स्थानाबद्दल विद्वानांत मतभेद आहेत वैदिक साहित्यात आढळणारे नमिष हे कुरुक्षेत्राच्या दक्षिणेला असावे, असा एक तर्क आहे रामायण – महाभारतात वर्णिलेले नमिष म्हणजे आजचे निमसार च होय, असेही निश्चित सांगता येत नाही [कल्याण–तीर्थांक, नमिषपरिक्रमा–त्रिपथगा, मे १९६२, ऋषिभूमि नमिषारण्य–धर्मयुग, १० मार्च १९५७, हि जॉ ए इ]

## नैरात्म्यवाद

अनात्मवाद पाहा

## नैर्ऋत

राक्षसांचे एक कुल पूतना आणि रेवती यांच्यापासून या कुळाची उत्पत्ती झाली हे राक्षस शूर व पराक्रमी असून ते रात्रीच्या वेळी संचार करतात हे त्र्यंबकाचे अनुचर आहेत विरूपाक्ष हा त्यांचा नेता व कुबेर हा राजा होय स्कंद हा यांचा अधिपती असल्याचे भागवत पुराणात सांगितले आहे (३ ७ ४३९) लहान मुलांना हे त्रास देत असत, असे वायु पुराणात म्हटले आहे (८४ १४) [पु इ]

## नैर्ऋतयाग

निर्ऋती या देवतेला उद्देशून करायचा एक याग चतुर्दशीयुक्त पौर्णिमेच्या दिवशी हा याग करतात यात अनुमती नामक देवतेसाठी एक पुरोडाश हवी करतात पुरोडाशाचे पीठ वाटताना पाट्याच्या मागच्या बाजूला जे पीठ सांडते, त्याचा पुरोडाश निर्ऋतीसाठी तयार करतात प्रथम निर्ऋती देवतेचा आणि नंतर अनुमती देवतेचा याग करतात एक फुटलेले कोलीत घेऊन दक्षिण दिशेला जातात व जिथे खारलेली किंवा भेगाळलेली जमीन दिसेल, तिथे निर्ऋतीचा पुरोडाश अर्पण करतात दक्षिणा म्हणून काळे वस्त्र किंवा काळी घोंगडी देतात [म ज्ञा को – वेदविद्या]

## नैवेद्य

पूजेतल्या सोळा उपचारांपैकी एक उपचार 'निवेद अर्हतीति' = निवेद अर्थात निवेदन याला जे योग्य त्याला नैवेद्य म्हणावे, अशी याची व्याख्या आहे याचा अर्थ देवाला निवेदनीय असे जे द्रव्य ते नैवेद्य होय नैवेद्य हा पंचविध असावा व तो शुद्ध असावा याविषयी तंत्रसारात पुढील श्लोक आहे –

> निवेदनीयं यद् द्रव्यं प्रशस्तं प्रयतं तथा ।
> तद् भक्ष्याह पञ्चविधं नवेद्यमिति कथ्यते ।।
> भक्ष्यं भोज्यं च लेह्यं च पेयं चूष्यं च पञ्चमम् ।
> सर्वत्र चैतं नवेद्यमाराध्यास्य निवेदयेत ।।

अर्थ – जे निवेदनीय द्रव्य असेल ते प्रशस्त व पवित्र असावे ते भक्षणास योग्य व पाच प्रकारचे असावे त्यालाच नैवेद्य असे म्हणतात हे पाच प्रकार म्हणजे भक्ष्य (गिळण्याजोगे), भोज्य (चावून खाण्याजोगे), लेह्य (चाटण्याजोगे), पेय (पिण्याजोगे) व चूष्य (चोखण्याजोगे) होत अशा

पंचविध पदार्थांनी युक्त असा नैवेद्य असावा तो नैवेद्य देवीची पूजा करून तिला समर्पावा

सोने, रुपे, तांबे दगड, कमलपत्र व यज्ञीय लाकूड यांच्या पात्रात नैवेद्य ठेवून तो देवाला दाखवावा तो देवाच्या उजव्या हाताला ठेवावा तंत्रसारात म्हटले आहे की देवाच्या वाम भागी ठेवलेला नैवेद्य अभक्ष्य होतो आणि त्याच्याबरोबर दिलेले उदक दारूसारखे होते विष्णूला दाखवलेला नैवेद्य यजमानाने स्वत भक्षण करावा विष्णुदत्त नैवेद्य हा चारही आश्रमातल्या लोकांना भोज्य ठरतो अन्य देवाना दाखवलेला नैवेद्य ब्राह्मणाला द्यावा किंवा त्या त्या देवाच्या भक्ताला द्यावा, असे सांगितले आहे शिवाचा नैवेद्य पूजकाने स्वत खाण्याविषयी तर कडक निषेधच आहे शिवनैवेद्य अभक्ष्य का झाला याविषयी ब्रह्मवैवर्त पुराणात कथा आहे, ती अशी –

एकदा सनत्कुमार विष्णूच्या भेटीसाठी वैकुंठात गेला त्या वेळी विष्णू भोजन करीत होता सनत्कुमार आलेला पाहून विष्णूने आपल्या उच्छिष्ट अन्नातला काही भाग त्याला दिला सनत्कुमाराने त्यातला काही भाग लगेच खाऊन टाकला उर लेला भाग घेऊन तो सिद्धाश्रमात गेला तिथे शिव होता सनत्कुमाराने स्वत जवळचा उरलेला नैवेद्य शिवाला दिला शिवाने तावडतोब तो भक्षण केला त्यामुळे त्याला अपार आनंद होऊन तो नृत्य करू लागला नृत्याच्या आवेशात आल्यावर त्याला मूर्छा आली आणि तो जमिनीवर पडला

एवढ्यात पार्वती तिथे आली आपल्या पतीची ती स्थिती पाहून तिला चिंता वाटली जवळच उभ्या असलेल्या सनत्कुमा राला तिने शिवाच्या मूर्च्छेचे कारण विचारले सनत्कुमाराने ते तिला सांगितले एवढ्यात शिव सावध झाला पण पार्वती मात्र त्याच्यावर खूप रागावली 'अत्यंत दुर्लभ असा विष्णूचा नैवेद्य मला न देता तुम्ही एकट्याने सेवन केला हे बरे नव्हे' असे म्हणून तिने रागाच्या भरात शिवाला शाप दिला, 'आज पासून जे तुझा नैवेद्य खातील ते पुढील जन्मी कुत्रे होतील!' तेव्हापासून शिवनैवेद्य पूजकाला अभक्ष्य ठरला

याविषयी गृह्य परिशिष्टात सांगितले आहे, त असे–

**पवित्र विष्णुनैवेद्य सुरसिद्धर्षिभि स्मृतम् ।**
**अन्यदेवस्य नैवेद्य भुक्त्वा चान्द्रायण चरेत ॥**

अर्थ – विष्णूचा नैवेद्य हा देव, ऋषी आणि सिद्ध यांनी पवित्र मानला आहे (अर्थात पूजकाने तो भक्षण करावा पण) अन्य (शिव, सूर्य, इ ) देवाना दाखवलेला नैवेद्य भक्षण केल्यास चांद्रायण प्रायश्चित्त करावे

नैवेद्य देवापुढे ठेवताना त्याच्याखाली पाण्याने चौकोनी मंडल करावे मग हातात तुलसीपत्र, दूर्वा किंवा फूल घेऊन त्याने तो नैवेद्य प्रोक्षण करावा व फूल त्या नैवेद्यावर ठेवावे मग –

**प्राणाय स्वाहा, अपानाय स्वाहा, व्यानाय स्वाहा,**
**उदानाय स्वाहा, समानाय स्वाहा, ब्रह्मणे स्वाहा ।**

या मंत्राने नैवेद्याकडे हात करून तो घास भरवल्याप्रमाणे देवाच्या मुखाकडे न्यावा त्या वेळी डावा हात स्वत च्या हृदया वर ठेवून अधोमुख व्हावे वरील मंत्र म्हणून झाल्यावर 'मध्ये पानीय समर्पयामि' म्हणून ताम्हनात उदक सोडावे मग पुनश्च वरील मंत्र म्हणून 'अमुक देवताभ्यो नम नैवेद्य समर्पयामि' असे म्हणावे व ताम्हनात उदक सोडावे

नैवेद्याचा कोणताही पदार्थ अशुची, अभक्ष्य, शिळा, न शिज लेला, करपलेला व उष्टावलेला नसावा तो झाकून देवापुढे आणावा व मग त्यावरचे आच्छादन काढावे नैवेद्य म्हणून फल अर्पण करायचे असेल, तर ते किडके, कुजके, कच्चे किंवा आंबट नसावे

महानैवेद्य पुरण, वरण, भाज्या, कोशिंबिरी, इ षड्रस अन्नाने युक्त असावा जेव्हा महानैवेद्य दाखवायचा नसेल तेव्हा गूळखोबरे, पंचखाद्य, दूध किंवा फळ यांचा नैवेद्य दाखवावा महानैवेद्य झाल्यावर देवाची आरती करावी

विशिष्ट दिवशी कुलदेवतेला नैवेद्य अर्पण करायची चाल चित्पावन ब्राह्मणात आहे चैत्री पाडवा, दसरा दिवाळी, देव-दिवाळी, होळी, इ सणाच्या दिवशी हे नैवेद्य दाखवतात, काही-जण शारदीय नवरात्रात व वासंतिक नवरात्रात हा आचार पाळ-तात लग्नमुंजीसारख्या मंगलकार्यात देवताना नैवेद्य घालण्या चीही रूढी काही कुटुंबात आहे श्रावणातील सोमवारी शिवाला, पौष पौर्णिमेस भगवतीला आणि मार्गशीर्ष शुद्ध प्रतिपदेस ग्राम देवताना नैवेद्य घालतात

कनकेश्वर, विश्वेश्वर, महालक्ष्मी या देवतांचे नैवेद्य घरातील मंडळी भक्षण करतात, तर निरंकारी, ब्रह्मदेव, निनुदेव, मळ-देव, जोगेश्वरी यांचा नैवेद्य गरीबाला किंवा गुरवाला देतात काही लोक भराडी, गावरखा, माग, इ देवाचे नैवेद्य वेगळे दाखवतात व ते महार, झाडूवाले, भंगी, परीट, न्हावी वगैरे लोकांस देतात सोमेश्वर, पद्मावती, खळनाथ व विठलादेवी यांचे नैवेद्य अस्सल मराठा लोकांस देण्याची चाल काही कुटुंबात आहे महापुरुषाचा नैवेद्य काही लोक घराबाहेर ठेवतात, तर कोळेश्वराचा नैवेद्य घरात प्रसाद म्हणून घेतात ग्रामदेवताचा नैवेद्य कोणालातरी देतात [ शा क , पू मा प्र , चित्पावन ]

**नैश** एक प्राचीन नगर आणि जनपद काबूल आणि सिंधू या दोन नद्यांच्यामध्ये असलेल्या मेरू पर्वताच्या पाय थ्याला जो लहानसा डोंगराळ भाग आहे त्या भागात या जन

नगराचा विस्तार होता. पतंजलीने याचा उल्लेख केला आहे. ग्रीक इतिहासकार याला नायस म्हणत. या जनपदात वास्तव्य करणाऱ्या लोकांना नश्य असे म्हणत. हे नश्य लोक भारतीय नसून डायोनिसस बरोबर आलेल्या ग्रीकांचे वंशज आहेत, असे एरियनचे मत आहे.

शिकंदराने भारतावर स्वारी करण्यापूर्वी ग्रीक लोकांनी हे शहर वसविले होते. त्या काळात तीच या जनपदाची राजधानी होती. त्याची शासनप्रणाली गणराज्यासारखी होती. त्याच्या शासनसभेत तीनशे सभासद असत. नैसाची गणना नगरराज्यात होत असे. [प. वा. भा.]

## नैषधीयचरित

एक संस्कृत महाकाव्य. याला संक्षेपात नैषध असेही म्हणतात. श्रीहर्ष हा याचा कर्ता होय. सम्राट हर्षवर्धन याचा आणि प्रस्तुत कवीचा कोणताही संबंध नाही. पहिला इ. स. च्या सातव्या शतकात होऊन गेला, तर दुसरा बाराव्या शतकात झाला. महाकवी श्रीहर्ष हा जयचंद राठोड या राजाचा आश्रित होता. त्या राजाच्याच प्रेरणेने त्याने प्रस्तुत महाकाव्य निर्माण केले.

तत्कालीन संस्कृत पंडितांत श्रीहर्षाचे स्थान उच्च होते. प्रगाढ पांडित्य आणि प्रतिभाशाली कवित्व यांचा त्याच्या ठिकाणी मनोज्ञ संगम झाला होता. त्याचे नैषध महाकाव्य वाचून पंडितांनी माना डोलावल्या. 'उदिते नैषधे काव्ये क्व माघः क्व च भारविः' = नैषध काव्याचा उदय झाल्यावर त्याच्यापुढे माघ आणि भारवी हे महाकवी हतप्रभ ठरले, अशी पंडितांनी त्या महाकाव्याची भलावण केली.

श्रीहर्षालाही आपल्या महाकाव्याच्या उत्कृष्टतेबद्दल थोडा अधिकच आत्मविश्वास होता. यामुळे नैषध काव्याच्या क्लिष्टतेबद्दल नाके मुरडणाऱ्या पंडितांचा त्याने पुढील शब्दांत उपहास केला आहे—

तरुणी ही तरुणांचेच अंतःकरण आकृष्ट करते. बालांना तिचे आकर्षण कसे वाटणार! तशीच माझी वाणी आहे. ती रसज्ञ पंडितांचेच अंतःकरण खुलवील. बालिश अरसिकांना माझ्या कवितेचे रमणीयत्व कसे कळणार!

प्रस्तुत महाकाव्याचे परीक्षण करताना डॉ. के. ना. वाटवे लिहितात—

श्रीहर्षाच्या काव्यात श्लेष, यमक, अनुप्रास, इ. शब्दालंकार व विविध अर्थालंकार, रस, ध्वनी, वक्रोक्ती, इ. काव्यजीविते, वैद्यक, कामशास्त्र, राज्यशास्त्र, धर्म, न्याय, ज्योतिष, व्याकरण, वेदान्त, इत्यादी सर्व परंपरागत शास्त्रीय ज्ञान यांचा मालमसाला इतका ठासून भरला आहे, की या काव्याला 'शास्त्रकाव्य' म्हणण्याची प्रथा आहे. तसेच या काव्यामुळे अभ्यासकाला हवे तेवढे शास्त्रीय ज्ञान, शब्दव्युत्पत्ती, व्यवहार व सांस्कृतिक विशेष यांचे काव्यगुणाच्या मधुर अनुपानासह सेवन घडत असल्यामुळे व त्याची पूर्वीची दुबळ मन प्रकृती त्यामुळे निकोप आणि सुदृढ बनत असल्याने नवधीयाला नैषध विद्वदौषधम् = विद्वानांचे बलवर्धक औषध, असे संबोधण्यात येते. हे काव्यरसायन दुबळ्या पचनशक्तीच्या माणसाला मानवत नाही. म्हणूनच नवधाच्या खवीर नी वृकोदर अभ्यासाला संस्कृतात विशेष मान आहे. नैषध म्हणजे व्युत्पत्तीची व रसिकतेची खरी कसोटी.

**संक्षिप्त कथानक**— नल नावाचा एक पुण्यश्लोक आणि महाप्रतापी राजा निषध देशात राज्य करीत होता. तो मोठा विद्वान, उदार आणि प्रजारंजक होता. तो सोळा वर्षांचा झाला नाही तोच त्याने सगळे भूमंडळ पादाक्रांत केले. त्याची भांडारे विविध धनांनी तुडुंब भरली. त्याचा प्रखर पराक्रम आणि धवल यश पाहून विधात्याला वाटले, की आपण सूर्य चंद्र निष्कारणच निर्माण केले. नलाचे औदार्य लोकविलक्षण होते. याचकांना धन वाटून देण्याच्या कामी त्याचा हात सदैव पुढे असे. त्याच्या मनात एकच रुखरुख होती, की आपणाला अजून सुवर्णमेरूची शतखंडे करून ती याचकांना देता आली नाहीत आणि दानोदकाच्या सिंचनाने निर्जल मरुभूमीचा समुद्र बनवता आला नाही. नलाची राज्यव्यवस्था इतकी चोख होती, की परचक्र, टोळधाडी, अनावृष्टी हे अनर्थ प्रजेला कधी ठाऊकच नव्हते. त्याचे सारे राज्य धनसमृद्ध होते.

नलराजा सुंदर होता, पण सुकुमार नव्हता. त्याचे बाहू पुष्ट, दीर्घ व कणखर होते. गोपुराच्या रुंद व बळकट दाराची रुंदी व बळकटी त्याच्या वक्षस्थलाने उचलली होती. तो यौवनात येताच त्याच्या कांतीपुढे शरदृतूतील चंद्रही फिका पडला. त्या मदनसुंदर पुरुषोत्तमाला पाहून त्रिभुवनातील सुंदरींना त्याचा प्रच्छन्न अभिलाष वाटू लागला. आपल्या रूपाचा गर्व वाहणारी कामिनी राजं आरशात आपले रूप न्याहाळी आणि हातातल्या नलाच्या चित्राकडे पाहून 'मी या मदनसुंदराला साजेशी आहे काय' असा प्रश्न स्वतःलाच विचारी.

दमयंती ही विदर्भाधिपती भीम राजाची कन्या. तिने एक दिवस नलाच्या रूपगुणांची कीर्ती ऐकली आणि त्या क्षणीच तिचे मन त्याच्यावर जडले. आपल्याला सर्वथैव अनुरूप असा वर कोणता असेल तर तो नलच होय, असा तिचा निश्चय झाला. तिला जागेपणी आणि निद्रेतही नलावाचून दुसरा विषयच दिसेनासा झाला. एके दिवशी तिचे चित्र काढायला आलेल्या चित्रकाराला तिने म्हटले, 'अरे कलावंता, तू

त्रिभुवनातल्या सौंदर्यालाही खाली पाहायला लावील, असे एखादे जोडपे चितार '

चित्रकाराने तिला तसे चित्र काढून दिले ते अप्रतिम अवतरले त्या चित्रातल्या पुरुषात ती नलाला आणि युवतीच्या चित्रात स्वतःला पाहू लागली पुढे पुढे तिला नलाचा विरह इतका दुःसह झाला, की हिवाळ्यातले दिवस आणि उन्हाळ्यातल्या रात्रीही तिला दीर्घ वाटू लागल्या

याच काळात दमयंतीच्या लोकोत्तर रूपलावण्याची कीर्ती नलाच्याही कानावर आली तिला न पाहताच नलाचे मन तिच्यावर अनुरक्त झाले मदनाने त्याला जणू घायाळच केले दमयंतीच्या चिंतनाने त्याला जी व्यथा होत असे, ती फक्त रात्रीला आणि त्याच्या कोमल शय्येलाच काय ती कळे ! पण असे असूनही नलाने विदर्भराजाकडे दमयंतीला मागणी घातली नाही कारण तो मानधन होता मागणे हे त्याला ठाऊक नव्हते पण आपल्या मित्रमंडळात मात्र तो दमयंतीविषयीची आपली अभिलाषा उघडपणे व्यक्त करी एक दिवस तर त्याचे मन अत्यंत बेचैन झाले राज्यकारभारातच नव्हे, तर मृगयेतच त्याचे लक्ष लागेना मग त्याने ठरवले, की एखाद्या सुंदर पण निर्जन स्थळी जाऊन दमयंतीचे ध्यान करीत बसावे

त्याप्रमाणे तो नगराजवळच्या उद्यानात गेला हिंडत असता त्याला एक विस्तीर्ण सरोवर दिसले त्या सरोवरात अनेक जलपक्षी विहार करीत होते आणि आश्चर्याची गोष्ट म्हणजे त्या पक्ष्यांतला एक हंस सोनेरी होता त्या अपूर्व पक्ष्याला पाहून नलाला मोठे कुतूहल वाटले काही वेळाने दमून भागून तो हंस पाय पोटाशी धरून आणि शिर आपल्या पंखात झाकून निजला असता नलाने गुपचूप जाऊन त्याला पकडले हंस घाबरला व सुटकेसाठी धडपड करू लागला पण नलापुढे त्याचा इलाज चालेना या प्रकाराने त्या सरोवरातल्या पक्ष्यांत एकच गोंधळ उडाला हंसींनी तर कलकलाटच सुरू केला आपली सुटका होत नाही, असे पाहून तो हंस मनुष्यवाणीने नलाला म्हणाला

" हे राजा, माझे पंख सोन्याचे आहेत म्हणून तुला माझा लोभ सुटला ना ! धिक्कार असो तुला ! तू आता मला मारशील पण माझा वध हा केवळ प्राणिवध ठरणार नाही यात तू माझा विश्वासघात केलास असे ठरेल अरे, मी तुझ्या भलेपणावर विश्वास ठेवूनच या सरोवरात विहरत होतो तुला जर हिंसेची इतकी खुमखुमीच असेल तर बलशाली वीरशिरोमणीशी युद्ध देऊन तू ती शमव की ! राजा, आता माझी परिस्थिती ऐक मी माझ्या वृद्ध मातेचा एकुलता मुलगा माझी पत्नी नुकतीच प्रसूत झाली आहे त्या दोघींना मीच काय तो आधार मी मेलो तर त्या दोघींची अवस्था दारुण होईल माझी असहाय पिले भुकेने कळवळून प्राण सोडतील तेव्हा तू मजवर दया कर आणि मला मारू नकोस "

या विनंतीने नलाचे चित्त द्रवले त्याने त्या हंसाला सोडून दिले हंस आनंदित झाला तो नलराजाला कृतज्ञतेने म्हणाला

" राजा, तू दयाधर्माचा पुतळा आहेस तुझ्या या उपकाराची अल्पशी परतफेड करावी म्हणून मी तुझे एक प्रिय करणार आहे विदर्भराज भीमाला दमयंती नावाची एक कन्या आहे ती दमन ऋषींच्या वरप्रसादाने त्याच्या पोटी जन्मली त्रिभुवनातल्या स्त्रियांच्या रूपगर्वाचे दमन करील, असे तिचे लावण्य असल्यामुळे तिला दमयंती असे उचित नाव ठेवले गेले आहे ही दमयंती सर्वार्थी तुलाच योग्य आहे तुझ्या अभावी तिचे रूपगुण वाया जातील विशेष म्हणजे तीही तुझ्यावर अनुरक्त आहे पण स्वर्गातले देवही तिच्या प्राप्तीची अभिलाषा धरून असल्यामुळे तिचा लाभ तुला कसा होईल, असा प्रश्न आहे म्हणून मी तिच्याकडे जाऊन तुझे गुण तिच्यापुढे अशा पद्धतीने वर्णीन, की तुझ्यावर जडलेले तिचे मन इंद्रालाही विचलित करता येऊ नये "

हंसाचे हे भाषण नलराजाला अत्यंत प्रिय वाटले तो त्याला म्हणाला " उन्हाने तापलेल्याला जसा शीतल वारा भेटावा, तसा कामज्वराने तप्त झालेल्या मला तू भेटलास तेव्हा आता तू लौकर तिकडे जा या अंगीकृत कार्यात तुला यश मिळो "

नलाचा निरोप घेऊन हंस विदर्भातल्या कुंडिनपुराकडे निघाला मार्गात त्याला अनेक शुभ शकुन झाले कुंडिनपुरातल्या रमणीय क्रीडावनात तो उतरला तिथे दमयंती आपल्या सख्यांसह विहार करीत असताना त्याला दिसली लागलीच गिरकी घेऊन तो दमयंतीच्या अगदी जवळ गेला हंसाचे ते सोनेरी रूप पाहून दमयंतीला त्याचा मोह उत्पन्न झाला ती त्याला धरण्यासाठी खाली वाकली पण हंस तिच्या हाती लागला नाही त्याने हुलकावण्या दाखवीत तिला बरेच दूर नेले आणि एकांती तिला म्हटले

" हे राजकन्ये, तू मला पकडण्यासाठी वृथा का श्रमतेस ? मला कोणीही पकडू शकत नाही फक्त एक नलराजा तेवढा या गोष्टीला अपवाद आहे आम्ही हंस मंडळी त्याची सेवा करीत असतो काय सांगू त्या नलाचे एकेक गुण ! त्याच्या रूप, औदार्य, रसिकता, गानकौशल्य, " लोकोत्तर गुणांमुळे स्वर्गीचे देवही लुब्ध होतात दमयंती, तुझ्यासारख्या गुणवती कन्येने अशा या राजबिंड्या पुरुषाला वरावे, असे मला वाटते तुम्हा दोघांचे लग्न झाले, तर तुल्यगुण वधूवर एकत्र आणण्याचा दुर्लभ योग ब्रह्मदेवाला लाभेल "

हंसाचे हे भाषण दमयंतीच्या मनाला गुदगुल्या करून गेले

आणि तिने श्लेषाथाने पण लाजत लाजत हसाला म्हटले–

" हे हसा, तू मला माझा उपकारकर्ता वाटतोस नलराजाचे वर्णन करून तू माझ्यावर फार मोठे उपकार केले आहेस मी एकच गोष्ट तुला सागते तो निषधनरेश मला पती मिळावा, म्हणून मी जन्मजन्मातरी वाट पाहीन मला जर माझ्या पित्याने नलाव्यतिरिक्त दुसऱ्या पुरुषाला दिले, तर मी ही माझी काया अग्नीत जाळून टाकीन तेव्हा आता तूच या कामी पुढाकार घे आणि माझा इष्ट वर मला मिळवून दे "

त्यावर हस म्हणाला " माझ इथे येणे सार्थकी लागले, असे मी समजतो आता मी तुझा निरोप घेतो परस्पराच्या लाभाने तुम्हा दोघाचे जीवन कृताथ होवो ! "

असे बोलून हस तिथून निघाला, तो अशोकवृक्षाच्या मुळाशी विरहार्त होऊन बसलेल्या नलाजवळ आला त्याला पाहून नलराजा आनदित झाला मग हसाने दमयतीचा सव वत्तात त्याला निवेदिला त्यानतर नलराजा पुढील घटनेची प्रतीक्षा करीत राहिला

इकडे कुडिनपुरात नलाच्या रूपगुणाचे वर्णन हसमखातून ऐकल्यापासून दमयती पराकाष्ठेची मदनविव्हल झाली त्या बाधेने तिची काया वाळली आणि वर्ण पाडुरका झाला ती कधी हसे, तर कधी भ्रमिष्टासारखी वागे 'दमयती, तुझा प्रियकर सदासवकाल तुझ्या हृदयातच आहे मग तू अशी कष्टी का ? ' असे सख्यानी विचारताच ती उत्तर दई ' ते खर ग ! पण तो सारखा हृदयातच राहतो आणि बाहेर प्रत्यक्षात मात्र कधीच दिसत नाही म्हणून मला दु ख होते '

अशा अवस्थेत एकदा ती मूर्च्छितच पडली त्यामुळे तिच्या महालात गलका व गोधळ उडाला भीम राजाने तो ऐकला व तो घाबरून तिथे गेला पण दमयती थोड्याच वेळात सावध झाली आणि तिने उठून पित्याला प्रणाम केला राजाला तिच्या विकाराचे निदान कळले विवाह हच हिच्या रोगावरचे औषध आहे, असे त्याने ताडले आणि तो तिला म्हणाला ' बाळे, आता मी तुझे स्वयवर माडीन त्यात तू तुझ्या अभीप्सित वराला माळ घाल ' असे बोलून राजा तिच्या अत पुरातून बाहेर आला त्याने लगेच दूताकरवी देशोदेशीच्या राजपुत्राना स्वयवराची निमत्रणे धाडली

त्याच वेळी देवर्षी नारद इद्राची भेट घेण्यासाठी स्वर्गलोकी गेला स्वागत–सत्कार झाल्यावर इद्राने नारदाला विचारले

" देवर्षे, अलिकडे मी पुष्कळ वर्षे पाहतो आहे, की धारातीर्थी पतन पावून माझ्या लोकात कोणीच शूर राजपुत्र येत नाहीत निधड्या छातीने मरणान्त युद्ध करण्याची ईर्षा बाळगणारे वीरपुगव अलिकडे राजवशात निपजतच नाहीत की काय ? त्याचे येण बद पडल्यामुळ मला माझे ऐश्वर्य व्यथ वाटते तरी या सबधात माझे एखादे पातक आडवे येते, की या गोष्टीला दुसरेच काहीतरी कारण आहे, त मला तुम्ही सांगा " त्यावर नारद म्हणाला

" ह देवेद्रा, त्रैलोक्यातले तरुण राजपुत्र स्वर्गात येण्याचे का टाळतात, याचे कारण ऐक पृथ्वीला ललामभूत झालेली भीम राजाची दमयती ही कन्या साप्रत उपवर झाली आहे तिच कोण्यातरी तरुणावर प्रेम बसले आहे, पण तो भाग्यवान तरुण कोण, ते मी योगसिद्ध असूनही मला अजून कळलेले नाही स्त्रीसुलभ लज्जेमुळे तीही त्याचे नाव सागत नाही त्यामुळे तिच्या पित्याने तिचे स्वयवर करण्याचा निश्चय केला आहे त्यामुळे आजकाल सव राजे केवळ त्या दमयतीच्या स्वयवराकडे डोळे लावून बसले आहेत त्याना अन्य काहीच सुचत नाही युद्धाला तर ते विषवत मानतात आजचा त्याचा पुरुषार्थ म्हणजे दागदागिने घालून आणि दमयतीला प्रिय असलेल्या गुणामध्ये नैपुण्य मिळवून तिच्या प्रीतीला पात्र होणे हाच झाला आहे त्यामुळे पथ्वीवरची युद्धे बद पडली असून, युद्ध पाहण्याची माझी करमणूकही नाहीशी झाली आह पृथ्वीवर नाही, तर निदान स्वर्गात तरी युद्ध पाहायला मिळेल, या आशेने मी इकडे आलो आहे "

पण इद्राने स्वर्गलोकी युद्धाचा सभव नसल्याचे सागितले ते ऐकून नारद तिथून निघून गेला मग इद्राच्याही मनात दमयतीच्या प्राप्तीचा विचार सुरू झाला त्यालाही मदनाने पछाडले अग्नी, यम व वरुण याताही दमयतीची वार्ता कळली आणि त्याच्याही तोडाला पाणी सुटले त्या चौघानीही पृथ्वीवर उतरण्याची तयारी केली ते आपापल्या वाहनातून पृथ्वीवर उतरत असता, त्याना नलाचा रथ समोरून यताना दिसला नलाचे तेज, तारुण्य आणि सौंदर्य पाहून ते लज्जित झाले याला टाकून दमयती आपल्याला वरणार नाही, अशी त्याची खात्री झाली

एवढ्यात इद्राला एक युक्ती सुचली खुद्द नलाचाच आपल्या स्वार्थाच्या कामी उपयोग करून घ्यावा, असा कपटी बेत त्याने केला तो पुढे येऊन खोट्या आजवाने नलाला म्हणाला

" हे नलराजा ! इद्र, अग्नी, यम व वरुण असे आम्ही चार देव आहो आणि तुझ्यापाशी आमचे एक मागणे आह '

नलराजा निष्कपट व सरळ अत करणाचा असल्यामुळ त्याला इद्राच्या कपटाची कल्पना आली नाही याचकाने मागावे आणि आपण ते त्याला द्यावे, हे त्याचे ब्रीदच होत त्यामुळे त्याने देवाचे मागणे त्याना देण्याचे मान्य केले त्याचा हकार मिळताच इद्र त्याला म्हणाला " आम्ही चौघे दमयतीच्या

पाणिग्रहणाची आशा धरून इकडे आलो आहो तेव्हा तू आमचा दूत हो आणि दमयंतीचे मन आमच्याकडे वळव "

आता मात्र नलाला इंद्राचे कपट पूर्णपणे उमगले तो मग देवाना म्हणाला "तुम्ही सर्व थोर आहा मी तुम्हाला फसवणे योग्य नव्हे दमयंतीच्या प्राप्तीचाच हेतू धरून मीही इकडे आलो आहे अशा स्थितीत मी तुमचे दूतकर्म कसे करू शकेन ? तेव्हा माझी तुम्हाला विनती अशी, की दमयंती मलाच वरील असे तुम्हीच काहीतरी करा "

त्यावर त्या चारही देवांनी नलाच्या विरुद्ध एकच गिल्ला केला 'तू वचन देतोस आणि ते मोडतोस, हे तुझ्या वंश कीर्तीला शोभणारे नाही,' असे ते म्हणाले देवांच्या या माऱ्यापुढे नलराजा हतबल झाला त्याने देवांचे दूतकर्म करायचे मान्य केले पण त्या कामी अडसर होता तो दमयंतीच्या अंतःपुरात प्रवेश करण्याचा म्हणून मग इंद्राने नलाला गरज पडेल त्याप्रमाणे गुप्त किंवा प्रकट होण्याची सिद्धी दिली नलराजा त्या कामगिरीवर गेल्यावर देव तिथेच त्याची वाट पाहत बसले

नलराजा गुप्तपणे दमयंतीच्या अंतःपुरात शिरला तिथे एका रम्य स्थळी दमयंती आपल्या सख्याबरोबर विश्रंभ गोष्टी करीत बसली होती तिला पाहताच नलाचे प्रेम अनावर झाले प्रेम आणि दूतकर्म या दोन गोष्टींच्या कात्रीत त्याचे मन सापडले तो स्वतःशीच तिच्या सौंदर्याचे वर्णन करू लागला 'अगोदरच विधात्याने तिला त्रैलोक्यसुंदरी बनविले आहे त्यात हा तारुण्याचा बहर आणि त्यातही मदनाने तिला शिकवलेले शृंगारचातुर्य ! छे ! हिचे वर्णन करणे ही गोष्ट शब्दातीत आहे '

नंतर त्याने आपले रूप प्रकट केले दमयंती विस्मयाने त्याच्याकडे टक लावून पाहू लागली तिच्या अंतरातली मूर्ती आणि समोरची मूर्ती या दोहोत तिला साम्य दिसले प्रत्यक्ष नलच आपल्यापुढे उभा आहे, असे तिला वाटले पण ते क्षण भरच ! तिला वाटले, की सर्व बाजूंनी सुरक्षित असलेल्या आपल्या अंतःपुरात नल कुठून येणार ? मग तिने नम्र भावाने नलाला विचारले 'तुम्ही कोण ? तुमचे नाव काय ? तुम्हाला इथे प्रवेश कसा मिळाला ? तुम्ही मानव असाल तर ही पृथ्वी कृतार्थ झाली, देव असाल, तर स्वर्गलोक सर्वोत्कृष्ट ठरला आणि नाग असाल, तर सर्वांच्या खाली असलेला नागलोक सर्वांच्या वरचढ झाला, असे म्हटले पाहिजे '

त्यावर नलाने तिला मोठ्या संयमाने उत्तर दिले

"हे रूपमती राजकन्ये ! मी इंद्र, यम, अग्नी आणि वरुण या लोकपालांनी तुझ्याकडे पाठवलेला दूत आहे तुझ्या रूप गुणावर ते माळले आहेत आणि स्वयंवरासाठी या राज्यात आले आहेत या चौघांपैकी कोणाशीही विवाह करून तू त्यांचे मनोरथ पूर्ण कर तुझ्या प्राप्तीवाचून आमचे जीवन व्यर्थ आहे, तरी तू कामबाणांनी आम्हाला झालेल्या जखमा बऱ्या करणारी औषधी हो, असा त्यांचा तुला संदेश आहे "

नलाने सांगितलेला तो देवसंदेश दमयंतीने ऐकला तो तिला रुचला म्हणून नव्हे, तर नलाची मधुरवाणी तिच्या कानांना सुख देत होती म्हणूनच तिने तो ऐकून घेतला मग ती भानावर येऊन त्याला म्हणाली "अहो दूतमहाराज, मी तुम्हाला तुमचे नाव आणि कुल विचारले होते ते तुम्ही मला सांगत नाही आणि भलतच काहीतरी बोलता"

"माझे नाव आणि कुल या प्रसंगी उच्चारणे अप्रस्तुत आहे पण तुझा हट्टच असेल, तर मी तुला एवढेच सांगू शकतो, की मी चंद्रवंशातला कोणी तरी एक आहे "

"तुमच्या या उत्तराने मला काहीच बोध होत नाही माझी अशी प्रतारणा तुम्ही काय म्हणून चालविली आहे ? आम्ही कुलकन्यका परपुरुषाशी बोलत नसतो "

"तू माझ्यासारख्या परपुरुषाशी बोलूच नकोस तू देवांच्या संदेशाला उत्तर दे "

"ऐका तर मग माझ्यासारख्या मानुष कन्येला वरणे हे देवांना अनुचित आहे कुठे स्वर्गातल्या त्या देवांगना आणि कुठे मी मानवकन्या ! त्यांच्यापुढे माझा पाड लागायचा नाही हेच माझे देवांच्या संदेशाला प्रत्युत्तर ! "

तेवढ्यात दमयंतीची एक सखी तिचे मनोगत बोलली 'या माझ्या प्रिय सखीने निषधेश्वर नलाला मनाने वरले आहे हे त्या साक्षी देवांना ठाऊक असेलच म्हणून त्यांनी हिच्या पातिव्रत्याला कलंक लावण्याचा प्रयत्न न करता कृपाळू होऊन हिला नलाची भिक्षा घालावी तसे न झाल्यास हिला आत्म हत्येचे पाप नाइलाजाने पत्करावे लागेल '

त्यावर नल म्हणाला "तुझ्यासारख्या मानुष स्त्रीने देवांची मागणी नाकारणे म्हणजे चालत आलेल्या भाग्याला डावलणे आहे इंद्राला टाकून नलाला वरण्याची तुझी इच्छा शहाणपणाची नाही ऊस सोडून शमीच्या काड्या खाणारा उटसुद्धा तुझ्यापेक्षा अधिक शहाणा ठरेल 'नल मिळाला नाही तर मी आत्महत्या करीन' असे तू म्हणतेस, पण मरून तरी तू देवलोकीच जाणार ना ? मग जिवंतपणीच खळखळ कशाला ? "

त्यावर दमयंती थोडा वेळ स्तब्ध राहून नलाला म्हणाली

"तुम्ही यमदूतालाच शोभतील असे कठोर व भेदक शब्द मला बोललात त्यामुळे मला दुःसह वेदना झाल्या आहेत "

त्यावर नलराजा फिरून धीर धरून बोलला

"हे पाहा दमयंती, इंद्राच्या दारी कल्पवृक्ष आहे. इंद्राने त्या वृक्षाकडे तुझी मागणी केली, तर त्या कल्पवृक्षाला इंद्राचे मनोरथ पूर्ण करावेच लागतील. वरुणाजवळ कामधेनू आहे. तिच्याकडे त्याने तुझी मागणी केल्यास तीही तुला वरुणाच्या घरात घालील. वैदिक यज्ञ हा सर्व कामप्रद असतो. मग खुद्द अग्नि-नारायणाला तुझी प्राप्ती अगदीच सुकर आहे. राजकन्ये, तू नीट विचार कर. स्वयंवर निर्विघ्न पार पाडण्याची जबाबदारी इंद्रपत्नी शची हिच्यावर असते. तीच जर तुझ्यावर रागावली, तर स्वयंवरासाठी जमलेल्या राजपुत्रांत कलह उत्पन्न होऊन स्वयंवरच मोडेल. विवाहाच्या वेळी अग्नी पेटलाच नाही, तर त्याच्या साक्षीने नलाशी तुझा विवाह होईलच कसा? जलाधिपती वरुणाने उदकाला स्थिर होण्याची आज्ञा केली, तर कन्यादानप्रसंगी तुझा बाप नलाच्या हातावर दानोदक सोडीलच कसे? यमाने तुझ्या किंवा तुझ्या नात्यातल्या एखाद्या माणसाला ऐनवेळी ठार मारले, तर लग्नात आपोआप विघ्न उत्पन्न होईल. तात्पर्य, देव जर अशी विघ्ने आणू लागले, तर नलाशी तुझा विवाह अशक्य आहे."

नलाची ही कटू व भेदक वचने ऐकून दमयंती अगतिक होऊन रडू लागली. तिने देवांचा धावा केला आणि हात जोडून नलालाही आत्मरक्षणार्थ हाक मारली.

एवढा वेळ दूत म्हणून आलेला हा पुरुष खुद्द नलराजाच आहे, हे दमयंतीला ठाऊक नव्हते. पण दमयंतीची आपल्या विषयीची एकनिष्ठा पाहून त्याचे चित्त द्रवले आणि त्याने आपले नाव उघड केले. एवढ्यात तो सुवर्णाचा हंसही तिथे आला व नलाला म्हणाला 'हे नलराजा, फार एवढे दूतकर्म पुरे झाले. यापुढे तू दमयंतीची निराशा करू नकोस.' मग नलाने मनातल्या मनात देवांची क्षमा मागितली आणि दमयंतीला धीर दिला. नंतर नलराजा देवांच्याकडे गेला आणि त्याने त्यांना घडला वृत्तान्त निवेदिला. अशा रीतीने देवांचे ते कपटी कारस्थान दमयंतीने निष्फळ ठरवले आणि नलही देवांना दिलेल्या वचनातून मुक्त झाला.

दुसऱ्या दिवशी स्वयंवरमंडपात देशोदेशींचे राजपुत्र येऊन दाखल झाले. नलराजाही आला. त्याच वेळी इंद्र, अग्नी, यम, वरुण हे देवही नलाचे रूप घेऊन त्याच्या शेजारी येऊन बसले. दमयंतीला फसवून आपल्यापैकी कोणाचा तरी कार्यभाग साधण्याची ही देवांची युक्ती होती.

राजे आणि राजपुत्र यांची अशी घनदाट सभा बसल्यावर भीमराजाला असा विचार पडला, की या सर्व लोकांची नावे आणि चरित्रे दमयंतीला कोण बरे सांगेल? मग त्याने त्यासाठी महाविष्णूची प्रार्थना केली. महाविष्णूने सरस्वतीला आज्ञा दिली. त्या क्षणी सरस्वती सभेत अवतीर्ण झाली. मग भीमराजाने तिचे स्वागत करून दमयंतीला सभेत बोलावले. ती त्रिभुवनसुंदरी मंडपात प्रवेश करताच सर्व सभा तिच्या दर्शनाने स्तिमित झाली. जे राजपुत्र ऐन तारुण्यात होते ते तर शृंगारिक हावभावच करू लागले. मग सरस्वतीने तिला आपल्याबरोबर मंडपातल्या रांगेरांगेत फिरवून सर्व राजांची आणि राजपुत्रांची ओळख करून दिली.

पण दमयंती कोणत्याही राजपुत्रापुढे न थांबता पुढे पुढे जाऊ लागली. शेवटी तिला नल दिसला. ती त्याच्याकडे पाहत असताना तिला नलासारखेच आणखी चार पुरुष तिथे दिसले. त्यामुळे ती फार गोंधळली. सरस्वतीने त्या चार देवांपैकी प्रथम इंद्राचे वर्णन अशा खुबीने केले, की ते इंद्र व नल या दोघांनाही लागू पडावे. त्यामुळे दमयंतीला संभ्रम पडला. त्यापुढे लगेच सरस्वतीने अग्नी, यम व वरुण यांचीही उभयपक्षी लागू होणारी प्रशंसा केली. त्यामुळे दमयंतीचा अधिकच गोंधळ झाला. नंतर तिने चार श्लोकांनी खऱ्या नलाची स्तुती केली. पण त्यापैकी पहिला श्लोक इंद्राला, दुसरा अग्नीला, तिसरा यमाला व चौथा वरुणाला लागू पडू लागला. नंतर सरस्वतीने दमयंतीला आणखी एक श्लोक ऐकवला. त्यातील सर्व विशेषणे खऱ्या नलाला लागू होत होती, तशीच ती इतर चारही देवांना लागू होत होती. त्यामुळे खरा नल कोणता तेच दमयंतीला कळेना.

मग तिने खरा नल कोणता ते दाखवण्याबद्दल देवांचीच प्रार्थना केली. त्या प्रार्थनेने देव तिच्यावर प्रसन्न झाले. देवांचा प्रसाद म्हणजे निश्चयात्मक बुद्धी, ती तिला प्राप्त झाली आणि मग सरस्वतीच्या वर्णनातील नलाला लागू होणारा अर्थ तिला वेगळा प्रतीत होऊ लागला. शेवटी तिने देव कोणते आणि नल कोणता हे स्पष्ट ओळखले. देवांचे पाय जमिनीला स्पर्श करीत नव्हते. त्यांच्या डोळ्यांची उघडझाप होत नव्हती. त्यांच्या अंगाला धूळ लागत नव्हती. त्यांना घाम येत नव्हता. त्यांनी धारण केलेल्या माळा सुकत नव्हत्या आणि त्यांची सावलीही पडली नव्हती. या गोष्टींमुळे खरा नल तिला निवडून काढता आला. आता खरे म्हणजे तिने लगेच नलाच्या गळ्यात माळ घालायची, पण लज्जेने तिचा हातच पुढे होईना. त्या वेळी सरस्वतीला तिची थट्टा करावीशी वाटली. तिने तिला पुढे ओढले आणि नलरूपी इंद्राकडे नेऊन म्हटले 'घाल याच्या गळ्यात माळ.' पण सर्पापासून हात मागे घ्यावा, तसा दमयंतीने आपला हात तत्क्षणी मागे घेतला. त्यानंतर सरस्वतीने तिला खऱ्या नलापुढे आणले व तिचा हात माळेसह नलाच्या कंठाशी नेला. तेव्हा मात्र दमयंतीने चटकन नलाच्या गळ्यात माळ घातली. त्यासरशी सर्वांच्या तोंडून प्रशंसोद्‌गार निघाले. मग इंद्रादी देव

आपापली रूपे धारण करून सरस्वतीसह स्वर्गलोकी निघून गेले पाठोपाठ आकाशातून त्या जोडप्यावर पुष्पवृष्टी झाली त्यामुळे भीमराजाच्या आनंदाला पारावार उरला नाही

मग ज्योतिष्याना शुभमुहूर्त विचारून भीमराजा दमयतीचा विधियुक्त विवाह करण्याच्या मार्गाला लागला विवाहाच्या आधी सौभाग्यवती स्त्रियानी दमयतीला मगल स्नान घातले व तिचा सगळा शृगार केला तिने मग सव वडीलधाऱ्या मडळीना नमस्कार केला आणि ती विवाहमडपात जायला सिद्ध झाली

इकडे नेपथ्यकुशल सेवकानी नलालाही वस्त्रभूषणानी नटवल नतर वरयात्रा निघाली नलराजा रथावर बसला विदर्भ नगरीतल्या स्त्रिया त्या नवरदेवाचे रूप यौवन पाहता पाहता देहभान विसरल्या लग्नमडपाच्या द्वारी येताच दमयतीच्या दम नावाच्या बधूने नलाचे स्वागत केले मग नलाने दमयतीचे विधियुक्त पाणिग्रहण केले भीमाने जावयाला रथ, घोडे, तलवार, गरुडमण्याचे भोजनपात्र, इ मौल्यवान वस्तू आंदण म्हणून दिल्या

लग्नानतर नलराजा काही दिवस सासुरवाडीला राहिला त्या दिवसात दमयतीचा भाऊ दम याने वऱ्हाडी मडळीच्या अनेक प्रकारच्या चेष्टा केल्या नलाची एक दासी हातात पखा घेऊन त्याला वारा घालीत उभी होती दमाच्या दासीने हळूच तिच्या पायावर एक सरडा सोडला तो वर वर चढ् लागताच त्या दासीची अवस्था चमत्कारिक झाली आणि ती पखा टाकून पळून गेली वऱ्हाडी मडळीत काही शाकाहारी पाहुणे होत त्यांच्या ताटात मासमय पदार्थांचा भ्रम उत्पन्न करतील अशी काही पक्वान्ने व व्यजने मुद्दाम वाढण्यात आली त्यामुळे ते लोक तोडे वेडीवाकडी करून पानावरून उठले मग त्याना कोणीतरी वस्तुस्थिती समजावून दिल्यावर तिथे एकच हशा पिकला एकदा सव भोज्य पदार्थ पाचूच्या ताटात वाढून ती ताटे वऱ्हाडी मडळीपुढे ठेवण्यात आली पाचूचा हिरवा रग त्या पदार्थांवर पडल्यामुळे त भरलेले पात्रच हिरवेगार दिसू लागले वऱ्हाडी मडळीना वाटल, की ही नुसतीच पाने आहेत त्यामुळे ते रागावले मग कोणीतरी खरा प्रकार त्याच्या निदर्शनास आणून दिल्यावर त्याचा राग शमला असे अनेक प्रकार थाल आणि हास्य विनोदात लग्नानतरचे ते काही दिवस चुटकीसारखे निघून गेले

मग नल राजाने आपल्या देशाला परत जायचे ठरवले माहेरच्या मडळीनी दमयतीला पाठवण्याची तयारी कली वाजत गाजत वरात निघाली आपल्या राज्याच्या सीमेपर्यत भीमराजा मुलीला पोचवायला गेला तिथून माघारी फिरताना त्याने दमयतीला जो उपदेश केला, तो असा—

"मुली, आता तुझे पुण्य हाच तुझा बाप आह यापुढे मी तुझा कोणीही राहिलो नाही तू क्षमाशील हो सतोष हेच धन समज आणि पतीलाच आपले सर्वस्व मान"

नलराजा आपल्या नववधूसह राजधानीत आला यावर मत्रिजनानी नगरसीमेवर त्याचे स्वागत केले नगरातून राजवाड्या कडे येताना पुरस्त्रीनी माड्या-सज्जातून त्या दांपत्यावर लाह्याची वृष्टी केली नलराजा दमयतीसह आपल्या राज प्रासादात प्रविष्ट झाला दमयतीची घरभरणी झाली

पण दुसरीकडे त्याच वळी आणखी एक पेचदार प्रसग घडत होता इंद्रादी देव स्वर्गाला चालले असता त्याना कृष्णवर्णी अपवित्र व्यक्तीचा एक मोठा जमाव समोरून येताना दिसला ते होते कलीने पुरस्कारलेले काम, क्रोध, लोभ व मोह त्याच्या बरोबर बौद्ध चार्वाकादी नास्तिकही होते ते सारे कलीचे सैन्य होते सर्वांच्या अगावर काळी वस्त्रे होती ते सैन्य जवळ येत असता चार्वाकाचे पुढील भाषण देवाच्या कानावर आले—

'दगड पाण्यात तरतात हे वाक्य जसे अप्रमाण, त्याच प्रमाणे वेदानी सागितलेली ज्योतिष्टोमादी यज्ञाची फले अप्रमाण आहेत जातीजातीत उच्चनीच भेद नाहीतच पाप नावाची वस्तूच नाही इद्रियनिग्रह हे आत्मवचन आहे श्रुति स्मृति पुराणे ही सगळी मूर्खांना फसवण्यासाठी धूर्तांनी रचलेली बाडे आहेत देहावगळा आत्मा नाहीच स्वर्गाचा लोभ व नरकाचे भय फोल आह वैराग्य हा मूर्खपणा आहे मीमासा, न्याय, वेदान्त, इ शास्त्रे कुचकामाची आहेत दानधर्म ही उधळपट्टी आहे देव सारे व्यभिचारी आहत "

चार्वाकाचे ते भाषण ऐकताच इद्राला पराकाष्ठेचा क्रोध आला त्याने चार्वाकाला दरडावले आणि त्याच्या विधानाचेही खडन केले यमाने व वरुणानेही इद्राला साथ दिली ते चौघेही देव आपल्यावर क्रुद्ध झाले आहत, असे पाहून चार्वाक हात जोडून त्याना म्हणाला 'महाराज, हा अपराध माझा नव्हे मी कलीचा दास आहे त्यामुळे त्याला जे प्रिय वाटेल तेच मला बोलावे लागते' चार्वाक असे बोलत आहे, तोच रथारूढ होऊन पुढे येणारा कली त्याना दिसला त्याच्याबरोबर द्वापरही होता त्याने मोठ्या तोऱ्यात देवाचे कुशल विचारून त्याना म्हटले 'आम्ही दमयतीच्या स्वयवराला निघालो आहो' त्यावर ते चौघेही देव हसू लागले कली म्हणाला 'तुम्ही हसता का?' त्यावर देव म्हणाले 'अरे, दमयतीचे स्वयवर केव्हाच होऊन चुकले तिने देवाना सोडून नलाला म्हणजे एका माणसाला वरले' त्यावर कली चवताळून म्हणाला 'खरे की काय? मग तुम्ही देव असे निर्लज्ज कसे? तुम्ही स्वर्गाची ही मान

ह्यानी सहन कशी केली ? त्या दोघांना तुम्ही उभे जाळले का नाही? थांबा; आता मी त्या नलाचा सूड घेतो. त्याचा दमयंतीशी व पृथ्वीशीही वियोग घडवून आणतो. हीच माझी प्रतिज्ञा !"

ती प्रतिज्ञा ऐकून इंद्र कलीचा निषेध करून म्हणाला.

"नलासारख्या सच्चरित्र पुरुषाशी तुझे वैर फलद्रूप होणार नाही. दमयंतीसारख्या साध्वीपुढेही तुझा पाड लागणार नाही. तुझा मुळी नलराज्यात प्रवेशच होणार नाही."

पण इंद्राचा हा सदुपदेश कलीने धुडकावून लावला. तो नलाचा सूड घेण्याच्या उद्देशाने द्वापरासह नलाच्या राजधानीला आला. पण आश्चर्याची गोष्ट अशी, की त्याच्या नगरप्रवेशालाच विघ्ने येऊ लागली. तिथल्या वेदपठनाच्या ध्वनीपुढे त्याला भूमीवर पायही ठेवता येईना. यज्ञधूमामुळे त्याचा श्वास कोंडू लागला. अतिथिसत्कारासाठी तिथल्या अंगणात पाणी सांडून जो ओलसरपणा आला होता, त्यावर त्याचे पाय घसरू लागले. ब्राह्मणांच्या अंगावर ओढलेले भस्माचे व चंदनाचे पट्टे खंजिरासारखे त्याच्या अंगात घुसू लागले. त्याला तिथे एकही मित्र भेटेना किंवा अनुकूल असे आश्रयस्थानही दिसेना. नल–दमयंतीचे त्याला दर्शन झाले; पण त्यांच्या शरीरांत प्रवेश करायला त्याला काही कारणच सापडेना. शेवटी तो नलाच्या उपवनातल्या बिब्याच्या झाडावर बसून नलाच्या दोषांकडे डोळ्यात तेल घालून पाहत राहिला. अशी बहुत वर्षे लोटली.

नलाचे राज्य सुस्थितीत असल्यामुळे त्याला आता विशेषसे काम उरले नव्हते. शिवाय दमयंतीसारखी तरुण, सुंदर व कलाचतुर पत्नी त्याला लाभली होती. त्यामुळे राज्याचा कारभार मंत्रिमंडळावर सोपवून तो विलाससुखाचा उपभोग घेत राहिला.

एके दिवशी संध्यासमयीचे निसर्गदृश्य पाहून तो प्रसन्न झाला व दमयंतीपुढे त्या दृश्याचे वर्णन करू लागला.

"हे प्रिये, ही पश्चिम दिशा लाक्षारसाने किंवा कुंकवाच्या सड्याने सारवल्यासारखी दिसत आहे. या दृश्याकडे पाहिले म्हणजे असे वाटते, की संध्याकाळ हा एक मोठा शिकारी असून, त्याने दिवसरूपी हत्तीचा वध केला आहे, त्याच्या विद्ध शरीरातून सांडणारे रक्त म्हणजे ही कातरवेळ असून, त्याच्या गंडस्थळातून बाहेर उडालेली मोत्ये म्हणजे या तारका होत."

एवढ्यात चंद्रोदय झाला आणि नलाने चंद्राचेही अनेक प्रकारे काव्यमय वर्णन केले. ते ऐकत असता दमयंती तल्लीन होऊन स्तब्ध बसली होती. तिची ती स्तब्धता पाहून नल तिला म्हणाला.

"प्रिये, तू बोलत का नाहीस ? तुझ्या मुखाप्रमाणे दिसणाऱ्या चंद्राची मी थोडी अधिक प्रशंसा केली म्हणून रागावलीस काय ? ते काही नाही ! आता तू बोललेच पाहिजेस. हे पाहा, तुझ्या मुखातून या चंद्राचे वर्णन ऐकण्याची मला फार उत्सुकता आहे."

त्यावर दमयंतीनेही आढेवेढे न घेता चंद्राचे वर्णन सुरू केले.

"अंधकाररूपी यमुनाप्रवाहाचा पूर वाहून गेल्यावर त्या नदीत एक श्वेतद्वीप दिसू लागते. चंद्रिका हा त्याचा वालुकामय प्रदेश असून चंद्र हा तिथला दिवा आहे. चंद्राच्या मांडीवर विश्वासाने बसलेल्या सशाचा ग्रास करण्यासाठी राहू त्याच्यावर झडप घालतो; पण मांडीवर झोपलेल्या त्या सशाला राहूच्या हवाली करण्याऐवजी चंद्र राहूला स्वतःचाच ग्रास करू देतो. आणि त्याच पुण्याच्या बळावर तो पुढे राहूच्या हातून सुटतो."

दमयंतीने केलेले हे वर्णन ऐकून नलाला हर्ष झाला. तो तिच्या मुखाचे चंद्राशी साम्य आणि चंद्रापेक्षाही श्रेष्ठत्व काव्यमय वाणीने वर्णून शेवटी म्हणाला.

"हे प्रिये, कामोत्सवाच्या प्रसंगी सुवर्णाच्या सहस्रधारांनी वर्षाव करणाऱ्या अभिषेककलशासारखा शोभणारा हा चंद्र आपणा उभयतांच्या परमानंदाला कारणीभूत होवो !"

**नैषधीयाचा उगम–** श्रीहर्षाने प्रस्तुत महाकाव्यात जिचा एवढा प्रपंच केला, ती नलकथा महाभारतात एका उपाख्यानाच्या रूपाने आली आहे. श्रीहर्षाने ती तिथूनच घेतली आणि तिला आपल्या प्रतिभेच्या सामर्थ्याने एका महाकाव्याचा आकार दिला. नलचरित्र हे फार मोठे भव्योदात्त चरित्र आहे. नल आणि दमयंती या दोघांनीही दुर्दैवाचे अनेक वज्राघात सोसले. ते दांपत्य जणू संकटांच्या अग्निदिव्यातूनच तावून सुलाखून बाहेर पडले. या नलचरित्राचा पूर्वार्ध म्हणजे त्याच्या विवाहापर्यंतचाच भाग कवीने आपल्या काव्यासाठी स्वीकारला आहे. पण काव्याला नाव मात्र दिले आहे नैषधीयचरित !

त्यावरून काही संशोधक असे अनुमान करतात, की प्रस्तुत महाकाव्य हे अपूर्ण आहे किंवा पूर्ण झाले असले, तर त्याचा उर्वरित भाग कालौघात लुप्त झाला आहे. जर ते पूर्ण असते, तर नलाच्या पुढच्या चरित्रात ज्याने उलथापालथ घडवली, त्या कलीचा प्रसंग कवीने त्यात आणला नसता. ज्या अर्थी त्याने कलिप्रसंगाचे अवतरण केले, त्या अर्थी त्याने नलचरित्राचा उत्तरभागही काव्यबद्ध केला असलाच पाहिजे. श्री. नीलकमल भट्टाचार्य हे या मताचे समर्थक आहेत. पण डॉ. चंडिकाप्रसाद शुक्ल हे प्रस्तुत काव्य अपूर्ण नसून पूर्ण असल्याचा दावा करतात. ते म्हणतात –

नलचरित्र हे पूर्वापार लोकविश्रुत आहे. त्याविषयी कवीने पहिल्या तीन श्लोकांत असे सूचित केले आहे, की 'त्या पुण्य-

श्लोकाच्या चरित्राच्या जेवढ्या अंशाचे स्मरण केले जाईल, तेवढा अंशही माणसाला पवित्र करण्यास समर्थ ठरेल.' यावरून कवीला नलचरित्राचा पूर्वभाग तेवढाच सांगायचा होता, असे निस्संशय म्हणता येते. आणि दुसरी गोष्ट अशी, की जर कवीला पुढचा चरित्रभाग लिहायचा असता, तर त्याने बाविसाव्या सर्गाच्या शेवटी समाप्तिदर्शक किंवा समारोपात्मक श्लोक लिहिले नसते. डॉ. वाटवेही याच मताचे आहेत.

पण त्यांच्या या युक्तिवादावर त्यांच्या आधीच काही पंडितांनी मूलेकुठार घातला आहे. ते म्हणतात, की समाप्तिसूचक ते चार श्लोकच मुळी प्रक्षिप्त आहेत. तसे नसते, तर पडितांमध्ये सदर काव्य साठ किंवा एकशे वीस सर्गांचे असल्याची जी प्रसिद्धी आहे, ती झालीच नसती.

रामायण– महाभारत आणि पुराणे या ग्रंथांतून अनेक धीरोदात्त पुरुषांची आणि श्रेष्ठ चारित्र्याच्या नायकांची आख्याने विस्ताराने वर्णिली असता, श्रीहर्षाने आपल्या कवित्वासाठी त्यांतले नलचरित्रच का निवडले, याविषयी एक ऐतिहासिक कारण सांगितले जाते, ते असे –

श्रीहर्ष ज्या जयचंद राठोडाच्या दरबारात होता, त्या जयचंदाला संयोगिता या नावाची एक कन्या होती. पृथ्वीराज या शूरवीराची कीर्ती ऐकून तिचे त्याच्यावर प्रेम जडले. पण पृथ्वीराज आणि जयचंद या दोघांत वैराग्नी धुमसत होता आणि त्यामुळेच संयोगितेचे पृथ्वीराजावरचे प्रेम जयचंदाला रुचण्याजोगे नव्हते. त्यामुळे त्याने संयोगितेचे स्वयंवर मांडले; पण त्यासाठी पृथ्वीराजाला मात्र निमंत्रण दिले नाही. याच्या उलट स्वयंवरासाठी येणाऱ्या राजपुत्रांच्या पुढे पृथ्वीराजाचा अपमान करावा, म्हणून जयचंदाने त्याचा पुतळा तयार केला आणि तो स्वयंवरमंडपाच्या महाद्वारात द्वाररक्षक म्हणून उभा केला. पण संयोगिता आपल्या प्रेमभावनेशी इतकी एकनिष्ठ होती आणि इतकी धीट होती, की तिने स्वयंवरप्रसंगी त्या पुतळ्याच्याच गळ्यात माळ घातली. थोड्याच वेळात पृथ्वीराजाने तिथे येऊन कृष्णकृत रुक्मिणीहरणाप्रमाणे संयोगितेचे हरण केले आणि तिच्याशी विवाह केला. त्या घटनेमुळे जयचंद आणि पृथ्वीराज यांच्यांतले वैर इतके विकोपाला गेले, की त्यात जयचंद आणि पृथ्वीराज या दोघांचीही अपरिमित हानी झाली.

ही घटना श्रीहर्षाने प्रत्यक्ष पाहिली होती. कोण्याही कवीला तिच्यावर काव्य करण्याचा मोह अनावर झाला असता. श्रीहर्षालाही तसा तो झाला. पण साक्षात त्या प्रसंगावर काव्य रचून पृथ्वीराज-संयोगितेचा उदोकार करणे म्हणजे आपल्या आश्रयदात्याला दुखवण्यासारखे होते, म्हणून त्याने त्यासाठी नल-दमयंतीच्या स्वयंवराची कथा निवडली आणि तिच्यावर महाकाव्य रचून त्यात नलाचे लोकोत्तर गुण आणि दमयंतीची नलविषयक निष्ठा व्यक्त केली.

यावरूनही प्रस्तुत काव्य हे पूर्ण असावे, या अनुमानाला बळकटी येते.

**काव्यगुण–** नैषधात शृंगार हा प्रधानरस आहे. संभोग आणि विप्रलंभ हे त्या रसाचे दोन्ही प्रकार यात विस्तारपूर्वक वर्णिले आहेत. पैकी विप्रलंभ हा स्वयंवराने झालेल्या मीलनाच्या पूर्वी आलेला असून, संभोग हा विवाहानंतर वर्णिलेला आहे.

प्रस्तुत काव्यात दमयंती ही सर्वप्रथम मुग्धा नायिकेच्या रूपात दिसते. विवाहोत्तर विलासप्रसंगी तिला अनेक मागच्या गोष्टी आठवतात आणि त्यामुळे तिचा जीव लाजतो. उदा०

**दूत्यसङ्गतिगतं यदात्मन: प्रागशिश्रवदियं प्रियं गिर: ।**
**तं विचिन्त्य विनयव्ययं ह्रिया न स्म वेद करवाणि कीदृशम् ।।**
**यत्तया सदसि नैषध: स्वयं प्राग्वृत: सपदि वीतलज्जया ।**
**तन्निजं मनसिकृत्य चापलं सा शशाक न बिलोकितुं नलम् ।।**
(नै. १८. ३१–३२)

अर्थ – दूतरूपाने अंत:पुरात आलेल्या नलाच्या समोर तिने आपल्या मुखाने जो प्रणयभाव प्रकट केला होता, तो तिला आठवला. तो आपल्या हातून विनयभंगच झाला, असे समजून तिला आपल्या त्या धृष्टतेबद्दल मीलनप्रसंगी लाज वाटली आणि आपण कसे वागावे ते तिला समजेनासे झाले. स्वयंवरसभेत तिने संकोच सोडून नलाच्या गळ्यात वरमाला घातली होती. ते आपले अविनीत कृत्य तिला त्या वेळी स्मरले आणि ती नलाच्या मुखाकडे पाहूही शकली नाही.

पण हळूहळू तिचा तो संकोच दूर झाला. तिचे मुग्धपण जाऊन ती प्रौढा बनली.

**चुम्बितं न मुखमाचकर्ष यत् पत्युरन्तरमृतं ववर्ष तत् ।**
**सा नुनोद न भुजं तदर्पितं येन तस्य किमभून्न तर्पितम् ।।**
(नै. १८. ७०)

अर्थ – नलराजा तिचे चुंबन घेऊ लागला असता तिने आपले मुख मागे घेतले नाही; तर पतीच्या अंतरात तिने अमृताचा वर्षाव केला. त्याने तिला घातलेले भुजबंधनही तिने झिडकारले नाही. त्यामुळे नलाची सर्वांगे तृप्त झाली.

त्यानतर ती नलाशी निस्संकोच हास–परिहास करू लागली.

**वीक्ष्य पत्युरधरं कृशोदरी बन्धुजीवमिव भृङ्गसङ्गतम् ।**
**मञ्जुलं नयनकज्जलैर्निजै: संवरीतुमशकत् स्मितं न सा ।।**
**तां विलोक्य विमुखश्रितस्मितां पृच्छतो हसितहेतुमीशितु: ।**
**ह्रीमती व्यतरदुत्तरं वधू: पाणिपङ्करुहि दर्पणार्पणात् ।।**
(नै. १८. १२५–२६)

अर्थ– त्या कन्यांनी दमयंतीच्या डोळ्यांत काजळ घातले होते. नलाने तिच्या अधराचे चुंबन घेताच त्याच्या अधरावर त्या काजळाची रेषा उमटली. त्यामुळे तो अधर भ्रमर बसलेल्या कुंद पुष्पासारखा दिसू लागला. ते पाहून दमयंतीला हसू आवरेना. ती तोंड बाजूला करून हसत आहे, असे पाहून नलाने तिला हसण्याचे कारण विचारले, पण लज्जेमुळे ती उत्तर देऊ शकेना. मग तिने तिथला आरसा उचलला आणि तो नलाच्या हाती दिला. (आरशात पाहिल्यावर नलाला तिच्या हसण्याचे कारण उमगले.)

एक धीरोदात्त व पुण्यश्लोक नायक म्हणून श्रीहर्षाने नलाकडे पाहिले आहे. नलकथेच्या संकीर्तनाने आपली वाणी पवित्र होईल अशी त्याची श्रद्धा आहे. महाभारतातल्या नलापेक्षा आपल्या काव्यनायकाचे रूप-गुणांना अधिक श्रेष्ठ असल्याचे त्याला दाखवायचे आहे. नलवर्णनाच्या रूपाने एका आदर्श राजाचे चित्र तो पुढे उभे करतो. महाभारतात बलवान, रूपवान, यजनशील, दानपती, सत्यवादी, सुंदर स्त्रियांचा आवडता अशी जी नलाला विशेषणे दिली आहेत, त्यांचा श्रीहर्षाने मनोहर विस्तार केला आहे. राजहंसाशी त्याची वागणूक सुसंस्कृतपणाची दाखवली आहे. तो इंद्राच्या कपटाला कपटाने प्रत्युत्तर न देता आपले वचन सत्यनिष्ठेने पाळतो (नै ५ १३७). देवांचा दूत म्हणून दमयंतीपुढे गेला असता तो तिला सांगतो, की 'मी दूत म्हणून तुझ्याकडे आलो आहे. अशा स्थितीत दूतधर्माला विसरून स्वतःचा स्वार्थ साधणे हे मला पसंत नाही.' महाभारतातील या प्रसंगीची नलाची वागणूक पूर्णपणे व्यवहारी आहे. त्या वागणुकीला आदर्शाची झळाळी चढवली ती श्रीहर्षानेच !

तरुण व रूपमती पत्नीशी विलास करीत असताही तो धर्माचरण विसरत नाही. त्याबद्दल दमयंती रागावली, तर तो तिची समजूत काढतो. नलाचे राजर्षित्व श्रीहर्षाला खुलवून दाखवायचे आहे. तशी त्या राजर्षीला शोभेल अशीच चतुर, प्रेमळ, सुस्वरूप, रसिक, धार्मिक व सुसंस्कृत अशी दमयंती श्रीहर्षाने चितारली आहे.

श्रीहर्षाच्या भाषाशैलीची अन्य महाकवींच्या शैलीशी तुलना करून डॉ. के. ना. वाटवे लिहितात–

श्रीहर्ष आपल्या काव्याला अमृतपाकाचे काव्य म्हणतो, कारण ते काव्य अमृताप्रमाणेच मंथनश्रम केल्यावाचून उमगणारे नाही. पण उमगले म्हणजे मात्र अमृताप्रमाणे गोड आहे. श्रीहर्षाच्या या मतात पुष्कळच तथ्य आहे. त्याचे शेकडो श्लोक प्रासादिक असून, काहींचे सौंदर्य प्रयत्नाने प्रतीत होणारे आहे. काही खरोखर कठीण व क्लिष्ट स्थळे सोडली, तर महाकाव्य रचनेला जी एक भारदस्त शैली लागते, ती श्रीहर्षाने वापरली आहे, असेच दिसून येईल.

नषधीयचरितात काही सुभाषिते सहजगत्या येऊन गेली आहेत. ही सुभाषिते कवीच्या सुसंस्कृत नीतिमत्तेवर प्रकाश पाडू शकतात. त्यांतील काही सुभाषिते अशी–

**विगर्हितं धर्मधनैर्निबर्हणं विशिष्य विश्वासजुषां द्विषामपि ।**

(नै १ १३१)

अर्थ– धर्मशील, सज्जन हे कोणत्याही प्राण्याची हिंसा निंद्यच मानतात. पण आपल्यावर विश्वास ठेवणाऱ्या शत्रूचीही हिंसा त्यांना विशेषकरून निंद्य वाटते.

**ब्रुवते हि फलेन साधवो न तु कण्ठेन निजोपयोगिताम् ।**

(नै २ ४८)

अर्थ– सज्जन लोक आपली उपयुक्तता फल देऊन बोलून दाखवतात, केवळ तोंडाने नव्हे.

**स्वत एव सतां परार्थता ग्रहणानां हि यथा यथार्थता ।**

(नै २ ६१)

अर्थ– (मीमांसक मताप्रमाणे) वृक्षादी पदार्थांचे ज्ञान जसे ते ते शब्द उच्चारताच स्वतःच स्फुरते, त्याप्रमाणे थोर लोक हे स्वयंप्रेरणेनेच परकार्याला प्रवृत्त होतात.

**विवेकधाराशतधौतमन्तः सतां न कामः कलुषीकरोति ।**

(नै ८ ५४)

अर्थ– विवेकाच्या शतधारांनी धुतल्या गेलेल्या सज्जनांच्या मनाला कामवासना कलुषित करू शकत नाही.

**मितं च सारं च वचो हि वाग्मिता ।**

(नै ९ ८)

अर्थ– मोजके पण अर्थगर्भ असे भाषण यालाच वक्तृत्व म्हणतात.

**सतां हि चेतः शुचिताऽऽत्मसाक्षिका ।**

(नै ९ १२९)

अर्थ– सज्जनांची चित्तशुद्धी ही आत्मसाक्षिक असते. (तिला दुसऱ्याच्या साक्षीची गरज नसते.)

श्रीहर्षाच्या कथाविस्तारातला एक महत्त्वाचा विषय म्हणजे त्याची अद्वैतवेदान्तावरील श्रद्धा हा होय. अनेक सर्गांत आणि विशेषतः १७ व्या सर्गात त्याचे हे वैशिष्ट्य दिसून येते. कवीची वृत्ती वैदिक धर्माचा अभिमान बाळगणारी आहे. त्याने अधर्म, अनीती व पाखंड यांचा उत्तम पूर्वपक्ष करून त्यावर स्वतःच बिनतोड उत्तरपक्ष मांडला आहे. शास्त्रीय असल्यामुळे रूक्ष ठरणारा हा विषय कवीने मोठ्या तन्मयतेने व कलात्मक पद्धतीने लिहिला आहे. त्यामुळे वरील सगळे सर्गही काव्यपूर्ण झाले आहेत, यात शंका नाही.

हे महाराज्य सवत्र पाल्हाळिक झाले आहे संयम व सुबद्धता याचा अभाव सगळीकडे जाणवतो श्लेषप्रियतेमुळेही त्याच्या काव्याला क्लिष्टता आली आहे [स का प , नपथ परिशीलन]

**नोक्कन** एक जात द भारतात हे लोक आढळतात हे स्वत ला जाडिपिळळै म्हणवतात जाडिपिळळै याचा अर्थ जातीची मुले असा आहे हा याचकाचा एक वर्ग असून पळ्ळी जातीतल्या लोकाकडे हे लोक भिक्षा मागतात पळ्ळीची वसाहत असलेल्या खेड्याना हे नियत काळी भेट देतात व त्याच्याकडून शुल्क या स्वरूपात काही पशाची वसुली करतात पळ्ळीच्या विवाहसमारंभात मिरवणुकीच्या वेळी हे ध्वज र तात त्या ध्वजावर हनुमान, वाघ, अग्नी इ चि हे असतात

पळ्ळीपासून शुल्क घेण्याचा आपला हक्कच आहे, असे त समजतात त्याच्या पूर्वजानी पूर्वी एकदा पळ्ळीना साहाय्य केले असल्याची कथा ते पुढीलप्रमाणे सागतात–

काजीवरम येथे एक पळ्ळी राजा राज्य करीत होता त्याच्या काळात एकदा देवाची मिरवणूक चालू असता देवाचा रथ अचानक थावला काही केल्या तो पुढे जाईना त्यावर एकच उपाय होता आणि तो म्हणजे त्याला नरबळी देणे पण त्यासाठी कोणीच पुढे येईना राजा चितातुर झाला अशा वेळी एक नोक्कन पुढे आला आणि तो आपल्या एकुलत्या एक मुलीचा बळी देण्यास तयार झाला ती मुलगी गरोदर होती राजा त्याच्यावर अत्यत प्रसन्न झाला आणि बलिदान झाल्यावर त्याने हुकूम काढला, की भविष्यकाळात पळ्ळीनी नोक्कनाना त्याचे जाडिपिळळ (जातिपुत्र) म्हणून वागणूक द्यावी या वेळी काही नोक्कनाना राजाकडून काही ताम्रपट पारितोषिक म्हणून मिळाले त्यापकी एक ताम्रपट सांप्रत चिंगलपुट जिल्ह्यातल्या पोन्नरी तालुक्यातील मूलवायल खेड्यात नोक्क रामस्वामीच्या ताब्यात आहे, असे सागतात [का द्रा स इ]

**नोक्टे** नेफाच्या तिरप विभागातील एक जमात पूर्वी हे लोक शत्रूला मारून त्याची मुडकी घरात ठेवीत असत पण वैष्णव पथाचा स्वीकार केल्यानतर त्यानी ही पद्धत सोडून दिली

त्याची घरे उचावर बाधलेली असून, त्यात आठ दहा माणसे सहज राहू शकतात त हेत हेच्या सुदर टोपल्या, करडया व शिकारीत मारलेल्या जनावराची मुंडकी यानी त्याची घरे सजव लेली असतात त्याच्या घराना कुलपे नसतात, कारण त्याना चोऱ्या करणे माहीत नाही

हे झूम पद्धतीने शेती करतात सकाळी लवकर उठून आणि न्याहारी करून सव माणसे शेतावर जातात व सध्याकाळी उशिरा घरी परततात दुपारचे जेवण ते शेतावरच करतात

नोक्टे लोकाना शिकारीची फार आवड असून, त्यासाठी लागणाऱ्या बदुकाही ते स्वत च तयार करतात

पूर्वीपासूनच हे लोक आसामच्या पठारी प्रदेशात व्यापारा साठी येत असत इ स च्या १६ व्या शतकात शकरदेवाने आसा मात वैष्णव पथाची स्थापना केल्यानतर त्याच्या नरोत्तम गोसावी नाम क शिष्याने नोक्टे लोकात वैष्णव पथाचा प्रसार केला आसामा त ल्या प्रमाणे त्याच्याही प्रत्येक खेड्यात नामघर असते



नोक्टे पुरुष – समारभाचा वेष

नोक्टे स्त्री पुरु पाचा पोषाख अगदी साधा असतो स्त्रिया व पुरुष कमरेभोवती एक वस्त्र गुडाळ तात साप्रत बऱ्याच स्त्रिया पोलकी व पुरुष सदरे वापरू लागले आहेत स्त्रियाच्या कमरेत मेखला, हातात बऱ्याच बागड्या आणि गळ्यात मण्याच्या माळा असतात विशेष प्रसगी आणि सणासुदीला त्या डोक्यावर पिसे खोचलेली टोपी घालतात पुरुषाच्या कमरेला वेताची गोल कडी असतात आणि खाद्यावर एक चादर टाक लेली असते स्त्रिया पाठीवर केस मोकळे सोडतात पुरुषही केस वाढवतात हा वैष्णव पथाचा प्रभाव आहे, असे सागतात

मुली व मुले आपापला जोडीदार पसत करून लग्न कर तात कन्याशुल्क अगदी कमी असते त्याची बरीचशी लग्ने मुलीला पळवून नेऊनच होतात

त्याच्या वस्तीत एक प्रमुख पुढारी असतो त्याला ते राजा

म्हणतात ता गावातील वडीलधाऱ्यांच्या सल्लामसलतीने गावाचा कारभार पाहतो त्याच्याबरोबर एक पुरोहितही असतो

त्यांच्यात सामुदायिक शयनगृहाची पद्धत आहे त्यांना ते मोरुग म्हणतात ती तरुण-तरुणींची वेगवेगळी असतात मोरुग साधारणपणे उंच जागी बांधलेले असते गावाच्या आजूबाजूची टेहळणी करण्यासाठी तिथे एक चौथरा उभारलेला असतो मोरुगच्या एका बाजूला नृत्य व खेळ यांच्यासाठी मैदान असते मोरुगच्या खांबावर आणि तुळईवर विविध प्रकारची नक्षी कोरलेली असते [ अँ गो हा आ ने , आ नॉ फा इ ]



नवविवाहित नोक्टे स्त्री

## नोजीव

एक जैन उपपंथ याला तरासिया असेही म्हणतात रोहगुप्त या नावाच्या श्रमणाने महावीराच्या निर्वाणानंतर ५४४ वर्षांनी हा पंथ सुरू केला हा रोहगुप्त अज्ज महागिरी या जैन आचार्याचा शिष्य होता रोहगुप्ताच्या मते जीव, अजीव याप्रमाणेच नोजीव असे तिसरेही एक तत्त्व अस्तित्वात आहे हे तत्त्व मानणारा पंथ म्हणून याला नोजीव हे नाव मिळाले [ हि जै मो ]

## नोधा गौतम

एक सूक्तद्रष्टा ऋग्वेदाच्या पहिल्या मंडलातील ५८–६४ ही सूक्ते आणि आठव्या व नवव्या मंडलातील ८८ व ९३ ही सूक्ते याच्या नावावर आहेत नोधा हा गौतमकुलोत्पन्न असून मोठा कवी होता त्याला त्याच्या काव्यासंबंधी सार्थ अभिमान वाटत असे तो म्हणतो–

"हे नोधा, वीर्यशाली, अत्यंत पूज्य व अत्यंत कर्तृत्ववान अशा मरुतांच्या सन्मानार्थ त्यांच्या गणास उद्देशून एक सुंदर स्तोत्र अर्पण कर आणि मीही कवी असल्याने मननाने चांगली हाताटी साध्य करून घेऊन यज्ञप्रसंगी प्रभावसंपन्न स्तोत्राची पाण्याप्रमाणे वृष्टी करीन "

या सर्व सूक्तांतून अग्नी, इंद्र, मरुत व सोम यांची स्तुती आहे त्याच्या अग्नीसंबंधीच्या स्तुतीची एक ऋचा अशी —

**मूर्धा दिवो नाभिरग्नि: पृथिव्या अथाभवदरती रोदस्यो: ।**
**तं त्वा देवासोऽजनयन्त देवं वैश्वानर ज्योतिरिदार्याय ।।**

(ऋ १ ५९ २)

अर्थ – अग्नी हा द्युलोकाचे मस्तक आणि पृथ्वीची नाभि आहे, द्युलोक आणि भूलोक यांचा हा अधिपती झाला आहे सर्व विश्वाविषयी मित्रत्व धारण करणाऱ्या हे अग्निदेवा, तू असा श्रेष्ठ देव असल्यामुळे, तू आर्यजनांना प्रकाश (मार्गदर्शक) व्हावेस, या हेतूने तुला दिव्य जनांनी जन्म घेण्यास लावले

नोधाने मरुतांच्या सूक्तात (१ ६४) मरुतांसंबंधी बरीच चरित्रविषयक माहिती दिली आहे

## नोनगढ

बिहार प्रदेशातील एक गाव हे गाव जमुई विभागात लखी सराईच्या आग्नेयेस अकरा मैलांवर किऊल नदीच्या पश्चिम तीरावर वसले आहे या गावाजवळ एक मोठे टेकाड आहे त्या टेकाडावरून या गावाला नोनगढ हे नाव मिळाले, अशी समजूत आहे या टेकडीची उंची चाळीस फूट असून त्याचा व्यास दोनशे फूट आहे हा संपूर्ण गढ पक्क्या विटांनी बांधलेला आहे पण हा गढ नसून बौद्ध स्तूप असावा असे वाटते या स्तूपाच्या उत्खननात सात फूट खालीवर एक लहान खोली व त्या खोलीत चिकणमातीचे तीन लहान स्तूप सापडले आहेत या खोलीच्या खाली केलेल्या उत्खननात आणखी एक खोली व त्या खोलीत चिकणमातीचे आठ स्तूप व एक भग्न मूर्ती सापडली आहे त्या मूर्तीवर एक लेख कोरलेला असून, त्या लेखाचा काळ इ स च्या प्रारंभीचा आहे, असे सांगतात ही मूर्ती वालुकापाषाणाची असून, तिचा वर्ण लालसर आहे यानंतरच्या उत्खननात एकोणीस फूट खोलीवर विटांची एक भग्न कमान आढळली आहे त्या कमानी भोवती विटांची फरसबंदी आहे तिथेच एका लहानशा मंदिराचेही अवशेष सापडले आहेत त्यावरून सदरहू मंदिर उद्ध्वस्त झाल्यानंतर त्याच्या ढिगाऱ्यावर हा स्तूप बांधला गेला असावा असे दिसते या ठिकाणी मूर्तीचे जे तुकडे सापडले आहेत त्यावरून ती मूर्ती कोणाची आहे, हे निश्चित सांगता येत नाही पण ती एखाद्या बौद्ध देवतेची मूर्ती असण्याचा बराच संभव आहे या स्तूपाच्या पूर्वेस सुमारे दोनशे फूट अंतरावर एका मठाचेही अवशेष आहेत [ मोघीर गॅझे ]

**नोनब** एक जात या लोकांची वस्ती म्हैसूर प्रदेशातील चिक्कनायकनहळ्ळी, गुब्बी, आर्सीकेरी, तिप्तूर तारिकेरी आणि कडूर या तालुक्यात आहे वेदवती नदीवर नोलंब वाडी नावाचा भाग यानी वसवला आहे याना नोलब, मक्कुक वीरशैव किंवा मोक्षमनदेवरु असेही म्हणतात हे मुख्यत शेती आणि व्यापार करतात काही थोडे नोकरीही करतात हे लिंगायत आहेत

याचे दोन गट आहेत त्यापकी मूरुदिवसदवरू हे तीन दिवस आणि नाल्कुदिवसदवरू हे चार दिवस विवाह समारभ करतात याच्यात परस्पर रोटीव्यवहार होतो, परतु बेटीव्यवहार होत नाही याच्या काही टाळयाना त्याच्या देवकावरून नावे पडली आहेत ती अशी–बल्लिअवरू– चादी, होनुसुरे–सोने, गोवरू–गाय, हुलिअवरू–वाघ व तेने–धा य

**विवाहप्रथा** – याच्यात प्रौढ विवाह रूढ असून लग्नाच्या वेळी मुलीचे वय १४ ते २० व मुलाचे वय २० ते २५ असते लग्ने आइ बापच ठरवतात मुला मुलीना त्याबाबत कसलाही अधिकार नसतो वाङनिश्चय व विवाहसमारभ वधूगृही होतात वाङनिश्चयाच्या वेळी वरपक्षाकडील मडळी वधूला परातीत साडी, नारळ, केळी, विड्याची पाने व सुपाऱ्या याचा अहेर करतात विवाहप्रसगी पूवजपूजा, बिडुव दास्मपूजा, वेवकायमुहूतम, मुक्षेश्वरपूजा, नोनबेश्वराची पूजा, इ विधी करतात

नोनबाची जातिपचायत असते तिच्या प्रमुखाला कट्टेयजमान म्हणतात वरिष्ठ सभासदाच्या साहाय्याने तो जातीच्या तटयाचा निवाडा करतो नतिक गु हे करणा याना जातिबहिष्कृत करतात

**मर्तिकप्रथा** – मताना बसलेल्या स्थितीत पुरतात नातेवाईक सुतक पाळीत नाहीत तिसऱ्या दिवशी मतात्म्याला अन्न देतात अकराव्या दिवशी ज्ञातिभोजन घालतात [ म द्रा का ]

**नोस्बुग** एक सुषिर वाद्य याला पचवेणुवाद्य असेही म्हणतात या वाद्याची पिशवी करडाच्या चामड्याची बनवतात तिला दोन छिद्रे असतात त्यावर भिन्न आकाराच्या वेताच्या दोन नळया जोडतात एकीतून तोडाने हवा आत भरतात आणि दुसरीतून ती बाहेर सोडतात नोसबुग हे वाद्य सूर धरण्यासाठी उपयोगी पडते [ म्यु ह ]

**नौकानयन** नौका = नाव, जहाज + नयन = नेणे, पाण्यात नाव चालवणे, असा त्या शब्दाचा अर्थ आहे भारतात अत्यत प्राचीन काळापासून नौकानयन चालू असून, त्या विद्येत भारतीय लोकानी पुष्कळ कौशल्य मिळविले होते, असे दिसते जगातील दूरदूरच्या देशाशी भारताचा व्यापार चालत असे आणि त्यातला बराचसा व्यापार समुद्रमार्गाने होत असे सायसे व ह्विट या सशोधकाच्या मते सनपूव ३००० च्या सुमारास भारत व बाबिलोनिया याच्यामध्ये सागरी व्यापार चालू असावा गेल्या १०० वर्षांत भारतात अनेक ठिकाणी जे उत्खनन झाले आहे, त्यावरून आयपूर्वकाळातील सिंधू सस्कृतीच्या अवशेषात नौकानयनाचे पुरावे उपलब्ध झाले आहेत लोथल येथे तर एका बदराच्याही खुणा सापडल्या आहेत यावरून सिंधू सस्कृतीच्या काळात भारतात नौकानयन बरेच प्रगत झाले होते, असे वाटते

वैदिक आर्यांनाही नौकानयन ज्ञात होते, असे ऋग्वेदातील विविध निर्देशावरून कळते त्यात सागराचा उल्लेख आहे (ऋ ५ १ २५), तसाच शभर वल्ही असलेल्या नौकेचाही उल्लेख आहे (ऋ १ ११६ ५) समुद्रावरून सुखरूप प्रवास कसा करावा (ऋ ७ ८८ ३) व महासागराच्या अथाग पाण्यात



प्राचीन नौका– अजटा येथील एक भित्तिचित्र

पडलेल्या मनुष्याला कसे वाचवावे (ऋ १ ११७ १४) हे आय लोकाना माहीत होते सागरी व्यापारी वाहतुकीचे उल्लेखही ऋग्वेदात अनेक जागी आलेले आहेत (ऋ १४८ ३, १ ५६ २)

रामायणाच्या काळात चीन, यवद्वीप, सुवर्णद्वीप, इ पूर्वेकडील देशाशी भारताचा सबध होता, असे रामायणातील काही उल्लेखावरून वाटते वदिक युगाप्रमाणेच त्या काळातही भारतीय लोक समुद्रपर्यटन करीत असावे रामायणात ज्या लोहित सागराचा उल्लेख आहे, तो साप्रतचा लाल समुद्र असावा महाभारतात काही ठिकाणी भारताबाहेरील द्वीपे

पांडवांनी जिंकल्याचा उल्लेख आहे, तर काही ठिकाणी महा सागरावरील वादळात सापडलेल्या नौकेचे व संकटग्रस्त व्यापाऱ्याचे वर्णन आहे यावरून सनपूर्व २००० या काळातील भारतीय नौकानयनासंबंधी कल्पना करता येते

सनपूर्व १५०० च्या सुमारास भारतातून रत्ने, सोने, हस्तिदंत, इ बहुमोल वस्तू पश्चिमेकडील देशात पाठवल्या जात होत्या सॉलोमन राजाच्या वेळी म्हणजे सनपूर्व १००० च्या सुमारास हस्तिदंत, तलम वस्त्रे, मसाल्याचे पदार्थ, सोने, रत्ने, उत्तम लाकूड, इ पदार्थ आणि मोर वगैरे पक्षी भारतातून समुद्रमार्गे पॅलेस्टाइनकडे जात होते उ भारतातील आर्य व द भारतातील द्रविड लोक या वस्तूंच्या व्यापारासाठी समुद्र पर्यटन करीत होते, असे काल्डवल व फौकस यांनी म्हटले आहे

सागरात नौका हाकारण्यासाठी दिशा समजणे अत्यंत आवश्यक असते त्यासाठी भारतीय नाविकांच्या जवळ दिशा दर्शक यंत्र होते त्यात एक लोखंडी मासा तेलात तरंगत ठेव लेला असे व त्याचे तोंड नेहमी उत्तरेकडे वळलेले असे त्याला मत्स्ययंत्र म्हणत ते एक प्रकारचे होकायंत्रच होते

त्यानंतरच्या काळातील भारतीय नौकानयनासंबंधीची पुष्कळ माहिती महावंश, त्रिपिटके, निकाय, जातके, इ बौद्ध ग्रंथावरून मिळते पाणिनीच्या अष्टाध्यायीतही समुद्र व नद्या यातील नौकानयनाचे उल्लेख पुष्कळ आढळतात त्यात उत्संग, उडुप, पिटक, उत्पथ, इ नौकांचे प्रकारही सांगितले आहेत या ग्रंथाची रचना सनपूर्व ६ ते ४ या शतकात झालेली असली, तरी त्यातील कथा व परंपरा त्यापूर्वीच्या काळातील आहेत भारताच्या पश्चिम किनाऱ्यावरील भृगुकच्छ व शूर्पारक आणि बंगालमधील ताम्रलिप्ती या बंदरातून भारतीय लोक पश्चिमेला बावेरु (बाबिलोन) पर्यंत व पूर्वेला सुवर्णद्वीपापर्यंत व्यापारासाठी जात आणि अमाप धन मिळवून आणीत तो व्यापार मुख्यत द्रविड लोकांच्या हाती होता तांदूळ, चंदन, हस्तिदंत, मोर, सोने, रत्ने, नीळ, तलम वस्त्रे, इ विविध पदार्थ भारतातून परदेशी जात

नौकानयनाचे शिक्षण देण्याची व्यवस्था तेव्हा होती, असे वाटते व्यापारी मार्ग, वाऱ्याची दिशा व वादळातून सुटका करून घेण्याचे उपाय, यांचे ज्ञान नाविकांना दिले जात असावे समुद्रात दिशा समजण्यासाठी दिशाकाक नामक पक्ष्यांचा उपयोगही केला जात असे साहसी लोकांनी केलेली समुद्रपर्यटने आणि त्यांच्यावर कोसळलेली संकटे, यांचे वर्णन अनेक कथांतून केलेले आहे त्यात दूरदूरच्या बंदरांची व नगरांची नावे असली, तरी त्यातील काही ठिकाणांची माहिती आज निश्चित सांगता येत नाही पण सनपूर्व शेकडो वर्षांपासून भारतीय लोक व्यापारासाठी व अज्ञात देशांचा शोध करण्या- साठी सागरावरून खूप दूरच्या सफरी करीत असत, यात मात्र संशय नाही अशा काही सफरींना ५–६ महिनेही लागत ५०० ते १००० प्रवासी मावतील एवढी मोठी जहाजेही त्या काळी



जावा बेटाकडे जाणारी एक प्राचीन भारतीय नौका—
बोरोबुदुर (जावा) येथील शिल्पकाम

होती वादळात सापडून बुडालेल्या नौकेतील काही प्रवासी कसे वाचले, त्यांचे वर्णनही अनेक कथांत सापडते बंगालमधील काही साहसी लोक कोचीन चीनमध्ये गेले व त्यांनी तिथे चंपा नामक वसाहत स्थापली अशीही माहिती बौद्ध ग्रंथात मिळते

बौधायन व गौतम धर्मसूत्रातही यासंबंधी उल्लेख आढळ- तात व्यापारी नौकांच्या मालकांनी राजाला किती कर भरा- यला पाहिजे, तेही वरील दोन्ही धर्मसूत्रात सांगितले आहे

सनपूर्व ४ थ्या शतकात भारतात नौका बांधण्याचा उद्योग फार मोठ्या प्रमाणावर चालू होता, असे दिसते गंगा, यमुना, सिंधू वगैरे नद्यांतून माणसांची व मालाची वाहतूक पुष्कळ होत असे त्यासाठी लागणाऱ्या लहानमोठ्या नौका निर्माण कर- णारे हजारो कारागीर भारतात होते शिकंदराने भारतावर स्वारी केली, त्या वेळी सिंधू नदी पार करण्यासाठी त्याने ज्या हजारो नौका वापरल्या, त्या स्थानिक कारागिरांनीच बनव लेल्या होत्या, असे इतिहासकार सांगतात त्यात काही युद्ध- नौकाही होत्या एवढ्या मोठ्या संख्येने चांगल्या, मजबूत व डौलदार नौका बांधण्याचे तंत्र व कसब परंपरागत असले पाहिजे मौर्यकालापूर्वीच्या २–३ शतकांत त्याचा विकास झाला असावा

**मौर्यकाल** – मौर्यकाळात नौकानिर्मितीचा व्यवसाय खूपच वाढला मात्र तो राजाच्या सत्तेखाली चालू होता असंख्य कारागीर सरकारी नोकर म्हणून नौका बांधण्याचे काम करीत सागरावरून सफरी व व्यापार करण्यासाठी सरकारी नौका

भाड्याने दिल्या जात. त्या व्यवसायाचे नियंत्रण करण्यासाठी चंद्रगुप्त मौर्य याच्या युद्धसभेत एक नौकाविभाग होता. त्याचे मोठे नौदल असून, त्याची व्यवस्था पाहण्यासाठी एक मोठा अधिकारी होता व एक नौकानयनसमितीही होती. कौटिल्याच्या अर्थशास्त्रात यासंबंधी विस्तृत माहिती मिळते. त्यात नौका विभागाच्या मुख्य अधिकाऱ्याला नावाध्यक्ष म्हटले आहे. समुद्रातील नौकानयनाप्रमाणेच नद्या व सरोवरे यांतील वाहतुकीवरही त्याचे नियंत्रण असे. त्या काळात भारताचा परदेशाशी मोठा व्यापार चालू होता. तो चालविणाऱ्या व्यापाऱ्यांकडून आणि संबंधित संस्थांकडून विविध कर वसूल करण्याचे काम नावाध्यक्षाचे होते. त्याचप्रमाणे समुद्रावर आणि नद्यांवर वाहतूक करणाऱ्या नौकांच्या सुरक्षिततेकडेही तो लक्ष देत असे. चाचेगिरी करणारी जहाजे, शत्रूच्या प्रदेशात जाणारी जहाजे आणि विधिनियमांचे उल्लंघन करणारी जहाजे नष्ट करण्याचा अधिकारही त्याला होता.

**सातवाहनकाल** – मौर्यकालानंतर इ. स. ३०० पर्यंतच्या आंध्र सातवाहनकाळात नौकानयनाची व सागरी व्यापाराची पुष्कळच प्रगती झाली. त्या काळात पश्चिमेकडील रोम, ग्रीस, ईजिप्त, अरबस्तान आणि पूर्वेकडे चीनपर्यंत भारताचा व्यापार प्रचंड प्रमाणावर चालू होता. महाभारतात रोमचा उल्लेख पुष्कळदा आलेला आहे. पेरिप्लस, टॉलेमीचा भूगोल व इतरही काही पाश्चात्य ग्रंथ यांत रोम व भारत यांच्या व्यापारी संबंधांचे विस्तृत वर्णन आढळते. हा सर्व व्यापार केवळ परदेशी जहाजांतून चालत नव्हता, तर काही भारतीय जहाजेही त्या मालाची ने-आण करीत होती. भारतीय मालाची किंमत म्हणून सोन्याची अगणित रोमन नाणी त्या काळी भारतात आणली जात. त्यांतील पुष्कळ नाणी भारताच्या निरनिराळ्या भागांत सापडली आहेत. तमिळ साहित्यातील कावेरीपत्तन, मुजिरी, इ. बंदरांत मोठाली जहाजे प्रवेश करू शकत होती. चोळ राजांनी दीपगृहेही बांधली होती.

ताम्रलिप्ती, गोपालपूर, मच्छलीपट्टण, इ. बंदरांतून असंख्य भारतीय लोक आपली गलबते घेऊन बंगालचा उपसागर पार करीत आणि ब्रह्मदेश व जावा, सुमात्रा, इ. द्वीपांशी व्यापार करायला जात. एवढेच नव्हे, तर कित्येक भारतीय लोकांनी त्या प्रदेशांत जाऊन वसाहतीही केल्या होत्या व तिथे भारतीय संस्कृतीचा प्रभाव पाडला होता. त्या काळी चंपा व फुनान या देशांत तर हिंदू राज्ये प्रस्थापित झाली होती.

त्या कालातील नौकानयनासंबंधी बरीच माहिती धर्मशास्त्रांतील उल्लेखांवरूनही मिळू शकते. मनुस्मृतीत समुद्रप्रवासासंबंधी पुष्कळ नियम दिलेले आहेत. एका जागी नौकायात्रेचे भाडे ठरविण्याविषयी नियम दिला आहे. नाविकाच्या चुकीमुळे प्रवाशांच्या सामानाचे नुकसान झाले, तर त्याचे उत्तरदायित्व



यवद्वीपात वसाहती करायला जाणारे भारतीय लोक – बोरोबुदुर येथील शिल्पकामातील एक नौका

नाविकावर पडते, पण नैसर्गिक उत्पातामुळे नौकेवर संकट येऊन नुकसान झाले, तर त्यात मात्र नाविकाकडे दोष नाही, असेही म्हटले आहे (मनु. ८. ४०८–४०९).

**गुप्तकाल** – गुप्तांचे साम्राज्य भारताच्या पूर्व किनाऱ्यापासून पश्चिम किनाऱ्यापर्यंत पसरले होते आणि ते वैभवशाली होते. त्या काळी भारताचा व्यापार खूपच वाढला होता. पूर्वेकडील चीन व जपान या देशांतही भारतीय माल पुष्कळ जात होता. एका जपानी ग्रंथावरून समजते की भारतीय मालाने भरलेली अनेक भारतीय जहाजे कँटन बंदरात जात होती. त्या काळात कंबोडिया (कंबुज), सयाम, इ. प्रदेशांवरही हिंदूंची राज्ये चालत होती. फाहियान, युआन च्वांग, इत्सिंग या चिनी प्रवाशांनी लिहून ठेवलेल्या वर्णनांवरून त्या काळातील समुद्रप्रवासाची व जलयानांची कल्पना करता येते. वराह, वायू, मार्कंडेय, भागवत, इ. पुराणांत नौकापर्यटनाचे अनेक उल्लेख आहेत. ज्योतिषविषयक ग्रंथांतही नौकानयनासंबंधी माहिती मिळते. व्यापारी व नाविक यांच्या आरोग्यावर चंद्र व नक्षत्रे यांचा प्रभाव पडतो, असे बृहत्संहितेत म्हटले आहे. कालिदास, हर्ष, दंडी, माघ, इ. संस्कृत कवींच्या ग्रंथांतही नद्यांतील व समुद्रावरील प्रवास, वादळे आणि नौकायुद्धे यांची वर्णने आहेत.

**मध्ययुग** – इ. स. च्या १० व्या शतकात राजराज चोळ याने प्रबळ नौकादल निर्माण करून लंकेवरही आपले प्रभुत्व स्थापले होते. पुढे राजेंद्र चोळ याने तर मलाया द्वीपकल्पातील कदरम या शैलेंद्रांच्या राज्यावर आपली नौसेना पाठवून ते जिंकले होते. तक्कोलम व मर्तबान ही बंदरेही त्याच्या सैन्याने जिंकली होती.

चोळ राजाची सत्ता पूर्व, दक्षिण व पश्चिम समुद्रावर असल्या मुळे चोळराजे स्वतःला त्रिसमुद्रेश्वर म्हणत.

त्याच काळातील पश्चिम भारतीय लोकांच्या सागरी व्यापाराची व नौदलाची माहिती मुसलमान इतिहासकारांनी लिहून ठेवली आहे. निजामुद्दीन अहमद याच्या तबकत-इ-अकबरीमध्ये सुलतान महमूद व जाट यांच्यातील नौयुद्धाचे वर्णन आढळते. अल बिरुनी यानेही त्यासंबंधी पुष्कळ तपशील वार माहिती दिली आहे. त्या काळात पूर्वीप्रमाणेच मोठाली भारतीय जहाजे गुजरात व मलबार या प्रदेशातील बंदरातून भारतीय माल घेऊन अरबस्तान, इराण व युरोपातील देशांना पोचवीत असत. गुजरातवर राज्य करणाऱ्या सुलतानाचे नाविक सैन्य पुष्कळ बलवान होते. त्याने कित्येकदा पोर्तुगीज नौदलाशी युद्ध करून त्यात जयही मिळवला होता. बेंजॅमिन (इ. स. चे १२ वे शतक), मार्को पोलो (१३ वे शतक), इब्न बतूता (१४ वे शतक), निकोलो कोंती (१५ वे शतक), इ. प्रवाशांनी भारतीय सागरी व्यापाराची पुष्कळ माहिती लिहून ठेवली आहे. पूर्वेकडील मलक्का हे व्यापाराचे मोठे केंद्र होते आणि तिथे भारतीय व्यापाऱ्यांची एक वसाहतच होती. भारतीय व्यापारी आपल्या स्वतःच्या जहाजातून पेगू, मतबान, तनासरीम व सुमात्रा या देशांशी व्यापार करीत. या काळात समुद्रावरील



ब्रिग– कारोमांडल किनाऱ्यावरील जहाज

चाचेगिरीही फार वाढली होती. त्यामुळे व्यापारी व प्रवासी यांना खूपच त्रास होत असे.

**मोगलकाल** – या काळातही भारतात जहाजे व नावा बांधण्याचा उद्योग मोठ्या प्रमाणावर चालू होता. मोगल बादशहांचे नाविक दल मोठे व मजबूत होते. बंगाल व सिंध या प्रांतातील नद्यांमध्ये त्यांचा संचार चालत असे. बंडखोर सुलतानांशी लढण्यासाठी त्याचा चांगला उपयोग होई. पण त्याच काळात युरोपातील व्यापारी कंपन्या भारतात येऊन आपले



मोगलकालीन युद्धनौका

पाय रोवू लागल्या होत्या. त्यांच्याजवळ तोफा असल्यामुळे व त्यांचे नौसामर्थ्य अधिक असल्यामुळे सागरावर त्यांचे प्रभुत्व हळूहळू वाढत होते. मोगल बादशहांनी तिकडे दुर्लक्ष केल्यामुळे भारताचा सागरी व्यापार परदेशी कंपन्यांच्या हाती गेला.

**नौकानिर्मिती** – प्रारंभी मानवाने झाडाचे बुंधे खोदून त्यांचाच नावांप्रमाणे उपयोग केला. कालांतराने लहानसहान लाकडे जोडून तराफे बनवण्याचे तंत्र त्याला अवगत झाले. वैदिक युगात नौका बनवण्याचे तंत्र पुष्कळच विकसित झाले असले पाहिजे. पण त्याचे ज्ञान वेदातील वर्णनांवरून मिळत नाही. त्यानंतरच्या पाली साहित्यात त्या काळातील नौकांचे वर्णन आढळते. एक नौका ८०० हात लांब, ६०० हात रुंद व ८० हात खोल असून, तिला तीन डोलकाठ्या असल्याचे कळते. मौर्यकाळी जे ग्रीक लोक भारतात येऊन गेले, त्यांनी भारतीय नौकानिर्मिती विषयी बरीच माहिती लिहून ठेवली आहे. प्लिनी याने लंकेचे वर्णन करताना भारतीय जहाजाचे वर्णन केले आहे. अगदी

अरुद जलमार्गातून जाताना दिशा बदलणे सोपे जावे म्हणून जहाजाच्या दो ही टोकाशी नाळी केलेल्या होत्या, असे त्याने म्हटले आहे त्या प्राचीन जहाजाचे वजन सुमारे ७५ टन असावे, असे अनुमानही त्याने केले आहे

प्राचीन भारतीय शिल्पकामात नौकाची अनेक कोरीव चित्रे निरनिराळया जागी आढळतात साची येथील स्तूपाच्या पूर्व व पश्चिम प्रवेशद्वारावर नौकाच्या आकृती आहेत, त्यावरून प्राचीन नौकाची कल्पना करता येते पूर्व प्रवेशद्वारावरील नौका ओबडधोबड फळ्या दोरीने एकत्र बाधून बनवलेली दिसते, तर पश्चिम प्रवेशद्वारावरील नौका मध्यमदिरा प्रकारची असून, ती साप्रतच्या राजाच्या विहार नौकासारखी दिसते

मुबईजवळच्या कान्हेरी लेण्यात एक सागरी नौकेची आकृती कोरलेली आहे ही लेणी इ स च्या २ या शतकातली आहेत

अजटा येथील लेण्यात जी भित्तिचित्रे चागल्या स्थितीत सापडली आहेत, त्यात नौकाची काही सुदर चित्रे दिसतात ती बहुधा इ स च्या ६ व्या किंवा ७ व्या शतकातली असावी



प्राचीन नौका – अजटा येथील एक भित्तिचित्र

त्याच काळातील सागरी नौकाच्या विविध आकृती जावामधील बोरोबुदूरच्या देवालयातील शिल्पकामात पाहायला मिळतात मदुरा येथील भव्य मदिरातील भित्तिचित्रातही नौकाची चित्रे आहेत पुरीच्या जगन्नाथमदिरावरही मध्यमदिरा नौकेची आकृती कोरलेली आढळते सातवाहन व पल्लव राजाच्या काही नाण्यावरही जहाजाच्या आकृती काढलेल्या दिसतात त्यावरून त्या त्या काळातील जहाजाची कल्पना करणे शक्य होते

पण प्राचीन साहित्य, शिल्प व चित्रे यावरून नौकाचे केवळ सामान्य स्वरूपच ध्यानात येते, नौकानिर्मितीविषयी शास्त्रीय ज्ञान मिळत नाही युक्तिकल्पतरु नामक एक सस्कृत ग्रथ उपलब्ध झाला आहे, त्यात मात्र नौकानिर्मितीचे तत्र सागितलेले आहे तो नौकारचनेवरचा प्रबधच आहे त्यात नौकाचे विविध प्रकार व आकार, त्या तयार करण्यासाठी लागणारे लाकूड वगैरे भिन्न पदार्थ व साधने या सर्वांचे विवेचन केलेले आहे भोज नरपती नामक पडिताने हा ग्रथ रचला आहे

वृक्षायुर्वेद म्हणजे वनस्पतिशास्त्र होय त्यात ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र असे लाकडाचे चार वर्ग केलेले आहेत क्षत्रिय वर्गातील लाकडाची नौका बनवणे नेहमी श्रेयस्कर होय, असे भोजाने युक्तिकल्पतरूत सागितले आहे सागरी प्रवासासाठी नौका बाधताना, फळ्या जोडण्यासाठी लोखडाचा मुळीच वापर करू नये, असा इशाराही त्याने दिला आहे कारण लोखडामुळे लोहचुबकाच्या खडकाकडे नौका ओढली जाण्याचा धोका असतो

नौकाचे आकारमान व उपयोग याना अनुसरून त्याचे सामान्य व विशेष असे दोन वर्ग युक्तिकल्पतरूत सागितले आहेत नद्या व सरोवरे यातील प्रवासासाठी सामान्य नौका होत्या व त्यांचेही दहा उपप्रकार होते त्याची लाबी, रुदी व उची भिन्न असे विशेष वर्गातील नौकाचे दीर्घा व उन्नता हे दोन उपवर्ग असून, दीर्घेचे दहा व उन्नतेचे पाच पोटभेद सागितले आहेत या भिन्न प्रकारातील काही प्रकारच्या नौका लाभदायक, तर काही तापदायक म्हणून सागितल्या आहेत

या नौका सुसज्ज व सुशोभित कशा कराव्या, तेही युक्तिकल्पतरूत सागितले आहे सोने, चांदी व तांबे आणि या तीन्ही धातूचा सयुक्त धातू, त्याचप्रमाणे चार भिन्न रग निरनिराळया प्रकारच्या नौकासाठी वापरण्याची प्रथा होती उदा० चार डोलकाठ्या असलेल्या नौकेला पाढरा रग, तीन डोलकाठ्या असलेल्या नौकेला लाल, दोन डोलकाठ्या असल्यास पिवळा आणि एक डोलकाठीवाल्या नौकेला निळा रग लावीत नौकाच्या टोकावर सिंह, सर्प, हत्ती, बदक, पोपट, इ पशुपक्ष्यांच्या आकृती बसवीत नौकाची शोभा वाढवण्यासाठी मोत्याच्या माळाही वापरीत

नौकाचे सर्वमदिरा, मध्यमदिरा व अग्रमदिरा असेही भेद केलेले आहेत पहिल्या प्रकारात नौकेच्या सपूर्ण पृष्ठभागावर खोली बनवलेली असते, मध्यमदिरा प्रकारात मध्यभागी, तर अग्रमदिरा प्रकारात पुढच्या भागात खोली केलेली असते तिसऱ्या प्रकारच्या नौका बहुधा लाबच्या प्रवासासाठी व युद्धासाठी उपयुक्त ठरत

मध्ययुगातील नौकाची वर्णने परकीय प्रवाशानी करून

ठेवली आहेत मार्को पालो याने भारतीय गलबताच्या लाकडी भिंती दुहेरी असल्याचे सांगितले आहे चुना व ताग एकत्र



पटुआ – नौकेचा एक प्रकार

कुटून त्यात तेल मिसळले असता डांबरापेक्षाही सरस व चिवट पदार्थ तयार होत असे व तो जहाजाच्या बुडाला लावीत

त्या वेळच्या जहाजावर १५० ते ३०० खलाशी असून, काही जहाजे हाकारण्यासाठी वल्हीही वापरली जात प्रत्येक वल्हे हलवायला चार माणसे लागत काही जहाजावर चार डोल काठ्या व चार शिडे असत प्रत्येक मोठ्या जहाजावर ५ ते १० लहान नावा ठेवलेल्या असत

निकोलो कोंती याने या संदर्भात म्हटले आहे, की त्या काळी युरोपात जी जहाजे तयार होत, त्यापेक्षा मोठी जहाजे भारतात बांधली जात त्यांना पाच पाच शिडे व तितक्याच डोलकाठ्या असत त्यांचा खालचा भाग तिहेरी फळ्यांचा बन वलेला असे वादळातील लाटांच्या माऱ्याने तो फुटू नयेत, हा त्यातला हेतू असे त्याचप्रमाणे जहाजाचे अनेक भाग जलाभेद्य केलेले असल्यामुळे त्यांतील एक भाग फुटला, तरी सबंध जहाजाला धोका पोचत नसे

मोगल बादशाहीच्या काळात नौकाव्यवसायाचा विकास चालू होता, असे तत्कालीन बंगाली साहित्यावरून कळते नौकांच्या रचनेत विविध प्रकारची कलाकुसर व पशुपक्ष्यांच्या आकृती कोरण्याची प्रथा त्या काळी विशेष विकसित झाली

**मराठ्यांचे आरमार** – छत्रपती शिवाजीमहाराजांनी स्वरा ज्याची स्थापना केल्यानंतर प्रथम देशावरील बराच भाग काबीज केला आणि मग कोकणप्रांताकडे आपला मोर्चा वळवला त्या वेळी जंजिऱ्याचा सिद्दी विजापूरच्या आरमाराचा प्रमुख असून, नागोठण्यापासून बाणकोटपर्यंतचा प्रदेश त्याला जहागीर म्हणून मिळाला होता तो कोकणातील हिंदूंना फार त्रास देत होता पण जंजिरा हा पाण्यातील अभेद्य किल्ला असल्यामुळे मराठे सरदारांना तो जिंकता येईना म्हणून शिवाजीमहाराजांनी इ स १६५७ च्या सुमारास आपले स्वतंत्र आरमार उभारले त्यासाठी त्यांनी चांगली बंदरे ताब्यात घेतली, मोक्याच्या जागा पाहून तिथे जंजिरे (जलदुर्ग) बांधले व मालवणचा सिंधुदुर्ग, कुलाबा, रत्नागिरी, अंजनवेल, विजयदुर्ग, सुवर्णदुर्ग, इ ठिकाणी जहाजे बांधण्याचे काम सुरू केले या नौदलाच्या बळावर शिवाजीमहाराजांनी जंजिऱ्याच्या सिद्दीवर स्वारी केली पण त्याला मोगलांची मदत मिळाल्यामुळे शिवाजीमहाराजांना त्याचा पराभव करता आला नाही त्यांच्या आरमारामुळे हबशाच्या जुलमाला पायबंद बसला एवढे मात्र खरे त्याचप्रमाणे इंग्रज, पोर्तुगीज व फ्रेंच यांच्यावरही त्यांचा दाब राहिला त्यांच्या आरमारात गुराबा, तराडे, तारवे, गलबत, दुबारे, शिबाडे, पगार, मचवे, बाघोर, तिरकटी पाल अशी निरनिराळ्या प्रकारची चार पाचशे जहाजे होती इ स १६७९ मध्ये त्यांच्या जवळ ६६ मोठी लढाऊ गलबते होती त्या सर्व आरमारावर ५००० पर्यंत खलाशी असत



मराठ्यांच्या आरमारातील एक जहाज

पुढे कान्होजी आंग्रे याने मराठ्यांच्या आरमारात पुष्कळ सुधारणा करून ते अधिक प्रबळ केले त्यात गुराबा व गलबते पुष्कळ होती तीन शिडांच्या गुराबांची शक्ती ३०० टन ओझे वाहून नेण्याइतकी असे बाकीची सर्व जहाजे १५० ते २०० टनांपर्यंत ओझे वाहून नेऊ शकत होती

मोठ्या गुराबावर १६ त ३० मोठ्या तोफा असत लहान गलबतावर सहा ते आठ लहान तोफा असत आग्र्याच्या नौदलाने पुष्कळदा परकीय नौदलाचा पराभव करून अनेक लढाऊ जहाज जिकून घेतली होती त्यामुळे समुद्रावर मराठ्याची सत्ता दीर्घ काळ टिकून राहिली तुळाजी आग्र्याच्या नौदलात ७४ तोफाचे एक मोठे पाल, २० ते ३० तोफाच्या आठ गुराबा



पिन्नके जहाज

आणि लहानमोठी ६० गलबते होती पण आपल्या प्रचड नौदलाच्या जोरावर तो पेशव्यानाही जुमानीनासा झाल्यामुळे इ स १७५५ मध्ये पेशव्यानी इग्रजाची मदत घेऊन त्याच्या जहाजाचा नाश केला

त्यानतर पेशव्यानी विजयदुर्ग येथे स्वत चे आरमार उभारले आनदराव धुळुप नामक सरदार त्याचा मुख्य होता हे नौदल इ स च्या १८ व्या शतकाच्या अखेरीपर्यंत चागल्या स्थितीत व प्रबळ होते तोपर्यंत इग्रजाना कोकणपट्टीवर आपली सत्ता स्थापणे शक्य झाले नाही

मराठ्याच्या लढाऊ जहाजावर युद्धसामग्री चागली असे नारायण पाल नावाच्या प्रचड जहाजावर २८ तोफा व ४ जबुरे होते तोफामध्ये गर्नाळी, हातगर्नाळी तोफा व जबुर असे प्रकार होते बदुका व गोळ्या याचा सग्रह मोठा असे जहाजावर मलामी म्हणजे दिशा पाहण्याचे होकायत्र, वालुकायत्र, दुर्बिणी वगैरे वस्तू, उत्तम औषधे आणि प्रकाशासाठी चद्रज्योती असत खुणेसाठी भिन्न भिन्न रगाची निशाणे जहाजावर लावीत जहाजाचे येणे जाणे कळण्यासाठी शिगे व कर्णे याचा उपयोग करीत

मराठ्याच्या आरमाराचे वर्णन इग्रज अधिकाऱ्यानी करून ठेवले आहे त्यावरून त्यातील निरनिराळ्या जहाजाचे स्वरूप कळून येते गुराबा म्हणजे दोन किंवा तीन शिडाची लढाऊ जहाजे होत लाबीच्या मानाने त्याची रुदी अधिक असे आणि त्याची टोके चिचोळी केलेली असत त्याच्या नाळी पुढे आलेल्या असून, पृष्ठभागी पक्के मजले बनवलेले असत गलबते म्हणजे सुमार ७० टनी जहाजे होत त्याचा पृष्ठभाग बाबूचा बनवलेला असे ती हाकारण्यासाठी ४० ते ५० मजबूत वल्ही वापरीत

इ स च्या १७ व्या शतकातच इग्रजानी भारतात जहाजे बाधून घ्यायला सुरुवात केली होती मुबई व सुरत येथे त्याचे कारखाने होते इ स १७३५ मध्ये सुरतेचा कारखाना मुबईला आणण्यात आला सुरतेच्या कारखान्याचा मुख्य अधिकारी लोजी नस्सरवानजी नावाचा पारशी मनुष्य होता तोही मुबईला आला त्याच्या कुटुबातील अनेक पुरुषानी इग्रजाना लढाऊ व व्यापारी जहाजे बाधून दिली कलकत्ता येथही एक कारखाना ईस्ट इडिया कपनीने सुरू केला होता भारतात इतर ठिकाणीही असे कारखाने असून त्यात भारतीय कारागीर जहाजे बाधण्याचे काम करीत एका फ्रेच माणसाने भारतीय नौकाव्यवसायाविषयी पुढीलप्रमाणे गौरवोद्गार काढले आहेत–‘ नौकानिर्मितीच्या कामात भारतीय लोक फार प्राचीन काळापासून कुशल असून, अजूनही ( इ स १९ वे शतक ) त्याची जहाजे युरोपीय कारागिराना आदर्श वाटतात त्याची जहाज डौल व उपयुक्तता या दोन्ही दृष्टीनी श्रेष्ठ ठरली आहेत ’ त्याने पुढे



बेंगल – मोठे व्यापारी जहाज

अनेक प्रकारच्या जहाजाचे वर्णन केले आहे त्यात पिन्नके, ग्राब, बेंगल, ब्रिग, डोणी, पट्टुआ, इ नावे दिली आहेत पिन्नके म्हणजे

मजबूत डालकाठ्याचे जहाज होय त्यावर दोन किंवा तीन खोल्या असत बेगल हे मोठे व्यापारी जहाज असून, त्यातून ४ ते ५ हजार मण धान्य नेता येत असे ब्रिग व डोणी ही कारो मांडल व मलबार या प्रदेशातली जहाजे होती पटुआ हे अगदी वेगळ्या प्रकारे बांधलेले जहाज होते त्याच्या फळ्या एकावर एक अशा लोखंडी पट्टीने जोडलेल्या असत

भारतीय सागापासून बनवलेली जहाजे, ब्रिटनमधे ओक वृक्षापासून बनवलेल्या जहाजांपेक्षा अधिक मजबूत, टिकाऊ व स्वस्त असतात, असे ले क वॉकर याने लिहून ठेवले आहे समुद्रप्रवासाला ती अधिक उपयुक्त होती पण ब्रिटिश कारखानदाराचे नुकसान होऊ नये म्हणून त्यानी बांधलेली जहाजेच वापरली पाहिजेत, असे ईस्ट इंडिया कपनीने ठरवले त्यामुळे हिंदी नौकानिर्मितीचा विकासच खुटला हिंदी जहाजातून नेलेल्या मालावरही जाचक निर्बंध घातले गेल्यामुळे बहुतेक सर्व व्यापार परदेशी बोटींतून होऊ लागला आणि भारतीय नौकानयनाची प्राचीन परपरा नष्ट झाली [ हि इ शि, अ हिं ने, म ज्ञा को, मराठ्याचे आरमार—श्री द ब पारसनीस, १९०४, श्रीमती सुमती मुरारजी—इलस वीकली, १४ फेब्रुवारी १९५४, श्री मदन मोहन सिंघ—दि इंडियन हिस्टॉरिकल क्वाटरली, जून सप्टेंबर १९६१, हिं वि को ]

## नौकासन

एक योगासन याची कृती अशी—प्रथम पोटाच्या आधाराने जमिनीवर पालथे निजावे या वेळी दोन्ही हात घट्ट मुठी वळून कमरेवर ठेवावे व दोन्ही नाकपुड्यातून श्वास फुफ्फुसात घ्यावा त्यानतर मस्तक व छातीचा भाग जमिनीपासून वर उचलावा आणि शरीराचे अन्य भाग



नौकासन

अशा प्रकारे ताणून ठेवावे, की ज्यामुळे शरीराचा सबंध भार पोटावर पडेल हा या आसनाचा पहिला भाग झाला मग सबंध शरीर डावीकडे वळवावे त्या वेळी पाय, छाती, पोट मस्तक, इ कोणत्याही अवयवाचा भूमीला स्पर्श होता कामा नये फक्त गुडघ्यापासून दडापर्यंतचा भागच जमिनीला टेकवावा त्यानतर पोटाच्या आधाराने म्हणजे पाय, छाती आणि मस्तकभाग जमिनीला न टेकवता शरीर एकदम उजव्या बाजूला वळवावे अशा प्रकारे तीनही स्थिती पूर्ण झाल्यावर हे आसन पुरे होते या आसनामुळे पोटाचे व छातीचे सर्व विकार नाहीसे होतात आणि भूक चागली लागते [ उ यो द ]

## नौटंकी

उ भारतातील एक लोकनाट्य याचे सर्वांत जुने रूप म्हणजे स्वाग होय पुढच्या काळात याच नाट्याला भगत म्हणू लागले व रीतिकाळात ते नौटकी म्हणून पुढे आले साप्रत स्वाग हे स्वतंत्र परपरेने चालते व नौटकीनेही स्वत ची परपरा निर्माण केली आहे इ स च्या १२ व्या शतकाच्या सुमारास नौटकीचा जन्म झाला व मल्ल, जाट, रावत, राजपूत व रगारी कोष्टी यानी तो खेळ सुरू केला, असे म्हणतात

नौटकी म्हणजे एक प्रकारचे सगीत रूपकच आहे महाराष्ट्रातल्या दशावताराशी व कर्नाटकातल्या यक्षगानाशी त्याचे साम्य आहे तीन्हीतही सूत्रधार हा खेळाचा प्रमुख सचालक असतो तोच खेळातल्या पात्राचा प्रसगाचा व दृश्याचा प्रेक्षकाना परिचय करून देतो नौटकीच्या खेळासाठी तात्पुरता मांडव घालून रगमच उभारतात रगमचावर पुढे एकच पडदा असतो रगभूमीवर पात्रांचा प्रवेश झाला, की पडदा उचलतात व पात्रे निघून गेली किंवा विशिष्ट प्रसग सपला, की पुढच्या प्रसगाच्या तयारीसाठी पडदा पाडतात नौटकीत प्रेक्षक व नट याच्यात जवळीक असते कित्येकदा प्रेक्षकातूनच पात्रे रगभूमीवर येतात आणि कित्येकदा ती प्रेक्षकाबरोबर प्रश्नोत्तरेही करतात

रगमचाच्या एका बाजूला नौटकीचे आख्यान गाणारे गायक व वाद्यवादक बसतात सूत्रधार आवश्यकतेप्रमाणे पुढे येतो व मागे जातो नबला व नगारा ही वाद्ये महत्त्वाची असतात दशावतार आणि यक्षगान याची कथानके पौराणिक असतात, पण नौटकीची नाट्यकथानके मात्र प्राय ऐतिहासिक वीर, प्रेमी युवक आणि सत याच्या चरित्रावर आधारलेली असतात हीर—रांझाच्या प्रेमाख्यानावरच नौटकीची पहिली उभारणी झाली, असे म्हणतात यात स्त्रियाच्या भूमिका स्त्रियाच करतात त्या बहुधा गणिकावर्गातल्या असतात प्रयोगाच्या शेवटी त्या गायन करून प्रेक्षकाचे मनरजन करतात नौटकीचा प्रयोग रोचक होण्यासाठी त्यात विनोदी किंवा हास्यरसाचे प्रसग मुद्दाम निर्माण करतात अशा प्रसगी स्त्रिया पुरुषवेषात रगभूमीवर येतात नाट्यातले सवाद पद्यमय असतात ते बहुधा चौबोला छदात रचलेले असतात ल्हान तानेचा व मोठ्या तानेचा असे त्या छदाचे दोन भेद आहेत या पद्यमय सवादात साहस, दर्पोक्ती, प्रणय याचे प्रकटन केले जाते नौटकीचा खेळ रात्री आठ वाजता सुरू होतो, तो पहाटेपर्यंत चालतो खेळाच्या

शेवटी सूत्रधार रंगभूमीवर येऊन प्रेक्षकांना उपदेश करतो की, वाईट मार्ग सोडा, चांगल्याची कास धरा आणि सत्यधर्माने वागा

प्राय कार्तिक मार्गशीर्ष व चैत्र वैशाख या मासात नौटकीचे प्रयोग होतात जत्रा भरत, तेव्हाही नौटकीवाल्यांचा ताफा तिथे येऊन खेळ करतो उ प्रदेशातील फर्रुखाबाद, शहाजहाँपूर, कानपूर, एटा, इटावा, मैनपुरी मेरठ, सहारणपूर या जिल्ह्यात नौटकीचा विशेष प्रचार आहे त्रिभुवनमंडळी या संस्थेची नौटकी आणि ग्वाल्हेरची नौटकी विशेष प्रसिद्ध आहे पारशी थिएट्रिकल कंपनीचा या मंडळ्यांवर विशेष प्रभाव आहे आपली नौटकी रंजक करण्यासाठी या मंडळ्या लोकप्रचलित सर्व मनोरंजनाची साधने आपल्या प्रयोगात वापरतात

कालक्रमानुसार नौटकीमध्ये अश्लीलता आणि बाष्कळपणा हे दुर्गुणही प्रविष्ट झाले नौटकी म्हणजे उच्छृंखल धिंगाणा असे तिला स्वरूप आले त्यामुळे सुसंस्कृत आणि सदभिरुचीच्या लोकांना नौटकी आवडेनाशी झाली त्या लोकांनी तिच्याकडे पाठ फिरवली ही परिस्थिती अमीर खुस्रव या कलारसिकाला जाणवली नौटकीचे लोकरंजनसामर्थ्यही त्याच्या अनुभवाला आले म्हणून त्याने नौटकीला परिष्कृत रूप द्यायचे ठरवले त्याने नव्या धर्तीची पद्यरचना आणि आकर्षक संगीत यांची जोड देऊन तिच्यामध्ये बरीच सुधारणा घडवून आणली, तिच्यातले बरेचसे अवगुणही दूर केले

पुढच्या काळात नौटकीची कानपूर व हाथरस अशी दोन घराणी निर्माण झाली या दोन्ही घराण्यांच्या विकासासाठी नौटकीवर प्रेम असलेल्या रसिकांनी व धनिकांनी पाण्यासारखा पैसा खर्च केला आहे

हाथरस घराण्याची परंपरा सुमारे पाचशे वर्षांची आहे इंदरमन याने इ स च्या १८ व्या शतकात कीर्तनाच्या पद्धतीवर नौटकीचे प्रयोग सुरू केले चिरंजीलाल, वासन पंडित व मुरलीधर हे त्याचे शिष्य होत त्यांनीही नौटकीच्या द्वारे लोकरंजन करण्याच्या कामी उभी हयात घालवली नत्थामहाराज हे कलाकार १९ या शतकात पुढे आले ते गायन व अभिनय यात तर प्रवीण होतेच, शिवाय कवीही होत त्यांनी अनेक आख्याने रचली व नौटकीत त्यांचा उपयोग केला त्यांनी स्वतःची नौटकी मंडळीच निर्माण केली नौटकीला शिष्टमान्य स्वरूप देण्याचे मोठे श्रेय नत्थामहाराजांनाच द्यावे लागते त्यांचे हे कलाकतत्व पाहून सुप्रसिद्ध गायिका गौहरबाई यांनी एका प्रसंगी हिऱ्याचा हार व हिऱ्याची अंगठी देऊन त्यांचा गौरव केला होता

पण या सर्व हाथरसवाल्या कलावंतांचा मुकुटमणी शोभतो, तो दीपचंद होय लोक त्याला दीपा या नावाने ओळखतात त्याचे समग्र जीवन म्हणजे नौटकीच्या विकासाची अमर कहाणी आहे तो स्वत गायक व अभिनयपटू होता त्याने नौटकीत शिरलेला उत्तान शृंगार व थिल्लरपणा काढून टाकून त्या जागी



नत्थामहाराज

वीररसाला स्थान दिले त्याने स्वत चा नौटकी मंडळी स्थापून भारतभर दौरा केला व नौटकीचे कलात्मक, पण परिष्कृत रूप रसिकांना दाखवले केवळ उ भारतात प्रचलित असलेली एक लोककला उभ्या भारतात परिचित करून देण्याचे श्रेय दीपचंदाने मिळवले

कानपुरी नौटकी प्रथितयश करण्याच्या कामी श्रीकृष्ण पहलवान, लालमणी नवरदार, त्रिमोहन व छिद्दन हे कलाकार पुढे आले त्यांनी आपल्या नौटकात संगीताचे विविध प्रकार आणले आणि अभिनयातही सुधारणा केली श्रीकृष्ण पहेलवान याने चालू शतकाच्या पूर्वार्धात व्यावसायिक नौटकी मंडळी सुरू केली तो काल राष्ट्रीय भावनेच्या प्रकर्षाचा होता सर्व देश त्या काळी स्वातंत्र्यप्राप्तीसाठी रसरसून उठला होता

श्रीकृष्ण पहलवानानेही आपल्या कलेच्या द्वारे या स्वातंत्र्य भावनेला जोर दिला त्याने शहीद भगतसिंह बलियाका शेर अशा वीरयुगवाची आख्याने नौटकीच्या द्वारे सादर करून लोकांच्या अंतरातली राष्ट्रीय भावना चेतवली त्रिमोहनानेही नव्या नौटकी लिहिल्या आणि त्यांचे प्रयोग केले छिद्दन हा कानपुरी नौटंकीवाल्यांचा श्रेष्ठ उस्ताद ठरला आणि लालमणीने नौटंकीसाठी उत्तमोत्तम नट व गायक एकत्र करून कानपुरी नौटकी दर्जेदार बनवली [ हि सा को , लो ध ना प ]

**नौरता** एक लोकोत्सव यास न्यौरता किंवा नेऊना असेही म्हणतात व्रज, बुंदेलखंड व मध्य प्रदेशाचा काही भाग, एवढ्या प्रदेशात हा उत्सव प्रचलित आहे नौरता हा नवरात्र शब्दाचा अपभ्रंश असावा यात आश्विन महिन्याच्या शुद्ध प्रतिपदेपासून नवमीपर्यंत व्रज प्रदेशातील कुमारिका मंदिरात जाऊन गौरीची पूजा करतात मंदिरात जाताना त्या गीते गात जातात आणि निघून परतताना एकमेकींना झाडाच्या डहाळीने मारतात गौरीची पूजा केल्याने अनुरूप वर मिळतो, अशी व्रजातील कुमारिकांची समजूत आहे

सुअटा नामक एक राक्षस कुमारिकांना फार त्रास देत असे, म्हणून पार्वतीने त्याचा वध केला तेव्हापासून हा उत्सव प्रचारात आला, अशी कथा सांगतात इतर प्रदेशात या उत्सवाची भिन्न रूपे आढळतात [ हि सा को , ब्र जी भ श ]

**नौलखा** एक प्राचीन जैन मंदिर हे मंदिर मारवाड जोधपूर लोहमार्गावरील मारवाड पल्ली या स्टेशनजवळ आहे या मंदिराचे बांधकाम इ स ११६१ मध्ये अल्हणदेवाने केले, असे सांगतात परंतु या मंदिरात तीर्थंकरांच्या ज्या मूर्ती आहेत, त्यांवर इ स १०८७ ते ११४४ पर्यंतचे लेख कोरलेले आढळतात त्यावरून हे मंदिर अल्हणाच्याही पूर्वी निर्माण झालेले असून, त्याने त्याचा केवळ जीर्णोद्धार केला असावा, असे वाटते हे मंदिर म्हणजे नागर शैलीचा एक उत्कृष्ट नमुना आहे [ भा स जै यो ]

**नौली** हठयोगातील एक प्रक्रिया या प्रक्रियेत आसनमांडी घालून बसायचे किंवा गुडघ्यावर हात ठेवून ओणवे उभे राहायचे असते तसे केल्यावर दोन्ही खांदे खाली वाकवून पोट डावीकडून उजवीकडे व उजवीकडून डावीकडे द्रुत गतीने फिरवतात घेरंडमुनीने या प्रकाराला लौलिकी योग म्हटले आहे नौलीच्या योगाने दीपन, पाचन चांगले होते व वातादी विकार दूर होतात, असे सांगितले आहे [ यो सो च ]

**नौसारिये** महाराष्ट्रातील एक गुन्हेगार जमात ह मूळचे उत्तर प्रदेशात राहणारे होत लोकांना ठकवून त्यांच्याकडून पैसे उकळणे हा यांचा पूर्वी व्यवसाय होता हे जुगारही खेळत जुगाराकडे लोकांना ओढण्यासाठी त्यांच्या टोळीतला एक जण थाटामाटाचा पोषाख करून नबाब बने तो फार पैसेवाला आहे आणि जुगारीचा त्याला फार नाद आहे, अशा अफवा ते लोकांत पसरवीत त्यामुळे पुष्कळ लोक त्यांच्याकडे जुगार खेळायला येत आणि फसत [ गु न्हेगार जाती ]

**न्यायदर्शन** षड्दर्शनांपैकी एक प्रमुख दर्शन न्यायाचे प्रतिपादन करणे, हा न्यायदर्शनाचा विषय आहे 'प्रमाणैरर्थपरीक्षणं न्याय ' = विविध प्रमाणांच्या साहाय्याने वस्तुतत्त्वाची परीक्षा करणे, म्हणजे न्याय होय, अशी त्याची व्याख्या आहे (वात्स्यायन न्यायभाष्य १ १ १) प्रमाणांचे स्वरूपवर्णन व प्रमाणपरीक्षेचे व्यावहारिक रूप यांच्याविषयी विवेचन केलेले असल्यामुळे याला *न्यायदर्शन* असे नाव मिळाले आहे परार्थानुमानाच्या पाच अवयवांना आणि अनुमान प्रमाणालाही न्याय असे म्हणतात न्यायदर्शनाला आन्वीक्षिकी विद्या असेही नाव आहे अन्वीक्षेचे दोन अर्थ आहेत–(१) प्रत्यक्ष व आगम यांवर आधारलेले अनुमान व (२) प्रत्यक्ष व शब्दप्रमाण यांच्या साहाय्याने अवगत विषयाचे अनु + ईक्षण म्हणजे अनुमान हे शास्त्र अशा अन्वीक्षेला अनुसरून प्रवृत्त झाल्यामुळे त्याला आन्वीक्षिकी म्हणण्याची प्रथा पडली अनुमानप्रक्रियेत हेतूचे महत्त्व सर्वांत जास्त असल्यामुळे याला हेतुविद्या किंवा हेतुशास्त्र असेही म्हणतात विद्वत्सभेतील शास्त्रार्थचर्चेला किंवा वादाला याचा फार उपयोग होत असल्यामुळे हे दर्शन वादविद्या किंवा तर्कविद्या या नावांनीही प्रसिद्ध आहे प्रमाणांची मीमांसा केल्यामुळे त्याला प्रमाणशास्त्र असेही म्हणतात याशिवाय याला वाकोवाक्य, तर्की, विमर्शी अशीही अन्य नावे आहेत

प्रमाणद्वारा प्रमेय वस्तूंचा विचार करणे आणि प्रमाणांचे विस्तृत विवेचन करणे, हे न्यायदर्शनाचे मूळ प्रयोजन आहे

न्यायविद्येचा उगम कधी झाला, ते निश्चित सांगता येत नाही पण तर्काच्या साहाय्याने वस्तुतत्त्व पारखण्याची पद्धतही फार प्राचीन आहे आत्मदर्शनासाठी तर्कानुकूल मनन करणे, हा एक उपाय श्रुतींनी सांगितला आहे *श्रौतानुष्ठानातील* विरोधाच्या परिहारासाठी मीमांसेने संहिताकालात सर्वांत प्रथम तर्काचा उपयोग केला त्यामुळे प्रारंभी मीमांसेलाच न्याय म्हणत असत पण नंतरच्या काळात न्यायात श्रौत विषयाच्या बाहेरील विषयांचाही समावेश झाला

न्यायदर्शनाचा इतिहास सुमारे दोन हजार वर्षांइतका प्राचीन

आहे त्या इतिहासात या दर्शनाच्या विकासाचे दोन प्रवाह दिसतात पहिला प्रवाह न्यायसूत्रकार गौतम यांच्यापासून सुरू होतो गौतमाने षोडश पदार्थांचे निरूपण केलेले असल्यामुळे त्या प्रवाहाला पदार्थमीमांसात्मक प्रणाली असे नाव आहे नंतरच्या काळात गंगेश उपाध्याय यांनी तत्त्वचिंतामणी या आपल्या ग्रंथात प्रमाणांची मीमांसा केली, म्हणून या दुसऱ्या प्रवाहाला प्रमाणमीमांसात्मक प्रणाली असे नाव मिळाले यांना अनुक्रमे प्राचीन न्याय आणि नव्य न्याय असेही म्हणतात

प्रारंभी न्याय आणि वैशेषिक ही दोन दर्शने स्वतंत्र होती, पण बौद्ध काळात या दोन दर्शनांचा इतका घनिष्ठ संबंध आला, की न्यायसूत्रे ही वैशेषिक दर्शनाची सूत्रे म्हणूनही उल्लेखिली जाऊ लागली

न्यायदर्शनाची ग्रंथसंपदा विपुल आहे ग्रंथांच्या बाबतीत वेदान्तदर्शनाच्या खालोखाल न्यायदर्शनाचाच क्रमांक लागतो

**प्रमुख आचार्य–** या दर्शनाचे काही प्रमुख आचार्य असे–

गौतम– (सनपूर्व ६ वे शतक) न्यायसूत्रांचा कर्ता याचे नाव अक्षपाद असून, गोत्र गौतम किंवा गोतम आहे हा मिथिलेत राहत होता, असे अनेक पंडितांचे मत आहे हा इ स च्या ४ थ्या शतकात होऊन गेला, असेही काही विद्वान मानतात

वात्स्यायन– (सनपूर्व २ रे शतक) याने न्यायसूत्रावर विस्तृत भाष्य लिहिले आहे सूत्रांतील गूढ अर्थांचे रहस्य त्यात स्पष्ट केलेले आहे याची भाषा संक्षिप्त पण प्रौढ आहे

उद्योतकर–(इ स चे ६ वे शतक) वात्स्यायनाच्या न्यायभाष्यावर याने न्यायवार्तिक नामक ग्रंथ लिहिला आहे दिङ्नागादी बौद्ध नैयायिकांच्या कुतर्कांचे खंडन करण्यासाठी आणि वैदिक न्यायाची निर्दुष्टता प्रतिपादन करण्यासाठी त्याने हा ग्रंथ लिहिला दिङ्नागाच्या आक्रमणामुळे क्षीणप्रभ झालेल्या न्यायविद्येचा प्रकाश याने पुन्हा सर्वत्र पसरविला आणि आपले उद्योतकर हे नाव सार्थ केले प्राचीन न्यायाचा हा ग्रंथ प्रौढ व पांडित्यपूर्ण आहे उद्योतकर हा काश्मीरात राहत होता, असे काही मानतात, तर काही त्याला मिथिलानिवासी समजतात

वाचस्पति मिश्र –(इ स चे ९ वे शतक) मिथिलेतील एक महापंडित उद्योतकराच्या न्यायवार्तिकाचा गूढार्थ समजावून देण्यासाठी आणि धर्मकीर्ती आदी बौद्ध नैयायिकांनी त्याच्यावर केलेल्या टीकेला उत्तर देण्यासाठी याने न्यायवार्तिकतात्पर्यटीका नामक ग्रंथ लिहिला त्यामुळे त्याला तात्पर्याचार्य असे नाव पडले न्यायसूचीनिबंध नावाचा आणखीही एक न्यायग्रंथ याने रचला आहे वैशेषिकदर्शन सोडून इतर दर्शनांवर याने टीका लिहिल्या असून, त्या प्रामाणिक, प्रौढ व पांडित्यपूर्ण आहेत याच्या प्रगाढ पांडित्यामुळे याला सर्वतंत्रस्वतंत्र व षड्दर्शनीवल्लभ अशा पदव्या मिळाल्या होत्या

जयंतभट्ट – (इ स च्या ९ व्या शतकाचा उत्तरार्ध) गौतमाच्या काही सूत्रांवर याने न्यायमंजरी नामक ग्रंथ लिहिला आहे ग्रंथाची भाषा अत्यंत प्रौढ व साहित्यिक आहे चार्वाक, बौद्ध, मीमांसक, वेदान्ती, इ विरोधकांचे त्याने रंजक पण पांडित्यपूर्ण भाषेत खंडन केले आहे

भासर्वज्ञ – (इ स च्या ९ व्या शतकाचा उत्तरार्ध) याने न्यायसार नावाचा ग्रंथ लिहिला असून, त्यात स्वार्थ व परार्थ अनुमान, पक्षाभास, दृष्टान्ताभास, मुक्ती, इत्यादींचे विवेचन केले आहे त्याच्या या सर्व कल्पना न्यायजगतात अपूर्व आहेत

उदयनाचार्य – (इ स चे १० वे शतक) याचा जन्म मिथिलेत झाला तात्पर्यटीकेवर याने तात्पर्यपरिशुद्धी नामक ग्रंथ लिहिला आहे पण याचे आत्मतत्त्वविवेक व न्यायकुसुमांजली हे ग्रंथ अत्यंत महत्त्वाचे ठरले आहेत आत्मतत्त्वविवेक या ग्रंथात बौद्धांच्या क्षणभंग व शून्यवाद यांचे खंडन असून, न्यायसंमत आत्मतत्त्वाचे विस्तृत विवेचन आहे न्यायकुसुमांजली या ग्रंथात सांख्यादी वैदिक आणि बौद्धादी अवैदिक दर्शनांतील ईश्वरनिषेधबाधक प्रमाणांचे मार्मिक आणि विद्वत्तापूर्ण खंडन केलेले आहे ईश्वरसिद्धी करणारा हा ग्रंथ न्यायजगतात अद्वितीय आहे

गंगेश उपाध्याय – (इ स चे १३ वे शतक) मिथिलेचा रहिवासी व नव्यन्यायाचा जन्मदाता याने तत्त्वचिंतामणी नामक ग्रंथ लिहून न्यायाच्या इतिहासात एक नवीन युग सुरू केले आपल्या ग्रंथात त्याने प्रत्यक्ष, अनुमान, उपमान व शब्द या चार प्रमाणांवर खूप विस्तृत विचार केला आहे या ग्रंथाची शैली वैशिष्ट्यपूर्ण असून, अवच्छेदक–अवच्छेद्य, निरूपक–निरूप्य अनुयोगी–प्रतियोगी, इ शब्द योजून त्याने तिला शास्त्रीय प्रतिष्ठा मिळवून दिली आहे पुढे ज्योतिष सोडून बाकीच्या बहुतेक सर्व शास्त्रांवर या शैलीचा प्रभाव पडलेला दिसून येतो

तत्त्वचिंतामणीवर गंगेशाचा पुत्र वर्धमान याने प्रकाश नामक टीका लिहिली आहे

पक्षधर मिश्र – (इ स च्या १३ व्या शतकाचा उत्तरार्ध) याचे नाव जयदेव असे होते कुठलाही सिद्धान्त घेऊन त्याचे पक्षभर (पंधरवडा) समर्थन करीत राहण्याच्या सवयीमुळे याला पक्षधर असे नाव मिळाले याने तत्त्वचिंतामणीवर आलोक नावाची टीका लिहिली आहे याचा शिष्य रुचिदत्त मिश्र हाही प्रकांड पंडित होता त्याने वर्धमानाच्या कुसुमांजलिप्रकाशावर मकरंद व तत्त्वचिंतामणीवर प्रकाश नामक टीका लिहिली आहे

अशा प्रकारे सुमारे दोनशे वर्षे मिथिला ही न्यायविद्येचे मोठे केंद्र बनून राहिली होती इ स च्या १५ व्या शतकात

बंगालमध्ये नवद्वीप येथे न्यायविद्यापीठाची स्थापना झाली इ स चे १६ वे व १७ वे ही दोन शतके म्हणजे नव्यन्यायाच्या इतिहासातील सुवर्णयुग होय या कालात अनेक प्रतिभासंपन्न नैयायिकांनी विपुल ग्रंथरचना केली व नवद्वीपाला न्यायदर्शनाचे पीठ अशी प्रतिष्ठा प्राप्त करून दिली अजूनही ती टिकून आहे या नवद्वीपातील काही प्रमुख नैयायिक असे–

वासुदेव सार्वभौम – (इ स च्या १३ व्या शतकाचा उत्तरार्ध व १४ शतकाचा प्रारंभकाल) बंगालमधील प्रसिद्ध नैयायिक आणि नवद्वीपातील न्यायविद्यापीठाचा संस्थापक याने मिथिलेत जाऊन पक्षधर मिश्राकडे तत्त्वचिंतामणीचे अध्ययन केले मिथिलेतील नैयायिक तिथले न्यायग्रंथ बाहेर नेऊ देत नसत म्हणून वासुदेव सार्वभौमाने तत्त्वचिंतामणी व न्यायकुसुमांजली हे दोन ग्रंथ मुखोद्गत केले व काशीत येऊन ते लिहून काढले नंतर नवद्वीपात जाऊन त्याने न्यायशास्त्राच्या अध्ययन–अध्यापनासाठी एका विद्यापीठाची स्थापना केली धार्मिक निबंधकार रघुनंदन, शाक्ततंत्राचा व्याख्याकार कृष्णानंद व नैयायिकशिरोमणी रघुनाथ भट्टाचार्य हे तिघेही याचे शिष्य होत

रघुनाथशिरोमणी – (इ स चे १४ वे शतक) नवद्वीपातील सर्वश्रेष्ठ नैयायिक वासुदेव सार्वभौम व पक्षधर मिश्र यांच्याकडे याने अध्ययन केले याने तत्त्वचिंतामणीवर दीधिती नामक टीका लिहिली असून, तीत त्याने अनेक सिद्धान्तांचे युक्तिपूर्वक खंडन करून आपले नवीन सिद्धान्त प्रस्थापित केले आहेत मूळ ग्रंथाबरोबरच ही टीकाही पुढे पाडित्याचा निकष ठरली ही टीका म्हणजे मौलिक विचार आणि तार्किक प्रतिभा यांचा अपूर्व संगम आहे त्याच्या या अद्वितीय तार्किक बुद्धीमुळे त्याला शिरोमणी ही पदवी मिळाली

मथुरानाथ तर्कवागीश – (इ स चे १६ वे शतक) रघुनाथ शिरोमणीचा सर्वश्रेष्ठ शिष्य याने आलोक, चिंतामणी व दीधिती यांवर गूढार्थप्रकाशिनीरहस्य नामक टीका लिहिल्या आहेत

जगदीश भट्टाचार्य – (इ स चे १७ वे शतक) मथुरानाथाच्या नंतरचा एक मोठा नैयायिक दीधितीवर याने जागदीशी नामक एक विस्तृत टीका लिहिली आहे याशिवाय *तर्कामृत व शब्दशक्तिप्रकाशिका हे आणखी दोन ग्रंथ याने* लिहिले आहेत त्यांपैकी शब्दशक्तिप्रकाशिका हा ग्रंथ जगदीशाचे सर्वस्व मानतात

गदाधर भट्टाचार्य – (इ स चे १७ वे शतक) दीधितीवर याने विस्तृत टीका लिहिली असून, ती गादाधरी या नावाने प्रसिद्ध आहे त्याचप्रमाणे याने आत्मतत्त्वविवेकावर व तत्त्वचिंतामणीच्या काही भागांवर मूलगादाधरी नामक टीका लिहिली आहे याशिवाय न्यायावर याने सुमारे बावन्न ग्रंथ लिहिले असून, त्यांपैकी व्युत्पत्तिवाद व शक्तिवाद हे विशेष प्रसिद्ध आहेत

इ स च्या १९ व्या व २० व्या शतकांतही राखालदास न्यायरत्न, कलाशचंद्रशिरोमणी, सीतारामशास्त्री, रामदत्त, बच्चा झा, वामाचरण भट्टाचार्य, बालकृष्ण मिश्र, शंकर तर्करत्न, इ अनेक प्रथितयश नैयायिक बंगालमध्ये होऊन गेले

**न्यायशास्त्राचे प्रयोजन** – निःश्रेयसप्राप्ती हे न्यायशास्त्राचे मुख्य प्रयोजन आहे न्यायशास्त्राच्या अध्ययनाने पदार्थांचे तत्त्वज्ञान होते आणि त्यामुळे आत्मसाक्षात्कार होऊन मोक्षाची प्राप्ती होते, असे मानलेले आहे ज्या सोळा पदार्थांच्या तत्त्वज्ञानाने मोक्ष मिळतो, असे या शास्त्रात मानले आहे ते पदार्थ असे– प्रमाण, प्रमेय, संशय, प्रयोजन, दृष्टान्त, सिद्धान्त, अवयव, तर्क, निर्णय, वाद, जल्प, वितंडा, हेत्वाभास, छल, जाती व निग्रहस्थान त्यांचे क्रमाने विवेचन पुढीलप्रमाणे–

*प्रमाण* – याचे लक्षण असे – '*यथार्थानुभव प्रमा तत्साधनं च प्रमाणम्*' = कोणत्याही वस्तूच्या यथार्थ रूपाची अनुभूती म्हणजे प्रमा होय या प्रमेच्या साधनाला प्रमाण असे म्हणतात (उदयनाचार्य)

ज्याप्रमाणे दिव्याचा प्रकाश आपल्यासमोर असलेल्या सर्व वस्तूंचे स्वरूप प्रकट करतो, त्याप्रमाणे बुद्धी (ज्ञान) सर्व पदार्थांना प्रकाशित करते

ज्ञान हा आत्म्याचा विशेष गुण आहे स्मृती आणि अनुभव असे त्याचे दोन प्रकार आहेत केवळ संस्कारामुळे उत्पन्न होणाऱ्या ज्ञानाला स्मृती असे नाव आहे अनुभूत पदार्थ नष्ट झाला, तरी त्याने उत्पन्न केलेले भावनारूप संस्कार अनुभविणाऱ्याच्या आत्म्यावर तसेच राहतात पूर्वी अनुभवलेल्या वस्तूप्रमाणे दुसरी एखादी वस्तू दिसली, की ते संस्कार उद्बुद्ध होतात आणि पुरुषाला पूर्वी अनुभवलेल्या पदार्थांचे स्मरण होते स्मृतिभिन्न ज्ञानाला अनुभव असे म्हणतात याचे यथार्थ आणि अयथार्थ असे दोन प्रकार आहेत यथार्थ ज्ञानाला प्रमा आणि अयथार्थ ज्ञानाला अप्रमा असे म्हणतात

प्रमेचे प्रत्यक्ष, अनुमिती, उपमिती आणि शाब्द असे चार *प्रकार आहेत संशय, विपर्यय आणि तर्क असे अप्रमेचे तीन* प्रकार आहेत एकाच धर्मीच्या ठिकाणी विरुद्ध नानाप्रकारक ज्ञान म्हणजे संशय विपर्यय म्हणजे मिथ्या ज्ञान उदा० शिंपल्याच्या ठिकाणी रजताचे भान होणे हा विपर्यय होय गूढ, अचिंत्य आणि सूक्ष्म तत्त्वाच्या ज्ञानासाठी तर्काचे बहुमोल साहाय्य होते

प्रमा चार प्रकारची आहे त्यामुळे प्रमाणे चार होतात ती

अशी – प्रत्यक्ष प्रमेचे कारण ते प्रत्यक्ष प्रमाण अनुमितिप्रमेचे कारण ते अनुमान प्रमाण उपमितिप्रमेचे कारण ते उपमान प्रमाण आणि शाब्दप्रमेचे कारण ते शब्द प्रमाण होय

इद्रिय आणि अर्थ याच्या सनिकर्षामुळे म्हणजे सबधामुळे जे ज्ञान उत्पन्न होते, त्याला प्रत्यक्ष असे म्हणतात डोळ्याचा घटाशी सबध आला, की घटाचे प्रत्यक्ष होते यालाच चाक्षुष प्रत्यक्ष असे नाव आहे त्याचप्रमाणे रसना (जीभ) आणि आम्र याचा साक्षात सबध आला की रासन प्रत्यक्ष होते याप्रमाणेच विषय आणि घ्राणेद्रिय, श्रवणेद्रिय व त्वगिद्रिय याचा सबध आला, की अनुक्रमे घ्राणज, श्रावण आणि त्वाच प्रत्यक्ष होते ही सव बाह्य प्रत्यक्षे होत

मन हेही एक इद्रियच आहे त्याच्याशी साक्षात सबध आल्यामुळे सुख, दु ख, ज्ञान, इच्छा, द्वेष, इत्यादीचे जे ज्ञान होते, त्याला मानस प्रत्यक्ष असे म्हणतात या सव प्रत्यक्षाना लौकिक प्रत्यक्ष असे म्हणतात

इद्रिये आणि विषय किवा अर्थ याचा सबध आला, की लौकिक प्रत्यक्ष होते हे सबध पुढील सहा प्रकारचे मानलेले आहेत– (१) सयोग (२) सयुक्त समवाय (३) सयुक्त समवेत समवाय (४) समवाय (५) समवेत समवाय व (६) विशेषण–विशेष्यभाव

चक्षूने घटाचे प्रत्यक्ष होते, त्या वेळी त्या दोघाचा जो सनिकर्ष होतो, त्याला सयोग असे नाव आहे घटरूपाचे प्रत्यक्ष सयुक्त समवाय सनिकर्षाने होते कारण रूप घटावर समवाय सबधाने राहते म्हणून चक्षूचा घटाशी सयोग आणि त्याच्या रूपाशी समवाय सबध असतो घटरूपत्वाचे प्रत्यक्ष सयुक्त समवेत समवाय सबधाने होते कारण रूपावर रूपत्व समवाय सबधाने राहते शब्दाचे श्रावण प्रत्यक्ष होते, ते समवाय सबधाने होते कारण श्रवणेद्रिय हे आकाशरूपच मानलेले आहे शब्द हा आकाशाचा गुण असून गुण गुणी याचा समवायसबध आहे शब्दत्वाचे प्रत्यक्ष समवेत समवाय सबधाने होते कारण शब्दत्व जाती शब्दावर समवाय सबधाने राहते अभावाचे प्रत्यक्ष विशेषण विशेष्यभाव सबधाने होते ‘घटाभाववद् भूतलम्’ या वाक्यात भूतलाचे नेत्राने प्रत्यक्ष होते ते विशेष्य असून घटाभाव हे त्याचे विशेषण आहे या सर्व सबधापासून ज्ञान होण्यासाठी आत्मा आणि मन याचा सयोग आवश्यक असतो

दूरस्थ आणि अविद्यमान पदार्थांचे अलौकिक प्रत्यक्ष होते त्यासाठी अलौकिक सनिकर्ष मानला असून, त्याचे पुढील तीन प्रकार होतात– (१) सामान्यलक्षणाप्रत्यासत्ती (२) ज्ञानलक्षणाप्रत्यासत्ती व (३) योगज

सामान्यलक्षणाप्रत्यासत्ती– महानसात (स्वयपाकघर) अग्नी आणि धूम याचे अनेकवार साहचर्य पाहून एखादा पुरुष ‘यत्र यत्र धूमस्तत्र तत्र वह्नि ’ – जिथे जिथे धूम (धूर) तिथे तिथे वह्नी (अग्नी) अशी धूम आणि वह्नी याची व्याप्ती मांडतो परतु वर्तमान, भावी व भूत अशा सगळ्या धूमाची वह्नीशी व्याप्ती आहे किवा काय, ते एका माणसाला कधीच कळणे शक्य नाही जेव्हा त्याला धूमाचे ज्ञान होते, तेव्हा त्याबरोबरच धूमत्व जातीचेही भान होते जाती ही नित्य असते ती भावी आणि भूत अशा सर्व धूमाशी सलग्न असते त्यामुळे धूमत्व या जातीमुळे म्हणजेच सामान्यामुळे धूमाचे ज्ञान होते अलौकिक सनिकर्षाला सामान्यलक्षणा असे म्हणतात, ते यामुळेच होय

ज्ञानलक्षणाप्रत्यासत्ती– चदनाचे खोड पाहिले की आपल्याला ‘सुरभिरय चन्दनखण्ड ’– हा चदनाचा तुकडा सुगधी आहे, असे ज्ञान होते म्हणजे चदनाच्या खोडाबरोबरच त्याच्या सौरभाचेही ज्ञान होते हे सौरभाचे ज्ञान आपल्याला घ्राणजप्रत्यक्षाने होत नाही कारण खोड दूर आहे मग सौरभाचे ज्ञान होते तरी कसे ? तर ते ज्ञानलक्षणाप्रत्यासत्तीने होते

योगज–परमाण्वादी सूक्ष्म पदार्थ, व्यवहित किवा दूरच्या वस्तू या योग्याना करतलामलकवत प्रत्यक्ष असतात, पण या प्रत्यक्षाला कुठलाच लौकिक सनिकर्ष कारण नसतो योग्याच्या सिद्धीमुळे त्याना हे शक्य होते म्हणून हा योगज सनिकर्ष होय

प्रत्यक्षाचे निर्विकल्पक आणि सविकल्पक असे आणखी दोन प्रकार आहेत दूरवरची एखादी वस्तू पाहिली की आपल्याला काहीतरी वस्तू आहे, एवढेच ज्ञान होते तिचे नाव, जाती या विषयी काही कळत नाही पहिल्या क्षणातील या नाम जाति विरहित ज्ञानाला निर्विकल्पक ज्ञान असे म्हणतात दुसऱ्या क्षणात त्या वस्तूचे नाम, गुण, जाती वगैरेंचे ज्ञान होते या विशिष्ट ज्ञानाला सविकल्पक ज्ञान असे नाव आहे

अनुमान– कोणत्याही लिगाच्या किवा हेतूच्या ज्ञानाने त्या लिगाला अथवा हेतूला धारण करणाऱ्या वस्तूचे ज्ञान करून घेणे, म्हणजे अनुमान होय उदा० एखाद्या पर्वतावर अविच्छिन्न धूमरेखा पाहून त्यावर अग्नी आहे असे, म्हणजे ‘पर्वतो वह्निमान’ असे ज्ञान होणे, याला अनुमान असे, नाव आहे

‘पर्वतो वह्निमान् धूमात यथा महानसम्’ या अनुमान वाक्यातील पर्वत हा पक्ष, वह्नी हे साध्य, धूम हा हेतू आणि महानस हा सपक्ष आहे जी वस्तू सिद्ध करायची तिला साध्य किवा व्यापक आणि ज्याच्या साहाय्याने ती सिद्ध करायची, तिला हेतू किवा व्याप्य असे म्हणतात साध्य जो वह्नी तो धूमापेक्षा जास्त ठिकाणी राहतो, म्हणून तो व्यापक आणि धूम त्याच्यापेक्षा कमी ठिकाणी राहतो, म्हणून व्याप्य होय उदा० तप्त लोखडी गोळ्यात वह्नी असतो, पण धूम नसतो

अनुमानाचे पूर्ववत्, शेषवत् आणि सामान्यतोदृष्ट असे तीन प्रकार मानिले आहेत. जेव्हा कारणावरून कार्याचे अनुमान होते ते पूर्ववत् अनुमान. कार्यावरून कारणाचे होते ते शेषवत् अनुमान आणि जे हा एखाद्या वस्तूचे विशेष रूप न कळता केवळ त्याच्या सामान्य स्वरूपाचे अनुमान होते ते सामान्यतोदृष्ट अनुमान होय.

स्वार्थानुमान आणि परार्थानुमान असेही अनुमानाचे आणखी दोन भेद आहेत. स्वतःसाठी केलेले अनुमान ते स्वार्थानुमान आणि दुसऱ्यासाठी केलेले ते परार्थानुमान होय. परार्थानुमानात पाच वाक्यांचा प्रयोग करावा लागतो. त्यांना अनुक्रमे प्रतिज्ञा, हेतु, उदाहरण, उपनय आणि निगमन अशी नावे आहेत. या पाच वाक्यांना मिळून ' न्याय ' अशी संज्ञा आहे. उदा० ' पर्वतो वह्निमान् '– प्रतिज्ञावाक्य ' धूमात् '– हेतुवाक्य ' यो यो धूमवान् स स वह्निमान् यथा महानसम् '– उदाहरणवाक्य ' अयं पर्वतो वह्निव्याप्यधूमवान् '– उपनयवाक्य आणि ( अतः ) 'अयं पर्वतो वह्निमान् '– निगमनवाक्य.

प्रतिज्ञावाक्यात जी वस्तू साध्य करायची असते, तिचा उल्लेख करतात. हेतुवाक्यात ज्या कारणाने साध्यसिद्धी करायची, तिचा निर्देश असतो. उदाहरणवाक्यात साध्य आणि हेतू यांचा साहचर्यनियम म्हणजे व्याप्ती दाखवलेली असते. उपनयवाक्य व्याप्तिविशिष्ट पक्षाचा बोध करून देते आणि अनुमानद्वारा प्रतिज्ञेची झालेली सिद्धी निगमनवाक्यात दाखवलेली असते.

*वह्नी आणि धूम यांच्यामधील साहचर्याला व्याप्ती असे नाव* आहे. व्याप्ती आणि पक्षधर्मता म्हणजे व्याप्तिविशिष्ट हेतू पक्षावर असणे, या दोन गोष्टी अनुमानाला आवश्यक आहेत. व्याप्तिविशिष्टपक्षधर्मताज्ञानालाच परामर्श असे म्हणतात. परामर्श हा व्याप्तीचे कारण असतो.

अनुमानाचे आणखी एका प्रकाराने विभाग पडतात. हे विभाग अनुमानोपयोगी व्याप्तीच्या प्रकारावर अवलंबून आहेत. केवलान्वयी, केवलव्यतिरेकी व अन्वयव्यतिरेकी अशी त्यांची नावे आहेत. जेव्हा हेतू आणि साध्य समान ठिकाणी राहतात, तेव्हा त्या व्याप्तीला केवलान्वयी म्हणतात आणि त्या व्याप्तीवर आधारित अनुमानाला केवलान्वयी अनुमान म्हणतात. उदा० ' घटो अभिधेयः प्रमेयत्वात् '= घट हा वाच्य आहे, कारण तो प्रमेय आहे. साध्याभाव आणि हेत्वभाव यांच्या व्याप्तीला व्यतिरेकव्याप्ती आणि केवळ अशा व्याप्तीवर आधारित अनुमानाला केवलव्यतिरेकी अनुमान असे म्हणतात. उदा० ' पृथ्वी इतरेभ्यो भिद्यते गन्धवत्त्वात् '= पृथ्वी इतरांहून भिन्न आहे, कारण ती गंधवती आहे. साध्य आणि हेतु व साध्याभाव आणि हेत्वभाव यांच्या व्याप्तीला अन्वयव्यतिरेकी व्याप्ती आणि त्यावर आधारित अनुमानाला अन्वयव्यतिरेकी अनुमान म्हणतात. धूम आणि वह्नी यांची व्याप्ती अशी असते. ' पर्वतो वह्निमान् धूमात् ' ही अन्वयव्याप्ती आणि ' ह्रदो धूमाभाववान् वह्न्यभावात् '= डोहात वह्नी नाही, म्हणून धूमही नाही, ही व्यतिरेकव्याप्ती होय.

हेतूच्या द्वारा अनुमानाची सिद्धी होते. हा हेतू पुढील पाच गुणांनी युक्त असला पाहिजे– (१) पक्षसत्त्व– हेतू पक्षावर असणे (२) सपक्षसत्त्व– तो सपक्षावर असणे (३) विपक्षासत्त्व– तो विपक्षावर नसणे (४) असत्प्रतिपक्षत्व– साध्याभावाची सिद्धी करून देणाऱ्या दुसऱ्या हेतूचा अभाव असणे व (५) अबाधितविषयत्व– प्रत्यक्षादी प्रमाणांनी हेतूचा विषय बाधित न होणे. यांपैकी एखाद्या गुणाचा जरी हेतूत अभाव असला, तरी तो दुष्ट हेतू होतो. यालाच असद्धेतू किंवा हेत्वाभास असे म्हणतात.

नैयायिकांनी पाच प्रकारचे हेत्वाभास मानलेले आहेत, ते असे– (१) सव्यभिचार (२) विरुद्ध (३) सत्प्रतिपक्ष (४) असिद्ध व (५) बाधित.

सव्यभिचार– यालाच अनैकांतिक असे नाव आहे. साधारण, असाधारण व अनुपसंहारी असे याचे तीन प्रकार होतात.

' साध्याभाववद्वृत्ति हेतुः ' हे साधारणाचे लक्षण. उदा० ' पर्वतो वह्निमान् प्रमेयत्वात् ' इथे वह्नी साध्य आणि प्रमेयत्व हेतू आहे. साध्याभाववान् जलह्रद. त्या ठिकाणी प्रमेयत्व हेतू राहतो. म्हणून तो साधारण हेतू समजावा.

' सर्वसपक्षविपक्षव्यावृत्तोऽसाधारणः '= सर्व सपक्ष आणि विपक्ष यांवर न राहणारा तो असाधारण हेतू होय. उदा० ' शब्दो नित्यः शब्दत्वात् '= शब्द नित्य आहे, कारण तो शब्द आहे. इथे नित्यत्व साध्य आणि शब्दत्व हेतू आहे. आकाशादी सर्व नित्य आणि द्व्यणुकादी अनित्य पदार्थांवर शब्दत्व राहत नाही, तर शब्दत्व हेतू फक्त शब्दावर राहतो. इथे आकाशादी नित्य पदार्थ सपक्ष आणि द्व्यणुकादी अनित्य पदार्थ विपक्ष आहेत. म्हणून शब्दत्व हेतू साधारण होय.

' अन्वयव्यतिरेकदृष्टान्तरहितः अनुपसंहारी '= जो हेतू अन्वयव्यतिरेकदृष्टांतरहित असतो, तो अनुपसंहारी होय. उदा० ' सर्वम् अनित्यं प्रमेयत्वात् ' इथे अनित्यत्व साध्य आणि प्रमेयत्व हेतू आहे. इथे सर्व हा पक्ष असल्यामुळे सपक्ष आणि विपक्ष उरतच नाहीत. त्यामुळे प्रमेयत्व हेतू अनुपसंहारी होतो.

विरुद्ध– ' साध्याभावव्याप्यो हेतुर्विरुद्धः '= साध्याचा अभाव जिथे असेल, तिथेच नियमाने राहणारा जो हेतू तो विरुद्ध होय. उदा० ' शब्दो नित्यः कृतकत्वात् ।' इथे नित्यत्व साध्य आणि

कृतकत्व हेतू आहे कृतकत्व हेतू साध्याभाव अनित्यत्व याच्याशी व्याप्त असतो

सत्प्रतिपक्ष– ‘साध्याभावसाधक हेत्वन्तर यस्य विद्यते स सत्प्रतिपक्ष ’= साध्याभाव साध्य करणारा दुसरा हेतू ज्या हेतूला असतो, तो सत्प्रतिपक्ष होय उदा० ‘शब्दो नित्य श्रावणत्वात्’ व ‘शब्दो अनित्य कार्यत्वात्।’ पहिल्या अनुमानात शब्द हा पक्ष आहे, नित्यत्व साध्य आहे आणि श्रावणत्व हेतू आहे हा श्रावणत्व हेतू सत्प्रतिपक्ष आहे त्याचे साध्य जे नित्यत्व त्याचा अभाव म्हणजे अनित्यत्व होय त्याची सिद्धी करणारा कार्यत्व हा दुसरा हेतू आहे सत्प्रतिपक्षालाच प्रकरणसम असे दुसरे नाव आहे

असिद्ध– असिद्ध हेत्वाभासाचे तीन प्रकार आहेत आश्रयासिद्ध, स्वरूपासिद्ध आणि व्याप्यत्वासिद्ध ‘गगनारविन्द सुरभि, अरविन्दत्वात ’= हे आश्रयासिद्धाचे उदाहरण यात गगनारविंद (आकाशकमल) हे वास्तवात अस्तित्वात नाहीच त्यामुळे अरविन्दत्व हेतू पक्षावर राहू शकत नाही याला पक्षासिद्ध असेही म्हणतात ज्या अनुमानात हेतू पक्षावर राहणे असंभाव्य आहे, तो स्वरूपासिद्ध होय उदा० ‘ह्रदो वह्निमान् धूमात’ इथे धूम हा हेतू डोहात कधीच राहणे शक्य नाही ज्या ठिकाणी व्याप्ती कोणत्या ना कोणत्या तरी उपाधीने युक्त असते म्हणजे साध्य आणि हेतू यांची व्याप्ती होण्यासाठी एखादी अट पुरी व्हावी लागते तो व्याप्यत्वासिद्ध हेतू समजावा सोपाधिक हेतू हा व्याप्यत्वासिद्ध असतो

बाधित– ज्या हेतूचा साध्याभाव दुसऱ्या प्रमाणाने निश्चित होतो, तो बाधित होय उदा० ‘वह्नि अनुष्ण द्रव्यत्वात् ’= इथे अनुष्णत्व साध्य आणि द्रव्यत्व हेतू आहे साध्याचा अभाव म्हणजे उष्णत्व स्पार्शन प्रत्यक्षाने म्हणजे त्वगिंद्रियाने त्याचे ग्रहण होते म्हणजे द्रव्यत्व हेतू प्रत्यक्षप्रमाणाने बाधित आहे याला कालात्ययापदिष्ट असेही नाव आहे

हे सर्व हेत्वाभास अनुमितिज्ञान आणि त्याचे करण जे अनुमान त्यातील एकाला प्रतिबंध करून अनुमेयाचे यथार्थ ज्ञान होऊ देत नाहीत

याशिवाय अव्याप्ती म्हणजे सर्व लक्ष्यावर न राहणे, अतिव्याप्ती म्हणजे लक्ष्येतरावर राहणे आणि असंभव म्हणजे लक्ष्यावरच न राहणे, असे आणखी तीन हेतुदोष मानलेले आहेत

उपमान – उपमितिज्ञानाच्या करणाला उपमान असे नाव आहे हा पदार्थ अमुक पदाचा वाच्य आहे, असे जे ज्ञान ती उपमिती होय तिचे करण म्हणजे सादृश्यज्ञान अर्थात उपमान म्हणजे सादृश्यज्ञान समजायचे ‘याच्या सारखा तो’ अशा अतिदेशवाक्यार्थाने स्मरण हा अवांतर व्यापार आहे उदा० गवय शब्दाच्या वाच्य पदार्थाला न जाणणारा एखादा पुरुष अरण्यातल्या पुरुषाकडून गवा गायीसारखा असतो असे ऐकतो आणि पुढे अरण्यात गेल्यानंतर गायीसारखा प्राणी पाहतो नंतर त्याला वरील वाक्यार्थाचे स्मरण होते आणि त्याला हा प्राणी गवय शब्दवाच्य आहे, असे ज्ञान होते हेच उपमितिज्ञान होय

शब्द– शब्द हे नैयायिकांनी मानलेले चौथे आणि शेवटचे प्रमाण आहे ‘आप्तोपदेश शब्द ’= आप्ताचे जे वाक्य ते शब्दप्रमाण होय ( न्या सू १ १ ८ ) आप्त म्हणजे यथार्थवक्ता पदांच्या समूहाला वाक्य असे म्हणतात

जे अर्थबोधक शक्तीने युक्त असते ते पद होय या पदापासून हा अर्थ जाणावा अशी ईश्वरेच्छा म्हणजेच शक्ती होय नव्य नैयायिक मात्र केवळ इच्छा म्हणजेच शक्ती असे मानतात हा शक्तिग्रह व्याकरण, उपमान, कोश, आप्तवाक्य, व्यवहार, वाक्यशेष, व्याख्यान आणि सिद्धपदाचे सान्निध्य यावरून होतो

पद चार प्रकारचे असते– यौगिक, रूढ, योगरूढ व यौगिकरूढ आकांक्षा, योग्यता, संनिधी आणि तात्पर्य यांचे ज्ञान वाक्यार्थज्ञानाला कारणीभूत होते वाक्याचे लौकिक आणि वैदिक असे दोन प्रकार आहेत वैदिक वाक्य ईश्वरोक्त असल्यामुळे स्वतंत्र प्रमाण आहे लौकिक वाक्य जर आप्ताने सांगितलेले असेल, तर ते प्रमाण आहे

प्रमेय – प्रमाणाच्या द्वारा ज्या पदार्थांचे ज्ञान होते त्यांना प्रमेय अशी संज्ञा आहे आत्मा, शरीर, इंद्रिय, अर्थ, बुद्धी, मन, प्रवृत्ती, दोष, प्रेत्यभाव, फल, दुःख व अपवर्ग अशी बारा प्रमेये न्यायशास्त्रात मानलेली आहेत आत्मा अर्थात जीवात्मा हा ज्ञानाचे अधिकरण आहे तो द्रष्टा, भोक्ता, सर्वज्ञ, नित्य आणि सर्वव्यापक आहे ज्ञान, सुख, दुःख, इच्छा, द्वेष, प्रयत्न, धर्म, अधर्म, संस्कार, संख्या, परिमाण, पृथक्त्व, संयोग आणि विभाग हे जीवात्म्याचे गुण आहेत अपवर्ग म्हणजे मोक्ष होय दुःखाची आत्यंतिक निवृत्ती झाल्याने मोक्ष मिळतो जीवात्म्याची एकवीस प्रकारची दुःखे आणि त्यांची कारणे जेव्हा नष्ट होतात, तेव्हाच तो जीवात्मा मुक्त होतो

संशय– ‘एकस्मिन धर्मिणि विरुद्धनानाधर्मवैशिष्ट्यावगाहि ज्ञान संशय ’= एका धर्मीमध्ये विरुद्ध अनेक धर्मविशिष्ट जे ज्ञान, तो संशय होय जसे ‘स्थाणुर्वा पुरुषो वा ’= अंधारात खांबाला पाहून हा खांब आहे की पुरुष आहे असे परस्परविरुद्ध नानाधर्मविशिष्ट संदिग्ध ज्ञान होणे

प्रयोजन– ज्यामुळे प्रवृत्त होऊन लोक काम करतात, त्याला प्रयोजन असे म्हणतात

दृष्टान्त– उदाहरणास दृष्टान्त म्हटले आहे

सिद्धान्त– प्रमाणाच्या द्वारे सिद्ध केलेल्या गोष्टीला सिद्धान्त असे म्हणतात

अवयव– अनुमानप्रक्रियेत ज्या पाच वाक्यांचा प्रयोग करतात, त्यांना अवयव असे नाव आहे प्रतिज्ञा, हेतू, उदाहरण, उपनय व निगमन अशी त्यांची नावे आहेत या पाच वाक्यांत मिळून *न्यायातील सर्व प्रमाणांचा एकत्र समावेश केलेला आहे* म्हणून या पाच अवयवांना परम न्याय असे म्हणतात

तर्क– 'व्याप्यारोपेण व्यापकारोपस्तर्कः'= व्याप्याच्या आरोपाने व्यापकाचा आरोप करणे, हाच तर्क आहे उदा० *अग्नीचा अभाव हा व्याप्य आणि धूमाचा अभाव हा व्यापक* उदा० या पर्वतावर जर अग्नी नसता, तर धूमही नसता, पण यावर तर धूम प्रत्यक्ष दिसत आहे अर्थात इथे अग्नीही आहे, हा तर्क होय तर्क हा प्रमाणाला साहाय्यभूत होतो

*निर्णय– एखाद्या गोष्टीच्या दोही बाजू लक्षात घेऊन* त्यावर उभय पक्षांनी ठरवलेले मत हेच तत्त्वज्ञान होय

वाद– तत्त्वजिज्ञासेच्या हेतूने दोन किंवा अधिक व्यक्तींत पूर्वपक्ष, उत्तरपक्ष होतो, त्याला वाद असे नाव आहे

जल्प– पूर्वपक्ष, उत्तरपक्ष करून खंडन मंडन करणाऱ्या वादाला जल्प असे म्हणतात

वितंडा– ज्या जल्पात कोणत्याच पक्षाचे मत प्रस्थापित होत नाही, त्याला वितंडा म्हणतात

हेत्वाभास– असद्हेतूलाच हे दुसरे नाव आहे

छल– वक्त्याचा अभिप्राय उलटा करून अर्थाचा अनर्थ करणे, याला छल म्हणतात

जाती– साधर्म्य-वैधर्म्याच्या द्वारे एखाद्या वाक्यातील दोष *सांगणे म्हणजे जाती होय*

निग्रहस्थान– वादी आणि प्रतिवादी यांचे विपरीत ज्ञान किंवा अज्ञान दाखवणे याला निग्रहस्थान म्हणतात

बौद्धांच्या बरोबर वाद व चर्चा करून गौतमाने स्वमत *प्रस्थापनेसाठी न्यायशास्त्रात या सोळा पदार्थांचा समावेश* केलेला आहे

**ईश्वर–** न्याय आणि वैशेषिक सूत्रांत ईश्वरासंबंधी संदिग्ध माहिती आहे परंतु उदयनाचार्यांनी आपल्या कुसुमाञ्जली *ग्रंथात ईश्वराची स्पष्टपणे सिद्धी केलेली आहे ईश्वरसिद्धान्त हा न्यायदर्शनातील महत्त्वाचा सिद्धान्त आहे न्यायदर्शनाची* ईश्वरविषयक मते अशी–

ईश्वराच्या अनुग्रहाशिवाय जीवाला प्रमेयाचे यथार्थ ज्ञान प्राप्त होत नाही किंवा मोक्षही मिळत नाही सृष्टीची रचना, पालन आणि तिचा संहार ईश्वरच करतो सदैव विद्यमान असणाऱ्या अणूंपासून तो विश्वाची उत्पत्ती करतो मात्र तो सृष्टीचे उपादानकारण नसून निमित्तकारण आहे तो जीवांना *कर्मफल देणारा आहे आणि त्यामुळे त्याचा नैतिक शासकही* आहे

न्यायदर्शनाची रचना अक्षपाद गौतमाने केली पुढे या दर्शनावर अनेक पंडितांनी मोठमोठे ग्रंथ लिहिले कोणत्याही *विषयाची योग्य मीमांसा करण्याला आवश्यक असलेल्या नियमांची पद्धती या दर्शनात सांगितली आहे* निर्दोष विचार, चर्चा व अनुमाने यांना आवश्यक असलेले नियम म्हणजे न्याय होय अध्यात्मविद्या, न्यायालयातील धर्मवाद आणि आयुर्वेदादी *प्रयोगात्मक विद्या या तीन परंपरांचा न्यायदर्शनोत्पत्तीशी प्रत्यक्ष* संबंध आहे शुद्ध बौद्धिक कल्पनांची उभारणी न्याय वैशेषिक दर्शनांनी केली आहे

व्यावहारिक दृष्टीने तत्त्वाचे विवेचन न्यायशास्त्राने केले *आहे यात नऊ नित्य द्रव्ये मानलेली आहेत मुक्तावस्थेत एका* आत्म्याला दुसऱ्या आत्म्यापासून पृथक दाखवणारे मन हेही नित्य आहे अनादिकालापासून एका मनाचा एका आत्म्याशी संबंध जडलेला असतो आणि आत्म्याच्या बरोबरच ते मनही *अनंत शरीरांतून फिरत असते मुक्तावस्थेतही ते आत्म्याशी* संबद्ध असते त्यामुळेच जीवात्मा व्यापक असूनही अव्यापक असल्यासारखा दिसतो जीवात्मा आणि परमात्मा यांत काहीही संबंध नाही दोघेही आपापल्या क्षेत्रात निरपेक्ष आहेत सर्व दुःखांचा नाश झाल्यावर जीवात्मा मुक्त होतो संसारदशेत जीवाच्या ठिकाणी सुखदुःखादी गुण उत्पन्न होतात आणि मुक्तावस्थेत ते होत नाहीत अन्य द्रव्यापासून जीवाचे पृथक्त्व आहे हे त्याच्या सुखदुःखादी गुणांवरून कळून येते आणि मुक्तावस्थेत गुणांच्या स्वरूपयोग्यतेने त्याचे इतर द्रव्यांपासून पृथक्त्व दर्शविले जाते म्हणजे एक प्रकारची सांसारिक दशा स्वरूपयोग्यतेच्या रूपाने मुक्त जीवातही राहतेच

न्यायदर्शनात जग हे ज्ञानाहून भिन्न अशी स्वतंत्र सत्तात्मक वस्तू मानलेली आहे आत्म्याशिवाय परमाणू, मन, आकाश, काल, दिक् ही सर्व द्रव्येही नित्य मानलेली आहेत पण एवढी द्रव्ये नित्य मानण्यात काही औचित्य दिसून येत नाही असा या दर्शनावर आक्षेप घेतलेला आहे वास्तविक एकच कोणतीतरी वस्तू नित्य मानणे, सर्व पदार्थांचा संबंध त्या वस्तूशी दाखवणे आणि त्या वस्तुतत्त्वाच्या एकत्वावर जोर देणे हेच खरे दर्शन होय

नैयायिकांनी ईश्वराचे स्वरूप लौकिक कर्त्याप्रमाणे मानलेले आहे ईश्वर सृष्टीचे निमित्तकारण आहे सुतार ज्याप्रमाणे आपल्या हत्यारांच्या साहाय्याने लाकडापासून विविध वस्तू बनवतो, त्याप्रमाणे ईश्वर विद्यमान परमाणूंपासून सृष्टीचा

उत्पत्ती करतो म्हणजे जगताच्या उत्पत्तीसाठी तो उपादान कारणावर अवलंबून आहे मग त्याला सर्वशक्तिमान, परम स्वतंत्र असे कसे म्हणता येईल असाही प्रश्न पुढे येतो

त्याचप्रमाणे नैयायिकांची मुक्त आत्म्याची कल्पनाही आक्षेपार्ह आहे मुक्तावस्थेत दुःखाचा नाश होतो, त्याचबरोबर त्या वेळी सुखही नसते त्यामुळे मुक्त आत्म्याला आनंदस्वरूप मानणाऱ्या वेदान्त्यांनाही नैयायिकांची कल्पना पसंत पडत नाही अर्थात सांख्यादी दार्शनिकांकडूनही हा आक्षेप आहेच

**बौद्ध न्याय** – हा वैभाषिक, सौत्रान्तिक, योगाचार व माध्यमिक या चार संप्रदायांत विभक्त आहे यांपैकी पहिले दोन हीनयानी व दुसरे दोन महायानी आहेत

वैभाषिक न्यायात पदार्थाचे विषय व विषयी असे दोन भेद मानलेले असून, ते दोन्ही पृथक आहेत विषयी भेदात रूप, वेदना, संज्ञा, संस्कार व विज्ञान हे पाच स्कंध चक्षुरादी सहा इंद्रिये व त्यांचे विषय मिळून बारा आयतने आणि इंद्रिय, विषय व विज्ञान हे तीन धातू यांचा समावेश होतो विषय भेदात रूपधर्म, चित्तधर्म, चैत्तधर्म व रूप चित्त विप्रयुक्त धर्म या चार हेतुप्रत्ययजन्य धर्मांचा समावेश होतो जगत हे क्षणिक, संस्कृत असंस्कृत धर्मांचे समष्टिरूप, सत्य, प्रत्यक्ष, बाह्य व क्षणभंगुर असून, अर्हत्पदाची प्राप्ती व निर्वाण हे मानवी जीवनाचे अंतिम साध्य आहे

सौत्रान्तिक न्यायात बुद्धाच्या सूत्ररूप वचनाच्या अर्थाला विशेष महत्त्व दिलेले आहे यातील पदार्थकल्पना वैभाषिक न्यायासारखीच आहे फरक इतकाच, की वैभाषिक न्यायात ज्ञान व ज्ञेय ही दोन्ही प्रत्यक्ष मानलेली आहेत, तर सौत्रान्तिक न्यायात ज्ञान हे प्रत्यक्ष आणि ज्ञेय हे अतींद्रिय अर्थात ज्ञानानुमेय मानलेले आहे

योगाचार न्यायात विज्ञानवाद हा सिद्धांतरूपाने स्वीकृत आहे विज्ञान ही एकच वस्तू, हा न्याय सत्य मानतो विज्ञानाचे प्रवृत्तिविज्ञान व आलयविज्ञान असे दोन भेद आहेत आलयविज्ञान म्हणजेच आत्मा होय हे उभयविध विज्ञान स्वप्रकाश, पण क्षणिक आहे जगताला स्वतंत्र सत्ता नाही ते विज्ञानाचा विवर्त आहे

माध्यमिक न्यायात शून्यवाद हा सिद्धांत आहे तदनुसार ज्ञान व ज्ञेय ही दोन्ही कल्पित असून, शून्य हेच पारमार्थिक सत्य आहे जगत हे या शून्याचाच विवर्त होय

बौद्ध न्यायात सर्व संप्रदायांना मान्य असलेली तत्त्वे अशी– प्रमाण – प्रत्यक्ष व अनुमान ही दोनच प्रमाणे बौद्ध मानतात प्रत्यक्षाचे निर्विकल्पक व सविकल्पक असे दोन भेद आहेत

व्याप्ती – बौद्धांच्या व्याप्तीचे क्षेत्र वैदिकांच्या व्याप्तीपेक्षा लहान आहे ज्या पदार्थांत कार्यकारणभाव किंवा तादात्म्य असते, त्या पदार्थांतच ते व्याप्य-व्यापकभाव मानतात

न्याय–उदाहरण व उपनय असे यांचे दोनच अवयव आहेत त्या दोहोंच्या आधारे विश्वाचा क्षणिकत्व, विज्ञानमात्रता, पुद्गलनैरात्म्य, धर्मनैरात्म्य, इत्यादींना हेतू करून बौद्ध नैयायिक स्वपक्षाची सिद्धी करतात

सत्ता – अर्थक्रियाकारित्व हे सत्तेचे लक्षण होय स्थिर पदार्थात सत्ता राहू शकत नाही

हेतु – हेतू हा सद्हेतू होण्यासाठी तो पक्षसत्त्व, सपक्षसत्त्व व विपक्षासत्त्व यांनी युक्त असावा लागतो

हेत्वाभास – विरुद्ध, असिद्ध व व्यभिचारी हे तीन हेत्वाभास होत

कथा – वाद, जल्प व वितंडा हे तीन कथाभेद आहेत पैकी जल्प व वितंडा हे त्याज्य असून, वाद हाच ग्राह्य होय

बौद्धन्यायशास्त्राचा विकास संस्कृत, पाली व मागधी या तीन भाषांतून झालेला आहे आर्यदेव, नागार्जुन, मैत्रेयनाथ, असंग, वसुबंधू, दिङ्‌नाग, धर्मकीर्ती, चंद्रकीर्ती, शांतरक्षित, इ. प्रकांड पंडितांनी विविध ग्रंथ लिहून बौद्ध न्याय व्यापक आणि गंभीर बनवला आहे

**जैन न्याय**– जैन न्यायाचे श्वेतांबर व दिगंबर असे दोन भेद आहेत अनेकान्तवाद हा दोहोंचाही प्रमुख सिद्धान्त आहे जैनांचे न्यायसिद्धान्त असे– जगातील प्रत्येक वस्तू ही परस्पर विरुद्ध अशा अनेक धर्मांच्या भिन्न भिन्न आशयांची बनलेली आहे वस्तूच्या बाबतीत भिन्न भिन्न दर्शनांच्या ज्या विविध कल्पना आहेत, त्या सर्व दृष्टिभेदाने सत्य आहेत त्यांतील काही यथार्थ व काही अयथार्थ मानणे योग्य नव्हे

जैन न्यायातील काही तत्त्वे अशी –

सप्तभंगीनय – एखाद्या वस्तूच्या परस्परविरुद्ध अशा दोन भावात्मक अंशांचा समन्वय करण्यासाठी सात वाक्यांचा प्रयोग करावा लागतो, त्यांचा समूह हा सप्तभंगीनय होय

प्रमाण – प्रत्यक्ष व परोक्ष अशी दोनच प्रमाणे आहेत वस्तूचे स्पष्ट रूपाने ग्रहण करणारे, ते प्रत्यक्ष व अस्पष्ट रूपाने ग्रहण करणारे, ते परोक्ष होय प्रत्यक्षाचे सांव्यावहारिक व पारमार्थिक असे दोन भेद होतात पहिल्याला मन, इंद्रिये, इ. बाह्य उपकरणांची आवश्यकता असते, तर दुसरे वरील उपकरणांच्या साहाय्यावाचून केवळ आत्मशक्तीने होते परोक्षाचे अनुमान व शब्द असे दोन भेद होतात

कथा, छल, जाती, निग्रहस्थान, न्यायवाक्य, सद्हेतू व हेत्वाभास या गोष्टीही जैन न्यायात स्वीकृत आहेत

सिद्धसेन दिवाकर, समन्तभद्र, हरिभद्रसूरी, अकलंकदेव,

माणिक्यनंदी, अभयदेवसूरी, देवसूरी, हेमचंद्र, यशोविजय गणी, इ. जैनाचार्य महान नैयायिक होत.

बौद्ध व जैन यांनी वेदप्रामाण्याचे खंडन मोठ्या हिरीरीने सुरू केल्याने त्यांनाही त्यासाठीच ते दोन्ही न्याय प्रवृत्त झालेले आहेत. त्यांतील बहुतेक प्रतिपादनेही वैदिक न्यायाच्या विरुद्धच आहेत. पण एक गोष्ट खरी, की या अवैदिकांच्या न्यायशास्त्राने वैदिक न्यायशास्त्राच्या विकासाला फार मोठी मदत केली. त्यांचे खंडन व आत्ममंडन या दोन्ही प्रयत्नांतून वैदिक न्यायशास्त्र विस्तारले व सूक्ष्मही झाले.

इ. स. ४०० ते १२०० हा कालखंड अवैदिक न्यायाचा उत्कर्षकाल ठरला आहे. या कालातील न्यायाला सांप्रदायिक न्याय, तत्पूर्वकालीन न्यायाला प्राचीन न्याय व इ. स. १२०० ते १८०० या कालातील न्यायाला नव्य न्याय म्हणतात.

वरील सर्व आस्तिक नास्तिक दर्शनांचे आलोडन करून तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांनी त्यांचे धावते समालोचन पुढीलप्रमाणे केले आहे.

सांख्य व योग यांच्यापेक्षा भिन्न, पण आपसात निकट संबंध असलेल्या विचारपद्धती म्हणजे न्याय-वैशेषिक दर्शने होत. या विचारपद्धतींनी धार्मिक श्रद्धेपासून फारकत घेतलेली असल्यामुळे त्यांना तर्कविद्या असे म्हणतात. मूलभूत तत्त्वे एकापेक्षा अधिक आहेत, असा घोषणा करून सांख्यांनी वेदोपनिषदांतल्या अद्वैत प्रधान विचारपद्धतीच्या कोंडीतून स्वतःची सुटका करून घेतली. त्यामुळे विश्वातील वैचित्र्य आणि भेद यांचा अर्थ मूलभूत भिन्न तत्त्वांच्या आधारावर मांडून दाखविण्याचा विचार तत्त्वचिंतनाच्या मध्ये प्रथमच आला. वेदांनी दिलेल्या विचारमर्यादेचे स्वतंत्र बुद्धीने पर्यालोचन करण्याचे कार्य कणाद मुनींनी सुरू केले. आकाश हे नित्य व विभू असल्यामुळे ते उत्पन्नच होत नाही, पण पृथ्वी, आप, तेज व वायू ही चार भूते कार्यरूप व विनाशी असल्यामुळे त्यांच्या मुळाशी त्यांच्याच गुणधर्मांचे सूक्ष्म अदृश्य कारण असले पाहिजेत, असे मानून कणादाने त्यांना परमाणू अशी संज्ञा दिली. परमाणू हे अभेद्य व शाश्वत आहेत. त्यांच्या संयोगाने दृश्य विश्व निर्माण होते व वियोगाने ते नष्ट होते. या विरूप परमाणूंच्या मध्ये जो भेदक धर्म आहे तो 'विशेष' होय. जगातील भेदाच्या मुळाशी असलेल्या तत्त्वांचे स्वरूप विशेषयुक्त असल्यामुळे विश्वात भेद व वैचित्र्य आले आहे, असा नेमका वैदिक कल्पनेच्या विरुद्ध असणारा विचार कणाद मुनींने मांडला म्हणून त्यांच्या दर्शनाला 'वैशेषिक' असे नाव मिळाले. पदार्थकल्पनेचा जन्म वैशेषिकदर्शनात झाला. या दर्शनाने द्रव्य, गुण, कर्म, सामान्य, विशेष, समवाय व अभाव अशा सात पदार्थांच्या मध्ये सर्व अस्तित्व व नास्तित्व सामावून टाकले.

वैशेषिकदर्शनाशी संबंध असलेले व त्या दर्शनाच्या विचारमंथनाने निर्माण झालेले दर्शन म्हणजे न्यायदर्शन होय. न्यायदर्शनाला वैशेषिकांचा परमाणुवाद मान्य आहे. न्यायदर्शनाची रचना अक्षपाद गौतमाने केली. वादपद्धती, ज्ञानाची साधने (प्रमाणे) आणि तर्काचे नियम हे न्यायदर्शनाचे विषय होत. यथार्थ ज्ञान व अयथार्थ ज्ञान यांचे स्वरूप व कार्यकारणभाव यांची या दर्शनात चर्चा आहे.

न्याय वैशेषिक ही दोन दर्शने शुद्ध बौद्धिक कल्पनांची उभारणी करणारी आहेत. ती भारतीयांच्या बुद्धिप्रधान चिन्तनातील एका उच्च परिणतीचे दर्शन घडवितात. न्याय वैशेषिक दर्शनांनी निर्माण केलेल्या प्रवृत्तीचे अनुकरण करून बौद्ध व जैन आचार्यांनी तर्कशास्त्राच्या अभ्यासात भर घातली. दिङ्नाग या बौद्ध आचार्याने मध्ययुगीन तर्कशास्त्राचा पाया घातला. बौद्धांचे पुष्कळसे तर्कग्रंथ सांप्रत नष्ट झाले आहेत, पण त्यांची तिबेटी भाषांतरे तिकडील बौद्ध मठांत सुरक्षित आहेत. नालंदा विद्यापीठाचा थोर तत्त्वज्ञ धर्मकीर्ती याने सातव्या शतकात प्रमाणवार्तिक व न्यायबिंदू हे तर्कग्रंथ रचले. युरोपमध्ये बर्कले याने जो विज्ञानस्वप्नवाद (विश्वाचे माणसाला इंद्रियांनी व मनाने जे ज्ञान होते, ते केवळ स्वप्न होय, असे मानणारा विचार) प्रतिपादिला, त्याची मांडणी बर्कलेच्या पूर्वी चौदाशे वर्षे धर्मकीर्तीने प्रमाणवार्तिकात केली आहे. त्याचे न्यायबिंदू व प्रमाणवार्तिक हे ग्रंथ अलीकडे मूळ संस्कृतात महापंडित राहुल सांकृत्यायन यांना सापडले असून, त्यांनी ते प्रसिद्धही केले आहेत. सिद्धसेन दिवाकर व हेमचंद्र या जैन पंडितांनी जैनांच्या तर्कशास्त्रावर सूत्रात्मक ग्रंथ लिहिले आहेत. जैनांचे न्यायशास्त्रावरील संस्कृत ग्रंथ विपुल प्रमाणात सांप्रत उपलब्ध झाले आहेत. [भा. द., वै. सं. वि., हिं. वि. को.]

## न्यायव्यास वाईदेशकर

(इ. स. चे १४ वे शतक) एक महानुभावपंथी मराठी ग्रंथकार. चक्रधर→ नागदेव→ जानोपाध्ये→ कमळाइसा→ पोमाइसा→ न्यायव्यास अशी यांची परंपरा आहे. याने इ. स. १३५३ मध्ये लीळाचरित्र या ग्रंथावर हेतुस्थळ नामक एक गद्य ग्रंथ लिहिला. चक्रधराने निरनिराळी सूत्रे कोणत्या प्रसंगी व कोणत्या हेतूने सांगितली, त्यांचे विवरण या ग्रंथात आहे. मराठीप्रमाणेच याने संस्कृतातही ग्रंथरचना केली आहे. स्मृतिवृद्धाचार, लीळाप्रयुक्ती, सिद्धान्तस्थळ हे याचे अन्य प्रमुख ग्रंथ होत. याने वज्रलिपी व सुंदरीलिपी या दोन सांकेतिक लिप्या तयार केल्या. यांपैकी सुंदरीलिपीत अनेक महानुभावीय ग्रंथ लिहिले गेले. [म. म. या., म. वा. इ. २, म. च. को.]

**न्यायसूत्रे** अक्षपाद गौतम याने लिहिलेला न्यायशास्त्रावरील मूळ सूत्रग्रंथ यात पाच अध्याय असून, प्रत्येक अध्यायाचे दोन भाग केलेले आहेत त्या प्रत्येक भागाला आह्निक असे नाव आहे याच्या प्रथम अध्यायात ११ प्रकरणे व ६१ सूत्रे, दुसऱ्या अध्यायात १ प्रकरणे व १३७ सूत्रे, तिसऱ्या अध्यायात १६ प्रकरणे व १४५ सूत्रे, चौथ्या अध्यायात २० प्रकरणे व ११८ सूत्रे आणि पाचव्या अध्यायात २४ प्रकरणे व ६७ सूत्रे आहेत, असे वृद्ध वाचस्पतिमिश्राने आपल्या न्यायसूचीनिबंधात लिहिले आहे न्यायसूत्रातील काही सूत्रे अशी –

**प्रमाण प्रमेय संशय प्रयोजन दृष्टान्त सिद्धान्त**
**अवयव तर्क निर्णय वाद जल्प वितण्डा हेत्वाभास –**
**च्छल जाति निग्रहस्थानानां तत्त्वज्ञानान्निःश्रेयसाधिगमः ।**

(न्यायसूत्र १ १ १)

अर्थ– प्रमाण, प्रमेय, संशय, प्रयोजन, दृष्टान्त, सिद्धान्त, अवयव, तर्क, निर्णय, वाद, जल्प, वितंडा, हेत्वाभास, छल, जाती व निग्रहस्थाने या पदार्थांच्या तत्त्वज्ञानाने निःश्रेयसाची म्हणजे मोक्षाची प्राप्ती होते

**प्रत्यक्षानुमानोपमानशब्दाः प्रमाणानि ।**

(न्या सू १ १ ३)

अर्थ–प्रत्यक्ष, अनुमान, उपमान शब्द अशी चार प्रमाणे आहेत

**इन्द्रियार्थसन्निकर्षोत्पन्नं ज्ञानमव्यपदेश्यमव्यभिचारि व्यवसायात्मकं प्रत्यक्षम् ।**

(न्या सू १ १ ४)

अर्थ– इंद्रिय आणि विषय यांच्या संबंधामुळे उत्पन्न झालेले संशयरहित व अव्यभिचारी असे जे ज्ञान त्याला प्रत्यक्ष असे म्हणतात

**अथ तत्पूर्वकं त्रिविधमनुमानं पूर्ववच्छेषवत्सामान्यतोदृष्टं च ।**

(न्या सू १ १ ५)

अर्थ– अनुमान हे प्रत्यक्षपूर्वक असून, त्याचे पूर्ववत, शेषवत व सामान्यतो दृष्ट असे तीन प्रकार आहेत

**प्रसिद्धसाधर्म्यात् साध्यसाधनमुपमानम् ।**

(न्या सू १ १ ६)

अर्थ– साधर्म्य प्रसिद्ध असल्यामुळे, साध्याचे जे साधन, त्याला उपमान प्रमाण असे नाव आहे

**आप्तोपदेश शब्द ।**

(न्या सू १ १ ७)

अर्थ– आप्ताचा उपदेश हेच शब्द प्रमाण होय

**आत्मशरीरेन्द्रियार्थबुद्धिमनःप्रवृत्तिदोषप्रेत्यभावफलदुःखापवर्गास्तु प्रमेयम् ।**

(न्या सू १ १ ९)

अर्थ– आत्मा, शरीर, इंद्रिय, अर्थ, बुद्धी, मन, प्रवृत्ती, दोष प्रेत्यभाव, फल, दुःख व अपवर्ग ही प्रमेये आहेत

पहिल्या अध्यायात सोळा पदार्थांची नावे व लक्षणे सांगितली असून, उर्वरित ग्रंथात त्या लक्षणांची परीक्षा केली आहे

दुसऱ्या अध्यायातील पहिल्या आह्निकात संशय, प्रमाणसामान्य, प्रत्यक्ष, अवयव, अनुमान, वर्तमान, उपमान आणि शब्दविशेष अशी आठ प्रकरणे आणि दुसऱ्या आह्निकात प्रमाणचतुष्ट्य, शब्दनित्यत्व, शब्दपरिणाम आणि शब्दपरीक्षा अशी चार प्रकरणे आहेत

तिसऱ्या अध्यायाच्या पहिल्या आह्निकात आत्मा, शरीर, इंद्रिये आणि इंद्रियांचे विषय यांचे विस्तृत विवेचन आले आहे तसेच यात इंद्रियभेद, दक्षिण-वामचक्षुरद्वैत, मनोभेद, अनादिनिधन, शरीरपरीक्षा, इंद्रियपरीक्षा, इंद्रियनानात्व आणि अर्थपरीक्षा यांचेही विवेचन आहे दुसऱ्या आह्निकात बुद्धी, मन आणि अदृष्ट या विषयांचे वर्णन आहे

चौथ्या अध्यायाच्या पहिल्या आह्निकात प्रवृत्ती आणि दोष यांची लक्षणे, दोषांची परीक्षा, प्रेत्यभावाची परीक्षा, शून्यतेचे उपादान आणि निराकरण, ईश्वराचे उपादानकारणत्व, आकस्मिकत्व, सर्वानित्यत्वाचे निरसन, सर्वनित्यत्वाचे निराकरण, सर्वस्वलक्षणपृथक्त्वाचे निराकरण, सर्वशून्यत्वाचे निराकरण, संख्या एकान्तवादाचे निराकरण फलपरीक्षा, दुःखपरीक्षा व अपवर्गपरीक्षा ही चौदा प्रकरणे आणि दुसऱ्या आह्निकात तत्त्वज्ञानोत्पत्ती, अवयवी निरवयव, बाह्यार्थभंगनिराकरण, तत्त्वज्ञानाभिवृद्धी व तत्त्वज्ञानपरिपालन अशी सात प्रकरणे आहेत

पाचव्या अध्यायातील पहिल्या आह्निकात जातिषट्क, प्राप्तिसम, इ सतरा प्रकरणे आहेत दुसऱ्या आह्निकात न्यायाश्रित पाच निग्रह, अभिमतार्थ प्रतिपादन न करणार चार निग्रह, स्वसिद्धान्ताला अनुरूप अशा प्रयोगाभासाचे तीन निग्रह आणि निग्रहस्थानविशेष, या विषयाचे प्रतिपादन केलेले आहे

न्यायदर्शनावर शेकडो ग्रंथ लिहिले गेले असले, तरी न्यायसूत्राचे महत्त्व कमी झालेले नाही न्यायसूत्राची भाषाशैली प्रौढ आहे प्रमाणे आणि तर्क या विषयात गौतमाला विशेष रुची आहे पूर्वपक्षाची मांडणी तो निःपक्षपातीपणाने करतो प्रतिपक्षाने कठीण शंका उद्भूत केल्या, तरी तो गडबडून जात नाही आपल्या सिद्धान्तावर त्याचा दृढ विश्वास आहे मोक्षाची प्राप्ती हे इतर दर्शनांप्रमाणे न्यायशास्त्राचेही चरम लक्ष्य त्याने मानले आहे पण बौद्धांच्या मताचे खंडन करणे हाही त्याचा एक उद्देश होता त्यामुळे या दर्शनात वाद, जल्प, वितंडा, हेत्वाभास, छल, जाती आणि निग्रहस्थान यांचा त्याने समावेश केलेला आहे [भा द स , हि वि को ]

त्याची स्थापना केल्याने देवतान्यास होतो. जगात कार्य कारण रूपात परिणत होऊन राहणाऱ्या किंवा त्याच्या पलिकडे असणाऱ्या तत्त्वांचा यथास्थान न्यास केल्याने तत्त्वन्यास होतो. हाताची पाच बोटे, करतल व करपृष्ठ या ठिकाणी जो न्यास करतात त्याला करन्यास म्हणतात. अंगन्यास हा पंचांग किंवा षडंग असतो. त्रिनेत्र देवतांच्या पूजोपासनेच्या वेळी षडंगाचा व अन्य देवतांच्या उपासनेत पंचांगाचा न्यास करतात. शरीराच्या कोणत्याही भागाला स्पर्श न करता सर्वांगाच्या ठिकाणी जो मंत्रन्यास करतात त्याला व्यापक न्यास म्हणतात. ऋषी, देवता, छंद, इ. न्यासाला ऋष्यादि न्यास म्हणतात.

अंतर्न्यास केवळ मनाने करतात व बहिर्न्यास केवळ त्या त्या स्थानाला बोटाने स्पर्श करून करतात. हा स्पर्श फुलानेही करण्याची पद्धत आहे. बोटांचा उपयोग करण्याचे दोन प्रकार आहेत. अंगठा व अनामिका एकत्र जुळवून त्यांनी सर्व अंगांना स्पर्श करणे, हा एक प्रकार आणि भिन्न भिन्न अंगांना भिन्न भिन्न बोटे जुळवून त्यांनी स्पर्श करणे, हा दुसरा प्रकार होय.

या न्यासक्रियेतल्या महत्त्वाच्या न्यासांची प्रक्रिया अशी –

**ऋष्यादिन्यास**– प्रत्येक मंत्राचे ऋषी, देवता, छंद, बीज व कीलक हे वेगवेगळे असतात. मंत्रसिद्धीसाठी त्यांचे ज्ञान व साहाय्य आवश्यक असते. शिवाला प्रसन्न करून ज्याने मंत्र प्रथम प्राप्त करून घेतला, तो साधक त्या मंत्राचा ऋषी होय. त्याचा न्यास मस्तकाच्या ठिकाणी करतात. स्वरव्यंजनांच्या विशिष्ट संख्येच्या ज्या रचनेमुळे एखाद्या वाक्याला मंत्रता येते, त्याला छंद म्हणतात. त्याचा न्यास मुखाच्या ठिकाणी करतात. मंत्रदेवतेचा न्यास हृदयाच्या ठिकाणी करतात. बीजाचा गुह्यभागी, शक्तीचा पायाच्या ठिकाणी व कीलकाचा सर्वांगी न्यास करतात.

**मातृकान्यास**– मातृ शब्दाला अल्पार्थक 'क' प्रत्यय लागून मातृका शब्द बनला आहे. स्वर व वर्ण यांना मातृका असे म्हणतात. मातृकान्यासाचा ऋषी ब्रह्मा, देवता मातृका, छंद गायत्री, बीज व्यंजन आणि शक्ती स्वर असतात. मातृकांतल्या स्वर वर्णांना अनुस्वार देऊन म्हणजे अ, क, ख, ग, घ, ङ यांच्या जागी अं, कं, खं, गं, घं, ङं असा सानुस्वार वर्ण उच्चारून प्रथम अंगुष्ठादी षडंग न्यास करतात. या न्यासात अकारादी सोळा स्वर, ककारादी बारा वर्ण, डकारादी दहा वर्ण, बकारादी सहा वर्ण, वकारादी चार वर्ण व ह, क्ष हे दोन वर्ण हे सबिंदू वर्ण अनुक्रमे कंठमूल, हृदय, नाभी, लिंगमूल, मूलाधार व भ्रूमध्य या ठिकाणी न्यस्त करतात.

या न्यासानंतर बहिर्मातृकान्यास करतात. हा करताना मातृकासरस्वतीचे पुढील श्लोकाने ध्यान करतात –

**पञ्चाशल्लिपिभिर्विभक्तमुखदोःपन्मध्यवक्षःस्थलाम् ।**
**भास्वन्मौलिनिबद्धचन्द्रशकलामापीनतुङ्गस्तनीम् ॥**
**मुद्रामक्षगुणं सुधाढ्यकलशं विद्यां च हस्ताम्बुजै – ।**
**र्बिभ्राणां विशदप्रभां त्रिनयनां वाग्देवतामाश्रये ॥**

अर्थ – पन्नास स्वरवर्णांच्या योगाने जिचे मुख, बाहू, चरण, कटी व वक्षःस्थल (हे अवयव) पृथक पृथक निर्मित आहेत, जिच्या सूर्यासमान तेजस्वी मुकुटावर चंद्रकला शोभत आहे, जिचे वक्षःस्थल उत्तुंग व पुष्ट आहे, जिच्या (चार) हातांमध्ये मुद्रा, रुद्राक्षमाला, सुधापूर्ण कलश व पुस्तक विराजत आहे व जिची प्रभा सर्वत्र फाकत आहे, त्या त्रिनेत्र वाग्देवतेला मी शरण जात आहे.

हे ध्यान केल्यानंतर ललाट, मुख, नेत्र, कर्ण, नासिका, कपोल, ओष्ठ, दंत, ब्रह्मरंध्र, इ. अवयवांच्या ठिकाणी सानुस्वार स्वरवर्णांचा न्यास करतात.

बहिर्मातृका न्यासानंतर संहारमातृका न्यास करावयाचा असतो. यात बहिर्मातृका न्यासाच्या उलट क्रमाने स्वर–वर्ण घ्यायचे असतात.

हे सर्व मातृका न्यास केले नाहीत, तर मंत्रसिद्धी होत नाही, असे मंत्रशास्त्रात सांगितले आहे.

**पीठन्यास** – देवतेची स्थापना करण्यास योग्य अशा स्थानाला पीठ म्हणतात. ओंकारपूर्वक मंत्र म्हणून हा न्यास पुढीलप्रमाणे करतात – आधारशक्तये नमः, कूर्माय नमः, अनंताय नमः, पृथिव्यै नमः, क्षीरसमुद्राय नमः, रत्नद्वीपाय नमः, मणिमंडपाय नमः, कल्पवृक्षाय नमः, मणिवेदिकायै नमः, रत्नसिंहासनाय नमः हृदये । धर्माय नमः दक्षिणस्कंधे । ज्ञानाय नमः वामस्कंधे । वैराग्याय नमः वामोरौ । ऐश्वर्याय नमः दक्षिणोरौ । अधर्माय नमः मुखे । अज्ञानाय नमः वामपार्श्वे । अवैराग्याय नमः नाभौ । अनैश्वर्याय नमः दक्षिणपार्श्वे ।

**केशवकीर्त्यादि न्यास** – वैष्णव संप्रदायात हा न्यास करतात. त्यात भगवंताच्या केशव, नारायण, माधव, इ. चोवीस मूर्तींना त्यांच्या त्यांच्या शक्तींसह शरीराच्या निरनिराळ्या अवयवांच्या ठिकाणी न्यस्त करतात.

**षडंग न्यास** – वर अनेक न्यास दिले असले, तरी पूजा नित्यक्रमात सामान्यपणे षडंग न्यास तेवढाच करण्याची पद्धती आहे. षडंग न्यासाचा एक प्रकार पुढीलप्रमाणे –

पुरुषसूक्तातला 'यत्पुरुषं व्यदधुः' हा मंत्र म्हणून 'हृदयाय नमः' असे म्हणायचे व हृदयाला स्पर्श करायचा. 'ब्राह्मणोऽस्य' या मंत्राने 'शिरसे स्वाहा' म्हणून मस्तकाला स्पर्श करायचा. 'चंद्रमा मनसो' या मंत्राने 'शिखायै वषट्' म्हणून शिखेला स्पर्श करायचा. 'नाभ्या आसीत्' या मंत्राने 'कवचाय हुं'

म्हणून बाहूंना स्पर्श करायचा. 'सप्तारयाला' या मंत्राने नेत्रत्रयाय वौषट' म्हणून डोळ्यांना स्पर्श करायचा व 'यज्ञेन यज्ञम' या मंत्राने 'अस्त्राय फट' म्हणून टाळी वाजवायची.

**वस्तु न्यास**– जेव्हा एखादी मूर्ती स्थापित करायची असेल, तेव्हा तिच्या अष्ट दिशांना काही वस्तूंचा न्यास करतात. म्हणजे त्या त्या दिशांना भूमीत पुरतात. यासाठी योग्य वस्तू पुढील प्रमाणे –

(१) रत्नन्यास – हिरा, मोती, वैडूर्य, शंख, स्फटिक, पुष्कराज, इंद्रनील आणि नील.

(२) चित्रद्रव्ये – तालक, शिलाजित, काजळ, श्याम, कुंजी, कांती, मा.. व ...

(३) धान्य – गहू, सातू, तीळ, मूग, नीवार, साव, मोहरी व ...

(४) सुगंधद्रव्ये – चंदन, रक्तचंदन, अगरू, अंजन, उशीर, ..., ... व ...

(५) धातु – सोने, पोवळे, तांबे, मिश्रधातू, आरकूटक, रुपे, ... [पु. इ., ... , पूनातत्त्व, कल्याण साधनांक]

## न्हाणवली

प्रथमतःच रजोदर्शन झालेल्या विवाहित मुलीला न्हाणवली म्हणतात. न्हाण आले म्हणजे मुका मुलगा झाला, असे समजून त्याच्याकडे साखर पाठवतात. हे रजोदर्शन ... परगृही किंवा परग्रामी होणे अशुभ समजतात.

ब्राह्मणांमध्ये अशा मुलींना बसण्यासाठी मखर घालतात, तिला आप्तेष्टांकडे जेवायला बोलावतात किंवा वाढणे म्हणून सुग्रास अन्न तिच्या घरी नेतात. तिच्या पंगतीला इतर काही मुली बसवतात. बारा दिवस तिचा शृंगार करून तिला ओवाळतात. ओवाळताना महाराष्ट्रातील स्त्रिया पुढील गाणे म्हणतात –

**ऋतुवंत सखे मी झाले। शुभ घडी न्हाण मजसि आले ॥ध्रु.॥**
**मखरास फुलांची जाळी। मकरंद सुगंधित टाळी।**
**कटि कसुनी पातळ पिवळ। हार जाळी मळवट भरिले।**
**शृंगार परोपरि त्याले। पायघड्यावरुन मी चाले।**
**ताट भरुन मिठाई मेवा। मी सखे किनीतरी खावा।**

ज्या लोकांमध्ये मखर घालण्याची प्रथा नाही, त्यांच्यातही ऋतुमतीने जमिनीवर बसायचे नसते. म्हणून तिला पाटावर बसवतात. तिसऱ्या दिवशी सायंकाळी सुवासिनी तिची ओटी भरतात. ओटीच्या साहित्यात गूळ, तांदूळ, गव्हाचे पीठ, इ. पदार्थ असतात. चौथ्या दिवशी तिला स्नान घालतात. काही काही जातीत सहाव्या दिवशी स्नान घालण्याची पद्धत आहे. सामान्यपणे पाचव्या दिवशी किंवा सोळा दिवसांच्या आत दिनशुद्धी पाहून तिचे गर्भाधान करतात. तो संस्कार होईपर्यंत देवाधर्माच्या कार्यात तिने केलेला स्वयंपाक निषिद्ध मानतात. तोवर सुवासिनी म्हणूनही तिला भोजनास बोलावीत नाहीत.

सांप्रत मुलींच्या विवाहाची वयोमर्यादा वाढल्यामुळे लग्नाआधीच मुली ऋतुमती झालेल्या असतात. पण काही कुटुंबातून लग्नानंतर होणाऱ्या प्रथम रजोदर्शनाच्या वेळी वरील सर्व कौतुकविधी केले जातात. पाहा – गर्भाधान.

## न्हानालाल दलपतराम

(१८७७ – १९४६ इ. स.) एक गुजराती महाकवी. यांचा जन्म अहमदाबाद येथील स्वामी नारायणपंथी श्रीमाळी ब्राह्मण कुळात झाला. यांचे वडील दलपतराम हेही एक नामवंत कवी होते. न्हानालाल लहानपणी अत्यंत हूड व उनाड होते, म्हणून दलपतरामांनी त्यांना मोर्वी येथे श्री. काशाराम दवे यांच्याकडे शिक्षणार्थ पाठविले. प्राथमिक शिक्षण मोर्वी येथे झाल्यावर न्हानालालांनी गुजरात महाविद्यालयात पदार्पण केले. इ. स. १९०१ साली ते मुंबईच्या एल्फिन्स्टन महाविद्यालयातून एम. ए. झाले.

यानंतर सुमारे वीस वर्षे न्हानालालांनी सरकारी नोकरीत घालविली व मग इ. स. १९२१ साली नोकरीला रामराम ठोकून असहकारितेच्या चळवळीत भाग घेतला. परंतु अल्पावधीतच यांची ती ऊर्मी ओसरली आणि त्यांनी चळवळीतून आपले अंग काढून घेतले.

न्हानालालांचा मूळ स्वभाव कवीचा असल्याने त्यांना अन्य कोणत्याच व्यवसायात रस वाटेना. महाविद्यालयीन शिक्षण घेत असतानाच त्यांनी काही कविता केल्या होत्या. वसंतोत्सव हे त्यांचे काव्यही त्याच काळातले. स्वतंत्र कवितांप्रमाणेच त्यांनी भगवद्‌गीता, मेघदूत, इ. संस्कृत ग्रंथांची भाषांतरेही केली. काव्याशिवाय त्यांनी काही नाटके, कादंबऱ्या, कथा व निबंधही लिहिले आहेत. पण ते विख्यात झाले ते महाकवी म्हणूनच.

प्रारंभी गर्बा, रास, गज्जल यांसारखी स्फुट कविता लिहिल्यानंतर इ. स. १९२६ च्या सुमारास न्हानालाल महाकाव्याकडे वळले. त्या वर्षी त्यांनी कुरुक्षेत्र हे भारतीय युद्धाविषयीचे महाकाव्य लिहायला घेतले व जवळ जवळ १४ वर्षांनी ते पुरे केले. त्यानंतर प्रेमकुंज आणि हरिसंहिता नामक आणखी दोन महाकाव्ये त्यांनी लिहिली. त्यांपैकी हरिसंहितेचा विषय भागवत पुराण हा असून, त्यांच्या मृत्यूमुळे हे काव्य अपुरेच राहिले.

न्हानालालांनी काव्यलेखनाला आरंभ केल्यानंतर गुजराती साहित्यात जी क्रांती घडली, तिचे वर्णन श्री. शंकरलाल याज्ञिक पुढीलप्रमाणे करतात–

न्हानालालांच्या काव्यात इतके नावीन्य होते, इतकी रसि-

गता होती, देशभक्तीचा प्रवाह इतका प्रचंड होता, की गुजर लोक त्यावर मुग्ध होऊन गेले व श्रेष्ठ श्रेणीच्या साहित्यिकामध्ये त्यांना एकदम मानाचे स्थान मिळाले नरसिंहराव दिवटियांच्या कवितेतील नावीन्य लोक पार विसरून गेले नर्मदाशंकरांचे पहिले दलपतरामाचे नावही ऐकू येईनासे झाले व त्यांच्या परंपरेतील इतर कवी निस्तेज दिसू लागले



महाकवि न्हानालाल

न्हानालालाच्या सर्वच काव्यावर पूर्वकालीन गुजर, संस्कृत आणि आंग्ल कवींच्या काव्यसाहित्याचा प्रभाव आढळतो तथापि न्हानालालाची स्वतःची म्हणून काही वैशिष्ट्येही त्यांत आढळतात त्यांच्या पूर्वीचा जमाना प्राधान्याने भक्तिकाव्याचा अथवा शृंगारकाव्याचा होता न्हानालालानी तिथे सामाजिक, राजकीय आणि ऐतिहासिक विषयांचे बीजारोपण करून भक्ति शृंगाराबरोबरच वीर रसालाही श्रेष्ठ स्थान दिले विषयाच्या नावीन्याप्रमाणेच त्यांनी भाषा व रचना यांही बाबतीत नावीन्य आणले संस्कृत साहित्यातील चंपू काव्याच्या धर्तीवर अपद्यागद्य नामक एका नव्या शैलीचा त्यांनी प्रथमच वापर करून दाखविला अल्पावधीतच त्यांची ही शैली अत्यंत लोकप्रिय झाली

संस्कृत आणि फारसी या दोन्ही भाषांवर त्यांचे प्रभुत्व असल्याने त्यांतील वाङ्मय वाचून त्यांचा दृष्टिकोन विशाल झाला त्यांचे काव्य रसपूर्ण, सौंदर्यदर्शी व कल्पनारम्य असून त्यांत शब्दलालित्य व भाषासौष्ठव जागोजाग प्रतीत होते त्यांच्या कवितेचा एक नमुना असा –

**धन्य हो धन्य ज पुण्यप्रदेश । अमारो गुणियल गुजर देश ।।**
**आयनु सागरतीर्थ पुराण । तपोवन भृगुवसिष्ठना माण ।।**
**गीताना गानारा महाराज । पार्थना सारथीना ज्यां राज्य ।।**
**ग्रीस रोमथीय जुना । कुरु पांडवथीय प्राचीन ।।**
**सोमनाथ गिरीनगर द्वारिका । युग युग ध्यान विलीन ।।**
**उभीने काल सिंधुने तीर । बजावे बसरी भव्य सुधीर ।।**

भावार्थ – आमचा गुणशाली व पुण्यप्रद असा गुजर देश धन्य आहे ! प्राचीन काळापासून हा देश आर्यांचे सागरतीर्थ आहे भृगु वसिष्ठांचे हे तपोवन आहे गीतागायक आणि पार्थसारथी कृष्णाचे हे राज्य ग्रीस व रोम यांच्यापेक्षाही जुनी आणि कौरव पांडवांनाही प्राचीन असणारी अशी सोमनाथ, गिरनार, द्वारका, ही नगरे इथे कित्येक युगे योग्यांप्रमाणे ध्यानमग्न होऊन उभी आहेत जणू कालसागराच्या तीरावर उभी राहून ती सुरेल बासरीच वाजवीत आहेत !

न्हानालालांनी आपल्या सर्वच काव्यकृतीतून धर्म, ईश्वर, मानवता मांगल्य, आशावाद, सौंदर्याभिरुची इ विविध तत्त्वांचा उद्घोष केला आहे आणि त्यामुळेच अर्वाचीन गुजर साहित्यात ते एक द्रष्टे कवि ठरले [ वि मु रा प , अ च को , श्री अरविंद जोशी – आजकल, फेब्रु १९६२ ]

**पक** एक जात या लोकांची वस्ती विदर्भ, मध्य प्रदेश ओडिसा, बिहार, इ प्रदेशांत आहे हे लोक गावड वर्गात मोडतात कापड विणणे हा यांचा प्रमुख व्यवसाय आहे काही लोक शेती व मजुरीही करतात यांच्यात कबीरपंथी व शाक्त असे मुख्य दोन वर्ग आहेत या जातीत अनेक कुळे असून, त्या कुळांची नावे बव्हंशी त्यांच्या देवकांवरून पडली आहेत उदा० नेवरा = मुंगूस परेवा = रानटी कबूतर इ त्यांची देवके असून, तीच कुलनामे आहेत

**विवाहप्रथा** – यांच्यात समान देवक असलेल्या कुळांत विवाह करीत नाहीत पूर्वी मुलीचे लग्न बारा वर्षांच्या आतच करीत शाक्तपंथी लोक मुलीचे लग्न ठरवायला जाताना दूल्हा देवाप्रीत्यर्थ होम करतात विवाहमुहूर्त ठरण्यापूर्वी नियोजित वधूवर शिवपार्वतीची प्रार्थना करतात व प्रार्थनेच्या दिवसापासून त्यांना तळ्याकाठी व नदीकाठी जायला बंदी असते विवाहापूर्वी सात टोपल्यांमध्ये पाण्याने भरलेले सात घडे ठेवून ते वधूच्या

डोक्यावर हाल्वनात नंतर विवाहस्तंभाभोवती वधू वर सात प्रदक्षिणा घालतात असा हा मंगराहन नावाचा विधी झाला म्हणजे विवाहसमारंभ संपतो मग सर्व मंडळी वराच्या घरी जातात त्या मंडळींना चौथिया असे म्हणतात तिथून मग वधूवरांना नदीवर नेतात तिथे ते आपले बेगडी दागिने पाण्यात सोडतात

पत्नी दुर्वर्तनी असल्यास तिला घटस्फोट देतात, पण अशा वेळी नवरा 'मर्ली जितीना मान ' या नावाने एक नानिमागणी देतो विवाहापूर्वी मुलीचा सजातीय माणसाबरोबर लैंगिक संबंध आला, तर कोणताही विधी न करता तिला त्या माणसाला देऊन टाकतात

**वेषधर्म** – कबीरपंथी पक्क मद्यमांस सेवन करीत नाहीत, पण शाक्त नसे करतात कबीरपंथी लोक अस्पृश्याशिवाय इतरांना आपल्या जातीत घेतात ज्याला शुद्ध करून घ्यायचे असेल, त्याच्या अंगावर इतर पंथ आपले पाय धुतात नंतर तो आपली जुनी जात सोडली हे दर्शविण्यासाठी एक काठी मोडतो मग त्याला तुळशीची माळ घालायला देतात पुरुषाप्रमाणेच स्त्रीलाही पंथ जातीत प्रवेश मिळविता येतो

कबीरपंथी पक्क फक्त कबीरालाच भजतात त्याच्या स्मरणार्थ माघ, फाल्गुन व कार्तिक मासाच्या पौर्णिमेला ते उपवास करतात ते एकत्र जमून भजने गातात व नारळ फोडून प्रसाद वाटतात त्यांचा एक महंत असतो व त्याचा एक निवाण असतो त्याची गादी वंशपरंपरेने चालते दहा पंधरा गावांवर त्याचा अधिकार चालतो शाक्त पंथ हे इतर हिंदूप्रमाणे सगळे सणवार करतात

**मर्तिकप्रथा** – हे लोक मृताला पुरतात प्रेतसंस्कार पुरा झाल्यावर मृताचे नातेवाईक थडग्यावर नारळ फोडून तो सर्वांना वाटतात दहाव्या दिवशी पुन्हा थडग्यावर नारळ फोडून तो वाटतात पण त्या वेळी प्रत्येक माणूस त्यातला थोडा भाग जमिनीत पुरतो पहिले तीन दिवस थडग्यावर दिवा लावतात दहा दिवस मृताच्या घरी स्वयंपाक करीत नाहीत [ म ज्ञा को , ट्रा का से प्रॉ इ ]

**पंक्तिपावन** पंक्तीला पावन करणारा सहस्रभोजन घालणारा गृहस्थ, विद्वान लोक व योगाभ्यासी पुरुष यांना पंक्तिपावन म्हणतात श्राद्धभोजन हे प्रायश्चित्तात्मक मानलेले आहे अशा श्राद्धभोजी ब्राह्मणाच्या पंक्तीला स्वतःच्या उपस्थितीने जो पवित्र करतो, त्या पुण्यवान पुरुषाला पंक्तिपावन म्हटले आहे

वेदाध्ययन केलेले, सदाचारी, मातापित्याच्या आज्ञेत वागणारे, सर्वांचे कल्याण चिंतणारे, श्रोत्रिय संयमी ब्रह्मचारी, पुण्यतीर्थांच्या ठिकाणी स्नान केलेले अक्रोधी, क्षमाशील, दानशील, जितेंद्रिय, यती, शास्त्रकार, वैय्याकरणी, धर्मशास्त्री, पौराणिक, सत्यवादी, ऋतुकालाभिगामी, पंचाग्निसाधक, त्रिणाचिकेत, बार्हस्पत्यशास्त्रज्ञ असे जे ब्राह्मण ते सर्व पंक्तिपावन होत, असे त्याचे वर्णन पद्म पुराणात केले आहे

अनाश्रमी (कोणताही आश्रम न पाळणारा), अयती, मोक्षवादी, नास्तिक, मुंड जटिल, कापालिक कारुक (कारागीर), गायक, वेदविक्रेते व वर्णाश्रमधर्माचे पालन न करणारे यांना त्यावरोबरच पंक्तिदूषक मानलेले आहे [ श क , गो स्मृ लि ]

**पंक्ती** एक वैदिक छंद हा चाळीस अक्षरांचा व पाच पादांचा असतो प्रत्येक पाद आठ अक्षरांचा असतो उदा०–

**प्रति प्रियतमं रथं । वृषणं वसुवाहनम । स्तोता वामश्विनावृषि । स्तोमेन प्रति भूषति । माध्वी मम श्रुतं हवम ।।**

(ऋ ५ ७५ १)

पाच अक्षरांच्या पाच पादांचा एक छंद आहे त्याला पदपंक्ती असे म्हणतात ब्राह्मणग्रंथात पंक्तीला पंचपाद हे नाव दिलेले आढळते [ म ज्ञा को, प्रस्तावनाखंड–विज्ञानेतिहास ]

**पंगवाले** एक मागसलेली पहाडी जमात हिमाचल प्रदेशातील चंबा जिल्ह्यात वायव्येला या लोकांचे वास्तव्य आहे त्या भागाला पांगी प्रदेश असेच म्हणतात त्याची उंची समुद्रसपाटीपासून ८ ते १२ हजार फूट आहे त्यामुळे या प्रदेशात थंडीच्या दिवसात एवढा बर्फ पडतो, की त्या प्रदेशातले जाणे येणेच बंद होते चंबापासून पांगी प्रदेशात जाईपर्यंत हिमालयाची मोठमोठी आठ शिखरे ओलांडावी लागतात

पंगवाल्यामध्ये ब्राह्मण, राजपूत, ठाकर व राठी या चार सवर्ण जाती असून, हाली, लोहार मेघ व ढागी या चार असवर्ण जाती आहेत असवर्णांना अस्पृश्यांसारखे लेखीत नाहीत ते सवर्णांबरोबर धार्मिक व सामाजिक अशा सर्व व्यवहारांत भाग घेऊ शकतात

सवर्ण किंवा असवर्ण हे सगळेच पंगवाले सामान्यपणे आळशी व आत्मसंतुष्ट असतात त्यांना मद्याचे व्यसनही जबरदस्त असते ते फक्त शेतीची नांगरट तेवढी करतात व रानातली लाकडे तोडून देतात बाकीची सगळी कामे त्यांच्या बायकाच करतात त्यामुळे त्यांच्यात दारिद्र्य फार आहे त्यांच्या शेतातून निघणारे अन्न त्यांना जेमतेम सहा महिने पुरते उरलेले सहा महिने कंदमुळे खाऊन तर कधी गवतही खाऊन त्यांना काढावे लागतात पंगवाले स्त्रिया पुरुषांच्या मानाने अधिक

वळकट व चिवट असतात त्यांना आपल्या गंगाजमनेच्या नद्यांचा सुस्तपणा व दुबळपणा आवडत नसल्यामुळे त्या आपल्या प्रदेशाच्या बाहेरच्यांवर पसंत करतात त्यामुळे तिकडच्या तरुणांना मुलीचा कमतरता भासते त्याच कारणाने त्या प्रदेशात नैतिक शिथिलता आढळून येते

**वेषभूषा –** पुरुष पायजमा व अंगरखा वापरतात व डोक्यावर काळी टोपी घालतात बायका चुणीदार पायजमा व कुडत्यासारखी चोळी वापरतात कमरेला चांदरबजा पट्टा बांधतात, केसांचा आंबाडा माथ्यावर घालून तो रुमालाने बांधून ठेवतात, कानात बाळ्या व गळ्यात चांदीचे हार आणि बोटात चांदीच्या अंगठ्या घालतात या पोषाखात त्या खूपच आकर्षक दिसतात त्या नेहमी हसतमुख असतात व मधुर गीते गातात तिथल्या स्त्री पुरुषांना स्नानाचा तिटकारा आहे ते बहुधा कधीच स्नान करीत नाहीत

**विवाहप्रथा –** हे लोक तीन प्रकारांनी विवाह करतात वधूच्या बापाला ५० रु देऊन मुलगी मिळवणे हा एक प्रकार होय याला फक्कीर पगडना किंवा धमपुण्याची शादी म्हणतात साटेलोटे करणे हा दुसरा प्रकार होय याला बाटा म्हणतात मुलाने मुलीच्या घरी सात वर्ष नोकरी करून मग तिच्याशी लग्न करणे हा तिसरा प्रकार होय हाच प्रकार विशेष प्रचलित आहे पंगवाल पुरुषाचे लग्न होणे सामान्यपणे कठीण जाते म्हणूनच त्यांचे लोक आंतरजातीय विवाहही करतात लग्न प्रसंगी जमलेल्या लोकांना भरपूर दारू पाजतात जो अधिक दारू पाजील, तो अधिक मोठा असे समजतात

**देवधर्म –** पंगवाल लोक हिंदू धर्माचे अनुयायी आहेत तरी ते बौद्ध देवतांनाही पूजतात ते स्थानिक देवतांना व भुताखेतांना पूजतात शिवरात्री जन्माष्टमी, त्रिपुरी पौर्णिमा, इ उत्सव मोठ्या प्रमाणात करतात त्या वेळी नाचगाण्याचे कार्यक्रम करतात पांगी प्रदेशाच्या उत्तरेस कैलासपर्वत आहे त्याला हे लोक शंकराचे निवासस्थान समजतात व भक्तिभावाने त्याचे दर्शन घेतात

पुष्कळसे पंगवाले पशुहत्येला व मांसाशनाला पाप समजतात पण त्यावाचून त्यांना गत्यंतर नसते ते इतर कोणताही पदार्थ एकटे बसून खातील, पण मांस मात्र दुसऱ्याला दिल्यावाचून खाणार नाहीत तसे केल्याने पापाची मात्रा कमी होते, अशी त्यांची श्रद्धा आहे

पंगवाले लोक जी भाषा बोलतात, तिला पंगवली असे म्हणतात ती संस्कृत व पाली या भाषांचे मिश्र रूप आहे त्यांच्या भाषेत साहित्य नाही पंगवाले लोकही निरक्षरच आहेत पण ते जी गीते गातात व ज्या कथा सांगतात, त्यावरून त्यांचा भूतकाल गौरवास्पद असावा, असे वाटते [ गा आ , टा इ ]

## पंगी नृत्य

हिमाचल प्रदेशातील एक लोकनृत्य या नृत्याचा हेतू केवळ मनोरंजन हा असतो त्यामुळे इच्छेस येईल तेव्हा हे नृत्य करतात दसऱ्याच्या दिवशी रात्री ते अवश्य करतात त्या वेळचे नृत्य राम रावण युद्धावर आधारित असते त्यात रामायणातल्या तत्संबंधी व्यक्तींची आणि निरनिराळ्या देवतांची सोंगे घेऊन स्त्रीपुरुष नाचतात हे फेर धरून व हातात हात गुंफून नाचायचे नृत्य आहे [ डा फु ]

## पंगुनी उत्तिरम

एक व्रत तमिळनाडमध्ये फाल्गुन महिन्याच्या पौर्णिमेला हे व्रत करतात याला कल्याणक व्रत असेही म्हणतात त्या दिवशी चंद्र सामान्यपणे उत्तरा नक्षत्रात असल्याने तो दिवस शिवपूजनासाठी विशेष योग्य समजला जातो या व्रताची कथा अशी –

एकदा पार्वतीने आपल्या हातांनी शिवाचे नेत्र बंद केले त्यामुळे सर्व विश्व अंधारात बुडाले शंकर रागावला त्याने पार्वतीचे पत्नीत्व नाकारले आणि तिचे सामर्थ्यही नष्ट केले मग पार्वतीने त्या गोष्टी परत मिळविण्यासाठी कांजीवरम येथे फाल्गुनी पौर्णिमेला तप सुरू केले त्यामुळे शंकर प्रसन्न झाला आणि त्याने तिला तिचे पूर्वपद दिले

या व्रताला आणखीही महत्त्व आले आहे कारण याच दिवशी मदुरेच्या मीनाक्षीचे सुंदरेशाशी लग्न झाले, अशी कथा आहे त्यामुळे मदुरा व तिरुवारूर या ठिकाणी हा सण विशेष प्रकारे साजरा करतात कांजीवरम, वेदारण्यम तिरुनेवेली व पस्र येथील देवस्थानातही हा उत्सव करतात [सा र पे ]

## पंचकमरणशांती

धनिष्ठा ते रेवती या पाच नक्षत्रांना पंचक म्हटले असून, ते अशुभ मानलेले आहे या पंचकात एखाद्याचा मृत्यू झाल्यास अनिष्ट प्राप्त होते, असे सांगितले असून, त्याच्या परिहारासाठी शांती करावी, असे सांगितले आहे त्याचा विधी असा –

प्रेताचे दहन करण्यापूर्वी दर्भाच्या पाच प्रतिमा करून त्या, प्रेताचे डोके, डोळे, कान, नाभी व पाय यांवर ठेवाव्या त्यावर मंत्रपूर्वक तुपाच्या आहुती द्याव्या मग प्रेताचे दहन करावे बारा या दिवशी पुढीलप्रमाणे शांती करावी – प्रथम अग्नीची स्थापना करून रुद्र, इंद्र व यम यांची पूजा करावी प्रधान होमात आज्य व पायस यांच्या आहुती द्याव्या होम झाल्यावर यजमानाला अभिषेक करावा मग ब्राह्मणांना लोखंड, तांबे, रुपे, इत्यादींची दाने द्यावी [श्री विद्याधरशास्त्री भिडे]

**पंचकल्याणक प्रतिष्ठा** जैन लोकांचा एक महोत्सव. तीर्थंकरांच्या गर्भ, जन्म, तप, ज्ञानप्राप्ती व निर्वाण या पाच गोष्टींना पंचकल्याणक म्हटले आहे. या गोष्टी ज्या तिथींना झाल्या, त्या दिवशी हा महोत्सव करतात. या महोत्सवात वरील सर्व प्रसंगांची वैशिष्ट्यपूर्ण दृश्ये दाखविली जातात. तीर्थंकरांच्या जन्मापूर्वीचे दृश्य वैभवाने व राजविलासाने नटलेले असते, तर त्याने संसारत्याग केल्यानंतरचे त्याचे विरक्त व अपरिग्रही जीवन तितकेच गंभीर व प्रभावशाली असते. जैनांतले दिगंबर व श्वेतांबर हे दोन्ही पंथ हा महोत्सव करतात. प्रत्येक तीर्थंकराच्या पंचकल्याणकांच्या तिथी वेगवेगळ्या आहेत.

**पंचकल्याणक व्रत** जैन धर्मातील एक व्रत. याचे बृहत् व लघु असे दोन प्रकार आहेत.

बृहत्व्रत – हे पाच वर्षांत पूर्ण होते. यात पहिल्या वर्षी त्या त्या तिथींना २४ तीर्थंकरांच्या गर्भकल्याणकाचे २४ उपवास, दुसऱ्या वर्षी जन्माचे २४, तिसऱ्या वर्षी तपाचे २४, चौथ्या वर्षी ज्ञानाचे २४ व पाचव्या वर्षी निर्वाणाचे २४, अशा क्रमाने हे उपवास करायचे असतात. त्या दिवशी 'ओं ह्रीं वृषभादिवीरान्तेभ्यो नमः' या मंत्राचा त्रिकाल जप करावा आणि व्रत पूर्ण झाल्यावर उद्यापन करावे, असे सांगितले आहे.

लघुव्रत – हे एका वर्षातच पूर्ण होते. यात १२० उपवास व १२० पारणा असतात. प्रत्येक तीर्थंकराच्या पंचकल्याणक तिथींना उपवास व दुसऱ्या दिवशी पारणा होते. [ जै. व्र. वि. रा. ]

**पंचकुल** एक प्राचीन राजकीय संस्था. न्यायदानाला व राज्यकारभाराला साहाय्यक अशी ही संस्था होती. गावाचा सर्व कारभार हीच संस्था पाही. तिच्यावर राजाचा व त्याच्या मंत्रिमंडळाचा अधिकार चाले. दुसऱ्या चंद्रगुप्ताच्या कारकिर्दीत ही संस्था प्रचलित होती असे साची येथील एका शिलालेखावरून कळते. पंचायत ही संस्था याच संस्थेतून उत्पन्न झाली असावी. [ हि. च. सा. अ. ]

**पंचकूटबसदी** एक प्राचीन जैन मंदिर. हे मंदिर कर्नाटक प्रदेशातील तीर्थहळ्ळी गावाच्या बाहेर उत्तरेला आहे. द्राविड शिल्पकलेचा एक उत्तम नमुना म्हणून या मंदिराचा उल्लेख करतात. इ. स. च्या अकराव्या शतकातील जैन शिल्पाचे हे नमुनेदार प्रात्यक्षिक आहे.

या मंदिराच्या विशाल प्रांगणात एक भव्य स्तंभ आहे. या स्तंभावर अनेक सुंदर चित्रे काढलेली आहेत. अंगणातून पुढे गेल्यावर मुख्य मंदिर लागते. मंदिरात प्रथम स्तंभमंडप व नंतर गर्भमंडप आहे. स्तंभमंडपात अनेक जैन देवां व यक्षिणी यांच्या मूर्ती आहेत.

तीर्थहळ्ळी हे स्थान परशुरामक्षेत्र म्हणूनही प्रसिद्ध आहे. परशुरामाने आपल्या परशूच्या द्वारे उथळ्या नदीचा प्रवाह सुरू केला, अशी समजूत आहे. [ भा. सं. जै. या. ]

**पंचकृष्ण** एक महानुभावीय संज्ञा. महानुभाव लोक आपले आराध्य देव म्हणून पाच कृष्ण मानतात. त्यांची नावे अशी– (१) श्रीकृष्ण, (२) दत्तात्रेय प्रभू, (३) गुंडम राउळ, (४) चांगदेव राऊळ व (५) चक्रधर. त्यातील श्रीकृष्ण म्हणजे भारत भागवतात वर्णिलेला आहे तोच श्रीकृष्ण होय. महानुभाव त्याला विष्णूचा अवतार न मानता व्यापक परब्रह्माचा अवतार समजतात. दत्तात्रेय प्रभू हा महानुभाव पंथाचे आदिकारण होय. चांगदेव राऊळाला दत्तात्रेयापासून ज्ञानशक्ती मिळाली व त्याने द्वारकेला जाऊन बावन्न पुरुषांना अवर विद्या दिली. गुंडम राउळाने चांगदेव राऊळाकडूनच ज्ञानशक्तीचा स्वीकार केला. चक्रधर हा महानुभाव पंथाचा संस्थापक होय.

**पंचकोश** मानव हा अन्नमय, प्राणमय, मनोमय, विज्ञानमय व आनंदमय असा पंचकोशात्मक आहे, असे तैत्तिरीयोपनिषदात सांगितले आहे. जीवात्म्याला आवरण घालणारे हे कोश असून, जीवात्मा यात गुरफटला जातो व सुख–दुःखांचा उपभोग घेतो. या पाच कोशांचे वर्णन असे –

पितृभुक्तान्नजाद् वीर्याज्जातोऽन्नेनैव वर्धते।
देहः सोऽन्नमयो नात्मा प्राक् चोर्ध्वं तदभावतः ॥

अर्थ – मातापित्यांनी खाल्लेल्या अन्नाच्या योगाने जे वीर्य उत्पन्न होते, त्यापासून देह उत्पन्न होतो व तो अन्नावरच वाढतो. त्यामुळे देहाला अन्नमय कोश असे म्हणतात. हा कोश आत्म्याहून भिन्न आहे, कारण देहाच्या उत्पत्तीपूर्वी व मरणानंतर त्याचा अभाव असतो.

पूर्णो देहे बलं यच्छन्नक्षाणां यः प्रवर्तकः ।
वायुः प्राणमयो नासावात्मा चैतन्यवर्जनात् ॥

अर्थ – संपूर्ण देहाला (व्याप्त रूपाने) बल देणारा व चक्षुरादी इंद्रियांचा प्रेरक जो वायू, तोच प्राणमय कोश होय. चैतन्याच्या अभावी त्याला आत्मा म्हणता येत नाही.

अहंतां ममतां देहे गेहादौ च करोति यः ।
कामाद्यवस्थया भ्रान्तो नासावात्मा मनोमयः ॥

अर्थ – देहाला 'मी' असे व गृहादिकांना 'हे माझे' असे म्हणणारा व कामक्रोधादी अवस्थांनी भ्रांत होणारा तो मनोमय कोश होय. तो आत्मा नव्हे.

**लीना सुप्तौ वपुर्बोधे व्याप्नुयादानखाग्रगा ।**
**चिच्छायोपेतधीर्नात्मा विज्ञानमयशब्दभाक् ।।**

अर्थ– चैतन्याभासाने युक्त असलेली जी बुद्धी सुषुप्तावस्थेत लीन होऊन जागृतावस्थेत सर्व शरीराला नखशिखांत व्यापून राहते, तिला विज्ञानमय कोश असे म्हणतात. हा आत्मा नव्हे.

**काचिद समुखावृत्तिरानंदप्रतिबिम्बभाक् ।**
**पुण्यभोगे भोगशान्तौ निद्रारूपेण लीयते ।।**
**कादाचित्कत्वतो नात्मा स्यादानन्दमयोऽप्ययम् ।**

अर्थ– सुखाचा अनुभव घेत असताना स्वभावतः बहिर्मुख असणारी अंतःकरणवृत्ती अंतर्मुख होते व त्यामुळेच ती आत्म्याच्या स्वरूपभूत आनंदाच्या प्रतिबिंबाला प्राप्त होते. तीच वृत्ती पुण्यकर्माच्या फलाचा भोग शांत झाला असता निद्रारूपाने लीन होते. अशा त्या अंतर्मुख वृत्तीलाच आनंदमय कोश असे म्हणतात. हा कोशही आत्मा नाही. कारण त्याचा नित्य अनुभव न येता केव्हा केव्हाच येतो.

या पंचकोशांनी आवृत्त झालेला जीवात्मा देहपातानंतर कोणत्या अवस्थेला कशा प्रकारे जातो, त्याचे विवरण योगी अरविंदांनी केले आहे, ते असे–

जीवाने देहत्याग केल्यानंतर तो सूक्ष्म पृथ्वीलोकातून प्राणलोकात प्रवेश करतो व त्या ठिकाणी प्राणमय कोशाचे विसर्जन करून तिथून प्रज्ञालोकाप्रत जातो. पुन्हा तिथेही तो आपली प्रज्ञा म्हणजे मनोमय कोश टाकून देऊन अखेरीस आपल्या निजधामात– स्वतःच्या जीवलोकात पदार्पण करतो. तिथे तो पुढील जन्म कुठे घ्यायचा व कोणकोणते प्राण–प्रज्ञाकोश धारण करायचे ते ठरविण्यासाठी पुष्कळ काळ वास्तव्य करून राहतो. पुढे पृथ्वीवर धारण करण्यास अनुरूप असे त्याचे पार्थिव शरीर व प्राण–प्रज्ञाकोश वगैरे घटना एकत्रित होतात व त्या पूर्ण झाल्यावर जीव हा त्यामध्ये प्रवेश करून भूलोकी पुनर्जन्म घेतो. पाहा– कोश [पंचदशी, शां. र., अरविंददोहन, भाग पहिला]

## पंचगंगा

पाच नद्यांचा समूह. या पाच नद्यांची नावे भिन्न भिन्न ग्रंथांत वेगवेगळी दिली आहेत, ती अशी –

(१) भागीरथी, गोदावरी, कृष्णा, पिनाकिनी व कावेरी
(२) नंदिनी, नलिनी, सीता, मालिनी आणि विष्णुपदा
(३) शिवा, भद्रा, भोगावती, कुंभा आणि सरस्वती
(४) किरणा, धूतपापा, सरस्वती, गंगा व यमुना

गंगा यमुना सरस्वती यांच्या संगमाला त्रिवेणी म्हणतात. त्या संगमात केलेले स्नान मोक्षदायक मानले आहे. या त्रिवेणी-वरूनच पंचगंगा ही कल्पना सुचली असावी. त्रिवेणीपेक्षा पंचगंगांचा समूह हा अधिक पुण्यप्रद आहे, असे म्हणतात.

## पंचगंगातीर्थ

एक प्राचीन तीर्थस्थान. हे स्थान पंढरपूरच्या उत्तरेस तीन मैलांवर आहे. इथून तुंगा, कांती, सुगा, सती व भगारी अशा पाच नद्या वाहतात, म्हणून या तीर्थाला पंचगंगा असे म्हटले आहे. इथे सार्वणिमनूने एक सुवर्णाचे शिवलिंग स्थापन केले होते, असे सांगतात. या तीर्थात स्नान व शिवाची पूजा केल्याने सर्व इच्छा पूर्ण होतात, अशी निघल्या रहिवाश्यांची समजूत आहे. इथे महाशिवरात्रीला मोठी यात्रा भरते. त्या दिवशी तिथे स्नान करून शिवदर्शन घेतल्याने शिवलोक प्राप्त होतो अशी श्रद्धा आहे. [पंढरीमाहात्म्य]

## पंचगती

पाच उपासनाप्रकार. परमेश्वराकडे नेणारे उपासनेचे पाच मार्ग सांगितले आहेत. त्यात देवांना संतुष्ट करण्यासाठी केलेले यज्ञ, वैराग्य उत्पन्न करणारे तप, ब्राह्मण्य प्राप्त करून देणारा कर्मसंन्यास आणि लय प्राप्त करून देणारे ज्ञान या पाचांचा समावेश होतो. [पु. इ.]

## पंचगव्य

एक शोधक द्रव्यमिश्रण. गोमूत्र, गोमय, दूध, दही आणि तूप या पाच, गायीपासून उत्पन्न झालेल्या पदार्थांना पंचगव्य असे म्हणतात. या पंचगव्यासाठी अनुक्रमे तांबड्या, पांढऱ्या, कांचनवर्ण, काळ्या व नीलवर्णाच्या गायी पसंत कराव्या, असे गरुड पुराणात म्हटले आहे.

अभक्ष्यभक्षण, आशौच, इ. दोषांचे परिमार्जन करण्यासाठी किंवा कोणत्याही प्रायश्चित्तप्रसंगी पंचगव्य प्राशन करावे, असे धर्मशास्त्रात सांगितले आहे. पंचगव्याची पाच द्रव्ये एकत्र करून त्यात पाणी घालणे याला पंचगव्यमेलन असे म्हणतात. त्या वेळी गोमूत्रासाठी गायत्रीमंत्र, गोमयासाठी 'गंधद्वारां' हा मंत्र, दुधासाठी 'आप्यायस्व' हा मंत्र, दह्यासाठी 'दधिक्राव्णो' हा मंत्र व तुपासाठी 'तेजोऽसि' हा मंत्र म्हणतात. 'देवस्य त्वा' या मंत्राने त्या मिश्रणात कुशोदक मिसळतात व पंचगव्य ढवळतात. मग प्रणवाचा उच्चार करून ते दशदिशांना शिंपडतात. एवढे केल्यावर पंचगव्य सिद्ध होते. मग ते आचमनाप्रमाणे तीन वेळा प्राशन करतात. प्राशनाचा मंत्र असा –

**यत्त्वगस्थिगतं पापं देहे तिष्ठसि मामके ।**
**प्राशनं पंचगव्यस्य दहत्वग्निरिवेंधनम् ।**

अर्थ– जे पाप माझ्या देहाच्या त्वचेत आणि अस्थीत राहिले असेल, ते पंचगव्याच्या प्राशनाने अग्नीने सरपण जळावे तसे नष्ट होवो.

पंचगव्यप्राशनामुळे विश्वमेधाचे फल मिळते व ते सुमुहूर्तावर प्राशन केल्यास सर्व पापे नष्ट होतात, असे वराह पुराणात म्हटले आहे. [व्रतराज, हिं. ध. शा. क., पु. इ.]

**पंचगौड व पचद्रविड** ब्राह्मणाचे स्थूल मानाने पचगौड आणि पचद्रविड असे दोन भाग पडतात त्यासबधी एक श्लोक आहे, तो असा –

**महाराष्ट्रा ध्रद्राविडा कर्णाटाश्चैव गुर्जरा ।**
**द्राविडा पञ्चधा प्रोक्ता वि ध्यदक्षिणवासिन ।।**
**सारस्वता कान्यकुब्जा गौडोत्कलमैथिला ।**
**गौडा पञ्चविधा प्रोक्ता वि ध्यादुत्तरवासिन ।।**

अर्थ– महाराष्ट्र, आध्र, तमिळनाड, कर्नाट (कानडी) *आणि गुजर हे विंध्य पर्वताच्या दक्षिणेकडचे ब्राह्मण पचद्रविड* होत आणि सारस्वत (सरस्वतीतीरावरील), कान्यकुब्ज (कनोज), गौड (दक्षिण गगातीरावरचे), उत्कल (ओरिसा) आणि मैथिल, हे विंध्याच्या उत्तरेकडचे ब्राह्मण पचगौड होत

पचद्रविड ब्राह्मणातही अनेक भेद आहेत महाराष्ट्रातल्या द्रविड ब्राह्मणात चित्तपावन (कोकणस्थ), देशस्थ, कऱ्हाडे व देवरुखे याचा समावेश होतो [ हि वि को ]

**पचघटपूर्णिमा** एक काम्य व्रत स्त्रीने पाच वर्षेपर्यंत पौर्णिमेला हे व्रत करतात या दिवशी एक भुक्त राहून देवीची पूजा करायची असते शेवटच्या पौर्णिमेला दूध, दही, तूप, मध व साखर या वस्तू पाच घटात भरून त्याच दान करतात फल – कामनापूर्ती [ हि ध ]

**पंचजन** (१) पाच जनाचा समूह या शब्दाने कोणते लोक सूचित होतात, त्याबद्दल विद्वानात मतभेद आहेत काणी ते पाच स्वतत्र मानववश समजतात, तर काणी पाच भिन्न समाज मानतात

वदिक वाङ्मयात हा शब्द अनेक ठिकाणी येतो ऋग्वेद काली आर्यलोक अनेक जनात (समुदायात) विभागले होते व त्यातील पाच जन प्रमुख होते हे पाच जन म्हणजे यदु तुर्वश, द्रुह्यु, अनु व पुरू हे असावे याचा उल्लेख पञ्च कृष्टय, पञ्च क्षिती पञ्चक्षिती मानुषी, पञ्चमानुषा, पञ्च चर्षणी, पञ्चजाता पञ्चभूमा, पञ्चव्राता इ नावानी येतो हे पचजन इतके प्रसिद्ध होते, की त्याची गणना देवाबरोबर होत असे इंद्राशी त्याचे सख्य होते

या पचजनानीच सिंधुसस्कृतीच्या लोकावर विजय मिळवला असे म्हणतात हे मुळात झेलम आणि चिनाब या नद्याच्या पूर्वेला राहत होते काही आर्य आणखीही पूर्वेकडे पोचले होते सनपूर्व सातव्या शतकात हे कुरुपचालात प्रविष्ट झाले तिथून पुढल्या काही शतकात काशी कोसलापर्यंत पोचले आणि तिथून पुढच्या काळात मगध देशात गेले

गधर्व, अप्सरा, देव, असुर आणि राक्षस हे पचजन होत, असे सायणाचार्यानी म्हटले आहे (अथर्व ४२३ १ वरील भाष्य)

देव, मनुष्य, गधर्व, सर्प, आणि पितर हे पचजन होत, असे ऐतरेय ब्राह्मणात सांगितले आहे (३ ३१)

*यास्काच्या मते गधर्व, पितर, देव, असुर व राक्षस हे पच* जन होत

औपमन्यवाच्या मते ब्राह्मण क्षत्रिय, वैश्य व शूद्र हे चार वर्ण व पाचवा निषाद हे पचजन होत

रॉथ या पाश्चात्य पडिताच्या मते पचजनात जगातील सगळ्या मानवजातीचा समावेश आहे अथर्ववेदात पूर्व, पश्चिम, उत्तर, दक्षिण व मध्य अशा पाच दिशा मानल्या आहेत या पाच दिशाना राहणारे लोक ते पचजन होत, असे रॉथचे म्हणणे आहे झीमर या दुसऱ्या पाश्चात्य पडिताला हे मत मान्य नाही त्याच्या मते पचजनाशी फक्त आर्याचाच सबध असून, मुख्यत त्याच्याच पाच टोळ्याना पचजन म्हटले आहे

अशा प्रकारे पौर्वात्य व पाश्चात्य विद्वानामध्ये मतभिन्नता दिसत असल्यामुळे अजूनही पचजन कोण हे निश्चित झालेले नाही [ व इ , नि म शा , वै नि , ऋ आ , वै का ]

(२) शखाचे रूप घेतलेला एक असुर याचे वास्तव्य समुद्रात होते यान सादीपनीच्या पुत्राला पकडून समुद्रात नेले होते कृष्णान समुद्रात बुडी मारून त्याला ठार मारले आणि *त्याच्या वरचे शखाचे आवरण दूर केले [ पु इ ]*

(३) एक प्रजापती याला असिक्नी नावाची कन्या होती ती त्यान दक्षाला दिली [ प्रा च को ]

**पंचतंत्र** एक जगप्रसिद्ध कथाग्रथ विष्णुशर्मा हा याचा कर्ता आहे यात पाच तत्रे (भाग) असल्यामुळे याला पचतत्र असे नाव मिळाले आहे या तत्राची नावे अशी—

(१) **मित्रभेद** – यात पिंगलक नावाचा सिंह व सजीवक नावाचा बैल या दोन मित्रात एका धूर्त कोल्ह्याने वैमनस्य कसे उत्पन्न केले, ती कथा आहे

(२) **मित्रसप्राप्ती**– यात चित्रग्रीव हस, हिरण्यक उदीर, लघुपतनक कावळा, चित्राग हरिण आणि मथर कासव याची मैत्री कशी जमली, ती कथा आहे

(३) **काकोलूकीयम**– यात कावळा व घुबड याच्या वराची कथा आहे

(४) **लब्धप्रणाशम** – यात वानर आणि सुसर याच्या मैत्रीची कथा आहे

(५) **अपरीक्षितकारकम** – यात ब्राह्मण आणि त्याचे मुगूस याची, अविचाराचा परिणाम दाखवणारी कथा आहे

पाच तंत्रे या पाच मुख्य कथा होत. त्यांच्या अनुषंगाने आणखीही कित्येक उपकथा प्रत्येक तंत्रात येतात. प्रत्येक तंत्र म्हणजे ही कथांची एक साखळीच असते. अशा एकूण ८७ कथा पंचतंत्रात आहेत. त्यांतल्या बहुतेक प्राणिकथा आहेत.

प्राणिकथांचा उगम पहिल्या प्रथम महाभारतात झाला. तिथूनच प्रेरणा घेऊन विष्णुशर्म्याने हा कथाग्रंथ निर्माण केला. त्याने आपल्या ग्रंथात महाभारतातल्याही काही कथा घेतलेल्या आहेत. रामायण, महाभारत, मनुस्मृती व चाणक्याचे अर्थशास्त्र यांतून विष्णुशर्म्याने कित्येक विचार आणि श्लोक ग्रहण केलेले आहेत. यावरून विष्णुशर्मा हा चंद्रगुप्त मौर्याच्या नंतर इ. स. पू. पहिल्या शतकात झाला असावा, असे अनुमान निघते.

प्रस्तुत पंचतंत्राचा उपक्रम झाला आहे, तो असा–

दाक्षिणात्य जनपदात महिलारोप्य नावाचे एक नगर होते. तिथे एक दानशूर, पराक्रमी आणि सर्वकलापारंगत असा अमरशक्ती नावाचा राजा होता. त्याला बहुशक्ती, उग्रशक्ती व अनंतशक्ती असे तीन मुलगे होते. ते तिघेही मतिमंद आणि विद्येला पराङ्मुख होते. राजाला या गोष्टीचे फार दुःख वाटे आणि त्याला एक वचन वारंवार आठवे–

**अजातमतमूर्खेभ्यो मताजातौ सुतौ वरम ।**
**यतस्तौ स्वल्पदुःखाय यावज्जीव जडो दहेत ॥**

अर्थ– अजात (न जन्मलेले) मृत आणि मूर्ख अशा पुत्रांत मेलेले आणि न जन्मलेले पुत्र अधिक बरे, कारण त्यांच्या पायी होणारे दुःख स्वल्प असते. मूर्ख पुत्र मात्र यावज्जीव (मनाला) जाळीत राहतो.

त्या राजाच्या आश्रयाला पाचशे पंडित होते. एके दिवशी त्या पंडितांना राजाने सांगितले, की 'माझे पुत्र शहाणे होतील असे काही तरी करा.' त्यावर ते पंडित राजाला म्हणाले, 'विष्णुशर्मा नावाचा एक पंडित ब्राह्मण आहे. तुम्ही आपल्या पुत्रांना त्याच्या स्वाधीन करा. तो त्यांना शहाणे करील.'

राजाने मग विष्णुशर्म्याला बोलावून आणले व त्याला आपली इच्छा सांगितली. तो म्हणाला, 'जर तू माझ्या तीन्ही मुलांना शहाणे केलेस, तर मी तुला शंभर देणग्या देईन.' त्यावर विष्णुशर्मा बोलला, 'मी शंभर देणग्यांसाठी माझ्या विद्येचा विक्रय करणार नाही. पण तुझ्या मुलांना मात्र अवघ्या सहा महिन्यांत शहाणे करून सोडीन. जर ही गोष्ट मी करू शकलो नाही, तर स्वतःचे नाव टाकून देईन.' राजाला ते ऐकून बरे वाटले. त्याने आपल्या तीन्ही मुलांना विष्णुशर्म्याच्या स्वाधीन केले. विष्णुशर्म्याने त्यांना शिकवण्यासाठी कथेची पद्धत अवलंबिली. तो त्या मुलांना म्हणाला, 'राजपुत्रांनो ऐका'–

**वर्धमानो महान स्नेहः सिंहगोवृषयोर्वने ।**
**पिशुनेनातिलुब्धेन जम्बूकेन विनाशितः ॥**

अर्थ– एका वनात सिंह आणि बैल यांचा मोठा स्नेह वाढत होता. पण एका अतिलोभी आणि दुष्ट अशा कोल्ह्याने त्यात बिब्बा घातला.

असे म्हणून विष्णुशर्म्याने ती कथा सुरू केली. मग एकीतून दुसरी, दुसरीतून तिसरी अशी कथांची गुंफण होऊ लागली. विष्णुशर्म्याने सगळे नीतिशास्त्र आणि व्यवहारविज्ञान त्या कथांच्या द्वारे त्या मंदबुद्धी राजपुत्रांना सांगितले. व्यवहार यशस्वी करण्यासाठी आवश्यक असलेल्या सर्व गुणांचा, कथा आणि सुभाषिते यांच्या द्वारे त्याने राजपुत्रांना उपदेश केला.

विष्णुशर्म्याला आपल्या या ग्रंथाबद्दल विलक्षण आत्मविश्वास होता. त्यामुळे ग्रंथाच्या शेवटी त्याने म्हटले आहे–

**अधीते य इदं नित्यं नीतिशास्त्रं शृणोति च ।**
**न पराभवमाप्नोति शक्रादपि कदाचन ॥**

अर्थ– हे नीतिशास्त्र जो नित्य अभ्यासील किंवा श्रवण करील, त्याचा इंद्रालाही कधी पराभव करता येणार नाही.

पंचतंत्रातील कथांची शैली अगदी स्वतंत्र आहे. त्यांचा प्रारंभ श्लोकाने होतो. गद्य भागातल्या विधानाला पुष्टी देण्यासाठी विष्णुशर्मा महाभारतादी ग्रंथांतून निवडक श्लोक घेतो. क्वचित तो स्वतःही श्लोक रचून ग्रंथात समाविष्ट करतो. पंचतंत्राचे गद्य जितके सरळ आणि स्पष्ट, तितकेच त्यातील श्लोकही समर्पक, अर्थपूर्ण, मार्मिक आणि पठनसुलभ आहेत. त्यामुळे या सर्व कथांना रुची तर आलीच आहे, शिवाय त्या परिणामकारकही झाल्या आहेत. कित्येक कथांचा समारोप तो एखाद्या श्लोकाने करतो व त्यातच पुढील कथेचा उपक्रम करतो. उदा०–

**यस्य बुद्धिर्बलं तस्य निर्बुद्धेस्तु कुतो बलम् ।**
**वने सिंहो मदोन्मत्तः शशकेन निपातितः ॥**

अर्थ– ज्याला बुद्धी आहे त्याला बळ आहे. निर्बुद्धाला बळ कुठून असणार! एक मदोन्मत्त (निर्बुद्ध) सिंह वनात राहत होता. त्याला एका (सुबुद्ध) सशाने ठार मारले.

त्यावर श्रोता प्रश्न करतो, 'हे कसे झाले?' मग विष्णुशर्मा ती गोष्ट सांगतो.

विष्णुशर्म्याचा बुद्धिबलावर फार मोठा भर आहे. पण बुद्धी विकसित आणि प्रकाशित व्हायला हवी असेल, तर केवळ पुस्तकी ज्ञानावरच अवलंबून राहून चालत नाही, असे त्याचे मत आहे. ते विशद करताना तो म्हणतो–

**य सतत परिपच्छति शृणोति स धारयत्यनिशम ।**
**तस्य दिवाकरकिरणनलिनीव विवर्धते बुद्धि ।।**

अर्थ – जो सतत परिप्रश्न करीत राहतो ऐकत राहता व ऐकलेले आणि निरतर अतरात धारण करतो, त्याची बुद्धी सूर्यकिरणाना कमल उमलावे तशी वर्धिष्णु होते

ज्याने देशोदेशी भ्रमण करून अनेक भाषा, अनेक रीतिरिवाज यथार्थपणे जाणले नाहीत, त्याचे जीवन व्यर्थ होय, असेही तो सांगतो

विष्णुशर्म्याच्या काळी भारताच्या मोठ्या भागावर कुशाणाचे साम्राज्य चालत होते इतरही अनेक लहानमोठे राजे छोट्या मोठ्या प्रदेशावर राज्य करीत होते त्याच्यात लढायाही होत होत्या त्या लढायात कोणाचा जय तर कोणाचा पराजय, असा चक्रनेमिक्रम सुरू होता या सर्व उलाढाली विष्णुशर्म्याला पाहून आणि ऐकून ठाऊक होत्या म्हणून त्याने राजनीतीविषयी अनेक ठिकाणी चर्चा केली आहे राजनीतीचे विवेचन करताना तो मनू, बृहस्पती, उशना, व्यास, चाणक्य, इ राजनीतिशास्त्रज्ञाना अनुसरला आहे राज्य उत्तम चालायला हवे असेल, तर राजाने आपली बुद्धी म्हणजेच आपली मुत्सद्देगिरी कुठेही कमी पडू देता कामा नये, असे सागताना तो म्हणतो –

**न तच्छस्त्रैर्न नागेन्द्रैर्न हयैर्न पदातिभि ।**
**कार्य ससिद्धिमभ्येति यथा बुद्ध्या प्रसाधितम ।।**

अर्थ – (सखोल) बुद्धीने जसे एखादे कार्य सिद्धीला जाते, तसे ते शस्त्रे, गजदल, घोडदल किंवा सैन्यदल यापैकी कशानेही सिद्धीला जात नाही

राजाने सदैव प्रजेच्या कल्याणासाठी झटले पाहिजे, हे सागताना तो एक सुस्पष्ट इशारा देतो –

**लोकानुग्रहकर्तार प्रवर्धन्ते नरेश्वरा ।**
**लोकाना सक्षयाच्चैव क्षय यान्ति न सशय ।।**

अर्थ – जे राजे लोकावर अनुग्रह करतात (प्रजेची अभिवृद्धी साधतात) त्याची भरभराट होते लोक जर क्षीण दुबळे झाले, तर राजे (ही) नाश पावतात, यात सशय नाही

राजाच्या खालोखाल त्याने व्यापारी लोकाना महत्त्व दिले असून, त्याच्या द्रव्यकमाईची भलावण केली आहे पचतत्रातली दुसरीच कथा वर्धमानक नामक व्यापाऱ्याची आहे विष्णुशर्मा धनाचे महत्त्व योग्य प्रकारे जाणतो त्याने म्हटले आहे –

**अर्थेभ्योऽपि हि वृद्धेभ्य सवृत्तेभ्यस्ततस्तत ।**
**प्रवर्तन्ते क्रिया सर्वा पर्वतेभ्य इवापगा ।।**

अर्थ – (देशात) आर्थिक सुबत्ता निर्माण झाल्यावर मग जशा पर्वतावरून नद्या उगम पावतात, तशा देशात सर्व प्रकारच्या (चांगल्या) क्रिया सुरू होतात

त्याला कूपमडूक वृत्ती मुळीच मान्य नाही तो म्हणतो –

**परदेशभयाद् भीता बहुमाया नपुसका ।**
**स्वदेशे निधन यान्ति काका कापुरुषा मृगा ।।**

अर्थ – ज्याना परदेशगमनाची भीती वाटते, असे मायावी कपट करणारे नपुसक व (नपुसक) लोक स्वदेशात नाश पावतात असे समजावे, कावळे, भ्याड पुरुष आणि मृग !

विष्णुशर्मा आपल्या कथानकाची अशी रचना करतो, की त्यामुळे लोकाचे धैर्य, साहस व पौरुष फुलून यावे तो माणसाच्या दैवासाठी पूजा–प्रार्थनेचा पुरस्कार न करता उद्योगाचा, प्रयत्नवादाचा पुरस्कार करतो –

**उद्यमेन हि सिध्यन्ति कार्याणि न मनोरथै ।**
**न हि सुप्तस्य सिंहस्य प्रविशन्ति मुखे मृगा ।।**

अर्थ – (माणसाची सकल्पित) कार्य उद्योगानेच सिद्ध होतात, मनोरथाने नाही झोपलेल्या सिंहाच्या मुखात हरणे (आपोआप) येऊन पडत नाहीत (त्यासाठी सिंहाला उद्योगच करावा लागतो)

यदाकदाचित कालगती फिरली आणि अपयश आले तराही माणसाने आपली हिंमत खचू देऊ नये, असे सागताना तो म्हणतो –

**त्याज्य न धैर्य विधुरेऽपि काले ।**
**धैर्यात कदाचिद् गतिमाप्नुयात् स ।।**

अर्थ – काळ विपरीत आला तरी माणसाने धीर सोडू नये कदाचित त्या धैर्यामुळेच त्याला त्यातून मार्ग सापडू शकेल

माणसाने दीनपणे जीवन जगणे म्हणजे ते जगणेच नव्हे, असे विष्णुशर्म्याचे सागणे आहे –

**यज्जीव्यते क्षणमपि प्रथित मनुष्य–**
**विज्ञानशौर्यविभवार्यगुण समेतम ।**
**तन्नाम जीवितमिह प्रवदन्ति तज्ञा**
**काकोऽपि जीवति चिर च बलिं च भुङ्क्ते ।।**

अर्थ – विज्ञान, शौर्य, विभव अशा श्रेष्ठ गुणानी युक्त अतएव प्रतिष्ठित असे जीवन माणसे क्षणभरच जरी जगली, तरी ते खरे जीवन, असे शहाणे लोक म्हणतात (अन्यथा) कावळा नाही का दीर्घायुष्य जगत आणि काकबळी खात ? (तसेच ते लाचारीचे जगणे !)

पचतत्राची रचना झाल्यावर ते शिक्षित समाजात तात्काळ लोकप्रिय झाले विद्यापरपरेत त्याचे अध्ययन व अध्यापनही सुरू झाले त्यातले कित्येक श्लोक वा श्लोकार्ध, सुभाषिते किंवा म्हणी याच्या स्वरूपात लोकाच्या जिव्हाग्री खेळू लागले पचतत्रातली काही प्रसिद्ध सुभाषिते अशी –

**राजा मित्र केन दृष्ट श्रुत वा ।**

अर्थ – राजा गवळ्याचा मित्र झाला आहे असे कोणी ना पाहिले ना ऐकिले

**जठरं को न बिभर्ति केवलम् ।**

अर्थ – उदरभरण हे सगळेच करतात

**कीलोत्पाटीव वानरः ।**

अर्थ – जसा एखादी पाचर उपटून टाकणारा वानर

**कन्यापितृत्वं खलु नाम कष्टम् ।**

अर्थ – मुलीचा बाप होणे ही गोष्ट अत्यंत कष्टदायक होय

**समानशीलव्यसनेषु सख्यम् ।**

अर्थ – ज्यांचा स्वभाव आणि संकट समान आहे, अशा लोकांशी मैत्री होते

**आत्मार्थे पृथिवीं त्यजेत् ।**

अर्थ – आत्मकल्याणासाठी पृथ्वीचा(ही) त्याग करावा

**मृत्युर्ध्रुवः प्राणिनां ध्रुवः ।**

अर्थ – प्राण्यांना मृत्यू हा ठरलेला आहे

**विद्वान् सर्वत्र पूज्यते ।**

अर्थ – विद्वानाची सर्वत्र पूजा होते

**नादत्तमुपतिष्ठति ।**

अर्थ – दिल्यावाचून मिळत नाही

जगातल्या बहुतेक सर्व भाषांतून पंचतंत्राची भाषांतरे झालेली असून, जगातले ते एक प्रसिद्ध पुस्तक ठरले आहे बुकशिओ, इसाप, इ. प्राचीन पाश्चात्य कथालेखकांना पंचतंत्राकडूनच प्रेरणा मिळाली, असे बहुतेक विद्वानांचे मत आहे

**पंचतपव्रत** एक काम्य व्रत ज्येष्ठ शुद्ध चतुर्दशीच्या दिवशी हे व्रत करतात त्यात स्वतःच्या भोवती चार अग्नी प्रज्वलित करून मध्ये बसतात पाचवा अग्नी सूर्य असतो दिवसभर असे बसून सायंकाळी व्रताचे उद्यापन करतात त्या वेळी ब्राह्मणाला सुवर्णाची गाय दान देऊन भोजन करतात फल – शिवलोकप्राप्ती [व्र प ]

**पंचतीर्थे** ब्राह्मणाच्या उजव्या हाताच्या ठिकाणी पाच तीर्थे मानली आहेत, ती अशी– बोटाच्या अग्रभागी देव तीर्थ, कनिष्ठिकेच्या मुळात ऋषितीर्थ, अंगठा व तर्जनी यांच्यामध्ये पितृतीर्थ, अंगठ्याच्या मुळात ब्रह्मतीर्थ व तळव्याच्या मध्यभागी अग्नितीर्थ तर्पण करताना देव, ऋषी व पितर यांना हाताच्या त्या त्या भागावरून उदक देतात पाहा – तर्पण

**पंचदशी** विद्यारण्य व भारतीतीर्थ यांनी रचलेला अद्वैत वेदान्तावरील एक ग्रंथ या ग्रंथात पंधरा प्रकरणे असल्यामुळे याला पंचदशी असे नाव मिळाले आहे पहिल्या पाच प्रकरणांना अनुक्रमे तत्त्वविवेक, महाभूतविवेक, पंचकोश विवेक, द्वैतविवेक व महावाक्यविवेक अशी नावे आहेत

तत्त्वविवेकात ब्रह्मात्मकतत्त्व तत्त्वाचा अन्नमयादी पंचकोशांपासून विवेक म्हणजे भेद केल्यामुळे, त्याला तत्त्वविवेक असे नाव दिले आहे या प्रकरणात जीव आणि ब्रह्म यांचे ऐक्य प्रतिपादन केले आहे

महाभूतविवेकात पंच महाभूतांचे गुण, धर्म व कार्य यांचे विवेचन आहे पंचकोशविवेकात अन्नमयादी पंचकोशांचे स्वरूप व अनात्मत्व यांचे विवेचन आहे

द्वैतविवेकात ईशनिर्मित व जीवकृत असे उभयविध द्वैत सांगितले आहे ईशकृत द्वैत हे नेहमी एकरूप असते पण जीव मात्र त्या द्वैताविषयी अनेक कल्पना करतो हा प्रकार पुढील श्लोकात सांगितला आहे –

**हृष्यत्येको मणिं लब्ध्वा क्रुध्यत्यन्यो ह्यलाभतः ।**
**पश्यत्येव विरक्तोऽत्र न हृष्यति न कुप्यति ।।**

(पंचदशी ४ २१)

अर्थ – रत्न मिळाल्याने एका जीवाला आनंद होतो, तर दुसऱ्याला ते न मिळाल्याने दुःख होते विरागी मनुष्य त्याच्याकडे नुसते पाहतो, पण त्याला आनंद होत नाही किंवा रागही येत नाही

ईशकृत द्वैत जीवाला बद्ध करीत नाही, पण जीवकृत द्वैत मात्र जीवाला बद्ध करते

महावाक्यविवेकात 'प्रज्ञानं ब्रह्म' 'अहं ब्रह्मास्मि,' 'तत्त्वमसि' व 'अयमात्मा ब्रह्म' या महावाक्यांवरून जीव आणि ब्रह्म यांच्या ऐक्याचे प्रतिपादन केले आहे

पुढच्या सहा ते दहा या प्रकरणांची नावे चित्रदीप, तृप्तिदीप, कूटस्थदीप, ध्यानदीप व नाटकदीप अशी आहेत

चित्रदीपात वस्त्रावर जसा चित्राचा, तसा ब्रह्मावर जगाचा आरोप झाला आहे, हे नाना उपपत्तींनी पटवून दिले आहे उदा०–

**वस्त्राभासस्थितान् वर्णान् यद्वदाधारवस्त्रगान् ।**
**वदन्त्यज्ञास्तथा जीवसंसारं चिद्गतं विदुः ।।**

(पंचदशी ६ ८)

अर्थ – ज्याप्रमाणे अज्ञ पुरुष वस्त्रात असलेले रंग आधारभूत वस्त्राचेच आहेत, असे म्हणतात, त्याप्रमाणे ते हा जीवाचा संसार आत्म्याचाच आहे, असे समजतात

तृप्तिदीपात जीवाच्या सात अवस्थांचे सम्यक् प्रतिपादन केले आहे अपरोक्ष आत्मज्ञानाने मनुष्याला कृतकृत्यता प्राप्त होते आणि तो तृप्त होतो, असे तिथे सांगितले आहे

कूटस्थदीपात कूटस्थ व जीव यांच्या स्वरूपातील भेद सांगून ब्रह्म व कूटस्थ यांचा भेद घटाकाश व महाकाश यांतील भेदा प्रमाणे नाममात्र आहे, असे स्पष्ट केले आहे

ध्यानदीपात, केवळ आत्मोपदेशाने उपासनेमुळेही ज्ञान परोक्ष ज्ञान होते, पण अपरोक्ष ज्ञान मात्र विचारावाचून होत नाही, असे सांगितले आहे. परंतु विवेकाच्या या विचारालाही काही प्रतिबंध असतात, असे पुढील श्लोकात म्हटले आहे –

**प्रतिबन्धो वर्तमानो विषयासक्तिलक्षण ।**

**प्रज्ञामान्द्यं कुतर्कश्च विपर्ययदुराग्रह ॥**

(पचदशी ९.४३)

अर्थ – विषयांमध्ये चित्ताची आसक्ती, बुद्धिमांद्य, कुतर्क, (आत्म्याच्या ठिकाणी कर्तृत्वादी गुण आहेत असे) विपरीत मानून त्याविषयी आग्रह धरणे, असे चार प्रकारचे वर्तमान प्रतिबंध आहेत

या प्रतिबंधाचा नाश शम, दम, तितिक्षा, उपरती, श्रद्धा व समाधान यांनी होतो. त्यानंतर निर्गुणोपासनेचे प्रकार सांगून, तिची प्रशंसा केली आहे आणि निर्गुण ब्रह्माच्या उपासनेने जीव मुक्त होतो, असे सांगितले आहे

नाटकदीपात साक्षी चैतन्याला नृत्यशाळेतील दीपाची उपमा देऊन साक्षीचे निर्विकारत्व सिद्ध केले आहे

शेवटच्या अकरा ते पंधरा या प्रकरणांना मिळून ब्रह्मानंद असे नाव दिले आहे. त्या प्रकरणांना अनुक्रमे योगानंद, आत्मानंद, अद्वैतानंद, विद्यानंद व विषयानंद अशी नावे आहेत

योगानंदात आत्मज्ञानाचे फल, ब्रह्माचे श्रुत्युक्त स्वरूप, ब्रह्मानंदाचे प्रकार, त्याचे स्वसंवेद्यत्व, इ. विषय आले आहेत

आत्मानंदात आत्मा हा अतिशय प्रिय आहे असे सांगून त्या आत्म्याचे निरंतर अनुसंधान करावे, असा उपदेश केला आहे

अद्वैतानंदात आनंदरूप ब्रह्म हे एकमेवाद्वितीय व सत्य असून, ते जगाचे उपादान कारण मानले आहे. त्यामुळे सर्व जगच आनंदरूप आहे, असे चिंतन करून त्यात चित्त स्थिर केल्याने अद्वैतानंदाचा लाभ होतो असे म्हटले आहे

विद्यानंदात विद्यानंदाचे स्वरूप व त्याचे अवांतर भेद सांगितले आहेत. दुःखाचा अभाव, इष्टप्राप्ती, कृतकृत्यतेची भावना व सर्व प्राप्तव्य प्राप्त झाले आहे, असा निश्चय, हे ते चार भेद होत

विषयानंदात ब्रह्मानंदाचा एकदेश असा विषयानंद शांत वृत्तीतच अनुभवाला येतो, असे प्रतिपादन केले आहे

**काष्ठे त्वौष्ण्यप्रकाशौ द्वावुद्भवं गच्छतो यथा ।**

**शान्तासु सुखचैतन्ये तथवोद्भूतिमाप्नुत ॥**

अर्थ – काष्ठामध्ये ज्याप्रमाणे उष्णता व प्रकाश ही दोन्ही उत्पन्न होतात त्याप्रमाणे शांत वृत्तीत सुख व चैतन्य ही दोन्ही उत्पन्न होतात

हा विषयानंद चित्त अंतर्मुख होण्यासाठी फार उपयोगी पडतो. तेव्हा विषयानंद हा चित्त एकाग्र करण्याचे द्वार आहे, असे समजून बाह्य विषयांचा त्याग करावा व वृत्ती अंतर्मुख करावी असा उपदेश विषयानंदात शेवटी केला आहे

यांची पहिली सहा प्रकरणे विद्यारण्यांनी व पुढची नऊ प्रकरणे, त्यांचे मीमांसाशास्त्राचे गुरू भारतीतीर्थ यांनी लिहिली आहेत, असे रामकृष्ण यांनी लिहिलेल्या टीकेवरून कळते

वेदान्तशास्त्रात या ग्रंथाला फार महत्त्व आहे. या एकाच ग्रंथाच्या सम्यक अध्ययनाने अद्वैत वेदान्ताचे चांगले ज्ञान होते

[ सार्थ पचदशी – सपा श्री द वा जोग, १९५१ ]

## पंचधान्यलक्षपूजा

एक पूजाप्रकार. काम्य व्रत. हे व्रत वैशाख, श्रावण, कार्तिक, माघ किंवा कोणत्याही शुभ मासात करतात. यव, गहू, मूग, तीळ व तांदूळ या धान्यांचा अनुक्रमे ठरविलेल्या परिमाणे घेऊन शिवाची पूजा करून पंचाक्षरी मंत्राने किंवा त्र्यंबकमंत्राने किंवा नाममंत्राने शिवाला वाहणे, असा याचा विधी आहे. या धान्यांचे लक्ष यथाक्रम पूर्ण झाले म्हणजे मग उद्यापन करतात. उद्यापनाच्या वेळी शिवगौरीची सुवर्णप्रतिमा व नंदीची रौप्य प्रतिमा करून त्यांची अभिषेकपूर्वक महापूजा करतात. ज्या ठिकाणी धान्याचे लक्ष वाहिले असतील, त्याच ठिकाणी ही महापूजा करायची असते. पूजेनंतर यथाशक्ति ब्राह्मणभोजन घालतात. फल – सुख, पुत्र व सायुज्यमुक्ती यांची प्राप्ती

गौरीने शिवाच्या प्राप्तीसाठी हे व्रत केले होते, असे भविष्य पुराणात सांगितले आहे [ व्रतराज ]

## पचपरमेष्ठी

एक जैन संज्ञा. परमेष्ठी म्हणजे परम पद पावलेला शुद्ध आत्मा होय. जैन धर्मात अर्हत, सिद्ध, आचार्य, उपाध्याय व साधू यांना पचपरमेष्ठी अशी संज्ञा आहे. त्याची व्युत्पत्ती अशी – 'परमे उत्कृष्टे इन्द्र धरणेन्द्र नरेन्द्र गणेन्द्रादिभिर्वन्दिते पदे तिष्ठतीति परमेष्ठी ।' = इंद्र, नरेंद्र, धरणेंद्र, गणेंद्र, इ. पुरुषांनी वंदित अशा श्रेष्ठ व उत्कृष्ट पदावर राहणारा तो परमेष्ठी होय

परमेष्ठी हा मलरहित, शरीररहित, अनिन्द्रिय, केवलज्ञानी, विशुद्धात्मा, परमजिन व शिवशंकर असतो. मलरहित म्हणजे अठरा दोषांनी रहित होय. परमेष्ठीचा हा सर्वश्रेष्ठ गुण समजला जातो. आत्मशुद्धी हा परमेष्ठीचा प्रमुख गुण आहे. या दृष्टीने साधूपासून अर्हतापर्यंत चढता क्रम मानला जातो

आत्मसिद्धीसाठी जो सदाचरण करतो तो साधु होय ज्याला जिनदीक्षा घेऊन बराच काळ झाला आहे, त्यालाही साधू म्हणावे, असे जैनशास्त्रात सांगितले आहे मोक्षप्राप्तीसाठी आवश्यक अशा शास्त्राचे जो अध्यापन करतो तो आचार्य होय दीक्षा देण्याचा आणि सर्वांचे अनुशासन करण्याचा अधिकार फक्त आचार्यालाच असतो जो मूर्तिमान शरीरापासून मुक्त आहे व अष्टकर्मरहित आहे, त्याला सिद्ध म्हणतात ज्याला व्याधिमुक्त असे दिव्य शरीर लाभले आहे, जो ज्ञान, दर्शन, वीर्य आणि सुख यांनी परिपूर्ण आहे आणि ज्याला धर्माचा उपदेश करण्याचा अधिकार आहे, तो अर्हंत होय [ ज ध ]

## पंचपल्लव

विशिष्ट पाच वृक्षांच्या पालवीला पंचपल्लव असे म्हणतात हे पाच वृक्ष कोणते, त्या संबंधी एकमत नाही त्यांचे पर्याय असे– (१) वड, पिंपळ, पायरी, जांभूळ व आंबा (ब्रह्मांड पुराण) (२) आंबा, उंबर, जांभूळ, रुई आणि पिंपळ (३) आंबा, जांभूळ, कवठ, महाळुंग आणि बेल (शब्द चंद्रिका) (४) पिंपळ, उंबर, अजीर, आंबा, व वड (व्रतराज) हे पंचपल्लव धार्मिक आणि मांगलिक कार्यासाठी उपयुक्त मानलेले आहेत

मांगलिक कार्यासाठी घट किंवा कलश स्थापतात, ते हा त्यात पंचपल्लव घालतात यजमानदंपतीला पंचपल्लवांनी अभिषेक करतात [ श क , स को ]

## पंचपिंडोद्धारण

एक व्यावहारिक आचार जलाशय, यान, शय्या, कूप, उद्यान व गृह ही जो बांधतो त्याच्या मालकीची असतात इतरांनी त्यांचा उपयोग केल्यास, बांधणाऱ्याच्या अंगी जर काही पाप असेल, तर त्याच्या चतुर्थांशाचे ते वाटेकरी होतात म्हणून अशा खासगी जलाशयात कोणी स्नान करू नये गत्यंतर नसेल, तर स्नान करताना त्या जलाशयातल्या गाळाचे पाच गोळे बाहेर काढून टाकावे कूपातून मातीचे गोळे काढणे शक्य नसते, म्हणून तीन घागरी पाणी काढून त्याने विहिरीभोवतीची जागा स्वच्छ करावी [आचारेंदु]

## पंचपीर

राजस्थानात पचपीर या नावाने काही ऐतिहासिक पुरुष पूजले जातात सामान्यत्व वीरपुरुष आहेत ज्यांनी वचनपूर्तीसाठी, लोककल्याणासाठी किंवा स्वाभिमान-रक्षणासाठी आत्मबलिदान केले, अशा वीरांची ही पूजा असते पीरशब्द वीरवरून आलेला आहे काही लोकभाषांत व चे प असे उच्चारण होत असते या पचपीरांची नावे एका दोह्यात खालीलप्रमाणे सांगितलेली आहेत–



पाबू हरभू रामदे, मांगळिया मेहा ।
पांचू पीर पधारज्यो, गोगाजी जेहा ॥

अर्थ – पाबू हरभू, रामदेव, मांगळिया मेहा व गोगा हे पाच पीर होत

यातील हरभू सोडल्यास बाकीच्या चौघांनीही अचाट वीरकृत्ये केलेली आहेत यांपैकी रामदेव व हरभू यांनी जीवत्समाधी घेतली असून, बाकीचे तिघेही रणभूमीवर पतन पावलेले आहेत

काही ठिकाणी पचपीरांच्या नावात फरक आहे या पीरांसाठी एखाद्या पिंपळाच्या झाडाखाली लहानसा चबुतरा उभारलेला असतो त्यांच्या स्मृतिप्रीत्यर्थ निरनिराळ्या महिन्यात निरनिराळ्या तिथींना जत्रा भरतात या पीरांना नवसही बोलले जातात चुरमा हा सामान्यतः पचपीरांचा नैवेद्य असतो खालच्या जातीचे लोक त्यांना गोंडया–बकऱ्याचा बळीही देतात पीरपूजेचा नागपूजा व यक्षपूजा यांच्याशीही संबंध आहे तेजाजी या दुसऱ्या एका पीराला नागदेव समजून नागपंचमीच्या दिवशी त्याची पूजा करतात मणिभद्रयक्ष हा मणिकपीर म्हणून बंगालमध्ये पूजला जातो



पचपीरांचे प्रतीक

राजस्थानाप्रमाणेच बंगालमध्यही पचपीरांची पूजा होत असते तिथला श्रेष्ठ पीर म्हणजे गाजीमियाँ हा होय बंगालमधल्या अनेक घरातून एका कोपऱ्यात एक मातीचा चौथरा बनविलेला असतो त्यावर एक उंचवटा करतात व त्यात एक लाकडी हात उभा पुरतात त्याची पाच बोटे म्हणजे पाच पीर असे समजतात प्रत्येक बुधवारी त्या उंचवट्याची पूजा करून त्याच्यापुढे धूप जाळतात

हिंदूप्रमाणेच मुसलमानांतही पंचपीरांची उपासना आहे शिया मुसलमान मुहम्मद, अली, फातिमा, हसन आणि हुसेन यांना पाच पीर मानतात राजस्थानी मुसलमान मोइनोद्दीन चिश्ती, हमजा, हाजी शक्करबार, शीरानी व सुजारू यांना पाच पीर मानतात इतर ठिकाणचे सुन्नी मुसलमान बहउद्दीन झकारिया, शाहरुकी आलम, शाह शम्सतब्रीज, शेख जलालमकदूम व शेख फरीदुद्दीन यांना पचपीर मानतात पंचपीरांना समर्पित केलेल्या द्रव्यादी वस्तू मुसलमान फकीर

घेतात मुसलमान पीराना हिंदूही भजतात व भारतात लग्नादी मगलकार्ये सिद्धीस जावी म्हणून जागरण नावाचे देव कृत्य करतात, त्यात गायक हिंदू देव-देवतांची गीते गातात, तशीच पचपीराचीही गातात [ नवभारती, आक्टो १९५५, वरदा, जुल १९५९, से इ १९०१, एन्सा रिए, फोक लोर ऑफ गुजरात]

**पंचप्रयाग** दोन किंवा अनेक नद्यांच्या सगमाला प्रयाग अशी सज्ञा आहे असे पाच सगम विशेष पवित्र मानलेले असून, त्याना पचप्रयाग ही सज्ञा आहे हे पाचही सगम हिमालयात असून, ते अलकनदेला इतर नद्या मिळून झाले आहेत त्याची नावे अशी- (१) देवप्रयाग- भागीरथी व अलकनदा याचा सगम, (२) कर्णप्रयाग- अलकनदा व पिंडार याचा सगम (३) रुद्रप्रयाग- अलकनदा व मदाकिनी याचा सगम (४) नदप्रयाग - अलकनदा व नदा याचा सगम व (५) विष्णुप्रयाग- अलकनदा व विष्णुगगा याचा सगम [ हि ध ]

**पंचप्राण** प्राण ही एक जीवन चालविणारी शक्ती असून तिच्यामुळेच विविध इद्रियांना विविध प्रकारची शक्ती प्राप्त होत असते हे प्राण पाच असल्याने त्यांना पच प्राण म्हणतात त्याची नावे व शरीरातगत त्याची कार्ये अशी- (१) प्राण- अन्न आत घेणारा, (२) अपान- मलमूत्रोत्सर्ग करणारा, (३) व्यान- अन्न पचविणारा, (४) उदान- शब्द उत्पन्न करणारा आणि (५) समान- डोळ्याची उघडझाप करणारा

या पाचही प्राणाची विशिष्ट स्थाने असून, ती खालील श्लोकात दिलेली आहेत-

हृदि प्राणो गुदेऽपान समानो नाभिमण्डले ।
उदान कण्ठदेशे स्याद् व्यान सर्वशरीरग ॥

अर्थ- प्राण हृदयात, अपान गुदद्वारात, समान नाभीच्या ठिकाणी, उदान कठस्थानी आणि व्यान सर्व शरीरात सचार करणारा असतो

भोजनाच्या सुरवातीला या पचप्राणाना पाच आहुती देतात

**पंचबुद्ध** पाच बौद्ध देवता अमोघसिद्धी अमिताभ, रत्नसभव, अक्षोभ्य व वैरोचन अशी त्याची नावे आहेत भारताबाहेर ही नावे दाक, अमिन्, होशो, अशुकू व दनिची अशी आहेत काही बौद्ध सप्रदायात अमिद यालाच आदिबुद्ध मानतात, तर काहीत दनिचीला तो मान देतात अन्य चारही बुद्धाना ध्यानी बुद्ध म्हणण्याची प्रथा आहे काहीच्या मते वरील पाच बुद्ध हे ध्यानी बुद्धच आहेत पाहा - ध्यानी बुद्ध

**पंचब्रह्मोपनिषद** एक नव्य उपनिषद हे कृष्णयजुर्वेदाशी सबध असलेले शैव उपनिषद आहे पिप्पल मुनीने शिवाला विचारलेल्या प्रश्नाने या उपनिषदाचा प्रारभ होतो 'सृष्टीत प्रथम कोण उत्पन्न झाले,' असा हा प्रश्न आहे त्याचे उत्तर देताना सद्योजात अघोर, वामदेव, तत्पुरुष व ईशान हे प्रथम क्रमश निर्माण झाले, असे शिव सागतो या पाचानाच पचब्रह्म अशी सज्ञा आहे सद्योजात पीत वर्णाचा, अघोर कृष्ण वर्णाचा, वामदेव गौर वर्णाचा, तत्पुरुष रक्त वर्णाचा व ईशान आकाशवर्णाचा आहे या पचब्रह्माचे रहस्य जाणणारा पुरुष मुक्त होतो 'नम शिवाय' या मत्राच्या जपाने ते रहस्य समजते, असा उपदेश शिवाने शेवटी केला आहे [श्री सी ग देसाई]

**पंचभूतव्रत** एक काम्य व्रत चैत्र शुद्ध पचमीला याचा प्रारभ करतात त्या दिवशी उपवास करून विष्णूच्या पृथ्वी, आप, तेज, वायु व आकाश या पचमहाभूतरूपी स्वरूपाची पूजा करतात वर्षभर व्रत करून मग उद्यापन करतात त्या वेळी वस्त्र दान देतात फल - कामनापूर्ती [ हि ध ]

**पंचम** (१) एक राग याचे आरोह-अवरोह सात स्वराचे असल्यामुळे याची जाती सपूर्ण आहे वादी- मध्यम सवादी- षड्ज गानसमय- रात्रीचा चौथा प्रहर या रागात गधार तीव्र असून, ऋषभ व पचम हे स्वर लुप्त असतात

(२) एक स्वर नाभी, कठ, हृदय, मस्तक आणि छाती या पाच स्थानातल्या वायूपासून हा स्वर निघतो, म्हणून याला पचम असे म्हणतात [ श क ]

**पंचमकार** मद्य, मास, मत्स्य, मुद्रा व मैथुन असे पाच मकार तत्रप्रधान सागितलेले आहेत या पचमकारानी देवीची उपासना करावी, असे विधान आहे पाहा- तत्रशास्त्र

**पंचमहापापनाशन** एक व्रत श्रावण शुद्ध द्वादशीला आणि श्रावण पौर्णिमेला श्रीकृष्णाच्या जगन्नाथ, देवकीसुत, इ बारा रूपाची पूजा करतात आणि श्रावण अमावास्येला ब्राह्मणाना तीळ मग, गूळ, भात, इ पदार्थांचे भोजन घालतात त्या वेळी पचरत्ने दान देतात फल- पचमहापातकापासून मुक्तता [ हि ध ]

**पंचमहाभूते** पृथ्वी, आप, तेज, वायू आणि आकाश ही पाच तत्त्वे पचमहाभूते म्हणून मानलेली आहेत त्यातूनच ही सर्व भौतिक सृष्टी निर्माण होते सर्व भौतिक पदा

धात पचमहाभूताचे अशरूपाने अस्तित्व असतच न्याय वैशेषिक दर्शनांत पहिली चार भूते ही अणुरूप व आकाश हे विभू मानलेले आहे चार्वाक दर्शनात फक्त चार भूते मानलेली असून, पाचवे आकाश हे इंद्रियगम्य नसल्याने ते मानलेले नाही स्थूल व सूक्ष्म असे याचे दोन भेद होतात

## पंचमहायज्ञ

गृहस्थाची जी नित्यकर्मे असतात, त्यात पच महायज्ञाची गणना आहे पचमहायज्ञ हे गृहस्थाला अवश्य कर्तव्य म्हणून सागितले आहेत

**अध्यापनं ब्रह्मयज्ञः पितृयज्ञस्तु तर्पणम् ।**
**होमो दैवो बलिर्भौतो नृयज्ञोऽतिथिपूजनम् ।।**

(मनु ३ ७०)

अर्थ – शिष्याला अध्यापन करणे हा ब्रह्मयज्ञ (यात स्वाध्यायही समाविष्ट आहे), तर्पण हा पितृयज्ञ (यात श्राद्ध व पिडदानही समाविष्ट आहे), वैश्वदेव हा देवयज्ञ, बलिप्रदान हा भूतयज्ञ आणि अतिथिपूजन हा मनुष्ययज्ञ होय

याना अहुत, हुत प्रहुत, ब्राह्म्यहुत व प्राशित असेही म्हणतात जप हे अहुत होम हे हुत, भूतबली हे प्रहुत, द्विजपूजा हे ब्राह्म्य हुत व पितृतर्पण हे प्राशित आहे या पचमहायज्ञाचे क्रमाने विवरण असे–

**ब्रह्मयज्ञ –** अध्ययन व अध्यापन ही ब्रह्मयज्ञाची दोन अगे आहेत ब्रह्मचर्याश्रमात जे अध्ययन केले असेल, ते गृहस्थाश्रमात स्वाध्यायाच्या अभावी विसरून जाण्याची शक्यता असते म्हणून अध्ययन केलेल्या वेदवेदांगापैकी काही भाग नित्य पठण करावा, असे सागितले व त्याची योजना ब्रह्मयज्ञात केली अध्यापनाने बुद्धीची वाढ होते व अध्ययन केलेल्या विषयाचा अर्थ अधिकाधिक स्पष्ट होत जातो म्हणून अध्यापनालाही ब्रह्मयज्ञात स्थान दिले गेले

ब्रह्मयज्ञाचा उल्लेख शतपथ ब्राह्मणात आहे (११ ५ ६ ३–८) ज्ञात अधीत वाङ्मयाचा स्वाध्याय ब्रह्मयज्ञात करायचा, त्यात चार वेद, वेदांगे, विविध विद्या, इतिहासपुराणे व गाथा याचा विशेषेकरून समावेश आहे ब्रह्मयज्ञ हा एकान्त स्थळी करावा, असे बहुतेक सूत्रकार सागतात ब्रह्मयज्ञाच्या शेवटी तदन्तर्गत तर्पण असते या यज्ञाने देवता सतुष्ट होतात व त्या गृहस्थाला आयुरारोग्य, समृद्धी, कीर्ती व आध्यात्मिक उन्नती देतात

**देवयज्ञ –** स्वाहा शब्द उच्चारून अग्नीत समिधा देणे, याला गौतमादी सूत्रकारानी देवयज्ञ म्हटले आहे 'देवेभ्य स्वाहाकार आकाष्ठात्' असे त्याविषयी वचन आहे (आप ध सू १ ४ १२ १३) देवयज्ञात अग्नी, प्रजापती, इंद्र, सोम, धन्वतरी व विश्वेदेव या देवताना समिधा द्यायच्या असतात वैश्वदेव हा देवयज्ञानच येतो यात देवताना उद्देशून चरूच्या आहुती देतात हा यज्ञ गृह्याग्नीवर अथवा गृह्याग्नी नसल्यास चुलीत अग्नी घेऊन त्यात करतात देव सूक्ष्म शरीराचे असल्यामुळे ते अग्नीत हवन केलेल्या द्रव्याच्या वासानेच सतुष्ट होत असतात, असे म्हटले आहे

**पितृयज्ञ –** तर्पण व पिडदान असे पितृयज्ञाचे दोन भाग आहेत पितर अनेक प्रकारचे आहेत सोमवत, अग्निष्वात्त, बर्हिषद, इ त्याची नावे आहेत गृहस्थाला जन्म देऊन पितर हे वंशसतती अविच्छिन्न ठेवतात अतएव पितृयज्ञाच्या योगाने त्याचे स्मरण करणे व त्याना जलदान व पिडदान करणे हे आवश्यक कर्तव्य ठरते म्हणून मनूने सागितले आहे, की 'गृहस्थाने प्रत्येक दिवशी श्राद्ध करून अन्न, उदक, दूध, मूळ, फळ, इ वस्तूच्या समर्पणाने पितराची प्रीती सपादन करावी (३ ८२)

**भूतयज्ञ –** प्राणिमात्रासाठी भूमीवर चरूचे बली देणे याला भूतयज्ञ असे म्हणतात याविषयी मनूचे वचन असे–

**शुना च पतितानां च श्वपचां पापरोगिणाम् ।**
**वायसानां कृमीणां च शनकैर्निर्वपेद् भुवि ।।**

(मनु ३ ९२)

अर्थ– कुत्रे, पतित, चाडाल, कुष्ठरोगी, कावळे व कृमी याना भूमीवर हलक्या हाताने बळी द्यावा

या यज्ञाच्या योजनेने गृहस्थाला कृमिकीटकापासून रोगी पतितापर्यंत काहीतरी कर्तव्य असल्याचे सूचित होते जे अन्न शिजवायचे ते गृहस्थाने केवळ आपण आणि आपले कुटुब एवढ्या पुरतेच मर्यादित ठेवायचे नाही त्या अन्नात वरील सर्व प्राणिमात्राचा वाटा असतो आणि तो वाटा श्राद्ध व बलिहरण याच्या द्वारे गृहस्थाने त्याना पोचता करायचा असतो

**मनुष्ययज्ञ –** अतिथीला अन्नदान करणे हा याचा विधी आहे म्हणून व याला अतिथियज्ञ असेही म्हटले जाते भारतात अतिथ्याला विशेष महत्त्व दिलेले आहे गृहस्थाचे ते एक प्रमुख कर्तव्य ठरवले आहे 'अतिथिदेवो भव' (तै उ ३ ११ २) या मंत्रात ही गोष्ट आदेशरूपाने सागितली आहे सायकाळी आलेल्या कोणत्याही अतिथीला अन्नावाचून उपाशी ठेवू नये, असे ऐतरेय ब्राह्मणात सांगितले आहे (२५ ५) बौधायनाने या अतिथीत आचाडाल सर्व जातीचा समावेश केला आहे (बौधा गृ सू २ ९ २१) अतिथी निराश होऊन दारातून निघून गेल्यास गृहस्थाची कुटुबसस्था नष्ट होते, असे महाभारतात सागितले आहे (म भा उद्योग ११५ ८) मनुष्ययज्ञात अतिथीप्रमाणेच, आश्रित, सेवक, पाल्य, ब्रह्मचारी यानाही अन्नदान करणे, याचा समावेश आहे

हे पाच महायज्ञ रोज करावे, असे तैत्तिरीय आरण्यकात (२ १०) सागितले आहे

**कल्पनेचा विकास –** ऋग्वेदात देवयज्ञ व पितृयज्ञ या दोनच यज्ञाचा उल्लेख येतो त्या दोहात पितृयज्ञाला अधिक महत्त्व दिले जात असावे महाभारतातही त्या अर्थाची वचने आहेत उदा०–

**देवकार्यादपि मुने पितृकार्य विशिष्यते ।**

(म भा शाति ३३९ ५६)

अर्थ– हे मुने, देवकार्यापेक्षाही पितृकार्य अधिक महत्त्वाचे आहे

या दोन यज्ञान्या द्वारे पितृऋण व देवऋण यातून मुक्ती सागितल्यावर आर्यांनी तिसऱ्या ऋषिऋणाची कल्पना प्रस्थापित केली हे ऋषी प्राय वेदपारगत ब्राह्मण असून अध्ययन– अध्यापन व यजन याजन याचा भार या ऋषीवर होता त्यामुळे समाजात त्याची हळूहळू प्रतिष्ठा वाढत गेली व ते देव पितराच्या बरोबरीचे मानले जाऊ लागले त्याच्याचसाठी मग ब्रह्मयज्ञाची योजना झाली म्हणूनच पचमहायज्ञातले हे तीन यज्ञ प्रमुख म्हणून सागितले आहेत

त्यापुढे संस्कृतीच्या विस्तारात आर्यांचा दृष्टिकोन अधिक व्यापक बनला मग या वरील तिहीच्या जोडीला भूतयज्ञ व मनुष्ययज्ञ हे आले त्याच्या योजनेने आर्यांनी समस्त प्राणिमात्राविषयी आपले औदार्य प्रगट केले पचमहायज्ञकल्पनेचा हा विकास शतपथ ब्राह्मणाच्या कालापर्यंत पूर्ण झाला असे दिसते कारण तियेच पहिल्या प्रथम ' पञ्च एव महायज्ञा ' असा उल्लेख येतो [ भा सा इ , व का स , हि ध आ ]

## पंचमहाशब्द

पाच वाद्याच्या ध्वनीला हा शब्द वापरतात ही पाच वाद्ये अशा– (१) शृग ( शिंग, कर्णा), (२) रोगट (ताशा) (३) शख, (४) भेरी (नगारा) व (५) जयघटा (तास, घडचाळ ) बाणभट्टाच्या मते– (१) पटह (नगारा) (२) नादी (झाझ), ( ) कुज, (४) काहळ व (५) शख राजाची स्वारी निघाली म्हणजे, ही वाद्ये त्याच्या पुढे वाजवली जात इतराना ती वाद्ये वापरण्याचा अधिकार नसे [ म ज्ञा को ]

## पंचमी

तिथिविशेष शुक्ल-कृष्ण पक्षातल्या पाचव्या तिथीला पचमी म्हणतात ती चद्राची पचम कलाक्रियारूप असते हिला पूर्णा असे दुसरे नाव आहे ही शुभ तिथी मानली आहे वर्षातल्या काही पचमी तिथी प्रसिद्ध आहेत, त्या अशा– नागपचमी (श्रावण शुक्ल पक्ष), ऋषिपचमी– (भाद्र शुक्ल पक्ष), ललितापचमी– (आश्विन शुक्ल पक्ष), पाडव पचमी– (कार्तिक शुक्ल पक्ष), वसत पचमी– (माघ शुक्ल पक्ष) व रगपचमी– (फाल्गुन कृष्ण पक्ष)

वरील तिथीची ग्रथे वार्षिक व्रतोत्सव सागणाऱ्या ग्रथात दिलेली असतात पचमीच्या दिवशी विशेषेकरून लक्ष्मीपूजेचे विधान सागितलेले आहे

पचमी तिथीला जन्माला आलेला मनुष्य सदर, विद्वान, गुणी व राजमान्य होतो, असे कोष्ठीप्रदीपात सागितले आहे

## पंचमीव्रत

एक काम्य व्रत हे मुख्यत्वे स्त्रियाचे व्रत आहे माघ शुद्ध पचमीला या व्रताचा प्रारभ करतात व पुढे प्रत्येक शुक्ल पचमीला ते करतात व्रतावधी सहा वर्षे व्रताच्या दिवशी विष्णुलक्ष्मीची पूजा करून तीळ व लाह्या याचे हवन करतात उद्यापनाच्या वेळी यथाशक्ति गोदान, शय्यादान, सुवर्णदान, इ सहा दाने व दक्षिणा देतात फल– सुख, सौभाग्य व विष्णुलोक याची प्राप्ती

या व्रताचा दुसरा प्रकार आहे, तो असा– प्रारभ मार्गशीर्ष शुद्ध पचमीला करून, एक वर्षभर प्रत्येक महिन्यात शुद्ध पचमीला लक्ष्मीची भिन्न नावाना पूजा करतात त्यासाठी लक्ष्मीची निरनिराळ्या धातूची किंवा काष्ठाची मूर्ती किंवा वस्त्रावर काढलेले चित्र घेतात सौभाग्यवती स्त्रियाना भोजन देतात उद्यापनाच्या वेळी तादूळ व तूप यानी भरलेली पात्रे व पूजेची मूर्तीही दान देतात [ श क , हि ध ]

## पंचमुखी शिव

पाच मुखाचा शिवमूर्ती ही पाच मुखे म्हणजे पृथ्वी, आप, तेज, वायू व आकाश या पच महाभूताची प्रतीके होत या पचमुखाना महादेव (पूर्वेचे), भैरव (दक्षिणेचे), नदिवक्त्र (पश्चिमेचे), उमावक्त्र (उत्तरेचे) व सदाशिव (वरचे) अशी नावे आहेत सदाशिव मुखाला ईशान असेही म्हणतात पूर्वेच्या महादेवमुखाला तीन नेत्र असतात ते तीन नेत्र म्हणजे सूर्य, चद्र व अग्नी होत त्याच्या दशभुजा म्हणजे दहा दिशा होत भैरवाच्या दोन हातातील गदा व महालुग ही मृत्यू आणि परमाणू (विश्वबीज) याची प्रतीके होत नदिवक्त्राच्या हातातील चर्म व त्रिशूल ही व्यक्त व अव्यक्त द्रव्याची प्रतीके होत उमावक्त्राच्या हातातील आरसा व कमळ ही ज्ञान व वैराग्य याची प्रतीके होत महादेवाचा जटाभार हे ब्रह्माचे, मस्तकावरील चद्रकोर हे ऐश्वर्याचे, वासुकी नाग हे दैवी कोपाचे, ठिपके असलेले व्याघ्रचर्म हे वासनेचे आणि नदी हे दिव्य धर्माचे प्रतीक होय पचमुखी शिवलिंगेही काही ठिकाणी आढळतात त्यात सद्योजात, वामदेव, अघोर, तत्पुरुष व ईशान

या शिवाच्या पाच रूपाचा अनभाव होतो कुशाण व गप्त काळात अशी लिंगे निर्माण झाली [ ु हिं इ , ह च रा अ ]

**पचमुद्रा** पूजाविधीतील पाच मुद्रा फुलाने भरलेल्या ओज ळीला आवाहन मुद्रा असे म्हणतात हीच ओजळ पालथी केली, की ती स्थापनी मुद्रा होत हाताची मूठ वळून आगठा वर उचलल्याने सान्निधापनी मुद्रा होते आगठा मुठीत घातला, की ती गरोधनी मुद्रा होते दो ही मुठी उताण्या धरल्या की समुखी मुद्रा होते [ श क ]

**पंचमूर्तिव्रत** एक काम्य व्रत चत्र शुद्ध पचमीला व्रतारभ करून, पुढे प्र यक महि याच्या पचमीला हे व्रत करतात व्रतावधी एक वर्ष व्रतदिनी उपवास करतात चदनाने एक वतुळ काढून त्यात शख, चक्र, गदा, पद्म व प ची याच्या आकृती काढून, त्याची पूजा करतात उद्यापनाच्या वेळी निर निराळ्या रगाची पाच वस्त्रे दान देतात फल – राजसूय यज्ञ केल्यामुळे लाभणारे पुण्य [ हि ध ]

**पचरक्षामंडळ** पाच बौद्ध दवताचा समूह या पाच देवताची नावे अशी– (१) महाप्रतिसरा, (२) महा साहस्रप्रमर्दिनी, (३) महामन्त्रानुसारिणी, (४) महामायूरी व (५) महासितवती या पाचही महादवता मिळून एक मडळ बनवतात

मडळाच्या मध्यभागी महाप्रतिसरा असत हिचे मूर्तिध्यान असे – गौर वर्ण सोळा वर्षांची वज्रपर्यकासनावर अधिष्ठित अष्टभुज चतुर्मुख त्रिनत्र, वज्र, पाश व त्रिशूल ही आयुध धारण करणारी मुकुटावर चत्य व बोधिवृक्षाचे पान

महाप्रतिसरेच्या पूर्वेस महामाहस्रप्रमर्दिनी असते हिचे मूर्ति ध्यान असे–नीलवर्ण चतुर्मुख अष्टभुज भीषण मुद्रा गळ्यात मुडमाला केस ज्वालेसारखे वर उडणारे पायाखाली भूत पिशाच हातात वज्र, अकुश, इ आयुधे आणि मस्तकावर वट वृक्षाचे पान

पश्चिमेस महामन्त्रानुसारिणी हिचे मूर्तिध्यान असे–त्रिमुख त्रिनेत्र अष्टभुज वास्तव्य सूर्यमडलात धनुष्य, बाण, इ आयुधे धारण करणारी मस्तकावर शिरीषाचे पान

दक्षिणेस महामायूरी हिचे मूर्तिध्यान पुढीलप्रमाणे–पशूवर बसलेली त्रिमुख त्रिनेत्र अष्टभुज रत्नपात्र, चक्र, इ वस्तू धारण करणारी मस्तकावर अशोकाचे पान

उत्तरेस महासितवती हिचे मूर्तिध्यान असे– हरितवर्ण त्रिमुख त्रिनत्र षड्भुज वज्र, धनुष्य, इ आयुधे धारण करणारी सूर्यमडळात वास्तव्य आणि मस्तकावर चाफ्याचे पान असत

या पाचही देवता पाच भागी बुद्धाशी सलग्न आहेत महा यान पथातील लोकात त्याच्या विषयी विशेष आदर आहे प्रत्येक महायानी बौद्ध भिक्षु सोन्याच्या किंवा रुप्याच्या पत्र्यावर त्याची चित्रे काढून घेऊन तो पत्रा आपल्याजवळ बाळगतो नेपाळ मधल्या सर्व विहारातून त्याच्या मूर्ती असतात याच्या उपासनेने समृद्धी प्राप्त होते, रोगनिवारण होते आणि अपघात टळतात, अशी बौद्धाची समजूत आहे [ इ बु इ ]

**पंचलागल** एक महादान याचा विधी असा– चदनाचे आणि सुवर्णाचे पाच पाच नागर तयार करावे त्याना तसलेच दहा बल शृगारून जोडाव पायस, समिधा व ताळ याचा होम करावा नतर नागराची पूजा करून ते नागर बला सह ब्राह्मणदपतीला दान द्यावे या दानाबरोबरच काही जमी नही दान द्यावी शिवाय सोन्याची साखळी, अगठी, बागड्या व रेशमी वस्त्र या वस्तू ब्राह्मणस्त्रीला दान द्याव्या फल – पापनाश व शिवलोकप्राप्ती [ हि ध , श क ]

**पंचवटी** एक पुण्यक्षेत्र हा नासिक क्षेत्राचाच एक भाग आहे गोदावरीच्या उत्तर तीरावरील शहराला पच वटी म्हणतात पचवटीत अनेक मदिरे आहेत **पाहा** – नासिक

**पंचवाक्य पुण्याहवाचन** सक्षिप्त पुण्याहवाचनात पुढील पाच वाक्ये उच्चारून यज मानाला आशीर्वाद देतात (१) अस्तु पुण्याहम । (२) आयु ष्मते स्वस्ति । (३) कर्म ऋध्यताम् । (४) अस्तु श्री । (५) अस्तु कल्याणम् । **पाहा**– पुण्याहवाचन

**पंचशारदीय** एक याग प्रत्येक वर्षाच्या शरदऋतूत हा याग करतात पाच वेळा हा याग केला म्हणजे पच शारदीय याग होतो मरुत ही या यागाची प्रधान देवता आहे पहिल्या यागात एकेका वर्षाच्या सतरा कालवडी व तितकेच खोड मरुताना अर्पण करतात त्यातले खोड सोडून देतात आणि कालवडी मारून त्याचा याग करतात पाचव्या वर्षी ओळीने पाच दिवस अग्निष्टोम, उक्थ्य, उक्थ्य उक्थ्य व अतिरात्र हे पाच सोमयाग निरनिराळ्या स्तोम पद्धतीने करतात त्यापकी पहिल्या चार यागात प्रत्येकी तीन आणि पाचव्या यागात पाच पशु मारायचे असतात हे पशू म्हणजे सतरा कालवडीच होत या वेळीही खोड तेवढे सोडून दतात ब्राह्मण व क्षत्रिय यानाचा फक्त हा याग करण्याचा अधिकार आहे [ म ज्ञा को ]

**पंचशिख** साख्य दर्शनाचा एक प्राचीन आचार्य हा पराशर गोत्री होता याच्या आईचे नाव कपिला असे होते त्यावरून त्याला कापिलेय असेही नाव पडले होते याला पचकोशाचे पूर्ण ज्ञान होते आणि त्यांबाहेर असणारे ब्रह्म, हा शिखेप्रमाणे जाणत असल्यामुळे याला पचशिख म्हणू लागले, अशी याच्या नावाची व्युत्पत्ती सागतात हा आसुरीचा शिष्य होता व ब्रह्मनिष्ठही होता कपिलाचे षष्टितत्र त्याने आसुरीकडून मिळवले व ते जनक, वसिष्ठ, इ शिष्याना पढवून त्याचा लोकात प्रसार केला

साख्यदर्शनात कपिलाला ब्रह्मदेवाचा अवतार मानतात, तर पचशिखाला कपिलाचा अवतार मानतात हा चिरजीव होता याने एक हजार वर्षेपर्यत मानसयज्ञ केला होता याच्या अगी ऊहापोह शक्ती होती आणि पाचरात्र नामक यज्ञात तो निष्णात होता असे महाभारतात म्हटले आहे (शाति २१८)

मिथिलेच्या जनदेव नामक जनकाच्या राजसभेत, शभर आचार्य जमून मरणोत्तर स्थिती व गती याविषयी चर्चा करीत होते त्याच्याकडून निरनिराळी मते प्रतिपादिली जात होती चर्चेचा पुष्कळसा भर श्रुतिशास्त्राच्या वचनावरच होता जम लेल्या मडळीत काही पाखडीही होते ते नास्तिक्यवाद प्रतिपादीत होते एवढ्यात पचशिख हा आचार्य तिथे प्रविष्ट झाला चालू चर्चेत भाग घेऊन त्याने आपल्या युक्तिवादाने तिथे जमलेल्या शभरही आचार्यांना कुठित केले त्याच्या सूक्ष्म बुद्धिमत्तेवर जनक राजा खूष झाला आणि त्याने त्या शभरांचा नाद सोडून पच-शिखाची कास धरली मग त्याने पचशिखाला प्रश्न विचारून त्याच्याकडून मोक्षशास्त्र समजून घेतले पचशिखाने जनकाला जे तत्त्वज्ञान उपदेशिले, त्याचे सार असे –

मानवी प्राणी हा शरीर, इंद्रिये आणि मन याचा समुदाय आहे मानवदेह पचधातूचा बनला आहे हे पाच धातू स्वभाव-तच एकत्र येतात आणि स्वभावतच विलग होतात शब्द स्पर्शादी पाच विषय व इंद्रियमनोयुक्त शरीर हे सहा गुण ज्ञान सिद्धीकरिता आवश्यक आहेत बुद्धी ही एक परमोच्च सजी वनी शक्ती असून, तिच्या योगानेच निश्चित तत्त्वदर्शन होते आत्म्याशिवाय जे जे काही आहे, ते ते सर्व अनात्म आहे आणि तेच दुखसततीचे अधिष्ठान आहे, हे ज्याला समजले त्याचे दुख नष्ट होते त्यासाठी आत्मानात्मविवेक करणे, हाच उत्तम विचार आहे सर्व दुखातून मुक्त होण्याचा मार्गही ताच

वर जे सहा गुण सांगितले, त्याच्या समुदायाला क्षेत्र असे म्हणतात शरीरातील मनाच्या ठिकाणी जो भाव प्रकट होतो, तो क्षेत्रज्ञ होय या क्षेत्रज्ञालाच जीवात्मा असे म्हणतात क्षेत्रज्ञ हा मूळ स्वरूपात शुद्ध आत्मा असल्यामुळे देहविनाशानतर क्षेत्रज्ञ नष्ट होतो असे म्हणणे युक्त नव्हे त्याचप्रमाणे देहनाशा बरोबर क्षेत्रज्ञही दृष्टीआड होत असल्यामुळे तो शाश्वत आहे, असे म्हणणेही युक्त नव्हे जीव देहातून निघून गेल्यावर आणि मूळ आत्मस्वरूपात मिसळून गेल्यावर त्याला सज्ञा तरी कुठली राहणार ? हे जो जाणील व गुणसमुदायाहून वेगळ्या अशा शुद्धस्वरूपी आत्म्याचा जो शोध घेईल तो अनिष्ट कर्मफला पासून व सर्व दुखापासून मुक्त होईल (म भा शाति २१९)

पचशिखाच्या तत्त्वज्ञानाचे नेमके स्वरूप सागताना श्री दि वे केतकर पुढीलप्रमाणे विवेचन करतात–

पचशिख हा अद्वैती आत्मवादी नव्हता, तर साख्य विचार सरणीचा आत्मवादी होता तो आत्मा व अनात्मा असे द्वद्व मानतो अनात्म्याच्या क्षेत्रात तो देहाची भौतिक घटना, बुद्धी, मन, सुखदुखादी मानसिक सवेदना ही सर्व अतर्भूत करतो व आत्मा हा केवळ निर्गुण निर्लेप, अलिंग मानतो उत्तरकालीन परिनिष्ठित साख्यदर्शनाची मूळ बीजे त्याच्या विचारसरणीत आढळून येतात उत्तरकालीन साख्यदर्शनात प्रकृती या तत्त्वात जो कल्पनाव्यूह गृहीत धरला आहे, तत्सदृश कल्पना व्यूह पच शिखाच्या अनात्मन किंवा गुणसमाहार या तत्त्वात गृहीत धर लेला दिसून येतो उपनिषदात याज्ञवल्क्याने 'अतोऽ यदार्तम्'= आत्म्याशिवाय इतर सर्व दुखग्रस्त व विनाशी आहे, असे जे प्रतिपादन केले, त्याचेच अधिक तपशीलवार विवेचन पचशिखाने केलेले असून, विशेष म्हणजे आत्मा व अनात्मा या द्वद्वावर त्याने अधिक भर दिला आहे उत्तरकालीन साख्यदर्शन अनेक पुरुष मानते पण पचशिख एकच आत्मा मानतो पचशिखाच्या तत्त्वज्ञानाचा भर मुख्यत 'सम्यक मन' ( = चागला, योग्य विचार ) यावर आहे शुद्ध आत्म्याशिवाय बाकी सगळा अना त्मा हा गुणसमाहार नाशिवत व दुखकारक असून, या गुण समाहारालाच आत्मा मानणे असम्यक दर्शन होय, तेच आपल्या दुखसततीचे मूळ होय आणि आत्मा व अनात्मा असा सम्य ग्दर्शनजन्यविवेक चित्तात बाणवणे हाच मोक्षाचा मार्ग होय, असा पचशिखाच्या तत्त्वदर्शनाचा गाभा सागता येईल

पचशिखाचा कोणताही सपूर्ण ग्रथ उपलब्ध होत नाही त्याची यत्रतत्र विखुरलेली वचने व त्याच्या नावाचे उल्लेख मात्र आढळ तात त्याचे मत पातजल योगसूत्रावरच्या व्यासभाष्यात उद्धृत आहेत वाचस्पतिमिश्राने ते दाखवून दिले आहेत साख्यका रिकेवर युक्तिदीपिका नावाची जी व्याख्या आहे, तिच्यातलेही अनेक सदर्भ पचशिखाचे असावे, अशी प उदयवीर शास्त्री याची धारणा आहे साख्यसप्ततीच्या अन्य व्याख्या व साख्यविषयक इतर ग्रथ यामधलेही नित्येक सदर्भ पचशिखाचे मानले पाहिजेत, असेही त्याचे मत असून, त्यानी अशा अनेक सदर्भांचे सकलन

करून दाखविले आहे [प्रा च को , सा द इ , श्री दि वे नेडेंकर– नवभारत, जा १९५९ ]

**पचशील** बौद्ध धर्मातली एक सज्ञा शील याचा मुख्य अर्थ सद्वर्तन असा आहे जगातल्या सर्व धर्मांनी सद्वर्तना बद्दल आवर्जून सांगितले आहे मानवी व्यवहार सुरळीत चाल्यचे असतील आणि व्यक्तीलाही आपले अंतिम श्रेय साध्य करायचे असेल, तर शील किंवा सद्वर्तन ही पहिली आवश्यक गोष्ट ठरते बुद्धाने तर ती धर्माज्ञाच ठरवली आणि विशिष्ट नीतिनियम शील या सज्ञेने प्रत्येक बौद्धाला आवश्यक केले 'सील यावजरा राभु ' = शील हे वार्धक्यापर्यंत यावज्जीव भले आहे, असे बुद्धाने म्हटले आहे (सयुक्त निकाय १ ६ १) त्यानतरच्या बौद्ध आचार्यांनीही शीलाचे माहात्म्य अनेक प्रकारे प्रतिपादिले आहे शील सर्व सपदाचे मूळ आहे व शील अगी बाणवले तरच सर्व साधना सफल होतील, असे बुद्धघोषाने म्हटले आहे (विसुद्धिमग्ग) ' सील किरेव कल्याण सील लोके अनुत्तर ' = शील पालन हे सर्वदा कल्याणकारी असून, शील हेच लोकात श्रेष्ठ आहे, असे जातकात सांगितले आहे

बुद्धाने शील या सज्ञेने जे पाच अवश्य पालनीय नियम सांगितले, ते पचशील या नावाने प्रसिद्ध आहेत त्यांची नावे अशी–

(१) जीवहिंसा न करणे, (२) चोरी न करणे, (३) कामोपभोगासाठी व्यभिचार न करणे, (४) खोटे न बोलणे व (५) मादक द्रव्याचे सेवन न करणे

ही पचशीले बुद्धाने मुख्यत गृहस्थ बौद्धासाठी सांगितली आहेत बौद्धदीक्षा घेतेवेळी ती प्रतिज्ञारूपाने स्वीकारायची असत

याशिवाय आणखी पाच शीले बुद्धाने विशेषत भिक्षूसाठी सांगितली आहेत, ती अशी –

(१) नियत वेळेवाचून आहार न घेणे, (२) नाचगाण्यात भाग न घेणे व नाटक तमाशा न पाहणे, (३) फुले अलकार, इ नीच्या वस्तूपासून दूर राहणे, (४) उच्च शय्या न वापरणे व (५) सोन्या–चादीची अभिलाषा न धरणे

ही दहा मिळून बुद्धाची दशशील होतात पचशील व दशशील पाळणारा माणूस खात्रीने निर्वाण मिळवील, असे त्याने सांगितले आहे बौद्ध धर्माबरोबरच ही दोन्ही पचशीले बृहत्तर भारतात फैलावली

पचशील ही कल्पना केवळ धर्मकारणापुरतीच मर्यादित न ठेवता आधुनिक राजकारणातही तिचा उपयोग करावा, ही कल्पना सर्वप्रथम इडोनेशियाचे डा सुकार्ण याच्या मनात उद्भूत झाली इडोनेशिया हा देश डचाच्या आधिपत्याखाली होता दुसऱ्या महायुद्धात जपानने त्यावर चढाई करताच डचाना तिथून पळ काढावा लागला मग तीही वर्ष इडोनेशिया जपानच्या सत्तेखाली राहिला पुन्हा इडोनेशियन राष्ट्रवाद्यानी गनिमी काव्याने व अमेरिकन फौजाच्या मदतीने जपानी लोकाना इडोनेशियामधून हुसकून लावले जपानी लोक गेल्यावर डच लोक पुनश्च त्या देशावर हक्क सागायला पुढे आले त्या वेळी इडोनेशियन जनता डॉ सुकार्ण याच्या नेतृत्वाखाली डचाशी स्वातत्र्ययुद्ध लढण्यास सज्ज झाली या स्वातत्र्ययुद्धाचे रणशिंग फुकताना १ जून १९४५ रोजी डा सुकार्ण यानी जे ऐतिहासिक भाषण केले, त्यात त्यानी पहिल्या प्रथम पचशील या सज्ञेचा उदघोष केला त्यानी ज्या पचशीलाची घोषणा केली ती पचशीले अशी –(१) राष्ट्रवाद, (२) मानवता, (३) स्वातत्र्य, (४) सामाजिक न्याय व (५) परमेश्वरावर श्रद्धा ठेवून स्वातत्र्याचा प्रयत्न

आतरराष्ट्रीय क्षेत्रात पचशील हे नवीन तत्त्व आहे प नेहरू हे त्याचे उद्गाते आहेत १९५४ साली चीनचे प्रधानमत्री श्री चाऊ एन लाय भारतात आले असता नेहरूंची व त्याची तिबेट व अन्य राजकीय प्रश्न यावर चर्चा झाली त्यानतर त्या दोघाचे जे सयुक्त पत्रक प्रसिद्ध झाले, त्यात आतरराष्ट्रीय शातीसाठी व स्थैर्यासाठी पचशील हा शब्द उपयोजिला गेला त्या सज्ञेत पुढील पाच शीलाचा अतर्भाव आहे –

(१) परस्पराच्या प्रादेशिक एकात्मतेचा व सार्वभौमत्वाचा परस्परानी मान ठेवावा

(२) एकाने दुसऱ्यावर आक्रमण करू नये

(३) एकमेकाच्या अतर्गत कारभारात ढवळाढवळ करू नये

(४) परस्परानी एकमेकाची समानता व हित साभाळावे

(५) शाततायुक्त सहजीवन उपभोगावे

यातले पाचवे शील सर्वांत महत्त्वाचे आहे तो आधीच्या चाराचा पायाच आहे शाततायुक्त सहजीवनावर श्रद्धा असली, तरच बाकीची शीले आचरणात येण्याची शक्यता असते

आतरराष्ट्रीय पचशीलाची ही घोषणा झाल्यानतर प्रारभीच भारत, चीन, रशिया, इडोनेशिया, ब्रह्मदेश, व्हिएटनाम, इडोचायना व युगोस्लाविया या देशानी या पचशील सिद्धाताचा स्वीकार केला त्यानतर बाडुग सभेलनात आशिया–आफ्रिकेतल्या २४ राष्ट्रानी त्याला मान्यता दिली इ स १९६४ साली सयुक्त अरब प्रजासत्ताकाच्या राजधानीत तटस्थ राष्ट्राचे जे सभेलन भरले त्यात भारताचे प्रधान मत्री क लालबहादुर शास्त्री यानी पचशीलाचा सिद्धात प्रभावी भाषेत माडला आणि त्याला सभेलनाने मान्यता दिली

पचशील हा शेवटचा शब्द नाही, तो केवळ शुभारभ आहे जागतिक शातता चिरस्थायी करण्यासाठी पोषक वातावरण

निमाण करणे, एवढीच पचशीलाची मर्यादित अपक्षा आहे पच-शील हा भारताच्या परराष्ट्रीय धारणाचा विषय आहे, असे काही लोक म्हणतात पण तसे म्हणण्यापेक्षा जागतिक शांतता टिकविण्यासाठी भारताने टाकलेले ते एक पहिले पाऊल आहे, असे म्हणणे अधिक सयुक्तिक ठरेल

वैयक्तिक जीवनात बुद्धाचे पचशील, राष्ट्रीय जीवनात डॉ सुकर्ण याचे पचशील व आतरराष्ट्रीय राजकारणात प नेह-रूचे पचशील या तीहींनाही त्याच्या त्याच्या क्षेत्रात फार महत्त्वाचे स्थान आहे [श्री नारायण य डाळे—नवभारत, जाने १९५६, हि वि को , बु अ उ ]

**पंचश्रुतज्ञानव्रत** एक जैन व्रत हे व्रत पूर्ण होण्यास ३३६ दिवस लागतात या व्रतकाळात १६८ उपवास व १६८ पारणा होतात एक उपवास, एक पारणे या अनुक्रमाने हे व्रत करतात त्यात 'ओम ह्री पचश्रुतज्ञानाय नम ' या मत्राचा त्रिकाल जप करतात [ जै व्र वि स ]

**पंचसखा** ओडिसातील पाच वैष्णव कवींची राज्ञा बलराम दास, जगन्नाथदास, अच्युतानन्ददास यशोवतदास व अनतदास अशी त्याची नावे आहेत हे पाचही कवी इ स च्या १६ व्या शतकातले व चैतन्यप्रभूचे शिष्य होते याच्या विचारात व भक्तिविषयक कल्पनेत इतके साम्य होते, की एकाच नदीचे पाच प्रवाह असावे अथवा एकाच झाडाच्या पाच फाद्या असाव्या, तसे त्याच्याविषयी लोकाना वाटे म्हणून त्याना पचशाखा असे नाव पडले त्याचेच पुढे पचसखा असे रूप रूढ झाले उत्कल प्रातात राजा प्रतापरुद्र याने या पाचही कवींची कठीण परीक्षा घेऊन मग त्याचा गौरव केला होता

या पाचात बलरामदास वयाने ज्येष्ठ होता त्याचा जन्म इ स १४७२ मध्ये झाला ज्ञानमिश्रा व योगमिश्रा अशा भक्तीने त्याने सिद्धी मिळवली होती जगमोहन रामायण, श्रीमद्भग वद्गीता, वेदान्तसार, वट अवकाश, कात कोइली, ब्रह्माड भूगोल, इ त्याचे ग्रथ आहेत त्याचे जगमोहन रामायण ओडि सात खूप लोकप्रिय आहे

जगन्नाथाने बलरामदासाकडून दीक्षा घेतली होती जगन्ना थाचा जन्म इ स १४९० मध्ये झाला जगन्नाथाने प्रवर्तित केलेला सप्रदाय अतिबडी या नावाने प्रसिद्ध आहे यान भाग वत दीक्षा सवाद, गुप्त भागवत, गजस्तुती, इ अनेक ग्रथ लिहिले या सर्वांत त्याच्या भागवताला सवश्रेष्ठ स्थान लाभले आहे

अच्युतानददासाचा जन्म इ स १५०३ मध्ये कटक जिल्ह्या-तील तल्काणा या गावी झाला याच्या पित्याचे नाव दीनबधू खुटिया व आईचे नाव पद्मावती होते वयाच्या ११ व्या वर्षीच त्याला गीता भागवत, मत्रतत्र, इ विषयाचे आपोआप ज्ञान झाले यान नित्यानद महाप्रभूकडून दीक्षा घेतली हा स्वत सिद्धयोगी असून गगेपासून गोदावरीपर्यतच्या प्रदेशातील गोपाल वर्गाचा दीक्षागुरू होता याने लहान मोठे मिळून एक लाख धर्मग्रथ लिहिले, अशी आख्यायिका आहे त्यात ३६ सहिता, ७८ गीता, २७ वशानुचरितसहित हरिवश, १६ उपवश, १०० मालिका व अनेक लहान मोठी भक्तिकाव्ये याचा समावेश आहे ओडिसातील शेकडो लोक त्याचे शिष्य बनले होते

यशोवतदास हा या मालेतील चौथा कवी होय इ स १४९२ च्या सुमारास याचा जन्म झाला हा सस्कृत भाषेचा पण्डित होता याच्या ग्रथात स्वरोदय, प्रेमभक्ती, ब्रह्मगीता, गीत गोविंद, इ ग्रथ विशेष प्रसिद्ध आहेत

अनतदासाचा जन्म इ स १४९३ मध्ये झाला याच्या पित्याचे नाव कपिल महाती व मातेचे नाव गौरी होते याची अनेक भजने, चउतिशा, उदय बाखर, छन बाखर, टीका बाखर, इ साहित्य प्रसिद्ध आहे हेतूदय भागवत हा याचा सवश्रेष्ठ ग्रथ होय

चैतन्य प्रभूच्या प्रेरणेने उत्कल प्रातात वैष्णव धर्माची जी एक जोरदार लाट उसळली, तोच धर्म पचसखानी घरोघर पोचवला

इ स च्या १६ व्या शतकात उत्कल प्रातावर वैष्णव, बौद्ध व तात्रिक अशा तीन्ही सप्रदायाचा प्रभाव होता या पाच कवींचा पचसखाधर्म हा वरील तीन्ही सप्रदायातल्या विचार धारानी बनलेला आहे त्याच्यावर मुख्यत्व महायानी पथ व नाथ पथ याचा प्रभाव आहे पचसखानी आपल्या धर्माच्या प्रचाराथ उडिया भाषेतून ग्रथ रचले व आपले तत्त्वज्ञान सामान्य जनतेपर्यत पोचवले

पचसखाचा हा वैष्णव धर्म उदार होता त्याला जाती पातीचे बधन नव्हते मूर्तिपूजा, तीर्थयात्रा, मत्रतत्र या गोष्टीना या धर्मात स्थान नसून, अत शुद्धी हीच महत्त्वाची बाब आहे

पचसखाच्या मते परमात्मा किंवा महाविष्णू म्हणजे निरा कार शून्य पुरुष असून, त्यानेच सर्व विश्व निर्माण केले तो साकार होऊन राम कृष्णाचे रूप धारण करतो त्याचप्रमाणे त्याच्या दृष्टीने राधा जीव असून श्रीकृष्ण परमात्मा आहे पच सखाधर्मात वैष्णव, तात्रिक व बौद्ध या तीन्ही पथाचा समन्वय करण्याचा प्रयत्न आहे [उ सा इ , हि ओ लि , मा रा ]

**पंचसूना** ज्या ठिकाणी प्राणिहिंसा होण्याची शक्यता असते, अशी घरातील पाच स्थाने पचसूना या नावाने ओळखली जातात ती स्थाने अशी

कण्डनी पेषणी चैव चुल्ली कुम्भी च मार्जनी ।
पञ्चसूना गृहस्थानां ताभिः स्वर्गं न विन्दति ।।

अर्थ – उखळ, पाटावरवंटा, चूल, भरलेले घडे ठेवण्याची जागा व केरसुणी या पंचसूना होत. गृहस्थाच्या घरी वरील पाच जागी हिंसा घडत असल्यामुळे गृहस्थाला स्वर्गप्राप्ती होत नाही. हा दोष दूर होण्यासाठी गृहस्थाने दररोज पंचमहायज्ञ केले पाहिजेत, असे शास्त्रवचन आहे ( मनु. ३.६९ ) [ आचारेंदु ]

**पंचस्कंध** बौद्ध दर्शनातली एक संज्ञा. स्कंध शब्दाचा अर्थ समुदाय असा आहे. बुद्धाने आत्म्याच्या स्वतंत्र सत्तेचा निषेध केला असला, तरी तो मन व मानसिक वृत्ती यांची सत्ता मानतो. मानसिक व्यापाराच्या द्वारेच आत्म्याची जाणीव होऊ शकते. बुद्धाने आत्मा हा पाच स्कंधांचा केवळ संघात ( समुदाय ) मानला आहे. रूप, वेदना, संज्ञा, संस्कार व विज्ञान अशी त्या पाच स्कंधांची नावे आहेत. वस्तुतः प्रत्येक जीव हा नामरूपात्मक आहे. रूप म्हणजे शरीराचे भौतिक अवयव आणि नाम म्हणजे मानसिक प्रवृत्ती होय. जेव्हा शरीर व मन यांचा परस्पर संयोग होतो, तेव्हा मानव व्यक्त स्थितीत येतो. रूपाच्या पुढचे चार स्कंध हे नामाचेच चार विभाग होत. या पाचही स्कंधांचे निरूपण पुढीलप्रमाणे –

**रूपस्कंध** – रूप शब्दाच्या दोन व्याख्या आहेत– ( १ ) ' रूप्यन्ते एभिर्विषया ' = ज्यांच्या द्वारा विषयांचे रूपण केले जाते ते रूप होय. इंद्रिय ही रूपस्कंधात येतात. ( २ ) ' रूप्यन्ते इति रूपाणि ' = रूपित केली जातात ती रूपे होत. विषयांना रूप अशी संज्ञा आहे. विषयासह इंद्रिय आणि शरीर ही यांनी मिळून रूपस्कंध होतो.

**वेदनास्कंध** – बाह्य वस्तूचे ज्ञान झाल्यानंतर त्याचा चित्तावर जो प्रभाव पडतो, त्याला वेदना असे म्हणतात. ही वेदना सुख, दुःख व नसुख-नदुःख अशी त्रिविध असते. वस्तूंच्या स्पर्शाने होणारी चित्ताची वरील त्रिप्रकारात्मक अवस्था वेदनास्कंध समजली जाते.

**संज्ञास्कंध** – वरील सुखदुःखात्मक वेदनेच्या आधारे मनुष्य वस्तूचे यथार्थ ग्रहण करण्यास समर्थ होतो व तो अनेक गुणांच्या आधारपरत्वे वस्तूचे नामकरण करतो. यालाच संज्ञास्कंध म्हणतात. विज्ञान व संज्ञा या दोहोंमधले अंतर नैयायिकांच्या निर्विकल्पक प्रत्यक्ष व सविकल्पक प्रत्यक्ष यांच्याप्रमाणे आहे. निर्विकल्पक प्रत्यक्षामध्ये वस्तूच्या विषयात एवढेच कळते, की ' यत्किञ्चिदिदम् ' = काहीतरी अस्पष्ट असे आहे. पण सविकल्पक प्रत्यक्षात नाम, जाती इत्यादींसह त्या वस्तूचे स्पष्ट ज्ञान होते. उदा०– ही गाय आहे, ती शुभ्र वर्णाची आहे व ती गवत खाते आहे. हे जे दुसरे सविकल्पक ज्ञान, तोच बौद्धांचा संज्ञास्कंध आहे.

**संस्कारस्कंध** – वाणी रागद्वेषादी मानसिक प्रवृत्तींचा समावेश असतो. यामुळे वस्तूचा परिचय होताच त्या वस्तूविषयी आपल्या मनात इच्छा किंवा द्वेष उदित होतो. रागादी क्लेश, मदमानादी उपक्लेश, त्याचप्रमाणे धर्म अधर्म हे सर्व या स्कंधात येतात.

**विज्ञानस्कंध** – ' अहमित्याकारो रूपादिविषय इंद्रियजो वा दण्डायमान ' = ' मी ' अशा आकाराचे ज्ञान, त्याचप्रमाणे इंद्रियजन्य रूपरसगंधादी विषयांचे ज्ञान ही दोन्ही ज्ञाने प्रवाहापन्न होतात, तेव्हा तो विज्ञानस्कंध होतो. बाह्य वस्तूचे ज्ञान आणि ' मी आहे ' असे आभ्यंतर ज्ञान या दोहोंचे ग्रहण विज्ञानस्कंधाच्या द्वारे होते.

स्कंधामध्ये संघटित आणि विघटित होण्याची क्षमता असते. ते एकत्र मिळतात, तेव्हा सर्व पदार्थांचा उद्गम होतो व ते विभक्त होताच त्या पदार्थाचा नाश होतो. [ बौ. द. मी. ]

**पंचांग** पाच अंगांनी युक्त, ते पंचांग होय. तिथी, वार, नक्षत्र योग व करण ही कालाची पाच अंगे आहेत. त्यांची माहिती कोष्टकरूपाने ज्या पुस्तकात दिलेली असते, त्याला पंचांग असे म्हणतात. कालगणना व कालनिर्देश हे पंचांगाचे प्रमुख कार्य होय. सूर्यचंद्रादी ग्रहांच्या गतीमुळे कालाची ही पाच अंगे निर्माण होतात. निरनिराळे ग्रह आकाशात कोणत्या क्षणी कुठे असतील, ते पंचांगावरून समजते आणि त्यावरून विविध कार्यांसाठी शुभाशुभ मुहूर्त ठरवता येतात. मूल जन्माला येते, त्या वेळची ग्रहस्थिती पाहून त्याचे भविष्य वर्तवता येते. नामकरण, उपनयन, विवाह, इ. संस्कार, गृहप्रवेश, शेतीची कामे, प्रवास, व्यापार, किंवा कोणतेही कार्य सुरू करण्यासाठी शुभ मुहूर्त पाहण्यासाठी पंचांगाचा उपयोग होतो.

प्राचीन काळी विविध प्रकारचे लहान मोठे यज्ञ केले जात. ते व्यवस्थित पार पडावे, म्हणून वेळापत्रकाची आवश्यकता निर्माण झाली. कालांतराने निरनिराळी व्रतवैकल्ये व उपवास करण्याची प्रथा सुरू झाली. कोणतेही कार्य विशिष्ट वेळी केले तर ते सफल होते किंवा त्याचे पुण्य लाभते, अशी श्रद्धा असल्यामुळे सूक्ष्म कालमापन करणे आवश्यक ठरले. वेदात दिवस, नक्षत्रे, ऋतू यांचा संबंध भिन्न भिन्न कृत्यांशी जोडलेला आढळतो. त्यातूनच पंचांगाची कल्पना साकार होत गेली. मात्र त्यातील सर्व अंगे एकदम प्रचारात आलेली नाहीत, क्रमाक्रमानेच त्यांचा एकत्र समावेश झाला. मानवाला ज्योतिषशास्त्राचे जसजसे अधिकाधिक ज्ञान होत गेले, तसतशी एकेका अंगाची भर पडत गेली. सनपूर्व १५०० च्या सुमारास तिथी व

नक्षत्रे ही दोनच अंग होती. कालांतराने वार व करणे ही अंगे प्रविष्ट झाली. योग हे अंग इ. स. च्या ७ व्या शतकात समाविष्ट झाले, असे शं. बा. दीक्षितांचे मत आहे. पुढे आवश्यकतेनुसार इतरही उपयुक्त माहिती पंचांगात देण्याची प्रथा सुरू झाली.

चांद्र मासाचे दोन भाग केलेले असतात, त्यांना पक्ष किंवा पंधरवडा म्हणतात. पंचांगाच्या एका पृष्ठावर एका पंधरवड्याची माहिती एकत्र दिलेली असते. वरच्या बाजूला शालिवाहन शक व विक्रम संवत यांचा निर्देश असून, ६० संवत्सरांपैकी चालू संवत्सराचे नाव, मासाचे नाव, शुक्ल किंवा कृष्ण पक्ष, नंतर इंग्रजी महिना व सन, उत्तरायण किंवा दक्षिणायन व ऋतूचे नाव दिलेले असते. त्याच्याखाली उभे रकाने असतात, त्यात प्रथम प्रतिपदादी तिथी व वार, मग त्या तिथींनी सूर्योदया-

| शके १८८९ प्लवंगनाम संवत्सर फाल्गुन कृष्णपक्ष शिशिर ऋतु | संवत् २०२४ सन १९६८ मार्च | उदयकाली स्पष्टग्रह सायन |
| --- | --- | --- |
| १ गु ३ २ उ ४ व्र ५ ४ धा १ ४९४ ३ कन्या ११ | फाल्गुनी पूर्णिमा [illegible] पश्चात् [illegible] | [illegible] |
| २ श ११ ह [illegible] धृ [illegible] तै २४ [illegible] | तुकाराम द्वितीया [illegible] | [illegible] |
| ३ मा [illegible] ३४ मा [illegible] वि [illegible] | संकष्ट चतुर्थी चंद्रोदय ९ वा ३४ मि [illegible] | [illegible] |
| ४ म [illegible] वि [illegible] गा [illegible] १८ | [illegible] पश्चात् [illegible] श्रीशिवजयंती | [illegible] |
| ५ [illegible] अ [illegible] तै [illegible] १९ | रंगपंचमी [illegible] | [illegible] |
| ६ [illegible] मनु [illegible] | [illegible] षष्ठी [illegible] | [illegible] |
| ८ [illegible] मू [illegible] | फाल्गुनी सायन सौर चैत्रमासारंभ | [illegible] |
| ९ गु [illegible] पू [illegible] तै [illegible] | [illegible] | [illegible] |
| १० शु [illegible] उ [illegible] मकर २३ | [illegible] पश्चात् [illegible] | [illegible] |
| ११ [illegible] श्र [illegible] मकर २४ | पापमोचनी ११ [illegible] पश्चात् [illegible] | [illegible] |
| १२ र [illegible] ध [illegible] कुंभ २ | | [illegible] |
| १३ स [illegible] श [illegible] २५ | भौमप्रदोष [illegible] | [illegible] |
| १४ बु [illegible] पू [illegible] मीन २६ | दिवरात्रि [illegible] | [illegible] |
| ३० गु [illegible] मीन २८ | दर्श [illegible] अमावास्या | [illegible] |

शुद्ध निरयन पंचांग

पासूनची घटी-पळे, नंतर अश्विनी, भरणी, इ. नक्षत्रांची आद्याक्षरे व त्यांची घटी-पळे. त्यानंतर विष्कंभ, प्रीती, इ. योगांची आद्याक्षरे व घटी-पळे. मग बव बालवादी करणे व त्यांच्या घटी असतात. त्यानंतर त्या त्या दिवसाचे दिनमान, मग क्रमाने पारशी, मुसलमानी व इंग्रजी तारखा आणि रविउदय व रवि अस्ताच्या वेळा दिलेल्या असतात. पुढे त्या दिवशी चंद्र कोणत्या राशीत आहे व पुढच्या राशीत किती घटका-पळांनंतर प्रवेश करणार आहे ते दिलेले असते. त्यानंतर त्या त्या दिवसाचे महत्त्व आणि त्या पक्षात घडणारी सूर्याची व मुख्य ग्रहांची संक्रमणे यांची माहिती असते. नंतर पानाच्या उजव्या बाजूच्या वरच्या कोपऱ्यात ग्रहांची पौर्णिमा किंवा अमावास्या या दिवसाची सूर्योदयाच्या वेळची स्थिती व दैनंदिन गती दर्शविणारे कोष्टक असते. त्यात स्थिती राशी, अंश, कला, विकला या पद्धतीने आणि गती, कला, विकला या पद्धतीने दिलेली असते. स्थिती सांगताना वारंवार राशी व अंश ही दोन अंगे घ्यावी लागतात. पण कोष्टकात केवळ अंकांनी दिलेला असतो व त्याच्या खाली अंशकलात्मक गती देतात. ग्रहाची गती वक्री असल्यास 'व' अक्षराने तसे दाखवितात. खालच्या कोपऱ्यात पौर्णिमा किंवा अमावास्या या दिवसाच्या सूर्योदयाची कुंडली दिलेली असते.

याव्यतिरिक्त पंचांगात प्रारंभी अवकहडाचक्र, संवत्सराचे नाव, या संवत्सराचा राजा, मंत्री यांची नावे, संवत्सरफले, ग्रहणे, संक्रांतिफले, मुहूर्त, इ. माहिती असते.

**सायन व निरयन** – पृथ्वी सुमारे ३६५¼ दिवसांत सूर्याभोवती एक प्रदक्षिणा पुरी करते, पण सूर्यच सर्व तारामंडलातून पश्चिमेकडून पूर्वेकडे भ्रमण करून सुमारे ३६५.२५६४ दिवसांनी मूळ जागी दिसू लागतो, असे आपल्याला वाटते. या अवधीला नाक्षत्रवर्ष म्हणतात. सूर्य ज्या वर्तुळमार्गातून फिरतो असे दिसते, त्याला क्रांतिवृत्त किंवा आयनिकवृत्त म्हणतात. हे क्रांतिवृत्त विषुववृत्ताला तिरकस छेदते. हे तिरकसत्व सध्या सुमारे २३ अंश २७ कला एवढे आहे. ही वृत्ते मोठी असून, ती परस्परांचे समान भाग करतात. ती ज्या बिंदूंत परस्परांना छेदतात, त्यांना संपातबिंदू म्हणतात. दि. २१ मार्चला सूर्य ज्या संपातात येऊन उत्तर गोलार्धात जातो, त्याला वसंतसंपात आणि सप्टेंबर महिन्यात तो ज्या संपातबिंदूत येतो, त्याला शरत्संपात म्हणतात.

खगोलात निरनिराळ्या ग्रहांची व ताऱ्यांची स्थिति-गती दर्शवताना एखादे प्रारंभस्थान गृहीत धरावे लागते. आपली

पंचांगे साधारणपणे सूर्य–सिद्धांतावरून किंवा ग्रहलाघवावरून तयार केली जातात. त्या ग्रंथांत हे आरंभस्थान शके ४४४ च्या सुमारास संपातांत धरले होते आणि रेवती नक्षत्रापैकी २२ वा तारका त्या वेळी त्या बिंदूजवळ होती. या आरंभस्थानापासून ग्रहाचे जे अंशात्मक अंतर असते, त्याला भोग म्हणतात. ग्रहाचे क्रांतिवृत्तापासून लंबांतर म्हणजे शर होय. ज्या पंचांगांत वसंत संपात हे आरंभस्थान मानले जाते आणि ग्रहाचे स्थान सांगताना अयनांश हिशेबात घेतले जातात, त्याला सायन म्हणजे गति युक्त पंचांग म्हणतात. संपातबिंदू हे स्थिर नसून, ते वर्षात ५० विकला या गतीने पश्चिमेकडे चलनात. त्यामुळे सूर्य एकदा वसंतसंपातात येऊन उत्तरोत्तर पूर्वेकडे जात असताना नाक्षत्र वर्ष संपायच्या थोडा आधीच पुन्हा वसंतसंपाती येतो. त्या अवधीला आतव सांपातिक किंवा सायन वर्ष म्हणतात. हे सायन वर्ष नाक्षत्र वर्षापेक्षा २० मिनिटे व २४ सेकंदांनी लहान असते.

ज्या पंचांगात वसंतसंपाताहून वेगळा कोणता तरी स्थिर बिंदू आरंभस्थान मानतात व अयनांश हिशेबात घेत नाहीत, त्याला निरयन पंचांग म्हणतात. सूर्यसिद्धांतात सांगितल्याप्रमाणे रेवती नक्षत्राच्या तारकापुंजातील शेवटचा बिंदू आरंभस्थान मानून राशी, नक्षत्रे यांची गणना अशा पंचांगांत केली जाते. रेवती नक्षत्राचा शेवटचा बिंदू कोणता याबद्दलही मतभेद असल्यामुळे निरयन पंचांगातही अनेक भिन्न प्रकार निर्माण झाले आहेत. वसंतसंपात आणि निरयन स्थिरबिंदू यामधील अंशात्मक अंतर म्हणजेच त्या पंचांगाचे त्या वर्षाचे अयनांश होत.

पंचांगातील कित्येक विषयांचा सायन व निरयन यांच्याशी काही संबंध नसतो. तिथी, वार, करण, ग्रहणे आणि सूर्य–चंद्राचे उदयास्त यांचे गणित सायन व निरयन पद्धतीत सारखेच असते. योग, उत्तरायण, दक्षिणायन आणि वसंतादी ऋतू यांचा निरयन कालगणनेशी काही संबंध नसतो, सायन पद्धतीनेच यांचा निर्णय करावा लागतो. नक्षत्रे व राशी यांचे गणित मात्र नाक्षत्र (निरयन) पद्धतीने करावे लागते.

**पंचांगातील विविधता** – सौर व चांद्र असे कालगणनेचे दोन भिन्न प्रकार आहेत. त्यामुळे पंचांगाचेही दोन प्रकार होतात. गेल्या २००० वर्षांत आर्यभट्ट, वराहमिहिर, ब्रह्मगुप्त, भास्कराचार्य, गणेश दैवज्ञ, इ. ज्योतिर्गणिती व सिद्धांतकार होऊन गेले. त्यांच्या अनुयायांनी निरनिराळी पंचांगे प्रचारात आणली. भारताच्या काही भागात पूर्वीपासून शक कालगणना प्रचलित आहे, तर इतरत्र विक्रमसंवत चालू आहे. निरनिराळ्या प्रदेशांतील वर्षारंभही भिन्न भिन्न आहेत. काही ठिकाणी चैत्रापासून, काही ठिकाणी कार्तिकापासून, तर काही ठिकाणी आषाढापासून वर्षारंभ होतो. चांद्रमासही सर्वत्र समान नसतात. नर्मदेच्या दक्षिणेला अमांत व उत्तरेला बंगाल सोडून इतर प्रदेशांत पौर्णिमांत मास मानले जातात. सौर मासांचा आरंभही सर्वत्र एकसारखा नसतो. त्यांची नावेही भिन्न आहेत. पूर्व भारतात ज्या सौर मासाला वैशाख म्हणतात, त्याला दक्षिण भारतात चित्तराइ असे नाव आहे. काही ठिकाणी त्याला मेषम म्हणतात, तर अन्य ठिकाणी वहाग म्हणतात. सांप्रत भिन्न प्रदेशांत जी पंचांगे प्रचलित आहेत, ती सौर, ब्राह्म व आर्य या सिद्धांतांना अनुसरून केलेली आहेत. त्यामुळे त्यांत एकवाक्यता नाही. अशी सुमारे ३० पंचांगे सांप्रत चालू आहेत. महाराष्ट्रातली पंचांगे ग्रहलाघवावर आधारलेली असतात. ती सीमेवरील गुजराती, कानडी, तेलगू इ. प्रदेशांतही चालतात. बंगाल, ओडिशा व तमिळनाडूच्या काही भागांत सौर पंचांगे प्रचलित आहेत. मद्रास राज्याच्या इतर भागात व मलबारात आर्यपक्षीय पंचांगे चालतात. तेलंगणात सूर्यसिद्धांतावर आधारित ग्रहलाघवीय पंचांग चालू आहे. मारवाडात ब्राह्मपक्षाचे पंचांग चालू आहे. उत्तर भारतातील अनेक प्रांतांत मकरंद ग्रंथावरून केलेले पंचांग चालू आहे, तर काश्मीरात खंडखाद्य या ग्रंथानुसार बनवलेले पंचांग चालू आहे. याव्यतिरिक्त श्रीवैष्णव, माध्व, स्मार्त या पंथांचीही वेगळी पंचांगे आहेत.

भारतातील सर्व जुनी पंचांगे निरयन पद्धतीची असून, त्यांतील गणित दृक्प्रत्ययास येत नाही. याचे कारण असे, की त्या पंचांगांतील गणित इ. स. ४०० च्या सुमारास निर्माण झालेल्या सूर्यसिद्धांतावर आधारलेले असते. आधुनिक यंत्रांच्या साहाय्याने घेतलेल्या सूक्ष्म खगोलीय वेधांच्या आधारे ग्रहगतीचे जे सरस मान समजून आले आहेत, त्यांचा सूर्यसिद्धांताच्या तत्त्वांमध्ये अंतर्भाव झालेला नाही. त्याचप्रमाणे जुनी पंचांगे चुकीच्या वर्षमानावर आधारलेली आहेत. या पंचांगांतील वर्षमान ३६५ दिवस ६ तास १२.६ मिनिटे आहे. हे शुद्ध सायन नाही व शुद्ध नाक्षत्रही नाही. ऋतुचक्रानुसारी सांपातिक किंवा आतव वर्षाचे शुद्ध मान ३६५ दिवस ५ तास व ४८.८ मिनिटे आहे. त्यामुळे इ. स. ५०० च्या सुमारास वर्षाचा आरंभ वसंतसंपाताच्या संक्रमणापासून होत असे, तो सांप्रत त्यानंतर २३ दिवसांनी होतो. त्या कारणाने संपात व अयने यांच्याशी संलग्न असणारे ऋतू आणि सण व उत्सव यांचा काल बदलतो आहे. आश्विन कार्तिकात येणारा शरद ऋतू भाद्रपद–आश्विन मासात येत आहे. शारदीय पौर्णिमा अजून शरद ऋतूत येते, ती काही शतकांनी वसंत ऋतूत येईल आणि वसंतपंचमी शरद ऋतूत येईल.

आर्यभट्टानंतर ४०० ते ५०० वर्षांनी विषुवांचे स्थानांतर किंवा संपाताचे परागमन खगोलज्ञांच्या ध्यानात आले. परंतु अयनचलनाच्या तत्त्वानुसार पंचांगातील वर्षमानाची शुद्धी

त्यांनी त्यांच्या उलट मागीतरा असतात ज्यांतिप्रमाणे समा ताऱ्या आंदोलनाविषयी कोष्टक तयार करून त सूर्यसिद्धान्तात घुगडा लिले संपातबिंदू एका विशिष्ट मर्यादेपर्यंत चढेल व पुन्हा मूळ स्थानाकडे येऊन उलट दिशेने वडू लागेल असा तो सिद्धान्त आहे पण संपाताच्या आंदोलनाचा हा सिद्धान्त निराधार ठरला आहे संपात दर वर्षी पाठीमागे सरकतो आणि सुमारे २६,००० वर्षांनी उलट प्रदक्षिणा करून मूळ स्थानी येतो, असे आता सिद्ध झाले आहे

आपले धार्मिक सण व उत्सव ऋतूंशी संबद्ध असल्यामुळे ग्रंथ कारण आव श्यक असल्यामुळे, आपल्या पचांगामध्ये आर्तव किंवा सांपातिक वर्षमानच वापरायला पाहिजे प्राचीन परंपरा आणि धर्मशास्त्र व पुराण यांतील वचनही सायन पद्धतीलाच पोषक अशी आहेत

**पचांगशोधन** – पचांगात सुधारणा करण्याचा प्रयत्न ३०० वर्षांपूर्वी शिवाजीमहाराजांनी केला होता त्यांनी कृष्ण नामक ज्योतिष्याला दृक्प्रत्ययास येणारा ज्योतिष ग्रंथ रचण्याचा आदेश दिला आणि त्याने करणकौस्तुभ नावाचा ग्रंथ रचला, तो ग्रंथ स्यात ग्रहकौतुक व ग्रहलाघव यांच्या आधाराने, पण स्वतः वेध घेऊन तयार केला आहे त्यात ज्याचापांचे साहाय्य घेतले आहे त्यातले वर्षमान सांप्रतच्या सूर्यसिद्धान्तानुसार आहे शून्य अयनांशाचे वर्ष शके ४५० हे ठरले असून, वर्षगती ६० विकला धरली आहे

त्यानंतर १०० वर्षांपूर्वी केरूनाना छत्रे यांनी शुद्ध निरयन पचांग सुरू केले त्यांतील ग्रहगतिस्थिती इंग्लिश नाटिकल आल्मनाकवरून घेतलेल्या असल्यामुळे सूक्ष्म व दृक्प्रत्ययी होती इ स १८७६ मध्ये बापूदेव शास्त्री यांनीही एक नवे पचांग सुरू झाले अशी दोन तीन पचांगे मद्रास प्रांतातही निघाली होती अशा प्रकारे निरयन पद्धतीचे दोन पक्ष झाले पहिला २२ अयनांश मानणारा ग्रहलाघव सूर्यसिद्धान्त पक्ष व दुसरा १८ अयनांश मानणारा रेवत पक्ष छत्रे यांचा रेवत पक्ष म्हणजेच शुद्ध निरयन टिळक पचांग पक्ष होय

तिसरा पक्ष सायनमताचा आहे केरूने, मोडक व दीक्षित यांनी इ स १८८२ मध्ये एक सायन पचांग सुरू केले त्याला श्रीशंकराचार्य द्वारकापीठ यांची मान्यता मिळाली होती पण जुन्याच्या अभिमान्यांनी ते स्वीकारले नाही

श्री व्यंकटेश बापूजी केतकर यांनीही स्वतःच्या करण ग्रंथाप्रमाणे केतकी नावाचे एक पचांग सुरू केले ते निरयन पचांगच आहे, पण त्याचा इतरांशी मेळ बसत नाही पुढे इ स १९०४ साली मुंबई येथे पहिले ज्योतिष संमेलन झाले त्यात लोकमान्य टिळकांनी रेवत पक्षाच्या तत्त्वाचा पुरस्कार केला व सर्व पचांगात एकवाक्यता असावी, यावर भर दिला त्या दृष्टीने ठराव झाले, पण ते अमलात आले नाहीत दुसरे संमेलन इ स १९१७ साली पुण्यास भरले व तिसरे मागली येथे इ स १९१९ मध्ये झाले. त्यात ठरले की राशिचक्राचे जे आरंभस्थान, म्हणजेच निरयन शर रेवती तारा, त्यापासूनच अयनांश नवीन करणग्रंथाने स्वीकारावे निर्णय शुद्ध पचांग प्रवर्तक मंडळाने स्वीकारला, पण जुन्या मताच्या २२ अयनांश धरून पचांग करणाऱ्यांनी तो मान्य नाही लो टिळकांनी शुद्ध व सूक्ष्म गणिताचा सर्वोपयोगी असा करणग्रंथ तयार करविला आणि त्याला अनुसरून शुद्ध निरयन टिळक पचांग सुरू केले

सांप्रत महाराष्ट्र व गुजरात या प्रदेशांतील सर्व पचांगे प्रत्यक्ष गणितावरून तयार केली जातात

गेल्या ५० वर्षांत जुनी पचांगे शुद्ध करण्याचे प्रयत्न पुष्कळ झाले आणि तिथि नक्षत्रांचे शुद्ध काल व ग्रहांची वास्तव स्थिती देणारी अनेक पचांगे प्रकाशित झाली त्या सर्व पचांगांत शुद्ध नाक्षत्र वर्षमान स्वीकारले आहे, पण पचांगसुधारकांनी ऋतुचक्राशी मेळ बसवणारे सांपातिक सौर वर्षमान स्वीकारले नाही परंपरा, रूढी व पक्ष यांचा अभिमान व दुराग्रह यांमुळे ऋतुविपर्यास, शुद्ध गणित व पचांगाचा धर्मशास्त्रीय उद्देश यांकडे कोणीही लक्ष दिले नाही सर्व निरयन पचांगकर्त्यांनी एकच आरंभस्थान व शुद्ध गतीने एकच अयनांश घेतले किंवा सायनपद्धती अनुसरली, तरच हा वाद मिटेल रेवती नक्षत्रातील २२ वी तारा सांप्रत संपातापासून सुमारे १९ ५ अंशावर असून सूर्यसिद्धान्तात मानलेले आरंभस्थान संपातापासून सुमारे २२ अंश दूर आहे

सर्व देशभर पचांगगणनेची शास्त्रोक्त व एकमुखी पद्धत प्रचारात आणण्याच्या उद्देशाने भारत सरकारच्या शास्त्रीय व औद्योगिक संशोधन मंडळाने नोव्हेंबर १९५२ मध्ये डॉ मेघनाद साहा यांच्या अध्यक्षतेखाली एक पचांगसुधारणा समिती नियुक्त केली त्या समितीने इ स १९५५ साली आपले प्रतिवृत्त सादर केले त्यात शालिवाहन शक कालगणना व आर्तव वर्षमान स्वीकारून लौकिक व्यवहारासाठी पुढील नियम सुचविले आहेत–

(१) वसंत संपाती सूर्य येतो, त्याच्या दुसऱ्या दिवशी वर्षारंभ मानावा

(२) सामान्य वर्ष ३६५ दिवसांचे आणि प्लुत किंवा वर्धापित वर्ष ३६६ दिवसांचे असावे शक वर्षात ७८ मिळवून येणाऱ्या बेरजेला ४ ने भाग गेल्यास ते वर्ष वर्धापित मानावे

(३) महिन्यांची नावे, चैत्र, वैशाख, इ असावी प्रत्येक महिन्याचे दिवस निश्चित असावे चैत्राचा आरंभ सामान्य वर्षात २२ मार्चला व प्लुत वर्षात २१ मार्चला व्हावा

(४) महिन्याचा आरंभ व त्यातील दिवसांची संख्या पुढील कोष्टकात दिल्याप्रमाणे असावी

| नाव | आरंभ दिवस | दिवससंख्या |
|---|---|---|
| १ चैत्र | २२ मार्च (प्लुत वर्षात २१ मार्च) | ३० (प्लुत असल्यास ३१) |
| २ वैशाख | २१ एप्रिल | ३१ |
| ३ ज्येष्ठ | २२ मे | ३१ |
| ४ आषाढ | २२ जून | ३१ |
| ५ श्रावण | २३ जुलै | ३१ |
| ६ भाद्रपद | २२ आगस्ट | ३१ |
| ७ आश्विन | २३ सप्टेंबर | ३० |
| ८ कार्तिक | २३ आक्टोबर | ३० |
| ९ मार्गशीर्ष (अग्रहायण) | २२ नोव्हेंबर | ३० |
| १० पौष | २२ डिसेंबर | ३० |
| ११ माघ | २१ जानेवारी | ३० |
| १२ फाल्गुन | २० फेब्रुवारी | ३० |

(५) वर्षातील सहा ऋतु पुढीलप्रमाणे मानावे—

ग्रीष्म=वैशाख-ज्येष्ठ, वर्षा=आषाढ श्रावण, शरद=भाद्रपद आश्विन, हेमंत=कार्तिक मार्गशीर्ष, शिशिर=पौष माघ, वसंत=फाल्गुन चैत्र

धार्मिक कृत्यासाठी पुढील व्यवस्था असावी—

(१) धार्मिक पंचागात सौर मास व चांद्र मास यांची सांगड घालावी लागते म्हणून वसंत संपातापासून २३° १५′ अंतरावरचा बिंदू हे आरंभस्थान मानून, सूर्य तिथे आला, की सौर वैशाख मास सुरू करावा तिथून सूर्य ३०/३० अंशावर गेला की सौर ज्येष्ठ, आषाढ, इ मास सुरू झाले, असे मानावे

(२) धार्मिक कार्यासाठी अमान्त चांद्र मास स्वीकारावे ज्या सौर मासात शुक्ल प्रतिपदा येईल, त्या सौर मासाचे नाव त्या चांद्र मासाला द्यावे दोन शुक्ल प्रतिपदा आल्यास पहिलीचा चांद्रमास हा अधिक मास व दुसरीचा निज मास मानावा

(३) २१ मार्च १९५६ ला अयनांश २३° १५′ होते, त्या वेळच्या मेषारंभापासून १३° २० चा एकेक टप्पा म्हणजे एकेक नक्षत्र मानावे अयनांश प्रतिवर्षी ५० २७″ या हिशबाने वाढत जातील

(४) दिवसाची गणना आघरात्रिक असावी, म्हणजे मध्य रात्रीपासून मध्यरात्रीपर्यंत एक दिवस मानावा त्यासाठी पूर्व रेखांश ८०° ५ आणि उत्तर अक्षांश २३° ११ येथील मध्य रात्र ही सर्व भारताची मध्यरात्र मानावी धार्मिक कृत्यासाठी मात्र स्थानिक सूर्योदयापासूनच सावन दिवस चालू ठेवावा

भारत सरकारने वरील प्रतिवृत्त मान्य करून त्याप्रमाणे राष्ट्रीय पंचांग २२ मार्च १९५७ (१ चैत्र शके १८७९) पासून सुरू केले त्यात शकगणना ग्रेगरियन कालगणनेच्या जोडीनेच आपल्या अंतर्गत व्यवहारासाठी योजलेली आहे आंतरराष्ट्रीय व्यवहारात भारताने ग्रेगरियन पद्धतीच वापरली पाहिजे

राष्ट्रीय पंचांगातील सौर वर्षाच्या आरंभाचा सांगड वसंत संपाताशी घातली असून, बाकीची सर्व व्यवस्था ग्रेगरियन पद्धतीशी जोडून दिलेली आहे चैत्र, वैशाख इ मास हे वस्तुत सौर पद्धतीचेच आहेत

**इस्लामी पंचांग**– मुसलमानी हिजरी वर्षात १२ चांद्र मास असतात अधिकमासाची व्यवस्था नसल्यामुळे ३३ वर्षांत सर्व मासांत सर्व ऋतू येऊन जातात पण ही पद्धती व्यवहाराच्या दृष्टीने, विशेषत शेतीसाठी अगदी गैरसोयीची आहे

अमावास्येनंतर प्रथम चंद्रदर्शन जेव्हा होते, त्या सध्याकाळी इस्लामी मासाचा पहिला दिवस सुरू होतो व २९–३० दिवसांचा महिना असतो त्यामुळे १२ चांद्र मासांच्या एका वर्षाचे ३५४ दिवस होतात

**पारशी पंचांग**– यात ३६५ दिवसांचे एक वर्ष असून, त्यात ३० दिवसांचे बारा मास असतात आणि शेवटले पाच दिवस गाथा नामक धार्मिक कार्यासाठी ठेवलेले असतात पारशी पंचांग सौर पद्धतीचे असले, तरी त्यात ग्रेगरियन पद्धतीप्रमाणे ४ थे वर्ष लीप वर्ष धरीत नाहीत, तर १२० वर्षांनंतर एक अधिक मास धरला जातो पाच दिवसांच्या गाथेऐवजी ६ दिवसांची गाथा ठेवली, तर या पंचांगाचा ऋतूंशी पुष्कळ मेळ बसेल असा प्रयोग पूर्वी एकदा केला गेला होता, पण तो अयशस्वी ठरला त्या पद्धतीला फसली सन म्हणतात त वर्ष २१ मार्चला सुरू होते सांप्रत काही थोडे लोक या पद्धतीचा उपयोग करतात पण बहुतेक लोक पाच दिवसांची गाथा पाळतात त्या पद्धतीचेही दोन प्रकार झाले आहेत त्यात वर्षारंभ एक महि-

त्याच्या अतराने येतो एका प्रकाराला कदीमी किंवा दरियाई रोज म्हणतात व दुसऱ्या प्रकाराला शाहशाही किंवा यमदजर्दी म्हणतात

**ग्रेगरियन पचांग**– हे इ स १५८२ मध्ये पोप ग्रेगरी याने तयार करवले तेच साप्रत सर्वत्र चालू आहे त्यात काही सुधारणा करून विश्वपचाग बनवण्याचे प्रयत्न सध्या चालू आहेत [ पचाग म्हणजे काय व ते कसे पाहावे – श्री आ रा कवरे, १९५९ भा ज्यो शा, ज्योतिर्विलास, प ज्या, द आ ले, ज्योतिष कौस्तुभ, राष्ट्रीय पचाग, हिं वि को ]

## पंचागसेवन

एक उपासनापद्धती मत्रयोग साधण्याची जी सोळा अगे सागितली आहेत, त्यात पचाग सेवन हे एक अग आहे उपास्य देवतेच्या गीता, सहस्रनाम, स्तव, कवच आणि हृदय या वाङ्मयाचे वाचन म्हणजे पचाग सेवन होय शिवोपासक असेल त्याने शिवगीता, शिवसहस्रनाम, शिवस्तव, शिवकवच व शिवहृदय याचा पाठ केल्याने शिवोपासनेतील पचागसेवन होते असेच इतरही उपास्य देवताविषयी पचागसेवन करतात पचागसेवनावाचून नुसता मत्रजप फलद्रूप होत नाही, असे सागितले आहे [ योगविद्या ]

## पंचाग्निविद्या

उपनिषदातील एक विद्या हिचे वर्णन छांदोग्योपनिषदात आले आहे, ते असे –

अतरिक्ष, पर्जन्य, पृथिवी, पुरुष व योषा ( स्त्री ) हे पाच अग्नी आहेत अतरिक्षरूपी अग्नीत देव हे श्रद्धेचे हवन करतात त्यातून सोम उत्पन्न होतो पर्जन्यरूपी अग्नीत सोमाचे हवन केल्याने वृष्टी उत्पन्न होते पृथ्वीरूपी अग्नीत वृष्टीचे हवन केल्याने अन्न उत्पन्न होते पुरुषरूप अग्नीत अन्नाचे हवन केल्याने वीर्य उत्पन्न होते आणि योषारूप अग्नीत वीर्याचे हवन केल्याने गर्भ उत्पन्न होतो या पाच अग्नींना परमात्मा व्यापून राहिला आहे याच्या द्वारे जो परमात्म्याला जाणतो, तो मुक्त होतो

श्वेतकेतूचा पुत्र आरुणी याला ही विद्या प्रवाहण जैवली या राजाने शिकविली मृत्यूनतर पुनर्जन्म कोणाला मिळतो, कोणाला मिळत नाही आणि ज्याला तो मिळतो तो कशा प्रकारे मिळतो, या गोष्टींचा समावेश या विद्येत आहे

स्थूल शरीराचा त्याग केल्यानतर जीव हा सूक्ष्म शरीरासह लोकांतरी जातो आणि एका विशिष्ट क्रमाने तो पुनश्च स्थूल शरीर प्राप्त करून घेऊन जन्माला येतो छांदोग्योपनिषदातील या गोष्टीची प्रक्रिया अशी आहे –

अग्नीत एखाद्या वस्तूची आहुती दिल्यानतर त्या वस्तूचे रूपातर होते, हा अनुभव आहे तूप अग्नीत घातल्यावर ते सुगधी धूमाच्या रूपात परिवर्तित होऊन वायत मिसळते अग्नी हा या परिवर्तनाचे कारण आहे याच प्रकारे स्थूल देह सोडल्या नतर दुसरा नवा देह ग्रहण करीपर्यंत जीवाच्या शरीरात जी पाच रासायनिक परिवर्तने होत असतात, त्याना पचाग्नी असे म्हटले आहे

मृत जीवाच्या सूक्ष्म शरीराला श्रद्धा व आप म्हणतात, कारण त्या वेळी त्याच्यामध्ये जलतत्त्वाचे प्राधान्य असते या आपाचे परिवर्तन सोमरूपात होते हे परिवर्तन ऊर्ध्वदशात म्हणजे अतरिक्षात होते, म्हणून अतरिक्ष हा प्रथम अग्नी होय हा सोम पुढे पर्जन्यरूपात परिवर्तित होतो, म्हणून पर्जन्य हा दुसरा अग्नी आहे पर्जन्य पाणी जल अन्नरूपात परिवर्तित होते हे परिवर्तन पृथ्वीवर होत असल्यामुळे पृथ्वी हा तिसरा अग्नी होतो अन्न वीर्यरूपात परिवर्तित होऊन पुरुषशरीरात प्रविष्ट होते, म्हणून पुरुष हा चौथा अग्नी ठरतो शेवटी वीर्य हे गर्भरूपात परिवर्तित होते हे परिवर्तन पत्नीच्या ठिकाणी होत असल्यामुळे पत्नी हा पाचवा अग्नी होतो

इथे श्रद्धेपासून गर्भापर्यंत जीवाच्या पाच दशा सागितल्या आहेत श्रद्धा शुभ व दुष्ट अशी दोन प्रकारची असते जन्मभर सत्कर्माचे अनुष्ठान केल्याने जीवाच्या ठिकाणी मरणोत्तर शुभ श्रद्धा राहते व दुष्कर्माच्या आचरणाने दुष्ट श्रद्धा राहते पुनर्जन्माचा निर्णय झाल्यानतर जीव आपल्या अत करणासह सोम, जल, अन्न, वीर्य व गर्भ अशा पाच अवस्थान निवास करून शेवटी पृथ्वीवर जन्म घेतो

अशा प्रकारे श्रद्धा किंवा कर्म याना अनुसरून जीव ससारात जन्ममरणाचे फेरे फिरत राहतो आणि अनेक योनीत जन्म घेऊन सुखदुःखे भोगतो या जन्ममरणाच्या चक्राला पितृयाण किंवा कृष्णगती म्हणतात या गतीला अज्ञान हे कारणीभूत असते याच्या उलट, ज्ञानाने प्राप्त होणाऱ्या मुक्त दशेला देवयान किंवा शुक्लगती म्हटले आहे शुक्लगतीत जीवाचे सूक्ष्म शरीरही गळून पडते व आत्मा आपल्या विशुद्ध स्वरूपात चिदानदाचा उपभोग घेतो [ कल्याण–साधनाक ]

## पंचाचार्य

वीरशैव मताचे प्रवर्तक असे पाच आचार्य त्याची नावे अशी – एकोरामाध्य, पडिताराध्य, रेवणाराध्य, मरुळाराध्य व विश्वाराध्य हे शिवलिंगातून उद्भवले आणि त्यानी दिग्विजय करून सर्वत्र शिवभक्तीचा प्रचार केला, असे म्हटले आहे या सबधात शिव पार्वतीला सागतो –

तस्मात्तस्माच्च गिरिजे पञ्चाननसमुद्भवा ।
सर्वाविसर्वलोकानां जगद्गुरुवरोत्तमा ॥

( सुप्रभोदागम )

अर्थ– माझ्या पाच मुखापासून उत्पन्न झालेले पंचाचार्य हे कैलासादी चौदा भुवनांचे श्रेष्ठ गुरू आहेत.

कर्नाटकातील बाळेहाळूर, माळव्यातील उज्जयिनी, हिमालयातील केदारक्षेत्र, श्रीशैलक्षेत्र व काशी या पाच ठिकाणी या आचार्यांनी धर्मपीठे स्थापन केली. या पंचाचार्यांनी उपनिषदादी ग्रंथांवर भाष्ये रचली होती असा समज असला, तरी अद्यापि त्यापैकी एकही भाष्य उपलब्ध झालेले नाही. [ श्री. श. र. ]

**पंचाप्सरस** (१) द. भारतातील एक तीर्थ. हे स्थान कन्याकुमारीनजीक आहे. यात अगस्त्य, सौभद्र, पौलोम, कारंधम व भारद्वाज अशा पाच सरोवरांचा समावेश आहे. या ठिकाणी पाच अप्सरांना शाप मिळून त्या ग्राहरूपाने राहिल्या होत्या. त्यामुळे त्या तीर्थात कोणी स्नान करायला जात नसे. परंतु वनवासाच्या निमित्ताने अर्जुन तिथे गेला असता त्याने या तीर्थात स्नान केले व त्यामुळे त्या अप्सरांचा उद्धार झाला, अशी कथा आहे (म. भा. आदि. २१६.१४). यात्रेच्या निमित्ताने बलरामही तिथे गेला होता. त्याने या स्थळी दहा हजार गायी दान दिल्याचा उल्लेख भागवत पुराणात आहे (१०. ७९. १७–१८). [ हि. ध. ]

(२) एक पुण्यप्रद सरोवर. हे दंडकारण्यात आहे. याची लांबी–रुंदी एकेक योजन आहे. माडकर्णी ऋषीने आपल्या तपःसामर्थ्याने हे सरोवर व त्यात एक भवन निर्माण करून, पाच अप्सरांसह तो त्यात राहू लागला, असे वर्णन वाल्मीकी रामायणात आले आहे (अरण्य. ११. ११–१८). [ वा. रा. का. ]

**पंचामृत** गाईचे दूध, दही व तूप, तसेच मध आणि साखर या पाच पदार्थांच्या मिश्रणाला पंचामृत असे म्हणतात. हे सर्व धर्मांच्या ठिकाणी विहित आहे. षोडशोपचार पूजेत स्नानानंतर देवाला पंचामृताचे स्नान घालतात. पूजाविधीत त्या प्रत्येक पदार्थासाठी एक एक मंत्र दिलेला असतो. गर्भवतीला दिनशुद्धी पाहून एकदा पंचामृत प्यायला द्यावे, असे ज्योतिस्तत्त्वात सांगितले आहे. [ पु. मा. प्र., श. क. ]

**पंचायत** एक प्राचीन संस्था. या संस्थेचे कमीत कमी पाच सदस्य असतात, म्हणून तिला हे नाव मिळाले आहे. भारताच्या सामाजिक, राजकीय व आर्थिक जीवनात पंचायतीला फार महत्त्वाचे स्थान प्राप्त झालेले होते. कोणतेही सार्वजनिक कार्य पार पाडण्यासाठी पंचायत स्थापण्याची प्रथा होती. ग्रामपंचायत व जातपंचायत हे पंचायतीचे प्रमुख प्रकार होत.

**ग्रामपंचायत** – ही वैदिक कालापासून अस्तित्वात होती. गावातील वयोवृद्ध व अनुभवी लोक तिचे सदस्य असत. गावाचा सर्व कारभार पंचायतच करीत असे. तिला न्यायदानाचाही अधिकार होता. संस्कृत व पाली वाङ्मयात ग्रामपंचायतीचे पुष्कळ उल्लेख सापडतात. इ. स. च्या ९–१० व्या शतकातील शिलालेखांवरून असे कळते, की द. भारतातही ग्रामपंचायती राजमान्य होत्या. धार्मिक व सामाजिक कामे, शेती, शिक्षण, इ. सर्व क्षेत्रांत पंचायतीचा अधिकार चालत असे.

मध्ययुगातही ग्रामपंचायती चालू होत्या. राज्यावर परचक्र आले, सत्तांतर झाले, तरी ग्रामपंचायतींना कोणी धक्का लावत नसे, असे म्हणतात. कारण त्या काळी प्रत्येक गाव स्वायत्त व स्वयंपूर्ण असे. मुसलमानी अमलात ग्रामपंचायतीची व्यवस्था तितकीशी सुरळीत नसावी. पण मराठ्यांच्या राज्यात ही संस्था पुनश्च नीटपणे चालू झाली. इंग्रजांची सत्ता सुरू झाल्यानंतर मात्र पंचायतसंस्था नामशेष झाली. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर पुन्हा या संस्थेचे पुनरुज्जीवन करण्यात आले. पूर्वीप्रमाणेच आताही गावाची सर्व व्यवस्था ग्रामपंचायतीकडे सोपवण्यात आली आहे. पंचायतीचे अधिकार व कार्यक्षेत्र आता विस्तृत झाले आहे. ( ग्रामपंचायत पाहा. )

**जातपंचायत** – पूर्वी प्रत्येक जातीची एक पंचायत असे व ती त्या जातीच्या सामाजिक जीवनाचे नियंत्रण करीत असे. अशा पंचायतीत दहा ते पंधरा सभासद असून, त्यांतील एकाला सरपंच मानले जाई. लग्नसंबंध, काडीमोड, इ. बाबतींत पंचायतीची अनुमती घ्यावी लागे. प्रत्येक जातीचे काही नियम असत आणि त्या नियमांचे पालन न करणाऱ्या व्यक्तीला जातपंचायत शिक्षा करीत असे. अशा मनुष्याला बहुधा जातिबाह्य ठरवले जाई व त्याच्याशी कोणीही कसलाही संबंध ठेवीत नसे. गावातील ब्राह्मण त्याच्याकडे पूजेला जात नसत, नापित त्याची हजामत करीत नसत किंवा परीट त्याचे कपडे धूत नसत. त्यामुळे त्या मनुष्याला गावात जगणेच कठीण होई. मग तो माणूस बहुधा पंचायतीला दंड देऊन किंवा जातिभोजन घालून या शिक्षेतून स्वतःची सुटका करून घेई. अपराध्याला तीर्थयात्रा करायला लावणे किंवा तत्सम काही प्रायश्चित्त घ्यायला लावणे, हाही बहिष्कार उठवण्याचा एक उपाय होता.

आदिवासी जमातींच्या जीवनातही जातपंचायतीला फार महत्त्व असते. त्यांच्या पंचायतीला पुष्कळ अधिकार असतात.

जुन्या काळी पारशी समाजात अंतर्गत नियंत्रणासाठी पंचायतीची व्यवस्था होती. पंचायत हेच त्यांचे न्यायालय असे. पंचायतीच्या निर्णयाविरुद्ध जो मनुष्य वागे, त्याला जातिबहिष्कृत करीत. इ. स. च्या १८ व्या शतकात पारशी पंचायतीचे अधिकार चालू होते. पण १९ व्या शतकात त्यांचा प्रभाव कमी

होऊ लागला [ म सा पु , हिं त्रि को , जातिव्यवस्था ]

**पंचायतनपूजा** शिव, विष्णू, देवी, सूर्य व गणपती या पाच देवतांच्या एकत्र उपासनेला हे नाव आहे भारतात अनेक धर्मपंथ प्रचलित आहेत प्रत्येकाचा उपासनामार्गही स्वतंत्र आहे त्यामुळे कित्येकदा पंथापंथांमध्ये वैमनस्यही उत्पन्न झालेले दिसते ही परिस्थिती ठीक नव्हे, असा विचार प्राचीन काळीच उदयाला आला व काही विशिष्ट देवाची उपासना सर्व पंथांनी मान्य करावी व आपसातले वैमनस्य काढून टाकावे, या दृष्टीने प्रयत्न सुरू झाले ' एकं सद् विप्रा बहुधा वदन्ति '= एकाच सद् वस्तूला ज्ञानी लोक अनेक प्रकारे संबोधतात, या ऋग्वेदातील मंत्रात वरील कल्पनेचे बीज सापडते भिन्न भिन्न संप्रदायातील बुद्धिमान पुरुषांना व उदारमतवाद्यांना हे कळत होते, की भिन्न पंथाच्या भिन्न उपास्य देवता ही सारी एकाच परमेश्वराची भिन्न नामरूपे असून, परमेश्वर त्या सर्वांना व्यापून आहे पुढे वेदान्तमताच्या प्रसारामुळे हा विचार वाढीला लागला त्यातून पुढे स्मार्तधर्मी ब्राह्मणांनी पंचायतनपूजेचा उपक्रम सुरू केला त्यासाठी त्यांनी वरील पाच देवता निवडल्या या पंचायतनात विष्णूसाठी शाळिग्राम, शिवासाठी बाणलिंग, सूर्यासाठी स्फटिकमणी, देवीसाठी मूर्ती व गणपतीसाठी नर्मदेतला तांबडा गोटा बसवण्याची चाल आहे जी मुख्य उपास्य देवता असेल, तिची स्थापना मध्यभागी करून बाकीच्या देवता चारही दिशांना बसवतात उपास्यभेदाने ही मांडणी पुढीलप्रमाणे करतात—

**विष्णुपंचायतन**— मध्यभागी विष्णू, ईशान्येस शिव, आग्नेयीस गणपती, नैर्ऋत्येस सूर्य व वायव्येस देवी

**शिवपंचायतन**— मध्यभागी शिव, ईशान्येस विष्णू, आग्नेयीस सूर्य, नैर्ऋत्येस गणपती व वायव्येस देवी

**सूर्यपंचायतन**— मध्यभागी सूर्य, ईशान्येस शिव, आग्नेयीस गणपती, नैर्ऋत्येस विष्णू व वायव्येस देवी

**देवीपंचायतन**— मध्यभागी देवी, ईशान्येस विष्णू, आग्नेयीस शिव, नैर्ऋत्येस गणपती व वायव्येस सूर्य

**गणपतिपंचायतन**— मध्यभागी गणपती, ईशान्येस विष्णू, आग्नेयीस शिव, नैर्ऋत्येस सूर्य व वायव्येस देवी

गृहस्थाने आपल्या घरात पंचायतनाची स्थापना करून त्याची नित्य पूजा करावी, असे धर्मशास्त्रात सांगितले आहे

पंचायतनातील पाच प्रमुख देवतांच्या पार्षद देवता पुढीलप्रमाणे सांगितल्या आहेत—

विष्णूच्या रमा, ब्रह्मा, शुक, सनत्कुमार, सनक, सनंदन, सनातन, विष्वक्सेन, उद्धव आणि अक्रूर

शिवाच्या बाण, रावण, चंडीश, नंदी, भृंगी आणि रिटी

सूर्याच्या माठर, पिंगल, दंड आणि चंडांशू

देवीच्या शंखा, उच्छिष्टा, चांडाली, गणपती रवी व चंद्र

गणपतीच्या गालव, गार्ग्य, मुद्गल व सुधाकर

मुख्य पूजा झाल्यावर मग या पार्षदांचा नामोच्चार करून त्यांना पुष्पांजली वाहतात पंचायतनपूजेचा पुरस्कार आद्य शंकराचार्यांनी केला व त्यायोगे विविध दैवतसंप्रदायातले वैर बऱ्याच प्रमाणात कमी केले, असे म्हणतात

अनेक देव एका प्रतिमेमध्ये एकत्रित करणे ही प्रवृत्ती हिंदूंच्या मूर्तिकलेतही दिसून येते बिहारमध्ये एक पंचायतन शिवलिंग सापडले आहे त्याला चार मुखे आहेत, ती विष्णू, सूर्य, पार्वती व गणपती या देवतांची आहेत भारतात कित्येक ठिकाणी पंचायतनमंदिरांचा समूह आढळतो त्यात प्रमुख देवतेचे मंदिर मध्यभागी असते व बाकीच्या चार देवतांची मंदिरे चारही कोपऱ्यात असतात [ नि सि , अखंड हिंदुस्थान, पू मा प्र ]

**पंचाल** एक प्राचीन जनपद हे कुरुदेशाच्या पूर्वेस होते रोहिलखंडाचा पुष्कळसा भाग, तसेच कनौजच्या निकटचा काही भाग यांचा पंचालात समावेश होता पंचाल देशाच्या प्राचीन राजांच्या नामावलीत संजय, पिजवन, सुदास व सहदेव यांचा उल्लेख आढळतो हे राजे विजयी व दाते म्हणून प्रसिद्ध होते, असे उल्लेख वैदिक वाङ्मयात अनेक ठिकाणी आढळतात पुढे पंचाल जनपदाचे दोन भाग पडले गंगेच्या उत्तरेचा तो उत्तर पंचाल व दक्षिणचा तो दक्षिण पंचाल होय उत्तर पंचालाची राजधानी अहिच्छत्र ही सांप्रतच्या बरेली जिल्ह्यात येते दक्षिण पंचालाची राजधानी कंपिला, फरुखाबाद जिल्ह्यात येते द्रौपदी ही उत्तर पंचाल देशाचा राजा द्रुपद याची कन्या होती द्रोणाचार्य व त्यांचा पुत्र अश्वत्थामा यांनी द्रुपदाला जिंकून पंचालाचा काही भाग आपल्या अधिकाराखाली घेतला होता

या पंचाल जनपदाचे पूर्वीचे नाव क्रिवी होते, असे शतपथ ब्राह्मणात म्हटले आहे ऐतिहासिक काळात पंचाल जनपद हे कान्यकुब्ज प्रदेश या नावाने प्रसिद्ध झाले या जनपद राज्यांच्या काळात कुरु–पंचाल या दोन जनपदांचा विशेष दबदबा होता कुरु–पंचालांची भाषा, यज्ञासंबंधी नियम, धर्म, शील व आचार या गोष्टी आदर्श मानल्या जात होत्या पाहा – कुरु [ मध्यदेश– डॉ धीरेंद्र वर्मा, १९५५ ]

**पंचाल राजवंश** पौरव वंशातील भरताचा सहावा वंशज अजमीढ याला तीन पुत्र होते अजमीढाच्या मृत्यूनंतर त्यातल्या ऋक्ष या पुत्राला हस्तिनापुरचे मुख्य राज्य

मिळाले आणि नील व बृहद्वसु या दोघांच्या वाट्याला इतर प्रदेश आले. त्या दोघांचे वंश पुढे उत्तर व दक्षिण पंचाल म्हणून प्रसिद्ध झाले. त्या वंशातील एक राजा भर्म्यश्व याच्या पाच पुत्रांना 'पंच अलम' ही पदवी मिळाली होती. तिच्यावरून त्या वंशाला पंचाल हे नाव मिळाले. त्या पाच पुत्रांपैकी सर्वात मोठा पुत्र मुद्गल हा होता. त्याच्या वाट्याला राज्याचा जो भाग आला, त्याचा पुढे खूप विस्तार झाला. दिवोदासाचा पुत्र सुदास याने पौरव राजा संवरण याचा पराभव करून त्याचे राज्य आपल्या राज्याला जोडले, परंतु ते फार काळ टिकले नाही. पुढे पौरवांच्या द्विमीढ शाखेतील राजा उग्रायुध याने उ. पंचाल राज्य जिंकले. तिथला राजा पृषत हा द. पंचालामध्ये आश्रयाला गेला. पुढे पौरवांच्या मूळ शाखेतील भीष्माने उग्रायुधाला जिंकून पृषत राजाला अहिच्छत्र येथे पुन्हा राज्यपद मिळवून दिले. पृषताचा पुत्र द्रुपद हा राजा झाल्यानंतर द्रोणाचार्याने अर्जुनाच्या हस्ते त्याचा पराभव केला आणि उ. पंचालाचे राज्य स्वतःसाठी ठेवून द. पंचालचे राज्य द्रुपदाला दिले. द्रुपदाला हा अपमान सहन झाला नाही. त्याने द्रोणाचार्यांचा सूड उगवण्यासाठी घोर तप करून एक पुत्र मिळविला. धृष्टद्युम्न हे त्याचे नाव होय. द्रुपदाची कन्या द्रौपदी हिचा पाच पांडवांशी विवाह झाला आणि भारतीय महायुद्धात द्रुपद हा पांडवांच्या बाजूने लढला. द. पंचालमध्ये ब्रह्मदत्त नावाचा एक राजा होऊन गेला. ऋग्वेद आणि अथर्ववेद यांचा क्रमपाठ निश्चित करणे, हे काम त्याचे आहे, असे म्हणतात. द्रुपदानंतर महापद्म नंद राजापर्यंत पंचाल वंशाचे २७ राजे झाले, असे पुराणात म्हटले आहे, पण त्यांची नावे मात्र दिलेली नाहीत. वैदिक व पौराणिक साहित्यात पंचाल देशातील परिचक्रा, काम्पिल्य आणि अहिच्छत्र या तीन नगरांचा उल्लेख आहे. बरेली जिल्ह्यात रामनगराजवळ अहिच्छत्राचे भग्नावशेष सापडले आहेत.

## पंचाक्षरी मंत्र

'नमः शिवाय' हा शिवाचा पंचाक्षरी मंत्र आहे. यजुर्वेदातल्या रुद्राध्यायात 'नमः शिवाय' या शब्दांनी एक अनुवाक सुरू होतो. तिथून हा मंत्र घेतलेला आहे. याला च प्रारंभी प्रणव जोडला, की तो 'ॐ नमः शिवाय' असा षडक्षरी मंत्र होतो. पंचाक्षरी मंत्रातील प्रत्येक अक्षराचा आध्यात्मिक अर्थ वेगवेगळा सांगितला आहे, तो असा–

न = समस्त लोकांचा आदिदेव. म = परम ज्ञान देणारा व महापातकांचा नाश करणारा. शि = कल्याणकारी, शांत व शिवानुग्रहाला कारणीभूत. वा = वृषभवाहन, वासुकी व वामांगी शक्ती यांचा सूचक. आणि य = परमानंदरूप व शिवाचे शुभ असे वास्तव्यस्थान. म्हणून त्या पाच अक्षरांना नमस्कार.

नटराज शिवाच्या तांडव नृत्याशीही वरील मंत्रातल्या पाच अक्षरांचा संबंध लावलेला आहे, तो असा–

न = अग्नी असलेला हात. म = मुयलक दैत्याला तुडवणारा पाय. शि = डमरुहस्त. वा = पसरलेला हात आणि य = अभयहस्त.

ईश्वर, शक्ती, आत्मा, अनर्थ व पापनिवारण असाही त्या पाच अक्षरांचा अर्थ सांगितलेला आहे. पंचाक्षरी मंत्राने शिवाची पूजा करावी आणि त्या मंत्राचे जपानुष्ठानही करावे, असे शैव मार्गात सांगितले आहे. या मंत्राची फलश्रुती अशी–

**पञ्चाक्षरेण मन्त्रेण पत्रं पुष्पमथापि वा ।**
**यः प्रयच्छति शर्वाय तस्य तत्फलं स्मृतम् ।।**

अर्थ – पंचाक्षरी मंत्राने जो शिवाला एकवार पत्र अथवा पुष्प समर्पील (शिवाची पूजा करील), त्याला (त्या पूजेचे) अनंत फल मिळेल.

पंचाक्षरी मंत्राचा जप करणारा मनुष्य शिवदीक्षा घेतलेला असो वा नसो, त्यालाही त्या जपाचे फल मिळते व त्याच्यावर शिवाचा अनुग्रह होतो, असे सांगितले आहे. [भा. प्र. वि.]

## पंचीकरण

वेदान्तात सांगितलेली एक प्रक्रिया. पृथ्वी, आप, तेज, वायू व आकाश ही पाच महाभूते होत. पंचीकरणात या प्रत्येक भूताचे प्रथम दोन भाग करतात. त्यांतील एका भागाचे पुनश्च चार भाग करतात. मग चारांतला प्रत्येक भूताचा एक एक भाग घेऊन तो त्या त्या भूताच्या अर्ध्या भागाला मिळवून ते भूत पूर्ण करतात. म्हणजे भूताचा अर्धा भाग आणि इतर चार भूतांचा प्रत्येकी एक अष्टमांश मिळून ते भूत पंचीकृत पूर्ण होते. शुद्ध भूताला अपंचीकृत भूत व वरील प्रक्रियेने बनविलेल्या भूताला पंचीकृत भूत असे म्हणतात. पंचीकृत भूत स्वतःबरोबरच इतर चारही भूतांच्या अंशांनी युक्त होते. त्यामुळे सर्व भूतांत सर्व गुण आढळतात. या पंचीकरणात ज्या भूताचा अर्धा भाग असतो, त्याच्या नावाने त्या भूताचा उल्लेख करतात.

या पंचीकरणामुळे आकाशात शब्द, वायूत शब्द व स्पर्श, अग्नीत शब्द, स्पर्श व रूप, जलात शब्द, स्पर्श, रूप व रस आणि पृथ्वीत शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध हे गुण अभिव्यक्त होतात. याच पंचीकृत भूतांपासून क्रमशः स्थूल, स्थूलतर व स्थूलतम कार्यांची अभिव्यक्ती होते. वरचे सात व खालचे सात लोक मिळून चौदा भुवनांनी युक्त ब्रह्मांड पंचीकरणामुळेच निर्माण होते. ते निर्माण झाल्यावर त्यात राहणाऱ्या जीवांची जरायुज, स्वेदज, अंडज व उद्भिज्ज अशी चार प्रकारची शरीरे व त्यांच्या आहारासाठी उपयुक्त वस्तू निर्माण होतात.

पाहा – त्रिवृत्करण. [भा. द. रा., भा. द. – मिश्र]

**पंजाब** भारतीय संघराज्यातला एक प्रदेश संपूर्ण पंजाब मात्र भारतात समाविष्ट नाही १९४७ साली त्याचे विभाजन झाले आणि एका पंजाबाचे पूर्व पंजाब व पश्चिम पंजाब असे दोन तुकडे झाले पश्चिम पंजाब पाकिस्तानाकडे गेला व पूर्व पंजाब भारताकडे राहिला

तसे पाहिले, तर आजवर पंजाबचे अनेकदा विभाजन झालेले आहे कुशाण राजाच्या कारकिर्दीत पंजाबची सरहद्द हिंदुकुश पर्वताच्या पलिकडच्या अगापर्यंत विस्तारली होती दिल्लीच्या सुलतानाच्या सत्ताकालात ती पेशावरपर्यंत मानली जात होती मोगल सत्तेच्या प्रारंभकाळी सतलुज व सिंधु या दोन नद्यांच्या मधला सारा प्रदेश पंजाब म्हणून ओळखला जात होता हे अंतर १८० कोसांचे होते पुढे मोगल बादशहांनी एका पंजाबचे दोन भाग केले एक लाहोरचा सुभा व दुसरा मुलतानचा सुभा शिखांचे पंजाबवर स्वामित्व येईपर्यंत हीच व्यवस्था होती १८५७ च्या स्वातंत्र्ययुद्धानंतर पंजाबचा कारभार ब्रिटिशांनी आपल्या हाती घेतला व हरियाणा प्रदेश पंजाबात समाविष्ट करून टाकला लॉर्ड कर्झनच्या कारकिर्दीत सिंधू नदीच्या पश्चिमेकडचा प्रदेश व दिल्ली हे भाग पंजाबपासून अलग करण्यात आले आणि त्यानंतर १९४७ साली भारत व पाकिस्तान अशी आणखी फाळणी झाली पण हीही शेवटची ठरली नाही त्यानंतर हिमाचल प्रदेश पंजाबपासून वेगळा करण्यात आला आणि अलिकडेच हरियाणा प्रदेशाचे स्वतंत्र राज्य निर्माण करून तेवढा भाग पंजाबातून बाजूला काढला गेला आहे




**चतु सीमा** – पूर्वेस उत्तर प्रदेश व हिमाचल प्रदेश, पश्चिमेस

पाकिस्तान, दक्षिणेस राजस्थान व हरियाणा आणि उत्तरेस काश्मीर ह्या भारतीय पंजाबाच्या चतुःसीमा आहेत.

**भौगोलिक विभाग** – पर्वतीय विभाग, तराई विभाग व मैदानी विभाग असे पंजाबचे भौगोलिक दृष्ट्या तीन विभाग पडतात.

पर्वतीय विभाग – हिमालयाच्या लहानमोठ्या पर्वतश्रेणी या विभागात पूर्व पश्चिम समांतर पसरल्या आहेत. त्यांची लांबी सुमारे २००० मैल व रुंदी सुमारे २०० मैल आहे. या पर्वत शिखरांची उंची काही ठिकाणी २०,००० फूट, तर काही ठिकाणी ६००० ते ७००० फूट आहे. हिमालय हे पंजाबला मिळालेले वरदान आहे असे मानले जाते. सिमला व कांगडा हे जिल्हे, तसेच होशियारपूर व गुरुदासपूर या जिल्ह्यांचा काही भाग, एवढा प्रदेश या विभागात येतो. पंजाबमधली थंड हवेची ठिकाणे याच विभागात आहेत.

तराई विभाग – हिमालयाच्या पायथ्याशी ज्या शिवालिक नावाच्या टेकड्या आहेत त्यांच्या आसपासचा मुलूख म्हणजे तराई विभाग होय. या प्रदेशात पाऊस खूप पडतो. याची उंची १००० ते ३००० फुटांपर्यंत आहे. या प्रदेशात भात, गहू, मका, ऊस, आंबा ही पिके चांगली येतात.

मैदानी विभाग – या विभागात निरनिराळे दुआब म्हणजे दोन नद्यांमधले भूप्रदेश येतात. या प्रदेशाची उंची समुद्रसपाटीपासून साधारणपणे १००० फूट आहे. या मैदानी विभागाचे आणखी दोन भाग होतात. पहिला विभाग पूर्वेकडचा म्हणजे रावी व यमुना यांच्या मधला होय. या विभागातल्या जमिनी समृद्ध आहेत व लोकवस्तीही दाट आहे. रावी व सिंधू यामधील दुआब हा पश्चिमेकडचा भाग होय. याही प्रदेशात पाऊस पुष्कळ पडतो व पिकेही चांगली येतात. जालंधर, अमृतसर, लुधियाना, अंबाला, ही मोठमोठी शहरे या विभागातच आहेत. झेलम व सिंधू या नद्यांच्या मधल्या भागाला दुआबासिंधसागर म्हणतात. झेलम व चिनाब यांतील प्रदेशाला दुआबाराचना म्हणतात. रावी व सतलज यांच्या मधल्या प्रदेशाला दुआबारी म्हणतात आणि व्यास व सतलुज या दोन नद्यांमधील भूप्रदेशाला बिस्त दुआब म्हणतात.

पंजाबातले हवामान कोरडे असते. इथली थंडी व उन्हाळा ही दोन्ही तीव्र असतात. बंगालच्या उपसागरातून येणारे मोसमी वारे पंजाबमध्ये पर्जन्यवृष्टी करतात. पाऊस वेगवेगळ्या भागात ५ ते ३६ इंच पडतो. पर्वतीय विभागात हिवाळ्यात हलके बर्फही पडते.

**नामकरण**– पंजाब हा शब्द पंच+आप या संस्कृत शब्दावरून बनला आहे. तो तिथल्या पाच नद्यांना अनुलक्षून आहे. झेलम, चिनाब, व्यास, रावी आणि सतलुज या त्या पाच नद्या होत. त्यावरून या प्रदेशाला पंचनद असेही प्राचीन काळी म्हणत असत. पंचनदवरूनच पंजाब शब्द बनला, असेही काहींचे मत आहे. वरील पाच नद्या पंजाबच्या भूमीला सजल, सुफल करीत पुढे सिंधू नदीला जाऊन मिळतात. सिंधू नदी त्या सर्वांसह पश्चिम सागराला भेटते.

या नद्या हिमालयाच्या पर्वतश्रेणीतून कसदार माती वाहून आणून पंजाबची भूमी सुपीक बनवतात, हे त्यांचे भौगोलिक महत्त्व, पण त्यांना याहून आगळे असे ऐतिहासिकही महत्त्व आहे. पंजाबातल्या निरनिराळ्या प्रदेशांना सीमित करण्याचे कार्य जसे त्यांनी केले, तसेच बाहेरून येणाऱ्या आक्रमकांना निदान पावसाळ्यात तरी रोखून धरण्याचे कार्यही केले. मैदानात आल्यावर या सर्व नद्या विस्तृत होतात. त्यामुळे वायव्येकडून येणारे आक्रमक सामान्यपणे शिवालिक पर्वतश्रेणीच्या पायथ्याशी असलेल्या प्रदेशातून त्या ओलांडीत. तिथून पायउतार झाल्यावर मग ते खाली दक्षिणेकडे वळत. त्यामुळे पंजाबात ज्या काही क्रांतिकारक लढाया झाल्या, त्या पंजाबच्या आग्नेयीस असलेल्या मैदानावर झाल्या. हे मैदान म्हणजे यमुना व सतलुज या दोन नद्यांमधला प्रदेश होय. ठाणेश्वर, कुरुक्षेत्र, सरहिंद आणि पानिपत ही रणक्षेत्रे याच प्रदेशात आहेत. पंजाबच्या पूर्व भागातली जमीन समृद्ध असल्यामुळे व तिथले हवापाणीही चांगले असल्यामुळे आक्रमकांना त्या प्रदेशावर धाड घालण्याची लालसा होत असे. तो मुलूख जिंकल्यावर तिथे स्थायिक होणेही त्यांना आवडत असे.

**व्यवसाय**– पंजाब हे कृषिप्रधान राज्य आहे. शेती उत्पादनाच्या दृष्टीने भारताच्या सर्व राज्यांत त्याचा पहिला क्रमांक लागतो. इथले शेकडा ६६ लोक शेतीमध्ये गुंतलेले आहेत. इथली बरीचशी भूमी कालव्यांच्या पाण्याने भिजते. पंजाबमध्ये नित्य वाहणारे आणि गरज पडेल तेव्हा वाहणारे असे दोन प्रकारचे कालवे आहेत. इथली कालव्यांची व्यवस्था सर्व जगात चांगली समजली जाते. भाकडा नांगल धरणातून निघालेल्या कालव्यामुळे तर पंजाबची सिंचाई योजना विशेषच महत्त्वपूर्ण झालेली आहे. भाकडा धरणातून निघालेले पाणी पंजाब सुपीक करून राजस्थानच्या भूमीलाही भिजवते. इथे विहिरींच्या पाण्यावरही बरीच जमीन ओली होते. गहू, यव, हरभरा, तीळ, ज्वारी, बाजरी, मका, तंबाखू, कापूस, ऊस ही इथली मुख्य पिके होत. गहू सर्वांत अधिक पिकतो. पर्वतीय विभागात फळांचे पीक चांगले येते. काही भागात चहाचीही लागवड होते. पशुपालन हाही एक इथला मोठा व्यवसाय आहे. त्यामुळे पंजाबात दही, दूध मुबलक मिळते. पंजाबी गायी व म्हशी दुधाळ म्हणून प्रसिद्ध आहेत.

पजाबच्या शेती व पशुपालन व्यवसायात जाट लोक प्रमुख आहेत उत्कृष्ट शेतकरी म्हणून त्याचा लौकिक आहे भारतीय सैन्यदलातही जाटाची सख्या मोठ्या प्रमाणात आहे



पजाबी शेतकरी

पजाबातल्या औद्योगिक क्षेत्रात शीख लोक सर्वात पुढे आहेत लोकरी व रेशमी वस्त्रे ते विणतात, लाकूडकाम करतात शस्त्रे, वाद्ये व खेळाची साधनेही बनवतात शीख लोक भारतीय सैन्य दलातही मोठ्या सख्येने आहेत

**व्यापारी गट**—पजाबात व्यापार करणाऱ्याचे पाच गट अथवा वर्ग आहेत पहिल्या वर्गात बनिया, सूसार, बोहरा व पहाडी महाजन हे लोक येतात दुसऱ्या वर्गात सूद व भाब्रा, तिसऱ्या वर्गात खत्री, खाक व भाटिया, चौथ्या वर्गात अरोड आणि पाचव्या वर्गात खोजा आणि पराच हे लोक येतात पहिला वर्ग पूर्व आणि आग्नेय या भागात राहतो दुसरा वर्ग उत्तरेकडील टेकड्यांच्या पायथ्याशी राहतो तिसरा वर्ग वायव्य सरहद्द सोडून बहुतेक सर्वत्र आढळतो चौथा वर्ग मूलत डेरेजाट आणि बहावलपूर या भागात राहतो पाचवा वर्ग हा मुसलमानाचा असून, ते लोक मध्य आणि पश्चिम विभागात आढळतात

बनियामध्ये आगरवाल, ओसवाल, माहेश्वरी, सरालिया, देस असे पोटविभाग आहेत बनियापकी ९९ टक्के लोक हिंदू असून, ते मुख्यत्वे वैष्णव आहेत, काही लोक जैन आहेत, माहेश्वरीची वस्ती बीकानेरमध्ये असून ते मूळचे राजपूत आहेत

सूसार हे वैष्णवपथी हिंदू असून, गुरगाव हे त्याचे मुख्य केंद्र आहे धोसी टेकडीवरून त्याना हे नाव पडले आहे हे मूळचे ब्राह्मण असून, साप्रत ब्राह्मण्य सोडून शेतकरी वर्गात दाखल झाले आहेत पहाडी भागात कोणत्याही दुकानदाराला किंवा सावकाराला बोहरा म्हणतात पजाबातील सगळे बोहरा हे हिंदू असून त्यातले काही मारवाडी ब्राह्मणही आहेत लुधियाना व त्याच्या आसपासचा प्रदेश हे सूद लोकाचे मुख्य केंद्र होय पजाबाबाहेर हे सहसा आढळत नाहीत पहाडावरचे व पहाडाखालचे असे त्याचे दोन भेद आहेत माखरेचा व्यापार आणि सावकारी या गोष्टी बहुतेक याच्या हाती आहेत होशियारपूर व सियालकोट ही भाब्राची मुख्य केंद्रे होत सूदाची आणि याची सामाजिक स्थिती बहुधा सारखीच आहे भाब्रा हे श्वेताबर जनापैकी आहेत

याशिवाय बनजारा, लबाना, राहबारी, ऊटवाल, गणियार, भम्रा, रगार, कुजडा काश्मीरी अशाही काही व्यापारधदा करणाऱ्या जाती पजाबात आढळतात पजाबची लोकसख्या दोन कोटीच्या वर आहे

**आर्यपूर्व पजाब** – पजाब हे नाव मिळण्यापूर्वी या प्रदेशाला सप्तसिंधू म्हणत सप्तसिंधू म्हणजे सात नद्याचा प्रदेश होय ऋग्वेदात तसा त्याचा उल्लेख येतो (ऋ ९ ६६ ६) सिंध आणि पजाब मिळून हा प्रदेश बनला होता वर दिलेल्या पाच नद्यात सिंधू व सरस्वती या दोन नद्या मिळविल्या, की ते नाव साथ होते सप्तसिंधूचेच इराणी रूप हप्त हिंदू असे होते इराणी लोक स च्या जागी ह असा उच्चार करतात हिंदू शब्द मूळ सिंधवरूनच बनला आहे सिंधू प्रदेशातल्या लोकाना ते लोक हिंदू म्हणत तेच नाव पुढे भारतीय जनतेने स्वत साठी स्वीकारले

आर्य लोक ख्रिस्तपूर्व तीन ते चार हजार वर्षांच्या सुमारास पजाबमध्ये प्रविष्ट झाले त्याच्या आगमनाच्या पूर्वीही पजाब हा सास्कृतिक दृष्ट्या विकसित असा प्रदेश होता हडाप्पा व तक्षशिला ही या भागातली दोन प्राचीन नगरे होत त्या दोन्ही नगरांचे उत्खनन साप्रत झालेले आहे त्या उत्खननावरून असे कळून येते, की आर्यांच्या आगमनापूर्वीच काही लोक इथ नगरे वसवून स्थायिक स्वरूपात राहत होते त्याची संस्कृती ही नागर संस्कृती होती त्याना नगररचनेचेही चागल्या प्रकारचे ज्ञान होते ते लोक व्यापार करणारे होते व त्याचा इराक व इराण या देशाशी व्यापारी सबध होता स्थलमार्गाप्रमाणेच जलमार्गानेही ते व्यापारी देवघेवी करीत त्याच्याकडे सपत्ती बाही मोठा साठा होता ही सपत्ती त्यानी शेती व व्यापार या दोन साधनानी मिळवली होती शेतीसाठी ते बलाचा उपयोग करीत व गायी, म्हशी, बकऱ्या, उट, हरिण या पशूना पाळीत ते शस्त्रास्त्रे बनवत, त्याचप्रमाणे स्त्री पुरुषानी वापरायचे

अनेक दागदागिनेही बनवीत त्याच्याजवळ लिपी होती आणि चित्रकलाही होती शिवाशी सादृश्य असलेल्या कोणत्या तरी देवाची ते पूजा करीत त्याशिवाय ते नाग व वृक्ष यानाही पूज्य मानीत

त्या सस्कृतीला सिधुसस्कृती असे म्हणतात कोणत्या तरी द्रविड जातीने ही सस्कृती निर्माण केली होती वदिक आर्यानी भारतात आल्यावर पुरदर इद्राच्या नतृत्वाखाली या द्रविडाचा पराभव केला, त्याची नागर सस्कृती उध्वस्त केली व सप्त सिधू प्रदेशावर विजय मिळवला त्यामुळे अबाला जिल्ह्यातल्या सरस्वतीपासून सिधूउपत्यकेपर्यतचा प्रदेश आर्याच्या स्वामित्वा खाली आला यदू पुरु, अनू, द्रुह्यू व तुवश हे आर्याचे पाच जन (गट) त्या प्रदेशावर सत्ता चालवू लागले पुढच्या काही शतकानतर त्याचा पूवकडे यमुना नदीच्या तीरापर्यत फलाव झाला

पण उत्तरच्या बाजूला हिमालयाच्या पर्वतश्रेणी आर्याचा रस्ता अडवून बसल्या होत्या त्या पहाडी प्रदेशात शबर हा किरात राजा राज्य करीत होता त्याचे हे राज्य व्यास व रावी या दोन नद्याच्या मध्यभागातल्या पहाडी प्रदेशात होते त्याला जलधर खड असे नाव होते सांप्रतचे जलधर हे नाव त्यावरूनच पडले आहे शबराच्या आधिपत्याखाली शबर गिरिदुर्ग होते व ते सामान्य शस्त्रीला अभेद्य होते

खालच्या मैदानी प्रदेशात शबराच्या राज्याला भिडून आर्य कुलोत्पन्न दिवोदासाचे राज्य होते त्यामुळे शबर आणि दिवो दास याच्यामध्ये सतत वर चाले दिवोदासाने अव्याहत चाळीस वर्ष शबराशी टक्कर देऊन त्याचे गिरिदुर्ग फोडले, त्याला परा भूत केले व आपला पुढील मार्ग मोकळा केला

ऋग्वेदात उल्लेखिलेले पचजन हे जरी सप्तसिधूचे स्वामी होते, तरी ते सिधुप्रदेशात राहत मात्र नसत वितस्ता (झेलम) व असिक्नी (चिनाब) या नद्याच्या पूर्वकडील भागात त्यानी आपला मुक्काम ठेवला होता या पचजनापकी पुरु हे पर ष्णीच्या (रावी) तीरावर राहत त्याच्या पूर्वला यदु तुर्वशाचे निवासस्थान होते हा भाग सतलुज व रावी या नद्याच्या खालच्या अगाला येतो द्रुह्यूची भूमी रावीच्या पश्चिमेस झेलमपर्यत पसरली होती द्रुह्यूच्या उत्तरेस अनू होते ऋग्वेदात दाशराज्ञयुद्ध या नावाने एक लढाई प्रसिद्ध आहे सातव्या मडलात त्या लढा इचे वर्णन करणारी सूक्ते आहेत दिवोदास व शबर याचे युद्ध हे भिन्नवशीय होते तर दाशराज्ञयुद्ध हे आर्यजनाचे आपसातलेच युद्ध होते सुदास विरुद्ध अनु द्रुह्यू असा तो सग्राम होता अनु द्रुह्यूच्या पक्षाला पक्थ, भलान, अलिन, विषाणी, शिव, इ आर्येतर गण येऊन मिळाले होते या युद्धात सुदास विजयी झाला परुष्णी (रावी) ओलाडून पुढे चालत्या शत्रूचा सहार करून त्याने उरलेल्याना रावीच्या पलिकडे पळवून लावले या युद्धात अनु-द्रुह्यूचे साठलक्ष सहा हजार सहासष्ट वीर ठार झाले या युद्धामुळे सुदासाला रावी नदीच्या पलिकडच्या अनु द्रुह्यूचा प्रदेशही मिळाला व त्याची कीर्तीही पुष्कळच वाढली

वदिक आर्य त्यानतर हळूहळू भारतात पूर्वकडे सरकू लागले सनपूर्व सुमारे १५०० च्या सुमारास त्यानी नर्मदेपर्यत हातपाय पसरले त्याच्या पाठोपाठ मालव नावाचा एक गण मध्यभारतात येऊन अवती प्रदेशावर राज्य करू लागला मालवगण हा पजाबा तूनच मध्यभारतात उतरला, याविषयी इतिहासकाराचे बहुमत आहे हे मालव लोक त्या काळीच सर्व लोकात अधिक युयुत्सू व युद्धकुशल होते शिकदराच्या आक्रमणाला रोखून धरले ते या मालवगणानेच ग्रीक इतिहासकार प्लूटार्क याने शिकदर आणि मालवगण यांच्या युद्धाचे वर्णन करताना म्हटले आहे, की मालवानी शिकदराचे सैन्य छिन्नभिन्न केले आणि त्याला आपली मोहीम स्थगित करून मागे जायला लावले

महाभारतकाली पजाबला वाहीक देश अशी सज्ञा होती त्या काळी या देशाची परिस्थिती ठीक नव्हती त्याला कोणी समर्थ असा शास्ता नव्हता छोटे छोटे शस्त्रजीवी सघ निर्माण होऊन ते आपसातच लढत होते त्यामुळे सारा पजाब भयग्रस्त झाला होता स्त्रियाची अब्रूही सुरक्षित नव्हती विवाहसस्थेचा तिथे अभाव होता धर्म नावाची वस्तूच शिल्लक उरली नव्हती मानवी उच्छृखलतेचे ते एक बेबद युग होते म्हणूनच महाभारतात म्हटले, की 'न तत्र दिवस वसेत्' = वाहीक देशात एक दिवसही वस्ती करू नये

भारतीय युद्धात पजाबातील गणराज्यानी कौरवाचा पक्ष घेतला होता शल्य व भूरिश्रवा हे पजाबचेच राजे होते भारतीय युद्धानतर सतलुजपासून रोहतकपर्यतच्या प्रदेशात यौधेय नावाचा एक बलशाली गण राज्य करू लागला या यौधेय वशाचे लोक आजही हरियाणा व भटियाणा या भागात वास्तव्य करतात व हिरा या नावाने ओळखले जातात झेलम नदीच्या काठी शहापूर व गुजरात या भागात केकय गण राज्य करीत होता सतलुज व व्यास या नद्याच्या उत्तर भागाला कुणिदाचे राज्य होते सियालकोट व त्या भोवतालचा प्रदेश या भागावर मद्र गणाचे राज्य होते असे अनेक गण पजाबच्या वेगवेगळ्या भागात आपापली सत्तास्थाने निर्माण करून बसले होते

**परकीय आक्रमणे** – शिकदराने भारतावर आक्रमण केले, त्या पूर्वीच्या हजार वर्षांत भारतावर परकीयाची चार पाच तरी आक्रमणे झाली होती परतु त्याविषयी फारशी माहिती उप लब्ध नाही सनपूर्व ३२६ मध्ये शिकदराने पजाबमध्ये प्रवेश

केला. तक्षशिलेच्या अंभी राजाला आपल्या बाजूला वळवून त्याने सिंधुनदीपलीकडील पुरु (पोरस) या राजावर हल्ला चढवला व त्याचा पराजय केला. त्यानंतर त्याचा पुढचा प्रवास बराच सुकर झाला. त्याने चिनाब व रावी या दोन नद्या पार करून व्यास नदीपर्यंतचा सर्व प्रदेश काबीज केला.

शिकंदरला त्यापुढे जाऊन मगधावर धडक मारायची होती. पण मगधाधिपतीचे सैन्य परम बलाढ्य असल्याचे वार्ता आल्यावरून शिकंदराच्या सैनिकांनी दहशत घेतली आणि आगेकूच करायला साफ नकार दिला. शिकंदराने त्यांना धमकावून पाहिले आणि चुचकारूनही पाहिले. पण कशाचाच उपयोग झाला नाही. मग निरुपाय होऊन शिकंदराला मागे परतावे लागले. तो परत गेल्यावर चंद्रगुप्त मौर्य याने तो सारा प्रदेश हस्तगत करून आपल्या साम्राज्याला जोडला.

त्यानंतर काही काळाने शिकंदराचा एक सेनापती सेल्यूकस याने पुनश्च पंजाबावर आक्रमण केले. पण चंद्रगुप्ताने ते मोडून काढले. चंद्रगुप्ताशी सलोखा करून आणि आपली मुलगी त्याला देऊन सेल्यूकसाला परत जावे लागले.

सनपूर्व दुसऱ्या शतकात बॅक्ट्रियाचा राजा मिनांडर (मिलिंद) याने पंजाब जिंकून सुमारे एक शतक तिथे राज्य केले, असे म्हणतात. तक्षशिला ही त्याची राजधानी होती. पुष्यमित्र शुंगाने त्याचे मर्दन करून त्याने बळकावलेला प्रदेश आपल्या सत्तेखाली आणला. मिनांडर पराभूत झाला, पण आपल्या मायदेशी परत गेला नाही. तो बौद्ध धर्म स्वीकारून भारतातच राहिला. त्यानंतर शक लोक चालून आले. त्यांनी पंजाब तर जिंकलाच, शिवाय इतरही भारतीय भूभाग आक्रमिला. या शकांना विक्रमादित्याने पराभूत केले आणि शकारी हे बिरुद स्वतःला लावून घेतले. त्यानंतरचे मोठे आक्रमण म्हणजे कुषाणाचे. त्या वंशातील कनिष्क हा पंजाब जिंकून तिथला राजा झाला. याची राजधानी पुरुषपुर (पेशावर) येथे होती. मध्य आशियापासून बंगालपर्यंत त्याचे साम्राज्य पसरले होते. इ. स. च्या ५ व्या शतकापर्यंत त्याचे हे साम्राज्य गाजले. नंतर श्वेत हूण भारतावर चालून आले. त्यांनी कुषाणांचा उच्छेद करून त्या जागी आपली सत्ता स्थापली. हे श्वेत हूण इराण, बुखारा, अफगाणिस्थान असे अनेक देश पादाक्रांत करीत भारतात पोचले होते. इथे येताच त्यांची स्कंदगुप्ताशी गाठ पडली. स्कंदगुप्ताने त्यांना मारून-पिटून परतीच्या वाटेला लावले. पण थोड्याच कालानंतर पुनश्च बळ बांधून ते भारतावर चालून आले. इ. स. च्या ५ व्या शतकाच्या अखेरीस पंजाब आणि गांधार घेऊन भारताच्या अनेक भागांवर त्यांनी सत्ता मिळवली. तोरमाण हा त्यांचा सरदार होता. त्याच्या नंतर त्याचा पुत्र मिहिरकुल हा सत्तेवर आला. त्याने सियालकोट ही आपली राजधानी केली. त्याने मध्य भारतावरही आक्रमण केले. पण माळव्यातील यशोधर्मा व गुप्त सम्राट बालादित्य यांनी मिहिरकुलाचा पराभव करून त्याच्या आक्रमणाला पायबंद घातला. काश्मीर व गांधार या देशांवर त्याची सत्ता राहिली. हा मिहिरकुलही भारत सोडून गेला नाही. त्याने हिंदू बनून शैव पंथाची दीक्षा घेतली. त्याच्या बरोबरचे सर्व हूण सैनिकही पुढे हिंदू लोकांत कायमचे मिसळून गेले.

इ. स. च्या ८ व्या शतकात पूर्व पंजाबवर तोमर वंशाचे राज्य होते, ९ व्या शतकात तो प्रदेश प्रतीहारांच्या साम्राज्यात समाविष्ट झाला. त्याच काळात पश्चिम पंजाबवर शाही वंशाचे राज्य होते. इ. स. च्या १० व्या शतकाच्या उत्तरार्धात पंजाबवर मुसलमानी आक्रमणे सुरू झाली. इ. स. ९८० साली गझनीचा सबुक्तिगीन याने पंजाबवर स्वारी केली. शाही जयपाळ हा त्या वेळी पश्चिम पंजाबवर राज्य करीत होता. त्याने सबुक्तिगीनाशी टक्कर दिली, पण त्याचा निभाव लागला नाही. मग त्याने सबुक्तिगीनाला खंडणी द्यायचे मान्य करून आपला गळा सोडवून घेतला. पुढे त्याने ती खंडणी न दिल्यामुळे सबुक्तिगीनाने पुन्हा त्याच्यावर स्वारी केली. त्या युद्धात जयपाळ सपशेल हरला. तेव्हापासून पंजाब हिंदूंच्या हातातून गेला आणि हिंदूंच्या इतिहासातील प्रदीर्घ तमोयुगाला प्रारंभ झाला, असे डा. पु. ग. सहस्रबुद्धे यांनी म्हटले आहे.

पुढे इ. स. च्या ११ व्या शतकात सबुक्तिगीनाचा मुलगा गजनीचा महमूद भारतावर चालून आला. त्याने पंजाबातच नव्हे, तर पूर्वेस कनौज व दक्षिणेस सोमनाथपर्यंत मजल मारली. पुढील तीनशे वर्षांत ही मुसलमानी आक्रमणे अव्याहत चालू राहिली. त्यामुळे पंजाब खिळखिळा झाला. इ. स. च्या १२ व्या शतकाच्या अखेरीस शिहाबुद्दीन घोरीच्या स्वाऱ्या सुरू झाल्या. इ. स. ११९३ मध्ये पृथ्वीराज चव्हाण मारला गेला आणि दिल्लीवर मुसलमानी सत्ता प्रस्थापित झाली. पृथ्वीराजाच्या मृत्यूने हिंदूंचा शेवटचा आशादीपही मालवला. इ. स. १२०५ मध्ये कुतुबुद्दीन ऐबक हा गुलाम वंशातला सुलतान लाहोर येथे बादशहा म्हणून सत्ताधिष्ठित झाला. इ. स. १२८८ पर्यंत गुलाम घराण्याची सत्ता दिल्ली व लाहोरवर चालली. त्यानंतर खिलजी वंशाची सत्ता सुरू झाली. इ. स. च्या १३ व्या शतकाच्या अखेरीस पंजाबवर मोगलांच्या स्वाऱ्या सुरू झाल्या. इ. स. १३१६ मध्ये अलाउद्दीन खिलजी मरण पावल्यावर दिल्लीवर तुघलक घराण्याचे राज्य सुरू झाले. इ. स. १३९८ साली तार्तर देशाच्या तैमूरने पंजाबवर धाड घातली. तो तर रक्तपिपासूच होता. त्याने पंजाब लुटला, जाळला आणि लोकांनी

बेसुमार कत्तल केली. तो दिल्लीला पोचला आणि तिथेही त्याने अतोनात मनुष्यसंहार केला.

तैमूर परत गेल्यावर सय्यद व लोदी या घराण्यांनी दिल्लीसह पंजाबवर राज्य केले. इ. स. १५१७ साली शिकंदर लोदी वारल्यावर त्याचा मुलगा इब्राहीम गादीवर बसला. त्याच्या कारकीर्दीत बाबराने पंजाबावर पाच वेळा स्वाऱ्या केल्या आणि अखेर इ. स. १५२६ साली पानिपतावर गाठून इब्राहिमला ठार केले.

**नानकपूर्व पंजाब** – त्या काळी मुसलमानी सत्ता दृढमूल झाली होती. तिने सर्वत्र हिंदूंचा छळवाद मांडला होता. जे काही हिंदू राजे होते, त्यांच्यात एकय तर नव्हतेच, शिवाय स्वाभिमानही नव्हता. ते एकमेकांच्या विरुद्ध लढत होते आणि त्या कामी प्रसंगी मुसलमानांचेही साहाय्य घेत होते. आपल्या मुली मुसलमान सत्ताधीशांच्या जनानखान्यात घालण्यातही त्यांना शरम वाटत नसे. ही झाली क्षत्रिय राजांची गोष्ट. ब्राह्मण वर्गालाही खरा धर्म म्हणजे काय हे कळत नव्हते. तो वर्ग कर्मकांडात निमग्न होता. सामान्य जनता उदास होती. तिला आपल्या राष्ट्रावर परचक्र आले आहे असे कधी वाटलेच नाही. ते तिला कोणी समजावूनही दिले नाही. ब्रह्मक्षत्रांनी तिच्या ठिकाणी धर्मप्रेरणा व राष्ट्राभिमान निर्माण करण्याच्या ऐवजी जाती जमातींत श्रेष्ठ कनिष्ठपणाच्या भिंती मात्र उभ्या केल्या.

इ. स. च्या १६ व्या शतकाच्या प्रारंभी लोदी घराण्याच्या अमलात राजकीय दृष्ट्या पंजाबचे दोन भाग झाले. एक मुलतानकडचा प्रदेश व दुसरा लाहोरकडचा प्रदेश. सामाजिक दृष्ट्याही एक हिंदू पंजाब व दुसरा मुस्लीम पंजाब असे त्याचे दोन ठळक भाग पडले होते. मुस्लीम समाज हा राज्यकर्त्यांचा समाज होता. त्याचा सर्वत्र मानसन्मान होई. त्याला सर्व सवलती मिळत. मोठमोठ्या हुद्द्यांवरही त्यांचीच नेमणूक होई.

हिंदू समाजाची स्थिती अगदी याच्या उलट होती. ते काफिर समजले जात. त्यांना जिझिया कर द्यावा लागे. याशिवाय इतरही अनेक कर हिंदूंकडून सक्तीने वसूल केले जात. हे कर चुकवायचे असले, तर एकच मार्ग होता आणि तो म्हणजे हिंदूंने मुसलमान होणे हा होय. अशा प्रकारे मुसलमान राज्यकर्ते आणि इस्लामचे प्रचारक हरतऱ्हेचा छळवाद करून हिंदूंना मुसलमान बनवू लागले होते.

सामाजिक दृष्ट्या जाती व पोटजाती यांनी पंजाबातील हिंदू समाज म्हणजे एक गुंतागुंतीचे जंगल झाले होते. ब्राह्मणवर्ग जनतेच्या अज्ञानाचा फायदा घेऊन श्रद्धावान गोरगरीब लोकांकडून दान दक्षिणेच्या रूपाने धन उकळीत होता. अस्पृश्यता हा धर्माचाच एक भाग बनला होता. शूद्रांचा स्पर्शही त्रैवर्णिकांना अधम ठरत होता. सर्वत्र अज्ञान आणि अंधश्रद्धा यांचा अंधार दाटला होता. ही सर्व परिस्थिती अवलोकन केल्यावर गुरू नानकांच्या मुखातून पुढील उद्गार निघाले –

**कलिकाती राजे कसाई। धर्म पंखकर उड गया।**
**कूड अमावस सच्च चंद्रमा। दिसे नाही कह चडिया।।**

भावार्थ – या कलियुगात राजे कसाई बनले आहेत. धर्म पंख लावून उडून गेला आहे. सर्वत्र अधर्म प्रभावी झाला आहे. असत्याची कृष्ण अमावास्या पसरली असून, सत्याचा चंद्रमा लोपून गेला आहे.

बाबर आला, तोही अन्याय, असत्य व अधर्म यांचा पुतळाच ठरला. त्याने पंजाबचे जनजीवन भकास व भयाण करून टाकले. गुरू नानक म्हणतात –

**पापकी जंज लै काबलो धाया।**
**जोरी मंगई दान वे लालो।**
**शरम धरम दोहे छप्प खलोरा।**
**कुड फिरही परधान वे लालो।।**

भावार्थ – क्रूर बाबर आपल्याबरोबर पापाची सेना घेऊन भारतावर चाल करून आला आहे. बलात्काराने धन व संपत्ती मागत आहे. लोकलज्जा व धर्म पळून गेले आहेत. सर्वत्र पाप व असत्य यांचा अमल चालू आहे.

बाबरापासून औरंगजेबापर्यंत दिल्ली–पंजाबवर मोगलांची सत्ता कायम राहिली. या काळात पंजाबामध्ये इतिहासाला पुनश्च एक वेगळी कलाटणी मिळाली. गुरू नानक यांच्या जन्माने पंजाबच्या इतिहासातील हे नवे उज्ज्वल पर्व सुरू झाले. हिंदू व मुस्लीम या दोन्ही धर्मांना मिलाफ करून एक नवा सुधारलेला धर्म स्थापावा असा नानकांचा विचार होता, असे काही इतिहासज्ञ म्हणतात, पण ते खरे नव्हे. इस्लामी अत्याचाराचा प्रतिकार करता यावा आणि हिंदूंमध्ये नवे बळ निर्माण व्हावे, या हेतूने त्यांना हिंदू धर्माची नवी घडी बसवायची होती. धर्मात बऱ्याच सुधारणा करायच्या होत्या. त्यांच्या या जीवनभराच्या प्रयत्नांतूनच पुढे शीख पंथ उदयाला आला.

त्या काळी मुसलमानांतही जातिभेद आणि प्रांतभेद होते. अफगाण मोगलांचा द्वेष करीत आणि मोगल अफगाणांना पाण्यात पाहत. त्यांची परस्पर युद्धेही होत. पण त्या दोन मुसलमान समाजाच्या झुंजीत कत्तल व्हायची ती हिंदूंची. घरादाराला मुकायचे ते हिंदूच. देवळे फोडली जायची, तीर्थस्थाने भ्रष्ट केली जायची ती हिंदूंचीच. सदपूर येथे मोगलांना अफगाणांनी विरोध केला, पण त्यात शिरकाण झाले ते हजारो हिंदूंचे. लाहोर घेताना बाबराला स्थानिक मुसलमानांनी विरोध केला. त्यामुळे बाबर चिडला आणि त्याने समग्र लाहोर शहर लुटले आणि नंतर जाळले. पण त्या जाळपोळीत भयंकर नाश व

संहार झाला, तो हिंदूंच्या संपत्तीचा आणि हिंदू जीवाचा

त्या काळच्या व्यापारही मुसलमानांच्याच ताब्यात होता मुसलमान व्यापारी पश्चिमेकडील मुसलमान राष्ट्रांबरोबर व्यापार करीत असत हिंदूमधली व्यापारी वृत्तीच मेली होती धर्मशास्त्राने परदेशगमन हे पाप ठरवल्यामुळे हिंदु समाज कूप-मंडूक बनला होता बाहेरच्या जगाशी त्याचा संपर्कच सुटला होता देशाबाहेर जावे, तलवार गाजवावी, व्यापार करावा, संपत्ती मिळवून आणावी, या कल्पनासुद्धा हिंदूला शिवत नव्हत्या त्यातूनही कोणी हिंदू व्यापार करू लागला, संपत्ती मिळवू लागला, तर ते लगेच मुसलमान राज्यकर्त्यांच्या डोळ्यात सलू लागे आणि ते हरप्रकारे त्याला नागवीत व हैराण करीत अशा प्रकारे पंजाबातला हिंदू केवळ नाममात्र माणूस राहिला होता स्वाभिमान ही चीजच त्याच्याजवळ उरली नव्हती छळून घ्यावे, तुडवून घ्यावे, एवढेच करणे नशीबी तो मागीत होता मरता मरता वसा तरी जगत होता

**शिखांचे कार्य–** गुरु नानकांनी त्या समाजाच्या ठिकाणी धर्मभावना निर्माण केली त्याला स्वाभिमान शिकवला त्यांचा शिष्य अंगद व त्याचा शिष्य अमरदास यांनी नानकांच्या धर्म-प्रेरणेला संघटित रूप देऊन शीख पंथ स्थापन केला अमरदास व त्याचा शिष्य रामदास यांनी अकबरावरही आपल्या विचा-रांचा प्रभाव पाडला होता त्यामुळे शीख संप्रदायाचा खूप विस्तार झाला रामदासाचा पुत्र गुरू अर्जुन हा ज्ञानी व धोरणी होता शिखांचा गुरुग्रंथ त्यानेच तयार केला त्याच्याच अप्रति-हत प्रयत्नामुळे शीख संप्रदाय ही पंजाबातली एक राजकीय शक्ती ठरली

अर्जुनाच्या मागून हरगोविंद गुरुगादीवर आला त्याने गादी-वर येताच साऱ्या शीख समाजाला क्षात्रधर्माची दीक्षा दिली त्याने विचार केला, की प्रबळ मुसलमानी सत्तेविरुद्ध झगडायचे, तर त्यासाठी सुसज्ज लष्करी बळ हवे म्हणून त्याने आपले घोडदळ तयार केले, तोफखाना उभारला आणि सैन्यही उभे केले पुढे हळूहळू शीख आणि मोगल यांच्यात संघर्ष सुरू झाले त्यात कधी शिखांचा जय होत असे, कधी त्यांना स्थलांतर करावे लागत असे, तर कधी नरमाईने वागून स्वतःचे अस्तित्व राखावे लागत असे

इ स १६६४ साली गुरू तेग बहादर हा गुरुगादीवर आला तो यात्रामिषाने सर्वत्र हिंडून मुसलमानांनाही शीख बनवू लागला त्यामुळे औरंगजेब खवळला त्याने तेग बहादरला पक-डून त्याचा वध केला त्याच्या वधामुळे शीख समाजात विल-क्षण चैतन्य निर्माण झाले या चैतन्याचे मूर्तिमंत प्रतीक म्हणजे गुरू गोविंदसिंघ हे होत दुही, भ्रष्टाचार, इ समाजातल्या दुर्गुणांविरुद्ध प्रथम त्यांना मोहीम काढली आणि गुरू नानकांनी सांगितलेल्या तत्त्वांना उजळा दिला हे करीत असतानाच त्यांनी आपले लष्करी बळही वाढवले औरंगजेबाला ही बातमी कळली त्याने राजपूत व मोगल सरदारांचे एक लाख सैन्य गुरु गोविंदसिंघावर घातले एवढ्या सैन्यापुढे गोविंदसिंघाचा निभाव लागला नाही त्यांना पराजित होऊन अरण्यवास पत्करावा लागला ते शेवटी मराठवाड्यात नांदेड येथे येऊन राहिले आणि तिथेच अखेर त्यांचा अंत झाला 'राज्य करेगा खालसा' हे शीख समाजाचे स्वप्न अशा प्रकारे धुळीस मिळाले

पण ते स्वप्न कायमचे धुळीत राहिले नाही शिखांच्या आणि भारताच्याही सुदैवाने इ स च्या १८ व्या शतकाच्या अखेरीस रणजितसिंघ हा थोर नेता पंजाबाला लाभला त्याने शीख संप्रदायात निर्माण झालेले पंथभेद दूर करून त्यांना एका छत्राखाली आणले बाहेर राहिले ते सतलजच्या दक्षिणेचे माळवा शीख रणजितसिंघाचे स्वामित्व त्यांना मानवले नाही त्यांनी रणजितसिंघाच्या विरुद्ध इंग्रजांकडे मदत मागितली इंग्रज अशा गोष्टीला टपलेलेच होतेच त्यांनी तत्काळ रणजितसिंघावर आपले सैन्य धाडले इंग्रजांचे सामर्थ्य रणजितसिंघ जाणून होता आपण इंग्रजांना पुरे पडणार नाही, हे लक्षात घेऊन त्याने इंग्रजांशी तह केला व सतलज ही आपल्या राज्याची दक्षिण सीमा राहील, असे इंग्रजांना अभिवचन दिले

मग त्याने उत्तरेकडे आपला मोर्चा वळवला त्याने वायव्य-कडून येणारे पठाणांचे आक्रमण मोडून काढले, जबारखानाचा पराभव करून काश्मीर जिंकले, पेशावर जिंकून वायव्य सरहद्दी-पर्यंत आपले प्रभुत्व स्थापले डॉ राहुरकरांच्या म्हणतात, की 'मराठ्यांनी आरंभलेले कार्य या विजयाने पुरे झाले पेशावर-पासून कन्याकुमारीपर्यंत मुस्लीम सत्ता निःशेष झाली '

त्यापुढचा काळ इंग्रजांचा इंग्रजांनी अखिल भारताबरोबरच पंजाबवरही आपली सार्वभौम सत्ता स्थापित केली ती सत्ता उखडून टाकण्यासाठी पंजाबात जी आंदोलने झाली, त्यांतले पहिले आंदोलन नामधारी पंथाचे होते बाबा रामसिंघ हे या आंदोलनाचे पुढारी होते शिखांपैकीच हा एक संप्रदाय होता वरवर हा पंथ धार्मिक दिसत होता, पण त्याचा अंतस्थ उद्देश पंजाबात राजकीय क्रांती करण्याचा होता थोड्याच काळात या संप्रदायाचे दोन लाखांच्यावर सदस्य झाले ते सर्व बाबा रामसिंघ यांना आपले गुरू मानू लागले रामसिंघाच्या वाणीत असे काही सामर्थ्य होते, की जो जो मनुष्य त्यांचे भाषण ऐके, तो तो संप्रदायाचा सदस्य बने रामसिंघांनी आपल्या सदस्यांत इंग्रजांच्या विषयी द्वेष व तिरस्कार निर्माण करण्यात खूप यश मिळवले, असे म्हणतात

नामधारींमध्ये एक गट साहसवाद्यांचा होता. अमृतसरसारख्या तीर्थस्थानात गोहत्या व्हाव्या, ही गोष्ट त्या गटाच्या मनात संताप उत्पन्न करीत होती. त्या संतापाच्या भरात एका रात्री त्यांनी अमृतसरवर हल्ला केला आणि तिथल्या सगळ्या खाटकांना कापून काढले. या घटनेने अमृतसरमध्ये विलक्षण खळबळ माजली. हे काम हिंदू धनिकांचे असावे, अशा कल्पनेने सरकारने कित्येक श्रीमंत हिंदूंना पकडून कैदेत टाकले. ही गोष्ट रामसिंघाना आवडली नाही. त्यांनी ते कृत्य करण्यात प्रमुख असलेल्या नामधारीला बोलावून आणून सांगितले की 'या कृत्याची जिम्मेदारी तू स्वीकारली पाहिजेस. पोलीस अधिकाऱ्याकडे जाऊन तू आपल्या कृत्याची कबुली दे आणि त्याचे होतील ते परिणाम निर्भयपणे सोस.'

त्याने तसे केले आणि इंग्रज सरकारने त्याच्यावर खटला चालवून त्याला फाशीची शिक्षा दिली.

पुढे याच साहसवादी गटाने रामसिंघाचा सल्ला न मानता अपुऱ्या तयारीने मोठ्या प्रमाणावर सशस्त्र उठाव केला. सरकारने तावडतोब रामसिंघ व त्यांचा भाऊ जालीमसिंघ यांना पकडले व दोघांनाही ब्रह्मदेशात हद्दपार केले. त्यानंतर बऱ्याच बऱ्याच नामधारींनाही काळ्या पाण्यावर पाठवून दिले. नामधारी संप्रदायाच्या विरुद्ध इंग्रज सरकारने सक्त कायदे केले. त्यांच्या गुरुद्वाऱ्यांवर कडक नजर ठेवली. अशा प्रकारे नामधाऱ्यांची चळवळ इंग्रज सरकारने मोडून काढली.

इ. स. १९१३ सालच्या जून महिन्यात बाबा सोहनसिंघ यांच्या नेतृत्वाखाली पंजाबात गदर पार्टीची स्थापना झाली. तिचाही उद्देश भारताला ब्रिटिशांच्या गुलामगिरीतून मुक्त करून देशात प्रजासत्ताक राज्य स्थापण्याचा होता. आपले उद्दिष्ट साध्य करण्यासाठी त्या पक्षालाही सशस्त्र उठाव करायचा होता. भाई करतारसिंघ व रासबिहारी बोस यांनी त्या दृष्टीने प्रयत्न सुरू केले. निरनिराळ्या सैनिक छावण्यांतील अनेक सैनिकही त्यांना अनुकूल झाले होते. त्या सशस्त्र उठावाचा दिवसही निश्चित झाला होता. पण कुठून तरी सरकारला या घटनेचा सुगावा लागला आणि सरकारने गदर पार्टीच्या सर्व पुढाऱ्यांना व प्रमुख कार्यकर्त्यांना लगोलग पकडून त्यांच्यावर खटले भरले. त्यात १७ जणांना फाशी व इतर अनेकांना जन्मठेप अशा शिक्षा दिल्या गेल्या. सरकारच्या या क्रूर दडपशाहीमुळे गदर पार्टीची चळवळ जमीनदोस्त झाली. पण गदर पार्टी नामशेष झाली, तरी पंजाबची स्वातंत्र्याची आकांक्षा मात्र मेली नाही. उलट दिवसेंदिवस ती वाढतच गेली. पंजाबात अनेक शूर देशभक्तांनी त्यासाठी जिवाचे रान केले. भगतसिंग हा क्रांतिकारक अशाच प्रयत्नात फासावर लटकला. लाला लजपतराय हे पंजाबचे सुपुत्र राष्ट्रीय चळवळीत अखिल भारताचे पुढारी झाले. त्यांच्या पुढारीपणाखाली पंजाब संघटित होऊन इंग्रजांविरुद्ध शर्थीने लढला. इ. स. १९४७ साली भारताबरोबरच पंजाबही स्वतंत्र झाला. पण त्याच वेळी फाळणीचा



भगतसिंग

प्रसंग उद्भवला. त्यात पंजाबचे दोन तुकडे होऊन ते दोन सत्तांच्या आधिपत्याखाली गेले. ती दुर्घटना घडत असता पंजाबी लोकांना अनन्वित अत्याचारही सहन करावे लागले.

**आर्यसमाज** – पंजाबच्या सांस्कृतिक इतिहासात आर्यसमाजाची कामगिरीही डोळ्यात भरण्याजोगी आहे. पंजाबात इंग्रज राजवटीचा जम बसल्यावर सरकारने सर्वत्र इंग्रजी शाळा व महाविद्यालये स्थापन केली. इंग्रजी शिक्षण घेऊन व इंग्रजी रीतिरिवाज स्वीकारून आपण प्रतिइंग्रज बनावे अशी तिथल्या प्रतिष्ठित लोकांची धारणा झाला. नव्या शिक्षणाच्या आणि नवविचारांच्या झगमगाटात कित्येक हिंदूंना आपला धर्मही त्याज्य व तिरस्करणीय वाटू लागला. अशातच ख्रिस्ती मिशनऱ्यांनी हिंदू धर्मावर निंदानालस्तीची झोड उठवून लोकांचा बुद्धिभेद आरंभला.

पंजाबी समाजात त्यामुळे अस्वस्थता आणि चलबिचल सुरू झाली. याच नेमक्या वेळी स्वामी दयानंद हे लाहोरमध्ये गेले. त्यांनी सर्व परिस्थितीचे अवलोकन केले. त्यांना वाटले, की प्रचलित हिंदू धर्मातल्या भ्रातकल्पनांवर गोष्टींना फाटा देऊन हिंदू जनतेला शुद्ध वैदिक धर्माची शिकवण द्यायला हवी.

म्हणून इ. स. १८७४ साली त्यांना आर्यसमाजाची स्थापना केली. या समाजामार्फत त्यांनी धर्मोपदेश सुरू केला. त्याबरोबरच राष्ट्रीय स्वाभिमान आणि धर्माभिमान वाढीस लागेल असे गुरुकुलपद्धतीचे शिक्षणही सुरू केले. पंजाबच्या सर्व जिल्ह्यांतून आर्यसमाजाच्या शाखा सुरू झाल्या. पंजाबात या चळवळीला बरेच निष्ठावंत कार्यकर्ते भेटले. त्यांनी स्वतःच्या इंग्रजी शाळा व महाविद्यालयेही सुरू केली. मागासलेल्या व अस्पृश्य जातींत त्यांनी शिक्षणप्रसार आरंभला. खालच्या जातींतल्या अनेक लोकांना त्यांनी वरच्या पातळीवर आणले. बाटून मुसलमान झालेल्या शेकडो लोकांना त्यांनी शुद्ध करून परत हिंदू धर्मात घेतले. त्यांनी अनेक ठिकाणी इस्पितळे व अनाथालये स्थापली.

हिंदूंच्या समाजातली ही धर्मजागृती पाहून मुसलमान चकित झाले. त्यांनीही मग आपल्या अंजुमानसंस्था जिकडे तिकडे सुरू केल्या. शिखांनी आपल्या सिंहसभा स्थापन करून आपण हिंदूंहून वेगळे असल्याचा दावा मांडला. आर्यसमाजाची खंडनमंडनपद्धती पसंत न पडून सनातनी म्हणवणाऱ्या अनेक हिंदूंनी सनातनधर्मसभा निर्माण केल्या. ख्रिस्ती व इस्लाम या दोन धर्मांच्या आक्रमणापासून हिंदू धर्माचे रक्षण करण्यासाठी आर्यसमाजाने अनेक संकटे सोसली व हिंदूंमध्ये धर्मजागृती निर्माण करण्यासाठी अपार परिश्रम घेतले.

**धर्मक्षेत्रे–रणक्षेत्रे** — पंजाबमध्ये जी महत्त्वाची धर्मस्थाने व रणक्षेत्रे आहेत, त्यांची थोडक्यात माहिती अशी –

**कुलू**– हे क्षेत्र हिमालयाच्या कुशीत आहे. वसिष्ठ, गौतम, व्यास, भृगी, इ. श्रेष्ठ ऋषींनी इथे तप केल्याचे सांगतात. इथे राजपुतांचे अनेक किल्ले आहेत. प्राचीन काळी हा प्रदेश कुणिंद गणराज्यात मोडत होता. इथले बहुसंख्य लोक कनैत जातीचे आहेत. आर्यांच्या आगमनापूर्वी सगळ्या हिमालयात हेच लोक वसलेले होते, असे कनिंगहॅम सांगतो. यांनाच पूर्वी कुणिंद असे म्हणत. कुलू ही देवांची भूमी म्हणून ओळखतात. इथे नाना नामरूपांचे देव पूजले जातात. दशहरापर्वाचा उत्सव सर्वांत मोठा असतो. एके काळी हे बौद्ध धर्माचे मोठे केंद्र असून, इथे अनेक विहार होते. कुलूतले आवडते पेय म्हणजे लुगडी होय. हे एक प्रकारचे मद्य असून, ते मध व फळे यांच्यापासून बनवतात.

**मनाली** – कुलूनगरापासून १९ मैलांवर हे ठिकाण आहे. इथे मनूचे प्राचीन मंदिर असून, जलप्रलयानंतर नव्या सृष्टीचा प्रारंभ इथूनच झाला, असे मानतात.

**वैजनाथ** – इथे एक प्रसिद्ध शिवमंदिर आहे. इथल्या शिवाला काही लोक बारा ज्योतिर्लिंगांपैकी मानतात. हे एक पुरातन तीर्थस्थान आहे. तिथे गंगा व यमुना यांच्याही मूर्ती आहेत.

**वज्रेश्वरी**– हे ठिकाण कांगडा जिल्ह्यात येते. इथे वज्रेश्वरीचे भव्य मंदिर असून, तिच्या दर्शनासाठी साऱ्या पंजाबमधून यात्रेकरू येत असतात.

**ज्वालामुखी**– कांगड्यापासून १६ मैलांवर हे स्थान येते. इथले ज्वालामुखीचे मंदिर पहाडात आहे. त्याच्या परिसरात जमिनीतून अग्निज्वाला निघतात व आपोआप विझतात. शतकानुशतके असा क्रम चालू आहे. हा एक निसर्गचमत्कार असला तरी लोक म्हणतात, की शिवाने जलंधर दैत्याला इथे पहाडाखाली दाबले, त्याच्या मुखातून या ज्वाळा उठत असतात. मंदिरासमोर एक कुंड आहे. त्यात सतीची जीभ गळून पडली, अशी कथा आहे. त्यामुळे हे ५१ शक्तिपीठांपैकी एक मानले जाते. इथेही खूप मोठी यात्रा भरते.

**रेवासर** – हे ठिकाण ज्वालामुखीपासून ५५ मैलांवर आहे. याला लोमश ऋषींचे तपःस्थान मानतात. इथे त्यांचे मंदिरही आहे. गुरू गोविंदसिंगांनीही इथे तप केले होते. इथे एक सरोवर असून, त्यात सात तरते भूखंड आहेत. त्याच्या पूर्वेस शीखांचा एक गुरुद्वारा आहे. इथे एक बौद्ध मंदिर असल्यामुळे बौद्ध लोकही या स्थानाला पवित्र तीर्थ मानतात.

**मणिकर्ण** – जोगिंदर शहरापासून सुमारे १४ मैलांवर हे स्थान येते. इथे एक सरोवर असून, त्याचे पाणी सदैव गरम असते. इथे पार्वतीगंगा व मणिकर्ण सरोवरातून निघालेला प्रवाह यांचा संगम होतो. तिथे स्नान करण्यासाठी पुष्कळ यात्रेकरू येतात.

**नमुंड** – सिमला तिबेट राजमार्गावरच्या रामपुरापासून ७ मैलांवर हे ठिकाण आहे. या स्थानाला परशुरामाची यज्ञभूमी मानतात. इथे अंबिकेचे एक देवालय आहे.

**चिंतापूर्णी देवी** – हे ठिकाण होशियारपुरापासून २५ मैलांवर आहे. इथल्या देवीचे हे नाव आहे. इथे दरवर्षी लाखो लोकांची यात्रा भरते.

**श्रीखंड महादेव** – कुगुड्यापासून ३३ मैलांवर हे स्थान येते. इथे एका पर्वताच्या गुहेत श्रीखंड महादेवाची मूर्ती आहे. भस्मासुराने इथे तप केले होते. त्याच्या भयाने पळत असता पार्वतीच्या नेत्रांतून ज्या अश्रुधारा वाहिल्या, त्यांचे पुढे नयनसरोवर बनले, असे सांगतात.

**मणिमहेश** – हे स्थान चंबा शहरापासून ६८ मैलांवर येते. इथे एक मोठा तलाव असून, भाद्रपद शुद्ध अष्टमीला त्या ठिकाणी स्नानयात्रा भरते.

**कर्तारपूर** – हे ठिकाण जालंधरपासून ९ मैलांवर आहे. इथे शिखांचा गुरू अर्जुनदेव यांच्या स्मृतिप्रीत्यर्थ गुरुद्वारा बनवलेला आहे. गुरू नानकांच्या वास्तव्याने हे स्थान पवित्र झाले आहे.

अमृतसर – हे एक मोठे शहर व शिखांचे पवित्रतम तीर्थस्थान आहे गुरू रामदास यांनी हे शहर वसविले इथले सुवर्णमंदिर भव्यता व कलात्मकता यांच्यामुळे जगप्रसिद्ध आहे इथे शिखांचे अकालतख्त असून, त्यात प्राचीन व ऐतिहासिक शस्त्रे ठेवलेली



सुवर्णमंदिर – अमृतसर

आहेत इथला प्रसिद्ध तलाव गुरू रामदास व गुरू अर्जुन या पितापुत्रांनी निर्माण करून पूर्णतेला नेला

आनंदपूर – हे सतलुजच्या पूर्व तीरावर वसले आहे गुरु गोविंदसिंघांनी पंच प्याऱ्यांना सर्वप्रथम अमृतपान करवले ते या ठिकाणी त्यांच्या काळात हे शीख संप्रदायाचे केंद्र बनले होते

अचलेश्वर – बटाल्यापासून ४ मैलांवर हे स्थान येते इथल्या मंदिरापुढे एक विशाल सरोवर आहे उत्तर भारतातले एकमेव कार्तिकस्वामीचे मंदिर या ठिकाणी आहे गुरु नानक यांनी काही काळ इथे साधना केली होती

व्यासकुंड – मनालीपासून ७ मैलांवर हे स्थान येते इथे १५ हजार फूट उंचीवर व्यास नदीच्या उगमाचे एक कुंड आहे स्थान दुर्गम असल्यामुळे फार थोडे लोक इथे स्नानाला जातात

कुरुक्षेत्र – दिल्ली–कालका लोहमार्गावरील एक प्रसिद्ध क्षेत्र कौरव पांडवांचे युद्ध याच ठिकाणी झाले व भगवान श्रीकृष्णाने अर्जुनाला याच रणक्षेत्रावर गीता सांगितली त्यामुळे हे एक प्रसिद्ध यात्रास्थान ठरले आहे इथे श्रीकृष्णाचे एक मंदिर आहे व संस्कृत महाविद्यालयही आहे

पानिपत – करनाळा जिल्ह्यात यमुना नदीच्या काठी हे ठिकाण आहे हे एक प्रसिद्ध रणक्षेत्र आहे इतिहासकाळात इथे तीन महत्त्वाच्या लढाया झाल्या, त्यांची माहिती अशी –

(१) मोगल वंशाचा संस्थापक बाबर व दिल्लीचा अफगाण सुलतान इब्राहिमखान लोदी यांचे युद्ध इ स १५२६ च्या एप्रिल महिन्यातल्या २१ तारखेला हे झाले या युद्धात मोगलांचा विजय झाला तोफखाना व बंदुकीची दारू ही इथल्या लोकांना अपरिचित असलेली युद्धसाधने वापरून बाबराने लोदीचा पराभव केला

(२) हिमू अर्थात हेमचंद्र व अकबर यांचे युद्ध हे इ स १५५६ साली नोव्हेंबरच्या ५ तारखेला झाले हिमू हा सूर घराण्यातील राजा मोहमद याचा दिवाण होता या युद्धात अकबराने बाजी मारून हिमूचा शिरच्छेद केला त्याबरोबरच दिल्लीवर राज्य करण्याचे अफगाणांचे प्रयत्न समाप्त झाले त्यामुळे मोगलांचे डळमळणारे सिंहासनही दृढ झाले

(३) अहमदशाहा अबदाली व मराठे यांच्यातले युद्ध हे सर्वांत मोठे युद्ध इ स १७६१ मध्ये झाले या युद्धाची पार्श्वभूमी अशी –

इ स १७५० मध्ये राघोबादादाने अबदालीचा सेनापती नजीबखान याला पदच्युत करून, तसेच सरहिंद येथे असलेल्या अबदालीच्या सुभेदाराला हाकलून लावून पंजाबला दुराण्यांच्या पाशातून मुक्त केले अबदालीला मराठ्यांचे हे वर्चस्व सहन झाले नाही त्याने मराठ्यांशी मुकाबला करायचे ठरवले आपला दळभार घेऊन व अटक ओलांडून तो पंजाबात उतरला त्या वेळी मराठ्यांनी दिल्ली काबीज करून पानिपतावर आपली छावणी ठेवली होती अबदालीने पुढे येऊन प्रथम मराठ्यांची रसद तोडली ते पाहून भाऊसाहेब पेशवे सबळले व अबदालीवर सरळ चालून गेले पण ते युद्ध मराठ्यांच्या दृष्टीने आणि भारताच्याही दृष्टीने दुर्दैवी ठरले मराठे अत्यंत निकराने लढत असताना विश्वासराव हा भाऊसाहेबांचा पुतण्या गोळी लागून धारातीर्थी पडला विश्वासरावाच्या मृत्यूमुळे हतप्रभ होऊन मराठी सैन्याने कच खाल्ली भाऊसाहेबही त्या युद्धात मारले गेले अशा प्रकारे मराठे हरले व त्या युद्धात हजारोंच्या संख्येने मारलेही गेले

मार्कंडेय – बिलासपूरजवळ हे सरोवर आहे इथे मार्कंडेय ऋषींनी तप केल्याचे सांगतात इथल्या पांच तीर्थांत स्नान करण्यासाठी यात्रेकरू जमतात

कैथल – करनाळा जिल्ह्यात हे स्थान आहे रामायणकाळात याला कपिस्थल म्हणत पांडवांनी कौरवांकडे जी पांच गावे मागितली, त्यांत हे एक होते

थानेसर – एक वैष्णव क्षेत्र इथे एक मोठे सरोवर असून, त्याला ब्रह्मसर म्हणतात जवळच स्थानेश्वर व लक्ष्मीनारायण यांची मंदिरे आहेत भारतीय युद्धापूर्वी पांडवांनी इथे शिवाची

पूजा करून विजयाचे वरदान मिळवले होते, असे सांगतात.

अटक, डेरा गाजीखान, डेरा-इस्माइलखान, जालंधर, लाहोर, मुलतान व पेशावर ही पंजाबमधील प्रमुख शहरे होत.

**स्पिती** – पंजाबच्या उत्तर सीमेवर हा भाग येतो. या भागात हिमालयाची बर्फाच्छादित शिखरे आहेत. प्राचीन काळी धर्मभूमी व देवभूमी म्हणून हा प्रदेश प्रसिद्ध होता. ऋषी मुनींनी इथे जे यज्ञ केले त्यांची साक्ष हवनकुंडाच्या रूपाने आजही इथे दिसते. त्रेतायुगात परशुराम या पर्वतभूमीत राहत होता. त्याच युगात गोमक्षक म्लेच्छांनी चीनच्या बाजूने या प्रदेशावर आक्रमण केले होते आणि जमदग्नीच्या तपोभूमीत प्रवेश करून त्याचा वध केला होता. परशुरामाने या म्लेच्छांचा कुरुक्षेत्रापर्यंत पाठलाग करून त्या ठिकाणी त्यांना कंठस्नान घातले. महाभारतात वर्णिलेला घटोत्कच हा याच भूमीत जन्मला व वाढला. इ. स. च्या सहाव्या शतकात श्वेत हूणांनी काश्मीर जिंकून पंजाबमध्ये प्रवेश करण्याचा प्रयत्न केला असता इथल्या शूरवीर पुरुषांनी त्यांना परतवून लावले. चेंगीजखान चालून आला असता त्यालाही या प्रदेशातल्या लोकांनी कडवा प्रतिकार केला होता.

हा प्रदेश सुमारे तीनशे वर्षे लडाखच्या कक्षेत होता. त्या वेळी या भागात बौद्ध धर्माने आपले पाय पसरले. इ. स. च्या सतराव्या शतकात या प्रदेशावर तिबेटच्या राजाने आक्रमण केले, पण त्याला त्यात यश मिळाले नाही. एकोणिसाव्या शतकात शीखांनीही स्पीतीवर आक्रमण केले, पण तिथल्या पहाडी तरुणांनी त्यांना तो प्रदेश घेऊ दिला नाही.

**लाहौल** – हाही पंजाबमधलाच एक विशिष्ट भाग आहे. युआन च्वांगने याला लोहोलो म्हटले आहे. इ. स. च्या आठव्या शतकाच्या प्रारंभी हा प्रदेश चीनदेशाच्या सत्तेखाली होता. त्याच वेळी लाहौलमध्ये बौद्ध धर्माने प्रवेश मिळवला. इ. स. १८४० साली शीखांनी हा प्रदेश हस्तगत केला व पुढे त्यांच्याकडून तो इंग्रजांना मिळाला.

**कांगडा** – हा पंजाबच्या उत्तरेचा पहाडी प्रदेश आहे. इथले लोक स्वतःला डोगरा म्हणवितात. प्राचीन वंशावळीप्रमाणे इथे ख्रिस्तपूर्व दीड हजार वर्षांच्या सुमारास कटोच राजपुतांच्या पूर्वजांचे राज्य होते. युआन च्वांगच्या मते कांगडाचे राज्य जालंधरपर्यंत पसरले होते. मुसलमानी सत्ताकालात हे कटोच राजपूत मैदानातून परास्त झाले व त्यांनी पहाडांत ये आपले गड निर्माण केले. कांगडा हे त्यांचे केंद्र होते. इथल्या देवमंदिरात अफाट धनसंपत्ती साठलेली आहे, अशी बातमी मिळाल्यावर गझनीच्या महमुदाने इ. स. १००९ साली या प्रदेशावर धाड घालून इथली संपत्ती लुटून नेली. कांगडा हे हिंदूंचे, तसेच जैनांचेही तीर्थस्थान आहे. कित्येक जैन मंदिरांचे भग्नावशेष या ठिकाणी आढळतात. वज्रेश्वरी देवीचे स्थान कांगडामध्येच आहे.

**चंडीगढ** – भारताची फाळणी झाल्यानंतर लाहोर ही पंजाबची राजधानी पाकिस्तानच्या वाट्याला गेली आणि भारतीय पंजाबला राजधानीच उरली नाही. पंजाब सरकारने चंडीगढ नामक स्थानावर आपली नवी राजधानी बनवण्याचा निर्णय घेतला. १९५३ साली भारताच्या राष्ट्रपतींनी या नगराची पायाभरणी केली. हे नगर शिवालिक पर्वतराजीच्या कुशीत वसले आहे. पाश्चात्य शैलीवर याची उभारणी झाली आहे. नऊ मजली सचिवालय, वरिष्ठ न्यायालय, विधानसभाभवन, राजभवन, विश्वविद्यालय या इथल्या वास्तू भव्य असून, दर्शनीय आहेत. या नगराचे सुमारे तीस भाग पाडलेले असून, प्रत्येक विभागातली घरे समान रूपाची ठेवण्याचा प्रयत्न केलेला आहे. नगर उभारताना ते सर्व बाजूंनी सुंदर दिसेल, हा विचार सतत मनात ठेवलेला आहे. चंडीगढच्या उत्तर सीमेवर एक कृत्रिम सरोवर निर्माण केलेले आहे. हौशी लोकांना त्यात जलविहार करता यावा आणि पावसाळी ओढ्यांचे पाणी त्यात साठून नगराचे संरक्षण व्हावे, असा दुहेरी उद्देश हा सरोवर निर्मितीच्या मागे आहे. इथे एका टेकडीवर चंडीचे मंदिर आहे आणि त्यावरूनच या नव्या नगराला चंडीगढ असे नाव दिलेले आहे.

**सण उत्सव** – पंजाबात सहाही ऋतू आपापले वैशिष्ट्य दाखवून जातात. या प्रत्येक ऋतूतले पंजाबी सण-उत्सव वेगवेगळ्या प्रकारचे असतात. त्या त्या सणावाराशी त्या त्या ऋतूचा संबंध असतो. होळीच्या सणात सारा पंजाब नाचून गाऊन आपला आनंद प्रदर्शित करतो. वैशाख महिन्यातल्या वैशाखी उत्सवात जागोजाग जत्रा भरतात. जाट पुरुष भांगडा व स्त्रिया गिद्धा नृत्य करून हा उत्सव साजरा करतात. श्रावण महिन्यात सकोलडे नावाचा सण सूर्यसंक्रांतीच्या दिवशी साजरा होतो. या सणात मुली व सौभाग्यवती स्त्रिया लाल-पिवळ्या धाग्यांची फुले बनवून ती अंगावर धारण करतात. त्या फुलांनाच सकोलडे असे नाव आहे. त्या दिवशी आई बाप आपल्या विवाहित कन्येला वस्त्रालंकार पाठवतात. अविवाहित मुली त्या दिवशी एखाद्या जलाशयावर जाऊन तिथे सामुदायिक मिष्टान्नभोजन करतात. शरदऋतूत पंजाबी स्त्रिया जलाशयात दिवे सोडतात. दिवाळी व भाऊबीजही साजरी करतात.

लोहडी हा पंजाबातला लोकप्रिय सण आहे. त्या दिवशी गावातले लोक एकत्र जमून मोठी धुमी पेटवतात, तिच्यात धान्य, रेवड्या, इत्यादींच्या आहुती देतात व त्या विस्तवाजवळ शेकत बसतात. विवाहित मुलगी त्या दिवशी सासरी असेल,

तर माहेरची माणसं व गावरी असतील, तर सासरचा माणूस तिला वस्त्रालंकार पाठवतात दसऱ्याच्या दिवशी रावण कुंभकर्ण व मेघनाद यांचे दारू भरलेले पुतळे तयार करून त्यांना आग लावून देतात रामायणातली सोंगही घेतात सरगी व तीयां हे दोन सण खास स्त्रियांचे आहेत सरगीच्या दिवशी सकाळी स्त्रिया सरगी खातात ही दुधात फेण्या, जिलबी, इ गोड पदार्थ व फळे घालून तयार करतात सरगीच्या सेवनानंतर दिवसभर उपास असतो रात्री त्या चंद्र दर्शनानंतर चंद्राची व पतीची पूजा करून मग अन्नग्रहण करतात



पंजाबी युवती

श्रावण शुद्ध तृतीयेला तीयाँ हा सण येतो या दिवशी बायका गावा बाहेरच्या पिंपळाखाली जमून गिद्धा नृत्य करतात मोठ्या शहरातून त्या दिवशी बायकांच्या जत्रा भरतात याशिवाय पंजाबात साझी, वसंतपंचमी, रक्षाबंधन, गुग्गानवमी, गुरू नानकजन्मोत्सव, गुरू गोविंदसिंघजन्मोत्सव, इ सण व उत्सव अत्यंत उत्साहाने साजरे केले जातात जन्मोत्सवाच्या दिवशी रोषणाई, भजन, कीर्तन, अन्नदान, इ कार्यक्रम होतात

**रीती रिवाज** -- सोळा संस्कारांपैकी गर्भ, जन्म, उपनयन, विवाह व अंत्यक्रिया हे संस्कार या ना त्या स्वरूपात पंजाबमध्येही केले जातात सांप्रत गर्भाधान संस्कार रूढ नाही, पण त्याऐवजी गर्भिणीचे काही लौकिक संस्कार करतात, त्यांना रीतें असे म्हणतात तिसऱ्या, पाचव्या, सातव्या, किंवा आठव्या महिन्यात हा संस्कार होतो या प्रसंगी माहेरची माणसे गर्भिणी स्त्रीला नवी वस्त्रे व मिठाईचे पदार्थ पाठवतात काही ठिकाणी त्या निमित्ताने गर्भिणी स्त्री व तिचा पती दोघे मिळून तिचे सासू सासरे मोठा दीर आणि जाऊ यांची पूजा करतात या वेळी काही फळे व एक रुपया घालून गर्भिणीची ओटी भरतात

अपत्यजन्माच्या आधी काही स्त्रिया गर्भिणीच्या मस्तकावरून मीठ व उडीद ओवाळून टाकतात मूल जन्माला येताच मातेच्या मुखात तांबे, रुपे किंवा सोने ठेवतात व मग ती आपल्या कुशीवर वळते नाळेचा काही भाग मुलाच्या बापाच्या घरातल्या बांधतात उरलेला भाग पिंपळ किंवा बोर यांच्यावर फेकून देतात अपत्यजन्म दिवसा झाला, तर रात्री नक्षत्रे दिसेपर्यंत त्याला मातेचे दूध पाजीत नाहीत बाळ बाळंतिणीला भुताखेताची बाधा होऊ नये म्हणून तिच्या खाटेवर लोखंडाचा तुकडा ठेवतात

काही जातीत मुलगा जन्मला, तर माता पहिले पाच दिवस जमिनीवर झोपते त्या पाच दिवसात तिच्या शेजारी गंगाजल भरलेल्या मातीच्या घड्यावर निरंतर जळणारा दिवा ठेवतात ब्राह्मण व क्षत्री जातीत बाळंतीण पहिले पाच दिवस दूध, तूप व साखर यांच्या आहारावर राहते त्या दिवसात ती धान्याचे पदार्थ खात नाही, सहाव्या दिवशी स्नान करून ब्राह्मणांना काही दान देते आणि प्रसूतिगृह सोडण्याच्या पूर्वी चंद्र व तारे यांच्यासाठी यव फेकते

मूल जन्मल्यानंतर तेराव्या दिवशी त्याच्या गळ्यात एक सुताचा धागा बांधतात, याला सूत्रसंस्कार म्हणतात जन्मलेले अपत्य मुलगी असेल तर केवळ ब्राह्मणांना व मुलगा असेल, तर सर्व आप्तेष्टांना भोजन घालतात नामकरणही त्याच दिवशी करतात पुरोहित पत्रिकेवरील जन्मराशी पाहून मुलाचे नाव सुचवतो शीख समाजात गुरुद्वाऱ्याचा ग्रंथी, ग्रंथसाहेब उघडतो व उघडलेल्या पृष्ठावरच्या पहिल्या अक्षराने सुरू होणारे नाव सुचवतो

तिसऱ्या किंवा पाचव्या वर्षी मुलाचा मुंडन संस्कार करतात प्राय हा संस्कार घरी न करता कुलदेवतेच्या किंवा अन्य कोणत्या तरी देवीच्या स्थानात जाऊन करतात हिंदू लोक मुख्यत्वे ज्वालामुखी किंवा चिंतापूर्णी देवी यांच्या मंदिरात जाऊन हा संस्कार करतात काही लोक यज्ञोपवीत संस्कार शास्त्रोक्त वर्षी करतात, तर काही लोक तो लग्नाच्या आधी उरकून घेतात या संस्कारात मुलाचे मुंडन करून त्याला पिवळी किंवा भगवी वस्त्र वापरायला देतात शीखांचा अमृतपान (अमृत छकना) हा संस्कार उपनयन संस्काराच्या जागी असतो विवाहाच्या पूर्वी किंवा क्वचित विवाहाच्या वेळीही हा संस्कार केला जातो

हिंदू व शीख या दोन्ही समाजात लग्न जमविण्याचा विधी सारखाच आहे लग्न निश्चित होण्यापूर्वी वधू वराचे आईबाप पत्रद्वारे किंवा न्हाव्याच्या मार्फत वाटाघाटी करतात मुलगी पसंत झाल्यावर लग्नाआधी ती मुलाच्या दृष्टीस पडू देत नाहीत मग मुलीचा बाप न्हाव्याच्या हाती वरपक्षाकडे फळे,

उपहार न काही द्रव्य पाठवतो त्या वेळी मुलाकडची माणसे नियोजित वराला तिलक लावतात, त्याला बिदागी देतात त्याच्याच हाती नियोजित वधूला वस्त्रालंकार व मेंदी पाठवतात ही मेंदी एखाद्या शुभ दिवशी मुलीच्या हाताना लावतात लग्नापूर्वी काही दिवस उडदाची पिठी तयार करून ती मुलाच्या हातावर ठेवतात व मग नातेवाईकानाही वाटतात त्यानंतर नातेवाइकाना गूळ व गुणे ( तेलात तळलेल्या कणकेच्या छोट्या छोट्या टिकल्या ) वाटतात हे त्याना विवाह समारंभाचे निमंत्रण असते नातेवाईक स्त्रियाना भिजलेले चणे देऊन त्याना विवाहप्रसंगी उपस्थित राहून गाणी म्हणण्याचे निमंत्रण देतात

मग पुरोहित दर्भांनी वराच्या माथ्याला तेल लावतो त्या वेळी वराची आई त्याच्या मनगटात कंगन बांधते त्या दिवशी वराला अभ्यंगस्नान घालतात नवरदेव एका कच्च्या टोपलीवर बसून स्नान करतो व मातीच्या घड्यावरची पाच झाकणे फोडतो वराचा मामा त्याला टोपलीवरून उठवतो तसे करताना तो वराला एखादा पशू किंवा काही रुपये उपहार म्हणून देतो



पंजाबी पुरुष

पुरोहित वराच्या मनगटात एक रेशमाचा धागा बांधतो मग वराच्या नातेवाईक स्त्रिया त्याला एक एक रुपया भेट म्हणून देतात त्याच्या भावजया त्याच्या डोळ्यात सुरमा घालतात

काही ठिकाणी लग्नाच्या आदल्या रात्री एक वेगळा विधी करतात मुलाची आई एखाद्या विहिरीच्या काठावर जाऊन स्नान व विहिरीत जीव देण्याचा आविर्भाव करते हेतू असा, की मुलाची बायको घरात आली, की संसारावरची आपली सत्ता नष्ट होईल, म्हणून जीव देऊन मोकळे होणे बरे मग नवरा मुलगा घोड्याच्या पाठीवर बसून विहिरीवर जातो व आईला सांगतो, की ' मी तुझी आबाळ होऊ देणार नाही व माझ्या बायकोला तुझी सेवा करायला लावीन ' या आश्वासनानंतर त्याची आई तिथून उठते व घरी येते

वरप्रस्थान गुरुद्वारावरून किंवा पूर्वजांच्या एखाद्या समाधिस्थलावरून पुढे जाते, त्या वेळी नवरदेव त्या स्थानाला काही उपहार समर्पित करतो जाताना वाटेत जी गावे लागतात, त्यातल्या धर्मशाळेला वरपक्षीय लोक एक एक रुपया देऊन पुढे जातात परत येताना धर्मशाळावाले ती रक्कम वराला भेट म्हणून देतात नवरा मुलगा वधूगृही आल्यानंतर वधू वरपक्षाचा परस्पर परिचय होतो मग वधू वराना एकत्र बसवतात त्या वेळी न्हाविण मुलाच्या हातावर कापसाचे सात बोळे ठेवते व नवरा मुलगा ते बोळे उचलून घेतो नवरा मुलगा वधूच्या समस्त दायासह तिला स्वीकारायला तयार असल्याचे ते द्योतक असते त्या वेळी नवरदेवाला आपल्या शक्तीची परीक्षा द्यावी लागते तो आपल्या करंगळीने वधूची बंद मूठ उघडतो रात्री वधू वर अग्नीला सात प्रदक्षिणा घालतात काही ठिकाणी शेणाने सारवून व रांगोळी घालून बनवलेल्या चौकोनालाच वधू वर प्रदक्षिणा घालतात त्या वेळी वधूचा चोळा व वराचा दुपट्टा यांची गाठ मारतात वरात घरी आणताना मुलीला डोलीत बसवतात कहार लोक ती डोली वाहून नेतात

कांगडा जिल्ह्यातल्या गद्दी जमातीचा विवाहविधी इतराहून वेगळा व लक्षवेधक असतो त्यांच्यातल्या लग्नविधीत मुलीचा बाप प्रथम ब्रह्मा, विष्णू, कुंभरूपी व चार देवता यांची पूजा करून मग वधूला वराच्या हाती देतो लग्नात वधू वराना एका डोलीत नेऊन कामदेवाच्या मूर्तीसमोर बसवतात त्या वेळी मुलीची आई व बहीण तिची वेणी घालते जमलेल्या बायका त्या प्रसंगी गीत गातात वराच्या घरीही असाच प्रकार होतो लग्न झाल्यावर पुरोहित वधूच्या तोंडावरचे घूंघट दूर करतो व दोन व्यक्तींना त्या दोघांच्या मनगटात बांधलेले धागे सोडायला लावतो त्यांनी तसे केल्यावर ते दोघे वधू वराचे भाऊ मानले जातात

अंत्यक्रिया मरण जवळ आल्यापासूनच सुरू करतात आसन्नमरण व्यक्तीला खाटेवरून उतरून जमिनीवर झोपवतात व त्याच्या डोक्याजवळ पणती पेटवून ठेवतात त्या वेळी ब्राह्मण मंत्र म्हणतात प्राण गेल्यावर प्रेताला स्नान घालतात व त्याच्या अंगाभोवती नवे कपडे लपेटतात मृताचे जवळचे आप्त त्या वेळी मुंडन करतात प्रेत स्मशानात नेताना वाटेत अर्ध्या मार्गावर

त्याला पिंड देतात दाहसंस्कारानंतर चवथ्या दिव ी चिते तल्या अस्थी गोळा करून त्या एका गाड्यात ठेवून देतात व काही दिवसांनंतर हरिद्वारला जाऊन त्या गगत विर्सजत करतात तेरा दिवस झाल्यानंतर पगडीबधनाचा विधी होतो ज्याने अत्यक्रिया केली असेल, त्याला त्याच्या सासुरवाडीहून पगडी येते व पचायत सभेत ती पगडी त्याच्या डोक्याला बाधली जाते ज्याला पगडी बाधली, तो पुरुष कुटुबप्रमुख म्हणून उद घोषित्ला जातो एका वर्षानंतर बारखी हा विधी होतो त्या वळी मत व्यक्तीचा पुत्र ब्राह्मणाना द्रव्यदान व वस्त्रदान करतो मत्यूच्या चवथ्या वर्षी चौबरसी होते या वळी मत व्यक्तीचा पुत्र ज्ञातिभोजन घाल्तो व ब्राह्मणाना अनेक महादाने देतो ज्या घरात मृत्यू होतो त्या घरातल्या बायका वर्षभर रगीत वस्त्रे व दागिने वापरीत नाहीत शीखाचा अत्यसस्कारही सामा यपणे हिंदूसारखाच असतो ते श्राद्ध तेवढे करीत नाहीत मृत्यूनतरच्या दहा दिवसात हिंदू लोक गरुड पुराणाचा पाठ करविनात, तर शीख लोक ग्रथसाहेबाचा पाठ करवितात

**वेषभूषा** – जुन्या काळी पजाबी हिंदू धोतर नेसत, खाद्यावर उपरणे घेत व डोक्याला पटका बाधीत या वेषभूषेत परिवतन झाले ते मुसलमानी सत्ताकाळात पाश्चात्त्याच्या सत्ताकाळात



पजाबी पुरुष – नत्यमुद्रेत

दुसरे परिवतन झाले मुसलमानकालीन पोषाखातला अघळपघळ पणा जाऊन इग्रजाच्या काळी तो साधा व सुटसुटीत बनला साप्रत पजाबमधला शहरी माणूस इतर भारतीय प्रदेशातल्या लोकाप्रमाणेच पहराव करतो पण त्यातही विविधता आहे

पायाला ा वेगळेपण म्हणजे, ते ग्रामीण विभागात दिसते पुरुष डोक्यावर लाबी तुरेदार पगडी बाधतात त्याच्या या पगड्या वेगवेगळ्या रगाच्या असतात ते लाब पायजामा व कुडता घालतात शेतकरी लोकात साफा, पटका किंवा गाथिया वापरण्याची पद्धत आहे ते शहरात जाताना खुला पाजामा व सलवार वापरतात पजाबी स्त्रिया सलवार घालतात, तिच्यावर गुडघ्या पयत पोचेल असा अगरखा घालतात व डोक्यावर मलमली किंवा रेशमी चुनडी ओढतात घागरा हा पजाबी स्त्रियाचा आवडता वस्त्रप्रकार आहे त्याचा घर फार मोठा असतो एका घागऱ्याला सुमारे वीस वार कापड लागते घराबाहेर जाताना घागऱ्यावर चोळी असते व शिरावर ओढणी असते कुलूतल्या स्त्रिया आपल्या अगाभोवती सुदर रीतीने कापड वेढून घेतात त्याच्यावर कमरबद असतो

पजाबी स्त्रिया नाक, कान, गळा, हात, दड, पाय व मस्तक या सर्व अवयवाच्या ठिकाणी अलकार घालतात पायातले अलकार रुप्याचे व इतर सव सोन्याचे असतात मस्तकावरच्या दागिन्यात सग्गी, हुळळ, चौंक, चन, बोरला, शिंगारपट्टी, टिक्का, झूमर, इ अलकार प्रमुख असतात वणीवर छब्बा नावाचा मोतीजडित अलकार घालतात काटे, बुदे, लोटन, पीप्पल, बालिया, तुगल, सोनचिडी, बुजली, टॉप्स, झुमके, डंडिया, मुक्किया हे कानातले दागिने होत जुन्या काळी बायका सात सात ठिकाणी कान टोचून त्यात बाळ्या, डडिया, इ अलकार घालीत पजाबातले काही पुरुषही कान टोचून त्यात अनतिया नावाचा अलकार घालतात कोका व नथ ही नाकातली भूषणे होत त्याशिवाय मछली, बुलाक, लौंग, तुक्करा असेही काही नाका तले दागिने आहेत नथ हे पजाबी स्त्रियाचे सौभाग्यचिन्ह आहे नथीला एक धागा बाधून ती कानावर बाधून ठेवतात तिने नाक ओघळू नये व ती ओठावर पडू नये हा त्यातला उद्देश असतो मछली किंवा बुलाक दोन्ही नाकपुड्याच्या मधल्या पडद्याला भोक पाडून ओठावर पडेल, अशी लटकावतात गळ्यात हस, कठी, गुलूबद, माला, गानी व हार घालतात दडावर कुहनी घालतात तिच्यावर अनताचे किंवा वाघाचे मुख जडवतात हातात काकणे, परिबद, चूडीया बद, गजरे व चूने घालतात लाल चुडा सौभाग्यचिन्ह मानला जातो मनगटाखाली हाताच्या पाठीवर पचागुला, रत्नचौक किंवा हत्तफुल्ल हे दागिने घालतात लच्छे, पायजेबे, तोडे, कडी, वाका व झाझर हे पायातले प्रमुख अलकार होत पजाबातले काही स्त्री–पुरुष सौंदर्यासाठी दातावर सोन्याची खोळ चढवतात काही लोक दाताला भोक पाडून त्यात सोन्याचा लहानसा तुकडा बसवतात हाताना मेंदी, कपाळाव

बिंदी, भांगात सेंदूर व डोळ्यांत सुरमा ही सौभाग्यदर्शक प्रसाधने मानतात.



पंजाबी स्त्री

**लोकश्रद्धा**– पंजाब हा भारताच्या सीमेवरचा प्रदेश असल्याने पंजाबी लोकांनी गेल्या दोन सहस्रकांत अनेक संस्कृती व सभ्यता पाहिल्या आहेत. अनेक जाती-वंशांचे लोक या भूमीवर आले आणि आपल्या संस्कृतींची पदचिन्हे उमटवीत भारतीय जीवनात मिसळून गेले. त्यामुळे पंजाबचे लौकिक संकेत व आचारविचार थेट वेदकालापासूनचे मिळू शकतात. ऋग्वेदातला सूर्य सप्ताश्व आहे, पण पंजाबमध्ये तो आठ घोड्यांच्या रथात बसत असल्याचे मानतात. एकदा तर या सूर्याला शम्स तबरेजची मासळी भाजून देण्यासाठी मुलतानच्या भूमीवर उतरावे लागले, अशी आख्यायिका सांगतात. मुलतानमध्ये उन्हाळा फार कडक असतो. त्याचे कारण वरील आख्यायिकेत सांगितले आहे. अहल्या–गौतमाची कथा कुठेतरी दक्षिणेत घडली असे रामायणावरून कळत असले, तरी पंजाबी लोक त्या घटनेचे स्थान करनाल जिल्ह्यातले गोंदर गाव मानतात. चंद्रमा हा ओषधी-पती असल्याची ऋग्वेदातील कल्पना पंजाबी लोकांतही प्रचलित आहे. तळ्यात किंवा तुपात चंद्राचे प्रतिबिंब पाहिल्याने कित्येक रोग दूर होतात, असे पंजाबी लोक मानतात. जेव्हा नदीला पूर येऊन तीरावरच्या वस्तीला धोका निर्माण होतो, तेव्हा पूर ओसरावा म्हणून एखाद्या वडीलधाऱ्याच्या हस्ते नदीला रुपया–नारळ अर्पण करतात. गाय–म्हैस व्यायल्यानंतर तिच्या पान्ह्याच्या धारा पहिल्याप्रथम जमिनीवर पिळतात. कित्येक लोक औषधाचे चार थेंब जमिनीवर टाकून मगच औषध घेतात. मरणोन्मुख व्यक्तीला जमिनीवर ठेवतात, त्यामागे तिला धरतीमातेचा स्पर्श व्हावा, ही कल्पना असते. पंजाबात विहिरीला बरेच मानाचे स्थान आहे. विहिरीविषयी कित्येक गीते व कथा प्रचलित आहेत. कित्येक विहिरींच्याविषयी अशी श्रद्धा असते, की तिला सात किंवा आठ प्रदक्षिणा घालून तिच्या पाण्याने स्नान केल्यास वंध्येला गर्भधारणा होते. सात वेगवेगळ्या विहिरींत स्नान केल्याने वेडही जाते, असे समजतात.

पंजाबातल्या जनतेत हिमालयाला सर्वोच्च स्थान आहे. हिमालयाकडे एकाग्र दृष्टीने पाहिल्यास मनासारखे फळ मिळते, असे समजतात. सप्टेंबरच्या दोन व तीन या तारखांना हिमालयाच्या एका पहाडावर अश्मवृष्टी होते, असे मंडी प्रदेशातले लोक समजतात. तारा तुटून पडला, त्या वेळी केसांना गाठ दिल्यास मनकामना पूर्ण होते, असे म्हणतात. वादळाच्या वेळी भूतप्रेत आणि देव उडत असतात. त्यामुळे जुने वृक्ष मुळासकट उन्मळून पडतात आणि गावकोटही ढासळतात. या संकटातून मुक्त होण्यासाठी सखी सर्वरचा शिष्य फेरो याला बलिदान करतात. पाऊस पडून उन्हाळा कमी व्हावा यासाठी विशिष्ट कबरी व समाधी यांची पूजा करतात. त्याचसाठी म्हाताऱ्या माणसावर पाण्याच्या बादल्या ओततात आणि त्याला अंगावरच्या कपड्यांसह जबरदस्तीने न्हायला घालतात. अशा वेळी तो म्हातारा माणूस जितक्या अधिक शिव्या देईल, तितका अधिक पाऊस पडेल, असे समजतात. कित्येकदा याच कारणासाठी घाणीने भरलेली मातीची मडकी लोकांच्या घरात नेऊन फोडतात. सूर्य-चंद्र ग्रहणाच्या वेळी गाभण गुरांच्या कपाळाला व शिंगांना शेंदूर फासतात. गर्भवती स्त्रियांनाही घरात बसवून ठेवतात. बाळंतिणीला दूध येईनासे झाले, की दुधाच्या झाडाची पूजा करतात व त्याच्यापुढे धूप जाळतात. मरतुकड्या मुलाला फकिराजवळ नेऊन त्याच्यावर मंत्रतंत्रादी उपचार करतात. दर्यामध्ये दिवे लावतात. देवाला बाबडाचा नळी देतात.

प्रतिबिंब व सावली यांच्याविषयीही बरेच लोकसंकेत आहेत. मनुष्याची शारीरिक शक्ती जेव्हा उचावते, तेव्हा त्याची सावली लांब पडते, असे मानतात. त्या वेळी सकाळ-संध्याकाळ पूजा-पाठ

इ. करतात. प्रेत जळताना त्याच्यावर स्मशानात जमलेल्या लोकांची सावली न पडेल, अशी खबरदारी घेतात. नवविवाहित स्त्री जेव्हा घरी येते, तेव्हा तिच्यावर विधवेची सावली पडू नये, असे मानतात. देवमूर्तींना भूतप्रेतांच्या पडछायेची बाधा पोचू नये, म्हणून कित्येक देवस्थानांच्या खिडक्या बंद ठेवतात.

भारताच्या भूगोलात निसर्गाने पंजाबला असे काही स्थान दिले आहे, की त्याने भारताचे प्रवेशद्वार ठरावे. उत्तरेकडून होणारी सर्व आक्रमणे याच मार्गाने झाली. सुलेमान–कीर्तहार या पर्वतराजीतून आणि खैबर, गोमल, टोची आणि बोलन या खिंडीतून शिकंदरपासून अहमदशाहा अब्दालीपर्यंतचे सर्व आक्रमक हिंदुस्थानात प्रवेश करते झाले. या सर्वांचे जीवघेणे घाव पहिल्या प्रथम पंजाबच्या देहावर बसले. पंजाबात जी आक्रमणे रोखली गेली, ती मागे फिरली आणि पंजाब पादाक्रांत करून जी पुढे आली, त्यांनी भारताचा ग्रास केला, असा तो इतिहास आहे. या शेकडो वर्षांच्या काळात पंजाबमधला मैदानी मुलूख अक्षरशः रणमैदान झाला होता. आपल्या पवित्र भूमीवर परक्यांना स्थान मिळू नये म्हणून पंजाबच्या सुपुत्रांनी शतकानुशतके प्राणपणाने त्यांच्याशी लढा दिला. त्यांना यश आले नाही ही गोष्ट वेगळी !

या सगळ्या धडामोडींचा परिणाम पंजाबच्या लोकांवर झाला आहे. लढाऊपणा हा पंजाबच्या भूमिपुत्रांचा स्वभावसिद्ध गुण ठरला आहे. पंजाबमधली अनेक शहरे अनेकदा लुटली गेली, बेचिराख, उद्ध्वस्त केली गेली, तीर्थस्थाने भ्रष्टविली गेली आणि महालमंदिरे जमीनदोस्त केली गेली. पण इतके सारे होऊनही पंजाबने आपले स्वत्व गमावले नाही. [पंजाब का इतिहास–श्री धर्मवीर, १९५०, पं. जी. सा., एस. रि. ए., म. धरती पंजाब की–श्री नरेंद्र धीर, १९५८, पं. का., सि. इ., रा. अ. भ्र., हिं. वि. को., हि. स. सं. वि., हिं. क. इ. पी., हिस्टरी ऑफ दि पंजाब–श्री सय्यद मुहंमद लतिफ.]

## पंजाबी भाषा व साहित्य

दिल्लीच्या आसपासचा काही प्रदेश, पूर्व पंजाबातील काही जिल्हे आणि पहाडी प्रदेश हे सोडल्यास बाकीच्या साऱ्या पंजाबाची भाषा पंजाबी या नावाने ओळखली जाते. ग्रियर्सनने यात थोडा फरक केला आहे. त्याने पूर्वी पंजाबीला पंजाबी व पश्चिम पंजाबीला लहंदी म्हटले आहे, पण वास्तवात त्या पंजाबीच्या दोन उपभाषा आहेत. पंजाबीची एक तिसरी उपभाषा आहे, तिला डोगरी म्हणतात. ही डोगरी जम्मू–काश्मीरच्या आग्नेय विभागात व कांगडाजवळच्या काही प्रदेशात बोलली जाते. मध्ययुगीन साहित्यात लहंदीचे मुलतानी रूप दृष्टिगोचर होते, नंतर आधुनिक काळात पूर्वी पंजाबीचे माझी रूप व्यवहारात येते. पंजाब युनिव्हर्सिटीच्या चौकशी समितीच्या प्रतिवृत्तानुसार पंजाबी ही इंडो आर्यन भाषांमधून निघालेल्या सर्व बोलींमध्ये प्राचीन भाषा आहे.

पंजाबीच्या उत्पत्तीसंबंधी विद्वानांत मतभेद आहेत. काही विद्वान असे म्हणतात, की पंजाबीची उत्पत्ती शौरसेनी प्राकृतातून झाली, तर काहींच्या मते ती पैशाची प्राकृतापासून झाली. डॉ. मोहनसिंह यांच्या मतानुसार पंजाबी ही महाराष्ट्री प्राकृतापासून उगम पावली आहे. आजच्या पंजाबीचे स्वरूप सांगताना श्री. नरेंद्र धीर पुढीलप्रमाणे लिहितात–पंजाब प्रांतातल्या बोलींचा विचार केल्यानंतर असे दिसते, की पंजाबी भाषेवर कालक्रमानुसार अहीर, गुजर, जाट, गक्खड, कंबोज व नट इ. भारतीय मानवगण व वेळोवेळी भारतावर आक्रमण करून आलेले ग्रीक, सिथियन, हूण, शक, कुशाण, इराणी, इ. पाश्चात्त्य लोक यांच्याही बोलींचा प्रभाव पडला आहे. मुसलमानी आक्रमणाच्या नंतर पंजाबीचे रूप बरेच परिवर्तित झाले आणि तिच्यात अरबी, फारसी, बलुची, इ. कित्येक भाषांचे शब्द प्रविष्ट झाले. पोर्तुगीज, फ्रेंच, डच, इंग्रज यांच्या भाषांतलेही कित्येक शब्द पंजाबीने आत्मसात करून घेतले. या सर्व बोलीभाषांच्या मिश्रणातून आजची पंजाबी भाषा बनली आहे.

**पंजाबीच्या विभिन्न बोली** – पंजाबमध्ये वेगवेगळ्या विभागांत अनेक बोली प्रचलित आहेत, त्या अशा–

माझी – केंद्रीय पंजाबीला ही बोली अत्यंत जवळची असून ती अमृतसर, लाहोर व गुरुदासपूर या प्रदेशांत बोलली जाते. या प्रदेशाला पूर्वी माझा हे नाव होते. त्यावरून तिला माझी हे नाव पडले. माझीचेही तीन पोटभेद आहेत.

दुआबी– ही व्यास व सतलुज या दोन नद्यांच्या मधल्या प्रदेशात बोलली जाते. हिचे तीन पोटभेद आहेत.

मलवई– सतलुजच्या पूर्वप्रदेशात ही बोलली जाते. फिरोजपूर, लुधियाना, बर्नाला, भटिंडा, पतियाळा, रायकोट व खन्ना या शहरांच्या आसपासचा भाग हे या बोलीचे क्षेत्र होय. हिचे चार पोटभेद आहेत.

पटियाली– ही मलवईच्या प्रदेशात कुठे कुठे बोलली जाते. हिचे दोन पोटभेद आहेत.

फिरोजपुरी– ही फिरोजपूर प्रदेशात बोलली जाते.

लहंदी– मुलतान, चकवाल, कहूटा व गुज्जरखान या प्रदेशांत ही बोलली जाते. पंजाबीचे प्राचीन साहित्य याच बोलीत आहे.

पोठोहारी– ही लहंदीला जवळची बोली आहे. हिचे चार पोटभेद आहेत.

कांगडी– ही पंजाबच्या पहाडी प्रदेशातली एक प्रमुख बोली

आहे. हिचे तीन पाठभेद प्रचलित आहेत.

चबल्ला– ही सिमला प्रदेशात बोलली जाते. शिमलाई ही हा त्याच भागातली आणखी एक बोली होय.

पुवाधी, पश्चिमी पहाडी, अंबालवी, पश्चिमी हिंदी, बाहिरता, पेशावरी, आरमुडी, बहावलपुरी, बिलूची, मेवाती, हिसारी, करनालवी, राठी, भटियानी, बागरी, इ. अनेक बोली पंजाब मध्ये बोलल्या जातात.

**वर्णमाला** – पंजाबी वर्णमालेचा क्रम आणि अक्षरांची नावे निश्चित करण्याचे काम शीख गुरूंनी केले. त्या वर्णमालेला त्यांनी गुरुमुखी असे नाव दिले. गुरू नानक यांच्या काळात पंजाबमध्ये अनेक लिप्या प्रचलित होत्या. देवनागरी, ल्हंदी, टाकरी व शारदा अशी त्यांची नावे आहेत. देवनागरी विशेषकरून संस्कृत भाषेसाठी वापरली जाई. व्यापारी हिशेब ल्हंदी किंवा महाजनी लिपीत ठेवले जात. टाकरी किंवा ठाकरी ही पहाडी प्रदेशात चालू होती. या लिपीचे काही शिलालेखही कांगडा जिल्ह्यात मिळाले आहेत. शारदा लिपी ही मुख्यतः काश्मीरची, पण त्याच्या शेजारच्या पंजाबात तीही कुठेकुठे चालू होती.

महाजनी लिपीत तीन स्वर व सत्तावीस व्यंजने आहेत. शारदा व टाकरी या लिपीत चार स्वर व तहतीस व्यंजने आहेत. गुरुमुखीत तीन स्वर व बत्तीस व्यंजने आहेत. मूळ ब्राह्मी लिपीतून ज्या दोन नवीन लिपी निर्माण झाल्या, त्यांपैकी एकीतून शारदा व देवनागरी लिपी जन्मल्या व दुसरीतून गुरुमुखी, महाजनी व ठाकरी या जन्माला आल्या. गुरुमुखी लिपीची बरीचशी अक्षरे देवनागरीशी मिळती जुळती आहेत.

पंजाबातली बहुतेक पुस्तके गुरुमुखी लिपीत प्रसिद्ध होतात. कित्येक पुस्तके फारसी लिपीतही छापली जातात. मागच्या काही वर्षांत पंजाबातल्या काही लेखकांनी आपली पुस्तके देवनागरीत छापवली आहेत. प्रा. मोहनसिंग, श्री जसवंतराय व प्रभजीत कौर या लेखकांचा तो प्रयत्न आहे.

**नामकरण** – पंजाब प्रदेशातल्या भाषेला पंजाबी हे नाव हाफीज बरखुरदार या कवीने इ. स. १६७० साली दिले. त्या पूर्वी तिला हिंदी किंवा हिंदवी म्हणत. पंजाबी हे नाव प्रकाशात आल्यावरही काही कवी तिला हिंदीच म्हणत. वस्तुतः १९ व्या शतकाच्या अखेरीपर्यंत हिंदू व शीख यांचा ओढा व्रजभाषेकडेच होता. मुसलमानांना मात्र ती भाषा अपरिचित होती. मुसलमान कवी आपल्या काव्यासाठी लोकप्रचलित बोली, विशेषतः लहंदी वापरीत. त्या भाषेत अरबी व फारसी यांचेही ते मिश्रण करीत.

पंजाबी व खडीबोली यांत फार थोडे अंतर आहे. पुल्लिंगी एकवचनी शब्दांची आकारान्त रचना, संज्ञा व सर्वनामे यांची प्रत्यक्ष व तिर्यक अशी दोन रूपे आणि क्रियापदांना कालादी भेदाने लागणारे प्रत्यय पंजाबी व खडी बोली यांत प्रायः समान आहेत. हिंदीतल्या को प्रत्ययाच्या जागी पंजाबीत ने नु, हिंदीतल्या से प्रत्ययाच्या जागी थो किंवा आ, हिंदीतल्या का, के, च्या जागी दा, दे, दी, हिंदीतल्या में च्या जागी विच असे प्रत्यय पंजाबीत लागतात. पुल्लिंगी–स्त्रीलिंगी शब्दांचे बहुवचन आँ असे तिर्यक होते. उदा० बातों, उडिआँ, मुड्याँ, पथराँ, साधुआँ इत्यादी.

ध्वनिविकासाच्या दृष्टीने पंजाबी भाषा अजूनपर्यंत आपल्या प्राकृत अवस्थेच्या पुढे गेलेली नाही. हिंदीतल्या हाथ, कान, जांघ, सात, कातना, छोडना या शब्दांची हत्थ, कन्न, जंघ, सत्त, कत्तणा, छड्डना ही प्राकृत रूपेच पंजाबीत आजही वापरली जातात.

**आरंभकाल** – पंजाबी साहित्याचा प्रारंभ केव्हा झाला, या विषयी विद्वानांत बरेच मतभेद आहेत. पहिले पंजाबी कवी कोण हे सांगताना श्री नरेंद्र धीर यांनी गोरखनाथ, चरपट नाथ, रतननाथ, इ. काही नाथयोग्यांची नावे घेतली आहेत. काही लोक चंदबरदाईचे पृथ्वीराज रासो हे काव्यही पंजाबी ढंगावर लिहिले असल्याचे मानतात. पण ऐतिहासिक दृष्ट्या ज्याचे पंजाबी भाषेचा कवी म्हणून पहिले नाव घेता येते व ज्याचे काव्यही उपलब्ध आहे, असा कवी म्हणजे फरीद शकरगंज हा होय. इ. स. ११७३ साली हा जन्मला. हा सूफीपंथी मुसलमान होता. शीखांच्या गुरुग्रंथसाहेबात या कवीची काही पद्ये गौरवपूर्वक घेतली आहेत. सलोहनामा हा फरीदवचनांचा संग्रह आहे. आजही त्याची वाणी पंजाबी जनतेत गायिली जाते. फरिदाच्या कवितेला ल्हंदीचा स्थानिक रंग आहे. तिच्यावर फारसीचाही काही प्रभाव दिसतो. याचे कारण असे, की फरीद शकरगंज हा काबूलमधून पंजाबात राहायला आला होता. फरिदाची सर्व कविता गावाविषयी आहे. निसर्गप्रेम व परमात्म्याचे प्रेम हे मुख्यत्वे फरीदाच्या कवितेचे वर्ण्य विषय होत. फरिदाने पुष्कळसे श्लोक लिहिले आहेत. त्याच्या काव्याची काही उदाहरणे अशी–

**फरीदा ऐसा होय रहो जैसा कक्ख मसीत ।**
**पैरोंतले लताडिए तू कदे ना छोड प्रीत ।।**

अर्थ – हे फरीदा, तू मशिदीतल्या गवताच्या काडीसारखा होऊन राहा. ती काडी जरी पायाने लाथाडली गेली तरी ती चिखलाविषयीची प्रीती सोडीत नाही. ( तुला जरी कोणीही पायाने लाथाडले, तरी तू तुझ्या हृदयातली प्रीती सोडू नकोस.)

**फरीदा पर पसार के अठठे पहरहि सौ**
**लेखा कोई ना पुच्छई जे बिच्चो जावे हो**

अर्थ – हे फरीदा, तू जरी अष्टौप्रहर निजून राहिलास, तरी तुझ्या दोन्ही पायांमधून जाणारादेखील तुझी विचारपूस कर

णार नाही (अर्थात तू त्याबद्दल खंत बाळगू नको)

अमीर खुस्रव हा फरीदचा शिष्य होय हा हिंदी भाषेचा कवी म्हणून प्रसिद्ध असला, तरी त्याच्या नावावर पंजाबी भाषेत काही उखाणे प्रसिद्ध आहेत उदा०

**वाह ओय रब्बा तेरे कम्म, बाहर हड्डियाँ अंदर चम्म**

अर्थ – परमेश्वरा, वारे तुझी करणी! आत कातडे बाहेर अस्थी (= नारळ)

**इक्क सौ लड़का पता होया दो माँवाँ दे पट**

अर्थ – दोन आया दोन पोटे, त्याच्या पोटातून एक कारटे (= शिंपल्यातले मोती)

**बाहरों आए दो मलग, हरियाँ टोपियाँ नीले रंग**

अर्थ – बाहेरून आले दोन मलंग, हिरव्या टोप्या निळा रंग (= वांगे)

सुरता पंडित नावाचा आणखीही एक मुशारत लेखक (उखाणे रचणारा) नानकपूर्व कालात होऊन गेला

खुस्रवनंतरचा पंजाबीचा कवी मसूद हा होय याने बारह मासा, सतवारा, अक्षरज्ञान, इ काव्यरचना केली आहे मसूदला पंजाबी भाषेत गौरवाचे स्थान आहे

मसूदच्या पश्चात शिखांचा पहिला गुरू नानक उदयाला आला तो प्रामुख्याने भक्तिमार्गी कवी होता पंजाबी साहित्याला त्याने फार मोठी देणगी दिली आहे ज्ञानाश्रयी भक्तिमार्गी कवींत त्याची गणना होते त्याने आपली काव्यरचना हिंदीमिश्रित पंजाबीमध्ये केली आहे त्याच्या काव्यातली बहुतेक पद्ये गुरुग्रंथात संग्रहीत केलेली आहेत गुरू नानक हा कबिराप्रमाणेच हिंदू–मुस्लिम ऐक्याचा समर्थक होता राम रहीम यांमध्ये तो फरक मानीत नसे त्याने कवित्त, सवय्या या जुन्या छंदांच्या जागी बारहमासा, वार (युद्धगाथा), सद, घोडी, इ लोककाव्याशी संबंध ठेवणाऱ्या छंदात आपली काव्यरचना केली गुरू नानकाच्या काव्यरचनेत जपुजी या ग्रंथाला श्रेष्ठ स्थान आहे त्याव्यतिरिक्त आसादी वार, सोहिला व रहिरास अशी त्याची अन्य काव्ये असून, सुमारे ५०० स्फुट पद्ये आहेत भाव आणि अभिव्यक्ती, त्याचप्रमाणे कला आणि संगीत या दोन्ही दृष्टींनी नानकाची वाणी अत्यंत सुंदर व प्रभावपूर्ण ठरली आहे भक्तीत सीमरन (स्मरण) व जीवनात सेवा हे नानकाच्या वाणीचे दोन प्रमुख स्वर आहेत

नानकाच्या शिष्य–प्रशिष्यांनी त्याचेच अनुकरण केले आहे गुरू रामदास याच्या कवितेत काव्यगुण अधिक आहेत गुरू अर्जुनदेव याच्या वाणीत ज्ञान आणि विचार याचे प्राधान्य आहे आदिग्रंथात सर्वांहून अधिक म्हणजे एक हजाराच्या वर पदे याचीच आहेत गुरू गोविंदसिंघाच्या दशम ग्रंथातली चंडीदी वार ही काव्यरचना पंजाबी भाषेतली असून, ती सिरखंडी छंदात निबद्ध आहे शीख गुरूंच्या व्यतिरिक्त भाई गुरुदास याच्या वाणीलाही गुरुमत साहित्यात मान्यता मिळाली आहे त्याची वार आणि गीते ही शुद्ध साहित्यिक पंजाबीमध्ये आहेत

**सूफी कवी** – पंजाबी सूफी कवींत फरीद शकरगंजानंतर लुत्फअली याचे नाव येते सफल मलूक नावाचे त्याचे एक काव्य आहे संवेदना, सरसता आणि वैराग्यभावना या तीन्ही गोष्टींत ते श्रेष्ठ दर्जाचे ठरले आहे पुढच्या सूफी कवींवर त्याचा बराच प्रभाव पडला आहे शाह हुसेन लाहोरी याची गीतेही प्रभावपूर्ण व कवित्वपूर्ण आहेत निरपेक्ष प्रेम हा त्याच्या काव्याचा विषय आहे सुलतान बाहू (१६२९–१६९० इ स ) याने सीहर्फिया नामक कविता रचल्या असून, त्यात अहंकारत्यागपूर्वक आत्मचिंतनावर विशेष भर दिला आहे शाहशरफ याने काही काफियाँ लिहिल्या आहेत त्यात रूपकाच्या द्वारे ईश्वरी प्रेमाचे रहस्य सांगितलेले आहे या सूफींनी जे रहस्यवादी वातावरण निर्माण केले, त्यातूनच पुढे पंजाबीत व हिंदीत छायावाद उगम पावला शाहशरफच्या नंतरचे व त्या काळातले दुसरे काही सूफी कवी म्हणजे गुल्लेशाह, करमअली, गुलामजिलानी गुलामरसूल, हाशीम, हिदायतुल्ला, इ होत गुल्लेशाहाच्या कवितेत घरगुती गोष्टींचे चित्रण असले, तरी तिच्यात नेहमी कोणतातरी उच्च विचार सुगुप्त असतो त्याने ईश्वरप्रेमाला व्यावहारिक प्रेमाच्या पडद्यात ठेवून त्याची महती गायिली आहे हीर–रांझा या प्रसिद्ध युगुलावर त्याने आख्यान रचले

**हिंदू भक्तकवी**– मुसलमानी सूफी कवींच्या व्यतिरिक्त अनेक हिंदू कवींनी सगुण–निर्गुण भक्तींवर अनेक कविता रचल्या आहेत या काव्यवाङ्मयात राम कृष्णाची लीला, वेदान्त, वैराग्य, भक्ती, नीती, इ विषय गायिलेले आहेत या भक्तिमार्गी काव्यवाङ्मयावर गुरू नानक, मीराबाई व शाहहुसेन याचा ठसा आहे कान्हना हा पंजाबीचा प्रसिद्ध भक्तकवी होय तो अर्जुनदेवाचा समकालीन होता बलीराम व बाबासुंदर हेही याच विचारसरणीचे कवी आहेत बाबासुंदरची मन्दरामकली ही रचना गुरुग्रंथात समाविष्ट केलेली आहे या भक्तिमार्गी कवींच्या परिहासात्मक अशाही काही कविता आढळतात सुथराशाह हा गुरू हरगोविंद याचा समकालीन होता याने नैतिक व धार्मिक उपदेश करणारी बरीच कविता लिहिली आहे त्याचा संप्रदाय आजतागायत प्रचलित आहे जल्हन हा सुथराशाहाच्या बरोबरीचाच होता त्यानेही उपहासगर्भ कविता लिहिली असून, तिच्या द्वारे संसाराची नश्वरता प्रतिपादिली आहे

**प्रेमाख्यान काव्य** – भक्तियुगानंतर प्रेमाख्यान काव्याचा काल येतो या कालात मानवी संसारातल्या प्रेमाला महत्त्व देऊन

प्रेमी युगुलाच्या जीवनावर आणि परस्परप्रणयावर आधारलेली भावविव्हल अशी आख्यानकाव्ये पंजाबात निर्माण होऊ लागली हीर रांझा, मिर्झा साहिबाँ, सस्सी पुन्नू, सोहनी महिवाल त्यांची नावे आहेत हीर रांझाच्या प्रेमावर पहिले काव्य दामोदर कवीने लिहिले आणि दुसरे वारिसशाह या कवीने लिहिले या दोहोंमध्ये वारिसशाहाचे काव्य अत्यंत सरस आहे त्याची काव्यशैली आजही पंजाबीत प्रशंसनीय मानली जाते हीरच्या सौंदर्याचे वर्णन करताना तो पुढील पंक्ती लिहितो –

**कही हीर दी करे तारीफ शायर**
**मत्थे चमकदा हुसन महताब वाजी।**
**सर्यां नाल ल्टकवडी आवदीए**
**पर भुलदा जिव उकाब वाजी।**
**नैन नरगिसी मिरग ममोलडे दे**
**गल्हा टहकिया फुलगुलाब दाजी।**
**सुरमा नैना दी धार विचफब रहया**
**चढया हिंद ते कटक पंजाब वाजी।**

अर्थ – हीरच्या सौंदर्याची कवीने कशी प्रशंसा करावी! तिच्या भालप्रदेशावर चंद्राची सुंदरता चमकत होती ती आपल्या सख्यांसह अशा प्रकारे झोपाळ्यावर झुलत होती, की जणू गरुडाचा पंख झुलत आहे तिचे मृगनयन नरगीसच्या फुलासारखे होते तिचे गाल गुलाबाच्या फुलाप्रमाणे सुगंध पसरीत होते तिच्या नयनात सुरमा अशा रीतीने घातलेला होता, की जणू हिंदवर पंजाबच्या सेनेने आक्रमण केले आहे

हीर रांझा या प्रेमाख्यानाचे थोडक्यात कथानक असे –

रांझा हा तख्त हजारा येथील एका कुटुंबातला लहान मुलगा होता आईबापांनी त्याला लाडात वाढवले होते कालांतराने त्याचा बाप मरण पावला आणि भाऊ भावजया त्याच्याविषयी कठोर वागत्या त्यामुळे कंटाळून रांझाने एके दिवशी गृहत्याग केला

हीर ही सयालच्या एका सरदाराची मुलगी दिसायला रतीसारखी सुंदर होती आणि रांझाची चिनाब नदी पार करीत असताना भेट झाली रांझा तिच्यावर मुग्ध झाला हीरलाही तो आवडला हीरच्या बापाला गुरे चारण्यासाठी एका गुराख्याची गरज होती हीरच्या प्रेमासाठी रांझाने ते काम पत्करायचे ठरवले गुराखी म्हणून तो हीरच्या बापाकडे राहिला हळूहळू दोघांचे प्रेम वाढीस लागले हीर कोणाला कळू न देता जंगलात जाऊन रांझाला भेटू लागली हीरच्या चुलत्याला एके दिवशी त्यांचे रहस्य समजले मग सगळ्या गावात त्याचा बोभाटा झाला यापुढे अधिक शोभा नको म्हणून हीरच्या बापाने रंगपूरच्या एका सरदाराशी तिचे लग्न लावून दिले हीर सासरी गेली पाठोपाठ रांझाही जोगी होऊन रंगपूराला पोचला हीरची नणंद तिला सामील होती व तिला हीरचे प्रेमप्रकरण ठाऊक होते ते प्रेम सफल व्हावे या इच्छेने ती हीरला मदत करीत होती तिच्या मदतीने त्या दोघांना पळून जाण्याचा बेत ठरवला आणि एका रात्री दोघेही रंगपुरातून पळून गेली सरदाराला हा प्रकार कळताच त्याने त्या दोघांना पाठलाग करून पकडले आणि राजापुढे हजर केले राजाने हीरला तिच्या नवऱ्याच्या स्वाधीन केले रांझा निराश होऊन तिथून निघून गेला

पीलू कवीने मिर्झा साहिबाँ या प्रेमी युगुलाची प्रणयगाथा लिहिली पीलूची वर्णनशैली सामान्य असली तरी कथेचे नावीन्य आणि मार्मिकतेची जोड, यामुळे त्या प्रणयगाथेला पंजाबी साहित्यात आदराचे स्थान मिळाले ती कथा थोडक्यात अशी –

मिर्झा हा रावी नदीच्या तीरावरच्या दानाबाद गावी जन्मला साहिबाँ ही त्याच्या मामाचीच मुलगी होती त्याचा बाप मेल्यानंतर त्याची आई त्याला घेऊन आपल्या भावाकडे गेली तिथे तो मशिदीत शिकायला जाऊ लागला साहिबाँही तिथेच शिकत होती त्या दोघांचे हळूहळू सख्य वाढले आणि त्यातून प्रेम निर्माण झाले थोड्या दिवसांत घरच्या लोकांना त्याचा सुगावा लागला मामाने मिर्झाला घरातून घालवून दिले आणि साहिबाँच्या विवाहाची तयारी सुरू केली साहिबाँला दुसऱ्या कोणाशी आपले लग्न होणे मान्य नव्हते म्हणून तिने कमू नावाच्या ब्राह्मणाच्या हाती मिर्झाला संदेश पाठवला, की 'तू येऊन मला पळवून ने' त्याप्रमाणे लग्नाच्या ऐन दिवशी मिर्झा घोडीवर स्वार होऊन तिथे आला आणि मोठे साहस करून साहिबाँला पळवून घेऊन गेला साहिबाँच्या भावांनी लगोलग त्या दोघांचा पाठलाग केला ती दोघे एका वृक्षाखाली आराम करीत असताना साहिबाँने आपले भाऊ मिर्झाला धरायला येत आहेत, हे पाहिले तिला वाटले, की मिर्झाशी त्यांची लढाई सुरू झाली, तर तो आपल्या सगळ्या भावांना मारून टाकील तिला तसे व्हायला नको होते, म्हणून तिने मिर्झाचा डोळा चुकवून त्याच्या बाणांचा भाता झाडावर टांगून ठेवला पाठोपाठ भावांचा हल्ला आलाच पण आता मिर्झा निशस्त्र होता धनुष्य होते पण बाणच नव्हते त्यामुळे साहिबाँच्या भावांनी त्याला पकडले आणि ठार केले आपल्या प्रियकराचा मृत्यू झाला हे पाहून साहिबाँही आत्महत्या करून मोकळी झाली

वरील कवीप्रमाणेच बरखुर्दार या कवीने सस्सी-पुन्नू व युसफ जुलेखाँ या प्रेमकथांवर आणि हाशम कवीने शिरी-फरहाद, लैला मजनू, सोहनी महिवाल या प्रेमकथांवर प्रेमाख्याने लिहिली

**मध्यकाल** – इ स च्या १७ व्या शतकात पंजाबी गद्य हळूहळू विकास पावू लागले कथा आणि धर्मोपदेश या गोष्टी साध्या

सरळ शलीत लिहिल्या जाऊ लागल्या गद्याच्या विकासात भाई मनीसिह याचे काय सर्वांत मोठे आहे तो अमृतसरच्या सुवर्ण मंदिराचा ग्रथी होता त्याला सस्कृत, फारसी व ब्रज या भाषा चागल्या येत होत्या त्यामुळे त्याच्या ग्रथात विद्वत्तेची प्रौढता आढळते त्याचा प्रसिद्ध ग्रथ 'सिखाँ दी भक्तमाल' हा होय तो पजाबी गद्य साहित्याचा उत्कृष्ट नमुना मानला जातो त्यात प्रसिद्ध शिखाची चरित्रे ग्रथित केली आहेत मनीसिहाला च पजाबी गद्याचा जनक मानतात अड्डनशाह हा दुसरा पजाबी गद्यलेखक होय पारसभाग हे त्याच्या ग्रथाचे नाव आहे त्यात साधुसताचा उपदेश साध्या सरळ भाषेत लिहिलेला आहे पजाबी गद्याला त्याने नाळरो आणल, असे म्हणतात

शिखाच्या राज्यकालात, विशेषत रणजितसिघाच्या कार किर्दीत, पजाबी लेखकाना मोठा राजाश्रय मिळाला कवी हाशम हा त्या आश्रितापैकी प्रमुख होय अहमदयार, कादरयार, अमाम बख्श हे आणखी काही राजाश्रित कवी होत या कालात कवीनी प्रणयकथा सोडून देशभक्तिपर कविता रचायला प्रारभ केला शाहमुहमद हा अशापकी श्रेष्ठ कवी होय त्याला पजाबचा पहिला राष्ट्रीय कवी मानतात या कवीने एक 'वार' (युद्धगाथा) लिहिली आहे तिच्यात शीखराज्याचे पतन, रणजितसिघाच्या मृत्यूनतरची अव्यवस्था, शिखाचे इग्रजाशी युद्ध, इग्रज या देशात आले त्याबद्दल खेद, हिंदु-मुस्लिम एक्य, देशातील अतर्गत फाटा फूट, या गोष्टीविषयी अत्यत तळमळीने लिहिले आहे शीख व इग्रज याच्या युद्धाचा प्रसग वर्णताना तो म्हणतो—

**सिहा मार के कटक मुकाय दित्त**
**हिंदुस्तानी ते पूरबी दक्खिनी जी।**
**लडन टापुआँ विच कुरलाट पया**
**कुर्सी चार हजार ह सखणी जी ॥**

अर्थ— शिखानी इग्रजाची फौजची फौज मारून समाप्त केली हिंदुस्तानी, पूर्व देशाची व दक्षिण देशाचीही! त्यामुळ लडन मध्ये हाहाकार माजला चार हजार खुर्च्या एकदम खाली झाल्या

त्याच्याच वक्ताचा दुसरा कवी म्हणजे मटक हा होय त्याने शीख व इग्रज याच्या लढाईचे ओजस्वी वर्णन केले आहे ऐति हासिक दृष्टया या काव्याची योग्यता मोठी मानतात शीख— राज्यकालात सरकारदरबारातली भाषा व शिक्षणाचे माध्यम फारसी असल्याकारणाने पजाबी गद्याची प्रगती कुठित झाली त्या मुळच एखादा उच्च कोटीचा ग्रथही शीख-राज्यकालात पजाबी मध्ये निर्माण झाला नाही गुरुग्रथावरही काही टीका लिहिल्या गेल्या किशोरदासाने भगवद्गीतेचे माहात्म्य लिहिले महाराजा रणजितसिहाची डायरीही याच कालात लिहिली गेली पजाबात इग्रजाचे वस्तान ठीक बसल्यावर इ स १८५४ मध्ये लुधियाना मिशनने पजाबी भाषेचा कोश निर्माण केला त्याच काळात अकबर-नामा व अदले-अकबरी या दोन फारसी ग्रथाचेही पजाबी अनुवाद प्रकाशित झाले

इग्रजानी पजाबात येताना उत्तर प्रदेशातले शेकडो— हजारो कारकून आपल्याबरोबर पजाबात आणले होते त्याची मातृभाषा उर्दू होती त्याच्या साहाय्याने इग्रजानी उर्दू ही राज्यकारभाराची भाषा बनविली त्यापुढे नियमित शिक्षणाचे माध्यमही उर्दूच झाले

उत्तर प्रदेशातल्या कारकुनाबरोबरच कित्येक बगाली बाबूही इग्रजानी पजाबात आणले होते ते इग्रजी भाषेत जाणकार होते त्यामुळे राज्यातले इग्रजी काम त्याच्यावर सोपवले गेले या बगाली बाबूनी पजाबी भाषा ही सरकारी कामकाजाची भाषा होऊ नये असेच प्रयत्न केले

इ स १८६० मध्ये शिक्षण विभागाचे कार्यालय लाहोरमध्ये निर्माण झाले मात्र मुलाची भाषा उर्दूच राहिली, परंतु मुलींपुरती पजाबीची सोय करण्यात आली या मुलींच्या शिक्षणासाठी काही लेखकानी पाठ्यपुस्तके लिहिली आणि त्यामुळे नव्या पजाबी गद्याचा पायाभरणी झाली इ स १८६४ मध्ये लाहोर येथे ओरिएटल कॉलेज स्थापन झाले या कॉलेजात पजाबीला प्रमुख स्थान देण्यात आले ख्रिस्ती मिशनऱ्यानीही नतंतर धर्मप्रसार करण्यासाठी पजाबीचा आश्रय केला पजाब पाठ्यपुस्तक समितीने विदेशी पुस्तकाचा पजाबीत अनुवाद करण्यास प्रारभ केला त्याचबरोबर काही स्वतत्र ग्रथही निर्माण झाले त्यामुळे हळूहळू पजाबीचा विकास होऊ लागला

पजाबी साहित्यावर आपला प्रभाव गाजविणारे दुसरे आदो लन सिहसभेचे होते पजाबीचा प्रचार करणे हे सिहसभेचे प्रधान उद्दिष्ट होते पजाबातल्या सर्व मुख्य शहरात सिहसभेच्या शाखा स्थापन झाल्या होत्या इ स १८८० साली पजाबी भाषेचे सर्वांत पहिले वृत्तपत्र गुरुमुखी या नावाने सुरू झाले त्यानतर खालसा या वृत्तपत्रानेही पजाबात बरीच प्रसिद्धी मिळवली

**आधुनिक काल**—पहिल्या महायुद्धाने पजाबी साहित्याला एक नवीन गती दिली त्या काळात युद्धाचा प्रचार आणि पजाबी जवानाचे मनोरजन या दोन गोष्टी डोळ्यापुढे ठेवून पजाबी साहित्य निर्माण होऊ लागले महायुद्ध सपताच सिहसभेच्या चळवळीला जोर चढला शीख मत व शीख सस्कृती याचा प्रचार करणे आणि शीख समाज हा हिंदुधर्मी समाजाहून अगदी वेगळा आहे, अशी भावना निर्माण करणे हा सिहसभेचा एक प्रमुख उद्देश होता या जमातीत शीख आणि शीखेतर याच्यात वादविवाद झाले आणि वर्तमानपत्रातून त्याचे प्रति- सादही उमटले साहित्यिक दृष्टया या आदोलनाचा लाभ असा, की त्यामुळे पजाबी गद्य सरस आणि प्रभावी होऊ लागले

त्यानतर अकाली चळवळीचा प्रारभ झाला त्यात शिखानी आपली सस्कृती व सभ्यता याना गौरवान्वित करण्यासाठी



भाई वीरसिह

पुष्कळ साहित्य लिहिले या दोन्ही चळवळीबरोबरच पजाबात शिक्षणाचा प्रसारही वाढत होता पश्चिमी विचारधारेशी तिथल्या तरुणाचा परिचय होऊ लागला होता पजाबी जन जीवनात एक प्रकारचा उत्साह निर्माण झाला होता नमका याच वेळी भाई वीरसिह हा एक महान साहित्यिक पजाबी भाषेच्या क्षेत्रात अवतरला त्याने पजाबीत बाबा नौधसिह, सदरी, विजयसिह व सतवत कौर या कादबऱ्या लिहिल्या आणि त्या पजाबमध्ये सवत्र लोकप्रिय झाल्या पुढे त्याने कादबरीलेखन सोडून देऊन खालसा समाचार नावाचे एक नियतकालिक सुरू केले त्यानतर राणा सुरतसिह नावाचे एक महाकाव्य त्याने प्रकाशित केले त्याचा विषय धार्मिक होता गुरू नानक चम त्कार व कलगीधर चमत्कार या नावानी गुरू नानक व गुरू गोविंदसिंघ याची विस्तृत चरित्रे त्याने लिहिली त्याबरोबरच लहान लहान कविताही बऱ्याच लिहिल्या

इ स १९१० च्या सुमारास कृपासागर या कवीने सर वॉल्टर स्कॉटच्या 'दि लेडी आफ दि लेक' या दीर्घ कवितेचा पजाबीत अनुवाद केला परतु त्याने आपल्या काव्याचे वाता वरण मात्र सवस्वी पजाबी ठेवले आणि त्यातल्या पात्रानाही शीख बनवले इ स १९२० नतर प्रगतिशील साहित्याला विशेष महत्त्व प्राप्त झाले त्या काळात कित्येक लेखक साम्य वादी विचारसरणीने लेखन करू लागले त्यातला सर्वांत प्रसिद्ध लेखक गुरुबक्षसिह हा होय त्याने प्रीतलडी नावाचे एक मासिक सुरू केले हे मासिक बरेच लोकप्रिय झाले तो अज्ञान आणि अधश्रद्धा याचा प्रबळ विरोधक होता आपल्या कथा कादबऱ्यातून त्याने पुराणमतवाद्यावर झोड उठवली त्याला काही लोक आधुनिक पजाबीचा जनकच मानतात

गद्याच्या क्षेत्रात जसे गुरुबक्षसिहाचे नाव प्रतिष्ठित झाले, त्याचप्रमाणे काव्याच्या क्षेत्रात मोहनसिहाचे नाव वर आले मोहनसिहाचे काव्य उच्च कोटीचे मानले जाते त्याने लिखारी नावाचे एक मासिकही चालवले होते त्या मासिकाच्या द्वारे त्याने अनेक लेखक प्रकाशात आणले मोहनसिह याची सव प्रगतीशील कविता लिखारीमध्येच प्रथम प्रकाशित झाली त्याच प्रमाणे सतसिह सेखो याच्या कथाही प्रथम लिखारीतच छापून आल्या काही काळानतर त्याने आपल्या मासिकाचे लिखारी हे नाव बदलून पज दरिया असे ठेवले

**कथा** – पजाबीत कथासाहित्य विपुल आहे वीरसिह, मोहन सिह व चरणसिह यानी पजाबीत प्रथम कथालेखन सुरू केले पण आधुनिक पजाबी कथेचा जन्म मात्र इ स १९३० नतरच झालेला दिसतो 'हजुआ दे हार' हा नानकसिह याचा पहिला कथासग्रह इ स १९३४ मध्ये व गुरुबक्षसिहाचा पहिला कथासग्रह इ स १९३८ मध्ये प्रका शित झाला सुरु वातीस पजाबी कथेवर इग्रजी साहित्याचा विशेष प्रभाव होता पुढे हळूहळू तो कमी झाला आणि पजाबी कथा विविध अगानी समृद्ध होत गेली सर्वांत प्रथम सत सिह सेखो यानं नव्या ढगाने कथा लिहायला सुरुवात केली भाडवलदार व धर्माचे ठेकेदार याच्यावर त्याचा कटाक्ष होता विज्ञाना



नानकसिह

घिष्ठित समाजवादाचा तो पुरस्कर्ता होता गुरुबक्षसिंह याला आदर्शवादी लेखक असे समजतात त्याच्या लेखनशलीत आकर्षकपणा असला तरी त्याची पात्रे मात्र जिती जागती वाटत नाहीत तो प्रथम तत्त्व ठरवतो, कथेचे उद्दिष्ट ठरवतो आणि मग त्यावर कथेचे जाळे विणतो मात्र त्याच्या सर्व लेखनात मानवप्रेम सवत्र आढळते कर्तारसिंह दुग्गल हा बहुप्रसव कथाकार आहे तो कलेसाठी कला या मताचा असून फ्रॉईडच्या विचाराना अनसरणारा आहे सतोखसिंह धीर हा आणखी एक उच्च श्रेणीचा कथालेखक होय त्याने पजाबच्या ग्रामीण जीवनावर कथा लिहिल्या साम्यवादी विचारसरणीचा आशावादी लेखक असे त्याचे वर्णन करतात महेंदर सिंहसरना हा शैलीकार लेखक म्हणून ओळखला जातो अमृता प्रीतम हिनेही कित्येक चांगल्या कथा लिहिल्या आहेत तिच्या कथेत भावनाप्रधानता विशेष आहे समाजसुधारणा हा तिचा आवडता विषय आहे कित्येक वेळा ती सामाजिक निबंध तोडून फेकून द्यायलाही निघते प्रभजोत कौर, दलीप कौर, हरिंदर कौर, इ आणखी काही कथालेखिका पजाबीला लाभल्या आहेत याशिवाय सुरिंदरसिंह नरूला, गुरमुखसिंह 'मुसाफिर', देवेंद्र सत्यार्थी, लोचन बक्षी, सुजानसिंह, उलवनसिंह विरक', अमरसिंह, सुखवीर, गुरुवेलपन्नू, गुरुवचनसिंह, प्रीतमसिंह 'पछी', नवतेजसिंह, बलवंत गार्गी, महेंद्रसिंह जोशी, इ कथाकार पंजाबमध्ये प्रसिद्ध झाले

**कादंबरी**—पंजाबीत कादंबऱ्या कमी लिहिल्या गेल्या आहेत चांगले कादंबरीकार हाताच्या बोटांवरच मोजता यतील पंजाबच्या कादंबरीकारात नानकसिंह याचे नाव सर्वप्रथम घ्यावे लागते सामाजिक समस्या व शीख संप्रदायाचे सिद्धान्त याना धरून ते कादंबऱ्या लिहितात पंजाबी तरुणाचे ते आवडते कादंबरीकार आहेत त्यानी गेली ३०–३२ वर्ष अव्याहत कादंबरीलेखन चालू ठेवले आहे कर्नल नरेंद्रपालसिंह, जसवंतसिंह 'कमल', सुरेंद्रसिंह नरूला, सुरजितसिंह सेठी, महेंद्रसिंह सरना, मीयाँबक्ष मिनहास, सुदरसिंह प्रा तेजासिंह, अमृता प्रीतम, देवींदर ही कादंबरीकाराची नावे प्रसिद्ध आहेत

**काव्य**—पजाबी भाषेत काव्याला सदैव श्रेष्ठ दर्जा दिला गेला आहे गुरुग्रंथ हा तर सगळा काव्यमयच आहे भाई वीरसिंह यानी पहिल्याप्रथम कवितालेखन सुरू केले राणा सुरतसिंह हे त्याचे महाकाव्य इ स १९०५ मध्ये प्रकाशित झाले ते जवळजवळ मुक्तछदात आहे वीरसिंहाच्या अनुकरणानेच पजाबी कवितेत मुक्तछंदाचा प्रभाव झाला त्याचे अनेक काव्य संग्रह प्रकाशित आहेत गुरुवाणी हा त्याचा प्रेरणास्रोत आहे

इ स १९२० सालापासून पजाबीत अनेक कवी जन्माला आले आणि त्यानी पजाबी काव्याला बहर आणला पण त्या सर्वात मोहनसिंह व अमृता प्रीतम या दोन व्यक्तीचा विशेष बोलबाला झाला मोहनसिंहाना पजाबीचे सर्वश्रेष्ठ कवी मानतात त्याच्या कवितांचा पहिला संग्रह 'सावपत्ते' या नावाने इ स १९३६ साली प्रसिद्ध झाला पजाबमध्ये पुठोहार नावाचा एक प्रदेश आहे सावेपत्तेतल्या सर्व कविता त्या प्रदेशातल्या जनजीवनाविषयीच्या आहेत त्याचा दुसरा कवितासंग्रह बड्डावला या



अमृता प्रीतम

नावाने इ स १९५८ मध्ये प्रसिद्ध झाला त्याच्या काव्यलेखनाबद्दल त्याना साहित्य अकादमीचा पुरस्कारही मिळाला आहे उत्तम कवितेसाठी अमृता प्रीतम या कवयित्रीलाही साहित्य अकादमीचा पुरस्कार लाभला आहे तिच्या कवितेत शेतकरी—कामकरी व पददलित समाज याच्याविषयी अपार सहानुभूती आढळते

देवेंद्र सत्यार्थी हे आणखी एक प्रथितयश लेखक होत त्याच्या गाठी अनुभवाची पुंजी फार मोठी आहे त्याना लोकसाहित्य गोळा करण्याचा आणि त्यावर लेखन करण्याचा छंद आहे त्यामुळे त्याच्या कवितेला लोकगीताचे वळण मिळाले आहे जुन्यातली जुनी आणि नव्यातली नवी जीवनमूल्ये त्याच्या ठिकाणी दृष्टीस पडतात

इ स १९४० नतर बावा बलवंत, प्रीतमसिंह सफीर, कर्तारसिंह दुग्गल, चरणसिंह जेठवालिया व हरिंद्रसिंहरूप याची नावे उल्लेखनीय ठरली आहेत तख्तसिंहाची उर्दू शायरी बरीच लोकप्रिय आहे अलिकडच्या पजाबी कवीत गोपालसिंह दर्दी, ईश्वर

चित्रकार, संतोखसिंह धीर प्रभजोत कौर, प्यारासिंह सहराई, जसवंतसिंह नेकी, गुरुचरण रामपुरी, शानसिंह दियोल, सुखबीर, तख्तसिंह, हजारासिंह गुरुदासपुरी, तारासिंह व हरिभजनसिंह ही नावे प्रसिद्ध आहेत

**लोकसाहित्य** – पंजाबी भाषेचे लोकसाहित्य शिष्ट साहित्याशी स्पर्धा करण्याइतके समृद्ध व बहुरंगी आहे त्यात धार्मिक तत्त्व आणि सामाजिक संबंध यांचे दिग्दर्शन असते पंजाबीत अज्ञात वस्तूंचे रहस्य आपल्या परीने उलगडून सांगणाऱ्या लोककथा आहेत, मंत्रद्रष्ट्या ऋषींच्या वचनाप्रमाणे प्रभाव शाली अशा लोकोक्ती आहेत, मंगलपर्व आणि उत्सव यांची गाणी आहेत आणि शौर्य – धैर्याचे पोवाडेही आहेत लोकजीवनाचे सारे रंग पंजाबी लोकसाहित्यात मिसळले आहेत

पोवाडा हा पंजाबी लोकगीतातला विशेष लोकप्रिय प्रकार आहे तो वीरवर्णनात्मक असतो त्याला वार असे म्हणतात ज्यांनी रणभूमीवर पराक्रम केला किंवा देह ठेवला, त्यांची वीर कृत्ये त्यात वर्णिलेली असतात पंजाबी लोकसाहित्यातली सर्वांत जुनी वार अमीर खुसरोने लिहिलेली आहे 'तुगलकशाह और खुसरोखान की लडाई की वार' असे तिचे नाव आहे त्यानंतर वारी लिहिण्याची परंपरा मोठ्या प्रमाणावर सुरू झाली आणि रायकमाल की मौज की वार, टुंडे असराज की वार, सिकंदर इब्राहीम की वार, ललावहीलीमा की वार, हसने महिमे की वार, मूरो की वार, मलि मूरीद और चंदर हडे साहिआं की वार, ज्योधे वीरे की वार, राणा कलाम देव मालव देव की वार, अशा अनेक वारी निर्माण झाल्या त्या भाट चारणांनी रचल्या आहेत तीच परंपरा स्वीकारून गुरू गोविंदसिंघांनीही चंडीदी वार नावाचे काव्य रचले, कादिर यार या कवीने सरदार हरिसिंह नलवा ही वार लिहिली, तर पीर मुहमद याने चठ्ठीयाँ की वार रचली नादिरशाह की वार ही नजाबत कवीची वार होय तिला सांप्रत पंजाबीच्या शिष्ट साहित्यात स्थान मिळाले आहे पण त्यापूर्वी ती पिढ्यान् पिढ्या लोकगायकांच्या द्वारे गायिली जात होती आजही गावोगावी फिरणाऱ्या गायक मिरास्यांत ही वार गाणारे लोक भेटू शकतील ही वार वीर रसाला चेतावणी देणारी आहे तिच्या शेवटच्या भागात काबूलच्या लढाईचे वर्णन आहे नादिरशहा व निजामुलमुल्किक या दोन पक्षांमध्ये जे समरांगण झाले, त्याचे वर्णन नजाबत पुढील प्रमाणे करतो –

> **दोहीं दलीं मुकाबला, रण सूरे गडकण ।**
> **चढ तोफीं गडडीं टुक्की आँ, लख्ख सँगल खडकण ।**
> **ओह वाल खाँविआँ कोहली, मण गोले गडकण ।**
> **ओह वाग पलीते छडडी आँ वाग बद्दल कडकण ।**
> **जिऊ वर खल्हे दोजखाँ, मुहँ ताहीं भड़कण ।**
> **जिउ झड मारू पखण विच्च बागाँ दे फडकण ।**

भावार्थ – दोही पक्षांत मुकाबला सुरू झाला रणांगणात शूरवीर गर्जना करू लागले गाडीवर चढून तोफा आल्या लाखो तलवारी खणखणल्या मणामणाचे गोळे गर्जना करू लागले त्या तोफा दारू खातात, पलित्याप्रमाणे जाळतात व मेघाप्रमाणे गरजतात जसे यांही दोजख (नरक) चे दार उघडावे तशी त्या तोफांची तोंडे भडकून उठतात वीरांचे नाना प्रकारचे सुखयुक्त मन बागामध्ये फडकतात

सामाजिक विचार किंवा निंदा उपहास असलेली काही लोकगीते पंजाबमध्ये प्रसिद्ध आहेत त्यांना बोली असे म्हणतात बोली गाणारे काही लोक तिथे आहेत ते वाद्याच्या साथीवर ती गातात बोलीमध्ये काही सभ्यभिरुचीची गीते आहेत, तर काही अश्लीलही आहेत बोली ऐकणारे लोक त्यामुळे तल्लीन होतात आणि पुष्कळदा प्रभावितही होतात बोलीच्या दोन-तीन वाक्यांत एक विशिष्ट प्रसंग किंवा विशिष्ट विचार पूर्ण केलेला असतो उदा०–

> **बहू कम करन नू कही बहू सुज भडोला होई**
> **बहू खान नू कही दो सजरियाँ दो बही**

अर्थ – सुनेला काम करायला सांगितले, तर ती फुरगटून बसली तिला खायला सांगितले, तर तिने दोन शिळ्या व दोन ताज्या रोट्या पुढे घेतल्या

पुत्रावण, मुंडण, जनेऊ, विवाह हे पंजाबमधले सार्वत्रिक संस्कार होत एखाद्या घरी पुत्रजन्म होताच आजूबाजूच्या बायका एकत्र जमून होलर या सदरात येणारी गीते गातात या गीतांत गर्भावस्थेचे सांगोपांग वर्णन असते

पंजाबात विवाहसंस्कार मोठ्या थाटामाटाने केला जातो बरेच दिवस त्याचे सोहळे व सोपस्कार चालतात यांत सर्व प्रकारची वेगवेगळी मांगलिक गीते असतात लग्न ठरल्या दिवसापासून शेजारणीपाजारणी एकत्र जमून ती गात असतात मुलीच्या घरी गायली जाणारी गीते सुहाग या नावाने व मुलाच्या घरी गायली जाणारी गीते घोडियाँ या नावाने प्रसिद्ध आहेत सुहाग या सदरात येणाऱ्या गीतांमध्ये बहुतांश गीते आईबापांना व आप्तेष्टांना कन्येची विनवणी या स्वरूपाची आहेत 'मला दूर देशी देऊ नका, माझ्यासाठी सुंदर नवरा शोधा, मला विसरू नका,' अशा प्रकारची ती विनवणी असते लग्नानंतर वरात निघताना जी गीते गायली जातात त्यांना वधावा असे म्हणतात ही गीते अत्यंत करुण असतात त्यांत आईबापाच्या व नातलगांच्या अंतःकरणाची कालवाकालव व्यक्त झालेली असते उदा०–

**गलियाँ तां तेरियाँ बाबुल पधत होइयाँ, अगन होया परदेस रे ।**
**सुण बाप मेरे क हर मन चाव रे क दिल वरयाव रे ।**
**माँ रोंदी दी अगियां भिज गई, बाप रोते वरयाव रे ।**
**सुन बाप मेरे क हर मन चाव रे, क दिल वरयाव रे ।**

अर्थ – तुमच्या गल्ल्या या मला पवत झाल्या आहेत आगण परदेश झाले आहे ऐका बाबा, प्रत्येकाच्या मनात आवड आहे प्रत्येकाचे मन समुद्रासारखे आहे आईच्या अश्रूनी आगण भिजले, बापाच्या रुदनाने समुद्र भरला ऐका बाबा, प्रत्यकाच्या मनात आवड आहे प्रत्येकाचे मन समुद्रासारखे आहे

सासरी जाण्यासाठी मुलगी बाहेर पडते आणि डोलीत बसते तव्हा तिच्या नातलग स्त्रिया करुण वाणीने म्हणतात–

**ले चलल्ले बाबला लै चल्ले वे**
**मैनू अज वी रन कटा, बाबल तेरा पुन्न होवे**
**पुन्न होवे परताप होवे**
**मनू अज दी रन कटा, बाबल तेरा पुन्न होवे**
***सोलह तें बरसां रख लइ,***
**रखियो न जावे रत, धिए घर जा अपने**
**ल चल्ले बाबुला ल चल्ले वे**
**मैनू अज वी रैन कटा, बाबल तेरा पुन्न होवे**

अर्थ – घेउन निघाला, बाबुल वघला धऊन निघाला मुलीला आजची रात्र इथे घालवू दे बाबुल, तुला पुण्य लागल सोळा वर्षांपर्यंत तू तिला माझ्या घरी ठेवलीस आता एक रात्रही ठेवणे कठीण होईल का ? ठीक आहे बटा, जा आपल्या घरी जा

पंजाबमध्ये प्रत्येक ऋतूची वेगवेगळी गीत आहेत तीयाँ, रक्खडी, रामधुन, सक्राती, ल्होहडी, होहली, दीगा, सांझी, इक्करी, इ त्याची नावे आहेत

श्रावण महिन्यातला तीयाँ अर्थात ततीया हा सण पंजाबातला मोठा सण होय वेळी प्रत्येक गावात पचरवडयाची जत्रा भरत असते त्या जत्रेला फक्त स्त्रियाच जातात आणि तिथ स्वच्छद पणे नाचतात, गातात अशा वेळी एक युवती माहेरची आठवण काढून पावसाला उद्देशून बाळते –

**नरसीं तां बरसीं मीहाँ मेरे बाबल दे वस,**
**होर वी वरसीं सौहरे क्यारियाँ ।**
**वरसिया तां बरसिया बीबी तेरे बाबल दे वस,**
**होर वी वरसिया बीबी सौहरे क्यारियाँ ।**

अर्थ – हे मेघा, तू पाऊस पाड माझ्या बापाच्या देशात पाऊस पाड आणि माझ्या सासरच्या फुलबागेतल्या वाफ्यावरही वृष्टी कर (मेघ उत्तर करतो–) हे फुलवधू मी बरसून आलो आहे, तुझ्या बापाच्या देशावर आणि तुझ्या सासरच्या फुलबागावरही !

पंजाबातले तरुण युवक पुष्कळदा सैन्यात भरती होऊन दूर देशी जातात किंवा उद्योगधंद्यासाठीही पंजाबच्या बाहेर वास्तव्य करतात मग पंजाबी युवतीना आपल्या उमारीचा काळ विरहात कठावा लागतो आणि मग ती विरहवेदना त्यांच्या गीतातूनही प्रकट होते उदा० –

**वम्मा वया लोभिया परदस न जाइ**
**कतागीं म निकडा, घर बठ के खाइ ।**

अर्थ – हे धनलोभी पतिदेवा, तू परदेशी जाऊ नको मी बारीक सूत कातीन तू घरी बसून खा

**ओह गये सज्जन ओह गय लंघ गरे वरिया**
**असां रज्ज गल्ला न कीतियाँ साड मनो न लत्थडा चा ।**

अर्थ – अरेरे ! तो गेला प्रियकर गेला समुद्राच्या पलतीरी निघून गेला आम्ही ऊर भरून प्रमगोष्टी केल्या नाहीत, की आमच्या मनाची आवड पुरी झाली नाही

हाच करुण स्वर धरून पंजाबची एक युवती लढाईवर *जाणाऱ्या आपल्या पतीला म्हणत –*

**जे उठ चलियों चाकरी, नीले घोड़ वालिया !**
**सानू बोजे पा । जित्थे ते आवे रातडी**
**नीले घोडे वालिया ! कडढ कलेजडे ला ।**

अर्थ – हे निळ्या घोड्यावर स्वार होणा या प्रियकरा, जर तू रा यातल्या नोकरीवर जात असलास तर मला आपल्या खिशात घालून बरोबर ने जिथे पुढे रात्र पडल तिथ मला खिशातून बाहेर काढ आणि हृदयाशी घट्ट धर

हीर रांझा हे पंजाबचे अतिलाडके प्रमी युगुल आहे वारिस शाहाने त्यावर लिहिलेले आख्यान काव्य तर पंजाबमध्ये लोक प्रिय आहेच पण पंजाबी स्त्रियानी त्या युगुलावर रचलेली गीतेही तितकीच लोकप्रिय आहेत उदा० –

**हथ्थी सूला मेरे परीं सूलां मेरे गल सूला वे तगो**
**सूल सरहांदा सूल परांदी मेरे सूला सज्जे खब्बे**
**सूला दी म सेज बछाई मेरे सूल सौन विच्च खुभे**
**एनियाँ सूलां मनू फुल्ल हो जावन जे मियाँ रांझन लभ्भे ।**

अर्थ – (हीर म्हणते–) माझ्या हातात, पायात काटे मोडले आहेत गळ्यात तर काट्याची माळच आहे माझ्या डोक्यात काटे आहेत आणि पायाच्या तळव्यातही काटे आहेत माझ्या डावीकडे आणि उजवीकडेही काटेच काटे आहेत मी काट्याची शेज अंथरली आहे माझ्या हृदयातही काटे टोचत आहेत जर माझा प्रियकर रांझा मला भेटेल तर हे सारेच्या सारे काटे फुले होऊन जातील

पंजाबी गद्य लोकसाहित्यात लोकोक्ती भरपूर आहेत उदा० –

**उत्तों बीबीआ दाढीआं, विच्चो काले कां ।**

अर्थ – वरून राजदान पुरुषासारखी दाढी, आतून मात्र काळा कावळा

पंजाबात हास्यात्मक, उपदेशात्मक आणि नीतिविचारात्मक अशा अनेक प्रकारच्या लोककथा आहेत कित्येक लोककथा कविताबद्धही आहेत अशा कथात अगदी मोजक्या शब्दांत कथा वस्तू, तिचे वातावरण आणि तिचा उद्देश या सर्व गोष्टी समाविष्ट असतात गद्य लोककथा या प्राय नीतिकथाच असतात माणूस आपमतलबी कसा असतो आणि एकाचे हित ते दुसऱ्याचे अनहित कसे होते, हे सांगणारी एक लोककथा पुढीलप्रमाणे –

एक होता कुंभार त्याला दोन मुली होत्या त्या मोठ्या झाल्या, लग्नाला आल्या कुंभार त्यांच्यासाठी वर शोधायला निघाला त्याला दोन मलगे पसंत पडले त्यापैकी एक शेतकरी होता आणि दुसरा कुंभार होता

कुंभाराने त्या दोघांना आपल्या दोन मुली दिल्या थोडा काळ गेल्यानंतर कुंभारीण नवऱ्याला म्हणाली 'मुलींचा समाचार घेऊन या ' कुंभार त्यासाठी बाहेर पडला तो प्रथम शेतकरी जावयाकडे गेला कुशल विचारताच जावई त्याला म्हणाला



देवेंद्र सत्यार्थी

'अजून पाऊस पडला नाही ही योग्य वेळ आहे आता पाऊस पडला तर पेरणी ठीक होईल आणि धान्यही महामूर पिकेल मी पावसाची वाट पाहतो '

कुंभार तिथून दुसऱ्या मुलीकडे गेला तो जावई भांडी मडकी घडवीत होता कुशल विचारताच तो कुंभाराला म्हणाला 'अजून पाऊस पडला नाही, ही देवाची खैर आहे त्यामुळे माझा आवा चांगला भाजला अजूनही तो काही दिवस न पडेल तर सारा माल पिकेल मग माझा धंदा असा तेजात येईल, की घरात चांदी सोने येईल '

कुंभार परत फिरला येताना वाटेत विचार करू लागला, दुनिया काय अजब आहे! एक म्हणतो, पाऊस पडेल तर चांगले, तर दुसरा म्हणतो, पाऊस न पडेल तर चांगले!

पंजाबी लोकसाहित्याचा संग्रह करून ते प्रकाशात आणण्याचे कार्य प्रामुख्याने श्री देवेंद्र सत्यार्थी यांनी केले आहे धरती गाती है, बेला फूल आधी रात, बाजत आव ढोल, इ काही पुस्तकातून त्यांनी पंजाबी लोकगीतांवर विस्तृत प्रकाश टाकला आहे त्याशिवाय श्री संतराम, प रामशरण, हरभजनसिंग हरजीतसिंग, कर्तारसिंग 'शमशेर', अमृता प्रीतम, अवतार सिंह दलेर, शेरसिंह 'शेर', संतोखसिंह 'धीर', महेंद्रसिंह रंधावा, वणजारा बेदी, इ अनेक लेखकांनी पंजाबच्या लोक साहित्याचे संकलन व त्यावर रसग्रहणात्मक विवेचनही केले आहे [रा अ ग्र, मं व प, च भा नि, हिं सा को, बं फू आ रा, रविश्रीमाला – पंजाबी, रा प्र समिती, वर्धा, १९६२, भा भा रा, सम्मेलनपत्रिका– लोकसंस्कृति अंक]

## पंजाबी रंगभूमी

पंजाबमध्ये अद्यापि रंगभूमीचा व्हावा तसा विकास झालेला नाही, असे तिथले समालोचक म्हणतात गेल्या ३–४ दशकात पंजाबी भाषेत काही नाटके लिहिली गेली व त्यांचे प्रयोगही झाले पण एखादा अपवाद सोडल्यास पंजाबमध्ये रंगभूमीला वाहून घेतलेल्या अशा संस्था अद्यापि निर्माण व्हायच्या आहेत पंजाबात रामलीला, रासलीला, स्वांग, नकल, नौटंकी, इ काही लोकनाट्ये प्राचीन काळापासून आजतागायत जिवंत आहेत त्यांची परंपरा खंडित झालेली नाही या लोकनाट्यात शूरवीर, धर्मात्मे, देवदेवता, प्रेमी युगुले यांच्या चरित्रावर आधारलेली काही आख्याननाट्ये आहेत शाहीर लोक ती गाऊन, नाचून आणि मधेमधे संवाद घुसडून लोकांपुढे प्रयुक्त करतात हशा पिकवून लोकांची करमणूक करणे, एवढाच त्यांचा मर्यादित उद्देश असतो या नाट्यातील संवाद लिखित नसतात ते गुरु–शिष्य परंपरेने तोंडीच प्रचलित असतात

अशा आख्याननाट्याचा लोकप्रिय नायक म्हणजे पूरन हा होय हा इ स च्या ७ व्या किंवा ८ व्या शतकात जन्मला हा ऐतिहासिक पुरुष असला, तरी त्याचे चरित्र पुष्कळसे दंतकथात्मकच

आहे तो शेवटी कानफाट्या जोगी बनला रसालू कुंवर हा पूरनाचा कनिष्ठ बंधू होय या दोघाच्या जोडीला भर्तृहरी व गोपीचंद यांचीही नावे आहेत या चौघांच्या कथानकावर व जीवनप्रसंगावर नाट्यरूप आख्याने निर्माण करून, लोकापुढे त्यांचे प्रयोग करणारा शाहिराचा एक मोठा वर्ग पंजाबमध्ये होऊन गेला पंजाबी नाट्याची ही प्रारंभिक अवस्था म्हणता येईल

दुसऱ्या अवस्थेत रामायणातील कथाचा अंतर्भाव होतो पंजाबी परंपरेनुसार लवकुश हे रामपुत्र पंजाबमध्ये जन्मले व त्या पितापुत्रांमधील युद्धही तिथेच झाले या युद्धावर पंजाबमध्ये संवादात्मक काव्य निर्माण झाले व त्या काव्याचे गायक नाट्याच्या रूपाने त्याचे लोकापुढे प्रयोग करू लागले या काव्याचा विशेष असा, की त्यात संस्कृत नाटकातला विदूषक आणि ग्रीक नाटकातले समूहगान (कोरस) या दोन्ही गोष्टी एकत्र आणल्या आहेत या आख्यानकाव्याच्या अनुकरणातूनच हीर–रांझा या प्रेमिकांवरची नाट्यकाव्ये पंजाबात निर्माण झाली हीर–रांझाचे नाट्य हे आजही पंजाबात लोकप्रिय आहे वारिसशाह या कवीने त्या प्रेमी युगुलाला असामान्य लोकप्रियता मिळवून दिली हृदयराम या कवीने हनुमन्नाटक नावाची, रामायणावर आधारलेली एक संगीतिका लिहिली गुरू गोविंदसिंघानी आपल्या काव्यात्मक आत्मचरित्राला बचित्तर नाटक असेच नाव दिले आहे त्यानंतर गुलाबसिंग या कवीने प्रबोधचंद्रोदय नाटकाचा पंजाबी हिंदीत अनुवाद केला

भंड हे पंजाबमधले भटके व लोकप्रिय नट होत ते बहुधा जोडीने हिंडतात डफ आणि ढोलके ही त्यांची वाद्ये ते सार्वजनिक जत्रांतून व एखाद्या घरी पुत्रजन्माच्या आनंदाप्रीत्यर्थ आपल्या लोकनाट्याचे प्रयोग करतात त्याचे चातुर्य, प्रसंगनिष्ठ विनोद आणि अभिजात नाट्यगुण वाखाणण्यासारखे असतात आपल्या नाट्यातून ते धार्मिक, राजकीय आणि सामाजिक या तीनही अंगाना मर्मस्पर्श करून जातात त्यांचेही संवाद लिखित नसून तोंडीच असतात रासधारिया आणि रामलीलावाले हेही फिरते नटच होत त्यांचे कार्यक्रम मुख्य हिंदीत होतात याचे कारण ते उ प्रदेशातून किंवा राजस्थानातून तिथे आलेले असतात

पंजाबमध्ये खऱ्या अर्थाने नाटकाची निर्मिती १९ व्या शतकाच्या अखेरीस सुरू झाली डा चरणसिंग यांचे शराब कौर हे नाटक आणि त्याचे पुत्र भाई वीरसिंघ यांचे राजा लखदातासिंह हे नाटक ही पंजाबमधली प्रारंभीची नाटके होत गुरुबक्षसिंघ यांनी इ स १९१२ साली मनमोहन हे नाटक लिहिले आणि त्या वेळी ते चांगलेच गाजले त्यापुढे शेक्सपियरच्या नाटकांची रूपांतरे होऊ लागली शाकुंतल आणि विक्रमोर्वशीय या कालिदासाच्या नाटकाची भाषांतरेही प्रसिद्ध झाली

१९२५ साली चार अंकी समस्याप्रधान नाटके डा मोहनसिंह यांनी लिहिली त्यानंतर अन्य काही हिंदी, इंग्रजी नाटकांचीही पंजाबीत भाषांतरे झाली

यानंतर कृपासागर, बाबा बुद्धिसिंघ, ग्यानी गुरुबक्षसिंघ, ब्रजलालशास्त्री व फिरोजदीन हे नाटककार उदयाला आले कृपासागराने रणजितसिंघ व डीडोजमवालनाल ही नाटके लिहिली बाबा बुद्धिसिंघानी चंद्रहरी, दामिनी, इ नाटके लिहिली फिरोजदीन यांनी हीररांझा हे नाटक लिहिले, ग्यानी गुरुबक्षसिंघ यांनी मनमोहन व ब्रजमोहन ही दोन नाटके लिहिली ब्रजलालशास्त्री यांनी पूरन, उदयीन, सावित्री, इ पद्यात्मक व गद्यात्मक नाटके लिहिली पण हे त्यांचे पंजाबीतले नामवंत साहित्यिक असूनही चांगले नाटककार ठरले नाहीत त्यांच्यापैकी काहींना तर नाटकाची घडणच ठाऊक नव्हती

इतकी नाटके लिहिली जाऊनही १९३७ सालापर्यंत पंजाबी रंगभूमीला फारशी चालना मिळाली नाही त्याच सुमारास पारशी थिएट्रिकल कंपनी पंजाबमध्ये पोचली व तिने तिथे आपली नाटके सुरू केली अद्यापही काही पारशी नाटकमंडळ्या तिथे आल्या या नाटकमंडळ्या भारतीय व इराणी पुराणातल्या कथाप्रसंगावर नाटके करीत, त्याचप्रमाणे शेक्सपियरची अनुवादित नाटकेही करीत त्या नाटकमंडळ्या पंजाबात खूप लोकप्रिय झाल्या त्याच्या नाटकाविषयी सर्वत्र चर्चाही सुरू झाल्या मग शाळा–कॉलेजांतून आणि गावागावातून काही काल नाटकाची चलती सुरू झाली या वातावरणाचा फायदा घ्यावा या हेतूने श्री ईश्वरचंदर नंदा यांनी नाट्यलेखन सुरू केले सुभद्रा व लिल्लीदाविवाह ही त्याची दोन मौलिक नाटके होत आधुनिक रंगभूमीचा पहिला नाटककार म्हणून त्याचेच नाव घेतले जाते त्याची नाटके तत्कालीन सामाजिक समस्यावर आधारलेली आहेत

सरदार हरचरनसिंह हे नंदाचे वारसदार समजले जातात सांप्रतच्या पंजाबी नाटककारांत हरचरनसिंहाचीच नाटके संख्येने अधिक आहेत अनजोड, राजा पारस, दोश, खेडणवेदीन चार, दूर दुरोडशहरा व कमला कुमारी ही त्यांनी नाटके मोठी आणि नाट्यगुणयुक्त आहेत या नाटकाचे पंजाबात सर्वत्र प्रयोग झाले आहेत

श्री गुरुदयालसिंह खोसला हे त्यानंतरचे नाटककार होत नंदा व हरचरनसिंह या दोघापेक्षाही त्यांना रंगभूमीचे व नाट्यवस्तूचे ज्ञान विशेष होते त्यांनी काही गुणी लोक एकत्र करून इ स १९४९ साली एक नाट्यसंस्था स्थापन केली व

तिच्या द्वारे तीन नाटके रंगभूमीवर आणली. त्यांची ही नाट्य संस्था दिल्लीत स्थापन झाली. तिचे खेळ दिल्लीत व पंजाबातल्या मोठमोठ्या शहरांत झाले व त्यांचे खूप कोड कौतुक झाले. श्री खोसलांची ही नाटके एकांकिका या स्वरूपाची असून ती दैनंदिन जीवनातल्या महत्त्वाच्या प्रश्नांवर आणि फाळणीनंतरच्या जनजीवनावर आधारलेली आहेत.

यापुढच्या पिढीत संतसिंह सेखो, शीला भाटिया, बलवंत गार्गी व अमरीकसिंह हे नाटककार पुढे आले. त्यांतले बलवंत



बलवंत गार्गी

गार्गी हे श्रेष्ठ होत. हे सर्व प्रगतिशील विचारांचे व मानवतावादी नाटककार आहेत. पंजाबी रंगभूमी अशा प्रकारे हळूहळू का होईना, पण प्रगतीची वाटचाल करीत आहे. [भा. ना. सा., श्री मोहन सिंह– मार्च आफ इंडिया, जाने. १९५८]

## पंजाबी लोकनृत्य

पंजाबात अनेक प्रकारची लोकनृत्ये प्रचलित आहेत. प्रदेशपरत्वे ती भिन्न भिन्न आहेत. त्यांतली काही ऋतूंवर आधारित आहेत, काही संस्कारांची आहेत, काही देवताप्रीत्यर्थ आहेत, तर काही केवळ मनोविनोदात्मक आहेत.

जत्रा आणि उत्सव यांतली पुष्कळशी लोकनृत्ये कुलू खोऱ्यात आढळतात. बहुतेक जत्रा आणि उत्सव शेताची कापणी झाल्यावर होत असतात व कुलूतले लोक त्या प्रसंगी मनसोक्त गाऊन आणि नाचून ते उत्सव आनंदाने साजरे करतात.

मैदानी प्रदेशात कोणत्याही सामाजिक समारंभातले लोकरंजनाचे साधन म्हणजे नृत्य होय. अशा प्रसंगी नृत्य करणाऱ्या नर्तकांचा एक वर्गच तिथे आहे. अशा नृत्यांत प्रसंगी श्रोतेही भाग घेतात आणि विविध आशयाची लोकगीते गातात.

पतियाळा जिल्ह्याच्या भागात रबाबी या नावाने ओळखले जाणारे नर्तक आहेत. रबाब हे वाद्य वाजवून त्याच्या साथीवर ते नाचतात, म्हणून त्यांना रबाबी हे नाव पडले आहे. खेड्यापाड्यांतूनसुद्धा प्रसंगविशेषी त्यांचे नृत्याचे कार्यक्रम घडवून आणले जातात.

मुझफरगड जिल्ह्याच्या काही भागात लग्नप्रसंगी झुम्मीर नावाचे नृत्य करतात. त्या भागातले ते अत्यंत लोकप्रिय नृत्य आहे. लग्नसमारंभातच नव्हे, तर कोणत्याही आनंदाच्या प्रसंगी चार माणसे एकत्र जमून झुम्मीरचा कार्यक्रम करतात. हे नृत्य फेर धरून करायचे असते. त्याला वाद्याची साथ असते. नर्तक टाळ्या वाजवून त्याचा ताल धरतात. हे नृत्य सगळ्यांना नाचता आले पाहिजे, अशी अपेक्षा असते. ज्याला झुम्मीर नाचता येत नाही, अशा तरुणाकडे मुलीसुद्धा अनादराने पाहतात. हे नृत्य मूळ बलुची लोकांचे होते. ते पंजाबी लोकांनी स्वीकारले आणि त्याचा आपल्या भागात प्रसार केला.

पंजाबमध्ये खट्टक नावाचा एक वर्ग आहे. ते लोक होळीच्या दिवसांत जे नृत्य करतात, त्याचे स्वरूप काहीसे युद्धासारखे असते. एका वेळी दोनदोनशे माणसे त्यात भाग घेतात. त्या वेळी खूप आरडाओरडा चालतो. त्यांच्या कर्कश आरोळ्यांनी वातावरण भयग्रस्त होते. नर्तकांच्या हातांत तलवारी असतात आणि त्या फिरवून ते जणू समोरच्या माणसाशी द्वंद्वयुद्धच करतात. या खड्गनृत्याला कौशल्याची गरज असते. अन्यथा त्यातून रक्तपात होण्याचेही भय असते. नृत्य द्रुतलयीत पराकोटीला गेले, की बासरीवादक आणि ढोलकेही आपापली वाद्ये वाजवीत नाचू लागतात. नर्तक युद्धनृत्याचे हातवारे करून थकले, की परत फेरात येऊन मिसळतात. मग त्या वर्तुळात एखादा कुशल मनुष्य तलवारीचे वेगवेगळे हात करून दाखवतो. नृत्य संपल्यानंतर मग सामुदायिक भोजन होते.

प्रस्तुत नृत्यात ढोलक वाजवणा-याला फार मान असतो. तो त्या नृत्याचा प्राणच असतो. द्रुतलयीत कुशलतेने वाजवणारा ढोलक्या नसेल, तर नर्तक सहसा नृत्याला उभेच राहत नाहीत.

पंजाबातल्या पुरुषवर्गाचे अत्यंत लोकप्रिय नृत्य म्हणजे भांगडा होय. ते पंजाबचे प्रातीय नृत्यच आहे. त्यात विलक्षण चैतन्य असते. या नृत्याला कोणतेही निमित्त लागत नाही. नर्तकांना इच्छा झाली, की त्याचे आयोजन होते. वैशाखीच्या जत्रेत त्याला

विशेष जोर येतो भांगडा नर्तकाच्या हातात लांब व जाड काठ्या असतात त्यांच्या टोकांना लोखंडी कड्या असतात



भांगडा नृत्य – पंजाब

नृत्यासाठी फेर धरला जातो मग एक इसम फेरात उभा राहून गीत सुरू करतो ते बहुधा प्रणयात्मक असते नर्तक एका स्वरात त्याचे पालुपद म्हणतात साथीला ढोल असतो नर्तक आपल्या हातातल्या काठ्या उंच उचलून त्या एका तालात जमिनीवर आपटतात तो आवाजही नृत्याला नादमयता आणतो

पुरुषांचे जसे भांगडा, तसे स्त्रियांचे गिद्धा नृत्य होय यात बायका गाण्याच्या मध्ये 'गिद्धा गिद्धा' असा उद्घोष करतात म्हणून त्याला हे नाव पडले आहे या नृत्याला एखादी मुलगीच ढोलकीची साथ करते तिच्या भोवती बायका फेर धरतात नाचताना त्या स्वतः टाळी वाजवतात आणि दुसरीच्या हातावरही टाळी देतात नृत्याच्या शेवटी शेवटी त्याची लय द्रुत, द्रुततर होत जाते गिद्धागीतांचा विषयही सामान्यपणे प्रेम हाच असतो

पंजाबात जे बलुची लोक आहेत, ते सगळे धर्माने मुसलमान आहेत नृत्य हीच एक त्यांची करमणूक असते पण हिंदूंची सांस्कृतिक पार्श्वभूमी त्यांना नसल्यामुळे त्यांच्या कोणत्याही नृत्याला पुराणकथांचा किंवा लौकिक प्रेमकथांचाही आधार नसतो त्यांची नृत्ये ही रांगडी आणि युद्धसदृश असतात [ फो डा ६ ]

**पंजासाहिब** पंजाबमधले शिखांचे एक प्रसिद्ध पुण्यक्षेत्र तिथे एक मंदिर असून, त्या मंदिराजवळ एक तलाव बांधलेला आहे त्या संबंधीची एक कथा सांगतात, ती अशी –

गुरू नानक एकदा फिरता फिरता रावळपिंडीजवळच्या हसन अब्दाल या गावी गेले तिथे जवळच एका टेकडीवर बावा वली कंदहारी नामक एक मुसलमान संत राहत असे त्या टेकडीवर एक झरा होता गुरू नानक यांनी एका शिष्याला त्या झऱ्याचे पाणी आणण्यासाठी पाठवले पण त्या मुसलमान संताच्या अनुयायांनी त्याला पाणी घेऊ दिले नाही तेव्हा गुरू नानक यांनी दैवी शक्तीने तो झरा बंद केला व तो आपल्या नमण्याच्या जागी आणला त्यामुळे तो मुसलमान संत संतापला व त्याने एक मोठा दगड टेकडीवरून गुरूकडे लोटला नानकांनी तो दगड नुसत्या हाताने थोपवून धरला तसे करताना त्यांच्या पंजाचा ठसा त्या दगडावर उमटला तेव्हापासून त्या स्थळाला पंजासाहिब हे नाव पडले आणि ते शिखांचे पुण्यक्षेत्र बनले महाराजा रणजितसिंगाच्या राजवटीत तिथे एक मंदिर व एक तलाव बांधला गेला



पंजासाहिब येथील मंदिर

वैशाखी पौर्णिमेला या ठिकाणी मोठी जत्रा भरते त्या वेळी हजारो शीख तिथे जमतात त्या वेळी ते तलावात स्नान करून कीर्तन श्रवण व गुरुवंदन करतात दुसऱ्या दिवशी भंडारा असतो [ श्री ए बी रजपूत – इलस्ट्रेटेड वीकली, ३ जून १९६२ ]

**पटारम** द भारतातील एक वन्य जमात या लोकांची वस्ती प्रामुख्याने त्रिवांकुर विभागात आढळते ते सदैव भटकत असतात त्यांच्या कुटुंबात दोन किंवा तीन यांपेक्षा अधिक माणसे नसतात ते जंगलातील झाडे तोडून त्यांच्या झोपड्या बांधतात आणि पानांनी त्या शाकारतात पांघरायला पुरेशी वस्त्रे नसल्यामुळे ते उबेसाठी घरात सदैव विस्तव बाळगतात यांच्यांत रोगांमुळे मृत्यूचे प्रमाण बरेच असते

**विवाहप्रथा**—यांच्यात अगदी लहान वयात मुलींची लग्ने करतात सामान्यपणे आतेमामे भावंडांचा विवाह होतो आपली बहीण भाच्याला द्यायची व त्याची बहीण आपण करायची असा गाटलाटहा चालते लग्न मुलीच्या घरी होते लग्नाच्या दिवशी नवऱ्यादेवाला वधूपित्याकडून एक धोतरजोडी मिळते ती दिल्यावर मुलीचा बाप आपल्या मुलीचा उजवा हात मुलाच्या हातात देतो आणि 'मी माझी मुलगी तुला देता आहे हिचा तू सांभाळ कर' असे म्हणतो नंतर नवरा नवरी एका चटईवर बसतात तिथे भाताचे चार घास आणतात त्यातील दोन घास नवरी नवऱ्याला व दोन घास नवरा नवरीला भरवतो एवढे झाल्यावर लग्नविधी पुरा होतो

मुलीला न्हाण आले, की तिला घरापासून थोड्या अंतरावर एका झोपडीत ठेवतात सोळा दिवस तिचा विटाळ मानतात इतर वेळी तो सात दिवस पाळतात त्या मुदतात तिच्या नवऱ्याने झाडावर किंवा टेकडावरही चढायचे नसते हत्याराचाही वापर करायचा नसतो त्यामुळे त्याहाही एका खोलीत बसवून ठेवतात या लोकांना स्त्रीच्या रजोदर्शनाचे भय वाटते म्हणून आणि निवाय आपणावर एखादी दैवी आपत्ती कोसळू नये, म्हणून ते स्वतःला असे कोंडून घेत असावे

**प्रसूतिप्रथा**—पंटारम लोकांत प्रसूतीही राहत्या घरात होत नाही घरापासून थोड्या अंतरावर बांधलेल्या झोपडीत ते बाळंतपणाची व्यवस्था करतात या वेळी ते सोळा दिवस सुवेर पाळतात या मुदतीत नवऱ्याला शिकारीसाठी किंवा अन्न मिळविण्यासाठी बाहेर पडता येत नाही जन्मलेले मूल मुलगा असल्यास तीन ते पाच महिने व मुलगी असल्यास चार ते सहा महिने त्या स्त्रीला याही प्रमाणात आशौच पाळावे लागते या काळात ती स्वयंपाक करीत नाही गर्भारपणात पाचव्या महिन्यापासून पुढे व बाळंतपण झाल्यानंतर सहा महिने पति पत्नींचा संबंध निषिद्ध मानतात

**मर्तिकप्रथा**— यांच्यात मृताला पुरतात सुतक आठ दिवस पाळतात नवव्या दिवशी शांतिभोजन घालतात एखाद्या वस्तीत मृत्यू झाल्यास त्या वस्तीतले सर्व लोक ती जागा सोडून दुसऱ्या ठिकाणी राहायला जातात [ रज कण ]

## पंडा ब्राह्मण

व्यवसायावरून बनलेली ब्राह्मणांची एक शाखा या लोकांची वस्ती सामान्यपणे वाराणसी, प्रयाग मथुरा, जगन्नाथपुरी रामेश्वर, इ तीर्थक्षेत्रात असते या लोकांचा स्वतंत्र वंश नाही यांच्यातील बहुतेक लोक द्राविडी, मैथिली, कान्यकुब्ज, इ ब्राह्मणांपैकी आहेत

देवपूजा, मंदिराची देखभाल आणि यात्रेकरूंचा दर्शनादी यात्राविधी करवणे हा यांचा प्रमुख व्यवसाय आहे या कार्याबद्दल यात्रेकरूंकडून त्यांना दक्षिणा मिळते व तिच्यावर ते आपला निर्वाह चालवतात देवाला अर्पण केलेले पदार्थ, वस्तू हत्ती घोडे, रथ, पालख्या, त्याचप्रमाण देवस्थानासाठी नमून दिलेल्या जमिनी यांचा उपभोग हे पंडेच घेतात पुष्कळदा यांच्याकडून यात्रेकरू लुबाडलेही जातात जरी यांचा सद्‌वर्तन धर्मकृत्याशी संबंध येत असला, तरी यांच्यात पंडित असे लोक तुरळकच आढळतात [ मा श्री आ प्र ]

## पंडारम

दक्षिण भारतातील ब्राह्मणेतर पुरोहितांचा एक वर्ग यांत मुख्यत शैवपंथी लोक असतात ते शिवालयात देवाची सेवाचाकरी करतात, फुलांच्या माळा घालून लिंग सुशोभित करतात आणि नैवेद्याचे वेळी आणि मिरवणुकीमध्ये गिनठेच्या तुता या वाजवण्याचे काम करतात तिरुत्तणी हे यांचे एकत्र जमण्याचे मुख्य ठिकाण आहे

काही पंडारम मोठाले जमीनदार आहेत काही संन्यासी आहेत तर काही पुरोहित आहेत काही मोठ्या श्रीमंत देवालयांचे व्यवस्थापक आहेत जे शैवपंथी आहेत, ते लिंग धारण करतात व ब्रह्मचर्य पाळतात शूद्र जातीतले पंडारम भिक्षा मागणे हे पवित्र कृत्य मानतात ते लिंग धारण करतात पण मांसाशन वर्ज्य मानीत नाहीत

पंडारम लोक सर्व अंगाला भस्म लावतात व भस्मी रंगाचे दिसतात म्हणून त्यांना पंडारम हे नाव मिळाले असावे दुसरी कल्पना अशी आहे की पंडारम हा शब्द बंडारम्‌पासून बनला आहे बंडारम म्हणजे सार्वजनिक खजिना होय दक्षिण भारतातील शिवाच्या देवालयात पंडारम लोक व्यवस्थापकाचे काम पाहतात आणि देवळाचा खजिना त्यांच्या ताब्यात असतो भिक्षेकरी पंडारम आपल्याजवळ सतत भस्माची डबी बाळगतात आणि जे जे त्यांना भिक्षा घालतात त्यांना भस्म लावतात त्यावरूनही पंडारम हे नाव त्यांना मिळाले असावे

**मर्तिकप्रथा**— हे लोक मृतांना पुरतात प्रेत बसलेल्या स्थितीत ठेवतात व त्यावर समाधी बांधतात त्या समाधीवर एक लहान लिंग व नंदीची लहानशी प्रतिमा ठेवतात व कधीकधी त्यांची पूजा करतात [ का द्वा स इ ]

## पंडितो

एक जात या लोकांची वस्ती ओडिसात आहे ही ज्योतिषांची व वैद्यांची जात म्हणून ओळखली जाते त्यावरून ज्योतिर्वैद्यक हे त्यांचे परंपरागत व्यवसाय असावे, असे वाटते हे लोक जानवे घालतात यांच्यात बालविवाह प्रचलित होते विधवाविवाहाचा मात्र निषेध होता त्यांना मद्यपान

चालत नाही ते मासे मात्र खातात [का द्वा स इ ]

**पडुकेश्वर** उ भारतातील एक तीर्थस्थान हे स्थान बदरी नारायणापासून सुमारे बारा मैलावर आहे या स्थानाजवळूनच अलकनंदा नदी वाहते तिच्या काठावर एक मंदिर आहे व त्या मंदिरात ध्यानस्थ नारायणाची सुवर्णमूर्ती आहे या मूर्तीचे वजन सुमारे साठ– सत्तर शेर भरेल, असे सांगतात या मूर्तीसंबंधी एक पौराणिक कथा आहे, ती अशी – अर्जुनाला पाशुपतास्त्राची प्राप्ती झाल्यावर तो इंद्रलोकी गेला प्रस्तुत मूर्ती तिथे इंद्राच्या देवघरात होती अर्जुनाला ती फार आवडली व त्याने ती मागितली इंद्राने ती त्याला दिली अर्जुन ती घेऊन धर्मराजाकडे आला धर्मराज त्या मूर्तीची पूजा करू लागला पुढे पांडव जेव्हा स्वर्गारोहणाला निघाले, तेव्हा धर्मराजाने ती मूर्ती इथे स्थापन केली [ तीर्थयात्राप्रबंध ]

**पंढरपूर** द भारतातील एक प्राचीन तीर्थक्षेत्र हे महाराष्ट्रातल्या सोलापूर जिल्ह्यातील कुर्डुवाडी या गावापासून बत्तीस मैलावर आहे याला पंडरपूर, पंढरी, पांडरंगपूर, पंडरीपूर, फागनीपूर, पौंडरीकक्षेत्र, पंडरग, पांडरंगपल्ली अशी विविध नावे आहेत संतजन या क्षेत्राचा भूवैकुंठ किंवा दक्षिणकाशी म्हणून उल्लेख करतात

पंडरग हा कानडी शब्द आहे त्याचे पंडरिगा पंडरी किंवा पंढरी असे रूप झाले असले पाहिजे पंढरी या शब्दाला पुर हा नगरवाचक प्रत्यय लागून पंढरीपूर आणि मग पंढरपूर हा शब्द बनला श्री राजपुरोहित व डॉ रा गो भांडारकर यांनी अनुक्रमे पंडरीकपुर व पांडरंगपुर या शब्दांपासून पंढरपूर शब्द व्युत्पन्न झाला आहे

हे क्षेत्र भीमा (भिवरा) नदीच्या तीरावर वसलेले आहे या ठिकाणी ही नदी अर्धचंद्राकृती वाहते म्हणून तिला चंद्रभागा असे नाव मिळाले आहे पंढरपूर क्षेत्राचे माहात्म्य सांगणारा पंढरी माहात्म्य नामक एक संस्कृत ग्रंथ आहे हा ग्रंथ स्कंदपुराणांतर्गत समजला जातो त्यातले पंढरपुराचे वर्णन असे –

> **पौण्डरीकमिति ख्यातं तीर्थं क्षेत्रं च पूजितम् ।**
> **पाण्डुरङ्गश्च तत्रास्ते मूर्तिमान् देवतोत्तमः ।।**
> **अर्धयोजनविस्तीर्णं तदर्धायामसम्मितम् ।**

अर्थ – (भीमेच्या काठी) पौंडरीक या नावाचे क्षेत्र आणि तीर्थ आहे त्या क्षेत्रात सर्वश्रेष्ठ देव पांडुरंग मूर्तरूपात राहून आहे हे क्षेत्र अर्धयोजन लांब आहे व त्याची रुंदी तदर्ध म्हणजे एक कोस आहे

पंढरीमाहात्म्यात पंढरीक्षेत्रवर्णनाबरोबरच तिथल्या द्वारांचाही उल्लेख आहे, या क्षेत्राचे पूर्वेकडील द्वार भीमा व शिशुमाला या नद्यांच्या संगमावर आहे तिथे संध्यावळी देवीचे स्थान आहे मानपूर हे याचे दक्षिणद्वार होय इथे सिद्धेश्वर शिवलिंग आहे भीमा व पुष्पावती या नद्यांच्या संगमावर हे द्वार आहे भुवनेश्वरी देवीचे स्थान हे याचे पश्चिमद्वार होय भीमा व भरणी नद्यांच्या संगमावर उत्तरद्वार आहे तिथे दुर्गा देवीचे स्थान आहे

**क्षेत्राची प्राचीनता** – पंढरपुराला महाराष्ट्रातील भक्तिसंप्रदायाचे आद्य पीठ मानतात त्याचा अगदा पहिला उल्लेख इ स ५१६ च्या ताम्रपटात पांडरंगपल्ली या नावाने आढळतो हा ताम्रपट राष्ट्रकूट घराण्यातील अविधेय राजाने खोदलेला आहे त्यात जयद्विट्ठ नावाच्या ब्राह्मणाला शंभुमहादेवाचा डाग राच्या पूर्वेस असलेल्या पात्र गावाचे दान दिल्याचा उल्लेख आढळतो 'पांडरंगपल्ली' या नावातील पांडरंग शब्द देवता वाचक की मनुष्यवाचक समजायचा, याविषयी विद्वानांत मतभेद आहेत बरेच संशोधक हा शब्द देवतावाचक मानतात

शके ११११ (इ स ११८९) मधील शिलालेख हे पंढरपुरातील आद्य व नवोपलब्ध साधन आहे प्रस्तुत शिलालेखात, जो कोणी मंदिराला पीडा देईल, त्याला विठ्ठलाची आण घातली आहे त्यावरून हे देऊळ विठ्ठलाचे आहे हे सिद्ध होते

गावाचा व देवाचा उल्लेख असलेला यानंतरचा शके ११५९ चा ( इ स १२३७ ) शिलालेख मुख्य मंदिरातच सोळखांबी मंडपात आहे हा शिलालेख संस्कृत–कानडा अशा मिश्र भाषेत आहे या लेखात होयसळ यादव घराण्यातील वीर सोमेश्वर याने विठ्ठलाच्या अंग–भोगासाठी आसंदिनाडामधील हिरिय गरज (म्हैसूरमधील कडूर तालुक्यातील आजचे हिरगरजी खेड) गाव दान केल्याचे नमूद केले आहे या लेखात पंढरपुराला पंडरगे असे म्हटले आहे आणि देवाला श्री विठ्ठल असे म्हटले आहे

डा श गो तुळपुळे यांनी नव्याने उजेडात आणलेल्या शके ११११ मधील शिलालेखाच्या आधारे असे अनुमान करता येते, की शके ११११ मध्ये पंढरपुरात विठ्ठलाचे देऊळ निर्माण झाले या संबंधात त्यांचे विवेचन असे–

" स्थापनेच्या वेळी मंदिर अगदी लहान होते हा 'लाभमडु' हळूहळू वाढत गेला शके ११५९ मध्ये त्यास होयसळ यादवांपैकी वीर सोमेश्वर याने कर्नाटकातील एक गाव दान दिला शके ११९२ मध्ये या देवळात किंवा देवळाच्या आवारात आपस्तंब यज्ञ करण्यात आला शके ११९५ मध्ये पाढरीफडमुख्य, प्रौढप्रताप चक्रवर्ती, श्रीरामचंद्र देवराव यादव व त्याचा करणाधिप हेमाद्रिपंडित यांनी पुढाकार घेऊन या देवळाची वाढ केली आणि देवस्थानची त्यांच्या कीर्तीस साजेल अशी व्यवस्था लावून

दिली. देवळाचा विस्तार शके १२७५ च्या सुमारास पुष्कळच झाला.'

पंढरपूरला विठ्ठलमंदिराच्या बाहेर चोखामेळ्याच्या समाधी



विठ्ठलमूर्ती – पंढरपूर

पाशी एक शिलालेख आहे. त्याचा काळ शके १२३३ (इ. स. १३११) असा आहे. त्याची भाषा मराठी आहे. त्यात पंढरपूरला पंडरिपुर व विठोबाला विठ्ठल किंवा विठल अशा उभय पद्धतींने संबोधले आहे.

या क्षेत्राचा उल्लेख पद्म पुराणात (उ. ख. १७६. ५५–५६) आढळतो. पैठण येथे जानश्रुती नावाचा एक राजा होऊन गेला. त्याने ब्रह्मवादी रैक्वाचा शोध करण्यासाठी आपल्या सारथ्याला पाठवले. तो अनेक क्षेत्रे धुंडाळीत धुंडाळीत पंढरपूरला आला आणि इथल्या द्विभुज विठ्ठलाला भेटला, असे तिथे सांगितले आहे.

आद्य शंकराचार्यांचे पांडुरंगाष्टक प्रसिद्ध आहे. या अष्टकात पंढरपूरला भीमेच्या तटावरील महायोगपीठ असे म्हटले आहे.

हेमाद्रीच्या चतुर्वर्गचिंतामणीच्या तीर्थखंडात पंढरपुराचा उल्लेख आहे. तिथे पंढरपुराला पौंडरीक व विठोबाला पांडुरंग असे म्हटले आहे.

याच सुमारास चौंडरस नावाचा एक कानडी कवी होऊन गेला. त्याने अभिनव दशकुमारचरिते या ग्रंथात पंढरपूर आणि तिथले विठ्ठलाचे मंदिर, त्यातील गरुड, गणपती, क्षेत्रपाळ इत्यादींचेही वर्णन केले आहे.

ज्ञानेश्वर आणि नामदेव यांनी तर पंढरपुराचा महिमा खूपच वर्णिला आहे. ज्ञानदेवाच्या पंढरपूरसंबंधाच्या काही पंक्ती अशा–

माझे जीवीची आवडी।
पंढरपुरा नेईन गुढी।।
जाईन गे माय तया पंढरपुरा।
भेटेन माहेरा आपुलिया।।

ज्ञानेश्वर – नामदेवाच्याप्रमाणेच सावता माळी, गोरा कुंभार, चोखामेळा, सेना न्हावी, कान्होपात्रा, एकनाथ, तुकाराम, बहिणाबाई, इ. संतकवींनी मुक्तकंठाने पंढरीचे महिमान गाइले आहे. नमुन्यासाठी बहिणाबाईंचा एक अभंग पुढे दिला आहे–

उदंड एकिला। उदंड गायिला।
उदंड देखिला। क्षेत्रमहिमा।।
पंढरीसारखे। नाही क्षेत्र कोठे।
जरी ते वैकुंठ। दाखविले।।
ऐसी चंद्रभागा। ऐसे भीमातीर।
ऐसा विटेवर। देव कोठे ?।।
ऐसे वाळुवंट। ऐसी हरिकथा।
ठाई ठाई देखा। दिंडीभार।।
ऐसे हरिदास। ऐसे प्रेम सुख।
ऐसा नामघोष। सांगा कोठे।।
बहिणी म्हणे आम्हा। अनाथा कारण।
पंढरी निर्माण। केली देवे।।

आतापर्यंत पाहिलेल्या शिलालेखीय व वाङ्मयीन पुराव्यांच्या आधारे असे दिसते, की पंढरपुराची प्राचीनता इ. स. च्या ६ व्या शतकाच्या पूर्वार्धापर्यंत जाते.

**विठ्ठलमंदिर** – हे मंदिर गावाच्या मध्यावर उंच भागी पूर्वाभिमुख आहे. त्याची पूर्व पश्चिम लांबी ३५० फूट असून दक्षिणोत्तर रुंदी १७० फूट आहे. पूर्वद्वाराला महाद्वार अथवा नामदेवदरवाजा असे म्हणतात. या दरवाजाच्या पहिल्या पायरीला नामदेवाची पायरी म्हणून ओळखतात. नामदेवाने इथे समाधी घेतली म्हणून हे नाव त्या पायरीला दिले गेले आहे. तिच्यावर उजव्या बाजूस नामदेवाचा पितळेचा चल मुखवटा बसविलेला असतो.

मदिरात जाणारे भक्तभाविक या पायरीवर पाय न देता वर जातात त्यापुढे डाव्या हाताला एक मोठा वटवृक्ष आहे त्याला



विठ्ठलमदिर – पढरपूर

लागूनच तेहतीस कोटी देवाचे मदिर आहे त्यापुढे मुक्तिमडप किंवा मुखमडप लागतो हा मडप अरुद व लहान असून चार–पाच कमानीवर आधारलेला आहे मडपाच्या अखेरीस डाव्या बाजूला एका मोठ्या फडताळात गणेशाची मूर्ती आहे काही लोकाचे असे म्हणणे आहे, की पूर्वी या गणेशाजवळच पूर्वेकडे तोड करून विठ्ठलमूर्ती होती साप्रत या मडपावर देवाचा नगारखाना आहे

गणपतीपासून चार पायऱ्या खाली उतरले, की एक मोठा फरसबदी मडप लागतो याची पूर्वपश्चिम लाबी सुमारे १२० फूट व दक्षिणोत्तर रुदी ६० फूट आहे या मडपात उतरल्यावर लगेच डाव्या हाताला सत प्रल्हादबुवा बडवे व कान्होबा हरिदास याच्या समाध्या आहेत या मडपातच दोन दीपमाळा असून, शिवाय एक गरुडाचे व किंचित उजव्या हाताला हनुमताचे मदिर आहे या मडपातच उजव्या बाजूकडील ओवरीच्या एका खोलीत समर्थ रामदासानी स्थापलेला उभा मारुती आहे

या मडपातून वर चढून गेले म्हणजे एक दालन लागते या दालनातून सोळा खाबाच्या मडपात जायला तीन दरवाजे आहेत पैकी मधला दरवाजा पितळी पत्र्यान मढविलला आहे या दरवाज्याच्या डाव्या–उजव्या बाजूना जय विजयाच्या मूर्ती आहेत इथून आत गले म्हणजे सोळखाबी मडप लागतो या मडपाच्या खाबावर कुठेकुठे कोरलेली व मत्स्यकूर्मादी अवताराची चित्रे रगवलेली दिसतात एका खाबावर बदूक घेतलेल्या मनुष्याचे चित्र आहे या मडपात डाव्या बाजूला चादीच्या पत्र्याने मढविलेला एक खाब आहे त्याला गरुडखाब किंवा पुरदरदासाचा खाब म्हणतात प्रथम या खाबास आलिंगन देऊन नतर विठ्ठलदर्शनाला जायचे असते सोळखाबीच्या मधल्या भागात रगशिळा आहे भाविक लोक तिथे एक तरी उडी मारतात व मग पुढे जातात किंचित पुढे उजव्या हाताला दोन पादुका आहेत दामाजापताच्या विनतीवरून पाडुरगाने महार वेषात बादशहाला इथे दर्शन दिले, अशी समजूत आहे त्याची स्मृती म्हणून या पादुका बसविल्याचे सागतात

यानतर चौखाबी मडप लागतो या मडपात जायला चादीच्या पत्र्याने मढविलेला एक मोठा दरवाजा आहे चौखाबी मडपाच्या दक्षिण बाजूला एक लहानसा दरवाजा आहे त्याला हत्ती दरवाजा म्हणतात या दरवाज्याच्या दोन्ही बाजूना दगडी हत्ती आहेत देवाच्या पूजापचारासाठी सोवळ्याने येणारे लोक इथून आत येतात या मडपाच्या उजव्या हाताला एक मोठे फडताळ आहे तिथे पाडुरगाचे शेजघर आहे या शेजघरात रुप्याचा पलग असून त्यावर बहुमोल शय्या आहे



गरुडस्तभ – पढरपूर

चौखाबी मडपातून पुढे गेले म्हणजे एक चौरस जागा लागते, तिला कमान असे म्हणतात कमानीच्या पुढे गर्भागाराचा दरवाजा आहे गर्भागाराची दर्शनी भिंत चादीच्या पत्र्याने मढविलेली आहे या दरवाजातून आत

गले म्हणजे भिताला लागून एक रुपेरी प्रभावळ आह त्या प्रभावळीच्या आत विटवर विठ्ठलमूर्ती उभा आहे

विठ्ठलाचे दर्शन घेतल्यावर सोळखांबी मडपाच्या दक्षिण दरवाज्यान बाहर पडता यते बाहेर पडल्यावर अंबाबाइ, नारद परशुराम, उजव्या सोडेत गणपता व डाव्या सोडेचा गणपती याचे दर्शन होते पुढे कान्होपात्रेची समाधी लागते या समाधी वर तरटीचे एक झाड आह तिथन पुढे व्यकटेशाचे लहान मदिर लागते या व्यकटेशाची मूर्ती गडकी शिळेची आहे व्यकटेशाला उजव घालून पुढे आल्यावर बाजीरावाची ओवरी लागत तिच्या समोर लक्ष्मीचे टुमदार मदिर आहे शेजारी सूय, गणेश, खडोबा व नागोबा हे दव आहेत

नामदेवाच्या पायरीसमोर चाखोबाची समाधी आह

**रुक्मिणीमदिर**– बाजीरावाच्या ओवरीतून पुढ सरकताच उजव्या हाताला विठ्ठलमदिराची पिछाडी व त्याचे शिखर दिसते



रुक्मिणीची मूर्ती– पढरपूर

लगेच उजव्या हाताला रुक्मिणीमदिरात जाण्यासाठी पायऱ्या लागतात या पायऱ्या चढून जाताच राही व सत्यभामा याची छोटी मदिरे लागतात तिथून पुढे गेल्यावर रुक्मिणीमदिराच्या गाभाऱ्याजवळच्या दालनात प्रवेश करता येतो रुक्मिणीची मूर्ती पूर्वाभिमुख आहे या मदिराचे गाभारा, मध्यगह मुख्यमडप व सभामडप असे चार भाग आहेत मध्यगहाच्या उत्तरेकडील भितीत एक खोली आहे ते रुक्मिणीचे शेजघर होय

तिथून पुढे गेले म्हणजे एक ओवरी लागत या ओवरीत डाव्या बाजूला अनुक्रमे काशीविश्वनाथ, राम लक्ष्मण काल भरव, रामेश्वरलिंग, दत्त, नरसोबा अशी मदिरे आहेत ही ओवरी सपताच उजव्या हाताला पुनश्च सोळखांबी मडपात जाण्याला एक दरवाजा लागतो या दरवाज्याला लागूनच चौऱ्याऐशीचा प्रसिद्ध शिलालेख आह या लेखाला पाठ घासली म्हणजे चौऱ्यायशी योनीतून सुटका होते, अशी भाविकाची सम जूत होती या भ्रामक समजुतीमुळे इतिहासाचे हे अस्सल साधन घासून घासून पुसट झाले आहे परतु अलिकड या लेखाच्या अवशिष्ट भागाच्या सुरक्षिततसाठी सबधित अधि का यानी त्यावर लोखडी जाळी बसविली आह

श्रीविठ्ठलाच्या व रुक्मिणीच्या उपचाराचे नित्य व नमित्तिक असे दोन भाग होतात त्यापकी नित्योपचारात काकड आरती, पचामतपूजा मध्यान्हपूजा, अपराह्णपूजा, धूपारती, शेजारती हे समाविष्ट आहेत देवाला बुधवारी व शनिवारी अभ्यग स्नान घालतात एकादशीच्या दिवशी देवाला फराळाचा नवेद्य असतो त्या दिवशी शेजारती होत नाही

नवरात्र, दसरा, बलिप्रतिपदा व गुढीपाडवा या दिवशी देवाला हिऱ्यामाणकाचे दागिने घालतात धनुर्मासात देवाला खिचडीचा नवेद्य असतो उन्हाळ्यात दुपारी थड पाणी, उप-हाराकरिता फळे, प हे व ताबूल देतात गोकुळाष्टमीला मोठा उत्सव करतात आषाढ वद्य प्रतिपदा आणि कार्तिक वद्य प्रति पदा या दिवशी देवळात काला होतो त्याला महाद्वारकाला असे म्हणतात या वेळी हरिदास उपनामक सेवकाच्या डोक्यवर देवाच्या पादुका बाधतात आणि त्याला मिरवीत आणतात मग दहिहडी फोडून काला करतात

पढरपुरी आषाढी कार्तिकी या मोठ्या यात्रा भरतात चत्र व माघ या मासातही यात्रा भरतात, पण त्या आषाढी कार्तिकीच्या तुलनेने लहान असतात या यात्राच्या वेळी देवाचे व देवीचे स्नान व पूजा सोडून इतर सव उपचार बद असतात आणि देव भक्ता साठी सवकाळ मोकळा असतो यात्रेनतर देवाची प्रक्षालनपूजा होते आणि मग देवाचे नित्योपचार पुनश्च सुरू होतात

**पढरपुराचा परिसर** – या क्षेत्रातील प्रमुख स्थाने पुढील प्रमाणे आहेत –

पुडलिकाचे मदिर – पढरपूर हे क्षेत्र भीमेच्या काठी असल्याने

नदीत उतरण्यासाठी इथे अनेक घाट बांधलेले आहेत चंद्रभागेच्या वाळवंटात पुंडलिकमंदिर, तुकाराममहाराजांचे वंशज भाऊसाहेब देहूकर, गोविंदबुवा अमळनेरकर गोविंदबुवा चोपडेकर व मामासाहेब दांडेकर.... मानुदासमहाराज वळापूरकर यांच्या समाध्या आहेत पुंडलिकाचे मंदिर महाद्वारघाटास सुख आहे मंदिरावर साठ फूट उंचीचे शिखर आहे या मंदिराच्या गाभाऱ्यात शिवलिंग आहे यावर पुंडलिकाचा चल मुखवटा बसवलेला असतो पुंडलिकाचे



पुंडलिकाचे मंदिर – पंढरपूर

पुजारी कोळी आहेत चंद्रभागेला जेव्हा पूर येतो, तेव्हा हा मुखवटा उद्धव घाटावरील महादेवाच्या मंदिरात आणून बसवतात ज्या पुंडलिकासाठी पांडुरंग पंढरीत आला, तो हा भक्तश्रेष्ठ पुंडलीक होय

नदीच्या पलिकडे पुंडलीकमंदिरासमोर नित्यानंद प्रभूंची समाधी आहे त्यांनी इथेच भीमेत देह ठेवला या मंदिराच्या थोडे उत्तरेला माध्व संप्रदायाचा एक मठ आहे

**विष्णुपद** – हे स्थान पुंडलिकाच्या देवळापासून दक्षिणेस सुमारे पाऊण मैलावर नदीच्या पात्रात आहे देवळाच्या मध्यभागी असलेल्या चौकोनात श्रीगोपालकृष्णाची समचरण व देहुडाचरण अशी दोन प्रकारची पावले आहेत त्याशेजारी गाईंचीही पावले आहेत पुंडलिकासाठी श्रीकृष्ण इथे आला, त्याने इथे भोजन केले व गाई खेळविल्या, अशी या स्थानासंबंधीची प्रल्हाद महाराजांनी सांगितलेली कथा आहे गावातील अनेक लोक मार्गशीर्ष मासात इथे भोजनासाठी जमतात या स्थानापासून नजीकच नदीच्या पात्रात नारदाचे एक लहानसे मंदिर आहे

**गोपाळपूर** – विष्णुपदाच्या पश्चिमेस थोड्या अंतरावर पुष्पावती नामक एका लहानशा नदीकाठी हे स्थान आहे तिथल्या टेकडीवर गोपालकृष्णाचे देऊळ आहे या मंदिरात देहुडाचरणी उभा राहून वेणू वाजवीत असलेल्या गोपालकृष्णाची मूर्ती आहे कार्तिकी पौर्णिमेला इथे काल्याचा उत्सव होतो त्या वेळी वारकरी भक्त एकमेकांच्या मुखात लाह्या घालतात इथेच भीमक राजाचे देऊळ व जनाबाईची गुहा आहे इथे तिचा जो संसार मांडलेला आहे, त्यात एक जातेही आहे विठ्ठलाने याच जात्यावर बसून जनाबाईबरोबर दळण दळले, असे सांगतात

**पद्मतीर्थ** – विठ्ठलाच्या मंदिरापासून पश्चिमेला जाताना हे स्थान लागते इथे पद्मावती देवीचे लहानसे देऊळ आहे नामदेव ज्ञानेश्वरासंगे यात्रेला जायला निघाला असता त्याला निरोप देण्यासाठी पांडुरंग इथवर आला होता, असे सांगतात इथेच त्याने नामदेवाचा हात ज्ञानेश्वराच्या हाती दिला, असा उल्लेख एका अभंगात आहे

**दिंडीरवन**– पंढरपूरच्या उत्तर बाजूला नदीकाठी हे वन आहे या वनात जनाबाईने गोवऱ्या वेचल्या, असे सांगतात या स्थळाविषयीची कथा अशी–

श्रीकृष्णाला राधेचा निदिध्यास लागला हे सहन न होऊन रुक्मिणी त्याच्यावर रुसून निघाली व या दिंडीरवनात येऊन बसली मग श्रीकृष्ण तिला शोधीत इथवर आला इथे त्या दोघांची भेट झाली आणि रुक्मिणीचा रुसवा फिटला

**व्यासनारायण** – दिंडीरवनाच्या थोडे उत्तरेस व्यासनारायणाचे मंदिर आहे हे मंदिर ज्योतिपंतदादा महाभागवत यांनी बांधले पूर्वी येथे भागवताची पारायणे होत असत

**यात्राविधी** – वारकरी पंढरीत आल्यानंतर चंद्रभागेचे स्नान, क्षेत्रप्रदक्षिणा, पांडुरंगदर्शन व हरिकीर्तन असा चतुर्विध यात्राविधी करतात क्षेत्रप्रदक्षिणेच्या मार्गात प्रामुख्याने पुढील स्थाने आहेत – ज्ञानेश्वरमंदिर, एकनाथमंदिर, भजनदासमठ, तांबडा मारुती, उद्धवमंदिर, पंचमुखी मारुती, काळिकामंदिर, वरटस्वामीमठ, रोहिदास, सेना न्हावी, बेरीचा महादेव, काळा मारुती, चौफाळा, दामृशेटीमंदिर, गुंडामहाराजमठ, निवृत्तिनाथमंदिर इत्यादी

**कुंडलतीर्थ** – हे तीर्थ हरिदास वेशीजवळ आहे विष्णूने दैत्याशी युद्ध करण्याच्या प्रसंगी आपल्या कानातील कुंडले इथे काढून ठेवली होती, अशी कथा आहे या तीर्थाशेजारी एक नृसिंहमूर्ती आहे सांप्रत कुंडलतीर्थाची जागा बुजविली गेली

असून, फक्त नरसिंहाच्या नावाने तेथे एक पिंपळ उभा आहे

पंढरपूर हे प्रादेशिक संस्कृतीच्या संगमवयाचे क्षेत्र आहे महाराष्ट्रातले वारकरी इथे येतात, तसेच कर्नाटकातले हरिदासही इथे येतात माध्वसंप्रदायही विठ्ठलाचा उपासक असल्याने त्या संप्रदायाचे लोकही इथे येतात मराठी-कन्नड संस्कृतींच्या सामंजस्याचा पंढरपूर हा एक मोठा दुवा आहे महाराष्ट्र, कर्नाटकाप्रमाणेच जवळजवळ साऱ्या भारतातून निरनिराळ्या पंथांचे व निरनिराळ्या विचारांचे लोक इथे यात्रेला आलेले दिसतात [श्रीविठ्ठल आणि पंढरपूर-श्री ग ह खरे, १९६३, श्रीक्षेत्र पंढरपूरदर्शन-श्री ग वा जोशी, श्री रमाकांत बुवा माऊली श्री प ज्ञा भालेराव, १९६०, सोलापूर गॅझे, सचित्र पंढरीवर्णन-श्री ना रा गोखले, १९२४, विठोबाचे राज्य-श्री पु रा बेहरे, १९६४, वा प ड, पंढरी माहात्म्य-श्री विठ्ठल दाजी धारूरकर, १९०८, दि क वि, प्रा म को, श्री पांडुरंग देसाई-साधना, २५ ऑगस्ट १९५६, श्री चिं ग कर्वे-प्रसाद, डिसेंबर १९५६, श्री मा प बहिरट, साधना सप्टेंबर १९५६, श्री बहिरट-प्रेमबोध, जुलै १९५२]

**पंथदासी** उ भारतातील एक पंथ पंथदास नावाच्या पुरुषाने या पंथाची स्थापना केली, म्हणून याला पंथदासी असे नाव मिळाले हा पंथ रामायत पंथाचा उपपंथ आहे, असे सांगतात हे लोक गळ्यात तुळशीमाळा धारण करतात आणि रामनाम जपतात काशीजवळ अहिरोहा व मोडकुडी या ठिकाणी याचे प्रमुख मठ आहेत अयोध्या, लखनौ व नेपाळ या ठिकाणी या पंथाचे पुष्कळ अनुयायी आहेत रामनवमीच्या उत्सवाला या पंथाचे सर्व लोक एकत्र येतात [व धे म व]

**पंप** (इ स चे १० वे शतक) एक कन्नड महाकवी हा वेंगी मंडलातल्या वेंगीपळू नामक गावी जन्मला हा जातीने देवराय ब्राह्मण होता याच्या पित्याचे नाव अभिराम असे होते अभिरामाच्या कुटुंबावर लक्ष्मी आणि सरस्वती या उभय देवतांचा वरदहस्त असल्याने त्याने पंपाचे शिक्षण संगोपन चांगल्या प्रकारे केले पंपाचे घराणे वैदिक ब्राह्मणाचे असल्यामुळे त्याने वेदांचे अध्ययन उत्तम केले तो संस्कृतही शिकला पंपाच्या जन्मापूर्वीच त्याच्या पित्याने जैनधर्म स्वीकारला होता, पण तरीही त्याने वेदाचा अभिमान सोडला नव्हता पित्याच्या या वृत्तीचा पंपावर चांगला परिणाम झाला व त्यामुळे 'सर्वधर्मी समानत्व' पाहण्याची सम्यक्‌दृष्टी त्याला लाभली कन्नड मातृभाषेवर त्याचे प्रभुत्व होते त्याचे कवित्वही अभिजात होते आपली प्रारंभीची कविता त्याने देशी छंदाबरोबरच संस्कृत छंदातही रचली पंपाने आपली कविता तत्कालीन चालुक्य नरेश दुसरा अरिकेसरी याला ऐकवली पंपाच्या कवितांवर तो राजा खूष झाला व त्याने त्याला आपल्या दरबारी ठेवून घेतले

पंप केवळ कवीच नव्हता, तर योद्धाही होता लेखणीबरोबरच त्याने तलवारही चालवली होती पंपाच्या काव्यात त्याच्या तत्त्वचिंतक वृत्तीचाही पुरेपूर प्रत्यय येतो आपल्या काव्यात त्याने सत्य, शिव आणि सौंदर्य यांचीच कास धरली आहे पंपाच्या या वृत्तीमुळेच तो राजाला प्रिय होऊन राहिला होता पंप सर्वसुखी व प्रसन्न राहावा, यासाठी राजा अत्यंत प्रयत्नशील असे पण पंपाची वृत्ती निरिच्छ योग्याची होती राजाच्या हेतूतली शुद्धता जाणूनही त्याने राजोपचाराकडे पाठ फिरवली व लक्ष्मणपाटक नावाच्या एका एकांतस्थानी आपली कुटी उभारून तो राहिला

पंपाच्या नावावर आज दोन काव्ये उपलब्ध आहेत एक आदिपुराण व दुसरे विक्रमार्जुनविजय किंवा पंपभारत यांपैकी आदिपुराण हा धार्मिक ग्रंथ असून, तो जिनसेनाच्या पूर्वपुराण या ग्रंथावर आधारलेला आहे पंपाने हे काव्य आपल्या वयाच्या ४० व्या वर्षी म्हणजे इ स ९४१ मध्ये रचले याची रचना चंपूशैलीत आहे आदिपुराणाच्या रचनेमागे पंपाचे, आपल्या कवित्वाची कसोटी पाहणे आणि जैन धर्माचे वास्तविक स्वरूप समजावून घेणे, असे दोन उद्देश होते आज उपलब्ध असलेल्या आदिपुराणाची रचना पाहताना त्याचे हे दो ही हेतू फलद्रूप झाले असावे, असे दिसते आदिपुराण हे पूर्वपुराणावर आधारित असले, तरी पंपाने त्याचे स्वरूप बदलून टाकले आहे त्याने मूळ ग्रंथातील सांप्रदायिक आचारवर्णनाला फाटा देऊन, काव्यदृष्टीला प्राधान्य दिले आहे त्यामुळे पूर्वपुराणापेक्षा आदिपुराण रसाळ व रोचक झाले आहे आपल्या जीवनातले अनेक अनुभवही त्याने या कथाप्रवाहात बेमालूम मिसळून दिले आहेत

विक्रमार्जुनविजय हे काव्य महाभारतावर आधारलेले असले, तरी ते मूळ ग्रंथापेक्षा खूपच निराळे झाले आहे महाभारताचा नायक आहे युधिष्ठिर आणि नायिका आहे द्रौपदी, तर पंपाने आपल्या काव्यात अर्जुन सुभद्रेला ती स्थाने बहाल केली आहेत 'विक्रमी अर्जुनाचा विजय' असा महाभारताचा वेगळा अर्थ लावून त्याने त्या दृष्टीने साऱ्या कथाप्रसंगांची मांडामांड केली आहे हे काव्य लिहिताना पंप अरिकेसरीच्या शौर्यधर्यादी गुणांनी इतका भारावून गेला होता, की हाती घेतलेल्या काव्यविषयात त्याला अर्जुनाऐवजी अरिकेसरीच दिसत होता, असे म्हणावे लागते एका ठिकाणी तर, 'मी चालुक्य कुलात जन्म घेतला आहे' अशा अर्थाचे वाक्य त्याने अर्जुनाच्या तोंडी घातले आहे पंपमते अर्जुन हाच भारतीय युद्धातला सर्वश्रेष्ठ योद्धा

होय अर्थात कर्णालाही तो खरेच गुण देतो कर्णवध हाच महा भारताचा उत्कर्षबिंदू असल्याचे पपाने म्हटले आहे

या काव्याचे १४ अध्याय आहेत आरंभीच अरिकेसरीची तुलना त्याने विष्णू, सूर्य, परमेश्वर व कामदेव याच्याशी केली आहे नतर गणेश सरस्वतीना वदन केले आहे पुढे अर्जुन, भीम व धर्मराज याच्याविरुद्ध दुर्योधन व कर्ण अशी नायक प्रतिनाय काची योजना केली आहे महाभारताची थोरवी कशात आहे, हे सांगताना तो म्हणता –

**छलदोळ दुर्योधन नन्नीयोळिनतनयन गंडिनोळक भीमसेनं ।**
**बलदोळ्ळ मद्रेशनत्युन्नतियोळमरासिंधुद्भव चापविद्या ।।**
**बलदोळ् कुंभोद्भव साहसद महिमेयोळ् फल्गुण धर्मदोळ नि**
**र्मलचित्त धर्मपुत्र मिगिलि वर्गाळिनी भारत लोकपूज्यम ।।**

अथ – हट्टी दुर्योधन, सत्यवादी कर्ण, पौरुषयुक्त भीम, सामर्थ्यवान शल्य, उदात्त भीष्म, धनुर्विद्यानिष्णात द्रोण, साहसी अर्जुन, धर्मनिष्ठ व पवित्र अत करणाचा युधिष्ठिर इ व्यक्तीच्या योगाने महाभारत लोकाना पूज्य असे ठरले आहे

सज्जन पात्राप्रमाणेच दुर्जन पात्रेही पपाने त्याच्या ठसठसीत गुणवैशिष्ट्यासह रगविली आहेत राजसूय यज्ञप्रसगी शिशु पालाने केलेले कृष्णनिंदेचे मर्मभेदक भाषण पुढीलप्रमाणे –

**मनदोलवर मूल्लोडे कुडु मनयोल हरिगग्रपूजेयं यज्ञदोली ।**
**मनुजाधीश्वर सभेयोल नेनेयल्लुमागदु दुरात्मन बेसगोलवा ।।**
**कुडुवेल्वन कुडुवन कुडे पडेवन पेम्पे नगलते वडेगुमो पेलव ।**
**कुडुवेलगम कुडुवण्ण कुडुगेम कुडे कोलद कलियनरियलक्कदु ।।**

भावार्थ – शिशुपाल सतापून धर्मराजाला म्हणाला कृष्णा विषयी तुला जर इतके प्रेमच असेल, तर तुझ्या घरी बोलावून त्याची पूजा कर या यज्ञप्रसगी, राजा–महाराजाच्या सभेत जिथे त्या क्षुद्र कृष्णाचे नाव घेणसुद्धा पाप, तिथे तू त्याचा स मान करू पाहतोस ? *कृष्णाची अग्रपूजा करू म्हणणाऱ्याची आणि* त्या कल्पनेने हर्षित होणाऱ्याची मी चागली हडडी नरम करीन वडबड करणाऱ्या दुढ्ढाचार्यांना साग, की शूर पुरुष करून दाख वतो, नुसता बडबडत नाही या दुढ्ढाचार्यांचे शौर्य काय आहे, हे मी आज पाहणारच आहे !'

कर्णवधाच्या प्रसगानतर पप म्हणतो – भारतात कर्णाव्यति रिक्त सस्मरणीय काहीच नाही ! सत्य, औदार्य, शौर्य आणि निष्ठा या कर्णाच्या सदगुणानीच भारत 'कर्णरसायन' झाले आहे

प्रवाही व सुबोध भाषाशैली, असीम कल्पनावैभव आणि प्रत्ययकारी वर्णने या गुणानी पपाची दोन्ही काव्ये सरस व रमणीय ठरली आहेत

पपाची रचना सख्येच्या दृष्टीने लहान खरी, पण तेवढ्या नेच त्यान कन्नड साहित्यात आपले अढळपद निर्माण करून ठवल इतकेच नव्हे, तर स्वत बरोबर आपल्या ध यालाही त्याने चिरस्मरणीय बनवले [द वि , म च का ]

**पंपा** एक प्राचीन सरोवर हे साप्रतच्या म्हैसूर राज्यातील बेल्लारी जिल्ह्यात यते या सरोवराजवळ असणाऱ्या ऋष्यमूक पर्वतावर रामाची मारुतीशी प्रथम भेट झाली सीता हरण करून लकेला परतताना रावणाला हे सरोवर पार करावे लागले होते, असे रामायणात म्हटले आहे (वा रा अरण्य ५४५) अरण्यकाडातील सत्र्य ७३ वा अध्याय या सरोवराच्या वर्णनात खर्ची पडला आहे हे सरोवर उत्तम प्रकारे बाधलेले असून, त्यात कमळाचे वेल पसरलेले आहेत, त्यातले पाणी सथ आहे, इथे हस, क्रौंच व कुरव हे पक्षी मधुर ध्वनी करीत असतात, याचे पाणी स्फटिकासारखे स्वच्छ असून, ओषधीयुक्त आहे आणि याच्या सभोवार अर्जुन, आम्र, अशोक, केतकी, बकुल, इ वृक्षाची दाटी आहे, असे तिथे म्हटले आहे मतग ऋषीचा आश्रम या सरोवराच्या तीरावरच होता तिथून जवळच पपा नावाची नदी वाहत असून, तिचेही जल आरोग्यावह असल्याचे म्हटले आहे [वा रा को , हि जॉ ए इ ]

**पंवल** एक जमात या लोकाची वस्ती द भारतात आढळते हे लोक पब नावाचे वाद्य वाजवतात, म्हणून याना हे नाव मिळाले असावे माल लोकाच्या विवाहसमारंभात व देव तांच्या उत्सवात पब वाद्य वाजविणे, हाच याचा प्रमुख व्यवसाय आहे हे अकम्माची कथाही गातात [का ट्रा स इ ]

**पंवार राजपूत** राजपूत वशाची एक शाखा चार अग्नि कुळापकी परमार वशाचे लोक अबू, मार वाड, गुजरात, माळवा, राजस्थान, इ प्रदेशात पसरले काही ठिकाणी त्यानी राज्यही स्थापली त्या परमार वशातील लोक पवार राजपूत या नावाने ओळखले जातात हे लोक देखणे, गोरे व तरतरीत असून, कष्टाळू आहेत शेती हा त्याचा मुख्य व्यवसाय आहे

**देवधर्म** – हे लोक शिव, विष्णू, इ देवताप्रमाणेच दुल्हादेवा लाही भजतात सुपारी व खजूर एका कापडात गुडाळून दूल्हा देवाचे प्रतीक म्हणून ते खुटीला बाधून ठेवतात दरवर्षी एकदा आणि मुलाच्या जन्माच्या वेळी व विवाहप्रसगी या देवाला बकरा बळी देतात सूर्य किंवा नारायण याचे प्रतीक म्हणून मोरपिसाचा जुडगा करून त्याची पूजा करण्याची प्रथा याच्यात आहे

वाघाकडून मारल्या गेलेल्या मनुष्याला हे लोक वाघदेव मान

तात व नियेच एका मातडीत याघाची प्रतिमा ठेवून श्राद्धाच्या दिवशी तिची पूजा करतात नाग चावून मेलेल्या माणसाचीही अशाच प्रकारे नागदेव म्हणून पूजा करतात

प्रत्येक पवाराचा एक दीक्षागुरु असतो तो ब्राह्मण किंवा गोसावी असतो तो शिष्याला मंत्र देतो

**विवाहप्रथा** – मुले वयात आल्यावर त्यांचे लग्न होते त्याला आईबापांची संमती लागते एखादे वेळी आईबापांना न विचारता मुलगी आपल्या प्रियकराच्या घरी जाऊन राहते व त्याच्याशी लग्न करते प्रियकराच्या आईबापांचीही त्या लग्नाला संमती नसेल, तर त्या दोघांना जातिबाह्य ठरवले जाते मग जातीला भोजन देऊन ती दोघे जातीत परत येतात



पवार राजपूत

तरुणाने भावी सासऱ्याच्या घरी काही दिवस नोकरी करून मग त्याच्या मुलीशी लग्न करायचे, अशीही प्रथा त्यांच्यात आहे

विवाहापूर्वी वरपिता वधूगृही जाऊन तिला नवी वस्त्रे देतो मग वधूचा पिता वरालाही अहेर देतो लग्न समारंभासाठी निघण्यापूर्वी वराची आई त्याला स्तनपान देते त्या वेळी पाण्याचे घडे घेऊन काही स्त्रिया समोर उभ्या राहतात वर त्यांच्या घड्यात पैसे टाकतो मग तो प्रथम वेताळाच्या किंवा समर्थाच्या मंदिरात जाऊन त्याचे दर्शन घेतो व नंतर लग्नमंडपात जातो तिथे त्याच्या मस्तकावर हळदीचे पाणी शिंपडतात मग पुरोहित घराच्या छपरावर चढून वधूवरांची नावे घेतो आणि ' राम नवरा, सीता नवरी सावधान ' असे म्हणतो नंतर नांगराच्या जोखडावर कापड टाकून वधूवरांना त्यावर एकमेकांकडे तोंड करून बसवतात एवढे झाले, की लग्न झाले असे समजतात

विधवाविवाह या लोकांत रूढ होता स्त्रीने व्यभिचार केला, तरच पतीला घटस्फोट मिळत असे स्त्रीला घरात महत्त्वाचे स्थान असून, तिच्या संमतीवाचून पती बहुधा काही करीत नाही पवार स्त्रियांना गाऊन घेण्याची फार आवड असते

**मर्तिकप्रथा** – हे लोक सामान्यपणे मृतांना जाळतात पण मृत्यू अनैसर्गिक असेल, तर प्रेत पुरतात ज्यांच्या अंगात देवी येते, त्यांचे प्रेतही पुरतात मृत व्यक्तीच्या नावाने ब्राह्मणाला गाय किंवा द्रव्य दान देतात [ द्रा का से प्रां इ , रा जा ]

**प** पाचव्या वर्गातील पहिला व व्यंजनांतील एकविसावा वर्ण सांप्रतचे स्वरूप प्राप्त होण्यापूर्वी या वर्णाला तीन

प = ᒐ ᑌ ᑭ प

प च्या रूपाचा विकासक्रम

अवस्थांतून जावे लागले त्यांपैकी पहिली अवस्था अशोकाच्या गिरनार येथील लेखात (सनपूर्व ३ रे शतक), दुसरी महाक्षत्रप शोडास याच्या वेळच्या मथुरा येथील जैन लेखात (सनपूर्व १ ले शतक) व तिसरी समुद्रगुप्ताच्या अलाहाबाद येथील स्तंभलेखात (इ स चे ४ थे शतक) दिसून येते

कामधेनु तंत्रात याचे वर्णन पुढीलप्रमाणे केले आहे –

> **चतुर्वर्गप्रद वर्ण शरच्चन्द्रसमप्रभम् ॥**
> **पञ्चदेवमयं वर्ण स्वयं परमकुण्डली ।**
> **पञ्चप्राणमयं वर्ण त्रिशक्तिसहितं सदा ॥**
> **त्रिगुणसहितं वर्णमात्मादितत्त्वसंयुतम् ।**

अर्थ – हा वर्ण शरद ऋतूतील चंद्राप्रमाणे कांतिमान, चतुर्वर्गप्रद, पंचदेवमय, पंचप्राणमय, परमकुंडली आणि तीन शक्ती, तीन गुण व आत्मतत्त्व यांनी युक्त आहे

ओष्ठ हे याचे उच्चारणस्थान आहे [ श क , म ज्ञा को ]

**पउमचरिय** (सं पद्मचरित) एक जैन महाकाव्य हे रामचरित्रावर आधारलेले आहे विमलसूरी हा याचा कर्ता होय या ग्रंथात वाल्मीकीची रामकथा खोटी आहे, असे ठरवून जैन परंपरेप्रमाणे रामायणकथा पाच कांडांत सांगितली आहे विद्याधरकांड, अयोध्याकांड, सुंदरकांड, युद्धकांड व उत्तरकांड ही त्या कांडांची नावे होत

मगधदेशाधिपती श्रेणिक याने रामचरित्राबद्दल काही शंका घेतल्या व विमलसूरीने त्या शंकांचे निरसन केले, असा उपक्रम करून हे महाकाव्य सुरू होते अनेक अद्भुत घटनांनी ते ओतप्रोत भरलेले आहे शृंगार, वीर, करुण व शांत हे यातले मुख्य रस होत कवीची भाषा अलंकारिक असली, तरी तिला बोजडपणा नाही गाथोदकधारा, द्विपदी, हेला द्विपदी, मंजरी, शालभंजिका, भुजंगप्रयात, इ छंदांचा कवीने वापर केला आहे रामायण व विष्णु पुराण या दोहोंचा या काव्यावर प्रभाव पडलेला आहे या ग्रंथात एकूण बारा हजार श्लोक असून, त्यांचे ९०

अध्याय राहत या महाकाव्यात रामापेक्षा लक्ष्मणाला जास्त महत्त्व दिलेले आहे राम व लक्ष्मण हे दोघेही जैन होते, एवढेच न हे तर ते जैन धर्माचे प्रचारकही होते असे कवी सांगतो ते हलधर व हरी यांचे अवतार असून, असुरसंहार व जैनधर्म प्रचार हे त्यांचे अवतारकार्य होय, असे त्याने प्रतिपादिले आहे पाहा–पदमचरित [ज सा इ, म सा अ, अ सा]

## पउमसिरिचरिऊ

(सं पद्मश्रीचरित) एक जैन खंडकाव्य धाहिल हा याचा कर्ता होय हा कवी शिशुपालवध या काव्याचा कर्ता माघ याच्या वंशातला असावा, असे संशोधक म्हणतात या काव्याचे चार विभाग असून, त्यात पद्मश्रीच्या पूर्वज माचे वर्णन आहे धार्मिक आवरण असलेली ही एक उत्कृष्ट प्रेमकथा असून, तिचा लेखनकाल इ स ११३५ हा आहे

पद्मश्रीचे हे चरित्र ऐतिहासिक किंवा पौराणिक नसून, ते कविकल्पित कथाचित्र आहे त्यात भावाने मनुष्याला त्याच्या पूर्वजन्मातले बरेवाईट कर्म पुढच्या जन्मात भोगावे लागते, असे दर्शविले आहे काव्यात योजलेली पात्रे धार्मिक भावनेने व विशिष्ट ध्येयाने प्रभावित झालेली दिसून येतात प्रस्तुत काव्याचे संक्षिप्त कथानक असे –

मध्य प्रदेशातल्या वसंतपूर या नगरात जितशत्रू नावाचा एक राजा राज्य करीत होता त्याच्या राणीचे नाव लीलावती होते त्या शहरात धनसेन नावाचा एक श्रीमंत व्यापारी राहत असे त्याला धनदत्त व धनावह या नावाचे दोन मुलगे आणि धनश्री नावाची एक सुंदर मुलगी होती धनश्रीला ऐन तारुण्यातच वैधव्य आले मग भावांनी तिला माहेरी आणले तिथे ती तपश्चर्या व पूजाअर्चा करून आपले जीवन कंठू लागली धर्मघोष नावाच्या एका मुनीचा तिने उपदेशही घेतला मृत्यूनंतर ती देवलोकी गेली

दुसऱ्या जन्मात ती सुंदर व सद्गुणी अशी राजकन्या झाली त्या वेळी तिचे नाव पद्मश्री असे ठेवले एकदा उद्यानात हिंडत असताना तिला समुद्रदत्त नावाच्या तरुणाचे दर्शन झाले व ती त्याच्यावर मोहित झाली पुढे त्या दोघांचा विवाहही झाला पण कोणत्या तरी पिशाचाच्या बाधेने पुढे त्या दंपतीत किल्मिष उत्पन्न होऊन समुद्रदत्ताने पद्मश्रीचा त्याग केला त्याने दुसरा विवाह केला त्यानंतर पूर्वजन्मातील काही कुकर्मामुळे पद्मश्रीवर चोरीचाही आळ आला पण त्या सर्व संकटातून तिने मार्ग काढला विमलशीला नावाच्या एका गणिकेने तिला त्या कामी मार्गदर्शन केले पुढे त्याही जन्मात तिने दान, तप, स्वाध्याय वगैरे आचरून शेवटी मोक्षपद प्राप्त करून घेतले

या काव्यात पद्मश्री व समुद्रदत्त यांचे प्रणयाराधन, मीलन व विरहव्यथा यांचे सुंदर चित्रण आढळते कथानिवेदन प्रवाही असून, त्यात केलेली वर्णने बहारीची वाटतात त्यात तत्कालीन शहरे, राजधान्या, खेडेगाव यांचे यथार्थ दर्शन होते शृंगार व करुण हे प्रस्तुत काव्याचे दोन प्रमुख रस होत

जैनांच्या धार्मिक वाङ्मयात पद्मश्रीचरित्र या काव्याला एक विशिष्ट स्थान आहे [अ सा]

## पकुध कच्चायन

(सं प्रकुध कात्यायन) एक दार्शनिक आचार्य व तीर्थंकर हा गौतम बुद्धाच्या पूर्वी होऊन गेला तो जगात मूलभूत असे सात पदार्थ मानतो त्यांची नावे अशी –पृथ्वी, आप, तेज, वायू, सुख, दु:ख व जीवन (किंवा जीव) पहिली चार दृश्य तत्त्वे व पुढची तीन अदृश्य तत्त्वे होत

पकुध कच्चायनाच्या मते हे सात पदार्थ उत्पन्न होत नाहीत व कोणाला उत्पन्नही करीत नाहीत ते हालत नाहीत, चालत नाहीत, किंवा काहीच करीत नाहीत ते पर्वतशिखराप्रमाणे किंवा स्थाणू (खांब) प्रमाणे स्थिर असतात ते कोणत्याच गोष्टीला कारण होत नाहीत म्हणून या जगात कोणी कोणाची हत्या करू शकत नाही किंवा हत्येला कारणीभूतही होऊ शकत नाही जेव्हा एखादा माणूस एखाद्यावर तलवारीचा घाव घालतो, तेव्हा ती हिंसा होतच नाही कारण तो जो घाव घालतो, तो वरील सातापैकी कोणत्याही तत्त्वावर न पडता तो त्या तत्त्वांच्या संधीत पडतो त्यामुळे या जगात कोणीच कोणाची हिंसा करू शकत नाही

पकुध कच्चायनाचा हा सिद्धांत अजित केसकंबलाच्या अक्रियावादासारखाच असला, तरी तो सामाजिक जीवनाला घातक असल्यामुळे बुद्धाने त्याचे खंडन केले व सदाचारावर भर देऊन आपल्या क्रियावादाचे समर्थन केले [लोकायत – श्री देवी प्रसाद चट्टोपाध्याय, १९५९, बौ द मी]

## पक्थ

पंचजनांच्या बाहेरचा एक जन किंवा गण दाशराज्ञ युद्धात हा पक्थ गण सुदासाच्या विरुद्ध पक्षात होता हे लोक अश्विनीकुमारांचे उपासक असल्यामुळे अश्विनीकुमारांनी त्यांचे रक्षण केले, असा उल्लेख वेदात आहे (ऋ ८ २२ १०) तूर्वयाण हा पक्थांचा पुढारी असून, तो इंद्रभक्त होता अलिन व विषाणी हे दोन गण पक्थांचे शेजारी होते पक्थ या शब्दावरूनच पक्थुन व त्यावरून पठाण शब्द बनला आहे, असे भाषाशास्त्रज्ञ मानतात हे लोक सिंधूच्या पश्चिमेस काबूलपर्यंत वसले होत [वे इ, ऋ द]

**पखवाज** एक घनवाद्य याला पखावज असेही म्हणतात संस्कृत पक्षवाद्य किंवा पक्षतोद्य या शब्दाचे हे अपभ्रष्ट रूप आहे भरताच्या मताप्रमाणे प्राचीन काळी याला पुष्करवाद्य म्हणत

पखवाज हा लाकडाचा आणि पिंपाच्या आकाराचा बनवतात याचे खोड शिसवी, खैर किंवा चाफा याचे असते खोड कातून ते गोलाकार बनवतात व आतून आरपार पोखरतात लाकडाची जाडी अर्धा इंच आणि लांबी सुमारे दीड हात ठेवतात दो ही तोंडांचा व्यास सुमारे वीतभर असतो खोडाच्या मध्याचा व्यास तोंडाच्या व्यासाच्या सव्वापट असतो पखवाजाची दोन्ही तोंडं कातड्याने मढवून किनारीवर अर्धा इंच दुहेरी चामडे घालतात पखवाजाच्या दोन्ही तोंडाच्या काठाबरोबर कातड्याच्या वादीचा वेठ वळलेला असतो, त्याला गजरा म्हणतात पखवाजाचा स्वर कमी जास्त करता यावा म्हणून लाकडाचे पाच सहा तुकडे वादीखाली अडकवलेले असतात, त्यांना गठ्ठे म्हणतात उजव्या हाताच्या तोंडावर शाई चढवून ती घोटवलेली असते डाव्या हाताच्या तोंडाला आयत्या वेळी पाण्यात भिजवलेली कणीक लावतात पूर्वी हे वाद्य मातीचे करीत असत आणि म्हणून त्याला मदंग = मातीचे अंग असलेले, असे नाव पडले दक्षिणेत अजूनही मातीचा माठ पालथा घालून त्याच्या पाठीवर पखवाजाचे गत, बोल, परण वगैरे प्रकार वाजवतात त्याला घटम असे म्हणतात

पखवाजाचे मुख्य तीन प्रकार आहेत–(१) हरितकी – हिरड्याच्या आकाराचा (२) जवाकृती – जवाच्या आकाराचा (अर्थात मधे फुगवटा असलेला) व (३) गोपुच्छाकृती – गाईच्या शेपटीला केसांचा गोंडा असतो त्या आकाराचा

ध्रुपद, होरी या संगीतप्रकारांना, नृत्याला, तसेच वीणावादनाला पखवाजाची साथ सोयिस्कर पडते पखवाजावर मुख्यत्वे धमार, ब्रह्म, रुद्र, विष्णू व गणेश हे ताल वाजतात पूर्वी हरदासाच्या कथेलाही याची साथ असे

इ स च्या एकोणिसाव्या शतकात पवतसिंह, रत्नसिंह व कुदऊसिंह हे प्रसिद्ध पखवाजिये होऊन गेले अलिकडे पखवाजाची जागा तबल्याने घेतली आहे पाहा – तबला, मदंग [ सेठ टीकमदास तापडिया – संगीत, जानेवारी १९५१, वाद्य संगीत अंक, सु वि को, हिं सा बृ इ ]

**पगडी** एक शिरोवेष्टन संरक्षण व सौंदर्यवर्धन या दुहेरी हेतूने भारतात प्राचीन काळापासून मस्तकाला वस्त्राचे वेष्टन बांधण्याची चाल आहे वैदिक युगात अशा वेष्टनाला उष्णीष म्हणत त्यालाच कालांतराने पागोटे पटका, फेटा, इ नावे मिळाली विशिष्ट पद्धतीने कायम बांधून ठेवलेल्या बसक्या पागोटयाला पगडी म्हणतात त्यासाठी नऊ इंच रुंद व २० ते २५ वार लांब तलम सुती किंवा रेशमी, रंगीत वस्त्र वापरतात लहानसा टोप घेऊन त्याच्या भोवती अशा वस्त्राचे लपेटे देतात तसे करताना वरच्या भागावर भिन्न जागी, भिन्न प्रकारचे उचवटे तयार करतात गोल, त्रिकोणी, चौकोनी अशा विविध प्रकारच्या पगड्या असतात काही पगड्या कापडाला पीठ भरून बांधलेल्या असतात

प्राचीन काळी अधिकारपरत्वे पगड्यांचे रंग व त्याच्या बांधण्याच्या पद्धती वेगवेगळ्या असत पगड्यांवरून वर्णांचाही बोध होत असे क्षत्रियांच्या पगड्या उंच असत, तर वैश्यांच्या ठेंगण्या असत प्राचीन काळी स्त्रियाही डोक्याला पगड्या बांधीत त्या पुरुषांच्या पगड्यांपेक्षा वेगळ्या असत, पण पुढे स्त्रियांनी पगड्या वापरण्याची चाल बंद पडली सैनिक आणि नागरिक यांच्या पगड्याही भिन्न आकाराच्या व भिन्न रंगाच्या असत पगडीचा एक सोगा पाठीवर सोडणे शुभ समजले जाई प्रसंगविशेषी भिन्न रंगाची व आकाराची पगडी वापरली जाई पुत्रजन्माच्या प्रसंगी पिवळी अथवा मोतिया रंगाची पगडी बांधीत विवाहप्रसंगी पगडी बांधून तिच्यावर तुरा खोवीत मताचे क्रियाकर्मांतर उरकल्यावर कर्त्याला पुण्याहवाचनपूर्वक पगडी किंवा मंदिल बांधण्याची प्रथा सांप्रतही चालू आहे एखाद्याचा सन्मान करायचा झाला, तर त्याला पगडी बांधण्याची प्रथा आहे काही प्रदेशात निरनिराळ्या सणात निरनिराळ्या रंगाच्या पगड्या वापरीत आजही काही प्रमाणात ती चाल रूढ आहे

शुंगकाळात विविध प्रकारच्या पगड्या वापरात होत्या, असे दिसते काही पगड्यांमुळे संपूर्ण मस्तक झाकले जात असे, तर काही पगड्यांतून मस्तकाचा वरचा भाग मोकळा दिसत असे सांची, भरहूत, मथुरा, अमरावती, इ ठिकाणच्या शिल्पकामात अशा पगड्यांची अनेक रूपे पाहायला मिळतात तिथल्या काही पगड्यांचा वरचा भाग शंखासारखा, तर काहींचा पर्यासारखा दिसतो काही पगड्यांच्या एका टोकावर तुरा खोवलेला दिसतो व दुसऱ्या टोकाला शमला सोडलेला असतो काही पगड्या गोल व मधोमध मोरपंख लावलेल्या असतात काहींची टोके एकत्र आणून त्यांची गाठ बांधलेली असत सातवाहन व गुप्त कालात बहुधा सर्व पुरुष पगडी वापरीत होते संस्कृत वाङ्मयात पगडीचा उल्लेख सर्वत्र आढळतो जयपूर व बिकानेर येथील संग्रहालयात विविध प्रकारच्या पगड्या घातलेल्या मूर्ती आढळतात सामान्यपणे देवांच्या मस्तकी मुकुट असतो, तर यक्षगंधर्वादिकांच्या मस्तकावर पगडी असते

इ स च्या १० व्या शतकातल्या पगड्याचे नमुने मवाडमधील काल्याणपूर या गावी मिळाले आहेत कुरळ्या केसावर शंकर पाळ्याच्या आकाराची पेचदार पगडी निथल्या मूर्तिशिल्पात दिसते इ स च्या १२ व्या शतकातली अर्धनारीश्वराची मूर्ती झालावाड येथे सापडली आहे तिच्या शिरावरही मुकुटाच्या ऐवजी पगडी आहे

पगड्या बनवतात दिल्लीचे बादशहा व निरनिराळ्या प्रांताच सुलतान यांच्या पगड्या अतिशय उंचा रेशमी कापडाच्या असून, त्यांना विविध रत्न जडवलेला असून लहानशी जरीची टोपी घेऊन तिच्यावर वस्त्राचे पट्टे विविध प्रकार गुंडाळून अशा पगड्या बनवीत शेख व मुस्लिम धर्माधिकारी यांच्या पगड्या हिरव्या रंगाच्या नमाज पढताना मुसलमान लोक पगडी घालतात



पगडीचे प्रकार – १ उदयपुरी, २ जोधपुरी, ३ बूंदी ४ बिकानेरी

राजस्थानात मोगली पद्धतीच्या पगडीव्यतिरिक्त राजपूत राजाच्या शेकडो प्रकारच्या पगड्या प्रचलित होत्या कारण प्रत्येक राजा आपल्या आवडीप्रमाणे वेगळ्या रंगरूपाची पगडी बनवून घेई व ती त्याच्या राज्यात लोकप्रिय होत असे जोधपुरी, जयपुरी, मेवाडी, करौली, हाडौती, फत्तेशाही, अमरशाही,

मुसलमानांच्या पद्धतीच्या पगड्या भिन्न पद्धतीच्या असतात

महाराष्ट्रानही मराठेशाहीत अनेक प्रकारच्या पगड्या प्रचलित होत्या छत्रपती शिवाजीमहाराजाची पगडी जिरेटोप या नावाने प्रसिद्ध आहे ती मागे झुकलेली असून, वर निमुळती होत जाते तिला मागच्या टोकाला मोत्याचा घोस असावा



पगडीचे प्रकार – १ जिरेटोप, २ दक्षिणी, ३ जयपुरी ४ मुसलमानी

भीमशाही, शिकस्तरशाही, सलीमशाही, गजशाही अशी त्यांची नावे होती मराठी, गुजराथी, पंजाबी, बंगाली, मालवा अशा प्रदेशपरत्वे वेगळ्या प्रकारच्या पगड्याही प्रचलित होत्या

मुसलमानातही पगड्या वापरण्याची पद्धत आहे उंच गोल टोपीभोवती तलम कापडाचा लांबलचक पट्टा गुंडाळून या

लेला असतो पेशव्यांच्या पगड्या विविध आकाराच्या व रत्नखचित होत्या प्रसिद्ध मराठा सरदाराच्या पगड्या त्या त्या नावानी प्रसिद्ध आहेत उदा० शिंदेशाही, होळकरी, गायकवाडी, इत्यादी त्या बहुतेक पिवळ्या असतात

ब्राह्मणांच्या पगड्या विशिष्ट पद्धतीने बनवलेल्या असत

ही प्रतिष्ठेची वस्तू समजली जाई. मारवाडातल्या दुर्गादास या वीर पुरुषाच्या संबंधात एक दोहा प्रसिद्ध आहे. तो असा–

जननी सुत एसो जने जसो दुर्गादास
बांध मुडासा रखियो बिन थरतो बिन आकास

अर्थ– मातेने दुर्गादासासारख्या अशा सुपुत्राला जन्म द्यावा, की त्याच्या पगडीचा पृथ्वीवर व आकाशातही (स्वर्गातही) मान राहील.

उघड्या डोक्याने घराबाहेर पडू नये, तसेच प्रवासाला व मंगल कार्याला जाऊ नये, अशी पूर्वापार समजूत असल्यामुळे पगडी हा अत्यावश्यक गोष्ट ठरली आणि त्यातूनच पुढे पग बांधाचे शेकडो प्रकार निर्माण झाले, असे वाटते. पाहा–उष्णीष, पागोटे [प्रा. भा. वे. भू., डि. इ., श्री मोहनलाल गुप्त– साप्ताहिक हिंदुस्थान, ७ नोव्हें. १९६५, इ. का.]

**पगाझ थनाई** द. भारतातील त्रेसष्ट नायनमार संतापैकी एक. मंदिरात जाऊन शिवाची नित्य पूजा करणे, हा याचा नेम होता. त्या कामी त्याने आपल्या जवळचे सर्व धन खर्च केले. पण तरीही त्याला साक्षात शिवदर्शन होईना. त्यामुळे तो निराश बनला. तशातच त्या प्रदेशात दुष्काळ पडला. त्यात त्यालाही उपास पडू लागले. तो केवळ पाणी पिऊन दिवस काढू लागला. एकदा पाण्याचा भरलेला घडा घेऊन येत असता भूक असह्य होऊन तो बेशुद्ध पडला. पण त्याचा तो भरलेला घडा नेमका शिवलिंगावर पडला होता. त्यामुळे शिवाने प्रसन्न होऊन त्याला दर्शन दिले. तो त्या भक्ताला रोज एक नाणे देऊ लागला. त्यामुळे त्याचा चरितार्थ चालला व त्याची शिवपूजाही अविच्छिन्न चालू राहिली.

**पजूनो–पूनो** एक लोकोत्सव. उत्तर प्रदेशात चैत्र पौर्णिमेला पजूनो–पूनो म्हणतात. ज्या कुटुंबात मुलगा असतो, त्या घरातील लोक या दिवशी पजनकुमाराची पूजा करतात. त्यासाठी एक चौकोनी जागा गोमयाने सारवतात. मग त्या चौकाच्या चार कोपऱ्यावर चार मातीची गाडगी मिठाई भरून ठेवतात. मध्यभागी तोटी असलेले आणखी एक गाडगे ठेवतात. त्यात पक्वान्ने घालतात. नंतर त्यावर पजन कुमार आणि त्याच्या दोन माता यांची चित्रे काढतात. नंतर त्या पात्राची पूजा करून कथा ऐकतात. मग घरातला मुलगा ते प्रत्येक पात्र हलवतो आणि पुन्हा जागेवर ठेवतो. मधल्या भांड्यातला प्रसाद काढून तो आईच्या पदरात घालतो. नंतर आई तो प्रसाद मुलाला खाऊ घालते. उरलेला भाग लोकांना वाटतात. या व्रताची कथा अशी–

वासुरवक नावाचा एक राजा होता. त्याला सिकौली आणि रूपा अशा दोन बायका होत्या. रूपा राजाची आवडती होती. पण सासू व नणंद या मात्र तिचा मत्सर करीत. यथाकाली रूपा गर्भवती झाली. मग एक दिवस ती राजाला म्हणाली, 'सासू आणि नणंद या माझा द्वेष करतात. मग प्रसूतीच्या वेळी मला कोण मदत करील?' राजा म्हणाला, 'मी करीन.' मग त्याने आपल्या महालात एक घंटा बांधली आणि तिची दोरी रूपाच्या महालात नेऊन लावली. राजा तिला म्हणाला, 'तुला जेव्हा गरज भासेल, तेव्हा ही घंटा वाजव, म्हणजे मी येईन.' मग रूपाला वाटले, की आपण एकदा या घंटेचा प्रयोग करून पहावा. म्हणून तिने उगीचच घंटा वाजवली. ती ऐकून राजा धावत तिच्या महालात आला. पण तिने अकारण घंटा वाजवली, हे समजताच राजाला तिचा राग आला आणि तो निघून गेला. रूपा त्यामुळे दुःखित झाली. मग ती आपल्या नणंदेला शरण गेली. नणंद तिला म्हणाली, 'प्रसूतीच्या वेळी उखळावर बस म्हणजे सर्व काही ठीक होईल.' पुढे रूपा उखळावर बसून प्रसूत झाली. तिला मुलगा झाला. पण त्या वेळी ती बेशुद्ध पडली. या संधीचा फायदा घेऊन नणंदेने तिचे मूल गावाबाहेर एका उकिरड्यावर नेऊन टाकून दिले. मग एका कुंभारणीने ते मूल आपल्या घरी आणले. पजनकुमार असे त्याचे नाव ठेवले. तो मुलगा तिथेच लहानाचा मोठा झाला. सिकौलीला ही हकीकत कळली. तिने राजाकडून त्याला राज्याबाहेर घालवून दिले. पजनकुमार आणखी मोठा झाल्यावर त्याने ओळख न दाखवता राजदरबारात ये-जा सुरू केली.

एकदा त्या राज्यात दुष्काळ पडला. दरबारातल्या शास्त्री पंडितांनी पाऊस पाडण्याचे एक विधान सांगितले. ते असे–

एक रथ तयार करावा, राजा–राणीने खांदा देऊन तो ओढावा आणि चैत्र–पौर्णिमेला जन्मलेल्या मुलाने त्याचे सारथ्य करावे, म्हणजे पाऊस पडेल. ते ऐकून पजनकुमार म्हणाला, 'मी चैत्र पौर्णिमेला जन्मलो आहे. मी सारथ्य करीन.' मग रथ तयार झाला. राजा आणि सिकौली राणी यांनी रथ ओढला, पण पाऊस पडला नाही. नंतर सिकौलीच्या जागी रूपा बसली. पुन्हा रथ ओढला गेला. त्या वेळी मात्र पाऊस पडला. पजन कुमाराने आईचे पाय धरले. राजाला सर्व हकीकत कळली. आपला मुलगा आपल्याला परत मिळाला हे पाहून राजा–राणीला आनंद झाला. तेव्हापासून हे व्रत सुरू झाले.

**पटणी** एक जमात. या लोकांची वस्ती पूर्व बंगालमध्ये आहे. रिस्लेच्या मते पटणी हे द्रविड वंशाचे आहेत. परंतु ते मूळचे डोम आहेत, असे डा. वाईजचे म्हणणे आहे. उत्तर

बंगालमध्ये यांना ग्राम पटणी असेच म्हणतात. हे लोक आज यांना आपल्याला उच्चमहिष्य म्हणवून घेतात, पण महिष्यांनी त्या मागणीला मान्यता दिलेली नाही.

ना, व्यापार, बहुरूपाचा, नौकानयन, मच्छिमारी हे यांचे प्रमुख व्यवसाय आहेत. यांच्यात बालविवाह रूढ होता, पण घटस्फोट आणि विधवाविवाह मात्र निषिद्ध होता. यांची सर्व धार्मिक कृत्ये पतित ब्राह्मण करतात. संकटकाळी हे पचपीरांना भजतात. गंगापूजा हा त्यांचा मोठा सण असतो.

## पटने

खानदेशातील एक नगर. मध्य युगात पट्टन नावाचे नगर प्रसिद्ध होते, त्यालाच सांप्रत पटणे हे नाव मिळाले असावे. या नगराच्या आसमंतात देवालये, मठ, विहिरी, तलाव आणि बुरुज यांचे असंख्य अवशेष पडलेले आहेत. येथील आई भवानी मंदिरातील एका शिलालेखात चांगदेव महाविद्यालयाच्या स्थापनेचा उल्लेख आढळतो. चांगदेव हा भास्कराचार्यांचा नातू होय. यादव राजा सिंघण याने त्याला प्रमुख ज्योतिषी नेमले होते. हे नगर त्या काळी धार्मिक व शैक्षणिक केंद्र होते.

महेश्वरमंदिर हे या नगरातले सर्वांत मोठे मंदिर आहे. ते इ. स. ११५३ पूर्वी बांधलेले आहे. त्याचे गर्भगृह ताराकृती व २८ कोनी असून, त्याच्या आत एका चौकोनी देवघरात शिवलिंग आहे. द्वारावर वरच्या बाजूस गजलक्ष्मी असून, त्यावर गणेश, शर्मी व सप्तमातृकांच्या मूर्ती आहेत. या मंदिराच्या सभामंडपाच्या मध्यभागी चार व कडेला सोळा स्तंभ आहेत. मंदिराच्या बाहेरील अंगाला विपुल नक्षीकाम आणि देवतांची व नर्तिकांची अत्यंत सुंदर चित्रे कोरलेली दिसतात. [श्री. नाईक—यू. इ. औ., भाग ९, जून-डिसेंबर १९६७]

## पटलिया

एक आदिवासी जमात. या लोकांची वस्ती विंध्य आणि सातपुडा या पर्वतश्रेणींत आहे. पटलिया हा पतलिया या शब्दाचा अपभ्रंश असावा. त्याचा अर्थ जातिबहिष्कृत असा होतो. हे मूळचे परमार रजपुतांचे वंशज होते आणि अबूचा पहाड हे त्यांचे निवासस्थान होते. एकदा एका दुष्काळात त्यांच्यापैकी एका पुरुषाने अभक्ष्य पशूचे मांस खाल्ले. त्यामुळे जमातीने त्याला मुलाबाळांसह बहिष्कृत करून अबूवरून हाकलून दिले. पुढे त्या माणसाचा जो वंश वाढला, ती ही पटलिया जमात होय. या जमातीत तीस पोटभेद आहेत.

हे लोक इंद्र, अग्नी, देवी व सर्प या देवतांना भजतात. कालिका देवीवर यांची विशेष भक्ती असते. हे स्वच्छ आणि नमळ राहतात. यांच्या बायका चांदीचे दागिने घालतात व निळी ओढणी वापरतात. त्यांची वेणी लहान आणि रंग गव्हाळी असतो. पुष्कळसे पटलिये शेतीवाडी धारण करणारे आणि श्रीमंतही असतात. [लोकशाला-त्रैमासिक]

## पटवारी

महाराष्ट्राच्या ग्रामीण समाजरचनेतील एक घटक. सरकारी साऱ्याची वसुली आणि इतर मुलकी कामे यासाठी पूर्वी प्रत्येक गावी कुलकर्णी असत. पण ज्या गावी कुलकर्णी नसत, तिथे सरकार पटवा याची नेमणूक करी. पमहाराष्ट्रात आणि वऱ्हाडातील मराठी जिल्ह्यात सर्वत्र पटवारी हे मासिक पगार घेणारे सरकारी नोकर आहेत. त्यांची बदलीही केली जाते. एकेका पटवाऱ्याकडे तीनचार गावे असतात. त्या गावांना पटवा याचा सजा असे म्हणतात. सजातील ज्या गावी पटवारी राहत असतो, त्या गावाला सजाचे गाव म्हणतात.

मराठवाड्यात कुलकर्ण्यालाच पटवारी म्हणतात. पूर्वी तो एक वतनदारच असे, पण पुढे त्याचा तनखा ठरविण्यात आला. वसुलाच्या प्रमाणात तो त्याला मिळत असे.

गावाचा वसूल ज्या प्रमाणात असेल, त्याला अनुसरून पटवाऱ्यांची संख्या निश्चित केलेली असते. ज्या गावचा वसूल दहा हजारापर्यंत आहे तिथे एक पटवारी असतो. त्याला पट्टेदार असे म्हणतात. दहा हजाराच्या पुढे दोन व वीस हजाराच्या पुढे तीन असे पट्टेदार नेमतात. पटवा याच्या भाऊबंदांना वतनी हक्क असतात. त्यासाठी हा पट्टेदार आपल्या तनख्यातील एक तृतीयांश रक्कम भाऊबंदांना वाटून देतो. [म. ग्रा. स.]

## पटवेकरी

धंद्यावरून बनलेली एक जात. वऱ्हाडात यांना पटवा, पटवी, पट्रा, इलाकेबंद, अशी नावे आहेत. यांची वस्ती प्रामुख्याने सातारा, सोलापूर, इ. महाराष्ट्राच्या दक्षिणी जिल्ह्यांत आढळते. हे लोक मूळचे गुजरातमधील असून, सुमारे दोनशे वर्षांपूर्वी ते इकडे आले, असे एक मत आहे. हे मराठी व गुजराती अशा दोन्ही भाषा बोलतात. त्यावरून वरील मत खरे असावे, असे वाटते. ते आपल्याला क्षत्रिय म्हणवतात आणि जानवेही घालतात. दागिने पटविणे, पालख्यांचे गोंडे करणे, घोड्यांचे साज पटवणे हे यांचे व्यवसाय आहेत. त्यावरूनच त्यांना पटवेकरी हे नाव मिळाले असावे. शिवाय हे लोक गंडे, दोरे, ताईत, कडदोरे इ. वस्तूही तयार करून विकतात.

धार्मिक कृत्यांच्या प्रसंगी त्यांना मद्यमांस चालते. यांच्यातील काही लोक तुळजापूरच्या देवीला आपली कुलदेवी मानतात.

यांच्यात विधवाविवाह रूढ आहे. हे मृतांना जाळतात व श्राद्धही करतात. [मु. इ. जा., म. ज्ञा. को., हिं. वि. को.]

**पटवेगार** एक जात. या लोकांची वस्ती म्हैसूर प्रदेशात आहे. मणी गुंफणे, मोत्याची पेंडी बनवणे, दागिने पट वण व कमरपट्टे तयार करणे ही कामे हे लोक करतात. याना देवजी, रामजी, साहूजी, खत्री अशी उपपदे लावून संबोधतात. हे स्वत ला सूर्यवंशी समजतात व आपली उत्पत्ती कार्तवीर्यार्जुनापासून झाल्याचे सांगतात. पटवेगार जातीत खालील उप जाती आढळतात – सकुनसाळी, नकुलसाळी, शुद्ध साळी व खत्री. त्यांच्यात परस्पर लग्नसंबंध होत नाहीत.

हे लोक तुळजापूरची अंबाबाई, पंढरपूरचा विठोबा यल्लम्मा इ. देवाना भजतात. शक्तिदेवतेची पूजा समारंभाने करतात व त्या वेळी बलिदानही करतात.

काही पटवेगार मुसलमानही आहेत. मुसलमान असूनही त्याची हिंदू धर्मावर पूर्ण श्रद्धा आहे. [ हिं वि को , म इ जा ]

**पटाचारा** एक बुद्ध भिक्षुणी. श्रावस्ती शहरातील एका सधन व्यापारी कुटुंबात हिचा जन्म झाला. तिने स्वेच्छेने एका तरुणाला वरले म्हणून तिच्या मातापित्याचा तिच्यावर रोष झाला. तिचे कौटुंबिक जीवन फार दु खाचे गेले. पती सर्प दशाने मृत्यू पावला. दोन मुले होती, तीही अपघाताने मेली. अशा रीतीने सर्व उद्ध्वस्त झाल्यावर ती आईबापाना भेटायला म्हणून आली, तो तेही घराचे छत अंगावर कोसळून मृत्युमुखी पडले होते. या सर्व दुर्घटनानी ती सैरभैर झाली.

भगवान बुद्ध त्या समयी श्रावस्तीस राहत होते. दु खी कष्टी पटाचारा बुद्धाकडे गेली आणि तिने आपला सर्व वृत्तान्त त्याला कथन केला. बुद्धाने तिचे सांत्वन करून तिला उपदेश दिला. मग ती भिक्षुणी होऊन बुद्धाच्या प्रेरणेने धर्मप्रसाराचे काम करू लागली. तिने आपले पुढील सर्व जीवन धर्मप्रचारासाठीच व्यतीत केले. पुढे पुढे तिच्या वाणीला आध्यात्मिक सामर्थ्य प्राप्त झाले. तिच्या भाषणाने लोकांची मने बौद्ध धर्माकडे वळू लागली. संसाराने त्रस्त झालेल्या अनेकाना तिने शांतीचा मंत्र दिला. धर्म कथिका व संघनायिका म्हणून पटाचाराचे नाव सर्वतामुखी झाले. [ पू प स म , पा वा ते भि र ]

**पटुआ** ओडिसा व बंगाल या प्रदेशामधील एक जमात. याच्यात हिंदू व मुसलमान या दोन्ही धर्मातील लोक आहेत. आपले पूर्वज विश्वकर्मा जातीचे होते, असे हे सांगतात. हिंदू आणि मुसलमान अशा दोन्ही धर्मांतील हे जातिबहिष्कृत लोक आहेत. याच्या जातिभ्रष्टतेविषयी एक आख्यायिका प्रचलित आहे, ती अशी–

या जातीच्या एका पुरुषाने शिवाच्या अनुज्ञेशिवाय त्याचे चित्र काढले. त्यामुळे रागावून शिवाने त्याना ' तुम्ही जाति भ्रष्ट व्हाल ' असा शाप दिला व तेव्हापासून ते तसे झाले.

हे पूर्वी मुसलमानाच्या पालख्या वाहण्याचे काम करीत. या जमातीचे चार प्रमुख पोटभेद आहेत. त्यांच्या चालीरीतींमध्ये फरक नसून केवळ जत्रेच्या वेळी ज्या प्रकाराची दिव्ये ते कर तात, त्यावरून ते भेद पडलेले आहेत. ते प्रकार असे–

(१) घट पटुआ– या जमातीचे लोक डोक्यावर पाण्याने भरलेला तांब्याचा घट घेऊन नृत्य करतात व लोकांकडून देवीच्या पूजेसाठी दक्षिणा घेतात. याच्यातील एक मुख्य पुरुष देवीच्या पूजोत्सवाच्या वेळी जळत्या निखाऱ्यावरून चालतो. पण त्याचे पाय भाजत नाहीत.

(२) ऊर्वी पटुआ– यात्रेच्या वेळी या जमातीच्या एका पटु आला आगीच्या धुमीवर उलटा टांगतात. तो सारखा झोके घेत राहतो. त्याचे डोके विस्तवाला लागलेले असते, तरी ते भाजत नाही.

(३) खड पटुआ– हे लोक जत्रेच्या वेळी तरवारीच्या धारे वर उभे राहण्याचे दिव्य करतात.

(४) फोड पटुआ– या जमातीचे लोक जत्रेच्या वेळी एक मोठी सुई जिभेतून आरपार घालवतात.

वैशाखातील सूर्य संक्रातीच्या पूर्वी सहा दिवस पटुआची ही जत्रा सुरू होते व सामान्यपणे पधरा दिवसपर्यंत चालते. जत्रेच्या अखेरच्या दिवशी बडा पटुआ म्हणून ओळखला जाणारा जमातीचा प्रमुख ग्रामदेवतेच्या देवळातील कलशातले मागच्या वर्षी भरलेले पाणी न ओतता त्यामध्ये दुसरे पाणी भरतो, मग तो कलश डोक्यावर घेऊन गावभर हिंडतो. त्या वेळी सर्व पटुआ लोक त्याच्या मागून मिरवणुकीने जातात.

ओडिसामध्ये या जमातीचे लोक गाणी गाऊन भिक्षा माग तात. ही गाणी रामायण महाभारतातल्या कथावर आधारलेली असतात. त्याचा ५ किंवा ६ लोकांचा संघ असतो. त्यापैकी एखादा पुरुष बाईचे सोंग घेऊन लोकांची करमणूक करतो. बंगालमधील पटुआ चित्रकार व शीघ्रकवी म्हणून प्रसिद्ध आहेत. [ स्ट ओ फो लो ]

**पटेटी** पारशी लोकांचा एक महत्त्वाचा सण. हा त्यांच्या वर्षअखेरीचा दिवस असतो. याच्या दुसऱ्या दिवशी नवरोज म्हणजे नूतनवर्षारंभ दिवस येतो. म्हणून या दोन्ही सणाना मिळून पटेटी नवरोज असे म्हणतात. या दिवशी पारशी लोक प्रार्थना करतात.

पटेटी हा शब्द पतेतपासून बनला आहे. पतेत ही एक पश्चात्तापदर्शक प्रार्थना असून, वळत न कळत हातून घडलेल्या

पातकाच्या क्षालनार्थ ती केली जाते ही प्रार्थना जेव्हा सामुदायिक रीत्या अंगीकारीत होते, तेव्हा तिला पतेत पशेमानी असे म्हणतात पशेमानी याचा अर्थ पश्चात्ताप असा आहे

**पटेल, सरदार वल्लभभाई** (१८७५–१९५० इ स ) भारतीय स्वातंत्र्यसंग्रामाचे अग्रगण्य सेनानी आणि स्वतंत्र भारताचे पहिले गृहमंत्री वल्लभभाईंचा जन्म गुजरातमधील करमसद नामक खेड्यात झाला त्यांचे वडील जव्हेरभाई हे शेतकरी होते त्यांच्या आईचे नाव लाडाबाई असे होते प्राथमिक शिक्षण करमसद येथे पुरे केल्यावर वल्लभभाई नडियाद येथून मॅट्रिकची परीक्षा उत्तीर्ण झाले बॅरिस्टर होण्याची त्यांची इच्छा होती, परंतु घरच्या आर्थिक परिस्थितीमुळे त्यांना ते शक्य दिसेना म्हणून मग त्यांनी वकील होण्याचे ठरवले वकिलीचा अभ्यासक्रम अल्प खर्चाचा व थोड्या कालाचा असल्यामुळे तो त्यांनी यथाकाल केला मग इ स १९०० साली त्यांनी गोध्रा गावी वकिलीच्या व्यवसायाला प्रारंभ केला

वल्लभभाई प्राधान्याने फौजदारी खटलेच चालवीत कारण त्यात त्यांना खूप कमाई होत असे अशा खटल्यासाठी लागणारी कुशल आणि बेडर वृत्ती त्यांच्या अंगी भरपूर होती त्यामुळे बॅरिस्टरीच्या परीक्षेसाठी लागणारा पैसा त्यांनी अल्पावधीत जमवला, पण त्यांच्या ऐवजी त्यांचे ज्येष्ठ बंधू विठ्ठलभाई त्यांच्या आधी इंग्लंडला गेले व बॅरिस्टर होऊन परत आले



सरदार वल्लभभाई पटेल

नंतर इ स १९१० साली वल्लभभाई इंग्लंडला गेले व १९१३च्या फेब्रुवारीत बॅरिस्टर होऊन भारतात परतले अहमदाबाद येथे त्यांनी आपल्या व्यवसायाला लगेच सुरवात केली वल्लभभाईंचे वय त्या वेळी अडतीस वर्षांचे होते आतापर्यंतचे त्यांचे जीवन हालअपेष्टा आणि काबाडकष्टात गेले होते त्यामुळे यापुढचे आयुष्य चैनीत घालवायचे, असा त्यांनी निश्चय केला होता पण नियतीने त्यांच्यासाठी वेगळेच कार्य आणि जीवन योजून ठेवले होते

इ स १९१७ सालच्या नोव्हेंबर महिन्यात गोध्रा येथे जी पहिली गुजरात राजकीय परिषद भरली, त्या परिषदेचे अध्यक्ष म गांधी होते वल्लभभाईंच्या मनावर त्यांच्या भाषणाचा फार प्रभाव पडला आणि थोड्याच दिवसांत ते म गांधींचे एकनिष्ठ अनुयायी बनले

१९१७ साली वल्लभभाई अहमदाबाद नगरपालिकेत निवडून आले व त्यांनी लोकहिताच्या कामाला वाहून घेतले त्या काळात आपल्या कणखर धोरणाने आणि प्रखर वक्तत्वाने त्यांनी नगरपालिका अक्षरश गाजवून सोडली दाब फार अडून राहिलेली कामेही त्यांनी निग्रहाने तडीस नेली त्यासाठी त्यांना अनेक वेळा सरकारी अधिकाऱ्यांच्याही विरुद्ध जावे लागले, पण वल्लभभाईंनी कधीही माघार घेतली नाही

त्याच वेळी खेडा जिल्ह्यावर अतिवृष्टीचे संकट कोसळले तिथल्या शेतकऱ्यांच्या झोपड्या, गुरेढोरे, पिके सारे काही वाहून गेले तशातच सरकारने सारावसुली सक्तीने सुरू केली त्यामुळे तिथले शेतकरी हवालदील झाले त्यांनी आपली गाऱ्हाणी वल्लभभाईंपुढे मांडली वल्लभभाईंनी लगेच त्यांची संघटना निर्माण केली व तिच्या मार्फत साराबंदीची चळवळ चालू केली त्यामुळे सरकारी अधिकारी चिसाळले व जागोजाग शेतकऱ्यांवर जुलूमजबरदस्ती करू लागले

वल्लभभाईंना त्याची कल्पना होतीच त्यांनी शेतकऱ्यांचे मनोधैर्य टिकवण्यासाठी खेडा जिल्ह्यात दौरा काढला त्या वेळी त्यांच्याबरोबर म गांधीही होते खेडा जिल्ह्यातील एकूण ६०० खेड्यांपैकी ४२५ खेड्यांत गांधी–पटेलांनी पदयात्रा केली, अतिवृष्टीचे ते भीषणगंभीर स्वरूप प्रत्यक्ष पाहिले आणि 'येतील त्या हालअपेष्टांना तोंड द्या, पण सारा भरू नका' असा त्यांना आदेश दिला आपल्या पाहणीचा निष्कर्ष कमिशनरला कळवताना वल्लभभाईंनी म्हटले 'शेतसारा तहकूब करणे अवश्य आहे आमच्या पाहणीवर विश्वास ठेवा व ते शक्य नसल्यास सरकार व जनता यांच्या प्रतिनिधींचे चौकशीमंडळ नेमा '

सरकारने वल्लभभाईंचा सल्ला मानला नाही व दडपशाहीचे सत्र चालूच ठेवले पण अखेरीस शेतकऱ्यांच्या संघटितसामर्थ्यापुढे सरकारचा टिकाव लागला नाही सरकार नमले आणि वल्लभभाईंनी नेतृत्व केलेला हा पहिला लढा यशस्वी झाला गांधीजींनी या विजयाचा मुक्तकंठाने गौरव केला

यानंतर कायदेभंगाच्या लढ्याला सुरुवात झाली. गुजरातेतील संग्रामाचे संचालन म. गांधींनी वल्लभभाईकडे सोपवले. दि. ६ एप्रिल १९२१ रोजी अहमदाबाद येथे निघालेल्या मिरवणुकीचे नेतृत्व वल्लभभाईंनी केले व साबरमतीच्या तीरावर भरलेल्या सभेत भाषणही केले. सभेच्या शेवटी त्यांनी स्वहस्ते म. गांधींची जप्त पुस्तके विकून कायदेभंगाचा शुभारंभ केला. सरकार वल्लभभाईंच्या या साऱ्या कृतीवर डोळे रोखून होते, पण त्या वेळी वल्लभभाईंना त्याने हात लावला नाही.

दि. ९ एप्रिल १९२१ रोजी चळवळीचे प्रमुख पुढारी म्हणून सरकारने म. गांधींना अटक केली. त्याचा परिणाम म्हणून देशभर दंगे उसळले. मग सरकारची दडपशाही व तिला उत्तर म्हणून आणखी दंगे, असे सत्र सुरू झाले. वल्लभभाईंनी या प्रसंगी अत्यंत कुशलतेने आणि बेडरपणे पावले टाकली. सरकारच्या आणि जनतेच्या हिंसक वृत्तीचा त्यांनी निषेध केला, पण त्याचबरोबर जनमानसातील स्वातंत्र्यप्रेम वाढीस लावावे, यासाठीही ते प्रयत्नशील राहिले. वल्लभभाईंचे हे कर्तृत्व पाहिल्यावर गुजराती जनतेने त्यांना गुजरात प्रांतिक परिषदेचे अध्यक्षपद बहाल केले.

त्याच वर्षीच्या १ ऑगस्टला स्वदेशीच्या आंदोलनाला सुरुवात झाली. विदेशी कपड्यांची होळी हा या आंदोलनातला एक महत्त्वाचा कार्यक्रम होता. उमरेठ येथे अशीच एक होळी पेटवली गेली. त्या होळीत वल्लभभाईंनी आपल्या डोक्यावरील विदेशी टोपी जाळून टाकली. यानंतर त्यांनी कधीच टोपी घातली नाही. अखेरपर्यंत ते स्वदेशी व्रतानेच वागले.

याच काळात वल्लभभाईंनी अहमदाबाद येथे राष्ट्रीय शाळांच्या स्थापनेत पुढाकार घेतला. अहमदाबादच्या उदाहरणावरून सुरत व नडियाद या शहरींही अशाच शाळा सुरू झाल्या. या शाळांतून देशभक्तीचे शिक्षण दिले जाई. त्यामुळे त्यांच्यावर सरकारचा रोष झाला. सरकारने लेखणीच्या एका फटकाऱ्याने त्या शाळा बेकायदा ठरवल्या. पण तरीही वल्लभभाईंनी चिकाटी सोडली नाही. त्यांच्या त्या चिकाटीला यशही आले. १९२४ च्या फेब्रुवारीत सरकारने माघार घेतली व वरील तीनही शाळांना मान्यता दिली. अहमदाबादच्या शाळेला तर दीड लाख रुपयांचे अनुदानही दिले.

इ. स. १९२७ च्या जुलै महिन्यात संबंध गुजरातभर अतिवृष्टी झाली. खेडा जिल्ह्यातले प्रत्येक खेडे जणू सरोवरच बनले. वल्लभभाईंनी त्या काळात आपल्या जिवाचे रान करून आपल्या स्वयंसेवकांकरवी हजारो पूरग्रस्तांना साहाय्य पोचवले.

अतिवृष्टीच्या अस्मानी संकटापाठोपाठ बार्डोली तालुक्यात सारावाढीच्या रूपाने दुसरे सुलतानी संकट उभे राहिले. दर तीस वर्षांनी शेतसाऱ्याची पाहणी करून आवश्यक तर त्यात वाढ करण्याची मुंबई सरकारची पद्धत असे. इ. स. १९२६ साली अशी पाहणी करून सरकारने बार्डोली तालुक्याचा शेतसारा तीस टक्क्यांनी वाढवला. या सारावाढीमुळे तेथल्या शेतकऱ्यांना सुमारे दीड लाख रुपये अधिक भरावे लागणार होते. पण शेतकऱ्यांना ते भरण्याची ताकद नव्हती. वारंवार होणाऱ्या अतिवृष्टीमुळे त्यांची सांपत्तिक स्थिती ओढगस्तीची झाली होती. ही सारावाढ रहित व्हावी म्हणून त्यांनी सनदशीरपणे प्रयत्न केले, पण सरकार ऐकेना. मग त्यांनी वल्लभभाईंकडे तक्रार नेली. वल्लभभाईंनी त्यांना साराबंदीचा उपाय सांगितला. मात्र त्याचबरोबर त्याच्या भीषण परिणामांचीही कल्पना दिली.

दि. ५ फेब्रुवारी १९२८ ही सारा भरण्याची अंतिम मुदत होती. त्याच्या आदल्याच दिवशी बार्डोली येथे वल्लभभाईंनी शेतकऱ्यांची परिषद बोलावली. तीत लढ्याची योजना निश्चित झाल्यावर दि. ६ फेब्रुवारीला वल्लभभाईंनी सरकारला एक पत्र पाठवले व सारावाढ रद्द करण्याची विनंती केली. पण सरकारने ती मानली नाही. उलट एक खास अधिकारी नेमून त्याच्याकरवी सरकारने सत्याग्रही शेतकऱ्यांच्या जमिनी व जनावरे जप्त करण्याचा सपाटा लावला. त्याचबरोबर धरपकड, लाठीमार हेही उपाय अवलंबिले. पण शेतकऱ्यांचा निश्चयही तितकाच कठोर होता. या सरकारी दडपशाहीला उत्तर म्हणून वल्लभभाईंनी शेतकऱ्यांना असहकाराचा आदेश दिला. खेड्यात येणाऱ्या कोणत्याही सरकारी अधिकाऱ्याला दूध, भाजी, फळे, धान्य या नित्यावश्यक वस्तू मिळेनात, की न्हावी, परीट, शिंपी उपलब्ध होईना. या असहकारामुळे तर सरकार फारच चवताळले. असहकार हा सरकारने गुन्हा ठरवला व त्याबद्दल नवे वटहुकूम काढून नव्याने दडपशाही आरंभली. पण वल्लभभाईंसारखा कणखर वृत्तीचा पुढारी लाभल्यामुळे शेतकऱ्यांनी तशा त्या दडपशाहीलाही भीक घातली नाही. शेवटी बार्डोलीचा तो लढा यशस्वी झाला. सरकारला वल्लभभाईंचे म्हणणे मान्य करावे लागले. लढा यशस्वी केल्याबद्दल म. गांधींनी वल्लभभाईंना सरदार ही पदवी देऊन त्यांचा गौरव केला. मग दि. ४ मे १९२९ रोजी वांद्रे येथे भरलेल्या महाराष्ट्र प्रांतिक परिषदेचे अध्यक्षस्थान वल्लभभाईंना देऊन महाराष्ट्रातील सारावाढीच्या लढ्याचेही नेतृत्व त्यांनी करावे, अशी त्यांना विनंती करण्यात आली. त्या पाठोपाठ तमिळनाडू, कर्नाटक, बिहार, इ. अनेक प्रांतांत त्यांचे सन्मान झाले.

दि. १२ मार्च १९३० रोजी म. गांधींची सुप्रसिद्ध दांडी यात्रा सुरू झाली. वल्लभभाईंनी त्यांचे स्वागत करण्यासाठी

f [illegible] या गावी एक सभा बोलावली पण ऐन वेळी [illegible] भाषणबंदी घातली वल्लभभाइनी ती [illegible] त्याना पकडून त्याच्यावर खटला [illegible] त्याना तीन महिने साधी कैद व ५०० रु दंड अशी शिक्षा [illegible]

[illegible] १९३० रोजी वल्लभभाइ तुरुगातून मुक्त झाले आणि [illegible] वर्षीच्या १ ऑगस्टला टिळक पुण्यतिथीच्या मिरवणुकीत [illegible] केल्यामुळे पुन्हा कारागृहात डांबले गेले त्यातून सुटताच मुंबइच्या एका खादीभांडाराच्या उदघाटन प्रसंगी त्यानी भाषण केले सरकारला ते भाषण राजद्रोहाला प्रोत्साहन देणारे [illegible], म्हणून पुन्हा त्याना पकडण्यात येऊन [illegible] शिक्षा देण्यात आली पुढे गांधी आयर्विन [illegible] ४ मार्च १९३१ रोजी ते मुक्त झाले

[illegible] स १९३१ च्या मार्च अखेर कराची येथे राष्ट्रीय सभेचे [illegible] अधिवेशन भरले, त्याचे अध्यक्षपद वल्लभभाइना देण्यात [illegible] अधिवेशनावर भगतसिगादी क्रांतिकारकांच्या फाशीच्या आणि मोतीलाल नेहरूंच्या मृत्यूची शोकछाया पडली होती बहुसंख्य काँग्रेस कार्यकर्ते हताश आणि किंकर्तव्यमूढ झाले होते, तर पुष्कळस संतप्त बनून हिंसात्मक मार्गाकडे वळण्याचा विचार करू लागले होते वल्लभभाइनी आपल्या अध्यक्षीय भाषणात सर्व कार्यकर्त्यांना योग्य मार्गदर्शन केले व अत्याचारी मार्गापासून त्याना दूर ठेवले परंतु पुढच्याच वर्षी सरकारची दडपशाही पुनश्च चालू झाली आणि तिच्या प्रतिकारार्थ झालेल्या आंदोलनात सरदार वल्लभभाइना पुन्हा एकदा तुरुगात जावे लागले

वल्लभभाइच्या या तुरुगवासाच्या काळातच त्याची आई लाडबाई व वडील बंधू विठ्ठलभाइ हे एका वर्षाच्या अंतराने मरण पावले या दोघाही आप्ताच्या अंत्यसमयी वल्लभभाइना उपस्थित राहता आले नाही

[illegible] ८ मार्च १९३५ रोजी वल्लभभाई बंधमुक्त झाले बाहेर त्याच्यासाठी कार्याचे डोंगर उभेच होते बोरसद तालुक्यात या वेळी ग्रंथीज्वराने (प्लेगने) कहर केला होता वल्लभभाई तत्काळ तिकडे धावले व त्यानी रुग्णाच्या शुश्रूषेला व वाड्या वस्त्याच्या स्वच्छतेला प्रारंभ केला त्यासाठी त्यानी एक स्वतंत्र इस्पितळही उघडले

यानंतर सरकारने भारतीयाना वसाहतीचे स्वराज्य देण्याची घोषणा केली त्यानुसार इ स १९३७ साली देशभर निवडणुका घेण्यात आल्या त्यात आठ प्रांतात काँग्रेसला बहुमत मिळून तेथील जनता प्रतिनिधीचे राज्य चालू झाले वल्लभभाई या वेळी काँग्रेसच्या पार्लमेंटरी बोर्डाचे अध्यक्ष होते त्या निवडणुका जिंकण्यात सरदार वल्लभभाइचा वाटा फार मोठा होता

त्यानंतर दुसरे महायुद्ध सुरू झाले त्या काळात १९४२ चा संग्राम झाला आणि शेवटी १९४७ साली देशाची फाळणी करून इंग्रज सरकार इथून निघून गेले मग स्वातंत्र्योत्तर भारताच्या पहिल्या मंत्रिमंडळात वल्लभभाईकडे गृहखाते आले वल्लभभाइच वय या वेळी बहात्तर वर्षांचे होते खरे तर हे वय विश्रांतीचे म्हटले पाहिजे पण वल्लभभाइनी तसे मानले नाही उलट राष्ट्राच्या सुव्यवस्थेची जबाबदारी त्यानी शिरावर घेतली आणि नंतरच्या अडीच वर्षांत म्हणजे मृत्यूच्या क्षणापर्यंत ती यशस्वीपणाने पार पाडली

या काळात वल्लभभाइनी प्रामुख्याने तीन महत्त्वाची कार्ये तडीला नेली सर्वप्रथम त्यानी मुस्लिम लीगच्या मुजोरीला पक्का पायबंद घातला स्वातंत्र्य आल्यावरही स्वतंत्र भारतातल्या जागोजागच्या मुस्लिम संघटना हिंदूना उपद्रव देत राहिल्या होत्या त्याचा परिणाम म्हणून हिंदही त्याना प्रत्युत्तर देऊ लागले होते त्यामुळे देशात दंगे वाढत होते आणि देशातले वातावरण अशांत झाले होते वल्लभभाइनी या गोष्टीचा कडक बंदोबस्त केला प्रसंगी त्यानी स्वातंत्र्यपूर्वकालात स्वीकारलेल्या अहिंसाव्रताला मुरड घालूनही काही प्रकरणे निकालात काढली

नंतर त्यानी भारतीय संघराज्य निर्मितीसाठी संस्थानांच्या विलिनीकरणाला हात घातला वल्लभभाइच्या या धोरणाला काही विशिष्ट अपवाद सोडून सर्व संस्थानिकानी संमती दिली विरोध केला तो जुनागड व हैद्राबाद या संस्थानांच्या अधिपतींनी पण वल्लभभाइनी साम–दाम दंडादी उपचारानी त्याचा विरोध मोडून काढला भारतातली सुमारे ७०० संस्थाने संघराज्यात विलीन करून त्यानी संबंध भारत एकछत्री सार्वभौम सत्तेखाली आणला वल्लभभाइच्या राष्ट्रीय जीवनातल हे फार मोठे आणि मोलाचे कार्य होय इतिहासात ही त्याची कामगिरी अजरामर ठरली आहे

वल्लभभाइचे आणखी एक महत्त्वाचे कार्य म्हणजे सौराष्ट्रातल्या सोमनाथाची पुन प्रतिष्ठा हे होय इ स १०२४ साली गझनीच्या महमुदाने सोमनाथावर स्वारी करून तिथली अगणित संपत्ती लुटून सोमनाथाचे लिंगही भग्न केले होते वल्लभभाइनी त्या मंदिराचा जीर्णोद्धार करण्याची कल्पना मनात आणली व त्याविषयीची योजना आखली इ स १९५१ साली भारताचे तत्कालीन राष्ट्रपती राजेंद्रप्रसाद याच्या हस्ते त्या ज्योतिर्लिंगाची पुन प्रतिष्ठा झाली

अशा प्रकारे सतत पंचवीस वर्षे स्वातंत्र्याच्या संग्रामात लढून आणि थोडा काळ स्वतंत्र भारताचे गृहमंत्रीपद भूषवून दि १५ डिसेंबर १९५० रोजी वल्लभभाई मुंबई येथे निधन पावले

**व्यक्तिमत्त्व** – वल्लभभाईंचे वर्णन करताना सामान्यतः त्यांना 'भारताचे पोलादी पुरुष' म्हटले जाते. वल्लभभाईंची शरीरयष्टी, त्यांचे विचार, कार्यपद्धती, इ. गोष्टींतून त्यांच्या पोलादी वृत्तीचा पुरेपूर प्रत्यय येत असे. विरोधकच काय, पण त्यांचे सहकारीही त्यांना वचकून असत. पण त्यांच्या पोलादी वृत्तीच्या तळाशी सूक्ष्म विनोदबुद्धीही वसत होती. स्वातंत्र्यसंग्रामाच्या काळात त्या सहकाऱ्यांनी परकीय सरकारचे जे अनेक घणाघात हसतमुखाने सहले, सोसले, त्याला कारण वल्लभभाईंची विनोदबुद्धी हेच होय. 'तुरुंगात आम्ही पोट धरधरून हसत होतो. याला कारण वल्लभभाईंचा विनोद,' अशी कबुली प्रत्यक्ष म. गांधींनीच दिली आहे. [स्व. भा. पहिले गृहमंत्री – श्री. ना. न. शिखरे, १९५६]

## पटेलिया

एक जात. या लोकांची वस्ती मुख्यत्वे गुजरातच्या पंचमहाल जिल्ह्यात आहे. चांपानेरच्या राजपुतांपासून आपली उत्पत्ती झाली, असे ते सांगतात. इ. स. १४८५ साली महंमद बेगडा याने जेव्हा चांपानेर काबीज केले, त्या वेळी हे लोक डोंगर व दऱ्या येथे गेले. त्यांच्या बायका मात्र मागेच राहिल्या. पुढे त्यांनी भिल्ल स्त्रियांशी लग्ने केली. यावरून त्यांना धनालिंग अथवा अशुद्ध म्हणू लागले. बहुधा हे शेती व शेतमजुरी करून निर्वाह करतात.

मुले मुली वयात आल्यावर त्यांची लग्ने करतात. त्यांच्यात मुलींना पळवून नेऊन लग्ने करण्याची चाल आहे. त्यामुळे त्यांना लग्नाच्या वेळी करावा लागणारा खर्च वाचतो.

रुद्र व हिंगलाज देवी यांना ते भजतात. औदीच्य ब्राह्मण अथवा श्रीगौड ब्राह्मण त्यांचे पौरोहित्य करतात.

## पट्टदकल

हे गाव कर्नाटकात बदामीपासून १० मैलांवर मलप्रभेच्या काठी आहे. इथे बदामीच्या चालुक्य राजांची दुय्यम राजधानी होती. या लहानशा गावाच्या परिसरात असंख्य लहान मोठी मंदिरे असून, शिल्पकलेच्या दृष्टीने ती फार प्रेक्षणीय आहेत. त्यांतील संगमेश्वर, विरूपाक्ष, मल्लिकार्जुन व पापनाथ ही मंदिरे विशेष प्रसिद्ध आहेत. इ. स. च्या ८ व्या शतकाच्या प्रारंभी चालुक्य राजा विजयादित्य याने संगमेश्वरमंदिर बांधले. प्रथम त्याला विजयेश्वर हेच नाव होते. हे एक शिवमंदिर असून, त्याची रचना साधी, पण भक्कम आहे. त्याचे शिखर चौकोनी मनोऱ्यासारखे आहे. त्याच्या शिरोभागी चारी बाजूंना गवाक्षे आहेत. विरूपाक्ष व मल्लिकार्जुन ही मंदिरे विक्रमादित्य (दुसरा) याच्या राण्या लोकमहादेवी व त्रैलोक्यमहादेवी यांच्यासाठी बांधलेली आहेत. विक्रमादित्याने पल्लवांची राजधानी कांची जिंकून घेतली आणि परत आल्यानंतर त्या विजयाचे स्मारक म्हणून ही दोन मंदिरे बांधली. विरूपाक्षमंदिराचे शिखर चौकोनी आहे, पण मल्लिकार्जुनमंदिराचे शिखर गोल आहे. या दोन्ही मंदिरांच्या दर्शनी भागात जी चावडी दिसते ती अत्यंत सुंदर आहे. पापनाथाचे मंदिर इ. स. च्या ७ व्या शतकाच्या अखेरीस निर्माण झाले असावे. त्याचे शिल्पकाम द्राविड शैलीचे असले तरी शिखर मात्र नागर शैलीचे आहे. हे प्रथम सूर्यमंदिर असावे. या सर्व मंदिरांच्या भिंतींवर रामायण, महाभारत व पुराणे यांतील प्रसंग कोरलेले आढळतात.

इथेच जवळच एक जैन मंदिरही आहे. त्याचे शिखर स्पष्टपणे द्राविड शैलीचे दिसते.

पट्टदकल येथे नागर व द्राविड या दोन्ही पद्धतींची मंदिरे जवळजवळ उभी आहेत. काही मंदिरांत दोहोंचे मनोहर मिश्रण झालेले दिसते. त्यातूनच पुढे चालुक्य शिल्पशैली उगम पावली. [श. द., श्री नाईक – नू. इ. अं., भाग ९, जुलै डिसेंबर १९४७, स्टॅ. ए., गा. रा. ज. या.]

## पट्टनवन

एक जात. या लोकांची वस्ती आंध्र व मद्रास प्रदेशातील कृष्णा व तंजावर या जिल्ह्यांत आढळते. यांना करयन असेही म्हणतात. समुद्रकाठचे लोक असा त्याचा अर्थ आहे. यांच्यात अनेक पोटजाती आहेत. यांची जातपंचायत असते. हे लोक मच्छीमारी करून उपजीविका करतात. त्याचबरोबर ते तराफे, नावा व बोटीही तयार करतात.

मद्रास शहरात ये देवाच्या मूर्ती खांद्यावर घेऊन जाण्याचा मान या जातीला आहे.

**धर्म** – हे लोक शैव आहेत. ते ग्रामदेवतांनाही भजतात. कुत्तियादवन ही त्यांची समुद्रदेवता होय. संतू निरुप्पा किंवा मित्रोदुन पिळळै या नावाच्या तिच्या सेवकालाही ते ठराविक वेळी भजतात. ते निरनिराळ्या देवतांच्या, ओली वाळू व माती यांच्या शंकूच्या आकाराच्या मोठ्या प्रतिमा तयार करून त्यांची स्थापना करतात आणि ठरलेल्या दिवशी त्यांना बलिदान करतात. मासेमारीच्या उत्सवात हे लोक समुद्रकिनाऱ्यावर आपल्या देवांची पूजा करतात.

**विवाहप्रथा** – यांच्यात वाङ्‌निश्चय करण्यापूर्वी लग्नाला मुलीच्या मामाची संमती घ्यावी लागते. विवाहमुहूर्त ठरला म्हणजे वरपक्ष ग्रामप्रमुखाला व गावकऱ्यांना पानसुपारी वाटतो. नवरामुलगा, वधूच्या मंडपात आला म्हणजे जानवे घालणारा ब्राह्मण पुरोहित अग्नी तयार करतो आणि त्यात तुपाच्या आहुती देतो. मग नवरामुलगा वधूच्या गळ्यात ताली बांधतो आणि मामा त्या दोघांच्या कपाळावर सोन्याचा किंवा चांदीचा

पट्टम नामक अलंकार बांधतो. वराचा मेहुणा आणि वधूचा मामा, वर-वराच्या बोटात अंगठी घालतात. विवाहविधीत वापरलेल्या जाव मन्त्र्याला बांधलेले दोरे व त्याबरोबर काही धान्य, इ. सर्व वस्तू सध्याकाळी समुद्रात फेकून देतात. एवढे झाल्यावर विवाहसमारंभ समाप्त होतो.

**मृतकप्रथा**– याच्यात प्रेते बसलेल्या स्थितीत पुरतात. काही लोक प्रेताचे दहनही करतात. पतिनिधनानंतर मयताच्या विध वेला तिचे नातेवाइक तावडी वस्त्रे देतात. [ ना. ट्रा. स. इ. ]

## पट्टनायक, गोपालकृष्ण

( १७८५-१८६२ इ. स. ) ओडिसातील एक वैष्णव कवी. गजाम जिल्ह्यातील पारलाखेमुंडा या गावी याचा जन्म झाला. तिथल्या स्थानिक राजाची फडणिशी त्याच्या घराण्यात वंश परंपरा चालत आलेली होती.

बालपणापासूनच गोपालकृष्णाला कविता करण्याचा छंद होता. मोठेपणी तो राधा-कृष्णाचा भक्त बनला. त्याने आपल्या अनेक गीतातून राधा-कृष्णाच्या लीला वर्णिल्या आहेत. राधा व कृष्ण यांचे प्रेम केवळ पौराणिक आधारावर गृहीत न धरता त्याच्या मागची एक वेगळी घटना त्याने सांगि तली आहे, ती अशी – राधा आणि कृष्ण हे बालपणी वृंदा वनात राहत असत. त्यांची प्रारंभी एकमेकांशी ओळखही नव्हती. पुढे यौवनात पदार्पण केल्यावर त्यांना आपापल्या नातलगाकडून एकमेकाच्या सौंदर्याची आणि गुणांची प्रशंसा ऐकू आली आणि मग त्यांना परस्परांबद्दल तारुण्यसुलभ आक र्षण वाटू लागले. अशा स्वाभाविक पद्धतीने राधा-कृष्णाचे प्रेम चित्रित करणारा गोपालकृष्ण हा पहिलाच ओडिया कवी होय. साधी भाषा, मधुर भाव आणि गेयता या तीन गुणांमुळे त्याचे काव्य ओडिसातील लोकांना अत्यंत प्रिय झाले आहे.

पारलाखेमुंडी येथे गोपालकृष्ण ज्या घरात राहत असे, ते त्या संताचे स्मारकच बनले आहे. त्या घरात त्याचा एक अर्धपुतळा बसवलेला असून, तिथे राहणारे त्याचे वंशज रोज त्या पुतळ्याची पूजा करतात. [ हि. ओ. लि., उ. सा. इ. ]

## पट्टराणी

राजाची मुख्य राणी हिलाच पट्टमहिषी, पट्टदेवी किंवा पट्टराज्ञी असे म्हणतात. हिला राजाबरोबर राज्याभिषेक होत असे. बहुधा पहिल्या राणीलाच पट्टराणीचे पद मिळत असे. आपल्या विशेष अधिकारामुळे ती राजाच्या बरोबर सिंहासनावर बसत असे आणि यज्ञादी कर्मांत त्याची पत्नी म्हणून भाग घेत असे. काही वेळा युवराजाच्या मातेलाही पट्टराणीचा मान मिळत असे.

## पट्टावलिया

जैन ग्रंथ. जैनांच्या प्रत्येक गच्छातील आचार्यांच्या परंपरा सांगणारी पुस्तके असतात, त्यांना पट्टावलिया असे म्हणतात. या ग्रंथात महावीरांपासून ग्रंथलेख काच्या आचार्यांपर्यंतची परंपरा दिलेली असते. तीत त्यांची नामावली, जन्मवर्ष, जन्मस्थान, दीक्षासंवत आणि आचार्यपद प्राप्तीचा काल नोंदविलेला असतो. त्याचप्रमाणे त्यांच्या जीवनातील प्रसंगादी कार्यांचा वृत्तांतही त्यात असतो. या ग्रंथांवरून काही ऐतिहासिक घटनांचा उलगडा होण्यास फार मदत झाली आहे. हे ग्रंथ इ. स. च्या दहाव्या शतकानंतर लिहिले जाऊ लागले, असे अनुमान आहे. [ ओ. गि. रा., भाग १ ]

## पट्टिणत्तार

( इ. स. चे १४ वे शतक ) एक तामिळ संत. हा वैश्य असून कावेरीपट्टिनम येथे राहत असे. एके दिवशी त्याच्या घरी एक संन्यासी भिक्षेसाठी आला. त्याला त्याच्या पत्नीने म्हटले की 'यजमान नदीवर आपली जहाजे पाहा यला गेले आहेत, ते येईपर्यंत थांबा.' पण तो थांबला नाही. त्यांना जाताना पट्टिणत्तार याच्या पत्नीजवळ एक नाक तुटलेली सुई व एक पद्य लिहून दिले व 'तुझा पती आला म्हणजे हे त्याला दे' असे सांगितले. पट्टिणत्तार घरी आल्यावर त्याला त्या वस्तू मिळाल्या. त्याने ती सुई पाहिली व ते पद्य वाचले मात्र, त्याला एकदम वैराग्य आले. लगेच त्याने आपली सर्व संपत्ती वाटून टाकली व तो संन्यस्त वृत्तीने राहू लागला.

पट्टिणत्तारने पुढे बरीच पद्यरचना केली. त्याच्या पद्यांचा एक संग्रह प्रसिद्ध झाला आहे. त्याच्या काव्यावर निराशेची छटा असली, तरी ते भावपूर्ण आहे. [ त. सा. स. ]

## पट्टनुलकारन

एक विणकर जात. यांची वस्ती मुख्यतः तमिळनाडमध्ये आहे. म्हैसूर प्रदेशातही काही लोक आढळतात. हे लोक सौराष्ट्रातून तमिळ प्रदेशात आले असल्याने ते सौराष्ट्र या नावानेही ओळखले जातात. पट्टनुल कारन याचा अर्थ रेशमी कापड विणणारे असा होतो. हे स्वतःला ब्राह्मण समजतात व आपल्या या समजुतीला मदुरेच्या नायक घराण्यातील मंगम्माळ राणीच्या एका आज्ञापत्राचा आधार देतात. ते यज्ञोपवीत धारण करतात आणि विवाह व अंत्यकर्मादी संस्कार ब्राह्मणाप्रमाणे करतात. ते आपल्या नावाला अय्यंगार, अय्यर, राव, इ. उपाधी लावतात. सनातनी वृत्तीचे जे लोक आहेत, ते आपणास चेट्टी म्हणवतात.

**विवाहप्रथा**– विवाहाच्या दिवसापूर्वी वरपक्षाचे लोक वधूच्या घरी जातात आणि वधूला औपचारिकरीत्या मागणी घालतात. त्या वेळी वधूचे नातेवाईक ठराविक प्रश्न विचार

तात 'तुम्ही कोण आणि कुठून आला?' वरपक्ष उत्तर देतो 'आम्ही सौराष्ट्रातून आलो, देवगिरीस वस्ती केली, नंतर दक्षिणेकडे विजयनगरपर्यंत प्रवास केला आणि तिथून मदुराईला आलो.' नंतर वरपक्षाचे लोक वधूपक्षाला तोच प्रश्न विचारतात आणि वधूपक्षही तसेच उत्तर देतो.

मुलींचे लग्न लहान वयात करतात. सगोत्र विवाह करीत नाहीत. आते मामे भावंडात लग्न होते. विवाहविधी पुष्कळसा ब्राह्मणांच्या विवाहविधीसारखाच असतो. विवाहाच्या चौथ्या दिवशी नागवली नामक एक विधी करतात. त्यात अनेक पात्रांची देवता म्हणून पूजा करतात.

हे लोक पट्टनुली नामक एक भाषा बोलतात. तीत कन्नड व तेलगू शब्द बरेच आहेत. बहुतेक लोकांना तेलगू भाषा बोलता येते. धंद्यासाठी एक सांकेतिक भाषा वापरतात. या जातीचे लोक वसवण्ण किंवा भास्कर यांचा उत्सव करतात.

म्हैसूर प्रदेशातले रहिवासी कट्टी नावाने रेशमी कापड विणतात. त्या कामी तेच प्रवीण असतात.

या लोकांत शैव व वैष्णव दो ही पंथांचे लोक आहेत आणि ते पूर्ण शाकाहारी आहेत. त्यांच्यात परस्पर रोटीबेटी व्यवहार होतो. तिरुपती येथील वेंकटेश्वर हा यांचा मुख्य देव असून त्याशिवाय ते लक्ष्मी, राम, नाग, इ. देवतांनाही भजतात.

मदुरा शहराला जे वैभव प्राप्त झाले आहे, ते या रेशीम विणणाऱ्या जातीमुळेच होय. आपल्या जातीचे सर्व प्रश्न सोडवण्यासाठी त्यांनी सौराष्ट्रसभा या नावाची एक संस्था स्थापन केली आहे. समाजातल्या लोकांसाठी शिक्षण संस्था, अनाथालये, दवाखाने व धर्मशाळा चालवणे आणि आपल्या समाजाचे सर्वतोपरी हित पाहणे, ही कामे ही संस्था करते.

हे लोक व्यवस्थित वागणारे, कुशल व उद्योगी आहेत. त्यांना संगीताची फार आवड आहे. शुभाशुभ शकुनांवर त्यांचा विश्वास असतो.

**मृतिकप्रथा** – हे लोक प्रेताचे दहन करतात व प्रेताच्या अस्थी गोळा करून जलाशयात टाकतात, दहा दिवस सुतक पाळतात, वर्षश्राद्ध करतात. विधवा स्त्रिया केशवपन करत नाहीत, फक्त मंगलसूत्र (बोत्त) तोडून टाकतात. [का. टा. स. इ.]

**पठाण** मुसलमानांची एक जात. हिंदुस्थानातील सर्व प्रदेशांत यांची वस्ती आहे. निरनिराळ्या ठिकाणी हे अफगाण, काबुली, खान, कंदाहारी, पख्तुनी, पेशावरी, रोहिले, इ. नावांनी ओळखले जातात. हे लोक अफगाणिस्थान आणि वायव्य सीमा प्रांत या भागातून इकडे आलेले आहेत. हे पुश्तू भाषा बोलतात.

अफगाणिस्थान व पाकिस्तान यांच्या सीमेवरील डोंगराळ प्रदेशात राहणाऱ्या व पुश्तू भाषा बोलणाऱ्या सर्व लोकांना पठाण म्हणतात. त्यांचा प्रदेश सिंधू नदीपासून पश्चिमेला कंदाहार-पर्यंत आणि हिंदुकुश पर्वतराजीपासून दक्षिणेस बलुचिस्तानापर्यंत पसरलेला आहे. सिंधू नदीच्या लगतचा प्रदेश सखल, मैदानी व सुपीक आहे, तर पश्चिमेकडील भाग डोंगराळ आहे. या डोंगराळ व दुर्गम प्रदेशात अनेक खिंडी असून, त्यांना भारताच्या इतिहासात फार महत्त्व आहे. कारण प्राचीन काळी बहुतेक परकीय लोक व आक्रमक या खिंडीमधून भारतात आले. त्यातली खैबरखिंड सर्वांत प्रसिद्ध आहे. पेशावर व काबूल यांच्यामध्ये ही खिंड असून तिची लांबी ४२ मैल व माथ्याजवळ उंची ३३७३ फूट आहे. पाकिस्तान व अफगाणिस्थान या देशातील दळणवळणाचा मुख्य मार्ग हाच आहे. याशिवाय कुरम, टोची, गोमल, इ. खिंडीतूनही हे दळणवळण पूर्वीपासून चालत आले आहे. या डोंगरी प्रदेशात २० ते २५ लाख टोळीवाले लोक वसलेले आहेत.



हिंदी पठाण

मात्र या प्रदेशावर आजपर्यंत कोणीही आपली सत्ता पूर्णपणे प्रस्थापित करू शकला नाही. पठाणांची लोकसंख्या एक कोटीच्या वर असून, त्यातले निम्मे पाकिस्तानात व निम्मे अफगाणिस्थानात आहेत.

पूर्वी हा प्रदेश गंधार या नावाने प्रसिद्ध होता. इ. स. च्या ५ व्या शतकापर्यंत तिथे बौद्ध संस्कृती नांदत होती. पण श्वेत हूणांच्या टोळधाडीमुळे ती नष्ट झाली. त्यानंतर इ. स. च्या ७ व्या शतकात युआन च्वांग या चिनी प्रवाशाला तिथे बौद्ध मठ-मंदिरांचे केवळ भग्नावशेषच पाहायला मिळाले. त्या वेळी

त्या प्रदेशात अनेक हिंदू राज्ये होती. पुढे इ. स. च्या १० व्या शतकात गजनी येथे एका तुर्की मुसलमान राजघराण्याने आपली सत्ता प्रस्थापित केली. त्याच घराण्यातील महमदाने हिंदुस्थान पर्यंत स्वाऱ्या केल्या आणि वायव्य सीमाप्रदेशावर आपली सत्ता स्थापली. त्या वेळी या प्रदेशात इस्लामचा प्रसार सुरू झाला होता. गजनी ते सुलेमान पर्वत या डोंगराळ भागात वस्ती करणाऱ्या लोकांना अफगाण हे नाव मिळाले ते त्याच काळात. त्यांना प्रारंभी गजनीच्या महमुदाच्या आक्रमणाला विरोध केला, पण लवकरच ते सर्व लोक मुसलमान झाले आणि त्यांच्यातील बरेच लोक महमुदाबरोबर हिंदुस्थानात आले.

त्यानंतर सुमारे दोनशे वर्षे सीमाप्रदेशावर गजनीच्या सुलतानांची सत्ता होती. पुढे त्या प्रदेशावर मंगोलांच्या टोळधाडी येऊ लागल्या. पण अफगाण टोळ्यांनी त्यांना खूप उपद्रव दिला. तमूरलंगाच्या सैन्यालाही त्यांनी विरोध केला. इ. स. १४५१ पासून १५२६ पर्यंत दिल्लीवर लोदी नावाच्या अफगाण सुलतानांचे राज्य होते. त्या काळात पुष्कळ अफगाण लोक हिंदुस्थानात येऊन वसले. त्यानंतर मोगल बादशहा बाबर याने सीमाप्रांतावर आपली सत्ता प्रस्थापित केली, पण त्याच्या मृत्यूनंतर अफगाण टोळ्यांनी ती झुगारून देऊन स्वायत्त राज्ये सुरू केली. इ. स. १५४० ते १५५५ या काळात अफगाण सरदार शेरशहा व त्याचे वंशज यांनी दिल्लीवर राज्य केले. त्या काळातही अफगाण लोक मोठ्या संख्येने भारतात आले. मोगल बादशहांना सीमाप्रांतावर संपूर्ण वर्चस्व स्थापण्यात कधीच यश मिळाले नाही.

पुढे नादिरशहाचा एक सेनापती अहमदशाहा याने इ. स. १७४८ मध्ये कंदाहार येथे स्वतःला अफगाणिस्तानाचा सुलतान म्हणून घोषित केले व दुर-इ-दुर्रान ही पदवी घेतली. तो अब्दाली नावाच्या अफगाण टोळीतला असल्यामुळे, त्या टोळीला दुर्रानी हे नाव मिळाले. इ. स. १७६१ साली पानिपतावर मराठ्यांचा पराभव करणारा अहमदशाह अब्दाली तो हाच होय. परत गेल्यानंतर त्याने पेशावरपर्यंत आपली सत्ता स्थापली. पण त्याच्या मृत्यूनंतर अफगाण टोळ्यांत यादवी सुरू झाली आणि त्या परिस्थितीचा फायदा घेऊन पंजाबच्या रणजितसिंगाने सीमाप्रांत जिंकून घेतला. पण त्याची सत्ताही तिथे दीर्घ काळ टिकली नाही. पुढे इ. स. १८४९ साली ब्रिटिश लोकांनी तो प्रदेश आपल्या साम्राज्यात समाविष्ट केला.

अफगाणिस्थानातील सर्व लोकांना अफगाण म्हणतात. पण सीमेवरील डोंगराळ प्रदेशात राहणारे बहुतेक लोक स्वतःला पश्तुन, पुश्तुन, पख्तुन किंवा पुख्तुन म्हणवितात. इ. स. च्या १६ व्या शतकापासून याच लोकांना पठाण हे नाव मिळाले आहे.

पठाण या नावाच्या व्युत्पत्तीविषयी फार मतभेद आहेत. महाभारतात पक्तुन नावाच्या सीमावर्ती लोकांचा उल्लेख आहे. पांडव वनवासात असताना गंधार देशात त्यांना हे लोक भेटले होते. पक्तुन यावरूनच पठाण हे नाव आले असावे, असे काही पंडितांचे मत आहे. ऋग्वेदातही पक्थ शब्द आढळतो.

पठाण लोक स्वतःला इस्राएलचा राजा सौल याचे वंशज मानतात. सौलच्या कुळात कैस नामक एक संत व वीर पुरुष अफगाणिस्थानातील घुर प्रांतात इ. स. च्या ७ व्या शतकात होऊन गेला. त्याच काळात खलिद नामक एक यहुदी गृहस्थ इस्लामचा प्रसार करण्यासाठी अफगाणिस्थानात आला होता. त्याने कैसलाही इस्लामची दीक्षा दिली व मुहंमद पैगंबराच्या भेटीला नेले. पैगंबराने त्याला पथन = नेता ही पदवी दिली. त्या शब्दावरून पठाण हे नाव निर्माण झाले, असेही एक मत आहे. कैसचे वंशज पुढे कंदाहारला गेले आणि तिथून ते पेशावरपर्यंत पसरले. अर्थात ही आख्यायिका फारशी प्राचीन नाही आणि तिला इतिहासात काही आधारही नाही. डॉ. बेल्यूच्या मते पठाण हा अफगाणिस्तानातील पुष्टान शब्दाचा हिंदी अपभ्रंश आहे.



युसूफजई पठाण

आर्य लोक गंधार देशातून पंजाब प्रदेशात आले आणि त्यानंतर यवन, शक, कुशाण, हूण, तुर्की, मंगोल हे सर्व आक्रमक याच प्रदेशातून भारतात शिरले. त्या सर्वांनी या प्रदेशात काही काळ वास्तव्य केले असेल. त्यामुळे त्या सर्व भिन्न भिन्न वंशांचे रक्त एकत्र मिसळून अफगाण किंवा पठाण लोक उत्पन्न झाले आहेत. त्यांची

पुश्तू भाषा संस्कृतोद्भव आहे, असे काही पंडितांचे मत आहे त्या भाषेत संस्कृत शब्द पुष्कळ आढळतात, एवढे मात्र खरे त्यावरून पठाण लोक मुख्यत आर्य वंशाचे आहेत, असे श्री अबदुल कैयुम यांचे मत आहे

पठाण लोकांत जातिभेद नाही, पण पूर्वीपासून त्यांच्या अनेक टोळ्या मात्र अस्तित्वात आहेत आफ्रिदी उस्तरानी, ओरक्जई, काकर, खटक, खलील, गिलजाइ, गंजियानी, गोरई, गोरगस्ती, दिलजाक, दुर्रानी, बंगश, महमदजई, महमूद, माहमद, युसुफजई, राहेला, वजीरी, लोदी, शीरानी, सूर, ही त्यांतील प्रमुख टोळ्यांची नावे आहेत काही टोळ्यांत पोटभेदही आहेत दुर्रानी टोळीच्या आठ व खलालच्या चार उपजाती आहेत

प्रत्येक टोळीत अनेक भिन्न घराणी असतात व त्यांना खेल म्हणतात त्या घराण्याच्या प्रमुखाला मालिक म्हणतात त्यांतील सर्वांत वृद्ध मालिक संपूर्ण टोळीचा सरदार किंवा प्रधान मानला जातो टोळीवर त्याचेच वर्चस्व असते अशा सर्व सरदारांची एक सभा असते, तिला जिरगा म्हणतात पठाणांच्या सर्व जीवनावर या सभेची सत्ता चालते

सर्व पठाण लोक सुन्नी हनफी पंथाचे असून, ते इस्लामचे कडवे अनुयायी आहेत मात्र स्थानिक पीर व फकीर यांना ते अधिक मानतात

सीमाप्रांतातील पठाण लोक मुख्यत शेतीचा व्यवसाय करणारे असले, तरी भारतात आलेले पठाण मुख्यत लष्करी पेशाचे होते पुढे ते व्यापार व सावकारीही करू लागले भारतात ते निर्दय सावकार म्हणूनच प्रसिद्ध आहेत त्यांचा व्याजाचा दर फार असतो आणि कर्जाची वसुली ते अत्यंत कठोरपणे व प्रसंगी बळजबरीनेही करतात

पठाण हे जसे स्वाभिमानी व स्वातंत्र्यप्रिय आहेत, तसेच ते फार हट्टवादी व अंधश्रद्धही आहेत सूडाची भावनाही त्यांच्यात बलवत्तर असते मात्र त्यांच्यातही काही नीतिधर्म दिसून येतो ते फार आतिथ्यशील आणि शरणागतांचे रक्षण करण्यात तत्पर असतात काही पठाण निष्कपटी व निगर्वी असतात वृद्ध माणसांना ते मान ठेवतात हे लोक उद्योगी व कष्टाळू आहेत, तसेच शूर लढवय्येही आहेत आपले कुळ व आपली भाषा यांचा त्यांना फार अभिमान वाटतो

बहुतेक पठाण शरीराने उंच, धिप्पाड व बळकट असून, दिसायला देखणे व गोरे असतात त्यांचे केस लांब असतात त्यावर ते फेटा बांधतात कमरेला रुंद चोळणा, अंगात सैल व लांब अंगरखा आणि त्यावर निळे जाकिट असा त्यांचा पोषाख असतो त्यांच्या खांद्यावर नेहमी एक लहान चादर असते व पायात पठाणी चढाव असतात पठाण स्त्रिया चुणीदार, पाय घोळ चोळणा नेसतात व डोक्यावरून बुरखा घेतात पुरुष व स्त्रिया दोघांनाही डोळ्यात सुरमा घालण्याची आवड असते



अब्दुल गफारखान

दिल्लीच्या पठाण सुलतानांप्रमाणेच बंगाल, रोहिलखंड, पंजाब, इ प्रदेशांवर राज्य करणारे पठाण सुलतान होऊन गेले शेरशाहा हा पठाण बादशहा तर इतिहासात खूपच प्रसिद्ध आहे अफगाणिस्थानचा सध्याचा राजा पठाणांतील दुर्रानी टोळीतला आहे भारतीय स्वातंत्र्यसंग्रामात आघाडीवर लढणारे व सरहद्द गांधी म्हणून प्रसिद्ध असलेले अब्दुल गफारखान हे पठाणच आहेत पाकिस्तानचे अध्यक्ष अयूबखान आणि तेथील अनेक उच्चपदस्थ अधिकारी हे पठाणच आहेत पठाण लोकांत आता शिक्षणाचा प्रसार सुरू झाला असून, ते आपल्या संस्कृतीचा विकास करू लागले आहेत [ गोल्ड अँड गन्स ऑन् दि पठाण फ्रॉन्टियर – श्री अब्दुल कैयुम, १९४५, दि फ्रॉंटियर ट्राइब्स – श्री युनुस मोहमद, १९४२, दि पठाण बॉर्डर लँड–जे डब्ल्यु स्पेन, १९६३, हिं वि को , गु हेगार जानी ]

**पठ्ठे बापूराव** (१८६६–१९४५ इ. स.) अर्वाचीन काळातील एक शाहीर व तमासगीर. यांचे पूर्ण नाव श्रीधर कृष्ण कुलकर्णी असे होते. हे सातारा जिल्ह्यातील रेठरे नामक गावचे राहणार होते. यांचे घराणे भिक्षुकाचे होते. बाळपणापासूनच त्यांच्या कवित्वाचा आणि पहाडी आवाजाची ख्याती झाली होती. त्यामुळे त्यांच्या शिक्षकाने त्यांना औंधच्या राजेसाहेबांकडे पाठविले. राजेसाहेबांनी त्यांची बडोदानरेशांकडे शिफारस करून त्यांना तिथल्या कलाभुवन नामक संस्थेत शिक्षणार्थ ठेवले. बापूरावांनी तिथे एक वर्ष मेकॅनिकल इंजिनिअरिंगचे शिक्षण घेतले व नंतर पोलिसखात्यात नोकरी धरली. ही नोकरी करीत असताना त्यांना तमाशाचा नाद लागला. पुढे त्यांना आपण स्वतःच तमाशा उभारावा असे वाटू लागले. परंतु घरचे वातावरण पूर्ण सनातनी असल्याने त्यांना एकदम या साहसात उडी घेववेना.

याच सुमारास त्यांचे आई वडील निवर्तले आणि त्यामुळे घरचे कर्तेपण त्यांच्याकडे आले. पुढे त्यांनी थोडे दिवस अस्वस्थतेत गेले. मग मात्र त्यांनी तमाशात जाण्याचा निश्चय पक्का धरला व पोलिसखात्यातली नोकरी सोडून ते रेठऱ्याला आले. बापूराव उत्तम लावण्या करतात व गातात, ही गोष्ट अल्पावधीतच गावभर झाली. स्वाभाविकच मग तमासगीर मंडळींनी बापूरावांचा पाठपुरावा केला. बापूराव कुस्तीतही प्रवीण असत. याच वेळी एका कुस्तीसाठी कोल्हापूरच्या शाहूछत्रपतींनी त्यांना दोनशे रुपये इनाम दिले. या पैशातूनच बापूरावांनी आपला तमाशाचा फड उभारला.

पुढील काळात बापूरावांचे कवित्व सर्वांगी बहरले. केवळ लावण्याच नव्हेत, तर जात्यावरच्या ओव्या, गोंधळी वासुदेवासाठी गाणी, भारुडे इ. विविध प्रकारच्या रचना त्यांनी केल्या. तमाशाच्या निमित्ताने बापूरावांना महार–मांग मंडळींत ऊठबस करावी लागे. त्यामुळे सनातनी ग्रामस्थांनी बापूरावांवर बहिष्कार टाकला. पण त्यामुळे बिचकून न जाता त्यांनी उघड उघडच ब्राह्मण्यविरोधी बंड पुकारले. आपल्या एका लावणीत ते स्पष्टच म्हणतात—

**श्रेष्ठवर्ण मी ब्राह्मण असुनी, सोवळे ठेवले घालुनि घडी ।**
**मशाल धरली हाती तमाशाची, लाज लावली वेशीवरी ।।**

यानंतर त्यांनी आपला फड घेऊन सबंध महाराष्ट्रात दौरा काढला. प्रारंभी तमाशात नाचण्यासाठी ताई आणि चंद्रा नामक दोन स्त्रिया त्यांच्याबरोबर होत्या, पण पुढे नामदेव घोलवडकरांच्या फडात नाचणारी पवळा नावाची नर्तकी बापूरावांच्या डोळ्यात भरली व त्यांनी तिला मोठ्या हिकमतीने आपल्या फडात आणले. पवळा ही तत्कालीन तमाशाच्या जगात एक स्वरूपसुंदर नर्तकी गणली जात असे. जातीने ती महार होती. त्यामुळे तिचा आणि बापूरावांचा संबंध ही गोष्ट समाजात खळबळजनक ठरली.



पठ्ठे बापूराव

सनातनी मंडळींनी या गोष्टीचा तीव्र शब्दांत निषेध केला, तर तमाशा शौकिनांनी तिचे स्वागत केले. मग इच्या स्नेहाऊरामय तर त्या उभयतांना नुसते एकत्र पाहण्यासाठी हजारो प्रेक्षकांनी पैसे देऊन गर्दी केली.

पवळाच्या संगतीत बापूरावांच्या तमाशाला नवा बहर आला. ठिकठिकाणी त्यांच्यावर पैशाचा पाऊस पडू लागला. साहजिकच पवळा ही बापूरावांना भाग्यलक्ष्मी वाटली. ते आपला सर्व वेळ तिच्याच सान्निध्यात काढू लागले. तिच्या रूपगुणाचे वर्णन करणाऱ्या अनेक लावण्या त्यांनी रचल्या. एका लावणीत ते म्हणतात—

**सुंदर नार तु ग उभी राहिलीस कवणाची ।**
**गोडी ग लावली तुझ्या बाव या चंचल मृगनयनाची ।**
**तुला घेउ शेलारी खडी बिलवरी ऐंयाची ।**
**कर संग रंगात आली कळि खुलली ग वय याची ।**
**हजारांत फाकडी ग जशी पुतळी ग मदनाची ।**
**तुझी पिवळी कांति ग मुस ओतिली ब्रह्मयाने सोन्याची ।**
**पठ्ठे बापूराव कविची घ्याची सुपारि मानाची ।।**

कालांतराने तर त्यांनी आपल्या लग्नाच्या बायकोला पोटगी देऊन पवळाबरोबरच राजरोस संसार मांडला.

परंतु भरतीच्या लाटेसारखी वाढत जाणारी ही कीर्ती आणि संपत्ती त्याच वेगाने ओसरली. तमाशा व्यवसायातल्या नेहमीच्या पद्धतीनुसार पवळाही लौकरच बापूरावांना सोडून गेली. त्यामुळे तर त्यांच्या तमाशाचा कणाच मोडून पडला. तरीही त्यांनी नवी नर्तकी मिळवून फड चालू ठेवण्याचा प्रयत्न केला. पण एकदा ओहोटीला लागलेला व्यवसाय पुनश्च सावरला नाही व अखेर दीन दरिद्री अवस्थेतच बापूरावांना मरण आले.

पठ्ठे बापूरावांच्या मरणामुळे रामजोशी, होनाजी, प्रभाकर,

इ. शाहीराच्या परंपरेतला अखेरचा शाहीर अस्तंगत झाला मराठी रंगभूमीच्या उत्कर्षासाठा बालगंधर्वांनी जशी पैशाची उधळण केली तशीच तमाशाशाहीसाठी पठ्ठे बापूरावांनी केली ते जितके विलासी होते, तितकेच दिलदार होते पैशाला तर त्यांनी दागिन्यांनी मढवूनच टाकले होते त्यांच्या चैनबाज जीवनाचा त्यांच्या काव्यावरही परिणाम झाला आहे त्यांची भाषा सरळ, सोपी, तशीच रोखठोक आहे आपण एकूण दोन लाख कविता रचली, असे ते सांगतात पण त्यांच्यापैकी फार थोडीच उपलब्ध आहे [ श्री गोविंद तळवलकर– लोकसत्ता, दिवाळी अंक १९५७, ल ना प ]

## पडते

एक जमात या लोकांची वस्ती कारवार, अकोला, कुमठा होनावर व गोवा या भागात आढळते हे लोक मूळचे गोव्यातील असून ते सहा–सात शतकापूर्वी कारवारकडे गेले असावे, असे म्हणतात हे कारवार भागात मीठ तयार करतात ते काम खालच्या वर्गाचे असे समजून तिथल्या वरिष्ठ जातींनी या पडते लोकांना वेगळे मानले व त्यामुळे त्यांची एक निराळी जात झाली, असे सांगतात

या जातीचे कानडी व कोंकणी असे दोन भेद आहेत कानडी लोकांच्या सहा व कोंकणी लोकांच्या तीन पोटजाती आहेत यांची अनेक कुळे आहेत यांच्यात आते–मामे बहिणाशी विवाह करतात हे लोक रामनाथ, वेताळ, मल्लिकार्जुन, इ देवतांना भजतात अलीकडे ते शेती करू लागले आहेत

हे मृतांना जाळतात किंवा पुरतात आणि आश्विन शुद्ध नवमीला महालय करतात [ मु इ जा ]

## पडदापद्धती

स्त्रियांच्या मुखावगुंठनाला पडदा असे म्हणतात कुलस्त्रीने घरात परक्या पुरुषापुढे वावरताना आणि घराबाहेर समाजात वावरताना मुखासह सर्व अंग वस्त्राने झाकून घेण्याची पद्धती काही प्रदेशांत व काही समाजांत रूढ आहे तिला पडदापद्धती असे म्हणतात पडद्यालाच गोषा असे दुसरे नाव आहे

प्राचीन काळी भारतात ही पद्धत अस्तित्वात होती किंवा नव्हती, नसल्यास ती कव्हापासून प्रचारात आली, याबद्दल विद्वानांत मतभेद आहेत त्यातूनच अस्ति - नास्ती असे दो ही प्रकारचे निष्कर्ष निघू शकतात वैदिक आर्यांत पडदापद्धती नव्हती, हे नक्की कारण तसा उल्लेख ऋग्वेदात कुठेही आढळत नाही याउलट स्त्रिया आणि पुरुष एकत्र मिळून खेळत व सामाजिक समारंभात भाग घेत असत, असे मात्र उल्लेख आहेत लग्न झाल्यानंतर त्या नवोढेला समारंभात सर्वांपुढे उपस्थित करण्याचाही कार्यक्रम होत असे त्या विषयीचा एक मंत्र असा—

**सुमङ्गलीरियं वधूरिमां समेत पश्यत ।**

(ऋ १० ८५ ३३)

अर्थ– ही वधू मंगलवती आहे हिला तुम्ही सगळे जमून पाहा

विद्वान स्त्रिया राजदरबारात पुरुष आचार्यांशी शास्त्रार्थ करीत व विद्यालयात अध्यापनही करीत, असे उपनिषदांवरून व धर्मशास्त्रावरून कळते त्यावरून सूत्रकालातही पडदापद्धती अस्तित्वात नव्हती, असे म्हटले पाहिजे

रामायण महाभारतातले काही उल्लेख मात्र पडद्याच्या अस्तित्वाला अनुकूल असा अर्थ दाखवतात रामायणात सीतेच्या बाबतीत पुढील श्लोक लिहिला आहे –

**या न शक्या पुरा द्रष्टुं भूतराकाशगैरपि ।**
**तामद्य सीतां पश्यन्ति राजमार्गगता जनाः ॥**

(वा रा अयोध्या ३ ८)

अर्थ – आकाशसंचारी अशा प्राण्यांनासुद्धा ज्या सीतेचे पूर्वी दर्शन घडत नसे, त्या सीतेला आज राजमार्गावरून जाणारे सर्वसाधारण लोकही पाहत आहेत

महाभारतातही असाच एक प्रसंग वर्णिलेला आहे भारतीय युद्धानंतर धृतराष्ट्र महाप्रस्थानासाठी वनात जायला निघाला असताना कौरवस्त्रियांबद्दल म्हटले आहे, ते असे –

**या नापश्यच्च द्रमा नव सूर्यो रामा कदाचन तस्मिन्नरेन्द्रे ।**
**महावनं गच्छति कौरवेन्द्रे शोकेनार्ता राजमार्गं प्रपेदुः ॥**

(म भा आश्रम १६ १३)

अर्थ – ज्या स्त्रियांना चंद्राने किंवा सूर्यानेही कधी पाहिले नाही, त्या आज कौरवश्रेष्ठ धृतराष्ट्र वनात जायला निघाला असता शोकात होऊन राजमार्गावरून चालत आहेत

पण वरील उदाहरणावरून राजस्त्रिया सहसा लोकांच्या दृष्टीसमोर येत नसत, एवढेच म्हणता येते सर्व स्त्रियांच्या बाबतीत पडदानशीनपणाचा निष्कर्ष त्यावरून काढता येत नाही

स्त्रियांना– विशेषत राजघराण्यातील स्त्रियांना– जनदृष्टीपासून आणि जनसंपर्कापासून दूर ठेवण्याची प्रवृत्ती इ स च्या पहिल्या शतकापासून सुरू झाली, असे दिसते इ स च्या दुसऱ्या शतकात झालेल्या भासाच्या नाटकात पडद्याचा उल्लेख आला आहे त्याच्या प्रतिमा नाटकातली सीता अवगुंठन घेऊन रंगभूमीवर प्रवेश करते स्वप्नवासवदत्तम्‌मधली नायिका पद्मावती हीही विवाहानंतर अवगुंठन धारण करते शूद्रकाच्या मृच्छकटिकातली वसंतसेना ही जेव्हा सभ्य स्त्री बनते, तेव्हा तीही अवगुंठन घेते पण इ स च्या तिसऱ्या शतकापर्यंत ही प्रथा फारशी लोकप्रिय झाली नव्हती व स्त्रियाही तिला विरोध करीत असत, असे दिसते ललितविस्तरात सिद्धार्थाची पत्नी

यशोधरेला दिलेले अवगुंठन दिल्याचा व तिने त्याचा निषेध केल्याचा उल्लेख आहे. त्यावेळी ती म्हणते, की 'ज्याचे शरीर संयत, इंद्रिये सुरक्षित, आचार रागरहित आणि मन प्रसन्न आहे, त्याचे मुख झाकून काय उपयोग?'

इ. स. च्या सातव्या शतकात भारतात आलेल्या युआन च्वांग आणि दहाव्या शतकात आलेल्या अबू जैद या अरब प्रवाशांनी आपल्या प्रवासवर्णनात भारतीय स्त्रिया पडदा वापरीत असल्याचा उल्लेख कुठेही केलेला नाही. हे प्रवासी एवढेच सांगतात, की परपुरुषांशी स्त्रियांचा संबंध येऊ नये, यासाठी स्त्रियांवर काही निर्बंध घातले आहेत आणि राजस्त्रियांसाठी अंतःपुराची व्यवस्था आहे. इ. स. च्या दहाव्या शतकाच्या अखेरीपर्यंत निर्माण झालेल्या सांची, भरहूत, अजंटा, वेरूळ, इ. ठिकाणच्या स्त्रीमूर्तींत व स्त्रीचित्रांत पडदा दाखवलेला नाही. तत्कालीन स्मृतिकारही पडद्याचा उल्लेख करीत नाहीत.

यावरून प्राचीन भारतात पडदापद्धती अस्तित्वात नव्हती, हे स्पष्ट होते. फक्त राजे आणि श्रीमंत यांच्या घराण्यांत विशिष्ट प्रसंगी स्त्रियांनी मुखावगुंठन घेण्याची चाल होती, एवढेच म्हणता येते. भारतावर मुसलमानांची आक्रमणे सुरू झाली, तेव्हापासून भारताच्या काही भागांत पडदापद्धतीचा प्रचार झाला. मुसलमानांत स्त्रियांनी बुरखा घेण्याविषयी आग्रह आहे. स्त्रियांनी आपले सर्व अवयव झाकावे आणि निकटच्या आप्तजनांशिवाय अन्य पुरुषाच्या नजरेला पडू नये, अशी कुराणात आज्ञा आहे. त्या आज्ञेला अनुसरून मुसलमानांत पडदापद्धती सुरू झाली. पुढे तैमूरलंगासारख्या आक्रमकांनी आपल्या स्त्रिया इतरांच्या दृष्टिपथातून दूर ठेवण्याच्या हेतूने पडद्याची चाल अधिक कडक केली.

हिंदू समाजात पडदापद्धतीचा अमल सुरू झाला, तो मुसलमान राज्यकर्त्यांच्या अनुकरणाने. मुसलमानी रियासतीतील हिंदू राजघराणी, सरदार घराणी आणि श्रीमंत कुटुंबे यांनी प्रथम आपल्या घरांत पडदापद्धती सुरू केली. परकीय आक्रमक पुरुषांच्या पापी दृष्टीपासून आपल्या स्त्रियांचे रक्षण व्हावे, म्हणून मग उत्तरेतल्या सर्वसामान्य लोकांनीही पडदा अमलात आणला. इ. स. च्या १५ व्या १६ व्या शतकात बहुतेक सर्व उत्तर भारतात पडदापद्धती जारी झाली. राजस्थानातल्या सर्व राजघराण्यांनीही ती स्वीकारली. एवढेच नव्हे, तर स्त्रियांनी पडद्यात राहणे हे कुलीनतेचे व गौरवाचे लक्षण समजले जाऊ लागले. पण ज्या प्रदेशात मुसलमानी सत्ता प्रभावी ठरली नाही, त्या प्रदेशात मात्र पडदापद्धती प्रचारात आली नाही. आजही दक्षिण भारतात पडदापद्धती अस्तित्वात नाही.

**पडद्याचे दुष्परिणाम** – *पडदापद्धतीमुळे स्त्रियांच्या शीलाचे* रक्षण काही प्रमाणात झाले असेल, पण इतर अनेक बाबतीत मात्र पडद्याने स्त्रीजीवन विकृत करून टाकले आहे. पडदानशीन स्त्रियांना बाहेर जाताना तर बुरखा घ्यावा लागतोच, पण घरातही मोकळेपणाने वावरता येत नाही. अशा या जागेत आणि चार भिंतींत कोंडून राहावे लागत असल्यामुळे त्यांना मोकळी हवा आणि सूर्यप्रकाश यांचा लाभ होत नाही. त्यामुळे त्यांना क्षय, रक्तक्षय यांसारख्या व्याधी सहजपणे जडतात. या व्याधी न जडल्या तरी त्यांचे आरोग्य कधीच ठीक राहत नाही. त्या पांढऱ्या फिकट दिसतात. शरीराच्या अनारोग्याचा परिणाम *त्यांच्या मन बुद्धीवरही होतो. त्या संकुचित व क्षुद्र मनोवृत्तीच्या* बनतात. अशा रीतीने मानवी जीवनाचे अर्धे अंग निकामी व भारभूत होते.

सांप्रत पडदापद्धतीचे असे अनेक दुष्परिणाम डॉक्टरवैद्यांच्या व समाजसुधारकांच्या निदर्शनास तीव्रतेने आले आहेत. त्यामुळे पडद्याविरुद्ध प्रचारही चालू झाला आहे. अलीकडे मुलींची *लग्ने मोठ्या वयात होतात. तोवर त्या शाळा व विश्वविद्यालये यांतून शिकतात व समाजातही मोकळेपणे वावरतात. अशा मुली* जेव्हा लग्न होऊन सासरी जातात, तेव्हा त्या पडद्यात वागायला साहजिकच नाखूष असतात. त्यामुळे आता हळूहळू पडद्याची चाल नष्ट होण्याच्या मार्गाला लागली आहे. [ हिं मा नू रु, पा वी हिं मि, भा सा इ, व सा ना ]

## पडि–उत्सव

केरळातला एक सामाजिक उत्सव. तिथल्या काही मंदिरांतील देवांना हत्तीवर बसवून त्यांची गावातून मिरवणूक काढतात. घराघरचे लोक पडी नावाच्या मापातून धान्य, तांबूळ, गूळ, इ. पदार्थ देवाला अर्पण करतात. त्यावरून या उत्सवाला हे नाव पडले असावे.

## पडियार

एक जात. या लोकांची वस्ती कर्नाटकातील कानडा जिल्ह्यात आहे. पडी म्हणजे धान्य मोजण्याचे एक माप, यावरून त्यांना हे नाव मिळाले, असे सांगतात. जातीबाहेर टाकलेल्या स्त्रियांपासून ही जात बनली, असे समजतात. या *जातीतील मुली देवदासी पद्धतीने राहतात आणि नाचगाणे करतात. त्यांच्यातले पुरुष त्यांना साथ करतात.* व्यंकोबा हा त्यांचा कुलदेव आहे. म्हैसूरच्या हविकरनामीला ते आपला धर्मगुरू मानतात. यांना मद्य मांस चालते. [ मु इ जा ]

## पणव

प्राचीन काळी उपयोगात आणले जाणारे एक चर्मवाद्य. जातकांत आणि संस्कृत वाङ्मयात या वाद्याचा

अनेक ठिकाणी उल्लेख आढळतो प्राचीन काळी कुरु लोक



पणव

रणवाद्य म्हणून याचा उपयोग करीत [क हि वा पु ]

**पणियन** द भारतातील एक आदिवासी जमात हे लोक मुख्यत मलबार व नीलगिरी या प्रदेशात वसलेले आहेत हे लोक काळे, ठेंगू, रुंद नाकाचे व कुरळ्या केसाचे असून, ते आफ्रिकेतून इकडे आलेले आहेत, असे एक मत आहे

पणियन या शब्दाचा अर्थ मजूर असा आहे गेल्या शतकात युरोपियन मळेवाल्यांनी या लोकांना जमिनीबरोबरच विकत



पणियन पुरुष

घेतले आणि गुलामासारखे आपल्या मळ्यावर राबवले पूर्वी शेती हाच यांचा व्यवसाय होता सध्याही पुष्कळसे लोक शेतीच करतात ते उत्तम शिकारी व मच्छीमारही आहेत लाकूड कापणे व हत्ती पकडणे हे उद्योगही काही लोक करतात

यांच्यात मुले वयात आल्यानंतर त्यांचे लग्न करतात मुलाचे आईबाप त्याच्यासाठी मुलगी पसंत करतात लग्न पक्के झाल्यावर मुलगा आपल्या नियोजित वधूच्या घरी सहा महिनेपर्यंत रोज एक लाकडाचा भारा नेऊन टाकतो यांचा विवाहविधी अगदी साधा असतो एखादा जमीनदार पणियन लग्नात पौरोहित्य करतो नवरामुलगा वधूच्या आईवडिलांना सोळा नाणी व नवे कपडे देतो त्याच्या नातेवाईक स्त्रिया वधूच्या गळ्यात ताली बांधतात पुरोहित वधूवराच्या मस्तकावर व पायावर पाणी घालतो आणि विवाहविधी पुरा होतो लग्नात मोठी जेवणावळ होते आणि स्त्रिया नृत्य करतात



पणियन स्त्री

हे लोक शिव, शास्ता, भगवती, गणपती, इ देवताप्रमाणेच पशू, वृक्ष, भुतेखेते यांनाही भजतात यांचा देव एखाद्या झाडाखाली पाषाणाच्या रूपात स्थापलेला असतो प्रसंगविशेषी त्याला ते भाताचा व नारळाचा नैवेद्य दाखवतात व त्याच्यापुढे दक्षिणाही ठेवतात

हे लोक पितळ, तांबे, इ मिश्र धातूंच्या आंगठ्या बोटात घालतात तमिळ तुळू व मलयाळम यांचे मिश्रण होऊन यांची भाषा बनली आहे पण पुष्कळजण कन्नड भाषा बोलतात

हे लोक प्रेत पुरतात व तिथे थोडा भात ठेवून, वरती चटई टाकतात. मृताला शांती मिळावी म्हणून काही धार्मिक विधी करण्याचीही चाल यांच्यात आहे. [का. द्रा. सं. इ., द्रा. के.]

**पणी** एक प्राचीन आर्येतर जनसमूह. यास्काने आपल्या निरुक्तात 'पणिर्वणिग्भवति' = पणी म्हणजे व्यापार करणारा, पण्याची अर्थात विक्रेय द्रव्याची विक्री करणारा असा त्याचा अर्थ दिला आहे. 'पणयः वणिजः' = पणी म्हणजे व्यापारी होत, असे सायणाचार्यांनीही म्हटले आहे. व्यापार करणे या अर्थी असलेले पण व वण हे शब्द मुळात जलवाचक आहेत. त्यावरून पणी हे जलमार्गाने व्यापार करणारे व पाण्याशी सतत संबंध ठेवणारे लोक होते, असे अनुमान निघते.

दास व दस्यु यांच्या खालोखाल पणी हे वैदिक आर्यांचे शत्रू होते. ऋग्वेदात पणींविषयी वर्णन आहे, ते असे—

**न्यक्रतून ग्रथिनो मृध्रवाचः पणींरश्रद्धां अवृधां अयज्ञान ।**
**प्रप्र तान् दस्यूरग्निर्विवाय पूर्वश्चकारापरां अयज्यून ।।**

(ऋ. ७. ६. ३)

अर्थ — यज्ञविरोधक, आवळलेल्या गाठींचे, चमत्कारिक भाषा बोलणारे (नाकात बोलणारे), अश्रद्ध, कंजूष, भक्तिहीन आणि (देवांची) उपासना न करणारे, अशा पणींना अग्नीने हाकलून टाकले. अग्नीने त्यांच्यासमोर जाऊन त्या यज्ञ न करणाऱ्या दुष्टांना मागे पिटाळून नष्ट केले.

पणींची संपत्ती आर्यांच्या उपयोगी पडत नसल्यामुळे व ते यज्ञही करीत नसल्यामुळे वैदिक आर्यांच्या डोळ्यांत ते सलत होते. म्हणून त्यांनी पणींना मारण्याविषयीही देवांची प्रार्थना केली आहे—

**जही न्यत्रिणं पणिं वृको हि षः ।**

(ऋ. ६. ५१. १४)

अर्थ — खादाड, कंजूष व दुष्ट अशा पणींचा तुम्ही नाश करा.

**परि तृंधि पणीनामारया हृदया कवे । अथेमस्मभ्यं रंधय ।**

(ऋ. ६. ५३. ५)

अर्थ — हे पूषा देवा, तू आपल्या आरीच्या टोकाने पणींची हृदये टोचून विंधून टाक आणि अशा प्रकारे त्यांना आमच्या अधीन कर.

ऋग्वेदातील अनेक उल्लेख एकत्र केले असता पणींविषयी पुढील माहिती मिळते—

पणी हे पुरांत राहत असत. त्यांची पुरे मजबूत तटबंदीची असत. त्यांची घरे शतदुर म्हणजे शंभर दरवाज्यांची, मोठी व प्रशस्त असत (ऋ. ७. ९९. ३). ती घरे सुखसोयींनी व चैनीच्या वस्तूंनी समृद्ध असत. पणींची संपत्ती आणि समृद्धी तीन प्रकारची होती— (१) गायी, घोडे व इतर पशुधन, (२) धान्याचे साठे व (३) सोने, मौल्यवान मणी, रत्ने व तशाच इतर वस्तू.

पणीजवळ विपुल पशुधन होते. त्यांच्यापाशी विविधरंगी गायींचे मोठमोठे कळप होते. त्यांच्याकडे घोडेही पुष्कळ होते. सिंधु-पंजाबमधील उत्खननाच्या प्राथमिक अवस्थेत घोड्यांचे अवशेष सापडले नसल्यामुळे आर्यांच्या पूर्वी भारतात वसलेल्या लोकांजवळ घोडे नसावे आणि आपल्या समर्थ अश्वशक्तीच्या जोरावर आर्यांनी त्यांना पादाक्रांत केले असावे, असा काही विद्वानांचा समज झालेला होता. पण तो समज खोटा आहे, हे वेदांतल्या पणींच्या वर्णनावरून कळते (ऋ. १. ८३. ४). सिंधूच्या पुढच्या काळातल्या प्रदेशातल्या उत्खननात घोड्यांचे सापळे सापडले आहेत.

पणी हे जसे व्यापारी तसेच शेतकरीही होते. ते लोकांना पुरून उरेल इतके धान्य पिकवीत व त्याचे साठे करून ठेवीत (ऋ. १. १३०. १, २. ३१. ३, ३. २. ७ इत्यादी). ते नद्यांचे प्रवाह अडवून आपल्या शेतांत पाणी आणीत. क्षेत्र आणि उर्वर अशी त्यांची दोन प्रकारची शेते होती. ती नद्यांच्या काठावरच होती.

त्यांच्याजवळची धनसंपदा ही सोने आणि मौल्यवान खडे या जातीची होती. ही संपदा आश्चर्य करण्याइतकी मोठी होती (ऋ. १. ४८. १, ९. ११०. ९). ते विलासीपणाने त्या संपत्तीचा उपभोग घेत. त्यांच्यातल्या स्त्रियांनाच नव्हे, तर पुरुषांनाही सोन्याचे आणि मणिरत्नांचे अलंकार घालून मिरवण्याची हौस होती (ऋ. १. १२२. २८, १. ३३. ८).

पणींची पुरे बहुधा नदीतीरावर असत. पुराचे पाणी नगरात शिरू नये म्हणून ते उंच जोते उभारून त्यावर घरे बांधीत. शहराभोवती खंदक खणून त्यांत पाणी भरून ठेवीत. त्यामुळे शत्रूंना त्यांच्यावर हल्ला करणे कठीण जात असे. नद्यांना बांध घालण्यातही ते पटाईत होते. पणींनी अडवलेले नद्यांचे प्रवाह वैदिक आर्यांनी त्यांना मारून मोकळे केले, असे जे उल्लेख ऋग्वेदात वारंवार येतात, त्यावरून पणींनी पाटबंधारे घालण्याची विद्या सूचित होते. पणींचा एक कुयव नावाचा राजा होता. त्याचे निवासस्थान तर तीन नद्यांच्या प्रवाहांनी घेरलेले होते. या तीन नद्या स्वतंत्र नसून, त्या शिफा नदीच्या तीन शाखा होत्या, असे म्हणतात.

पणी लोक नौकानयनातही तरबेज असावे व लहानमोठ्या नावांतून त्यांचा दूर देशी व्यापार चालत असावा, असे दिसते. व्यापारधंद्यासाठी हिंडताना त्यांच्यातले कित्येक गट लोकांच्या गायींची खिल्लारेही चोरून आणीत. या चोरीच्या आणि लुटीच्या प्रकरणांतून त्यांना वारंवार लढाया करण्याचेही प्रसंग येत. त्या लढायांत काही वेळा त्यांचा जय होत असला, तरी बऱ्याच वेळा

याना आर्यांकडून मारच खावा लागे सरस्वती नदीने त्याचा वारंवार पराभवच केला' असे ऋग्वेदात वर्णन आहे (६ ६१ १) त्यावरून सरस्वतीच्या तीरावर पणींचा जबरदस्त पराभव झाला आणि तो दिवोदासाने केला असे कळून येते

**पणींचे व वैदिक आर्यांचे संबंध** — पणींना वैदिक आर्य आपले शत्रू मानीत ते पणींचा उच्छेद करण्याबद्दल वारंवार देवतांची प्रार्थना करीत आणि स्वत ही वेळोवेळी त्यांच्यावर धाडी घालीत पणींनी अंगिरांच्या गायी पळवल्या आणि त्यांचा शोध घेण्यासाठी इंद्राने सरमा नावाच्या दूतीला पणींकडे पाठवले, असे वर्णन ऋग्वेदात आहे सरमा पणींचा संवाद ऋग्वेदात प्रसिद्ध आहे

इंद्राने गायींच्या शोधार्थ पाठवलेली सरमा ही दूती अफाट अशा रसा नदीचे पात्र ओलांडून पणींच्या निवासस्थानी गेली आणि त्यांना म्हणाली 'मी तुम्ही पळवलेल्या धेनू हस्तगत करण्यासाठी इंद्राच्या आज्ञेने इथे आले आहे' पणींनी तिला विचारले 'तुझा तो इंद्र आहे तरी कसा ?' सरमा म्हणाली 'इंद्र खराखरी कसा आहे, ते मला समजलेले नाही मी इतकेच जाणते, की तो अपराध्यांना शासन करतो तुम्ही गायी चोरून अपराधी ठरला आहा, म्हणून तो तुम्हाला जमिनीवर लोळवील'

सरमेचे अशा प्रकारचे आत्मविश्वासाचे बोलणे ऐकून पणी तिला म्हणाले 'तुला आम्ही बहीण समजू तू आता परत न जाता इथे आमच्याकडेच राहा' त्यावर सरमा बोलली 'तुमचा भाऊपणा मला नको तुम्ही आता इथून चालते व्हा म्हणजे तुम्ही अडवून ठेवलेल्या गायी बाहेर येतील तुमची आगळीक आता इंद्राला आणि अंगिरसांना कळली आहे' (ऋ १० १०८)

पण ही गायींची खिल्लारे लुबाडून आणण्याची गोष्ट पणीपेक्षा वैदिक आर्यांनीच अधिक प्रमाणात केली आहे, असे ऋग्वेदातल्या अनेक उल्लेखावरून कळून येते पणींचे गोधन लुटण्यापासूनच आर्यांनी त्यांच्याशी संघर्ष सुरू केला (ऋ १० १८३ १) गायी पळवून आणण्यासाठी अशी जी युद्धे केली जात, त्यांना गोषुयुधम् किंवा गोसाता असे म्हटले आहे (ऋ १ ११२२, ८ ८४ ७) या युद्धात आर्यांना पणींच्या सहस्रावधी गायींचा लाभ होत असे

प्राथमिक आर्यजनांपैकी अंगिरसांचे कुल हे जबरदस्त महत्त्वाकांक्षी होते अग्निप्रयोग करून शत्रूचे सर्वस्व लुटण्यात आणि जाळण्यात अंगिरस कुलातले लोक मोठे पटाईत असावे पेटलेल्या चुड्या घेऊन ते पणींवर चाल करून जात अंगिरांनी प्रथम शत्रूचे अन्न आणि नंतर त्यांचे पशुधन लुटून आणले, असे वर्णन ऋग्वेदात आहे (ऋ १० १८३ ४) वैदिक आर्य हे केवळ पणींचे पशुधन लुटीत असे नव्हे, तर त्यांचे धान्यसाठेही लुटून नेत हे अन्नाचे साठे लुटण्यासाठी जी युद्धे केली जात त्यांना वाजसाता असे म्हटले आहे (ऋ १ १३० १)

आर्यांचा व पणींचा असा अनेक शतके संघर्ष चालू होता, असे दिसते या संघर्षात पणींची खूप हानी झाली त्यांची पुरे जळाली, संपत्ती नष्ट झाली आणि तो समाजही विस्कळित झाला कित्येकांना आर्यांचे दास्यही पत्करावे लागले पुढे पणीमधले काही लोक दक्षिण भारतात जाऊन बसले काही लोक हिमालयाच्या पायथ्याशी जाऊन राहिले, तर काही पूर्व भारतात गेले पूर्वेकडे गेलेल्या पणींच्या बद्दल श्री नगेंद्रनाथ चौधरी पुढील माहिती देतात —

जे पणी आर्यांचे दास्य स्वीकारायला तयार नव्हते, ते करतोया नदी ओलांडून कामरूप देशात गेले त्या भागात सगळीकडे दाट जंगले असून, त्यात रानटी लोकांची वस्ती होती त्या लोकांच्या सहवासात राहिल्यावर कालांतराने पणी स्वतःची संस्कृती विसरून गेले सांप्रत ते पणिकोच या नावाने ओळखले जातात भागवत पुराणात एका ठिकाणी पणींना निवातकवच असे म्हटले आहे त्यातील कवच शब्दाचा अपभ्रंश कोच असा होऊन त्यांना पणिकोच असे जोडनाव पडले असावे

जे पणी आर्यावर्तात राहिले, ते आर्यजनांशी मिसळून गेले त्यांपैकी काही जनांनी आर्यांची भाषा व संस्कृतीही स्वीकारली अशा लोकांपैकी बृबू नावाच्या एका उदार पुरुषाबद्दल ऋग्वेदात गौरवपर अशी ऋचा आली आहे—

> **अधि बृबु पणीनां वर्षिष्ठे मूर्धन्नस्थात ।**
> **उरु कक्षो न गाङ्ग्य ।।**
> **यस्य वायोरिव द्रवद् भद्रा रातिः सहस्रिणी ।**
> **सद्यो दानाय मंहते ।।**
>
> (ऋ ६ ४५ ३१–३२)

अर्थ — मोठा विस्तीर्ण वृक्ष उगवावा, त्याप्रमाणे गंगेच्या तटाकावर राहणारा बृबू नावाचा पुरुष पणींच्या कुलात शिरोभागी जाऊन बसला आहे त्याची कल्याणकारक अशी हजारो प्रकारची औदार्यवृत्ती उत्तम प्रकारे (सत्पात्री) दान करता यावे म्हणून वायूप्रमाणे एकदम जोराने वाहत असते

आर्यावर्तात आर्यांची सत्ता सर्वत्र प्रस्थापित झाल्यानंतर त्यांनीही पणींशी मिळते घेतले असावे आर्य ऋषी पणींकडून दानाची अपेक्षा करीत व पणीकडून त्यांना ती फार मोठ्या प्रमाणावर मिळत असेही दिसते

**पणींची ओळख** — पणी कोण होत, याविषयी विद्वानांमध्ये एकवाक्यता नाही ऋग्वेदात त्यांना असुर म्हटले आहे काही विद्वान असे मानतात, की ते आशियाच्या पश्चिम सीमेवरच्या फिनीशिया या देशाचे रहिवासी होते प्राचीन काळी फिनी

शियन्स हेही पणीप्रमाणेच व्यापारी व सावकारी करणारे होते आणि त्यांचा व्यापार भूमध्यसमुद्राच्या तीरावरील प्रदेशामध्ये चालत होता. पणी आणि फिनी यांत वर्णसाम्यही आढळते. यावरूनही पणींचा फिनिशियन्सशी संबंध जोडता येतो. काही विद्वान याच वर्णसाम्यावरून त्यांना प्युनिक ठरवतात. पणींच्या मूलस्थानाचा शोध घेण्यासाठी रशियात जावे लागेल, असे श्री. अ. ज. करंदीकर लिहितात. याविषयी त्यांच्या प्रतिपादनाचा सारांश असा–

पणींच्या संदर्भात बलाचा उल्लेख येतो. बलाचा रशियाशी संबंध असल्याचे उघडकीस आल्यानंतर पणींचाही शोध त्याच देशात करणे योग्य होईल, या कल्पनेने रशियातील माहिती चाळून पाहताना सायबेरियातील ओबी नदीच्या उगमापासून लापलंडच्या बर्फाच्छादित भागापर्यंतच्या विस्तृत आणि विरल वस्तीच्या प्रदेशात फिन्नीक वंशाच्या आठ विभिन्न टोळ्या निवास करीत होत्या असे कळून आले. ऋग्वेदातील पणींशी ज्या सरमेने वाद निर्माण झाला आहे, तिच्या नावाशी सदृश अशा सरमाशियन कुळाची वस्ती फार प्राचीन काळी उरालपर्वतात होती, असे गॉर्डन चाइल्ड यांनी दाखविले असून, अवेस्ता ग्रंथानेही इराणच्या वायव्येला सैरीमा प्रांत असल्याचा उल्लेख येत असल्याने, सरमा आणि पणी यांच्या सुप्रसिद्ध संवादाचे स्थळही त्याच भागात असले पाहिजे.

भारतात वसत असलेले आणि ऋग्वेदात उल्लेखिलेले पणी हे हडप्पा संस्कृतीचे लोक असल्याचे सांगून डॉ. अ. म. अळतेकर त्याविषयी पुढील प्रतिपादन करतात–

वेदातले पणी व हडप्पा संस्कृतीचे लोक हे एक असण्याची शक्यता आहे. निदान त्यांच्यापैकी एक वर्ग तरी सिंधुप्रदेशात राहत होता व हडप्पा संस्कृती त्यानेच निर्माण केली, असे दिसते. पणी हे व्यापारी, व्याजबट्टा करणारे व अत्यंत धनिक होते, अशी ऋग्वेदात वर्णने आहेत. हडप्पा संस्कृतीचे लोकही अगदी याच प्रकारचे लोक होते. उत्खननात या लोकांची धनाढ्यता कळून आली आहे. श्री. घोष यांनी केलेल्या संशोधनात घग्घर नदीच्या तीरावर हडप्पा संस्कृतीचे अवशेष सापडले आहेत. ही घग्घर म्हणजेच ऋग्वेदकालीन सरस्वती नदी होय. तिच्याच किनाऱ्यावर वैदिक आर्यांनी पणींचा फार मोठा पराभव केला होता (ऋ. ६. ६१. १). यावरून सरस्वतीच्या काठी पणींचे वास्तव्य असल्याचे सिद्ध होते. ऋग्वेदात सरस्वतीला लोहनगरी असे म्हटले आहे (७. ९५. १). यावरून असा निष्कर्ष निघतो, की सरस्वती ही काही काळ आर्य व पणी यांच्या प्रदेशाची सीमा असावी. हरियूपिया या नगरीत इंद्राने आर्य ऋषीच्यासाठी ज्या शत्रूंचा विनाश केला (ऋ. ६. २७. ५–६), ते शत्रू कदाचित हडप्पा संस्कृतीचेच लोक असण्याची शक्यता आहे. रूपड, आलमगीर, गिरनगर व इतरही काही हडप्पा संस्कृतीची केंद्रे आर्यांनी जिंकली, त्या वेळी सरस्वती नदीच्या नैर्ऋत्य दिशेच्या हडप्पा लोकांनी आर्यांचे आधिपत्य मान्य केले असावे. ते व्यापाराने मुबलक प्रमाणावर धन संचय करीत असल्यामुळे त्यांना कंजूष म्हटले गेले असावे. ऋग्वेदात वर्णिलेल्या दाशराज्ञ युद्धातही पणींनी भाग घेतला असण्याची शक्यता आहे.

पणींचे व हडप्पा संस्कृतीच्या लोकांचे सादृश्य व साधर्म्य श्री. अ. ना. देशपांडे यांनी पुढीलप्रमाणे दाखवून दिले आहे –

पणींनी मुख्यतः समुद्रावरून दूर देशी व्यापार करून धन मिळवले होते. पणी हे नावच त्यांच्या सागरी व्यापाराचे सूचक आहे. सिंधुपरिसरातील उत्खनित अवशेष अभ्यासून पाहता असे दिसते, की वाणिज्यविद्येतील प्रावीण्य हे त्या सैंधव (हडप्पानिवासी) लोकांचेही प्रमुख वैशिष्ट्य आहे. त्यांनी समुद्रमार्गे सुमेर, इजिप्त, क्रीट, या देशांशी व्यापारी संबंध जोडले होते. सुमेरमध्ये सिंधुवासीयांच्या व्यापाराच्या मुद्रा सापडल्या आहेत. वेदांतील पणींजवळ बहुविध आणि मुबलक पशुधन होते, तसेच ते धान्यजवळही होते, अशी उत्खननातून स्पष्ट साक्ष मिळते. सिंधुपरिसरातील उत्खननात धान्याची मोठाली कोठारे सापडली आहेत. ऋग्वेदातील आर्यांनी आपल्या शत्रूला 'शिश्नदेवा' म्हणजे लिंगपूजक असे संबोधले आहे. सिंधुपरिसरातील उत्खननातही लिंगाच्या आकाराचे दगड उपलब्ध झाले आहेत. 'वृषाकपि' हा आर्यपूर्वांचा देव होय. नासिकाग्र हे त्याचे मुख्य चिन्ह आहे. सिंधूच्या उत्खननात मिळालेल्या देवांच्या मूर्तींत एक वानराचीही मूर्ती आहे. तीन शिरे व सहा डोळे असलेला विश्वरूप नावाचा आर्यांच्या शत्रूंचा एक देव होता, अशी माहिती ऋग्वेदात मिळते. सिंधुसंस्कृतीतील लोकांचाही त्रिमुखी आणि डोक्यावर शिंगांचा टोप घातलेला असा एक देव होता, अशी माहिती त्या संस्कृतीच्या अवशेषांतून प्राप्त होते. हडप्पा येथील उत्खननातून तिथल्या शहराचे व तटबंदीचे जे दर्शन घडते, ते ऋग्वेदातील वर्णनाशी अत्यंत जुळणारे असे आहे. वैदिक आर्यांनी पणींची शहरे चुडण्या लावून जाळली, असे ऋग्वेदात नमूद आहे. सिंधूच्या उत्खननात असा जळालेला दरवाजा उपलब्ध झाला आहे. ऋग्वेदातील हरियूपिया हे शहर म्हणजेच हडप्पा होय. हे दोन भागांत विभागलेले असल्याचे वेदांत म्हटले आहे, तर हडप्पाही दोन विभागांत विभागलेले आणि मजबूत तटबंदी असलेलेच उत्खननात सापडले आहे. [व. इ., वै. आ. ज्यो. वै. दे. पु., ऋ. आ., श्री. प्र. रा. देशमुख – नवभारत, डिसें. १९५७, नवभारत, फेब्रु. १९६०, आ. आ. दे.]

**पतंग** एक खेळ. पातळ कामट्यांना कागद चिकटवून पतंग बनवितात. त्यातील एक कामटी उभी असते, तिला तिडडा म्हणतात. दुसरी कामटी कमानीसारखी वाकवितात, तिला कमान म्हणतात. खाली लांब पातळ शेपटी जोडतात. हा पतंग आकाशात उंच उडता यावा, म्हणून त्याला लांब दोरा बांधतात. पतंग आकाशात उंच उडविणे एवढाच यातला आनंद नसतो, तर आपल्या दोरीने दुसऱ्याचा पतंग काटणे व त्यावर विजय मिळविणे हाही त्यातला एक आनंद असतो. दुसऱ्याचा पतंग काटण्यासाठी दोरा धारदार असावा लागतो. त्यासाठी त्याला मांजा लावतात. मांजा म्हणजे काचेची बारीक पूड करून ती भात अथवा तत्सम चिकट पदार्थांत घालून केलेले मिश्रण. पतंग उडविता यावा म्हणून तिडडा व कमान ज्या बाजूला असेल त्याच्या विरुद्ध बाजूला किन्ना बांधतात. याचे दोन धागे असून, ते तिडड्याला दोन जागी बांधतात आणि मग त्यांची टोके लांब दोऱ्याला जोडतात.

पतंगाचे अनेक प्रकार व आकार आहेत. त्यांना पंचुडी, चापट, अड्डा, पाण्या, ताऱ्या अशी वेगवेगळी नावे आहेत.

उत्तर भारतात हा खेळ विशेष लोकप्रिय आहे. महाराष्ट्रात साधारणतः मुलेच पतंग उडवितात, परंतु गुजरातमध्ये मोठी माणसेही या खेळात हिरीरीने भाग घेतात. त्याच्या स्पर्धाही होतात. दिवाळीपासून पतंगाचा हंगाम सुरू होतो, तो संक्रांतीपर्यंत चालतो. संक्रांतीचा दिवस हा मुख्य दिवस असतो. त्या एका दिवशी सामान्य माणूसही या खेळासाठी शक्य तेवढी पदरमोड करतो.

अनेक शतकांपूर्वीपासून हा खेळ भारतीयांना परिचित आहे. जगातल्या अनेक देशांमध्ये हा खेळ खेळला जातो. बेथोल्ड लाफेट याच्या मते हा खेळ चीनमधून भारतात आला. मोगलांच्या काळात पतंग खेळण्याची कला पराकोटीला गेली. भारत, चीन, जपान, मलाया, सयाम व कोरिया या आशियातील देशांमध्ये या खेळाला महत्त्वाचे स्थान आहे. मलायातील पतंगांना शेपटी नसते, तर चीन व जपानमधील पतंगांना पक्षी, मासा, पशू, साप यांचे आकार दिलेले असतात.

शास्त्रीय संशोधनात पतंगाचा उपयोग बराच होत असे. बेंजॅमिन फ्रँकलिन याने पतंगाच्या दोरीच्या खालच्या टोकाला लोखंडाचा तुकडा बांधून ढगातली विद्युल्लता पृथ्वीवर आणली. मार्कोनीनेही बिनतारी संदेश हजारो मैल दूर पाठवण्याचा प्रयोग प्रथम केला, तेव्हा त्या कामी मोठ्या पतंगाचा उपयोग केला होता. हवेचा दाब, उष्णता, आर्द्रता व वेग यांचा अभ्यास करण्यासाठी पतंगाचा उपयोग केला जात असे. दूरस्थळी संदेश पाठविण्यासाठी, तसेच उंचावरून फोटो घेण्यासाठीही पतंगाचा उपयोग करतात. [हिं. वि. को.; व्या. ज्ञा. को. खंड १ ला, ॲं. गा. ओ. रि. इ., १९५६]

**पतंग प्राजापत्य** एक सूक्तद्रष्टा. ऋग्वेदाच्या १० व्या मंडलातले १७७ वे सूक्त याच्या नावावर आहे. हा प्रजापतीचा आवडता पुत्र होता. याने निर्माण केलेल्या सामामुळे उच्चैःश्रवस कौपेयाला मरणानंतर पुनः शरीर प्राप्त झाले, अशी कथा आहे. त्याच्या सूक्तातील एक ऋचा अशी –

> पतङ्गमक्तमसुरस्य मायया
> हृदा पश्यन्ति मनसा विपश्चितः ।
> समुद्रे अन्तः कवयो वि चक्षते
> मरीचीनां पदमिच्छन्ति वेधसः ॥
>
> (ऋ. १०. १७७. १)

अर्थ – हा पतंग (= परमात्मरूप पक्षी किंवा सूर्य) आपल्या ईश्वरी मायेने (अतर्क्य शक्तीने) व्याप्त असल्याने, जे उत्तम ज्ञानी आहेत ते त्याला केवळ आपल्या हृदयाच्या संवेदनेने युक्त अशा मनानेच ओळखतात; कवी म्हणजे जे गूढ कल्पनांतरंगांत निमग्न असतात, तेही (विश्वरूपी) समुद्राच्या उदरातच त्याला पाहतात आणि जे विधाते (= स्वायंभुवादी) असतात, ते मात्र त्याच्या प्रकाशस्थानाच्या प्राप्तीची इच्छा धरतात.

याने सूर्याचे वर्णन पतंग या नावाने केल्यामुळे या ऋषीला पतंग हे नाव मिळाले असावे. [प्रा. च. को.]

**पतंजली** (सनपूर्व दुसरे शतक). व्याकरणमहाभाष्याचा कर्ता, योगदर्शनाचा प्रणेता व आयुर्वेदातल्या चरकपरंपरेचा जनक. भारतात होऊन गेलेल्या अग्रगण्य विद्वानांत पतंजलीची गणना होते. म्हणूनच त्याला नमन करताना भर्तृहरीने आपल्या वाक्यपदीय ग्रंथाच्या प्रारंभी पुढील श्लोक लिहिला आहे –

> योगेन चित्तस्य पदेन वाचां मलं शरीरस्य च वैद्यकेन ।
> योऽपाकरोत्तं प्रवरं मुनीनां पतञ्जलिं प्राञ्जलिरानतोऽस्मि ॥

अर्थ – योगाने चित्ताचा, पदाने (व्याकरणाने) वाणीचा व वैद्यकाने शरीराचा मल ज्याने दूर केला, त्या मुनिश्रेष्ठ पतंजलीला मी अंजलिबद्ध करून नमस्कार करतो.

पतंजली हा गोनर्द ग्रामाचा रहिवासी होता. याच्या मातेचे नाव गोणिका असे होते. पित्याचे नाव मात्र उपलब्ध नाही. पं. रामचंद्र दीक्षित यांनी पतंजलिचरित या नावाने त्याचे चरित्र लिहिले आहे. त्यात पतंजलीला शेषाचा अवतार मानून त्याविषयी आख्यायिका दिली आहे. ती अशी –

एकदा श्रीविष्णू शेषशय्येवर निद्रित असताना शंकराने तांडव नृत्य सुरू केले. विष्णूची निद्रा त्या वेळी गाढ नसल्यामुळे साह-

जिकडे त्याने त्या शिवनृत्याकडे लक्ष गेले. ते नृत्य पाहत असता विष्णूला इतका आनंद झाला, की तो त्याच्या देहात मावेना. म्हणून त्याने आपला देह वाढविण्यास सुरुवात केली. विष्णूचा देह वाढताच शेषाला त्याचा भार असह्य झाला. तो आपल्या सहस्र मुखांनी फूत्कार टाकू लागला. त्यामुळे लक्ष्मी घाबरली. तिने विष्णूला हालवून जागे केले. तो जागा होताच शेष जिकडे त्याचा देह आकुंचित झाला. शेषाने मग निःश्वास सोडला. तो विष्णूला म्हणाला, 'आज तुम्ही माझी परीक्षा पाहायचे ठरवले होते काय ?' त्यावर विष्णूने शेषाला शिवाच्या तांडव नृत्याचे कलात्मक श्रेष्ठत्व विशद करून सांगितले. शेष म्हणाला, 'मलाही ते नृत्य एकदा पाहायचे आहे.' त्यावर विष्णूने त्याला सांगितले, 'तू पृथ्वीवर पुन्हा एकदा अवतार घे, म्हणजे त्या अवतारात तुला शिवतांडव पाहता येईल.'

तदनुसार शेष निघाला व अवतार घेण्यासाठी योग्य ठिकाण शोधू लागला. त्यात गोणिका नावाची स्त्री पुत्रप्राप्तीसाठी तप करीत असलेली त्याला दिसली. शेषाने मनोमन तिला मातृरूपात स्वीकारायचे ठरवले. मग ती ओंजळ भरून सूर्याला अर्घ्य देत असता शेष सूक्ष्म रूपाने तिच्या ओंजळीत पडला. तिने ओंजळीतले पाणी खाली टाकताच तो बालकरूपाने तिच्यापुढे उभा झाला. गोणिकेने त्याला आपला पुत्र मानून उचलून घेतले. ती त्याला म्हणाली, 'तू माझ्या अंजलीतून पतन पावलास, म्हणून मी तुझे नाव पतंजली असे ठेवते.'



पतंजली– काल्पनिक चित्र

पतंजली बाल्यावस्थेतच अध्ययन करू लागला. मग तो तपाला बसला. त्याने शिवाला प्रसन्न करून घेतले. शिवाने त्याला चिदंबरक्षेत्री आपले तांडव नृत्य दाखवले. मग त्याने त्याला आदेश दिला, की 'तू पदशास्त्रावर भाष्य लिही.' तदनुसार चिदंबरम येथेच राहून पतंजलीने पाणिनीची सूत्रे व कात्यायनाची वार्तिके यांच्यावर विस्तृत भाष्य लिहिले. ते महाभाष्य या नावाने प्रसिद्ध झाले.

**अध्यापन –** महाभाष्याची ख्याती ऐकून हजारो पंडित पतंजलीकडे त्याच्या अध्ययनासाठी येऊ लागले. पतंजली एका पडद्याच्या आड बसून शेषनागाच्या स्वरूपात एकाच वेळी त्या शतसहस्र शिष्यांना ते शिकवू लागला. त्याने सर्व शिष्यांना अशी सक्त आज्ञा दिली होती, की कोणीही पडद्याच्या आत डोकावू नये. पण एकाच वेळी हजारो शिष्यांना एकटा मनुष्य वेगवेगळे पाठ कसे शिकवू शकतो, याचे विद्यार्थ्यांमध्ये कुतूहल जागृत झाले. ते शमविण्यासाठी त्यांनी एके दिवशी पडदा उघडला. तेव्हा सहस्रमुख अशा शेषनागाच्या रूपात पतंजली सर्वांना अध्यापन करीत आहे, असे त्यांना दिसले. पण त्या शेषनागाचे तेज इतके ज्वलंत होते, की त्या तेजामुळे ते सगळे शिष्य एकदम जळून गेले. जो एकटा पाणी आणण्यासाठी म्हणून बाहेर गेला होता, तो तेवढा वाचला. पतंजलीने आपले महाभाष्य लायक शिष्यांना शिकवण्याचा आदेश त्याला दिला. मग पतंजली चिदंबर क्षेत्रातून निघाला व गोनर्द ग्रामी आला. तिथे आपल्या मातेचे दर्शन घेऊन तो परत आपल्या शेषरूपात प्रविष्ट झाला.

**अन्य ग्रंथ –** महाभाष्याप्रमाणेच आयुर्वेदाची चरकसंहिताही पतंजलीने लिहिली, असे म्हटले आहे. चरकसंहितेचे मूळ नाव आत्रेयसंहिता असे आहे. चरक ही कृष्ण यजुर्वेदाची एक शाखा होती. तिच्या अनुयायांनाही चरक असेच म्हणत. चरक लोक सामान्यपणे आयुर्वेदज्ञ, मांत्रिक व नागोपासक होते, अशी प्रसिद्धी आहे. पतंजली हा त्याच शाखेचा असावा, असे म्हणतात. चरकसंहिता जरी अग्निवेशाच्या नावावर असली, तरी पतंजलीने तिच्यावर प्रतिसंस्कार केला असावा, याविषयी बहुतेक विद्वानांचे एकमत आहे. पतंजलीला आयुर्वेदाची चांगली जाणकारी होती, हे त्याच्या महाभाष्यावरूनही कळून येते. महाभाष्यात शरीररचना, शरीरसौंदर्य, शरीरविकृती, रोगनिदान, औषधिविज्ञान यांविषयी अनेक ठिकाणी अनेक उल्लेख आलेले आहेत.

तीच गोष्ट योगसूत्रांची. योगसूत्रेही त्यानेच रचली, अशी प्रसिद्धी आहे. पण भाष्यकार, योगसूत्रकार व चरकसंस्कर्ता असा एकच पतंजली असावा, हे अनेक विद्वानांना मान्य नाही. ते भिन्न काळातले भिन्न पतंजली असले पाहिजेत, असा त्यांचा तर्क आहे. पण डॉ. प्रभुदयाल अग्निहोत्री यांना हा तर्क मान्य नाही. योगसूत्रात अपप्रयोग नाहीत, सूत्रांच्या अर्थासाठी अध्याहारांची गरज भासत नाही आणि त्यांची रचनाशैली महाभाष्याप्रमाणेच स्पष्ट व प्रासादिक आहे. त्यावरून महाभाष्यकर्ता हाच योगसूत्रांचाही कर्ता आहे, असे ते मानतात. अन्य कोणत्याही दार्शनिकाच्या तुलनेने योगसूत्रकार हा श्रेष्ठ प्रतीचा वैयाकरण दिसतो. चक्रपाणी या एका प्राचीन टीकाकारानेही वरील तीनही ग्रंथांचा कर्ता पतंजली, एकच व्यक्ती असल्याचे पुढील श्लोकाने सूचित केले आहे–

पातञ्जलमहाभाष्यचरकप्रतिसंस्कृतैः ।
मनोवाक्कायदोषाणां हर्त्रेऽहिपतये नमः ॥

अर्थ – योगसूत्रे, महाभाष्य, आणि चरकसंहितेचे प्रतिसंस्करण या तीन कृतींनी अनुक्रमे मन, वाणी आणि देह यांच्या दोषांचा निरास करणाऱ्या पतंजलीला माझा नमस्कार असो.

द्विवेदी यांनी चरक शब्दाचा आणखी एक वेगळा अर्थ सांगितला आहे. ते म्हणतात– अध्ययन संपल्यावर पतंजली काही काळ चरक म्हणजे भ्रमणशील झाला होता. निरनिराळ्या देशांत आणि गावांत हिंडून त्याने पाणिनी–कात्यायनांच्या पश्चात संस्कृत भाषेच्या शब्दप्रयोगांत जी परिवर्तने घडून आली व रूढ झाली त्यांचे अध्ययन केले व त्यांचे निरूपण करण्यासाठी इष्टी या नावाने नवे काही नियम निर्माण केले.

श्री. अ. ज. करंदीकर हे चरक याचा चर अर्थात हेर असा अर्थ घेऊन पतंजलीविषयी पुढील संभावना व्यक्त करतात – पतंजली हा प्रथम चर अथवा हेर या नात्याने लोकांत संचार करीत असावा. तसे असल्यास अर्थशास्त्रात वर्णिलेल्या सत्री नावाच्या हेरांत त्याचा समावेश झालेला असला पाहिजे. पितृहीन व आप्तहीन असल्यामुळे ज्यांना अवश्य पोसावे लागते, अशा मुलांना (तरुणांना) सामुद्रिक, मुखपरीक्षा, जादूविद्या, वशीकरण, आश्रमधर्म, शकुनविद्या इ. गोष्टी शिकवून त्यांच्यातून सत्री म्हणजे संसर्गाने अथवा समागमाने वृत्तसंग्रह करणारे हेर निवडावे, असे चाणक्याने अर्थशास्त्रात सांगितले आहे. पतंजलीला गोणिकापुत्र म्हणून ओळखतात. तेव्हा त्याचा बाप अकाली निधन पावला असावा आणि त्यामुळे पतंजलीला कोणाचा आधार उरला नसावा. त्यामुळे सत्री नामक गुप्तचरांमध्येच त्याचे शिक्षण झाले असावे किंवा याने आपण होऊन तो साहसी व्यवसाय पत्करला असावा.

**पतंजलीचे जन्मस्थान–** पतंजलीच्या जन्मस्थानाबद्दलही वाद आहेत. पतंजलीने कात्यायनाला दाक्षिणात्य म्हटले आहे, त्यावरून तो उत्तरभारताचा रहिवासी असावा, हे कळते. गोनर्द हे त्याचे गाव वर सांगितलेच आहे. पण गोनर्द कुठे आहे याविषयी भिन्नभिन्न मते आहेत. डा. भांडारकर गोनर्द म्हणजे गोंडप्रदेश असे समजतात. ते स्थान अवधप्रदेशात असावे, असे काही पंडित मानतात. वेबर ते मगधाच्या पूर्वेस असल्याचे मानतो. कनिंगहॅम हा गोनर्द म्हणजे गोंड असे समजतो. पण पतंजली हा आर्यावर्ताचा अभिमानी होता, त्यावरून आर्यावर्तातच कुठेतरी त्याचे गाव असले पाहिजे, हे निश्चित होते. त्या दृष्टीने गोनर्द हे विदिशा व उज्जैन यांच्यामध्ये कुठेतरी असले पाहिजे, असा निष्कर्ष निघतो. प्रो. सिल्व्हाँ लेव्ही यांच्या मतेही गोनर्द हे विदिशा व उज्जैन यांच्या वाटेवरच आहे. त्यांनी असेही दाखवून दिले आहे की विदिशेच्या शेजारी असलेल्या सांचीच्या बौद्ध स्तूपाला आसपासच्या बहुतेक सगळ्या गावांतल्या लोकांनी दान दिल्याचा उल्लेख आढळत असून, त्यांत गोनर्द ग्रामांतल्या लोकांची नावे मात्र आढळत नाहीत. या गोष्टीबद्दल त्यांनी आश्चर्यही व्यक्त केले आहे. पण यावरून असे अनुमान निघते, की गोनर्दाचे लोक कट्टर बौद्धविरोधक असावे. अशा बौद्धविरोधकांच्या केंद्रात पतंजली वाढला, ही घटना त्याच्या चरित्राच्या दृष्टीने महत्त्वाची आहे.

**पुष्यमित्राशी संबंध–** मौर्यसम्राट बृहद्रथाचा वध करणाऱ्या पुष्यमित्र शुंगाचा पतंजली हा समकालीन होता. त्या दोघांचा परिचय नव्हे, तर परस्पर मित्रभावही असल्याचे पतंजलीच्या महाभाष्यावरून सूचित होते. पतंजलीने व्याकरणाची परीक्षा पाटलिपुत्रात दिली, अशी परंपरा आहे. तिथेच पुष्यमित्र आणि पतंजली यांचा स्नेह निर्माण झाला असावा. बौद्ध बनून वैदिक धर्माला विरोध करणाऱ्या मौर्य कुलाचा उच्छेद करून भारतात पुनश्च वैदिकधर्मी राज्याची प्रस्थापना करण्याचे बेत त्या दोघांनी तिथेच केले असावे. या दृष्टीने श्री. अ. ज. करंदीकर यांनी पतंजलिविषयक आख्यायिकांना ऐतिहासिक अर्थ लावण्याचा प्रयत्न केला आहे तो असा–

विष्णूने आपले शरीर फुगवले आणि ते शेषाला असह्य झाले याचा सरळ अर्थ असा आहे, की पृथ्वीपतिरूपी विष्णूने अर्थात मौर्य सम्राटाने आपल्या अधिकारमर्यादांचे केलेले अतिक्रमण पतंजलीप्रमाणेच मध्यभारतातील सर्व नागकुलोत्पन्नांना असह्य झाले होते. पतंजलीचा आणि नागकुलाचा घनिष्ठ संबंध होता, असे दिसते. कारण पतंजलीला नागाचाच अवतार मानले आहे. या नागांनी पुष्यमाणव या नावाची एक संघटना पुष्यमित्राच्या नेतृत्वाखाली निर्माण झाली असावी, असे ' महीपालवचः श्रुत्वा जुघुषुः पुष्यमाणवाः ' = महीपालाचे ( राजाचे ) वचन ऐकून पुष्यमाणव प्रक्षुब्ध झाले, या महाभाष्यातील श्लोकार्धावरून सूचित होते. ही कल्पना श्री. प्रभातचंद्र चक्रवर्तींपासून डा. वासुदेवशरण अग्रवाल यांच्यापर्यंत अनेक विद्वानांनी स्वीकारली आहे. पुष्यमित्राबरोबर पतंजलीनेही या संघटनेचे नेतृत्व केले असावे.

पुष्यमित्र व पतंजली हे दोघेही वैदिक धर्माचे, तसेच संस्कृत भाषेचे पुरस्कर्ते होते. पुष्यमित्राने दोन अश्वमेध केले होते आणि त्यांत पतंजलीने पौरोहित्य केले होते. पतंजलीने व्याकरणमहाभाष्य लिहून तर संस्कृतभाषेला गौरवाच्या शिखरावर नेऊन बसवले. त्यामुळे पाली अर्धमागधीसारख्या बौद्ध जैनांच्या धर्मभाषाही मागे पडल्या. 'संस्कृत आणि अपभ्रंश शब्दांनी सारखाच अर्थ व्यक्त होत असला, तरी धार्मिक दृष्ट्या संस्कृत

शब्दाचाच उपयोग करावा, कारण तसे केल्याने अभ्युदय होतो, असे पतंजलीने म्हटले आहे. याचा इष्ट अर्थ हा की अपभ्रंश शब्द ज्ञान असताना ते वापरल्यामुळे लोकांमध्ये भिन्न गटागटातून विभक्तपणाची भावना बळावत जाते. उलटपक्षी संस्कृताला चिकटून राहिल्याने परंपरेला स्थैर्य लाभून एकराष्ट्रीयत्वाची भावना दृढमूल होते. त्या काळी पतंजलीने व पुष्यमित्र यांनी केलेल्या संस्कृत भाषेच्या पुनरुद्धारामुळेच रामायण–महाभारतादी महान ग्रंथांचा अखिल भारतात सामान्यतः एकाच स्वरूपात प्रचार होऊन भारतात एकराष्ट्रीयत्व आतापर्यंत टिकून राहिले.

**अभ्युदयाचा पुरस्कर्ता** – पतंजलीला मोक्षाइतकेच ऐहिक अभ्युदयाचे महत्त्व वाटत होते. बौद्ध धर्माने अभ्युदय या ध्येयाकडे नुसते दुर्लक्षच केले होते असे नव्हे, तर प्रत्यक्षपणे अभ्युदयविरोधी धोरण स्वीकारले होते. अभ्युदयाचा संबंध इहलोकाशी म्हणजेच पर्यायाने वर्तमानकाळाशी येतो. बौद्धांनी शब्दच्छल करून वर्तमानकालाचे अस्तित्वच अमान्य केले होते आणि जनसमुदायाचा बुद्धिभेद चालवला होता. पतंजलीने बौद्धांच्या अशा अनेक वर्तमानकालविरोधी वचनांचे खंडन करून वर्तमानकालाचे अस्तित्व सिद्ध केले आहे. बौद्धांचा वर्तमानकालविरोध हा यज्ञविरोधी प्रचाराचाच एक भाग होता. त्यासाठी ' इह पुष्यमित्रं याजयामः ' = इथे (आम्ही) पुष्यमित्राकडून यज्ञ करवीत आहोत, हे विशिष्ट वाक्य पतंजलीने वर्तमानकाळाचे उदाहरण म्हणून दिले आहे.

महाभाष्य ही पतंजलीची अजरामर रचना आहे. भारतात अनेक भाष्ये निर्माण झाली. नंतर शंकराचार्य, रामानुज, सायण, इ. महान आचार्यांनी ती निर्माण केली. पण या सर्व भाष्यांत पतंजलीचे हे एकच भाष्य महाभाष्य ठरले. व्याकरणातली सूक्ष्मातिसूक्ष्म रहस्ये या महाभाष्याच्या द्वारे उलगडली जातात. त्याचप्रमाणे या ग्रंथात शब्दाच्या व्यापकतेवर प्रकाश टाकून स्फोटवाद नावाच्या एका नव्या तात्त्विक सिद्धांताचा पाया पतंजलीने घातला आहे. अनादी, अनंत, अखंड, अज्ञेय, स्वयंप्रकाश, इ. नाना विशेषणांनी युक्त असे शब्दब्रह्मच सृष्टीचे आदिकारण आहे, असे पतंजली मानतो. पाहा – महाभाष्य [ प्रा. का. भा., म. भा. इ., पा. पा. या. सं., अ. का., हिं. वि. वा.]

## पतित

सदाचारापासून किंवा स्वधर्मापासून जो च्युत होतो, तो पतित होय. पतितामध्ये सर्व प्रकारची पापे करणाऱ्यांचा समावेश होतो. मार्कंडेय पुराणात याचे एक लक्षण दिले आहे, ते असे–

**स्वधर्मं यः समुत्सृज्य परधर्मं समाश्रयेत ।**
**अनापदि स विद्वद्‌भिः पतितः परिकीर्तितः ॥**

अर्थ – स्वधर्माचा त्याग करून संकटकाल नसताना जो परधर्माचा आश्रय करतो, त्याला विद्वानांनी पतित म्हटले आहे.

चांडाल स्त्रीशी संग केल्याने किंवा तिच्याशी लग्न केल्याने ब्राह्मण पतित होतो, असे म्हटले आहे. तसेच पतित माणसाबरोबर एक वर्षभर झोपल्याने, जेवल्याने, जाण्याने, बसल्याने किंवा बोलल्यानेही माणस पतित बनतो, असे मनूने म्हटले आहे ( ११.१८० ). पतित लोक मेल्यावर त्यांना जाळू नये. त्यांची अंत्येष्टी किंवा अस्थिसंचय करू नये, त्यांच्याविषयी शोक करू नये किंवा त्यांना पिंडदानही करू नये, असे ब्रह्म पुराणातील शुद्धितत्त्वात सांगितले आहे.

जो पतित असेल, मग तो प्रत्यक्ष गुरु असला तरी, त्याचा त्याग करावा, पण स्वतःची माता जर पतित झाली, तर तिचा मात्र त्याग करू नये, असे मत्स्य पुराणात सांगितले आहे. [श. क., पु. ट., धर्मशास्त्रविचार]

## पतितपरावर्तन

पतिताला शुद्ध करून घेणे. बहुतेक सर्व पापांची निष्कृती प्रायश्चित्तामुळे होते, अशी कल्पना आहे. ब्राह्मणांना दाने दिल्यानेही सर्व पापांचा नाश होतो. पाहा – धर्मांतर, प्रायश्चित्त [ धर्मशास्त्रविचार ]

## पतितसावित्रीक

ज्याचे उपनयन झाले नाही आणि त्यामुळे ज्याला गायत्रीमंत्राचा उपदेश मिळाला नाही, अशा त्रैवर्णिक पुरुषाला पतितसावित्रीक असे म्हणतात. आश्वलायन गृह्यसूत्रात या विषयी म्हटले आहे, ते असे–

**आ षोडशाद् ब्राह्मणस्यानतीतः कालः आ द्वाविंशात् क्षत्रियस्य चतुर्विंशाद्वैश्यस्यात ऊर्ध्वं पतितसावित्रीका भवन्ति ।**

( आश्व. गृ. सू. १.१९.५–६ )

**अर्थ** – ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य यांचा उपनयनकाल अनुक्रमे सोळा, बावीस आणि चोवीस वर्षांपर्यंत असतो. त्याचा अतिक्रम झाल्यास त्याला मंत्राचा अधिकार राहत नाही. त्यामुळे त्याचे उपनयनही होऊ शकत नाही.

पतितसावित्रीक हे पातकी असून, त्यांचे उपनयन करू नये, त्यांना वेद शिकवू नयेत, त्यांच्याशी विवाहसंबंधही करू नये व त्यांच्याकडून यज्ञ करवू नयेत, असे वसिष्ठ म्हणतो ( ११.७८–७९ ) [ हिं. ध., धर्मशास्त्रविचार ]

## पति-पत्नी

धार्मिक किंवा शासनमान्य अशा विवाहसंस्काराने गृहस्थाश्रम चालविण्यासाठी व प्रजोत्पादनासाठी एकत्र आलेल्या स्त्री पुरुषांना पतिपत्नी अशी संज्ञा आहे. यांनाच दंपती असे दुसरे नाव आहे. ' जाया च पतिश्चदम्पती '

= भार्या व पती मिळून दंपती, असा त्याचा विग्रह आहे. दम = घर + पती = स्वामी, अर्थात घराचे समान अधिकाराचे स्वामी, असा याचा अर्थ होतो.

मानवी जीवनात पति पत्नीचे नाते हे अत्यंत मधुर असे आहे. ते जितके कोमल तितकेच चिवट आहे. यात केवळ शारीरिक आकर्षणच नसते, तर त्याच्याभोवती अनेक मधुर भावनांचे जाळे विणलेले असते. कुटुंब वत्सलता त्यातूनच प्राप्त होते. त्या दोघांच्या अनुरागानेच सगे परिवारातील अनेक नातेसंबंध निर्माण होतात. पति पत्नींच्या नात्यात केवळ कामपूर्तीच अपेक्षित नसते, तर धर्म व अर्थ यांच्या साधनाचीही अपेक्षा असते आणि हे त्रिविध पुरुषार्थांचे साधन त्या दोघांची परस्पर अनुरूपता आणि अनुकूलता असली, तरच शक्य होते. म्हणूनच विवाहबंधनात एकत्र आलेले हे दोघे मनानेही एक असावेत. एकमेकास अनुकूल व एकमेकांचे न्यून ते पूर्ण करणार असावे अशी सार्वत्रिक समजूत आहे. ऋग्वेदापासून ती दृष्टोत्पत्तीस येते. त्याविषयी एक मंत्र आहे तो असा–

**या दम्पती समनसा सुनुत आ च धावत ।**
**देवासो नित्ययाशिरा ।प्रतिप्राशव्या इत सम्यञ्चा बर्हिराशाते ।**
**न ता वाजेषु वायत ॥**

(ऋ. ८.३१.५–६)

अर्थ – जे पति पत्नी मनःपूर्वक सोमरस पिळून सिद्ध करतात आणि हे देवांनो, तो रस निर्भेळ दुग्धहवनीशी (मिश्र करून) गाळून स्वच्छ करतात, त्या उभयतांना उत्तम अन्न प्राप्त होते. त्यांचा एक विचार निश्चल राहतो व यज्ञ शेवटास जातो. सत्त्व सामर्थ्यात त्यांना कधीच उणीव पडत नाही.

अथर्ववेदात पति पत्नीच्या संबंधात अत्यंत मनोरम भाव प्रदर्शित केले आहेत, ते असे–

पति पत्नी परस्परांचे अवलोकन प्रेमयुक्त दृष्टीने करोत. एकाला पाहून दुसऱ्याला आनंद होवो. पति पत्नींच्या मनात एक दुसऱ्याला पाहताच, द्वेषभाव किंवा तिरस्कार उत्पन्न होईल अशी भावना कधीही असू नये. त्या दोघांचा दृष्टिकोन शुद्ध पवित्र आणि निर्दोष असावा. कोणाच्याही दृष्टीने अपवित्रता नसावी. सामान्य पाण्यानेसुद्धा डाग पवित्र व शुद्ध होतात. त्याप्रमाणे ज्ञानानेसुद्धा दृष्टीत पवित्रता येते. पतीने स्वतःच्या हृदयात पत्नीला उत्तम स्थान द्यावे. तिथे धर्मपत्नीशिवाय दुसऱ्या कोणाला स्थान असू नये. त्याचप्रमाणे पत्नीनेसुद्धा पतीला स्वतःच्या हृदयात स्थान द्यावे व धर्मपतीशिवाय अन्य कोणा पुरुषाचे स्थान तिथे नसावे. पति पत्नींनी एकमेकांना आपल्या हृदयात स्थान द्यावे. पति पत्नींची मने परस्परांशी मिळालेली असावीत. ती कधीही विभक्त होऊ नयेत. त्यांतील कोणी एक व्यक्ती दुसऱ्याशी प्रतारणा न करो व स्वतःचे मन अन्य कोणाकडे जाऊ न देवो (अथर्व. ७.३६).

**समान अधिकार** – वैदिक युगात पति पत्नीच्या समानतेविषयी अनेक उल्लेख आढळतात. ऋग्वेदात एका ठिकाणी तर पत्नीला पतीचे अर्धांगच मानले आहे (ऋ. ५.६१.८). तैत्तिरीय ब्राह्मणामध्ये अर्धो वा एष आत्मनो यत्पत्नी = पत्नी ही पतीच्या आत्म्याचे अर्धे अंग असे म्हटले आहे (तै. ब्रा. ३.३.३.५). प्रजापतीने स्वतःचे द्विधा विभक्त रूप केले. एका विभागाला पती आणि दुसऱ्या विभागाला पत्नी नाव देऊन म्हणून पति पत्नी हे द्विदल धान्याच्या डाळीप्रमाणे समान आहेत, अशी कथा शतपथ ब्राह्मणात दिलेली आहे (१४.४.२.४.१). वाजपेय यज्ञात स्वर्गारोहणाचे प्रतीक म्हणून सतरा पायऱ्यांच्या शिडीवर चढून यूपाच्या टोकापर्यंत जायचे असते. त्याजवळ यजमान आपल्या पत्नीलाही आपल्याबरोबर न्यावयाचे (श. ब्रा. ५.२.१.१०). सूत्रकालातही त्याच प्रकारची समानतेची भावना दृग्गोचर होते.

**जायापत्योर्न विभागो विद्यते । पाणिग्रहणाद्धि सहत्वं कर्मसु ।**
**तथा पुण्यफलेषु । द्रव्यपरिग्रहेषु च ॥**

(आप. ध. सू. २.१४.१६–१९)

अर्थ – पति पत्नीत विभाग दिसत नाही. पाणिग्रहणाने कर्माच्या ठिकाणी सहभाव येतो. त्याप्रमाणे पुण्याचे फल आणि द्रव्य व्यवहार यातही सहभाव असतो.

महाभारतात शकुन्तला दुष्यन्ताला भार्येचे महत्त्व पटवीत असताना सांगते ते असे–

**अर्धं भार्या मनुष्यस्य भार्या श्रेष्ठतमः सखा ।**

(म. भा. आदि. ७४.४१)

अर्थ – पत्नी ही पतीचे अर्धांग आहे. पत्नी हा पतीचा श्रेष्ठतम मित्र आहे.

पुरुषाला जी तीन ऋणे फेडायची असतात, त्यापैकी यज्ञात सहकार्य करून देवऋण व पुत्रोत्पत्ती करून पितृऋण फेडण्यात पत्नीची मदत होते, म्हणून धर्मशास्त्रकारांनी पत्नीला संसारात फार महत्त्व दिले आहे.

इ. स. च्या पहिल्या शतकापर्यंत भारतीय समाजात प्रौढ विवाह रूढ होते. त्या काळात स्त्रियांचे उपनयनही होत असे. अर्थात त्या काळी स्त्रियांना शिक्षणाचाही लाभ होत असे. त्यामुळे लग्नाच्या वेळी ती वयाने मोठी, शिक्षित व सुसंस्कृतही असे. त्यामुळे पतीला बरोबरीच्या नात्याने आणि संसारातला एक समान जोडीदार या भावनेने तिच्याशी वागणे शक्य होत असे. पण त्यानंतर परिस्थिती बदलली. प्रौढविवाहाच्या जागी बालविवाह सुरू झाले. मग विवाह हाच स्त्रियांचा उपनयनसंस्कार, पती हाच तिचा गुरू आणि पतिगृह हेच तिचे गुरुकुल अशी धारणा

समानस्तरावर ना ठरू दिले गेले याामुळे तीही मागासलेली मागे राहिली नाही

बालविवाहाची प्रथा रूढ झाल्यामुळे पती मोठ्या वयाचा, ती अल्पवयीन, अशिक्षित व अननुभवी असे. त्यामुळे पतीला तिच्याशी मित्रभावाने वागणे अशक्य वाटू लागले. त्यामुळे पतिपत्नी गृहस्थाश्रमात पूर्वकालीन पत्नीप्रमाणे तिला मानाची वागणूक मिळणे दुरापास्त झाले. पतिर्हि देवो नारीणां पतिर्बन्धुः पतिर्गतिः = स्त्रियांना पती हाच देव, तोच बंधू आणि तोच गती, असा आदेश धर्मशास्त्राने दिला. पती हाच स्त्रीचे सर्वस्व ठरविण्यात आले आणि अशा प्रकारे पत्नीचे स्थान तिच्या भाग्याशी लावले गेले.

**पतीचे अधिकार** – हिंदू कुटुंबपद्धतीत पतीला राजासारखे निरंकुश अधिकार प्राप्त आहेत. आपस्तंब धर्मसूत्रावर टिप्पणी लिहिताना हरदत्त म्हणतो– स्वामी भार्यायाः गृहे यथा राजा राष्ट्रे = जसा राष्ट्रामध्ये राजा तसा कुटुंबामध्ये पती हा स्वामी असतो. सामान्यतः स्त्री ही शारीरिक दृष्ट्या पुरुषापेक्षा दुबळी असते आणि मातृत्वाच्या जबाबदारी पार पाडताना व समाजात वावरत असताना तिला संरक्षणाची जरूरी असते. पत्नीला हे संरक्षण पतीकडूनच मिळायचे असते. पतीने ते तिला दिले आणि त्यातूनच पुढे स्वामित्वाची कल्पना निर्माण झाली. त्या कल्पनेमुळे पती हा पत्नीचा स्वामी, धनी ठरला. पत्नीच्या या पारतंत्र्यातली पुढील कारण घडली, असे दिसून येते–

(१) पत्नी ही आर्थिक दृष्ट्या पतीवर अवलंबून असते. तिचे भरण–पोषण पतीलाच करावयाचे असते, म्हणूनच पती हा पत्नीचा भर्ता ठरला आहे. महाभारतात म्हटले आहे, ते असे–

**भार्याया भरणाद् भर्ता पालनाच्च पतिः स्मृतः ।।**

(म. भा. आदि. १०४. ३०)

अर्थ – पत्नीचे भरण करीत असल्यामुळे भर्ता आणि पालन करीत असल्यामुळे पती असे म्हटले जाते.

प्राचीन काळच्या स्त्रियांनी हे परावलंबन लाचारीने न हे, पण आपली ताकद व मर्यादा ओळखून खुषीने स्वीकारले होते.

(२) बालविवाह रूढ झाल्यामुळे लग्नात मुलगी ही अगदी कोवळ्या वयाची असे. पती किंवा सासरची माणसे जसे संस्कार करतील तशी ती पुढे वाढत असे. पती हा पूज्य आणि पती हाच परमेश्वर, असे संस्कार सासरी व माहेरी तिच्या मनावर बिंबवले गेल्यामुळे तिने पतिपराधीनता एक धर्म म्हणून स्वीकारली. शतकानुशतके ती कुढत राहिली, पण तिने आपल्या स्वातंत्र्याचा पुकारा कधीच केला नाही. तिच्या या पतिपरायण वृत्तीतूनच पतीच्या अधिकाराला अधिक बळ मिळाले.

(३) उपनयन बंद झाल्यामुळे तिला विद्येचा अधिकार व शिक्षणाची सोय उरली नाही. आपण शिकले पाहिजे, असे स्त्रीला स्वतःला कधी वाटले नाही आणि ती ज्ञानसंपन्न व्हावी, असे पुरुषानेही कधी मनात आणले नाही. ही ज्ञानपराङ्मुखताही तिच्या पतिपराधीनतेला कारणीभूत झाली.

पत्नीचा त्याग करण्याचा, तिला पणाला लावण्याचा, घरातून घालवून देण्याचा व दान करण्याचा अधिकारही धर्मशास्त्रकारांनी पतीला देऊन टाकला आहे. मित्रसह राजाने आपली पत्नी मदयंती ही वसिष्ठाला दान दिल्याची कथा त्याचप्रमाणे युवनाश्व राजानेही आपल्या स्त्रियांचे दान केल्याची कथा महाभारतात आहे (म. भा. शांति. २३४). युधिष्ठिराने स्वतःच्या मालकीची एक वस्तू म्हणून द्रौपदीला द्यूतात पणाला लावले, ही कथा सुप्रसिद्ध आहे. वैदिक युगात पत्नी ही धनाच्या संपत्तीपैकी एक वस्तू नव्हती. पण पुढच्या काळात पत्नीला पतीची संपत्ती म्हणून समजण्यात येऊ लागले. आपत्काळी पतीने पत्नीचे खुशाल दान करावे, अशीही सवलत पतीला मिळाली. कौटिल्याने आपल्या अर्थशास्त्रात दंडाची रक्कम चुकती करण्यासाठी धन, पुत्र आणि पत्नी यांचेही दान उचित मानले (३. १६. ३). पत्नी ही मालकीची वस्तू ठरल्यानंतर तिला ताडन करण्याचा अधिकारही पतीने घेतला. मनुवादी स्मृतिकारांनी पतीचा हा अधिकार नाकारला नाही, तर फक्त कशाने मारावे, कुठे मारावे आणि किती मारावे, याविषयीचे काही निर्बंध घातले.

या अधिकारामुळे पति–पत्नीच्या सामाजिक अवस्थेत फारसे अंतर पडले नाही. पण विधवाविवाहाचा निषेध झाल्यावर मात्र दोघांमधले वैषम्य खूप वाढले. पतीला पत्नीचा त्याग करण्याचाही अधिकार मिळाला. बौधायनाने पतीची सेवा न करणारी, स्वैरिणी व पतिघातिनी अशा पत्नीच्या त्यागाचे विधान केले आहे. गर्भघातिनी, हीनवर्ण पुरुषाशी संबंध करणारी, शिष्यगामिनी, मद्यपी व संसाराची उधळमाधळ करणारी अशा पत्नीचा त्याग करावा, असे हारीताने सांगितले आहे. मात्र त्याग याचा अर्थ पत्नीला घरातून घालवून देणे असा नसून, तिच्याशी संभोग, संस्पर्श, संभाषण व सहधर्माचरण एवढ्या गोष्टी वर्ज करणे, असा सांगितलेला आहे. याविषयी हारीत म्हणतो–

**भार्याया व्यभिचारिण्या परित्यागो न विद्यते ।**
**वस्त्रपिण्डं कुचेलं च अधःशय्यां च शाययेत् ।।**

(स्मृ. च. २८२)

अर्थ – भार्या व्यभिचारिणी झाली तरी तिला घरातून घालवून देऊ नये, तर तिला गोळाभर अन्न आणि जुनेपाने कपडे देऊन तिची व्यवस्था करावी. तिला पर्यंकावर निजू न देता भूमीवर निजायला लावावे.

निष्कारणपणे पत्नीचा त्याग करणाऱ्या पुरुषाचा धर्मशास्त्रात निषेध केला आहे. केवळ लहरीखातर पत्नीचा त्याग करणाऱ्या पुरुषाला राजाने अतिशय अधिक दंड करावा आणि त्याला पतित समजून न्यायालयात साक्षीदार म्हणूनही अपात्र ठरवावे, असे नारदाने म्हटले आहे. आपस्तंबधर्मसूत्रात अशा गुन्ह्याला घोर पाप समजून त्याला पुढीलप्रमाणे प्रायश्चित्त सांगितले आहे– निर्दोष पत्नीचा त्याग करणाऱ्या पुरुषाला वस्त्राएवजी गाढवाचे कातडे पांघरायला लावावे आणि सहा महिनेपर्यंत सात घरी भिक्षा मागून निर्वाह करायला लावावा.

परंतु इतके निर्बंध लादले असले आणि इतकी प्रायश्चित्ते सांगितली असली, तरी केवळ स्वतःच्या लहरीखातर पत्नीचा त्याग केल्याची हजारो उदाहरणे प्राचीन काळाही समाजात घडत असत. अशा वेळी घर नाहीसे झाल्यानंतर पत्नीला पुष्कळदा माहेरचा आधारही मिळत नसे. अशा परित्यक्ता स्त्रियांचे जीवन भारभूत, असह्य आणि लोकापवादांनी दूषित होत असे.

एक पत्नी हयात असता दुसरी पत्नी करण्याचा अधिकारही धर्मशास्त्राने पतीला दिला आहे. पुत्राची आवश्यकता हे त्याचे मुख्य कारण सांगितले आहे. पत्नी जर वंध्या ठरली, तर विवाहानंतर आठ या वर्षी पतीने दुसरी पत्नी करावी, असे मनू म्हणतो (९ ८१). पत्नी हितकारक व शीलसंपन्न असून, सदा रोगी असेल, तर तिची अनुमती घेऊनच दुसरा विवाह करावा. अग्निहोत्र चालवण्याची इच्छा असेल आणि अशा स्थितीत जर पत्नी मृत झाली, तर लगेच दुसरा विवाह करून अग्निहोत्र चालू ठेवावे, असे धर्मशास्त्र म्हणते.

**पतीची कर्तव्ये** – पत्नीच्या भरणपोषणाची जबाबदारी धर्मशास्त्रकारांनी पतीवर टाकली आहे. हे कर्तव्य प्राचीन काळापासूनच निर्धारित केलेले आहे. अथर्ववेदातल्या एका मंत्रात (१४ १ ५२) ही पत्नी मजकडून पोषणीय आहे, म्हणजेच मी हिचे पोषण करीन, अशी पतीला प्रतिज्ञा करण्यास सांगितले आहे. मनूनेही स्त्रीला भरणयोग्य मानले असून, ते न करणाऱ्या पुरुषाला राजाने ६०० पण दंड करावा, असे सांगितले आहे. ‘अन्नपानजिता दारा: सफलं तस्य जीवितम्।’ = जो गृहस्थ अन्नोदकादी गोष्टींनी स्त्रीचे मन जिंकतो, त्याचे जीवन सफल होय, असे महाभारतातही म्हटले आहे (म भा उद्योग ३९ ८२).

जर पतीने पत्नीचे भरणपोषण केले नाही, तर अशा अवस्थेत पत्नी त्या पतीचा त्याग करून दुसरा विवाह करू शकत होती, का पतीला आपल्या भरणपोषणाविषयी बाध्य करीत होती, यावर प्राचीन साहित्याच्या द्वारे काही प्रकाश पडू शकत नाही. पण पत्नीच्या भरणपोषणाच्या बाबतीत असमर्थ ठरणाऱ्या किंवा तो गोष्ट टाळणाऱ्या पुरुषाचा समाजात निंदानालस्ती मात्र होत असे. असे असूनही काही लोक पत्नीच्या संपत्तीवर स्वतःचेच भरणपोषण करतात. याची उदाहरणे प्राचीन काळापासून आढळतात. अशा पुरुषाविषयी प्राचीन काळच्या समाजानेही तिरस्कार व्यक्त केला आहे. महाभारतात अशा भार्योपजीवी पुरुषाला गाईचे हत्या करणाऱ्यासमान पापी मानलेले आहे (म भा अनु १२ १२४–१२५).

भरणपोषणाइतकेच पत्नीचे रक्षण हे पतीचे महत्त्वाचे कर्तव्य ठरवले आहे. शत्रू, चोर, हिंस्र, लंपट, दुष्ट पुरुषांपासून आणि भौतिक आपत्तींपासून पत्नीचे रक्षण करणे, हे पतीचे कर्तव्य होय. महाभारतात विदुर म्हणतो, की आपत्तीसाठी धन वाचवावे आणि त्या धनाने स्त्रियांचे रक्षण करावे (म भा उद्योग ३७ १८). जो पुरुष पत्नीच्या रक्षणाच्या कामी असमर्थ ठरतो, तो अपयशाचा व नरकाचा धनी होतो, असेही महाभारतात म्हटले आहे (म भा आश्व ९० ४५). भार्येच्या रक्षणावर महाभारतात बराच भर दिलेला आहे. कौरवांच्या राजसभेत दुःशासनाने द्रौपदीला विवस्त्र करण्याचा लज्जास्पद प्रयत्न केला, त्या वेळी पांडव तिथे उपस्थित होते, पण तरीही त्यांनी तिचे संरक्षण केले नाही. द्रौपदीच्या मनातील ही चीड तिने पुढे एका प्रसंगी तीव्र शब्दांत व्यक्त केली आहे. ती कृष्णाला आपले दुःख सांगताना म्हणते–

> गर्हये पाण्डवांस्त्वेव युधि श्रेष्ठान् महाबलान्।
> यत्क्लिश्यमानां प्रेक्षन्ते धर्मपत्नीं यशस्विनीम् ॥
> धिग्बलं भीमसेनस्य धिक्पार्थस्य च गाण्डिवम्।
> यौ मां विप्रकृतां क्षुद्रैर्मर्षयेतां जनार्दन ॥
> शाश्वतोऽयं धर्मपथः सद्भिराचरितः सदा।
> यद्भार्यां परिरक्षन्ति भर्तारोऽल्पबला अपि ॥
>
> (म भा वन १२ ६६–६८)

अर्थ– हे श्रीकृष्णा, युद्धात श्रेष्ठ आणि महाबल अशा पांडवांचीच मी निंदा करते. कारण यशस्विनी अशा धर्मपत्नीची विटंबना होत असता ते केवळ पाहत राहिले. भीमसेनाच्या बलाचा धिक्कार असो. अर्जुनाच्या गाण्डीवाचा धिक्कार असो. कारण त्या दोघांनी क्षुद्र पुरुषांकडून माझ्यावर होणारा अत्याचार सहन केला. अल्पशक्तीचेही पती आपल्या पत्नीच्या रक्षणासाठी उभे राहतात. सज्जनांनी आचरलेला तो शाश्वत असा धर्ममार्ग आहे.

धर्मसूत्रे आणि स्मृती यांनीही स्त्रियांच्या रक्षणाविषयी आवर्जून सांगितले आहे. त्याचे म्हणणे असे, की स्त्रियांच्या ठिकाणी विषयवासना अधिक असल्यामुळे त्यांचे पाऊल वाकडे

पडण्याची जास्त शक्यता असते. तसे झाल्यास त्याचा तो दोष मानता येणार नाही. म्हणून पतीने पत्नीवर सतत लक्ष ठेवले पाहिजे. पत्नी जर दूषित किंवा विकृत झाली, तर तिची संततीही तशाच प्रकारची निपजते. म्हणून प्रयत्नपूर्वक तिचे रक्षण करणे, हे पतीचे कर्तव्य ठरते. पती हा आपल्या पत्नीच्या रक्षणाने आपले चरित्र, कुल, धर्म या सर्वांचेच रक्षण करत असतो ( मनु ९ ७ )

भरण, पोषण व रक्षण एवढ्यानेच पतीचे कर्तव्य संपत नाही. त्याबरोबरच त्याने पत्नीशी प्रेमाने आणि आदराने वागले पाहिजे. विदुराने याविषयी सांगताना म्हटले आहे, ते असे-

> **श्लक्ष्णो मधुरवाक स्त्रीणां न चासां वशगो भवेत ।**
> **पूजनीया महाभागा पुण्याश्च गृहदीप्तय ॥**
> **स्त्रिय श्रियो गृहस्योक्तास्तस्माद्रक्ष्या विशेषत ॥**
>
> ( म भा उद्योग ३८ १०–११ )

अर्थ– (पतीने) स्त्रियांशी मृदू आणि मधुर वाणीने बोलावे, मात्र त्यांच्या आधीन होऊ नये. स्त्रिया या पुण्यवंत गृहाला प्रकाशित करणाऱ्या, महाभाग्यशाली आणि पूजनीय असतात. त्या गृहाच्या लक्ष्मीच असतात. म्हणून त्यांचे प्राधान्याने रक्षण करावे.

पतीने पत्नीचा प्रेमपूर्वक आदर करावा. पण तिच्या आहारी मात्र जाऊ नये, असाही शास्त्रकारांचा कटाक्ष आहे. स्त्रैण किंवा स्त्रीजित पतीची त्यांनी अनेक प्रकारे निर्भर्त्सना केली आहे. मनूने तर अशा पुरुषाच्या घरी भोजनही निषिद्ध ठरविले आहे (४ २१७). याज्ञवल्क्य आणि वसिष्ठ यांनीही या बाबतीत मनूला अनुमोदन दिले आहे (याज्ञ १ १६३, वसि स्मृ १४ ११)

पती हा कुटुंबाचा चालक असतो. त्यामुळे कौटुंबिक व्यवहारांवर त्याचेच नियंत्रण असणे आवश्यक ठरते. पुरुष जर स्त्रीजित झाला किंवा स्त्रीच जर त्याला आपल्या तालावर नाचवू लागली, तर त्याच्या सामाजिक प्रतिष्ठेला धक्का लागतो. स्त्रीने कार्यक्षेत्र मुख्यत्वे घराच्या अंतर्गत असल्याने बाहेरचा व्यवहार करण्यास लागणारा विचार व समंजस दृष्टिकोन तिच्या ठिकाणी असण्याची शक्यता कमी असते. बाह्य प्रपंचाचे चढउतार तिला आकलन होणेही कठीण जाते. त्यामुळे स्त्री बरोबर ठरल्यास तिच्याकडून पतीला उचित असे मार्गदर्शन होऊ शकणार नाही. म्हणून पुरुषानेच बाहेरचा व्यवहार स्वतःच्या शक्तीने व बुद्धीने चालवावा, असा पूर्वापार प्रघात आहे. याच्या उलट वागणारा म्हणजे संपूर्णपणे स्त्रीच्या तंत्राने चालणारा पुरुष समाजात उपहासाला पात्र होतो आणि त्याचे घरही अधोगतीला जाते. हा दृष्टिकोन शास्त्रकारांचाच नाही, तर तो कवींचाही आहे. 'स्त्री पुंवच्च' या पाणिनीच्या सूत्रावरून घातलेली समस्या पुरी करताना कालिदासाने पुढील श्लोकचरण लिहिला, असे भोजप्रबंधात सांगितले आहे–

> **स्त्री पुंवच्च प्रभवति यदा तद्धि गेहं विनष्टम् ।**

अर्थ– स्त्री जर पुरुषाप्रमाणे प्रभू म्हणजे कुटुंबावर सत्ता चालविणारी होईल, तर ते घर नष्ट होते.

स्त्रीजित पुरुषाची निंदा होण्याचे आणखी एक कारण असे, की असा पुरुष प्रायः विषयलंपट समजला जातो. कामासक्तीमुळेच तो स्त्रीच्या आधीन जातो, असेच लोक समजतात.

**पत्नीची महत्ता–** ऋग्वेदकालापासूनच पत्नी ही गृहस्थाश्रमाचे मूळ मानली आहे. ऋग्वेदात पत्नी म्हणजेच घर असे स्पष्ट म्हटले आहे (ऋ ३ ५३ ४). याचाच अनुवाद पुढील श्लोकात केला आहे–

> **न गृहं गृहमित्याहुर्गृहिणी गृहमुच्यते ।**
> **गृहं तु गृहिणीहीनं कान्तारादतिरिच्यते ॥**

अर्थ– भिंती आणि छप्पर म्हणजे घर नव्हे, गृहिणी हे घर होय. गृहिणीहीन असलेले घर हे अरण्याहून भयाण किंवा कंटाळवाणे होते.

वैदिक युगात पत्नी ही पतीच्या बरोबरीने बसून यज्ञ करीत होती. कित्येकदा ती पतीला वगळून पृथक्‌रूपानेही यज्ञ करीत असल्याचे उल्लेख आहेत. याविषयीचे उदाहरण विश्ववारेचे होय. ती प्रातःकाळी यज्ञ करीत होती, असे म्हटले आहे (ऋ ५ २८ १). दुसऱ्या एका ठिकाणी कन्येकडून इंद्राला सोमाचा हवि दिल्याचा उल्लेख आहे (ऋ १० ८६ १). पत्नी ही यज्ञात मंत्र म्हणत होती. इतकेच नव्हे, तर पतीबरोबर यज्ञवेदीच्या निर्मितीतही भाग घेत होती ( श ब्रा १० २ ३ १, १० २ ३ ४ ). सौभाग्यवृद्धीसाठी ती स्वतंत्ररूपानेही सीतायज्ञ करी, असे पारस्करगृह्यसूत्रात म्हटले आहे (२ १७)

पण ब्राह्मणकालापासून तिची ही भागीदारी उत्तरोत्तर काळात हळूहळू कमी कमी होऊ लागली. वेदकाळी पत्नीकडून केली जाणारी नित्याची यज्ञीय कृत्ये पुढे तिला डावलून यज्ञातील पुरोहितच करू लागले. प्रारंभी यज्ञातला हवी बनविण्याचे काम पत्नी करीत असे, पुढे ते कार्य आग्नीध्र नावाचा ऋत्विज करू लागला. सामयागातले प्रवर्ग्य हे कृत्य प्रथम पत्नीकर्म होते. पण पुढे ते उद्गाता नावाचा ऋत्विज करू लागला (श ब्रा १४ ३ १ ३५). याज्ञिकातल्या एका संप्रदायाने स्त्रियांना यज्ञाधिकार नाही, कारण त्यांचे स्थान यज्ञवेदीच्या बाहेर आहे, असे मत मांडले. ते मत पुढे इतके प्रभावी झाले, की पुढच्या हजारो वर्षांत स्त्रीला यज्ञाधिकार तर नाकारला गेलाच, शिवाय तिला शूद्रासमकक्ष ठरविले गेले. याज्ञिकांनी अशा प्रकारे पत्नीचा अनादर करून तिला यज्ञबाह्य ठरविले, तर उपनिषदांच्या काळात आणि त्याही पुढे बौद्ध–जैनांच्या उत्कर्षकालात गृहस्थ

धर्मापेक्षा संन्यासधर्माला महत्त्व आले. वैराग्य हे संसारापेक्षा श्रेष्ठ ठरले. स्त्री ही पुरुषाला विषयकर्दमात लोळविणारी आणि त्याच्या परमार्थाची हानी करणारी आहे, अशा समजुतीने स्त्रीची परोपरीने निंदा सुरू झाली. या वैराग्यपर आणि मोक्षपर धर्माच्या उत्कर्षकाळात जो तो गृहस्थाश्रमाची आणि त्याबरोबरच गृहिणीचीही निर्भर्त्सना करू लागला. धर्मवासिष्ठात त्याचे प्रत्यंतर मिळते. ते असे–

**यस्य स्त्री तस्य भोगेच्छा निःस्त्रीकस्य क्व भोगभूः ।**
**स्त्रियं त्यक्त्वा जगत् त्यक्तं जगत् त्यक्त्वा सुखी भवेत् ॥**

अर्थ– ज्याला स्त्री आहे, त्याला भोगाची इच्छा होते. ज्याला ती नाही त्याला भोगाचा संभव कुठून असणार? स्त्रीचा त्याग केल्याने जगताचा त्याग केल्यासारखे होते आणि जगाचा त्याग केल्याने मनुष्य सुखी होतो.

**पत्नीची कर्तव्ये–** पत्नीच्या कर्तव्याचे विशद वर्णन मनुस्मृती, याज्ञवल्क्यस्मृती, विष्णुधर्मसूत्र, व्यासस्मृती, महाभारत इ. ग्रंथांत केलेले आहे. त्या वर्णनांत पतिसेवा आणि पातिव्रत्य या दोन गोष्टींना विशेष महत्त्व दिलेले आहे. पत्नीने घरात कसे असावे आणि वागावे, याविषयी मनु म्हणतो–

**सदा प्रहृष्टया भाव्यं गृहकार्येषु दक्षया ।**
**सुसंस्कृतोपस्करया व्यये चामुक्तहस्तया ।**
(मनुस्मृती ५.१५०)

अर्थ– पत्नीने सदैव हसतमुख असावे, गृहकार्यांत दक्ष असावे, घरदार व भांडीकुंडी स्वच्छ ठेवावी आणि हात राखून खर्च करावा.

याज्ञवल्क्याने या व्यतिरिक्त पतीचे प्रिय कार्य करणे, सासू-सासऱ्यांची सेवा करणे, सदाचरणाने वागणे आणि संयम धारण करणे ही पत्नीची अधिक कर्तव्ये सांगितली आहेत (१.८३–८७).

पतीच्या आज्ञेवाचून घराबाहेर जाणे, अवगुंठन न घेता बाहेर पडणे, जलद चालणे, व्यापारी, संन्यासी, वृद्ध आणि वैद्य यांच्या व्यतिरिक्त अन्य पुरुषांशी बोलणे, मांड्या, पोटऱ्या व स्तन उघडे ठेवणे, जोराने हसणे, धूर्त, चेटकिणी व दुःशील अशा स्त्रियांशी संबंध ठेवणे, या गोष्टी शंखाने गृहिणीला वर्ज्य सांगितल्या आहेत (याज्ञ. १.८७). बृहस्पतीने संक्षेपात पत्नीच्या कर्तव्याविषयी एक श्लोक लिहिला आहे, तो असा–

**पूर्वोत्थानं गुरुष्वर्वाक् भोजनं व्यञ्जनक्रिया ।**
**जघन्यासनशायित्वं कर्म स्त्रीणामुदाहृतम् ॥**

अर्थ– पती व वडीलधारी माणसे यांच्या आधी उठणे, भोजन, उपहार या गोष्टी यांच्या मागून करणे आणि त्यांच्यापेक्षा कमी उंचीच्या आसनावर बसणे व कमी उंचीच्या शय्येवर निजणे ही स्त्रीची कर्मे सांगितली आहेत.

महाभारताच्या मते पत्नीने पितृगृही फार दिवस राहू नये, कारण तसे केल्याने कीर्ती, चरित्र आणि धर्म यांची हानी होते (आदि. ७४.१२). पत्नीने पतीचे नाव घेऊ नये, कारण त्यामुळे त्याच्या आयुष्याचा क्षय होतो. पतीने निर्भर्त्सना केली तरी उलट बोलू नये आणि मारले, बोलले तरी हसतमुख राहावे, असे स्कंद पुराणात सांगितले आहे (ब्रह्मखंड ७.१८–१९).

पतिसेवेने पत्नीला जसे पुण्य मिळते, तसे ते व्रत, उपवास, यज्ञ, दान, इ. गोष्टींनी मिळत नाही. पतिसेवेव्यतिरिक्त पत्नीला दुसरा कोणतीही तरणोपाय नाही. महाभारतात याविषयी विवेचन करताना पुढील गोष्ट सांगितली आहे–

सुमना नावाची एक स्त्री होती. तिने शांडिलीला 'तू देवलोकात कशी आलीस?' असा प्रश्न केला. त्यावर ती म्हणाली 'मी काषाय वस्त्रे किंवा वल्कले परिधान केल्यामुळे किंवा जटा धारण केल्यामुळे स्वर्गात आले नाही, तर पतिसेवेमुळे मला स्वर्गलोकाची प्राप्ती झाली. मी माझ्या गार्हस्थ्य जीवनात पतीला अनुकूल वागले, सर्व विषयांत सावध राहिले, गृहकृत्ये उत्तम प्रकारे केली, पतीला कधी त्रास दिला नाही. त्यामुळे मला स्वर्गलोक मिळाला.'

दुसरी कथा अशी– एके दिवशी सत्यभामेने द्रौपदीला प्रश्न केला 'तू तुझ्या पाच पतींना आपल्या स्वाधीन ठेवले आहेस, ते हा असा कोणता मंत्र तुझ्याजवळ आहे, तो मला सांग.' त्यावर द्रौपदीने तिला सांगितले 'माझ्यापाशी मंत्रतंत्र काही नाही. मी माझ्या पतींची आज्ञा पाळते. त्यांचे विचार लक्षात घेते. त्यांना वाईट वाटेल असे काही करीत नाही. स्नान, भोजन, शयन या सर्व गोष्टी मी त्यांच्या नंतर करते. मी त्यांच्या आधी उठते आणि त्यांच्या नंतर झोपी जाते आणि निरहंकार वृत्तीने वागते (म. भा. वन. १२३).'

**पातिव्रत्य –** मन, वचन आणि देह यांनी पतीशी अव्यभिचारी निष्ठेने वागणाऱ्या पत्नीला मनूने पतिव्रता म्हटले आहे (९.२९–३०). हा आदर्श भारतात अनेक स्त्रियांनी पाळल्याचे इतिहासपुराणांवरून कळून येते. हिंदू कुटुंबसंस्थेत अनेक स्त्रियांनी विषम परिस्थितीतही पतीची साथ केली आहे आणि त्यांचे संकट आपल्या शिरावर ओढून घेऊन प्रसंगी प्राणत्यागाचेही धैर्य दाखवले आहे. प्राचीन साहित्यात पातिव्रत्याचा श्रेष्ठ आदर्श सीतेने दाखवला आहे. रावणाने तिला पळवून लंकेत नेल्यानंतर तिला वश करण्यासाठी अनेक प्रलोभने दाखवली. पट्टराणी करण्याचेही आश्वासन दिले, वनवासी रामापेक्षा आपले सत्ता-वैभव किती प्रचंड आहे तेही तिला सांगितले. पण ते सर्व ऐकल्यावर सीतेने रावणाला निक्षून उत्तर दिले, ते असे –

दारिद्री असो अथवा राज्यभ्रष्ट असो, पती हेच माझे सर्वस्व आहे. जशी सूर्याला सुवर्चला, इंद्राला शची, वसिष्ठाला अरुंधती, अगस्त्याला लोपामुद्रा, च्यवनाला सुकन्या, सत्यवानाला सावित्री, सौदासाला मदयंती, सगराला केशिनी आणि नलाला दमयंती अनुरक्त होती, तशी मी रामाला अनुरक्त आहे. राम हेच माझे सर्वस्व आहे. एक वेळ चंद्र उष्ण होईल, अग्नी शीतल होईल किंवा समुद्राचे पाणी गोड होईल, पण सीता आपल्या सती धर्मापासून कधीही विचलित होणार नाही.

पातिव्रत्यातील आणखी एक तत्त्व असे, की एखाद्या पुरुषाशी विवाह ठरल्यानंतर त्याच्या ठिकाणी काही न्यूने किंवा व्यंग दिसून आली, तरी त्याच्या व्यतिरिक्त अन्य पुरुषाचा स्त्रीने विचार न करणे. सत्यवान सर्वगुणसंपन्न होता, पण तो अल्पायुषी होता हे त्याच्या या सावित्रीला कळले, पण तिने ते कळल्यावर त्याच्याशीच विवाह केला. याविषयी तिने बापाला निर्धारपूर्वक सांगितले ते असे–

> **दीर्घायुरथवाल्पायुः सगुणो निर्गुणोऽपि वा ।**
> **सकृद्वृतो मया भर्ता न द्वितीयं वृणोम्यहम् ।।**
> (म. भा. वन. २९४.२७)

अर्थ – माझा पती दीर्घायु असो अथवा अल्पायु असो, सद्गुणी असो वा दुर्गुणी असो, मी एकदा (मनाने) जो वरला तो वरला. यापुढे मी दुसऱ्या कोणालाही वरणार नाही.

सावित्रीचा हा आग्रह तिच्या पित्याला मान्य करावा लागला आणि त्याप्रमाणे तिचा विवाह सत्यवानाशीच झाला. पुढे तिने सत्यवानाचे प्राण घेऊन जाणाऱ्या यमाला प्रसन्न करून त्याच्याकडून आपला पती परत मिळविला. हा तिच्या पातिव्रत्याचाच प्रभाव होता.

दुसरे उदाहरण गांधारीचे. तिला जेव्हा कळले, की ज्याच्याशी आपला विवाह व्हायचा आहे, तो नियोजित वर धृतराष्ट्र आंधळा आहे, तेव्हा तिनेही आपल्या डोळ्यांवर कायमची पट्टी बांधून घेतली. हेतू हा, की आपल्या चित्तात पतीच्या विषयी कोणताही विपरीत भाव निर्माण न व्हावा.

सीतेप्रमाणेच द्रौपदीनेही आपल्या पाच पतींसह घोर कष्ट आणि अपमान सोसले, पण आपले पातिव्रत्य अढळ राखले. हरिश्चंद्राची पत्नी तारामती हिने आपला पती विश्वामित्राच्या देण्यातून मुक्त व्हावा म्हणून स्वतःला विकून घेण्यासही कमी केले नाही.

पतिव्रता नारींची अशी कितीतरी उदाहरणे पुराणांतरी दिलेली आहेत.

**सतीधर्म–** ब्रह्मवैवर्त पुराणात सतीचे माहात्म्य सांगताना पुढील श्लोक लिहिला आहे–

> **पृथिव्यां यानि तीर्थानि सतीपादेषु तान्यपि ।**
> **तेजश्च सर्वदेवानां मुनीनां च सतीषु वै ।।**

अर्थ – पृथ्वीच्या ठिकाणी जी तीर्थे आहेत, ती सगळी सतीच्या चरणांच्या ठिकाणी आहेत. त्याचप्रमाणे सर्व देवांचे आणि सर्व मुनींचे तेजही सतीच्या ठिकाणी आहे.

कित्येक पतिव्रता स्त्रियांनी केवळ आपल्या सतीत्वाच्या प्रभावामुळे अनेक अद्भुत, असामान्य व चमत्कृतिजनक गोष्टी केल्या, अशीही उदाहरणे पुराणांत आणि इतर ग्रंथांत आढळतात. पतिव्रता स्त्री परपुरुषाला अदृश्य होऊ शकते. पौष्य राजाची राणी उत्तंक दर्शनाला आला असता अशीच अदृश्य झाली होती (म. भा. आदि.). शांडिलीने सूर्याचे रोधन धरले होते (मार्कं. पु.). पती मांडीवर डोके ठेवून झोपला असता एका पतिव्रतेचे बालक आगीत पडले. पण पतीची झोपमोड होईल म्हणून ती मुलाला उचलण्यासाठी उठली नाही की हलली नाही. पण तरीही ते मूल भाजले नाही. तिच्या सतीत्वाच्या प्रभावामुळे ती आग त्या मुलाला चंदनासारखी शीतल झाली (भोजप्रबंध २९२). रत्नाधिप राजाचा हत्ती मेला असता राजाच्या अनेक राण्यांनी त्याला स्पर्श केला, पण तो जिवंत झाला नाही. शेवटी हर्षगुप्ताची पतिव्रता पत्नी शीलवती हिने स्पर्श करताच तो जिवंत झाला (कथासरित्सागर). मिहिरकुलाला चंद्रकुल्या नदीचा प्रवाह वळवायचा होता. पण त्या वाटेत एक मोठा खडक उभा होता. मिहिरकुलाने महाप्रयत्न करूनही तो दूर झाला नाही. शेवटी एका कुंभाराच्या पतिव्रता स्त्रीने स्पर्श करताच तो पाषाण मार्गातून दूर झाला (राजतरंगिणी).

हिंदू समाजात सतीत्वाचा हा आदर्श अनादिकालापासून रूढ असल्याची समजूत आहे, पण ऐतिहासिक दृष्ट्या ती सत्य नाही. समाजातले स्त्रीचे मित्रत्वाचे किंवा सहधर्मचारित्वाचे स्थान ढळल्यावर ब्राह्मणग्रंथांच्या काळात हा आदर्श निर्माण केला गेला. पुढे मनूने त्याचे जोरदार समर्थन केले आणि तो आदर्श हळूहळू सर्वमान्य झाला. सतीत्वाच्या सिद्धांतात स्त्रियांच्या पुनर्विवाहाला स्थान नाही, पण गुप्तकालापर्यंत स्त्रियांनी पुनर्विवाह केल्याचे उल्लेख मिळतात. कौटिलीय अर्थशास्त्रात तर विवाहविच्छेदालाही मान्यता दिलेली आहे. पुनर्विवाह करणाऱ्या सात प्रकारच्या स्त्रियांचा नारदाने विस्तारपूर्वक उल्लेख केला आहे. रामगुप्ताची पत्नी ध्रुवदेवी हिने पतिनिधनानंतर चंद्रगुप्त या आपल्या दिराशी दुसरा विवाह केल्याची कथा हर्षचरितात दिलेली आहे. यावरून स्पष्ट होते, की गुप्तकालापर्यंत सतीत्वाचा आदर्श स्त्रियांच्या पुनर्विवाहाला प्रतिबंधक नव्हता.

जातककथांवरूनही या गोष्टीला पुष्टी मिळते. आपल्या

पतीपेक्षा भावाला महत्त्व देणारी स्त्री जातकात आढळते. पती, पुत्र आणि बंधू यांना राजाने बंदीत टाकल्याचे पाहून एक स्त्री राजाकडे जाते व त्यांना सोडण्याबद्दल त्याची प्रार्थना करते. त्या वेळी राजा तिला म्हणतो, 'तुझ्या प्रार्थनेसाठी तिघांपैकी एकाला कोणाला तरी मी मुक्त करीन !' त्या वेळी ती स्त्री म्हणते, 'माझ्या भावाला सोडा, कारण पती व पुत्र हे सुलभ आहेत, भाऊ तसा नाही.'

वेदकालापासून मध्ययुगापर्यंतच्या काळात सतीधर्माचा जो विकास झाला, त्याच्या पुढील तीन अवस्था विचारात घ्याव्या लागतात—

(१) प्रारंभिक अवस्था – या अवस्थेत पतिपत्नींचा अधिकार समान होता. दोघांनी समान रूपाने एकमेकांशी निष्ठावंत राहावे, अशी कल्पना होती.

(२) सतीत्वाचा उत्कर्ष काल – या काळात पती हा भिन्न आहे, ही कल्पना मागे पडली. आता तो देव आणि पूज्य आहे, ही कल्पना मूळ धरू लागली. पत्नीचे स्वातंत्र्य आणि तिचे अधिकार कमी कमी होऊ लागले.

(३) सतीत्वाचा उत्तरकाल – ही अवस्था गुप्तयुगानंतरची आहे. या अवस्थेत सतीत्वाचा विचार संकुचित होऊन परा काष्ठेला पोचला. पतीच्या जीवनकालात आणि त्याच्या मृत्यूनंतरही पत्नीने दुसऱ्या पुरुषाशी संबंध ठेवता कामा नये, पतीने अपमान केला तरीही त्याच्याविरुद्ध तक्रार करता कामा नये आणि तो दुःशील असला तरीही देव समजून त्याची पूजा केली पाहिजे असे कठोर निर्बंध गुप्तोत्तरकालात स्त्रीवर घातले गेले. स्त्रीहृदयातही हा आदर्श इतका ठसला, की लाखो हिंदू स्त्रियांनी पतीच्या मृत्यूनंतर वैधव्याच्या अमंगल आणि कष्टप्रद अवस्थेत दिवस काढले आणि कित्येक स्त्रियांनी पतीबरोबरच चितेवर आरोहण करून आपल्या शरीराची राख केली. राजस्थानातील रजपूत स्त्रियांनी केलेले सामुदायिक जोहार हे त्याचे पराकाष्ठेचे उदाहरण होय. मात्र हा आदर्श एकट्या स्त्रीच्याच माथी मारून पुरुषाने आपली एकपत्नीव्रतातून सुटका करून घेतली.

दांपत्यजीवनात अन्योन्य निष्ठेला फार महत्त्व आहे. अथर्ववेदात याविषयी म्हटले आहे, की पतिपत्नींनी चक्रवाकमिथुनाप्रमाणे परस्परांशी निष्ठावंत राहावे (१४.२.६४). मनूनेही स्त्रीपुरुषधर्माचे वर्णन करताना पुढील श्लोक लिहिला आहे—

> अन्योन्यस्याव्यभीचारो भवेदामरणान्तिकः ।
> एष धर्मः समासेन ज्ञेयः स्त्रीपुंसयोः परः ॥
>
> (९.१०१)

अर्थ – परस्परांनी आमरण अव्यभिचारी वृत्तीने वागावे, हा संक्षेपात स्त्री पुरुषाचा श्रेष्ठ धर्म जाणावा.

पण मनूनेच पुढे पत्नी मृत झाल्यानंतर पुरुषाला पुनर्विवाह विहित सांगितला आणि पतिमरणानंतर पत्नीच्या पुनर्विवाहाचा मात्र निषेध केला. त्यापुढच्या सर्व धर्मशास्त्रकारांनीही मनूचीच चाकोरी धरली. त्यामुळे स्त्रियांकडून जशी पातिव्रत्याची अपेक्षा धरली गेली, तशी ती पुरुषाकडून धरली गेली नाही. पतिव्रता स्त्रियांच्या तुलनेने पत्नीव्रत पुरुष अगदी कमी संख्येने आढळतात. सप्तर्षींच्या मध्ये राहणारी अरुंधती केवळ वसिष्ठ याच्याकडे दृष्टी लावून होती (कुमारसंभव ७.१०), पण वसिष्ठाची दृष्टी मात्र अक्षमाला या शूद्र स्त्रीवर गेली होती (मनु ९.२३). पाच पांडवांनी द्रौपदीकडून पातिव्रत्याची अपेक्षा केली, पण त्यांच्यापैकी प्रत्येकाने अन्य स्त्रियांशी विवाह केलेच. रावणाने पातिव्रत्य प्रयत्नपूर्वक रक्षिले, पण इंद्राने गौतमपत्नीचे पातिव्रत्य भंग करण्यात संकोच मानला नाही, अशी आणखीही कितीतरी उदाहरणे सांगता येतील. कालांतराने हिंदू समाजात पुरुषाने अनेक भार्या करणे ही सर्वसामान्य प्रथाच सुरू झाली.

पण पातिव्रत्याचा हा एकांगी आदर्श सांप्रत युगात टिकणे कठीण आहे. हिंदू विवाहविधेयकाने या गोष्टीचा विचार करून घटस्फोटाची सोय केली असून विवाहप्रसंगात स्त्रीपुरुषांना समान नियम घातले आहेत. आता हिंदू स्त्री-पुरुषांना एकच विवाह करता येतो. एक स्त्री हयात असताना किंवा विवाहाशी घटस्फोट न घेतल्यावाचून पुरुषाला दुसरा विवाह करता येत नाही. प्रसंगी योग्य कारण असल्यास पत्नीलाही न्यायालयात अर्ज करून मागून विवाहविच्छेद घेता येतो आणि इच्छा असल्यास दुसऱ्या पुरुषाशी लग्न करता येते. दोघांनाही आता विवाहाच्या व विवाहविच्छेदाच्या बाबतीत तुल्याधिकार आहेत. [ पो. वा. हि. वि., हि. न. ]

## पतिव्रता

पतिनिष्ठ व पतिपरायण स्त्री. हिलाच सती, साध्वी असेही म्हणतात. पाहा – पतिपत्नी.

## पतीर भरणे

(सं. पात्रभरण) महाराष्ट्रातला एक कुलाचार. दर वर्षी श्रावण किंवा आश्विन महिन्यात हा कुलाचार करतात. ज्या दिवशी पतीर भरायचे असते, त्या दिवशी एका जोग्याला बोलावतात. हा जोगी पतीर म्हणजे तांब्याचे अथवा मातीचे पात्र घेऊन येतो. मग एका पाटावर रांगोळी घालून तिच्यावर ते पात्र ठेवतात आणि त्यात धान्य, अगर शिजलेला भात भरतात. नंतर पतीराची पूजा करून त्याला नैवेद्य दाखवतात. त्या वेळी जोगी आपला दास वाजवत असतो. नंतर त्या जोग्याला जेवायला वाढतात. जेवण झाल्यावर जोगी ते भरलेले पतीर घेऊन जातो. धनधान्य समृद्धी हे त्या कुलाचाराचे फल असते. [ चि. शा. व. ]

**पत्कलाईपुरणाई** तमिळनाडमधल्या दोन ग्रामदेवता यांना अय्यनारच्या बायका मानतात या दोघी नाही मुकुट असतो त्यांच्या एका हातात फळ असते व दुसरा हात मांडीवर ठेवलेला असतो त्या दोघी अय्यनाराच्या मूर्तीच्या बाजूला स्थापित असतात पत्कलाई उजव्या बाजूला व पुरणाई डाव्या बाजूला असते [ जा इ इ ]

**पत्नीसंयाज** दर्शपूर्णमासातील एक विधी 'पत्नीभिः सह मिश्रा ते ते पत्नीसंयाजाः।' = इतर देवांबरोबर देवांच्या पत्न्यांना हविर्भाग देणे म्हणजे पत्नीसंयाज होय पत्नी संयाजात चार आज्याहुती असून, त्या क्रमाने सोम, त्वष्टा, देवपत्नी आणि अग्नी गृहपती यांना देतात [ वि ज ]

**पत्रकृच्छ्र** एक व्रत या व्रतात तीन दिवसापर्यंत पूर्ण त्याग करून चौथ्या दिवशी पळस, उंबर, कमळ व बेल यांची पाने उकळून त्यांचे पाणी व कुश गवताचे पाणी प्राशन करायचे असते हेच व्रत ५, ६ किंवा ७ दिवस केले, तर त्याला पर्णकृच्छ्र म्हणतात पर्णकृच्छ्रात रोज एकाच वृक्षाच्या पानाचे सेवन करायचे असते [ श क ]

**पत्रलेखा** एक अलंकरणपद्धती प्राचीन काळी स्त्रिया कस्तुरी आपल्या गालावर व स्तनावर विविध पानांच्या आकृती रखीत, त्या प्रकाराला हे नाव आहे यालाच पत्रवल्ली व पत्रभंग अशीही नावे होती अशा प्रकारचे उल्लेख संस्कृत वाङ्मयात अनेक ठिकाणी येतात कालिदासाने केलेला एक उल्लेख असा –

**महेन्द्रमास्थाय महोक्षरूपं यः संयति प्राप्तपिनाकिलीलः ।**
**चकार बाणैरसुराङ्गनानां गण्डस्थलीः प्रोषितपत्रलेखाः ॥**

(रघुवंश ६ ७२)

अर्थ – तो (ककुत्स्थ) युद्धात बैलाचे रूप धारण करणाऱ्या इंद्रावर बसला आणि त्याने शंकराप्रमाणे पराक्रम करून आपल्या बाणांनी असुरांच्या स्त्रियांच्या गालावरील पत्रलेखा पुसून टाकली (असुरवधामुळे त्यांच्या बायका रडू लागल्या आणि त्यांच्या गालावरची पत्रलेखा धुऊन निघाली )

**पत्रव्रत** एक काम्यव्रत हे स्त्रीव्रत आहे व्रतावधी एक वर्ष यात प्रत्येक दिवशी पान सुपारीचा विडा करून एका स्त्रीला किंवा पुरुषाला द्यायचा असतो उद्यापनाच्या वेळी सोन्याचे अथवा रुप्याचे नागवेलीचे पान व मोत्यांचा चुना दान देतात फल– दुर्दैव व मुखदुर्गंधी यांचा नाश [ हि ध ]

**पत्रा** ही भारतातील एक जात हे लोक ओरिसातून आले असे म्हणतात यांचे दोन पोटविभाग आहेत पहिल्यात साहू, पात्रा व प्रष्टी आणि दुसऱ्यात तग, जंगली, तेलगू व महानायक अशा पोट जाती आहेत बेहेर व नायकी अशा त्यांच्या पदव्या आहेत

पहिल्या पोटविभागाचे लोक रेशमाचे करगोटे व गोंडे तयार करतात तर दुसऱ्या भागाचे लोक रेशमी कापड विणण्याचा व्यवसाय करतात या दोन्ही विभागांच्या लोकांत रोटीव्यवहार होत नाही

यांच्यात सामान्यतः बालविवाह रूढ आहे हे लोक दुसऱ्या पोटजातीतील असगोत्र कुटुंबाशी विवाहसंबंध करतात कापड विणणाऱ्या जातीच्या एखाद्या मुलीचा विवाह जर रजोदर्शनापूर्वी झाला नाही तर तिचे प्रथम एका म्हाताऱ्याशी लग्न लावतात व मग रीतीप्रमाणे दुसरे लग्न करतात दुसऱ्या विभागात अशा वेळी मुलीचे प्रथम बाणाशी लग्न लावतात हे विवाह नाममात्रच असतात

या लोकांत जातपंचायत आहे कापड विणणाऱ्या पोटविभागाच्या प्रमुखाला महानायक असे म्हणतात बेहेरा व भाल्लाबय या नावाचे दोन अधिकारी त्याला मदतनीस असतात दुसऱ्या पोटविभागाच्या प्रमुखाला सेनापती व त्याच्या मदतनिसाला दलपती असे म्हणतात

यांच्यापैकी तेलगू पोटजातीच्या लोकांचा वस्ती प्रामुख्याने कडप्पा व कुर्नूल या जिल्ह्यांत आढळते यांचे दोर व गुरीकल असे दोन पोटवर्ग आहेत दोर (नायक, अधिपती) लोक हे प्राचीन पाळेगार (जमीनदार) लोकांचे वंशज आणि गुरीकल हे पाळेगारांचे सेवक किंवा अनुयायी असावेत, असे संशोधकाचे मत आहे गुरीकलाच्या विवाहसमारंभात दोरांना प्रथम पान सुपारी दिली जाते

यांच्या विवाहात पुरोहित ब्राह्मण असतो विधवाविवाह व घटस्फोट या दोन्ही गोष्टी या लोकांना मान्य नाहीत

वैष्णव असूनही हे गंगम्म आणि एल्लम्म यांना भजतात हे प्रेते पुरतात पितरांचे वार्षिक श्राद्ध करतात अंत्यक्रियेचे पौरोहित्य सातानी लोक करतात [ का टा स इ ]

**पत्रावळ** भोजनासाठी उपयोगात आणलेली पानांची गोलाकार थाळी किंवा ताट पत्रावळीवर जेवण करणे हे प्रशस्त मानलेले आहे पत्रावळीसाठी पळस, टेंटू, आघाडा, फणस, वड, जांभूळ, आंबा, चाफा व केळ या वृक्षांची पाने घ्यावी ती तुटलेली, फाटलेली, किड्यांनी खाल्लेली व मलिन असू नयेत पत्रावळीच्या अधोभागी एक पान जोडावे ते न जोड

यास अशी पत्रावळ भोजनाला निषिद्ध मानलली आहे पत्रावळ एकपानी किंवा दोनपानी असेल किंवा पळसाच्या पानाच्या पत्रावळीतील मधले पान केळीचे किंवा कमलपत्र असेल तर त्याला मात्र खाली पान जोडण्याची आवश्यकता नाही पत्रावळी करताना डेखाला डख किंवा टोकाला टोक जोडू नये, पानाचे अग्र मध्यभागी येऊ नये पानाची पाठीला पाठ लागू नये, डेख पानाच्या टोकाला जोडावे, असे सांगितले आहे भोजनासाठी निमंत्रित ब्राह्मणाकडन पत्रावळी लावून घेऊ नयत, असाही नियम आहे

चातुर्मासात किंवा काही व्रते आचरताना ठराविक पानाच्या पत्रावळीवर भोजन करण्याचा प्रघात आहे [आचारे दु ]

**पत्रिकापूजन** लग्नविधीतील एक धार्मिक कृत्य वराकडील आणि वधूकडील उपाध्याय वेगवेगळ्या कागदावर लग्नाचा मुहूर्त, हळदीचा वळ व वधू–वराची नावे लिहितात नतर गणपतीची पूजा करून त्या कागदावर हळद कुकू शिंपडून त्याची पूजा करतात मग वराचा उपाध्याय ती पत्रिका वधूपित्याला किंवा प्रमुख व्यक्तीला देतो आणि वधूकडील उपाध्याय दुसरी पत्रिका वरपित्याला किंवा त्या पक्षातल्या प्रमुखाला देतो नतर पानसुपारी वाटतात व बायका हळदीकुकू देतात उपाध्यायाना दक्षिणा दिल्यावर विधी सपतो

**पथवारी** व्रजमडलातील एक सर्व क ग्रामदेवता पथवारीची प्रतिमा किंवा मंदिर असत नाही किसानांच्या स्त्रिया रस्त्यावरील छोटे छोट दगड एकत्र करून रस्त्याच्या मध्यभागी त्यांचा ढीग करतात व त्यालाच पथवारी म्हणतात परदेशी गेलले किंवा यात्रेसाठी गेलले आप्तेष्ट सुखरूप परत यावे, या उद्देशाने या देवतेची अभिषेकपूर्वक पूजा करतात तिच्या पूजेसाठी जाताना किसानाच्या स्त्रिया रस्त्यावर पाण्याची धार धरून चालतात व गाणी गातात [कृ जा त्र श ]

**पदचिन्ह** पायाच्या प्रतीकाला किंवा ठशाला पदचिन्ह म्हणतात देवदेवता आणि सतमहात्मे हे आपल्या स्पर्शाने भूमीला पवित्र करतात, अशी समजूत आहे हा स्पर्श मुख्यत्वे पायाचा असतो म्हणून पुण्यवताच्या शरीरात त्याच्या चरणाना प्राधान्य दिलेल आहे म्हणूनच अशा पूज्य पुरुषाना वदन करताना त्याच्या पायावर डोके ठेवण्याची पद्धत आहे अशा विभूतीचा आपल्या मस्तकाला स्पर्श होणे हे भाग्याचे मानतात गगा ही विष्णूची पादोदकधाराच आहे 'विष्णुपादाब्जसम्भूता' = विष्णूच्या चरणकमलापासून निघालेली, असे तिचे वर्णन आहे हा सकेत लक्षात ठेवून सत महतांचे पाय धुतलेले पाणीही तीर्थरूप मानतात आसन्नमरण रोग्याला सर्व प्रायश्चित्त म्हणून ब्राह्मणाचे चरणतीर्थ देण्याचीही प्रथा आहे



बुद्धाचे पदचिन्ह

एखाद्याचे श्रेष्ठत्व व पूज्यत्व दर्शविण्यासाठी त्याच्या नावापुढे पाद किंवा चरण शब्द लावण्याचा सस्कृत भाषेत प्रथा आहे गुरुचरण, आचार्यचरण, श्रीपाद, इ त्याची उदाहरणे होत आद्य शकराचार्यांना भगवत्पूज्यपाद या नावाने संबोधितात

या भावनेतूनच पुढे पादपूजा प्रवर्तित झाली भारतात पदचिन्हाची पूजा बौद्धानी सुरू केली असे म्हणता येते बुद्धाच्या मूर्ती निर्माण होण्याच्या पूर्वी बौद्ध लोक दगडावर बुद्धाचा पाय खोदून त्याची पूजा करीत पुढे ही प्रथा अन्य सप्रदायानही सुरू झाली दत्त सप्रदायात दत्ताच्या पादुकांचेच पूजन महत्त्वाचे असते औदुंबर, नरसिंहवाडी, गाणगापूर, इ दत्तक्षेत्रात दत्ताच्या पादुकाच मदिरात ठेवलेल्या आहेत भरताने रामाच्या पादुका रामाच्या प्रतिनिधी म्हणून राज्यगादीवर स्थापल्या आणि नंदिग्रामी राहून तो स्वत चे नव्हे तर रामाचे राज्य चालवू लागला, अशी कथा रामायणात आहे गुरुपरपरेत गुरूच्या निधनानतर त्याच्या पादुका गादीवर ठेवून त्याची पूजा करण्याची पद्धती अनेक पथात प्रचलित आहे ज्ञानेश्वराच्या सतांच्या पालखीत त्याच्या पादुकाच मिरवतात रामदासी मठातून समर्थांच्या पादुकाचीच पूजा केली जाते शकराचार्यांच्या पीठावर बसलेल्या जगद्गुरूची पूजाही पादपूजा याच नावाने ओळखली जाते कित्येक ठिकाणी एखाद्या खडकावर एखादे पदचिन्ह उमटलेले दिसते ते कोण्यातरी देवतेचे आहे, असे समजून त्याचीही पूजा केली जाते गयेमध्ये असे एक पदचिन्ह असून त्याला विष्णुपद म्हणतात व यात्रेकरू त्यावरच पिंडदान करतात

**पदपाठ** वेदमंत्राचे पदश अध्ययन मंत्राचा अर्थ समजण्यासाठी त्यांतील प्रत्येक पद वेगवेगळे करून दाखवावे लागते. मंत्रातील शब्दाच्या स्वरज्ञानासाठीही पदविभाग आवश्यक असल्याचे अथर्ववेद प्रातिशाख्यात म्हटले आहे (१ १ ३). निरनिराळ्या वेदसंहितांचे पदकार भिन्न भिन्न आहेत. ऋग्वेद संहितेचा पदपाठ शाकल्याने, सामवेदाचा गार्ग्याने आणि कृष्ण यजुर्वेदाच्या तैत्तिरीय संहितेचा आत्रेयाने केला आहे. शुक्ल यजुर्वेदाचा व अथर्ववेदाचा पदपाठ कोणी केला त्याचा माहिती उपलब्ध नाही. याशिवाय कृष्णयजुर्वेदाच्या मैत्रायणी संहितेचा पदपाठही उपलब्ध आहे, पण कर्ता अज्ञात आहे. अथर्ववेदाचा पदपाठ रावणाने केला असल्याचे काहींचे मत आहे.

पदपाठात सामासिक पदामध्ये अवग्रह दिला जातो. सर्वोदात्त पदाच्या पुढे इतिकार येतो. संहितेत दीर्घ असणारा स्वर कित्येक वेळा पदपाठात ह्रस्व होतो. पदपाठामुळे त्या त्या शब्दाचा स्वर कोणता आहे, हे जाणता येते व त्यावरून त्या शब्दाचा अर्थ निश्चित करणे सोपे जाते. पदपाठासंबंधी अनेक नियम प्रातिशाख्य ग्रंथांतून दिलेले आहेत. पदपाठाचे एक उदाहरण असे –

संहितेतील मूळ ऋचा (ऋ. १ २ १) अशी –

**वायवा याहि दर्शतेमे सोमा अरङ्कृता ।**
**तेषां पाहि श्रुधी हवम् ॥**

याचा पदपाठ असा –

**वायो इति । आ । याहि । दर्शत । इमे । सोमाः । अरम्ऽकृताः । तेषाम् । पाहि । श्रुधि । हवम् ॥**

ऋग्वेदामध्ये पुनरुक्त झालेली पदे पदपाठात गाळली जातात. अशा पदांना गलित पदे म्हणतात. वेदाध्ययनामध्ये संहितेनंतर पदपाठाचे अध्ययन करतात. पदपाठाच्या आधारावरच जटा, घन, इ. वेदविकृती बसविलेल्या आहेत. [ वैदिक स्वरसमीक्षा – श्री अमरनाथशास्त्री, १९६४ ]

**पदम अबोर** नेफाच्या सियांग विभागातील अनेक टोळ्यांपैकी एक टोळी. पूर्वी या सर्व टोळ्यांना अबोर (= रानटी) असे नाव होते. त्या लोकांनी ते नाव आता टाकले आहे. ते आपण स्वतःला आदी हे नवे नाव लावतात.

सियांग, यॅम्ने आणि सियोम या नद्यांच्या तीरावर या लोकांची वस्ती आहे. हा सर्व भाग पहाडी असून, त्यातील काही पर्वतश्रेणी दहा ते पंधरा हजार फूट उंच आहेत. त्या नेहमी बर्फाच्छादित असतात. या भागात घनदाट अरण्ये आहेत. हिवाळा आणि पावसाळा हे इथले दोन मुख्य ऋतू आहेत. सियांग दरीत आणि इतर सखल भागात मार्चच्या शेवटच्या आठवड्यापासून ते सप्टेंबर, या काळात खूप पाऊस पडतो आणि ऑक्टोबर ते जानेवारी हा इथला थंडीचा मोसम असतो. या दिवसांत सर्वत्र दाट धुके पसरलेले असते आणि फक्त सकाळीच ते नाहीसे होते.

पदम हे उत्तरेकडून आले असे सांगतात. रामसिंगाजवळचे बोमा हे त्यांचे मूळचे निवासस्थान होय. यॅम्ने नदीच्या डाव्या तीरावरील सिदिप गावापासून त्यांची वस्ती सुरू होते. हा सर्व नदीकाठचा भाग, दक्षिणेकडे गिकपर्यंतचा प्रदेश आणि आग्नेयीला दाबुक खेडे, इथपर्यंत त्यांचा समाज आहे.

याच्या एका गावातून दुसऱ्या गावात जाण्यासाठी अरुंद पायवाटा असतात. आपल्या गावाच्या हद्दीत असणाऱ्या पायवाटांची ते नेहमी दुरुस्ती करतात आणि त्या चांगल्या स्थितीत ठेवतात. सर्वसाधारणपणे हे लोक, डोंगर चढावा लागला, तरी सरळ जवळचा रस्ता पसंत करतात. उभ्या चढणीच्या डोंगरावर ते दगडी पायऱ्या बनवतात. पाणथळ जागी लाकडाचे ओंडके ठेवतात. उंच डोंगर चढताना ते लाकडी शिड्याही वापरतात.

पदम लोकांना प्रवास करताना डोंगराप्रमाणे अनेक ओहोळ व नद्याही पार कराव्या लागतात. उथळ नदीत ते दोन–दोन फुटांच्या अंतरावर शिळा ठेवतात आणि त्यावरून नदी ओलांडतात. पण नदीचा प्रवाह वेगवान आणि खोल असला, तर नदीच्या दोन्ही तीरांवर समोरासमोर दगडी भिंती घालून त्यांच्यावर लाकडाचा एक लांब व मोठा ओंडका ठेवून साकव तयार करतात. काही ठिकाणी वेताचे झुलते पूलही नद्यांवर उभारतात. या पुलाचे वेगवेगळे प्रकार असून, ते बांधण्यात या लोकांचे फार कौशल्य दिसून येते. या झुलत्या पुलात काही



पदम लोकांचा झुलता पूल

फुटांच्या अंतरावर ते वेताच्या गोल कड्या बसवतात. तसेच त्यावरून चालत जाण्यासाठी दहा ते बारा इंच एवढा भाग वेताच्या काड्यांनी विणून काढतात. मग सर्व बाजूंनी पूल वेताच्या कामट्यांनी आवळून घेतात आणि तो भक्कम बनवतात.

त्याच्यावरून चालताना पूल बराच हालतो, मात्र तो सहसा मोडत नाही. दरवर्षी पुलाचा थोडा थोडा भाग दुरुस्त करतात.

पदम लोक चपळ, आनंदी, उदार मनाचे आणि प्रामाणिक आहेत. ते मंगोलाइड वंशाचे आहेत. त्यांचे केस आणि डोळे काळे असून, त्यांच्या त्वचेचा रंग तपकिरी असतो. त्यांचे कपाळ सपाट, चेहरा रुंद व नाक आखूड असून, गालाची हाडे वर आलेली असतात. ते मध्यम उंचीचे असतात.

पदम लोकांची सर्व वस्ती लहान लहान खेड्यांतच असून सियांग विभागात पासीघाट आणि अलाँग ही दोनच शहरे असून, तीही अलीकडे भारत सरकारने निर्माण केली आहेत. त्यांची खेडी नद्यांच्या जवळ आणि डोंगरमाथ्यावर वसलेली आहेत. खेड्यांचे प्रवेशमार्ग नैसर्गिक अडथळ्यांबरोबरच मानवनिर्मित अडथळे उभारूनही सुरक्षित केलेले असतात. त्यांच्या खेड्यात प्रवेश करायचा तर अत्यंत अवघड अशी उभी चढण चढावी लागते.

नवे खेडे वसवण्यापूर्वी ते प्रथम सोईस्कर जागा शोधतात. पाणी आणि भरपूर सूर्यप्रकाश ज्या ठिकाणी उपलब्ध होईल, अशी जागा ते वस्तीसाठी पसंत करतात. नंतर जंगल तोडून तिथे झोपड्या बांधतात. साधारणपणे ते डोंगरमाथ्यावर झोपड्या उभारतात. मग त्यांच्या मागून येणारे लोक डोंगर उतरणीवर सर्व बाजूंनी रांगेने झोपड्या बांधीत पायथ्यापर्यंत येतात. माथ्यापासून पायथ्यापर्यंत एक उभा सरळ रस्ता केलेला असतो. त्यालाच फाटे फोडून वस्तीतले अंतर्गत रस्ते तयार करतात. झोपड्यांची रांग डोंगराच्या बाजूने असते. गावाच्या मध्यभागी जिथून सर्व गाव नजरेच्या टप्प्यात येईल, अशा ठिकाणी मोशप म्हणजे तरुणांचे सार्वजनिक शयनगृह असते.



पदमांची झोपडी

बहुधा प्रत्येक गावात, गावापासून जरा दूर अंतरावर धान्य साठविण्यासाठी झोपड्या बांधतात. जमिनीत खांब पुरून, त्यांवर उंच जागी ही कोठारे बांधलेली असतात. त्यांना फक्त पुढच्या बाजूला एकच दार असते.

घरे– या लोकांचा घरे बांबूची असून काही ठिकाणी लाकूड वापरून आणि वेताच्या दोऱ्यांनी बांधून ती मजबूत केलेली असतात. डोंगरउतरणीवर बांबूचे किंवा लाकडाचे खांब उभारून त्यांवर बांबूच्या जाड तट्ट्यांची सपाट जमीन तयार करतात. ही जमीन चौकोनी असते. तिच्या भोवती लाकडी फळ्यांच्या किंवा बांबूच्या तट्ट्यांच्या भिंती उभारतात. ही खोली म्हणजेच घर होय. घराला खिडक्या नसतात. पुढच्या बाजूला एक आणि मागच्या बाजूला एक, अशी दोनच दारे घराला असतात. पुढच्या दाराला घरात शिरण्यासाठी शिडी लावलेली असते. घरात जाळासाठी चूल असते. चुलीच्या वर तीन फळ्यांची मांडणी असते. तिच्यावर मांस, मासे व सरपण वाळवतात. खोलीच्या बाहेरच्या बाजूला,



वनाचा टोपला

डाव्या हाताला शौचकूप असतो. घराचे छप्पर पाने किंवा गवत यांचे बनवतात. छप्पर उतरते असून खालपर्यंत आलेले असते. त्यामुळे वादळी वाऱ्यापासून आणि पावसापासून भिंतींचे संरक्षण होते. घरात अतिशय अंधार असतो. कारण उजेड येण्याची काही सोयच केलेली नसते. घरातली चूल मात्र सदैव पेटलेली असते आणि तिच्या भोवतीने मंडळी बसलेल्या राहतात. घराच्या पुढचा थोडा भाग ओसरीसारखा असतो. जो उघडा असतो, त्याचा वाळवणासाठी आणि विणायला बसण्यासाठी उपयोग करतात. घराच्या खाली पाळीव जनावरे बांधतात. शौचकूप खालून बंदिस्त करून त्यात डुकरे ठेवतात. घरासाठी पहिल्या दोन ओळींत तीस–तीस आणि तिसऱ्या ओळीत पंचवीस खांब पुरतात. घराचा दरवाजा एका मजबूत लाकडी फळीचा असतो आणि तो आतून बंद करता येतो. घराला पोटमाळा असतो. त्याच्यावर भात साठवतात. घराच्या भिंतीवर शिकारीत मारलेल्या जनावरांची शिरे व हाडे दिसतात. मिथुन

जनावरांच्या कवट्या टांगलेल्या असतात. त्यावरून, एखाद्या माणसाने आपल्या हयातीत किती मिथुन बळी दिले ते समजते. त्यापैकी निम्म्या कवट्या त्याच्या मृत्यूनंतर त्याचे थडगे सजविण्यासाठी वापरतात. थडग्यात विविध टोपल्या लाकूड, बांबू वेत, मासे व भात यांची भांडी, शिकारीची आणि युद्धाची आयुधे, शेतीची औजारे आणि विणण्याचे माग, इ. वस्तू असतात. झोपण्यासाठी त्यांना आयथळग नसतो. असते चुलीजवळ नुसत्या जमिनीवरच ते बसतात व तिथेच झोपतात.

**वेशभूषा**– पदम स्त्री एक रंगीबेरंगी कापड कमरेभोवती गुंडाळते आणि वर लांब हाताचे काळे पोलके घालते. या दोन्ही वस्त्रांवर रंगीत सुताने नक्षी विणलेली असते. स्त्रिया आपले कपडे स्वतःच विणतात. त्या विणकामात तरबेज असून त्यांच्या त्या कामात नक्षी आणि रंगसंगती यांचा सुंदर मेळ साधलेला असतो. पूर्वी त्या तपकिरी, काळा, निळा, हिरवा, लाल, इ. रंग झाडांच्या सालीपासून तयार करीत आणि त्यात सूत रंगवीत. हल्ली बहुधा आयते रंगीत सूत विकत घेऊन त्यापासून कापड विणतात. थंडीच्या दिवसात अंगावर घेण्यासाठी त्या सुती रग विणतात.

पदम स्त्रियांच्या कानातले अलंकार मोठे आणि विविध असतात. चांदीच्या तारेची सहा-सात वलये एकापुढे एक जोडून आणि त्यांना खाली मणी व घुंगर लावून एक अलंकार बनवतात. हा अलंकार कानात घातला असता, कानाचे छिद्र खूपच रुंद होते. याशिवाय, काही स्त्रिया लाकडाचा जाड तुकडा व चांदीचे फुलासारखे दिसणारे अलंकार कानात घालतात, गळ्यात रंगीबेरंगी मण्यांच्या माळा घालतात. त्यांच्या हातात अनेक तऱ्हेच्या बांगड्या असतात. त्या कमरेभोवती पितळी गोल चकत्या बसवलेला चामड्याचा पट्टा बांधतात. पदम पुरुष माळेचे अनेक फेरे गळ्याभोवती गुंडाळतात. त्यात पुढच्या बाजूला हाडाच्या दोन वाटोळ्या चकत्या बसविलेल्या असतात. काही माळा लांब असतात आणि त्यात हाडाचे लांब तुकडे, पितळी नळ्या वगैरे अडकवलेल्या असतात. याशिवाय हिरव्या व पांढऱ्या रंगाच्या तीन माळा त्यांच्या छातीवर रुळत असतात. त्यापैकी एकीत



टापूल

रानडुकराचा सुळा असतो. स्त्रियांचे आणि पुरुषांचे केस झाप पद्धतीने कापलेले असतात.



पदम पुरुष

**शस्त्रास्त्रे**– वाघ आणि वन यांना मनवलेल्या ढाली व शिरस्त्राणे ते वापरतात. पुढच्या बाजूला डुकराचे सुळे आणि वर अस्वलाचे कातडे किंवा पक्ष्यांच्या चोची लावून शिरस्त्राणे सुशोभित केलेली असतात. याशिवाय ते भाले, तलवारी, डाओ, चाकू, धनुष्य बाण, बंदुका, इ. हत्यारेही वापरतात.

**उद्योगधंदे**– पदम लोक झूम पद्धतीने शेती करतात. त्यासाठी रानातील थोडी जमीन तिथले गवत कापून साफ करतात आणि मोठी झाडे तोडतात. ती वाळली, की जाळतात आणि मग त्यात नांगरून धान्य पेरतात. साधारणपणे एकदा साफ केलेल्या जमिनीत एक ते तीन वर्षे त्यांना पीक मिळते. नंतर ती जमीन निरुपयोगी होते. मग ती सोडून दुसरी जमीन साफ करतात. प्रत्येक गावाची जमीन नद्या आणि पर्वतांच्या रांगा या सीमांनी मर्यादित केलेली असते. ही जमीन गावातील कुटुंबांना शेती करण्यासाठी विभागून दिलेली असते.

झूम पद्धतीमुळे प्रत्येक वर्षी शेतीसाठी त्यांना नवीन जमीन शोधावी लागते. अशा शोधाला त्यांच्या दृष्टीने फार महत्त्व असते. सर्वसाधारणपणे गावाचा मुख्य पुरुष इतर वडीलधाऱ्यांच्या सल्ल्याने आणि शुभशकुन पाहून योग्य जागा निवडतो. जंगलातील गवत व झाडेझुडपे कापत असताना ते मापुन नावाचा एक समारंभ करतात. त्यासाठी गावातील वडीलधारी मंडळी बांबूचे खांब आणतात आणि ते जमिनीत पुरतात. त्यांच्याबरोबर तान आणि सिक्याग या वृक्षांच्या दोन फांद्याही पुरतात. मोपुन

नागाची वेनाची एक टोपली भाता व पान भरून त्या दोन फांद्यावर टांगतात भाती व पान म्हणजे धान्याचे दाणे आहेत, असे समजतात त्याजवळ डुक्कर बळी देतात आणि मंत्र म्हणून त्याचे रक्त मातृदेवतेला शिंपडतात

जंगल साफ करण्याच्या दिवशी आजारी माणसे व लहान मुले वगळून गावातील सर्व स्त्री पुरुष रानात जातात पाडलेल्या झाडांच्या ओंडक्यांनी कुटुंबाच्या जमिनीची हद्द ठरवितात उरलेले ओंडके जाळण्यासाठी वापरतात जंगल तोडून साफ करायला साधारण महिना लागतो नंतर पंधरा दिवस ते वाळत ठेवतात मार्च–एप्रिल आणि जुलै–ऑगस्ट अशा दोन वेळा हे काम करतात जंगल तोडून झाले, की शेतीसंबंधीच्या भुता



पदम ग्रामप्रमुख

खेताना प्रसन्न करण्यासाठी जो समारंभ करतात, त्याला अरन किंवा पोबी असे म्हणतात त्या वेळी सर्व लोक जंगलातील काम पाच दिवस थांबवतात आणि घराच्या खांबांना आले, मांस व भात यांच्या पुरचुंड्या टांगून ठेवतात नंतर ग्रामवृद्ध जंगलात जाऊन बांबूचे खांब आणतात आणि मोशपच्या जवळ त्यांचा एक चौथरा उभारतात त्याच्या मध्यभागी बांबू व काही झाडांच्या फांद्या रोवतात एक डुक्कर आणि कोंबडी यांचे बळी देतात त्यांचे रक्त त्या उभारलेल्या चौथऱ्यावर शिंपडतात गावातील वृद्धांना तिथे भात मांस व अँपांग मद्य यांची मेजवानी देतात हा समारंभ झाल्यावर पेरणी करतात कापूस, भात, मका, मिलेट, नाचणी, वांगी, कांदा घेवडा, मिरच्या, आले, रताळी इत्यादी ते लावतात पपया फणस आणि संत्री ही फळे मुख्यतः पिकवतात हल्ली ते ऊसही पिकवू लागले आहेत पेरणी झाल्यावर गावातील सर्व लोक शेतामध्ये कुंपण उभारतात यानंतर एक दिवस विश्रांती घेऊन ताडमाड जेवतात आणि पशूंच्या देवाला ताहीं पन्नाय अर्पण करतात सुरणी झाल्यानंतर स्त्रिया आपापल्या घरी मोपुन सारखाच एक समारंभ करतात त्या समारंभात धान्याच्या काठीजवळ कोंबडीचे पिल्लू बळी देतात त्याचे रक्त काठीभोवती शिंपडतात आणि ते मारलेले पिल्लू एक रात्रभर कोठीत ठेवतात मग त्याचा पिसे काढून घेतात आणि काठीजवळ जमिनीत पुरतात रात्री मुली नृत्य करतात

शेवटच्या वेणणीच्या आधी जनावरांच्या सुखसमृद्धीसाठी एक उत्सव करतात ज्यांच्याकडे मिथुन असतील, असे लोक त्यांना रानातून घरी आणतात आणि घरासमोर बांधून ठेवतात आपल्या ऐपतीप्रमाणे लोक डुकरे आणि कोंबडीची पिल्ले बळी देतात आणि मांस व आरयाचे तुकडे भुताखेताना अर्पण करतात घराच्या दारावर मनुष्यांचे टांगून ठेवतात रात्री अँपांग आणि भात यांची मेजवानी करतात काही वेळा हा उत्सव चार पाच दिवस चालतो या उत्सवात रोज रात्री मोशपजवळ मुली नृत्य करतात शेत पिकल्यावर हातानेच भाताच्या लोंब्या खुडतात क्वचित त्यासाठी चाकूही वापरतात खुडलेले धान्य मळणीसाठी शेतावरच्या झोपडीत नेतात मळणी पायांनी करतात कापणी मळणीच्या दिवसात ते रात्री शेतावरच राहतात पाखडून स्वच्छ केलेले धान्य कोठीघरात मोठमोठ्या टोपल्यांत साठवतात रोजच्या रोज त्यातून दिवसाला लागेल तेवढे भात काढून नेतात भात आणि मीठ मिरची घातलेली पातळ पालेभाजी एवढेच त्यांचे रोजचे जेवण असते मासे आणि मांस ते कधीमधी खातात चुलीजवळ बसून तीन चार जण एकाच पानात जेवतात सकाळी, दुपारी आणि रात्री सारखेच पदार्थ असतात मधून मधून ते अँपांग पितात बरेच लोक तंबाकू खातात किंवा ओढतात काही लोकांना अफूचेही व्यसन असते

या लोकांना शिकारीची आवड असते उंदीर खारी, साळिंदर वगैरे प्राणी पकडण्यासाठी ते पिंजरे लावतात हरिण, रानडुकरे, वाघ, चित्ते वगैरे प्राण्यांची शिकार धनुष्यबाण व डाओ

या आयुधांनी करतात. दर वर्षी एकदा गावाची सामूहिक शिकार असते. शिकार शोधण्यासाठी ते तीन रात्री रानात झोपतात आणि चौथ्या दिवशी शिकार करून ती ग्रामवृद्धांना वाटून देतात. तेही उलट तरुण शिकाऱ्यांना भात आणि अँपाँग मद्य देतात. पुरुष शिकारीला गेलेले असतात, त्या तीन दिवसांत स्त्रिया आणि मुली शेतावर जात नाहीत. चौथ्या दिवशी आधी केळीचे पान कापतात आणि मग सर्वजण शेतावर जातात. मासे पकडण्यासाठी पुरुषांप्रमाणेच स्त्रियाही जातात. काही वेळा ते सामुदायिक रीत्याही मासे पकडतात.

**विवाहप्रथा** – एखाद्या मुलीशी लग्न करायची आपली इच्छा मुलगा आपल्या आईवडिलांच्या कानांवर घालतो. त्यांना जर हा संबंध पसंत असेल, तर मुलाची आई अँपाँग मद्य, दोन किंवा अधिक धूर देऊन वाळवलेल्या खारी व आलेपाक या वस्तू घेऊन मुलीच्या घरी जाते व मुलीला मागणी घालते. जर मुलीकडच्या लोकांनी या भेटवस्तू स्वीकारल्या, तर त्यांना हा संबंध मान्य आहे, असे समजतात आणि त्या दिवसापासून त्या दोघांचे लग्न पक्के झाले, असे मानतात. यानंतर केव्हाही मुलाला मुलीच्या घरी जाऊन तिच्या संगतीत रात्र घालवायला परवानगी असते. मुलगा आपल्या भावी सासू–सासऱ्यांना मधूनमधून अँपाँग आणि मांस भेटीदाखल पाठवतो व मुलीवरील आपले प्रेम व्यक्त करतो. मुलीकडील माणसेही त्यांना प्रतिभेट पाठवतात. श्रीमंत लोक आपल्या मुलामुलींचे विवाह ठरवताना श्रीमंत सोयरीक पसंत करतात आणि मुलांच्या इच्छा विचारातच घेत नाहीत. अशा संबंधात एखाद्या वेळी मुलीला मुलगा पसंत नसेल, तर तो तिचे मन वळवायचा प्रयत्न करतो. त्यात त्याला जर यश आले, तर ती रात्री आपल्या घरी त्याचे स्वागत करते. पण तिला मुलगा पसंत नसेल, तर ती राशेंगमध्येच आपल्या पसंतीच्या मुलाबरोबर रात्र घालवते.

पदम लोकांना मुलीसाठी देज द्यावे लागते. पण ते पैशाच्या किंवा जनावरांच्या रूपात नसते. त्यासाठी त्यांना वधूच्या घरी सारखा मांसाचा पुरवठा करावा लागतो. सामुदायिक मासेमारीच्या वेळी नवऱ्यामुलाच्या वाटचाला आलेले सर्व मासे आणि इतर वेळी त्याने स्वतः पकडलेल्या माशांपैकी अर्धे मासे त्याला बायकोच्या माहेरी पाठवावे लागतात. सामुदायिक शिकारीतला त्याचा वाटाही असाच जातो

एखादा तरुण जेव्हा श्रीमंत कुटुंबातील मुलीशी लग्न करतो, तेव्हा त्याला दोन समारंभ साजरे करावे लागतात. त्यांपैकी पहिला समारंभ युनिग उत्सवाच्या वेळी करतात. त्यासाठी दहा ओझी भात, निदान दोन डुकरे, अँपाँगची दहा नळकांडी, चार ते पाच ओझी शिजवलेला भात, दोन ते तीन ओझी वाळवलेले मांस, तेवढीच ओझी धुराने वाळवलेले उंदीर व खारी आणि एक मिथुन एवढा संभार घेऊन मुलाचे नातलग तरुण युद्धवेष चढवून मिरवणुकीने मुलीच्या घरी जायला निघतात. मुलीचे नातलग तरुणही असेच मिरवणुकीने नवऱ्याच्या



युद्धवेषात पदम पुरुष

घरी जायला निघतात. वाटेत उभय पक्षाची गाठ पडते आणि लुटूपुटीची लढाई होते. दोन तास अशी लढाई झाल्यावर सर्वजण दमतात आणि मुलीकडील तरुण मुलाकडच्या लोकांना वाट देतात. ते मुलीच्या घराजवळ आले, की मुलीकडच्या स्त्रिया त्यांचे स्वागत करतात. मुलाकडील लोकांनी त्यांना सर्व भेटी दिल्यावर, त्या स्त्रिया त्यांना अँपाँग आणि खाद्यपदार्थ देतात. मग मुलीचे आईवडीलही डुकरे किंवा मिथुन कापतात आणि मोठी मेजवानी देतात. असाच जो दुसरा समारंभ करतात, त्यात मिथुनाच्या ऐवजी डुकरे देतात. काही वेळा साटेलोटे पद्धतीने व पळून जाऊनही मुले–मुली लग्न करतात.

लग्न झाल्यानंतर थोडे दिवस तरुण आपल्या पित्याच्या किंवा सासऱ्याच्या घरी राहतो. साधारणपणे माहेरी राहून बायकोला एक–दोन मुले झाल्यावर तो नवे घर बांधतो. त्याचे वडील हयात असेपर्यंत जमीन व इतर संपत्ती मात्र वडिलां-

मवी व हुशार ग्रामवृद्धाच्या एका मंडळाचा अधिकार चालतो या मंडळाला केबांग असे नाव असून सामाजिक आणि राजकीय बाबतीत गावावर त्याची सत्ता असते गावातील सर्व कामे, सण, उत्सव, शिकार, नवी घरे बांधणे नवागताना



पदम मुली – नृत्यवेषात

स्थायिक व्हायला मदत करणे, शेतीसाठी नवीन जमीन तयार करणे अपराध्याला शिक्षा करणे, इ सर्व बाबतीत परंपरागत आचार, रीतिरिवाज व कायदा याना धरून केबांगचे सदस्य मार्गदर्शन करतात केबांगने एखाद्या बाबतीत निर्णय दिला, की गावातले लोक तो मानतात मोशपमधील तरुण त्याचा निर्णय सर्वांना कळवतात केबांगची सभा चालू असताना त्याच्या सदस्याना विशिष्ट प्रकारची अँपाँग वाटतात आणि त्याच्यासाठी मिथुन व डुकरे कापतात

काही वेळा केबांगच्या सदस्याना चोरीसारख्या एखाद्या बाबतीत निर्णय देता येत नाही तेव्हा ते आरोपीला दिव्य करायला सागतात उकळत्या पाण्यातून अंडे काढणे, उकळत्या शिशाचे थेंब हातावर घेणे, कोंबडीच्या पिलाचे थोडे मांस त्यात माती मिसळून खाणे, इ काही दिव्ये या लोकात प्रचलित आहेत

**देव धर्म** – सर्व नैसर्गिक शक्तीवर भुताखेताची सत्ता चालते, असा त्याचा विश्वास आहे त्यामुळे ते सदैव त्याना सतुष्ट ठेवण्याचा प्रयत्न करतात एखादा झरा एकदम आटतो, वायूची बने नष्ट होतात, जंगलात शिकार थोडीशीच मिळते, नद्यातून मासे नाहीसे होतात, पिके येत नाहीत, इ सर्व गोष्टीना भुताचा राग कारणीभूत असतो, असे ते मानतात अशा वेळी, एखाद्या अंगात येणाऱ्या माणसाकडून ते त्या भुताची इच्छा काय आहे, ते विचारतात आणि त्याप्रमाणे बलिदान करून त्याला सतुष्ट करतात

**मृतिकप्रथा** – हे लोक मृताना पुरतात मृत्यू झाल्यानंतर थोड्या दिवसानी मृताचा अंत्यसंस्कार करतात दूरच्या नातेवाईकाना त्या प्रसंगी उपस्थित राहता यावे, म्हणून हा अंत्यसंस्कार लांबवलेला असतो प्रेताला एका कुशीला वळवून त्याचे गुडघे हनवटीला चिकटवतात व कापडात गुंडाळून खड्ड्यात ठेवतात खड्ड्यात पाने व झाडाच्या डहाळ्या टाकलेल्या असतात त्यात प्रेत ठेवल्यावर त्यावर फळ्या टाकतात आणि माती टाकून खड्डा भरतात प्रेताबरोबर खोटे मणी, हार व पितळेचे एक भांडे पुरतात थडग्यावर एक लहानशी झोपडी उभारून त्यात भात आणि मद्य ठेवतात आठवडाभर रोज नवीन भात



थडग्यावरील झोपडी

व मद्य ठेवावे लागते तसेच तिथल्या झोपडीत विस्तवही पेटवून ठेवतात तो वर्षभर तसाच जळता राहावा लागतो काही महत्त्वाच्या व्यक्तीच्या बाबतीत विस्तव त्याहूनही जास्त दिवस जागृत ठेवतात मृताचे शिरस्त्राण, शस्त्रे व त्याने शिकारीत मारलेल्या पशूची शिरे, इ वस्तू त्या झोपडीवर टांगून ठेवतात

मत्यनतर काही दिवस घराशी पाठवान ज्या लोकांना परंतु खपला त्यांनी दिवा प्रेताला प्रकाश दिला असे तर गरा सात दिवस त्यांच्या घरात जात नाहीत त्यानंतर घराला गन्त करणा या त्यांना भजनाना दिला की ती गंदार पूर्ण झाला असे समजतात रिवाजाप्रमाणे या वेळी यासन्यासी दिल, दुसर किंवा मिथुन वळा देतात गना म्याला त्या प्राण्याचा काही भाग अर्पण करतात आणि मत पावूच्या आत्म्याशी मत व्यक्तीच्या आत्म्याकडे जाण्यासाठी प्रार्थना करतात मतान्या अत्यसंस्काराची जबाबदारी त्याच्या वारसाची जवळच्या नात वाईकाची किंवा त्याच्या कुळातल्या लोकांचा असते ही जबाबदारी त्यांनी टाळ याम केल्यास त्यांना दंड करत

*मत्यूनंतरही दुसऱ्या लोकात मतात्म्याचे अस्तित्व कायम असत, अशी या लोकांचा समजूत आहे* [ आरपेक्टस आफ पदम मिर्याग कल्चर– श्री सचिन रात, १९६० ]

## पदार्थदशमी

एक काम्य व्रत या व्रताला पदार्थव्रत असेही म्हणतात या व्रताचा प्रारंभ मार्गशीर्ष शुद्ध द्वादशीपासून होतो त्या दिवशी उपवास करून दशदिशा व त्यांचे दिक्पाल यांची पूजा करतात एक वर्षपर्यंत प्रत्येक महि न्याच्या शुद्ध दशमीसही दिक्पालपूजा करायची असते इंद्र, अग्नी, यम, निऋती, वरुण, वायू, कुबेर, ईशान, ब्रह्मा व अनंत असे ते दिक्पाल होत वर्षअखेरीस दुभती गाय दान देऊन ब्राह्मणभोजन घालतात फल– धन धान्य, विद्या यांची समृद्धी [ ब्र प ]

## पदार्थविज्ञान

सृष्टीतील जड पदार्थाचे गुणधर्म आणि उष्णता, विद्युत, गती, इ शक्तींचा पदार्थां वर होणारा परिणाम यांचे जे शास्त्र, त्याला हे नाव आहे त्यात शक्तींची भिन्न रूपे, प्रकाश ध्वनी, चुंबकत्व, पदार्थातील मूलद्रव्ये व त्यांचे अणुपरमाणू या सर्वांचा विचार केला जातो प्राचीन भारतीय पंडितांनी या शास्त्राचा विचार धर्मशास्त्र व तत्त्वज्ञान यांच्या अनुषंगाने केला आहे सृष्टीचा उत्पत्ती, विश्वाची रचना, त्याचे आदिकारण, मूलद्रव्ये, यांसबंधी प्राचीन ऋषींनी जे तत्त्वचिंतन केले, त्यातून अध्यात्मशास्त्र उगम पावले पंचमहाभूतांच्या भिन्न भिन्न प्रकारच्या संयोगाने सृष्टी निर्माण झाली, असे त्यात प्रतिपादले आहे अनेक ऋषींची जिज्ञासा व संशोधनबुद्धी यामुळे निरनिराळी दर्शने उदयाला आली त्यांतील लोकायत हे दर्शन जडवादी आहे पंचेंद्रियांना प्रतीत होणारी जड सृष्टी तेवढी सत्य असून, पृथ्वी, जल, अग्नी व वायु या चार मूलतत्त्वांपासून ती उत्पन्न झाली आणि चैतन्यही त्याच जडातून निर्माण झाले, असे त्यात प्रतिपादिले आहे

आध्यात्मिक दर्शनांपकी वैशेषिक दर्शनात द्रव्यांचे पृथ्वी, आप, तेज, वायु, आकाश, काल, दिक्, आत्मा व मन असे नऊ प्रकार मानलेले आहेत त्यांतील पहिल्या पाच द्रव्यांचे अनुक्रमे गंध, रस, रूप, स्पर्श व शब्द हे गुण मानले पहिल्या चार द्रव्यांची घटना परमाणूंनी झाली असून एखाद्या द्रव्याचे सूक्ष्मातिसूक्ष्म विभाजन करत गेल्यास शेवटी असा कण उरतो की ज्याचे विभाजन करणे अशक्य होते त्या अतिसूक्ष्म कणाला परमाणू म्हणतात परमाणू हेच जगाचे मूळकारण आहे हे परमाणू भिन्न भिन्न प्रकारे एकत्र आले असता त्यांच्यात निरनिराळे गुण निर्माण होतात व त्यामुळे निरनिराळे पदार्थ निर्माण होतात पृथ्वी, आप, तेज व वायू यांचे परमाणू स्वभावतःच भिन्न असून, पृथ्वीच्या मूळ *परमाणूत रूप, रस, स्पर्श व गंध हे चार गुण असतात* जलाच्या परमाणूत तीन, तेजाच्या परमाणूत दोन व वायूच्या परमाणूत एक गुण असतो कणादाचे हे विचार आधुनिक पर माणुवादाशी *जुळणारे आहेत हे विचार न्याय दर्शनातही* आढळतात

सांख्य दर्शनातला पहिला सिद्धान्त असा आहे की या विश्वात नवीन असे काहीच निर्माण होत नाही हा सिद्धान्त अर्वाचीन पदार्थविज्ञानातील द्रव्याच्या अविनाशित्वाच्या तत्त्वाशी सुसंगत वाटतो या दर्शनात सर्व पदार्थांचे जे मूलद्रव्य त्याला प्रकृती हे नाव दिलेले आहे पदार्थांच्या गुणांचे सत्त्व, रज व तम असे *तीन भेद मानलेले असून, त्यांचा कमी अधिक प्रमाणात संयोग* झाल्यामुळे नानाविकारात्मक वा गुणात्मक सृष्टी उत्पन्न होते, असे सांख्यांनी प्रतिपादिले आहे

बौद्ध व जैन दर्शनांनीही अणुपरमाणूंचा विचार केलेला आहे पण हे सर्व विचार केवळ तर्कावर आधारित होते त्यांना प्रयो गाचा निकष लावलेला नव्हता

भारतीय दर्शनांत अणुपरमाणूंच्या गतीसंबंधीही विचार केलेला आढळतो त्या गतीला परिस्पंद असे म्हणतात प्रशस्त पादाने आपल्या भाष्यात पदार्थांच्या गतीचाही विचार केलेला आहे त्यात गतीचे भिन्न प्रकार सांगितलेले असून गमन, कंपन, *स्पंदन, भ्रमण, आरोहण, अभिघात,* अशी त्यांची नावे दिली आहेत व त्यांची कारणेही सांगितली आहेत गती मोजण्यासाठी अंतर व काल यांची अत्यंत सूक्ष्म परिमाणे प्राचीन काळी उप योगात होती कालाचा अत्यंत सूक्ष्म भाग म्हणजे त्रुटी व लांबीचे सूक्ष्म परिमाण म्हणजे त्रसरेणू होय

त्रुटी = $\frac{१}{३३७५०}$ सेकंद आणि त्रसरेणू = $\frac{१}{३४९५२५}$ इंच

ध्वनिशास्त्रात भारतीय शास्त्रज्ञांनी सांगितलेल्या पुष्कळ कल्पना आजही अबाधित आहेत हवेतील कंपनामुळे नादलहरी

उत्पन्न होतात व त्यामुळे ध्वनी ऐकू येतो, असे शबरस्वामींचे मत होते प्रतिध्वनी कसा उत्पन्न होतो हे प्राचीनांना माहीत होते स्वराची तीव्रता, उंची व घन याचेही ज्ञान होते संगीतशास्त्राचा तर खूपच विकास झालेला होता

प्रकाश व उष्णता यांचे प्रसारण म्हणजे अत्यंत सूक्ष्म कण अतिशय वेगाने सर्व दिशांना सरळ रेषेत जातात ही कल्पना भारतीय पंडितांनी लिहून ठेवली आ० प्रकाशक्रियांचे परिवर्तन, वक्रीभवन, इ गोष्टींचा विचारही त्यांनी केलेला दिसतो लोहचुंबकत्वाचा उपयोग नौकानयनात केला जात असे त्यासाठी लोखंडाचा एक मासा तेलाने भरलेल्या पात्रात ठेवीत पृथ्वीच्या लोहचुंबक धर्मामुळे विशिष्ट दिशेला त्याचे तोंड वळत असे ते एक प्रकारचे होकायंत्रच होते त्याला मत्स्ययंत्र असे म्हणत काचेची भिंगे करण्याची कलाही प्राचीन काळी भारतीय कारागिरांना अवगत होती

अशा प्रकारे तात्त्विक आणि व्यावहारिक या दोन्ही क्षेत्रात पदार्थविज्ञानाचा मर्यादित विकास प्राचीन भारतात झाला होता [पा सा ए हिं, संस्कृतिसंगम, वि उ वि ]

**पदिनेणकीलक्कणक्कू** तमिळ भाषेतला अठरा सूक्ति ग्रंथांचा संग्रह या सर्व सूक्तींत नीती आणि शील यांना प्राधान्य दिले आहे यांतल्या कित्येक सूक्ती संस्कृत सुभाषितांसारख्या आहेत हे सर्व ग्रंथ तमिळ संघम कालानंतरचे आहेत

तिरुवल्लुवर यांचा कुरळ हा नीतिग्रंथ या संग्रहातलाच असून, त्याला तमिळवेद असे म्हणतात विद्वानांनी या ग्रंथाची मुक्त कंठाने प्रशंसा केली आहे नालडियार हा या संग्रहातील नीतिग्रंथही सुप्रसिद्ध आहे पाहा– कुरळ, नालडियार [त सा स ]

**पद्दूरणी** एक यज्ञीय पात्र यज्ञात सोम विकत घेण्याच्या वेळी गाय नेली जात असता तिच्या सातव्या पावलावर तुपाची आहुती देतात नंतर त्या तुपाने ओलसर झालेली माती एका थाळीत भरून घेतात त्या थाळीलाच पद्दूरणी असे म्हणतात त्या मातीचा तिसरा हिस्सा यजमानपत्नीला देतात पुढे हविर्द्रव्य वाहणाऱ्या गाड्यांना वंगण म्हणून ही माती उपयोगात आणायची असते [श्री विद्याधरशास्त्री भिडे]

**पद्मकयोग** एक शुभ योग याचे प्रकार असे – (१) माघ शुद्ध सप्तमी ही षष्ठीयुक्त असून, त्या दिवशी रविवार असणे या दिवशी केलेल्या सूर्यपूजेचे फल सूर्यग्रहणाच्या दिवशी केलेल्या सूर्यपूजेपेक्षा अधिक असते (२) विशाखा नक्षत्री सूर्य व कृत्तिका नक्षत्री चंद्र असणे या योगावर पुष्कर तीर्थात स्नान केल्यास व त्या वेळी कपिला गाय दान दिल्यास विष्णुपदप्राप्ती होते असे सांगितले आहे (३) विष्टी, व्यतीपात व रविवार यांचा मेळ जमणे [हि ध , नि सिं , पु चिं ]

**पद्मगुप्त परिमल** (इ स चे ११ वे शतक) एक कवी हा धारा नगरीच्या सिंधुराजाच्या दरबारातला राजकवी होता याच्या पित्याचे नाव मृगांकगुप्त असे होते याने संस्कृत साहित्यातील पहिले ऐतिहासिक महाकाव्य रचले या महाकाव्याचे नाव नवसाहसांकचरित असे आहे

या महाकाव्याचे १८ सर्ग असून त्यात सिंधुराजाच्या पूर्वजांचे म्हणजे परमारवंशीय राजांचे वर्णन केलेले आहे हे महाकाव्य वैदर्भी रीतीचे उत्कृष्ट उदाहरण समजले जाते सौंदर्य, प्रसाद व कल्पना हे गुण याच्यात आहेत निसर्गदृश्यांचे वर्णनही सुंदर आहे याच्या कृतींवर महाकवी कालिदासाच्या काव्याची छाप दिसते पाहा– परमार राजवंश [स सा इ ]

**पद्मतीर्थ** दक्षिण भारतातील एक तीर्थ हे पंढरपूर क्षेत्रातील पांडुरंगमंदिराच्या पश्चिम अंगाला आहे इथे पांडुरंगाने पद्मादी द्रव्यनिधी स्थापन केले, म्हणून या तीर्थाला पद्मतीर्थ असे नाव पडले, अशी कथा आहे या ठिकाणी पद्मावती देवीचे मंदिर आहे बुधवारयुक्त अष्टमीच्या दिवशी इथे स्नान केले असता सर्व पापांचा नाश होतो, अशी भाविकांची श्रद्धा आहे

या तीर्थासंबंधी अनेक आख्यायिका सांगतात त्यांतील एक अशी– सुशर्मा नावाचा एक ब्राह्मण होता तो मद्य-मांस सेवन करून पातकी बनला होता एकदा तो ब्राह्मण फिरत फिरत पद्मतीर्थाजवळ आला त्याने तिथे स्नान करून तिथल्या देवीचे दर्शन घेतले पुढे काही काळाने तो मरण पावला त्या वेळी त्याला नेण्यासाठी यमदूत व विष्णुदूत असे दोघेही आले ब्राह्मणाला कोणी न्यायचे, या बाबतीत त्यांचा परस्परांत वाद झाला अखेर विष्णुदूतांनी त्या ब्राह्मणाला विष्णुलोकात नेले यमदूतांनी घडलेला वृत्तांत यमाला निवेदन केल्यावर यम म्हणाला 'त्या ब्राह्मणाने पद्मतीर्थावर स्नान केले होते, त्यामुळे त्याची सर्व पापे नष्ट झाली, अतएव विष्णुदूतांनी त्याला वैकुंठात नेले हेच बरोबर झाले' पाहा – पंढरपूर [पंढरीमाहात्म्य ]

**पद्मनर्तेश्वर** बौद्ध धर्मातील अवलोकितेश्वराच्या मूर्तीचा एक प्रकार साधनमालेत त्याचे वर्णन आहे, ते असे– एकमुख, अठरा हातांचा व अर्धपर्यंकासनस्थित त्याच्या

टाच्या उजव्या बाजूला तारा, सुधन भ्रकुटी आणि हयग्रीव हे सहचर आहेत

विश्वकमल हे त्याचे अभिज्ञान चिन्ह असून, हा नृत्यप्रिय बोधिसत्त्व समजला जातो याच्या ध्यानाचे आणखी दोन पर्याय आहेत, ते असे–

(१) द्विभुज, रक्तवर्ण, पशुवाहन व सर्वालंकारभूषित



पद्मनर्तेश्वर

याच्या मस्तकावर अमिताभाची मूर्ती असते आणि हा पांडर वासिनी देवीने आलिंगित असतो

(२) त्रिनेत्र, अष्टभुज, यज्ञोपवीतधारी, अर्धपर्यंकस्थित व तांडव अवस्थेत असलेला याच्या हातात वज्रांकित दंड, त्रिशूळ, माला, कमंडलू, रक्तकमल, इ वस्तू असतात त्याच्या परिवारात आठ देवी असतात [ इ बु इ ]

**पद्मनाभद्वादशी** आश्विन शुद्ध द्वादशी या दिवशी हे काम्य व्रत करतात त्याला पद्मनाभव्रत असेही म्हणतात त्या दिवशी पद्मनाभ विष्णूची सुवर्णमूर्ती स्थापून तिची पूजा करतात, रात्री जागरण करतात व दुसऱ्या दिवशी ती मूर्ती ब्राह्मणाला दान देतात [ व्र प ]

**पद्मनाभ मिश्र** (इ स चे १६ वे शतक) विहार प्रदेशा तील मिथिला नगरीचा एक सुविख्यात पंडित हा नैयायिक, वेदांती, साहित्यशास्त्रज्ञ व कवी होता वीरभद्रचंपू, चिंतामणिपरीक्षा, सेतु (अथवा वैशेषिक सेतू), किरणावलीभास्कर, वर्धमानेन्दु, राद्धान्तमुक्ताहार, काणाद रहस्यग, खण्डनखण्डखाद्यटीका, शरन्नागम, इ ग्रंथ त्याने लिहिले आहेत वीरभद्रचंपूत वीरभद्राचे चरित्र प्रासादिक संस्कृतात वर्णन केलेले आहे त्यातील एक श्लोक असा –

> **निर्वापणाय हृदयस्थवियोगवह्ने–**
> **रश्रोरजस्रमिह य क्रियतेऽभिषेक ।**
> **तेनोद्गता सुतनु धूमपरम्परेव**
> **रात्रौ तमस्ततितया प्रथिमानमेति ॥**

अर्थ– अंत करणात असलेल्या वियोगरूपी अग्नीला विझव ण्यासाठी नयनातून पाझरणाऱ्या अश्रूंचा जो अविरत अभिषेक करावा लागतो, त्यामुळे या आगीतून जो धूर उत्पन्न होतो तोच रात्रीच्या घनदाट अंधकाराच्या रूपाने प्रकट होतो

पद्मनाभ कवीच्या कर्ज झाले होते ते वीरभद्राने फेडले, अशी आख्यायिका आहे या उपकाराची अंशत फेड म्हणून पद्मनाभाने या चरित्राची रचना केली [ विष्णुभूमी १५ जून १९५६ ]

**पद्मनाभाचार्य** (इ स चे १६ वे शतक) मध्वाचार्यांचा शिष्य याचे पहिले नाव शोभनभट्ट असे होते तो अतिशय विद्वान म्हणून प्रसिद्ध होता चालुक्यांची राजधानी असलेल्या कल्याण नगरीत तो राहात असे त्याच ठिकाणी त्याचा व मध्वाचार्यांचा शास्त्रविषयक वादविवाद झाला या वादात शोभनभट्टाचार्यांचा पराभव झाला व त्याने मध्वाचार्यांचे शिष्यत्व पत्करले मग मध्वाचार्यांनी त्याचे नाव पद्मनाभाचार्य असे ठेवले मध्वाचार्यांनंतर तो त्याचा उत्तराधिकारी झाला मध्वाचार्यांच्या ग्रंथावर त्याने टीका लिहिल्या आहेत त्याशिवाय त्याने पदार्थसंग्रह, मध्वसिद्धान्तसार, इ काही ग्रंथही लिहिले आहेत [ हिंदुत्व ]

**पद्मपाणी** एक ध्यानी बोधिसत्त्व ध्यानी बुद्ध अमिताभ व त्याची शक्ती पांडरा यांच्यापासून हा उत्पन्न झाला याला अवलोकितेश्वर असेही म्हणतात पद्म हे याचे अभिज्ञान चिन्ह असून, याचा वर्ण लाल आहे 'ॐ मणिपद्मे हुम्' हा याचा मंत्र आहे अजंठ्याच्या लेण्यातले याचे चित्र जगप्रसिद्ध आहे नेपाळ व तिबेट या देशातही याच्या अनेक मूर्ती आढळतात त्यात याच्या हातात बहुधा एक कमळ असते, म्हणून *याला पद्मपाणी हे नाव मिळाले आहे पाहा– अवलोकितेश्वर* [ इ बु इ, गॉ नॉ बु, ए सा रि ए ]

**पद्मपादाचार्य** (इ स चे ८ वे शतक) आद्य शंकराचार्यांच्या चार प्रमुख शिष्यांपैकी एक हे काश्यपगोत्री ऋग्वेदी ब्राह्मण असून, चोळदेशाचे रहिवासी होते

त्यांचे आई-वडील अहोबळ नगरी राहत असत. त्यांना नरसिंहाची उपासना होती. नरसिंहाच्याच कृपेने पद्मपादाचा जन्म झाला असे सांगतात. पित्याप्रमाणेच पद्मपादाचार्यही नरसिंहाचे भक्त होते. नरसिंहाच्या प्रेरणेने ते वेदविद्येच्या अध्ययनासाठी काशी क्षेत्री गेले. तिथे वेदाध्ययन करताना त्यांची व आद्य शंकराचार्यांची भेट झाली. आचार्यांनी त्यांच्या विद्येची परीक्षा घेतली व ते परीक्षेत चांगल्या प्रकारे उत्तीर्ण झालेले पाहून त्यांना संन्यासदीक्षा दिली. दीक्षेनंतर पद्मपादाचार्य असे त्यांचे नाव ठेवले. पुढे ते आचार्यांचे निस्सीम भक्त बनले. याच्या नावामागची एक आख्यायिका आहे, ती अशी –

एकदा आचार्यांची करुण हाक त्यांच्या कानी आली आणि ती हाक ऐकल्यावर ते आचार्यांच्या समीप जाण्यासाठी उतावीळ झाले. वाटेत होती अलकनंदा नदी. तिला पूलही होता. पण ते त्या पुलावरून न जाता सरळ नदीच्या पात्रात उतरले. नदीचे पाणी बरेच होते. पण त्यांच्या भक्तीचे सामर्थ्य एवढे, की नदीच्या पाण्यातून जात असताना त्यांच्या प्रत्येक पावलाखाली कमळे निर्माण होऊ लागली. त्या कमळांवर पाय देत देत ते पलतीरी सुखरूप पोचले. त्यांच्या पायाखाली अशी कमळे उत्पन्न झाली म्हणून त्यांना पद्मपाद असे नाव पडले.

ही आख्यायिका पद्मपाद या नावाची व्युत्पत्ती सांगण्यासाठी मुद्दाम घडविलेली दिसते.

पद्मपादाचार्य संन्यास घेतल्यानंतर काही काळ हिंडत असत. पुढे आचार्यांकडून अनुज्ञा घेऊन ते एकटेच दक्षिण भारतातील तीर्थयात्रेला निघाले. कालहस्ती, शिवकांची, कुंभकोण, पुंडरीकपूर, शिवगंगा, रामेश्वर, इ. तीर्थांच्या यात्रा करून ते आपल्या गावी परतले.

पुढे ते आपल्या मामाच्या गावी येऊन राहिले. तिथे येण्यापूर्वीच पंचपादिका हा ब्रह्मसूत्रावरील टीकाग्रंथ त्यांनी लिहिला होता. त्यांचे मामा हे द्वैती होते. आपला भाचा विद्यासंपन्न होऊन आला व तो ब्रह्मसूत्रभाष्यावर टीकाग्रंथ लिहू शकला, हे पाहून मामांना फार कौतुक वाटले. प्रत्यक्ष टीका वाचल्यावर मात्र भाच्याने आपल्या द्वैत मताचे खंडन करून अद्वैताचा पुरस्कार केल्याचे त्यांना आढळले. त्यामुळे कौतुक नष्ट झाले व ते मनोमन पद्मपादाचा द्वेष करू लागले.

पद्मपाद जेव्हा पुनश्च तीर्थयात्रेला निघाले, तेव्हा त्यांनी आपला ग्रंथ मामांकडेच ठेवला. मामा आपला द्वेष करतात हे त्यांना ठाऊकच नव्हते. मामाही अशा संधीची वाटच पाहत होते. भाच्याचा ग्रंथ तर जळावा आणि आपल्यावर आळ मात्र न यावा, या हेतूने त्यांनी स्वतःच्या घरालाच आग लावून दिली. त्या आगीत घराबरोबर पद्मपादाचा ग्रंथही जळून गेला.

पद्मपादाचार्य यात्रेहून परत येतात, तो ही अनर्थकारक वार्ता त्यांना समजली. मामांनीही शोकाचे प्रदर्शन करून नक्राश्रू ढाळले. पद्मपादाचार्यांना त्यामुळे दुःख तर झाले, पण ते हताश झाले नाहीत. ते म्हणाले, 'ग्रंथ जळून गेला तर जाऊ दे! माझी बुद्धी तर शाबूत आहे! मी ग्रंथ पुन्हा लिहून काढीन.'

मग त्यांची बुद्धीही नष्ट व्हावी म्हणून मामांनी एक नवा कुटिल डाव रचला. त्यांनी प्रसंग साधून पद्मपादांना अन्नातून विष चारले. त्यामुळे पद्मपादाचार्यांची बुद्धीच निकामी झाली. मग त्यांनी आपल्या गुरूंच्या सन्निध जाऊन राहायचे ठरवले. त्या वेळी शंकराचार्य केरळात होते. त्यांच्याकडे जाऊन पद्मपादांनी आपला सर्व वृत्तांत त्यांना निवेदन केला. शंकराचार्यांनी त्यांचे सांत्वन केले आणि त्यांची बुद्धीही त्यांना परत मिळवून दिली. मग पद्मपादांनी पुनश्च तो ग्रंथ लिहून काढला.

आचार्यांच्या अद्वैत मताचा प्रभावी प्रचार करण्याचे महान कार्य पद्मपादाचार्यांनी केले. ते वेदान्ताप्रमाणेच तंत्रशास्त्राचेही गाढे पंडित होते. त्यांनी लिहिलेल्या ग्रंथांत वर उल्लेखिलेला पंचपादिका हा ग्रंथच प्रमुख आहे. शंकराचार्यांच्या ब्रह्मसूत्रभाष्यावरची ही पहिली टीका होय. तिच्यात चतुःसूत्रीचे विस्तृत विवेचन केलेले आहे. या ग्रंथावर पुढच्या काळात अनेक महत्त्वाचे विवरणग्रंथ लिहिले गेले.

याशिवाय विज्ञानदीपिका, विवरणटीका, पंचाक्षरीभाष्य, प्रपंचसार, आत्मानात्मविवेक असे अन्य काही ग्रंथही पद्मपादाच्या नावावर आहेत. [भा. च. को.; श्रीशंकराचार्य]

**पद्म पुराण** (१) एक वैष्णव पुराण. पुराणांच्या यादीतले हे दुसरे होय. देवीभागवतात मात्र या पुराणाला चौदावा क्रमांक दिलेला आहे. हे महापुराणांपैकी एक आहे. श्लोकसंख्येच्या दृष्टीने हे स्कंद पुराणाच्या जोडीला येईल. याची श्लोकसंख्या ५५ हजार आहे. म्हणजे हे पुराण महाभारताच्या निम्म्याने मोठे. याच्या बंगाली व देवनागरी अशा दोन प्रती उपलब्ध आहेत. देवनागरीतील प्रत पुण्याच्या आनंदाश्रमाने चार भागांत छापलेली असून, बंगाली प्रत अजून हस्तलिखित स्वरूपातच राहिली आहे. प्रस्तुत पुराणाची पाच खंडे आहेत, त्यांची नावे अशी –

**प्रथमं सृष्टिखण्डं हि भूमिखण्डं द्वितीयकम् ।**
**तृतीयं स्वर्गखण्डं च पातालं च चतुर्थकम् ।।**
**पञ्चमं चोत्तरं खण्डं सर्वपापप्रणाशनम् ।**

अर्थ – पहिले सृष्टिखंड, दुसरे भूमिखंड, तिसरे स्वर्गखंड, चौथे पातालखंड व पाचवे उत्तरखंड होय. हे पुराण सर्व पापे नष्ट करणारे आहे.

प्रस्तुत पुराणाचा पहिला नमनाचा श्लोक असा—

**स्वच्छं चन्द्रावदातं करिकरमकरक्षोभसञ्जातफेनं ।**
**ब्रह्मोद्भूतिप्रसक्तव्रतनियमपरैः सेवितं विप्रमुख्यैः ।।**
**ओंकारालङ्कृतेन त्रिभुवनगुरुणा ब्रह्मणा दृष्टिपूतम् ।**
**सम्भोगाभोगरम्यं जलमशुभहरं पौष्करं वः पुनातु ।।**

*अर्थ* – स्वच्छ, चंद्राप्रमाणे शुभ्र, हत्तीच्या सोंडा आणि सुसरी यांच्या आघातामुळे फेसाळलेले ब्रह्मोत्पत्तीची इच्छा धरणाऱ्या व व्रत नियमपरायण अशा विप्रश्रेष्ठांनी सेवा केलेले ओंकार ध्वनीने भूषित व त्रिभुवनाचा गुरु असलेल्या ब्रह्मदेवाच्या दृष्टिपाताने पुनीत झालेले, दर्शन, स्पर्श, अवगाहन, या गोष्टींनी आनंद देणारे आणि अशुभाचा नाश करणारे असे जे पुष्कर तीर्थाचे जल, ते तुम्हाला पावन करो.

खंडक्रमाने प्रस्तुत पुराणात विषय आले आहेत, ते असे—

**सृष्टिखंड** – सूत शौनक संवादातून पुराणाचा प्रपंच पुलस्त्य-भीष्म संवादद्वारा सृष्टिकथा, मन्वंतरादिपरिगणनकथन, प्रलय वर्णन, विष्णूने वराहरूप घेऊन केलेला पृथ्वीचा उद्धार, चार वर्णांची उत्पत्ती, विष्णु-ब्रह्मसंवाद, दक्षप्रजाविन्यास, देव दानव-गंधर्व उरग राक्षस, इत्यादींची उत्पत्ती, बाणासुरचरित्र, गरुड, संपाती व जटायू यांच्या जन्मकथा, पृथूचे उपाख्यान, आदित्यवंशकथन, इक्ष्वाकुवंशवर्णन, पितृवंश, सोमोपाख्यान, पुरूरव्याचे चरित्र, कार्तवीर्य – उपाख्यान, यादवांची उत्पत्ती, कृष्णाची जन्मकथा, विष्णूने दशावतार धारण केले त्याचे कारण, भृगूचा विष्णूस शाप, शिवकृत ब्रह्मशिरच्छेद, शिवाला ब्रह्महत्या, वाराणसी माहात्म्य, पुष्करोत्पत्ती, ब्रह्मकृत यज्ञानुष्ठान, सरस्वतीमाहात्म्य, वृत्रासुरोपाख्यान, दधीचिकथा, अगस्त्यचरित्र, वीरभद्रोत्पत्ती, वामनावतार, तारकासुरकथा, कार्तिकेयजन्म, गंगामाहात्म्य, सूर्यचरित्र, दुर्गापूजा इत्यादी.

**भूमिखंड** – शिवशर्मा ब्राह्मणाला पितृभक्तीच्या द्वारे स्वर्ग प्राप्ती, देवकथा, पृथुचरित्र, इंद्राला इंद्रपदाची प्राप्ती, सुव्रतो-पाख्यान, मरुतांची उत्पत्ती, जैनधर्मकथन, सुदर्शनोपाख्यान, नहुषाचे व ययातीचे आख्यान, शिवधर्मकथन, यमपीडाकथन, स्वर्ग वर्णन, वासुदेवस्तोत्र, अशोकसुंदरीची कथा, इत्यादी.

**स्वर्गखंड** – दुष्यंतचरित्र, अप्सरालोकवर्णन, सूर्यलोकवर्णन, रुद्रसर्ग, वरुणोपाख्यान, रावण कुबेराचा जन्म, स्वर्लोक व मर्त्य-लोक यांचे वर्णन, वैकुंठवर्णन, सगराख्यान, गंगावतरण, दिवोदास, हरिश्चंद्र व मांधाता यांची चरित्रे, आश्रमधर्म, भक्ष्याभक्ष्यविचार, दक्षयज्ञ, सतीचा देहत्याग, राजधर्म, इत्यादी.

**पातालखंड** – रामचरित्र, सीतात्याग, कामाक्षीचे चरित्र, च्यवनाख्यान, नीलगिरीयात्राविधी, गंडकीमाहात्म्य, पुरुषोत्तम स्तोत्र, सुबाहुचरित्र, सत्यवानाची कथा, कर्मविपाक, वाल्मीकींचे चरित्र, कृष्णचरित्र, वृंदावनमाहात्म्य, हरिपूजाविधी, कृष्णमंत्र दीक्षाविधान, मासकृत्य, शिवलिंगपूजेचे नियम, शिवपूजावर्णन, महापुराणे व उपपुराणे यांच्या संख्येचे कथन, इत्यादी.

**उत्तरखंड** – बदरिकाश्रमवर्णन, नारदाचे उपाख्यान, श्रीशैल, हरिद्वार, गया, गंगा, तुळशी, प्रयाग, अन्नदान, एकादशी इत्यादींची माहात्म्ये, दानप्रशंसा, चातुर्मास्यव्रतविधी, मुद्गल मुनीचे आख्यान, विष्णुसहस्रनाम स्तोत्र, रामरक्षा, नमस्कार, अपामार्जन, वैष्णवलक्षण, मासमाहात्म्ये, वैशाखमाहात्म्य, विविधतीर्थमाहात्म्य, गीतामाहात्म्य, भागवतसप्ताहविधी, माघस्नानकथा, गुरुपत्नीपुत्रांना गुरुशुश्रूषाकथा, माघस्नान माहात्म्ये, विराटरूप सृष्टिकथन, दशावतारवर्णन, इ. विषय या खंडात आले आहेत.

आनंदाश्रमात छापलेल्या पद्म पुराणाच्या प्रतीत आदी नावाचा एक खंड अधिक आहे. मत्स्य व पद्म या दोन्ही पुराणांतील विषय एकच आहेत. त्यामुळे या दोन्हींना एकमेकांचे अंश मानले जाते. पद्म पुराणाची अध्यायसंख्या ६२८ व श्लोक संख्या ४८४५२ मिळते. भागवत आदी पुराणांच्या सूचीत दिलेल्या संख्येपेक्षा ही संख्या बरीच कमी आहे. फलत: या ग्रंथात पद्म पुराणाचे नाना विषयावरचे श्लोक प्रमाण म्हणून उद्धृत केले आहेत. *या प्रचंड महापुराणाचे मूलरूप केवढे होते,* ते सांगणे कठीण आहे. विद्वानांनी या पुराणातल्या कथांचे समीक्षण करून त्यातल्या अनेक कथा अत्यंत प्राचीन असल्याचे सांगितले आहे. डॉ. ल्यूडर्सच्या मते पद्म पुराणातील ऋष्यशृंगाची कथा महाभारतातल्या त्या कथेपेक्षा प्राचीनतर आहे. पद्म पुराणातले तीर्थयात्राप्रकरणही वनपर्वातल्या तीर्थयात्राप्रसंगा-पेक्षा प्राचीन असल्याचे कित्येक विद्वान मानतात. कालिदासाच्या शाकुंतल नाटकाची कथा महाभारतातल्या कथेपेक्षा पद्म पुराणातल्या कथेशी खूपच मिळती जुळती आहे. पातालखंडा-तली रामकथा आणि रघुवंश यांच्यात खूपच साम्य आहे. त्यावरून कालिदासाने पद्म पुराणातूनच आपले विषय निवडले असावे, असा विद्वानांचा तर्क आहे.

पद्म पुराणाचे उत्तरखंड सर्वांत मोठे आहे. मुद्रित उत्तर खंडाचे २८२ अध्याय आहेत, तर वंगीय हस्तलिखित प्रतीत ते १७२ आहेत. उत्तरखंड या नावावरूनच ते खंड मूळ पुराणाला मागाहून जोडले गेले आहे, हे सिद्ध होते. पण मागाहून म्हणजे कोणत्या काळात हे सांगणे मात्र कठीण आहे. त्यात रामानुजाच्या मताचा उल्लेख येतो, त्यावरून ते रामानुजाचार्यांनंतर निर्माण झाले, असे म्हणावे लागते. प्रस्तुत खंडात द्रविड देशातल्या एका

वष्णव राजाची कथा दिलेली आहे हा राजा प्रथम वष्णव होता, पण शवाच्या आग्रही मताचा प्रभाव पडून त्याने वष्णव घम सोडला इतकेच नव्हे, तर त्याने आपल्या राज्यातल्या विष्णुमर्ती उचलून फेकन दिल्या, विष्णुमंदिरे बद केली व आपल्या प्रजेला शव बनण्याची सक्तीही केली, असे सागतात श्री अशोक चतर्जी या विद्वानाच्या मते वरील राजा म्हणजे चोळ वशातील कुलोत्तुग (दुसरा) होय तो शवाच्या प्रभावाने वीरशैव बनला होता इ स ११३३ हा त्याच्या राज्यारोहणाचा काल आहे त्यावरून उत्तरखडाची रचना त्या कालानतर झाली असली पाहिजे

प्रस्तुत खडातले अनेक विषय प्रधान विषयाशी सबद्ध नाहीत यातली अनेक उपाख्याने म्हणजे पूर्वखडात दिलेल्या आख्यानाचीच पुनरावृत्ती आहे जलधरोपाख्यानाची पुनरावृत्ती तर एकाच उत्तरखडात झाली आहे पहिले जलधरोपाख्यान ३ ते १९ या अध्यायात सागितले आहे आणि त्याहून लहान असे तेच आख्यान ९८ ते १०६ या अध्यायात पुन्हा सागितले आहे याचे कारण पहिल्या मोठ्या उपाख्यानात जलधराचा वध करण्याच्या कामी एक शिवच समर्थ आहे, अन्य कोणताही देव ते काय करू शकणार नाही, असे प्रतिपादन केलेले होते दुसऱ्या छोट्या आख्यानात शिवाचे त्या दृष्टीने महत्त्व कमी केलेले आहे

सर्व वैष्णव सप्रदायानी पद्म पुराणाला खूप महत्त्व दिलेले आहे काव्यदृष्ट्याही हे पुराण ललितमधुर आहे बहुतेक सर्व पुराणे अनुष्टुप छदात निबद्ध आहेत, पण प्रस्तुत पुराणात त्या व्यतिरिक्त अनेक मोठ्या छदाचाही उपयोग केलेला आहे यात अनेक ठिकाणी आलेली विष्णुस्तुती हृदयगम आणि भावविवश अशी आहे त्यापैकी दोन सुदर श्लोक असे–

**ससारसागरमतीव गभीरपार**
**दु खोर्मिभिर्विविधमोहमयस्तरङ्ग ।**
**सम्पूर्णमस्ति निजदोषगुणस्तु प्राप्त**
**तस्मात समुद्धर जनार्दन मां सुदीनम ।।**
**कर्माम्बुदे महति गर्जति वर्षतीव**
**विद्युल्लतोल्लसति पातकसचयमे ।**
**मोहान्धकारपटलमपि नष्टदृष्टे –**
**दीनस्य तस्य मधुसूदन देहि हस्तम ।।**

अर्थ– हे जनार्दना, ससाररूपी सागर अत्यत गभीर व अपार असून, तो दु खाच्या लाटा व विविध मोहमय तरग यानी भरलेला आहे स्वत च्या दोषानी आणि गुणानी मी त्यात पडलो आहे, म्हणून मज दीनाचा तू त्यातून उद्धार कर कर्मरूपी मोठा ढग जणू गजतो, वर्षतो आणि विजानी चमकतो माझ्या पाप सचयाचा तो परिणाम होय त्यामुळे मोहाधकाराचे पटल आले असून, माझी दृष्टी नष्ट झाली आहे हे मधुसूदना, अशा स्थितीत तू मज दीनाला आपल्या हाताचा आधार दे

उत्तरखडाच्या शवटी क्रियायोगसार नावाचे परिशिष्ट असून, त्याचे २६ अध्याय आहेत वैष्णव धर्माचे व्यावहारिक स्वरूप समजण्याच्या दृष्टीने हे परिशिष्ट उपयुक्त आहे [ म शा को , पु वि , पुराणम्, जाने १९६१, हिंदुत्व, भा स , पु नि ]

(२) एक जैन पुराण हे अपभ्रश भाषेत लिहिलेले आहे रइधू हा याचा कर्ता होय यात ११ सधी व २६५ कडवके आहेत रामकथेचे वर्णन हा या पुराणाचा विषय आहे या पुराणात पद्म हे रामाला दिलेले नाव असून, तो जैन असल्याचे मानले आहे विमलसूरीने पउमचरिय नावाचा रामचरित्रविषयक ग्रथ प्राकृत भाषेत लिहिलेला आहे त्याच्या आधारेच रइधूने आपल्या पुराणाची रचना केली आहे प्रस्तुत पुराणातले राम चरित्र वाल्मीकिरामायणला अनुसरून लिहिलेले नसून, ते जैन सकेताप्रमाणे लिहिलेले आहे

पुराणाच्या पुष्पिकेत बलभद्र पुराण असेही नाव त्याला दिल्याचे आढळते हे पुराण कोण्या हरिसिंहसाहूच्या प्रेरणेने लिहिले गेले असून, ते त्यालाच समर्पिलेले आहे प्रत्येक सधीच्या प्रारभी सस्कृत श्लोक लिहून हरिसिंहाची प्रशस्ती आणि त्याच्या मगलाची कामना केलेली आढळते

'ॐ नम सिद्धेभ्य ' असे प्रथम मगलाचरण करून पुढे जिनस्तवन केलेले आहे त्यानतर जबुद्वीप, भरतक्षेत्र, मगधदेश, राजगृह, इ स्थळाचा व काही व्यक्तीचा एका कडवकात निर्देश केलेला आहे रामकथेचा प्रारभ गौतमश्रेणिक याच्या आशकेने होतो आणि इद्रभती त्या आशकेला उत्तर म्हणून समग्र रामकथा सागतो

प्रस्तुत पुराण महावीराच्या निर्वाणानतर सुमारे बाराशे वर्षांनी रचले गेले आहे हा काल इ स ५७७ च्या सुमाराचा येतो [ वि व द , अपभ्रश साहित्य ]

(३) रामचरित्रात्मक जैन पुराण हे सस्कृत भाषेत असून, रविषेण हा त्याचा कर्ता आहे याला पद्मचरित असेही म्हणतात जैन परपरेत रामाला पद्म असे नाव आहे त्याला आठवा बलभद्र असेही म्हणतात त्याचेच चरित्र या ग्रथात वर्णिले आहे रविषेण हा आपल्या सघाचा किंवा गण–गच्छाचा उल्लेख करीत नाही त्याचे स्थान कोणते तेही निश्चित कळत नाही पण त्याच्या सेनान्त नावावरून अनुमान होते, की तो सेनसघातला असावा इद्रसेन, दिवाकरसेन, अर्हत्सेन व लक्ष्मणसेन अशी त्याने आपली गुरुपरपरा सागितली आहे प्रस्तुत ग्रथाचे सक्षिप्त कथानक असे–

रत्नश्रवा नावाचा राक्षस वशातला एक राजा पाताळात राज्य करीत होता त्याला केकसी नावाची राणी होती तिला

चार मुले झाली रावण कुमकण, चद्रनखा व बिभीषण ही त्याची नावे होत राजाने रावणाचे दशानन असे दुसरे एक नाव ठेवले एक दिवस रावणाला त्याच्या आईकडून कळले, की वश्रवण विद्याधर नावाच्या आपल्या मावसभावाने आपल्या बापाचे लकाराज्य हिरावून घेतल्यामुळे आपल्याला या पाताळ लकेत दिवस काढावे लागत आहेत ते ऐकून रावणाला वश्रवणाचा द्वेष वाटू लागला त्याने विद्या मिळवून सामर्थ्यशाली व्हायचे ठरवले तो वनात जाऊन त्यासाठी तप करू लागला जबुद्वीपात एक यक्ष राहत होता त्याने रावणाची परोपरीने परीक्षा घेतली त्या सव दिव्यातून पार पडून रावणाने अनेक विद्या हस्तगत केल्या मग त्याचे मदोदरीशी लग्न झाले तिच्याशिवाय इतर सहा हजार कन्याशीही त्याने विवाह केले चद्रनखेचे खरदूषणाशी लग्न झाले व तिला शबूक नावाचा मुलगा झाला पुढे रावणाने वश्रवणाशी युद्ध करून त्याला लकेतून हुसकले व लकेवर आपले आधिपत्य स्थापले वश्रवणाच्या पुष्पक विमानात बसून रावणाने दक्षिणदिग्विजय केला

वाली व सुग्रीव हे दोघे बधु होत ते वानर नसून विद्याधर होते रावणाने वालीचा पराभव केल्यावर वालीने सुग्रीवाला राज्यावर बसवले व स्वत दिगबरदीक्षा घेतली हनुमान हा चरमशरीरी महापुरुष होता तो प्रथम रावणाचा मित्र होता त्याने रावणाचा पक्ष घेऊन वरुणाविरुद्ध युद्ध केले व त्या युद्धात विजय मिळवल्यावर रावणाची बहीण चद्रनखा हिच्या अनग कुसुमा या नावाच्या मुलीशी लग्न केले

एके दिवशी रावणाला असे कळले, की आपला मत्यू दशरथ व जनक याच्या सततीपासून होणार आहे ते कळल्यावर रावणाने बिभीषणाला त्या दोघांचा वध करण्यासाठी पाठवले पण बिभीषण येण्यापूर्वीच ही वार्ता नारदाने त्या दोघाना कळवून सावध केले होते मग जनक व दशरथ यानी आपापला एक एक पुतळा तयार करून तो आपल्या महालात ठेवून दिला त्या पुतळ्यानाच खरे जनक व दशरथ समजून बिभीषणाने त्याचा शिरच्छेद केला बिभीषणाने परत येऊन काम यशस्वी केल्याचे सागितल्यावर रावण निश्चित झाला

अयोध्येच्या दशरथ राजाला कौशल्या, सुमित्रा व सुप्रभा अशा तीन राण्या होत्या एके दिवशी तो देशभ्रमणासाठी निघाला असता योगायोगाने कैकयीच्या स्वयवराला पोचला त्याला पाहताच कैकयीने त्याच्याच गळ्यात माळ घातली ते पाहून स्वयवरासाठी जमलेले अन्य राजे खवळून उठले त्याचे व दशरथाचे घमासान युद्ध झाले त्या युद्धात कैकयीने दशरथाचा रथ चालवला तिच्या त्या धैर्याने व चातुर्याने दशरथ प्रसन्न झाला व तिला त्याने वर मागण्यास सांगितले त्यावर कैकयी म्हणाली की माझा वर तुमच्या राज्यभडारात सुरक्षित असू दे, गरज पडेल तेव्हा मी तो मागून घेईन '

पुढे कौशल्येला राम (पद्म) सुमित्रेला लक्ष्मण, कैकयीला भरत व सुप्रभेला शत्रुघ्न असे दशरथाला चार पुत्र झाले जनक राजाला विदेहा नावाची एक राणी होती तिला सीता नावाची कन्या व भामडल नावाचा पुत्र अशी दोन अपत्ये झाली भामडलाला पूर्वभवातल्या एका वैऱ्याने प्रसूतिगृहातूनच पळवून नेले तिथून तो एका विद्याधराला प्राप्त झाला विद्याधराने त्याचे लालनपालन केले एक दिवस नारदाने एक चित्रपट भामडलाला दाखवला त्यात सीतेचेही चित्र होते त्या चित्रातले सीतेचे रूपलावण्य पाहून भामडल तिच्यावर भाळला ती आपली बहीण आहे हे त्याला ठाऊक नव्हते त्यामुळे सीतेशी आपले लग्न व्हावे, म्हणून त्याने विद्याधरापाशी आग्रह धरला विद्याधराने कपट करून जनकाला आपल्या लोकात आणले 'तुम्ही सीता माझ्या मुलाला दे' असे तो जनकाला म्हणाला पण जनक त्याच्या मागणीला कबूल होईना तो म्हणाला, की 'मी माझी मुलगी दशरथपुत्र रामाला देण्याचे वचन दिले आहे' त्यावर विद्याधर म्हणाला तू तुझ्या मुलीच्या विवाहासाठी वज्रावर्त नावाच्या धनुष्याला बाण लावण्याचा पण ठेव जर रामाने तो पण जिंकला, तर सीता त्याला मिळेल अन्यथा आम्ही तिला बलात्काराने पळवून आणू ' जनकाने नाइलाज म्हणून विद्याधराची ती शर्त मान्य केली व सीतेचे स्वयवर माडले त्या स्वयवरात रामाने त्या धनुष्याची दोरी चढवली आणि सीता त्याची पत्नी झाली लक्ष्मण व भरत याची लग्नेही त्याच मडपात झाली

वरात अयोध्येत आल्यावर दशरथ आपले राज्य रामाला द्यायला निघाला पण कैकयी नमकी त्या वेळी आड आली तिने राज्यभाडारात सुरक्षित ठेवलेला वर मागितला आणि त्या वराने भरताला राज्य मिळावे, अशी इच्छा व्यक्त केली दशरथाला ती मान्य करणे भाग पडले मग राम, लक्ष्मण व सीता ही तिघे दक्षिण दिशेला वनवासासाठी निघून गेली पण पुढे कैकयीला आपल्या वर्तनाचा पश्चात्ताप झाला व ती भरताला घेऊन रामभेटीला गेली तिने रामाला परत अयोध्येत येण्याचा खूप आग्रह केला, पण रामाने तो मानला नाही त्याने भरतालाच राज्याभिषेक करून परत धाडले

वनवासात राम-लक्ष्मणानी अनेक युद्धे केली एका ठिकाणी त्यानी वज्रकर्णाला सिंहोदर चद्रापासून वाचवले, दुसऱ्या ठिकाणी वालखिल्याला म्लेच्छ राजाच्या बदीतून सोडवले मधल्या काळात अमितवीर्य नावाच्या राजाने भरतावर आक्रमण केले आहे, असे समजताच रामाने गुप्त रूपाने तिथे जाऊन भर

ताचे संरक्षण केले. वनवासात असतानाच लक्ष्मणाने अनेक राजकन्यांशी विवाह केले.

दंडकारण्यात येऊन त्या तिघांनी कर्णरवा नदीच्या तीरी वास्तव्य केले. तिथे सीतेने रामाला जैन मुनींचे दर्शन घडविले व त्यांना भोजन वाढले. चंद्रनखेचा पुत्र शंबूक हा सूर्यहास खड्गाच्या सिद्धीसाठी बारा वर्षे वेळुवनात तपश्चर्या करीत बसला होता. एके दिवशी ते खड्ग त्याच्यापुढे प्रकट झाले. योगायोगाने लक्ष्मण त्याच वेळी तिथे पोचला व शंबूकाच्या आधी त्याने ते खड्ग हस्तगत केले. त्याची परीक्षा पाहण्यासाठी त्याने ते खड्ग वेळुवनावर चालविले. त्यामुळे सगळे वेळू तुटले आणि त्याबरोबरच शंबूकही मारला गेला. चंद्रनखा जेव्हा त्याला भोजन देण्यासाठी तिथे आली, तेव्हा तिला आपल्या पुत्राचे प्रेत दिसले. घडलेला प्रकार तिला समजला. तिला अपार दुःख झाले. पण ते दाबून तिने राम–लक्ष्मणांचा सूड घ्यायचे ठरविले. ती मायावी कन्येचे रूप घेऊन राम–लक्ष्मणांकडे आली. तिने त्यांच्याविषयी आपले प्रेमही प्रकट केले. पण राम–लक्ष्मणांनी तिचा स्वीकार केला नाही. मग ती परत गेली व तिने आपल्या पतीला म्हणजे खरदूषणाला पुत्रनिधनाची वार्ता कथन केली. खरदूषण क्रुद्ध होऊन रावणासह राम–लक्ष्मणांवर चालून आला. त्या युद्धात खरदूषणाचा वध झाला. पण त्याच वेळी रावणाने सीतेचे हरण केले. सीतेला लंकेत नेऊन त्याने देवारण्य नामक उद्यानात ठेवले. मग तो तिच्याकडे नित्य प्रेमयाचना करू लागला.

खरदूषणाला मारून राम आश्रमात येतो, तर सीता तिथे नाही. त्यामुळे रामाला फार दुःख झाले. राम–लक्ष्मण मग तिचा शोध करीत करीत दक्षिणेकडे जाऊ लागले. किष्किंधेत आल्यावर त्यांना सुग्रीव भेटला. रामाने त्याच्याशी मैत्री संपादली. त्याच वेळी साहसगती नावाचा एक विद्याधर सुग्रीवाचे मायावी रूप घेऊन त्याचे राज्य व पत्नी यांच्यावर अधिकार सांगू लागला. रामाने त्याला मारले व त्यामुळे सुग्रीव रामाचा भक्त बनला. सुग्रीवाने आपल्या तेरा कन्या रामाला देऊन त्याला आपला जावईही करून घेतले.

सुग्रीवाच्या आज्ञेने विद्याधरमंडळी सीतेचा शोध करायला निघाली. त्यांपैकी रत्नजटी नावाच्या विद्याधराने सीता लंकेत असल्याचा शोध लावला. रावणाने सीतेला पळवून नेले आहे, असे समजताच सगळे विद्याधर कचरले. कारण, रावण हा त्या काळचा एक महाबलाढ्य सत्ताधारी होता. त्याचा वध कोण करू शकेल, असा सर्वांच्या मनात संभ्रम निर्माण झाला. जो कोणी कोटिशिळा उचलील, तोच रावणाला मारू शकेल, असे मागे एकदा अनंतवीर्य नावाच्या केवलीने सांगितले होते. सुग्रीवादी मंडळींना त्या गोष्टीचे स्मरण झाले मग सगळे मिळून त्या कोटिशिळेकडे गेले. लक्ष्मणाने ती शिळा उचलून दाखविली. मग रावणाचा वधकर्ता आपल्यामध्ये आहे, असे समजून सर्वांना आनंद झाला.

त्यानंतर रामाचा संदेश घेऊन हनुमान लंकेत गेला व सीतेला भेटला. त्याने खुणेची अंगठीही सीतेला दिली. जोवर रामाचा समाचार मिळणार नाही, तोवर मी अन्नोदक ग्रहण करणार नाही, अशी सीतेची प्रतिज्ञा होती. त्यामुळे रामसंदेश मिळताच आनंदित होऊन तिने अन्नोदक घेतले. एवढे काम करून व लंकेची खूप नासधूस करून मारुती रामाकडे परत आला.

मग राम विद्याधरसैन्य घेऊन आकाशमार्गाने लंकेत पोचला. रावणाला ती बातमी समजली. रामाशी सामना देणे ही गोष्ट त्यालाही दुर्घट वाटत होती. म्हणून त्याने ठरवले, की आपण बहुरूपिणी विद्या साध्य करूनच रामाशी युद्ध करायला जावे. तो त्या विद्येसाठी आसनस्थ झाला. विद्याधरमंडळींनी त्याच्या विद्यासिद्धीत व्यत्यय आणण्याचा खूप प्रयत्न केला. पण कशालाही न डगमगता त्याने विद्या साध्य करून घेतली. एवढ्यात रामसैन्याने चारही बाजूंनी लंकेला वेढा घातला. लक्ष्मणाच्या प्रेरणेने अनेक विद्याधर लंकेत शिरून लोकांना उपद्रव करू लागले.

बिभीषणाला रावणाची ही सर्व कारवाई अन्यायाची वाटत होती. अजून तरी रावणाने सन्मार्गावर यावे आणि सीतेला रामाच्या हवाली करून लंकेवरचे संकट टाळावे, म्हणून तो रावणाला हितोपदेश करायला प्रवृत्त झाला. पण रावणाने त्याचे काहीही न ऐकता उलट त्याचीच निर्भर्त्सना केली.

बिभीषणाने मग ठरविले, की आपण आता रावणाच्या पक्षाला राहायचे नाही. मग लगेच तो तिथून निघाला आणि रामाला येऊन मिळाला.

थोड्याच वेळात उभय पक्षीं तुंबळ युद्ध सुरू झाले. रावण हजार हत्तींच्या ऐंद्र नामक रथावर चढून युद्धात आघाडीवर राहिला. मंदोदरीचा पिता मयासुर हा रावणाच्या बाजूने लढत असता रामाने त्याला बाणाने विद्ध केले. पाठोपाठ लक्ष्मणाने पुढे होऊन रावणाला युद्धाचे आव्हान दिले. त्या युद्धात रावणाने फेकलेली शक्ती लक्ष्मणाला लागली आणि तो मूर्च्छित होऊन धरणीवर कोसळला. त्याची ती दशा पाहून राम विलाप करू लागला. अयोध्येतही ती बातमी पसरली. तिथले सर्व लोक दुःखी झाले. मग केकयीने विशल्या नावाच्या एका कुमारीला लंकेत पाठवले. त्या कुमारीच्या ठिकाणी मूर्च्छित माणसाला उठवण्याचे सामर्थ्य होते. विशल्या लंकेत येताच तिच्या केवळ स्नानजलाच्याच स्पर्शाने लक्ष्मणाची मूर्च्छा गेली व तो खडखडीत बरा

झाला मग लक्ष्मणाने त्याच ठिकाणी विशल्येशी लग्न केले

रावण लक्ष्मण यांचे पुनश्च युद्ध सुरू झाले किती ही प्रयत्न केला तरी लक्ष्मण पराभूत होत नाही, असे पाहिल्यावर रावणाने शेवटी त्याच्यावर सूर्यासारखे तेजस्वी असे एक चक्र फेकले पण ते चक्र लक्ष्मणाच्यावर आदळण्याऐवजी प्रदक्षिणा करून त्याच्या हातातच आले मग लक्ष्मणाने तेच चक्र रावणावर फेकले त्या अमोघ चक्राच्या प्रहारासरशी रावण तत्काळ मरण पावला

त्या क्षणी लढाई संपली लंकेतले लोक व सैनिक सैरावैरा पळू लागले मंदोदरीसह रावणाच्या अठरा हजार बायका रणभूमीवर येऊन विलाप करू लागल्या रामाने त्या सर्वांचे सांत्वन केले मग जीवनाची नश्वरता जाणून इंद्रजित, मेघवाहन, कुंभकर्ण, मंदोदरी इ. लोकांनी जिनदीक्षा घेतली मंदोदरी जैन आर्यिका बनली

मग रामाने वाजत गाजत लंकेत प्रवेश केला देवारण्यात जाऊन रामाने सीतेची भेट घेतली त्या वेळी आकाशात उभ्या असलेल्या देवांनी आणि विद्याधरांनी सीता रामावर पुष्पवर्षाव केला सीतेला घेऊन राम रावणाच्या महालात गेला तिथल्या शांतिनाथ जिनालयात जाऊन त्याने शांतिनाथाची स्तुती केली बिभीषणाचे सांत्वन करून त्याला राज्याभिषेक केला राम लक्ष्मण लंकेत सहा वर्षे राहिले तेवढ्या अवधीत त्यांनी आपल्या सर्व विवाहित स्त्रियांना तिथे आणवले व त्यांच्यासह विलाससुखाचा उपभोग घेतला

इकडे अयोध्येत रामाची वाट पाहून पाहून कौसल्या थकून गेली सुमित्रेलाही पुत्रवियोग असह्य झाला नारदाला त्या दोघींची ही अवस्था समजली तो अयोध्येतून लंकेत गेला तिथे विलासात निमग्न असलेल्या राम लक्ष्मणांना त्याने त्यांच्या मातांचे विरहदुःख कथन केले मग ते दोघे अयोध्येला जाण्याचा विचार करू लागले एवढ्यात बिभीषण तिथे येऊन त्यांना म्हणाला, की 'आणखी फक्त सोळा दिवस थांबा' रामाने त्याची विनंती मान्य केली तेवढ्या अवधीत बिभीषणाने विद्याधर कारागिरांकरवी अयोध्या नगरीचे नूतनीकरण केले त्याचबरोबर त्याने भरतालाही राम लक्ष्मणांचा कुशल-समाचार कळवला

मग राम सर्वांसह पुष्पक विमानात बसून अयोध्येत प्राप्त झाला त्या प्रसंगी कुलभूषण केवली त्या ठिकाणी आला त्याच्या आगमनाने सर्वत्र आनंद पसरला केवली। दर्शनार्थ आलेल्या रामाला जैन धर्माचा उपदेश केला भरतालाही त्याने त्याच्या पूर्वजन्माची हकीकत सांगितली ती ऐकताच त्याचे वैराग्य इतके प्रबळ झाले, की त्याने तात्काळ दिगंबरदीक्षा धारण केली त्या दुःखाने कैकयीलाही जीवन नकोसे वाटले आणि तिनेही आर्यिकेची दीक्षा स्वीकारली

मग सर्व राजे एकत्र जमले त्यांनी राम व लक्ष्मण या दोघांनाही राज्याभिषेक केला त्यानंतर रामाने सर्व राजांना निरनिराळे देश वाटून दिले अशी सर्व स्थिरस्थावर झाल्यावर राम स्वस्थ मनाने राज्याचा उपभोग घेऊ लागला

एवढ्यात अयोध्येच्या जनतेत सीतेच्या चारित्र्याविषयी लोकापवाद पसरला रामाच्या कानावरही तो आला रामाला त्या अपवादाचे मोठे भय वाटले आणि तो गरोदर असलेल्या सीतेचा त्याग करण्यास प्रवृत्त झाला कृतान्तवक्त्र नावाच्या सेनापतीला बोलावून त्याने त्याला सीतेला वनात नेऊन सोडण्याची आज्ञा दिली 'तुला जिनमंदिराच्या दर्शनाला नेतो' असा बहाणा करून सीतेला त्याने नगराबाहेर काढले गंगा नदीच्या पैलतीरी नेऊन त्याने तिला रामाचा आदेश ऐकविला तो ऐकताच सीता मूर्च्छित होऊन धरणीवर पडली पण थोड्याच वेळात सावध होऊन तिने रामाला संदेश दिला 'तुम्ही माझा त्याग केला हे ठीक, पण जैन धर्माचा मात्र त्याग करू नका' तो संदेश घेऊन सेनापती परत गेला तो गेल्यावर सीता तिथेच विलाप करीत बसली

एवढ्यात पुंडरीकपुराचा वज्रजंघ नावाचा राजा तिथे पोचला सीतेचा विलाप ऐकून त्याला तिची करुणा आली त्याने तिचे सांत्वन केले आणि तिला बहीण मानून आपल्या राजवाड्यात आणले नऊमास भरल्यावर सीतेने दोन पुत्रांना जन्म दिला अनंगलवण व लवणांकुश अशी त्यांची नावे ठेवली गेली सीता घरी आल्यामुळे वज्रजंघाचे राज्यवैभव वाढले वज्रजंघाने आपल्या बत्तीस कन्या अनंगलवणाला द्यायचे ठरवले पृथू राजाची कन्या कनकमाला ही लवणांकुशासाठी नेमस्त केली त्याने या दोन्ही पुत्रांना धनुर्विद्येचे उत्तम शिक्षण देऊन त्यांच्याकरवी दिग्विजय केला

एके दिवशी नारदाने तिथे येऊन त्या दोघा कुमारांना सांगितले, की 'तुम्ही रामाचे पुत्र आहात' त्यापुढे नारदाने त्यांना सविस्तर रामचरित्रही ऐकवले त्या चरित्रवर्णनात त्या दोघांना कळले, की रामाने आपल्या आईला गर्भिणी अवस्थेत अन्यायाने वनात टाकले कुमारांना त्या गोष्टीचा विलक्षण क्रोध आला ते वज्रजंघाचे सैन्य घेऊन अयोध्येवर चाल करून आले त्यांचे व रामाचे घनघोर युद्ध सुरू झाले कोणत्याही शस्त्राच्या प्रयोगाने त्यांचा पराभव होत नाही, असे पाहिल्यावर राम आश्चर्यात पडला एवढ्यात सिद्धार्थ नावाच्या एका ब्राह्मणाने रामाला येऊन सांगितले, की 'तू ज्यांच्याशी युद्ध करतोस ते तुझे औरस पुत्र आहेत' मग रामाने शस्त्र टाकून दिले आणि तो आनंदाने

त्या दोघा कुमारांना भेटला. त्यामुळे सर्व वातावरण एकदम आनंदित झाले.

मग सर्वांच्या विनंतीवरून रामाने सीतेला बोलावून आणले आणि तिला सर्व लोकांसमक्ष आपल्या शुद्ध चारित्र्याबद्दल अग्नि-दिव्य करायला सांगितले. सीता त्या गोष्टीला तयार झाली. तिने पंचपरमेष्ठींचे स्मरण करून जळत्या अग्निकुंडात उडी टाकली. त्या सरशी जे अग्निकुंड होते, ते जलकुंड झाले. जलकुंडातले पाणी लोंढ्यालोंढ्यांनी बाहेर पडू लागले आणि सर्व लोक त्या जलप्रवाहात बुडू लागले. सर्वत्र हाहाकार माजला. मग रामाने त्या जलाला पदस्पर्श करताच ते ओसरले व लोकांवरचे संकट दूर झाले. रामाने त्या कुमारांच्या समोर सीतेची क्षमा मागितली आणि तिला आपल्याबरोबर राजवाड्यात येण्याची विनंती केली. पण सीतेला आता वैराग्य आले होते. त्यामुळे ती राजवाड्यात न जाता पुनश्च वनातच गेली आणि तिने आर्यिकेची दीक्षा घेतली. सीतेचा निःशल्य आत्मा तपःप्रभावाने अच्युत स्वर्गात प्रतींद्र झाला.

थोड्याच दिवसांत लक्ष्मणाने देहत्याग केला. मात्र तो स्वर्गात न जाता नरकात गेला. रामानेही वैराग्य घेऊन तप आरंभिले. काही कालाने तो क्षपणक श्रेणी प्राप्त करून घेऊन केवळी बनला. सीतेच्या जीवाने नरकात जाऊन लक्ष्मणाचा जीव पाहिला. त्याने धर्मोपदेश देऊन लक्ष्मणजीवाच्या दुःखाविषयी सहसवेदना दाखवली. लक्ष्मणजीवाला नरकातून बाहेर काढण्याचाही प्रयत्न केला. पण त्यात सीतेच्या जीवाला यश आले नाही. पुढे थोड्याच कालात रामाने निर्वाण प्राप्त केले.

संस्कृत भाषेतले हे पद्मचरित आणि प्राकृत भाषेतले पउमचरिय या दोन्ही ग्रंथांचे कथानक समान आहे. ताडून पाहिल्यावर असे वाटते, की एक कोणते तरी दुसऱ्याचे भाषांतर आहे. मग प्रश्न निर्माण होतो, की या ठिकाणी कोणी कोणाचा अनुवाद केला? पाश्चात्य-पौर्वात्य विद्वानांनी या प्रश्नाचा अनेक प्रकारे ऊहापोह केला आहे. त्याच्या सर्व मुद्यांचा साकल्याने विचार करून श्री. नाथूराम प्रेमी यांनी जे विवेचन केले आहे, त्याचा सारांश असा–

प्राकृतातून संस्कृतात अनूदित झालेले प्राचीन जैन साहित्य पुष्कळ आढळते. पण संस्कृत ग्रंथांचा इतक्या मोठ्या प्रमाणावर प्राकृतात अनुवाद केल्याचे एकही उदाहरण मिळत नाही. याशिवाय वरील दोन्ही ग्रंथांपैकी पउमचरिय या ग्रंथात संक्षेप दिसतो, तर पद्मचरितात विस्तार आढळतो. या व अशाच अनेक अंतर्गत पुराव्यांवरून वाटते, की पउमचरिय या प्राकृत ग्रंथाचाच रविषेणाने पद्मपुराण या नावाने संस्कृत भाषेत सविस्तर अनुवाद केला असावा. [ पद्मपुराण ]

**पद्मप्रभ** जैनांचा सहावा तीर्थंकर. याचा वर्ण कमलासारखा असल्यामुळे अथवा हा गर्भात असताना याच्या मातेने कमलाच्या शय्येवर झोपण्याची इच्छा केल्यामुळे याला हे नाव पडले. जैन शिल्पात याच्या मूर्ती फारशा आढळत नाहीत. पहा – तीर्थंकर. [ ज. इ. ]

**पद्मराग** माणकाचा एक प्रकार. याचा रंग पद्माप्रमाणे म्हणजे कमळाप्रमाणे लाल असतो. गुरुत्व, स्निग्धता, निर्मलता व अतिरक्तता हे माणकाचे गुण आहेत. द्विच्छाय, विरूप, सभेद, इ. त्याचे दोष मानलेले आहेत. पांढरट लाल माणकाला विप्र, गडद लाल माणकाला क्षत्रिय, पिवळट लाल माणकाला वैश्य व काळपट लाल माणकाला शूद्र असे म्हटले असून त्या त्या वर्णांच्या राजाने त्या त्या वर्णाचे माणिक धारण करावे, म्हणजे संपत्तिलाभ होतो, असे सांगितले आहे. पहा – माणिक. [ श. म. ]

**पद्मवज्र** वज्रयान पंथातला एक सिद्ध पुरुष. हा कुकुरिपाचा शिष्य होता. याला सरोरुहवज्र असेही दुसरे नाव होते. याला तिबेटात विशेष मान होता. तारानाथाच्या मते यानेच प्रथम हेवज्रतंत्र प्रचलित केले. याने अनेक संस्कृत ग्रंथ रचले होते, असे म्हणतात. त्यांतील गुह्यसिद्धी हा ग्रंथ विशेष प्रसिद्ध असून, तो विद्वन्मान्य आहे. गुह्यसमाज तंत्रात ज्या तांत्रिक प्रक्रियांचे वर्णन केलेले आहे, त्या सर्व बुद्धाच्या प्रेरणेमुळे निर्माण झाल्या, असे त्याने सांगितले आहे. तसेच महामुद्रा ही सिद्धी प्राप्त करण्याचे प्रमुख साधन असल्याचेही त्याने म्हटले आहे. [ आर्यसंस्कृति, बुद्धिज्म् इन ओरिसा ]

**पद्मव्यूह** प्राचीन युद्धातील एक व्यूहरचना. या व्यूहाचा आकार कमलासारखा असे. भारतीय युद्धात कौरवांच्या बाजूने द्रोणाचार्यांनी या व्यूहाची रचना केली होती. त्यात कौरवपक्षीय राजांचे त्यांनी कमळ बनवले होते. राजकुमार कमळातले केसर व सम्राट कर्णिका बनले होते. त्या सर्वांची वस्त्रभूषणे व ध्वजपताका लाल रंगाच्या होत्या. जयद्रथवध प्रसंगी पद्मव्यूहाच्या आत गर्भव्यूह व त्याच्याही आत सूचीव्यूह रचला होता. जयद्रथ त्या सूचीव्यूहात बसला होता. [ प्रा. भा. सा. ]

**पद्मसंभव** (इ. स. चे ८ वे शतक). नालंदा विद्यापीठातला बौद्ध धर्माचा एक थोर आचार्य व प्रचारक. हा काश्मीरच्या इंद्रबुद्धी नामक राजाचा पुत्र होता, असे तिबेटी साहित्यावरून कळते. ओडिशातील लंकापुरचा राजा इंद्रभूती याचा तो पुत्र होता, असे अन्य काही पंडितांचे मत

आहे कुमारदेवी नावाच्या स्त्रीशी त्याचा विवाह झाला होता त्याची कर्मभूमी मात्र पूर्व भारतात होती तिथे त्याने तांत्रिक विद्या आत्मसात केली आणि तिबेटच्या राजाने बोलावल्यावरून तो तिकडे गेला तिबेटातील बान धर्मात मनतिशा



पद्मसंभव

चाची पूजा व जादूटोणा याना प्राधान्य होते पद्मसंभवाने तीच विद्या हस्तगत करून तिथल्या लोकावर खूप प्रभाव पाडला आणि नतर हळूहळू तिथल्या लोकाना बौद्ध धर्मातील योगाचार या पथाचे ज्ञान दिले तान्त्रिक लामा पथाची स्थापना करून त्याने तिबेटात बौद्ध धर्माचे पाय पक्के रोवले तिथे त्याने अनेक मठही स्थापले

तिबेटातून परत आल्यानतर पद्मसंभव बौद्ध धर्माच्या प्रसारासाठी दुस या देशातही गेला होता, असे कळते कोणी म्हणतात, की तो पन्नासाव्या वर्षी अचानक अदृश्य होऊन यक्षाचा राजा झाला त्याच्या थोरपणामुळे पुढे त्याला देवत्व प्राप्त झाले बौद्ध परपरेत तो द्वितीय बुद्ध मानला गेला त्याच्या अनेक मूर्ती उपलब्ध असून, तो कमलासनस्थ असतो वज्र आणि खटवाग ही त्याची प्रतीके त्याच्या हातात असतात त्याचा जन्म कमळातून झाला असे मानले जाते [ गां ना बु , एन्सा रि ए , माच ऑफ इंडिया, नोव्हे १९५७, ज रमा श , जो ध वि ]

**पद्मसाळी** द भारतातील एक जात या लोकाची वस्ती तमिळनाड प्रदेशात आहे पण हे तेलुगू भाषा बोलतात या लोकाच्या पडारी, बोम्मा वगैरे तीस पोटजाती आहेत हे सगळे विणकर आहेत

**विवाहप्रथा** – हे लोक विवाह जमविण्यासाठी ब्राह्मण पुरोहिताची मदत घेतात त्याच्या विवाहविधीत कानडा व तेलुगू *पद्धतीचे मिश्रण आढळते वधू मगळसूत्र घालून कणसाच्या ढिगा*वर उभी राहते तिथे हनुमताची पूजा करते नतर तिला बैलावर बसवून वराच्या घरी नेतात तिथे वधूच्या नाकातील नथणी एका दुधाच्या थाळीत लपवतात ती वधूने पाच वेळा तिथे हात घालून उचलायची असते गृहप्रवेश करण्यापूर्वी नवरा मुलगा व मुलीला उचलून घेऊन थोडा वेळ नाचतो या नृत्यालाच देगा-आरा असे म्हणतात

**देवधर्म**– पद्मसाळी हे बरेचसे वैष्णव आणि थोडे शैव आहेत शैवपथी लोक लिंग धारण करतात वैष्णव पद्मशाली वेकटेश्वराला आपली कुलदेवता मानतात त्याशिवाय ते रगस्वामी, नरसाप्पा, सुकालम्म, उडकुडी वीरण्णा, गगम्म किंवणी अम्म, मुत्यालम्म, कालिलम्म, अकम्म, मरीअम्म, दुगम्म वगैरे निरनिराळ्या चौदा देवताना भजतात भावन नावाच्या ऋषीला ते आपला पूर्वज मानतात काही ठिकाणी त्याची स्वतंत्र देवालये आहेत ते भावन ऋषीचा वार्षिक उत्सव करतात त्या वेळी ऋषीचे प्रातिनिधिक स्वरूप म्हणून रगविलेली दोन भांडी वाघाच्या मूर्तीवर ठेवतात आणि त्याना भात भाज्या याचा महानैवेद्य करतात नतर ना भक्ताना प्रसाद म्हणून वाटतात

यापैकी बहुतेकाचा उदरनिर्वाह विणकामावर चालतो हे लोक गरीब पण व्यसनी आहेत त्यामुळे वर्षानुवर्षे ते कर्जबाजारीच असतात काही जणाचे स्वत चे माग असतात, पण बहुतेक लोक सावकाराचे माग चालवून मजुरी मिळवितात या लोकाची जातपचायत असते सेट्टी किंवा गोडू नावाचा पचायतीचा पुढारी असतो पुढारीपण परपरागत चालते

**मर्तिकप्रथा** – याच्यात प्रेते पुरण्याची प्रथा आहे प्रेताना बसलेल्या स्थितीत पुरतात प्रेत घरातून बाहेर नेण्यापूर्वी त्याला एक कोंबडा बळी देतात मृत्यू शनिवारी किंवा रविवारी आला तर प्रेत जाळतात त्या वेळी तो कोंबडा तिरडीला बांधून नेतात व प्रेताबरोबर जाळतात तसे केल्याने त्या घरात पुन्हा लवकर मृत्यू होत नाही, अशी त्याची समजूत असते पाचव्या दिवशी एक मेंढी बळी देऊन तिचे मास खातात सुतक सपण्याच्या दिवशी सर्वजण दारू पितात [ का ट्रा स इ ]

**पद्माकरभट्ट** (१७५३–१८३३ इ स ) रीतिकालातील शेवटचा हिंदी कवी याचे घराणे मूळ तेलगी ब्राह्मणाचे होते पण पद्माकराचे पूर्वज तेलगणातून गढमाडला या ठिकाणी येऊन स्थायिक झाले तिथे त्या कुळाच्या दोन शाखा झाल्या एक गोकुळस्थ व दुसरा मथुरास्थ पद्माकर हा दुसऱ्या शाखेचा होता याच्या कुळात अनेक कवी उत्पन्न झाले म्हणून त्या कुळालाच 'कवीश्वर' अशी उपाधी मिळाली पद्माकराचे अध्ययन त्याच्या वापाजवळच झाले त्याने बापाकडून मंत्र सिद्धीही मिळविली होती, असे सांगतात

पद्माकर हा तत्कालीन अनेक राजाच्या पदरी राहिला अनेक राजानी त्याचा सन्मान करून त्याला पुष्कळ देणग्याही दिल्या नागपूरचा राजा रघुनाथराव याच्यावर त्याने एक प्रशसापर काव्य लिहिल्यामुळे त्या राजाने खूष होऊन त्याला एक लाख रुपये, एक हत्ती आणि दहा गावे एवढी संपदा दिली• जयपूरच्या महाराजाकडून याला कविराजशिरोमणी ही पदवी आणि काही गावाची जहागिरी मिळाली या संपत्तीमुळे तो सदैव थाटामाटात राहत असे याने जी काव्ये लिहिली त्याची नावे अशी – हिंमतबहादुरबिरुदावली, पद्माभरण जगद्विनोद, प्रबोधपचासा, गंगालहरी, रामरसायन, भाषाहितोपदेश, ईश्वर पचीशी, अलीजाहप्रकाश व प्रतापसिंहबिरुदावली यातले बहुतेक ग्रंथ निरनिराळ्या नृपतीच्या प्रशस्तिपर आहेत

आयुष्याच्या शेवटी याला कुष्ठरोग जडला त्या वेळी त्याने सात वर्षे गंगाकिनारी वास्तव्य केले आणि त्या मुदतीत गंगा लहरी हे काव्य लिहिले त्यामुळे तो रोगमुक्त झाला, असे सांगतात त्याचे रामरसायन हे काव्य वाल्मीकिरामायणाच्या आधारे लिहिलेले आहे त्यातील एक उतारा असा–

> प्रल के पयोनिधि लौं लहरे उठन लागी
> लहरा लग्यो त्यो होन पौन पुरवया को ।
> भौर भरी झांझरी विलोक मझधार परी,
> धीर धरात पद्माकर खिवया को ।
> कहा धार कहा, पर जानी हू न जात कछू
> दूसरे दिखात न रखया और भैया को ।
> बहन न पाई घेरि घाटहि लग हू ऐसो,
> अमित भरोसो मोहि मेरे रघुरया को ।।

भावार्थ– प्रलयसागराच्या लाटा उसळत आहत पूर्वेकडचा वारा वाहतो आहे त्यामुळे प्रवाहात भोवरा निर्माण झाला आहे पण अशाही स्थितीत पद्माकर कवी हा नावाड्याच्या विश्वासावर धीर धरून राहिला आहे या नावाड्याबद्दल मला पुन पुन्हा सांगितले गेले पण कशाचा उमजच पडत नाही नाव दिसत नाही, की नावाडीही दिसत नाही माझ्यामोवती पाणी वेढून राहिले आहे रघुरायाच्या कृपेने मी घाटाला लागेन, असा भरवसा धरला आहे

पद्माकर हा हिंदी रीतिशास्त्राचा जाणकार समजला जातो शृंगार, वीर आणि भक्ती हे रस त्याने आपल्या काव्यातून यशस्वीपणे खेळवले आहेत पचासा नावाचा जो काव्यप्रकार रूढ झाला, त्याचा जनक पद्माकर होय याला बिहारीच्या तोडीचा कवी मानतात संस्कृत आणि प्राकृत या दोन्ही भाषावर त्याचा अधिकार होता असा हा कवी कानपूर येथे गंगेच्या काठी वयाच्या ८० व्या वर्षी निधन पावला [ हिं वि को , क को १, विंध्यभूमी, जून १९५६, हिं सा २, हि सा को २ ]

**पद्मालय** एक गाणपत्य क्षेत्र हे स्थान महाराष्ट्रातील जळ गाव जिल्ह्यातल्या एरडोल गावापासून सुमारे पाच मैलावर आहे गणेश पुराणातील उपासना खडाच्या ७४ या अध्यायात या क्षेत्राचा प्रवाल म्हणून उल्लेख आहे इथल्या गणेशमंदिरासमोर एक तळे आहे त्या तळ्यात खूप कमळे उगवतात त्यावरून त्या स्थानाला पद्मालय असे नाव मिळाले असावे या गणेशमंदिरातील गणपती स्वयंभू असल्याचे सांगतात याशिवाय इथे महादेव व मारुती यांचीही मंदिरे आहेत इथून जवळच भीमकुंड नावाचे ठिकाण आहे तिथे भीमाने बकासुराचा वध केला, अशी दंतकथा सांगतात कार्तिकी पौर्णिमेला इथे मोठी यात्रा भरते [ म जि – जळगाव ]

**पद्मावत** एक हिंदी महाकाव्य प्रसिद्ध सूफी कवी मलिक मुहंमद जायसी याने हे प्रेमकाव्य अवधी भाषेत रचले आहे मलिक मुहंमद याचा जन्म इ स १४७५ च्या सुमारास झाला, असे अनुमान केले जाते तो उत्तर प्रदेशातील जायसी गावचा रहिवासी होता त्या गावाला तो धर्मक्षेत्र मानीत असे तिथेच त्याने पद्मावत या काव्याची रचना इ स १५४० च्या सुमारास केली

या काव्यात इ स च्या १६ व्या शतकातील अवधी भाषेचे रूप चागले दिसून येते तत्कालीन म्हणी, वाक्संप्रदाय व सुभाषिते यांचा उपयोग कवीने फार सुंदर रीतीने केलेला आहे दोहा व चौपाई या वृत्तात हे काव्य रचलेले असून, त्यात प्राय सात अर्धचौपायाच्या नंतर दोहा वापरलेला आहे कथात्मक काव्यासाठी ही रचनाशैली फार उपयुक्त मानली जाते प्रस्तुत काव्यातील कथेचा सारांश असा –

सिंहलद्वीपाचा राजा गधर्वसेन याची राजकन्या पद्मावती ही अत्यंत रूपमती होती तिच्याजवळ हिरामन नावाचा एक सूज्ञ व बोलका पोपट होता एके दिवशी तो पद्मावतीला

म्हणाला ' मी दूरदेशी जाऊन तुमच्या राजेसाठी वर शोधून आणतो ' राजाने ते भाषण ऐकले व त्याला पोपटाचा राग आला राजा आपणाला मारील या भयाने पोपट उडून गेला, पण एका पारध्याच्या जाळ्यात सापडला पारध्याने त्याला बाजारात नेऊन विकले एका ब्राह्मणाने त्याला विकत घेऊन चितोडचा राजा रत्नसेन याच्याकडे नेले राजाने लक्ष रुपये देऊन तो पोपट विकत घेतला

रत्नसेनाची राणी नागमती सुंदर असून, तिला आपल्या रूपाचा फार गर्व होता पण हिरामनाने सिंहलद्वीपाची राजकन्या तिच्यापेक्षाही लावण्यवती असल्याचे सांगताच ती संतापली व तिने पोपटाला ठार मारण्याची आज्ञा आपल्या दासीला दिली पण दासीला राजाची भीती होती म्हणून तिने त्याला लपवून ठेवले जेव्हा राजाने त्या पोपटाची चौकशी केली, त्या वेळी दासीने लगेच त्याला राजापुढे आणले पोपटाने त्यालाही पद्मावतीचे रूपवर्णन ऐकवले ते ऐकून राजा पद्मावतीच्या प्राप्तीसाठी व्याकुळ झाला आणि जोगी बनून सिंहलद्वीपाकडे निघाला तिथे पोचल्यावर त्याने तिथल्या महादेवाच्या मंदिरात राहून तपश्चर्या सुरू केली हिरामन पोपट राजकन्येकडे गेला व त्याने रत्नसेनाच्या प्रेमाची कहाणी तिला सांगितली मग पद्मावतीही राजाच्या भेटीसाठी आतुर झाली व शिवपूजेच्या निमित्ताने मंदिरात गेली तिचे ते अलौकिक लावण्य पाहून राजा मूर्च्छितच पडला मग पद्मावती तशीच परत गेली राजवाड्यात आल्यावर पद्मावतीने त्याला निरोप पाठवला ' तुम्ही सिंहलगड चढून जाण्याचे दिव्य केलेत, तरच मी तुम्हाला वरीन ' रत्नसेन त्या कामगिरीवर निघाला पण वाटेत त्याला गंधर्वसेनाने पकडले त्या वेळी रत्नसेनाने पद्मावतीसाठी मागणी घातली राजाला त्या गोष्टीचा राग आला व त्याने रत्नसेनाला सुळावर चढवण्याची आज्ञा दिली तेव्हा रत्नसेनाने शिवाची प्रार्थना केली शिवाने आपले गण पाठवून त्याची सुटका केली आणि तो जोगी नसून चितोडचा राजा असल्याचे गंधर्वसेनाला कळवले मग गंधर्वसेनाने रत्नसेनाशी पद्मावतीचा विवाह लावून दिला

काही दिवस सिंहलद्वीपात राहून राजा रत्नसेन पद्मावतीसह चितोडला परत गेला तिथे त्या दोघांनी काही वर्षे सुखात घालवली

रत्नसेनाच्या दरबारात राघवचेतन नावाचा एक पंडित होता त्याचे व राजाचे एकदा बिनसले व तो अलाउद्दीन खिलजीला फितूर झाला त्याने पद्मावतीच्या सौंदर्याचे वर्णन करून अलाउद्दिनाला मुग्ध केले व तिला जिंकून आणण्यासही उद्युक्त केले

लगेच अलाउद्दिनाने चितोडवर स्वारी करून गडाला वेढा दिला पण प्रयत्न करूनही त्याला गड सर होईना म्हणून त्याने तहाची बोलणी सुरू केली रत्नसिंह तहाला तयार झाला व त्याने अलाउद्दिनाला गडावर आणून आपल्या महालात खाना दिला त्या वेळी फक्त आरशात पद्मावतीचे प्रतिबिंब सुलतानाला दिसेल, अशी त्याने व्यवस्था केली ते प्रतिबिंबातले अप्रतिम लावण्य पाहून अलाउद्दिन विलक्षण बेचैन झाला मग त्याने राजाला कपटाने पकडून दिल्लीला नेले

मग पद्मावतीने रत्नसिंहाला सोडवून आणण्यासाठी गोरा व बादल या शूर सरदारांना दिल्लीला पाठवले त्यांनी तेथे जाऊन अशी हूल उठवली की पद्मावती राणी लवाजम्यासह अलाउद्दिनाकडे येत आहे ते ऐकून अलाउद्दीन हुरळून गेला त्याने त्या पालख्यांच्या स्वागताची तयारी केली ७०० पालख्यांचा तो लवाजमा होता प्रत्येक पालखीत दोन सशस्त्र सैनिक लपून बसले होते पालख्यांचे भोईही सशस्त्र होते सुलतानाने त्या सर्व पालख्यांना आत येऊ दिले पण प्रथम राजाला भेटण्याची राणीची इच्छा आहे असे सांगून सर्व पालख्या रत्नसेनाकडे गेल्या तिथे ते सर्व सैनिक पालख्यातून बाहेर येऊन राजाच्या पहारेकऱ्यांवर तुटून पडले वीर गोरा याने सुलतानाच्या सैन्याला अडवून धरले आणि बादलाने राजाला सोडवून नेले पण चितोडला परतल्यावर तो लवकरच मरण पावला पद्मावती व नागमती त्याच्याबरोबर सती गेल्या

अलाउद्दिनाने पुन्हा चितोडवर स्वारी करून ते जिंकले, पण पद्मावतीची रक्षाच त्याच्या हाती लागली

याच कथेवरून इतिहासात चितोडच्या पद्मिनीची कथा समाविष्ट केली गेली आहे पण ती कथा ऐतिहासिक नसून, दंतकथावर आधारली आहे

पद्मावत हे महाकाव्य मानले जाते त्यातील कथावस्तू सुबद्ध असून, विविध घटनांचा विकासक्रमही यथायोग्य वाटतो कवीने या काव्यात शृंगार, वीर, करुण, इ रसांचा सुंदर परिपाक साधला आहे प्रेम आणि विरह यांचे निरूपण सूफी मतानुसार करण्याचा कवीचा उद्देश असावा त्यासाठी त्याने प्रेमाचा एक महान आदर्श निर्माण केला आहे या काव्यात कवीने एक आध्यात्मिक रूपक रचवले आहे, असेही काही पंडितांना वाटते चितोड हा देह, रत्नसेन हा आत्मा, पोपट हा गुरू, पद्मावती ही बुद्धी व नागमती ही प्रवृत्ती असून, बुद्धी व प्रवृत्ती यांच्यातील संघर्ष कवीने रंगवला आहे, असे म्हणतात कवीची भावुकता, सहृदयता व समन्वयी वृत्ती यांमुळे या काव्यातले काही प्रसंग अत्यंत रोचक वाटतात त्याच्या प्रतीकात्मक वर्णनशैलीमुळे काव्याला सजीवता येते

या प्रदीर्घ काव्यात स्वतंत्र कल्पनाविलास मात्र कुठेच आढ

ळून नाही. कवीची वर्णनशैली भारतीय असली, तरी त्याच्या काव्याची रचना मात्र मसनवी स्वरूपाची आहे. काव्याचा आत्मा मात्र सूफीच नव्हे, तर शुद्ध इस्लामी आहे. त्याने सूफी संप्रदायाच्या संकेतानुरूप धर्मनीती तत्त्वाचे विवेचन केले असले, तरी त्याची इस्लामनिष्ठाही मधून मधून प्रकट झाली आहे. काव्याच्या आरंभी कवीने परमेश्वराची स्तुती केलेली असून, त्यानंतर मुहंमद पैगंबर व चार खलीफा यांचीही प्रशंसा केली आहे. [हिं. सा. को. २, हिं. वि. को., हिं. म. का.]

## पद्मावती

एक प्राचीन नगरी. मध्य प्रदेशात ग्वाल्हेरच्या नैर्ऋत्येला ४२ मैलांवर पवाया नावाचे एक खेडे गाव आहे. अलिकडे तिथे झालेल्या उत्खननावरून, तिथेच प्राचीन काळी पद्मावती नगरी वसलेली होती, असे सिद्ध झाले आहे. हे गाव सिंध (सिंधू) व पारा (पार्वती) या नद्यांच्या संगमाजवळ वसलेले आहे.

विष्णु पुराणात नाग राजांची राजधानी म्हणून या नगरीचा उल्लेख आलेला आहे. महाकवी भवभूती या नगरीत वास्तव्य करीत असावा. त्याच्या मालतीमाधव या नाटकात पद्मावती मधील देवालये, प्रासाद, जवळच्या नद्या आणि आसमंतातील निसर्ग, यांची सुंदर वर्णने आढळतात. पवायाच्या पूर्वेला सिंध व मधुमती (महुवार) या नद्यांच्या संगमाजवळ सुवर्णबिंदू नामक शिवालय होते. तिथे एक चौथरा असून, त्यावर एक शिवलिंग आहे. हे शिवलिंग स्वयंभ आहे, असे मालतीमाधव या नाटकात म्हटले आहे. धारावीश भोज याच्या सरस्वतीकंठा भरणात व खजुराहो येथील एका शिलालेखातही या नगरीचे सुरेख वर्णन केलेले आहे. खजुराहो येथील शिलालेखातील दोन श्लोक असे–

> सौधोत्तुङ्गपतङ्गलङ्घनपथप्रोत्तुङ्गमालाकुला ।
> शुभ्राभ्रकषपाण्डुरोच्चशिखरप्राकारचित्राम्बरा ।।
> प्रालेयाचलशृङ्गसन्निभशुभ्रप्रासादसद्मावती ।
> भव्या पूर्वमभूदपूर्वरचना या नाम पद्मावती ॥
> यद्वल्गत्तुङ्गतुरङ्गमोद्गमखुरक्षोदात्रज प्रोत्थित ।
> यस्या जीर्णकठोरबभ्रमकरोत् कूर्माविराभ नभ ।।
> मत्तानेककरालकुम्भिकरटप्रोत्कृ ष्टदाबभुर्त ।
> युष्त कदममुग्रया क्षितितल ता ब्रूत किं सस्तुम ।।

अर्थ – ज्या नगरात सूर्याच्या आकाशातील मार्गाइतक्या उत्तुंग सौधांची रांग लागून राहिली होती, जिच्या गगनचुंबी शुभ्र शिखरांच्या तटांनी आकाश चित्रविचित्र दिसत असे, जिच्या मध्ये हिमालयाच्या शिखरासारखे उत्तुंग मंगल प्रासाद (देवालये) होती व जी अत्यंत भव्य व अपूर्व रचनेची होती अशी ती पद्मावती नगरी होती. ज्या नगरीतील दौडणाऱ्या उंच घोड्यांच्या टापांनी उडवलेल्या धुळीच्या योगे आकाशाला जीर्ण व जाड वस्त्राचे अस्तर उत्पन्न होऊन ते कासवाच्या पोटासारखे दिसू लागत असे व जिच्यातील अनेक मत्त व भीषण आकाराच्या हत्तींच्या गंडस्थळातून वाहणाऱ्या मदाने पृथ्वीतलावर चिखल होत असे, अशी ती नगरी होती. तिचे आम्ही कसे वर्णन करावे? सांगा.

पवाया येथे सापडलेल्या काही नाण्यांवरून पद्मावती नगरी सनपूर्व २ या शतकात अस्तित्वात असावी, असे वाटते. जी काही ताम्याची नाणी तिथे सापडली आहेत, ती नागराजांच्या पूर्वीच्या जनपदाची असावी, असेही अनुमान केले जाते. तिथे मणिभद्र यक्षाची एक मूर्ती सापडली आहे. तिच्या पीठावर कोरलेल्या लेखावरून कळते, की इ. स. च्या पहिल्या शतकात तिथे शिवनंदी नामक नागराजा राज्य करीत होता. कनिष्काने त्याचा पराभव करून पद्मावतीवर आपली सत्ता स्थापली, पण नागराजांनी कुशाणांना तिथून हुसकून लावून पुनश्च तिथे आपले राज्य स्थापले. नव नागराजे पद्मावतीला राज्य करतील असे पुराणात म्हटलेले आहे. त्या राजांची नावे पवायाजवळ सापडलेल्या नाण्यांवर मिळतात. त्यात भीमनाग, स्कंदनाग, बृहस्पतिनाग, देवनाग, विभुनाग, इ. नावे आहेत. हे राजे भारशिव वंशाचे होत. इ. स. च्या तिसऱ्या शतकात गणनाग नावाचा बलाढ्य राजा पद्मावती येथे राज्य करीत होता.

त्यानंतर निदान तीनचार शतके तरी पद्मावती ही नगरी विद्येचे केंद्र म्हणून गाजत होती. विदर्भासारख्या दूरदूरच्या प्रदेशातले विद्यार्थी तिथे अध्ययनासाठी येत. इ. स. च्या ११ व्या शतकापर्यंत ही नगरी तेथील देवालय, विहार, उद्याने व प्रासाद यामुळे सुविख्यात झाली होती.

पद्मावतीचा मध्य युगातला इतिहास मात्र अज्ञात आहे. इ. स. च्या १६ व्या शतकात सिकंदर लोदीचा सुभेदार सफदरखाँ याने तिथे एक किल्ला बांधला. बुंदेलखंडाचा राजा वीरसिंह देव याने तिथे धूमेश्वर महादेवाचे मंदिर बांधले. त्यानंतर पद्मावती नगरीचे वैभव हळूहळू नष्ट झाले आणि पवाया या नावाने एका खेड्याच्या स्वरूपात तिचे अस्तित्व राहिले. [अ. यु. भा., वि. स्मृ. ग्रं., म. भा. इ., रा. मु. ३]

## पद्मावती देवी

(१) जैनांची एक देवता. तेविसावा तीर्थंकर पार्श्वनाथ याच्या वेळी हिने जिनशासनात पुष्कळ सुधारणा केली, म्हणून ती पार्श्वनाथाची शासनदेवी ठरली. या देवीचा पती धरणेंद्र याने पार्श्वनाथाचे रक्षण केले म्हणून त्याला यक्ष हे नाव मिळाले आणि त्यावरून पद्मावती

यक्षिणी झाली नाग ह त्या दोघाच अभिज्ञानचिन्ह हात पूव ज मी ती दोघेही नागदपती होती एका वैदिक यज्ञात त्याची आहुती दिली जात असता पाश्र्वनाथाने त्याना वाचवले पण त्या प्रकरणात त्याचे अग भाजल्यामुळे लवकरच त्याना मत्यू आला मृत्युकाळी पाश्र्वनाथाने त्याना णमोकार मत्र ऐकविला त्यामुळे पुढील ज मी ती दोघे जिन भगवानाची परम भक्त झाली जन वाङमयात पदमावती व धरणेद्र याची वणने व स्तोत्रे पुष्कळ आढळतात

पदमावती देवी पुढील मत्राची अधिष्ठात्री देवता आह – (१) ॐ ह्रा ह्रीं ह्र क्ली पदमे पदमकटिनि नम ।(२) ॐ ह्रा ह्र ह्र क्ली श्री पद्मे नम । (३) ॐ ऐं ल्ली ह्रौं नम । (४) ॐ ह्रीं नम ।

या देवीचे यत्र बनविण्याची रीत अशी– एका ताम्रपात्रावर मध्यभागी ह नाव लिहून त्याच्या भोवती ह्री हे अक्षर लिहि तात त्याच्या चारही बाजूना कामदेवाचे पाच बाण 'द्रा द्री क्ली ब्लू स ' लिहून त्याच्या भोवती पुन्हा ह्री हे अक्षर लिहि तात एवढे केल्याने ह यत्र पुरे होते हे यत्र होमकुडात पुरून त्यावर तूप, दूध व साखर एकत्र करून बनवलेल्या तीस सहस्र गाळचाची आहुती दिली असता देवी प्रसन्न होते, असे समजतात

या देवीच्या कवचाचे माहात्म्य वर्णिलेले आहे, ते असे –

**राजद्वारे श्मशाने च भूतप्रेतोपचारके ।**
**स घने च महादु खे भयशत्रुसमागमे ।**
**स्मरणात कवच ह्यस्य भय किञ्चिन्न जायते ।।**

अर्थ – राजद्वारात श्मशानात, भूतप्रेताच्या उपचारात, अत्यत दु खद प्रसगी किंवा शत्रूशी गाठ पडली असता पद्माव तीच्या कवचाचे स्मरण केल्याने कसलेही भय राहत नाही

ही पद्मावती देवी सौभाग्यलक्ष्मी देणारी, जगाला सुखी करणारी, वध्या स्त्रीलाही पुत्रवती करणारी, नाना रोगाचा नाश करणारी, पापहरण करणारी, भक्ताचे रक्षण करणारी, रकाना धन देणारी व चिंतामणीप्रमाणे सव इच्छा सफल कर णारी अशी आहे

भरवपद्मावतीकल्प या ग्रथात या देवीचे वणन आहे, ते असे–

पद्मावतीला चार हात असून, उजवीकडील एक हात वरद-मुद्रेत आहे व दुसऱ्या हाती अकुश आहे डाव्या हातांत दिव्य फल व पाश आह अकुश व पाश यातून ज्वाला निघत आहेत ती त्रिनयना आहे तिच्या मस्तकी तीन फणा असलेल्या नागाचा मुकुट आहे कुर्कुट व नाग ही तिची वाहने आहेत

या देवीची सौम्य व रौद्र अशी दोन रूपे आहेत सौम्य रूपातली दवी जगाचे कल्याण करते, तर रौद्र रूपातली देवी दुष्टाचे निर्दालन करते, असे सागितले आहे

या दवीच्या अनेक कलापूण मूर्ती उपल ध आहेत खडगिरी येथील गुहेत तिची एक प्राचीन मूर्ती आहे त्याच गुहेच्या दुसऱ्या भागात पाश्र्वनाथाची शासिका व यक्षिणी अशा स्वरू पातलीही तिची मूर्ती आह तिचे रूप असे –

**तथा पदमावती देवी कुक्कुटोरगवाहना ।**
**स्वणवर्णा पदमपाशभृद्दक्षिणकरद्वया ।।**
**फलाङ्कुशधराभ्या च वामदोर्भ्या विराजिता ।**

अथ – पद्मावती देवी सोनेरी वर्णाची असून कावळा व नाग ही तिची वाहने आहत तिला चार हात असून, तिच्या उजव्या दोन हातात पद्म व पाश आणि डाव्या हातात फळ व अकुश आहेत (दिगबरमते दोन कमळे, अकुश व माळा)

काही जैन हिला षडभुजा, अष्टभुजा किंवा चोवीस भुजा असलेली मानतात हिचे बगालमधल्या मनसादेवीशी बरेच साम्य आहे श्रवणबेळगोळ येथे इ स च्या ११ व्या शतकात निर्माण झालेले पाश्र्वनाथाचे मदिर असून, त्याच्या द्वाराजवळ धरणेद्र व पदमावती याच्या मूर्ती आढळतात चद्रगिरीवरील मदिरातही पद्मावतीची मूर्ती आहे व ती इ स च्या १२ व्या शतकातली आहे मदिरातही या देवीची मूर्ती आहे या व्यति रिक्त पुणे, नागपूर आणि वर्धा जिल्ह्यातील सिंधी या ठिकाणीही पदमावतीच्या सुदर मूर्ती आढळतात [ जै इ , ज भ प ]

(२) लक्ष्मीचे एक नाव सागरमथनामुळे लक्ष्मी सागरा तून वर आली, तेव्हा ती पद्मावर उभी होती, म्हणून तिला ह नाव मिळाले, असे पुराणात सागितले आहे पढरपूर येथे या देवीचे एक मदिर आहे ( पद्मतीर्थ पाहा )

पुण्यापासून जवळच पद्मावतीचे एक लहानसे मदिर आह तिथे एक कुड असून, त्यातले पाणी रोगहारक आहे, अशी समजूत आह बुलडाणा जिल्ह्यातील कळबेश्र्वर या गावीही पद्मावतीचे मदिर एका तलावाच्या काठी आहे

(३) एक बौद्ध देवता ही कमलासना, त्रिनयना व द्विप द्महस्ता आहे

(४) एक शाक्त दवता ही देवील कमलासना, त्रिनयना व द्विपद्मभुजा आहे [ श्रीविद्यार्णवतत्र ]

**पद्मावती विद्या** तत्रमार्गातील एक मत्रविद्या ही महाविद्या कल्पवृक्षाप्रमाणे जे जे मागावे ते ते देणारी आहे, असे म्हटले आहे या विद्येचा मत्र असा –

**ॐ ह्रीं पदमावति देवि त्रैलोक्यवार्ता कथय कथय स्वाहा ।**

या मत्राचा दोन वर्षे दररोज एकशे आठ जप केल्याने ही विद्या साध्य होते व ती सिद्ध झाल्यावर साधकाला सव जगाचा वृत्तात बसल्या जागी समजतो, असे म्हटले आहे पद्मावती

देवी ता वृत्तात साधकान्या कानात येऊन सागत, असे तन्त्रविद्येत सांगितले आहे [योगिनीतन्त्रम]

**पद्मासन** एक योगासन याला कमलासन असेही म्हणतात याची प्रक्रिया अशी–

डावा पाय उजव्या मांडीवर व उजवा पाय डाव्या मांडीवर ठेवावा दोन्ही पायाच्या टाचा बेंबीच्या खालच्या भागात लावून ठेवाव्या हनुवटी हृदयाला लावावी दृष्टी नासाग्र करावी दोन्ही हात दोन गुडघ्यावर ठेवावे पाठीचा कणा ताठ ठेवावा

पद्मासन घालताच थोड्याच वेळात सुषुम्ना नाडी गतिमान



पद्मासन

होते त्यामुळे मनाला शांती मिळते परशुरामाने या आसनावर विजय मिळविला होता, असे सागतात

**बद्धपद्मासन**– याचाच दुसरा प्रकार म्हणजे बद्धपद्मासन होय यात पद्मासनावर बसून दोन्ही हात मागे घ्यायचे असतात तसे करून उजव्या हाताने डाव्या पायाचा व डाव्या हाताने उजव्या पायाचा अंगठा धरतात यात दोन्ही गुडघे जमिनीवर टेकून धरायचे असतात [उ यो द]

**पधरिया** एक जात या लोकाची वस्ती गुजरातेत व सौराष्ट्रात आढळते हे लोक मूळचे काळी होते आणि त्यानी मृत जनावराचे मास खाल्ले म्हणून त्याना जातीबाहेर टाकण्यात आले, असे सागतात त्यामुळे पुढे त्याचा स्वतन्त्र जातच निर्माण झाली [मु इ जा]

**पन** एक उत्सव काश्मीर प्रदेशात भाद्रपद मासात हा उत्सव करतात लक्ष्मी ही या उत्सवाची प्रमुख देवता आहे उत्सवात तिची पूजा करतात या उत्सवाच्या निमित्ताने इष्टमित्राकडे भेटी पाठविण्याचाही प्रघात आहे [म क]

**पनस** भिक्षेकऱ्याचा एक वर्ग या लोकाची वस्ती आन्ध्र प्रदेशात आहे हे भिक्षेकरी केवळ कमसल (सोनार) लोकाकडेच भिक्षा मागतात आणि भिक्षा मागताना त्याच्यासबधी काही स्तुतिपर गाणी गातात कर्नूल जिल्ह्यात ते कमसला बरोबर बेरी कोमटी यांच्याकडेही भिक्षा मागताना आढळतात याच्यासबधी एक दंतकथा सागतात, ती अशी –

कोमटी लोकाची बचेलुवारी नावाची एक टोळी होती या टोळीतील लोकानी जमीनमहसुलाची बाकी दिली नाही, म्हणून त्याना गोवळकोड्याच्या राजाने तुरुगात टाकले ते कैदेत असता एकदा काही कारागीर त्या तुरुगावरून जात होते त्याना पाहून 'आम्हाला मुक्त करा' अशी त्या कैद्यानी त्याना विनती केली कारागिराना त्याची दया आली आणि त्यानी त्याची थकबाकी चुकती करून त्याना सोडवले ते मुक्त झाल्यावर त्याच्या उदरनिर्वाहासाठी कमसल लोकानी आपल्या जातीच्या लोकावर पट्टी बसवली आणि त्यानी इतर जातीकडे भिक्षा मागू नये, अशी त्याना अट घातली

पनस लोक हे पैसे भिक्षेच्या रूपाने मागण्यासाठीच कमसलाच्या घरोघर जातात [का ट्रा स इ]

**पनार** एक अस्पृश्य जात या लोकाची वस्ती तमिळनाडमध्ये आहे प्राचीन काळी याना अस्पृश्य मानीत नसत सघम काळात चातुर्वर्ण्य समाजाचे सारे हक्क याना उपभोगता येत असत त्या काळी राजाच्या दरबारात हे लोक भाटगिरीचा धदा करीत संगीत, नाट्य व नृत्य या कलात ते निष्णात असत याळ हे वीणेसारखे वाद्य तेच उत्तम वाजवीत राजे लोक या भाटाना खूप ठेवण्याचा प्रयत्न करीत राजदरबारात सुवर्णकमळे देऊन त्याचा सन्मान करण्यात येई एखाद्या राजाला युद्धात विजय मिळाल्यानतर तो शत्रूकडून लुटलेली सुवर्णनाणी पनार भाटाना देई ब्राह्मण लोक देखील त्याचा आदरसत्कार करीत तिरुप्पाण आळवार आणि तिरुनीलकठ यलप्पनार हे सत पनार जातीचेच होत असे हे लोक कालातराने अस्पृश्य का ठरले, ते मात्र समजत नाही [र ऐ को व्हॉ]

## पानक

द्रविड वर्गाती एक जात याची वस्ती मुख्यत मध्य प्रदेशातील विंध्याचलाजवळ मडल, बिलासपूर, रायपूर, सिद्धी व शाहडाल या भागात आढळते

या जातीत दोन प्रमुख विभाग असून कबीरपथी आणि सक्त अशी त्याची नावे आहेत कबीरपथी लोक आपणास वरच्या दर्जाचे, सुधारक, श्रेष्ठ व प्रामाणिक समजतात ते मासाशन करीत नाहीत व दारूला स्पर्शही करीत नाहीत त्या मानाने सक्त हे मागसलेले, व्यसनाधीन व गोड बगा वगैरे जातीशी सबध ठेवणारे असे आहेत दोन्ही उपपथात बेटीव्यवहार होत नाही त्याची उपनावे वनस्पती, पशू, निर्जीव वस्तू यावरून पडलेली आहेत

**विवाहप्रथा** – मडल प्रदेशात मुलीचा बाप लग्न ठरवायला जातो मुलाच्या बापाला तो सबध समत झाल्यास मग सर्व नातेवाईक मुलीचे चुबन घेऊन तिला एक रुपया भेट देतात विवाहातील मुख्य समारभाला 'मधोहूण' असे म्हणतात या सस्कारात वधूवराच्या वस्त्रांना गाठ मारतात व ती दोघे विवाहस्तभाला तीन प्रदक्षिणा घालतात विवाहसमारभ उरकल्यावर वधूवराना नदीकिनारी नेतात तिथे ती दोघे, आपल्या अगावरची सर्व बेगडी भूषणे जलात विसर्जित करतात सक्त लोकात वधूप्रशोधनाला निघण्यापूर्वी दूल्हा देवाची पूजा करतात मुलीचे देज घेतात देज देण्याची ऐपत नसलेला तरुण भावी सासऱ्याच्या घरी काही काळ नोकरी करतो कबीरपथी लोकात मात्र देजाची चाल नाही पत्नीच्या वर्तनाबद्दल सशय उत्पन्न झाल्यास पतीला विवाहविच्छेद करता येतो त्या प्रसगी त्याला ज्ञातिबाधवाना मेजवानी द्यावी लागते

**व्यवसाय** – सक्त वर्गातले लोक डोंगराळ प्रदेशात राहतात तिथे ते जगले साफ करून शेती करतात आणि लाकूडफाटा व इतर वन्य पदार्थ विकून उपजीविका चालवतात काही लोक विणकामाचा धदा करतात ते कापड विकून त्याच्या बदली धान्य व इतर ससारोपयोगी जिन्नस घेतात सांप्रत या लोकात हळूहळू सुधारणा होत आहे एखादा जमिनीचा तुकडा मिळवून तिथे स्थिर राहावे, बैलांची जोडी पदा करून शेती करावी, याकडे त्याची प्रवृत्ती वाढत आहे

विणकामावर उपजीविका करणारे सक्त लोक बगा, गोड वगैरे जमातीच्या लोकाना लागणारी वस्त्रे तयार करतात

कबीरपथी लोकाचा सुशिक्षित वर्गाशी बराच सबध येतो त्यामुळे त्याची मुले शिक्षण घेऊन कोतवाल, पटवारी, म्हणून नोकरी करतात अलीकडे ग्रामसेवक व शिक्षक या पेशातही अनेक लोक शिरले आहेत याच्यातले काही लोक व्यापारउदीम करून चागले सधन झाले आहेत जगली जमातीकडून वन्य वस्तू खरेदी करून व त्या साठवून पुढे योग्य वेळी वाढत्या किमतीने हे लोक त्या विकतात त्यामुळे त्याना चागला पैसा मिळतो

**देव धर्म** – कबीरपथी लोक मूर्तिपूजा करीत नाहीत त्याचा ध्यानावर भर असतो याच्यात चौका नावाचा एक धार्मिक विधी रूढ आहे त्यासाठी ते गव्हाच्या पिठाने चार रेघा मारून एक चौक तयार करतात त्याचा महत मग तिथे काही धार्मिक विधी करतो मग सगळे लोक झाजा व मृदग याच्या साथीवर कबीराचे दोहे म्हणतात शेवटी आरती करून प्रसाद वाटतात महत हा लोकाना उपदेश करून त्याच्या मनावर कबिराचे तत्त्वज्ञान ठसवण्याचा प्रयत्न करतो पथाची दीक्षाही तो देतो दीक्षेच्या वेळी पाण्याने भरलेले एक भाडे घेऊन त्यावर दिवा तेवत ठेवतात कबीराचे गुणगान असणारे दोहे म्हणतात दीक्षार्थीच्या हातात विड्याची पाने व गूळखोबरे देतात त्याच्या कुटुबातील मडळीच्या हातातही अशीच पाने व पदार्थ देतात मग महत दीक्षा घेणाऱ्याच्या कानात मत्र सागतो त्याची गुप्तता राखली जाते व तो केवळ त्याच्यापुरता आहे, असे समजतात मग महत त्याला साजसकाळ म्हणायच्या प्रार्थना शिकवितो व त्याच्या गळ्यात तुळशीची माळ घालतो या पथातले सुशिक्षित लोक बोधसागर व अमारमूल हे कबिराचे उपदेशग्रथ पठण करतात

**मर्तिकप्रथा** – हे लोक प्रेते पुरतात प्रेताचे मस्तक उत्तर दिशेला करतात नतर स्नान करून नारळ फोडतात मग त्याचे तुकडे करून जमलेल्याना वाटतात प्रत्येकजण एक एक तुकडा प्रेताखाली जमिनीत पुरतो नतर तिथे एक दिवा लावून ठेवतात एका द्रोणात पाणी भरून तो द्रोण मृताच्या घराजवळ तीन दिवस ठेवतात दहा दिवस सुतक पाळतात दहाव्या दिवशीही असाच नारळ फोडून जवळच्या नातलगाना त्याचा प्रसाद देतात [ चे द्रा म प्र ]

## पन्नेजनीस्थाली

एक यज्ञीय पात्र सामयागामध्ये प्रातःसवनात पाणी भरून घेण्याचा एक विधी असतो विधीच्या सुरवातीस यजमानपत्नी मातीच्या एका घागरीतून पाणी आणते त्या घागरीला पन्नेजनीस्थाली असे म्हणतात तृतीय सवनामध्ये सामगायक यज्ञायज्ञीयस्तोत्र म्हणू लागले, म्हणजे पत्नीने या घागरीमधील पाणी आपल्या मांडीवर ओतायचे असते [ श्री विद्याधरशास्त्री भिडे ]

## पपौरा

एक जैन क्षेत्र हे क्षेत्र विंध्यप्रदेशातील टीकमगडापासून थोड्या अतरावर असलेल्या एका जगलात आहे त्याच्या चारही बाजूना कोट आहे त्या कोटाच्या आत

जवळ जवळ नव्वद जनमन्दिरे आहेत इथे दरवर्षी कार्तिक शुद्ध चतुर्दशीला मोठी यात्रा भरते [जै ध]

**पयोव्रत** एक काम्य व्रत हे व्रत फाल्गुन शुद्ध प्रतिपदेपासून द्वादशीपर्यंत आचरतात या व्रतात विष्णुपूजा व केवळ दुग्धाहार करायचा असतो हे व्रत प्रथम ब्रह्मदेवाने कश्यपाला व कश्यपाने आपली पत्नी अदिती हिला उपदेशिले अदितीने हे व्रत केल्यावर विष्णूने वामनरूपाने तिच्या उदरी जन्म घेतला

प्रत्येक अमावास्येला दूध पिऊन राहणे, हा या व्रताचा दुसरा प्रकार आहे असे एक वर्षभर व्रत करून शेवटी श्राद्ध करतात आणि पाच गायी, वस्त्रे व जलपात्रे ब्राह्मणाला दान देतात फल – पुत्रप्राप्ती [व्र प]

**पयोष्णी** मध्य प्रदेशातल्या ऋक्ष पर्वतातून उगम पावून विंध्य पर्वताच्या दक्षिणेकडे वाहणारी एक नदी बलरामाने या नदीची यात्रा केली होती, असा उल्लेख आहे पयोष्णी नदी ओलांडून पांडव वैदूर्य पर्वतावर व तिथून नर्मदेकडे गेले, असे महाभारतात म्हटले आहे या नदीच्या काठी पिंगळेश्वरी देवी असून, तिच्या तीरावर पितरांचे श्राद्ध करतात या नदीचे पाणी रुचकर, पवित्र, रोगहारक, बलदायक कांतिप्रद व हलके असल्याचे सांगितले आहे

सातपुडा व अजंटा या डोंगरावरचे पाणी या नदीला येऊन मिळते विदर्भ व खानदेश यांतून वाहत जाऊन ही चांगदेव क्षेत्राजवळ तापी नदीला मिळते

हिची लांबी १८० मैल असून, विदर्भात या नदीला दक्षिणोत्तर बऱ्याच नद्या येऊन मिळतात पयोष्णीमाहात्म्य या ग्रंथात हिच्या काठची स्थळे वर्णिली आहेत

चंद्राची कन्या इंदुमती हिच्या उष्ण सुधाच्या ओघातून या नदीचा जन्म झाला, अशी कथा आहे तिच्यावरूनच तिला पयोष्णी हे नाव पडले असे सांगतात [सु वि को, श क]

**पय्यूर भट्ट** केरळ प्रदेशातले संस्कृत पंडितांचे एक घराणे चौदाव्या शतकाच्या मध्यापासून पंधराव्या शतकाच्या मध्यापर्यंत तीन पिढ्यांत अनेक विद्वान पुरुष या घराण्यात होऊन गेले ते मीमांसाशास्त्राचे पंडित होते पोरक्कलम जवळचे वेलगाड हे यांचे वसतिस्थान होय हे ठिकाण त्रिचूरपासून वायव्येला सोळा मैलांवर आहे नंद गोपाची कन्या योगपालिका ही या घराण्याची उपास्य देवता आहे या देवतेसंबंधी त्यांच्या वाङ्मयात अनेक उल्लेख आढळतात काही विद्वानांच्या मते या घराण्याला पय्यूर हे नाव या देवीवरूनच पडले असावे कारण पय्यूर याचा अर्थ गाईचे गाव असा होतो

ऋषी हा या घराण्याचा मूळ पुरुष होय ऋषीने गौरीशी विवाह केला त्यांना जो पुत्र झाला त्याचे नाव परमेश्वर संस्कृत वाङ्मयात हा परमेश्वर (पहिला) मोठा पंडित, टीकाकार व कवी म्हणून प्रसिद्ध आहे न्यायसमुच्चय हा त्याचा मीमांसा दर्शनावरील एक अधिकृत ग्रंथ आहे याशिवाय त्याच्या अन्य ग्रंथांची नावे अशी – (१) सुमनोरमणी – हा कालिदासाच्या मेघदूतावरील टीका आहे (२) जुषध्वंकरणी (३) स्वदितंकरणी – हा वाचस्पतिमिश्राच्या न्यायकणिकेवरील टीकाग्रंथ आहे (४) हरिचरित – हे कृष्णचरित्रविषयक काव्य आहे

परमेश्वर (पहिला) याला पाच पुत्र होते त्यांतील एक पुत्र ऋषी (दुसरा) होय त्याच्या पुत्राचे नाव परमेश्वर (दुसरा) हाही मोठा मीमांसक म्हणून प्रसिद्ध होता त्याने बरेच ग्रंथ रचले आहेत त्यांची नावे अशी – (१) पूर्वमीमांसाटीका, (२) गोपालिका – स्फोटसिद्धीवरील टीका, (३) तत्त्वविभावना – वाचस्पतिमिश्राच्या तत्त्वबिंदूवरील टीका, (४) चिदानंदाच्या नीतितत्त्वाविर्भाव ग्रंथावरील टीका व (५) मंडनमिश्राच्या विभ्रम ग्रंथावर टीका

त्याच्या या टीकाग्रंथांमुळे मूळ ग्रंथ समजणे सुलभ झाले आहे शिवाय त्या ग्रंथांत अनेक विवाद्य प्रश्नांवर चर्चाही केलेली आहे

परमेश्वर (दुसरा) याला वासुदेव नावाचा एक भाऊ होता हा महापंडित व कवी म्हणून प्रसिद्ध झाला याने जे काव्यग्रंथ लिहिले त्यांची नावे अशी – (१) देवीचरित, (२) अच्युतलीला, (३) सत्यतपःकथोदय, (४) शिवोदय, (५) वाक्यावली, (६) कौमारिलयुक्तिमाला किंवा कौमारिलतिलकम् व (७) चकोरसंदेश परमेश्वर (दुसरा) याच्या मुलाचे नाव ऋषी (तिसरा) त्याने जैमिनिसूत्रार्थसंग्रह हा ग्रंथ रचला आहे

या घराण्याच्या विद्वत्तेसंबंधी असे सांगतात, की मानविक्रम झामोरीन राजाच्या दरबारी या घराण्यातील नऊ विद्वान लोक एका वेळेला होते [कों वे स लि, मी द]

**परकायाप्रवेश** योगमार्गाने प्राप्त होणारी एक सिद्धी परकायाप्रवेश या सिद्धीला परशरीरावेश, परपुरप्रवेश देशांतरावेश अथवा अन्यदेहप्रवेश असेही म्हणतात नाथसंप्रदायात या सिद्धीला प्राणसंजीवनविद्या म्हटले आहे ही प्रक्रिया कशी घडते त्यासंबंधी एक वचन आहे, ते असे –

**बन्धकारणशैथिल्यात् प्रचारसंवेदनाच्च चित्तस्य परशरीरावेशः ।**

अर्थ – बंधकारण जे धर्माधर्म ते शिथिल झाल्याने आणि मन, प्राण व इंद्रिये यांचा संचार करण्याचा मार्ग असलेल्या नाड्यांमध्ये चित्त एकाग्र केल्याने आपले चित्त, इंद्रिये इत्यादिकांचा

दुसऱ्याच्या शरीरात प्रवेश करविता येतो.

एखाद्या प्रेताच्या देहात प्रवेश करून योगी त्यात चलनवलनाची क्रिया उत्पन्न करू शकतो अथवा दुसऱ्या मनुष्याच्या मनात प्रवेश करून त्याचे मन आणि इंद्रिये यांवर ताबा चालवू शकतो. त्याच वेळी स्वतःच्या शरीरातही तो राहू शकतो. प्रकृती आणि पुरुष ही तत्त्वे भिन्न आहेत, हे ज्ञान प्राप्त झाले म्हणजे योग्याला या सिद्धीची प्राप्ती होते. दुसऱ्याच्या शरीरात त्याला प्रवेश करायचा असला, तर त्या शरीरावर संयम करून ते तो करू शकतो. योग्याचा आत्मा सर्वव्यापी झालेला असतो. इतकेच नव्हे, तर त्याचे मनही सर्वव्यापी होते. त्याच्या शरीरातील मन हे सर्वव्यापी मनाचाच एक अंश असतो व हे ज्ञान झालेले असल्यामुळे योग्याला त्या अन्यरूपी मनाचा विस्तार करता येतो.

आद्य शंकराचार्यांनी कामशास्त्राचे ज्ञान मिळविण्यासाठी अमरूक राजाच्या शरीरात प्रवेश केला होता, अशी कथा आहे. याची आणखी काही उदाहरणे अशी –

नंदराजा मरण पावला असता इंद्रदत्ताने त्याच्या शरीरात प्रवेश करून नंदराजा मरण पावल्याचा पत्ता लागू न देता त्याचे राज्य नेले, अशी कथा कथासरित्सागरात आहे. राजा विक्रम किंवा मुकुंद यांच्या संबंधीही अशाच कथा आहेत. पार्श्वनाथ व चक्रधर यांच्या चरित्रातही असे प्रसंग आहेत.

भुताने किंवा वेताळाने स्मशानातील चितेवर ठेवलेल्या प्रेतात प्रवेश करून स्मशानाच्या जवळपास फिरकणाऱ्या लोकांना त्रास दिल्याचे प्रसंग वेताळपंचविशीत दिलेले आहेत.

खेचरी मुद्रा साध्य केल्याने परकायाप्रवेशाची सिद्धी प्राप्त होते, असे हठयोगात सांगितले आहे. [योगविद्या, डॉ. कैलासनाथ मिश्र, भारती, जानेवारी १९६२.]

## परकीया

एक नायिकाभेद. जिचे परपुरुषावरील प्रेम प्रकट झालेले नाही, ती परकीया होय, असे हिचे लक्षण सांगितले आहे. परोढा व कन्यका असे तिचे दोन भेद आहेत. कन्या ही पित्याच्या अधीन असल्यामुळे, तिला परकीया मानलेले आहे. तिच्या सर्व चेष्टा गुप्त असतात. परोढा परकीया नायिकेचे उदाहरण पुढीलप्रमाणे –

> **अयं रेवाकुञ्जः कुसुमशरसेवासमुचितः**
> **समीरोऽयं वेलादरविलसदेलापरिमलः ।**
> **इयं प्रावृड् धन्या नवजलदविन्यासचतुरा**
> **पराधीनं चेतः सखि किमपि कर्तुं मृगयते ।।**

अर्थ – हा रेवा नदीच्या तीरावरचा कुंज मदनाची सेवा करायला योग्य आहे. हा तीरावरचा वारा वेलदोड्याच्या सुगंधाने युक्त आहे. नवीन मेघांच्या पखरणीत चतुर असलेला वर्षाकाळ धन्य झाला आहे. हे सखे, माझे मन दुसऱ्याच्या अधीन आहे आणि ते काही तरी करण्याच्या खटपटीत आहे.

गुप्ता, विदग्धा, लक्षिता, कुलटा, अनुशयाना, मुदिता, ह्या नायिकांचा परकीया नायिकेच्या वर्गातच समावेश होतो.

केवळ प्रेम हाच परकीया भावाचा आधार होय. भक्तिसंप्रदायात राधेला परकीया नायिका मानले आहे. [हिं. सा. को., न. कृ. मा. म., श. क.]

## परजा

एक आदिवासी जमात. ही गोंडांचीच एक शाखा असून, ती अत्यंत मागासलेली आहे. मध्य प्रदेशातल्या बस्तर जिल्ह्यात यांची वस्ती आहे. त्यांच्यातही भाषेवरून मरी, मटरा व हलबा असे भेद पडलेले आहेत. पूर्वी वरंगळच्या राजाचे सैनिक म्हणून त्यांनी बस्तर प्रदेशात प्रवेश केला व ते तिथल्या डोंगराळ भागात स्थायिक झाले, असे मानतात.

जंगलातून कंदमुळे, मध, डिंक, लाख, ह्या वस्तू आणून त्या शहरात विकणे, शिकार करणे, औषधी वनस्पती गोळा करणे, हे यांचे व्यवसाय आहेत. यांच्यातले काही लोक शेती व शेतमजुरीही करतात.

हे लोक मध्यम बांध्याचे व निमगोरे आहेत. यांच्या डोक्यावरचे केस फार दाट व ओठ जाड असतात. पुरुष लंगोटी घालतात. बायका कमरेभोवती एक अपुरे वस्त्र गुंडाळतात. त्यांच्या छातीवर पदर नसतो. त्या गळ्यात मण्यांच्या माळा घालतात आणि दंडात व पायात पितळी दागिने घालतात.

**विवाहप्रथा –** यांच्या लग्नाचा धार्मिक असा कोणताच विधी नसतो. मुले स्वतःच आपला जोडीदार निवडतात आणि पतिपत्नींचे नाते जाहीर करतात. त्यांची लग्ने बहुधा चैत्र महिन्यात होतात. आतेमामे भावंडांचे लग्न प्रतिष्ठितपणाचे मानतात. लग्नप्रसंगी नृत्याचे आयोजन करतात.

**देवधर्म –** हे लोक भुताखेतांची पूजा करतात. वार्षिक सणवार सगळे पाळतात. हे दंतेश्वरी नावाच्या देवीला भजतात.

**मृतिकप्रथा –** हे मृतांना पुरतात. प्रेत पुरल्यावर त्याच्या आत्म्याचे प्रतीक म्हणून एक मासा धरून तो घरी आणतात. कुठे तीन तर कुठे नऊ दिवस सुतक पाळतात. [द्रा. ह.]

## परंजोती मुनिवर

(इ. स. चे ११ वे शतक) तमिळनाडमधील एक सुप्रसिद्ध कवी. तमिळ साहित्यात यांचे एक विशिष्ट स्थान आहे. या कवीने वेदारण्यपुराणम व तिरुविळैयाडपुराणम ही दोन काव्ये रचली आहेत. पहिल्या काव्यात तंजाऊर जिल्ह्यातील वेदारण्यम या क्षेत्राचे व दुसऱ्या काव्यात शिवाच्या लीलांचे वर्णन आहे. या काव्यग्रंथाच्या

गुरुवानींनी तथा स्कंद पुराणावर आधारित असून, नंतरच्या भागात मदुरा या क्षेत्राचे व त्याच्या परिसराचे वर्णन आहे. तमिळ साहित्याचा व काव्याचा अभ्यास करणाऱ्यांना हा काव्यग्रंथ अभ्यासावा लागतोच, एवढे त्याचे महत्त्व आहे.

मदुरेतील तविरान या शैवपंथीय मठाचा मठप्रमुख म्हणून परंजोती मुनिवर प्रसिद्ध होता. [त. रा. स.]

**परडी विधी** एक लौकिक विधी. रोगाची साथ घालविण्यासाठी हा विधी करतात. त्यात भात, गारुळ, लिंबू, लाल फूल, लाकडा किंवा दिवा, इ. वस्तू एका टोपलीत ठेवून ती टोपली महाराच्या डोक्यावर देतात. महार ती टोपली दुसऱ्या गावाच्या शिवेवर नेऊन ठेवतो. टोपलीबरोबर कोंबडे अथवा बकरेही असते. ज्या गावच्या शिवेवर ही टोपली ठेवली असेल त्या गावचे लोक ती टोपली पुढच्या गावच्या शिवेवर नेऊन ठेवतात. अशा रीतीने शेवटी ती टोपली समुद्रात जाऊन पडते व त्या परडीबरोबर रोगही गाव सोडून निघून जातो, अशी समजूत आहे.

**परदेशगमन** भारताच्या उत्तर सीमेवर उंच व दुर्गम पर्वतराजी पसरलेली असली आणि द. भारताचे द्वीपकल्प तीन्ही बाजूंनी समुद्राने वेढलेले असले, तरी भारताचे जगाशी दळणवळण फार प्राचीन काळापासून चालू होते. भारतीय संस्कृतीचा विकास केवळ एकांगी झालेला नाही; कारण जगाच्या निरनिराळ्या भागांतून भिन्न भिन्न वंशांच्या मानवांचे अनेक समूह निरनिराळ्या कालखंडांत भारतात येऊन स्थायिक झाले आणि त्या सर्वांनी मिळून इथली संस्कृती घडविली आहे. त्याचप्रमाणे असंख्य भारतीय लोक व्यापाराच्या किंवा सफरीच्या निमित्ताने निरनिराळ्या देशांत जात व तिथे दीर्घ काळ वास्तव्य करून परत येत. येताना ते काहीतरी सांस्कृतिक व नास्तिक विचार घेऊन येत व त्यांचा इतर संस्कृतींशी समन्वय करीत. काही भारतीय लोकांनी पेगू, कंबुज, जावा, सुमात्रा, बोर्निओ, जपान, इ. देशांत जाऊन वसाहतीही स्थापल्या होत्या. काही ठिकाणी त्यांनी आपली राज्येही निर्माण केली होती.

हे सर्व दळणवळण समुद्रावरून व जमिनीवरून अशा दोन्ही मार्गांनी चालू होते. भारतीय व्यापारी आपला माल घेऊन अरबस्तान, इजिप्त, युरोप आणि पूर्वेकडे मलाया, जपान येथपर्यंत स्वदेशी किंवा परदेशी जहाजांतून सफरी करीत. उत्तरेकडील पर्वतराजीत अनेक खिंडी आहेत आणि त्यांतून भारतीय लोकांचा काबूल, कंदाहार, इराण, तिबेट, ब्रह्मदेश व चीन या देशांशी व्यापार चाले. बौद्ध धर्माचा प्रसार करण्यासाठी कित्येक बौद्ध पंडित व भिक्षू दूरदूरच्या देशांत गेले होते, असा इतिहास आहे. संस्कृत व पाली साहित्यांत यासंबंधी असंख्य उल्लेख आहेत. पाश्चात्य व पौर्वात्य लेखकांनी भारतीय लोकांच्या परदेशगमनाची वर्णने लिहून ठेवली आहेत. पूर्वेकडील द्वीपकल्पात भारतीय संस्कृतीचे अवशेष अजूनही सापडतात.

मौर्य, सातवाहन, गुप्त, चालुक्य, चोळ, इ. राजवंशांच्या इतिहासावरून स्पष्ट कळते, की इ. स. च्या ११ व्या शतकापर्यंत भारतीय लोकांचे परदेशगमन मोठ्या प्रमाणावर व अव्याहत चालू होते. सनातनी वृत्तीच्या ब्राह्मणांनी समुद्रप्रवासाविषयी निषेध सांगितला असला, तरी तो न मानता पुष्कळ ब्राह्मण समुद्रप्रवास करीत असे सूत्रवाङ्मयावरून कळते. समुद्रप्रवास करणाऱ्या ब्राह्मणाला मनूने श्राद्धाच्या भोजनासाठी अपात्र मानले आहे; त्यावरून मनूच्या काळी ब्राह्मण परदेशगमन करीत होते, असे सिद्ध होते. समुद्रप्रवास करणारे ब्राह्मण जातिबहिष्कृत होत नसत. परत आल्यावर प्रायश्चित्त घेतल्यानंतर त्यांना स्वजातीत राहता येत असे. त्यावरून मनुस्मृतीच्या काळातील लोक हा परदेशगमननिषेध विशेषसा मानीत नसावे, असे दिसते. व्यापारासाठी किंवा वसाहती व राज्ये स्थापण्यासाठी ते अनिवार्यपणे समुद्र पार करून परदेशांत जात राहिले होते.

पुढे इ. स. च्या ११ व्या शतकात *कलिवर्ज्य प्रकरण* निर्माण झाले आणि त्यात पूर्वी धर्म्य मानली गेलेली अनेक कृत्ये कलियुगात वर्ज्य ठरवली गेली. समुद्रपर्यटन, आंतरजातीय विवाह, सपिंड व सगोत्र विवाह, नियोग, सोमविक्रय, इ. अनेक गोष्टींचा त्या निषेधात समावेश केलेला आहे. परदेशी गेल्याने परकीय लोकांबरोबर अन्योन्यांशी व्यवहार घडतात आणि त्यामुळे मनुष्य बाटतो व जातिबाह्य ठरतो, अशी भीती भारतीयांच्या मनात निर्माण झाली. त्यामुळे लोकांनी परदेशात जाणेच बंद केले.

प्रथम कलिवर्ज्याचा हा निषेध फक्त ब्राह्मणांना बंधनकारक असला, तरी कालांतराने इतर वर्णांचे लोकही तो मानू लागले आणि सर्व समाजच त्यामुळे कूपमंडूक बनला. हिंदू समाजाच्या अवनतीची व अधःपाताची जी सात कारणे आहेत, त्यांना स्वा. सावरकरांनी सप्तशृंखला हे नाव दिले आहे. अस्पृश्यता, जातिभेद, शुद्धिबंदी, व्यवसायबंदी, रोटीबंदी, वेदबंदी व सिंधुबंदी, या त्या सप्तशृंखला होत. यांतील सिंधुबंदी म्हणजे समुद्रपर्यटनाला बंदी होय. त्यामुळे हिंदू लोकांना जगाचे ज्ञान मिळेनासे झाले व ते प्रगतीला व पराक्रमाला पारखे झाले.
[हिं. इ. शि.; हिं. ध.; हिं. स. स. बि.]

**परधान** गोंड आदिवासींची एक शाखा. या लोकांची वसती मुख्यत्वे मध्यप्रदेश व विदर्भ या भागांत आहे. पूर्वी परधान हे गोंडांचे पुरोहित व भाट म्हणून काम करीत असत. मध्ययुगात ते गोंड राजांच्या दरबारात नगारखाना ठेवण्याचे काम करीत, असेही एक मत आहे. परधानांच्या स्त्रिया गोंड लोकांकडे सुइणीचे व त्यांच्या मुलींच्या अंगावर गोंदण भरण्याचे काम करीत. गोंड राजांच्या अस्तानंतर त्यांची ही कामे आपोआप सुटली आणि ते चरितार्थासाठी चोरीमारी करू लागले. पण पुढे त्यांनी तो व्यवसाय सोडला आणि ते पुनश्च गोंडांकडे भिक्षा मागण्यासाठी जाऊ लागले.

परधानांना पन, पठारी, देसाई, मोकासी किंवा भाऊ अशीही नावे आहेत. या सर्वांच्या काही ना काही व्युत्पत्ती परधानांनी दिलेल्या आहेत. जो पराचे म्हणजे दुसऱ्याचे धान्य म्हणजे धान्य खातो, तो परधान होय, ही त्यांपकी एक व्युत्पत्ती होय. पहिला परधान एका धानाच्या (भातशेताच्या) पऱ्यावर (बांधावर) जन्मला अशी त्यांची समजूत असून त्यावरूनही ते आपली व्युत्पत्ती सांगतात.

परधान हा गोंडांपेक्षा अधिक भावनाप्रधान आहे. आपल्या वंशनामांवर व पूर्वजांवर त्यांची फार श्रद्धा असते. त्यांच्या जीवनात वाद्याला फार मोठे स्थान आहे. ते गोंडांपेक्षा बुद्धिमान, हजरजबाबी आणि विनोदी असतात. ते दिसायलाही गोंडांपेक्षा रूपस असून, त्यांचे शरीर चिवट आणि चपळ असते. यांच्या स्त्रियाही देखण्या असून, त्यांना दागिन्यांची आवड असते.



परधान युवती



परधान युवक

परधान हे आपल्यापकीच आहेत, असे जरी गोंड सांगत असले, तरी ते परधानांशी लग्नसंबंध मात्र करीत नाहीत. परधान गोंडांकडे जेवतात पण गोंड परधानांकडे जेवत नाहीत. कारण परधानांना ते आपल्यापेक्षा हीन दर्जाचे मानतात.

नर्मदेच्या खोऱ्यात परधानांचे राजनेगी आणि गोगिया असे दोन भेद आहेत. अन्यत्र आणखीही पुष्कळ भेद आहेत. परधान लोकांत धुर्व, मरावी, कुम्र, सुरो, मरसी, मरकम, इ

अनेक कुळे आहेत. त्यांची नावे देवकावरून पडलेली आहेत.

परधानाची घरे मातीची असतात. सर्वसाधारणपणे मध्य भागी मुख्य घर असते आणि त्याच्या दोन बाजूना दोन लहान घरे बांधतात. मधल्या मुख्य घराला देवघर असे म्हणतात आणि त्यात देव व बना वाद्य ठेवतात. याच घरात स्वयंपाकगृह असते. चुलीपुढे धान्याच्या दोन मोठ्या कणग्या ठेवलेल्या असतात. त्यामुळे कोणाही त्या ओलांडून पुढे जाऊ शकत नाही. मोठ्या मुलाचे लग्न झाले, की त्याला या मधल्या घरात झोपायला देतात आणि त्याचे आई-वडील बाजूच्या एका घरात झोपतात. तिसरे घर हा बहुधा करून गोठा असतो.

घरातला सर्व पैसा ते स्वयंपाकगृहातील एका कणगीखाली पुरून ठेवतात. किंवा घरातील वडीलधारी स्त्री आपल्या अंथरुणाखाली तो पुरून ठेवते. त्यांच्या प्रत्येक घराच्या मागे थोडी मोकळी जागा असते. नवे भात पिकण्यापूर्वी दोन महिने त्यांच्या घरातले धान्य संपून जाते. तेव्हा त्या काळातल्या निर्वाहासाठी या जागेत ते मका पिकवतात आणि त्या धान्यावर गुजराण करतात.

परधानाची घरे एकमेकांपासून दूर असतात. दुसऱ्या घरातील चेटकिणीने आपल्या घरात व गोठ्यात डोकावून पाहू नये आणि शेजाऱ्यांनी आपल्या कोंबड्या पळवू नयेत, अशी त्यांची



भिंतीवरील मातीचे नक्षीकाम

इच्छा असते. त्यांच्या घराच्या भिंतीवर अनेक आकृत्या काढलेल्या असतात.

धार्मिक मनोवृत्तीचा परधान सकाळी उठल्याबरोबर, जमिनीवर पाय ठेवण्यापूर्वी तिला हाताने स्पर्श करतो. वृद्ध परधान मुखमार्जन झाल्यावर आपले बना वाजवून काही स्तोत्रे म्हणतो. बाकीची मंडळी काही न खाताच आपापल्या उद्योगाला बाहेर जातात. पावसाळ्याचे दिवस वगळून कुटुंबातील सर्वजण दुपारी घरी येतात आणि चटणी किंवा भाजीबरोबर पेज जेवतात. ही पेज तांदूळ, कोदो किंवा कुटकी या धान्याची केलेली असते. पावसाळ्यात मात्र घरातील मुलगी पेज घेऊन शेतात जाते, कारण सर्व लोक त्या काळात शेतीच्या कामात गुंतलेले असतात. परधान लोक शेतीसाठी बैल वापरतात, पण त्यांची काळजी मात्र मुळीच घेत नाहीत. पावसाळ्यात तर त्यांना उपाशी पोटी काम करायला लावतात. बैल थकल्यामुळे चालेनासा झाला, तर ते त्याला मिरच्यांची धुरी देतात, त्याची शेपटी पिरगळतात किंवा त्याला पराणीने टोचतात. याचा परिणाम म्हणजे त्यांचे बैल तीन वर्षांपेक्षा जास्त जगत नाहीत.

नांगर धरण्यासाठी परधान लोक काही वेळा मजूर लावतात. अशा वेळी नांगर धरून दमलेल्या मजुरांना प्रोत्साहन देण्यासाठी शेताचा मालक पुष्कळदा आपल्या तरुण मुलींना शेतावर पाठवतो. त्या नवीन कपडे व दागिने घालून, दुपारचे जेवण घेऊन शेतात जातात आणि बराच वेळ तिथे राहून गोड आणि लाघवी भाषेत मजुरांशी बोलत राहून त्यांना काम चांगले करायला उत्तेजन देतात.

सर्वसाधारणपणे परधान लोकांना आपल्याकडे पाहुणा यायला नको असतो. कारण त्याला देण्यासाठी त्यांच्याकडे जादा अन्नच नसते. पण आपला निकटचा आप्तेष्ट घरी आला, तर मात्र परधानाला फार आनंद होतो. त्याने पाय धुतल्यावर त्याला मुख्य घरात नेतात. त्याला रात्री तिथे झोपायला देणे आणि आपण बाजूच्या घरात झोपणे, हा त्यांचा आतिथ्याचा उच्च प्रकार होय. पाहुण्याला काही देताना किंवा त्याला जेवायला बोलावताना यजमान त्याच्याशी अत्यंत आदबीने बोलतो व वागतो. भोजनानंतर तो पाहुण्याला बना वाद्याच्या साथीवर गाणी गाऊन दाखवतो आणि पाहुणा जर चांगला गायक असेल, तर त्यालाही गायला सांगतो.

सणासुदीच्या दिवशी परधान पांढऱ्या मातीने घरे सारवतात आणि सर्वजण आंघोळ करतात. त्या दिवशी वडीलधारी माणसे घरात जमून दारू पितात. त्या वेळी एक कोंबडीचे पिल्लू मारून, अंगणात विस्तवावर भाजतात आणि दारू पिता पिता त्याचे तुकडे तोडून खातात. या दिवशीच्या जेवणात मासे आवश्यक असतात. माशाचे काटे काढताना परधान बडा देवाची प्रार्थना करतो, की आम्ही जसे माशापासून काटे दूर करतो, तशी तू आमच्या आयुष्यातली संकटे दूर कर. त्या दिवशी देवांना आणि पितरांना नैवेद्य दाखवतात.

**भिक्षावृत्ती**– मागतेरी म्हणजे भिक्षा हा परधानाचा प्रमुख व्यवसाय आहे. दर तिसऱ्या वर्षी परधान आपल्या कुळाच्या गोंडाकडे भिक्षा मागण्यासाठी जातो. अशा वेळी त्याला दासोंदी

आणि गोंडाला ठाकूर असे म्हणतात परधानाने आपल्या कुला तील गोत्राशिवाय इतर कुणाकडे भिक्षा मागितली, तर त्याला जातिबहिष्कृत करतात

माघ महिन्यात शेतातील कामे संपलेली असतात, तेव्हा दासोदी आपल्या बायकामुलांसह मागतरीच्या दौऱ्यावर निघ तात आणि वैशाखाच्या अखेर घरी परत येतात निघण्यापूर्वी घर पाव यांनी सारवून स्वच्छ करतात आणि सर्वजण आंघोळ करून शुचिर्भूत होतात मग आपल्या बना वाद्यापुढे उदबत्ती लावतात शक्य असल्यास लाल कोंबडा किंवा कोंबडी सरस्वती देवीला बळी देतात सरस्वती गायकाच्या गळ्यात आणि वाद्यात निवास करते आणि त्याचा आवाज मधुर बनवते, अशी त्याची समजूत आहे नंतर ते बनाला नमस्कार करतात आणि ते वाद्य पिशवीत ठेवून देतात ठाकुराच्या घरी पोचल्यावर त्याच्या घरातील स्त्री पाण्याचा तांब्या भरून आणते आणि तो दोन्ही हातांनी धरून दासोदीला देते एका हाताने पाणी देणे, हे अपमानकारक समजले जाते दासोदी त्यातले पाच थेंब बडा पेन आणि पितर यांच्यासाठी जमिनीवर व काही थेंब बनावर शिंपडतो मग एकमेकांना कुशल प्रश्न विचारून झाल्यावर दासोदीला खायला प्यायला मिळते आणि बसायला एक गोणपाट मिळते यानंतर दासोदीचे मुख्य काम म्हणजे आपल्या विनोदी बोलण्याने ठाकुराला प्रसन्न राखणे, हे होय कारण तो प्रसन्न झाला, तरच त्याला द्रव्यलाभ व्हायचा असतो रात्री दासोदी नवे कपडे घालून आणि काही वेळा हातात व पायात घुंगरू बांधून बसतो आणि बनाची तार छेडतो मग एखाद्या प्राचीन गोंड वीराची किंवा पांडवांची कथा तो गाऊ



केसांत व कानात घालण्याचा अलंकार

लागतो रात्रभर हा कार्यक्रम चालतो त्यासाठी आजूबाजूचे श्रोतेही जमतात दुसऱ्या दिवशी सकाळी ठाकुराची बायको शुचिर्भूत होऊन त्याला एक सुपभर तांदूळ किंवा कोदो व एक रुपया एवढी बिदागी देते तो तिला आशीर्वाद देतो आणि तिच्या पदरात बडा पेनच्या नावाने त्यातलेच काही मुठी धान्य घालतो ते मग ती राखीव म्हणून ठेवते

याशिवाय ठाकुराच्या मोठ्या मुलीच्या लग्नाच्या वेळी दासोदीला एक रुपया आणि तिची अष्टपुत्री मिळते त्या मुलीला मुलगा झाला म्हणजे आणि तिच्या म्हातारपणी, दासो दाला काही पैसे मिळतात गोंड ठाकुराच्या अत्यसंस्काराच्या वेळीही त्याला एक रुपया मिळतो



परधानाचे वाद्य बना

एका मागतरीच्या फेरीत तो निरनिराळ्या खेड्यातील वीस ते तीस घरी जातो सर्वसाधारणपणे प्रत्येक घरी त्याला दोन रुपये मिळतात या वेळी मिळणारे धान्य ही त्याच्या बायकोची मिळकत धरली जाते घरी परत आल्यावर तो आपले बना वाद्य ठेवून देतो आणि नवे धान्य खाण्याचा सण झाल्यावरच ते पुनश्च हाती घेतो

बना हे लाकडी वाद्य असते परधानाच्या जीवनात त्याला फार मोठे स्थान असते ते बडा पेनचे प्रतीक आहे, असे ते समजतात ते बनवताना त्यांना काही पथ्ये पाळावी लागतात बनासाठी लाकूड कापायला जाताना एक विधी करतात, तो असा– वैशाख महिन्यात एखाद्या रविवारी वाद्य बनवणारा आंघोळ करून उपवास करतो आणि रानात जाऊन एकटेच असलेले एक विशिष्ट झाड निवडतो मग त्याच्यावर तांदूळ टाकतो आणि त्याच्या मुळात कोंबडीची पिल्ले बळी देतो दुसऱ्या दिवशी ते झाड कापून त्याचे लाकूड घरी आणतो आणि श्रियाल जागो, रात माई, राइ लिंगो इ वीरांचे व देवांचे नाव घेऊन त्याचे वाद्य बनवतो बना वाजवल्यामुळे बडा पेन पृथ्वीवर उतरला, अशी त्यांची एक कथा आहे मोरपिसे, घुंगूर, लोकरीचे गोंड वगैरे लावून बनाला सजवतात

दरवर्षी बडा पेन आणि बना यांच्या प्रीत्यर्थ परधान लोक एक लहानसा समारंभ करून एक लाल कोंबडी बळी देतात आणि तीन वर्षांनी एकदा बकरा बळी देतात त्या वेळी बना हे वाद्य अंगणात एका बाबूला अडकवून ठेवतात

**देवधर्म** — भगवान आणि बडा पेन हे त्यांचे प्रमुख देव आहेत. बडा पेनलाच बडा देव, बुढा पेन किंवा धु हा देव अशी नावे आहेत. रानातल्या सजा नामक वृक्षावर तो राहतो, अशी त्यांची समजूत आहे. ब सबोरन मर्री देव हा त्यांचा दुष्ट देव आहे.

परधानात आजारी माणसांना बरे करणाऱ्या भगताला गुणिया किंवा पडा असे म्हणतात. आजार किंवा रोगराई देवाच्या कोपामुळे होते, अशी त्यांची समजूत आहे. अशा वेळी ते भगताला बोलावतात. भगत निरनिराळे उपाय करून कोणत्या देवाचा कोप झाला आहे, ते शोधून काढतो आणि बलिदान करून त्याला संतुष्ट करतो.

**सण उत्सव** — परधानांच्या सण-उत्सवांचे दिवस ठरलेले असले, तरी ते लोक आपल्या सोयीने सण साजरे करतात. याचे कारण सणाच्या वेळी घरातील सर्व माणसे घरात हजर असली पाहिजेत आणि घरातील स्त्रिया ऋतुमती असता कामा नयेत, असा त्यांचा नियम आहे.

एकती उत्सव — वैशाख शुद्ध तृतीया हा या सणाचा दिवस आहे. त्या दिवशी खेड्यातील मुली बापडी बाहुल्या बनवून त्या हळदीने रंगवतात आणि बाहुलाबाहुलीचे लग्न लावतात. पण या सणाचा खरा हेतू पाऊस चांगला पडेल की नाही किंवा पिके चांगली येतील की नाही, हे अजमावण्याचा असतो. या दिवशी गुणिया पहाटे उठून जवळच्या झऱ्यावर जाऊन एका नव्या मडक्यात पाणी भरतो. नंतर एका विशिष्ट झाडाच्या दोन फांद्या कापून घेऊन तो शेतात जातो. तिथे इतरही गावकरी जमतात. ते मातीची पाच मोठी ढेकळे घेऊन चार ढेकळांचा एक चौकोन बनवतात आणि एक ढेकूळ चौकोनाच्या मध्यभागी ठेवतात. ती चार ढेकळे म्हणजे पावसाचे चार महिने आणि मधले ढेकूळ म्हणजे कार्तिक महिना होय. मग पाण्याच्या मडक्याला एक छिद्र पाडतात आणि त्याच्यावर दिवा असलेले दुसरे मडके ठेवतात. त्याच्यापुढे धूप जाळतात आणि हळदीने रंगवलेला एक दोरा त्याला बांधतात. गावाचा मुख्य कुळव घेऊन त्या मडक्यांभोवती पाच प्रदक्षिणा घालतो आणि बाकीचे लोक बैलांना त्याच्याभोवती तीनदा फिरवतात. मग रात्रभर पाण्याचे सच्छिद्र मडके त्या ढेकळांवर ठेवतात आणि सकाळी जी ढेकळे फार भिजलेली आढळतील, त्या महिन्यात अतिवृष्टी होणार आणि ती जर भिजली नाहीत, तर अवर्षण पडणार असे समजतात.

हरेली उत्सव — आषाढ महिन्याच्या दुसऱ्या पंधरवड्यात ते हरेली नावाचा एक उत्सव करतात. या दिवशी सकाळी प्रत्येक जण गुरांना मीठ चारतो आणि त्यांना चरायला बाहेर सोडतो. नंतर पाच झाडांच्या फांद्या आणि नागू तोडून आणतात. त्या गोठ्याच्या व घराच्या दारात आणि शेतात उभ्या करतात. शेतातल्या फांद्यांभोवती त्या प्रदक्षिणा घालताना ते ‘ कोदो माता, तू चांगली वाढ ’ असा घोष करतात. संध्याकाळी लोक गुरे परत यायच्या मार्गावर उभे राहतात. कळपाच्या अग्रभागी जर गाय असेल, तर कोदोचे पीक भरपूर येणार आणि बैल असला, तर भात महामूर पिकणार असे समजतात. नंतर ते आपल्या गुरांना पुन्हा एकदा मीठ चारतात आणि शेजाऱ्यांच्या गोठ्यात जाऊन तिथल्या गुरांना चारा घालतात. हा दिवस ते खानपानात घालवतात.

नवा उत्सव — नवान्नभक्षणाचा त्यांचा हा सण श्रावणअखेर येतो. सणाच्या आदल्या दिवशी नवान्नभक्षण करायला या, असे देवांना व पितरांना निमंत्रण देतात. सणाच्या दिवशी सकाळी शेतातून भाताच्या लोंब्या आणि रानातून सजा वृक्षाची पाने व फांदी घेऊन येतात. बहरवासी देवाच्या नावाने ती फांदी उभारतात. अंगणात, गोठ्यात आणि घराच्या देवस्थानी वेगवेगळ्या देवतांना नैवेद्य दाखवितात. नंतर देवाचा प्रसाद म्हणून थोडा भात सर्वांना वाटतात. मग लोक गावात हिंडून प्रत्येकाच्या घरात जाऊन नवीन भाताचे काही घास खातात. या दिवशी ते खूप दारू पितात. लग्न झालेल्या व ठरलेल्या प्रत्येक मुलीने या दिवशी सासरी असले पाहिजे, असा नियम आहे.

मरहाई जत्रा — ही जत्रा बाजारात भरते. अहीर व्यापारी त्या वेळी आपली दुकाने सजवतात. परधानाची बायको या जत्रेच्या निमित्ताने नवऱ्याकडून नवे कपडे व मण्यांच्या माळा मिळवते. जत्रेच्या दिवशी बाजारात परधान स्त्रिया व पुरुष नटून थटून फिरत असतात. या वेळी पुरुषाची जुनी प्रेयसी त्याच्याकडे येऊन काही बक्षीस उपटते आणि त्याने ते दिले नाही, तर त्याचे धोतर ओढते किंवा त्याला अपशब्द बोलते.

**विवाहप्रथा** — विवाहापूर्वी परधान मुले आणि मुली स्वैरा-चाराचे जीवन जगत असतात. बहुतेकांनी वयात येण्यापूर्वीच कामजीवनाचा अनुभव घेतलेला असतो.

परधान मुलामुलींचे विवाह त्यांचे आईबाप ठरवतात. पुष्कळदा आते मामे भावंडांत विवाह होतात, पण त्यासाठी मुलामुलींची संमती विचारात घेतात. मुलीचे देज देण्याची पद्धत आहे. त्यात भात, डाळ, मीठ, दारू, दोन ढोलकी साड्या, कापड व रोख रकम यांचा समावेश असतो. लग्नापूर्वी नियोजित वर आपल्या वधूला काळ्या पोतीची माळ देतो आणि ती माळ गळ्यात घातल्या दिवसापासून वधू पतीच्या घरातली झाली, असे समजतात.

लग्नसमारंभात मुलीकडचे लोक अतिशय तऱ्हेवाईकपणे वागतात आपल्याला पुरेसा दारू मिळाली नाही, अशी त्यांची सदैव कुरकुर चाललेली असते मुलीचे आई-वडील आणि मोठा भाऊ यांना वाटत असते, की वराकडील मंडळींनी आपल्याकडेच लक्ष द्यावे आपल्यासाठी पुरेशी दारू तयार केली आहे का नाही हे पाहण्याची त्यांची एक विचित्र पद्धत आहे एकजण दारूच्या मडक्यात आपला पाय बुडवतो त्याच्या मांड्यापर्यंत जर दारू पोचली नाही तर ते लग्न मोडून घरी जाण्याची धमकी देतात

रात्री वरात वराच्या गावी पोचली, की गावातील वृद्ध एका हाताने रिकाम्या बाटल्या हलवतात व दुसऱ्या हातात जळणाऱ्या गोवऱ्या धरतात याचा अर्थ त्यांना दारू व तबाकू हवी, असा होतो

ज्या मुलाला मुलीचे देज देण्याची ऐपत नसेल, तो मुलीच्या घरी लग्नाआधी काही वर्षे नोकरी करतो आणि मग तिच्याशी लग्न करतो

काही वेळा लग्न झालेली स्त्री दुसऱ्या माणसाबरोबर पळून जाते आणि मग तो तिच्या पूर्वीच्या नवऱ्याला नुकसानभरपाई देऊन तिच्याशी घरोबा करतो

**प्रसूतिप्रथा–** प्रसूतीचा क्षण येईपर्यंत स्त्रिया काम करीत असतात त्यामुळे पुष्कळदा रानातच त्यांची प्रसूती होते स्त्री घरी असली, तर त्या वेळी सुइणीला बोलावतात मुलाची नाळ जाड बोरूने कापतात नंतर नाळ व वार घरातच पुरतात आणि त्या जागी अग्नी प्रज्वलित करून तो सहा दिवस तसाच ठेवतात

मुलगा झाला, तर अंगणात एक भाला ठेवतात त्याचा अर्थ एक क्षत्रिय जन्माला आला, असा होतो, आणि मुलगी झाली, तर तिच्या आईच्या माहेरी अंगणात भाला ठेवतात घरातल्या वीरासाठी आम्हाला एक बायको मिळाली, असे त्यावरून सूचित होते

मूल जन्मल्यावर लगेच त्याला शिंक आली, तर तो अशुभ शकुन समजतात सहाव्या दिवशी सटीची पूजा करतात त्या वेळी शेजारच्या स्त्रियांना बोलावून त्यांना जेवण व दारू देतात या दिवशी मुलाचा मामा त्याच्या डोक्याच्या मागचे व पुढचे दोन दोन केस कापतो मुलाचा जन्म झालेल्या जागेजवळ दिवा पेटवून ठेवतात पण तो मुलाला पाहू देत नाहीत कारण तसे केल्यास मुलगा तिरळा होतो, अशी समजूत आहे बाराव्या दिवशी मुलाचे नाव ठेवतात

**मृतिकप्रथा–** भगवान ही त्यांची मृत्युदेवता आहे मृत्यूनंतर माणसाचा आत्मा भगवानाकडे जातो, त्याच घरात मुलाच्या रूपाने जन्म घेण्यासाठी येतो किंवा असमाधानी भूत म्हणून गावाभोवती फिरत राहतो अशी त्यांची समजूत आहे

जेव्हा माणूस आसन्नमरण होतो, तेव्हा सर्व नातेवाईक त्याच्याभोवती जमतात मग घरातले लोक एक रुपया व थोडे दही त्याच्या तोंडात घालतात आणि त्याला तो रुपया व दही गिळायला लावतात मृत्यूनंतर तिथे जमलेले सर्व लोक शोकगीत गातात घरची माणसे गरीब असली, तर प्रेत पुरतात त्यासाठी एक पैसा देऊन थडग्यासाठी जागा विकत घेतात प्रेत खड्ड्याभोवती तीनदा फिरवतात आणि मग पुरतात प्रत्येक गावकरी मृतिकाला येताना सिरना झाडाच्या डहाळ्या आणतो आणि थडग्यात टाकतो

प्रेत जाळावयाचे असेल तर त्या कामी मृताच्या मोठ्या मुलाकडे देतात आणि तो त्या चितेवर टाकतो प्रेत जळत असताना एक जण त्याच्या डोक्याकडे व एकजण त्याच्या पायाकडे बसतो मग ते दोघे एकमेकाकडे तीनदा कुऱ्हाड टाकतात प्रेत जळल्यावर सर्वजण जवळच्या झऱ्यावर जाऊन स्नान करतात नंतर ते मृताच्या घरी जातात तिथे त्यांना हात, पाय व डोके यांना लावायला थोडे तेल देतात आणि प्यायला दारू देतात दहाव्या दिवशी घरातील स्त्रिया रक्षा गोळा करतात आणि नदीत टाकतात त्याचप्रमाणे त्या नदीतला एक मासा पकडतात आणि तो मृताचा आत्मा समजून मृताच्या सुनेकडून नवीन मडक्यात ठेवतात घरी आल्यावर घराजवळच एका तात्पुरत्या बांधलेल्या झोपडीत ती सून जाऊन बसते मृताचे नातेवाईक तिला एक रुपया किंवा कालवड द्यायचे कबूल करतात तेव्हाच ती बाहेर येते त्यानंतर त्या दिवशी संध्याकाळी जेवणावळ होते आणि मृतात्मा परत आला आहे, असे काही खुणांवरून ठरवून तो मासा फेकून देतात रात्री नृत्याचा कार्यक्रम होतो सहा महिन्यानंतर आणि वर्षानंतर मृताचे श्राद्ध करतात याशिवाय वर्षानंतर मृताच्या नावाने कुंडा नामक एक विधी करतात तो जर वेळेवर केला नाही तर मृताचे भूत त्या कुटुंबाला त्रास देते, अशी समजूत आहे एकाच गोत्रातील अनेक कुटुंबे मिळून हा विधी करतात त्यासाठी प्रत्येक कुटुंब एक तांब्याचे नाणे, पाच हळकुंडे आणि तीन इंच लांब बोरू यांची एका फडक्यात पुरचुंडी बांधून आणते तसेच घरटी एक बकरा किंवा कोंबडीचे पिल्लू आणतात गावाबाहेर साजा वृक्षाखालची जागा या विधीसाठी पसंत करतात बकऱ्यांना त्या झाडाला बांधून ठेवतात आणि गवत, झुडपे, झाडे यांच्यामध्ये पुरचुंड्या लपवून ठेवतात मग जमलेले लोक ढोल आणि ढोलकी वाजवू लागतात त्यातला एखादा बडा पाची स्तुतिस्तोत्रे गातो त्यानंतर एखाद्या माणसाच्या अंगात येते आणि तो या विधीचा

पुजारी कोण ते दाखवतो. या अंगात आलेल्या माणसाला बरुआ असे नाव आहे. बरुआ मग लपवलेल्या पुरचुंड्या शोधून काढतो आणि आग, पाणी, देवी, पटकी, इत्यादींनी ज्याला मृत्यू आला असेल त्याची पुरचुंडी फेकून देतो. उरलेल्या पुरचुंड्या पूजा जवळ ठेवतात. प्रत्येक पुरचुंडीबद्दल एक रुपया घेऊन त्या सजा वृक्षाखाली ठेवतो. नंतर तो बकरी आणि कोंबडी बळी देतो. त्याच्या यकृताचा एक तुकडा पुजारी शिजवतो आणि बरुआ व तो असे दोघे मिळून तो खातात. मग जमलेल्या लोकांना दारू वाटतात. पुजारी मग सगळ्या पुरचुंड्या सजा झाडाला टांगून ठेवतो. या दिवसापासून मृतात्म्यांना अन्नपाणी देण्याची जबाबदारी पुजाऱ्याकडे येते आणि त्याबद्दल प्रत्येक घरातून त्याला एक रुपया मिळतो. [दि परधान्स ऑफ दि अपर नर्बदा व्हॅली –श्री. शामराव हिवाळे, १९४६]

**परब्रह्मोपनिषद** एक नव्य उपनिषद. हे अथर्ववेदाशी संबद्ध असून गद्य पद्यमिश्रित आहे. यात पिप्पलाद आंगिरसाने शौनकाला ब्रह्मज्ञान उपदेशिले आहे. पिप्पलाद म्हणतो – ब्रह्मविद्या ही देवाहून व प्राणाहूनही श्रेष्ठ आहे. प्रणवहंस म्हणजे ब्रह्म होय. जीव हाही प्रणवरूपच आहे. ब्रह्मज्ञान झालेल्या संन्याशाचे जीवब्रह्मैक्य होते. अशा संन्याशाचे शिखासूत्र ज्ञानमय असते. तो बहिःसूत्राचा त्याग करून स्वान्तःसूत्र धारण करतो. [श्री. सी. ग. देसाई]

**परभी** प्रभू लोकांच्या बोली भाषेचे नाव. या बोलीला कायस्थी, मुंबईकरांची कायस्थी, दामणी अशीही नावे होती. ही बोली मुंबई, ठाणे व दमण या भागातील लोक बहुसंख्येने बोलत. एका काळी मुंबईच्या पाठारे प्रभूंची ही बोली भाषा होती. या बोलीत साहित्य जवळजवळ नाहीच. एखादे नाटक किंवा काही स्फुट लेख तेवढे उपलब्ध आहेत. ही बोली आजमितीस व्यवहारातून अजिबात गेली आहे. प्राथमिक मराठी भाषेला ही बोली फार जवळची आहे. तिच्यावर गुजराती भाषेचाही बराच प्रभाव आढळतो. परभी बोलीचा एक नमुना असा–

कोणा एक माणसाला दोन पोरं होती. त्याच्या लाना बापाला बोलला, बाबा जो दौलतीचा भाग माला येयाचा तो दे. मग त्याजून त्याला दौलत वाटून दिल्ही. मग थोडे दिसांन धाकटा पोर अस्वा गोळा करून दूर देशाला गेला, न तिकडे उधळपट्टी अस्की दौलत घालविली. मग त्याजून अस्क खरचल्यावर ते देशान फार दुष्काळ पडला. त्यासाठी त्याला अडचण पडाया लागली. तव ता ते देशानचे एके माणसाजवळ जावून रायला. त्याजून ते त्याला डुकर चारयाला त्याचे शेतात धाडला. तव डुकर जी टरफलं खात असत त्याचे वर त्याजून आपलं पोट भरव असं त्याला वाटल न कोणा त्याला काय दिल्लनय।

बोलीच्या अभ्यासामध्ये इतिहास आणि संस्कृती या विषयीचे पुरावे अधिक निखळ स्वरूपात मिळतात. परभी भाषेचे महत्त्व त्या दृष्टीने फार आहे. [प्रा. ग. ना. श्री. व. दी. राव– मराठी संशोधन पत्रिका, जानेवारी, १९६७]

**परमस्वामी (नृसिंह)** (मृत्यू इ. स. १११८) तिबेटी परंपरेनुसार चौऱ्यायशी सिद्धांपैकी एक. हा इ. स. १०९१ मध्ये भारतातून तिबेटमध्ये गेला. तिथून तो पुढे इ. स. ११०० मध्ये चीनलाही गेला. चीनमध्ये काही वर्षे वास्तव्य केल्यानंतर इ. स. १११२ मध्ये पुन्हा तो तिबेटमध्ये आला. तिबेटमध्ये त्याला फा-दम्-पा (सत्पिता) असे म्हणत. याने दोहाचिन्त गुह्य, महामुद्रारत्नागिगीत्युपदेश, वज्रडाकिनीगीती, सकलसिद्धवज्रगीती असे ग्रंथ लिहिले आहेत. [म. च. को., पु. त. नि.]

**परमहंस** यतींचा एक प्रकार. कुटीचक, बहूदक, हंस व परमहंस असे चार प्रकारचे संन्यासी असतात. त्यांतील परमहंस हा सर्वांत श्रेष्ठ होय. परमहंसांना घरदार नसते. ते सदैव फिरत राहतात. एखादे मंदिर, गुहा, वृक्षाचा तळ, नदीतीर, स्मशान, तणकूट, इ. स्थानांचा ते थोडा वेळ आसरा घेतात. ते प्राणधारणेसाठी भिक्षा मागतात. पण ती मिळाली किंवा न मिळाली तरी सुखदुःख मानीत नाहीत. त्यांच्यातले काही वस्त्रे वापरतात, तर काही दिगंबर असतात. त्यांना शिखा व सूत्र (जानवे) नसते. परमहंसाजवळ एकच दंड असावा, असे पराशरमाधवीयात सांगितले आहे. त्यांनी ममतेचा त्याग केलेला असतो. धर्मअधर्म, सत्य असत्य, शुद्ध अशुद्ध इ. द्वंद्वांपासून ते मुक्त असतात. ते निःस्पृह असतात. कोणत्याही वस्तूच्या बाह्य रूपाला ते महत्त्व देत नाहीत. ते सदैव परमतत्त्वाच्या चिंतनात मग्न असतात. त्यांचे आचरण पाहून ते वेडे आहेत असे लोकांना वाटते, पण वस्तुतः ते तसे नसतात.

विद्वत आणि विविदिषु असे याचे दोन भेद आहेत. विद्वत म्हणजे ब्रह्मज्ञान प्राप्त झालेला आणि विविदिषु म्हणजे ते प्राप्त करून घेण्याची इच्छा असलेला होय. याज्ञवल्क्य हा विद्वत् संन्यासी होता. विद्वत्संन्यास जीवन्मुक्तीचा साधक असतो, तर विविदिषुसंन्यास विदेहमुक्ती म्हणजे मरणोत्तर मुक्ती देणारा असतो. संवर्तक, आरुणी, श्वेतकेतू, दुर्वास, ऋभु, दत्तात्रेय, रैवतक, इ. पुरुष परमहंस संन्यासी होते.

मृत्यूनंतर परमहंसाचे दहन करीत नाहीत, तर त्याचा देह

पुरतात त्याच्यासाठी पिंडदान करीत नाहीत व आशौचही पाळीत नाहीत [ हिं थ , भ क , भा सा इ ]

## परमहंसपरिव्राजकोपनिषद

एक नव्य उपनिषद हे अथर्व वेदाशी संबद्ध असून संपूर्ण गद्यात्मक आहे हे आदिनारायणाने ब्रह्मदेवाला सांगितले यात संन्यास घेण्याची पात्रता कशी मिळवावी, याचे विवरण आहे तीही आश्रम व्यवस्थित पार पाडून मग संन्यासाश्रम स्वीकारावा किंवा वैराग्य उत्पन्न झाल्यास ' यदहरेव विरजेत् तदहरेव प्रव्रजेत् । ' = ज्या दिवशी वैराग्य उत्पन्न होईल त्याच दिवशी संन्यास घ्यावा, असे सांगितले आहे पुढे ब्रह्म व ओंकार याचे अभेदाने वर्णन केलेले आहे [श्री सी ग देसाई]

## परमहंस सभा

एकोणिसाव्या शतकातला महाराष्ट्रातील एक सुधारक पंथ श्री दादोबा पांडुरंग तर्खडकर यानी ३१ जुलै १८४९ या दिवशी श्री राम बाळकृष्ण जयकर यांच्या सहकार्याने मुंबईत या सभेची स्थापना केली तत्कालीन ख्रिस्ती धर्मप्रचाराला तोंड देण्याच्या इच्छेने ज्या काही



दादोबा पांडुरंग

संस्था त्या काळात निर्माण झाल्या, त्यांतली ही एक संस्था होती ख्रिस्ती मिशनरी हिंदु धर्मातील ज्या काही दुर्गुणांवर धर्मप्रसार करीत आणि त्या दृष्टीने आपला धर्म श्रेष्ठ असल्याचे प्रतिपादीत, त्यांचा विचार करून ती दुर्गुण आपल्या धर्मातून दूर करावी, हा या संस्थेचा मुख्य उद्देश होता तदनुसार मूर्तिपूजानिषेध, एकेश्वरी मताचा अवलंब व जातिभेदनिर्मूलन या तीन गोष्टींवर सभेचा मुख्य भर होता समता व बंधुभाव या दोन तत्त्वांच्या पायावर या संस्थेची उभारणी झालेली होती त्यामुळे इंग्रजी शिक्षण घेऊन पाश्चात्त्य संस्कृतीशी परिचय झालेले काही धर्मसुधारक लोक या संस्थेकडे आकृष्ट झाले हळूहळू सभेच्या सभासदांची संख्या सुमारे एक हजारापर्यंत गेली महाराष्ट्रातले डॉ आत्माराम पांडुरंग, बाळशास्त्री घिसे, मोरोबा विनोबा, बाबा पदमनजी, सखारामशास्त्री, डा रा गो भांडारकर, इ तत्कालीन अनेक विद्वान या संस्थेचे सभासद झाले होते वर्षातून अनेकदा निरनिराळ्या जातींच्या लोकांचे सहभोजन या सभेच्या द्वारे होत असे आपण जातिभेद मानीत नाही, हे पटवून देण्यासाठी सभासदाला ख्रिस्त्यानाने तयार केलेल्या पावाचा एक तुकडा खावा लागे प्रत्येक बैठकीच्या वेळी सभासद हलक्या जातीतल्या व्यक्तीने शिजविलेले अन्न ग्रहण करीत सभासदत्वाच्या दीक्षाविधी पुढीलप्रमाणे असे –

सभासद होऊ इच्छिणाऱ्याला प्रथम एक प्रार्थना वाचायला देत मग संस्थेचे नियम त्याच्याकडून वाचून घेत ते नियम मान्य असल्याचे त्याने सांगितले, की त्याला ओंजळीत पाणी घेऊन ते जमिनीवर सोडायला सांगत याला जलसंस्कार म्हणत एवढा विधी झाला, की तो सभेचा अधिकृत सभासद समजला जाई

सभेची बैठक भरे, त्या वेळी प्रारंभी व शेवटी मराठीत प्रार्थना म्हणत या प्रार्थना श्री दादोबा पांडुरंग यानीच रचलेल्या होत्या सभेचे सर्व काम गुप्तपणे चाले हळूहळू सभेच्या शाखा पुणे, नगर काशी, कलकत्ता, मद्रास, इ ठिकाणीही स्थापन झाल्या प्रस्तुत सभेच्या धर्ममतावर आधारलेले पारमहंसिक ब्राह्मधर्म नावाचे एक आवीबद्ध प्रकरणही श्री दादोबा पांडुरंग यानी तयार केले होते त्यात ते म्हणतात– नीतीविना ज्ञान केवळ शुष्क नीती हे ज्ञानाचे मुख्य होय तदव्यतिरिक्त जे ज्ञान, तो केवळ वरील झळझळाट व आडंबरमात्र अनृत, लोभ, मत्सर, वैर, आलस्य, गर्व, क्रूरता, इ दुर्गुणांपासून अलिप्त असावे

पण या संस्थेला अल्पकालिकच आयुष्य लाभले इ स १८६० च्या सुमाराला सभासदांत झालेल्या मतभेदामुळे ही संस्था बंद पडली या संस्थेचा कारभार गुप्तपणे चालत होता, असे म्हणतात एकदा एका सभासदाने सभासदांच्या नावाची

वही पडकून गेली. आपली नावे जाहीर होतील या भयाने बरेच सभासद घाबरले व सभेपासून दूर राहू लागले. त्यामुळे संस्था हळूहळू बंद पडली, असाही प्रवाद आहे. [श्री ग ल चंदावरकर– नवभारत, मार्च १९५०; रा गो भा ले व्या.; हिं क ड पी.; दादोबा पांडुरंग, दिनविशेष.]

## परमहंसोपनिषद

एक गौण उपनिषद. हे उपनिषद शुक्ल यजुर्वेदाशी संबद्ध असून, पूर्णपणे गद्यात्मक आहे. हे गद्य संवादपर आहे. श्रीकृष्णाने नारदाला ते सांगितले. यात परमहंसाचा जीवनक्रम सांगितलेला आहे. परमहंसस्थितीला पोचलेला संन्यासी सर्व व्यावहारिक गोष्टींच्या अतीत असतो. त्याच्या सर्व इंद्रियांची गती थांबते व ती इंद्रिये आत्म्यातच स्थिरावतात. 'ब्रह्मैवाहमस्मि' = मीच ब्रह्म आहे, असा त्याला अनुभव येत असतो. त्याला दंडधारणेचीही गरज राहत नाही. [श्री सी ग दसाई]

## परमाणम

द. भारतातील एक लोकधर्म. संन्यासी ब्राह्मणाला ज्या ठिकाणी पुरतात, तिथे एक लिंग स्थापतात आणि त्याला भात, नारळ व साखर यांचा नैवेद्य दाखवितात. या नैवेद्याला परमाणम असे नाव आहे. याच्या सेवनाने वंध्या स्त्रीला संतती होते, अशी समजूत आहे. [हिं म क.]

## परमात्मा

तत्त्वज्ञानात आत्म्याचे दोन भेद मानलेले आहेत. एक जीवात्मा व दुसरा परमात्मा. या दोघांत नित्यत्व, ज्ञातृत्व, विभुत्व, इ. गुण समान आहेत. जीवात्म्याचे ज्ञान सीमित आहे, तर परमात्मा सर्वज्ञ आहे, असे न्यायशास्त्राने मानले आहे.

भागवत पुराणात परमात्म्याविषयी पुढील श्लोक आहे–

**वदन्ति तत् तत्त्वविदस्तत्त्वं यज्ज्ञानमद्वयम् ।**
**ब्रह्मेति परमात्मेति भगवानिति शब्द्यते ॥**

(भाग पु. १. २. ११)

अर्थ – त्या एक आणि अद्वितीय अशा परम तत्त्वाला ज्ञानी लोक ब्रह्म, योगी लोक परमात्मा आणि भक्तजन भगवान असे म्हणतात.

परमात्म्याला परब्रह्म, विश्वात्मा, पुरुषोत्तम अशी अन्य नावेही आहेत. पाहा – आत्मा, ब्रह्म. [ज्ञा भा रा सा भू.]

## परमानंद

(इ. १८३८–१८९३) महाराष्ट्रातील एक सुधारक व पत्रकार. यांचा जन्म सावंतवाडी संस्थानातील माणगाव येथे झाला. त्यांचे संपूर्ण नाव नारायण महादेव परमानंद असे होते. पण त्यांना मामा परमानंद असे म्हणत. ते न्या. रानडे व डॉ. भांडारकर यांचे सहाध्यायी होते. इंदुप्रकाशच्या इंग्रजी विभागाचे संपादक असताना त्यांनी उत्कृष्ट इंग्रजी भाषेत सामाजिक सुधारणांचा प्रचार केला. नेटिव्ह ओपिनियन या पत्राचेही ते तीन वर्षे संपादक होते. त्या वेळी त्यांना महाराष्ट्राच्या सामाजिक व आर्थिक समस्यांना तोंड फोडण्याचे कार्य केले.

परमानंदाच्या निस्पृहतेमुळे न्या. रानडे, डॉ. भांडारकर, न्या. तेलंग यांच्यासारखे विचारवंत पुरुष त्यांना फार मानीत. सत्यप्रियता, न्यायनिष्ठुरता व निर्भयता या गुणांमुळे इंग्रज अधिकाऱ्यांनाही परमानंदाविषयी आदर वाटत असे.

बालविवाहाला विरोध, पुनर्विवाह, स्त्रीशिक्षण, इ. सुधारणांचा परमानंदांनी पुरस्कार केला. पुनर्विवाहित स्त्रियांना सामाजिक बहिष्कारामुळे मानाने जीवन जगणे कठीण होत असे, म्हणून त्यांच्यासाठी परमानंदांनी स्वतंत्र वसाहत काढली व त्यांच्या घरातील उत्सवात सक्रिय भाग घेऊन समाजाला कर्तव्यनिष्ठेची जाणीव दिली.

परमानंद हे प्रार्थनासमाजाचे अध्वर्यु होते व त्यांनी त्या समाजाच्या सुबोध पत्रिकेचे १५ वर्षे संपादन केले. [मामा परमानंद आणि त्यांचा कालखंड– श्री पु. बा. कुलकर्णी, १९६३.]

## परमानंद कवींद्र

(इ. स. चे १७ वे शतक) एक संस्कृत पंडित व कवी. याचे मूळ नाव गोविंद निधिवासकर अर्थात नेवासकर असे होते. हा नेवाशाचा राहणारा होता. एकवीरा ही या घराण्याची कुलदेवता होती. या देवीपासून आपल्याला वाक्सिद्धी किंवा प्रतिभा प्राप्त झाली, असे तो लिहितो.

हा बरीच वर्षे काशीत राहिला. तिथे त्याने संस्कृत भाषेचे अध्ययन व राज्यशास्त्राचे ज्ञान संपादिले. तिथून तो इ. स. १६७३ मध्ये महाराष्ट्रात आला व पोलादपूर येथे राहून विद्यार्थ्यांना अध्यापन करू लागला. शिवाजी महाराजांनी त्याची कीर्ती ऐकून पोलादपुरात त्याची भेट घेतली. इ. स. १६७४ साली शिवाजी महाराजांना राज्याभिषेक झाला, त्या प्रसंगी परमानंद उपस्थित होता. त्या वेळी महाराजांनी आपल्या जीवनावर एक मोठे काव्य रचण्यास त्याला सांगितले, असे तो पुढील श्लोकाच्या द्वारे सांगतो –

**योऽयं विजयते वीरः पर्वतानामधीश्वरः ।**
**दाक्षिणात्यो महाराजः शाहराजात्मजः शिवः ॥**
**साक्षान्नारायणस्यांशस्त्रिदशद्विषिदारणः ।**
**स एकदात्मनिष्ठं मां प्रसाद्येवमभाषत ॥**

**यानि यानि चरित्राणि विहितानि मया भुवि ।**
**विधीयन्ते च सुमते तानि सर्वाणि वर्णय ।।**
**मालभूपमुपक्रम्य प्रथितं मत्पितामहम् ।**
**कथामेतां महाभाग महनीयां निरूपय ।।**

अर्थ – गडांचा अधिपती, दक्षिणेतील महाराजा, प्रत्यक्ष विष्णूचा अवतार यवनांचा संहारकर्ता, शहाजीचा पुत्र, असा हा जो वीर शिवाजी विजयाने शोभून दिसत आहे, तो एकदा मज ब्रह्मनिष्ठाला प्रसन्न होऊन म्हणाला ' हे सुबुद्धे मी या पृथ्वीवर जी जी कृत्ये केली व सांप्रत जी करीत आहे, त्या सर्वांचे तू वर्णन कर माझा आजा प्रसिद्ध मालोजी राजा याच्यापासून प्रारंभ करून हे महाभागा तू ही महनीय कथा सांग '

मग कवीने १०० अध्यायांची आखणी करून शिवचरित्राचे महाकाव्य लिहायचे ठरवले त्याचे ३१ अध्याय व ३२ व्या अध्यायाचे ९ श्लोक तेवढे पुरे झाले इ स १६६१ मधील शृंगारपूरावरील स्वारीपर्यंतचे शिवचरित्र त्यात आले आहे या ग्रंथाला त्याने शिवभारत असे नाव दिले या ग्रंथावरूनच शिवाजीमहाराजांनी त्याला कवींद्र अशी पदवी दिली हा ग्रंथ घेऊन तो पुढे वाराणसीला गेला असावा कारण त्यात आपण सदर ग्रंथ काशीतल्या पंडितांच्या विनंतीवरून गंगेच्या तीरावर वाचला, असे पहिल्याच अध्यायात म्हटले आहे

शिवभारत हा ग्रंथ ऐतिहासिक दृष्ट्या फार महत्त्वाचा समजला जातो शिवाजी महाराजांच्या कारकिर्दीत त्यांच्या राजवटीचे समक्ष अवलोकन करून परमानंदाने त्याची रचना केली आहे प्रस्तुत काव्य बव्हंशी अनुष्टुभ छंदात असून, अध्यायांचे शेवटचे काही श्लोक त्याने अन्य मोठ्या वृत्तात लिहिले आहेत प्रस्तुत काव्यात वीर रसाला चांगलाच अवसर मिळालेला आहे ते ओज, प्रसाद माधुर्य या गुणांनीही युक्त आहे

अफझुलखानाच्या वधाचा प्रसंग कवीने बऱ्याच विस्ताराने वर्णिला असून, त्यात शिवाजीमहाराजांच्या भेटीसाठी निघालेल्या अफझुलखानाच्या मनात कोणता कपटी डाव होता, ते पुढीलप्रमाणे सांगितले आहे –

**विश्वब्धो मयि वर्तते शिवमहीपालः स तस्मादहं**
**तस्योपान्तमुपेत्य साम्प्रतममुं सामोपधिं संश्रयन् ।**
**गुप्तामात्मकटारिकां तदुदरे गाढं निखाय स्वयं**
**देवानामपि मन्दिरेऽद्य सुतरां सद्यो विधास्ये भयम् ।।**

अर्थ – त्या शिवाजीराजाने माझ्यावर विश्वास ठेवला आहे म्हणून मी त्याच्याकडे जाऊन त्याच्याशी सख्य करण्याचे कपट करीन आणि त्या भेटीच्या वेळी माझी गुप्त कट्यार मी स्वत त्याच्या पोटात खोल खुपसून (मी त्याला ठार करीन व) देवांच्या मंदिरामध्येसुद्धा अतिशय भय उत्पन्न करीन

शिवाजी महाराजांनी अफझुलखानाचा कपटी डाव ओळखला होता तेव्हा त्याच्याशी कसे वागायचे आणि काय करायचे हे आपल्या सेनापतींना सांगताना ते म्हणतात–

" मी बोलावल्यावरून तो यवन संधी करण्याच्या इच्छेने इकडे येत आहे तेव्हा शत्रुसेना या अरण्यात येत असता तुम्ही तिला अडथळा करू नका तुम्ही शस्त्रास्त्रांनी सज्ज होऊन मजबरोबर राहा, असे केल्यावर एकांतात भेट घेण्यासाठी येणाऱ्या अफझुलखानाला कदाचित भीती वाटेल, म्हणून तुम्ही सर्वांनी शस्त्रसज्ज होऊन गहन अरण्याच्या आत लपून न कळत दडून राहावे स्वत करार करूनसुद्धा जर तो संधी करणार नसेल, तर आमच्या दुंदुभीचा ध्वनी होताच तुम्ही त्याची सेना कापून काढावी "

अफझुलखानाच्या वधाच्या वेळी शिवाजीमहाराजांनी भवानी तलवार किंवा वाघनखे वापरली, अशा दोन्ही अनुश्रुती आहेत शिवाजीमहाराजांनी भवानी तलवार वापरून अफझुलखानाचा वध केला, असे शिवभारतकार सांगतात त्या वधाच्या पूर्वी भवानी देवीने स्वत त्यांना दर्शन देऊन सांगितले ते असे–

**विधिना विहितोऽस्त्यस्य मृत्युस्त्वत्पाणिनामुना ।**
**अतस्तिष्ठामि भूपाहं कृपाणी भूमणे तव ।।**

अर्थ–(हे शिवनृपा,) तुझ्या या हाताने त्या अफझुलखानाचा मृत्यू व्हावा अशी ब्रह्मदेवाने योजना केली आहे म्हणून हे राजा, मी तुझी तलवार होऊन राहिले आहे

इ स १६८७ साली हा कवी निवर्तला त्याचे याहून चरित्र उपलब्ध होत नाही [श्रीशिवभारत–संपा श्री स म दिवेकर]

**परमानंददास** ( १४९३–१५८४ इ स ) अष्टछाप कवींपैकी एक याचा जन्म कनोज येथे एका ब्राह्मण कुटुंबात झाला घरच्या गरिबीमुळे आईवडिलांना त्याचे लग्न करता आले नाही त्याचा परिणाम म्हणून हा वयाच्या सव्विसाव्या वर्षी विरक्त होऊन प्रयागला गेला लौकरच तो एक कीर्तनकार व शीघ्रकवी म्हणून नावारूपाला आला त्या वेळी प्रयागजवळ अडेल या गावी वल्लभाचार्य मुक्कामाला होते एका रात्री झालेल्या साक्षात्कारानुसार हा वल्लभाचार्यांच्या भेटीला गेला व त्याने त्यांच्याकडून पुष्टिमार्गाची दीक्षा घेतली वल्लभाचार्यांनी त्याचे परमानंदस्वामी हे मूळ नाव बदलून परमानंददास असे ठेवले तो आचार्यांबरोबर ब्रजभूमीला गेला पुढे तो गुरूंच्या आदेशानुसार गोवर्धनाला जाऊन राहिला तिथल्या श्रीनाथमंदिरात त्याला नित्यकीर्तनसेवा मिळाली फावल्या वेळात तो काव्यरचनाही करू लागला

परमानंददास जसा कवी व कीर्तनकार होता, तसाच तो

सगीतज्ञही होता श्रीकृष्णाच्या बाललीला वर्णन करणारा हा कीतनकार गोकुळाष्टमीच्या दिवशी कृष्णलीलापर गीत गात



परमानददास

गात मरण पावला मरणसमयी त्याने गायिलले एक गीत असे–

**रोधे बठ तिलक सम्भारति । मृगनयनी कुसुमायुध करि धरि ।**
**न द सुवनका रूप विचारत । दरपन हाथ सिगार बनावति ।**
**बासर जुग सम टारति ।।**
**अ तर प्रीत श्यामसु दर सौं । हरि सग केलि सम्भारति ।**
**बासर गत रजनी ब्रज आवत । मिल्त गोवर्धन प्यारी ।**
**परमान द स्वामीके सग । मुदित भई ब्रज नारी ।।**

अर्थ – मृगनयनी व्रजनारी श्रीकृष्णासाठी सोळवल्या आहेत त्यानी कपाळी कुकू लावले आहे हातात कामदेवाचे आयुध घेतले आहे हातात आरसा घेतला आह त्या नदपुत्राच्या रूपाचे स्मरण करीत आहेत दिवस हा त्याना युगासमान वाटत आह श्रीहरीबद्दल अत करणात वसत असलेल्या प्रेमामुळे त्याच्याशी क्रीडा करण्याचे विचार त्याच्या मनात चालू आहेत दिवस सपला रात्र पडली व्रजनारी गोवधनात श्रीकृष्णाला भेटून परमानदस्वामीबरोबर आनदित झाल्या

परमानदसागर नावाचा त्याचा एक पदसग्रह आहे या सग्रहात ११०१ पदे आहत ही पदे मुख्य व कृष्णलीला वणन करणारी आहत याशिवाय उद्धवलीला, दीघलीला दानलीला, ध्रुवचरित्र, असेही काही ग्रथ त्याने रचल होत असे म्हणतात परमानदाची भाषा उत्कट व प्रवाही आहे त्याची विरहगीत तर चटका लावणारी आहत त्यात परमेश्वराच्या भेटी विषयीची तळमळ दिसून येते द्वारकेश, नाभादास, ध्रुवदास, नागरीदास, आदींनी परमानददासाच्या स्तुतिपर कवन लिहिली आहेत [ अष्टछाप–परिचय, हि सा को २, हि सा इ , त प्र हि कृ , ब्र कृ मा भ , रु प व स ]

## परमानंद सेन

(ज म इ स १५२४) एक बगाली कवी नदिया भागातील काचनपाडा येथे याचा ज म झाला तो चतन्याच्या सान्निध्यात आल्यावर चत यानी त्याचे नाव कणपूर असे ठवले

याने आपल्या वयाच्या अठराव्या वर्षीच का यरचनेला प्रारभ करून चैत यचरित नावाचे महाकाव्य निर्माण केले ह काव्य एकदर वीस सर्गात विभागलेले आहे त्याची भाषा प्रवाही व प्रासादिक आह याशिवाय त्याचे अ यही काही ग्रथ आहत, त्याची नावे अशी– आर्याशतक, श्रीचत यचद्रोदयनाटक, श्रीगौरगणोद्देशदीपिका, अलकारकौस्तुभ, आनदवृदावनचपू वणप्रकाशकोष व चमत्कारचद्रिका

या सव काव्यातून प्रामुख्याने वात्सल्यरस आढळतो तेच या कवीचे वशिष्ट्य आहे [ हि वि को ]

## परमार राजवंश

राजपुताच्या अग्निकुलापैकी एक राजवश या वशातील सिधुराजाचा दरबारी कवी पद्मगुप्त परिमल याने आपल्या नवसाहसाकचरित नामक ग्रथात या परमार वशाची कुळकथा सागितली आह, ती अशी–

वसिष्ठ ऋषींची कामधेनू राजर्षी विश्वामित्राने पळवून नेली, तेव्हा तिला सोडवून परत आणण्यासाठी वसिष्ठ ऋषीने अबू पवतावर एक यज्ञ आरभला त्या यज्ञाच्या अग्निकुडातून एक वीर पुरुष उत्पन्न झाला व त्याने कामधेनूला सोडवून आणले त्याच्या त्या कामगिरीबद्दल वसिष्ठाने त्याला परमार = शत्रूचा नाश करणारा, अशी पदवी दिली आणि राज्यपदही दिले हाच पुरुष परमार वशाचा सस्थापक होय उपेंद्र हा परमार वशा तील पहिला ज्ञात पुरुष मानला जातो परमार वशाचे इ स १०५० नतरचे जे अभिलेख आहेत, त्यात वरील कथा आढळते, पण तत्पूर्वीच्या अभिलेखात ती सापडत नाही

इ स च्या १० व्या शतकाच्या प्रारंभीचे परमार वंशाचे एक दानपत्र हरसोल येथे मिळाले असून, त्यात या वशाचा उदय राष्ट्रकूट वशापासून झाला असे म्हटले आहे इ स ८१२ च्या सुमारास राष्ट्रकूट राजा गोविंद (तिसरा) याने प्रतीहार राजा नागभट (दुसरा) याचा पराभव करून मालव प्रदेश जिंकला व आपल्या कुळातील उपेंद्र नामक पुरुषाला ते राज्य दिले लाट देशाचा अधिपती कर्कराज याला त्याने उपेंद्राला साहाय्य करण्याचा आदेश दिला होता त्यामुळे नागभटाला मालव देश परत जिंकून घेता आला नाही उपेंद्र याला कृष्णराज असेही नाव होते तो राष्ट्रकूटाचा सामत म्हणून राज्य करू लागला धारानगरी ही त्याची राजधानी होती

उपेंद्राच्या मागून त्याचा पुत्र वैरिसिंह (पहिला) हा राजा झाला त्याच्या नतर त्याचा पुत्र सीयक (पहिला) आणि मग त्याचा पुत्र वाक्पती (पहिला) हे राजे झाले वाक्पती (पहिला) याच्या वेळी (इ स ८७५ ते ९१४) राष्ट्रकूट राजा इंद्र (तिसरा) याने प्रतीहाराच्या राज्यावर स्वारी करून महीपाल (पहिला) याचा पराभव केला होता त्या स्वारीत वाक्पती (पहिला) याने भाग घेतला असावा त्याच्या नतर त्याचा पुत्र वैरिसिंह (दुसरा) किंवा वज्रट हा गादीवर बसला त्याच्या कारकिर्दीत प्रतीहार महीपाल (पहिला) याने मालव देशावर आक्रमण करून नर्मदेपर्यंतचा सव प्रदेश जिंकला उज्जयिनी व धारा या नगरीही त्याने जिंकल्या पुढे इ स ९४६ नतर राष्ट्रकूट राजा कृष्ण (तिसरा) याच्या साहाय्याने वैरिसिंहाने मालवदेश परत मिळवला

वैरिसिंहाचा पुत्र सीयक (दुसरा) हा महापराक्रमी निघाला तो हर्ष या नावानेही प्रसिद्ध होता प्रारंभी तो राष्ट्रकूटाचे प्रभुत्व मानीत होता त्याने आपली सत्ता पश्चिमेला साबरमती नदीपर्यंत प्रस्थापित केली सौराष्ट्राचा राजा अवनिवर्मा योगराज (दुसरा) याचा त्याने एकदा पराभव केला, असे दिसते मालव देशाच्या वायव्येला हूणमडल या प्रदेशावर अज्जप याचे राज्य होते सीयकाने अज्जपानतरच्या एका राजाचा पराभव केला, असे म्हणतात पण चंदेल राजा यशोवर्मा याने सीयकाचा पराभव करून वेत्रवतीपर्यंत आपली सत्ता स्थापली होती, असे कळते

राष्ट्रकूट राजा कृष्ण (तिसरा) याच्या मृत्यूनतर सीयक (दुसरा) याने राष्ट्रकूटाचे प्रभुत्व अमान्य केले तेव्हा राष्ट्रकूट राजा खोट्टिग याने मालव देशावर स्वारी केली नर्मदेच्या तीरावर त्या दोघाचे घनघोर युद्ध झाले त्यात सीयकाने खोट्टिगाचा पराभव करून राजधानी मान्यखेटपर्यंत त्याचा पाठलाग केला (इ स ९७२) व तिथे पुष्कळ लूटालूट केली त्यामुळे सीयकाची सत्ता तापी नदीपर्यंत प्रस्थापित झाली

सीयकाला प्रथम पुष्कळ वर्षे पुत्र झाला नव्हता पण एकदा अरण्यात फिरत असताना त्याला एक नवजात बालक मुंज नावाच्या गवतात पडलेले सापडले त्याला सीयकाने तेच म्हणजे मुंज हे नाव दिले व आपला वारस ठरवले नतर त्याला औरस पुत्रही झाला त्याचे नाव सिंधुराज मुंजानंतर त्याने राज्य करावे, असा आदेश सीयकाने दिला होता मुंज हा इ स ९७३ च्या सुमारास सिंहासनावर बसला तो उत्पल व वाक्पतिराज (दुसरा) या नावानीही प्रसिद्ध होता त्याने श्रीवल्लभ, पृथ्वीवल्लभ व अमोघवर्ष अशा पदव्या धारण केल्या होत्या त्रिपुरीचा कलचुरी राजा युवराज (दुसरा) याचा त्याने पराभव केला हूणमडल व मेदपाट ही राज्ये त्याने जिंकली चाहमान बलिराज याच्याकडून त्याने अबू पर्वत व जोधपूरचा दक्षिण भाग जिंकून घेतला त्यानतर मुंज राजाने अणहिलपाटण व लाट या राज्यावर स्वारी करून तीही जिंकली तेव्हा चालुक्य राजा तैल याने आपला सेनापती बारप्प याला लाट देशाच्या सरक्षणासाठी तिकडे पाठविले आणि स्वत मालव देशावर आक्रमण सुरू केले पण मुंज राजाने बारप्पाचा पराभव केला आणि तैल राजाचे आक्रमणही सहा वेळा परतवून लावले मग त्याने स्वत च चालुक्याच्या राज्यावर आक्रमण केले त्या वेळी मात्र त्याचा पराभव झाला व तो तैल राजाच्या हाती सापडला तैलाने त्याला कैदेत डाबले आणि नर्मदेपर्यंतचा प्रदेश परत जिंकून घेतला काही दिवसानी मुंज राजाच्या अधिकाऱ्यानी त्याला सोडविण्याचा प्रयत्न केला, पण ते कारस्थान उघडकीस आले व मग तैलाने मुंज राजाला फाशी दिले

मुंज राजा कुशल सेनापती होता, तसाच थोर कवीही होता तो विद्या कलाचा आश्रयदाताही होता धनंजय, भट्टहलायुध, धनिक, पद्मगुप्त, अमितगती, इ अनेक कवीना त्याने उदार आश्रय दिला होता त्याने अनेक मंदिरे बाधली व पुष्कळ तलावही खोदले राधनपूर संस्थानात मुंजपूर नावाचे एक गाव आहे ते त्यानेच वसवले, असे म्हणतात त्याचा मृत्यू इ ९९३ ते ९९८ या काळात केव्हा तरी झाला

मुंजानतर त्याचा भाऊ सिंधुराज सिंहासनावर बसला त्याने कुमारनारायण व नवसाहसांक या पदव्या धारण केल्या होत्या चालुक्य सत्याश्रय याचा पराभव करून त्याने नर्मदेच्या दक्षिणेकडील आपला प्रदेश परत जिंकून घेतला त्याने अपरात व लाट हे प्रदेशही जिंकले पण चौलुक्य राजा चामुंडराज याच्यापुढे मात्र त्याला हार खावी लागली

सिंधुराजाच्या मागून इ स १००० च्या सुमारास त्याचा

पुत्र भोज हा राजा झाला. त्याने इ. स. १०५५ पर्यंत राज्य केले. इ. स. १००८ मध्ये शाही राजा आनंदपाल याला गझ्नीच्या महमुदाविरुद्ध साहाय्य करण्यासाठी भोज राजाने आपले सैन्य पाठवले होते. त्या नंतरही त्याने मुसलमानांच्या आक्रमणांना विरोध करून उत्तर भारताचे संरक्षण करण्याचा पुष्कळ प्रयत्न केला. आपल्या राजवटीच्या प्रारंभी भोज राजाने कलचुरी राजा गांगेयदेव आणि राजेंद्र चोळ यांच्यासह चालुक्य राजा जयसिंह याच्यावर स्वारी केली, पण जयसिंहाने त्यांचा पराजय केला.

इ. स. १०२० च्या सुमारास भोज याने कोकण प्रांत जिंकून तो आपल्या राज्यात समाविष्ट केला. त्यानंतर त्याने बुंदेलखंड, ग्वाल्हेर, कान्यकुब्ज, नाडोल वगैरे प्रदेशांवर स्वाऱ्या केल्या, पण त्यात त्याला यश मिळाले नाही. शाकंभरीचा चाहमान वीर्यराम मात्र त्याला शरण आला. भोजाचे राज्य गोदावरीच्या तीरापर्यंत पसरले होते. चितोड, बांसवाडा, डुंगरपूर, भिलसा ही ठिकाणेही त्याच्या राज्यात होती. चालुक्य राजा जयसिंह याचा पुत्र सोमेश्वर (पहिला) हा इ. स. १०४२ त गादीवर आला. मग त्याने माळव देशावर स्वारी करून धारा, उज्जन, मांडू ही नगरे जिंकली. पण भोजाने लवकरच ती परत घेतली.

गुजरातचा चौलुक्य राजा चामुंडराज एकदा माळव देशातून काशीला जात असताना, भोजराजाने त्याचा अपमान केला होता. त्यामुळे चौलुक्य राजाने त्याच्याशी वैर धरले. पुढे चौलुक्य भीम (पहिला) याने परमार धंधुक याच्याकडून अर्बुद पर्वत जिंकून घेतला, तेव्हा भोजाने त्याच्यावर स्वारी करून त्याची अणहिलपाटण ही राजधानी लुटली. पुढे भीम याने कलचुरी राजा कर्ण याचे साहाय्य घेऊन माळव देशावर स्वारी केली. ते युद्ध चालू असतानाच भोज राजा मरण पावला आणि माळव देश शत्रूच्या हाती गेला.

भोज राजा केवळ शूर सेनानी नव्हता, तर तो मोठा विद्वानही होता. विविध विषयांवर त्याने अनेक ग्रंथ लिहिले होते, असे म्हणतात. त्याने अनेक पाठशाळा स्थापल्या. अनेक पंडित त्याच्या आश्रयाला होते.

भोजराजानंतर त्याचा पुत्र जयसिंह याने चालुक्य राजा विक्रमादित्य (सहावा) याच्या साहाय्याने माळव राज्य परत मिळवले. पुढे विक्रमादित्याने वेंगीचे राज्य जिंकले, तेव्हा जयसिंह त्याच्याबरोबर गेला होता. पण पूर्व चालुक्य राजा विजयादित्य (सातवा) याने चोळराजा वीर राजेंद्र याच्या साहाय्याने वेंगीचे राज्य परत घेतले. पुढे चालुक्य राजा सोमेश्वर (तिसरा) याने गुजरातचा चौलुक्य राजा कर्ण याचे साहाय्य घेऊन माळव देशावर स्वारी केली. त्या युद्धात जयसिंह मारला गेला आणि माळव राज्य पुन्हा शत्रूच्या हाती गेले. भोजराजाचा भाऊ उदयादित्य याने शाकंभरीचा चाहमान राजा विग्रहराज (तिसरा) याचे साहाय्य घेऊन शत्रूचा पराभव केला व राज्य परत घेतले.

उदयादित्याने इ. स. १०८६ पर्यंत राज्य केले असावे. त्याने उदयपूर येथे नीलकंठेश्वराचे मंदिर बांधले. त्याच्या नंतर त्याचा सर्वांत लहान पुत्र लक्ष्मदेव ऊर्फ जगद्देव हा राजा झाला. तो पराक्रमी होता. त्याने गौड, अंग, कलिंग, आंध्र, चांगडा इ. प्रदेशांवर आक्रमण करून विजय मिळवले. कलचुरी यश:कर्ण राजाचाही त्याने पराजय केला. त्याचप्रमाणे पंजाबचा सुभेदार महमूद याने उज्जैनवर स्वारी केली, तेव्हा जगद्देवाने त्याचा यशस्वी प्रतिकार केला. त्याने चालुक्य विक्रमादित्य (सहावा) याच्याबरोबर द्वारसमुद्रावरही स्वारी केली होती, पण होयसळांनी त्याचा पराभव केला. अर्बुद पर्वताजवळ जगद्देव आणि चौलुक्य राजा कर्ण यांचे युद्ध झाले, त्यात जगद्देवाने कर्णाचा पराजय केला. इ. स. १०९४ च्या सुमारास जगद्देवाने आपला मोठा भाऊ नरवर्मा याला राज्य दिले व तो चालुक्य विक्रमादित्याच्या दरबारात जाऊन राहिला. विक्रमादित्याने त्याला काही प्रदेशाचे राज्य दिले होते, असे प्रबंधचिंतामणी या ग्रंथात म्हटले आहे.

नरवर्मा याने दीर्घ काळ राज्य केले, पण तो काळ शांततेचा नव्हता. चंदेल राजा सल्लक्षणवर्मा, शाकंभरीचा चाहमान राजा अजयदेव आणि विक्रम चोळ राजाचा पल्लव सेनापती यांनी माळव देशावर आक्रमणे केली व त्यांत नरवर्म्याचा पराभव झाला. चौलुक्य राजा जयसिंह सिद्धराज व नरवर्मा यांचे युद्ध बारा वर्षे चालू होते. शेवटी सिद्धराजाने नरवर्म्याला कैद केले. पुढे नरवर्मा सुटला, पण त्या पराभवामुळे परमारांच्या सार्वभौम सत्तेला मोठा हादरा बसला. नरवर्मा स्वतः कवी होता आणि विद्वानांचा आश्रयदाताही होता.

नरवर्मा याच्या नंतर त्याचा पुत्र यशोवर्मा इ. स. ११३३ च्या सुमारास गादीवर आला. त्या वेळी परमारांचे राज्य खिळखिळे झालेले होते. त्या परिस्थितीचा फायदा घेऊन देवास येथे विजयपाल नामक पुरुषाने स्वतंत्र राज्य सुरू केले. चंदेल राजा मदनवर्मा याने भिलसा प्रदेश जिंकला. चौलुक्य राजा जयसिंह सिद्धराज व नाडोलचा चाहमान राजा आशाराज यांनी तर माळव देशावरच स्वारी केली व यशोवर्मा याला कैद करून नेले. जयसिंहाने सबंध माळव देशच आपल्या राज्याला जोडला व स्वतःला अवंतिनाथ ही पदवी घेतली. इ. स. ११३८ च्या सुमारास यशोवर्मा याचा पुत्र जयवर्मा याने माळव देश पुन्हा

परत घेतला होता, पण लवकरच कल्याणचा चौलुक्य राजा नरसिंह ( पहिला ) याने माळव देशावर स्वारी करून तो जिंकला व जल्लाळ नामक पुरुषाला तिथले राज्य दिले इ स ११४३ नंतर लवकरच चौलुक्य राजा कुमारपाल याने बल्लाळचा पराभव करून संपूर्ण माळव देश पु हा गुजरातला जोडला

त्यानंतर सुमारे वीस वर्षे माळव देश गुजरातच्या राज्यात समाविष्ट राहिला त्या कालखंडात परमार वंशातील काही पुरुष भोपाळ निमाड, होशंगाबाद, खानदेश, इ प्रदेशावर सामंत म्हणून राज्य करीत होते पण लवकरच परमार जयवर्मा याचा पुत्र विंध्यवर्मा याने चौलुक्य मूलराज (दुसरा) याचा पराभव करून माळव देशाचे राज्य परत मिळवले पण होयसळ व यादव या राजांनी त्याच्यावर वारंवार आक्रमण केल्यामुळे त्याला शांतता कधी ती लाभलीच नाही यादव राजा भिल्लम याने इ स ११८९ च्या सुमारास माळव देशावर स्वारी करून खूप लुटालूट केली इ स ११९० च्या सुमारास विंध्यवर्मा याने चोळाच्या बरोबर होयसळाच्या राज्यावर स्वारी केली, पण होयसळ राजा बल्लाळ ( दुसरा ) याने ती परतवून लावली

इ स ११९३ च्या सुमारास विंध्यवर्मा मरण पावला, तेव्हा मात्र परमारांची सत्ता स्थिर व प्रबळ झाली होती विंध्यवर्म्याचा पुत्र सुभटवर्मा हा गादीवर आल्यानंतर त्याने गुजरातकडे मोर्चा वळवला प्रथम त्याला पुष्कळच जय मिळाले, पण शेवटी भीम (दुसरा) याचा मंत्री लवणप्रसाद याने त्याला परत पिटाळून लावले यादव राजा जैतुगी यानेही सुभटाचा पराभव केला

सुभटवर्मा याचा पुत्र अर्जुनवर्मा हा इ स १२१० च्या सुमारास माळवाधिपती झाला त्याने गुजरातवर स्वारी केली व जयसिंहाचा पराभव करून त्याच्या कन्येशी विवाह केला पुढे यादव राजा सिंघण याच्याकडून मात्र अर्जुनवर्म्याला पराभव पत्करावा लागला अर्जुनवर्मा याने अनेक ग्रंथ लिहिले होते, असे म्हणतात मदन, आशाधर, इ अनेक पंडित त्याच्या आश्रयाला होते

इ स १२१५ ते १२१८ या काळात केव्हातरी अर्जुनवर्मा याच्या जागी देवपाल हा माळवाधिपती झाला जयवर्म्याचा भाऊ लक्ष्मीवर्मा याचा तो नातू होता त्याचे राज्य भडोचपासून भिलसापर्यंत पसरले होते लाट देशाचा राजा संग्राम सिंह किंवा शंख हा देवपालाचा सामंत होता यादव राजा सिंघण याने लाट देशावर स्वारी करून शंखाला कैद केले तेव्हा देवपालाने सिंघणाशी संधी करून शंखाला सोडवले पुढे त्या तिघांनी मिळून द गुजरातवर स्वारी केली, पण ती यशस्वी झाली नाही उलट गुजरातचा मंत्री वीरधवल याने नंतर भडोचवर स्वारी करून ते जिंकले इ स १२३३ मध्ये इल्तुमिश याने भिलसा घेऊन उज्जैनवरही धाड घातली होती पण देवपालाने त्याचे आक्रमण यशस्वी परतवून लावले

इ स १२४३ च्या सुमारास देवपालाचा पुत्र जैतुगिदेव हा गादीवर आला त्याच्या राजवटीत यादव राजा कृष्ण याने माळव देशावर आक्रमण केले इ स १२५० मध्ये सुलतान बल्बन याने आणि गुजरातचा राजा वीसलदेव वाघेला यानेही परमारांच्या राज्यावर स्वाऱ्या केल्या वीसलदेवाने धारा नगरीही लुटली

इ स १२५६ च्या सुमारास जैतुगीचा धाकटा भाऊ जयवर्मा (दुसरा) हा गादीवर आला त्यानंतर सुमारे ५० वर्षे या वंशातील चार पाच राजांनी राज्य केले मात्र रणथंभोरचे चाहमान राजे, यादव राजे, वाघेला लोक आणि दिल्लीचे सुलतान यांनी माळव देशावर स्वाऱ्या करून तिथे खूप लुटालूट केली शेवटी इ स १३०५ मध्ये अल्लाउद्दीन खिलजीने तो देश जिंकून आपल्या राज्यात समाविष्ट केला

परमार वंशाच्या सुमारे ३५ शाखा निरनिराळ्या प्रदेशात राज्य करीत होत्या त्यातील काही शाखांची माहिती अशी—

**अबू**— इ स च्या १० व्या शतकाच्या उत्तरार्धात माळवाधिपती मुंज याने आपला पुत्र अरण्यराज याला अबू प्रदेशाचे राज्य दिले चंद्रावती ही त्याची राजधानी होती त्याच्या नंतर कृष्णराज, धरणीवराह, महीपाल किंवा ध्रुवभट व धंधुक हे गादीवर आले इ स १०३० च्या सुमारास गुजरातचा चौलुक्य राजा भीम (पहिला) याने धंधुकाला पदच्युत केले होते, पण धंधुकाने लवकरच आपले राज्य परत मिळवले धंधुकाचे तीन पुत्र पूर्णपाल, दंतिवर्मा व कृष्ण (दुसरा) हे त्याच्या नंतर क्रमाने राजे झाले पूर्णपाल याने चौलुक्यांचे प्रभुत्व अमान्य केले होते, पण भीम (पहिला) याने अबूवर पुन्हा आपले वर्चस्व स्थापून, त्याला ते मान्य करायला लावले त्यानंतर अबूचे राज्य चौलुक्यांच्या सत्तेखालीच राहिले इ स ११५० च्या सुमारास अबूवर राज्य करणारा यशोधवल याने चौलुक्य राजा कुमारपाल याच्याबरोबर माळव देशावर स्वारी केली आणि माळवाधिपती बल्लाळ याला ठार मारले त्यानंतर अबूच्या बहुतेक सर्व परमार राजांनी गुजरातच्या राजांना साहाय्य करून अनेक परचक्रे परतवली इ स १३२० च्या सुमारास अबूचे राज्य द मारवाडच्या चाहमान राजाने जिंकून घेतले

**वागड** — परमार वंशातील पहिला पुरुष उपेंद्र याचा डंबरसिंह नामक कनिष्ठ पुत्र होता त्याच्या वंशातील धनिक नामक पुरुषाने इ स च्या १० व्या शतकाच्या मध्यात वागड येथे

स्वतंत्र राज्य स्थापन केले. सांप्रतचे बांसवाड व डुंगरपूर हे प्रदेश त्यात समाविष्ट असून, उत्थुणक (अर्थुण) ही त्याची राजधानी होती. धनिकानंतरचा राजा चच्च याने मालवराज परमार सीयक (दुसरा) याच्या बाजूने राष्ट्रकूट खोट्टिग याच्याशी युद्ध केले, त्यात तो मारला गेला. त्याच्या नंतर चंडप व सत्यराज हे क्रमाने गादीवर आले. सत्यराज याने परमार भोज राजाला चौलुक्य राजांविरुद्ध मदत केली. त्यानंतर या कुळातील पाच-सहा राजांनी राज्य केले. इ. स. च्या १२ व्या शतकाच्या मध्यात हे राज्य गुहिलानी जिंकले.

**जाबालिपूर** (जालोर) – मालवाधिपती मुंज याचा पुत्र चंदन याने हे राज्य स्थापन केले. त्याच्यानंतर देवराज, अपराजित, विज्जल, धारावर्ष आणि बीसल (इ. स. १११७) यांनी तिथे राज्य केले. इ. स. च्या १२ व्या शतकाच्या उत्तरार्धात तिथे कुम्हपाल हा राज्य करीत होता. नाडोलचा चाहमान राजा कीर्तिपाल याने कुम्हपालाचा पराभव करून जालोरचे राज्य जिंकले.

**भिन्नमाल**– मालवाधिपती सिंधुराज याचा पुत्र दुसल याने हे राज्य स्थापले. इ. स. च्या ११ व्या शतकाच्या प्रारंभी त्याच्या कुळातील देवराज याने शाकंभरीचा चाहमान राजा दुर्लभराज याच्याकडून मरुमंडळ हा प्रदेश मिळविला. देवराजाचा नातू कृष्णराज ( इ. स. १०६०– १०६६ ) याला चौलुक्य राजा भीम ( पहिला ) याने बंदिवासात टाकले होते. पण नाडोलचा चाहमान राजा बालप्रसाद याने त्याला सोडवून पुन्हा गादीवर बसवले. त्यानंतर या कुळातील राजांनी शंभर ते सव्वाशे वर्षे राज्य केले. इ. स. च्या १३ व्या शतकाच्या प्रारंभी द. मारवाडच्या चाहमान राजाने भिन्नमालचे राज्य जिंकून घेतले. [ हि. क. इं. पी.; वि. स्मृ. ग्रं.; हि. वि. को. ]

## परमार्थ

परम = श्रेष्ठ + अर्थ = लाभ, यावरून परमार्थ म्हणजे सर्वोच्च ध्येय किंवा सर्वोच्च लाभ असा त्याचा अर्थ होतो. मनुष्याला जीवनात ज्या गोष्टी श्रेयस्कर व मोलाच्या वाटतात, त्यांना जीवनमूल्ये म्हणतात. व्यक्तिपरत्वे जीवनमूल्यांची कल्पना भिन्न असते.

धर्म, अर्थ, काम व मोक्ष हे चार पुरुषार्थ म्हणजे जीवनमूल्येच होत. धर्म, अर्थ व काम हे मोक्ष या परम पुरुषार्थाला साधनीभूत असतात. त्या परम पुरुषार्थालाच परमार्थ असे म्हटले आहे. स्वार्थ किंवा देहबुद्धी विवेक–वैराग्याच्या अग्नीत जाळल्यावाचून 'मी देह नसून आत्मा आहे ' हे आत्मज्ञान होत नाही. भारतीय दर्शनकार व संत आत्मज्ञान याच अर्थाने परमार्थ हा शब्द वापरतात. रामदासांनी यासंबंधी विवेचन केले आहे, ते असे–

परमार्थ हा ब्रह्मसाक्षात्कार आहे. तो अखंड, अक्षय व अपार आहे. परमार्थाने सायुज्यतेची पदवी लाभते. अंतर्यामी परब्रह्म उघड होते. अंतरी शुद्ध आत्मा प्रकट होतो. परमार्थ हेच जन्माचे सार्थक आहे. परमार्थाने परमात्मा अनुभवाला येतो.

योगसाधनाने चित्त अंतर्मुख होऊन त्याला आत्मदर्शन झाले म्हणजे 'मीच आत्मतत्त्व ' अशी त्याला ओळख पटते. या साक्षात्कारामुळे जे सुख लाभते, तेच सर्वोच्च सुख किंवा परमानंद होय. त्यात मन बुडाल्यावर प्राणांतिक दुःखाची देखील त्याला जाणीव होत नाही. या स्थितीलाच स्थितप्रज्ञता म्हणतात.

मनुष्य परमार्थाकडे का वळतो ? या प्रश्नाचे उत्तर गुरुदेव रानडे यांनी पुढीलप्रमाणे दिले आहे – माया, मोह, अज्ञान, अन्याय यांमुळे मनुष्याला जगात दुःख भोगावे लागते. त्याचप्रमाणे जरा, व्याधी व मृत्यू यांचे भय प्रत्येकाला वाटत असते. जीवनात सर्व गोष्टी नश्वर असल्याची जाणीव पदोपदी होत असते. अशा अनेक कारणांमुळ मनुष्य बेजार होतो, तेव्हा दुःखनिवृत्ती व्हावी या हेतूने तो परमार्थाकडे वळतो. जीवनातील अपूर्णता व असमाधान यांमुळे त्याला देवाची ओढ लागते. जीवन स्वभावतःच दोषमय असते व कितीही प्रयत्न केले, तरी ते संपूर्णतः दोषरहित करता येत नाही. त्यासाठी जीवनाच्या वरच्या म्हणजे आध्यात्मिक पातळीवरच गेले पाहिजे. या परम सत्याची जाणीव होणे, म्हणजेच परमार्थाकडे प्रवृत्ती होणे होय. पाच ज्ञानेंद्रिये व बुद्धी यांच्या कक्षेच्या पलिकडे असणारा ज्ञानाचा एक प्रांत असून त्याचे ज्ञान व्हावे, अशी इच्छा सुसंस्कृत मनुष्याच्या ठिकाणी असते. अज्ञेयाविषयीची ही जिज्ञासा म्हणजेच ब्रह्मजिज्ञासा निर्माण झाली, की मनुष्य परमार्थाकडे वळतो.

वरील परमार्थप्रेरक कारणांचा विचार पारमार्थिक साधनेत तीव्रता येण्यासाठी अत्यंत आवश्यक असतो. साधक त्या कारणांचा जितका विचार करील, तितकी त्याची साधनांवर श्रद्धा वाढते.

परमार्थप्राप्तीची पहिली पायरी म्हणून साधकाने आपले जीवन विशुद्ध राखले पाहिजे. त्यासाठी सद्‌गुणांचे संपादन व दुर्गुणांचा त्याग केला पाहिजे. भक्ती हा सर्वोत्तम गुण मानलेला आहे. भक्तीमध्ये सर्व गुणांचा समावेश होतो. म्हणूनच भक्तियोग हा परमार्थप्राप्तीचा श्रेष्ठ मार्ग होय, असे एक मत आहे. परमार्थ साधू इच्छिणाऱ्याच्या ठिकाणी प्रपंचाविषयी पराकाष्ठेची अनासक्ती यावी लागते. परमार्थाला आवश्यक असणारी दुसरी गोष्ट म्हणजे देवाविषयी नम्रभाव. साधकाने जगाविषयी निर्भय, पण देवाविषयी सभय असावे; शिवाय त्याच्या अंतःकरणातील भेदभावही नष्ट होणे आवश्यक असते.

परमार्थात सद्‌गुरूची अत्यंत आवश्यकता असते, असे उप-

निवृत्तिनाथापासून रामदास–तुकारामादी संतापर्यंत सर्वांनी आग्रहाने सांगितले आहे. आत्मज्ञान हे अत्यंत गहन असल्यामुळे ते केवळ स्वतःच्या बळावर प्राप्त होणे शक्य नाही. त्यासाठी आत्मज्ञानी गुरू अत्यावश्यक असतो. [ रा च त , श्री के विवेलसरे – प्रसाद ऑक्टोबर १९५९, सा वा ]

**परमाश्व** बौद्धांचा एक देव. हा हयग्रीवाचाच बौद्ध प्रकार आहे. याचे मूर्तिध्यान असे – चतुर्मुख, अष्टभुज व चतुष्पाद. याचे वाहन म्हणून चार देव आणि चार देवता दाखवलेल्या असतात. [ इ बु इ ]

**परमेश्वर** ईश्वराचे आधिक्यदर्शक नाव. याची व्याख्या पातंजल योगदर्शनात पुढीलप्रमाणे दिली आहे – 'क्लेशकर्मविपाकाशयैरपरामृष्टः पुरुषः स्वेच्छया निर्माणकायमधिष्ठाय लौकिकवैदिकसम्प्रदायप्रवर्तकः संसाराङ्गारे तप्यमानानां प्राणभृतामनुग्राहकश्च' = क्लेश, कर्म, विपाक आणि आशय यांनी अस्पृष्ट असा पुरुष स्वेच्छेने निर्माणकायाचा आश्रय करून लौकिक आणि वैदिक संप्रदायाचा प्रवर्तक होतो आणि संसाररूपी अग्नीत तापणाऱ्या जीवांचा अनुग्राहक बनतो, यालाच परमेश्वर असे म्हणतात. पाहा – ईश्वर

**परमेष्ठिगुणव्रत** एक जैन व्रत. २८६ दिवसांचे हे व्रत आहे. या व्रतात १४३ उपवास आणि १४३ पारणा असतात. अरहंताच्या ४६ गुणांचे ४६ उपवास आणि ४६ पारणा, सिद्धांच्या ८ गुणांचे आठ उपवास आणि आठ पारणा, आचार्यांच्या ३६ गुणांचे ३६ उपवास आणि ३६ पारणा, उपाध्यायांच्या २५ गुणांचे २५ उपवास आणि २५ पारणा आणि सर्व साधूंच्या २८ गुणांचे २८ उपवास आणि २८ पारणा, असे या व्रताचे दिनविभाजन आहे. [ ज व्र वि स ]

**परमोच्चाटनयंत्र** व्यक्तीला स्थानभ्रष्ट करण्यासाठी वापरायचे साधन. हे तयार करण्यासाठी हळदीच्या पानाच्या रसाने भूर्जपत्रावर साध्यनाम लिहून त्याच्याभोवती एक वर्तुळ काढतात. वर्तुळाबाहेर एक अष्टदल पद्म काढून त्याच्या प्रत्येक दलात 'फट्' हा बीजमंत्र लिहितात. पुन्हा त्या अष्टदलाला वर्तुळाचे वेष्टन घालतात. यंत्र लिहून पूर्ण झाल्यावर त्याची पूजा करतात. मग त्याचे चूर्ण करून ते विड्याच्या पानातून साध्य व्यक्तीला खायला देतात. त्याने ते भक्षण केल्याबरोबर त्या व्यक्तीचे स्वस्थानापासून उच्चाटन होते, असे सांगितले आहे. [ यंत्र चिंतामणि ]

**परलोक** मनुष्य ज्या विश्वात जन्मतो व जगतो, त्याला इहलोक व मृत्यूनंतर ज्या अन्य लोकांत जातो, त्याला परलोक म्हणतात. पृथ्वी किंवा भूलोक या व्यतिरिक्त विश्वाचे जे अनेक अदृश्य विभाग मानलेले आहेत, त्या सर्वांना परलोक अशी संज्ञा आहे. त्यांत अंतरिक्ष, स्वर्ग, विष्णुलोक, ब्रह्मलोक, शिवलोक, सिद्धलोक, पितृलोक व नरक यांचा अंतर्भाव होतो. भू, भुवः, स्वः, महः, जनः, तपः, सत्यम् असेही सात लोक मानलेले असून पहिल्या भूलोकावरच्या जीवांना पुढचे सहा परलोक आहेत. मनुष्याच्या कर्मानुसार मृत्यूनंतर त्याचा आत्मा विशिष्ट परलोकात जातो, अशी कल्पना प्राचीन काळापासून प्रचलित आहे. मृत मनुष्याच्या देहाचे दहन केल्यानंतर अग्नी त्याच्या आत्म्याला परलोकात घेऊन जातो, असे अथर्ववेदात सांगितले आहे (६.१२०).

प्रत्येक मृत मनुष्याच्या आत्म्याला परलोकातही एक दिव्य व सूक्ष्म देह प्राप्त होतो. वीर पुरुष, महान तपस्वी व उदार दाते हे स्वर्गात जातात. तिथे त्यांना सुखोपभोगांनी परिपूर्ण असे जीवन लाभते. मनुष्याने पृथ्वीवरील जीवनात जितकी पुण्यकृत्ये केली असतील, तेवढ्या मानाने त्याचे स्वर्गातील जीवन कमी-अधिक सुखमय असते. ज्याला सत्यज्ञान झाले असेल, तो परब्रह्मात विलीन होतो. त्याला पुनर्जन्म नाही. पण आत्मज्ञानाच्या अभावी पुण्यवानाला पितरांच्या मार्गाने चंद्रलोकी जावे लागते. तिथे तो सर्व सुखे भोगून व पृथ्वीवर परत येऊन मानवी जन्म घेतो. जे दुष्कृत्ये करतात, त्यांना हीन पशुयोनीत पुनर्जन्म मिळतो. पापी माणसांना नरकात जावे लागते. प्रत्येकाच्या पापपुण्याप्रमाणे त्याला यमधर्म नरकात किंवा स्वर्गात पाठवतो. नरकातल्या जीवांना अनंत यातना भोगाव्या लागतात.

पितर म्हणजे चांगले आत्मे अशी कल्पना वैदिक वाङ्मयात आढळते. पृथ्वीवरील मानवांनी पितरांना अर्पण केलेले भोग त्यांना परलोकात पोचतात. परलोकी जाण्यासाठी व तिथून परत येण्यासाठी उपनिषदांत दोन मार्ग सांगितले आहेत, त्यांना देवयान व पितृयान असे म्हणतात.

परलोकाविषयी श्री अरविंद घोष यांचे प्रतिपादन असे– इंद्रियद्वारा गोचर होणाऱ्या संकुचित स्वरूपाच्या जड विश्वाच्या पलीकडे श्रेष्ठ स्वरूपाच्या, ज्ञानाच्या विशाल श्रेणी म्हणजेच लोक अस्तित्वात असून, त्यांच्या परिणामकारक क्रिया भौतिक विश्वावर होत असतात, या विश्वाला त्यांनी पूर्णपणे व्यापलेले असते. परलोकाविषयीचे माणसाचे अनुभव व्यक्तिनिष्ठ व सृष्टिनिष्ठ असे दोन प्रकारचे असतात. व्यक्तिनिष्ठ अनुभव आपल्याला आपल्या इच्छा, वासना, भावना, विचार इत्यादींच्या द्वारा प्राप्त होतो आणि सृष्टिनिष्ठ अनुभव बाह्य जड

विश्वातून प्राप्त होतो दोन्ही अनुभवाचे स्वरूप वेगळे असते

परलोकातल्या व्यक्तींची रूपे अपार्थिव म्हणजे सूक्ष्म द्रव्याची बनलेली असतात त्या व्यक्ती भूलोकावरील जीवनावर आपला प्रभाव पाडतात व वचरव चालवितात त्यातील काही व्यक्ती किंवा शक्ती आपण देवी मानतो त्या कल्याणकारक असतात त्याबरोबरच अ य काही आसुरी शक्तीही असून त्या उत्पातकारक असतात हे परलोक आपल्या चक्षूना अदृश्य असले, तरी योग-चक्षूनी गोचर होऊ शकतात

इहलोकीचा पार्थिव देह सोडल्यापासून पुनश्च पार्थिव देह धारण करीपर्यंतच्या मधल्या काळात जीवाला परलोकी वास्तव्य करायचे झाल्यास त्याचा स्वत चा, त्याच्या लिंग शरीराचा व त्याच्या प्राणप्रज्ञेचाही विकास होणे आवश्यक असते ज्या जीवाचा पुरेसा विकास झालेला आहे व ज्याच्यामध्ये परलोकी वास्तव्य करण्याची पात्रता आलेली आहे, असाच जीव परलोकी वास्तव्य करतो तिथे त्याच्या पुढील विकासाची योजना तयार होते न या अनुभवासाठी पार्थिव शरीराप्रमाणेच कोणते नवे प्राण प्रज्ञाकोश धारण करायचे ह देखील तिथेच निश्चित होते

मानव फारसा सुसंस्कृत झालेला नव्हता तेव्हापासूनच त्याच्या मनात मरणोत्तर जीवनासंबधी काही कल्पना उद्‌भवल्या होत्या मृत्यू म्हणजे संपूर्ण नाश नसून, मनुष्याच्या मत्यूनतर त्याचा जीव किंवा आ मा कोणत्या तरी सचेतन रूपात वावरत असला पाहिजे, अशी त्याची श्रद्धा होती परलोकाविषयी त्याच्या मनात विविध कल्पना होत्या परलोक इहलोकापेक्षा अधिक सुख-मय असेल, असे त्याला वाटत होते दु खमय परलोकाची कल्प नाही त्याला होती आणि दुष्ट मनुष्याला तिथे यातना भोगाव्या लागत असतील, असेही त्याला वाटत होत मांत्रिक व पंचाक्षरी याना अलौकिक दि य दृष्टी असल्यामुळे त्याना परलोकाचे ज्ञान सहज प्राप्त असत असे ते समजत व त्यानी केलेल्या वर्णनावर पूर्ण विश्वास ठेवीत

परलोकी जाताना मृत मनुष्याच्या मार्गात अनेक अडचणी व आपत्ता येतात आणि भुते, राक्षस, इ भयानक प्राणी त्याला वाटेत अडवतात, असेही त्याना वाटे अशा प्रकारच्या अनेक प्राचीन कथा जगात सर्वत्र प्रचलित आहेत त्यामुळे अत्यसंस्काराच्या वेळी पुढील प्रवासात उपयुक्त व आवश्यक अशा वस्तू प्रेताजवळ ठेवण्याची चाल सुरू झाली अन्न, पाणी, दिवा, पादत्राणे, इ विविध वस्तू मतासाठी त्याच्याबरोबर खड्डयात ठेवण्याची किंवा त्या वस्तू दान देण्याची चाल अजूनही आहे

मताविषयी आदर व भय वाटणे ही दुसरी भावना होय त्या भावनेतूनही अनेक प्रकारचे विधी अत्यसंस्कारात समाविष्ट झाले आहेत त्या विधीमुळे परलोकात मताच्या जीवाला सुख मिळेल आणि तो भूतयोनीत जाऊन आप्तेष्टाना बाधा करीत राहणार नाही, अशीही समजूत असत मनुष्याच्या इहलोकातल्या आचरणावर त्याच्या परलोकाच्या जीवनातले सुख व दु ख अवलंबून असते, असेही सव जातीजमातीतल्या लोकाना आणि आदिवासीनाही वाटत असते

मनुष्याच्या मत्यूनतर त्याचा केवळ आत्माच शिल्लक राहतो, असे नसून मनुष्याचे संपूर्ण व्यक्तित्व शिल्लक असते, असे ख्रिस्ती लोक मानतात मत्यूनतर अधिक भाग्याचे व आनंदाचे जीवन लाभावे, इतकेच नव्हे, तर ऐहिक सुखाच्या शतपट सुख मृत्यूनतर माणसाला प्राप्त व्हावे, अशी त्याची अपेक्षा असते त्याची पारलौकिक जीवनाची जी चित्रे रंगविलेली आहेत, त्यात आध्यात्मिक जीवनाचे प्रतिबिंब नसून पृथ्वी-वरील सुखोपभोगाचीच ती सुधारलेली आवत्ती वाटते मात्र ती सुखे पापाची वासनापूर्तीच्या पलिकडची असतात मनुष्य-देहाचे पुनरुत्थान व अखिल विश्वाचे स्वर्गात रूपातर यावर ख्रिस्ती धर्माचा विशेष भर आहे जेव्हा अखिल विश्वाचे पुनरुत्थान होईल, तेव्हा स्वर्गाचे निराळे अस्तित्वच उरणार नाही तोपर्यंत पुण्यवान लोक सुखात राहतील आणि पापी लोक पापक्षालनार्थ प्रायश्चित्त घेतील असे ते मानतात त्या पाप्याचा उद्धार व्हावा म्हणून पृथ्वीवरील लोकानी प्रार्थना करावी, असे त्याचे सागणे असते

इस्लामधर्मातही पुनरुत्थानाची कल्पना आहे, ती अशी — पापपुण्याचा अतिम निर्णय होईपर्यंत मनुष्याचा आत्मा सप्त स्वर्गापलिकडे जाऊन परमेश्वराला भेटतो आणि नतर सर्वात खालच्या स्वर्गात राहतो पुनरुत्थानाच्या वेळी सव मृतात्म्याना पूर्वीचेच देह पुन प्राप्त होतील आणि पुण्यात्मे उद्धरून जातील जे पापी असतील, त्याचा उद्धार महमद पैगंबर करील व मग परमेश्वर त्याना शुद्ध करून घेईल मग अशा प्रकारे पुण्यवान व शुद्ध झालेल्या आत्म्याना स्वर्गात सर्व सुखे प्राप्त होतील स्वर्गातील सुख म्हणजे पृथ्वीवरील विषयोपभोगाचीच ती पूर्णावस्था असते, असे मुसलमान समजतात पापी माणसाना नरकात भीषण यातना भोगाव्या लागतात पण त्या यातनानी त्याचे आत्मे पापातून मुक्त होऊन स्वर्गात जातात इस्लामवर श्रद्धा नसलेल्या माणसाचे पापात्मे मात्र सदैव नरकातच यातना भोगत राहतात, अशी मुसलमानाची खात्री असते

पुण्यात्मे स्वर्गात जाऊन तिथे दि य सुखे भोगतात आणि पापात्मे नरकात जाऊन यातना भोगतात, ही कल्पना पारशी धर्मातही आहे पुनरुत्थानाच्या वेळी सर्वांना पूर्वीचे देह प्राप्त होऊन मग त्याचा पुनरुद्धार होईल व त्या वेळी पापी लोकही शुद्ध होऊन त्याना स्वर्ग मिळेल, असे ते मानतात पाहा — स्वर्ग,

नरक [ए'सा रि ए, अरविंददोहन, घार १ली, ग ज्ञो शि ]

**परलोकविद्या** परलोकातील व्यक्तीशी सबध प्रस्थापित करण्याच्या विद्येला हे नाव आहे मृत्यू नतर मनुष्याचा आत्मा सूक्ष्म देह धारण करून परलोकात काही काल वास्तव्य करता अशा सूक्ष्मदेहधारी व्यक्तीशी इह लोकातील माणसाना मध्यस्थाच्या साहाय्याने किंवा स्वतत्रपणे सवाद करता येतो अशी या शास्त्राची धारणा आहे प्राचीन ख्रिस्ती लोक व अमेरिकेचे मूळ रहिवासी याना ही परलोक विद्या अवगत होती, असे म्हणतात अमेरिकेतील अँड्र्यू जॅक्सन डेव्हीस याला आधुनिक परलोकविद्येचा आद्य प्रणेता मानतात याचा ज म यथाक सस्थानात इ स १८२६ साली झाला त्याचा बाप एक गरीब चाभार व विणकर होता अँड्र्यू जक्सन हा मनाने व शरीराने अगदी दुबळा होता अक्षर ओळखीपलिकडे त्याचे शिक्षण झाले नव्हते त्याचा स्वभाव भित्रा, हळवा व तऱ्हेवाईक होता त्याची बुद्धीही फार मद होती त्याच्या ठिकाणी धार्मिक वृत्ती तर मुळीच नव्हती पण वयाच्या १७–१८ वर्षानतर त्याच्या अगातील अलौकिक व दिव्य शक्ती अचानक प्रकट झाली प्रथम त्याला परलोकातून दिव्य वाणी ऐकू येऊ लागली मग त्याला दिव्य दृष्टी प्राप्त झाली पुढे तो परलोकातून येणाऱ्या प्रेरणामुळे असामान्य व विद्वत्तापूर्ण अशी सचार-भाषणे करू लागला या भाषणात सर्व प्रकारचे ज्ञान असे तो भविष्यवादीही बनला त्याच्या एका पुस्तकात मोटार, विमाने वगैरे अनेक शोधाचे भाकित करून ठेवलेले आहे त्यानेच वतवल्याप्रमाणे दि ३१ मार्च १८४८ च्या रात्री आधुनिक परलोकविद्येचा आरभ न्यूयॉर्क जवळच्या एका खेडगावात झाला तिथल्या एका मुलीला ठोस्याच्या भाषेत गूढ सदेश मिळू लागले त्यानतर अनेक व्यक्तीनाही अशा प्रकारचे सदेश मिळू लागले प्रख्यात शास्त्रज्ञ विल्यम क्रूक्स याचा प्रथम या प्रकारावर विश्वास नव्हता त्यानी नास्तिक बुद्धीने त्याचे सशोधन सुरू केले पण विचा रातो त्याना त्या सदेशग्रहणात बरेच तथ्य आढळले व त या विद्येचे उपासक बनले त्याच्याप्रमाणे स्टेड, कॉनन डॉइल, ऑलिव्हर लाज, इ अनेक विद्वान सशोधकानीही या परलोक सदेशाचे सशोधन केले व त्यानाही त्यात सत्यता आढळली या सदेशग्रहणाच्या पद्धतीत जे विविध चमत्कार दिसून यतात, ते परलोकातील थोर प्रज्ञासपन्न व्यक्तीच्या प्रेरणेमुळे घडतात, असे त्या भौतिक शास्त्रज्ञानी मान्य केले आहे

अशा अनेक पडितानी परलोकाविषयी सशोधन करून जे निष्कर्ष काढले आहेत, त्यात पुष्कळ मतवचित्र्य दिसून येते त्याची परलोकासबधी ज्ञानाची साधन मुख्यत तीन आहेत– (१) सूक्ष्मदर्शन किंवा दिव्यदर्शन, (२) परलोकातून मिळ णाऱ्या प्रेरणा व (३) प्रयोगातील घटनावरून केलेली अनुमाने काही पडिताच्या मत सव परलोक पृथ्वीच्या भावती क्रमान पसरलेले असून, पृथ्वी हेच त्याचे केंद्र आहे त्याची सख्या सामान्यपणे सात मानली जाते त्याचे पृथ्वीपासून अतर निश्चित नाही काहीच्या मते परलोक हे पृथ्वीतून बाहेर पड णाऱ्या सूक्ष्म द्रव्यापासून बनलेले असतात, तर काहीच्या मते परलोक हेच खरे जग असून, भूलोक ही त्याची छाया आहे कोणी असे मानतात, की सारे जग एकच असून, त्याच्या स्थूल प्रत्ययाला इहलोक व सूक्ष्म प्रत्ययाला परलोक म्हणतात इह लोकातील कर्मानुसार जावाला परलोकी मानसिक क्लेश भोगावे लागतात तिथे सुष्ट व दुष्ट व्यक्ती एकत्र राहू शकत नाहीत प्रत्येक जीव आपल्या नतिक किंवा आध्यात्मिक योग्यतेप्रमाणे वेगळ्या लोकी जातो समान अवस्था असलेल्या व्यक्ती एकाच परलोकात राहतात भूलोकातील नाती व नावे परलोकातही चालू असतात पुण्यवान लोक तिथे दीर्घ काल राहतात, तर पापी लोक लवकर पुनर्जन्म घेऊन परत येतात तीन हजार वर्षांपूर्वी भूलोकात होऊन गलेल्या व्यक्तीचे परलोकातील अस्तित्व सिद्ध करता येते तिथे कोणालाही उद्योग करावा लागत नाही त्याचे आध्यात्मिक शिक्षण चालू असते तिथे पुण्य सपादन करून त्याना जन्ममरणाच्या फेऱ्यातून मुक्तही होता यत

आधुनिक परलोकविद्या प्राचीन परलोकविद्येप्रमाणे केवळ श्रद्धेय नसून अनुभवाने व प्रयोगानी ती सिद्ध करता येते, असे त्या विद्येतल्या पडिताचे म्हणणे आहे प्राचीन काळी सिद्ध किंवा योगी पुरुषाना त्याच्या दवी सामर्थ्यामुळे अनेक गोष्टीचे ज्ञान प्राप्त होत असे ते ज्ञान त्याना परलोकातील व्यक्तीच्या प्रेरणेनेच प्राप्त होत असावे अलिकडच्या काळातही अशी काही द्रष्टी माणसे आढळतात पण ते त्याच व्यक्तिगत आत रिक सामर्थ्य मानले जाते सामान्य व्यक्तीच्या माध्यमाच्या द्वारा जेव्हा परलोकातील व्यक्तीचे सदेश ग्रहण केले जातात, तेव्हा त्याचे अस्तित्व सिद्ध होते आधुनिक परलोकविद्येमुळे ते शक्य झाले आहे

परलोकविद्येच्या प्रयोगात अनेक प्रकारचे चमत्कार अनु भवाला येतात त्या चमत्काराची उपपत्ती परलोकातील व्यक्तीचे अस्तित्व व दवी सामर्थ्य मान्य केल्यावाचून लावता येत नाही माध्यम व्यक्तीच्या सुप्त मनाच्या सामर्थ्यामुळे ते चमत्कार घडतात, ही कल्पना बरोबर नाही आधुनिक परलोक विद्येत धर्माची मूलतत्त्वे सांडलेली नाहीत पण भौतिक शास्त्राची मदत घेऊन ती विद्या जीवनसातत्याच्या साक्षात

पुराव्यावर अधिष्ठित झालेली आहे परलोकविद्या म्हणजे नवीन धर्मपंथ नसून, धार्मिक विकास व विचारस्वातंत्र्य यांवर आधारलेली अभिनव पद्धतीची अशी ती शिकवण आहे आधुनिक परलोकविद्येच्या पुरस्कर्त्यांनी जी सारभूत तत्त्वे स्वीकारली आहेत, त्यांत ईश्वराची सेवा करणे, त्याची आज्ञा पाळणे, समता व बंधुभाव, जीवनसातत्य, कर्मविपाक, जीवाचे अमरत्व, त्याचा सतत होणारा विकास व शेवटी ईश्वराशी ऐक्य या तत्त्वांचा अंतर्भाव होतो

प्रख्यात शास्त्रज्ञ सर आलिव्हर लॉज यांनी परलोकविद्येविषयी पुढील उद्‌गार काढले आहेत–

माझ्या मते पुराव्याने हे सिद्ध आहे की दिवंगत सुबुद्ध जीव काही परिस्थितीत आपल्या या स्थूल जगाशी संबंध जोडू शकतात अशा रीतीने ते आपल्या शास्त्रीय संशोधनाच्या कक्षेत येतात दृश्य व अदृश्य जगांतील भिंत जरी अजून स्थूल आहे, तरी ती ठिकठिकाणी पातळ झाली आहे भक्तिमार्गाप्रमाणेच हा परलोकविद्यामार्ग सर्वांना इह परलोकातील वळणवळणासाठी उपयोगी पडेल

परलोकविद्येतील अनुभव जरी निर्विवाद सिद्ध झाले आहेत, तरी त्या अनुभवांच्या व अनुमानांच्या उपपत्तीसंबंधी जे संशोधन चालू आहे, त्यात अखेर एक अज्ञानाची भिंत आड येतेच त्यापलिकडे काय आहे, यासंबंधी तर्कच करावे लागतात अधिक प्रभावी साधनांच्या अभावी त्या संशोधनाला काही अपरिहार्य मर्यादाही पडल्या आहेत

भारतात श्री नरसिंहम पंतलू, श्री जे एन मित्र, श्री नागराणी, श्री दोरास्वामी अय्यर, श्रीमती गायत्रीदेवी, श्री वि दा ऋषी, श्री स कृ फडके, इ व्यक्तींनी या विषयाचा पुष्कळ अभ्यास करून त्यावर ग्रंथ व लेख लिहिले आहेत काहींनी दीर्घ काळ परलोकविद्येचे प्रयोग करून आपले अनुभवही ग्रथित केले आहेत श्री फडके यांनी या विद्येच्या बाबतीत त्यांनी केलेल्या संशोधनाचे सार सांगितले आहे, ते असे–

आधुनिक परलोकविद्येच्या प्रयोगद्वारा ज्या परलोकाशी आपले संवाद होतात ते परलोक म्हणजे प्रेतलोक, नरकलोक व मर्त्य पितलोक हे होत सामान्य सच्छील हिंदू मरणोत्तर मर्त्य पितृलोकात जातात व तिथे जपध्यानद्वारा ईश्वरोपासना करतात प्रत्येक व्यक्ती आपल्या परलोकातील गुरूच्या मार्गदर्शनाखाली एकांतात आत्मोद्धार करण्याच्या साधनात मग्न असते असत्कर्म करणारे, प्रेतलोक व नरकलोक या पृथ्वीजवळच्या लोकांत जातात व मानसिक क्लेश भोगतात साधारण कर्म करणारे लोक पितृलोकात आणि विरक्त व ज्ञानी पुरुष त्यापलिकडच्या लोकांत जातात आपल्या पुराणांत ज्या भुवर्लोकादींचे वर्णन आढळते, ते देवतालोक फार मोठे व सूक्ष्म आहेत तिथे मर्त्य मानव मरणोत्तर सहसा जाऊ शकत नाही नित्य पितरांचा लोकही मर्त्य पितृलोकाहून वेगळा आहे हे लोक व पाताळलोक यांची माहिती परलोकविद्येतील संवादांत मिळत नाही हे संवाद बहुतलोकांतर्गत सात विभागांशी होऊ शकतात त्यांतील तिसरा स्वर्लोक म्हणजे पुराणांतील स्वर्ग नव्हे पुण्यशील जीवात्मे त्यापुढील जनलोक, तपोलोक व सत्यलोक या एकाहून एक श्रेष्ठ लोकी जातात पृथ्वीपासून अगदी जवळ असलेल्या कमी स्पंदनाच्या क्षेत्रात प्रेतलोक आहे त्यातच भुते, पिशाचे वगैरे असतात परलोकविद्येच्या प्रयोगांत स्थूल चमत्कार करणारे व संवादाची बतावणी करणारे निकृष्ट जीव याच लोकांत असतात

परलोकांत दिक्‌कालाची कल्पना आहे तिथली संवादपद्धती इथल्याप्रमाणेच म्हणजे शब्दोच्चार व श्रवण याप्रमाणेच आहे मनोमय संवाद शक्य असला, तरी तो अपवादात्मक जाणावा भविष्यकथन, वस्तुसंशोधन, रोगनिवारण करणे स्थूल चमत्कार दाखवणे, स्थूल रूपात व्यक्त होणे, इ सिद्धी सर्व दिवंगतांच्या ठिकाणी नसतात

मरणोत्तर लवकरच होणाऱ्या संवादांत दिवंगत जीव बहुधा ‘ हा परलोक कल्पनातीत सुखावह आहे ’ असे सांगतात कारण त्यांना सूक्ष्म देह प्राप्त झालेला असल्यामुळे इहलोकातील व्याधी तिथे नसतात, चरितार्थासाठी त्यांना कष्ट करावे लागत नाहीत तिथे द्वेष, मत्सर, इ विकारही नसतात

प्राचीन काळी दुर्वास, रघुराजा, दुष्यंत, रावण, मुचकुंद, इ अनेक व्यक्ती मृत्यूपूर्वी सदेह स्वर्गात जाऊन आल्याच्या कथा आपल्या पुराणांत आहेत त्या व्यक्ती स्वतःच्या तपःसामर्थ्याने किंवा देवता व सिद्ध पुरुष यांच्या वरदानामुळे तात्पुरती दिव्य शरीरे धारण करून दिव्य लोकी गेल्या असाव्या नारदमुनी तर सदैव तीही लोकांतून संचार करीत होता पुराणांतील लोक व आधुनिक परलोकविद्येतील परलोक अगदी वेगळे आहेत पुराणांतील स्वर्ग, नरक, पितृलोक, देवयान, पितृयान, चंद्रलोक यांची वर्णने लाक्षणिक आहेत, ती अक्षरशः खरी मानायची नाहीत देवता व नित्य पितर हे वस्तुतः अमूर्त शक्तिकेंद्र असतात त्यांच्या लोकांचे क्षेत्र आधुनिक परलोकविद्येच्या क्षेत्राहून पुष्कळच व्यापक, सूक्ष्म व गूढ आहे [सु वि को , चंद्रशेखर– परलोकच्या दिवंगतांचे संवाद – श्री स कृ फडके, १९५७]

**परवन** एक जात हे लोक भारताच्या आग्नेय किनाऱ्यावर, द भारतातल्या तिन्नेवल्ली जिल्ह्यातल्या बंदरभागात आणि सीलोनच्या वायव्य किनाऱ्यावरील काही प्रदेशांत राहतात हे आपली मूळ भूमी अयोध्या असल्याचे सांगतात

या जातीच्या उत्पत्तीसंबंधी वेगवेगळी मते आहेत तत्रग्रंथात याना ब्राह्मण पुरुष व शूद्र स्त्री याची सतती म्हटले आहे, तर जातीवेदी नूल या ग्रंथात ही जात कुरव (टोपल्या विणणारा) पुरुष व चेट्टी (वश्य) स्त्री याच्या अनतिक सबधातून झाली, असे सागितले आह

आपण वरुणाच्या वशातले आहो, असे ते सागतात जव्हा शिवाने असुराचा नाश करण्यासाठी कार्तिकेयाला जन्म दिला, तेव्हाच शरवण नावाच्या सरोवरापासून परवन उत्पन्न झाले शेवटच्या कल्पाच्या अखेरीस सर्व पृथ्वी जेव्हा जलमय झाली, जेव्हा परवनानी एक होडी तयार केली आणि त्या होडीत बसून ते जलप्रलयातून सुरक्षित बाहेर पडले किनाऱ्याला लागताच प्रथम ज्या ठिकाणी त्यानी वसाहत केली, त्या ठिकाणाला डोणीपूर अर्थात होडीचे नगर असे नाव पडले

या दतकथेवरून त्याचा नौकानयनाशी सबध कळतो एका काळी ही जमात खरोखरच दर्यावर्दीपणात प्रभुत्व मिळवून राहिली होती त्या सामर्थ्याच्या बळावर तिने इतर काही जातीवरही आपला अमल बसवला होता या जमातीत अदीय रासेन नावाचा राजवशही निर्माण झाला होता

पार्वती ही आपल्याच वशात उत्पन्न झाली, अशी कथा ते पुढीलप्रमाणे सागतात – परवनाचा राजा त्र्यबक व त्याची पत्नी वरुणवल्ली यानी सतानप्राप्तीसाठी तप केले तेव्हा पार्वतीने प्रसन्न होऊन त्याना वर दिला, की 'मी कन्या म्हणून तुमच्या पोटी येईन ' त्याप्रमाणे ती आली तीरिसेर मर्देते असं त्यानी तिचे नाव ठेवले पुढे पार्वतीचा पुत्र कार्तिकेय याने मोठ्या माशाचे रूप घेतले आणि तो समुद्रात परवनाच्या मच्छीमारी होडग्यावर हल्ले करू लागला त्याच्या नाशासाठी त्र्यबक राजाने असे जाहीर केले, की जो इसम हा मासा पकडील, त्याला मी माझी कन्या देईन ' तेव्हा शिवाने एका परवनाचे रूप घेऊन तो मासा पकडला आणि मग त्र्यबक राजाने आपली कन्या (पार्वती) त्याला दिली

महाभारतातील मत्स्यगधा हाही आपल्याच वशातील आहे, असे ते सागतात – ती परवनांच्या राजाला यमुनेच्या तीरावर एका माशाच्या पोटात सापडली त्याने तिचे नाव मच्छकिंदी असे ठेवले पुढे तिचे शतनू राजाशी लग्न झाले

**शाखाभेद** – परवनांच्या तीन मुख्य शाखा आहेत – तमिळ परवन, मलयाळम परवन आणि कानडा परवन तमिळ परवन या मूळ जमातीपासून पुढील दोन शाखा निर्माण झाल्या असाव्या तमिळ परवनाची मुख्य वस्ती तुतिकोरिन येथे आहे हे बहुतेक सगळे ख्रिस्ती आहेत ते स्वत ला पांड्य राजघराण्याचे वशज मानीत असल्याने ब्राह्मण जातीकडेच अन्नव्यवहार करतात याचा मुख्य धदा समुद्रावर मच्छीमारी करण्याचा आहे मलयाळम परवन हे माडाचे शिपले काढण्याचा धदा करतात याशिवाय



परवन पुरुष

चुन्याच्या भट्ट्या लावणे आणि पैलवानी करणे, हाही त्याच्या व्यवसायाचाच एक भाग आहे त्याच्या स्त्रिया सुइणीचे काम करतात कानडी परवन छत्र्या करण्याचा, तसेच भुताखेताची सोंगे घेऊन गाण्यानाचण्याचा धदा करतात

इ स १५३२ साली मुसलमानांच्या छळापासून स्वत ची सुटका करून घेण्यासाठी परवनानी पोर्तुगिजाची मदत घेतली, तेव्हा त्यांना ख्रिस्ती धर्म स्वीकारावा लागला या बाटलेल्या परवनाना कामोरिन ख्रिस्ती म्हणतात [ का ट्रा स इ ]

## परवीवर

पजाबातील एक जमात परव = पक्षी किंवा झोपडी, या शब्दावरून याना हे नाव मिळाले आहे हे लोक गवताच्या झोपडीत राहतात अमृतसर, मुलतान, गुजरात व मुख्यत्वे सियालकोट या भागात त्यांची वस्ती आहे शिकार हा याचा परपरागत व्यवसाय आहे याच्यात गुन्हेगारी वृत्ती फार आढळते तिला आळा घालण्यासाठी सरकारने मुद्दाम त्याना शेतीसाठी जमिनी दिल्या, पण तरीही त्याना शेतीवर स्थायिक होणे आवडले नाही त्यामुळेच याच्यात स्थायिक लोकाचे प्रमाण

अत्यल्प आहे बहुतेक सव जमात अजून भटकीच राहिली आहे अलिकडे याच्यातील बरेच लोक भाजी विकतात व फरीवाल्या चाही धदा करतात त्यामुळे परवीवाला म्हणजे भाजीवाला असा त्या शब्दाला अर्थ आला आहे [प का]

## परशराम शाहीर

(१७५४-१८४४ इ स) एक प्रसिद्ध महाराष्ट्रीय शाहीर नाशिक जिल्ह्यातील सिन्नर तालुक्यातील वावी हे त्याचे गाव होत लहानपणापासून याला रामविजय वगैरे पौराणिक ग्रथ आणि पुढे पुढे ज्ञानेश्वरीसारखे आध्यात्मिक ग्रथ वाचण्याचा नाद लागला देवपुरकरबाबा नावाचा एक सत्पुरुष परशरामाचा गुरू होता त्याच्याच प्रेरणेने पुढे परशरामाचे मन कवितकडे वळले

आपल्या गावच्या व इतर ठिकाणच्या दैवताच्या वर्णनपर, तसेच भारत-भागवतातील कथानकावरही परशरामाची कवने आहेत मल्हारराव होळकर, खडेराव महाराज, फत्तेसिंग गायकवाड वगैरे पेशवेकालीन राजकारणी पुरुषावरही याने पोवाडे रचिले आहेत

परशराम हा सात्त्विक वृत्तीचा शाहीर होता हा लावण्या रचून त्या तमाशात म्हणून दाखवी पण त्यापासून कमाईची विशेष अपेक्षा बाळगीत नसे तो तमाशा नाचवीत मुलुखभर हिंडला पण त्याने आपला पिढीजात शिप्याचा धदा कधीही सोडला नाही तो मोठा नि स्पृह व विरक्त वृत्तीचा होता एकदा त्रिबकजी डेंगळ्यानी त्याचा तमाशा मुद्दाम बोलावून कोपरगावी श्रीमत पशवे सरकाराचा मुक्काम असता तिथे त्याची हजेरी लावली ता तमाशा पाहून श्रीमताची मर्जी खूष झाली व ते त्याला काही बक्षिसी देण्यास प्रवृत्त झाले पण परशरामाने ती बक्षिसी घेतली नाही तो म्हणाला 'माझ्या सुईदोऱ्याला ह्यात असू द्या' त्या प्रसगी त्याने एक कवन करून म्हटले, ते असे–

**पोट भराया उभारिला ना तमाशाचा धदा।**
**महाल मोकासे जहगी वळसे करतिल अपुला बदा।**
**रुची मनाची गायन करुना आळवावे गोविदा।**
**चनीखातर आम्ही राया पडतो नाही या फदा।**
**कम आमुचे हरिगुण गावे नाम न विक्री परिसा।**
**सुई दोऱ्याला ह्यात असो द्या तोचि इनाम मोकासा।**
**निज कर्मी रत नर झाल्यावर काय उणा मग त्या पसा।**

पुढे बडोदे, इदूर, ग्वाल्हेर या सस्थानात तमासगिरी करून त्याने खूप प्रसिद्धी मिळविली

देशस्थितीवर त्याने तीन पोवाडे रचले आहेत त्यावरून पेशवेकालीन व अव्वल इंग्रजीतल्या समाजस्थितीचे हुबेहूब चित्र डोळ्यापुढे उभे राहत त्यातील काही चरण असे–

**सकट मोठे। युगांत आलासे वाटे। आचरण खोटे॥ ध्रु॥**
**बुडाला धम। हारपले नाणे। विसरले सत्कर्माचे भाणे।**
**नगरी दिसती उदासवाणे। शूर सरदार होऊन दिनवाणे।**
**पुत्र पित्याला क्रोधे ताडी। कथा कीर्तनाची लागेना गोडी।**
**ऐके इफगाण्याची झोडी। नीच हीन जातीचा जोडी।**

*सवर्ण सजतीचे झगडे, दोन बायकाच्या दादल्याची फजिती, शेंदाड शिपायाची लढाई, इ अनेक चित्रे त्यान आपल्या कवनातून रगविली आहेत*

परशरामाच्या पुष्कळ लावण्या द्व्यर्थी आहेत त्यातला वरवरचा अर्थ शृगारिक व आतला आध्यात्मिक असतो त्याचे एक उदाहरण असे–

**माहेरी माझे चित्तमन रमले सासरचा न लगे वारा।**
**वहा शिवळव्या करीन परतु एक लग्नाचा नको नवरा॥**

यातील बोलणारी 'मी' ही बुद्धी असून, प्रपच हे तिचे सासर व भगवताचे पाय हे तिचे माहेर आहे याच अनुरोधाने त्या कवनाचा सगळा आध्यात्मिक अर्थ लावता येतो

आपल्या शेवटच्या दुखण्यात त्याने आसपासच्या सव शाहिराना बोलावून आणून जलसा करविला व आपणही शेवटची लावणी म्हटली नतर 'उदईक आम्ही मरणार तरी आमच्या पुढे नाच्या पाऱ्यावर साज घालून तुम्ही चालावे' असे त्याने जमलेल्या शाहिराना सागितले त्याप्रमाणे दुसऱ्या दिवशी त्याच्या निधनानतर त्याची ही अखरची इच्छा पूर्ण करण्यात आली [म सा, त क त शा, म च को, ला ना प]

## परशुराम

(१) जमदग्नी व रेणुका याचा पुत्र दशावतार कल्पनेत याला सहावा अवतार मानले आहे राम-कृष्ण याची अवतारकृत्ये इतिहास पुराणातून विस्तृत प्रमाणावर आढळतात मत्स्य, कूर्म, वराह नरसिंह व वामन याच्या नावावर एकेक पुराण आहे, पण परशुरामाला मात्र पुराण नाही त्याच्या कथा राम कृष्णापेक्षा कमी, पण त्याच्या पूर्वीच्या अवतारापेक्षा जास्त आहेत त्या रामायण महाभारतातून व पुराणातून आलल्या आहेत भिन्न भिन्न पुराणातून परशुरामाविषयी जे काही लिहिलेले आहे ते एकत्र सगतवार माडल्यास परशुरामाचे चरित्र कळून यते, ते असे –

भृगुकुलोत्पन्न जमदग्नीचा आश्रम नर्मदेच्या तीरावर होता तिथे एकाणिसाव्या त्रेतायुगात व महाभारतमते त्रेता व द्वापर याच्या सधिकालात परशुरामाचा जन्म झाला वैशाख शुद्ध तृतीया ही त्याची जन्मतिथी होय त्याची आई रेणुका ही क्षत्रियकन्या होती पितसावर्ण्यामुळे तो ब्राह्मण ठरला त्याच्या

आजाचे नाव ऋचीक असे होते विश्वामित्राच्या सत्यवती नामक बहिणीशी ऋचीकाने विवाह केला होता म्हणजे परशुरामाचा आजा ब्राह्मण व आजी क्षत्रिय होती परशुरामाला रुमण्वत सुषेण, वसू व विश्वावसू असे चौघे भाऊ होते परशुराम हा सर्वांत धाकटा होय पण या धाकट्याच्या हातूनच महान अघटित कृत्य झाली

परशुराम हा तल्लख बुद्धीचा होता उपनयनानंतर शालग्राम पर्वतावर जाऊन त्याने कश्यपाकडून मंत्रोपदेश घेतला थोड्याच कालात याने सर्व विद्यांचे अध्ययन केले त्यातल्या त्यात धनुर्विद्येवर त्याची मोठी भक्ती होती त्याने गंधमादन पर्वतावर तप करून शिवाला प्रसन्न करून घेतले व त्याच्याकडून धनुर्विद्या मिळविली त्याविषयीचा एक श्लोक असा –

> **शिवो भार्गवरामाय धनुर्विद्यामदात् पुरा ।**
> **पारम्पर्येण शिष्याणां तेन लोके प्रचारिता ।।**
> (शिवधनुर्वेद १३)

अर्थ – पूर्वी शिवाने भार्गवरामाला धनुर्विद्या दिली व भार्गवरामाने ती विद्या शिष्यपरंपरेने लोकात प्रचारली

शिवाकडून त्याला अनेक अस्त्रेही प्राप्त झाली परशुरामाला ब्राह्म, वैष्णव, रौद्र, आग्नेय, वासव नैर्ऋत इ एक्केचाळीस अस्त्रे शंकराकडून मिळाली त्याचा प्रसिद्ध परशूही त्याने शंकराकडूनच मिळविला

परशुराम कसा दिसत असे त्याचे वर्णन वाल्मीकी रामायण व हरिवंश या ग्रंथात केले आहे, ते असे –

> **ददर्श भीमसङ्काशं जटामण्डलधारिणम् ।**
> **भार्गवं जामदग्न्यं राजा राजविमर्दनम् ।।**
> **कैलासमिव दुर्धर्षं कालाग्निमिव दुःसहम् ।**
> **ज्वलन्तमिव तेजोभिर्दुर्निरीक्ष्यं पृथग्जनैः ।।**
> **स्कन्धे चासज्य परशुं धनुर्विद्युद्गणोपमम् ।**
> **प्रगृह्य शरमुग्रं च त्रिपुरघ्नं यथा शिवम् ।।**
> (वा रा बाल ७४ १७–१९)

भावार्थ – भयंकर जटावल्कलधारी आणि राजांचे मर्दन करणारा असा भार्गवकुलोत्पन्न जमदग्निपुत्र परशुराम दशरथ राजाने पाहिला तो कैलासाप्रमाणे अपराजित होता प्रलयकालीन अग्नीप्रमाणे दुःसह होता तो तेजाने तापत असल्यामुळे सामान्य जनांना त्याच्याकडे पाहणे अशक्य होते त्याच्या खांद्यावर परशू होता व जणू विजेच्या लोळासारखे धनुष्यही होते त्याच्या हातात तीक्ष्ण असा बाण होता त्रिपुरांतक शिवासारखा तो दिसत असे

> **असावसक्तपरशुं जटावल्कलधारिणम् ।**
> **गौरमग्निशिखाकारं तेजसा भास्करोपमम् ।।**
> **क्षत्रान्तकरमक्षोभ्यं वपुष्मन्तमिवार्णवम् ।**
> (हरि २ ३९ २१–२२)

भावार्थ – खांद्यावर परशू घेतलेला जटावल्कलधारी, अग्निज्वालेसारखा तांबूस गोरा, सूर्यासारखा तेजस्वी, क्षत्रियांचा अंतक, कोणाकडूनही क्षुब्ध न होणारा आणि जणू देहधारी सागरच (असा परशुराम श्रीकृष्ण व बलराम यांना एका वट वृक्षातळी दिसला)

एकदा परशुरामाची आई रेणुका ही एका सरोवरावर (किंवा नदीवर) पाणी आणायला गेली होती त्याच वेळी तिथे चित्ररथ गंधर्व आपल्या स्त्रियांसह जलविहार करायला आला होता त्याचे रूप आणि त्याचा तो विलास पाहून रेणुकेचे मन थोडेसे बावरले ती थोडा वेळ तो जलविहार पाहत राहिली थोड्याच वेळात भानावर येऊन तिने पाण्याची घागर भरून घेतली आणि ती लगबगीने आश्रमात परत आली पण तिच्या मनाची विचलता जमदग्नीला अंतर्ज्ञानाने आधीच कळली होती त्यामुळे त्याने तिला ठार करायचे ठरवले त्याने एकामागून एक आपल्या चारही मुलांना रेणुकेच्या वधाची आज्ञा केली पण त्यांपैकी कोणीच त्या कामासाठी आपला हात उचलला नाही परशुरामाने मात्र बापाची आज्ञा पाळली आणि मातेचा वध केला त्याचा तो आज्ञाधारकपणा पाहून जमदग्नी प्रसन्न झाला त्याने 'वर माग' म्हणताच परशुरामाने आईला जिवंत करण्याचा वर मागितला आणि जमदग्नीने त्याप्रमाणे रेणुकेला पुनश्च सजीव केले

*जमदग्नीच्या समकाली नर्मदेच्या उत्तर तीरावर एक विख्यात* पुरुष जन्माला आला होता, त्याचे नाव कार्तवीर्य तो हैहय कुलातला होता, म्हणून त्याला हैहय म्हणत व त्याला सहस्र बाहू होते, म्हणून सहस्रार्जुन असेही म्हणत तो भारतातील पहिला सम्राट होय (वायू पु ९४ ९ २०, हरिवंश १ ३३) त्याच्या फार *किर्दीत हैहयांचे साम्राज्य नर्मदेच्या मुखापासून हिमालयाच्या* पायथ्यापर्यंत पसरले होते

या साम्राज्यसत्तेचा कार्तवीर्याला लवकरच मद चढला तो देव–ब्राह्मणांना जुमानीनासा झाला एके दिवशी वसिष्ठाच्या आश्रमात येऊन त्याने तो आश्रम नाहक जाळून टाकला त्या वेळी वसिष्ठाने त्याला शाप दिला, की 'भार्गवकुलोत्पन्न परशुराम तुझे सहस्र बाहू तोडून तुझा वध करील ' तो शाप एकल्यावर त्याला वाटले, की भार्गवाच्या सामर्थ्याचा एकदा अंदाज तरी घ्यावा म्हणून तो जमदग्नीच्या आश्रमात आला त्याने जमदग्नीचा सवत्स कामधेनू जबरदस्तीने पळवून नेली परशुराम त्या वेळी आश्रमात नव्हता तो परत आल्यावर त्याला ती सर्व हकीकत समजली त्याच वेळी त्याने कार्तवीर्याच्या वधाची

प्रतिज्ञा केली पण जमदग्नीला ते आवडले नाही त्याने परशुरामाला त्या गोष्टीपासून परावृत्त करण्याचा प्रयत्न केला, पण परशुराम ऐकेना त्यावर जमदग्नीने त्याला ब्रह्मदेवाची अनुज्ञा घ्यायला सांगितले तो ब्रह्मदेवाकडे गेला ब्रह्मदेव म्हणाला, की तू शंकराची आज्ञा घे शंकराने त्याला तशी आज्ञा दिली मग त्याने नर्मदेच्या तीरावर येऊन कार्तवीर्याला युद्धाचे आव्हान दिले थोड्याच वेळात कार्तवीर्य व परशुराम यांचे द्वंद्वयुद्ध जुंपले त्या युद्धात परशुरामाने प्रथम त्याचे सहस्र बाहू तोडले व शेवटी त्याला ठार केले



परशुराम – एक सांकेतिक चित्र

त्याबरोबर कार्तवीर्याचे अनेक पुत्र परशुरामावर धावून आले त्याने त्यांचाही समाचार घेतला त्या युद्धात कार्तवीर्याचे पाच पुत्र जीव वाचवण्यासाठी रणांगणातून पळाले आणि हिमालयाच्या कुशीत जाऊन लपले विजय संपादून व कामधेनू घेऊन परशुराम आश्रमात परत आला पण या विजयाबद्दल जमदग्नीने त्याचे अभिनंदन न करता त्याला क्षत्रवधाच्या दोषाबद्दल बारा वर्षे तीर्थयात्रेस पाठवले त्याप्रमाणे त्याने प्रथम तीर्थयात्रा केली व नंतर महेंद्रगिरीवर बसून तप आरंभिले

परशुराम दूर जाऊन तपाला बसला आहे, ही बातमी कळताच सहस्रार्जुनाच्या वधाचा सूड घेण्यासाठी हैहयांनी जमदग्नीच्या आश्रमावर धाड घातली जमदग्नी त्या वेळी ध्यानस्थ होता तशा स्थितीतच त्याचा वध करून आणि त्याचे शिर तोडून घेऊन हैहय माहिष्मतीकडे निघून गेले

ही बातमी वायुवेगाने सर्वत्र पसरली ती परशुरामाच्याही कानावर गेली तो तप सोडून आश्रमाकडे त्वरेने आला तिथले ते क्रूर आणि अमानुष दृश्य पाहून त्याचे डोळे क्रोधाने लाल झाले जमदग्नीच्या मृत देहावर बाणांच्या एकवीस जखमा झाल्या होत्या त्या पाहून त्याने त्याच क्षणी एक घोर प्रतिज्ञा केली, की "हैहयांनी व त्यांच्या सहकारी क्षत्रियाधमांनी केलेल्या या क्रूर ब्रह्मवधाबद्दल त्यांना शिक्षा म्हणून मी २१ वेळा पृथ्वी निःक्षत्रिय करीन !"

मग तो कावडीच्या एका पारड्यात जमदग्नीचे प्रेत व दुसऱ्या पारड्यात माता रेणुका यांना बसवून आश्रमातून बाहेर पडला तो अनेक तीर्थे, क्षेत्रे व अरण्ये हिंडला क्षत्रियांच्या या अधम कृत्याचा तो रक्तरंजित पुरावा त्याने ठिकठिकाणच्या ब्रह्मसमुदायाला व इतर लोकांनाही दाखविला फिरत फिरत तो सह्याद्रीवरील माहूर क्षेत्रात प्राप्त झाला तिथे थोडा वेळ विश्रांती घेऊन तो पुढे निघणार, एवढ्यात आकाशवाणी झाली, की 'तू इथेच पित्याचा अग्निसंस्कार कर ' मग परशुरामाने तिथे जमदग्नीच्या प्रेताला मंत्राग्नी दिला रेणुका त्या प्रसंगी सती गेली (रेणुकामाहात्म्य)

आता परशुराम आपली प्रतिज्ञा पुरी करायला मोकळा झाला त्याने प्रथम माहिष्मतीवर जोरदार हल्ला चढवला सहस्रार्जुनाचे सारे पुत्र युद्धासाठी धावून आले, पण त्याने सर्वांनाच कंठस्नान घातले त्या युद्धात सर्व हैहयांचा व त्यांच्या सामंत मांडलिकांचाही संहार झाला अशा प्रकारे अत्याचारी क्षत्रियांचा निःपात करून त्याने आपले शस्त्र खाली ठेवले मग तो तपश्चर्येसाठी महेंद्रगिरीवर निघून गेला

कदाचित हे प्रकरण इथेच संपले असते पण काही वर्षांनी क्षत्रियांनीच त्याला पुनश्च डिवचले व मग पुन्हा तो परशु उभारून उठला माजलेल्या क्षत्रियांचा समाचार घ्यावा, युद्ध संपवावे, तपासाठी महेंद्र पर्वत गाठावा आणि पुन्हा दुष्ट क्षत्रिय माजले, की पुन्हा त्यांचा संहार करावा, असा त्याचा क्रम ठरून गेला अशा २१ मोहिमा परशुरामाने केल्या त्याचे पहिले युद्ध हैहय कुळापुरतेच मर्यादित होते पण पुढे त्याने युद्धाची व्याप्ती वाढविली दुर्मद शत्रूंचा संहार करीत तो थेट हिमालयाच्या पायथ्याला जाऊन भिडला अंग, वंग, कलिंग, विदेह, काश्मीर, दरद, कुंती, शिबी, क्षुद्रक, ताम्रलिप्ती, वीतिहोत्र, त्रिगर्त, मालव, इ अनेक देशांच्या उन्मत्त राजांचा त्याने संहार केला त्याने शेवटचे युद्ध केले ते समंतपंचकावर तिथे त्याने क्षत्रिय रक्ताच्या डोहात आपला परशू धुतला व शस्त्र खाली ठेवले

या क्षत्रियविजयामुळे समुद्रवलयांकित पृथ्वी त्याच्या सत्तेखाली आली होती त्यामुळेच त्याला अश्वमेधाचाही अधिकार

प्राप्त झाला होता म्हणून त्याने प्रथम सर्व तीर्थांचे स्नान व जिंकलेल्या पृथ्वीची तीनदा प्रदक्षिणा करून मग यज्ञाचा उपक्रम केला त्या यज्ञात कश्यप अध्वर्यू होता त्या यज्ञाची वेदी सुवर्णाची होती व ती दहा वावे लांब आणि नऊ वाव उंच होती यज्ञाच्या अखेरीस दक्षिणा म्हणून रणयज्ञात संपादिलेल्या समस्त भूमीचे परशुरामाने कश्यपाच्या हातावर दानोदक सोडले ब्राह्मणाने ब्राह्मणाला दिलेले भारताच्या इतिहासातले हे पहिले आणि शेवटचेच महादान होय यामुळे क्षणापूर्वीचा पृथ्वीपती दुसऱ्याच क्षणाला अकिंचन ठरला भूमीशी त्याला काही कर्तव्य नव्हते दुष्ट, दुर्मद क्षत्रियावर दंड धरता धरता पृथ्वी त्याच्या पायाशी लोळण घेऊन आली होती पण त्याला तिचे ओझे झाले होते साम्राज्याच्या भवचक्रात त्याला गळा अडकवायचा नव्हता आणि म्हणूनच ना घाईघाईने आपल्या स्वामित्वाचा त्याग करून मोकळा झाला

पण पृथ्वीचे दान घेऊनही कश्यपालासुद्धा राज्य करायचे नव्हते त्याने विचार केला, की केवळ धर्मनिरोधाने पृथ्वीचे पालन होऊ शकणार नाही त्यासाठी दंडधारी क्षत्रियांचीच गरज आहे म्हणून मग त्याने क्षत्रियांचे संशोधन सुरू केले परशुरामाने संहार करूनही काही क्षत्रिय कुले समूळ नष्ट झाली नव्हती कित्येक क्षत्रिय परशुरामाच्या भयाने नामांतर व स्थलांतर करून अज्ञातवासात राहिले होते त्यांपैकी कित्येकांनी हलके धंदे सुरू केले होते, तर कित्येक हलक्या लोकांच्या सहवासात राहिले होते कश्यपाने त्यांना हुडकून काढले आणि राज्य करण्याविषयी सांगितले पण त्यांपैकी कोणीच उघड होण्यास व राज्यकारभार शिरावर घेण्यास तयार होईना, इतकी त्यांनी परशुरामाची धास्ती घेतली होती त्यावरून कश्यपाला जाणवले ते हे, की जोवर परशुराम या भूमीत आहे, तोवर क्षत्रिय कुळ पुनश्च ऊर्जित दशेला येणार नाहीत म्हणून मग त्याने परशुरामाला सांगितले, की ' यज्ञात दान मिळाल्यामुळे पृथ्वी माझी झाली आहे म्हणून याउपर तुला या भूमीवर राहण्याचाही अधिकार राहिला नाही '

कश्यपाची ती आज्ञा परशुरामाने मानली व तो आर्यावर्तातून निघून महेंद्रगिरीवर वास्तव्याला गेला नंतर कश्यपाने जागोजाग क्षत्रिय कुळांची स्थापना केली मूळची त्यांची त्यांची राज्ये त्यांना त्यांना देऊन टाकली आणि विस्कळित झालेली समाजाची घडी पुनश्च बसविली

पुढे एकदा दाशरथी रामाची कीर्ती ऐकून त्याच्या पराक्रमाची परीक्षा पाहण्यासाठी परशुराम रामाच्या वाटेत आडवा आला त्याने आपल्याजवळचे धनुष्य रामापुढे केले व ते वाकवून त्याला बाण लावण्यास सांगितले रामाने तसे केले आणि जो बाण सोडला, त्या बाणाने त्याने परशुरामाची काश्यपी भूमीवरची गती त्याच्याच सांगण्याप्रमाणे निरुद्ध केली त्या वेळी परशुरामाने ते धनुष्य रामाला देऊन टाकले या धनुर्दानाच्या निमित्ताने परशुरामाने आपले तेज रामाच्या ठिकाणी संक्रांत केले धनुष्याशी संबंधित असलेले किंवा धनुष्याने व्यक्त होऊ शकणारे असे ते क्षात्रतेज होते

त्यानंतर क्षत्रियवधाची कल्पनाही मनात न आणता ब्राह्मण व क्षत्रिय या दोघांनाही परशुराम सारख्याच औदार्याने अस्त्रविद्या शिकवू लागला द्रोणाचार्य, भीष्माचार्य आणि कर्ण हे महाभारतातले श्रेष्ठ धनुर्धर परशुरामाजवळ अस्त्रविद्या शिकले

महेंद्रगिरीवर राहत असता परशुरामाने समुद्र हटवून स्वतःचे परशुरामक्षेत्र निर्माण केले वैतरणेपासून कन्याकुमारीपर्यंतच्या प्रदेशाला मध्ययुगीन ग्रंथांत परशुरामक्षेत्र ही संज्ञा दिलेली आढळते सह्याद्रीच्या शिखरावरून परशू फेकून परशुरामाने शूर्पारक प्रदेश निर्माण केला किंवा परशुरामाची विनंती सागराने अमान्य केल्यामुळे परशुराम खवळला आणि त्याने बाण मारून समुद्र मागे हटवला व ८०० योजने लांबीचा शूर्पारक प्रदेश निर्माण केला, अशा दोन्ही प्रकारच्या कथा आढळतात त्याने महेंद्रगिरीवरून परशू भिरकावला, तो कन्याकुमारीनजीक समुद्रात पडला आणि त्यामुळे केरळ प्रांत निर्माण झाला, अशी कथा केरलोत्पत्ती या ग्रंथात आहे सह्याद्रीच्या दक्षिण भागात तिरुवितांकूरमध्ये महेंद्रगिरी नावाचे हे उंच शिखर आहे

क्षत्रियवधाची प्रतिज्ञा पुरी केल्यावर परशुरामाने कृतकृत्यतेचे समाधान मानून म्हटले ' यापुढे ब्रह्मवेत्त्या ब्राह्मणावर आक्रमण झाले, तरच त्याच्या संरक्षणासाठी मी शस्त्र धरीन, अन्यथा नाही '

पण परशुरामाला ही आपली प्रतिज्ञा एका स्त्रीच्या प्रकरणात मोडावी लागली अंबा हे त्या स्त्रीचे नाव अंबिका व अंबालिका अशा आणखी तिच्या दोन बहिणी होत्या त्या तिघी काशिराजाच्या कन्या होत्या त्याने त्या तिघींचेही स्वयंवर मांडले होते त्या स्वयंवरात भीष्म गेला आणि त्याने विचित्रवीर्यासाठी त्या तीन्ही मुलींना पळवून आणले पण अंबेने भीष्माला सांगितले, की ' माझे प्रेम शाल्वावर जडले आहे, तेव्हा मी विचित्रवीर्याशी लग्न करू शकत नाही ' हे ऐकून भीष्माने तिला सोडून दिले अंबा मग शाल्वाकडे गेली शाल्व तिला म्हणाला की ' तू भीष्माच्या स्पर्शाने दूषित झाली आहेस तेव्हा मी तुझ्याशी लग्न करणार नाही ' अशा प्रकारे तिला दोहीकडून धक्का मिळाला मग तिने भीष्माचा सूड घ्यायचे ठरवले आणि परशुरामाकडे जाऊन आपले गाऱ्हाणे त्याला

सांगितले. परशुराम म्हणाला की ' मी भीष्माला तुझा स्वीकार करायला लावीन ' त्याप्रमाणे परशुरामाने भीष्माला भेटून त्याला 'अंबेचा स्वीकार कर' असे सांगितले. पण भीष्माची आमरण ब्रह्मचर्याची शपथ असल्याने त्याने ती गोष्ट नाकारली. मग परशुराम चिडला. त्याने भीष्माला युद्धाचे आव्हान दिले. त्या दोघांचे २३ दिवस अटीतटीचे युद्ध झाले. पण त्या युद्धात परशुरामाचा पराजय झाल्यामुळे 'जितोऽस्मि' अशी कबुली देऊन तो युद्धभूमीवरून निघून गेला.

जरासंधाने कृष्णकृत कंसवधाचा सूड घेण्यासाठी मथुरेवर १७ आक्रमणे केली. ही आक्रमणे कृष्ण बलरामाच्या नेतृत्वाने यादवांनी परतवून लावली असली, तरी त्यात मथुरेची बरीच दुर्दशा झाली. तशातच जरासंधाचे अठरावे आक्रमण झाले. आता मथुरेची धडगत नाही, असे जाणून जरासंधाचा रोख मथुरेकडून आपल्याकडे वळावा, अशा मुत्सद्दीपणाने राम कृष्णांनी पलायन आरंभले. पळून पळत ते दक्षिण दिशेकडे निघाले, येता येता करवीर नगरापाशी आले. तिथे वेणा नदीच्या तीरावर त्यांना परशुराम दिसला. कृष्णाने त्याला नमस्कार करून आपली सर्व हकीकत सांगितली व पुढच्या राजकारणाबद्दल सल्ला विचारला. त्या वेळी परशुरामाने त्यांना गोमंत पर्वतावर राहून जरासंधाशी दुर्गयुद्धाच्या पद्धतीने सामना देण्यास सांगितले.

**परशुरामाचा काल** – क्षत्रियसंहारासाठी परशुरामाने ज्या देशांत संचार केला, त्याच्या नामावळीत दक्षिणापथातल्या देशांची नावे आढळत नाहीत. त्याचा मुख्य पराक्रम नर्मदा प्रदेशात झाला व त्यापुढील पराक्रम उत्तर व पूर्व या दिशांना झाले. यावरून असे दिसून येते, की दक्षिणदेशात त्या वेळी आर्य संस्कृतीचा प्रसार झालेला नव्हता. नर्मदेच्या खाली क्षत्रिय राज्यसंस्थाही अस्तित्वात नव्हती. अर्थात ज्या काळी दक्षिणेत क्षत्रिय राज्यसंस्था अस्तित्वात न होती, अशा कोणत्यातरी काळी परशुराम झाला असला पाहिजे. डॉ. पुसाळकर हा काल साडेचार हजार वर्षांमागचा मानतात, तर प्रा. माटे यांच्या मते तो सात हजार वर्षांमागचा आहे. त्याची कारणे पुढीलप्रमाणे–

राम व कृष्ण यांच्या चरित्रात आर्य लोकांच्या चातुर्वर्ण्याचा चांगला मिलाफ झालेला दिसतो. आपला हा समाज चार वर्णांचा मिळून बनलेला आहे व आपण सर्व त्या समाजाचे अवयव आहो, ही कल्पना राम कृष्णकाळी दृढमूल झाली होती. समाजाची नैतिक बंधने व आर्थिक नियमन ही आपणा सर्वांना बंधनकारक आहेत, आपण सर्व परस्परावलंबी आहो, आणि त्यामुळे परस्परांच्या पोषणासाठी आपण सलोख्याने वागले पाहिजे, ही जाणीव तत्कालीन समाजाला होती. कृष्णावतारात भांडणे व लढाया पुष्कळच आहेत, पण त्या भिन्न भिन्न राजांमध्ये आहेत. एक वर्णाच्या वण दुसऱ्या एका वर्णाशी वैर मांडून झगडत, लढतो, असे तिथल्या युद्धावरून दिसत नाही. याचा अर्थ त्या काळी आर्य लोक आपले जमात हे स्वरूप सोडून सामुदायिक जीवितांच्या बळावर एक बलिष्ठ समाज बनवून बसले होते. पण परशुरामचरित्रातल्या लढाया ब्राह्मण व क्षत्रिय या दोन वर्णांत झालेल्या आहेत. त्या काळी हे दोन वर्ण एकमेकांशेजारी राहत असूनही आपले जमातरूप विसरले नव्हते आणि सलोख्याच्या भावनेने त्यांचा एकमेकांशी संपर्क आलेला नव्हता, असे दिसते. हा काल सामान्यतः सात हजार वर्षांपूर्वीचा असावा आणि तोच काल परशुरामाचा समजला पाहिजे.

**अवताररहस्य** – परशुरामाने क्षत्रियसंहार केला व तो सुमारे ७००० वर्षांपूर्वी होऊन गेला ही दोन विधाने एकत्र केली म्हणजे परशुरामाने क्षत्रियवधाचे काम का केले असावे, याची अंधुक कल्पना येते. ब्रह्म व क्षत्र या दोन जमाती कुठून तरी भारताच्या सप्तसिंधुप्रदेशात आल्या व शेजारी शेजारी पण जमातरूपानेच राहू लागल्या. या प्रदेशात माणसासाठी अन्न व गुरासाठी चारा विपुल मिळू लागल्याने त्यांच्यातले भटकेपण कमी होत गेले व त्यांच्या वसाहतींना हळूहळू कायम स्वरूप येऊ लागले. त्यामुळे जमात या स्वरूपातली त्यांची काही वैगुण्ये लोपली असली, तरी एकमेकांचे अपहरण हे वैगुण्य मात्र बराच काळ टिकून राहिले. दुसऱ्या जमातीची जीवनसाधनेच नव्हे, तर माणसेही पळवून आणायची व ती आपल्या समूहात पचवून, जिरवून टाकायची ही प्रवृत्ती आजही वन्य किंवा पहाडी अशा कित्येक जमातींच्या अंगी दिसते. तसे करण्यात आपण काही गुन्हा किंवा नैतिक अपराध करतो, असे त्यांना वाटतच नाही. ब्रह्म क्षत्रांच्या वैमनस्याचा प्रसंग या अपहरणबुद्धीतूनच घडला असावा, असे वाटते. क्षत्र जमातीने ब्रह्म जमातीवर केलेल्या वर्षानुवर्षांच्या अत्याचारामुळे ब्रह्म जमातीच्या हृदयात जी एक क्रोधाची आग धुमसत राहिली होती, तिचा ज्वालामय परिस्फोट म्हणजे परशुराम होय, असे म्हणता येते.

क्षत्रियांनी केलेला ब्राह्मणाच्या गायीचा अपहार हे परशुरामाच्या संहारकार्याचे कारण म्हणून पुराणे सांगतात. पण एवढ्या मोठ्या उत्पातपरंपरेला ते कारण अपुरे वाटते. कार्तवीर्याने केवळ गाय चोरावी आणि त्यातून या दोन वर्णांचे प्राणांतिक युद्ध उद्भवावे, हे असंभाव्य वाटते. खरे तर कार्तवीर्यासारख्या एका सम्राटाला एखाद्याची गाय चोरण्याची काय गरज होती ? जमदग्नीच्या गायीप्रमाणेच वसिष्ठाची गायही त्याने चोरली होती आणि त्याबद्दल वसिष्ठांचा शाप घेतला होता. पण केवळ गाय चोरल्यामुळे शांतिब्रह्म वसिष्ठ इतका खवळून शाप देण्यास प्रवृत्त झाला असेल, ही शक्यता कमी

वाटते यावरून असे अनुमान करावे लागते, की अपहृत केलेल्या त्या गायी नसून आश्रमीय स्त्रिया असल्या पाहिजेत ऋषीचा वध करणे, आश्रम जाळणे, गायी चोरणे, मुले पळवणे इ गोष्टी या मोठ्या अपहरणाच्या अनुषंगाने घडलेल्या गौण गोष्टी असाव्या या अनुमानाला ऋग्वेद आणि अथर्ववेद यामध्येही आधार मिळतो क्षत्रिय हे आपले जमात रूप ध्यानात ठेवून ब्राह्मण जमातीशी वागत होते व ब्राह्मणाचा अनेक प्रकारचा छळ त्यांच्या हातून होत होता, असे अथर्ववेदावरून चांगले ध्यानात येते ब्राह्मण स्त्रीचे अपहरण केल्यामुळे त्यांचे काय विपरीत परिणाम झाले, ते अथर्ववेदात (५ १७) सांगितले आहे, त्याचा सारांश असा–

ब्राह्मण स्त्री ही राज्य दग्ध करून टाकते तिचे अपहरण केल्याने ती भयंकर बनते सर्वत्र दुःख उत्पन्न करून ती अनेक आपत्तींना जन्म देते सत्य जाणणारे राजे अशा अपहृत स्त्रीला परत करतात सोमराजाने ब्राह्मणाची स्त्री प्रथम परत केली नंतर इतर अनेकांनी तसेच केले ज्यांनी तसे केले, ते ऊर्जित झाले ज्यांनी ते केले नाही, त्यांचे घर सुखी राहिले नाही त्यांचे गोठे, पाकगृहे, बागा, रथ, शनी, इ सर्वांचाच नाश झाला

त्यापुढच्या १८ व १९ या सूक्तात धेनुहरणाचे प्रकरण व परिणाम सांगितले आहेत ब्राह्मणाच्या छळाचा परिणाम सांगताना भृगुकुलाचे नाव स्पष्ट घेतले आहे अर्थात परशुरामही त्यात आलाच ब्राह्मणाला मऊ समजून जो मारतो, त्याची होळी होते ब्राह्मणाची हिंसा करणारा झिजून मरतो जे ब्राह्मणावर थुंकले त्यांना रक्तात बसावे लागले आणि ज्यांनी ब्राह्मणाची हिंसा केली त्यांनी आत्मनाशच करून घेतला

वरील तीनही सूक्ते ही ब्रह्म-क्षत्राच्या वैरामागे असलेल्या कारणाविषयी पुरेशी बोलकी आहेत

इथे दुसराही एक मुद्दा लक्षात घेण्याजोगा आहे एकट्या परशुरामाने हजारो क्षत्रियांशी युद्धे केली, यात गृहीत गोष्ट अशी, की परशुराम एकटाच लढला आणि क्षत्रियांच्या बाजूने मात्र लक्षावधी लोक लढले परशुरामाने एकट्याने लढून सर्वांना ठार करावे, हे मान्य करणे कठीण आहे यातून दोन कल्पना उद्भवतात पहिली अशी, की परशुरामाने मुख्य मुख्य क्षत्रिय वीरांशी द्वंद्वयुद्धे केली व त्यात त्या क्षत्रिय वीरांचा अंत होताच त्यांचे सर्व अनुयायी सैरावैरा पळून गेले दुसरी कल्पना अशी, की जर परशुराम मोठमोठ्या सैन्यांशी लढला असला, तर तो एकटा लढला नसला पाहिजे त्या कामी त्याला त्याच्या जमातीची किंवा त्याबरोबरच अन्यांचीही मदत असली पाहिजे एरवी एका माणसाने उठावे व एकट्याच्या सामर्थ्यावर एका जमातीला २१ वेळा धुळीला मिळवावे, हे खरे वाटत नाही

परशुरामाला असे साह्य कसे व कोणाचे मिळाले, याविषयी श्री स आ जोगळेकर यांनी पुढील विचार मांडले आहेत–

हैहय कुलातील कृतवीर्य व त्याचा पुत्र कार्तवीर्य या दोघांची आक्रमणे मुख्यत्वे उ भारतातील क्षत्रिय राज्यकर्त्यांना बाधली हैहयांच्या आक्रमणाचा प्रारंभ भद्रश्रेण्य याने केला त्याने हर्यश्व या क्षत्रियाच्याच ताब्यात असलेले काशीचे राज्य जिंकले हैहयांनी वैशालीच्या राजघराण्याशी संघर्ष केला होता व पराभवही खाल्ला होता त्यांनीच कान्यकुब्जाचा राजा गाधी याचे राज्य उद्ध्वस्त केले होते त्या गोष्टीचा सूड घेण्यासाठी गाधीने आपली कन्या सत्यवती ही ऋचीकाला म्हणजे परशुरामाच्या आजोबाला दिली होती कारण तो हैहयांचा वैरी आहे हे त्याला ठाऊक होते हैहयांच्या उपसर्गामुळेच विश्वामित्रानेही राज्यत्याग केला होता याच हैहयांनी वायव्य सरहद्दीकडील शक, कंबोज, यवन व पह्लव या लढाऊ जमातींची कुमक आणवून अयोध्येवर हल्ला केला होता आणि सूर्यवंशी क्षत्रिय राजा बाहु याचा पराभव केला होता याच बाहूने पुढे दक्षिणापथात येऊन भार्गवाश्रमात आश्रय घेतला तिथेच सगर नामक त्याचा दिग्विजयी पुत्र जन्मला भार्गवांनी म्हणजे ब्राह्मणांनी त्याचे लालनपालन केले और्व, च्यवन आणि वसिष्ठ यांनी त्याला शस्त्रास्त्रपारंगत केले त्यांच्याच प्रेरणेवरून सगराने हैहयांविरुद्ध उठावणी केली व अखेरीस हैहयसंघाचा धुव्वा उडवून अयोध्येचे राज्य परत मिळवले या पौराणिक संदर्भावरून असे वाटते, की परशुरामाला त्याच्या संहारकार्यात अयोध्या, काशी व वैशाली येथील राज्यकर्त्यांचे म्हणजेच क्षत्रियांचेही साहाय्य झाले असणे संभवनीय आहे ब्रह्म जमातीतले तरुण वीर तर त्याच्यामागे उभे होतेच, त्याशिवाय आसामपासून अपरान्तापर्यंतच्या नागांचे साहाय्यही त्याला मिळाले असण्याची शक्यता आहे

इतिहास-पुराणकारांनी परशुरामाचे कर्तृत्व एवढ्यापुरतेच मर्यादित ठेवले असते तर चांगले झाले असते त्यामुळे गैरसमजाला कमी वाव मिळाला असता खरे पाहू जाता परशुरामाने २१ वेळा पृथ्वी निःक्षत्रिय केली, हा केवळ वदतोव्याघातच आहे कोणत्याही अतिपराक्रमी पुरुषाच्या आवाक्यातली ही गोष्ट कधीही नव्हती व नाही वाल्मीकीने त्याला क्षत्रविमर्दन न म्हणता राजविमर्दन म्हटले आहे, तेही लक्षात घेतले पाहिजे त्यावरून असे म्हणता येते, की परशुरामाने सरसकट क्षत्रियांचा संहार न करता दुष्ट–दुर्जन अशा क्षत्रिय राजांचा संहार केला म्हणजे कृष्णावतारात कृष्णाने पांडवांना हाताशी धरून जे आणि ज्या प्रकारचे कार्य केले ते आणि त्याच प्रकारचे कार्य परशुरामाने आपल्या अवतारात केले वाल्मीकी रामायणात व रेणुकामाहात्म्यात अनेक ठिकाणी तसे स्पष्टच

म्हटले आहे (वा रा बालकांड ७, अयोध्याकांड ५, युद्धकांड १०, रेणुका ४० ७७)

परशुरामाने क्षत्रियसंहार केला, या घटनेमुळे वस्तुत सगळ्या क्षत्रिय जाती त्याच्या विरोधी असल्या पाहिजेत पण वस्तुस्थिती तशी नाही परशुरामाला दैवत मानणारी क्षत्रिय कुळे आजही आहेत हिमाचल प्रदेशातले राजपूत लोक त्या परिसरात परशुरामाचे राज्य आहे असे आजही मानतात चागरयात चागले पीक प्रथम परशुरामाला अर्पण करावे, ही श्रद्धा आजही त्या भागात आहे उ प्रदेशात मुजफराबादजवळ एक परशुराममंदिर असून, त्याच्या यात्रेसाठी तिकडील क्षत्रिय समाजही येत असतो लमाण लोक स्वत ला राजपूत समजतात त्याच्यातही परशुराम हे दैवत आहे ते समूहाने पायी प्रवास करीत महेंद्रगिरीवर परशुरामाच्या यात्रेला जातात अपरांत-भूमीत परशुरामाने अनेक क्षत्रिय कुळे आणून वसवली, त्याचे तर परशुराम हे कुळदैवतच आहे

आश्रमवासी ब्राह्मणानी अध्ययन, अध्यापन व तपश्चर्या करून संस्कृतिसंवर्धन करायचे नगरातल्या ब्राह्मणानी राजाचे व इतराचे पौरोहित्य करून राजाबरोबर राजकारणातही भाग घ्यायचा आणि क्षत्रियानी वरील उभयविध कार्य करणाऱ्या ब्राह्मणाचे संरक्षण व संगोपन करायचे, अशी शिस्त प्राचीन आर्य समाजात पाळली जात असे ऐतरेय ब्राह्मणाच्या ८ व्या पंचिकेत या शिस्तीचे विवेचन व समर्थन केलेले आहे व्याव-हारिक दृष्ट्या वेदशास्त्र धारण करणारे ब्राह्मण दुबळ, कारण ते अल्पसंख्य, एकाकी व धनाने कमजोर शस्त्रधारी क्षत्रिय प्रबळ, कारण ते बहुसंख्य, संघटित व संपन्न शास्त्र व शस्त्र याच्या योजनापूर्वक सहकार्याने आणि समतोल संगोपनाने संस्कृतीचे संवर्धन होते, असा समाजशास्त्राचा सिद्धांत आहे परशुरामाच्या काळात वरील दोन शक्तीचा तोल बिघडला होता *तो बिघडलेला तोल सावरण्याचे काम परशुरामाने केले* तसेच ब्रह्म क्षत्रांनी मिळून समाजाचा उत्कर्ष साधला पाहिजे, ही जाणीवही परशुरामामुळेच निर्माण झाली परशुरामाच्या अवतारकृत्याचा हा थोडक्यात निष्कर्ष आहे

**परशुराम व जाती-जमाती** – भारतातील अनेक ब्राह्मण जाती परशुरामाशी आपला संबध दाखवतात गुजरातेतील भार्गव ब्राह्मण आपण भृगू वंशातले आहो, असे सागतात महाराष्ट्रातले चित्पावन व सारस्वत ब्राह्मण आपणास परशुरामाने कोकणात आणून वसवले, असे सागतात केरलोत्पत्ती नामक ग्रंथात सागि-तले आहे, की परशुरामाने आठ गोत्राचे ब्राह्मण व अठरा क्षत्रिय सोमवंशी सामत याची कुळे समतपंचकाहून आणवली व केरळात वसवली परिश्रमपूर्वक शेती करण्याकडे लोकानी प्रवृत्त व्हावे, म्हणून त्याने सुवर्णाचे छोटे छोटे टाक पाडवले आणि ते केरळाच्या शेतजमिनीत विखरून टाकले, अशी कथा आहे अद्यापि तिथल्या शेतातून सू म सुवर्णमुद्रा सापडतात हे सुवर्ण परशुरामाने रिमयेमारख्या पद्धतीने तयार केले असावे आणि ते शास्त्र त्याला शिवाने शिकवले असावे असे सुवर्णतंत्रम् या ग्रंथातील ईश्वर परशुरामसंवादावरून दिसून येते परशु-राम हा वर्णनिर्माता होता यज्ञकर्म करायला ब्राह्मण मिळेनात, म्हणून त्याने तुळु प्रांतातल्या कोळ्याना ब्राह्मण्य दिले, अशी कथा परशुरामसाष्टिकथे या कन्नड पुराणात दिलेली आहे पश्चिम किनाऱ्यावरच्या बहुतेक सर्व जाती जमाती या ना त्या प्रकारे परशुरामाशी आपला संबध जोडतात व त्याला भजतात

निरनिराळ्या जातीचे इतिहास वाचले असता असे आढळून येते, की त्यातील कित्येक जाती परशुरामाच्या क्षत्रियसंहाराशी आपला इतिहास निगडित असल्याचे सागतात त्याचे मुख्य म्हणणे असे असते, की आपण मुळात क्षत्रियच होतो, परंतु परशुरामाच्या भयाने क्षत्रियत्व टाकून देऊन आपण अन्य व्यव-साय पत्करला व त्यामुळे आपल्याला वैश्यपण किंवा शूद्रपण प्राप्त झाले असे सागणाऱ्या या जाती हटगार, भाटिये, आग्री, भिस्ती, दर्जी गोल, गोधळी, निळारी, खारवे, शिंपी, वंजे, इ अनेक आहेत कदाचित त्या सत्य सागत असतील पण परशु-रामाच्या भयामुळे अर्थार्जनाचा व्यवसाय बदलला हे त्याचे सागणे मात्र बरोबर नाही लोकसंख्येचा वाढ झाली, की एका कुळातल्या सर्वांना वंशपरपरेने एकच एक व्यवसाय करणे शक्य होत नाही शिवाय माणसे आवडीप्रमाणे व गरजेप्रमाणेही नवे आणि निराळे व्यवसाय पत्करतात त्यातून पोटाला मिळते असे सिद्ध झाल्यावर पुढील अनेक पिढ्या तोच व्यवसाय चालू ठेव-तात ही सामाजिक वस्तुस्थिती लक्षात घेता परशुराम झाला नसता तरी सर्वच क्षत्रियाना केवळ तलवारीवर वंशपरपरेने *जगणे शक्य झाले नसते त्याना प्रवृत्ती किंवा कुवत याना अनु*सरून वेगवेगळे व्यवसाय पत्करावेच लागले असते

परशुराम हा सप्त चिरजीवात गणला जातो, अशी कल्पना आहे पण मन्वतराच्या वेळी तो आपल्या देहाचे विसर्जन कर-णार आहे, असे महाभारतात सागितले आहे—

**एवं शतगुणयुक्तो भृगूणां कीर्तिवर्धन ।।**
**जामदग्न्यो ह्यतियशा मरिष्यति महाद्युति ।**

(द्रोण ७० २३-२४)

अर्थ– अशा प्रकारे शंभर गुणानी युक्त भृगूची कीर्ती वाढ-वणारा, महातेजस्वी व अत्यंत यशस्वी असा परशुराम मरणार आहे

केरळात परशुरामाचा शक चालू आहे या शकाचे वर्ष सौर

असून सिंहमासापासून त्याचा वर्षारंभ असतो या शकाचे हजार वर्षांचे एकेक चक्र असून सांप्रत चौथे चक्र चालू आहे त्याला कोल्लम शक असेही म्हणतात [सह्याद्रि, परशुराम चरित्र–श्री म गाडे, १९३८, प्रा च को, गो सा घ, राज राजेश्वर परशुराम–श्री म स पारखे, १९६७]

## परशुरामजयंती

एक व्रत व उत्सव वैशाख शुद्ध तृतीयेला परशुरामजयंती असे म्हणतात परशुराम हा विष्णूचा अवतार होय तो रेणुकेच्या पोटी वैशाख शुद्ध तृतीयेला पुनर्वसू नक्षत्रावर, रात्रीच्या पहिल्या प्रहरी सहा ग्रह उच्चीचे आणि राहू मिथुन राशीत असताना जन्माला आला, म्हणून परशुरामजयंती रात्रीच्या पहिल्या प्रहरात साजरी करतात त्यानिमित्त परशुरामाची पूजा करतात व उपवास करतात उद्यापनाच्या वेळी सर्वतोभद्र मंडलावर ब्रह्मादिदेवतांचे आवाहन करून कलशावर सुवर्णनिर्मित परशुरामाची मूर्ती स्थापन करतात मग विष्णुमंत्राने तिची पूजा करतात अग्निस्थापना करून प्रधान होमापर्यंत कर्म झाल्यावर घृतमिश्रित पायस द्रव्याने प्रधान देवतेसाठी १०८ आहुती देतात मग पूर्णाहुती करतात फल – पापनाश व पुरुषार्थ सिद्धी

कोकणात चिपळूणनजीक परशुरामाचे देवालय असून, त्या गावाला परशुरामक्षेत्र म्हणतात तिथे परशुरामजयंतीचा मोठा उत्सव होतो आणि भारतात परशुरामजयंतीला विशेष महत्त्व असते [हि ध, ऋ ग्र स]

## परशुरामक्षेत्रे

परशुराम हा सर्व कोकणाचा देव समजला जातो वैतरणेपासून कन्याकुमारीपर्यंतची पश्चिम समुद्राची किनारपट्टी त्यानेच समुद्राकडून मिळवली आणि तिथे वसाहती उभारल्या, अशा कथा आहेत त्यामुळे या भूमीत अनेक स्थळ परशुरामक्षेत्रे म्हणून ओळखली जातात

सह्याद्रीच्या उत्तर टोकावर साल्हेरचा डोंगर आहे तिथे एक मध्ययुगीन गड असून, त्याच्या एका टोकावर परशुरामाचे मंदिर आहे मंदिराच्या उत्तरेस १०० हातांवर सामान्य मनुष्याच्या पावलाच्या चौपट आकाराची दोन पावले खोदलेली आहेत बाण मारताना मनुष्य ज्या पवित्र्यात पावले ठेवील त्या पवित्र्यात त्यांची योजना केलेली आहे या ठिकाणी उभे राहून परशुरामाने समुद्रावर बाण मारला आणि समुद्र मागे हटवला, असे सांगतात

दक्षिणेत सह्याद्रीच्या अंतिम टोकाला तिरुवितांकुर जिल्ह्यात महेंद्रगिरी नावाचा डोंगर आहे तेही परशुरामक्षेत्रच मानतात त्या ठिकाणी परशुरामाचे कायमचे वास्तव्य आहे, असे समजतात ओडिसामध्ये महेंद्र पर्वत आहे तिथेही एक परशुरामक्षेत्र आहे, असे म्हणतात कृष्णा वेण्णा संगमावरील खंड या गावाला पूर्वी परशुरामक्षेत्र म्हणत गुजरातमध्ये भडोच जिल्ह्यात सहाव्या शतकातील भृगूचे देवालय आहे ते स्थानही परशुरामाचेच मानतात पंजाबात कांगडा जिल्ह्यामध्ये परशुरामाचे एक पुरातन मंदिर आहे आसामच्या पूर्व सीमेवरील एका पर्वताच्या दरीतून ब्रह्मपुत्रा भारतात प्रवेश करते परशुरामाने परशू फेकल्यामुळे ही दरी निर्माण झाली, अशी स्थानिक दंतकथा आहे

काकणात चिपळूणपासून पाच मैलांवरील एका डोंगरावर परशुरामाचे एक मंदिर आहे हा डोंगर सुमारे एक हजार फूट उंच आहे तिथे जो गाव वसला आहे, त्यालाही त्या देवस्थानामुळे परशुराम असेच म्हणतात तिथल्या मंदिरात तीन मूर्ती



काम, परशुराम व काल यांच्या मूर्ती – परशुरामक्षेत्र, चिपळूण

ओळीने उभ्या आहेत काम, परशुराम व काल अशी त्यांची नावे आहेत काम शब्दाने ब्रह्मा, परशुराम शब्दाने विष्णू व काल शब्दाने शिव अशी ती तीन देवांची मांडणी आहे परशुरामाची मूर्ती इतर दोहोंपेक्षा जरा अधिक उंच आहे

हे मंदिर निर्माण केले, ते एका मुसलमान स्त्रीने इ स १५०० साली विजापूरच्या आदिलशाहाच्या बेगमेची तारवे समुद्रात गेली असता बेपत्ता झाली त्यामुळे बेगम चिंताग्रस्त झाली कोकणाचा स्वामी आणि समुद्राचा शास्ता म्हणून ती परशुरामाला ओळखत होती तिने त्याला नवस केला, की माझी तारवे सुरक्षित किनाऱ्याला लागल्यास मी तुझे देऊळ बांधीन थोड्याच काळात तिची तारवे सुखरूप परत आली मग तिने दाभोळाहून काळे दगड आणून इथल्या मंदिराचा गाभारा उभारला पुढे इ स १६९८ साली ब्रह्मेंद्रस्वामी धावडशीकर यांनी त्या मंदिराचा जीर्णोद्धार केला व मागच्या

अगास रणवेच मंदिर बांधले ब्रह्मेंद्रस्वामींच्या काळा पर्यंत प्रस्तुत मंदिरात मूर्ती नव्हत्या सगळे पूजाप्रचार तिथल्या शिलासनालाच समर्पित होत पुढे गुहागरच्या पर्चुरे नामक एका गृहस्थाने इथल्या मूर्ती घडवून त्यांची प्रतिष्ठापना केली

तिथल्या स्त्रिया परशुरामाच्या चरित्रावरच्या अनेक ओव्या गातात त्यांपैकी काही अशा–

**वाजत्री वाजती । बाणगंगेच्या धक्क्यावरी ।**
**परशुराम सख्यावरी । अभिषेक ।।**
**भार्गवराम दंग । उभे कड्यावरी ।**
**निळ्या घोड्यावरी । स्वार झाले ।।**
**अक्षयतृतीयेला । उदककुंभ द्यावा ।**
**मनात स्मरावा । भार्गवराम ।।**
**अक्षयतृतीयेला । जन्मले परशुराम ।**
**मातेला मारुनी । पुरविती पितृकाम ।।**
**एकवीस वेळा । निःक्षत्री केली धरणी ।**
**अद्‌भुत वाटे करणी । परशुरामाची ।।**

प्रतिवर्षी जयंतीयेच्या दिवशी परशुरामाचा मोठा उत्सव इथे होत असतो [ सह्याद्रि, ती म २ ]

## परशुरामाचार्य

(इ स चे १७ वे शतक) एक हिंदी कवी व आचार्य याचा जन्म राजस्थानातील गौड ब्राह्मण कुळात झाला लहानपणीच त्याचे आईबाप निवर्तले त्यानंतर त्याने हरिव्यास या आचार्याचे शिष्यत्व पत्करले हरिव्यासानंतर तोच त्याचा उत्तराधिकारी झाला याने अजमीरजवळ परशुरामपुरी या नावाची वसाहत करून तिथे सर्वेश्वराचे मंदिर बांधले, तसेच पुष्करक्षेत्रात परशुरामपुरी या नावाने एक आचार्यपीठ स्थापले हे पीठ रामानुजी संप्रदायाचे आहे परशुरामाचार्याने तिथेच समाधी घेतली त्याचा शिष्य हरिवंशदेवाचार्य याने त्या समाधीजवळ एक मंदिर बांधले

परशुरामाचार्याला ब्रजभाषेचा एक श्रेष्ठ कवी समजतात त्याने तिथिलीला, वारलीला, बावनीलीला, इ तेरा ग्रंथ लिहिले असून, ते सारे परशुरामसागर या नावाने प्रसिद्ध आहेत हाही कबिराप्रमाणे हिंदु मुस्लीमऐक्याचा पुरस्कर्ता होता याची पद्ये मधुर व लालित्यपूर्ण आहेत त्यातले एक पद असे–

**गोविंद मैं बंदीजन तेरा ।**
**प्रात सभ उठि मोहन गाऊँ तौ मन मोनें मेरा ।**
**करम करम भरम कुल करणी नाकी नाहिन आसा ।**
**करूँ पुकार द्वार सिर नाऊँ गाऊँ सुखविधाता ।**
**'परसराम' जन करत बीनती सुणि प्रभु अविगतनाथा ।।**

अर्थ—हे गोविंदा, मी तुझा दासानुदास आहे प्रातःकाळी उठून तुझे गुणगान केले म्हणजे मन प्रफुल्लित होते कर्मा कर्मकांड करीत राहण्याची मला मुळीच गोडी नाही तुझ्या नावाचा पुकार करावा तुझ्या मंदिराच्या द्वारी जावे व तुझे गुणगान करावे, नाचावे, गावे असे मला वाटते परशुरामाची हीच लोकांना नम्र विनंती की लोकांनी प्रभूची सुरम्य चरित्र कथा सदैव ऐकत राहावे

राजस्थानातील जंगली व मागासलेल्या लोकांमध्ये याने भक्तिभावना निर्माण केली व त्यांच्या हिंसावृत्तीला आळा घातला, असे सांगतात [ भा स ]

## परशू

एक प्राचीन आयुध लाकूड तोडण्यासाठी वापरायचे हत्यार, अशा अर्थी हा शब्द वेदात अनेक ठिकाणी आलेला आहे मात्र त्याचे वर्णन कुठेही आढळत नाही वेदकाळी युद्धातही याचा उपयोग करीत 'हे इंद्रा, ज्याप्रमाणे परशूच्या आघाताने वृक्ष दुखावतो, त्याप्रमाणे आमचे शत्रू तप्त होवोत' अशी प्रार्थना विश्वामित्राने केली आहे (ऋ ३ ५३ २२) हे फेकून मारण्याचे आयुध आहे

परशुरामाचे हे मुख्य शस्त्र होते हे शिवाचेही आवडते आयुध आहे मूर्तिकलेत शिवाच्या व इतर देवतांच्याही हातात हे आयुध आढळते हे आयुध पूर्वी घोड्याच्या किंवा बैलाच्या अस्थीपासून तयार करीत पण मागाहून लोखंडाचा परशूच वापरला जात असे व आजही वापरला जातो त्याच्या पात्याची धार अर्धचंद्राकृती असते आणि त्याच्या दुसऱ्या बाजूला एक मोठे छिद्र असून, त्यात लाकडी दांडा घातलेला असतो तो हाती धरतात


परशू

चोरीचा आरोप आला असता आपले निरपराधित्व सिद्ध करण्यासाठी तापलेला परशू हाती धरायला लावण्याचे दिव्य पूर्वी प्रचलित होते त्याचा उल्लेख छांदोग्य उपनिषदात आढळतो (६ १६ १) [ वे इं, क म, इ नॉ ]

**परसोडा** एक प्राचीन तीर्थ. याला ऋषितीर्थ असेही म्हणतात. हे स्थान गुजरातमधील बीजापूर तालुक्यात साबरमती नदीच्या तीरावर आहे. ते संगमस्थान म्हणून प्रसिद्ध आहे. या ठिकाणी साबरमतीला नगरी, सुग्मती व अमरवली या नद्या येऊन मिळतात. येथे विभांडक ऋषीचा पुत्र ऋष्यशृंग याचा आश्रम होता, असे सांगतात. [कल्याण–तीर्थांक]

**परळी–वैजनाथ** बारा ज्योतिर्लिंगांपैकी एक स्थान. परळी हे गाव मराठवाड्यातील बीड जिल्ह्यात आहे. इथले वैजनाथाचे मंदिर एका टेकडीवर बांधलेले आहे. इतर ज्योतिर्लिंगापेक्षा या स्थानाचे वैशिष्ट्य असे मानतात, की इथेच फक्त शंकर हा पार्वतीसह वास करतो. त्यामुळेच या क्षेत्राला 'जवळ आगळ काशी' – काशीपेक्षा तसभर श्रेष्ठ असे म्हणतात.

मंदिरात स्वयंभू लिंग आहे. मंदिराचा गाभारा आणि सभामंडप एका पातळीवर आहेत. अन्यत्र गाभारा खाल असतो. या मंदिराची बांधणी हेमाडपंती आहे.

मंदिरात गाभा-यापर्यंत पोचायला एकूण चार दरवाजे आणि चार अंगणे ओलांडावी लागतात. मंदिराला दिशासाधन आहे. त्यामुळे विषुवदिनी गवाक्षातून सूर्यकिरण लिंगावर पडतात.

गाभा-यातील पिंडी शाळिग्राम शिळेची असून, ती हातभर उंच आहे. तिचा व्यास सुमारे दोन हात आहे. गाभाऱ्यात चार नंदादीप अखंड तेवत असतात. देवाची दररोज चार वेळा पूजा होते. प्रातःपूजेनंतर लिंगावर मुखवटा बसवतात. पूजक वंशपरंपरेचे असतात. देवस्थानाच्या व्यवस्थेसाठी पेशवे सरकारकडून गावच्या समस्त ब्राह्मणांना ५२८० बिघे जमीन इनाम मिळाली आहे. नवरात्र, आश्विनी पौर्णिमा, त्रिपुरी कार्तिकी पौर्णिमा आणि महाशिवरात्र, या काळात इथे फार मोठा उत्सव होत असतो.

या क्षेत्राला वेगवेगळ्या काळात वेगवेगळी नावे होती. वैजनाथालाच वैद्यनाथ म्हणतात. तिथल्या पहाडावर औषधीवनस्पती विपुल प्रमाणात मिळत व वैद्य लोक त्यांचा उपयोग करीत. त्यामुळे देवाला वैद्यनाथ असे नाव पडले, अशी त्याची कथा सांगतात. समुद्रमंथनातून अमृत घेऊन वर आलेला धन्वंतरी विष्णूच्या आज्ञेवरून वैद्यनाथाच्या पिंडीत लपला व दैत्यांचा उपशम झाल्यावर त्याने ते अमृत देवांना दिले, अशी कथा आहे. तिच्यावरून वैद्यनाथाला धन्वंतरी व अमृतेश्वर अशीही नावे मिळाली. देव–दानवांच्या युद्धात देवांना अमृत पाजून विजयी केले, म्हणून परळीस वैजयंती आणि जयंती अशी नावे मिळाली आहेत. त्याशिवाय रुद्रक्षेत्र, हरिहरक्षेत्र, नारायणक्षेत्र, प्रभासक्षेत्र, कांतिपुरी अशी ही या क्षेत्राची नावे आहेत. पृथ्वीची मध्यरेखा परळीवरून जाते असे मानतात.

परळीच्या परिसरात विष्णू, अंबाभवानी, गुरुंचा मारुती, गणपती, मुरलीधर, गोपालराम, दत्त, राम, राळेबाई, गुरारी (अंबा आरोग्य भवानी) इ. अनेक मंदिरे आहेत.

लीळाचरित्र, आनंद रामायण, इ. ग्रंथांत वनवासाला निघालेला राम परळी येथे आल्याचे वर्णन आहे. रुक्मांगद व श्रियाळराजा हे इथलेच मानतात. जगमित्र नागा हा इथलाच राहणारा होता. गावाबाहेर त्याचा मठ असून तिथे लिंगायतांची मुख्य वस्ती आहे. [वि. मु. रा. प., पुरुषार्थ, ऑक्टोबर–नोव्हेंबर १९६३, परळ्या वैद्यनाथ च., मराठवाडा, परिचय]



**पराक** एक व्रत. बारा दिवस अन्न सेवन न करणे व इंद्रियांवर पूर्ण संयम ठेवणे असा याचा विधी आहे. (मनु ११.२१५) हा कृच्छ्राचाच एक प्रकार आहे. या व्रतामुळे सर्व पापांचे क्षालन होते, असे सांगितले आहे. (विष्णुधर्मसूत्र ४६.१८)

**परान्न** दुसऱ्याच्या मालकीच्या अन्नाला परान्न म्हणतात. यात दुसऱ्याने शिजवलेल्या किंवा स्पर्शलेल्या अन्नाचाही समावेश होतो. व्रती, जपी, तपी, इ. नेमनिष्ठेच्या लोकांनी परान्न घेऊ नये, असे धर्मशास्त्रात सांगितले आहे.

पारण्याच्या दिवशी परान्न घेतल्यास व्रत निष्फळ ठरते. परान्न घेणाऱ्याचे यज्ञयागही निष्फळ ठरतात. परान्न भोजन करून तीर्थयात्रा करणाऱ्याचे यात्राफल कमी होते. परान्नाने जिव्हा दग्ध होते आणि तिने उच्चारलेला मंत्र सिद्ध होत नाही. गुरु, माता, पिता व पुत्र यांच्या घरचे अन्न मात्र परान्न होत नाही. [आचारे दु., श. क.]

**परा बाला** पुराणांत वर्णिलेली एक विद्या. ही विद्या सर्वसिद्धिप्रदायिनी मानलेली आहे. भगवती त्रिपुरसुंदरीने या विद्येचा अर्जुनाला प्रथम उपदेश केला होता. त्यामुळेच त्याला कृष्णलीलेचे रहस्य समजले. [पु. वि.]

**परार्ध** लक्ष लक्ष कोटी संख्या. ब्रह्मदेवाच्या आयुष्याचा अर्धा काल. यासंबंधी कूर्म पुराणातील श्लोक असा–

निजेन तस्य मानेन चायुर्वर्षशतं स्मृतम् ।
तत् पराख्यं तदर्धं च परार्धमभिधीयते ॥

अर्थ – ब्रह्मदेवाचे आयुष्य त्याच्या स्वतःच्या गणनेनुसार शंभर वर्षांचे आहे, असे सांगितले आहे. त्याला पर असे नाव आहे. त्याच्या अर्धाला परार्ध असे म्हणतात.

ब्रह्माचे आयुष्य दोन परार्ध असून, त्यातील सांप्रत चालू असलेले वाराह कल्प हे दुसरे परार्ध होय. [ श. क. ]

**पराशर** एक सूक्तद्रष्टा, वसिष्ठाचा पौत्र, गोत्रप्रवर्तक व ग्रंथकार. ऋग्वेदाच्या पहिल्या मंडलातील ६५ ते ७३ ही सूक्ते याच्या नावावर आहेत. ही सर्व सूक्ते अग्निविषयक असून काव्यमय आहेत. आपले उपमेय तो अनेक उपमांनी विभूषित करतो पुढील ऋचा त्या दृष्टीने उल्लेखनीय आहे—

**पुष्टिर्न रण्वा क्षितिर्न पृथ्वी गिरिर्न भुज्म क्षोदो न शम्भु।**
**अत्यो नाज्मन् त्सर्गप्रतक्तः सिन्धुर्न क्षोदः क ईं वराते ।।**

(ऋ. १.६५.३)

अर्थ—उत्कर्ष जसा रमणीय असतो, पृथ्वी जशी विस्तीर्ण असते, पर्वत जसा (फलपुष्पादी) भोग्य वस्तूंनी परिपूर्ण असतो, उदक जसे हितकर असते, भरधाव सुटलेला घोडा मैदानावर जसा अधिक गतिमान होतो, महानदी ज्याप्रमाणे दोन्ही तट भंगून टाकील अशी सामर्थ्यवान असते, त्याप्रमाणे हा अग्नी आहे. खरोखर याला कोण प्रतिबंध करू शकेल !

पराशराला अग्नीचे दिव्यत्व आणि महनीयत्व प्रतीत झाले आहे, त्याप्रमाणे सनातन सत्य नियमांचे महत्त्वही कळले आहे. तो म्हणतो—

**ऋतस्य देवा अनुव्रता गुर्भुवत् परिष्टिर्द्यौर्न भूम ।**
**वर्धन्तीमापः पन्वा सुशिश्विमृतस्य योना गर्भे सुजातम् ।।**

(ऋ. १.६५.२)

अर्थ—सनातन सत्य नियमांपासून जे अनुशासन निर्माण झाले त्याचे देवही परिपालन करतात. स्वर्गाप्रमाणेच पृथ्वीही त्या सत्य नियमांचे आश्रयस्थान झाली आहे. प्रत्यक्ष सत्याने जिथे जन्म घेतला, अशा गर्भातून अतिशय गौरवयुक्त असा ज्याचा जन्म झाला, तो अग्नी वृद्धिंगत होऊ लागला असता सर्व उदकांनी त्याचे स्तवन करून त्याच्या वाढण्याला उत्तेजन दिले.

कात्यायनाच्या सर्वानुक्रमणीत पराशर हा शक्तीचा पुत्र होता, असे म्हटले आहे; तर निरुक्तातल्या व्युत्पत्तीवरून त्याला वसिष्ठपुत्र म्हटले गेले आहे. तिथे पराशर शब्दाची 'पराशीर्णस्य स्थविरस्य जज्ञे' = अत्यंत थकलेल्या वृद्धापासून याचा जन्म झाला, अशी व्युत्पत्ती दिली आहे. पण त्यावरून पराशराला वसिष्ठाचा पुत्र मानणे बरोबर नाही. कारण सर्व पुत्र निधन पावल्यामुळे, वृद्ध वसिष्ठाला केवळ याचाच आधार उत्पन्न झाला होता आणि त्यावरूनच ही व्युत्पत्ती निर्माण झाली असावी. त्याविषयीची कथा अशी—

एकदा वसिष्ठ वैतागून आश्रमातून बाहेर निघाला. तेव्हा याचा पुत्र शक्ती याची विधवा पत्नी अदृश्यंतीही त्याच्या न कळत त्याच्या मागोमाग निघाली. काही वेळाने वसिष्ठाच्या कानांवर वेदध्वनी येऊ लागला. म्हणून त्याने मागे वळून पाहिले, तो अदृश्यंतीच्या पोटातून आवाज येत असल्याचे त्याच्या ध्यानी आले. तेव्हा आपल्या वंशाचा अंकुर जिवंत आहे, हे पाहून तो आश्रमात परत फिरला.

आपला पिता शक्ती याला राक्षसांनी ठार मारले, हे जेव्हा पराशराला कळले, तेव्हा सर्व राक्षसांचा संहार करण्याच्या हेतूने त्याने राक्षससत्र आरंभले. पण त्यात निरपराध राक्षसही मारले जाऊ लागले. म्हणून पुलस्त्यादी ऋषींनी त्याला या सत्रापासून परावृत्त केले. सत्र थांबविल्याबद्दल पुलस्त्याने त्याला 'तू सकलशास्त्रपारंगत व पुराणवक्ता होशील' असा वर दिला (विष्णु पु. १.१). राक्षससत्रासाठी सिद्ध केलेला अग्नी मग पराशराने हिमालयाच्या उत्तरेला एका अरण्यात टाकला. तो अद्यापही पर्वदिवशी राक्षस, पाषाण व वृक्ष यांना भक्षण करतो, असे विष्णू (१.१) व लिंग पुराणांत (१.६४) सांगितले आहे.

एकदा पराशर तीर्थयात्रेला गेला असता यमुनेच्या तीरावर सत्यवती नावाची धीवरकन्या त्याच्या नजरेला पडली. तो तिच्या यौवनावर व सौंदर्यावर लुब्ध झाला. तिच्या अंगाला मत्स्यासारखा वास येत होता; तेही त्याने मनावर घेतले नाही. तो जेव्हा कामातुर होऊन तिच्याकडे भोगयाचना करू लागला, तेव्हा तिने त्याला म्हटले, की 'मी तुझी इच्छा पूर्ण केली, तर माझा कन्याभाव दूषित होईल.' त्यावर पराशराने तिला दोन वर दिले ते असे—(१) तुझा कन्याभाव नष्ट होणार नाही व (२) तुझ्या अंगाचा मत्स्यगंध नष्ट होऊन त्या जागी तुझ्या अंगाला सुगंध येईल आणि तो एक योजनपर्यंत पसरेल. हे वर मिळाल्यावर सत्यवती त्याच्या मागणीला अनुकूल झाली. भर दिवसा होडीत धुके निर्माण करून त्याने आपला एकांत कोणाला दिसणार नाही, अशी व्यवस्था केली व सत्यवतीचा उपभोग घेतला. त्या संबंधापासून तिला वेदव्यास हा पुत्र झाला (म. भा. आदि. ६३.१०५; भाग. पु. १.३).

पराशरापासून प्रवृत्त झालेल्या पराशर गोत्रात गौरपराशर, नीलपराशर, कृष्णपराशर, श्वेतपराशर, श्यामपराशर व धूम्रपराशर असे सहा भेद आहेत.

पराशराने जनकाला जे तत्त्वज्ञान उपदेशिले, त्याचाच अनुवाद भीष्माने धर्मराजाला सांगितला. त्याला पराशरगीता असे नाव आहे (म. भा. शांति. २९१—२९९). याशिवाय पराशराच्या नावावर पुढील ग्रंथ आढळतात— बृहत्पराशरहोराशास्त्र (१२ हजार श्लोकांचा ज्योतिषग्रंथ), लघुपाराशरी, बृहत्पाराशरीय धर्मसंहिता (३३०० श्लोक), पाराशर धर्मसंहिता (स्मृती), पराशरोदितं वास्तुशास्त्रम् (विश्वकर्म्याने याचा

उल्लेख केला आहे) पाराशरसंहिता (वास्तुशास्त्र) पराशरोपपुराण, पराशरोदित नीतिशास्त्र व पराशरोदित ज्योतिःशास्त्र हे सर्व ग्रंथ लिहिणारा पराशर सूक्तद्रष्ट्या पराशराहून भिन्न असावा, असे वाटते.

तसेच कृषिसंग्रह, कृषिपराशर व पराशरतंत्र हेही ग्रंथ याच्या नावावर आहेत. पण हा पराशर कोण याबद्दल विद्वानांत मतभेद आहेत. पण कृषिपराशर या ग्रंथाच्या शैलीवरून तो इ. स. च्या ८ व्या शतकाच्या आधीचा नसावा, असे वाटते.

कृषिपराशर या ग्रंथात शेतीवर होणारा ग्रहनक्षत्रांचा प्रभाव, ढग व त्यांच्या जाती, पावसाचे अनुमान, गाईंचा देखभाल, बैलांची सुरक्षितता, नांगर, धान्याची पेरणी, कापणी व संग्रह, शेणखत, इ. विषयांवर माहिती आहे. या ग्रंथावरून या काळी शेती अतिशय समृद्ध होती, असे अनुमान करता येते.

पराशर हा आयुर्वेदाचा एक कर्ता व चिकित्सक होता. अग्निवेश, भेल व पराशर हे समकालीन होते असे चरकसंहितेवरून कळते (सूत्र १.३१). पराशरतंत्रात कायचिकित्सेवर जास्त भर दिलेला आहे. पराशराने हस्त्यायुर्वेद नावाचाही एक ग्रंथ लिहिला आहे. हेमाद्रीने पराशराच्या मताचा विचार केलेला आहे. पराशराचा हा ग्रंथ स्वतंत्र होता का त्याच्या ज्योतिष संहितेचा एक भाग होता, हे निश्चित सांगता येत नाही. [ हिं. वि. को., प्रा. च. को., पु. इ., आ. इ. ]

## पराशरस्मृती

हिला पाराशरस्मृती असेही नाव आहे. या स्मृतीचा उपक्रम पुढीलप्रमाणे केलेला आहे – एकदा काही ऋषी व्यासांकडे गेले आणि त्यांनी व्यासांना कलियुगात मानवजातीचे कल्याण साधणारे आचार व धर्म याविषयी माहिती विचारली. तेव्हा व्यासांना त्या ऋषींना बदरिकाश्रमात राहत असलेला आपला पिता पराशर याच्याकडे नेले. तिथे पराशराने त्यांना चार वर्णांचे धर्म सांगितले.

या स्मृतीच्या पहिल्या अध्यायात एकोणीस स्मृतिग्रंथांची नावे दिली असून कृत, त्रेता, द्वापर आणि कली या चार युगांत अनुक्रमे मनू, गौतम, शंख लिखित आणि पराशर यांच्या स्मृती प्रमाण मानाव्या असा आदेश दिला आहे.

पराशरस्मृतीत पुढील विषय आलेले आहेत – चार युगांचे धर्म, विविध दृष्टिकोनांतून या चार युगांमधील फरक, षट्कर्म, अतिथिसत्कार, क्षत्रिय, वैश्य व शूद्र यांची निर्वाहाची साधने, गृहस्थांची कलियुगातील कर्तव्ये, जननमरणाशौचाची शुद्धी, दरिद्री, मूर्ख किंवा रोगी पतीचा त्याग करणाऱ्या पत्नीला शिक्षा, स्त्रियांचा पुनर्विवाह, श्वानदंशादींनी शुद्धी, चांडालादिकांनी मारलेल्या ब्राह्मणाच्या देहाला स्पर्श केला असता, त्याबद्दल प्रायश्चित्त, अग्निहोत्री ब्राह्मणाचा देशांतरी मृत्यू झाला असता त्याच्या अंत्यक्रियेचा विचार, निरनिराळे पशू व पक्षी यांना हिंसा केल्यास प्रायश्चित्त, गायी, वृषभ इत्यादींच्या पापाची शुद्धी, रजस्वला स्त्रियांनी परस्पर स्पर्श केला असताना त्याबद्दल प्रायश्चित्त, अजाणता गाई-बैलांची हिंसा झाल्यास त्याबद्दल प्रायश्चित्त, अगम्यागमनाबद्दल प्रायश्चित्त, इत्यादी.

या स्मृतीत पराशराने आपली काही मते मांडली आहेत ती अशी – पती नाहीसा झाला, मृत झाला किंवा क्लीब असला, तरी स्त्रीने दुसरा विवाह करू नये.

> **देशभङ्गे प्रवासे वा व्याधिषु व्यसनेष्वपि ।**
> **रक्षेदेव स्वदेहादि पश्चाद्धर्मं समाचरेत् ।।**

अर्थ – देशात अराजक माजले असता आणि प्रवासात आजारात आणि संकटात आधी देहाचे रक्षण करावे आणि मग धर्माचे आचरण करावे.

मिताक्षरा, अपरार्क, स्मृतिचंद्रिका यांत आणि हेमाद्री व विश्वरूप यांच्या ग्रंथांत पराशरस्मृतीतील वचने आहेत. पराशरस्मृती इ. स. चे पहिले ते पाचवे शतक, या काळात रचली गेली, असे विद्वानांचे मत आहे. [ हिंदुत्व, हिं. ध. ]

## परिग्रहपरिमाणव्रत

एक जैन व्रत. स्त्री, पुरुष, घर, सोने, इत्यादींचा संग्रह म्हणजे परिग्रह होय. हे व्रत विशिष्ट कालावधीचे नसून जीवनभर आचरायचे असते. यात परिग्रहाला मर्यादा घालून काम, क्रोध, मद, मोह यांचाही संयम करायचा असतो. हे एक अणुव्रत आहे. [ जै. ध. ]

## परिचारिका

प्रधान देवतेच्या सेविकांना हे नाव आहे. परिचारिकांच्या मूर्तींच्या हातांत चवरी किंवा पुष्पमाला असते. या परिचारिका मुख्य मूर्तीच्या प्रभावळीत किंवा क्वचित स्वतंत्रही असतात. स्वतंत्र मूर्ती प्रामुख्याने मंदिराच्या महाद्वारावर अथवा स्तंभावर कोरलेल्या असतात. या मूर्तींवरून तत्कालीन अलंकारांचे आणि केशरचनेचे विविध प्रकार कळून येतात. भारतात या प्रकारच्या मूर्ती खूप आढळतात. [ स्थ. नै. ]

## परिणामवाद

एक दार्शनिक सिद्धांत. जगदुत्पत्तीच्या संदर्भात सांख्यांनी परिणामवादाचा स्वीकार केलेला आहे. त्रिगुणात्मक अचेतन प्रधानापासून जगत उत्पन्न होते, असे सांख्य दर्शनात प्रतिपादिले आहे. या प्रधानापासून एकदम जगत उत्पन्न होत नाही, तर प्रधानापासून महत्, त्यापासून अहंकार आणि अहंकारापासून इंद्रिये, पंच तन्मात्रे व पंच महाभूते अशा क्रमाने ही दृश्य सृष्टी बनते, अशी ही कल्पना आहे. या

गात्पत्तीच्या क्रमाला परिणामवाद असे म्हणतात.

परिणामवादाचे लक्षण असे– 'सतत्त्वतोऽन्यथाप्रथा विकार इत्युदीरित' – एका वस्तूच्या मूळ रूपाचा परित्याग होऊन रूपान्तरात जेव्हा त्याला दुसरी भिन्नता प्राप्त होते, तेव्हा त्या विकाराला परिणाम असे म्हणतात (वेदान्तसार खं० २१) उदा० दुधापासून दह्याची उत्पत्ती.

जेव्हा कारणापासून उत्पन्न झालेले कार्य वास्तव असते, तेव्हा त्याला परिणाम असे म्हणतात. दुधापासून दही बनते, ते दही म्हणजे खरी वस्तू असते. दुधापेक्षा त्याचा आकार, रूप आणि फल ही भिन्न असतात.

परिणामवादाचा स्वीकार करून सांख्यांनी दृश्य जगत हे सत्य मानलेले आहे. याउलट वेदान्ती हे जगत म्हणजे वास्तव नसून आभासमात्र आहे, असे मानतात. या सिद्धान्ताला त्यांनी विवर्तवाद असे नाव दिले आहे [वे. शा. री., मा. द.]

## परितोष मिश्र

(इ. स. चे १३ वे शतक) मीमांसा दर्शनाचा एक आचार्य. हा मिथिलेत राहत होता. याने कुमारिलभट्टाच्या तन्त्रवार्तिकावर अजिता नामक एक व्याख्या लिहिली आहे. ती अतिशय सरळ, सोपी व विवेचनात्मक आहे. व्याख्येच्या अजिता या नावावरून याला पुढे अजिताचार्य म्हणून ओळखू लागले. या व्याख्येवर मिथिलानिवासी अनंतनारायण मिश्र याने विजया नामक टीका लिहिली आहे [मी. द.]

## परित्राणपाठ

बौद्ध धर्मातील एक विधी. परित्राण म्हणजे रक्षण होय. रोगी किंवा आपद्ग्रस्त व्यक्तींच्या मुक्ततेसाठी परित्राणाचा पाठ करतात. या पाठात महामंगलसुत्त, करणीय मेत्तसुत्त, महामंगलगाथा, पुण्यानुमोदन व जय मंगल अट्ठगाथा, ही प्रकरणे वाचायची असतात. विवाहादी मंगलकार्ये, गृहप्रवेश, भोजनदान, इ. प्रसंगीही परित्राणपाठ करण्याची पद्धत आहे. पाठाच्या प्रारंभी आवाहनात्मक असा पुढील श्लोक म्हणतात–

> **समन्ता चक्कवाळेसु अत्रागच्छन्तु देवता ।**
> **सद्धम्मं मुनिराजस्स सुणन्तु सग्गमोक्खदं ।।**

*अर्थ* – हे समस्त चक्रवालवासी देवगण हो, तुम्ही इथे यावे आणि मुनिराज भगवान बुद्धाच्या स्वर्ग–मोक्ष देणाऱ्या सत्य धर्माचे श्रवण करावे.

परित्राणपाठ करण्याचा मुख्य अधिकार भिक्षूचा असतो. पण जिथे बौद्ध भिक्षू उपलब्ध नसेल त्या ठिकाणी एखाद्या जाणत्या गृहस्थाने पाठ केला तरी चालतो. आत्मकल्याणासाठी स्वतः पाठ म्हणणेही विहित आहे.

पाठ करताना रोग्याला पाठकाच्या समोर बसवतात. त्याच्या हाती एक निळी सूत देतात. त्याचे एक टोक श्रवण करणाऱ्याच्या हाती असते व दुसरे टोक एका जलपूर्ण कलशात सोडतात. कलश आंब्याच्या पानांनी झाकतात. पाठ संपल्यावर ते सूत श्रवण करणाऱ्याच्या हाती बांधून त्याला कलशातले पाणी पिण्यास देतात. उरलेले घरात शिंपडतात [बौद्धचर्याविधी]

## परिधी

एक यज्ञीय वस्तू. मुख्य यागाच्या पूर्वी अग्नीभोवती हातभर लांबीच्या समिधा मांडतात, त्यांना परिधी असे म्हणतात. या परिधी पळस, खैर, उंबर, इ. यज्ञीय वृक्षांपासून काढतात. अग्नीच्या पश्चिम, दक्षिण व उत्तर बाजूनाच परिधी घालतात. पैकी पश्चिमेची सर्वांत जाड, दक्षिणेकडील सर्वांत लांब आणि उत्तरेकडची अगदी बारिक असते [हि. ध.]

## परिप्लुपात्र

एक यज्ञीय पात्र. हे स्रुचीच्याच आकाराचे असते. फक्त याला दांडा नसतो. ऋत्विजांना सोमपान करण्यासाठी असलेल्या चमसामध्ये सोमरस भरून घेण्यास या लहान पात्राचा उपयोग होतो.

## परिमंडलकथा

कथारचनेचा एक प्राचीन प्रकार. एक मुख्य कथा घेऊन तिच्या भोवती अनेक उपकथा गुंफणे. या प्रकाराला लोकसाहित्याच्या परिभाषेत परिमंडलकथा असे म्हणतात. सूतपरंपरेच्या कथांचे हे खास वैशिष्ट्य म्हणून सांगता येते. महाभारतातील सभापर्व हे या प्रकारचे उत्तम उदाहरण आहे. या पर्वात जनमेजयाच्या सर्पसत्राची कथा ही आधारभूत कथा असून, गरुडकथांचा समूह, कद्रू–विनता व रुरु–प्रमद्वरा यांची आख्याने, तसेच आस्तिक, उत्तंक, इत्यादींच्या उपकथा त्या मुख्य कथेत सामावलेल्या आहेत. गुणाढ्याच्या बृहत्कथेत, विष्णुशर्म्याच्या पंचतंत्रात, दंडीच्या दशकुमारचरितात व उत्तरकालीन जैन कथासाहित्यात या प्रकारचे कथातंत्र स्वीकारलेले दिसते [लो. सा. रू.]

## परियर

उ. भारतातील एक प्राचीन तीर्थस्थान. हे गंगेच्या काठावर, उन्नाव शहराच्या उत्तरेला चौदा मैलांवर आहे. कार्तिकी पौर्णिमेस इथे मोठी यात्रा भरते. गंगास्नान हा या यात्रेचा प्रमुख हेतू असतो. या स्थानाशी अनेक दंतकथा निगडित आहेत. त्यांतील एक अशी–

रामचंद्राने अश्वमेध यज्ञाच्या प्रसंगी सोडलेला घोडा लव आणि कुश या त्याच्याच पुत्रांनी येथे पकडला. त्यामुळे अश्वरक्षक व लव–कुश यांचे इथे युद्ध झाले.

या युद्धातील बाण अजूनही इथल्या नदीत मिळतात, अशी लोकांची श्रद्धा आहे इथले बाल्कानेश्वराचे (महादेव) मंदिर लव–कुशानी बांधले अशी समजूत आहे इथे सीतेचेही एक मंदिर आहे [ कल्याण–तीर्थांक ]

## परिवर्तिनी एकादशी

एक व्रत भाद्रपद शुद्ध एकादशीला हे व्रत करतात या दिवशी विष्णूने शयनावस्थेत आपली कूस बदलली म्हणून या एकादशीला हे नाव प्राप्त झाले हिला पद्मा एकादशी असेही म्हणतात विष्णु पूजा, उपवास, रात्री जागरण व कथाकीर्तन, असा या व्रताचा विधी आहे या व्रताची कथा अशी –

प्राचीन काळी मांधाता नावाचा एक राजा होऊन गेला त्याच्या राज्यात एकदा अवर्षण पडले दुष्काळामुळे त्याची सारी प्रजा हैराण झाली मांधात्याने अंगिरस ऋषीकडे जाऊन त्या दुष्काळाचे कारण विचारले त्यावर ऋषी म्हणाला 'सांप्रत एक शूद्र तपश्चर्या करीत आहे त्याला तपाचा अधिकार नाही त्या पापाने हे अवर्षण पडले आहे तेव्हा तू त्याचा वध कर, म्हणजे पाऊस पडेल' त्यावर राजा म्हणाला 'मी तप करणाऱ्याचा वध करणार नाही याहून निराळा उपाय सांगा' मग अंगिरस ऋषीने परिवर्तिनी एकादशीचे व्रत त्याला सांगितले राजाने ते सर्व प्रजेकडून करवून घेतले त्या पुण्यसंचयाने पाऊस पडला व दुष्काळ दूर झाला (पद्म पु उ ख ५७ )

याच तिथीला किंवा दुसऱ्या दिवशी द्वादशीला विष्णूचा परिवर्तनोत्सव करतात त्या प्रसंगी सायंकाळी विष्णूची पूजा करून त्याची पुढील श्लोकाने प्रार्थना करतात–

**वासुदेव जगन्नाथ प्राप्तेयं द्वादशी तव ।**
**पार्श्वेन परिवर्तस्व सुखं स्वपिहि माधव ।।**

एवढे झाल्यावर नृत्यगीतादी कार्यक्रम करून उत्सव समाप्त करतात [व्रतपरिचय, हि व्र प त्यौ , व्रतराज]

## परिवारम

द भारतातील एक जात या लोकांची वस्ती प्रामुख्याने मदुरा, तिरुनेलवेली, कोईंबतूर या जिल्ह्यात व म्हैसूरच्या काही भागात आहे म्हैसूरमधील परिवारम हे मूळचे तमिळनाडमधील असावे, असा तर्क आहे परिवारम या शब्दाचा अर्थ सेना किंवा समुदाय असा होतो पूर्वी या जातीचे लोक सैनिक होते, असे सांगतात

चिन्न उलीयम आणि पेरीय उलीयम असे याचे दोन पोटभेद आहेत चिन्न उलीयम हे पालखी वाहण्याचे काम करतात, तर पेरीय उलीयम हे जमीनदाराकडे घरकाम करतात त्या दोघात लग्नसंबंध होत नाही शेती, मच्छीमारी आणि व्यापार हे परिवाराचे प्रमुख व्यवसाय आहेत

**विवाहप्रथा** – यांच्या विवाहातील काही विधी इतर जाती प्रमाणेच आहेत, पण काही विधी मात्र विलक्षण आहेत, ते असे – प्रारंभी एक इसम पाण्याचा घडा डोक्यावर घेऊन वधूच्या घरी जातो तिथे गेल्यावर पुढच्या अंगणाला तीन प्रदक्षिणा घालतो या वेळी नऊ प्रकारची धान्ये एका पिवळ्या फडक्यात बांधून ते फडके एका बांबूला बांधतात मग तो बांबू घेऊन वरवरही त्या माणसाबरोबर अंगणाला प्रदक्षिणा घालतात तिसरी प्रदक्षिणा झाल्यावर तो बांबू व ते घडे घराच्या [illegible] यांत ठेवून देतात नंतर पहिल्या बांबूबरोबरच आणखी तीन बांबू आणून त्यांचा लग्नमंडप तयार करतात नंतर वधू–वराची मनगटे एकत्र बांधून वराचा भाऊ त्यांना थोडे अंतर चालवतो मग एका मिठाच्या भांड्यात ती दोघे हात घालतात मग नवरा मुलगा फडक्यात गुंडाळलेला एक वरवंटा वधूच्या हातात देऊन म्हणतो का हे मूल घे मी राजवाड्यात जात आहे' पत्नी ते मूल घेऊन म्हणते, की 'मुलाला माझ्या जवळ द्या त्याच्यासाठी दूध तयार आहे' याप्रमाणे तीन वेळा करतात नंतर वराची बहीण वधूला नाळी बांधते लग्नाचे पौरोहित्य ब्राह्मण करतो

मुलगी प्रथम ऋतुस्नात झाली म्हणजे तिला एका निराळ्या झोपडीत सोळा दिवस ठेवतात नंतर ती झोपडी जाळतात व तिने वापरलेली मडकी फोडून टाकतात फोडलेल्या मडक्याच्या तुकड्यात जर पावसाचे पाणी साठले, तर त्या मुलीला संतती होणार नाही, असे समजतात म्हणून त्या मडक्यांचा अगदी बारीक चुरा करतात स्त्री प्रसूत झाल्यावर बारा दिवस सुवेर पाळतात बाराव्या दिवशी मुलाचे नाव ठेवतात आणि एकाणतिसाव्या दिवशी त्याचे कान टोचतात

**देवधर्म** – शिव आणि विष्णु या त्यांच्या आराध्य देवता होत रंगस्वामी, रामदेवरू, मरम्म आणि गंगम्म या लोकदेवतांचीही ते पूजा करतात

**मर्तिकप्रथा** – हे लोक प्रेते पुरतात किंवा जाळतात सुतक अकरा दिवस पाळतात तिसऱ्या दिवशी अस्थी गोळा करून एका भांड्यात ठेवतात व काही दिवसानंतर त्या जलात विसर्जित करतात बाराव्या दिवशी नातलगांना भोजन घालतात [का ट्रा स इ , भैं टा का ]

## परिवेदन

एक धार्मिक रूढी मोठ्या भावाच्या आधी लहान भावाने लग्न करणे किंवा मोठ्या बहिणीचे लग्न व्हायच्या आधी तिच्या लहान बहिणीचे लग्न करणे या गोष्टीला परिवेदन म्हणतात अशा वेळी त्या मोठ्या भावाला परिवित्त किंवा परिवित्ती असे म्हणतात त्याचप्रमाणे धाकट्या

बहिणीला अग्रेदिधिषू व परिविदिनी आणि धाकट्या बहिणीला दिधिषू असे म्हणतात. त्यांच्या यजमानांना अनुक्रमे अग्रेदिधिषुपती व दिधिषुपती म्हणतात. अशा मुलीच्या पित्याला किंवा पालकाला परिदायी किंवा परिदाता म्हणतात. मोठ्या भावाच्या आधी अग्न्याधान करणाऱ्या धाकट्या भावाला पर्याधाता व मोठ्याला पर्याहित म्हणतात.

विष्णुधर्मसूत्रात परिवेत्त्याला दोषी ठरवून त्याला श्राद्धाला बोलावू नये, असे सांगितले आहे. वसिष्ठधर्मसूत्रात त्याला बारा दिवसांचे कृच्छ्र प्रायश्चित्त सांगितले आहे.

मोठा भाऊ वेडा, पापी, रोगी किंवा क्लीब असल्यास अथवा देशांतराला गेला असेल, तर त्याच्या आधी लहान भावाला लग्न करण्यास किंवा सोमयाग करण्यास हरकत नसते. हल्लीच्या काळात परिवेदन गर्ह्य समजले जात नाही. [हि. ध.]

**परिषद** — समावार बसणे असा या शब्दाचा अर्थ आहे. 'विद्वानांची समिती' अशा अर्थी हा शब्द वैदिक वाङ्मयात आलेला आहे (बृहदा. उप. ६.१.१). विवाद्य धार्मिक प्रश्नांवर निर्णय देणारी सभा, न्यायाधीशाला साहाय्य करणारी समिती, राजाचे मंत्रिमंडळ असाही याचा अर्थ आहे. धार्मिक परिषदेत निदान दहा विद्वान असावे, असे धर्मसूत्रात व स्मृतिग्रंथात सांगितले आहे. त्या परिषदेत वेदांचे अध्ययन केलेले व अर्थज्ञान जाणणारे, तर्कशास्त्राचे ज्ञान असलेले पंडित, एक मीमांसक, एक नैष्ठिक ब्रह्मचारी, एक गृहस्थ व एक संन्यासी अशा व्यक्तींचा समावेश होत असे. परिषदेत पाच किंवा सात लोक असले तरी पुरेसे होतील, असे बृहस्पतीने म्हटले आहे. वसिष्ठ, याज्ञवल्क्य व पराशर यांच्या मते निदान तीन ते चार लोक परिषदेत असावे. धर्माला अनेक अंगे असतात व त्याची गती सूक्ष्म असते, म्हणून विशेष संशयाच्या प्रसंगी एकाच पुरुषाने निर्णय देऊ नये, मग तो कितीही ज्ञानसंपन्न असो, असेही सांगितलेले आहे.

प्राचीन काळी पापाचरणाबद्दल प्रायश्चित्त सांगण्याचे काम धर्मपरिषदेचे असे, तर अपराधी मनुष्याला ते प्रायश्चित्त घ्यायला लावण्याची जबाबदारी राजाकडे असे. राजा परिषदेच्या निर्णयाप्रमाणेच चालत असे, असेही म्हटले आहे (विष्णु धर्मसूत्र ५. १९८, आप. ध. सू. २. ५. १०. १२). परिषदेच्या सदस्यांनी स्वार्थासाठी, मायाममतेमुळे, भयाने किंवा अज्ञानामुळे कमी प्रायश्चित्त सांगितले, तर त्यांना पाप लागते, असे पराशर सांगतो (६. ५५–५७). परिषदेचा निर्णय शक्यतो एकमताने व्हावा, असे प्रायश्चित्तसारात म्हटले आहे. मात्र परिषदेने प्राणांतिक प्रायश्चित्त कोणालाही सांगू नये, असा धर्मशास्त्राचा दंडक होता (मनु. ११. ७३).

वैदिक वाङ्मयात विद्वत्परिषदेचाही उल्लेख आहे. उच्च शिक्षणाच्या विचारार्थ अध्यापक व निवडक विद्यार्थी यांची अशी समिती नेमण्याची प्रथा होती. त्या परिषदेला राजाही उपस्थित राहत असे.

प्राचीन काळी राजाला मार्गदर्शन करणारी जी समिती असे, तिला मंत्रिपरिषद असे नाव होते. गणराज्याचा कारभारही परिषदेच्या द्वारा चालत असे.

प्रत्येक बौद्ध भिक्षुसंघातही एक परिषद असे. संघातील सर्व भिक्षु त्या परिषदेचे सदस्य होऊ शकत. परिषदेच्या कामासंबंधी अनेक नियम केलेले असत. त्या परिषदेच्या स्वरूपावरून गणराज्यातील परिषदेची कल्पना करता येते, कारण शाक्य व लिच्छवी गणराज्यातील परिषदेचा आदर्श पुढे ठेवूनच भिक्षुसंघातील शासनव्यवस्था ठरवली गेली होती. सर्व प्रकारची धोरणे निश्चित करणे आणि विधिनियम तयार करणे, हे परिषदेचे काम असे. [वे. इ., हि. ध., बौ. का. स.]

**परिस्रुत** — एक प्राचीन पेय. हे पेय मादक असले, तरी सुरा व सोम यांहून ते भिन्न असल्याचे उल्लेख अथर्ववेद (३.१२.७, २०.१२७.९) व शतपथ ब्राह्मण (६.१.२.१४, ११.५.१.१३) यांत आलेले आहेत. हे पेय फुलांपासून तयार करीत आणि त्याचा उपयोग यज्ञप्रसंगी केला जाई, असे वाजसनेयी संहिता (१.३८, १९.१५), मैत्रायणी संहिता (३.११.२), व कात्यायन श्रौतसूत्र (१४.१.१४, १५.१०.११) यांत म्हटले आहे. [वै. इ.]

**परिहार** — रजपुतांच्या चार अग्निकुळांपैकी एक. या वंशातील एक राजघराणे प्रतीहार या नावाने प्रख्यात असून, त्या वंशातील सामान्य लोक परिहार या नावाने ओळखले जातात. यांची वसती राजस्थानातील मारवाडात आणि अवध प्रदेशात आहे. मात्र सांप्रत यांची लोकसंख्या अगदी अल्प उरली आहे. यांच्या अनेक पोटजाती असून, त्यांतील इन्दा रजपूत ही पोटजात विशेष प्रसिद्ध आहे. ती जोधपूरच्या पश्चिम भागात आढळते.

हे लोक विष्णूचे उपासक असले, तरी जोधपूरची चामुंडा ही त्यांची कुलदेवता आहे. हे लोक वड, पिंपळ व रोहिडा या वृक्षांना पवित्र मानतात व ते वृक्ष कधी तोडीत नाहीत. यांचा एक प्रसिद्ध पूर्वज नरहरराव यांची गुहा मंडोर येथे आहे. तिथे हे लोक यात्रेसाठी जातात व त्याची पूजा करतात.

या लोकांचे विवाह, अंत्यक्रिया वगैरे संस्कार राठोड, भाटी, इ. रजपुतांप्रमाणेच असतात. [रा. जा.]

**परीट** महाराष्ट्रात कपडे धुण्याचा उद्योग करणाऱ्या लोकांना परीट म्हणतात त्यांना धोबी असेही नाव आहे मराठा, लिंगायत, कामाठी आणि तेलगी असे निरनिराळ्या जातीचे परीट आहेत कामाठी आणि तेलगी परीट हे परदेशी आहेत मराठा परिटांना कुणबी परीट म्हणतात ते मूळचे मराठेच आहेत या कुणबी परिटांचे देशी व कोकणी असे दोन वर्ग आहेत यांच्यात आपसात रोटी–बेटी व्यवहार होत नाही देशी परिटांच्यातही दोन भाग आहेत एक अस्सल व दुसरे कडूस किंवा दासीपुत्र यांची पवार, बाघ, दळव, सुर्वे अशी उपनावे असून नाग, कुऱ्हाड, सूर्यफूल चिंच, आंबा अशी यांची देवके आहेत

**विवाहप्रथा** – समान देवके असलेल्या कुटुंबांचा लग्नसंबंध होत नाही आतेमामेभावंडांना लग्न करता येते पूर्वी मुली वयात येण्यापूर्वी त्यांचे लग्न होत असे लग्नासाठी मुलाचा बाप मुलीला मागणी घालतो व मुलीच्या बापाला देज देतो मराठा कुणबी जातीप्रमाणेच यांचा विवाहसंस्कार होतो लग्नाचे पौरोहित्य ब्राह्मण करतात विधवेला पुनर्विवाह करता येतो त्याचा विधी फार साधा असतो कृष्णपक्षात रात्रीच्या वेळी हा विवाह गुपचुप एका बाजूला करतात विवाह लागल्यावर दुसऱ्या दिवशी सकाळपर्यंत या वधूवरांची तोंडे पाहणे अशुभ समजले जाते

पत्नी व्यभिचारी असल, तर पतीला काडीमोड करून दुसरा विवाह करता येतो कोकणी परिटांत दोन भाऊ दोन बहिणींशी लग्न करू शकतात, पण देशी परिटांत मात्र तसे करता येत नाही देशी परिटांत एखाद्या मुलीने वरच्या जातीच्या मुलाशी अनैतिक वर्तन केले, तर त्या मुलीला वरच्या जातीत राहण्याची परवानगी दिली जाते पण त्यासाठी मुलीच्या बापाने जातपंचायतीला दंड व ज्ञातिभोजन द्यावे लागते पुरुष जर खालच्या जातीमधला असेल, तर मुलीला बहिष्कृत करतात

**देव धर्म** – यांच्यातले काही लोक वारकरी पंथाचे व काही कबीर पंथाचे आहेत बहिरोबा, खंडोबा म्हसोबा, भवानी व ग्रामदेवता ही या लोकांची दैवते होत ते देवकाचीही पूजा करतात शंगेरीचे मठाधिपती हे त्यांचे गुरु होत

परीट हे गावातील बलुतेदारांपैकी एक आहेत ग्रामीण विभागात त्यांना धुलाईच्या मोबदल्यात पैसे न मिळता सुगीच्या वेळी प्रत्येक खळावरून धान्याचा ठराविक वाटा मिळतो गावात लग्नकार्य, सोयर, सुतक असताना परीट गावकऱ्यांचे कपडे धुतात लग्नात वधूवरावर चादवा धरणे, पायघड्या घालणे, हळदी व तेलवण या प्रसंगी चौक भरणे, ही कामे परिटाकडे व परिटिणीकडे असतात सध्या लोकांचे कपडे नेहमी धुण्याबद्दल परिटाला रोज भाकरी मिळते सांप्रत काही परीट जमीनदार बनले आहेत, तर काही शेतमजुरी करू लागले आहेत

**मर्तिकप्रथा** – हे लोक मृतांना जाळतात किंवा पुरतात भाद्रपद वद्य पक्षात पितरांसाठी महालय करतात, तेव्हा ब्राह्मणांना शिधासामग्री देतात व जातिबांधवांना जेवण घालतात पाहा– धोबी [ टा बॉ , म ग्रा स , गा गा ]

**परुच्छेप दैवोदासी** एक सूक्तद्रष्टा ऋग्वेदाच्या पहिल्या मंडलातील १२७ ते १३९ ही सूक्ते याने रचली आहेत या सूक्तांत अग्नी, इंद्र, वायू, मित्रावरुण, पूषा व विश्वेदेव यांची स्तुती आहे इंद्राची प्रार्थना करताना तो म्हणतो,

> त्वं न इंद्र राया परीणसा याहि
> पथाँ अनेहसा पुरो याह्यरक्षसा ।
> सचस्व नः पराक आ सचस्वास्तमीक आ ।
> पाहि नो दूरादारादभिष्टिभिः सदा पाह्यभिष्टिभिः ॥
> (ऋ १ १२९ ९)

अर्थ – जो मार्ग विपुल ऐश्वर्याचा आणि निर्दोष असेल, त्याच मार्गाने आम्हाला घेऊन चल ज्या मार्गात राक्षस नसतील त्याच मार्गाने आम्हाला घेऊन चल आम्ही परदेशी असलो, तरी आमच्याबरोबर राहा आणि घरी असलो तरी राहा आम्ही जवळ किंवा दूर असलो, तरी आपल्या कृपाछत्राने आमचे सदैव रक्षण कर

एकदा परुच्छेप व नृमेध या दोघामध्ये मंत्रसामर्थ्याविषयी स्पर्धा लागली होती त्या वेळी नृमेधाने ओल्या लाकडात धूर उत्पन्न केला, तर परुच्छेपाने लाकडाशिवाय अग्नी उत्पन्न केला, असे तैत्तिरीय संहितेत सांगितले आहे (२ ५ ८ ३)

**परुष्णी** एक वेदकालीन नदी ऋग्वेदात अनेकदा हिचा उल्लेख आला आहे (५ ५२ ९, ७ १८ ८९, १० ७५ ५) सांप्रतची पंजाबमधील रावी म्हणजेच प्राचीन परुष्णी नदी होय दाशराज्ञ युद्ध याच नदीच्या काठी झाले होते या नदीचे पाणी चढल्यामुळे पळणारे राजे बुडून मेले आणि त्यामुळे त्या युद्धात सुदासाला जय मिळाला असे ऋग्वेदात सांगितले आहे (ऋ ७ १८ ८) विल्सनच्या मते परुष्णी या नावाचा संबंध ऊर्णा म्हणजे लोकर या शब्दाशी आहे परुषू म्हणजे पारिष्कृत केलेल्या लोकरीचा गुंता होय त्यावरून परुष्णी हे नाव पडले आहे असे त्याचे मत आहे पाहा– रावी [ म ज्ञा को भाग ३, बृहत्पूर्व जग, वै सा , भू द ]

**परेंग** गर आदिवासी जमात या लोकांची वस्ती ओडिसातील कोरापुट जिल्ह्यात आहे परेंगांचा गदबांशी घनिष्ठ संबंध असून, त्यांची भाषा मात्र सवरांच्या भाषेसारखी आहे त्यांच्या लोककथांमध्ये परेंगांना व गदबांना भाऊ भाऊ म्हटले आहे त्या दोन्ही समाजाची ग्रामीण व सामाजिक व्यवस्था सारखीच आहे गदबांप्रमाणे त्यांच्यातही मुलांसाठी व मुलींसाठी सामुदायिक शयनगृहाची प्रथा आहे

हे लोक पूर्वी गोमांस खात असावे, असे त्यांच्या कथांवरून दिसते त्यांना गायीविषयी विशेष आदर वाटत नाही

इस्पुर महाप्रभू हा परेंगांचा प्रमुख देव होय डांग डोंग, माडिग, धर्मदेवता, वसुमाती (धरती माता), भाम (पर्जन्यदेवता), मेघराज, जम्म (यम), लक्ष्मी, सीता, इ त्यांच्या अन्यही देवता असून त्या त्यांच्या कथांतूनही आढळतात राम, लक्ष्मण, भीम, इ व्यक्तींसंबंधी यांच्या कथा विचित्र आहेत [ट्रा मि ओ ]

**परैयन** द भारतातील एक जात यांची वस्ती मुख्यत तमिळनाडू प्रदेशात आहे यांना परह असेही म्हणतात परै=ढोल, या शब्दावरून परैयन हे नाव यांना मिळाले आहे कारण हे लोक अनेक प्रसंगी ढोल वाजविण्याचे काम करतात

व्यवसाय – यांच्यातील काही लोक विणकर आहेत, तर काही वैद्य व पुरोहित आहेत प्राचीन काळी ही जात प्रतिष्ठित मानली जात असावी त्याविषयी एक कथा सांगतात, ती अशी– यांचा मूळ पुरुष साल सांबवन हा ब्राह्मण पुरोहित होता शिवालयात देवपूजेत गोमांस अर्पण करण्याचे काम त्याला करावे लागे एकदा त्याने नैवेद्यातला गोमांसाचा थोडासा भाग आपल्या गरोदर पत्नीसाठी लपवून ठेवला त्यामुळे देव कोपला व त्याने साल सांबवनाला परैयन केले (ढोल वाजवण्याचे काम करायला सांगितले) आणि त्याच्या भावाला पुरोहिताचे काम दिले

यांच्यातील काही लोकांना विशेष अधिकार असून, अनेक ठिकाणी, निरनिराळ्या प्रसंगी मानाचे स्थान दिले जाते, ते त्यांच्या पूर्वीच्या उच्च दर्जाचे द्योतकच आहे सांप्रत मात्र त्यांना हलका दर्जा प्राप्त झालेला असून, ते शेतमजुरी, रखवालदारी, रस्ते झाडणे, भंगीकाम, थडगी खणणे, इ हलकी कामे करतात गेल्या शतकात उच्च वर्णाचे लोक यांना हीन व अस्पृश्य मानीत तसेच त्यांना गुलामांसारखे राबवीत पण ख्रिस्ती मिशनऱ्यांच्या प्रयत्नांमुळे या लोकांची स्थिती आता पुष्कळ सुधारली आहे

या लोकांची वसती वेगळी आणि गावापासून दूर असते तिला परचेरी म्हणतात परैयन आपल्या वसतीत ब्राह्मणांना येऊ देत नाहीत ते जर आपली वस्ती सोडून गेले, तर ब्राह्मण लोक ती जागा घर बांधण्यासाठी चांगली समजतात परैयनांना गावाच्या सीमेचा चांगली माहिती असते त्याविषयी तंटा उत्पन्न झाला, तर परैयनाच्या प्रमुखाने दिलेला निर्णय सर्वजण मान्य करतात



परैयन पुरुष

**देव धर्म** – यांच्यातले काही लोक शैव आहेत, तर काही वैष्णव आहेत बरेच लोक आता ख्रिस्ती झाले आहेत सर्व प्राणिमात्राचा जनक व सर्वव्यापी असा एक परमेश्वर ते मानतात व त्याला कडवुल असे म्हणतात मात्र त्याचे देवालय नसते व त्याची पूजाही कोणी करीत नाही कन्नियम्म म्हणजे सात कुमारिका यांचा पूजा यांच्यात रूढ आहे त्यासाठी ते एका झाडाखाली लहानशी झोपडी किंवा देऊळ बांधून, त्यात सात दगड मांडतात अशा देवळाला अम्मन कोईल म्हणतात एल्लम्म, मुथीलम्म, पदैयत्तल व परवोनम्म या त्यांच्या ग्रामदेवता आहेत तेल, हळदकुंकू, फुले, कापूर यांनी उपचारांनी त्यांची पूजा केली जाते देवतेपुढे नारळ फोडतात किंवा कोंबडे, बकरे बळी देतात पटकीची व देवीची साथ सुरू झाली, की गंगम्म व मरियम्म या देवतांची पूजा करतात मारी देवी हिचा वार्षिक उत्सव करतात दरवर्षी तिचे लग्नही लावतात हे लोक भूत–पिशाचांचीही पूजा करतात

काडुगल्र ही यांची संरक्षक देवता होय तिच्या वार्षिक उत्सवात हे लोक भुतांखेतांची सोंगे घेऊन नाचतात अवर्षण झाले असता कोडुपावीचा धावा करतात तिची मातीची प्रतिमा करून सात दिवस तिला रथातून मिरवतात शेवटच्या दिवशी

तिची अत्ययात्रा काढण्यापूर्वी मर्ताचे गुह्य अवयव तोडतात त्या वेळी ढोल वाजवतात या विधीमुळे पाऊस पडतो, अशी त्यांची समजूत आहे

मंत्रतंत्र व जादूटोणा यांत परयन लोक फार कुशल असतात ते नंतर कुत्रा किंवा मांजर यांची रूपे घेऊ शकतात अशी निकडच्या लोकांची समजूत आहे

प्रथम ऋतुप्राप्तीच्या प्रसंगी हे लोक मुलीला फार जपतात तिला आठ दिवस बाजूला बसवून ठेवतात किंवा स्वतंत्र झोपडीत ठेवतात नवव्या दिवशी तिला स्नान घालून मग अंगणात आणतात तिला दृष्ट लागू नये म्हणून धणवीचे दहा दिवे तिच्यावरून तीन वेळा ओवाळतात व तिला काही वस्तू भेट देतात



परैयन स्त्री

**विवाहप्रथा**–बहुधा आईवडील आपल्या मुलांची लग्ने ठरवतात मुलीच्या शोधासाठी निघताना शकुन पाहतात विवाहासाठी वधूच्या मामाची संमती असावीच लागते ती मिळाली की मग वाङ्निश्चय करतात तो वधूवरांवर आजन्म बंधनकारक असतो लग्न लहान वयात ठरले, तरी मुले वयात आल्यानंतरच विवाह होतो विवाहसमारंभाच्या आधी दोन्ही पक्ष परस्परांना भेटीदाखल वस्त्रे, तांदूळ, भाजीपाला आणि ऐपतीप्रमाणे द्रव्य देतात

वधूच्या गळ्यात ताळी म्हणजे हळदीने पिवळा केलेला दोरा बांधणे, एवढाच विधी लग्नात महत्त्वाचा असतो वल्लुवर म्हणजे पुरोहित यांच्या समक्ष तो करतात मग तो वधूवरांना आशीर्वाद देतो

परैयन पुरुष आतेबहिणीशी किंवा मामेबहिणीशी लग्न करू शकतो विवाहविधी होण्यापूर्वी वधूवर पतिपत्नी या नात्याने एकत्र राहू शकतात त्यांना मुले झाली तरतीही औरस मानली जातात विवाह जाणत्या वयात झाला, तर वधूवर लगेच एकत्र नांदत नाहीत त्यासाठी वधूची माता मुहूर्त पाहून दिवस ठरवते त्या दिवशी ज्ञातिभोजन घालून मग त्या दंपतीला एकत्र राहण्याचा परवानगी दिली जाते

या जातीत बहुपत्नीकत्व नाही पण दुसरी स्त्री ठेवला, तर मात्र चालते तिची मुलेही औरसच मानली जातात पत्नीला मूल झाले नाही, तर मग त्या ठेवलेल्या स्त्रीशी लग्न करतात

स्त्री विधवा झाली, की सोळाव्या दिवशी तिची ताळी काढून टाकतात मग ती कुंकू लावीत नाही केशवपनाची चाल मात्र यांच्यात नाही

**पंचायत**–यांची जातपंचायत असते जातीतले धनिक व प्रतिष्ठित पुरुष पंचाचे काम करतात न्याय-निवाडा, घटस्फोटाला परवानगी, अपराधाबद्दल शिक्षा या गोष्टी पंचायतीच्या अधिकारात असतात बलात्कार, व्यभिचार, इत्यादींसाठी अपराध्याला कडक शिक्षा केली जाते काही वेळा त्याला अग्निदिव्यही करायला लावतात

या जातीचे काही लोक केरळ प्रदेशात, विशेषत मलबार मधील डोंगराळ भागातही आढळतात तिथे ही जात सर्वांत हलकी मानली जाते बांबूच्या टोपल्या व सुपे बनवणे हा त्या लोकांचा व्यवसाय आहे त्याशिवाय हे लोक जादूटोणाही करतात त्यांच्यात वाटमारीची प्रवृत्तीही आढळते कालीच्या उत्सवात ढोल वाजवण्याचे काम यांच्याकडेच असते मंत्रविद्येच्या जोरावर हे लोक निरनिराळ्या पशूंची रूपे घेऊ शकतात, वशीकरणातही ते प्रवीण असतात, अशी समजूत आहे

**मृतकप्रथा** – हे लोक बहुधा प्रेते पुरतात आणि क्वचित जाळतात तिसऱ्या किंवा पाचव्या दिवशी मृतात्म्याला दुग्धांजली देण्याची प्रथा आहे पंधराव्या दिवशी पिंड देतात, त्या विधीला कर्मांतरम म्हणतात काही महिन्यांनंतर मृतात्म्याला फुले वाहतात व नारळ फोडतात वर्षश्राद्ध करण्याचीही प्रथा आहे
[का दा रा र, एम ए पी एच, मदुरा गद्दो]

**पर्जन्य** ऋग्वेदातील एक गौण देवता ऋग्वेदातील काही सूक्तांत पर्जन्याची प्रशंसा केलेली आहे पर्जन्याचा अर्थ इथे वर्षाकालीन मेघ असा केलेला असून, त्याच स्वरूपात त्याचे वर्णन केलेले आहे हाच मेघ दररोज गर्जून वर जातो आणि वृष्टी करून पृथ्वीला तृप्त करतो, असे म्हटले आहे त्याला मोठ्याने हंबरणाऱ्या वृषभाची उपमा दिली आहे वृष्टी करणे, हेच त्याचे मुख्य काम आहे तो द्यूचा पुत्र असून बलवान, गर्जना करणारा, उत्कर्षाविष्कार करणारा व वनस्पतींमध्ये जलरूप गर्भ धारण करणारा आहे तो ओषधींचे संवर्धन करतो, पाण्याची सुबत्ता करतो आणि सर्व जगावर सत्ता चालवतो तो स्थावर-जंगम सृष्टीचा आत्मा आहे त्याची दोन रूपे असून, त्यांतील एक रूप वांझ गायीसारखे व दुसरे रूप उत्पादक

आहे तो वृक्षावर आघात करतो आणि राक्षसांना ठार मारतो. सुप्रजा देण्याबद्दल, ओषधी फलयुक्त करण्याबद्दल, अन्न देण्याबद्दल आणि द्यावा-पृथिवी जलाने भरून टाकण्याबद्दल त्याची प्रार्थना करण्यात आली आहे.

वर्षाव करणे हे त्याचे वैशिष्ट्य आहे. तो जलमय रथावर आरूढ होऊन चारही बाजूंना उडतो. आपल्या अश्वांना हाकलणाऱ्या सारथ्याप्रमाणे तो आपल्या वर्षाछिन्न दूतांचे प्रदर्शन करतो. जेव्हा तो वृष्टी करतो, तेव्हा सिंहाच्या गर्जनेप्रमाणे आवाज येतो. वारा आणि विद्युत यांच्याशी याचा संबंध आहे. याला एके ठिकाणी पिता असे म्हटले आहे.

पर्जन्याविषयीचे ऋग्वेदातील एक सूक्त पुढीलप्रमाणे—

**पर्जन्याय प्र गायत दिवस्पुत्राय मीळ्हुषे ।**
**स नो यवसमिच्छतु ।।**
**यो गर्भमोषधीनां गवां कृणोत्यर्वताम् ।**
**पर्जन्यः पुरुषीणाम् ।।**
**तस्मा इदास्ये हविर्जुहोता मधुमत्तमम् ।**
**इळां नः संयतं करत् ।।**

(ऋ. ७. १०२)

अर्थ— आकाशाचा पुत्र आणि जलाचा वर्षाव करणारा जो पर्जन्य, त्याच्यासाठी स्तुति गायन करा. आम्हाला धनधान्य देण्याची त्याला इच्छा होवो. या पर्जन्यामुळे ओषधी-वनस्पतींमध्ये, गायींमध्ये, घोड्यांमध्ये आणि स्त्रियांमध्ये गर्भधारणा होते. म्हणून हे ऋत्विजांनो, त्याच्या प्रीत्यर्थ अग्निमुखामध्ये हा अत्यंत मधुर असा हविर्भाग अर्पण करा. तोच आपली संतती परी समृद्धी घडवून आणील.

पर्जन्य या नावाची व्युत्पत्ती अनिश्चित आहे. पण त्याच्या स्वभाववैशिष्ट्यावरून, नेनफ या पंडिताने लिथुआनियन गर्जनदेवता पर्कुनस याच्याशी त्याचा संबंध जोडला आहे.

**संकेत**— पर्जन्याविषयी काही संकेत आहेत, ते असे— हस्त नक्षत्रावर पडलेला पाऊस मलाना माईट असतो. स्वाती नक्षत्रावर पडलेल्या पावसाने मोती निर्माण होतात. मघाच्या पावसाचे पाणी प्यायल्यास चार महिनेपर्यंत आरोग्य टिकून राहते. विशाखा नक्षत्राचा पाऊस विषारी प्राणी निर्माण करतो. देवीची साथ आलेली असल्यास ती चित्रा नक्षत्राच्या पावसाने नष्ट होते. मार्गशीर्ष व माघ महिन्यात, लग्नाच्या वेळी पाऊस पडल्यास, तो अशुभ, पण इतर महिन्यांत त्या वेळी पाऊस पडल्यास तो शुभ. नूतन गृहप्रवेश करीत असताना पाऊस आल्यास तो शुभ. वधू वराच्या अंगावर पाऊस पडल्यास गर्जिनशांती करावी. तसेच बाळंतिणीवर, लहान मुलांवर किंवा नूतन ऋतुप्राप्त झालेल्या स्त्रीवर पाऊस पडल्यास ते अशुभ होय. पूजेला सुरवात करायच्या आधी अंगावर पावसाचे थेंब पडल्यास, वस्त्रे बदलावी. देवाच्या मूर्तीवर किंवा देवाला वाहण्याच्या वस्तूवर पाऊस पडल्यास संप्रोक्षणविधी करावा. हवनाग्नीवर पाऊस पडून तो विझल्यास प्रायश्चित्तपूर्वक पुनराधान करावे. पावसाचे पाणी प्रसादावर पडल्यास तो अपवित्र होतो. अर्घ्य, संध्या, तर्पण व अभिषेक यासाठी पावसाचे पाणी वर्ज्य समजावे.

मुसलमान लोकांतही पावसासंबंधी काही बरे-वाईट संकेत आहेत. प्रवासाला निघते वेळी किंवा लग्नाच्या वेळी पाऊस आल्यास ते शुभ चिन्ह मानतात. मात्र वधू वराच्या अंगावर पाऊस पडल्यास ते अशुभ मानतात. कुराणावर पाऊस पडू देऊ नये, असा त्यांचा नियम आहे. बाहेर पाऊस पडत असताना सच्चा मुसलमान कुराण पठण करीत नाही. मात्र मेघगर्जना होत असताना कुराण पठण करणे, फार पवित्र मानतात. कारण गडगडणारे ढग सुभानअल्ला असे म्हणतात, अशी त्यांची समजूत आहे. एखाद्याच्या मृत्यूनंतर तीन दिवसांच्या आत पाऊस आल्यास ती व्यक्ती सद्गुणी होती, असे मानतात.

**पावसाचे भविष्य**— पाऊस ही आपल्या देशातील एक अत्यावश्यक गोष्ट आहे. पाऊस पडला, तरच धान्य पिकते व नद्या विहिरींना पाणी टिकते. त्यामुळे सर्वजण उन्हाळ्याच्या शेवटी पावसाची आतुरतेने वाट पाहत असतात. विष्णू पुराणात सांगितले आहे, की सूर्य आपल्या किरणांच्या द्वारे आठ महिने बाष्परूपात जलकण शोषून घेतो आणि मग पाऊस पाडतो. जेव्हा बुध व शुक्र हे दोन ग्रह एका राशीत येतात, तेव्हा पाऊस पडतो. जेव्हा या दोघांच्या मध्ये सूर्य येतो, तेव्हा पाऊस पडत नाही. बुध, गुरू आणि शुक्र यांच्या उदयाच्या आणि अस्ताच्या वेळी आणि मंगळ व शनी हे वक्री असताना पाऊस पडतो. पाऊस पडायला जरा विलंब झाला, तर लोक त्याची प्रार्थना, विनवणी करतात.

**लोकगीते**— पावसासंबंधीची लोकगीते सर्वत्र प्रचलित आहेत. एका मैथिली लोकगीतात पर्जन्यदेवता इंद्राला पुढीलप्रमाणे आवाहन केले आहे—

**हाली हुलु बरसू इन्दर देवता**
**पानी बिनु पड़इछइ अकाले हो राम !**
**चौर सूखल, चाचर सूखल**
**सूखि गेलइ भइआ के जिराते हो राम !**
**राडी बमनिआ हरवा जोतइ छइ**
**फरवा उछटि अड़िया लगइ छइ हो राम !**

अर्थ— हे इंद्रदेवा, तू रिमझिम बरसात कर. हे राम, पाण्याविना दुर्भिक्ष पडले आहे. हिरवी मैदाने सुकून गेली आहेत. नदीनाले आणि तलाव कोरडे पडले आहेत. हे राम, हिरव्या

पिकांत मरणारी माझ्या भावांना शेतेही वाळून गेली आहेत विधवा ब्राह्मण स्त्रीने नागरं जाळला आहे आणि त्याचा फाळ मातीतून उगवून वर येतो आहे आणि घाऱ्याला लागतो आहे

पंजाबातील एक युवती श्रावण महिन्यात झोपाळ्यावर बसून मेघाला सांगते, ते असे–

> **बरसीं ता बरसीं मींहा मेरे बाबल दे देस,**
> **होर वी बरसीं सौहरे क्यारिए ।**
> **बरसिया ता बरसिया बीबो तेरे बाबल दे देस**
> **होर वी बरसिया बीबी सौहरे क्यारिएं ।**

अर्थ – हे मेघा, माझ्या पित्याच्या देशात तू बरसात कर आणि सासरच्या बागांवरही तू वर्षाव कर (त्यावर पर्जन्य म्हणतो– ) हे कुलवधू मी तुझ्या पित्याच्या देशात वृष्टी करून आलो आहे आणि तुझ्या सासरच्या बागाही पाण्याने भिजवून आलो आहे

महाराष्ट्रातील एक स्त्री पावसाला वृष्टी करण्याबद्दल विनवणी करते, ती अशी –

> **पड पड तू पावसा । माझा मुरडाच्या झाऱ्याखाती ।।**
> **कुनबी आल्यात काकुळती ।।**
> **पड पड तू पावसा । पिकू दे मूगराळा ।**
> **बधु माझा लेकुरवाळा ।।**
> **पड पड पावसा । नको बधू तालामाला ।**
> **व्हईल दुबळ्या भाजीपाला ।।**
> **पावसाची वाट । पहात्याल मलमल ।**
> **देवा मेघाजीन सुर्यासमोर डेर दिल ।**
> **मेघरायाच लगीन । ढगाचा वाजे डफ ।**
> **ईजबाई नवरी आली झपाझप ।।**
> **मेघरायाच लगीन । ढगाच्या मांडवात ।**
> **नवरी ईजबाइ आली चकाकत ।।**

अशा प्रकारची पर्जन्यविषयक लोकगीते भारतातल्या सर्व भागात प्रचलित आहेत महाराष्ट्रात आश्विन मासातील दसऱ्याच्या नवरात्रामध्ये मुली फेर धरून भोंडल्याची गाणी म्हणतात हे एक पर्जन्ययात्राच आहे त्याला हादगा असे म्हणतात हादगा म्हणजे सूर्य हस्त नक्षत्रात असताना खेळायचा खेळ होय हस्त नक्षत्रात पाऊस पडावा आणि त्याने देशात धान्य समृद्धी व्हावी या त्या खेळामागचा उद्देश असतो [ऋ द, व सा स व गा, रा पा र गा है]

## पर्जन्यनक्षत्रे

सूर्य मृग नक्षत्रात आला म्हणजे पावसाळा सुरू होतो व तो चित्रा नक्षत्रात गेला म्हणजे पर्जन्यकाळ बहुतेक संपतो म्हणून मृग नक्षत्रापासून हस्त नक्षत्रापर्यंतची नऊ नक्षत्रे पावसाची मानलेली आहेत याच नक्षत्रात भारतात बहुतेक ठिकाणी पाऊस पडतो मात्र प्रत्येक वर्षी तो सारखा पडत नाही, तर कमीजास्त पडतो हे पावसाचे मान आगाऊ कसे ओळखावे, याबद्दल ज्योतिष्यांनी काही ठोकताळे बसवले आहेत त्यासाठी सूर्यनक्षत्र कुठल्या वाहनावर आहे, ते काढतात व त्या वाहनावरून पावसाचे भाकित करतात याची रीत अशी – सूर्यनक्षत्रापासून दिवस नक्षत्रापर्यंत नक्षत्रे मोजून त्या आकड्याला नऊ या संख्येने भागतात बाकी शून्य आल्यास हत्ती, एक आल्यास अश्व, दोन आल्यास जंबूक, तीन आल्यास मंडूक, चार आल्यास मेष, पाच आल्यास मयूर सहा आल्यास मूषक, सात आल्यास महिषी व आठ आल्यास गर्दभ अशी सूर्यनक्षत्राची वाहने समजतात मंडूक, महिषी व हत्ती ही वाहने सुवृष्टिसूचक, मयूर, मूषक व गर्दभ ही अल्पवृष्टिसूचक, जंबूक व मेष ही अवर्षणसूचक आणि अश्व हे पर्वतावर होणाऱ्या वृष्टीचे सूचक मानतात

## पर्जन्यविधान

पाऊस पडावा म्हणून करण्यात येणारा विधी देशाची सुबत्ता पावसावर अवलंबून असते पाऊस योग्य वेळी आणि योग्य तेवढाच पडला, तर वृक्षवल्लींचे पोषण होते आणि धान्यही भरपूर पिकते पण कित्येकदा पाऊस अजिबात पडत नाही अशा वेळी लोक जे निरनिराळे विधी करतात, त्यांपैकी काही पुढे दिले आहेत –

वैदिक ब्राह्मण पाऊस पडावा म्हणून ऋग्वेदातील पर्जन्यसूक्ते म्हणतात, शिवलिंग पाण्यात बुडवतात किंवा लिंगावर सतत धार धरतात, त्याचप्रमाणे कारीरीष्टी करतात

कुंभार, बुडबुडे जोशी वगैरे लोक, पाऊस पडावा म्हणून एका पाटावर मातीच्या लिंगाची स्थापना करतात आणि तो एका नागव्या मुलाच्या डोक्यावर ठेऊन त्याला घरोघर फिरवतात घराघरातले लोक त्या लिंगावर पाणी ओततात

काही ठिकाणी एखाद्या डबक्यातून दगड घेतात आणि त्याची पूजा करून ते गावात घरोघर फिरवतात त्या वेळी प्रत्येक घरातील लोक त्या दगडावर पाणी ओततात

गिरनार पर्वतावर टोक या नावाचे एक सुळक्यासारखे शिखर आहे त्यावर एखादा माणूस चढून गेला तर पाऊस हमखास पडेल, असे समजतात

पाऊस पडावा, म्हणून हरसिद्धी देवीला स्नान घालतात व खिरीचा नैवेद्य दाखवतात इंद्र हा पर्जन्यवृष्टीचा धारक आहे म्हणून अवर्षण पडले असता काही लोक इंद्रमहोत्सव करतात काही वेळा शृंग नामक ऋषीची मूर्ती करून तिची जलात स्थापना करतात व तिच्यापुढे होमहवन करतात ग्रामदेवतांच्या

पूजेअर्चेत अंतर पडले असता अवर्षण पडते, अशी समजूत आहे. म्हणून त्यांना निरनिराळ्या प्रकारचे बळी देऊन संतुष्ट करतात.

गुजरातेत खालच्या वर्गातील काही स्त्रिया मातीचा एक गोळा करून पाटावर ठेवतात व तो वेलीच्या पानांनी झाकतात. या गोळ्याला मेहुलो असे म्हणतात. एक स्त्री तो पाट डोक्यावर घेते व घरोघर फिरते. बाकीच्या स्त्रिया गाणी गात तिच्या मागून जातात. घरातील लोक मेहुल्यावर तांब्याभर पाणी ओततात आणि त्या स्त्रियांना थोडे धान्य देतात.

मध्य प्रदेशातल्या एका जातीत, पाऊस लांबला, तर लोक बेडूक गोळा करून आणतात आणि त्यांच्या पायांना दोऱ्या बांधून लिंबाच्या झाडाच्या फांद्यांना उलटे टांगून ठेवतात. नंतर लहान मुले त्या फांद्या हातात घेऊन गावभर फिरतात, तेव्हा लोक त्यांच्या अंगावर पाणी टाकतात. बेडकांना त्रास दिला असता वरुण राजाला त्यांची दया येते आणि तो पाऊस पाडतो, अशी त्यांची समजूत आहे.

भडोचमधील लोक पाऊस पडावा, म्हणून वरुण राजाच्या घोड्याची मिरवणूक काढतात.

गुजरातमध्ये काही भागांत पाऊस पडावा, यासाठी लहान मुलींना एकत्र जमवून त्यांच्या केसांत कडुलिंबाच्या डहाळ्या खोचतात. मग या मुली गाणी गात घरोघरी हिंडतात. घरातील लोक त्यांच्या अंगांवर घागरभर पाणी टाकतात. द. भारतातही अशीच प्रथा आहे. पण तिथे मुलींऐवजी मुले गावभर फिरतात आणि ती नग्न असतात. तसेच, तिथे अवर्षणरूपी दानवाचा एक पुतळा तयार करून तो जाळण्याचीही पद्धत आहे.

प्राचीन काळी, पाऊस जर लांबला, तर राजे लोक सोन्याच्या नांगराने शेत नांगरीत किंवा बत्तीस लक्षणी पुरुष किंवा नवीन लग्न झालेले दांपत्य यांचा बळी देत, असे उल्लेख दंतकथांतून आढळतात.

सौराष्ट्रातील काही गावांत मुले एकत्र जमून दुसऱ्या गावच्या मुलांवर दगड फेकतात. ही दगडफेक जितकी अधिक होईल, तितका पाऊस जास्त पडेल, अशी या लोकांची समजूत आहे.

बिहारमध्ये काही ठिकाणी पावसाला निमंत्रण देण्यासाठी एक बेडूक एका मडक्यात ठेवतात आणि ते मडके शेजाऱ्याच्या घरी नेऊन ठेवतात. काही ठिकाणी बेडकांचे लग्न लावतात. बेडूक हा वरुण राजाचा आवडता प्राणी असल्यामुळे तो आनंदित झाला, तर वरुणही प्रसन्न होऊन पाऊस पाडील, अशी कल्पना असते. नेपाळात त्यासाठी बेडकांची पूजा करतात. राजस्थानात अशा वेळी आसन्नमरण बेडकाला पाणी पाजतात.

बंजारी जातीच्या स्त्रिया दूर रानात जातात आणि डोक्याला फेटा बांधून व हातात काटेरी झाडांच्या फांद्या घेऊन एकमेकींना झोडपतात व रक्तबंबाळ करतात. अशा रीतीने अंगातले रक्त गेले असता स्त्रियांची पापे नष्ट होतात व वरुण पाऊस पाडतो, अशी त्यांची समजूत आहे.

भिल्ल स्त्रिया इंद्राची प्रतिमा तयार करून तिची पूजा करतात. रात्री ती प्रतिमा एका कुमारिकेच्या डोक्यावर देतात आणि स्त्रिया हातात पेटत्या मशाली घेऊन गाणी गात गावभर हिंडतात.

पंजाबात, एका मडक्यात चिखल भरून ते एखाद्या म्हातारीच्या घराच्या दारात ठेवतात. मडके पाहून म्हातारी शिव्या देऊ लागते. ती जितक्या जास्त शिव्या देईल, तितके अधिक ढग जमून अधिक पाऊस पडेल, अशी त्यांची समजूत आहे.

जलपैगुरी जिल्ह्यात, पाऊस पडावा म्हणून अमावास्येच्या रात्री स्त्रिया गावाबाहेर जमतात, नग्न होतात आणि वरुणदेवाला आवाहन करतात.

हिमालयाच्या तराईतल्या स्त्रिया पौर्णिमेच्या रात्री एखाद्या खोऱ्यात जाऊन नग्नावस्थेत नृत्य करतात.

कर्नाटकात, दुर्गव्वा देवीच्या देवळाभोवती पाच आठवडे बाजार भरवतात. त्यामुळे देवळाभोवती जी घाण होते, ती धुवून टाकण्यासाठी देवी पाऊस पाडते, अशी समजूत आहे.

काही ठिकाणी पुरुष एकत्र जमून एकाला गोवालादेव बनवतात व घरोघर फिरतात. लोक गोवालादेवाच्या अंगावर दही व ताक शिंपडतात व इतरांच्या अंगांवर पाणी शिंपडून त्यांना शिधा देतात. सर्वजण शेवटी नदीकिनारी जाऊन स्वयंपाक करतात व गोवालादेवाला नैवेद्य दाखवतात.

अतिवृष्टी झाली, तर ती थांबण्यासाठीही काही विधाने आहेत, ती अशी —

फाल्गुनात जन्मलेल्या माणसाला, एका पानात पावसाचे पाणी धरून ते प्यायला लावतात आणि ते पान काठीला बांधून घराच्या छपरावर ठेवतात. काही ठिकाणचे लोक त्यासाठी अलव्रा व्रत करतात. या दिवशी कोणीही गृहकृत्य करता कामा नये व दिवसभर भजन करीत राहिले पाहिजे, असा नियम असतो.

काही ठिकाणी एखादा पुरुष नग्न होऊन उलट गतीने चरखा फिरवीत राहतो. काही ठिकाणी शेतकरी जळता विस्तव पावसात धरतात; तसेच इरले उलटे करून पावसात ठेवतात. काही लोक त्यासाठी होलिका देवीची पूजाही करतात.

## पर्जन्यशांती

अतिवृष्टी झाली, तर ती थांबावी आणि योग्य काळी योग्य तेवढा पाऊस पडावा, म्हणून पर्जन्यशांतीचे विधान सांगितले आहे. ते विधान असे— कर्त्याने प्रथम वैदिक ब्राह्मणांची व वरुणप्रतिमेची पूजा करून उदकात

उभे राहून व वरुणाचे ध्यान करावे मग वेदातील काही सूक्ते म्हणावी नतर शाल वस्त्रे धारण करून अग्निप्रतिष्ठापना करावी वरुणाला उद्देशून दूध, घृत, वेतान्याच्या समिधा आणि चरू याचे हवन करावे मग पूर्णाहुती करून शातिपाठ करवावा *आचार्याला वरुणप्रतिमेचे दान करावे [ शातिकमलाकर ]*

**पर्णकूर्च** एक व्रत या व्रताचा विधी असा - तीन दिवस पूर्ण उपवास करून चौथ्या दिवशी पलाश, उबर, कमळ व बेल याची पाने पाण्यात उकळून ते पाणी व कुश गवताचे पाणी प्राशन करतात फल – पापनाश [ हि ध ]

**पर्णकृच्छ्र** एक व्रत हे पाच, सहा किंवा सात दिवस करतात *या व्रतात रोज एकाच वृक्षाच्या पानाचा काढा* करून तो प्यायचा असतो अशा प्रकारे बेल, उबर, पलाश, इ पाच सहा प्रकारच्या वृक्षाच्या पानाचा काढा करून घेतात आणि शेवटी एक दिवस कुश गवत घातलेले पाणी प्राशन करतात फल – पापनाश [ हि ध ]

**पर्णशबरी** बौद्धाची एक देवता हिचा वर्ण पीत, त्रिमुखी, षड्भुज व त्रिनेत्र आहे हिच्या मुद्रेवर शुद्ध हास्य *असून हातात धनुष्यबाण आहेत* हिचे सर्व शरीर पानानी झाकलेले व अलकारविभूषित असते विघ्न (गणेश) हे हिचे वाहन होय हिची दोन रूपे वर्णिली आहेत एका रूपात तिच्या मस्तकावर अक्षोभ्य हा ध्यानी बुद्ध असतो, तर दुसऱ्या रूपात त्या जागी अमोघसिद्धी हा ध्यानी बुद्ध असतो ही साथीचे उपद्रव दूर करते, अशी समजूत आहे [ इ बु इ ]

**पर्णशबर** एक प्राचीन जमात मार्कंडेय पुराणात या लोकाचा उल्लेख आढळतो ही जमात सबर जमातीपैकीच एक असावी पूर्वी हे लोक लज्जारक्षणासाठी पानांच्या माळा वापरीत म्हणून त्याना हे नाव पडले अजूनही काही सवरामध्ये ही चाल दिसते पाहा – सवर [ द्रा ए इ ]

**पर्वतिया मिरी** नेफाच्या सुबनसिरी विभागातील एक आदिवासी जमात हे लोक डोंगरावर राहत असल्यामुळे त्याना पर्वतिया मिरी असे नाव मिळाले आहे पूर्वी हे लोक आपल्या डोंगराच्या भोवती वसलेल्या आसामच्या लखीमपूर जिल्ह्यातील गावावर धाडी घालून त्याची लुटालूट करीत असत एकदा त्यानी अशीच लुटालूट केली असता, आसाम सरकारने त्याच्या बदोबस्तासाठी सैन्य पाठवले पण पर्वतिया मिरीनी त्याचा पराभव केला तेव्हा ते सरकारी सैन्य आपल्या बदुका व दारुगोळा मागे टाकून पळून गेले हे सर्व सामान जाळून टाकावे, असे मिरीनी ठरवले पण त्या वेळी भरलेल्या बदुका आपोआप उडाल्या आणि त्यात कित्येक मिरी मेले त्याच *प्रमाणे दारूगोळ्याचा भडका उडूनही पुष्कळ लोक मरण पावले* तेव्हा त्याना वाटले, की ज्या राजाची सैन्ये मागच्या हाताचा आधार न घेताही इतका उत्पात करू शकतात, तो राजा खरोखर फारच शक्तिमान असला पाहिजे म्हणून मग त्यानी राजाकडे एक शिष्टमडळ पाठवले त्या शिष्टमडळाने राजाला सागितले, की मिरीना थोडाबहुत करवसुलीचा हक्क दिल्यास पुढील काळात ते लुटालूट करणार नाहीत तेव्हा राजाने त्याचे म्हणणे मान्य केले अशी कथा हे लोक सागतात पाहा – मिरी [ इ स्ट पा प्रे, जाने १९६० ]

**पर्यंकविद्या** एक आध्यात्मिक विद्या पर्यंक म्हणजे पलग होय ब्रह्मलोकात ब्रह्मा अथवा हिरण्यगर्भ ज्यावर विश्राती घेत असतो, त्या स्थानाला पर्यंक म्हटले आहे यावरून ब्रह्मलोकाप्रत जाण्याचा जो मार्ग तो या ठिकाणी पर्यंकविद्या या नावाने विवक्षित आहे चद्र, विद्युत, अग्नी वायू, वरुण, इद्र, प्रजापती या लोकातून मार्ग क्रमीत साधकाच्या आत्म्याला ब्रह्मलोकापर्यंत पोचायचे असते *या मार्गात आत्म्याला अनेक* अडथळे पार करावे लागतात त्यानतर तो ब्रह्मलोकी पोचतो तिथे ब्रह्म्याचा अपराजित नामक एक प्रासाद असतो त्यावर इद्र व प्रजापती हे द्वारपाल असतात तिथवर पोचल्यावर आत्म्याला ते काही प्रश्न विचारतात आणि आत्म्याने त्याची समर्पक उत्तरे दिल्यावर त्याला प्रासादात प्रवेश देतात सर्व मार्ग पार करून तिथे पोचलेल्या आत्म्याच्या स्वागतासाठी ब्रह्मदेव मग अप्सराची योजना करतो त्या फळे-फुले देऊन आणि त्याला वस्त्रालकारानी नटवून ब्रह्म्याच्या पर्यंकापुढे आणून उभा करतात ज्या वेदीवर ब्रह्मदेवाचा पर्यंक माडलेला असतो, त्या वेदीच्या पहिल्या पायरीवर पाऊल ठेवताच ब्रह्मा त्या आत्म्याला विचारतो, की 'तू कोण आहेस ? ' त्यावर आत्मा उत्तर देतो 'जो तू आहेस, तोच मी आहे ' ब्रह्मा पुन्हा विचारतो 'मी कोण आहे ?' आत्मा उत्तर देतो 'तू सत्य आहेस ' ब्रह्मा विचारतो 'सत्य म्हणजे काय ?' आत्मा उत्तरतो 'जे देवाच्या पलिकडे आणि प्राणाच्याही पलिकडे आहे ते सत्य होय ' (कौषी ब्रा उ १ ६)

अशा प्रकारे पर्यंकाप्रत पोचलेल्या आत्म्याला विश्वाच्या उत्पत्ति-स्थिति लयाचेही सामर्थ्य प्राप्त होते, असे सागितले आहे *मात्र या शक्तीचा उपयोग त्याने करू नये, असे त्याच्यावर*

बंधन आहे. ते सामर्थ्य त्याने वापरल्यास तो आत्मा आणि विश्व उत्पन्न करणारी दिव्य शक्ती या दोघांत संघर्ष उत्पन्न होण्याची भीती असते.

हे पद प्राप्त करून घेण्यासाठी साधकाला नैष्ठिक ब्रह्मचर्य पाळणे, विकारांवर विजय मिळविणे आणि अहंकाररहित होणे, अत्यावश्यक असते. [ ३२ विद्या– श्री. नारायणस्वामी अय्यर ]

**पर्यंकशौच** *संन्यासग्रहणातील एक विधी. पर्यंकशौच म्हणजे* व्यक्तीला पलंगावर बसवून केलेले त्याचे शुद्धीकरण होय. याचा विधी असा – एखाद्या शुभ दिवशी एखादा गृहस्थ संन्यासदीक्षा घेऊ इच्छिणाऱ्या पुरुषाला आपल्या समोर पलंगावर किंवा चौरंगावर बसवतो. त्याच्या डाव्या व उजव्या बाजूला मातीचे पाच पाच लहान ढीग व स्वच्छ पाणी ठेवतो. डाव्या हाताच्या पहिल्या ढिगातली माती व पाणी घेऊन गृहस्थ त्याचे दोन्ही गुडघे धुतो. नंतर उजव्या हाताच्या पहिल्या ढिगाच्या अर्ध्या भागातील माती व पाणी घेऊन गृहस्थ आपला डावा हात धुतो. त्यातल्याच उरलेल्या अर्ध्या भागातील मातीने आपले दोन्ही हात एकाच पाण्यात सातदा धुतो. नंतर डाव्या हाताच्या दुसऱ्या ढिगातील मातीने संन्याशाच्या मांड्या धुतो. मग आपले हात धुतो. अशाच प्रकारे वेगवेगळे ढीग घेऊन तो त्याचे घोटे, पाय व तळहात धुतो. शेवटी तो स्वतःचे हात धुऊन कृत्य समाप्त करतो. [ हि. ध.; ध. सिं. ]

**पर्यग्निकरण** एक यज्ञीय कर्म. हविर्द्रव्याभोवती अग्नी फिरविणे याला पर्यग्निकरण असे म्हणतात. पशुयागामध्ये पशूचे उपाकरण केल्यानंतर त्या पशूच्या भोवती अग्नी फिरवायचा असतो. यूपासंनिध बांधलेला पशू, शामित्रशाळा व आहवनीय यांच्या भोवतीही पर्यग्निकरण करतात.

**पर्युषण** जैनांचे एक धार्मिक पर्व. राग-द्वेष नाहीसे करणे व आत्मिक कल्याण साधणे या उद्देशाने हे पर्व साजरे केले जाते. त्याला पर्वराज किंवा धर्मपर्व असेही म्हणतात.

दिगंबर जैन हे पर्व भाद्रपद शुद्ध पंचमीपासून चतुर्दशीपर्यंत दहा दिवस मानतात. या दहा दिवसांत कडकडीत उपवास करणे हा महत्त्वाचा भाग असतो. ज्यांना दहा दिवस उपवास करणे शक्य नसते, ते एक दिवसाआड उपवास करतात. पर्वाच्या अखेरच्या दिवशी म्हणजे अनंत चतुर्दशीला सार्वजनिक उपवास असतो. काही कट्टर धार्मिक जैन या पर्वाच्या आधी तीस दिवस अन्न न घेता केवळ उष्णोदकावर राहतात. पर्वदिवसात रोज सकाळी मंदिरात जमून अष्टविधा पूजा करतात. तत्त्वार्थसूत्र ग्रंथातील एक एक अध्याय वाचतात. साधेपणाने राहतात. क्षमा, मार्दव, आर्जव, सत्य, संयम, तप, त्याग, शौच, आकिंचन्य आणि ब्रह्मचर्य या दशधर्मांचे पालन करण्याचा प्रयत्न करतात, म्हणून प्रस्तुत पर्वाला दशलक्षणपर्व अशीही संज्ञा आहे.

श्वेतांबर जैन श्रावण वद्य द्वादशीस पर्वाचा प्रारंभ करून भाद्रपद शुद्ध पंचमीला ते संपवितात. त्यांच्या दृष्टीने असे एकूण आठ दिवस हा या पर्वाचा कालावधी असतो. काही भाविक जैन या कालावधीत साधुवेषाने एखाद्या उपाश्रयात राहतात.

पर्युषणाच्या अखेरच्या दिवसाला संवत्सरी असे म्हणतात. संबंध वर्षात आपल्याकडून जे अपराध घडले असतील, त्याबद्दल त्या दिवशी एकमेकांची क्षमा मागायची असते. दूर गावी असलेल्या मित्रांनाही अशीच क्षमायाचनेची पत्रे लिहिली जातात. पर्युषणाच्या तिसऱ्या दिवशी कल्पसूत्राची मिरवणूक काढतात आणि पाचव्या दिवशी महावीराची जयंती साजरी करतात. महावीराच्या मिरवणुकीत पाळणा मिरवतात. पाहा– दशलक्षण– व्रत. [ जै. क.; सु. वि. को.; एन्सा. रि. ए. ]

**पर्व** धर्मशास्त्र व ज्योतिषशास्त्र यांत विशिष्ट योगांना पर्व म्हटले आहे. पर्व हे पुण्यकारक मानलेले असून, पर्वकाळी काही विधिनिषेधही सांगितलेले आहेत. विष्णु पुराणात पांच पर्वे प्रमुख सांगितली आहेत, ती अशी–

**चतुर्दश्यष्टमी चैव अमावास्याथ पूर्णिमा ।**
**पञ्चान्येतानि राजेन्द्र रविसङ्क्रान्तिरेव च ।।**

अर्थ–चतुर्दशी, अष्टमी, अमावास्या, पूर्णिमा व सूर्यसंक्रांती ही पाच पर्वे होत.

दक्षिणायन–उत्तरायणांचा प्रारंभकाल, विषुवदिन, चंद्रसूर्यांची ग्रहणे व व्यतीपात योग, ही आणखी काही पर्वे ब्रह्म पुराणात सांगितली आहेत. मन्वंतराचा प्रारंभ हाही पर्वकाळच मानलेला आहे. त्यासाठी पंचांगात मन्वादी तिथी दिलेल्या असतात. अर्धोदय, महोदय, इ. आणखीही काही पर्वे सांगितली आहेत.

प्रातः, मध्याह्न व सायं हे तीन काळही पर्वेच होत. त्यांचा काळ दोन घटिका (४८ मिनिटे )असतो.

पर्वकाळी विहित कर्मे–तीर्थस्नान, दान, श्राद्ध, जप, उपवास.

पर्वकाळी निषिद्ध कर्मे–क्षौर, तैलाभ्यंग, मांससेवन, इत्यादी.

**पर्वणीकर सीताराम** ( इ. स. चे १८ वे १९ वे शतक ) *एक संस्कृत पंडित. हा जयपूरच्या* महाराजाच्या आश्रयाला होता. पर्वणीकराचे घराणे हे मूळचे महाराष्ट्रीय ब्राह्मण घराणे होय. पर्वणी गाव हे नाशिकजवळ आहे. सीतारामाचा पूर्वज माधवभट्ट हा प्रथम जयपूरला गेला.

आजपर्यंत संस्कृत साहित्याच्या इतिहासकारांना प्रस्तुत पंडित केवळ कुमारसंभवाच्या आठ ते सतरा सर्गांचा भाष्यकार म्हणूनच माहीत होता. पण जयपूरच्या त्याच्या घराण्यात त्याचे आणखी बरेच साहित्य उपलब्ध झाल्यामुळे त्याची वाङ्मयीन थोरवी कळणे, आज सुलभ झाले आहे.

जयवंश हे त्याचे एक महाकाव्य नुकतेच राजस्थान विद्यापीठाने प्रकाशित केले आहे. त्याशिवाय राघवचरित, नलविलास, लघुरघुकाव्य, नृपविलास हीही त्याची काव्ये आहेत. विशेष म्हणजे ही सर्व काव्ये सटीक आहेत. त्याने चौदा अष्टकेही रचली आहेत. त्यांपैकी पुढील अष्टके उपलब्ध झाली आहेत– शिवाष्टक, सूर्याष्टक, भैरवाष्टक, देव्यष्टक, हेरंबाष्टक, गंगाष्टक, विष्ण्वष्टक व हनुमदष्टक. राहिलेली सहा अष्टके अजून सापडली नाहीत.

साहित्यसार, साहित्यसुधा, काव्यप्रकाशटीका, कुमारसंभवव्याख्या हे त्याचे अन्य ग्रंथ असून, त्याशिवाय छंदःशास्त्रावर छंदःप्रकाश नावाचा एक, अलंकारशास्त्रावर तीन आणि गणित विषयावर एक असे ग्रंथही त्याने रचले आहेत. गणित विषयावरचा ग्रंथ अजून उपलब्ध झाला नाही. सत्तावीस नक्षत्रमालाही त्याने लिहिली आहे. [ पी. के. गो. को. व्हा. ]

## पर्वत काण्व

एक सूक्तद्रष्टा. हा कण्वकुलातला आहे. ऋग्वेदाच्या आठव्या मंडलातील १२ वे सूक्त याच्या नावावर आहे. नवव्या मंडलातील १०४ व १०५ ही सूक्ते 'पर्वत नारदौ' या जोड नावावर असली, तरी या सूक्तांचा द्रष्टा पर्वतकाण्वच असल्याचे सांगतात. इंद्राच्या सामर्थ्याची स्तुती करताना हा म्हणतो–

> **न यं विविक्तो रोदसी नान्तरिक्षाणि वज्रिणम् ।**
> **अमादिदस्य तित्विषे समोजसः ॥**
>
> (ऋ. ८. १२. २४)

अर्थ– आकाश आणि पृथ्वी ही दोन्हीही लोकदेखील वज्रधर इंद्राला आकलन करू शकत नाहीत आणि अंतरिक्ष तर नाहीच नाही. उलट याच्याच ओजस्वितेमुळे मात्र सर्वच (विश्व) उज्ज्वल होते.

या सूक्तात इंद्र व विष्णू यांचे ऐकात्म्य कल्पिले आहे. यावरून ऋग्वेदकालातच विष्णू ही देवता स्वतंत्रपणे प्रतिष्ठा मिळवू लागली होती, असे दिसते. [ प्रा. च. को. ]

## पर्वतदान

एक दान. या दानाला अचलदान, शैलदान, मेरुदान अशी विविध नावे आहेत. निरनिराळी धान्य, मीठ, साखर, गूळ, तूप, तीळ, कापूस, सोने, चांदी व रत्न अशा दहा द्रव्यांची दाने मत्स्य पुराणात सांगितली आहेत. दानद्रव्यांचा पर्वतासारखा ढीग करावा लागतो. यावरून या दानाला हे नाव पडले आहे. या दानाचा विधी असा–

पूर्वेला किंवा ईशान्येला थोडा उतरता चौरस ओटा करून तो शेणाने सारवतात. त्यावर दर्भांकुर पसरतात. त्यानंतर दान द्रव्याचा मोठा ढीग आणि त्याच्या पायथ्याशी छोटे छोटे ढीग घालतात. धान्य दान द्यायचे असेल, तर एक हजार, पाचशे किंवा तीनशे द्रोण (एक प्राचीन माप) धान्य घेतात. त्यावर सुवर्णाची तीन झाडे रोवतात. चारही दिशांना मोती, गोमेद, पुष्पराग, पाचू, माणके, नील यांच्या कमळवेला ठेवतात. ब्रह्मा, विष्णू यांच्या अशा देवतांच्या सोन्या चांदीच्या प्रतिमा तयार करून त्याही त्या राशीवर बसवतात. नंतर होम करतात. होमात प्रत्येक देवतेला तेरा आहुती देतात. शेवटी तो पर्वत आणि त्यावरील सर्व वस्तू ब्राह्मणाला दान देतात. [ हिं. ध. ]

## पर्वतमाहात्म्य

भारतातील कित्येक पर्वतांना निरनिराळ्या कारणामुळे पूज्यत्व प्राप्त झाले आहे. काही पर्वतांवर देवाचे वास्तव्य असते, तर काही पर्वतांवर थोर मुनी व साधू वास करतात. काही पर्वतांवर देवतांची मंदिरे असतात, तर काही पर्वतांवर पवित्र नद्यांची उगमस्थाने असतात. पुराणे, काव्ये आणि लोककथा यांत अनेक पर्वतांचे माहात्म्य वर्णिलेले आहे. हिमालयाला सर्व पर्वतांचा राजा व देवतात्मा मानतात. त्याच्या गिरिकंदरातून गंगा, यमुना, सरस्वती, सिंधू, चंद्रभागा, शुतुद्री, वितस्ता, परुष्णी, शरयू, इ. पवित्र नद्यांचा उगम होतो. कैलास, गौरीशंकर, कांचनगंगा, इ. अनेक पवित्र शिखरे आणि मानससरोवरासारखी पवित्र सरोवरे या पर्वतराजीत आहेत. कैलास हे तर साक्षात शिवाचे वसतिस्थान मानलेले आहे. बदरीकेदार व बदरीनारायण यांची मंदिरे हिमालयातच आहेत. नर–नारायण ऋषींनी याच पर्वतावर तप केले होते.

सह्याद्रीवर त्र्यंबकेश्वर व भीमाशंकर ही ज्योतिर्लिंगे आणि सप्तशृंग स्वामिनीचे स्थान आहे. अनेक ऋषींची तपःस्थाने या पर्वतावर होती. परशुरामाचा सह्याद्रीशी निकट संबंध असून, कोल्हापूरची अंबाबाई हीसुद्धा सह्याद्रीच्या परिसरातच आहे.

गिरनार पर्वत हे दत्तात्रेयाचे तपःस्थान होते. तिथे जो मृत्यू पावतो, त्याला मोक्ष मिळतो आणि जो त्याच्या भैरवजप नामक शिखरावर चढून जातो, त्याला साक्षात भगवद्दर्शन होते, असे म्हणतात. पावागडावर महाकालीचे मंदिर आहे. शत्रुंजय पर्वतावर जैनांची पुष्कळ मंदिरे आहेत. अबूच्या पहाडावर जगदंबेचे मंदिर आहे. द्वारकेजवळचा रैवतक पर्वत पूर्वी सुवर्णाचा होता असे सांगतात. यादव लोक त्याचा वार्षिक उत्सव करीत. त्याला गिरिमह असे नाव होते. विंध्य पर्वतावर विंध्य

वासिनीच्या आणि आशापुर मातांची याची स्थाने आहेत. गीरनार गिरीवर कालकाईचा आश्रम होता. व तिथे रामानंद यांच्या रत्न वसमस्था असल्या होत्या. अगस्त्य मुनी याच पर्वतावर राहत असे. गन्धर्वगिरी ० परशुरामाचे निवासस्थान होय. हिंगलाज पर्वतावर हिंगलाजदेवीचे मंदिर आहे.

कैलासाप्रमाणेच मेरुपर्वताचे माहात्म्य पुराणात वर्णिलेले आहे. मेरू हे ब्रह्मदेवाचे वसतिस्थान असून, तो सर्व पर्वतांच्या केंद्रस्थानी मानलेला आहे. सर्व भूगोल हा सप्तद्वीपात विभागलेला असून त्यातले जंबुद्वीप हे मध्यभागी येते. मेरू हा सुवर्ण पर्वत जंबुद्वीपाच्या मध्यभागी आहे, असे पुराणात सांगितले आहे.

पुराणात मेरूच्या दक्षिणेकडील तीन पर्वतराजींचे वर्णन आढळते. त्यातील निषध म्हणजे हिंदुकुश पर्वत, हेमकूट म्हणजे कैलास पर्वत आणि हिमवान म्हणजे हिमालय पर्वतश्रेणी होय. हिमालयात राक्षस, पिशाच, हेमकूटावर गंधर्व, अप्सरा आणि निषधावर नाग लोक राहतात असे सांगितले आहे. या व्यतिरिक्त पुराणात सह्य, मलय, महेंद्र, पारियात्र, ऋक्ष, विंध्य व शुक्तिमत या सात पर्वतांचेही वर्णन केलेले आहे.

पुराणांनी सर्व पर्वतांचे दोन वर्ग केलेले आहेत– (१) वर्ष पर्वत– हे निरनिराळ्या वर्षांच्या सीमा दाखवतात. उदा०– हिमालय. (२) कुलपर्वत– हे देशातील प्रांतांच्या सीमा दाखवतात. हे सात आहेत. महेंद्र, मलय, सह्य, शुक्तिमान, ऋक्ष, विंध्य व पारियात्र अशी त्यांची नावे आहेत.

ऋग्वेदात इंद्रा–पर्वता अशा युग्म देवतेचा उल्लेख आहे. पण मैत्रायणी संहिता व काठक संहिता यांत एक वेगळीच कथा आढळते, ती अशी– पूर्वी पर्वतांना पंख होते व ते पक्ष्यांप्रमाणे उडू शकत. ते असे सर्वत्र उडून स्थलांतर करू लागल्यामुळे पृथ्वीचा तोल ढळू लागला. म्हणून मग इंद्राने त्या पर्वतांचे पंखच कापून टाकले. तेव्हापासून त्यांचे उडणे बंद झाले. या विचित्र कथेचा उगम वेदपूर्व कालात झाला असावा. पुराणात व महाकाव्यात ही कथा आहे.

प्राचीन काळी शेती करणारे लोक इंद्र या पर्जन्यदेवतेची पूजा करीत होते. कृष्णाच्या वेळी व्रजमंडळातले लोक पावसाळा संपल्यावर इंद्राचा उत्सव करीत. व्रजमंडळातले लोक गोपालक होते व त्यांचा संबंध इंद्रापेक्षा पर्वताशी जवळचा होता. गिरिकंदरात त्यांच्या गायी चरत व पुष्ट होऊन भरपूर दूध देत. म्हणून इंद्राऐवजी पर्वताला देवता मानून त्याचा उत्सव करावा, असे कृष्णाने सांगितले आणि गोवर्धन पर्वताचा पूजोत्सव सुरू केला. तेव्हापासून पर्वतपूजा प्रचलित झाली. आजही वैष्णव लोक जन्माष्टमीला व भागवत सप्ताहात मातीचा किंवा लाह्यांचा गोवर्धन बनवून त्याची पूजा करतात.

आदिवासी लोकांतही पर्वतपूजा प्रचलित आहे. सातपुडा पर्वताचा मरगाई म्हणून एक पर्वतशिखरावर आहे. खाड, तोरणमाळ वगैरे ठिकाणचे देव डोंगरावरच असतात व तिथे जाऊन ते त्या देवाची पूजा करतात. त्यामुळे त्यांना ते डोंगरही पूज्य ठरले आहेत. त्या लोकांचा एक डोंगरदेव आहे, त्याचा उत्सव दसऱ्याच्या दिवशी केला जातो. कित्येक लोक पर्वताला पर्जन्यदेवच मानतात. [ लो द , ए ना रि ए , फो लो नो इ , जा पु , पु वि , श क ]

## पर्वनक्तव्रत

एक काम्य व्रत. शिव ही या व्रताची देवता आहे. व्रताची एक वर्ष पात दर पौर्णिमेला नक्त भोजन करायचे असते. उद्यापनाच्या वेळी शिवभक्तांना भोजन देतात. फल – शिवलोकप्राप्ती. [ हि व ]

## पर्वभूभाजनव्रत

एक काम्य व्रत. शिव ही या व्रताची देवता आहे. पर्वकाळ असेल त्या दिवशी हे व्रत करतात. या व्रतात उघड्या जमिनीवर अन्न वाढून घेऊन भोजन करायचे असते. फल–अतिरात्र यज्ञाचे पुण्य. [ हि व ]

## पर्शु-भारतीय संस्कृती

एक प्राचीन संस्कृती. आर्यांचे मूळ स्थान उत्तर किरघीज प्रदेशात होते. पुढे त्यांच्या काही टोळ्या प्रथम बल्ख प्रदेशात येऊन वसल्या. तिथे दीर्घ काळ वास्तव्य केल्यानंतर त्यांची एक शाखा पश्चिमेकडे इराणात गेली व दुसरी शाखा पूर्वेकडे सप्तसिंधू प्रदेशात आली. बल्ख प्रदेशात त्या लोकांनी ज्या संस्कृतीचा विकास केला ती पर्शुभारतीय या नावाने ओळखली जाते. या संस्कृतीची माहिती पारशी लोकांच्या धर्मग्रंथावरून कळते. जे लोक इराणात जाऊन स्थायिक झाले, ते आजच्या पारशी लोकांचे पूर्वज आणि जे लोक भारतात आले, ते वैदिक आर्यांचे पूर्वज होत. इराणी व भारतीय लोकांची भाषा, संस्कृती, धर्मग्रंथ व आचारविचार यांत जे साम्य आढळते, त्यावरून ते अत्यंत प्राचीन काळी एकत्र राहत होते, एकच धर्म पाळीत होते व एकच भाषा बोलत होते, हे समजून येते. पर्शु भारतीय संस्कृती ही इराणी व भारतीय संस्कृतींची जननी होय. [ म ज्ञा को प्रस्तावना खंड ३, बुद्ध पूर्व जग ]

## पर्शू

एक प्राचीन आयुधजीवी संघ. पाणिनीने या संघाचा उल्लेख केला आहे (अष्टा ५, ३ ११७). त्या संघातील प्रत्येक सदस्याला पार्शव म्हणत. ऋग्वेदातही या संघाचा उल्लेख आढळतो (८ ६ ४६). परशुराम हा या संघातला होता, असे

अनुमान काहा संशोधकांनी केले आहे हे पगू कोम म्हणजे इराणातील पारसीक होत [ पा दा भा , गु वि गो ]

**पलटूदास** उ भारतातील एक संत व कवी याच्या जन्मकालासंबंधी मतभिन्नता आहे डा राधाकृष्ण सिंह याच्या मते इ स १७२२ ते १७२२ या काळात कधीतरी त्याचा जन्म झाला असावा श्री विद्यापती मालविका याच्या मते त्याचा जन्म इ स १७९३ मध्ये झाला या या दोन मतात सुमारे ५० वर्षांचे अंतर पडते नगपूर जलालपूर या गावी हा जन्मला याबद्दल मात्र सर्वांची एकवाक्यता आहे हे गाव फैजाबाद जिल्ह्यात आहे

पलटूदास हा गौर वर्णाचा पण कुरूप आणि ठेंगणासाच होता, असे म्हणतात तो जातीने कांदू बनिया होता याने आपल्या अनेक पद्यातून स्वतः ला बनिया असे म्हटले आहे ही जात विशेषेकरून मिठाईचा व धान्याचा व्यापार करीत असते हे लोक आपल्या मालाची ने आण घोड्यावरून किंवा बैलावरून करतात पलटूदासही हा जातिव्यवसाय करीत असावा, असे वाटते पण या धंद्यात त्याला विशेषसा रस होत नसे त्यामुळे त्याची आर्थिक परिस्थिती निकृष्टच होती कदाचित त्यामुळेच हळूहळू त्याला आपल्या धंद्याचा तिटकारा येऊ लागला असावा एके दिवशी त्याने आपले दुकान गोरगरिबांकडून लुटविले आणि त्या जागी धर्मशाळा बांधली

पलटूदासाच्या मनात हे जे परिवर्तन झाले त्यामागे त्याच्या मनातील सांसारिक विरक्ती हेच प्रमुख कारण होते त्याच्या या वैराग्यामुळे त्याच्या मातापित्यांना अपार दुःख झाले मुलाबाळांना वेळेवर पोटभर अन्न घालता येत नाही, अशा स्थितीत उत्पन्न झाल्याने त्याची पत्नीही कष्टी झाली मुले जेव्हा त्याच्याकडे भूक म्हणून येत, त्या वेळी तो त्यांना भजन करायला सांगे

दीक्षा घेतल्यावर तो अयोध्येत मठ बांधून राहिला पलटूदास हे याच काळ्यातले नाव असावे, असे वाटते कारण गुरू गोविंदसाहेब याने त्याला दीक्षा दिल्यानंतर त्याच्या योगसाधनेला अनुलक्षून असे हे नाव त्याला दिले त्याचा एक दोहा असा—

> पलपलमें पलटू रहे, अजपा आठो याम ।
>
> गुरु गोविंद अस जानिके, राखा पलटू नाम ।।

भावार्थ— तो अहर्निश अजपाजपात लीन राहत असल्यामुळे आणि त्याला आपला श्वास अंतर्मुख करून फिरविण्याची युक्ती साधली असल्यामुळे गुरु गोविंद साहेबाने त्याचे 'पलटू' असे नामकरण केले

त्याचा गुरु गोविंदसाहेब हा कोण आणि कोणत्या पंथाचा होता, याविषयी काही माहिती मिळत नाही पलटूदास मात्र त्याला कबिराचा गुरू रामानंद याचा अवतार मानतो

पलटूदासाच्या काव्यावरून त्याच्या स्वभावाची बरीच कल्पना येऊ शकते तो स्पष्टवादी व मनाचा अपार होता त्याला कोणी भीत नव्हता होते ते सगळे मनातूनच बुद्धिवादी असल्यामुळे तो पोथी पुस्तकांत सांगितले ते सगळे खरे, असे मानत नसे प्रत्येक मत आणि सिद्धांत तर्काच्या कसोटीवर घासून पाहण्याची त्याची प्रवृत्ती होती त्याच्या या स्वभावामुळेच अयोध्येतीलच महंत, धर्मशास्त्री, नागा गोसावी, वुना बैरागी आणि मुल्ला मौलवी हे त्याच्यावर नेहमीच खवळून उठलेले असत या लोकांनी पलटूदासाला अनेक प्रकारे छळले, सतावले पण तो सर्वांशी सामना देऊन निर्भयपणे उभा राहिला तो म्हणे, हिंदू धर्मात किंबहुना सर्व धर्मांत मठ आणि पाठ खूप माजला आहे त्यासाठी धर्मात क्रांती व्हायला हवी यामुळे तो अयोध्येतील धर्मशास्त्र्यांची आणि मुल्ला मौलवींची रुढी उडवी त्यामुळे एकदा त्यातल्या काही लोकांनी पलटूदासाला जिवंत जाळून मारण्याचा प्रयत्न केला पण त्यातून तो कसाबसा निसटला आणि पुढे जगन्नाथपुरीला जाऊन काही दिवस राहिला

पलटूदास हा समदर्शी होता तो कोणत्याही एका धर्माचा पक्षपाती नव्हता तो जातपात मानत नसे आणि उच्चनीच भेदही मानीत नसे त्याचे विचार आणि धार उदात्त मानवधर्मासाठी होते

त्याने प्रथम हठयोगाचा अभ्यास धरला होता पण त्याने आत्मकल्याण साध्य होत नाही, असे दिसून येताच तो लययोगाचा साधक झाला साधनेवर त्याची अपार निष्ठा होती साधना ही श्रद्धापूर्वक झाली पाहिजे तरच तिला फळ मिळते, असे तो मानी व सांगे

पलटूदासाचे साहित्य 'पलटूसाहबकी बानी' या नावाने तीन खंडांत प्रसिद्ध झाले आहे याशिवाय 'आत्मकर्म' व काही फुटकळ काव्याचा संग्रह 'पलटूसाहबकी शब्दावली' या नावाने प्रकाशित झालेला आहे रेखता, सवैया, कवित्त, कुंडलिया, इ छंदात याने आपले काव्य रचले आहे याची भाषा व्रज, अवधी आणि फारसीमिश्रित हिंदी आहे याची काही पदे रहस्यवादी आहेत, तर काही पदे नाथ व सिद्ध यांच्या मताप्रमाणे साधनेच्या संबंधीची आहेत

**दार्शनिक विचार**—पलटूदास हा साधक होता, तरी दार्शनिक न होता पण त्याने आपल्या अनुभूतीला अनुसरून प्रसंगोपात्त जी काव्यरचना केली आहे, तिच्यात त्याच्या आध्यात्मिक धारणेचा प्रत्यय येऊन जातो तो अद्वैती होता त्यामुळे त्याने जागोजाग द्वैतवादाचे खंडन करून जीव, जगत, ब्रह्म, इत्यादी विषयी आपले विचार व्यक्त केले आहेत त्याचा सारांश असा—

ब्रह्म हे निर्गुण, शाश्वत, अखंड व सर्वव्यापी आहे. ते विश्वाच्या कणाकणामध्ये व्याप्त आहे. त्यालाच त्याने हरी म्हटले आहे.

> जैसे काठ में अग्नि है, फूल में है ज्यों बास ।
> हरि जन में हरि रहत है, ऐसे पलटू दास ॥
> मिहदी में लाली रहै, दूध माहि घिव होय ।
> पलटू तैसे संत हैं, हरिबिन रहै न कोय ॥

**भावार्थ** – काष्ठात अग्नी, फुलात वास, तसा श्रीहरी प्रत्येक व्यक्तीत वास्तव्य करून राहत आहे. मेंदीत लाली, दुधात तूप, तसा तो सर्वत्र आहे. हरीवाचून कोणीही नाही.

ब्रह्म सगुण व निर्गुण असे उभयविध आहे. ते मायायुक्त झाले, तेव्हा सगुण बनते व सृष्टि स्थिति प्रलयाला कारणीभूत होते. निर्गुण हे निराकार असते. त्यामुळे त्याच्यावर जीवाचा कोणताही आकार किंवा गुण आरोपित करता येत नाही. त्यामुळेच ते अनिर्वचनीय ठरते.

महाकाश हे घटामध्ये घटाच्या आकाराचे होते. पण घडा फुटला तरी त्यातले आकाश नाश पावत नाही, तर ते महाकाशात विलीन होते.

> इस भाँतिसे जड शरीर मह,
> चैतन करैं परगास है जी ।
> पलटू शरीर का नास होअ,
> चतन का नाहीं नास है जी ॥

**भावार्थ** – घटात जसे आकाश घटाच्या आकारासारखे, त्याप्रमाणे या जड शरीरात चैतन्य प्रकाशित होत असते. शरीराचा नाश झाला तरी चैतन्याचा नाश होत नाही.

ब्रह्म हे जीवरूपाने मनुष्यशरीरात वास्तव्य करीत असले, तरी जीवाच्या सुख दुःखाचा अनुभव ब्रह्माला येत नाही. ब्रह्म हे विश्वाचे निमित्त, तसेच उपादान कारणही आहे. तेच कर्ता आहे व तेच कर्म आहे. त्यापुढे तो म्हणतो –

> आपुइ ठाकुर आपुइ सेवक करे अपनी पूजा,
> आपुइ दाता आपुइ मंगता आपुइ जोगी भोगी ॥

**भावार्थ** – ब्रह्म हेच मालक आणि तेच नोकरही आहे. तेच पूज्य आणि पूजकही आहे. दाता आणि याचक, योगी आणि भोगी तेच आहे.

जीवाची उत्पत्ती मायेमुळे होते. पण मूलरूपात तो ब्रह्मच असतो. जीव ब्रह्माचा भेद हा अज्ञानमूलक आहे. ज्याप्रमाणे जल व तरंग यांच्यामधील द्वैताला वायू कारणीभूत होतो, त्याचप्रमाणे जीव ब्रह्मातील द्वैताला माया कारणीभूत होते.

माया ही नटिनी आहे. ती प्रत्येक ठिकाणी भिन्न भिन्न आकर्षक रूपात वर्तमान असते. ती परिवर्तनशील असून, विश्वाला आपल्या विविध आकर्षक रूपांनी भुरळ घालते.

> सबको बसम करे जगत को माया जीती ।
> आपु न बसि मैं होय रहे वह सबसे रीती ॥

**भावार्थ** – मायेने सर्वांना वश करून घेतले आहे. तिने जगताला जिंकले आहे. ती मात्र कोणाला वश न होता सर्वांहून वेगळीच राहिली आहे.

काम, क्रोध, मद व लोभ हे या मायेचे साहाय्यक आहेत. ती एक चक्की असून, रवा मध्ये जगाला भरडीत राहिली आहे आणि काम व क्रोध हे ती चक्की फिरवीत राहिले आहेत. मन हेही मायेचे मित्र आहे.

या मायेचा त्याग किंवा निरास करून आत्मदर्शन करणे, हे मनुष्याच्या जीवनाचे परम उद्दिष्ट होय. यालाच मोक्ष असे म्हणतात. त्यासाठी निष्काम भक्ती हे श्रेष्ठ असे साधन आहे. या साधनामुळे जीव-ब्रह्मातला भेद नाहीसा होतो आणि साधक मुक्त होतो. अशा मुक्त पुरुषाची मग जी स्थिती होते, ती अशी–

> काम क्रोध जिनके नहीं, नहिं भूख पियासा ।
> लोभ मोह एको नहीं, नहिं जग की आसा ॥
> ज्यों कंचन त्यों काच है, अस्तुति से निंदा ।
> सत्रु मित्र दोउ एक हैं मुरदा नहिं जिंदा ॥

**भावार्थ**– ज्याला काम क्रोध राहत नाहीत, तहान-भूक जाणवत नाही, लोभ मोह विकृत करीत नाहीत, त्याची जगाविषयीची आशाच नष्ट होऊन जाते. त्याला सोने आणि काच, निंदा आणि स्तुती, शत्रू आणि मित्र, जीवित आणि मृत सगळेच सारखे असतात.

एक साक्षात्कारी संत म्हणून पलटूदासाला खूप मानसन्मान मिळाला. त्याला दणग्याही भरपूर मिळाल्या. त्याच्या भोवती शिष्यपरिवारही खूप जमा झाला. मोठमोठे अमीर-उमराव त्याच्यापुढे हात जोडून उभे असत.

अयोध्येपासून चार मैलावरच्या रामघाट या गावी पलटूदासाची समाधी आहे. तिच्यावर आश्विन शुद्ध द्वादशी अशी तिथी लिहिलेली आहे, पण संवत लिहिलेला नाही. बिहार मधल्या देवरिया जिल्ह्यातल्या सालोपार या गावीही त्याची समाधी दाखवतात. तिथे त्या समाधीवर भाविक लोक चिमटा, गांजा, त्रिशूल, लंगोट इ. वस्तू वाहतात. समाधीला नवसही बोलतात. या दोन स्थळांपैकी अयोध्येजवळच्याच स्थळी त्याचा मृत्यू झाला असावा, असे संशोधक मानतात. [संत पलटूदास और पलटूपंथ – डॉ. राधाकृष्ण सिंह, १९६६]

## पलटूदासी पंथ

पलटूदासाच्या विचारसरणीवर आधारलेला एक पंथ. अनुभवगम्य सत्याचा शोध हे या पंथाचे मुख्य तत्त्व आहे. त्यामुळे या पंथाला बुद्धिप्रधान पंथ

समजतात या पंथाची पहिली गादी अयोध्येत स्थापन झाली आणि तिथून पुढे आसपासच्या प्रदेशात याचा प्रसार झाला थोड्याच काळात उत्तर भारतातल्या प्रसिद्ध पंथामध्ये याची गणना होऊ लागली

पलटूदासाचे पलटूप्रसाद व हुलासदास असे दोन मुख्य शिष्य होते पलटूप्रसादाने विवाहानंतर एक वर्षाने पलटू दासाकडून दीक्षा घेतली नंतर तो अयोध्येतच राहिला व पलटूदासाच्या मृत्यूनंतर त्याच्या मठाचा उत्तराधिकारी बनला

किसुनदास, लक्ष्मणदास व रामबहोरादास असे पलटूप्रसादाचे तीन शिष्य होते किसुनदास हा पांडेय ब्राह्मण असून, प्रयागचा रहिवासी होता पलटूप्रसादाकडून दीक्षा घेतल्यानंतर तो त्याच्या आज्ञेने मालपूर येथे राहू लागला पलटूप्रसादाच्या नंतर हा त्याच्या गादीवर बसला त्यामुळे लक्ष्मणदास हा पलटूप्रसादाचा दुसरा शिष्य रागावून अयोध्येतून बाहेर पडला त्याने पडूलघाट येथे आपला मठ स्थापला व अयोध्येच्या मठाशी आपला संबंध तोडून टाकला

किसुनदासाच्या मुलाचा रामसेवकदास हा पुढे अयोध्येच्या गादीवर बसला सुमारे चाळीस वर्षे तो मठाधिपती राहिला त्याच्या नंतर रामप्रागदास याला गादी मिळाली हा एक सिद्ध योगी होता व त्याची कीर्ती दूरपर्यंत पसरली होती घरी आपल्या लग्नाची तयारी सुरू झाली आहे, असे दिसताच याने गृहत्याग करून संन्यास घेतला लोक त्याला परमहंस म्हणत हा सदैव नग्न फिरे याच्या चमत्काराच्या अनेक कथा उत्तर भारतात प्रसिद्ध आहेत

रामप्रागदासाला त्रिवेणीदास व जगन्नाथदास असे दोन शिष्य होते ते एकामागून एक गादीवर बसले त्यांच्या काळात मठाचे उत्पन्न खूप वाढले जगन्नाथदासाच्या मृत्यूनंतर राम सुमेरदास हा त्या गादीवर आला

अयोध्यामठाच्या शिष्यपरंपरेत पलटूप्रसादाव्यतिरिक्त दुसरा कोणी कवी झाला नाही आणि कोणाची वचनेही उपलब्ध नाहीत

पलटूदासाचा दुसरा शिष्य हुलासदास याने बस्तीनी जिल्ह्यातल्या बाराबंकी या शहरी आपली गादी स्थापन केली त्याच्या पश्चात मसादास, गरीबदास, हरिभजनदास, विदुरदास, शिवप्रसाददास हे महंत त्या गादीवर बसले

या मठाशी संबंधित असलेल्या मंडळीत फक्त हुलासदासाचीच काव्यरचना उपलब्ध आहे याने लिहिलेल्या ब्रह्मविलास या ग्रंथाचा पहिला भाग प्रकाशित झाला आहे पलटूदास ज्ञान, भक्ती व वैराग्य यांना प्राधान्य देतो, तर हुलासदास प्रेम, ज्ञान, भक्ती व विवेक ही चार तत्त्वे साधनेची साहाय्यक मानतो त्यात विवेकाला बरेच प्राधान्य दिले आहे विवेकावाचून साधकाचे विचार निर्मळ होत नाहीत, कुकर्मांचा त्याग होत नाही आणि विकाराचे निर्मूलन होत नाही असे तो म्हणतो

पलटूप्रसादाच्या बनारसीदास या शिष्याने जवगढ येथे आपला मठ स्थापित केला रामरूपदास या आणखी एका शिष्याने जलालपूर येथे आपली गादी स्थापली त्याच्या पश्चात लक्ष्मीदास, महादेवदास, संतोषदास, इ महंत त्या गादीचे अधिकारी झाले दुखहरनदास, गोवर्धनदास, विश्वनाथप्रसाद हे पडूलघाट येथील मठाचे महंत झाले या परंपरेत लक्ष्मणदासाचीच काही काव्यरचना उपलब्ध आहे त्याच्या मतावर वैष्णव धर्माचा प्रभाव अधिक आहे त्याने जी पदे रचली आहेत, त्यात उपदेशात्मक पदांची संख्या अधिक आहे

**दीक्षा व साधना**—या पंथाची दीक्षा घेणाऱ्याला प्रथम कर्तव्याकर्तव्याचे ज्ञान घडवतात, ब्रह्मचर्यपूर्वक पंथीय ग्रंथाचे पठन करवतात व हळूहळू त्याला अष्टांगयोगात प्रविष्ट करतात निर्गुण भक्ती हे या पंथाचे वैशिष्ट्य आहे ही भक्ती जपतपाच्या आधारे नव्हे, तर श्वासप्रश्वासाच्या आधारे करायला पाहिजे, असे ते समजतात साधकाने ब्रह्माच्या ज्योतिर्मय स्वरूपाचे सतत चिंतन करीत राहावे, म्हणजे तो सत्यलोकात पोचतो आणि तिथल्या सत्यपुरुषाचे दर्शन करू शकतो कबीरपंथियांनी सत्यलोकाची जी कल्पना मांडली, ती पलटूदासी पंथात जशीच्या तशी घेतली आहे

या पंथाची काही वैशिष्ट्ये आणि रीतिरिवाज आहेत ते असे—हे लोक श्वेतवस्त्र धारण करून गळ्यात तुळशीच्या मण्यांची माळ घालतात कपाळी विशिष्ट प्रकारचा तिलक करतात या तिलकाला हरिमंदिर असे नाव आहे कारण तो मंदिराच्या आकाराचा असतो याविषयी पलटूदासाचा एक दोहा आहे, तो असा—

> **हरिमंदिर जेहि शीस प, उर तुलसीकी माल ।**
> **पलटू न कह देखि कर, डर मानत है काल ।।**

अर्थ—ज्याच्या कपाळी हरिमंदिर आहे व ज्याच्या हृदयावर तुळशीची माळ आहे, त्याला पाहून काळालाही भय वाटते, असे पलटू म्हणतो

**अधिकारग्रहण**—ज्या वेळी एखादा महंत गादीवर बसतो, तेव्हा एक विशेष समारंभ करतात निवडलेल्या महंताला कंठी, माळा व शाल देऊन सुसज्जित चौरंगावर बसवतात त्याच्या डोक्याला पगडी बांधतात नंतर गुरू त्याला तिलक लावतो त्यानंतर मोठा भंडारा होतो आणि जमलेल्या सर्वांना प्रसाद दिला जातो

एखादा महंत किंवा पंथानुयायी मृत्यू पावतो, तेव्हा त्याला प्रथम स्नान घालतात मग नवे वस्त्र नेसवून तिलक लावतात

विशेष प्रकारची पेटी बनवून त्याला त्या पेटीत सिंहासनावर बसवतात. पेटीत जलपात्र व भोजनसामग्री ठेवतात. मग ती पेटी जमिनीत पुरतात. त्या जागी समाधी बांधून नित्य दिवा ठेवतात. मृताला उद्देशून मोठा भंडारा घालतात.

प्रस्तुत पंथाचे मठ संपन्न आहेत. मठाच्या मोठमोठ्या शेतजमिनी आहेत. त्यांच्या भांडारात भक्तांकडून मिळालेले धनही संचित असते. मठात वास्तव्य करणाऱ्या साधुसंतांसाठी व अतिथि-अभ्यागतांसाठी त्या धनधान्याचा उपयोग केला जातो. परोपकार आणि अतिथिसेवा याबद्दल महंतांना विशेष आस्था असते. महंतांचे आचरण नैतिक व निर्मल असते, असा आजवरचा इतिहास आहे.

शिष्यसंख्या वाढवणे, कर्मकांडाचे आडंबर करणे, मूर्तिपूजा करणे, इ. गोष्टी पलटूदासाला मुळीच मान्य नव्हत्या. पण पुढे त्या गोष्टी संप्रदायात शिरल्या आहेत. अयोध्येच्या मठात पलटूदास व पलटूप्रसाद या गुरुशिष्यांच्या मूर्ती स्थापलेल्या असून, त्यांची नित्य साग्रसंगीत पूजा होत असते. या पंथाचे अनुयायी उत्तर प्रदेश व नेपाळ या भागात मोठ्या संख्येने आहेत.
[संत पलटूदास और पलटूपंथ – डॉ. राधाकृष्ण सिंह, १९६६.]

## पलाशकर्म

एक धार्मिक विधी. याला महाराष्ट्रात पळसुला म्हणतात. बटूच्या उपनयनानंतर चौथ्या दिवशी हा विधी करतात. आचार्य बटूसह पूर्वेला अगर उत्तरेला एका पळसाकडे जातो. मग तिथे वृक्षाच्या पूर्वेला किंवा उत्तरेला तीन स्थंडिले तयार करतात. मग प्रणव, श्रद्धा व मेधा यांचे आवाहन करतात. प्रणवाची 'यश्छन्दसाम...' या मंत्राने, श्रद्धेची 'श्रद्धयाग्नि...' या मंत्राने आणि मेधेची 'मेधा देवी...' या अनुवाकाने पूजा करतात. नंतर बटूच्या हातातला दंड त्या पळसाच्या मुळाशी ठेवतात आणि दुसरा दंड घेऊन बटू व आचार्य घरी परत येतात. [हिं. ध.]

## पलियन

द. भारतातील एक जात. या लोकांची वस्ती मदुरा जिल्ह्यात, तसेच तिन्नेवेल्ली व तिरुवितांकुर या सरहद्दीवर आढळते. हे लोक लहान लहान टोळ्या करून टेकड्यांवर किंवा दऱ्यांमध्ये राहतात. टेकड्यांवर राहणारे लोक गवताच्या झोपड्या बांधून राहतात, तर दऱ्यांमधील लोक गुहांमध्ये राहतात. तिथे हिंस्र पशूंपासून त्रास होऊ नये म्हणून ते रात्रभर धुनी पेटवून ठेवतात.

या जातीचा एक वृद्ध पुढारी असतो. तो रात्री शेकोटी पेटवून तिच्या शेजारी झोपतो. पण ती शेकोटी सतत तेवत ठेवण्याचे काम मात्र त्याच्या पत्नीकडे असते. केवळ या कामासाठी त्याला दोन बायका करण्याची परवानगी असते. त्या बायका आळीपाळीने ती शेकोटी जळत ठेवतात.

हे लोक अत्यंत आळशी, अस्वच्छ व मागासलेले आहेत. यांना शेती किंवा शिकार यांची माहिती नाही. ते कोणतेही जनावर पाळीत नाहीत. कंदमुळे व फळे यांवर ते निर्वाह करतात.



पलियन पुरुष

कंदमुळे भाजून खातात. हे मनाने भित्रे, बुजरे व लाजाळू असल्यामुळे इतर लोकांत मिसळत नाहीत. यांना तंबाकूचे व्यसन असते.

**विवाहप्रथा** – यांच्यात मामेबहिणीशी किंवा मावसबहिणीशी विवाह होतात. पण नात्यातल्या इतर मुलींबरोबर मात्र त्यांना विवाह करता येत नाही. कुटुंबातील वडील मंडळी विवाह ठरवतात. वधूला हुंडा द्यावा लागत नाही. पण वधूचे नातेवाईक वराच्या घरी जाताना कंदमुळे, मध, मणी, नगरे वस्तू घेऊन जातात. विवाहाच्या वेळी वर वधूच्या गळ्यात काळ्या मण्यांची माळ बांधतो आणि तिला एक साडी देतो. वधूही वराच्या गळ्यात तशाच मण्यांची माळ बांधते. नंतर भोजनसमारंभ होऊन विवाहविधी पुरा होतो. विवाहानंतर प्रथम अपत्याच्या जन्मापर्यंत पतिपत्नी एका निराळ्या खोलीत राहतात. एखाद्या तरुणाला वधू मिळत नसेल, तर दोन भाऊ एकाच मुलीशी लग्न करतात.

**देवधर्म** – मयाडी ही त्यांची एक देवता आहे. तिचा उत्सव ते चैत्र महिन्यात करतात. या देवतेचा प्रतिनिधी म्हणून ते नागाच्या आकृतीसारखा एक पाषाण एखाद्या झाडाखाली किंवा लहानशा छप्पराखाली स्थापतात. जत्रेच्या दिवशी सूर्योदयापूर्वी तिथे जमतात. मग या देवतेसमोर अग्नी पेटवतात. देवीसाठी

कावडा कापून तो त्या अग्नीत भाजतात त्याच्यापैकी काही लोक कुरुपुस्वामीला व शिवाला भजतात

या लोकांना औषधी–वनस्पतींचे बरेच ज्ञान असते त्या ज्ञानाच्या बळावर ते वैदूगिरीही करतात फार व त्या वेळात पक्ष्यांचे पिंजरे, चटया, टोपल्या वगैरे वस्तू तयार करतात डावराच्या चाडापासून ते दोरही तयार करतात हे लोक पानाची व गवताची वस्त्रप्रावरणे बांधून ती वापरतात



पलियन स्त्री

उत्तर तिन्नेवेल्ली भागातील पलियन लहान लहान टोळ्या करून राहतात दोन टोळ्यांच्या वसतिस्थानांत अंतर बरेच असते हे पूर्ण अशिक्षित आहेत त्यांच्या कित्येक स्त्रियांना तर स्वतःचे नावदेखील ठाऊक नसते

**मर्तिकप्रथा** – प्रेताला स्नान न घालता किंवा इतर काहीही विधी न करता उताणे पुरतात आठव्या दिवशी मृताला कंदमुळे व मद्य अर्पण करून त्याची पूजा करतात आणि जातीला सुरक्षित ठेवण्यासंबंधी त्याची प्रार्थना करतात जातीवर एखादे मोठे संकट आले किंवा कोणी आकस्मिक रीतीने मरण पावला तर हे मृतात्म्याची आराधना करतात तो मृतात्मा कोणाच्या तरी शरीरात संचार करतो व आवश्यक त्या गोष्टी सांगतो, अशी त्यांची श्रद्धा आहे [ मदुरा गॅझे , का टा स इ ]

## पलुस्कर विष्णू दिगंबर

(१८७२–१९३१ इ स ) संगीत क्षेत्रातील एक युगपुरुष गाडगीळ हे त्यांचे मूळ उपनाम होते पण ते पलूस गावचे राहणारे असल्यामुळे लोक त्यांना पलुस्कर म्हणू लागले आणि पुढे तेच आडनाव बनले

यांचे घराणे मूळचे कीर्तनकाराचे त्यामुळे बालवयापासूनच ते वडिलांच्या कीर्तनात साथीला उभे राहात कीर्तनातील साथीच्या निमित्ताने त्यांच्या मनावर नकळत गाण्याचे संस्कार घडले इंग्रजी सहावीपर्यंत यांचे शालेय शिक्षण झाले कुरुंदवाड संस्थानचे अधिपती श्रीमंत नानासाहेब पटवर्धन हे विष्णुपंतांचे सहाध्यायी व वर्गबंधू होते त्यामुळे नानासाहेबांचे वडील श्री दाजीसाहेब पटवर्धन यांचा विष्णुपंतांवर लहानपणापासूनच लोभ होता विष्णुपंतांचे वडील दाजीसाहेबांच्या आश्रयालाच होते त्यामुळे दाजीसाहेब विष्णुपंतांच्या शिक्षणाची व संसाराची आस्थापूर्वक चौकशी करीत असत इंग्रजी सहावीत असतानाच विष्णुबुवांचे लग्न झाले परंपरागत कीर्तनाचा व्यवसाय स्वीकारायचा की थोडे फार इंग्रजी शिकून संस्थानातच एखादी नोकरी पत्करायची एवढाच बुवांच्या पुढे प्रश्न होता पण पुढे एक घटना अशी घडली, की त्यामुळे त्यांच्या जीवनाला एकदम वेगळे वळण लागले—

कुरुंदवाडला दत्तजयंतीचा उत्सव मोठ्या प्रमाणात होत असे अशाच एका उत्सवाप्रसंगी शोभेच्या दारूने बुवांचे तोंड भाजले व डोळ्यांवर जबरदस्त परिणाम झाला त्यांच्यावर अनेक इलाज करण्यात आले पण त्यांना यश आले नाही भाजलेला चेहरा मात्र बरा झाला अशा परिस्थितीत डोळ्यांशी संबंधित असणारा अभ्यास करणे त्यांना अशक्य ठरले म्हणून मग त्यांनी गाणे शिकावे असे त्यांच्या आप्तेष्टांनी ठरवले याच वेळी पं बाळकृष्णबुवा इचलकरंजीकर हे मिरज संस्थानात गाणे शिकविण्यासाठी दरबारी गवई म्हणून राहिले होते, विष्णुबुवांची त्यांच्याकडे रवानगी झाली बाळकृष्णबुवांनीही विष्णुपंतांना मनापासून तालमी दिल्या आणि त्यांच्याकडून व्यवस्थित रियाजही करून घेतला सात दहा वर्षे बारा बारा तास मेहनत करून विष्णुबुवा गायनविद्येत पारंगत झाले

अभ्यास करीत असतानाच एक गोष्ट विष्णुपंतांच्या नजरेस आली ती ही की समाजाला गायनाची आवड असली तरी समाजात गायक वादक कलाकारांना योग्य ती प्रतिष्ठा नाही बाळकृष्णबुवा हे तर दरबारी गवई आणि संगीताचार्य, पण त्यांनाही समाजात योग्य तो मान दिला जात नसे याचे एक ठळक उदाहरण मिरजेतच घडले एक दिवस ही गुरुशिष्यांची जोडी गाण्यावर चर्चा करीत रस्त्याने चालली होती समोरून संस्थानाधिपतीची घोड्याची गाडी आली त्यांनी गाडी थांबवून विष्णुबुवांना गाडीत घेतले, पण बाळकृष्णबुवांना मात्र घेतले नाही या घटनेचा विष्णुपंतांच्या मनावर परिणाम झाला त्याच वेळी त्यांच्या मनाने घेतले, की कलावंतांवरचा हा सामाजिक बहिष्कार दूर व्हायला हवा, त्यांना समाजात प्रतिष्ठा मिळायला हवी आणि त्या कामी आपणच प्रयत्न करायला हवे

इ स १८९६ च्या नारळी पौर्णिमेला दोन सहाध्यायांसह

विष्णुपंतांनी मिरजेची सीमा ओलांडली प्रथम ते साताऱ्याला व नंतर तिथून बडोद्याला गेले बडोद्याच्या राममंदिरात त्यांनी आपल्या गाण्याच्या मैफिली चालू केल्या बडोदेकरांना बुवांचे गायन आवडले थोड्याच दिवसांत त्या वेळच्या बडोद्याच्या महाराणी जमनाबाई गायकवाड यांच्या कानावर बुवांची कीर्ती गेली त्यांनी बुवांना रीतसर निमंत्रण देऊन त्यांचा जलसा घडवून आणला त्या जलशात तिथल्या पट्टीच्या गायकांवर बुवांनी मात केली पुढे राजकोट, जुनागड, मांगरोळ, इ अनेक ठिकाणी मैफली गाजवीत त्यांनी दौरे काढले या प्रवासातच ते गिरनारच्या दत्तदर्शनाला गेले तिथे एका साधूने त्यांना आशीर्वाद देऊन सांगितले, की 'तुम्ही पंजाबात जाऊन तिकडे संगीतप्रचाराचे कार्य करा ' त्याप्रमाणे ते पुढच्या दौऱ्यावर निघाले सबंध मध्य प्रदेश त्यांनी आपल्या गायकीने दुमदुमून सोडला ग्वाल्हेरात तर त्यांची फारच वाहवा झाली त्यानंतर मथुरा, भरतपूर, दिल्ली, अमृतसर, लाहोर, रावळपिंडी, मुलतान, इ ठिकाणीही त्यांनी खूप कीर्ती मिळविली

आपल्याला समाजात मानमान्यता मिळवायची, तर गायनाबरोबरच व्याख्यानही आपल्याला जमायला हवे, असे त्यांच्या मनाने घेतले व मथुरेच्या मुक्कामात त्यांनी वक्तृत्वाचा अभ्यास केला आपल्या कार्यक्रमाच्या आरंभी ते प्रथम प्रथम आपले भाषण लिहून वाचीत, पण नंतर त्यांना बोलण्याचा चांगला सराव झाला व ते अस्खलित भाषणे करू लागले

अलीगडच्या मुक्कामात एका नापिताने त्यांच्या पुढे काही पदे म्हटली व लगेच त्यांचे स्वरलेखनही करून दाखवले त्याचप्रमाणे रागाचे विवेचन करणारे काही संस्कृत श्लोकही त्याने बुवांना ऐकवले ते सारे ऐकून बुवा चकित झाले आतापर्यंत बुवांच्या शिक्षणपद्धतीत स्वरलेखनादी गोष्टी कधी आल्याच नव्हत्या त्यामुळे संगीताच्या शास्त्रीय मीमांसेत आपण अनभिज्ञ आहोत, हे विष्णुबुवांना कळून आले त्यांनी मग आपले सर्व कार्यक्रम बंद करून संगीतशास्त्राच्या संशोधनपूर्वक अभ्यासाला प्रारंभ केला नऊ महिनेपर्यंत त्यांनी अविश्रांत अभ्यास करून स्वरलेखनपद्धतीचे संशोधन केले त्यासाठी त्यांनी पाश्चात्त्य स्वरलेखनपद्धतीचाही अभ्यास केला नंतर तालदर्शनासाठी निरनिराळी चिन्हे बनवून भारतीय संगीत लिपिबद्ध करण्याचे एक माध्यम तयार केले या पद्धतीच्या आधारेच त्यांनी मग संगीताच्या अध्ययनासाठी पाठ्य पुस्तकेही प्रकाशित केली

संगीत लिपिबद्ध करून त्याचा प्रसार करायचा, तर त्यासाठी एक स्थिर असे शिक्षणकेंद्र निर्माण करायला हवे, याची त्यांना जाणीव झाली त्यातूनच गांधर्व महाविद्यालयाचा जन्म झाला लाहोर येथील काही प्रतिष्ठित लोकांच्या साहाय्याने त्यांनी ५ मे १९०१ रोजी लाहोर येथे गांधर्व महाविद्यालय या संस्थेची स्थापना केली या विद्यालयाची स्थापना म्हणजे संगीतक्षेत्रातील एक युगप्रवर्तक घटना होती संगीतकलेला



पं विष्णू दिगंबर पलुस्कर

लोकाभिमुख करण्याचे कार्य या संस्थेच्या स्थापनेपासूनच सुरू झाले, असे अनेकांचे मत आहे संगीताचे शिक्षण देणारे शिक्षक ही तयार करायचे, अशी त्यांची आणखी एक कल्पना होती तदनुसार त्यांनी अनेक गायक शिक्षक तयार केले म गांधींच्या विनंतीवरून त्यांनी साबरमतीच्या आश्रमात संगीतशिक्षक म्हणून नारायणराव खरे यांची रवानगी केली विद्यालयात संगीताचे वर्ग चालविण्याव्यतिरिक्त संगीतशिक्षणाला लागणाऱ्या क्रमिक पुस्तकांची छपाई करण्यासाठी त्यांनी एक लहानसा छापखानाही खरेदी केला त्याची व्यवस्था त्यांनी विद्यालयातील मुलांकडे सोपविली या विद्यालयातर्फे संगीतामृतप्रवाह या नावाचे एक हिंदी मासिकही चालू करण्यात आले होते या मासिकात त्या काळात लोकप्रिय झालेली देशभक्तिपर गाणी स्वरलेखनासहित छापली जात

लाहोरला अशा प्रकारे सर्व काम मार्गी लागल्यावर त्यांनी त्याच विद्यालयाची दुसरी शाखा मुंबईत उघडली नंतर पुणे, नागपूर, इ. ठिकाणीही संस्थेचा प्रसार केला मुंबईच्या शाखेत स्त्रियांना शिक्षण देण्याची त्यांनी स्वतंत्र व्यवस्था केली होती त्यासाठी आपली पत्नी व भाची यांना त्यांनी संगीताचे शिक्षण देऊन तयार केले

संगीताच्या क्रमबद्ध परीक्षा घेऊन विद्यार्थ्यांना संगीतविषयक पदव्या देण्याची कल्पनाही विष्णुबुवांचीच ते आपल्या विद्यालयातून अशा प्रकारचे पदवीदानसमारंभ घडवून आणीत परंपरानिष्ठ गायकांना बुवांचे हे करणे रुचले नाही पण त्यांनी त्या कामी कोणाचाही कदर केली नाही

गांधर्व महाविद्यालयातर्फे संगीतपरिषदा भरविणे ही बुवांची संगीतक्षेत्रातली एक विशेष कामगिरी होय १९१६ साली श्री विष्णू नारायण भातखंडे यांनी बडोद्याला श्रीमंत सयाजीराव गायकवाड यांच्या अध्यक्षतेखाली एक मोठी अखिल भारतीय संगीतपरिषद भरविली होती साऱ्या भारतातून या परिषदेला अनेक संगीतकार आले होते या परिषदेत विष्णुबुवांनी स्वरलेखनावर आपला संशोधनात्मक निबंध वाचला त्यानंतर बुवांना आपल्या विद्यालयातर्फेच या परिषदा भरवण्याचे ठरविले त्यानुसार १९१८ मध्ये त्यांनी मुंबईला संगीत परिषद भरविली डॉ. जयकर हे या परिषदेचे अध्यक्ष होते या परिषदेला जोडून भारतीय वाद्यांचे प्रदर्शन भरविण्यात आले होते

सभागृहातून संगीताचे जलसे करण्याची प्रथा प्रथम विष्णुबुवांनीच सुरू केली ठरलेल्या वेळी जलसा सुरू करणे व योग्य वेळी तो बंद करणे यावर त्यांचा फार कटाक्ष होता गायकाच्या लहरीप्रमाणे जलशाची सुरवात किंवा समाप्ती व्हायची, हे त्यांना मुळीच मान्य नव्हते

पुढे त्यांच्यावर खूप संकटे आली त्यांच्या विद्यालयाची मुंबईची इमारत लिलावात निघाली त्यामुळे त्यांची मनःशांती ढळली मन स्थिर करण्यासाठी मग ते ईश्वरभक्तीकडे वळले पुढे काही काळ ते नाशिक येथे राहिले त्यानंतर पाच सहा वर्षे त्यांनी भारतभर दौरे करून कीर्तने–प्रवचने केली आपल्या दौऱ्यात त्यांनी ‘रघुपति राघव राजाराम’ हे भजन सर्वत्र लोकप्रिय केले पुढे महात्मा गांधींनी ते भजन आपल्या आश्रम-भजनावलीत दाखल करून घेतले १९३० साली बुवा रामायणावर प्रवचने करण्यासाठी नेपाळात गेले होते आधीच वार्धक्य आणि त्यातून प्रवासाचा ताण यामुळे तिथे त्यांची प्रकृती बिघडली नंतर उपचारासाठी त्यांना मिरजला आणण्यात आले त्यांच्यावर पुष्कळ उपचार केले गेले, पण त्यांची प्रकृती पुन्हा मूळ पदावर आली नाही अखेर तिथेच त्यांचे देहावसान झाले

विष्णुबुवा जसे गायनशास्त्रपारंगत होते, तसेच ते देशभक्तही होते स्वातंत्र्याच्या आंदोलनात त्यांनी अनेक स्वातंत्र्यसैनिकांना आपल्या महाविद्यालयात आश्रय दिला होता ‘वंदे मातरम्’ हे साग्रसंगीत राष्ट्रगीत प्रत्यक्ष सभेत म्हणण्याची प्रथा त्यांनीच सुरू केली

संगीतविषयावर विष्णुबुवांनी लहान मोठी सुमारे साठ पुस्तके लिहिली आहेत संगीततत्त्वदर्शक हा त्यांचा ग्रंथ हिंदी भाषेत आहे या ग्रंथाच्या प्रस्तावनेत ते म्हणतात, ‘आपली प्राचीन ऋषिप्रणीत संगीतविद्या दिवसेंदिवस लोप पावत चालली आहे तिला जगवण्यासाठी व गायनाद्वारा परमेश्वराला प्रसन्न करून घेण्यासाठी मी हा ग्रंथप्रपंच मांडला आहे ’ यावरून त्यांच्या संगीतविद्येच्या प्रचारामागचे आध्यात्मिक अधिष्ठानही स्पष्ट होते [विष्णु दिगंबर पलुस्कर, गान रत्नश्री, संगीतसाधना]

**पल्लन** दक्षिण भारतातील एक जात यांची वस्ती मुख्यतः तंजावर, तिरुचिरापल्ली, मदुरा व तिरुनेलवेल्ली या



पल्लन पुरुष

जिल्ह्यांत आहे हे लोक ठेंगू, काळे, राकट व पुष्ट असतात जमीनदारांच्या शेतात मजुरी करणे, हा यांचा मुख्य व्यवसाय

आहेत. सखल व दलदलीच्या जमिनीत शेती करण्यात हे कुशल आहेत. मुसलमान व ख्रिस्ती लोकांकडे यांना कष्टाची व हलकी कामेही करावी लागतात. उच्च जातीचे लोक यांना गुलामा-प्रमाणे वागवतात.

ब्राह्मण स्त्री व शूद्र पुरुष यांपासून हे लोक उत्पन्न झाले असे म्हणतात. पण हे लोक स्वतः मात्र आपली उत्पत्ती देवेंद्रापासून झाल्याचे सांगतात. यांच्या ताडमन, कोगा, कडैयार, मगानाड, तेय्या अरुमा, राजा, साम्बिया, इ. दहा पथरा पोट-जाती आहेत. त्यांचा आपसात बेटीव्यवहार होत नाही. यांची जातपंचायत असून पंचायतप्रमुखाला कुडुंबन असे नाव आहे. त्याच्या मदतनिसांना कलाडी व वारियर म्हणतात. ही पदे वंशपरंपरेने चालतात. अपराधी व्यक्तीला जातिबाह्य ठरवणे व जातीत परत घेणे या गोष्टी त्याच्या अधिकारात असतात.

**देवधर्म–** हे लोक स्वतःला शैव म्हणवतात. पण ते मुख्यत्वे ग्रामदेवता व भुतेखेते यांनाच भजतात. त्यांना पशुबली देणे



पल्लन स्त्री

आणि त्याचा प्रसाद म्हणून त्या पशूचे मांस मद्यासह भक्षण करणे, हे ते धर्मकृत्य समजतात.

मुलीला प्रथम ऋतुप्राप्ती झाल्यावर तिला वेगळ्या झोपडीत ठेवतात. तिथे तिला फळे, दूध, गूळ व डाळी यांवर निर्वाह करायला लावतात. सातव्या दिवशी तिला स्नान घालून घरात घेतात व तिची झोपडी जाळून टाकतात. अकराव्या दिवशी स्नान केल्यानंतर ती पूर्ण शुद्ध झाली, असे समजतात.

**विवाहप्रथा–** यांच्यात विवाहाच्या पूर्वी वराची बहीण ताळी, नवे वस्त्र, विडा व फळे-फुले घेऊन वधूच्या घरी जाते व वधूच्या गळ्यात ताळी बांधते. त्यानंतर वधू एका खांबाला प्रदक्षिणा घालून मग वराच्या घरी जाते.

काही ठिकाणी वराचा मामा व जातिप्रमुख तारळ, फळे, फुले व देज घेऊन वधूकडे जातात व त्या सर्व वस्तू त्या गावाच्या प्रमुखाजवळ देतात.

विवाहाच्या दिवशी वराचे व वधूचे मामा मिळून मांडव व बोहले तयार करतात. वधूवरांना स्नान घालून व कंकणे बांधून बोहल्यावर बसवतात. मग त्यांच्या मस्तकावर एक वस्त्र धरून त्यावर पाणी शिंपडतात. नंतर त्यांच्या गळ्यात माळा घालतात. त्यानंतर मामाने दिलेली नवी साडी नेसून वधू वराजवळ येऊन बसते. तिथे वराची बहीण वधूच्या गळ्यात ताळी बांधते. एवढ्याने लग्नविधी पुरा होतो.

**मर्तिकप्रथा –** हे लोक मृतांना पुरतात. प्रेत पुरल्यानंतर मृताचा मुलगा किंवा आप्त उजव्या खांद्यावर पाण्याने भरलेले मडके घेऊन त्याला तीन प्रदक्षिणा घालतो. प्रत्येक प्रदक्षिणेच्या आरंभी मडक्याला एक भोक पाडतात. शेवटी प्रेताच्या डोक्याच्या बाजूला मडके टाकून ते फोडतात. मग सर्वजण स्नान करून घरी जातात. यांच्यात अकरा दिवस सुतक पाळतात.

[का. द्रा. स. ६ ; मदुरा गॅझे.]

## पल्लव राजवंश

तमिळनाडमधील तोंडमंडलम या प्रदेशावर राज्य करणारा एक राजवंश. कांचीपुरम ही त्यांची राजधानी होती. तमिळ संघम साहित्यात पल्लवांचा उल्लेख नसल्यामुळे ते मूळचे तमिळनाडमधले नसावे, असे काही पंडितांचे मत आहे. सातवाहनांच्या साम्राज्य – काळात त्यांचे सामंत किंवा प्रांताधिपती म्हणून ते तमिळनाडमध्ये गेले असावे आणि इ. स. च्या तिसऱ्या शतकात सातवाहनांची सत्ता दुबळी झाल्यानंतर त्यांनी आपले स्वतंत्र राज्य सुरू केले असावे, असे म्हणतात. पण काही पंडितांना हे मत मान्य नसून, पल्लव लोक मूळचे तमिळनाडमधलेच होते, असे सिद्ध करण्याचा ते प्रयत्न करतात. मणिमेखलै या महाकाव्याच्या आधारे, पल्लव राजवंशाचा मूळ पुरुष हा चोळ राजपुत्र व नाग राजकन्या यांचा पुत्र होता आणि त्या नाग राजकन्येची जन्मभूमी मणिपल्लवम

ही होती, त्यामुळे त्यांच्या कुळाला पल्लव हे नाव प्राप्त झाले, असे ते म्हणतात पल्लवांना तमिळ मानणारे पंडित कुरुब या वन्य जातीच्या लोकांना पल्लवांचे वंशज मानतात

श्री काशीप्रसाद जायस्वाल यांच्या मते पल्लव लोक हा वाकाटक वंशाची एक शाखा होती ते श्रेष्ठ ब्राह्मण कुळातले होते, पण त्यांना क्षात्रवृत्ती स्वीकारली होती त्यांच्या राजवटीवर उत्तर भारतीय सांस्कृतिक परंपरेची छाप स्पष्ट दिसून येते त्यांनी धर्ममहाराज, अश्वमेधयाजिन, इ पदे या घेतल्या होत्या त्यांचे आरंभीचे ताम्रपट प्राकृत भाषेत असून, नंतरचे संस्कृतात आहेत ते स्वतःला अश्वत्थाम्याचे वंशज समजत त्यांनी सातवाहनांची अर्थशास्त्रप्रणीत शासनव्यवस्था अंगीकारली होती या सर्व वर्णनावरून पल्लवांचे उत्तरभारतीयत्व सिद्ध होते, असे श्री जायस्वाल मानतात मात्र त्यांचे हे मत अजून सर्वमान्य झालेले नाही



नागनागिणी – गंगावतरण – शिल्प, महाबलिपुरम

काही पंडित पल्लवांना पार्थियन किंवा पह्लव लोकांपैकी मानतात पण नावातील साम्यापलिकडे त्यांचा कोणताही संबंध अजून सिद्ध झालेला नाही

**इतिहास –** इ स च्या तिसऱ्या शतकातील काही प्राकृत ताम्रपटावरून सिंहवर्मा व शिवस्कंदवर्मा या पल्लव राजांची नावे ज्ञात झाली आहेत यांचे राज्य कृष्णा नदीपासून पेन्नार नदीपर्यंत पसरले होते त्या राजांनी अश्वमेध यज्ञ केल्याचा उल्लेख आढळतो, पण त्यांच्याविषयी अधिक माहिती उपलब्ध होत नाही त्यांच्यापैकी विष्णुगोप राजाचा (इ स ३५०–३७५) समुद्रगुप्ताने पराभव केला होता, असे कळते इ स ३७५ ते ५७५ या कालखंडात या वंशात ७–८ राजे होऊन गेले त्यांची नावे संस्कृत ताम्रपटावरून समजतात पण त्यांचा इतिहास मात्र नीट समजलेला नाही

त्यानंतर सिंहविष्णु नावाचा एक राजा झाला (इ स ५७५–६००) व त्याने पल्लव राज्यशासनाची कीर्ती पुष्कळ वाढवली त्याने कळभ्र लोकांच्या बंडाचा पुडाईला पायबंद घालून चोळ मंडळावर आपली सत्ता प्रस्थापित केली हा राजा विष्णूचा उपासक होता त्याने प्रसिद्ध संस्कृत कवी भारवी याला आश्रय दिला होता

सिंहविष्णूचा पुत्र महेंद्रवर्मा (इ स ६००– ३०) हा या वंशातील एक श्रेष्ठ राजा मानला जातो तो जसा पराक्रमी होता, तसाच प्रतिभासंपन्न साहित्यिक व संगीतज्ञही होता त्याने चार प्रहसने रचली होती चित्रकलेचीही त्याला आवड होती एका मोठ्या सलग खडकात मंदिर खोदून काढण्याची शिल्पपद्धती त्यानेच सुरू केली

याच्या कारकिर्दीत पल्लवांना चालुक्यांशी संघर्ष सुरू झाला चालुक्य राजा पुलकेशी (दुसरा) याचा विजयी सेना कांची नगरीपर्यंत येऊन पोचली होती पण महेंद्रवर्मा याने ती स्वारी परतवून लावली पुलकेशीने पल्लवांच्या राज्यातील उत्तरेकडचा काही भाग मात्र बळकावला

महेंद्रवर्मा प्रारंभी जैन धर्माचा अनुयायी होता पण अप्पर याच्या प्रभावाने तो शैव झाला त्याने विष्णुपूजेलाही प्रोत्साहन दिले पुढे तो जैनविरोधकही बनला



वराह मंडप – महाबलिपुरम

महेंद्रवर्मा याचा पुत्र नरसिंहवर्मा (प्रथम) (इ स ६३०–६६८) हा या वंशातील सर्वांत श्रेष्ठ राजा होय त्याच्या वेळी पल्लवांची सत्ता ही द भारतातील प्रमुख शक्ती ठरली त्याने चालुक्य राजा पुलकेशी याच्या अनेक स्वाऱ्यांचा यशस्वी प्रति

वार केला आणि मग स्वतःच चालुक्यांच्या राज्यावर आक्रमण सुरू केले. इ. स. ६४२ मध्ये त्याने चालुक्यांची बदामी ही राजधानी जिंकली. त्या युद्धात पुलकेशी मारला गेला. पुढे चालुक्य राजा विक्रमादित्य याने इ. स. ६५५ मध्ये आपली राजधानी बदामी ही परत घेऊन चालुक्यांची सत्ता पुन्हा प्रस्थापित केली.

नरसिंहवर्मा याने लंकेचा एक राजपुत्र मानवर्मा याला आश्रय देऊन त्याच्या साहाय्यार्थ लंकेवर दोनदा नौदल पाठवले व त्याला लंकेचे सिंहासन मिळवून दिले. नरसिंहवर्म्याने चोळ, चेर व कलभ्र यांचाही पराभव केला होता, असे म्हणतात. त्याने महामल्ल ही पदवी घेतली होती. त्याच्या प्रेरणेने अखंड खडकात खोदून काढलेली रथमंदिरे महाबलिपुरम येथे अजूनही उभी आहेत. त्या वेळी तोंडमंडलममध्ये अनेक बौद्ध मठ व जैन मंदिरे होती आणि कांची येथे विद्येचे महान केंद्र होते, असे वर्णन युआन च्वांग याने केले आहे.

नरसिंहवर्मा याच्यानंतर त्याचा पुत्र महेंद्रवर्मा (दुसरा) याने दोनच वर्षे राज्य केले. त्या अवधीत चालुक्य विक्रमादित्याने त्याचा पराभव केला. त्या युद्धात महेंद्रवर्मा बहुधा मारला गेला असावा. त्याच्यानंतर त्याचा पुत्र परमेश्वरवर्मा (पहिला) (इ. स. ६७०–६९५) याच्या कारकीर्दीतही विक्रमादित्याने



रथमंदिर – महाबलिपुरम

पल्लवांच्या राज्यावर स्वारी केली होती. पण परमेश्वरवर्म्याने त्याचा पुन्हा पराभव करून त्याला पिटाळून लावले.

परमेश्वरवर्मा हा शिवभक्त असून, त्याने कांची नगरीजवळच कूरम येथे एक शिवमंदिर निर्माण केले. त्याच्यानंतर त्याचा पुत्र नरसिंहवर्मा (दुसरा) (इ. स. ६९५–७२२) याची

राजवट शांतता व समृद्धी या दृष्टींनी विशेष उल्लेखनीय ठरली. कला व साहित्य या क्षेत्रांत त्याने बरीच कामगिरी केली. कांची येथील कैलासनाथमंदिर व महाबलिपुरम येथील सागरतीरावरील मंदिर ही त्याने निर्मिलेल्या वास्तुशिल्पाची श्रेष्ठ प्रतीके



सागरतीरावरील मंदिर – महाबलिपुरम

होत. चित्रकलेलाही त्याने प्रोत्साहन दिले. दंडी हा संस्कृत पंडित त्याच्या दरबारात होता, असे म्हणतात. त्याने सुमारे २५० पदव्या धारण केल्या होत्या. त्यांतील राजसिंह, शंकरभक्त व आगमप्रिय या प्रमुख होत. चीनमध्ये त्याचे राजदूत गेले होते व त्यांचा चीनच्या सम्राटाने मोठा आदरसत्कार केला होता असे कळते. त्याचा पुत्र परमेश्वरवर्मा (दुसरा) (इ. स. ७२२–७३०) याच्या कारकीर्दीत चालुक्य राजाने पुन्हा आक्रमण करून कांचीपुरी जिंकली, पण पल्लव राजाने त्याला खंडणी दिल्यामुळे तो परत गेला. त्या स्वारीत गंगराजाने चालुक्यांना मदत केली होती, म्हणून परमेश्वरवर्मा याने गंगांच्या राज्यावर स्वारी केली, पण त्या युद्धात तो स्वतःच मारला गेला.

परमेश्वरवर्मा याला पुत्र नव्हता, म्हणून राज्यातील प्रमुख नागरिकांनी नंदिवर्मा नामक एका बारा वर्षांच्या मुलाला सिंहासनावर बसवले. त्याला पल्लवमल्ल असेही नाव होते. तो सिंहविष्णूचा भाऊ भीमवर्मा याचा वंशज होता. त्याने इ. स. ७९६ पर्यंत राज्य केले. प्रारंभी त्याला पांड्य राजा मानवर्मा राजसिंह याच्या आक्रमणाला तोंड द्यावे लागले. परमेश्वरवर्मा याचा पुत्र म्हणून चित्रमाय नावाच्या एका युवकाला पल्लवांचे राज्य मिळवून देण्यासाठी पांड्य राजाने ते आक्रमण केले होते. पण नंदिवर्मा याचा शूर सेनापती उदयचंद्र याने त्याचा यशस्वी प्रतिकार केला. त्याने पूर्व चालुक्यांच्या एका सामंताचे राज्य जिंकले. पांड्यांच्या आक्रमणाला कायमचा आळा घालण्यासाठी

त्याने गंग व कदंब या प्रदेशांच्या राजांचे साहाय्य घेऊन पांड्य राज्यावर स्वारी केली, पण या स्वारीत मात्र त्याला यश आले नाही

इ स ७४० मध्ये चालुक्य राजा विक्रमादित्य (दुसरा) याने पल्लव राज्यावर आक्रमण करून कांची नगरी जिंकली पण त्याने नगरीचा विध्वंस न करता, लुटलेली संपत्ती परत दिली पुढे चालुक्य राजा कीर्तिवर्मा यानेही पल्लवावर स्वारी करून त्याच्याकडून मोठी खंडणी वसूल केली इ स ७५० च्या सुमारास राष्ट्रकूट राजा दंतिदुर्ग याने कांचीवर स्वारी केली, पण आपल्या सामर्थ्याचे नुसते प्रदर्शन करून व आपली कन्या नंदिवर्मा याला देऊन तो परत गेला

या सर्व धामधुमीत पल्लवाचे राज्य जसेच्या तसे टिकून राहिले नंदिवर्मा याने गंग राजा श्रीपुरुष याचा पराभव करून त्याचा काही प्रदेशही जिंकला होता नंदिवर्मा विष्णुभक्त होता त्याने मुक्तेश्वर, वकुंठ पेरुमाळ, इ अनेक मंदिरे निर्माण केली तो विद्वानही होता त्याचा पुत्र दंतिवर्मा (इ स ७९६-८४७) याच्या कारकीर्दीत पांड्य व राष्ट्रकूट राजांनी त्याच्यावर स्वाऱ्या करून त्याला हैराण केले त्यामुळे पल्लवांची प्रतिष्ठा पुष्कळच कमी झाली पण त्याचा पुत्र नंदिवर्मा (तिसरा) (इ स ८४७-८७२) याने ती परत मिळवली तो एक समर्थ शासक ठरला त्याने प्रबळ नौदलही निर्माण केले होते सयाम द्वीपातील तकुआपा येथे एका तमिळ कोरीव लेखात एका विष्णु मंदिराचा व अवनिनारणम नावाच्या जलाशयाचा उल्लेख आहे ते मंदिर व तो जलाशय नंदिवर्मा यानेच निर्माण केला असे म्हणतात

त्याच्या राजवटीच्या अखेरीस पांड्य राजाने नंदिवर्म्याचा पराभव केला नंदिवर्म्याच्या मागून त्याचा पुत्र नृपतुंगवर्मा (इ स ८७२-८९३) याने पांड्याचा पराभव करून आपली सत्ता पुन्हा दूरवर प्रस्थापित केली त्याने विद्येच्या प्रसाराला उत्तेजन दिले त्याच्या कारकिर्दीच्या शेवटी काही वर्षे त्याचा एक नातलग अपराजित हा राज्यकारभार पाहत होता त्यानेही पांड्याचा पराभव केला पण त्याची फारशी माहिती मिळत नाही मात्र तोच पल्लव वंशातला शेवटचा राजा ठरला इ स ८९३ च्या सुमारास पल्लवांचा सामंत आदित्य चोळ याने अपराजिताचा पराभव करून त्याचे राज्य जिंकले व तोंडमंडलावर आपली सत्ता स्थापली

पल्लव राजे मुख्यत शैव असले, तरी त्यांच्या राज्यात सर्व पंथांना पूर्ण स्वातंत्र्य मिळत होते पल्लवांनी आर्य व द्रविड संस्कृतींचा समन्वय केला पल्लवांच्या काळात तमिळनाडमध्ये विलक्षण धार्मिक जागृती झाली अनेक वैष्णव आणि शैव संत त्यांच्या काळात होऊन गेले त्यांच्या काव्यामुळे लोकांना भक्तीचा महिमा समजला आणि त्यांच्या मालाची भर पडली



पल्लव शिवमूर्ती – (इ स च ५ व शतक)

त्या वेळी कांची हे कलाकौशल्याचे व व्यापाराचेही मोठे केंद्र बनले

**पल्लवशिल्प**— पल्लवांच्या काळात द्रविड शिल्पशैलीचा उदय झाला, असे मानले जाते इ स च्या ७ व्या शतकात महेंद्रवर्मा व नरसिंहवर्मा या पल्लव राजांनी खडकात मंडप खोदून या शिल्पशैलीचा पाया घातला अशा प्रकारचे हे मंडप पहाडात खोदलेले आहेत त्यांचे प्रचंड स्तंभ खालच्या व वरच्या टोकाशी चौकोनी आणि मध्यभागी अष्टकोनी आहेत प्रारंभी ते साधे होते, पण पुढे त्यावर नक्षी कोरली जाऊ लागली इ स च्या ७ व्या शतकाच्या उत्तरार्धात राजा नरसिंहवर्मा याने महाबलिपुरम येथे प्रचंड खडकात खोदून बांधलेली रथमंदिरे ही वरील गुहांपेक्षा निराळ्या प्रकारची आहेत त्यांचा पहाडाशी संबंध नसून ती सपाट, वालुकामय भूमीवर उभी आहेत या मंदिरात पल्लव शिल्पशैली साकार झालेली आहे ही रथमंदिरे बौद्ध मठाच्या धर्तीवर आहेत त्यांना पांड-

धर्मराज रथ म्हणतात. त्याच्या रचनेत पल्लव शिल्पशैलीची शिखरे व स्तंभ आणि गोपुराचे प्रारंभीचे रूपही दृष्टीस पडते. तिथेच दुसऱ्या खडकात गंगावतरणाचा प्रसंग कोरलेला आहे. त्याला अर्जुनाची तपश्चर्या असेही म्हणतात. त्यात नदीपूजा व नागपूजा



धर्मराजरथ – महाबलिपुरम

यांचे चित्रण आढळते. महाबलिपुरमची ही मंदिरे प्राचीन शिल्प समारात अप्रतिम ठरली आहेत. त्यांच्या जवळच दहा मंडप



वैकुंठपेरुमाळमंदिर – कांची

खोदलेले असून तेही विपुल अलंकरणांनी नटलेले आहेत. त्यांच्या भिंतीवर सुंदर चित्रेही कोरलेली आहेत. त्यातील स्तंभांच्या तळाशी सिंहाकृती आढळतात.

त्यानंतर पल्लव राजांनी काही मंदिरे रेखीव पद्धतीने म्हणजे घडीव पाषाण रचून निर्माण केली. महाबलिपुरम येथील समुद्रकिनाऱ्यावरचे मंदिर आणि कांचीपुरम येथील कैलासनाथ व वैकुंठपेरुमाळ ही मंदिरे त्यांची सुंदर उदाहरणे होत. वैकुंठपेरुमाळ हे मंदिर पल्लव शिल्पशैलीचे उत्कृष्ट उदाहरण समजले जाते. त्याचे विमान चौकोनी असून, ते ६० फूट उंच आहे. [ हिं वि को , हिं म इ पी , ए इ – मजु , भ यु भा , त सा स , टें सा इ ]

**पल्लविधान** एक जैन व्रत. या व्रताचे लघु व बृहत असे दोन भाग आहेत. लघु व्रत चाळीस दिवसांत पुरे होते. त्यात पंचवीस उपवास आणि पंधरा पारणा असून णमोकार मंत्राचा त्रिकाल जप करायचा असतो.

बृहत व्रताचा कालावधी एक वर्ष असतो. त्यात बहात्तर दिवस उपवास व त्रेचाळीस पारणा होतात. [ ज व्र वि म ]

**पळियर** द. भारतातील एक जात. या लोकांची वस्ती केरळ प्रदेशातील कोट्टायम जिल्ह्यात आहे. मदुरा जिल्ह्यातील गुडलूर हे त्यांचे मूळ गाव असून पूर्वी त्यांना काटु कल्लर असे म्हणत असत. हे लोक पळिचिअम्मन या देवतेची पूजा करतात म्हणून त्यांना पळियर अशी संज्ञा मिळाली असावी.

शिकार करणे हा त्यांचा पूर्वीचा व्यवसाय असला तरी सांप्रत ते शेती करतात. हे लोक तमिळ व मलयाळम या उभय भाषांचे मिश्रण असलेली भाषा बोलतात.

मुली वयात आल्यावर त्यांची लग्ने होतात. आते किंवा मामे बहिणीशी लग्न होते. लग्नापूर्वी दोन महिने नवरामुलगा भावी सासऱ्याच्या घरी काम करतो. लग्न वराच्या घरी होते. वधूला वस्त्रे देणे हा लग्नातील महत्त्वाचा विधी असतो. पळियरांचे विवाहसमारंभ सामान्यतः बुधवारी, गुरुवारी किंवा शुक्रवारी रात्री होतात. पहिले मूल होईपर्यंत दांपत्य वराच्या आईवडिलांच्या घरी राहते. पुरुषाला मृत भावाच्या पत्नीशी लग्न करता येते. तसेच पत्नीला मूल न झाल्यास तिच्या बहिणीशी त्याला विवाह करता येतो.

यांच्यात घटस्फोटाची पद्धत असून, मोठ्या माणसांनी तसे जाहीर केले, की घटस्फोट मिळतो. घटस्फोट घेतलेला पुरुष आणि विधवा यांना कोणाशीही पुन्हा लग्न करता येते.

नवजात बालकाचा नामकरणविधी सातव्या दिवशी करतात.

मरिअम्म, कुरुप्पस्वामी व काली या त्यांच्या देवता होत. ते प्राणी व वृक्ष यांनाही पूजतात.

यांच्यात जातपंचायत असते. पंचायतप्रमुख हा परंपरेने ठरलेला असतो. यांच्या एल्लरा, नीणा मनियार व धर्मकर्ण असे यांचे तीन मतदार असतात.

मनाला पुरतात व त्या जागी नारळ ठेवतात. स्त्रियांचे बरोबर तेरा आठ दिवस मरणाशौच पाळतात. [ द्रा. के. ]

## पल्ली

दक्षिण भारतातील एक जात. हिला वन्नियन असेही नाव आहे. अग्निकुलातील क्षत्रियांचे आपण वंशज आहो असे या जातीचे लोक सांगतात. वन्नियन हे नाव वह्नी या संस्कृत शब्दावरून आले आहे, असे त्यांचे म्हणणे आहे. निरवितापुरचा राजा कुलशेखर आळवार हा आपल्याच जातीतील होता असे हे मानतात. दक्षिण अर्काट जिल्ह्यात द्रौपदीची अनेक मंदिरे असून, तिथले पुजारी पल्ली जातीचे आहेत. या मंदिरांच्या उत्सवाच्या वेळी पल्ली लोक उत्साहाने भाग घेतात, याचे कारण म्हणजे पांडव व आपण अग्निकुलातले आहो, असे ते मानतात. त्या प्रसंगी ते महाभारताचे वाचन करतात किंवा त्यातील काही प्रसंगावर नाट्य सादर करतात.

कुव्वानकूग या गावी अरवान नामक अर्जुनाच्या पुत्राच्या नावाने मोठी जत्रा भरते. त्यामागे एक कथा आहे, ती अशी—

भारत पांडवांचे युद्ध सुरू होण्यापूर्वी, त्या युद्धात आपल्याला जय मिळावा, म्हणून कौरवांनी एक यज्ञ केला व त्यात पांढरा हत्ती बळी दिला. पांडवांना काही पांढरा हत्ती मिळेना, म्हणून अर्जुनाने आपला पुत्र अरवान याला बळी देण्याची सूचना केली. अरवानही त्या गोष्टीला तयार झाला. पुढे युद्धात पांडवांचा जय झाला, व ह्या अरवानाला दैवत्व प्राप्त झाले. अरवान हा लग्न होण्यापूर्वीच बळी गेला म्हणून त्याच्या उत्सव–प्रसंगी विवाहित पुरुष स्त्रीचा वेष करून त्याच्याशी आपले लग्न लावतात. आजार झाला असता तसा नवसही बोलतात. वैशाख महिन्यात अठरा दिवस हा उत्सव चालतो. त्या अठरा रात्री महाभारताचेही वाचन चालते. ते ऐकण्यासाठी पल्ली लोक मोठ्या संख्येने जमतात. प्रत्येकजण येताना एक दोन कोंबड्या आणतो. अठराव्या रात्री या सर्व कोंबड्यांचे बलिदान होते. त्या वेळी अरवानाची लाकडी मूर्ती एका वृक्षराजीत नेतात. मग लग्न करू इच्छिणारे सर्व पुरुष स्त्रीवेष करून देवासमोर येतात आणि पुजाऱ्यांच्या हातून ताळी बांधून घेतात. रात्री देवाची मूर्ती पुन्हा देवळात आणतात आणि त्याच्या समोर एक कापड धरतात. त्यामुळे देव दिसत नाही. त्यावरून त्याचे बलिदान झाले, असे समजतात आणि ज्या पुरुषांनी त्याच्याशी नुकतेच लग्न लावलेले असते, ते मोठ्याने शोक करतात.

पमर्दैयन, वन, अग्नी, अरसू, क्षत्रिय, नागवरम, नट्टमान, मालाइमान, व पडयाची या त्यांच्या प्रमुख पोटजाती आहेत.

**देवधर्म –** पल्ली हे शैव आणि वैष्णवही आहेत. त्याशिवाय ते मुत्यालम्मा, मरीयम्मा, अय्यनार, मुनेश्वर, द्रौपदाम्मा, इ.



पल्ली स्त्रिया

देवतांनाही भजतात. या देवतांच्या उत्सवप्रसंगी एकावर एक सात मडकी ठेवून ती फुलांनी सजवतात. मग देवीचे प्रतीक म्हणून ती देवळात एका कोपऱ्यात ठेवतात. त्याला करगम असे म्हणतात. त्याची सकाळ संध्याकाळ होणाऱ्या मिरवणुका काढतात.

हे लोक मजुरी, शेती, व्यापार, नोकरी, इ. व्यवसाय करतात. यांच्यात जातपंचायत असून, त्याच्या मुख्याला परियनाट्टाण किंवा नाट्टमक्कारन असे म्हणतात.

**विवाहप्रथा –** मुलींचे विवाह त्या वयात आल्यावर होतात. साखरपुड्याच्या समारंभासाठी नवरामुलगा आपल्या नियोजित वधूच्या घरी जातो. मग मुलाचा बाप एका थाळीत विड्याची पाने, फुले, वधूचे दागिने, दुधाचे पैसे व नारळ या वस्तू ठेवून त

वधूपित्याकडे देतो. त्या वेळी तो ' हे पैसे तुमचे आणि मुलगा आमचा ' असे म्हणतो. वधूपिताही त्या थाळीचा स्वीकार करताना ' पैसे आमचे आणि मुलगी तुमची ' असे म्हणतो. मग दोघांनीही तीनदा म्हटल्यावर जमलेल्या लोकांना पानसुपारी वाटतात. *त्या वेळी मामाला प्रथम पानसुपारी देतात. लग्नासाठी* वधूच्या मामाची संमती आवश्यक असते. मामाला जर एखादे लग्न पसंत नसेल, तर लग्नविधी चालू असतानाही मुलीला पळवून नेण्याचा त्याला अधिकार असतो.

लग्नाच्या आदल्या दिवशी, वधूला मिरवणकीने वरगृही नेतात. लग्नाच्या दिवशी सकाळी बोहले तयार करून, त्यावर खाव, गडकी आणि दिवे ठेवतात. वधू-वरांना तेल लावून स्नान घालतात. त्या वेळी त्यांच्या गुडघे, खांदे व मस्तक यावर पिठाचे लहान गोळे ठेवतात. मग ती दोघे बोहल्याभोवती तीन प्रदक्षिणा घालून घरातले देव, ग्रामदेवता आणि पितर यांना पाच मडक्यांत पायस अर्पण करतात. मग वधू-वर विवाहवेष करतात. वर वधूच्या गळ्यात ताली बांधतो. लोक त्यांच्यावर अक्षता उधळतात. मग ती दोघे पुनश्च बोहल्याभोवती तीन प्रदक्षिणा घालतात. सायंकाळी ती दोघे एका शेतात जातात. त्या वेळी वराच्या हातात नांगराचा फाळ आणि वधूच्या हातात पेजेचे मडके असते. तो जमिनीचा एक लहानसा तुकडा नांगरतो आणि बी पेरतो. मग शेणाचा गणपती बनवून त्याला पान सुपारी देतो. *नवरा मुलगा मग दमल्याचे सोंग करून खाली* बसतो आणि वधू त्याला पेज वाढते. वधूने गृहप्रवेश केल्याबरोबर आपल्या उजव्या हाताने तांदळाच्या आणि मिठाच्या भांड्यांना स्पर्श करायचा असतो.

विधवेच्या पुनर्विवाहाच्या वेळी नियोजित वराऐवजी एखादी सुवासिनी तिच्या गळ्यात ताली बांधते.

मुलगी प्रथम ऋतुमती झाली, की चौथ्या दिवशी तिने स्नान केल्यानंतर ब्राह्मण तिच्यावर तीर्थजल प्रोक्षण करतो.

**मृतकप्रथा** – हे लोक कधी मृतांना पुरतात, तर कधी जाळतात. विवाहित पुरुष मरण पावल्यावर त्याचा मुलगा खाली घातलेल्या लाटेला मापात ठेवलेला दिवा हातात घेऊन प्रेताभोवती तीन प्रदक्षिणा घालतो. मग प्रेताला स्नान घालतात *आणि त्याची बायकोही प्रेतावर पाणी पडेल, अशा तऱ्हेने स्नान* करते. हा विधी आवश्यक असतो. प्रेत स्मशानात नेत असता वाटेत एका ठिकाणी खाली ठेवतात आणि अरिचंद्र नामक स्मशानदेवतेला भाताचा बळी देतात. अविवाहित माणसाचा मृत्यू झाल्यास, त्याचा विवाहविधी पार पाडतात. त्यासाठी *त्याच्या गळ्यात रुईच्या फुलांची माळ घालतात आणि शरीरा*वर मातीचे गोळे ठेवतात. [ श्री. द्रा. म. इ. ]

**पल्लीपतन**

पालीला संस्कृतात पल्ली म्हणतात. हा एक सरपटणारा प्राणी आहे. पाल अंगावर पडली, तर त्यामुळे काही शुभाशुभ फले प्राप्त होतात, अशी समजूत आहे. या संबंधीचा श्लोक असा–

*निपतति यदि पल्ली दक्षिणाङ्गे नराणां*
स्वजनधनवियोगो लाभदा वामभागे ।
उरसि शिरसि पृष्ठे कण्ठदेशे च राज्यं ।
करचरणहृदिस्था सर्वसौख्यं ददाति ।

अर्थ – पाल जर माणसाच्या उजव्या अंगावर पडली, तर स्वजन किंवा धन यांचा वियोग होतो. ती डाव्या बाजूवर पडली तर लाभ होतो. छातीवर, डोक्यावर, पाठीवर व गळ्यावर पडली तर राज्य मिळते आणि हात, पाय आणि हृदय यांच्यावर पडली असता सर्व सुखे मिळतात.

लोककल्पनेनुसार पल्लीपतनाची शुभ फले अशी – पाल डोक्यावर पडली, तर पुत्रवृद्धी. डाव्या गालावर पडली, तर प्रिय व्यक्तीचे दर्शन. उजव्या गालावर पडली, तर इष्ट लाभ. तोंडावर पडली, तर मिष्टान्नलाभ. नाकावर पडली, तर कल्याण. खालच्या ओठावर पडली, तर धनलाभ. कंठावर पडली, तर मित्रदर्शन. उजव्या खांद्यावर पडल्यास जय. मनगटावर पडल्यास अलंकारप्राप्ती. हृदयावर पडल्यास सुखलाभ. पोटावर पडल्यास धनलाभ. नाभीवर पडल्यास जय.

*तसेच अशुभ फले पुढीलप्रमाणे*–केसांवर पडल्यास रोग. केशाग्रावर व टाळूवर मृत्यू. डाव्या डोळ्यावर बंधन. डाव्या कानावर दुःख. ओष्ठसंपुटावर मरण. डाव्या खांद्यावर पराजय. हातावर आणि नखावर धनहानी. नसेवर रोग.

भिन्न भिन्न तिथी, वार व नक्षत्रे यांना अनुसरून काही शुभाशुभ फले बृहज्ज्योतिषसार या ग्रंथात सांगितली आहेत.

पालीच्या चुकचुकण्यावरूनही काही शुभाशुभ फल प्राप्त होतात, अशी समजूत आहे.

कांचीतील विष्णुमंदिराच्या आढ्याला एक सोन्याची व एक चांदीची अशा दोन पाली चिकटवलेल्या आहेत. त्यांना स्पर्श केल्याने अंगावर पाल पडल्याचे दोष निरस्त होतात, अशी भाविकांची समजूत आहे.

पल्लीपतनाची शांती अशी – प्रथम स्नान करून पंचगव्य प्राशन करतात. नंतर आज्यावलोकन करून अशुभनाशार्थ शांती करतात. त्यासाठी पालीची सुवर्णप्रतिमा करून आणि ती तांबड्या वस्त्रात झाकून तिची पूजा करतात. कलशावर रुद्राची पूजा करून मृत्युंजयमंत्राने खैराच्या समिधांचा आणि व्याहृती *मंत्रांनी तिळांचा यथाशक्ति होम करतात. नंतर स्विष्टकृता*-पासून अभिषेकापर्यंतची कर्मे करतात. सोने, वस्त्र व तीळ

याच दान न्हात शिवमन्दिरात दिवा लावून शिवमंत्राचा जप करतात [ श क , लो द , र सि ]

**पल्लेवाळ** एक ब्राह्मण जात या जातीची वाडी फार वस्ती खानदेश व ब्हाणपूर या भागात आढळते याच मूळ स्थान गुजरात होय तिथून ते इकडे आले हे माध्यंदिन वाजसनेयी शाखेचे असून, यांच्या रीतीभाती महाराष्ट्रीय ब्राह्मणाप्रमाणे आहेत पारस्कर व कात्यायन या सूत्रांनी हे आपली सर्व कर्मे करतात [ मु इ जा ]

**पवनपावन** शरीरशुद्धीचा एक विधी तो करताना प्रथम आचमन व प्राणायाम करून 'शरीरशुद्ध्यर्थ आत्मानं पावयिष्ये' असा संकल्प करतात मग सात साग्र दर्भ घेऊन व ते पाण्यात बुडवून नाभीपासून मुखापर्यंतच्या शरीराचे प्रोक्षण करतात या वेळी 'ॐ चित्पतिर्मा पुनातु' हा मंत्र म्हणतात एकदा मंत्राने व दोनदा मंत्र न म्हणता हे प्रोक्षण करतात मग 'यद्देवा त्वहेडनम्' या अनुवाकाने मार्जन करतात

मग ते दर्भ टाकून दुसरे दर्भ घेतात आणि 'ॐ वाक्पतिर्मा पुनातु' या मंत्राने नाभीपासून नासिकेपर्यंतच्या अवयवाचे प्रोक्षण करतात एकदा मंत्राने व दोनदा मंत्र न म्हणता मग 'पवमान सुवर्जन' हा अनुवाक म्हणतात नंतर 'आपो हि ष्ठा' या तीन मंत्रांनी मार्जन करतात

नंतर ते दर्भ टाकून दुसरे दर्भ घेतात '‌ॐ देवो ना सविता पुनातु' या मंत्राने नाभीपासून ललाटापर्यंतच्या अवयवावर जल प्रोक्षण करतात एकदा मंत्र म्हणून व दोनदा मंत्र न म्हणता मग 'तस्य ते पवित्रपते' या मंत्राचा जप करतात नंतर 'हिरण्यवर्णा शुचय' इ मंत्रांनी मार्जन करतात मग ते दर्भ टाकून देऊन 'ॐ भूर्भव सुव' म्हणून जलप्राशन करतात 'आपो हि ष्ठा' इ मंत्रांनी मुखावरून हात फिरवतात त्या नंतर तेच मंत्र उलट्या क्रमाने म्हणून आचमन करतात नंतर समंत्रक आचमन करून शंभर किंवा हजार वेळा गायत्रीजप करतात मग 'इडादेवहू' या मंत्राचा, 'अप न शोशुचदघम' या सूक्ताचा व पुरुषसूक्ताचा दहा वेळा जप करतात या विधीच्या योगाने शरीरगतगत वायूचे शोधन होते [ ऋ ब्र स ]

**पवनमुक्तासन** एक योगासन एकपाद व द्विपाद असे याचे दोन प्रकार आहेत याची प्रक्रिया अशी—

पहिल्या प्रकारात जमिनीवर उताणे निजावे डावा पाय जमिनीवर सरळ पसरावा आणि उजवा पाय गुडघ्यात वाकवून तो पोट व छाती यावर हातांच्या पंजांनी दाबावा नंतर डोके वर उचलून गुडघ्याला तोंड लावावे श्वासोच्छ्वास चालू ठेवावा



द्विपाद पवनमुक्तासन

नंतर उजवा पाय सरळ करून डावा पाय वाकवावा आणि पहिल्याप्रमाणे तोंड गुडघ्याला लावावे

दुसऱ्या प्रकारात दोन्ही पाय एकदम गुडघ्यात वाकवून ते दोन्ही हातांनी छातीवर दाबावे आणि तोंड गुडघ्यांच्या मध्ये ठेवावे पाच वेळा श्वासोच्छ्वास करून सहाव्या वेळी श्वास घेताना पाय सरळ करावे

मेद व वात कमी करण्यासाठी हे आसन उपयुक्त आहे उदानादी वायूचे कार्य बिघडल्यामुळे शरीरात दाह व वेदना उत्पन्न होऊन चक्कर येते आणि हृदयविकार निर्माण होतो या आसनामुळे हे दोष नष्ट होऊन शरीर सशक्त बनते [ उ यो द ]

**पवना** ब्रह्मदेशातील ब्राह्मणांना पवना असे म्हणतात पवना हा पावन शब्दाचा अपभ्रंश आहे असे समजतात मंडाले हे पवना लोकांचे मुख्य स्थान आहे रंगून, अमरपुरा, इ शहरांतही यांची वस्ती आहे यांचे आराकानी, मणिपुरी आणि मध्ये असे तीन भेद आहेत यांच्यात परस्पर रोटीव्यवहार होत नाही त्याचप्रमाणे भारतातून नवीन गेलेल्या ब्राह्मणांच्या हातचेही अन्न ते खात नाहीत हे नवीन ब्राह्मण जलमार्गाने ब्रह्मदेशात गेल्यामुळे त्यांना ते भ्रष्ट व म्हणून आपल्यापेक्षा कनिष्ठ दर्जाचे समजतात ज्योतिष सांगणे, हा या लोकांचा प्रमुख व्यवसाय आहे या ब्राह्मणांना प्रत्येकाला संस्कृत व ब्रह्मी अशी दोन नावे असतात

हे लोक राम, कृष्ण, इ देवतांना भजतात ते चैतन्यप्रभूंचीही उपासना करतात पूजेच्या वेळी हे ब्राह्मण संस्कृत मंत्राऐवजी बंगाली व हिंदी गीते म्हणतात

पवना ब्राह्मण ब्रह्मदेशात कधी व कोणत्या प्रसंगाने गेले, याविषयी निश्चित माहिती नाही. पण ब्रह्मी राजांनी स्वतःच्या संस्कारासाठी त्यांना काशीहून इकडे आणले, असे ते सांगतात.

डॉ. ग्रो. न. केतकर यांच्या मते हे ब्राह्मण आसामातून मणिपूर व आराकान या दोन खुष्कीच्या मार्गांनी, प्राचीन काळी ब्रह्मदेशात गेले. मुसलमानांचा भारतात प्रवेश होण्यापूर्वी ब्रह्मदेश, सयाम, कांबोज, इ. देशांत ब्राह्मणांची वसती झाली होती. पवना ब्राह्मण हे त्यांचेच अवशेष असावे. गेल्या शे-दोनशे वर्षांतच जर त्यांची वसती झाली असती, तर त्यांचा ब्रह्मी समाजाशी इतका दृढ संबंध प्रस्थापित झाला नसता.

ब्रह्मदेशाला ब्रह्म हे नाव मिळाले, ते या ब्राह्मणांच्या मानाजिक महत्त्वामुळेच मिळाले असावे. ब्रह्मी समाजातील उच्च वर्गातील लोकांचे विवाह पवना ब्राह्मणच लावीत. अगदी ब्रह्मी राजाच्या कारकिर्दीत, ब्राह्मणाकडून लग्न लावून घेण्याचा अधिकार फक्त राजेलोक आणि सरदार यांनाच होता. बौद्ध भिक्षूला दीक्षा देण्याचे कामही पवना ब्राह्मणच करीत असत. राज्याभिषेकाचे पौरोहित्यही पवना ब्राह्मणाकडेच असे.

पवनांचा सामाजिक दर्जा उच्च असला, तरी त्यांची आर्थिक परिस्थिती मात्र अत्यंत हलाखीची आहे. त्यांची राहणी कनिष्ठ प्रकारची आहे. विटाळ होईल, या भीतीने ते ब्रह्मी लोकांत मिसळत नाहीत आणि गावाबाहेर कुठे तरी दलदलीच्या प्रदेशात कशातरी झोपड्या बांधून राहतात.

अनेक पवनांच्या मुली मुसलमानांशी लग्न लावतात किंवा लग्न न करताही त्यांच्याकडे राहतात. दोघांनाही हिंदुस्थानी येत असल्यामुळे परस्पर परिचय होणे सोपे जाते. मुलींना नाचगाणे येत असल्यामुळे मुसलमान त्यांच्याकडे आकर्षिले जातात आणि ते लोक व्यापार उदीम करून चांगले पैसे मिळवीत असल्यामुळे पवना मुली त्यांच्यावर भाळतात. [ गा. ग. या. ]

**पवनार** वर्धा जिल्ह्यातील, वर्ध्यापासून सहा मैलांवर धाम नदीच्या पूर्व तीरावरील एक गाव. या गावात नदीकाठी प्राचीन अवशेषांनी समृद्ध असलेली एक गढी आहे. सध्याचे संपूर्ण गाव प्राचीन वस्तीवरच वसलेले आहे. याचे पूर्वीचे नाव प्रवरपूर असे होते. ते वाकाटक राजा प्रवरसेन याने वसविले असे म्हणतात. वाकाटकांची ती राजधानीच होती. प्रवरपूरचा अपभ्रंश पवनार असा झाला आहे.

धाम नदीच्या पश्चिम तीरावर आचार्य विनोबाजींचा आश्रम आहे. या आश्रमाचे काम चालू असता जे उत्खनन झाले, त्यात प्राचीन मंदिराच्या बांधकामाचे अवशेष आणि काही मूर्ती सापडल्या. इथे सापडलेले एक रामपंचायतनाचे शिल्प विनोबांच्या आश्रमातील भरतराम मंदिरात ठेवले असून ते ६ फूट उंच व ४ फूट रुंद आहे. हे शिल्प दीड हजार वर्षांपूर्वीचे आहे, असे म्हणतात. वाकाटकांचे आणखी एक भग्न शिल्प तिथे सापडले आहे. ही शिल्प गंगाकालीन आहेत. नदीच्या काठी इ. स. च्या चौथ्या-पाचव्या शतकातील एक राममंदिर होते. हे मंदिर व इथली शिल्पेही वाकाटक काळातली निर्मिती असावी असे म्हणतात. धाम नदीच्या दोन्ही तीरांवर दूरवर पसरलेल्या मोठ्या आकाराच्या विटा सापडतात. त्यांवरून पवनारच्या प्राचीन विस्ताराची कल्पना येते. वाकाटकांच्या नंतर पवनार ही विदर्भाची राजधानी नाही. पवनारचे महत्त्व मुसलमानी अमलापर्यंत टिकून होते. [ श्री. भ. के. ढाळीकर-- विदर्भ संशोधन मंडळ, वार्षिक १९६६, ग. वै. ]

**पवमानेष्टी** एक काम्य याग. यात पवमानी मंत्रांनी अग्नीला आहुती देतात. शरीर निरोगी व्हावे म्हणून पवमान अग्नी, पावक अग्नी व शुची अग्नी यांसाठी इष्टी करावी, असे तैत्तिरीय संहितेत (२. २. ४. १) सांगितले आहे. तीन देवता असलेल्या इष्टीला पवमानेष्टी म्हणतात. अग्निहोत्र घेण्याचा विधी केल्यानंतर प्रथम ही इष्टी करायची असते. सोमपूर्वक आधान केले असल्यास अग्निहोत्र घेतल्यावर लगेच सोमयाग करून नंतर एक वर्षाने ही पवमानेष्टी करतात. [ श्री. विद्याधरशास्त्री भिडे ]

**पवाड** दिव्य, अतिमानवी कृती किंवा चमत्कार यांना पवाड म्हणतात. खंडोबाच्या वीर नावाचे उपासक आपल्या उपास्य देवतेच्या उत्सवात जी कायक्लेशाची व बळप्रदर्शक अशा अद्भुत कृत्ये करून दाखवतात, त्यांना पवाड अशी संज्ञा आहे.

कर्नाटकातील कंचवार नावाचे पूर्वास्पृश्य समाजातील लोकही पवाड करतात. त्यांचे बरेच प्रकार आहेत. लोखंडाचा एक गज पिंढरीच्या खालच्या भागात आरपार खुपसतात. मग तो गज काढून त्याजागी त्याच आकाराची चामड्याची वादी ओवतात आणि नंतर त्याच छिद्रात कातेरी बाभळीची एक बारीक फांदी घालतात. दुसऱ्या एका प्रकारात लाकडाची निमुळती खुंटी पिंढरीत ठोकून घेतात. तिसऱ्या प्रकारात हातात खिळे ठोकतात व त्या खिळ्यांना पणत्या लावून देवाची आरती करतात. तसेच जिभेत दाभण अथवा मोठी सुईही घालतात. याशिवाय आणखीही काही प्रकार आहेत. जेजुरीचे वाघ्ये लंगर तोडण्याचा पवाड करतात. जेजुरीचे

वीर चपाषष्ठीच्या उत्सवात माडीत मोगरी किंवा तलवार मारून घेतात आणि त्या रक्ताने देवीला टिळा लावतात

आंध्र प्रदेशातही पवाडप्रथा आहे धगधगत्या अग्निकुंडात प्रवेश करणे, जमिनीत खोचलेल्या त्रिशूळावर शरीर झोकून देणे, इ अनेक पवाड आंध्रात प्रचलित आहेत दक्षिणेतील अनेक ग्रामदेवतांच्या उपासनेत हा प्रकार रूढ आहे

दक्षिणेतील विविध ग्रामदेवतांचे उपासक आपापल्या उपास्यांचे पवाड गीतबद्ध करून गात असतात ज्या गीतात पवाड वर्णिलेला असतो, त्या गीतालाच पुढे पवाडा असे नाव पडले [ म लो उ , म स ]

**पवारणा** बौद्ध आचारधर्मातील एक संज्ञा अपराधाची कबुली देण्याचा व शिक्षा घेण्याचा विधी असा त्याचा अर्थ आहे पावसाळ्याचे चार महिने बौद्ध भिक्षू प्रवास बंद ठेवून आपापल्या विहारात राहत या काळात त्यांचे वाचन, पठण, चर्चा, इ कार्यक्रम चालत अनेक भिक्षू अशा प्रकारे एकत्र राहू लागल्यामुळे त्यांच्यात भांडणेही होत ही गोष्ट जेव्हा बुद्धाच्या ध्यानी आली, तेव्हा त्यान पवारणादिन पाळायचे ठरवले वर्षाकालाच्या अखरच्या दिवशी हा दिवस त्याने साजरा केला पुढेही तो क्रम चालू राहिला या दिवशी सर्व भिक्षूनी एकत्र जमून वर्षाकालात आपण काय पाहिले, काय वाचले व आपल्याला काय शंका आहेत, यासंबंधी चर्चा करायची असे शिवाय एखाद्या भिक्षूच्या खाजगी वर्तनासंबंधी कोणाला काही सांगायचे असल्यास त्याला तसे सांगण्याचीही मुभा असे मग तशा अपराधी भिक्षूला आपल्या अपराधाचा स्वीकार करावा लागत असे अपराधाच्या कमी – अधिकपणाप्रमाणे त्याला शिक्षाही दिली जात असे [ म ज्ञा का , उ प्र बौ वि ]

**पवित्रक** धर्मकृत्याच्या वेळी बोटात घालण्याचे एक वलय 'पवित्रपाणि प्राणानायम्य' = बोटात पवित्रक घालून मग प्राणायामपूर्वक पुढील कृत्याचा सारंभ करावा, असे वचन आहे हे पवित्रक फार करून उजव्या हाताच्या अनामिकेत किंवा तर्जनीत घालतात श्राद्धप्रसंगी डाव्या हाताच्या अनामिकेतही पवित्रक घालण्याची पद्धत आहे त्याला जी विशिष्ट गाठ असते, ती देवनागरी ळच्या आकाराची दिसते

पवित्रक सामान्यपणे दर्भांचे करतात ते तीन, पाच अथवा सात दर्भ एकत्र करून व त्यांच्या दोन्ही टोकांना गाठ देऊन बनवतात त्यातले दर्भ साग्र व प्रादेशमात्र असावे व एका दर्भाच्या पोटात दुसरा दर्भ असू नये, असे शास्त्र आहे

कित्येक लोक पवित्रकाची सोन्याची अंगठी बनवून ती कायमची बोटात ठेवतात या सुवर्णाच्या पवित्रकाला अनामांगुल अशी संज्ञा असून, ते इतर धातूच्या किंवा दर्भांच्या पवित्रकाची बरोबरी करू शकत नाही, असे धर्मशास्त्रात म्हटले आहे सोन्याचे पवित्रक एकदा वापरल्यानंतर अग्निसंस्कार करून पुनश्च वापरायला हरकत नसते

चांदीचे पवित्रक तर्जनीत घालून पितरासंबंधीची सर्व धर्मकृत्ये करतात या विषयीचे वचन असे –

**तर्जन्यां रजतं धृत्वा पितृभ्यो यत् प्रदीयते ।**
**अन्तोऽस्ति परमाणूनां तस्यान्तो नव विद्यते ।।**

अर्थ – तर्जनीत रुप्याचे पवित्रक घालून जे अन्नोदकादी पितरांना दिले जाते, त्याचे फल अनंत असते परमाणूंना अंत असू शकेल, पण अशा फलाला अंत नाही

ज्याचे वडील वा वडील बंधू हयात आहेत, त्याने रौप्य पवित्रक वापरू नये, असे संग्रह नामक ग्रंथात सांगितले आहे

सोन्यारुप्याप्रमाणे तांब्याचेही पवित्रक करतात निरनिराळ्या वर्णांनी निरनिराळी पवित्रके वापरावी, असे धर्मशास्त्राने सांगितले आहे त्या संबंधीचा एक श्लोक असा –

**दर्भं पवित्रं विज्ञेयं ब्राह्मणस्य विशेषत ।**
**हेमराजतताम्राणि क्षत्रविट्शूद्रजातिषु ।।**

अर्थ – ब्राह्मणाने दर्भाचे, क्षत्रियाने सुवर्णाचे, वैश्याने चांदीचे व शूद्राने तांब्याचे पवित्रक वापरावे

स्थानपरत्वे पवित्रकाची निरनिराळी फले सांगितली आहेत, ती अशी – अनामिकेच्या अग्रभागी असलेल्या पेरात पवित्रक घातल्याने तपाची वृद्धी होते, मधल्या पेरात घातल्याने संततीची वृद्धी आणि मुळाच्या पेरात घातल्याने सर्व इच्छापूर्ती होते, असे सांगितले आहे त्यामुळे पवित्रक बोटाच्या मूलभागात घालणेच प्रशस्त मानतात

पवित्रक हे स्पर्शाला पावन करणारे असते त्याचा ज्या वस्तूला स्पर्श होईल, ती वस्तूही पवित्र होते अशी समजूत आहे

पवित्रकासंबंधी काही निषेध असे – बोटात पवित्रक ठेवून जेवण करू नये किंवा आचवू नये एकाने वापरलेले पवित्रक दुसऱ्याने वापरू नये दर्भाचे पवित्रक धर्मकृत्य आटोपल्यावर त्याची गाठ सोडून पाण्यात अगर अग्नीत टाकावे किंवा पुरावे

हवनीय द्रव्यांवर पाणी शिंपून ती शुद्ध करण्यासाठी जे दोन साग्र दर्भ धरतात, त्यांनाही पवित्र अशी संज्ञा आहे [ व्रतराज, आचारेंदु, आह्निकसार, धा क ]

**पवित्रारोपण व्रत** एक काम्य व्रत निरनिराळ्या देवतांना पोवती (जानवी) अर्पण करणे, हा या व्रताचा प्रमुख विधी आहे सोने, रुपे, तांबे, रेशीम, कमलतंतू,

कुश किंवा कापूस यांची ही जानवी करतात. जानव्याला शंभर ते एकशे आठ यत गाठी देतात.

शिवाला पवित्र वाहायचे असेल, तर ते विशिष्ट वृक्षाच्या पानांचे, फुलांचे अथवा कुशांचे करतात. शिवाला पवित्र अर्पण करण्याची वार्षिक तिथी आश्विन शुद्ध किंवा वद्य अष्टमी ही असते. श्रावण मासात हे व्रत मध्यम फलदायी व भाद्रपदात कनिष्ठ फलदायी समजतात.

निरनिराळ्या देवतांना पवित्र घालण्याचा विधी निरनिराळ्या तिथींना करतात. वासुदेवाला पवित्र घालण्याचा विधी श्रावण शुद्ध द्वादशीला किंवा सूर्य सिंह, कन्या किंवा वृश्चिक राशीत असतांना करतात.

पवित्र घालण्याच्या निरनिराळ्या देवतांच्या तिथी पुढील प्रमाणे आहेत–

प्रतिपदा–कुबेर, द्वितीया–त्रिदेव, तृतीया–भवानी, चतुर्थी–गणेश, पंचमी–चंद्र, षष्ठी–कार्तिकेय, सप्तमी–सूर्य, अष्टमी–दुर्गा, नवमी–मातृका, दशमी–वासुकी, एकादशी–ऋषी, द्वादशी–विष्णू, त्रयोदशी–कामदेव, चतुर्दशी–शिव व पौर्णिमा–ब्रह्मदेव.

मुमुक्षू लोकांनी हे व्रत कृष्ण पक्षात करावे व कामना असणाऱ्यांनी शुद्ध पक्षातच करावे, असे सांगितले आहे. [हिं. ध.]

**पवित्रेष्टी** आत्मशुद्धीसाठी करायची इष्टी. बौधायन व आश्वलायन श्रौतसूत्रांत, तसेच भारद्वाजपरिशेष सूत्रातही हिचा विधी आहे. या इष्टीमध्ये दहा देवता असून, त्यांच्यासाठी विविध हवी असतात. हिच्यात प्रधानयाग झाल्यानंतर काही उपहोम करायचे असतात. या इष्टीचे सर्व विधान दर्शपूर्णमासाप्रमाणे करतात. पवित्रेष्टी केल्याने दहा पिढ्यांचा उद्धार होतो, असे बौधायन श्रौतसूत्रात सांगितले आहे (२८. २).
[श्री. विद्याधरशास्त्री भिडे]

**पशुकामेष्टी** पशुधन मिळावे व वाढावे, यासाठी पुष्कळ याग सांगितलेले आहेत. वेदकाळी पशू हेच प्रमुख धन असल्यामुळे ते विपुल प्रमाणात लाभावे, अशी तत्कालीन लोकांना इच्छा असणे हे स्वाभाविक असे. त्यासाठी निरनिराळ्या देवतांना उद्देशून हवी तयार करून इष्टी कराव्या, असे सांगितले आहे. एका इष्टीमध्ये अग्नी, इंद्र व प्रजापती या देवता आहेत. अग्नीसाठी अष्टाकपाल पुरोडाश, इंद्रासाठी पंचकपाल पुरोडाश व प्रजापतीसाठी संसृष्ट हवी तयार करावा, असे सांगितले आहे. दही, मध, तूप, लाह्या व पाणी हे पाच पदार्थ एकत्र मिसळून हा संसृष्ट हवी तयार करायचा असतो. प्रजापती, सोमापूषणौ, इंद्र, इ. देवांसाठी निरनिराळे हवी तयार करून याग करायचे असतात. या सर्व इष्टींचे तंत्र दर्शपूर्णमासेष्टीप्रमाणे असून दक्षिणा मात्र निरनिराळी असते. [श्री. विद्याधरशास्त्री भिडे]

**पशुगायत्री** यज्ञात पशूला मारतेवेळी त्याच्या कानात जो मंत्र जपतात, त्याला हे नाव आहे. हा पशुगायत्री मंत्र असा–

> पशुपाशाय विद्महे। शिरश्छेदाय धीमहि।।
> तन्नः पशुः प्रचोदयात्।।

**पशुचिकित्सा** पशूंच्या आरोग्यासंबंधीची चर्चा, पशूंची शुभाशुभ लक्षणे, त्यांच्यावरचे उपचार, इ. गोष्टींसंबंधी माहिती देणारे ग्रंथ प्राचीन काळातच निर्माण झाले होते. त्यांपैकी पालकाप्यकृत गजचिकित्सा, गजायुर्वेद, गजदर्पण व गजपरीक्षा, बृहस्पतिरचित गजलक्षण व गोवैद्यशास्त्र, जयदत्तकृत अश्वचिकित्सा, नकुलविरचित शालिहोत्रशास्त्र व अश्वतंत्र, गणरचित अश्वायुर्वेद, अश्वलक्षण व हयलीलावती, इ. ग्रंथ उपलब्ध आहेत. इ. स. च्या १३ व्या शतकात पशुचिकित्सेसंबंधीच्या एका संस्कृत ग्रंथाचा फारसीत अनुवाद केलेला आहे. त्यात घोड्यांच्या जाती, त्यांची सवारी व पैदास, तबेल्याची रचना, घोड्यांचे रंग, गुण, अवयव, आजार, चिकित्सा, त्यांचे दूषित रक्त काढणे, त्यांचे खाणे पिणे, त्यांना पुरुषत्वविषयाची साधने आणि त्यांच्या दातांवरून त्यांचे आयुष्य आळखणे, असे अकरा अध्याय आहेत. यावरून घोड्यांसंबंधी त्यात किती तपशीलवार विचार केला आहे, ते कळते.

त्या काळी पशुविज्ञान व कामशास्त्र यांचीही बरीच प्रगती झाली होती. पशूंचे स्वभाव, प्रकृती व शरीरविज्ञान या बाबतींत तत्कालीन जाणत्यांना पुष्कळच ज्ञान होते. सर्पांच्या वेगवेगळ्या जाती त्यांना माहीत होत्या. पावसाळ्यापूर्वी साप नर-मादी एकत्र येतात आणि पुढे साधारण सहा महिन्यांनी सर्पीण २४० अंडी घालते. त्यांपैकी बरीचशी अंडी ती दोघे खाऊन टाकतात. उरलेल्या अंड्यांतून दोन महिन्यांनी पिले बाहेर येतात. सातव्या दिवशी पिल्लाचा रंग काळा होतो आणि पंधरा वीस दिवसांत त्यांना दात येतात. पुढे तीन आठवड्यांनी त्यांत विष उत्पन्न होते. सहा महिन्यांनंतर साप कात टाकतो. त्याच्या त्वचेवर २४० सांधे असतात, इत्यादी माहिती भविष्य पुराणात दिली आहे. सुश्रुतात कृमी व सरपटणारे प्राणी यांच्यासंबंधी विचार केला आहे.

जैन पंडित हंसदेव याने मृगपक्षिशास्त्र नामक एक ग्रंथ

लिहिला आहे. त्याने सिंहाचे मृगेंद्र, पंचास्य, हर्यक्ष, केसरी, हरी व सिंह असे सहा भेद सांगून, त्यांची वैशिष्ट्ये दिली आहेत. सिंहाची शेपटी लांब असून, त्याच्या मानेवर दाट आयाळ असते. त्याची शरीराची चण बारीक असते आणि त्याचा रंग सोनेरी असतो. त्याच्या शरीरावर मऊ केस असतात. ते शरीराने मजबूत असून, अतिशय वेगाने पळतात. भूक लागली असता ते क्रूर बनतात आणि यौवनकालात विशेष कामुक असतात. ते गुहांत राहतात आणि खुषीत असले, की शेपटी हलवतात. अशाच प्रकारे सिंह आणि सिंहीण यांचा स्वभाव, सिंहिणीचा गर्भकाल, इ. विषयांबाबतही त्याने विस्तृत वर्णने केली आहेत.

याशिवाय हंसदेवाने वाघ, कोल्हा, गेंडा, हत्ती, घोडा, उंट, गाढव, गाय, बैल, म्हैस, बकरी, हरिण, वानर, उंदीर, इ. पशूंच्या व गरुड, हंस, गिधाड, सारस, कावळा, घुबड, पोपट, कोकिळ, इ. विविध पक्ष्यांच्या जाती, रंग, यौवनकाल, संभोगयोग्य अवस्था, गर्भकाल, खाणे पिणे, निवास, इ. विषयासंबंधी माहिती दिली आहे. ऊस हे हत्तीचे भोजन आहे. हत्तीचे आयुष्य सर्वांत जास्त म्हणजे शंभर वर्षे आणि उंदराचे कमीत कमी म्हणजे दीड वर्ष असते, असे त्याने सांगितले आहे.

श्येनशास्त्र नामक ग्रंथात ससाणा चिमण्यांची शिकार कशी करतो, त्याचे वर्णन आहे. [ पू. म. भा. ; म. मा. स. ]

## पशुपतिनाथ

नेपाळातील एक शिवस्थान. हे काठमांडूपासून तीन मैलांवर बागमती नदीच्या काठी वसले आहे. इथल्या शिवलिंगाला पशुपतिनाथ असे नाव आहे. त्याचे मंदिर उंच चौथऱ्यावर बांधलेले असून, त्याला सर्व बाजूंनी पायऱ्या आहेत. सर्व मंदिर पितळेच्या पत्र्याने मढविलेले असून, देवादिकांच्या मूर्तींनी सजविलेले आहे. मंदिराचे आवार विस्तीर्ण आहे. या सर्व परिसराला देवपाटण असे नाव आहे.

गर्भागारात पशुपतिनाथाची पिंडी सुमारे चार हात उंचीची असून, तिच्यावर चतुर्मुख शिवलिंग आहे. त्या चारही मुखांवर मुखवट बसवलेले असतात. मधले मुख हे पाचवे मुख मानले जाते. हे शिवस्थान स्वयंभू म्हणून प्रसिद्ध आहे.

पशुपतीने महिषाचे रूप घेतले होते, अशी कथा आहे. या महिषाचे धड केदारनाथ येथे व शिर पशुपतिनाथ येथे असल्याचे सांगतात. पशुपतिनाथ हा शिवाच्या अष्टमूर्तींपैकी एक मानतात.

इथे देवाची नित्य त्रिकाल पूजा होते. अभिषेकानंतर देवाच्या मस्तकावर श्रीयंत्र लिहून त्याची पूजा करतात. प्रत्येक पौर्णिमेला विशेष पूजा असते. नेपाळनरेशांचे हे कुलदैवत आहे. त्यामुळे देवस्थानाचा सर्व खर्च नेपाळ सरकारच्या तिजोरीतून होतो. देवस्थानचे उत्पन्नही वर्षाला लाखाच्या घरात असते.

पशुपतिनाथाच्या पुजाऱ्यांना रावळ असे म्हणतात. ते चौघे असून, त्यांत एक म्हैसुरी व बाकीचे तिघे कऱ्हाडे ब्राह्मण आहेत. पुजाऱ्यांची नेमणूक राजगुरूकडून केली जाते. त्यांना वृत्तीसाठी शेतजमिनी दिलेल्या असतात.

गुह्येश्वरी ही पशुपतिनाथाची पत्नी होय. तिचे मंदिर मुख्य मंदिराशेजारीच आहे. तिथेच जवळ कालभैरवाचे स्थान आहे. या कालभैरवाला दर पौर्णिमेस रेडा, बकरा, मेंढा, बदक व कोंबडे असे पाच प्राणी बळी देण्याचा प्रघात आहे. याशिवाय विरूपाक्ष, गोरखनाथ, इ. देवांची मंदिरेही पशुपतिनाथाच्या परिसरात असून, तीही दर्शनीय आहेत.

पशुपतिनाथाला ज्योतिर्लिंगांत स्थान नसले, तरी त्याची यात्रा महापुण्यप्रद मानली जाते. [ कल्याण–तीर्थांक ; स. गा. प्र. व. ]

## पशुपक्षिमुखी देवता

निष्पन्नयोगावलीत अशा प्रकारच्या अनेक देवतांचे वर्णन आहे. त्या भेसूर, नग्न, प्रेतावर नाचणाऱ्या, मुंडमाला धारण करणाऱ्या, हातात कपाल व कर्तरी धारण करणाऱ्या आणि खांद्यावर खट्वांग (खाटेचा पाय) घेणाऱ्या असतात. त्या देवतांपैकी काहींचे वर्णन असे–

(१) हयास्या – अश्वमुखी, द्विभुज व निळसर पूर्व दिशेची देवता.

(२) शूकरास्या – डुकराच्या तोंडाची, द्विभुज आणि पीतनील दक्षिण दिशेची देवता.

(३) श्वानास्या – श्वानमुखी व रक्तनील पश्चिम दिशेची देवता.

(४) सिंहास्या– सिंहमुखी व रक्तनील उत्तर दिशेची देवता.

या सर्व देवता बौद्ध परंपरेतल्या आहेत. कधी कधी या देवता चतुर्मुखी व चतुर्भुजही असतात. वराह, नृसिंह, हयग्रीव, गणपती, इ. पौराणिकांचे देवही पशुमुखच आहेत. [ इ. बु. इ. ]

## पशुपालन

भारत हा प्राचीन काळापासून कृषिप्रधान देश आहे. शेतीचे काम व्यवस्थित होण्यासाठी शेतकऱ्यांना पशूंची गरज लागते. त्याचप्रमाणे गाडीला जुंपण्यासाठी, माणसांना बसून जाण्यासाठी व ओझे वाहण्यासाठीही पशूंची आवश्यकता असते. काही पशूंचे दूध पिण्यासाठी व मांस खाण्यासाठी उपयोगी पडते. बहुधा सर्वच पशूंचे चामडे, दात, शिंगे, लोकर, इ. काही ना काही भाग माणसाच्या उपयोगी पडतो. पूर्वी हत्ती, घोडे व उंट हे प्राणी लढाईच्या प्रसंगी महत्त्वाचे ठरत. प्राचीन काळी करमणूक म्हणून मेंढे, रेडे, हत्ती,

बैल, इ. पशूंची आपसात झुंज लावीत. काही वेळा त्या झुंजीवर पैजाही लावीत.

अशा परिस्थितीत शेतीबरोबरच पशुपालन हाही प्राचीन भारतीय लोकांचा एक व्यवसाय बनल्यास नवल नाही. पशूंना लागणारे गवतही भारतात प्रायः सर्वत्र उगवत असे आणि प्राचीन काळी लोकसंख्या कमी असल्यामुळे गवताची पुरेशी कुरणे पशूंना चरण्यासाठी मिळत असत.

सिंधुसंस्कृतीचे लोक गाई, म्हशी, शेळ्या, मेंढ्या, हत्ती, डुकर, गाढव व उंट हे प्राणी पाळीत असत, असे कळते. सिंधमधूनच वशिंड असणारे बैल भारताच्या इतर प्रांतांत गेले आहेत. गाय व बैल मोठ्या प्रमाणावर पाळीत असत. कारण त्यांचा शेतीसाठी जास्त उपयोग होत असे. वैदिक आर्यही शेतीबरोबरच पशुपालन करीत. ते गायी, बैल, म्हशी, घोडे, शेळ्या व मेंढ्या हे पशू पाळीत. त्यांपैकी गायींवर त्या लोकांची विशेष भक्ती होती. गायी सकाळी रानात चरायला जात आणि सायंकाळी घरी परत येत. दिवसातून तीनदा गायींची धार काढीत. गायीला ते देवता मानीत. यज्ञप्रसंगी लोक इंद्राची प्रार्थना करीत, की आमच्या गायींची संख्या भराभर वाढू दे आणि शत्रूंच्या गायीही आम्हाला मिळू देत.

उपनिषत्कालात आश्रमवासी ऋषींकडे पुष्कळ गायी असत आणि त्यांचे शिष्य त्या गायींना चरायला नेण्याचे काम करीत. सत्यकामाला त्याचा गुरू हारिद्रुमत याने चारशे गायी चारण्यासाठी दिल्या होत्या. त्यांचे त्याने पालनपोषण केले आणि थोड्याच काळात त्यांची संख्या एक हजार झाल्यावर, त्याने त्या गुरूच्या स्वाधीन केल्या. राजाकडेही गायींची मोठमोठी खिल्लारे असत. जनक राजाने एक हजार गायींच्या शिंगांना सोने बांधून त्या याज्ञवल्क्याला अर्पण केल्या, असा उल्लेख बृहदारण्यक उपनिषदात आहे. जनकाजवळच्या काही गायी हत्तीएवढ्या धष्टपुष्ट होत्या, असे म्हटलेले आहे. जानश्रुती राजाने रैक्वाला एक सहस्र गायी देऊन त्याच्याकडून विद्या मिळवली होती.

रामायणकालातही राजाकडे हजारो घोडे, हत्ती व गाढवे असत. केकय देशाच्या राजाने भरताला चौदाशे घोडे, हत्ती व खेचरे दिल्याचा उल्लेख आहे.

युधिष्ठिराजवळ शंभर गायींचा एक, याप्रमाणे अडतीस लाख कळप होते, असे महाभारतात सांगितले आहे. कौरवांकडेही हजारो गायी होत्या. महाभारतकालातच लोक पशुपालनशास्त्राचा अभ्यास करू लागल्याचे कळते. पांडवांपैकी सहदेव हा पशुशास्त्रातला पंडित होता. अज्ञातवासाच्या प्रसंगी तो गवळ्याचा वेष धारण करून विराट राजाकडे गेला आणि त्याला म्हणाला, की 'माझ्या देखरेखीखाली गायींची संख्या लवकर वाढते आणि त्यांना काही रोगराई होत नाही. चांगल्या बैलांची लक्षणेही मला समजतात.' तेव्हा विराट राजाने त्याला आपल्या पदरी ठेवून घेतले. नकुल हा अश्वविद्येचा पंडित होता. त्यालाही विराटाने नोकरी दिली.

जातकवाङ्मयात ग्रामीण लोकांच्या पशुपालनाचे वर्णन मिळते. त्या काळी प्रत्येक कुटुंबाकडे काही पशू असत. पण गावातील सर्व पशूंची व्यवस्था एका कुशल पशुपालकाकडे असे. एका मोठ्या कुरणात तो सर्व पशूंना चारीत असे. कुरणाचे मूल्य सर्व गावकरी मिळून देत असत. त्याला आपले सर्व पशू व त्यांची चिन्हे माहीत असत. तो त्यांच्या अंगावरील माश्यांची अंडी काढून टाकीत असे, त्यांच्या जखमा बऱ्या करीत असे व धूर करून त्यांना चावणाऱ्या डासांना पळवून लावीत असे. पशूंच्या पाणवठ्याच्या जागाही त्याला चांगल्या परिचित असत.

कौटिल्याच्या काळात पशुपालन हे महत्त्वाचे शास्त्र गणले जात होते. राजकुमारही पशुविभागाच्या अध्यक्षाकडे या शास्त्राचे अध्ययन करीत असत. गाय-बैल, घोडे व हत्ती यांच्यावर देखरेख करण्यासाठी राजाने गो-अध्यक्ष, अश्वाध्यक्ष व हस्त्यध्यक्ष असे अधिकारी नेमलेले असत.

गोविभागाच्या अध्यक्षाच्या देखरेखीखाली राजाच्या हजारो गायी, बैल, म्हशी, शेळ्या, मेंढ्या, गाढवे, खेचरे, डुकरे, इ. पशू असत. पण या सर्व प्राण्यांत गायी अधिक असत. निरनिराळ्या पशूंचा शंभराशंभरांच्या कळपांत अध्यक्ष विभागणी करी. प्रत्येक कळपात लहान-मोठे, तरुण-म्हातारे असे सर्व प्रकारचे पशू असत. राजाचे पशू ओळखता यावे, म्हणून तापलेल्या सळईने त्यांच्या अंगावर राजचिन्ह उठवीत असत. या सर्व पशूसंबंधीची सर्व माहिती अध्यक्षाने नोंदलेली असे. त्यात पशूंचे राजचिन्ह, रंग, दोन शिंगांच्या मधले अंतर, त्यांची जात, अवस्था, योग्यता व काम करण्याची शक्ती यांचा उल्लेख असे.

कौटिल्याच्या काळी पशूंना चरण्यासाठी राजाने कुरणे ठरवून दिलेली असत. आपल्या कुत्र्यांच्या साहाय्याने शिकारी लोक हिंस्र पशूंना त्या कुरणांतून पळवून लावीत. एका गुराख्याकडे शंभर पशूंचा एक कळप असे. कळपातील दुबळ्या पशूंच्या गळ्यात घंटा बांधलेली असे. त्यामुळे, साप, चित्ते वगैरे प्राणी त्यांच्यापासून दूर राहत. गुराख्यांना बहुधा वेतन दिले जात असे. पण काही वेळा त्यांच्यावर गायी सोपवून देत व दरवर्षी त्यांच्याकडून ठराविक तूप घेत.

पशूंच्या आरोग्याकडे अध्यक्ष जातीने लक्ष देत असे. वासरे आणि वृद्ध व रोगी गायींकडे विशेष लक्ष पुरविण्यात येई.

पशूंना नेहमी सुरक्षित ठिकाणी ठेवण्याबद्दल गुराख्यास. थंडीत दिवशी असे ज्या तळ्याचे आणि नद्यांची खोली समान सारखीच आहे आणि जिथे दलदल व हिंस्र प्राणी नाहीत, अशाच ठिकाणी त्यांना पाणी पिण्यासाठी नेत असत पशूंना काही इजा झाल्यास, त्याबद्दल गुराख्याला जबाबदार धरण्यात येई व त्याला दंड करीत पशूंना जो मारील किंवा मारायला लावील, तसेच त्यांना चोरील किंवा चोरीला प्रवृत्त करील त्याला मृत्युदंड दिला जाई चोराच्या हातून पशूंची सुटका करणाऱ्याला बक्षीस दिले जाई पशूंच्या धार काढण्याच्या वेळा ठरवून दिलेल्या असत पावसाळ्यापासून सहा महिने दोनदा व त्यापुढे सहा महिने एकदाच धार काढायची, असा नियम होता यापेक्षा जास्त वेळा दोहन करणाऱ्या व्यक्तीचा अंगठा कापण्यात येई पशूंच्या नाकात वेसण घालताना त्यांना कमीत कमी त्रास होईल, असे नियम केलेले होते

पशुपालनाचा हा व्यवसाय खूप फायदेशीर होता कौटिल्याच्या काळी पशूंचे चामडे, चरबी, स्नायू, दात, शिंगे व हाडे या सर्वांचा उपयोग केला जात असे त्यांचे मांस विकीत किंवा वाळवून ठेवीत लोणी काढल्यानंतरचे ताक गवळ्यांना मिळे किंवा कुत्रे आणि डुकरे यांना पाजीत गा-अध्यक्ष लोण्याचा व्यवस्थित हिशेब ठेवी

या पशूंच्या खाण्याची व्यवस्थाही चांगली होती बैलांना भुसा, गवत, पेंड, मांस, दही, दूध, जव, तेल किंवा तूप, साखर व शृंगिबेराची फळे देण्यात येत

अश्वावरच्या प्रमुखाला अश्वाध्यक्ष असे नाव होते तो घोड्यांची जात, लक्षण व योग्यता यांची नोंद करून ठेवीत असे घोड्या, घोडे व शिंगरे यांना वेगवेगळ्या ठिकाणी ठेवीत तसेच त्यांची खोली घोड्याच्या लांबीच्या चौपट मापाने घेत मध्यभागी घोड्यांना आडवे होण्यासाठी जागा असे गरोदर घोडीला लोणी, सातू आणि तेलात मिसळून औषधे देत प्रसूतीच्या वेळेला घोडीला वहा दिवस लोणी व आरा आणि पुढे सहा महिने यांपर्यंत दूध आणि चार वर्षांपर्यंत जव खायला घालीत

कौटिल्याच्या काळात कांबोज, सिंधू, अरट्ट व वनायू या देशांतील घोडे सर्वोत्तम, बाल्हीक, पापेय सौवीर व तैतल प्रदेशातले घोडे मध्यम व बाकीचे हीन कोटीचे गणले जात तीक्ष्ण आणि दुष्ट घोड्यांना लढाईसाठी व मवाळ घोड्यांना सवारीसाठी शिक्षण देत घोड्यांच्या आरोग्याची चांगली काळजी घेत असत त्यासाठी वैद्य नेमलेले असत औषधाच्या दोषामुळे किंवा वैद्याच्या हलगर्जीपणामुळे जर घोड्याचा आजार वाढला, तर त्याला दंड होत असे

हत्तींची व्यवस्था बघणाऱ्याला हस्त्यध्यक्ष असे नाव होते हत्तींची मने तो सुरक्षित ठेवीत असे त्याच्या हाताखाली हत्तींना शिक्षण देणारे, त्यांच्या आरोग्याकडे लक्ष देणारे, त्यांना बाहेर नेणारे, बांधणारे, त्यांच्या खाण्यापिण्याची व्यवस्था करणारे, इ लोक असत

हत्ती आणि हत्तिणी यांच्यासाठी वेगवेगळ्या खोल्या असत त्या हत्तींच्या लांबीच्या दुप्पट रुंद व उंच असत हत्तींना बांधण्यासाठी लाकडी फळ्यांचा चौक केलेला असे सकाळ संध्याकाळ अशा दोन वेळा त्यांना खायला देत व मग दोनदा आंघोळ घालीत दुपारी त्यांना व्यायाम करायला लावीत आणि त्यानंतर थोड्या वेळाने त्यांना पाणी पाजीत

साधारणपणे वीस वर्षांचे हत्ती रानातून पकडून आणीत दूध पिणारे लहान पिल्लू, मस्त, दात नसलेले व रोगी असे हत्ती आणि पिल्लांना दूध देणारी हत्तीण यांना पकडीत नसत चाळीस वर्षांचा हत्ती सर्वोत्तम गणला जात असे

हत्तींना खाणे रुचकर असे भात, तेल, तूप, मांस, मीठ, दही, साखर, मद्य, दूध हिरवे व वाळलेले गवत, इ पदार्थ त्यांना देण्यात येत काही वेळेला करमणुकीसाठी हत्तींच्या पिल्लांना पकडीत हत्तींच्या गळ्यात माळा घालून व अंगावर सुंदर झुली घालून त्यांना सजवीत [ भा प्रा म , म भा स , वै रा इ , प्रा भा सा सा भू ]

**पशुपूजा** पशू म्हणजे प्राणी ' अविशेषेण सर्वं पश्यति '= जो वैशिष्ट्य न जाणता, सारख्याच दृष्टीने सर्व पाहतो, तो पशू होय, अशी त्याची व्याख्या आहे ऋग्वेदात पशूंचे वायव्य, आरण्य व ग्राम्य असे तीन भेद केलेले आहेत (१० ९० ८), पुरुषाने आपल्या अवयवांपासून हे पशू निर्माण केले, असे तिथे सांगितले आहे 'वायव्य म्हणजे अंतरिक्षात संचार करणारे पक्षी होत रेडा, वानर, ऋक्ष, सरपटणारे प्राणी, इ आरण्य म्हणजे अरण्यात राहणारे पशू असून गाय, बोकड, गाढव, इ ग्राम्य म्हणजे पाळीव पशू होत अथर्ववेदात आरण्य पशूंचेही भीम (भयंकर), सपक्ष (पक्षी), शिशुमार (मगर, सुसर), मत्स्य व कृमिकीटक असे पाच वर्ग दिले आहेत (११ २ २४-२५, १२ १ ४९)

पशूंना उभयदत व अन्यतोदत असे म्हटलेले आहे त्यांचे हस्तादान म्हणजे हाताचा उपयोग करणारे व मुखादान म्हणजे तोंडाने वस्तू पकडणारे असे दोन विभाग केलेले आहेत मनुष्य, हत्ती व माकड, हे तीन पशू हस्तादान असल्याचे न संहितेत म्हटले आहे (६ ४ ५ ७)

वैदिक वाङ्मयात मानवाचा समावेशही पशूंतच केलेला आहे घोडा, गाय, बकरा, मेंढा व मनुष्य या पाच प्राण्यांचा यज्ञातील

वळी म्हणून त्यांचा अनेकदा उल्लेख आला आहे (तै सं ४ २ १० १, वा सं १६ १७, मै सं २ ७ १७) द्विपाद व चतुष्पाद असेही पशूंचे दोन भेद होतात पशूंमध्ये मनुष्याचा क्रम पहिला असून तो शतायू व पशूंचा राजा आहे, असे श ब्राह्मणात म्हटले आहे (६ २ १ १८) ऐतरेय आरण्यकात मानव, पशू व वनस्पती यांच्यातील बौद्धिक फरकाचे रोचक वर्णन केले आहे (२ ३ २)

निरनिराळ्या पशूंच्या निरनिराळ्या अधिष्ठात्री देवता सांगितल्या आहेत, त्या अशा – दुर्गा ही सिंहाची प्रजापती ही गाईंची, वायू ही मृगाची, चंद्र ही मेषाची, नक्षत्र ही सशाची आणि विष्णू ही काळविटाची अधिष्ठात्री देवता होय शिवाय गायींच्या पाठीवर इंद्र व अश्वाच्या ठिकाणी बारा आदित्य वास करतात, म्हणून हे पशू पूज्य मानलेले आहेत

वैदिक कालात पूषा ही पशूंची संरक्षक देवता मानलेली होती अप्रत्यक्ष रूपाने तो गायी व इतर पशू यांचे रक्षण करतो, अशी वैदिक कालातील लोकांची धारणा होती त्यामुळे वैदिक लोक पूषाची स्तुतिस्तोत्रे गात असत व पूषाच्याच कृपेने गोधनाची वृद्धी होते, असे मानीत असत त्या कालात यज्ञीय दक्षिणा म्हणून लोक शेकडो, हजारो गायी दान देत असत

पशूंना सुरक्षित ठेवण्याबद्दल आणि त्यांना नीटपणे गोठ्यात पोचविण्याबद्दल लोक यज्ञप्रसंगी अनेक देवतांची स्तुती करीत पशू निरोगी असावे, घोडे अधिक जलद पळावे आणि त्यांनी घोडदौडीच्या स्पर्धेत जय मिळवावा, अशीही कामना ते सूक्तांतून व्यक्त करीत

महाभारतकालापासून गायीचे धार्मिक महत्त्व अतिशय वाढले आणि गोधन हे सर्वश्रेष्ठ धन मानले जाऊ लागले तसेच गायीचे दर्शन आणि दान पुण्यप्रद मानले जाऊ लागले गाय हे लक्ष्मीचे मूळ तसेच यज्ञाचे मुख व नेत्र आहे आणि ती स्वर्गाची शिडी असून, सर्व कामना पूर्ण करणारी आहे, अशी भावना लोकांच्या मनात निर्माण केली गेली भरताने नाट्यशास्त्रात सांगितले आहे, की नाट्यगृह तयार झाल्यावर त्यात सात दिवस गायी बांधून ठेवाव्या

बैलाची उपयुक्तता शेतीच्या दृष्टीने फार आहे या उपयुक्ततेतूनच त्याच्याबद्दल मानवाच्या मनात प्रेम व कृतज्ञता उत्पन्न झाली कृतज्ञतेतूनच पुढे पूज्यबुद्धीचा जन्म झाला मग लोक वर्षातल्या ठराविक दिवशी बैलाची पूजा करून त्याच्या मिरवणुका काढू लागले काही पशूंचा निरनिराळ्या देवतांशी वाहन म्हणून संबंध जोडण्यात आला दुर्गेचे वाहन सिंह, इंद्राचे ऐरावत, शंकराचे नंदी, गणपतीचे उंदीर, कार्तिकेयाचे मयूर, विष्णूचे गरुड, लक्ष्मीचे घुबड, ब्रह्मदेवाचे हंस, अग्नीचे मेंढा, वाघेश्वरी देवीचे वाघ, अशी ही वाहने मानलेली आहेत त्या देवतांच्या पूजेबरोबर त्यांच्या वाहनांचीही पूजा करण्याची पद्धत आहे सर्पाची पूजाही अशीच सर्व भारतभर प्रचलित आहे विष्णूचे अवतार म्हणून मत्स्य, कूर्म व वराह हे प्राणीही हिंदू लोक पूज्य मानतात

पुष्कळ आदिवासी जमातींत निरनिराळे प्राणी हे देवके म्हणून मानलेले आहेत अशा प्राण्यांना ते पूज्य समजतात आणि त्यांचे मांस खात नाहीत अशा रीतीने भारतीय समाजाच्या सर्व थरांत पशुपूजा प्रचलित असलेली दिसते

**पश्चिम** एक मुख्य दिशा पूर्वेकडे तोंड करून उभे राहिले असता जी पाठीकडे येते, ती किंवा ज्या दिशेला सूर्य अस्ताला जातो, ती पश्चिम होय वरुण हा या दिशेचा स्वामी आहे ती सप, सोम व अध्वर्यू यांची दिशा आहे, असे म्हटले आहे ही दिशा शुभ मानलेली आहे

**पश्चिमोत्तानासन** एक यौगिक आसन शिवसंहितेत याला उग्रासन म्हटले आहे याची प्रक्रिया घेरंड संहितेत (२ २२) पुढीलप्रमाणे सांगितली आहे –

**प्रसार्य पादौ भुवि दण्डरूपौ संन्यस्तभालश्चितियुग्ममध्ये ।**
**यत्नेन पादौ च धृतौ कराभ्यां योगीन्द्रपीठं पश्चिमोत्तानमाहुः ॥**

*अर्थ – प्रथम सरळ बसून दोन्ही पाय ताठ समोर पसरावे* त्यानंतर दोन्ही हातांनी दोन्ही पायांचे अंगठे पकडून मस्तक



पश्चिमोत्तानासन

गुडघ्यांना लावावे याला योगींद्रपीठ पश्चिमोत्तान म्हटले आहे हे आसन करताना छाती गुडघ्यांवर टेकवण्याचा प्रयत्न करावा

प्रसंगी आसनाचा कालावधी हळूहळू वाढवीत न्यावा या आसनामुळे पोटाची चरबी कमी होणे, सांधे लवचिक बनणे, कंबरदुखी नष्ट होणे, हे फायदे होतात व शरीर सुडौल आणि पीळदार बनते ऊर्ध्वश्वास लागत नाही [उ यो द.]

**पहाडी** द भारतातील एक जात या लोकांची वस्ती महाराष्ट्र प्रदेशातील पुणे जिल्ह्यात आढळते. हे लोक शेती, मजुरी, वाण्याचा धंदा, इ. विविध व्यवसाय करतात. भवानी व खंडोबा ही त्यांची कुलदैवते आहेत. देशस्थ ब्राह्मण त्यांचे पौरोहित्य करतात. जादूटोणा, शकुनप्रश्न यावर त्यांचा विश्वास आहे.

**विवाहप्रथा** – मुलाचे वडील प्रथम मुलीला मागणी घालतात. विवाहात देवक बसविण्यापूर्वी सर्वजण मारुतीच्या मंदिरात जातात. जाताना बरोबर पाच प्रकारची पाने, कुऱ्हाड व नैवेद्य नेतात. नंतर घरी आल्यावर त्याच वस्तू देवक म्हणून बसवतात. या वेळी एक बोकड कापतात आणि पाच सवाष्णींना भोजन घालतात.

**प्रसूतिप्रथा** – स्त्री बाळंत झाल्यावर पाचव्या दिवशी सटीची (षष्ठीची) पूजा करतात. त्या दिवशी रात्री घरातील स्त्रिया जागरण करतात. बाराव्या दिवशी पाच सवाष्णींना सटीच्या नावाने भोजन देतात. बाळंतीण खडे मांडून सटीची पूजा करते. बारसेही बाराव्या दिवशीच करतात. जननाशौच दहा दिवस पाळतात.

मुलाचे जावळ दुसऱ्या महिन्यापासून एक वर्षापर्यंत केव्हाही करतात. ते करण्यासाठी एखाद्या बागेत जातात. तिथे सटीच्या नावाने एक शेळी कापतात व जमलेल्यांना व न्हाव्याला तिच्या मांसाचे जेवण देतात.

पहाडी लोक जुनी ( १८ व्या शतकातील ) मराठी भाषा बोलतात. त्यांना तंबाखू व गांजा यांचे व्यसन असते. यांच्यात जातपंचायत आहे. तिच्या मार्फत जातीचा सर्व भांडणे सोडविली जातात.

**मृतकप्रथा** – हे लोक मृताला जाळतात. मृताचे पागोटे पाण्यात भिजवून त्याचे पाणी मृताच्या तोंडात घालतात आणि मग त्याला अग्नी देतात. [ पुना गॅझे. ]

**पहाडी चित्रशैली** पुंछ, जम्मू, कांगडा व गढवाल या पहाडी प्रदेशात विकसित झालेल्या चित्रकलेला हे नाव आहे. मोगल चित्रकलेचा थोडासा प्रभाव या चित्रशैलीवर दिसत असला, तरी ती एक स्वतंत्र शैली आहे. रेखांची कोमलता, स्वच्छंदता, सरलता, रमणीयता व स्वाभाविकता हे पहाडी चित्रशैलीचे विशेष गुण आहेत. अजंठा चित्रकलेतील रेषांमध्ये प्रौढता आढळते, तर पहाडी शैलीच्या रेखांमध्ये निरागसपणा व कोमलपणा अधिक दिसतो. पहाडी रेखाचित्रांत काही तरी जादू असल्यासारखे वाटते.

पहाडी चित्रकार हे सामान्यपणे लोककलाकार होते. ग्रामीण कारागिराप्रमाणेच ते लोकांची घरे चित्रांनी सजवीत आणि फावल्या वेळात धार्मिक चित्रे रंगवीत. त्यातूनच ही शैली विकसित झाली. डोगरा लोकांचा चित्रकलाही पहाडी शैलीचीच आहे.

पहाडी शैलीच्या चित्रांत वस्त्राभरणांचे वैपुल्य दाखविण्याची पद्धत आहे. त्यामुळे शरीरसौष्ठवाला गौणत्व मिळाले आहे.

पाहा–चित्रकला [ श्री. रामचंद्र शुक्ल, नवनीत, मार्च १९५६ ]

**पहाडी भाषा** नेपाळपासून काश्मीरपर्यंत, हिमालयाच्या पर्वतराजीतील प्रदेशात प्रचलित असणाऱ्या भारतीय आर्यभाषांना पहाडी भाषा असे म्हणतात. पूर्वेकडील, मध्य भागातील व पश्चिमेकडील असे त्यांचे तीन पोटभेद केलेले आहेत. यांत नेपाळी, कुमायुनी, गढवाली आणि जौनसारी, कुलू, चंबा, मद्रवाह, इ. वर्गातील बोली भाषा यांचा समावेश होतो.

या भाषा बोलणारे मूळचे खश लोक इंद्रजातीय असून, ते हिमालयाच्या पश्चिमेकडील भागातून खाली उतरले व दुसऱ्या बाजूने राजस्थानातून आर्य वंशाचे लोक उत्तरेकडे सरकले आणि खश लोकांत जाऊन मिसळले. त्यामुळे त्या सर्व भाषांत तिबेटी-ब्रह्मी, मुंडा व आर्य भाषांचे मिश्रण झालेले आढळते.

या भाषांपैकी बहुतेक भाषा केवळ बोली असून, त्यांत साहित्य निर्माण झालेले नाही. [ भा. भा. स., म. भा. उ. वि. ]

**पह्लव** प्राचीन काळी भारतावर आक्रमण करणाऱ्या परकीय लोकांची एक जमात. या लोकांचे मूळ नाव पार्थियन असे होते. सनपूर्व तिसऱ्या शतकात या लोकांनी पर्थियात म्हणजे कास्पियन समुद्राच्या आग्नेय दिशेला असलेल्या खुरासानच्या भोवतालच्या प्रदेशात स्वतंत्र राज्य स्थापले. सनपूर्व दुसऱ्या शतकात पार्थियन राजा मिथ्रदात (प्रथम) याने हेरात व कंदाहार हे प्रांत जिंकले. पुढे त्याच्या सैन्याने सिंधू नदीपर्यंत मजल मारून तिथपर्यंत आपले वर्चस्व स्थापले होते, असे म्हणतात. त्यानंतर पह्लव (पार्थियन) व शक (स्किथियन) यांच्या संघर्षामुळे पार्थियन सम्राटाची सत्ता दुर्बळ होऊन दूरचे प्रांत स्वतंत्र झाले आणि तिथे पह्लव किंवा शक-पह्लव सरदारांची राज्ये सुरू झाली.

कंदाहारवर राज्य करणाऱ्या पह्लव घराण्यातील वनान हा पुरुष प्रसिद्ध आहे. त्याची जी नाणी सापडली आहेत, त्यांच्या पुढील बाजूवर ग्रीक अक्षरे व मागील बाजूवर खरोष्टी लिपीतली अक्षरे आढळतात. इ. स. च्या पहिल्या शतकाच्या पूर्वार्धात द. अफगाणिस्तानावर राज्य करणारा पार्थियन राजा गोंडोफरनेज याने भारताच्या वायव्य भागातील बराच प्रदेश

शकांकडून जिंकला. त्याने काबूल व कंदाहार या प्रदेशांवरही आपली सत्ता स्थापली होती. त्याची काही नाणी भारतात सापडली आहेत. त्याचा एक अभिलेखही पेशावर जिल्ह्यातील तख्त-ए-बाही या ठिकाणी मिळाला आहे. येशू ख्रिस्ताचा एक शिष्य सेंट थॉमस भारतात येऊन प्रथम गोंडो फरनेजच्या दरबारात राहिला होता व त्याने त्या राजाला ख्रिस्ती धर्माची दीक्षा दिली होती, अशी आख्यायिका आहे.

गोंडो फरनेजने इ. स. ४६ पर्यंत राज्य केले असावे. त्याच्या नंतर पेकरेस नावाचा राजा होऊन गेला. पण लवकरच म्हणजे इ. स. ७९ च्या सुमारास कुशाणांनी पह्लवांचा पराभव करून सर्वत्र आपली सत्ता स्थापली. [ हि. क. इ. पी. २ ]

**पळणी** दक्षिण भारतातले एक पुण्यक्षेत्र. हे मदुरा जिल्ह्यात आहे. इथे एका गिरिशिखरावर सुब्रह्मण्याचे देवालय आहे. या पर्वताला वराहगिरी म्हणतात.

इथे सुब्रह्मण्याच्या हातात दंड आहे. त्यामुळे त्याला दंडायुधपाणी असेही म्हणतात. हे मंदिर पश्चिमाभिमुख असून, त्याच्या जवळच एक भव्य गोपुर आहे.

या पर्वतावर सुब्रह्मण्य येऊन कसा स्थिर झाला, त्यासंबंधी पौराणिक कथा आहे, ती अशी-

एकदा शिव-पार्वती बोलत बसले असता सुब्रह्मण्य आणि गणेश या त्यांच्या दोघा पुत्रांत विश्वप्रदक्षिणा करण्याची स्पर्धा लागली. सुब्रह्मण्य मोरावर बसून पृथ्वीप्रदक्षिणेला निघाला.



सुब्रह्मण्यमंदिर – पळणी

गणपती देहाने स्थूल आणि त्याचे वाहन उंदीर, त्यामुळे त्याला सुब्रह्मण्याबरोबर धावणे शक्य नव्हते. म्हणून त्याने एक युक्ती योजिली. तो मातापित्यांना प्रदक्षिणा करून पुढे झाला आणि म्हणाला, ' माझी पृथ्वीप्रदक्षिणा पुरी झाली. मी स्पर्धा जिंकली.' शिवाने त्याचे म्हणणे मान्य केले व संतुष्ट होऊन स्पर्धेचे बक्षीस म्हणून त्याला एक डाळिंब दिले.



कावडी – पळणी

सुब्रह्मण्य पृथ्वीप्रदक्षिणा पुरी करून येता तो गणेशाची चलाखी त्याच्या नजरेस आली. त्यामुळे तो क्रुद्ध झाला. मग शिवाने त्याची समजूत घालून त्याला म्हटले, ' तुला डाळिंब फळाची काय आवश्यकता ? तू स्वतःच एक फळ आहेस.' ( तमिळ भाषेत पळ याचा अर्थ फळ आणि नी चा अर्थ तूच असा आहे. त्यावरून पळणी शब्द बनला. ) हा समजूत सुब्रह्मण्याला पटली नाही. तो रागाच्या भरातच तिथून निघाला आणि या ठिकाणी येऊन रमला.

या भागात हे मंदिर प्रसिद्ध असून, हा देव नवसाला पावतो, असे समजतात. त्यामुळे मुसलमान लोकही या देवाला नवस बोलतात.

कार्तिक महिन्यात इथे मोठा उत्सव होतो. सुब्रह्मण्याच्या नमनाचा एक श्लोक प्रसिद्ध आहे. तो असा –

**गले रत्नभूषं तनौ मञ्जुवेषं करे ज्ञानशक्तिं दरस्मेरमास्ये ।**
**कटिन्यस्तपाणिं शिखिस्थं कुमारं भजेऽहं गुहादन्यदेवं न मन्ये ॥**

अर्थ – ज्याच्या कंठात रत्नहार, शरीरावर सुंदर वेष, हातात ज्ञानशक्ती आणि मुखकमलावर सुंदर हास्य विलसत आहे, तसेच ज्याचे हात कमरेवर असून ज्याने मयूर हे आपले वाहन केले आहे, अशा कुमाराला मी भजतो. गुहस्वामीशिवाय दुसऱ्या देवाला मी मानीत नाही.

पळणीला जाताना सुब्रह्मण्याचे भक्त त्याच्यासाठी दुधाच्या कावडी घेऊन जातात व त्या देवाला अर्पण करतात.

**पळस** (सं. पलाश) एक पवित्र वृक्ष. ऋग्वेदकालापासून हा वृक्ष प्रसिद्ध आहे. शतपथ ब्राह्मणात त्याची ब्रह्मा व सोम यांच्याशी तुलना केली आहे.

एकदा शिवपार्वती एकांतात असता देवांनी अग्नीला ब्राह्मणरूपाने तिथे पाठवून त्यांच्या सुरतसुखात विघ्न आणले पार्वतीला ती गोष्ट सहन झाली नाही तिने अग्नीला त्याच प्रमाणे ब्रह्मा, विष्णू व रुद्र यांनाही 'तुम्ही वक्ष होऊन राहाल' असा शाप दिला त्या शापाप्रमाणे विष्णू अश्वत्थ, रुद्र वड आणि ब्रह्मा पळस झाला (पद्म पु उ स १६०)

पलाश वृक्षाला ब्रह्मतेजाचे प्रतीक मानतात ब्राह्मण बटूला उपनयनप्रसंगी पलाशदंड देतात ता त्यासाठीच औषधी–वनस्पतींनी पृथ्वीरूपी धेनूचे दोहन करण्याच्या कामी पलाश वृक्षाच्या लाकडाचे पात्र वापरले होते, असे वायू पुराणात म्हटले आहे यज्ञकर्मातही याचा उपयोग होतो [श क , वै को , क हि वा पु ]

## पक्ष

प्रत्येक महिन्याचे पधरा पधरा अहोरात्राचे जे दोन भाग पडतात, त्याना पक्ष अशी संज्ञा आहे पक्ष शब्दाच्या दोन व्याख्या आहेत, त्या अशा–

(१) '*पच्यते परिगृह्यते दैवपित्र्कार्यार्थ य*' = देव व पितर यांच्या कार्यासाठी जो स्वीकारला जातो, तो पक्ष होय

(२) 'पक्ष्यते चन्द्रस्य पञ्चदशानां कलानां आपूरणक्षयौ वा येन' = चंद्राच्या पधरा कलांचे पूरण किंवा क्षय ज्याने होतो, तो पक्ष होय

शुक्ल व कृष्ण अशी त्याची नावे आहेत शुक्ल पक्षात रात्रीचा पूर्व भाग चंद्राने प्रकाशित असतो, तर कृष्ण पक्षात रात्रीचा उत्तर भाग चंद्राने प्रकाशित असतो

शुक्ल पक्षात देवकृत्ये, त्यांचे उत्सव व समृद्धीसाठी करायची कृत्ये करावी आणि कृष्ण पक्षात श्राद्धादी पैतृक कृत्ये, तसेच मंत्र, तंत्र, अभिचार, इ दुष्ट कृत्ये (करायची असल्यास) करावी असा सामान्य नियम आहे

प्रत्येक पक्षात पधरा तिथी असतात धर्मकृत्यासाठी या तिथी कशा घ्याव्या, याविषयी तिथ्यादितत्त्वात पुढील श्लोक दिलेला आहे –

**शुक्लपक्षे तिथिर्ग्राह्या यस्यामभ्युदितो रवि ।**
**कृष्णपक्षे तिथिर्ग्राह्या यस्यामस्तमितो रवि ॥**

अर्थ– शुक्ल पक्षातील तिथी सूर्योदयव्यापिनी घ्याव्या व कृष्ण पक्षातील तिथी सूर्यास्तव्यापिनी घ्याव्या

## पक्षप्रदोष

एक काम्य व्रत हे व्रत स्त्री–पुरुषांना विहित आहे शिव ही या व्रताची प्रधान देवता असून बृहस्पती, गणेश, नवशक्ती, अष्टसिद्धी, इ अंगदेवता आहेत कार्तिक शुद्ध त्रयोदशीस या व्रताचा प्रारंभ करतात पुढे प्रत्येक महिन्याच्या शुद्ध व वद्य त्रयोदशींना हे व्रत करून वर्षअखेर त्याचे उद्यापन करतात व्रतविधी असा–

व्रतदिवशी उपोषण करून सूर्यास्तापूर्वी स्नान करावे मडपी खाली अष्टदल काढून त्यावर शिवमूर्ती स्थापावी शिवाचे ध्यान पुढील मंत्राने करावे–

**चन्द्रकोटिप्रतीकाशं त्रिनेत्रं चन्द्रभूषणम् ।**
**वरदाभयहस्तं च हरिणं च परश्वधम् ॥**
**दधानं नागवलयं केयूराङ्गदभूषणम् ।**
**व्याघ्रचर्मपरीधानं रत्नसिंहासने स्थितम् ॥**

मग षोडशोपचारे पूजा करावी ब्राह्मणभोजन घालावे उद्यापनाच्या वेळी उमेसहित शंकराची सुवर्णप्रतिमा व नंदीची रौप्य प्रतिमा करून त्यांची कलशावरच्या पूर्ण पात्रात स्थापना करावी यथाविधि त्यांची पूजा करावी घृत, तिल व चरू या हवनीय द्रव्यांनी होम करावा मग आचार्याला त्या प्रतिमांचे दान करून आशीर्वाद घ्यावा आणि व्रताची समाप्ती करावी

प्रस्तुत व्रताची कथा अशी–

एक ब्राह्मण स्त्री होती ती अत्यंत दरिद्री होती तिला शुचिव्रत नावाचा एक पुत्र होता राज्यभ्रष्ट झालेला व पोरका बनलेला धर्मगुप्त नावाचा एक मुलगाही तिने धर्मपुत्र म्हणून बाळगला होता ती एके दिवशी त्या दोन्ही पुत्रांना घेऊन शांडिल्य ऋषीकडे गेली तिने त्या ऋषीला दारिद्र्य नाशाचा उपाय विचारला ऋषीने तिला पक्षप्रदोष व्रत करायला सांगितले मग तिने त्या पुत्रांसह व्रत सुरू केले चार महिन्यानंतर तिच्या शुचिव्रत नामक पुत्राला एका दलदलीच्या जागी एक कुंभ दिसला तो त्याने घरी आणला उघडून पाहतात, तो त्यात भरपूर द्रव्य निघाले ब्राह्मण स्त्रीने त्या द्रव्याचे दोन सारखे भाग करून आपल्या दोन्ही पुत्रांना वाटून दिले

पण धर्मगुप्ताने आपला वाटा स्वीकारला नाही तो म्हणाला 'भावाला मिळालेल्या द्रव्यात मी वाटेकरी व्हावे हे मला पसत नाही शिवाची कृपा झाली, तर मलाही धनलाभ होईल' असे म्हणून त्याने आपला वाटा मातेला परत दिला

त्यानंतर काही काळाने ते दोघे बंधू वनात गेले असता त्यांना तिथे गंधर्वकन्या दिसल्या त्यांमधील जो प्रमुख गंधर्वकन्या होती तिचे नाव अंशुमती असे होते तिला धर्मगुप्त आवडला तिने आपल्या मैत्रिणींना कोणत्या तरी निमित्ताने दूर पाठवून धर्मगुप्ताची एकांती भेट घेतली त्या भेटीत तिने धर्मगुप्ताला सांगितले, की 'तू माझा पती म्हणून स्वीकार कर' त्यावर धर्मगुप्ताने तिला आपली सर्व हकीगत सांगितली पण तरीही तिने त्याच्याशी लग्न करण्याचा आग्रह सोडला नाही 'मी शंकराची प्रार्थना करून सर्व काही ठीक करीन' असे ता

धर्मगुप्ताला म्हणाली धर्मगुप्ताने घरी येऊन ती वार्ता आपल्या मातेला सांगितली

मग त्या गंधर्वकन्येने शिवाचे दर्शन घेऊन त्याला प्रार्थना केली ' हे महादेवा, धर्मगुप्त नावाच्या एका राज्यभ्रष्ट तरुणा वर माझे मन जडले आहे, तरी तू त्याचे राज्य त्याला पुन्हा मिळवून दे शिवाने ' तथास्तु ' म्हटले

मग यशुमतीने धर्मगुप्ताशी लग्न केले थोड्याच दिवसात धर्मगुप्ताला त्याचे विदर्भ देशाचे राज्य परत मिळाले ती दरिद्री ब्राह्मण स्त्री राजमाता झाली

फल – या व्रतामुळे चतुर्विध पुरुषार्थांची सिद्धी होते वैभव प्राप्ती होते व पापनाश होतो [ व्रतराज ]

## पक्षवर्धिनी एकादशी

एक व्रत जेव्हा पौर्णिमा किंवा अमावास्या यांचा वृद्धी असेल म्हणजे ती तिथी प्रतिपदेलाही असेल तेव्हा त्या तिथीला पक्षवर्धिनी आणि त्या पक्षरवडघात येणा या एकादशीची वृद्धी असेल तर त्या एकादशीला पक्षवर्धिनी एकादशी असे म्हणतात या दिवशी विष्णुपूजा करून रात्री जागरण व कीर्तनादी कार्यक्रम करतात

फल – समृद्धी, दीर्घायुष्य व विष्णुलोक यांची प्राप्ती [ हि ध ]

## पक्षव्रत

एक काम्य व्रत हे व्रत शुक्ल पक्षातील प्रतिपदेपासून पौर्णिमेपर्यंत नित्य करतात या व्रतात प्रात स्नानानंतर सूर्याच्या सुवर्णप्रतिमेची पूजा करून सूर्याला अर्घ्य द्यायचे असते अर्घ्याचा मंत्र असा–

> **एहि सूर्य सहस्रांशो तेजोराशे जगत्पते ।**
> **अनुकम्पय मां देव गृहाणार्घ्यं दिवाकर ॥**

या व्रतात एक वेळ मध्याह्नकाळी हविष्यान्न सेवन करतात कृष्ण पक्षात प्रतिपदेपासून प्रारंभ करून अमावास्येपर्यंत रोज प्रात स्नानानंतर चंद्राची चांदीची प्रतिमा करून तिची पूजा करतात पूर्वीप्रमाणेच आजळीमध्ये पाणी घेऊन ' सोमप्रकाश काय सूर्याय नमोऽर्घ्य ' असे म्हणून अर्घ्य देतात

फल – आयुष्य, आरोग्य व सौभाग्य यांची वृद्धी [ व्र प ]

## पक्षसंधिव्रत

एक काम्य व्रत मत्स्य पुराणात ( १०१ ८२ ) या व्रताला शिखिव्रत असे म्हटले आहे दोन पक्षांच्या संधिकालात हे व्रत करतात, म्हणून या व्रताला हे नाव मिळाले आहे व्रतावधी एक वर्ष व्रत दोन प्रकारे करतात त्यापैकी पहिला प्रकार असा –

प्रतिपदेला एकभुक्त राहणे आणि उद्यापनाच्या वेळी कपिला

दुसऱ्या पद्धतीने व्रतधारी व्यक्तीने प्रतिपदेच्या दिवशी नसलेल्या जमिनीवर अन्न ठेवून भोजन करायचे असते फल— अग्निराज यज्ञाच्या पुण्याची प्राप्ती [ हि ध ]

## पक्षहोम

आपस्तंबाली, प्रतिपदेपासून चतुर्दशीपर्यंतच्या चौदा दिवसांचे सायंप्रातर्होम आकर्षाने म्हणजे नियत कालापूर्वी करणे, याला पक्षहोम असे म्हणतात यात प्रत्येक दिवशी लागणारे हविर्द्रव्य एकत्र घेऊन हवन करतात समिधा व उपस्थानही एकच असते लागोपाठ तीन पक्षहोम करावे लागल्यास अग्निनाश होतो व अग्नीचे पुनराधान करावे लागते

## पक्षितीर्थ

दक्षिण भारतातील एक पुण्यक्षेत्र हे स्थान मद्रास प्रदेशातील चिंगलपेट शहरापासून नऊ मैलावर आहे याचे तमिळ नाव तिरुक्कळुकुन्रम असे आहे त्याचा अर्थ मृत्यु-संजीवन असा होतो

इथे एका टेकडीवर शंकराचे मंदिर आहे या टेकडीला वेद-गिरी असे नाव आहे टेकडीवर जाण्यासाठी ५०० पायऱ्या आहेत शंकराच्या मंदिरात असलेल्या शिवलिंगाला दक्षिणामूर्ति-लिंग मानतात हे लिंग कदलीस्तंभासारखे दिसते हे स्वयंभू लिंग समजले जाते या मंदिराच्या प्रदक्षिणेच्या वाटेवर एका गुहेत पार्वतीची मूर्ती आहे मंदिराच्या मागे एक खडक आहे



पक्षितीर्थ

या खडकावर रोज मध्याह्नकाळी घारीएवढे दोन पांढरे शुभ्र पक्षी येऊन बसतात प्रथम पुजारी मंत्र म्हणून व थाळी वाजवून त्या पक्ष्यांना आवाहन करतो पक्षी आल्यावर त्यांना नैवेद्य म्हणून खीर, भात व पाणी देतो ते खाऊन व पाणी पिऊन ते पक्षी उडून जातात या पक्ष्यांना नैवेद्य दाखविल्यानंतर उरलेले

वर्षापासून चालत आलेली आहे हे दृश्य पाहण्यासाठी लाख लाखांचे लोक तिथे येतात हे दोन पक्षी म्हणजे पूर्वजन्मीचे ऋषी आहेत, असे सांगतात याविषयी एक पौराणिक आख्यायिका आहे, ती अशी–

एकदा ब्रह्मदेवाच्या आठ मानसपुत्रांनी सारूप्य मुक्ती मिळविण्यासाठी शंकराची आराधना सुरू केली पण शंकराने प्रसन्न होऊन वर मागण्यास सांगताच त्यांनी सारूप्याऐवजी सायुज्य मागितले तेव्हा शंकराने क्रुद्ध होऊन त्यांना शाप दिला, की 'तुम्ही गिधाडे होऊन फिरत राहाल ' पुढे त्यांनी पश्चात्ताप व्यक्त केल्यावर शंकर त्यांना म्हणाला 'गृध्ररूपात तुम्ही तपश्चर्या करीत राहिलात, तर प्रत्येक युगात तुमच्यापैकी दोघांना सारूप्य मुक्ती मिळेल '

त्याप्रमाणे कृत, त्रेता व द्वापर या तीन युगांत प्रत्येकी दोन याप्रमाणे सहा मानसपुत्र मुक्त झाले सांप्रतच्या कलियुगात पूषा व विधाता हे दोघे राहिले आहेत तेच या वेदगिरीवर तप करीत असतात त्यांच्या दर्शनाने मोक्ष मिळतो व मनोरथ पूर्ण होतात, असे भाविक लोक मानतात हे दोन पक्षी सकाळी गंगेत स्नान करतात, दुपारी वेदगिरीवर भोजन करतात आणि रात्री वस्तीला चित्रकूटावर जातात, अशीही आख्यायिका आहे

या डोंगराच्या पायथ्याशी एक देवीचे देवालय व तलाव आहे या तलावात स्नान केल्याने सर्व प्रकारचे रोग बरे होतात, अशी समजूत आहे या ठिकाणी यात्रेकरूंसाठी कित्येक धर्मशाळा बांधलेल्या आहेत [ म ज्ञा को , भा दे मा लो , कल्याण–तीर्थांक, त सा स ]

**पक्षी** प्राचीन काळापासून मानवाचा पशूप्रमाणेच पक्ष्यांशीही निकटचा संबंध आला आहे संस्कृत वाङ्मयाच्या परिशीलनावरून कळते, की प्राचीन काळी लोक पशूप्रमाणेच पक्षीही पाळीत असत त्यांत शुक, सारिका, मोर व सारस हे पक्षी प्रामुख्याने पाळले जात

वात्स्यायनाने आपल्या कामसूत्रात म्हटले आहे, की प्रत्येक नागरकाने आपल्या घरात एक पोपट पाळावा आणि शक्य तर त्याला बोलायला शिकवावे पद्म पुराणाच्या स्वर्ग खंडात अनेक पाळीव पक्ष्यांचा एकत्र उल्लेख आहे, तो असा–

पाच किन्नर किशोरी गौरीपूजनासाठी अच्छोद सरोवरावर गेल्या होत्या तिथे त्यांनी एका ब्राह्मण युवकाला पाहिले आणि त्याच्यावर त्यांचे मन जडले खिन्नतेच्या स्थितीतच त्या घरी आल्या त्यामुळे त्यांनी क्रीडामयूराला नाचवले नाही, पिंजऱ्यातल्या पोपटाला बोलायला शिकवले नाही मैनेशी संभाषण केले नाही किंवा पाळलेल्या सारसाशीही त्या खेळल्या नाहीत

जातकग्रंथातही काही पाळीव पक्ष्यांचा उल्लेख आहे जे पक्षी संदेश पोचविण्याचे काम करीत, त्यांना जातकात दूतग्रहारिक असे नाव दिलेले आहे एका कोसलराजाकडे असा एक संदेशहर सारस पक्षी होता काही चोरांनी एक पोपट पाळला होता आणि ते चोरी करीत असताना कुणाची चाहूल लागली, तर तो पोपट तशी सूचना देऊन चोरांना सावध करीत असे, अशीही एक कथा जातकात आहे

अर्थशास्त्रात बातमी पोचविणाऱ्या कबुतराचा उल्लेख आहे राजा वसु एकदा लढण्यासाठी समुद्राच्या दुसऱ्या बाजूला गेला असता, त्याच्या राणीने भूर्जपत्रावर एक पत्र लिहून ते एका पोपटाकरवी त्याच्याकडे पाठवले, असे स्कंद पुराणातील रेवा खंडात सांगितले आहे

याशिवाय घराच्या वळचणीत खोपलेला पारावत, मानिनीला हसविणारा शुक, विरहिणीला विरंगुळा देणारी सारिका, घरातल्या पुष्करिणीत मृणालतंतू भक्षण करणारा कलहंस, अज्ञात प्रियकराला संदेश पोचविणारा राजहंस, आम्रमंजरीचे सेवन करून आलेल्या कुहूकुहूने विरहिणीच्या अंतःकरणात हुरहूर उत्पन्न करणारा कोकिळ, चंद्रिकापान करणारा चकोर, नृत्य करणारा मोर, कमलपत्रावर विराजमान होणारी बकमाला, एकमेकांना साद घालणारी चक्रवाकदंपती, धान्याच्या शेतात मनोहर निनाद करणारे क्रौंच, नगरीच्या परिसरातील जलाशयातले हंस, वगैरे अनेक पक्ष्यांचे निर्देश संस्कृत साहित्यात आढळतात

राजवाड्यातही पक्षी पाळले जात त्यांत कोंबडा, कुरर, कपिंजल, लावक, वार्तिक, चकोर, कादंब, हारीत, कोकिल, शुक व सारिका हे पक्षी प्रामुख्याने असत त्यांपैकी कोंबडा, लावक, वार्तिक वगैरे पक्ष्यांची झुंज लावीत व राजकुलातील लोक करमणूक म्हणून ती पाहत

काही पक्ष्यांविषयी संस्कृत वाङ्मयात काही संकेत रूढ आहेत, ते असे–चक्रवाकदंपतीला दिवसा दिसत नाही ती दोघे फक्त एका पानाच्या आड असली तरी विरहव्याकुळ होऊन एकमेकांना साद घालीत राहतात लांडोरीला मोराचे अश्रू पिऊन गर्भधारणा होते कबुतराला दगडही पचवता येतात ऋग्वेदात घुबड व कपोत यांना यमाचे दूत असे म्हटले आहे

पशुपक्ष्यांना बोलता येते आणि त्यांची स्वतंत्र भाषा असते, असेही प्राचीन भारतीय साहित्यात सांगितले आहे विशिष्ट माणसांना ती भाषा कळते लोककथांमध्ये पक्ष्यांच्या भाषेला अनेक वेळा प्राधान्य दिलेले आढळते या कथा बहुधा ठराविक साच्याच्या असतात कथानायक चिंताग्रस्त मनःस्थितीत दमूनभागून एखाद्या झाडाखाली बसलेला असतो त्याच झाडावर काही पक्षी येऊन बसतात व त्यांचे संभाषण सुरू होते आपण

थाय पाहिले, कोणते धाडस केले किंवा कुठे काय घडले, या विषयी ते एकमेकांना सांगत असतात आणि त्यांच्या त्या संभाषणातून कथानायकाला त्याच्या काळजीतून मुक्त होण्याचा मार्ग सापडतो.

महाभारत, जातके, पंचतंत्र, कथाकोश, कथासरित्सागर, इ. ग्रंथांत पशुपक्ष्यांच्या अनेक कथा आलेल्या आहेत. कथाकोशात राणी मदनावलीची एक कथा आली आहे, ती अशी —

घनदाट अरण्यातील एका राजवाड्यात राणी मदनावली एकाकी जीवन कंठीत असे. तिच्या अंगाला दुर्गंध येत असल्यामुळे राजाने तिला तिथे आणून टाकले होते. आपल्या अशा एकाकी आणि परित्यक्त जीवनाला पूर्वजन्मीचे कोणते महापाप कारणीभूत झाले असेल, अशा विचारात ती नेहमी मग्न असे. अशा स्थितीत एके दिवशी जवळच्या आम्रवृक्षावर पोपटाची एक जोडी बोलत असलेली तिला दिसली. ती दोघे तिच्याविषयीच बोलत होती. पोपटीण पोपटाला विचारीत होती, की 'राणीचे दुःख निवारण करण्याचा काही उपाय आहे का ?' त्यावर पोपटाने तिला सांगितले, की 'पूर्वजन्मी तिच्या हातून एका तापसीचा अनादर झाला होता. तेव्हा तापसीने तिला शाप दिला, की 'पुढच्या जन्मी तुझ्या शरीराला दुर्गंध येईल व त्यामुळे तुला एकलकोंडे जीवन जगावे लागेल.' राणीने जर सात दिवस जिनाची पूजा केली आणि दिवसातून तीन वेळा दुर्गंध हुंगला, तर ती या शापातून मुक्त होईल.'

राणीने त्या दोघांचे संभाषण ऐकले. तिला त्यांची भाषा समजली. मग तिने त्याप्रमाणे सात दिवस जिनाची पूजा केली व ती शापातून मुक्त झाली.

काही पक्ष्यांविषयी लोकांत काही समजुती रूढ आहेत, त्यांपैकी काही अशा — कावळे हे पूर्वी ऋषी होते, त्यांना दिव्य दृष्टी असते आणि त्यांना खाऊ घातलेले अन्न पितरांना पोचते. कोकिळा ही पार्वतीचा अवतार आहे. गरुड हे विष्णूचे आणि हंस किंवा मोर हे सरस्वतीचे वाहन आहे. हंसाची पूजा केली असता अंगीकृत कार्यात यश येते. स्वप्नात हंस दिसला, तर तो शुभ शकुन होय. हंसाला नीरक्षीरविवेक करता येतो. पोपटाची पूजा केल्याने आवाज सुधारतो व जीभ जड असली, तर ती सुधारते. घुबड, वटवाघूळ, पाकोळी, घार, गिधाड आणि टिटवी हे पक्षी अपवित्र होत. मोर आणि चातक हे आपल्या डाव्या बाजूने गेले, तर तो शुभ शकुन होय. घरातून बाहेर जाताना बहिरी ससाण्याने उजव्या बाजूला शब्द केला तर ते शुभ व डाव्या बाजूला केला, तर ते अशुभ होय. एखाद्या घराच्या छपरावर घुबड येऊन बसणे हे अशुभ होय. कावळा शिवणे हेही अशुभच. [प्रा. भा. म., प्रा. भा. क. वि., लौ. द.]

**पक्षीनृत्य** एक लोकनृत्य. ओडिसातील जुआंग या आदिवासी जमातीचे हे एक उल्लेखनीय नृत्य आहे. या नृत्यात पक्ष्यांच्या हालचालींना अनुसरून अभिनय असतो. नृत्यात अनेक पक्ष्यांचे अभिनय केले जातात.

हे स्त्रीपुरुषसमिश्र नृत्य आहे. खंजिरीच्या साथीवर व चांदण्याच्या प्रकाशात या नृत्याचे कार्यक्रम होतात. नृत्यात पुरुष मध्यभागी असतात व स्त्रिया त्यांच्या भोवती फेर धरतात. नाचाच्या वेळी निरनिराळ्या झाडांच्या पानांनी त्या आपली शरीरे सजवितात. [प. हो. रा.]

**पांगुरा बोंगा** मुंडा लोकांचा एक भूतदेव. पांगुरा नावाच्या खेड्यात याचे वास्तव्य आहे, म्हणून याला पांगुरा बोंगा असे म्हणतात. या खेड्याजवळ असलेल्या अबघड्याच्या खाली हा राहतो, अशी त्या लोकांची समजूत आहे. याला ग्रामरक्षक देवांपैकी एक मानतात.

कर्नल डाल्टन या मानववंशशास्त्रज्ञाच्या मते पांगुरा बोंगा हे स्त्रीभूत असून कर्नल दिशुम बोंगाची ती बायको आहे. काही लोक याला पुरुषभूतही मानतात.

परणीच्या वेळी या देवाची वार्षिक पूजा होते. त्या वेळी याला कोंबड्याचा बळी देतात. बळी देण्याचा वार सोमवार असतो. [ए. सा. मुंडा]

**पांगूळ** भिक्षेकऱ्यांची एक जात. यांची वस्ती मुख्यतः दक्षिण महाराष्ट्रात आहे. खंडोबा देवाला वाहिलेल्या एका पांगळ्या मनुष्यापासून आमची उत्पत्ती झाली, असे हे लोक सांगतात. भिक्षा मागत गावोगाव भटकणे हा त्यांचा व्यवसाय आहे. त्यांच्या सर्व रीतीभाती मराठा कुणब्यांप्रमाणे आहेत. त्यांच्या बायका गोधड्या शिवतात व घोंगड्या विणतात.

ऐन पहाटेच्या वेळी पांगूळ भिक्षा मागायला निघतो. या गोष्टीला तो धर्म जागवणे म्हणतो. नेसायला लंगोटी, पांघरायला घोंगडी, डोक्यावर गोधडीची शंखाकृती टोपी, काखेला झोळी आणि हाती धगराची काठी असा त्याचा वेष असतो. त्याच्या मुखी 'धर्म जागो, धर्म जागो' असा घोष असतो.

पांगुळाला पांगळ्या अरुणाचा प्रतिनिधी मानतात. म्हणूनच तो अरुणोदयापूर्वी दारी येतो. त्याला पैशाच्या किंवा वस्त्र — प्रावरणाच्या रूपाने भिक्षा घातली, की तो चक्राकार फिरून उड्या मारतो आणि पाऊड (= दान) सर्व देवदेवतांना पोचल्याची पावती देतो. पांगूळ अनेकदा झाडावर अथवा भिंतीवर बसूनही पहाटे रस्त्याने येणाऱ्याजाणाऱ्यांजवळ भिक्षा मागतो.

पांगूळ ही संस्था फार जुनी असावी. महानुभावांच्या लीळा-

चरित्रात पागुळाचे उल्लेख आहेत चक्रधराचा पट्टशिष्य नागदेवाचार्य एकदा राखचे टिळे लावून व पायाला फडकी बाधून पागळ वेषाने चक्रधराकडे आला होता, अशी कथा आहे


पांगूळ

पागुळावर ज्ञानदेव, नामदेव, एकनाथ, तुकाराम, रामदास या सतानी रूपके रचली आहेत त्यापकी रामदासाचे पागुळावरचे एक रूपक असे--

भरत गा खडामाजीं ।
शरयूतीर गांवो ।।
धर्माचें नगर तेथे ।
राज्य करी रामरावो ।।
पांगुळा पाय देतो ।
देवी जानकीचा नाहो ।।
जाईन मी तया ठायां ।
सेवा दुलभ ठावो ।।
राघवाचा धम जागो । अधम रे भागो ।।
अज्ञान निरसूनिया । विज्ञानीं लक्ष लागो ।।
मीपणाचे मोडले पाय । म्हणोनि पागुळा जालों ।।
तूपणाची कीर्ति वर्ड । ऐकुनिया शरण आलो ।।

यात रामदासानी अज्ञानाचा निरास व्हावा आणि विज्ञानाकडे लक्ष लागावे अशा न हचे दान राघवाच्या चरणी मागितले आहे [ मु इ जा, बा ब का, गा गा, म लो उ ]

**पांचजन्य** विष्णूच्या हातातला शख याच्या उत्पत्तीसबधी एक कथा आहे, ती अशी--

पचजन नावाचा एक दैत्य होता तो तिमीच्या (एक मासा) रूपाने समुद्रात राहत होता त्याच्या अस्थीपासून हा शख बनवून विष्णूने तो आपल्या हाती धरला पचजनाचा म्हणून त्याला पाचजन्य असे नाव मिळाले भारतीय युद्धाच्या प्रारंभी श्रीकृष्णाने हा शख वाजविला होता

**पांचरात्र** एक प्राचीन सप्रदाय हा सगुण भक्तीला प्राधान्य देणारा पण तात्रिक असा सप्रदाय आहे महाभारतकाली वेदातमताच्या खालोखाल पाचरात्रमतालाच महत्त्व होते ईश्वराची सगुण रूपात उपासना करण्याची पद्धती शिव व विष्णू यांच्या उपासनेने प्रचलित झाला त्यातल्यात्यात विष्णूचे सगुण रूप हे विशेष उपास्य ठरले ब्राह्मणकाळात विष्णू हा श्रेष्ठ देव असल्याची भावना निर्माण झाली व पुढे वासुदेव कृष्ण हा विष्णूचा अवतार मानला गेला कृष्णाच्या सगुण उपासनेला महाभारतकाळी पांचरात्र असे नाव मिळाले सवसामान्य सगुण भक्तीचा माग आणि पाचरात्र माग यामध्ये फरक आहे पाचरात्र मागात तत्रविद्येचा रहस्यमय भाग अधिक आहे

पाचरात्र शब्दाचे पच व रात्र हे दोन घटक शब्द होत पाच देव (व्यूह), पच महाभूते, पाच पूजाप्रकार किंवा पाच ज्ञानप्रकार असे पच शब्दाचे अनेक अर्थ होतात रात्र शब्द ज्ञान या अर्थी घेतलेला आहे शतपथात त्याचा रात्र असा अथ दिलेला आहे पाच दिवस चालणाऱ्या सत्राला तिथे पाचरात्र म्हटले आहे हे पाचरात्र सत्र नारायणाने केले आणि त्यामुळे तो सर्व देवतामध्ये श्रेष्ठ ठरला, असे तिथे म्हटले आहे

पाचरात्र मत प्राचीन असले तरी ते वैदिक आहे, असे निश्चितपणे सागता येत नाही वैदिक मानावे, तर स्मृतीनी त्याची निंदा केली आहे पाचरात्रमताच्या लोकाना वैदिक लोक पक्तीला घेत नसत, असेही डा दासगुप्ता यानी सांगितले आहे पाचरात्रिक लोक हिंसायुक्त यज्ञाला विरोध करणारे व अहिंसामूलक भक्तिमार्गाचा प्रचार करणारे होते, हे त्याचे कारण असले पाहिजे पुराणामध्ये पाचरात्राचे अनेक सिद्धात मिळत असले, तरी त्यानीही पाचरात्रिकाची निंदाच केली आहे कूर्म पुराण म्हणते, की पूर्वज मी गोवध केल्याच्या पापामुळ या ज मी मनुष्य पाचरात्रिक होतो (कूर्म पु १६) वायू, लिंग, नारदीय, इ पुराणे आणि अनेक सहिता हे ग्रथही कूर्म पुराणाच्याच मताचे आहेत भागवत, महाभारत व विष्णू पुराण यात मात्र पाचरात्रिकाची प्रशसा केलेली आढळते चार वेद व सांख्य योग या पाचाचा त्या मतात समावेश आहे, असे म्हणून महाभारताने या मताचा गौरव केला आहे

पाचरात्राला अवैदिक म्हणावे, तर वैदिक कर्मकांड हे फलसिद्धीसाठी आवश्यक आहे, असे त्याच मतात सांगितले आहे यामुनाचार्यांनी आपल्या आगमप्रामाण्य या ग्रथात पाचरात्राला वैदिक ठरवण्याचा खूप प्रयास केला आहे पुराणांनी पाचरात्र, कालामुख, कापालिक व शाक्तमत या सर्वांना एकाच पक्तीत बसवले असले, तरी यामुनाचार्यांच्या मते बाकीची मते अवैदिक असून, पाचरात्र तेवढे वैदिक आहे नारायण हा वैदिक देव आहे आणि तोच पाचरात्रमताचा प्रवर्तक आहे तेव्हा त्या मताला अवैदिक ठरवणे चूक आहे, असे त्यानी ठामपणे सांगितले आहे यामुनाचार्यांच्या नतर वेदातदेशिक व भट्टारक वेदोत्तम

यानीही पांचरात्र मताला वैदिक ठरवले आहे.

पण संशोधकाच्या मते पांचरात्र मताला वैदिक ठरवता येत नाही कारण शैव व शाक्त या अवैदिक मतांतल्या कितीतरी गोष्टी पांचरात्रात स्वीकारलेल्या आहेत पांचरात्र पूजापद्धती, ही निश्चितपणे अवैदिक आहे शाक्ती, मूर्तिपूजा, गुह्ययाग, शक्तिपात, इ जी तत्त्वे पांचरात्रमतात आढळतात, ती वेदेतर धर्मांतूनच त्या पंथात शिरली आहेत

**नामकरण** – परमतत्त्व, मुक्ती, भुक्ती, योग व विषय या पांचांचे निरूपण असल्यामुळे या तंत्राला पांचरात्र असे नाव मिळाले आहे भागवततंत्र व सात्वततंत्र अशीही त्याला नावे आहेत ईश्वरसंहितेत या मताला एकायनवेद असे म्हटले असून, तो चारही वेदांपेक्षा प्राचीनतर असल्याचे सांगितले आहे

पांचरात्र संप्रदायात दर्शन, मंत्र, यंत्र, माया, योग, मंदिर निर्माण प्रतिष्ठाविधी, संस्कार, वर्णाश्रमधर्म व उत्सव अशा दहा विषयांची चर्चा आहे यावरून हे स्पष्ट होते, की या संप्रदायात केवळ भक्तीचेच विवेचन नसून योग, मंत्र, यंत्र, इ तांत्रिक बाजूचेही विवेचन आहे त्यावरून हे शैव–शाक्त मिश्रित शास्त्र मानले गेले आहे

महाभारतातले नारायणीयोपाख्यान (शांति ३३५–३४६) हा या तंत्राचा मूळ स्रोत होय नारदाने पांचरात्र तत्त्वाची जिज्ञासा धरून श्वेतद्वीपात गमन केले आणि नारायण ऋषी-कडून हे तंत्र मिळवले पुढे त्याने त्यातील सिद्धांतांचा देशभर प्रचार केला नारदानंतर शांडिल्य, भारद्वाज, मौंज्यायन, औपगायन व कौशिक या ऋषींनी त्याचा प्रसार केला हे सर्व ऋषी यजुर्वेदाच्या काण्व शाखेचे होते

पांचरात्र शास्त्रात पुढील चार विषय विवेचिलेले आहेत–

(१) ज्ञान – ब्रह्म, जीव आणि जगत यांच्या आध्यात्मिक रहस्यांचे उद्घाटन आणि सृष्टितत्त्वाचे विशेष निरूपण

(२) योग – मुक्तीला साधनीभूत अशा योग आणि योग संबद्ध प्रक्रिया यांचे वर्णन

(३) क्रिया – देवालयनिर्मिती, मूर्तिस्थापना व मूर्तींचे विविध आकार–प्रकार यांचे वर्णन

(४) चर्या – आह्निक क्रिया, मूर्ती व यंत्र यांची पूजा, वर्णाश्रमधर्म, विशिष्ट पर्वे आणि उत्सव या प्रसंगी करायचे विशिष्ट पूजाविधान

प्रस्तुत तंत्रात सर्वांत अधिक वर्णन चर्येचे आहे त्याखाली क्रिया, ज्ञान व योग यांचा अनुक्रम लागतो त्यावरून चर्या व क्रिया यांचे विवेचन हेच पांचरात्रसंहितांचे मुख्य उद्दिष्ट असल्याचे दिसून येते

**पांचरात्रदर्शन** – या तंत्राचे दार्शनिक सिद्धांत असे–

**ब्रह्म** – ब्रह्म हे अनादि, अनंत, अक्षर, इ आहे अहिर्बुध्न्य संहिता (२ ५३) म्हणते–

> **सर्वद्वंद्वविनिर्मुक्तं सर्वोपाधिविवर्जितम् ।**
> **षाड्गुण्यं तत् परं ब्रह्म सर्वकारणकारणम् ॥**

अर्थ – परब्रह्म हे सर्व द्वंद्वांपासून मुक्त, सर्व उपाधींनी रहित, षड्गुणयुक्त आणि सर्व कारणांचेही कारण आहे

ब्रह्म हे व्यक्त आणि अव्यक्त, तसेच साकार व निराकार आहे गुणांच्या योगाने त्याच ब्रह्माला भगवान म्हणतात ते समस्त भूतांच्या ठिकाणी वास करीत असल्याने त्याला वासुदेव म्हणतात हित व रमणीयत्व यांचा गर्भ असल्यामुळे त्याला हिरण्यगर्भ म्हणतात आणि कल्याणकारक असल्यामुळे त्याला शिव म्हणतात ज्ञान, शक्ती, ऐश्वर्य, बल, वीर्य व तेज हे ब्रह्माचे सहा गुण होत

ज्ञान हे ब्रह्माचे स्वरूप आहे आणि त्याचा गुणही आहे शक्ती म्हणजे जगताचे उपादान कारण होय जगाचे उत्पत्ति प्रलय करण्याचे सामर्थ्य म्हणजे शक्ती होय ऐश्वर्य म्हणजे स्वतंत्रतापूर्वक कार्य करण्याची शक्ती बल म्हणजे जगताची रचना करूनही न दमणे वीर्य म्हणजे सृष्टीचे उपादान होऊनही विकाररहित असणे तेज म्हणजे कोणाच्याही साहाय्याची अपेक्षा न धरता सृष्टिरचनेत समर्थ असणे ही षड्गुणांची कार्ये होत या षड्गुणांत ज्ञान हेच भगवंताचे उत्कृष्ट रूप आहे त्यापुढील पांच हे ज्ञानाचे पांच गुण समजावेत

भगवंताच्या ठिकाणी मुख्यत्वे पांच शक्तींचा निवास असतो उत्पत्ती, स्थिती, विनाश, निग्रह आणि अनुग्रह अशी त्यांची नावे आहेत त्यांच्या शक्तीचे सामान्य नाम लक्ष्मी असे आहे भगवान हा शक्तिमान व लक्ष्मी त्याची शक्ती होय या दोहोंचा संबंध चंद्र–चंद्रिका, समुद्र–तरंग, सूर्य–किरण यांच्या एकतेसारखा आहे पण ती दोन्ही आपापल्या परस्परसंबद्ध असली, तरी त्या दोहोत अद्वैत मात्र नाही प्रलयदशेत जेव्हा विश्वप्रपंचाचा लय होतो, तेव्हाही भगवान आणि लक्ष्मी यांचे नितांत ऐक्य होत नाही त्यांचा अविनाभाव असला, तरी मुळातला भेद राहतोच

भगवंताची ही आत्मभूत शक्ती प्रारंभी कोण्या अचिंत्य अशा कारणातून उन्मेष प्राप्त करून घेऊन विश्वरचनेच्या कार्याला प्रवृत्त होते (अहि बु सं ५ ४) आनंदा, स्वतंत्रा, लक्ष्मी, श्रीपद्मा, इ तिची नावे आहेत सृष्टिकाली या शक्तीची दोन रूपे होतात एक क्रियाशक्ती व दुसरी भूतिशक्ती भगवंताच्या जगदुत्पत्तीच्या संकल्पाला क्रियाशक्ती म्हणतात आणि जगताच्या परिणतीला भूतिशक्ती म्हणतात हे शक्ति-द्वय असल्यावाचून भगवंताला सृष्टिव्यापार करता येत नाही सृष्टीचे शुद्ध व शुद्धेतर असे दोन भेद आहेत

शुद्धसृष्टी – जगाच्या परम कल्याणासाठी भगवान स्वत च पुढील चार रूपाची सृष्टी करतो –

व्यूह – वासुदेव, सकर्षण, प्रद्युम्न व अनिरुद्ध हे चार भगवताचे व्यूह होत पकी सकर्षण हा भगवताचा बधू, प्रद्युम्न हा पुत्र व अनिरुद्ध हा नातू होय वासुदेव हा परमात्मा, सकर्षण हा जीव, प्रद्युम्न हे मन व अनिरुद्ध हा अहकार समजावा वासुदेव सोडून पुढील तीन व्यूहात पूर्वोक्त षड्गुणापकी दोन दोन गुणाचे प्राधान्य असते सकर्षणाच्या ठिकाणी ज्ञान व बल, प्रद्युम्नाच्या ठिकाणी ऐश्वर्य व वीर्य आणि अनिरुद्धाच्या ठिकाणी शक्ती व तेज याचे आधिक्य असत सृष्टीची रचना हे सकर्षणाचे काय, पाचरात्रक्रियचे शिक्षण देणे हे प्रद्युम्नाचे काय व क्रियाफल अर्थात मोक्ष याचे तत्त्व प्रतिपादणे हे अनिरुद्धाचे कार्य होय

व्यूहकल्पना हा पाचरात्रिकाचा वशिष्ट्यपूर्ण सिद्धान्त आह वरील चारही व्यूहाचा कृष्णचरित्राशी घनिष्ठ सबध आहे त्यातला सकर्षण म्हणजे बलराम होय त्याला जीव कसे आणि का मानले ते मात्र कळत नाही कारण बलराम हा वासुदेवापासून उत्पन्न झालेला नाही, तर तो त्याचा मोठा भाऊ आहे जीव आणि परमेश्वर याचा सबध काही भावाभावासारखा नसतो पण ऋग्वेदातल्या 'द्वा सुपर्णा' मत्रात जीवात्मा व परमात्मा याना सयुजौ (जोडीने असणारे) व सखायौ (परस्परमित्र) म्हटले आहे, त्या आधारावरून कदाचित वासुदेवाला परमात्मा व सकर्षणाला जीवात्मा म्हटले असावे पाचरात्रमत श्रीकृष्णाच्या कालात सात्वत लोकामध्ये प्रसत झाले असाव सात्वत लोक हे श्रीकृष्णाचे वशज होते प्रद्युम्न व अनिरुद्ध ही नावे श्रीकृष्णाच्या वशातले श्रेष्ठ पुरुष म्हणून सात्वतानी व्यूहकल्पनत स्वीकारली असावी

विभव – विभव म्हणजे अवतार होय अहिर्बुध्न्य सहितेत ३९ विभवाची गणना केलेली आहे मुख्य व गौण असे त्याचे भेद आहेत मुख्याची उपासना मुक्तीसाठी व गौणाची उपासना भुक्तीसाठी केली जाते पद्मनाभ, ध्रुव, मधुसूदन, कपिल, त्रिविक्रम, दत्तात्रेय, इ पुरुष हे विभवच आहेत विभवकल्पनेत दीपशिखेचा सिद्धात स्वीकृत आहे जशी एका ज्योतीने दुसरी ज्योत लावावी, तिने तिसरी ज्योत प्रज्वलित करावी, तशी अवतारपरपरा ही विष्णुज्योतीची प्रवाहपरपरा आह

अर्चावतार – पाचरात्र विधीने पवित्र केल्यानतर पाषाणादी मूर्ती याही भगवताचे अवतारच मानल्या जातात सर्वसाधारणाच्या पूजेसाठी त्याचा उपयोग होत असल्याने त्याना अर्चावतार असे म्हटले आहे

अतर्यामी – भगवान सर्व प्राणिमात्राच्या हृदयकमलात वास्तव्य करीत असून, तो त्याच्या समस्त व्यापाराचा नियामक आहे योगप्रक्रियेच्या द्वारे या अतर्यामीच्या रहस्यात्मक शक्तीला जागृत करता येते

भगवताच्या शुद्धसृष्टीत अवताराव्यतिरिक्त वकुठाचेही महत्त्व सागितले आहे भोग, वभव आनद, इ सर्व काही त्या ठिकाणी प्राप्त असून, ते सार अप्राकृत व विकाररहित आहे

**स देश परम व्योम निर्मलं पुरुषात्परम् ।**
**तत्रान वमया भोगा लोकाश्चान वलक्षणा ।**
**ज्ञानान वमया देहा मुक्तानां भवितात्मनाम् ॥**

अर्थ – तो देश परमव्योम आहे तो निर्मळ असून पुरुषाहून पर आहे त्या ठिकाणाचे भोग आनदमय आहेत लोक आनदरूप आहेत तिथल्या अनुभवी मुक्ताचे देह आनदमय आहेत

वकुठ हे भगवताचे नित्य विहारस्थल आहे महाप्रलयातही ते नष्ट होत नाही वासुदेव हा त्या धामात लक्ष्मीसह वास्तव्य करतो भगवताचे हे षड्गुणधारी अप्राकृत रूप केवळ मुक्तानाच सुलभ आहे

व्यूहातल्या वासुदेवाहून वैकुठातला वासुदेव हा वेगळा आहे, हे समजण्यासाठी त्याला परवासुदेव म्हटले आह

शुद्धेतरसृष्टी – भूतिशक्तीचा विकास पुढे कूटस्थ व माया शक्ती या रूपात होत असतो ही सृष्टी शुद्ध व अशुद्ध याच्या मिश्रणातून विकसित झाली आहे

भूतिशक्तीच्या शुद्धाशुद्ध तत्त्वातून कूटस्थाची उत्पत्ती होते कूटस्थ हा सर्व आत्म्याची समष्टी आह तो प्रद्युम्नापासून उत्पन्न होतो व अनादिवासनेने कुठित राहतो चातुर्वर्ण्यही त्याच्यापासूनच निर्माण होते पाचरात्राच्या या कूटस्थाचे उपनिषदातल्या प्रजापतीशी सादृश्य आह

मायाशक्तीला मूलप्रकृती, शाश्वतविद्या किंवा चित्रा असे म्हणतात ही भौतिक पदार्थांच्या समष्टिरूपाने प्रतीत होते कूटस्थानतरच हिची उत्पत्ती होते आणि त्या दोहोच्या सयोगाने जीवाची उत्पत्ती होत शक्तीपासून नियती, तिच्यापासून काल व त्याच्यापासून गुण उत्पन्न होतात या सर्वांच्या सयोगाने महत्तत्त्वाची उत्पत्ती होते बुद्धी, प्राण व काल हे महत्तत्त्वाचे गुण होत अशा प्रकारे निर्माण झालेल्या भौतिक शरीरात चेतनेचा अवतार होतो, त्यालाच जीव म्हणतात जीव हा स्वभावत सर्वशक्तिशाली, व्यापक व सर्वज्ञ आहे पण सृष्टिकालात भगवताची तिरोधान शक्ती त्याच्या या तीन गुणाना झाकून टाकते त्यामुळे तो किंचित्कर, अणू व किंचिज्ञ बनतो आणि पूर्वकर्मानुसार जाती, आयुष्य व भोग मिळवतो या विकट भवचक्रात त्याला निरतर फिरावे लागते त्यामुळे त्याला जे क्लेश होतात, ते पाहून भगवताच्या हृदयात कृपेचा स्वयमेव

आविर्भाव होतो. भगवंताला ज्या जीवाविषयी करुणा उत्पन्न होते, त्या जीवावर त्याचा शक्तिपात होतो. त्यानंतर जीव मोक्ष-समीक्षेने मुक्त होतो व त्याच्या ठिकाणी वैराग्य येऊन तो विवेका-विषयी आग्रह धारण करणारा होतो.

**साधनामार्ग** – साधनामार्गाचे प्रतिपादन करणे, हे पांचरात्र पंथाचे प्रधान लक्ष्य आहे. पांचरात्रांनी त्रैवर्णिकांनाच साधनेचे अधिकारी मानले आहे. साधकाला दीक्षागुरूची आवश्यकता असते. तो गुरू योग, मंत्र, तंत्र, इ. गोष्टी विशेषत्वाने जाणणारा असावा लागतो. शिष्याने अशा गुरूला शरण जावे आणि त्याज-कडून उपदेश घ्यावा, असे सांगितले आहे. गुरूच्या शरणागती-संबंधी पांचरात्रिकांनी आग्रह दाखवला आहे. शिष्याला पहिल्या प्रथम अशी शपथ घ्यावी लागते, की 'मी हे शास्त्र गुप्त राखीन.' मग त्या शिष्याच्या ठिकाणी अंगन्यास करून देव-तांची प्रतिष्ठा केली जाते. त्यानंतर गुरू त्याला सुदर्शनमंत्र देतो आणि उपदेश करताना सांगतो, की 'या मंत्राचा प्रयोग लोकरक्षण, राज्यरक्षण, परोपकार, इ. महत्त्वाच्या कार्यातच कर; क्षुद्र कार्यात मंत्राचा विनियोग करू नको.' पर्वत, नदी-तीर, विष्णुमंदिर, आश्रम, सिद्धालय ही साधनेची ठिकाणे सांगितली आहेत. तिथे एक लक्ष पुरश्चरण केल्याने मंत्रदेवता प्रसन्न होते, असे सांगितले आहे.

पांचरात्रमतात योगसाधनेवर अधिक भर दिलेला आहे. तिथे योगाला आत्महवी म्हटले आहे. देवतेला आत्मसमर्पण करणे, असा त्या शब्दाचा अर्थ आहे. तसे केल्याने जीवात्मा व परमात्मा यांचा संयोग होतो. मग प्रत्येक क्षणी साधकाला परमात्म्याशी एकतेची जी अनुभूती येते, तिलाच पांचरात्रिकांनी योग म्हटले आहे.

*चक्रसाधना* – सृष्टी ही ब्रह्माच्या संकल्पशक्तीचा परिणाम आहे. त्या शक्तीला सुदर्शनचक्र म्हटले आहे. ध्यान व जप यांच्या द्वारे या सुदर्शनचक्राची साधना करायची असते. त्या-बरोबरच त्यांची एक यंत्रसाधनाही असते. या साधनेत यंत्र-स्थित देवतांचे ध्यान सांगितले आहे. ही साधना पांचरात्रिकांनी अथर्ववेदातून घेतली असावी.

**शरणागती** – भगवंताच्या अनुग्रहशक्तीचे उद्‌बोधन करण्या-साठी जीवाला किंवा साधकाला शरणागतीची अपेक्षा असते. ही शरणागती पुढील सहा प्रकारची आहे –

(१) *आनुकूल्यस्य सङ्कल्पः* – भगवंताला अनुकूल राहायचा संकल्प.

(२) *प्रातिकूल्यस्य वर्जनम्* – भगवंताला जे प्रतिकूल होईल, त्याचा त्याग करणे.

(३) *रक्षिष्यतीति विश्वास* :– भगवान आपले रक्षण करील अशी दृढ श्रद्धा धारण करून उपासना करणे.

(४) *गोप्तृत्ववरणम्* – भगवंताला स्वतःचे रक्षक मानणे.

(५) *आत्मनिक्षेपः* – आत्मसमर्पण.

(६) *कार्पण्यम्* – नितांत लीनता.

पांचरात्र भक्ताला पंचकालज्ञ म्हटले आहे. कारण तो आपल्या कालाचे पाच प्रकार करून भगवंताच्या उपासनेत राहतो. या पंचकालांची नावे अशी –

(१) *अभिगमन* – कर्म, मन आणि वाणी; तसेच जप, ध्यान आणि अर्चन यांनी भगवंताला अभिमुख होणे.

(२) *उपादान* – पूजेसाठी फलपुष्पादी वस्तूंचा संग्रह करणे.

(३) *इज्या* – भगवंताची यथासांग पूजा करणे.

(४) *अध्याय* – आगम ग्रंथांचे श्रवण व मनन करणे, तसेच त्यांचा उपदेश करणे.

(५) *योग* – अष्टांग योगाचे अनुष्ठान करणे.

शास्त्रोक्त पद्धतीने मंदिर निर्माण करणे व त्यात इष्टदेवतेची विधिपूर्वक प्रतिष्ठा करून तिची संप्रदाय पद्धतीने पूजा-अर्चा करणे, हाही एक पांचरात्र साधनेचा महत्त्वाचा भाग आहे.

अशा प्रकारच्या उपासनेच्या बळावर साधकाला मोक्षप्राप्ती होते. पांचरात्रात मुक्तीला ब्रह्मभावापत्ती म्हणतात. कारण त्या दशेत जीव ब्रह्माशी एकरूप होतो व तो फिरून कधीही संसा-रात येत नाही. त्या दशेत तो निरतिशय आनंदाचा उपभोग घेत व भगवत्सेवा करीत राहतो.

**पांचरात्रसाहित्य** – प्रस्तुत संप्रदायाची साहित्यिक संपत्ती विशाल आणि विस्तृत आहे. पण तिच्यापैकी फार थोडे साहित्य आजवर प्रकाशित झाले आहे. प्रकाशित साहित्यही द. भारतामध्ये तेलुगू लिपीत असून, त्या मानाने नागरी लिपीतले अत्यल्प आहे.

या मताचे सर्वप्रथम विवरण शांतिपर्वातल्या नारायणीय उपाख्यानात केलेले आहे. याचे प्राचीन ग्रंथ संहिता या नावाने प्रसिद्ध आहेत. प्रस्तुत संप्रदाय उ. भारतात निर्माण झाला व पुढे तो द. भारतातही प्रसृत झाला. पांचरात्र संहितांपैकी अनेक संहिता द. भारतातच निर्माण झाल्या आहेत आणि त्यांत तिक-डील तीर्थांचे माहात्म्य विशेष रूपाने सांगितले आहे. कपिंजल संहितेच्या निर्देशाप्रमाणे पांचरात्र संहितांची संख्या २१५ असून त्यांत अगस्त्य, काश्यप, नारदीय, महासनत्कुमार, वासिष्ठ, वासुदेव, विश्वामित्र व विष्णुरहस्य या संहिता प्रमुख आहेत.

आजवर तेरा संहिता प्रकाशित झालेल्या असून, त्यांची नावे पुढीलप्रमाणे आहेत– अहिर्बुध्न्य, ईश्वर, कपिंजल, जयाख्य, पराशर, पाद्मतंत्र, बृहद्‌ब्रह्म, भारद्वाज, लक्ष्मीतंत्र, विष्णुतिलक, श्रीप्रश्न, विष्णू व सात्वत. यांपैकी सहा संहिता नागरी लिपीत छापलेल्या असून, सात संहिता तेलुगू लिपीत आहेत. अन्य

संहिताही विषयविवेचनाच्या दृष्टीने प्रकाशनयोग्य असल्या, तरी त्या अजून हस्तलिखित स्वरूपातच आहेत प्रमुख संहितांची माहिती अशी–

अहिर्बुध्न्यसंहिता – अहिर्बुध्न्य याने बहुत काल तप करून संकर्षणाकडून सत्यज्ञान प्राप्त करून घेतले आणि त्या ज्ञानातूनच ही संहिता प्रकट झाली या संहितेत जीव–ब्रह्माचा संबंध वेदान्ताप्रमाणेच सयुजा व सखा या स्वरूपाचा आहे सृष्टीच्या आविर्भावकाली जीव ब्रह्मापासून पृथक होतात व प्रलयकाली पुनश्च तियेच लीन होतात, असे तिच्यात सांगितले आहे या संहितेच्या मते, पुरुष–प्रकृतिभेद संकर्षणापासून सुरू होत नसून तो प्रद्युम्नापासून सुरू होत आहे ही संहिता काश्मीरमध्ये निर्माण झाली

जयाख्यसंहिता – हिची ३३ पटले आहेत या संहितेचा वक्ता साक्षात नारायण आहे या संहितेत सात्वत, पौष्कर व *जयाख्य ही तीन तंत्रे म्हणजे रत्नत्रय होय असे सांगितले आहे*

परमसंहिता – हिचे ३१ अध्याय असून त्यांत सृष्टीची उत्पत्ती दीक्षाविधी, पूजाप्रकार व योग यांचे निरूपण आहे या संहितेतली अवतरणे रामानुजांनी आपल्या श्रीभाष्यात घेतली आहेत

परमेश्वरसंहिता – हिच्यात साधनविधीचे वर्णन असून, ही संहिता द्वापरयुगाच्या अंती संकर्षणापासून प्रवृत्त झाली, असे म्हटले आहे

पौष्करसंहिता – हिचे ४३ अध्याय आहेत हिच्यात कित्येक दार्शनिक तत्त्वांचे विवेचन केले आहे रामानुजाचार्यांनी श्रीभाष्यात हिच्यातली अवतरणे घेतली आहेत

बृहद्ब्रह्मसंहिता – हिच्यात हरिलीलेचे विशद वर्णन आहे पुष्टिमार्गी साहित्य इथूनच त आले असावे या संहितेच्या मते हरी व त्याची लीला यांच्यांत अंतर नाही राधा लीलारूपिणी असून गोलोकात राधा–कृष्णाचा नित्यविहार चालतो जो जीव रसिक असेल, त्याला त्या लोकात विष्णूच्या कृपेने ही लीला पाहायला मिळते

हयशीर्षसंहिता – हिचे १४४ अध्याय असून, त्यांत छोट्या छोट्या देवतांच्या मूर्ती कशा तयार कराव्या व त्यांची पूजाअर्चा कशी करावी, ते सांगितले आहे

विष्णुतत्त्वसंहिता – हिचे ३९ अध्याय आहेत यांत मूर्तिपूजा, भोग, वैष्णव मुद्रांचे अंकन, पवित्रीकरण, इ विषय सांगितले आहेत या संहितेवर सांख्याचा स्पष्ट प्रभाव दिसतो

डॉ विश्वंभरनाथ उपाध्याय यांनी मध्यकालीन हिंदी काव्य की तांत्रिक पृष्ठभूमि या ग्रंथात पांचरात्र साहित्याचे आलोडन करून त्या संप्रदायाविषयी जे निष्कर्ष सांगितले आहेत, ते असे–

(१) पांचरात्रमत उपनिषद्युगाच्या शेवटी विकसित झाले

(२) त्याच्या विकासात अथर्ववेदाचा बराच हात आहे

(३) या मतावर सांख्याचा प्रभाव आहे, पण तो प्राचीन सांख्याचा होय

(४) याचा शाक्तसाधना व दर्शन यांच्याशी घनिष्ठ संबंध आहे

(५) दार्शनिक दृष्ट्या पांचरात्रमत शक्तिवादी आहे, मायावादी नाही यात जीवब्रह्माची अभिन्नता मानली आहे, तशीच त्यांची भिन्नताही मानली आहे शैवांचा आभासवाद या मतात व्यूहवादाच्या रूपाने स्वीकारलेला आहे या मताचा वर्णाश्रमधर्मावर विशेष जोर आहे पांचरात्रिक इतर तंत्रांतला वामाचार स्वीकारीत नाहीत, पण दक्षिणाचार स्वीकारतात [भा सं सा , भक्ति का विकास, रा द इ , म सा अ , म सं प , भा सं , हिंदुत्व ]

**पांचाळ** द महाराष्ट्र, कर्नाटक व तमिळनाड या प्रदेशांत आढळणारी एक जात पंच आठ म्हणजे पाच हुन्नर, यावरून हा शब्द आला आहे सोनार, सुतार, कासार (ताबट), लोहार व शिल्पकार (पाथरवट) असे यांचे पाच भेद आहेत यांच कारागीर वर्गांना मिळून पांचाळ हे नाव मिळाले आहे मात्र मूळ सोनार, सुतार, लोहार वगैरे जातींहून पांचाळ लोकांतील कारागिरांचे पाच वर्ग भिन्न आहेत पांचाळ लोक स्वतःला ब्राह्मण मानतात, जानवे घालतात व ब्राह्मणांप्रमाणे सगळे संस्कार करतात वर्णाश्रमव्यवस्था कडक झाल्यानंतर जे ब्राह्मण वरील कामे करीत राहिले आणि ज्यांना सात्त्विक ब्राह्मण आपल्या श्रेणीचे मानीनासे झाले, ते हे लोक होत पण कारागिरी व सधनता यामुळे त्यांची समाजातली प्रतिष्ठा मात्र कमी झाली नाही पेशवाईत हे लोक दैवज्ञ ब्राह्मण म्हणून ओळखले जात होते तमिळनाडमध्ये यांना कम्मालर म्हणतात

पांचाळांच्या पाच वर्गांत परस्पर विवाहसंबंध होतात त्यांची पाच गोत्रे आहेत सुपर्ण दैवज्ञ, अभमुनन त्वष्ट, प्रत्न शिल्पी, सनग मनू व सनतन मय अशी त्यांची नावे आहेत ही नावे विश्वकर्म्याच्या पाच पुत्रांच्या नावांवरून पडली आहेत

यांच्यात काही लोक शैव आणि काही वैष्णव आहेत, काही लिंगायतही आहेत कालिका किंवा कालम्मा ही यांची कुलदेवी होय गणपती, सूर्य, खंडोबा, बहिरोबा या देवांनाही हे लोक भजतात व आपल्या हत्यारांचीही रोज पूजा करतात

पांचाळ लोक धर्मकार्यासाठी इतर ब्राह्मणांना बोलावीत

नाहीत. त्या जातीतले धर्मशास्त्र जाणणारे लोकच त्यांचे पौरोहित्य करतात.

यांच्यांतले काही लोक भविष्यकथन, वैद्यकी, इ. व्यवसायही करतात. हे पूर्ण शाकाहारी असून, इतर ब्राह्मणांच्या हातचे अन्नपाणीही त्यांना चालत नाही.

**विवाहप्रथा** – मुलामुलींची लग्ने बहुधा लहान वयात होतात. आईवडील लग्नसंबंध ठरवतात. सगोत्र व सपिंड विवाह करीत नाहीत. आतेबहिणीशी व मामेबहिणीशी लग्न करता येते. लग्नसमारंभ ब्राह्मणांच्या प्रमाणे केला जातो. त्यात वाङनिश्चय, साखरपुडा, देवतांना आवाहन, वरपूजन वगैरे विधी असतात.

**मर्तिकप्रथा** – हे लोक सामान्यपणे प्रेतांचे दहन करतात. काही लोक मात्र प्रेते पुरतात. दहा, बारा किंवा सोळा दिवस सुतक पाळतात. अंत्यसंस्कार ब्राह्मणांप्रमाणेच करतात. मृत्यू अपघाती असेल, तर एक महिन्यानंतर अंत्यक्रिया सुरू करतात. पुष्कळ लोक भाद्रपद कृष्ण पक्षात एकत्र मिळून पितरांचे महालय श्राद्ध करतात. विवाहित स्त्री मरण पावते, तेव्हा तिच्या आत्म्याला संतुष्ट करण्यासाठी स्त्रिया हुविस्थ नावाचा विधी करतात. पहा – कम्मालर. [ मुं. इ. जा.; एन्सा. रि. ए.; मै. ट्रा. का.; ट्रा. का. बॉं. ]

**पांडरा** एक बौद्ध देवता. हिचे वस्त्र पांढरे असते, म्हणून हिला पांडरवासिनी असेही म्हणतात. ही ध्यानी बुद्ध अमिताभ याच्या कुळातली असून, त्याची आत्मिक शक्ती आहे. तेजधातू हे तिचे स्वरूप असून, तिचा वर्ण लाल आहे. कमल हे तिचे प्रतीक आहे. [ इं. बु. इ. ]

**पांडवनृत्य** उत्तर प्रदेशातले एक लोकनृत्य. हे खुल्या मैदानात चालते. यात स्त्रिया भाग घेत नाहीत. ढोल व दमामा ही वाद्ये याच्या साथीला असतात. या नृत्यात जे गीत गायिले जाते, त्यात कुंती व पाच पांडव यांची कथा असते. मात्र ती महाभारतीय कथेहून वेगळी आहे. गीताच्या पूर्वार्धात भीमादी पांडवांच्या वीरकृत्यांचे वर्णन असते; पण उत्तरार्धात गोविंद नावाच्या एका पांडवपुत्राची कथा असते. हा गोविंद विसल्या राणीच्या प्रेमपाशात सापडतो आणि अनेक दुःखे भोगतो. आपल्या पुत्राची ती दुर्दशा पाहून त्याची माता विलाप करते. या गीतामुळे हे नृत्य वीर व करुण या रसांचे बनते. वेगवेगळ्या विभागांत या नृत्याचे वेगवेगळे पर्याय आहेत. त्यांपैकी काही असे –

गढवाल प्रदेशात हे नृत्य दसऱ्यापासून दिवाळीपर्यंतच्या काळात केव्हातरी होते. यात नृत्याबरोबर अभिनयात्मक नाटचही असते. पाच पांडव व द्रौपदी ही यातली मुख्य पात्रे होत. द्रौपदीची भूमिका एखादा पुरुषच करतो. कालिया लोहार या नावाचे एक गौण पात्र त्यात असते. ही भूमिका एखादा हरिजन करतो. पांडवांच्या हातांत वेगवेगळी शस्त्रे असतात व द्रौपदीच्या हातात जंबिया असतो. ढोल, दमामा, बांकोरी व झांज ही वाद्ये या नृत्याच्या साथीला असतात. मुख्य वादकाला दास म्हणतात. नृत्याच्या शेवटी एक शेळी खांबाला बांधतात व अर्जुन तिचा गळा कापतो. ही शेळी हे कौरवांचे प्रतीक समजले जाते.

जौनसार – बावर या प्रदेशातले लोक पांडवपूजक आहेत. ते जे पांडवनृत्य करतात, त्याचा प्रकार असा –

पांडवांची यात्रा भरल्यानंतर तिच्या शेवटच्या दिवशी हे नृत्य करतात. गावातले लोक प्रातःकाळी भोज्य पदार्थ तयार करून त्याच्या टोपल्या भरतात. मग स्त्री-पुरुष व मुले-मुली त्या टोपल्या डोक्यावर घेऊन मिरवणुकीने नृत्यस्थळापर्यंत जातात. मिरवणुकीच्या पुढे पाच पांडव व द्रौपदी यांची सोंगे घेतलेले पुरुष नाचत नाचत चालतात. त्या वेळी त्यांच्या अंगात पांडवांचा अवसर आलेला असतो. त्यामुळे ते बेहोषपणे नाचत जातात.

नृत्याच्या पटांगणात पोहोचल्यावर लोक आपल्या डोक्यावरच्या भोज्य पदार्थांच्या टोपल्या तिथे रांगेने मांडून ठेवतात. मग ढोल, दमामे वाजू लागतात. त्यासरशी भीमसेन आपली गदा उभारून एकटा नाचू लागतो. थोड्या वेळाने बाकीचे पांडवही त्या नृत्यात सामील होतात. त्यानंतर द्रौपदीही त्यांच्या बरोबरीने नाचू लागते. मग ती सर्व मंडळी विविध प्रकारचे नृत्याभिनय करून दाखवितात.

दिवसभर असे नृत्य झाल्यानंतर संध्याकाळी लोक नर्तकांचे हात धुवून त्यांची पूजा करतात. मग द्रौपदी टोपल्यातील पदार्थांचे पांडवांना भोजन वाढते. [ इं. फो. लो.; संमेलन पत्रिका – लोकसंस्कृति अंक; भा. लो. नृ. ]

**पांडुकोळी** थडग्यांचा एक प्रकार. या थडग्यांची रचना अशी – तीन बाजूंना भिंतींप्रमाणे तीन अनघड दगड पुरलेले असतात. त्यांवर छप्पराप्रमाणे एक दगड ठेवलेला असतो. थडग्याची उंची अडीच–तीन फुटांपेक्षा अधिक नसते. ही थडगी कुरुब म्हणजे धनगर, गवळी वगैरे पशुपालनाचा धंदा करणाऱ्या लोकांनी बनवलेली असतात. त्यांमध्ये मृतांच्या अस्थी ठेवलेल्या असतात.

अशा प्रकारची थडगी कर्नाटकात आढळतात. बडगे जातीचे लोक त्यांना मोर्यांचे घर असे म्हणतात. पुणे जिल्ह्यातील भोसरी व मोशी या गावांच्या माळांवरही अशी थडगी आहेत.

**पाडुसोपाक** एक जात चांडाळ पुरुष व वदेहक स्त्री यांची ही संतती होय, असे मानले जाते यानाच बुरुड म्हणतात हे लोक बांबूची सुपे, टोपल्या, चटया वगैरे विणतात पाहा – बुरुड [ हिं ग्र ]

**पांडे जिनदास** (इ स चे १६ वे शतक) एक कवी हा आग्र याचा रहिवासी होता त्याच्या पित्याचे नाव ब्रह्मचारी शांतिदास असे होते *अकबर बादशहाचा प्रधान* तोडरमल याचा हा आश्रित होता त्याचा पुत्र दीपाशाह याला शिकवण्याच्या निमित्ताने याने जम्बूस्वामीचरित हा ग्रंथ लिहिला या ग्रंथात जंबूस्वामी नावाच्या एका जैन भक्ताचे चरित्र वर्णिले आहे या ग्रंथाची भाषा शुद्ध हिंदी आहे याची योगीरासा, जखडी, चेतनगीत, मुनीश्वरोंकी जयमाल, मालो रासा, इ अनेक काव्ये प्रसिद्ध आहेत जोगीरासा काव्यात हा म्हणतो –

**चेतन पडिओ अचेतनकी फंदी जित खच तिह जाई ।**
**मोह फंद गले लग रे भाई मैं मैं मे बिललाई ।।**
**तस ग्रंथ महिं बसू निरंतर, चेतन दीपक जोऊ ।**
**मिथ्या तमबल दूरि करे पिउ, परम समाधिहि सोऊ ।।**

अर्थ – अचेतनाच्या गराड्यात चेतन अडकले आहे जिकडे ओढ बसेल तिकडे ते खेचले जाते आहे अरे बाबा, मोहाचा फास गळ्याला बसला आहे त्यामुळे मैं मैं असे ( मी आणि माझे) व्याकुळ उद्गार निघत आहेत त्यासाठी निरंतर ग्रंथगत तत्त्व मनात ठसवून जागतीचा दीप लावू या व त्याद्वारा तमोगुणाचे बळ दूर करू या आणि परम समाधीचा झोप घेऊ या

*त्याच्या अशा कित्येक पदांमधून योग–भक्तीचे झरे वाहताना* दिसतात [ हिं जै भ क , हिं सा २ ]

**पांडे राजमल** (इ स चे १६ वे शतक) एक विद्वान ग्रंथकार संस्कृत, प्राकृत, अपभ्रंश व हिंदी या चारही भाषांमध्ये याने ग्रंथ लिहिले आहेत लाटी संहिता, जंबूस्वामी चरित्र, अध्यात्मकमलमार्तंड, पंचाध्यायी, इ , त्यांची नावे आहेत कुंदकुंदाचार्यांच्या समयसार ग्रंथावर त्याने टीकाही लिहिली आहे हिंदी जैन गद्यात सर्वांत प्राचीन टीका हीच आहे याशिवाय छंदोविद्या नावाचा एक ग्रंथ संस्कृत, प्राकृत, अपभ्रंश व हिंदी या चारही भाषांमध्ये त्याने लिहिला आहे [ हिं सा ७ ]

**पांडे हेमराज** (इ स चे १७ वे शतक) एक हिंदी जैन कवी जयपूर राज्यातल्या सांगानेर गावी याचा जन्म झाला हा अग्रवाल जातीचा गर्गगोत्रीय ब्राह्मण असून, रूपचंद या पंडिताचा शिष्य होता गुरूजवळ जैन सिद्धांताचे *प्रगाढ अध्ययन करून याने खूप नावलौकिक मिळवला* पंचास्तिकाय व नयचक्र या ग्रंथांवर याने टीका लिहिल्या असून, जैन समाजात त्या ग्रंथांना फार मान आहे याची इतर काव्यरचना अशी – प्रवचनसार ग्रंथाचा पद्यानुवाद, सितपट चौरासी बोल, भक्तामर स्तोत्राचा पद्यानुवाद, हितोपदेश बावनी, उपदेश दोहा शतक, गुरुपूजा इत्यादी

उपदेश दोहा शतकात तो म्हणतो –

**ठौर ठौर सोधत फिरत, काहे अंध अवेव ।**
**तेरे ही घरमें बसो, सदा निरंजन देव ।।**

अर्थ – अरे जीवा, तू आंधळ्यासारखा त्या परमेश्वराला इतस्ततः कुठे शोधीत फिरतो आहेस ? तो निरंजन देव तर तुझ्याच घरात वस्ती करून आहे

संस्कृत व प्राकृत या भाषांप्रमाणेच हिंदीवरही त्याचा उत्तम अधिकार होता [ हिं जै भ क ]

**पांडो** एक आदिवासी जमात हे लोक राजस्थानात उदयपूर मध्ये आढळतात पांडो व कावार या दोन्ही जमाती एकाच वंशाच्या आहेत, असे डा हिरालाल म्हणतात कारण त्या दोन्ही जमातींच्या चेहरेपट्टीत बरेच सादृश्य आढळते उतरहा व सुरगुजीदा असे त्यांचे दोन पोटभेद आहेत यांच्यात दरी आहेत

पांडोंची एक स्वतंत्र बोली आहे कोरवा व ओडिया भाषांतील काही शब्द त्यांच्या भाषेत आढळतात पांडोंखेरीज दुसरे कोणी ती बोली बोलत नाहीत यांच्या वस्त्या स्वच्छ असतात घरे लाकूड–मातीची असून, त्यावर चित्रे काढलेली असतात उतरहांच्या घरांना एकच दार असते, तर सुरगुजीदांच्या घरांना दोन दारे असतात रजस्वला स्त्री दाराचा वापर करीत नाही

बहुतेक सर्व पुरुष डोक्याच्या पुढच्या बाजूच्या केसांची हजामत करतात व बाकीचे केस वाढवतात पुरुषांच्या कमरेला फक्त दोरीवरची लंगोटी असते स्त्रिया कमरेभोवती एक वस्त्र गुंडाळतात दुसरे वस्त्र त्या डोके व खांदे यांच्यावरून लपटतात बांबूच्या पाट्या, टोपल्या, इ वस्तू करणे, हा पांडोंचा मुख्य व्यवसाय आहे ते बांबूचेच धनुष्य बाण बनवून त्यांच्या साहाय्याने शिकार करतात

**विवाहप्रथा** – पांडोमध्ये अविवाहित मुलामुलींसाठी शयनगृहे चालविण्याची प्रथा आहे प्रत्येक शयनगृहात सहा मुलांची किंवा मुलींची सोय केलेली असते एखादा मुलगा सतत पाच रात्री शयनगृहात गैरहजर राहिला, तर त्याला पंचायतीपुढे जाब द्यावा लागतो मुलींच्या विवाहाचे वय १०–१२ वर्षे व मुलाचे

१८–२० वर्षे सामान्यत: असते. लग्ने आई-बाप ठरवतात. एकमेकांनी स्वतंत्रपणे एकमेकांना पसंत केल्यास त्यांच्या लग्नाला मान्यता देतात. एखादी मुलगी लग्नापूर्वी गरोदर राहिली, तर संबंधित पुरुषाला तिच्याशी लग्न करण्याची सक्ती करतात. लग्नासाठी खास एक काठी उभी करतात. वधू-वरांनी तिच्याभोवती सात प्रदक्षिणा घातल्याने लग्नविधी पुरा होतो.

**देवधर्म** – बराईहान (ब्रह्मदेव) हा यांचा देव आहे. त्याशिवाय ते पूर्वजांनाही भजतात. त्यांची पूजा करताना साल वृक्षाचा धूप जाळतात. त्यांच्या देवाची मूर्ती नसते किंवा देवालयही नसते. पूजा–प्रार्थनेच्या वेळी ते एका जागी तांदूळ पसरतात व त्यांचीच पूजा करतात. देवाला बोकडाचा बळी देतात. बोकडाचे शिर पुजाऱ्याला देतात व इतर भाग गावातल्या लोकांना प्रसाद म्हणून वाटतात. बकरा मिळाला नाही, तर भाताचा बळी देतात. दसऱ्याच्या दिवशी व शिमग्यात त्यांचा हा पूजोत्सव होतो.

**मर्तिकप्रथा** – हे लोक मृतांना पुरतात. पुरण्याच्या वेळी त्याच्यावर नवे वस्त्र घालतात. मयताची कुऱ्हाड व त्याच्या इतर वस्तू त्याच्याबरोबरच पुरतात. खड्ड्यात धान्य पेरून त्यावर पाणी शिंपडतात. मृताला तो जिथे जाईल तिथे अन्नोदक मिळावे, हा त्यातला हेतू असतो. मृताचा पुनर्जन्म त्याच देवकात होतो, असे समजतात. [से. इं. १९३१]

## पांड्य राजवंश

तमिळनाडच्या प्राचीन इतिहासात चोळ' चेर व पांड्य या तीन राजवंशांना विशेष महत्त्व आहे. त्यांतील पांड्य वंशाचे राज्य वल्लुरू नदीच्या दक्षिणेला कन्याकुमारीपर्यंत पसरलेले होते. त्यात तिन्नेवेल्ली, मदुरा व रामनाड हे जिल्हे व तिरुवितांकूरचा दक्षिण भाग एवढा प्रदेश समाविष्ट होता. मदुरा ही त्यांची राजधानी होती.

रामायण, महाभारत, बृहत्संहिता, महावंश, इ. ग्रंथात पांड्यांचे उल्लेख आहेत. बुद्धाच्या निर्वाणानंतर काही दिवसांनी लंकेचा राजकुमार विजय व पांड्य राजकुमारी यांचा विवाह झाला, असे महावंशावरून कळते. कात्यायनाने पांडु या शब्दापासून पांड्य या नावाची व्युत्पत्ती सांगितली आहे. पांडवांशी पांड्य कुलाचा संबंध जोडणाऱ्या काही आख्यायिका द. भारतात प्रचलित आहेत. हेरेक्लीज (कृष्ण याचा युनानी पर्याय) याची कन्या पंडाइया हिच्या नावावरून पांड्य हे नाव मिळाले, असे मेगॅस्थिनीसने म्हटले आहे. तिच्या पित्याने तिला दूर दक्षिणेकडील राज्य दिले होते व तिच्याबरोबर विशाल गजदल, अश्वदल व पायदळ सैन्य पाठवले होते. तिथे तिने राज्य केले.

पांड्यकवाटचे मोती व मदुरेकडील सुती वस्त्रे यांचा उल्लेख कौटिल्याने केला आहे. मौर्य सम्राट अशोक याच्या शिलालेखांत दक्षिणेकडील शेजारी राज्य म्हणून पांड्य देशाचे उल्लेख आढळतात. अशोकाने त्या देशात मनुष्य व पशू यांच्यासाठी चिकित्सालये उघडली होती आणि बौद्ध धर्माच्या उपदेशासाठी आपले दूत पाठवले होते. कलिंग राजा खारवेल याला पांड्य राजाकडून मोती, मणी व रत्ने मिळाली होती. स्ट्रॅबो व टॉलेमी यांच्या ग्रंथांत व पेरिप्लसमध्येही पांड्यांचा उल्लेख आहे. त्या काळी पांड्यांचा परदेशांशी मोठा व्यापार चालत असे.

तमिळ संघमसाहित्यात प्राचीन पांड्य राजांची नावे व कृत्ये यांची काही माहिती मिळते. त्यांतील पहिला राजा मुदुकुडुमी पेरुवळुदी हा फार पराक्रमी म्हणून प्रसिद्ध आहे. त्याने अनेक युद्धे करून विजय मिळवले होते व पुष्कळ यज्ञ केले होते. त्याचा वंशज नेडुंजेळियन हा अधिक प्रख्यात आहे. तो इ. स. च्या तिसऱ्या शतकाच्या आरंभी अल्पवयातच राजा झाला. चोळ व चेर राजांनी आणखी काही राजांचे साहाय्य घेऊन पांड्य देशावर आक्रमण केले. पण नेडुंजेळियन याने ते आक्रमण परतवून लावले; एवढेच नव्हे, तर शत्रूंचा पाठलाग करून तलैयालंगानम येथे त्यांचा पूर्ण पराभवही केला. नेडुंजेळियन वैदिक ब्राह्मण धर्माचा अनुयायी असून, त्याने अनेक यज्ञयाग केले होते. तो स्वत: कवी होता व त्याने अनेक कवींना आश्रय दिला होता. त्या कवींनी त्याच्यावर पुष्कळ गीते रचून त्याचे नाव अमर केले.

पांड्य वंशातील उग्र नामक राजानंतर इ. स. च्या ३ ऱ्या शतकाच्या अखेरीस त्या वंशाची सत्ता नष्ट झाली, ती इ. स. च्या ६ व्या शतकाच्या अखेरीस पुन्हा प्रस्थापित झाली. मधल्या तीनशे वर्षांच्या कालखंडात तिथे उत्तरेकडून आलेल्या कलभ्रांचे प्रभुत्व असावे. पण त्या काळातला इतिहास अज्ञातच आहे. पांड्य वंशातील कडुंगोण (इ. स. ५९०– ६२०) व त्याचा पुत्र मारवर्मा अवनिशूळामणी (इ. स. ६२०–६४५) यांनी कलभ्रांची सत्ता नष्ट करून पांड्य वंशाचे राज्य पुनश्च सुरू केले. तिसरा राजा शेंदन किंवा जयंतवर्मा (इ. स. ६४५–६७०) हा अत्यंत शूर व न्यायी म्हणून प्रसिद्ध होता. त्याने चेर राजाचा पराभव केला होता. त्याचा पुत्र अरिकेसरी परांकुश मारवर्मा (इ. स. ६७०–७१०) याने पांड्य साम्राज्याचा पाया घातला. तमिळ परंपरेत प्रसिद्ध असलेला कूण पांड्य राजा हाच असावा. त्याने आपल्या राज्याच्या सीमेपलिकडे आक्रमणे सुरू केल्यामुळे पल्लव व चेर राजांशी त्याचा संघर्ष सुरू झाला. अरिकेसरी याने शैव संत ज्ञानसंबंधर याच्या प्रभावामुळे जैनपंथ सोडून शैव पंथ स्वीकारला व जैनांचा छळ केला, असे म्हणतात.

त्यानंतरचा पांड्य राजा कोच्चडैयन रणधीर (इ. स. ७१०–७३०) पराक्रमी व आक्रमणशील होता. चोळ व चेर राजे त्याचे

प्रभुत्व मानत होते त्याने कोंगुदेश व मंगळपुरम (मंगलोर) हे प्रदेश जिंकले होते मारवर्मा राजसिंह (प्रथम) (इ स ७३०–७६५) हा देखील महापराक्रमी निघाला त्याने चालुक्यांच्या सहाय्याने पल्लव राज्यावर आक्रमण केले व तंजाऊरच्या आसपासचा बराच प्रदेश बळकावला पल्लवराजा नंदिवर्मा पल्लव मल्ल याचा अनेकदा पराभव करून राजसिंहाने रजन ला पल्लव भंजन ही पदवी घेतली पुढे चालुक्य राजा कीर्तिवर्मा (दुसरा) याचाही त्याने पराभव केला गंगवंशातील एका राजकन्येशी त्याने लग्न केले होते त्याने गोसहस्र, हिरण्यगर्भ, तुलाभार, इ अनेक महादाने केली

राजसिंहाचा पुत्र नेडुंजडैयन (इ स ७६५–८१५) हा जटिलवर्मा, परांतक, वरगुण (प्रथम) व मारजडैयन या नावांनीही प्रसिद्ध होता त्याने आपले साम्राज्य बरेच वाढवले पश्चिम कोंगुदेशाचा सामंत अग्निमान हा चेर व पल्लव यांच्या मदतीने पांड्य राजाविरुद्ध उठला होता, पण परांतकाने त्या सर्वांचा पराभव करून कोंगुदेश आपल्या साम्राज्यात समाविष्ट केला तंजाऊर, तिरुचिरापल्ली, सेलम, कोयमत्तूर व दक्षिण तिरुवितांकूर हे प्रदेशही त्याच्या सत्तेखाली आले त्याने शिव व विष्णू या देवतांची अनेक मंदिरे बांधली शैव संत मणिक्क वाचकर हा याच्याच समकाली होऊन गेला असावा परांतकाच्या राजवटीतले वेळविकुडी–दानपत्र ऐतिहासिक दृष्टीने महत्त्वाचे आहे त्यात प्राचीन पांड्य राजांची माहिती आहे

जटिल परांतक याचा पुत्र श्रीमार श्रीवल्लभ (इ स ८१५–८६२) यानेही साम्राज्यविस्तार करण्याचे धोरण चालू ठेवले होते त्याने लंकेवर स्वारी करून तिचा उत्तरभाग व राजधानी लुटली पल्लव राजा नंदिवर्मा (तिसरा) याने चोळ राष्ट्रकूट व गंग यांचे साहाय्य घेऊन पांड्य राज्यावर आक्रमण केले पण श्रीमाराने कुंभकोणमजवळ त्याचा पराभव केला मात्र शेवटी पल्लव राजा नृपतुंग याने श्रीमाराचा अरिसिलच्या युद्धात पूर्ण पराभव केला त्याच सुमारास लंकेच्या राजाने पांड्य राज्यावर स्वारी करून त्याची राजधानी लुटली

त्यानंतर वरगुणवर्मा (इ स ८६२–८८०) याने पल्लवांच्या आक्रमणाला विरोध केला, पण पल्लव, चोळ व गंग यांनी मिळून श्रीपुरंबियमच्या युद्धात त्याचा पूर्ण पराभव केला (इ स ८८०) परांतक वीरनारायण (इ स ८८०–९००) याच्या कारकीर्दीत चोळ राजाने पांड्यांकडून कोंगुदेश घेतला मारवर्मा राजसिंह (दुसरा इ स ९००–९२०) याला लंकेच्या राजाचे साहाय्य मिळाले होते, तरी चोळ राजा परांतक (प्रथम) याने त्याचा पराभव करून मदुरा ही त्याची राजधानी घेतली तेव्हा राजसिंह लंकेत पळून गेला तिथे आपला राजमुकुट व रत्नभांडार ठेवून तो आश्रयार्थ केरळात गेला त्याची माता केरळची राजकन्या होती

अशा प्रकारे पांड्यांचे पहिले साम्राज्य लयाला गेले त्यानंतर सुमारे तीन शतके त्यांचे स्वतंत्र राज्यही झाले नाही पण पांड्य वंशातील पुरुषांनी चोळांचे स्वामित्व सरळपणे कधीच मान्य केले नाही त्यांनी चोळांची सत्ता झुगारून देण्यासाठी पुष्कळ प्रयत्न केले मात्र ते यशस्वी झाले नाहीत राष्ट्रकूट राजाने तक्कोलम येथे चोळांचा पराभव केल्यामुळे काही काळ पांड्य राज्य स्वतंत्र झाले, पण राजराज चोळ याने पुन्हा ते जिंकले राजेंद्र चोळ याने लंकेतून पांड्यांचा राजमुकुट जिंकून आणला व आपल्या एका मुलाला मदुरेचा राज्यपाल नेमले अधिराजेंद्र चोळ याच्या वेळी अराजक माजल्यामुळे पांड्य राजांनी पुन्हा उठाव केला, पण कुलोत्तुंग (पहिला) याने तो मोडून काढला त्याने पांड्य देशात अनेक लष्करी तळ उभे केले व आपले प्रभुत्व चालू ठेवले, पण पांड्यांच्या अंतर्गत कारभारात मात्र हस्तक्षेप केला नाही त्यानंतरच्या काळात पांड्यांची सत्ता हळूहळू वाढू लागली पण इ स ११६९ ते ११७७ या काळात पांड्य राज्यात यादवी माजल्यामुळे चोळांना पुन्हा तिथे आपले वर्चस्व स्थापणे शक्य झाले पुढे चोळांची सत्ताही क्षीण झाली त्यामुळे इ स ११९० च्या सुमारास जटावर्मा कुलशेखर पांड्य याने स्वतंत्र राज्य सुरू केले कुलोत्तुंग चोळ (तिसरा) याचा पराभव करून त्याने तंजाऊर, चिदंबरम वगैरे प्रदेश घेतला खरा, पण होयसळांनी हस्तक्षेप केल्यामुळे त्याला तो प्रदेश सोडावा लागला कुलोत्तुंगाने सुंदर पांड्यांचे स्वामित्व मान्य केले, पण राजराज चोळ (तिसरा) याने मात्र ते झुगारून दिले त्यामुळे मारवर्मा याने पुन्हा चोळ प्रदेशावर स्वारी करून बराच प्रदेश बळकावला या वेळीही होयसळांनी चोळांना मदत करून पांड्यांचा पराभव केला व चोळांचे राज्य रक्षिले त्यानंतर मारवर्मा सुंदर पांड्य (दुसरा, इ स १२३८–५१) याच्या कारकीर्दीत राजेंद्र चोळ (तिसरा) याने स्वारी करून पांड्यांचा पराभव केला, पण होयसळांनी त्या वेळी पांड्य राजाचा पक्ष घेऊन चोळांना विरोध केला

मारवर्मांचा पुत्र जटावर्मा सुंदर पांड्य (प्रथम, इ स १२५१–६८) हा या वंशातला सर्व श्रेष्ठ सम्राट होता त्याने चेर, होयसळ, आंध्र, काकतीय, चोळ व बाण या सर्वांचा पराभव करून आपली सार्वभौमसत्ता प्रस्थापित केली होती लंकेच्या उत्तर भागावरही त्याची सत्ता होती लंकेपासून नेल्लोर व कडप्पापर्यंत त्याचे साम्राज्य पसरले होते त्यामुळे चोळांचे सर्व राज्य पांड्य साम्राज्यात विलीन झाले जटावर्मा याने समस्तजगदाधार, हेमाच्छादनराज, महाराजाधिराज श्रीपरमेश्वर, इ अनेक पदव्या

धारण केल्या. त्याला जे अमाप वैभव प्राप्त झाले होते, त्याचा त्याने दानधर्मात आणि चिदंबरम व श्रीरंगम येथील मंदिरांवर सोनेरी छत घालण्यासाठी विनियोग केला.

जटावर्मा सुंदर पांड्य याने राजकुमारांना उपराजा म्हणून शासनव्यवस्थेत घेतले होते. त्याच्या कारकीर्दीत जटावर्मा वीर पांड्य व मारवर्मा कुलशेखर हे उपराजे म्हणून काम करीत होते. मारवर्मा कुलशेखर (इ. स. १२६८–१३१०) याच्या वेळी जटावर्मा सुंदर पांड्य (दुसरा व तिसरा), जटावर्मा वीर पांड्य (दुसरा) व मारवर्मा विक्रम पांड्य हे प्रमुख उपराजे होते. मारवर्मा कुलशेखर हा या वंशातला शेवटला श्रेष्ठ सम्राट होय. केरळ, कोंगू, चोळमंडळ, तोंडमंडळ व लंका या प्रदेशांवर त्याची सत्ता होती. मार्को पोलो व मुस्लिम इतिहासकार वस्साफ यांनी याच्या सामर्थ्याचे व वैभवाचे खूप वर्णन केले आहे. त्या काळी पांड्यांच्या राज्यात व्यापाराची भरभराट झालेली होती.

मारवर्मा कुलशेखर याला जटावर्मा वीर पांड्य (दुसरा) व जटावर्मा सुंदर पांड्य (तिसरा) हे दोन पुत्र होते. त्यांतला पहिला अनौरस व दुसरा औरस होता. वीर पांड्य युवराज होता; पण सुंदर पांड्याने इ. स. १३१० मध्ये पित्याचा वध करून सिंहासन बळकावले. लवकरच अलाउद्दीन खिलजीचा सरदार मलिक काफूर याने मदुरेवर स्वारी केली. यादवी व मुस्लिम आक्रमण यांमुळे पांड्यांची सत्ता दुबळी झाली आणि साम्राज्यातील पुष्कळ भाग स्वतंत्र झाले. इ. स. १३२९ साली मुसलमानांनी पुन्हा स्वारी करून मदुरा नगरी घेतली व दिल्लीच्या सुलतानाने तिथे आपला सुभेदार नेमला. तरीदेखील मदुरा, रामनाड, तिन्नेवेल्ली, तंजाऊर, द. अर्काट व पदुकोट्टाइ या भागांवर पांड्यांचे राज्य चालू होते. पुढे युवराज कंपन याने पांड्य राज्यावर आक्रमण करून त्याचा बराच भाग विजयनगरच्या साम्राज्यात समाविष्ट केला व पांड्यांची सत्ता फक्त तिन्नेवेल्लीपुरतीच शिल्लक राहिली. त्यानंतर हळूहळू ती सत्ताही क्षीण होऊन इ. स. च्या १६ व्या शतकाच्या आरंभी पांड्य राजवंशाचा पूर्ण लोप झाला.

**पांड्यशिल्प** – पल्लव राजांनी सुरू केलेल्या द्राविड शिल्पशैलीचा विकास चोळ व पांड्य राजांनी केला. पल्लवांच्या गुहामंदिरांसारखी मंदिरे पांड्य राजांनी खडकात खोदली आहेत. तिरुमलैपुरम येथील गुहामंदिर त्या काळातल्या पांड्यशिल्पाचे उत्कृष्ट उदाहरण होय. तिथे ब्रह्मा, विष्णू, शिव व गणेश यांच्या ज्या मूर्ती कोरलेल्या आहेत, त्याही पल्लव शिल्पातील मूर्तींसारख्याच वाटतात. पल्लव शिल्पात गोपुरांचा उदय झालेला असून, चोळ व पांड्य राजांनी त्या शिल्पाचा पुष्कळ विकास केला. पुढे द्राविड शिल्पशैलीचे ते एक प्रमुख अंग ठरले आणि पांड्यांच्या राज्यात बहुसंख्य प्रचंड गोपुरे निर्माण झाली. मदुरा येथील मंदिरांची गोपुरे फारच भव्य



मीनाक्षीमंदिर – मदुरा

आहेत. श्रीरंगम येथील जंबुकेश्वराचे मंदिर आणि चिदंबरम, तिरुमलै व कुंभकोणम येथील मंदिरे यांच्या द्वारावरील भव्य गोपुरे पांड्यांनीच निर्माण केली आहेत.

चोळ व पांड्य यांनी मंदिरांना विशाल मंडप जोडण्याची प्रथा सुरू केली. त्या मंडपांचे स्तंभ खूपच नक्षीदार असतात. काही मंडपांना रथाचा आकार दिलेला आहे. चिदंबरम येथील देवालयातील नर्तन–सभामंडप व मदुरा येथील महामंडप अत्यंत प्रेक्षणीय आहेत. चिदंबरम येथील देवालयात द्राविड शिल्पशैलीची सर्व रूपे उत्तम स्वरूपात पाहायला मिळतात. इ. स. च्या १३ व्या शतकात पांड्य राजांनी त्या मंदिरांसाठी विपुल द्रव्य खर्चिले.

पदुकोट्टापासून ३२ मैलांवरील अवदैयर–कोविल येथील भव्य शिवमंदिर पांड्यशिल्पकामाचे उत्कृष्ट उदाहरण मानले जाते. ते इ. स. च्या १३ व्या शतकातले असून, त्यातील अखंड पाषाणाचे, विपुल नक्षीकाम केलेले अनेक स्तंभ उल्लेखनीय आहेत. तिन्नेवेल्ली येथील शिवमंदिरही पांड्य शैलीचे आहे. भव्यता हा पांड्यशिल्पाचा गुणविशेष होय. त्यातील मूर्तीदेखील खूप मोठ्या असतात आणि त्यांत सुबक सौंदर्यही आढळते. [त. सा. सं.; हि. क. इं. पी.; हिं. वि. को.; इं. आ. – गांगुली]

## पांढरीदेवी

एक ग्रामदेवता. महाराष्ट्र प्रदेशातील रत्नागिरी जिल्ह्याच्या अनेक गावांची व शेतांची ही प्रमुख देवता आहे. दर पौर्णिमेला हिला नारळ वाहतात. पेरणी व कापणी या वेळी हिला कोंबड्याच्या किंवा बकऱ्याचा बळी

देतात गुरव किंवा मराठी कुणबी हे या देवतेचे पुजारी असतात [ चि पावन, रत्ना गॅझे ]

**पांबन तुळ्ळल** केरळातील एक नागपूजाविधी नागदेवाला प्रसन्न ठेवल्यामुळे मुले होतात व त्यांना उदंड आयुरारोग्य प्राप्त होते, अशी केरळातील स्त्रियांची समजूत आहे त्यासाठी त्या पुढील विधान करतात – एखाद्या सुमुहूर्तावर पुल्लुवन नामक पुरोहिताला बोलावतात तो समारंभस्थळी येतो आणि रांगोळ्या घालून व पूजासाहित्य तयार करून घेऊन बसतो मग या विधानात भाग घेणाऱ्या नायर मुली सुस्नात होऊन एका रांगेने पुरोहितासमोर बसतात नंतर कोडम नामक वाद्याच्या साथीवर नागस्तोत्रे गायिली जातात या वेळी काही मुलींच्या अंगात नागदेवाचा संचार होऊन तो त्या मुलींच्या पैकी एकीच्या द्वारे अन्य मुलींना मनोरथ पूर्ण होण्याचा आशीर्वाद देतो पांबन तुळ्ळल या शब्दाचा अर्थ सर्पनृत्य असा आहे [ सो चे म ]

**पांसुकूलचीवर** धुळीने माखलेले वस्त्र असा या शब्दाचा अर्थ आहे उकिरड्यावरच्या धुळीने भरलेल्या चिंध्या गोळा करून आणि त्या स्वच्छ धुवून त्यांचे तयार केलेले वस्त्र भिक्षूने किंवा भिक्षुणीने वापरावे, अशी बुद्धाची पहिली आज्ञा होती तसे करणे हे अपरिग्रहतेचे लक्षण समजले जाई अशा प्रकारचे वस्त्र वापरण्याचे व्रत घेतलेल्या माणसाला पांसुकूलिक अशी संज्ञा होती [ पा वा त मि र ]

**पाईक** ओडिसातील एक जमात पाईक म्हणजे पादचारी होत हे एके काळी पायदळातील सैनिक होते हे स्वतःला राजपूत म्हणवतात राजपूत यांच्याशी बेटीव्यवहार करतात हरीण, कदंब, नागेश वगैरे त्यांची देवके आहेत हे लोक शूर व अचूक नेमबाज म्हणून प्रसिद्ध आहेत

काही गावात पहारेकरी, जासूद, निरोप्या अशी कामे हे लोक करतात चालस्वक्षी, छिनकरन, इ त्यांची उपनावे आहेत सगळ्या कुटुंबांना नाईक पुजारी, वैद्य, राउत अशा स मानार्थ पदव्या मिळाल्या आहेत

यांचे विवाह तरुणपणी होतात अशुभ वारी मुलगी ऋतुमती झाली तर अपशकून टाळण्यासाठी तिचा विवाह प्रथम झाडाशी करतात हातावर व बोटावर गोंदून घेण्याची प्रथा स्त्री व पुरुष दोघांतही आहे गोंदून घेतल्याने सर्पदंशाचा धोका राहत नाही, अशी त्यांची समजूत आहे सैन्यातील नोकरी बजावल्याबद्दल यांना राजे रजवाडे व जमीनदार यांच्याकडून जमिनी मिळाल्या आहेत [ वा ट्रा स इं , टा का से प्रॉ इं ]

**पाईक नृत्य** एक लोकनृत्य हे ओडिसातील, विशेषत कालहंडी जिल्ह्यातील, युद्धनृत्य आहे प्राचीन काळी ओडिसातील निरनिराळ्या स्वतंत्र राजांचे जे खडे सैन्य असे, त्यांना पाईक असे म्हणत राजे लोकांनी त्यांना फुकट जमिनी दिल्या होत्या हे वीर शेतकरी शेतात कष्ट केल्यानंतर मनोरंजनार्थ जे नृत्य करीत तेच हे पाईक नृत्य होय दसऱ्याच्या दिवशी राजाला मुजरा करायच्या वेळी ते लोक हे नृत्य करीत या पाईकांच्या वंशातले लोक अजूनही शकोटीभोवती जमून हे नृत्य करतात [ ए हो रा ]

**पाकभांडदान** एक दान स्वयंपाकाची भांडी दान देणे, असा याचा अर्थ आहे एका दांपत्याला पुरेल इतके अन्न शिजविण्यासाठी लागणारी भांडी आणि एक वेळ पुरेल इतके अन्न संक्रांतीच्या दिवशी दान देतात त्या वेळी मंत्र म्हणतात, तो असा –

> **ताम्रायसारकूटानि भांडानि विविधानि च ।**
> **नित्यतृप्तिसुखार्थाय पाकोपकरण ददे ।।**

फल – सुखप्राप्ती व नित्य तृप्ती [ व्रतराज ]

**पाकयज्ञ** ज्यात देवतोद्देशाने शिजविलेले अन्न दिले जाते, अशा यज्ञांना पाकयज्ञ म्हणतात पंचमहायज्ञांतला ब्रह्मयज्ञ सोडून इतर चार हे पाकयज्ञ होत, असे मनू सांगतो (२ ८६) अष्टका, पार्वण स्थालीपाक, श्राद्ध, श्रावणी, आग्रहायणी, चैत्री व आश्वयुजी हे सात पाकयज्ञ होत, असा दुसरा पर्याय धर्मशास्त्रात अन्यत्र सांगितलेला आहे गौतमाने या पाकयज्ञांचा संस्कारात अंतर्भाव केला आहे [ श क , हि ध ]

**पाकविद्या** विविध अन्नपदार्थ चवदार व खाण्यालायक करण्याचे जे शास्त्र, त्याला पाकशास्त्र म्हणता येईल पाक शब्दाची व्याख्या आढळते, ती अशी – ' स्थालीमार्जनाद्योदनपरीक्षान्तो व्यापारनिचय पाक ' = भांडी घासण्यापासून शिजविलेल्या अन्नाची परीक्षा करण्यापर्यंतचा जो क्रियासमूह त्याला पाक असे म्हणावे

पाकाचे पुढील प्रकार पाकराजेश्वर या ग्रंथात सांगितले आहेत –

> **भर्जन तलन स्वेद पचन क्वथन तथा ।**
> **तान्दूर पुटपाक च पाक सप्तविधो मत ।।**

अर्थ – तवा, घमेले, इ पात्रात घालून भाजणे, तेल – तुपात

तळणे, वाफेवर उकडणे, पाण्यात शिजवणे, शिजवलेल्या पदार्थांतला किंवा धान्यातला रस काढून घेऊन त्याचे कढण करणे, तोंड बंद करून भूमीत, मडक्यात किंवा भांडयात भाजणे (तंदूर) आणि खाली-वर कोळसे घालून किंवा अग्नी पेटवून पदार्थ शिजवणे, असा सात प्रकारचा पाक होतो.

पाकाच्या पात्राविषयी ब्रह्मवैवर्त पुराणात पुढील नियम सांगितला आहे –

**नित्यं नूतनभाण्डेन कर्तव्यः पाक एव च ।**
**अथवा पक्षपर्यन्तं ततस्त्याज्यं मनीषिभिः ।।**

अर्थ – नित्य नव्या भाडयांतूनच (अर्थात मातीच्या) स्वयंपाक करावा किंवा पंधरा दिवसांपर्यंत एक भांडे वापरून मग शहाण्यांनी त्याचा त्याग करावा.

सृष्टीतला आदिमानव हिंस्र पशूप्रमाणे मांस, मासे व कंदमुळे कच्च्या स्वरूपात खाऊन आपली उदरपूर्ती करीत होता. अग्नीचा शोध लागल्यानंतर व अग्नी टिकवून ठेवण्याची कला साध्य झाल्यावर तो आपले पदार्थ शिजवून किंवा भाजून खायला शिकला. शेती, भोजनात धान्याचा उपयोग आणि धान्यदिकांचे विविध पदार्थ बनवणे या गोष्टी संस्कृतीच्या उत्तरोत्तर प्रगतीच्या द्योतक आहेत. भाजण्या-शिजवण्याची क्रिया साध्य झाल्यानंतर त्याला भोजनातली चव समजू लागली. हळूहळू तो चोखंदळ बनला आणि विविध भोज्य पदार्थ विविध प्रकारे बनवून चवीने खाऊ लागला. पुढे त्याला कच्चे अन्न पचेनासे झाले. त्यामुळे त्याने अन्न शिजविण्याची कला अधिकाधिक प्रगत केली व पुढे त्यातूनच पाकशास्त्र निर्माण झाले.

अन्नात शाकान्न व मांसान्न असे दोन भेद पडतात. दोन्ही प्रकारचे पदार्थ बनवण्याच्या कृती वेगवेगळया आहेत. शाकाहारावर राहणे आणि मांसाहार शक्यतो टाळणे हा भारतीय भोजनपद्धतीचा आध्यात्मिक आदर्श आहे. भोजनात रसनेंद्रियाच्या लोलुपतेला स्थान नसावे आणि भोज्य पदार्थांतील पौष्टिकपणा व सकसपणा टिकवला जावा, अशी अन्नविषयक प्रवृत्ती एके काळी भारतात होती.

प्राचीन काळी जे भोज्य पदार्थ मनुष्य सेवन करीत होता, त्यांचे वर्गीकरण पुढीलप्रमाणे करता येते–

(१) वनस्पतिवर्गापासून प्राप्त – अन्न, फल, मूल, नाल, पत्र, पुष्प, शाक, तेल, गूळ, साखर व मसाले.

(२) प्राणिवर्गापासून प्राप्त – मांस, दूध, तूप, चरबी, अंडे व मध.

(३) भूगर्भ व पाणी यांच्यापासून प्राप्त – मीठ.

वरील वस्तूंपासून पुढील पाच प्रकारांचा आहार बनवितात – (१) भोज्य (२) भक्ष्य (३) चोष्य (४) लेह्य व (५) पेय.

भात, डाळ, शाकभाजी, इ. भोज्य पदार्थ होत. लाडू, मोदक इ. भक्ष्य पदार्थ होत. चोखून खाण्याचे पदार्थ हे चोष्य होत. चटणी, लोणचे इ. जिभेला लावण्याचे पदार्थ हे लेह्य होत. पिण्याचे पदार्थ हे पेय होत.

वरील पाच प्रकारच्या आहारातून मनुष्याने स्वाद व स्वास्थ्य या दोन्ही दृष्टींनी विचार करून पदार्थ सेवन करावे, असे सांगितले आहे. इंद्रियनिग्रह होण्यासाठी व मन ताब्यात राहण्यासाठी सत्त्व गुणांची वाढ करतील, असेच पदार्थ सेवन करावे, असे आयुर्वेदात सांगितले आहे. मनुष्य जसे अन्न खातो तसा त्याचा स्वभाव बनतो, ही भारतीय विचारवंतांची शाश्वत धारणा आहे. छांदोग्य उपनिषदात म्हटले आहे, की आहारशुद्धीमुळे सत्त्वशुद्धी होते, तिच्यामुळे ध्रुवस्मृती (धारणाशक्ती) लाभते आणि तिच्यामुळे मोक्ष मिळतो (७·२६·२). गीतेत सात्त्विक, राजस व तामस अशा त्रिविध आहारांचे वर्णन दिलेले असून, त्याचे परिणामही सांगितले आहेत. त्यांत सात्त्विक आहार हा बल, सत्त्व, आरोग्य, सुख आणि प्रीती यांची वृद्धी करतो, असे म्हटले आहे (१७·८–१०).

शतपथ ब्राह्मणात सतरा प्रकारच्या भोज्य पदार्थांची नावे दिलेली आहेत (५.२.२.३). गायीच्या दुधापासून दहा प्रकारचे भोज्य पदार्थ बनवीत असत, असेही शतपथात सांगितले आहे (८.४.४.७). भोजन स्वादिष्ट बनविण्यासाठी त्यात मीठ घालणे ही गोष्ट ऋग्वेदोत्तर कालापासून सुरू झाली असावी. पण प्राचीन काळी मीठ ही अत्यंत महाग वस्तू होती. छांदोग्य उपनिषदात मीठ हे सोन्यापेक्षाही दुर्लभ असल्याचे म्हटले आहे (४.१७.७). प्राचीन काळी प्राण्यांचे कच्चे मांस मनुष्य खात होता. पुढे त्याला खाण्यासाठी धान्यादी पदार्थ उपलब्ध झाले. तरी त्याने मांसाचा त्याग केला नाही. तो ते भाजून किंवा शिजवून आणि त्यात मीठ-मसाले घालून खाऊ लागला. सळईला खोचून मास विस्तवात भाजणे व ते दह्याबरोबर खाणे या गोष्टीचा उल्लेख जातकात येतो (ससजातक). जातकयुगात भात व मांस यांची गणना सर्वोच्च आहारात होत असे. बौद्ध साहित्यात क्षीरौदनाची (दुधात शिजवलेला भात) मोठी प्रशंसा मिळते. बुद्ध म्हणतो, की क्षीरौदनामुळे आनंद मिळतो, आयुष्य वाढते आणि कांती सतेज होते. बुद्धिसंवर्धन हा क्षीरौदनाचा विशेष गुण मानलेला आहे. त्याने कफ, वात आणि पित्त या तीन्ही दोषांचे शमन होते, पचनशक्ती वाढते आणि शरीर बलवान होते, असे आयुर्वेदात म्हटले आहे.

रामायणकाळ हे अन्नसमृद्धीचे युग होते. त्या काळी गोड पक्वान्नांचे सेवन विशेष प्रचारात होते. अतिथीला उच्च प्रतीचे

अन्न वाढणे हा सामाजिक शिष्टाचार मानला जात होता वसिष्ठ मुनीने विश्वामित्राचे आणि त्याच्या सैन्याचे श्रेष्ठ पक्वान्नांनी आतिथ्य केले, ऋष्यशृंगाला अंग देशातून अयोध्येत आणण्यासाठी वेश्यांनी नाना प्रकारची मिष्टान्ने आपल्याबरोबर नेली व रावणाने सीतेला वश करण्याच्या उद्देशाने उत्तम प्रकारच्या भक्ष्यभोज्य वस्तूंचे प्रलोभन दाखवले, अशी वर्णने रामायणात आढळतात आर्य, वानर आणि राक्षस या तीन जातींचे खान पानाचे प्रकार भिन्न होते, असेही रामायणावरून कळते वानर विशुद्ध शाकाहारी, आर्य मुख्यत्वे शाकाहारी व क्वचित मांसाहारी आणि राक्षस मुख्यत्वे मांसाहारी होते

तांदूळ, यव व गहू ही तत्कालीन तीन प्रमुख अन्नधान्ये होती याशिवाय मूग, चणे, कुळीथ व उडीद यांच्या डाळीही ते लोक भोजनात वापरीत कृसरान्न (खिचडी), पायस, मत्स्यान्न (मालपुवा), मोदक, हविष्यान्न (तुपात शिजवलेले पदार्थ), मठ्ठा, खवा, दूध, दही, ओली–सुकी मिठाई, रागषाडव (मध, साखर आणि विविध फळांचा रस एकत्र करून बनवले जाणारे स्वादिष्ट पेय), सूप (रसदार आमटी किंवा भाजी) या पदार्थांची नावे रामायणात आढळतात मांसपदार्थही अनेक प्रकारचे होते, असे कळते मासेही भोज्य पदार्थांत असत मासे पकडणे व विकणे हे व्यवहार दाश व कैवर्त लोक करीत ताजे मांस शिजवणे, तसेच त्यावर संस्कार करणे व ते सुकवून सुरक्षित ठेवणे या गोष्टीही लोकांना माहीत होत्या गुहाने भरताचे स्वागत करताना त्याला ताजे व सुके मांस दिले होते रामायणावरून रावणाच्या जेवणातील पदार्थांची सूची मिळते कच्चे मांस, भाजलेले मांस, दही व मीठ मिसळून तयार केलेले मांस, शिजवलेले मांस, विविध प्रकारचे तिखट मिठाचे पदार्थ व नाना प्रकारची आसवे हे पदार्थ रावणाच्या भोजनात असत

महाभारतकाळात निरामिष भोजनात वडे, विविध प्रकारच्या भाज्या, मिठाया, रसायोग, दूध, खीर, खिचडी, जीवतीची भाजी, डुकर व हरीण यांचे मांस, दहीमिश्रित भात, खीर, मालपुवे मोदक, द्राक्षमिश्रित पदार्थ, इ वस्तू भोज्य सामग्रीत महत्त्वाच्या गणल्या जात

स्वयंपाकघरात जी भांडी आवश्यक असत, त्यांची नावे पुढीलप्रमाणे आढळतात –

अरणी (अग्नी उत्पन्न करण्याचे लाकूड), उखळ, मुसळ दही घुसळण्याचा डेरा, रवी–दोरी, कलश दुग्धदोहनपात्र, सुरई, लाकडाची दुढी, द्रोणी, ताट थाळी, पात्री (अन्न साठवण्याचे मोठे भांडे), पेला, कटोरी, फळमुळे ठेवण्यासाठी वेळूची पेटारी, कढई, पेय पदार्थ साठविण्याची भांडी, लोखंडी पटी आणि शिजवण्यासाठी लोखंडी किंवा तांब्याची भांडी

**पाकपदार्थ** – प्राचीन काळी विशेष प्रचारात असलेले आणि लोकांच्या आवडीचे असे काही पाकपदार्थ पुढीलप्रमाणे –

अपूप – हा एक प्रकारचा वडा असून, तो ऋग्वेदकाळा पासून प्रसिद्ध आहे घृतवत अपूपाचा उल्लेख ऋग्वेदात आढळतो (१० ४५ ९) हे भारताचे सर्वप्राचीन असे मिष्टान्न होय अपूपाचे दोन प्रकार काशिका या व्याकरणग्रंथात दिलेले आहेत– (१) भ्राष्ट्र (२) कालश किंवा कौंभ कणिक भिजवून व त्याची गोळी बनवून ती भट्टीत भाजून घेत, त्याला भ्राष्ट्र म्हणत याचे अलिकडील नाव खारिया असे आहे चण्याच्या डाळीत मसाला घालून ते मिश्रण कणकेच्या गोळ्यात भरीत मग लहान किंवा मोठ्या कलशात थोडे पाणी घालून व त्यात सरकंड्याचे (एक प्रकारचे कुश तृण) तुकडे घालून पाण्याच्या वर येतील असे ते ठेवीत मग त्यावर चूर्ण भरलेले कणकेचे गोळे ठेवून कलशाखाली विस्तव करीत कलशातील पाण्याच्या निघणाऱ्या वाफेवर हे गोळे शिजून येत याना कालश किंवा कौंभ अपूप म्हणत याशिवाय आणखीही अपूपाचे काही प्रकार होते लग्नकार्यात व सणावारी अपूप बनवण्याची प्रथा होती अभ्यूप नावाचाही एक प्रकार पाणिनीने अपूपादी गणात उल्लेखिलेला आहे हे अभ्यूप गूळ घालून केलेले असत

कुल्माष – गव्हाची कणिक किंवा ज्वारी बाजरीचे पीठ पाण्यात वाफारून घेत व त्यात तेल किंवा तूप आणि गूळ घालून त्याचे लाडू बनवीत या लाडवानाच कुल्माष असे म्हणत हे गोरगरिबांचे अन्न होते छांदोग्य उपनिषदात कुल्माषाचा उल्लेख आलेला आहे कुरुक्षेत्रातल्या एका गावात शेतीचे पीक हाती न आल्यामुळे तियले लोक कुल्माष खाऊन गुजारा करीत होते, असे तिथे म्हटले आहे (१ १० २)

चूर्ण – तुपात कणिक भाजून तिच्यात साखर मिसळून हे बनवीत हे स्वतंत्रपणे खात किंवा कणकेच्या गोळ्यात भरून त्याचे अपूप बनवीत पाणिनीने चूर्णी अपूपाचा उल्लेख केला आहे

ओदन – भाताला ही संज्ञा होती लोकांचे हे प्रिय भोजन होते नेहमीचा भात शुद्ध पाण्यात शिजवीत व त्याला उदौदन म्हणत याशिवाय निरनिराळ्या पदार्थांबरोबर तांदूळ शिजवून त्यांचे क्षीरौदन, दध्योदन, मुद्गौदन, तिलौदन, घृतौदन असे भाताचे प्रकार करीत त्यांना पचौदन अशी संज्ञा होती

मंथ – भाजलेल्या सातूत दूध मिळवून बनविलेल्या पदार्थाला हे नाव होते सातूचे पीठ वड्यात मिसळल्याने त्विसातू बनत असे सुश्रुताने मंथ कसा बनवावा ते पुढीलप्रमाणे सांगितले आहे – सातूच्या पिठात थोडे तूप घालून त्यात थंड पाणी ओतावे आणि ते मिश्रण रवीने घुसळावे मंथ फार पातळ किंवा घट्ट

असू नये. चरकाने या मंथाला तृप्तिप्रद म्हणून गौरविले आहे.

यवागू – ही एक प्रकारची लापशी होती. पाणिनीच्या कालात यवागू हे आम जनतेचे प्रिय भोजन होते, असे दिसते. साल्व जनपदातल्या लोकांना यवागू विशेष आवडत असे, असे पाणिनीने म्हटले आहे. आजही राबडी या नावाने यवागू खाण्याचा रिवाज साल्व देशात (पंजाब) आहे. लापशी ऊन ऊन असताना खात, तिला उष्णिका यवागू असे म्हटले आहे.

यावक – यव उखळात कुटून त्यांचे पीठ करीत व मग त्यात दूध साखर घालून ते खात.

पिष्टक – सातूचे पीठ पाण्यात घालून त्यात थोडे मीठ टाकीत आणि उकळी आल्यावर तो पदार्थ खाली उतरीत. आजही पीठा या नावाने हा पदार्थ उत्तरेत रूढ आहे.

संयाव – दूध, गूळ आणि कणिक ही एकत्र करून बनवलेल्या पदार्थाला हे नाव होते. सांप्रत उत्तरेत याला हलुआ असे म्हणतात. सुश्रुताने याला मधुरभोजन म्हटलेले आहे.

पायस – हे एक मधुर व पुष्टिप्रद पक्वान्न होय. यालाच दूधपाक असे म्हणतात. महाराष्ट्रात तो खीर या नावाने प्रसिद्ध आहे. दुधात तांदूळ शिजवून आणि त्यात साखर घालून हा पदार्थ तयार करतात. पुत्रकामेष्टीच्या प्रसंगी अग्नीने प्रसन्न होऊन दशरथाला पायसच दिला होता. प्राचीन काळी पायसात पुष्कळ तूप घालून तो खाण्याची प्रथा होती. पायस हा सूर्याचा नैवेद्य म्हणूनही प्रसिद्ध आहे.

प्रलेह – हे कढीचे नाव आहे. प्राचीन काळी उकळत्या ताकात सुरण किंवा इतर भाजीपाला घालून प्रलेह तयार करीत. तो भुरके मारून खाण्याची प्रथा होती.

करंभ – तांदळाचे पीठ, दही व साखर एकत्र करून हा पदार्थ तयार करीत.

क्षीरवट – उडदाच्या पिठाच्या वड्यांना हे नाव होते. या पिठाचे वडे करून ते दह्यात किंवा दुधात बुडवून ठेवीत. भोजनाच्या शेवटी ते खाण्याची प्रथा होती. आजही दक्षिणेत दहीवडा खूप प्रचारात आहे.

लड्डुक – हे पक्वान्न भारतभर लोकप्रिय आहे. संस्कृतात लाडवांना मोदक म्हटलेले आहे. मोदक याचा अर्थ खाताना आनंद देणारा असा होतो. निरनिराळ्या धान्यांची पिठे व तूप गूळ, इ. पदार्थ एकत्र करून विविध प्रकारचे लड्डुक बनवले जात. लड्डुक हे गणपतीचे प्रिय पक्वान्न होय.

यूष – कढण किंवा सूप या जातीचा हा पदार्थ होता. ज्या वस्तूचा यूष बनवायचा असेल ती वस्तू प्रथम थोडी भाजून घेत. मग तिच्यात अठरापट पाणी घालून ती शिजवीत. अर्धे पाणी आटल्यावर खाली उतरीत. यूष जसा गोड तसाच तिखटमिठाचाही बनवीत. त्या यूषात डाळिंबाचे दाणे घालीत. कधी कधी मांसरसही अशा प्रकारे तयार करीत.

शष्कुली – करंजी किंवा कचोरी हिला हे नाव होते. शष्कुलीत मधुर पदार्थाचे चूर्ण भरीत.

रागषाडव – कच्चा आंबा भाजून त्यात तेल, साखर, सुंठ, इ. वस्तू घालून हा करीत किंवा कच्च्या आंब्याचे तुकडे भाजून व ते साखरेच्या पाकात घालून हा बनवीत. मग त्यात मिरची, वेलची, इ. पदार्थ घालून त्या रसायनाला सुवासित करीत. हे एक प्रकारचे रायतेच होय.

शाकपदार्थ – शाकभाज्या बनवताना वेली, पाने, देठ, अंकुर व फळे यांचा उपयोग करीत. शाकाहारात शाकभाज्यांना विशेष महत्त्व देत. शाकभाज्यांच्या सदरात मोडणाऱ्या काही वस्तू जेवताना कच्च्या खाण्याची किंवा त्यांचे कढण बनवण्याची प्रथा होती.

स्वयंपाकात तिळाचे तेल हे सर्वोत्कृष्ट मानीत. तिळाचे तेल हे आरोग्यप्रद आणि रोगनाशक समजले जाई. पंचविध प्रकारांपैकी भोज्य पदार्थांत ते गोड करायचे असतील, तेव्हा मध, तीळ, दूध व साखर घालीत आणि ते खारे करायचे असता सुंठ, पिंपळी, मिरची, मीठ, जिरे, मेथी, ओवा, धने, इ. मसाल्याचे पदार्थ टाकीत.

स्वयंपाक करणाऱ्या आचाऱ्याला सूद किंवा सूपकार म्हणत. *राजांच्या राजवाड्यात संस्कारकुशल अर्थात पाककर्मनिपुण* असे सूपकार असत. प्राचीन काळी राजकुमारांनाही पाककला शिकवली जात असे. नळ, भीम व लक्ष्मण हे रामायण–महाभारतातले निष्णात पाकविशारद होत. राजवाड्यातले स्वयंपाकी भोजनपदार्थ वाढताना चांगला पोशाख करीत. दशरथाच्या अश्वमेधात ब्राह्मणांना वाढणारे स्वयंपाकी सुवेष व अलंकृत होते आणि त्यांच्या हाताखाली काम करणारे खटपटचे मणिकुंडलधारी होते, असे सांगितले आहे.

पंडित रघुनाथसूरी याने 'भोजनकुतूहल' नावाचा एक ग्रंथ लिहिलेला असून, तो उज्जयिनीच्या प्राच्य ग्रंथसंग्रहात आहे. अजून तो प्रकाशित झालेला नाही. ग्रंथाचा काळ इ. स. च्या अठराव्या शतकाचा पूर्वार्ध हा आहे. हा ग्रंथ लिहिताना रघुनाथसूरीने धर्मशास्त्र व वैद्यकशास्त्र यातले एकंदर १०१ ग्रंथ उपयोगात आणले असल्याचे कळते. वरील शास्त्रातल्या ग्रंथांतले उतारे एकामागून एक व्यवस्थित देऊन, क्वचित ठिकाणी स्वतःचे मत सांगून त्याने प्रस्तुत ग्रंथ तयार केला आहे. यावरून प्रस्तुत ग्रंथाला स्वतंत्र ग्रंथ म्हणता येत नसले, तरी पाकशास्त्रविषयक माहिती एकत्र करणारा या दृष्टीने त्याचे महत्त्व पुष्कळ आहे.
[प्रा. भा. सा. सां. भू.; सु. वि. को.; रा. का. स.; पा. का. भा.]

**पाकाटी वेशम** एक जमात. हे लोक आंध्र प्रदेशात आढळतात. ही एक भटकी जमात आहे. नटनाट्य व गाणबजावणे हा त्यांचा पिढिजात व्यवसाय आहे. आपले सगळे कुटुंब बरोबर घेऊन हे लोक गावोगाव हिंडतात आणि लोकांना उघड्या जागी काही नाट्यप्रसंग करून दाखवतात. आपल्या नाट्याची आख्याने ते रामायण–महाभारतादी ग्रंथांवरून घेतात. त्यांच्या अंगी अभिनयकौशल्य स्वभावसिद्ध असते. त्यांच्या नाट्यातले संवादही खुसखुशीत असतात. त्यात स्त्रियांच्या भूमिका पुरुषच करतात. आंध्र प्रदेशात कलाकार म्हणून त्यांची विशेष प्रसिद्धी आहे.

**पाखंडी** वेदविरोधी व नास्तिक या अर्थी वापरला जाणारा शब्द. त्याची व्युत्पत्ती सांगताना त्या शब्दाचे पा + खंड असे दोन विभाग केले आहेत. पा = त्रयी धर्म (ऋग्यजुःसामप्रणीत) + खंड = त्याचे खंडन करणारा. सामान्यपणे वैदिक धर्म न मानणाऱ्या व त्या धर्मविरुद्ध प्रचार करणाऱ्यांना पाखंडी म्हणतात. त्यांना नग्न असेही म्हटले आहे. ज्यांना वेदांचे आवरण नाही, ते नग्न होत, असे पराशर ऋषीने मैत्रेयीला सांगितल्याचा उल्लेख विष्णु पुराणात आहे. तिथलीच दुसरी कथा अशी–

देवासुरांचे युद्ध झाले व त्यात देवांचा पराभव झाला. मग विष्णूने मायामोह अवतार धारण करून रक्तवस्त्र परिधान केले व असुरांना मोह उत्पन्न करून त्यांनी यज्ञविमुख व्हावे म्हणून अहिंसाव्रताचा उपदेश केला. त्या तत्त्वज्ञानाने असुर भुलले व ते वेदविरोधक बनले. त्यानाच पुढे नग्न अशी संज्ञा प्राप्त झाली. जैन मुनी हे नग्न संचरत व ते यज्ञविरोधी प्रचार करीत, त्यावरून सगळ्याच पाखंड्यांना नग्न हे नाव दिले गेलेले असावे.

चार्वाक, अजित केशकंबल, गौतम, पूर्ण काश्यप, वर्धमान महावीर, मखली गोशाल, यांना वैदिकांनी पाखंडी म्हटले आहे. शिवव्रतधर ब्राह्मण ते सगळे पाखंडी होवोत, असा भृगूने शाप दिल्यामुळे कापालिक, भैरव, पाशुपत, लकुलीश, इ. शैव पंथ पाखंडी गणले गेले. वैष्णवांनीही हिंसाप्रधान यज्ञपद्धतीचा त्याग केल्याने पांचरात्र, सात्वत, इ. प्राचीन वैष्णव पंथांनाही पाखंडी म्हटले आहे.

पाखंडी लोक सद्‌गुणांना पारखे, समाचारपराङ्मुख व वेदप्रामाण्य न मानणारे असल्यामुळे ते समाजाचा बुद्धिभेद करून सामाजिक बेदिली व अव्यवस्था निर्माण करतात, असे पुराणांचेही मत आहे. म्हणून पाखंडी लोकांना स्पर्श करू नये, त्यांच्याशी संभाषण करू नये, धर्मकृत्यांच्या प्रसंगी त्यांचे दर्शन झाल्यास सूर्यदर्शन करावे, तसेच अंत्यसंस्कारातही त्यांची उपस्थिती पापकारक मानावी, असे पुराणे आणि स्मृतिशास्त्रे यांचे सांगणे आहे. [न. क., पु. इ., ॲ. गा. ओ. रि. इ.]

**पागी** एक जात. कारवार जिल्ह्यात काळी नदीच्या काठी या लोकांची वस्ती आहे. ती अल्पसंख्य जात आहे. कोकणी भाषेत मासे धरण्याच्या क्रियेला पागण म्हणतात. त्यावरून त्यांचे नाव पागी किंवा पागे पडले. हे गोव्याकडून आलेले लोक असून, मच्छीमारी हाच त्यांचा पिढीजाद धंदा आहे. अलिकडे ते शेती, फेरी बोट चालविणे व मोलमजुरी हे व्यवसायही करतात. गोव्यातील मल्लिकार्जुन, पुरुषदेशा आणि महामाई ही यांची कुलदैवते आहेत. कद्रा या गावी त्यांच्या महामायी देवीचे मंदिर आहे. दरवर्षी ते तिच्या यात्रेला जातात. प्रसंगी देवाला कोंबडी, बकरी यांचा बळी देतात. कर्नाटकी ब्राह्मण यांचे पौरोहित्य करतात.

**पागोटा** महाराष्ट्रातल्या लहान मुलींचा एक खेळ. यात दोन मुली समोरासमोर दहा–बारा हातांच्या अंतरावर उभ्या राहतात. नंतर उजव्या हातावरून डावा हात, डाव्या हातावरून उजवा हात, उजव्या पायावरून डावा पाय व डाव्या पायावरून उजवा पाय असे क्रमाक्रमाने नाचवीत नाचवीत दोघीही एकमेकींच्या जागेवर जातात. नंतर त्याच पद्धतीने परत आपल्या जागी येतात. या वेळी त्या खालील गाणे म्हणतात–

> **पागोटा घाली झिंगोटा ।**
> **सिता बोलावते । पाळणा हलवते ।**
> **मथुरेच्या बागेत । जाईन म्हणते ।**
> **लाल साडी । आणीन म्हणते ।**

मंगळागौर, हरतालिका, इ. प्रसंगी हा खेळ खेळतात. [व्या. ज्ञा. को., सु. वि. को.]

**पागोटे** एक शिरोवेष्टन. एक लांबलचक असे वस्त्र डोक्याला गुंडाळतात, त्याला पागोटे म्हणतात. त्यालाच फटका, फेटा, रुमाल, साफा, कोशा, मंदिल, मुंडासे, इ. अन्य नावे आहेत. प्राचीन काळी अशा प्रकारच्या शिरोवेष्टनाला उष्णीष हे नाव होते (उष्णीष पाहा). पूर्वी पुरुषांप्रमाणेच स्त्रियाही असले शिरोवेष्टन वापरीत. भरहुत, भाज, बोधगया, सारनाथ, सांची, मथुरा, इ. ठिकाणी जी शिल्पे सापडली आहेत, त्यांत स्त्रीमूर्तींच्या मस्तकावर अशी शिरोवेष्टने दिसतात. इ. स. च्या ८ व्या शतकानंतरच्या शिल्पांत मात्र स्त्रियांचे

शिरोवेष्टन आढळत नाही. त्याचा वापर बंद झाला असावा.

कालांतराने भारतीय पुरुषांच्या शिरोवेष्टनाचे दोन प्रकार झाले — (१) पागोटे म्हणजे प्रत्येक वेळी मस्तकाला गुंडाळून बांधायचे वस्त्र व (२) पगडी म्हणजे विशिष्ट आकाराचे बांधून ठेवलेले पागोटे. (पगडी पाहा)

सांप्रत निरनिराळ्या जातीचे व पेशांचे पुरुष वेगवेगळ्या प्रकारचे पागोटे बांधतात व त्यांना भिन्न भिन्न नावे देतात. मस्तकाभोवती वस्त्र नुसते गोलाकार गुंडाळले असता त्याला पागोटे म्हणतात. काही लोकांची पागोटी खूप उंच व फुगीर असतात, तर काहींची घट्ट बांधलेली व बसकी असतात. त्यांच्या रूपातही प्रदेशपरत्वे फरक असतो. ब्राह्मणी पद्धतीच्या गोल पागोट्यांतही व्यक्तिपरत्वे अनेक रूपे दृष्टीस पडतात. मराठे लोकांच्या घट्ट बांधलेल्या पागोट्याला मुंडासे म्हणतात. संत तुकारामाचे पागोटे व बिहारमधील मैथिली ब्राह्मणांचे पागोटे यांत पुष्कळ साम्य आढळते.

पागोट्याचा पृष्ठभाग एका बाजूला उंच व दुसऱ्या बाजूला उतरता असला, की त्याला पटका म्हणतात. त्याच्या दोन्ही बाजू उंच व मधला भाग खोलगट असला, तर त्याला फेटा म्हणतात. एक बाजू कानापर्यंत खाली गेली असली, तर त्याला साफा म्हणतात. सरदार व संस्थानिक यांनी आपापल्या फेट्यांना विविध आकार व रूपे देऊन त्यांचे अनेक प्रकार निर्माण केले आणि त्यांना कोशा, मंदिल अशी नावे दिली. ही विविध रूपे



(१, २ व ३) उष्णीष, (४) पंजाबी फेटा, (५) मारवाडी पागोटे



(१) रुमाल, (२) शिखांचा फेटा, (३) जोधपुरी पटका, (४) सिरमुरी साफा, (५) भावनगरी कोशा



(१) तुकारामाचे पागोटे, (२ व ३) ब्राह्मणी पागोटे, (४) ब्राह्मणी रुमाल, (५) मराठी कोशा

प्राचीन शिल्पकृतीत दृष्टीस पडतात कुबेर व यक्ष याच्या मस्तकावर अशी शिरोवेष्टने आढळतात राजस्थानी फेटा पगडी ते बारा हात लाब व एक हात रुद असतो महाराष्ट्रातील फेटा त्या मानाने लहान असतो फेट्याच्या वस्त्राचे एक टोक मध्य भागी खोवून टाकलेले असते किंवा त्याचा तुरा केलेला असतो व दुसरे टोक पाठीवर सोडलेले असते राजपुतासारखे लढवय्ये लोक असा फेटा वापरीत असल्यामुळे, तो लष्करी गणवेषाचा एक घटकच ठरला होता पहिला बाजीराव स्वारीवर जाताना असा फेटा बाधीत असे पटक्याच्या मागे अशी मोठी परपरा असल्यामुळे, ता प्रतिष्ठेचे एक प्रतीक ठरला आहे

रुमाल म्हणजे बारा हात लाबी रुंदीचा कपडा घेऊन तो त्याच्या एका कर्णाभोवती गडाळून बनवलेले पागोटे होय ता डोक्याभोवती बाधल्यानतर त्याचे कोणतेही टोक मोकळे राहत नाही रुमाल व्यवस्थित बाधला असता, त्याला मागे, पुढे व बाजूना टोके आलेली दिसतात द भारतात अशा प्रकारचा रुमाल प्रचलित आहे तो आकाराने बराच मोठा असतो तमिळ भाषेत त्याला उरुमाली असे नाव आहे यावरूनच रुमाल हा शब्द आला असावा शिखाचा फेटाही रुमालाप्रमाणच विशिष्ट पद्धतीने बाधलेला असून, तो मागे व पुढे निमुळता झालेला असतो मात्र ते त्यासाठी बहुधा रगीत वस्त्र वापरतात

सामान्य लोक सर्वसाधारणपणे पाढरे पागोटे किंवा रुमाल वापरतात सणा समारभाच्या वेळी मात्र ते निरनिराळ्या रगाचे व जरीचे रुमाल बाधतात श्रीमताचे फेटे बहुधा रेशमी व जरतारी असतात त्याच्या रचनेत प्रतिष्ठेप्रमाणेच रुबाबही दिसून येतो कुस्तिगीर शाहीर, इ पुरुषाचे पटके तितके उची नसले, तरी रुबाबदार व मोठे असतात त्याने तुरे-शमलेही सुदर दिसतात एका बाजूला कललेला त्याचा पटका अधिक शोभिवत दिसतो पूर्वी असा कलता पटका बाधणे दोषास्पद मानले जात नसे, पण कालातराने ते रगेलपणाचे चिन्ह ठरले मथुरेजवळ सनपूर्व दुसऱ्या शतकातली बलरामाची मूर्ती सापडली असून, तिचे शिरोवेष्टन राजपुताच्या साफ्यासारखे उजव्या कानावर आलेले आहे [ इ का ]

## पाच

एक शुभसूचक अक धार्मिक व मागलिक कृत्यात कित्येक गोष्टी पाच या सख्येने कराव्या, असे सागितले आहे उदा० पचायतनातल्या पाच देवता, पुण्याहवाचनातल पचपल्लव, पचरत्ने, पचधान्य, पूजेतले पचामृत, शुद्धीसाठी पचगव्य, नैवेद्यासाठी पचपक्वान्ने, पचमहायज्ञ इत्यादी यज्ञ व पुरश्चरण याचीही पाच अगे मानलेली आहेत

लोकसस्कृतीत नागरणीचे पहिले पाच तास फार महत्त्वाचे असतात हे पाच तास न थाबता पूर्ण करावे लागतात स्त्रीला सतती व्हावी या हेतूने तिच्या ओटीभरणात पाच प्रकारची फळे घालतात

दर्शनात व इतर शास्त्रातही पचकल्पना रूढ आहे अभ्यास, अनुगान, अभिनय, उपासना व औषध याची प्रत्येकी पाच अगे मानली आहेत अहकार आणि आनद याचे पाच प्रकार आहेत प्रात स्मरणीय अशा अहल्या, द्रौपदी, इ स्त्रियाची सख्या पाचच आहे महानुभाव सप्रदायाचे लोक पचकृष्ण मानतात शाक्त सप्रदायी पचमकाराचे सेवन करतात महापातकाची सख्याही पाचच मानली आहे सद्योजात, वामदेव, अघोर, तत्पुरुष व ईशान अशी शिवाची पाच रूपे व पाच मुखे आहेत छत्र, चामर, सिहासन, मुकुट व राजदड ही पाच राजचिन्हे होत मुद्रा, ऊर्ध्वपुंड्र, नाम, मत्र व याग हे वैष्णवाचे पाच सस्कार आहेत दीप, कमल, वस्त्र आम्रफल व सुपारी ही एकत्र घेऊन ओवाळणे याला पचारती म्हणतात ज्योतिषशास्त्रात राज, अग्नी, रोग, चोर व मृत्यू अशी पाच पचके मानलेली आहेत मत्र, स्पर्श, भाव, अभाव, महा, तसेच क्रिया, भक्ती, हठ, ज्ञान व राज असे पाच प्रकारचे योग मानले आहेत अशा अन्य कितीतरी पचात्मक गोष्टी सागता येतील मानवी शरीरात अतर्बाह्य इद्रिये प्रत्येकी पाच असतात हाताला व पायाला बोटेही पाच पाच असतात त्यावरून पाच या अकाला एवढे महत्त्व आले असावे [ की पा , लो सा रू ]

## पाचकळशी

एक जात हे लोक सोमवशी क्षत्रिय पाठारे कुलापैकी आहेत याची वस्ती मुख्यत्वे ठाणे जिल्ह्यात व मुबई शहरात आहे याच्या लग्नसमारभात व वरातीच्या वेळी सिहासनासारख्या बोहल्यावर गभारा पाच कलश ठेवलेले असतात, म्हणून याना पाचकळशी असे नाव मिळाले आहे श्री ग गो नाईक याच्या मते पाचकळशी हा क्षत्रियत्वाचा बहुमानदर्शक असा हुद्दा आहे व बिबाच्या काळी तो काही लोकाना मिळाला होता इ स च्या तेराव्या शत कात पैठण नगराहून राजा बिब किंवा भीम मुबईला आला, तेव्हा हे लोक त्याच्याबरोबर आले बिबाच्या सैन्यात हे लोक शिपाई होते सांप्रत ते शेतीवाडी, सुतारकाम, शिवणकाम, कारकुनी, इ व्यवसाय करतात

याच्यात सोमवशी क्षत्रिय पाठारे पाचकळशी, साष्टीकर अष्टागरस्थ पाचकळशी, मळेकर पाचकळशी, साष्टीकर वसई-कर चौकळशी, अष्टागरस्थ चौकळशी व वाडवळ असे सहा भेद आहेत

या लोकात पचायत आहे ग्रामसभा ही सर्वांत खालची

असून, महासभा ही सर्वांत उच्च सभा आहे. अष्टागर प्रांतात चेऊल येथे त्यांची महासभा आहे. या लोकांत पद्माक्ष, भद्राक्ष, विश्वामित्र, बकदालभ्य, कश्यप, कण्व, वसिष्ठ, गौतम, इ. गोत्रे आहेत.

**विवाहप्रथा** – मामेबहिणीशी लग्न होते. पत्रिका पाहून लग्न ठरवतात. हुंडा घेण्याची प्रथा नाही. पण वधूपित्याकडून सोन्या-मोत्याचे दागिने घेतात. लग्नात अंतरपाट धरल्यावर वधूवरांच्या शेजारी नंग्या तलवारी अथवा सुरे घेऊन काही लोक उभे राहतात. त्याचबरोबर आठ सुवासिनींही वधू–वरांच्या शेजारी उभ्या राहतात. त्या लग्नाच्या साक्षी समजल्या जातात.

यांच्यांत विधवाविवाहाला मान्यता आहे. असा विवाह रात्री नवानंतर आंब्याच्या झाडाखाली एका तासात उरकतात. विधवेला पुन्हा विवाह करायचा असेल, तेव्हा ती मृत पतीच्या घरचे सर्व दागदागिने व जडजवाहीर त्या कुटुंबियांच्या प्रतिनिधी-जवळ परत करून तिकडचे सर्व संबंध तोडून टाकते.

**देवधर्म** – हे लोक शिव, विष्णू, दत्तात्रेय, गणपती आणि विठोबा या देवांना भजतात. महालक्ष्मी, एकवीरा, वज्रेश्वरी, जोगेश्वरी या त्यांच्या कुलस्वामिनी होत. हे लोक विशेष प्रसंगी खंडोबाला कोंबडे, बकरे अर्पण करतात. यांच्या सर्व धार्मिक कृत्यांचे पौरोहित्य पळशीकर ब्राह्मण करतात.

**मतिकप्रथा** – हे लोक प्रेते जाळतात. महारोगी किंवा देवीने मेलेले यांना पुरतात. मृतासाठी पिंडदान करतात. एखाद्या स्त्रीला अहेव मरण आल्यास तिला पिवळ्या रंगाचे लुगडे नेसवतात, तिची खणानारळाने ओटी भरतात, तिला फुलांनी सजवतात व सर्व नातेवाईक तिला वंदन करतात. मृतदेह बांबूच्या ताटी-वर ठेवतात आणि भोवताली नारळाची पाने गुंडाळतात. और्ध्व-देहिकानंतर ब्राह्मणांना दाने देतात. चौदाव्या दिवशी मृताच्या सन्मानार्थ ज्ञातिभोजन घालतात. एखाद्याचा मृत्यू अपघाताने झाला असेल तर नारायणबली नावाचा विधी करतात. [म. ज्ञा. को.; ट्रा. का. बॉं.; पाठारे क्षत्रिय जातीचा इतिहास, खंड पहिला – श्री. ग. गो. नाईक, १९६० ]

## पाचरगिरी

जैनांचे एक पवित्रस्थान. हे स्थान गया जिल्ह्यातील औरंगाबाद पोटविभागाच्या पूर्वहद्दीजवळ असलेल्या रफीगंजपासून सुमारे दोन मैलांवर आहे. इथे एक टेकडी असून, तिच्या दक्षिणेला मध्यभागी एक गुहा आहे. या गुहेचे तोंड लहानशी वाट ठेवून बाकीचे बंद केलेले आहे. या गुहेत पार्श्वनाथाची एक मोठी मूर्ती असून, तिच्या भोवती इतर लहान लहान मूर्ती आहेत.

या टेकडीनजीकच चेओन नावाच्या गावात एक हिंदू देवालय आहे. त्या देवालयाची बरीच पडझड झाली आहे. हे देवालय ग्रॅनाईटच्या दगडांनी चुन्याचा वापर न करता बांधलेले आहे. [ गया गॅझे. ]

## पाचलीभैरव

शिवमार्गी नेवार जातीची एक देवता. लिंग हे या देवतेचे प्रतीक आहे. यावरून ही देवता म्हणजे शिवाचेच एक रूप असावे, असे वाटते. परंतु नेवार लोक मात्र याला वीरभद्राचे रूप मानतात. हा काठमांडूच्या दक्षिणेकडील खोऱ्याचा राजा आहे, अशी त्यांची समजूत आहे. याला मांसाचा नैवेद्य हवा असला, तरी रक्ताचे मात्र वावडे आहे. त्यामुळे बळी द्यायचा प्राणी अशा कौशल्याने कापावा लागतो, की देवाला रक्ताचा स्पर्श होऊ नये. इतर नेवारांपेक्षा ज्यापू, मातंधर व कसाई नेवार या देवाला विशेष भजतात. [ दि नेवार्स – श्री. गोपालसिंह नेपाळी, १९६५ ]

## पाचवीपूजा

काही लोक प्रसूतीच्या पाचव्या दिवशी षष्ठी देवीची पूजा करतात आणि तिलाच पाचवी पूजा असे म्हणतात. पाहा – षष्ठीपूजा.

## पाचू

हरित वर्णाचे एक महारत्न. याला पाच, गरुडपाच व मरकत अशीही नावे आहेत. या रत्नाच्या उत्पत्ती-संबंधी ठक्कर फेरूने एक आख्यायिका दिली आहे, ती अशी–

एके दिवशी बली नावाचा असुर इंद्रलोक जिकण्यासाठी गेला. तिथे देवतांनी त्याला यज्ञपशू बनविण्याविषयी प्रार्थना केली आणि त्याने ती मानली. पुढे त्या यज्ञपशूच्या हाडांपासून हिरे, दातांपासून मोती व पित्तापासून पाचूची उत्पत्ती झाली.

गरुडाने हे पित्त पृथ्वीवर टाकले आणि ते बर्बरालय वगळून वाळवंटाच्या नजीक आणि समुद्रकिनाऱ्याजवळ असलेल्या एका पर्वतावर पडले व त्याचे पाचूत रूपांतर झाले, असे बुद्धभट्टाने सांगितले आहे. अगस्तीय रत्नपरीक्षेत तुरुष्क देश व मगध या दोनच ठिकाणी पाचूच्या खाणी असल्याचा निर्देश आहे. अवलिंद, मलयाचल, बर्बरदेश व समुद्रतीर या ठिकाणी पाचू सापडतात, असे ठक्कर फेरूने सांगितले आहे.

सांप्रत पाचूच्या खाणी कोलंबिया, ब्राझिल, पेरू, उल व अलताई पर्वत, सैबेरिया, ब्रह्मदेश आणि भारतातील मद्रास राज्य, खंबायत आणि अजमीर या ठिकाणी आहेत. पाचूचे समपार्श्व व षट्कोनी आकाराचे खडे खाणीत सापडतात. नंतर त्यांना अनेक कृत्रिम आकार देऊन त्यांचे मूल्य वाढवतात.

गरुडोद्गार, कीडउठी, बासवती, मूगउनी व धूलिमराई अशा पाचूच्या पाच जाती मानलेल्या आहेत.

उत्तम पाचू सतेज गवतासारख्या हिरव्या रगाचा असतो या हिरव्या रगात सानरी सतेज झाक असल्यास त्याची उत्तमात गणना करतात पाचूचे तेज अत्यत कोमल असल्यामुळे त्याला फार तकाकी असते एकाच रगाचा व पाणीदार पाचू तळहाता-वर ठेवून सूक्ष्म नजरेने पाहिल्यास त्यातून किरणाच्या सूक्ष्म लकेरी बाहेर फुटताना दिसतात व तळहात हिरवा दिसतो असा पाचू पाण्याने भरलेल्या काचपात्रात ठेवला असता पाण्याचा रगही हिरवा दिसतो

तेजस्वीपणा, तुळतुळीतपणा, बालतणाच्या वर्णासारखा वर्ण, निर्मलता, वजनदारपणा आणि कोमलता हे पाचूचे गुण असून रूक्षता, अतर्भागी फोडासारखा ऐब असणे किंवा रज कण असणे, मळकटपणा, निस्तेजता आणि खडा रगीबेरगी असणे हे त्याचे दोष होत

वेगवेगळ्या दागिन्यात व विशेषत अगठ्या करण्यासाठी पाचूचा उपयोग करतात पाचू हे बुधाचे प्रिय रत्न मानलेले आहे

पाचूच्या देवमूर्तीही घडवतात नागपूरच्या श्रीमत भोसल्या कडे एकराच पाचचे रामपचायतन आहे त्यातील रामचद्राची मूर्ती ३३२ रत्ती वजनाची आहे बँकॉक शहरात पाचूची एक बुद्धमूर्तीही आहे

पाचूमध्ये रोगहारक शक्ती आहे, पाचू अगावर धारण केला असता मूर्च्छा, अतिसार इ रोग बरे होतात, अशी समजूत आहे त्याचप्रमाणे गरोदर स्त्रीने पाचू अगावर धारण केल्याने ती सुखरूप प्रसूत होते व भुतेखेत तिच्यापासून दूर पळतात, असेही मानतात हिरवा रग थड व डोळ्याना सुखकारक असल्यामुळ पाचूचे चष्मही बनवितात [ लघुरत्नपरीक्षा, म ज्ञा को , रत्नपरीक्षा – म गु अ ग्र ]

**पाटण** महाराष्ट्रातल्या जळगाव जिल्ह्यात चाळीसगावपासून १० मैल अतरावर असलेले एक गाव या जिल्ह्यातले हे सर्वात प्राचीन वसतिस्थान असावे श्री राजवाड यानी इथे सशोधन करून याविषयी माहिती दिली आहे, ती अशी–

इ स च्या १३ व्या, १४ व्या शतकात निकुभ राजाची ही राजधानी होती इथे महादेवाचे एक पुरातन मदिर आहे याच्या सभामडपाची बाधणी हेमाडपती आहे या मदिराचे एकूण शिल्प प्रेक्षणीय आहे शके १०९५ (इ स ११७३)च्या शिलालेखा वरून इथे इ स ११२८ च्या सुमारास हेमाडीदेव राजाचे राज्य होते, असे कळते प्रसिद्ध ज्योतिषी भास्कराचार्य यांचा नातू चागदेव याने आपल्या आजोबाच्या ग्रथाच्या अध्ययनासाठी इथे एक मठ बाधला होता वरील राजाने त्या मठासाठी जे उत्पन्न लावून दिले, त्याचा निर्देश त्या शिलालेखात आहे

गावापासून अर्ध्या मैलावर एकडाच्या बाजूला आह्ळाळाच्या पूर्व काठावर एक देवीचे देऊळ आहे त्याच्या सभामडपात गोहेरा स्वामी याची समाधी असून, त्याने उपासना करून देवीला इथे आणले, असे म्हणतात प्रतिवर्षी इथे जत्रा भरते

जवळच अर्ध्या मैलावर शृगार चौरी सीता न्हाणी व नागा र्जुन ही तीन लेणी आहेत [ म जि –जळगाव ]

**पाटलापूजा** एक उत्सव भिल्ल आणि इतर काही आदिवासी याचा हा उत्सव आहे पाटला हे दुर्गेचे एक नाव असून, ताबूस-पाढरा असा तिचा वर्ण आहे देवी नवसाला पावली म्हणजे मग ते लोक हा उत्सव करतात कृष्ण पक्षातली चतुर्थी हा या उत्सवाचा दिवस असतो त्या साठी गावातले एक मोठे मैदान साफ करून घेतात

पूजेच्या वेळी सात प्रकारची धान्य भरून सात टोपल्या ठेवतात त्यावर दिवे लावतात मग त्या टोपल्याची पूजा कर तात या उत्सवासाठी गावोगावच्या लोकाना निमत्रणे धाडतात मग ते गाण्या नाचण्याची सामग्री घेऊन तिथे येतात मात्र ते चद्रोदय होण्यापूर्वी गावात प्रवेश करीत नाहीत चद्र उगवला, की मग सगळे उत्सवाच्या जागी जमतात व ढोलाच्या साथीवर नृत्य करतात सकाळपर्यंत हे नाच गाणे चालते [ लोककला ग्र ]

**पाटलिपुत्र** एक प्राचीन नगर याला पुष्पपूर, कुसुमपूर अशीही अन्य नावे आहेत साप्रत त्याला पाटणा म्हणतात ही बिहारची राजधानी आहे पूर्वी मगधाची राजधानी व बौद्ध धर्माचे मोठे केंद्र म्हणून या नगराचा लौकिक होता कथासरित्सागरातील सोमप्रभेच्या कथेत पाटलिपुत्राला पृथ्वीचे भूषण म्हटले आहे एवढे त्या नगराचे महत्त्व होते

पाटलिपुत्र या नगरनामाविषयी ज्या दतकथा प्रचलित आहेत, त्यापैकी एक अशी –

पुत्रक नामक एका दक्षिणापथस्थ गरीब ब्राह्मण पुत्राचा पाटली नावाच्या एका राजकन्येशी विवाह झाला आणि त्या उभयताच्या नामसक्षेपावरून त्याच्या प्रदेशाला पाटलिपुत्र हे नाव प्राप्त झाले

साप्रतच्या पाटणा या शहराच्या जागी किंवा त्याच्या परि सरात कुठेतरी पाटलिपुत्र हे नगर वसले असावे, असे सशो धकाचे मत आहे

मगधाचा प्राचीन राजा अजातशत्रू याने पाटलिपुत्र येथे प्रथम राजधानी स्थापन केली त्याची पूर्वीची राजधानी राज गृह येथे होती परतु पुढे साम्राज्यवाढीच्या आणि प्रदेशरक्षणाच्या

दृष्टीने त्याला राजगृह गैरसोयीचे वाटू लागले व म्हणून त्याने गंगाकिनारी एका मोक्याच्या ठिकाणी नव्या राजधानीचा पाया घातला. सनपूर्व ४८० या वर्षी सुनीध व वस्सकर हे अजातशत्रूचे दोन मंत्री त्या कामावर रुजू झाले. थोड्याच दिवसांत महापरिनिर्वाणाला निघालेला बुद्ध या मार्गाने जात असता या उभय मंत्र्यांनी त्याला आपल्या नव्या बांधकामाच्या जागी बोलावून आणले. त्या वेळी बुद्धाने अजातशत्रूची व त्याच्या मंत्र्यांचीही खूप वाखाणणी केली व ही नगरी भावी काळात राज्यकारभाराचे आणि व्यापाराचे मोठे केंद्र होईल, असे भविष्य सांगितले. मात्र अग्नी, पाणी आणि अंतर्गत कलह यांच्यामुळे या नगरीचा नाश होईल, तेव्हा सावध राहावे, अशी सूचनाही त्याने देऊन ठेवली. त्यानंतर बुद्धाने तिथून प्रयाण केले. राजधानीचे बांधकाम पुरे झाल्यावर या प्रसंगाची स्मृती म्हणून अजातशत्रूने या नगराच्या एका द्वाराला गौतमद्वार व नदीच्या एका घाटाला गौतमतीर्थ असे नाव दिले. बुद्धाच्या महापरिनिर्वाणानंतर त्याचा कमंडलू पाटलिपुत्र येथे आणून पुरण्यात आला.

पाटलिपुत्र हे नगर गंगा व शोण या नद्यांच्या संगमावर वसले होते. त्याची लांबी ९ मैल व रुंदी २ मैल होती. त्याच्या चोहोबाजूंना ३० हात खोल खंदक असून, त्यात शोण नदीचे पाणी खेळवले होते. नगराभोवती लाकडी तट असून, त्याला ६४ दरवाजे व ५७० बुरुज होते. तत्कालीन भारतात हेच एक मोठे, प्रमुख आणि सुसंपन्न नगर होते, असे ग्रीक इतिहासकार मेगॅस्थिनीस सांगतो.

अजातशत्रूनंतर त्याचा नातू उदयाश्व किंवा उदायिभद्र हा पाटलिपुत्राच्या गादीवर आला. त्याने राज्यविस्ताराबरोबर पाटलिपुत्र नगराचाही विस्तार केला आणि त्याला मजबूती आणली व बांधेसूद रूप दिले.

उदयाश्वानंतर शिशुनाग आणि नंद या वंशातील राजांनी इथे राज्य केले. मग तिथे चंद्रगुप्त मौर्य याची सत्ता स्थापन झाली. त्याने इथे विशाल प्रासाद उभारला होता. तो लाकडी असून, त्याची रचना अत्यंत कलात्मक होती.

चंद्रगुप्ताचा नातू सम्राट अशोक याने या नगरीचे रूप सर्वांगी बदलून टाकले. नगराभोवतीची लाकडी भिंत काढून त्याने तिथे दगडी तट उभारला. त्याचप्रमाणे अनेक नवे महाल, मठ आणि मंदिरे यांचीही उभारणी केली. त्याच्याच कालात इथे एक बौद्ध संगीती (धर्मपरिषद) झाली व ती बरीच गाजली.

अशोकानंतर पाटलिपुत्राच्या गादीवर आलेले राजे नेभळे आणि कर्तृत्वशून्य होते. त्यामुळे ग्रीक–यवनांसारख्या शत्रूंनी पाटलिपुत्राचे साम्राज्य जिंकण्यासाठी पुनश्च डोके वर काढले. ग्रीक सेनापती दिमित्रियस याने पाटलिपुत्रावर हल्ला चढवून तिथल्या अमाप संपत्तीची लूट केली. तो माघारा वळतो न वळतो तोच कलिंगसम्राट खारवेल याने ही नगरी दोन वेळा जाळण्याचा प्रयत्न केला. या वेळी पाटलिपुत्रावर राज्य करणारा शेवटचा मौर्य राजा बृहद्रथ याने हा सर्व प्रकार पाहून आपला शुंगवंशीय सेनापती पुष्यमित्र याला शत्रूंचे पारिपत्य करण्याची आज्ञा दिली; पुष्यमित्र त्या मोहिमेवर निघणार एवढ्यात त्याने ती आज्ञा मागे घेतली. पुष्यमित्राला बृहद्रथाच्या या धरसोड वृत्तीचा राग आला आणि त्याने बृहद्रथाचा शिरच्छेद करून मगधाचे राज्य हस्तगत केले. नंतर त्याने मोठा पराक्रम करून ग्रीक–यवनांना सीमेपार घालवून दिले.

पुष्यमित्रानंतर पाटलिपुत्रावर चालून आलेल्या कण्व व शक यांनी तिथे एवढा प्रचंड संहार केला, की काही काळ पाटलिपुत्र नगरात केवळ विधवा स्त्रियाच शिल्लक राहिल्या, असे म्हणतात. पाटलिपुत्राच्या जीवनातील ही काही वर्षे अत्यंत दुर्दैवी आणि हलाखीची गेली. मग तिथे गुप्त वंशाचे राज्य आले. गुप्त सम्राटांनी पाटलिपुत्राची शोभा वाढवली. पण पुढे गुप्तांची सत्ता दुर्बल झाल्यावर पाटलिपुत्राला उतरती कळा लागली. मध्यंतरी (इ. स. चे १६ वे शतक) शेरशहा सूरीने या नगरीला तिचे पूर्वरूप देण्याचा प्रयत्न केला; परंतु तो असफल होऊन शेवटी पाटलिपुत्राचे वैभव पूर्णपणे लयाला गेले.

पाटलिपुत्र हे प्राचीन भारतातले एक अत्यंत महत्त्वाचे आणि सुप्रसिद्ध शहर होते. या नगराचा इतिहास हा तत्कालीन भारताच्या कीर्तीचा, वैभवाचा आणि विजयाचा इतिहास होता. युरोपच्या इतिहासात रोमचे जे स्थान तेच भारताच्या इतिहासात पाटलिपुत्राचे होते. सनपूर्व ५ वे शतक ते इ. स. चे ६ वे शतक एवढ्या प्रदीर्घ कालखंडात या नगराला राजधानीचा मान मिळाला. या काळात इथल्या राजांनी केवळ भारतातच नव्हे, तर भारताबाहेरही आपल्या साम्राज्याच्या सीमा वाढवल्या. इथले बौद्ध भिक्षू अफगाणिस्तान, लंका, नेपाळ, तिबेट, तुर्कस्तान, चीन, जपान, ब्रह्मदेश, इंडोचायना, जावा, सुमात्रा, इ. सुदूर देशांतून धार्मिक दिग्विजय करून आले. तक्षशिलेवर विदेशी आक्रमकांची टोळधाड आल्यावर तिथले आचार्य व शिष्य पाटलिपुत्रातच आश्रयाला आले. इथल्या राजदरबारात शास्त्रकारांच्या परीक्षा घेतल्या जाऊन त्यांचा गौरव केला जात असे. वर्ष, उपवर्ष, पाणिनी, पिंगल, व्याडी, वररुची, पतंजली, इ. पंडितांना पाटलिपुत्र येथे परीक्षा दिल्यावरच विद्वान म्हणून मान्यता मिळाली, असे राजशेखर आपल्या काव्यमीमांसेत सांगतो.

इथल्या महाविद्यालयात आयुर्वेद व शल्यविद्या या विषयांचे

शिक्षण दिले जाई इथे शिक्षण घेऊन उत्तीर्ण झालेल्या शल्य विशारदांना अरबांच्या राज्यात विशेष मान होता अरब बादशहा आपल्या देशातील हकीमांना पाटलिपुत्र येथील चिकित्सालयात शिक्षणासाठी आवर्जून पाठवीत इ स च्या आठव्या शतकात अरब खलिफाने माणिक्य आणि धन्वतरी या दोन विद्वानांना चरक सुश्रुतादी ग्रंथांची भाषांतरे करण्यासाठी अरबस्तानात बोलावून घेतल्याचा उल्लेख मिळतो कात्यायन (सनपूर्व ५ वे शतक), चाणक्य, मेगस्थिनीस (सनपूर्व ४ थे शतक), उपगुप्त (सनपूर्व ३ रे शतक), आर्यभट्ट (इ स चे ५ वे शतक), इ अनेक विद्वानांनी इथे वास्तव्य केले होते मौर्यकाळापासून इथे राजनीती व गुप्तचरविभाग या शास्त्रांचे शिक्षण दिले जाऊ लागले अशोकाच्या राज्यकालात बौद्ध तत्त्वज्ञानाचे शिक्षणकेंद्र म्हणून त्याचा लौकिक झाला मौर्यकालात इथल्या शिक्षणाचे माध्यम पाली भाषा होते शुंग, कण्व, गुप्त, इ वंशाच्या राज्यकालात ती जागा संस्कृत भाषेने घेतली गुप्तांच्या ऱ्हासकाळात मात्र पाटलिपुत्राच्या शिक्षणकेंद्राचे महत्त्व कमी होऊन ते स्थान नालंदा, विक्रमशिला या अन्य विद्यापीठांना प्राप्त झाले

पाटलिपुत्र येथे पाटनदेवी नामक एका देवतेची दोन मंदिरे असून, त्यातले एक महाराजगंज विभागात व दुसरे हरमंदिर विभागात आहे दक्षयज्ञात जळालेल्या सतीचे शरीर घेऊन शिव गावोगाव फिरत असता तिचे पट म्हणजे वस्त्र इथेच गळून पडले व त्या प्रसंगाची स्मृती म्हणून हे पाटनदेवीचे स्थान निर्माण झाले, अशी कथा आहे शिखांचे दहावे गुरु गोविंदसिंग यांचा जन्म इथेच झाला असल्याने हे नगर शिखांचे तीर्थक्षेत्र झाले आहे रणजितसिंगाने गोविंदसिंगाच्या जन्मस्थानी एक स्मृतिमंदिर उभारले असून, त्यात गोविंदसिंगाच्या अनेक वस्तू सुरक्षित ठेवल्या आहेत दर पंधरा दिवसांनी एकदा भाविकांना त्यांचे दर्शन घेता येते [प्रा मी त्रि , ज रमा ग्र , पा र , सु वि को , प का भा , भा न क , भारती–१७ ऑगस्ट १९५८]

## पाटलिया

एक जात पाटलिया म्हणजे वाटलेले अशा अर्थाने तो शब्द रूढ आहे यांची वस्ती प्रामुख्याने मध्य प्रदेशातील धार, झाबुआ व अलिराजपुर या संस्थानांच्या भागात आहे वर्ण व शरीराची ठेवण या बाबतीत यांचे भिल्लांशी अधिक साम्य आहे यांच्या उत्पत्तीविषयी पुढील कथा सांगतात–

फार पूर्वी राजपुतांच्या परमार कुलातील काही कुटुंबे अबू प्रदेशात राहत होती पुढे तिथे अवर्षण पडल्यामुळे त्यांनी गुजरातमध्ये स्थलांतर केले तिथे त्यांचे दोन भाग पडून काही कुटुंबे पावागडमध्ये तर काही पंचमहालमध्ये स्थायिक झाली एकदा नवरात्र उत्सवात पावागडमधल्या काही परमार स्त्रिया गरबा नृत्य करीत असता कालीदेवी त्या नृत्यात सामील झाली ते पाहून एका न्हाव्याने ही वार्ता पावागडच्या राजाला कळवली तत्काळ राजा तिथे आला व देवीच्या रूपसौंदर्यावर मोहित होऊन तिला आपली पत्नी होण्यास विनवू लागला देवीला त्याची ही लगट आवडली नाही तिने राजाला व तिथल्या सर्व परमार कुटुंबांना शाप दिला आणि ती अंतर्धान पावली

इथून पुढे त्या कुटुंबांच्या हालअपेष्टांना सुरुवात झाली कालांतराने त्यांना पावागडाहूनही स्थलांतर करावे लागले वाटेत त्यांनी अन्नाच्या अभावी एक नील गाय मारून खाल्ली त्यामुळे तर त्यांना कोणत्याही गावात थारा मिळेना गोमांसभक्षक म्हणून सर्वांनी त्यांना वाळीत टाकले पुढे ते भटकत भटकत मध्य प्रदेशात येऊन स्थायिक झाले

**विवाहप्रथा** – यांच्यात निरनिराळी गोत्रे असून, त्यांपैकी १२ गोत्रे राजपुतांची आहेत सगोत्र विवाह होत नाहीत बायको मिळवण्यासाठी नवऱ्याला आपल्या भावी सासऱ्याकडे किमान सात वर्षे नोकरी करावी लागते ती टाळायची तर देज म्हणून काही रक्कम द्यावी लागते सात वर्षांनंतर या जावयाला वेगळे बिऱ्हाड थाटून देण्यात येते बिऱ्हाड थाटल्यानंतर एका वर्षाच्या आत मूल झाले नाही, तर त्यांचे लग्न लावून देतात नोकरीची मुदत संपण्यापूर्वी जर वधू वर पळून गेले, तर वरपिता वधूपित्याला पैसे देतो मुलीला पळवूनही विवाह करण्याची प्रथा आहे

महत्त्वाच्या धार्मिक विधींसाठी ब्राह्मण पुरोहित बोलावतात कालिका, नाहरसिंध, मकुआ परमार, इ देवांना ते भजतात नाहरसिंध व मकुआ परमार हे दोन पाटलियांचे मूळपुरुष असल्याचे सांगतात [रो व्ह १९३१]

## पाटीदार

गुजरातमधल्या चारोतर भागातील एक सुप्रसिद्ध जमात लेवा व कडवा असे पाटीदारांचे दोन प्रमुख भेद आहेत या दोघांत लग्नसंबंध होत नाहीत लेवा हे कडव्यांपेक्षा स्वतःला श्रेष्ठ समजतात

चारोतर हा सुपीक व समृद्ध प्रदेश आहे लेवा पाटीदारांचे हे मुख्य केंद्रस्थान होय या भागातील पाटीदार लोक धाडसी, महत्त्वाकांक्षी, व्यापारउदीम यांत पुढाकार घेणार व परदेशात जाऊन व्यापारउद्योगात नाव कमावलेले असे आहेत या भागातील विशिष्ट सहा खेड्यांतील लेवा पाटीदार आपणास श्रेष्ठ समजतात ते इतरांच्या मुली करून घेतात, पण आपल्या मुली इतरांकडे देत नाहीत या लोकांचा एक विशिष्ट गट आहे व त्या गटातच हे लग्नसंबंध करतात या गटात मुली देणे हे प्रतिष्ठेचे लक्षण समजले जात असल्याने त्यांच्यात हुंडा-

पद्धत रूढ झाली आहे. या सहा खेड्यांतल्या पाटीदारांना सारो माणस म्हणजे प्रतिष्ठित पाटीदार समजतात. या समजुतीत नैतिक श्रेष्ठता व सांपत्तिक सुस्थिती यांचा समावेश होतो.

यांच्यांत एकत्र कुटुंबपद्धती रूढ असून, कुटुंबप्रमुख सर्व सत्ता चालवितो. प्रतिष्ठितपणाला साजेसे व्यवहार व्हावे म्हणून हे लोक आपल्या नावाने विहिरी व तलाव खोदणे, धर्मशाळा, मंदिरे बांधणे वगैरे सार्वजनिक हिताची कामे करतात.

आपल्या मुली आपल्यापेक्षा श्रेष्ठ वर्गात द्यायच्या, असे या लोकांचे धोरण असल्याने त्यांना अनुरूप वर मिळवणे कठीण जाते. असे जे थोडे असतात, ते जबर हुंडा घेतात. ज्यांना असा हुंडा देणे परवडत नाही, अशा गरिबांच्या मुली त्यामुळे अविवाहित राहतात. त्यांच्यांत आत्महत्येचे प्रमाणही त्या कारणाने वाढलेले दिसते.

शिक्षणप्रसारामुळे या जमातीतील लोकांच्या संकुचित कल्पना आता बदलत असून, ते इतर कडवा वगैरे पाटीदार जमातींशी मिळून मिसळून वागू लागले आहेत. [घु. फं. व्हॉ.]

## पाटील

प्राचीन ग्रामसंस्थेतील गावाचा मुख्य अधिकारी. मुख्यत्वे महाराष्ट्र–कर्नाटकात उपयोजिली जाणारी एक संज्ञा. पट्टकील या संस्कृत शब्दावरून पाटील शब्द बनला आहे. अशोकाच्या काळी कापसाचे विणलेले पट्ट गावकीच्या नोंदी लिहिण्याकरिता वापरीत. जमीनीच्या मालकीची नोंद या पट्टांवर करीत आणि ते पट्ट वेळूच्या नळीत घालून सुरक्षित ठेवीत. या नळकांड्याला पट्टकील म्हणत. हे पट्टकील ज्याच्या ताब्यात असत, त्या ग्रामणीला पट्टकीलक म्हणत. या शब्दावरून पुढे पट्टकील, पाटैलू, पाटेल, पाटील या क्रमाने तो शब्द बनला. तांब्याच्या पत्र्यांवर जमिनीच्या मालकीची नोंद करण्याची कला निघाल्यावर पाटैलूजवळ ताम्रपत्रेही संग्रहार्थ ठेवलेली असत. चालुक्यादी राजांच्या कारकिर्दीत गणसंघातील काही गण गावगन्नाचे पाटैलू बनले आणि काही गण कुणबी बनले, असे इतिहासाचार्य राजवाडे यांचे मत आहे.

पाटीलकी ही जमिनीच्या नांगरटीबरोबर उदयास आली. दुर्गादेवीच्या दुष्काळानंतर जी गावे वसली ती पाटलाकडूनच वसवली गेली, असे म्हणतात. पाटलाला ग्रामसंस्थेत देशपरत्वे कमीजास्त मानमरातब असत. पाटील हे नाव पाटील मोकदम, मोकदम व पाटील अशा तीन प्रकारे लिहितात. मोकदम म्हणजे मुख्य आदमी. जुन्या काळी पाटील हा गावाचा जणू राजाच असे. मोकदम पाटील या शब्दाशी अनेक अर्थ संबंधित आहेत, ते असे– पाटील घराण्यातील पाटिलकीचा धनी, वडील घराण्यातील व्यक्ती आणि टिळ्याविड्याचा व निशाणी नांगराचा अधिकारी. पाटील घराण्यात सगळेच पाटील आडनाव लावतात. परंतु पाटिलकी ज्याच्या हाती असते, तोच खरा पाटील होय. देशमुखीच्या खालोखाल पाटिलकीला महत्त्व होते व पाटिलकीचे वतनही वंशपरंपरेने चाले.

महाराष्ट्रात प्रांतपरत्वे पाटलाला वेगवेगळी नावे आहेत. मिरज–कोल्हापूरकडे त्याला चौधरी कामगावुंड म्हणतात. कोकणात चौगुला म्हणतात, तर विदर्भात व इतर महाराष्ट्रात पाटील म्हणतात. जुन्या ताम्रपटात त्याचा उल्लेख ग्रामकूट असा आहे. जातपाटील, सरपाटील, जडेपाटील असेही त्याचे भेद आहेत. काही ठिकाणी एकाच गावाला दोन पाटील असून, त्यातला एक पोलिस पाटील व दुसरा मुलकी पाटील असतो. यांना विदर्भात कोतवाली पाटील व महाली पाटील म्हणतात. पाटील हा बहुधा मराठा जातीचा असतो.

**पाटलाचे अधिकार** – गावपाटील याचे काम राजकीय स्वरूपाचे असते. जातपाटलाचे काम सामाजिक व धार्मिक स्वरूपाचे असते; तो जातपंचायतीत भाग घेऊन गावपाटलाच्या सहाय्याने गावातले तंटेबखेडे मिटवतो. गावपाटलाला जातपाटलाचे सर्व अधिकार असून, शिवाय तो राजाचा प्रतिनिधी मानला जातो. तो गावाचाही प्रतिनिधी असतो. बहुतेक गावांत गावशिवेत मध्यभागी ग्रामवस्ती असते; परंतु पाटीलगढी मात्र मान्याच्या ठिकाणी गावकुसाजवळ घातलेली असते. ज्याने गाव वसवले, तो गावपाटील होतो. तो मुख्य मिरासदार म्हणून त्याचे घराणे सर्वांत वडील समजले जाते. जुन्या काळी पाटलाला गावापुरते मुलकी, दिवाणी व फौजदारी अधिकार असत. पाटील हे बहुतेक सरदार असत. महादजी शिंद्यांना पाटील म्हणवून घेण्यात भूषण वाटे. " उतरंडीला नसेना दाणा; पण दादला असावा पाटील राणा " ही बायकी म्हण पाटलाच्या मानमरातबावरून पडली आहे.

**पाटलाची कर्तव्ये** – भूमीची सुपीकता वाढवणे, गावाची सर्व प्रकारे व्यवस्था ठेवणे, पीकपाणी पाहणे, बलुतेदारांच्या तक्रारी दूर करणे; वतनदार, बलुतेदार, मठ, समाधी, अन्नछत्रे यांसारख्या सामाजिक संस्थांची वतने ज्यांची त्यांना पोचविणे; लोकांसाठी मनोरंजनात्मक कार्यक्रमाची आखणी करणे, लहानसहान कज्जे मिटवणे, इ. कामे पाटलाला करावी लागत. कोकणातील बहुतेक भागांत पाटीलकी अधिकार खोताकडे असे. सरकारी हुकुमांची जनतेला समज देऊन त्यांची अंमलबजावणी करणे, मामलेदाराकडून रयतेला तगाई मंजूर करून आणणे व त्याच्या फेडीची जबाबदारी घेणे, जागल्यामार्फत आल्यागेल्याची खबर मिळवणे, चोरीमारीसारख्या गुन्ह्यांचा तपास लावणे, इ. कामे खोताला करावी लागत. सरकारीत

अधिकारी आणि रयतेचा प्रतिनिधी अशी त्याची उभयविध भूमिका असे

पाटील हा महार, पोतदार व कुलकर्णी याच्यामार्फत गावाची सगळी कामे उरकीत असे देशात राजसत्ता बळकट नसेल, तर खजिना सांभाळणे, जमिनीची मोजणी करणे, न्याय चौकशीत होणाऱ्या दिव्याचा निदापणा पाहणे, बाजारपेठतील वजने-मापे तपासणे, गावातील सारा वसूल करून सरकारी कोठारात भरणे, ही कामे पाटलाची असत बेळगाव धारवाडच्या बाजूला विवाह, मुंज, यज्ञ, गासाव या प्रसंगी काही द्रव्य पाटलाला देण्याची पद्धत होती इमारती लाकडाचा काही हिस्साही मानपानाच्या पोटी पाटलाला देत पाटीलकीच्या कामासाठी त्याला काही सरकारी वार्षिक मुशाहिराही मिळत असे काही भागात पाटलांना वतन इनामी जमिनी दिलेल्याही आढळतात

कोणत्याही जातीच्या लग्नसमारंभाच्या वेळी पहिला मानाचा विडा पाटलाला मिळायचा साडे विधी करताना ब्राह्मणांना पाटलाची परवानगी घ्यावी लागायची शिमग्याच्या सणात होळीला पहिला नवेद्य त्याने दाखवायचा पोळ्याच्या मिरवणुकीत पहिला बैल पाटलाचा असायचा दसऱ्याला घट उठवताना पहिला घट पाटलाचा उठायचा सीमोल्लंघनाच्या वेळी आपटा आणि शमी याच्या पानांची पूजा करण्याचा मान पाटलाला मिळायचा

अलिकडे हळहळ गावकीतला पाटलाचा मान कमी होत चालला आहे [ या का म , म ग्रा स , प्रा भा स व , रा॰ ले स , गा गा , म जी , भा सां –पूर्वार्ध ५ ]

**पाटील, कर्मवीर भाऊराव** (१८८७ १९५९ इ स ) महाराष्ट्रातील एक महान समाजसेवक सातारच्या दक्षिण भागातील ऐतवडे गावच्या पाटील घराण्यात कुंभोज गावी याचा जन्म झाला हे धर्माने जैन होते पण मराठा आणि जैन या दोन जमातीचा जुना ऋणानुबंध असल्याने कित्येक लोक भाऊरावाना मराठाच समजत त्याचे सामाजिक कार्य मराठा समाजात घडले गेले कोल्हापूरच्या जैन वसतिगृहात राहून त्यानी इंग्रजी सहावी पर्यंत शिक्षण घेतले त्यानतर कोल्हापूरच्या छत्रपती शाहू महाराजाशी त्याची ओळख झाली आणि भाऊराव त्याच्या राजवाड्यात दोन वर्ष राहिले शिक्षण थांबल्यावर ओगले व किर्लोस्कर या कारखान्याचे विक्रेते म्हणून ते काम करू लागले हे काम करीत असताना त्यानी भारतभर प्रवास केला या भारत-भ्रमणात त्याना एक गोष्ट कळून आली, की विचार, उच्चार व आचार याचे उगमस्थान म्हणजे शिक्षण होय सत्य, सामाजिक समता आणि धार्मिक व आर्थिक स्वातंत्र्य याचा संगम म्हणजेही शिक्षणच होय जोवर बहुजन



कर्मवीर भाऊराव पाटील

समाजापर्यंत शिक्षणाचा प्रसार होणार नाही, तोवर आपल्या देशाचे पाऊल पुढे पडणार नाही शिक्षण म्हणजे जनजागृती, जनजागृती म्हणजे समाजक्रांती आणि समाजक्रांतीतूनच नव समाजनिर्मिती हे सूत्र त्यानी आपल्या मनाशी पक्के केले व ते महाराष्ट्रात जनताशिक्षणाच्या कार्याला प्रवृत्त झाले

इ स १९११ च्या सुमारास सातारा जिल्ह्यातल्या दुधगाव या गावी एक शिक्षणसंस्था स्थापून त्यानी आपल्या शैक्षणिक कार्याचा शुभारंभ केला पुढे १९१९ साली कऱ्हाड येथे त्यानी रयत शिक्षणसंस्था नावाची एक संस्था स्थापन केली तिथून पुढे शैक्षणिक प्रचारासाठी त्यानी ठिकठिकाणी हिंडून व्याख्याने दिली

भाऊराव काही काळ सत्यशोधक समाजाचे पुढारी म्हणूनही प्रसिद्ध होते त्याचा युक्तिवाद बिनतोड व वक्तृत्व प्रभावी असे सातारा जिल्ह्यात असे एकही खेडे आढळणार नाही, की ज्याने भाऊरावाचे खणखणीत व तुफानी व्याख्यान ऐकले नाही

एक विद्यार्थी घेऊन त्यानी कऱ्हाडला वसतिगृहाचा प्रारंभ केला म गांधीच्या हस्ते त्याचे उद्घाटन केले आज शेकडो विद्यार्थी त्या वसतिगृहात राहून शिकत आहेत या विद्यार्थ्यांच्या पुढच्या कॉलेज शिक्षणासाठी त्यानी पुणे येथे 'युनियन बोर्डिंग हाउस' स्थापन केले शिक्षकाना अध्यापनशास्त्राचे शिक्षण देण्यासाठी 'सिल्व्हर ज्युबिली रूरल ट्रेनिंग कॉलेज,

व रा. ब. काळे स्मारक प्रॅक्टिसिंग स्कूल, या संस्था त्यांनी उभारल्या. या संस्थांत अध्यापनशास्त्राचे शिक्षण घेतलेले भरपूर शिक्षक हाताशी येताच जिथे शाळा नव्हत्या अशा बहुतेक खेड्यांतून त्यानी प्राथमिक शाळा सुरू केल्या. मुलींच्या शिक्षणाकरिता जिजामाता अध्यापिका विद्यालय व लक्ष्मीबाई पाटील वसतिगृह या संस्थाही त्यांनी काढल्या. यानंतर सातारा जिल्ह्यातील विद्यार्थ्यांची सोय व्हावी म्हणून त्यांनी साताऱ्याला छत्रपती शिवाजी कॉलेजही स्थापले.

छत्रपती शाहू महाराज व विठ्ठलराव शिंदे या समाजसुधारकांच्या कार्याचा त्यांनी समन्वय केला. त्यांच्या संस्थांत तयार झालेले लोक मिळेल तें वेतन व पडेल तें काम या धोरणावर संस्थेचे आजीव सभासद होऊन रयत शिक्षण संस्थेचा भार शिरावर वाहतात. भाऊरावांचे एक वैशिष्ट्य हे, की त्यांनी ब्राह्मणेतर व अस्पृश्य विद्यार्थ्यांसाठी सामायिक वसतिगृहे स्थापन केली. त्यांच्या संस्थेत धर्मभेद व जातिभेद यांना थारा नाही. मराठे, महार व मुसलमान यांची मुले एकत्र आणून त्यांच्यामध्ये बंधुभाव निर्माण करणे हा त्यांच्या सामायिक वसतिगृहें निर्माण करण्याच्या मागचा हेतू होता. राष्ट्राची गरज लक्षात घेऊन तदनुसार बहुजन समाजातल्या विद्यार्थ्यांना शिकवून तयार करणे, या गोष्टींवर त्यांच्या संस्थांचा विशेष भर आहे.

सांप्रत सातारा, कोल्हापूर, नगर, सोलापूर, मुंबई अशा महाराष्ट्राच्या सर्व भागांत भाऊरावांच्या रयत शिक्षणसंस्थेच्या शाखोपशाखा शैक्षणिक कार्य करीत आहेत. भाऊरावांची शैक्षणिक क्षेत्रातली ही महनीय कामगिरी लक्षात घेऊन पुणे विद्यापीठाने त्यांना डॉक्टरेट देऊन त्यांचा व त्यांच्या कार्याचा बहुमान केला. [कर्मवीर भाऊराव पाटील–श्री. घोरपडे, १९५१; अ. च. को.; माझ्या आठवणी]

**पाटेश्वरी** एक शक्तिपीठ. हे उत्तर प्रदेशातील बलरामपुराजवळ येते. इथे सतीचे पट म्हणजे वस्त्र गळून पडले, असे सांगतात. प्रतिवर्षी इथे वासंतिक नवरात्राचा उत्सव होत असून, त्या वेळी भाविक यात्रेकरूंची इथे गर्दी होते. देवस्थानसाठी स्वतंत्र इनामाची व्यवस्था आहे. मुख्य मंदिराभोवती अन्नपूर्णा, शेषनाग, शीतला, भैरवनाथ, कालिका, इ. देवांची मंदिरे आहेत. इथला सूर्यतलाव प्रेक्षणीय आहे.

**पाठारे प्रभू** एक जात. या लोकांची वस्ती उत्तर कोकणात, विशेषतः मुंबई, माहीम, साष्टी, ठाणे, वसई, इ. ठिकाणी आहे. यांना पाताणे किंवा पैठणे प्रभू असेही म्हणतात. पैठणवरून पैठणे किंवा पाताणे हे नाव पडले.

देवगिरीचा राजा रामदेवराव यादव याचा इ. स. १२९४ मध्ये अलाउद्दीन खिलजीने पराभव केल्यावर त्याने आपला दुसरा मुलगा बिंबदेव याला उत्तर कोकणात पाठवून दिले. त्याच्या बरोबर काही सरदार आणि पाठारे प्रभू ज्ञातीची काही कुटुंबेही होती. बिंबदेवाने तिथे महिकावती नामक राजधानी स्थापन केली. हीच आधुनिक माहीम नगरी होय.

पाठारे प्रभूंच्या पूर्वेतिहासासंबंधी माहिती देणारे व नारणजी नामक एका पाठारे प्रभूने इ. स. १७९८ मध्ये नकललेले एक बाड सापडले आहे. या बाडात एकूण पाच हकीकती दिलेल्या आहेत. पहिल्या हकीकतीत रामराजाचा महिमा व पाठारे जातीच्या सहासष्ट कुळांचा उल्लेख आहे. दुसऱ्या हकीकतीत राजा बिंबाच्या अंमलापासून मुसलमानी अंमलाच्या प्रारंभापर्यंतची स्थूल संगती लावलेली आहे. तिसऱ्या हकीकतीत सोपारे येथील वैतरणी तीर्थाचे माहात्म्य वर्णिलेले आहे. चौथ्या हकीकतीत पाठारे जातीच्या अठरा कुळांची नावे दिली आहेत आणि पाचव्या हकीकतीत बिंब राजापासून मुसलमानी अंमलापर्यंतच्या राजांची परंपरा व त्यांच्या कारकिर्दीतील काही महत्त्वाच्या गोष्टी दिलेल्या आहेत.

पहिल्या प्रकरणात राजा रामदेव याच्या कुळाचे वर्णन करताना चापानेर, हस्तनापूर, नागाबाज, मुंगीपैठण व पणाळे अशा पाच पैठणांचा उल्लेख केलेला आहे. बिंबाच्या राजवंशाचा या पाच पैठणांच्या राजवंशांशी संबंध होता व त्याने आणलेले पाठारे प्रभू मूळ या पाच राज्यांत राहणारे होते.

राजा, प्रधान व पाठारे प्रभू मिळून एकूण पंचाण्णव कुळांचा निर्देश या बाडात आलेला आहे. त्यापैकी पैठणहून अठ्ठावीस, नागाबाजहून नऊ, चापानेरहून तेरा, पन्हाळ्याहून सात, चेरणेरहून सात, दौलताबादेहून तीन व अनहिलवाडहून दोन अशी पाठारे प्रभूंची कुळे कोकणात आली, असे बाडकार म्हणतो. ही कुळे चेऊल, येकसार, कोंडिवटे, दहसार, चेंबूर, गोरेगाव, शीव, पसपीली, चेंदवली, कल्याण, काळवे, माहीम, ठाणे, इ. ठिकाणी येऊन कायमची वतनदार झाली. याचा अर्थ ही कुळे गुजरात, राजस्थान व देश या भागांतून इकडे आली व येताना त्या त्या भागातील भाषा व चालिरीती घेऊन आली.

या पंचाण्णव कुळांच्या कुलदेवताही बाडात नमूद केलेल्या आहेत. त्यांत जोगेश्वरी, महालक्ष्मी, पद्मावती, वज्रायणी, एकवीरा, चंडिका, रामदेवी, कुमारिका, ललिता, आद्येश्वरी, रुद्रायणी, लक्षेश्वरी, साधलिका, रामेश्वरी, इ. शक्तींची निरनिराळी नावे कुलदेवता म्हणून दिलेली आहेत. त्यावरून पाठारे प्रभू पूर्वी ज्या प्रांतात राहत होते, तिथे शक्तीची उपासना सुरू

झाल्यानंतर ते कोकणात उतरले हे ठिकाण यवनेश्वर हे लोक स्मार्त शैव असून शृंगेरी मठाच्या धार्मिक अधिकाराखाली आहेत

बाडकारांनी पाठाऱ्यांची गोत्रे दिली आहेत त्यांत श्रीपती, रामळ, नागेश्वर, भिजक, श्रीचंदल, जानादेव, कासेश्वर केशव, दुर्ग, श्रवण, अंकुश, इ नावे आहेत प्रचलित गोत्रप्रवरग्रंथात ही नावे आढळत नाहीत तेव्हा ती त्यानंतरच्या काळात प्रचलित झाली असावी मात्र गौतम, वसिष्ठ, पराशर, कौंडिण्य, अत्री वगैरे गोत्रे गोत्रप्रवरग्रंथातील आहेत त्यावरून आर्यांच्या इतर पोटजातीप्रमाणे याही जातीचा उगम पुरातन असावा, हे कळते

रावबहादूर पी बी जोशी यांच्या मते पाठारे हा प्रतीहार या संस्कृत शब्दाचा अपभ्रंश आहे पाठारे हे कनोज व राजस्थान येथील प्रतीहारांचे वंशज होत इ स १०१८ मध्ये गझनीच्या महमूदाने कनोजवर स्वारी केली व प्रतीहार घराण्यातील शेवटचा राजा राज्यपाल याचा पराभव केला या घटनेनंतर प्रतीहार किंवा पाठारे प्रभू यांचे पूर्वज देवगिरीच्या राजाच्या आश्रयासाठी पैठणला आले, असे दिसते पुढे ते भीमदेवाबरोबर किंवा बिंबदेवाबरोबर उत्तर कोकणात आले तेव्हा त्यांना पैठणे प्रभू किंवा पैठणकर प्रभू असे म्हणू लागले पाठारे हे नाव पैठण या शब्दाचा अपभ्रंश होय, असे श्री जोशी यांचे म्हणणे आहे

सह्याद्री खंडाच्या २८ व्या अध्यायात सांगितले आहे, की पाठारे प्रभूंचा आद्य पुरुष राणा अश्वपती हा पैठण क्षेत्रात जाऊन राहिला होता तेथे त्याने एकदा भृगू ऋषीचा अपमान केला त्यावर भृगूने अश्वपतीला शाप दिला, की ‘तुझे राज्य जाईल’ त्यावर राजाने त्याची क्षमा मागितली तेव्हा भृगूने ‘तू कारकुनी करून ऊर्जितावस्थेला येशील,’ असा त्याला उःशाप दिला तेव्हापासून त्यांचे नाव पाठारे प्रभूऐवजी पैठण किंवा पट्टण प्रभू असे पडले

**विवाहप्रथा** – पूर्वी यांच्यात मुलामुलींचे विवाह लहान वयात होत असत लग्न जुळविताना पत्रिका पाहण्याची पद्धत होती सीमंतपूजनाऐवजी यांच्यात कुलदेवतेला बकरा बळी देण्याची चाल आहे लग्नापूर्वी एखाद्या दिवस आधी घरातील वृद्ध पुरुष कुलदेवीची पूजा करतो नंतर बकऱ्याला देवीसमोर आणतात एका सुपात थोडे तांदूळ घालून ते बकऱ्यापुढे ठेवतात आणि तो ते तांदूळ खायला लागला, की वृद्ध पुरुष तलवारीने त्याचे डोके उडवतो मग तो ते डोके हातात धरून त्याच्या रक्ताचे काही थेंब देवीवर पडू देतो नंतर ते मुंडके थाळीत घालून देवीच्या चौरंगाखाली दुसऱ्या दिवसापर्यंत ठेवून देतात आणि उरलेला बकरा शिजवून खातात

लग्नाच्या आधी चार दिवस वधूला वरगृही बोलावतात आणि तिला फळे, मेवामिठाई, नवीन कपडे आणि दागिने देतात नंतर तिला तोही घरच्या अगदी जवळच्या नातेवाईकांकडे पाठवतात त्या वेळी स्त्रिया सासूने तिला काय काय दिले, याची चौकशी करतात लग्नाच्या आदल्या दिवशी हळद लावण्याचा समारंभ करतात

विवाह मुलीच्या घरी होतो विवाह समारंभात मधुपर्क, अक्षता टाकणे अंतरपाट, कन्यादान, सप्तपदी हे विधी प्रमुख असतात वधू वर लग्नाच्या वेळी तांदळाच्या ढिगावर उभे राहतात मंगलाष्टके झाल्यावर मुहूर्ताच्या वेळी, वराचा पिता वधूच्या गळ्यात काळी पोत बांधतो आणि वधू वराच्या गळ्यात हार घालते जुन्या काळी त्यांचे हे विवाहसोहळे चार चार दिवस चालत असत

मुलगी प्रथम ऋतुमती झाली, की घरातील वडीलधारी स्त्री तिची ओटी भरते पूर्वी मुलीला चांगले कपडे घालून मखरात बसविण्याची चाल होती त्या वेळी तिच्यासाठी वाजंत्री वाजवीत नातेवाईक स्त्रिया तिच्यासाठी वाढणे घेऊन येत चार दिवस असाच कार्यक्रम चालत असे पाचव्या दिवशी ती स्नान करीत असे त्याच दिवशी तिचा गर्भाधानाचा विधी होई

**प्रसूतिप्रथा** – स्त्रीची प्रसूती तिच्या माहेरी होते पूर्वीच्या काळी तिला मदत करण्यासाठी सुइणीला बोलावीत मूल जन्मल्यावर थोडा वेळ त्याला सुपात ठेवतात आणि आंघोळ घालून बाजेवर निजवतात मूल जन्मल्याबरोबर थाळी वाजवून आनंद व्यक्त करतात त्याच दिवशी संध्याकाळी मुलाची पत्रिका तयार करतात पाचव्या दिवशी सटीची पूजा करतात दहाव्या दिवशी सुवेर संपल्यावर त्या दिवशी अथवा अकराव्या किंवा बाराव्या दिवशी मुलाचे नाव ठेवतात सहाव्या महिन्यानंतर मुलाचे कान टोचतात कान टोचल्यानंतर वर्षभरात मुलाचे नाक टोचतात

**मर्तिकप्रथा** – हे लोक प्रेते जाळतात जाळलेल्या जागी मातीचा लहानसा त्रिकोणी ढीग करतात, त्याच्यावर शेणपाणी शिंपतात, दूर्वा पसरतात आणि त्यावर पाण्याची पाच मडकी, तीळ, भाताचे पिंड, पोळ्या, तूप, इ वस्तू ठेवतात मृताचा मुलगा पिंडापुढे कापूर व धूप जाळतो आणि मृताला ते सर्व स्वीकारण्याची विनंती करतो

मृताचा आत्मा दहा दिवसपर्यंत घरात घोटाळत राहतो, अशी या लोकांची समजूत आहे म्हणून दहा दिवस त्याला आंघोळ करण्यासाठी एका द्रोणात पाणी व पिण्यासाठी एका द्रोणात दूध ठेवतात अकराव्या, बाराव्या व तेराव्या दिवशी श्राद्ध करतात [ वर्ण व जाती– श्री मो वि पटवर्धन, १९६६,

उ. को. प्रा. इ.; पाठारे क्षत्रिय जातीचा इतिहास, खंड पहिला— श्री. ग. गो. नाईक, १९६०; पाठारे प्रभूंची मध्यकालीन परंपरा— श्री. म. मो. फडणीस, भा. इ. सं. मंडळ, तृतीय संमेलन, शके १८३७; पूना गॅझे.]

**पाणपोई** पांथस्थांना व आल्यागेल्यांना पाणी मिळावे म्हणून जी सोय करतात, तिला पाणपोई म्हणतात. हे एक पूर्त कर्म आहे. धनिक व्यक्ती व सार्वजनिक संस्था अशा पाणपोया घालतात. त्यांमध्ये गुरांनाही पाणी मिळण्याची सोय असते. प्राचीन काळी बहुतेक राजे सर्व राजरस्त्यांवर जागोजागी अशा पाणपोया बांधीत.

पाणपोईत मातीचे मोठमोठे डेरे पाण्याने भरून ठेवतात. तृषितांना पाणी देण्यासाठी एक माणूस तिथे नेमलेला असतो. गावे किंवा शहरे यांच्या बाहेर असलेल्या पाणपोईजवळ पांथस्थांना थोडा वेळ विश्रांती घेता यावी व उपाहार करता यावा, म्हणून एखादी पर्णकुटी बांधतात. कित्येक ठिकाणी कळकाच्या पन्हळी ठेवलेल्या असतात. पाणपोयीतला मनुष्य एका बाजूने त्या पन्हळीत पाणी ओततो व तृषित मनुष्य पन्हळीच्या दुसऱ्या टोकातून येणारे पाणी ओंजळीने पितो.

**पाणिनी** एक महान वैयाकरण. याला पंडित मंडळी गौरवाने भगवान पाणिनी असे म्हणतात. याच्या कालाबद्दल खूप मतभेद आहेत. कोणी त्याला सनपूर्व ८ व्या शतकातला मानतात, तर कोणी त्याला सनपूर्व ४ थ्या शतकातला समजतात.

पाणिनी हे त्याचे व्यक्तिनाम असेल की काय याबद्दलही वाद आहे. त्याच्याच एका सूत्रावरून (अष्टा. ६.४.१६५) ते गोत्रनाम असावेसे वाटते. बौधायनाचेही तेच मत आहे. या गोत्राचे भार्गव, च्यवन, आप्नवान, और्व आणि जामदग्न्य असे पाच प्रवर आहेत. भट्टोजी दीक्षिताने पाणिनी शब्दाची निराळीच व्युत्पत्ती दिली आहे. 'पणीचे पुरुषअपत्य तो पाणिन व त्याचा नातू तो पाणिनी, असे तो म्हणतो.'

पाणिनीला वाहीक, शालंकी, दाक्षीपुत्र व शालातुरीय अशा अन्यही संज्ञा आहेत. वाहीक हा एक गंधार देशाचा भाग होता. त्या भागातला तो म्हणून त्याला वाहीक म्हणत. शालंकी शब्दाची व्युत्पत्ती कळत नाही. दाक्षीपुत्र या नावावरून त्याच्या आईचे नाव दाक्षी होते, असे कळते. दाक्षी ही दक्ष नावाच्या गणातली होती. शालातुरीय हे नाव त्याच्या जन्मगावावरून पडले आहे, असे दिसते. सांप्रत त्या गावाला लहुर असे म्हणतात. लहुर हा शलातुर शब्दाचाच अपभ्रंश आहे. पाणिनीचे पूर्वजही याच गावात राहत होते. पाणिनी हा तक्षशिलेच्या विद्यापीठात शिकला असावा, असा तर्क आहे.

इ. स. च्या ७ व्या शतकात चिनी प्रवासी युआन च्वांग हा भारताचा प्रवास करीत असता शलातुराला पोचला होता. तेव्हा त्याला पाणिनिविषयक अनेक दंतकथा ऐकायला मिळाल्या. तिथे पाणिनीचा एक पुतळाही बसविला आहे, असे त्याने म्हटले आहे. सांप्रत तो पुतळा लाहोरच्या संग्रहालयात आहे. पण श्री. दीक्षित यांच्या मते तो पुतळा पाणिनीचा नसून बुद्धाचा असावा. पाणिनीचे जीवनचरित्र फारसे उपलब्ध होत नाही. त्यासाठी आख्यायिका व किंवदंती यांच्यावरच अवलंबून राहावे लागते. कथासरित्सागरात पाणिनीविषयी एक किंवदंती आलेली आहे, ती अशी—

वर्ष नावाचा एक आचार्य पाणिनीचा गुरू होता. पाणिनी व कात्यायन हे दोघे त्याच्याकडे शिकत. त्या दोघांत कात्यायन कुशाग्र बुद्धीचा व पाणिनी मंद बुद्धीचा होता. प्रत्येक बाबतीत कात्यायन पाणिनीला मागे टाकी. ही स्थिती पाणिनीला असह्य झाली व तो गुरुगृहाचा त्याग करून हिमालयात गेला. तिथे त्याने शिवप्रसादासाठी घोर तप केले. त्या तपाने शिव प्रसन्न झाला आणि त्याने पाणिनीला प्रतिभाशाली बुद्धी दिली. पाणिनीच्या समोर नृत्य करीत असताना शिवाने चौदा वेळा आपला डमरू वाजवला. त्यातून जे ध्वनी निघाले, त्यांना अनुसरून पाणिनीने अइउण्, ऋलृक्, एओङ्, इ. चौदा प्रत्याहारसूत्रे बनविली (कथासरित्सागर १.४). पाणिनीची अष्टाध्यायी या चौदा सूत्रांवरच आधारलेली आहे.

युआन च्वांगला शलातुरगावी पाणिनीविषयी तिथल्या विद्वानांकडून ज्या आख्यायिका ऐकायला मिळाल्या, त्यांचा सारांश असा—

अतिप्राचीन काळी साहित्याचा विस्तार फार मोठा होता. कालक्रमाने त्याचा ऱ्हास झाला आणि एके दिवशी सर्वशून्य झाले. त्या वेळी देवांनी ज्ञानाच्या रक्षणासाठी पृथ्वीवर अवतार घेतला. त्यांनी मग व्याकरण व साहित्य जन्माला घातले. पुढे व्याकरणाचा विस्तार होऊ लागला. ते खूप वाढले, असे पाहून ब्रह्मदेव व इंद्र यांनी लोकांच्या गरजेला अनुसरून व्याकरणाचे काही नियम बनवले व शब्दांची रूपे स्थिर केली. पुढे वेगवेगळ्या ऋषींनी आपापल्या मताला अनुसरून वेगवेगळी व्याकरणे रचली. त्यांचे शिष्य-प्रशिष्य त्या व्याकरणांचे अध्ययन करू लागले. पण जे मंदबुद्धी होते, त्यांना त्या सर्वांचे यथावत आकलन होईना. नेमक्या याच वेळी पाणिनीचा जन्म झाला.

जन्मतःच त्याची ग्रहणशक्ती तीव्र होती. मनुष्याची आयुष्यमर्यादा आणि व्याकरणाचा पसारा या गोष्टींचा मेळ बसणे

शक्य नाही, असे पाहून पाणिनीने व्याकरणात सुधारणा कर ण्याचे व नियम निश्चित करून अशुद्ध श दप्रयोग टाळ करण्याचे ठरवले लगेच तो व्याकरणविषयक सामग्रीचा सग्रह करण्या साठी प्रवासाला निघाला या प्रवासात ईश्वरदेव नावाच्या एका प्रकांड पडिताशी त्याची गाठ पडली पाणिनीन आपल्या नव्या व्याकरणाची योजना त्याच्यापुढे माडली ती ऐकून ईश्वरदेव खूप झाला आणि त्याने पाणिनीला त्याच्या कार्यात मदत करण्याचे ठरवले ईश्वरदेवाकडून योग्य ते मार्गदर्शन मिळवून पाणिनी एकातस्थळी गेला तिथे बसून त्यान आठ अध्यायाचे एक नव व्याकरण निर्माण केले मग त्याने सदर ग्रथ पाटलिपुत्र येथील नद सम्राटाकडे पाठविला सम्राटाने विद्वानाकडून त्या ग्रथाचे परीक्षण करविले तो ग्रथ विद्वानानी एकमताने उपयुक्त व सारभूत असा ठरविला मग सम्राटाने एक आज्ञापत्र काढून सदर ग्रथ आपल्या साम्राज्यात शिकविला जावा असा आदेश दिला अष्टाध्यायी जो मुखोद्गत करील, त्याला सहस्र सुवर्ण मुद्राचा पुरस्कार मिळेल, असेही घोषित केले पुढे मगधसम्राट नद हा पाणिनीचा मित्रच बनला

वरील आख्यायिकेवरून पाणिनीने शुद्ध श दाच्या सामग्रीचा सचय करण्यासाठी पुष्कळ प्रवास केला होता, हे कळून येते त्याच्यासमोर पूर्वाचार्यांचे व्याकरण ग्रथ होते, पण पाणिनीला ते समाधानकारक वाटत नव्हते बहुमुखी शास्त्राच्या अभ्यासा साठी ते ग्रथ अपुरे पडत होते त्याला वाटत होते की आपल्या पर्णकुटीत बसून व प्राचीन ग्रथात आढळतील तवढ्याच शब्दाच्या सीमेत राहून एखाद्या भाषेचे व्याकरण रचण्याचा प्रयत्न करणे, ही गोष्ट अयोग्य आहे जी जिवत भाषा असते, तिचे वेगवान स्रोत ग्रथाच्या बाहेरच आढळतात गावे, जनपदे नगरे, आचार्यांचे आश्रम मन्त्रिपरिषदा, राजदरबार, शासन व्यवहार, सन्याची विभिन्न क्षेत्रे, व्यापारी श्रेणी व निगम, श्रमिकाच्या कामशाला, इ क्षेत्रात अहर्निश नवे नवे श द, नवे नवे वाक्यप्रयोग, लोकोक्ती, म्हणी याची नाणी सारखी पडत असतात व ती तोंडातोंडी त्या त्या प्रदेशात प्रसार पावतात नवे व्याकरण लिहायचे तर त्या सर्वांचा सग्रह करणे आणि व्याकरणदृष्ट्या त्या सर्व शब्दाना आणि उक्तीना नियमबद्ध करणे आवश्यक आहे

पाणिनी नर्मदेच्या उत्तरेचा बहुतेक सर्व भूभाग हिंडला होता शेताची नावे, धान्याची नावे, नागरणी, पेरणी, पाळीव पशू, विविध वाहने, स्त्री पुरुषाचे खेळ, मुलाना नाव ठेवण्याच्या पद्धती, पाठशालातील अध्यापनाच्या पद्धती, विविध प्रकारचे साहित्य, शिक्के व नाणी, वजने मापे, भोजनपदार्थ, इ गोष्टी विषयी पाणिनीच्या अष्टाध्यायीत नियम व उल्लेख मिळतात

त्यावरून तो भाषाविषयक सामग्री गोळा करण्यासाठी केवढ्या विशाल आणि विभिन्न क्षेत्रात हिंडला असेल, त्याची कल्पना येते त्याने उदीच्याम्, प्राच्याम् असे निर्देश करून त्या त्या प्रातातले लोक एखाद्या शब्दाचा कसा ह्रस्व दीर्घ उच्चार करतात किंवा कसे हेल काढून तो शब्द उच्चारतात, तेही दाखवून दिले आहे या सर्व गोष्टींनी प्रभावित होऊन काशिका काराने ' अहो महती सूक्ष्मेक्षिका वर्तते सूत्रकारस्य ' = सूत्रकार पाणिनीचा केवढी मोठी ही सूक्ष्म दृष्टी, असे गौरवपूर्वक उद्गार काढले आहेत पाणिनीने आपल्या अष्टाध्यायीत जनपद, ग्राम, नगर, सघ, गोत्र, चरण, इ गोष्टींची लाबलचक सूची दिली आहे सुमारे एक सहस्र गोत्राची नावे पाणिनीय गणात आढळतात शास्त्रीय गोत्राच्या व्यतिरिक्त लौकिक गोत्राची नावेही पाणिनीने सग्रहित केलेली आहेत अष्टाध्यायीत ५०० गाव व नगर याची पुरती सूची मिळते त्याशिवाय तत्कालीन रीतिरिवाज, कलाकौशल्य, देवधर्म, उपासनापद्धती, लोकाची राहणी, शिक्षण, जीवनव्यवसाय, इ अनेक गोष्टींची माहिती त्या ग्रथात उपलब्ध होते

पाणिनीने आपल्या काळापूर्वी निर्माण झालेल्या वाङ्मयाशी चागला परिचय करून घेतला होता सूत्रातून ज्या वाङ्मयाचा निर्देश आढळतो, ते तर त्याला ज्ञात होतेच, शिवाय अनुल्लेखित असे बरेच वाङ्मय त्याने दृष्टिखालून घातले असावे, असेही कळते वेदत्रयी, वेदांच्या विभिन्न शाखा, वेदागे, ब्राह्मणे, महा भारत, कथा गाथात्मक साहित्य, श्रौतसूत्रे व धर्मसूत्रे, उपनिषदे, याशिवाय दृष्ट आणि प्रोक्त या सदरात येणारे बहुतेक वाङ्मय पाणिनीला ज्ञात होते, असे समजून येते

सस्कृत साहित्याच्या उगमापासून स्वत च्या कालापर्यंत शब्द आणि अक्षरे याच्याविषयी जितके ज्ञान उपलब्ध होण्या सारखे होते, तेवढे सर्व उचलून त्याला पाणिनीने आपल्या अष्टाध्यायीत स्थान दिले म्हणूनच पतजलीने पाणिनीच्या व्याकरणाला ' महत्शास्त्रौघ ' = विशालशास्त्रसमूह असे गौर वाने म्हटले आहे त्यामुळे पाणिनीची अष्टाध्यायी प्रातिशाख्या प्रमाणे त्या त्या वेदापुरतीच मर्यादित राहिली नाही तिने सर्व वेदाशी आपला सबध जोडला सामवेदाच्या ऋक्तत्र नामक प्रातिशाख्यातली बरीचशी सूत्रे पाणिनीच्या सूत्राशी मिळती जुळती दिसतात दोहोची तुलना करून डॉ वासुदेवशरण अग्रवाल मानतात – पाणिनीने पूर्वीच्या सूत्राना भाषा, अर्थ आणि विस्तार या तीन्ही दृष्टींनी पल्लवित केले पाणिनीने कोणाचे किती ऋण घेतले हे समजायला आज निश्चित साधन उपलब्ध नाही एवढेच सागता येते, की विषयप्रतिपादनाच्या दृष्टीने अष्टाध्यायी स्वत च्या ठिकाणी परिपूर्ण आहे

पाणिनीच्या अष्टाध्यायीतील सूत्रे वैदिक दर्शनाच्या अभ्यासासाठी तर उपयोगी पडतातच; पण उपनिषदांच्या अभ्यासासाठीही त्यांचा उपयोग होतो. किंबहुना सर्वच संस्कृत वाङ्मयाचा अभ्यास त्यामुळे सुलभ होतो.

पाणिनीच्या ग्रंथावर आधारित सिद्धान्त कौमुदी हा ग्रंथ भट्टोजी दीक्षित यांनी रचला. गेली कित्येक शतके त्या ग्रंथावरूनच मुख्यत्वे पाणिनीय व्याकरणाचे अध्ययन चालते. या ग्रंथात वैदिकी प्रक्रिया आणि स्वरप्रक्रिया अशी दोन प्रकरणे आहेत. वैदिकी प्रक्रियेत पाणिनीचे व्याकरणविषयक नियम सर्व वैदिक वाङ्मयाला कसे लागू पडतात, हे दाखविले आहे व स्वरप्रक्रियेत वैदिक भाषेचे उच्चार कसे करावे, याचे विवेचन आहे. आपली व्याकरणविषयक सूत्रे रचताना पाणिनीने सर्व वैदिक ग्रंथभांडार व उपनिषदे यांचे आलोडन केले आहे, असे दिसून येत असले, तरी या सूत्रांचा व वैदिकी प्रक्रियांचा अर्थ लावताना मात्र फार सावधानता बाळगावी लागते.

पाणिनीची उच्च प्रतिभा, असामान्य रचना आणि त्यामुळे जिज्ञासू जगावर झालेले उपकार, हे सारे लक्षात घेऊन शिक्षाग्रंथात पुढील श्लोक लिहिला गेला आहे–

**येन धौता गिरः पुंसां विमलैः शब्दवारिभिः ।**
**तमश्चाज्ञानजं भिन्नं तस्मै पाणिनये नमः ।।**

अर्थ– ज्याने निर्मल अशा शब्दजलाने मनुष्यांच्या वाणी धुवून स्वच्छ केल्या आणि अज्ञानजन्य अंधकार दूर केला, अशा त्या पाणिनीला नमस्कार असो.

पाणिनी हा जसा व्याकरणकार तसाच कवीही होता, असे काही जणांचे म्हणणे आहे. जांबवतीविजय नावाचे एक काव्य पाणिनीने रचले, असे मानतात. पण हे मानणे वस्तुस्थितीला सोडून आहे. बहुतेक विद्वानांनी ते काव्य पाणिनीचे नव्हे, असे ठामपणे सांगितले आहे. त्या काव्याचा कर्ता दुसराच कोणीतरी असावा आणि तो इ. स. च्या ९ व्या शतकात झालेला असावा, असे प्रा. म. दा. साठे म्हणतात.

आख्यायिका अशी आहे, की एका सिंहाच्या भक्ष्यस्थानी पडून पाणिनीचा अंत झाला. पाहा– अष्टाध्यायी. [ पाणिनी परिचय– डॉ. वासुदेवशरण अग्रवाल, १९६५; पाणिनि व पाणिनीय व्याकरण संप्रदाय–श्री. म. दा. साठये, १९६२ ]

**पाताल** अधोलोक. ‘ पतन्ति अस्मिन् दुष्क्रियावन्तः’ = दुष्कृत्ये करणारे लोक ज्यात पडतात, अशी स्थाने म्हणजे पाताल होय, अशी त्याची व्याख्या केलेली आहे. पातालाला अधोभुवन, असुरभवन, बलिसद्म, रसातल, नागलोक, इ. बरीच नावे आहेत. ही सर्व स्थाने पृथ्वीच्या खाली आहेत.

पातालांची संख्या सात मानलेली असून अतल, नितल, वितल, गभस्तिमान, तल, सुतल व पाताल अशी त्यांची नावे आहेत. पद्म पुराणात ही नावे थोडी वेगळी दिली आहेत, ती अशी– अतल, वितल, सुतल, तलातल, महातल, रसातल व पाताल.

ही पाताले म्हणजे विवरातील स्वर्गच होत. त्यात समृद्ध भवने, उद्याने, विहारस्थाने आणि क्रीडास्थाने आहेत. पृथ्वीच्या खाली अयुत योजने अतल असून तिथे महासुर मयपुत्र राहतो. त्याच्या खाली अयुत योजने वितल असून, तिथे हाटकेश्वर शिव विहार करतो. त्याच्याबरोबर पार्वती आणि त्याचे भूतगणही आहेत. त्यात हाटकी नामक मोठी नदी वाहते. वितलाच्या खाली अयुत योजने सुतल असून, तिथे पुण्यश्लोक बळी निवास करतो. सुतलाच्या खाली अयुत योजने तलातल असून तिथे त्रिपुराधिपती, दानवेंद्र मय निवास करतो. त्याच्याही खाली अयुत योजने महातल असून, त्या ठिकाणी काद्रवेय नामक सर्पांचा गण वास करतो. गरुडाला भिऊन हे कद्रूचे पुत्र इथे सहकुटुंब राहिले आहेत. त्याच्या खाली अयुत योजने पाताल असून, त्या ठिकाणी शूर असे नाग लोकांचे अधिपती वस्ती करून राहिले आहेत.

इथे सूर्यकिरण केवळ प्रकाश देतात. ते लोकांना उन्हाचा ताप देत नाहीत. त्याचप्रमाणे चंद्रही फक्त रात्रीचा प्रकाश देण्यासाठी उगवतो. त्याच्यामुळे लोकांना थंडीची बाधा होत नाही, असे विष्णू पुराणात सांगितले आहे. पातालाच्या खाली शेष राहतो. त्याच्या मस्तकावर पृथ्वी आहे.

पाताळाची कल्पना जगातील सर्व लोकांत प्रचलित आहे. पातालात अंधार असतो, अशी बाबिलोनी, हिब्रू, मिसरी, ग्रीक, रोमन वगैरे लोकांची कल्पना होती. पाताळ हे मृतांचे निवासस्थान आहे आणि पाताळातील वस्तू आपल्या उलट दिशेने लटकलेल्या असतात, अशीही समजूत आहे.

श्री. कीर्तिदेव देसाई यांच्या मते पाताळलोक हा भारताच्या पश्चिम किनाऱ्यावर होता. आपल्या या सिद्धान्ताच्या पुष्टीसाठी त्यांनी अनेक पुरावे दिले आहेत. त्यांपैकी काही असे–

गुजरातमधील अनेक स्थानांचा पाताळाशी संबंध जोडलेला आहे. तापी नदीच्या मुखाजवळच्या प्रदेशाला उत्तम पातालबिल असे अनेकदा म्हटलेले आहे. नर्मदा नदीचाही पाताळाशी घनिष्ट संबंध दिसतो. नर्मदेला नागांची बहीण म्हटलेले आहे.

विष्णू आणि स्कंद या पुराणांत गभस्तिमान आणि नागद्वीप हे दोन्ही पाताळाचे भाग मानलेले आहेत. श्री. सुरेंद्रनाथ बानर्जी यांनी ही दोन द्वीपे कच्छच्या समुद्रकिनाऱ्याजवळ होती, असे दाखवले आहे.

प्रभास आणि गिरनार या दोन ठिकाणी अनेक पाताल-

विवरे होती असे स्कंद पुराणात सांगितले आहे यावरून, सिंधू नदीच्या मुखापासून नृपारकापर्यंतच्या भारताच्या पश्चिम किनाऱ्यावरील प्रदेशाला पुराणकाळी पाताल लोक म्हणत, असे सिद्ध होते [ प्रा च , पु इ , सु वि को , श्री कीर्तिदेव देसाई–नॉनआयर्स आन दि वेस्टर्न कोस्ट, जर्नल आफ दि युनिव्हर्सिटी ऑफ बाम्बे, जुलै १९५९ ]

## पातालयक्ष

जैन दैवतसमूहातला एक यक्ष हा अनंत नाथाचा सेवक आहे याचे वर्णन असे –

हा त्रिमुख असून राहा हाताचा आहे तो अंकुश, माला, धनुष्य, दोरी, नागर आणि फल धारण करतो (श्वेतांबर मते कमल खड्ग, पाश मुगूस, फल आणि माला धारण करणारा )

याच्या मस्तकावर तीन नागफण्याचे छत्र असते ते याचे नागलोकावरचे आधिपत्य सूचित करते नागराचा संबंध तो कृषिदेव असल्याचेही सुचवतो [ ज इ ]

## पातालव्रत

एक काम्य व्रत चैत्र वद्य प्रतिपदेला हे व्रत करतात त्याचा विधी असा –

एकानंतर दुसरे अशा क्रमाने सप्तपातालांची पूजा करावी त्या दिवशी नक्त भोजन करावे उद्यापनाच्या वेळी ब्राह्मणाच्या घरामध्ये दिवे लावावे आणि शुभ्र वस्त्रे दान करावी फल – संकटनिवारण व सुखसमृद्धीचा लाभ [ हि ध ]

## पातिमोक्ख

बौद्ध भिक्षूंच्या दैनंदिन आचरणाची नियमावली त्रिपिटकापैकी विनयपिटकाचे सार यात सर्व लिन आहे हे एकूण २२७ नियम असून, त्यात बौद्ध भिक्षूंनी वस्त्रे कोणती वापरावी, अन्न कोणते घ्यावे, औषधे किती व कोणती घ्यावी, परस्परांशी वागताना कसे बोलावे वगैरे बाबतीत मार्गदर्शन आहे दर पंधरा दिवसांनी या नियमांचा उच्चार करण्याची प्रथा असे व तिला उपोसथ असे म्हणत पातिमोक्ख या शब्दात मोक्षाचा उल्लेख असला तरी मोक्षासाठी काय करावे हे या नियमावलीत कुठेही सांगितलेले नाही या नियमांचे ७ विभाग पाडले असून, त्या प्रत्येक विभागाचे आचारमाहात्म्य भिन्न श्रेणीचे आहे बौद्ध पंथापूर्वी भारतात असलेल्या अन्य पंथाच्या नियमावलीच्या आधारेच पातिमोक्ख मधील नियमांची रचना केलेली आहे [ ए रि ए ]

## पातुर

(१) एक नगर हे नगर विदर्भातील बाळापूर तालुक्यातल्या निर्गुणा नदीच्या काठी वसले आहे या गावात पातुर नावाच्या एका अवलियाची कबर आहे हिंदू आणि मुसलमान दोघेही त्या अवलियाला भजतात याशिवाय इथल्या डोंगरात बरीच बौद्ध लेणी आहेत त्या लेण्यांमधून बरेच अस्पष्ट शिलालेखही आहेत गावाच्या वेशीवरही असेच शिलालेख आहेत

(२) एक जात या लोकांचे वास्तव्य राजस्थानात आहे या जातीतल्या बायका गाणे बजावणे आणि गणिकावृत्ती यावर आपला चरितार्थ चालवतात हे आपली उत्पत्ती राजपुतांपासून झाली असे सांगतात [ लोककला श्रे , नि मु रा प ]

## पात्र

क्रियेचे किंवा आधेयाचे जे रक्षण करते, ते पात्र होय यज्ञ–यागादी कार्यात व देवपूजेत पात्रनिर्मितीला महत्त्व असते पात्र लाकडाचे, निरनिराळ्या धातूंचे वा मातीचेही बनवतात देवपूजेसाठी घ्यायच्या पात्राचा विस्तार सहा अंगुळ, त्याचा नासिका चार अंगुळे व ओठ एक अंगुळ असावा, असे सांगितले आहे

सुवर्णपात्राच्या योगाने सर्व गोष्टी प्राप्त होतात रुप्याच्या पात्राने आयुरारोग्य व संतती प्राप्त होते ताम्याच्या पात्राने सौभाग्याची आणि मातीच्या पात्रामुळे धर्माची प्राप्ती होते, असे सांगितले आहे

विष्णूचे पादतीर्थ पात्रानेच घेतले पाहिजे, असा दंडक आहे पात्रातून तीर्थ घेणारा मोक्षाला जातो आणि त्याच्या सर्व पापांचा निरास होतो, असे भविष्य पुराणात सांगितले आहे पात्रावाचून केलेल्या क्रिया विफल होतात [ श क ]

## पात्रव्रत

एक काम्यव्रत माघ शुद्ध एकादशी व पौर्णिमा या दोन तिथींना मिळून हे व्रत पुरे करतात या व्रताचा विधी असा –

एकादशीला उपवास करावा पौर्णिमेला एका शुद्ध केलेल्या जागी सुवर्णपात्रात तूप भरून ठेवावे त्या पात्रावर नव्या वस्त्रांची एक जोडी ठेवावी त्या रात्री जागरण करावे दुसऱ्या दिवशी सकाळी ते पात्र विष्णूच्या देवाल्यात नेऊन तिथे त्या तुपाने व इतर पंचामृतांनी विष्णूला स्नान घालून त्याची पूजा करावी नंतर ते पात्र विष्णूला अर्पण करावे मग आचार्यांना, अंधांना आणि गरिबांना यथाशक्ति भोजन घालावे फल – सुखसमृद्धीचा लाभ व विष्णुलोकप्राप्ती [ हि ध ]

## पात्री

एक यज्ञीय पात्र पिष्टसंयवनी असेही याचे नाव आहे हवी तयार करण्यासाठी लागणारे पीठ व वरून पाणी या पात्रीत घेऊन त्याचा पुरोडाश बनवतात हे पात्र मातीचे करतात [ श्री विद्याधरशास्त्री भिडे ]

**पाथरवट** धंद्यावरून बनलेली एक जात. दगडाची कामे करणारे ते पाथरवट होत. यांची वस्ती महाराष्ट्रात आहे. हे लोक मूर्ती घडविण्याचे कामही करतात. आम्ही राजपूतांचे वंशज आहो, असे ते सांगतात. मराठा, कामाठी व तेलंगी असे याचे तीन वर्ग आहेत. परंतु या तीन वर्गांत रोटीबेटी व्यवहार होत नाही. यांच्या लग्नात नवरा–नवरी बांबूच्या पेटाऱ्यात उभी राहतात. यांचा पुरोहित बहुधा यजुर्वेदी ब्राह्मण असतो. खंडोबा हे यांचे कुलदैवत होय. हे लोक मराठी भाषा बोलतात. त्यांची राहणी स्वच्छ व नेटकी असते. त्यांचे आचारविचार मराठा कुणब्यांप्रमाणे असतात. यांच्यांत जातपंचायत असते. ती जातीतील तंटे मिटविते. [म.ज्ञा.को.; मुं.इ.जा.]

**पाथियार** एक जमात. यांची वस्ती केरळ प्रदेशातील कालिकत जिल्ह्यात आणि विशेषतः थेकुनपेट्टा व किडंगनद या भागात आढळते. हे लोक वर्णाने काळे किंवा पिंगट असतात. ते मल्याळम भाषा बोलत असले तरी, त्यांच्या भाषेत कानडी शब्दांचा भरणा बराच आहे. त्यावरून या जमातीचे मूळ स्थान कानडी प्रदेशात असावे, असे वाटते. यांच्यांत मातृप्रधान कुटुंबपद्धती आहे. शेतात काम करणे, हा त्यांचा प्रमुख व्यवसाय आहे. त्यामुळे त्यांची घरेही शेताजवळच असतात.

**विवाहप्रथा** – मुले वयात आल्यावर त्यांचा विवाह करतात. वराची मामेबहीण हीच बहुधा वधू ठरवली जाते. विवाहापूर्वी वराला काही दिवस वधूकडे सेवेसाठी राहावे लागते किंवा वधूसाठी देज द्यावे लागते. मुप्पन नावाचा जातिप्रमुख असतो. विवाह निश्चित ठरवण्यापूर्वी त्याचा विचार घेतात. वधूवरांची पत्रिका पाहाण्याची चाल आहे.

*हे लोक शिव, विष्णू व काली या देवतांना भजतात.*

**मर्तिकप्रथा** – तरुण मृत झाल्यास त्याला पुरतात. परंतु वृद्ध मृताचे दहन करतात. सातव्या दिवशी मृताच्या अस्थी गोळा करतात. सात दिवस सुतक पाळतात. [ट्रा. के.]

**पाथेयश्राद्ध** मृताच्या प्रेतत्वनिवृत्तीसाठी करायच्या श्राद्धांपैकी एक. बहा दिवसांच्या और्ध्वदेहिक क्रियेमध्ये हे करतात. यात क्षण, आसन, अर्घ्य, इ. उपचार अमंत्रक द्यायचे असतात. मग एका कुशावर सक्तुपिंडाचे दान करून उदकुंभादी वस्तू दक्षिणेसह ब्राह्मणाला देतात. [अ. श्र. स.]

**पाद** शरीराचा एक अवयव. 'पद्यते अनेन इति' = ज्याच्या योगाने गमन करता येते, तो पाद होय, अशी त्याची व्याख्या आहे. गर्भस्थ बालकाला दोन महिन्यांनी पाय येतात. पाय हे अध्यात्माचे इंद्रिय आहे, असे महाभारतात म्हटले आहे. पायाने पाय किंवा उष्टे ओलांडू नये, बिस्तरावर पाय तापवू नयेत व कांस्यपात्रात पाय धुवू नयेत, असे सांगितले आहे. तसेच देवमूर्ती, ग्रंथ, मांगलिक वस्तू, पूजाद्रव्ये व श्रेष्ठ व्यक्ती यांना पादस्पर्श करू नये, असेही सांगितले आहे. गुरूचे पाय शिरोधार्य मानण्याची पद्धत आहे. [श. क.]

**पादकृच्छ्र** एक व्रत. पादकृच्छ्र म्हणजे कृच्छ्राचा चौथा भाग होय. याचा विधी असा –

> **एकभक्तेन नक्तेन तथैवायाचितेन च ।**
> **उपवासेन चैकेन पादकृच्छ्र उदाहृतः ॥**

अर्थ – (एक दिवस) एकभुक्त राहिल्याने, (एक दिवस) नक्त भोजन केल्याने, (एक दिवस) अयाचित भोजन केल्याने आणि (एक दिवस) उपवास केल्याने पादकृच्छ्र व्रत होते.

अशा प्रकारे हे व्रत चार दिवसाचे होते. [हि. ध.; श. क.]

**पादत्राण** तळपायाला काटेकुटे बोचू नयेत व थंडी, ऊन, वारा यांच्यापासून त्यांचे रक्षण व्हावे, म्हणून त्यांना जे आवरण घालतात, त्याला पादत्राण म्हणतात. प्राचीन काळापासून माणसे पादत्राणांचा उपयोग करीत आली आहेत. वेदवाङ्मयातही त्यांचे अनेक उल्लेख आढळतात. संस्कृत भाषेत पादत्राणांना उपानह म्हणतात.

प्राचीन काळी झाडाच्या साली, वेत, लाकडी फळ्या, मुंजतृण, लोकर, ताडपत्र, भूर्जपत्र, कमलपत्र, गवत, मृगाजिन, डुकराचे कातडे, इ. वस्तूंचा पादत्राणांसाठी उपयोग करीत.

अग्निचयनात श्येनचिती निर्माण करण्याचे काम चालू असता यजमान, अध्वर्यू व विटा मांडणारे ही मंडळी हरणाच्या कातड्याचे जोडे वापरीत. असे कातडे केस असलेले असावे, असा नियम असे. राजसूय यज्ञात विशिष्ट प्रसंगी डुकराच्या कातड्याचे पादत्राण वापरीत

घरात, देवळात, मठात, यज्ञमंडपात, पवित्र स्थानी व सोवळ्यात वावरताना चामड्याची पादत्राणे वापरू नयेत, असा संकेत आहे. म्हणून तशा स्थळी किंवा प्रसंगी वापरण्यासाठी, फळीवर हरणाचे कातडे चढवून त्याची पादत्राणे बनवितात. संन्यासी अशाच प्रकारची पादत्राणे वापरतात. त्यांना खडावा अशी संज्ञा आहे.

मूर्तिशिल्पात मूर्तीच्या पायात उपानह किंवा पादुका असाव्या, असे सांगितले आहे. त्याविषयीचा एक श्लोक असा –

> **उपानहौ प्रकर्तव्यौ स्वपादप्रतिमौ तथा ।**
> **पादुके च तथा कार्ये अन्यथा दुःखशोकदौ ।**

अर्थ – मूर्तीच्या पायाच्या मापाची पादत्राणे किंवा पादुका कराव्या तसे न केल्यास दुःख-शोक प्राप्त होतात

पधराव्या शतकापासून भारतात चित्रविचित्र पादत्राणे प्रचारात येऊ लागली अठराव्या शतकापासून पादत्राणाचे आकार, त्याची शिलाई, त्यावरची कलाकुसर, इ. बाबतीत सौंदर्यदृष्टी आली वापरणाऱ्याच्या व्यवसायपरत्वे आणि स्थानिक परिस्थितीनुसारही पादत्राणाच्या निर्मितीत बरेच फरक पडले त्याच्या बनावटीतही खपच वैचित्र्य आले

## पादप्रक्षालन

पाय धुणे असा या शब्दाचा अर्थ आहे दुसऱ्याचे पाय धुणे हेही पादप्रक्षालनातच येते आचारेंदु या ग्रथात त्याविषयी सांगितले आहे, ते असे—

> प्रथम प्राङमुख स्थित्वा पादौ प्रक्षालयेच्छनः ।
> न हसन्न च सञ्जल्पन्नाऽसमानमवलोकयन ।।
> इत्येव मृदभिराजानु प्रक्षाल्य चरणौ पृथक ।
> हस्तावामणिबन्धाच्च कुर्यादाचमन ततः ।।

अर्थ – प्रथम पूर्व दिशेला तोंड करून सावकाशपणे पाय धुवावे ते धुताना हसू नये, गप्पागोष्टी करू नयेत व स्वत कडे पाहत राहू नये गुडघ्यापर्यंत माती लावून एक एक पाय स्वच्छ धुवावा एवढे झाल्यावर कोपरापर्यंत हात धुवून नतर आचमन करावे

पादप्रक्षालनासबधी काही सकेत रूढ आहेत, ते असे –

देवपूजा किंवा कोणताही धार्मिक विधी करण्यापूर्वी, स्वयपाकघरात व देवाऱ्यात जाण्याआधी, बिऱ्हाडी परत घरात येताना, भोजनाला बसण्यापूर्वी व बाळंतिणीच्या खोलीत जाताना पाय धुतले पाहिजेत मल–मूत्रविसर्जनानतर प्रथम डावा व नतर उजवा पाय धुवावा इतर वेळी ही क्रिया उलट करावी, असे सांगितले आहे

षोडशोपचार पूजेत देवाला पाद्य देतात, तोही पाय धुण्याचाच प्रकार आहे मधुपर्कपूजा पादप्रक्षालनपूर्वक करावी असे सांगितले आहे लग्नात वर मातेचेही पाय धुण्याची प्रथा आहे महाराष्ट्रातील मराठा समाजात लग्नसमारभप्रसगी वधूपक्षातील एका विवाहित स्त्रीने वराचे पाय धुण्याची चाल आहे केरळात वधूने वराचे पाय धुतात अनेक आदिवासी लोकात वराबरोबर आलेल्या सब लोकांचे पाय धुतले जातात असे पाय धुतले नाहीत, तर भुतेखेते त्या समारभात विघ्न उत्पन्न करतात, अशी त्यांची समजूत असते

पत्नीने पतीचे पाय धुणे हा एक पतिसेवेचा भाग मानलेला आहे गाथासप्तशतीमध्ये पत्नीने सायकाळच्या वेळी पतीचे पाय धुतल्याचा उल्लेख आहे (१३०) [आचारे दु, एसा रि ए]

## पादसेवन

नवविधा भक्तीपैकी चौथी भक्ती भगवताच्या चरणकमलाची प्रत्यक्ष सेवा किंवा त्या या पदकमलाचे भजन करणे, याचा अतर्भाव पादसेवन भक्तीत होतो या भक्तीचा आदर्श म्हणजे लक्ष्मी होय त्याविषयी ज्ञानेश्वर लिहितात –

> मग सर्वस्वें करूनि सेवा । अभिमानू सांडूनि पांडवा ।
> ते पाय धुवावयाचिया वेवा । पात्र जाहली ।।

(ज्ञानेश्वरी १ ३७७)

परमेश्वराच्या पदकमलांची प्रत्यक्ष सेवा घडणे फार कठीण आहे त्यासाठी ब्रह्मदेवही आसावलेला असतो व तशी प्रार्थना करतो –

> तदस्तु मे नाथ स भूरिभागो
> भवेऽत्र वाऽन्यत्र तु वा तिरश्चाम् ।
> येनाहमेकोऽपि भवज्जनानां
> भूत्वा निषेवे तव पादपल्लवम् ।।

(भाग पु १० १४ ३०)

अर्थ – हे नाथ, आता या जन्मात किंवा पुढे कर्मानुसार कोणत्याही तिर्यग्योनीत मला जन्म आला, तरी त्या वेळी तुझ्या भक्तमडळीत माझाही समावेश व्हावा व मला तुझ्या चरणकमलाची प्रत्यक्ष सेवा घडण्याचे भाग्य लाभावे

रुक्मिणीनेही श्रीकृष्णाची अशीच प्रार्थना केली आहे—

> अस्त्वम्बुजाक्ष मम ते चरणानुरागः ।
> आत्मन्रतस्य मयि चानतिरिक्तदृष्टेः ।।

(भाग पु १० ६० ४६)

अर्थ – तुम्ही नेहमी निजानदात रममाण झालेले असता व त्यामुळे तुमची माझ्याविषयी उपेक्षा वृत्ती असते पण माझी तुम्हाला अशी प्रार्थना आहे, की मला तुमच्या चरणकमलाची सेवा तेवढी प्राप्त व्हावी

अनेक सतांनी पादसेवन भक्तीचे माहात्म्य वर्णिलेले आहे

## पादांगुष्ठासन

एक योगासन याची प्रक्रिया अशी – प्रथम टाचा व पायाचे तळवे वर उचलून पायाच्या बोटांच्या आधारावर बसावे मग उजव्या हाताची बोटे उजव्या पायाजवळ आणि डाव्या हाताची बोटे डाव्या पायाजवळ ठेवावी त्यानतर उजवा पाय डाव्या पायाच्या गुडघ्यावर ठेवावा व डाव्या पायाच्या टाचेवर अडकोश ठेवावा या वेळी कबर, पाय व डोके समातर रेषेत ठेवून श्वासोच्छ्वास चालू ठेवावा मग दोन्ही हाताची बोटे जमिनीवर उचलून धरावी मग शरीर समतोल ठेवून दोन्ही हात कमरेवर ठेवावे डोळे उघडे ठेवावे इतके केल्यावर या आसनाचा अर्धा भाग पुरा होतो याच प्रकारे

डावा पाय उजव्या गुडघ्यावर ठेवून व उजव्या पायाच्या टाचेवर अंडकोश ठेवून पुढचा अर्धा भाग पुरा करावा.



पादांगुष्ठासन

हे आसन केल्याने मन स्थिर राहते, वीर्यवाहिनी नाडी सशक्त होते व पायाची बोटे मजबूत होतात. [ उ. यो. द. ].

**पादोदक** देवाचे पाय धुतलेले जल. देवाप्रमाणेच संतमहंतांचे पाय धुतलेले पाणीही तीर्थरूप मानतात. जो देवाचे चरणतीर्थ प्राशन करतो, तो देवकृपेला पात्र होतो, अशी समजूत आहे. या संबंधीचा एक श्लोक असा—

**पीते धृते च शिरसि सर्वास्तुष्यन्ति देवताः ।**
**प्रायश्चित्तं हि पापानां कलौ पादोदकं हरेः ।।**

अर्थ – पादोदक प्राशन केल्याने आणि मस्तकावर शिंपडल्याने सर्व देवता संतुष्ट होतात. विष्णुपादोदक हे या कलियुगात सर्व पापांचे प्रायश्चित्त आहे.

सर्व पापांचे क्षालन करण्याची इच्छा करणाऱ्याने प्रथम विप्रपादोदक घ्यावे व नंतर विष्णुपादोदक घ्यावे, असे धर्मशास्त्रात सांगितले आहे.

पादोदकाने अकाल मृत्यूचे हरण होते आणि सर्व व्याधींचा विनाश होतो, अशी समजूत आहे.

पादोदकाचा एक थेंबही जमिनीवर पडू देऊ नये, असा



पादपूजा

संकेत आहे. एकादशीला एकदा व इतर दिवशी तीनदा पादोदक घ्यावे, असे सांगितले आहे. [ श. क.; आचारेन्दु ]

**पादोदकस्नान** एक व्रत. याचा विधी असा– उत्तराषाढा नक्षत्राच्या दिवशी उपवास करून श्रवण नक्षत्राच्या दिवशी विष्णूच्या पावलांना स्नान घालावे. त्याचप्रमाणे सोने, रुपे, तांबे किंवा चिकणमाती यांची पात्रे करून त्यांतून संकर्षण, प्रद्युम्न व अनिरुद्ध यांच्या मूर्तींच्या पावलांनाही स्नान घालावे. नंतर ती चार पात्रे विहीर, तळे किंवा नदी यांच्या पाण्याने भरून त्यावर मंत्रसंस्कार करावा. मग त्या पाण्याने स्नान करावे. फल– सर्व संकटांचा परिहार, रोगनिवृत्ती, कीर्ती व संपत्ती यांचा लाभ. [ हि. ध ]

**पादोनकृच्छ्र** एक प्रायश्चित्त. पादोन याचा अर्थ तीन चतुर्थांश असा आहे. हे नऊ दिवस करायचे असते. पहिले तीन दिवस दुपारी एकदा जेवणे, नंतरचे तीन दिवस अयाचित मिळेल ते केव्हाही एकदाच जेवणे व त्यानंतरचे तीन दिवस पूर्ण उपवास करणे, असा याचा विधी आहे. [ हि. ध. ]

**पाद्य** पादप्रक्षालनासाठी घेतलेले जल म्हणजे पाद्य होय. षोडशोपचार पूजेतील हा तिसरा उपचार आहे. पाद्यासाठी सोने, चांदी, तांबे किंवा लोखंड यांचे पात्र घेतात. त्याचा विस्तार सहा अंगुळे, नासिका चार अंगुळे व ओठ एक अंगुळ असावा आणि त्या जलात कमल, विष्णुपर्णी, दूर्वा व सावे हे चार पदार्थ घालून त्याने देवाचे पादप्रक्षालन करावे, असे सांगितले आहे. मधुपर्क पूजेतही पूज्यास पाद्य द्यावयाचे असते. पाहा – देवपूजा. [ श. क.; व्रतराज ]

**पाथरनृत्य** सौराष्ट्रातील आदिवासी काळघाचे एक नृत्य यात नर्तक हातात टाळ किंवा झाजा घेऊन वर्तुळाकार बसतात मग त्याचे गाणे सुरू होते व गाणे गाता गाताच ते उठून होडी वल्हवल्यासारखा अभिनय करून नाचू लागतात काही नर्तक हातात टाळाऐवजी काठ्या घेतात व तिचा वल्ह्यासारखा उपयोग करतात नृत्याची गती जसजशी वाढत जाते तसतसे ते नाना प्रकारचे अगविक्षेप करतात अनेक वेळा ते खाली डोके व वर पाय करून पायात टाळ धरून वाजवतात आणि हातावर नाचतात [ए हो रा ]

**पाध्ये काशीनाथ अनंत** (१७९० – १८०५ इ स )एक धर्मनिबधकार याच्या वडिलांचे नाव अनत पाध्ये व आईचे अन्नपूर्णा असे होते रत्नागिरी जिल्ह्यातले गोळवली हे त्यांचे मूळ गाव होय मगगेश्वर तालुक्यातल्या बहात्तर गावाची जोसकी याच्याकडे होती, पण हे पाडुरगाचे भक्त असल्यामुळे ते पढरपुरी राहायला गेले व आयुष्याच्या अखेरीपर्यंत तिथेच राहिले याना बाबा पाध्ये असेही म्हणत

यानी धर्मसिंधू नावाचा ग्रथ रचला व तो अत्यत मान्य ठरला धार्मिक व्यवहारासाठी आवश्यक असलेल्या धर्मशास्त्रीय विषयाचा विचार त्यानी या ग्रथात उत्तम रीतीने माडला आहे हा ग्रथ लिहिण्यासाठी त्यानी निर्णयसिंधु पुरुषार्थ चिंतामणी काल माधव, हेमाद्री, कालतत्त्वविवेचन, कौस्तुभ, स्मृत्यर्थसार, इ ग्रथाचा आधार घेतला आहे आणि कित्येक ठिकाणी स्वत ला योग्य वाटणारा निर्णयही दिला आहे धर्मसिंधूचा निर्णय साप्रत काशीपासून रामेश्वरापर्यंत सर्वत्र मान्य केला जातो

प्रस्तुत ग्रथ पढरपुरी लिहून पुरा झाल्यावर बाबाचे बंधू विठ्ठलपत पाध्ये तो घेऊन काशीला गेले त्यांनी तो ग्रथ परीक्षेसाठी तिथल्या पण्डिताच्या पुढे ठेवला काशीस्थ पडितानी त्याची परीक्षा करून तो अधिकृत व उत्तम असल्याचा निर्णय दिला इतकेच नव्हे, तर त्या ग्रथाची पालखीतून काशी क्षेत्रात मिरवणूकही काढली

धर्मसिंधूचे तीन परिच्छेद म्हणजे तीन भाग आहेत पहिल्या व दुसऱ्या परिच्छेदात वर्षाच्या बारा महिन्यातील धर्मकृत्या सबधी कालनिर्णयपूर्वक विवेचन केलेले आहे तिसऱ्या परिच्छेदाचे पूर्वार्ध व उत्तरार्ध असे दोन भाग आहेत त्यात सोळा सस्कार, नित्यकर्मे, अग्निहोत्र, मूर्तीची अर्चा, गृहारंभ, गृहप्रवेश, प्रयाण, इ गोष्टीविषयी नियम सागितले आहेत पुढे कलियुगातील वर्ज्यावर्ज्य गोष्टीचे सागोपाग विवेचन केले आहे त्यापुढे सन्यास ग्रहणाचा विचार सागितला असून, सन्यासी व विधवा याचे धर्मही तपशीलवार सागितले आहेत हा मूळ ग्रथ सस्कृत भाषेत असून, त्याचे मराठी भाषातरही प्रकाशित झाले आहे

बाबा पाध्ये यानी पढरपुरात एक सस्कृत पाठशाळा चालविली होती पेशवे त्याना सालीना १२०० रुपयाची सभावना देत असत त्यानी पढरपूरच्या विठ्ठलाच्या पूजेतील उपचार वाढविले स्वरचित सस्कृत आरत्या विठोबापुढे म्हणण्याचा प्रथाही सुरू केली विद्वत्ता व सदाचरण या दोन्ही गुणामुळे पढरपुरात बाबाविषयी नितात आदर निर्माण झाला होता प्रतिष्ठित लोक व राजेरजवाडेसुद्धा पाडुरगाच्या दर्शनानतर बाबाच्या दर्शनाला जात मृत्यूपूर्वी काही काळ त्यानी सन्यास घेतला होता [ध सिं , वारी अप्रसिद्ध ऐतिहासिक चरित्रे ]

**पानपदास** (१७१९–१७७३ इ स ) एक हिंदी सतकवी हा मूळचा दिल्लीजवळच्या एका खेड्यगावचा रहिवासी होता घरच्या दारिद्र्यामुळे याच्या माता–पित्यानी याचा बालपणीच त्याग केला पुढे दिरघान जातीच्या एका पुरुषाने याचा साभाळ केला व स्वत च्या शिल्पव्यवसायाचेही त्याला शिक्षण दिले याच काळात पानपदास लेखन–वाचनही शिकला सस्कृत व फारसी भाषावर त्याने प्रभुत्व मिळविले उत्तम शिल्पकार म्हणूनही याने नाव कमावले पण त्याचा ओढा अध्यात्माकडे असल्याने त्याला अन्य कामात रस वाटेना व्यवसाया निमित्त गावोगाव फिरत असताना तो साधुसंताच्या गाठी-भेटी घेऊ लागला अशाच एका प्रसगी त्याची व मगनीराम नामक एका कबीरपथी साधूची भेट झाली त्याच्या साधुत्वाने प्रभावित होऊन पानपदासाने कबीरपथाची दीक्षा घेतली

दीक्षा घेतल्यावरही त्याने आपला व्यवसाय सोडला नाही त्या नतर एकदा बिजनौर जिल्ह्यातील धामपूर नामक गावी एका नव्या इमारतीचे बांधकाम तो करीत होता एके दिवशी त्या इमारतीच्या मालकाच्या कानावर पानपदासाच्या साधुत्वाची कीर्ती गेली व त्याने आपली ती नवी इमारत पानपदासाला देऊन टाकली मग पानपदासाने तिथेच आपला मठ उभारला

वाणीग्रथ या नावाने पानपदासाच्या कविता सग्रहीत असून, तिचे हस्तलिखित धामपूर मठामध्ये ठेवलेले आहे या कवितेचे नामस्तोत्र, नामलीला, गगनगोरी, तत्त्वोपदेश, प्रेमरतन, इ नावानी एकूण १२ भागात सकलन केले आहे

त्याच्या शिष्यपरिवारात मनसादास, कालीदास, चूडदास व बुद्धिदास हे चौघे प्रमुख होत याच्या नावावर एक पथही आहे, परंतु तो फारसा प्रसिद्ध नाही [उ भा स प ]

**पान वाहणे** वारली आदिवासी लोकांचा एक श्राद्धविधी. हे लोक प्रत्येक सणाच्या दिवशी सर्व धान्ये व भाज्या एकत्र शिजवून सुपात भरतात. नंतर ते सूप घराच्या छपरावर ठेवतात. तो नैवेद्य कावळ्यांनी खाल्ला, की पितरांना मिळाला, असे समजतात. तसे झाले नाही, तर मग ते भगताकडे गाऱ्हाणे नेतात. [ म. लो. मा. ४ ]

**पानान** द. भारतातली एक जात. यांची वस्ती तमिळनाड, केरळ व आंध्र या प्रदेशांत आहे. तमिळनाडमध्ये हे शिंपी व सुतार म्हणून कामे करतात आणि आंध्रात जादूटोणा व छत्र्या विणणे, हे व्यवसाय करतात. त्यांच्या बायका सुईणकाम करतात. केरळात धार्मिक समारंभप्रसंगी थुडी नामक चर्मवाद्य वाजवण्याचे काम यांच्याकडे असते. काही पानान न्हाव्याचे काम करतात, तर काही टोपल्याही विणतात. पनिक्कन नावाची यांची एक पोटजात असून, ती अस्पृश्य समजली जाते.

यांच्या ग्रामप्रमुखाला कप्रदन असे म्हणतात. तो मरण पावला, की पूर्वी ती बातमी राजाला कळवीत. मग राजा मयताच्या मुलाला एक तलवार, चिलखत, भाला, लहान बंदुका, त्यांची दारू, चांदीचे कडे, इ. वस्तू पाठवी. अजूनही कप्रदानाचे प्रेत स्मशानाकडे नेत असताना त्याचा मुलगा व इतर काही माणसे वरील सर्व वस्तू अंगावर धारण करून प्रेताः मागे चालतात. घरातून प्रेत बाहेर नेताना, ते जमिनीवर ठेवताना व दहन झाल्यावर असे तीन बंदुकीचे बार काढतात. पूर्वी प्रेतदहनानंतर मयताचा पुत्र स्वतः बनवलेली छत्री घेऊन जाई व राजा त्याला कप्रदनपद बहाल करी.

मुक्कन, चाथन, कप्पिरी, मलैकोरथी, काली, इ. त्यांच्या देवता होत. या देवतांच्या प्रतिमा म्हणून निरनिराळ्या झाडांखाली काही दगड ठेवतात व विशेष दिवशी त्यांना स्नान घालून कोंबडी—बकरी बळी देतात. या देवतांच्या प्रीत्यर्थ प्रत्येक पानान शुद्ध प्रतिपदा व शुद्ध आणि वद्य एकादशी करतो.

हे लोक प्रेते पुरतात व मृताशौच सोळा दिवस पाळतात. प्रतिवर्षी मृताला पिंडदान करतात. [का. ट्रा. स. इं.]

**पानो** द. भारतातील एक जात. या लोकांची वस्ती गंजम जिल्ह्यात आहे. यांच्यात खोंड पानो व देस पानो अशा दोन पोटजाती आहेत. पानो लोक ओडिया, भाषा बोलतात. हे व्यापार व विणकाम करतात, शिंगे, कातडी व गुरेढोरे यांची विक्री करतात आणि लहान लहान जंगले मक्त्याने घेऊन त्यांत रेशमी किड्यांची वाढ करतात. विवाह, अंत्यविधी व बलिदान या प्रसंगी हे लोक वाद्ये वाजविण्याचेही काम करतात आणि त्याच्या मोबदल्यात अन्न, वस्त्र व मद्य मिळवितात.

यांची घरे सालवृक्षाच्या लाकडांची असतात. घराबर गवताचे छप्पर असते. कधी कधी ते बांबूचीही घरे बांधतात.

देस पानो लोकांचा विवाहविधी दंडासी व हुड्डी जातीप्रमाणे असतो, तर खोंड पानोंचा विवाहविधी खोंडांच्या विवाह विधीप्रमाणे असतो. वधू ही एक देवाण—घेवाणीची वस्तू आहे असे ते मानतात. एक रेडा, एक डुक्कर व पितळेचे एक भांडे एवढे ते मुलीचे किमान देज घेतात. वधू—वरांची बोटे एकमेकांत गुंफणे हा विवाहविधीतील महत्त्वाचा विधी होय. ज्या घरात विवाहकार्य चालू असेल, त्या घराच्या बाहेर पाण्याने भरलेले एक पितळेचे मोठे भांडे ठेवतात. लग्नाला येणारे लोक त्या पाण्याने पाय धुतात आणि मग आत जातात.

पानोंचा व खोंडांचा परस्परांशी निकटचा संबंध आहे. खोंड लोक अडीअडचणीच्या प्रसंगी सल्लामसलतीसाठी पानोंकडे येतात. पानो व खोंड यांच्यांत बेटीव्यवहार होत नाही; परंतु पानो इसमाने खोंड स्त्री पळवून नेल्यास ती त्याची पत्नी होऊ शकते. पानोने जर विवाहित खोंड स्त्रीशी व्यभिचार केला, तर त्या पानोला खोंड स्त्रीच्या नवऱ्याला एक रेडा, एक बोकड, एक डुक्कर, भाताची टोपली, एक रुपया व थोडी भांडी एवढ्या वस्तू दंड म्हणून द्याव्या लागतात. एखादा खोंड पुरुष वाघाकडून मारला गेला, तर एका डुकराचा बळी देऊन त्या घटनेची शांती करितात. डुकराचा बळी देण्याचा विधी मात्र पानो इसम करतो.

काही पानो ठाकुराणी नामक ग्रामदेवतेची पूजा करतात. पूजेकरिता मूर्ती म्हणून आठाचा आकडा काढतात व त्यावर अक्षता व हळद वाहतात. नंतर एक कोंबडे बळी देऊन त्याचे रक्त त्या मूर्तीवर वाहतात. काही ठिकाणी धर्मदेवता व गगनसुनी यांची पूजा होते. त्यांच्यासाठी बलिदानही करतात.

खोंडांच्या संगतीत असलेल्या पानो स्त्रिया आपल्या तोंडावर गोंदून घेतात.

हे लोक मृत पूर्वजांना पूज्य मानतात आणि मृतांसाठी पिंडदान करतात. नवीन मूल जन्माला आल्यावर मृत आजा किंवा मृत पणजा यांपैकी कोणी जन्माला आला आहे काय, असा प्रश्न पुरोहिताला विचारतात. पुरोहिताने होय असे उत्तर दिल्यास मृत पूर्वजांना डुकराचा बळी देतात [का. ट्रा. स. इं.]

**पाप** एक धर्मशास्त्रीय संज्ञा. पाप शब्दाची नेमकी व्याख्या करणे कठीण आहे. पातक, अंहस्, दुरित, अघ इ. शब्द पाप या शब्दाचे समानार्थक आहेत. पातकाची व्याख्या न्याय-

कोशात दिली आहे, ती अशी – 'पातित्यजनकादुरदृष्टप्रयोजक क्रियाविशेष ' = पातित्य उत्पन्न करणारा व वाईट अदृष्टाचा प्रयोजक असा क्रियाविशेष म्हणजे पातक होय सामान्यपणे असे म्हणता येईल, की ईश्वरी नियमाविरुद्ध वर्तन करणे किंवा धर्मशास्त्राने जे निंद्य किंवा निषिद्ध ठरवले असेल, असे कृत्य करणे म्हणजे पाप होय पाप हे माणसाला पतित बनवते, त्याला नरकवास भोगवून विविध योनीत जन्म घ्यायला लावते, त्रिविध ताप भोगवते आणि त्याच्या आत्मोन्नतीला, स्वर्गगतीला आणि मोक्षालाही प्रतिबंध करते, अशी त्याच्याविषयी धर्मशास्त्रीय धारणा आहे सस्कृतीच्या कोणत्याही थरातल्या माणसाच्या, त्याचप्रमाणे सुशिक्षित–अशिक्षित, अशा कोणत्याही माणसाच्या मनात या ना त्या स्वरूपात पापविषयक जाणीव असतेच, असा अनुभव आहे एखादा बुद्धिवादी मनुष्य पाप ही वस्तूच नाही असे प्रतिपादन करीत असला, तरी नास्तिकांनाही त्याचा पापाचा विचार करावाच लागतो

पाप हे मळाप्रमाणे माणसाच्या अंगाला चिकटते आणि ते शारीरिक उपायांनी दूर करता येते, अशी समजूत अगदी प्रारंभी होती ऋग्वेदात ही कल्पना आढळते जलोदरासारखे रोग पापामुळे उत्पन्न होतात व वरुणाची प्रार्थना केल्याने त्यातून सुटका होते, असे तिथे म्हटले आहे ऋग्वेदातील वरुण ही देवता सर्व साक्षी असल्यामुळे तिला सर्व माणसांची बरीवाईट वर्मे समजतात, अशी कल्पना असल्यामुळे पापक्षालनार्थ मुख्यत्वे त्याचीच प्रार्थना केलेली आहे गृत्समद ऋषी म्हणतो –

**दामेव वत्साद्विमुमुग्ध्यंहो न हि त्वदारे निमिषश्चनेशे ।**

(ऋ २ २८ ६)

अर्थ – (हे वरुणा) दावरापासून दावे दूर करावे, त्याप्रमाणे तू माझी पापापासून मुक्तता कर कारण तुझ्या सामर्थ्यावाचून कोणाच्या डोळ्याची पापणीसुद्धा हलत नाही

वरुणाप्रमाणेच आपोदेवता, अग्नी व सविता ह्याही पाप नष्ट करू शकतात, असे म्हटले आहे ऋग्वेदात (ऋ ७ ४९) पापमुक्तीबद्दल व स्वतःला पावन करण्याबद्दल आपोदेवतेची प्रार्थना आहे आंगिरस कुत्साचे एक अग्निसूक्त असून, त्यात प्रत्येक मंत्राच्या शेवटी 'अप न शोशुचदघम' = हा अग्नी (प्रज्वलित होऊन) आमचे पाप नष्ट करो, असे पालुपद आहे

तथापि पापामुळे आपला नैतिक किंवा मानसिक अधःपात झाला आहे व त्यातून आपला उद्धार व्हायला हवा आहे, ही कल्पना मात्र अशा पापमुक्तीच्या प्रार्थनातून दिसत नाही आपल्या हातून घडलेल्या चुकीमुळे आपल्यावर देवतेचा कोप झाला असून, तो नाहीसा करणे व देवतेला प्रसन्न करून घेण्यासाठी तिला काही अर्पण करणे, एवढीच कल्पना ऋग्वेदातील पापमुक्तीच्या प्रार्थनांमध्ये आहे, असे दिसते

ऋग्वेद, तैत्तिरीय संहिता, वाजसनेयीसंहिता, काठकसंहिता यांत पापाविषयी वेगवेगळे विचार दिसतात आणि त्या कल्पनेचा काही विकासही दिसतो, तो असा –

**न स स्वो दक्षो वरुण ध्रुति सा**
**सुरामन्युर्विभीदको अचित्ति ।**

(ऋ ७ ८६ ६)

अर्थ – हे वरुणा कोणीही मनुष्य आपण होऊन (पाप करण्यास) धजत नाही पण मद्यपान, क्रोध जुगार व अविवेक यांच्यामुळे पाप घडते

**न पापासो मनामहे नारायासो न जल्हव ॥**

(ऋ ८ ६१ ११)

अर्थ – आम्ही पापी, निर्धन व अग्नी होणार नाही

**पापास सन्तो अनृता असत्या इद पदमजनता गभीरम ॥**

(ऋ ४ ५ ५)

अर्थ – जे पापी होतसाते अनृत (विश्वनियमाविरुद्ध वागणारे) व असत्य (भाषण करणारे) असतात, त्यांच्यासाठी हा अथांग खोल असा नरक उत्पन्न झाला आहे

**सप्तमर्यादा कवयस्ततक्षुस्तासामेकामिदभ्यंहुरो गात ॥**

(ऋ १० ५ ६)

अर्थ – कवींनी (ज्ञात्या पुरुषांनी) (धर्माच्या) सात मर्यादा घालून दिल्या आहेत त्यातील एकाचेही उल्लघन केल्यास मनुष्य पापी होतो

**तस्माद् ब्राह्मण सुरां न पिबति पाप्मनाने त्ससृज्या इति ।**

(काठकसंहिता १२ १२)

अर्थ – पापाचा ससर्ग होऊ नये, म्हणून ब्राह्मण दारू पीत नाही

**सर्व पाप्मान तरति तरति ब्रह्महत्या योऽश्वमेधेन यजते ॥**

(तै स ५ ३ १२)

अर्थ – जो अश्वमेध करतो तो सर्व पाप तरून जातो, ब्रह्महत्याही तरतो

वरील वचनात पापाविषयी तारतम्यही सांगितल्याचे दिसते ब्रह्महत्या हे सर्वांत मोठे पातक होय, असे त्यावरून कळते तैत्ति ब्राह्मणातही पापाच्या अनेक श्रेणी सांगून ब्रह्महत्येपलीकडे काही नाही, असे म्हटले आहे (३ २ ६–११) पुढल्या काळात हे तारतम्य अधिक स्पष्ट होऊन पापाचे वर्गीकरण झाले

**पापप्रकार** – स्तेय (चोरी), गुरुपत्नीशी व्यभिचार, ब्रह्महत्या, भ्रूणहत्या, सुरापान, दुष्कृत कर्मांचे पुनः पुन आचरण व असत्य भाषण ही महापापे निरुक्तात सांगितली आहेत (६ २) ब्रह्महत्या, चौर्य, गुरुपत्नीशी व्यभिचार व मद्यपान ही महापापे

होत, असे छांदोग्य उपनिषदात सांगितले आहे (५.१०.९).

महापाप्यांबरोबर संबंध ठवणाराही तितकाच पापी होतो, असेही तिथे म्हटले आहे.

प्रकीर्ण, अपांक्तेय, मालिनीकरण, ज्ञातिभ्रंशकर, उपपातक, अतिपातक आणि महापातक असे सात पापप्रकार अन्यत्र सांगितले आहेत. कात्यायनाने महापातक, अतिपातक, पातक, प्रासंगिक पातक व उपपातक असे पाच पापप्रकार सांगितले आहेत.

तिथ्यादितत्त्वात काया, वाचा आणि मन यांची मिळून दशविध पापे सांगितली आहेत, ती अशी –

**अदत्तानामुपादानं हिंसा चैवाविधानतः ।**
**परदारोपसेवा च कायिकं त्रिविधं स्मृतम् ।।**
**पारुष्यमनृतं चैव पैशुन्यं चापि सर्वशः ।**
**असम्बद्धप्रलापं च वाङ्मयं स्याच्चतुर्विधम् ।।**
**परद्रव्येष्वभिध्यानं मनसाऽनिष्टचिन्तनम् ।**
**वितथाभिनिवेशं च त्रिविधं कर्म मानसम् ।।**

अर्थ– एखाद्याने दिली नसता त्याची वस्तू घेणे (चौर्य), विधान नसता प्राणहिंसा करणे व परदारागमन ही तीन कायिक पापे होत. कठोरपणा, खोटेपणा, सर्वांशी दुष्टपणा व असंबद्ध बडबड ही चार वाणीची पापे होत. दुसऱ्याच्या द्रव्यावर डोळा ठेवणे, मनाने दुसऱ्याचे अनिष्ट चिंतिणे व खोट्या गोष्टींचा अभिनिवेश करणे, ही तीन मानसिक पापे होत.

महानिर्वाणतंत्रात पाप दोन प्रकारचे आहे, असे सांगितले आहे. त्याविषयीचे श्लोक असे–

**अनुष्ठानं निषिद्धस्य त्यागो विहितकर्मणः ।**
**नृणां जनयतः पापं क्लेशशोकामयप्रदम् ।।**
**स्वानिष्टमात्रजनकात्परानिष्टोपपादकात् ।**
**तदेव पापं द्विविधं जानीहि कुलनायिके ।।**
**परानिष्टकरात् पापान्मुच्यते राजशासनात् ।**
**अन्यस्मान्मुच्यते मर्त्यः प्रायश्चित्त्या समाधिना ।।**

अर्थ– धर्मशास्त्राने निषिद्ध ठरविलेल्या गोष्टींचे आचरण व शास्त्रविहित कर्माचा त्याग, या दोन गोष्टींमुळे माणसांना पाप लागते व ते क्लेश, शोक व रोग निर्माण करते. हे पार्वती, केवळ स्वतःचे अहित करणे व दुसऱ्याचे अनिष्ट करणे यामुळे पाप दोन प्रकारचे होते, असे तू जाण. दुसऱ्याचे अनिष्ट केल्यामुळे घडणाऱ्या पापापासून राजाने केलेल्या शासनाने मुक्ती मिळते. आणि स्वतःचे अहित करणाऱ्या पापापासून मनुष्य प्रायश्चित्त व समाधी यांच्या योगाने मुक्त होतो.

पाप हे नरकवास व अधोगती यांना कारणीभूत होत असते. ब्रह्महत्यादी पातकांपैकी कोणत्या पापामुळे कोणत्या योनीत जन्म घ्यावा लागतो, त्याची विस्तृत यादी मनूने दिली आहे (१२.५३–७२). श्रुतिस्मृतींतील पापांच्या यादीत पुराणांनी पुढे खूप भर घातली. झाडांचा चिक पिणे, अफू, वांगे, तोंडले, कांदा, लसूण व वाळ्ळावरच्या छत्र्या खाणे, जाईच्या फुलांचा व्यापार करणे, सार्वजनिक द्रव्यनिधीचा अपहार करणे, कुग्रामात वास्तव्य करणे, वैद्यकीय व्यवसाय, स्त्रीचा क्रय-विक्रय, शस्त्राने उपजीविका, स्निग्ध पदार्थांचा विक्रय, अतिथीवाचून भोजन, द्रव्य घेऊन वेदाध्ययन, इ. गोष्टी व कलिवर्ज्य प्रकरणात सांगितलेल्या गोष्टी करणे, अशी ती पापांची यादी आहे.

पाप हे सांसर्गिक व आनुवंशिक रोगासारखे असल्याचे मत्स्य पुराणात सांगितले आहे. एखादे पाप ताबडतोब फल देतेच असे नाही. हळूहळू ते कर्त्याला बाधते आणि त्याचा मुळापासून उच्छेद करते. जर ते कर्त्याला भोगावे लागले नाही, तर ते त्याच्या पुत्राला किंवा नातवालाही भोगावे लागते. अशा रीतीने पाप हे तीन पिढ्यांपर्यंत आपला अंमल गाजवते. पद्म पुराणात पापसंक्रमण याहून व्यापक प्रमाणात सांगितले आहे, ते असे – प्रजेने केलेले पाप राजाला व राजाचे पाप प्रजेला बाधते. पापी स्त्रीचे पाप तिच्या पतीला, चाकराचे पाप धन्याला, गुरूचे पाप शिष्याला आणि शिष्याचे पाप गुरूला, यजमानाचे पाप पुरोहिताला व पुरोहिताचे पाप यजमानाला बाधक होते. एकाचे पाप कोणत्या गोष्टीमुळे इतरांना बाधक होते, त्याविषयी गरुड पुराणातला श्लोक असा–

**आलापाद् गात्रसंस्पर्शात् संवासात् सहभोजनात् ।**
**आसनाच्छयनात् यानात् पापं सङ्क्रमते नृणाम् ।।**

(गरुड पु. ११२)

अर्थ– पापी माणसाशी संभाषण, त्याचा स्पर्श, सहवास, भोजन, त्याच्याशी एकासन, शयन व त्याच्या बरोबर वाहनात जाणे, या गोष्टींनी एकाचे पाप दुसऱ्या माणसात संक्रांत होते.

सर्वसामान्य मनुष्यालासुद्धा पाप हे वाईट आहे, असे कळत असते. पण तरीही त्याच्या हातून पाप घडतेच ! असे का होते, हा यापुढचा प्रश्न आहे. गीतेत अर्जुनाने हाच प्रश्न श्रीकृष्णाला विचारला आहे. अर्जुन म्हणतो, की मनुष्य इच्छा नसतानाही बलात्कार केल्याप्रमाणे पाप आचरतो. कोणती शक्ती त्याला हे पाप आचरायला लावते ? त्यावर श्रीकृष्णाने त्याला उत्तर दिले, ते असे (३.३७)–

**काम एष क्रोध एष रजोगुणसमुद्भव ।**
**महाशनो महापाप्मा विद्ध्येनमिह वैरिणम् ।।**

अर्थ– रजोगुणापासून उत्पन्न झालेले काम व क्रोध हेच मनुष्याला पापकर्मात प्रवृत्त करणारे शत्रू होत. ते मोठे अधाशी व मोठे पापी आहेत, असे तू जाण.

हा रजोगुण तरी कुठून येतो, हा त्यापुढचा प्रश्न असून, श्रीकृष्णाने १४ व्या अध्यायात त्याचे उत्तर दिले आहे, की सत्त्व, रज व तम हे गुण प्रकृतीतच आहेत आणि हेच जीवात्म्याला देहामध्ये बद्ध करून ठेवतात.

पाप हे रजोगुणोत्पन्न कामक्रोधामुळे होते, हे कळल्यावर मनुष्याची त्या पापातून सुटका होऊ शकेल की नाही आणि होत असल्यास ती कोणत्या उपायाने होईल याविषयी जिज्ञासा उत्पन्न होते. प्रारंभिक पापकल्पना शरीराला चिकटणारा दोष एवढीच असल्यामुळे ते पाप दुसऱ्यावर ढकलून मोकळे होता येते अशी समजूत होती. इंद्राला ब्रह्महत्येचे पाप लागले असता त्याने ते निरनिराळ्या वस्तूंत विभागून देऊन स्वतःला मोकळे केले, अशी कथा तैत्तिरीय संहितेत आली आहे (२.५.१).

अथर्ववेदात अशाच प्रकारची दुसरी एक कथा आहे, ती अशी – यज्ञात होणाऱ्या पशुहत्येचे पाप कोणाच्या माथी मारावे याचा देवांना निश्चय होईना. त्या वेळी अग्नीने पाण्यात एका मागून एक तीन कोळसे टाकून एकत, द्वित व त्रित असे तीन पुरुष उत्पन्न केले. मग देवांनी त्या तिघांवर आपले पाप लोटून दिले. त्या तिघांनी ते सूर्यास्ताच्या वेळी झोपणाऱ्या माणसाच्या अंगावर ढकलले. त्याने ते ज्याचे दात पिवळे आहेत, त्याच्यावर लोटले. त्याने ते नखे किडले या माणसावर, त्याने थोरल्या बहिणीच्या आधी लहान बहिणीचे लग्न लावणाऱ्यावर, त्याने ते मोठ्या भावाच्या आधी स्वतःच लग्न करणाऱ्यावर, त्याने ते मनुष्यवध करणाऱ्यावर आणि त्याने ते गर्भपात घडवणाऱ्यावर लोटून दिले. अशा क्रमाने ते पाप एकाकडून दुसऱ्यावर ढकलले गेले. गर्भपात घडविणाऱ्याच्या पलिकडे मात्र ते लोटले जाईना (अथर्व. ६.११२.३).

पाप हे केवळ शारीरिक नसून, ते मानसिकही असते व मनाच्याद्वारे त्याचा आत्म्याशी संबंध पोचतो, अर्थात पाप हे माणसाच्या नैतिक व आत्मिक अधःपाताला कारणीभूत होते, अशी कल्पना वेदोत्तर काळात रूढ झाली व तिच्यामुळे पापक्षालनाचे उपायही बदलले. 'पश्चात्तापेन शुद्ध्यति' असे एक सुप्रसिद्ध वचन आहे. माणसाला पापकर्माचा पश्चात्ताप झाला म्हणजे तो पापमुक्त होऊन शुद्ध होतो, असा त्याचा अर्थ आहे. पण पश्चात्ताप हा पापनिवृत्तीसाठी समर्थ असा एकमेव उपाय नव्हे असे धर्मशास्त्रकारांनी सांगितले आहे. पश्चात्ताप अवश्य हवा, कारण तो झाल्याने मनुष्य पुनश्च ते पापकर्म आचरणार नाही. पण पश्चात्ताप हे प्रायश्चित्ताचे एक अंग असून, कोणत्या ना कोणत्या तरी प्रायश्चित्तावाचून पापाची निष्कृती होत नाही, असे सर्व धर्मशास्त्रकार सांगतात. ज्ञानपूर्वक व अज्ञानपूर्वक असे पापाचे दोन प्रकार मनूने कल्पिले आहेत. अज्ञानपूर्वक घडलेल्या पापाची निष्कृती पश्चात्तापाने किंवा त्या पापाचा जाहीर उच्चार केल्याने होऊ शकते. पण ज्ञानपूर्वक केलेल्या पापाचे मात्र कठोर प्रायश्चित्त घेतले पाहिजे, असे त्याने म्हटले आहे (११.४६).

स्मृती व पुराणे यांच्या काळात पापक्षालनाचे असंख्य उपाय सांगितले गेले. त्या सर्वांत प्रायश्चित्तावर विशेष भर आहे. पाप सौम्य किंवा तीव्र असेल, त्याप्रमाणे प्रायश्चित्तेही सौम्य व तीव्र सांगितली आहेत. कृच्छ्र, अर्धकृच्छ्र, पादकृच्छ्र, पादोनकृच्छ्र, चांद्रायण, इ. अनेक लहान मोठी प्रायश्चित्ते स्मृतींत व पुराणांत दिलेली आढळतात. प्रायश्चित्ताबरोबरच उपवास, दान, व्रत व तीर्थयात्रा यांनाही पापनाशक मानले असून, त्यांचाही पापपरत्वे आचार सांगितला आहे.

कितीही मोठे पाप असो, ते या जन्मातले असो किंवा मागच्या जन्मातले असो, त्याचा दानाने नाश होतो असे वचन आहे –

सुवर्णदानं गोदानं भूमिदानं तथैव च ।
नाशयन्त्याशु पापानि अन्यजन्मकृतान्यपि ।।
(अत्रिस्मृती २१४)

अर्थ – सुवर्णदान, गोदान, त्याचप्रमाणे भूमिदान ही दाने अन्य जन्मी केलेल्या पापांचाही सत्वर नाश करतात.

पापनिष्कृतीसाठी दानाइतकेच उपवासालाही महत्त्व दिले आहे. अन्नावाचून शरीर कृश करणे व त्याबरोबरच अहिंसा, सत्य, दया, संयम, सौजन्य, इ. सद्गुण अंगी बाणवणे एवढा उपवास या शब्दाचा व्यापक अर्थ आहे. दक्षस्मृतीत या विषयी श्लोक आहे, तो असा –

अयने विषुवे चैव चंद्रसूर्यग्रहे तथा ।
अहोरात्रोषितः स्नात्वा सर्वपापैः प्रमुच्यते ।।

अर्थ – अयनदिन, विषुवदिन व चंद्र-सूर्यग्रहणदिन या दिवशी अहोरात्र उपवास केल्याने व (तीर्थात) स्नान केल्याने सर्व पापांपासून मुक्तता होते.

तीर्थयात्रा हाही पापनिष्कृतीचा उपाय म्हणून सांगितला आहे. तीर्थयात्रेत अनेक देव-देवतांचे दर्शन घडते आणि गंगादी पुण्यसरितांचे स्नानही घडते. या दोन्ही गोष्टी सामान्य पापांच्याच नव्हे, तर महापापांच्या मुक्तीलाही समर्थ ठरतात, असे निरनिराळ्या पुराणांत व तीर्थमाहात्म्यांत सांगितले आहे. गंगेच्या स्नानानेच नव्हे तर नामोच्चारानेही मनुष्य सर्व पातकांपासून मुक्त होतो. इतकेच नव्हे तर त्याला विष्णुलोकही प्राप्त होतो, अशी पुराणांनी ग्वाही दिली आहे.

पुढे शैव वैष्णवादी पंथांनी आपापल्या उपास्याचा भक्तिमार्ग रूढ केला व ईश्वराला शरण जाण्याने, त्याची पूजा-अर्चा करण्याने व त्याच्या नामस्मरणानेही भक्ताची सर्व पापे धुतली

जातात, असे आग्रहाने प्रतिपादिले. गीतेत (१८.६६) भगवंतानेही तसेच म्हटले आहे –

**सर्वधर्मान् परित्यज्य मामेकं शरणं व्रज ।**
**अहं त्वा सर्वपापेभ्यो मोक्षयिष्यामि मा शुचः ।।**

अर्थ – सर्व धर्म सोडून तू मला एकट्याला शरण ये. मी तुला सर्व पापांपासून मुक्त करीन. भिऊ नको.

गीतेच्या नवव्या अध्यायात भक्तीचे विवेचन करतानाही भगवंताने, भक्ती ही भक्ताची सर्व पापे नष्ट करण्यास समर्थ आहे, अशा आशयाचे प्रतिपादन केलेले आहे. योगसाधना, तांत्रिक प्रार्थना, यंत्रपूजा, इ. गोष्टींनी पाप तर नष्ट होतेच; पण त्या बरोबर पुण्यसंचयही होतो, असे अनेक नव्य उपनिषदांतून सांगितलेले आढळते.

उपनिषदांत ब्राह्मणांच्या कर्मकांडाविरुद्ध प्रतिक्रिया सुरू झाली. त्यामुळे त्या प्रतिक्रियेत पापाचे खरे स्वरूप, तसेच तांत्रिक व नैतिक पापांचे भिन्नत्व यासंबंधी मूलभूत विचार केला जाईल, अशी अपेक्षा होती. पण उपनिषदांनी कर्माला मुळीच महत्त्व न देता बुद्धी व ज्ञान यांच्या साहाय्याने जीवब्रह्मैक्य कसे साधेल, हाच विचार मुख्यत्वे केला. ज्ञान हाच त्यांनी मोक्षाचा एकमेव मार्ग ठरविला. सत्कृत्य असो वा दुष्कृत्य असो, त्यामुळे माणसाचा जन्म-मरणाचा फेरा काही चुकत नाही. म्हणूनच कर्म हे ज्ञानापेक्षा कनिष्ठ अतएव उपेक्षणीय आहे, असे मानून उपनिषदांनी सत्कर्म व दुष्कर्म यांचे व्यवच्छेदक लक्षण कोणते, त्याविषयी काहीच चर्चा केली नाही. फक्त सत्कर्म करणाऱ्याला सद्गती मिळते व दुष्कृत्य करणाऱ्याला दुष्ट योनीत जन्म घ्यावा लागतो, एवढेच सांगितले. ज्ञानाने कोणत्याही बऱ्या-वाईट कृत्यांचा बरा-वाईट परिणाम नष्ट होतो, ज्ञानाग्नीत कर्माकर्मांचे हीण जळून जाते, असाच उपनिषदांचा उद्घोष आहे (कौषी. उ. ३·१). 'तू जरी पाप्यांतला महापापी असलास तरी, ज्ञानरूपी होडीत बसूनच त्या सर्व पापांतून तरून जाशील' असे गीताकारांचेही वचन आहे (गीता ४·३६). पण अशा वचनांमुळे कर्म–सिद्धान्तच बाधित होतो.

सर्व पापे वासनामूलक असतात असे जैन धर्मात म्हटले आहे. वासनेचा क्षय झाल्यावाचून अर्हत्पदाची प्राप्ती होणार नाही, असे महावीराने सांगितले आहे. म्हणून वासनेचा क्षय करण्यासाठी जैन आचार्यांनी अनेक नियम घातले व ते आचरले नाहीत, तर पाप लागते असे सांगितले. या कामी ते इतके पुढे गेले की हिंसेच्या भयामुळे त्यांनी शेती व तत्संबंधी व्यवसायही त्याज्य मानले. 'वासनाप्रक्षयो मोक्षः' = सर्व वासनांचा क्षय करणे म्हणजे मोक्ष होय, असे वेदांती आचार्यांनीही सांगितले. पण वासनाक्षय हा सामान्य जनांना सुसाध्य असा मार्ग नव्हे, हे त्यांना जाणवले होते. म्हणून ज्ञान व मोक्ष यांच्या प्राप्तीसाठी चित्तशुद्धीची आवश्यकता आहे आणि ही चित्तशुद्धी सदाचार आणि सद्विचार यांच्या योगाने प्राप्त होईल, असे त्या दार्शनिकांना सांगावे लागले.

मनू, याज्ञवल्क्य, इ. स्मृतिकार आणि निबंधकार यांचे तत्त्वज्ञान कर्म-विपाकाच्या सिद्धान्तावर आधारित आहे; पण सत्कर्म व दुष्कर्म यांतील भेद नेमका कसा ओळखावा, या विषयीचा सोपपत्तिक विचार त्यांनीही मांडला नाही. भक्तिमार्गी आचार्यांनी तर कर्मसिद्धान्ताला अपवादच सांगितले. केवळ भक्तीमुळे भगवान् प्रसन्न होतो व कशाही पतिताचा उद्धार करतो, असे सांगितल्यामुळे भक्ताला काही नीतिनियमांचे पालन करणेही आवश्यक उरले नाही. केवळ भगवत्कृपा हेच निर्णायक, पापनाशक तत्त्व मानल्यामुळे त्यांनीही पर्यायाने कर्मविपाकाचा सिद्धान्त लटका पाडला.

शंकराचार्यांसारख्या तत्त्वज्ञानी पुरुषांनी केवळ ब्रह्म, माया, मोक्ष, ज्ञान, या गोष्टींचाच विचार केला. कर्माकडे विशेष लक्ष देण्याची त्यांना आवश्यकता वाटली नाही. अशा प्रकारे धर्मशास्त्र व तत्त्वज्ञान या दोहोंनीही नैतिक गुणांच्या आचरणाची उपेक्षा केल्यामुळे पुराणांनी पापांची यादी हवी तशी वाढवली व त्यांच्या क्षालनासाठी व्रते, वैकल्ये, प्रायश्चित्ते, तीर्थश्राद्धे या उपायांची भरमार करून टाकली. वरील गोष्टींमुळे भिक्षुक वर्गाला अर्थलाभ होऊ लागल्यामुळे त्यांनीही व्रतवैकल्यादी गोष्टींचे प्रस्थ वाढवून ठेवले. त्यामुळे प्रायश्चित्तादी गोष्टींनी पापनाश होऊ शकतो; त्यासाठी नैतिक व मानसिक सुधारणा व्हायला पाहिजेच असे नाही, ही कल्पना बळावली. मध्ययुगात कबीर, दादू, इ. काही संतांनी असल्या थोतांडाचा कडाडून निषेध केला; परंतु त्यामुळे लोकांत दृढमूल झालेली वरील गोष्टींविषयीची अंधश्रद्धा कमी झाली नाही.

बौद्ध विचारसरणीत मात्र पापकल्पनेला मुळीच स्थान नाही. बौद्ध मतानुसार हे विश्व म्हणजे सुघटित व नियंत्रित असे एक चक्र आहे. यातली प्रत्येक घटना एका अनंत कार्यकारणमालिकेचा एक भाग असते. या विश्वरचनेचे बंधन मनुष्याप्रमाणेच देवांवरही असते. तिचे नियम भौतिक व नैतिक अशा दोन्ही क्षेत्रांत प्रभावी असतात. प्रत्येक कृत्य, शब्द आणि विचार यांचा काहीतरी परिणाम घडतोच आणि तोही कोण्या देवतेच्या मर्जीप्रमाणे नव्हे; तर स्वयंप्रेरणेने घडतो. कोणत्याही सचेतन प्राण्याला स्वतःच्या कर्माचा परिणाम टाळता येत नाही. एखादी देवता कितीही शक्तिमान असली, तरी तीही माणसाच्या कर्माचा तो परिणाम टाळू शकत नाही. कारण ती देवताही विश्वाच्या नियमांनी बांधलेली असते. नियमांचे

कतरव त्या दवतेकडे नमते बुद्धालाही ते श्रेय मिळत नाही बुद्ध केवळ निसगनियमाचे निरूपण करीत असतो

मनुष्य पाप करीत नाही, तर अज्ञानामुळे चुका करतो त्या चुकामुळे विश्वचक्राच्या गतीत बाधा यते आणि त्याच्या निवाणमार्गाच्या प्रवासात व्यत्यय येतो, इतकेच समजायचे

ख्रिस्ती धर्मानुसार पापाची कल्पना व तिचे निराकरण असे– अँडाम या प्रथम मानवाने सैतानाच्या शब्दाला भुलून जे काही केले, ते मूळ पाप होय तेच पुढे सव मानव जातीत अशरूपाने उतरले त्यामुळ मनुष्य हा जन्मजात पापीच असतो चुरणे, वेडेवाकडे वतन, कायद्याचा भग, दुष्टपणा, घातकी पणा, माणूस व परमेश्वर यान्याशी दगलबाजी, इ गोष्टी या पाप होत या पापामुळे माणसाच्या मनात चागले विचार येत नाहीत, हातून चागल्या कृती घडत नाहीत व चागल्या गोष्टींचा मनावर परिणाम होत नाही त्याच्या आत्म्याचे जीवन व सामर्थ्य झिजत जाते तो देवापासून अधिकाधिक दूर जातो

येशूला शरण गेल्याने व पापाची कबुली देऊन पश्चात्ताप व्यक्त केल्याने माणसाची पापातून मुक्तता होते, असे ख्रिस्ती धर्मात सागितले आहे कामविषयक काही गैरकृत्य हातून घडल्यास सात घरी भिक्षा मागून आपल्या गरवर्तनाची ब्रह्मचाऱ्याने कबुली द्यावी, असे मनूने म्हटले आहे (११ १२२) पण त्याच्याही मत नुसत्या कबुलीने पापनिवृत्ती होत नाही, तर त्यासाठी त्याला आपल्या कृत्याचा पश्चात्ताप झाला पाहिजे म्हणजे पापनिवेदनाला मनूने पश्चात्तापाची जोड दिली आहे ख्रिस्ती धर्मानही पश्चात्तापावाचून पापनिवृत्ती होत नाही, असेच सागितले आहे

पापाचे सघीर = क्षुल्लक व काबीर = महापाप असे दोन वग इस्लामी धर्मात मानले आहेत रोजची प्रार्थना वेळच्या वेळी केल्याने सघीर पापातून मुक्ती मिळते अल्ला किंवा एकमेव इश्वर यान्यावर विश्वास न ठेवणे, मनुष्यवध, चोरी, व्यभिचार, रमजानचे रोजे न पाळणे, शुक्रवारच्या प्रार्थनेत कुचराई करणे, जादूटोणा, जुगार, मद्यपान खोटी शपथ घेणे, भारी व्याज घेण आईबापाची अवज्ञा करणे, खोटी साक्ष देणे, अनाथ मुलाना फसवण, ईश्वराच्या दयेविषयी निराश होण व रणागणातून भेकडासारख पळून जाण, ही सव इस्लाम धर्मातील महापाप होत अल्लाव्यतिरिक्त दुसऱ्या कोणावर श्रद्धा ठेवणे हे त्यानी घोर पाप मानले आह इतर पापाबद्दल क्षमा मिळणे शक्य आहे, पण या पापाला क्षमा नाही

इस्लामनेही पापाच्या बाबतीत पश्चात्तापाला महत्त्व दिले आहे परधर्मातील मनुष्याने इस्लामवर विश्वास व्यक्त करणे हा त्या धर्माचा एक प्रकारचा पश्चात्तापच हाय, असे इस्लामी धर्माचार्य मानतात ईश्वराचे प्रेषित असे जे पुरुष होऊन गेले, ते सर्व पापमुक्त होते, असे त्यानी मानले आहे कुराणात मुहमद पैगंबराने अनेक ठिकाणी पापाबद्दल क्षमा मागितली आह हे खरे, पण त्याचा अर्थ मुहमद पापे करीत होता असा नव्हे त्याची प्रत्येक कृती सुन्ना म्हणजे आदर्श असन म्हणन तो क्षमा मागतो आपल्याप्रमाणे आपल्या अनुयायानाही पापाबद्दल क्षमा मागावी हा त्याचा हेतू असतो व्यभिचार, हत्या, इ सर्व पापे इस्लाममध्ये एकाच मापाने मोजली जातात कारण पापकल्पनेला आधारभूत असे कोणतेच नैतिक तत्त्व त्यानी ठरवलेले नाही पाप म्हणजे शरीराची बाह्य अशुद्धी, असेच मुसलमान समजतात आणि दानधम व प्रार्थनेपूर्वी हस्तपादप्रक्षालन केल्याने ते नष्ट होते, असे मानतात

पापकल्पनेचा बुद्धिवादी दृष्टिकोन श्री म दा साठे यानी माडला आहे, तो असा––

बुद्धिवाद्याच्या मते पापकल्पना ही मनुष्यकृत असून समाजधारणेच्या पोटी ती जन्माला आली आहे त्या कल्पनेशी सबधित अशी दुसरी कल्पना नरकाची होय पण नरक हे केवळ बुजगावणे आहे, असे ते समजतात पापाच्या श्रेणीप्रमाणे त्याचे फल म्हणून मिळणाऱ्या नरकाच्याही श्रेणी असायला हव्या, पण तशा त्या दिसत नाहीत समाजस्थिती बदल यास समाजधारणेचे नियमही बदलतात हे स्मृतीतल्या भिन्न भिन्न वचनावरून प्रत्ययास येते त्यावरून समाजाच्या एका परिस्थितीत जे कृत्य पाप ठरेल ते ती समाजधारणा बदल यावर ठरणार नाही असे म्हणावे लागते पूवजाच्या पापाबद्दल त्याच्या वशजानी जबाबदार असणे किंवा आपले पाप दुसऱ्याच्या माथी टाकून त्यातून मुक्त होणे किंवा ब्रह्मज्ञानाने अथवा परामक्तीने त्या पापाचा नाश होणे, या सव कल्पना बुद्धिवादी दृष्टीला चुकीच्या वाटतात त्यात अधश्रद्धेचाच फार मोठा भाग आहे जो ईश्वराचे व पुनर्जन्माचे अस्तित्वच मानीत नाही तो पापाबद्दल ईश्वर शिक्षा करील आणि ती या जन्मात मिळाली नाही तरी पुढच्या जन्मात मिळेल, हेही मान्य करणार नाही मद्यपान हे समाजधारणेला विघातक अस यामुळे ते पाप या सज्ञेत गणले गले आहे पण ते पाप त्याने गुप्तपणे केले तर त्याबद्दल त्याला शिक्षा कोण देणार ? याला ही पापकल्पनेत उत्तर नाही, असे ते म्हणतात जे मद्यपानासबधी तेच परस्त्रीशी अनैतिक सबध वगैरे बाबतीत म्हणता येईल

मग पापकल्पना ही सर्वथा निरुपयोगी अतएव त्याज्य आहे काय ? तर तसे नाही या विषयी त्याचे मत असे––

पापभयाने मनुष्य सदाचरणाने वागण्याचा सभव असतो त्यामुळे समाजधारणेला बळकटी येऊ शकते अशी बळकटी

बुद्धिनिष्ठेने येऊ शकणार नाही. लहान मुलाला भिववण्यासाठी ज्याप्रमाणे बागुलबुवा उपयोगी पडतो, तशी अज्ञानी समाजाला योग्य मार्गावर ठेवण्यासाठी पापकल्पना उपयोगी पडते. बुद्धिवाद्यांच्या कोटिक्रमाप्रमाणे समाजातल्या गुप्त पापांना शासन करता येत नाही पण अशा गुप्त पापांना शासन मिळावे म्हणूनच प्रत्येक धर्मात ईश्वर, त्याच्या आज्ञा, त्या आज्ञांचे उल्लंघन झाल्यास पाप व त्यासाठी घोर नरक, अशा कल्पना रूढ केलेल्या असतात. कारण नीतीच्या मागे असे काही तरी धर्माचे अधिष्ठान निर्माण केल्याशिवाय नीतीची उभारणी वाळूच्या पायावर केल्यासारखे होईल. बुद्धिवादी दृष्टिकोन स्वीकारून तसे न केल्यास समाजाची प्रगती होणार नाही. [ध. शा. वि.; क्रि. स्ट. ले. उ ; रा. क.; एन्सा. रि. ए.; श्री. म. दा. साठचे—नवभारत—जुलै, १९५८]

## पापघटदान

ज्ञाताज्ञात पातकाची निवृत्ती होऊन पुत्रप्राप्ती व्हावी, या हेतूने हे दान करतात. त्याचा विधी पुढीलप्रमाणे— यजमानाने सपत्नीक आदल्या दिवशी एकभुक्त करून व्रतस्थ राहावे. दुसऱ्या दिवशी शुचिर्भूत होऊन एका चौकोनी मंडलावर तांबडे वस्त्र पसरावे, त्यावर स्वतःच्या ऐपतीप्रमाणे सोने, चांदी किंवा तांबे यांचा एक कलश सुशोभित करून स्थापावा. त्यात तूप किंवा साखर भरावी. वर पूर्णपात्र ठेवावे. त्यात मध्यभागी सुवर्णाची विष्णुमूर्ती व तिच्या जवळ फणायुक्त नागमूर्ती स्थापावी.

दुसरीकडे अग्निस्थापना करून आचार्यद्वारा अग्निमुख करावे. मग विष्णुमूर्तीची पूजा करावी. नंतर दर्भाग्रे तुपात बुडवून त्यांचे यथाशक्ति हवन करावे. मग ब्राह्मणाला त्या कलशाचे दान द्यावे. दान घेणाऱ्या ब्राह्मणाचे पुनश्च तोंड पाहावे लागू नये म्हणून तो शक्य तितका दूरचा बोलवावा. ब्राह्मण भोजन घालून व्रताची सांगता करावी. [व्र. प.]

## पापनाशिनी एकादशी

फाल्गुन कृष्ण एकादशीला पापमोचनी किंवा पापनाशिनी असे नाव आहे. कोणत्याही एकादशीला जेव्हा गुरु-पुष्ययोग असेल किंवा सूर्य कुंभ, किंवा मीन राशीत असता जी येत असेल, त्या एकादशीलाही पापनशिनी म्हणतात. या एकादशीची कथा सांगितली आहे ती अशी—

मेधावी नावाचा एक ऋषी होता. तो हिमालयात तप करीत असता मंजुघोषा नावाची एक अप्सरा त्याच्यावर मोहित झाली. तिने मेधावीचा तपोभंग केला. पुढे मेधावीस पश्चात्ताप झाला. मंजुघोषेने आपणास तपोभ्रष्ट केले या रागाने त्याने तिला शाप दिला, की 'तू पिशाच योनीत जाशील.' मंजुघोषेने मग त्याची करुणा भाकली. तेव्हा ऋषीने तिला उःशाप दिला, की 'पापमोचनीचे व्रत केल्याने तुझा उद्धार होईल.' नंतर दोघांनीही ते व्रत केले व ती आपापल्या पापापासून मुक्त झाली.

## पापनाशिनी द्वादशी

फाल्गुन शुद्ध द्वादशी. शिवाय पुष्यनक्षत्र असलेल्या शुद्ध द्वादशीलाही हे नाव आहे. या दिवशी जे व्रत करतात, त्याचा विधी असा—

फाल्गुन शुद्ध एकादशीला प्रातःकाळी स्नान केल्यावर ओंजळीत उदक घेऊन पुढील मंत्राने या व्रताचे ग्रहण करावे—

**द्वादश्यां तु निराहारः स्थित्वाहमपरेऽहनि।**
**भोक्ष्यामि जामदग्न्येश शरणं मे भवाच्युत॥**

अर्थ — मी द्वादशीच्या दिवशी निराहार राहून दुसऱ्या दिवशी भोजन करीन. परशुरामा, तू माझा रक्षणकर्ता हो.

नंतर आवळीच्या झाडाखाली एक वेदी तयार करून तिच्यावर कलश स्थापावा. त्यावर तांब्याचे किंवा पितळेचे भांडे ठेवून त्यात खीर भरावी. त्या खिरीतच परशुरामाची सुवर्णप्रतिमा ठेवून तिची षोडशोपचारे पूजा करावी. पूजेनंतर अर्घ्य द्यावे. नंतर आवळीला पाणी घालून पुढील मंत्र म्हणावा—

**मातापितामहश्चान्ये अपुत्रा ये च गोत्रिणः।**
**ते पिबन्तु मया दत्तं धात्रीमूले सदा पयः॥**

अर्थ — माझे मातामह, पितामह व गोत्रातले अन्य निपुत्रिक लोक मी आवळीच्या मुळात दिलेले पाणी सदा प्राशन करोत.

त्यानंतर आवळीला प्रदक्षिणा घालून व्रत पूर्ण करावे व यथाशक्ति ब्राह्मण भोजन घालावे. [व्र. प.]

## पापमोचनव्रत

एक काम्य व्रत. शिव ही या व्रताची देवता आहे. या व्रतात कर्त्याने अन्नावाचून बारा दिवस बेलाच्या झाडाखाली राहायचे असते. फल—भ्रूणहत्येच्या पापापासून मुक्ती. [हि. ध.]

## पापसंक्रांतिव्रत

कर्क संक्रांतीस या व्रताला प्रारंभ करतात. काही शास्त्रकारांच्या मते कोणत्याही संक्रांतीपासून याचा प्रारंभ करायला हरकत नाही. याचा विधी असा— स्नान झाल्यावर पांढऱ्या तिळांनी भरलेल्या कुंभाचे दान करावे. प्रतिमासी कुंभ थोडा मोठा मोठा घ्यावा. उद्यापनाच्या वेळी सुवर्णाची किंवा रुप्याची द्विभुज सूर्यप्रतिमा करून ती प्रतिमा, तीळ व गाय यांचे दान करावे. व्रतावधी एक वर्ष. फल - पापक्षय. [व्रतराज].

**पापसूदनतीर्थ** एक प्राचीन तीर्थ हे स्थान काश्मीरमधील कुठार परगण्यात कोठेर गावाजवळ आहे तिथे एक मोठे दगडी कुंड आहे त्या कुंडात उमापतीची राख मयी मूर्ती होती असे, सांगतात ते कुंड मालवराज भोज याने बांधले, अशी प्रसिद्धी आहे नीलमत पुराणात या तीर्थाचा उल्लेख आहे त्या कुंडात दरवर्षी वैशाख मासात काष्ठाचे तुकडे प्रकट होतात, असे अल बिरूनीने लिहिले आहे त्याचप्रमाण या कुंडातून महादेवाची एक चंदनमूर्ती निघत, असे अबुल फजलचे म्हणणे आहे या प्रतिमेला स्पर्श केल्यास भुक्ती व मुक्ती मिळते, अशी अनेकांची समजूत आहे [हिं ध , राजतरंगिणी]

**पापानुका** द भारतातील एक ग्रामदेवता कृष्णाच्या जन्मानंतर वसुदेवाने त्याला गोकुळात नेऊन यशोदेच्या बाजेवर ठेवले आणि तिची मुलगी आणून कंसाच्या स्वाधीन केली कंसाने तिला शिळेवर आपटण्यासाठी वर उचलताच ती वरच्या वर आकाशात उडून गेली तिचे उत्तर भारतातले नाव एकानंशा असून, दक्षिणेत तिलाच पापानुका असे म्हणतात दक्षिणेतले लोक तिला पृथ्वीची माता मानतात माडिग आदिवासी तिला मथम्मा किंवा मातंगी म्हणतात

अकम्माच्या जत्रेत चौथ्या दिवशी एक मिरवणूक निघते, त्या वेळी स्त्रीवेष धारण केलेला एक पुरुष एका लांब काठीच्या टोकाला कागदाचा दिवा लावतो व ती काठी घेऊन मिरवणुकीच्या अग्रभागी चालतो या कागदी दिव्याच्या डोक्यावर एक माडे असते व त्यावर एक पला असतो ही दिव्यासहित काठी हे पापानुकेचे प्रतीक असते [द्र गॉ मॉ हिं ]

**पापापनोद धेनुदान** या दानाचा विधी असा – गरीब, सुलक्षणी, दुधाळ व देखणी अशी काळ्या रंगाची गाय आणून तिची शिंगे सोन्याने व खूर रुप्याने मढवावे तिच्या गळ्यात घंटा आणि शेपटीला मोती बांधावे, अंगावर अलंकार घालावे, दोन पांढरी वस्त्रे आच्छादन म्हणून तिच्या पाठीवर घालावी नंतर दानसंकल्प करून धेनूची व ब्राह्मणाची पूजा करावी मग तिचे दान द्यावे फल– पापनाश

**पाबूजी राठोड** ( ६ म चे १४ वे शतक ) एक आदर्श वीर पुरुष राजस्थानातल्या पंचपीरांत याची गणना आहे राजस्थानाच्या इतिहासात याला मानाचे स्थान आहे याची आख्यायिका सांगतात, ती अशी–

पाबू हा गरीब होता अशा स्थितीत एके दिवशी त्याचे लग्न ठरले लग्नाला जाण्यासाठी त्याला घोडा हवा होता पण तो त्याच्यापाशी नव्हता या विवंचनेत असताना देवल नावाची एक चारणी घोडीवर बसून आपली गुरे वळत असलेली त्याला दिसली पाबूजीने तिच्यापाशी त्या घोडीची लग्नापुरता मागणी केली त्यावर चारणी म्हणाली 'घोडी आल्यामुळेच मी माझ्या गोधनाचे रक्षण करू शकते तो तुला दिल्यास शत्रू माझे गोधन पळवून नेईल' ते ऐकून पाबू म्हणाला 'तू चिंता करू नकोस केव्हाही आणि कोणत्याही परिस्थितीत मी तुझ्या गोधनाचे रक्षण करीन' मग चारणीने त्याला आपली



पाबूजी

घोडी दिली तिच्यावर बसून तो वधूगृही गेला त्याचे लग्न लागले त्यानंतर सप्तपदीला प्रारंभ झाला एवढ्यात ती चारणी आक्रोश करीत लग्नमंडपात आली कारण तिचे गोधन शत्रूंनी पळवले होते तिचा तो आक्रोश ऐकताच पाबूजी सप्तपदी अर्धीच टाकून तिच्या हाकेला धावला पण दुर्दैव असे, की गायी पळवणाऱ्या लुटारूंच्या टोळीशी त्याची जी चकमक झाली तिच्यात तो ठार झाला त्याचे ते दिव्य कृत्य पाहून लोक म्हणू

लागले, की वचनपूर्ती करावी तर ती या पाबूजीसारखी. कालांतराने तो त्या गुणाचा आदर्शच ठरला. लोक त्याचे पोवाडे रचून ते भक्तिभावाने गाऊ लागले.

**पाबूजीची फड–** भोपा नावाच्या राजस्थानातल्या जातीने त्याला आपला उपास्य देव मानले आहे. ते लोक एका लांबरुंद पडद्यावर पाबूजीच्या जीवनातील विविध प्रसंगांची चित्रे काढतात. त्या पडद्याला 'पाबूजीकी फड' म्हणतात. तो पडदा घेऊन ते लोक गावोगाव हिंडतात. लोकांना ती चित्रे दाखवताना ते त्या प्रत्येक चित्रप्रसंगाचे गाणे म्हणतात. अशा रीतीने पाबूजीचे भाट बनून स्वतःची उपजीविका करणे हा भोप्यांचा एक चरितार्थाचा धंदाच बनला आहे. राजस्थानातले कित्येक लोक आपला उंट आजारी पडला अथवा एखादे संकट आले तर पाबूजीकी फड वाचून घेण्याचा नवस करतात.

पाबूप्रकाश व नैणसीरीख्यात हे दोन पाबूविषयक ग्रंथ आहेत. त्यांत पाबूजीचा जन्म अप्सरेपासून झाल्याचे म्हटले आहे. ही कविकल्पना सोडली, तर पाबूजीच्या आख्यायिकेला ऐतिहासिक पुरावे उपलब्ध आहेत.

पाबूप्रकाश या ग्रंथाचा कर्ता पाबूजीचा गौरव करताना पुढील दोहा लिहितो–

**उड जासी आबूह, गिरनारौ यासी गरक ।**
**प्रथमी पर पाबूह, मणधारी रहसी अमर ।।**

अर्थ – आबू आणि गिरनार गड, प्रसंगी पृथ्वीच्या पोटात गडप होतील. परंतु या पृथ्वीवर मणिधारी पाबू मात्र अमर होईल.

मारवाडात फलौदीपासून १८ मैलांवर कोलू गावी पाबूजीचे मंदिर आहे. हे मंदिर धांदलसोमाचा पुत्र सोहड याने इ. स. १३५८ मध्ये बांधले, असा स्तंभलेख तिथे आहे.

## पायकी

एक लोकनृत्य. हे मुंडा लोकांचे नृत्य असून, त्याला खड्गनृत्य अथवा संग्रामनृत्य असेही म्हणतात. लग्नसमारंभात व जत्रांच्या वेळी या नृत्याचे कार्यक्रम होतात. नृत्यात भाग घेणारे नर्तक सामान्यपणे मुंडा जातीचेच असतात. क्वचितप्रसंगी अन्य आदिवासी जमातींचे नर्तकही त्यात सामील होतात. लग्नाच्या वेळी अशा नर्तकांना बिदागीही मिळते. या नृत्याला वाद्यांची साथही असते. ही वाद्ये डोम किंवा गासी जातीचे लोक वाजवतात.

पायकी नृत्ये विविध प्रकारची असून त्यांचे तालही विविध आहेत. नर्तकांचा पोषाख रंगीबेरंगी असून तो मुद्दाम त्यासाठी तयार केलेला असतो. त्यांच्या डोक्यांवर पगड्या असतात. पगडीत एक मोरपीस खोवलेले असते. पायांत चाळ असतात. एका हातात तलवार व दुसऱ्या हातात ढाल असते,



पायकी नृत्य

आपापल्या प्रतिस्पर्ध्यांचे लुटुपुटीचे वार ढालीवर झेलून ते हा नाच करतात. [ एन्सा. मुंडा. ]

## पायगुण

एखादी व्यक्ती नव्याने घरात आल्यावर ज्या शुभ अथवा अशुभ घटना घरात घडतात, त्या घटनांवरून ती व्यक्ती चांगल्या किंवा वाईट पायगुणाची हे ठरवितात. ही गोष्ट माणसाप्रमाणेच घरात येणा या पशु–पक्ष्यांनाही लागू करतात. पशु-पक्ष्याचा पायगुण चांगला नसेल, तर त्या जीवाचा त्याग करता येतो. पण माणसाच्या बाबतीत तसे करता येत नाही. म्हणून जेव्हा वाईट पायगुण अनुभवाला आला असेल, तेव्हा पुढील दुष्परिणाम टळावे, म्हणून निरनिराळे उपाय किंवा तोडगे करतात.

## पायपालट्याचा नाच

महाराष्ट्रातले एक लोकनृत्य. सोनकोळी लोकांत हे नृत्य प्रचलित आहे. यात सगळे नर्तक एका रांगेत उभे राहतात. एकजण ढोलके वाजवणारा असतो, तो त्यांच्या समोर उभा राहतो. नंतर नर्तक जोड्या करून व एकमेकांचे हात पकडून समोरासमोर येतात. नंतर एकदा उजवा पाय डाव्या पायावर आणि मग डावा पाय उजव्या पायावर, अशा प्रकारे पायाला तिढा घालून उड्या मारीत ते नाचतात. नाचताना सर्व जण टाळ्या वाजवतात. कधी डोक्यावर टाळी वाजवतात, तर कधी समोर वाजवतात. यात पायांची सारखी अदलाबदल करायची असते, म्हणून या नाचाला पायपालट्याचा नाच असे नाव पडले आहे. पाहा – कोळी. [ भा. लो. नृ. ]

**पायस** तांदुळाची दुधात शिजवलेली खीर या शब्दाची व्याख्या अशी–

**अतप्ततण्डुलो धौत परिभृष्टो घृतेन च ।**
**खण्डयुक्तेन दुग्धेन पाचित पायसो भवेत ।।**

अर्थ– धुतलेले तांदूळ तुपावर भाजून व त्यात दूध, साखर घालून आटवून जी खीर करतात तिला पायस असे म्हणावे

दशरथाने पुत्रकामेष्टी केली असता अग्नीने प्रकट होऊन त्याला प्रसादाचा पायस दिला व त्याच्या प्राशनाने त्याच्या तीन्ही राण्या गर्भवती झाल्या, अशी कथा रामायणात आहे

पायस हा एक प्राचीन पक्वान्नप्रकार आहे षड्रस अन्नात पायसाला फार महत्त्व आहे कित्येक शांतिक व पौष्टिक कर्मांत पायस हा एक हवी म्हणून सांगितलेला असतो श्राद्धातही पायस आवर्जून करतात मध, गूळ, तूप व तीळ यांनी युक्त पायस बनवून तो गंगाजलात सोडल्यास कर्त्याचे पितर शंभर वर्षेपर्यंत तृप्त राहतात, असे सांगितले आहे तसेच शूद्राच्या घरी केलेला पायस ब्राह्मणासही निषिद्ध नाही असे म्हटले आहे

या पदार्थाला दूध – पाक असेही म्हणतात गुजरातमधील हा एक आवडता पदार्थ आहे

**पायू भारद्वाज** एक सूक्तद्रष्टा ऋग्वेदाच्या सहाव्या मंडलातील ७५ वे व दहाव्या मंडलातील ८७ वे अशी दोन सूक्ते याच्या नावावर आहेत पहिल्या सूक्तात त्याने धनुष्य, बाण, भाते, चिलखत, भुजबंध, रथ, सारथी व वीर योद्धे यांच्याविषयी गौरवपूर्वक आणि आत्मीयतेने लिहिले आहे तो रणांगणावर वावरला असला पाहिजे किंवा त्याने रणधुमाळीचे अगदी जवळून निरीक्षण केले असले पाहिजे, असे त्या सूक्तावरून वाटते धनुष्यावर त्याचा फार भरवसा आहे धनुष्याच्या साहाय्याने आम्ही जग जिंकू असे तो आत्मविश्वासाने म्हणतो

दुसरे सूक्त रक्षोहाग्नी सूक्त म्हणून प्रसिद्ध आहे त्या सूक्तात त्याने मुरदेव, यातुधान, क्रव्याद व किमीदिन या राक्षसांना ठार मारण्याबद्दल अग्नीला प्रार्थिले आहे

जेव्हा अभ्यावर्ती चायमान आणि प्रस्तोक साञ्जय यांचा वरशिखांनी युद्धात पराभव केला तेव्हा भरद्वाजाने पायूला त्यांच्यासाठी यज्ञ करण्यास सांगितले पायू हा भरद्वाजाचा पुत्र होता [ प्रा च को सी ऋ ]

**पायोवगमन** जैन आचारधर्मातील एक संज्ञा हा प्रायोपवेशनासारखाच आत्मत्यागाचा प्रकार आहे या प्रकारामध्ये पायोवगमन करणारा माणूस कोणत्याही प्रकारची हालचाल न करता झाडासारखा स्थिर उभा राहतो व शेवटी तशा अवस्थेतच प्राणत्याग करतो [ हिं जै मो ]

**पारणे** उपवासानंतर दुसऱ्या दिवशी केलेल्या प्रथम भोजनाला पारणे असे म्हणतात या संबंधीचे ब्रह्मवैवर्त पुराणातील दोन श्लोक असे –

**पारणं पावनं पुंसां सर्वपापप्रणाशनम् ।**
**उपवासाङ्गभूतं च फलदं शुद्धिकारणम् ।।**
**सर्वेष्वेवोपवासेषु दिवापारणमिष्यते ।**
**अन्यथा फलहानिः स्याद्धृते धारणपारणम् ।।**

अर्थ– पारणे करणे हे पवित्र असून सर्व पापांचा नाश करणारे आहे ते उपवासाचे एक अंग असून, शुद्धी करणारे व फल देणारे आहे सर्व उपवासानंतर ते दिवसा करावे, अन्यथा फलहानी होते

पारण्याच्या वेळी देवाला महानैवेद्य करायचा असतो शक्य तर त्या वेळी ब्राह्मणभोजनही घालावे, असे सांगितले आहे

**पारद** एक प्राचीन जमात महाभारतात व पुराणात यांचा उल्लेख असंस्कृत लोक असा केला आहे मनुस्मृतीत त्यांना पतित क्षत्रिय म्हटले आहे क्षत्रियांनी वेदाध्ययनाचा आणि यज्ञ करण्याचा अधिकार यांच्याकडून घेतल्यामुळे ते म्लेच्छ ठरले ( विष्णु पु ४ ३ ४७-४८ ) हरिवंश पुराणात (१३ ७६३–६४, १४ ७७५–८३) यांना म्लेच्छ व दस्यू म्हटले आहे

यांच्या निवास–स्थानासंबंधी विद्वानांत मतभेद आहेत पार्जिटरच्या मते हे लोक शक-यवनादींप्रमाणे वायव्य सरहद्द प्रांताचे रहिवासी होते काहींच्या मते पारद लोकांचा देश दक्षिण भारतात होता सिंधू नदीच्या पश्चिमेला पारद होते, असेही एक मत आहे टॉलेमीने पारदेन म्हणजेच पारद यांना बलुचिस्तानचे रहिवासी मानले आहे पारद म्हणजे पार्थियन लोक असेही एकमत आहे [ ना प्र प – विक्रमांक, १९४३, प का भा , हिं जॉं ए इं , पु इं ]

**पारद शिवलिंग** पाऱ्याचे बनवलेले शिवलिंग शैव उपासनेत या लिंगाला फार महत्त्व आहे या विषयी मातृकाभेदतंत्रात श्लोक आहे, तो असा––

**पारदं परमेशानि ब्रह्मविष्णुशिवात्मकम् ।**
**यो यजेत पारदं लिङ्गं स एव शम्भुरव्ययः ।।**

अर्थ – हे पार्वती, पारद शिवलिंग हे ब्रह्मविष्णुशिवात्मक आहे पारद लिंगाची जो उपासना करील, तो अव्यय असा होय

हे लिंग कसे निर्माण करावे, या विषयी वरील तंत्रातच पुढील विधान सांगितले आहे – पहिल्या दिवशी पुण्याहवाचन करावे. एका पुरुषाची मधुपर्काने पूजा करून त्याला वस्त्रालंकार द्यावे. मग यजमानाने पंचाक्षर मंत्र १०८ वेळा जपावा. नंतर प्रासाद महामंत्राचा जप करावा. जपाच्या दशांशाने होम करावा. दुसऱ्या दिवशी पारा आणून त्याच्यावर नवार्ण मंत्राचा १०८ जप करावा. तिसऱ्या दिवशी लिंग करणाऱ्या कारागिराला बोलावून त्याची पूजा करावी. त्याने शिवरूपाचे चिंतन करीत पारा पाट्यावर घालावा मग त्यावर निळ्या कोरांटीच्या पानांचा रस घालून प्रणवोच्चाराने पाऱ्याचे त्या रसाशी मिश्रण करावे. मग त्याचे लिंग बनवावे. नंतर त्याला किंचित उष्णता द्यावी म्हणजे ते घट्ट होते. [श. क.]

**पारधी** एक जात. पारधी हा शब्द पारध=शिकार या शब्दापासून बनला आहे. या लोकांची मुख्य वस्ती खानदेशात आहे. याशिवाय कच्छ, मध्य प्रदेश, महाराष्ट्रात नासिक, सोलापूर व विजापूर या जिल्ह्यांत यांची वस्ती आहे. प्रदेशपरत्वे यांना वेगवेगळी नावे आहेत. दक्षिण महाराष्ट्रात यांना फासेपारधी म्हणतात, तर विजापूर जिल्ह्यात अटवीसंचार म्हणतात.

हरणपारधी, मोर, कोरचर, वाघरी, मेवारी, टकारी, पालपारधी, राजपारधी, कोरचर, भिल्लपारधी, लंगोटीपारधी, बहिलिया, गायपारधी, इ. यांच्या अनेक पोटजाती आहेत

हे लोक भटके व शिकारी असल्याने या जमातीत वाळीत टाकलेले व निराश्रित असे इतर जातींतले लोक येऊन मिसळले आहेत. हे मिसळलेले लोक मुख्यत्वे राजपूत, कोळी, वाघरी, धनगर, कावलीकर, कोरचर, इ. आहेत. त्यामुळे यांची जात म्हणजे अनेक जातींचे मिश्रण बनली आहे. पारधी, फासेपारधी हरणपारधी, कोरचर व वाघरी या त्यांच्या मुख्य जाती मानल्या जातात. यांतील बहुतेक जातींची नावे ही त्यांच्या व्यवसायावरून पडली आहेत. फासा म्हणजे सापळा. सापळ्याच्या योगाने जे शिकार करतात, ते फासेपारधी होत. अटवीसंचार याचा अर्थ जंगलात भटकणारे असा आहे. वाघरीने ससे पकडणारे वाघरी पारधी होत. जाळ्यांना टाकी घालणारे ते टकारी अथवा टाकणकर होत. धारवाडकडे चित्तेवाले पारधी या नावाचे लोक आढळतात. हे लहान लहान वाघ धरून राजे लोकांना विकतात अथवा गाड्यावर वाघ घालून गावोगाव भटकतात. बैलाच्या आडून हरणाला जाळे घालणाऱ्यांना बहेलिया म्हणतात.

**चालीरीती** – हे लोक भटके असल्यामुळे यांच्या चालीरीतींत एकसारखेपणा आढळत नाही. आपण राजपूतवंशीय आहो, असे हे सांगतात. यांचे दाभाडे, चव्हाण, पवार, सोळंकी व सोनावणी असे मुख्य पाच वंश आहेत. एखाद्याने व्यभिचार अथवा मोठे दुष्कृत्य केले तर त्याला शासन म्हणून उकळत्या तेलाच्या भांड्यात टाकलेले नाणे उचलायला सांगतात. जर त्याचा हात भाजला नाही, तर तो निर्दोषी म्हणून सुटतो. परंतु हात भाजला किंवा नाणे काढायला त्याने नकार दिला, तर त्याला दोषी ठरवून त्याला जातिबहिष्कृत करतात. हे बकरा, मेंढा, हरीण, डुक्कर आणि पंख असलेल्या सर्व पक्ष्यांचे मांस खातात मद्यपानही करतात.

**व्यवसाय** – शिकारीव्यतिरिक्त पाथरवटाचे काम करणे, वनस्पतींची औषधे विकणे, मोलमजुरी करणे, पाहारा करणे, भिक्षा मागणे, जासुदाचे काम करणे, असे विविध उद्योग हे लोक करतात. याच्यांत गुन्हेगारी प्रवृत्तीही आढळते.

बहुतेक पारधी वाघरी भाषा बोलतात. या भाषेचे जाटांच्या भाषेशी सादृश्य आहे. उत्तरेकडील पारधी गुजराती भाषा बोलतात व कर्नाटकातले कन्नड भाषा बोलतात. मराठी बोलणारेही काही आहेत. परजातीशी ते हिंदी बोलतात. त्यांची एक खास सांकेतिक भाषाही आहे. गुन्हेगारीच्या व्यवहारात ते ती भाषा बोलतात.

पारध्यांच्या वस्तीला पारधवाडा म्हणतात. शहराजवळ अथवा खेड्याच्या एका कोपऱ्यात हे तात्पुरती वस्ती उभारून राहतात. यांची घरे म्हणजे कापडाची अथवा गवताची पाले असतात. पाच पंचवीस पालांचा असा तो एक समूह असतो. साधारणपणे पंधरा दिवस एका गावी राहून नंतर ते तिथून मुक्काम हलवतात.

**वेषभूषा** – फिरते पारधी अस्वच्छ व अर्धनग्न असतात. ते केस कापीत नाहीत व विंचरीतही नाहीत. यांच्या बायका लुगडे–चोळी अथवा घागरा नेसतात. त्या हातांत कथील किंवा पितळ या धातूंच्या बांगड्या घालतात. त्यांच्या कानांत बाळ्या आणि पायांत साखळ्या असतात. स्त्री–पुरुष दोघेही गळ्यात रंगीबेरंगी मण्यांच्या माळा घालतात. पुरुषही बाळ्या, कडी व साखळ्या घालतात. पुरुषांच्या डोक्याला एक चिंधी अथवा पागोटे आणि कमरेला अपुरे धोतर असते. घरदार करून राहिलेल्या पारध्यांचा पोषाख मात्र कुणब्यांप्रमाणे असतो. त्यांच्या स्त्रिया घागरा किंवा लुगडे नेसतात व बुरखा वापरतात. महाराष्ट्रीय लोकांच्या सहवासाचाही काही परिणाम यांच्या पोषाखावर झालेला आहे.

पारधी हे वर्णाने काळे, चपळ, धीट व सोशिक असतात. गळ्यात अडकवलेल्या शिटीतून ते चित्तर पक्ष्यासारखा आवाज काढतात. मोर, ससाणा, बदक, कोल्हा, ससा यांच्या आवाजाची ते तोंडाने नक्कल करतात. फिरस्ते पारधी आपली पोरे व

गाई गुरे यासह फिरतात कधी कधी त्यांच्या तळावर शभरावर माणसे जमतात पावसाळ्यात त्यांच्या टोळ्या गावाजवळ गोळा होतात आणि शेतीचा हंगाम सुरू झाला म्हणजे फुटून फेरीला निघतात या वेळी जे गुन्हे करणारे असतात, ते दुसऱ्या जातीत मिसळतात अथवा दुसऱ्या जातीतल्या लोकांना आपल्यात घेतात

**धर्म** – बहुसंख्य पारधी हिंदू आहेत परंतु काही मुसलमानही आहेत मरीआई, माळरदेवी, भवानी, जगमाता, खंडोबा, लक्ष्मी, दुर्गा सप्तशृंगी, ही त्यांची दैवते आहेत त्यांच्या नावाने त्या त्या गावी ते यात्रा भरवतात सांथीचे रोग आल्यास देवीचा कोप झाला, असे समजतात

रोगराईत दैवतला संतुष्ट करण्यासाठी बळी देतात व रक्ता निवेद्य करतात मुसलमान अवलिया किंवा वैरागी यांनाही ते भजतात दसरा आणि शिमगा हे यांचे दोन मोठे सण असतात यांना धर्मगुरू नसतो यांच्यात अराई झुडपाचे काटे, बोरीच्या झाडाचे पाट, शमीची पाने, आम्रवृक्ष, जांभूळ, उंबर, ही मुख्य देवके आहेत

**विवाहप्रथा** – पोटजातीत नसेच समान देवकात लग्न करीत नाहीत कच्छ विभागाशिवाय इतर प्रांतातल्या पारध्यात आते बहीण, मावसबहीण व मामेबहीण यांच्याशी विवाह होतो दोन सहोदर भावांचे दोन सहोदर बहिणींशी लग्न होऊ शकते वधूवरांनी ताडाच्याभोवती सात फेऱ्या घालणे व एकमेकांच्या उभयतांवर अक्षता टाकणे हा विवाहातला प्रमुख विधी असतो खानदेशातील पारध्यांना वधूसाठी बरेच देज द्यावे लागते देज देणे शक्य नसेल, तर नवऱ्या मुलाला भावी सासऱ्याच्या घरी काही काळ नोकरी करावी लागते यांच्यात बहुपत्नीत्व रूढ आहे विधवेला भावाच्या दिराशी पुनर्विवाह करता येतो विधवेला मुलेबाळे नसतील तर तिच्या पुनर्विवाहाच्या नवऱ्याने तिला काही रुपये द्यायचे असतात

या जातीत पंचायत नसल्याने जातीचा प्रमुखच त्यांच्यातल्या लढ्याबखेड्याचा निवाडा करतो

**मर्तिकप्रथा** – हे लोक दक्षिणेकडे तोंड करून प्रेत पुरतात बाळतपणात मेलेल्या स्त्रियांना आणि यात्रा करून आलेल्यांना मात्र जाळतात कच्छ विभागात प्रेताला पुरण्यापूर्वी त्याच्या उजव्या अंगठ्याला अग्नी देऊन तो जाळतात मृताची रक्षा पाण्यात विसर्जित करतात दहाव्या दिवशी पिंडदान करून ज्ञातिभोजन घालतात पितृपक्षात महालय करतात

फासेपारधी लोक दणकट, स्वच्छंदी आणि बेपर्वा असतात गुरेढोरे व बायकापोरे यांच्यासह हे एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणी फिरत असतात ते पाले बांधून राहतात कुत्रे त्यांच्या पालाची राखण करतात यांच्या पालात दिवा लागत नाही, की अन्न शिजत नाही स्त्रिया गावात भीक मागून अन्न आणतात आणि सगळे लोक त्याची वाटणी करून ते खातात हे सर्व प्रकारचे व गाईचेही मांस खातात काही पुरुष तात्पुरती शेतांची राखण पत्करतात, तर काही गुरट्या चोऱ्याही करतात काही लोक टोपल्या विणून त्या विकतात

कमरेला लंगोटी, अंगात मळकी बंडी रंगीबेरंगी पागोटे, गळ्यात मण्यांच्या माळा व कमरेला फाशाचे झुबके असा त्यांचा वेष असतो यांच्या स्त्रिया साडी नेसून, पायात तोडे, गळ्यात मण्यांच्या माळा, हातात गोठवजा पितळी बांगड्या व नाकात मुरकी घालतात पोर असेल तर ते पाठीवर झोळीत घालून हिंडतात

**देवधर्म** – मरीआई, माळरदेवी ही फासेपारध्यांची दैवते होत देवर्षीवर त्यांची फार श्रद्धा असते कोणत्याही संकटप्रसंगी ते त्याला शरण जातात ज्या गावी मुक्काम असेल त्या गावी वर्षातून एका पौर्णिमेला आपल्या समाजाची सभा भरवतात त्यांचे जत्रेचे ठिकाण गावापासून दूर आडरानात असते त्या वेळी वर्गणी काढून एक रेडा विकत घेतात, मग त्याला क्रूरपणे ठार करतात, त्याचे मांस शिजवून सामुदायिक भोजन करतात डोक्यावरचे केस हे देवाचे आहेत, अशी समजूत असल्यामुळे ते आयुष्यात कधीही हजामत करीत नाहीत

रेड्याच्या जत्रेप्रमाणे दरवर्षी त्यांची एक तंट्याची सभा भरते तिच्यात चारपाचशे पालातले लोक भाग घेतात सभेचा मुख्य चौधरी त्यांच्या तक्रारी ऐकून त्यांचा न्याय-निवाडा करतो व्यभिचारी स्त्रीला कढत तेलातला पैसा काढून आपले निरपराधित्व सिद्ध करावयास सांगतात व्यभिचारी पुरुषाला टोळीतून हद्दपार करतात

**विवाहप्रथा** – फासेपारध्यात मुलामुलींची लग्ने लहानपणीच उरकतात वधूच्या बापाला वराकडून चारशे ते हजार रुपयापर्यंत देज मिळते एवढी रक्कम एकाच वेळी देणे शक्य नसल्यास ती हप्त्याहप्त्यांनी देण्याची मुभा असते लग्नाच्या वेळी हाडे व पाने यांचे तोरण बांधतात या लोकांत जांभळाच्या पाल्याला फार महत्त्व असते ते जनावराच्या लांबट हाडाला भाकरी व जांभळाचा पाला गुंडाळून ते घराच्या छपरावर टांगून ठेवतात लग्नात देवक बसवतात व वधूवर त्याला प्रदक्षिणा घालतात मग त्या दोघांच्या वस्त्रांना सात सात गाठी मारून त्यांच्यावर अक्षता टाकतात

**मर्तिकप्रथा** – ऐपतीप्रमाणे मृतांना जाळतात किंवा पुरतात तिसऱ्या दिवशी दहनाच्या किंवा पुरलेल्या जागी थोडी काकवी आणि तूप ओततात एवढ्याने त्यांची अंत्यक्रिया पुरी होते

लंगोटी पारध्यांची वस्ती मध्य प्रदेशात आहे. हे लोक लंगोटी नेसतात व केस वाढवतात. हे शौचशुद्धीसाठी पाणी वापरीत नाहीत. यांच्यांत चव्हाण, पोहार व साळुंकी अशी तीन गोत्रे आहेत. अंबा, मरीमाता व काली या देवतांना ते भजतात. हे लोक मराठी व उर्दू बोलतात. यांच्यातही गुन्हेगारी प्रवृत्ती आढळते. यांच्या बायका पायात रुप्याचे दागिने घालीत नाहीत. हे लोक देवकार्य मारताना रेडा मारतात. जातीसंबंधीच्या गुन्ह्याला दंड म्हणून दारू पाजावी लागते. व्यभिचारी व्यक्तीचा डावा कान वस्तऱ्याने कापतात. आपले निरपराधित्व सिद्ध करण्यासाठी आरोपीला वेगवेगळी दिव्ये करावी लागतात.

इतर पोटजातींची राहणी व रीतभात आणि देवधर्म व व्यवसाय सामान्यपणे वरील पोटजातींप्रमाणेच असतात. [ट्रा. का. बॉ.; मुं. इ. जा.; गु. जा.; स्वराज्य जून, १९६१; ट्रा. का. सें. प्रॉ. इं.; म. लो. मा.].

## पारनेर

एक गणपतिक्षेत्र. हे नगर जिल्ह्यात आहे. याच्याविषयीची कथा अशी– भरद्वाज मुनींचा भौम नावाचा एक मुलगा होता. तो वर्णाने लाल होता. बापाने त्याला गणेशोपासना करायला सांगितले. भौमाने ती केल्यामुळे त्याला गजाननाने दर्शन देऊन त्याचे मंगल असे नाव ठेवले. त्याला ग्रहमालिकेतही स्थान दिले. भौमाला ज्या ठिकाणी गणपती प्रसन्न झाला, त्या स्थळी भौमाने दशभुज गणपतीची स्थापना केली आणि मंगलमूर्ती या नावाने त्याची पूजा केली.

तेव्हापासून हे स्थळ गणपतीक्षेत्रांत महत्त्व पावले.

## पारमात्मिकोपनिषद्

एक नव्य वैष्णव उपनिषद. या उपनिषदात विष्णू हाच परब्रह्म आहे, असे सांगून त्याच्याविषयी पुढील विवेचन केले आहे–

विष्णूचे षडक्षर, अष्टाक्षर आणि द्वादशाक्षर मंत्र हे पारमात्मिक आहेत. यातील षडक्षर मंत्र विष्णुपर असून, अष्टाक्षर मंत्र नारायणपर आहे. विष्णूहून कोणी मोठा नाही. भक्तांसाठी तो अवतार घेतो म्हणून त्याला भव म्हणतात. सूर्यचंद्राचे तेज हे त्याचेच आहे. त्याने रुद्रावरही अनुग्रह केला आहे. त्याच्या तीन मूर्ती, तीन गुण आणि तीन पावले प्रसिद्ध आहेत. ब्रह्मांड तोच निर्माण करतो. ऋषी व मुनी यज्ञद्वारे त्याचीच उपासना करतात. सर्व निसर्ग विष्णूच्या आज्ञेत आहे. कामरूपाने तो प्राणिमात्राच्या मनाला सुखवितो. अनेक अवतार त्यानेच धारण केले. विष्णू जलशायी आहे व लक्ष्मी त्याच्या वक्षावर विसावली आहे. [श्री. सी. ग. देसाई]

## पारमिता

बौद्ध तत्त्वज्ञानातील एक संज्ञा. पार जाणे किंवा पूर्णत्व असा त्या शब्दाचा अर्थ आहे. बुद्धाने आपल्या प्रत्येक जन्मात एक एक गुण पूर्णतेला नेला आणि त्यामुळे त्याला शेवटच्या जन्मात बोधी प्राप्त झाली, अशी बौद्धांची धारणा आहे. दान, शील, नैष्कर्म्य, प्रज्ञा, वीर्य, क्षांती, सत्य, अधिष्ठान, मैत्री व उपेक्षा अशा दहा पारमिता थेरवादी बौद्ध दर्शनात सांगितल्या आहेत. महायानी पंथात मात्र सहाच पारमिता मानलेल्या आहेत. दान, शील, शांती, वीर्य, ध्यान व प्रज्ञा अशी त्यांची नावे आहेत. बुद्धत्वाच्या प्राप्तीसाठी प्रयत्न करणाऱ्या बोधिसत्वाला या सहा पारमितांचे ग्रहण करणे अर्थात दानशीलादी गुण पूर्णत्वाला नेणे आवश्यक असते.

**दानपारमिता** – आपल्या सर्व वस्तूचे दान करणे व दानफलाचाही त्याग करणे. बोधिसत्त्व स्वतःचे शरीर सर्व प्राणिमात्रांसाठी अर्पण करतो व आत्मभावही सोडून देतो.

**शीलपारमिता** – चित्तातील विरती. चित्ताची शुद्धी करण्यासाठी शीलपारमितेचा अभ्यास आवश्यक असतो. तिच्या योगाने द्वेषाचे प्रशमन होते.

**क्षांतिपारमिता** – म्हणजेच सहनशीलता. ही तीन प्रकारची असते– (१) दुःखाधिवासना – अत्यंत कठिण प्रसंग आला तरी मन खचू न देता त्याला तोंड देणे. (२) परापकारमर्षण– दुसऱ्याने अपकार केला तरी तो सहन करणे, क्रोध येऊ न देणे व त्याचा अपकार न करणे. व (३) धर्मनिध्यान – शरीरावर आघात करणाऱ्या व्यक्तीवरही न रागावणे. क्षमा हाच जीवनाचा मूलमंत्र मानणे.

**वीर्यपारमिता** – वीर्य म्हणजे उत्साह. ज्याच्या अंगी पुरुषार्थ असतो, त्याला काहीही दुष्कर नसते. वीर्य असल्याविना पुण्यलाभ होत नाही.

**ध्यानपारमिता** – चित्ताची एकाग्रता. संसाराची आसक्ती सोडून दिली तरच समाधी लावता येते आणि चित्त एकाग्र झाल्यामुळे ज्ञानप्राप्ती होते.

**प्रज्ञापारमिता** – सर्व धर्मांची निस्सारता किंवा शून्यता समजणे, म्हणजेच पूर्ण ज्ञान प्राप्त होणे. सर्व दृश्य वस्तुजात मायामय अतएव मिथ्या आहे, हा परमार्थ कळल्यामुळे बोधिसत्त्वाचे चित्त शांत होते. चित्ताच्या एकाग्रतेमुळे प्रज्ञेचा प्रादुर्भाव सुलभ होतो. प्रज्ञेमुळे दानादी गुण पूर्णत्वाला जातात आणि सर्व आवरणांचा नाश होऊन परमार्थाची प्राप्ती होते. म्हणून सहा पारमितांमध्ये प्रज्ञापारमिता श्रेष्ठ मानली आहे.

अशा प्रकारे षट्पारमितांच्या योगाने बोधिसत्त्वाची साधना सफल होते, त्याला बुद्धत्व प्राप्त होते आणि त्याच्या जीवनाचा प्रत्येक क्षण प्राणिमात्रांच्या कल्याणासाठी व्यतीत होतो.

वज्रयान पंथाने या पारमितांना देवतारूप देऊन त्यांचे पूजन सुरू केले. प्रज्ञापारमिता ही त्यांतील सर्वश्रेष्ठ देवता होय. ती चतुर्भुज असते. इतर पारमिता मात्र द्विभुज असतात. सर्वांच्या उजव्या हातात चिंतामणी वज्र असतो व डाव्या हातात अभिज्ञानचिन्ह असते. दानपारमिता पाटल वर्णाची असून, धान्यमंजरी हे तिचे चिन्ह आहे. शीलपारमिता ही श्वेतवर्ण असून, सपुष्प चक्र हे तिचे चिन्ह आहे. क्षांतिपारमिता पीतवर्ण असून, श्वेतकमल हे तिचे चिन्ह आहे. ध्यानपारमिता ही हरित वर्ण असून तिचे चिन्ह नीलकमल आहे. प्रज्ञापारमिता ही पीत वर्ण असून, कमळावर ठेवलेले पुस्तक हे तिचे चिन्ह आहे. [ बौ ध्द, वा न मी, इ बु इ ]

## पारमेष्ठ्य

एक वैदिक शासनव्यवस्था. या व्यवस्थेत माणसाचे अंगभूत दोष सुधारण्याकडे विशेष लक्ष असे. सर्व माणसे ही परमेश्वराची लेकरे आहेत असे समजून त्यांना समान अधिकार दिला जाई असे. आजकाल रामराज्य ही शासनपद्धती परिचित आहे. या दोन्ही शासनपद्धती जवळ जवळ सारख्याच आहेत, असे अनेकांचे मत आहे. [ व मा ]

## पारशव

एक प्राचीन जमात. ब्राह्मण पुरुष व शूद्र स्त्री यांची संतती म्हणजे पारशव होय, असे नारद व गौतम म्हणतात. पारशव हे शूद्रासारखेच असून, शूद्रांचेच व्यवसाय त्यांनी करावे, असे सह्याद्रिखंडात म्हटले आहे. बौधायन, कात्यायन, मनू व याज्ञवल्क्य सांगतात, की पारशव हे निषादाचेच दुसरे नाव आहे. मनूने (९ १७८) हा शब्द पारय म्हणजे तरून जाणे आणि शव म्हणजे प्रेत या शब्दांपासून व्युत्पादिला आहे. म्हणजे जिवंत असून जो मेल्याप्रमाणेच आहे तो पारशव होय. उशनसाच्या मते हे लोक भद्रकालीचे पुजारी म्हणून किंवा तंतुवाद्ये वाजवून आपली उपजीविका करीत. [ हि ध ]

## पारशी

एक भारतीय समाज. हे लोक पर्शिया म्हणजे इराण या देशातून भारतात आले, म्हणून यांना पारशी हे नाव मिळाले. वैदिक आर्य व इराणी लोक अत्यंत प्राचीन काळी एकत्र वसलेले होते. बल्ख प्रदेशातून जे लोक इराणात गेले त्यांनी तिथे नवे साम्राज्य स्थापले आणि वेगळी संस्कृती निर्माण केली. तेच इराणी लोक पारशांचे पूर्वज होत. (पशु–भारतीय संस्कृती पाहा.)

इ स च्या ७ व्या शतकात इराणात ससानी वंशाचे राज्य चालू असताना अरबांनी तो देश जिंकला व तिथे इस्लामचे प्रभुत्व प्रस्थापित केले. त्या वेळी पुष्कळ पर्शियन लोकांनी इस्लामचा स्वीकार केला, पण काही कट्टर धर्मनिष्ठ लोक इस्लाम धर्म स्वीकारायचा नाही, अशा निर्धाराने खोरासानच्या डोंगराळ प्रदेशात पळून गेले. तिथे त्यांना सुमारे शंभर वर्षे आपल्या धर्माचे रक्षण केले. पण तिथेही त्यांना इस्लामी आक्रमण भोवलेच. त्यामुळे त्यांच्यातील काही जणांनी इराणी आखाताच्या मुखाजवळ असलेल्या ओमुझ बेटावर स्थलांतर केले. त्या ठिकाणीही आपल्या धर्माचे रक्षण करणे कठीण झाल्यामुळे ते जहाजात बसून दक्षात रासाठी निघाले व भारताच्या पश्चिम किनाऱ्याला लागले.

प्रथम ते दीव बेटावर उतरले. तिथे १९ वर्षे वास्तव्य करून मग ते गुजरातमधील संजाण या शहरात राहायला गेले. तिथे त्या वेळा यादव वंशातील जदीराणा याचे राज्य होते. निर्वासित लोकांचा मोबेद (धर्मगुरु) नजराणे घेऊन जदीराण्याकडे गेला



अग्निस्तंभ – संजाण

व त्याने संजाण येथे राहण्याची राजाकडे परवानगी मागितली. राजाने त्याला त्यांचा धर्म व आचार याविषयी विचारले असता त्याने सांगितले, की ' आम्ही सूर्य, चंद्र, अग्नी व जल यांची पूजा करतो व कस्ती ( जानवे ) घालतो '. ते ऐकून राजाने

त्यांना काही अटींवर आपल्या राज्यात वसण्याची परवानगी दिली. त्या अटी अशा–

(१) संजाणमध्ये वापरली जाणारी भाषा त्यांनी वापरावी.
(२) त्यांच्या स्त्रियांनी हिंदू स्त्रियांसारखा पोषाख करावा.
(३) त्यांनी हत्यारे बाळगता कामा नयेत. आणि
(४) त्यांनी आपली लग्ने रात्री लावावीत.

पारशी लोकांनी त्या अटी मान्य केल्या आणि संजाणजवळ आपली नवी वसाहत सुरू केली. तिथेच त्यांनी पहिले अग्निमंदिर बांधले. आपल्या आगमनाचे स्मारक म्हणून तिथे त्यांनी एक अग्निस्तंभही उभारला.

रामायण, महाभारत व पुराणे यांतील संदर्भावरून ध्यानात येते, की प्राचीन काळातही इराणातील असंख्य लोक भारतात येऊन स्थायिक झाले होते. सूर्यपूजक शाकद्वीपी ब्राह्मण हे त्यांतलेच होत. मात्र ते सर्व लोक भारतीय संस्कृतीत विलीन होऊन हिंदू बनले. इराण देशावर अरबाचे आक्रमण झाल्यामुळे जे इराणी भारतात आले, त्यांना इराण व भारत यांचा जुना संबंध माहीत असावा. भारतात आपले स्वागत होईल असा विश्वास त्यांच्या मनात वसत असावा, म्हणूनच ते असीम हाल-अपेष्टा सोसून इकडे आले असावे. हिंदूंनी त्यांचे स्वागत केले; पण त्यांना आपल्यांत सामावून घेतले नाही. कारण त्या काळी मुसलमानी आक्रमणांमुळे हिंदू लोकांची वृत्ती संकुचित बनली होती. शिवाय ज्या प्रदेशात पारशी लोक प्रथम स्थायिक झाले, तिथे आदिवासी लोकांची वस्ती अधिक होती. पारशी लोक स्वतःला त्यांच्याहून श्रेष्ठ मानीत असल्यामुळे ते त्यांच्यापासून दूर राहिले होते.

पारशी लोक इ. स. च्या ८ व्या शतकात संजाणला आले, अशी समजूत आहे. इ. स. १६०० च्या सुमारास बहमन कैकोबाद संजाना याने 'किस्सा-इ-संजान' नामक काव्य रचले असून, त्यात पारशी लोकांच्या आगमनाची हकीकत दिली आहे. प्रचलित कथा, स्त्री आणि वृद्धांच्या आठवणी यांच्या आधारे ते काव्य रचले आहे. पण त्यात कालक्रम सापडला, तरी एकही निश्चित दिनांक मिळत नाही. दस्तुर अस्पंदिआरजी कामदिनजी यांनी आपल्या 'कदीम तारीख पार्सीओनी कसर' या पुस्तिकेत मात्र पारशांच्या आगमनाचा निश्चित दिनांक दिला आहे. शुक्रवार, श्रावण शुद्ध नवमी, वि. सं. ७७२ या दिवशी पारशी लोक संजाणला आले, असे त्यांनी म्हटले आहे. त्यांनी त्या दिवसाची पारशी तिथीदेखील दिली आहे. पण संशोधकांनी सर्व बाजूंनी सखोल अभ्यास करून ठरविले आहे, की पारशांचे संजाणमध्ये आगमन झाले ते वर्ष वि. सं. ७७२ नसून, ९९२ म्हणजे इ. स. ९३६ हे असले पाहिजे.

कालांतराने संजाणहून काही पारशी लोक नवसारी, भडोच, अंकलेश्वर, वारिआव, खंबायत, सुरत, बीकानेर, ठाणे, चौल, इ. ठिकाणी जाऊन स्थायिक झाले. प्रारंभी अनेक शतके त्यांची वस्ती गुजरातेत असल्यामुळे गुजराती हीच त्यांची मातृभाषा बनली.

पुढे महंमूद बेगडा याने संजाणवर स्वारी केली, त्या प्रसंगी पारशी लोकांनी संजाणच्या राजाच्या बाजूने युद्धात पराक्रम केला. पण त्यांचा नेता आर्देशीर आपल्या बऱ्याच सैनिकांसह मारला गेला. त्या वेळी मुसलमानांनी तिथे खूप विध्वंस केला. त्यामुळे पारशी लोक तिथून पळून गेले.

अकबर बादशाहाच्या वेळी पारशांचा मोगलदरबारात प्रवेश झाला. अकबराने त्यांना आश्रय दिला, त्यांचे बरेच आचार-विचार स्वीकारले व त्यांना जमिनीही इनाम दिल्या. त्यामुळे



पारशी पुरुष

पारशी लोकांना ठिकठिकाणी आपल्या वसाहती व सांस्कृतिक केंद्रे स्थापणे शक्य झाले.

इ स च्या १५ व्या शतकात नरिमान होशांग नावाचा एक मनुष्य इराणात जाऊन आला तिथे त्याला त्याचे काही धर्म बांधव भेटले भारतीय पारशी लोकांची वार्ता कळल्यामुळे त्यांना अतिशय आनंद झाला परत येताना नरिमान याने आपल्या धर्मातील मूळ आचार विचाराची माहिती गोळा करून आणली भारतातील पारशी लोकांत तोपर्यंत धर्मविषयक बरेच मतभेद उत्पन्न झाले होते ते नाहीसे करून समाज संघटित करण्यासाठी वरील माहितीचा फार उपयोग झाला

भारतात ब्रिटिश सत्ता प्रस्थापित झाल्यानंतर पारश्यांच्या उत्कर्षाला पुष्कळच वाव मिळाला पारशी लोक बुद्धिमान व उद्योगप्रिय असल्यामुळे ब्रिटिश अधिकाऱ्यांनी अनेक क्षेत्रात त्यांचा उपयोग करून घेतला व्यापार व उद्योगधंद्यात अनेक पारशी पुरुषांनी कर्तबगारी दाखवून नाव कमावले

भारतात आल्यानंतर येथील हवामान, अन्नपाणी व परिस्थिती यांचा परिणाम होऊन पारशी लोकांचे देह स्वरूप व स्वभावधर्म यात बराच फरक पडला असला, तरी त्यांच्या मूळ पूर्वजांचे स्वभावविशेष काही प्रमाणात अद्यापही त्यांच्यात आढळतात इतर भारतीयांपेक्षा पारशी मनुष्य अगदी वेगळा दिसतो तो अधिक उंच आणि अधिक उजळ असतो

**व्यवसाय–** संजाण व आसपासची गावे येथे वसाहती करून राहिलेले पारशी दोन तीनशे वर्षे मुख्यत शेतीवर आपला उदरनिर्वाह करीत, पण नंतर ते निरनिराळ्या शहरांत जाऊन व्यापार करू लागले सुरतला गेल्यानंतर त्यांची भरभराट सुरू झाली डच पोर्तुगीज आणि विशेषत इंग्रज यांच्याशी संबंध आल्यामुळे त्यांचा व्यापार खूप वाढला ब्रह्मदेश, चीन, मलाया, मक्का, मारिशिअस येथपर्यंत ते आपला माल पाठवू लागले विणकाम, सुतारकाम, मातीकाम, इ व्यवसायांतही ते आपले कौशल्य दाखवू लागले काही लोकांनी जहाजे बांधण्याचा प्रचंड उद्योग सुरू केला बरेच पारशी देसाई व चौधरी म्हणून सरकारी अधिकारी झाले इंग्रजांना सागवानाचे लाकूड, कपडे गाडघोडे, बैल, मेंढे दारू वगैरे पुरवण्याची कंत्राटे घेऊन अनेक पारशी श्रीमंत झाले इंग्रजांशी घनिष्ठ संबंध आल्यामुळे त्यांना शिक्षणाचे महत्त्व पटले व त्या क्षेत्रातही त्यांनी खूप प्रगती केली एकोणिसाव्या शतकात ब्रिटिशांची राजवट सुरू झाल्यानंतर कित्येक पारशी घराणी उद्योग शिक्षण, राजकारण, इ क्षेत्रात उदयाला आली व श्रेष्ठपदाला चढली भारताचा औद्योगिक विकास सुरू झाला, त्याचे बरेचसे श्रेय पारशी उद्योगपतींना दिले पाहिजे त्या लोकांनी अपार परिश्रम करून अलोट संपत्ती मिळविली आणि खूप दानधर्मही केला ससून, कामा, जहांगीर, टाटा, वाडिया, पेटिट वगैरे कित्येक घराणी या दृष्टीने प्रख्यात ठरली



जमशेटजी जीजीभाई टाटा

**वेदधर्म–** भारतातले पारशी हे इराणमधील झरथुष्ट्री संप्रदाय आपला धर्म मानतात त्यात अहुर मज्द या एकाच परमेश्वराची आराधना करण्याचा आणि अग्नीला त्याचे प्रतीक मानून त्याची पूजा करण्याचा उपदेश आहे याव्यतिरिक्त सूर्य, चंद्र, जल, वायू पर्वत, तारका व दिवंगत सत्पुरुष यांचीही उपासना पारशी लोक करतात अवेस्ता हा त्यांचा धर्मग्रंथ होय त्यातील पुष्कळ विचार वेदातील विचारांशी मिळते–जुळते आहेत वैदिक धर्माप्रमाणेच पारशांचा धर्म विजिगीषू व प्रवृत्तिमार्गी आहे त्यात यज्ञ होमहवन यांना महत्त्वाचे स्थान आहे प्रत्येक पारशी वसाहतीत एक अग्निमंदिर असतेच त्याला अग्यारी, आतश बहराम, इ नावे आहेत उपासतापास, व्रत, वैकल्ये यांना त्या धर्मात स्थान नाही

**मोबेद –** पारशांच्या पुरोहिताला मोबेद म्हणतात गृहस्थाच्या घरी मंत्र म्हणणे, अग्यारी, अदरन, आतश बेहेराम यांतील सर्व विधी करणे, नवजोत, विवाह, इ विधींमध्ये धार्मिक मार्गदर्शन करणे, मृताचे सर्व संस्कार करणे, इ त्यांची कामे असतात मोबेदांचे कार्यक्षेत्र मर्यादित असते अशा अनेक मोबेदांवर दस्तुर नावाचा अधिकारी असतो या पुरोहितांचा पोषाख नेहमी पांढरा असतो ते केस, मिशा व दाढी वाढवतात त्यांची टोपीही शुभ्र असते

मोबेदांतील कमी अधिकाराच्या व्यक्तींना एरवद म्हणतात

ज्या मुलाला एरवद व्हायचे असेल, त्याला नावार हा संस्कार करून घ्यावा लागतो. यस्न, वीस्परद, पाचगाह, पाचन्यामिश



मोबेद– पारशी पुरोहित

व काही यष्ट याचे त्याला प्रथम अध्ययन करावे लागते. त्यानंतर त्याला बरेश्नम नामक प्रायश्चित्त घ्यावे लागते. शरीर व मन शुद्ध व्हावे हा त्यातला हेतू असतो त्यासाठी गोमेझ (गोमूत्र), निरंग (बैलाचे मूत्र) व भस्म, इ. पदार्थ वापरतात या विधीचा कालावधी एक महिना असतो. नावार संस्कार पूर्ण झाल्यानंतर त्याला एरवद ही पदवी मिळते आणि नवजोत व विवाह हे संस्कार चालविण्याचा अधिकार प्राप्त होतो.

त्यानंतर त्याला मोबेद व्हायचे असेल, तर मर्ताब हा विधी करावा लागतो. बरेश्नम झाल्यानंतर सकाळी यस्नमंत्र म्हणायचे, त्याच दिवशी स्त्रोष देवतेप्रीत्यर्थ यस्न म्हणायचा व मध्यरात्री वेदिदाद म्हणायचा, असा तो विधी असतो. हा विधी झाल्यानंतर त्याला मोबेद ही पदवी मिळते व त्याला इतर संस्कार करण्याचा अधिकार प्राप्त होतो.

**विवाहप्रथा –** वैदिक धर्माप्रमाणेच झरथुष्ट्री धर्मात विवाहाला प्राधान्य आहे. संन्यास व ब्रह्मचर्य याचा त्या धर्माने निषेध केला आहे; लग्न करून योग्य प्रकारे संसार करणे हे मनुष्याचे मुख्य जीवितकर्तव्य होय, असे पारशीधर्म मानतो

पारशी लोक जवळच्या नात्यातील स्त्री-पुरुषाचा विवाह अधिक प्रशस्त मानतात. त्यामुळे ते चुलत भावा-बहिणीचाही विवाह करतात इराणातील झरथुष्ट्री धर्माच्या लोकांत वयात आल्यानंतर लग्न होत असे; पण भारतातल्या पारशी लोकांत बालविवाहाची प्रथा सुरू झाली सांप्रत मात्र ती प्रथा बंद पडून प्रौढपणीच लग्ने होतात. लग्न ठरवताना वधू-वराच्या पत्रिका पाहतात. त्या जुळत असल्या, तर वाङ्‌निश्चय करतात मग लग्नासाठी मुहूर्त पाहतात

लग्नसमारंभ वधूच्या घरी सायंकाळी होतो. वधूकडील मंडळी वरगृही जाऊन वराला वाजतगाजत घेऊन येतात लग्नमंडपात दोन खुर्च्या समोरासमोर ठेवलेल्या असतात वधू वर त्यावर बसतात. मग त्यांच्यामध्ये अंतरपाट धरतात त्या वेळी अंतरपाटाच्या वस्त्राखालून दोघांचे उजवे हात एकत्र जुळवून ते सुताने बांधतात. त्याच सुताचे सात पदर दोघांच्या भोवती गुंडाळतात. शिवाय एक वस्त्रही भोवती गुंडाळून त्याला गाठ मारतात. त्या गाठीला विवाहग्रंथी असे म्हणतात. त्यानंतर अग्नीत धूप टाकतात. मग वधू-वर एकमेकांच्या मस्तकावर अक्षता टाकतात. त्या वेळी दस्तुर मंत्र म्हणतो

मग अंतरपाट दूर केला जातो आणि वधू-वर खुर्च्यांवर शेजारी बसतात. दोन्ही बाजूंना दोन मोबेद उभे राहून झेंद व संस्कृत भाषेतील आशीर्वचने म्हणतात आणि वधू-वरावर अक्षता टाकतात. मग दस्तुर त्या दोघांना काही प्रश्न विचारतो आणि त्यांची योग्य ती उत्तरे मिळाल्यावर त्यांना सदाचरणाचा उपदेश करतो व त्यांना चांगली बुद्धी देण्याविषयी प्रार्थना करतो. त्यानंतर तनदुरुस्तीची म्हणजेच आयुरारोग्याविषयीची प्रार्थना होते. आणि वधू-वर, दस्तुर व दोन साक्षीदार विवाहपत्रकावर स्वाक्षऱ्या करतात.

पारशी पुरुष एक पत्नी जिवंत असताना दुसरे लग्न करू शकत नाही. मात्र स्त्री व पुरुष या दोघांचाही पुनर्विवाह या समाजाला मान्य आहे.

**प्रसूतिप्रथा –** स्त्रीला गर्भधारणेनंतर पाचवा महिना लागला, की तिची सासू तिला नवी वस्त्रे देऊन तिला तिच्या माहेरी पाठवते. तिचे आई-वडीलही तिला नवे कपडे देतात. या सोहळ्याला पंचमासी म्हणतात. सातव्या महिन्यात अघरणी म्हणजे ओटी भरण्याचा समारंभ होतो.

या लोकांत जननाशौच चाळीस दिवस पाळतात. त्यानंतर

बाळंतिणीला स्नान घालून शुद्ध करतात आणि तिच्या सर्व वस्तू कोणाला तरी देऊन टाकतात.

प्रसूतीनंतर पाचव्या दिवशी मुलीच्या सासरी भोन म्हणजे उंची दारू पाठवतात. षष्ठीपूजनाच्या रात्री बाळंतिणीच्या बाजेजवळ एक कोरा कागद, दौत, लेखणी, नारळ व कुंकू या वस्तू ठेवतात. देवी मुलाचे भवितव्य त्या कागदावर लिहून



पारशी स्त्री

ठेवते, अशी त्यांची समजूत आहे. नंतर सासरची माणसे बाळंतविडा पाठवतात. त्याच दिवशी मुलाची कुंडली तयार करतात.

सातव्या वर्षी मुलाचा व मुलीचा नवजोत नामक विधी केला जातो. तो ब्राह्मणांच्या व्रतबंधाप्रमाणे असतो. त्यात मुलाला कस्ती व सदरा घालतात. त्या विधीमुळे मुलगा धर्मशिक्षणाला पात्र होतो.

**सण व उत्सव** – पारशांचे सण तीन प्रकारचे आहेत. काही सण ऋतुमानाप्रमाणे येतात, काही सण त्यांच्या इतिहासातल्या विशिष्ट घटनांशी संबंधित असतात, तर काही पूर्वजांच्या स्मरणार्थ साजरे केले जातात.

पहिल्या प्रकारात गहंबार नावाचे सण मुख्य होत. ते दर दोन महिन्यांनी येतात व पाच दिवस चालतात. गावातील सर्व पारशी लोक मिळून ते साजरे करतात. अहुर मझ्दाने सृष्टी उत्पन्न केली, त्याबद्दल त्याचे आभार मानणे हा त्यांचा हेतू असतो. यांतील शेवटचा सण विशेष महत्त्वाचा असून, तो १० मार्च ते २० मार्चपर्यंत चालतो. त्या दिवसांत स्वर्गातले पितर पृथ्वीवर येऊन नातेवाईकांना भेटतात अशी त्यांची श्रद्धा असते.

पारशांच्या प्रत्येक महिन्याला नाव असते, तसे प्रत्येक दिवसालाही नाव असते. काही दिवसांची नावे व महिन्यांची नावे समान आहेत. असे १२ दिवस सणाचे समजतात. त्यांपैकी सात सण विशेष महत्त्वाचे आहेत. पहिल्या महिन्याचा एकोणिसावा दिवस म्हणजे फर्वर्दिन, हा मृतात्म्यांच्या स्मरणार्थ असतो. त्या दिवशी सर्वजण अग्यारीत जमतात, मंत्र म्हणून चंदनाचा भुसा व धूप अग्नीत समर्पितात व शेवटी फळे वाटतात. मेहेरंगन हा सण सातव्या महिन्याच्या सोळाव्या दिवशी येतो. तो सूर्याच्या सन्मानार्थ असतो. आवन अर्दुइसुर हा सण आठव्या महिन्याच्या दहाव्या दिवशी येतो. तो जलदेवदूतांच्या सन्मानार्थ असतो त्या दिवशी पारशी लोक समुद्रात किंवा नदीत नारळ, साखर व फुले वाहतात आणि जलदेवदूतांची प्रार्थना करतात. अदर हा सण नवव्या महिन्याच्या नवव्या दिवशी येतो. तो अग्नीच्या सन्मानार्थ असतो. त्या दिवशी लोक अग्यारीत जाऊन प्रार्थना करतात व दानधर्म करतात. नवव्या महिन्यातला एकोणिसावा दिवस म्हणजे दुसरा फर्वर्दिन होय. तो पहिल्या फर्वर्दिनासारखाच असतो. बहमन हा सण अकराव्या महिन्याच्या दुसऱ्या दिवशी येतो. तो बहमन नामक देवदूताच्या सन्मानार्थ असतो. वहमन हा पशुपक्ष्यांचा संरक्षक आहे. काही पारशी या महिन्यात मांसाशन वर्ज्य करतात आणि कुत्र्यांना दूध व इतर पशूंना चारा घालतात. अस्पंदाद हा सण बाराव्या महिन्याच्या पाचव्या दिवशी असतो. त्या दिवशी पारशी लोक आपल्या उपाध्यायाकडून मंतरलेली वाळू व पेहेल्वी मंत्र लिहिलेला एक कागद घेऊन येतात. वाळू घराच्या सर्व कोपऱ्यांत टाकतात व कागद मुख्य दरवाजावर लावतात.

पारशी वर्षारंभदिनाला नवरोज म्हणतात. तो ऑगस्ट अखेर किंवा सप्टेंबरच्या आरंभी येतो. त्यापूर्वी वर्षअखेरचे सहा दिवस पटेटीचा सण असतो. शेवटच्या दिवशी अहुर मझ्दाने विश्वाची उत्पत्ती केली व त्याच दिवशी पूर्व इराणचा राजा गुस्तास्प याने झरथुष्ट्री धर्म स्वीकारला, असे समजतात.

वसंत ऋतूत ज्या दिवशी अहोरात्र समान असतात (२१ मार्च) त्या दिवशी उत्सव करण्याची आज्ञा जमशेद बादशहाने काढली. तो दिवस जमशेदी नवरोज म्हणून प्रसिद्ध आहे.

खोर्दाद साल हा सण फर्वर्दीन मासाच्या ६ व्या दिवशी असतो. त्या दिवशी आदिमानव गयोमर्द व झरथुष्ट्र यांचा जन्म झाला, असे मानतात.

**चालीरीती** – डोके व पाय कधी उघडे ठेवू नयेत असा यांच्यांत नियम आहे. भोजनापूर्वी परमेश्वराची प्रार्थना करायची असते. जेवताना बोलायचे नसते. शिंक किंवा जांभई आल्यास 'अहरिमनाचा नाश होवो' अशा अर्थाचा मंत्र म्हणायचा असतो. दात पडल्यास तो आणि नखे व केस काढल्यानंतर ते जमिनीत पुरून मंत्र म्हणतात. कोंबड्याला फार पवित्र मानतात; आरवता येऊ लागल्यानंतर त्याला ते खात नाहीत. कोंबडा किंवा पोपट मेल्यावर त्याच्या देहाभोवती सदरा गुंडाळून व कस्ती बांधून तो चांगल्या ठिकाणी नीट पुरतात यांच्यांत रजस्वला स्त्रियांचा विटाळ फार कडकपणे पाळतात.

खेडेगावातील पारशी, हिंदूंच्या देवांना व मुसलमानांच्या पीरांना नवस बोलतात. होळीला नैवेद्य दाखविणे, देवीला कोंबडे, बकरे बळी देणे, मारुतीला तेल घालणे वगैरे गोष्टीही ते करतात. दृष्टबाधा होऊ नये म्हणून मुलाला तीट लावणे, त्याची दृष्ट काढणे, मंतरलेले ताईत बांधणे, यावरही त्यांची श्रद्धा असते. अहरिमन व त्याचे दूत यांचे वसतिस्थान उत्तरेकडे असते, म्हणून उत्तरेकडे डोके करून ते निजत नाहीत.

पारशी लोकांत जातिभेद नाही, तसा वर्णाश्रमभेदही नाही. त्यांच्यात गृहस्थाश्रम तेवढा आहे; इतर आश्रम नाहीत. पण त्यांच्यांत तीन पक्ष मात्र आहेत. ते धार्मिक किंवा सामाजिक कारणाने बनलेले नसून, पंचांगभेदावरून पडले आहेत. सस्सानी वंशातील शेवटचा सम्राट यज्दगेर्द शेहरयार याच्या मृत्यूनंतर त्याच्या स्मरणार्थ संवत सुरू करण्यात आला. प्राचीन काळी इराणात १२० वर्षांनी एक अधिक मास (कबीसा) मानण्याची प्रथा होती, ती यज्दगेर्द संवतातही स्वीकारली गेली. पण इस्लामच्या आक्रमणानंतर इराणातील मझ्दयस्नी लोक (अहुर मझ्दाचे उपासक) कबीसा धरायला विसरले आणि त्यांचा नूतन वर्षारंभ दर १२० वर्षांनी एक मास आधी येऊ लागला. जे लोक खोरासानमध्ये काही दिवस राहून नंतर भारतात आले, त्यांनी एकदाच कबीसा धरला व नंतर ते देखील ती प्रथा विसरले. त्यामुळे त्याचा वर्षारंभ व इराणातील वर्षारंभ यात एक मासाचे अंतर पडले. इ. स. च्या १५ व्या शतकापासून भारतातून काही पारशी व्यक्ती इराणात जाऊन आल्या आणि तैमूरलंगाच्या इराणवरील आक्रमणामुळे काही मझ्दयस्नी लोक भारतात आले, तेव्हा वर्षारंभातला हा फरक ध्यानात आला. मग काही पारशी लोक इराणमधील वर्षारंभ पाळू लागले व ते स्वत.ला कदीमी (प्राचीन) म्हणवू लागले. ज्यांनी एक मास नतर वर्षारंभ पाळण्याची प्रथा चालू ठेवली, ते शहेनशाही या नावाने ओळखले जाऊ लागल



पारशांचे अग्निकुंड

वरील दोन्ही वर्षारंभदिवस कबीसा न धरण्यामुळे चुकले आहेत, म्हणून जमशेदी नवरोज (२१ मार्च) हाच वर्षारंभ मानावा आणि त्या वर्षाला फस्ली सवत म्हणावे, असा एक तिसरा पक्ष नंतर उत्पन्न झाला. त्या पक्षाला फस्ली हे नाव मिळाले. पारशी लोकांत शेकडा ७५ शहेनशाही, शेकडा २० कदीमी व शेकडा ५ फस्ली लोक आहेत. इ. स. १९६८ साली यज्दगर्दे संवत १३३६ असून, फस्ली नवरोज २१ मार्चला, कदीमी नवरोज ३१ जुलैला व शहेनशाही नवरोज ३१ ऑगस्टला आहे

या तीन पक्षांत वादाची रणे पुष्कळ झाली. काही काळ त्यांच्यांत लग्नसंबंधही होत नसत. पण मग ते होऊ लागले. त्यांच्या संस्कारांत किरकोळ भेद मात्र उरले आहेत.

**पंचायत** — इराणातून इकडे आलेल्या पारश्यांजवळ त्यांचे धर्मग्रंथ वगैरे काही नव्हते. म्हणून समाजाचे नियमन करण्यासाठी त्यांनी स्थानिक जातपंचायत–पद्धती स्वीकारली. गावातील प्रतिष्ठित, वयस्क व सज्जन व्यक्तींची समिती बनवून तिच्या द्वारे ते सर्व प्रश्न सोडवू लागले. पंचायतीच्या प्रमुखाला दावर अशी संज्ञा आहे. दातो–वार (न्यायदाता) या पहलवी शब्दावरून हे नाव आले आहे दावराला पूर्वी बरेच अधिकार होते; पण ब्रिटिश सत्ता सुरू झाल्यानंतर ते हळूहळू कमी झाले. त्या वेळी पंचायतीने केलेले नियम सर्व समाजाला बंधनकारक असत. गेल्या शतकाच्या मध्यापासून मात्र त्यांच्या पंचायतीकडे धर्मादाय निधीची व्यवस्था करण्याव्यतिरिक्त दुसरे काही काम राहिले नाही. पारशी लोकांत भिक्षा मागणे निषिद्ध असल्यामुळे बहुतेक सर्व गरीब लोक अशा धर्मादाय संस्थांकडून मदत घेतात. अशा पारशी संस्था पुष्कळ असून, त्यांचे निधीही मोठे असतात. त्यांच्या द्वारा फार मोठ्या प्रमाणावर गोरगरिबांना मदत केली जाते. अशा प्रकारे पारशी समाज आपल्या गरीब बांधवांची सतत काळजी घेत असतो.

**मर्तिकप्रथा**-- हे लोक अग्नी, जल व पृथ्वी यांना पवित्र मानतात आणि मृतदेह अत्यंत अपवित्र असतो, असे मानून त्याचे दहन करीत नाहीत, तो जमिनीत पुरीत नाहीत किंवा पाण्यात बुडवत नाहीत. प्रेतामुळे अग्नी, जल व पृथ्वी अपवित्र होऊ नयेत, अशी त्यांची इच्छा असते. म्हणून प्रेत दगडावर उघडे ठेवून गिधाडांच्या भक्ष्यस्थानी पडावे अशी ते व्यवस्था करतात.

मनुष्य मरणोन्मुख झाला, की दस्तुर त्याच्यापाशी अवेस्तातले काही मंत्र म्हणतो व त्याच्या पापाबद्दल क्षमा करण्याविषयी प्रार्थना करतो. प्राणोत्क्रमण झाल्यानंतर मृताच्या देहाला प्रथम स्नान घालतात व मग तो स्वच्छ वस्त्रात गुंडाळून त्याच्या कमरेला कस्ती बांधतात. मग प्रेत बाहेर आणून एका गुळगुळीत दगडावर किंवा वाळूवर ठेवतात. प्रेतवाहक त्या जागेभोवती तीन वर्तुळाकार रेघा ओढतो. त्या रेघा कोणी ओलांडू नये, असा नियम आहे. त्यानंतर तिथे विशिष्ट लक्षणांचा एक कुत्रा आणून त्याला ते प्रेत दाखवतात. तो कुत्रा पिंगट रंगाचा असून, त्याला चार डोळे असतात. म्हणजे त्याच्या दोन्ही डोळ्यांवर डोळ्याच्या आकाराचे दोन ठिपके असतात. मनुष्य मेला असेल तरच तो कुत्रा त्या प्रेताकडे टक लावून पाहतो; जिवंत असेल तर त्याकडे मुळीच पाहत नाही, अशी त्यांची समजूत आहे. मग एक मोबेद प्रेताजवळ ठेवलेल्या अग्निकुंडात चंदन व धूप टाकतो आणि मंत्र म्हणतो.

प्रेत फक्त दिवसाच स्मशानात नेतात. त्यासाठी लोखंडी तिरडी वापरतात. प्रेतवाहकांचा पोशाख शुभ्र असतो. प्रेताबरोबर फक्त पुरुष स्मशानात जातात. दोघे मोबेद पुढे राहून गाथेतील मंत्र म्हणतात.

जिथे मृत्यू झाला असेल ती जागा व प्रेत ज्या मार्गाने नेले असेल तो मार्ग गोमूत्र शिंपडून शुद्ध करतात. स्मशानाला दोख्मा म्हणतात. तिथे गेल्यावर सर्वजण प्रेताचे अखेरचे दर्शन घेतात. त्यासाठी मृताच्या तोंडावरील वस्त्र थोडा वेळ दूर करतात. कुत्र्यालाही ते पुन्हा दाखवतात.

गावापासून दूर माळावर किंवा डोंगरावर दोख्मा असतो. तिथे दगडावर किंवा वाळूवर नग्न केलेले प्रेत सूर्यप्रकाशात उघडे ठेवून देतात. थोड्याच वेळात गिधाडे त्यावर झडप घालून त्याचे सर्व मांस खाऊन टाकतात. शहरात अशी मोकळी जागा मिळणे कठीण असल्यामुळे, या अंत्यसंस्कारासाठी गोल मनोरे बांधलेले असतात. मनोऱ्याच्या माथ्यावर प्रेते ठेवण्यासाठी कोनाडे किंवा खाचा केलेल्या असतात. त्यांच्या तळाशी जाळी असून, खाली खोल विहिरी असतात, त्यात वाळू असते. मृताची हाडे व इतर अवशेष त्या जाळीतून खाली पडतात व विहिरींतल्या वाळूत ते मिसळून जातात. अशा प्रकारचे मनोरे



बांधण्याचे काम विधिपूर्वक केले जाते. त्या वेळी पूजा व प्रार्थना होते.



दोख्मा– मनोऱ्याचा वरचा भाग

प्रेत कोनाड्यात ठेवल्यानंतर मोबेद व आप्तजन हातपाय धुवून प्रार्थना करतात. मृताचा आत्मा तीन दिवसांनंतर पृथ्वी सोडून जातो, अशी त्यांची समजूत आहे. म्हणून तीन दिवस मृत्यूच्या जागी मोबेद चंदन जाळीत व मंत्र म्हणत बसतो. तिसऱ्या दिवशी व चौथ्या दिवशी पहाटे 'उथम्ण' नावाचा विधी करतात. त्या वेळी मृताचे आप्त धर्मनिधीसाठी द्रव्य देतात व मृत मनुष्याने संकल्पिलेल्या देणग्यांचा उच्चार करतात. मृत्यू हिवाळ्यात झाला असेल तर नऊ रात्री व उन्हाळ्यात झाला असेल तर एक महिना त्या घरात अग्नीची पूजा करू नये, असा नियम आहे. त्यावरून अशा घरात अन्न शिजवू नये व तिथल्या माणसांना इतरांनी अन्नपाणी आणून द्यावे, अशी चाल पडली आहे.

काही लोक मृतासाठी पहिल्या वर्षी दररोज श्राद्ध करतात. नंतर महिन्यातून एकदा करतात. सामान्यपणे वर्षातून एकदा श्राद्ध केले जाते. वर्षाचे शेवटचे दहा दिवस मृतांच्या श्राद्धासाठीच असतात. त्या श्राद्धाला फ्रवर्दिगन किंवा मुक्ताद असे म्हणतात.

**सुधारणाचळवळ**-- इ. स. १८५१ साली काही आंग्लविद्याविभूषित पारशी तरुणांनी रहनुमाई मज्दयस्नन नावाची एक सभा स्थापली. पारशी लोकांची सामाजिक स्थिती सुधारणे व झरथुष्ट्री धर्माला उजाळा देऊन तो शुद्ध करणे, हे त्या सभेचे उद्देश होते. रास्त गफ्तार नावाचे वृत्तपत्र त्या सभेने चालवले होते. त्यात प्राचीन धर्मग्रंथाचा सखोल अभ्यास करून अनेक पंडितांनी धर्माचे शुद्ध स्वरूप विशद करणारे लेख

लिहिले. पारशी समाजातील पडदापद्धती व बालविवाह बंद करणे वगैरे सामाजिक सुधारणाही सभेने घडवून आणल्या.

इराणातून निर्वासित झालेले हे लोक भारतात स्थायिक झाले व त्यांनी लवकरच इथे आपला चांगला जम बसविला. त्यांनी या भूमीलाच आपली मातृभूमी मानले. त्यांनी प्रथम शेती केली, मग व्यापार केला आणि नंतर उद्योगधंदे सुरू केले. प्रत्येक क्षेत्रात त्यांनी नाव कमावले आणि अपार धन मिळवले. उद्योगप्रियता, कष्टाळूपणा, उत्साह, आनंदीपणा, धाडस, परिस्थितीशी जुळवून घेण्याची वृत्ती, इ. अंगभूत गुणांमुळेच ते यशस्वी झाले. पाश्चात्य विद्या त्यांनी पूर्ण आत्मसात केली. त्यांच्यात निरक्षर मनुष्य क्वचितच आढळतो. दादाभाई नौरोजी व फेरोजशहा मेहता यांच्यासारखे राजकारणी मुत्सद्दी आणि डॉ. भाभासारखे श्रेष्ठ संशोधक त्यांच्यांत निपजले आहेत. भारतीय संस्कृतीच्या विकासात पारशी लोकांचे श्रेय पुष्कळच आहे, यात संशय नाही. **पाहा** — अवेस्ता, आतश, बेहेराम, झरथुष्ट्री धर्म, नवजोत, नवरोज, निरंग, पटेटी. [पारशांचा इतिहास—श्री. म. वि. कायवटे, १९२१; बि. मु. रा. प.; एन्सा. रि. ए.; ब्रिफ हिस्टरी ऑफ पार्सीज — श्री. झाबवाला; अरायव्हल ऑफ दि पार्सीज इन इंडिया — श्री. तारापोरवाला, व्हॉ. स्ट. इं.; म. ज्ञो. शि.; संस्कृति — समवाय; डॉ. सबर हवेवाला — धर्मयुग, २८ ऑगस्ट १९६६]

**पारसनाथ** एक जैन पुण्यक्षेत्र. हा पार्श्वनाथ शब्दाचा अपभ्रंश आहे. जैनांचे सगळे संप्रदाय याला परमक्षेत्र मानतात. बिहारमधील हजारीबाग जिल्ह्यात कलकत्त्यापासून सुमारे २००मैलांवर वायव्य दिशेस हे स्थान एका टेकडीवर आहे. इथून जैनांचे २० तीर्थंकर आणि अनेक मुनी मोक्षाला गेले, असे सांगितले आहे. २३ वा तीर्थंकर पार्श्वनाथ इथूनच मोक्षाला गेला. म्हणून त्याच्या नावावरून या स्थानाला पारसनाथ हे नाव मिळाले.

जैन ग्रंथांमधून संमेदगिरी, संमेदशिखर, संमेदाचल अशा विविध नावांनी याचा उल्लेख येतो. इथे टेकडीच्या माथ्यावर असलेल्या मंदिरात पार्श्वनाथाची नग्न मूर्ती ध्यानावस्थेत असून, तिच्या मस्तकावर नागफणी आहे. याशिवाय या मंदिरात चौवीस तीर्थंकरांच्या मूर्ती व पादुकाही आहेत. पार्श्वनाथापूर्वी निर्वाणाला गेलेल्या नऊ तीर्थंकराची मंदिरेही या टेकडीवर आहेत. प्रत्येक मूर्तीवर कोरीव लेख आहेत. सध्याचे देऊळ संगमरवरी असून ते फारसे जुने नाही; मात्र मुख्य मूर्ती प्राचीन आहे पारसनाथाभोवती अनेक लहान लहान टेकड्या असून त्यांच्यावरही तीर्थंकरांच्या घुमट्या आहेत. जैन लोक या सर्व घुमट्यांना प्रदक्षिणा घालणे, हे पुण्यकारक मानतात. अशी प्रदक्षिणा घालण्यास तीस मैलाचा फेरा करावा लागतो.



पार्श्वनाथाचे मंदिर – पारसनाथ

पार्श्वनाथ टेकडीवर गंधर्वनाला व सीतानाला असे दोन जलप्रवाह आहेत. यांपैकी गंधर्वनाल्यापासून टेकडीच्या शिखरापर्यंतचा भाग पवित्र मानतात. शिखराच्या पायथ्याशी मधुवन नावाचे लहान गाव असून, त्यात दिगंबरी वीसपंथी, तेरापंथी आणि श्वेतांबरी अशा तीन कोठ्या आहेत. या सर्व कोठ्यांत मिळून सत्तावीस मंदिरे आहेत.

जैनांप्रमाणे संताळ लोकही या स्थानाला यात्रास्थळ मानतात पार्श्वनाथ हा त्यांचा मरंगदूरू म्हणजे गिरिदेव आहे ते आपल्या समाजातील गुन्ह्यांची चौकशी इथे करतात व गुन्हेगाराला जातिबहिष्कृत करतात. संताळांना इथे शिकार करण्याचा हक्कही मिळालेला आहे. [कल्याण-तीर्थांक; एन्सा. रि. ए.; टें. ली. बि.; स. भा. प्र. व.; हजारी. गॅझे.]

**पारस्कर** एक प्राचीन देश. पतंजलीने याचा उल्लेख केला आहे. सिंध प्रांतातल्या थरपारकर जिल्ह्याचे हे प्राचीन नाव होय कच्छच्या रणाचा उत्तर भूभाग प्राचीनकाळी पारस्कर या नावाने परिचित होता. [प. का. भा.]

**पारस्कर गृह्यसूत्र** शुक्ल यजुर्वेदाचे पारस्कररचित एक गृह्यसूत्र. याला कातीय किंवा वाजसनेय अशीही नावे आहेत. यात विवाह, गर्भाधान, इ. संस्कार; तसेच

कृषिप्रारंभ, विद्याध्ययन, श्रावणी, गृहनिर्माण, वृषोत्सर्ग, श्राद्ध, इ. विषयांचे विवरण आहे. यात आद्याक्षरे देऊन जे श्लोक किंवा अवतरणे उद्धृत केली आहेत, ती सर्व शुक्ल यजुर्वेदाच्या माध्यंदिन शाखेतून घेतलेली आहेत. [ वै. सा.; इं. वे. क. सू. ]

**पारानंदपंथ** शाक्त लोकांचा एक पंथ. याला परमानंदपंथ असेही नाव आहे. न्यास आणि हिंसा यांचा या पंथात निषेध आहे. यज्ञात ज्या ठिकाणी पशुबली द्यावा, असा आदेश असेल, त्या ठिकाणी निर्जीव वस्तूचा बळी द्यावा, असे या पंथाचे मत आहे. बोकड बळी द्यायचा असेल, त्या जागी पिष्टपशूचे हवन करावे, असेही सांगितलेले आहे. राजाला मात्र युद्धात भाग घ्यायला, हिंस्र पशूंची शिकार करायला आणि त्या पशूंना कालीपुढे बळी द्यायला, या पंथाची संमती आहे. या पंथाचे उत्तराचार, वामाचार आणि दक्षिणाचार असे तीन भेद आहेत. उत्तराचारामधील लोकांच्या नावाच्या शेवटी आनंद आणि वामाचारातील लोकांच्या नामाच्या अंती नाथ, अशी उप पदे जोडलेली असतात. वामाचार पंथाचे श्रेष्ठ आणि कनिष्ठ असे दोन भेद आहेत. श्रेष्ठ भेदात मांस आणि मत्स्य यांचा निषेध आहे. पारानंदपंथाचे अनुयायी- विशेषत: दक्षिणाचारी- वेद, स्मृती आणि पुराणे यांना प्रमाण मानतात. [ तं. स्ट. रि. लि.]

**पारायण** वैदिक वा धार्मिक ग्रंथ ठराविक मुदतीत श्रद्धापूर्वक पूर्ण वाचणे किंवा म्हणणे याला पारायण असे म्हणतात. ते करणाऱ्याला पारायणिक म्हणतात. श्रावण किंवा भाद्रपद पौर्णिमेपासून पुढे साडेचार महिने वेदांचे पारायण करावे, असे सांगितले आहे. वैदिक मंडळींत संहिता व क्रम, जटा, घन या वेदविकृती यांचे पारायण करण्याची पद्धत आहे.

पारायणकालात कर्त्याला व्रतस्थ, मौनी, भूमिशायी व हविष्य भोजी राहावे लागते. पारायणकालात तो कधी दुधावर राहतो, म्हणून त्याला पयोव्रतयती असेही म्हणतात.

भागवत पुराणाचे पारायण सात दिवसांत करण्याची पद्धत आहे. त्याला भागवतसप्ताह म्हणतात.

रामायण, महाभारत, सप्तशती, गीता, ज्ञानेश्वरी, गुरुचरित्र, दासबोध, एकनाथी भागवत, इ. अनेक ग्रंथांची विशिष्ट कालमर्यादेत पारायणे करण्याची पद्धत आहे. ही पारायणे बहुधा पर्वकालात करतात. [ श. क.; पा. का. भा. ]

**पारायणोपनिषद** एक नव्य उपनिषद. हे शैव असून अथर्ववेदाच्या सौभाग्यकांडाशी संबद्ध आहे. यात प्रारंभी रुद्रगायत्री मंत्र दिलेला आहे, तो असा–

**महाकालाय विद्महे । स्मशानवासिने धीमहि ।**
**तन्नो रुद्रः प्रचोदयात् ।।**

पुढे गायत्री मंत्रासह एका बीजाक्षर मंत्राचे पारायण करावे, असे सांगितले असून कालनित्येचे स्तवन करावे, असे म्हटले आहे. देवीसहस्रशीर्षाचा २०० वेळा जप केल्याने साधक हा पारायणी होतो व त्याला वाणीचे प्रभुत्व प्राप्त होते, असे सांगितले आहे. [ श्री. ह्री. ग. देसाई ]

**पारावत** एक गण किंवा जमात. ऋग्वेद व तांड्य महाब्राह्मण यांत, दूर राहणारे किंवा लांबून आलेले लोक अशा अर्थी हा शब्द वापरला आहे. परंतु या लोकांचा निश्चित देश कोणता, ते कळत नाही. एका कण्वकुलोत्पन्न ऋषीने पारावतांकडून आपल्याला मिळालेल्या रथाचे वर्णन केले आहे (ऋ. ८.३४). ग्रीक लेखकांच्या ग्रंथांवरून आणि इराणी शिलालेखांतील माहितीवरून असे कळते, की पारावत ही पर्शू लोकांतील एक टोळी होती. ग्रीकांनी तिचा उल्लेख पाराएताकेनी या नावाने केला आहे.

सायणाच्या मते हे लोक यमुनेच्या काठी राहत असत. तुरश्रवा नावाचा यांचा पुरोहित होता. सरस्वतीला पारावतघ्नी म्हटले आहे. [ वै. सा.; प्रा. च. को.; दाशराज्ञ युद्ध ]

**पारिक** राजस्थानातील एक ब्राह्मण जात. यांची वस्ती विशेषेकरून सांबर आणि नागोर भागात आहे. हे पंजाबमधून इकडे आले, असे सांगतात. यांच्यांत एकशे तीन पोटजाती आहेत. हे वल्लभ संप्रदायाचे अनुयायी आहेत. लोकांच्या घरी पूजापाठ करणे, हा यांचा प्रधान व्यवसाय होय. परंतु खेड्यांत राहणारे पारिक शेतीही करतात. [ रा. जा. ]

**पारिजात** एक पुष्पवृक्ष. याची फुले नाजूक व सुगंधी असतात. तो तिन्हीसांजा फुलतो, रात्रभर दरवळतो व सकाळी जमिनीवर फुलांचा सडा घालतो. पावसाळ्यात या वृक्षाला विशेष बहर येतो. पाच स्वर्गीय वृक्षांत याची गणना आहे. समुद्रमंथनातून तो निर्माण झाला व देवलोकी नेला गेला. स्वर्गातला हा देववृक्ष सत्यभामेचा हट्ट पुरविण्यासाठी कृष्णाने द्वारकेत आणला व तिच्या महालापुढे लावला, अशी कथा आहे (विष्णू पु. ५.३०–३१).

निरनिराळ्या देवतांच्या पूजाविधीत पारिजातकाची पत्रे व पुष्पे आवश्यक सांगितली आहेत. सप्तमी तिथीस रात्रीच्या दुसऱ्या प्रहरी राजश्यामला देवीची पारिजातकाच्या पुष्पांनी पूजा केल्यास देवतासामीप्य प्राप्त होते, असे सांगितले आहे.

**पारिजाता** एक लौकिक देवता. हिचे स्थान उत्तर प्रदेशातील बारावंकी या गावापासून २२ मैलांवर आहे. त्या गावाला क्तिूर म्हणतात. हे गाव कुंतीने वसविले. अशी दंतकथा आहे. देवीच्या मंदिरापासून एका मैलावर पारिजातकाचा एक वृक्ष आहे. त्याच्या जवळच एक भुयार आहे. त्याला कुंतीचे शयनगृह म्हणतात. ते भुयार मंदिर व वृक्ष यांना जोडते. मंदिरात कुंतेश्वर नावाचा देव असून, त्याच्या शेजारीच पारिजाता देवीची मूर्ती आहे. ही देवी कुंतीचेच रूप मानतात. याविषयी आख्यायिका प्रचलित आहे, ती अशी–

सूर्य दररोज कुंतीला स्वर्गातून पारिजातकाचे फूल आणून देत असे. एके दिवशी ढग आल्यामुळे सूर्याला ते काम करता आले नाही. त्यामुळे कुंतीला चिंता उत्पन्न झाली. मग मातेची ती चिंता दूर करण्यासाठी अर्जुनाने स्वर्गातून तिला पारिजात वृक्षच आणून दिला. तो वृक्ष तिने या जागी लावला आणि त्या दिवसापासून कुंतीला पारिजाता असे नाव पडले.

स्थानिक लोक या पारिजातकाला नवस बोलतात. नवदंपती प्रथम याच्या दर्शनाला येतात. इथे मुलाचे जावळ वगैरे संस्कारही करतात. मंगळवारी तिथे जत्रा भरते. सांप्रत तिथले भुयार बंद केलेले आहे. लोक त्याला भूलभुलैया म्हणतात. [श्री. जयनाथमणि त्रिपाठी– त्रिपथगा, जाने. १९६२ ]

**पारिप्लवाख्यान** चक्री पद्धतीने सांगायच्या आख्यानांना हे नाव आहे. ही आख्याने अश्वमेधकर्त्या राजांची असतात व ती सांगण्याचे काम सूत करतात. शतपथ ब्राह्मणाच्या अश्वमेध प्रकरणात ( १३.४.३ ) त्यांचे सविस्तर वर्णन आहे, ते असे–

अश्वमेधाच्या आरंभी तीन सावित्री इष्टी करतात. एक घोडा संचारासाठी सोडतात. त्याच्या रक्षणार्थ सैन्य व सेनाधिकारी पाठवतात. त्यानंतर वेदीच्या दक्षिण दिशेस सोन्याचे मऊ आसन घालतात. त्यावर ऋत्विज बसतो. होत्याच्या दक्षिणेस यजमान व त्याच्या दक्षिणेला ब्रह्मा व उद्गाता बसतात. होत्याच्या पूर्वेला अध्वर्यू बसतो. मग अध्वर्यू यजमानाला पारिप्लवाख्यान सांगण्याबद्दल सूताला प्रैष देतो व सूत रोज एकेक आख्यान सांगू लागतो. एखादे आख्यान ज्या राजाचे असेल, त्याच्या प्रजाजनांना ते श्रवण करण्यासाठी बोलावतात.

दहा दिवसांत दहा राजांची आख्याने सांगितली जातात. पहिल्या दिवशीच्या आख्यानाचा राजा असतो वैवस्वत मनू, दुसऱ्या दिवसाच्या आख्यानाचा वैवस्वत यम, तिसऱ्या आख्यानाचा आदित्य वरुण, चवथ्याचा सोम वैष्णव, पाचव्याचा अर्बुद काद्रवेय (सर्प), सहाव्याचा कुबेर वैष्णव, सातव्याचा असित धान्व, आठव्याचा मत्स्य साम्मद, नवव्याचा तार्क्ष्य वैपश्यत व दहाव्या दिवसाच्या आख्यानाचा धर्म इंद्र असतो. अशा दहा आख्यानांचे एक सत्र संपले, की त्याच क्रमाने तीच आख्याने पुन्हा सांगायची असतात. एका वर्षात ३६ वेळा त्याची आवृत्ती होते. ही आख्याने रात्रीच सांगितली जातात. [ पु. वि. ]

**पारियात्र** एक कुलपर्वत. याला पारिपात्र व पारिपात अशीही अन्य नावे आहेत. हा पर्वत नेमका कुठे आहे, या संबंधी विद्वानात मतभेद आहेत. बौधायन गृह्यसूत्रानुसार हा पर्वत म्हणजे आर्यावर्ताची दक्षिण सरहद्द होय.

मार्कंडेय पुराणाच्या मते वेदस्मृती (बनास), वेदवती, सिंधू (कालीसिंध), वेण्वा, (पर्णाशा, प. बनास) सदानीरा, (सरस्वती), मही, चर्मण्वती (चंबळ) व वेत्रवती (बेतवा) या नद्या पारियात्र या पर्वतावर उगम पावल्या आहेत. त्यावरून हा अरवली पर्वत ठरतो.

पारियात्र या नावाची एक प्राचीन जमात होती. त्या जमातीला हे नाव या पर्वतावरूनच मिळाले असावे, असे मत आहे. परंतु विष्णू पुराणात मात्र पारियात्र हे मेरुपर्वतावर राहणारे लोक होते, असे म्हटले आहे.

या पर्वतावर तारकाने दहा हजार वर्षे तप केले होते (मत्स्य पु. १६२. ६; १६३. ८०). या पर्वताची यात्रा पुण्यप्रद मानलेली आहे. [ हि. जॉ. ए. इं.; जॉ. पु.; पु. इं. ]

**पार्का** एक मजूर जमात. यांची वस्ती मध्य प्रदेशातील जबलपूर जिल्ह्यात आहे. खेडेगावात राखणदारीचे काम करणे हा यांचा प्रमुख व्यवसाय होय. या जमातीमधील पुरुषाने आपल्यापेक्षा श्रेष्ठ दर्जाच्या स्त्रीशी विवाह केल्यास तो निषिद्ध मानला जात नाही; पण एखाद्या स्त्रीने जर आपल्यापेक्षा कनिष्ठ दर्जाच्या पुरुषाशी संबंध ठेवला, तर तो निषिद्ध ठरतो. यांच्यांतील बरेच लोक कबीर पंथाचे आहेत. ते बुढा नावाच्या देवाला भजतात. आषाढ महिन्यात ते लोखंडाच्या चौकोनी तुकड्याची व बाणाची पूजा करतात. यांच्यांतील काही लोक ढोलाच्या साथीवर नाच–गाण्याचे प्रयोग करतात. यांच्यांत जातपंचायत आहे. पंचायतीमधील लोक सामाजिक गुन्ह्याबद्दल केलेल्या दंडाची रक्कम सामाजिक मालमत्ता म्हणून उपयोगात आणतात. [ ट्रा. का. सें. प्रॉ. इं. ]

**पार्थसारथी मिश्र** (इ. स. चे १० किंवा ११ वे शतक) एक श्रेष्ठ न्याय–मीमांसापंडित. हा मिथिलेचा रहिवासी होता. याच्या वडिलांचे नाव यज्ञात्मा.

तत्कालीन विद्वानांत यज्ञात्मा हा दार्शनिक म्हणून सुप्रसिद्ध होता. पार्थसारथी मिश्र याने त्याच्यापाशीच सकल शास्त्रांचे अध्ययन केले. अध्ययन पूर्ण झाल्यावर त्याने तंत्ररत्न, न्याय रत्नाकर, न्याय रत्नमाला, शास्त्रदीपिका (पूर्व मीमांसा) असे ग्रंथ लिहिले व ते विद्वानांत मान्यता पावले. मीमांसा दर्शनाच्या इतिहासात पार्थसारथी मिश्र याचे स्थान अद्वितीय मानतात. आपल्या टीकाग्रंथांतून त्याने बौद्ध तत्त्वज्ञानातील नास्तिकवाद, विज्ञानवाद व शून्यवाद या वादांचे सप्रमाण खंडन केले असून, वेदान्तशास्त्रातील व्यावहारिक दृष्टिकोन स्पष्ट केला आहे. त्याच्या टीकेची शैली व्यंगपूर्ण आहे. त्याने कित्येक नवीन मते प्रस्थापित केली आहेत. [ मी. द.; सां. द. इ. ]

## पार्थिवलिंगपूजा

एक काम्य विधान. निरनिराळ्या युगांत शिवलिंग कोणत्या पदार्थाचे बनवावे, या विषयी एक श्लोक आहे, तो असा–

**कृते रत्नमयं लिङ्गं त्रेतायां हेमसम्भवम् ।**
**द्वापरे पारदं श्रेष्ठं पार्थिवं तु कलौ युगे ।।**

अर्थ–(पूजेसाठी) कृतयुगात रत्नांचे, त्रेतायुगात सोन्याचे, द्वापरात पाऱ्याचे व कलियुगात पार्थिव (मातीचे) लिंग प्रशस्त होय.

या पूजेचा विधी असा – शुचिर्भूत होऊन अरण्यात, तलावावर किंवा नदीवर जावे. तिथल्या भूमीला नमस्कार करून तिची पुढील मंत्राने प्रार्थना करावी –

**सर्वाधारधरादेव त्वद्रूपां मृत्तिकामिमाम् ।**
**लिङ्गार्थं तु प्रगृह्णामि प्रसन्नो भव मे भव ।।**

अर्थ – हे सर्वाच्या आधारभूत अशा धरेच्या देवा, त्वद्रूप अशी मृत्तिका मी लिंग निर्माण करण्यासाठी नेत आहे. तू माझ्यावर प्रसन्न हो.

मग ८० तोळ्यांपेक्षा कमी भरणार नाही इतकी माती ' सद्योजातं प्रपद्यामि ' या मंत्राने हातात घ्यावी. ' वामदेवाय नमो ' या मंत्राने तिच्यावर पाणी शिंपडावे. ' अघोरेभ्यो ' या मंत्राने पिंडी करावी. ' तत्पुरुषाय ' या मंत्राने पाण्यावरील बुडबुड्याच्या आकाराचे लिंग करून ते पिंडीवर बसवावे. ' ईशानः सर्वविद्यानाम् ' या मंत्राने त्याच्यावर अक्षता टाकाव्या. पूजास्थानी बिल्वपत्र ठेवून त्यावर लिंग स्थापावे. मग त्याची प्राणप्रतिष्ठा करावी. नंतर हात उताणा करून लिंगाला स्पर्श करावा. सद्योजातादी मंत्रांनी षोडशोपचारे पूजा करावी. लिंगाच्या आठ दिशांना पिंडीवर अष्टमूर्तींची पूजा करावी. यथाशक्ति ' ॐ नमः शिवाय ' या मंत्राचा जप करावा. लिंगमस्तकावरचे एक फूल काढून त्याचा वास घ्यावा. मग आपल्या हृदयात महादेवाने प्रवेश केला आहे, असे समजून त्याची मानसपूजा करावी. मग लिंगाचे विसर्जन करावे.

जो पार्थिवलिंगाची पूजा करील, तो आयुष्यवान, बलवान, श्रीमान, पुत्रवान, धनवान, व सुखी होईल, असे नंदी पुराणात सांगितले आहे. भस्माचा किंवा मातीचा त्रिपुंड्र लावल्यावाचून व रुद्राक्षमाला धारण केल्यावाचून पार्थिवलिंगपूजा करू नये, असे लिंग, पुराणात सांगितले आहे. मंत्रमहोदधीत पार्थिवपूजेचे विस्तृत विधान सांगितले आहे. [ नि. सिं.; पु. चि. ]

## पार्वणश्राद्ध

श्राद्धाचा एक प्रकार. पित्रादी त्रयींना उद्देशून विहित व तीन पिंडांनी युक्त ते पार्वण श्राद्ध होय. हे अमावास्या, पौर्णिमा, चतुर्दशी, अष्टमी व सूर्यसंक्रांती या पर्वदिवशी करतात. म्हणून याला पार्वण म्हटले आहे. ' पुरुषत्रयमुद्दिश्य यत् क्रियते तत्पार्वणम् ' = तीन पुरुषांना उद्देशून केले जाते ते पार्वण श्राद्ध होय, अशी त्याची व्याख्या पराशरमाधवीयात दिली आहे (१२. १९९). याचे विधान प्रतिसांवत्सरिक श्राद्धाप्रमाणेच असते. याचे एकपार्वणक, द्विपार्वणक व त्रिपार्वणक असे तीन प्रकार होतात.

## पार्वती

शिवपरिवारातली एक देवता. हिमाचल व मेना यांची कन्या. दक्ष प्रजापतीची सती नावाची कन्या होती. ती त्याने शिवाला दिली होती. पुढे दक्षाचे व शिवाचे वैर उत्पन्न झाले. दक्षाने एक मोठा यज्ञ केला. त्या यज्ञाप्रीत्यर्थ त्याने देवांना बोलावले; पण शिवाला मात्र वगळले. सतीला आपल्या पतीचा हा अपमान सहन झाला नाही. तिने त्या यज्ञमंडपात येऊन दक्षाचा धिक्कार केला व यज्ञकुंडातल्या अग्नीत स्वतःला जाळून घेतले.

पुढे याच सतीने हिमालयाच्या पोटी जन्म घेतला व तिला पार्वती हे नाव मिळाले. रामायणात व शैव पुराणात ही कथा आढळते. या नव्या जन्मातही पार्वतीला शिवाचाच ध्यास लागला.

ती जेव्हा मोठी झाली, तेव्हा तिच्या आईबापांना ती कोणाला द्यावी, अशी चिंता उत्पन्न झाली. एवढ्यात एके दिवशी नारद तिथे आला. हिमाचलाने त्याला पार्वतीसाठी स्थळ विचारले. त्यावर नारद म्हणाला. ' हिला भिक्षाटनी नवरा मिळेल; मात्र तो देवांनाही पूज्य असेल. ' ते ऐकून त्या दोघांची चिंता अधिकच वाढली. तिच्या जन्मकाळाचा काही दोष असेल, तर तो शमावा म्हणून हिमाचलाने तिला शिवाची उपासना करण्यास सांगितले. पार्वतीलाही तेच हवे होते.

ती मग एका पर्वतशिखरावर बसून शिवाची आराधना करू

लागली. पण बराच काळ लोटला, तरी शिव तिला प्रसन्न होईना. पार्वती तरुण, देखणी होती; पण तिच्या रूप-यौवनाचा प्रभाव शिवावर पडला नाही. देवांना शिव-पार्वतीचा विवाह अपेक्षित होता; पण शिव अविचल राहिल्यामुळे देवही चिंतेत पडले.

मग त्यांनी शिवाला विचलित करण्यासाठी मदनाला त्याच्याकडे धाडले. मदनाने योग्य वेळ साधून त्याच्यावर शरसंधान केले; पण त्याच क्षणी शिवाने तृतीय नेत्र उघडून मदनाला जाळून टाकले.

पार्वतीला ही गोष्ट समजली. मग तिने आपली तपस्या अधिक उग्र करायचे ठरविले. पूर्वी ती कंद, मुळे व फळे खाऊन निर्वाह करीत होती; पण आता तिने तीही आहार टाकला. केवळ पाने खाऊन ती तप करू लागली. तिच्या तपाची ही उग्रता व तिचे एकांतिक प्रेम पाहून शेवटी शिव अंतरी द्रवला आणि प्रसन्न होऊन तिच्यापुढे उभा राहिला. शिवाने तिचे पाणिग्रहण करण्याचे मान्य केले.



पार्वतीची कांस्यमूर्ती

मग शिवाने सप्तर्षींना हिमाचलाकडे पाठवून त्यांच्याकडून पार्वतीला मागणी घातली. हिमाचलाने ती मान्य केली. एके दिवशी शिव-पार्वतीचा विवाह थाटामाटाने साजरा झाला. पार्वती कृतार्थ झाली.

**पार्वतीच्या कथा**—पार्वतीच्या काही कथा पुराणांतून आढळतात, त्या अशा—

एके दिवशी शिव-पार्वती क्रीडा करीत असता पार्वतीने शिवाचे डोळे झाकले. चंद्र, सूर्य व अग्नी हे तेजोरूप देव शिवाच्या नेत्रात राहत असल्याने पार्वतीने डोळे झाकताच विश्वात सर्वत्र अंधार पसरला. ते पाहून ऋषि-मुनी तिथे धावत आले व त्यांनी शिवाचे डोळे सोडण्याबद्दल तिची प्रार्थना केली. तिने हात बाजूला करताच शिवाचे डोळे उघडले व सर्वत्र प्रकाश पसरला.

एकदा एका वनात पार्वती विवस्त्र स्थितीत शिवाच्या अंकावर बसली असता काही ऋषी शिवदर्शनास आले. त्यामुळे लज्जित होऊन तिने वस्त्र परिधान केले. मग शिवाने तिला आश्वासन दिले, की जो पुरुष यापुढे या स्थानात प्रवेश करील तो स्त्री होईल (भाग. पु. ९.१.२९-३२).

देवीच्या १०८ नावांच्या जपामुळे पार्वती शिवाच्या अर्धांगात प्रविष्ट झाली व शिव अर्धनारीश्वर बनला (मत्स्य पु. १२.९).

पार्वती प्रथम काळी होती. नंतर अनरकेश्वर तीर्थात स्नान करून तिथल्या लिंगापुढे दीपदान केल्यामुळे ती गोरी झाली (स्कंद पु. ५.१).

पार्वतीने अंगीच्या मळापासून गजानन हा पुत्र निर्माण केला व शंकरापासून तिला कार्तिकेय हा पुत्र झाला. बाण व वीरभद्र यांनाही तिने पुत्र मानले होते.

वैदिक व सूत्र वाङ्मयात पार्वतीच्या भवानी, शर्वाणी, रुद्राणी व मृडानी अशा चार रूपांचा उल्लेख आढळतो. पाणिनीने या रूपांच्या सिद्धीसाठी एक सूत्र लिहिले आहे (अष्टा. ४.१.४९). शतपथ ब्राह्मणाच्या मते भव, शर्व व रुद्र ही तीन अग्नीची रूपे होत. अग्नी व रुद्रशिव यांचे ऐकात्म्य वैदिक वाङ्मयात सर्वत्र आढळते. शर्वरूप प्राच्य देशात व भवरूप वाहीक (पंजाब) देशात लोकप्रिय होते (श. ब्रा. १.७.३.८). शर्वाणी व भवानी ही नावे शर्व, भव या नावावरूनच प्रचलित झाली आहेत. रुद्राणी हे रूप रुद्र या नावावरून आले आहे.

पुराणात पार्वती ही अत्यंत जिज्ञासू अशी स्त्री दाखविली आहे. नामरूपांच्या पसाऱ्याखाली दडलेल्या शिवतत्त्वाची प्राप्ती करून घेण्यासाठी ती शिवाला विविध प्रश्न करते आणि शिव तिला अनेक प्रकारची व्रतवैकल्ये आणि त्यांच्या कथा सांगतो. स्त्रिया जो वाणवसा करतात, तो शिव-पार्वतींच्या संवादातूनच प्रकट झालेला आहे.

पार्वती ही मूर्तिमती करुणा आहे. दीनदुबळ्यांच्या दुःखाने ती लगेच कळवळते. कोणत्याही भयभीताची आर्त हाक शिवाच्याही आधी तिच्या कानी पडते. ती मग शिवाला समाधीतून जागृत करते आणि त्याला पुढे घालून आर्तत्राणासाठी धाव घेते. पार्वतीचे असे कृपाळू मातृस्वरूप अनेक व्रतकथा व लोककथा यांतून प्रकट झाले आहे.

याहून वेगळे असे पार्वतीचे एक रूप आहे. त्याला शक्ती म्हणतात. शक्ती ही उग्र—भयंकर आहे. चंड-मुंड-महिषांच्या मर्दनप्रसंगी तिचे हे शक्ति-स्वरूप अचानक प्रकट झाले. शिव कार्यान्वित होतो तो या शक्तीमुळेच होय. (शक्ती पाहा)

**पार्वतीमूर्ती**— काश्यपशिल्प व मानसार या ग्रंथांत पार्वतीची

मूर्ती कशी करावी, ते पुढीलप्रमाणे सांगितले आहे—पार्वती स्वतंत्र असेल तेव्हा चतुर्भुज व शिवाजवळ असेल तेव्हा द्विभुज करावी. स्वतंत्र असताना तिच्या मस्तकी जटामुकुट असावा. वरच्या दोन हातांत कमळ किंवा परशू व पाश असावा आणि खालचे दोन हात वरद व अभय मुद्रेत असावे. शिवाजवळ असताना ती कमलासनस्थ किंवा उभी आणि सर्वाभरणभूषित असावी. तिच्या उजव्या हातात कमळ व डावा हात खाली सोडलेला असावा.

रूपमंडन या ग्रंथात चतुर्भुज व त्रिनेत्र असे तिचे सामान्य रूप सांगितले आहे. रूपमंडनात सहा व रूपावतार ग्रंथात बारा अशी तिची रूपे सांगितली असून, घोरपड हे तिचे वाहन असल्याचे सांगितले आहे.

पार्वतीची स्वतंत्र मंदिरे सहसा आढळत नाहीत. शिवमंदिरांतून कधी कधी ती गाभाऱ्याच्या मागील भिंतीतल्या कोनाड्यात बसविलेली आढळते.

**पार्वतीमंगल** — शिव-पार्वतीविवाहावर लिहिलेली काव्ये बहुतेक भारतीय भाषांत आहेत. कालिदासाच्या कुमारसंभवात पार्वतीच्या विवाहाचे व त्या दोघांच्या प्रणयाचे भावरम्य वर्णन आहे. तुलसीदासाने सोहर व हरिगीतिका या छंदांत पार्वतीमंगल नावाचे स्वतंत्र काव्य रचले असून, त्यात कुमारसंभवाचे अनुसरण आहे. मराठीतही गौरीसैंवर नावाचे एक अठरा प्रसंगांचे काव्य असून, त्यात पार्वतीच्या जन्मापासून लग्नानंतर तिची वरात निघेपर्यंतचा कथाभाग आहे.

श्री. रामानंद तिवारी यांनीही पार्वतीवर एक महाकाव्य लिहिले आहे. हिंदीतले हे पहिले महाकाव्य होय. याचे सत्तावीस सर्ग आहेत. हिमालयवर्णनापासून प्रारंभ करून, अंती शिवनीती व शिवधर्म यांचे वर्णन करून हे काव्य समाप्त केले आहे. याच्या पूर्वार्धात कालिदासाचे अनुसरण असून कालिदासाप्रमाणेच शिवपार्वतींच्या प्रथम मीलनाचे शृंगारिक वर्णन कवीने केले आहे. त्यातल्या काही पंक्ती अशा—

**कहते कहते शिव हुए ओज से अर्जित**
**उठ लिया पाणि में पाणि उमा का कम्पित ।**
**उमडा जीवन का ज्वार विमल बेला की**
**मर्यादा में इच्छा से मधु खेला की ।**
**आकांसासी इच्छा के इंगित भरसे**
**जीवनसागर की लहरी सी शिकर से**
**अभिनंदन से शंकर के नर्मद करके**
**उठतीसी आई उमा भाव-स्मित करके**

भावार्थ — बोलता बोलता शिवाचे अंतःकरण ओजोभावाने भरून आले. तो उठला आणि पार्वतीचा कंपित हस्त त्याने हातात घेतला. त्या पवित्र वेळी जणू त्याच्या जीवनाला भरती आली. अंतरात मधुर क्रीडेची इच्छा धरून त्याने पार्वतीला संकेत केला. तिच्या जीवनसागराच्या लाटांवर जणू तुषार उसळले. मग शंकराची थट्टा करीत पार्वती उठली व स्मितमुखाने त्याच्या जवळ आली.

प्रस्तुत काव्याच्या उत्तरार्धात कवीने शिवपुराणाचा आधार घेऊन काव्यातला दार्शनिक भाग सजविला आहे.

शिव-पार्वतींच्या विवाहासंबंधीच्या लोककथाही आहेत. त्यांपैकी एक आसामी लोककथा अशी—

पार्वती जन्मली, तेव्हा ती एक संगमरवरी शिळा होती. एके दिवशी शिव त्या बाजूने चालला असता त्याने ती शिळा पाहिली. त्याला ती आवडली. त्याने तिच्यातून एक स्त्री निर्माण केली, तिच्यात प्राण घातला आणि मग तिच्याशी लग्न केले. [ पु. इं.; हिं. सा. को. २; प्रा. च. को.; मू. वि.; सा. इं. इ. गॉ. गॉ.; जं. रा.; पा. का. भा.; गा. दै. ]

## पार्श्व

जैन दैवतसमूहातला एक यक्ष. याला धरणेंद्र किंवा धरणीधर असेही म्हणतात. हा पार्श्वनाथाचा सेवक आहे. याचे वर्णन असे—

हा कासवावर बसलेला, निळा, हत्तीच्या तोंडाचा, चतुर्भुज, नागफणांचे छत्र असलेला आणि सर्प व मुंगूस धारण करणारा आहे. (दिगंबरमते सर्प, पाश आणि वरदमुद्रा धारण करणारा).

जैनांच्या यक्षसमुदायात याला फार महत्त्व आहे. ग्वाल्हेर आणि जोगिन का मठ या ठिकाणी याच्या मूर्ती आहेत. कठ नावाच्या तापसाच्या धुमीत जळत असताना पार्श्वनाथाने ज्याला वाचवला तो सर्प म्हणजे हा यक्ष होय. याचे पौराणिक शेषनागाशी बरेच साम्य आहे. [ जै. इ. ]

## पार्श्वनाथ

जैनांचा तेविसावा तीर्थंकर. अश्वसेन राजाचा मुलगा. याच्या मातेचे नाव वामादेवी. काशी येथे पौष वद्य दशमीस याचा जन्म झाला. जन्मनक्षत्र—अनुराधा, लांछन—सर्प, ज्ञानवृक्ष—देवदार, यक्ष—गजानन व शासनदेवता—पद्मावती. उंची नऊ हात. वर्ण नील. आयुष्य १०० वर्षे. गर्भावस्थेत असताना याच्या आईने आपल्या पार्श्वभागी एक नाग पाहिला होता, म्हणून याचे नाव पार्श्वनाथ ठेवले गेले. पार्श्व नावाच्या यक्षाचा स्वामी म्हणूनही याला हे नाव मिळाले, असे सांगतात.

त्रिषष्टिशलाकापुरुषचरित या ग्रंथात पार्श्वनाथाची कथा वर्णिलेली आहे, ती अशी—

वाराणसीच्या अश्वसेन राजाची पत्नी वामादेवी हिला

[illegible] पुत्र झाला. राजाने त्याचा जन्मोत्सव थाटाने साजरा केला व त्यानिमित्त अनेक कैदी बंधमुक्त केले. पार्श्वनाथ तरुण झाल्यावर एके दिवशी एक दूत त्याच्या दरबारात [illegible] कुशस्थलीच्या प्रसेनजित राजाकडून आला होता आणि त्याने राजकन्या प्रभावती हिला अश्वसेनाने आपली सून करून घ्यावे असा संदेश आणला होता. तो संदेश ऐकून अश्वसेनाला फार आनंद झाला.

[illegible] कलिंग देशाच्या यवन नामक राजाला हे वर्तमान समजताच त्याला प्रभावतीची अभिलाषा उत्पन्न झाली आणि त्याने ससैन्य चाल करून कुशस्थलीला वेढा घातला. अश्वसेनाला ही बातमी कळताच त्याने यवन राजाचे पारिपत्य करण्यासाठी कुशस्थलीवर चालून जायचे ठरविले. पण पार्श्वनाथ म्हणाला. 'बाबा तुम्ही घरी राहा. मी ते काम करून येतो.' लगेच पार्श्वनाथाने कुशस्थलीवर चाल केली आणि यवन राजाचा पुरता पराभव केला. त्याचा तो पराक्रम पाहून प्रसेनजित राजाला हर्ष झाला आणि त्याने मोठ्या आनंदाने प्रभावतीचे त्याच्याशी लग्न लावून दिले. पार्श्वनाथ गृहस्थाश्रमी बनून बापाला राज्यकारभारात मदत करू लागला.

त्या काळी वाराणसीबाहेर कठ नावाचा एक तापस पंचाग्निसाधन करीत बसला होता. सगळे नागरिक त्याच्या दर्शनाला जात होते. एके दिवशी पार्श्वनाथही गेला. दर्शन करीत असता त्याला त्या तापसाच्या धुनीत जळणाऱ्या एका लाकडात सर्प दिसला. ते पाहून तो म्हणाला. 'एवढा तपस्वी; पण याला प्राण्याची दया नाही. दयेवाचून धर्म कसला.' त्यावर कठ बोलला. 'इथे कोणाची हिंसा होते आणि कोणावर दया करायची ?', त्यावर पार्श्वनाथाने नोकराकरवी ते जळणारे लाकूड फोडले. त्यातून धरण नावाचा नाग निघाला. तो जळणाऱ्या लाकडाच्या उष्णतेने होरपळत होता. ते पाहून लोकांनी पार्श्वनाथाच्या अंतर्ज्ञानाची प्रशंसा केली. ती ऐकून कठ खजिल झाला. त्याने आणखी खडतर तप आरंभले. कालांतराने तो मेला आणि मेघमाली नामक असुराच्या रूपाने पुन्हा जन्माला आला.

काही काळाने पार्श्वनाथाला वाटले, की आपले कर्मफल भोगून संपले म्हणून मग त्याने प्रव्रज्या घ्यायचे ठरविले. लगेच त्याने अरण्याचा मार्ग धरला. तिथे एका आश्रमात तो राहिला. त्याच्याबरोबर अन्य तीनशे राजांनीही प्रव्रज्या घेतली.

नंतर तो प्रवासाला निघाला. वाटेत एका विहिरीजवळ वटवृक्षाखाली तो थांबला असता पूर्वजन्मीचे वैर स्मरून मेघमाली असुराने त्याच्यावर अनेक उत्पात आणले. पण पार्श्वनाथाला त्यापैकी कशाचेच भय वाटले नाही. त्याची ती सहनशीलता पाहून मेघमाली चवताळला. त्याने मुसळधार पाऊस सुरू केला. त्या पावसामुळे मोठा पूर आला आणि त्याचे पाणी पार्श्वनाथाच्या नाकापर्यंत पोचले. त्या वेळी धरणनागाचे आसन कंपित झाले. लगेच तो आपल्या जीवदात्याच्या रक्षणासाठी धावून आला. त्याने पार्श्वनाथाच्या मस्तकावर सात फणाचे छत्र धरले. मग मात्र मेघमाली पश्चात्ताप पावून आपल्या घातक कृत्यापासून परावृत्त झाला व पार्श्वनाथाला शरण गेला



पार्श्वनाथ

तिथून पार्श्वनाथ वाराणसीला येऊन एका उद्यानात राहिला तिथेच ज्या दिवशी त्याच्या प्रव्रज्येला ८४ दिवस पुरे झाले, त्या दिवशी म्हणजे चैत्र कृष्ण चतुर्दशीला सकाळी त्याच्या घाती कर्माचा नाश झाला व त्याला केवलज्ञान प्राप्त झाले. त्यानतर त्याच्या दर्शनाला देव–देवता, नर–नारी आणि साधू–साध्वी असे अनेक लोक तिथे आले. त्याचा बाप अश्वसेनही वामादेवीसह आला. त्या वेळी जमलेल्या सर्व लोकांना पार्श्वनाथाने धर्मोपदेश केला. मग तो तिथून निघाला आणि धर्मोपदेश करीत देशोदेशी हिंडू लागला. साकेत, श्रावस्ती, कौशाबी, कांपिल्य, अहिच्छत्रा, इ. ठिकाणी विहार करून त्याने अनेक लोकाना

आपल्या धर्मात आणले. बंगालमधील आर्येतर जातींतही त्याने धर्मप्रसार केला. त्याला हजारो शिष्य–शिष्यिणी भेटल्या. त्याच्या पुरुषशिष्यांत मुनिचंद्र, गांगेय, कालासेवासियपुत्त, पुंडरीय कासव, मोहिल, आनंद रक्खिय हे प्रमुख होते, आणि शिष्यिणींत सोमा, जयंनी, विजया, काली, पुष्पचूला या प्रमुख होत्या.

त्यानंतर काही कालाने त्याला कळले, की आपले निर्वाण जवळ आले आहे. म्हणून मग तो संमेद पर्वतावर गेला व तिथे ३३ साधूंसह तीस दिवस अनशनव्रत करून श्रावण शुद्ध अष्टमीच्या दिवशी विशाखा नक्षत्री निर्वाण पावला. हे शिखर ज्या पर्वतावर आहे, त्याला मग लोक पार्श्वनाथ पर्वत म्हणू लागले.

त्रिषष्टिशलाकापुरुषचरित हा श्वेतांबर संप्रदायाचा ग्रंथ आहे. त्यातल्या बऱ्याच गोष्टी दिगंबरांना मान्य नाहीत. दिगंबरांचे पार्श्वनाथाविषयीचे मत असे—

तो पौष कृष्ण एकादशीला विशाखा नक्षत्रात जन्मला आणि श्रावण शु. सप्तमीला विशाखा नक्षत्रातच निर्वाणाला गेला. तो आजन्म ब्रह्मचारी होता. केवली झाल्यावर तो कवलाहार (अन्नाहार) करीत नसे. कारण केवलींना जीवधारणासाठी अन्नाची गरज नसते. अर्थात त्याने निर्वाणकाली अनशन केले, ही गोष्ट खरी नाही.

पार्श्वनाथाची वरील सर्व कथा काल्पनिक वाटते. त्यावरून पूर्वीच्या काही संशोधकांनी पार्श्वनाथही काल्पनिकच मानला होता. पण त्रिपिटकात आणि आगम ग्रंथांत पार्श्वनाथासंबंधी जी इतर माहिती मिळते, तिच्यावरून पार्श्वनाथ हा ऐतिहासिक पुरुष होता, असा निष्कर्ष निघतो. बहुतेक विद्वानांनी ही गोष्ट आता मान्य केली आहे.

महावीराच्या पूर्वी जैनांना निर्ग्रंथ (निगण्ठ) म्हणत. त्रिपिटकात त्यांचा अनेक ठिकाणी उल्लेख आला आहे. पार्श्वनाथाच्या चातुर्याम धर्माचाही तिथे उल्लेख आढळतो. त्यावरून असे दिसते, की निर्ग्रंथ संप्रदाय बुद्धाच्या पूर्वी पुष्कळ वर्षे अस्तित्वात होता. वप्प नावाचा शाक्य निर्ग्रंथांचा श्रावक होता, असा उल्लेख अंगुत्तर निकायात आढळतो. एका अट्ठकथेत वप्प हा बुद्धाचा चुलता होता, असे म्हटले आहे. यावरून निर्ग्रंथांचा धर्म गौतम बुद्धाच्या जन्मापूर्वी शाक्य देशात पोचला होता, असे म्हणावे लागते.

महावीरापूर्वीच्या या निर्ग्रंथांचा नेता पार्श्वनाथ होता, असा उल्लेख जैन ग्रंथांत अनेक ठिकाणी आहे. बुद्धकालापर्यंत निर्ग्रंथ हे पार्श्वनाथाचा चातुर्याम धर्मच मानीत असत. अहिंसा, सत्य, अस्तेय व अपरिग्रह हे ते चार याम होत. याम शब्द यम् = नियमन करणे, यावरून आलेला आहे. हिंसा, असत्य, चौर्य आणि संग्रहवृत्ती या चार गोष्टींचे नियमन करून वागणे, असा त्याच्या त्या चार यामांचा अर्थ आहे.

महावीराने या चार यामांत ब्रह्मचर्याची भर घातली आणि त्या पंचयामात्मक धर्माला पंचमहाव्रते असे नाव दिले. बौद्ध धर्मातल्या काही व्यवस्था बौद्धांनी मूळच्या निर्ग्रंथांकडून घेतलेल्या आहेत. त्यांच्या उपोसथ व वर्षावास या गोष्टी पार्श्वनाथाच्या परंपरेतूनच आल्या असल्या पाहिजेत. निर्ग्रंथ कमीत कमी एक वस्त्र वापरीत, याला त्रिपिटकात आधार मिळतो; पण त्यांच्या नग्नतेला मात्र आधार मिळत नाही. याचा अर्थ चातुर्यामाची पंचमहाव्रते करणे आणि सचेलक व्रताचे अचेलक व्रतात परिवर्तन करणे, या गोष्टी महावीराने घडवून आणल्या आहेत.

पार्श्वनाथाने निर्ग्रंथ संप्रदायाची संघटना करून त्याला स्थिर रूप दिले. त्यासाठी त्याने आर्य, आर्यिका, श्रावक व श्राविका असे चतुर्विध संघ निर्माण केले. या संघाची व्यवस्था उत्तम चालावी, म्हणून त्यांवर शुभदत्त, आर्यघोष, वसिष्ठ, ब्रह्मचारी, सौम्य, श्रीधर, यश व वीरभद्र असे आठ गणधर नेमले.

पार्श्वनाथाचा चातुर्याम धर्म या नावाचा एक ग्रंथ श्री. धर्मानंद कोसंबी यांनी लिहिला आहे. त्याच्या प्रस्तावनेत श्री. काका कालेलकर लिहितात –

पार्श्वनाथांचा चातुर्याम धर्मच महावीराच्या पंचमहाव्रतात परिणत झाला आहे. तोच धर्म बुद्धाच्या अष्टांगिक मार्गात आणि पातंजल योगाच्या यम–नियमांमध्ये प्रकट झाला आहे. गांधींच्या आश्रमधर्मातदेखील चातुर्याम धर्मच प्रधानपणे दृग्गोचर होत आहे.

वेदान्ताच्या मुळाशीदेखील चातुर्याम धर्म आहेच. तसे पाहिले तर चातुर्याम धर्म म्हणजे मनुष्याने स्वतःच्या असामाजिक वृत्ती दूर करून विश्वकुटुंब स्थापन करण्याची पूर्वतयारी करणारा समाजधर्म होय. सत्य, अहिंसा, अस्तेय आणि अपरिग्रह या चार सामाजिक सद्गुणांवाचून कोणतीही समाजरचना स्थिरपणे सिद्ध होऊ शकणार नाही.

**पार्श्वनाथाच्या मूर्ती** – पार्श्वनाथाच्या मूर्ती भारतात विपुल प्रमाणावर आढळतात. त्या ओळखण्याची खूण म्हणजे त्यांच्या मस्तकावरील फणाछत्र ही होय. या फणा तीन, सात आणि क्वचित अकराही असतात. पार्श्वनाथाची एखादी गुहा असेल तर तिच्या कमानीवरही सर्पमस्तके खोदतात. पाहा – चातुर्याम धर्म. [जै. ध.; भा. सं. जै. यो.; बौ. का. भा.; पा. चा. ध.]

## पालकुरती सोमनाथ

(११८०–१२२० इ. स.) एक वीरशैव कवी आणि विद्वान. हा जातीने जंगम असून, गोदावरी जिल्ह्यातल्या पाल्कुरके या गावचा रहि-

वर्षे होता. कन्नड तेलुगू आणि संस्कृत या तीन्ही भाषांचा तो पंडित होता. बसवपुराण नावाचा एक ग्रंथ त्याने तेलुगू भाषेत लिहिला आणि तो पुढच्या काळातील कवींना मार्गदर्शक ठरला. बसव आणि त्याचे समकालीन वीरशैव भक्त यांची काव्यात्मक चरित्रे याने लिहिली आहेत. याशिवाय अनुभवसार, चतुर्वेद सारसूक्त, सोमनाथभाष्य, रुद्रभाष्य, इ. अनेक ग्रंथ त्याने लिहिले आहेत. याच्या साहित्यात भक्तीपेक्षा तत्त्वनिरूपणावर अधिक भर आहे. त्यामुळे याला तत्त्वज्ञानकलाप ही पदवी मिळाली आहे.

त्याने आपले सर्व साहित्य सर्वसामान्य लोकांसाठी सोप्या व साध्या भाषेत लिहिले. त्यामुळे त्याला तेलुगू जनपद वाङ्मयाचा जनक म्हणूनही मान मिळाला. मल्लिकार्जुनाने दक्षिणेत शिवभक्तीचा प्रसार उच्च वर्गात केला तर पालकुरती सोमनाथाने तो सामान्य जनतेत केला. या दोघांच्या प्रयत्नाने आंध्र प्रदेशात वीरशैव धर्म खूप बहरला व आंध्रातून जैन धर्म नामशेष झाला.

पालकुरती सोमनाथाचे वैशिष्ट्य हे, की तो अन्य मतांच्या बाबतीत अत्यंत असहिष्णू होता. जैनांचे डोके उडवा, वैष्णवांचे नाक कापा, चार्वाकाचे गर्वहरण करा, अद्वैत्यांना मारा, बौद्धांशी भांडा, असे उद्गार त्याने जागोजाग काढले आहेत. असे असले, तरी आंध्रात त्याची पदे आबालवृद्धांच्या तोंडी आहेत. तेलुगू साहित्यात त्याचे नाव अजरामर राहिले आहे.
[ हि. क. भ तु. अ.; व. का. रा.; त्रि. दे. दै. ]

## पालखी

(१) एक वाहनप्रकार. संस्कृत पर्यंकिका→ पल्लंकिआ→ पालखी असा तो शब्द बनला आहे. याचेच शिबिका, मेणा असे वेगवेगळे प्रकार आहेत.

पालखी लाकडी असते. तिला दोन दांडे असतात हे दांडे खांद्यावर घेऊन माणसे पालखी वाहून नेतात. ती वाहण्यास दोनपासून सहापर्यंत माणसे लागतात. तिला कापडाचे लाल रंगाचे रेशमी छत व गोंड्यांची झालर लावलेली असते. मधोमध हात धरण्यासाठी एक गोंडा सोडलेला असतो पालखी व मेणा यांच्या अर्धवर्तुळाकृती दांड्यांच्या शेवटच्या दोन्ही टोकांना हत्ती, वाघ, सिंह किंवा घोडा या प्राण्यांची धातुनिर्मित तोंडे बसवलेली असतात. पुणे येथील राजा केळकर संग्रहालयात २०–२५ प्रकारची पालखीची मुखशिल्पे आहेत. ती पत्र्याची किंवा ओतीव आहेत पालखी वाहणाऱ्यांना भोई म्हणतात उत्तर महाराष्ट्रात देवस्थानाच्या पालख्या वाहून नेण्याचा खास मान भोई लोकांकडे पिढ्यान्‌पिढ्या चालत आलेला आहे.

एकच माणूस बसेल अशी लहान पालखी आणि अनेक माणसे बसतील अशी मोठी शिबिका असे पालखीचे दोन मुख्य प्रकार आहेत. मोठ्या पालख्यांना खिडक्या असून त्यांना पडदे लावलेले असतात. वर सुशोभित आच्छादन असते. शिबिका चौकोनी असून ती भरजरी कपड्यांनी सजवतात. तिच्या शेंड्यावर एक चवरी बसवलेली असते. वरचा दांडा धनुष्याकार असतो.



पालखीचे दांडे



पालखीचे संयोजनाचित्र

प्राचीन व ऐतिहासिक काळी सरदार दरकदार असे उच्च

श्रेणीचे व सुखवस्तू लोक वाहन म्हणून पालखी वापरीत. पालखी हे मानाचे वाहन असल्यामुळे ते वापरण्याचा अधिकार सर्वांनाच नसे. समाजातल्या अधिकारी व श्रेष्ठ व्यक्तींनाच तो मिळे. अशा लोकांना पालखीनशीन म्हणत. राजाकडून ज्यांना तो अधिकार मिळाला आहे, अशा लोकांना पालखीपदस्थ म्हणत.

पुराणकालापासून या वाहनाला महत्त्व होते. सांप्रत पालखी माणसांचे वाहन म्हणून फारशी प्रचारात राहिली नाही. देवादिकांच्या मूर्तींची मिरवणूक काढण्यासाठी तेवढा तिचा उपयोग करतात. आळंदीची व देहूची पालखी ज्ञानेश्वर-तुकारामांच्या पादुका घेऊन आषाढीच्या वारीला पंढरपुरी जाते. पूर्वी लग्न-मुंजींच्या मिरवणुका पालखीतून निघत. शंकराचार्य व



पालखी

काही श्रेष्ठ पुरुष अजूनही पालखीत बसून जाताना दिसतात. मुंडा आदिवासीतले श्रीमंत लोक वधूच्या वरातीत आजही पालखीचा उपयोग करतात.

मेणा संपूर्णपणे लाकडी असतो. पूर्वी मेण्याचा उपयोग मुख्यत्वे पडदानशीन स्त्रियांना नेण्यासाठी केला जात असे. मोगलकालातील राजपूत व मोगल स्त्रिया मेण्यातून प्रवास करीत. त्यांच्या मेण्यांवर वेलबुट्टींची चित्रे असत. [ एन्सा. मुंडा; कृ. जी. ब्र. श.; म. व्यु. को. ]

(२) एक क्रीडाप्रकार. हा खेळ महाराष्ट्रात प्रचलित आहे. या खेळासाठी तीन मुले लागतात.दोन जरा मोठी व एक लहान. दोन मोठे भिडू एकमेकांसमोर उभे राहतात. प्रत्येक जण उजव्या हाताने आपला डावा दंड पकडतो व डावा हात भिडूच्या खांद्यावर ठेवतो. असे केले असता हातांची चौकट तयार होते. मग तिसरा भिडू या चौकटीत बसतो व आपले दोन्ही हात या दोघांच्या खांद्यावर ठेवतो. नंतर हे दोघे त्याला पालखीत बसवल्याप्रमाणे वाहून नेतात. [ व्या. ज्ञा. को. ]

## पालखीनृत्य

महाराष्ट्रातील धार्मिक नृत्याचा एक प्रकार. या नृत्यात दोन गडी पालखी खांद्यावर घेऊन तिला झोके बसणार नाहीत अशा रीतीने घट्ट पकडून नाचतात. पालखीत स्थानीय देवतांच्या धातु प्रतिमा ठेवलेल्या असतात. या नृत्याला ढोलाची साथ असते. ढोलाची व नृत्याची गती पुढे पुढे वाढत जाते. नाचता नाचता नर्तकांपैकी एखाद्याच्या अंगात देवाचा संचार होतो. त्याआधी कोणीतरी जमिनीत एक नारळ आणि सव्वा रुपया पुरून ठेवलेला असतो. संचार झालेला नर्तक त्या वस्तू हुडकून काढतो. [ भा. लो. नृ. ]

## पाल राजवंश

बंगालमधील एक राजवंश. इ. स. च्या ८ व्या शतकाच्या पूर्वार्धात बंगालमध्ये अतिशय अराजक माजले होते. तिथे अनेक लहान राज्ये होती; पण त्यांच्यांत अंदाधुंदी चालत होती. त्यामुळे सर्वत्र अशांतता होती. त्या काळी गौड देशातील दयितविष्णू नामक एका विद्वान पुरुषाला वाप्यट नावाचा पुत्र होता. तो शास्त्रसंपन्न होता, तसाच शूरही होता. त्याने देशात शांतता प्रस्थापित करण्याचा पुष्कळ प्रयत्न केला. पण त्याला म्हणावे तसे यश आले नाही. त्याचा पुत्र गोपाल पित्याप्रमाणेच शूर वीर निघाला. त्याचा पराक्रम पाहून तिथल्या प्रतिष्ठित लोकांनी त्याला सिंहासनावर बसवले. ही गोष्ट इ. स. ७५० च्या सुमारास घडली. गोपाल या नावातील पाल या शब्दावरूनच त्याच्या वंशाला पाल हे नाव प्राप्त झाले.

गोपाल राजाने लवकरच बंगालमध्ये शांतता प्रस्थापित केली. तो बौद्ध धर्माचा अनुयायी असून, त्याने नालंदा येथे एक बौद्ध विहार बांधला होता, असे म्हणतात. त्याने इ. स. ७७० पर्यंत राज्य केले. त्याचा पुत्र धर्मपाल (इ. स. ७७०–८१०) याने मगधावरही आपली सत्ता स्थापली आणि करतोया नदीच्या काठी पुंड्रवर्धनपूर येथे आपली राजधानी नेली. तो पित्यापेक्षाही पराक्रमी होता. राष्ट्रकूट व प्रतीहार राजांशी त्याला दीर्घ काळ संग्राम करावा लागला; पण शेवटी त्यात तो यशस्वी झाला. त्यामुळे उ. भारतात पाल वंशाचे साम्राज्य प्रस्थापित झाले. कनौजचा राजा इंद्रायुध हा प्रतीहारांचा मांडलिक होता. त्याला पराभूत करून धर्मपालाने चक्रायुधाला ते राज्यपद दिले. मग त्याने पश्चिमेला सिंधपर्यंत व दक्षिणेला नर्मदेपर्यंत दिग्विजय केला. पुढे प्रतीहार राजा नागभट्ट (दुसरा) याने कनौजवर स्वारी करून ते परत जिंकले. पण राष्ट्रकूट राजा गोविंद (तिसरा) याने नागभट्टाचा पराभव केल्यानंतर धर्मपालाने राष्ट्रकूटाचे प्रभुत्व मान्य केले. मात्र गोविंद राजा परत गेल्यावर धर्मपालाची सत्ता पुन्हा प्रस्थापित झाली. धर्मपाल

शूर होता, तसाच कुशल सेनानी व मुत्सद्दीही होता. त्याने परमेश्वर, परमभट्टारक, महाराजाधिराजा, इ. पदव्या धारण केल्या होत्या. त्याने विक्रमशीला विद्यापीठ स्थापले. पूर्व बंगालमध्ये सोनपूर येथे ज्या एका मठाचे अवशेष सापडले आहेत, तो मठ यानेच स्थापला होता. बिहारमधील उदंतपुरी येथेही त्याने एक विहार बांधला होता. त्याने धार्मिक शिक्षणाच्या पन्नास शाळा स्थापल्या होत्या. प्रसिद्ध बौद्ध ग्रंथकार हरिभद्र हा धर्मपालाचा आश्रित होता.

धर्मपालाचा पुत्र देवपाल (इ. स. ८१०–८५०) हादेखील थोर सम्राट होता. त्याने आसाम, ओरिसा व द. भारत या प्रदेशांवर आक्रमणे केली. प्रतीहारांचा पराभव करून त्याने हूणांच्या राज्यावरही स्वारी केली होती. हूणांचा बदोबस्त केल्यानंतर त्याने अफगाणिस्थानातील कंबोजपर्यंत मजल मारली होती, असे म्हणतात. त्याने चाळीस वर्षे राज्य केले. तो बौद्ध धर्माचा पुरस्कर्ता असून, त्याने अफगाणिस्थानातील जलालाबादचा एक बौद्ध दार्शनिक इंद्रगुप्त याला नालंदा विहाराचा प्रमुख नेमले होते. देवपालाच्या राजवटीत बंगाल व बिहार हे प्रदेश वैभवाच्या शिखरावर होते, असे वर्णन इतिहासकारांनी केले आहे.

देवपालानंतर धर्मपालाचा भाऊ वाक्पाल याचा नातू विग्रहपाल हा सिंहासनावर बसला. त्याने ३–४ वर्षेच राज्य केले. पुढे स्वेच्छेने राज्यत्याग करून तो भिक्षू बनला. त्याचा पुत्र नारायणपाल याने इ. स. ९०८ पर्यंत राज्य केले. पण तो कर्तृत्ववान नसल्यामुळे त्याचे साम्राज्य नष्ट झाले. एवढेच नव्हे; तर बिहार व बंगाल हे त्याच्या सत्तेखालचे प्रांतही प्रतीहारांनी जिंकले. पुढे राष्ट्रकूटांनी प्रतीहारांचा पराभव केल्यामुळे नारायणपालाला त्याचे राज्य परत मिळाले. नारायणपालानंतर राज्यपाल, गोपाल आणि विग्रहपाल यांनी सुमारे ८ वर्षे राज्य केले. पण लवकरच बंगालचा पूर्वभाग व पश्चिमभाग यांवर चंद्र व कांबोज या घराण्यांनी आपली सत्ता प्रस्थापित केली. पुढे इ. स. ९८८ च्या सुमारास महिपाल याने आपले राज्य पुन्हा जिंकून घेतले व १०–१२ वर्षांत ते बलिष्ठ बनवले. त्याने आपल्या कारकीर्दीत पाल वंशाचे पूर्वीचे वैभवही परत मिळवले इ. स. १०२१ च्या सुमारास राजेंद्र चोळ याने बंगालवर स्वारी करून महिपालचा पराभव केला; पण त्या स्वारीचा फारसा परिणाम पाल राज्यावर राहिला नाही. कलचुरी राजा गांगेयदेव याने वाराणशीच्या आसपासचा प्रदेश पालांकडून जिंकून घेतला.

महिपालाने आपल्या दीर्घ कारकीर्दीत पूर्वीचे वैभव पुन्हा मिळवले. त्याने वाराणसी, नालंदा व बोधगया येथे अनेक विहार, मंदिरे व तलाव बांधले, असे म्हणतात. महिपालाच्या मृत्यूनंतर याचा पुत्र जयपाल इ. स. १०३८ मध्ये सिंहासनावर बसला. त्याच्या कारकीर्दीत कलचुरी कर्णदेव याने मगधावर स्वारी केली; पण त्याला तिच्यात यश मिळाले नाही. त्याने मगधात पुष्कळ जाळपोळ व लुटालूट केली. पण जयपालाने त्याचा पूर्ण पराभव केला. पुढे दीपंकर श्रीज्ञान याच्या मध्यस्थीमुळे जयपाल व कर्ण यांच्यात तह झाला.

जयपाल इ. स. १०५५ मध्ये मरण पावला. त्याच्या नंतर विग्रहपाल (तिसरा), महिपाल (दुसरा), सूरपाल व रामपाल यांनी इ. स. ११०२ पर्यंत राज्य केले. रामपाल गादीवर येण्यापूर्वी बंगालच्या उत्तर भागावर कैवर्तांची सत्ता प्रस्थापित झाली होती. पण रामपालाने आपल्या सामंतांचे साहाय्य घेऊन कैवर्तांचा राजा भीम याचा पराभव करून उ. बंगाल परत घेतला. रामपालानंतर पाल वंशाची सत्ता हळूहळू क्षीण होत गेली आणि इ. स. ११६० च्या सुमारास राधा प्रांताचा राजा विजयसेन याने ती पूर्ण नष्ट केली.

**कलाविकास–** पालांचे चार शतकांचे राज्य हे पालयुग म्हणून प्रसिद्ध आहे. त्या काळात बंगालमध्ये साहित्य, दर्शन व कला यांचा पुष्कळच विकास झाला. पाल राजे बौद्ध धर्माचे पुरस्कर्ते असले, तरी त्यांच्या राज्यात वेदविद्या, यज्ञयाग व संस्कृत भाषा यांचा पुष्कळ प्रसार होता. सध्याकरनंदी, श्रीधरभट्ट, जिनेंद्रबुद्धी, चक्रपाणीदत्त, सुरेश्वर, वंगसेन, जितेंद्रिय इ. अनेक कवी, पंडित, वैयाकरण, वैद्य व धर्मशास्त्रकार त्या काळी बंगालमध्ये होऊन गेले.

पालकालीन मूर्तिकलेला शिल्पशास्त्रातील अनेक नियमांचे बंधन असल्यामुळे त्यातल्या बहुतेक मूर्तींचे रूप अमानवी वाटत असले, तरीही त्या सुडौल व सुंदर दिसतात. पाल युगापर्यंत देवदेवतांच्या मूर्ती स्थिर व ध्यानमग्न बनवण्याची प्रथा होती पाल युगातील शिल्पकारांनी गतियुक्त मूर्ती घडवण्याची प्रथा सुरू केली. त्यांच्या मूर्तींत मानवी भाव व्यक्त झालेले दिसतात, तसाच त्या मूर्तींच्या द्वारे कोणत्यातरी कृतीचाही बोध होतो. ब्रह्मा, विष्णू, महेश्वर, देवी, सूर्य, नवग्रह, ध्यानी बुद्ध, अवलोकितेश्वर, मंजुश्री, तारा, हेरूक, जैन तीर्थंकर यांच्या अशा प्रकारच्या पाषाणाच्या व धातूच्या असंख्य मूर्ती बिहार व बंगाल या प्रदेशांत पाहायला मिळतात. बुद्धाच्या जीवनातील अनेक प्रसंग त्यात शिल्पबद्ध केलेले आढळतात. त्या कलाकारांनी बौद्ध देवतांनाही अलंकारविभूषित केले आहे. त्या काळी मातीच्या मूर्तीही पुष्कळ निर्माण झाल्या.

पाल युगात बंगाल व बिहार या प्रांतांत अनेक मंदिरे व बौद्ध विहार निर्माण झाले होते. पण सांप्रत त्या सर्वांचे केवळ भग्नाव-

शेषांच्या रूपाने सर्वत्र दर्शन घडते.

पालांच्या कारकीर्दीत अनेक बौद्ध ग्रंथ ताडपत्रांवर लिहिले गेले. त्या ताडपत्रांच्या कडांवर सुंदर चित्रे काढलेली आढळतात. पुढे मुसलमानी आक्रमणामुळे बरेच पंडित बंगाल व बिहार प्रांतांतून नेपाळमध्ये पळून गेले व जाताना त्यांनी आपल्या पोथ्याही तिकडे नेल्या. त्यांवरील चित्रांच्या अनुकरणातूनच पुढे नेपाळी चित्रशैली निर्माण झाली. [ हि. क. इं. पी.; हिं. वि. को.; बौ. ध. बि.; भारत-शिल्प ]

## पाला

ओडिसा प्रदेशातील लोकवाङ्मयाचा प्रसार करणारी एक संस्था. या संस्थेमुळेच मध्ययुगात ओडिया भाषेतील लोकवाङ्मय समृद्ध झाले. या पालांमध्ये निरनिराळे संघ असतात प्रत्येक संघात पाच किंवा सहा लोक असतात. त्यातील एकजण गायक असतो व तोच त्या जथ्याचा प्रमुख असतो. गायकाला एक प्रमुख मदतनीस असतो. त्याला सिरपालिया असे नाव आहे. गायक जिथे कमी पडेल, तिथे तो त्याला मदत करतो. संघातला एकजण मृदंग वाजवतो व इतरजण झांजा वाजवून नाचतात.

गायकाचा पोषाख इतरापेक्षा भिन्न असतो. तो डोक्याला पागोटे बांधतो. त्या पागोटच्यावर एक चामर असते. गायक जेव्हा एखादी गोष्ट सांगतो किंवा विनोद करतो, तेव्हा ते चामर तो जोराने हालवीत राहतो. मृदंगवादकही क्वचित एखादी विनोदी गोष्ट सांगतो. प्रत्येक पालाच्या संघाबरोबर त्या संघाचा एक खास कवी असतो. तो आपली कवने फक्त त्याच जथ्याला देतो. क्वचित्प्रसंगी गायकही शीघ्र काव्य रचून श्रोत्यांकडून वाहवा मिळवतो. तो फार बुद्धिमान व बहुश्रुत असतो.

अनेकदा दोन संघांत सवाल-जबाबांचे सामनेही होतात. हे सामने महिना महिना चालतात. यात जो संघ विजयी होईल, त्याला गावकीतले लोक बक्षीस देतात. [ स्ट. ओ. फो. ]

## पालिताणा

जैनांचे एक पुण्यक्षेत्र. या गावाच्या पश्चिमेला शत्रुंजय नावाचा एक डोंगर आहे. हा डोंगर सुमारे दोन हजार फूट उंच असून, वर चढायला सहा हजार पायऱ्या केलेल्या आहेत. जैन श्रावकांनी या पर्वताची चढउतार करताना अनवाणी चालायचे असते. श्रावकाने या पर्वतावर जेवणखाण करणे, थुंकणे, लघुशंका करणे या गोष्टी निषिद्ध आहेत. इथे रात्री वस्तीही करायची नसते.

हे मुख्यत्वे श्वेतांबरपंथी श्रावकांचे पुण्यक्षेत्र आहे. श्रीमाळी, ओसवाल, पोरवाल, इ. वर्गांतले लोक शत्रुंजय पर्वताची यात्रा करतात. हे सर्व लोक वाणी व उदमी असून धनसंपन्न असल्याने त्यांनी शत्रुंजय पर्वताला मंदिरनगरी बनवले आहे. इथे आदिनाथ, कुमारपाल, विमलशाह, संप्रीती राजा आणि चार्यमुख यांची पाच मुख्य मंदिरे आहेत त्यातही आदिनाथाचे मंदिर मुख्य आहे. हे मंदिर संगमरवरी असून, प्रशस्त आहे. इथली आदिनाथाची मूर्ती पद्मासनाधिष्ठित असून, ती हिरे-माणकांच्या अलंकारांनी झळाळत असते. शत्रुंजय म्हणजे जणू आदिनाथाचा स्वर्गच होय.

या पर्वतावर मंदिरे बांधणे हे जैन लोक मोठेच पुण्यकर्म समजतात. या समजुतीतूनच इथे लहान मोठी नऊशे मंदिरे उभी झाली आहेत. इथले सर्वांत उंच मंदिर चार्यमुखाचे असून, ते पंचवीस मैलांवरून दिसते.

सर्व मंदिरांभोवती चौकोनी तट आहे. इथले पुजारी श्रावक नसून भोजक आहेत ते आपली वस्त्रे गेरूने रंगवतात. धोतर व बंडी हा त्यांचा वेष असतो. [ गुजरात; स. भा. प्र. व. ]

## पाली

(१) अष्ट विनायकांपैकी बल्लाळेश्वराचे स्थान. हे महाराष्ट्रातील कुलाबा जिल्ह्यात व सुधागड तालुक्यात आहे. इथल्या गणपतीला बल्लाळविनायक असेही म्हणतात. हे स्थान अत्यंत प्राचीन असून, त्याची कथा गणेश पुराणात व मुद्‌गल पुराणात वर्णिलेली आहे, ती अशी—

कृतयुगात पल्लीपूर ( सांप्रतचे पाली ) नामक नगरात कल्याणश्रेष्ठी नावाचा एक धनिक वैश्य राहत होता. त्याला बल्लाळ नावाचा एक मुलगा होता. लहानपणापासूनच बल्लाळाला गणपतीची भक्ती जडली. त्याने आपल्या मित्रांसमवेत रानात एक भला मोठा दगड गणपती म्हणून स्थापला. तो सर्व मुलांसह दिवसभर रानातच राहून गणपतीच्या पूजेत निमग्न राहू लागला. त्यामुळे त्या सर्व मुलांची प्रकृती खालावली. ते पाहून त्या मुलांच्या वडिलांनी कल्याणश्रेष्ठीकडे तक्रार केली, की तुझ्या मुलाच्या नादी लागल्यामुळे आमच्या मुलांची अशी दशा झाली.

कल्याणश्रेष्ठीला त्यामुळे आपल्या मुलाचा फार राग आला आणि तो एके दिवशी सोटा घेऊन रानात गेला. तिथे त्याला दिसले, की एका शेंदूर फासलेल्या शिळेपुढे बल्लाळ ध्यानस्थ बसला आहे आणि बाकीची मुले देवाच्या सेवेत दंग आहेत. ते पाहून कल्याणश्रेष्ठीने बल्लाळाला यथेष्ट मार दिला. तेवढ्यानेही त्याचे ध्यान विचलित होईना; म्हणून त्याने तशाच अवस्थेत त्याला एका झाडाला बांधून ठेवले. इतके करून तो घरी निघून गेला. बाकीची मुले आधीच पळाली होती.

थोड्या वेळाने बल्लाळ शुद्धीवर आला आणि त्याने आप-

त्याला सोडवण्याबद्दल देवाची प्रार्थना केली. मग गणपती ब्राह्मणाच्या रूपाने त्याच्यापुढे प्रगट झाला त्यासरशी बल्लाळाचे बंध तुटले त्याने गणपतीला ओळखले व प्रार्थिले, की



श्रीबल्लाळ विनायक

'तू इथेच राहून भक्ताचे रक्षण कर.' देवाने 'तथास्तु' म्हटले आणि सांगितले, की 'भाद्रपद शुद्ध चतुर्थीला जे या स्थानाची यात्रा करतील, त्यांचे सर्व मनोरथ पूर्ण होतील.'

मग बल्लाळाने ब्राह्मणांना बोलावून तिथे बल्लाळेश्वर गणेशाची स्थापना केली व त्यावर मंदिर उभारले. हे देऊळ मुळात लाकडी होते. श्रीमंत बाबूराव फडणीस व त्यांचे पुत्र मोरोबादादा फडणीस यांनी त्याचा जीर्णोद्धार करून, इ. स. १७७० च्या सुमारास साप्रतचे दगडी देवालय निर्माण केले.

हे मंदिर श्रीकारी धाटणीचे असून पूर्वाभिमुख आहे. याला दिशासाधन आहे. बल्लाळेश्वराची मूर्ती तीन फूट उंचीची व जरा रुंद आहे. तिच्या कपाळाचा भाग काहीसा खोलगट आहे सोंड डावीकडे झुकलेली असून, बेंबीत व नेत्रात चकचकीत हिरे बसवलेले आहेत.

मुख्य मंदिराच्या मागच्या बाजूला ढुंढी विनायकाचे देऊळ आहे. त्या देवळातील मूर्ती स्वयंभू आहे पूर्वी बल्लाळ आपल्या मित्रांसह अरण्यात ज्या मूर्तीची पूजा करीत असे, तीच ही मूर्ती असल्याची दंतकथा प्रचलित आहे.

भाद्रपद व माघ या महिन्यांतील चतुर्थीला इथे मोठ्या प्रमाणावर उत्सव होतो माघी उत्सवात तृतीयेला सध्याकाळी देवाची पालखी निघते व ती प्रत्येक घरी थांबते. त्या वेळी घरोघरचे लोक देवाला पंचारती ओवाळतात. हे देवस्थान जागृत आहे, असे मानतात [अष्ट विनायक, श्री. बल्लाळ विनायक दर्शन – श्री. ग ल धारप, १९५८]

(२) खंडोबाचे एक स्थान. हे सातारा – कोल्हापूर रस्त्यावरील अतीत या गावच्या नैर्ऋत्येला पाच मैलावर आहे इथे खंडोबाचे एक मंदिर आहे. मंदिराच्या गाभाऱ्याच्या मध्यभागी एक चौरस मेघडबरी असून, तिच्यातल्या शाळुंकेवर खंडोबा व म्हाळसा यांची दोन स्वयंभू लिंगे आहेत त्यांच्या पुढे गादीच्या बैठकीवर दोघांचे दोन मुखवटे ठेवलेले आहेत मेघडबरीच्या मागे घोड्यावर बसलेला व सपत्नीक असा पितळी हेगडी (खंडोबाचा प्रधान) आहे. मेघडबरीच्या दक्षिणेला बाणाई या त्याच्या पत्नीची, हात जोडलेली उभी मूर्ती आहे

या मंदिराच्या पूर्व दारासमोर खंडोबाचे एक लहानसे मंदिर आहे. त्यातील मूर्ती बैठी व चतुर्भुज आहे. तिच्या चार हातांत खड्ग, डमरू, त्रिशूळ व पानपात्र आहे. मूर्तीच्या मांडीखाली दोन्हीकडे मणी व मल्ल यांची मुंडे आहेत.

आश्विन महिन्याच्या नवरात्रात इथे देवाचा मोठा उत्सव होतो. पौष महिन्यातल्या मृगनक्षत्रदिनी दुपारी देवाचे म्हाळसेशी लग्न लागते त्यासाठी देव हत्तीवरून तारळी नदीच्या पलिकडे जातो. रात्री बारानंतर वरात निघते, ती दुसऱ्या दिवशी सकाळी आठ वाजता देवळात येते. लग्नाच्या पाचव्या दिवशी पाखाळणी (प्रक्षालनपूजा) होते.

इथे खंडोबाचे भक्त देवाला लंगर तोडणे, जागरण, भीक, पशू वाहणे, वाघ्या वनणे, भंडार उधळणे, इ नवस करतात इथला पुजारी गुरव आहे [म. चा. दै.]

## पाली भाषा व साहित्य

पाली ही एक प्राकृत भाषा असून या भाषेत बौद्धांचे बहुतेक सर्व धार्मिक वाङ्मय ग्रथित केलेले आहे. पाली शब्दाच्या व्युत्पत्तीविषयी विद्वानात मतभेद आहेत. भिक्षू सिद्धार्थाने पाली हा शब्द पाठ या शब्दापासून तर, आणखी एका विद्वानाने तो पायड (=प्राकृत) या शब्दापासून व्युत्पादिला आहे. मॅक्स वेलेसर या जर्मन विद्वानाने, पाली हे पाटलीचे संक्षिप्त रूप असून, त्याचा अर्थ पाटलिपुत्राची प्राचीन भाषा असा आहे, असे सांगितले आहे. प. विधुशेखर भट्टाचार्य यांनी पाली या शब्दाचा अर्थ पंक्ती असा दिला आहे व तो संस्कृत पाली शब्दाचा पर्यायवाचक आहे, असे सांगितले आहे. अभिधानप्प-

दीपिका (इ. स. चे १२ वे शतक) या पाली कोशात तंती (तंत्र), बुद्धवचन, पंती (पंक्ती) व पाली हे शब्द पर्यायवाचक म्हणून दिलेले आहेत. यावरून पाली शब्दाचा अर्थ पंक्ती आणि नंतर ग्रंथातील पंक्ती असा केला गेला. पण ध्वनिशास्त्रदृष्ट्या पाली शब्द पंक्तीपासून व्युत्पादिता येत नाही. त्यापेक्षा पंक्ती या अर्थी असलेल्या पाली, पाठ्ठ, पाडू या देशी शब्दांशी त्याचा संबंध जोडणे, अधिक सयुक्तिक दिसते. अभिधानप्पदीपिकेत पाली शब्दाची व्युत्पत्ती 'पालेति रक्खतीति पाली' = बुद्धवचनांचे रक्षण करणारी, ती पाली होय, अशी दिली आहे. आचार्य बुद्धघोषाने पाली शब्दाचा अर्थ बुद्धवचन असाच दिला आहे. भिक्षू जगदीश काश्यप यानी पाली शब्द परियाय (पर्याय) या त्रिपिटकात अनेकदा येणाऱ्या शब्दापासून व्युत्पादिला आहे. अशोकाच्या भाब्रू येथील शिलालेखात त्रिपिटकातील धम्मपरियाय या शब्दाऐवजी धम्मपलियाय हा शब्द योजलेला असून त्याचा अर्थ बुद्धाचा उपदेश किंवा वचन असा आहे. याच पलियाय शब्दापासून पाली शब्द बनला, असे काश्यपांनी म्हटले आहे.

आज जिला पाली असे नाव आहे, ती भाषा बुद्धकालीन भारतात, मगध देशात बोलली जात होती, असे सिंहली परंपरा सांगते. मूळ त्रिपिटकात भाषेचे नाव दिलेले नाही; पण बुद्धघोषादि आचार्यांनी बुद्धाच्या उपदेशाच्या भाषेला मागधी असे म्हटले आहे. विसुद्धिमग्ग आणि महावंस या ग्रंथात मागधीला सर्व प्राण्यांची मूलभाषा असे म्हटले आहे. मागधीऐवजी पाली या शब्दाचा उपयोग इ. स. च्या १४ व्या शतकापासून सुरू झाला.

पाली ही मूळ कोणत्या प्रदेशातील भाषा होती, याबद्दल विद्वानांची अनेक मते आहेत. प्रो. ऱ्हीस डेविड्स् यांच्या मते, सनपूर्व ६ व्या व ७ व्या शतकात कोशल देशात ती भाषा बोलली जात होती. वेस्टरगार्ड व ई. कुस्न हे पालीला उज्जयिनी प्रदेशातील बोली मानतात. पाली भाषेचे उगमस्थान विंध्यप्रदेश हे आहे; कारण गिरनारच्या शिलालेखाशी तिचे सर्वांत जास्त साम्य आहे, असे फ्रॅंक या विद्वानाचे म्हणणे आहे. स्टेन कनौ यानेही विंध्यप्रदेशालाच पाली भाषेचे उगमस्थान मानले आहे. कारण त्याच्या मते पैशाची प्राकृताशी पालीचे अधिक साम्य आहे. ओल्डेनबर्ग म्हणतो, की पाली ही कलिंग देशाची भाषा होती. कारण कलिंगातूनच लंकेत अनेक शतके धर्मप्रचाराचे काम चालू होते. जर्मन विद्वान गायगर याने पाली हे मागधीचे एक रूप होते, असे मानले आहे.

भाषेच्या दृष्टीने पाली ही मध्ययुगीन भारतीय आर्य भाषेचे एक रूप असून, तिचा विकास सनपूर्व सहाव्या शतकापासून सुरू झाला, असे मानतात. त्याच्या पूर्वीच्या भारतीय आर्य भाषेचे स्वरूप वैदिक वाङ्मयात व रामायण, महाभारत, इ. ग्रंथांत आढळते. तिला अनुक्रमे वैदिक व संस्कृत भाषा अशी नावे आहेत.

या प्राचीन आर्य भाषा आणि मध्यकालीन प्राकृत भाषा यांत दोन भेद आहेत, ते असे–

(१) मध्यकालीन भाषांत ऋ, लृ, ऐ, औ या स्वरांचा अभाव; ए व ओ यांच्या ह्रस्व स्वरांचा विकास; श, ष, स यांच्या स्थानी कोणत्याही एकाचा आणि सामन्यतः स् चा प्रयोग; विसर्गाचा अभाव आणि असवर्णयुक्त व्यंजने असंयुक्त बनविण्याकडे किंवा सवर्ण संयोगात परिवर्तन करण्याकडे प्रवृत्ती.

(२) नामे व क्रियापदे यांमध्ये द्विवचनाचा अभाव, पुल्लिंग व नपुंसकलिंग यांमध्ये अभेद व व्यत्यय, कारके व क्रियापदांची रूपे यांत संकोच; परस्मैपद, आत्मनेपद व गण इत्यादींचा लोप. याशिवाय देश व काल यांच्या भेदानुसार अनेक भेद.

कालमानानुसार या भाषांचे प्राक्-मध्यकालीन (सनपूर्व ६०० ते इ. स. १००), मध्यकालीन (इ. स. १०० ते ६००) व उत्तर मध्यकालीन (इ. स. ६०० ते १०००) असे तीन कालखंड पडतात. या सर्व भाषांना प्राकृत हे सामान्य नाव दिलेले आहे. प्राक् मध्यकालीन भाषांचे स्वरूप अशोकाच्या प्रशस्ती व पाली साहित्य यांमध्ये दिसते. मध्यकालीन भाषा म्हणजे मागधी, अर्ध मागधी, शौरसेनी व महाराष्ट्री या असून, त्यांचे विपुल साहित्य उपलब्ध आहे. उत्तर मध्यकालीन भाषांना अपभ्रंश व अवहट्ठ अशी नावे आहेत.

वैदिक भाषा ही यास्क व पाणिनी यांच्या काळी संस्कृत बनून आर्यांच्या शास्त्र व धर्म यांची भाषा झाली होती. त्याच वेळी आर्यांची बोलभाषा विकसित होऊन तिने नवे रूप धारण केले होते. मगध किंवा कोशल या प्रांतांत त्या भाषेने जे रूप घेतले तीच पाली भाषा होय. यावरून वैदिक भाषेपासून, मध्यकालीन आर्यभाषायुगात संस्कृत व पाली यांचा विकास भिन्न भिन्न पद्धतींनी झाला आहे, हे कळून येते.

संस्कृत भाषेहून पालीच्या ध्वनिसमूहाचे वेगळेपण दिसते, ते असे (१) ऋ, लृ, ऐ व औ या स्वरांचा प्रयोग पाली भाषेत होत नाही. (२) ऱ्हस्व ए व ऱ्हस्व ओ हे नवीन स्वर आढळतात. (३) विसर्ग नसतो. (४) श, ष नसतात (५) ळ, ळ्ह या व्यंजनाचा प्रयोग संस्कृतपेक्षा अधिक होतो. दोन स्वरांच्या मध्ये येणाऱ्या ड् चे स्थान ळ् व ढ चे स्थान ळ्ह घेतात

साधारणपणे अ, इ, उ हे संस्कृत ऱ्हस्व स्वर पालीत तसेच राहतात. उदा० सं. अग्नि, पाली अग्गि.

संस्कृतातील इ व उ हे संयुक्त व्यंजनाच्या आधी असल्यास

पालीत ते अनुक्रमे ए व ओ होतात. उदा० विष्णु–वेण्हु; उष्ट्र–ओट्ठ.

संस्कृतात जिथे संयुक्त व्यंजनापूर्वी दीर्घ स्वर येतो, तिथे पालीत त्याचे रूप ऱ्हस्व होते. उदा० चैत्य– चेतिय, मौर्य–मोरिय.

संस्कृत ऋ चे पालीत अ, इ किंवा उ होते. उदा० ऋक्ष–अच्छ, कृत– कित, ऋजु– उजु किंवा उज्जु.

संस्कृतमधे पदाच्या अंती असलेला दीर्घ स्वर पालीत ऱ्हस्व होतो. उदा० देवानां– देवानं, नदी– नदि.

संस्कृतातील विसर्गाचा पालीत लोप होतो. उदा० दुःखं–दुक्खं, निःशोक – निस्सोको.

संस्कृतातील क्ष् चे पालीत क्ख् किंवा च्छ् होते. उदा० क्षुधा – खुधा, क्षारिका– छारिका, कक्ष– कच्छ, तक्षति– तच्छति.

संस्कृतातील मध्यसंयुक्त व्यंजनांचे पालीत परिवर्तन होताना व्यंजन– अनुरूपता, व्यंजनविपर्यय, प्राणध्वनीचे आगमन व लोप, इ. प्रवृत्ती दिसतात. उदा० उक्त– उत्त; सप्त– सत्त; आश्चर्य– अच्छेर; कर्क– कक्क; स्वप्न– सोप्प; शक्य– सक्क; अश्व– अस्स; रम्य– रम्म; इ.

संस्कृतातील अन्त्य व्यंजन पालीत लुप्त होते. उदा०– भगवान्–भगवा, सम्यक्–सम्मा.

पाली भाषेच्या विकासाच्या चार अवस्था दिसतात, त्या अशा –

(१) त्रिपिटकात येणाऱ्या गाथांची भाषा. ही भाषा अत्यंत प्राचीन असून, वैदिक भाषेपेक्षा ही अत्यल्प भिन्न आहे. पालीतील काही विशिष्ट रूपेही त्या प्राचीन काळातच तयार होऊ लागली होती. सुत्तनिपाताची भाषा ही याचे उत्तम उदाहरण आहे.

(२) त्रिपिटकाच्या गद्य भागाची भाषा. गाथांच्या भाषेपेक्षा या भाषेत प्राचीन रूपे कमी आढळतात व नवीन रूपे जास्त प्रमाणात दिसतात. जातकांची भाषा हे याचे उदाहरण आहे.

(३) उत्तरकालीन पाली गद्य साहित्याची भाषा. या भाषेचे स्वरूप मिलिंदप्रश्न व अट्ठसाहित्य यांमध्ये दिसते. ही एक विकसित व उदात्त गद्य शैली आहे.

(४) उत्तरकालीन पाली काव्याची भाषा. या काव्यांत कवींनी आपल्या मनाप्रमाणे कधी प्राचीन रूपांचा, तर कधी नवीन रूपांचा प्रयोग केला आहे. संस्कृताचा वाढता प्रभाव, हे या कालातील साहित्याचे एक विशेष लक्षण आहे. महावंस, दीपवंस, दाठावंस, तेलकटाहगाथा, इ. ग्रंथांत या भाषेचे स्वरूप दिसते.

**पाली साहित्य** – पाली साहित्यात प्रामुख्याने भगवान बुद्धाच्या उपदेशांचा संग्रह आहे. पण बुद्धाच्या हयातीत त्याचा काही उपदेश लेखबद्ध झाला होता, याला काही प्रमाण आढळत नाही. बुद्धाचे सर्व शिष्य त्याचा उपदेश कंठस्थ करण्याचा प्रयत्न करीत. त्यांनी जो भाग कंठस्थ केला असेल, त्याला अनुसरून त्याना धर्मधर, सुत्तन्तिक, विनयधर व मात्रिकाधर असे म्हणत. या मौखिक परंपरेच्या आधारावर बुद्धाच्या उपदेशांना साहित्यिक रूप देण्यासाठी तीन वेळा संगीती (धर्मपरिषदा) भरल्या. त्यांपैकी प्रथम संगीती बुद्धाच्या निर्वाणानंतर चार महिन्यांनी राजगृहात भरली होती. तिच्यात पाचशे भिक्षूंनी भाग घेतला होता, म्हणून तिला पंचशतिका असे नाव मिळाले होते. या सभेचा अध्यक्ष महाकाश्यप हा होता. त्याने बुद्धाचा साक्षात शिष्य भिक्षू उपाली याला विनयासंबंधी आणि स्थविर, आनंद याला सुत्तासंबंधी अनेक प्रश्न विचारले आणि अन्य भिक्षूंच्या संमतीने, त्याने त्यांचा संग्रह केला. अशाच प्रकारची दुसरी संगीती बुद्धनिर्वाणाच्या नंतर शंभर वर्षांनी वैशालीत भरली. तिला सातशे भिक्षू उपस्थित होते, म्हणून ती सप्तशतिका या नावाने प्रसिद्ध आहे. विनयासंबंधी काही विवाद्य प्रश्नांचा निर्णय करण्यासाठी ही सभा भरली होती. वैशालीचे भिक्षू काही बाबतींत बौद्ध शास्त्राच्या विरुद्ध वर्तन करीत होते. वैशालीच्या या सभेत त्या भिक्षूंचे वर्तन विनयविरोधी आहे, असे घोषित करण्यात आले. महास्थविर रेवंताच्या अध्यक्षतेने या संगीतीत धम्माचे संकलन करण्यात आले. बुद्धाच्या सर्व वचनांचे तीन पिटक, पाच निकाय, नऊ अंगे व चौऱ्यायंशी हजार धर्मस्कंध अशा विभागांत वर्गीकरण याच वेळी करण्यात आले, असे आचार्य बुद्धघोषाने म्हटले आहे. तिसरी संगीती सम्राट अशोकाच्या काळात बुद्धनिर्वाणानंतर २३६ वर्षांनी पाटलिपुत्र येथे भरली होती. त्या संगीतीचा अध्यक्ष मोग्गलिपुत्त तिस्स हा होता. नऊ महिने ही सभा चालली आणि तिच्यात बुद्धाच्या वचनांना अंतिम रूप देण्यात आले. याच संगीतीत सुत्तपिटकातील सिद्धांताच्या आधारावर अभिधम्मपिटकाची रचना करण्यात आली.

लंकेत दीर्घ कालपर्यंत त्रिपिटकाची मौखिक परंपरा चालू होती. वट्टगामिनी राजाच्या काळात (सनपूर्व २९ ते १) अट्ठकथांसह त्रिपिटक लिपिबद्ध करण्यात आले, असे दीपवंस व महावंस या ग्रंथांत सांगितले आहे. सर्व त्रिपिटकात मूळ बुद्धवचनेच आहेत किंवा काय, याबद्दल विद्वानांत मतभेद आहेत. त्यांतील काही गाथा प्रक्षिप्त आहेत, हे प्राचीन आचार्यांनीही मान्य केले आहे. पण त्रिपिटकात मूळ बुद्धवचने सुरक्षित आहेत, यात शंका नाही. त्यांतील सूत्रांची शैली जिवंत वाटते. प्रत्येक सूत्राच्या प्रारंभी, बुद्धाने ज्या ठिकाणी त्याचा उपदेश केला, त्या स्थानाचा निर्देश केलेला आहे.

मूळ पाली साहित्य तीन भागांत विभागलेले असून, त्यांना पिटक असे नाव दिलेले आहे. त्रिपिटकात विनयपिटक, सुत्त-पिटक व अभिधम्मपिटक यांचा समावेश होतो.

विनयपिटकात भिक्षूंनी पालन करायच्या सदाचाराचे नियम दिलेले आहेत. विनयपिटकाचे सुत्तविभंग, संघक व परिवार असे तीन उपविभाग आहेत. सुत्तविभंगाचे पुन्हा पाराजिक व पाचित्तिय आणि संघकाचे महावग्ग व चुल्लवग्ग असे दोन विभाग आहेत.

विषय, विस्तार आणि रचना या दृष्टींनी सुत्तपिटक हा त्रिपिटकाचा महत्त्वाचा भाग आहे. यात भगवान बुद्धाच्या किंवा सारिपुत्त, मोग्गलान, इ. त्यांच्या शिष्यांच्या उपदेशांचा संग्रह आहे.

सुत्तपिटकाचे दीघनिकाय, मज्झिमनिकाय, संयुत्तनिकाय, अंगुत्तरनिकाय व खुद्दकनिकाय असे पाच निकाय म्हणजे भाग आहेत. दीघनिकायाचे तीन भाग असून त्यांत ३४ सुत्ते आहेत. इतर सुत्तांपेक्षा ही अधिक लांब असल्यामुळे, या निकायाला दीघ हे नाव दिलेले आहे.

मज्झिमनिकायात मध्यम आकाराची १५२ सुत्ते असून, त्यांचे पंधरा वर्ग केलेले आहेत, ते असे – मूल परियाय, सीहनाद, ओपम्म, महायमक, चूलयमक, गहपती, भिक्खू, परिब्बाजक, राज, ब्राह्मण, देवदह, अनुपाद, सुञ्जता, विभंग व षडायतन. यांपैकी १४ व्या विभंग वर्गात १२ सुत्ते असून, बाकीच्यांत १० सुत्ते आहेत.

संयुत्तनिकायात लहान व मोठ्या अशा दोन्ही प्रकारच्या सुत्तांचा समावेश असल्यामुळे, याला संयुत्त हे नाव मिळाले आहे. यात एकूण ५६ सुत्ते असून, ती सगाथ, निदान, खंध, षडायतन व महावग्ग या पाच वर्गांत विभागलेली आहेत.

अंगुत्तरनिकायातील सुत्तांचा संग्रह एका विशिष्ट क्रमाने केलेला आहे. सुरुवातीला बुद्धाने एकसंख्यात्मक पदार्थांविषयी जो उपदेश केला आहे, त्याबद्दलची सुत्ते दिलेली असून, त्यानंतर क्रमाने दोनसंख्यात्मक, तीनसंख्यात्मक, इ. पदार्थांविषयीची सुत्ते दिलेली आहेत. त्यांना एकनिपात, दुकनिपात, अशी एकादसक निपातापर्यंतची नावे दिलेली आहेत. या निपातांची पुन्हा वर्गात विभागणी केलेली आहे. अंगुत्तरनिकायात सुत्तांची संख्या २३०८ आहे.

खुद्दकनिकायात पंधरा स्वतंत्र रचनांचा समावेश आहे. त्यांची नावे अशी– खुद्दकपाठ, धम्मपद, उदान, इतिवुत्तक, सुत्तनिपात, विमानवत्थू, पेतवत्थू, थेरगाथा, थेरीगाथा, जातक, निद्देस, पटिसंभिदामग्ग, अपादान, बुद्धवंस व चरियापिटक.

अभिधम्मपिटकात बुद्धाच्या दार्शनिक विचारांचे विवेचन केलेले असून त्यांचे वर्गीकरणही केलेले आहे.

त्रिपिटकेतर साहित्याची दोन युगे मानता येतात. प्रथम युगातील सर्वांत महत्त्वाचा ग्रंथ म्हणजे मिलिंदपञ्हो हा होय. मिलिंद हे मिनांडर या यवन राजाच्या नावाचे रूपांतर आहे. सनपूर्व दुसऱ्या शतकात याने भारतावर स्वारी करून पंजाबमध्ये आपले राज्य स्थापन केले होते. हा राजा मोठा विद्वान होता. याने भिक्षू नागसेनाला काही मार्मिक प्रश्न विचारले आणि नागसेनाने त्यांची चातुर्याने उत्तरे दिली. ती सर्व प्रश्नोत्तरे या ग्रंथात समाविष्ट केलेली आहेत. या ग्रंथात बाहिरकथा, लक्खणपञ्हो, विमतिछेदनपञ्हो, मेंडकपञ्हो, धुतंगकथा व ओपम्मकथापञ्हो, असे सात अध्याय आहेत. यांपैकी पहिले तीन अध्याय हा मूळचा ग्रंथ असून बाकीचे मागून जोडलेले आहेत, असे मानतात. या ग्रंथाची भाषाशैली रोचक असून ती संस्कृतला अधिक जवळची आहे.

त्रिपिटकेतर साहित्याचे दुसरे युग म्हणजे इ. स. चे ५ वे ते ११ वे शतक हा कालखंड होय. याचा प्रारंभ त्रिपिटकाच्या अट्ठकथांनी होतो. प्राचीन सिंहली भाषेतील अट्ठकथांवर पाली अट्ठकथा आधारलेल्या आहेत. आचार्य बुद्धघोषाने त्या रचलेल्या असून, त्यांची संख्या सोळा आहे. याशिवाय, त्याने विसुद्धिमग्ग नामक बौद्ध धर्माच्या सिद्धांताचे स्पष्टीकरण करणारा ग्रंथ लिहिला असून, बौद्ध दर्शनाचा तो ज्ञानकोशच आहे.

बुद्धदत्त आणि धर्मपाल या दोन आचार्यांनीही अट्ठकथा-साहित्यात भर घातली आहे. बुद्धदत्त हा बुद्धघोषाचा समकालीन होता. याने बुद्धघोषाच्या समंतपासादिका नामक अट्ठकथांचे सार उत्तरविनिश्चय आणि विनयविनिश्चय या दोन पद्यग्रंथांत ग्रथित केले आहे. तसेच त्याच्या अभिधम्मावरील अट्ठकथांच्या आधारे त्याने अभिधम्मावतार हा गद्य–पद्य–मिश्रित ग्रंथ व बुद्धवंसावरील मधुरत्थपकासिनी ही अट्ठकथा हे ग्रंथ लिहिले आहेत. धम्मपालाने सात अट्ठकथा लिहिल्या आहेत. खुद्दकनिकायातील उदान, इतिवुत्तक, विमानवत्थू, पेतवत्थू, थेरगाथा, थेरीगाथा व चरियापिटक या ग्रंथांवर त्याने परमत्थदीपनी नामक अट्ठकथा लिहिल्या आहेत. त्याचप्रमाणे, त्याने नेत्तिप्रकरणावर अत्थसंवण्णणा व लीनत्थवण्णणा नामक टीका, विसुद्धिमग्गावर परमत्थमंजूषा, इ. टीका लिहिल्या आहेत. याशिवाय, आनंदकृत अभिधम्ममूलटीका, चुल्लधम्मपालकृत सच्चसंखेप, उपसेनकृत सद्धम्मप्पजोतिक, महानामकृत सद्धम्मप्पकासिनी, कस्सपकृत मोहविच्छेदनी व विमतिच्छेदनी, वज्रबुद्धिकृत समंतपासादिकेवरील टीका, क्षेमकृत खेमप्पकरण, अनिरुद्धकृत अभिधम्मत्थसंगहो, परमत्थविनिश्चय व नामरूपपरिच्छेद, धर्मश्रीकृत खुद्दकसिक्खा, महास्वामीकृत

मूलसिक्खा इत्यादी अनेक ग्रंथ प्रसिद्ध आहेत.

इ. स. च्या १२ व्या शतकात लंकेतही काही पाली ग्रंथ निर्माण झाले लंकानरेश पराक्रमबाहू (प्रथम – इ. स. ११५३ ते ११८६) याच्या कारकिर्दीत सिंहली स्थविर महाकस्सप याने एक संगीती भरवली. त्याचा परिणाम म्हणून सारिपुत्ताने समतपासादिकाप्रमुख अट्ठकथांवर दीपनी, मंजूसा, पकासिनी, इ. नावांनी आठ टीका लिहिल्या. त्याचे शिष्य संघरक्खित, बुद्धनाम, वाचिस्सर व मेघंकर यांनीही निरनिराळ्या अट्ठकथांवर टीका लिहिल्या आहेत. इ. स. च्या १३ व्या शतकात स्थविर विदेह, बुद्धप्रिय व धर्मकीर्ती यांनी समंतकूटवण्णणा वगैरे ग्रंथ रचले. इ स. च्या १४ व्या शतकातील मेघंकरकृत लोकप्पदीपसार आणि इतर अज्ञात कर्त्यांचे पंचगतिदीपन, सद्धमोपायन व तेलकटाहगाथा हे काव्य ग्रंथप्रसिद्ध आहेत.

इ. स. च्या १५ व्या शतकात पाली साहित्यनिर्मितीचे केंद्र लंकेतून ब्रह्मदेशात गेले. या शतकात अरियवंसकृत मणिसारमंजूसा, मणिदीप व जातकविसोधन; सद्धम्मसिरिकृत नेत्तिभावनी; सीलवसकृत बुद्धालकार आणि रट्ठसारकृत जातकांचे काव्यात्मक रूपांतर हे ग्रंथ प्रसिद्ध झाले. इ. स. च्या १६ व्या शतकात सद्धम्मालंकाराने पट्ठाणप्रकरणावर पट्ठाणदीपनी नामक टीका लिहिली. इ. स. च्या १७ व्या शतकात त्रिपिटकालंकारचा वीसतीवण्णणा, सारिपुत्ताची विनयसंग्रहावर विनयालंकार नामक टीका व यसवड्ढनवत्थू हे तीन ग्रंथ निर्माण झाले याशिवाय त्रिलोकगुरू, सारदस्सी व महाकस्सप यांनीही ग्रंथरचना केली. इ. स.च्या १८ व्या शतकातील ज्ञानाभिवंशाच्या पेटकालंकार नेत्तिप्रकरणावरील टीका, साधुविलासिनी ही दीघनिकायाची व्याख्या व राजाधिराजविलासिनी नामक काव्य या रचना प्रसिद्ध आहेत. इ. स. च्या १९ व्या शतकात ब्रह्मदेशात नलाटधातूवंस, संदेसकथा, सीमाविवादविनिश्चय, इ ग्रंथांची रचना झाली.

इ. स. च्या २० व्या शतकात श्री. धर्मानंद कोसंबी यांनी विसुद्धिमग्गदीपिका व अभिधम्मत्थसंग्रहावर नवनीत नामक टीका लिहिली. यावरून पाली साहित्यनिर्मितीची धारा अडीच हजार वर्षांपासून चालू शतकापर्यंत अविच्छिन्न चालू राहिली आहे, असे म्हणता येते.

दीपवंस आणि महावंस हे पाली भाषेतील ऐतिहासिक ग्रंथ आहेत. दोन्ही ग्रंथांत लंकेचा इतिहास दिला आहे.

पाली भाषेत काही शास्त्रीय ग्रंथांची रचनाही झाली आहे. कच्चान आणि मोग्गल्लायन यांनी लिहिलेले व्याकरणग्रंथ आणि त्यांवरील टीका प्रसिद्ध आहेत. याशिवाय सद्धम्मगुरुकृत सद्दवुत्ती, मंगलकृत गंधट्ठी, सामनेर धम्मदस्सीकृत वच्चवाचक, अरियवंशकृत गंधाभरण, ब्रह्मदेशनरेश क्यच्चा याच्या कन्येने रचलेले विभत्त्यर्थप्रकरण, जंबूध्वजकृत संवण्णानयदीपना व निरुत्तिसंग्रह व राजगुरुकृत कारकपुप्फमंजरी हेही ग्रंथ व्याकरणासंबंधीच आहेत.

अभिधानप्पदीपिका व एकक्खर कोश हे पालीतील कोशग्रंथ होत.

पाली छंदःशास्त्रावर वृत्तोदय, छंदोविचित, कविसारप्रकरण, इ. ग्रंथ आहेत. वृत्तोदय हा ग्रंथ स्थविर संघरक्खिताने रचलेला असून, त्यानेच पाली काव्यशास्त्रावर सुबोधालंकार हा ग्रंथ लिहिला आहे.

विषयाच्या दृष्टीने पाली काव्याचे वर्णनात्मक काव्य व आख्यानात्मक काव्य असे दोन भेद होतात. अनागतवंस, तेलकटाहगाथा, जिनालंकार, जिनचरित, पज्जमधू, सद्धम्मोपायन, पञ्चगतिदीपन व लोकप्पदीपसार हे प्रमुख वर्णनात्मक काव्यग्रंथ आहेत. रसवाहिनी, बुद्धालंकार, सहस्सवत्थुप्पकरण आणि राजाधिराजविलासिनी ही आख्यानात्मक प्रधान काव्ये आहेत. या दोन्ही प्रकारच्या काव्यांत नैतिक आदर्शवाद रंगवलेला असून, त्यांची शैली मात्र नीरस आहे.

पाली भाषेतील अभिलेख साहित्य महत्त्वाचे आहे. सनपूर्व ३ ऱ्या शतकापासून इ स. चे १५ वे शतक एवढा त्या अभिलेखांचा प्रदीर्घ कालखंड आहे. अशोकाचे शिलालेख, साची व भरहूत येथील अभिलेख, सारनाथ येथील कनिष्ककालीन अभिलेख, मौंगन (ब्रह्मदेश) येथील दोन स्वर्णपत्रलेख, बोबोगी पॅगोडा येथील खंडित शिलालेख, प्रोम (ब्रह्मदेश) येथील वीस स्वर्णपत्रलेख, पेगन येथील अभिलेख व कल्याणी अभिलेख हे त्यांपैकी महत्त्वाचे अभिलेख होत.

अशोकाचे शिलालेख उत्तरेला हिमालयापासून दक्षिणेत म्हैसूरपर्यंत आणि पूर्वेला ओडिसापासून पश्चिमेला काठियावाडपर्यंत मोठमोठ्या शिला व दगडी स्तंभ यांवर कोरलेले आहेत. अशोकाच्या वेळचा इतिहास समजण्यासाठी त्यांचा फार उपयोग होतो.

मूल त्रिपिटक ग्रंथ बर्मी, सिंहली, सयामी आणि रोमन या लिप्यांत प्रकाशित झालेले आहेत. पण काही वर्षांपूर्वी राहुल सांकृत्यायन यांनी नागरी लिपीत सुत्तपिटकाचे मज्झिम व दीघ हे दोन निकाय आणि विनयपिटकाचा हिंदी अनुवाद प्रकाशित केला आहे. खुद्दक निकायाचे अकरा ग्रंथही त्यांनी मूल रूपात प्रकाशित केले आहेत. भदंत आनंद कौसल्यायन यांनी जातकांचा हिंदी अनुवाद प्रकाशित केला आहे. तसेच त्रिपिटक नागरी लिपीत छापण्याचे काम सरकारी पातळीवर चालू आहे. [ हिं. वि. को.; हिं. सा. को.; पा. मा. इ. ]

**पालीवाल** एक ब्राह्मण जात. हे गौड आहेत. पाली या गावावरून यांना हे नाव पडले आहे. पाली हे गाव मारवाडात असून, मंडोरच्या राजाकडून त्यांना ते इनाम मिळाले होते. हे लोक साप्रत राजस्थानात सर्वत्र विखुरलेले आहेत. ते शेती व व्यापार करतात. याच्या बारा प्रमुख पोट-जाती आहेत, त्या अशा — (१) जागिया (२) जजिया (३) पुसिद (४) घामट (५) मायल (६) ठेमा (७) पेयड (८) हरजाल (९) चरक (१०) सांदू (११) कोग व (१२) हरदोलयो.

पालीवाल हे वैष्णव आहेत. त्यांच्यांत मोठ्या प्रमाणावर विष्णुयाग करण्याची पद्धत आहे. विष्णुयाग करणे हे त्यांच्यात गौरवाचे लक्षण समजले जाते.

हे लोक वरपक्षाकडून देज म्हणून खूप मोठी रक्कम घेतात. त्यामुळे गोरगरीब पालीवालापैकी पुष्कळाना अविवाहितच राहावे लागते. मुलगी अशा प्रकारे बापाला धन देणारी ठरल्यामुळे तिला या जातीत कुलोद्धारक मानतात व मुलाला कुळबुडव्या समजतात. [रा. जा.]

**पालीव्रत** एक काम्य व्रत. भाद्रपद शुद्ध चतुर्दशीच्या दिवशी विवाहित स्त्रिया एखाद्या जलाशयावर जातात आणि तिथे पाटावर अक्षता व कुंकू यांनी एक वरुणाची मूर्ती अथवा वारुणयंत्र रेखाटून त्याची पूजा करतात. मग ब्राह्मणभोजन घालतात या व्रताचा अधिकार चारही वर्णांना आहे. तोंडाला फार पाणी सुटू नये, तोंड बेचव होऊ नये व त्याला दुर्गंधी येऊ नये, म्हणून हे व्रत करायचे असते. [व्र. प.]

**पावडम** द. भारतातील वैष्णव भिक्षेकऱ्यांची एक जुनी अघोरी प्रथा. वानर, गरुड व सर्प यांना ते पवित्र मानतात. एखाद्याने जर या प्राण्यांपैकी कोणाला मारले, तर पूर्वी हे लोक घंटा वाजवून आपल्या अनुयायांना गोळा करीत व त्या इसमाच्या दारात जाऊन त्याच्याकडे दंडाची रक्कम मागत त्याने ती देण्याचे नाकारले, तर आपल्यांतल्याच एका माणसाच्या दंडावर घाव घालीत. त्यामुळे रक्तस्राव होऊन तो माणूस बेशुद्ध पडे. त्या वेळी सर्व जण आपली वाद्ये वाजवून व ओरडून भयंकर कोलाहल माजवीत. त्यामुळे तिथे जमलेले गावातले लोक वैतागून जात आणि मध्यस्थी करीत व प्राणिवध करणाऱ्या माणसाकडून त्या गुन्ह्याबद्दल त्या लोकांना काही रक्कम देववीत. मग ते जमलेले वैष्णव दुसऱ्या एका वष्णवाच्या मांडीवर घाव करून त्याचे रक्त एका वाटीत धरीत, ते जखमी माणसाच्या दंडावर शिपडीत व तो शुद्धीवर आला, की त्याला घेऊन निघून जात. तो मनुष्य खरोखर बेशुद्ध पडलेला नसे. ही प्रथा सांप्रत रूढ नाही. [हि. मॅ. क. से.]

**पावमानी मंत्र** ऋग्वेदाच्या ९ व्या मंडलातील सर्व मंत्रांना पावमानी मंत्र असे म्हणतात. काहींच्या मते सोमाला उद्देशून असलेले ऋग्वेदातले सर्व मंत्र हे पावमानी मंत्र होत. पवमान अर्थात दशापवित्रातून खाली गळणारा सोमरस, याला उद्देशून हे मंत्र असल्यामुळे यांना पावमानी असे नाव मिळाले. हे मंत्र पाठकाला पावन करणारे आहेत, असे म्हटले आहे. [हि. ध.; वे. इं.]

**पावणाई** दक्षिण कोकणातील एक ग्रामदेवता. वाडे या गावी हिची मूर्ती असून, ती द्विभुजा आहे. तिथला पुजारी सुतार आहे. [चित्पावन]

**पावरा** एक वन्य जमात. सातपुडा प्रदेशाच्या अक्राणी महालात या लोकांची वस्ती आहे. पटले, खडे, पराडके, अशी त्यांची आडनावे आहेत.

हे लोक स्वतःला राजपूत वंशाचे मानतात. उदयपूरच्या राण्याने आपल्याला पावागडातून हाकलून लावले आणि आपण या भागात आलो असे हे म्हणतात. यांची अंगलट, भाषा व वर्ण यांवरूनही हे राजस्थानातून येऊन इथे स्थायिक झाले असावे, असे वाटते. हे स्वतःला भिल्लांपेक्षा श्रेष्ठ समजतात. हे रंगाने निमगोरे व सुदृढ प्रकृतीचे असतात. कमरेला लंगोटी, डोक्याला पागोटे आणि अंगात सदरा असा यांचा पोषाख असतो. सदरा



पावरा — पति-पत्नी

नसल्यास धोतराचा सोगा ते अंगाभोवती गुंडाळतात. कधी कधी लुंगीच्या पद्धतीने धोतरही नेसतात. कानात चांदीच्या साखळ्या घालतात. याच्या स्त्रिया नऊ वारी सकच्छ लुगडे नेसून डोक्यावरून पदर घेतात; बांगड्या, चांदीचे कडे, दंडात

वेली, गळ्यात सरी असे चांदीचे दागिने घालतात; तसेच मोत्यांच्या माळा व रुप्याचे हारही घालतात. त्यांची चांदीची कर्णफुले व पैंजणे ही राजस्थानी पद्धतीची असतात. शुद्ध दागिने वापरणे हे शुभ व मंगलकारक समजतात.

पावरांचा मुख्य व्यवसाय शेती हा आहे. यांच्या अडाणीपणामुळे व्यापारी लोक यांना व्यवहारात फसवतात. त्यामुळे हे सदैव कर्जबाजारी असतात. हे भोळसट आणि एकवचनी असून गुन्हा ताबडतोब कबूल करतात. यांना तंबाकूचे जबरदस्त व्यसन असते. पैसा मिळविण्यासाठीही बाहेरच्या प्रदेशात जाणे त्यांना आवडत नाही. आप्तेष्टांसमवेतच जगणे आणि मरणे त्यांना आवडते. ते कुणाची मजुरी किंवा नोकरी करीत नाहीत. त्यांना वार आणि महिनाही कळत नाही. ज्या पावरांचा तळोदे, शहादे अशा गावांशी थोडा संबंध येतो, त्यांच्या राहणीत मात्र थोडी सुधारणा दिसते.

पावरांची एक वेगळी बोली आहे. मराठी, गुजराती व हिंदी यांच्या मिश्रणाने ती बनली आहे.

**देवधर्म**— पावरा लोक रोगराईच्या निवारणासाठी देवाला बोकडाचा बळी देतात. भगताकडून ते मंत्रतंत्र करवतात. वाघदेव व इंद्रदेव हे त्यांचे प्रमुख देव होत. वाघाची भीती त्यांना सतत वाटत असल्याने ते वाघाला पूज्य मानतात व देव म्हणून त्याची पूजा करतात. त्यांच्या गावाच्या वेशीवर व प्रत्येक पाड्यावर वाघाच्या नावे दोनचार गोटे शेंदूर लावून ठेवलेले असतात. त्यांची पूजा मुख्यत्वे श्रावणात करतात; तोपर्यंत ते नवीन धान्य खात नाहीत.

कळंब वृक्षाची फांदी हे इंद्रदेवाचे प्रतीक असते. या इंद्रदेवाला कोंबड्या – बकऱ्यांचा बळी देतात. त्यांच्या उत्सवात मांसाहार व मद्यपान यथेच्छ चालते; नाच – गाण्यालाही ऊत येतो. ते अर्जुनाला राजा फांटा व श्रीकृष्णाला गांडा ठाकूर म्हणतात; सातपुड्यातील एका उंच शिखराला देवमोगरा म्हणतात. तिथल्या काळी देवीच्या मूर्तीला ते भजतात. महाशिवरात्रीला तिथे त्यांची मोठी यात्रा भरते. दिवाळी व भंगोऱ्या म्हणजे होळी हे यांचे महत्त्वाचे सण होत. यांचा मडवी नावाचा भाट असतो. तो कथा सांगून व गाणी गाऊन पावरांचे मनरंजन करतो.

**विवाहप्रथा**— भंगोऱ्या हा सण प्रत्येक गावी दोन चार दिवसांच्या अंतराने साजरा होतो. या वेळी नृत्य करताना ते तोंडाला मुखवटे घालतात, हातात मोरपिसारा घेतात व पायात घुंगरू बांधतात. पावरा तरुणी नटून सजून त्या नृत्यात भाग घेतात. त्यांचे ते नृत्य स्त्री-पुरुषमिश्र व बेहोषीचे असते. या नाचाला बासरी व ढोल यांची साथ असते. याच वेळी तरुण–तरुणींचा निकट परिचय होतो व त्यातून त्यांची लग्नेही जमतात. अशा वेळी एखादा तरुण आपल्याला आवडलेल्या तरुणीला आपल्या घरी पळवून नेतो. मग त्याच्या मागे मुलीचा बाप तिथे जातो. नंतर गावचा पाटील व कारभारी यांच्या समवेत त्यांचे लग्न निश्चित होते. मुलाकडून मुलीच्या बापाला देज मिळते. लग्नाला मुहूर्त लागत नाही. कोणत्याही एका बुधवारी हळद लागते व गुरुवारी मुलाकडेच लग्न लागते.

काही वेळा भंगोऱ्या सणात विवाहित स्त्रीलाही पळवून नेले जाते. अशा वेळी त्या स्त्रीचा पती बलवान असेल, तर तो गुन्हेगाराला गाठून प्रसंगी त्याचा खूनही करतो; दुबळा असेल, तर पंचांकडे फिर्याद करतो. मग पंच निर्णय देतात. स्त्रीला पहिल्या नवऱ्याकडे जायचे नसेल, तर तिचा नवा नवरा पहिल्या लग्नाचा खर्च भरून देतो.

**ग्रामव्यवस्था**— पावरांचे गाव दहा बारा झोपड्यांचे असते. त्याला पाडा म्हणतात. प्रत्येक पाड्याला एक पाटील असतो. त्याची नेमणूक सरकारी नियमानुसार असते. प्रत्येक पाड्याला एक कारभारी असतो. हा सरकारनियुक्त व गावातला प्रतिष्ठित नागरिक असतो. पाटील व कारभारी वागतील त्याप्रमाणे सगळा पाडा वागतो.

**मृतिकप्रथा**— यांच्यांत मृत्यू होतो तेव्हा गवाल लोक वाद्ये वाजवून ती गोष्ट जाहीर करतात. मग आजूबाजूचे सर्व लोक तिथे जमतात. मग ते सर्व मिळून प्रेत स्मशानात नेऊन पुरतात. [ म. लो. मा. भाग ४; म. जि. – जळगाव ]

## पावशी देवी

एक ग्रामदेवता. ही आगरी लोकांची पाऊस पाडणारी देवता आहे. शंकराच्या मंदिरात एका बाजूला हिची मूर्ती बसविलेली असते. अवर्षण पडल्यास हिला मंदिरातून बाहेर काढून तिची पालखीतून मिरवणूक काढतात व ती तळ्यापर्यंत नेतात. मग गावचा पुढारी तिला खुणेने तळ्यात बुडवून ठेवतो. पाऊस पडू लागला, की पुन्हा तिला मंदिरात आणून मूळच्या जागी बसवतात.

## पावागड

एक देवीक्षेत्र. बडोद्यापासून पूर्वेस सुमारे २५ मैलांवर हा एक डोंगरी किल्ला आहे. मारुती द्रोणागिरी उचलून घेऊन जात असता त्या पर्वताचा जो एक तुकडा खाली पडला तो हा पावागड होय, अशी दंतकथा आहे. याची उंची सुमारे २८०० फूट आहे. गडावर महाकाली व भद्रकाली या दोन देवतांची मंदिरे आहेत. त्या दोघी बहिणी आहेत, असे समजतात. त्यांतली भद्रकाली ही थोरली व महाकाली ही धाकटी होय. पावागडावर लोक जातात ते विशेषे-

करून महाकालीच्या दर्शनासाठी. गडावर दुधिया नावाचा एक तलाव आहे. त्यात स्नान करून मग देवीच्या दर्शनाला जायचे, असा तिथला शिरस्ता आहे. तलावापासून मंदिरापर्यंत जायला २२५ पायऱ्या चढाव्या लागतात. ही देवी प्रकृतीने



महाकालीचे मंदिर– पावागड

सौम्य आहे. तिला पशुबली देत नाहीत. त्या भागातले ते एक जागृत देवस्थान समजले जाते.

प्रस्तुत गडाला अटका, बुढियाका व लालीका असे तीन मोठे दरवाजे आहेत. गडावर कित्येक भुयारेही आहेत. वर चढून गेल्यावर खापरा जव्हेरीची हवेली दिसते. खापरा हा इतिहासकाळातला एक महान लुटारू होता. त्याने तिथे एका उंच दरीच्या कडेवर सात ताळांचा महाल बांधला होता. सांप्रत त्याची पडझड झाली असली, तरी तशाही स्थितीत त्याची भव्यता लोपत नाही. प्राचीन काळी या गडावर विश्वामित्र ऋषींचा आश्रम होता. इथली देवीची मूर्ती विश्वामित्रानेच स्थापन केली, असे सांगतात. या गडावरून एक नदी उगम पावते, तिला विश्वामित्री म्हणतात.

गडाखाली जे गाव आहे, त्याला चांपानेर असे नाव आहे. जुन्या काळी ते एक भक्कम तटबंदीचे सुंदर नगर होते. त्यात ८४ मोहल्ले व ५२ बाजार होते, असे सांगतात. या सर्वांचे अवशेष आजही तिथे विखरून पडलेले आहेत.

इ. स. च्या १५ व्या शतकाच्या अखेरीस पाताई रावल नावाचा एक राजा चांपानेर आणि पावागड यांवर राज्य करीत होता. त्याचे राज्य समृद्ध व प्रगतिशील होते. एके दिवशी नियतीने पलट खाल्ली आणि चांपानेर होत्याचे नव्हते झाले. या संबंधीची कथा अशी–

नवरात्राचा उत्सव सुरू होता. राजवाड्याच्या चौकात राणीवशातल्या स्त्रियांनी रासोत्सव मांडला होता. त्या उत्सवात आपणही सहभागी व्हावे, असे महाकालीला वाटले आणि ती लेणी लुगडी लेवून त्या स्त्रियांच्या मेळाव्यात प्रकटली. एवढ्यात कुठून तरी पाताई राजा तिथे आला. त्याची नजर देवीवर पडली. तो तिच्या सुंदर रूपावर लुब्ध झाला. लगेच त्याने पुढे होऊन तिचा हात धरला. त्यामुळे महाकाली संतापली व तिने राजाला शाप दिला, की 'तुझ्या राज्याची धुळधाण होईल.' त्या सरशी त्या नगराला एकदम आग लागली. मग समस्त प्रजा देवीकडे येऊन ती आग शमविण्याविषयी देवीची प्रार्थना करू लागली. त्यावर देवी म्हणाली. 'आताची आग तुमच्यासाठी मी लगोलग शमवीन; पण थोड्याच काळात या राज्यावर यवनाची धाड कोसळेल व तुमचा पापी राजा राज्यभ्रष्ट होईल.'

आणि झालेही तसेच. थोड्याच दिवसांत म्हणजे इ. स. १४८४ साली महमूद बेगडा या सुलतानाने चांपानेरवर स्वारी करून पावागडासह पाताई रावलाचे राज्य जिंकून घेतले.

या क्षेत्राला सिद्धक्षेत्र असे मानतात. जैनांचेही हे पवित्र स्थळ आहे. तिथे पार्श्वनाथाचे मंदिर आणि रामपुत्र लव–कुशांची पदचिन्हे आहेत. लव – कुश हे शेवटी जैन बनले आणि याच गडावरून निर्वाणाला गेले, असे जैन परंपरा सांगते. [ वि. मुं. रा. प ; श्री. ज. ह. दवे– भारती, जून १९५९; जै. सा. इ. ]

## पावागिरी

एक जैन क्षेत्र. याला सिद्धक्षेत्र मानतात. हा डोंगर मध्य प्रदेशातील खरगोन जिल्ह्याच्या पश्चिमेला दहा मैलांवर असलेल्या ऊन नावाच्या गावाजवळ आहे. या गावात व डोंगरावर मिळून काही जैन मंदिरे आहेत. डोंगरावरचे मंदिर दगडी असून, त्याचा गाभारा व सभामंडप चांगल्या स्थितीत आहे. मंदिराच्या भिंती व खांब यांच्यावर खजुराहोच्या पद्धतीचे कोरीव काम आहे. त्यात स्त्री-पुरुषांच्या शृंगारदर्शक मूर्ती आहेत. काही मूर्तींवर इ. स. १२०१ चे लेख आहेत. इथून चार जैन मुनी निर्वाणाला गेले, अशी कथा आहे. [ जै. सि. भा., मार्च १९३९; भा. सं. जै. यो.; जै. सा. इ. ]

## पावापुरी

एक जैन क्षेत्र. दिगंबर व श्वेतांबर या दोन्ही संप्रदायांना मान्य असे हे क्षेत्र आहे. पापा किंवा अपापा या मूळ नावावरून हे नाव बनले आहे. हे स्थान पाटण्या-

हून ५८ मैलावर व पाटणा–राची मार्गावर आहे. गुणावापासून याचे अंतर १३ मैल आहे. पण या स्थानासबधी मतभेद आहेत. गोरखपूर जिल्ह्यातले पपौर हे गाव म्हणजेच पावापुर होय, असे राहुल सांकृत्यायन म्हणतात. हे गाव कुशीनाराच्या ईशान्येस १२ मैल असून गोरखपुराच्या पूर्वेस ३७ मैलावर आहे.

वयाच्या ७२ व्या वर्षी जैनाचा २४ वा तीर्थंकर महावीर याचे पावापुरी येथे निर्वाण झाले. त्या वेळी इथल्या षष्ठिपाल राजाच्या घरी तो राहिला होता. ज्या रात्री त्याचे निर्वाण झाले, त्याच रात्री नऊ मल्ल व नऊ लिच्छवी अशा १८ राजानी प्रोषधोपवास करून दीपोत्सव केला, असे कल्पसूत्रात म्हटले आहे. हा दिवस कार्तिक अमावास्येचा होता.

पावापुरीत पुढील तीन मदिरे विशेष उल्लेखनीय आहेत–

समवसरणमदिर – ज्या ठिकाणी महावीराने लोकांना अतिम उपदेश केला, त्या ठिकाणी हे बाधलेले आहे.

ग्राममदिर– हे मंदिर इतर सर्व मंदिरात मोठे व सुदर आहे. ज्या ठिकाणी महावीराचे प्राणोत्क्रमण झाले, त्या ठिकाणी



मुख्य जैन मंदिर – पावापुरी

त्याचा मोठा भाऊ नंदिवर्धन याने हे मदिर बांधले, असे म्हणतात. इ. स. १६४१ साली बिहारच्या श्वेतांबरी संघाने या मदिराचा जीर्णोद्धार केला.

जलमंदिर– हे विमानाच्या आकृतीचे अतएव वैशिष्टयपूर्ण आहे. हे एक मैल घेराच्या एका सरोवरात बांधलेले असून, घाटापासून मदिरापर्यंत जाण्यासाठी तलावात दगडी पूल बांधलेला आहे. महावीराचा दाहसंस्कार जिथे झाला, त्या जागी हे मदिर उभारण्यात आले आहे. असे सागतात, की महावीराच्या दाहसस्कारासाठी जे असंख्य लोक त्या ठिकाणी जमा झाले होते, त्यानी तिथली चिमूट चिमूट माती नेल्यामुळे जो एक मोठा खड्डा बनला त्याचेच पुढे हे सरोवर निर्माण झाले. जलमंदिरात महावीराच्या पादुका ठेवलेल्या आहेत. तिथेच महावीराच्या गौतम व सुधर्म या दोन शिष्याची पदचिन्हेही कोरलेली आहेत.

याशिवाय इतरही काही मदिरे त्या ठिकाणी आहेत. धर्मशाळा व दानशाळाही आहेत. महावीराच्या निर्वाणदिनी या ठिकाणी जैन लोकाची मोठी यात्रा भरते. [ जै. सा. इ ; टें. ली. बी ; ज. स्मा. ग्र.; हि. जॉ. ए इं.; जै. ध. ]

## पावैया

हिजडे किंवा तृतीय प्रकृती लोकांचा एक वर्ग. हे लोक गुजरातेत आढळतात. याच्यात हिंदू व मुसलमान असे भेद आहेत. हे लोक आपल्याला बहुचरा देवीची प्रजा मानतात. या वर्गाबद्दल एक दंतकथा आहे, ती अशी –

चंपानेर येथे वारिया नावाचा राजा होता. तो बहुचरा देवीचा भक्त होता. त्याच्या पोटी संतान नव्हते. पुढे देवीच्या कृपेने त्याला पुत्र झाला. राजाने त्याचे नाव जेटो ठेवले आणि त्याला बहुचरा देवीच्या सेवेला अर्पण केले. तो निपुत्रिक निपजला. एक दिवस देवीने जेटोला दृष्टांत देऊन सांगितले, की 'तू आपले जननेंद्रिय कापून टाक आणि स्त्रीवेष धारण करून राहा.' जेटोने तसे केले.

त्या दिवसापासून या वर्गात फक्त नपुसकांची भरती होते. पावैया हे बहुचरेची गाणी गाऊन भिक्षा मागतात.

एखाद्याला आपल्या वर्गात समाविष्ट करून घेताना हे लोक प्रथम त्याचे जननेंद्रिय कापण्याचा विधी करतात. इ. स. १८८० मध्ये गायकवाड सरकारने या विधीवर बंदी घातली. पाहा – हिजडा. [ मुं. इ. जा. ]

## पाश

एक प्राचीन शस्त्र. दोर किंवा दोरी वलयाकार करून व तिला सरकती गाठ मारून पाश बनवितात. धनर्वेदात पाश लोखंडी असावा व तो कसा बनवावा, याविषयी एक श्लोक दिला आहे, तो असा –

**पाशः सुसूक्ष्मावयवो लौहधातुस्त्रिकोणवान् ।**
**प्रादेशपरिधिः सीसगुलिकाभरणान्वितः ॥**

अर्थ – पाश हा लोखडी व त्रिकोणी असून त्याचे अवयव सूक्ष्म असावे. त्याचा परिधी प्रादेशमात्र असून त्याला शिशाच्या गोळ्या जडवलेल्या असाव्या.

समस्त पाश व व्यस्त पाश असे पाशाचे दोन प्रकार आहेत. ज्याची दोन्ही टोके एकमेकांना जोडलेली असतात, तो समस्त पाश व ज्याच्या एका टोकाजवळ लहानसा फास केलेला असतो. तो व्यस्त पाश होय. समस्त पाश फेकण्याचे एकूण अकरा हात असून, व्यस्त पाशाचे पाच आहेत.

पाशांचा उपयोग करणारा माणूस फार चपळ व सावध

असावा लागतो. त्याला घोडा, उंट, इ. पशूवर स्वार होऊन पाश फेकून धावते प्राणी पकडायचे असतात व ते काम अत्यंत अवघड असते.

पाश हे वरुणाचे प्रमुख आयुध आहे. यमाचा पाशही प्रसिद्ध आहे. वरुण समस्त व यम व्यस्त पाश वापरतो. गणपती व सरस्वती या दोन देवताही पाश धारण करतात. बौद्ध अवलोकितेश्वराच्या हातातही पाश असतो. बुद्धाच्या पदचिन्हातही पाशाचे चिन्ह आहे. [श क.; रि. इं.; प्रा. यु वि.]

## पाशुपतब्रह्मोपनिषद्

एक नव्य उपनिषद. हे शैव असून अथर्ववेदाशी संबद्ध आहे. हे गद्यपद्यात्मक आहे. वालखिल्याने विचारलेल्या प्रश्नाला उत्तर म्हणून ब्रह्मदेवाने हे उपनिषद सांगितले. याच्या शेवटी ४६ श्लोक अनुष्टुप छंदात असून, त्यात वेदान्ताची तत्त्वे सोप्या भाषेत सांगितली आहेत. या उपनिषदाचा साराश असा –

पशुपती शिव हाच परब्रह्म होय. सर्व सृष्टीचा कर्ता धर्ता तोच आहे. शरीरातील इंद्रियाच्या विविध कृती त्याच्याच प्रेरणेने होतात. इंद्रिये ही पशू असून शिव हा त्यांचा पालक म्हणजेच पशुपती आहे. तो मायाविरहित असून, अवर्णनीय परमप्रकाश आहे. साधकाने त्याला स्वतःच्या आत्म्याच्या ठिकाणी पाहायचे असते. पण मायेच्या प्रभावामुळे ते सर्वांनाच जमत नाही. त्यासाठी प्रथम चित्तशुद्धी व्हावी लागते. ती झाल्यानंतर क्रमाक्रमाने ज्ञानप्राप्ती होते ज्ञान प्राप्त झाल्यावर साधकाच्या हृदयग्रंथी तुटतात व त्याला विश्वस्वामित्वाची जाणीव होते. [श्री. सी. ग. देसाई]

## पाशुपतमूर्ती

शिवमूर्तीचा एक प्रकार. शिवाचे हे रूप उग्र असून, ते पाशुपत शैवाचे उपास्य आहे. शिल्पसार या ग्रंथात याचे मूर्तिध्यान पुढीलप्रमाणे सांगितले आहे – पंचमुख, द्विभुज, मुद्रा - कराल, भ्रुकुटी-भग्न, तीन्ही नेत्र - अग्निज्वालेसारखे लाल, एका हाती नरकपाल आणि दुसऱ्या हाताची वरदमुद्रा. [सा. इं. इ. गॉ. गॉ.]

## पाशुपतव्रत

एक काम्य व्रत. शुद्ध किंवा वद्य द्वादशीला या व्रताचा प्रारंभ करतात. व्रतविधी असा – व्रतकर्त्याने द्वादशीला एकभुक्त राहावे, त्रयोदशीला अयाचित मिळेल ते खाऊन राहावे आणि चतुर्दशीला नक्त भोजन करावे. पौर्णिमेच्या दिवशी सोने, चांदी किंवा तांबे यांची एक गायीची किंवा बैलाची मूर्ती करावी. त्या मूर्तीजवळ सोन्याच्या पानावर शिव–पार्वतीची मूर्ती स्थापावी. मग त्या सर्वांची पूजा करावी, शिवाची प्रार्थना करावी आणि गाय किंवा बैल यांची मूर्ती ब्राह्मणाला दान द्यावी.

महाभारतात शांतिपर्वाच्या २८४ व्या अध्यायात दक्षयज्ञविध्वंसनाचे आख्यान आले आहे. त्यात अग्नीतून शिव प्रकट झाला आणि दक्षाने १००८ नावांनी त्याची स्तुती केली, असे म्हटले आहे. त्याच वेळी शिवाने दक्षाला पाशुपतव्रत सांगितले. या व्रताची महती सांगताना शिव दक्षाला म्हणतो –

हे व्रत गूढ व अपूर्व आहे. ते सर्व वर्ण आणि सर्व आश्रम यांच्यासाठी खुले आहे ते मोक्षदायकही आहे. ते वर्णाश्रम धर्माशी काही बाबतींत जुळते आहे, तर काही बाबतीत नाही. ते चारही आश्रमातल्या लोकांना योग्य आहे आणि अत्याश्रमी लोकांनाही लायक आहे' (म भा. शांति. २८४.१९३-९४).

हे व्रत अन्य दोन–तीन प्रकारांनीही करता येते. फल – पापनाश व स्वर्गप्राप्ती. [श. क.; हि. ध.]

## पाशुपत संप्रदाय

एक प्रमुख व प्राचीन संप्रदाय. पशुपती अर्थात रुद्र–शिव हे या पंथाचे उपास्य दैवत आहे. यजुर्वेदाच्या रुद्राध्यायात शिवाला पशुपती म्हटले आहे अणि पुढे महाभारतातही पशुपती या स्वरूपातच त्याचे वर्णन आले आहे. त्यावरून प्रस्तुत संप्रदायाच्या प्राचीनत्वाबद्दलचा संकेत मिळतो. सगुण उपासनेत शिवरूप अधिक प्राचीन का विष्णुरूप अधिक प्राचीन हे सांगणे कठीण आहे रुद्र व विष्णू या दोन्ही वैदिक देवता आहेत. पुढे दशोपनिषदात परब्रह्माशी विष्णूचे तादात्म्य कल्पिले गेले, तर श्वेताश्वतर उपनिषदात ते रुद्राशी दाखविले गेले. रुद्र हा विश्वाचा एकमेव शास्ता असल्याचे श्वेताश्वतरात सांगितले आहे.

**यो देवानां प्रभवश्चोद्भवश्च विश्वाधिपो रुद्रो महर्षिः।**
**हिरण्यगर्भं जनयामास पूर्वं स नो बुद्ध्या शुभया संयुनक्तु ॥**

(श्वेताश्वतर ३·४)

अर्थ– रुद्र महर्षी हा देवांचा उत्पत्तिकर्ता व उत्पत्तिस्थान असून विश्वाचा अधिपती आहे. त्याने पूर्वी हिरण्यगर्भाला उत्पन्न केले. तो आम्हांला शुभ बुद्धीशी संयुक्त करो.

यजुर्वेदात रुद्राची विशेष स्तुती आहे आणि श्वेताश्वतर हे कृष्ण यजुर्वेदाचे उपनिषद आहे. त्यावरून यजुर्वेदाच्या काळापासून परमेश्वर या स्वरूपात शिवाची उपासना सुरू झाली असावी, असे दिसते. पांचरात्र हे प्राचीन वैष्णव मत असून, महाभारताने त्याच्या तोडीचे स्थान पाशुपत मताला दि' आहे या मतात संन्यासाश्रमाच्या वरची एक अत्याश्रमी अवस्था मानलेली आहे. या संज्ञेचा उच्चारही पहिल्याप्रथम श्वेताश्वतर उपनिषदातच झाला आहे, तो असा –

**तपःप्रभावादेव प्रसादाच्च ब्रह्म ह श्वेताश्वतरोऽथ विद्वान् ।**
**अत्याश्रमिभ्यः परमं पवित्रं प्रोवाच सम्यगृषिसङ्घजुष्टम् ।।**

अर्थ– नंतर विद्वान, श्वेताश्वतर ऋषी तपःप्रभाव व प्रसाद या दोन गुणांमुळे, अत्याश्रमी लोकाना ऋषिसंघाने सेवन केलेले परम पवित्र असे ब्रह्म सांगता झाला.

या अत्याश्रमी पाशुपतांचे वर्णन महाभारताच्या अनुशासन पर्वात आले आहे, ते असे –

**तेन सन्दिग्धसर्वाङ्गा भस्मना ब्रह्मचारिणः ।**
**जटिला मुण्डिता वाऽपि नानाकारशिखण्डिन. ।।**
**विकृताः पिङ्गलाभाश्च नग्ना नानाप्रकारिण· ।**
**भैक्षं चरन्त· सर्वत्र निःस्पृहा निष्परिग्रहाः ।।**
**मृत्पात्रहस्ता मद्भक्ता मन्निवेशितबुद्धयः ।**
**चरन्तो निखिलं लोकं मम हर्षविवर्धनाः ।।**

(म. भा. अनु. १४५.१२५०-५२ गीता प्रेस – गोरखपूर प्रत)

अर्थ– (शिव म्हणतो–) भस्माने ज्याची सर्व अंगे माखलेली आहेत असे ब्रह्मचारी, कोणी जटिल, कोणी मुंडित, कोणी भिन्न-भिन्न आकाराच्या शेंड्या धारण करणारे, पिंगलवर्ण, विकृत वेष धारण करणारे, नग्न, भिक्षाटनासाठी सर्वत्र फिरणारे, सर्व बाबतीत निस्पृह, संग्रहरहित, मातीची पात्रे धारण करणारे, माझे भक्त आणि माझ्या ठिकाणी बुद्धी ठेवणारे असे पाशुपत माझा हर्ष वाढवीत समस्त लोकात सचार करीत असतात

पाशुपत मताचा उगम वेदातील रुद्र–शिव परंपरेतून झाला आहे. वैदिक वाङ्मयात अग्नी व रुद्र यांचे ऐकात्म्य अनेक ठिकाणी आढळते. ' अग्निर्वै पशूनामीष्टे ' = अग्नी हा पशूचा अधिपती आहे, असे शतपथात म्हटले आहे. इतकेच नव्हे, तर सर्व पशू हे अग्निरूपच आहेत, असेही सांगितले आहे (श. ब्रा. ४. ३. ४. ११; ६.२. १.१२). ' प्राणाः पशवः ' = जे जे प्राणवान ते ते सर्व पशू होत, असेही वैदिक वचन आहे आणि ' पशवो हि यज्ञः ' = सर्व पशू हे यज्ञार्थ किंवा यज्ञरूप आहेत, असेही दुसऱ्या एका वैदिक वचनात म्हटले आहे. पाशुपत मताचे महत्त्व सांगणाऱ्या लिंग पुराणातही म्हटले आहे, की देव, असुर व मानव हे सारे पशूच होत ' (लिंग पु. १.७२.४२). जिथे जिथे अग्नी तिथे तिथे यज्ञ ही वैदिक कल्पना आहे. यज्ञ हा शरीररूपाने पशव्यचिती रचीत असतो, अशी यज्ञीय कल्पना आहे. याचा अर्थ सर्व शरीर ही यज्ञीय चितीच होय, असा होतो. यज्ञात व्रत आणि दीक्षा यांना प्राधान्य असते. पाशुपत मतातही त्याच दोन गोष्टीना प्राधान्य दिलेले आहे. अशा अनेक गोष्टींचा तुलनात्मक अभ्यास करून वैदिक पशुविद्याच पाशुपतांनी नव्या स्वरूपात मांडली आहे, असे प्रसिद्ध प्राच्यविद्या-पंडित वासुदेवशरण अग्रवाल सांगतात.

ब्राह्मणकालातच काही शैव पंथ निघाले होते. पण श्वेताश्वतर उपनिषदाच्या रचनेनंतर लवकरच पाशुपतांचा एक नवा पंथ उदयाला आला. त्याचे धर्मशास्त्र व तत्त्वज्ञान निराळे होते. श्वेताश्वतर उपनिषदाने व्रात्यांच्या तत्त्वज्ञानपद्धतीत पशू, पाश, इ. शब्द योजले होते. तेच शब्द उचलून पाशुपतानी आपले नवे दर्शन बनवले. पुढे ब्राह्मणानी पाशुपत मताला मान्यता दिल्यानंतर त्या मतात श्रौत, अश्रौत आणि मिश्र असे तीन प्रकार निर्माण झाले.

श्रौती पाशुपत हे वेदाधारे वर्तत, चातुर्वर्ण्य मानीत आणि सदर व्रत हे ब्राह्मणानीच आचरायचे व्रत असून इतराना त्याचा अधिकार नाही, असे समजत. नकुलीशाचे अनुयायी हे अश्रौत पाशुपत व तंत्रमार्गी हे मिश्र पाशुपत होत.

इ. स. १०५ च्या सुमारास नकुलीश किंवा लकुलीश नावाचा एक पुरुष गुजरातमध्ये उत्पन्न झाला. शिवाच्या अठरा अवतारामध्ये लकुलीशाला आद्य अवतार समजतात. याने पाशुपत संप्रदायाची नव्याने घडी बसवून त्याचे व्यवस्थित तत्त्वज्ञान निर्माण केले आणि तो संप्रदाय सर्वांना खुला केला. सर्वदर्शनसंग्रहकाराने त्याचेच तत्त्वज्ञान नकुलीशदर्शन या नावाने आपल्या ग्रंथात मांडले आहे

**पाशुपतदर्शन–** शैव सिद्धांतात पशू, पाश व पती हे मूलभूत त्रिक मानलेले आहे. पाशुपत मतालाही तेच आधारभूत आहे. पाशुपत मतानुसार पदार्थ पाच आहेत. कार्य, कारण, योग, विधी व दु.खान्त या पाच पदार्थांच्या अनुषंगानेच पशू, पाश व पती याचे त्यानी विवेचन केले आहे.

(१) कार्य– जे स्वातंत्र्यशक्तीने रहित अर्थात परावलबी, ते ते सारे कार्य होय. विद्या, कला आणि पशू असे कार्याचे तीन भेद आहेत.

विद्या हा जीव किंवा पशू याचा गुण आहे. विद्येचेही दोन भेद पडतात. एक बोधस्वभाव आणि दुसरा अबोधस्वभाव. बोधस्वभाव विद्येचेही विवेकप्रवृत्ती व अविवेकप्रवृत्ती असे दोन भेद आहेत. त्यांतील प्रत्येक प्रमाणाने व्यक्त होणारी जी विवेकवृत्ती तिला चित्त म्हणतात. पशूच्या विषयधर्मांना न जाणणारी जी विद्या, ती अबोधरूप होय.

कला ही चेतनाच्या अधीन असून स्वतः अचेतन असते. कार्य व कारण असे तिचे दोन प्रकार होतात. पृथिव्यादी पाच तत्त्वे व रूपादी पाच गुण यांचा समावेश कार्यरूप कलेत होतो. पाच ज्ञानेंद्रिये, पाच कर्मेंद्रिये व अंत.करणत्रय असे कारणरूप कलेचे तेरा प्रकार होतात.

कार्यकारणरूप कलेने बद्ध होऊन सदा विषयामध्ये परतंत्र असणाऱ्या जीवाला पशू म्हणतात. पशुत्व म्हणजे पारतंत्र्य

होय. पशूंचेही सांजन व निरंजन असे दोन भेद होतात.

(२) कारण – जगाचे उत्पत्ति-स्थिति-संहार करणारे आणि जगावर अनुग्रह करणारे ते कारण होय. यालाच पती असे म्हणतात. निरतिशय ज्ञान–क्रिया–शक्तींनी युक्त असणे हे पतित्वाचे लक्षण होय. पती हा पशूंचा पालक आणि परमेश्वर आहे. तो एक असूनही गुण आणि क्रिया यांच्या संबंधाने अनंत रूपात व्यक्त होत असतो. तो अनंत ऐश्वर्यांनीही संपन्न असतो. पती व आद्य असे त्याचे दोन मुख्य भेद आहेत.

(३) योग – चित्ताच्या द्वारा आत्मा व ईश्वर यांचा संबंध होणे हा योग होय. क्रियालक्षण व क्रियोपरमलक्षण असा तो दोन प्रकारचा आहे. जप, ध्यान, इ. रूप योगाला क्रियालक्षण व ज्ञान, निष्ठा, गती इ. रूप योगाला क्रियोपरमलक्षण म्हणतात. क्रियोपरम योगात सर्व क्रियाचा उपशम होऊन परमेश्वराच्या ठिकाणी एकनिष्ठ भक्ती, त्याच्या स्वरूपाचे ज्ञान व त्याची गती या गोष्टी प्राप्त होतात.

(४) विधी – धर्मार्थसाधक व्यापाराला विधी म्हणतात. तो प्रधान व गौण असा दोन प्रकारचा आहे. प्रधान हा साक्षात धर्माचा हेतू होतो. त्यालाच चर्या असे म्हणतात. व्रत व द्वार अशी दोन प्रकारची चर्या आहे. भस्मस्नान, भस्मशयन, उपहार, जप व प्रदक्षिणा असे पाच प्रकारचे व्रत आहे. याविषयी लकुलीशाने सांगितले आहे, ते असे–

त्रिकाल भस्मस्नान करावे. भस्मावरच शयन करावे. उपहार म्हणजे नियम होय. हसित, गीत, नृत्य, हुडुक्कार, नमस्कार व जप्य असा सहा प्रकारचा नियम आहे. कंठ व ओष्ठ यांना कंपित करून मोठ्याने ह ह ह ह असे हसणे, हे हसित. गांधर्वशास्त्राच्या नियमानुसार महेश्वराच्या गुणधर्मादी गोष्टींचे चिंतन करणे हे गीत. हात व अंगोपांगे यांनी हावभाव करणे ते नृत्य व जीभ व टाळू यांच्या संयोगाने बैलाच्या आवाजासारखा आवाज काढणे, हा हुडुक्कार होय.

चर्येचा द्वार नावाचा जो दुसरा प्रकार आहे, त्याचे क्राथन, स्पंदन, मंदन, शृंगारण, अवितत्करण व अवितद्‌भाषण असे सहा प्रकार आहेत. झोप न लागलेल्या पुरुषाने झोप लागल्याप्रमाणे दाखविणे, हे क्राथन; वात झाल्याप्रमाणे शरीरावयव कंपित करणे, हे स्पंदन; पाय दुबळे झाल्याप्रमाणे लंगडत चालणे, हे मंदन. कामिनीला पाहून आपण जणू कामुक झालो आहो अशा कल्पनेने कामचेष्टा करणे, हे शृंगारण; कार्याकार्यविवेकहीन पुरुषाप्रमाणे लोकनिंदित कर्म करणे, हे अवितत्करण आणि परस्परविरुद्ध अनर्गल व अनर्थक भाषण करणे, हे अवितद्‌भाषण होय.

अनुस्नान, भैक्ष्य, उच्छिष्टभोजन, निर्माल्यसेवन, लिंगधारण, इ. गुणभूत विधी चर्येच्या पहिल्या प्रकारच्या विधीवर अनुग्रह करणारे आहेत.

(५) दुःखान्त – दुःखाची आत्यंतिक निवृत्ती म्हणजे दुःखान्त होय. यालाच परमपुरुषार्थ किंवा मोक्ष असे म्हणतात. वर सांगितलेल्या योग आणि विधी यांच्या द्वारे मिथ्या ज्ञान, अधर्म, शक्तिहेतू, च्युती व पशुत्व या पाच मलांचा नाश करून हा दुःखान्तरूप मोक्ष सिद्ध होतो. या मोक्षाचा उपाय म्हणजे शिवाला शरणागती होय. पशुपतीच्या प्रसादाने मलांचा नाश होतो आणि जीवाला मुक्ती लाभते. हा दुःखान्त अनात्मक व सात्मक असा दोन प्रकारचा आहे. दुःखांची आत्यंतिक निवृत्ती म्हणजे अनात्मक होय. पारमैश्वर्यप्राप्ती हा सात्मक होय. या पारमैश्वर्य अवस्थेत अद्‌भुत ज्ञान आणि क्रियाशक्ती यांचा उदय होतो. ही अद्‌भुत ज्ञानशक्ती दर्शन, श्रवण, मनन, विज्ञान व सर्वज्ञत्व अशी पाच प्रकारची आहे. सूक्ष्म, व्यवहित आणि विप्रकृष्ट पदार्थांचे ज्ञान हे दर्शन, सर्व प्रकारच्या शब्दांचे ज्ञान हे श्रवण, सर्व विषयांचे ज्ञान हे मनन, समस्त शास्त्रांचे ग्रंथतः आणि अर्थतः परिज्ञान हे विज्ञान आणि ज्ञानशक्तीची पराकाष्ठा हे सर्वज्ञत्व होय. अद्‌भुत क्रियाशक्ती ही मनोजवित्व, कामरूपित्व व विकरणधर्मित्व अशी त्रिविध आहे. एखादे कार्य मनोगतीहूनही जलद करणे हे मनोजवित्व, विनासायास अभीप्सित रूप धारण करणे हे कामरूपित्व आणि इंद्रियांच्या साहाय्यावाचून सर्व पदार्थ जाणणे व सर्व कार्ये करणे हे विकरणधर्मित्व होय.

इतर शास्त्रे व पाशुपत मत यांची तुलना करताना श्री. द. वा. जोग यांनी जे विवेचन केले आहे, त्याचा सारांश असा–

इतर शास्त्रांत दुःखाची निवृत्ती हाच दुःखान्त आहे; पण पाशुपतात परमेश्वरभावाची प्राप्ती हा दुःखान्त आहे. इतर शास्त्रांत पूर्वी नसून पुढे होणारे ते कार्य असे म्हटलेले आहे. पण इथे नित्यपश्वादी हे कार्य आहे. इतर शास्त्रांत कारण सापेक्ष मानलेले आहे. म्हणजेच एका कार्याच्या अपेक्षेने जे कारण असते तेच त्याच्या कारणाच्या अपेक्षेने कार्य होते. पण पाशुपत शास्त्रात कारण म्हणजे एक निरपेक्ष परमेश्वरच होय. इतर शास्त्रांत योग हा कैवल्यादी फळ देणारा आहे; पण इथे तो परमेश्वरभावाच्या प्राप्तीने दुःखाचा अंत हे फळ देणारा आहे. इतर शास्त्रांत स्वर्गादी फले पुनर्जन्म देणारी आहेत; तर इथे परमेश्वराचे सामीप्य हे फल पुनर्जन्म न देणारे आहे. पाशुपतांनी त्यालाच मोक्ष म्हटलेले आहे.

अथर्वशिरस् हे पाशुपतव्रताचे वर्णन करणारे उपनिषद आहे, त्याचा सारांश असा–

पशुपती रुद्राचे ज्ञान होण्यासाठी साधकाने मिताहाराने राहावे. श्रवण व मनन सतत चालू ठेवावे. क्रोध व लोभ यांचा

त्याग करावा. रुद्रावर मन एकाग्र करावे. 'अग्निरिति भस्म, जलमितिभस्म ' या मंत्राने अंगाला भस्म लावावे आणि पाशुपतव्रत आचरून पाश तोडून टाकावा.

पाशुपत सूत्र नावाचा त्यांचा एक ग्रंथ असून तो नकुलीशाने लिहिला, असे समजतात. त्यावरचे कौडिन्याचे पंचार्थी भाष्य अधिकृत मानतात. याहून अधिक साहित्य उपलब्ध नाही. षड्दर्शनांपैकी वैशेषिक दर्शनाचा पाशुपतांशी संबंध आहे. न्यायवार्तिक ग्रथाचा कर्ता उद्योतकर याने पाशुपताचार्य या उपाधीने आपला परिचय दिला आहे.

पाशुपतांनी आपल्या पंथाच्या प्रसारार्थ सौर पुराण लिहिले. या पुराणाच्या रचनाकाली बौद्ध, जैन, कापालिक, तांत्रिक, इ. अनेक पंथ देशात वावरत होते. ते वेद व धर्मशास्त्र यांना मानीत नव्हते. ते शिवपूजेचीही हेटाळणी करीत होते. अशा वेदविरोधी शिवनिंदकांना बदनाम करण्यासाठी पाशुपतांनी अशी कथा रचली, की वरील सर्व पंथांचे लोक हे रक्तासुर नावाच्या दानवाचे अनुयायी आहेत.

याच सुमारास वैष्णव पंथाचाही देशात बराच प्रसार झाला होता. पाशुपतांना त्यांचीच भीती अधिक होती. पण त्यांनी वैष्णवांशी विरोधी भूमिका न घेता सामोपचाराचे धोरण स्वीकारले. त्यांनी विष्णूचे स्तवन करून अशा कथा निर्माण केल्या, की शिव हा सर्वश्रेष्ठ देव असून, विष्णू हा त्याचाच अंश आहे. सर्व देवांत विष्णूच शिवाला अधिक प्रिय असून, त्याच्या कृपेमुळेच विष्णूचे स्थान अढळ राहिले आहे.

नकुलीशानंतर सर्व वर्णांचे लोक या मतात आले आणि या पंथाचा प्रसार काश्मीरपासून म्हैसूरपर्यंत झाला. म्हैसूरजवळ बेलगामे हे नकुलीश पंथाचे महत्त्वाचे केंद्र होते. कलचुरी राजवंशातील अल्हणदेवी व नोहला राणी यांनी भेडाघाट येथे पाशुपत आचार्यांसाठी मठ बांधून दिले होते, असे उल्लेख कलचुरींच्या शिलालेखांतून सापडतात.

पाशुपत पंथाच्या तत्त्वज्ञानाचा व्यापक प्रभाव तमिळ शैवांवरही पडलेला दिसतो. पाशुपतांच्याच शाखा म्हणून दक्षिणेत कापालिक, कालामुख, भैरव, वीरशैव, रसेश्वर, इ. संप्रदाय विकसित झाले. पाशुपत मताला शाक्त मताशी जोडण्याचे काम सोम सिद्धांताने केले. शिवज्ञानबोधम हा तमिळ शैव मताचा सर्वांत अधिकृत ग्रंथ मानला जातो. त्यातल्या बारा सूत्रांत पाशुपत मताचे निदर्शन केले आहे.

प्रस्तुत मताचा प्रसार बृहत्तर भारतातही झाला होता. फाहियानने यवद्वीपात पाशुपत मत प्रचलित असल्याचा उल्लेख केला आहे. कंबोज आणि चंपा या देशांतही याचा प्रसार झाला होता असे कळून येते. [ हिंदुत्व; हिं. सा. को.; भा. वा. शा. प्र. वि.; रि. इं; न्यू इं. अँ., सप्टेंबर १९४३; वा. पु. स्ट.; पुराणम्–फेब्रुवारी, १९६०; भा. सं. सा.; प्रा. म. धा. इ. ]

**पाशुपतास्त्र** पशुपती शंकराचे अस्त्र म्हणून याला हे नाव मिळाले आहे. शिवाच्या हातातील त्रिशूळाला पाशुपतास्त्र म्हणतात. हे अस्त्र ज्वालारूप आणि संपूर्ण विश्वाचा नाश करण्यास समर्थ असते, असे सांगितले आहे.

देवी पुराणात या अस्त्राचे स्वरूपवर्णन केले आहे. त्यात त्याला महाकाय, पंचमुख, दशभुज, त्रिलोचन, ऊर्ध्वकेश, प्रलयाग्नीप्रमाणे तेजस्वी व भयोत्कट म्हटले आहे.

अर्जुनाने उग्र तप करून शंकराकडून पाशुपतास्त्र मिळवल्याची कथा महाभारतात ( वन. ४०·८–१५ ) आहे. कर्ण, भीष्म, कृप, द्रोण, यांच्यासारख्या महान योद्धयांशी युद्ध करून त्यांच्यावर विजय प्राप्त करावा, या हेतूने अर्जुनाने ते जगत्संहारक अस्त्र शंकराजवळ मागितले व शंकराने त्याला ते दिले. त्या प्रसंगी महादेव अर्जुनाला म्हणाला. ' हे माझे परमप्रिय पाशुपतास्त्र मी तुला देतो. ते धारण करायला आणि त्याचा उपयोग व उपसंहार करायला तू समर्थ आहेस. मात्र हे पार्था, तू अविचाराने कोणावर या अस्त्राचा उपयोग करू नकोस. अल्पशक्ती पुरुषावर जर तू हे अस्त्र वापरशील, तर ते सर्व जगाचा विनाश करील. हे अस्त्र धारण करणारा पुरुष केवळ आपली दृष्टी, मनःशक्ती, वाणी किंवा आपले धनुर्बाण, यांचा उपयोग करून शत्रूचा नाश करू शकेल.'

त्यानंतर शंकराने अर्जुनाला पाशुपतास्त्राचे रहस्य सांगितले व अर्जुनाने ते अस्त्र ग्रहण केले.

अनुशासन पर्वात (१४·२५८–२६५) पाशुपतास्त्राचे वर्णन केलेले आहे, ते असे– त्या अत्यंत भयंकर व दिव्य अस्त्राचे तेज सूर्याप्रमाणे किंवा प्रलयाग्नीप्रमाणे होते. त्याचे रूप सर्पासारखे असून त्याला सहस्र शिरे, सहस्र नेत्र, सहस्र जिव्हा व असंख्य दात होते. त्याच्या मुखातून अग्नीचा वर्षाव चालू होता. ब्राह्म, नारायणीय, ऐंद्र, वारुण, आग्नेय, या अस्त्रांपेक्षा ते अधिक शक्तिशाली होते. त्याच्या योगाने शंकराने एकच बाण मारून दैत्यांची तीन पुरे जाळून भस्म केली. चराचर सृष्टीसहित तीन्ही लोकांचे एका निमिषात भस्म करण्याचे सामर्थ्य त्या अस्त्रात होते. त्याला ब्रह्मा, विष्णू, इ. देवतांपैकी कोणीही अवध्य नव्हते. सर्व अस्त्रांत पाशुपतास्त्रच श्रेष्ठ होय. [ श.क. ]

**पाषाणचतुर्दशी** सूर्य वृश्चिक राशीत असताना येणाऱ्या शुक्ल पक्षातील चतुर्दशीला हे नाव आहे. या चतुर्दशीचे एक व्रत सांगितले असून, गौरी ही या व्रताची

देवता आहे. त्या दिवशी कणकेचे दगडासारखे दिसणारे गोळे तयार करून त्यांचा नैवेद्य देवीला दाखवायचा व सायंकाळी ते गोळे भक्षण करायचे, असा या व्रताचा विधी आहे. फल— अक्षय सौभाग्य प्राप्ती. [ग. क; हि. ध.]

**पाषाणपूजा** जगातील बहुतेक सर्व देशांत कोणत्या ना कोणत्या तरी स्वरूपात प्राचीन काळापासून पाषाणांची पूजा प्रचलित आहे. एखादी प्रचंड शिला, एखादा विस्तीर्ण खडक किंवा एखादा स्तंभाकृती उंच पाषाण पाहून मनुष्य आश्चर्यचकित होतो आणि त्या पाषाणात काहीतरी अद्‌भुत शक्ती असली पाहिजे, अशी कल्पना करून त्या शक्तीला संतुष्ट राखण्यासाठी त्या पाषाणाची पूजा–अर्चा करू लागतो.

भारतात अनेक जमातींत लहान लहान दगडगोटे किंवा दगडांचे ढीग यांची देव म्हणून पूजा करण्याची पद्धत आहे. अशा दगडांना शेंदूर फासून त्यांच्या ठिकाणी देवत्व आणतात. विशेष आकाराचे दगड किंवा खडक असले, की त्यांच्याविषयी काही दंतकथाही प्रचलित असतात. मनुष्य, पशू, राक्षस, यक्ष, किंवा अप्सरा यांना कोणाच्या तरी शापामुळे पाषाणाचे रूप प्राप्त झाले, असे बहुधा त्या दंतकथेत सांगितलेले असते. काही ठिकाणी उल्कापात होऊन एखादा विलक्षण रंगरूपाचा पाषाण जमिनीवर पडतो आणि मग लोक त्याचीही पूजा करतात. मक्का येथील काबा हा पाषाण असाच आहे, असे म्हणतात.

अनेक ठिकाणी दगडावर किंवा खडकावर काहीतरी छाप उठलेला असतो. तो छाप देवता, वीर पुरुष, साधुसंत, किंवा राक्षस यांच्यापैकी कोणाच्यातरी पायाचा किंवा हाताचा आहे, अशी लोक कल्पना करतात आणि त्याची पूजा करू लागतात. असले काही ठसे दिसले, की ते बुद्धाच्या हाताचे किंवा पायाचे आहेत, असे समजून बौद्ध लोक त्यांची पूजा करतात. युरोपात असले ठसे मेरीच्या किंवा संतांच्या हाता–पायाचे असल्याचे मानतात. एखाद्या सपाट दगडावर उंचवटा असला, की लोक त्याची स्वयंभू लिंग म्हणून पूजा करू लागतात. अनेक रानटी जमाती पाऊस पडावा किंवा सूर्यप्रकाश मिळावा, म्हणूनही पाषाणांची पूजा करतात.

एखाद्या दगडात भूत-पिशाचासारख्या अतिमानुष शक्तीचा वास आहे, अशा कल्पनेने आणि एखाद्या उपकारी दैवताचे स्थान म्हणूनही पाषाणपूजा प्रचलित आहे. द. भारतातील कुणबी लोक आश्विन पौर्णिमेला शेतातील सहा दगड वेचून त्यांना चुना व गेरूचे ठिपके लावतात आणि पाच पांडव व व कुंती म्हणून त्यांची पूजा करतात. म्हैसूरमधील शानार लोक दोन ओबड धोबड दगडांची देव आणि देवी म्हणून पूजा करतात. गुजरातमधील वेताळदेव व संभादियादेव, मध्य प्रदेशातील भैंसासुर, मुठियादेव, घटोइयादेव, खेडापती व खेडमाता ही सर्व पाषाण दैवतेच आहेत. उ. भारतातील खेडेगावात, ग्रामदेवता म्हणून एखाद्या वृक्षाखाली दगडांची रास रचलेली असते. कोल्हापूरचा जोतिबा व त्याची पत्नी यमाई यांचीही पाषाणप्रतीकेच आहेत.

काही देवतांची प्रतीके म्हणून विशिष्ट प्रकारच्या पाषाणांची पूजा करण्याची पद्धत उच्चवर्णीय लोकांतही रूढ झालेली आहे. द. भारतातील स्मार्त ब्राह्मणांच्या देव्हाऱ्यात शालग्राम, बाण–लिंग, लाल–पाषाण, खनिज धातूचा तुकडा व स्फटिक असे पाषाण असतात. ते अनुक्रमे विष्णू, शिव, गणेश, देवी व सूर्य यांचे प्रतीक मानलेले आहेत. स्वयंभू पाषाण विशेष पवित्र मानतात. अशा अनेक स्वयंभू मूर्ती आणि शिवलिंगे भारतात अनेक ठिकाणी आढळतात आणि ती जागृत समजली जातात.

याशिवाय आणखी काही प्रकारच्या पाषाणांचीही भारतात पूजा होते. भाद्रपदात ज्येष्ठा गौरी या नावाने नदीतले खडे आणून त्यांची पूजा करण्याची प्रथा कोकणस्थ ब्राह्मणांत आहे. सीमेबाहेरच्या भुताखेतांपासून गावाचे रक्षण व्हावे, म्हणून काही लोक सीमेच्या दगडांची पूजा करतात. त्या दगडांत सुंदी पेन्नू हा देव वास करतो, असे कांध लोक मानतात. गुजरातमधील लोक दगडावर घोड्याची आकृती कोरतात व त्याला खेत्रपाल असे म्हणतात. त्रिचनापल्लीच्या बाजूला सीमादेवीची पूजा करून तिला कोंबडा बळी देतात. म्हैसूरच्या बाजूला अशा दगडांवर शैव किंवा वैष्णव पंथाची चिन्हे कोरलेली असतात. द. भारतात ग्रामदेवतेची बरीचशी प्रतीके पाषाणरूपच आहेत. महामारी वगैरे साथीचे रोग आले असता, त्यांना कोंबडी-बकरी बळी देतात. तिकडील प्राचीन दुर्गाच्या प्रवेशद्वारात एक उभट गोल किंवा कोनाकृती दगड बसविलेला आढळतो. त्याला हद्दुराई असे म्हणतात. हाही ग्रामदेवतेचाच एक प्रकार आहे.

अनेक ठिकाणी मृताचे स्मारक म्हणून काही दगड ठेवलेले असतात. अंत्यसंस्कारात ज्या दगडावर पाण्याचे मडके फोडतात, त्याला अश्मा किंवा जीवखडा म्हणतात व दहा दिवसांचे क्रियाकर्मांतर तो जीवखडा पुढे ठेवूनच करतात. नंतर त्याचे नदीत विसर्जन करतात. [ एन्सा. रि. ए. ]

**पासी** एक द्रविड जमात. या लोकांची वस्ती बंगालमधील चोवीस परगणा, तसेच बिहार व मध्य प्रदेश या ठिकाणीही आढळते. परशुरामाने आपल्या काही खास कामासाठी आपल्याला निर्माण केले, अशी आपली उत्पत्ती हे सांगतात. त्यावरून ही एक प्राचीन व मिश्र जमात असावी, असे संशोधकांचे

मत आहे. गुजर, गुअल, अरख, खाटीक, बहेलिया, भिल्ल अशी त्यांची आडनावे आहेत. त्यांच्यात श्रेष्ठ–कनिष्ठ असे भेदही आहेत. राजपासी हे सर्वश्रेष्ठ मानले जातात. झाडांची कलमे करणे, खजूर तयार करणे, शेतमजुरी करणे व घरकाम हे त्यांचे व्यवसाय आहेत. याशिवाय हे पारध करतात व ताडीही काढत.

**विवाहप्रथा** – हे बालविवाहाला आदर्श विवाह मानतात. श्रावण वृक्षाला सात प्रदक्षिणा घालणे, ही त्यांची सप्तपदी होय. शेतीसाठी उपयोगी पडणाऱ्या सर्व वस्तू विवाहप्रसंगी वापराव्याच्या अशी त्यांची रूढी आहे. विधवेने धाकट्या दिराशी लग्न करणे शिष्टसंमत आहे. धार्मिक कृत्यांच्या पौरोहित्यासाठी हे ब्राह्मणांना बोलावतात.

पासी हे शाक्तपंथी आहेत. ते बंदी, गोरापा, राम ठाकूर, सोखा, इ. क्षुद्र देवतांनाही भजतात.

पासी या शब्दाचा जाळे अथवा दोर असा एक अर्थ आहे. ताडीच्या झाडावर चढताना हे लोक एका विशिष्ट दोराचा वापर करतात.

**मर्तिकप्रथा** – हे लोक मृतांना जाळतात; पण साथीने मेलेल्यांना मात्र पुरतात. पुरुषाचे मृताशौच दहा दिवस व स्त्रीचे नऊ दिवस पाळतात. अंत्यक्रिया बहिणीचा मुलगा करतो. [का. ट्रा स. इं.; से. इं., १९५१]

## पाळणा

एक गीतप्रकार. मुलाच्या बारशाच्या दिवशी त्याला पाळण्यात घालताना जी गीते म्हणतात, त्यांना पाळणे अशी संज्ञा आहे. राम–कृष्ण–दत्त यांच्या जन्मोत्सवप्रसंगी त्या त्या देवतांचे पाळणे म्हटले जातात. पाळण्याची गीते ही मुख्यत्वे राम–कृष्णपर असतात व तीच घरोघरी बारशाच्या निमित्ताने गायली जातात. घरात जन्मलेला पुत्र राम-कृष्णांसारखा आदर्शभूत व्हावा, अशी त्यामागे आकांक्षा असते. पाळण्याचा एक नमुना असा –

**जो जो जो जो रे श्रीरामा । निजसुख गुणविश्रामा ।।ध्रु.।।**
**ध्याती मुनियोगी, तुजलागीं । कौसल्याबोसंगी ।।**
**वेदशास्त्रांची, मति जाण । स्वरुपीं झाली लीन ।।**
**चारी मुक्तींचा विचार । चरणीं पाहती थोर ।।**
**भोळा शंकर, निशिदिनी । तुजला जपतो मनीं ।।**
**दास गातसे, पाळणा । राम–लक्ष्मणा ।।**

पाळणा हा अंगाई गीतांचाच एक प्रकार आहे.

## पाळिया

गुजरातेत व सौराष्ट्रात आढळणारे एक सामान्य शिल्प सौराष्ट्रात खेडेगावातील वेशीनजीक किंवा आसपास काही दगड पुरलेले असतात व त्यांवर शेंदूर फासलेला असतो. त्यांना पाळिया असे म्हणतात. आत्मबलिदान केलेल्यांची स्मारके असा त्या शब्दाचा अर्थ आहे. गावावर एखादे संकट किंवा परचक्र आल्यावेळी त्याच्या निवारणासाठी ज्या पुरुषांना मरण पत्करावे लागले, त्याचे ते स्मारक असते. सती गेलेल्या स्त्रीचाही पाळिया उभा करतात आत्महत्या केलेल्या स्त्रियांचेही पाळिये आढळतात. या पाळियांवर मृत्युदिन, वर्ष व काही वेळा मृत व्यक्तीचे नावही कोरलेले आढळते पाळियावर घोडेस्वाराचे चित्र कोरतात. त्याच्या हातात भाला व तलवार असते. क्वचित प्रसंगी हाती तलवार घेतलेला एखादा माणूसही कोरलेला असतो. महाराष्ट्र–कर्नाटकातल्या वीरगळांसारखेच हे पाळिये होत. [वि. मुं. रा. प.]

## पिंगल

(१) छंदःशास्त्राचा एक आचार्य वेदाचे पाचवे अंग जे छंद, त्यावरील छन्द.सूत्र हा ग्रंथ याने रचला आहे. हा ग्रंथ सूत्ररूप असून, त्याचे आठ अध्याय आहेत. यात आरंभापासून चौथ्या अध्यायाच्या ७ व्या सूत्रापर्यंत वैदिक छंदांची लक्षणे दिली असून, त्यानंतर लौकिक छंदांचे वर्णन केलेले आहे.

पिंगलाला पिंगलाचार्य किंवा पिंगलनाग अशीही नावे होती. हा नेमका कोणत्या काळात होऊन गेला, त्याबद्दल पुरेशी माहिती मिळत नाही. श्री. कीथने त्याचा मूळ काळ सनपूर्व २०० वर्षे असा ठरवला आहे. हा पाणिनीचा धाकटा भाऊ होता, असे छंदःसूत्राच्या भावप्रकाश टीकेत म्हटले आहे.

पिंगलाने आपल्या ग्रंथात क्रौष्टुकी, यास्क, काश्यप, गौतम, आंगिरस, भार्गव, कौशिक, वसिष्ठ, सैतव, इ. आचार्यांचा उल्लेख केला आहे. [प्रा. च. को.; वै. सा सं.]

(२) एक जात. आयोगव स्त्री व ब्राह्मण पुरुष यांच्या संततीला हे नाव असल्याचे सूतसंहितेत म्हटले आहे [हि ध]

## पिंगल भाषा व साहित्य

पूर्वी पिंगल शब्द छंदःशास्त्र अशा अर्थाने प्रचलित होता पण इ. स. च्या १८ व्या शतकापासून पिंगल शब्दाचा भाषा या अर्थी प्रयोग होऊ लागला. गुरू गोविंदसिंगाच्या विचित्रनाटक या ग्रंथात पिंगल शब्दाचा भाषा या अर्थी पहिल्या प्रथम प्रयोग केलेला आढळतो. त्यानंतर राजस्थानातील चारण कवींनी त्याचा अनेकवार प्रयोग केला आहे. सांप्रत पिंगल शब्दाच्या अर्थात थोडा बदल झाला आहे. आता पिंगल शब्द राजस्थानीमिश्रित व्रजभाषा या अर्थी योजतात आणि व्रजभाषेला शुद्ध व्रजभाषा असे म्हणतात.

पिंगल आणि डिंगल या दोन भाषांत काही साम्य असल्या-

मुळे काही लोक पिंगल भाषेलाच डिंगल भाषा म्हणतात. पण या दोन भाषांत फरक आहे. पिंगल भाषेत व्रजभाषा व राजस्थानी या दोन्ही भाषांची वैशिष्टये आढळतात; तर डिंगल भाषेत केवळ मारवाडी व्याकरणाचे अनुकरण केलेले दिसते.

पिंगल भाषेत व्रजभाषेचा अंश किती आणि राजस्थानीचा अंश किती, हे निश्चित नाही. ते त्या त्या कवीच्या इच्छेवर आणि अभ्यासावर अवलंबून असते. उदा० पृथ्वीराज रासो या काव्यात राजस्थानीपेक्षा व्रजभाषेची वैशिष्टये अधिक प्रमाणात आढळतात; तर सुरजमलकृत वंशभास्कर या ग्रंथात राजस्थानीची वैशिष्टये अधिक दिसतात.

राजस्थानात पिंगल भाषेत विपुल साहित्य रचलेले आहे. पण त्यांपैकी फारच थोडा भाग प्रकाशित झाला आहे. विषयाच्या दृष्टीने समस्त पिंगल साहित्याचे वर्गीकरण पुढील प्रमाणे करता येईल.

(१) **चरित्रकाव्य** – याचे रासो काव्य व अन्य काव्य असे दोन भेद आहेत. रासो काव्यात पृथ्वीराज रासो व खुमाण रासो हे ग्रंथ फार प्रसिद्ध आहेत. अन्य काव्यात राजविलास, सुजानचरित्र, वंशभास्कर, इ. ग्रंथ प्रसिद्ध आहेत.

(२) **पौराणिक काव्य** – अशा काव्यांतील विषय पुराणांतून व महाभारतातून घेतलेले असतात. भाषासौंदर्य, रचना आणि वर्णनशैली या दृष्टींनी ही काव्ये चांगल्या दर्जाची आहेत. अवतारचरित्र, वीरविनोद, इ. ग्रंथ या प्रकारात मोडतात.

(३) **भक्तिकाव्य**– याचे रामभक्तिकाव्य, कृष्णभक्तिकाव्य व निर्गुणभक्तिकाव्य, असे तीन प्रकार आहेत. नरहरिदासाचे अवतारचरित्र व प्रतापकुंवरीचे रामगुणसागर हे ग्रंथ तुलसीरामायणावर आधारलेले आहेत.

कृष्णभक्तिकाव्यात अष्टछाप कवी, कृष्णदास पयहारी, मीराबाई, नागरीदास, इ. कवींच्या रचनांचा समावेश होतो.

निर्गुण भक्तिकाव्य हे दादू पंथ, चरणदासी पंथ, रामसनेही पंथ, इ. पंथांतल्या संत-महात्म्यांच्या वाणींच्या रूपात मिळते. या वाणींवर कबिराच्या साहित्याचा बराच प्रभाव आहे.

(४) **रीतिकाव्य**– पिंगल साहित्यात रीतिकाव्ये बरीच असून, ती शृंगाररसाने परिपूर्ण आहेत. रीतिसाहित्याचा प्रथम कवी जान हा मुसलमान होता. त्याने रसमंजरी, रसकोष, भावशतक, इ. ग्रंथ रचले आहेत. त्यानंतर या विषयावर अनेक ग्रंथ रचले गेले. त्यांपैकी महाराजा जसवंतसिंहकृत भाषाभूषण, कुलपती मिश्राचा रसरहस्य, सोमनाथाचा रसपीयूषनिधी, इ. ग्रंथ विशेष प्रसिद्ध आहेत.

(५) **नीतिकाव्य**– या विषयावर काव्य लिहिणारा प्रमुख कवी म्हणजे वृंद हा होय. त्याच्या सतसई या ग्रंथांत नीती व व्यवहार यांचे सुरस वर्णन आहे. त्याच्या नंतर उमेदराम, प्रतापसिंह, बालाबख्श, इ. कवींनी नीतिविषयी ग्रंथ रचले आहेत.

(६) **फुटकळ काव्य** – यात संगीत, कोश, शकुन, वैद्यक, वृष्टी, रमल, रत्नपरीक्षा, स्तोत्र, इ. विषयांवरील ग्रंथांचा समावेश होतो. [ रा. पिं. सा.; रा. भा. सा. ]

## पिंगला

योगशास्त्रात वर्णिलेली एक नाडी. हिला सूर्यनाडी असेही नाव आहे. ही इडेच्या डाव्या बाजूला असते. हिचा रंग लाल-पांढरा असतो. ही मेरुदंडाच्या उजव्या बाजूने उठते आणि सुषुम्नेला लपेटून वर जाते व शेवटी नाकाच्या उजव्या बाजूला समाप्त होते.

सूर्य ज्याप्रमाणे जीवाला कार्यक्षेत्राकडे प्रचोदित करतो, त्याप्रमाणे पिंगला नाडी जीवाला बाह्य क्रिया करायला प्रवृत्त करते. पिंगलेच्या क्रियाकालात स्नान, भोजन, मैथुन, युद्ध, इ. राजस कर्मे केली जातात. पिंगला ही सूर्याची म्हणजे विष्णूची पालनशक्ती आहे. ती जाग्रदवस्थेची द्योतक आहे. जीवाला अर्धनारीश्वराचे प्रतीक मानून, देहाच्या डाव्या भागात चंद्रतत्त्व आणि उजव्या भागात सूर्यतत्त्व आहे, हे दर्शविण्यासाठी बहुधा इडेला डाव्या नाकपुडीतील आणि पिंगलेला उजव्या नाकपुडीतील प्रवाह असे म्हटले असावे. पिंगलेची गती केंद्रातिग आणि इडेची केंद्रानुग असते. [ श. क.; हिं. सा. को.; पूजातत्त्व ]

## पिंगळी सूरण्णा

(इ. स. चे १६ वे शतक) विजयनगरच्या कृष्णदेवरायाच्या दरबारातील अष्ट दिग्गज कवींपैकी एक. हा आपस्तंब सूत्राचा नियोगी ब्राह्मण होता. त्याच्या बापाचे नाव अमरण्णा व आईचे अंबम्मा होते.

याने कळापूर्णोदयमू, गरुडपुराण, राघवपांडवीय, प्रभावतीप्रद्युम्न, इ. काव्ये लिहिली. कळापूर्णोदयमू हे अष्टसर्गात्मक प्रबंधकाव्य असून, उत्कृष्ट काव्यात याची गणना होते. हे काव्य त्याने कृष्णरायाला अर्पण केले आहे. राघवपांडवीय हे द्व्यर्थी काव्य आहे. तेलुगू भाषेतील हे पहिले द्व्यर्थी काव्य होय. हे काव्य त्याने अकविडू येथील पेद्दा व्यंकटाद्री याला अर्पण केले आहे. प्रभावतीप्रद्युम्न या काव्यात त्याने नाटकाच्या धर्तीवर विविध प्रसंगांचे चित्रण केले आहे. तेलुगू साहित्यात पिंगळी सूरण्णा हा तिक्कन्नाच्या तोडीचा कवी मानला जातो. कल्पनाविलास व रचनाकौशल्य या गुणांत पेद्दन्नासारखे सिद्धहस्त कवीही याची बरोबरी करू शकत नाहीत. पाहा– कळापूर्णोदयमू.
[ वि. स्मा. ग्रं.; ते. वा. ]

**पिंगळे** भिक्षेकऱ्यांची एक जात. यांची वस्ती महाराष्ट्रात आढळते. हे लोक पिंगळा नावाच्या पक्ष्याच्या साहाय्याने भविष्य सांगतात, म्हणून त्यांना हे नाव मिळाले असावे. हे कमरेला व डोक्याला वस्त्र गुंडाळतात, अंगात लांब अंगरखा व जाकीट घालतात आणि त्यावर एक उपरणे घेतात. हे कपडेही त्यांनी भिक्षा मागूनच मिळविलेले असतात. रस्त्याच्या कडेला बसून अथवा दारोदार हिंडून हे भिक्षा मागतात व भविष्य सांगतात. त्यांचा भुताखेतावर, शुभाशुभ शकुनांवर व आकड्यांवर विश्वास असतो. [ बा. बे. क्रा. ]

**पिंगा** मुलींचा एक खेळ. हा खेळ एकेकटीचा असला, तरी एका वेळी अनेक मुली मिळून तो खेळतात. यात दोन्ही हात कमरेवर ठेवून पायात अंतर ठेवायचे असते आणि



पिंगा

कमरेखालचा भाग न हालवता फक्त वरच्या भागाला प्रदक्षिणाकृती गती द्यायची असते. प्रथम कमरेपासून डोक्यापर्यंतचा भाग पुढे करतात. तो जमिनीशी समांतर ठेवतात. नंतर उजवी, मागची व डावी बाजू या क्रमाने वर्तुळाकार फिरतात. पिंगा घालीत असताना खालील गाणे म्हणतात–

**पिंगा बाई पिंगा चवळीच्या शेंगा ।**
**चवळीच्या शेंगेला दाणाच नाही ।**
**मामाच्या लेकीला नाकच नाही ।**
**माझा पिंगा गेला खडकी ।**
**विसरला फडकी । माझा पिंगा ।।**
**माझा पिंगा गेला दुरी ।**
**आणल्या तुरी । माझा पिंगा ।।**
**माझ्या पिंग्याला झाली दृष्ट ।**
**उतरा पीठ । माझा पिंगा ।।**

मंगळागौर, हरतालिका या व्रतांच्या प्रसंगी हा खेळ खेळण्याची महाराष्ट्रात पद्धत आहे. या खेळाने कमरेच्या स्नायूंना व पोटाला चांगला व्यायाम होतो. [ व्या ज्ञा. को. ]

**पिंजारी** धंद्यावरून बनलेली एक जात हे लोक कापूस पिंजण्याचा धंदा करतात. यांची वस्ती प्रामुख्याने महाराष्ट्रात आढळते. पिंजण म्हणजे कापूस पिंजण्याची धनुकली, या शब्दापासून पिंजारी शब्द बनला आहे. या जातीला धनुकपठाणी असेही म्हणतात. यांच्यांतील काही लोक पलंग विणण्यासाठी नवार तयार करतात; त्यांना नवारी म्हणून ओळखतात. या जातीत हिंदू व मुसलमान अशा दोन्ही धर्मांचे लोक असून मुसलमान पिंजारी संख्येने जास्त आहेत. हे लोक कापूस पिंजून गाद्या, उश्या, रजया, इ. वस्तू तयार करतात. काही शेतमजुरीही करतात.

**हिंदू पिंजारी** – यांची सहा कुळे प्रसिद्ध आहेत, ती अशी– (१) वर्लासकर (२) जाधव (३) खानेल (४) खैरनार (५) सानोई व (६) ठाकरे.

हे लोक समान कुळांत विवाहसंबंध करीत नाहीत. दोघे भाऊ दोघी बहिणींशी विवाहबद्ध होऊ शकतात. मुलाच्या पित्याकडून मुलीला मागणी घातली जाते व मुलीसाठी देज द्यावे लागते. स्थानिक कुणबी लोकांच्या लग्नपद्धतीप्रमाणे यांची लग्ने होतात. आराई आणि बोरी यांच्या फांद्या ही यांची देवके होत. फांद्या लग्नमंडपाला बांधतात. त्याबरोबरच घुसळण्याची रवी, लाकडी मुसळ आणि पुरणपोळीही खांबाला बांधतात. विधवाविवाह रूढ आहे. एखाद्या प्रथमवराला विधवेशी विवाह करायचा असेल, तर तो पहिल्याने एका अंगठीशी लग्न लावतो.

हे लोक खंडोबा, देवी आणि बहिरोबा या देवतांना भजतात. यांचे पौरोहित्य ब्राह्मण करतात. हे मृतांना जाळतात.

**मुसलमान पिंजारी** – हे लोक मूळचे हिंदू होते, पण औरंगजेबाच्या वेळी बाटून मुसलमान झाले. त्यांची राहणी कुणब्यासारखी असते. गुजरातमध्ये त्यांना नाडफ आणि ताई असे म्हणतात. काही ठिकाणी या लोकांनी शेख, सय्यद, पठाण अशी नावे धारण केली आहेत. ते इतर मुसलमानांशी रोटीव्यवहार करतात; पण बेटीव्यवहार करीत नाहीत. हे शाकाहारी असून, हिंदू देव-देवतांना भजतात; हिंदूंचे सर्व सणही पाळतात. यांच्या पुढाऱ्यांना मेहेतर पाटील किंवा चौधरी म्हणतात. ते जमातीतील तंटेबखेडे मिटवितात. यांच्यांत हिंदू-मुसलमान या उभय जातीपासून एक मिश्र जात उत्पन्न झाली आहे, तिला वाना

म्हणतात. बाना लोक पिराची पूजा करतात व कापसाचे पीक



पिंजारी

हाती आले, की नव्या कापसाला पिंजण्याच्या धनुकलीजवळ ठेवून त्याला मलिद्याचा नैवेद्य दाखवतात.

स्त्री प्रसूत झाल्यापासून चाळीस दिवस तिला अपृश्य मानतात. मुलाचे जावळ दहाव्या दिवशी करतात, त्याला झालर म्हणतात. काही लोक शेख फरीद या संताच्या नावाने मुलांचे केस वाढवतात. [ का. ट्रा. स. इं.; सु. वि. को. ]

**पिंडदान** प्रेताला अथवा पितरांना उद्देशून जो सातूच्या पिठाचा किंवा भाताचा गोळा देतात, त्याला पिंड म्हणतात. हा शब्द निरुक्त (३.४) व लाटचायन श्रौतसूत्र (२.१०.४) यांत आलेला आहे. पिंडाची व्याख्या अशी – ' परस्परसंश्लेषाद्विभागं परित्यज्यासङ्घाततां प्राप्तमन्नं पिण्डः ' = परस्परांशी पूर्ण मिसळल्यामुळे विभक्तपणा टाकून संघातरूपाला प्राप्त झालेले (गोळा झालेले) अन्नाचे कण म्हणजे पिंड होय.

श्राद्धप्रसंगी पितरांच्या नामगोत्रांचा उच्चार करून पिंडदान करतात. प्रेताला फक्त त्याच्याच एकाच्या उद्देशाने पिंड देतात, तर पार्वण, सांवत्सरिक, इ. श्राद्धांत पिता, पितामह व प्रपितामह या त्रयीला उद्देशून तीन पिंड देतात.

श्राद्धात ब्राह्मणपूजनानंतर, अग्नौकरणानंतर, ब्राह्मणभोजनानंतर, विकिरदानानंतर, स्वधाशब्दोच्चारानंतर किंवा ब्राह्मणांना निरोप दिल्यानंतर पिंडदान करावे, असे सहा पक्ष स्मृतीत सांगितले आहेत. शाखाभेदाने त्यांची व्यवस्था समजावी. श्राद्धासाठी केलेल्या स्वयंपाकातल्या सर्व पदार्थातला थोडा थोडा अंश अग्नौकरणाच्या चरूत मिसळून व त्यात तिळ, मध व तूप घालून पिंड बनवावे. पित्याच्या पिंडाहून मोठा पितामहाचा व त्याहून मोठा प्रपितामहाचा पिंड असावा, असे एक मत आहे. पार्वण श्राद्धातले पिंड आवळ्याएवढे, एकोद्दिष्टातले बेलफळाएवढे व नवश्राद्धातले सर्वात मोठे असावे. दक्षिणाभिमुख होऊन पिंडदान करावे. साग्निकाने अग्नीच्या समीप व अनग्निकाने ब्राह्मणांच्या समीप पिंड द्यावे.

त्यासाठी प्रथम भूमीचे प्रोक्षण करावे. मग त्या भूमीवर दर्भाने एक रेषा काढावी. त्या रेषेवर तीन वेळा उदक द्यावे. तिच्यावर साग्र दर्भ पसरावे. त्या दर्भावर पिता, पितामह व प्रपितामह अशा क्रमाने एका ओळीत नामगोत्रांचा उच्चार करून ' स्वधा नमः ' असे म्हणून पिंड द्यावे. पितरांची नावे माहीत नसल्यास ' स्वधा पितृभ्यः पृथिवीषद्भ्यः ' या मंत्राने पहिला, ' स्वधा पितृभ्योऽन्तरिक्षसद्भ्यः ' या मंत्राने दुसरा व ' स्वधा पितृभ्यो दिविषद्भ्यः ' या मंत्राने तिसरा असे पिंड द्यावे. गोत्र माहीत नसल्यास काश्यप गोत्र उच्चारावे. महालयात तीर्थश्राद्धात, तसेच माघमासी किंवा मघा नक्षत्रावर केलेल्या श्राद्धात पितृत्रयी, मातृत्रयी, मातामहादित्रयी, मातामह्यादित्रयी, तसेच पुत्र, पत्नी, कन्यापुत्र, सहोदर, आचार्य, गुरू, शिष्य इत्यादींना पिंड द्यावे, असे सांगितले आहे.

मग पिंडपितृयज्ञात सांगितल्याप्रमाणे पिंडपूजा करावी. पूजेत श्राद्धपाकाचा नैवेद्य दाखवून व नमस्कार करून पिंडांचे उद्वासन करावे. मग त्यांचे विसर्जन करावे. पिंडविसर्जनाविषयी अनेक मते आहेत, ती अशी –

पिंड पाण्यात किंवा अग्नीत विसर्जित करावे अथवा ब्राह्मणाला, गाईला किंवा बकऱ्याला द्यावे अथवा वारुळाजवळ नेऊन टाकावे. काहींच्या मते पहिला पिंड कर्त्याने व दुसरा पिंड त्याच्या पत्नीने भक्षण करावा आणि तिसरा पिंड पाण्यात टाकावा. तीर्थश्राद्धातील पिंड तीर्थात विसर्जित करावे.

**पिंडदानाचे अधिकारी** – औरस पुत्र हा पिंडदानाचा अधिकारी होय. हेमाद्रीच्या मते औरस पुत्र नसेल तर दत्तक पुत्राला, त्याच्या अभावी नातवाला आणि त्याच्याही अभावी पणतवाला तो अधिकार आहे. या सर्वांच्या अभावी मृत पुरुषाच्या पत्नीला पिंडदान करता येते. सहोदर बंधूला आणि तोही नसेल तर सपिंड व समानोदक पुरुषांना पिंडदानाचा अधिकार पोचतो. **पाहा** – पिंडपितृयज्ञ, श्राद्ध. [ हि. ध.; नि. सि. ]

**पिंडपितृयज्ञ** पितरांच्या तृप्तीसाठी करायचा एक यज्ञ. याची व्याख्या सत्या. सू. २.७ वरील टीकेत केली आहे, ती अशी –

' पिण्डैः पिण्डदानेन सहितः पितृभ्यो देवेभ्यो यज्ञो होमः स

पिण्डपितृयज्ञः ' = पिंडांनी अर्थात पिण्डदानाने युक्त असा पितर व देव यांच्यासाठी केलेला यज्ञ अर्थात होम तो पिंडपितृयज्ञ होय. काही शास्त्रकारांच्या मते हा यज्ञ दर्शेष्टीचे एक गौण अंग आहे; पण जैमिनी म्हणतो, की तो स्वतंत्र याग आहे ( जै. ४.४.१९). हा यज्ञ केव्हा करावा, याविषयी कात्यायन म्हणतो, 'अपराण्हे पिण्डपितृयज्ञश्चन्द्रादर्शनेऽमावास्यायाम् ' = ज्या दिवशी चंद्र पूर्णपणे अदृश्य असतो, अशा अमावास्येच्या दिवशी अपराण्हकाली पिंडपितृयज्ञ करावा (४.११९). आपस्तंबाच्या मते तो अपराण्ही अथवा सूर्याचे किरण वृक्षांच्या शेंड्यावर जातात, त्या वेळी करावा (१.७.३.४). या यज्ञाचा प्रयोग असा –

कर्त्याने देशकालाचा उच्चार करून ' पितृतृप्तिद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं पिण्डपितृयज्ञं करिष्ये' असा संकल्प करावा.' आग्नेयीकडे मुख करून अग्निध्यान करावे. आग्नेयी दिशेस अग्रे होतील अशा दर्भांनी परिस्तरण व पर्युक्षण करून अग्नीच्या ईशान्येस किंवा वायव्येस आग्नेयीकडे अग्रे होतील, अशा प्रकारे दर्भ पसरावे. त्यांवर स्थाली, सूप, स्फ्य (लाकडी तलवार), उखळ, मुसळ, स्रुवा, ध्रुवा, कृष्णाजिन, बर्ही, इध्मा, मेक्षण (मेखसू) व कमंडलू ही पात्रे स्थापावी. सुपात स्थाली ठेवून त्यात भात भरावे. मग यजमानपत्नीने ते भात उखळात घालून मुसळाने सडून त्याचे तांदूळ करावे. मग दक्षिणाग्नीवर त्या तांदुळाचा चरू शिजवावा. अग्नीतून एक पेटते कोलीत उचलून ' ये रूपाणि ..' हा मंत्र म्हणून अग्नीच्या आग्नेयीस न्यावे. मग आग्नेयीकडे संपणारी एक स्पष्ट रेषा स्फ्यने दक्षिणाग्नी व गार्हपत्य यांच्यामध्ये काढावी. तिच्यावर उदकसिंचन करून बर्ही पसरावे. एका पात्रात तूप ओतून त्याच पात्राने ते ध्रुवेमध्ये घालावे. नंतर त्या तुपाने चरूवर अभिघार करावा. तो चरू अग्नीच्या पश्चिम भागी बर्हीवर ठेवावा. काजळ, तेल, इ. आवश्यक वस्तू अग्नीच्या दक्षिणेस ठेवाव्या. अग्नी प्रज्वलित करावा. प्राचीनावीती करून इध्म्याचे अग्नीत अमंत्रक हवन करावे. तुपाने मेक्षणावर उपस्तरण करून मेक्षणाने चरू दोन वेळा घ्यावा. त्यावर अभिघार करावा. मग ' सोमाय पितृमते स्वधा नमः ।' 'अग्नये कव्यवाहनाय स्वधा नमः ' या मंत्रांनी अग्नीत त्या चरूच्या दोन आहुती द्याव्यात. सव्य करून मेक्षण अग्नीत टाकावे. पुन्हा अपसव्य करावे. आखलेल्या रेषेवर आदी, मध्य व अंत या तीन ठिकाणी अनुक्रमे ' शुन्धन्तां पितरः शुन्धन्तां पितामहाः शुन्धन्तां प्रपितामहाः ' असे म्हणून जलसिंचन करावे. त्या रेषेवर पिता, पितामह व प्रपितामह यांच्यासाठी ओळीने तीन चरुपिंड ठेवावेत. ' अत्र पितरो मादयध्वम् ' या मंत्राने त्या पिंडांचे अनुमंत्रण करावे. डाव्या बाजूने वळून व श्वास रोधून पिंडांपैकी राहिलेल्या चरूचे अवघ्राण करावे. मग त्या चरूचा त्याग करावा. ' शुन्धन्ताम् ' इ. मंत्रांनी पिंडांवर जलसिंचन करावे. त्यांना तेल व काजळ लावावे. वस्त्राचा पदर किंवा सुताचा तुकडा किंवा कर्त्याच्या वयाला पन्नास वर्षे झाली असल्यास त्याच्या मनगटावरचा एक केस पिंडांना वाहावा. पिंडांची पूजा करावी. ' नमो वः पितरः ' इ. मंत्रांनी पिंडांचे उपस्थान करावे. दक्षिण दिशेकडे थोडे चालावे. पिंडांचे उद्वासन करावे. मग अग्नीजवळ यावे. ' वीरं मे दत्त पितरः ' म्हणून मधला पिंड पत्नीला भक्षण करण्यास द्यावा. बाकीचे दोन पिंड उदकात सोडावे किंवा खोल खळग्यात टाकावे. ज्याला क्षय किंवा महारोग असेल, त्याने ते दोन्ही पिंड भक्षण केल्यास तो रोगमुक्त तरी होईल किंवा मृत्यू पावेल, असे सांगितले आहे. मग मांडलेली पात्रे जोडीजोडीने उत्सर्जित करावी. शिल्लक एक राहिल्यास त्याचा तृणासह उत्सर्ग करावा. एवढे झाल्याने पिंडपितृयज्ञ पुरा होतो.

ज्याने अग्निहोत्र घेतले नसेल त्याने गृह्याग्नीवर प्रस्तुत यज्ञ करावा. तो करणे शक्य नसेल, तर निदान पितृतर्पण तरी करावे, असे मनू सांगतो (२.१२७). [ सं. कौ.; हि. ध. ]

**पिंड-ब्रह्मांड** अध्यात्मशास्त्रातली एक संज्ञा. पिंड = व्यष्टिदेह + ब्रह्मांड = समष्टिदेह. प्रत्येक प्राण्याचा, विशेषतः माणसाचा देह म्हणजे पिंड व चतुर्दशभुवनात्मक परमेश्वराचे विराट शरीर म्हणजे ब्रह्मांड होय. व्यष्टि-समष्टी हे दोन शब्द पिंडब्रह्मांडांचे पर्याय आहेत. ते दोन्ही परमेश्वरांच्याच स्वरूपाचे दोन भाग आहेत. व्यष्टींचा समूह म्हणजे समष्टी अथवा ब्रह्मांड व समष्टीचे पृथक्करण केलेले रूप म्हणजे व्यष्टी अथवा पिंड असे समजावे. ब्रह्मांडातूनच पिंडाची उत्पत्ती होत असल्यामुळे त्या दोघांत कार्यकारणभाव आहे. ज्या दोन पदार्थांचा कार्यकारणभाव असतो, ते पदार्थ तत्त्वतः अभिन्न अर्थात एकरूप असतात. उदा० माती आणि घट किंवा सोने आणि अलंकार. त्याप्रमाणेच पिंडब्रह्मांडांत तादात्म्य म्हणजे एकरूपता आहे. ' पिंडी ते ब्रह्मांडी ' हा वाक्प्रचार या जाणिवेतूनच निर्माण झाला आहे.

समष्टिरूप ब्रह्मांडातील सर्व पदार्थांची व्यष्टिरूप पिंडातल्या अवयवांच्या ठिकाणी कल्पना करून पिंड-ब्रह्मांडांच्या ऐक्याची भावना करावी, असे साधनामार्गात सांगितले आहे. अशी उपासना ही परमेश्वराचीच उपासना होते.

आपल्या शरीरात मूलाधारापासून सहस्रारापर्यंत जी सात चक्रे आहेत, त्यांच्या ठिकाणी क्रमाने भूः, भुवः, स्वः, इ. सप्त लोकांची कल्पना करावी. कंबर, मांड्या, गुडघे इ. अवयवांच्या ठिकाणी अतल, वितलादी सप्त पाताळांची कल्पना

करावी. रसरक्तादी सप्त धातूंची क्रमाने जंबू, प्लक्ष, इ. द्वीपांच्या ठिकाणी कल्पना करावी. इडा, पिंगला, सुषुम्ना, या नाड्यांना गंगा, यमुना, सरस्वती समजावे. अन्य नाड्यांच्या ठिकाणी गोदा, नर्मदा, इ. नद्यांची व स्वेद, बाष्प, इ. शरीरातील जलीय द्रव्यांच्या ठिकाणी सप्त समुद्रांची कल्पना करावी. अशा प्रकारे पिंडाचे ब्रह्मांडाशी पूर्ण ऐक्य कल्पून त्या दोहोंना व्यापून राहिलेला परमेश्वर या दोहोंहून निराळा नाही; तसेच पिंड-ब्रह्मांडही परमेश्वराहून निराळे नाही, अशी एकरूपतेची भावना करावी.

नाथयोगी आणि सिद्ध यांनी पिंड-ब्रह्मांडांची ही कल्पना बरीच उचलून धरली आहे. सिद्ध-साधनेत या विषयी म्हटले आहे, ते असे–

ब्रह्मांडाची सृष्टी आणि क्रमविकास याचे ज्ञान प्राप्त करून घेणे असेल, तर साधकाने स्वतःच्या पिंडाची उत्पत्ती व परिणाम यांच्याकडे सूक्ष्म दृष्टीने पाहिले पाहिजे. ज्याला पिंडाचे तत्त्व समजले, त्याला ब्रह्मांडातले काहीही अज्ञात राहत नाही. ब्रह्मांडात जितक्या प्रकारचे भाव अथवा अवस्था विद्यमान आहेत, त्या सर्व अशा साधकाला आपल्याच देहामध्ये प्रत्यक्ष दिसू शकतात. त्याविषयी म्हटले आहे, ते असे–

**अखण्डपरिपूर्णात्मा विश्वरूपो महेश्वरः ।**
**घटे घटे चित्प्रकाशस्तिष्ठतीति प्रबुध्यताम् ।।**

अर्थ– अखंड आणि परिपूर्ण असा ज्याचा आत्मा आहे, असा विश्वरूप महेश्वर चित्प्रकाशरूपाने प्रत्येक पिंडात किंवा देहात निवास करतो, असे जाणावे.

निराकार परम वस्तू जेव्हा आकारग्रहणासाठी उद्युक्त होते, त्याच वेळी सृष्टीचा संकल्प होतो. सिद्ध योग्यांनी सृष्टीच्या या संकल्पापासून पूर्ण विकासापर्यंत सर्व अवस्थांचे सहा विभाग करून आदी, साकार, महासाकार, प्राकृत, अवलोकन व गर्भ असे सहा पिंड मानले आहेत.

नाथयोग्यांनी मनुष्याच्या पिंडात ब्रह्मांडाचा कोणता अंश कोणत्या ठिकाणी राहतो, ते सांगितले आहे. चौरंगीनाथाचा प्राण-संकली हा ग्रंथ या बाबतीत विस्तारपूर्वक निदर्शन करणारा आहे. मनुष्यशरीरातच नव्हे; तर प्रत्येक अणु-परमाणूमध्येही ब्रह्मांड संकुचित स्वरूपात वास्तव्य करते. शक्तीची अल्पता किंवा अधिकता एवढाच त्यामध्ये भेद समजावा. 'ब्रह्माण्डे ऽप्यस्ति यत्किञ्चित् तत्पिण्डेऽप्यस्ति सर्वथा' = जे काही ब्रह्मांडात आहे ते सर्व पिंडांमध्येही आहे, हा सिद्धांत होय. 'यह घट भीतर सात समुदर याही में नौलख तारा' = प्रत्येक घटात (देह) सात समुद्र व नवलक्ष तारे असतात, असा या सिद्धांताचा अनुवाद कबिरानेही केला आहे. 'देह ही पंढरी । आत्मा अविनाश विटेवरी' या तुकोबांच्या उक्तीतही हाच पिंड-ब्रह्मांडांचा संकेत सूचित झाला आहे. [ सु. स्तो. सं.; भा. सं. सा.; सहज साधना ]

**पिंडारक** एक पुण्यक्षेत्र. हे द्वारकेजवळ आहे. श्रीकृष्णाचा जीवनातला बराच काळ इथे गेला, असे सांगतात. एकदा यादवांनी सांबाला स्त्रीवेष देऊन, त्या स्त्रीला मुलगा होईल की मुलगी, असा प्रश्न इथल्या ऋषींना विचारला. त्यामुळे संतप्त होऊन ऋषींनी शाप दिला, की 'हिच्या उदरी मुसळ जन्माला येईल व त्याच्या योगे समस्त यादवकुल नष्ट होईल.' हा प्रसंग पुढे याच गावी घडला. [ पु. इं. ]

**पिंडोपनिषद** एक नव्य उपनिषद. हे अथर्ववेदाशी संबद्ध असून, अवघ्या आठ श्लोकांचे आहे. काहींच्या मते हे शुक्ल यजुर्वेदाशी संबद्ध आहे. मनुष्यदेह पंचत्वात विलीन झाल्यावर त्याच्या जीवात्म्याचे काय होते, असा प्रश्न देवांनी विचारल्यावर प्रजापतीने त्यांना दिलेले उत्तर म्हणजे हे उपनिषद होय. त्याचा सारांश असा–

देह पतन पावल्यावर जीवात्मा त्याला सोडून जातो. तो पहिले तीन दिवस पाण्यात, पुढचे तीन दिवस अग्नीत, त्या पुढचे तीन दिवस आकाशात व एक दिवस वायूत राहतो. दहाव्या दिवशी अंत्यक्रिया करणारा अधिकारी दहा पिंड देऊन त्या जीवात्म्याला शरीर तयार करतो. पहिल्या पिंडाने संभव, दुसऱ्या पिंडाने मांस, तिसऱ्याने त्वचा, चौथ्याने रक्त अशा क्रमाने ते शरीर बनते. [श्री. सी. ग. देसाई]

**पिंड्ये जयराम** (इ. स. चे १७ वे शतक) एक संस्कृत कवी. याच्या वडिलांचे नाव गंभीरराव असून, आईचे गंगांबा असे होते. सप्तशृंगीच्या समोरील मार्कंड्याच्या डोंगराखाली याचे गाव होते. शहाजीराजांनी कर्नाटकात बंगळूरप्रांती निवास केल्यावर आश्रयार्थ हा त्यांच्याकडे गेला. जयरामाला एकूण बारा भाषा येत होत्या. राधामाधवविलासचंपू हे त्याचे प्रसिद्ध संस्कृत काव्य म्हणजे शहाजीराजांचे स्तुतिस्तोत्रच आहे. ऐतिहासिक पुराव्याच्या दृष्टीनेही त्या काव्याला महत्त्व आहे.

दहा उल्लास आणि एक परिशिष्ट मिळून प्रस्तुत चंपूचे एकंदर अकरा भाग आहेत. पहिल्या पाच उल्लासांत राधाकृष्णांचे वर्णन आहे व पुढच्या पाच उल्लासांत शहाजीराजांची प्रशंसा आहे. दहाव्या उल्लासापर्यंतचा भाग संस्कृतमध्ये आहे. शहाजीराजांच्या व इतर राजपुरुषांच्या समोर जयराम व इतर कवी

यांनी प्रसंगोपात्त संस्कृतव्यतिरिक्त इतर भाषांत जे कवित्व व समस्यापूरण केले, ते परिशिष्ट-खंडात आहे.

कवीने शहाजीची नल, नहुष, भगीरथ, हरिश्चंद्रादि पुण्यश्लोक महापुरुषांशी केवळ तुलनाच केली नाही; तर श्रीकृष्णाप्रमाणे भूभारहरणाचे त्याने व्रत घेतले होते, असे म्हटले आहे. यावरून शहाजीराजांच्या राजकारणाचे महत्त्व कळून येते. शहाजीराजांच्या दिनचर्येचे जयरामाने केलेले वर्णन वैशिष्टयपूर्ण असून, शहाजीराजांची धारणा व ध्येयवाद त्यातून स्पष्ट होतात. हे काव्य शहाजीपुत्र एकोजीच्या कारकीर्दीत रचले गेले, असे श्री. के. व्ही. लक्ष्मणराव यांचे म्हणणे आहे.

श्री. के. व्ही. लक्ष्मणराव यांच्या मते जयराम हा शिवाजीमहाराज व एकोजीराजे या दोघांच्या पदरी होता. याच कवीने संस्कृतात शिवाजीमहाराजांच्या चरित्रातले काही प्रसंग वर्णन करून सांगणारे 'पर्णालपर्वतग्रहणम्' नामक आख्यान रचले आहे. यात महाराजांच्या सैनिकांनी पन्हाळगड जिंकला, त्या युद्धप्रसंगाचे वर्णन आहे. त्या वेळच्या बऱ्याच अनुपलब्ध गोष्टींवर त्यामुळे प्रकाश पडतो. शिवाजीमहाराज व समर्थ रामदास यांच्या भेटीची माहितीही त्यातून मिळते. शिवाजीमहाराजांनी सुरत शहर दुसऱ्यांदा लुटले, त्या प्रसंगापासून (इ. स. १६७०) बहोलोलखानाशी प्रतापराव गुजराचे युद्ध झाले (इ. स. १६७४), तिथपर्यंतचा कथाभागही त्यात आहे.

शिवाजीमहाराजांच्या चारित्र्यावर मुग्ध होऊन सबंध शिवचरित्रच विविध भाषांत गुंफण्याचा त्याने संकल्प केला होता व त्या कार्याला आरंभही केला होता. [ रा. वि चं; पु. छ. शि.; रा. शि.; विविधज्ञानविस्तार एप्रिल, मे व जून १९२३ ]

**पिंपळ** एक पुण्यवृक्ष. हा वृक्ष कोणी तोडीत नाहीत. त्याच्या छायेत खोटे बोलत नाहीत. पाणवठ्याजवळ उगवलेल्या बहुतेक पिंपळांखाली गणपती व नाग यांच्या मूर्ती ठेवलेल्या असतात. श्रावण मासाच्या वद्य त्रयोदशी, चतुर्दशी आणि अमावास्या या दिवशी पिंपळाच्या मुळात पाणी घातल्याने पितरांची तहान भागते, असे सांगितले आहे श्रीकृष्णाने पिंपळाखालीच देहत्याग केला. एखाद्या जलाशयाजवळ वड, पिंपळ व उंबर एकत्र वाढले, तर तिथे दत्तगुरू वास्तव्य करतो, असे मानतात. काही ठिकाणी पिंपळाचे तुळशीशी लग्न लावतात. भूतयोनीतील मुंज्या पिंपळावर राहतो, अशी समजूत आहे. आदिवासी पिंपळाला वृक्षांच्या राज्यातला द्वाररक्षक मानतात; कारण आपल्या सळसळीने तो सदैव जागल्याचे काम करीत असतो. पिंपळ हा काकविष्ठेतून उत्पन्न होतो, अशी समजूत आहे. काही ठिकाणी पिंपळ खैरासारख्या झाडांच्या फांद्यांवर वाढून त्या झाडांचा नाश करतो; म्हणून त्याला वैबाध ( नाश करणारा ) असे म्हटले आहे. सिंधुसंस्कृतीत पिंपळाचे पान हे सुख–संपत्तिवर्धक समजले जाई लोकसंस्कृतीत अश्वत्थाचो पट नावाचे एक व्रत आहे या व्रतासाठी पाच प्रकारची पिंपळपाने घेतात. हिरवे पान सौंदर्यासाठी, कोवळे पान नवजात पुत्रासाठी, पिकलेले पान पतीच्या दीर्घायुष्यासाठी, वाळलेले पान सुख– समृद्धीच्या वृद्धीसाठी व फाटलेले पान अनपेक्षित अनर्याद संपत्तीसाठी मानून त्या पाचही पानांचे पूजन करतात. **पाहा**– अश्वत्थ, वृक्षपूजा. [ श. क.; फो. लो. जन १९६५; ट्री. व. ऑ. ]

**पिछीगुंत** एक जमात. या लोकांची वस्ती आंध्र प्रदेशात आहे. पिछीगुंत या शब्दाचा अर्थ भिक्षा मागणाऱ्यांचा जमाव असा आहे. या जातीच्या उत्पत्तीसंबंधी एक दंतकथा सांगतात, ती अशी–

एका वेल्लाळ इसमाला एकशे दोन अपत्ये झाली. त्यांत फक्त एकच मुलगी होती. मुलांपैकी एकजण लंगडा होता. त्याचे हे वैगुण्य पाहून इतर भावांनी असे ठरवले, की प्रत्येकाने एकेका वर्षी त्याला एक कोलगम धान्य व एक फन (नाणे) द्यावे. त्याप्रमाणे ते करू लागले. पुढे त्यांनी या लंगड्या भावाचे एका भिन्न जातीच्या तेलुगू मुलीशी लग्न लावून दिले. या दांपत्याला जी संतती झाली, ती कोणत्याही जातीची नसल्यामुळे त्यांना पिछी (भिक्षेकरी) किंवा पिंछीकुंटर (लंगडे) हे नाव मिळाले.

भिक्षा मागणे हा या जमातीचा व्यवसाय आहे. त्याशिवाय हे लोक ताप, पोटदुखी, इ. विकारांवर औषधेही देतात. ते गावातील नगारे वाजवतात व गोष्टीही सांगतात. त्यांना तिकडील प्रसिद्ध घराण्यांचा इतिहास माहीत असतो. कापू, कम्म, गोल्ल, इ. लोकांच्या वंशावळी यांच्यापाशी असतात यांच्यांतील काही लोक वेल्लाळांच्या शेतात मजुरीही करतात. [ का. ट्रा. स. इं. ]

**पिछोरा** एक प्राचीन लहानसे वाद्य. हे लहान बाजासारखे असे. पिछोरा व कांडवीणा ही दोन स्त्रियांनी वाजवायची वाद्ये असल्याचा उल्लेख लाट्यायन श्रौतसूत्रात आहे ( ४. २ व ८ ). पिछोरा हे वाद्य वाकड्या दांड्याचे असून, त्याच्या टोकाला मोराची पिसे लावलेली असत. या वाद्यात स्वरांसाठी वेगवेगळी छिद्रे असत. मथुरेच्या कुशाणकालीन कलेत या वाद्याची चित्रे मिळतात. [ म. ज्ञा. को. ]

**पिठोरी** एक काम्यव्रत. श्रावण अमावास्येला पिठोरी अमावास्या म्हणतात. ज्यांची मुले जगत नाहीत, अशा स्त्रिया पिठोरीचे व्रत करतात. हे व्रत पूजाप्रधान असून, चौसष्ट

योगिनी या त्याच्या देवता आहेत. या व्रताचे विधान असे –

श्रावण अमावास्येच्या दिवशी दिवसभर उपोषण करावे. सायंकाळी स्नान करून सर्वतोभद्र मंडलावर आठ कलश स्थापावे. त्यावर पूर्णपात्रे ठेवून त्यांत ब्राह्मी, माहेश्वरी, इ. शक्तीच्या मूर्ती स्थापाव्या. तांदुळाच्या राशीवर चौसष्ट सुपाऱ्या माडून त्यांवर चौसष्ट योगीनींचे आवाहन करावे. त्यांची षोडशोपचारे पूजा करावी. नंतर व्रतासाठी केले पक्वान्न डोक्यावर घेऊन 'कोणी अतिथी आहे काय ?' असा प्रश्न विचारावा. मुलांनी 'मी आहे' असे म्हणून ते पक्वान्न मागच्या बाजूने काढून घ्यावे.

पूर्वी पूजेच्या मूर्ती पिठाच्या करीत. अलिकडे त्यांची छापील चित्रे मिळतात. या व्रतात नैवेद्यासाठी पिठाचेच सर्व पदार्थ करतात. त्यावरून या तिथीला पिठोरी अमावास्या असे नाव पडले असावे. या व्रताची कथा अशी–

प्राचीन काळी श्रीवर नावाचा एक ब्राह्मण होता. त्याला शंकर नावाचा पुत्र होता. शंकराच्या पत्नीचे नाव विदेही होते. त्या दंपतीला मुले झाली, पण ती सगळी अल्पायुषी ठरली. एकदा श्रीवर श्राद्ध करीत असता विदेही प्रसूत झाली. पण तिचा तोही मुलगा तत्काळ मेला. त्यामुळे सासू सुनेला टाकून बोलली. विदेहीला त्यामुळे फार दुःख झाले. ते मूल घेऊन ती रानात निघून गेली. त्या रानात एक स्त्री राहत होती. तिने विदेहीला रानात येण्याचे कारण विचारले. तेव्हा आपले दुःख तिला सांगून विदेहीने विचारले, की 'माझे हे दुःख दूर होईल व माझी मुले जगतील, असा काही उपाय मला सांगशील का ?' तेव्हा ती स्त्री म्हणाली, की 'मध्यरात्री इथे चौसष्ट योगिनी येतील, त्या वेळी तू त्यांची प्रार्थना कर.' ठरल्याप्रमाणे चौसष्ट योगिनी तिथे आल्या. 'इथे कोणी अतिथी आला आहे काय ?' असा त्यांनी प्रश्न विचारला. ते ऐकून विदेही पुढे आली. तिने त्यांना आपली कहाणी सांगितली व त्यांची प्रार्थना केली. 'तुझी मुले जगतील' असा योगिनींनी वर दिला. त्याप्रमाणे थोड्याच वेळात विदेहीचे सर्व मृत मुलगे जिवंत होऊन तिच्यापुढे उभे राहिले. नंतर विदेही पुत्रांसह आपल्या घरी गेली आणि समारंभपूर्वक तिने चौसष्ट योगिनींचे पूजन केले. तेव्हापासून हे व्रत प्रचारात आले. [ व्रतराज ]

**पिडारी** द. भारतातील एक ग्रामदेवता. तमिळ प्रदेशात हिची लहान-मोठी मंदिरे आढळतात. या देवतेचा स्वभाव चिडखोर आहे, असे मानतात. त्याचे प्रतीक म्हणून तिचे सर्वांग रक्ताने किंवा शेंदुराने माखतात आणि तिच्या डोक्यावर विस्तव ठेवतात.

हिची मूर्ती एका वेशीवर बसवतात. तिच्या मस्तकावर मुकुट आणि कपाळावर शिवमुद्रा असते. केस पिंजारलेले असतात. ती चतुर्भुज असून त्रिशूल, डमरू, अंकुश व कपाल ही आयुधे धारण करते.

हिच्या मंदिरद्वारावर मुन्नाडियर नावाचे दोन द्वारपाल असतात. मंदिरासमोर पिंपळ व कडुनिंब हे वृक्ष असतात. या दोन वृक्षांना पिडारींचे दांपत्य समजतात. गावात कोणाकडेही लग्न निघाले असता प्रथम त्यांची पूजा करतात. दर शुक्रवारी पिडारीची पूजा करतात. वर्षातून एकदा हिची मोठी यात्रा भरते. ही यात्रा आठ दिवस चालते. त्या वेळी पिडारीची रथातून मिरवणूक काढतात. मिरवणुकीत रक्ताने कालवलेला भात रस्त्यावर फेकतात. जत्रेच्या वेळी तिचे भक्त निखाऱ्यातून चालण्याचेही प्रयोग करतात. [ व्हि. गॉ. सा. इं.; ओ. इ. इं ]

**पिडिया** उ. प्रदेशातील कुमारिकांचे एक व्रत. हे व्रत कार्तिक शुद्ध प्रतिपदेपासून मार्गशीर्ष शुद्ध प्रतिपदेपर्यंत एक महिना करतात. पिडिया हा पिंड (गोळा) या शब्दाचा अपभ्रंश आहे. कार्तिक शुद्ध प्रतिपदेला गाई-बैलांच्या गोमयमूर्ती करून त्यांची पूजा करतात. मग त्यातलाच उरलेला शेणाचा भाग घेऊन त्याचे गोळे करतात व ते घराच्या भिंतींवर अशा प्रकारे चिकटवतात, की त्यांतून मनुष्याकृती निर्माण व्हावी. त्यांच्या भोवती पाण्यात पीठ कालवून त्याने नक्षी काढतात.

आपल्या भावाला आयुरारोग्य मिळावे, म्हणून कुमारिका हे व्रत करतात. या व्रतात रोज सकाळी त्या पिडियाची कहाणी ऐकतात व पिडियाची गीतेही गातात. या गीतांत बहीणभावांच्या अकृत्रिम प्रेमाचे वर्णन असते. बहीण म्हणते–

**तोहरी बधइया भइया पिडिया बरतिया हो**

अर्थ – भाऊराया, तुझ्या भल्यासाठीच मी पिडिया काढते !

महिना पूर्ण झाल्यावर व्रताची समाप्ती करतात. त्या दिवशी मुली गूळ घालून नवीन तांदळाची खीर करतात, तिला रसिआव असे म्हणतात. दुसऱ्या दिवशी शेणाच्या पिडियांचे जलाशयात विसर्जन करतात. [ हिं. सा. को. ]

**पितर** एक देवसदृश योनी. मृत व अमृत असे पितरांचे स्थूल मानाने दोन भेद पडतात. माणसे मरून पितृलोकाला जातात व वंशजांना पितर ठरतात, ते मृत होत. सृष्ट्यारंभापासून पितृलोकात राहणारे ते अमृत पितर होत. यमाला वैदिक आर्यांनी पहिला पितर मानले आहे. इतर सर्व पितर यमाबरोबर आनंद करतात, असे ऋग्वेदात म्हटले आहे (१०.१४.१०). अंगिरस, अथर्वण, भृगु, नवग्व, इ. ऋषी पितरांत मोडतात (ऋ. १०.१४.६). ज्या पितरांनी सोमयाग करून स्वर्ग प्राप्त

करून घेतला, अशांना सोम्यास असे म्हणतात. पितर हे यजमानाने केलेल्या पितृयज्ञात येऊन दक्षिणेच्या बाजूला दर्भासनावर बसतात व आपले स्वधारूप अन्न ग्रहण करतात (ऋ. १०.१५.६). काळ्या घोड्याला दागिने घालून सजवावे, त्याप्रमाणे पितरांनी आकाशाला नक्षत्रांनी सुशोभित केले व स्वर्गाकडे जाणारा मार्ग यज्ञद्वारा त्यांनीच आखून दिला, असे त्याच्याबद्दल म्हटले आहे (ऋ. १०.१४.१५; १०.६८.११).

वैदिक ऋषींना पितरांबद्दल बराच आदर वाटत होता, हे पुढील ऋचेवरून कळून येईल--

**उदीरतामवर उत्परास उन्मध्यमाः पितरः सोम्यासः ।**
**असुं य ईयुरवृका ऋतज्ञास्ते नोऽवन्तु पितरो हवेषु ।।**

(ऋ. १० १५ १)

अर्थ -- स्तवन चालू द्या. सोमप्रिय असे जे पितृगण आहेत, त्यापैकी जे खालच्या लोकात, जे उच्च लोकात आणि जे मध्यम लोकात वास करीत असतात; तसेच ज्यांना आत्मसामर्थ्य प्राप्त झालेले असूनही जे फार सौम्य, सात्त्विक वृत्तीचे आणि सनातन धर्म जाणणारे असतात, असे ते पितर आम्ही हाक मारताच येऊन आमचे रक्षण करोत.

यापुढच्या एका ऋचेत पितरांची कल्याणाबद्दल प्रार्थना केलेली आहे, ती अशी--

**बर्हिषदः पितर ऊत्यर्वागिमा वो हव्या चकृमा जुषध्वम् ।**
**त आ गतावसा शन्तमेनाथा नः शं योररपो दधात ।।**

(ऋ. १०.१५ ४)

अर्थ - कुशासनावर अधिष्ठित असणाऱ्या पितरांनो, तुम्ही आपल्या साहाय्यक शक्तींसह इकडे या. हे जे हविर्भाग आम्ही तुमच्यासाठी सिद्ध केले आहेत, त्यांचा स्वीकार करा. तुम्ही आपल्या अत्यंत कल्याणप्रद कृपाछत्रासह आगमन करा आणि आमचे हित, क्षेम आणि निष्पापत्व आम्हाला साध्य करून द्या.

वैदिक आर्यांनी पितरांकडे वीरपुत्रांनी युक्त अशी संपत्तीही मागितली आहे. पुराणे व स्मृतिग्रंथ यांतूनही पितरविषयक कथा-कल्पना आढळतात.

कालिका पुराणात पितर हे ब्रह्मदेवाचे पुत्र मानलेले असून, त्यांची उत्पत्ती पुढीलप्रमाणे सांगितली आहे--

**तच्छरीरात्तु घर्माम्भो यत्पपात द्विजोत्तमाः ।**
**अग्निष्वात्ता बर्हिषदो जाताः पितृगणास्ततः ।।**
**भिन्नाञ्जननिभा सर्वे फुल्लराजीवलोचनाः ।**
**नितान्तसंयताः पुण्या संसारविमुखाः परे ।।**
**सहस्राणां चतुःषष्टिरग्निष्वात्ताः प्रकीर्तिताः ।**
**षडशीतिसहस्राणि तथा बर्हिषदो द्विजा ।।**

(कालिका पु. २)

अर्थ - ब्रह्मदेवाच्या शरीरातून जे घर्मजल खाली पडले, त्यातून अग्निष्वात्त व बर्हिषद असे पितृगण निर्माण झाले. ते सर्व काजळासारखे काळे कुळकुळीत, प्रफुल्ल कमलासारखे नेत्र असलेले अत्यंत संयमी, पुण्यवान व संसारविमुख होते. अग्निष्वात्त हे चौसष्ट हजार व बर्हिषद हे शायंशी हजार संख्येचे होते.

वराह पुराणातल्या श्राद्धकल्पातही पितरांच्या उत्पत्तीची कथा दिली आहे, ती अशी--

ब्रह्मदेवाने देव उत्पन्न केले व त्यांना यज्ञ करण्यास सांगितले. पण देवांनी तसे करण्याचे नाकारले. तेव्हा ब्रह्मदेवाने त्यांना शाप दिला, की 'तुम्ही मूढ व्हाल.' देव तसे बनले. पण त्यामुळे लोकांचा नाश होऊ लागला. तेव्हा ब्रह्माने देवांना त्यांच्या पुत्रांकडे जाण्यास सांगितले. देव तसे गेले व त्यांनी आपल्या पुत्रांना ब्रह्मशापाबद्दल प्रायश्चित्त विचारले. त्यावर देवपुत्रांनी देवांना प्रायश्चित्ते समजावून दिली. ती ऐकून देव म्हणाले, की 'आम्हांला असा बोध करणारे तुम्ही खरोखर पितर आहां.' देव हे सत्यवाक् असल्यामुळे तेव्हापासून देवपुत्र हे पितर झाले व स्वर्गात देवही त्यांची उपासना करू लागले.

पुराणांनी मूर्त व अमूर्त असे दोन प्रकारचे पितर मानले आहेत. हविष्मत (काव्य), सुस्वधा (उपभूत), आज्यप व सोमप (सुकाल) असे मूर्त पितरांचे चार गण आहेत. यांची उपासना चार वर्ण करतात. अमूर्तांत वैराज, अग्निष्वात्त व बर्हिषद असे तीन गण आहेत. त्यांची उपासना देव करतात. या सात गणांना अनुक्रमे सत्य, विरजस, सोमपथ, मरीचिगर्भ, कामग, मानस व सनातन हे सात लोक राहण्यासाठी दिलेले आहेत. या सातांना प्रत्येकी एकेक मानसकन्या आहे. मेना, अच्छोदा, पीवरी, गो, यशोदा, विरजा व नर्मदा अशी त्यांची नावे आहेत. महाभारतात पितरांचे अग्निष्वात्त, फेनप, उष्मप, सुधावान व बर्हिषद असे वेगळे गुण सांगितले आहेत (सभा. ८).

पितर हे देवांपेक्षा आद्य आहेत. त्यापैकी अग्निष्वात्त हे पूर्वेचे, बर्हिषद हे दक्षिणेचे, आज्यप हे पश्चिमेचे व सोमप हे उत्तरेचे होत, असे म्हटले आहे.

प्राचीनावीतीने स्वधा असे म्हणून दिलेले अन्न व सोमरस पितर सेवन करतात. त्यांना गेंड्याचे मांस, भात, सांवे, यव, मूग, ऊस, पांढरी फुले, फळे, दर्भ, उडीद, देवभात, गाईचे दूध, तूप व मध हे पदार्थ फार आवडतात. मसूर, तागाचे बी, पावटे, राजमाष, कुळीथ, कमल, बेल, रुई, धोतरा, कडुनिंब, अडुळसा व शेळी मेंढीचे दूध हे पदार्थ त्यांना आवडत नसावे; कारण ते श्राद्धात निषिद्ध सांगितले आहेत. यांना लोभ, मोह व भय हे विकार होतात; पण शोक होत नाही. यांना आपली इच्छा मुखाने व्यक्त करता येत नाही. हे मनोवेगाने वाटेल तिथे जाऊ

शकतात. हे कल्पान्ती शापाने नष्ट होतात व कल्पारंभी उःशापाने उत्पन्न होतात.

**पितरांची आकांक्षा** – महाभारतात पितरांनी गायिलेल्या आकांक्षादर्शक अशा काही गाथा दिलेल्या आहेत, त्या अशा–

**अपि नः स्वकुले जायाद्यो नो दद्यात् त्रयोदशीम् ।**
**मघासु सर्पिःसंयुक्तं पायसं दक्षिणायने ।।**
**आजेन वाऽपि लोहेन मघास्वेव यतव्रतः ।**
**हस्तिच्छायासु विधिवत् कर्णव्यजनवीजितम् ।।**
**एष्टव्या बहवः पुत्रा यद्येकोऽपि गयां व्रजेत् ।**
**यत्रासौ प्रथितो लोकेष्वक्षय्यकरणो वटः ।।**

(अनु. ८८. १२–१४)

**अर्थ** – आमच्या कुलात असा कोणी पुरुष होईल का, की जो दक्षिणायनाच्या कृष्ण पक्षात मघा व त्रयोदशी या योगावर आम्हाला घृतमिश्रित पायस अर्पण करील किंवा नियमपूर्वक हत्तीच्या छायेत बसून त्याच्या कर्णरूपी पंख्याने वारा घेत, मघा नक्षत्री तांबड्या बकऱ्याच्या मांसाच्या योगाने आमचे विधियुक्त श्राद्ध करील ? कुलात पुष्कळ पुत्र उत्पन्न होवोत अशी अपेक्षा धरावी. त्यांतला एक तरी गयेला जाईल आणि तिथल्या लोकविख्यात अक्षय्यवटाखाली श्राद्ध करून श्राद्धफलाला अक्षय्य बनवील.

**पितृसमाज** – पितरविषयक वैदिक, स्मार्त व पौराणिक साहित्याचे आलोडन करून श्री. ना. गो. चापेकर यांनी पितर हा देवा-मानवांप्रमाणे एक स्वतंत्र समाज होता, असे दाखवून दिले आहे. त्यांच्या विवेचनाचा सारांश असा––

देव, पितर आणि मनुष्य हे निरनिराळे समाज होते, असे अनेक उल्लेख वैदिक वाङ्मयात आढळतात. उदा० 'देवा मनुष्याः पितरः' (श. ब्रा. ३.६.२.२५). 'देवा मनुष्या असुराः पितर ऋषयः' (अथर्व १०.१०.२६). पुरातन काली यज्ञ झाल्यावर त्याच्या योगाने ऋषी, मनुष्य व पितर उत्पन्न झाले, असे ऋग्वेदातही म्हटले आहे (१०.१०३.६).

विविध प्रकारची प्रजा निर्माण करताना ब्रह्मदेवाने पितर निर्माण केले, असे पुराणात म्हटले आहे. मेलेल्या माणसांना आपण सामान्यपणे पितर म्हणतो; पण वरील उत्पत्तिकल्पना मृत माणसांच्या संबंधाने संभवनीय दिसत नाही. देव, असुर, मनुष्य यांच्याबरोबर पितर उत्पन्न झाल्याची कथा ब्रह्मांड पुराणात सांगितली आहे, तीच खरी वाटते.

पितृसमाजाचे मुख्य धार्मिक कृत्य म्हणजे पितृपूजा, पितृसेवा किंवा श्राद्ध हे होय. सांप्रत मृत पितरांचेच श्राद्ध केले जाते; पण अतिप्राचीन काळी जिवंत पितरांचेही श्राद्ध करण्याचा प्रघात होता. सांप्रत मृत पितरांच्या स्थानी ब्राह्मणांची योजना करतात, तसेच प्राचीन काळीही करीत आणि जिवंत पित्याला पितृस्थानी बसवीत. मनूनेही या गोष्टीचा उल्लेख केला आहे (३.२२०). पिता जिवंत असूनही मुलाने श्राद्ध करण्याची प्राचीन काळी चाल होती, ही गोष्ट लक्षात ठेवण्याजोगी आहे. यावरून पितृयज्ञ किंवा पितृपूजा हा पितर समाजाचा मुख्य धर्म होता, असे दिसते. हे पितृश्राद्ध नित्य करायचे असे ज्या मनुष्यसमाजात अग्नीची नित्य उपासना विहित म्हणून सांगितली आहे, त्याच समाजात नित्यश्राद्धाची कल्पना उद्भूत होणे अस्वाभाविक दिसते. श्राद्ध करणे हाच धर्म असल्यामुळे सर्व इष्ट गोष्टींची प्राप्ती श्राद्धाने होते, असा त्या समाजाचा समज होता. ज्याप्रमाणे वैदिक मानव निरनिराळ्या उद्देशांसाठी वेगवेगळ्या इष्टी करीत, त्याप्रमाणे पितृसमाजात गोधनाच्या समृद्धीसाठी गोष्ठश्राद्ध, घोड्यांच्या विपुलतेसाठी अश्वश्राद्ध, प्रवासाला जाताना यात्राश्राद्ध, आत्मशुद्धीसाठी शुचिश्राद्ध अशी वेगवेगळी श्राद्धे करीत. श्राद्ध हे प्रत्येक कर्माचे एक अंगच मानीत अशा श्राद्धाला कर्मांगश्राद्ध असे म्हणत.

पुरूरव-आर्द्रव व धूरिलोचन हे पितरांचे विश्वेदेव होत. वैदिकांच्या विश्वेदेवांहून हे वेगळे आहेत. मातली, यम आणि बृहस्पती हे पितृसमाजाचे नेते होत. देवकर्म स्वाहाकाराने होते; तर पितृकर्म स्वधाकाराने करावे लागते. एकच समाज असता तर हे भेद होण्याचे कारण नव्हते. देवयान व पितृयान हे परलोकगमनाचे दोन मार्गही स्वतंत्र आहेत. यावरूनही पितृसमाजाचे भिन्नत्व प्रतीत होते. मनुष्यांचा राजा मनू, देवांचा इंद्र व पितरांचा यम हेही भिन्नत्वसूचकच आहे. त्यांच्या धर्मकृत्यांच्या कालातही फरक आहे. देवकार्ये पूर्वाण्ही, मनुष्यकार्ये मध्यान्ही व पितृकार्ये अपराण्ही केली जात. देवसमाज आपले उपरणे डाव्या खांद्यावरून घेई, तर पितृसमाज ते उजव्या खांद्यावरून घेई. हीच गोष्ट सांप्रत यज्ञोपवीताच्या सव्य-अपसव्याने सूचित होते.

देवांच्या स्वभाववर्णनात आणि पितरांच्या स्वभाववर्णनात–ही फरक आहे पितरांना कधी राग येत नसे. ते शुद्ध राहत व ब्रह्मचर्याने वागत. विशेष म्हणजे ते आपल्या हातात शस्त्र धरीत नसत, असे मनू म्हणतो. हे वर्णन देवांच्या वर्णनाहून भिन्न आहे क्रोध, ईर्ष्या व शस्त्र यांचा संबंध सुटल्यानंतर समाजात वैर व भेद निर्माण होण्याचे कारणच राहत नाही. म्हणूनच यजुर्वेदात पितरांना समानाः (भेदरहित) व सुमनसः (एक दिलाने वागणारे) असे म्हटले आहे.

पितृसमाजात काही लोक प्रेते जाळीत, तर काही प्रेते पुरीत. त्यावरूनच पितरांमध्ये अग्निष्वात्त अथवा अग्निदग्ध आणि अनग्निष्वात्त अथवा अनग्निदग्ध असे भेद होते. पितरांना

सुवर्णनाणे वापरण्याचे माहीत नसावे. त्यांची बसण्याची पद्धतही विलक्षण होती. ते उपरणे उजव्या खांद्यावर घेऊन उजवा गुडघा जमिनीवर टेकून बसत. (ऋ. १०.१५.६; श.ब्रा. २.४.२.२).
**पाहा** – पितृपूजा. [ वै. को; प्रा. च. को.; वै. मा.; श्री. ना. गो. चापेकर– म. सा. प. १९३२; ऋ. आ.; ऋ. द. ]

**पिता** ' पाति रक्षति अपत्यं यः '= जो अपत्यांचे रक्षण करतो. तो पिता होय, अशी त्याची व्याख्या आहे. आपल्या परिवाराचे भरण–पोषण करणे, हेही पित्याचेच काम असते. पशुपक्ष्यांच्या परिवारात मादीसाठी व अपत्यांसाठी अन्न मिळवून आणणे आणि संकटांपासून त्याचे रक्षण करणे, अशी नराची दोनच कामे असतात. मानवाच्या प्रारंभिक अवस्थेत पित्याचीही ही दोनच कर्तव्ये होती. पण संस्कृतीच्या विकासाबरोबर मुलाना शिक्षण देणे, हेही पित्याचे तिसरे एक कर्तव्य ठरले. कालिदासाने या तीन कर्तव्यांचा विनय, रक्षण आणि भरण या नावांनी उल्लेख केला आहे (रघु. १.२४).

प्राचीन काळी पिता आपल्या पुत्रांना स्वतः शिकवीत असे. आरुणेय श्वेतकेतूला त्याच्या पित्याने चोवीस वर्षांत संपूर्ण वेद शिकवले, असे बृहदारण्यकात सांगितले आहे (६.२.१.४).

महाभारतात चिरकारीने पित्याच्या महिम्याचे वर्णन केले आहे, ते असे –– पिता आपले शील, चरित्र, गोत्र व कुल यांच्या रक्षणासाठी आपल्याला पत्नीच्या ठिकाणी धारण करतो आणि त्याच्यापासूनच पुत्र जन्माला येतो. म्हणूनच पित्याविषयी म्हटले आहे––

**पिता धर्मः पिता स्वर्गः पिता हि परमं तपः ।**
**पितरि प्रीतिमापन्ने सर्वाः प्रीणन्ति देवताः ।।**

(म. भा. शांति. २६६. २१)

अर्थ– पिता हा धर्म आहे, तो स्वर्ग आहे, तो श्रेष्ठ तप आहे. तो प्रसन्न झाला असता सर्व देवता संतुष्ट होतात.

प्राचीन हिंदू कुटुंबात पित्याचे स्थान सर्वांत उच्च होते. त्याला पुष्कळ अधिकार होते. आपल्या पुत्राला प्राणदंडाची शिक्षा देण्याचा किंवा त्याचा वध करण्याचाही अधिकार त्याला प्राचीन काळी होता. पण संपूर्ण भारतीय वाङ्मयात पित्याने पुत्राला प्राणदंड दिल्याचा उल्लेख मात्र कुठेच आढळत नाही. पुत्राला दंड करण्याचा पित्याचा अधिकार ऋग्वेदातल्या एका कथेत दिसतो, ती कथा अशी –– एकदा अश्विनीकुमारांचे वाहन असलेले गाढव, लांडगी बनून ऋज्राश्वाकडे आले. तेव्हा तिला खाऊ घालण्यासाठी ऋज्राश्वाने लोकांच्या मालकीचे असलेले शंभर बकरे तिला खायला दिले. त्यामुळे लोकांचे खूप नुकसान झाले. या अपराधाबद्दल त्याचा पिता वृषागिर याने ऋज्राश्वाला अंध केले. मग अश्विनीकुमारांनी त्याची दृष्टी त्याला परत दिली (ऋ. १.११६.१६).

काही वेळा मुलाना ताडन करतांना पित्याला विवेक राहत नसे आणि तो अत्यंत निर्घृणपणे पुत्राला दुखापत करीत असे. म्हणून शास्त्रकारानी ताडनासंबंधी काही मर्यादा पित्यावर घातल्या आहेत. पुत्राला दोरीने किंवा छडीने मारावे आणि तेही शरीराच्या पृष्ठभागावर मारावे; डोक्यावर कधीही मारू नये. हे नियम मोडणाऱ्या पित्याला, चोराला चौर्यकर्माबद्दल देतात, ती शिक्षा द्यावी, असे मनूने सांगितले आहे. (मनु. ४.२९९ –३००). यावरून, पुत्राला शिक्षा किंवा दंड करण्याचा पित्याचा अधिकार मनूच्या काळी मर्यादित झाला, हे कळून येते.

ज्या समाजात पुत्र ही पित्याची संपत्ती मानली जाते, तिथे पित्याला गाय, बैल, जमीन, यांच्याप्रमाणे पुत्रालाही विकण्याचा अधिकार मिळतो. वैदिक काळातले पुत्राला विकण्याचे प्रसिद्ध उदाहरण म्हणजे शुनःशेपाचे होय (ए. ब्रा. ७.१२.). हरिश्चंद्र राजाला संतान नव्हते, म्हणून त्याने वरुणाकडे पुत्राची याचना केली. वरुण म्हणाला की ' झालेला मुलगा तू यज्ञात मला अर्पण करशील, तर मी तुझी इच्छा पूर्ण करीन.' हरिश्चंद्राने ते मान्य केले. पुढे त्याला मुलगा झाला. वरुणाने त्याला त्याच्या प्रतिज्ञेची आठवण करून दिली. पण पुत्रप्रेमामुळे हरिश्चंद्राला तसे करवेना. अनेक सबबी पुढे करून तो यज्ञ लांबणीवर टाकू लागला. शेवटी वरुण त्याच्यावर रागावला व त्याने हरिश्चंद्राला जलोदराचा विकार जडवला. मग मात्र त्याने यज्ञ करायचे ठरवले. हरिश्चंद्राच्या या पुत्राचे नाव रोहित असे होते. बाप आपला यज्ञात बळी देणार असे समजताच तो रानात पळून गेला. तिथे अजीगर्त नामक एका क्षुधार्त ब्राह्मणाशी त्याची गाठ पडली. अजीगर्ताला तीन पुत्र होते त्याने शंभर गायींच्या मोबदल्यात आपला मधला पुत्र शुनःशेप रोहिताला विकला. त्याला घेऊन रोहित घरी आला. ऋत्विजांनी त्याला यूपाला बांधून मारायची तयारी केली, तेव्हा शुनःशेपाने वरुणादी देवतांची स्तुती केली व देवतानी त्याला मुक्त केले. मग विश्वामित्राने त्याला आपला ज्येष्ठ पुत्र बनविले.

नारदाने पित्याचे वर्चस्व आणि पुत्राची पराधीनता यांचा स्पष्ट उल्लेख केला आहे. तो म्हणतो, की कुटुंबातील ज्येष्ठ पुरुषाला स्वातंत्र्य असते. या लोकात राजा, आचार्य आणि सर्व वर्णांतील घरमालक (पिता) हे तिघेच स्वतंत्र आहेत. स्त्रिया, पुत्र, दास, दासी हे सर्व पराधीन आहेत. असे असले तरी पत्नीचे किंवा पुत्राचे दान देण्याचा अधिकार पतीला वा पित्याला नाही, असे त्याने सांगितले आहे. कात्यायनाचे मत तसेच आहे व कौटिल्यानेही तसेच म्हटले आहे.

पण कालांतरात पित्याचे कुटुंबातील हे प्रभुत्व हळूहळू कमी होत गेले. पुत्राला विकण्याचा अधिकार बहुधा वैदिक काळानंतरच पित्याला असावा. पण तो फार काळ चालला नाही. सनपूर्व ६ व्या शतकात त्याच्या अधिकारांवर नियंत्रण आले. इ. स. च्या १९ व्या शतकाच्या अंतापर्यंत पिता हा कुटुंबाचा स्वामी असला, तरी कायद्याच्या दृष्टीने त्याच्यावर अनेक बंधने होती. त्याचे कुटुंबावर प्रभुत्व होते, तेही नैतिक किंवा भावनिक दृष्ट्या होते. पिता हा आपल्या पुत्रांकडून सेवेची व आज्ञापालनाची आशा करीत असे; पण हक्क म्हणून त्या गोष्टी मागत नसे.

जन्मदात्याव्यतिरिक्त आणखी काही व्यक्तींनाही पिता मानलेले आहे. कन्यादाता, अन्नदाता, ज्ञानदाता, अभयदाता, मंत्रदाता आणि ज्येष्ठ भ्राता हे अन्य पिते होत (ब्रह्मवै. पु. श्रीकृष्णजन्मखंड ३५). चाणक्याने उपनयन करणारा यालाही पिता म्हटले आहे. [ श. क.; वे. इं.; हिं. प. मो.]

## पितामह

(इ. स. ४०० ते ७०० अंदाजे) एक स्मृतिकार. याने आपल्या स्मृतीत व्यवहाराचा विशेष विचार केला आहे. वेद, वेदांगे, मीमांसा, स्मृती, पुराणे व न्यायशास्त्र यांचा धर्मशास्त्रातच समावेश होतो, असे त्याचे मत आहे. कोणताही दावा प्रथम ग्रामपंचायतीत, नंतर नगरात आणि त्याच्या नंतर राजापुढे चालवावा; दोन्ही बाजूचे पक्षकार एकाच देशातले, एकाच नगरातले किंवा एकाच गावातले असले, तर त्यांच्या फिर्यादींचा निकाल विशिष्ट स्थानिक चालीरीती आणि संकेत यांना अनुसरून द्यावा; पण दावा जर दोन वेगळ्या गावांतील लोकांचा असेल, तर मात्र त्याचा निकाल शास्त्राप्रमाणे द्यावा, असे याने सांगितले आहे.

आह्निक, व्यवहार व श्राद्ध या विषयांवरची याची वचने स्मृतिचंद्रिकेत घेतली आहेत. त्रिवरूपाने याच्या आशौचासंबंधीच्या मताचा उल्लेख केला आहे. [ हि. ध.; प्रा. च. को. ]

## पितृपक्ष

भाद्रपदाच्या कृष्णपक्षाला हे नाव आहे. हा पक्ष पितरांना प्रिय आहे. यात एक दिवस पितराचे श्राद्ध केले असता, ते वर्षभर तृप्त राहतात, असे सांगितले आहे. पाहा – महालय. [ श. क. ]

## पितृपूजा

मृत पितरांची पूजा करणे हा धर्माचाच एक भाग मानला गेला आहे. भारतातलाच नव्हे, तर सगळ्या जगातला तो एक अतिप्राचीन धर्म आहे. जगातल्या सुधारलेल्या व न सुधारलेल्या सर्व जातीजमातींत या ना त्या प्रकारे पितृपूजा प्रचलित आहे. भूत-प्रेतांची पूजा आणि मृत वीरांची पूजा हे पितृपूजेला जवळचे असे प्रकार होत. मृत पितरांना सद्‌गती लाभावी, त्यांनी पितृलोकातून वंशावर कृपादृष्टी ठेवावी, वंशात वीर पुरुष निर्माण होऊन त्यांनी वंशाची कीर्ती व समृद्धी वाढवावी आणि जे कोणी पितर पितृलोकात न जाता भूतयोनीत गेले असतील आणि जे वंशातल्या किंवा कुलातल्या लोकांना बाधा करीत असतील, त्यांची ती बाधा दूर व्हावी आणि त्याबरोबरच त्यांचा उद्धार व्हावा अशा बहुविध उद्देशांनी पितृपूजा प्रचारात आली आहे.

पितृपूजेची श्रौत-स्मार्त विधाने म्हणजे श्राद्ध व तर्पण ही होत. श्रौत परंपरेत पिंडपितृयज्ञ हा साग्निकाने करायचा एक यज्ञ आहे. त्याचाच पर्याय म्हणजे गृह्यसूत्रांतले पार्वण श्राद्ध होय. पार्वण व एकोद्दिष्ट असे श्राद्धाचे दोन मुख्य भेद आहेत. एकोद्दिष्ट श्राद्धे ही मुख्यतः मृत झालेल्या एकाच पुरुषाच्या किंवा स्त्रीच्या प्रेतत्वनिवृत्तीसाठी असतात. प्रेतदहनानंतर मृतात्मा तत्काळ पितर या पदाला पोचतो, अशी वेदकालीन लोकांची समजूत असली, तरी गृह्यसूत्रांच्या काळात या कल्पनेत बदल झाला, तो असा––

देह सोडल्यावर मृतात्मा प्रेत होतो. पुढे वर्षभर तो प्रेत अवस्थेतच राहतो. या अवस्थेत त्याला अनंत यातना भोगाव्या लागतात. त्या यातनांतून त्याची सुटका करण्यासाठी एकोद्दिष्ट, सपिंडीकरण, इ. श्राद्धे कर्तव्य होत.

पौराणिक काळात आणखी एक नवीन कल्पना रूढ झाली. या कल्पनेप्रमाणे मृताच्या शरीराचे दहन झाल्याबरोबर मृतात्मा अतिवाहिक नावाचे एक सूक्ष्म शरीर धारण करतो. या शरीरात असताना त्याला थंडी, ऊन, भूक, तहान यांचे अत्यंत क्लेश होत असतात. या अवस्थेतून त्याला मुक्त करण्यासाठी पुराणांनी पिंडांची योजना केली. अतिवाहिक अवस्थेतून मुक्त झाल्यावर त्याला प्रेतशरीर प्राप्त होते. मासिक, एकोद्दिष्ट आणि सपिंडीकरण यांच्यामुळे त्याचे ते प्रेतशरीर नष्ट होऊन मृतात्मा पितर या अवस्थेला जातो. तिथे अन्य पितरांशी संयुक्त होऊन तो पार्वणश्राद्धाचा अधिकारी बनतो.

ज्या मृतांचा योग्य प्रकारे अंत्यसंस्कार झाला नसेल, त्यांच्या बाबतीत वरील एकोद्दिष्टादी श्राद्धे करता येत नाहीत. म्हणून मृताचे संपूर्ण मृत शरीर मिळत नसेल, तर त्याच्या अस्थींचे तरी दहन करावे आणि अस्थीही मिळत नसतील तर मृताची दर्भप्रतिमा तयार करून तिचा दाह करावा आणि मग पुढील सर्व श्राद्धे करून त्या मृताला पितृपदावर आरूढ करावे, असे धर्मशास्त्रात सांगितले आहे. यावरून अग्निसंस्कार हा या सर्व क्रियाकर्मांतराचे मूळ आहे, असे दिसते.

पितृश्राद्धाच्या इतिहासक्रमाने रूढ झालेल्या तीन अवस्था दिसतात, त्या अशा——अग्नौकरण ही पहिली अवस्था. हिच्यात समिधा आणि पिंड यांची अग्नीत आहुती द्यायची असते. ऋग्वेद-काली या अवस्थेला प्राधान्य होते. दुसऱ्या अवस्थेत पिंडदान प्रचारात आले. यजुर्वेद, ब्राह्मणे आणि श्रौत व गृह्यसूत्रे यांत पिंडदानाचे विधान आहे. तिसऱ्या अवस्थेत ब्राह्मणभोजन आवश्यक मानले गेले व श्राद्धविधीतला तो प्रमुख भाग ठरला. श्राद्धाला ब्राह्मण मिळत नसल्यास दर्भाच्या ब्राह्मणाला (चट) क्षण देऊन त्याच्या पुढे भोज्य पदार्थ वाढावे, असे सांगितले आहे. सांप्रतच्या पार्वण श्राद्धात वरील तीन्ही अवस्था एकत्रित झाल्या आहेत. हे श्राद्ध गृहस्थाला कर्तव्य म्हणून सांगितले आहे.

पुढे श्राद्धाचे अनेक प्रकार प्रचारात आले. मंगलकार्याच्या आरंभी कार्य सुसंपन्न व्हावे, म्हणून नांदीश्राद्ध करावे, कोणत्याही पर्वतिथीस पितरांना उद्देशून ब्राह्मणभोजन घालावे, यात्रेला गेल्यावर प्रत्येक तीर्थावर पितरांचे श्राद्ध करावे, गयेतल्या विष्णु-पदावर पितरांसाठी पिंडदान करावे, भाद्रपद मासाच्या कृष्ण पक्षात सर्व पितरांना उद्देशून महालय श्राद्ध करावे, मार्गशीर्ष शुक्ल द्वितीयेस पितरांची पूजा करावी, अक्षय्य तृतीयेस पितरांना उद्देशून आमान्न, उदकुंभ, पंखा, छत्री, पादत्राण, या वस्तू दान द्याव्या, असे पुराणांनी सांगितले आहे. हे सर्व प्रकार पितृपूजेचेच होत.

पितरांना वंशजांकडून जशी पिंडाची व ब्राह्मणभोजनाची अपेक्षा असते, त्याचप्रमाणे त्यांना उदकाचीही अपेक्षा असते. पितरांना उद्देशून दिलेले हे उदक म्हणजेच पितृतर्पण होय. पार्वण श्राद्ध केल्यानंतर दुसऱ्या दिवशी पितृतर्पण करावे, असे सांगितले आहे. इतकेच नव्हे, तर गृहस्थाला नित्य ब्रह्मयज्ञ विहित असल्याचे सांगून देव-ऋषि-पितृतर्पण त्याला जोडून दिले आहे. वराह पुराणात ब्रह्मदेव पितरांना सांगतो—

**अमावास्यादिनं वोऽस्तु तस्यां कुशतिलोदकैः ।**
**तर्पिता मानुषैस्तृप्तिं परां गच्छत नान्यथा ।।**

अर्थ — पितर हो, अमावास्या हा दिवस तुमचा असो. त्या दिवशी कुशतिलयुक्त उदकाने माणसे तुमचे तर्पण करतील, त्या वेळी तुम्हांला परम तृप्ती लाभेल, अन्यथा नाही.

पितरांविषयी आदर बाळगणे, त्यांच्या नावे दानधर्म करणे व त्यांना संतोष होईल अशी कृत्ये करणे हे वंशजांचे कर्तव्य आहे, असे धर्मशास्त्र सांगते. 'देवपितृकार्याभ्यां न प्रमदितव्यम्'= देव आणि पितर यांच्या कार्यात हेळसांड करू नये' असा उपनिषदांचा आदेश आहे. जन्माला येणाऱ्या माणसावर जी तीन ऋणे असतात, त्यांत एक पितृ-ऋणही असते. कुलाची कीर्ती वाढवून व प्रजोत्पत्ती करून ते ऋण फेडायचे असते.

श्रौत-स्मार्त श्राद्धादिविधीचा ज्यांना अधिकार नाही, अशा भारतातील असंख्य जाती-जमाती आपापल्या परंपरेप्रमाणे पितृपूजा करताना आढळतात. या पितृपूजेत अन्नदानाला विशेष प्राधान्य असते. बहुतेक लोक पितृपक्षात पितरांसाठी आप्तेष्टांना गोडधोड भोजन घालतात. काही लोक कावळ्याला किंवा गायीला सुग्रास अन्न देतात. काही जातीत पितरांच्या नावाने काही टाक किंवा नारळ घरात ठेवलेले असतात. निरनिराळे प्राणी किंवा वृक्ष हे कित्येक जातींची देवके असतात. त्या त्या वृक्षात अथवा प्राण्यात पितरांचे आत्मे वास्तव्य करीत असतात, अशी त्यांची समजूत असते. त्यामुळे लग्नकार्यात सर्वाआधी देवकांची पूजा होत असते. काही लोक ठराविक काळात पितरांच्या उद्देशाने वड, पिंपळ, बाभूळ, बोर व तुळस यांच्या मुळात पाणी घालतात. ज्याने एखादे गाव वसविले असेल, तो पुरुष त्या सगळ्या गावाचा पितर होतो. त्यामुळे ग्रामस्थ लोक वर्षातून एकदा सामुदायिकपणे त्याची पूजा करतात. कित्येकदा सर्व पितरांचा प्रतिनिधी म्हणून यमाचीही पूजा करतात.

काही लोक मृतांची स्मारकेही उभारतात. जिथे अंत्य संस्कार केला असेल त्या जागी लहानसा चौथरा उभारणे किंवा लहानसे मंदिर उभारून त्यात शिवलिंगाची स्थापना करणे, अशा गोष्टी कित्येक ठिकाणी केल्या जातात. आसाममधील खासी जमातीत मृतांचे स्मारक म्हणून एखादा उंच दगड उभा पुरण्याची प्रथा आहे. नाग, मिकिर, कुकी, लुशाई, इ. जमाती, तसेच मध्य प्रदेशातील भिल्ल, सौराष्ट्रातील चारण, इ. लोकही आपल्या पितरांची अशा प्रकारची स्मारके उभारून वर्षातल्या ठराविक दिवशी त्यांची पूजा करतात.

## पितृयान

ऊर्ध्व लोकी जाण्याचा एक मार्ग. याला कृष्ण गती असेही म्हणतात. पाहा — देवयान—पितृयान.

## पितृव्रत

एक काम्य व्रत. पितरांना संतुष्ट करण्यासाठी हे व्रत करतात. व्रतावधी एक वर्ष. प्रत्येक अमावास्येला केवळ दुधावर राहणे व उद्यापनाच्या वेळी श्राद्ध करून पाच गायी किंवा सवस्त्र उदकुंभ दान देणे, असा याचा विधी आहे. फल — शंभर पूर्वजांना मोक्षप्राप्ती आणि व्रतधारी व्यक्तीला विष्णुलोकप्राप्ती. [ हि. ध. ]

## पिनाकी

एक वाद्य. आधुनिक व्हॉयोलिनचे हे मूळ रूप आहे. याचा आकार धनुष्यासारखा असतो. याची दोन्ही टोके एका दोरीने बांधलेली असल्याने त्याचा आकार टिकून

राहतो. याचे खालचे टोक एका भोपळ्यावर आधारलेले असते. याच्या दोन्ही टोकांना तांती बांधलेल्या असतात. त्याच्या मध्यावर तांतींच्या खाली पावणे दोन वोटे लांबीची एक घोडी बसवलेली असते. स्वरस्थानावर तांती दाबता याव्या, म्हणून ही बसवतात. धनुकलीने हे वाद्य वाजवतात. धनुकलीला घोड्याच्या शेपटीचे केस बांधतात. तिच्यावर राळ घासली, की ती चांगली फिरते. खालचा भोपळा पायात धरतात व वरचे टोक खांद्यावर ठेवून डाव्या हाताने तांतींवर दाब देऊन हे वाद्य वाजवतात. [ सं. शा. ]

**पिपीलिकामध्य चांद्रायण** एक व्रत. याचा विधी असा— शुक्ल चतुर्दशीस उपवास करून पौर्णिमेस व्रतारंभ करावा. त्या दिवशी 'आप्यायस्व' 'सं ते पयांसि' व 'नवो नवो' या तीन मंत्रांनी चंद्राचे तर्पण करून त्याच मंत्रांनी आज्यहोम, हवीचे अभिमंत्रण व चंद्राचे उपस्थान करावे. नंतर तिथींच्या संख्येइतके ग्रास करून 'ॐ भूः ॐ भुवः' इ. मंत्रांनी ते अभिमंत्रित करावे. विनासायास जेवढे अन्न घशाखाली जाईल तेवढाच घास घ्यावा. या ग्रासासाठी सातू, कण्या, यवान्न, शाक, दूध, दही, तूप, फळे, उदक या वस्तू चालतात. पहिल्या दिवशी पौर्णिमेस पंधरा ग्रास घ्यावे. पुढे वद्य पक्षातल्या प्रत्येक तिथीला एकेक घास कमी कमी करीत आणावा. अमावास्येला संपूर्ण उपवास करून पुन्हा पौर्णिमेपर्यंत एकेक घास वाढवीत जावे. फल — अतिपातकांचा क्षय. [ नि. सि. ]

**पिप्पलाद** एक ऋषी. पिंपळाची पाने खाऊन जगणारा असा या शब्दाचा अर्थ आहे. त्याच्या मातेची गभस्तिनी, सुवर्चा व सुभद्रा अशी तीन नावे आढळतात. गभस्तिनी ही दधीची ऋषीची पत्नी होय. दधीची मृत झाला, तेव्हा त्याची पत्नी गभस्तिनी ही गरोदर होती व परस्थळी होती. पतीच्या मृत्यूचे वर्तमान ऐकताच तिने पोट फाडून आपला गर्भ बाहेर काढला व तो पिंपळाच्या झाडाखाली ठेवला. एवढे करून ती सती गेली. त्या गर्भाचे वृक्षांनी संरक्षण केले. पुढे त्यातून एक बालक बाहेर पडला, तोच पिप्पलाद होय.

पशुपक्ष्यांनी याचे संरक्षण केले व सोमाने याला सर्व विद्या शिकवल्या. आपल्या मातृपितृवियोगाला शनी कारण आहे, असे जाणून याने त्याला आकाशातून खाली पाडले. परंतु शनी शरण आल्यामुळे 'यापुढे बारा वर्षांच्या आतील मुलांना तू त्रास देऊ नकोस,' असे त्याला बजावून पिप्पलादाने त्याला सोडून दिले. गाधी, पिप्पलाद व कौशिक यांचे स्मरण केले असता शनीची पीडा होत नाही, असे म्हणतात. आपल्या माता-पित्यांना भेटण्यासाठी देवांच्या मदतीने हा स्वर्गात गेला. तिथून परत आल्यावर याने गौतमकन्येशी लग्न केले ( ब्रह्म पु. ११०-२२५).

दधीचीने जिथे देहत्याग केला, तिथे कामधेनूने दुधाची धार सोडली. म्हणून त्या स्थानाला दुग्धेश्वर असे नाव पडले. पिप्पलाद त्या ठिकाणी तपश्चर्या करीत असे, त्यावरून त्या स्थानाला पिप्पलादतीर्थ असे म्हणू लागले.

वेदव्यासाने आपला शिष्य सुमंतु याला अथर्वसंहिता दिली. पिप्पलाद हा सुमंतूचा शिष्य होय. अथर्ववेदाच्या एका शाखेचे याने प्रवर्तन केले, म्हणून त्या शाखेला पिप्पलादशाखा असे नाव पडले. अथर्ववेदाची एक पाठशालाही याने स्थापन केली होती. हा मोठा दार्शनिक होता. कबंधी कात्यायनाने त्याला जगदुत्पत्तीसंबंधी प्रश्न विचारला असता त्याने उत्तर दिले, ते असे—

सृष्टीच्या उत्पत्तीपूर्वी जगत्कर्ता होता. त्याने रै व प्राण ही जोडी निर्माण केली. या दोन तत्त्वांनी एकत्र येऊन सर्व प्राणिमात्रांची उत्पत्ती केली. प्राण हा आत्म्यापासून उत्पन्न झाला आणि आत्म्यावर छायेप्रमाणे पसरला. मनाच्या क्रियेने प्राण मानवी शरीरात प्रवेश करतो व पाच रूपांत स्वतःला विभागतो.

त्याने गार्ग्याला सांगितले, की 'गाढ झोपेत इंद्रिये निष्क्रिय असतात; फक्त जाणीव तेवढी कार्य करीत असते.' शैब्य सत्यकामाला तो सांगतो, की 'ॐकाराच्या निरनिराळ्या मात्रांचे ध्यान केल्याने जीव–ब्रह्मैक्य साधते.' दुसऱ्या एका ठिकाणी तो सांगतो, की 'ॐकाराचे ध्यान व योगमार्ग यांनी परब्रह्माची प्राप्ती होते.' शरभ उपनिषद हे पिप्पलादाचे महाशास्त्र असून, त्यात ब्रह्मा, विष्णू व महेश यांची एकरूपता सांगितली आहे. भीष्माच्या निर्वाणसमयी हा मुनिगणांसमवेत तिथे उपस्थित होता. [ क्रि. स्ट. ले. उ.; हिं. मा.; प्रा. च. को.; म. ज्ञा. को. ]

**पियो** एक पक्षी. संथाळ आदिवासींच्या जीवनात याला महत्त्वाचे स्थान आहे. याचा रंग पिवळा असून, हा 'पिऊ पिऊ' असा आवाज काढतो. एखाद्या संथाळ आदिवासीच्या घराजवळ त्याचा आवाज आला किंवा त्याचे दर्शन घडले, की त्या घरच्या मुलीचे लौकरच लग्न होणार, असे समजतात. पियो एखाद्या मुलीसाठी वरसंशोधनही करतो, अशी समजूत आहे.

**पिशाच** (१) एक अतिमानवी योनी. मानवाच्या मृत्यूनंतरच्या अस्तित्वासंबंधीची ही एक कल्पना आहे. पिशाचांचा दर्जा राक्षसांच्या खाली मानतात. प्रजापतीने राक्षस

व असुर याच्याबरोबरच पिशाचाची उत्पत्ती केली. पुराणमते पिशाच हे कश्यपाला क्रोधवशा या भार्येपासून झालेले पुत्र होत

एखाद्याच्या मृत्यूने त्याच्या जीवनाची समाप्ती व्हावी, हे मानवाच्या भावनेला पटेना. म्हणून त्याने मृत्यूनंतरच्या देहहीन परंतु वासनामय अशा अदृश्य जीवनाची कल्पना केली आणि त्या कल्पनेतून भूतयोनी जन्माला आली, असा ऐतिहासिकाचा तर्क आहे 'पिशितं मांसमश्नातीति पिशाचः'= मांस भक्षण करणारा तो पिशाच होय, अशी पिशाच शब्दाची व्याख्या आहे. युद्धात जेव्हा माणसे मरतात, तेव्हा त्यांच्या रक्तमांसाचे भक्षण करण्यासाठी तिथे भुतावळ जमते, अशी सांकेतिक वर्णने वाङ्मयात अनेक ठिकाणी आढळतात. ती वर्णने वरील व्याख्येला धरूनच आहेत. स्थूलपणे भूत, प्रेत, पिशाच हे एकाच कल्पनेचे पर्याय मानले जातात.

मानवी समाजात ज्या कल्पना दृढमूल झालेल्या आहेत, त्यांत पिशाचाचे अस्तित्व ही एक कल्पना आहे. मानवाच्या आरंभावस्थेतच या कल्पनेचा प्रादुर्भाव झाला असावा.

भुतेखेते ही वस्तुस्थिती आहे, की कल्पना आहे याचा निर्णय करणे कठीण असले, तरी त्यांच्या अस्तित्वासंबंधीची खात्री मानवाने हजारो वर्षांपूर्वीपासून गृहीत धरली आहे. त्यांचा उद्भव, संचार, इच्छेनुसार रूप धारण करण्याची शक्ती, पीडा देण्याचे आणि प्रसंगी भले करण्याचे सामर्थ्य, स्वभाव, निवासस्थाने, त्यांच्या शक्तीच्या मर्यादा, त्यांना प्रसन्न करून घेण्याचे, प्रतिबंध करण्याचे किंवा हुकमतीत ठेवण्याचे उपाय, तसेच त्यांच्या प्रतिबंधाची किंवा त्यांना हुकमतीत ठेवण्याची शक्ती बाळगणारे मांत्रिक या सर्वांविषयी मानवी मनाने अनेकविध कल्पना उराशी बाळगल्या आहेत. या भूतविश्वाच्या अंगोपांगाचा तपशील इतका सूक्ष्म आहे, की मानवाला त्या संबंधीचा मानसिक पातळीवरचा अनुभव हा वास्तव अनुभवच वाटत आलेला आहे.

धर्मकल्पनेच्या उदयाबरोबरच पिशाचकल्पनेचा उदय झाला असावा, असे एक मत आहे. वैदिक काळापासून तर ती आढळतेच. ऋग्वेदात 'पिशाचि' असा शब्द आलेला आहे (१·१३३·५). पण त्याहीपेक्षा पिशाचविषयक निश्चित पुरावा रामायणात आढळतो, तो असा—

**जानकी तु महाराज निःश्वसन्ती तपस्विनी ।**
**भूतोपहतचित्तेव विष्ठिता विस्मृता स्थिता ।।**

(वा. रा. अयोध्या. ५८·३४)

अर्थ– महाराज, गरीब बिचारी जनककन्या तर भुताने झपाटल्याप्रमाणे निरोप वगैरे सांगण्याचे सर्व काही विसरून जाऊन दुःखाने सुस्कारे टाकीत उभी राहिली आहे.

पुत्रवियोगाने कौसल्येची स्थितीदेखील भुताने पछाडल्याप्रमाणे झाली होती, असेही म्हटले आहे (वा. रा. अयोध्या ६०·१). याशिवाय महाभारत, भागवतादी पुराणे यांतूनही पिशाचाचे संदर्भ जागोजाग आढळतात. मनुस्मृतीतदेखील पिशाचाचा उल्लेख आला आहे (१·४३).

जिवंतपणी वासना अतृप्त राहिल्यास मनुष्य मृत झाल्यावर तो पिशाचयोनीत जातो, अशी मुख्य समजूत आहे अकाली मरण पावणारी व अपघातात मरणारी माणसेही पिशाच बनतात सतत दुष्कृत्ये करणाऱ्यांनाही याच योनीत जावे लागते. मृताचे अंत्यसंस्कार विधियुक्त झाले नाहीत, तर तीही माणसे पिशाच बनतात विश्वासघात, फसवणूक अत्याचार यामुळे मानसिक किंवा शारीरिक यातना होऊन मरणारी आणि जीवनातील वैफल्यामुळे आत्महत्या करणारी माणसेही पिशाच बनतात, अशी कल्पना आहे

**बाह्यस्वरूप**– ज्या मानाने व्यक्तीची आशा, इच्छा अथवा सूडबुद्धी असेल त्या मानाने त्या त्या पिशाचाचे आकार बनतात. निरनिराळ्या प्रांतांत भुतांची वर्णने निरनिराळी आढळतात पंजाबातील व काश्मीर प्रदेशातली भुते गोरीपान असतात, तर तमिळनाडु व कर्नाटक यांतील भुते काळी असतात, असा समज आहे त्या त्या प्रदेशातील माणसांचा जो रंग तोच सर्वसामान्यपणे त्यांच्या भुतांचाही रंग मानला जातो, असे यावरून दिसते. भुतांची शरीरे विकृत, कुरूप व भयंकर असतात त्यांच्या तोंडात हिंस्रप्राण्यांसारखे दात असतात. त्यांचे हातपाय उलटे असतात. गळ्यात रुंडमाळा असतात त्यांच्या घशाचे भोक सुईप्रमाणे बारीक असते असा देहाकार असूनही ती वायुरूप असतात त्यामुळे त्यांची छाया पडत नाही ती विविध रूपे धारण करू शकतात. त्यांच्या अंगी जबरदस्त शक्ती असते भुतांची संख्या अगणित मानलेली आहे. मेलेल्या माणसांची भुते होतात, या धारणेतूनच स्मशान हे त्यांचे क्रीडास्थान ठरविण्यात आले असावे. त्यामुळे त्यांचा राजा हा चिताभस्म अंगाला फासतो व गळ्यात नरमुंडमाला धारण करतो, अशी कल्पना उदित झाली यातूनच शिव हा स्मशानवासी असल्यामुळे तो भुतांचा नियंत्रक असल्याची कल्पना निघाली आणि शिवमंदिरे स्मशानाशेजारी उभारली जाऊ लागली.

**भुतांचे वर्गीकरण**– सुष्ट आणि दुष्ट अशा प्रवृत्तीवरून भुतांचे स्थूल वर्गीकरण केलेले आहे. स्त्री भुते व पुरुष भुते असाही एक भेद आहे विवाहपूर्व व विवाहोत्तर मरणाने बनलेली व ब्राह्मण-ब्राह्मणेतर जातींची असेही एक वर्गीकरण आहे. त्यांच्या निवासस्थानावरूनही त्यांचे बरेच प्रकार संभवतात.

**काही प्रमुख भुतांची वैशिष्ट्ये**– खून झालेल्या माणसाचे भूत रागीट आणि सूड घेणारे असते. ज्या ब्राह्मणाचा खून

होतो, त्याच्या भुताला ब्रह्मराक्षस, ब्रह्मासुर किंवा ब्रह्मदैत्य असे म्हणतात. तो ब्राह्मण जितका विद्वान असेल, तितके त्याचे भूत प्रभावी असते. बंगालमध्ये अशा भुतांना महाभयंकर समजतात. ती सर्वशक्तिमान आणि विध्वंसक असतात. शिर नसलेले धड आणि छातीला डोळे असे त्यांचे स्वरूप असते. ओसाड प्रदेशात किंवा वठलेल्या झाडावर राहून अशी भुते प्रवाशांना दगड मारीत असतात, असेही सांगतात.

इच्छा अतृप्त राहिलेल्या माणसांच्या भुतांचे अनेक प्रकार कल्पितात. विधवा, विधुर आणि निपुत्रिक स्त्रिया यांचीही भुते असतात. यांपैकी सर्वांत भयंकर असलेल्या भुतांना चुडेल म्हणतात. पंजाबमध्ये ही भूत-स्त्री फार सुंदर असते, अशी समजूत आहे. ती उलटया पायाने वावरते आणि मुख्यतः आपल्याच कुटुंबातील माणसांना उपद्रव देते. हिच्या पोटाला झाडाच्या ढोलीसारखे भोक असते. तमिळनाडमधील या प्रकारचे भूत न्हाणीवर किंवा स्वयंपाकघर या ठिकाणी वावरते. ते आपल्या सवतीला व तिच्या मुलांना पछाडते. एक-दोन मुले झाल्यानंतर मृत्यू पावलेल्या स्त्रीचे भूत लठ्ठ पोट व हातपाय कृश अशा रूपाचे असते. केव्हा केव्हा ही भुते सुंदर स्त्रीचे रूप घेऊन पुरुषांबरोबर वावरतात आणि त्याला आपल्या कह्यात घेऊन आपला कावा साधतात.

दुःखी मुले आणि अविवाहित पुरुष यांच्या भुतांना झोटिंग म्हणतात. असे भूत ज्या झाडावर असते, त्या झाडाखालून एखादा प्रवासी गेला, तर तो आजारी पडतो व त्याच्या दुर्दैवाला सुरुवात होते.

**भुतांची काही नावें–** विशिष्ट भुतांना काही नावे दिलेली असतात, ती अशी–

(१) वेताळ– याला भुताखेतांचा राजा समजतात. हा भूत नसून देवता आहे, अशीही एक समजूत आहे. हा मांत्रिकाच्या अंगात शिरून दुसऱ्याच्या अंगातील भुते काढण्याच्या कामी त्याला मदत करतो. कोकण आणि गोमंतक या भागात याची देवळेही आहेत.

(२) ब्रह्मग्रह– वेदपारंगत पण गर्विष्ठ ब्राह्मणाचे भूत.

(३) समंध– ज्याला वारसा नसतो व ज्याचे अंत्यसंस्कार विधियुक्त होत नाहीत, तो अथवा लोभी माणूस समंध होतो व तो आपल्या संपत्तीचा कोणाला उपभोग घेऊ देत नाही.

(४) ब्रह्मसमंध– ब्राह्मण पण धनलोभी माणसाचे भूत. मृत्यूनंतर तो आपल्या धनाचे रक्षण करतो. धनाला कोणी हात लावला नाही, तर तो कोणालाही पीडा देत नाही.

(५) देवचार– लग्न झाल्यानंतर मेलेल्या शूद्राचे भूत. गावातली भुते याच्या ताब्यात असतात. याला प्रसन्न करण्यासाठी कोंबडे, बकरे, इ. बळी देतात. त्यामुळे तो गावाचे रक्षण करतो.

(६) मुंजा – सोडमुंज होण्यापूर्वी मरण पावलेल्या ब्रह्मचारी ब्राह्मणाचे भूत. मुंजा पिंपळाच्या झाडावर राहतो व लोकांना पछाडतो. याच्या कमरेभोवती लहान लहान घंटा असतात. पूर्वास्पृश्य जातींपैकी कोणी जर पिंपळाला स्पर्श केला, तर तो त्याला ताबडतोब पछाडतो, असे म्हणतात.

(७) खविस– मुसलमान, महार, वडार, लमाण यांच्या भुतांना खवीस म्हणतात. हा माडाएवढा उंच असतो. अविवाहित पुरुष मरण पावला तर, तोही खविस होतो, अशी समजूत आहे.

(८) गिऱ्हा– पाण्यात बुडून मरणाऱ्याचे अथवा ज्याचा खून होतो, त्याचे भूत. गिऱ्हा सामर्थ्यवान नसतो. तो पाण्याच्या काठावर राहतो व रात्री एखाद्या माणसाला त्याच्या नावाने हाका मारतो आणि भलत्याच मार्गाने नेऊन त्याला फसवतो. तसेच रात्री नदी ओलांडून लोक पैलतीरावर चालले असता त्यांना त्रास देतो आणि त्यांना खोल पाण्यात नेऊन बुडवतो. याच्या डोक्याचा केस एखाद्याला मिळाला, तर हा त्याचा कायमचा दास होतो.

(९) चेटक – हे कुणबी अथवा शूद्र मनुष्याचे भूत असते.

(१०) झोटिंग– खारवी अगर कोळी जातीच्या मनुष्याचे भूत. मुसलमानाच्या भुतालाही झोटिंग म्हणतात. झोटिंग एका झाडावर एक पाय व दुसऱ्या झाडावर दुसरा पाय ठेवून उभा राहतो. याला डोके नसते, अशी समजूत आहे.

(११) वीर– अविवाहित क्षत्रिय पुरुषाचे भूत. त्याला परदेशचे भूत असेही म्हणतात. हा लढाऊ पोशाख करून हातात ढाल–तलवार घेऊन रात्री भटकत असतो.

(१२) चेडा– अविवाहित महाराचे भूत. हा डोंगरात, अरण्यात किंवा गावाच्या सीमेवर राहतो व पाळीव जनावरांना त्रास देतो.

(१३) म्हसोबा– हा भुतांचा राजा असून वेताळाइतकेच त्याचे सामर्थ्य असते. अनेक ठिकाणी याची देवळे असतात.

(१४) जाखीण-अळवंत – बाळंतपणात अथवा रजस्वला अवस्थेत मृत्यू पावलेल्या सुवासिनीचे भूत. ही स्मशानात राहते. ज्यांना ही पछाडते, त्यांना तिच्यापासून मुक्त करण्यासाठी नरसोबाच्या वाडीला किंवा गाणगापूरला नेतात. हिला अवगत असेही म्हणतात.

(१५) लाव– रजस्वलावस्थेत मरणाऱ्या स्त्रीचे भूत. लाव आणि विवशा ही सवतीसवतीची भुते असतात.

(१६) लावसट– विधवेचे भूत. स्मशान हे त्याच्या राह-

ण्याचे ठिकाण होय. गुराढोरांना पीडा देणे, कपडे फाडणे, प्रेते खाणे हे त्याचे विशेष गुणधर्म आहेत, असे म्हणतात.

(१७) हडळ– बाळंतीण झाल्यापासून दहा दिवसांच्या आत अथवा रजस्वला अवस्थेत जी स्त्री मृत्यू पावते, ती हडळ होते. ती हिरवा पोशाख करते व स्मशानात किंवा चिंचेच्या झाडावर राहते. ती कोणत्याही माणसाला पछाडते, पण वेताच्या छडीने झोडपली, की त्याला सोडून जाते.

(१८) जिद – कृपण पुरुषाचे भूत. ते मनुष्याचा अथवा सापाचा आकार धारण करते. ब्रह्मसमंधाप्रमाणे ते आपल्या पुरून ठेवलेल्या द्रव्यावर बसते. त्या द्रव्याला कोणी हात लावला नाही, तर ते कोणाला त्रास देत नाही.

(१९) पिलर – ठेंगणी व टोळच्या करून हिंडणारी भुते. ती अपाय करणारी तशीच उपकारकही असतात.

(२०) यदम कडताई–– खूप मुलांच्या गरीब आईचे भूत. ती आपल्या मुलांना अन्न घालण्यासाठी सर्वांना उपद्रव देत असते.

(२१) कबंध–– अनिच्छेने लढाईत जाऊन मेलेल्याचे भूत. हा रणभूमीवर राहतो आणि त्या बाजूने जाणाऱ्या-येणाऱ्यांना पछाडतो.

(२२) म्हैसासुर–– रेड्याच्या आकाराचे भूत. हा इतका भयंकर असतो, की लोक त्याला पाहून घाबरतात, रक्त ओकतात व तिथल्या तिथे प्राण सोडतात

(२३) कर्णपिशाच–– या प्रकारचे भूत मागे घडलेल्या व पुढे घडणाऱ्या गोष्टी कानात सांगते. कदाचित विद्वान ज्योतिषी ब्राह्मणाचे हे भूत असावे.

(२४) राणोबा–– हा रानात राहतो आणि रात्री गाड्यांचे बैल सोडून देतो, असे म्हणतात. गाडीवाला जर सूर्योदय होईपर्यंत गाडीतच राहिला, तर त्याला मात्र तो इजा करीत नाही.

**इतर काही भुते** – सटवाई नावाचे एक भूत आहे. ते स्त्रियांना बाळंतपणात त्रास देते आणि जन्मलेल्या मुलाला पाचव्या अथवा सहाव्या दिवशी मारून टाकते. शाकिणी हे अविवाहित मुलीचे भूत असून, तळखांबा हे खालच्या जातीच्या अविवाहित पुरुषाचे भूत असते. बापा नावाचे भूत शेताचे रक्षण करते. त्याच्या नावाने शेताच्या सीमेवर एक दगड पुरतात, त्याला शेंदूर लावतात आणि त्याची पूजा करतात. दर वर्षी त्याला बळी द्यावा लागतो. तसे न केल्यास ते शेतमालकाला त्रास देते. पाणिपात्र नावाच्या भुताचे मस्तक हत्ती किंवा उंट यांच्याप्रमाणे असते. कालकाई आणि वहिरोबा ही भुते कोणाला उपद्रव करीत नाहीत. त्यांची जर एखाद्यावर कृपा झाली, तर त्याला बारा वर्षेपर्यंत समृद्धीचा लाभ होतो. नंतर मात्र त्या समृद्धीचा नाश होतो. हिरवा, वाघोबा, गांगुड, मैतान या नावांचीही भुते असतात. हिरव्याला भांग, भाकरी, लसूण व धनुष्यबाण लागतात. वाघोबा रानातल्या गुराढोरांना त्रास देतो. त्याला नारळ आणि तुपाचे दिवे द्यावे लागतात. याशिवाय आणखी काही भुतांची नावे पुढीलप्रमाणे––

वंत्री, बावरो, डाकण, शाकिणी, डाकिणी, कुष्मांड, बोड, ढोलियो, वले मरद, भूचर, खेचर, जलाई, जाखरो, शिकोतरा, अष्टाथरो, चंदचाणी, चोरोसी, कांतिणी, जोगणी, हथाडी, मियाळी, धांचिणी, मोतिणी, बलगडी, मोळणी, खुटिणी, मारीच, सुती, गवती, बेठी, उभी, आवी, चौरार, मत्रपत्रंती, मासखवंती, भाषिका, प्रताव वीरा, खंचरा, चौरासीवीरू, नावनरसिंग, जेखा, जुटका, मसिदा, गधर्वी, जानी अस्मानी, मामीकुला, झंपाडी, नेलाडी, बल्का, कोन्दा, वेतालिक, पुरश्न, शिकोनरू, खिजडिओ, मामो जान, राखेवलियो, अंधारिओ, सोव लियो, खुळियो, रगतियो, तक्षमी, जीज, नाथोबा चलेगट, राणूबाई, सोनूबाई, अड्डवनती, कुलकोल्हा, यक्षकिमर, कोल्हीदेव, मल्लद चवडो, चावडी, बावन्नी, महापती, हेल्लगोली, गेंडगोली, किला, रेणगोती, हुलसू व जल्मी.

**पिशाचांची निवासस्थाने**– भुते विशेषत: पिंपळ, कवठी, चिंच, बाभूळ, अडुळसा, इ. झाडांवर; तसेच तिवाठ्यावर, गलिच्छ जागी, पडक्या घरात, पडक्या विहिरीत, नदीकाठी, ओढ्याकाठी, तळ्याकाठी, गावाच्या सीमेवर व चुलीत राहतात. स्मशानाला तर भुतांचे जन्मस्थानच मानतात द्रविड लोक घराच्या आढ्यांत भूत राहते, असे समजतात व स्त्रियांना आणि पाहुण्यांना आढ्याखाली उभे राहू अथवा झोपू देत नाहीत. उ. भारतात फुलांमध्ये भुतांचा निवास असतो, अशी समजूत आहे. म्हणून त्या प्रदेशातले लोक लहान मुलांना फुलांचा वास घेऊ देत नाहीत.

भुते मंदिरात आणि स्वच्छ उजेडाच्या जागी राहू शकत नाहीत. त्याचप्रमाणे ती कधी जमिनीवरही बसत नाहीत. काही ग्रामदेवतांच्या मंदिरांतून भुतांना बसण्यासाठी खुंट मारून ठेवतात. कधी कधी विटा आणि बांबूही मांडतात.

**भूत लागल्याची लक्षणे**– जेव्हा एखाद्याला भूत पछाडते, तेव्हा तो माणूस वेडेचाळे करू लागतो किंवा आजारी पडतो. घुमणे, बडबडणे, आपणांस येत नसलेल्या भाषेत बोलणे, माहीत नसलेल्या गोष्टी सांगणे, प्रापंचिक नकारी अथवा सूडभावना व्यक्त करणे, शिव्याशाप देणे, विवस्त्र पळणे, डोळे तारवटलेले असणे, डोळ्यातल्या बाहुल्या मोठ्या होणे, झोप उडून जाणे, इ. सारी लक्षणे भूत लागल्याची आहेत.

एखाद्या वास्तूत भूत शिरले, की तिथे विक्षिप्त आकार दिसू लागतात, कधी निरनिराळे आवाज ऐकू येतात, कधी वस्तू पेट घेतात, कधी माणसांच्या अंगांवर चमत्कारिक खुणा उमटतात, कपडे पेटतात किंवा फाटतात, केस कापले जातात, तर कधी घरात लिंबे येतात. कधी दुभती जनावरे एकदम आटून जातात, तर कधी वस्तू फुटून जातात किंवा काळ्या पडतात.

**भूत निवारणाचे उपाय—** भुताखेतांपासून घर किंवा माणसे मुक्त करण्याचे अनेक मार्ग सांगितलेले आहेत. मृतांना पिंडदान करण्याने ते भूतयोनीतून मुक्त होऊन बाधा करण्याचे सोडून देतात. मृतांचे संस्कार विधियुक्त व वेळच्या वेळी केले, तर त्यांची भुते अपाय करीत नाहीत. भुताने पछाडलेले लोक अनेक वेळा एखाद्या मंदिराच्या आवारात किंवा विशेषत: दत्तमंदिरात जाऊन आराधना, प्रदक्षिणा, मंत्र-तंत्र, अंगारे-धुपारे वगैरे उपचार करतात. प्रामुख्याने गाणगापूर, माहूर, औदुंबर, नरसोबाची वाडी, इ. प्रसिद्ध दत्तस्थानात भुते काढण्याचे प्रकार चालतात. नरसिंह सरस्वतीच्या काळानंतर या स्थानांतून हे प्रकार सुरू झाले असावे. नरसिंह सरस्वतींनी भूतबाधा नष्ट केल्याची उदाहरणे गुरुचरित्रात आली आहेत, म्हणून दत्तस्थानांना या दृष्टीने महत्त्व प्राप्त झाले असावे, असे वाटते.

तमिळनाड प्रदेशात प्रेत पुरताना त्याच्या अवतीभवती उभे असणारे लोक म्हणतात, की 'बाबारे, आतापर्यंत तू आमच्यांत वावरत होतास, पण आता निघून गेला आहेस. पुन्हा आम्हाला त्रास द्यायला कधीही परत येऊ नकोस. तुझ्या पत्नीला त्रास देऊ नकोस. घरातील लहान मुलाबाळांना संकटात ढकलू नकोस किंवा रोगराई उत्पन्न करू नकोस. हे पूर्वजांनो, तुम्ही या मृतात्म्याला चार समजुतीच्या गोष्टी सांगा. त्याचे पिशाच त्रास देण्यासाठी वा अन्य कसलाही उपद्रव देण्यासाठी परत येणार नाही, याची दक्षता घ्या.'

भुताला भुलवून घराबाहेर काढून टाकणे हाही एक उपाय असतो. त्यासाठी घराच्या मागच्या दाराला उलटी पावले काढून त्यामार्गे भुताला घालवून देण्याचा विधी करतात. जे दार कधीही उघडले जात नाही, त्या दाराने काही मंत्र तंत्र करून भुतांना हाकलून देतात. काही वेळा प्रेतवाहकांना दिशा बदलायला सांगतात किंवा प्रेत उलटच्या दिशेने वाहून न्यायला सांगतात. प्रेताच्या हातापायाची बोटे दोरीच्या टोकाने करकचून बांधतात. काही वेळा ती कापडी शिवणीनेही झाकून टाकतात. एखादी स्त्री गर्मीसारख्या रोगाने मृत्यू पावली, तर मासे धरण्याच्या जाळ्यात तिला बांधतात. त्यामुळे तिच्या भुतालाच त्या जाळ्यात पकडून ठेवले, अशी त्यांची समजूत असते. नंतर ते जाळे जाळून किंवा पुरून टाकतात. स्मशानातून परत येताना मागे दगड मारतात व वाटेत काटे पसरतात. भुतांनी परत येऊ नये, हा त्यामागचा उद्देश असतो. मृताचे निकटचे नातेवाईक मुंडण करतात. त्यातही भुताने नातेवाईकांना ओळखू नये, हाच हेतू असतो. काही खालच्या जमातीत याच उद्देशाने प्रेताचे तोंड खाली करून ते पुरतात. भुताने त्यातून वाट काढू नये म्हणून खड्डयात काटेकुटे, दगड, वगैरे भरतात.

उत्तर भारतात घरातून प्रेत हलवताना उंबऱ्याबाहेर एक दगड, गायीचे शेण, लोखंड, विस्तव आणि पाणी ठेवतात. प्रेत हालवले, की सर्वजण त्या दगडाला स्पर्श करतात.

दुष्ट प्रवृत्तीच्या भुतांपासून संरक्षण व्हावे म्हणून काही अघोरी उपचारही प्रचारात आहेत. त्यांपैकी काही असे— एखादी गरोदर स्त्री मृत झाली, तर तिने भूत होऊन छळू नये म्हणून मूल तिच्या पोटातून बाहेर काढतात. तिच्या बोटात लहान लहान खिळे टोचतात. लोखंडाच्या गोल कड्यांनी तिचे आंगठे जखडून ठेवतात. प्रेतवाहक लोक अशा स्त्रीचे प्रेत दूरवर वाहून नेतात आणि तिथे तिचे घोट्यापासून पाय मोडून काढतात. त्यात मोठे काटे रुतवतात. तिला पुरताना तिचे तोंड खाली करतात. तिच्या बरोबर गाढवाची हाडे पुरतात आणि तोंडाने म्हणतात. 'परत आलीस तर गाढव होशील.' स्मशानातून परत येताना वाटेत मोहऱ्या पसरतात. भूत मोहरीचा प्रत्येक दाणा वेचीत बसते आणि मग त्याला घराचा मार्ग सापडत नाही.

एखादी स्त्री रजोदर्शनकाळी किंवा बाळंतपणाच्या दहाव्या दिवशी अथवा सहाव्या महिन्याची बाळंतीण असताना मेली, तर तिने भूत होऊ नये, म्हणून ब्राह्मण पुरोहिताकडून मंत्रतंत्र करून घेतात. तिच्या बोटात घोड्याच्या नालाची आंगठी घालतात, जवळच दिवा तेवत ठेवतात आणि भुताला नैवेद्य देतात. वधू-वरांना, प्रेतवाहकांना, अंत्यसंस्कार करणाऱ्यांना व शोक करणाऱ्यांना भूतबाधा होऊ नये, म्हणून त्यांच्यावरून अन्न ओवाळून टाकतात.

अनेक ठिकाणी अन्न, शिधा, कोंबडी, बकरे, रेडा वगैरे बळी देऊन भुतांना संतुष्ट करण्याची प्रथा आढळते. त्यासाठी शिजवलेले अन्न रस्त्याच्या कडेला फेकतात. हिमाचल प्रदेशात भुताने पछाडलेल्या माणसावरून अन्न ओवाळून टाकतात. त्या अन्नाला कोणी स्पर्श केला, तर भूत त्याला पछाडते अशी समजूत आहे.

पछाडलेल्या माणसाला चाबकाचे फटकारे मारूनही त्याचे भूत घालवण्याची पद्धत आहे. चाबकाचे फटके बसू लागले, की ते भूत बोलू लागते, गयावया करते आणि नंतर त्या व्यक्तीला सोडून जाते, असे समजतात. भूताने सोडून जाण्याचे नाकारले तर त्याला केरसुणीने किंवा वहाणांनीही मारतात. तोंडाने जितके अभद्र बोलता येईल तितके बोलतात. कित्येकदा अशा

व्यक्तीला देवापुढे नेऊन मार देतात. त्या वेळी भुताला विचारतात, की 'तुला काय पाहिजे ? काय केले म्हणजे तू जाशील?' मग ते भूत आपणाला जे हवे असेल ते मागते. त्या मागणीची पूर्तता झाल्यावर ते भूत माणसाला सोडून जाते.

जी पिशाचे रोगराई उत्पन्न करतात, त्यांचे निवारण करण्याच्या प्रथा थोड्या भिन्न आहेत. पंजाबात अमुक एक रोग उत्पन्न करणारे भूत आहे, असे समजताच मांत्रिक स्मशानात जातो, तिथून थोडी माती आणतो, पिशाचाने पछाडलेल्या माणसाजवळ ती माती ठेवतो व नंतर जवळच्याच झाडाला दोर बांधतो किंवा रोग्याला नखशिखांत बांधतो.

स्वतः बांधलेल्या घरातून ज्या मनुष्याला हाकलून देण्यात येते, त्याचे भूते त्याच घरात राहते. ते अन्य कोणालाही त्या घरात राहू देत नाही. ते घर पाडले म्हणजेच ते तिथून निघून जाते, असे म्हणतात.

**मांत्रिक व त्यांचे मंत्र-तंत्र–** भुते विध्वंसक कृत्ये करतात, या समजुतीतूनच भुते काढणे हा व्यवसाय निर्माण झाला. त्यातून भूतनिवारणाचे एक शास्त्रच बनले आहे. पंचाक्षरी किंवा मांत्रिक या शास्त्राचा अभ्यास करतात. त्यांना भगत, बेगा, बोंगा, परिहार, देवऋषी, इ. नावे आहेत. मांत्रिक आणि देवऋषी यांना भूतनिवारणाचे मंत्र प्राप्त होत असतात. त्यांचे एखादे कुलसंरक्षक भूत असते व ते त्यांना अनुकूल असते. ते भूत प्रयोगप्रसंगी त्याच्या अंगात संचार करते. जेव्हा त्याच्या अंगात भूत संचार करते, तेव्हा तो गरगर फिरतो, थै थै नाचतो, डोके फिरवतो व हातापायांना आळोखे-पिळोखे देतो. जवळ जवळ त्याला अर्धमूर्च्छा येते. अशा मांत्रिकाला आयुष्यभर काही पथ्ये पाळावी लागतात. त्याने कोणत्याही परस्त्रीशी बोलावयाचे नसते. चटईवर किंवा घोंगड्यावर झोपायचे असते. जेवताना दिवा गेला, तर पुढे जेवायचे नसते. जेवताना दळणाचा, धुण्याचा, कांडण्याचा आवाज ऐकायचा नसतो. रजस्वला स्त्रीचा शब्द त्याच्या कानावर येता कामा नये. तिने त्याची खोली झाडता कामा नये. यांपैकी कोणतीही गोष्ट घडली, तर मांत्रिकाला दिवसभर उपवास करावा लागतो. ठराविकच अन्न त्याला खावे लागते. शिळे किंवा दोनदा शिजविलेले अन्न त्याला खायचे नसते. हे नेमधर्म मांत्रिकाने पाळले नाहीत, तर त्याचा मंत्र निरुपयोगी ठरतो. त्याचप्रमाणे त्याने आपल्या पिशाचविद्येवर पैसाही मिळविता कामा नये, असे सांगितले आहे.

भुतांशी समरस होण्यासाठी काही वेळा मांत्रिक बळी दिलेल्या पशूचे रक्तप्राशन करतो, त्यामुळे त्याच्या अंगात भूतसंचार होतो. दक्षिणतला माडिगा मांत्रिक पोतराज किंवा वीरावेसी भूताचे पारिपत्य करतेवेळी आपल्या दातांनी बळी दिल्या जाणाऱ्या बोकडाला दंश करतो आणि मग त्याचा गळा कापतो. उ. भारतातही अशाच तऱ्हेची उपचारपद्धती आहे.

मांत्रिकांच्या प्रयोगांना जे यश प्राप्त होते ते मंत्रामुळे होय. मंत्राचे सामर्थ्य 'मन्त्राधीनं जगत्सर्वम्' या वचनावरून समजते. महाराष्ट्रात गुरुचरित्र, नवनाथभक्तिसार हे ग्रंथ मंत्ररूप आहेत, या समजुतीने भूतबाधा नष्ट व्हावी म्हणून विशिष्ट विधिविधानांसह ते वाचले जातात.

मंत्राबरोबर यंत्राचेही महत्त्व पिशाचविद्येत आहे. यंत्राची आकृती उडीद, सातू अथवा हळद याची बनवितात. एखाद्या व्यक्तीच्या किंवा वस्तूच्या भोवती तिला बंदिस्त करण्यासाठी अथवा तिच्या संरक्षणासाठी विशिष्ट प्रकारची वर्तुळे काढण्याचीही प्रथा आढळते भुतांना आवाहन करतेवेळी मांत्रिक स्वतः-भोवतीही असेच वर्तुळ काढीत असतो. हे वर्तुळ जमिनीवर बोटाने किंवा काठीने काढतात किंवा बिस्तव, पाणी, काटे यांच्या साहाय्याने काढतात. रामकथेत समाविष्ट झालेली लक्ष्मणरेषा हा या कल्पनेचा आविष्कार असावा. प्राचीनकाळी आसन्नप्रसव स्त्रीला भूतबाधा होऊ नये, म्हणून तिच्याभोवती काळ्या खडूचे वर्तुळ काढीत असत. मंतरलेल्या सूत्राने अनेक चमत्कार होतात, अशा कथा कथासरित्सागरात आहेत. जानव्याची ब्रह्मगाठ दाखविली, की भुते पळून जातात, अशीही एक समजूत आहे.

**पिशाचनिवारक देवतांची पूजा —** द. भारतात पिशाचांचे निवारण व्हावे म्हणून ग्रामदेवतांची पूजा करण्याची प्रथा आहे. भुतांचा राजा वेताळ याने आपल्या अनुचरांना नियंत्रण घालावे म्हणून त्याचीही पूजा करतात. पुरुषांपेक्षा स्त्रियांना भूतबाधा लवकर होते. म्हणून स्त्रियाच अशा देवतांची पूजा करतात.

द. भारतात अय्यनार हा भूतप्रमुख समजला जातो. तो घोडा किंवा हत्ती या वाहनावर बसून व हातात तलवार घेऊन दऱ्याखोऱ्यांतून हिंडतो आणि क्रूर भुतांचे निवारण करतो, अशी समजूत आहे.

भैरव किंवा काळभैरव ही भुतांची नियंत्रक देवता मानली जाते. त्याला प्रसन्न केल्याने रोगराई नष्ट होते, अशी समजूत आहे. भैरोबा ही देवता महाराष्ट्रात प्रसिद्ध आहे. काही ठिकाणी बरेच लोक एकत्र जमून त्याची प्रतिमा पुरतात. त्यामुळे भुताखेतांपासून गावाचे रक्षण होते, असे समजतात.

**पिशाचविद्या आणि धर्म –** मानव जातीच्या आरंभावस्थेत पिशाचविद्या आणि धर्म यांचा जवळचा संबंध होता; परंतु त्या दोहोंच्या सीमारेषा मात्र अस्पष्ट होत्या. धर्म आणि पिशाचविद्या ही दोन्ही संकटातून तारण्याची अथवा इष्ट प्राप्तीची

साधने आहेत, अशी त्या आदिम कालातही समजूत होती. आपले जीवन सुसह्य आणि सुखकर व्हावे म्हणून अति–मानवी शक्तींना वश करून घेणे किंवा त्यांवर प्रभाव गाजविणे यासाठी त्या काळच्या मानवाची धडपड चालू होती. त्यासाठी तो या दोन्ही साधनांचा उपयोग करू लागला. त्यातून पिशाच विद्येचे मंत्र-तंत्रात्मक विधान निर्माण झाले.

**पिशाचविद्या आणि वैद्यक** — जसजशी वैद्यकाची वाढ होत गेली, तसतशी पिशाचविद्या सिद्ध करणाऱ्या मांत्रिकाना आपल्या मर्यादांची जाणीव होत गेली. या जाणिवेतूनच त्यांनी पिशाच निवारक निरनिराळ्या औषधी वनस्पतींचा शोध सुरू केला. पण औषधी-वनस्पतींचे पिशाचनिवारक किंवा रोगहारक गुणधर्म मंत्रामुळे त्यांच्यांत उत्पन्न होतात, असेच त्यांनी मानले व लोकांना सांगितले. तसे करण्यात त्यांचा फायदा होता.

आयुर्वेदाच्या ग्रंथांमधूनही मणिमंत्रांचा समावेश आहे. प्रसिद्ध वैद्यकग्रंथांतून औषधयोजनेबरोबरच दैवी उपचारांचीही चर्चा केलेली आढळते. लहान मुलांना छळणाऱ्या बालग्रहांसाठी त्यांची शांती करावी, असे वैद्यकात सांगितले आहे.

मांत्रिकांना आपल्या प्रयोगासाठी अनेकदा माणसाची कवटी आणि त्याच्या हातापायांची हाडे यांची आवश्यकता असते. त्यांतल्या त्यात नवप्रसूत स्त्रीची हाडे अधिक उपयुक्त अशी त्यांची समजूत आहे. म्हणून मांत्रिक रात्रीच्या वेळी स्मशानातून प्रेते उकरूनही हाडे गोळा करतात. यातूनच मांत्रिकाला मानवाच्या शरीररचनेचे ज्ञान झाले असावे. निरनिराळ्या रोगांवर व भूतबाधांवर उपचार म्हणून मांत्रिक माणसाच्या डोक्याला भोक पाडीत आणि त्या छिद्रातून भुतांना बाहेर काढल्याचे सांगत. अशा अनेक छिद्रयुक्त कवटया उत्खननात सापडल्या आहेत. ही छिद्रे भरून येऊ लागल्याच्याही खुणा संशोधकांच्या निरीक्षणात आढळून आल्या आहेत. यावरून डोक्याला छिद्रे पाडल्यानंतरही माणूस जिवंत राहत असावा, असे वाटते. मांत्रिकांचे हे अभावित व अज्ञानजन्य प्रयोगही वैद्यकाच्या वाढीला कारणीभूत झाले, असे म्हणतात. आजही आधुनिक संस्कृतीचा स्पर्श न झालेल्या आदिवासीत किंवा गिरिजनांत मांत्रिकी आणि वैद्यकी हे दोन्ही व्यवसाय एकाच व्यक्तीकडे असल्याची उदाहरणे आढळतात.

सांप्रत शिक्षणाची आणि विज्ञानाची बरीच वाढ झाली आहे. पण तरीही पिशाचविद्येवर विश्वास ठेवणारे लोक आजच्या सुधारलेल्या जगातही आढळतात. आजही कित्येक जाणकार लोक पिशाचांच्या सामर्थ्याची ग्वाही देतात आणि पिशाच योनी अस्तित्वात असल्याचे प्रतिपादितात. भुतांच्या कथा आजही वृत्तपत्रातून येत असतात. त्यांच्या सत्यासत्यतेची वैज्ञानिक शहानिशा मात्र होत नाही. [ए.सा. रि. ए.; स. पॉ.; हि. ध. स.; लो. सा. रू.; वै. सं. वि.; प्रा. भा. सा. सां. भू.; रा. का. सं.; रा. का. स.; का. दे. सं.; पु. इं.; सि. भा. सं. प.; भा. सा. इ.; वै. मा.; अ. का.; जै. भ. पृ.; ग. क.; म. ज्ञा. को.; पिशाचांच्या परिसरात– श्री. रा. दा. करमरकर, १९५२; पॉ. रि. फो. इं.; मि. क.]

(२) एक प्राचीन जात. या जातीसंबंधी देशी-विदेशी विद्वानांत बरेच मतभेद आहेत. या जातीचे आंतरिक व बाह्य गुणधर्म हे राक्षसांच्या गुणधर्माप्रमाणेच आहेत, असे एक मत आहे. हे कच्चे मांस खात असत आणि त्यावरूनच यांना पिशाच ही संज्ञा मिळाली, असे म्हटले जात असे. ग्रियर्सनने असे सिद्ध केले आहे, की भारताच्या वायव्य भागातील दरदिस्तान, चित्रळ, इ. ठिकाणी राहणारे लोकच पिशाच या व्यापक जातिनामाने ओळखले जात होते. या लोकांत कच्चे मांस खाण्याचा प्रघात होता, असेही ग्रियर्सनने सांगितले आहे. पार्जिटरचेही तेच मत आहे. काही पंडितांच्या मते यांचा निवास विंध्यगिरीच्या परिसरात होता.

यांचे आणि आर्यांचे संघर्ष चालत. या संघर्षात आर्यांची सरशी झाली व पिशाचांना आर्यावर्त सोडून विंध्य पर्वतराजीचा आश्रय घ्यावा लागला, असे एक मत आहे.

या जातीत जी विवाहपद्धती प्रचलित होती, तिला पुढच्या काळात पैशाच या नावाने स्मृतिकारांनी मान्यता दिली.

पैशाची ही पिशाचांची भाषा होय. गुणाढ्याची बृहत्कथा मूळची याच भाषेत होती, असे म्हणतात. पाहा – पैशाची. [म. ज्ञा. को.; का. दे. स.; सि. भा. सं. प.; प्रा. भा. सा. सां. भू.]

## पिशाचचतुर्दशी

चैत्र वद्य चतुर्दशीला हे नाव आहे. या रात्री शिवाची पूजा करावी, तसेच निकुंभ नामक शिवभक्ताची पूजा करावी आणि गोठ्यात, नदीत, रस्त्यांवर व मंदिरशिखरावर पिशाचांना बली द्यावा, असा या व्रताचा विधी सांगितला आहे. फल– पिशाचबाधानिवारण.

## पिशाचमोचन

एक काम्य व्रत. या व्रताचे दोन पर्याय आहेत. ते असे—

(१) व्रतधारी व्यक्तीने मार्गशीर्ष शुद्ध चतुर्दशीस काशीमध्ये कपर्दीश्वराजवळ स्नान करून अन्नदान करावे. पिशाचमोचन नावाचे काशीत एक तीर्थ आहे. तिथे मार्गशीर्ष शुद्ध चतुर्दशीला स्नान, शिवपूजा व अन्नदान केल्याने मरणोत्तर पिशाचयोनी प्राप्त होत नाही व जे कोणी पितर पिशाच-योनीत गेले असतील त्यांनाही मुक्ती मिळते अशी समजूत आहे. या

ठिकाणी दान घेतल्यास पाप लागत नाही, असे सांगितले आहे.

(२) चैत्र शुद्ध चतुर्दशीला मंगळवार येईल त्या दिवशी गंगेत स्नान करावे आणि ब्राह्मणभोजन घालावे. फल – वरील पर्यायाप्रमाणेच. [ व्रतराज; व्र प. ]

## पिशारती

अंबलवासीपैकी एक पोटजात. या लोकांची वस्ती द. भारतात आढळते. पिशार म्हणजे संन्याशाचा शिष्य आणि पिशारती म्हणजे पळून गेलेला शिष्य होय. या जातीच्या उत्पत्तीसबंधी एक दंतकथा सांगतात, ती अशी—

एका ब्राह्मण तपस्व्याचा एक शिष्य होता त्या शिष्याला संन्यास घेण्याची इच्छा झाली त्याने मुडनापर्यंतचे सर्व विधी केले इतक्यात सन्यासाश्रमाचे कडक निर्बंध आणि सुखविहीन जीवन यापुढे आपल्याला जगावे लागणार हे त्याच्या लक्षात आले त्यावरोबर तिथून तो पळून गेला. पुढे त्याने एका पारशव जातीच्या स्त्रीबरोबर लग्न केले. त्यांना जी संतती झाली तिलाच पिशारती असे म्हणू लागले.

पिशारती लोक ज्या घरात राहतात, त्या घराला पिशारम अशी संज्ञा आहे वैष्णव मंदिरात बसून माळा तयार करणे व देवालयाची झाडलोट करणे, हे त्यांचे मूळ व्यवसाय होत. परतु यांच्यातील काही लोक विद्यार्जन करून आता संस्कृत पंडित झाले आहेत श्रीमंतांच्या घरी ते संस्कृत व मलयाळम् भाषेचे शिक्षक म्हणून काम करतात. काही पिशारती लोक मोठे जमीनदारही आहेत.

**विवाहप्रथा** – हे लोक ऋतुप्राप्ती होण्यापूर्वी मुलीचा ताळीबंधन विधी करतात विवाहातील महत्त्वाचा विधी म्हणजे वधू–वराचे हात एकमेकांच्या हातांत देणे हा होय. याशिवाय वधू–वराना जाईचे एक रोप लावावे लागते. नतर ती दोघे स्नान करतात व एकमेकाच्या वस्त्राना स्पर्श करतात. नवरा मुलगा चेरुताळी वधूच्या गळयात बांधतो व एवढ्याने लग्नविधी पुरा होतो जातीचे पुरोहितच लग्नाचे पौरोहित्य करतात.

मूल चार किंवा सहा महिन्यांचे झाल्यावर त्याचा निष्क्रमण विधी आणि उष्टावणाचा संस्कार करतात. मुलाचा मामा मुलाला अंगठीने भात भरवतो. चौल तिसऱ्या वर्षी करतात. या वेळी मुलाचा मामा प्रथम मुलाच्या केसांना वस्तरा लावतो. नतर पुढील काम न्हावी करतो.

मुलाला सोळाव्या वर्षी अष्टाक्षरी मंत्राची दीक्षा देतात. मग तो मुलगा ब्राह्मणांप्रमाणे काशीयात्रेला निघण्याचा नाममात्र संकल्प करतो. त्यानंतर मुलाला पान खाण्याची परवानगी मिळते आणि गृहस्थाश्रमातले काही हक्कही प्राप्त होतात.

पिशारती लोक वैष्णवपंथी आहेत. ते नित्य विष्णूचा अष्टाक्षरी मंत्र जपतात या मंत्राची दीक्षा घेण्यासाठी ब्राह्मण पुरोहिताला बोलावतात.

**मृतिकप्रथा** –मृताला जमिनीवर बसवतात. मृताचा पुतण्या मृतापुढे अष्टाक्षरी मंत्र म्हणतो व साष्टांग दंडवत घालतो. नतर मृताला स्नान घालून वस्त्रे नेसवतात. त्याला पुरण्यासाठी नऊ फूट खोल व तीन फूट चौरस खड्डा करतात. खड्ड्यांत पंचमहाभूताचे प्रतिनिधी म्हणून मीठ व राख पसरतात मग त्यांत प्रेताला ठेवतात सन्याशाप्रमाणे मृत पिशारतीही जीवनमुक्त असतो, अशी समजूत असल्यामुळे त्याची उत्तरक्रिया करीत नाहीत फक्त अकराव्या दिवशी ब्राह्मणाकडून एकोद्दिष्ट श्राद्ध सारखा एक विधी करतात. या वेळी एक दर्भ घेऊन त्याला गाठ मारतात. तो दर्भ मृतात्म्याचे प्रतीक समजून तो घेऊन देवालयात जातात. तिथे जळत असलेला दिवा महाविष्णूचे प्रतीक समजून त्याची पूजा व प्रार्थना करतात. असाच विधी पहिल्या वर्षाच्या अखेरीस करतात. [ का ट्रा. स. इं. ]

## पीकदाणी

मुखातील तांबूलरस टाकण्यासाठी उपयोगात आणले जाणारे भांडे. याला पिकदाणी, पिकदानी, पिकदान, पिकधरणी, पिकपात्र अशीही नावे आहेत. हे भांडे धातूपासून बनवितात त्याचे तोंड रुंद पसरट असून, खालचा भाग वाटोळा, पण बसका असतो. तांबूलाप्रमाणेच चुळा टाकण्यासाठीही या पात्राचा उपयोग करीत असत (राज्यव्यवहार कोश).

वात्स्यायनाने आपल्या कामसूत्रात नागरिकाच्या शयनगृहात कोणत्या वस्तू असाव्या, ते सांगताना पीकदाणीचाही उल्लेख केला आहे; पीकदाणी उचावर ठेवू नये, असेही सांगितले आहे.

पूर्वी लग्नात जावयाला ज्या अनेक गोष्टी देणगीदाखल देत त्यात पीकदाणीही असे. अलिकडे ही प्रथा बंद झाली आहे. नलाला भीमराजाने दिलेली पीकदाणी माणकांची बनविलेली होती व ती विश्वकर्म्याकडून भीमराजाकडे आली होती, असे नैषधीय चरितात म्हटले आहे.

## पीटल

राजस्थानातील एक जात. यांना कलबी या नावानेही ओळखतात. हे गुजरात प्रदेशातील पाटण या गावी राहायला आल्यानंतर त्याना पीटल ही स्थानवाचक संज्ञा मिळाली, अशी समजूत आहे. या जातीची उत्पत्ती राजपूत पुरुष व गुजराती ब्राह्मण स्त्री यांच्यापासून झाली असे सांगतात. इ. स. १२ व्या शतकाच्या सुमाराला गुजरातवर मुसलमानांचे आक्रमण झाले. त्या वेळी काही गुजराती ब्राह्मण स्त्रिया घाबरल्या आणि त्यानी राजपुतांच्या घराचा आश्रय

घतला. त्यातल्या काही कायमच्या तिथेच राहिल्या. पुढे त्यांना जी संतती झाली, ती कलवी या नावाने ओळखली जाऊ लागली. कलवी स्त्रिया आजही आपल्याला ब्राह्मणवंशीय समजत असल्यामुळे त्या मद्य, मांस याचे सेवन करीत नाहीत. इतकेच नाही; तर त्या आपल्या नवऱ्यासंगे भोजनही करीत नाहीत. त्यांची भांडी देखील स्वतंत्र असतात.

या जातीचे चव्हाण, सोळंखी, पवार, पडिहार, गोराल, इ. प्रमुख पोटभेद असून, त्या प्रत्येकाचे काही उपभेदही आहेत. या उपभेदांची नावे जीवजंतूंवरून पडलेली आहेत. यांच्यांतील बरेचसे लोक वैष्णव असून, काही थोडे शाक्त आहेत.

यांच्या स्त्रिया लाखेच्या बांगड्या न वापरता हस्तिदंताच्या बांगड्या वापरतात. त्या नाकात, कानांत व गळयात चांदीचे दागिने घालतात. पायात पितळेचे अथवा कांशाचे दागिने घालतात.

यांची विवाहपद्धती इतर जातींहून भिन्न आहे. विवाहप्रसंगी एका मोठ्या काहिलीत बाजरी शिजवतात. मग वधूचे आई – वडील त्या कहिलीला प्रदक्षिणा करून तिची पूजा करतात. यांची मृतिक-प्रथाही अगदी वेगळी आहे. [ रा. जा. ]

**पीठापुरम** एक पुण्यक्षेत्र. आंध्रमधील गोदावरी जिल्ह्यात अन्नावरम्‌पासून सोळा मैलांवर हे स्थान आहे. याला पादगया, पूर्णगया किंवा दक्षिणगया असेही म्हणतात. भारतातील पाच प्रमुख पितृतीर्थांत याची गणना होते, म्हणून यात्रेकरू इथे सपिंडक श्राद्ध करतात. हे पिंडदान शहराबाहेरच्या महापादगया नामक सरोवरावर होते.

या सरोवराजवळ कुक्कुटेश्वराचे मंदिर आहे. त्याला इथले लोक कुट्टण्ण अथवा कुट्टण्णस्वामी म्हणतात. इथे उमा-महेश्वरांनी कुक्कुटदंपतीच्या रूपात काहीकाळ निवास केला होता, अशी कथा आहे. महाशिवरात्रीला इथे मोठी यात्रा भरते आणि रथोत्सव होतो. या मंदिराशेजारीच मधुस्वामीचे मंदिर असून, त्यात नारायणाची मूर्ती आहे. [ कल्याण – तीर्थांक ]

**पीठिका** जिच्यावर मूर्ती, शिवलिंग किंवा एखादे प्रतीक बसविलेले असते, अशा जागेला पीठिका असे म्हणतात. पीठिका ही धातू, पाषाण किंवा काष्ठ यांची करतात. ती सामान्यपणे ठेंगणी, चौकोनी, साधी किंवा नक्षी असलेली किंवा विविध आकृत्या कोरलेली असते. शाळुंका हीदेखील एक पीठिकाच असते. शैव परंपरेत लिंगाचे जितके प्रकार तितकेच पीठिकेचेही असतात. शिल्पभेदपरत्वे पीठिकेचे नागर, द्राविड व वेसर असे तीन मुख्य प्रकार होतात. नागर पीठिका चौरस, द्राविड अष्टकोनी व वेसर वाटोळी असते. देवांवर घातलेले पाणी देवाच्या पायाशी पीठिकेच्या खोलगट भागात जमा होते. ते बाहेर जाण्यासाठी पीठिकेला एक पन्हळ करतात. त्यातून ते पाणी खाली पडते व गाभाऱ्यातून बाहेर निघून जाते. तळपट्टीपद्म (पालथे कमळ), क्षेपण (पुढे आलेला भाग), कंधर (गळा), कंप (फितीसारखी पट्टी), ऊर्ध्वपद्म (वरचे उताणे कमळ), वाजन (फीत) व घृतवारी (पाणी साठण्याची जागा) असे पीठिकेचे भाग असतात. स्थंडिल, वापी, वेदी, यक्षी, मंडला, पूर्णचंद्रा, वज्रा, पद्मा, अर्धचंद्रा, त्रिकोणा असे पीठिकेचे दहा प्रकार आहेत. **पाहा** – शाळुंका. [ एन्सा. हिं. आ. ]

**पीतांबरोपनिषद्** एक नव्य उपनिषद. हे शाक्त उपनिषद असून, यात पीतांबरा देवीचे शांभवी महाविद्या म्हणून वर्णन केले आहे, ते असे–

पीतांबर नेसलेली, पिवळे अलंकार धारण करणारी व सर्वांगी पिवळी म्हणून हिला पीतांबरा म्हणतात. ती चतुर्भुज आहे. तिच्या उजव्या दोन हातांत वज्र आणि शत्रूची जीभ आहे. तिचे सौंदर्य अनुपम असून, ती उगवत्या सूर्याप्रमाणे तेजःपुंज आहे. ती सुवर्णसिंहासनावर अधिष्ठित आहे.

पीतांबरेचे यंत्र काढून त्याचीही पूजा करतात. हे यंत्र असे – प्रथम षट्कोन काढावा. त्याच्या भोवती १६ पाकळ्यांचे कमळ काढावे. त्याभोवती तीन वर्तुळे काढावी. षट्कोनाच्या मध्यभागी देवीचे आवाहन करावे. ब्राह्मी, माहेश्वरी, कौमारी, वैष्णवी, वाराही, नारसिंही, चामुंडा व महालक्ष्मी अशा तिच्या आठ नावांचा उच्चार करून तिची प्रार्थना करावी. सोळा पाकळ्यांच्या कमळात वगला, स्तंभिनी, जृंभिणी, इ. सोळा देवतांचे ध्यान करावे. षट्कोनाच्या सहा कोठ्यांत डाकिनी, राकिनी, लाकिनी, काकिनी, शाकिनी, हाकिनी या रौद्र देवींचे आवाहन वा स्मरण करावे.

पीतांबरा देवीची व तिच्या यंत्राची पूजा करणाऱ्या साधकाला छत्तीस अस्त्रे प्राप्त होतात, असे या उपनिषदात सांगितले आहे. [ श्री. सी. ग. देसाई ]

**पीरजादापंथ** एक धर्मपंथ. इ. स. च्या १७ व्या शतकाच्या मध्यात महंमद सादुल्ला नामक इसमाने या पंथाची स्थापना केली. त्याने हिंदू व इस्लाम या धर्मग्रंथांतील तत्त्वांच्या आधारे एक समन्वयात्मक धर्मपंथ निर्माण केला. तो निकलंक (कल्की) अवतार मानीत असे व त्याला भजायला सांगत असे. या पंथाचे अनुयायी मध्य प्रदेश, गुजरात, इ. ठिकाणी आढळतात. [ मे. मि. इं. ]

**पुंगी** एक वाद्य. गारुडी व जादुगार लोक नाग–सर्पांना मोह-विण्यासाठी हे वाद्य वापरतात. त्यासाठी देठाकडे निमुळता होत गेलेला एक कडू भोपळा घेतात. तो आतून



पुंगी

पोखरतात. त्याच्या रुंद टोकाशी त्याला एक भोक पाडतात. त्यात देवनाळाच्या वीत-दीडवीत लांबीच्या दोन नळ्या बसवतात. या दोन नळ्यांपैकी एकीला स्वरांची छिद्रे पाडलेली असतात व दुसरी नुसती सुरासाठी असते. स्वरांच्या छिद्रांवर बोटे ठेवून वरील अंगास ठेवलेल्या मोठ्या छिद्रांवर तोंडाने फुकल्याने पुंगी वाजू लागते. पुंगीच्या नळ्या जोडण्यासाठी व स्वर कमी जास्त करण्यासाठी मेणाचा उपयोग करतात. या वाद्याची अशी रचना केलेली असते, की त्यातून भैरवीचे स्वर निघावे. पुंगीवर नागवराळी नामक राग वाजविला जातो. तो सर्पांना फार प्रिय असतो, असे समजतात.

पुंगीसारखेच एक वाद्य आसाममधील डोंगरी लोक वाजवतात. त्यात भिन्न भिन्न लांबीच्या ५ ते ९ वेतनलिका भोपळ्याच्या तोंडावर बसवलेल्या असतात. या वाद्याची रचना ऑर्गनच्या तत्त्वावर केलेली असते. [ म्यु. इं.; परंपरा–लोकगीत ]

**पुंडरीक विठ्ठल** (इ. स. चे १६ वे शतक) एक प्रसिद्ध गवई व संगीततज्ञ. हा म्हैसूरचा रहिवासी व जामदग्न्यगोत्री ब्राह्मण होता. हा बुद्धिमान व महत्त्वाकांक्षी होता. इ. स. १५७० साली हा कीर्ती संपादण्यासाठी म्हैसूरमधून बाहेर पडला व उत्तरेकडे निघाला. प्रथम तो बऱ्हाणपूर येथे थांबला. याच्या काळात उत्तर हिंदुस्तानी संगीतपद्धतीत बराच घोटाळा माजला होता. ही परिस्थिती लक्षात घेऊन राजा बुऱ्हाणखान याने पुंडरिकाला उत्तरी संगीत शिस्तबद्ध करण्यास सांगितले. त्या आज्ञेवरून पुंडरीक त्या कामाला लागला. प्रथम त्याने उत्तर व दक्षिण अशा दोन्ही संगीतपद्धतींचा तौलनिक अभ्यास केला व नंतर सद्रागचंद्रोदय नावाचा ग्रंथ रचला. त्यानंतर तो राजपूत राजा मानसिंग याच्या आश्रयाला गेला. मानसिंगाच्या आज्ञेने त्याने रागमंजिरी हा ग्रंथ लिहिला. अशा प्रकारे संगीतशास्त्रज्ञ अशी त्याची कीर्ती सर्वत्र झाल्यावर अकबराने इ. स. १५९९ मध्ये याला दिल्लीला बोलावले. तिथे त्याने रागमाला हा ग्रंथ लिहिला. या ग्रंथात त्याने रागवर्गीकरणाच्या कामी परिवाररागपद्धती अंगीकारिली. ही पद्धत रागांमध्ये दिसून येणाऱ्या स्वरसाम्याच्या तत्त्वावर आधारित आहे. विद्वानांच्या मते अशा प्रकारे रागगट निर्माण करण्याची पुंडरिकाची ही पद्धत इतर तत्सम पद्धतीपेक्षा अधिक सयुक्तिक आहे. दाक्षिणात्य संगीतात मेळ व जन्यराग यांचा विचार करून त्याने एक नवी पद्धत निर्माण केली. त्यानंतर बादशहाच्या आज्ञेवरून त्याने नृत्यनिर्णय नावाचाही एक ग्रंथ लिहिला. दिल्लीमध्ये याला खूप मानमरातब मिळाला. [ वि. स्मा. ग्रं.; सु. वि. को.; सं. शा. क. इ. ]

**पुंडलिक** एक प्रसिद्ध विठ्ठलभक्त. पंढरपुरात भीमरथीच्या तीरी जानुदेव ब्राह्मणाच्या पोटी याचा जन्म झाला. याच्या मातेचे नाव सत्या असे होते. हा वयात येताच एका सुस्वरूप मुलीशी याचे लग्न झाले. तिचे लाड पुरविण्यात व तिला सुखात ठेवण्याच्या नादात याने आईबापांना तुच्छ लेखून त्यांचे हाल केले. शेवटी घरच्या जाचाला कंटाळून ते काशी-यात्रेला निघून गेले. कालांतराने पुंडलिकही काशीला निघाला. वाटेत तो कुक्कुट ऋषीच्या आश्रमात राहिला. तो ऋषी माता-पित्यांची मनोभावे सेवा करीत असे. त्याच्या त्या पुण्यामुळे गंगा, यमुना व सरस्वती या नद्या त्याला स्नान घालण्यासाठी पहाटे त्याच्या आश्रमात येत. पुंडलिकाने ते पाहिले व त्याला आश्चर्य वाटले. त्याने कुक्कुट ऋषीला त्या प्रकाराचा खुलासा विचारला. मातृपितृसेवेचे हे फल आहे, असे सांगून कुक्कुटाने त्याला पुत्रधर्माचा उपदेश केला. त्या उपदेशाने त्याची मती पालटली. त्याला आईबापांच्या सेवेचे महत्त्व पटले. मग तो पुढे जाऊन आईबापांना भेटला. त्याने त्यांची काशीयात्रा यथासांग केली व त्यांना घरी आणले. मग तो सदैव त्यांची सेवा–शुश्रूषा करीत राहिला.

या त्याच्या सेवेने विष्णू त्याच्यावर प्रसन्न झाला आणि त्याच्या भेटीसाठी तिथे गेला. परंतु मातापित्यांच्या सेवेत थोडेसेही अंतर पडू नये म्हणून त्याने विष्णूला उभे राहण्यासाठी जवळची एक वीट भिरकावली. विष्णू या विटेवर उभा राहिला व तोच पुढे विठ्ठल या नावाने भागवतधर्मियांचे उपास्य बनला. पुंडलिकाची ही मातृपितृभक्ती पाहून त्याला विठ्ठलाने वर मागायला सांगितले. तेव्हा पुंडलिक म्हणाला, ‘ ज्या रूपाने तू आता माझ्यासमोर उभा आहेस, त्याच रूपाने इथे निरंतर राहा. तू इथे पुंडलिकवरद या नावाने प्रसिद्ध व्हावेस

व या क्षेत्रालाही पुंडलिकपूर हे नाव प्राप्त व्हावे.' त्यावर विठ्ठलाने तथास्तु म्हटले.

पंढरपुरात चंद्रभागेच्या वाळवंटात विठोबाच्या देवळापासून सुमारे १५०० फूट अंतरावर पुंडलिकाचे देऊळ आहे. त्याला पुंडलिकाची समाधी मानतात. या मंदिरात पुंडलिकाचे प्रतीक म्हणून शिवलिंग आहे. कोळी लोक हे पुंडलिकाचे पुजारी होत. पांडुरंगाचे दर्शन घेण्यापूर्वी पुंडलिकाचे दर्शन घेतले पाहिजे, अशी इथली प्रथा आहे. पुंडलिकाचे देऊळ चांगदेवाने बांधले, असे म्हणतात. सध्याचे देऊळ मात्र इ. स. १७५० मध्ये होळकरांनी बांधले.

पुंडलिक ही ऐतिहासिक व्यक्ती असून, त्याचा काळ इ. स. च्या बाराव्या शतकाचा उत्तरार्ध मानतात. पुंडलिकाला कानडी मानण्याकडे विद्वानांचा कल आहे. [ विठोबाचे राज्य– श्री. पु. रा. बेहरे, १९६४; सु. वि. को.; श्रीक्षेत्र पंढरपुरदर्शन ]

**पुंड्र** (१) एक प्राचीन देश. हा सांप्रतच्या बंगालमध्ये होता. बंगालमधले रंगपूर, दिनाजपूर, पूर्णिया, माल्दह, बोग्रा, राजशाही व पबना हे सात जिल्हे प्राचीन काळी पुंड्र देशात मोडत होते. या देशाच्या रहिवाशांना पौंड्र म्हणत. विष्णू पुराणात पुंड्र नामक तिथल्या मूळ लोकांचा उल्लेख आलेला आहे. वसिष्ठाच्या कामधेनूच्या शरीरातून जे विविध जमातींचे पुरुष जन्मले, त्यात पौंड्रांचाही उल्लेख आहे. पौंड्र हे प्रथम क्षत्रिय होते. पण नंतर ते शूद्र बनले किंवा जातिभ्रष्ट झाले, असे ऐतरेय ब्राह्मणात म्हटले आहे. पौंड्रांना विश्वामित्राचे वंशज समजतात. महाभारतात पौंड्र, पौंड्रिक, पुंड्रिक अशा नावांनी त्याचा उल्लेख आढळतो. तिथे त्यांना म्लेच्छ म्हटले आहे.

श्रीकृष्णाच्या वेळी या देशात पौंड्र वंशातला वासुदेव नावाचा राजा होता. तो कृष्णाचा द्वेष करीत असल्यामुळे कृष्णाने त्याला युद्धात ठार मारले. इ. स. च्या ७–८ व्या शतकात हा देश चांगल्या स्थितीत होता, असे बौद्ध वाङ्मयावरून कळते. त्या काळात केव्हातरी या देशावर पुंड्रवर्धन नावाचा राजा राज्य करून गेला. सांचीच्या स्तूपाभोवतीची तोरणे याने पाठवली होती, असे म्हणतात.

(२) एक चंद्रवंशी राजा. याच्या पित्याचे नाव बली होते व भावांची नावे अंग, वंग, सुम्ह आणि कलिंग अशी होती, असे उल्लेख पुराणातून आढळतात.

(३) भालप्रदेशावर गंध अगर भस्म लावण्याची पद्धती. याचे त्रिपुंड्र, ऊर्ध्वपुंड्र, इ. प्रकार आहेत. पुंड्र ही शैव–वैष्णवांतील भेद ओळखण्याची एक ठळक खूण असते. पाहा–त्रिपुंड्र. [ हि. आ.; श. क.; पुराणम–जानेवारी १९६५ ]

**पुंसवन** (१) एक गर्भसंस्कार. याची व्याख्या संस्कारप्रकाशात सांगितली आहे, ती अशी –

**पुमान् प्रसूयते येन कर्मणा तत् पुंसवनमीरितम् ।**

अर्थ – ज्या कृत्याच्या योगाने पुरुष अपत्य जन्माला येईल, त्या कृत्याला पुंसवन असे म्हणतात.

पुंसवनाचा हा संस्कार प्राचीन काळापासून प्रचलित असावा. कारण पत्नीने पुत्राला जन्म द्यावा, अशी आकांक्षा ऋग्वेदात व अथर्ववेदात आढळते. याविषयी अथर्ववेदातला एक मंत्र (अथर्व. ३.२३.२) असा –

**आ ते योनिं गर्भ एतु पुमान् बाण इवेषुधिम् ।**
**आ वीरोऽत्र जायतां पुत्रस्ते दशमास्यः ।।**

अर्थ – (पती आपल्या पत्नीला म्हणतो.) ज्या प्रकारे बाण भात्यात खुपसला जातो, त्याप्रमाणे पुत्रगर्भाचे आधान तुझ्या योनीत होऊ दे. तुला दहा महिन्यांनी पुत्र होऊ दे.

या मंत्रपाठाबरोबर गर्भिणी स्त्रीला कोणत्यातरी प्रकारची वनस्पती दिली जात असावी. अथर्ववेदाच्या वरील सूक्तातच असे म्हटले आहे, की ज्यांचा पिता द्यौ आहे, माता पृथ्वी आहे व समुद्र मूळ आहे, अशा दिव्य वनस्पतीचे किंवा वेलीचे अंकुर किंवा रोप तुला पुत्र प्राप्त होण्याच्या कामी मदत करोत.

पुत्रजन्माचे महत्त्व वैदिक आर्यांना फार वाटत असे. कारण युद्धे आणि वसाहतींचा विस्तार या कामी त्यांना वीर पुत्रांची फार मोठी गरज असे. त्यामुळे वैदिक समाजात अनेक पुत्र प्रसविणाऱ्या स्त्रीला मानाचे स्थान असे. कन्या जन्मली तरी पुढच्या वेळी स्त्रीने पुत्राला जन्म द्यावा, अशी आकांक्षा धरली जात असे. या प्रबल पुत्राकांक्षेचे तत्त्व मनात ठेवून पुढच्या काळात पुंसवन संस्काराची व्यवस्थित पद्धती ठरविली गेली आणि त्यात यातुविद्येतील काही प्रयोगही समाविष्ट करण्यात आले.

**पुंसवनाचा काल** – गर्भधारणा झाल्यानंतर तिसऱ्या किंवा चौथ्या महिन्यात किंवा त्या वेळी न जमल्यास त्याच्या पुढच्या महिन्यात पुंसवन संस्कार करावा, असे गृह्यसूत्रांत सांगितले आहे. मनू व याज्ञवल्क्य यांच्या मते प्रस्तुत संस्कार गर्भाशयात गर्भाची हालचाल सुरू होण्याच्या पूर्वी केला पाहिजे. सांप्रत गर्भधारणा झाल्यानंतर दुसऱ्या महिन्यापासून आठवा महिना संपेपर्यंत केव्हातरी हा संस्कार करण्याची रूढी आहे. निरनिराळ्या समाजात कुलाचाराप्रमाणे पुंसवनाचा महिना ठरविला जातो. हा संस्कार प्रथम गर्भधारणेच्या वेळी एकदाच करावा, का प्रत्येक गर्भधारणेच्या प्रसंगी करावा, याविषयी दुमत आहे. विज्ञानेश्वराने मात्र स्पष्ट सांगितले आहे, की पुंसवन हा क्षेत्रसंस्कार असल्याने एकदाच करावा; प्रत्येक गर्भधारणेच्या वेळी करू नये (याज्ञ. १.११ वरील मिताक्षरा).

**पुंसवनविधी**— आश्वलायन गृह्यसूत्रात पुंसवनविधी सांगितला आहे, तो असा – गर्भधारणेपासून तिसऱ्या किंवा चौथ्या महिन्यात पुनर्वसू नक्षत्रावर (किंवा कोणत्याही पुरुष नक्षत्रावर) गर्भिणीने उपोषण करावे. दुसऱ्या दिवशी पुष्य नक्षत्रावर तिच्या पतीने अग्निस्थापना करून विधियुक्त भात शिजवावा; आज्यभागापर्यंत होम करावा. नंतर ज्या गायीचे वासरू तिच्याच रंगारूपाचे असेल त्या गाईचे दूध विरजून तयार केलेले दही स्त्रीच्या उजव्या तळहातावर घालावे. त्यावर एक सातूचा दाणा ठेवावा (हे पुलिंगाचे प्रतीक). मग त्या सातूच्या दोहो बाजूस दोन उडीद ठेवावे (हे अंडकोशाचे प्रतीक). नंतर ते दही स्त्रीला प्यायला लावावे. ती ते प्राशन करीत असता 'तू काय पितेस ?' असा तिला प्रश्न विचारावा. 'मी पुंसवन पीत आहे' असे तिने उत्तर द्यावे. हे दधिप्राशन तीनदा करवावे. मग त्या गर्भिणीला एका स्वच्छ छताखाली मखरात बसवून तिचा सन्मान करावा. नंतर पतीने 'आ ते गर्भो' व 'अग्निरैतु' हे मंत्र म्हणून तिच्या उजव्या नाकपुडीत दूर्वांचा रस पिळावा. गर्भिणीने तो रस पोटात जाईल असे करावे. घशात आल्यावर तो थुंकून टाकू नये. मग यजमानाने पूर्वी शिजवून ठवलेल्या भाताची प्रजापतीला उद्देशून अग्नीत आहुती द्यावी. 'यत्ते सुसीमे' या मंत्राने पतीने स्त्रीच्या हृदयाला स्पर्श करावा. (आश्व. गृ. १.१३.२.७).

अन्य गृह्यसूत्रांतून गर्भिणीच्या नाकपुडीत वटवृक्षाचा रस किंवा कुशकंटक किंवा सोमलता यांचा रस पिळावा, असे सांगितले आहे. त्याचबरोबर एक जलपूर्ण घडा स्त्रीच्या मांडीवर ठेवावा आणि 'सुपर्णोऽसि' इ. मंत्र म्हणून पतीने गर्भिणीच्या उदराला स्पर्श करावा. या स्पर्शाचा उद्देश असा, की गर्भाची योग्य प्रकारे वाढ व्हावी आणि गर्भपात किंवा गर्भविकृती असले काही अनिष्ट होऊ नये.

मातृमुखी पुत्र भाग्यवान म्हटला जातो. गाय-वासरू एकाच रंगारूपाची असलेल्या गायीचे दही घ्यायला सांगण्यात पुत्र मातृमुखी अतएव भाग्यवान निपजावा, असे दिसून येते.

कौशिक सूत्रांत याहून वेगळा विधी सांगितला आहे, तो असा – अश्वत्थ व शमी यांच्या लाकडाच्या मंथनातून अग्नी उत्पन्न करावा. नंतर गोऱ्हा असलेल्या गायीच्या तुपात तो अग्नी टाकावा. ते तूप गर्भिणीच्या उजव्या नाकपुडीत टाकावे. तोच अग्नी मधुमिश्र पेयात टाकून ते पेय गर्भिणीला प्यायला द्यावे. मग काळी लोकर अग्नीभोवती पसरून नंतर तिचा गंडा करून गर्भिणीच्या हाताला बांधावा. एक बाण अभिमंत्रित करून तो गर्भिणीच्या मस्तकावर मोडावा. त्याचा एक तुकडा गर्भिणीच्या अंगावर बांधावा. त्याचबरोबर धनुष्याच्या दोरीला तीन गाठी मारून ती दोरी स्त्रीला बांधावी. याचे नाव धनुर्बाणविधी असे आहे. गर्भ स्थिर राहण्यासाठी हा विधी केला जात असे. (कौशिक सू. ३५-१-४; १२-१५).

महाराष्ट्रात या विधीला ओटी भरणे, असे म्हणतात. तो एक लौकिक विधी आहे. त्या वेळी गर्भवतीला पुष्पमालांनी नखशिखांत सजवितात. तिच्या हाती धनुष्यबाण देतात. लोकमानसाने या कृत्याचा संबंध कोसल्येला डोहाळे लागले आणि ती धनुष्यबाण घेऊन रावणास मारायला उद्युक्त झाली, या कथेशी जोडला आहे. पण या प्रथेचे खरे मूळ अथर्ववेदातील वर दिलेल्या विधीत असावे. [ वे. शा. दी.; हिं. सं.; वै. नि. ]

(२) एक काम्य व्रत. पुत्रप्राप्तीच्या उद्देशाने हे करतात. हे व्रत स्त्रीने आपल्या पतीच्या अनुज्ञेने मार्गशीर्षाच्या शुद्ध पक्षात सुरू करावे, असे सांगितले आहे. व्रतावधी एक वर्ष. या व्रतात नित्य लक्ष्मी–नारायणांची पूजा करायची असते. कार्तिक अमावास्येच्या दिवशी व्रताची सांगता करायची असते. त्या दिवशी स्त्रीने उपवास करावा. दुसऱ्या दिवशी पतीने पाकयज्ञाच्या विधीप्रमाणे अग्नीत चरूच्या बारा आहुती द्याव्या आणि अवशिष्ट चरू पत्नीला भक्षण करण्यास द्यावा मग ब्राह्मणभोजन घालून व्रत पूर्ण करावे.

इंद्राला ठार मारणारा पुत्र उदरी जन्माला यावा, अशी दितीने इच्छा केली असता, कश्यपाने तिला हे पुंसवन व्रत करायला सांगितले, अशी कथा आहे (भाग. पु. ६. १८. ४७–५४).

**पुकलेंदी** ( इ. स. चे ९ वे शतक ) एक तमिळ कवी हा तमिळनाडमध्ये चिंगलपेटजवळच्या कळत्तुर गावी राहत असे. हा कंबन व ओट्टुक्कूत्तन यांचा समकालीन होता. पांड्य राजाचा दरबारी कवी म्हणून याला मोठा मान होता. ओट्टुक्कूत्तन आणि पुकलेंदी यांची आपसात नेहमी स्पर्धा चाले. त्या विषयीच्या अनेक कथा तमिळ साहित्यात आहेत. ओट्टुक्कूत्तन हा चोळ राजाच्या दरबारी होता. त्याने मत्सरग्रस्त होऊन चोळराजाकरवी एकदा पुकलेंदीला तुरुंगात डांबले होते, असे सांगतात.

याचा सर्वांत प्रसिद्ध ग्रंथ नलवेण्बा हा होय. नलदमयंतीची कथा तमिळ भाषेतील वेण्बा छंदात याने या ग्रंथात लिहिली आहे. याशिवाय अल्लियर पुराणिमालै व नल्लतंगाल कदै या त्याच्या फुटकळ काव्यकृतीही प्रसिद्ध आहेत. [ त. सा. सं. ]

**पुग्गलपञ्ञत्ती** ( सं. पुद्गलप्रज्ञप्ती) पाली भाषेतील एक महत्त्वाचा ग्रंथ. व्यक्तींसंबंधी ज्ञान अथवा त्यांचा परिचय, असा याचा अर्थ आहे. व्यक्तीचे गुण, कर्म व

स्वभाव यांना अनुसरून विविध प्रकारचे वर्गीकरण या ग्रंथात केले असून, ते अंगुत्तर निकायाच्या शैलीवर केलेले आहे. ते करताना कर्त्याने बुद्धवचनांचा आधार घेतलेला आहे. आर्य-श्रावक, पृथग्जन, सम्यक्संबुद्ध, प्रत्येक बुद्ध, शैक्ष्य, अशैक्ष्य, आर्य, अनार्य, स्रोतापन्न, सकृदागामी, अनागामी, इ. प्रकारांनी हे व्यक्तींचे वर्गीकरण आढळते. बौद्ध धर्माचा नैतिक दृष्टिकोण समजण्याच्या दृष्टीने या वर्गीकरणाचे विशेष महत्त्व आहे. संपूर्ण ग्रंथात दहा अध्याय असून, पहिल्या अध्यायात एका प्रकारच्या व्यक्ती, दुसऱ्यात दोन प्रकारच्या व्यक्ती, अशा क्रमाने वाढवीत दहाव्यात दहा प्रकारच्या व्यक्तींचे वर्गीकरण आहे. उदाहरणार्थ चार या प्रकारातील व्यक्तीचे वर्गीकरण असे –

(१) अशा कोण व्यक्ती आहेत, की ज्या गडगडणाऱ्या पण बरसात न करणाऱ्या मेघासारख्या होत ?

उत्तर– जे बोलतात खूप; पण काहीच करीत नाहीत. अशी माणसे नुसत्या गरजणाऱ्या पण पाऊस न पाडणाऱ्या मेघासारखी होत.

(२) न गडगडता पाऊस पाडणाऱ्या मेघासारख्या कोण व्यक्ती आहेत ?

उत्तर – ज्या करतात पण बोलत नाहीत अशा व्यक्ती.

(३) गरजणाऱ्या व पाऊसही पाडणाऱ्या मेघासारख्या कोण व्यक्ती आहेत ?

उत्तर– ज्या व्यक्ती बोलतातही आणि हाताने करतातही अशा व्यक्ती.

(४) जो गडगडतही नाही आणि पाऊसही पाडीत नाही, अशा मेघासारख्या कोण व्यक्ती आहेत ?

उत्तर – ज्या व्यक्ती काही बोलतही नाहीत आणि काही करीतही नाहीत अशा व्यक्ती. [पा. सा. इ.]

**पुछीखेल** ओडिसा प्रदेशातील स्त्रियांचा एक खास क्रीडा-प्रकार. हा खेळ कोजागरीच्या रात्री मुख्यत्वे उपवर मुली खेळतात. त्या दिवशी त्या उपवासही करतात. खेळताना त्या उकिडवे बसतात व एक हात व एक पाय आलटून पालटून मागेपुढे हालवतात. दिवे लागणीची वेळ ही या खेळाला सर्वांत अनुरूप वेळ मानली जाते. या नृत्यात स्त्रियांची स्पर्धाही लागते. जी सर्वांत जास्त वेळ टिकेल तिचा जय होतो. हा खेळ खेळताना त्या खालील गाणे म्हणतात –

**छि लो लाई आ खेलमा वाई**
**वाई गले रुषि आम गो मा पिसी**
**वासि परवाले नुननि सान दिअर गुननि**
**घुंचि जारे घुंचि जा मंचा तलकु**
**मंग तलर सिंह पारिआ भुरसि मुड्कु**
**हटाली रे हटाली गोलाप फुल फुटाली**
**तुइ हटाली अकाले पुडु तोर कपाले**

शरीराच्या सर्व अवयवांना व्यायाम होण्याच्या दृष्टीने हा खेळ उपयुक्त आहे. त्यामुळे बांधा सुडौल व प्रमाणबद्ध बनतो.

**पुजारी** पंजाबमधील एक जात. पुजारी याचा खरा अर्थ मंदिरातून देवपूजा करणारा ब्राह्मण असा आहे; परंतु कांगडा आणि सिमला टेकड्यांमधील पुजाऱ्यांची एक स्वतंत्र जातच बनली आहे. न्हावी, ब्राह्मण, राजपूत आणि जोगी यांच्यातील अंतर्गत लग्नसंबंधाने ही जात निर्माण झाली आहे. भोजक लोकांचा अंतर्भावही पुजाऱ्यांमध्येच केला जातो.

पुजाऱ्यांत मुसलमानही आहेत. त्यांना बुखारी व सैयद म्हणतात. यांची वस्ती जालंधर, लाहोर आणि अमृतसर या मोठ्या शहरांमध्ये आढळते. [पं. का.]

**पुटभेदन** एक नगरप्रकार. प्राचीन काळी मोठ्या व्यापारी केंद्राला पुटभेदन म्हणत. शाकल, पाटलिपुत्र व इंद्रप्रस्थ या शहरांना पुटभेदन म्हटले आहे. मुहरबंद असलेल्या मालाच्या मोठमोठ्या गाठी म्हणजे पुट होय. अशा गाठी या प्रकारच्या शहरात फोडल्या जात. त्यावरून विशिष्ट व्यापारी केंद्रांना पुटभेदन हे नाव पडले. पुटभेदनात व्यापाऱ्यांची संख्या जास्त असे (समरांगण – सूत्रधार). [प्रा. भा. न. न.]

**पुण्य** एक सामाजिक व धार्मिक संज्ञा. याच्या व्याख्या अशा– 'इष्टान्तरजनकम्' = वेगळे इष्ट फळ उत्पन्न करणारे ते पुण्य होय व 'विहितानुष्ठानजन्यं पुण्यम्' = विहित कर्माने जे उत्पन्न होते ते पुण्य होय. धर्मशास्त्रकारांनी जे आचारविषयक नियम केलेले आहेत, त्या नियमांचे यथायोग्य पालन केल्याने जी एक विशेष शक्ती किंवा सामर्थ्य प्राप्त होते, त्याला पुण्य अशी संज्ञा आहे. याच्या उलट ते पाप होय. मनुष्याचे पुण्य ज्या मानाने कमी– जास्त असेल, त्याप्रमाणे त्याला इहलोकी कमी– जास्त प्रमाणात सुखप्राप्ती होऊन अंती त्याच पुण्याच्या जोरावर स्वर्गसुखही मिळत असते, अशी सामान्य धारणा आहे.

धर्मशास्त्राने सांगितलेल्या नियमांचे यथायोग्य आचरण केल्यामुळे जसे पुण्य मिळते, तसेच ते विशिष्ट काळी विशिष्ट गोष्टींशी सान्निध्य किंवा साहचर्य केल्यानेही मिळते. उदा० पर्वकाळी तीर्थस्नान व देवदर्शन. गायीला स्पर्श करणे, गोमय व गोमूत्र लावून स्नान करणे, देवतांचे तीर्थप्रसाद सेवन करणे

इ. गोष्टींच्या द्वारेही पुण्य मिळते. क्षेत्राच्या ठिकाणी धर्मशाळा बांधणे, अन्नछत्रे घालणे, अन्नदान, विद्यादान, भूमिदान, इ. दाने देणे, विविध व्रते व उपवास करणे इ. गोष्टीही पुण्यप्रद मानलेल्या आहेत. थोडक्यात सांगायचे तर सर्व इष्टापूर्त कर्मे ही पुण्योत्पादकच असतात. ती माणसाला धन, सुख व स्वर्ग यांची प्राप्ती होण्याच्या कामी मदत करतात. माणसाची प्रवृत्ती पुण्याकडे वळावी आणि त्याने पापापासून दूर राहावे, यासाठी वरील सर्व गोष्टी धर्मशास्त्रात सांगितल्या आहेत.

माणसाने पुण्य करावे, सतत करीत राहावे; पण त्याचा स्वमुखाने उच्चार करू नये व त्याला लोकांत प्रसिद्धी देऊ नये, असे देवलाने सांगितले आहे. तो म्हणतो –

**तस्मादात्मकृतं पुण्यं वृथा न परिकीर्तयेत्**

अर्थ – उच्चारलेले पुण्य नष्ट होत असल्यामुळे स्वतः केलेल्या पुण्याची वायफळ वाच्यता करू नये.

पुण्याने स्वर्गप्राप्ती व पापाने नरकवास हा संकेत लोकांत आणि धर्मशास्त्रात अत्यंत प्रभावी आहे. **पाहा** – पाप.

## पुण्यक व्रत

एक काम्य व्रत. हे स्त्रीव्रत आहे. माघ शुद्ध त्रयोदशीला याचा आरंभ करतात. व्रतावधी एक वर्ष. या कालात नित्य कृष्णाची पूजा करायची असते. त्यानंतर व्रताचे उद्यापन करतात. फल – श्रीकृष्णासारख्या विख्यात पुत्राची प्राप्ती. [ श. क. ]

## पुण्यत्राता

(इ. स. चे ५ वे शतक) एक काश्मीरी पंडित. महाविद्वान म्हणून त्याची ख्याती होती. बौद्ध धर्माच्या प्रचारासाठी हा चीनमध्ये गेला होता. याची व कुमारजीव याची मैत्री होती. त्या दोघांनी मिळून अनेक संस्कृत बौद्ध ग्रंथांचा चिनी भाषेत अनुवाद केला. [ श्री. रोचक पंडित – धर्मयुग, २८ जून १९६४ ]

## पुण्याहवाचन

एक धार्मिक व्रत. पुण्य + अह + वाचन = कार्यारंभाचा दिवस पुण्य म्हणजे शुभकारक आहे, असे ब्राह्मणांकडून वदविणे, असा या शब्दाचा अर्थ आहे. कोणत्याही मंगल कार्याला पंचांगात शुभ दिवस पाहूनच प्रारंभ करतात. पण तरीही ब्राह्मणांनी तो दिवस पुण्यकारक असल्याचे सांगून व यजमानाला तसा आशीर्वाद देऊन त्या कामी दुजोरा द्यायचा असतो. म्हणून कोणत्याही मंगलकार्याच्या प्रारंभी गणपतिपूजनानंतर पुण्याहवाचन करण्याचा प्रघात आहे. गृह्यसूत्रांमध्ये याचा विधी फार थोडा सांगितला आहे. सत्याषाढ म्हणतो, की कमीत कमी सहा ब्राह्मणांना भोजन घालून त्यांच्याकडून आशीर्वाद घ्यावे (सत्या. श्रौ. सू. १९. १. ६). निबंधग्रंथांमध्ये मात्र पुण्याहवाचनाचा विस्तृत विधी सांगितला आहे, तो असा –

प्रथम धान्यराशींवर दोन कलश स्थापन करतात. त्यांत पाणी, गंध, पंच पल्लव, दूर्वा व सुवर्ण घालतात. या प्रत्येक वस्तूसाठी एकेक स्वतंत्र मंत्र असतो. मग त्या कलशांवर धान्याने भरलेली पूर्णपात्रे ठेवतात. मग यजमान उत्तरेच्या कलशावर वरुणाचे आवाहन करतो. मग गुडघ्यावर उभे राहून तो कलश उचलतो व स्वतःच्या, पत्नीच्या आणि ज्या व्यक्तीचे मंगलकार्य व्हायचे असेल, त्या व्यक्तीच्या मस्तकाला कलश टेकवतो आणि पुन्हा स्वतःच्या मस्तकाला लावून जागच्या जागी ठेवतो. मग तो ब्राह्मणांची पूजा करतो. ब्राह्मण त्याला 'शान्तिरस्तु, पुष्टिरस्तु, तुष्टिरस्तु, अविघ्नमस्तु,' इ. मंत्रांनी आशीर्वाद देतात. त्यानंतर यजमान पुनश्च मंत्रपूर्वक पुण्याहवाचन मागतो. त्या वेळचा संकल्प **असा** –

'मह्यं सकुटुम्बाय महाजनान्नमस्कुर्वाणाय आशीर्वचनमपेक्षमाणाय अद्य करिष्यमाण अमुककर्मणः पुण्याहं भवन्तो ब्रुवन्तु' = सकुटुंब, महाजनांना नमस्कार करणारा व आशीर्वादाची अपेक्षा करणारा अशा मला आज केल्या जाणाऱ्या अमुक कृत्यासाठी पुण्याह आहे, असे आपण म्हणा. त्यावर ब्राह्मण 'ॐपुण्याहम्' असे म्हणतात. नंतर 'आयुष्मते स्वस्ति, कर्म ऋध्यताम्' इ. आणखी आशीर्वाद देतात. मग घरातील सुवासिनी दिवा हातात घेऊन यजमानाला ओवाळतात. यजमान उत्तरेचा कलश उजव्या हाती व दक्षिणेचा कलश डाव्या हाती धरून उचलतो, हात सरळ करतो व दोन्ही कलशांतील पाणी एका धारेने ताम्हनात ओततो. त्या वेळी ब्राह्मण 'समुद्रादूर्मि' इ. मंत्र म्हणतात. मग ते त्या जलाने यजमानदंपती व त्याचा परिवार यांना 'समुद्रज्येष्ठाः०', 'त्रायन्तामिह०' 'इमा आपः०' इ. मंत्र म्हणून अभिषेक करतात. एवढे झाल्याने पुण्याहवाचन समाप्त होते.

पुण्याहवाचनाचा हा विधी मनाला प्रसन्न करून उत्साह देणारा असतो. त्यातल्या मंत्रांची योजनाही तशाच प्रकारची आहे. हा सर्व विधी अत्यंत काव्यमय आणि हृदयंगम असा आहे. [ श्री. विद्याधरशास्त्री भिडे ]

## पुण्योपाय

(इ. स. चे ७ वे शतक) एक बौद्ध आचार्य. हा मध्य प्रदेशातला राहणारा होता. इ. स. ६५५ मध्ये बौद्ध धर्माचे १५०० हून अधिक ग्रंथ घेऊन हा चीनमध्ये गेला. यांत महायान आणि हीनयान या दोन्ही संप्रदायांचे ग्रंथ होते. चीनमध्ये त्याने बौद्ध धर्माचा बराच प्रचार केला. [ श्री. वाजपेयी – ना. प्र. प. – विक्रमांक – उत्तरार्ध १९४४ ]

**पुत्र** मुलगा. पुत्र शब्दाची व्याख्या अशी – '**पुनाति पित्रादीनिति**' जो पितरांना पवित्र करतो, तो पुत्र होय किंवा 'पुन्नामनरकात् त्रायत इति' = पुत् नामक नरकापासून जो मातापित्यांचे रक्षण करतो, तो पुत्र होय.

मनूने पुत्रांचे बारा प्रकार सांगितले आहेत, ते असे –

(१) **औरस**– स्वतःच्या भार्येच्या ठिकाणी पुरुषाने उत्पन्न केलेला.

(२) **क्षेत्रज** – व्याधिग्रस्त किंवा क्लीब पुरुषाने आपल्या पत्नीच्या ठिकाणी दुसऱ्या पुरुषाकडून उत्पन्न करविलेला.

(३) **दत्त** – संकटप्रसंगी आईबापांनी दुसऱ्याला दिलेला.

(४) **कृत्रिम** – समानजातीय आणि पुत्राच्या गुणांनी युक्त असलेला.

(५) **गूढ**–ज्याचा पिता नक्की कोण, हे ठाऊक नाही असा.

(६) **अपविद्ध** – मातापित्यांनी टाकलेला किंवा त्यांच्यापैकी एकाच्या निधनामुळे दुसऱ्याने टाकलेला आणि त्यामुळे एखाद्याने पुत्र म्हणून स्वीकार केलेला.

(७) **कानीन** – अविवाहित कन्येला पित्याच्या घरी असता झालेला. त्या कन्येशी विवाह करणाऱ्या पुरुषाचा हा कानीन पुत्र ठरतो.

(८) **सहोढ** – गर्भिणी स्त्रीशी विवाह केला असता, तिला झालेला.

(९) **क्रीत** – एखाद्याने जनक मातापित्यांकडून विकत घेतलेला.

(१०) **पौनर्भव** – परित्यक्त किंवा विधवा स्त्रीने पुनर्विवाह केल्यावर तिला झालेला.

(११) **स्वयंदत्त** – आईबाप नसलेला किंवा आईबापांनी विनाकारण त्याग केलेला मुलगा, की जो स्वतःच दुसऱ्याला पुत्र म्हणून आपला स्वीकार करायला लावतो.

(१२) **पारशव** – शूद्र पत्नीच्या ठिकाणी ब्राह्मण पुरुषाने उत्पन्न केलेला. हा जिवंत असून (पारयन्) मेल्यासारखाच (शव) असतो, म्हणून त्याला हे नाव दिलेले आहे.

यांपैकी पहिल्या सहा पुत्रांना दायाद व पुढच्या सहांना अदायाद मानलेले आहे. सर्व पुत्रांत औरस पुत्र हा विशेष महत्त्वाचा असून, त्याने पित्याचे सर्व धन घ्यावे आणि बाकीच्या भावांचे संरक्षण करावे, असे मनूने सांगितले आहे ( मनु. ९.१६३ ). प्राचीन काळी औरस पुत्रांमध्येही ज्येष्ठ पुत्राला अधिक महत्त्व होते. पित्याच्या मागून तोच कुटुंबाचा मालक होत असे याचे कारण मनू पुढीलप्रमाणे सांगतो ( मनु. ९.१०६ ).–

**ज्येष्ठेन जातमात्रेण पुत्री भवति मानवः ।**
**पितॄणामनृणश्चैव स तस्मात् सर्वमर्हति ॥**

अर्थ – जेष्ठ पुत्राच्या जन्मानेच मनुष्य पुत्रवान होतो आणि आपल्या पितृऋणातून मुक्त होतो. म्हणून त्याला सर्व (संपत्ती व अधिकार) मिळाले पाहिजेत.

पण पुढच्या काळात इतर पुत्रांनाही पैतृक संपत्तीतला काही वाटा मिळालाच पाहिजे, अशी समजूत दृढ होऊ लागली. त्याचप्रमाणे सर्व पुत्रांनी कुटुंबात एकत्र राहावे किंवा इच्छा असल्यास वेगळे राहावे, अशीही व्यवस्था मान्य होऊ लागली. विभक्तपणाला अशी मान्यता मिळाली, तरी ज्येष्ठ पुत्राचे महत्त्व मात्र एकदम कमी झाले नाही. त्याला संपत्तीच्या वाटणीत वीस हिस्से अधिक मिळू लागले व कनिष्ठ पुत्रांना त्या मानाने कमी भाग मिळू लागला. पण कालांतराने हीही प्रथा नष्ट होऊन सर्व भावांना पैतृक धनात सारखा वाटा मिळावा, असे ठरले.

**पुत्राचे महत्त्व**— वैदिक युगापासून विवाहाचा मुख्य उद्देश प्रजोत्पत्ती हा मानलेला आहे. विवाहसंस्काराच्या वेळी, वधू-वर कामना करतात, की प्रजापती आमच्या ठिकाणी प्रजा उत्पन्न करो (ऋ. १०.८५.४३). त्यांची हीच इच्छा अनेक संहिता, श्रौतसूत्रे व गृह्यसूत्रे यांमध्येही प्रकट झालेली आहे.

विवाहित स्त्रीपुरुषांना अपत्याची आणि त्यातल्या त्यात पुत्राची प्रबल इच्छा असते. विवाहप्रसंगी नव दांपत्याला पुरोहित आशीर्वाद देतो, की तुम्ही जन्मभर पुत्रपौत्रांसह आनंदाने राहा. अथर्ववेदात वीर पुत्रांसाठी प्रार्थना केलेली असून स्त्रीला सांगितले आहे, की तू प्रथम पुत्राला जन्म दे (३. २३.३–५ ).

आशीर्वाद आणि प्रार्थना, यांशिवाय पुत्रप्राप्तीसाठी करण्याचे अनेक विधीही त्या काळात प्रचलित होते. गर्भाधानाचा विधी हा त्यांपैकीच एक होय ( तै. ब्रा. ३.७.१).

आश्वलायन गृह्यसूत्रांत दुसरा एक विधी सांगितला आहे, तो असा – विवाहसंस्कारात 'गृभ्णामि ते सौभगत्वाय' हा मंत्र म्हणून वर वधूचे पाणिग्रहण करतो आणि त्याच वेळी पुत्रप्राप्ती व्हावी म्हणून तिचा अंगठा धरतो. गर्भाधानाप्रमाणे चतुर्थीकर्म व पुंसवन या संस्कारांचा उद्देशही तोच आहे.

आर्य लोकांनी कन्येपेक्षा पुत्राचीच विशेष कामना केलेली आहे. तिची कारणे अशी – आर्यांना आर्येतरांशी युद्धाचे प्रसंग वारंवार येत. त्यासाठी त्यांना वीर पुत्रच उपयोगी पडत. अन्न शोधणे, मिळवणे व त्याचा संग्रह करणे या कामातही पुत्राचाच उपयोग अधिक होत असे. मुली ते काम समाधानकारकपणे करू शकत नसत. वैदिक साहित्यात पुत्र अशा अर्थी 'वीर' शब्दाचा प्रयोग केलेला आढळतो. त्यावरून त्या काळी पुत्राचा वीरतेशी घनिष्ठ संबंध होता, हे कळते. 'पुत्रो वै वीरः' असे शुक्ल यजुर्वेदात स्पष्ट म्हटले आहे ( ४.२३ ).

लढाऊ जाती आपले संख्याबल वाढवण्याचा नेहमी प्रयत्न करीत असतात. कारण युद्धात जय मिळविण्यासाठी संख्याबलाचा फार मोठा उपयोग होतो. वैदिक काळी कुळात खूप पुत्र उत्पन्न व्हावे, यावर लोकांचा विशेष भर होता, त्याचे कारणही तेच. त्या काळी विवाहाच्या प्रसंगी नियोजित वराने आपल्या पत्नीच्या ठिकाणी दहा पुत्र उत्पन्न करावे अशी आकांक्षा बाळगीत (ऋ. १० ८५.४५).

वृद्धावस्थेत मातापित्यांचे पालन करण्यासाठी, पित्याच्या मृत्यूनंतर त्याचा वंश पुढे चालविण्यासाठी आणि त्याच्या कुटुंबाचे रक्षण करण्यासाठीही पुत्राची गरज असे. पित्याच्या धार्मिक कार्यांचाही पुत्र हाच उत्तराधिकारी असे. कन्या ही परघरी जात असल्यामुळे ही कार्ये तिच्याकडून होणे शक्य नसल्याने गृहस्थाला पुत्राचीच कामना विशेष असे व आजही तशीच ती असते.

वैदिक युगाच्या शेवटी ऋणत्रयाची कल्पना पुढे आली. प्रत्येक पुरुषाने जी तीन ऋणे फेडायची असत, त्यांपैकी पितृऋण हे एक असे व ते पुत्र उत्पन्न केल्यानेच फिटत असे. म्हणूनच शास्त्रकारांनी पुत्राचा खूप गौरव केलेला दिसतो. वसिष्ठ सांगतो –

**अनन्ताः पुत्रिणो लोकाः। नापुत्रस्य लोकोऽस्तीति श्रूयते।**
(वसिष्ठ धर्मसूत्र १७·१२)

अर्थ– पुत्र असणाऱ्यांना अनंत (स्वर्ग) लोक प्राप्त होतात. पुत्रहीन व्यक्तीला मात्र कोणताही लोक मिळत नाही, असे श्रुतीत सांगितले आहे.

पुत्राचे माहात्म्य पुढे पुढे इतके वाढले, की त्याच्या अभावी यज्ञ, दान, तप, इ. सर्व कर्मे व्यर्थ मानली जाऊ लागली.

पुत्राला एवढे महत्त्व प्राप्त झाले, त्यामागे पुढील दोन धार्मिक कारणे मुख्य होती– पुत्र हा पित्याचे नरकापासून रक्षण करतो हे एक आणि पितरांचे आत्मे पुत्रांनी पिंडोदक दिल्यावरच सुखी व संतुष्ट होतात, हे दुसरे.

त्यामुळे, एखाद्याला पुत्र नसणे, ही मोठी दुःखदायक बाब मानली गेली. त्यामुळे साहजिकच वंध्या स्त्रीकडे समाज तिरस्काराने पाहू लागला. त्यामुळे पुढे वंध्या स्त्रीने दिलेले अन्नही दूषित समजण्यात येऊ लागले. जो अशा अन्नाचा स्वीकार करील, त्याचे आयुष्य कमी होईल, अशा कथाही निर्माण झाल्या. त्यामुळे पुत्रहीन मातापितरे अत्यंत दुःखी होऊ लागली. प्राचीन साहित्यात पुत्र नसल्यामुळे दु.खी असलेल्या अशा अनेक दांपत्यांची वर्णने आली आहेत. युवनाश्वाला पुत्र नव्हता; म्हणून त्याने राज्याचा त्याग केला आणि तो वनात गेला. दिलीप राजाने वसिष्ठाला कळवळून सांगितले, की माझ्या मागून माझ्या पितरांना पिंड मिळणार नाहीत म्हणून ते आता स्वधेचा संग्रह करण्यात गुतले आहेत आणि त्यामुळे ते पुरेसे अन्नही घेत नाहीत माझ्या मागून त्यांना पाणी द्यायलाही कोणी नाही, या विचाराने ते मी दिलेले जलही आपल्या उष्ण निःश्वासांनी कोमट करून पीत आहेत (रघु. १.६६.६७.७१).

दशरथानेही आपल्या पुरोहिताला सांगितले होते, की 'पुत्र नाही, म्हणून मी दुःखी आहे. मला कसलेच सुख नाही.'

म्हणूनच अनपत्यता दूर करण्यासाठी अनेक उपाय निर्माण झाले. उग्र तपस्या, देवतांची आराधना, यज्ञ, औषधोपचार, जादूटोणा, इ. गोष्टी त्यात येतात. हे उपाय करूनही औरस पुत्र न झाल्यास एखादा मुलगा दत्तक घ्यावा पण पुत्रहीन राहू नये, अशी कल्पना प्रचलित झाली. भारताप्रमाणेच जगातील अनेक देशांतही पुत्र दत्तक घेण्याची प्रथा रूढ आहे.

पुत्र दत्तक घेण्यासंबंधीचा उल्लेख प्रथम ऋग्वेदात आढळतो (१.२४.१-२). विश्वामित्राने शुनःशेपाला दत्तक घेतले आणि त्याचे नाव देवरात असे ठेवले, ही गोष्ट ऐतरेय ब्राह्मणावरून कळते. अत्री ऋषीने आपली सर्व मुले और्वाला दत्तक दिली, असा उल्लेख यजुर्वेदात आढळतो. दशरथाने आपली कन्या शांता ही लोमपादाला दत्तक दिली होती, असे रामायणात सांगितले आहे (वा. रा. बाल. ११.२.७).

औरस पुत्र नसल्यास ज्याप्रमाणे पुत्र दत्तक घेण्याची प्रथा होती, त्याचप्रमाणे एखादा मनुष्य निपुत्रिक वारला असता, त्याचा वंश पुढे चालावा व त्याला परलोकी चांगली गती प्राप्त व्हावी, म्हणून त्याच्या पत्नीच्या ठिकाणी नियोगपद्धतीने पुत्र उत्पन्न करण्याची चालही भारतात प्राचीन काळी रूढ होती विचित्रवीर्याच्या दोन स्त्रियांच्या ठिकाणी व्यासाने पंडू व. धृतराष्ट्र हे दोन पुत्र उत्पन्न केले, अशी कथा महाभारतात आहे. मात्र कालांतराने ही नियोगपद्धती त्याज्य मानली गेली. [हिं. प. मी.; श. क.; पितापुत्रसंबंध – श्री. य. रा. दाते]

**पुत्रकामव्रत** एक काम्य व्रत. भाद्रपद पौर्णिमेला हे व्रत करतात. त्याचा विधी असा– त्या दिवशी निपुत्रिक पुरुषाने आपल्या घरी पुत्रेष्टी करावी. मग ज्या गुहेत रुद्राचे वास्तव्य होते अशी समजूत असेल, अशा गुहेत प्रवेश करून तिथे रुद्र, पार्वती व नंदी यांची पूजा करून होम करावा. गुहेला प्रदक्षिणा घालावी. व्रतकर्त्याच्या पत्नीने तीन दिवस फक्त दूधभात खाऊन राहावे. पतीने सोने, रुपे किंवा लोखंड याची एक प्रादेशमात्र शिवाची मूर्ती करावी. नंतर ती मूर्ती अग्नीत तापवून एका पात्रात ठेवावी आणि तिला दुधाचा अभिषेक करावा. मग ते दूध पत्नीला प्राशन करायला द्यावे.

याचा दुसरा पर्याय असा – ज्येष्ठ पौर्णिमेला हे व्रत करावे. एका पात्रात तांदूळ भरावे. त्यावर शुभ्र वस्त्र आच्छादावे. त्यात सोने घालावे. त्यावर गुळाने भरलेले पूर्णपात्र ठेवावे. त्यात ब्रह्मा आणि सावित्री यांच्या अनुक्रमे सुवर्णाच्या व साखरेच्या मूर्ती ठेवाव्या. नंतर त्यांची पूजा करून दुसऱ्या दिवशी ते पात्र ब्राह्मणाला दान द्यावे. मग ब्राह्मणभोजन घालावे; पण स्वतः मात्र अळणी भोजन करावे. याप्रमाणे वर्षभर प्रत्येक पौर्णिमेला करून मग व्रताचे उद्यापन करावे. त्या वेळी दुभती गाय, सावित्रीची रुप्याची मूर्ती आणि ब्रह्म्याची सोन्याची मूर्ती यांचे दान द्यावे. त्याचप्रमाणे शुभ्र तिळांचा होम करावा आणि ब्रह्म्याच्या नावाचा जप करावा. फल – पुत्रप्राप्ती व पापमुक्ती. या व्रताला पुत्रकाम्यव्रत असेही नाव आहे. [ हि. ध. ]

**पुत्रकामेष्टी** पुत्रप्राप्तीसाठी करायची एक इष्टी. हिचा विधी असा – यजमानाने पत्नीच्या रजोदर्शनापासून सहाव्या दिवशी भार्येसह स्नान करून इष्टीचा संकल्प करावा. मग पुण्याहवाचन व नांदीश्राद्ध करून अग्निस्थापना करावी. नंतर श्वेतवर्ण गाईच्या दुधात चरू शिजवून अग्नी, वरुण, विष्णु, पृथ्वी, सोम व सूर्यासावित्री या देवतांना त्याच्या आहुती द्याव्या. 'अपश्यं त्वा' इ. मंत्र म्हणावे. अवशिष्ट चरू– पायसाचे प्राशन करावे. स्त्रीच्या नाभीस स्पर्श करावा. नंतर ब्राह्मणाला दक्षिणा देऊन इष्टी समाप्त करावी. रात्री दर्भाच्या शय्येवर शयन करावे.

उत्तम संतती प्राप्त व्हावी अर्थात मुलगा व्हावा यासाठी पुत्रवान अग्नी व पुत्रिन् इंद्र या देवतांसाठी इष्टी करावी, असे तैत्ति. संहितेत सांगितले आहे (२.२.४). अशा प्रकारचे आणखीही काही याग संहिता व श्रौतसूत्रे यांमध्ये सांगितले असून, त्या सर्व यागांचे तंत्र दर्शपूर्णमास यागाप्रमाणेच आहे. हे याग अग्निहोत्र्यासच करता येतात. दशरथाने पुत्रकामेष्टी केल्यानंतर त्याला चार पुत्र झाले, अशी कथा रामायणात सांगितलेली आहे. [ ध. मि.; सं. कौ. ]

**पुत्रद विधी** पुत्रप्राप्तीसाठी करायचा एक विधी. ज्या रविवारी रोहिणी किंवा हस्त नक्षत्र असेल, त्या दिवसाला पुत्रद रविवार म्हणतात. हा विधी असा – व्रतकर्त्याने त्या दिवशी उपवास करून सूर्याची पूजा करावी. 'ह्रीं श्रीं सः' या महाश्वेता मंत्राचा जप करावा. त्या रात्री सूर्यमूर्तीपुढेच शयन करावे. दुसऱ्या दिवशी सूर्याला करवीर पुष्पे आणि तांबड्या चंदनाचे गंध यांचे अर्घ्य द्यावे. मग पार्वणश्राद्ध करून तीन पिंडांपैकी मधला पिंड भक्षण करावा. [ हि. ध. ]

**पुत्रदा एकादशी** (१) श्रावण शुद्ध एकादशीचे नाव. ही पुत्रप्रद मानलेली आहे. या संबंधीची कथा अशी– द्वापर युगात माहिष्मती नगरीत महाजित नावाचा एक राजा होता. त्याला मुलगा नव्हता, त्यामुळे तो फार दुःखी होता. एके दिवशी त्या राजाचा प्रधान लोमश ऋषीकडे गेला आणि त्याने ऋषीला राजाचे दुःख सांगितले. लोमश म्हणाला. 'पूर्वजन्मी तुमचा राजा वैश्य होता. त्याने खूप संपत्ती मिळविली; पण तिचा सदुपयोग केला नाही. एके दिवशी एक गाय तळ्याच्या काठी पाणी पिण्यासाठी आली असता त्याने तिला हाकलून दिले. त्या पापामुळे या जन्मी त्याला मुलगा होत नाही. तुम्ही पुत्रदा एकादशीचे व्रत करून त्याचे पुण्य राजाला दिले, तर त्याला पुत्र होईल. प्रधानाने तसे केले व त्याच्या पुण्याने राजा पुत्रवान झाला.

(२) पौष शुद्ध एकादशीलाही हेच नाव दिलेले आहे. या एकादशीच्या व्रताने पुत्रप्राप्ती होते, असे सांगून या व्रताची कथा दिली आहे, ती अशी –

भद्रावती नगरीत सुकेतुमान नावाचा एक राजा होता. त्याला मूल नव्हते. त्यामुळे तो सदैव दुःखी असे. एका रात्री तो घोड्यावर बसून अरण्यात गेला असता त्याला तहान लागली. म्हणून तो एका तळ्याजवळ आला. तिथे पुष्कळ ऋषी स्नानासाठी जमले होते. राजाने त्यांना आपली कहाणी सांगितली. ऋषी त्यावर राजाला म्हणाले, की 'आज पुत्रदा एकादशी आहे. तू तिचे व्रत कर; म्हणजे तुला संतती होईल. राजाने तसे केले व यथाकाळी राजाला सत्पुत्र लाभला.

या दिवशी करायच्या व्रताचा विधी असा–दशमीच्या दिवशी दुपारी हविष्यान्नाचे भोजन करून एकभुक्त करतात. दुसऱ्या दिवशी स्नानोत्तर संकल्पपूर्वक षोडशोपचारे विष्णुमूर्तीचे पूजन करतात व ऋतुकालोद्भव फळांचा नैवेद्य दाखवितात. त्या दिवशी उपवास करून. रात्री गायन–कीर्तनादी करून जागरण करतात. नंतर द्वादशीला यथाशक्ति ब्राह्मणभोजन घालून व्रतसमाप्ती करतात. [ व्र. प. ]

**पुत्रप्रद कृष्णमंत्र** पुत्रप्राप्तीसाठी जप करण्याचा एक मंत्र. हा मंत्र श्लोकरूप आहे, तो असा –

**देवकिसुत गोविन्द वासुदेव जगत्पते ।**
**देहि मे तनयं कृष्ण त्वामहं शरणं गत. ।।**

या मंत्राचा ऋषी नारद, छंद अनुष्टुभ व देवता सुतप्रद कृष्ण आहे. या मंत्राचा एक लक्ष जप करावा व मध, साखर आणि घृत यांनी युक्त अशा तिळांचे हवन करावे, असे सांगितले आहे. [ मंत्र – महोदधि ]

**पुत्रप्राप्तीव्रत** एक काम्य व्रत. वैशाख शुद्ध पंचमीला उपवास व षष्ठीला स्कंदप्रतिमेची पूजा करून व्रतारंभ करतात. त्यानंतर प्रतिमासी याप्रमाणेच पूजा करून वर्षअखेरीला व्रताचे उद्यापन करतात. फल – पुत्र, संपत्ती व आरोग्य यांची प्राप्ती.

देवीपुराणात या व्रताचा आणखी एक पर्याय दिला आहे, तो असा – श्रावण पौर्णिमेला शांकरी (दुर्गा) – प्रतिमेचे पूजन करतात. ही प्रतिमा चांदीची किंवा सोन्याची करावी, असे सांगितले आहे. क्वचित दुर्गाप्रतिमेऐवजी तिच्या पादुका अथवा खड्गही चांदीचे अगर सोन्याचे करून त्यांची पूजा करतात. मगएखाद्या शुभ नक्षत्र असलेल्या दिवशी सातूचे कोंब उगवलेल्या वेदीवर या पूजावस्तूंची विधिपूर्वक प्रतिष्ठापना करतात. त्याच वेदीवर नंतर होम करतात. फल– पुत्रप्राप्ती. [ हि. ध. ]

**पुत्रसप्तमीव्रत** एक काम्य व्रत याचे दोन पर्याय आहेत, ते असे –

(१) माघ शुद्ध षष्ठीला उपवास व रात्री भूमीवर शयन करतात. सप्तमीला श्वेतपुष्पांनी सूर्यनारायणाच्या प्रतिमेचे पूजन व मग होमहवन करतात. त्यानंतर दहीभाताचे किंवा खिरीचे ब्राह्मणांना भोजन घालतात. व्रतकालात कर्ता इंद्रियनिग्रह करतो व पतित मनुष्याशी संभाषण करीत नाही. माघ वद्य सप्तमीला सूर्यपूजेसाठी रक्तपुष्पे घेतात. अशा प्रकारे एक वर्षभर प्रतिमासी दोन्ही सप्तम्यांना ही पूजा करतात. फल – तेजस्वी पुत्राची प्राप्ती व धनधान्यसमृद्धी. [ व्रतराज; कृ. क. त.]

(२) भाद्रपद शुद्ध किंवा वद्य षष्ठीला संकल्प करून सप्तमीला उपवास व विष्णुमंत्राने विष्णुप्रतिमेची पूजा करतात. अष्टमीला गोपालमंत्राने विष्णुपूजा करून तिलहोम करतात. याप्रमाणे एक वर्षभर प्रतिमासी उभय पंधरवड्यांत सप्तमी तिथींना हे व्रत करतात. व्रताच्या उद्यापनप्रसंगी दोन काळ्या गायींचे ब्राह्मणाला दान देतात. फल– पुत्रप्राप्ती. [ हि. ध. ]

**पुत्रिका** एक धर्मशास्त्रीय संज्ञा. ज्या मुलीला भाऊ नाही किंवा जिचे वडील माहीत नाहीत, अशा मुलीला पुत्रिका म्हणावे, असे मनूने सांगितले आहे (३.११). इतरही धर्मशास्त्रकार याच विधानाला अनुसरले आहेत.

वेदकालापासूनच पुत्राला महत्त्व प्राप्त झाल्याने पिंडदानासाठी जर एखाद्याला मुलगा नसला, तर तो मुलीलाच पुत्र समजून तिचे लग्न करीत असे व मुलीच्या मुलाने आपल्याला पिंड द्यावा, अशी व्यवस्था करीत असे. त्यामुळे अशा मुलीशी कोणी लग्न करू नये, असे धर्मशास्त्रात सांगितले आहे. कारण अशा मुलीला झालेला पुत्र हा पित्याचा न राहता तो त्याच्या सासऱ्याचा ठरतो आणि म्हणूनच पितृकुलाला पारखा होतो. पित्याला त्याच्याकडून पिंडदानाची अपेक्षा करता येत नाही. [ हि. ध.; वे. इं.; पो. वी. ए इं.; भा. सा. इ. ]

**पुत्रीयव्रत** एक काम्यव्रत. भाद्रपद किंवा आश्विन वद्य अष्टमीला बाळकृष्णाच्या मूर्तीचे पूजन करून व्रतारंभ करतात देवाच्या स्नानासाठी पंचामृत घेतात. नंतर पुरुषसूक्ताचा पाठ म्हणून तूप व खीर यांचे हवन करतात. मग मुलगा किंवा मुलगी यांपैकी ज्या अपत्याची अपेक्षा असेल, त्याप्रमाणे फळांचे भोजन करतात. उदा० मुलगा हवा असेल, तर केळी, पेरू, आंबे यांचे भोजन करतात. याप्रमाणे एक वर्षभर प्रतिमासी शुद्ध व वद्य दोन्ही अष्टम्यांना हे व्रत करतात. फल – संतानप्राप्ती. [ हि. ध.; व्र प. ]

**पुत्रीयानंतव्रत** एक काम्य व्रत. मार्गशीर्ष महिन्यात त्या महिन्याच्या नावाचे नक्षत्र असलेल्या दिवशी उपवास व विष्णुप्रतिमेची पूजा करून व्रतारंभ करतात. नंतर प्रतिमासी त्या त्या महिन्याच्या नावाचे नक्षत्र असलेल्या दिवशी विष्णूच्या एकेका अवयवाची म्हणजे मार्गशीर्षात डाव्या गुडघ्याची, पौषात कमरेच्या डाव्या भागाची पूजा करतात. दर चार महिन्यांनी निरनिराळ्या रंगांची फुले देवाला वाहतात. त्याप्रमाणेच देवाच्या स्नानद्रव्यात बदल करतात पहिले चार महिने गोमूत्र, पुढे दूध व मग दही यांचा स्नानद्रव्यासाठी उपयोग करतात. पूजा केल्यावर अनंताच्या नावाचा जप करून नाममंत्राने होम करतात व ब्राह्मणभोजन घालतात. फल – पुत्रप्राप्ती. [ हि. ध. ]

**पुनई** बंगालमधील एक उत्सव. तिथल्या स्त्रिया माघ पौर्णिमेला हा उत्सव करतात. जुजुब नावाच्या झाडाची एक व बिन्ना नावाच्या झुडपाची एक अशा दोन फांद्या एकत्र करून त्या घराच्या अंगणात लावतात अंगणात एक लहानसे तळे करून त्याच्या चारी बाजू तांदुळाच्या पिठीने रांगोळी काढून सुशोभित करतात. तांदुळाच्या पिठाची पाच प्रकारची पक्वान्ने, पाच प्रकारची धान्ये, पाच फळे व पाच भाज्या यांचा चंद्राला नैवेद्य दाखवतात. पूजा संपल्यावर त्या छोट्याशा तळ्यात तो नवेद्य विसर्जित करून वर एक दगडाचे झाकण ठेवतात व्रती स्त्रिया या छोट्या तळ्याभोवती बसून व्रताची कहाणी ऐकतात. [ इं. फो. लो., एप्रिल–जून १९५९ ]

**पुनःप्रतिष्ठा** स्थापन केलेल्या मूर्तीच्या बाबतीत काही विपरीत घडले, तर तिला शुद्ध करून तिची पुनःस्थापना करतात, त्या विधीला हे नाव आहे. मूर्ती दूषित होण्याची कारणे वेगवेगळ्या ग्रंथांत वेगवेगळी दिलेली आहेत. त्यांतील मुख्य अशी – चांडाळ, मद्यपी व पापी लोक यांचा स्पर्श, इ. कारणांनी मूर्ती दूषित झाली असता तिची पुनःप्रतिष्ठा करावी, असे हयशीर्ष पंचरात्रात सांगितले आहे. मूर्ती फुटणे, दग्ध होणे, स्थानभ्रष्ट होणे, कुत्रा, गाढव, इ. नीच पशूचा, तसेच पतित, रजस्वला वगैरेंचा मूर्तीला विटाळ होणे, इ. कारणे घडली असताही मूर्तीची पुनःप्रतिष्ठा करावी, असे अन्य ग्रंथांत सांगितले आहे.

**पुनःप्रतिष्ठेचा विधी**–प्रथम पुण्याहवाचन करून दोन ब्राह्मणांना भोजन घालावे रात्री जलाधिवास करावा. दुसऱ्या दिवशी पंचगव्याने मूर्तीला स्नान घालावे. एका कलशात शुद्धोदक घालून त्यात नवरत्ने टाकावी. नंतर त्या त्या देवतेच्या गायत्रीने त्या उदकाचे अभिमंत्रण करून त्या उदकाने मूर्तीला स्नान घालावे. नंतर यथाविधि पूजा करून नैवेद्य दाखवावा.

पुनःप्रतिष्ठा अधिकमासात व शुक्रादिकांच्या अस्तादिकातही केली तरी चालते. **पाहा** – जीर्णोद्धार. [ नि. सि. ]

**पुनराधान** एक धार्मिक विधी. थोड्याशा फरकाने अग्न्याधानाचा व पुनराधानाचा विधी सारखाच आहे. फार दिवस नित्य होम व इष्टी अंतरल्यास अथवा दुसरे काही प्रमाद घडल्यास अग्निहोत्राचे तीन्ही अग्नी कर्माच्या दृष्टीने निरुपयोगी होतात. अशा वेळी पुनराधान करून खंडित अग्निहोत्र पुन्हा चालू करायचे असते. **पाहा** – अग्न्याधान.

**पुनराधेय** एक धार्मिक विधी. अग्न्याधान केल्यापासून एका वर्षाच्या आत जर यजमानाला मोठे दुखणे आले, त्याची संपत्ती गेली, पुत्राचा मृत्यू झाला किंवा त्याने द्रव्य व कीर्ती मिळविण्यासाठी देशांतर केले, तर तो पुन्हा अग्न्याधान करतो. त्यालाच पुनराधेय असे नाव आहे. याचा विधी सर्वसाधारणपणे अग्न्याधानासारखाच आहे.

जैमिनीच्या मते हा प्रायश्चित्तात्मक विधी असून, गार्हपत्य व आहवनीय हे दोन अग्नी विझल्यास पुनराधान करावे लागते.

पुनराधेय हा विधी पावसाळ्यात आणि मध्यान्ही करतात. **पाहा** – अग्न्याधान. [ हि. ध. ]

**पुनरुत्थान** ख्रिस्ती धर्मातील एक कल्पना. जगाच्या अंतकाळी परमेश्वर न्यायासनावर बसेल व सर्व मृत देह थडग्यांतून उठून त्याच्यापुढे न्यायनिवाड्यासाठी उभे राहतील, असा ख्रिस्ती धर्माचा विश्वास आहे यालाच ते पुनरुत्थान असे म्हणतात. एके दिवशी प्रत्यक्ष ख्रिस्ताने आपल्या थडग्यातून वर येऊन शिष्यांना दर्शन दिले, अशी कथा आहे. तिच्यावरूनच ख्रिस्त्यांचा पुनरुत्थानावर विश्वास बसला. पुनरुत्थानाची तीन उदाहरणे बायबलाच्या जुन्या करारात व पाच उदाहरणे नव्या करारात समाविष्ट आहेत. ही कल्पना इस्लाम व पारशी या धर्मांतही आढळते [ सु वि को ]

**पुनरुपनयन** एखाद्या पुरुषाच्या घराण्यात एकाच वेदाचे अध्ययन करण्याची पद्धती असले आणि जर त्याला आणखी एखाद्या वेदाचे अध्ययन करायचे असेल, तर त्याचे पुनरुपनयन करावे लागते, असा आश्व. गृह्य सूत्रातील या विषयासंबंधी असलेल्या सूत्रांचा काहींनी अर्थ केला आहे.

पुनरुपनयनात केशवपन आणि मेधाजनन हे विधी वैकल्पिक आहेत. परिदान आणि मुहूर्त याबाबत काहीच नियम नाहीत. या उपनयनातला गायत्रीमंत्र 'तत्सवितुर्वृणीमहे०' (ऋ. ५.८२.४) हा आहे.

आप. ध. सू. १.१.१.१० वरच्या टीकेत हरदत्त म्हणतो, की सर्व वेदांना ब्राह्मणग्रंथांत एकच गायत्रीमंत्र सांगितला असल्यामुळे, एकदा उपनयन झाल्यावर तीन्ही वेदांचे अध्ययन करता येते. पण अथर्ववेदाचे अध्ययन करायचे असेल, तर मात्र पुन्हा उपनयन करावे लागते.

उपनयनाच्या वेळी बटूच्या खांद्यांवर हात ठेवून त्याला आचार्याजवळ न्यायचे विसरून राहिल्यासही पुनरुपनयन करावे लागते.

काही पापांच्या प्रायश्चित्तादाखलही पुनरुपनयन करतात. अजाणता सुरापान करणे; मानवी मल, मूत्र व वीर्य प्राशन करणे; वन्य पशू, गाढव, कोंबडे, इत्यादींचे मांस भक्षण करणे; ब्रह्मचाऱ्याने मातापिता व आचार्य यांव्यतिरिक्त इतरांचे प्रेत वाहून नेणे; निषिद्ध देशी जाणे; इ. गोष्टी घडल्यासही पुनरुपनयन करावे, असे सांगितले आहे. [ हि ध. ]

**पुनर्जन्म** मनुष्य मरण पावतो, तेव्हा त्याचा आत्मा मृत देहाला सोडून जातो आणि कालांतराने आपल्या पूर्व कर्मानुसार उच्च किंवा नीच योनीत पुन्हा जन्म घेतो, असा पुनर्जन्माचा सिद्धान्त आहे. जो मनुष्य पुण्यवान असेल, त्याला मनुष्ययोनी प्राप्त होते; पण जो पापी असेल त्याला पशुपक्षी किंवा कृमिकीटक या नीच योनीत जन्म घ्यावा लागतो. पुनर्जन्माचा हा सिद्धान्त कर्म-विपाकाच्या सिद्धान्ताला पूरक आहे.

या लोकात काही माणसे व प्राणी जन्मतःच सुखी, सद्गुणी व भाग्यवान असतात; तर काही जन्मतःच दुःखी, दुर्गुणी किंवा दुर्दैवी असतात. याचे कारण पूर्व सुकृत किंवा दुष्कृत होय, असे मानले जाते. कोणत्याही कर्माचे फळ मिळालेच पाहिजे, हा कर्म-सिद्धान्त आहे. पण प्रत्येक कर्माचे फळ या जन्मात मिळतेच असे नाही. म्हणून पूर्व जन्मातील कर्माचे फळ या जन्मी आणि या जन्मातील कर्माचे फळ पुढील जन्मी भोगावे लागते, असे म्हटले आहे. या कर्मफलभोगासाठीच आत्म्याला पुनर्जन्म घ्यावा लागतो.

पुनर्जन्माची कल्पना ऋग्वेदात आढळत नाही, असे मत श्री. मॅकडोनेल, डॉ. केतकर वगैरे पंडितांनी व्यक्त केले आहे. मनुष्य मेल्यावर त्याचा जीव वृक्षवनस्पतीत किंवा पशुपक्ष्यांत प्रवेश करतो, किंवा त्याच घरातील स्त्रीच्या पोटी पुन्हा जन्म घेतो, अशी समजूत अनेक आदिवासी जमातींच्या लोकांत प्रच-लित आहे. मॅक्डोनेलच्या मते आर्यांनी पुनर्जन्माची कल्पना येथील मूळ रहिवाशांकडून घेतली. पण हे मत सर्वमान्य झालेले नाही. आर्य लोक संस्कृतीच्या प्राथमिक अवस्थेत होते, तेव्हा-पासूनच ही पुनर्जन्माची कल्पना त्यांच्यात प्रचलित असली पाहिजे. त्यांना ऐहिक सुखाची अधिक अभिलाषा असल्यामुळे मृत्यूनंतर जीवाचे काय होते, याविषयी त्यांनी फार खोल विचार केला नसेल; पण देवलोक, पितृलोक, स्वर्गलोक व यमलोक हे लोक त्यांना ज्ञात होते. मृत माणसाचा आत्मा आपल्या योग्यते-प्रमाणे त्यांतील एका लोकात जातो व तिथे आत्मोन्नती करून वरच्या लोकात जातो, अशी त्यांची समजूत होती.

प्रा. रा. द. रानडे यांनी वैदिक वाङ्मयाचे परिशीलन करून, त्यात पुनर्जन्माच्या कल्पनेचा विकास कसा होत गेला, त्याचे विवेचन पुढीलप्रमाणे केले आहे –

ऋग्वेदात ही पुनर्जन्माची कल्पना नसली, तरी तत्समान कल्पना अनेक ठिकाणी ग्रथित केली आहे. जगातील सर्व वस्तू सजीव आहेत, असे मानणे ही या कल्पनेच्या उत्क्रांतीची पहिली पायरी होय.

**सूर्यं चक्षुर्गच्छतु वातमात्मा द्यां च गच्छ पृथिवीं च धर्मणा।**
**अपो वा गच्छ यदि तत्र ते हितमोषधीषु प्रति तिष्ठा शरीरैः॥**

(ऋ. १०. १६. ३)

अर्थ – (हे मृतजीवा!) तुझे नेत्र सूर्याला जाऊन मिळोत, तुझा प्राण वायूत जावो, तुझ्या धर्मकर्मानुरूप तू आकाशात जा, पृथ्वीत जा, उदकात जा किंवा तुला योग्य वाटत असेल, तर (नूतन) शरीरासह वनस्पतीत वास्तव्य कर.

या ऋचेत पुनर्जन्माची कल्पना स्पष्टपणे व्यक्त झालेली नसून, 'सर्व जग सचेतन आहे' या कल्पनेला आधारभूत अशा सूचना मात्र आहेत. आपण त्या मृतात्म्याला परत बोलावून पुन्हा पृथ्वीवर जन्म घेण्यास सांगणार आहो, असे एका ऋषीने एका ठिकाणी म्हटले आहे.

**अपश्यं गोपामनिपद्यमानमा च परा च पथिभिश्चरन्तम्।**
**स सध्रीचीः स विषूचीर्वसान आ वरीवर्ति भुवनेष्वन्तः॥**
**य ईं चकार न सो अस्य वेद य ईं ददर्श हिरुगिन्नु तस्मात्।**
**स मातुर्योना परिवीतो अन्तर्बहुप्रजा निर्ऋतिमा विवेश॥**

(ऋ. १. १६४. ३१–३२)

अर्थ – देहधारक आत्मा कधीही न थकता आपल्या नेहमीच्या पद्धतीने येथे येतो व परत जातो, हे मी पाहिले आहे. संयो-गाच्या व वियोगाच्या अशा दोन्ही सामर्थ्यांनी युक्त होऊन तो पुन्हा पुन्हा जगात परत येत असतो. ज्याने याला निर्माण केले, त्याला हा जाणत नाही, कारण जो याला एकसारखा पाहत असतो, तो याच्यापासून गुप्त राहिला आहे; आणि म्हणूनच हा (मनुष्यप्राणी) मातेच्या उदरात गुंडाळला जाऊन व अनेक जन्म घेऊन दुःखसागरात बुडून गेलेला आहे.

या दोन ऋचांत मात्र पुनर्जन्माची कल्पना स्पष्टपणे आढ-ळते. त्या कल्पनेचा विकास पुढे उपनिषदात झालेला दिसतो. कठोपनिषदात (१ १ ६) नचिकेत म्हणतो, की मनुष्य गवता-प्रमाणे वृद्ध होऊन मृत्युमुखी पडतो व गवताप्रमाणेच पुनः जन्माला येतो. बृहदारण्यकोपनिषदात पुनर्जन्माचे विवेचन उत्कृष्टपणे केलेले आहे, ते असे –

**तद्यथा तृणजलायुका तृणस्यान्तं गत्वाऽन्यमाक्रममाक्रम्याऽऽ-त्मानमुपसंहरत्येवमेवायमात्मेदं शरीरं निहत्या विद्यां गम-यित्वाऽन्यमाक्रममाक्रम्याऽऽत्मानमुपसंहरति।**

**यथाकारी यथाचारी तथा भवति साधुकारी साधुर्भवति पापकारी पापो भवति पुण्यः पुण्येन कर्मणा भवति पापः पापेन। अथो खल्वाहुः काममय एवायं पुरुष इति। स यथाकामो भवति तत्क्रतुर्भवति यत्क्रतुर्भवति तत्कर्म कुरुते यत्कर्म कुरुते तदभिसंपद्यते।** (बृहदा. ४ ४ ३, ५)

भावार्थ – जसा एखादा सुरवंट गवताच्या एका पात्याच्या टोकाशी आल्यावर आश्रयाची जागा प्रथम दुसऱ्या पात्यावर पाहतो व मग त्यावर चढतो, तद्वत हा आत्मा एका देहाचा अंत झाल्यावर प्रथम दुसरा देह पाहून नंतर त्याचा आश्रय करतो.

हा आत्मा आपल्या कर्मानुरूप व आचारानुरूप जन्म घेतो. चांगले कर्म करणारा साधू होतो, पापकर्म करणारा पापी होतो. याप्रमाणे आपल्या कर्माप्रमाणेच तो पुण्यवान किंवा पापी होतो, म्हणून 'हा पुरुष काममय आहे' असे म्हणतात. ज्याची जशी इच्छा असते तसा त्याचा निश्चय होतो, निश्चयानुरूप कर्म घडते व कर्माप्रमाणे फल मिळते.

इथे कर्मविपाकाचे तत्त्व स्पष्टपणे सांगितले आहे. आणि त्यापुढे म्हटले आहे, की मनुष्य वासनारहित झाल्यामुळे त्याची पुनर्जन्माची परंपरा संपते, तो जिवंतपणीच ब्रह्मरूप होतो व मृत्यूनंतर ब्रह्मामध्ये विलीन होतो

स्वर्गफलाची काम्यबुद्धी मनात ठेवून यज्ञयाग केला असता स्वर्ग प्राप्त होतो. पण यज्ञयागादी पुण्यकर्माचे फल स्वर्गातील उपभोगामुळे संपले, की आत्म्याला या कर्मलोकी म्हणजे भूलोकी पुनश्च यावे लागते, असेही या उपनिषदात (बृहदा. ४.४.६) सांगितले आहे.

छांदोग्य व कौषीतकी उपनिषदांतही कर्म व पुनर्जन्म यांचा संबंध स्पष्टपणे सांगितला आहे आत्मा आपल्या पापपुण्यांप्रमाणे कीटक, पतंग, मासा, पक्षी, कुत्रा, वाघ, साप, मनुष्य (चांडाल, वश्य, क्षत्रिय, ब्राह्मण), इ. प्राण्यांचा जन्म घेतो, असे तिथे म्हटले आहे.

पुनर्जन्माची ही कल्पना श्राद्धातील कल्पनेशी विसंगत वाटते; कारण मृत पूर्वजांचे आत्मे पुनर्जन्म घेतल्यानंतरही १०० वर्षांनी पिंड ग्रहण कसे करू शकतील ? पण या शंकेचे उत्तर म्हणून बृहदारण्यकात असे म्हटले आहे, की पितरांना अर्पण केलेले अन्न भिन्न रूपांनी त्या त्या आत्म्याला तो ज्या योनीत पुन्हा जन्मला असेल, तिथे पोचते.

**दर्शने व पुनर्जन्म** – मोक्ष प्राप्त होईपर्यंत मनुष्याचा जीव असंख्य निरनिराळ्या योनींतून भ्रमण करीत असतो, हा सिद्धान्त वेदान्त, सांख्य, योग, न्याय, बौद्ध, जैन, इ. सर्व दर्शनांनी स्वीकारला आहे. सांख्य दर्शनात पुनर्जन्माची प्रक्रिया विशद केलेली आहे, ती अशी –

सर्वव्यापक पुरुष एका देहातून अन्य देहात प्रवेश करतो, असे म्हणणे सयुक्तिक होणार नाही. निर्गुण पुरुषाचा पुनर्जन्म होत नसून, सूक्ष्म लिंगशरीराचा पुनर्जन्म होतो. बुद्धी, अहंकार, मन, पाच ज्ञानेंद्रिये, पाच कर्मेंद्रिये आणि पाच तन्मात्रा या तत्त्वांपासून हे लिंगशरीर बनते. एका देहातून दुसऱ्या देहात संसरण करीत असताना आत्म्याच्या भोवती या लिंगदेहाचा सूक्ष्म कोश असतो. या लिंगदेहासह आत्मा हृदयाच्या आतील आकाशात राहतो. हे आकाश अंगुष्ठप्रमाण असते, म्हणून लिंगदेहही अंगुष्ठमात्र असतो. हा लिंग देह सूक्ष्म व अदृश्य असतो. त्यात पूर्वजन्मातील विचार व कर्मे यांचे संस्कार सुरक्षित असतात.

पुनर्जन्माला कारणीभूत असलेल्या कर्माविषयी जैनांची कल्पना वेगळी आहे. जैन दर्शनात कर्म पौद्गलिक मानलेले असून, ते जीवात पूर्णपणे प्रविष्ट होते व त्याला संसारचक्रात ओढून आणते, असे म्हटले आहे. त्या कर्मानुसार त्याला पुनर्जन्म मिळतो. निरंतर पुण्यकर्म केल्याने सम्यक् दृष्टी प्राप्त होते आणि त्यानंतर मनुष्य पाप व पुण्य या दोहोंवर विजय मिळवून जिन (देवता) बनतो. सम्यक् ज्ञान प्राप्त झाले, की मोक्ष मिळतो व जीवाची जन्ममरणाच्या चक्रातून सुटका होते.

बौद्ध दर्शनात आत्म्याचे अस्तित्व मानलेले नसले, तरी पुनर्जन्माचे तत्त्व स्वीकारलेले आहे. बौद्ध धर्माचा उदय झाला तेव्हा पुनर्जन्माचा सिद्धान्त इतका दृढपणे प्रस्थापित झाला होता, की त्याचा निरास करणे अत्यंत दुर्घट होते. म्हणून बुद्धाला तो सिद्धान्त स्वीकारावा लागला आत्माच नाही, तर मग पुनर्जन्म कोणाचा होतो, या प्रश्नाचे उत्तर बौद्धांच्या कर्मवादात मिळते. मनुष्याच्या कर्माचा नाश कधीच होत नाही, त्याचे यथोचित फल अवश्य मिळतेच व ते भोगावेच लागते, असा बौद्धांनी आपला कर्मवाद मांडला आहे. या सिद्धान्ताप्रमाणे मनुष्याचा वर्तमान जन्म हे पूर्वजन्मातील कर्मांचे फल होय. ज्याप्रमाणे एका दिव्याच्या ज्योतीने दुसऱ्या दिव्याची ज्योत प्रज्वलित केली जाते, त्याप्रमाणे एका जन्मातील कर्माने दुसऱ्या जन्माची अवस्था निश्चित केली जाते. मनुष्य मरतो त्या वेळी रूप, वेदना, विज्ञान, संज्ञा व संस्कार हे त्याच्या शरीराचे पाच स्कंध (घटक) नष्ट होतात; पण त्याच्या कर्मांच्या प्रभावामुळे तत्काळ नवीन पाच स्कंध उत्पन्न होऊन अन्य लोकात एक नवा जीव अस्तित्वात येतो. त्या जीवाचे स्कंध भिन्न असले, तरी कर्म तेच असल्यामुळे मृत जीव आणि नवीन जीव यांचा अभेद असतो म्हणजेच मृत जीवाचा पुनर्जन्म होतो.

पुनर्जन्माच्या चक्रात आत्म्याची उन्नती होऊ लागली, की मग त्याला अधोगती मिळत नाही, म्हणजे मनुष्याचा आत्मा पशुयोनीत व पशूचा आत्मा कीटक योनीत जात नाही, असे काही पंडितांचे मत आहे. पण कर्मविपाकाच्या सिद्धान्ताशी ते विसंगत आहे. कारण आत्म्याला त्याच्या प्रत्येक जन्मातील कर्मानुसार भिन्न योनी प्राप्त होते, असे उपनिषदांत व महाभारतातही सांगितले आहे.

**तद्बीजं देहिनामाहुस्तद् बीजं जीवसंज्ञितम् ।**
**कर्मणा कालयुक्तेन संसारपरिवर्तनम् ।।**

(म. भा. शांति. २१३.१३)

अर्थ – तो अव्यक्त आत्माच देहधारी प्राणिमात्रांचे बीज होय. आणि तो बीजभूत आत्माच गुणांच्या योगाने जीव बनतो. तोच काल व कर्म यांच्या प्रभावामुळे संसारचक्रात भ्रमण करीत राहतो.

वृक्षांमध्ये जीव किंवा चैतन्य असते, त्यांना सुखदुःख असते, इतकेच नव्हे, तर त्यांना पंचेंद्रियेही आहेत, असे महाभारतात सांगितले आहे. (शांति. १८४. ११–१७). मृत मनुष्याचा आत्मा चंद्रापर्यंत जाऊन पृथ्वीवर परत आल्यावर प्रथम वनस्प

तींत प्रवेश करतो आणि अन्नाच्या रूपाने नराच्या शरीरात व तेथून रेताच्या द्वारे मादीच्या गर्भाशयात पोचतो. ही कल्पना पाश्चात्य जीव-शास्त्राशी सुसंगत वाटते. त्या शास्त्रान्वये रेतात असंख्य शुक्रबिंदू असतात. पण त्यांतील एखादाच बिंदू जीव-युक्त असतो व त्याचा स्त्रीच्या रजोगोलाशी संयोग होताच गर्भधारणा होते. सगळे शुक्रबिंदू जीव धारण करू शकत नाहीत. वरील सिद्धान्ताप्रमाणे आत्म्याच्या संसरणात तो ज्या शुक्रबिंदूत प्रवेश करतो, तेवढाच गर्भधारणेला उपयुक्त ठरतो.

गीतेत पुनर्जन्माचा सिद्धान्त स्पष्ट सांगितला आहे, तो असा—

**वासांसि जीर्णानि यथा विहाय नवानि गृह्णाति नरोऽपराणि ।**
**तथा शरीराणि विहाय जीर्णान्यन्यानि संयाति नवानि देही ।।**
(गीता २-२२)

अर्थ— ज्याप्रमाणे मनुष्य आपली जीर्ण वस्त्रे टाकून देऊन दुसरी नवी वस्त्रे धारण करतो, त्याप्रमाणे देहधारी आत्मा जीर्ण शरीराचा त्याग करून अन्य नवीन शरीर धारण करतो.

आत्म्याच्या या संसरणाविषयी गीतेत अनेक जागी विवेचन केलेले आहे, ते असे— अविनाशी आत्मा प्राकृत जगात एका शरीरातून दुसऱ्या शरीरात जातो व प्रकृतीच्या गुणांचा उपभोग घेतो. कोणत्याही व्यक्तीचा पुनर्जन्म तिच्या ठायी असलेल्या गुणांप्रमाणे उच्च किंवा नीच योनीत होतो. कोणत्याही कर्माचा नाश होत नाही. ईश्वर कोणाचे पाप किंवा पुण्य घेत नाही. प्रत्येकाला आपल्या कर्माचे फळ भोगावेच लागते. चांगले कर्म करणारा मनुष्य वाईट गतीला जाणार नाही; त्याला उत्तम योनीत जन्म मिळून अंती तो परमसिद्धी मिळवतो. याउलट वाईट कर्मे करणारा मात्र सतत हीन गतीला जातो. याचा अर्थ पुनर्जन्म हा बंध उत्पन्न करणारा व सर्व दुःखांचे मूळ आहे.

कर्म हे प्राणिमात्रांच्या जन्माचे कारण होय, असे गीतेच्या आठव्या अध्यायात म्हटले आहे. मृत्यूच्या समयी ईश्वराचे स्मरण करून देहत्याग केला, तर तो आत्मा परमात्मपदाला जातो, असेही त्याच अध्यायात सांगितले आहे. पुढे असेही म्हटले आहे, की ( गीता ८·६ )—

**यं यं वापि स्मरन्भावं त्यजत्यन्ते कलेवरम् ।**
**तं तमेवैति कौन्तेय सदा तद्भावभावितः ।।**

अर्थ— अंत्यसमयी शरीरत्याग करताना मनुष्य ज्या काही भावांचे (स्थितीचे) स्मरण करतो, त्याच भावात सदा मग्न राहून तो त्याच स्थितीला जातो.

गुण, कर्म व अंतकाळची भावना अशी पुनर्जन्माची तीन भिन्न कारणे गीतेत सांगितली आहेत. वरवर पाहता ती विसंगत वाटत असली, तरी वस्तुतः ती तशी नाहीत. कारण मनुष्याच्या हातून कर्म घडते, ते त्याच्या गुणाप्रमाणे आणि अंत्य-समयीची भावनाही जन्मभर त्याने केलेल्या कर्मावरच अव-लंबून असते. सतत ईश्वराचे अनुसंधान ठेवले, तरच मरणसमयी त्याचे स्मरण होऊ शकते, अन्यथा नाही. सारांश गुणाप्रमाणे मनुष्याचे कर्म असते, गुणकर्मांप्रमाणे स्वभाव बनतो, स्वभावा-नुरूप अंतकाळची भावना राहते व त्या भावनेप्रमाणे त्याला पुनर्जन्म प्राप्त होतो.

मनुष्याच्या पापकर्मामुळे त्याच्या आत्म्याला कोणकोणत्या योनीत पुनर्जन्म मिळतो, ते धर्मशास्त्रात सांगितले आहे (मनु. १२·५४–६९; याज्ञ. ३·२०६–२०८ व २१२–२१५). महा-पातक केल्यामुळे मनुष्याच्या आत्म्याला दीर्घ काल भयंकर नरकवास भोगावा लागतो आणि मग भिन्न भिन्न योनींत पुनर्जन्म मिळतो. त्याचा तपशील असा—

ब्रह्महत्या करणाऱ्याला कुत्रा, डुक्कर, गाढव, उंट, बैल, शेळी, मेंढी, हरीण, पक्षी, चांडाळ व पुक्कस यांच्या योनीत क्रमाने जावे लागते. सुरापान करणाऱ्या ब्राह्मणाला कृमी, कीटक, पतंग, पक्षी व हिंस्र पशू याचे जन्म मिळतात. सोने चोरणाऱ्या ब्राह्मणाला कोळी, सर्प, सरडा, जलचर प्राणी व पिशाच या योनीतून हजार वेळा जावे लागते. गुरुपत्नीशी व्यभिचार कर-णाऱ्याला शंभर वेळा गवत, झुडपे, वेली व हिंस्र पशू यांच्या योनींमधून जावे लागते. शूद्र स्त्रीशी व्यभिचार केल्यामुळे भूत-योनी प्राप्त होते. जातिबाह्य लोकांशी सहवास, व्यभिचार व ब्राह्मणाची ( सुवर्णव्यतिरिक्त ) चोरी करणारा ब्रह्मराक्षस होतो. धान्य चोरणारा ब्राह्मण उंदीर होतो, मध चोरणारा कीटक होतो, दूध चोरणारा गाय होतो, मांस चोरणारा गिधाड होतो, वस्त्र चोरणारा पक्षी होतो, हरीण चोरणारा लांडगा होतो, घोडा चोरणारा वाघ बनतो, फळेमुळे चोरून खाणारा वानर होतो व स्त्रीला पळवून नेणारा अस्वल होतो.

कर्मसिद्धान्तानुसार आत्म्याचे जे संसरण चालू असते, ते संपणे, याला मोक्ष म्हणतात. कर्मयोग, ज्ञानयोग किंवा भक्ति-योग यांच्या आचरणामुळे मनुष्याचा आत्मा जन्ममरणाच्या चक्रातून सुटतो, असे भगवद्गीतेत सांगितले आहे. अशा प्रकारे मोक्ष प्राप्त करणे, हे हिंदू मनुष्याचे परमोच्च उद्दिष्ट असते. गेली दोन हजार वर्षे हिंदू लोक विविध प्रकारची व्रतवैकल्ये, उपासना व साधना करून मोक्ष मिळविण्याचा प्रयत्न करीत आहेत. ऐहिक सुखोपभोगासाठी भूतलावर पुनर्जन्म घ्यावा अशी इच्छा बहुतेकांना नसते. धर्मशास्त्राचा आदेशही मोक्षप्राप्तीसाठी सायास करावे असाच आहे

ख्रिस्ती व इस्लाम या धर्मांच्या लोकांना मात्र पुनर्जन्माचा हा सिद्धान्त मान्य नाही. मनुष्य मरण पावल्यानंतर त्याचा आत्मा, त्याच्या पाप-पुण्यासंबंधी निर्णय घेऊन परमेश्वर त्याला

स्वर्गसुख किंवा नरकयातना भोगायला सांगेपर्यंत, कोठेतरी वास्तव्य करतो, अशी त्यांची समजूत आहे.

भारतीय पंडितांनी जो पुनर्जन्माचा सिद्धान्त उपनिषदांच्या आधारे प्रस्थापित केला आहे, त्यासंबंधी प्रा. के. अ. पटवर्धन यांनी केलेले विवेचन असे –

वैदिक वाङमयातील पुनर्जन्माची कल्पना आणि वेदान्त व धर्मशास्त्र यांतील पुनर्जन्माचा सिद्धान्त यांत महदंतर आहे. वेद व उपनिषदे यांत जी विचारप्रणाली आढळते ती शास्त्रीय असून, आधुनिक विज्ञानातील कल्पनांशी मिळती – जुळती आहे. पण वेदान्ती व धर्मशास्त्रकार यांनी उपनिषदांतील वाक्यांचा चुकीचा अर्थ लावून कर्मविपाकावर आधारित पुनर्जन्माचा सिद्धान्त प्रचलित केला आहे. तो सिद्धान्त केवळ अनुमानावर आधारित आहे, तो शास्त्रीय पद्धतीने सिद्ध झालेला नाही. वास्तविक, मनुष्य पुत्ररूपानेच पुनर्जन्म घेत असतो, असे वेदांत व उपनिषदांत प्रतिपादले आहे. सुश्रुत आत्रेय याने स्पष्ट शब्दांत हेच सांगितले आहे, की पुत्र–प्रपौत्र होऊन वंशसातत्य राहिल्यानेच माझा आत्मा अमर होईल. ' प्रजाभिरग्ने अमृतत्वमश्याम् ' = हे अग्ने, मी वंशसातत्याने अमृतत्वाचा उपभोग घेईन, असे तो म्हणतो. ' आत्मा वै पुत्रनामासि ' = पुत्राचे नाव आत्माच आहे, अर्थात पुत्ररूपाने आत्माच पुन्हा जन्माला आला आहे, या वाक्यातही तेच प्रतीत होते.

मनुष्याचा आत्मा एक देह सोडून अन्य देहात पुनर्जन्म घेतो हे मान्य केले, तर असा प्रश्न उत्पन्न होतो, की त्याला पूर्वजन्माचे स्मरण का नसते ? भारतीय अध्यात्मशास्त्राचे या प्रश्नाला उत्तर असे, की आत्मा अज्ञानाने आवृत असल्यामुळे त्याला भूतकाळाचे विस्मरण होते. अज्ञान जेव्हा नष्ट होते, तेव्हा त्याला पूर्वजन्माचे स्मरण होऊ शकते. योगशास्त्रात पूर्वजन्माचे ज्ञान प्राप्त करण्याचे उपायही सांगितले आहेत. पूर्वजन्माचे वृत्त सांगणाऱ्या अनेक व्यक्ती पौराणिक कथांत आहेत. सांप्रतही पूर्वजन्माचे स्मरण असलेल्या कित्येक व्यक्ती आढळतात. जयपूरचे श्री. बानर्जी यांनी अशा पुष्कळ व्यक्तींच्या कथा जमा करून प्रसिद्ध केल्या आहेत. अमेरिकेतील ड्यूक विद्यापीठातील मनोविज्ञानाचे प्राध्यापक डॉ. राइन हे यासंबंधी शास्त्रीय पद्धतीने संशोधन करीत आहेत. पुनर्जन्माविषयी काही विश्वसनीय प्रमाणे त्यांना मिळाली आहेत. त्यामुळे पुनर्जन्माचा सिद्धान्त भ्रामक नसावा, असे वाटते. [ उपनिषद्रहस्य; म. भा. उ.; हिं. ध.त.; गी. ए. अ.; बौ. का. भा.; ऋ. वि. श्रे.; हिं. वि. को. ]

**पुनर्भू** ज्या विधवा स्त्रीने पुनर्विवाह केला आहे, अशा स्त्रीला धर्मशास्त्रात पुनर्भू म्हटले आहे. नारदाने पुनर्भू स्त्रियांचे तीन प्रकार सांगितले आहेत, ते असे –

(१) जिचे पाणिग्रहण झालेले आहे; परंतु विवाहहोम व सप्तपदी झालेली नाही, अशी अक्षतयोनी कन्या प्रसंगवशात पुन्हा दुसऱ्या पुरुषाशी लग्न करते ती.

(२) कुमार पतीला सोडून दुसऱ्या पतीचा आश्रय करणारी आणि पुन्हा पहिल्या नवऱ्याकडे येणारी स्त्री.

(३) पतिनिधनानंतर नियोगपद्धतीने संतान प्राप्त करून घेण्यासाठी दीर नसल्यास इतर सवर्ण अथवा सपिंड पुरुषाकडे जाणारी स्त्री.

कश्यपाने पुनर्भूचे सात प्रकार सांगितले आहेत, ते असे–

**वाचा दत्ता मनोदत्ता कृतकौतुकमङगला।**
**उदकस्पर्शिता या च या च पाणिगृहीतिका ।**
**अग्निं परिगता या च पुनर्भूः प्रसवा च या ।।**

अर्थ– वाग्दत्त, मनोदत्त, वराने हातात कंकण बांधलेली, पित्याने कन्यादान केलेली, पाणिग्रहण केलेली, अग्नीभोवती प्रदक्षिणा केलेली आणि अपत्याला जन्म दिलेली अशी स्त्री जर पुन्हा दुसऱ्या पुरुषाशी लग्न करू पाहील, तर तिला पुनर्भू ही संज्ञा प्राप्त होते. [ हिं. ध.; हिं. सा. बृ. इ ]

**पुनर्वसू** अश्विन्यादी गणनेतले सातवे नक्षत्र. पुनः आणि वसू असा हा जोड शब्द आहे. पुनश्च वसू (धन) मिळवून देणारे, असा त्याचा अर्थ होतो. यासंबंधी वैदिक वाङमयात एक कथा आहे, ती अशी – देवांनी धन मिळविण्याच्या इच्छेने पुष्य नक्षत्रावर अग्न्याधान केले, पण त्यामुळे त्यांना धन मिळण्याऐवजी, त्यांच्याजवळ होते तेही निघून जाऊन, त्यांना दारिद्र्य प्राप्त झाले. मग त्यांनी त्याच्या अलिकडच्या नक्षत्रावर अग्न्याधान केले आणि त्यामुळे त्यांना पुनश्च त्यांचे धन प्राप्त झाले. यावरून त्या नक्षत्राचे पुनर्वसू असे नाव पडले (तै. सं १.५.१.४; काठक सं ८.१५).

' पुनर्वसू द्वे तारे ' = पुनर्वसूच्या दोन तारका आहेत, असे सांगितले आहे. सामान्यपणे समान आकृतीच्या दोन तारका आकाशात जवळजवळ दिसत असल्यामुळे त्यांना मिथुन किंवा जुळे असे म्हटले आहे. पुनर्वसूचे पहिले तीन चरण मिथुन राशीतच येतात. आकाशात या दोन तारका आकाशगंगेच्या उत्तर तीरावर पुष्यनक्षत्र आणि ब्रह्महृदय या दोन पुंजांच्या मध्यभागी जोडीने दिसतात. यांना कॅस्टर व पोलक्स अशी ग्रीक नावे आहेत. यांपैकी उत्तरेचा तो कॅस्टर व त्याच्या दक्षिणेचा तो पोलक्स होय. भारतीय परंपरेप्रमाणे यांनाच अनुक्रमे कश व प्लव असे म्हणतात.

भारतीय परंपरेत पुनर्वसू ओळखण्याची खूण मंचक (खाट)

अशी सांगितलेली आहे. पण दोन तारकांनी मंचक बनत नाही, म्हणून विषुववृत्ताच्या उत्तरेस जवळच असलेला प्रश्वा आणि त्याचा उत्तरेस जवळच असलेली दुसरी एक तारका, या दोन घेऊन मंचकाची आकृती पुरी केलेली आहे.

ग्रीक साहित्यात पोलक्स व कॅस्टर या दोन जुळ्यांसंबंधी एक कथा आहे. भारतीय परंपरेत मात्र अशी कथा सापडत नाही फक्त एक लहानसा कथाकण सापडतो. तो श्री दुर्गा भागवत यांनी दिला आहे — असुरांच्या चयनात मांडलेली चित्रा नावाची वीट काढून घेऊन इंद्र आकाशात उडाला. त्या वेळी दोन असुरांनी त्याच्या मागून गगनोड्डाण केले. तेच पुनर्वसू झाले.

अदिती ही पुनर्वसूची देवता आहे. ती हविर्भाग भरवून पुनर्वसूच्या जुळ्याला वाढवते, असे तै. ब्राह्मणात म्हटले आहे (३.१.१.४). म्हणजे ती त्यांची माताही म्हणायला हरकत नाही. आकाशगंगा म्हणज अदिती व तिच्या कुशीतली ही दोन बाळे ही तिची संतती, अशी काही कल्पना मानवजातीच्या बाल्यावस्थेत असू शकेल.

हेमाद्रीने पुनर्वसूचे मूर्तिध्यान सांगितले आहे, ते असे—

**शूकरास्यो बिडालस्थो गौरवर्णः पुनर्वसुः ।**
**सूत्रवज्राङ्कुशाभीतीर्बिभ्राणः परिकीर्तितः ।।**

(च. व चि.)

अर्थ— डुकरासारखे तोंड, मांजर हे वाहन, गौरवर्ण, चतुर्भुज, तीन हातांत सूत्र, वज्र व अंकुश धारण करणारी व चौथा हात अभयमुद्रेत अशी पुनर्वसूची आकृती बनवावी

फलज्योतिषात पुनर्वसू हे चर व सुलोचन नक्षत्र मानले आहे. वाहनांचा व्यवसाय, सहली, इ. गोष्टी या नक्षत्रावर कराव्या, असे सांगितले आहे. [ भा. ज्यो. इ.; नक्षत्रलोक ]

**पुरंदरदास** (१४८४ ते १५६४ इ. स.) कर्नाटकातील एक थोर संत कवी. याचा जन्म महाराष्ट्रात, पुण्यापासून जवळच असलेल्या पुरंदरगडावर झाला, असे म्हणतात; पण काही पंडितांच्या मते, कर्नाटकात बेलारी जिल्ह्यात हंपीजवळ जे पुरंदरगड नामक गाव आहे, ते याचे जन्मस्थान होय. याचा पिता वरदप्पा नायक हा मोठा सराफ होता. हंपीजवळ कमलापूर येथे एक ताम्रपट मिळाला आहे, त्यावरून कळते, की तो वसिष्ठगोत्री, यजुर्वेदी ब्राह्मण होता. त्याच्या पत्नीचे नाव लक्ष्मक्का किंवा कमलांबा असे होते. तिरुपती येथील श्रीनिवासाच्या कृपेमुळे त्याना जो पुत्र झाला, त्याचे नाव त्यांनी श्रीनिवास किंवा तिरुमलैयप्पा असे ठेवले. त्याला तिम्मप्पा किंवा शिवप्पा असेही म्हणत.

लहानपणीच विद्वान आचार्यांजवळ तिम्मप्पाचे संस्कृत व कन्नड या भाषांचे उत्तम अध्ययन झाले. त्यास संगीताचेही शास्त्रशुद्ध ज्ञान मिळवले होते. वयाच्या सोळाव्या वर्षी तिम्मप्पाचे लग्न सरस्वती नामक एका सुशील मुलीशी झाले. त्या दंपतीला चार पुत्र व एक कन्या अशी पाच अपत्ये झाली. पुत्रांची नावे वरदप्पा, गुरुअप्पा, अभिनवप्पा व मध्वप्पा अशी होती.

वडिलांच्या मृत्यूनंतर तिम्मप्पाने त्यांचा सराफीचा व्यवसाय स्वतःच्या हुशारीने खूप वाढवला. कुशल रत्नपारखी म्हणून त्याची कीर्ती सर्वत्र पसरली. विजयनगरसम्राट कृष्णदेवराय याच्या दरबारात त्याला फार मान होता. लवकरच तो नवकोट नारायण झाला. एवढा धनाढ्य असूनही तो अत्यंत कृपण होता. दारी आलेल्या भिक्षेकऱ्याला मूठभर धान्य किंवा एक पैसा देणेही त्याच्या जीवावर येई. उलट त्याची पत्नी मात्र अत्यंत उदार व दयाळू होती. तिला पतीचा कंजूषपणा मुळीच पसंत नसे. पण कालांतराने हा धनलोभी मनुष्य त्यागी व विरक्त बनला. त्याविषयी एक आख्यायिका सांगतात, ती अशी—

एके दिवशी पांडुरंग एका वृद्ध व गरीब ब्राह्मणाचे रूप घेऊन तिम्मप्पाच्या पेढीवर आला आणि मुलाच्या लग्नासाठी काही द्रव्य मागू लागला. पण तिम्मप्पाने त्याला काहीही न देता वाटेला लावले. मग तो ब्राह्मण सरस्वतीकडे गेला व त्याने तिच्याकडेही मदत मागितली. तिला त्याची दया आली; पण घरातील कोणतीही वस्तू ती पतीच्या परवानगीवाचून याचकाला देऊ शकत नव्हती. म्हणून मग तिने स्वतःची नथ काढून ती त्या याचकाला देऊन टाकली. ती नथ घेऊन तो ब्राह्मण परत तिम्मप्पाकडे गेला व त्याने ती नथ विकत घेऊन तिची योग्य किंमत देण्याबद्दल तिम्मप्पाला विनंती केली. ती नथ हाताळताना तिम्मप्पाला संशय आला, की ही नथ आपल्या पत्नीचीच असावी. पण ब्राह्मणाला त्या नथीची किंमत देऊन त्याने ती तिजोरीत ठेवली व घरी गेल्यावर पत्नीला नथीविषयी छेडले. त्यामुळे सरस्वती फार घाबरली. आता आपली धडगत नाही, असे समजून तिने विषप्राशन करून जीव द्यायचे ठरविले. लगेच विषाचा पेला तयार करून तिने तो ओठाला लावण्यासाठी उचलला. एवढ्यात एक चमत्कार झाला. सरस्वतीची नथ पटकन् तिच्या पेल्यात येऊन पडली. तिला अत्यंत हर्ष झाला. ती नथ घेऊन ती पतीकडे गेली; तेव्हा तोही चकित झाला. दुकानात परत जाऊन पाहतो, तर नथ तिजोरीत नव्हती. या चमत्काराने तिम्मप्पा चपापला. त्याने घरी येऊन पुन्हा चौकशी केली, तेव्हा पत्नीने त्याला सर्व घटना सांगितली. मग त्याने त्या ब्राह्मणाचा खूप शोध केला; पण तो त्याला सापडला नाही. त्या वेळी तिम्मप्पाला समजले की प्रत्यक्ष परमेश्वरच ब्राह्मणाच्या रूपाने आपल्याकडे याचक होऊन आला होता.

तो म्हणाला. 'मी मात्र त्याला काही न देता विन्मुख पाठवले. धिक्कार असो माझ्या संपत्तीला आणि त्याहून माझ्या कृपणपणाला!' अशा पश्चात्तापाने त्याची एकदम वृत्तीच पालटली. मग त्याने याचकांना व गोरगरिबांना बोलावून आणून आपली सर्व संपत्ती त्यांना दान देऊन टाकली. सर्वस्वाचा त्याग करून तो मोकळा झाला. दुसऱ्या दिवसापासून त्याने भिक्षेची झोळी खांद्याला लावली.

थोड्याच दिवसांत तिम्मप्पाला पांडुरंगाने स्वप्नात येऊन विजयनगरला जाण्याचा आदेश दिला. त्याप्रमाणे तो आपल्या परिवारासह हंपी येथे जाऊन राहिला. तिथे त्याने व्यासरायांकडून वैष्णव पंथाची दीक्षा घेतली. व्यासरायांनी त्याचे पुरंदर विठ्ठल असे नाव ठेवले (इ. स. १५२५). त्यांच्या मठातील सत्यधर्मतीर्थ नामक संताने त्याला पुरंदरदास म्हटले व तेच त्याचे नाव पुढे रूढ झाले.

विजयनगर येथील वास्तव्यात पुरंदरदास रोज सकाळी नगरात फिरून आपल्या सुरेल व गोड आवाजात भक्तिगीते गाई व त्या दिवसाला पुरेशी भिक्षा गोळा करी. त्याची मुले त्याच्या गीतांना साथ करीत. तो स्वतःच ती पदे रचीत असे. ती पदे रसाळ व हृदयस्पर्शी असल्यामुळे ऐकता ऐकता ती लोकांना आवडू लागली. थोड्याच काळात ती कर्नाटकभर लोकप्रिय झाली. त्याची कवित्वकीर्ती ऐकून कृष्णदेवरायही त्याचा भक्त बनला. त्याने तिरुपती येथील देवालयात पुरंदरदासासाठी एक वेगळा मंडप बांधून दिला. तो दासरमंडप म्हणून आजही प्रसिद्ध आहे.


पुरंदरदास

पुरंदरदासाने सबंध भारताची तीर्थयात्रा करून सर्व तीर्थक्षेत्रांत काही काल वास्तव्य केले आणि तिथल्या निरनिराळ्या देवतांवर पदे रचली. पंढरपूर क्षेत्रातही त्याने दीर्घ काल वास्तव्य केले. तिथे असताना त्याच्यावर एक अत्यंत दुर्धर प्रसंग ओढवला.

पंढरपुरात एक नर्तकी होती व ती विठ्ठलाची एकनिष्ठ भक्त होती. एके दिवशी पुरंदरदासाचे रूप घेऊन पांडुरंग त्या दासीच्या घरी गेला व त्याने तिचे नृत्यगायन ऐकण्याची इच्छा व्यक्त केली. तिनेही अत्यंत भक्तिभावाने त्याची ती इच्छा पूर्ण केली. त्यामुळे प्रसन्न होऊन देवाने आपल्या हातातले एक अमोल कंकण तिला दिले. दुसऱ्या दिवशी सकाळी देवाच्या हातातले कंकण नाहीसे झाल्याचे पुजाऱ्यांना कळले व त्याची शोधाशोध सुरू झाली. शेवटी ते कंकण त्या नर्तकीजवळ सापडले. 'पुरंदरदासाने ते आपल्याला दिले,' असे तिने पुजाऱ्यांना सांगितले. त्यांनी लगेच पुरंदरदासाला पकडून देवळात नेले आणि एका खांबाला बांधून यथेच्छ झोडपले. इतक्यात गाभाऱ्यातून देववाणी ऐकू आली, की 'मीच पुरंदरदासाच्या वेषाने जाऊन ते कंकण दासीला दिले होते. तुम्ही पुरंदरदासाला सोडा व त्याला ज्या खांबाला बांधले त्याची पूजा करा.' मग पुजाऱ्यांनी पुरंदरदासाला सोडून त्याची क्षमा मागितली व त्याची मूर्ती त्या स्तंभावर कोरली. तो स्तंभ दासरस्तंभ म्हणून आजही प्रसिद्ध आहे. भक्तजन पांडुरंगाच्या गाभाऱ्यात जाण्यापूर्वी प्रथम त्याला वंदन करतात. त्यालाच गरुडस्तंभ म्हणतात.

आयुष्याच्या अखेरचे दिवस पुरंदरदासाने हंपी येथे ईशसेवेत घालवले व शेवटी तिथेच देह ठेवला.

पुरंदरदासाने कन्नड भाषेत विपुल काव्यरचना केली आहे. त्याच्या पदांची संख्या चार लक्ष पंचाहत्तर हजार होती, असे म्हणतात. पण त्यांतली काही हजार पदेच उपलब्ध आहेत. ती देवरनाम किंवा दासरपदगळू या नावाने प्रसिद्ध आहेत. त्या पदांतील उच्च, तात्त्विक विचार ध्यानी घेऊन व्यासरायांनी त्या पदांना पुरंदरोपनिषद या शब्दाने गौरवले. त्यांत उपनिषदे व पुराणे यांतील तात्त्विक व धार्मिक विचारांचे सार आहे. ती पदे ज्ञानगर्भ असूनही भक्तिरसाने ओथंबलेली आहेत. त्यामुळेच ती सर्वतोमुखी झाली व कर्नाटकात भक्ती हा लोकधर्म बनला. ज्ञानेश्वर–तुकारामादी संतांनी ज्याप्रमाणे महाराष्ट्रात भक्तीचा मळा पिकवला, त्याचप्रमाणे पुरंदरदासाने आपल्या रसाळ वाणीने कर्नाटकातील भाविक जनांना भक्तीचे अमृत पाजले. त्याने ज्ञान, भक्ती व वैराग्य यांची उत्तम रीतीने सांगड घातली. आत्मशुद्धी, आत्मोद्धार व त्याबरोबरच सर्वांचा उद्धार हे त्याने जीवनाचे उद्दिष्ट मानले होते. त्यासाठी साधन म्हणून त्याने परमेश्वराची अनन्य भक्ती उपदेशिली. त्याच्या काव्यात त्याची निस्सीम भक्ती, उत्कट प्रेम व ईश्वराच्या दर्श-

नाची आत्यंतिक तळमळ या गोष्टी सर्वत्र दिसून यतात. भक्तीचा महिमा गाताना तो म्हणतो–

**इदु भाग्यविदु –भाग्यविदु भाग्यवैय्या।**
**पदमुनाभन पादस्मरणे सुखवय्या ।।**

अर्थ – भक्ती हेच संसारातले परम भाग्य होय. पद्मनाभाच्या चरणांचे स्मरण हेच परम सुख होय.

नामस्मरणाचे महत्त्व त्याने आपल्या पदांत जागोजागी सांगितले आहे, ते असे–

**मरेय बेड मनवे नीनु हरिय स्मरणैया**
**यागयज्ञ माडलेके योगियतियु आगलिके ।**
**हरिस्मरणे मात्रंदिद घोर दुरितवेदक नाश**
**परमपुरुष श्रीपुरंदरविठ्ठलराय पदविकोडवु पवनतय्य ।।**

अर्थ – हे मना ! तू श्रीहरीचे स्मरण करायला विसरू नको. त्या श्रीहरीच्या प्राप्तीसाठी यज्ञयाग करण्याची किंवा संन्यास घेण्याची आवश्यकता नाही. केवळ त्याच्या नामस्मरणानेच सर्व पापे नष्ट होतील.

तुकारामाप्रमाणेच पुरंदरदास हा बहुश्रुत व व्यवहारी होता. त्याच्या पदांत जगाचे सखोल ज्ञान व विविध अनुभव व्यक्त झाले आहेत. पाखंड, अंधश्रद्धा, ढोंगीपणा, बाह्यावडंबर, जातिभेद यांचा त्याने स्पष्ट व कठोर शब्दांत निषेध केला आहे. अस्पृश्य लोकांबद्दल त्याला फार कळवळा होता. जन्मजात अस्पृश्यता त्याला मान्य नव्हती, हे त्याच्या पुढील पदावरून ध्यानात येते.

**होलेय होरगिहने उरोळु गिल्लवे ।**
**श्रीहरियस्मरणेयनु बल्लवरुपेळि ।।**
**कोंड साळगळन्नु तिद्द दतिने होलेय ।**
**लंडतनदलि नडेत भंड होलेय ।।**

अर्थ – हे हरिभक्तांनो ! सांगा ना अस्पृश्य कुठे राहतो ? गावाच्या बाहेर ? छेः ! जो खोटे बोलतो, जो उधारी बुडवतो, जो निर्लज्ज जीवन जगतो, तोच खरा अस्पृश्य होय !

आत्मशुद्धीचा खरा मार्ग त्याने पुढील पदात सांगितला आहे–

**स्नान माडिरय्या ज्ञान तीर्थदलि ।**
**नानुनीने अहंकार बिट्टु ।।**
**वेदशास्त्रगळनोदिदवंदु स्नान।**
**भेदाभेद तिळिदरोंदु स्नान।।**
**साधु सज्जनर संग ओंदु स्नान।**
**पुरंदर विठ्ठल ध्यान वे स्नान ।।**

अर्थ – आपपर भाव सोडून ज्ञानरूपी तीर्थांत स्नान करा. वेदशास्त्रांचे अध्ययन करणे, भेदात अभेद जाणणे, सज्जनांचा सहवास व श्रीहरीचे ध्यान करणे हेच खरे तीर्थस्नान होय.

वरील भक्तिगीतांव्यतिरिक्त पुरंदरदासाने द्रौपदीवस्त्रहरण, सुदामचरित्र व परतत्त्वसार ही काव्येही रचली आहेत. पण ती अजून अप्रकाशित आहेत.

पुरंदरदास विष्णुभक्त असला, तरी त्याने शिवाची किंवा अन्य देवतांची निंदा केली नाही. त्याने आपल्या पदात शिव, पार्वती, गणेश यांनाही श्रद्धापूर्वक वंदन केले आहे. इतर देवतांच्या भक्तांविषयीही त्याला प्रेम वाटे. त्याच्या दृष्टीने सर्व उपासनापद्धती समान आहेत. कारण एकाच परमात्म्याची प्राप्ती हे त्या सर्वांचे उद्दिष्ट आहे.

पुरंदरदास व त्याचे शिष्य यांनी प्राकृत भाषेत भक्तिमार्ग सांगितला व आपली परंपरा सुरू केली. हरिदासांच्या या परंपरेला दासकूट म्हणतात. मध्वाचार्यांच्या द्वैत मताला अनुसरूनच हरिदासांनी भक्तीचे तत्त्वज्ञान सांगितले आहे.

पुरंदरदासाची भाषा संस्कृतनिष्ठ असली, तरी ती जड व क्लिष्ट नाही. ती सुबोध व प्रवाही आहे. त्याच्या काव्यात विविध अलंकार, म्हणी व वाक्संप्रदाय पुष्कळ आढळतात.

पुरंदरदास जसा महान भगवद्भक्त होता, तसाच श्रेष्ठ संगीतज्ञही होता. त्याला कर्नाटक संगीताचा पितामह मानतात. त्याची सर्व पदे रागबद्ध असून, त्यांचे कीर्तने, सुळादी व उगाभोग असे तीन वर्ग केलेले आहेत. ही सर्व पदे ताल-लयबद्ध व गेय आहेत. कीर्तने ही भक्तिगीते असून, त्यांत पल्लवी, अनुपल्लवी व चरण हे भाग आहेत. संगीतशास्त्राच्या दृष्टीने त्यांची रचना उत्कृष्ट आहे. सुळादीची रचना अधिक शास्त्रीय व कठीण आहे. उगाभोग हा प्रकार मात्र अगदी साधा आहे.

त्याच्या काळी कर्नाटक संगीताला अवकळा आली होती, विकृती जडली होती. हे सारे नष्ट करून पुरंदरदासाने त्याला शास्त्रशुद्ध रूप दिले. त्यासाठी सर्व प्रचलित रागांची रूपरेखा त्याने निश्चित केली. संगीताच्या शिक्षणासाठी त्याने अनेक स्वरावली, अलंकार, पिळ्ळारिगीत, घनरागगीत व प्रबंध यांची रचना केली. कृती हा गीतप्रकार त्यानेच सुरू केला. त्यागराज, दीक्षितार, शामशास्त्री, इ. संगीतकारांनी पुरंदरदासाच्या प्रेरणेनेच कर्नाटक संगीताचा विकास केला. त्यागराजाला पुरंदरदासाकडूनच संगीताची स्वप्न-दीक्षा मिळाली होती, असे म्हणतात. [युगप्रभात, मार्च १९५९, जानेवारी १९६४; हिं. क. भ. तु. अ.; भक्त श्री पुरंदरदास– श्री. दा. गो. संगोराम, १९६०; स्ट. इं. म्यु.; भारती, १२ जाने. १९६४; हिं. वि. को.; मि. टी. ह. क.]

**पुरम** मणिपूर संस्थानातील एक टोळी. मणिपूर संस्थानात कुकी जमातीची बरीच मोठी वस्ती आहे. तिचे जुने कुकी व नवे कुकी असे दोन भाग आहेत. जुन्या कुकीत

१३ टोळ्यांचा अंतर्भाव होतो. पुरम ही त्यांतलीच एक टोळी होय. इंफाळ खोऱ्याच्या पूर्व सीमेवर पुरमांची चार खेडी आहेत. त्यांच्यापैकी पुरम खुलेन हे सर्वात जुने आणि मोठे खेडे आहे. याशिवाय पुरम टंपक, पुरम चंगनिग लॉग, पुरम चुंबांग ही आणखी तीन खेडी होत. ही सर्व खेडी एकमेकांना जवळ आहेत. प्रत्येक खेडे हे स्वयंपूर्ण असते. प्रत्येक खेड्याला त्याचा स्वतःचा प्रमुख अधिकारी असतो आणि प्रत्येक खेड्याचे सामाजिक, धार्मिक विधी आणि सण स्वतंत्र असतात. पुरमांच्या खेड्यात इतर टोळ्यांना वस्ती करता येत नाही. ते लोक नवीन खेडे वसवताना विधिपूर्वक जागेची निवड करतात. सर्वसाधारणपणे सोमवार हा शुभ दिवस समजून खेड्याचा पाया घालतात. त्या वेळी पाया घालणारा आपल्याबरोबर कोंबडा घेऊन जातो व देवाची प्रार्थना करून त्याची मान मुरगळतो. कोंबडा मरताना त्याचा उजवा पाय डाव्या पायावर पडल्यास तो शुभ शकुन मानतात.


पुरम पुरुष

सर्व पुरम खेड्यांमध्ये लमण व रुइशांग अशा दोन सार्वजनिक जागा असतात. लमण हे नुंगचुंगबा या देवाचे व धार्मिक कृत्याचे स्थान असते; तर रुइशांग हे ग्रामपंचायतीचे कार्यालय असते.

पुरम लोक गावातल्या श्रेष्ठ लोकांचे स्मारक म्हणून खेड्याच्या सीमेवर रस्त्यालगत चौकोनी उंचवटे उभारतात. गावाच्या मध्यावर त्यांची सार्वजनिक विहीर असते.

**घरेदारे** – सुखवस्तू पुरम माणसाजवळ घर, गोठा, धान्यकोठार, डुक्करवाडा व कोंबड्याचे खुराडे असे सर्व काही असते. वैयक्तिक धान्यकोठार ज्याच्या त्याच्या अंगणात असते. तर सामुदायिक कोठार वस्तीपासून लांब असते. सर्व कोठारे उंच जागी बांधलेली असतात. खेड्याच्या मुखियाचे घर मोठे असते व त्याच्या भिंती बांबूच्या असतात. गरिबांच्या घराच्या भिंती मात्र कुडाच्या असून त्यांवर चिखल थापलेला असतो. घराला मागचे पुढचे दार असते, पण घरात खोल्या नसतात. प्रत्येक घराला पडवी असते. घरे बांधताना वस्तीतले लोक एकमेकांना विनामूल्य सहकार्य करतात. गृहप्रवेशाच्या दिवशी कुटुंबातला सर्वांत म्हातारा माणूस भांडेभर दारू देवाच्या नावे जमिनीवर ओततो. नंतर अधिकारानुसार जमलेल्यांना दारू पाजली जाते.

**उद्योगधंदे** – पुरम पुरुषांचा मुख्य व्यवसाय शेती हा आहे. मुख्य पीक तांदूळ असून त्याशिवाय फळफळावळ, मका, कांदे, तीळ, इ. वस्तूही ते पिकवतात. ते डोंगरी शेतीही करतात. डोंगरी शेतीत सतत तीन वर्षे पीक काढल्यावर दहा वर्षे ती ते ओसाड ठेवतात. डोंगरी शेतजमिनीवर खेड्याचा सामुदायिक हक्क चालतो. सपाटीवरील शेती मात्र वैयक्तिक मालकीची असते. पेरणीच्या कामात स्त्रिया भाग घेत नाहीत; परंतु निंदणीत भाग घेतात. गायी, म्हशी, बैल, रेडे, डुकरे, कुत्री, मांजरे व कोंबडी हे प्राणी ते पाळतात. गाय अथवा म्हैस यांचे दूध ते पीत नाहीत. जनावरांचा खाण्यासाठी उपयोग करतात. तो त्यांचा मुख्य आहार असतो. त्यांच्या बहुतेक धार्मिक विधीत, मुलाचे जावळ काढताना व अंत्यविधीच्या वेळी डुकराचे मांस आवश्यक असते. त्यांच्या बहुतेक सणांचा शेतीशी संबंध असतो.


पुरम स्त्री

**वेषभूषा** – पुरम पुरुष कमरेभोवती पाच-सहा हात लांबीचे वस्त्र गुंडाळतात. थंडीत अंगावर रंगीत चादर घेतात व डोक्याला पगडीवजा वस्त्र गुंडाळतात. प्रत्येक पुरुषाच्या गळ्यात पितळी वाटोळ्या मण्यांच्या माळा असतात. स्त्रिया एकच वस्त्र वापरतात व त्याने आपले शरीर नखशिखांत झाकून घेतात. त्यांची बहुतेक वस्त्रे घरी हातमागावर विणलेली

असतात. त्या गळ्यात विविध प्रकारचे हार व बोटात आंगठ्या घालतात. नृत्याच्या वेळी कमरेला कापडी पट्टा बांधतात व रानटी फुलांनी त्या आपले शरीर सजवतात.

**कुटुंबपद्धती** – पुरम लोकांत विभक्त कुटुंबपद्धती आहे. लग्न झाले, की मुलगे वेगळे राहतात. फक्त धाकटा मुलगा तेवढा लग्न झाले, तरी आई-वडिलांजवळ राहतो. बापाच्या मालमत्तेची समान वाटणी होत असली, तरी त्यातला सर्वांत मोठा हिस्सा धाकट्या मुलाला मिळतो.

**रीतिरिवाज** – पुरम लोकांत वेगवेगळ्या कुळ्या असतात. प्रत्येक कुळीचा एक प्रमुख असतो. त्याला पिप म्हणतात. सामाजिक व धार्मिक कार्यांत त्याला मोठा मान असतो. हा मान वंशपरंपरागत असतो. एखाद्या माणसाला पालखीत बसण्याचा मान मिळाला, तर तो तीन डुकरे कापून गावकऱ्यांना मेजवानी देतो या मानाला टो-लाय-हाँग म्हणतात. हे लोक खेड्यात रोगराईची साथ आली, तर देवाला डुकरांचा बळी देतात.

एखाद्यावर चोरीचा गुन्हा शाबीत झाल्यास चोरीची वस्तू मूळ मालकाला परत करायला लावतात. चोराला दारूचा एक खुजा व एक डुक्कर एवढा दंड करतात. एखाद्याने अविवाहित स्त्रीवर बलात्कार केल्यास त्याला तिच्याशी लग्न करायला लावतात. व्यभिचारी स्त्रीच्या नवऱ्याला घटस्फोट मिळतो. अविवाहित स्त्रीला मूल झाले, तर त्या मुलाच्या अनौरस बापाला तीन वर्षेपर्यंत त्या मुलाचे पालनपोषण करावे लागते

एखादा अविवाहित पुरुष गावातील मुलांचा प्रमुख असतो. मुलांच्या हातून आगळीक घडली, तर त्यांना शिक्षा करण्याचा त्याला अधिकार असतो. अविवाहित तरुण अविवाहित तरुणींच्या घरी झोपायला जातात. त्यातून परिचयपूर्वक लग्नसंबंध घडून यावे, अशी पुरमांची इच्छा असते मात्र, त्यातून काही अनिष्ट प्रकार घडू नयेत एवढी दक्षता घेतली जाते.

**विवाहप्रथा** – पुरम लोकांत बहुपत्नीकत्वाची चाल असली, तरी ते शक्यतो एकाहून अधिक बायका करीत नाहीत. समान कुळीत लग्नसंबंध होत नाहीत लग्नाच्या वेळी मुलाचे वय वीस व मुलीचे तेरा असावे लागते. विवाहाच्या वाटाघाटी पूर्ण झाल्यावर वराला तीन वर्षे आपल्या भावी सासऱ्याकडे नोकरी करावी लागते. त्या तीन वर्षांत वधू-वराचा शरीरसंबंध घडू देत नाहीत. लग्ने बहुधा सोमवारी होतात. लग्न झाले, की नवरा मुलगा पाच दिवस सासऱ्याकडे राहून सहाव्या दिवशी घरी जातो. योग्य कारणासाठी स्त्री-पुरुषांना घटस्फोट घेता येतो. पण वांझपण हे मात्र घटस्फोटाचे कारण होऊ शकत नाही. घटस्फोटाची परवानगी पंचायतीकडून घ्यावी लागते.

**देवधर्म** – पुरम हे मुख्यत्वे निसर्गपूजक असले तरी, ते कृष्ण, महादेव, राम, दुर्गा, काली, यम या देवांनाही भजतात. यांच्यांत कुलदेवाला फार महत्त्व असते. मुगचुगबा हा त्यांचा ग्रामदेव असून, त्याचा ते वर्षातून दोनदा उत्सव करतात. लाहोल हे भूत गावाचे राखणदार असते. जंगल साफ करताना या भुताला संतुष्ट करतात. साबहाँग ही त्यांची देवता लक्ष्मीस्वरूप असते. सूर्य-चंद्रांना ते पति-पत्नी मानतात. यांच्यावर वैष्णव धर्माचा विशेष पगडा आहे. हे वर्षातून एकदा पितृपूजा करतात, त्या वेळी पितरांना डुकराच्या मांसाचा नैवेद्य दाखवतात.


पुरम तरुणी (अलकृत)

**प्रसूती** – बाळंतपणाच्या वेळी बाळंतिणीची आई सोडल्यास दुसऱ्या गोत्राच्या स्त्रीला घरात राहू देत नाहीत. प्रसववेदना सुरू झाल्या, की मैपी नावाचा भगत घराच्या दारात सूर्य-चंद्रांना पाच केळी व मूठभर तांदूळ अर्पण करून सुलभप्रसूतीसाठी बाळंतिणीच्या मस्तकावर मंत्र घालतो. मुलाची नाळही तोच कापतो. तिसऱ्या दिवशी मुलाचे नाव ठेवतात. प्रसूतीनंतर स्त्रीला थोड्याशा दारूशिवाय एक दिवस दुसरे काही देत नाहीत. बाळंतपणात स्त्री मेली, तर फार अशुभ समजतात. तिचे प्रेत गावापासून दूर नेऊन पुरतात. त्या वेळी खेड्यातले लोक आपापल्या घराची दारे बंद करून आत बसतात. प्रेतयात्रेला जाणारे लोक परतताना गावाच्या सीमेवर हातपाय धुवून विशिष्ट पानांचा धूर घेतात व मगच गावात येतात.

**मर्तिकप्रथा** – दुष्ट भुतांच्या कारवायांमुळे सर्वांना मृत्यू येतो अशी पुरमांची समजूत आहे. म्हणून ते प्रेत शवपेटिकेत घालून, स्मशानात नेतात. पुरण्यापूर्वी एका डुकराचा बळी देतात. नंतर प्रेतयात्रेतील लोकांना दारू व डुकराचे मांस वाटतात. मयत पुरुषाच्या मनगटांना प्रत्येकी चार तांब्याचे पैसे बांधतात. त्याच्या शेजारी त्याची हत्यारेही गाडतात. मयताच्या घरी पडवीत विस्तव पेटवून ठेवतात. अंत्ययात्रेतला प्रत्येकजण त्याला स्पर्श करून मग घरी जातो. मयताच्या विधवेला एक वर्षपर्यंत दुसरे

लग्न करता येत नाही. [ दि पुरमस–श्री. तर्कचंद्र दास, १९४५ ]

**पुरमंडल** एक तीर्थस्थान. हे काश्मिरात जम्मूपासून १६ मैलांवर शिवालिक पर्वतराजीत आहे. या ठिकाणी सुध महादेव नावाचे एक मंदिर असून, ते पार्वतीचे निवासस्थान मानलेले आहे. इथेच तिचे शिवाशी लग्न झाले, असे समजतात. या ठिकाणी देवक नदी गुप्त झाली, असे म्हणतात. ही नदी म्हणजे पार्वतीचेच रूप होय. त्या विषयीची एक कथा अशी–

एकदा पृथ्वीवर पापी व दुर्जन यांची संख्या वाढली. त्यामुळे लोकमर्यादा छिन्न-विच्छिन्न झाली. त्या वेळी कश्यपाने शंकराकडे जाऊन त्याला मानव जातीचा उद्धार करण्यासाठी विनविले. त्यावर शंकराने पार्वतीला आज्ञा दिली, की ' तू नदीचे रूप घेऊन पृथ्वीवरच्या माणसांचा उद्धार कर.' पार्वती त्या गोष्टीला कबूल झाली; पण तिने शंकराला अशी अट घातली, की त्याने नेहमी तिच्या सन्निध राहावे. शंकराने ती अट मान्य केली. मग पार्वतीने देवक नदीचे रूप घेऊन आपला प्रवाह सुरू केला व शंकर नागरूपाने तिच्या तीरावर अवतीर्ण झाला.

जिथे देवक नदी गुप्त झाली, त्या ठिकाणी एक फणाधारी नागमूर्ती आहे, ती शिवाची मूर्ती समजतात. हा नाग हेच इथले प्रमुख दैवत आहे. त्याशिवाय इथे आणखीही काही मंदिरे आहेत. इथले सर्वांत प्राचीन मंदिर इ. स. च्या सातव्या शतकातले असून, ते काश्मीरच्या महाराजाने बांधले. इतर मंदिरे व मंडप डोग्रा वंशातल्या रणवीरसिंग या राजाने बांधली. इथल्या मंदिरांत शिल्पकलेचे काही अपूर्व नमुने आढळतात. [ श्री. सुराज सराफ – इलस्. वीकली, जुलै, १९५६ ]

**पुरवी आट्टम** द. भारतातील एक नृत्य. हे धार्मिक आणि सामाजिक उत्सवांच्या वेळी होत असते. त्याच्या द्वारे ऐतिहासिक आणि पौराणिक कथानके सादर केली जातात. यात आतून पोकळ असलेल्या लाकडी घोड्या मध्ये मुख्य नर्तक उभा राहून वाद्यांच्या आणि गीतांच्या साथीवर नाचतो. राजस्थानातल्या कच्छीघोडी नृत्यासारखेच हे नृत्य आहे. [ भा. लो. नृ. ]

**पुरश्चरण** एक तांत्रिक कर्म. याची व्याख्या अशी– ' मन्त्रफलसिद्ध्यर्थं नियतसङ्ख्याको जपः ' = ( इष्ट देवतेच्या ) मंत्राच्या फलसिद्धीसाठी त्याचा ठराविक संख्येने जप करणे, याला पुरश्चरण किंवा पुरस्क्रिया असे म्हणतात. जीवहीन पुरुष ज्याप्रमाणे कोणतेही कर्म करायला असमर्थ असतो, त्याप्रमाणे पुरश्चरणहीन मंत्रही सिद्धी मिळवून द्यायला असमर्थ असतो, असे योगिनीहृदयात सांगितले आहे.

जप, होम, तर्पण, अभिषेक व ब्राह्मणभोजन अशी पुरश्चरणाची पाच अंगे आहेत. चंद्र व नक्षत्रे अनुकूल असता शुक्ल पक्षात शुभ दिनी पुरश्चरणाला प्रारंभ करतात. ग्रहणाच्या वेळीही पुरश्चरण करतात. पुरश्चरणाचा विधी असा–

सकाळी शुचिर्भूत होऊन जपाला बसावे. पुरश्चरणाचा जप एक लक्ष किंवा मंत्राची अक्षरे असतील तितके हजार एवढा असावा. रोज ठराविकच जप करावा. मध्यान्हाच्या आधी तो संपवावा. संकल्पित संख्या पुरी झाल्यावर त्याच्या दशांशाने हवन करावे. ते शक्य नसल्यास हवनसंख्येच्या चौपट जप करावा. हवन संख्येच्या दशांश संख्येने इष्ट देवतेचे तर्पण करावे. तर्पणाच्या दशांश संख्येने देवतेला अभिषेक करावा. अभिषेकाच्या दशांश संख्येइतक्या ब्राह्मणांना भोजन घालावे. ब्राह्मणभोजन घालणे शक्य नसल्यास गुरूची पूजा करून त्याला संतुष्ट करावे. याप्रमाणे केले असता मंत्र सिद्ध होऊन देवताही प्रसन्न होते.

द्रव्याच्या अभावी हवनादी करणे शक्य नसेल, तर केवळ जपानेही पुरश्चरण करता येते, असे मुडमालातंत्रात सांगितले आहे.

पुरश्चरणासाठी पुण्यक्षेत्र, नदीतीर, गुहा, पर्वतशिखर, नदीसंगम, निर्जन उद्यान, शिवालय, इ. स्थाने प्रशस्त मानलेली आहेत. पुरश्चरणकर्त्याला भक्ष्याभक्ष्याचे काही नियम पाळावे लागतात. परान्नभोजन, गात्रमर्दन, मैथुन, असत्य भाषण, इ. गोष्टी त्याला निषिद्ध सांगितल्या आहेत. **पाहा–** जप. [ श. क.; पुरुषार्थ चिंतामणी; हिं. वि. को. ]

**पुरश्चरणसप्तमी** एक पूजाप्रधान व्रत. माघ शुद्ध सप्तमीला सूर्य मकर राशीत असून रविवार असेल तर त्या दिवशी हे व्रत करतात. यात तांबडी फुले वाहून सूर्याच्या मूर्तीची पूजा करतात. नंतर पंचगव्य प्राशन करतात. प्रत्येक महिन्याच्या सप्तमीला एक वर्षपर्यंत ही पूजा करायची असते. प्रत्येक वेळी फुले, धूप व नैवेद्य निरनिराळ्या प्रकारचा असावा लागतो. फल – पापमुक्ती. [ हिं. ध. ]

**पुराणवस्तुसंशोधन** भूतलावर किंवा भूगर्भात सापडलेल्या पुराणवस्तूंचे संशोधन व अध्ययन करून, त्यावरून इतिहासाचा मागोवा घेणे आणि प्राचीन काळातील मानवी जीवन व संस्कृती यांच्याविषयी स्थूल कल्पना करणे, याचे जे शास्त्र त्याला पुराणवस्तुसंशोधनशास्त्र असे म्हणतात. प्रारंभी प्राचीन वस्तूंचा संग्रह केवळ कलासक्त दृष्टीने केला जात असे. सुंदर चित्रे व मूर्ती मांडून

घराची शोभा वाढविण्याची आवड पुष्कळ लोकांना असते. जुन्या काळातील एखादी दुर्मिळ किंवा विचित्र वस्तू सापडली, तर तिला केवळ जुन्या काळातील म्हणूनच विशेष मोल असते. जुनी नाणी, अलकार, भांडी, दिवे, उपकरणे इत्यादींवरील कलाकुसरीमुळे एखाद्या रसिक माणसाला त्याचा संग्रह करावासा वाटतो. मात्र अशा वस्तूंना काही ऐतिहासिक महत्त्व



कार्ले येथील लेण्यातील स्तूप

किंवा सांस्कृतिक मूल्य असेल, ही कल्पना पुष्कळांना नसते. जुन्या काळी तर ही जाणीव नव्हतीच, असे म्हटले तरी चालेल. प्राप्त वस्तू चांगल्या स्थितीत राहावी, ती आकर्षक दिसावी, एवढाच हेतू मनात बाळगून संग्रहकर्ता तिची काळजी घेत असे.

शिलालेख, ताम्रपट, हस्तलिखित पोथ्या, दानपत्रे, इ. जुन्या वस्तूंचे महत्त्वही पूर्वी कोणाला समजले नव्हते. त्यामुळे अशा प्रकारच्या असंख्य वस्तू जागोजागी धूळ खात किंवा कपाटात बंदिस्त होऊन पडलेल्या होत्या. त्यांचा अभ्यास करून इतिहासाचे धागे जुळविण्याची कल्पना कोणालाही आली नव्हती.

**प्रारंभ** – भारतात असंख्य मंदिरे, मशिदी, मठ, स्तूप, दुर्ग, लेणी, मनोरे, इ. प्राचीन वास्तू सर्वत्र आहेत. त्या इतिहास व शिल्पकला या दोन्ही दृष्टींनी मोलाच्या आहेत. पण इंग्लिश लोक इकडे येऊन स्थायिक होईपर्यंत त्यांच्याकडे कोणाचे लक्ष गेले नव्हते. या खंडप्राय देशात अनेक संस्कृती उदयाला आल्या, वैभवाने नांदल्या व अस्त पावल्या. त्या सर्वांचे अवशेष बऱ्यावाईट स्थितीत जागोजागी आढळतात. हा सांस्कृतिक ठेवा इतका व्यापक आणि विविध प्रकारचा आहे, की परकीय लोक त्याच्या ओझरत्या दर्शनानेही स्तिमित झाले. त्याचा अभ्यास करण्यासाठी सर विल्यम जोन्स यांनी इ. स. १७८४ साली कलकत्ता येथे एशियाटिक सोसायटी नामक संस्थेची स्थापना केली. आशिया खंडातील देशांचा प्राचीन इतिहास, कला-विकास, शास्त्राभ्यास, साहित्य आणि प्राचीन संस्कृतीचे अवशेष याचा अभ्यास करणे, हा त्या संस्थेचा उद्देश होता. एशियाटिक रिसर्चेस या नावाची एक पत्रिकाही इ. स. १७८८ मध्ये सुरू करण्यात आली. मात्र विल्यम जोन्स व त्याचे सहकारी प्राचीन ग्रंथ व कोरीव लेख यांच्या संशोधनावरच भर देत होते इतर वस्तू व वास्तू प्राचीन काळाच्या इतिहासाची बहुमोल साधने असतात, ही जाणीव त्यांनाही नव्हती. तथापि त्यांनी केलेले वाङमयीन संशोधन इतिहासाच्या दृष्टीने उपयुक्त ठरले, यात संशय नाही.

विल्यम जोन्स यांनी चंद्रगुप्त मौर्य याच्यासंबंधी लिहिलेले लेख म्हणजे भारताच्या प्राचीन इतिहासावर टाकलेला पहिला प्रकाशझोत होय. गंगा व शोण या नद्यांच्या संगमावरील पालिबोथ्रा म्हणजेच पाटलिपुत्र हे नगर (सांप्रतचे पाटणा शहर) होय, असा स्थाननिश्चय त्यांनी केल्यामुळे भारताच्या भौगोलिक संशोधनालाही चालना मिळाली. चार्लस विल्किन्सन याने गुप्त व कुटिल या लिप्यांचा शोध लावून भारतातील कोरीव लेखाच्या अभ्यासाचा पाया घातला. पुढे कोलब्रुक व विल्सन यांनी त्या अभ्यासाला अधिक शास्त्रीय वळण लावले.

इ. स. १७९४ मध्ये सर चार्लस मॅलेट याने वेरूळच्या लेण्यावर एक लेख प्रसिद्ध केला. आणि इ. स. १८०४ मध्ये सॉल्ट याचा कान्हेरी गुंफेवरील वर्णनात्मक व सचित्र लेख प्रसिद्ध झाला. इ. स. १८१३ साली विल्यम अर्स्किन याने एलेफंटा लेण्यांवर एक निबंध लिहिला. त्याच काळात मद्रासकडे कोलीन मॅकेंझी याने सुमारे आठ हजार कोरीव लेख जमा केले आणि असंख्य पुराण वस्तूंची चित्रे काढून ठेवली.

इ. स. च्या १९ व्या शतकाच्या प्रारंभी काही वर्षे कंपनी सरकारच्या आदेशावरून फ्रान्सिस बकॅनन याने भारताच्या अनेक प्रांतांतील प्राचीन स्मारकांचे निरीक्षण केले. त्याने शेकडो प्राचीन वास्तू व ऐतिहासिक स्थाने यांची मोजमापे घेऊन विस्तृत वर्णन लिहून ठेवली आणि त्यांची रेखाचित्रेही काढली. त्याच्या प्रतिवृत्तात अनेक कोरीव लेखांच्या प्रती लिहून ठेवलेल्या आहेत.

त्यानंतर कित्येक वर्षे या क्षेत्रात कोणी फारसे संशोधन केले नाही. इंग्रज सरकार आपली सत्ता बळकट करण्यात गुंतलेले असल्यामुळे सांस्कृतिक अवशेषांच्या अभ्यासाकडे त्यांचे मुळीच लक्ष नव्हते. उलट लॉर्ड बेंटिंकच्या अमदानीत तर ताजमहालचा संगमरवरी पाषाण फोडून विकून टाकण्याची कल्पना उगम पावली होती. पण ती कृतीत उतरली नाही हे सुदैव.

**सर्वेक्षण व संकलन –** इ. स. १८३३ साली जेम्स प्रिन्सेप हा कलकत्त्याच्या टाकसाळीचा अधिकारी एशियाटिक सोसायटीचा



जेम्स प्रिन्सेप

सेक्रेटरी झाल्यापासून मात्र पुराणवस्तुसंशोधनाला वेगळे वळण लागले. सुसूत्रपणा व काटेकोरपणा हे त्याच्या संशोधनाचे विशेष गुण होते. इ. स. १८३४ ते १८३६ या दोन वर्षांत ब्राह्मी व खरोष्ठी लिप्या वाचण्यात यश मिळवून त्याने प्राचीन कोरीव लेखांची गूढता नष्ट केली. त्यामुळे अनेक प्राचीन लेखांचा बोध होऊन शिलालेखांतील पियदसी म्हणजेच अशोक मौर्य हे सिद्ध झाले आणि त्यानंतरच्या अनेक राजांचा कालक्रम ठरवणे शक्य झाले. उ. प्रदेश व पंजाब यांतील काही जागी संशोधकांनी थोडेसे उत्खनन करून अनेक मूर्ती, शिलालेखा नाणी व पुष्कळ भग्नावशेष मिळविले होते. जेम्स प्रिन्सेप याच्या लिपीसंशोधनावरून त्यावरील लेखांचा अभ्यास करणे सुलभ झाले आणि त्यामुळे कुशाणांचा इतिहास ज्ञात झाला.

प्रिन्सेपच्या प्रेरणेमुळे भारतात अनेक संशोधक पुराणवस्तूंचा अभ्यास स्वतंत्रपणे करू लागले. त्यांपैकी जेम्स फर्ग्युसन, मॉर्कहॅम किट्टो, एडवर्ड थॉमस, कनिंगहॅम, इलियट, कर्नल मेडोज टेलर, स्टीव्हन्सन व भाऊ दाजी हे विशेष प्रसिद्ध आहेत. फर्ग्युसनने भारतातील विविध प्रकारच्या प्राचीन वास्तूंचे निरीक्षण करून वास्तुशास्त्राचा इतिहास लिहिला आणि तो अत्यंत महत्त्वाचा ठरला. त्यात अनेक चित्रेही आहेत.

त्यानंतर लवकरच हिंदुस्थान सरकारने देशातील सर्व प्राचीन स्मारकांच्या संरक्षणाची व त्यांतील चित्रे व शिलालेख यांच्या प्रती बनविण्याची योजना आखली.

इ. स. १८६१ साली पुराणवस्तुसंशोधनखात्याची स्थापना होऊन त्या कामासाठी कनिंगहॅमची नेमणूक झाली व त्याने चार पाच वर्षांत उ. भारतातील बहुतेक सर्व महत्त्वाच्या स्मारकांची माहिती नोंदवून ठेवली. इ. स. १८७८ मध्ये गुप्त निधीचा कायदा पास झाला. त्या अन्वये गुप्त धन किंवा मूल्यवान वस्तू सापडल्या, तर त्या सरकारच्या मालकीच्या होतील असे ठरले. कनिंगहॅमने वीस पंचवीस वर्षे पुराणवस्तुसंशोधनाचे कार्य मोठ्या उत्साहाने केले. ठिकठिकाणी उत्खनन करून त्याने अनेक स्तूप व शिलालेख शोधून काढले. प्राचीन भारतीय संस्कृतीच्या अभ्यासाला त्यामुळे चालना मिळाली. मात्र त्याचे हे उत्खनन केवळ बौद्ध क्षेत्रापुरतेच मर्यादित राहिले. मौर्यकालीन अखंड पाषाणस्तंभ, भरहूतचा स्तूप; तसेच तक्षशिला, कौशांबी, श्रावस्ती ही प्राचीन नगरे, बोधगयेचे मंदिर, गुप्तकालीन मंदिरे व गुप्त सम्राटांचे लेख यांचा शोध त्याच्या कारकीर्दीतच लागला. शिलालेख प्रसिद्ध करण्यासाठी इंडियन अँटिक्वेरी नावाचे नियतकालिकही सुरू करण्यात आले. पण उत्खननाचे शास्त्रीय तंत्र त्याला माहीत नव्हते. त्याने खोलपर्यंत उत्खनन कधी केले नाही आणि प्राप्त वस्तूंचा अभ्यास केवळ कलेच्याच दृष्टीने केला.



कौशांबी येथील बौद्ध विहाराचे अवशेष

उत्खनित वस्तूंचा प्राचीन संस्कृतीशी संबंध जोडण्याचा प्रयत्नही त्याने केला नाही. तथापि त्याने केलेले प्राथमिक संशोधनच

नंतरच्या कामाच्या दृष्टीने मोलाचे ठरले आहे. त्याच्या नंतर जेम्स बर्गेस यानेही सुमारे वीस वर्षे काम करून द. भारतातील वास्तूची विस्तृत माहिती जमा केली व ती प्रसिद्ध केली. त्याच्या कारकीर्दीत मथुरा येथे मोठ्या प्रमाणावर उत्खनन झाले व तिथे कुशाणकालीन अवशेष पुष्कळच सापडले.

**शास्त्रीय संशोधन** – इ. स. १८९९ मध्ये लॉर्ड कर्झन व्हाइसरॉय म्हणून हिंदुस्थानात आला आणि त्याने पुराणवस्तुसंशोधनाला शास्त्रीय रूप दिले. पाश्चात्य पंडितांच्या मते भारतात विस्तृत प्रमाणावर उत्खनन करणे आवश्यक होते. कर्झनने पुराणवस्तुखात्याची पुनर्घटना करून सर जॉन मार्शल याला त्या खात्याचा प्रमुख नेमले. आपल्या सव्वीस वर्षांच्या कारकीर्दीत मार्शलने प्रथम सारनाथ, श्रावस्ती, कुशीनगर, सांची, तक्षशिला या प्राचीन बौद्ध तीर्थक्षेत्रांचे संशोधन सुरू केले कारण त्या स्थानी काही स्तूप सापडले होते. तिथे उत्खनन करून मार्शलने त्या प्राचीन नगरांचा इतिहास सजीव केला. बौद्ध क्षेत्रातील स्तूपांत एकात एक ठेवलेल्या सोन्या-चांदीच्या मंजूषा



जॉन मार्शल

व त्यांत ठेवलेले बुद्धाचे अवशेष सापडले. तक्षशिला येथे मार्शलने १९१३–१९१४ मध्ये विस्तृत प्रमाणावर उत्खनन केल्यामुळे विविध प्रकारची विपुल सामग्री हाती आली. तिथे जे अनेक बौद्ध मठ व स्तूप होते, त्यांचे भग्नावशेष त्या जागी मिळाले.

नालंदा, पाटलिपुत्र, इ. प्राचीन नगरांच्या जागीही त्या वेळी उत्खनन करण्यात आले. तिथे प्राचीन मंदिरे, मठ, स्तूप, मूर्ती,



नालंदा विद्यापीठ

शिलालेख, इत्यादींचे पुष्कळ अवशेष मिळाल्यामुळे उ. भारताच्या इतिहासावर बराच प्रकाश पडला. त्यानंतर लवकरच मोहेंजोदडो व हडप्पा येथे केलेल्या उत्खननात प्रागतिहासिक काळातील सिंधु-संस्कृतीचा शोध लागला आणि पुराणवस्तुसंशोधनाला फार जोरदार चालना मिळाली. इतर प्रांतांत व संस्थानांतही बरेच उत्खनन करण्यात आले. त्यात वायव्य सरसीमा भागात ग्रीक-बौद्ध जातीच्या गांधार शिल्पाचे नमुने सापडले, तर पंजाबात अश्मयुगाचे अवशेष सापडले. कल्हणाने काश्मीरचा इतिहास लिहून ठेवला होता. त्याची प्रचीती पाहण्याचे काम सर ए. स्टायन याने केले.

म्हैसूर संस्थानात त्या काळी पुराणवस्तुसंशोधन वेगाने सुरू होते; असंख्य शिलालेखांचा अभ्यास केला जात होता. इ. स. १९२८ मध्ये चंद्रावली व ब्रह्मगिरी येथे जे उत्खनन झाले, त्यांत सातवाहन, मौर्य व इतर कालखंडातील अवशेष मिळाले. मद्रास प्रांतातही निरनिराळ्या मंदिरांतील असंख्य शिलालेखांचा अभ्यास झाला. त्यामुळे बराच इतिहास उजेडात आला. अमरावतीच्या उत्खननात जे स्तूपांचे भग्नावशेष सापडले, त्यांना तर प्राचीन इतिहासाच्या दृष्टीने अतिशय महत्त्व प्राप्त झाले.

विस्तृत उत्खननामुळे सिंधु-संस्कृतीतली अनेक नगरे व त्यांतील असंख्य वस्तू उपलब्ध झाल्या, तरी उत्खननशास्त्रातले प्रगत तंत्र मार्शलने अवलंबले नसल्यामुळे त्या संस्कृतीची उत्क्रांती कशी झाली ते त्या वेळी समजले नाही. सखोल उत्खनन करून जमिनीच्या भिन्न थरांतील वस्तू व वास्तू यांचा तौलनिक अभ्यास केला, तरच तिथे एकीमागून एक झालेल्या

मानवी वसाहतींच्या संस्कृतीचा विकासक्रम ध्यानात येतो. पण मार्शलच्या वेळी तसे उत्खनन व संशोधन केले गेले नाही. मात्र प्राचीन स्मारकाचे संरक्षण व जीर्णोद्धार या बाबतीत मार्शलने केलेले कार्य महनीय ठरले.

**शास्त्रीय पद्धतीने उत्खनन** – इ स १९३९ पर्यंत भारतात जुन्या पद्धतीने पुष्कळ ठिकाणी उत्खनन व संशोधन झाले. इ. स १९४०–४४ या कालखंडात मात्र उत्तर प्रदेशातील रामनगर येथे नवीन तंत्राचा अवलंब करून जे उत्खनन करण्यात आले त्यात अहिच्छत्रा या प्राचीन नगरीचा शोध लागला. तिथल्या वस्तीचे अनेक थर क्रमाने खणून प्रत्येक थरातील खापरे, मणी, नाणी, वास्तूचे अवशेष, इ. वस्तूंचा अभ्यास केल्यामुळे अहिच्छत्राच्या प्राचीन रहिवाश्यांची सुमारे पंधराशे वर्षांच्या कालखंडातील सांस्कृतिक वाटचाल समजली.

इ. स १९४४ साली सर मॉर्टिमर व्हीलर हा पुरातत्त्व विभागाचा महानिदेशक म्हणून भारतात आला. त्याच्या चार वर्षांच्या कारकिर्दीत पुराणवस्तुसंशोधनाची पुष्कळच प्रगती झाली. त्या काळात तक्षशिला, हडप्पा, पाँडेचरीजवळचे अरिकामेडू व दक्षिणेतील ब्रह्मगिरी येथे नवीन पद्धतीचे उत्खनन सुरू झाले आणि त्यातून महत्त्वाचे निष्कर्ष निघाले ब्रह्मगिरी येथील उत्खननामुळे सनपूर्व १००० च्या सुमारास तिथे नांदणाऱ्या ताम्रयुगीन संस्कृतीचा शोध लागला. व्हीलर याने थरप्रमाणे उत्खनन करून व प्रत्येक थरातील खापरे वगैरे वस्तूंची वैशिष्टये पाहून त्या थराचा काल ठरविण्याची पद्धती निश्चित केली. उत्खननशास्त्राला इतर भौतिक शास्त्राचे साहाय्य आवश्यक असते व त्यामुळे प्राचीन अवशेषाचे सांस्कृतिक मूल्यमापन करणे सुलभ होते, हे जाणून व्हीलरने तसे सहकार्य मिळवण्याची व्यवस्था केली आणि पुराणवस्तुसंशोधनाच्या कार्याला शिस्त लावली.

स्वातंत्र्यप्राप्तीनंतर केंद्र सरकारने पुराणवस्तुसंशोधन खात्याची पुनर्घटना केली. त्यात विलीन संस्थानांतील कार्याचा अंतर्भाव केला आणि संशोधनाचे कार्य व्यवस्थित व्हावे यासाठी विधिनियम तयार केले. त्या कार्यात आता निरनिराळी विद्यापीठे व संशोधनसंस्था सहभागी होत असून, त्या सर्वांच्या संशोधनाचा समन्वय केंद्रीय समितीच्या द्वारा केला जातो.

गेल्या वीस वर्षांतील उत्खननामुळे एक गोष्ट ध्यानात आली आहे ती ही, की सिंधुसंस्कृती केवळ सिंधूच्या खोऱ्यातच नांदत नव्हती, तर पूर्वेला गंगेपर्यंत, उत्तरेला पंजाबातील शिवालिक पर्वतराजीपर्यंत आणि दक्षिणेला नर्मदा नदीपर्यंत तिचा विस्तार होता. राजस्थानातील काली बंगा व गुजरातमधील लोथल या दोन ठिकाणच्या उत्खननामुळे आता सिंधुसंस्कृतीविषयी पुष्कळ अधिक ज्ञान प्राप्त झाले आहे. हस्तिनापुर, कौशांबी, राजघाट, श्रावस्ती व वैशाली येथे केलेल्या उत्खननामुळे सिंधुसंस्कृती व मौर्यकाळ यांच्या मधल्या काळातील इतिहासावर थोडासा प्रकाश पडला आहे. नावडातोडी येथील उत्खननात सनपूर्व १६०० ते १२०० या कालखंडातील अवशेष सापडले आहेत.

नागदा, त्रिपुरी, आवडा, एरण, आहार व गिलंड येथील उत्खननात ताम्रयुगीन संस्कृतीचे अवशेष सापडले आहेत. जोरवे, नेवासे, चंदोली या जागीही ताम्रयुगातील संस्कृतीचे दर्शन घडले आहे द. भारतातील उत्खननामुळे पाषाणयुगातील मानवी जीवनावर पुष्कळ प्रकाश पडला आहे. पाषाणयुगाचे अनेक निरनिराळे कालखंड असून, त्यांतील मानवी जीवनाची भिन्नता अलिकडे भारतात भिन्न ठिकाणी झालेल्या शास्त्रीय उत्खननामुळे समजून आली आहे.

भारताच्या ज्ञात इतिहासाचे संशोधन करण्यासाठी ज्या अनेक ठिकाणी उत्खनन सुरू झाले आहे, त्यांतील जगतराम, दिल्ली, तामलुक, चंद्रकेतुगड, शिशुपालगड, जोगडा, रत्नगिरी,



तेर येथील भग्न मूर्ती

बडोदे, अमरेली, देवनीमोरी, सिरपूर, तेर शालिवडमहुं व अमरावती (जि. गुंटुर) ही ठिकाणे प्रमुख होत. नागार्जुनकोंड येथे जे उत्खनन करण्यात आले, त्यात प्राचीन बौद्ध स्तूप व मठ, सातवाहन काळातील वास्तू व वस्तू आणि पाषाणयुगातील आयुधेही मिळाली आहेत.

**सांस्कृतिक मूल्यमापन**—काही ठिकाणी मानवी वसाहती एकाच जागी एकावर एक होत गेल्याने, भिन्न थरात भिन्न भिन्न

काळांतील संस्कृतीचे अवशेष सापडतात. त्यांचा कालखंड ठरवण्यासाठी अलिकडे 'कार्बन १४' या पद्धतीचा अवलंब केला जातो. सर्व वनस्पतीत कार्बन १४ नामक एक घटक असतो. तो किरणोत्सर्गी आहे. झाड जळाल्यानंतर त्यातील या घटकाचे प्रमाण हळू हळू निश्चित प्रमाणात कमी कमी होत जाते. उत्खनित वस्तूतील या घटकाचे प्रमाण शोधून काढले, तर त्या वस्तूचा कालखंड ठरवता येतो त्यात फार तर २०० वर्षांची चूक होऊ शकेल. या पद्धतीने नेवासे येथील ताम्रपाषाणयुगाची शेवटची वसाहत सनपूर्व ११०० च्या सुमारास झाली आणि हडप्पा येथील सिंधुसंस्कृतीची सुरुवात सनपूर्व २५०० च्या सुमारास झाली, असे ठरविण्यात आले आहे. साठ हजार ते एक लाख वर्षापर्यंतच्या कालखंडाची मोजदाद 'थर्मोल्युमिनिसन्स' या नवीन पद्धतीने करता येते. त्या पद्धतीत खापरे किंवा दगड यांना खूप प्रखर उष्णता दिली असता, त्यातून विशिष्ट प्रकारची ज्योत निघते त्या ज्योतीची प्रखरता किंवा मंदपणा यावरून त्या वस्तूचा काल समजतो. दोन हजार वर्षांपूर्वीच्या जुन्या भट्टया, चुली व जळालेल्या वस्तू यांचा काल 'आर्किओ मॅग्नेटिझम' या पद्धतीने ठरवता येतो.

प्राचीन मानवाने बनवलेली घरे-दारे, त्याची भांडी-कुंडी, त्याचे अलंकार, दफनपद्धती, त्याचे अन्न, त्याची आयुधे, खेळणी, मूर्ती, नाणी असे विविध प्रकारचे अवशेष उत्खननात मिळतात. भारतातील उत्खननात खापरे व मडकी फार मोठ्या प्रमाणावर सापडतात. लाकडाच्या, धातूच्या किंवा इतर प्रकारच्या वस्तू लवकर नष्ट होतात. पण भाजून तयार केलेली मातीची भांडी हजारो वर्षे जशीच्या तशी राहतात; त्यामुळे पुराव्याच्या दृष्टीने त्यांना अनन्यसाधारण महत्त्व असते. डॉ. व्हीलर यांच्या मते खापरे म्हणजे पुराणवस्तुशास्त्राची मुळाक्षरेच होत. कुठल्याही खापराचा तुकडा फोडून पाहिला, तर त्याच्या गाभ्यावरून पुढील गोष्टी कळतात – मातीला घट्टपणा येण्यासाठी तीत शेण, राख, गवताच्या काड्या किंवा धान्याचा भुसा मिसळतात धान्याच्या भुशाचा अभ्यास केल्यास तत्कालीन कृषिव्यवसाय, त्यावरून मानवी संस्कृतीचे स्थिर स्वरूप व त्या काळातले हवामान यावर प्रकाश पडतो. खापरावर नक्षी काढलेली असते, पशुपक्ष्यांची चित्रे असतात. त्यावरून त्या वेळच्या समाजाची कला व निसर्गस्थिती कळते. खापराच्या अभ्यासामुळे त्या काळातील धार्मिक कल्पना काय होत्या, तेही अनुमानिता येते.



मृण्मय मातृदेवता – कोल्हापूर

उत्खननात सापडलेल्या वास्तूच्या भग्नावशेषावरून त्या काळातील नगरीचे व घरांचे स्वरूप कळते; सामाजिक, धार्मिक व राजकीय स्थिती समजते आणि हवामानाचा अंदाज करता येतो स्मशानभूमीत सापडलेले हाडांचे सांगाडे आणि इतर वस्तू यांवरूनही त्या काळातील मानवाच्या समजुती, अंत्यक्रियेची पद्धती व मरणोत्तर जीवनाच्या कल्पना याविषयी अनुमान करता येते उत्खननात धान्याचा पुरावा सापडला, तर त्यावरून त्या काळातले हवामान, आहारपद्धती व शेतीचे ज्ञान याची माहिती मिळते. जनावरांची हाडे मिळाली, तर त्या काळी कोणते पशू पाळीव होते, ते समजते. राख, कोळसा, माती, सुकलेली विष्ठा यांसारख्या क्षुद्र वस्तूवरही भूतकाळाबद्दल महत्त्वाची माहिती मिळवता येते. अश्मयुगातील खडबडीत व मोठी दगडी हत्यारे, नवाश्मयुगातील घोटीव व लहान आयुधे, ताम्रपाषाणयुगातील तांब्याची, ब्राँझची व गारगोटीच्या छिलक्यांची हत्यारे व ऐतिहासिक काळातील लोखंडी हत्यारे यावरून मानवी संस्कृतीच्या प्रगतीचे व तात्त्विक ज्ञानाच्या विकासाचे चित्र रेखाटता येते. उत्खननात व इतरत्र सापडलेल्या नाण्यांचा अभ्यास केला, तर इतिहास कळतो. त्याचप्रमाणे धातुकामाचे तंत्र, मोजमापाची पद्धती व कलाकुसर यांचीही कल्पना येते. नाण्यांवरील अक्षरे व चित्रे यावरूनही राजकीय व धार्मिक स्थितीचे ज्ञान होते. उत्खननात सापडलेले अलंकार समकालीन वाङ्मयात किंवा शिल्पात आढळले, तर तो पूरक पुरावा ठरतो. त्यावरून त्या वेळच्या समाजाची आर्थिक स्थिती व कलाप्रियताही समजून येते.

गेल्या वीस वर्षांत भारतात सर्वत्र जागोजागी झालेल्या उत्खननामुळे अनेक प्राचीन नगरे, दुर्ग, मंदिरे व स्तूप यांचे अवशेष; पाषाणाची व धातूची आयुधे व उपकरणे; मातीची व धातूची विविध रंगांची, भिन्न आकार-प्रकारांची भांडी, नानाविध अलंकार, नाणी, मूर्ती, शिलालेख, इ. वस्तू सापडल्या

असून, शास्त्रीय पद्धतीने त्यांचा अभ्यास केल्यामुळे अश्मयुगापासून मध्ययुगापर्यंत भारतीय संस्कृतीचा विकासक्रम स्पष्ट



सूर्यमंदिर – मोढेरा

दिसून आला आहे आणि उत्खननशास्त्र हे मानवी संस्कृतीच्या मूल्यमापनाचे एक उत्कृष्ट साधन होय, हा सिद्धांत सर्वमान्य झाला आहे.

लिखित ग्रंथ हे इतिहासाचे प्रमुख साधन मानले जाते. पण फार प्राचीन काळातील ग्रंथ उपलब्ध नसल्यामुळे पुराणवस्तुसंशोधन हेच साधन त्या दृष्टीने उपयुक्त ठरते. लिखित ग्रंथात केवळ युद्धे, राजकीय घटना व राजवंश यांची माहिती मिळते, तर पुराणवस्तूंच्या अभ्यासामुळे त्या माहितीला दुजोरा मिळतो आणि त्या काळातील उद्योग, कला, घरे, मंदिरे व समाजस्थिती यांवर प्रकाश पडतो.

उत्खननात सापडलेल्या वस्तूंचे सूक्ष्म रीतीने परीक्षण करण्यासाठी रासायनिक विश्लेषण, चुंबकत्व, सूक्ष्म दर्शन, उत्सर्जन इ. शास्त्रीय तंत्रांचा पुष्कळ उपयोग केला जातो. नवीन तांत्रिक साधनांमुळे वस्तूंची मोडतोड न करता त्यांचे संपूर्ण परीक्षण करणे शक्य झाले आहे. क्ष–किरणादी उत्सर्जित किरणांचा त्या कामी फार उपयोग होतो.

**संरक्षण** – भारतातील असंख्य प्राचीन स्मारकांचे संरक्षण करणे ही एक अत्यंत कठीण समस्या आहे. शतकानुशतके हवा, पाणी व ऊन यांच्या प्रभावामुळे पुष्कळ वास्तूंची खूप पडझड झालेली असून, आसपासच्या लोकांनी तिथले दगड, विटा, माती, इ. सामान वेळोवेळी काढून नेल्यामुळे तर त्यांची अधिकच दुर्दशा झाली आहे. काही स्मारके मात्र अजून चांगल्या स्थितीत आहेत. आणि ती तशीच राहतील, अशी व्यवस्था सरकारने केली आहे. सर्व वास्तू आहेत त्या स्थितीतच रक्षण करण्याचे धोरण पुराणवस्तुसंशोधन खात्याने अंगीकारले आहे. अर्धवट पडलेला भाग पूर्ण ढासळू नये, या हेतूने त्याला आधार देण्यापुरतेच नवे बांधकाम केले जाते व तेही शक्यतो जुन्यासारखेच दिसेल, असा प्रयत्न केला जातो. प्राचीन स्मारकांचे रक्षण करण्याचे एक शास्त्रच बनले आहे. आणि हे कार्य प्राच्यविद्याविशारद, वास्तुशास्त्रज्ञ व कलाभिज्ञ यांच्या सहकार्याने होते. भिन्न भिन्न वास्तूंचे रक्षण करण्यासाठी भिन्न उपाय व पद्धती योजणे आवश्यक असते. चितोडगडावरील राणा कुंभाचा महाल, विजापूरचा गोलघुमट, कोणार्कचे सूर्यमंदिर व महाबलिपुरम येथील समुद्रकिनाऱ्यावरचे मंदिर यांचा जीर्णोद्धार अगदी वेगवेगळ्या पद्धतीने करण्यात आला आहे. त्यात रसायन, स्थापत्य, भौतिकी, इ. अनेक शास्त्रांचे साहाय्य घेतलेले आहे. अजंटा, वेरूळ वगैरे लेण्यांतील भित्तिचित्रांचे संरक्षण करण्याचे कामही नवीन शास्त्रीय पद्धतीमुळे आता सोपे झाले आहे.



राणा कुंभाचा महाल – चितोड

**पुरालेख** – पुराणवस्तुसंशोधनात प्राचीन लेखांचे महत्त्व विशेष असते. किंबहुना अशा लेखांमुळेच पुराणवस्तुसंशोधनाला प्रारंभ झाला, असे म्हटले पाहिजे. शिलालेख, ताम्रपट;

लाकडावर किंवा इतर धातूंच्या फलकांवर कोरलेले लेख; कागद, भूर्जपत्र किंवा ताडपत्र यांवरचे हस्तलेख; नाण्यांवरील लेख या सर्वांचा समावेश पुरालेखांत होतो. संशोधकाला त्या लेखांतील लिपी वाचता आली आणि भाषा समजली, तरच त्यांतील माहितीचा उपयोग होऊ शकतो. त्यातही कोरीव लेखांतील माहिती अधिक विश्वसनीय असते आणि वाङ्मयीन माहितीला पुष्टी देण्यासाठी अशा लेखांचा पुष्कळ उपयोग होतो.

भारताच्या ज्ञात इतिहासाच्या काळातील लेख संस्कृत, प्राकृत, द्राविड, अरबी, फारसी, इ. भाषांत असल्यामुळे ते वाचणे फारसे कठिण नव्हते. पण दोन हजार वर्षांपूर्वीचे खरोष्ठी व ब्राह्मी लिपीत लिहिलेले लेख वाचण्याची युक्ती सापडण्यापूर्वी त्यांचा काहीच उपयोग नव्हता. जेम्स प्रिन्सेप याने तो शोध लावल्यामुळे मौर्यकालीन इतिहासावर पुष्कळ



सांची येथील गुप्तमंदिर

प्रकाश पडला. पण सिंधुसंस्कृतीच्या अवशेषांत जे लेख सापडले आहेत, त्यांची चित्रलिपी अजूनही कोणाला नीट समजलेली नसल्यामुळे त्या काळातील इतिहास कळणे दुर्घट झाले आहे.

सम्राट अशोक मौर्य याच्या शिलालेखांवरून त्याची शासनपद्धती, त्याचे धार्मिक विचार आणि त्याचा राज्यविस्तार या संबंधी बरीच माहिती उपलब्ध झाली आहे. त्याचप्रमाणे बुद्धाच्या जीवनाविषयीही पुष्कळच ज्ञान प्राप्त झाले आहे. त्यानंतरच्या अनेक राजवंशांच्या स्थळकाळांची माहितीदेखील त्यांच्या कोरीव लेखांमुळेच मिळाली आहे. गुप्त, वाकाटक, पल्लव, पांड्य, चेर, चोळ, चालुक्य, इ. वंशांतील राजांचे हजारो शिलालेख व ताम्रपट भिन्न भिन्न रूपांत प्राप्त झाले आहेत. त्यांवरून त्यांच्या राज्यांतील धार्मिक, सामाजिक, सांस्कृतिक व राजकीय परिस्थिती व घटना यांचे ज्ञान झाले असून भौगोलिक माहितीही मिळाली आहे. बहुतेक कोरीव लेखांत ते कोरले गेले तेव्हाची तिथीही दिलेली असते. त्यावरून भारतात पूर्वी प्रचलित असलेले विक्रम, गुप्त, शक, कलचुरी, इ. संवतांचे प्रकार आणि भिन्न भिन्न राजवंशांचे कालखंड ध्यानात आले आहेत.

भारतातील सर्व प्राचीन साहित्य हस्तलिखित पोथ्यांच्या रूपाने उपलब्ध झाले आहे. त्या पोथ्या संस्कृत, प्राकृत, तमिळ, तेलुगू, कन्नड, मराठी, गुजराती, इ. अनेक भाषांत लिहिलेल्या असून त्यासाठी भूर्जपत्र, ताडपत्र, कागद व दीर्घ कालपर्यंत टिकणारी शाई यांचा उपयोग केलेला आहे. अशा हजारो पोथ्या युरोप व आशिया खंडातील अनेक देशांत आहेत. लंडन हे भारतीय ग्रंथसंपत्तीचे सर्वांत मोठे केंद्र असून, तिथे सुमारे ५००० भारतीय ग्रंथ सुरक्षित ठेवलेले आहेत. जर्मनी, फ्रान्स, इटली, चीन, जपान व तिबेट या देशांतही भारतीय हस्तलिखित ग्रंथ पुष्कळ आढळतात.

भारतात अशा असंख्य पोथ्या निरनिराळ्या ग्रंथसंग्रहालयांत व घरोघरी पडल्या आहेत. भारताचा वैभवशाली इतिहास व उच्च संस्कृती यांचे ते ज्ञानभांडारच आहे. त्यातील काही ग्रंथांचा अभ्यास झाला आहे, काहींचा होत आहे; पण अजून त्या भांडाराचा बराच भाग अस्पृष्ट राहिला आहे.

पुराणवस्तुसंशोधनशास्त्र हे उपोद्बलक शास्त्र आहे. वाङ्मय, इतिहास, सामाजिक चालीरीती, नीती, श्रद्धासमजुती, इ. मानवी संस्कृतीच्या विविध अंगोपांगांना पुष्टिकारक असा पुरावा या शास्त्रामुळे उपलब्ध होतो. मात्र त्यासाठी मानवाशी संबंध असलेल्या सर्व शास्त्रांचे ज्ञान पुरातत्त्वविदाला असावे लागते; निदान त्या त्या शास्त्रज्ञांचे सहकार्य घेणे अपरिहार्य ठरते. प्राचीन मानवाच्या मनाचे व्यापार कसे चालत असावे, या विषयी अनुमान मानसशास्त्रज्ञ करू शकतो. प्राचीन काळातील नीतिनियमांचे स्वरूप कसे असेल, हे समाजशास्त्रज्ञ सांगू शकतो. उत्खननात सापडलेल्या अस्थींवरून प्राणिशास्त्रज्ञ व भूगोलज्ञ भोवतालच्या परिस्थितीचा अंदाज करू शकतो. उत्खनित पुरावा आणि वाङ्मयीन पुरावा यांचा समन्वय इतिहासज्ञ करू शकतो. या सर्वांच्या सहकार्यानेच प्राचीन काळातील मानवी जीवनाचे यथार्थ चित्र उभे करता येते. [ हि. क. इं. पी.; हि. स.; पुरातत्व–विज्ञान, डॉ. वैजनाथ पुरी, १९५३; पुरातत्व–परिचय, श्री परमेश्वरीलाल गुप्त, १९४७; महाराष्ट्रातील उत्खनने, डॉ. शां. भा. देव, १९६२; ए. इं.–स्पे. ज्यु. नं. १९५३; संस्कृति–पुरातत्व विशेषांक, १९६२ ]

**पुराणे** भारतीय साहित्यातील एक महत्त्वाचा ग्रंथसमूह. श्रुती आणि स्मृती यांच्या नंतर पुराणांचा उच्चार होतो. याज्ञवल्क्याच्या संकल्पात 'श्रुतिस्मृतिपुराणोक्त फलप्राप्त्यर्थं' असे वाक्य असते. म्हणजे श्रुती व स्मृती यांच्या खालोखालच आपल्याला पुराणोक्त फलाचीही अपेक्षा असते. स्मृति–सूत्रकारांनी श्रौत स्मार्त धर्माचा अधिकार त्रैवर्णिकांनाच दिला व इतरांना त्यापासून वंचित केले. अशा वंचितांना व उपेक्षितांना उद्धरण्यासाठी पुराणांचा अवतार झाला. सर्व वर्णीना, वर्णबाह्यांना, किंबहुना सर्व मानवांना पारमार्थिक समता पुराणांनी दिली. सर्वांना समानतया पावन करण्याची प्रतिज्ञा करूनच पुराणे उदयास आली व त्रैवर्णिकांच्या संकुचित वृत्तीचे उच्चाटन करून सर्वसमावेशक झाली. 'एष साधारण पन्था साक्षात् कैवल्यसिद्धिद' पुराणे हा सर्वांना कैवल्य प्राप्त करून देणारा सर्वांचा मार्ग आहे, असे पद्म पुराणात म्हटले आहे.

भारतीय संस्कृती व सभ्यता यांचा सामान्य जनतेत प्रचार करण्याचे श्रेय पुराणांनाच दिले पाहिजे. पुराणांच्या दृष्टीने 'लोके वेदे च' म्हणजे लोक आणि वेद अशी उभयत्र आहे. वेदविहित धर्माचे सरलसुबोध प्रतिपादन करून त्यातील तत्त्वे जनमनांत रुजविण्याचे कार्य पुराणांनी केले आहे.

पुराणांचे सामाजिक महत्त्वही फार मोठे आहे. समाजातल्या सर्व थरांचे किंबहुना ब्राह्मणांपासून श्वपच आणि अन्य म्लेच्छ जातींचेही सामाजिक नियमन पौराणिकांनी केले आहे. सदाचार, श्रद्धा, नीती, इ. तत्त्वांचे शिक्षण पुराणांतल्या मनोरंजक कथांच्या द्वारे समाजातल्या आबालवृद्धांना दिले. धर्म, दर्शन, संस्कृती, राजनीती इ. गोष्टीही पुराणांनी सोप्या भाषेत सर्वांना सुगम केल्या. कथाकीर्तन, व्रते, उपवास, देवाराधन, सणवार, इ. द्वारा सर्व जनतेत पुराणांनीच धार्मिकता जागृत ठेवली. आणि हे सर्व वैदिक परंपरेशी संबंध न तोडता पुराणांना घडवून आणले.

भक्तिमार्गाची स्थापना हीदेखील पुराणांचीच श्रेष्ठ कामगिरी होय. वेदांत भक्तीची बीजे आढळतात, पण तिला स्वतंत्र व मोक्षसाधक दर्जा पुराणांनीच दिला. भक्ती हे मनुष्याच्या धार्मिक भावनेचे उच्चतम रूप होय. ती भक्ती पुराणांनी सर्व सुलभ केली. पुराणांनी हिंदू धर्माला भव्यता दिली आणि हिंदूंच्या रसिकतेचेही पोषण केले. साप्रतच्या हिंदू धर्माचे आधार वेद नसून पुराणेच आहेत, असे म्हटल्यास ते वावगे ठरणार नाही.

वाङ्मयदृष्ट्याही पुराणांचे महत्त्व कमी नाही. पुराणांतली चित्ताकर्षक आख्याने आणि स्तोत्रे ही वाङ्मयाचे रमणीय आविष्कार ठरावेत, अशा योग्यतेची आहेत. काही पुराणांचा विशिष्ट देवतासंप्रदायावर भर असल्यामुळे त्यातील अतिशयोक्ती आणि बुद्धीला न पटणारे भरताड पाहून कित्येक पाश्चात्त्य व भारतीय समीक्षक पुराणांना महत्त्व न देता त्यांची उपेक्षाच करतात, पण भारतीय परंपरा व इतिहास समजण्यासाठी यांच्याइतके दुसरे उपयुक्त वाङ्मय कोणतेच नाही. म्हणूनच व्यास पुराणात म्हटले आहे –

> यो विद्याच्चतुरो वेदान् साङ्गोपनिषदो द्विजः ।
> न चेत् पुराणं संविद्यान्नैव स स्याद् विचक्षणः ।।

अर्थ – वेदांग आणि उपनिषदे यांच्यासह चारही वेदांचे अध्ययन केलेला ब्राह्मण जर पुराणवाङ्मयाचा अनभिज्ञ असेल, तर त्याला विद्वान म्हणता येणार नाही.

> वेदाः प्रतिष्ठिताः सर्वे पुराणे नात्र संशयः ।
> × ×
> आत्मा पुराणं वेदानां पृथगङ्गानि तानि षट् ।
> यच्च दृष्टं हि वेदेषु तद् दृष्टं स्मृतिभिः किल ।
> उभाभ्यां यत्तु दृष्टं हि तत्पुराणेषु गीयते ।।

(स्कन्द पु. रेवा १)

अर्थ – पुराण हा वेदांचा आत्मा होय. वेदांची षडंगे ही पुराणांचे अवयव होत. जे वेदांनी पाहिले आहे ते स्मृतींनी पाहिले आणि श्रुतिस्मृतींना ज्याचे दर्शन झाले ते पुराणांमध्ये गायिले आहे.

**पुराणाची व्याख्या** – 'पुरा नवं भवति' = प्राचीन असूनही जे नवे असते, ते पुराण होय, अशी निरुक्तातील व्याख्या आहे. वायु पुराणातील व्याख्या अशी –

> यस्मात् पुरा ह्यनतीदं पुराणं तेन तत्स्मृतम् ।

अर्थ – जे प्राचीन परंपरेची कामना करते, ते पुराण म्हटले गेले आहे.

या व्याख्यांवरून असे दिसते की पुराणांचा वर्णविषय प्राचीन कालाशी संबद्ध आहे. वेदोपनिषदांत प्रथमतः इतिहासपुराण असा जोडशब्द येतो. पुराणकाली इतिहासालाही पुराण म्हणत आणि पुराणालाही इतिहास समजत. महाभारत हे स्वतःला इतिहास म्हणवते, पण तरीही कित्येक वेळा पुराण या शब्दाने स्वतःचा उल्लेख करते (म. भा. आदि १.१७). वायु पुराण हे पुराण असूनही स्वतःला इतिहास म्हणवते. यावरून एक गोष्ट स्पष्ट होते, की प्राचीन काळी इतिहास व पुराण यांचे पृथक्पण दाखविणारी विभाजनरेषा अधिक अस्पष्ट होती. कालांतराने या दोहींच्या नावाचे वैशिष्ट्य निश्चित झाले. छांदोग्योपनिषदाच्या भाष्यात (७.१) शंकराचार्यांनी या दोन्ही संज्ञांचे वेगळेपण स्पष्ट दाखविले आहे. ते म्हणतात, की इतिहास

व पुराण ही दोन्ही वेदांमध्ये उपलब्ध आहेत. त्यांतली पुरूरवा-उर्वशीची कथा हा इतिहास आहे. प्रारंभी केवळ असत् विद्यमान होते आणि पुढे त्याच्यातूनच सृष्टिविस्तार झाला इत्यादी सृष्टिप्रक्रियादर्शक विवरण हे पुराण आहे.

**पुराणांचे प्राचीन उल्लेख** – ऋग्वेदात अनेक ठिकाणी पुराण हा शब्द आला असून, तो तेथे विशेषणरूपाने दिसतो. त्याचा तिथला अर्थ 'प्राचीन' अर्थात 'पूर्वकाली झालेला' असा आहे. त्यानंतर अथर्ववेदात पुराण शब्द आढळतो. तिथला मंत्र असा–

**ऋचः सामानि छन्दांसि पुराणं यजुषा सह ।**
**उच्छिष्टाज्जज्ञिरे सर्वे दिवि देवा दिविश्रितः ।।**

(अथर्व ११ ७ २४)

अर्थ – (उच्छिष्ट म्हणजे परमात्मा) त्यापासून ऋचा, साम, छंद व पुराण ही यजुर्वेदासह उत्पन्न झाली. इतकेच नव्हे; तर स्वर्गात वास्तव्य करणारे देवही उच्छिष्टापासूनच उत्पन्न झाले.

गोपथ व शतपथ या ब्राह्मणांतही पुराणाचा अनेकवार उल्लेख येतो. त्यावरून त्या काळची पुराणांची एकरूपता समजते. गोपथात सांगितले आहे, की कल्प, रहस्य, ब्राह्मण, उपनिषद, इतिहास, अन्वाख्यान व पुराण यांना बरोबर घेऊन सर्व वेद निर्माण झाले (गो. ब्रा. १ २·१०) शतपथ ब्राह्मणात ब्रह्मयज्ञप्रसंगी इतिहास व पुराणे याचे पठन करण्याचे फल सांगितले आहे, की त्यांच्या पठनाने देवांना मधुपूर्ण आहुती प्राप्त होतात (११.५. ६ ८). तिथेच दुसऱ्या एका ठिकाणी अश्वमेधात यजमानाला पुराणवेद ऐकवावा, असे म्हटले आहे. छांदोग्योपनिषदात नारद सनत्कुमाराला आपण किती विद्यांचे अध्ययन केले हे सांगत असताना त्यांत पुराणविद्येचीही गणना करतो (७.१.२). पुढे इतिहास–पुराणांचा पंचमवेद म्हणून गौरव केलेला दिसतो (७.१.४). आश्वलायन गृह्यसूत्रात पुराणपठनाचा उल्लेख अनेकवार आढळतो. तिथे म्हटले आहे–

**यद् ब्राह्मणानि कल्पान् गाथा नाराशंसीरितिहासपुराणानी-त्यमृतस्य कुल्या** । (आश्व. गृह्य. ३·४)

अर्थ – ब्राह्मणे, कल्प, नाराशंसी गाथा आणि इतिहास-पुराणे यांचा स्वाध्याय करणारा गृहस्थ (देव-पितरांना) अमृताची सरिता प्राप्त करून देतो.

त्याच युगातल्या आपस्तंब धर्मसूत्रातही पुराणांचा उल्लेख आहे. महाभारतात पुराणाचा सामान्य रूपाने उल्लेख तर आहेच; शिवाय त्यात पुराणातल्या कथाही घेतल्याचा निर्देश आहे. महाभारताच्या आदिपर्वात (५·२) याविषयी एक श्लोक आहे, तो असा–

**पुराणे हि कथा दिव्या आदिवंशाश्च धीमताम् ।**
**कथ्यन्ते ये पुराऽस्माभिः श्रुतपूर्वाः पितुस्तव ।।**

अर्थ – पुराणांत अनेक दिव्यकथा आणि बुद्धिमान राजर्षी व ब्रह्मर्षी याचे वंश वर्णिलेले आहेत आणि ते सर्व या आधी आम्ही तुझ्या पित्याच्या (लोमहर्षण) मुखातून श्रवण केलेले आहेत.

पुराणांचा गौरव करताना महाभारताने सांगितले आहे, की पुराण, मनुस्मृती, सांग वेद व चिकित्साशास्त्र हे चार ईश्वराज्ञेने सिद्ध असे ग्रंथ आहेत. त्यामुळे तर्काचा आश्रय करून त्यांचे खंडन करणे उचित नव्हे.

रामायणातही अनेक पुराणांचा उल्लेख आहे (वा. रा. १·९.१). मनुस्मृतीत पुराणांचा गौरव आढळतो, तो असा–

**स्वाध्यायं श्रावयेत् पित्र्ये धर्मशास्त्राणि चैव हि ।**
**आख्यानानीतिहासांश्च पुराणानि खिलानि च ।।**

(मनु ३ २३२)

अर्थ – पितृश्राद्धाच्या वेळी निमंत्रित ब्राह्मणांना यजमानाने स्वाध्याय वेद ऐकवावा. तसेच धर्मशास्त्र, आख्यान, इतिहास, पुराणे व खिलसूक्ते ऐकवावी.

याज्ञवल्क्यानेही मनूच्या या उक्तीचा अनुवाद करून अशा स्वाध्यायश्रवणाने देवता व पितर यांची विशेष तृप्ती होते, असे सांगितले आहे (१.४५–४६).

**पुराणांचा उद्गम** – मूळ पुराण किंवा पुराणे कथा, गाथा व राजवंशवर्णन या स्वरूपात विखुरलेली होती. सूत, मागध व बंदी या लोकांच्याकडे त्या पुराणांचा संग्रह होता. हे लोक तत्कालीन राजांचे सेवक होते. राजांच्या वंशावळी सुरक्षित ठेवणे आणि वंशातल्या महान राजांच्या अद्भुत पराक्रमाची आख्याने तयार करून ती विशिष्ट प्रसंगी गाऊन दाखविणे हे त्यांचे काम होते. पद्म पुराणात (१.१.२८) सूतांचा हा धर्म म्हणून सांगितला आहे–

**धर्म एष हि सूतस्य सद्भिर्दृष्टः सनातनः ।**
**देवतानां ऋषीणां च राज्ञां चामिततेजसाम् ।।**
**वंशानां धारणं कार्यं स्तुतीनां च महात्मनाम् ।।**

अर्थ – अमित तेजस्वी अशा देवता, ऋषी व राजे यांच्या वंशावळी ठेवणे, त्या महात्म्यांची (कथाकाव्यांच्या द्वारे) प्रशंसा गाणे, हा सज्जनांनी ठरविलेला सूतांचा सनातन धर्म आहे.

एका बाजूने वैदिक मंत्रांची परंपरा व दुसऱ्या बाजूने सूतांची कथा-गाथांची परंपरा, अशा दोन्ही परंपरा अविच्छिन्नपणे समांतर चालत. वैदिक ऋषी आपल्या सूक्तांतून देवांची स्तुती करीत; तर सूत, मागध हे मानवातल्या श्रेष्ठ पुरुषांची परंपरा गात. म्हणूनच त्यांच्या या प्रशंसात्मक गाथेला वेदांनी नाराशंसी असे म्हटले आहे.

वेदकाळी यज्ञसंस्था हे सामाजिक आणि सांस्कृतिक केंद्र होते. यज्ञामध्ये अश्वमेध हा एक वर्षभर चालणारा यज्ञ असे.

या यज्ञात यजमानाला निरनिराळ्या श्रेष्ठ राजांची चरित्रे ऐकवण्यासाठी सूताला यज्ञमंडपात बोलावले जाई. मग तो भरल्या सभेत वीणेच्या साथीवर श्रेष्ठ राजांच्या स्तुतीची आख्याने गाई. यांनाच पारिप्लव आख्याने अशी संज्ञा होती अश्वमेधाची परंपरा ऋग्वेदकाळापासून चालू असलेली दिसते. पुराणांच्या रचनेचा प्रारंभही त्याच काळात झाला असावा. अश्वमेधाशिवाय द्वादशवार्षिक नावाचे एक सत्र असे. हे सत्र बारा वर्षे चाले. त्यातही पुराण सांगण्यासाठी सूतांना बोलाविले जाई मग ते विविध कथांच्या रूपाने नीती, धर्म, इत्यादीविषयक विचार सांगत. यावरूनही पौराणिक संस्कृती ही वैदिक संस्कृतीशी समांतर असल्याचे कळते.

या दोन्ही संस्कृतींचे साहचर्य यज्ञसंस्थेत झाले. याज्ञिकांनी यज्ञसंस्थेत या गाथा–कथाकारांना एकत्र आणून उभय संस्कृतींचा संगम साधला. या प्रसंगाने वैदिकांच्या मनावर पुराणपरंपरेचा प्रभाव पडला आणि तो त्यांनी मोकळ्या मनाने स्वीकारला. याच यज्ञसंस्थेतल्या ब्रह्मा नामक ऋत्विजाने वेगवेगळ्या सूत-मागधांच्या मुखी असलेल्या कथा–गाथांचा संग्रह केला. त्या संग्रहाला आदिपुराण असे नाव मिळाले. या इतिहासाचे सूचन मत्स्य पुराणातल्या पुढील श्लोकार्धावरून होते––

**पुराणं सर्वशास्त्राणां प्रथमं ब्रह्मणा स्मृतम् ।**

(मत्स्य. पु. ५३·३)

अर्थ – सर्व शास्त्रांना धरून असलेले पुराण पहिल्या प्रथम ब्रह्मदेवाने निर्माण केले.

त्यापुढे पुराणांच्या इतिहासात एका नव्या युगाचा प्रारंभ झाला. भगवान व्यासांनी या ब्रह्मसंग्रहित पुराणाची एक संहिता करून त्या पुराणाला सुव्यवस्थित रूप प्राप्त करून दिले. कोणकोणत्या उपकरणांचा आश्रय करून व्यासाने या पुराणसंहितेचे प्रणयन केले, त्याविषयी विष्णू पुराणात महत्त्वपूर्ण विवरण आहे, ते असे —

**आख्यानैश्चाप्युपाख्यानैर्गाथाभिः कल्पशुद्धिभिः ।**
**पुराणसंहितां चक्रे पुराणार्थविशारदः ।।**

(विष्णू पु. ३.६.१५)

अर्थ – आख्याने, उपाख्याने, गाथा व कल्पशुद्धी या उपकरणांनी युक्त अशी पुराणसहिता पुराणार्थविशारद अशा व्यासाने निर्माण केली.

वरील चार उपकरणाचे संक्षेपात विवेचन असे ––

(१) आख्यान – वक्त्याने स्वयंदृष्ट अशा अर्थाचे किंवा कथाप्रसंगाचे ज्यात वर्णन केलेले असते, ते आख्यान होय.

(२) उपाख्यान – ऐकीव अर्थाचे कथन किंवा परंपरेने श्रवणपथावर आलेल्या कथेचे कथन म्हणजे उपाख्यान होय.

काही विद्वानांच्या मते हा भेद केवळ दृष्ट-श्रुताचा नसून बृहत आणि स्वल्प अशा आकाराचा आहे. आकाराने जे मोठे ते आख्यान व आकाराने जे लहान ते उपाख्यान होय, असे ते म्हणतात. उदा० रामायण हे आख्यान असून, त्यात आलेले सुग्रीवाचे कथानक हे उपाख्यान होय.

(३) गाथा – वेद, ब्राह्मणे आणि उपनिषदे यांत अनेक प्राचीन पद्ये उपलब्ध होतात आणि ती एखाद्या श्रेष्ठ राजाच्या असामान्य शौर्याची आणि प्रभूत दानाची प्रशंसा करतात. ऐतरेय ब्राह्मणात (८·३१) ऐंद्र महाभिषेकाच्या प्रसंगाने अशा अनेक राजस्तुतिविषयक गाथा समाविष्ट केलेल्या आहेत. त्या गाथा कुणी रचल्या त्यांची नावनिशी कळत नाही; पण तरीही त्या लोकप्रसिद्ध होत्या. त्यांना श्लोक असेही म्हणत. पुराणांमध्येही अशा अनेक गाथांचा आढळ होतो. कधी कधी अशा एकाच लहानशा गाथेच्या उदरात एक मोठा इतिहास किंवा आख्यान लपून राहिलेले दिसते. या गाथा अतिप्राचीन काळाशी संबद्ध असत आणि तत्कालीन राजेमहाराजे यांच्या सद्‌गुणांचे वर्णन करणाऱ्या असत.

(४) कल्पशुद्धी – या शब्दाच्या अर्थासंबंधी बरेच मतभेद आहेत. काही ठिकाणी कल्पशुद्धीच्या जागी कल्पजोक्ती असाही पाठभेद आढळतो; पण त्यानेही खऱ्या अर्थावर काही प्रकाश पडत नाही. पं. मधुसूदन ओझा हे कल्प शब्दाचा अर्थ कल्प नामक वेदांग असा करतात व कल्प शब्दात श्रौतसूत्र, गृह्यसूत्र, धर्मसूत्र, सदाचार व संस्कार या सर्वांचा अंतर्भाव करतात. शुद्धिपदाने त्यांना धर्मशास्त्रात सांगितलेली सहा प्रकारची शुद्धी अपेक्षित आहे.

वरील चार उपकरणाचे आश्रयण करून व्यासांनी आपली पुराणसंहिता तयार केली.

रोमहर्षण नावाचा सूत व्यासांचा एक प्रमुख शिष्य होता. व्यासांनी स्वनिर्मित पुराणसंहिता त्याला शिकविली. रोमहर्षणाचे सुमती, अग्निवर्चा, मित्रायू, शांशपायन, अकृतव्रण व सावर्णी असे सहा शिष्य होते. रोमहर्षणाने आपल्याला मिळालेली पुराणसंहिता या शिष्यांना पढवली. यांतील शेवटच्या तीन शिष्यांनी आपापल्या नव्या पुराणसंहिता तयार केल्या आणि रोमहर्षणाला मिळालेली धरून चार पुराणसंहिता निष्पन्न झाल्या. या घटनेचा उल्लेख विष्णू (३.६.१७–१९) व अग्नी (२७१. ११–१२) या पुराणांनी केला आहे.

व्यासकृत मूल पुराणाची अठरा पुराणे कशी झाली, याविषयी भागवताच्या मत्सरंजनी टीकेत पुढील कथा दिली आहे –

**त्रय्यारुणिकश्यपसावर्ण्यकृतव्रणवैशंपायनहारीतेभ्य षड्भ्य षट् पुराणानि । रोमहर्षणाच्चत्वारि । व्यासात् सप्त । एवं**

**सप्तदश पुराणानि व्यासाश्रमेऽधीत्य भागवतं शुको वदिष्य- तीति व्यासाज्ञप्त उग्रश्रवा अपि शुकमुखात् शुश्राव।**

अर्थ – (रोमहर्षणाचा पुत्र उग्रश्रवा,) तो त्र्य्यारुणिकश्यपादी सहा रोमहर्षणशिष्याकडून सहा पुराणे पढला. रोमहर्षणाकडून चार व व्यासांकडून सात अशा एकूण सतरा पुराणांचे अध्ययन त्याने व्यासाश्रमात केले. अठरावे पुराण भागवत होय. 'ते पुराण तुला शुक सांगेल', असे व्यासांनी सांगितले. त्याप्रमाणे उग्र- श्रव्याने भागवतपुराण शुकमुखातून श्रवण केले. (अशा प्रकारे अठरा पुराणे उग्रश्रव्याला प्राप्त झाली.)

अशा या अठरा पुराणसंहिता निर्माण होऊन त्या आदिपुराणे म्हणून प्रसिद्धीस आल्या. ही सर्व आदिपुराणे व्यासोक्त मानली गेली. ही आदिपुराणे मुळात प्रत्येकी १२ हजार श्लोकांची होती, असे भविष्य पुराणात म्हटले आहे (भविष्य पु ब्राह्म. १). त्यात अनेक आख्याने व उपाख्याने यांची भर पडून ती खूप वाढली व त्यांना सद्यःस्वरूप प्राप्त झाले. पुराणाची ही अभिवृद्धी सूतांनी घडवून आणली.

**पुराणांची वाढ** – विक्रमादित्य (इ. स. पूर्व ५७) मरण पावल्यावर काही वर्षांनी या वृद्धीच्या कार्याला प्रारंभ झाला याविषयीचे भविष्य पुराणातील श्लोक असे–

> **शौनकाद्यास्तु ऋषयो ज्ञात्वा भूपस्य स्वर्गतिम् ।**
> **गत्वा सूतं प्रणम्योचुर्धर्मं मुख्यं वदाधुना ।।**
> **तेभ्यः सूतः पुराणानि श्रावयामास वै पुनः ।**
> **शतवर्षं पञ्चलक्षश्लोकमध्यापयन्मुदा ।।**
> **ते श्रुत्वा मुनयः सर्वे जग्मुर्हृष्टाः स्वमालयम् ।।**
>
> (भविष्य पु. अति. २. २३).

अर्थ – (विक्रम) राजा स्वर्गवासी झाल्यावर शौनकादी ऋषी सूताकडे गेले व त्याला नमस्कार करून म्हणाले, 'आता आम्हांला मुख्य धर्म सांग' मग सूताने त्यांना शंभर वर्षेपर्यंत पुराणे पुन्हा ऐकवली व त्या पंचलक्षात्मक पुराणसंहिता त्यांना आनंदाने शिकवल्या. त्या ऐकून ते सर्व मुनी हर्षित होऊन आपापल्या निवासस्थानी गेले.

वरील पाच लक्ष सख्येपैकी एक लक्ष श्लोकाचे महाभारत व चार लक्ष श्लोकांची मिळून सर्व पुराणे असा तो संख्याविभाग समजावा. पुराणांची ही वाढ सूताने (सूतपरंपरेतल्या पौरा- णिक वर्गाने) केली, हेही त्यावरून समजते. मत्स्य पुराणाच्या मतेही सर्व पुराणांची मिळून चार लक्ष श्लोकसंख्या भरते. महाभारतात मत्स्य पुराणाचा उल्लेख केला आहे व त्यात वन- पर्वातली प्रलयकथा मत्स्य पुराणावरूनच घेतली आहे. मत्स्य पुराणाप्रमाणेच वायु पुराणाचा उल्लेखही महाभारतात आहे व अनुशासन पर्वातील १४३ ते १४६ हे चार अध्याय ब्रह्म पुराणातून घेतल्याचे सांगितले आहे (म.भा. अनु. १४३.१८). त्यावरून पुराणाची ही वाढ इ. स. च्या प्रारंभीच झाली असावी, असे अनुमान करता येते.

पुढे गुप्तकाळापासून हर्षवर्धनाच्या काळापर्यंत (इ. स. ४०० ते ८००) पुराणात आणखी भर पडली. याच काळात भविष्य पुराणात भविष्यकालीन म्हणून सांगितलेल्या राजांच्या वंशावळी पुराणात पुनश्च समाविष्ट करण्यात आल्या. इ. स. ८०० ते १२०० हा हिंदू राजांच्या अखेरीचा काळ होय. या काळात पुराणांची आणखी वाढ झाली. मुसलमानी सत्तेच्या काळात आणि त्यानंतर इंग्रजांनी मुंबई बेट घेईपर्यंतच्या काल- खंडातही थोडी थोडी भर पडतच राहिली. बायबलमधला अडाम व अब्राहाम याच्यासंबंधीचा भाग भविष्य पुराणात घातला गेला, तो याच काळात. लॉर्ड रे, व्हिक्टोरिया (विकटा- वती) इ. इंग्रज व्यक्तींची नावे तर त्यात आहेतच; शिवाय गुरुंड (इंग्रजी) भाषेतले शब्द असलेला एक श्लोकही दिलेला आहे तो असा —

> **रविवारे च संडे च फाल्गुने चैव फर्वरी ।**
> **षष्टिः सिक्स्टीति च ज्ञेया तदुदाहरमीरितम् ।।**
>
> (भविष्य प्रति. १.६.३७)

**अर्थ** — रविवार म्हणजे संडे, फाल्गुन म्हणजे फेब्रुवारी, साठ म्हणजे सिक्स्टी, असे उदाहरणादाखल जाणावे.

पुराणातले हे निरर्थक भरताड पाहून तर्कतीर्थ लक्ष्मण- शास्त्री जोशी म्हणतात – या कालखंडात पौराणिक वाङ्मयात अस्ताव्यस्तपणे भेसळ झाली आहे. त्यामुळे पुराणाचे धर्मेतिहास व भारतीयांचा अतिप्राचीन इतिहास या दृष्टीने असलेले महत्त्व नष्टप्राय झाले आहे. अज्ञानी, पोटभरू व मूर्ख भिक्षुक वृत्तीच्या ब्राह्मणांनी पुराणाच्या शुद्ध स्वरूपाला बिघडून टाकले, तो हाच काळ होय.

**संख्या आणि वर्गीकरण** — प्राचीन कालापासून पुराणांची संख्या अठरा मानली गेली आहे. महापुराणे आणि उपपुराणे असे त्यांचे वर्गीकरण आहे. दोन्ही वर्गांतल्या पुराणांची संख्या अठराच आहे.

महापुराणे — ब्रह्म, पद्म विष्णु, शिव, भागवत (काहींच्या मते देवी भागवत), नारदीय, मार्कंडेय, अग्नी, भविष्य, ब्रह्म- वैवर्त, लिंग, वराह, स्कंद, वामन, कूर्म, मत्स्य, गरुड व ब्रह्मांड ही अठरा महापुराणे होत देवी भागवतात प्रत्येक पुराणाचे आद्याक्षर घेऊन अठरा पुराणांचा एक श्लोक बनवला आहे, तो असा —

> **मद्वयं भद्वयं चैव ब्रत्रयं वचतुष्टयम् ।**
> **अनापलिंगकूस्कानि पुराणानि पृथक् पृथक् ।।**

**अर्थ** — मद्वय – मत्स्य, मार्कंडेय; भद्वय – भागवत, भविष्य; ब्रत्रय—ब्रह्म, ब्रह्मवैवर्त, ब्रह्मांड; वचतुष्टय – वामन, विष्णू, वायू, वराह; अ – अग्नी, ना – नारद, प—पद्म, लिं – लिंग, ग—गरुड, कू – कूर्म व स्क – स्कंद मिळून अठरा पुराणे पृथक पृथक समजावी.

भागवत पुराणानुसार अठरा पुराणांची श्लोकसंख्या पुढीलप्रमाणे — ब्रह्म १० हजार, पद्म ५५ हजार, विष्णू २३ हजार, शिव २४ हजार, भागवत १८ हजार, नारद २५ हजार, मार्कंडेय ९ हजार, अग्नी १५४००, भविष्य १४५००, ब्रह्मवैवर्त १८ हजार, लिंग ११ हजार, वराह २४ हजार, स्कंद ८११००, वामन १० हजार, कूर्म १७ हजार, मत्स्य १४ हजार, गरुड १९ हजार व ब्रह्मांड १२ हजार. ही सर्व श्लोकसंख्या सुमारे ४ लक्ष भरते. देवीभागवत, मत्स्य व अग्नी या पुराणांत दिलेल्या अठरा पुराणांच्या श्लोकसंख्येत काही फरक आहे.

उपपुराणे— नारसिंह, नारदीय, इत्यादी १८ होत. (उपपुराणे पाहा).

पद्म पुराणात (उत्तर. २६३ ८१–८४) सत्त्वादी गुणभेदाने पुराणांचे वर्गीकरण केले आहे, ते असे—

सात्त्विक – विष्णू, नारद, भागवत, गरुड, पद्म व वराह.
राजस – ब्रह्मांड, ब्रह्मवैवर्त, मार्कंडेय, भविष्य, वामन व ब्रह्म.
तामस – मत्स्य, कूर्म, लिंग, शिव, स्कंद व अग्नी.

यांतील वर्ण्य देवता कोणत्या ते मत्स्य पुराणाने पुढील श्लोकांत सांगितले आहे –

**सात्त्विकेषु पुराणेषु माहात्म्यमधिकं हरेः ।**
**राजसेषु च माहात्म्यमधिकं ब्रह्मणो विदुः ।।**
**तद्वदग्नेश्च माहात्म्यं तामसेषु शिवस्य च ।**
**सङ्कीर्णेषु सरस्वत्याः पितृणां च निगद्यते ।।**

(मत्स्य पु. ५३·६८–७९)

**अर्थ** — सात्त्विक पुराणांत विष्णूचे, राजस पुराणांत ब्रह्मदेवाचे व तामस पुराणांत शिव व अग्नी यांचे माहात्म्य अधिक असून, त्या बाहेरच्या संकीर्ण पुराणांत सरस्वती व पितर यांचे माहात्म्य सांगितले आहे.

**पुराणलक्षण** – सर्वमान्य असे पुराणांचे लक्षण पुढीलप्रमाणे—

**सर्गश्च प्रतिसर्गश्च वंशो मन्वन्तराणि च ।**
**वंशानुचरितं चेति पुराणं पञ्चलक्षणम् ।।**

**अर्थ** — सृष्टी, प्रलय, राजवंश, मन्वंतरे आणि राजे व महर्षी यांच्या वंशांत उत्पन्न झालेले महापुरुष यांचे वर्णन करणे, असे पुराणांचे पंचविध लक्षण आहे.

वरील पाच लक्षणांचे क्रमाने विवरण असे —

(१) सर्ग — सर्ग म्हणजे सृष्टिविस्तार किंवा सृष्टिविद्या



होय. पुराणांनी हा विषय विस्ताराने मांडला आहे. पौराणिक सृष्टिविद्येवर सांख्यदर्शनाचा विशेष प्रभाव आहे. पण पौराणिक सृष्टितत्त्व हे सांख्यदर्शनाचा केवळ अनुवाद नाही. सांख्यदर्शनात सृष्टीचा विकास प्रकृती व पुरुष या दोन तत्त्वांच्या परस्परसंयोगाचे फल असल्याचे सांगितले आहे. सांख्य ही दोन्ही तत्त्वे अनादी व नित्य मानतात, पण पुराणांनी मात्र ही दोन्ही तत्त्वे एका विष्णूचीच दोन रूपे मानलेली आहेत. सांख्यदर्शनाहून पुराणाचे हे पृथक्त्व पुढील श्लोकात व्यक्त झाले आहे —

**विष्णोः स्वरूपात्परतो हि ते द्वे रूपे प्रधानं पुरुषश्च विप्र ।।**
**तस्यैव तेऽन्येन धृते वियुक्ते रूपान्तरं यद् द्विज कालसंज्ञम् ।**

(विष्णू पु. १·२·२४)

**अर्थ** — विष्णूच्या परम स्वरूपापासून प्रधान व पुरुष ही दोन रूपे उत्पन्न होतात. आणि त्याच्याच कालसंज्ञक तिसऱ्या रूपाच्या द्वारे सृष्टिकाली ती दोन्ही संयुक्त होऊन प्रलयकाळी वियुक्त होतात.

श्रीविष्णू आपल्या कालशक्तीच्या द्वारा विश्वाचे सृष्टि-प्रलय घडवून आणतो. कालालाच निमित्त करून विष्णू लीलया स्वतःच्या ठिकाणी स्वतःच सृष्टिरूपाने प्रकट होतो व अंती हा विश्वपसारा स्वत.मध्येच विलीन करून आपल्या निजरूपात स्थित होतो.

ही जी सृष्टी आब्रह्मस्तंबपर्यंत विस्तार पावते, तिचे तीन मुख्य प्रकार पुराणांनी सांगितले आहेत. त्यांना प्राकृत सर्ग, वैकृत सर्ग व प्राकृत-वैकृत सर्ग अशी नावे आहेत. प्राकृत सर्ग हा अबुद्धिपूर्वक होत असतो. म्हणजे प्राकृत सृष्टी ही नैसर्गिक नियमांनी बनत असते. तिच्यासाठी ब्रह्मदेवाला आपली बुद्धी वापरावी लागत नाही. वैकृत व प्राकृत-वैकृत हे दोन सर्ग मात्र ब्रह्मदेवाच्या बुद्धिसामर्थ्याने उत्पन्न होत असतात. प्राकृत सर्गाची संख्या तीन, वैकृत सर्गाची पाच व प्राकृत-वैकृत सर्गाची एक, अशा प्रकारे हे सगळे मिळून नऊ सर्ग होतात. त्यांची माहिती श्री. बलदेव उपाध्याय यांनी पुढीलप्रमाणे दिली आहे –

ब्रह्मसर्ग — (प्राकृतापैकी पहिला) महत्तत्त्व किंवा बुद्धी हिच्या सर्गाला हे नाव आहे. सांख्यदर्शनाप्रमाणे महत्तत्त्व हाच प्रकृति–पुरुषांच्या संयोगाचे पहिले फल आहे.

भूतसर्ग — (प्राकृतापैकी दुसरा) पंच तन्मात्रांच्या सृष्टीला हे नाव आहे. तन्मात्रा म्हणजे पृथिव्यादी पंच भूतांच्या अत्यंत सूक्ष्मावस्थेचे द्योतक तत्त्व होय.

वैकारिकसर्ग — (प्राकृतापैकी तिसरा) इंद्रियसृष्टीला हे नाव आहे. पाच ज्ञानेंद्रिये, पाच कर्मेंद्रिये व संकल्पविकल्पात्मक मन मिळून ही अकरा इंद्रियांची सृष्टी असते.

मुख्यसर्ग — (वैकृतापैकी पहिला) हा अविद्यारूप सर्ग आहे. तम. (अज्ञान), मोह, महामोह (भोगेच्छा), तामिस्र (क्रोध) व अंधतामिस्र (अभिनिवेश), अशी ही पंचपर्वा अविद्या असते. ही तमोगुणी सृष्टी असून, ती ब्रह्मदेवाच्या ध्यानातून अबुद्धिपूर्वक उत्पन्न होते. ही उत्पन्न झाल्यानंतर ब्रह्मदेव पुनश्च ध्यान करतो. त्या ध्यानातून ज्ञानशून्य व अंतर्बाह्य तमोमय अशी वृक्ष, गुल्म, लता, तृण व वीरुध (वेलीचा एक प्रकार) अशी पाच प्रकारची जडसृष्टी निर्माण होते. भूतलावर स्थावर स्वरूपात ती दिसत असल्यामुळे तिला मुख्यसर्ग म्हटले.

तिर्यक्सर्ग — (वैकृतापैकी दुसरा) वरील सृष्टी ही पुरुषार्थसाधक नाही, असे ब्रह्मदेवाच्या अनुभवाला येताच त्याने पुनश्च ध्यान केले व त्यातून तिर्यग्योनीतले पशू व पक्षी हे उत्पन्न झाले. अशा प्रकारे स्थावरानंतर हा जंगम सृष्टीचा आविष्कार झाला.

देवसर्ग — (वैकृतापैकी तिसरा) वरील तिर्यग्योनीच्या सृष्टीनेही ब्रह्याचे समाधान झाले नाही. म्हणून त्याने देवसृष्टीची उत्पत्ती केली. हा देवसर्ग ऊर्ध्व लोकात निवास करणारा, सात्त्विक आणि अंतर्बाह्य प्रकाशमय असा झाला.

मानुषसर्ग — (वैकृतापैकी चौथा) त्यानंतर ब्रह्मदेवाने पुनश्च ध्यान करून पृथ्वीवर भ्रमण करणारा, सत्त्वरजतमोमय असा मनुष्यांचा सर्ग निर्माण केला. हा सर्ग सत्त्वगुणाच्या उद्रेकामुळे आभ्यंतर ज्ञानाने संपन्न असतो, रजोगुणाच्या उद्रेकामुळे कार्यव्यापृत असतो आणि तमोगुणाच्या उद्रेकामुळे अनेक दुःखे भोगतो.

अनुग्रहसर्ग — (वैकृतापैकी पाचवा) हा सर्ग विपर्यय, सिद्धी, शांती व तुष्टी असा चार प्रकारचा असतो. विपर्यय (विपरीत होणे) स्थावरात, सिद्धी मनुष्यात, शक्ती तिर्यग्योनीत व तुष्टी देव सृष्टीत राहते.

कौमार सर्ग — (प्राकृत–वैकृताचा) या शब्दाने सनत्कुमारांची सृष्टी सांगितली आहे. सनत्कुमार हे विष्णूचेच अवतार मानले गेले आहेत.

(२) प्रतिसर्ग — हे पुराणांचे दुसरे लक्षण आहे. प्रतिसर्ग म्हणजे प्रलय होय. हा चार प्रकारचा असतो. नैमित्तिक, प्राकृत, आत्यंतिक व नित्य अशी त्यांची नावे आहेत. भागवत पुराणात (१२·४) हा विषय विशदपणे वर्णिलेला आहे. त्याचा सारांश असा —

एक हजार युगचौकड्या म्हणजे ब्रह्मदेवाचा एक दिवस होतो. यालाच कल्प असे म्हणतात. या कल्पाचा अंत झाल्यावर ब्रह्मदेवाची तेवढीच रात्र चालू होते. या रात्रीत जगाचा प्रलय होतो. या प्रलयात भूः, भुवः, स्वः हे तीन लोक बुडून जातात. पण त्यावरचे चार लोक तसेच राहतात या प्रलयाच्या वेळी ब्रह्मदेव साऱ्या विश्वाला स्वतःच्या ठिकाणी विलीन करून झोपी जातो ब्रह्याच्या शयनाचे निमित्त करून होणारा प्रलय म्हणून याला नैमित्तिक प्रलय असे म्हणतात.

प्राकृत प्रलय नैमित्तिक प्रलयापेक्षा अधिक वर्षांनी होत असतो. ब्रह्मदेवाचे आयुष्य त्याच्या दिनमानाप्रमाणे शंभर वर्षांचे असते ते समाप्त होताच एक महाप्रलय उपस्थित होतो. त्या वेळी महत्तत्त्वापासून पृथ्वीपर्यंत सर्वांचा प्रकृतीत विलय होतो आणि पंच महाभूतांच्या मिश्रणाने बनलेले हे समस्त ब्रह्मांड आपले स्थूल रूप सोडून कारण रूपात अवस्थित राहते. त्या वेळी फक्त प्रकृतीच तेवढी अवशिष्ट राहते. ती अव्यक्त, अनादी, अनंत, नित्य व अविनाशी असते. पण कालप्रभावाने तिची शक्ती क्षीण झाल्यामुळे तीही आपल्या मूल कारणात विलीन होऊन राहते.

आत्यंतिक प्रलयाला कालाचे नियमन नसते. तो या क्षणीही होऊ शकतो किंवा कोटी कोटी वर्षांच्या कालातही होत नाही. तो घडून येण्याची सामग्री जेव्हा उपस्थित होते, तेव्हा तो होतो.

पुराणांच्या मते सृष्टी जशी नित्य आहे, तसाच प्रलयही नित्य आहे. ज्ञानी लोक म्हणतात, की आब्रह्मस्तम्बपर्यंत जे जे म्हणून प्राणी किंवा पदार्थ असतात, ते सारखे उत्पन्न होत असतात आणि मरतही असतात. संसारातला प्रत्येक पदार्थ प्रतिक्षण बदलत असतो. पण हे बदलणे सूक्ष्म असल्यामुळे स्थूल दृष्टीला दिसत नाही. ते बुद्धीलाही स्पष्ट रूपाने ग्रहण करता येत नाही. बहुतेक सर्व पुराणांतून या नित्य प्रलयाबद्दल कमी अधिक वर्णने आढळतात.

(३) मन्वंतर — मन्वतराची व्याख्या अशी — 'मन्वन्तरं तु दिव्यानां युगानामेकसप्ततिः । = एकाहत्तर दिव्य युगांचा काळ म्हणजे मन्वन्तर होय, ही अमरकोशातली व्याख्या असून, ती पुराणावरूनच घेतली आहे. पुराणमते मनुष्यमानाने एक युगचौकडी ४३ लाख २० हजार वर्षांची होते. अशा १ हजार युगचौकड्या संपल्यावर ब्रह्मदेवाचा १ दिवस होतो. या एका दिवसालाच कल्प असे म्हणतात. एका कल्पात १४ मनू होतात. एक मनू संपल्यावर दुसरा मनू उदयाला येईपर्यंत जो मधला काळ जातो, त्याला एक मन्वंतर असे म्हणतात. ३० कोटी ६७ लाख २० हजार इतक्या मानव वर्षांचे हे मन्वंतर असते. पुराणांची ही मन्वंतर गणना ज्योतिःशास्त्रालाही जुळणारी आहे. मन्वंतरांची नावे १४ असून, ती विष्णू व भागवत या पुराणांत पुढीलप्रमाणे सांगितली आहेत – स्वायंभुव, स्वारोचिष, उत्तम, तामस, रैवत, चाक्षुष, वैवस्वत, सावर्णी, दक्षसावर्णी, ब्रह्मसावर्णी, धर्मसावर्णी, रुद्रसावर्णी, देवसावर्णी किंवा रुची व इंद्रसावर्णी किंवा भौम

प्रत्येक मन्वंतरात बहुतेक पुराणांच्या मते पाच आणि भागवत पुराणाच्या मते सहा अधिकारी असतात. विशिष्ट कार्य संपादित करण्यासाठी ते येतात आणि ते कार्य समाप्त करून मन्वंतर बदलताच आपला अधिकार सोडून निवृत्त होतात. त्यांच्या जागी मग दुसरे अधिकारी येतात. या अधिकाऱ्यांची नावे मनू, सप्तर्षी, देव, इंद्र व मनुपुत्र अशी आहेत. भागवतात विष्णूच्या एका अंशावताराची कल्पना करून पाचांच्या जागी सहा अधिकारी दिले आहेत, तो श्लोक असा–

मन्वन्तरं मनुर्देवा मनुपुत्राः सुरेश्वराः ।
ऋषयोंऽशावताराश्च हरेः षड्विधमुच्यते ।।
(भाग. पु. १२·७·१५)

**अर्थ–** मनू, देव, मनुपुत्र, इंद्र, ऋषी व अंशावतार असे हे श्रीविष्णूच्या अंशभूत अधिकाऱ्यांचे षड्विध मन्वंतर होते.

पुराणानी प्रत्येक मनूला एका विशिष्ट प्रदीर्घ कालखंडासाठी सम्राट किंवा शास्ता मानले असून, त्याला विष्णूचा सात्त्विक अंश म्हटले आहे (विष्णू पु. ३·२·५४). हे मनू मनुष्यांची धर्ममर्यादा स्थापित करण्यासाठी आणि त्या त्या कालाचा धर्म सांगणारी स्मृती करण्यासाठी जन्म घेतात. एक युगचौकडी समाप्त झाल्यानंतर वेदांचा लोप होतो. त्या वेळी पुनश्च वेदांचे प्रवर्तन करून राष्ट्रहित साधण्यासाठी सप्तर्षी स्वर्गातून भूतलावर उतरतात. मनुपुत्र हे क्षत्रिय राजे होत. त्यांना मनुपुत्र अशासाठी म्हटले, की ते परंपरेने मनूचे वंशज असतात. ते आपल्या शासनकालात मनुप्रणीत धर्माचा आश्रय करून व दंडनीतीला अनुसरून प्रजांचे संरक्षण करतात. मनूच्या व्यवस्थेत द्विजांसाठी यज्ञयाग विहित आहेत. त्या यज्ञयागांचा हविर्भाग सेवन करण्यासाठी देव उत्पन्न होतात आणि देवांचा राजा इंद्रही नवा होतो. तो सृष्टीच्या अभ्युदयासाठी जलवृष्टी करून धान्ये आणि वृक्ष-वनस्पती यांची अभिवृद्धी करतो. विष्णूच्या अंशावताराचे कार्य अधर्माचा नाश आणि धर्माचे संरक्षण हे असते. अशी ही प्रत्येक मन्वंतराची रचना असते.

(४–५) वंश व वंशानुचरित– हे पुराणांचे चौथे व पाचवे लक्षण होय.

पुराणामध्ये ज्या वंशांचे वर्णन उपलब्ध होते, त्या सर्वांचा प्रारंभ मनूपासून होतो. मनूची संतती असल्यामुळे सर्व मनुष्यांना मानव ही संज्ञा प्राप्त झाली आहे. मनूंची संख्या चौदा आहे; पण वंशनिर्मिते या दृष्टीने स्वायंभुव आणि वैवस्वत हे दोन मनूच विशेष महत्त्वाचे आहेत. स्वायंभुव हा पहिला मनू असून, वैवस्वत हा सातवा आहे. स्वायंभुव मनू हा ब्रह्मदेवाचा प्रथम पुत्र असून, या भूमीचा पहिला सम्राट होता. शतरूपा ही त्याची पत्नी होती. त्या दंपतीच्या पोटी प्रियव्रत व उत्तानपाद असे दोन पुत्र जन्मले. प्रियव्रताला आग्नीध्र, इध्मजिव्ह, यज्ञबाहू, महावीर, हिरण्यरेता, घृतपृष्ठ, सवन, मेधातिथी, वीतिहोत्र व कवी असे दहा पुत्र झाले. या दहांपैकी सात पुत्र हे सात द्वीपांचे अधिपती झाले आणि तीन पुत्र नैष्ठिक ब्रह्मचारी राहिले. प्रियव्रताला दुसऱ्या राणीच्या ठायी उत्तम, तामस व रैवत असे तीन पुत्र झाले व ते क्रमाने तिसऱ्या, चौथ्या व पाचव्या मन्वंतराचे अधिकारी बनले. उत्तानपादाला सुनीतीच्या ठायी ध्रुव व सुरुचीच्या ठायीउत्तम असे दोन पुत्र झाले. त्यांनीही काही काल पृथ्वीवर राज्य केले.

या वंशाचा प्रादुर्भाव अतिप्राचीन काली झाला. या वंशात अनेक बलशाली व यशस्वी असे राजे झाले. या राजात प्रियव्रत, ऋषभ, नाभी, भरत, ध्रुव, भद्राश्व, पृथू, इ. भूपतींची नावे प्रख्यात आहेत.

वैवस्वत मनूच्या वंशाचे वर्णन हा पौराणिक इतिहासाचा मेरुदंड आहे. मनू हा सूर्य व सोम या दोन्ही वंशांचा प्रणेता आहे. इक्ष्वाकू, नाभाग, नृग, धृष्ट, शर्याती, नरिष्यत, प्रांशू, नाभानेदिष्ट, करुष व पृषध्र हे वैवस्तव मनूचे दहा पुत्र होत. या दहा पुत्रांनी भारतवर्षाच्या भिन्न भिन्न प्रदेशांत जाऊन आपली राज्ये स्थापली. त्यांची माहिती श्री. बलदेव उपाध्याय यांनी दिली आहे, ती अशी–

इक्ष्वाकू हा मनूचा उत्तराधिकारी व सूर्यवंशाचा पहिला पुरुष होय. त्याने अयोध्या ही राजधानी करून भारताच्या मध्यदेशावर राज्य केले. नाभानेदिष्टाने वैशाली येथे राहून बिहारमध्ये सत्ता गाजवली. करुषाने बिहारच्या नैर्ऋत्येस आणि तिथून शोण नदीच्या तीरापर्यंत आपले राज्य स्थापले. धृष्टाने व त्याच्या वंशजानी पूर्व पंजाबवर आपली सत्ता गाजवली. शर्यातीने आनर्त देशात (उ. सौराष्ट्र) आपले राज्य गाजवले. नरिष्यंताचे वंशज भारतवर्षाच्या बाहेर मध्य एशियापर्यंत जाऊन तिकडचे राजे बनले व शक या नावाने प्रसिद्ध झाले. नृगानेही चर्मण्वती नदीच्या प्रदेशात आपले राज्य निर्माण केले. पृषध्र व प्रांशू यांचे विशेष राज्यवृत्त उपलब्ध होत नाही. इक्ष्वाकुवंशात पृथू, बृहदश्व, मांधाता, अंबरीष, युवनाश्व, हरिश्चंद्र, दिलीप, भगीरथ, रघू, राम, इ. महापुरुष निर्माण झाले.

वैवस्वत मनूला इला नावाची एक कन्या होती. तिचा विवाह सोमपुत्र बुधाशी झाला. त्याचा पुत्र पुरूरवा हा सोमवंशाचा प्रवर्तक ठरला. याची राजधानी प्रतिष्ठानपुर ही प्रयाग क्षेत्राजवळ होती. सांप्रत तिलाच झूंसी असे नाव आहे. पुरूरव्याला आयू व अमावसू असे दोन पुत्र झाले आयूने प्रतिष्ठानपुरावर राज्य केले आणि अमावसूने कान्यकुब्ज प्रदेशावर

सत्ता स्थापली. आयूला पाच पुत्र झाले. त्यापैकी नहुष हा पहिला पुत्र होय. नहुषाचा मुलगा ययाती. त्याने देवयानी व शर्मिष्ठा य च्याशी लग्ने केली व त्याला देवयानीच्या ठायी यदू व तुर्वसू आणि शर्मिष्ठेपासून द्रुह्यू, अनू व पुरू मिळून पाच पुत्र झाले. या पाचही पुत्रांपासून पाच प्रसिद्ध क्षत्रिय वंशाचा उदय झाला.

यापैकी पुरूची वंशवेल पुराणानी विस्तारपूर्वक दिली आहे. या वंशात ययाती, दुष्यंत, भरत, रंतिदेव, हस्ती, कुरू, शंतनू व पुढे कौरव–पांडव असे प्रख्यात पुरुष निर्माण झाले.

महाभारतोत्तर राजवंशाचे विवेचन श्री. बलदेव उपाध्याय पुढीलप्रमाणे करतात – महाभारतोत्तर राजवंशाचे पौराणिक विवरण महाभारतपूर्व वंशावळीपेक्षा अधिक प्रामाणिक आहे. शुंग, कण्व, आन्ध्र, इ. वंशांच्या ऐतिहासिक ज्ञानाचा मुख्य आधार पुराणेच आहेत. पुराणे नसती तर अन्य स्रोतांतून या महान राजवंशातली चार–दोन नावेच आणि तीही बहुधा संदिग्ध रूपातच आपल्याला कळू शकली असती. या कालखंडातले पौराणिक वंशवृत्त मुद्रा व अभिलेख या संशोधित साधनाच्या द्वारे आता बव्हंशी प्रमाणित ठरले आहे. कलियुगातल्या अराजकतेचे व पडझडीचे वर्णन हे हूणांनी केलेल्या विध्वंसाचे व अत्याचाराचेच प्रतिबिंब ठरते.

पार्जिटर या पुराणसंशोधकाच्या मते कलियुगातील राजवृत्ताचे संकलन पहिल्याप्रथम भविष्य पुराणात केले गेले व त्याच्या आधारावर पुन्हा मत्स्य, वायू, ब्रह्मांड, विष्णू, गरुड व भागवत या पुराणांनी कमी–अधिक स्वरूपात तेच संकलित केले. पुराणातील राजवंशांच्या वृत्तांताचे संकलन भाट-चारणांच्या परंपरेत चालत असलेल्या आख्यायिकांच्या आधारावर केले गेलेले आहे. या संकलनात प्रायः मगध या केंद्रातून देशाच्या सर्व दिशांना शासन करणाऱ्या राजांच्या वृत्तांतावरच विशेष लक्ष दिले आहे.

बृहद्रथ या राजाने राजगृह येथे मगध साम्राज्याची स्थापना केली. हा जरासंधाचा वंशज होता. पुराणमते बार्हद्रथ वंशाच्या ३२ राजांनी मगधावर सुमारे १ हजार वर्षे राज्य केले. प्रद्योत हा अवंतीचा राजा होय. त्या वंशातल्या पाच राजांनी त्या प्रदेशावर १३८ वर्षे राज्य केले. शिशुनाग वंश हादेखील मगधातलाच राजवंश होय. या वंशाने प्रद्योत वंशाच्या समाप्तीनंतर ३२१ वर्षे राज्य केले. या वंशाचा अंतिम राजा महापद्मनंद हा होता. या वंशाचे उन्मूलन चाणक्याच्या साहाय्याने चंद्रगुप्ताने केले. चंद्रगुप्त हा मौर्य होता. त्याच्यापासूनच मौर्य राजवंशाचा प्रारंभ झाला. या वंशात बृहद्रथापर्यंत ८ किंवा १० राजे झाले, असे भिन्न भिन्न पुराणांवरून कळते. मौर्यांनी १३७ वर्षे राज्य केले. त्यानंतर शुंग वंशाची सत्ता सुरू झाली. शुंग वंशाचा संस्थापक पुष्यमित्र हा होय. देवभूमी किंवा देवभूती हा या वंशातला शेवटचा राजा होय. या वंशातील राजांनी ११२ वर्षे राज्य केले. शुंग वंशातल्या शेवटच्या देवभूमीला मारून त्याचा अमात्य वसुदेव याने मगधाचे राज्य मिळवले. तोच कण्व राजवंशाचा संस्थापक होय. तो धरून या राजवंशात ४ राजे झाले व त्यांनी ४५ वर्षे राज्य केले. आंध्रांनी या राजवंशाचा अंत केला. या आंध्रांनाच सातवाहन असे म्हणतात. सिमुक हा आंध्र वंशाचा संस्थापक होय. सिमुकापासून पुलुमायीपर्यंत ३ राजांची नावे पार्जिटरने मत्स्य पुराणाच्या विभिन्न पाठांच्या आधारे दिली आहेत. मत्स्य पुराणाच्या मते या राजवंशाने ४५० वर्षे (वायू पुराणाच्या मते ३०० वर्षे) राज्य केले. आंध्र राजवंशाचा सविस्तर वृत्तांत मत्स्य पुराणात मिळतो आणि तो इतिहासालाही मान्य ठरतो. पुराणातले राजवंशाचे संकलन मुख्यत्वे यज्ञश्री सातवाहनाच्या काळात पूर्ण झाले होते. म्हणूनच त्या पुढच्या राजवंशाचे वर्णन पुराणात अत्यल्प प्रमाणात आढळते. विशिष्ट प्रदेशातल्या राजवंशांपैकी ज्यांची चर्चा पुराणात प्रामुख्याने आढळते, ते म्हणजे गर्दभिल, शक, तुषार, गुरुड, हूण, आभीर व श्रीपर्वतीय हे होत. याव्यतिरिक्त वाकाटक, मग व नैषध या राजवंशांची विशेष चर्चा वायू व ब्रह्मांड या पुराणांत आढळते (वायू पु. ९९; ब्रह्मांड पु. ३.७४). पूर्वकालीन गुप्तांपैकी समुद्रगुप्तापर्यंतच्या राजांची माहिती काही अंशी पुराणांत उपलब्ध होते; पण उत्तरकालीन गुप्तांची होत नाही. पूर्वकालीन गुप्तांना समकालीन असे राजवंश म्हणजे चंपावतीचे व मथुरेचे नाग, मणिधान्य प्रदेशाचे राजे देवरक्षित, ताम्र, लिप्त, गुह, कलिंग, महिष, सौराष्ट्र इ. होत. त्यांचीही चर्चा पुराणांनी केलेली आहे. या राजांच्या वर्णनानंतर कलियुगाच्या दोषाचे वर्णन करून पुराणे राजवंशाचे विवरण समाप्त करतात.

पुराणाची दशविध लक्षणे सांगणारा एक श्लोक भागवत पुराणात दिलेला आहे, तो असा –

**सर्गश्चाथ विसर्गश्च वृत्ती रक्षान्तराणि च ।**
**वंशो वंशानुचरितं संस्था हेतुरपाश्रय ।।**

(भाग. पु. १२. ७. ९)

याचा अर्थ असा – (१) सर्ग – सृष्टिवर्णन. (२) विसर्ग – जीवसृष्टी. जीवातून जीवाची उत्पत्ती. (३) वृत्ती – जीवाच्या जीवननिर्वाहाची सामग्री. (४) रक्षा – भगवंताच्या विविध अवतारांकडून वेदाचे व सज्जनांचे रक्षण व त्याबरोबरच वेदविरोधकांचा आणि दुर्जनांचा संहार. (५) अंतरे – मन्वंतरे. (६) वंश – सूर्य–सोमादी वंश. (७) वंशानुचरित – वरील वंशातले प्रमुख राजर्षी. (८) संस्था – विविध प्रकारचे प्रलय

(९) हेतू – जीववर्णन व (१०) अपाश्रय – जीवाच्या जाग्रत, स्वप्न व सुषुप्ती अशा तीन अवस्था. या तीन अवस्थांमध्ये जो चेतन आत्मा निवास करतो, त्याला क्रमाने विश्व, तैजस व प्राज्ञ अशी नावे आहेत. जीवाच्या या तीन्ही वृत्तींत जो साक्षीरूपाने सतत प्रतीत होतो, तो परमात्मा म्हणजेच विश्वाचे अधिष्ठानरूप अपाश्रय तत्त्व होय.

**भुवनकोशवर्णन** – भूगोल आणि खगोल म्हणजेच समस्त ब्रह्मांड हा पुराणांचा आणखी एक वर्ण्य विषय आहे. ब्रह्मांडाला त्यांनी भुवनकोश असे म्हटले आहे. या भुवनकोशवर्णनात पृथ्वी, भारत, सप्तस्वर्ग, सप्तपाताल, द्वीपे वर्षे, समुद्र, पर्वत, नद्या, तीर्थक्षेत्रे, इ. गोष्टींचे तपशीलवार वर्णन आहे. पुराणांतले भूगोलवर्णन आणि भारतवर्णन हे बरेचसे यथातथ्य आहे, असे अनेक संशोधकांनी मान्य केले आहे. पुराणांतली ही भूगोलज्ञानाची वाढ पुढील कारणांमुळे झाली, असे श्री. एस्. मुझफर अली म्हणतात–

(१) लष्करी मोहिमा– भारतीय पराक्रमी पुरुषांनी भारतात व बृहत्तर भारतात ज्या मोहिमा केल्या, त्यामुळे भारतीयांना दूरदूरच्या देशांची माहिती झाली आणि पुराणांनी तिचा उपयोग करून घेतला.

(२) व्यापारी दळणवळण– उत्तरेच्या पर्वतश्रेणींच्या पलिकडे, तसेच दक्षिणेच्या सागराच्या पलिकडे भारतीयांचे दळणवळण पुरातन कालापासून चालू होते. त्यातूनही भूगोलज्ञानात भर पडली.

(३) धर्मप्रसार– बौद्ध भिक्षूंनी भारताच्या आग्नेयीस असलेली बेटे, चीन, जपान व उत्तरेस काबूल, कंदाहार, इ. देशांत जाऊन बौद्ध धर्माचा प्रसार केला. या बौद्ध भिक्षूंच्या गमनागमनातून काही भौगोलिक ज्ञान उपलब्ध झाले व ते पुराणांना उपयोगी पडले.

(४) राजकीय हितसंबंध– भारताच्या सम्राटांना बाहेरच्या प्रदेशांशी राजकीय संबंध ठेवावे लागत. परकीय देशांचे राजदूतही भारतीय साम्राटांच्या दरबारात आपापल्या देशांच्या कामासाठी येत. या राजकीय हितसंबंधांतूनही भौगोलिक ज्ञानाच्या कक्षा वाढल्या.

सर्व पुराणांत, विशेषतः वायू, मार्कंडेय, स्कंद, ब्रह्मांड, वराह, मत्स्य आणि भागवत या पुराणांत भारताच्या व जगाच्याही भूभागासंबंधी बरीच विस्तृत माहिती दिलेली आहे. काही पुराणांतून काही काही भूप्रदेशांची तपशीलवार वर्णने आढळतात. पद्म पुराणाच्या भूमिखंडात बऱ्याच यात्रास्थळांचे वर्णन आहे. अग्नी पुराणात गयाक्षेत्राविषयी बारीक सारीक माहिती आहे. ब्रह्म व वराह या पुराणांत मथुरा व जगन्नाथपुरी यांची सविस्तर माहिती आहे. वामन पुराणात ठाणेश्वर व पद्म पुराणात अजमेरकडचा प्रदेश यांची विस्तृत माहिती आहे त्यावरून त्या त्या पुराणाच्या निर्मितीच्या स्थळ–काळाविषयी काही अनुमाने करता येतात. अशाच प्रकारच्या भौगोलिक वर्णनांच्या आणि ऐतिहासिक पुराव्यांच्या आधारावर निरनिराळ्या पुराणांचा रचनाक्रम ठरविण्याचा प्रयत्न डॉ. हाजरा व डॉ. सरकार यांनी केला आहे.

पृथ्वीची रचना – पुराणांनी द्वीपविभागात पृथ्वीची मांडणी केली आहे. द्वीपकल्पनेत चतुर्द्वीपा पृथ्वी व सप्तद्वीपा पृथ्वी असे दोन पर्याय आहेत. पैकी चतुर्द्वीपा पृथ्वी ही कल्पना पुराणांच्या प्राचीन रूपात आलेली असून, सप्तद्वीपा पृथ्वी ही कल्पना पुराणांत भर पडून त्यांची वाढ झाली, त्या काळातली आहे.

ही चार द्वीपे मेरूच्या चार दिशांना असल्याचे सांगितले आहे. याविषयी वायू पुराणातले श्लोक असे–

**पद्माकारा समुत्पन्ना पृथिवी सघनद्रुमा ।**
**तदस्य लोकपद्मस्य विस्तरेण प्रकाशितम् ।।**
**महाद्वीपास्तु विख्याताश्चत्वारः पत्रसंस्थिताः ।**
**ततः कर्णिकसंस्थानो मेरुर्नाम महाबलः ।।**

(वायू पु. ३४.४५–४६)

**अर्थ**– घनदाट वृक्षांसह ही पृथ्वी कमलाच्या आकाराने उत्पन्न झाली. त्या लोकपद्माचा पुढे विस्तार झाला. चार विख्यात महाद्वीपे ही या कमलाच्या चार पाकळ्यांच्या जागी असून, मेरू नावाचा महाबल पर्वत या लोकपद्माच्या कर्णिकेच्या (मध्यभाग) जागी आहे.

मेरू पर्वत इलावृतवर्षात आहे. त्याच्या पूर्वेस भद्राश्व, दक्षिणेस जंबुद्वीप, पश्चिमेस केतुमाल व उत्तरेस उत्तरकुरू अशी ही चार महाद्वीपे आहेत. मेरू हा सुवर्णपर्वत असून, तो जंबुद्वीपाचे केंद्र आहे. त्याच्या चारही बाजूंस मंदर, गंधमादन, विपुल व सुपार्श्व असे चार पर्वत असून त्यांनी जणू मेरूला चारही अंगी घिरे दिले आहेत. मेरूवर देवांचा निवास असून तो भूतलाचा स्वर्ग आहे. मेरू पर्वत ही पुराणांतील काल्पनिक वस्तू असावी, असे काही वर्षांपूर्वी संशोधकांना वाटत होते. पण अलिकडे भौगोलिक, भाषिक व ऐतिहासिक अशा त्रिविध पुराव्यांनिशी पुराणांतला मेरू पर्वत हा वास्तव आहे, असे ठरले आहे. प. सैबेरियामध्ये असलेला अलताई पर्वत हाच पुराणातील मेरू होय, असे आता संशोधकांनी सिद्ध केले आहे. असे असले, तरी पुराणे म्हणजे भूगोलाची पुस्तके नव्हेत, हे मात्र लक्षात ठेवायला हवे.

समस्त पृथ्वी ही सप्तद्वीपांत विभागली गेली आहे, ही पुराणांची वैशिष्ट्यपूर्ण कल्पना आहे. ही सात द्वीपे अशी–

(१) जंबूद्वीप– (क्षारसमुद्राने वेष्टित)
(२) प्लक्षद्वीप– (इक्षुरससमुद्राने वेष्टित)
(३) शाल्मलीद्वीप– (सुरासमुद्राने वेष्टित)
(४) कुशद्वीप– (घृतसमुद्राने वेष्टित)
(५) क्रौंचद्वीप– (दधिसमुद्राने वेष्टित)
(६) शाकद्वीप– (क्षीरसमुद्राने वेष्टित)
(७) पुष्करद्वीप– (स्वादुसमुद्राने वेष्टित)

प्रत्येक द्वीपात सात नद्या व सात पर्वत असतात. या सर्व द्वीपांत जंबुद्वीप हे मध्यभागी असून, त्याच्या भोवती इतर द्वीपे पसरलेली आहेत. जंबुद्वीपाचा विस्तार एक लक्ष योजने आहे. यापुढचे प्रत्येक द्वीप पूर्वद्वीपाच्या दुप्पट विस्ताराचे आहे. श्री. वि. का. राजवाडे आणि कर्नल विल्फर्ड यांनी या द्वीपांचा आजच्या भौगोलिक स्थितीशी संबंध दाखविण्याचा बराच यशस्वी प्रयत्न केला आहे. त्याचा सारांश असा–

शाकद्वीपामध्ये मग, मशक, मानस व मंद हे अनुक्रमे चार वर्ण असल्याचे महाभारताच्या भीष्मपर्वात सांगितले आहे. मगांनाच शाकद्वीपी ब्राह्मण म्हणतात. मंदक हे शक होत. मंदांनी इ. स. पू. ७०० ते ५५० पर्यंत असुर देशावर म्हणजेच असीरियावर राज्य केले. सायरस हा शब्द कुरूचा अपभ्रंश आहे. तो इलाम प्रांताचा राजा होता. इलाम हा प्रांत इलिपी या देशात होता. इलिपी हेच इलावृतवर्ष होय. असीरिया व बाबिलोनिया यांच्या पूर्वेस कास्पियन समुद्रापर्यंत पसरलेल्या मुलखाला इलिपी म्हणत. मीढ हे लोक इलावृतात राहत होते. पुराणातले अजमीढ, पुरुमीढ, इ. राजे इलावृतवर्षातूनच भारतवर्षात आले असावे. पर्शू हे लोक मीढांच्या दक्षिणेस व पारद (पार्थियन) हे लोक गांधार देशाच्या शेजारी राहत. बर्बर हे बाबिलोनियात राहत.

काश्मीरच्या उत्तरेस एका बिंदूपासून पर्वताच्या सहा रांगा निघाल्या आहेत. हिमालय, हेमकूट, निषध, नील, श्वेत व शृंग हे ते पर्वत होत. त्यांच्या मध्यबिंदूला पुराणकार मेरुपर्वत म्हणतात. हा भू-पद्माच्या कर्णिकेच्या जागी मानलेला आहे. हिमालय प्रसिद्ध आहे. हेमकूट म्हणजे हिंदुकुश, निषध म्हणजे सुलेमान, नील म्हणजे काराकोरम, श्वेत म्हणजे कुवेनलुन व शृंग म्हणजे हियेनशान होय, असे काही पंडितांचे मत आहे. हे सहा पर्वत ज्या द्वीपात आहेत, त्याचे नाव जंबुद्वीप.

तुर्कस्थान व ग्रीस मिळून प्लक्षद्वीप होते. ग्रीकांच्या अतिप्राचीन इतिहासात पॅलॅसगी म्हणून जे नाव येते, ते प्लक्षाचे अपभ्रष्ट रूप आहे. क्षारोद म्हणजे भूमध्य समुद्र. हा प्लक्षद्वीपाच्या भोवती आहे. इक्षुरससागर (काळा समुद्र) व कास्पियन समुद्र यांमधील प्रदेशाला शाल्मलीद्वीप म्हणत. अरल समुद्र म्हणजे पुराणातला घृतसमुद्र होय. तो व कास्पियन समुद्र यांच्यामधल्या देशाला कुशद्वीप म्हणत. प्राचीन लोक कुशद्वीपांतील लोकांना कोसीन म्हणत. पुराणे त्यांना कुश (कुशाण) म्हणतात. अरल समुद्राच्या पश्चिमेस क्रौंचद्वीप आहे. सध्याची समरकंद व बुखारा ही शहरे असलेला टापू क्रौंचद्वीपात गणला जात असे. क्रौंचद्वीपाच्या पूर्वेस उत्तर समुद्र व अलताई पर्वत यांच्या दिशेने शाकद्वीप होते. सांप्रतच्या चीनच्या उत्तरेकडील भागाला पुष्करद्वीप म्हणत. कुवेनलुन पर्वताने या द्वीपाचे दोन भाग केले आहेत.

वरील मत श्री. राजवाडे यांनी मांडले आहे. कर्नल विल्फर्ड यांनी एशियाटिक रिसर्चेस (खंड ११) मध्ये पौराणिक भूगोलाची उपपत्ती सांगितली आहे, तिचा सारांश असा —

पुराणातील रम्यक किंवा रमणक वर्ष हे रोमक म्हणजे इटली या देशाचे नाव आहे. क्रौंचद्वीप म्हणजे बाल्टिक समुद्राजवळचा प्रदेश. क्रौंचद्वीपाच्या ज्या भागात स्कंदाने वसती केली, तो प्रदेश स्कंदनाभी म्हणजेच स्कंदिनेव्हिया समजावा. सगळा युरोप, आफ्रिकेचा उत्तर किनारा व आशियामायनर मिळून होणाऱ्या भूभागाला केतुमाल म्हणत. पुष्करद्वीप म्हणजे आइसलंड होय. पुष्करद्वीपात अहोरात्र सहा सहा महिन्यांचे असतात, असे वर्णन आहे. ते याला लागू पडते. जर्मनीजवळच्या समुद्राला क्षीरसमुद्र नाव असावे. कारण युरोपातील जुन्या भाषेत त्याला खिरिया असे म्हणत. ग्रेटब्रिटन व त्याभोवतालचा भूमध्य समुद्र यांना अनुक्रमे घृतद्वीप व घृतसमुद्र म्हणत. सॅक्सन म्हणजे शकसून् (शकांचे वंशज) हे शाकद्वीपाहून पश्चिमेकडे गेले व त्यांनी युरोपात वसती केली. इक्षुसमुद्राला ते लोक युक्साईज सी म्हणतात. हे नामसादृश्य लक्षात घेणे आवश्यक आहे.

पौराणिक भूगोलाविषयी तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी आपले विचार सांगतात, ते असे —

भारतीयांनी अतिप्राचीन काळी केलेल्या भौगोलिक परिक्रमणाच्या व वसाहतस्थापनेच्या इतिहासाचा सूचक कथासंग्रह पुराणात पुष्कळच सापडतो. त्यातील भौगोलिक स्थानांची, प्रदेशांची, राष्ट्रांची व लोकसमुदायांची नामे हल्ली माहीत असलेल्या नामांशी जुळवण्याचे काम फार कठिण आहे. सगराने हिंदुस्थानाबाहेरील शक, यवन, पारद, बर्बर, पल्लव इत्यादी लोकसमुदायांना जिंकून त्यांना केशभूषणादी चिन्हे बदलविण्यास लावली, असे पुराणांत म्हटले आहे. चीनपासून ग्रीसपर्यंत पसरलेल्या अतिप्राचीन राष्ट्रांत ब्राह्मण व क्षत्रिय यांचे अस्तित्व होते. ती राष्ट्रे कालांतराने ब्राह्मणांचा संपर्क सुटल्यामुळे क्षत्रियत्वाचा लोप होऊन दस्यू किंवा वृषल बनली,

असे महाभारतात, मनुस्मृतीत व अन्य पुराणांत सांगितले आहे. हा वृत्तात काल्पनिक आहे की खरा आहे, हे समजण्यास आज काही साधन मिळत नाही. ययातीने असुरराज वृषपर्वा याच्या कन्येशी विवाह केला होता. हा असुरराज हिंदुस्थानातील प्रदेशात राज्य करीत होता की हिंदुस्थानाबाहेरील प्रदेशात राज्य करीत होता, हेही समजण्यास काही मार्ग नाही.

**भारत** — भारत हे सप्तद्वीपांपैकी जंबुद्वीपात आहे. त्याला भारत हे नाव मिळण्यापूर्वी अजनाभ (भाग. पु ५.७.३) व हैमवत वर्ष (वायू पु. ३५.५२) अशी नावे होती. अज म्हणजे भगवान विष्णू होय. त्याच्या नाभिकमलावर हा देश अवस्थित आहे, असे मानून याला अजनाभ म्हणू लागले. पहिली सृष्टी भारतात झाली आणि मानवाची उत्पत्तीही प्रथम भारतातच झाली, हा अर्थ अजनाभ शब्दाने सूचित होतो. हिमालय पर्वत याच्या उत्तरेस असल्यामुळे याला हैमवत वर्ष असे नाव मिळाले इथे वर्ष शब्दाचा अर्थ द्वीपातर्गत एक प्रदेश असा आहे.

अजनाभ देशात ऋषभ नावाचा एक राजा प्राचीन काळी होऊन गेला त्याला १०० पुत्र झाले. भरत हा त्यातला ज्येष्ठ पुत्र होय. ऋषभाने आपले राज्य त्याला दिले. भरताने मोठमोठे यज्ञ केले व या देशाचे उत्तम प्रकारे पालन पोषण केले. त्यावरून भरताचा देश तो भारत असे त्याचे नवे नाव रूढ झाले आणि अजनाभ व हैमवत ही नावे मागे पडली ( भाग. पु. ५.७ १–३ ).

भारतवर्षाचा भूगोल कूर्म संस्थान व कार्मुक संस्थान अशा दोन प्रकारांनी अभिव्यक्त केलेला आहे. कूर्म संस्थानात भारताचे नऊ विभाग कल्पून, ते कासवाच्या भिन्न भिन्न अवयवांच्या जागी स्थापलेले आहेत (मार्कं. पु. ५८). कार्मुक संस्थानात भारताचा आकार धनुष्यासारखा कल्पिलेला असून, हिमालय म्हणजे धनुष्याची कमान आणि कन्याकुमारीचे टोक म्हणजे त्याची ओढलेली प्रत्यंचा असे मानले आहे.

मत्स्य व मार्कंडेय या पुराणांत भारताचे नवखंडात्मक विभाजन सांगितले असून, त्या खंडांची नावे पुढीलप्रमाणे दिलेली आहेत — इंद्रद्वीप, कसेरू, ताम्रपर्ण, गभस्तिमान, नागद्वीप, सौम्य, गंधर्व, वारुण व भारत (मत्स्य पु. १४७–७–८).

पौराणिक भूगोलात वर्ष व कुल असे दोन प्रकारचे पर्वत सांगितले आहेत. वर्ष पर्वत हे सीमेचे पर्वत असून, ते एका वर्षाला दुसऱ्या वर्षापासून अलग करतात. कुल पर्वत हे प्रांतीय सीमा दाखवितात. महेंद्र, मलय, सह्य, शुक्तिमान्, ऋक्ष, विंध्य व पारियात्र अशी कुल पर्वतांची नावे आहेत.

पुराणांनी अनेक ठिकाणी भारतवर्षाची प्रशस्ती गायिली आहे आणि सर्व क्षेत्रांत ते अतुलनीय असल्याचे सांगितले आहे

**जाम्बवे भारतं वर्षं तीर्थं त्रैलोक्यविश्रुतम् ।**
**कर्मभूमिर्यतः पुत्र तस्मात् तीर्थं तदुच्यते ।।**

अर्थ — जंबुद्वीपात भारतवर्ष हे त्रैलोक्यविश्रुत तीर्थ आहे. त्याला तीर्थ म्हणण्याचे कारण ती मनुष्याची कर्मभूमी आहे.

विष्णू पुराणात म्हटले आहे, की भारत हीच कर्मभूमी असून अन्य देश व लोक या भोगभूमी होत. म्हणूनच देवांनाही मरून भारतात मनुष्यरूपाने जन्म घेण्याची इच्छा होते. अनेक राजर्षी, ब्रह्मर्षी, देवर्षी, आचार्य, संत, महंत यांचे आगर म्हणून भारतवर्षाचा प्रत्येक कण पवित्र आहे. या दृष्टीने भारतातील नद्या, नगरे, धामे, सरोवरे, कुंडे, आश्रम, इत्यादींचे महत्त्व पुराणानी कथांच्या आणि वर्णनांच्या द्वारे भारतीयांच्या मनावर ठसविले म्हणूनच आपण काशी, रामेश्वर, इ. यात्रा करू लागलो; सह्याद्री, विंध्याद्री, हिमाचल, नीलाचल, महेंद्र, इ. पर्वत चढू लागलो. पुराणात जे महत्त्व विश्वेश्वराचे तेच रामेश्वराचे, जे गंगा-यमुनाचे तेच, नर्मदा-कावेरीचे. भारताच्या कुठल्याही क्षेत्राची यात्रा करायची असली, तर त्या क्षेत्राविषयी आणि तिथल्या बारीक-सारीक तीर्थाविषयीही कथा आढळतात. या कथा पुराणकारांनी स्वतः रचल्या नाहीत; तर त्या लोककथा, स्थलकथा, व्यक्तिकथा, या स्वरूपात आधीच तिथे प्रचलित होत्या. पुराणानी क्षेत्रमाहात्म्य वाढविण्यासाठी त्यांचा व्यवस्थित संग्रह केला. आसेतुहिमाचल भारतवर्ष ही कल्पना पुराणानीच दृढ केली.

**ब्रह्मांड** — पुराणांच्या दृष्टीने ब्रह्मांडात १४ भुवने आहेत आणि ती भूतत्त्वातून निर्मित आहेत. भूः = पृथ्वी हे पहिले भुवन असून, त्याच्यावर एकापुढे एक अशी सहा भुवने आहेत, त्यांची नावे अशी – सत्यलोक, तपोलोक, जनलोक, महर्लोक, स्वर्लोक व भुवर्लोक. या सात लोकांना 'ऊर्ध्वलोक' असे म्हटले आहे. पृथ्वीच्या खाली सात भुवने असून, त्यांची नावे अशी – अतल, वितल, सुतल, तलातल, रसातल, महातल व पाताल. या सात भुवनांना पाताल असे सामान्य नाव असून, त्याना अधोलोक असेही म्हटले आहे.

वरील चतुर्दश भुवनात्मक ब्रह्मांडाचे ज्ञान असलेल्या व्यक्तीला पुराणानी पुराणविद असे म्हटले आहे.

**वेदार्थाचे उपबृंहण** – पुराणे आपण कशासाठी रचली, ते व्यासानी भविष्य पुराणात एका ठिकाणी पुढीलप्रमाणे सांगितले आहे (भविष्य. पु १·९४ ५९)–

**इतिहासपुराणानि मया सृष्टानि सुव्रत ।।**
**य एते चतुरो वेदा गूढार्थाः सततं स्मृताः ।**
**अतस्त्वैतानि सृष्टानि बोधायैषां महामुने ।।**

अर्थ – हे महामुने सुव्रता, हे चार वेद गूढार्थक असल्यामुळे (त्यांचा अर्थ समजणे दुर्घट होते, म्हणून) त्यांचा बोध व्हावा, यासाठी मी इतिहास–पुराणे निर्माण केली.

यावरून वेदार्थाची उकल किंवा त्याचे उपबृंहण हा पुराणाचा एक प्रमुख हेतू ठरतो. पुराणांनी वेदार्थाचे उपबृंहण केले आहे, ही धारणा महाभारतकाली उत्पन्न झाली. महाभारतात तशा अर्थाची अनेक वचने आहेत. त्यांतले एक वचन असे–

**पुराणपूर्णचन्द्रेण श्रुतिज्योत्स्नाः प्रकाशिताः।**

(म. भा. आदि. १·८६)

अर्थ – पुराणरूपी पूर्णचंद्राने श्रुतिरूपी चंद्रिकेला प्रकाशित केले.

या विषयीचा एक सर्वप्रसिद्ध श्लोक असा–

**इतिहासपुराणाभ्यां वेदं समुपबृंहयेत्।**
**बिभेत्यल्पश्रुताद् वेदो मामयं प्रहरिष्यति ॥**

अर्थ – इतिहास व पुराणे यांच्या साहाय्याने वेदाचे उपबृंहण करावे. अल्पश्रुत (केवळ वेद जाणणारा; परंतु पुराणे न जाणणारा) अशा माणसाला वेद घाबरतो. त्याला वाटते, की हा आपल्यावर प्रहार करील (आपल्या अर्थाचा विपर्यास करील).

उपबृंहण या शब्दात बृह् धातु असून, त्याचा मुख्य अर्थ वाढविणे असा आहे. त्यावरून एखाद्या सिद्धांताची पुष्टी करणे, त्याची अनेक अंगांनी वाढ करणे, या अर्थी उपबृंहण हा शब्द बनला आहे. वेदमंत्रात जो अर्थ प्रतिपादिलेला आहे, त्या अर्थाचे किंवा सिद्धांताचे विस्तारपूर्वक पोषण करणे म्हणजे वेदार्थाचे उपबृंहण होय. असे उपबृंहणाचे जे प्रकार पुराणांत आढळतात, त्यांचे विस्तृत विवेचन श्री. बलदेव उपाध्याय यांनी केले आहे.

पुराणांत वेदसंहिता व उपनिषदे यांतील अनेक मंत्रांची व्याख्या संक्षेपाने किंवा विस्ताराने केलेली आढळते. 'विष्णोर्नुकं वीर्याणि प्र वोचम्०' हा ऋग्वेदातला (१·१५४·१) विष्णुपरक मंत्र होय. त्याची विशद व्याख्या त्यातलेच शब्द घेऊन भागवतात केली आहे (२·७·४०) 'ईशावास्यमिदं०' या औपनिषदिक मंत्राची व्याख्या भागवतात सात श्लोकांत केली असून, त्या श्लोकांना मंत्रोपनिषद असे म्हटले आहे (भाग. पु. ८·१·९-१६). 'तत्सवितुर्वरेण्यम्०' या गायत्री मंत्राची व्याख्या अग्नी पुराणात केली असून, त्या मंत्राची देवता सवित्याऐवजी विष्णू असल्याचे सांगितले आहे (२१६·१–१८). 'चत्वारि शृङ्गा त्रयो अस्य पादा०' हा ऋग्वेदातला अग्निवर्णनाचा मंत्र सुप्रसिद्ध आहे (४·५८·३). या रहस्यात्मक मंत्राच्या विविध व्याख्या उपलब्ध होतात. स्कंद पुराणाने ही व्याख्या केली असून, त्याचा अर्थ शिवपरक सांगितला आहे (काशीखंड ७३·९३–९६).

वैदिक आख्यानांचे उपबृंहण – वैदिक साहित्यात प्रसंगवशात अनेक ठिकाणी अनेक आख्याने त्रुटित स्वरूपात आली आहेत. धार्मिक आणि लौकिक असे त्यांचे दोन विभाग पडतात. धार्मिक आख्यानात प्रजापती व विष्णू यांनी अनेक रूपे धारण केल्याची कथा असते, तर लौकिक आख्यानात विशिष्ट राजाचे किंवा राजर्षीचे वृत्त, एखादा प्रणयप्रसंग, एखाद्या देवतेचे सामर्थ्य, इ. वर्णित असते. अशा दोन्ही प्रकारच्या आख्यानांचे पुराणांनी विस्तारपूर्वक उपबृंहण केले असून, त्या त्या ठिकाणचे गूढ संकेतही उकलून दाखवले आहेत. मत्स्य, कूर्म व वराह ही रूपे प्रजापतीने विशिष्ट कारणासाठी घेतली, असे वेदांत म्हटले आहे (श. ब्रा. २·८·१·१; ७·५·१·५; तै. सं. ७·१·५·१). पुराणांनी अवतारवादाची प्रस्थापना करताना वरील तीन्ही रूपांना अवतार मानून ते अवतार त्या त्या कारणासाठी विष्णूने घेतले असे सांगितले व त्यांच्या कथाही निर्माण केल्या.

ऋग्वेदात त्रिविक्रम विष्णूचे एक सूक्त आहे (ऋ. १·१५४). शतपथात वामनाने असुरांकडून पृथ्वी जिंकून ती देवांना दिल्याची कथा आहे. या घटनेचे उपबृहण बहुतेक पुराणांतून झालेले आहे. वामन पुराण तर त्या घटनेच्या विशदीकरणासाठीच निर्माण झाले आहे.

लौकिक आख्यानांत पुरूरवा–उर्वशींचे आख्यान हे ऋग्वेदातल्या प्रसिद्ध आख्यानांपैकी एक आहे. ते मुळात लहान आहे; पण पुराणांनी अतिरंजन करून त्याची खूप वाढ केली आहे. विष्णू व भागवत या पुराणांत चंद्रवंशाचा प्रारंभ सांगताना या आख्यानावर एक एक अध्याय लिहिला आहे. एक आगळी प्रणयकथा म्हणून शुद्ध साहित्यिक रूपात त्या आख्यानाचे प्रणयन झाले आहे.

दुसरे लौकिक आख्यान हरिश्चंद्र व शुनःशेप यांचे. ते ऐतरेय ब्राह्मणात आले आहे (३३). या कथेचा विस्तार मार्कंडेय, ब्रह्म व देवी भागवत या पुराणांनी केला आहे (मार्क ८; ब्रह्म १०४; दे. भा. ७·१३·२७) त्यांतही मार्कंडेयातले हरिश्चंद्राख्यान प्रभावी व नितांत मनोरम उतरले आहे.

वेदांची भाषा ही परोक्ष किंवा प्रतीकात्मक असते. तिथे एखाद्या प्रतीकाच्या द्वारे एखादा सिद्धांत सांगितलेला असतो. पण ही प्रतीके सामान्य जनांच्या आकलनाला दुर्बोध असतात. पुराणांच्या साहाय्यानेच त्यांतले रहस्य उलगडू शकते. जो मंत्र वेदांत रूपकाचा उपयोग करून गुह्यरूपाने निर्दिष्ट केलेला असतो, त्याचे रहस्य सुबोध वर्णनशैलीत सामान्य जनांसाठी पुराणांनी प्रकट केलेले असते. उदा०' अहल्यायै जारः' हे वैदिक वाक्य. वैदिक साहित्यात अनेक ठिकाणी त्याचा आढळ होतो. हे एक अहोरात्रविषयक प्रतीक आहे. इथे रात्र ही अहल्या

(अहर्लीयते यस्यां सा = जिच्यामध्ये दिवस विलीन होतो ती) आहे. 'आदित्योऽत्र जार उच्यते रात्रिर्जरयिता' (निरुक्त ३.३.४) =रात्रीला जीर्ण करणारा, नष्ट करणारा या निरुक्तीने सूर्य हा तिचा जार होय. तोच इंद्र शब्दाने इथे निर्दिष्ट आहे. गौतम म्हणजे चंद्र हा अहल्येचा अर्थात रात्रीचा पती. या वाक्याचा हा भौतिक अर्थ कुमारिल भट्टाने पुढील वाक्यात सांगितला आहे – चंद्राची पत्नी रात्र ही सूर्याचा उदय होताच संपून जाते.

सृष्टीतील दैनंदिन घटनेचे प्रतीक असलेल्या या वाक्यावर पुराणांनी एक आख्यान रचून सांगितले आहे, ते असे – देवराज इंद्राने गौतम ऋषीची पत्नी अहल्या हिचे बलात्काराने किंवा कपटरूपाने धर्षण केले व त्यामुळे क्रुद्ध होऊन गौतमाने अहल्येला शिळा होण्याचा व इंद्राला सहस्रभगांकित होण्याचा शाप दिला. पुढे त्यानेच उःशाप दिल्यावर अहल्या रामचंद्राच्या पदस्पर्शाने पूर्व रूपाला प्राप्त झाली व इंद्र सहस्रभगांजागी सहस्रनेत्र असलेला बनला.

पुराणांनी या कथेचे उपबृंहण करताना इंद्राला संभाळून घेण्याचे ठरवले व इंद्राने हे अनैतिक कृत्य देवलोकाच्या रक्षणार्थ केले, असे सांगितले. पण देवकार्य झाले म्हणून काय झाले? पाप ते पापच. त्याला शिक्षा ही मिळायलाच हवी. म्हणून लोकमर्यादेच्या संरक्षणासाठी पुराणांनी त्याला वृषणहीन बनवले व नंतर देवगणांनी कृपावंत होऊन त्याला मेषवृषण बसवून दिला असेही सांगितले.

'इंद्राने विश्वरूपाला ठार मारले' 'प्रजापतीने आपल्याच कन्येवर बलात्कार केला' व 'बृहस्पतीची भार्या तारा हिला चंद्राने आपली पत्नी बनवले' या वैदिक घटनांचेही पुराणांनी विस्तृत कथांच्या रूपाने उपबृंहण केले आहे.

**पुराणे आणि धर्म** – भारतीय संस्कृतीचा प्रचार व प्रसार करण्याच्या कामी पुराणांचे महत्त्व सर्वमान्य आहे. भारत आणि बृहत्तर भारत एवढ्या भूखंडात हिंदू धर्माचा जो व्यापक प्रसार झाला आणि त्याला जी सार्वत्रिक लोकप्रियता लाभली, त्याचे रहस्य पुराणांनी जे धर्माचे सर्वांगीण विवेचन केले, त्यात आहे. वेदात सांगितलेली सूक्ष्म धर्मतत्त्वे विशद करून सांगण्यासाठी पुढच्या काळात पुराणे अवतरली. वेदाधिकार नसलेल्या फार मोठ्या समाजाचे ज्ञान वाढवणे व त्या समाजाला धर्मप्रवण करणे यासाठी वेदव्यास आणि त्यांचे शिष्य-प्रशिष्य यांनी पुराणांचे प्रणयन केले. आपल्या साध्यासुध्या संस्कृत भाषेच्या बळावर भारत आणि त्याच्या भोवतीची द्वीपे यांत वैदिक विचारधारा, कर्मधारा व भावधारा प्रवाहित करण्याचे फार मोठे श्रेय पुराणांना आहे. लोकगौरवाची दृष्टी हेच पुराणांचे वैशिष्ट्य होय. म्हणूनच 'इतिहासपुराणानि भिद्यन्ते लोकगौरवात्' = वैदिक वाङमयाहून इतिहास-पुराणे वेगळी पडतात, ती लोकगौरवामुळे होत, असे स्कंद पुराणाच्या कुमारिका खंडात म्हटले आहे (४०.१९८).

वेदाने जे परमतत्त्व द्रष्ट्या ऋषींच्या मनबुद्धीनाही अगम्य अशा प्रदेशात ठेवले, ते पुराणांनी सामान्य जनतेला बुद्धिगम्य करून सोडले. उपनिषदामधले 'सत्यं ज्ञानमनन्तं ब्रह्म' पुराणांनी सौंदर्यमूर्ती व पतितपावन अशा भगवंताच्या रूपात प्रकट केले. ब्रह्म हे नामरूपांच्या पलीकडे आहे, ही वेदांची कल्पना; तर भगवान सर्वनामी, सर्वरूपी व सर्वभावमय आहे, असा पुराणांचा उद्घोष. पुराणांनी सर्वातीत अशा ब्रह्माला सर्वांच्या हृदयात आणून बसवून मानवी अंतःकरणातले देवत्व जागृत केले. पुराणांनी केवळ वर्णाश्रमांचाच धर्म सांगितला नाही, तर वर्णबाह्यांचाही धर्म सांगितला. तत्त्वज्ञान हे कोणत्याही धर्माचे अधिष्ठान असते व आचार ही त्यांची अभिव्यक्ती असते. या दोन्ही दृष्टींनी पुराणात धर्माचे प्रवचन केलेले आहे. पौराण धर्माचे स्वरूप आणि त्याची व्यापकता वायू पुराणाने पुढील श्लोकात सांगितली आहे.

**पुराणेष्वेषु बहवो धर्मास्ते विनिरूपिताः ।**
**रागिणां च विरागीणां यतीनां ब्रह्मचारिणाम् ॥**
**गृहस्थानां वनस्थानां स्त्रीशूद्राणां विशेषतः ।**
**ब्राह्मणक्षत्रियविशां ये च सङ्करजातयः ॥**

(वायू पु. १०४. ११–१२)

अर्थ – या पुराणांत पुष्कळ धर्म सांगितले आहेत. प्रवृत्तिमार्गी, वीतरागी, यती, ब्रह्मचारी, गृहस्थ, वानप्रस्थ, विशेषे – करून स्त्रीशूद्र तसेच ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य आणि संकरजातींचे लोक या सर्वांचे धर्म पुराणांत सांगितले आहेत.

पौराणिक उपासना ही मुख्यत्वे सगुणोपासना आहे आणि तिला अवतारवादाचा आधार आहे. अवतारकल्पना ही पौराणिक धर्माला मूलाधार अशी आहे, असे म्हटले तरी चालेल. अधर्माचा उच्छेद आणि धर्माची संस्थापना हे अवतारांचे प्रधान कार्य होय. अनीती व अधर्म यांच्या आक्रमणामुळे जेव्हा जगातली विद्यमान नैतिक व धार्मिक व्यवस्था उद्ध्वस्त होते, जेव्हा प्रकाशाच्या जागी अंधकाराचे, सत्याच्या जागी असत्याचे व धर्माच्या जागी अधर्माचे साम्राज्य प्रस्थापित होते. त्या वेळी करुणामय भगवान कोणत्या तरी रूपाने भूतलावर अवतीर्ण होऊन धर्माची विस्कटलेली घडी पुनश्च नीट बसवतो, अशी पुराणांची पूर्ण श्रद्धा आहे. त्याचबरोबर भगवंताचा अवतार हा मानवाला देव बनवणे, त्याच्या अंतरात ईशतत्त्वाची स्थापना करून मोक्षमार्गाकडे त्यांचे उन्नयन करणे, हे कार्यही करीत

असतो. भागवत पुराणात तसे स्पष्टच सांगितले आहे—

**नृणां निःश्रेयसार्थाय व्यक्तिर्भगवतो नृप ।**
**अव्ययस्याप्रमेयस्य निर्गुणस्य गुणात्मनः ।।**

(भाग. पु. १०. २६. १४)

अर्थ — अव्यय, अप्रमेय, गुणात्मा पण निर्गुण अशा भगवंताची अवताररूपाने जी अभिव्यक्ती होते, ती मानवांचे मोक्षरूप परमकल्याण साधण्यासाठीच होय.

जर भगवान आपल्या पूर्ण वैभवविलासांनिशी भूतलावर अवतीर्ण झाला नसता, तर अल्पज्ञ जीवाला त्याच्या सौंदर्य, गांभीर्य, औदार्य, कारुण्य, इ. दिव्य गुणांचे ज्ञान झालेच नसते.

पुराणांनी अवतारांची संख्या भिन्न भिन्न सांगितली आहे. पण त्यांत दशावतारांची कल्पना सर्वमान्य आहे. याशिवाय भगवान अनंत प्रसंगी अनंत रूपांनी पृथ्वीवर अवतरतो आणि मानवांची संकटे दूर करून त्यांना सन्मार्ग दाखवतो अशी पुराणांची सांगी आहे. ज्याप्रमाणे एखाद्या अगाध सरोवरातून हजारो छोटे छोटे पाट बाहेर निघतात, त्याप्रमाणे भगवंताच्या विश्वव्यापक स्वरूपातून असंख्य अवतार पृथ्वीवर येतात, असे भागवतात व हरिवंशात म्हटले आहे (भाग पु. १·३·६; हरिवंश १·४१·४१).

शिव, विष्णू, गणपती, सूर्य व देवी या पाच देवतांची उपासना पुराणांनी सांगितली आहे. त्याचबरोबर राम, कृष्ण, इ. अवतारांची उपासनाही उपदेशिली आहे. वैष्णव पुराणात विष्णूच्या अनेक अवतारांच्या व शैव पुराणात शिवाच्या भिन्न भिन्न अवतारांच्या कथा आहेत. देवी व गणपती यांचेही अवतार त्या त्या देवतांच्या पुराणांतून वर्णिले आहेत. भगवंताचे निर्गुण—निराकार रूप सर्वसामान्य लोकांना समजत नाही, म्हणून त्यांच्यासाठी पुराणांनी त्याच्या सगुण साकार रूपांची कल्पना केली. त्यांचा तपशील सांगितला आणि त्यांच्या प्रसन्नतेसाठी विविध पूजा—कल्पांचीही मांडणी केली. वैदिकांचा धर्म यज्ञप्रधान होता; तर पुराणांनी त्या जागी पूजाप्रधान धर्म प्रतिष्ठित केला. यज्ञसंस्थेला विरोध न करता त्यांनी हे कार्य केले, हे महत्त्वाचे. वैदिक मंत्र, तंत्र, उपचार आणि क्रियाकलाप यांची पुराणांनी प्रशंसा केली; पण त्याचबरोबर त्यात त्यांनी आपले काही क्रांतिकारक असे परिवर्तनही केले. मंत्रपूर्वक हवन हे पुराणांनी विविध व्रतांचे एक अंग म्हणून स्वीकारले; पण त्याबरोबरच नैवेद्यावर आणि अन्नदानावर विशेष भर दिला. पूजाप्रकारात पुराणांनी वैदिक मंत्रांचा स्वीकार केला; पण त्याहून अधिक प्रार्थना व स्तोत्रे यांची मातब्बरी सांगितली. यज्ञमंडपाच्या जागी त्यांनी त्याहून अधिक सुंदर व कलात्मक अशी मंदिरसंस्था निर्माण केली. ऋत्विजांच्या जागी देवांच्या पूजा-कथा सांगणारे पुरोहित निर्माण केले. मूर्तिपूजेला अग्रस्थान दिले. विविध देवतांच्या मूर्ती कशा घडवाव्या, त्यांची आयुधे कोणती असावी आणि त्यांची पूजा—अर्चा कशी करावी, या गोष्टींच्या वर्णनात पुराणांनी आपले अनेक अध्याय खर्ची घातले आहेत. भारतात मध्ययुगीन कालात जी कलात्मक आणि भव्योत्तुंग देवमंदिरे निर्माण झाली, त्या मंदिरनिर्मितीची सामग्री पुराणांनी पुरवली आहे. मंदिरनिर्मिती हे पुराणांनी एक धर्मकृत्य किंवा पुण्यकृत्य मानले आहे. त्याबरोबरच पुण्यक्षेत्रात किंवा अन्यत्र आवश्यक त्या ठिकाणी वापी, कूप, तडाग निर्माण करणे, धर्मशाळा बांधणे, लोकांच्या सुखसोयींची कामे करणे या गोष्टीही पूर्तधर्म या स्वरूपात सांगितल्या आहेत.

व्रत म्हणजे निष्ठापूर्वक आचरायचे पूजोपवासादी कर्म होय. व्रत हा शब्द ऋग्वेदातही आला आहे. तिथे अग्नीला व वरुणाला व्रतपती असे म्हटले असून, वरुणाची व्रते ही अभेद्य असल्याचे सांगितले आहे. पुराणांनी तो शब्द उचलला आणि त्याला लोकमानसात प्रतिष्ठा प्राप्त करून दिली. व्रताचा प्रधान उद्देश आत्मशुद्धी व परमात्मचिंतन हा असून, ते परमेश्वराजवळ पोचण्याचे एक अमोघ साधन आहे, अशी पुराणांची धारणा आहे. शिवरात्रीचे शिवव्रत, एकादशीचे विष्णुव्रत, चतुर्थीचे गणेशव्रत, सप्तमीचे सूर्यव्रत व अष्टमीचे देवीव्रत ही व्रते त्या त्या देवतांच्या पुराणांत नित्यव्रते म्हणून सांगितली आहेत. नैमित्तिक व्रते ही कोणत्या तरी निमित्ताने प्राप्त होत असतात उदा० कृच्छ्रचांद्रायणादी व्रते. विशिष्ट कामनांच्यासाठी केली जाणारी व्रते ही काम्यव्रते होत. अशा व्रतांची संख्या फार मोठी आहे. ऋतुपरिवर्तनाची, मासांची, तिथींची, वारांची अशी अनेक काम्यव्रते पुराणांनी सांगोपांग आणि त्यांच्या कथांसह वर्णिलेली आहेत. व्रताचे अंतिम पर्यवसान सत्याच्या उपलब्धीत व्हायचे असते. त्या विषयीचा एक श्लोक असा —

**व्रतेन दीक्षामाप्नोति दीक्षयाऽऽप्नोति दक्षिणाम् ।**
**श्रद्धां दक्षिणयाऽऽप्नोति श्रद्धया सत्यमाप्यते ।।**

अर्थ — व्रताने दीक्षा मिळते. दीक्षेने दक्षिणा (दया दाक्षिण्यादी गुण) मिळते. दक्षिणेने श्रद्धा प्राप्त होते आणि श्रद्धेने सत्याची प्राप्ती होते.

उपवास हे एक व्रताचेच अंग असते. उपवासात परमेश्वराची ध्यान—धारणा अभिप्रेत असते. उपवासाने शरीराबरोबरच मनाचीही शुद्धी होत असते आणि ती झाली तरच व्रताचे पूर्ण फळ पदरात पडते.

ब्राह्मणांना, याचकांना व गोरगरिबांना अन्नदान करणे ही कोणत्याही व्रताची सांगता होय. म्हणूनच पुराणांनी अन्नसंतर्पणावर विशेष भर दिला आहे. अन्नदानाची महती सांग-

ताना ब्रह्म पुराणात पुढीलप्रमाणे वर्णन केलेले आहे—

**सर्वेषामेव दानानामन्नं श्रेष्ठमुदाहृतम् ।**
**प्राणा ह्यन्नं मनुष्याणां तस्माज्जन्तुः प्रजायते ।।**
**अन्ने प्रतिष्ठता लोकास्तस्मादन्नं प्रशस्यते ।**

(ब्रह्म पु. २१८·१०–१२)

अर्थ – सर्व दानांत अन्नदान श्रेष्ठ म्हणून सांगितले आहे. मनुष्यांचे प्राण हे अन्नमयच असतात. अन्नापासूनच जीवांची उत्पत्ती होते. सर्व लोक अन्नाच्या ठिकाणी प्रतिष्ठित आहेत. म्हणून अन्न हे प्रशस्त होय.

तीर्थयात्रा हे पौराण धर्माचे एक प्रमुख अंग आहे. काशी, प्रयाग, गया, पुष्कर, सेतुबंध, चार धामे, सप्त पुऱ्या, बारा ज्योतिर्लिंगे, इ. तीर्थक्षेत्रांचे माहात्म्य पुराणांनीच वाढविले आणि भाविकांना व श्रद्धावंतांना आसेतुहिमाचल भारताची यात्रा करायला व तिचे कष्ट आनंदाने सोसायला उद्युक्त केले. तीर्थयात्रेशी श्राद्धविधीही जोडून दिला. श्राद्ध व पिंडदान यांच्या द्वारे पितरांचे संतर्पण करणे, हे गृहस्थाचे धार्मिक कर्तव्य होय, असा पुराणांचा आदेश आहे. सर्व तीर्थश्राद्धांत गया आणि मातृगया या क्षेत्रांतले श्राद्ध श्रेष्ठ मानलेले आहे. यात्रा, श्राद्ध, पूजाअर्चा, व्रतवैकल्ये, इ. करीत असता दक्षिणेच्या रूपाने द्रव्य-दानाचेही माहात्म्य पुराणांनी वर्णिलेले आहे. अपरिग्रहाचे तत्त्वज्ञानही पुराणांत आढळते. भागवतातला एतद्विषयक एक श्लोक असा —

**यावद् ध्रियेत जठरं तावत्स्वत्वं हि देहिनाम् ।**
**अधिकं योऽभिमन्येत स स्तेनो दण्डमर्हति ।।**

(भाग. पु. ७·१४·१८)

अर्थ – जितक्या धनाने आणि धान्याने उदरंभरण होईल, तेवढेच धनधान्य माणसाच्या मालकीचे समजावे. त्याहून अधिकावर जो आपली मालकी सांगेल त्याला चोर समजून दंड करावा.

अहिंसा हे धर्मतत्त्व भारतात जैन–बौद्धांनी, विशेषतः जैनांनी प्रतिष्ठित केले, असा पुष्कळांचा समज आहे. पण तो बरोबर नाही. जैन–बौद्धांच्याही आधी छांदोग्योपनिषदात त्याची महती सांगितली आहे (३·१७·४). पुराणांतही ठिकठिकाणी अहिंसेचे प्रतिपादन झालेले आहे –

**न वेदैर्न च दानैश्च न तपोभिर्न चाध्वरैः ।**
**कथंचित् स्वर्गतिं यान्ति पुरुषाः प्राणिहिंसकाः ।।**

अर्थ – प्राणिहिंसक पुरुष वेदाध्ययनाने, दानांनी, तपांनी आणि यज्ञांनी कोणत्याच प्रकारे स्वर्गगतीला जात नाहीत.

**अहिंसा परमो धर्मो अहिंसैव परं तपः ।**
**अहिंसा परमं दानमित्याहुर्मुनयः सदा ।।**

अर्थ – अहिंसा हा परम धर्म आहे. तेच परम तप आहे. तेच परम दान आहे. मुनींनी नेहमी असेच म्हटले आहे.

परमेश्वराचा अनुग्रह आणि त्याद्वारे निःश्रेयसाची किंवा मोक्षाची प्राप्ती हे मनुष्याचे साध्य होय, असे पुराणे सांगतात व त्यासाठी भक्तिमार्ग हे सुलभ व श्रेष्ठ असे साधन मानतात. पुराणांनी भक्तीला निःश्रेयसाचे स्वतंत्र साधन मानून तिचा ठायी ठायी मुक्तकंठाने गौरव केला आहे. भागवत पुराण हे तर भक्तिशास्त्राचे सर्वस्वच आहे. भक्तितत्त्वाचे निरूपण करणे, हेच भागवताच्या निर्मितीचे प्रयोजन आहे. भागवतात प्रारंभीच एक कथा सांगितली आहे, ती अशी–

अठरा पर्वांचे महाभारत वेदव्यासांनी रचले; पण एवढे महत्कार्य हातून होऊनही त्यांना कृतकृत्य वाटले नाही आणि समाधानही लाभले नाही. जेव्हा त्यांनी भक्तिप्रधान भागवताची रचना केली, तेव्हाच त्यांना तृप्ती आणि समाधान प्राप्त झाले.

भगवंताच्या प्राप्तीचा एकमेव उपाय म्हणजे भक्ती होय आणि भक्तीशिवाय अन्य साधने ही केवळ विडंबनरूप होत, असे सांगताना भागवत पुराणात व्यास म्हणतात –

**प्रीणनाय मुकुन्दस्य न वृत्तं न बहुज्ञता ।**
**न दानं न तपो नेज्या न शौचं न व्रतानि च ।**
**प्रीयतेऽमलया भक्त्या हरिरन्यद् विडम्बनम् ।**

अर्थ – भगवंताच्या प्रीतीसाठी शील, बहुश्रुतता, दान, तप, यज्ञ, शौच, व्रत यांपैकी कशाचाच उपयोग होत नाही. निर्मल अशा भक्तीनेच श्रीहरी प्रसन्न होतो. त्यासाठी अन्य साधने विडम्बनरूप होत.

भक्ती ही केवळ त्रैवर्णिकांचाच उद्धार करते, असे नसून ती अखिल मानवजातीला समानत्वाने पावन करते. तसेच भक्तीजवळ जाती, वंश इत्यादी भेद नाहीत, हे सांगताना मत्स्य पुराणात म्हटले आहे–

**पुल्कसः श्वपचो वापि ये चान्य म्लेच्छजातयः ।**
**तेऽपि वन्द्या महाभागा हरिपादैकसेवकाः ।।**

अर्थ – पुल्कस (निषाद), चांडाल किंवा अन्य म्लेच्छ जातीचे लोक जर श्रीहरीचे भक्त असतील, तर तेही वंद्य होत.

'न मे भक्तः प्रणश्यति' = माझ्या भक्ताचा कधीही नाश होत नाही (गीता ९·३१), अर्थात त्याचा या भवसागरातून उद्धार होतो, असे भगवंताचे प्रतिज्ञावाक्य आहे. भगवंताच्या या प्रतिज्ञेचे पुरावे म्हणून भगवद्भक्तीने उद्धरून गेलेल्या भक्तांच्या शेकडो नव्हे, हजारो कथा पुराणांनी सांगितल्या आहेत. एका वाक्यात सांगायचे, तर पुराणांनी भक्ती हे सुगम व सुलभ असे साधन हाती देऊन मानवमात्राच्या उद्धाराचा मार्ग खुला केला आहे.

पौराण धर्म हा काही वेगळा किंवा नवा असा धर्म नाही. सनातन वैदिक धर्मातूनच त्याचा विकास झाला आहे. त्यातली समस्त तत्त्वे वैदिकच आहेत. केवळ बदलत्या सामाजिक परिस्थितीच्या गरजा पूर्ण करण्यासाठी पुराणांनी कित्येक नव्या विषयाचा त्यात अंतर्भाव केला. वैदिक युगात कर्मकांडावर विशेष भर होता; पण पौराणिक युगात कर्मकांड हे जटिल, दुर्बोध आणि दुःसाध्य ठरल्यामुळे पुराणांनी त्याचे महत्त्व कमी करून त्या जागी भक्तीची स्थापना केली.

**पुराणे आणि विज्ञान** —पुराणांत विविध लोकोपयोगी शास्त्रे आणि विद्या यांची चर्चाही प्रसंगोपात्त आलेली आहे. विशेषतः अग्नी, गरुड व नारद या पुराणांत अशा शास्त्रांची चर्चा विस्तृतपणे केलेली आढळते. त्या त्या विज्ञानशाखाचे ग्रंथ अभ्यासून पुराणकारांनी त्यांच्या आधारे या शास्त्रांची माहिती दिली आहे. त्यांपैकी काही विज्ञानशाखा अशा—

(१) पशुवैद्यक — यात पशूंच्या रोगांचे निदान व चिकित्सा या गोष्टींचा अंतर्भाव होतो. भारतात घोड्यांचा उपयोग युद्धासाठी व वाहनासाठी वेदकालापासून होत आलेला आहे. घोडा हा असा उपयुक्त ठरल्यामुळे त्याची तंदुरुस्ती राखणे, त्याच्या रोगांवर उपचार करणे, त्याच्या शुभाशुभ गुणांची पारख करणे वगैरे गोष्टींचे ज्ञान अश्वशास्त्रात समाविष्ट झाले. आयुर्वेदात अश्वचिकित्सा हा एक स्वतंत्र विभाग आहे आणि तो शालिहोत्र या नावाने प्रसिद्ध आहे. सोमपुत्र बुध हा गजवैद्य म्हणून प्रसिद्ध होता. पालकाप्य नावाच्या एका वैद्याने हस्त्यायुर्वेद नावाचा एक ग्रंथच लिहिलेला आहे. गायींची चिकित्सा करण्याचे शास्त्रही निर्माण झाले होते. या पशुवैद्यकाचे विवेचन अग्नी पुराणात केलेले आहे (२८२).

(२) आयुर्वेद — हे एक लोकोपयोगी व लोकजीवनाशी नित्य संबधित असे शास्त्र आहे. गरुड पुराणात आयुर्वेदाचे सांगोपांग विवेचन आढळते. त्यात निदान व चिकित्सा या दोन्ही गोष्टी येतात. त्याचबरोबर विविध औषधींचे स्वरूप आणि त्यांचे गुणधर्म यांचाही परिचय होतो. गरुड पुराणात वनस्पतींच्या नावांची विस्तृत सूची मिळते व त्यांचे द्रव्यगुणही समजतात. सर्पविष दूर करण्याची विद्या गारुडी विद्या या नावाने अग्नी पुराणात उपन्यस्त आहे (१९७). त्याचबरोबर सिद्धयोग व कल्पयोग यांचेही विवरण आहे. एका ठिकाणी वृक्षायुर्वेदही सांगितला आहे (२८२). या प्रकरणात वृक्ष, लता, कुंज, इ. वनस्पतिसृष्टीला होणारे रोग व त्यावरचे उपचार यांची माहिती मिळते.

(३) रत्नपरीक्षा — प्राचीन भारतात रत्ने अलंकार म्हणून तर वापरीतच; शिवाय त्यांचा वैद्यकशास्त्रातही उपयोग होत असे. मणी, मंत्र व ओषधी या तीन रोगहारक व सिद्धिदायक वस्तूंत मणी या शब्दाने रत्नांचाच अंतर्भाव केलेला आहे. निरनिराळ्या ग्रहांची निरनिराळी रत्ने सांगितली असून, त्या त्या ग्रहाचे चांगले फल अधिक मात्रेने मिळावे, म्हणूनही रत्नांचा उपयोग करण्यास सांगितले आहे. गरुड पुराणात अशा अनेक रत्नांचे वर्गीकरण व त्यांच्या गुणदोषांचे विवेचन केले आहे. मुक्ताफल, पद्मराग, मरकत, इंद्रनील, वैदूर्य, पुष्पराग, कर्केतन, पुलक, स्फटिक, प्रवाळ, इ. रत्नांची नावे व त्यांची परीक्षा गरुड पुराणात दिलेली आहे.

(४) वास्तुविद्या — मंदिर व राजप्रासाद यांच्या निर्मितीच्या शास्त्राला वास्तुविद्या असे म्हणतात. राजांना या विद्येचा विशेष उपयोग असे. ही विद्या मत्स्य, अग्नी, विष्णुधर्मोत्तर व गरुड या पुराणांत विवेचिली आहे. मत्स्य पुराणातले या विषयीचे विवेचन विशेष महत्त्वाचे आहे. त्यात वास्तुविद्येचे मूल सिद्धान्त, स्थानाची निवड, निर्मितीचा नकाशा, देवमूर्तींची निर्मिती व मंदिर–प्रासादांची रचना हे चार विषय प्रामुख्याने चर्चिले आहेत. मत्स्य पुराणाने या शास्त्रातल्या अठरा आचार्यांची नावेही दिली आहेत (२५२–२५३).

(५) सामुद्रिकविद्या — स्त्री–पुरुषांच्या शारीरिक शुभाशुभ लक्षणांचा विचार या विद्येत येतो. हिलाच अंगविद्या असेही दुसरे नाव आहे. अग्नी पुराण (२४३–२४५) व गरुड पुराण (१.६३–६५) यांमध्ये या विद्येचा प्रपंच केला आहे. स्त्री–पुरुषांच्या अवयवांचे स्वरूप, त्यांची लांबी–रुंदी, इ. गोष्टी पाहून त्या स्त्री–पुरुषांचे जीवन कशा प्रकारे घडेल याची कल्पना देणे, हे या विद्येचे प्रयोजन होय. रामायणाच्या सुंदरकांडात रामाच्या शारीर सुलक्षणांचे वर्णन दिले आहे, ते या विद्येचेच एक अंग होय (वा. रा. सुंदर. ३५. १५–२०).

(६) धनुर्विद्या — अग्नी पुराणाच्या चार अध्यायांत (२४९-२५२) या विद्येचे सारसंकलन आहे. ब्रह्मा, प्रजापती, इंद्र, मनू, जमदग्नी, अगस्त्य व भारद्वाज हे धनुर्विद्येचे प्राचीन आचार्य होत. त्या काळी धनुष्यबाण हेच दुरून शत्रुसंहार करण्याचे प्रमुख शस्त्र असल्यामुळे त्याचे शास्त्र निर्माण झाले होते म्हणून पुराणानाही त्या शास्त्राची दखल घ्यावी लागली.

**पुराणांतील अलौकिक विद्या** — भारतीय वाङ्मयात चौदा विद्या प्रसिद्ध आहेत. या विद्यांच्या नावांत फेरबदल असेल; पण संख्येत नाही. पुराणांतील निरनिराळ्या आख्यानांच्या अनुषंगाने ज्या चौदा विद्या निर्दिष्ट केलेल्या आहेत, त्यांची नावे पुढीलप्रमाणे —

(१) अनुलेपनविद्या — या विद्येत एका विशिष्ट लेपाचा उपयोग सांगितला आहे. हा लेप पायाला लावला असता अर्ध्या

दिवसात सहस्र योजने चालण्याची शक्ती पायांत येते, असे सांगितले आहे. एका ब्राह्मणाला हा पादलेप मिळाला होता. त्याच्या प्रभावाने तो सुखेनैव हिमालय चढून गेला; पण सूर्य-किरणांनी तापलेल्या बर्फावर पाय ठेवताच तो लेप धुतला गेल्याने त्याची प्रवास करण्याची अलौकिक शक्ती नष्ट झाली (मार्क. पु. ६१.८.२०).

(२) स्वेच्छारूपधारिणी विद्या – या विद्येमुळे माणसाला इच्छेनुरूप रूप धारण करता येत असे. मदनिका नावाच्या एका राक्षसपत्नीला, महिषासुराला, धर्ममूर्ती नामक राजाला व इतर अनेक राक्षस लोकांना ही विद्या अवगत होती (मार्क. पु. २; ८३. २०; स्कंद पु. ब्रह्मखंड, ७. १५. २७; पद्म पु. २१. ३).

(३) अस्त्रग्रामहृदयविद्या – ही विद्या साध्य झाल्याने अस्त्रांचे रहस्य समजत असे आणि त्यामुळे शत्रुपराजय सुलभ होत असे. मनोरमा नावाच्या विद्याधरीने आपल्यावर चाल करून आलेल्या राक्षसापासून सुटका करून घेण्यासाठी स्वारोचिष मनूला ही विद्या दिली होती (मार्क. पु. ६३. २४–२७).

(४) सर्वभूतरुतविद्या – या विद्येमुळे माणसाला सर्व जीव-जंतूंच्या ध्वनीचा अर्थ समजत असे. विभावरी नामक विद्याधरीने ही विद्या स्वारोचिष मनूला दिली होती (मार्कं. पु. ६४. ३). ब्रह्मदत्त राजालाही ही विद्या अवगत होती (मत्स्य. पु. २०. २५).

(५) पद्मिनी विद्या – या विद्येच्या प्रभावाने भूमिगत निधींची प्राप्ती होत असे. कलावती नामक स्त्रीने ही विद्या स्वारोचिषाला दिली होती (मार्क. पु. ६४. १४).

(६) रक्षोघ्नविद्या – यज्ञांना विघ्न करणाऱ्या राक्षसांना पिटाळून लावण्यासाठी किंवा मारण्यासाठी या विद्येचा उपयोग होत असे.

(७) जालंधरी विद्या – वाल्मीकीने रामपुत्र कुश– लवांना ही विद्या शिकविली होती, असे पद्म पुराणावरून कळते. पण तिथे त्या विद्येचे स्वरूप मात्र सांगितलेले नाही.

(८) पराबाला विद्या – ही विद्या सर्व सिद्धिप्रदायिनी होती. त्रिपुरा सुंदरीने अर्जुनाला या विद्येचा उपदेश केला होता. तिच्या प्रभावामुळे त्याला कृष्णलीलेचे रहस्य समजून आले (स्कंद पु. पाताल. ४३. ४०).

(९) पुरुषप्रमोदिनी विद्या – या विद्येच्या प्रभावाने स्त्रिया पुरुषांना मोह घालून आपल्याला वश करून घेत. यमाची कन्या सुनीथा हिला रंभेने ही विद्या शिकविली होती. तिच्या प्रभावाने तिने अत्रिपुत्र अंश याला वश करून घेतले व ती त्याची पत्नी बनली. ही एक प्रकारची वशीकरण विद्याच आहे. हिचे वर्णन व काही प्रयोग अग्नी पुराणात दिलेले आहेत (१२३–२६).

(१०) उल्लाघनविधानविद्या – या विद्येच्या प्रभावाने वाकडी वस्तू सरळ करता येत असे. याच विद्येच्या बळावर श्रीकृष्णाने अष्टांगीं वक्र असलेल्या कुब्जेला सरळ केले (विष्णू पु. ५. २०. ९).

(११) देवहूती विद्या – ही देवांना आवाहन करण्याची विद्या होती. दुर्वासाने ही विद्या कुंतीला दिली होती. त्या विद्येचा प्रयोग करून कुंतीने सूर्याचे स्मरण करताच तो तिच्या-पुढे प्रकट झाला, अशी कथा भारत व भागवत यांत आली आहे.

(१२) युवकरणविद्या – एखाद्या जीर्ण वस्तूला स्पर्श कर-ताच ती वस्तू या विद्येच्या प्रभावामुळे तरुण, ताजी व टव-टवीत बने. शंतनूला ही विद्या अवगत होती. तिच्या बळावर तो केवळ स्पर्शाने वृद्धांनाही तरुण बनवीत असे (भाग. पु. ९. २१. ११).

(१३) वज्रवाहिनिका विद्या – या विद्येच्या बळावर युद्धात शत्रूचे अचूक विधान करून त्याचा वध करता येत असे (लिंग पु. ५१).

(१४) गोपाल मंत्र विद्या– हे एक मंत्रविधान आहे. ही विद्या शंकराने पुष्पश्रव मुनीच्या पुत्राला दिली होती. तिच्या प्रभावाने साधकाला वाक्सिद्धी प्राप्त होत असे.

**पुराणांची वर्णनशैली** – प्रतिपाद्य विषयाचे यथार्थ निरूपण शब्दाच्या माध्यमातून होत असते. प्रतिपाद्य विषय ज्या प्रकारचा तत्त्वात्मक किंवा भावात्मक असेल, त्या प्रकाराला पोषक व अभिव्यंजक अशी भाषा किंवा शैली ग्रंथकार वापरीत असतो. दार्शनिक विषयावर सूत्रे, व्याख्या किंवा भाष्ये लिहिणाऱ्या ग्रंथकारांची भाषा दार्शनिक विषयांना अनुरूप अशी उदात्त आणि शास्त्रीय होते. या उलट कवीला कोमल भावांची अभिव्यक्ती करायची असते, म्हणून त्याची भाषा स्वभावतःच सरसमधुर होते. याप्रमाणेच पुराणांच्या भाषेचीही एक वेगळी शैली आहे. पुराणे ही अर्थप्रधान आहेत. विवक्षित अर्थ वाचकाला स्वच्छ-पणे कळावा, याविषयी पुराणांचा आग्रह असतो. त्यामुळे ती शब्दाला प्राधान्य देत नाहीत किंवा रसालाही महत्त्व देत नाहीत. पुराणांची भाषा ही सुहृत्संमित असते. ज्याप्रमाणे एखादा सुहृद आपल्या मित्राच्या हितासाठी प्रेरित होऊन त्याला कथा आणि उदाहरणे यांच्या द्वारे विवक्षित गोष्ट पटवून देतो, त्याच ढंगाने आणि शैलीने पुराणे आपले कार्य करतात.

पुराणांचे लक्ष्य सर्वसामान्य जनांचे चित्त आकृष्ट करून त्यांना धर्माच्या मार्गी लावणे हे आहे. त्यासाठी पुराणे सोपी आणि सरळ भाषा स्वीकारतात. पुराणांना काहीतरी शिकवायचे असते; आणि तेही लोकानुरंजन करून. पुराणांचे वाङ्मयीन स्वरूप पाहताना ही गोष्ट स्पष्ट दिसते. पुराणे पाप–पुण्यांचा

प्रपंच करतात आणि पापापासून निवृत्ती आणि पुण्याकडे प्रवृत्ती व्हावी, यासाठी लोकांना उपदेश देतात. ती वेदांप्रमाणे आदेश देत नाहीत.

पुराणांची भाषा लोकव्यवहाराला प्राधान्य देणारी असल्यामुळे ती व्याकरणाच्या बंधनात सर्वस्वी राहिलेली नाही. त्यामुळेच पुराणांच्या भाषेत अपाणिनीय प्रयोग वैपुल्याने आढळतात.

पुराणांत अलंकारांचा विन्यासही वरील मूलभूत तात्पर्य दृष्टीपुढे ठेवूनच केलेला असतो. तो काव्यशोभाकर नसून, काव्यगत अर्थाला उपोद्‌बलक असतो. त्यांतल्या उपमा–उत्प्रेक्षा बहुसंख्य लोकांच्या व्यावहारिक अनुभूतीला धरून असतात. उदा० संसाराचे अशाश्वत स्वरूप सांगण्यासाठी दृष्टांत म्हणून दिलेला पुढील श्लोक पाहा–

**यथा हि पथिकः कश्चिच्छायामाश्रित्य तिष्ठति ।**
**विश्रम्य च पुनर्गच्छेद् तद्वद् भूतसमागमः ।।**

(पद्म. पु. ५.१८.१३८)

अर्थ – ज्याप्रमाणे एखादा वाटसरू एखाद्या वृक्षाच्या छायेत (काही काल) बसतो आणि विश्रांती घेऊन पुढे निघून जातो, त्याप्रमाणे जीव या संसारात येतात, काही काल तिथे वास्तव्य करतात आणि नंतर मृत्यूच्या द्वारे निघून जातात.

काल हे सृष्टीतले एक प्रबल तत्त्व आहे. कालामुळेच सृष्टीत सदैव उलथापालथी होत असतात. कालाचा हा महिमा सांगण्यासाठी भागवत पुराणात पुढील श्लोक आलेला आहे–

**यथा प्रयान्ति संयान्ति स्त्रोतोवेगेन वालुकाः ।**
**संयुज्यन्ते वियुज्यन्ते तथा कालेन देहिनः ।।**

(भाग. पु. ६.१५.३)

अर्थ – ज्याप्रमाणे नदीतले वाळूचे कण प्रवाहाच्या वेगाने पुढे जातात आणि त्या जागी दुसरे येतात, त्याचप्रमाणे या संसारात कालाच्या प्रभावामुळे प्राण्यांचे संयोग–वियोग घडत असतात.

हाच वाळूचा दृष्टांत निराळ्या कारणांसाठी पद्म पुराणात दिलेला आहे–

**अन्यस्माल्लब्धोष्मा नीचः प्रायेण दुःसहो भवति ।**
**रविरपि न तपति तादृक् यादृशं तपति वालुकानिकरः ।।**

(पद्म पु. ६.८.१४)

अर्थ – दुसऱ्याकडून ज्याला धनरूपी उष्णता प्राप्त होते, असा नीच बहुधा दुस्सह बनतो. (उदाहरण सांगायचे तर) सूर्याकडून उष्णता घेणारा वाळूचा ढीग मध्यान्हीच्या वेळी ज्या प्रमाणात दुस्सह असे चटके देतो, त्या प्रमाणात सूर्यही देत नाही.

देहाची अनित्यता पटविण्यासाठी भागवतमाहात्म्यात जो दृष्टांत वापरला आहे, तो तर तत्काळ पटण्याजोगा आहे–

**यत्प्रातः संस्कृतं चान्नं सायं तच्च विनश्यति ।**
**तदीयरससम्पुष्टे काये का नाम नित्यता ।।**

अर्थ – प्रातःकाळी शिजवलेले अन्न सायंकाळी शिळे होते, नासून जाते. मग अशा त्या नाशिवंत अन्नावर पोसल्या गेलेल्या देहाच्या नित्यतेबद्दल काय बोलावे !

पुराणे कित्येकदा ऋतुवर्णनेही करतात आणि त्या वर्णनात जाता जाता लोकव्यवहाराचे निदर्शनही करून जातात. पुढील सहा श्लोक याचे उदाहरण म्हणून देता येतील –

**न बबन्धाम्बरे स्थैर्यं विद्युदत्यन्तचञ्चला ।**
**मैत्रीव प्रवरे पुंसि दुर्जनेन प्रयोजिता ।।**

(विष्णू पु. ५.६.४२)

अर्थ – (वर्षाऋतूत) आभाळात वीज चमकते; पण अत्यंत चंचल असल्यामुळे ती आकाशात स्थिर राहू शकत नाही. श्रेष्ठ पुरुषांशी दुर्जनांनी केलेली मैत्री तरी कुठे स्थिर राहते !

**ऊहुरुन्मार्गवाहीनि निम्नगाम्भांसि सर्वतः ।**
**मनांसि दुर्विनीतानां प्राप्य लक्ष्मीं नवामिव ।।**

(विष्णू पु. ५.६.३८)

अर्थ – वर्षाकाली नद्यांना पूर आला म्हणजे त्या भलत्या दिशेने वाहू लागतात. दुर्विनीत (उन्मत्त) पुरुषांना नव्याने लक्ष्मी प्राप्त झाली की त्यांचीही मने अशीच उन्मार्गगामी बनतात.

**जलौघैर्निरभिद्यन्त सेतवो वर्षतीश्वरे ।**
**पाखण्डिनामसद्वादैर्वेदमार्गाः कलौ यथा ।।**

(विष्णू पु. ५ ६.३८)

अर्थ– पाऊस धो धो पडू लागला म्हणजे नदीनाल्यांवरचे पूल किंवा शेताचे बांध उद्ध्वस्त होऊन जातात. कलियुगात पाखंडी लोकांच्या खोटया मतवादांनी वेदमार्गही तसेच उत्सन्न होतात.

**मार्गा बभूवुः सन्दिग्धास्तृणैश्छन्ना असंस्कृताः ।**
**नाभ्यस्यमानाः श्रुतयो द्विजैः कालहता इव ।।**

(भाग. पु. १० २०.१६)

अर्थ– (वर्षा ऋतूत) उखर-पाखर झाल्यामुळे व गवताने आच्छादल्यामुळे पायवाटा संशयास्पद होतात. ब्राह्मणांनी अभ्यास न ठेवल्यामुळे कालहत झालेल्या श्रुतीही तशाच संशयास्पद बनतात.

**उत्सृज्य जलसर्वस्वं विमलाः सितमूर्तयः ।**
**तत्यजुश्चाम्बरं मेघा गृहं विज्ञानिनो यथा ।।**

(विष्णू पु. ५.१०.४)

अर्थ– (शरत्काली) आपल्या जलसंपत्तीचा सर्वस्वी त्याग करून विमल व शुभ्र झालेले मेघ आकाशाचा त्याग करतात.

ज्ञानी पुरुषांचेही तसेच असते. ते मायाममतेचा त्याग करून निर्मल होतात व ( अखेर ) गृहाचा त्याग करून निघून जातात.

**अवाप्तुस्तापमत्यर्थं शफर्यः पल्वलोदके ।**
**पुत्रक्षेत्रादिसक्तेन ममत्वेन यथा गृही ।।**

(विष्णू पु. ५.१०.२)

अर्थ– (शरद ऋतूत) डबक्यातले पाणी आटले, की त्यात राहणाऱ्या लहान मासोळ्यांना खूप ताप होतो. माझी मुले, माझी शेतीवाडी, अशा ममत्वाने आसक्त झालेल्या गृहस्थाचीही तीच गत होते.

कवी कधी पुराणे एखादे सांग रूपक वापरून आपला इष्ट आशय व्यक्त करताना दिसतात संसाराला सागराची उपमा अनेक ठिकाणी दिली जाते. पण संसारावर सागराचे रूपक बसवून त्याचे वर्णन ब्रह्म पुराणाने केले आहे, ते असे–

**कष्टेऽस्मिन् दुःखबहुले निःसारे भवसागरे ।**
**रागग्राहाकुले रौद्रे विषयोदकसम्प्लवे।।**
**इन्द्रियावर्तकलिले दृष्टोर्मिशतसङ्कुले ।**
**मोहपङ्काविले दुर्गे लोभगम्भीरदुस्तरे ।।**
**निमज्जज्जगदालोक्य निरालम्बमचेतनम् ।।**

(ब्रह्म पु. २६.१९-२१)

अर्थ– हा संसाररूपी सागर निःसार, कष्टमय व दुःखबहुल आहे. यात रागरूपी सुसरी भरलेल्या आहेत. तो क्रूर आहे. विषयरूपी उदकाने तो भरलेला आहे. त्यात जागोजागी इंद्रियरूपी भोवरे आहेत. दैवरूपी शेकडो लाटांनी तो उसळताना दिसतो. त्यात मोहरूपी चिखल दाटलेला आहे. त्यामुळे तो दुर्गम झाला आहे. लोभाने तो तरून जाण्यास कठिण झाला आहे. अशा या भवसागरात आलंबनरहित व अचेतन असे जग बुडत असलेले पाहून दुःख होते.

वाग्धेनू व यज्ञवराह ही पुराणांतली आणखी दोन रूपके आहेत. वाक् म्हणजे वेदत्रयी. तिचा धेनुरूपाने उपन्यास प्रथम बृहदारण्यकाने केला (५.८). त्याचे उपबृंहण मार्कंडेय पुराणाने पुढीलप्रमाणे केले आहे––

**सर्वस्याधारभूतेयं वत्स, धेनुस्त्रयी मयी ।**
**यस्यां प्रतिष्ठितं विश्वं विश्वहेतुश्च या मता ।।**
**ऋक्पृष्ठाऽसौ यजुर्मध्या सामवक्त्रशिरोधरा ।**
**इष्टापूर्तविषाणा च साधुसूक्ततनूरुहा ।।**
**शान्तिपुष्टिशकृन्मूत्रा वर्णपादप्रतिष्ठिता ।**
**आजीव्यमाना जगतांसाक्षया नापचीयते ।।**

(मार्क. पु. २९.६-८)

अर्थ– वत्सा, वेदत्रयरूप धेनू सर्वांना आधारभूत आहे. हिच्या ठिकाणी विश्व प्रतिष्ठित असून, ही विश्वाला कारणीभूत मानलेली आहे. ऋग्वेद ही हिची पाठ, यजुर्वेद ही कटी, सामवेद हे तोंड व मान, इष्टापूर्त ही शिंगे, चांगली सूक्ते हे केस आणि शांती व पुष्टी हे विष्ठा व मूत्र होत. ही वर्णरूपी पायांवर उभी आहे. जगत हे हिचे खांदे आहेत. ही अविनाशी व कृश न होणारी आहे.

यज्ञवराह ही रूपककल्पना मत्स्य, वायू, ब्रह्म, ब्रह्मांड, इ. अनेक पुराणांनी विस्तारून मांडली आहे. नारायणाने वराहरूप घेऊन वेदांचा उद्धार केला व बुडत्या पृथ्वीला वर काढून स्वस्थानी प्रतिष्ठित केले, अशी ती कथा आहे. ह्याच वराह पुराणांनी यज्ञरूपात स्तविला आहे. मत्स्य पुराणाने ते रूपक फुलवले आहे, ते असे–

**वेदपादो यूपदंष्ट्रः क्रतुदन्तश्चितीमुखः ।**
**अग्निजिह्वो दर्भलोमा ब्रह्मशीर्षो महातपाः ।।**
**अहोरात्रेक्षणधरो वेदाङ्गश्रुतिभूषणः ।**
**आज्यनासः स्रुवतुण्डः सामघोषस्वनो महान् ।।**

(मत्स्य पु. २४७.६७-६९)

अर्थ – चार वेद हे या यज्ञवराहाचे पाय, यूप ही दाढ, क्रतू हा दात, चयन हे मुख, अग्नी ही जिव्हा, दर्भ हे केस, ब्रह्म हे मस्तक, अहोरात्र हे डोळे, वेदाङ्गे हे अलंकार, आज्य ही नासिका, स्रुवा ही सोंड व सामघोष हा या महातप वराहाचा महानाद होय.

सर्व पुराणांत भागवताची वर्णनशैली ही अत्यंत काव्यमय आणि सरस–मनोज्ञ आहे. लीलाविहारी श्रीकृष्ण हा भागवताचा नायक होय. भागवतात वेदस्तुतीच्या रूपाने नामरूपातीत व अवाङ्मनसगोचर अशा ब्रह्मस्वरूपाची अद्वैत वेदान्ताला धरून स्तुती केलेली आढळते. तो वेदस्तुतीचा भाग दिव्योदात्त असा आहे. त्याचबरोबर श्रीकृष्णाच्या सगुण रूपाचे, त्याच्या विविध लीलांचे, गोपींसह केलेल्या त्याच्या रासक्रीडेचे, त्याच्या पराक्रमाचे आणि त्याच्या भक्तवत्सलतेचे वर्णन करण्याचा जेव्हा जेव्हा प्रसंग येतो, तेव्हा तेव्हा व्यासमहर्षींची प्रतिभा झंकारून उठते. मग अनेक काव्यगुणांनी तो प्रसंग पल्लवित होतो. श्रीकृष्णाच्या देहसौंदर्याचे वर्णन व्यासांनी स्वतः केले आहे व इतरांकडूनही करविले आहे. त्याचे एक उदाहरण भीष्मांचे. भीष्म अंतकाळाची वाट पाहत शरशय्येवर पहुडले असता त्यांच्या मनश्चक्षूंसमोर नेहमी श्रीकृष्णाची सावळी श्रीमूर्त उभी असे. त्या सगुण–साकार परब्रह्माचे भीष्माने अकरा श्लोकांत स्तवन केले आहे. त्यांतले काही श्लोक असे–

**त्रिभुवनकमनं तमालवर्णं रविकरगौरवराम्बरं दधाने ।**
**वपुरलककुलावृताननाब्जं विजयसखे रतिरस्तु मेऽनवद्या ।।**

**स्वनिगममपहाय मत्प्रतिज्ञामृतमधिकर्तुमवप्लुतो रथस्थः ।**
**धृतरथचरणोऽभ्ययाच्चलद्गुर्हरिरिव हन्तुमिमं गतोत्तरीयः ।।**
(भाग. पु. १.९.३३, ३७)

भावार्थ – तो भगवान श्रीकृष्ण त्रिभुवनसुंदर आहे. त्याचा वर्ण सावळा असून, त्याने रविकिरणासारखे शुभ्र व तलम वस्त्र परिधान केले आहे भुरभुरणाऱ्या केसांनी त्याचे मुखकमल झाकोळले आहे तो अर्जुनाचा सखा आहे. त्याच्या ठिकाणी माझी अनिंद्य प्रीती असो. 'युद्धात मी शस्त्र धरणार नाही' अशी त्याची प्रतिज्ञा. 'मी तुला शस्त्र धरायला लावीन' ही माझी प्रतिज्ञा. (भारतीय युद्धातल्या) त्या आणिबाणीच्या प्रसंगी अर्जुन माझ्या शरवर्षावाने जर्जर झाला असता तो श्रीहरी आपली प्रतिज्ञा विसरला व माझी प्रतिज्ञा खरी करण्यासाठी रथाखाली उतरला. त्याने रथाचे चाक हाती घेतले आणि तो मला मारण्यासाठी सिंहासारखा माझ्यावर चाल करून आला. तसे करताना त्याचे उत्तरीयही गळून पडले.

काही पुराणांवर कालिदास व बाणभट्ट यांचाही प्रभाव आढळतो. पद्म पुराणातले शकुंतलेचे आख्यान कालिदासाच्या अभिज्ञान शाकुंतलाचा मागोवा घेऊन लिहिलेले आहे. शिव-पार्वतींच्या विवाहाचे सविस्तर वर्णन शिव पुराणात आले आहे. त्यात कालिदासाच्या कुमारसंभवाची उसनवारी उघड उघड दिसून येते. पार्वती शिवाच्या प्राप्तीसाठी तप करीत असता शिव ब्रह्मचाऱ्याच्या वेषाने तिच्याकडे आला व तिचे मन पराङ्मुख करण्यासाठी स्वतःचीच निंदा करू लागला, हा प्रसंग कुमारसंभवाच्या पाचव्या सर्गात (श्लो. ६५ ते ७३) वर्णिला आहे. त्यातले तेच शब्द आणि त्याच कल्पना उचलून शिव पुराणाने तो प्रसंग सजवला आहे. त्यांतले काही श्लोक असे—

**चन्दनं च त्वदीयाङ्गे चिताभस्म शिवस्य च ।**
**क्व दुकूलं त्वदीयं वै शाङ्करं क्व गजाजिनम् ।।**
**यदि द्रव्यं भवेत्तस्य कथं स स्याद्दिगम्बरः ।**
**वाहनं च बलीवर्दः सामग्री तस्य कापि न ।।**
**वरेषु ये गुणाः प्रोक्ता नारीणां सुखदायकाः ।**
**तन्मध्ये हि विरूपाक्षे न एकोऽपि गुणः स्मृतः ।।**
(शिव पु. रुद्र सं. २७)

अर्थ – (हे पार्वती, शिव तुला कुठल्याही दृष्टीने अनुरूप नाही) तुझ्या अंगी चंदनाची उटी, तर शिवाच्या अंगाला चिताभस्म. कुठे तू नेसलेले रेशमी तलम वस्त्र; तर कुठे शंकराच्या पाठीवरचे ते हत्तीचे कातडे ! जर त्याच्यापाशी द्रव्य असते, तर तो दिगंबर कसा राहिला असता ! त्याचे वाहन काय तर बैल. कसलीही (संसारोपयोगी) सामग्री त्याच्याजवळ नाही. वराच्या ठिकाणी अपेक्षित म्हणून जे काही गुण सांगितले आहेत व जे स्त्रियांना सुखकारक ठरणारे आहेत, अशांपैकी एकही गुण विरूपाक्ष शिवाच्या ठिकाणी आढळत नाही. (तेव्हा तू त्याचा नाद सोडून दे.)

परिसंख्या अलंकार हा बाणभट्टाचा हातखंडा अलंकार होय. तो श्लेषविहीन असला तरी मनोहर वाटतो; मग श्लेषयुक्त असला तर त्याची बहार काय वर्णावी ! याच बाणभट्टाच्या शैलीचे अनुकरण करून स्कंद पुराणाच्या काशीखंडात दिवोदासाच्या राज्याचे वर्णन केले आहे, ते असे—

**विभ्रमो यत्र नारीषु न विद्वत्सु च कर्हिचित् ।**
**नद्यः कुटिलगामिन्यो न यत्र विषये प्रजाः ।।**
**तमोयुक्ता क्षपा यत्र बहुलेषु न मानवाः ।**
**रजोजुषः स्त्रियो यत्र न धर्मबहुला नराः ।।**
(स्कंद पु. काशीखंड २४.९–१०)

अर्थ – (काशीच्या राज्यात) विद्वानाच्या ठिकाणी कधीही विभ्रम (संशयास्पद अवस्था) नाही; तर तो स्त्रियांच्या ठिकाणी (विभ्रम = विलास) आहे. त्या राज्यातील प्रजा कुटिलगमिनी (कुमार्गाने जाणाऱ्या) नाहीत; तर तिथल्या नद्या कुटिलगमिनी (वळणावाकणांनी वाहणाऱ्या) आहेत. त्या राज्यात माणसे तमोयुक्त (अज्ञानयुक्त) नाहीत, तर कृष्ण पक्षातील रात्री तमोयुक्त (अंधारयुक्त) आहेत. त्या राज्यातले धर्मसंपन्न पुरुष रजोजुष (रजोगुणयुक्त) नाहीत; तर स्त्रिया तेवढ्या रजोजुष (ज्यांना मासिक रजोदर्शन असते अशा) आहेत.

निसर्गवर्णन करण्यातही पुराणकारांनी अनेक ठिकाणी आपली प्रतिभा आणि निरीक्षणशक्ती यांचा प्रत्यय घडविला आहे. मत्स्य पुराणात काशीच्या उपवनाचे विस्तृत वर्णन आले आहे. ते या दृष्टीने पाहण्याजोगे आहे. काशीला आनंदकानन असे दुसरे नाव आहे. या आनंदकाननात पार्वतीसह सुखसंचाराला आलेला कैलासराणा शंकर पार्वतीला तिथली वनशोभा दाखवीत आहे, असा तो प्रसंग आहे. हे काशीचे उद्यान शिव-पार्वतींना कसे दिसले त्याच्या वर्णनातले चार श्लोक असे—

**प्रोत्फुल्लनानाविधगुल्मशोभितं लताप्रतानावनतं मनोहरम् ।**
**विरूढपुष्पैः परितः प्रियङ्गुभिः सुपुष्पितैः कण्टकितैश्च केतकैः ।।**
**मदाकुलाभिस्त्वमराङ्गनाभिर्निषेवितं चारु सुगन्धिपुष्पम् ।**
**क्वचित् सुपुष्पैः सहकारवृक्षैर्लतोपगूढैस्तिलकद्रुमैश्च ।।**
**प्रगीतविद्याधरसिद्धचारणं प्रवृत्तनृत्याप्सरसाङ्गणाकुलम् ।**
**प्रहृष्टनानाविधपक्षिसेवितं प्रमत्तहारीतकुलोपनादितम् ।।**
**निबिडनिचुलनीलं नीलकण्ठाभिरामं**
**मदमुदितविहङ्गव्रातनादाभिरामम् ।**
**कुसुमिततरुशाखालीनमत्तद्विरेफं**

**नवकिसलयशोभाशोभितप्रान्तशाखम् ।।**

(मत्स्य पु. वाराणसीमाहात्म्यवर्णन, २४,२८–३०)

भावार्थ— काशीतले ते उपवन प्रफुल्लित अशा नानाविध कुंजांनी सुशोभित होते. वेलींच्या ताटव्यांनी नम्र होऊन ते मनोहर दिसत होते. त्याच्या सभोवती पुष्पित अशा प्रियंगुलता बहरल्या होत्या. मधून मधून काटेरी केवडे फुललेले होते. प्रणयधुंद अशा देवांगना त्या वनात आल्या होत्या. त्यांत सुदर, सुगंधी पुष्पे उमलली होती. कुठे कुठे आम्रवृक्षांना मोहर आला होता. कुठे कुठे तिलक वृक्षांना लतांनी आलिंगन दिले होते. तिथे विद्याधर, सिद्ध, चारण गात होते. तिथे अप्सरांचे नृत्य चालत होते. नाना प्रकारचे पक्षी तिथे आनंदाने उडत होते. मदयुक्त कबुतराचे थवे कलकलाट करीत होते. त्या वनात जल-वेत विपुल असल्यामुळे ते निळे दिसत होते. मोरांच्या संचाराने त्याला शोभा आली होती. मदमत्त पक्ष्यांच्या थव्यांचा नाद तिथे श्रुतिसुखद वाटत होता. तिथे फुललेल्या वृक्षशाखांच्या ठिकाणी भ्रमर लीन झाले होते आणि नवपल्लवांच्या शोभेने आजूबाजूच्या वृक्षशाखा दृष्टीला सुखवीत होत्या.

पुराणांतील अशी कित्येक स्थळे सरस-मनोज्ञ आहेत. ती वाचीत असता आपण पुराण वाचीत नसून, एखादे प्रसादयुक्त काव्यच वाचीत आहो, असे वाटते.

**पौराणिकदर्शन**— पुराणांनी प्रसंगवशात तत्त्वज्ञानदर्शक विचारही व्यक्त केले आहेत. पुराणांतले हे दर्शन अद्वैतपर आहे. नाना रूपांनी भासणाऱ्या या जगताच्या मुळाशी एका सर्वशक्तिमान तत्त्वाची सत्ता आहे आणि त्या सत्तेवरच हे विश्व स्थित आहे, असे पुराणे मानतात. वैष्णव पुराणात हे परमतत्त्व विष्णुरूपाने, शैव पुराणात शिवरूपाने व भागवत पुराणात कृष्णरूपाने ओळखले गेले आहे.

पुराणमते ते तत्त्व सगुण व निर्गुण असे उभयविध आहे. पण सामान्य मानवांच्या भक्तीसाठी त्याचे सगुणरूपच विशेष ग्राह्य होय. पुराणे कर्म, भक्ती व ज्ञान या तीन्ही मार्गांचे विवेचन करतात; पण त्यांतल्या त्यात त्यांचा भक्तीविषयी विशेष आग्रह आहे. भक्तिमार्गाचा आश्रय केल्याने मानवाला या दुःखरूप संसारातून सुखेनैव उद्धरून जाता येते. भागवताच्या एकादश स्कंधात या भक्तीचे सांगोपांग विवेचन साक्षात भगवंताच्याच मुखाने केलेले आहे. भक्तीबरोबरच योगाविषयीही पुराणांना आस्था आहे. शैव पुराणांत तो पाशुपत योग व वैष्णव पुराणांत तो भागवत योग या नावाने वर्णिलेला आहे

जीव, जगत, ब्रह्म व साधनमार्ग असे कोणत्याही दर्शनाचे चतुःसूत्र होय. त्या दृष्टीने पुराणांत येणारे विचार असे—

जीव – प्रकृती व पुरुष या दोहोंच्या संयोगातून नानाविध जीव निर्माण होतात. जल हे उपादानकारण व वायू हे निमित्तकारण यांच्या संयोगाने बुडबुडा नावाचा पदार्थ निर्माण होतो; पण तो कोणी स्वतंत्र पदार्थ नसतो. प्रकृति-पुरुषांच्या संयोगातून उत्पन्न झालेला जीवही तसाच आहे. तो स्वतंत्र नसून अध्यासरूप आहे. सगुणाच्या भाषेत सांगायचे, तर भगवान हा शास्ता असून, जीव हा शासित आहे. भगवान नियामक असून, जीव नियम्य आहे. जीवांची भिन्नता व त्यांचे पृथक अस्तित्व हे भगवंताकडून नियंत्रित आहे. जीव नेहमी मायेच्या पाशात बद्ध असतो; तो इंद्रियांच्या द्वारे विषयसेवन करतो आणि शरीरेंद्रियांना आत्मस्वरूप मानतो. आनंदादी गुणांनी तिरोहित झाल्याकारणाने तो संसारदुःखात पडतो.

जग – जग त्रिगुणात्मक असून, ते वस्तुतः सत्य नाही. पण सत्य अधिष्ठानाच्या आश्रयाने राहिल्यामुळे ते सत्य असे भासते. जग हे आत्म्यामध्येच कल्पित असून, आत्म्यानेच व्याप्त आहे. म्हणूनच आत्मज्ञानी लोक त्याला आत्मरूप मानतात व त्याच रूपाने त्याचा स्वीकार करतात. सुवर्णाचे अलंकार बनविले, तरी शेवटी ते सुवर्णरूपच असतात. तद्वत आत्म्याने व्याप्त झालेले जगही शेवटी तद्रूपच आहे.

जग उत्पत्तीच्या पूर्वी नव्हते व प्रलयानंतर राहणार नाही. त्याची ही दोन्ही टोके असद्रूप असल्यामुळे त्याचे मधले रूपही असद्रूपच समजावे. भगवंताच्या केवळ ईक्षणाने मायेमध्ये क्षोभ उत्पन्न होतो. मग ती विचित्र कर्मांचे फल देण्यासाठी सृष्टी करते. सृष्टीत जी विविधता व विषमता दिसते, ती कर्मांच्या विषमतेमुळे आहे. जीव नाना प्रकारची कर्मे करतो व त्या कर्मांचे फल भोगण्यासाठी या सृष्टीत जन्म घेतो.

ब्रह्म – ब्रह्म हे मन, बुद्धी व इंद्रिये या करणांनी सर्वथा रहित असूनही समस्त अंतःकरणे व बाह्यकरणे यांच्या शक्तींनी सर्वदा संपन्न असते. त्यालाच परमात्मा किंवा परमेश्वर असे म्हणतात. तो स्वयंप्रकाश आहे. कोणतेही कार्य करण्यासाठी त्याला इंद्रियांचे साहाय्य तिळभरही लागत नाही. तो या विशाल ब्रह्मांडाचा अधिपती आहे. तो जेव्हा संकल्पमात्रे मायेशी क्रीडा करतो, तेव्हा जीवांची सूक्ष्म शरीरे व त्यांचे सुप्त कर्म आणि संस्कार जागृत होतात. मग जीवांची सृष्टी होते. परमात्मा हा सर्वांभूती सम आहे. त्याला कोणी आपला नसतो, कोणी परका नसतो. काही लोक सगुण रूपात त्याची उपासना करतात, तर काही लोक त्याच्या निराकाराचे चिंतन करतात. परमात्मा या दोन्ही प्रकारच्या भक्तांची सेवा आणि उपासना स्वीकारतो आणि सफल करतो. इतकेच नव्हे, तर हिरण्यकश्यपू, रावण, इत्यादींच्या सारखे जे पुरुष त्याच्याशी सर्वदा वैरभाव धरतात, त्यांच्यावरही अंती तो दया करतो.

परमात्म्याचे शासन अखंड रूपाने या विश्वावर आणि त्यातल्या प्राणिमात्रावर चालते. तो या विश्वाचा षड्गुणैश्वर्य-संपन्न सम्राट आहे. त्याचा कोणाला अंत लागत नाही. सर्वश्रुती भगवंताच्या वर्णनातच चरितार्थ होतात. श्रुतिगम्य आणि श्रुतिबोध्य असा एक परमात्माच असतो.

साधनमार्ग – भक्ती हे परमात्मप्राप्तीचे श्रेष्ठ साधन आहे. तिला वर्णाश्रमांची मर्यादा नाही व देशकालांचेही बंधन नाही. भक्ती हे सरस तत्त्व आहे, कारण ते प्रेममय आहे. प्रेम हे एक जीवनमूल्य आहे. वृत्ती प्रेममय झाली, की जगाचे रूपच पालटते. या प्रेमाच्या काही पायऱ्या आहेत. प्रथम विशिष्ट देवावर प्रेम, मग त्याने निर्माण केलेल्या विभूतीवर प्रेम आणि त्यातून पुढे अखिल मानवमात्रावर प्रेम, अशी ही चढती श्रेणी आहे. ही प्रेमभक्ती मानवी हृदयात ठसावी, तिच्यावर नेहमी जलसिंचन होत राहावे म्हणून पुराणांनी अनेक पूजा व व्रते निर्माण केली आणि त्यांच्या कथाही रचल्या. पुराणांच्या या भक्तिमाहात्म्या-वरूनच भारतात पुढे अनेक भक्तिसंप्रदाय निर्माण झाले. भागवत, रामानुज, माधव, वल्लभ, वीरशैव, चैतन्य, इ. भक्ति-संप्रदायांचे मूळ पुराणांतच आहे.

पुराणे केवळ मुक्तीचाच आदर्श मानीत नाहीत; तर भुक्ती-चाही मानतात. पुराणांत दोहोंचीही प्रतिष्ठा आहे; दोहोंचेही संतुलन आहे. पुराणांत जीवनाचे तीन सोपान मानलेले आहेत– (१) वर्णाश्रमोचित कर्म करावे व निरासक्त चित्ताने त्याचे फल भोगावे. (२) भगवान हा जगच्चालक आणि भक्तकाम-कल्पद्रुम असल्यामुळे त्याच्या कृपेची आकांक्षा धरावी. सदैव श्रद्धापूर्वक त्यालाच शरण जावे. (३) शरीर, वाणी आणि मन त्याच्या सेवेला वाहावे. भूतमात्री भगवंत पाहावा. भूतसेवा ही भगवत्सेवा मानावी. म्हणजे मुक्तीसाठी निराळे काही करायला नको. वारसाहक्काने संमती मिळावी, तशी ती मिळते.

म्हणूनच पुराणांची प्रशस्ती गात असताना शिव पुराणाने म्हटले आहे–

**अन्यो न दृष्टः सुखदो हि मार्गः**
**पुराणमार्गो हि सदा वरिष्ठः ।**
**शास्त्रं विना सर्वमिदं न भाति**
**सूर्येण हीना इव जीवलोकाः ।।**

अर्थ – (इहपरलोकी) सुख देणारा अन्य मार्ग कोणी पाहिला नाही. पुराणमार्ग हाच सर्वदा श्रेष्ठ आहे. सूर्याने रहित असे जीवलोक ज्याप्रमाणे प्रकाशित होत नाहीत, त्याप्रमाणे पुराणशास्त्रावाचून जगात कशाचाही प्रकाश पडत नाही.

**पुराणकथन व श्रवण** – गृहस्थाची जी अनेक नित्य कर्तव्ये आहेत, त्यांत पुराणश्रवण हेही एक आहे. गृहस्थाने तिसऱ्या प्रहरी पुराण ऐकावे, असे सांगितले आहे. या पुराणश्रवणाचे फल असे–

**यथा पापानि पूयन्ते गङ्गावारिविगाहनात् ।**
**तथा पुराणश्रवणाद् दुरितानां विनाशनम् ।।**

(वामन पु. ९५.८६)

अर्थ – गंगाजलात स्नान केल्याने जशी सर्व पापे धुवून जातात, त्याचप्रमाणे पुराणश्रवणाने सर्व दुरितांचा नाश होतो.

**अष्टादश पुराणानि यः शृणोति नरोत्तमः ।**
**कथयेद्वा विधानेन नेह भूयः स जायते ।।**

(नारद पु १.१.६२)

अर्थ – जो नरश्रेष्ठ अठरा पुराणे श्रवण करील किंवा विधि-विधानांसह ती सांगेल त्याचा पुनर्जन्म चुकेल.

वरील श्लोकात पुराणश्रवणाबरोबरच पुराणकथनाचाही निर्देश केला आहे. पुराणकथन करणाऱ्या पुरुषाला पौराणिक किंवा पुराणिक असे म्हणतात. तो व्युत्पन्न, बहुश्रुत, उत्तम वक्ता आणि सदाचरणी असावा, असे सांगितले आहे. एखाद्या देवळ त दिवसाच्या चौथ्या प्रहरी पुराणिकाने पुराण सांगावे आणि स्त्री-पुरुष श्रोत्यांनी ते श्रद्धाभक्तीने ऐकावे, ही परंपरा भारतात कित्येक शतकांची आहे. एखाद्या देवस्थानात हे पुराणकथन बारमहा चालते, तर एखाद्या मंदिरात ते चातुर्मास्यापुरते असते. पुराणिक पुराण सांगण्यासाठी व्यासपीठावर बसतो. मग श्रोत्यांपैकी कोणीतरी त्याच्या कपाळी बुक्का लावून त्याला फुलांचा



पुराणमूर्ती

हार घालतो. पुराण सपल्यावर क्वचित आरतीही होते. ठरलेल्या पुराणाबरोबरच पुराणिक विशिष्ट मासांची माहात्म्येही

सांगतो. पुराण ऐकायला येणाऱ्या स्त्रिया मूठ-पसा धान्य, कालोद्‌भव फळे आणि काही दक्षिणा पुराणिकाच्या पुढे ठेवतात. पुराण समग्र सांगून पूर्ण झाल्यावर श्रोते मडळी त्याच्या समाप्तीचा समारंभ करतात. त्या वेळी पुराणिकाला व्यासमहर्षी समजून श्रोते त्याची पूजा करतात आणि वस्त्र, पात्र, दक्षिणा, इ. देऊन त्याची संभावना करतात. चातुर्मास्याचे पुराणकथन आषाढ शु. दशमीस सुरू होते आणि कार्तिक पौर्णिमेस त्याची समाप्ती होते. द्वादशीस पुराणाला अनध्याय असतो. त्या तिथीस रोमहर्षण नावाच्या आद्य पुराणिकाला बलरामाने ठार केले, म्हणून पुराणिक ती तिथी अनध्याय म्हणून पाळतात.

आबालवृद्धांना भारतीय संस्कृतीचा परिचय करून देणे आणि धर्मसंस्था टिकवून धरणे या गोष्टींचे श्रेय पुराणिकाला बरेच आहे. निरनिराळ्या देशी भाषांमधून भागवत, महाभारत, रामायण, देवी भागवत, गणेशपुराण, इत्यादींचे संक्षेप-विस्ताराने पद्यात्मक अनुवाद झाले आहेत. या अनुवादकांनी ती ती भाषा बोलणाऱ्या सामान्य जनांनाही पुराणांचा व त्यांतील कथांचा परिचय घडवून आपापल्या प्रदेशांत पौराणिक संस्कृतीचा प्रचार करण्याच्या कामी फार मोठे यश मिळविले आहे.

**पुराणांचे मूर्तिध्यान** – समग्र पुराणवाङ्मयाची एक देवतामूर्ति कल्पून तिचे ध्यान पुढीलप्रमाणे सांगितले आहे–

**पुराणं चम्पकाभासं शुकवक्त्रं च तुन्दिलम् ।**
**अक्षसूत्राभयं ज्ञेयं नानाभरणभूषितम् ।।**

अर्थ – पुराणमूर्ती सोनचाफ्याच्या कांतीसारखी, शुकमुखी, उजव्या हाती अक्षमाला व डाव्या हाताची अभय मुद्रा असलेली आणि नाना आभरणांनी भूषित अशी जाणावी.

[ पु. वि.; पु. त. मी.; पु. इं.; जॉ. पु.; एन्सा.रि. ए.; वै. सं. वि.; हि. ध.; पुराणम्, जाने. १९६४, जुलै १९६५; हिंदुत्व ]

## पुरुमीळ्ह आंगिरस

एक सूक्तद्रष्टा. ऋग्वेदातल्या आठव्या मंडलातील ७१ वे सूक्त याच्या नावावर असून, अग्निस्तुती हा त्या सूक्ताचा विषय आहे. याने अग्नीला रजनीनाथ, ओजस्वितेचा पालक, कल्याणमूर्ती, इ. विशेषणांनी गौरविले आहे. त्याची एक ऋचा अशी–

**अग्निरिषां सख्ये ददातु न ईशे यो वार्याणाम् ।**
**अग्निं तोके तनये शश्वदीमहे वसुं सन्तं तनूपाम् ।।**

( ऋ. ८·७१·१३ )

अर्थ – अग्नी हा उत्साहाविषयीच्या प्रेमात आम्हांस ठेवो. तो ज्या अत्युत्कृष्ट वस्तूंचा अधिपती आहे, त्या दिव्य वस्तूंचा आमच्या पुत्रपौत्रांना निरंतर लाभ व्हावा म्हणून आम्ही त्या सद्रूप आणि परंपरारक्षक अग्नीची करुणा भाकतो.

द्वेषबुद्धी नष्ट व्हावी आणि सुखसमृद्धी लाभावी म्हणूनही त्याने अग्नीची स्तुती केली आहे. [ प्रा. च. को. ]

## पुरुमीळ्ह सौहोत्र

एक सूक्तद्रष्टा. ऋग्वेदाच्या चौथ्या मंडलातील ४३ व ४४ ही दोन सूक्ते याच्या नावावर आहेत. अश्विनीकुमारांची स्तुती हा या सूक्तांचा विषय आहे. या सूक्तांतून आश्विनौंच्या चरित्रासंबंधी बरेच उल्लेख आले आहेत. अश्वींच्या दिव्य शक्तीविषयी आश्चर्य व्यक्त करून तो म्हणतो–

**मक्षू हि ष्मा गच्छथ ईवतो द्यूनिन्द्रो न शक्तिं परितक्म्यायाम् ।**
**दिव आजाता दिव्या सुपर्णा कया शचीनां भवथः शचिष्ठा ।।**

( ऋ. ४·४३·३. )

अर्थ – ( हे अश्वी हो ) आज इतके दिवस गेले, परंतु तितक्याही वेळी तुम्ही इंद्राप्रमाणे अगदी तातडीने संकटसमयी आमच्या मनगटात जोर यावा म्हणून धावून येत आहातच. तुम्ही दिव्य लोकातून अवतीर्ण होता आणि तुमचे पखही दिव्यच आहेत. तर अलौकिक शक्तींपैकी कोणत्या शक्तीमुळे तुम्ही अत्यंत बलाढ्य झाला आहा ? (ते आम्हांला सांगाल काय ?)

हा सूक्तद्रष्टा आपल्या सूक्तांना मननीय स्तुती असे म्हणतो. शिवाय त्याने आपल्याला कोणत्या गोष्टीमुळे सूक्ते सुचतात, हेही सांगितले आहे. [ प्रा. च. को.; ऋ. द.; सी. ऋ. ]

## पुरुष

( १ ) एक वैदिक कल्पना. पुरुष हा शब्द वैदिक वाङ्मयात परमेश्वर या अर्थी योजलेला असून, विश्वाचे अंतिम सत्य पुरुषरूप मानलेले आहे. ऋग्वेदातील पुरुषसूक्तात त्याला केवळ पुरुष म्हटले असून, छांदोग्य उपनिषदात त्याला उत्तम पुरुष म्हटले आहे. ईश्वर हा पुरुषोत्तम किंवा परम पुरुष आहे, अशी कल्पना जगातील सर्व मोठ्या धर्मांनी आधारभूत मानलेली आहे. तो माणसापेक्षा अत्यंत श्रेष्ठ आणि विश्वातील सर्व शक्तींपेक्षा अधिक शक्तिमान असा माणूस आहे, अशी श्रद्धा सर्व प्रथित धर्मांच्या मुळाशी दिसते. त्यामुळेच सर्व धर्मांचे स्वरूप स्तोत्रे, प्रार्थना, पूजा किंवा समर्पण अशा प्रकारचे दिसते. जो सर्वज्ञ व कृपावंत आहे, त्याचीच पूजा-अर्चा किंवा भक्ती करणे योग्य ठरते. संसार यशस्वी व्हावा आणि अंतिम कल्याण लाभावे, या उभयविध हेतूने मनुष्य धर्माचा एक साधन म्हणून आश्रय करीत असतो. त्यासाठी ईश्वर हा पुरुष आहे, म्हणजे मनुष्य आहे, अशी श्रद्धा बाळगणे आवश्यक ठरते.

निसर्गातील महान शक्ती या पुरुषरूप आहेत; तसेच निसर्गातील शक्तीचे नियंत्रण करणारी देवताही पुरुषरूप आहे, असे मानून वेदांत पुरुषाची प्रार्थना केलेली आहे. सोम, अग्नी, सूर्य,

सविता, पूषा, उषा, वायू, आप, पृथ्वी, द्युलोक, या निसर्गातील शक्ती होत आणि इंद्र, वरुण, बृहस्पती किंवा अदिती या देवता निसर्गशक्तींचे नियंत्रण करणाऱ्या देवता होत. पण या देवता विशिष्ट निसर्गशक्तींशी एकरूप म्हणून ओळखता येत नाहीत. म्हणून या दोन्ही प्रकारच्या देवतांविषयक भावनांना स्वतःमध्ये समाविष्ट करणारी पुरुष ही कल्पना वेदांमध्ये उद्‌भूत झाली. ऋग्वेदातील पुरुषसूक्तात, पुरुषाचे वर्णन विश्वरूप व विश्वातीत असे केले आहे. या पुरुषाचे मुख ब्राह्मण होते, वैश्य त्याचे ऊरू होते व त्याच्या पायांपासून शूद्र उत्पन्न झाले. त्याच्या मनापासून चंद्र, डोळ्यापासून सूर्य, मुखापासून अग्नी व इंद्र, प्राणापासून वायू, नाभीपासून अंतरिक्ष, डोक्यापासून स्वर्ग, पायांपासून भूमी व कानापासून दिशा उत्पन्न झाल्या. अशा प्रकारे सर्व सृष्टी त्या पुरुषापासून जन्मली आणि ती पुरुषाहून अन्य नाही, असे पुरुषसूक्तात सांगितले आहे. पुरुषाचे व्यापकत्व सांगताना पुरुषसूक्तात पुढील ऋचा गायिली आहे –

**सहस्रशीर्षा पुरुषः सहस्राक्षः सहस्रपात् ।**
**स भूमिं विश्वतो वृत्वात्यतिष्ठद्दशाङ्गुलम् ।।**
(ऋ. १०. ९०. १)

अर्थ – हा पुरुष सहस्रशीर्ष, सहस्राक्ष व सहस्रपाद आहे. त्याने सर्व भूमी तर व्यापलीच आहे. शिवाय तो दहा अंगुळे शिल्लक राहिला आहे.

विश्वाचे तत्त्व किंवा ईश्वर हा पुरुषरूप आहे, ही कल्पना ईश्वर निसर्गशक्तिरूप आहे, या विचारापेक्षा किंवा ईश्वर हा विश्वातीत आहे, या कल्पनेपेक्षा अधिक गंभीर, अर्थपूर्ण आणि धार्मिक भावनेला कृतार्थ करणारी आहे. मनुष्याच्या रचनेतील गुंतागुंत, व्यवस्था आणि आश्चर्यमयता पाहूनच आणि विश्वातील सर्व शक्तींचा मनुष्याच्या ठिकाणी असलेला संगम पाहूनच परम पुरुषाची कल्पना वैदिक ऋषींना सुचली असावी. अथर्ववेदात (१०.२) मनुष्याच्या रचनेबद्दल आश्चर्ययुक्त कुतूहल व्यक्त केलेले आहे. माणसाच्या विविध अंगांचा वैचित्र्यपूर्ण कार्याशी मेळ घालून जी शरीररचना झालेली दिसते, ती कशी झाली व कोणी केली, असा प्रश्न वारंवार त्या सूक्तात विचारला आहे. जागृती व निद्रा, सुख व दुःख, सुबुद्धी व दुर्बुद्धी, तहान व भूक, सत्य व असत्य, मृत्यू व अमरत्व, बल व दौर्बल्य, रेतस् व मन ही कोणी निर्माण केली? तसेच भूमी, द्युलोक, अग्नी व संवत्सर यांची व्यवस्था कोणी केली? असे प्रश्नही तिथे उपस्थित केले आहेत आणि पुरुषरूप ब्रह्माने हे सारे उत्पन्न केले, असे त्यांचे उत्तरही तिथेच दिले आहे.

परम पुरुष अग्निरूप किंवा सूर्यरूप आहे, असा विचारही वेदांमध्ये आढळतो. सूर्यावर प्राणिमात्राचे जीवन अवलंबून असते. सर्व दृश्य पार्थिव पदार्थांचे अस्तित्व सूर्यावर अवलंबून आहे. म्हणून त्याला अग्निस्वरूप किंवा सूर्यस्वरूप मानून हिरण्मय पुरुष असे नाव दिले गेले. वाजसनेयी संहितेत (३१.१८) व तैत्तिरीय आरण्यकात 'हा पुरुष तमाच्या पलिकडे आहे; त्याला मी जाणतो. त्यालाच जाणल्यानंतर मनुष्य मृत्यूच्या पलिकडे जातो; श्रेयाकडे जाण्याचा दुसरा मार्ग नाही,' असे सांगितले आहे. त्याच्यापुढे श्री व लक्ष्मी त्याच्या पत्नी आहेत, दिवस व रात्र या त्याच्या दोन कक्षा आहेत, नक्षत्रे हे त्याचे रूप आहे व अश्विदेव हे त्याचे उघडलेले मुख आहे, असे त्याचे वर्णन केले आहे.

अशा रीतीने मानवी चैतन्य, कालचैतन्य आणि विश्वचैतन्य या तिघांना पुरुष अशी संज्ञा मिळाली. स्थूल शरीराहून ते चैतन्य भिन्न असल्यामुळे पुढे पुरुष शब्दाचा अर्थ पुरनिवासी तत्त्व असा केला गेला व तो आत्मा या शब्दाशी समानार्थक शब्द बनला. (आत्मा पाहा) तसेच विश्वाचे अंतिम सत्यही पुरुष किंवा ब्रह्म या नावाने वैदिक वाङ्मयात उल्लेखिले जाऊ लागले.

पुढच्या काळात, सांख्य दर्शनाच्या आचार्यांनी आपल्या तत्त्वज्ञानात पुरुष व प्रकृती अशी दोन मूल तत्त्वे मानली. पुरुषाचे वर्णन त्यांनी कमलपत्राप्रमाणे अलिप्त, संगरहित व द्रष्टा असे केले आहे. तो अविकारी आहे व त्याच्या शुद्ध स्वरूपात वास्तविक बदल होत नाही; त्यामुळे शरीर आणि दृश्य सृष्टी यांची उत्पत्ती पुरुषापासून संभवत नाही, असे या दर्शनात सांगितले आहे. पुरुष हा नित्य, व्यापक, क्रियाहीन, गुणरहित, व चेतन आहे. प्रकृतीच्या संसर्गात आल्यावर पुरुषाला जीव अशी संज्ञा मिळते, असेही त्याचे वर्णन केले आहे. सांख्य दर्शनातील पुरुष व प्रकृती या तत्त्वांचे विवेचन भगवद्‌गीतेत आले आहे. पुरुष हा अनादी साक्षी असून, प्रकृती ही एकजिनसी कार्यकर्त्री आहे असे ज्ञानेश्वरांनी म्हटले आहे. देहाला चैतन्य देणाऱ्या पुरुषालाच चेतना ही संज्ञा आहे. ही चेतना देहात नखशिखांत उभी व जागी असते आणि वसंतामुळे वनराजी फुलते, त्याप्रमाणे या चेतनेमुळे मन, बुद्धी, इ. शक्ती टवटवीत होतात व फुलतात. प्रकृती व पुरुष ही दोन अनादिसिद्ध जुळी तत्त्वे आहेत. पुरुष हा अस्तित्ववाचक, तर प्रकृती ही क्रियावाचक आहे. प्रकृतीच्या पापपुण्यात्मक कर्मांमुळे निर्माण होणाऱ्या सुखदुःखांचा उपभोग पुरुष घेतो.

भगवद्‌गीतेने एक उत्तम पुरुष मानला आहे. अज्ञान ज्ञानात विरते व स्वतःचा नाश करते, अग्नी काष्ठ जाळून स्वतःही जळून जातो, त्याप्रमाणे ज्ञानाने आपलाच नाश केल्यावर जो मागे राहतो, तो उत्तम पुरुष होय. तो क्षराक्षरांच्या विरुद्ध व

त्या दोहोंच्याही पलिकडे आहे. तो ज्ञेयविरहित ज्ञानासारखा दिसतो. मानसशास्त्रदृष्टच्या तो जागृती, स्वप्न व सुषुप्ती यांपेक्षा श्रेष्ठ आहे. प्रलयकाळी महार्णवाच्या पुराप्रमाणे तो आपली सर्व मर्यादा ओलांडतो. द्रष्टा व दृश्य या दोहोंच्या पलिकडे असलेले केवळ सत् तत्त्व तो आहे व त्यालाच परमात्मा असे नाव आहे, असे ज्ञानेश्वर या उत्तम पुरुषाचे वर्णन करतात. **पाहा** – सांख्य दर्शन. [ वै. सं. वि.; वे. वे. नि.; भा. द. इ.; म. सं. प. मा.]

(२) खोली मोजण्याचे एक माप. एक पुरुष खोल वस्तूला प्राचीन काळी पौरुष असे म्हणत असत. अर्थशास्त्रात (२.२०) या मापाचे तीन प्रकार सांगितले आहेत, ते असे –

खातपौरुष = ८४ अंगुले = ५। फूट. खंदक, दोर, इ. मोजण्यासाठी याचा उपयोग करीत.

पौरुष = ९६ अंगुले = ६ फूट. सैन्यातील शिपायांची भरती करण्याच्या वेळी त्यांची उंची या मापाने मोजीत. याला दंड असेही म्हणत.

अग्निचित्यपौरुष = १०८ अंगुले = ६।। फूट. अग्निचयनाची वेदी या मापाने बनवीत असत. पण बौधायनाने मात्र वेदी बनविण्यासाठी साडेसात फूट किंवा पाच अरत्नी म्हणजे एक पुरुष असे प्रमाण मानले आहे. [ पा. का. भा.; पा. प. ]

**पुरुषदत्ता** जैनांची एक विद्यादेवी. हिचे वाहन महिष आहे (दिगंबरमते मोर). हिच्या हाती वज्र असते.

**पुरुषपूर** एक प्राचीन नगर. हे वायव्य सीमा प्रदेशात होते. विद्वानांच्या मते ते सांप्रतच्या पेशावरच्या जागी होते.

पुरुषपूर हे पर्वतश्रेणींनी वेढलेले असून, त्याच्या दक्षिण अंगाने सिंधू नदी वाहते. खैबरखिंडीपासून ते जवळच आहे. भारत व त्याच्या वायव्येकडील देश यांना जोडणारा मार्ग पुरुषपुरावरूनच जातो. त्यामुळे त्या नगराला परकीय आक्रमकांना सतत तोंड द्यावे लागले आहे. ग्रीक राजा मिनांडर ( मिलिंद ) याने या प्रदेशावर राज्य केले होते, असे म्हणतात. पुढे हे शहर शकांच्या ताब्यात गेले. शक पराभूत झाल्यावर कुशाण लोक तिथे आले. कनिष्क या कुशाण राजाने पुरुषपुराला आपली राजधानी स्थापली. कनिष्काच्या कारकीर्दीत हे नगर वैभवाच्या शिखरावर पोचले आणि त्याचा अनेक अंगांनी विकास झाला. कनिष्क बौद्ध झाल्यावर ते बौद्ध धर्माचेही मोठे केंद्र बनले. तिथे प्रासाद, विहार व मठ बांधले गेले. तिथे शिल्पकलेची जी प्रगती झाली, ती गांधारशैली म्हणून ओळखली जाते. या शैलीत गौतम बुद्धाच्या मोठमोठ्या मूर्ती निर्माण झाल्या. आपल्या शहराची पांडित्याच्या दृष्टीनेही प्रतिष्ठा वाढावी म्हणून कनिष्काने अश्वघोष, चरक, इ. विद्वानांना पाटलिपुत्राहून पुरुषपुरात आणून त्यांच्या योगक्षेमाची उत्तम व्यवस्था केली. पार्श्व, माठर, नागार्जुन, वसुबंधू, इ. प्रकांडपंडितही आपल्या वास्तव्याने पुरुषपुराची कीर्ती वाढवून गेले.

याच पुरुषपुरात कनिष्काने ६०० फुटांहून अधिक उंचीचा व तेरा मजल्यांचा असा एक भव्योत्तुंग स्तूप उभारला होता. इ. स. च्या नवव्या शतकापर्यंत तो उभा होता. पण पुढे तो खंडित झाला. तो जर आज उभा असता, तर जगातल्या अद्भुत वास्तूत त्याची गणना झाली असती. नवव्या शतकापर्यंत पुरुषपूर हे त्या स्तूपासाठी प्रसिद्ध होते.

सांप्रत पुरुषपूर (पेशावर) विभागात खलिल, मोहंमद, मोहमदसाई, खट्टक, जिगानी, आफ्रिडी, पठाण, इ. जमाती वास्तव्य करतात. [ मु. पू. म.; प्रा. भा. न. न. ]

**पुरुषप्रमोहिनी** एक प्राचीन विद्या. या विद्येच्या प्रभावाने स्त्रिया इच्छित पुरुषांना वश करू शकत. यमकन्या सुनीथा हिला रंभेने ही विद्या शिकवली होती. या विद्येचा प्रयोग करून ती अत्रिपुत्र अंश याची धर्मपत्नी झाल्याचे वर्णन पद्म पुराणात (भूमि. ३४.३८) आले आहे. अग्नी पुराणातही या विद्येची माहिती असून, तिथे काही औषधी वनस्पतीही त्या विद्येसाठी उपयुक्त म्हणून सांगितल्या आहेत (१२३.२६). या विद्येने देवही वश होतात, असे म्हटले आहे. [ पु. वि. ]

**पुरुषमेध** नरमेध पाहा.

**पुरुषसूक्तविधी** ऋग्वेदाच्या दहाव्या मंडलातले ९० वे सूक्त पुरुषसूक्त या नावाने प्रसिद्ध आहे. त्याचा द्रष्टा नारायण ऋषी असून, पुरुष ही त्याची देवता आहे. याच्या सोळा ऋचा आहेत. या सूक्तात पुरुषरूप परमेश्वराची प्रशंसा आहे. त्यामुळे पूजा व अभिषेक यांच्यासाठी पुरुषसूक्ताचा विनियोग करण्याची पद्धत आहे. देवाच्या षोडशोपचार पूजेत पुरुषसूक्ताची एकेक ऋचा म्हणून एकेक उपचार देवाला समर्पण करतात.

तैत्तिरीय आरण्यकातही (३.१२) पुरुषसूक्त पठित असून, त्यामध्ये अठरा ऋचा आहेत. महाग्निचयनामध्ये पुरुषरूप अग्नीचे चयन केल्यानंतर या सूक्ताने त्याचे उपस्थान करण्यास सांगितले आहे.

पुरुषसूक्ताच्या आधारे विष्णू या देवतेसाठी एक स्वतंत्र याग सांगितला आहे. त्याला विष्णुयाग असे म्हणतात ( विष्णुयाग पाहा ).

याशिवाय शांतिकमलाकरात पुरुषसूक्तविधी या नावाचे काही विधी दिले आहेत, ते असे –

(१) शुक्ल पक्षातल्या एकादशीच्या दिवशी दंपतीने उपवास करून पुरुषसूक्ताने विष्णूची पूजा करावी. द्वादशीच्या दिवशी विष्णूसाठी पुरुषसूक्ताने चरू शिजवून त्याचे हवन करावे. या विधानाने विष्णुभक्त अशा पुत्राची प्राप्ती होते. चरुहोम सहस्र-संख्येने केल्यास विष्णुपदाची प्राप्ती होते.

(२) पुरुषसूक्ताची एकेक ऋचा म्हणून तीर्थात स्नान करावे व नंतर समग्र पुरुषसूक्त म्हणावे. याने सर्व पापे नष्ट होऊन इष्ट गती लाभते.

(३) एक महिनाभर फलाहार करून पुरुषसूक्ताचा जप करावा. सूर्याचे उपस्थान करावे. शेवटी आज्यहोम करावा. याने साक्षात नारायणाचे दर्शन होते.

**पुरुषार्थ** हिंदू धर्मातील एक कल्पना. या शब्दाची व्युत्पत्ती अशी –' पुरुषैः अर्थ्यते इति '= पुरुष ज्याची इच्छा करतात, तो पुरुषार्थ होय (सर्वदर्शनसंग्रह).

प्राचीन काळापासून धर्म, अर्थ, काम व मोक्ष असे चार पुरुषार्थ मानलेले आहेत. प्रारंभी मोक्ष हा स्वतंत्र पुरुषार्थ मानलेला नव्हता. त्यामुळे धर्म, अर्थ आणि काम या तीन पुरुषार्थांना अनुलक्षून त्रिवर्ग हीच परिभाषा प्रारंभी रूढ होती. नंतरच्या काळात चतुर्विध पुरुषार्थाची कल्पना उदय पावली.

धर्म म्हणजे सामान्यतः शुद्ध नैतिक आचरण होय. धर्मशास्त्राने घालून दिलेल्या धार्मिक कृत्यांचा समावेशही यातच होतो. उपनिषदातील आध्यात्मिक तत्त्वज्ञानाचा जेव्हा पुढे धर्मात अंतर्भाव करण्यात आला, तेव्हा धर्माचे प्रवृत्तिपर आणि निवृत्तिपर असे दोन विभाग झाले. कालान्तराने निवृत्तिपर धर्मालाच मोक्ष असे नाव मिळाले व एक स्वतंत्र पुरुषार्थ म्हणून त्याची गणना होऊ लागली.

भारतीय नीतिशास्त्राच्या दृष्टीने पुरुषार्थाची कल्पना फार मौलिक आहे. केवळ मोक्ष अथवा धर्म हे जीवनाचे साध्य होऊ शकत नाही. मोक्षाला आणि धर्माला अर्थ आणि काम यांचाही आधार लागतो. सामान्यपणे धर्म म्हणजे शुद्ध नैतिक वर्तन, अर्थ म्हणजे उपयुक्ततावादाशी जुळणारे साध्य आणि काम म्हणजे प्रत्यक्ष उपभोग्य वस्तू किंवा उपभोगरूप जीवनक्रम होय. मात्र अर्थ आणि काम हे दोन्ही मानवाला उपयुक्त असले तरी ते धर्माला अनुसरूनच असले पाहिजेत, असे आपस्तंबाने सांगितले आहे (आप. ध. सू. ११. ८. ७. २२-२३). भगवद्गीतेत श्रीकृष्णही ' धर्माविरुद्धो लोकेषु कामोऽस्मि भरतर्षभ =' मी त्रैलोक्यातील धर्माला विरुद्ध नसणारा काम आहे, असे अर्जुनाला सांगतो (७·११). असे हे अर्थकामांचे स्वरूप आहे.

सर्व पुरुषार्थ व्यापक अर्थाने धर्मातच अंतर्भूत होतात, असेही आपस्तंबाने म्हटले आहे. वृक्ष हा फळांसाठी वाढविला जातो, हे खरे असले, तरी छाया व गंध यांचा त्या अनुषंगाने लाभ होतोच. त्याचप्रमाणे, धर्माच्या आचरणाने अर्थ व काम हे दोन्ही सिद्ध होतात. धर्मशास्त्रातच गृहस्थाश्रमाचे विधान आहे. त्यात काम आपोआप अंतर्भूत होतो. वर्णव्यवस्थेने अर्थ सिद्ध होतो. अशा प्रकारे अर्थ व काम यांची पुरुषार्थाच्या रूपात गणना करून भारतीय धर्मशास्त्रकारांनी मानवाच्या ऐहिक जीवनक्रमाला नैतिक व धार्मिक अधिष्ठान प्राप्त करून दिले, स्वार्थ आणि परमार्थ यांत संवादित्व स्थापन केले आणि व्यक्ती आणि समाज यांचा अन्योन्याश्रय स्थापित केला. भारतीय धर्मशास्त्रकारांनी, ऋणकल्पनेने सामाजिकतेला प्राधान्य दिले आणि पुरुषार्थकल्पनेने व्यक्तिमत्त्वाचा महिमा सांगितला.

या चतुर्विध पुरुषार्थांपैकी मोक्ष हा सर्वांत शेवटचा व श्रेष्ठ होय. या अनाद्यनंत संसारातून कायमची सुटका करून घ्यावी, अशी तळमळ प्रत्येक हिंदू मनुष्याला लागलेली असते. वैदिकांच्या सर्व आस्तिक दर्शनांनी मोक्ष हेच साध्य मानलेले आहे.

**धर्मार्थकाममोक्षाणां यस्यैकोऽपि न विद्यते ।**
**अजागलस्तनस्येव तस्य जन्म निरर्थकम् ।।**

अर्थ– धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष यांपैकी एकही पुरुषार्थ ज्याला साधला नाही, त्याचा जन्म अजागलस्तनाप्रमाणे निरर्थक होय.

सर्वसाधारण मनुष्याची पुरुषार्थाविषयीची भावना या सुभाषितात व्यक्त झाली आहे. [हि.ध.; वै. सं. वि.; सो. इं. ट्रॅ.]

**पुरुषोत्तमदेव** (इ. स. चे १२ वे किंवा १३ वे शतक) बंगालमधील एक प्रख्यात वैयाकरण. देव ही याची उपाधी होती. हा बौद्ध होता. त्यामुळे याने अष्टाध्यायीतील वैदिकी प्रक्रिया वगळून उर्वरित सूत्रांवर भाष्य लिहिले. भाषावृत्ति या नावाने ते प्रसिद्ध आहे.

राजा लक्ष्मणसेनाचा हा आश्रित होता. त्याच्याच प्रेरणेने याने हा व्याकरणग्रंथ लिहिला. पुढच्या काळातील वैयाकरणांनी हा ग्रंथ प्रमाण मानला आहे. सृष्टीधर नामक एका बंगाली पंडिताने भाषावृत्तीवर टीका लिहिली आहे. बिहारच्या वैयाकरणांनीही पुरुषोत्तम देवाचा आदराने उल्लेख केला आहे. अनेक पंडितांनी याच्या ग्रंथाला प्रमाण ग्रंथ म्हणून मान्यता दिली आहे. यावरून पुरुषोत्तम देवाची विद्वन्मान्यता कळून येते.

याच्या नावावर आणखी काही ग्रंथ आहेत, त्यांची नावे अशी— महाभाष्यलघुवृत्ती, कारककारिका, दुर्घटवृत्ती,

त्रिकांडशेष, परिभाषावृत्ती (ललितावृत्ती), ज्ञापकसमुच्चय, उणादिवृत्ती, अमरकोश– परिशिष्ट, द्विरूपकोश व अक्षरकोश. [हि. वि. को.; पू. म. भा.]

**पुरुषोत्तमव्रत** एक काम्य व्रत. जगन्नाथपुरीतील बारा पर्वोत्सवांच्या वेळी तिथली यात्रा करणे हा या व्रताचा प्रमुख विधी आहे. स्नान, गुडिचा, हरिशयन, दक्षिणायन, पार्श्वपरिवर्तन, उत्थापनैकद्वादशी, प्रावरणोत्सव, पुष्याभिषेक, उत्तरायण, दोला- यात्रा, दमनकचतुर्दशी व अक्षय्यतृतीया हे ते पर्वोत्सव होत. [हि. ध.]

**पुरुषोत्तमाचार्य** निंबार्क संप्रदायाचा एक आचार्य. याने निंबार्काचार्यांच्या दशश्लोकीवर वेदांतरत्नमंजूषा नावाचे मोठे विवरणभाष्य लिहिले आहे. दशश्लोकी आणि श्रीनिवासाचार्यांचा रहस्यप्रबंध या ग्रथांवर विवरण लिहिण्याचा पहिला मान याचा असल्यामुळे विवरणकार या नावाने हा प्रसिद्ध आहे. याचा आणखी एक ग्रंथ श्रुत्यंतसुरद्रुम हा असून, त्यात श्रीकृष्णस्तवराजावर पांडित्यपूर्ण टीका आहे. [भागवत संप्रदाय– श्री. बलदेव उपाध्याय, १९५४]

**पुरुहन्मा** एक सूक्तद्रष्टा. हा आंगिरस कुळातला आहे. ऋग्वेदाच्या आठव्या मंडलातील सत्तरावे सूक्त याच्या नावावर आहे. इंद्रस्तुती हा त्या सूक्ताचा विषय आहे. त्याने इंद्राला अखंडानंदपूरण, शत्रुभयंकर, वृत्रनाशन, अभयलोकधारक, इ. विशेषणे लावली आहेत. त्याच्या सूक्तातली एक ऋचा अशी –

**तं वो महो महाय्यमिन्द्रं दानाय सक्षणिम् ।**
**यो गाधेषु य आरणेषु हव्यो वाजेष्वस्ति हव्यः ।।**

(ऋ. ८.७०.८)

अर्थ – जो श्रेष्ठांतही श्रेष्ठ, पूजनीयांतही अत्यंत पूजनीय व वरदान देण्याला सदैव सज्ज अशा त्या (इंद्रा) चे स्तवन करा. संकटे क्षुल्लक असोत वा दुस्तर असोत, संकटकाली त्यालाच हाक मारावी, सत्त्वप्राप्तीच्या प्रयत्नात त्याचाच धावा करावा.

याला पंचविंश ब्राह्मणात (१४. ९. २९) वैखानस असेही म्हटले आहे. [म. ज्ञा. को.; प्रा. च. को.]

**पुरू** पंचजनांपैकी एक जनसमुदाय. हा परुष्णीच्या (रावी) पूर्वेला राहत होता. ऋग्वेदकालाच्या पूर्वीही हा जन अस्तित्वात होता व त्या जनाचे भरत, तृत्सू, कुशिक, इ. काही शाखांत विभाजन झाले होते. कुशिकांचा नेता विश्वामित्र हा होता. भरतांचे पुढारी वध्र्यश्व, दिवोदास व सुदास हे तिघे नात्याने पितामह, पिता व पुत्र होते. दिवोदास व सुदास यांना पुरु–भरत असेही म्हणत. ते तृत्सूंचेही नेते होते. पण पुढे मूळ पुरुजन आणि त्याची भरत ही शाखा या दोघांत काहीच सख्य राहिले नाही आणि दाशराज्ञ युद्धाच्या वेळी पुरूंनी भरतांच्या विरुद्ध लढाईत भाग घेतला. त्या युद्धात भरताकडून पुरूंचा पराभव झाला. या युद्धात भरतांच्या बाजूने वसिष्ठांचाही भाग होता. दुष्ट वचन बोलणाऱ्या पुरूंचा युद्धात पराजय करण्याविषयी वसिष्ठाने इंद्राची प्रार्थना केली आहे (ऋ. ७ १८. १३).

पुरुकुत्स, त्याचा पुत्र त्रसदस्यू व त्याचा पुत्र कुरुश्रवण या पुरूंच्या तीन राजांची नावे ऋग्वेदात आढळतात. कुरुश्रवण या नावावरून असे दिसते की, भावी कुरू वंशाचा उदय पुरूंतूनच झाला असावा. [ऋ. आ.]

**पुरू आत्रेय** एक सूक्तद्रष्टा. ऋग्वेदाच्या पाचव्या मंडलातील १६ वे व १७ वे सूक्त याच्या नावावर आहे.

अग्निस्तुती हा या दोन सूक्तांचा विषय आहे. त्यांतली एक ऋचा अशी–

**नू न एहि वार्यमग्ने गृणान आ भर ।**
**ये वयं ये च सूरयः स्वस्ति धामहे सचो तैधि पृत्सु नो वृधे ।।**

(ऋ. ५.१६.५)

अर्थ– हे अग्निदेवा, आमच्याकडे लवकर धावून ये. तुझे स्तवन आमच्याजवळ चालूच असते. तर तुझे अभिलषणीय धन तू आम्हांकरिता घेऊन ये आणि आम्ही व आमचे जे धुरीण आहेत त्यांनी एकदमच क्षेम सुखाचा उपभोग घ्यावा, म्हणून सर्वांच्या अभिवृद्धीकरिता चाललेल्या युद्धामध्ये तू आमचा साहाय्यक हो.

या ज्ञानी कवीची भाषा रमणीय व काव्याला साजेशी आहे. [म. ज्ञा. को.; प्रा. च. को.; सी. ऋ.]

**पुरोडाश** भाजून तयार केलेला एक हवी. हा तयार करण्याचा विधी असा– तांदुळांचे अथवा यवांचे पीठ भाजून त्यात उकळते पाणी ओततात. नंतर त्या पिठाचा घोड्याच्या टापेइतका उंच व कासवाच्या आकाराचा गोळा करून तो खापराच्या तुकड्यांवर ठेवून भाजतात. हा सर्व विधी समंत्रक असतो. गाडीतून भात आणणे, ते कांडणे, त्याचे पीठ करणे, त्याचा गोळा बनविणे, तो खापरांवर भाजणे व त्याला तूप लावणे इतके विधी पुरोडाशासाठी करावे लागतात. पुरोडाश किती खापरांवर भाजायचा, ते देवतेनुसार ठरलेले असते. म्हणून त्याला सप्तकपाल, अष्टाकपाल एकादशकपाल, द्वादशकपाल, इ. नावे असतात. पुरोडाशातल्या काही भागाची त्या त्या

देवतेला आहुती देऊन अवशिष्ट भाग ऋत्विजांनी भक्षण करायचा असतो. [ श्री. विद्याधरशास्त्री भिडे ]

**पुरोहित** (१) प्राचीन काळी राजाला राज्यकारभारात व धार्मिक बाबतीत साहाय्य करणाऱ्या मुख्य ब्राह्मण अधिकाऱ्याला पुरोहित अशी संज्ञा होती. पुरोहित शब्दाचा अर्थ पुरः = अग्रभागी + हित = स्थापित असा आहे (ऋ. १.१.१). त्याला पुरोधा असेही म्हणत. पुरोहिताच्या कार्याला पुरोहिती असे नाव होते (ऋ. ७.६०.१२). पुरोहित हा राजाचा शिक्षक, मार्गदर्शक व मित्र असे. ऋग्वेदात अशा काही पुरोहितांची नावे आली आहेत. विश्वामित्र आणि वसिष्ठ हे भरताचा राजा सुदास याचे पुरोहित होते. कुरू हा श्रवण राजाचा पुरोहित (ऋ १०.३३) व देवापी हा शंतनूचा पुरोहित होता (ऋ. १०.९८). राजघराण्यातील धार्मिक कार्यात पौरोहित्य करणे, हे पुरोहिताचे प्रमुख काम असे. याशिवाय, राजनैतिक व्यवहारातही त्याच्याचकडे नेतृत्व असे. युद्धप्रसंगी तो राजाबरोबर रणांगणावर जात असे आणि शत्रूपासून राजाचे रक्षण व्हावे व युद्धात त्याला जय मिळावा, म्हणून देवांची स्तुती करीत असे (ऋ. ७.१८.१३).

बृहस्पती हा देवांचा पुरोहित होता. त्याच्या स्तुतिस्तोत्रातील पुढील ऋचेत पुरोहितसंस्थेविषयीचा आदर व्यक्त झाला आहे–

**इद्राजा प्रतिजन्यानि विश्वा शुष्मेण तस्थावभि वीर्येण ।**
**बृहस्पतिं यः सुभृतं बिभर्ति वल्गूयति वन्दते पूर्वभाजम् ।।**
(ऋ. ४.५०.७)

अर्थ– जो भव्याकृती (पुरुष) बृहस्पतीला भक्तिरसपूर्ण स्तुतिसुमनांनी अलंकृत करतो आणि त्याच्या चरणी लीन होतो, तोच सत्ताधारी राजा होतो आणि आपल्या प्रतिस्पर्ध्यांना धाकाने आणि पराक्रमाने पादाक्रांत करून राज्य करतो.

**स इत् क्षेति सुधित ओकसि स्वे तस्मा इळा पिन्वते विश्वदानीम् ।**
**तस्मै विशः स्वयमेवा नमन्ते यस्मिन् ब्रह्मा राजनि पूर्व एति ।।**
**अप्रतीतो जयति सं धनानि प्रतिजन्यान्युत या सजन्या ।**
**अवस्यवे यो वरिवः कृणोति ब्रह्मणे राजा तमवन्ति देवाः ।।**
(ऋ. ४.५०.८-९)

अर्थ– ज्या राजाच्या घरी ब्रह्मवेत्ता व सत्पुरुष अशा पुरोहिताला मान मिळतो, तोच आपल्या प्रासादात सुखासमाधानाने नांदतो. त्याच्यासाठी अन्नदात्री पृथ्वी धान्याने नेहमी समृद्ध होते आणि त्याच्यापुढे प्रजाजन आपण होऊन नम्र होतात. अशा राजाचे सामर्थ्य अप्रतिहत असते आणि तो शत्रूची धनसंपत्ती जकून घेतो. स्वजनांनाही तो आपल्या तंत्राने वागायला लावतो. देव त्याच्यावर कृपा करतात.

ऋग्वेदात श्रुतबंधू, कवष, प्रियमेध, भरद्वाज, वामदेव, कक्षीवान, इ. पुरोहितांच्या कर्तृत्वाचे वर्णन आहे. पुरोहित या नात्याने वसिष्ठाची कामगिरी तर विशेष डोळ्यांत भरण्यासारखी आहे. तृत्सू किंवा भरत या सघाच्या राजाचा शत्रूने पराभव केला होता. त्यामुळे त्याच्या सर्व संपत्तीची वाताहात होऊन प्रजेची अत्यंत दुर्दशा झाली होती. अशा स्थितीत वसिष्ठाने त्याला मदत केली आणि त्याच्या राज्याचे पुनरुज्जीवन केले. दाशराज्ञ युद्धाच्या वेळची त्याची कामगिरीही महत्त्वाची आहे. सुदास राजाने आपला पुरोहित विश्वामित्र याच्या प्रेरणेने अश्वमेध यज्ञ केला होता. त्या यज्ञाच्या प्रसंगाने त्याने अनेक राजांना जिंकले व त्यांना अपमानित केले. त्या सर्व राजांनी याचा बदला घेण्यासाठी सुदासाविरुद्ध कट केला. त्या कटात तुर्वश, पुरू, वैकर्ण, इ. बलाढ्य राजेही सामील होते. त्यांच्या आक्रमणाच्या आपत्तीतून बचाव होण्यासाठी वसिष्ठाचे साहाय्य मिळणे आवश्यक आहे, हे जाणून सुदासाने विश्वामित्राला पुरोहितपदावरून दूर केले आणि त्या जागी वसिष्ठाला नेमले. या युद्धात वसिष्ठाने आपल्या बुद्धिबलावर सुदासाला जय मिळवून दिला. वसिष्ठ म्हणतो, की ' सत्या तृत्सूनामभवत् पुरोहितिः '= आम्ही तत्सूचे केलेले पौरोहित्य सफल झाले. दोन्ही बाजूच्या सैन्यांच्या बलाबलाचा विचार करता, ही गोष्ट फार कठीण होती. ' सिह्यं चित् पेत्वेना जघान '= शेळीने सिंहाची शिकार केली (ऋ. ७.१८.१७), असे या युद्धाचे वर्णन ऋग्वेदात केले आहे.

शुक्ल यजुर्वेदातील काही उल्लेखांवरूनही पुरोहिताचे राजसंस्थेतील महत्त्व ध्यानात येते. ' वयं राष्ट्रे जागृयाम पुरोहिताः ' = आम्ही पुरोहित होऊन राष्ट्रकल्याणार्थ सदैव सावध राहू (शुक्ल यजुर्वेद ९.२३), असे पुरोहितांनी म्हटले आहे. वेदकालातील राजपुरोहित आपल्या राज्याच्या कल्याणाची सदैव चिंता करीत आणि त्या बाबतीत राजाला मार्गदर्शन करीत. एक पुरोहित या बाबतीत आत्मविश्वासाने सांगतो, ते असे–

**संशितं मे ब्रह्म संशितं वीर्यं बलम् ।**
**संशितं क्षत्रं जिष्णु यस्याहमस्मि पुरोहितः ।।**
(शुक्ल यजुर्वेद ११.८१)

अर्थ – शास्त्रशुद्ध आचरणाने मी माझे ब्रह्मतेज अत्यंत तीक्ष्ण व कडकडीत राखले आहे. मी माझे शरीरसामर्थ्य व सर्व इंद्रियांच्या शक्ती सतत कार्यक्षम ठेवल्या आहेत. इतकेच नव्हे, तर ज्या राजाचा मी पुरोहित आहे, त्या राजाचे जयशाली असणारे क्षात्रतेजही मी वृद्धिंगत केले आहे.

यापुढे तो सांगतो, की राष्ट्राच्या संरक्षणासाठी राष्ट्रातील

वीर पुरुषांचे बाहू सदैव उभारलेले असतील, अशी परिस्थिती मी निर्माण केली आहे.

ब्राह्मणकालात तर पुरोहिताचे महत्त्व अधिकच वाढले. तो राजाला राजकारणाबरोबर न्यायदानातही साहाय्य करू लागला. ऐतरेय ब्राह्मणात म्हटले आहे, की ' अर्धात्मो ह एष क्षत्रियस्य यत् पुरोहितः ' = पुरोहित हा राजाचे अर्धांग होय (७·२६). त्या काळी राजे लोक आपल्या पुरोहितावर पूर्णपणे विसंबून राहत होते, असे दिसते. देवासुरांच्या संग्रामात ज्या वेळी देवांचा पराभव होऊ लागला, तेव्हा देवांचा पुरोहित बृहस्पती याने त्यांचे रक्षण केले व त्यांना जय मिळवून दिला.

कौटिल्याने आपल्या अर्थशास्त्रात राजपुरोहित कसा असावा, त्याचे वर्णन केले आहे, ते असे—

**पुरोहितमुदितोदितकुलशीलं षडङ्गे वेदे दैवे निमित्ते दण्डनीत्यां च अभिविनीतं आपदां दैवमानुषीणां अथर्वभिः उपायैः च प्रतिकर्तारं कुर्वीत । तमाचार्यं शिष्यः पितरं पुत्रो भृत्यः स्वामिनमिव चानुवर्तेत ।**

अर्थ — विख्यात कुलशीलाचा; षडंगसहित वेद, दैवी व नैमित्तिक कर्मे आणि शास्त्र यांत कुशल; राज्यशास्त्रात पंडित; दैवी व मनुष्यकृत आपत्तींचा अथर्ववेदोक्त मंत्रांनी व व्यावहारिक युक्तींनी प्रतिकार करणारा; अशा पुरुषाला राजाने आपला पुरोहित नेमावे. पुत्र ज्याप्रमाणे पित्याला, नोकर ज्याप्रमाणे धन्याला, त्याप्रमाणे राजाने त्याला बहुमान देऊन वागवावे आणि त्याच्या मार्गदर्शनानुसार वर्तावे.

पुरोहित हा मंत्रानुष्ठानसंपन्न, वेदत्रयीचा ज्ञाता, कर्मतत्पर, जितेंद्रिय, जितक्रोध, लोभमोहरहित, षडंगविद असावा. तो धनुर्विद्या व धर्म यांचा ज्ञाता असावा; म्हणजे त्याच्या भीतीने राजाही धर्मरत व नीतीने वागणारा होईल, असे शुक्रनीतिसारात म्हटले आहे. शुक्राने पुरोहिताला राजराष्ट्रभृत म्हणजे राजाचे व राज्याचे पालन करणारा असे म्हटले आहे.

अनेक गृह्यसूत्रांतही राजाने पुरोहित नेमावा, अशा अर्थाची वचने आहेत व तो कसा असावा याबद्दल वर्णनेही आहेत. आश्वलायन गृह्यसूत्रांत सांगितले आहे, की पुरोहिताने राजाला युद्धाच्या तयारीत मदत करावी, त्याच्या विजयासाठी धार्मिक विधी करावे आणि प्रत्यक्ष युद्धाच्या प्रसंगी त्याच्याबरोबर रणांगणावरही जावे (३·१२).

राजपुरोहिताला त्या काळी अशा प्रकारे बरेच महत्त्व असल्यामुळे अनेक ब्राह्मणांना हे पद मिळविण्याची महत्त्वाकांक्षा असे. अशी महत्त्वाकांक्षा बाळगणाऱ्या ब्राह्मणाने बृहस्पतिसव करावा, असे आपस्तंब श्रौतसूत्रांत (२२·७·६) आणि कात्यायन श्रौतसूत्रांत (२२·५·११) सांगितले आहे.

गृह्य कर्मे आणि शांती वगैरे कार्यासाठी पुरोहित नेमण्याची आवश्यकता मनूने प्रतिपादन केली आहे (७·७८).

सोमेश्वराने आपल्या मानसोल्लासात त्रयी विद्या, दंडनीती, शांतिकर्म, पौष्टिक व आथर्वण कर्मे यांत कुशल असलेल्या व्यक्तीला राजपुरोहित नेमावे, असे सांगितले आहे. शांतिकर्माचा संबंध आठ प्रकारच्या दैवी प्रकोपांशी जोडलेला आहे. अग्नी, जल, व्याधी, दुर्भिक्ष, मूषक, वाघ, साप व राक्षस अशा आठ दैवी आपत्ती कौटिल्याने सांगितल्या आहेत. पुरोहिताला शांतिकर्मे ज्ञात असतील, तर तो त्या कर्मांच्या द्वारे दैवी आपत्तीपासून प्रजांचे रक्षण करू शकतो.

जातकयुगातही राजाच्या दरबारात ब्राह्मण पुरोहिताचे स्थान महत्त्वाचे होते. राजा विद्वान, योग्य व त्यागी ब्राह्मणाला आदरपूर्वक बोलावून त्याला पुरोहितपद देत असे. राजा पुरोहिताला आचार्य म्हणून संबोधीत असे. सरभंग जातकात एक पुरोहित राजाला ' रात्री झोप चांगली लागली ना ' असे विचारतो. त्यावर राजा उत्तर देतो, की ' रात्री राजवाड्यावर सर्वत्र विजा चमकत असल्यामुळे मला चांगली झोप आली नाही. ' त्यावर पुरोहित त्याला सांगतो, की ' तुझ्या पुत्राचा जन्म हे याचे कारण आहे. अशा परिस्थितीत जन्मलेला मुलगा सर्वश्रेष्ठ धनुर्धर होतो. ' त्यावर राजाने पुरोहिताला सांगितले, की, ' या मुलाला तुम्ही तुमच्या अधीन ठेवून योग्य शिक्षण द्या आणि तो वयात आल्यानंतर त्याला माझ्या स्वाधीन करा. '

पुरोहिताची जागा बहुधा वंशपरंपरागत असे. यामुळे राजकुल व पुरोहितकुल यांचा घनिष्ठ संबंध राही. बऱ्याच वेळा, राजपुत्र व पुरोहितपुत्र हे लहानपणापासून एकत्रच वाढविले जात आणि पुढे राजपुत्र राजा झाल्यानंतर पुरोहितपुत्रालाही पुरोहितपदाची प्राप्ती होई.

राजाच्या भाग्यात वाटेकरी होणाऱ्या पुरोहिताला कधी कधी राजाबरोबर त्याच्या दुर्दैवाचेही भागीदार व्हावे लागे. राज्यावर शत्रूचे आक्रमण झाले असता, एक राजा नगर सोडून पळून जातो आणि जाताना राणी, एक सेवक व पुरोहित यांना बरोबर नेतो, असे एका जातकात सांगितले आहे. पांडव बारा वर्षांच्या वनवासाला निघाले, तेव्हा त्यांचा धौम्य हा पुरोहित त्यांच्या बरोबर गेला व त्याने धर्मराजाचे मनोधैर्य टिकून राहील अशा प्रकारे वर्तन केले, असे महाभारतात सांगितले आहे.

राजाशी संगनमत करून पुरोहिताने प्रजेला लुबाडले व त्यामुळे क्षुब्ध होऊन लोकांनी राजासह त्या पुरोहिताचाही बळी घेतला, असे पदकुसलमाणव जातकात सांगितले आहे.

यावरून काही पुरोहित आपल्या अधिकाराचा गैरवापरही करीत, असे दिसते. राजा दुर्बळ व धर्मभोळा असल्यास

महत्त्वाकांक्षी पुरोहित त्याच्यावर आपली हुकमत गाजवत असे आणि सर्व सत्ता आपल्या हाती घेऊन अमाप संपत्ती गोळा करीत असे, अशीही उदाहरणे जातकात दिलेली आहेत. काही वेळा तो यज्ञाच्या निमित्ताने राजाकडून भरपूर द्रव्य घेई. काही वेळा पुरोहित राजाला खोटेच भविष्य सांगून आपला स्वार्थ साधून घेई. एकूण, जातककालातील पुरोहित हा राजाप्रमाणेच विलासी व सुखासीन जीवनाला चटावलेला बनला होता, असे दिसते.

जातककालानंतरही राजदरबारात ब्राह्मण पुरोहित नेमण्याची प्रथा अस्तित्वात होती. इ. स. च्या ७ व्या शतकात हर्षवर्धनाच्या पित्यानेही पुरोहित नेमलेला होता. हर्षाच्या जन्माच्या वेळी पुरोहित हातात फळ व शुद्ध जल घेऊन उभा होता. असे वर्णन बाणभट्टाने केले आहे. इ. स. च्या १२ व्या शतकात होऊन गेलेल्या चालुक्य नरेश सोमेश्वर याच्या राज्यातही पुरोहिताला बरेच महत्त्व होते.

राजाश्रित नसून लोकाश्रित असणाऱ्या पुरोहिताचे कार्यक्षेत्र ग्रामवस्तीत धार्मिक विधींचे पौरोहित्य, मंत्रतंत्र, शकुनप्रश्न इत्यादिकांपुरतेच मर्यादित असे. राजाचे आणि राजपुरोहिताचे जे नाते तेच ग्रामपुरोहित व तिथला राजप्रतिनिधी यांचे असे.

ग्रामसंस्थेत ग्रामजोशी पुरोहिताचेच काम करतो व एखादे धार्मिक कृत्य दुसऱ्या कोणी संपादिले, तरी त्यातल्या काही वस्तू व दक्षिणा त्याला हक्काने मिळते. कित्येक कुटुंबांत त्यांचा स्वतःचा असा एखादा पुरोहित वंश परंपरेने चालत आलेला असतो. त्या कुटुंबांतली वर्षकृत्ये व संस्कारकृत्ये तोच संपादितो [ वे. रा. द.; ऋ. द.; हिं. स.; इं. वे. क.; बु. भा. स.; जा. का. भा. सं.; मानसोल्लास – एक अध्ययन ]


पुरोहित जातीचा एक पुरुष

(२) राजस्थानातील एक जात. राजे आणि सरदार–दरकदार यांच्या मुलामुलींची लग्ने ठरवणे हा त्यांचा प्रमुख व्यवसाय आहे. यांच्यांतले काही लोक शेतीही करतात. हे वैष्णवसंप्रदायी आहेत. राजगुरू, सिंधप, ओदीचा, जागरवाल, पाचलोड, सीहा, पालीवाल, सेवड, सौढा, दूधा, मनणा, महीवाल, वरिया, इ. यांचे पोटभेद आहेत.

राजगुरू व पाचलोड पुरोहित आपली उत्पत्ती अबूच्या पहाडावर यज्ञकुंडातून झाली, असे सांगतात. ओदीचा हे उद्दालक ऋषीपासून, जागरवाल वरल ऋषीपासून व सीहा गौतम ऋषीपासून निर्माण झाले, अशाही कथा आहेत.

विवाहप्रसंगी अग्नीभोवती चार प्रदक्षिणा घालण्याची प्रथा यांच्यांत आहे. यांच्यांत विधवाविवाह रूढ आहेत. [ रा. जा. ]

## पुर्निपुकुर

एक काम्य व लौकिक व्रत. विहिरीचे पाणी सुकू नये व प्रखर उन्हाने झाडे करपू नयेत, म्हणून बंगाली कुमारिका वैशाख मासात हे व्रत करतात. त्यासाठी मुली एकत्र जमून एक खळगा खोदतात व त्यात झाडाची एक फांदी पुरतात. खळगा पाण्याने भरतात. फांदीला पुष्पमाला घालतात आणि विशिष्ट गीत गात गात त्या फांदीवर एकेक फूल वाहतात. [ इं. फो. लो. ]

## पुलक

एक रत्न. याचा रंग तांब्यासारखा असतो. हे रत्न दशार्ण, मेकल, कलिंग, इ. देशांतील पर्वतांवर व नद्यांमध्ये आढळते. याचे वर्णन खालील श्लोकात केले आहे —

**शङ्खाब्जभृङ्गार्कविचित्ररङ्गाः शुद्धैरुपेताः परमाः पवित्राः ।**
**माङ्गल्ययुक्ता बहुभक्तिचित्रा वृद्धिप्रदास्ते पुलका भवन्ति ।।**

अर्थ – शंख, कमल, भुंगा, सूर्य यांच्याप्रमाणे अनेक छटांचे, पण शुद्ध रंगाचे व परम पवित्र मंगल असे पुलक अनेक कामांच्या उपयोगी असून कल्याणप्रद आहेत.

## पुलयन

चेरुमन पाहा.

## पुलस्त्य

एक सांख्याचार्य व स्मृतिकार. महाभारतात (आदि. ६६. १०) याला ब्रह्मदेवाचा मानसपुत्र व भागवतात (४. १) कपिलाचा मेहुणा म्हटले आहे. मिताक्षरेत याचे काही श्लोक दिले आहेत. पुलस्त्यस्मृती इ. स. च्या चौथ्या व सातव्या शतकाच्या दरम्यान केव्हा तरी लिहिली गेली असावी. [ हि. ध.; प्रा. च. को.; हिं. वि. को. ]

## पुलिंद

एक प्राचीन जमात. वैश्य पुरुष व क्षत्रिय स्त्री यांची ही प्रतिलोम व विवाहबाह्य संतती असून, गुरे पाळणे व शिकार करणे हे यांचे व्यवसाय होत, असे उशनस

स्मृतीत म्हटले आहे. हे लोक विश्वामित्राचे पुत्र होते, पण त्याची आज्ञा न मानल्यामुळे त्यांना विश्वामित्राने 'तुम्ही रानटी व्हाल' असा शाप दिला, असा उल्लेख ऐतरेय ब्राह्मणात आला आहे. संस्कृत वाङमयात यांचा उल्लेख अनेक ठिकाणी येत असून, त्यांना म्लेच्छ, असे म्हटले आहे. पण नेमके त्यांचे स्थान सांगितलेले नाही. उत्तरेत दशार्ण देशाच्या वायव्येस पुलिंदांचे राज्य होते व पुलिंदनगर या नावाची त्याची राजधानी होती, असे कळते. टॉलेमीच्या मते पुलिंद लोक नर्मदा-परिसर, गुजरात, नासिक व उज्जैन इथवर पसरले होते. भारतीय युद्धात पुलिंद लोक कौरवाच्या बाजूने लढले, असे म्हटले आहे. [ वे. इं.; ट्रा. ए. इं.; हि. ध. ]

**पुलैयर** मद्रास राज्यातील एक जात. मदुरा जिल्ह्यातील पळणी टेकड्यांवरचे हे अगदी पहिले रहिवासी असावे. यांच्यांत कोलन कुप्पन, पीही आणि मदियमन नामक तीन पोटजाती आहेत. त्याच्यांत परस्पर विवाहसंबंध होतात.

मुलांचे विवाह आईबाप ठरवितात. वधूच्या गळयात वराने पांढऱ्या मण्यांची ताळी बांधणे, हा लग्नातील प्रमुख विधी असतो. लग्नात घेतलेले देज परत केले असता स्त्रीला घटस्फोट मिळतो.

या लोकांना औषधी– वनस्पतींची आणि फुलांची बरीच माहिती असते. भूतबाधा झाली असता, ती दूर करण्यासाठी यांना बोलावतात. यांच्या मध्यस्थीशिवाय स्थानिक ग्रामदेवता प्रसन्न होत नाहीत, अशी लोकांची श्रद्धा आहे.

**देवधर्म** – हे लोक मयंदी, करुमलैयर आणि पुवदै या देवतांना भजतात. या देवतांच्या वार्षिक उत्सवाच्या वेळी ज्यांनी वर्षभर गोमांस भक्षण केले नाही, असे बारा पुरुष नृत्य करतात. उत्सवाच्या पहिल्या दिवशी, जुन्या काळी मयंदी देवीला बकरा बळी देत असत; पण सांप्रत ती प्रथा बंद झाली आहे. दुसऱ्या दिवशी ते नाचणीची आंबील भरून एक मडके करुमलैयरच्या मंदिरात नेतात, त्याच्या भोवती नृत्य करतात आणि मग तो प्रसाद जमलेल्या लोकांना वाटतात. तिसऱ्या दिवशी ते पुवदच्या नावाने आठ दिवसांच्या उपवासाला सुरुवात करतात. तो संपल्यावर नृत्य करतात. या लोकांना नृत्याची अतिशय आवड असून, फाल्गुन महिन्यात स्त्रिया आणि पुरुष ढोलाच्या साथीवर मनसोक्त नृत्य करतात.

हे लोक डुकराचे मांस, गोमांस व उंदीरही खातात. शिकारीची यांना आवड असून, एखादा प्राणी मारल्यावर ते त्याचे कातडे किंवा मांस जवळच्या देवाला अर्पण करतात. भविष्य काळातही देवाने आपल्याला चांगली शिकार मिळवून द्यावी, असा त्यामागचा हेतू असतो. यांचा एक जातिप्रमुख असतो, त्याला नत्तमैकरर असे म्हणतात. [ मदुरा गॅझे. ]

**पुल्कस** एक जात. हिला पौल्कस किंवा पुक्कस असेही म्हणतात. बौधायन व मनू यांच्या मते निषाद पुरुष व शूद्र स्त्री याची ही संतती होय. काहींच्या मते निषाद पुरुष व उग्र किंवा क्षत्रिय स्त्री यांची ही संतती आहे. मद्य आणि मादक द्रव्ये विकून ते आपला उदरनिर्वाह करतात, असे सूतसंहितेत म्हटले आहे. क्षत्रियाने सोने चोरल्यास किंवा ब्रह्महत्या केल्यास पुढल्या जन्मी तो पुल्कस होतो असे आपस्तंब म्हणतो. पुरुषमेधातील एक बळी असाही त्याचा उल्लेख यजुर्वेदात आहे. (वाज. सं. ३०·१७; तै. ब्रा. ३·४·१४). मनूच्या मते शिकार करणे हा पुल्कसांचा प्रमुख व्यवसाय होय. क्वचित् प्रसंगी मंदिरे व राजवाडे झाडण्याचे कामही ते करीत [ हि. ध ]

**पुष्कर** ( १ ) एक पुण्यक्षेत्र. हे स्थान राजस्थानात अजमेरच्या वायव्येस सात मैलावर आहे. याला ब्रह्मक्षेत्र असे म्हणतात. शिव-विष्णूची तीर्थक्षेत्रे भारतात शेकडो आहेत. पण ब्रह्मदेवाचे क्षेत्र असे हे एकच होय. या क्षेत्राचे माहात्म्य पुराणांनी मुक्तकंठाने गायिले आहे. प्रयाग क्षेत्राला जसे तीर्थराज म्हणतात, तसे पुष्कराला नुसते पुष्कर न म्हणता पुष्करराज असे म्हणतात. याविषयी पद्म पुराणात (आदि. ११·८२) म्हटले आहे, ते असे–

**यथा सुराणां सर्वेषामादिस्तु पुरुषोत्तमः ।**
**तथैव पुष्करं राजंस्तीर्थानामादिरुच्यते ॥**

अर्थ – जसा सर्व देवांचा आदी पुरुषोत्तम, तसेच सर्व तीर्थांचे आदी पुष्करतीर्थ होय.

पुष्कराची गणना पंचतीर्थांत ( पुष्कर, कुरुक्षेत्र, गया, गंगा व प्रभास ) व पंचसरोवरांतही ( मानस, पुष्कर, बिंदू, नारायण व पंपा ) होते.

या क्षेत्राविषयीची एक आख्यायिका पद्म पुराणातच दिली आहे, ती अशी–

एकदा ब्रह्मदेव भूलोकी भ्रमण करायला निघाला. या क्षेत्रानजीक त्याने एक निबिड अरण्य पाहिले. त्याचे आकर्षण वाटून तो त्यात प्रविष्ट झाला. त्याच्या आगमनाने सारे वृक्ष आनंदित झाले. त्यांनी ब्रह्मदेवाचे उत्तम आतिथ्य केले. त्यामुळे ब्रह्मदेव प्रसन्न झाला. वृक्षांनी 'तुम्ही या वनात कायमचा निवास करा' असा विधात्याकडे वर मागितला. त्याने 'तथास्तु' म्हटले. ब्रह्मदेव त्या अरण्यात प्रविष्ट झाला तेव्हा त्याच्या हाती तीन पुष्करे ( कमळे ) होती. ही तीन पुष्करे तीन ठिकाणी गळाली व

तिथे तीन सरोवरे निर्माण झाली. ज्येष्ठ, मध्यम व कनिष्ठ अशा तीन नावांनी ती प्रसिद्ध झाली.



ब्रह्मदेवाचे मंदिर — पुष्कर

मग एक दिवस ब्रह्मदेवाने यज्ञ करण्याचे ठरविले. चंद्र नदीचा उत्तर भाग, सरस्वतीचा पश्चिम भाग, नंद स्थानाचा पूर्वभाग व कनिष्ठ पुष्कराचा दक्षिण भाग, एवढ्या क्षेत्राची त्याने यज्ञवेदी बनवली. यज्ञाचा मुहूर्त ठरला. ब्रह्मदेव आसनस्थ झाला. पण त्याची पत्नी सावित्री ही कुठेतरी प्रसाधनात गुंतून राहिल्यामुळे वेळेवर तिथे उपस्थित झाली नाही. त्यामुळे मुहूर्त टळण्याची आपत्ती आली. एवढ्यात तिकडून एक गोपबालिका येताना दिसली. तिलाच यज्ञपत्नी करून यज्ञाला आरंभ करावा असे ब्रह्मदेवाने ठरविले. गायत्री हे त्या मुलीचे नाव होते. तिला ती गोष्ट मान्य झाली. मग त्या दोघांचे लग्न झाले. तिच्यासह ब्रह्मदेवाने यज्ञदीक्षा घेतली. यज्ञकर्मे क्रमाने सुरू झाली.

एवढ्यात सावित्री नटून थटून तिथे आली. पण आता तिच्याकडे कोणीच लक्ष दिले नाही. आपली जागा दुसऱ्या एका स्त्रीने घेतली आहे, हे पाहून तिला राग आला. त्या अपमानाने विद्ध होऊन ती तिथून निघाली व जवळच्या एका पर्वताच्या शिखरावर जाऊन बसली. सांप्रत त्या ठिकाणी तिचे मंदिर बांधलेले आहे. त्याच पर्वताच्या समोर दुसरा एक पर्वत असून, यत्वर गायत्रीचे मंदिर आहे. हे गायत्रीमंदिर एक शक्तिपीठ मानलेले आहे. सतीचा मणिबंध या ठिकाणी गळून पडला आणि त्यामुळे ते शक्तिपीठ बनले.

या क्षेत्रात पुष्कर तीर्थाचे स्नान व ब्रह्मदेवाचे दर्शन या दोन गोष्टी प्रमुख आहेत. पुष्कर सरोवराभोवती ब्रह्मघाट, गौघाट, बदरीघाट, इ. कितीतरी घाट बांधलेले आहेत. ब्रह्मदेवाच्या मदिरात चतुर्मुख ब्रह्ममूर्ती विराजित आहे. तिच्या डाव्या-उजव्या अंगी गायत्री आणि सावित्री आहेत. परिवारात सनका-दिकांच्या मूर्ती आहेत. क्षेत्रात या मंदिराशिवाय वराह, बदरी-नारायण, आत्मेश्वर, इ. अन्यही बरीच मंदिरे आहेत.

विष्णूचा वराह अवतार इथेच ब्रह्मदेवाच्या नाकपुडीतून झाला अशी कथा आहे. विनशन क्षेत्रात लुप्त झालेली सरस्वती नदी पुष्कर सरोवरात पुन्हा प्रकट झाली, असे म्हटले आहे. पुष्कर क्षेत्राच्या तीन अंगांनी काही टेकड्या उभ्या आहेत. त्यांतल्या एका टेकडीला यज्ञ पर्वत व दुसऱ्या टेकडीला मंकण पर्वत असे म्हणतात. यज्ञ पर्वतावर अगस्त्य ऋषीचा आश्रम आहे. पुष्कर तीर्थात स्नान केल्यावर अगस्त्य कुंडात स्नान केले तरच पुष्करयात्रेचे फल मिळते असे सागतात. या ठिकाणी विश्वामित्राने तपश्चर्या केल्याची कथा वाल्मिकी रामायणात दिली आहे (बाल·६२). शुनःशेपाने विश्वामित्राला शरण येऊन आपले रक्षण करण्याची प्रार्थना केली, तीही याच ठिकाणी.

कार्तिक मासात पुष्कर क्षेत्राची यात्रा विशेष पुण्यप्रद मान-लेली आहे. म्हणून त्या महिन्यात इथे यात्रेकरू बहुसंख्येने येतात. इथली प्राचीन मंदिरे औरंगजेबाने उद्ध्वस्त केली त्यामुळे ते तीर्थस्थान उजाड झाले होते. पुढे राजस्थाना-तील राजांनी तिथे नव्याने क्षेत्ररचना केली आणि ते क्षेत्र पुनश्च



पुष्कर सरोवराचे घाट

वाजते-गाजते झाले. इथे पशुहत्येला बंदी आहे. [ राजस्थान; कल्याण-तीर्थांक; श्री. ज. ह. दवे भारती, २१ एप्रिल १९५७ ]

(२) पुराणांतील सप्तद्वीपांपैकी एक द्वीप. निरनिराळ्या पुराणात या प्रदेशाचे भिन्न प्रकारचे वर्णन आढळते. या प्रदेशात

पाऊस पडत नाही, झरे नाहीत आणि वनस्पती उगवत नाहीत, असे ब्रह्मांड पुराणात म्हटले आहे. वामन पुराण व गरुड पुराण यांत तिथल्या तापदायक हवामानाचे आणि क्रूर लोकांचे भयंकर वर्णन केलेले आहे. तो जणू नरक लोकच असून, तिथे राक्षस राहतात आणि तो प्रदेश अतिशय अपवित्र असून, तिथले सर्व काही भयानक आहे, असे त्यात म्हटले आहे. विष्णू पुराणात मात्र त्याचे चांगले वर्णन केलेले असून, त्याला स्वर्गलोकच मानले आहे.

या द्वीपात मानस नामक एक वर्तुळाकार पर्वतराजी असून, तिच्यामुळे या प्रदेशाचे दोन भाग पडले आहेत, असे बहुतेक पुराणांत सांगितले आहे. त्यांतील बाहेरच्या भागाला महावीतम आणि आतील भागाला धातकी अशी नावे दिलेली आहेत. मत्स्य पुराणात याचे वर्णन जरा वेगळे आहे, ते असे –

या प्रदेशाच्या भोवती अनेक पुष्करे (कमळांची सरोवरे) आहेत, म्हणून त्याला पुष्करद्वीप म्हणतात. याच्या पूर्व भागात चित्रसानू नामक गोलाकार पर्वत आहे. पश्चिम भागात मानस नामक गोल पर्वत आहे व महावीत नामक त्याचे शिखर आहे.

पुराणांत या द्वीपाची आणखी माहिती मिळते, ती अशी –

या द्वीपाभोवती गोड्या पाण्याचा समुद्र आहे व मध्यभागी क्षीरसमुद्र आहे. त्यात सोनेरी कमळे आहेत. या द्वीपाच्या शिखरावर सूर्याच्या रथाचे चक्र फिरत असते; त्यामुळे मानवांचे वर्ष व देवांचा दिवस होतो. प्रियव्रताचा पुत्र वीतिहोत्र हा या द्वीपाचा राजा होता. त्याने आपल्या दोन पुत्रांना हे राज्य विभागून दिले. इथे ब्रह्मदेवाची व वटवृक्षाची पूजा केली जाते. या द्वीपात जाती नाहीत व वेदही नाहीत.

या द्वीपाचे दोन भिन्न प्रकारानी पुराणांत वर्णन केलेले आहे, ते त्यातील वेगवेगळ्या भागाचे असले पाहिजे. एका देशाचा एक भाग अगदी रुक्ष, जलहीन, अत्यंत उष्ण किंवा थंड आणि दुसरा भाग सुपीक व समशीतोष्ण, अशी स्थिती पृथ्वीवर पुष्कळ ठिकाणी आढळते. तशीच स्थिती या द्वीपातील दोन भागांची असावी. इतिहासाचार्य राजवाडे यांच्या मते चीनच्या उत्तरेकडील प्रदेश म्हणजे पुष्करद्वीप होय. ते उत्तर कुरूंच्या पूर्वेला होते. पण भिन्न पुराणांतील सर्व वर्णने ध्यानात घेता जपान, मांचूरिया व सैबेरियाचा आग्नेय भाग या सर्व प्रदेशाला पुष्करद्वीप मानणे सयुक्तिक वाटते. [ पु. इं.; रा. ले. सं.; जॉ. पु. ]

## पुष्कलावती

पश्चिम गंधारची प्राचीन राजधानी. ही सुवास्तू (स्वात) व कुभा (काबूल) नद्यांच्या संगमावर वसलेली होती. सांप्रत पेशावरच्या ईशान्येला १७ मैलांवर असलेल्या प्रांग व चारसद्द या गावांत या नगरीचे अवशेष अजूनही मिळतात. हिला पुष्करावती असेही नाव होते. भरताने ही नगरी निर्माण करून आपला पुत्र पुष्कर याच्या नावावरून तिला पुष्कलावती हे नाव दिले, असे रामायणात सांगितले (वा. रा. उत्तर. १०१. १०–११).

प्राचीन काळी व्यापाराच्या दृष्टीने उत्तरापथ हा उत्तरेकडील एक मार्ग विशेष महत्त्वपूर्ण होता. बंगालच्या उपसागरावरील ताम्रलिप्ती बंदरापासून पुष्कलावतीपर्यंत हा हमरस्ता होता. या मार्गात तक्षशिला, शाकल, हस्तिनापूर, कान्यकुब्ज, प्रयाग, वैशाली, राजगृह, पाटलिपुत्र अशी अनेक महत्त्वपूर्ण नगरे होती. पुष्कलावती हे व्यापाराचे महत्त्वाचे केंद्र होते. युआन च्वांगने एक समृद्ध नगर म्हणून त्याचा उल्लेख केला आहे. याचा परिघ सुमारे तीन मैलांचा होता. नगराच्या पश्चिम द्वाराजवळ एका देवमंदिरात एक स्फटिकाची मूर्ती होती. या नगरीत अशोकाने एक स्तूप बांधला होता. बौद्ध लोक त्याच्या दर्शनासाठी येत. पुढे परकीय आक्रमणाच्या काळात या नगरीचे वैभव नष्ट झाले. [ हि. जॉ. ए. इं.; पा. का. भा ; प्रा. भा. न. न. ]

## पुष्टिमार्ग

वल्लभसंप्रदाय पाहा.

## पुष्प

फूल. मानवाचा फुलांशी संबंध अतिप्राचीन काळापासून आलेला आहे. स्त्रियांचा आणि फुलांचा संबंध तर अनादिसिद्ध आहे. स्त्रियांच्या जीवनात फुलांना फार महत्त्व होते व आहे. सौंदर्याच्या दृष्टीने फुलांचे आणि फुलांच्या हारगजऱ्यांचे महत्त्व वैदिक कालापासून लोकांच्या लक्षात आलेले आहे. ऋग्वेदात स्रक् म्हणजे पुष्पमाला हिचा उल्लेख आलेला आहे. अश्विनीकुमारांच्या गळ्यात कमलपुष्पांचे हार होते, असे ऋग्वेदात सांगितले आहे (१०·१८४·३). वनवासात असताना सीताही कमलमाला गळ्यात घालत होती, असा उल्लेख रामायणात आहे. वाल्मीकीच्या काळातील स्त्रियांचा साजशृंगार अंकुर, पुष्प, माला किंवा पल्लव यांनी होत असे. सीतेला अर्जुन, तिलक व कर्णिकार या वृक्षांची फुले फार प्रिय होती. फुले तोडणे व वेचणे, हा तिचा आवडीचा छंद होता. रावणाने तिचे हरण केले, तेव्हा तिच्या केसातील फुले मार्गावर गळून पडली असे रामायणात सांगितले आहे ( वा. रा. अरण्य·५२·२६ ). रावणाच्या राण्याही आपल्या केसात फुलांच्या माळा घालीत.

स्त्रियांप्रमाणे पुरुषांनाही फुलांची आणि हारांची आवड होती. रंगीबेरंगी फुलांच्या माळा गळ्यात घालून बाहेर फिरायला जायचा अयोध्येतील पुरुषांचा रिवाज होता. अशोकवाटिकेत रावण सीतेला भेटायला आला, तेव्हा त्याने गळ्यात रक्तपुष्पांच्या माळा घातल्या होत्या, असे रामायणात सांगितले

आहे. रात्रीही गळचात फुलांचे हार घालूनच झोपायची पद्धत होती. द. भारतातील पुरुष तर सुगंधी फुलांचा मुकुटच मस्तकावर धारण करीत.

प्राचीन काळी विशेष आनंदाच्या प्रसंगी अभिनंदनीय व्यक्ती-वर पुष्पवृष्टी करण्याची प्रथा होती. रावणाचा वध केल्यावर रामचंद्रावर एवढी पुष्पवृष्टी झाली, की त्याचा सबंध रथ झाकून गेला, असे रामायणात म्हटले आहे (युद्ध·१०८·२८). रामचंद्राने अहल्येचा उद्धार केला, तेव्हाही त्याच्यावर अशीच पुष्पवृष्टी झाली झाली होती.

महाभारतातही स्त्रियांनी फुलांचे हार घातल्याचे उल्लेख आहेत. फुले तोडणे आणि त्यांचे गजरे, हार, माळा, वेण्या, इ. गुंफणे हा प्राचीन कालापासून स्त्रियांचा एक आवडता उद्योग आहे. आपला केशपाश शृंगारण्यासाठी स्त्रिया प्रामुख्याने फुलांचा उपयोग करीत असत. निरनिराळचा रंगीबेरंगी फुलांनी सजविलेल्या केशपाशाला कालिदासाने कुसुमोत्खचित असे म्हटले आहे. कधी कधी स्त्रिया एकाच प्रकारची फुले माळेत गुंफीत; तर कधी निरनिराळी फुले घेऊन त्यांचा हार बनवीत. वसंत ऋतूत लोक मोहाच्या सुवासिक फुलांची माला गळचात घालीत, तर स्त्रिया भांगात कदंब पुष्पे ठेवीत. वर्षाऋतूत त्या केतकी व कदंबपुष्पांच्या माला डोक्यात माळीत. प्रेमीजन आपल्या प्रेयसी-साठी मालती, जुई, बकुळ, इ. फुलांचे हार बनवून त्यांना पाठवीत. वसंत ऋतूत सोनचाफा, मोगरा, अशोक, इ. फुलांनी स्त्रियांचा केशपाश सुगंधी होत असे. शरद ऋतूत स्त्रिया नवमालती पुष्पे केसात माळीत. हेमंत ऋतूत रात्री त्या केसात फुलांची वेणी घालीत. त्यामुळे रात्रभर फुलांचा सुगंध दरवळत राही. ग्रीष्म ऋतूत कानावर शिरीषपुष्प ठेवीत. वर्षा ऋतूत ककुभाची मंजरी, शरद ऋतूत नीलोत्पल व वसंत ऋतूत कण्हेर ही पुष्पे लोक कानावर खोचीत. स्त्री-पुरुषांचे कानातले अलं-कार प्रायः पानाफुलांचेच असत. कुमुददल, मल्लिकामंजरी, चंदन, अशोक व तमाल यांचे पल्लवही कर्णपूर म्हणून उप-योगात आणीत. वर्षा ऋतूत सुगंधी कर्णफूल धारण करून आणि गळचात सुवासिक फुलांच्या माळा घालून तरुणी आपल्या प्रियकरांना मोहवीत आहेत, असे वर्णन कालिदासाने ऋतु-संहारात केले आहे.

काही काही फुले प्रतीकरूपाने काही अर्थ व्यक्त करतात. शिरीषाचे लाल फूल अनुराग व प्रणय यांचे द्योतक मानले आहे; तर कमल हे पावित्र्याचे सूचक मानले आहे.

काही विशिष्ट प्रसंगी विशिष्ट रंगाची फुले उपयोगात आणीत असत. एखाद्याचा वध करताना किंवा बळी देताना त्याच्या गळचात लाल फुलांच्या माळा घालण्याची पद्धत होती. युद्धा-वर निघालेल्या वीरांचा सत्कार रंगीत फुलांनी केला जात असे.

हिंदू लोकांच्या सर्व मंगलप्रसंगी फुले आवश्यक मानलेली आहेत. शुभप्रसंगी देवांचे रथ, पालखी, घोडे, हत्ती फुलांनी सजवितात. लग्नाच्या वेळी वधू-वरांना फुलांचा साज चढव-ण्याची प्रथा साऱ्या भारतात प्रचलित आहे. तसेच समागमाच्या पहिल्या रात्री वधूवरांची शय्या फुलांनी सुशोभित करण्याचीही हौशी लोकांची पद्धत आहे.

महाराष्ट्रात दसऱ्याच्या दिवशी घराच्या दारावर फुलांच्या माळा बांधतात. पोळा, बलिप्रतिपदा, इ. गुरांच्या सणात त्यांच्याही गळचात पुष्पमाला घालतात. द. भारतात, विशेषतः केरळात ओणम, दीपावली, यांसारख्या सणांच्या दिवशी घरा-समोर विविध फुलांचीच रांगोळी काढतात.

देवपूजेत पुष्प हा एक स्वतंत्र उपचार आहे. विशिष्ट देवतांना विशिष्ट फुलेच प्रिय असतात व काही फुले निषिद्ध असतात. सरस्वती, लक्ष्मी व विष्णू यांना कमल अतिशय प्रिय आहे. मारुतीला लाल फुले अधिक आवडतात. शंकराला धोत्रा पसंत पडतो, तर श्रीकृष्णाची कदंबपुष्पावर विशेष प्रीती आहे. महाकाली व दुर्गा यांना लाल फुले व कामा-ख्येला बकुल, मंदार, कुंद, सिंधुवार ही फुले आवडतात. देवाला ताजी, चांगली व स्वहस्ते तोडलेली फुले वाहिल्याने देव प्रसन्न होतो, असे अग्नी पुराणात सांगितले आहे. मोठमोठ्या देवा-लयांतून देवाला लागणारे हार व माळा तयार करण्यासाठी पुष्पबंधनमंडप नावाचा एक मंडप असतो. [श.क.; प्रा. भा. सा. सां. भू.; प्रा. भा. प्र.; रा. का. सं.]

## पुष्पक

प्राचीन कालातील एका विमानाचे नाव. वाल्मीकि-रामायणात या विमानाचे वर्णन आले आहे, ते असे—

पुष्पक विमान मेघाप्रमाणे उंच, सुवर्णाप्रमाणे सुंदर आणि अनेक रत्नांनी सजविलेले होते. विमानाच्या आतील भागात अनेक पर्वतराजी उभारलेल्या होत्या. त्यांच्यावर फुलांनी बहर-लेले वृक्ष होते; धवलगृहे निर्माण केलेली होती; फुलांनी भर-लेल्या पुष्करिणी होत्या; केसरांनी युक्त कमळे होती आणि चित्रविचित्र वने व सरोवरे होती; वैडूर्य, प्रवाल आणि रुपे यांचे सुंदर पक्षी होते; मनोहर हत्ती व घोडे होते. आतील वेदिका वैडूर्य मण्यांच्या बनवलेल्या होत्या. आत कूटागारे होती. त्यांच्यावर धवल पताका फडकत होत्या. विमानाच्या आत क्षुद्र घंटा बसवलेल्या होत्या आणि त्या मंजुळ नाद करीत होत्या. त्यात मोती आणि रत्ने यांनी सजवलेली दालने होती. त्यांचे स्तंभ सोन्या–चांदीचे होते आणि त्यांवर ईहामृगाच्या मूर्ती कोरलेल्या होत्या. गवाक्षे आणि सोपान तप्त सुवर्णाचे होते.

हजारो भूतगण त्याचा भार वाहत होते. या विमानाचे वैशिष्टच असे होते, की ते मनोजव आणि मनात येईल त्या ठिकाणी जाणारे होते.

प्रारंभी हे विमान विश्वकर्म्याने ब्रह्मदेवासाठी बनवले होते; पण कुबेराने तप करून ते ब्रह्मदेवाकडून मिळवले. पुढे रावणाने कुबेराचा पराभव करून त्याच्यापासून ते हस्तगत केले. रामचंद्राने युद्धात रावणाचा वध केल्यावर बिभीषण लंकेचा राजा झाला आणि त्याने ते विमान रामचंद्राला अर्पण केले. याच विमानात बसून रामचंद्र लंकेतून अयोध्येला गेला. त्यानंतर रामचंद्राने ते कुबेराकडे परत पाठविले. पण कुबेराने आज्ञा केल्यावरून ते पुनश्च रामचंद्राच्या सेवेसाठी उपस्थित झाले. रामचंद्राने त्याची पूजा करून त्याला परत पाठवले. रामचंद्राने स्मरण करताच त्याच्या सेवेसाठी उपस्थित होण्याचे आश्वासन देऊन ते विमान परत कुबेराकडे गेले. [वा. रा. को.]

**पुष्पगुच्छविवाह** एक विवाहविधी. गुजरातमधील केडवा कुणब्यांत ही चाल आहे. या जातीत दर बारा वर्षांनी एकदा सामुदायिक लग्ने होतात. या लग्नसराईत एखाद्या मुलीला वर न मिळाल्यास पुढील अकरा वर्षेपर्यंत तिला कुवार राहावे लागू नये म्हणून पुष्पगुच्छाशी तिचे लग्न लावतात. लग्नानंतर तो गुच्छ विहिरीत विसर्जित करतात. त्यानंतर ती मुलगी विधवा समजली जाते व योग्य वर मिळताच त्याच्याशी तिचे पाट पद्धतीने लग्न होते. [ल. वि. सो.]

**पुष्पदंत** (१) (इ. स. चे दुसरे शतक) एक जैन आचार्य. हा धरसेनाचा शिष्य होता. धरसेन हा मोठा श्रुतज्ञानी होता. त्याला वाटले की, आपल्या पश्चात श्रुतज्ञानाचा लोप होण्याची शक्यता आहे. म्हणून त्याने पुष्पदंत व भूतबली या दोन शिष्यांना ते ज्ञान शिकवले. पुढे गुरूचा निरोप घेऊन पुष्पदंत बनवासी देशात आला. त्याने तिथे राहून बीसदिसूत्रांची रचना केली आणि ती सूत्रे जनपालित नावाच्या शिष्याला पढवून त्याला भूतबलीकडे पाठवून दिले. त्यापुढची ग्रंथरचना भूतबलीने केली. अशा प्रकारे दोघांनी मिळून जो ग्रंथ निर्माण केला, त्याला षट्खंडागम असे नाव मिळाले. [जै. ध.]

(२) (इ. स. च्या १० व्या शतकाचा उत्तरार्ध.) एक जैन पंडित व अपभ्रंश भाषेचा महाकवी. हा काश्यप गोत्री व ऋग्वेदी ब्राह्मण होता. याचे घरगुती नाव खंड असे होते. केशवभट्ट व मुग्धा हे त्याचे आई–वडील होत. हा विदर्भात राहणारा होता. श्री. नाथूराम प्रेमी याच्या मते पुष्पदंत प्रथम शैव होता आणि नंतर जैन झाला. मीमांसा, सांख्य व वेदांत या दर्शनाचे पुष्पदंताला चांगले ज्ञान होते. बौद्ध दर्शनातही तो प्रवीण होता. पुढे जैन झाल्यावर त्याने जैन धर्माचा व दर्शनाचा सखोल अभ्यास केला. कवित्व तर त्याच्या अंगी सहज सिद्ध होते. कविकुलतिलक, काव्यरत्नाकर, सरस्वतीनिलय, इ. बिरुदांनी पडित लोक त्याचा गौरव करीत. तो मात्र स्वतःला अभिमानमेरू व कवि – इसल्ल (कवि–पिशाच ?) या उपाधींनी गौरवी.

तो प्रथम भैरव अर्थात वीरराज नामक कोण्या राजाच्या दरबारी राजकवी होता. पण एकदा त्या दरबारात त्याचा अपमान झाल्यामुळे त्याने तो राजाश्रय सोडला व तो मान्यखेट येथे राहायला गेला. त्या वेळी कृष्णराज (३ रा) हा राष्ट्रकूट राजा तिथे राज्य करीत होता. भरत या नावाचा त्या राजाचा एक महामात्य होता. त्याने पुष्पदंताला तिथे मानमान्यता मिळवून दिली व ग्रंथरचनेची प्रेरणाही दिली. भरताला नन्न नावाचा पुत्र होता. त्यानेही बापाच्या पश्चात पुष्पदंताची मानमान्यता कायम ठेवली. पुष्पदंताचे तीन ग्रंथ उपलब्ध आहेत, ते असे –

**तिसठ्ठिमहापुरिसगुणालंकारु** (त्रिषष्टिमहापुरुषगुणालंकार) – हा ग्रंथ अपभ्रंश भाषेत असून, तो महापुराण या नावाने प्रसिद्ध आहे. त्याचे आदिपुराण व उत्तरपुराण असे दोन विभाग आहेत. यात त्रेसष्ट शलाकापुरुषांची चरित्रे वर्णिली आहेत. आदिपुराणात प्रथम तीर्थंकर ऋषभदेव याचे चरित्र असून, उत्तरपुराणात बाकीचे तेवीस तीर्थंकर व त्याचे समकालीन महापुरुष यांची चरित्रे आहेत. या ग्रंथाचे १०२ संधी आहेत. दोन्ही खंड मिळून सुमारे वीस हजार श्लोकांइतकी त्यांची संख्या भरते. हा ग्रंथ पूर्ण करण्याकरिता त्याला सुमारे सहा वर्षे लागली. या ग्रंथाविषयी कवीला मोठा अभिमान होता. तो म्हणतो, की 'या ग्रंथात जे आहे तेच सर्वत्र आहे व या ग्रंथात जे नाही ते अन्यत्र कुठेही नाही.' ग्रंथातल्या अनेक संधींमध्ये त्याने आपल्या आश्रयदात्या भरताची प्रशस्ती गायिली आहे.

**णायकुमारचरिउ** (नागकुमारचरित)– हे एक खंडकाव्य आहे. याचे ९ संधी असून, त्यात पंचमीचा उपवास करणाऱ्या नागकुमाराचे चरित्र वर्णिलेले आहे. याच्या शेवटच्या संधीत त्याने साख्य, मीमांसा, क्षणिकवाद, शून्यवाद, इ. दार्शनिक मतप्रणालीचे खंडन केले आहे. नीती, अर्थ, ज्योतिष, इ. शास्त्रांवरील पुष्पदंताचे प्रभुत्व त्यावरून कळून येते.

**जसहरचरिउ** (यशोधरचरित) – हेही एक खंडकाव्य असून, त्यात यशोधर नामक एका पुराणपुरुषाचे चरित्र वर्णित आहे. यात चार संधी आहेत. हे खंडकाव्य म्हणजे पुष्पदंताच्या भाषाप्रभुत्वाचा सर्वोत्कृष्ट नमुनाच आहे. यात विरहाची व दारिद्र्या-

चीही सुदर वर्णने आढळतात. तत्कालीन सामंत–सरदारावर थोडक्यात पण कठोर अशी टीका त्याने केली आहे. हे त्याचे खंडकाव्य जैन संप्रदायात इतके प्रिय झाले, की सोमदेव, वादिराज, हरिभद्र, इ. अनेक दिगंबर–श्वेतांबर लेखकांनी त्याचा संस्कृतात व प्राकृतात आपापल्या ढंगाने अनुवाद केला आहे.

पुष्पदंताच्या ठिकाणी स्वाभिमान व विनयशीलता या दोन गुणांचे विचित्र मिश्रण झाले होते. एका ठिकाणी तो स्वत.ला महाकवी समजून इतर कवींना तुच्छ समजतो; तर दुसऱ्या ठिकाणी आपण अज्ञ, मूर्ख आणि बुद्धिहीन असल्याचेही सांगतो.

राजदरबारात एवढी प्रतिष्ठा मिळाली असूनही तो द्रव्या-विषयी निर्लेप व निरासक्त होता. तो नाममात्र गृहस्थ व खऱ्या अर्थाने मुनी होता. एका ठिकाणी महामात्याला तो सांगतो –

**धणु तणुसमु मज्झु ण तं गहणु, णेहु णिकारिमु इच्छामि ।**
**देवीसुअ सुदणिहि तेण हउं णिलए तुहारए अच्छमि ।।**

अर्थ – मी धनाला तृणासम मानतो. मला त्याची आकांक्षा नाही. मी केवळ अकृत्रिम प्रेमाचा भुकेला आहे. म्हणूनच तुझ्या आश्रयाला राहिलो आहे.

श्री. नाथूराम प्रेमी यांनी पुष्पदंताच्या काव्याचे महत्त्व एकाच परिच्छेदात सांगितले आहे, ते असे –

पुष्पदंत हा अपभ्रंश भाषेचा एक महाकवी होता. त्याच्या काव्यातले ओज, प्रवाह, रस व सौंदर्य हे विशेष अन्यत्र दुर्लभ आहेत. भाषेवर त्याचा असामान्य अधिकार आहे. त्याचे शब्द-भांडार विशाल आहे. शब्दालंकार व अर्थालंकार या दोहोंनीही त्याची कविता समृद्ध आहे. [ जै. सा. इ. ]

(३) शिवमहिम्नस्तोत्राचा कर्ता. हे स्तोत्र सर्वत्र अत्यंत लोकप्रिय आहे. पण नावापलिकडे त्याच्या कर्त्याचे अधिकृत चरित्र उपलब्ध होत नाही. [ महिम्नस्तोत्र ]

**पुष्पद्वितीया व्रत** एक काम्यव्रत. कार्तिक शु. द्वितीयेला या व्रताचा प्रारंभ करून, प्रत्येक मासातील शुद्ध द्वितीयेला वर्षभर हे व्रत करतात. अश्विनी कुमार ही या व्रताची देवता आहे. यात कर्त्याने व्रतदिनी पूजायोग्य फुलांवर उदरनिर्वाह करायचा असतो. समाप्तीच्या वेळी सोन्याची फुले आणि एक गाय ब्राह्मणाला दान देतात. फल–सुखप्राप्ती. [हि. ध.]

**पुष्पराग** एक रत्न. याला पुष्कराज, पुष्पराज, पुखराज अशीही अन्य नावे आहेत. या रत्नाची उत्पत्ती बल नामक असुराच्या चामडीपासून झाली, असे मानतात. या रत्नाचा मुख्य घटक अल्यूमिना हा असून, त्यात सिकतेचे प्रमाणही बरेच असते. ब्राझिल, पेरू, बोहेमिया, अरबस्तान, रशिया, सिलोन व भारत या देशांत या रत्नाच्या खाणी आहेत. भारतात हिमालय पर्व-तात पुष्कराज सापडतो व तो उत्तम प्रतीचा असतो. हा फिक्का पिवळा, सोनेरी, गहिरा, पिवळा, पांढरा, केशरी, लालसर, निळसर, हिरवट, गुलाबी, नारिंगी वगैरे अनेक रंगांचा असतो. त्यांपैकी सैनल म्हणजे पिवळी वजनदार जात आणि सफेता म्हणजे पांढरी जात, या दोन जाती जास्त प्रसिद्ध आहेत. वजन-दारपणा, स्निग्धता, मनोहरपणा, स्वच्छता, इ. त्याचे गुण असून, छाटे, खाडे, कण, डाग वगैरे याचे दोष आहेत. कौरंटक, काषायक, सोमलक वगैरे याचे पोटभेद आहेत. पुष्परागाचा उपयोग अंगठ्या, कुड्या वगैरे दागिने करण्याकडे होतो. पुष्पराग हे गुरूचे रत्न मानलेले आहे. [ ल. र. प.; श. क. ]

**पुष्पसूत्र** सामवेदाचे एक सूत्र. गोभिलऋषी हा या सूत्राचा कर्ता आहे. या ग्रंथाच्या पहिल्या चार प्रपाठकांत नाना प्रकारचे पारिभाषिक शब्द आलेले आहेत. या प्रपाठकां-वर कोणाचीही टीका उपलब्ध नसल्याने या सांकेतिक शब्दांचा अर्थ लावणे फार कठीण झाले आहे. उरलेल्या भागावर अजात-शत्रूचे भाष्य आहे. ऋग्वेदमंत्रांची परिणती सामवेदात कशी झाली, हे या सूत्रात सांगितले आहे. [ हिंदुत्व ]

**पुष्पावचय** प्राचीन भारतातील एक क्रीडा. ही मुख्यत्वे स्त्रियांची क्रीडा असे. या क्रीडेत उद्दालक, पुष्प-भंजिका, वारण पुष्पप्रचायिका, शालभंजिका, तालभंजिका, जीवतुत्रप्रचायिका, इ. प्रकारांचा समावेश होत असे. विशिष्ट ऋतूत ऋतुपरत्वे फुलणारी फुले परडीत गोळा करणे, हा या क्रीडेतील मुख्य भाग होय. विशिष्ट समारंभात या क्रीडांच्या सामुदायिक स्पर्धाही ठेवीत. मुख्यत्वे पूर्व भारतात या क्रीडा प्रचलित होत्या. वृक्ष-वेलीच्या उंच उंच फांद्यांवर फुललेली फुले गोळा करणे याला भंजिका म्हणत व जमिनीवर पडलेली फुले वेचण्याच्या क्रीडेला प्रचायिका म्हणत. कालिदासाने मेघदूतात विदिशेचे वर्णन करताना या क्रीडेचा उल्लेख केला आहे. संपन्न वर्गातील लोकच हा खेळ खेळत. गुप्तकाळापर्यंत हा खेळ प्रचलित होता. [ प. का. भा. ]

**पुष्पाष्टमी व्रत** एक काम्य व्रत. श्रावण शु. अष्टमीला हे व्रत सुरू करतात. व्रतावधी एक वर्ष. शिव ही या व्रताची देवता आहे. प्रत्येक महिन्यात शु. अष्टमीच्या दिवशी शिवाच्या वेगवेगळ्या नावांनी वेगवेगळ्या फुलांनी आणि वेग-वेगळे नैवेद्य दाखवून ही पूजा करतात. [ हि. ध. ]

**पुष्य** अश्विन्यादी गणनेतले आठवे नक्षत्र. याच्या अतिशय मंदप्रभ तारकांचा एक गुच्छ असून,तो आयनिक वृत्ताच्या उत्तरेस वृत्ताला लागूनच आहे. हे नक्षत्र कर्क राशीत येते. पुनर्वसू व मघा या दोन नक्षत्रांच्या मध्यभागी जो एक अतिशय अंधुक तारकागुच्छ दिसेल, ते पुष्य समजावे. त्याची आकृती सामान्यपणे कर्का (खेकडा) सारखी आहे. फलज्योतिषात त्याला कौस्तुभ म्हटले आहे. मधला गुच्छ तो कौस्तुभ. त्याच्या दोन बाजूंच्या दोन तारका ही त्या हाराची दोन टोके होत. धुक्या-सारख्या विरळ दिसणाऱ्या पुष्याच्या या पुंजात अक्षरशः हजारो सूर्यांची भरती आहे.

गुरू ही त्याची देवता आहे. गुरूचे सगळे शुभ धर्म पुष्य नक्षत्रात वृद्धिंगत होतात. गुरु-पुष्य योग हा अमृतसिद्धी योग मानला आहे. विवाह सोडून इतर सगळ्या गोष्टींना तो लाभ-कारक मानतात. राम-जानकी यांचा विवाह गुरु-पुष्य योगावर झाला व पुढे त्या दंपतीचा एकंदर गृहस्थाश्रम आपद्ग्रस्तच ठरला. म्हणून पुढच्या मुहूर्तवेत्त्यांनी हा योग विवाहाला प्रति-कूल ठरवला, असा एक संकेत आहे. वेदकाळी पुष्याला तिष्य म्हणत. तिष्याचे पुष्य कसे झाले हे कळत नाही.

पुष्य नक्षत्र शुभ, लघू, ऊर्ध्वमुख, अंध व पुंनक्षत्र मानलेले आहे. ह्या नक्षत्रावर जन्मणारा पुरुष मातृ-पितृभक्त, धार्मिक, प्रसन्न व मानसन्मान मिळवणारा होतो, असे कोष्ठीप्रदीपात सांगितले आहे. पुष्य नक्षत्रावर गंगास्नान केल्याने कोटी कुलांचा उद्धार होतो, असे ब्रह्मांड पुराणात म्हटले आहे. मेषा-रूढ, मेघवर्ण व चतुर्भुज असे पुष्याचे मूर्तिध्यान हेमाद्रीने सांगितले आहे. [ श. क.; नक्षत्रलोक ]

**पुष्यद्वादशी व्रत** एक काम्य व्रत. ज्या द्वादशीला पुष्य नक्षत्र असेल, चंद्र व गुरू यांची युती असेल आणि रवी कुंभ राशीत असेल, त्या दिवशी हे व्रत करायचे असते. ब्रह्मा, विष्णू आणि महेश यांची किंवा एकट्या वासुदेव – विष्णूची पूजा हा या व्रताचा मुख्य विधी आहे. फल – सकल कामनांची पूर्ती. [ हि. ध. ]

**पुष्यमित्र** (राज्यकाल इ. स. पू. १८७–१५१) मौर्य वंशा-नंतर मगधावर राज्य करणारा सम्राट. हा भार-द्वाज ब्राह्मण असून, त्याच्या कुलाचे नाव शुंग असे होते. प्रथम तो मौर्य सम्राट बृहद्रथ याच्या सैन्यात एक अधिकारी होता. ग्रीक राजा डेमेट्रियस याने मगधावर स्वारी केली, तेव्हा बृह-द्रथाने पुष्यमित्राला मुख्य सेनापती नेमले. पण कलिंगाधिपती खारवेल याने त्याच वेळी डेमेट्रियसवर स्वारी करून त्याला



परत पिटाळून लावले. त्यामुळे तो युद्धप्रसंग टळला. पुढे लव करच पुष्यमित्राने एका सेनासंचलनाच्या प्रसंगी बृहद्रथाचा वध करून मगधाचे राज्य मिळवले. त्याच वेळी ग्रीक राजा मिनँडर याने मगधावर स्वारी केली. पुष्यमित्राने प्रचंड सैन्या-निशी त्याच्यावर चाल करून त्याचा पूर्ण पराभव केला आणि त्याला सिंधुनदीपार हाकलून लावले.

पुष्यमित्र शुंग शिवभक्त व वैदिक धर्माचा अभिमानी होता. मौर्य वंशाच्या राजवटीत बौद्ध धर्माला अवास्तव महत्त्व प्राप्त झाल्यामुळे भारतीयांचे क्षात्रतेज नष्ट होत चालले होते आणि भारतीय बौद्ध लोकांत स्वदेशद्रोही वृत्ती बळावत चालली होती. त्यामुळेच ग्रीक सेनेला कुठेही विशेष प्रतिकार न होता मगधापर्यंत मजल मारता आली. शेवटचा मौर्य सम्राट बृहद्रथ हा दुबळा व विलासी होता. ग्रीकांचा नि:पात करण्यासाठी बृहद्रथाला पद-च्युत करून आपणच सिंहासनावर बसावे, अशी आकांक्षा पुष्य-मित्राच्या मनात येणे साहजिक होते. त्या दृष्टीने त्याने सैन्य-बलावर राज्यक्रांती घडवून आणण्याची पूर्वतयारी केली असली पाहिजे. योग्य संधी येताच त्याने बृहद्रथाला ठार मारून सम्राट-पद मिळवले. मिनँडरचा पराभव करून त्याने पाटलिपुत्र येथे अश्वमेध यज्ञ केला. नंतर त्याने अनेक देशद्रोही बौद्ध भिक्षूंना देहान्त शासन केले. बौद्ध साहित्यात पुष्यमित्राने बौद्ध लोकांना निर्दयपणे छळले व त्यांचे मठ उद्ध्वस्त केले, असे वर्णन आढ-ळते. पण तो वृत्तीने असहिष्णू होता, असे सिद्ध करायला अन्य पुरावा उपलब्ध नाही.

पुष्यमित्र सिंहासनावर बसला, तेव्हा त्याची सत्ता मगधाच्या मध्य भागापुरतीच मर्यादित होती. ग्रीकांचा पराभव केल्यानंतर त्याचे साम्राज्य पंजाबातील जालंधरपर्यंत प्रस्थापित झाले. विदिशा ही नगरीही त्याच्या साम्राज्यात होती. पुष्यमित्र हा चंद्रगुप्त, अशोक, इ. सम्राटांच्याच मालिकेतला एक श्रेष्ठ सम्राट होता. सम्राटपदाचा अभिषेक करवून घेतल्यावरही तो स्वतःला सेनापती पुष्यमित्र असेच म्हणवीत असे. यावरून राजा हा प्रजेचा स्वामी नसून सेवक आहे, अशी त्याची दृढ धारणा असावी असे दिसते. त्याने पाटलिपुत्राचे सिंहासन हे सैनिकी क्रांतीच्या मार्गाने मिळविले असले, तरी एकदा राजदंड स्वीकारल्यावर त्याने सदैव सैनिकी सामर्थ्याचे प्रदर्शन केले नाही. तो कडवा ब्राह्मण असला, तरी त्याच्या ठायी जातिवंत क्षत्रियाचा उमदे-पणाही वास करीत होता. त्याने देशद्रोही बौद्धधर्मीयांची कत्तल केली असली, तरी कोण्याही सज्जन परधर्मीयाला त्रास दिला नाही. देशाला कमकुवत करणाऱ्या बौद्ध विचारसरणीपासून समाजाला मुक्त करणे व वैदिक धर्माची पुनःप्रतिष्ठा करणे, हेच त्याचे प्रधान जीवितकार्य होते. त्यात तो पूर्णतः यशस्वी

झाला, असे इतिहासावरून कळते. पाहा – शुंगवंश. [ हि. क. इ. पी.; स सो. पा ; म. च. को. ]

## पुष्यार्कद्वादशी

एक काम्य व्रत. ज्या द्वादशीला सूर्य पुष्य नक्षत्रात येईल, त्या दिवशी या व्रताला प्रारंभ करतात जनार्दनाची पूजा हा या व्रताचा प्रमुख विधी आहे. यात एकादशीला उपवास करतात आणि द्वादशीला तुपाने भरलेले एक पात्र दान देतात. फल – पापमुक्ती. [ हि. ध. ]

## पुसदेकर शार्ङ्गधर

(इ. स. चे १६ वे शतक) एक महानुभाव व्युत्पन्न ब्राह्मण. हा अमरावती जिल्ह्यातील पुसदे येथील राहणारा असून, व्याकरण, धर्म, न्याय, ज्योतिष, इ. शास्त्रात पारंगत होता. याने संस्कृत व मराठी भाषांत बरीच ग्रंथरचना केली आहे. याने गीतेवर कैवल्यदीपिका या नावाने संस्कृत आणि मराठी, अशा टीका लिहिल्या आहेत. याशिवाय याने मराठीत गीताप्रश्नावली, परमहंसधर्ममालिका, दत्तात्रेयवर्णनस्तोत्र, रासक्रीडास्तोत्र, द्वात्रिंशल्लक्षण, चौपद्या व काही भाष्येही रचली आहेत. याचा काव्यचूडामणि नामक संस्कृत ग्रंथही प्रसिद्ध आहे. त्यात त्याची विद्वत्ता व संस्कृत भाषाप्रभुत्व ही दिसून येतात. [ म. म. वा. ]

## पुळे

एक गणपतिक्षेत्र. गणपतिपुळे या नावानेही हे प्रसिद्ध आहे. हे रत्नागिरीच्या उत्तरेला बारा मैल अंतरावर समुद्रकिनारी आहे. इथला गणपती स्वयंभू आहे. इथे एका डोंगराच्या पायथ्याशी डोंगराला लागूनच पश्चिमाभिमुख असे गणपतिमंदिर आहे. म्हणून तो सगळा डोंगरच गणपतिस्वरूप मानतात. हा गणपती जागृत व नवसाला पावणारा म्हणून प्रसिद्ध आहे.

मंदिरात लहानसा दगडी गाभारा आहे. दोन गंडस्थळे, खाली नाभी व दोन हात एवढेच आतल्या गणपतीचे रूप आहे. मूर्तीची दृष्टी क्षितिजपातळीवर असल्यामुळे वर्षातून दोनदा सूर्यास्ताच्या वेळी सूर्यकिरण मूर्तीच्या डोक्यावर पडतात.

देवालयाला प्रदक्षिणा घालायची वाट फरसबंदीची असून, ती सर्व डोंगराभोवती आहे एक प्रदक्षिणा पुरी करण्यासाठी सुमारे पाऊण मैल चालावे लागते.

अखिल भारतात चार दिशांना चार मंगलमूर्तींची महास्थाने असून, त्यांना द्वारदेवता अशी संज्ञा आहे. त्यांपैकी पुळे येथील गणपती ही एक द्वारदेवता होय.

पुलिन म्हणजे वाळवंट होय. हे देवस्थान समुद्राच्या किनाऱ्यावरील पुलिनावर असल्यामुळे याला गणपति-पुळे असे नाव पडले. या क्षेत्रासंबंधी एक पौराणिक कथा आहे, ती अशी –

परशुराम हा गणेशभक्त होता. त्याने गणपतीची आराधना करून त्याच्याकडून परशू मिळविला व त्याच्या साहाय्याने



गणपतिपुळे येथील गणपती

दुष्ट क्षत्रियांच्या संहाराचे काम पूर्ण केले. मग आपल्या उपासनेसाठी त्याने पश्चिम सागर हटवून परशुराम क्षेत्र निर्माण केले. या सागरतीरावर प्रार्थनेसाठी आपले आवडते उपास्य दैवत असावे, म्हणून त्याने गणपतीची प्रार्थना केली. त्या वेळी गजाननाने दृष्टान्त दिला, की मी पर्वतरूपाने या सिंधुसागरतीरावर विराजमान आहे. तेव्हापासून हे क्षेत्र प्रसिद्ध झाले.

इतिहासकाळात विजापूरच्या बादशाहाने या देवस्थानाला दरसाल तीनशे रुपयाची नेमणूक करून दिली होती शिवाजीमहाराजांनी या देवस्थानाला भेट देऊन तिथे नित्य पुराण सांगण्यासाठी काही व्यवस्था करून दिली होती. हरभटजी पटवर्धन यांनी या क्षेत्री उग्र तपस्या करून गणपतीची आराधना केली. त्या वेळी गजाननाने प्रसन्न होऊन 'देशावर जा, तुझे भाग्य उदयाला येईल' असा त्यांना दृष्टांत दिला. मग हरभटजी पटवर्धन देशावर गेले व पुढे पेशवाईच्या काळात हे पटवर्धन घराणे उदयास आले. त्यामुळे सर्व पटवर्धन संस्थानिकांनी हे आपले कुलदैवत मानले आहे. पेशवेही या गणपतीला आपले इष्ट दैवत मानीत. श्रीमंत माधवराव पेशवे व सौ. रमाबाई यांनी या देवालयाजवळ धर्मशाळा बांधली व पुराणाबद्दल खोंडेशास्त्री यांना सनद करून दिली. सरदार

गोविंदपत बुदेले यानी प्रदक्षिणेची पाखाडी बाधली पुढे पटवधन राख्यानिकानी इथे नित्यपूजा, अनुष्ठान, नैवेद्य, पुराण व चौघडा एवढी सर्व व्यवस्था लावून दिली

भाद्रपद शुद्ध प्रतिपदेपासून पचमीपर्यन्त एक व माघ शुद्ध प्रतिपदेपासून पचमीपर्यन्त दुसरा असे दान माठे उत्सव इथे होतात प्रत्येक सकष्टी चतुर्थीला, विशेषत अगारकी चतुर्थीला, इथे भक्ताची गर्दी होते [पुरुषार्थ– जून १९६३, वि मु रा प, श्रीक्षेत्र गणपति-पुळे माहात्म्यवर्णन– श्री ज वि फाटक]

## पुळ्ळुवन

केरळातील एक जात पुळळू म्हणजे बहिरी ससाणा होय याची बाधा झाल्यामुळे गरोदर स्त्रिया आणि लहान मुले याना काही विकार होतात, अशी केरळातील लोकाची समजूत आहे असे विकार या जातीचे लोक दूर करतात, म्हणून त्याना पुळ्ळुवन असे नाव मिळाले

पुळ्ळुवन लोकाच्या उत्पत्तीबद्दल निरनिराळ्या दतकथा प्रचलित आहेत त्यापैकी एक दतकथा त्याना कद्रूचे पुत्र मानते त्याच्याबद्दलची दुसरी एक दतकथा अशी –

अग्नीने जेव्हा खाडववन जाळले, तेव्हा एक साप आगीतून कसाबसा बाहेर आला तेव्हा एका स्त्रीने त्याच्या अगावर पाणी ओतून त्याचा दाह शात केला व त्याला आपल्या मडक्यात राहायला जागा दिली त्याबद्दल कृतज्ञता म्हणून, सपदशाने आणि सर्पाने दिलेल्या शापाने उद्भवणारे विकार दूर करण्याचे मत्र त्या सापाने तिला दिले या स्त्रीचे वशजच पुढे पुळ्ळुवन या नावाने ओळखले जाऊ लागले

पुळ्ळुवन लोक भविष्य सागणे, वैद्यकी, शेतमजुरी, उपाध्येपण, इ व्यवसायही करतात याच्या झोपड्या मातीच्या असून, त्याच्यावर केबळी छप्पर असते

मुलगी प्रथम ऋतुमती झाली, की तिला एका स्वतत्र खोलीत ठेवतात सातव्या दिवशी सात स्त्रिया तिला तेल लावून स्नान घालतात आणि तिला जर भुताखेताने पछाडले असेल, तर केळीच्या एका खुटावर शहाळ्याचे तुकड ठवून त्याच्यावर वाती लावतात आणि ते मुलीच्या भोवती ओवाळून पाण्यावर तरगत सोडतात

**विवाहप्रथा** – हे लोक तालिकेट्टुकल्याणम हा सस्कार आणि सबधम हा लग्नविधी करतात गावातल्या गावातच लग्नसबध जुळविण्याची याची प्रथा आहे पूर्वी याच्यात बहीण भावाचे लग्न करण्याची प्रथा होती स्त्रीला घटस्फोट हवा असेल, तर तिचे आईबाप तिच्या नवऱ्याला एक कापड देतात याचा अर्थ त्याने पूर्वी दिलेले कापड परत केले, असा होतो आणि एवढ्याने त्या स्त्रीला घटस्फोट मिळतो

केरळात प्रत्येक कुटुबाच्या अगणात नागासाठी एक लहानशी देवळी असते तिला नागट्टनकावू म्हणतात नागट्टनकावूतील नागाचा आपल्यावर कोप झाला आहे, असे आढळून आल्यास त्याला प्रसन्न करून घेण्यासाठी केरळी लोक पुळ्ळु



पुळ्ळुवन पुरुष

वनाना बोलावतात त्या वेळी एक पुळ्ळुवन आणि त्याची पत्नी हातात अनुक्रमे वीणा आणि कुडम नामक वाद्ये घेऊन बसतात आणि या वाद्यांच्या साथीवर काही गीते म्हणतात

पुळ्ळुवन लोकाचा जादूटोणा आणि भुतेखेते यावर फार विश्वास आहे माणसाला कोणतेही दुखणे आले, तरी ते भुताखेताच्या पछाडण्यामुळेच आले आहे, असे ते समजतात आणि त्याच्यासाठी कोंबडी बकरी बळी देतात

**देवधर्म**– हे लोक ब्राह्मणाच्या देवळात जाऊन दुरूनच देवाची पूजा करतात ते वेलयुधन, अय्यप, राहू, भुनी, चायन, इ देवताना भजतात आणि त्याना वर्षातून एकदा नारळ, केळी, तादूळ वगैरे पदार्थ अर्पण करतात

**मर्तिकप्रथा** – हे लोक मृताना पुरतात पुरण्याची जागा नदीजवळ असते प्रेत वस्त्राने झाकतात आणि पुरताना प्रेता शेजारी नारळ ठेवतात मृताचा पुत्र पधरा दिवस रोज मृताला पिंडदान करतो पधरा दिवसानी त्याचे आशौच सपते आणि मग ते नातेवाईकाना जेवण घालतात दर महिन्याच्या प्रतिपदेला मटण, कोंबडी, पिंड, ताडी, इ पदार्थ केळीच्या पानावर ठेवून ते मृताना अर्पण करतात [का ट्रा स इ, डॉ सी अच्युत मेनन, बी सी लॉ को व्हॉ १]

## पूतानम नंपूतिरी

(इ स १६–१७ वे शतक) केरळातला एक सत व कवी मलबारमधील नेन्मनी या गावी याचा एका ब्राह्मण कुळात जन्म झाला पूतानम ह

त्याचे व्यक्तिनाम नसून, ते त्याच्या सासुरवाडीच्या घराण्याचे नाव आहे. त्या कुळातील एकुलत्या एक मुलीशी लग्न करून तो घरजावई झाला व पुढे त्याच कुलनामाने ओळखला जाऊ लागला. त्याच्या गुरूचे नाव नीलकंठ होते. कदाचित ते त्याच्या बापाचेही नाव असू शकेल. पूतानमच्या पुढील कवितेवरून त्याला ९० वर्षांचे आयुष्य लाभले होते, असे कळते –

**कृष्णन् कळिक्कुकळिक्कोप्पु काणन् एन्नै कौतिक्कनु दयांबुराशे।**
**त्वन्नामसंकीर्तन मैण्णि थैण्णि तोण्णूरट्टुत्तू परिवत्सर मे।**

(श्रीकृष्णकर्णामृतम्)

अर्थ – हे दयासिंधो, ज्या खेळण्याने श्रीकृष्ण खेळत असे ते खेळणे पाहण्यासाठी कितीतरी दिवस मी आसुसलो आहे. तुझे नामसंकीर्तन करता करता माझे वय ९० वर्षांचे झाले आहे.

पूतानम हा निस्सीम कृष्णभक्त होता. गुरुवायूरच्या कृष्णमंदिराजवळच त्याचे घर होते त्यामुळे तो नेहमी त्या मंदिरात जाऊन पूजापाठ करीत असे. त्याच्या काळी केरळात मेलपुत्तूर नावाचा एक प्रकांड पंडित गुरुवायूर येथेच राहत होता. पूंतानम काव्या रची आणि ते दुरुस्तीसाठी आणि मलाईसाठीही मेलपुत्तूरला दाखवी. मेलपुत्तूर त्याच्या काव्याची प्रशंसा करी. असे काही दिवस चालले; पण एके दिवशी पूतानमची कविता पाहून मेलपुत्तूरने त्याचा तीव्र उपहास केला. ती गोष्ट पूंतानमच्या जिव्हारी लागली. त्या रात्री त्याला झोपही आली नाही. तो सारखा तळमळत राहिला.

आपल्या भक्ताची ही मानखंडना श्रीकृष्णाला सहन झाली नाही. त्याने त्याच रात्री मेलपुत्तूरला वातव्याधी जडवली. तो जेव्हा विव्हळू तळमळू लागला, तेव्हा श्रीकृष्णाने दर्शन देऊन त्याला सांगितले, की 'तुझा हा विकार म्हणजे माझ्या भक्ताच्या अपमानाचे फळ आहे. तुला बरे व्हायचे असेल, तर मुकाट्याने पूंतानमकडे जा व त्याची क्षमा माग. तुझ्या विद्वत्तेपेक्षा पूतानमची भक्ती मला अधिक प्रिय आहे.' मग मेलपुत्तूरने तसे केले व तो व्याधिमुक्त झाला.

पूंतानमला एक मुलगा झाला होता; पण तो लवकरच मरण पावला. त्यामुळे पूंतानमला अपार पुत्रशोक झाला. संतानगोपाल या व्रताची कथा त्याने ऐकली होती. त्या कथेत एका ब्राह्मणाला त्याचा मृत पुत्र परत मिळाल्याचा प्रसंग होता. म्हणून पूंतानमने त्या कथेवर पाला छंदात एक काव्य रचले व तो त्याची पारायणे करू लागला. त्या साधनेमुळे त्याला पुत्र काही मिळाला नाही, पण ज्ञान मात्र मिळाले. साक्षात बालकृष्ण आपल्या हृदयात वास्तव्य करीत असता आपल्याला निराळे मूल हवेच कशाला, या निर्णयावर तो आला. आपले हे विचारपरिवर्तन त्याने ज्ञानप्पाना या काव्यात विशद केले आहे.

पुढेही त्याच्यावर अनेक आपत्ती कोसळल्या. त्याचे घर जळाले आणि आईने विहिरीत आत्महत्या केली. पण या घटनांचे दुःख न मानता आपण भवजंजाळातून सुटलो, असेच त्याने मानले. एक चटई आणि एक पानदान या दोनच वस्तू घेऊन तो भ्रमंतीला निघाला.

संतानगोपालम पाना, ज्ञानप्पाना, श्रीकृष्णकर्णामृतम्, घनसंघ, पार्थसारथिस्तवम्, आनंदनृत्तम्, इ. काव्ये पूंतानमने लिहिली आहेत त्यांपैकी श्रीकृष्णकर्णामृतम् हा भागवताच्या दशमस्कंधाचा भावानुवाद असून, ते काव्य केरळी जनतेत अत्यंत लोकप्रिय आहे. पूतानम हा पुराण उत्तम सांगत असे. त्याच्या त्या कलेचा गौरव करणारी एक दंतकथा सांगतात ती अशी – शंकर एकदा पार्वतीला भागवत सांगत होता. ते ऐकल्यावर पार्वती शंकराला म्हणाली. 'तुमचे श्लोकपठण चांगले आहे; पण तुम्हांला पूतानमसारखे भक्तिपूर्ण विवरण करता येत नाही.'

पूतानमची कविता केरळात घरोघर म्हटली जाते. केरळीय भक्तजनांत पूंतानम हा अद्वितीय समजला जातो. त्याने जो भक्तिस्नेहपूर्ण ज्ञानदीप प्रज्वलित केला, तो आजही तेवत राहिला आहे. पूंतानमविषयी अनेक आख्यायिका केरळात प्रचलित आहेत. [ हिं. म. कृ.; से. सें.; कै. सा द.; म. सा. इ. ]

**पूग** एकाच नगरात राहणाऱ्या विविध वर्णांच्या व नाना व्यवसाय करणाऱ्या प्रतिष्ठित गृहस्थांच्या संघटनेला पूग असे म्हणतात. काशिका या ग्रंथान्वये नाना जातीचे, अनियतवृत्तीचे आणि पैसा व सुख यांच्यामागे लागलेले अशा लोकांच्या संघटनेला पूग हे नाव आहे. कात्यायनाच्या मते व्यापारी लोकांच्या संघाला पूग म्हणतात.

पूग ही श्रेणीपेक्षा उच्च दर्जाची व्यापारी संघटना असे. या संस्थेला राजमान्यता होती आणि आपापल्या क्षेत्रापुरते न्यायदान करण्याचा अधिकार तिला होता श्रेणीने नेमलेल्या समितीमध्ये व्यवसायासंबंधी एखाद्या विवाद्य प्रश्नाचा निकाल लागू शकला नाही, तर ते प्रकरण या समितीपुढे जाई. पूगांच्या नेत्यांचा राजदरबारी योग्य तो मान राखला जाई.

या समितीचे त्रिविध प्रकार होते. स्थानिक न्यायालये खेडेगावांतून असत. ग्रामणी हा त्यांचा नेता असे. व्यापारउदीम करणाऱ्या लोकांसाठी फिरती न्यायालये असत. राज्यसंस्थेने नेमलेली वरिष्ठ न्यायालये नगरात असत. राजा हा यांचा अध्यक्ष असे. [ हि. ध.; या. का. म.; प. का. भा.; हि. व्हि. क. वे. इं. ]

**पूजा** 'देवपूजा पाहा.

**पूजाकुणित** दक्षिण भारतातील एक लोकनृत्य म्हैसूरच्या दक्षिणेकडील भागात मरिअम्मा देवीच्या वार्षिक महोत्सवात हे नृत्य करतात त्या वेळी मुख्य नर्तक देवीला वस्त्राभरणानी अलंकृत करून डोक्यावर घेतो कधी कधी आळीपाळीने इतर नर्तकही देवीची मूर्ती आपल्या मस्तकावर घेतात त्या वेळी इतर नर्तक त्याच्या भोवती फेर धरतात व आपण देवीचे सरक्षक आहो, असे सुचवितात नर्तकाच्या हातात सुमारे दहा हात लाबीचे बाबू असतात त्याना रगीत कापड गुडाळलेले असते आणि वरच्या टोकाला धातूचे छत्र बसविलेले असते डोक्यावरील मूर्तीचा तोल साभाळून नाच करणे, हे या नाचाचे वैशिष्ट्य आहे या नृत्याला ढोल, नगारा, इ वाद्याची साथ असते नृत्याची गती प्रारभी सथ असते व उत्तरोत्तर ती वाढत जाते [ए हो रा ]

**पूतनाशांती** पूतना नावाच्या बारा उग्र व भयकर अशा देवता आहेत त्यांची नावे अशी– नन्दिनी, सुनदा, स्वग्रहा, मुष्टिका, मातृका, शकुना, मुक्तकेशी, अथवा, कृमिका, निरता, पिच्छिका व कामुका या पूतना देवता अनुक्रमे पहिल्या दिवशी, पहिल्या मासी व पहिल्या वर्षी, दुसऱ्या दिवशी, दुसऱ्या मासी व दुसऱ्या वर्षी अशा क्रमाने बारा वर्षे बालकाना अपस्मारादी विकार निर्माण करीत असतात अशा वेळी त्याची जी शाती करतात, तिचे विधान असे–

नदीच्या दोन्ही तीरावरची माती आणून तिची एक स्त्री-प्रतिमा तयार करावी ती न भाजलेल्या मातीच्या परळात ठेवावी तिच्या बाजूला भात, पाढरे फूल, सात पाढऱ्या पताका, सात वडे, सात पुऱ्या, सात स्वस्तिका (तादुळाच्या पिठाच्या तिकोनी आकृती), सात दिवे, दारू मास, मत्स्य व विडा या वस्तू त्या परळात माडाव्या मग 'ॐ नमो रावणाय, हन हन, मुञ्च, स्वाहा' हा मत्र २१ वेळा म्हणावा नतर परळासकट ती स्त्री प्रतिमा उचलून व ती बालकावरून सात वेळा ओवाळून मध्यान्ही पूर्वेस चव्हाठ्यावर नेऊन ठेवावी मग घरी येऊन स्नान करावे व विशिष्ट वृक्षाची पाने जाळून बालकाला धूप द्यावा भरलेल्या कलशात पिपळाचे पान टाकून त्या पाण्याने बालकावर मार्जन करावे हे धूप व मार्जन तीन दिवस करून चौथ्या दिवशी एका ब्राह्मणाला सुग्रास भोजन वाढाव

हा नदिनी नामक पूतनेचा शातिविधी आहे इतर देवताचे शातिविधान थोड्याफार फरकाने असेच आहे [शा क ]

**पूतभृत** एक यज्ञीय पात्र गाळलेला सोम धारण करणारा घट तो पूतभृत होय ही एक मातीचा मोठी घागर असते आधवनीयात तयार केलेला सोम दशापवित्रातून गाळून या घागरीत ठेवतात या घटाला पवमानग्रह असेही म्हणतात तृतीय सवनात या घागरीतल्या सोमामध्ये दूध मिसळतात या दूधमिश्रित सोमाला आशिर अशी सज्ञा आहे यागासाठी यातील सोम वापरतात [श्री विद्याधरशास्त्री भिडे]

**पूयवह** अठ्ठावीस नरकापैकी एक दूध, मध, मास, लाख, मीठ सुगधी द्रव्ये, तेल, रस, तीळ, इ पदार्थांचा व्यापार करणार लोक या नरकात पडतात [पु इ ]

**पूयोद** अठ्ठावीस नरकापैकी एक अनीतिमान स्त्रियाशी ज्याचा शरीरसबध घडतो, ते या नरकात पडतात

**पूरकळी** एक लोकनृत्य उ मलबारात मीनम (मार्च एप्रिल) मासात पूरम नावाचा एक उत्सव होतो त्या प्रसगी हे नृत्य करतात यात विनोद, विडबन, सगीत, इ विविध प्रकार असल्यामुळे ते लोकाना आवडते [सो चें म ]

**पूरण** एक सूक्तद्रष्टा ऋग्वेदाच्या दहाव्या मडलातील १६० वे सूक्त याच्या नावावर आहे इद्रस्तुती हा या सूक्ताचा विषय आहे इद्र हा भक्ताचा कनवाळू आणि दुष्ट निर्दालक आहे, असे त्याने म्हटले आहे याची एक ऋचा अशी–

**अनुस्पष्टो भवत्येषो अस्य यो अस्मै रेवान् न सुनोति सोमम् ।**
**निररत्नौ मघवा त दधाति ब्रह्मद्विषो हन्त्यनानुदिष्ट ॥**

(ऋ १० १६० ४)

अर्थ – धनवान नसताही जो उपासक इद्राप्रीत्यर्थ सोमरस पिळतो, त्याच्या नेत्राना देव प्रत्यक्ष दर्शन देतो तो भगवान इद्र त्या भक्ताला त्याच्या मनगटाला धरून चालवितो आणि (शत्रूना ठार कर अशी) जरी त्याची प्रार्थना केली नसली, तरी तो वेदज्ञानाचा द्वेष करणाऱ्या दुष्टाचा नाशच करतो

**पूरण कस्सप** गौतम बुद्धाचा समकालीन जडवादी विचारक बुद्धघोषाच्या सुमगलविलासिनी या ग्रथावरून याच्या विषयी काही माहिती उपलब्ध होते, ती अशी–

पूरण कस्सप हा एक दासपुत्र होता एके दिवशी सधी साधून त्याने धन्याच्या घरातून पलायन केले वाटेत त्याला चोरानी लुटले व त्याच्या अगावर बोटभर वस्त्रही ठेवले नाही पुढे नग्न अवस्थेतच तो एका गावी पोचला लोकानी नाव विचारल्यावर तो आत्मगौरवाने म्हणाला की 'मी पूरण कस्सप बुद्ध आहे' पुढे त्याची व अजातशत्रू राजाची भेट झाली अजातशत्रूने

तत्त्वज्ञानाविषयी त्याला काही प्रश्न विचारल्यावर त्याने आपला अक्रियावाद पुढीलप्रमाणे त्याला सांगितला–

पाप व पुण्य या गोष्टी असिद्ध आहेत. कर्म करणे किंवा करविणे, छेदन करणे किंवा करविणे, असत्य, कपट, चौर्य, व्यभिचार, इ. गोष्टी करणे यांत पाप नाही. गंगेच्या दक्षिण किनाऱ्यावर कोणाची हत्या केली तरी पाप लागत नाही आणि उत्तर तीरावर यज्ञ केला तरी त्याचे पुण्य लाभत नाही.

मात्र असे असले तरी व्रत, तप आणि समाधी यांवर त्याची दृढ श्रद्धा होती. याला पाचशे अनुयायी मिळाले होते. तो स्वत:ला सर्वदर्शी समजे. धम्मपदाच्या एका टीकेवरून कळते, की याला बुद्धाचे माहात्म्य सहन झाले नाही आणि त्याने श्रावस्तीजवळ यमुना नदीत उडी घेऊन देहत्याग केला. [प्रा. भौ. बि.; बौ. ध. वि.; भा. द. इ.]

**पूरम** द भारतातला एक उत्सव. केरळातल्या शिव आणि देवी यांच्या देवस्थानांत, चैत्र किंवा वैशाख महिन्यातल्या पूर्वा नक्षत्रावर हा उत्सव करतात. या प्रसंगी देवस्थानांतल्या सगळ्या उत्सवमूर्ती हत्तीवर बसवून त्यांची मिरवणूक काढतात. ही मिरवणूक गावात हिंडून मग जवळच्या एखाद्या मैदानात येते आणि तिथे रात्रभर आतषबाजी होते.

**पूरिया** एक राग. हा मारवा थाटातून निघतो. यात ऋषभ कोमल व मध्यम तीव्र लागतो. पचम वर्ज्य असून, बाकीचे स्वर शुद्ध लागतात. जाती षाडव. वादी- गंधार. संवादी- निषाद गानसमय- रात्रीचा पहिला प्रहर. आरोह स्वर – नी, रे, ग, म, ध, नी, सा. अवरोह स्वर – नी, रे, नी, ध, म, ध, ग, म, ग, म, नी, रे, सा. वियोग किंवा शृंगार या रसांच्या परिपोषासाठी या रागाचा उपयोग करतात. [कल्पना–संगीत]

**पूरिया धनाश्री** एक राग. हा पूर्वी थाटातून निघतो. यात ऋषभ आणि धैवत कोमल लागतात. मध्यम तीव्र व अन्य स्वर शुद्ध लागतात. जाती – ओडव संपूर्ण. वादी- पंचम संवादी- षड्ज. गानसमय– सायकाळ.

**पूर्णागिरी** एक पवित्र पर्वत. ईशान्य लोहमार्गाची एक शाखा पीलीभीतीपासून टनकपूरपर्यंत जाते. तिथून पुढे सुमारे नऊ मैलांवर शारदा नदीच्या काठी नेपाळच्या सीमेवर हा पर्वत आहे. हा सपूर्ण पर्वत देवीरूप मानला जातो. इथली झाडे कधी तोडीत नाहीत. रजस्वला स्त्री व अपवित्र पुरुष यांना या पर्वतावर चढण्याची मनाई आहे. इथे अनेक मंदिरे असून, सर्वांत उंच स्थानी महाकालीचे मंदिर आहे. ते सदैव बंद असते. विनंती केल्यास पुजारी ते उघडतो. नवरात्रात इथे मोठी जत्रा भरते. [कल्याण–तीर्थांक]

**पूर्णपात्र** मंगल कलशावर धान्याने भरून ठेवलेले ताम्हनासारखे रुंद पात्र. याच पात्रात व्रतातल्या प्रधान देवतेची स्थापना करतात.

पुत्रजन्मादी सुवार्ता आणणाऱ्या व्यक्तीला राजे लोक वस्त्रालंकार, द्रव्य, इ. भरून एक पात्र देत असत, त्यालाही पूर्णपात्र अशी संज्ञा आहे. बाणाच्या कादंबरीत या पात्राचा उल्लेख आहे. यज्ञप्रसंगी ऋत्विजाला ज्या पात्रात २५६ मुठी धान्य भरून देतात, त्यालाही वरील नाव आहे. [हि. ध.]

**पूर्णप्रकाशानंदनाथ** (इ. स च्या १७ व्या शतकाची अखेर व १८ व्या शतकाचा प्रारंभ) एक नाथसंप्रदायी मराठी ग्रंथकार. कारवार जिल्ह्याच्या कुमठा तालुक्यातील अंभहल्ली हे याचे गाव होय. गोमंतकातील श्रीमंगेश हे त्याचे कुलदैवत. त्याचे वास्तव्यही अखेरपर्यंत मंगेशाजवळच होते. याने पूर्णप्रबोधचंद्रोदय, शिवदर्पण व राधाविलास हे तीन ग्रंथ रचले आहेत. पूर्णप्रबोधचंद्रोदय हा ग्रंथ अन्वय व व्यतिरेक अशा दोन भागात विभागला आहे. पहिल्या भागात चार व दुसऱ्या भागात पाच असे एकूण नऊ अध्याय असून, त्यांत १८४७ ओव्या आहेत. हा सगळा ग्रंथ वेदान्तपर आहे.

शिवदर्पण ही शिवगीतेवरील समश्लोकी मराठी टीका असून, ती अनुष्टुप छंदात आहे. राधाविलास हे याचे आख्यानकाव्य आहे. त्यात विविध वृत्तांतील १७० श्लोक आहेत. हे काव्य बरेच क्लिष्ट आहे. [गो. च. प.]

**पूर्णसरस्वती** (इ. स. च्या १४ व्या शतकाचा पूर्वार्ध) एक केरळीय कवी व नाटककार. दक्षिण मलबारमध्ये याचा एका ब्राह्मण कुटुंबात जन्म झाला. पूर्णज्योती हे त्याच्या गुरूचे नाव होते. गुरू व शिष्य दोघेही संन्यासी असून, त्रिचूरच्या मठात राहत असावे, असे म्हणतात.

पूर्णसरस्वतीने जे ग्रंथ रचले त्यांची नावे अशी– विद्युल्लता – मेघदूतावरची टीका. रसमंजरी – मालती-माधवावरील टीका. टिप्पण – अनर्घराघवावरील टीका. भक्तिमंदाकिनी – शंकराचार्यांच्या विष्णुपादादी केशान्त स्तोत्रावरील टीका. ऋजुलघ्वी- माधवव्रावरील काव्यमय टीका.

हंसदूत – मेघदूताच्या धर्तीवर लिहिलेले काव्य. हेही मंदाक्रांता वृत्तात असून, त्याचे १०२ श्लोक आहेत. यात कांची

नगरीत राहणाऱ्या एका रमणीने वृंदावनवासी कृष्णाला प्रेम-संदेश पाठविल्याचे वर्णन आहे.

कमलिनी–राजहंस – हे पाच अंकी नाटक आहे. राजहंस व पंपासरोवरातील कमलिनी यांच्या लग्नाचा प्रसंग त्यात वर्णिलेला आहे. प्रस्तुत नाटकातील एक श्लोक असा–

**वाणी ममास्तु वरणीयगुणौघबद्धा ।**
**श्लाघ्या तथापि विदुषां शिवमाश्रयन्ती ।**
**दासी नृपस्य यदि वारपदे नियुक्ता ।**
**देवीति सापि बहुमानपदं जनानाम् ॥**

*अर्थ* – माझी वाणी जरी श्रेष्ठ गुणसमुदायाने निबद्ध असली, तरी ती विद्वानांच्या शिवभावनेचा आश्रय करून राहिल्यामुळेच तिला श्लाघ्यत्व प्राप्त झाले आहे. राजाची दासी जर त्याची पत्नी झाली, तर ती जशी देवी या उपाधीने लोकांना बहुमानास्पद होते, तसेच माझ्या वाणीचे आहे.

याशिवाय इतरही काही टीकाग्रंथ याने लिहिले आहेत. ज्या केरळीय कवींनी संस्कृत साहित्य समृद्ध केले, त्यांपैकीच पूर्णसरस्वती हा एक आहे. [ कॉ. के. स. लि. ]

**पूर्णाहुती** प्रधान होमाच्या नंतर तुपाची धार धरून जी आहुती देतात, तिला पूर्णाहुती म्हणतात. ही आहुती उभे राहून द्यायची असते. आचार्य पूर्णाहुतीची धार धरतो व 'मूर्धानं दिवो अरतिं ...' इ. मंत्र म्हणतो. त्या वेळी यजमान दर्भाने आचार्यांच्या उजव्या दंडाला स्पर्श करतो व पत्नी यजमानाच्या हाताला हात लावते. पूर्णाहुती ही अग्निनारायणाच्या तृप्तीसाठी असून, यागपूरक असते.

**पूर्णिमा** शुक्ल पक्षातील शेवटची तिथी. या दिवशी चंद्र सोळा कलांनी परिपूर्ण होतो, म्हणून या तिथीला पूर्णिमा असे म्हणतात. हिलाच पौर्णिमा, पौर्णमासी व पूर्णमासी अशीही अन्य नावे आहेत. पूर्णमासी शब्दाची व्याख्या हेमाद्रीने दिली आहे, ती अशी –

**पूर्णमासो भवेद् यस्यां पूर्णमासी ततः स्मृता ।**

*अर्थ* – जिच्या ठिकाणी मास पूर्ण होतो, ती पूर्णमासी होय.

ही व्याख्या पूर्णिमान्त मासाला अनुलक्षून आहे. पूर्णिमेला चंद्राची तिथी मानतात. अनुमती व राका असे तिचे दोन भेद आहेत. ज्या तिथीला चंद्र एका कलेने कमी असतो, तिला अनुमती व ज्या तिथीला चंद्र पूर्ण असतो, तिला राका असे म्हणतात.

पौर्णमासी म्हणजे पौर्णिमेची रात्र होय. ती अत्यंत पवित्र असते, असे अथर्ववेदात म्हटले आहे (७. ८०). या रात्री चंद्र व सूर्य यांचा अत्यधिक विकर्ष होतो, म्हणजे ते एकमेकांपासून अधिकात अधिक दूर जातात, असे गोभिल गृह्यसूत्रात म्हटले आहे (१. ५. ७).

महापूर्णिमा – ज्या नक्षत्रावरून मासाला नाव पडले आहे, त्या नक्षत्री पूर्णचंद्र जेव्हा गुरूने संयुक्त होतो, तेव्हा त्या तिथीला महापूर्णिमा असे म्हणतात.

अशा पूर्णिमेस स्नान, दान, उपवास इ. गोष्टींचे महाफल मिळते. ज्येष्ठ, आषाढ, कार्तिक व माघ या मासांच्या पूर्णिमांनाही स्नान–दानादी कृत्ये करावी, असे सांगितले आहे.

बारा पूर्णिमांची विशेष कृत्ये अशी –

**चैत्र** – हनुमानजयंती. **वैशाख** – बुद्धजयंती.
**ज्येष्ठ** – वटसावित्रीची पूजा.
**आषाढ** – गुरू व यती यांची पूजा.
**श्रावण** – रक्षाबंधन, उपाकर्म (श्रावणी).
**भाद्रपद** – नवान्नभक्षण, पितृश्राद्ध.
**आश्विन** – कोजागरी व्रत, मार्गशोधन (घराभोवतीच्या वाटा झाडणे).
**कार्तिक** – त्रिपुरदहनोत्सव, दीपाराधना – या दिवशी गृहिणीने घराच्या भिंतीवर शिव–पार्वतींचे चित्र काढून त्यांची पूजा करावी व उसाच्या रसाचा नैवेद्य दाखवावा, असे हेमाद्रीने सांगितले आहे.
**मार्गशीर्ष** – दत्तजयंती. **पौष** – विष्णुमूर्तीला तुपाने स्नान.
**माघ** – नवान्नभक्षण. **फाल्गुन** – होलिकापूजन.

पौर्णिमेच्या दिवशी अग्निहोत्र्याने पौर्णमास यागाचे अनुष्ठान करायचे असते. हा दिवस पर्वदिन मानलेला असून, धर्मशास्त्रात या दिवशी अनेक धार्मिक कृत्ये करण्यास सांगितले आहे.

बौद्ध–जैनांनीही पूर्णिमेला महत्त्व दिलेले आहे. गौतम बुद्धाचा जन्म वैशाख पूर्णिमेला झाल्यामुळे त्या धर्मात या तिथीचे महत्त्व वाढले आहे. जैन लोक चैत्र व कार्तिक या पूर्णिमांना शत्रुंजयपर्वत, संमेदशिखर, गिरनार व अबूचा पहाड या स्थानांची यात्रा करतात. आषाढी व फाल्गुनी या पूर्णिमांना उपवास करून ते जिनपूजा व जिनालयावर दिव्यांची आरास करतात. आषाढी पूर्णिमेला जैन साधू ज्या गावी असतात, त्याच गावी ते पावसाळ्याचे पुढील चार महिने राहतात. [ वे. इ., एन्सा. रि. ए., म. ज्ञा. को., हि. ध., दा. क. ]

**पूर्त** एक धार्मिक संज्ञा. हा शब्द इष्ट शब्दाला जोडून इष्टापूर्त असा येतो. पूर्त म्हणजे सामान्यपणे समाजोपयोगी पुण्यकृत्ये होत. पहा – इष्टापूर्त.

**पूर्व** एक दिशा. या दिशेला सूर्य उगवतो. हिचा अधिपती इंद्र आहे, म्हणून हिला ऐंद्री व मघोनी अशीही नावे मिळाली आहेत. पूर्व दिशेकडून वाहणारा वारा मधुर, स्निग्ध, अग्निमांद्यकर, पित्तनाशक व वातकारक मानलेला आहे.

**पूर्वाफल्गुनी** अश्विन्यादी गणनेतले ११ वे नक्षत्र. याच्या दक्षिणोत्तर दोन तारका आहेत. पैकी उत्तरेची ठळक व दक्षिणेची तिच्याहून मंद आहे. हे नक्षत्र सिंह राशीत येते. भग ही त्याची देवता आहे. हे उग्र, मुलोचन व स्त्रीनक्षत्र आहे. हे हस्तिमुख, अरुणवर्ण व दोन्ही हातात पोपट धारण करणारे आहे, असे हेमाद्रीने त्याचे मूर्तिध्यान सांगितले आहे. या नक्षत्रावर जन्मणारा पुरुष शूर, साहसी, कोपिष्ट, धूर्त व दक्ष असतो, असे कोष्ठीप्रदीपात सांगितले आहे. या नक्षत्रास केवळ पूर्वानिक्षत्र असेही म्हणतात. [ नक्षत्रलोक ]

**पूर्वाभाद्रपदा** अश्विन्यादी गणनेतले २५ वे नक्षत्र. याच्या दोन तारका आहेत. पूर्वा व उत्तरा भाद्रपदा ही दोन नक्षत्रे मिळून गगनमंडळात एक विशाल चौक बनवितात. त्यापैकी श्रवणाच्या जवळ असलेल्या दक्षिणोत्तर दोन तारका या पूर्वाभाद्रपदा होत. या नक्षत्राचा पहिला चरण कुंभ राशीत व पुढचे तीन चरण मीन राशीत येतात. वैदिक काळात पूर्वाभाद्रपदेला प्रोष्ठपदा असे म्हणत. ती अमृताचे सरक्षण करणारी आहे, असे तै. ब्राह्मणात म्हटले आहे. पूर्वाभाद्रपदेचा अधिपती अज एकपाद हा आहे. हे नक्षत्र उग्र, अधोमुख व पुंनक्षत्र आहे. या नक्षत्रावर जन्मलेला मनुष्य जितेंद्रिय, आदरणीय व कलाचतुर होतो, असे कोष्ठीप्रदीपात म्हटले आहे. शुभ्र, गोमुख, मेषवाहन व मद्यपात्र धारण करणारे, असे याचे मूर्तिध्यान हेमाद्रीने सांगितले आहे. [ नक्षत्रलोक ]

**पूर्वाषाढा** अश्विन्यादी गणनेतील २० वे नक्षत्र. याच्या चार तारकांचा चौकोन आयनिक वृत्तावर येतो. वृश्चिक पुच्छातल्या शेवटच्या दोन तारकांजवळ सात आठ तारकांचा समूह दिसतो, त्यात पूर्वाषाढा येतात. पूर्वाषाढा या गौरवर्ण कन्या, तरुणी व रूपमती आहेत, असे त्याचे वर्णन तै. ब्राह्मणात केले आहे. त्या सत्कर्मे व मधुसंचय करतात. आप ही या नक्षत्राची देवता आहे. हे नक्षत्र उग्र, अध व स्त्रीनक्षत्र आहे. या नक्षत्रावर जन्मलेला मनुष्य देवभक्त, अनुरक्त, बंधुजनांना मान्य व अतिदक्ष असतो, असे कोष्ठीप्रदीपात सांगितले आहे. पूर्वाषाढा ही नीलवर्ण, पीतवस्त्र व चतुर्भुज आहे, असे तिचे मूर्तिध्यान हेमाद्रीने सांगितले आहे. [ नक्षत्रलोक ]

**पूर्वाह्ण** दिवसाचे तीन समान भाग मानून त्यांतल्या पहिल्या भागाला पूर्वाह्ण असे म्हणतात. स्कंद पुराणाच्या मते दिवसाच्या दोन समान विभागांतल्या पहिल्या भागाला पूर्वाह्ण म्हणावे. पूर्वाह्ण हा देवांचा काल असतो, म्हणून बहुतेक देवकृत्ये त्याच कालात करतात. [ श. क. ]

**पूर्वी** एक राग. यात ऋषभ आणि धैवत कोमल व बाकीचे स्वर शुद्ध लागतात. आरोहात पंचम स्वर वर्ज्य आहे. जाती – षाडव संपूर्ण. वादी – गधार. संवादी – निषाद. गानसमय सायंकाळ. [ कल्पना-संगीत; संगीत-शास्त्र ]

**पूविडल** रंगावलीचा एक प्रकार. पूव म्हणजे फुले आणि ईडल म्हणजे त्यांची रचना होय. केरळमधले लोक फुले आणि पाकळ्या यांचीच रंगावली घालतात.

पूविडलची सुरुवात सुमारे दोन हजार वर्षांपूर्वीची असावी. कारण वात्स्यायनाने चौसष्ट कलात 'तण्डुलकुसुमबलिविकाराः' असा तिचा उल्लेख केला आहे. कामदेवाच्या पूजेसाठी पूर्वी मुख्यत्वे नक्षीदार पुष्परचना करीत असत. ती परंपरा केरळात आजही चालू राहिली आहे.

पूविडलची रचना प्रामुख्याने ओणमच्या उत्सवात करतात. या पुष्परचना गोलाकार, कमल-पत्राकार, षट्कोनी, इ. अनेक प्रकारच्या असतात. प्रथम बोटांनी आकृती रेखाटून मग तिच्यावर पुष्परचना करतात. रचना पुरी झाली, की तिच्या मध्य-



पूविडल (१) आधुनिक (२) पारंपरिक

भागी कोणी तुळस ठेवतात; कोणी फुलांचेच उंच कमळ करतात; तर कोणी मत्स्याकृती बनवतात. पुष्परचना करताना रंगसंगतीचा विचार करून गडद रंगाशेजारी फिका रंग अशा पाकळ्या

भरतात रगावलीचा हा एक अभिनव प्रकार आहे पाहा –ओणम्
[ केसरी– दीपावली अक, १९६३ ]

**पूषा** एक वदिक देवता ऋग्वेदातील सपूर्ण आठ सूक्ते पूषाला उद्देशून रचलेली आहत त्याशिवाय त्याचा इद्राबरोबर एका सूक्तात, सोमाबरोबर एका सूक्तात आणि इतर देवताबरोबर सुमारे अठ्ठावन सूक्तात उल्लेख आहे अथर्ववेदात आणि ब्राह्मण ग्रथातही त्याची स्तुती केलेली आह

ऋग्वेदातील पूषासबधीच्या आठ सूक्तापैकी पाच सूक्ते सहाव्या मडलात आहेत सहावे मडल हे भारद्वाजाचे अस या मुळे त्याच्या कुलात पूषा देवतेची विशेष आराधना चालत होती, असे वाटते पूषाचा इद्राशी आणि सोमाशी जो सयुक्तपणे उल्लेख आला आहे, त्याचा बारकाईने अभ्यास केल्यास मुळात इद्रप्रधान आणि पूषाप्रधान असे दोन स्वतत्र धर्मपथ अस्तित्वात होते आणि त्याना एकत्र आणण्याचा वरील सूक्तात प्रयत्न केलेला आह, असे दिसून येते

ऋग्वेदात पूषाचे रूपगुणवर्णन आढळते, ते असे – त्याला दाढी आहे, त्याच्याजवळ आरा किंवा अकुश आहे त्याच्या हातात सुवर्णाची गदा आहे त्याच्या रथाला घोड्याऐवजी बकरे जोडलेले आहेत तो करभ खातो तो शक्तिमान आहे

पूषाचे वैशिष्ट्य असे, की तो पशुपालक आहे तो गायी-बैलाचा व अश्वादिकाचा रक्षक आह तो गुराची वाढ करतो आणि चुकलेल्या जनावराना शोधून आणतो तो मार्गांचा ज्ञाता असून, भटक्या टोळ्याना तो मार्गात मदत करतो त्याच्याकडे पुष्कळ धन असून, आपल्या अनुयायाना तो खूप धन देतो तो तेजस्वी आणि प्रकाशमान आह

द्युलोक आणि पृथ्वी याच्याहून दूर अशा जागी याचा जन्म झाला आहे तो त्या दोन्ही ठिकाणी जात-येत असतो दूरच्या मार्गांची त्याला माहिती असल्याने, तो मताना पितराच्या निवासस्थानी पोचवतो

वैदिक दैवतशास्त्र हे विकसनशील आहे वैदिक आर्यांच्या जीवनक्रमात जसजसे बदल होत गेले, तसतसा वैदिक देवताच्या स्वरूपातही फरक होत गेला पूषा देवतेच्या बाबतीतही तसेच घडले आहे पूषा देवतेच्या काही विशेषणावरून त्या देवतेचे मूळ स्वरूप ठरविण्याचा प्रयत्न काही पडितानी केला आहे, तो असा–

यास्काच्या मते पूषा हा एक आदित्य आह बृहद्देवताही पूषाला सूर्यदेवताच मानते हिलेब्राट, लुडविग, माक्स म्यूलर, इ पाश्चात्य पडितानीही पूषाला एक सौर देवताच मानले आहे पण या मताला विरोधी पुरावा ऋग्वेदातच सापडतो ऋग्वेदात पूषाला सूर्याचा दूत असे म्हटले आहे (६ ५८ ३) आणि एका ठिकाणी तर तो सूर्यापासून वेगळा आहे, असेही सागितले आहे (ऋ ६ ४८ १७)

याशिवाय पूषाची अजाश्व आणि करभाद ही विशेषणे, तसेच त्याची एकवेणी आणि वाढलेली दाढी या वैशिष्ट्या-वरून त्याला सूर्यदेवता मानणे चुकीचे ठरते

पूषा हा गुराढोरावर आणि शेळ्यामेढ्यावर लक्ष ठेवतो, त्याचे रक्षण करतो व त्याची वाढही करतो, या ऋग्वेदातल्या उल्ले-खाच्या आधारे डा रा ना दाडेकर त्याला आर्यांचा पशुपालक देव मानतात पशुपालक आर्य हे नवीन नवीन कुरणाच्या शोधात सारखे भटकत असत त्यामुळे त्यानी आपला देव हा मार्गांचा ज्ञाता आहे, या गोष्टीवर सारखा भर दिला आहे तो आपल्या अनुयायाना एका कुरणातून दुसऱ्या कुरणात सुर-क्षितपणे घेऊन जातो, असेही म्हटले आह व ' गोधनाची इच्छा करणाऱ्या आम्हाला मार्गदर्शन कर,' अशी त्याची प्रार्थनाही केली आह (ऋ ६ ५६ ५) अनेकदा त्याची गुरे व शेळ्या मेंढ्या मार्ग चुकून भलतीकडेच जात आणि हरवत अशा वेळी त्याचे मालक हरवलेले पशू शोधून देण्याविषयी पूषालाच आवाहन करीत भटक्या पशुपालक टोळ्यामध्ये काही लोक प्रवासाचा मार्ग शोधण्यात आणि हरवलेले पशू शोधून काढ ण्यात निष्णात असत त्यामुळे या भटक्या आर्यांनी आपल्या-पकी काही लोकाचा हा गुण आपल्या देवतेला चिकटवला आपला देव आकर्षक दिसावा, म्हणून त्यानी त्याला कपर्द आणि श्मश्रूही बहाल केली आपली शस्त्रेही त्यानी त्याच्या हातात दिली फरक एवढाच, की त्या शस्त्रात त्यानी दैवी शक्ती आहे, असे मानले अष्ट्रा ही पशुसाधनी आहे आपल्या आरेने तो गुरे पळवून नेणाऱ्या पणीना शासन करतो तो मेंढ्याच्या लोकरीचे वस्त्र विणतो आणि त्याची लोकरही स्वच्छ ठेवतो पशुपालक आर्यटोळ्यानी आपली अशा प्रका-रची कामेही आपल्या देवाच्या ठिकाणी कल्पिली आहेत ते खातात, तसलेच साधे अन्न म्हणजे करभ त्याचा देवही खातो अशा तऱ्हेने पशुपाल आर्यांनी आपला देवही आपल्यासारखाच कल्पिलेला दिसून येतो

ऋग्वेदातील भारद्वाजाच्या सूक्तावरून ते कुल पूषाचे उपा सक होते, हे कळून येते गुरे पाळणे आणि त्याचे सगोपन व सवर्धन करणे हा भारद्वाजाच्या त्या प्राचीन कुलाचा व्यव-साय असला पाहिजे भारद्वाजाच्या नतर काण्वही पूषाची उपा सना करू लागले आणि त्यानतर इतरही कुलानी त्याचे अनु-करण केले

पूषा या देवतेच्या विकसनशील व्यक्तिमत्त्वात त्याचा पशुशी

संबंध असणे, ही पहिली पायरी होय. वैदिक दैवतशास्त्रातील एक सर्वसाधारण वैशिष्ट्य असे, की त्यातील सर्व देवतांचा संबंध स्वर्ग आणि प्रकाश यांच्याशी जोडलेला असतो. पूषाच्या बाबतीतले सर्व उल्लेख तपासले, तर त्याला सूर्य न मानता चंद्र मानले पाहिजे, असे दिसून येईल. पूषाला मार्गशोधक किंवा मार्गदर्शक म्हटले आहे त्याचे कारण रात्रीचा अंधार पडून जेव्हा मार्ग दिसेनासा होतो अशा वेळी चंद्र उगवला, की त्याच्या प्रकाशात तो स्पष्ट दिसू लागतो.

पूषा हा सूर्येचा पती होता, अशी एक कथा ऋग्वेदात आहे. पूषा ही प्रकाशाची देवता आहे, असे वैदिक ऋषींनी ठरविल्यावर त्या मताला बळकटी आणण्यासाठी त्यांनी पूषाचा संबंध सूर्यकन्या सूर्या हिच्याशी जोडून दिला; तसाच तो इंद्र व सोम यांच्याशीही जोडला. निरनिराळ्या वैदिक आय कुलांच्या देवतांना एकाच वैदिक दैवतसमूहात आणण्यासाठी वदिक आर्य त्या देवतांचा संबंध इंद्राशी जोडून देत. याच कारणासाठी पूषाला इंद्राचा सखा (ऋ. ६. ५६. २) व बंधू असे त्यांनी संबोधले आणि अशा प्रकारे त्यांनी आपल्या धर्मात पूषाला मानाचे स्थान मिळवून दिले. त्याचप्रमाणे सोमाशी संबंध जोडल्यामुळे वैदिक यज्ञयागातील त्याचे स्थानही बळकट झाले. त्याला उद्देशून अर्घा याग करण्यात येऊ लागला (ऋ. ६. ५०. ५) आणि पुढे त्याला सोमरसाचाही हविर्भाग मिळू लागला. पूषा देवतेचे माहात्म्य वाढविण्यासाठी हा सर्व खटाटोप करण्यात आला.

आश्वलायन आणि पारस्कर गृह्यसूत्रांतही पूषा हा पशुपालक व मार्गदर्शक देव आहे, असे मानूनच मृतांना परलोकी नेण्याच्या त्याच्या कामगिरीचा उल्लेख केला आहे आणि हरवलेल्या वस्तू शोधून आणण्याची त्याची क्षमता लक्षात घेऊन, त्याने हरवलेला सोम व अग्नी शोधून आणला, असे म्हटले आहे. हरवलेल्या वस्तू परत मिळण्यासाठी पूषाला उद्देशून याग करावा, असेही आश्वलायन गृह्यसूत्रांत सांगितले आहे (३. ७. ९). प्रवासाला निघताना मार्गदर्शक पूषा देवतेला बळी द्यावा व त्या वेळी ऋग्वेदातील ६.५३ हे सूक्त म्हणावे, असे शांखायन गृह्यसूत्र सांगते. पूषाला द्यायचा बळी घराच्या उंबऱ्यावर द्यावा, असेही तिथे म्हटले आहे. [ वै. मा.; म. ज्ञा. को.; वेदविद्या.; ऋ. द.; वै. सा. सं.; डॉ. रा. ना. दांडेकर–पूषन, दि पॅस्टोरल गॉड ऑफ दि वेद – न्यू इंडियन अँटिक्वरी, मे १९४२ ]

## पृथिसव

एक याग. हा याग केवळ इष्टीच्या द्वारेच केला जातो. राजसूय यज्ञात उत्तर वेदीशी संबद्ध असलेली कर्मे वजा करता उरलेली सर्व कर्मे या यागात करतात. वेनपुत्र पृथी याला देवांनी हा याग उपदेशिल्यामुळे याला **पृथिसव** हे नाव मिळाले. [ म. ज्ञा. को. ]

## पृथ्वी

पंचमहाभूतांपैकी पहिले भूत. प्रथ् = विस्तार पावणे, या धातूवरून हा शब्द बनला आहे. ‘ प्रथते विस्तारं याति इति ’ = जी विस्तार पावते ती पृथ्वी अशी तिची व्याख्या आहे. पृथ्वीला तिच्या गुणधर्मांना अनुलक्षून अनेक नावे आहेत – भू, भूमी, विश्वंभरा, धरित्री, क्षिती, वसुधा, मेदिनी, मही इत्यादी. भाषापरिच्छेद या न्यायग्रंथात तिचे वर्णन दिले आहे, ते असे –

**तत्र क्षितिर्गन्धहेतुर्नानारूपवती मता ।**
**षड्विधस्तु रसस्तत्र गन्धोऽपि द्विविधो मतः ।।**
**स्पर्शस्तस्यास्तु विज्ञेयो ह्यनुष्णाशीतपाकजः ।**
**नित्यानित्या च सा द्वेधा नित्या स्यादणुलक्षणा ।।**
**अनित्या तु तदन्या स्यात् सैवावयवयोगिनी ।**
**सा च त्रिधा भवेद्देहमिन्द्रियं विषयस्तथा ।।**
**योनिजादिर्भवेद्देहमिन्द्रियं घ्राणलक्षणम् ।**
**विषयो द्व्यणुकादिस्तु ब्रह्माण्डान्त उदाहृतः ।।**

अर्थ – गंध हा पृथ्वीचा गुण असून ती नानारूपवती मानलेली आहे. तिच्या ठिकाणी षड्विध रस आहेत. तिचा गंधही (सुगंध व दुर्गंध अशा प्रकारे) द्विविध आहे. तिचा स्पर्श अनुष्ण, अशीत व पाकज जाणावा. पृथिवी ही नित्य व अनित्य अशी द्विविध आहे. त्यांपैकी अणुरूप ही नित्य असून, तिच्याहून भिन्न व जिचे अवयव होऊ शकतात, ती अनित्य होय. देह, इंद्रिये व विषय या भेदांनी आणखी ती त्रिविध होते. जारज, स्वेदज, अंडज व उद्भिज्ज हे तिचे देहरूप, प्राण हे इंद्रियरूप आणि द्व्यणुकापासून ब्रह्मांडापर्यंत विश्व हे तिचे विषयरूप होय.

महाभारताच्या आश्वमेधिक पर्वात पृथ्वीचे अध्यात्मादी लक्षण सांगितले आहे, ते असे –

**पृथिवी पंचमं भूतं घ्राणश्चाध्यात्ममुच्यते ।**
**अधिभूतं तथा गन्धो वायुस्तत्राधिदैवतम् ।।**

अर्थ – पृथिवी हे (आकाशादी क्रमाने) पाचवे भूत असून, घ्राण हे तिचे अध्यात्म, गंध हे अधिभूत व वायु हे अधिदैवत आहे.

हिरण्यरूप अंडाची दोन छकले झाली आणि त्यातून द्यौ आणि पृथ्वी यांची निर्मिती झाली, असे मनूने म्हटले आहे (१.१३). पृथ्वी प्रथम बनली आणि द्यौची सूर्य, ग्रह, इ. अनेक अंगे पाठीमागून अस्तित्वात आली. शतपथ ब्राह्मणातही असेच म्हटले आहे (१४.१.२.१०) –

**इयं वै पृथ्वी भूतस्य प्रथमजा ।**

अर्थ – ही पृथिवी सर्व भूतांमध्ये प्रथम उत्पन्न झाली.

तै. ब्राह्मणामध्ये (२.२.४.२) तिच्या उत्पत्तीचे एक वेगळे कारण सांगितले आहे, ते असे –

**स भूरिति व्याहरत् । स भूमिमसृजत् ।**

अर्थ – त्याने (प्रजापतीने) भूः असा शब्द उच्चारला. (आणि) त्याने भूमी उत्पन्न केली.

प्रथम ही पृथ्वी अत्यंत शिथिल असावी. त्यामुळे वायू कधी कधी तिला उंच वाहून नेई, तर कधी कधी तिला खाली ढकली. देवांनी हे पाहिले. त्यांनी तिचे स्थान दृढ करण्याचा विचार केला आणि कंकर (खडे, गोटे) भरून तिला वजनदार केले. इंद्राने वृत्रासाठी वज्र फेकले व त्यातून जे थेंब खाली गळाले तेच हे कंकर होत (तै. ब्रा. १.३; मै. सं १.६.३).

पृथ्वीवर क्रमाने ज्या नऊ सृष्टी निर्माण झाल्या, त्यांचा निर्देश शतपथ ब्राह्मणात पुढीलप्रमाणे आला आहे.

**स श्रान्तस्तेपानः फेनमसृजत...स श्रान्तस्तेपानो मृदं शुष्कापमूषसिकतं शर्करामश्मानमयोहिरण्यमोषधिवनस्पत्यसृजत तेनेमां पृथिवीं प्राच्छादयत् ।। ता वा एता नव सृष्टयः ।**

(श. ब्रा. ६. १.१.१३–१४)

अर्थ – श्रांत व तप करणाऱ्या प्रजापतीने प्रथम फेन (फेस) उत्पन्न केला . . . त्या श्रांत व तप करणाऱ्या प्रजापतीने माती, शुष्काप (पाणी सुकून बनलेला कासवाच्या पाठीसारखा खडबडीत खडक), ऊष (क्षार द्रव्याच्या कणांनी युक्त), सिकता (वाळू), शर्करा (जाड वाळू), अश्मा (मोठमोठे दगड), अयः (लोखंड), हिरण्य (सोने) व ओषधि – वनस्पती उत्पन्न केल्या. या त्या नवसृष्टी होत.

शतपथ ब्राह्मणात पृथ्वीला अग्निगर्भा म्हटले आहे. ज्याप्रमाणे माता पुत्राला आपल्या गर्भाशयात धारण करते, त्याप्रमाणे पृथ्वी अग्नीला आपल्या पोटात धारण करते. (श. ब्रा. ६.५.१.११).

पृथ्वी वाटोळी असल्याचे प्राचीन काळच्या शास्त्रज्ञांनाही माहीत होते. पृथ्वी परिमंडलरूप अर्थात वाटोळी व स्वतःभोवती फिरणारी, तसेच वातावरण धारण करणारी आहे, असे शतपथात म्हटले आहे (श. ब्रा. ७.१.१.३७).

**पृथ्वीची रचना** – पुराणांतही पृथ्वीच्या उत्पत्ती–स्थिती-गती-सबंधी काही माहिती दिली आहे. पृथ्वी उत्पन्न कशी झाली, या विषयी ब्रह्मवैवर्त पुराणात पुढील कथा सांगितली आहे –

प्रलयजलात विराट पुरुष पहुडला होता. कालांतराने त्याच्या सर्वांगावर मलाचे पुट चढले व तो मल त्याच्या रोमरंध्रांतही शिरला. असा काही काळ गेल्यानंतर त्या प्रत्येक रोमरंध्रात एकेक पृथ्वी निर्माण झाली. ही पृथ्वी सृष्टिकाली प्रलयजलाच्या पृष्ठभागावर प्रकट होऊन तरंगू लागत असे आणि प्रलयाच्या वेळी जलात बुडून अदृश्य होत असे.

पृथ्वीमंडलाभोवती कोणती स्थिती आहे, त्याविषयी ब्रह्मांड पुराणात पुढील वर्णन आहे –

**पृथिव्या मण्डलं कृत्स्नं घनतोयेन धार्यते ।**
**घनोदधिः परेणाथ धार्यते घनतेजसा ।।**
**बाह्यतो घनतेजश्च तिर्यगूर्ध्वं तु मण्डलम् ।**
**समन्ताद् घनवातेन धार्यमाणं प्रतिष्ठितम् ।।**

अर्थ – पृथ्वीमंडलाच्या भोवती घनजल आहे. तो घनसागर घनतेजाने धारण केलेला आहे. त्याच्या बाहेर सर्व बाजूंनी तिरका व ऊर्ध्व घनवात आहे.

पृथ्वीच्या खाली नागलोक आहे, या कल्पनेतूनच पृथ्वी शेषनागाच्या मस्तकावर आहे ही पौराणिक कल्पना पुढे आली.

पृथ्वी ही सप्तसागरांनी व सप्तद्वीपांनी युक्त आहे. तिच्यावर मेरू व हिमाचल हे महापर्वत आहेत; ब्रह्मा-विष्णु-महेश यांची आलये आहेत, पुण्यतीर्थे आहेत व पुण्य भारत आहे. तिच्या खाली सप्त पाताळे असून, उर्ध्व लोकी ब्रह्मलोक आहे. ही पृथ्वी एकदा अधोलोकात बुडत असता विष्णूने वराहरूप घेऊन तिला वर काढले म्हणून तिला वराहपत्नी असे म्हणतात. हिचा विस्तार कोटी योजने आहे.

पृथुराजा व पृथ्वी यांचे एक आख्यान भागवत पुराणात विस्ताराने सांगितले आहे, ते असे– पृथु राजा राज्य करीत असता पृथ्वीवर दुष्काळ पडला. अन्न आणि औषधी यांची निर्मिती अत्यल्प प्रमाणात होऊ लागली. त्या वेळी सर्व प्रजा क्षुधार्त व पीडित होऊन पृथूला शरण गेल्या. पृथूने वरील अपराधाबद्दल पृथ्वीला शासन करण्याचे ठरविले. तो धनुष्यबाण घेऊन तिच्या मागे लागला. पृथ्वी भयभीत झाली आणि गोरूप घेऊन पृथूला शरण आली. तिने पृथूला विनविले, की ‘ तू माझे दोहन करून सर्व प्रकारची संपत्ती मिळव. ’ पृथूने ती विनंती मान्य केली. मग देव, असुर, पितर, मनुष्य, राक्षस, पर्वत, इ. वर्गानी आपापले वत्स व पात्रे आणून अनुक्रमे बल, माया, स्वधा, कृषी, धान्य, रक्त, महौषधी, रत्ने, इ. वस्तू दोहून घेतल्या. त्यापूर्वी पृथ्वी उंच-सखल होती. पृथूने तिला सपाट केले व तिच्यावर ग्राम, जनपद, पुर, नगर, इ. वसाहती स्थापन केल्या.

पृथूच्याही आधी पृथ्वीचे अशा प्रकारे अनेकदा दोहन झाले होते. पहिले दोहन ब्रह्च्याने केले, दुसरे दोहन अग्निधराने, तिसरे चैत्राने, चौथे देवभुजाने, पाचवे बालबंधूने इत्यादी.

पृथ्वी ही भूतधात्री आहे. ती सर्व चराचराला सुखाने धारण करते. पण तिला काही लोकांचा भार होतो. याविषयी पृथ्वीच स्वमुखाने सांगते, ते असे –

**कृष्णभक्तिविहीना ये ये च तद्‌भक्तनिन्दकाः ।**
**तेषां महापातकिनामशक्ता भारवाहने ।।**
**स्वधर्माचारहीना ये नित्यकृत्यविवर्जिताः ।**
**श्रद्धाहीनाश्च वेदेषु तेषां भारेण पीडिता ।।**

अर्थ – जे कृष्णभक्तिहीन आहेत व जे कृष्णभक्तांचे निंदक आहेत, त्या महापातक्यांचा भार वाहण्याच्या कामी मी असमर्थ आहे. जे स्वधर्माचरण करीत नाहीत, जे नित्य कृत्ये आचरीत नाहीत व जे वेदांविषयी श्रद्धा बाळगीत नाहीत, त्यांच्या भाराने मी पीडित आहे.

यापुढे अशाच प्रकारच्या पापी लोकांची यादी पृथिवीने दिली आहे. सामान्यपणे हिंसक, दुर्जन, असत्यवादी, जातिनिषिद्ध कृत्ये करणारे, इ. पापी लोकांचा पृथ्वीला भार होतो, असा त्याचा अर्थ आहे.

**वैज्ञानिक माहिती** – पृथ्वीविषयीची वैज्ञानिक संशोधनाच्या द्वारे कळून आलेली वास्तव स्थिती अशी –

सूर्यमंडलात बुधापासून प्लूटोपर्यंत जे नऊ ग्रह फिरत असतात, त्यांमध्ये पृथ्वी हा तिसरा ग्रह आहे. चंद्र हा पृथ्वीचा उपग्रह आहे. चंद्राच्या प्रभावामुळेच पृथ्वीवरच्या सागरांना भरतीओहोटी येते. पृथ्वी गोल असली, तरी ती चेंडूसारखी गोल नसून, नारिंगासारखी गोल आहे. तिचे ध्रुवप्रदेश किंचित चपटे आहेत. विषुववृत्तावर तिला थोडासा फुगवटा आलेला आहे. दक्षिणोत्तर ध्रुवांच्या व्यासापेक्षा विषुववृत्तावरील तिचा व्यास २७ मैल अधिक आहे. पृथ्वीचा पृष्ठभाग हा समतलच मानला पाहिजे. तिच्यावर नद्या, सागर आणि पर्वत यांच्यामुळे उंच – सखल भाग दिसत असला, तरी आठ हजार मैल व्यासाच्या तुलनेने हा उंचसखलपणा नगण्य होय. पृथिवीवरील उच्चतम स्थान २९ हजार फूट उंचीचे एव्हरेस्ट हे शिखर हिमालयात असून, ३६,५६० फूट हा तिच्या पृष्ठभागाचा नीचतम बिंदू फिलिपाईन्स द्वीपाजवळील महासागरात आहे. पृथ्वीचे क्षेत्रफळ सुमारे १९ कोटी ७० लाख चौरस मैलांचे आहे. त्यातला ७१ टक्के भाग समुद्रमय असून, उरलेला स्थलमय आहे.

स्थलमंडल, जलमंडल आणि वायुमंडल अशा तीन मंडलांनी पृथिवी बनलेली आहे. तिच्या घन भागाला स्थलमंडल म्हणतात. समुद्रातून बाष्परूपाने वर जाणारे जल पृथिवीचे जलमंडल निर्माण करते. त्या दोघांनाही वेढून असणारे ते वायुमंडल होय.

स्थलमंडलाच्या अंतर्गत काही भौतिक व रासायनिक शक्ती कार्य करीत असतात. त्यांच्यामुळे ज्वालामुखी उत्पन्न होतात व त्याच शक्ती पृथ्वीच्या कवचाचे काही भाग वर उचलून स्थलाची रचना करतात. पृथ्वीची आकर्षण–शक्ती स्थलमंडलातच असते. ती जलमंडल व वायुमंडल यांना नेहमी आकर्षित करीत राहते. ही दोन मंडले भूपृष्ठभागाचे संरक्षण करतात.

जलमंडलाच्या अंतर्गत येणाऱ्या पाण्यामध्ये एकटा प्रशांत महासागरच पृथ्वीच्या अर्ध्याहून अधिक पृष्ठभागाला आच्छादित करून राहिला आहे. त्याची सरासरी खोली १४,००० फूट आहे. पृथ्वीवर आढळणाऱ्या जलाचा अंश स्थलमंडलातही प्रवेश करतो आणि तो आतल्या अधोभूमीजलाच्या रूपाने प्राप्त होतो.

वायुमंडलात शे. ९९ टक्के नायट्रोजन व ऑक्सिजन आहेत आणि शे. १ टक्का अन्य काही विरल वायू आहेत.

पृथ्वीचे आयुष्य अनेक वैज्ञानिकांनी अनेक प्रकारे सांगितले आहे. पण आधुनिक संशोधन – पद्धतीच्या द्वारे ते १ अब्ज ८० कोटीपासून तीन अब्ज वर्षांपर्यंत मानले गेले आहे.

अंतरिक्षात कोणताही गोल स्थिर नसतो. पृथिवीही त्याचप्रमाणे स्थिर नाही. तिला दैनिक व वार्षिक म्हणजे स्वतःभोवती फिरणे व सूर्याभोवती फिरणे अशा दोन गती आहेत. पहिल्या गतीप्रमाणे ती एका दिवसात आपल्या आसाभोवती एक प्रदक्षिणा पुरी करते. दुसऱ्या गतीने ती एका दीर्घ वर्तुळात सूर्याभोवती सुमारे ३६५ दिवसांत एक प्रदक्षिणा पुरी करते. तिच्या पहिल्या गतीमुळे अहोरात्र व दुसऱ्या गतीमुळे ऋतुपरिवर्तन होते.

**पृथ्वीसूक्त** – पृथिवी हा शब्द वैदिक वाङमयात प्रशस्तभूमी या अर्थाने आला आहे. तिचा बहुधा द्यौबरोबर निर्देश आढळतो. द्यावापृथिवी हे एक महत्त्वाचे युग्म ऋग्वेदात मानले आहे (१·१९१·६). तिला देवता म्हटले असून, लहानसे का होईना; एक सूक्त तिच्यासाठी ऋग्वेदात आहे (५·८४). मेधातिथी काण्व पृथ्वीची पुढीलप्रमाणे प्रार्थना करतो –

**स्योना पृथिवि भवा नृक्षरा निवेशनी ।**
**यच्छा नः शर्म सप्रथः ।।**

(ऋ. १·२२·१५)

अर्थ – हे पृथिवी, तू आम्हांला प्रसन्न हो. तुझ्यापासून कोणालाही उपसर्ग पोचत नाही. तू आपल्या पृष्ठभागावर सर्वांचाच समावेश करतेस. तर तू आम्हांस सौख्यातिशय प्राप्त करून दे.

अथर्ववेदात पृथिवीच्या वर्णनपर असेच एक दीर्घ व सुंदर सूक्त आहे, त्यातले काही मंत्र असे–

**सत्यं बृहदृतमुग्रं दीक्षा तपो ब्रह्म यज्ञः पृथिवीं धारयन्ति ।**
**सा नो भूतस्य भव्यस्य पत्न्युरुं लोकं पृथिवी नः कृणोतु ।।**

(अथर्व. १२.१.१)

अर्थ– सत्य, ऋत, उग्र, क्षात्रतेज, दीक्षा, तप, ज्ञान आणि यज्ञ हे पृथिवीचे धारण करतात. भूत आणि भविष्यत् या सर्व पदार्थांची पालनकर्त्री अशी ही पृथिवी आम्हांला महान लोक (कार्यक्षेत्र) प्राप्त करून देवो.

**त्वज्जातास्त्वयि चरन्ति मर्त्यास्त्वं बिभर्षि द्विपदस्त्वं चतुष्पदः ।
तवेमे पृथिवी पञ्च मानवा येभ्यो ज्योतिरमृतं मर्त्येभ्य
उद्यन्त्सूर्यो रश्मिभिरातनोति ।।**

(अथर्व, १२.१.१५)

अर्थ – हे पृथिवी, हे मनुष्य तुजपासूनच उत्पन्न झाले आहेत आणि तुझ्यावरच संचार करीत आहेत. द्विपाद व चतुष्पाद अशा पशूंचे तू धारण-पोषण करतेस. तसेच ज्या मानवासाठी अमृतरूप तेज उगवता सूर्य आपल्या किरणांच्या द्वारे पसरवितो, ते हे आम्ही पाच प्रकारचे जन तुझी सेवा करण्याची इच्छा करीत आहो.

**निधिं बिभ्रती बहुधा गुहा वसु मणिं हिरण्यं पृथिवी ददातु मे।
वसूनि नो वसुदा रासमाना देवी दधातु सुमनस्यमाना ।।**

(अथर्व. १२.१.४४)

अर्थ – पुष्कळ प्रकारच्या खाणीत ही पृथ्वी सोने, रत्ने, इ. धातूंचा निधी धारण करते. अशी ही पृथ्वी आम्हांला ते सर्व धन देवो. धनदात्री, दानकर्त्री आणि देवस्वरूप अशी ही पृथ्वी आमच्यावर प्रसन्न होऊन आम्हाला धन देवो.

या सर्व सूक्तात अथर्वण ऋषीने भूमीला मातृत्व व देवत्व प्रदान करून, स्वत:ला तिचा पुत्र म्हटले आहे. तो म्हणतो – ही भूमी प्राण्याविषयी वात्सल्य भाव धारण करणारी आहे. ती सुरभी असून, तिच्यात अमृत भरले आहे. ती अनंत आहे, विश्वंभरा आहे स्थूल दृष्टीला ती केवळ शिलाभूमी किंवा धुळीने भरलेला गोळा वाटेल; पण जो ज्ञानी आहे व ज्याच्याजवळ ध्यानशक्ती आहे, त्याला तिचे हृदय कळून येईल आणि त्याच्या पुढे तिचे अमर रूप प्रकट होईल. तिच्या आराधनेने मानवाला अनेक वरदाने लाभतील. तिच्यावर अनेक अरण्ये असून, अनेक प्रकारच्या वीर्यवान औषधी जन्माला येतात. वर्षा ऋतूमध्ये जेव्हा जलपूर्ण मेघ आकाशात गर्जून वर्षाव करू लागतात, तेव्हा औषधींच्या वृद्धीने पृथ्वीचे शरीर झाकून जाते. तिच्यावर नियमित ऋतुचक्र फिरत असते. अहोरात्रांची पाठशिवणी चालत असते. जिचे हृदय अमृत व सत्य यांनी भरले आहे, अशी ही भूमी आमच्या राष्ट्रात आम्हांला तेज व बल देवो.

**पृथ्वी देवता –** प्रचलित हिंदू देवतांत पृथ्वीला देवता म्हणून विशेषसे स्थान नाही. पण प्राचीन काळी पृथ्वीची स्वतंत्र देवता म्हणून पूजा होत असावी असे सिद्ध होते. ही पूजा केव्हा आणि का बंद झाली यासंबधी निश्चित माहिती मिळत नाही. विदर्भात माहूरधरी येथे पृथ्वीची एक प्राचीन मूर्ती उपलब्ध झाली आहे. ही मूर्ती बसलेली असून नग्न आहे. सिंधू उत्खननात उपलब्ध झालेल्या खापराच्या मुद्रेवरील मूर्तीसारखी ती आहे. सिंधू संस्कृतीत पृथ्वी ही एक प्रमुख देवता होती. खाली डोके आणि वर पाय अशा अवस्थेतले एक नग्न चित्र सिंधू उत्खननात सापडले आहे. त्या स्त्रीच्या जननेंद्रियातून एक झाड वर निघाल्याचे दाखविले आहे. त्यामुळे हे चित्र पृथ्वी देवतेचेच आहे, असे म्हणता येते. त्या चित्राच्या दुसऱ्या बाजूला एक स्त्री जमिनीवर बसली असून, तिचे हात प्रार्थनेच्या अवस्थेत आहेत. तिथे जवळच तलवार हातात घेतलेला एक मनुष्य आहे. हे चित्र पृथ्वी देवीला देत असलेल्या नरबलीचे आहे, असे मानतात. ही देवता प्राचीन काळी भारतापुरतीच मर्यादित नसून, मध्य अशियातही ती असण्याची शक्यता आहे. इ. स. पूर्व १४ व्या शतकातील हिट्टाइट आणि मिट्टानी या दोन जमातीमध्ये झालेला तहनामा उपलब्ध आहे. त्यातील ही दोन जमातींची नावे अनुक्रमे पृथ्वीदर्शक सीता व मातृदर्शक माता, या शब्दांची रूपे आहेत. प्राचीन काळी पृथ्वी आणि माता या देवताच्या उपासकांचे वेगवेगळे पथ असावेत असे दिसते. यावरून पृथ्वी ही देवता कृषिप्रधान आर्यपूर्व लोकांची असावी आणि ते तिची स्वतंत्रपणे आराधना करीत असावे, असा तर्क करणे चुकीचे होणार नाही. [ श. क.; म. ज्ञा. को.; वै. वि. भा. स.; वै. मा.; वे. इ.; हि. वि. को.; सो. इं. ट्रॅ.; श्री. प्र. रा. देशमुख, नवभारत, मे १९६२ ]

## पृथ्वीदान

एक काम्य दान. याचा विधी पुढीलप्रमाणे – जबुद्वीपाच्या आकाराची सुवर्णाची मूर्ती करून व तिच्यावर वसू, रुद्र व आदित्य याच्या प्रतिमा ठेवून तिचे दान करावे. फल – विष्णुलोकप्राप्ती. [ मत्स्य पुराण २८५ ]

## पृथ्वीपूजा

श्रौत-स्मार्त कर्मात पृथ्वीपूजेचे विशेष विधान नाही; पण लोकसमाजात मात्र पृथ्वीची पूजा प्रचलित आहे पृथ्वी ही माता आहे, ही धारणा लोकसमूहात सर्वत्र आढळते. पृथ्वी धान्ये आणि औषधी वनस्पती उत्पन्न करते आणि त्यामुळे प्राणिमात्रांचे पोषण होते. या कारणाने लोकानी पृथ्वीला देवत्व दिले आहे. विष्णू हा सृष्टीचा पालनकर्ता मानलेला आहे आणि पृथ्वी ही पालनकर्त्री असल्यामुळे तिला विष्णूची पत्नी म्हटले आहे. मूर्तिकलेत काही ठिकाणी विष्णूच्या एका अंगी श्री देवी आणि दुसऱ्या अंगी भू देवी घडवलेली असते. प्रात स्मरणात पृथ्वीची क्षमायाचना केलेली आढळते –

**समुद्रवसने देवि पर्वतस्तनमण्डले ।
विष्णुपत्नि नमस्तुभ्यं पादस्पर्शं क्षमस्व मे ।।**

अर्थ – समुद्ररूपी वस्त्र नेसलेल्या आणि पर्वतरूपी स्तनमडल असलेल्या, हे विष्णुपत्नी देवी, तुला नमस्कार असो. माझ्या पादस्पर्शाबद्दल तू मला क्षमा कर.

ज्या जागी एखाद्या वास्तूची उभारणी करायची असेल, त्या

जागी प्रथम भूमिपूजा करण्याची चाल सर्वत्र आहे. शेतकरी समाजात पेरणीच्या आधी भूमिपूजा करून तिला कोंबडे, बकरे बळी देण्याचीही पद्धत आहे. धान्य मळण्यापूर्वी शेतकरी जी खळ्याची पूजा करतात, तीही एक प्रकारे पृथ्वीपूजाच होय. द. कोकणात सांतेरी आणि भूमका या नावाने ओटा व वारूळ यांची पूजा करतात, ती पृथ्वीचीच पूजा असते. कोकणात काही ठिकाणी एका मडक्यात दिवा, अन्न व पानसुपारी या वस्तू ठेवून ते मडके मार्गशीर्ष अमावस्येला जमिनीत पुरतात आणि उन्हाळी पिकांच्या कापणीच्या वेळी ते मडके बाहेर काढून व त्यात धान्य भरून घरात आणतात. आश्विन शुद्ध अष्टमीलाही काही ठिकाणी पृथ्वीपूजा करण्याची चाल आहे. काही ठिकाणी लग्न, मुंज, इ. कार्यासाठी मांडव घालतानाही पृथ्वीची पूजा करतात.



भूदेवी (चोळकालीन मूर्ती)

पृथ्वी ही कोरवा आदिवासींची मुख्य देवता आहे. ते एखाद्या शालवृक्षाखाली तिचे लहानसे मंदिर बांधतात व मार्गशीर्ष महिन्यात तिची पूजा करून, तिला बोकडाचा बळी देतात. काही आदिवासी जमाती श्रावणात तिची पूजा करतात. पृथ्वी ही आजन्म कुमारी मानली आहे. म्हणून आदिवासी लोक तिचा प्रसाद विवाहित स्त्रियांना देत नाहीत. गाई-म्हशींचे दूध काढतेवेळी पहिली धार जमिनीवर सोडतात व लहान मुलाला तेल लावतेवेळी तेलाचा थेंब जमिनीवर टाकतात, हाही एक पृथ्वीपूजेचाच प्रकार समजला पाहिजे. [पॉ. रि. फो. नॉ इं.]

**पृथ्वीराज चौहान** (११५९– ११९३ इ. स.) दिल्लीचा शेवटचा हिंदू सम्राट व चाहमान राजवंशातील प्रतापी पुरुष. याच्या बापाचे नाव सोमेश्वर असून, आईचे कर्पूरदेवी असे होते.

सोमेश्वराच्या राज्यकालात पृथ्वीराजाने शालेय आणि सैनिकी अशा उभयविध शिक्षणात प्रावीण्य संपादिले. पुढे इ. स. ११७७ साली सोमेश्वर मरण पावला. त्या वेळी पृथ्वीराज राज्यकारभाराला अननुभवी असल्यामुळे त्याच्या आईनेच कदंबवास या मुख्य प्रधानाच्या साहाय्याने कारभार चालविला. कदंबवासाने पृथ्वीराजाचे सर्वतोपरी रक्षण केले. इतकेच नव्हे; तर त्याचे आसन दृढ व्हावे म्हणून त्याने राज्याच्या सर्व सीमांवर सैन्य पाठवून पक्का बंदोबस्तही केला. याच काळात तिने भुवनैकमल्ल नामक एका शूर पुरुषाची सेनापती म्हणून नेमणूक केली. हाती सत्ता येताच त्याने नाग राजांचा निःपात करून पृथ्वीराजाच्या साऱ्या शत्रूंना जबर दहशत बसवली. अशा प्रकारे सर्व बाजूंनी सुस्थिरता प्राप्त झाल्यावर पृथ्वीराज राज्यकारभार पाहू लागला. लौकरच त्याने अजमेर सोडले व तो दिल्लीला गेला. दिल्लीचे राज्य बीसलदेवापासून त्याच्याच वंशाकडे होते.

दिल्लीला सत्ताधीश झाल्यावर पृथ्वीराजाला आपल्या सामर्थ्याचा अवास्तव अभिमान निर्माण झाला व त्या तोऱ्यात तो दरबारातल्या अनेक वयोवृद्ध सरदार-मानकऱ्यांना दुखवू लागला. त्यामुळे मंत्रिमंडळात त्याच्या वर्तनाविषयी असंतोष माजला.

दरम्यानच्या काळात मुहंमद घोरीने भारतावर स्वाऱ्या सुरू केल्या होत्या. इ. स. ११९०–९१ या वर्षी त्याने पृथ्वीराजाच्या राज्यावर आक्रमण केले. पृथ्वीराजाने प्रचंड सैन्यानिशी घोरीवर हल्ला चढविला व ८० मैल दूर असणाऱ्या तराई या गावी त्याचा पराभव केला.

याच वेळी पृथ्वीराज व कनोजचा राजा जयचंद्र गाहडवाल यांच्यांतील वैमनस्य विकोपाला गेले. जयचंद्राची मुलगी संयोगिता हिचे पृथ्वीराजावर प्रेम बसले होते. आपल्या शत्रूवर आपलीच मुलगी प्रेम करते, हे कळल्यावर जयचंद्राला अत्यंत दुःख झाले, तसाच तिचा मनस्वी रागही आला. त्याने सांगून समजावून पाहिले; परंतु ती आपला हट्ट सोडीत नाही, असे दिसल्यावर त्याने तिला बंदीत टाकले. थोड्याच काळात जयचंद्राने संयोगितेचे स्वयंवर मांडले. स्वयंवराला त्याने सर्व राजांना निमंत्रिले; पण पृथ्वीराजाला कटाक्षाने वगळले. संयोगितेला त्याची कल्पना येताच तिने परस्पर गुपचुप पृथ्वीराजाला निमंत्रण पाठवले व वस्तुस्थितीची पूर्ण कल्पना दिली.

मग पृथ्वीराज गुप्तवेषाने स्वयंवरस्थळी आला. स्वयंवर–मंडपाच्या दाराजवळ द्वारपाल म्हणून जयचंद्राने पृथ्वीराजाचा एक लाकडी पुतळा उभा केला होता. संयोगिता मंडपात आली व ती एकेका राजाला न्याहाळण्याचा बहाणा करीत दरवाजापर्यंत

गेली. तिथे पोचताच तिने पृथ्वीराजाच्या त्या लाकडी पुतळ्यालाच वरमाला घातली. त्याबरोबर तिथेच लपून बसलेल्या पृथ्वीराजाने तिला उचलले व आपल्या घोड्यावर घेऊन तो दिल्लीच्या मार्गाला लागला.

जयचद्राने हे पाहिले आणि तो अत्यंत संतप्त झाला. त्याने पृथ्वीराजाचा पाठलागही केला. परंतु पृथ्वीराज त्याच्या हाती लागला नाही.

आता पृथ्वीराज शृंगारविलासांत रममाण झाला. त्याच्या पूर्वीच्या उन्मत्तपणाला आता आणखीच भरती आली. दरम्यानच्या काळात बऱ्याच राजपूत राजांनाही तो दुखवून बसला. आणि हीच नेमकी संधी साधून घोरीने पुनश्च प्रचंड सैन्यानिशी त्याच्यावर चाल केली. पृथ्वीराजाने कसेबसे सैन्य जमवून त्याला तोंड देण्याचा प्रयत्न केला; पण राजपुतानी पराक्रमाची शर्थ करूनही शेवटी ते हरले. घोरी विजयी झाला. राजपूत सैन्यात पळापळ सुरू झाली. स्वतः पृथ्वीराजही हत्तीवरून उतरला व घोड्यावर बसून पळून जाऊ लागला. पण घोरीच्या सैनिकांनी त्याला पकडले व ठार मारले.

पृथ्वीराजरासोमध्ये या घटनेचे वर्णन वेगळ्या पद्धतीने केले आहे, ते असे – पृथ्वीराज घोरीच्या बदीखान्यात असताना त्याचा



पृथ्वीराज चौहान

परम मित्र चंदभाट याने पृथ्वीराजाचे धनुर्विद्यानैपुण्य घोरीला दाखवण्याचे निमित्त साधून त्याच्याकरवी घोरीला ठार मारले. नंतर पृथ्वीराज–चंदभाट यानी परस्परांची शिरे उतरवली. परंतु या घटनेला ऐतिहासिक आधार नाही.

पृथ्वीराज हा साहसी, अद्वितीय धनुर्धर आणि मातबर योद्धा होता. तथापि विलासीपणा, हेकेखोर वृत्ती, स्वकीयांना अकारण दुखविण्याची सवय आणि शत्रूला दया दाखविण्याची वृत्ती हे दुर्गुण त्याच्या ठायी असल्याकारणाने त्याचे व पर्यायाने तत्कालीन हिंदू राज्याचे फार मोठे नुकसान झाले. पृथ्वीराज हा अखेरचा दिल्लीपती ठरला. त्याच्या मृत्यूनंतर मुसलमान सत्ताधीशांची उत्तर भारतावर घट्ट पकड बसली. [ हि. क. इं. पी.; हिं. वि. को.; हमारा राजस्थान; मु. रि. ]

## पृथ्वीराज राठौड

( १५४९ – १६०० इ. स. ) राजस्थानातील एक प्रसिद्ध भक्तकवी व योद्धा. हा बीकानेर – नरेश राय कल्याणमल याचा मुलगा असून, अकबराच्या दरबारी सरदार म्हणून राहिला होता. मुहणोत नैणसी या राजस्थानी इतिहासकाराच्या उल्लेखावरून कळते की, अकबराने त्याला गागरोनगडाची जहागीर बहाल केली होती. पृथ्वीराज हा जरी अकबराचा आश्रित असला, तरी तो देशाभिमानी व धर्माभिमानी क्षत्रिय होता. सारे राजपूत राजे अकबराला शरण गेल्याचे पाहून त्याला दुःख झाले आणि त्यामुळेच त्याला अकबराशी प्राणपणाने झुंज देणाऱ्या प्रतापसिंहाविषयी अत्यंत आदर वाटू लागला.

एकदा राणा प्रताप मोठ्या विपन्न दशेत सापडला. आपला सगळा स्वातंत्र्याभिमान गुंडाळून ठेवून अकबराला शरण जावे, असे त्याला वाटू लागले. तसे त्याने अकबराला पत्रही लिहिले. राणा प्रतापाचे ते पत्र पाहून अकबर हुरळून गेला व त्या भरात त्याने पृथ्वीराजाला डिवचण्यासाठी मुद्दाम ते पत्र त्याला दाखवले. पृथ्वीराजाने ते पत्र वाचले व त्याला फार वाईट वाटले. तो अकबराला म्हणाला. ‘महाराज, हे पत्र प्रतापसिंहाचे नाही. तो तुम्हांला असे शरणपत्र कधीही पाठवणार नाही.’ अकबराला हे ऐकून मोठे नवल वाटले. तो पृथ्वीराजाला म्हणाला. “प्रतापसिंह मला शरण येणार नाही असे तू एवढ्या आत्मविश्वासाने सांगतोस त्याचे कारण काय ?’ – ‘ते तुम्हांला थोड्याच दिवसांत कळेल.” पृथ्वीराजाने उत्तर दिले.

मग पृथ्वीराजाने राणा प्रतापाला एक पत्र लिहिले व त्यात अकबराला कधीही शरण न जाण्याच्या त्याच्या प्रतिज्ञेची त्याला आठवण देऊन म्हटले –

**पटकूं मूछां पाण, कै पटकूं निजतन करद ।**
**दीजै लिख दीवाण, इण दो महली बात इक ।।**

भावार्थ– स्वातंत्र्यप्रेमाने वेड्या बनलेल्या हे प्रतापसिंहा,

तुझ्या अभिमानाने मी आपल्या मिशीवर हात फिरवू, की तू शरण येणार ही वार्ता ऐकून माझ्या शरीरावर तलवार चालवून घेऊन त्याचा शेवट करू ? या दोन गोष्टींपैकी मी काय करू ते लिहून कळव.

प्रतापाला हे पत्र वाचून पुनश्च स्वाभिमानाचे स्फुरण आले आणि त्याने पृथ्वीराजाला लिहिले–

**खुशी हूंत पीथल कमध, पटको मूछां पाण ।**
**पछटण है जेत पतो, कमला सिर के वाण ।।**

भावार्थ– हे वीर पृथ्वीराज, तू बेधडक आपल्या मिशीवर ताव दे. जोपर्यंत प्रताप जिवंत आहे, तोपर्यंत त्याची तलवार यवनांचा निःपात करीत राहील.

पृथ्वीराजाने वेलिक्रिसन रुकमणीरी, दसम भागवत रा दूहा, दशरथ रावउत, गंगालहरी, वसुदेवउत, इ. अनेक लहानमोठे काव्यग्रंथ लिहिले असून, त्याची स्फुट कविताही विपुल आहे. तो डिंगल आणि ब्रज या दोनही भाषांचा पंडित होता. त्याची भाषा ओजस्वी आणि रचना सरस व रमणीय आहे. त्याची सर्वच वर्णने प्रत्ययकारी आहेत. युद्धाचे वर्णन करताना तो एका ठिकाणी लिहितो –

**कळकळिया कुतकिरण कळि ऊकळी,**
**वरजित विसिख विवरजित वाउ ।**
**धडि धडि धबकि धार धारुजळ,**
**सिहरि सिहरि समखै सिळाउ ।।**

अर्थ– युद्धाच्या ऐन रणरंगात भालेरूपी सूर्यकिरण चमकू लागले आहेत. बाणयुद्ध थांबले आहे. शरीराशरीरावर तलवारींचे घाव बसत आहेत, (ते पाहून असे वाटते), की डोंगरांच्या शिखरांवर विजा लखलखत असाव्या.

पृथ्वीराजाची प्रथमपत्नी मरण पावल्यावर त्याला अत्यंत दुःख झाले. बरेच दिवस तो वैराग्याने राहिला; परंतु पुढे त्याने आप्तस्वजनांच्या आग्रहावरून दुसरे लग्न केले. त्याच्या दुसऱ्या पत्नीचे नाव चंपादे असे होते. ती सुस्वरूप होती, तशीच कवयित्रीही होती. तिच्या सान्निध्यात पृथ्वीराजाचे अखेरचे दिवस सुखात गेले. [रा. भा. सा.; हिं. सा. को.; क. कौ.]

## पृषदाज्य

दही मिसळलेल्या तुपाला पृषदाज्य म्हणतात. पृषद=ठिपके; तुपात दही मिसळल्यावर ते ठिपके असलेल्या पदार्थासारखे दिसते, म्हणून त्याला हे नाव मिळाले आहे. यागासाठी म्हणून घेतलेल्या आज्याचा तिसरा हिस्सा दह्यात ओतावा म्हणजे पृषदाज्य तयार होते, असे सत्याषाढ श्रौतसूत्रांत सांगितले आहे (४·२). पृषदाज्य तयार करताना स्रुचीमध्ये प्रथम आज्य घेऊन त्यावर दही घालतात. या स्रुचीला पृषदाज्यधानी असे म्हणतात. पशुयागामध्ये आणि चातुर्मास्यासारख्या यागांमध्ये अनुयाज (प्रधानयागानंतर होणारे याग) हे पृषदाज्याने करावे, असे सांगितले आहे.

## पृष्ठोदरदान

एक काम्य दान. मकर संक्रातीच्या दिवशी एका थाळीत धान्य भरून व तिच्यावर दुसरी थाळी पालथी घालून त्या संपुटाचे दान करतात. त्या वेळी खालील मंत्र म्हणतात–

**शरावयुगुलं विप्र धान्यपूर्णं मनोहरम् ।**
**गृहाण विधिना दत्तं सोदरौ रसवर्धनम् ।।**

फल– पुत्र-बांधवांची वृद्धी. [व्रतराज]

## पृष्ठ्य षडह

सोमयागाचा एक प्रकार. यात प्रत्येक दिवशी सोम कुटून त्याचे हवन व सेवन केले जाते. तसेच या यागात प्रत्येक दिवशी वेगवेगळी पृष्ठसंज्ञक सामे म्हटली जातात. ही पृष्ठसामे सहा असून, त्यांची नावे अशी– रथतर, बृहत्, वैरूप, वैराज, शाक्वर आणि रैवत. हा याग द्वादशाह आणि सत्र यात अतर्भूत आहे.

प्राचीन काळी हा याग वर्षाच्या शेवटी केला जात असावा. ३६० दिवसांचे सामान्य वर्ष आणि ३६६ दिवसांचे नाक्षत्र सौर वर्ष यांचा समन्वय करण्यासाठी हा याग प्रचलित झाला असावा. **पाहा**– द्वादशाह. [श्री. विद्याधरशास्त्री भिडे]

## पेंढारी

लुटारू लोकांचा एक वर्ग. मोगलशाहीच्या पडत्या काळात हा वर्ग उदय पावला. पेशव्यांच्या किंवा इतर सरदारांच्या सैन्याबरोबर जे बाजारबुणगे असत, त्यांना पेंढारी म्हणत. त्यांना शत्रूच्या प्रदेशात खंडणी वसूल करण्याचे काम मिळे. ती वसूल करताना ते खूप लुटालूट व अत्याचार करीत. लुटीचा ठराविक भाग त्यांना सरकारात भरावा लागे.

इंग्रजांची सत्ता हिंदुस्थानात सर्वत्र जसजशी दृढ होत गेली, तसतशी देशी सेना कमी झाली व या लुटारू लोकांनी आपली स्वतंत्र पथके बनवून मध्यप्रांत, माळवा, गुजरात, महाराष्ट्र, मद्रास, कर्नाटक, बिहार, इ. प्रांतांत धुमाकूळ घातला. काही संस्थानिक त्यांना गुप्तपणे मदत करीत. पुढे किरकोळ बंदोबस्ताने भागेना, असे पाहून लॉर्ड हेस्टिंग्ज याने अनेक सरदारांचे साहाय्य घेऊन पेंढारी लोकांना माळव्यात कोंडले आणि त्यांचा पाडाव केला.

त्या पेंढाऱ्यांचे वंशज सांप्रत काहीतरी उद्योग करून पोट भरतात. त्यांची एक स्वतंत्र जातच बनली आहे. म्हैसूर, महाराष्ट्र व मध्य प्रदेश या राज्यांत त्यांची मुख्य वसती आहे.

पेंढारी लोक काटक व चपळ असत. ते रोज पन्नास–साठ मैलांची घोडदौड करू शकत. हल्ला झाल्यास त्याला तोंड न देता ते पळून जात व पुन्हा दुसरीकडे एकत्र होऊन कुठेतरी धाड घालीत. त्यांची लुटीची योजना पद्धतशीर असे. लुटीचे स्थळ आधी निवडून दोन तीन हजार पेंढारी तिथे हल्ला करीत. गावकऱ्यांना आधी सूचना देऊन, ते आपली खंडणी वसूल करीत. त्यांनी ती दिली नाही, तर मग त्यांचा छळ करून गावाला आग लावून देत. ते स्त्रियांवर अत्याचार करीत आणि इतरांची कत्तल करीत. ते लुटीचा माल उज्जैन, इंदूर, इ. शहरांतील व्यापाऱ्यांना विकीत. उघड्या बाजारात त्यांची विक्री होई. पेंढाऱ्यांना नमवण्याचे सामर्थ्य मराठेशाहीत कोणालाच नव्हते. उलट दौलतराव शिंद्यांना इंग्रजांविरुद्ध पेंढारी आपल्या उपयोगी पडतील, अशी आशा वाटत होती. पण ब्रिटिशांनी सर्वत्र शांतता प्रस्थापित केल्यावर यांच्या लूटमारीला आळा बसला.

पेंढाऱ्यांत सर्व जातीजमातींच्या लोकांचा भरणा होत असे. मात्र मुख्यतः ते मुसलमान असत. त्यांची खास अशी भाषा नाही. ते ज्या प्रदेशात राहतात, तिथली भाषा बोलतात. दर्शलहबर ही उर्दू भाषा त्यांची सांकेतिक भाषा होती. सांप्रत हे लोक व्यापार, गवंडीकाम किंवा मजुरी करतात.

**देवधर्म** – मरी आई, म्हसोबा, खंडोबा, इ. देवांना हे भजतात. हिंदू पेंढारी हिंदूंचे सर्व सण पाळतात. हे चांदीच्या पत्र्याचे टाक बनवून त्यांची पूजा करतात. हे टाक त्यांच्या पूर्वजांच्या नावे त्यांच्या घरात ठेवलेले असतात. हे लोक मुसलमानांच्या पिरांनाही भजतात. त्यांची धार्मिक कृत्ये करणारा पुरोहित त्यांच्याच जातीतला असतो.

**विवाहप्रथा** – हिंदू पेंढारी लोकांची आळंदे, क्षीरसागर, घायतिलक, रणशिंग व थोरात अशी पाच कुळे आहेत. समान कुळात लग्नसंबंध होत नाही. मामेबहिणीशी लग्न करतात. बहुपत्नीकत्वाची चाल आहे. लग्ने प्रौढपणी होतात. एखाद्याने एखाद्या तरुणीला फूस लावली, तर त्याला तिच्याशी विवाह करावाच लागतो. लग्न जुळवताना मुलाचा बाप मुलीला मागणी घालतो. लग्नाच्या वेळी एखादा प्रतिष्ठित माणूस वराला आपल्या घरी नेऊन त्याच्या डोक्याला फेटा बांधतो व त्याला वधूगृही आणतो. मग कणकीचे पुतळे तयार करून ते तेलात तळतात, त्यांना पूर्वजांची नावे ठेवतात व ते वरगृही नेऊन सर्वांना वाटतात. याला रुखवत म्हणतात. यांचे बरेचसे लग्नविधी मराठ्यांच्या विधीप्रमाणे आहेत. लग्न लागल्यावर सोनाराच्या घरातून देवीची मूर्ती आणून ग्रामवेशीवर तिची पूजा करतात. मग वऱ्हाडी घरी परततात.

**मर्तिकप्रथा** – हे लोक प्रेते पुरतात. प्रेत पश्चिमेकडे किंवा उत्तरेकडे डोके करून पालथे अगर बसके ठेवतात. दहा दिवसांनी पुरुष क्षौर करतात व ज्ञातिभोजन घालतात. मृताचे वर्षश्राद्ध करतात. पितृपधरवड्यात, अक्षय्यतृतीयेला व वर्षतिथीला श्राद्ध करतात.

**मुसलमान पेंढारी** – दक्षिणेकडे मुसलमान पेंढारी आढळतात. बेळगावकडील मुसलमान लोकांप्रमाणे यांची राहणी, आचार व पेहेराव असतो. हिंदू पेंढाऱ्यांशी यांचे बेटीव्यवहार होत नाहीत; परंतु अत्तार, बागवान अशा मुसलमान जमातींशी होतात. [ट्रा. का. बॉं.; चं. द. भू.; म. ज्ञा. को.]

## पेंतिय

द. भारतातील एक जात. या जातीचे लोक स्वतःला होलुव किंवा हळबा असेही म्हणतात. हे लोक बस्तर प्रदेशातून तमिळनाडमध्ये आले आणि पेंतिकोन्न येथे राहू लागले. म्हणून त्यांना पेंतिकोनय किंवा पेंतिय असे नाव मिळाले. मद्रास सेन्सस रिपोर्टात (१९०१) यांचा उल्लेख ओडिसातील पानविक्रेते असा केलेला आहे. हे लोक हळबा बोली बोलतात. काही पेंतिय शेती करतात. या लोकांचे बोडो (मोठे किंवा मूळचे) आणि सन्नो (लहान) असे दोन भेद आहेत. त्यांपैकी सन्नो हे बोडोंचीच अवैध संतती आहे, असे मानतात. या दोन्ही लोकांत परस्पर विवाहसबंध होतात. बोडोंची कुरुम (कूर्म), भाग (वाघ), नाग, सूर्य अशी अनेक देवके आहेत. जातीच्या प्रमुखाला भठनायको असे म्हणतात. त्याला आणखी तीन मदतनीस असतात. दर शनिवारी हे कामिल्ली नामक देवतेची पूजा करतात.

**विवाहप्रथा** – मुलींची लग्ने लहान वयातही होतात. मुलाला आतेबहिणीशी लग्न करायचा अधिकार आहे. लग्न मुलीच्या घरी होते. मुलगी परगावची असेल, तर मुलाकडील मंडळी त्या गावी जातात आणि एका स्वतंत्र घरात उतरतात. मग ते मुलीच्या आईसाठी तीन वस्त्रे, वडिलांसाठी तीन रुपये आणि प्रत्येक भावासाठी कापड व काही पैसे; तसेच तांदूळ, मद्य व इतर काही वस्तू घेऊन वधूकडे जातात व त्या वस्तू त्या त्या माणसांना देतात. वधू आणि वर या दोघांच्याही घरापुढे मांडव घालतात. वधूच्या मांडवाला पाच आणि वराच्या मांडवाला नऊ खांब असतात. लग्नाच्या दिवशी सकाळी नवरा मुलगा वधूगृही जातो. त्या वेळी देसारी नामक पुरोहित मंडपात एक पडदा लावतो व वधू-वरांनी मंडपाला सात प्रदक्षिणा घातल्यावर तो काढून टाकतो. मग वधू-वर मंडपात प्रवेश करतात. देसारी त्यांच्या करंगळ्या जुळवतो. नतर जेवणावळ होते. दुसऱ्या दिवशी वधू वरगृही जाते आणि तिथे ती दोघे एकमेकांवर हळदीचे पाणी शिंपडतात. या दिवशी खूप मद्य पिऊन लोक

बेहोषीने नृत्य करतात. धाकट्या दिराला वडील भावजयीशी लग्न करता येते.

यांची जातपंचायत असते. जातिबहिष्कृत माणसाला पुन्हा जातीत घेण्यासाठी एखाद्या झऱ्याच्या काठी नेतात व तिथे सोन्याच्या किंवा चांदीच्या तारेने त्याच्या जिभेला डाग देतात. मग पुरीच्या जगन्नाथाचा प्रसाद त्याला खायला देतात. नंतर तो घरी जातो आणि सर्वांना भोजन घालतो. जमलेल्या वडील मंडळीला तो कापड देतो. चार जातिप्रमुखांना इतरांपेक्षा जास्त कापड मिळते. नंतर थोडा भात बरोबर घेऊन लोक त्याला पुन्हा झऱ्यावर नेतात आणि भातासह त्याला प्रवाहात ढकलून देतात. या स्नानानंतर तो शुद्ध झाला असे मानतात.

**मर्तिकप्रथा** – हे लोक मृतांना जाळतात. मृताशौच दहा दिवस पाळतात. या दहा दिवसांत इतर लोक मृताच्या नातेवाइकांना जेवण घालतात. दहाव्या दिवशी ज्ञातिभोजन होते. भाद्रपद प्रतिपदेला ते ब्राह्मणांना शिधा देतात. [ का. ट्रा. स. इं ]

**पछवी** चित्रकलेचा एक प्रकार. कापडावर देवतांची व पौराणिक प्रसंगांची चित्रे रंगविणे, याला पश्चिम भारतात पेछवी म्हणतात. ही एक जुनी प्रथा आहे. या कलेचे संयुत्त निकाय, भासाचे दूतवाक्य व अन्य प्राचीन वाङमय यांत उल्लेख मिळतात.

नाथद्वारा या क्षेत्रात पेछवीचा उगम झाला, असे म्हणतात. तिथे येणाऱ्या श्रीनाथभक्तांना परत जाताना नाथजीची खूण म्हणून तिथल्या चित्रकारांनी कापडावर नाथजीची चित्रे रंगवून देण्यास प्रारंभ केला. भक्तगण ही चित्रे नेऊन आपल्या कृष्ण-मूर्तीच्या मागे लावू लागले.

पेछवीमध्ये दोन प्रकारची चित्रे आढळतात. गोवर्धन पर्वतावर वल्लभाचार्यांना नाथजीचे प्रथम दर्शन घडते, हा एक प्रकार व पूजेसाठी काढलेले केवळ नाथजीचे चित्र, हा दुसरा प्रकार. सतराव्या शतकातील पेछवी चित्रे जाडया भरडया खादीवर काढीत. सर्व चित्रे स्वतंत्रपणे हाती काढलेली असत. गोपाळ-कृष्णाची मुरली ऐकून त्याच्या भोवती जमा झालेल्या गायी बहुतेक अशा चित्रांमध्ये दिसतात. [ इलस्. वीकली २५-३-१९६२ ]

**पेड्डम्म** द. भारतातील एक ग्रामदेवता. ही तेलुगू प्रदेशात आढळते. गावात रोगराई उत्पन्न होते, तेव्हा तिचा उत्सव करतात. त्या वेळी गावातील कुंभार तिची मूर्ती व सुतार तिच्यासाठी लहान रथ तयार करतो. मग त्या रथातून कुंभाराच्या घरून मूर्तीची मिरवणूक काढतात. त्या वेळी तिच्यावर मेंढयाच्या रक्ताचा अभिषेक करतात. मग धोबी तिला मांडवात नेऊन बसवतो. नंतर पशूच्या रक्तात भिजवलेल्या भाताचा तिला नैवेद्य दाखवतात. एक रेडा बळी देतात. त्या वेळी माडिगा जातीचे लोक तिची स्तोत्रे गातात. पेड्डम्म व दुर्गम्म या दोघींच्या गुणधर्मांत बरेच साम्य आहे. दोघीही दशभुजा आहेत. हिच्याविषयी कथा आढळते, ती अशी –

सृष्टीच्या प्रारंभी केवळ प्रकाशच काय तो होता. त्या प्रकाशाने ध्यानशक्तीच्या द्वारे एक स्त्री निर्माण केली व तिला एका बागेत ठेवले. हीच पेड्डम्म होय. पण आपल्याला पती मिळावा, या इच्छेने तिने जाईचे एक फूल तोडून ते कमळावर ठेवले आणि स्वतः एक पाखरू बनून त्या कमळाभोवती घिरटया घालणे सुरू केले. थोडयाच वेळात त्या कमळातून तीन अंडी निघाली. सुमारे ७२ दिवसांनी त्यांतले एक अंडे फुटले व त्यातून पृथ्वी व आकाश ही उत्पन्न झाली. त्यातल्या बलकातून सूर्य–चंद्र निर्माण झाले आणि त्यातल्या काळचा ठिपक्यातून ब्रह्मा–विष्णु–शिव जन्मले. दुसरे अंडे फुटून त्यातून राक्षस उत्पन्न झाले; तर तिसरे अंडे कुजल्याने त्यातून रोगराई उत्पन्न झाली. पेड्डम्माने ब्रह्मा–विष्णु–शिव या तीन्ही देवांची अभिलाषा धरली. त्यामुळे त्यांनी तिला शाप दिला, की ' तू तारुण्याचा भर येण्याच्या आतच म्हातारी होशील. ' नंतर तिने शिवाची अभिलाषा धरली. त्यासाठी तिने देवांचे शत्रू असलेल्या सर्व राक्षसांना ठार केले. शेवटचा राक्षस उत्पन्न झाला, त्याचे नाव दुंदुभी. त्याचे स्वरूप रेडयाचे होते. तिने पाताळातल्या सिद्धलूच्या साहाय्याने त्या महिषरूप दैत्याचे शिर तोडले. त्या दिवसापासून दरवर्षी पेड्डम्माला रेडा बळी देण्याची प्रथा सुरू झाली. [ द्र. गॉ मॉ. हिं ]

**पेतवत्थू** एक बौद्ध कथासंग्रह. हा पालीभाषेत आहे. पेतवत्थू म्हणजे भुताखेतांच्या कथा होत. या कथांमधून माणसाला कृतकर्माची फळे कशी भोगावी लागतात, ते सांगितले आहे. प्रस्तुत संग्रहात पिशाचांच्या ५० कथा असून पेतवत्थू, उरग पेतवत्थू, उब्बरी पेतवत्थू व धातुविवण्ण पेतवत्थू असे त्यांचे चार वर्ग आहेत. दुष्कर्मे आचरल्यामुळे पिशाच योनीला गेलेल्या माणसांच्या या सर्व कथा आहेत. [ पा. सा. इ.; भगवान बुद्ध दर्शन. ]

**पेद्दन्न अल्लसानी** (मृत्यू इ. स. १५३५) एक तेलुगू महाकवी. याचा जन्म सांप्रतच्या म्हैसूर प्रदेशातील बेल्लारी भागातील दोरनाला नामक एका खेडेगावात झाला. हा नंदवारिक ब्राह्मण होता. चोकन्ना हे त्याच्या वडिलांचे नाव. याने बालपणीच संस्कृत व तेलुगू भाषेचा उत्तम अभ्यास केला. पुढे लवकरच हा कविता करू

लागला. प्रथम हा कृष्णदेवरायाचे वडील नरसिंह रायलू याच्या दरबारात कवी म्हणून राहिला. नरसिंहानंतर कृष्णदेवरायाने याला आपल्या दरबारातील अष्ट दिग्गजांमध्ये स्थान दिले. शठकोपयती हा त्याचा गुरू होय. पेद्दन हा प्रथम शैव होता; पण पुढे वैष्णव बनला.

कृष्णदेवराय पेद्दन्नाच्या काव्यमाधुर्यावर फार प्रसन्न होता. असे सांगतात, की एकदा स्वतः राजाने या कवीची पालखी आपल्या खांद्यावर वाहिली आणि स्वहस्ते कविगंडापेंडर (तोडा) नावाचा एक अलंकार त्याच्या पायात बांधला. इतका मोठा मान त्याच्या दरबारातील इतर कोणत्याही कवीला मिळाला नव्हता. या राजकवीला राजाने एका प्रांताची सुभेदारीही दिली होती. विजापूरच्या बादशहाशी झालेल्या युद्धात हा कृष्णदेवरायाबरोबर रणभूमीवर गेला होता.

'मनुचरित्रम्' हा त्याचा तेलुगू भाषेतला प्रख्यात काव्यग्रंथ होय. कृष्णदेवरायाने मोठा पराक्रम करून मुसलमानांवर जो जय मिळविला, त्याचे वर्णन याच्या प्रस्तावनेत कवीने केले आहे. प्रस्तुत काव्याच्या अंतरंगसौंदर्यामुळेच त्याला आंध्र-कविपितामह ही बहुमानाची पदवी मिळाली. या काव्यात पुढे त्याने स्वारोचिष मनूच्या उत्पत्तीची कथा सांगितली आहे. मार्कंडेय पुराणातील एका लहानशा कथेला त्याने महाकाव्याचे स्वरूप दिले आहे. या काव्यात त्याची प्रतिभा तर दिसतेच; शिवाय रचनाकौशल्यही प्रतीत होते. विकार आणि पावित्र्य या दोन भावनांमधील संघर्षाचे चित्रण इतक्या मार्मिकतेने केल्याचे अन्यत्र क्वचितच पाहायला मिळते. या काव्यावरून त्या वेळचा राजदरबार व कृष्णदेवरायाचे व्यक्तिगत जीवन यांवरही चांगला प्रकाश पडतो. तेलुगू पंचमहाकाव्यांत या काव्याची गणना करतात.

प्रस्तुत काव्यातील एक प्रसंग असा – प्रवर नामक एक ब्राह्मण युवक हिमालयामध्ये हिंडत असता वरूथिनी नावाची एक अप्सरा त्याला भेटली. त्याचे दर्शन होताच तिच्या मनात आले –

**वदनप्रभूत लावण्यांबु संभूत**
**कमलंबुलन वीनि कन्नुलमरू**
**निक्किवीनुलतोड नेक्क सक्केमुलाडु**
**करणि नुन्नवि वीनि धनभुजमुलु।**
**संकल्प संभावास्थान पीठिक बोले**
**वैदग्रै कनुपट्टु वीनि युरमु**
**प्रतिघटिंचु चिगळपै नेरॅवारिन**
**रीतिनुन्नवि वीनि मृदु पदमुलु।**
**नेरेटेटि यसल् तेञ्चिनी रजाप्तु**
**सानबट्टनरापोडि चल्लि मेदिपि**
**पदनु सुध निडि चेसेनो पद्मभवुदु**
**वीनि गाकुन्न गलदे यी मेनिकांति ।**

अर्थ – या पुरुषाचे नेत्र मुखकांतीच्या शुभ्र जळात उत्पन्न होणाऱ्या कमलासारखे आहेत. याच्या भुजा वर उठून जणू कानाशी परिहास करीत आहेत. याचे विशाल हृदय जणू कामदेवाचे राज्यसिंहासन आहे. याचे चरण नवपल्लवांवरही मात करणारी लाली व कोमलता घेऊन बसले आहेत. हा पुरुष उत्पन्न करण्याच्या वेळी विधात्याने जणू आकाशगंगेतले सुवर्णधुळीचे कण आणले आणि सूर्याचे तेज कमी करावे म्हणून त्याला घासल्यामुळे खाली पडलेले काही कण त्यात मिसळले. मग अमृताने हात ओले करून विधात्याने या पुरुषाचे सृजन केले.

प्रवराने तिला पुढचा मार्ग विचारला. त्यावेळी वरूथिनी त्याला म्हणाली –

**इंतलु कन्नुलुंड देरू वेव्विरे वेडेदुभूसुरेंद्र ?**
**कांतमुनंदु नुन्न जवरांड्र नेंप बिडि पल्करिंचुला**
**गिंतरे काक नीवेरुगमे मुनु वच्चिन त्रोवचोप्पुनी ?**
**किंत भयंबू लेकडुग नेल्लिद मैतिमि; माटलेटिकिन्**

अर्थ – हे ब्राह्मणा ! तुझे नेत्र किती विशाल आहेत ! काय तुला तुझ्या विशाल नेत्रांनी स्वतःचा मार्ग शोधून काढता येत नाही ? दुसऱ्याला विचारण्याची आवश्यकताच काय ? तू वाट विचारण्याचा बहाणा करून एकटी राहणाऱ्या माझ्यासारख्या तरुणीशी बातचीत करू पाहत आहेस. या गोष्टी हव्याच कशाला ? तुला वाटले असेल, की ही तरुणी म्हणजे वाटेवर पडलेले रत्न आहे. तसे नसते तर तू इतका निडर होऊन माझ्याशी लघळपणा करायला आला नसतास.

अर्थात हा सगळा थट्टेचा प्रकार होता. कारण तिला तो ब्राह्मण युवक आवडला होता. मग आपला परिचय करून देऊन तिने त्याला प्रेमादरपूर्वक म्हटले –

**भूसुर कैतव कुसुमशरासन मंदिट विंद वैतिवि; गैकरेम्मा ।**
**समुन्दचन्मणिभव नासीनत सेददेरि यातिथ्यंबुल् ।।**

अर्थ – हे अपर कामदेवा ! हे ब्राह्मणा ! तू माझ्या घरी अतिथी बनून आला आहेस. तेव्हा थोडा वेळ बसून विश्राम कर. माझ्या आतिथ्याचा स्वीकार करून मग पुढे जा.

याखेरीज त्याचा रामस्तवराजम् नावाचा रामस्तुतिपर एक ग्रंथ आहे, असे श्री. कावेल्ली व्यंकटरामस्वामी यांनी आपल्या दक्षिणेतील कविचरित्रात म्हटले आहे. पण त्या काव्याचा उल्लेख अन्यत्र आढळत नाही. श्री. व्यंकटराम स्वामीच्या मते अद्वैतसिद्धांतम् हा तत्त्वज्ञानविषयक ग्रंथ व

रंगरा–छंद हा छंद:शास्त्रावरील ग्रंथ हे दोन्ही ग्रंथ पेद्दन्नाचेच आहेत. याशिवाय हरिकथासारम्, प्रपंचदर्पण, रसमंजरी व सत्यवधूप्रीणनम् हे आणखी काही ग्रंथही पेद्दन्नाने रचले आहेत.

या ग्रंथसंपदेशिवाय पेद्दन्नाची स्फुट कविताही बरीच असावी, असे वाटते. एकदा राजसभेत राजाच्या सांगण्यावरून त्याने बत्तीस चरणांची कविता कशी असावी, या विषयावर उत्पलमालिका या नावाने एक कविता तात्काल रचली, अशी आख्यायिका सांगतात. त्यातील खुबी अशी, की प्रत्येक चरणाचे प्रथमाक्षर व द्वितीयाक्षर एकच आहे. शिवाय यातील अर्धी मालिका संस्कृतप्रमाणे तर अर्धी, तेलुगूप्रमाणे दिसते. कृष्णदेवरायाच्या मृत्युप्रसंगावर त्याने रचलेले काही श्लोक हे करुण रसाचे उत्तम उदाहरण म्हणून सांगतात.

पेद्दन्नाने प्रथमच तेलुगू भाषेत उर्दू शब्दप्रयोग वापरण्यास सुरुवात केली. त्यानंतर त्याचे अनुकरण इतरही कवींनी केले. कृष्णदेवरायानंतर थोड्याच दिवसांनी हा आपल्या जन्मगावी येऊन मरण पावला. **पाहा–** तेलुगू भाषा व साहित्य. [म. ज्ञा. को.; ते. वा.; वि. स्मा. ग्रं.; ते. उ. सा.]

## पेयाळवार

तमिळनाडमधील बारा आळवारांपैकी एक. हा विष्णूच्या खड्गाचा अवतार असल्याचे मानतात. याचा जन्म मैलापूर येथील एका विहिरीतल्या कमळातून झाला, अशी कथा आहे. हा नैष्ठिक ब्रह्मचारी व विष्णूचा परम भक्त होता. भक्तीच्या आवेशामध्ये आल्यानंतर हा उन्मत्ताप्रमाणे वागे, म्हणून याला लोक पेय (वेडा) आळवार म्हणू लागले.

याचा काळ निश्चितपणे सांगता येत नाही. याला पोयगै आळवार व भूतत्ताळयार यांच्या समकालीन मानतात. या तिघांना मिळून मुनित्रय अशी संज्ञा आहे.

असे सांगतात, की तिरुमळिशै आळवार हा प्रथम कट्टर शिवभक्त होता; पण त्याच्याशी शास्त्रार्थ करून पेयाळवारने त्याला विष्णुभक्तीचे महत्त्व पटवून देऊन वैष्णव बनविले. यावरून पेयाळवार हा शास्त्रज्ञानीही होता, असे वाटते.

पेयाळवारची १०० पदे मूंट्राम तिरुवंतादी या नावाने प्रबंधम्‌मध्ये संग्रहीत आहेत. ती तिरुवंतादी या विशिष्ट छंदात रचलेली आहेत. त्या पद्यात कठोर हृदयालाही भक्तीने आर्द्र करण्याचे सामर्थ्य आहे. ईश्वर हा पृथ्वी, आकाश, अष्टदिशा, वेद, वेदार्थ अशा सर्व ठिकाणी भरून राहिला आहे आणि आश्चर्याची गोष्ट ही, की त्याचा निवास माझ्या हृदयातही आहे. असे त्याने एका पद्यात म्हटले आहे.

पेयाळवारच्या वरील विचारांवरून त्याचा औपनिषदिक वाङ्मयाशी परिचय असल्याचे कळून येते. दुसऱ्या एका ठिकाणी तो आपल्या मनाला संबोधित करून सांगतो–

**पकुण्दिलंकुम् अंतिप्पोलुदु अरियाय इकलन्द इरण्यियन ताकम् चुकिन्देगुम् चितप्पिळन्द एन्नेंचमे ! वाल्त्तु ।**

(मूट्राम तिरुवन्तादि ९५)

अर्थ– हे मना, नृसिंहावतार धारण करून आपली भक्तवत्सलता प्रगट करणाऱ्या श्री विष्णूच्या चरणांना तू वंदन कर. त्या चरणांची स्तुती कर.

पेयाळवारच्या अनेक पद्यांत कृष्णाच्या बाललीला वात्सल्यभावाने वर्णिलेल्या आहेत. [त. प्र. हिं. कृ.]

## पेरना

एक भटकी जमात. यांची वस्ती पंजाबात आढळते. यांच्यांत बारताली आणि तेरताली असे दोन वर्ग आहेत. चूहरा जातीतही काही पेरना आहेत; पण त्यांच्यांतील बहुसंख्य लोक मुसलमान आहेत. नट, बाजीगर आणि पेरना यांच्यांत बरेच साम्य आहे. मात्र पेरना पुरुष आपल्या स्त्रियांना वेश्याव्यवसाय करायला लावतात; परंतु नटांच्या स्त्रिया हा व्यवसाय करीत नाहीत.

पेरना स्त्रिया डोंबाऱ्याचे खेळ करतात. त्या वेळी त्यांच्या हातात तलवार किंवा चाकू असतो. पण अशा कसरतीच्या कामापेक्षा त्यांना नाचगाणे अधिक आवडते. त्यांच्या नृत्याला पुरुष ढोलक्याची साथ करतात. [पं. का.]

## पेराय

मुंडारी प्रदेशातील आदिवासींचा एक वर्ग. हे लोक विणकर आहेत व संख्येने अल्प आहेत. मुंडांचे सर्व सण व धार्मिक विधी ते पाळतात. पितरांना कोंबड्यांचा बळी देतात अथवा कच्ची कैरी अर्पण करतात. त्यांचा विवाहविधी व और्ध्वदेहिक मात्र मुंडांहून वेगळे आहे.

हे एकेकाळी मुंडच होते; परंतु काही कारणाने जातिबहिष्कृत झाले. हे मुंडांच्या हातचे अन्न खातात; परंतु मुंड यांच्या हातचे अन्न खात नाहीत. [एन्सा. मुंडा.]

## पेरिके

द. भारतातील एक जात. पेरिके या शब्दाचा अर्थ गोणपाट असा आहे. हे लोक गोणपाट तयार करतात; म्हणून यांना हे नाव पडले आहे. यांच्यांतले काही सधन लोक स्वत:ला क्षत्रिय समजतात व परशुरामाच्या भीतीने आपले पूर्वज इकडे पळून आले, असे सांगतात. शेती व व्यापार हे यांचे मुख्य धंदे आहेत. यांच्यातील काही लोकांनी मद्रास राज्यात उच्च दर्जा प्राप्त करून घेतला आहे. काही लोक भीक मागून देवऋषीपणही करतात.

**विवाहप्रथा –** विवाहाच्या दिवशी वधू-वर आणि त्यांचे तीन-

तीन नातेवाईक उपास करतात. वधू-वर लग्न लागताना एका पोत्यावर बसतात. त्या दोघांच्या मध्ये मैलर देवतेचे चित्र काढलेले एक पोते ठेवतात. त्यांच्या शेजारी डाळ व तांदूळ भरून एक मडके ठेवतात. लग्न लागल्यावर ते डाळ तांदूळ शिजवून मैलर देवतेला त्या खिचडीचा नैवेद्य दाखवतात. मग ती खिचडी वधू-वरांना जेवायला वाढतात. उपास करणारे नातेवाईक सुताचे १०१ धागे एकत्र करून त्यांचा दोरा तयार करतात व त्याला साठ गाठी मारतात. वधू-वरांना हळद व चुना लावलेली वस्त्रे लेववून मग तो दोरा वधूच्या गळयात बांधतात.

**मर्तिकप्रथा –** हे लोक मृतांना जाळतात. एका काळी यांच्या बायका नवऱ्याबरोबर सती जात. पण सांप्रत ती चाल नाही. पूर्वी हे लोक मृताची रक्षा जमिनीत पुरून तिथे एक तुळशीवृंदावन बनवीत. विजयनगरजवळ छीपूरपल्ली या गावी अशी पुष्कळ वृंदावने दिसतात. जाणारे-येणारे लोक या वृंदावनावर लाखेची बांगडी किंवा फुले वाहतात. [ का. ट्रा. स. इं. ]

## पेरियपुराणम्

तमिळ भाषेतील एक महान ग्रंथ. यात ६३ शैव संतांची चरित्रे वर्णिलेली असून, ४२८६ पदे आहेत. तमिळनाडमध्ये या ग्रंथाचा खूप प्रचार आहे. यात भक्तचरित्रांच्या अनुषंगाने त्या काळातील आचार-विचार, धार्मिक विश्वास, जाति-जमाती, त्यांचे रीतिरिवाज, व्यवसाय, विनोद, अलंकार, इ. गोष्टींवरही काही प्रकाश पडतो. शैवधर्म आणि तेवारम् गीते यांच्या सूक्ष्म तत्त्वाचे विवेचनही यात आढळते. या ग्रंथामुळे दक्षिणेत शैवधर्माच्या प्रचाराला फार मोठा हातभार लागला.

शेक्किळार हा या ग्रंथाचा कर्ता होय. हा वेल्लाळ जातीचा होता. हा विद्वान, राजकारणी आणि शिवभक्त होता. काही काळ याने कुलोत्तुंग चोळराजाचा मंत्री म्हणूनही काम केले होते (इ. स. चे ११ वे शतक). शेक्किळार मंत्री असताना त्याच्या लक्षात आले, की आपला राजा जैन धर्माकडे आकृष्ट होत आहे. म्हणून त्याने राजाला तिरुतोंडरअंतादी हा ग्रंथ वाचायला दिला. या ग्रंथात शिवभक्तांची चरित्रे आहेत. तो ग्रंथ वाचून राजा प्रभावित झाला आणि त्याने शेक्किळारला असाच आणखी एक ग्रंथ लिहिण्याची आज्ञा दिली. मग राजाच्या आज्ञेवरून शेक्किळारने पेरियपुराणम् हा ग्रंथ लिहिला. [ त. सा. सं. ]

## पेरियाळवार

(इ. स. चे ८ वे शतक) तमिळनाडमधल्या आळवार संतांपैकी एक. पेरियाळवार याचा अर्थ महान आळवार असा होतो. याचे मूळ नाव विष्णुचित्त असे होते. रामनाथपुरम जिल्ह्यातील श्रीविल्लिपुत्तूर या गावी एका ब्राह्मण कुळात याचा जन्म झाला. याच्या पित्याचे नाव मुकुंदाचार्य व मातेचे पद्मा असे होते. आंडाळ ही याची पाळलेली मुलगी होती.

लहानपणापासूनच याला विष्णुभक्ती जडली. तिथल्या विष्णुमदिरातल्या वटपत्रशायी विष्णूला रोज पुष्पमाला गुंफून अर्पण करणे, ही त्याची अर्चनभक्ती होती. त्यासाठी त्याने एक फुलबाग लावली होती. दिवसातला बराच वेळ तो विष्णुमंदिरात बसून विष्णुसहस्रनामाचा पाठ करीत असे.

वल्लभदेव नावाचा एक पांड्य राजा त्याच्या काळात मदुरेत राज्य करीत होता. त्याने एक दिवस पंडितसभा बोलावून अशी घोषणा केली, की जो कोणी विद्वान वैदिक प्रमाणानी ईश्वरसिद्धी करून त्याच्या प्राप्तीचा नेमका मार्ग सांगेल, त्याला राजाकडून मोठा पुरस्कार मिळेल. राजाच्या या घोषणेनंतर एका रात्री विष्णूने पेरियाळवारला स्वप्नादेश दिला, की ‘ तू राजसभेत जा आणि राजाला विष्णुभक्ती हा शाश्वत आनंदाच्या उपलब्धीचा सर्वश्रेष्ठ मार्ग असल्याचे पटवून दे. ’ विष्णुचित्त पंडितसभेत शास्त्रार्थ करण्याइतका पढिक विद्वान नव्हता. पण त्याने देवाची आज्ञा मानली आणि तो मदुरेच्या दरबारात गेला. पंडितसभा भरली आणि खंडन-मंडनाचे शास्त्रार्थ सुरू झाले. पेरियाळवारने त्यात भाग घेऊन श्रीविष्णू हाच श्रेष्ठ देव आहे आणि त्याला शरण जाणे हेच हितकर व मोक्षदायक आहे, असे अनेक प्रमाणांनी सिद्ध करून दिले. त्याच्या विवेचनाने सर्व पंडित मुग्ध व स्तिमित झाले. राजाचीही तीच स्थिती झाली. मग त्याने विष्णुचित्ताचा विजय उद्घोषित करून त्याला पट्टरपिरान (श्रेष्ठ ब्राह्मण) अशी उपाधी दिली, त्याच्या सन्मानार्थ मदुरेत हत्तीवरून त्याची मिरवणूक काढली आणि बरेचसे धन देऊन त्याची रवानगी केली. विष्णुचित्त अशा प्रकारे कीर्तीवान व धनवान होऊन परत आपल्या गावी आला. मिळालेले धन खर्चून त्याने तिथल्या विष्णुमंदिरापुढे एक गोपुर बांधले.

पेरियाळवाराची ४७३ पद्ये तिरुपल्लांडू व पेरियाळवार तिरुमोळी या दोन संग्रहांच्या रूपाने प्रबंधम्‌मध्ये समाविष्ट आहेत. त्यांतल्या तिरुपल्लांडूला धार्मिक महत्त्व अधिक आहे. श्रीवैष्णवांच्या घरात त्यांचा नित्यपाठ चालतो. पेरियाळवार तिरुमोळीमध्ये कवीचे मन बालकृष्णाच्या मधुर लीलांत रममाण झालेले आहे. वात्सल्यमधुर भावांनी त्याने त्या वर्णिल्या आहेत. श्रीकृष्णाच्या मुरलीवादनाचा तिथल्या चराचरांवर कसा प्रभाव पडला, ते वर्णिताना तो म्हणतो–

**चिरु विरलकल तडवीपरिमारचेंकण कोडच्चेव्वाय कोप्पळिप्प कुरुवेर्यप्पुरुवम कूडलिप्प गोविन्दन कुळल कोडू ऊदिन पोदु**

**परवैयिन गणकळ कुडु तुरन्दु वयु चूलन्द पडु काडु किडप्प**
**करवैयिन गणकळ कालपरप्पिट्टु**
**कविळित्तरंकी चेवियाट्ट किल्लोवे।**

अर्थ – किशोर कृष्णाच्या मृदू अगुली मुरलीच्या छिद्रांवर नाचू लागल्या. अरुणकमलासारखे त्याचे नेत्र वक्र झाले. बासुरी वाजवण्याच्या परिश्रमाने (थोडयाच वेळात) त्याच्या मुखाला फेस आला. भ्रुकुटीच्या वरच्या भागी घर्मबिंदू जमले. अशा प्रकारे जेव्हा त्याचे मुरलीवादन रंगात आले, तेव्हा पक्ष्याचे थवे आपल्या घरटयातून बाहेर येऊन कृष्णापुढे अशा प्रकारे पसरले, की तोडलेल्या वृक्षाचे रानच समोर पडले आहे, असे वाटावे. गाईच्या झुडीही तिथे आल्या आणि पाय पसरून व मस्तक नमवून कानांची अजिबात हालचाल न होऊ देता ते मुरलीवादन ऐकू लागल्या.

पेरियाळवारच्या या सगळचा गीताची शैली पिळ्ळै तमिळ या नावाने प्रसिद्ध आहे. त्याच्या नंतरच्या अनेक कवींनी त्या शैलीचे अनुकरण केले आहे. [ त. प्र. हि. कृ. ]

## पेरिवरम्

द. भारतातील एक जात. या लोकांची वस्ती मदुरा जिल्ह्यात आहे. चिन्न उलियम्, पेरिय उलियम् व कोंबई पेरिवरम् अशा यांच्या तीन शाखा आहेत. या शाखांत परस्पर लग्नसंबंध होत नाहीत. हे लोक तोतिया जातीच्या जमीनदाराकडे सकुटुंब सपरिवार नोकरी करतात. काही लोक मेणे व पालख्या वाहतात.

**विवाहप्रथा** – लग्नाच्या दिवशी वधूच्या घरी एक माणूस भरलेली घागर घेऊन अंगणाला तीन प्रदक्षिणा घालतो. त्याच्या मागून वधू-वर एक बांबू घेऊन तशाच प्रदक्षिणा घालतात. त्या बांबूला नऊ धान्ये घातलेली एक पुरचुडी बांधलेली असते. प्रदक्षिणा झाल्यावर बांबू व घागर अंगणाच्या ईशान्य दिशेला नेऊन ठेवतात. मग वधू-वरांची मनगटे एकत्र बांधतात. वराचा भाऊ त्यांना थोडचा अंतरावर घेऊन जातो आणि त्यांचे बांधलेले हात मिठाच्या भांडचात बुडवतो. मग नवरा मुलगा जात्याचा खुंटा फडक्यात गुंडाळून वधूच्या हाती देतो. नंतर वराची बहीण वधूच्या गळचात ताळी बांधते. एवढे झाल्यावर त्यांचा विवाह-समारंभ पुरा होतो. [ मदुरा गॅझे. ]

## पेरुंकदै

एक तमिळ जैन महाकाव्य. पेरुंकदै या शब्दाचा अर्थ बृहत्कथा असा आहे. गुणाढचाच्या बृहत्कथेतील उदयनाच्या कथेवर हे महाकाव्य आधारलेले आहे. हे पूर्ण उपलब्ध नाही. त्याच्या फक्त सोळा हजार पंक्ती उपलब्ध आहेत. जीवकचिंतामणी या महाकाव्यापेक्षाही या काव्याचे स्थान वरचे मानतात. विजयमंगलम्चा राजकुमार कोंगुवेलिर हा या महाकाव्याचा कर्ता होय. त्याला जैन धर्माबद्दल विशेष प्रेम होते. या महाकाव्यात त्याने जैन धर्माचे अनेक सिद्धान्त कथेच्या अनुषंगाने विशद करून सांगितले आहेत. [ त. सा. सं. ]

## पेरुमाळ तिरुनाल

दक्षिणेतील वैष्णवांचा एक महत्त्वाचा सण. हा विष्णु-लक्ष्मींचा उत्सव असून, वैष्णव भक्त तो मोठचा प्रमाणात साजरा करतात. हा उत्सव दहा दिवस चालतो. त्या वेळी रोज विष्णु-लक्ष्मींची मिरवणूक काढतात. प्रत्येक दिवशी त्यांचे वाहन निरनिराळे असते. शेवटच्या दिवशी देवाची रथातून मिरवणूक काढतात. मग त्याला नौकाविहारासाठी गावाबाहेरच्या मोठचा तळचावर नेतात. होडीत बसवून तळचाला तीन प्रदक्षिणा करतात. हे सर्व चालू असता नाच-गाणी व वाद्यवादन चालू असते. [ सा. इं. गॅ. ]

## पेरुमिझलई कुरुंब

तमिळनाडमधील त्रेसष्ट नायन्मारांपैकी एक. संत सुंदरमूर्ती याचा हा परम भक्त होता. सुंदरमूर्ती देहत्याग करणार असल्याचे याला अंतर्ज्ञानाने समजले व त्याच्या वियोगाचे दु:ख असह्य होईल, असे समजून याने आपल्या ब्रह्मरंध्राचा भेद करून देहत्याग केला. [ पे. पु. ]

## पेशवाई

महाराष्ट्राच्या इतिहासातील एक उज्ज्वल कालखंड. छत्रपती शाहू महाराजांनी श्रीवर्धनकर बाळाजी विश्वनाथ भट याला इ. स. १७१३ मध्ये पेशवाईची वस्त्रे दिली, तेव्हापासून मराठेशाहीचा कारभार भट घराण्याच्या तंत्राने चालू झाला. त्या कारभाराला पेशवाई असे म्हणतात. हे भट घराणे मूळचे श्रीवर्धनचे. इ. स. १४७८ च्या सुमारास श्रीवर्धन परगण्याची देशमुखी या घराण्याकडे आली. त्या प्रदेशावर हबशाचा अंमल होता. बाळाजी पंताचा आजा अंताजी व बाप विसाजी हे दोघे छत्रपती शिवाजीमहाराजांच्या पदरी होते. तिकडे हबशाचा भटांवर काही कारणाने क्रोध होऊन इ. स. १६७० च्या सुमारास त्याने भटांची देशमुखी जप्त केली. तेव्हा बाळाजी विश्वनाथ दाभोळ-चिपळूण या भागात गेला व तिथून काही वर्षांनी वरघाटी आला.

प्रथम शंकराजीपंत सचिवाकडे व मग सेनापती धनाजीकडे त्याने नोकरी केली. राजारामाच्या वेळी तो प्रथम पुणे प्रांताचा व मग दौलताबाद प्रांताचा सरसुभेदार झाला. त्या काळात त्याने औरंगजेबाच्या कैदेत असलेल्या शाहूला पुष्कळ मदत केली. शाहू सुटून परत आल्यानंतर बाळाजीने त्याचा पक्ष घेतला व धनाजीला त्या पक्षात ओढले. धनाजीच्या मृत्यूनंतर

बाळाजीनेच नवी सेना उभी करून ताराबाईचा बंदोबस्त केला आणि शाहूची सत्ता निर्वेध केली. बाळाजी हा निःस्वार्थी व प्रामाणिक होता. त्याच्या कर्तबगारीमुळे प्रसन्न होऊन शाहूने त्याला पेशवेपद दिले.

इ. स. १७१३ साली फर्रुखसेयर हा दिल्लीचा बादशाहा झाला, त्या वेळी त्याला हसनअली व हुसेनअली या सय्यद बंधूंची पुष्कळ मदत झाली. बादशाहाने हसनअलीला वजिरी देऊन हुसेनअलीला सेनापती केले. पण पुढे बादशाहाचे सय्यद बंधूशी बिनसले व बादशाहा त्याच्या नाशासाठी कारस्थाने करू लागला. त्याने त्या दोघांना फोडण्यासाठी हुसेनअली याला निजामाच्या जागी दक्षिणचा सुभेदार नेमून दिल्लीच्या बाहेर पाठवले.

शाहूची सुटका झाली तेव्हा बादशाहाने त्याला शिवाजीच्या वेळचे स्वराज्य आणि मोगलांच्या सहा सुभ्यांवर चौथाई व सरदेशमुखी घेण्याचा हक्क दिला होता. पण तशा सनदा मात्र झाल्या नव्हत्या. बाळाजी विश्वनाथ याने बादशाहाच्या सांगण्यावरून हुसेनअली याच्या विरुद्ध चढाई करून तिकडील बराच प्रदेश जिंकला. तेव्हा हुसेनअलीने मराठ्यांशी तह करून त्यांनी जिंकलेला प्रदेश त्यांना दिला आणि दक्षिणेत चौथाई सरदेशमुखी वसूल करण्यास परवानगी दिली. त्याबद्दल मराठ्यांनी आपली पंधरा हजार फौज बादशाहाच्या मदतीला ठेवावी असेही ठरले. मराठ्यांनी बादशाहाला दरसाल १० लाख रुपये खंडणी द्यावी आणि बादशाहाने छ. शाहूच्या मातोश्री वगैरे मंडळींना सोडून द्यावे असेही ठरले. पण पुढे बादशाहा व सय्यद बंधू यांचा तंटा विकोपाला जाऊन सय्यदबंधूंनी मराठ्यांची मदत मागितली. तेव्हा पेशवे मोठी सेना घेऊन दिल्लीला गेले. तिथे सय्यदबंधूनी बादशाहा फर्रुखसेयरला पदच्युत करून रफिउद्द्‌राजत याला तक्तावर बसवले आणि त्याच्या शिक्कामोर्तबासह चौथाई, सरदेशमुखी व स्वराज्य यांच्या सनदा बाळाजी पेशव्याला दिल्या. त्याचबरोबर शाहूच्या मातोश्री येसूबाई व बायकामुले यांनाही त्याच्या हवाली केले. अशा प्रकारे बाळाजीची दिल्लीची मोहीम अत्यंत यशस्वी झाली (इ. स. १७१९).

पेशव्यांनी चौथाईच्या वसुलीसाठी निरनिराळे प्रदेश सरदारांना वाटून दिले होते. एकाने दुसऱ्याच्या प्रांतात जाऊ नये, असेही ठरवले होते. या पद्धतीमुळे मराठ्यांची सत्ता सर्वत्र लवकर प्रस्थापित झाली. पश्चिम किनाऱ्यावर कान्होजी आंगरे याचे वर्चस्व होते. त्यालाही बाळाजीने शाहूशी समेट करायला लावून मराठमंडळात सामील करून घेतले. त्यामुळे सिद्दी शरण येऊन त्याने पेशव्यांशी तह केला. इंग्रजांनी विजयदुर्गावर चढाई केली असता, आंगऱ्यांनी त्यांचा पराभव केला.

इ. स. १७२० साली बाळाजी विश्वनाथ सासवड येथे मरण पावला; तेव्हा त्याचे वय साठीच्या जवळपास होते. तो मोठ्या योग्यतेचा मुत्सद्दी होता. बादशाहीतील कर्तबगार पुरुष जयसिंह व सय्यदबंधू यांचा स्नेह संपादून त्याने निजामावर वचक ठेवला होता. प्रतिपक्षियांची मने वळवून त्यांचा उपयोग राज्यवृद्धीकडे करण्यात तो कुशल होता. त्याने जमीन महसुलाची व्यवस्थाही उत्तम ठेवली, महाराष्ट्रीय लोकांना पराक्रमाचे नवे क्षेत्र दाखवून दिले आणि हिंदुपदपातशाहीचा पाया घातला ही त्याची मोठी कामगिरी होय.

**बाजीराव**– बाळाजी विश्वनाथ याच्या मृत्यूने छ. शाहूची व मराठी राज्याची मोठी हानी झाली. ती भरून काढण्यासाठी बाळाजीचा पुत्र विसाजी (बाजीराव) याच्या व्यतिरिक्त दुसरा कोणी पुरुष शाहूला आढळला नाही. त्या वेळी तो अगदी तरुण म्हणजे अवघा वीस वर्षांचा होता. तरीही शाहूने इतर सरदारांचा सल्ला न मानता, त्याला लगेच पेशवाईची वस्त्रे दिली. लहानपणापासून वडिलांबरोबर राहिल्यामुळे त्याला परिस्थितीचा व राजकारणाचा पुष्कळ अनुभव मिळाला होता. बाळाजी विश्वनाथाची मुत्सद्देगिरी आणि निरनिराळ्या प्रकरणांतील डावपेच त्याने प्रत्यक्ष पाहिले होते. त्या काळातील अनेक मोहिमांत त्याने भाग घेतला असल्यामुळे युद्धकलेचे शिक्षणही त्याला मिळाले होते. लेखन, वाचन, घोड्यावर बसणे, भालाफेक, इ. गोष्टींतही तो कुशल होता. ईर्षा, शौर्य व धाडस हे गुण तर त्याच्या अंगी उपजतच होते. त्याची शरीरप्रकृतीही सुदृढ होती. अजब योजना आखण्याची कल्पक बुद्धी आणि त्या योजना सिद्धीला नेण्याचे सामर्थ्य या दोन्ही गोष्टी त्याच्या अंगी होत्या.

इ. स. १७२० साली निजाम दक्षिणचा सुभेदार झाला आणि मराठ्यांना उपद्रव देऊ लागला. पण बाजीरावाचे सारे लक्ष त्या वेळी दिल्लीकडे होते. त्याने शिंदे, होळकर, पवार यांच्याकरवी खानदेश, बागलाण व माळवा या प्रांतांत आपली सत्ता स्थापण्याचा प्रयत्न सुरू केला. दक्षिणेकडे पेशव्यांचे लक्ष नाही असे पाहून, निजामाने तिकडे पाय पसरायला व इंग्रज–फ्रेंचांशी मसलती चालवायला सुरुवात केली. चंद्रसेन जाधव वगैरे फितूर सरदार व सिद्दी यांच्या मदतीने तो मराठी राज्यात धुमाकूळ घालू लागला. प्रथम बाजीरावाने शाहूच्या मताप्रमाणे सामोपचाराने त्याच्याशी वाटाघाटी केल्या; पण त्यातून काही निष्पन्न न झाल्यामुळे शाहूने त्याला निजामावर स्वारी करण्यास परवानगी दिली. इ. स. १७२८ मध्ये बाजीरावाने पालखेड येथे निजामाचा पराभव केला व निजामाने पेशव्यांशी तह केला. त्याच सुमारास बाजीरावाचा भाऊ चिमणाजी अप्पा

याने माळवा हस्तगत केला होता. इ. स. १७२९ साली छत्रसालाच्या बोलावण्यावरून बाजीराव बुंदेलखंडात गेला व त्याने महंमद बंगशाचा पराभव करून छत्रसालाचे रक्षण केले.



थोरला बाजीराव

त्याबद्दल छत्रसालाने अडीच लक्षांचा झाशी प्रांत व आपल्या राज्याचा तिसरा हिस्सा पेशव्यांना दिला.

बाजीराव स्वतः सेनापती होऊन स्वाऱ्या करू लागल्यामुळे मराठ्यांचा सेनापती दाभाडे बिथरला व निजामाला फितूर झाला. त्यामुळे बाजीरावाला दाभाडे याचेही पारिपत्य करणे भाग पडले. इ. स. १७३१ मध्ये डभई येथे लढाई होऊन, तीत दाभाडे ठार झाला.

त्यानंतर पेशव्यांनी जंजिऱ्याच्या सिद्दीवर स्वारी करून त्याची बरीच ठाणी जिंकली. इ. स. १७३५ पर्यंत ते कोकणात होते. पुढील वर्षी ते माळव्यात गेले. माळव्यात मराठ्यांचे वर्चस्व असले, तरी तिथे बादशहाचा सुभेदार कारभार पाहत होता. तिथली चौथाई वसूल करण्याचा अधिकार बादशाहाकडून पेशव्यांना हवा होता. पण बादशहा त्या गोष्टीला तयार झाला नाही. त्या बाबतीत सवाई जयसिंह याने दिलेला सल्लाही त्याने मानला नाही. उलट त्याने सर्व मुसलमान सरदार व निजाम याच्या साहाय्याने जयसिंह व मराठे यांच्याशी युद्ध करण्याचे ठरवले. त्या प्रसंगी बाजीरावाने मोठ्या सैन्यासह माळव्याकडे प्रयाण केले.

ही मोहीम दोन वर्षे चालू होती. तिच्यात बहुतेक राजपूत राजे बाजीरावाला सामील झाले होते. त्या प्रसंगी मराठ्यांचा मोड करण्यासाठी बादशहाने निजामालाही बोलावले. पण त्याचा काही उपयोग झाला नाही. इ. स. १७३७ च्या पहिल्या तीन महिन्यांतच शिंदे, होळकर वगैरे मराठे सरदारांनी नर्मदेपासून यमुनेपर्यंतच्या विस्तृत प्रदेशात युद्धाचा धुमाकूळ घालून मुसलमान सैन्यास जेरीस आणले. बाजीराव स्वतः बुंदेलखंडातून अचानक दिल्लीवर चालून गेला आणि त्यामुळे बादशाहा गडबडला. या वेळी दिल्ली शहराच्या बाहेर किरकोळ चकमकी झाल्या आणि तेवढ्याने बादशाहाला दहशत बसवण्याचा उद्देश पुरा झाला आहे, असे आढळून आल्यामुळे बाजीराव राजधानीत न शिरता परत फिरला.

पुढे इ. स. १७३७ च्या अखेरीला पेशव्यांची निजामाशी भोपाळ येथे गाठ पडली. मराठ्यांच्या सेनांनी निजामाला चहू बाजूंनी घेरल्यामुळे तो शरण आला. त्या वेळी झालेल्या तहामध्ये माळवा आणि नर्मदा व चंबळ यांच्या मधला प्रदेश मराठ्यांना मिळावा असे ठरले; त्याचप्रमाणे मोठी खंडणीही मिळाली.

त्या काळात वसई, साष्टी, ठाणे या भागात पोर्तुगीज लोक मोठ्या प्रमाणावर धार्मिक अत्याचार करू लागले होते. त्यांचा बंदोबस्त करण्यासाठी पेशव्यांना तिकडे अनेकदा सैन्य पाठवावे लागले होते. इ. स. १७३७ मध्ये चिमणाजी अप्पाने वसईची एक मोहीम पुरी केली होती. इ. स. १७३८ मध्ये त्याने वसईवर दुसरी मोहीम सुरू केली. ती इ. स. १७३९ च्या जूनमध्ये संपून तिच्यात मराठ्यांचा पूर्ण जय झाला. या विजयामुळे मराठ्यांचा वचक सर्व देशात बसला व त्यांची सत्ता स्थिर झाली.

त्याच सुमारास नादिरशहाने दिल्लीवर स्वारी करून तिथे खूप अत्याचार केले. तिथून तो दक्षिणेवर चालून येणार अशी बातमी कळल्यामुळे बाजीरावाने पुन्हा उत्तरेकडे मोर्चे वळवले. पण तेवढ्यात नादिरशहा परत गेल्याची बातमी आली.

निजामाने भोपाळच्या तहात कबूल करूनही माळव्याच्या सनदा पेशव्यांना दिल्या नाहीत. त्यामुळे बाजीरावाने इ. स. १७३९ च्या डिसेंबरात त्याच्या प्रदेशावर स्वारी केली व औरंगाबाद येथे त्याचा पराभव केला. २७ फेब्रुवारी १७४० रोजी मुंगीपैठण येथे त्या दोघांत पुन्हा तह झाला. त्या तहात बाजीरावाला नर्मदेकाठी नवीन परगणे मिळाले आणि ते ताब्यात घेण्यासाठी तो तिकडे गेला. त्या प्रवासातच २८-४-१७४०

रोजी नर्मदेच्या काठी रावेरखेडी येथे त्याला मृत्यू आला.

विसाव्या वर्षी मराठी राज्याची सूत्रे हाती घेऊन बाजीरावाने अल्पावकाशात सगळीकडे आपले वर्चस्व स्थापन केले. जी जुनी सरदार मंडळी अनुकूल होती, त्यांचा त्याने योग्य उपयोग करून घेतला व जी प्रतिकूल होती त्यांना बाजूला सारून आपल्या प्रभावाने निर्माल्यवत बनवले. शिंदे, होळकर, पवार वगैरे नवे समवयस्क सरदार त्याने निर्माण केले आणि त्यांच्या बळावर तो उत्तरेकडील राजकारण खेळू लागला. त्याने जे हाती घेतले ते सिद्धीस नेले. त्याला कुठेच अपयश आले नाही. स्वराज्याचा चांगला बंदोबस्त करून त्याने उत्तरेस थेट दिल्लीपर्यंत धडाडीने मोहिमा करून मराठ्यांची सत्ता प्रस्थापित केली. निजामासारख्या अनुभवी व समर्थ प्रतिस्पर्ध्याला त्याने केवळ गनिमी काव्याने नामोहरम केले. दिल्लीची बादशाही नष्ट करून हिंदुपदपातशाही स्थापायची, असा त्याचा निश्चय होता. त्यासाठी त्याने राजपुतांशी सख्य केले. पण त्याच्या त्या योजनेला मात्र छत्रपती शाहू महाराजांची संमती नव्हती. बादशहा व निजाम यांना नाहीसे करणे त्यांना पसंत नव्हते आणि बाजीरावाला त्यांच्या आज्ञेत राहूनच सर्व कारभार करायचा असल्यामुळे तो दिल्लीची बादशाही नष्ट करू शकला नाही. मात्र दक्षिणेप्रमाणेच उत्तरेकडेही सर्वत्र हिंदू धर्माचे वर्चस्व प्रस्थापित करण्याचे आपले संकल्पित कार्य त्याने आपल्या अतुलनीय पराक्रमाने पूर्ण केले.

बाजीरावाच्या राजकारणात व यशात चिमाजी अप्पाचा वाटा मोठा होता. बाजीराव मुलुखगिरीत गुंतलेला असताना चिमाजीने राजधानीतले राजकारण फार हुशारीने चालवले व नेहमी बाजीरावाचा पाठपुरावा केला. माळवा, वसई, इ. मोहिमांत त्याचा मोठा पराक्रमही दिसून आला. इ. स. १७४० च्या डिसेंबरात तोही मरण पावला.

बाजीरावाने इ. स. १७२९ साली बुंदेलखंडावर स्वारी करून बंगशाच्या तावडीतून छत्रसालाची सुटका केली, तेव्हा छत्रसालाने बाजीरावाला कंचनी नावाची एक मुस्लीम नर्तकी नजर केली होती. मस्तानी या नावाने ती प्रसिद्ध आहे. ती शेवटपर्यंत बाजीरावाजवळ निष्ठेने राहिली.

**बाळाजी बाजीराव** (नानासाहेब) –बाजीरावाचा पुत्र बाळाजी नेहमी साताऱ्याला असे. लहानपणीच त्याला चिमाजी अप्पाकडून उत्तम राजकीय शिक्षण मिळाले होते. शाहू महाराजांची नानासाहेबावर अतिशय मर्जी होती. नानासाहेब कर्तबगार असून, पेशवाई सांभाळायला लायक आहे, अशी त्यांची खात्री होती व सर्व दरबारही त्याला अनुकूल होता. म्हणून शाहूने बाजीरावानंतर पेशवाईची वस्त्रे त्यालाच दिली.

हिंदुपदपातशाहीच्या प्रचंड उद्योगामुळे बाजीरावाला जे अपरंपार कर्ज झाले होते, ते फेडण्याची व्यवस्था नानाने प्रथम केली. त्याने राज्याची व्यवस्थाही उत्तम लावली. इ. स. १७४९ साली छ. शाहूचा मृत्यू झाला. तोपर्यंत पेशवे छत्रपतींचे केवळ कारभारी किंवा प्रतिनिधी होते. त्यानंतर मात्र ते सर्वतोपरी राज्याचे मुखत्यार झाले. नानासाहेब थोर मुत्सद्दी, उत्तम संस्कृतज्ज्ञ, कलमबहाद्दर, धोरणी व अत्यंत हिशेबी होता. तो कुठेही असला तरी राज्याच्या सर्व व्यवहारावर त्याचे लक्ष असे. श्रीरंगपट्टण येथून दिल्लीचा, तर बुंदेलखंडातून कर्नाटकाचा कारभार तो करी. त्याची वृत्ती नेहमी तडजोडीची असे; पण प्रसंगी तो कडकपणाही धरी. बाबूजी नाईक, रामचंद्र बाबा, पुरंदरे दमाजी गायकवाड, इ. अनेक विरोधी, सरदारांवर वचक बसविण्यात तो यशस्वी ठरला.



नानासाहेब ( बाळाजी बाजीराव )

उत्तरेकडे मराठ्यांचे वर्चस्व कमी होऊ नये म्हणून नानासाहेबाने तिकडे लागोपाठ तीन स्वाऱ्या केल्या. माळवा, बुंदेलखंड, बागेलखंड या प्रांतांचा बंदोबस्त करून नानासाहेबाने दिल्लीवर जास्त शह बसवला आणि काशी, प्रयाग, बंगाल, बिहार वगैरे प्रदेशही मिळवण्याचा उपक्रम सुरू केला. त्या वेळी रघुजी भोसले हा पेशव्यांचा मोठा प्रतिस्पर्धी होता. इ. स. १७४२ च्या आक्टोबरात नानासाहेबाने त्याचा पराभव केला. इ. स. १७४५ त भेलशावर आणि १७४७–४८ त नेवाईवर स्वारी करून त्याने उत्तरेकडे आपली सत्ता दृढ केली व तिकडच्या कायम बंदोबस्तासाठी शिंदे व होळकर यांची योजना केली. पण पुढे त्यांच्यांतच तेढ आली आणि ती मराठ्यांच्या सत्तेला घातक ठरली.

मध्यंतरीच्या काळात नानासाहेबाने चिमाजी अप्पाचा पुत्र सदाशिवराव भाऊ याला कर्नाटकात पाठवून तिकडचा बंदो-

बस्त केला आणि पोर्तुगीजांनाही वठणीवर आणले. त्या स्वारीत सदाशिवरावाचा कारभारी सखारामबापू याने खूप कर्तबगारी दाखविली.

शाहूच्या मृत्यूनंतर पेशव्यांनी रामराजाला गादीवर बसवले आणि शाहूच्या आज्ञेप्रमाणे राज्याची सर्व सूत्रे आपल्या हाती घेतली. शाहूने मृत्यूपूर्वी पेशव्यांना स्वतःच्या अखत्यारीने राज्य चालविण्याचा लेखी आदेश दिला होता. त्यावरून पेशव्यांनी भोसल्यांचे राज्य बळकावले, हा आक्षेप खोटा ठरतो.

त्यानंतरच्या दोन तीन वर्षांत नानासाहेबाने विरोधी पक्षाचा बंदोबस्त करण्याचा उद्योग केला. त्या अवधीत ताराबाईने रामराजाला कपटाने कैद करून सिंहगडावर आपल्याजवळ ठेवले होते आणि पेशव्यांविरुद्ध कारस्थान करून काही सरदारांच्या मदतीने राज्यात बखेडा सुरू केला होता. पण नानासाहेबाने प्रतिनिधी, गायकवाड, दाभाडे वगैरे सरदाराना नमवून आपले वर्चस्व प्रस्थापित केले. त्याने रामराजालाही सोडवण्याचे प्रयत्न केले; पण ताराबाईच्या मृत्यूपर्यंत (१७६३ इ. स.) त्याची सुटका होऊ शकली नाही.

फ्रेंच लोकांच्या मदतीने निजाम मराठ्यांच्या मुलूखात धुमाकूळ घालू लागला, तेव्हा नानासाहेबाने स्वारी करून घोडनदी येथे इ. स. १७५१ मध्ये त्याचा पराभव केला. १७५२ त भालकीचा तह झाला, त्यात पेशव्यांना तापी–गोदा दुआब मिळाला. चार-पाच वर्षे दोघांचा सलोखा होता. पण निजामाला नाहीसा करून दक्षिण मोकळी करण्याचा पेशव्यांचा संकल्प असल्यामुळे व निजामाने कबूल केलेली २५ लक्षाची जहागीर न दिल्यामुळे नानासाहेबाने ते निमित्त धरून निजामावर इ. स. १७५७ त स्वारी केली. सिंदखेड येथे त्यांची लढाई होऊन निजामाचा पराभव झाला. पुढे निजाम इंग्रजांशी सख्य करू लागला. कबूल केलेली दहा लाखांची जहागीर निजाम देईना, म्हणून पेशव्यांनी त्याच्यावर पुनश्च स्वारी केली. त्या स्वारीत रघुनाथराव, सदाशिवराव आणि नानाचा पुत्र विश्वासराव यांनी उदगीर येथे निजामाचा पूर्ण पराभव करून साठ लाखांचा प्रांत व अशीरगड, देवगिरी वगैरे किल्ले घेतले. त्यामुळे निजाम खूप डबघाईला आला.

त्यापूर्वीच नानासाहेबाने कर्नाटकात आपले वर्चस्व स्थापले होते. इ. स. १७५३ पासून १७६० पर्यंत त्याने दक्षिणेत आठ स्वाऱ्या करून अनेक नवीन प्रांत हस्तगत केले व पुष्कळ खंडणी मिळवली. त्यामुळे मराठी राज्य तुंगभद्रेपर्यंत पसरले आणि पेशव्यांची आर्थिक स्थिती सुधारली. लवकरच त्यांनी नवीन तोफखानाही उभारला.

तुळाजी आंग्रे याने आपले आरमार फार प्रबळ केले होते आणि त्यामुळे इंग्रजांना तो दाबात ठेवू शकत होता. पण मानाजी व तुळाजी या भावांच्या वैरामुळे त्यांचे सामर्थ्य कमी झाले. आंग्रे शिरजोर होऊन पेशव्यांना जुमानीत नव्हते, हे खरे; पण नानासाहेबाने त्यांचा बंदोबस्त स्वतःच करायला हवा होता. तसे न करता त्याने इंग्रजांची मदत घेऊन आपलेच आरमार बुडविले. त्यामुळे पश्चिम किनारा मोकळा होऊन इंग्रज निर्भय झाले. त्यांनी विजयदुर्ग घेतला आणि नंतर यशवंतगड व सिंधुदुर्ग हे किल्लेही घेतले. पुढे पेशव्यांनी हबशावर स्वारी केली तेव्हा इंग्रजांनी हबशालाच मदत केली.

पानिपतचे युद्ध– निजामाविरुद्ध मिळवलेल्या उदगीरच्या प्रचंड विजयामुळे मराठ्यांची सत्ता कळसाला पोचली. लवकरच दिल्लीची पातशाहीही मराठे बुडवणार अशी चिन्हे दिसू लागली. बादशाहाचा सेनापती नजीबखान याला राघोबादादाने पदच्युत केले आणि सरहिंद येथील अब्दालीच्या सुभेदाराला हाकलून पंजाब दुराण्याच्या हातून सोडवला (१७५८). एवढेच नव्हे, तर होळकर, शिंदे, बर्वे या सरदारांनी अटक या नगरावर चढाई करून ते जिकले व तिथे आपला भगवा ध्वज फडकवला. या सर्व घडामोडीमुळे बादशाहा अलमगीर व मुसलमान सरदार चिंतातुर झाले. दत्ताजी शिंदे याने रोहिलखंडात नजीबखानावर स्वारी केली, तेव्हा नजीबखानाने अब्दालीला ताबडतोब मदतीला बोलवले. अबदालीच्या मनातही दिल्लीचा बादशहा होण्याची ईर्षा होतीच; म्हणून तो मोठी फौज घेऊन आला. दत्ताजी शिंदे व मल्हारराव होळकर यांचे सख्य नसल्यामुळे त्यांचा अब्दालीने पराभव केला. तेव्हा नानासाहेबाने सदाशिवराव भाऊ व विश्वासराव यांना मोठ्या सैन्यानिशी उत्तरेकडे पाठवले. या प्रसंगी राजपूत राजांनी मात्र मराठ्यांना मुळीच मदत केली नाही. कारण दोन वर्षांपूर्वी राघोबा व जयाजी शिंदे यांनी त्यांचा पराभव केला होता, त्याचे शल्य त्यांच्या मनात डाचत होते.

मराठ्यांची सेना तोफखान्यासह सुमारे ७० हजार होती, तर अब्दालीजवळ १ लक्ष ३० हजार खडे सैन्य व तोफखाना होता. मराठे सरदारांचे आपसांत एकमत नव्हते; किंबहुना वैमनस्यच होते. अब्दालीने पानिपत व दिल्ली यांच्यामध्ये आपली छावणी टाकल्यामुळे मराठ्यांचा दिल्लीशी संबंध तुटला व त्यांना रसद व्यवस्थित मिळेनाशी झाली. शेवटी भाऊसाहेबांनी १४ जानेवारी १७६१ रोजी सर्व सैन्यानिशी अब्दालीवर चाल केली. मराठी सैन्य विजयाच्या मार्गावर असताना सायंकाळी विश्वासराव गोळी लागून ठार झाला आणि त्यामुळे चिडून जाऊन भाऊसाहेब स्वतः गर्दीत घुसले. दोघेही नेते दिसेनासे झाल्यामुळे मराठी सैन्याचा धीर सुटला व त्याची पळापळ

झाली. मग अब्दालीने जोरदार हल्ला करून मराठ्यांची बेसुमार कत्तल केली. मराठ्यांचे काही सरदार मारले गेले, काही पळून गेले. फक्त एकचतुर्थांश लोकच कसेबसे जीव बचावून परत आले.

या संग्रामापूर्वी भाऊसाहेबाने पेशव्यांना निकडीची पत्रे पाठवून मदत मागितली होती. तदनुसार नानासाहेब मोठ्या सैन्यासह दिल्लीकडे निघालाही होता. पण भेलशापर्यंत पोचल्यावर तिथे त्याला मराठ्यांच्या पराभवाची वार्ता कळली. तरीही दिल्लीला जाऊन गिलच्यांचा सूड घ्यावा, असा त्याचा विचार होता. पण वाटेत ग्वाल्हेरजवळ असताना युद्धातून पळून आलेले अनेक सरदार त्याला भेटले व त्यांनी नानासाहेबाच्या विचाराला मोडता घातला. नानासाहेबाची पत्नी गोपिकाबाई हिनेही त्याला विरोध केला. त्यामुळे नानासाहेब पुण्याला परत आला. पण विश्वासराव आणि सदाशिवराव भाऊ यांच्या मृत्यूमुळे, त्याचप्रमाणे युद्धातील जबरदस्त पराभवामुळे त्याला जो धक्का बसला, त्यातून तो वर येऊ शकला नाही. पुढे लवकरच त्याचा अंत झाला (२४ जून १७६१).

बाजीरावाचे हिंदुपदपातशाहीचे स्वप्न नानासाहेबाने पुष्कळ अंशी सत्यसृष्टीत आणले, यात संशय नाही. पानिपतच्या युद्धापूर्वी मराठ्यांचे विशाल साम्राज्य निर्माण झाले होते. नानासाहेबाने राज्यकारभाराची व्यवस्था अत्यंत व्यवस्थित लावून दिली होती. तो वृत्तीने धार्मिक असून, मोहिमेवर असताना वाटेतील सर्व तीर्थक्षेत्रांच्या यात्रा करीत असे. त्याने महाराष्ट्राप्रमाणेच पुण्याचे वैभव वाढवले. तो स्वतः रसिक व रंगेल होता त्याच्याजवळ नृत्य गायनकुशल अशा अनेक नाटकशाळा होत्या. मात्र त्याचा हा रंगेलपणा राज्यकारभाराच्या आड कधीहीआला नाही.




मराठ्यांचे साम्राज्य ( जाड काळ्या रेघेने मर्यादित प्रदेश )

**माधवराव** — पानिपतच्या युद्धातील जबरदस्त आघाताने आणि नानासाहेबाच्या मृत्यूमुळे मराठी साम्राज्य हादरले होते यात शंका नाही. आता त्याला नेस्तनाबूत करायला अवघड जाणार नाही, अशा कल्पनेने मराठ्यांच्या शत्रूंनी सर्व दिशांनी त्याच्या विरुद्ध उठावणी केली. हैदर, निजाम आणि उत्तरेकडील मुसलमानच नव्हेत, तर राजपूत, जाट व इतर लहान मोठे हिंदू संस्थानिकही मराठ्यांच्या विरुद्ध लढायला सिद्ध झाले. अशा दुर्धर प्रसंगी मराठी राज्याची धुरा नानासाहेबाचा तरुण पुत्र माधवराव याने आपल्या खांद्यावर घेतली. त्या वेळी त्याचे वय केवळ १७ वर्षांचे होते. प्रथम काही दिवस त्याचा चुलता राघोबादादा कारभार पाहत होता. पुढे माधवरावाने कारभार स्वतःकडे घेतला. त्यामुळे राघोबा बिथरला व निजामाला जाऊन मिळाला.

निजामाने ती संधी साधून मराठी राज्यावर पुन्हा स्वारी केली व पुण्यापर्यंत मजल मारली. माधवराव मोहिमेवर होता,



थोरला माधवराव

त्यामुळे निजामाचे फावले पुणे शहरात लुटालूट व जाळपोळ करून तो परत गेला. त्यानतर मात्र सर्व मराठे सरदार पुन्हा पेशव्यांकडे परत आले आणि त्या संयुक्त बळावर राक्षसभुवन येथे इ. स. १७६३ मध्ये पेशव्यांनी निजामाचा पूर्ण पराभव केला. निजामाने ८२ लक्षांचा मुलूख पेशव्यांना देऊन त्यांच्याशी तह केला.

इ. स. १७६४ मध्ये माधवरावाने कर्नाटकावर स्वारी केली. कृष्णेच्या दक्षिणेकडील मराठी राज्य बुडवण्याचा उद्योग हैदरने आरंभला होता. त्याला निजाम व इग्रज मदत करीत होते. पण माधवरावाने पाच स्वाऱ्या करून इ. स. १७७२ पर्यंत त्याचा पूर्ण बंदोबस्त केला.

तिकडे उत्तरेत जाट, रोहिले व राजपूत राजे मराठ्यांचा प्रदेश बळकावण्याचा प्रयत्न करू लागले होते. पण त्यात त्यांना यश आले नाही. मराठे सरदारानी जाट, नजीबखान, रोहिले, बंगश या सर्वांचा पराभव करून दिल्लीवरही आपली सत्ता स्थापली. त्यामुळे शहाअलम हा केवळ नामधारी बादशाहा राहिला. त्याने समग्र हिंदुस्थानचे साम्राज्य चालवण्याला अधिकार मराठ्यांना दिला.

माधवरावाने आपल्या लोकोत्तर सामर्थ्याने व शौर्याने सर्व शत्रूंना नमवून सार्वभौम सत्ता मिळवली हे खरे; पण राघोबादादाची राज्यतृष्णा हीच त्याच्यावर आलेली मोठी आपत्ती होती. त्याने वेळोवेळी फितुरी करून निजाम, हैदर व इंग्रज यांना मदत केली व स्वत:च्या पुतण्याशीच संग्राम केला. पण राघोबादादा हाती सापडल्यावर माधवरावाने त्याला औदार्याने वागवले. 'तुम्हीच दौलत सांभाळा' असेही तो त्याला म्हणाला, पण राघोबाच्या ठिकाणी तेवढी कुवतच नव्हती. पेशवाईतल्या या गृहकलहामुळे मराठी राज्याची फारच हानी झाली.

माधवराव राजकारणाप्रमाणे रणक्षेत्रातही कुशल होता. त्याने स्वत: अनेक स्वाऱ्याचे सेनापत्य करून विजय मिळवले. इंग्रजांचा वाढता प्रभाव पाहून त्याने अनेक ठिकाणी तोफा, बंदुका व दारूगोळा तयार करण्याचे कारखाने सुरू केले. अत्यंत दक्ष राहून त्याने इग्रजांचा हात मराठी राज्यात शिरकू दिला नाही. तो अत्यत करारी, न्यायनिष्ठुर व कर्तव्यनिष्ठ होता. पानिपतावर झालेल्या भयंकर पराभवाचा प्रतिशोध घेऊन व मराठी राज्याला वैभवाच्या शिखरावर नेऊन हा तरुण पेशवा क्षयरोगामुळे इ. स. १७७२ च्या नोव्हेंबरात अकाली मृत्यू पावला.



राघोबादादा

**बारभाईंचा कारभार** — माधवरावाच्या अंतकाळच्या इच्छेप्रमाणे त्याचा धाकटा भाऊ नारायणराव याला पेशवाईची वस्त्रे

मिळाली. माधवरावाचा कारभारी सखारामबापू हाच नारायणरावाचाही कारभारी झाला. पण एखाद्या कर्तबगार व समर्थ पुरुषाला पेशवेपद मिळण्याऐवजी त्या दुबळ्या तरुणाला केवळ परंपरेने ते पद प्राप्त झाल्यामुळे मराठी राज्याचे अतिशय नुकसान झाले. माधवरावाने राघोबाला कैदेत ठेवले होते, तो आता सुटला व नारायणरावाविरुद्ध कारस्थाने करू लागला. शनिवारवाड्याच्या संरक्षणार्थ ठेवलेल्या गारद्यांना त्याने आपल्या कटात घेतले आणि त्यांना नारायणरावाला धरण्याची गुप्त आज्ञा दिली. राघोबाची पत्नी आनंदीबाई हिने तर नारायणरावाला मारण्याचीच आज्ञा गारद्यांना दिली, असे म्हणतात. त्याप्रमाणे गारद्यांनी त्या असहाय्य पेशव्याचा वध केला आणि पेशवे म्हणून राघोबाच्या नावाने द्वाही फिरवली. पण अनेक सरदारांना तो प्रकार पसंत पडला नाही व त्यांनी एक गुप्तमंडळ स्थापून मुख्य न्यायाधीश रामशास्त्री प्रभुणे यांना त्या वध-प्रकरणाची चौकशी करायला सांगितले. त्या निर्भीड ब्राह्मणाने राघोबाच्या तोंडावर नारायणरावाच्या हत्येचा आरोप करून त्यासाठी त्याला देहान्त प्रायःचित्त सांगितले.

राघोबा पेशव्यांचा कारभार सुरू झाल्यानंतर लवकरच नारायणरावाची पत्नी गंगाबाई ही गरोदर असल्याचे ध्यानात आले आणि तिला पुत्र होईल त्या आशेने मराठमंडळाने राघोबाविरुद्ध कारवाई सुरू केली. राघोबा दक्षिणेकडे स्वारीवर गेला असता नाना फडणीस, सखारामबापू, मोरोबादादा, काळे, फडके, पेठे, रास्ते, पटवर्धन, घायगुडे, नारो अप्पाजी, इ. सरदारांनी पुणे नगर ताब्यात घेऊन गंगाबाईच्या नावाने द्वाही फिरवली. हे प्रकरण बारभाईचे कारस्थान या नावाने प्रसिद्ध आहे. सखारामबापू हा त्या बारभाईंचा नेता होता. ती वार्ता कानी पडताच राघोबा लगेच परत आला. त्याची व बारभाईंच्या सैन्याची कोरेगाव येथे गाठ पडली. त्या लढाईत बारभाईंचा पराजय होऊन पेठे मारले गेले. तरीही नाना व सखारामबापू यांनी धीर सोडला नाही. १८ एप्रिल १७७४ या दिवशी पुरंदर गडावर गंगाबाईला पुत्र झाला. तोच पुढे सवाई माधवराव या नावाने प्रसिद्ध झाला. त्याला लगेच पेशवाईची वस्त्रे मिळाली.

पेशवेपद हातचे गेल्यावर राघोबाने इंग्रजांची मदत घेऊन पुण्यावर चाल केली. पण वडगाव येथे मराठ्यांनी इंग्रजांचा मोठा पराभव केला आणि राघोबाला ताब्यात घेतले. प्रारंभी सखारामबापू व नाना यांनी संगनमताने व धडाडीने कारभार केला, हे खरे; पण पुढे सखारामबापूचा कल राघोबाकडे झुकला व त्यामुळे नानाने त्याला कैदेत टाकले.

इंग्रजांनी पुन्हा मोठी सेना जमवून मराठ्यांशी युद्ध सुरू केले; पण नानाने शिंदे, भोसले, फडके, होळकर यांच्या मदतीने त्यांचा पुन्हा पराभव केला. निजाम व हैदर यांनीही मराठ्यांचा पक्ष घेऊन इंग्रजांवर हल्ले केले. शेवटी इ. स. १७८३ साली सालबाई



सखारामबापू बोकील

येथे तह होऊन राघोबा मराठ्यांच्या स्वाधीन झाला. पुढे लवकरच तो मरण पावला.

त्यानंतरच्या दहा वर्षांत महादजी शिंदे याने दिल्लीवर आपले वर्चस्व प्रस्थापित केले. राजपुतांनी त्याला विरोध केला; पण त्यांचे काही चालले नाही. महादजीने जनरल डिबॉइन याला पदरी ठेवून शिस्तबद्ध सेना तयार केली. दिल्लीच्या बादशाहाने त्याला वकील–इ–मुतालीक ही पदवी दिली; पण ती त्याने स्वतःकडे न ठेवता पेशव्यांना बहाल केली.

सवाई माधवराव पेशवे असताना नाना व महादजी या जोडीने हिंदू साम्राज्याची धुरा अत्यंत धडाडीने सांभाळली. हैदरच्या मृत्यूनंतर त्यांचा मुलगा टिपू याने दक्षिणेत उच्छाद मांडला होता. तेव्हा मराठ्यांनी त्याच्यावर स्वारी केली आणि त्याचा पूर्ण पराभव केला. पण काही वर्षांनंतर त्याने पुन्हा बळ बांधून त्रावणकोरच्या हिंदू राजावर स्वारी केली. तेव्हा नानाने इंग्रज व निजाम यांच्याशी मैत्री जोडून टिपूविरुद्ध युद्ध सुरू केले. इ. स. १७९२ मध्ये टिपूचा पुन्हा पराभव झाला आणि त्याने

आपले अर्धे राज्य व तीन कोट रुपये जेत्याना दिले. मराठ्याना ९० लक्षाचा प्रदेश व एक कोट रुपये मिळाले



सवाई माधवराव

इ. स. १७९४ च्या फेब्रुवारी महिन्यात महादजी शिंदे मरण पावला त्यामुळे मराठ्याचे सामर्थ्य कमी झाले, अशी कल्पना करून निजामाने प्रचड सैन्यासह महाराष्ट्रावर मोहीम सुरू केली. तिचा पुरा बदोबस्त करण्यासाठी नाना फडणिसाने सर्व सरदाराना पाचारण केले आणि भोसले, होळकर, गायकवाड, रास्ते, शिदे, पटवर्धन, विंचूरकर, घाटगे, चव्हाण, डफळे, पवार, थोरात, पाटणकर, इ. सर्व सेनानायक एकत्र आले. सवाई माधवराव स्वत. स्वारीवर निघाला परशुरामभाऊ पटवर्धन मुख्य सेनापती होता. दोन्ही सैन्याची खडर्याजवळ गाठ पडली. त्या ठिकाणी घनघोर रणसग्राम झाला आणि निजामाचा मोठा पराभव झाला. त्या वेळच्या तहामध्ये निजामाने पाच कोटी रुपये मराठ्याना देण्याचे मान्य केले, पण लवकरच सवाई माधवराव मरण पावल्यामुळे निजामाने सर्व खडणी दिली नाही.

सवाई माधवराव पेशवा असला, तरी नाना फडणीसच सर्व कारभार पाहत असे. खडर्याच्या लढाईनंतर सवाई माधवरावाने राघोबाचा मुलगा बाजीराव याच्याशी गुप्तपणे पत्रव्यवहार करून आपला असतोष प्रकट केला ते नाना फडणिसाला समजल्यावर त्याने वाड्यावरचे चौकीपहारे कडक केले. या प्रकारामुळे सवाई माधवरावाच्या दुबळ्या मनावर परिणाम होऊन तो आजारी पडला व त्या आजारातच त्याने कारज्यावर उडी टाकून जीव दिला (२७-१०-१७९५) असे म्हणतात

**दुसरा बाजीराव** — याचा जन्म धार येथे इ. स. १७७५ साली झाला. नाना फडणिसाने त्याला कैदेत ठेवले होते. सवाई माधवरावाच्या मृत्यूनंतर नानाने प्रथम त्याच्या पत्नीच्या मांडीवर दत्तक देऊन गादी चालवण्याचे ठरवले; पण सर्व सरदार त्या विचाराशी सहमत झाले नाहीत. बाजीरावाने शिंद्याना चार लक्षांचा मुलुख व दोन कोट रुपये देण्याचे कबूल करून स्वत.ला पेशवेपद मिळावे, असे कारस्थान केले; पण ते नानाला समजले व त्यानेच पुढाकार घेऊन बाजीरावाला गादीवर बसवले (इ. स. १७९६). पुढे बाजीरावाने शिंद्याकडून नानाला कैद केले व आपला भाऊ अमृतराव याला कारभारी नेमले (१७९७) पण पुढल्या वर्षी शिंद्याने नानाला मोकळे केले व बाजीरावाने त्याला पुन्हा कारभारी नेमले. त्याने राज्यकारभाराची व्यवस्था नीट लावण्याचा पुष्कळ प्रयत्न केला, पण त्या कालात सर्वत्र अराजक माजले होते, ते थाबवण्यात त्याला यश आले नाही. इ. स. १८०० मध्ये नाना फडणीस मरण पावला. त्यानतर मराठी राज्यात अधिकच बेबदशाही माजली. बाजीरावाने नानाची जहागीर व सर्व सपत्ती जप्त केली आणि त्याच्या पक्षाच्या मडळीना कैद केले.

नाना फडणिसाचे भानू घराणे भट घराण्याबरोबरच कोकणातून देशावर आले होते. नानाला राज्यकारभाराचे शिक्षण सदाशिवराव भाऊच्या तालमीत मिळाले होते. इ. स. १७५६



दुसरा बाजीराव

मध्ये त्याला फडणिशीची वस्त्रे मिळाली. थोरले माधवराव यांच्या वेळी तो फडणिशीचा कारभार पाहत होता. जमिनीची मशागत करून त्याने महसुलाचे उत्पन्न वाढवले व कारभारासाठी पैसा जमवला. तो कारस्थानी, धूर्त व दूरदर्शी होता. सरदारांना अडचणीत गाठून द्रव्य काढण्याचे कसब नानाला चांगले अवगत होते. सवाई माधवरावाच्या मृत्यूनंतर त्याने सरकारी खजिन्यातील सर्व धन लांबवले, असे म्हणतात. त्यानंतरची त्याची सर्व कारस्थाने स्वतःच्या स्वार्थासाठी झाली. त्यांत त्याने राघोबाप्रमाणे शत्रूची मदत घेण्यासही कमी केले नाही. मात्र माधवरावाच्या मृत्यूनंतर नानाने बारभाईचा कारभार मुत्सद्देगिरीने व धडाडीने चालविला, ही त्याची



नाना फडणीस

अत्यंत मोठी कामगिरी होय. त्या वेळी छत्रपती नामधारी व पेशवेही नामधारी, अशी स्थिती होती. अशा स्थितीत सर्व मराठमंडळाला संघटित करून मराठी राज्याची धुरा नानाने यशस्वीपणे २० वर्षे संभाळली. पण त्याच्या अंगी शौर्य नसल्यामुळे तो सदैव परावलंबी राहिला. राजकीय डावपेच खेळण्याचे त्याचे कौशल्य मात्र असामान्य होते. म्हणूनच तो इंग्रजांना मराठी राज्यापासून दूर ठेवू शकला. तथापि शेवटी सत्तालोभाने त्याने स्वतःच इंग्रजांचा आश्रय घेतल्यामुळे त्याच्या कर्तबगारीला व देशाभिमानाला काळा डाग लागला.

नानाच्या मृत्यूनंतर बाजीरावाने अनिर्बंधपणे कारभार सुरू केला. अनेक मराठे सरदारांना त्याने दुखवल्यामुळे ते त्याचा द्वेष करू लागले. त्यांचे आपसांतले वैरही चालूच होते. अशा स्थितीत बाजीरावाने इ. स. १८०२ साली वसईला जाऊन इंग्रजांशी तह केला आणि त्यात सर्व सत्ता इंग्रजांना देऊन टाकली. इ. स. १८०३ मध्ये इंग्रजांनी त्याला पुण्याला नेऊन पुन्हा गादीवर बसवले. शिंदे, भोसले वगैरे सरदारांनी इंग्रजांशी युद्ध केले; पण त्यात त्यांचा पराभव झाला. कारण बहुतेकांनी आपसांत लढून आपले सामर्थ्य खर्ची केले होते. यशवंतराव होळकर याने स्वतःच्या हिमतीवर इंग्रजांशी बरीच वर्षे संग्राम केला. शेवटी मराठे, शीख, जाट या सर्वांचे संघटन करून, इंग्रजांची वाढती सत्ता नष्ट करण्याचा प्रयत्नही त्याने केला. पण दुर्दैवाने त्यात तो अपेशी ठरला.

अशा प्रकारे मराठी राज्य बहुतेक इंग्रजांच्या ताब्यात गेले. पुढे इ. स. १८१५ च्या सुमारास त्रिंबकजी डेंगळे हा पेशव्यांचा कारभारी असताना पेशव्यांनी शिंदे, होळकर, भोसले वगैरे सरदारांचे साहाय्य घेऊन इंग्रजांशी युद्ध करण्याचा प्रयत्न केला. पेंढाऱ्यांच्या निमित्ताने त्यांनी आपली सेनाही वाढवली. बापू गोखले हा त्यांचा मुख्य सेनापती होता. इ. स. १८१७ मध्ये पुण्याजवळच ही लढाई झाली. तीत पेशव्यांचा पराभव झाला व इंग्रजांनी शनिवारवाड्यावर आपले निशाण फडकावले. त्यानंतर बरेच दिवस बाजीरावाने गनिमी लढाई चालविली. तिच्यात बापू गोखले याने पराक्रमाची शर्थ केली; पण २० फेब्रुवारी १८१८ रोजी तो अष्टे येथे लढता लढता समरांगणी पडला. मग बाजीराव इंग्रजांना शरण गेला. इंग्रजांनी त्याला आठ लक्षांची जहागीर देऊन ब्रह्मावर्त येथे नेऊन ठेवले. तिथे त्याने उर्वरित आयुष्य धार्मिक कृत्यात घालविले. १४ जानेवारी १८५१ मध्ये तिथेच तो मरण पावला. त्याला औरस पुत्र नव्हता. त्याने तीन मुलगे दत्तक घेतले होते. त्यांतील नानासाहेब हा १८५७ च्या क्रांतियुद्धातला एक सेनापती होय. युद्धाच्या रणधुमाळीत बाजू अंगावर येऊ लागली, तेव्हा तो नेपाळात गेला व इ. स. १८५८ च्या ऑक्टोबर महिन्यात तिकडेच मरण पावला.

पेशवाईच्या प्रारंभापासून मुसलमानी सत्ता नाहीशी करून हिंदुस्थानात सर्वत्र हिंदू धर्माचे वर्चस्व स्थापायचे, हे ध्येय मराठ्यांच्या नजरेसमोर होते. त्याप्रमाणे मराठ्यांनी इ. स. १७६० च्या सुमाराला बहुतेक सर्व हिंदुस्थानात आपली सत्ता प्रस्थापित केली. पण महाराष्ट्राबाहेरील प्रदेशांत आपली सत्ता कायम करण्याच्या दृष्टीने पेशव्यांनी योग्य ते उपाय योजले नाहीत. शिवाजीमहाराजांनी स्वराज्याची स्थापना केल्या

नंतर समर्थ रामदासस्वामींनी समाजाला स्वधर्मप्रेम, स्वदेशप्रेम व स्वामिभक्ती यांचा जो उपदेश केला होता, त्याचा प्रभाव पुढे कित्येक वर्षे टिकला आणि मराठ्यांनी स्वराज्याचे रक्षण केले. इ. स १७२० पर्यंत महाराष्ट्रधर्माची स्थापना खंबीरपणे झाली.



बापू गोखले

त्यानंतर पेशव्यांनी हिंदुपदपातशाहीची स्थापना केली. पण हिंदू धर्म व हिंदुस्थान यांविषयी प्रेम आणि राज्यकर्त्यांविषयी स्वामिभक्ती सर्व लोकांत उत्पन्न करण्यासाठी त्यांनी काहीही केले नाही, असे इतिहासाचार्य राजवाड्यांचे मत आहे. ते कार्य करायला समर्थासारखा सत्पुरुषही त्या काळात झाला नाही. जिंकलेल्या प्रदेशांतील लोकांना मुसलमानांप्रमाणे मराठेही परकेच वाटत आणि पेशव्यांना किंवा त्यांच्या सरदारांना तलवारीच्या जोरावर तिथे आपली सत्ता टिकवावी लागे. चौथाई वसूल करताना मराठे सरदारांनी परप्रांतांत जुलूम-जबरदस्ती केल्याचीही पुष्कळ उदाहरणे इतिहासात आढळतात. त्या लोकांच्या संरक्षणाची जबाबदारी मात्र त्यांनी कधीच स्वीकारली नाही. त्यामुळे ते लोक परशत्रूला लगेच सामील होत. पेशव्यांची सत्ता किती अस्थिर होती, हे पानिपतच्या मोहिमेत स्पष्ट दिसून आले. त्या प्रसंगी उ. हिंदुस्थानातील सर्व लोक मराठ्यांच्या विरुद्ध गेले.

पेशव्यांच्या अपयशाचे दुसरे मोठे कारण म्हणजे मराठे सरदारांची स्वार्थी व फुटीर वृत्ती हे होय. छत्रपतींविषयी सर्वांना भक्ती नव्हती किंवा पेशव्यांविषयी बहुतेकांना प्रेम नव्हते. स्वदेश, स्वधर्म, स्वराष्ट्र, मराठी साम्राज्य या संबंधात आपले काही कर्तव्य आहे, त्यासाठीच आपली शक्ती खर्च केली पाहिजे, ही जाणीव पेशव्यांव्यतिरिक्त कोणालाही नव्हती. बहुतेक सरदार स्वपराक्रमाने जिंकलेला मुलुख स्वतःच्या ताब्यातच राहावा, अशी अपेक्षा करीत होते. पेशवे समर्थ होते तोपर्यंत सरंजामदारांनी केंद्रसत्ता मानली; पण पुढे ते पेशव्यांनाही जुमानीनासे झाले. अनेक सरदार तर शत्रूलाच फितूर झाले. त्यांचा बंदोबस्त करण्यासाठी पेशव्यांना आपले पुष्कळ सामर्थ्य खर्ची घालावे लागले. सर्व मराठे सरदारांनी स्वतःसाठी अपार धनसंचय केला; पण पेशवे मात्र कर्जबाजारी झाले. राघोदादासारखा पराक्रमी पुरुष आणि नाना फडणिसासारखा पेशवाईचा आधारस्तंभ या दोघांनीही शेवटी सत्तालोभाने इंग्रजांसारख्या कपटी शत्रूचा आश्रय घेतला, हे मराठेशाहीचे दुर्दैव होय. तथापि स्वार्थीपणा, फुटीरपणा, परधार्जिणेपणा, फितुरी, इ. दोष असूनही मराठ्यांनी मुसलमानांची सत्ता नष्ट केली, हे त्यांचे यश अत्यंत स्पृहणीय मानले पाहिजे.

इ. स. च्या अठराव्या शतकात मराठ्यांची संस्कृती त्या काळातील प्रगत राष्ट्रांच्या संस्कृतीहून कमी दर्जाची होती, म्हणून मराठ्यांना अपयश आले, असे इतिहासाचार्य राजवाडे यांनी प्रतिपादले आहे. पेशव्यांना इतिहास-भूगोलाचे कामापुरते ज्ञान होते, पण ते पाश्चात्य लोकांच्या मानाने अगदीच क्षुद्र होते. युरोपात विकसित झालेल्या शास्त्रांचा गंधही पेशव्यांच्या राज्यात कोणाला नव्हता. पाठशाळा, विद्यापीठे, विद्वत्सभा, वादसभा, शोध, पर्यटणे, इ. संस्था त्यांनी सुरू केल्या नाहीत. छापण्याची कला माहीत करून घेण्याचाही त्यांनी प्रयत्न केला नाही.

विद्या व कला या क्षेत्रातही मराठ्यांनी पेशवाईत फारशी प्रगती केलेली दिसत नाही. यादवकाळात व त्यापूर्वी गणित, ज्योतिष, धर्मशास्त्र, तत्त्वज्ञान, इ विषयांत महाराष्ट्रीयांनी जे संशोधन व लेखन केले होते, तसे कार्य पेशवाईत झाले नाही. मराठे लोक उद्योगधंद्यांत व कलाकौशल्यात मूलतःच मागसलेले होते. पेशवाईच्या काळात महाराष्ट्र वैभवाच्या शिखराला पोचला, तेव्हा त्याच्या उद्योगधंद्यांची पुष्कळ वृद्धी झाली, हे खरे; तथापि मराठ्यांनी भव्य मंदिरे किंवा प्रासाद निर्माण केले नाहीत. मात्र त्यासाठी आवश्यक असणारे स्वास्थ्य त्यांना लाभलेच नाही, हेही लक्षात घेतले पाहिजे. [म. ज्ञा. को.; हिंदुपदपातशाही.; मराठी रियासत; पे. का. म.; रा. ले. सं.]

**पेहेलवान** महाराष्ट्रातील भिक्षेकऱ्यांचा एक वर्ग. हे लोक मुसलमान असून, रस्त्यावर शारीरिक कसरतीची कामे करून पैसे मिळवतात. सहा ते बारा इंच लांबीच्या अनेक सुऱ्या हाती घेऊन त्या एका मागून एक जलदगतीने वर उडवून त्या परत झेलणे, दगडी गोळे हाताने उडवून ते हातावर किंवा छातीवर झेलणे, लांब सुरी तोंडात खुपसून रक्त काढणे इ. कसरतीचे प्रयोग ते करून दाखवतात. [ बाँ. बे. क्रा. ]

**पैंगलोपनिषद्** एक नव्य उपनिषद. हे यजुर्वेदाशी संबद्ध आहे. हे याज्ञवल्क्य मुनीने पैंगलाला सांगितले असून, याचे चार खंड आहेत.

पहिल्या खंडात आत्मज्ञानासंबंधीची माहिती सांगताना सृष्टिरचनेपासून प्रारंभ करून सत्, चित् व आनंद या मूल तत्त्वांपासून ईश्वरचैतन्याची निर्मिती; सत्त्वावरणानंतर विक्षेपशक्तीने रजोगुणाचे आवरण आणि इतर सर्व चराचर सृष्टीची निर्मिती; तसेच जाग्रत, स्वप्न, सुषुप्ती या तीन अवस्थांतील आत्म्याचे विवरण, इ. गोष्टी सांगितल्या आहेत.

दुसऱ्या खंडात विभू असा ईश जीवरूपाप्रत कसा पोचला त्याचे वर्णन; स्थूल, सूक्ष्म आणि कारणदेह यांचे वर्णन; जीव आणि ईश्वर यांच्या स्वरूपाचे वर्णन आणि शरीर कोणत्या तत्त्वांपासून बनले त्याचे विवरण आहे.

तिसऱ्या खंडात महावाक्यांचे विवरण करून 'तत्त्वमसि, त्वं ब्रह्मासि, अहं ब्रह्मास्मि' वगैरे तत्त्वांच्या मननाने व वअध्ययनाने अनुपमेय अमृतानंद लाभतो, असे सांगितले आहे.

चौथ्या खंडात ज्ञानी व त्याची कर्तव्ये यांचे वर्णन करून कुळात एखादा जरी ब्रह्मज्ञानी झाला, तरी एकशे एक पिढ्या उद्धरतात, असे सांगितले आहे. मम म्हणजे बंधन आणि न मम म्हणजे मुक्ती, अशा काही सुंदर व्याख्या या उपनिषदाच्या शेवटी दिल्या आहेत. [श्री. सी. ग. देसाई. ]

**पैंग्य** पिंगाचा वंशज. कौषीतकी ब्राह्मणात अनेक ठिकाणी यज्ञकर्मासंबंधी याची मते स्वीकारलेली आहेत. शतपथ ब्राह्मणात पैंग्य मधुक या नावाने याचा उल्लेख आढळतो. हा यास्काचा शिष्य होता. आत्रेय शाखेच्या अनुक्रमणीत पैंग्य हे यास्काच्या वंशाचे नाव म्हणून दिले आहे. याच्या अनुयायांना पैंगिन म्हटले आहे. दर्शपौर्णमास इष्टीच्या संबंधात याने काही वेगळी मते सांगितली आहेत. प्राण म्हणजेच ब्रह्म असे याने प्रतिपादन केले असून, खऱ्या विद्वान माणसाला अग्निहोत्र करण्याची गरज नाही, असे सांगितले आहे.

पैंगलोपनिषद, पैंगिरहस्यब्राह्मण, पैंग्यस्मृती व पैंग्यायन ब्राह्मण हे ग्रंथ याच्या नावावर आहेत. [ क्रि. स्ट. ले. उ.; म. ज्ञा. को.; प्रा. च. को.; तर्पण ]

**पैंकिया नाच** एक लोकनृत्य. व्रजमंडलात हे विशेष प्रचलित आहे. विवाहप्रसंगी वरातीबरोबर दोन पुरुष स्त्रीवेष घेऊन हे नृत्य करत जातात. त्यांच्याबरोबर एक मुलगा असतो, तोही कागदाचा एक मोठा हंस अथवा मोर आपल्या अंगाभोवती बांधून नाचतो. नाचताना तो आपले तोंड आळीपाळीने डावीकडे, उजवीकडे व समोर वळवतो. त्या मुलाला पैंक असे म्हणतात. [ कृ. जी. ब्र. श. ]

**पैठण** एक धर्मक्षेत्र व संतक्षेत्र. महाराष्ट्रातल्या औरंगाबाद जिल्ह्यात गोदावरीच्या उत्तर तीरावर हे क्षेत्र वसले आहे. औरंगाबादेपासून हे सुमारे ३२ मैलांवर आहे. या स्थानाच्या मागे २५०० वर्षांची सांस्कृतिक परंपरा आहे. पैठणचा सर्वांत जुना उल्लेख सुत्तनिपात या ग्रंथात आढळतो. तिथे या नगराला पोतण नगर असे म्हटले असून, ते अस्सक (अश्मक) देशाची राजधानी असल्याचे सांगितले आहे. अशोकाच्या शिलालेखात येथील नागरिकांचा पेत्तनिक असा उल्लेख येतो. सांची येथील स्तूपावरच्या कोरीव लेखांतही पैठणिकांचे उल्लेख आहेत. इ. स. च्या पूर्वीपासून व्यापार-धंद्यानिमित्त पैठणचे व्यापारी देशांतरी संचार करीत असल्याचा पुरावा मिळतो. पेरिप्लस या नावाच्या एका ग्रंथात पैठणसंबंधी लिहिले आहे, ते असे – दक्षिण देशात पैठण व तगर अशी दोनच शहरे व्यापारीदृष्ट्या महत्त्वाची आहेत. पैठणहून भडोच मार्गे गोमेद या रत्नाची परदेशात मोठी निर्यात होते. पैठणला नाना प्रकारचे कापडही तयार होते. जरीचे काम सर्वांत कुठे चांगले होत असेल तर ते पैठणला. आजही जरीबुट्टयांची भारी लुगडी पैठणी या नावानेच ओळखली जातात.

अशोकाच्या निधनानंतर थोड्याच कालात महाराष्ट्रात सातवाहन नावाचे एक राजकुल उदयास आले आणि त्याने महाराष्ट्रात विस्तृत व बलाढ्य असे साम्राज्य निर्माण केले. त्याच्या एवढ्या मोठ्या साम्राज्याची राजधानी प्रतिष्ठान अर्थात पैठण हीच होती. त्यामुळे सातवाहनांच्या काळात पैठणचा सर्वांगीण विकास झाला. पण पुढे सातवाहनांनंतर चालुक्य, राष्ट्रकूट, इ. जे राजे झाले, त्यांनी आपल्या राजधान्या दुसरीकडे केल्यामुळे पैठणच्या वैभवाला हळूहळू उतरती कळा लागली. सांप्रत एक तालुक्याचे ठिकाण एवढेच त्याचे राजकीय महत्त्व उरले आहे.

एका काळी पैठणला दक्षिणकाशी असे म्हणत. काशीसार-

खेच पैठणही इतिहासकाळात संस्कृत विद्येचे महापीठ म्हणून प्रसिद्ध होते. सातवाहन राजे विद्याकलांचे पोशिंदे होते. त्यामुळे त्यांच्या सत्ताकाळापासूनच इथे पंडितांची परंपरा सुरू झाली. बृहत्कथेचा कर्ता गुणाढ्य हा आद्य सातवाहनाचा आश्रित होता. गुणाढ्याचा पैठणशी आलेला हा संबंध महाराष्ट्राच्या सांस्कृतिक इतिहासात फार महत्त्वाचा ठरला आहे. गुणाढ्यामुळेच प्राकृत भाषांना प्रतिष्ठा व राजाश्रय लाभला. व्याकरण आणि धर्मशास्त्र या दोन ज्ञानशाखांचे इथे अध्ययन, अध्यापन चाले. पैठणच्या धर्मशास्त्रज्ञांनी दिलेला धर्मशास्त्रविषयक निर्णय महाराष्ट्रात अखेरचा मानला जात असे. अनेक मोठमोठे पंडित पैठणात होऊन गेले. निर्णयसिंधूचा कर्ता कमलाकरभट्ट, सिद्धान्त कौमुदीचा कर्ता भट्टोजी दीक्षित, शिवाजी महाराजांचे क्षत्रियत्व सिद्ध करून त्यांना राज्याभिषेक करणारा गागाभट्ट, हे शास्त्री-पंडित पैठणचेच होत.

सातवाहनांच्या काळानंतर पैठणशी महानुभाव संप्रदायाचा प्रवर्तक चक्रधर याचा घनिष्ठ संबंध आला. काही काळ पैठण हेच त्याच्या संप्रदायाचे प्रचारकेंद्र होते. इथल्या भोगनारायणाच्या मंदिरात त्याने दहा महिने वास्तव्य करून शेवटी तिथेच संन्यास घेतला. इथूनच तो महाराष्ट्राच्या भ्रमंतीवर निघाला. म्हणून लोक त्याला प्रतिष्ठानीचे चांगदेव राऊळ असे म्हणत. सांप्रत भोगनारायणाचे मंदिर महानुभावांचा मठ किंवा दत्तात्रेयांचे देऊळ म्हणून ओळखले जाते. भग्नावस्थेतच ते कसेबसे उभे आहे.

त्यानंतर या भूमीला पाय लागले ते ज्ञानेश्वरमहाराजांचे. त्यांनी पैठणला येऊन तिथल्या शास्त्री-पंडितांकडे आपल्याला उपनयनाचा अधिकार मिळावा अशी प्रार्थना केली. पण संन्याशाच्या मुलांना उपनयनाचा अधिकार नाही, असा निर्णय देऊन त्या शास्त्री-पंडितांनी त्या भावंडांचा उपहास केला. ज्ञानेश्वरांनी पुढे याच ठिकाणी रेड्यामुखी वेद वदवून आपले अद्भुत सामर्थ्य प्रकट केले. ही घटना गोदाकाठच्या नागतीर्थावर घडली असे सांगतात. इथेच पैठणचा प्रसिद्ध नागघाट आहे.

विद्यापीठ म्हणून पैठणचे माहात्म्य कालांतराने कमी झाले; पण इ. स. च्या १६ व्या शतकात संत एकनाथमहाराज यांची जन्मभूमी, कर्मभूमी आणि निर्याणभूमी म्हणून या स्थलाला नवे माहात्म्य प्राप्त झाले. यानंतर पैठण हे एक भक्तिपीठ म्हणून महाराष्ट्रात प्रसिद्धी पावले. एकनाथमहाराजांच्या वाड्याचेच सांप्रत मंदिरात रूपांतर झाले आहे. या वाड्याचे देवघर हे मंदिराचा गाभारा बनले आहे. नाथांच्या वेळच्या वाड्याचा जीर्णोद्धार झाला असला तरी महाद्वार, भिंती आणि गाभाऱ्यापुढचे खांब त्या वेळेचेच आहेत. जिथे श्रीखंड्याच्या रूपाने द्वारकेचा राणा गोदावरीच्या पाण्याच्या कावडी ओतीत असे तो वाड्यातला रांजणही (हौद) त्या वेळचाच आहे. इथल्या गाभाऱ्यात नाथांच्या पूजेतला बाळकृष्ण ठेवलेला आहे. सांप्रत या वाड्यात नाथांचेच वंशज राहतात गावातल्या या नाथस्थानाला आतले नाथ असे म्हणतात.

बाहेरचे नाथ म्हणून जे स्थान आहे, त्या ठिकाणी गोदावरीच्या पात्रात नाथांनी देह विसर्जन केला. म्हणून तिथे



एकनाथांचे समाधिमंदिर

वाळवंटाला लागूनच त्यांचे समाधिमंदिर बांधलेले असून, गाभाऱ्यात पादुका आहेत.

फाल्गुन वद्य षष्ठीला नाथषष्ठी असे म्हणतात. त्या दिवशी एकनाथांचे निर्याण झाले; म्हणून नाथांच्या पुण्यतिथीचा सहा दिवस मोठा उत्सव होतो आणि अष्टमीच्या रात्री गोपाळकाला होऊन तो संपतो. या उत्सवाला लाखो भाविकांचा मेळावा जमतो.

कृष्ण दयार्णव आणि शिवदिन केसरी या संतांचे मठही पैठणातच आहेत. कृष्ण दयार्णवाने पैठण येथेच हरिवरदा हा भागवताच्या दशमस्कंधावरचा टीकाग्रंथ रचला. खुद्द त्याच्या हातची हस्तलिखित प्रत तिथल्या मठात ठेवली आहे

शिवदिन केसरीचा एखाद्या सरदाराच्या पुरातन गढीसारखा दिसणारा मठ गोदावरीच्या वळणावर उंच ठिकाणी आहे. सांप्रत तो जीर्ण-शीर्ण दिसतो. नाथषष्ठीच्या उत्सवात नाथांची पालखी निघाली, की त्या मिरवणुकीत शिवदिनाचा झेंडा असतो.

सातवाहनांच्या प्राचीन राज-प्रासादाच्या खुणा आजही पैठणात दिसतात. त्या वास्तूच्या प्रचंड आवारात आज एक मशीद उभी आहे. मशिदीच्या आजूबाजूला शिल्पसौंदर्याने नटलेले सातवाहनकालीन दगडी खांब छिन्नभिन्न अवस्थेत पडून राहिले आहेत. वाड्याच्या आवारातच एक विहीर आहे, ती

शालिवाहनाची विहीर म्हणून ओळखली जाते. इथे गोदावरीच्या मुगी उतारावर मोइजुद्दीन ऊर्फ मौलाना साहेब याची कबर आहे. त्याने तिथे वास्तव्य करून त्या भागात इस्लामचा प्रचार केला. त्या कामी जे आडवे आले त्यांची त्याने कत्तल केली आणि इथल्या महालक्ष्मीमंदिराचा ताबा घेऊन इ. स. च्या तेराव्या शतकातल्या त्या भव्य मंदिराचे मशिदीत रूपांतर केले. पुढे याच मशिदीत त्याने देह ठेवला. मोइजुद्दिनाचे इस्लामीकरणाचे हे कार्य पुढेही चालूच राहिले आणि कालिका, मूर्धादित्य आणि चक्रपाणी ही पैठणातली देवमदिरेही मशिदीत रूपांतरित झाली.

नागघाटाजवळ जो एक रूक्ष व खडकाळ भाग आहे, तो मुगीपैठण म्हणून ओळखला जातो. त्याला पालथी नगरी असेही म्हणतात. पालथी नगरी म्हणजे धरित्रीच्या उदरात गडप झालेले सातवाहनकालीन पैठण होय. हैदराबादच्या पुराणवस्तुसंशोधन खात्याने काही वर्षांपूर्वी इथे उत्खनन केले. या उत्खननात त्या प्राचीन पैठणातील घरांचे पाये, सांडपाणी बाहेर घालवण्यासाठी विटांनी बांधून काढलेल्या नाल्या, पाणी जमिनीत मुरवण्यासाठी खोल खणलेल्या विहिरी, काही मूर्ती, फुटकी तुटकी काही मातीची भांडी, बौद्धकालीन काही नाणी, असा पुरातन वस्तुसंभार सापडला. त्यावरून तत्कालीन लोकांची स्थापत्यविद्येतील प्रगतीही कळून आली.

[एका जनार्दनी–श्री. रा. चि. ढेरे, १९५८; मणिकाचन; तीर्थरूप महाराष्ट्र; प्रा. भा. न. न ; ए. सि. ए. हिं.; श्री. ज. ह. दवे – भारती, जानेवारी १९६०; हि. जॉ. ए. इं.; म. उ. ]

## पैठीनसी

एक स्मृतिकार. हा बराच प्राचीन असावा. अथर्वपरिशिष्टात तर्पणाच्या यादीत याचे नाव आहे आणि त्याने लिहिलेल्या श्राद्धविधींतले काही विधी अथर्ववेदीय श्राद्धविधीशी जुळते आहेत. त्यावरून हा अथर्ववेदी असावा असे म्हणतात. स्मृतिचंद्रिकेत, तसेच अपरार्क, हरदत्त, इत्यादीच्या ग्रंथांत पैठीनसीची बरीच सूत्रे आढळतात. वारसहीन श्रोत्रियाचे धन विद्वत्परिषदेला मिळते, राजाला नाही; तसेच देवालयांची आणि गणांची ठेव आणि अज्ञान मुले व स्त्रिया यांचे धन राजाने स्वत.साठी खर्च करू नये, असे पैठीनसी म्हणतो. [ हि. ध.; तर्पण. ]

## पैडाल

( इ. स. चे १८ वे शतक ) द. भारतातील एक प्रसिद्ध कवी व गायक. पुरंदरदासानंतर कवी म्हणून यालाच मान्यता आहे. हा तेलुगू ब्राह्मण असून सोंटी वेंकट सुबय्या यांचा शिष्य होता. याने आपल्या गुरूकडून संगीतशास्त्राचे सखोल ज्ञान मिळवले. पुढे हा मद्रासला गेला आणि तिथे आपल्या गायकीने प्रसिद्धीस चढला. याने संचारी गीते, लक्षणगीते, प्रबंध व कीर्तने अशी एक हजार गीते रचली आहेत. तो गाण्याच्या बैठकीत स्वरचित गीतेच गात असे.

त्याच्या काळातला हा सर्वश्रेष्ठ गायक होता. गुडाळ शेषैय्यार, शोभनाद्री, इ. नामवंत संगीतकार याचे शिष्य होते. गुरुमूर्ती शास्त्री असे त्याचे नाव होते. [ डि. सा. इं. म्यु. म्यु. ]

## पैंडी

द. भारतातील एक जात. यांची वस्ती आंध्रातल्या विजगापट्टण आणि ओडिसातल्या गंजम या जिल्ह्यात आहे. पैंडी स्वत.ला वाल्मीकीचे वंशज मानतात. हे लोक शेती, मजुरी, पहारेकऱ्याचे काम, पिंजाऱ्याचा धंदा, व्यापार इ. व्यवसाय करतात. डोंगरी प्रदेशातील माल विकत घ्यायचा आणि तो मैदानी प्रदेशात आणून विकायचा, असाही काहींचा धंदा असतो.

मुलगी प्रथम ऋतुमती झाली, की तिला काही दिवस बाजूला बसवतात. स्नान घालण्याच्या दिवशी प्रथम एक माडिग जातीचा माणूस तिच्या हातापायांची नखे काढतो आणि मग ती स्नान करून शुद्ध होते.

**विवाहप्रथा** – मुलींची लग्ने लहान वयातही होतात. मुलाने मामेबहिणीशी लग्न केल्यास पाच रुपये आणि अन्य मुलीशी केल्यास दहा रुपये देज द्यावे लागते. गंजम जिल्ह्यातील पैंडीचा विवाहसमारंभ साधारणपणे तेलुगू पद्धतीने होतो. पण काही ओडिया रीतीही त्यांनी स्वीकारल्या आहेत. हा समारंभ तीन दिवस चालतो. पहिल्या दिवशी बारा खांबांवर एक मंडप उभारतात. पुरुषांना दिवसा आणि बायकांना रात्री मेजवानी देतात. विवाहाचा मुहूर्त रात्रीचा ठरवतात. मुहूर्ताच्या वेळी वर वधूगृही जातो. तिथे ती दोघे एकमेकांवर अक्षता टाकतात. मग वर वधूचा हात धरून तिला मंडपात नेतो आणि ती दोघे विवाहवेदीवर बसतात. मग वर वधूच्या कपाळावर बाशिंग, मनगटात सूत्र आणि गळ्यात मंगळसूत्र बांधतो. नंतर ती दोघे आदल्या दिवशी सात उच्चवर्णियांच्या घरून आणलेल्या पाण्याने स्नान करतात. तिसऱ्या दिवशी इष्टमित्र नूतन दांपत्याला आहेर करतात आणि घरचे लोक पितरांना तृप्त करतात.

**देवधर्म** – गंजममधील पैंडी लोक ग्रामदेवतांना भजतात. त्यांना देवळात जायला बंदी असल्यामुळे देवळाच्या दारासमोरची चिमूटभर माती ते घरी नेतात आणि स्वच्छ केलेल्या जागी कापडावर ती ठेवतात. मग त्या मातीसमोर ते देवीला अर्पण करायच्या वस्तू मांडतात. विजगापट्टण जिल्ह्यातील पैंडी वैष्णव आहेत. दर कार्तिक महिन्यात ते एकदा आपल्या जातिबांधवांना भोजन घालतात.

**मर्तिकप्रथा** – पैंडी लोक मृतांना जाळतात किंवा पुरतात आणि

मृताची राख झाडावर किंवा मुंग्यांच्या वारुळावर टाकतात. राख नेणाऱ्याला त्यांचा पुरोहित विचारतो. ' मृताचे काय झाले ? ' राख नेणारा उत्तर देतो. ' तो काशीला किंवा जगन्नाथपुरीला गेला. ' प्रेत जाळलेल्या जागी एक कापड पसरतात व त्यावर मृतासाठी खाद्यपदार्थ ठेवतात. चौथ्या दिवशी हे लोक एक डुक्कर कापतात आणि त्याचा एक पाय मृत्युशय्येच्या जागी टांगून ठेवतात. त्यानंतर उरलेला डुक्कर शिजवून खातात. तेल आणि हळद यांना स्पर्श केला असता त्यांचे मृताशौच संपते व ज्ञातिभोजन घातल्याने और्ध्वदेहिक पुरे होते. दरवर्षी हे लोक मृताचे श्राद्ध करतात. [ का. ट्रा. स. इं. ]

**पैदाइश** एक मुस्लीम संस्कार. उत्पत्ती किंवा जन्म असा या शब्दाचा अर्थ आहे. मूल जन्माला आल्याबरोबर त्याची नाळ कापून व त्याला स्वच्छ करून कपड्यात गुडाळतात आणि बाहेर आणतात. गावचा मुख्य मौलवी व इतर पुरुष बाहेर बसलेले असतात. मौलवी मुलाच्या उजव्या कानात अझान व डाव्या कानात इकामत हे मंत्र उच्चारतो. या कामासाठी मौलवीचीच गरज असते, असे नाही. ज्याला हे मंत्र पाठ येतात, असा कोणीही मुसलमान ते काम करू शकतो.

या संस्कारानंतर मुलाचा बाप दानधर्म करतो. नंतर मुलाच्या आयुरारोग्यासाठी व सुखशांतीसाठी फातिहा ही प्रार्थना म्हटली जाते. या वेळी इष्टमित्र नूतन बालकासाठी भेट घेऊन येतात व त्याचे शुभ चिंतितात.

मूल जन्मल्यानंतर सातव्या दिवशी हजरत इब्राहिम याच्या बलिदानाची स्मृती म्हणून मुलगा असल्यास दोन व मुलगी असल्यास एक बकरा कापतात. त्या बकऱ्याचे मांस नातेवाईकांना व इष्टमित्रांना प्रसाद म्हणून देतात. याच वेळी मुलाचे केस कापतात आणि त्या केसांच्या वजनाइतकी चांदी किंवा तेवढ्या किमतीचे धान्य फकिरांना वाटतात. हा कार्यक्रम सातव्या दिवशी न झाल्यास सातव्या वर्षापर्यंत केव्हाही करतात. सातव्या दिवशीच मुलाचे नावही ठेवतात. अब्द म्हणजे सेवक किंवा गुलाम म्हणजे दास, हे शब्द ईश्वरवाचक शब्दांना जोडून ईश्वरसेवक किंवा दास अशा अर्थी अब्दुर्रहमान, गुलामअल्ली अशी नावे ठेवतात. मुलीच्या नावात महंमद पैगंबराच्या बायकांची व मुलींची नावे (फातमा, आयशा, रुकिया, इ.) ठेवण्याकडे प्रवृत्ती असते. [ मु. स. सं. ]

**पैल** एक प्राचीन आचार्य. व्यासांनी वेदमंत्रांच्या संहिता तयार केल्यावर याला ऋक्संहिता शिकवली. हा वसू ऋषीचा पुत्र होता. पांडवांच्या राजसूय यज्ञात याने होत्याचे काम केले होते. व्यासांनी याला ब्रह्मांड पुराण सांगितले, असा उल्लेख ब्रह्मांड पुराणात आहे (१·१·१४) इंद्र प्रमती व बाष्कल हे याचे शिष्य होते. [ प्रा. च. को.; वै. सा. सं.; तर्पण ]

**पैशाच विवाह** विवाहाच्या आठ प्रकारांपैकी शेवटचा प्रकार. मुलगी झोपलेली, मद्य पिऊन झिंगलेली किंवा मूर्च्छित असताना तिच्याशी चोरून संभोग करणे व मग तिच्याशी लग्न करणे, या प्रकाराला पैशाच विवाह असे नाव आहे. हा विवाहप्रकार अत्यंत निकृष्ट मानलेला आहे. मध्य युगात म्हणजे इ. स. सुमारे १००० ते १५०० या काळात काही पुरुष जादूटोणा करून किंवा मंत्रांचा प्रयोग करून स्त्रियांना वश करून घेत व त्यांच्याशी विवाह करीत. अशा विवाहांचा अंतर्भावही पैशाच विवाहातच केलेला आहे.

पैशाच या विवाहप्रकाराचा स्मृतिग्रंथांत उल्लेख आहे. पण त्यावरून हा प्रकार स्मृतिकारांना मान्य होता, असा त्याचा अर्थ होत नाही. उलट या प्रकाराचे समाजातून समूळ उच्चाटन व्हावे, यासाठी त्यांचे प्रयत्न असत. तथापि, अशा प्रकारचे विवाह करण्याची रूढी पुरातन काळी मागसलेल्या जातीत होती आणि वधू मिळविण्याचा हाही एक मार्ग होता, एवढे सूचित करण्यासाठी स्मृतिकारांनी त्याचा उल्लेख केला आहे. याशिवाय, भ्रष्ट केलेल्या मुलींना अन्य पती मिळण्याचा सुतराम संभव नसल्यामुळे, त्यांना व त्यांच्या संततीला कायदेशीर संरक्षण मिळावे, या हेतूनेही त्यांनी पैशाच विवाहाचा विवाहप्रकारांत निर्देश करून ठेवला असावा. यात स्मृतिकारांची सामाजिक दृष्टी प्रत्ययाला येते. [ हि. ध.; पो. वी. हिं. सि. ]

**पैशाची** पिशाच लोकाची प्राचीन प्राकृत भाषा. षड्भाषाचंद्रिका या ग्रंथाचा कर्ता लक्ष्मीधर हा पांड्य, केकय, बाल्हीक, सिंह, नेपाळ, कुंतल, सुदेष्ण, भोट, गांधार, हैव आणि कनोज या प्रदेशांना पिशाच देश मानतो. काही पाश्चात्त्य विद्वानांच्या मते पैशाची ही उज्जैनच्या आसपासच्या प्रदेशातील भाषा होती; पण ग्रियर्सनच्या मते भारताच्या वायव्य सीमेवरील दरदिस्तान, चित्रळ वगैरे प्रदेश हा पिशाच लोकांचा व पैशाची भाषेचा मूळ देश होय. तिथूनच ते लोक आपल्या भाषेसह सर्वत्र पसरले असावे.

वररुचीने प्राकृतप्रकाश या ग्रंथात शौरसेनी या प्राकृत भाषेतून पैशाचीचा उगम झाल्याचे प्रतिपादले आहे. मार्कंडेयाने प्राकृतसर्वस्व या ग्रंथात कांचीदेशीय, पांड्य, पांचाल, गौड, मागध, व्राचड, दाक्षिणात्य, शौरसेन, कैकय, शाबर व द्राविण असे पिशाचांचे अकरा प्रकार सांगितले आहेत. मात्र त्याने

शौरसेन, कैकय व पांचाल या तीनच प्रकारच्या पैशाची बोलींचा उल्लेख केला आहे. त्याच्या काळी हे तीनच प्रकार उरले असावे. त्याच्या मते कैकय पैशाची संस्कृत भाषेवर आणि शौरसेन पैशाची शौरसेनीवर आधारित होती. पांचाल पैशाची व शौरसेन पैशाची यांत विशेष भेद नाही. दंडीने आपल्या काव्यादर्शात पैशाची भाषेला भूतभाषा म्हटले आहे. भोजदेवाने सरस्वतीकंठाभरण या ग्रंथात उच्च जातीच्या माणसांनी विशुद्ध पैशाची भाषा बोलू नये, असे सांगितले आहे.

ग्रियर्सनच्या मते पैशाची हे पाली भाषेचेच एक रूप आहे. ही भाषा संस्कृताशी पुष्कळ मिळतीजुळती असल्यामुळे तिच्यात श्लेषालंकाराला बराच वाव आहे. गुणाढ्याची बृहत्कथा पैशाची भाषेत रचलेली होती; पण तो मूळ ग्रंथ उपलब्ध नाही. सोमदेवाचा कथासरित्सागर, क्षेमेन्द्राची बृहत्कथामंजरी, बुधस्वामीचा बृहत्कथाश्लोकसंग्रह ही त्याची संस्कृत रूपांतरे होत.

या भाषेची पुढील लक्षणे प्राकृत व्याकरणात सांगितलेली आहेत —

(१) ण्य, न्य व ज्ञ या अक्षरांच्या ऐवजी ञ्ञ चा उपयोग उदा०— पुण्य— पुञ्ञ, अन्य—अञ्ञ, सर्वज्ञ — सव्वञ्ञो.

(२) ण च्या जागी न चा उपयोग. उदा०— गुण — गुन.

(३) द च्या जागी त चा उपयोग. उदा० — दामोदर — तामोतर.

(४) ल च्या जागी ळ चा उपयोग. उदा०—सलिल—सळिळ.

(५) श, ष यांच्याऐवजी स चा उपयोग. उदा०—विषम — विसम.

(६) ट च्या जागी त चा उपयोग. उदा०— कुटुंब — कुतुंब.

(७) पूर्वकालवाचक प्रत्यय त्वा याच्या ऐवजी तूण चा उपयोग. उदा०— गत्वा— गंतूण.

पैशाची प्राकृत भाषेची उपभाषा चूलिका पैशाची ही होय. हिची दोन विशेष लक्षणे आहेत, ती अशी —

(१) ग, घ इत्यादी घोष वर्णाच्या जागी क, ख, इत्यादी अघोष वर्णाचा उपयोग. उदा०— नगर— नकर; मेघ— मेखो.

(२) र च्या जागी ल चा विकल्पाने उपयोग.

मध्य आशिया, खोतान, चिनी तुर्कस्तान, वायव्य सीमा प्रांत व पंजाब या प्रदेशांत सापडलेल्या खरोष्टी लिपीतल्या काही शिलालेखांत या भाषेची वरील लक्षणे आढळतात. प्राकृत व्याकरण ग्रंथ व काही संस्कृत नाटके यांतही या भाषेचा अल्पसा वापर केलेला आहे.

पुश्तू व इतर दरद भाषा पैशाची भाषेपासूनच उगम पावलेल्या आहेत किंवा त्या पैशाचीने प्रभावित झालेल्या आहेत. [प्रा. सा. इ.; सिं. भा. सं. प.; हिं. वि. को.]

**पोंगळ** द. भारतातला एक उत्सव. हा मुख्यत्वे तमिळनाडमध्ये प्रचलित आहे. हा प्रत्यक्षात तीन दिवस चालत असला, तरी त्यापूर्वी सुमारे महिनाभर त्याची तयारी चालते. पोंगळ हा उत्सव नववर्षाच्या स्वागतार्थ व सूर्याच्या प्रीत्यर्थ साजरा केला जातो. तमिळ पंचांगाप्रमाणे मर्गळी किंवा मार्गशीर्ष हा वर्षाचा शेवटचा महिना असतो. हा महिना अशुभसूचक व रोगकारक मानला जातो. त्यामुळे त्या सबंध महिनाभर अशुभनिवारणार्थ आणि रोगविनाशार्थ काही विधि—विधाने केली जातात. या काळात शिवाची अभिषेकपूर्व पूजा होते. स्त्रिया आपल्या अंगणात सडा—रांगोळी करून एका कोपऱ्यात गोमयाचे गोळे मांडतात व त्यांवर झेंडूची फुले वाहतात. हे गोळे म्हणजे विघ्नहर्त्याची प्रतीके होत. संध्याकाळी ती उचलून अंगणाच्या दुसऱ्या कोपऱ्यात साठवून ठेवतात.

सबंध महिनाभर असा कार्यक्रम केल्यावर शेवटच्या दिवशी पहाटे संन्यासी मंडळीचे ताफे झांजा वाजवीत लोकांच्या दारोदार जाऊन त्यांना उठवतात. मग स्त्री—पुरुष मुलाबाळांसह घर आणि त्याचा परिसर झाडून लख्ख करतात. याही दिवशी विघ्नहर्त्याची प्रतीके पूजतात. संध्याकाळी घरोघर साठवलेली ती प्रतीके एकत्र करून त्यांची वाद्यांच्या गजरात मिरवणूक काढतात व गावाबाहेर नेऊन त्यांचे विसर्जन करतात. दुसऱ्या दिवसापासून नववर्षाला व पोंगळसणाला प्रारंभ होतो.

हा तइ मासाचा पहिला दिवस असून, त्याला भोगी पोंगळ असे म्हणतात. या दिवशी इंद्राची पूजा व आप्तजनांसह मिष्टान्न भोजन करतात.

दुसऱ्या दिवसाला सूर्य किंवा पेरुम पोंगळ म्हणतात. या दिवशी सुवासिनी स्त्रिया पहाटेच सुस्नात होऊन ओलेत्याने अंगणात दुधातली तांदुळाची खीर शिजवतात. खिरीला उकळी आली, की 'पोंगळ ओ पोंगळ' असे मोठ्याने ओरडतात. खीर शिजल्यावर सूर्य व गणपती यांना तिचा नैवेद्य दाखवतात व नंतर काही भाग गायीला घालून उरलेला भाग सर्वजण वाटून घेतात. या दिवशी सर्व लोक एकमेकांच्या घरी जातात व परस्परांना काही भेटी देऊन 'पोंगळ,' 'पोंगळ' असे म्हणतात. खेडेगावचा पाटील या दिवशी ग्रामदेवतेला पोंगळाचा म्हणजे खिरीचा नैवेद्य दाखवितो.

तिसरा दिवस म्हणजे मुट्टू पोंगळ. या दिवशी गायीची पूजा करायची असते. सकाळीच केशरयुक्त जलाने गायी—बैलांना स्नान घालतात. मग त्यांच्या गळ्यात फुलांच्या माळा घालून व शिंगाना बेगड लावून त्यांना शृंगारतात. काही ठिकाणी खाद्य पदार्थांच्या माळा घालण्याचीही प्रथा आहे. या दिवशी गुरांना गोडाधोडाचे जेवण घालतात. दिवसभर त्यांना मोकळी सोड-

तात. संध्याकाळी त्यांची व देवतांची मिरवणूक काढतात. मिरवणूक इष्ट स्थळी पोचली, की तिथे नृत्यगायनादी कार्यक्रम होतात व मग हा उत्सव समाप्त होतो. [सा. इं. फे.]

**पोंगी** एक वेणुवाद्य. याचा आकार नागस्वरम्‌सारखा असतो. त्यातून एकच सूर निघतो. त्या सुराला श्रुती असे म्हणतात. पोंगीला सुराची उंची कमीजास्त करण्यासाठी चार–पाच छिद्रे असतात. नागस्वरम् या वाद्यावरोबर सूर धरण्यासाठी याचा उपयोग, विशेषतः द. भारतात करतात. [म्यु. इं.]

**पोंबद** द. भारतातील नर्तकांची एक जात. बैलुपोंबद व पदरतीपोंबद अशा यांच्या दोन शाखा आहेत. पहिल्या शाखेचे लोक मुख्यत्वे शेती करतात आणि दुसऱ्या शाखेचे लोक भुता–खेतांची सोंगे काढून नाच करतात व त्यावर उपजीविका करतात. विशिष्ट भुतांची सोंगे विशिष्ट पोंबदानीच घ्यायची, असा त्यांच्यांत निर्बंध आहे. हे लोक तुळू भाषा बोलतात. [का. ट्रा. स. इं.]

**पोखर्ण ब्राह्मण** ब्राह्मणांतली एक पोटजात. या लोकांना पुष्कर्ण असेही म्हणतात. सिंधूचे खोरे व मारवाड या भागांत यांची वस्ती आहे. हे सिंधमधून मारवाडात आले, असे सांगतात. हे पंचद्राविडांपैकी आहेत. यांच्या एकूण चौऱ्यायंशी शाखा असून, त्यांत पुरोहित, व्यास, जोशी, कल्ला, बोहरा व उपाध्याय या शाखा श्रेष्ठ समजल्या जातात. यांच्या उत्पत्तीविषयी दोन आख्यायिका सांगतात, त्या अशा—

(१) हे लोक प्रथम बेलदार होते. पुष्कर म्हणजे तलाव खोदण्याचे काम ते करीत. अशा एका खोदलेल्या तलावातील देवी त्यांच्यावर प्रसन्न झाली. तिने त्यांना पोखर्ण या नावाने ब्राह्मण बनविले. हे लोक कुदळीची पूजा करतात; त्यावरून आणि पोखर्ण या नावावरून ही दंतकथा निर्माण झाली असावी.

(२) यांची वसाहत राजस्थानातील पुष्कर क्षेत्रात होती, म्हणून यांना हे नाव पडले असावे.

हे लोक उंचेपुरे व शरीराने धष्टपुष्ट असतात. हे गुजराती व मारवाडी या दोन्ही भाषा बोलतात. यांच्यांतले पुष्कळसे लोक शेती व गोपालन करतात, काही मिठाई बनविण्याचे व आचाऱ्याचे काम करतात व काही भाटिया व लोहाणा यांचे पौरोहित्य करतात. पुष्कळसे लोक सरकारी नोकरही आहेत.

**देवधर्म** – यांच्यांत शैव, वैष्णव व शाक्त असे तीन्ही पंथांचे लोक आहेत. यांची चौदा गोत्रे असून, प्रत्येक गोत्राच्या दोन कुलदेवता असतात. उदा०– भारद्वाज – जाजला व काकरेचा.

**विवाहप्रथा** – यांच्यांत हुंडा किंवा देज देण्याची पद्धत नाही. लग्ने बहुधा बायकाच ठरवतात. यांच्यांतली सगळी लग्ने एकाच दिवशी सामुदायिक पद्धतीने होतात.



पोखर्ण ब्राह्मण

**मृतकप्रथा** – हे लोक कोणत्याही कार्यापेक्षा अंत्यसंस्कारासाठी विशेष खर्च करतात. ते दहा दिवस जवळच्या नातेवाइकांना जेवण घालतात आणि बाराव्या दिवशी मोठे ज्ञातिभोजन घालतात. आशौचकालात मृताचे बहुतेक सर्व नातेवाईक क्षौर करतात. [रा. जा.; मुं. इ. जा.; भा. ब्रा. जा. प्र.]

**पोट्टुकुरी वेरब्रह्मम्** द. भारतातील मदवरम् येथील एक देव. दर शुक्रवारी आजूबाजूच्या सर्व ठिकाणांहून निरनिराळ्या जातीजमातींचे लोक मदवरम् येथे येतात व त्याची पूजाप्रार्थना करतात. याच्या उत्पत्तीविषयी कथा आहे, ती अशी — हा एक सुताराचा मुलगा होता. एकदा रानात गुरे चारीत असता त्याला सर्पदंशाने मेलेला एक माणूस आढळला. त्याने त्याला पुन्हा जिवंत केले. पुढे एके दिवशी प्रवास करीत असताना पाऊस आल्याने तो एका ठिकाणी थांबला. आश्चर्य असे, की तो ज्या ठिकाणी उभा होता, तिथे पाऊस अजिबात पडत नव्हता. अशा प्रकारे त्याने अनेक चमत्कार करून दाखवले. पुढे तो मरण पावल्यावरही खड्ड्यातून उठून बाहेर आला आणि त्याच्या शिष्यांना भेटला.

'पुढल्या जन्मी मी एका भिकाऱ्याच्या रूपाने पृथ्वीतलावर येईन' असे सांगून तो अदृश्य झाला. पुढे त्याच्या शिष्यांनी त्याची मूर्ती बनवून तिची पूजाअर्चा सुरू केली. [द्र. गॉ. मॉ. हिं.]

**पोट्टुराझू** द. भारतातील तेलंगणातला एक ग्रामदेव. सात बहिणी म्हणून ओळखल्या जाणाऱ्या ग्रामदेवींचा पोट्टुराझू हा भाऊ समजला जातो. त्याला भात व बळी दिलेल्या पशूचे रक्त यांचा नैवेद्य दाखवतात. कधी एखाद्या ग्रामदेवतेचा पती, तर कधी सेवक या रूपांतही तो आढळतो. याचे प्रतीक म्हणून एखादा दगड किंवा लाकडी खांब उभा केलेला असतो. नेल्लूर येथे याचे मंदिर आहे. मंदिराच्या प्रांगणात एक काळा दगड असून त्यालाच पोट्टुराझू समजतात. एक ब्राह्मण पुजारी त्याची नित्य पूजा करतो. [द्र. गॉ. मॉ. हि.]

**पोड** बंगालमधील एक जात. या लोकांची वसती मुख्यतः खुलना, जेसोर, मिदनापूर व चौवीस परगणा या जिल्ह्यांत आहे. स्थानभेदानुसार हे लोक पद्मराज, पुंडरीक, पौंड्र, पोड, बलाई, इ. नावांनी ओळखले जातात. पौंड्र या नावाचा अपभ्रंश होऊन पोड हे नाव आले आहे, असे वाटते. या लोकांविषयी काही कथा संस्कृत साहित्यात आढळतात. क्षत्रिय पुरुष व नापित स्त्री यांच्यापासून ही जात उत्पन्न झाली, अशी एक कल्पना आहे. पुलिंद या अनार्य जातीतून ही जात उत्पन्न झाली, अशीही समजूत आहे. त्यामुळे यांना हीन मानले जाते. पण हे मात्र स्वतःला क्षत्रिय समजतात. परशुरामाच्या भयाने हे क्षत्रिय लोक डोंगराळ व जंगली प्रदेशात पळून गेले. पुढे मूळ जातीशी संबंध तुटल्यामुळे त्यांच्यांत आचारहीनता आली. नंतर त्यांनी बौद्ध धर्म स्वीकारला. पण कालांतराने तो सोडून ते पुन्हा हिंदू झाले. मात्र त्या वेळी उच्च वर्णाच्या हिंदूंनी त्यांना शूद्र मानून दूर ठेवले. पण काही पोड लोक अजूनही क्षत्रियांचे आचार व संस्कार पाळतात आणि धार्मिक कृत्ये करण्यासाठी ब्राह्मण पुरोहितांना बोलावतात. सांप्रत हे लोक शेती किंवा व्यापार करतात. शूद्र समजले जाणारे पोड मासेमारीचा उद्योग करतात. [ए शॉर्ट हिस्टरी अँड एथ्नॉलाजी ऑफ दि कल्टिव्हेटिंग पोड्स— श्री. महेंद्रनाथ करण, १९१९]

**पोतदार** सरकारच्या खजिन्यात आलेली नाणी पारखणारा अधिकारी. गावचा सोनार किंवा सराफ असाही या शब्दाचा एक अर्थ आहे. मराठ्यांच्या कालात निरनिराळ्या कारणांनी जो पैसा खजिन्यात जमा होत असे, त्याला तहसील, इरसाल किंवा पोता असे म्हणत. त्यावेळी टांकसाळ नसल्याने नाणे खरे किंवा खोटे हे पारखणे कठीण जात असे. तहसिलीतून काही नाणी परत आली, तर ती कोणाच्या माथी मारायची हा पाटलापुढे प्रश्न पडायचा. या सर्व गोष्टी ध्यानात घेऊन नाणी तपासायला एक माणूस नेमला गेला व त्याला पोतदार असा हुद्दा दिला गेला. तालुकाकचेरीत जो कारकून नाणी तपासून घेतो त्याला आजही पोतदार म्हणण्याची पद्धत आहे. सोनारांमध्ये पोतदार ही बहुमानाची पदवी समजण्यात येते. [गां. गा.]

**पोतन्ना** (१४०५ – १४७० इ. स.) द. भारतातील एक महान भक्तकवी. याच्या जन्मस्थानाबद्दल मतभेद आहेत; पण आंध्रमधील वरंगळ जिल्ह्यातल्या बम्मेर गावी याचा जन्म झाला, असे बहुतेक संशोधक मानतात. म्हणूनच त्याला सर्व लोक बम्मेर पोतन्ना या नावाने ओळखतात. याच्या पित्याचे नाव केसनमंत्री असून, आईचे लक्कसानम्मा असे होते. हा नियोगी ब्राह्मण होता. पोतन्नाच्या बापाची थोडी शेती होती. तिच्यावर त्याचा संसार रुटूखुटू चालला होता. त्यामुळे पोतन्नाचे बालपण दैन्यात आणि कष्टांतच गेले. बापाच्या मृत्यूनंतर तोही शेती करू लागला, पण त्यालाही त्या शेतीवर सुखाचा संसार करता येईना.

पोतन्नाला कवित्वाचे देणे सहजसिद्ध होते. म्हणून त्याने कवितेच्या आधारावर कोणत्या तरी राजाचा आश्रय मिळवण्याचे ठरविले. लगेच त्याने भोगिनीदंडकम् या नावाचे एक शृंगारिक काव्य लिहिले. ते घेऊन तो राचकोंडाचा राजा सर्वज्ञ सिंगमनायुडू याच्याकडे गेला. त्याने दरबारात त्या राजाला आपल्या शीघ्रकवित्वाची चुणूक दाखविली. राजा त्याच्यावर खूष झाला व पोतन्नाला भरपूर बिदागी देऊन त्याने त्याला आपल्या पदरी ठेवून घेतले. इतर कवींप्रमाणेच तोही नित्यनवे चमत्कृतीपूर्ण असे राजस्तुतीचे श्लोक लिहू लागला.

एवढ्यात एके दिवशी त्याच्या आयुष्याला कलाटणी देणारी एक घटना घडली. दरबारातून घरी येत असता चिदानंद नामक एक योगी त्याला भेटला. त्याने पोतन्नाला हाक मारून त्याच्याशी काही बोलण्याची इच्छा प्रकट केली. सकृद्दर्शनी पोतन्नावर त्या योगिराजाची छाप पडली. पोतन्ना त्याच्या मागोमाग चालू लागला. ते दोघे एकांत स्थळी जाऊन बसले. योगिराजाने त्यांची चौकशी करून त्याला म्हटले, 'तू एक प्रतिभावान कवी आहेस, पण तुझी ही प्रतिभा आजमितीस नरस्तुतीच्या कामी खर्ची पडून वाया जात आहे. तू हा नाद सोड. तू असे एखादे काव्य निर्माण कर, की तुझे नाव अजरामर होईल. ईश्वराची आराधना आणि त्या रूपाने दैवी गुणांची प्रशंसा यांतच कवितेचे खरे सार्थक आहे, हे नेहमी लक्षात ठेव.'

ाच आणि त्यात त्याला योग्य गुरु भेटला त्याने त्या यागि
ाचा आदेश मानला पण कोणत्या विषयावर काव्य लिहावं,
विषयी त्याचे मन अजून संभ्रमात होते अशी आख्यायिका
तात की तो याचा संभ्रम साक्षात रामप्रभूने दूर केला
ल्विर्त। गोदावरीच्या तीरावर पोतन्ना ध्यानस्थ असता
ता रामाने त्याला दर्शनपूर्वक आदेश दिला 'तू भागवत
णाचा अनुवाद कर त्यायोगे तू भवबंधनातून मुक्त होशील!'
न्ना एकदम भानावर आला राम त्याच्या दृष्टीपुढून अंतर्धान
ला पण त्याची ती दिव्य वाणी मात्र पोतन्नाच्या कानात
न राहिली पोतन्नाला काव्यविषय मिळाला त्याच क्षणी
च्या मुखातून पुढील काव्यपंक्ती सहजगत्या बाहेर पडल्या –

**ओनरन् नन्नय तिक्कनदि कवु लियुर्विन् बुराणावलुल ।**
**वेनुगुन जेयुचु मत्पुराकृत शुभाधिक्यबु वानेट्टि वो ।।**
**तेनुगुन जेयरुमुन्नु भागवतमुन दीनिन दर्निगिचिना ।**
**जननबुन सफलबु जसेद बुनर्जन्मबु लेकुडगन ।।**

अर्थ – नन्नय तिक्कन इ. कवींनी तेलगू भाषेत पुराणाचा
ुवाद केला आहे पण कोणीही (अद्यापि) भागवताचा
ुवाद केला नाही मी भागवताचा अनुवाद तेलुगूत करून
ला जन्म कृतार्थ करीन मी जन्ममरणातून मुक्त होईन

मग एका शुभदिनी भगवताचे स्मरण करून त्याने आपल्या
गू भागवताचे मंगलाचरण केले अनुवाद एकेका अध्यायाने
जाऊ लागला तलुगू महाभारताचा कर्ता तिक्कन्न महाकवी
त्याचा आदर्श होता पोतन्नाने त्याच्याच शैलीचे अनुकरण
मात्र त्याच्याजवळ स्वतःची कल्पकता भरपूर होती
मुळे मूळ संस्कृत भागवतावर त्याने अनेक सुंदर देशी अलं
र चढवले त्याने व्यासाची कथा घेतली, पण अनुवाद मात्र
रपण केला त्याने मूळ भागवतातील तत्त्वज्ञानाची प्रकरण
व्यमय बनवून टाकली

भागवताचा सप्तम स्कंध हा त्याचा गाभा समजला जातो
स्कंधातली प्रल्हादाची चरित्रकथा वर्णन करताना कवीच्या
ाने भावुकता वरिली आहे ज्याप्रमाणे तिक्कनाने महा
रताच्या विराट पर्वात आपल्या प्रतिमेचे पालाण दाखविले,
प्रमाणे भागवताच्या सप्तम स्कंधात पोतन्नाने आपला
ाविलास प्रकर्षाने दाखविला आहे मूळ भागवतातला
म स्कंध भक्तचरित्राच्या दृष्टीने अत्यंत महत्त्वाचा आहे
द्रमोक्षाची कथा त्यातच आहे भक्तवत्सल भगवान गजें
ी आर्त हाक ऐकून मगर–मुखातून त्याला सोडविण्यासाठी
धावून आला, त्याचे पोतन्नाने सरसमनोज्ञ वर्णन केले
हे त्यातल्या चार पंक्ती अशा–

**...अनुचु अलबडु गृगमुन जदीय सोयंबु डै।**
**परियारबुनु जीर उभ्रगपतिन ब्रन्निपडा कर्णिका ।।**
**तर घम्मिल्लभु चक्कनोत्तडु विवाव प्रोद्धत श्री कुचो ।**
**परिचेलाचल मन वीडडु गज प्राणावनोत्साहि य ।।**

भावार्थ– मकराने गजेंद्राचा पाय पकडला हळूहळू तो
गजेंद्राला गिळू लागला गजेंद्र प्राणसंकटात सापडला त्याने
श्रीहरीचा धावा केला तो तत्काल मनोवेगाने भूतलावर उत
रला त्याने निघतेवेळी लक्ष्मीचा तर निरोप घेतला नाहीच,
शिवाय आपली शस्त्र, चक्र, गदा ही आयुधे घेण्याचेही त्याला
भान राहिले नाही

पोतन्ना भागवताचा अनुवाद करीत आहे, ही वार्ता लवकरच
तेलंगणात सर्वत्र पसरली भक्त आणि रसिक लोक पोतन्नाच्या
घरी येऊन झालेल्या अनुवादाच्या नकला करून नेऊ लागले,
त्याबरोबरच ते पोतन्नाची कीर्तीही गाऊ लागले ती ऐकून
दक्षिणेतल्या अनेक रसिक भूपतींना वाटले, की पोतन्नाला
आपल्या दरबारात आश्रय द्यावा आणि असा रससिद्ध कवी
आपल्या आश्रयाला आहे, हा अभिमान मिरवावा त्याला तशी
आमंत्रणेही येऊ लागली

पोतन्नाचा श्रीनाथ नावाचा एक मेहुणा होता तोही कवी
होता, पण त्याची प्रतिभा शृंगार–विलासात डुबून राहण्यातच
धन्यता मानी त्याला पोतन्नाच्या भागवतानुवादाचे मुळीच
कौतुक वाटत नसे तो पोतन्नाच्या काव्याला पदोपदी नाके
मुरडी श्रीनाथाला राचकोंडाच्या राजाचा आश्रय होता
तो राजाजवळ इतर कवींबरोबरच पोतन्नाविषयीही तुच्छतेचे
उद्गार काढी पण राजा जाणकार होता त्याला पोतन्नाची
योग्यता कळली होती त्याने श्रीनाथाजवळ पोतन्नाच्या भाग-
वताविषयी एके दिवशी विषय काढला व श्रीनाथाला म्हटले

'कविराज, पोतन्ना तुमचे मेहुणे आहेत असे ऐकतो
त्याच्या भागवतानुवादाबद्दल मी खूप प्रशंसा ऐकली आहे
त्याने आपले भागवत मला अर्पण करावे अशी माझी इच्छा
आहे त्या कामी तुम्ही त्याचे मन वळवलेत, तर मी तुम्हाला
भरपूर द्रव्य देईन '

श्रीनाथाच्या तोंडाला पाणी सुटले त्याला वाटले, की
पोतन्ना दरिद्री आहे त्यामुळे राजपुरस्कार मिळतो आहे हे
समजताच तो तत्काळ या गोष्टीला तयार होईल म्हणून तो
पोतन्नाच्या घरी गेला त्याने राजाची इच्छा पोतन्नाच्या कानी
घातली पोतन्नाला हा सारा प्रकार अनपेक्षित होता त्यामुळे
त्याचे मन संभ्रमात पडले होय म्हणावे तर आपल्या भक्तीला
व स्वाभिमानाला दूषण आणि नाही म्हणावे तर राजाज्ञेचा
अवमान आणि त्यामुळे अनेक अनर्थांना निमंत्रण त्यामुळे तो

'होय, नाही' काहीच म्हणेना. मग श्रीनाथाने आपल्या बहिणीला भरीस घातले. राजकृपेमुळे मिळणाऱ्या सुखोपभोगांचे तिच्यापुढे रसभरित वर्णन केले. तीही मग पोतन्नाला आपला ग्रंथ घेऊन राजाकडे जाण्याविषयी आग्रह करू लागली. पोतन्ना अगतिक झाला व तशाच अवस्थेत देवापुढे जाऊन बसला. डोळे मिटून त्याने देवाची प्रार्थना आरंभली. एवढ्यात साक्षात सरस्वतीच त्याच्यापुढे प्रकट झाली. मात्र ती प्रसन्न नव्हती. तिच्या डोळ्यांतून आसवे गळत होती. ती पाहून पोतन्नाने तिला विचारले–

**काटुक कंटि नीरु चनुकट्टु पयिबड नेलवेड्चे दो।**
**कैटभ दैव्य मर्दनुनि गादिलि कोडल ! यो मदंब यो।**
**हाटक गर्भुराणि निनु नाकटिकिन् गोनिपोयि यल्लक्र।**
**नीट किराट कीचकुल कम्म द्रिशुद्धिग नम्मु भारती॥**

भावार्थ– देवी शारदे ! काजळ घातलेल्या तुझ्या डोळ्यांतून हा अश्रुपात का बरे होतो आहे ? तुझे कमलमुख असे म्लान का झाले आहे ? कसले दुःख झाले आहे तुला ? ...समजलो. मी माझा भागवत ग्रंथ राजाला अर्पण करीन म्हणून तुला दुःख झाले आहे. सरस्वती, नको अशी कष्टी होऊस. मी तसे करणार नाही. माझी शारदा राजाच्या गळ्यात पडणार नाही.

यानंतर पोतन्नाने राजाच्या निमंत्रणाला नकार दिला. श्रीनाथाच्या तोंडून पोतन्नाचा नकार कळताच राजाला दुःख झाले आणि पोतन्नाचा रागही आला. त्याने कित्येक सैनिक बरोबर देऊन राजपुरोहिताला पोतन्नाकडे पाठवले. 'पोतन्ना सामाने वळत नसेल, तर बलप्रयोग करायलाही कचरू नका' असा राजाने पुरोहिताला आदेश दिला. राजपुरोहिताने पोतन्नाचे मन वळविण्याचा खूप प्रयत्न केला; पण पोतन्नाने त्याला एकच आणि अखेरचे उत्तर दिले, की माझा भागवत ग्रंथ भगवंताला केव्हाच समर्पित झाला आहे. आता तो दुसऱ्या कोणाला अर्पण करणे हे माझ्या हाती नाही. त्या उत्तराने सैनिक संतप्त झाले. पोतन्नाच्या भागवताची पोथी हस्तगत करण्यासाठी ते त्याच्या घरात घुसू लागले. पण श्रीरामाच्या अदृश्य शक्तीने त्यांचा मार्ग अडवला. तिने त्या सगळ्या सैनिकांना एकाएकी गलितगात्र केले. ते सगळे अपयश पदरात घेऊन राजाकडे परत गेले.

पोतन्नाचे समग्र भागवत तीस हजार पद्यांचे आहे. त्याने त्यात काव्य व संगीत यांचा दुग्धशर्करासंयोग केला आहे. श्री. एस्. लक्ष्मीनरसैया पोतन्नाविषयी लिहितात — आंध्रातल्या भक्तकवींमध्ये पोतन्नाचे स्थान सर्वश्रेष्ठ आहे. पोतन्नाने भक्तीचे इतक्या सजीवतेने वर्णन केल्यामुळेच भक्तीला दहावा रस होण्याची योग्यता लाभली. त्याच्याविषयी वसुराय नावाचा एक कवी आदरयुक्त भक्तीने पुढील पद्यपंक्ती लिहितो—

**बेरगु पडनेल वारी कवित्वमुनकु**
**ब्रदुकु पै यास कूडनु बाडु सेयु**
**घोर दारिद्रय दुःखंबु गुड्चुचकट**
**ये गतिनि बल्के पोतन्न भागवतमु ?**

भावार्थ –पोतन्नाची कविता ही आश्चर्याने पाहण्याजोगी वस्तू नाही. तिचे पठन केल्याने मायामोह दूर होतात. पोतन्ना आपल्या अठराविश्वे दारिद्र्याचे विष पीत पीत अशा अमृतमय भागवताची रचना कशी करू शकला, ही मात्र विस्मयजनक गोष्ट आहे.

पोतन्नाने भागवताशिवाय वीरभद्रविजयमु व नारायणशतकमु असे आणखी दोन ग्रंथ लिहिले आहेत. पण त्याच्या भागवतापुढे ते फिके ठरतात. **पाहा** – तेलुगू भाषा व साहित्य. [ पंचधारा– कार्तिक शके १८८०; पंचामृत; ते. उ. सा.; ते. वा.; आं. भा. ]

**पोतराज** महाराष्ट्रातील मरीआई या ग्रामीण देवतेचा एक उपासक. तो महार किंवा बहुशः मांग जातीचा असतो. पोतराज हा शब्द तमिळ भाषेतील पोट्टुराजू या



पोतराज

शब्दाचा मराठी अपभ्रंश आहे. मरीआईला गौरवाने लक्ष्मीआई असेही म्हणतात. त्यामुळे पोतराज हा मरीआईवाला किंवा

लक्ष्मीआईवाला या नावानेही ओळखला जातो.

पोतराज पुरुष असूनही तो स्त्रीसदृश वेष धारण करतो. कारण दक्षिण भारतात ग्रामदेवतांच्या आराधनेत स्त्रियांचे अथवा स्त्रीत्वाचा आभास करणाऱ्या पुरुषांचे प्रस्थ अधिक आढळते. लिबाचा पाला नेसून देवीचे दर्शन घेण्याची चाल पूर्वी होती. पण आता ते शक्य नसल्याने पोतराज कमरेभोवती हिरव्या खणांचा घागरा नेसतो व त्यावर घुंगरांची सैलशी माळ घालतो. त्याच्या पायात खडे भरलेले मोठे पितळी वाळे असतात. पोतराज स्त्रीप्रमाणे आपले केस वाढवून त्यांचा अंबाडा बांधतो व कपाळी कुंकवाचा मळवटही भरतो.

देवीची साथ येते तेव्हा अथवा पावसाळ्याच्या प्रारंभी मरीआईचा फेरा गावात येतो, अशी समजूत आहे. त्या वेळी पोतराज आपल्या अंगाला डावी-उजवीकडे डोल देत देत आणि डफाचा कडकडाट करीत गावात प्रवेश करतो. त्या वेळी त्याचे साथीदार सनई वाजवतात. त्यांच्याबरोबर मरीआईचा देव्हारा डोक्यावर घेतलेली एक स्त्री असते. ती अंगात आल्यासारखे करून देव्हाऱ्यासह नाचत असते. तिच्या एका हाती मोरपिसांचा कुंचा असतो. देवीच्या आगमनाची वार्ता देताना पोतराज पुढील गाणे म्हणतो –

**आलीया मरीबाई तिचा कळेना अनुभऊ**
**भल्याभल्यांचा घेतो जीवु । आलीया मरीबाई...**
**आलीया मरीबाई हा का सुटला तुझा वारा**
**दुनिया कापते थरथरा आलीया मरीआई ।**

पोतराज व त्याचे साथीदार यांचा ताफा चावडी, देऊळ, अथवा गावाच्या मध्यभागी असलेल्या एखाद्या पाराजवळ थांबतो. नंतर देवीला प्रसन्न करण्यासाठी पोतराज हातांत एक कोरडा घेतो. हा कोरडा म्हणजे तीन-चार इंच व्यासाचा, चार-पाच फूट लांब व टोकाशी निमुळता होत गेलेला एक आसूड असतो. त्याच्या हातात धरायच्या बाजूला गोल गोटा विणलेला असतो व त्यावर शेंदूर माखलेला असतो. तो उजव्या हाती घेऊन पोतराज तो हवेत जोराने फिरवतो व त्याचे फटाफट आवाज काढीत तो आपल्या अंगाभोवती मारून घेतो. हे चालू असताना तो देवीच्या देव्हाऱ्यासमोर उभा राहून पुढील आरोळ्या ठोकतो –

**बया ! दार उघड, बया ! दार उघड.**
**मरीआई बया ! दार उघड.**
**लक्ष्मीआई बया ! दार उघड.**

मग तो आपल्या दंडाला घट्ट दोरी बांधून दंडाच्या स्नायूंत तीक्ष्ण दाभण खुपसून रक्त काढतो. तेवढ्यानेही देवी प्रसन्न होत नाही, असे त्याला दिसले, तर तो आवेगाने आपल्या मनगटाला दातांनी चावा घेतो. त्या वेळी देव्हारा घेतलेली स्त्री देवीचा संचार होऊन नाचू लागते. ते मरीआई प्रसन्न झाल्याचे लक्षण होय.

जेव्हा पटकीची साथ सुरू होते, तेव्हा मरीआईचा गाडा गावाबाहेर घालवण्यासाठी पोतराजाला आमंत्रण दिले जाते. मग पोतराज एका छोट्या गाड्यावर मरीआईची मूर्ती बसवून गावकऱ्यांसह तो गाडा गावसीमेपलिकडे नेऊन टाकतो.

मरीआई ही देवी कडकलक्ष्मी या नावानेही प्रसिद्ध आहे. **पाहा** – कडकलक्ष्मी; पोट्टुराझू. [ म. लो. उ. ]

## पोता

यज्ञातल्या सोळा ऋत्विजांपैकी एक. ऋग्वेदात व ब्राह्मणांत त्याचा उल्लेख आढळतो (ऋ. १·९४·६; २·५·२; ऐ. ब्रा.६·१०; श. ब्रा. ४·३·४·२२). सोमयागांमध्ये तो सोमरस शुद्ध करण्याचे व सोमाला उद्देशून याज्या मंत्र म्हणण्याचे काम करीत असे. ब्राह्मणोत्तर काळात याचे महत्त्व कमी झालेले दिसते. [ श्री. विद्याधरशास्त्री भिडे ]

## पोत्ती मल्याळ

केरळीय ब्राह्मणांची एक जात. जे नंबुद्री या जातिनावाने ओळखले जात नाहीत, अशा केरळमधील सर्व ब्राह्मणांना ही संज्ञा आहे. यांचे स्थानपरत्वे दोन वर्ग पडतात – (१) केरळच्या प्राचीन भागांपैकी अगदी दक्षिणेकडे पूर्वी राहत असलेले व (२) त्रिवांकुरमध्ये येऊन नंबुद्री लोकांत मिसळलेले. स्थानत्तिल पोत्ती व पत्तिलतू पौत्ती हे लोक पहिल्या वर्गात मोडतात. दुसऱ्या वर्गात तिकवल देशी यांचा समावेश होतो. पोत्ती ब्राह्मण अद्यापही मंदिरातील पूजेअर्चेचा व्यवसाय करतात. यांच्या वारसा कायदा, समाजरचना, नावे, इ. गोष्टी नंबुद्री ब्राह्मणांप्रमाणेच असतात. [ म. ज्ञा. को.]

## पोन्न

(इ. स. चे १० वे शतक) एक कन्नड कवी. हा जैन होता. पंप, पोन्न व रन्न हे तिघे कन्नड कवी रत्नत्रय या नावाने प्रख्यात आहेत. पोन्न हा राष्ट्रकूट राजा कृष्ण (तिसरा) याच्या दरबारात होता. राजाने त्याला कविचक्रवर्ती ही पदवी दिली होती. तो कवी, तसाच प्रकांडपंडितही होता. त्याने एक आगमिक व दुसरे लौकिक अशी दोन काव्ये रचली. मात्र यांतले लौकिक काव्य भुवनैकरामाभ्युदय हे अजून उपलब्ध झालेले नाही. त्यात रामकथा सांगितलेली आहे, असे म्हणतात.

शांतिपुराण हे पोन्न कवीचे चंपूकाव्य असून, त्यात १६ वा तीर्थंकर शांतिनाथ याचे चरित्र वर्णिलेले आहे. जैन संप्रदायाच्या तत्त्वज्ञानाचे निरूपणही त्यात उत्तम प्रकारे केलेले आहे. एक उत्तम जिनपुराण म्हणून या ग्रंथाला प्रतिष्ठा लाभली

आहे. त्यातील काही श्लोक अतिशय काव्यमय असून, त्यांत पोन्नाची श्रेष्ठ रचनाशैली दिसून येते. त्याने कालिदासाच्या सुमारे दोनशे श्लोकांचे कन्नडमध्ये भाषांतर केले आहे. मात्र तो गर्विष्ठ असून, स्वतःला कालिदासापेक्षाही श्रेष्ठ समजत असे. जिनाक्षरमाले हे त्याचे लहानसे काव्य म्हणजे एक जिन-स्तोत्र आहे. त्यात त्याने क पासून ळ पर्यंतचे वर्ण आद्यंती येतील अशी रचना केली आहे. [ म. च. को.; क. द ]

**पोमला** एक जात. या लोकांची वस्ती मुख्यत्वे गुजरातेत आढळते. त्यांच्या भाषेचे तेलुगू भाषेशी बरेच साम्य आहे. त्यावरून ते तेलंगणातून गुजरातेत आले असावे, असे म्हणतात. आदिवासीत त्यांची गणना होते. खेळणी, केरसुण्या, टोपल्या, पाटचा, इ. वस्तू बनवणे, हा यांचा व्यवसाय आहे. हे लोक लक्ष्मीला भजतात. यांच्यांत स्त्री प्रसूत झाल्यावर तिला केले जाणारे सर्व सोपस्कार तिच्या नवऱ्यालाही करतात.

**पोयगै आळवार** ( इ. स. चे ५ वे शतक) तमिळनाड-मधल्या आळवार संतांपैकी एक. मुनित्रय किंवा मुदलाळवार या तीन आळवारांमध्ये याला पहिले स्थान



पोयगै आळवार

आहे. म्हणूनच याला आदिकवी अशी उपाधी लाभली आहे. याचा जन्म कांचीच्या उत्तर दिशेला असलेल्या तिरुवेहा गावा-तल्या एका तलावात एका कमल पुष्पांतून झाला, अशी आख्या-यिका आहे. पोयगै याचा अर्थ तलाव असाच आहे. याला विष्णूच्या शंखाचा अवतार मानतात. याचे अधिकृत चरित्र उपलब्ध होत नाही. त्याच्या काव्यातल्या काही उल्लेखांवरून त्याजा जिवनावर थोडासा प्रकाश पडतो, तो असा –

पोयगैला बाळपणापासूनच विष्णुभक्तीचा छंद लागला होता. पुढे त्याने योगाचेही विशेष ज्ञान मिळवले. हा वेदोपनिषदांचा ज्ञाता होता. तो एके ठिकाणी कुठेच राहिला नाही. दक्षिणेत सर्वत्र हिंडून त्याने विष्णुभक्तीचा प्रचार केला. इतर कोणाही आळवारामध्ये नसेल, इतकी धार्मिक सहिष्णुता त्याच्या अंगी होती. म्हणूनच कोणत्याही अन्य धर्माचे किंवा पथाचे त्याने खंडन केले नाही. भक्ती हेच त्याच्या जीवनाचे एकमेव ध्येय होते. एका ठिकाणी तो म्हणतो. ' माझे मुख केवळ त्या चक्रधारी विष्णूचेच स्तवन करील. माझे कान केवळ त्याच्याच गुणगाथा ऐकतील. माझे हात केवळ त्यालाच नमस्कार करतील; अन्य कोणाला नाही. भक्ती हाच सरल आणि सर्वश्रेष्ठ मार्ग आहे.'

**अवरवर ताम नाम अरिन्तावारेत्ती**
**इव खिरेम्पेरु मानेन्दु चुवरमिचै**
**चार्तियुम वैत्तुम तोळवार उलक्लन्त**
**मूर्तियुरुवे मुदल**

अर्थ – भक्ताला जे रूप आवडते, तेच भगवंताचे रूप होय. त्याला जे नाम आवडते, तेच भगवंताचे नाम होय. भक्त ज्या ढंगाने उपासना करील, तोच ढंग मान्य करून चक्रधर विष्णू त्याचा उपास्य बनतो.

आपल्या भक्तियुक्त अंतःकरणाची आर्तता त्याने पुढील पद्यात व्यक्त केली आहे –

**उर्णवार यार उन पेरुमै । ऊळितोरुळी**
**उर्णवारार उन्नुरुवन्तन्ने । उर्णवारार ।**
**विण्णकत्ताय । मण्णकत्ताय । वेंकटत्ताय । नाल्वेद**
**पण्णकत्ताय । नी किडन्तपाल ।**

अर्थ – युगामागून युगे निघून जात आहेत. आम्ही केवळ आत्मनिवेदन करीत राहिलो आहो. हे भगवंता, तू मुखावर मंद-मधुर स्मित धारण करून चिरकाल विराजत आहेस. आम्ही असहाय्यपणे तुला पुकारीत राहिलो आहो. पण आजवर तुझे नाम आणि रूप रहस्यमयच राहिले आहे.

पोयगैने भगवंताच्या लीला वर्णिताना तमिळनाडमधल्या अनेक वैष्णव क्षेत्रांतील विष्णूच्या अर्चावतारांचीही स्तुती केली आहे. पोयगैची १०० पद्ये प्रबंधमच्या इर्यपा विभागात संग्रहीत असून, ती अंतादी छंदात रचल्यामुळे मुदल तिरुवन्तादी या नावाने प्रसिद्ध आहेत. [ त. प्र. हि. कृ. ]

**पोयते** विवाहविधीतला एक सोहळा. खानदेशातील अब्राह्मण लोकांत पोयत्याची प्रथा आहे. त्यासाठी कच्च्या सुताची जानव्यापेक्षा जाड अशी एक लडी बनवितात, ती हळदीने पिवळी करतात व हळद लागल्यानंतर ती वधू-वरांच्या गळ्यात बांधतात. या लडीलाच पोयते अशी संज्ञा आहे. पोयते घालताना जमलेल्या बायका गाणे म्हणतात, त्याचा आशय असा ब्रह्मदेवाने देवकापसाचा ताणा कापला. विष्णू आणि कृष्ण यांनी त्याच्या काडच्या भरल्या. तिथून हे पोयते आणले आणि ते वधू-वराच्या गळ्यात बांधले. [ ऐ. ले. च. ग्रंथ ८ ]

**पोरबंदर** सौराष्ट्रातील एक पुण्यक्षेत्र. श्रीकृष्णाचा मित्र सुदामा याचे हे गाव असल्यामुळे याला



सुदाम्याचे मंदिर – पोरबंदर

सुदामपुरी असेही म्हणतात. भाविक जनांमध्ये हेच नाव अधिक प्रचलित आहे. या गावात सुदाम्याचे एक मंदिरही आहे. खाडीत पोरवाई मातेच्या मंदिराचे अवशेष असून, हे मंदिर सुमारे आठशे वर्षांपूर्वीचे असावे, असा विद्वानांचा तर्क आहे. पांढऱ्या स्वच्छ दगडांनी बांधलेले हे नगर अतिशय सुदर दिसते. पोरबंदरच्या राजांना राणा असे म्हणत. भाटिया, लोहाणा, मेमण, इ. जातीचे लोक इथे राहतात.

म. गांधीचा जन्म इथेच झाला. त्यांचा जन्म ज्या घरात झाला त्याला लागूनच कीर्तिमदिर नामक एक भव्य वास्तू बांधून गांधीजीचे स्मारक करण्यात आलेले आहे. त्याला लागूनच एक छानदार इमारत नानजी कालिदास यांच्या प्रेरणेने बांधली गेली आहे. तिची उंची ८० फूट आहे. इथे गांधीजीच्या जीवनासंबंधीच्या चित्रांचे प्रदर्शन मांडून ठेवलेले आहे.

मूळ द्वारका म्हणून ओळखले जाणारे स्थान इथून १६ मैलांवर विसवाडा येथे आहे. तिथून दोन मैलांवर खाडीपलिकडे हर्षदमाता (हरसिद्धी) देवीचे मंदिर आहे. असे म्हणतात, की प्रथम ही देवी पर्वतावर होती व ती उग्र होती. तिच्या दृष्टीच्या टप्प्यात येणारी जहाजे समुद्रात बुडत असत. पुढे झगड्शाह या भक्ताच्या आराधनेमुळे देवी शांत व सौम्य बनली आणि जहाजे बुडेनाशी झाली. नंतर तिचे मंदिर डोंगराच्या पायथ्याशी बांधण्यात आले तसेच महाराजा विक्रमादित्याने इथेच देवीची आराधना करून मग येथील देवी उज्जयिनीला नेली, अशी आख्यायिका सांगतात. उज्जयिनीच्या हरिसिद्धी मदिरात देवीचा निवास दिवसा असतो व पोरबंदरच्या मंदिरात रात्री असतो, असे म्हणतात. दोन्ही ठिकाणी मुख्य पीठावर यंत्र असून, दोन्ही ठिकाणची देवीची मूर्ती एकसारखी आहे. [ कल्याण–तीर्थांक; लोकयात्रा; वि. मु. रा. प. ]

**पोरवाल** राजपूतांपैकी एक जात. हे लोक एका काळी गुजरातमधल्या पाटण गावचे रहिवासी होते. सांप्रत



पोरवाल पुरुष

त्यांची बरीचशी वस्ती राजस्थानात आहे. सुमारे ८०० वर्षां-

पूर्वी या लोकांनी जन धर्माचा स्वीकार केला, असे म्हणतात. पवार, राठोड, सोळंखी इ. त्यांची आडनावे आहेत. हे बहुतेक लोक सावकारीचा धंदा करतात. हे डोक्याला पगडी किंवा फेटा न बांधता एक दुपट्टा बांधतात.

पोरवाल लोक मुलीचे मोठ्या प्रमाणावर देज घेतात. त्यामुळे त्यांच्या समाजात मुलगी ही द्रव्याची पेटी समजली जाते. म्हणूनच घरात मुलगी जन्मली, की त्यांना मोठा आनंद होतो. सूप वाजवून ते तिच्या जन्माची वार्ता जाहीर करतात.

हे लोक मृतांचे काहीही अंत्यसंस्कार करीत नाहीत; प्रेताला भडाग्नी देऊन त्याचे दहन करतात. [ रा. जा.]

## पोरस

शिकंदरच्या आक्रमणाला समर्थपणे तोंड देणारा एक भारतीय राजा. याला पुरू किंवा पौरव असेही म्हणत. हा केकय देशाचा राजा होता.

सनपूर्व ३२५ या वर्षी मॅसेडोनियाचा सम्राट शिकंदर मोठ्या सैन्यानिशी भारतावर चालून आला. त्याचे प्रचंड सैन्य आणि कुशल सेनापतित्व यांच्यापुढे सीमेवरच्या कोणत्याही भारतीय राजाचा अथवा गणराज्याचा टिकाव लागला नाही. काही थोडे अपवाद वगळले, तर बहुतेक राजे युद्ध न करताच त्याला शरण गेले. तक्षशिलेचा राजा अंभी याने तर शिकंदराचे स्वागतच केले. त्यानेच शिकंदरला आमंत्रण दिले होते.

अंभीच्या या घरभेद्या वृत्तीची पोरसाला चीड आली व शिकंदराच्या आक्रमणाला पक्का पायबंद घालावा, म्हणून त्याने आपली प्रचंड सेना तयार केली. अखेर झेलमच्या किनाऱ्यावर शिकंदर आणि पोरस यांच्या सेनांची गाठ पडली. अलिकडच्या तीरावर पोरसने आपल्या सेनेची व्यूहरचना केली व शिकंदर नदी उतरून अलिकडे येऊ नये, यासाठी त्याने त्याचे सर्व मार्ग बंद करून टाकले. पावसाळा चालू असल्याने झेलमचे पात्र दुथडी भरून वाहत होते. त्यामुळे सुमारे एक महिना उलटला तरी शिकंदराला नदी उतरता आले नाही. मग एके दिवशी तो आपल्या सैन्याचे काही निवडक विभाग बरोबर घेऊन नदीच्या वरच्या बाजूला जवळ जवळ वीस मैल गेला व तिथे नदी पार करून अलिकडे आला. मग त्याने पोरसाच्या सेनेवर मागच्या बाजूने हल्ला करून एकच गोंधळ उडवून दिला. याच वेळी पुढच्या बाजूनेही ग्रीक सैनिकांनी पोरसवर हल्ला चढवला. अशा प्रकारे कचीत सापडल्यामुळे व सैन्यातील हत्ती, घोडे बिथरल्यामुळे पोरसचा पूर्ण पराभव झाला. तो स्वतः अखेरपर्यंत लढत राहिला. त्याला शेवटी शिकंदराचा बंदिवान व्हावे लागले.

बंदिवान अवस्थेत त्याला शिकंदरापुढे उभे केले असता, त्याच्या स्वातंत्र्याभिमानाचा गौरव करून शिकंदराने त्याला विचारले, की मी तुला कसे वागवावे ? यावर पोरसाने उत्तर दिले, की अर्थातच एखाद्या स्वतंत्र आणि सार्वभौम राजासारखे ! या त्याच्या निर्भीड उत्तरामुळे खूष होऊन शिकंदराने त्याला त्याचे सर्व राज्य व स्वतः जिंकलेला बराचसा मुलूख देऊन सन्मानाने परत पाठवले. [ भा. यु.; हि. क. इं. पी.; स. सो. पा. ]

## पोरोजा

एक मिश्र जमात. ओडिसातला गंजम जिल्हा आणि आंध्रातला विजगापट्टम जिल्हा या भागात हे लोक वसले आहेत. यांना परजा असेही म्हणतात. या लोकांत अनेक जातींचा समावेश आहे. परजा व पोरोजा हे दोन्ही शब्द संस्कृत प्रजा शब्दाचे अपभ्रंश आहेत. इ. स. च्या २ऱ्या शतकापासून या लोकांची इथे वस्ती आहे. इ. स. च्या १७ व्या शतकात गंगवंशानुचरितम नामक एक काव्य रचलेले आहे. त्यात पोरोजांविषयी सांगितले आहे, ते असे--

ओडिसाच्या गंग वंशातील एक राजपुत्र दक्षिणेकडे गेला आणि त्याने गुडरी या ठिकाणी राज्य स्थापन केले. जाताना त्याने आपल्याबरोबर काही ओडिया लोकही नेले होते. त्यांना त्याने तिथल्या जमिनी इनाम दिल्या. त्यामुळे पूर्वीपासून तिथे वसलेल्या लोकांना त्यांचे दास होण्याशिवाय गत्यंतर उरले नाही. अशा रीतीने हे लोक या नवीन जमीनदारांचे प्रजा किंवा रयत बनले.

पोरोजा लोकांचे बारा विभाग असून, ते ज्या भागात राहतात, त्यावरून त्यांना नावे मिळालेली आहेत. त्यांपैकी काही प्रमुख विभाग असे--

(१) बोडो पोरोजा -- हे गोमांस खात नाहीत.

(२) सनो पोरोजा-- हे गोमांस खातात.

(३) जोडिया पोरोजा-- हे गोमांस खातात व एका विशिष्ट तऱ्हेने पागोटे बांधतात.

(४) पेरांग पोरोजा-- यांच्या स्त्रिया फक्त पितळेचे दागिने घालतात आणि नाकात एक त्रिकोणी अलंकार घालतात.

(५) बारंग जोडिया-- हे गोमांस खातात व ओडिया भाषा बोलतात.

(६) पेंगू पोरोजा-- म्हैस व रेडा यांचे मांस खाणारे व न खाणारे असे यांचे दोन भेद आहेत. कोंढ लोकांच्या बोलीशी यांच्या बोलीचे खूप साम्य आहे.

(७) खोंडी किंवा कोंडी पोरोजा-- हा कोंढ लोकांचाच एक विभाग असून, हे लोक गोमांस व म्हशीचे मांस खातात. ते कोडू किंवा कोंढ बोली बोलतात.

(८) बोंडा, बुंडा किंवा नंगा पोरोजा-- हे गदबापैकी असून, त्यांचीच भाषा बोलतात.

(९) तगर पोरोजा— हे कोयांपैकी असून, ते कोया व काही ठिकाणी तेलुगू बोलतात.

(१०) दिदायी पोरोजा— हे ओडिया भाषा बोलतात.

**वेषभूषा**—पोरोजा पुरुष कमरेभोवती एक व डोक्याभोवती एक फडके गुंडाळतो. तरुण पोरोजा डाव्या हातात एक-दोन धातूची कडी व गळयात रंगीत मण्यांच्या माळा घालतो. पोरोजा स्त्री बहुधा तांबडे काठ असलेले पांढरे वस्त्र नेसते. ते अर्ध्या मांड्या झाकण्यापुरतेच असते. वस्त्राचा एक भाग डाव्या खांद्यावर घेऊन त्या तिथे त्याची गाठ मारतात. त्या रंगीत मण्यांच्या खूप माळा आणि धातूची एक-दोन कडी घालतात. बोंडो पोरोजा स्त्रीच्या कानाच्या पाळीला अनेक छिद्रे पाडलेली असतात आणि त्यांत वलये अडकवलेली असतात. त्या डाव्या हातात कोपरापर्यंत पितळेच्या बांगड्या घालतात आणि उजव्या हातात फार थोड्या बांगड्या घालतात किंवा अजिबात घालीत नाहीत. त्यांच्या प्रत्येक बोटात अंगठी असते

बोंड किंवा नंगा याचा अर्थ नग्न असा असून, या स्त्रिया कमरेभोवती एक हातभरच चौरस वस्त्र गुंडाळतात. असे तोकडे वस्त्र त्या का नेसतात, याबद्दल एक आख्यायिका सांगतात, ती अशी— सीता एकदा अपुऱ्या वस्त्राने नदीत स्नान करीत असताना, बोंड स्त्रियांनी तिला पाहिले व त्या हसल्या. तेव्हा तिने त्यांना शाप दिला, की 'पुढील काळात तुम्ही सर्वजणी डोक्याचे मुंडण कराल व फक्त लज्जारक्षणापुरते वस्त्र कमरेभोवती गुंडाळाल.' तेव्हापासून त्या डोक्याचे मुंडण करून डोक्याभोवती बांबूचे गोल कडे गुंडाळतात व तोकडे वस्त्र नेसतात.

पोरोजांच्या प्रत्येक खेड्याभोवती कुंपण असते. त्यांची घरे दोन किंवा तीन रांगांत बांधलेली असतात. प्रत्येक घराला स्वयंपाकघर, कोठीची खोली व झोपण्यासाठी खोली, अशा तीन खोल्या असतात. त्या सर्व अलग अलग असून, त्यांच्याभोवती भिंत असते. काही घरांना गोठा व पानगृह असते. गावातील तरुण मुली व मुले यांच्यासाठी स्वतंत्र शयनगृहे असतात.

गावाचा एक प्रमुख असतो व तो गावातील भांडणतंटे मिटवतो. हे लोक डोंगरउतारावर शेती करतात आणि गुरे व डुकरे पाळतात.

**विवाहप्रथा** – या लोकांत गिधाड, वाघ, नाग, इ. देवके असून, समान देवकांत लग्नसंबंध होत नाही. सर्वसाधारणपणे एखादा मुलगा एखादी मुलगी पसंत करतो आणि आईबापांना आपली पसंती कळवतो. मग ते मुलीच्या आईवडिलांकडे जातात. मुलीच्या आईबापांना जर हा संबंध पसंत असला, तर ते देज आणि विवाहमुहूर्त या गोष्टी ठरवतात. लग्नाच्या आदल्या दिवशी नवरा मुलगा आपल्या काही मित्रांसह नवरी मुलगी ज्या ठिकाणी एकटी सापडेल, अशा ठिकाणी दबा धरून बसतो. आणि ती तिथून जाऊ लागली, की तिला पकडून आपल्या घरी घेऊन जातो. मग मुलीचे आईबाप काही लोकांसह तिला सोडवून आणण्यासाठी जातात. नंतर दोन्ही पक्षांत लुटुपुटीची लढाई होते आणि सर्वजण दमल्यावर वराच्या घरी त्यांना मेजवानी होते.

बारंग जोडिया लोकांत, मुलाने मुलगी पसंत केल्यावर मुलाचे आईबाप तिच्या आईबापांसाठी दारू व तांदूळ घेऊन जातात. त्यांनी या वस्तूचा स्वीकार केला, तर त्यांना हा संबंध पसंत आहे, असे समजतात. त्यानंतर पुन्हा एका वर्षाने मुलाचे आईबाप तांदूळ, दारू, कापड व काही पैसे घेऊन मुलीच्या घरी जातात व पुन्हा मुलीला मागणी घालतात. त्याच्या दुसऱ्या दिवशी संध्याकाळी वधू आपल्या नातेवाइकासह वराच्या गावी जाते. वराच्या घरासमोर दोन खांब पुरलेले असतात आणि त्यांची टोके दोरीने एकत्र बांधलेली असतात. दोरीला एक भोपळा टांगलेला असतो. वधू–वर घरासमोर आल्यावर एक माणूस तो भोपळा तोडून टाकतो. मग वधू–वर घरात प्रवेश करतात. त्या वेळी वराचे आईबाप वधूला नवीन कापड देतात. जमलेल्या लोकांना दारू वाटतात. नंतर स्त्री–पुरुषांचे नृत्य होते आणि दुसऱ्या दिवशी जेवणावळ होते. दुपारी जातिप्रमुखांच्या उपस्थितीत वधूला वराच्या स्वाधीन करतात. एक आठवडाभर वधू सासरी राहते आणि मग माहेरी येते. तिथे वर्षभर राहून ती पुन्हा सासरी जाते.

बोंड पोरोजा लोकांतील विवाहप्रकार असा – एखादा तरुण आपल्या काही मित्रांना घेऊन गावातील मुलीच्या शयनगृहात जातो. तिथे प्रत्येकजण आपल्यासाठी एक मुलगी पसंत करतो. मग त्या मुलामुलींत शीघ्र कवित्वाची चढाओढ लागते व काव्यातच परस्परांची थट्टामस्करी चालते. त्यांपकी एखाद्या मुलीने एखाद्या तरुणाचा स्वीकार करायचा, असे ठरवले, तर तो शेकोटीतले एक कोलीत उचलतो आणि ते तिच्या वक्षःस्थळाला लावतो. नंतर घरी जाऊन एका मित्राबरोबर त्या मुलीसाठी पितळेची एक बांगडी पाठवतो. काही महिन्यांनी मुलाचे आईबाप त्या मुलीच्या आईबापांकडे जातात व मुलीला मागणी घालतात. तिथे त्यांच्यासाठी मेजवानी होते. मग मुलगी आपल्या दोन मैत्रिणींसह त्यांच्याबरोबर वराच्या घरी जाते. मुलाचे आईबाप नंतर मुलीच्या घरी काही तांदूळ पाठवतात. मुलीच्या मैत्रिणीनाही तेवढेच तांदूळ देतात. मग त्या तिघी–जणी पुन्हा आपल्या घरी परत येतात. काही महिन्यांनंतर मुलाचे आईबाप मुलीच्या घरी जाऊन तिला आपल्याकडे घेऊन येतात.

मग भोजन आणि नृत्य हे कार्यक्रम होतात आणि एवढे झाल्या-वर मुलगा व मुलगी पति–पत्नी म्हणून राहू लागतात.

काही वेळा काही बोंड तरुण, मुली शोधण्यासाठी दुसऱ्या गावी जातात व त्या गावच्या लोकांना आपली इच्छा सांगतात. गावचे लोक ती मान्य करतात आणि त्यांना एक प्रकारचे मद्य देतात. मग हे तरुण गावात एक भुयार खोदतात. एकाच माण-साला आत जाता येईल, एवढेच त्याला प्रवेशद्वार ठेवतात. मग तरुण व तरुणी समान संख्येने आत शिरतात. तिथे प्रत्येक तरुण एक मुलगी पसंत करतो आणि तिचे बोट धरून बाहेर येतो. वडीलधारी मंडळी मुलींच्या हातात बांगड्या घालतात. मग ते तरुण आपापल्या पसंतीच्या मुलीच्या घरी जातात. तिथे मुलींचे आईबाप त्यांना आशीर्वाद देतात. मग मुलगा वधूला घेऊन आपल्या घरी जातो.

नंगा पोरोजा लोकांत विवाहाची वेगळी प्रथा आहे, ती अशी-ते नऊ फूट व्यासाचा एक खड्डा खणतात आणि उन्हाळ्यात गावातल्या सर्व उपवर मुलींना त्या खड्ड्यात ठेवतात. मग ज्याने त्यांच्यापैकी एक मुलगी आधीच पसंत करून ठेवलेली असते, असा एक तरुण तिथे येतो आणि त्या मुलीला मागणी घालतो. तिने जर नकार दिला, तर तो दुसऱ्या मुलीला विचारतो. याप्र-माणे एखाद्या मुलीकडून होकार मिळेपर्यंत हा कार्यक्रम चालतो.

सर्व पोरोजा लोकांना विधवाविवाह मान्य आहे. विधवेला धाकट्या दिराशी लग्न करता येते.

**देवधर्म** – जोडिया आणि पेंगू पोरोजा हे भूमिदेवतेची तीन वर्षांनी एकदा पूजा करतात. गावाबाहेर एखाद्या झाडाखाली तिच्या नावाने एक दगड बसवलेला असतो. पूजेच्या वेळी तिला गाय, बकरे, डुक्कर व कबूतर बळी देतात. बोंड पोरोजा चैत्र आणि माघ या महिन्यांत ठाकुराणीचा उत्सव करतात. गाव-सीमेवर असलेल्या निसान देवतेलाही ते भजतात. ही त्यांच्या गावाची संरक्षक देवता असते. याशिवाय, पावसाळा संपल्यावर ते एका गुहेत जाऊन वाघ देवतेची पूजा करतात आणि तिला बकरे किंवा रेडा बळी देतात. मग ते दारू पितात व ढोलाच्या साथीवर नृत्य करतात.

श्रावण महिन्यात ते नवीन धान्य खाण्याचा उत्सव करतात. पौष पौर्णिमेला ते ग्रामदेवतांच्या नावे रेडा बळी देतात. मिष्टान्नभोजन, मद्यपान आणि नृत्य यांत ते आदला दिवस घालवतात. पौर्णिमेच्या रात्री गावातील तरुण मुली गाणी गात घरोघर जाऊन तांदूळ मागून आणतात. मग पहाटे गावाच्या मध्यभागी शेकोटी पेटवून त्यावर त्याचा भात शिजवतात. सूर्योदय झाल्यावर सर्वजण स्नान करतात, नवे कपडे घालतात आणि मिष्टान्न भोजन करतात.

पोरोजांचा भूतेखेते व जादूटोणा यांवर जबर विश्वास आहे.

**मर्तिकप्रथा** – हे लोक सोयीनुसार प्रेते जाळतात किंवा पुर-तात. त्यानंतर सर्वजण जवळच्या नदीत किंवा तळ्यात स्नान करून एक उभट दगड घेतात आणि तो गावाबाहेर उभा पुर-तात आणि दुसरा एक सपाट दगड त्याच्या मुळाशी ठेवतात. उभ्या दगडाला एक चिंधी गुंडाळतात आणि त्याच्या मागे टोकाशी चिरलेला बांबू उभा करतात. तिसऱ्या दिवशी आणि दहाव्या दिवशी मृताला सपाट दगडावर पिंड देतात. दहाव्या दिवशी रात्री मृताला अर्पण करण्यासाठी केलेले पदार्थ घेऊन घरातील माणूस त्याला जाळलेल्या किंवा पुरलेल्या जागी जायला निघतो. अर्ध्या वाटेत पोचल्यावर तो मृतात्म्याला हाक मारतो. त्या वेळी मृताला खांदा दिलेल्या एखाद्याच्या अंगात मृतात्मा संचरतो आणि त्याला ओ देतो. मग त्या माण-साला मृताच्या घरी नेतात. तिथे रांगोळीने यम, शनी व भूत यांच्या आकृती काढून त्यांच्या मध्यभागी तीन दाणे ठेवतात. त्यांवर एक भांडे पालथे घालतात. अंगात आलेला माणूस पायाने ते भांडे ठोकरतो. त्या वेळी दाणे ज्याच्या आकृतीवर सापडतील, त्या देवाने मृतात्म्याला नेले असे समजतात.

जोडिया पोरोजा प्रेत जाळतात, जवळच एका खड्ड्यात त्याची राख पुरतात आणि त्याच्यावर पुष्कळ लहान लहान दगड ठेवतात. त्या दगडांत एक खांब पुरतात आणि त्यावर बारा दिवस पाणी ओततात. हे लोक तीन दिवस आशौच पाळतात आणि चौथ्या दिवशी एरंडेल व हळद अंगाला लावून स्नान करतात. [का. ट्रा. स. इं.; से. इं. १९३१]

## पोवाडा

एक मराठी काव्यप्रकार. याला पवाडा असेही म्हणतात. वीरांच्या पराक्रमांचे, विद्वानांच्या बुद्धि-मत्तेचे, तसेच एखाद्याच्या सामर्थ्य, गुण, कौशल्य, इ. गुणांचे काव्यात्मक वर्णन, प्रशस्ती किंवा स्तुतिस्तोत्र म्हणजे पोवाडा, असा पोवाडा शब्दाचा अर्थ महाराष्ट्र शब्दकोशात दिला आहे. श्री. कृ. पां. कुलकर्णी यांनी संस्कृत भाषेतील प्र + वद् = स्तुती करणे, या धातूपासून, पोवाडा शब्द व्युत्पादिला आहे.

एखाद्याची एखाद्या चांगल्या कामाबद्दल स्तुती करण्याची रीत वैदिक कालापासून चालत आलेली आहे. वैदिक वाङ्मया-तील गाथा या अशाच स्तुतिपर आहेत. त्यांतल्या नाराशंसी किंवा नरप्रधान गाथा म्हणजे महापुरुषांच्या आयुष्यातील मह-त्त्वाच्या प्रसंगांवर व त्यांच्या दानशूरतेबद्दल रचलेले पोवाडेच होत. अथर्ववेदात परीक्षितगाथांचा उल्लेख आहे. त्याचप्रमाणे, सम्राटाभिषेक झाल्यावर इंद्र आसंदीवर बसला असता, विश्वे-देवांनी अभ्युत्क्रोश केला, असे ऐतरेय ब्राह्मणात म्हटले आहे.

हा अभ्युत्क्रोश म्हणजे इंद्राचे गुणसंकीर्तनच होय, असे सायणाचार्यांनी त्यावर भाष्य केले आहे. इंद्राला त्याच्या पराक्रमाची आठवण करून दिल्यावर तो अधिक उत्साहसंपन्न व कार्यक्षम होईल, या हेतूने विश्वेदेवांनी त्याचे हे स्तुतिस्तोत्र गायिले आहे. हाच अभ्युत्क्रोश कालौघात परिवर्तन पावला, यादवकालात भाटाच्या बिरुदगायनात प्रकट झाला आणि तोच पुढे शिवकालात भाटांच्या जागी आलेल्या शाहिरांच्या मुखाने पोवाड्यांच्या रूपात प्रकट झाला, असे म. ना. सहस्रबुद्धे यांनी म्हटले आहे.

अशा प्रकारची स्तवनात्मक कवने इ. स. च्या १० व्या शतकापासून हिंदीत किंवा तत्सम भाषेत रचली जात होती. त्यांना रासो असे म्हणत. पृथ्वीराज चौहान याचा भाट चंद बरदाई याचे पृथ्वीराज रासो हे काव्य म्हणजे पृथ्वीराजाचा पोवाडाच आहे. राजस्थानातून काही राजपूत कुळे महाराष्ट्रात आली, तेव्हा त्यांच्याबरोबर त्यांचे भाटही आले. त्यांपैकी काही पुढे महाराष्ट्रातच स्थायिक झाले. त्यांनी आपला भाटगिरीचा म्हणजे पोवाडे रचून गाण्याचा पेशा कायम ठेवला. उत्तर पेशवाईत प्रसिद्धीस आलेला सिद्धनाथ ऊर्फ सिदू रावळ शाहीर, हा असा भाटच होता. भूषण नावाचा एक कवी शिवाजीमहाराजांच्या बरोबर काही काल होता. त्याने शिवाजीमहाराजांच्या चरित्रातील काही रोमहर्षक प्रसंग काव्यात वर्णिले आहेत, तेही पोवाडा या सदरातच जमा होतील.

पूर्वीच्या काळी पोवाडे रचणे आणि ते सदरेवर म्हणून दाखवणे, हे काम गोंधळी लोकांचे असे. पुढे उत्तर पेशवाईत तमाशेवाल्यांचे स्वतंत्र फड निर्माण झाले. या फडांतल्या लोकांपैकी ज्यांच्या अंगी कवित्वशक्ती असे, ते शाहीर पोवाडे व लावण्या रचीत. गोंधळी लोक संबळ व तुणतुण्याच्या साथीवर पोवाडे म्हणत; तर शाहीर डफाच्या साथीवर ते गात.

पोवाड्यांची भाषा व रचना ओबड धोबड असते. त्यांत मुख्यत्वे वीररसाचा आविष्कार असतो. वीर आणि मुत्सद्दी पुरुषांच्या लढाया, त्यांचे पराक्रम, त्यांची कारस्थाने, इत्यादींचे जोरकस शब्दचित्र पोवाड्यात काढलेले असते. पोवाड्यांमध्ये सामान्यत. राजकीय इतिहासच वर्णिलेला असतो काही पोवाडे एखादी महत्त्वाची राजकीय घटना घडल्यानंतर लगेच रचलेले आहेत. त्यामुळे ऐतिहासिक माहितीच्या दृष्टीनेही त्यांचे महत्त्व विशेष आहे.

सांप्रत उपलब्ध असलेल्या पोवाड्यांची संख्या सुमारे तीनशे आहे. त्यांपैकी शिवकालीन म्हणजे शिवाजीमहाराजांपासून पहिल्या शाहू महाराजांपर्यंतच्या काळातले सात आहेत, पेशवेकालीन सुमारे दीडशे आहेत. बाकीचे अव्वल इंग्रजीतील आहेत.

अफझलखानवध, तानाजी व बाजी पासलकर हे तीनच पोवाडे खुद्द शिवाजीमहाराजांच्या स्वराज्यप्रयत्नांवर व त्यांच्या प्रभावळीवर रचलेले आहेत. अफझलखानवधाचा पोवाडा शाहीर अज्ञानदासाने रचला व तो महाराजांना म्हणून दाखवला. त्याबद्दल महाराजांनी त्याला एक घोडा व शेरभर सोन्याचा तोडा बक्षीस म्हणून दिला, असे त्यानेच आपल्या पोवाड्याच्या शेवटी म्हटले आहे. या पोवाड्याचा काही भाग असा–

**राजा विचारी भल्या लोकांला । कैसे जावे भेटायाला ।।**
**बककर कृष्णाजी बोलला । शिवबा सील करा आंगाला ।।**
**भगवंताची सील ज्याला । आंतून बारीक झगा त्याला ।।**
**मुसेजरीच्या सुरवारा । सरजा बंद सोडुन दिला ।।**
**डावे हाती बिचवा त्याला । वाघनख सरज्याच्या पंजाला ।।**
**पटा जिव म्हाल्याप दिला । सरजा बन्द सोडुन चालिला ।।...**
**अबदुल जातका भटारी । तुमने करना दुकानदारी ।।**
**इतकिया उपरी । अबदुल मनीं खवळला पुरा ।।**
**कव मारिली अबदुल्याने । सरजा गवसून धरला सारा ।।**
**चालविली कट्यार । सीलवर मारा न चले जरा ।।**
**सराईत शिवाजी । ज्याने बिचव्याचा मारा केला ।।**
**उजवे हातीं बिचवा त्याला । वाघनख सरज्याच्या पंजाला ।।**
**उदरच फाडुनी । खानाची चरबी आणिली द्वारा ।।**

या कालखंडातील शाहीर मराठेच आहेत. त्यांची भाषा तडफदार पण रांगडी आहे. त्यांनी पोवाड्यात ओवीसारखे सुलभ वृत्त वापरले आहे. या कालखंडातील संभाजी व राजाराम यांच्या कारकीर्दीसंबंधी पोवाडा उपलब्ध नाही.

दुसरा कालखंड पेशवाईतील पोवाड्यांचा. त्याची सुरुवात पानिपतच्या पोवाड्यांनी व शेवट खडकी, अष्टी इथल्या लढायांच्या पोवाड्यांनी होतो. या कालखंडात अनेक ब्राह्मण शाहीरही उदयाला आले. बरेचसे ब्राह्मण शाहीर व्युत्पन्न व पढिक विद्वान असल्यामुळे त्यांनी शाहिरी वाङ्मयात पुष्कळ संस्कृत शब्द वापरले आहेत. त्यांच्या पोवाड्यांच्या चालीही अवघड आहेत.

पानिपतच्या लढाईवर अनेकांनी पोवाडे रचले आहेत. त्यांपैकी सगनभाऊचा पोवाडा सर्वांत चांगला आहे. सगनभाऊ शेवटच्या बाजीरावाच्या वेळी हयात होता. हा पुण्यातच राहत होता. त्याच्या पोवाड्याचा काही भाग पुढीलप्रमाणे—

**भाऊ नाना तलवार धरून । गेले गिलच्यावर चढाई करून ।।धृ०।।**
**अटोकाट जमले पठाण कुंजपुऱ्यास साठ हजार ।**
**दुहेरी तोफा लाविल्या पुढे कोसाचा मार ।।**
**कुंजपुरा येईना हाती भाऊ जाहले मनीं दिलगीर ।**
**बोलावून पेंढारी मग त्यांनी काढला विचार ।।**

**दिल्ली सोडावी डावी उदेपूर वेढावे चहूंफेर ।**
**होळकराशी केला हुकूम । बाण मग सोडी नागपूरकर ।।**
**आतां फराशीस पुढें गेले गरनाळा भरगोळ्यांचा मार ।**
**पेंढाऱ्यांनी वेठ उठविला तोफखान्यासमोर ।।**
**(चाल) जागोजागा छबिने भाऊचे । राऊत पडले भाऊचे ।।**
**तट पाडिले किल्ल्याचे । फार सैन्य पडले भाऊचे ।।**
**चढले निशाण शिंद्यांचे । पाट वाहती बहु रक्ताचे ।।**
**एक लाख मनुष्य दिल्लीचे । घायाळ पडले जखमाचे ।।**
**बारा हजार पेंढार भाल्याचे । लूट मुभा दिल्लीची ।।**

तिसरा कालखंड अव्वल इंग्रजीतील पोवाड्यांचा. इ. स. १८१८ साली पेशवाई बुडाली आणि महाराष्ट्रावर इंग्रजांचा अंमल चालू झाला. यानंतर पहिल्या काही वर्षांत जे पोवाडे रचले गेले, त्यांत स्वराज्य गेल्याबद्दलची हळहळ व्यक्त झालेली आहे. पण पुढे इंग्रजी अंमल अंगवळणी पडल्यावर, इंग्रजांच्या शिस्तीची लोकांवर छाप पडली. त्यामुळे या कालातले काही पोवाडे इंग्रजांच्या स्तुतीने भरलेले दिसतात. पेशवाईच्या काळात पुण्याला महत्त्व होते, ते आता मुंबईकडे गेले आणि पेशव्यांचे महत्त्व इंग्रजांना प्राप्त झाले.

स्वराज्य बुडाल्यावर पोवाड्यांची निर्मिती घटत चालली. जे काही पोवाडे इंग्रजी राजवटीत रचले गेले, त्यांतही विशेष दम नव्हता. आणि हे पोवाडे तरी रचले गेले, याचे कारण पेशवाईतील प्रभाकर आणि परशुराम हे दोन शाहीर इ. स १८४३ व १८४४ पर्यंत जिवंत होते हेच आहे. पेशवाई नष्ट झाल्यावर त्यांचा आधार तुटला आणि चरितार्थ चालवण्यासाठी त्यांना लुंग्यासुंग्या लोकांची खुशामत करावी लागली. श्री. य. न. केळकर या संदर्भात म्हणतात —

ज्या प्रभाकराने पेशव्यांच्या दरबारचा कडाका गायला, त्याला, त्याच तोंडाने स्प्रिंगलसाहेबांच्या मोजणी हपिसाचा पोवाडा गावा लागला. ज्याने सवाई माधवरावाच्या रंगाची आणि बाजीरावाच्या विलासाची वर्णने उल्हासाने आलापिली, त्याला आता बकाल मुंबईमधल्या शौकी मंडळींच्या पानचट लीला घोकण्याचा प्रसंग आला. ज्यांनी नाना–महादजीचा गौरव केला, त्यांनाच आता साष्टी कलेक्टर–हपिसातल्या मंडळींची स्तुतिस्तोत्रे म्हणावी लागली किंवा ज्यांनी आत्मस्फूर्तीने परशुरामभाऊ, बापू गोखले यांचे पराक्रम तोंडभर गायिले, त्यांनाच आता मुंबईतल्या पेस्तनजीशेटाची चाटुस्तुती करावी लागली. सारांश, पेशवाईतील जे शाहीर शिल्लक राहिले होते, त्यांनी पोटाकरता काही पोवाडे गायले, हेच काय ते मुख्यतः इंग्रजी अंमलातले पोवाडे. ही शाहिरांची पिढी नष्ट झाल्यावर मात्र शाहिरी कवितेची नदी बहुतेक कोरडी ठणठणीत पडली.

शाहिरांनी आपले बरेच पोवाडे कोणाच्या तरी सांगण्यावरून रचलेले आहेत. अज्ञानदासाने अफजलखानाच्या वधावर जो पोवाडा रचला, तो जिजाबाईच्या सांगण्यावरून. हा पोवाडा इ. स. १६५९ त लिहिला गेला. अज्ञानदास, तुळशीदास व यमाजी हे शिवाजी व बाजी यांचे आश्रितच होते. अनंत फंदी हा पेशवे दरबारचा भाट होता. खर्ड्याच्या लढाईवरील त्याच्या पोवाड्यात नाना फडणिसांची अवास्तव स्तुती आहे. गंगू हैबती, होनाजी व प्रभाकर या शाहिरांना सवाई माधवराव व दुसरा बाजीराव यांनी वेळोवेळी इनामे दिलेली आहेत. याशिवाय इतर सरदारांचाही त्यांना आश्रय होता. या सरदारांच्या वाड्यांची अतिशयोक्तिपूर्ण वर्णने त्यांनी केली आहेत. सवाई माधवराव रंग खेळले, या विषयावरही एक पोवाडा प्रभाकराने रचला आहे.

शाहिरांची रचना ही अशी परप्रेरित असल्यामुळे आत्मनिष्ठ काव्याचे वैशिष्टच त्यांच्या पोवाड्यांत आढळत नाही. पण समकालीनांच्या भावनांशी समरस होऊन शाहिरांनी विषय मांडल्यामुळे तत्कालीन मराठी जीवनाचे स्पष्ट चित्र मात्र त्यांच्या काव्यांत उमटले आहे. खर्ड्याच्या लढाईतील विजयाचे वर्णन करण्यापूर्वी शाहिराने पानिपतच्या अपयशाबद्दल अश्रू ढाळले आहेत. पेशवाईच्या अस्ताविषयी लिहिताना गतवैभवाच्या आठवणीने त्याचा ऊर भरून आलेला दिसतो; तर इंग्रजी अमदानीवरील पोवाड्यांत दुःखाची, वैतागाची, भयचकितपणाची व कौतुकाची अशी संमिश्र भावना दिसून येते. इंग्रजी राजवटीच्या नवेपणाने तत्कालीन लोकांप्रमाणेच सगनभाऊ, परशुराम व प्रभाकर हे शाहीर दिपून गेलेले दिसतात.

शाहिरांच्या कवितेत तत्कालीन लोकांची भावना पूर्णपणे प्रतिबिंबित झालेला दिसते. म्हणूनच वि. का. राजवाडे यांच्यासारखे इतिहाससशास्त्रज्ञ अस्सल साधनांत बखरीपेक्षा पोवाड्यांना वरचा दर्जा देतात. इ. स. च्या बाराव्या–तेराव्या शतकांतील बिंबस्थानच्या केशवदेवाच्या भाटांनी रचलेल्या पोवाड्यांची मीमांसा करताना महिकावतीच्या बखरीच्या प्रस्तावनेत वि. का. राजवाडे लिहितात—

पोवाडे हे गद्यपद्यात्मक असून, चंपू काव्याच्या सदरात मोडतात. पोवाडा हे केवळ श्राव्य नव्हे, ते दृश्य काव्यही आहे. पोवाडा हे एक प्रकारचे नाटक आहे. त्यात अनेक पात्रे असतात. मुख्य शाहीर व त्याचा साथीदार हे दोघे पोवाड्यातील व्यक्तींच्या सोंगांची बतावणी करतात. मुख्य पात्राची बतावणी मुख्य शाहीर किंवा गोंधळी करतो. याशिवाय, कथानकाचा धागा शाबूत ठेवून, कथेचे तात्पर्य तिऱ्हाइतपणे सांगण्याचे नाटकातील सूत्रधाराचे कामही तो गद्यात करतो. वीरश्रीच्या

अतिरेक झाला, की तो एकदम पद्याच्या वातावरणात उड्डाण मारतो. वीरश्रीच्या आगीने धगधगणारे व रसरसणारे ते पद्य सहजच तुटक असून, कथानकाचा बराच मोठा भाग अध्याहृत ठेवते. तो अध्याहार शाहीर योग्य अभिनयाने व गद्य भाषेने पुरा करून दाखवितो.

एकूण पोवाड्यांपैकी, तानाजी मालुसरे आणि सिंहगड, बाजी पासलकर, प्रतापसिंह व शहाजीमहाराज, प्रतापसिंहाची शिकार, शहाजीच्या स्वारीचा थाट, सातारकर छत्रपती व त्यांचे सरदार, सामानगडच्या गडकऱ्यांचे बंड, पानपतवरची लढाई, नानासाहेब पेशव्यांचा मृत्यू, पेशवाईच्या आरंभापासून नानासाहेब पेशव्यांच्या मृत्युपर्यंतचा वृत्तांत, थोरले माधवराव पेशव्यांची पतिव्रता स्त्री रमाबाई सती गेली तो वृत्तांत, नारायणराव पेशव्यांचा मृत्यू, सवाई माधवरावांचा जन्म, पेशव्यांची बदामी किल्ल्यावर मोहीम, शेवटले बाजीराव पेशवे, खडकीची लढाई, नाना फडणीस, जनकोजी शिंदे, महादजी शिंदे, अहल्याबाई होळकरीण, मल्हारराव होळकर, फत्तेसिंग गायकवाड, नागपूरकर आप्पासाहेब भोसले, परशुरामभाऊ पटवर्धन, इ. सुमारे चव्वेचाळीस पोवाडे जास्त प्रसिद्ध आहेत आणि ते तुळशीदास, यमाजी, हरी, सगनभाऊ, राघूजी पाटील, पिराजी, मार्तंडबाजी, मरी पिपाजी, पेमा माळी, प्रभाकर, लहरी मुकुंदा, खंडू संतू, बाळा लक्ष्मण, अनंत फंदी, होनाजी बाळा, रामजोशी, सुलतान, विकनदास, हैबती, गंगू हैबती, इ. शाहिरांनी रचलेले आहेत.

इ. स. १८०३ व १८०४ या सालांत पुणे शहरात व आसपासच्या प्रदेशात भयंकर दुष्काळ पडला होता. त्यामुळे अन्नधान्याची फार महागाई झाली होती. त्या वेळचे वर्णन राम जोशी याने आपल्या पोवाड्यात केले आहे त्यातला काही भाग असा—

**हे राहो भाजींत बागवान जोडका।**
**पैशाचा एकची मुळा एक दोडका।**
**पैशास मक्याचा कंद एक मोडका।**
**हा कांदा दो पैशांस एक बोडका।**
**जळणास रुपायाला एक लहान खोडका।**
**घोड्यास शिपाई काय करिल बोडका।**
**काळाने देश यापरि केला रोडका।**

पूर्वीच्या काळी ज्या मानाने पोवाड्यांची रचना झाली, त्या मानाने सांप्रतच्या काळात ही रचना अत्यल्प आहे. शाहीर नानिवडेकर, खाडिलकर, इ. काही मंडळी आधुनिक कालातली शाहीर मंडळी होत. स्वातंत्र्य-लढ्याच्या काळात या मंडळींच्या पोवाड्यांनी तत्कालीन वातावरणात काही अंशी चैतन्य निर्माण केले, यात शंका नाही. [ म. जी.; लो. सा. रू.; म. शा. वा.; प्रा. म. वा. स्व.; म. सा.; इतिहासप्रसिद्ध पुरुषांचे व स्त्रियांचे पोवाडे – आक्वर्थ व शाळिग्राम, १८९१; शाहिरी वाङमयाची तोंडओळख– श्री. य. न. केळकर, सह्याद्री, ऑगस्ट १९३९ ]

**पोषी पूनम** गुजरातेत प्रचलित असलेले एक व्रत. हे पौष पौर्णिमेला करतात. या पौर्णिमेला भगिनी-पौर्णिमा असेही म्हणतात. हे व्रत लहान मुली आपल्या भावासाठी करतात. त्यासाठी त्या दिवसभर उपवास करतात; सकाळी नदीवर स्नान करून पाणी आणतात; स्वयंपाकासाठी रानशेणी गोळा करतात; सायंकाळी घराच्या गच्चीवर किंवा एखाद्या मोकळ्या जागी चांदण्यात स्वयंपाक करतात. या स्वयंपाकात कणकेची चांदकी प्रमुख असते. त्या चांदकीला मधोमध छिद्र पाडून मुली त्या छिद्रातून चंद्रदर्शन घेतात. तसे करताना त्या पुढील गाणे म्हणतात –

**चांदा तारी चानकी, कूतरा तारी रोटली,**
**आज मारी पोषी पूनम.**

मग त्या भावाजवळ जेवायची परवानगी मागतात.

**पोष्यवर्ग** ज्याचे पालनपोषण करावे, असे सांगितले आहे. असा वर्ग. माता, पिता, भ्राता, गुरू, पत्नी, अपत्ये, अतिथी व अग्नी हे पोष्य होत. गृहस्थाने यांचे भरण–पोषण करावे, असे सांगितले आहे. त्यामुळे पालनकर्त्याला स्वर्गप्राप्ती होते आणि वरील व्यक्तींना त्रास दिला असता नरकात जावे लागते, असे गरुड पुराणात म्हटले आहे. [ श. क. ]

**पोळा** बैलांचा एक सण. शेतकरी समाजात या सणाला फार महत्त्व आहे. याला बेंदूर किंवा बेंडर असेही म्हणतात. आषाढ, श्रावण किंवा भाद्रपद या महिन्यांच्या अमावास्येला प्रदेशपरत्वे हा सण करतात. पेरण्या झाल्यानंतर शेतीच्या कामातून बैल रिकामे झाले, म्हणजे एक दिवस त्यांना न्हाऊ-माखू घालायचे, आरती ओवाळायची, त्यांना नैवेद्य दाखवायचा, दुपारी त्यांना रंगवून व शृंगारून त्यांची गावातून वाजत–गाजत मिरवणूक काढायची, असा या उत्सवाचा सोहळा असतो. ही एक प्रकारची बैलांविषयी कृतज्ञता व्यक्त केलेली असते.

हा सण साजरा केल्याने शेतात भरपूर धान्य पिकते आणि गोठ्यात गोधनाची वृद्धी होते, अशी समजूत आहे.

**पौडीदेवी** बिहारमधील एक प्रसिद्ध शक्तिदेवता. हिला मंडलेश्वरी, हिंगुलक्ष्मी, इ. अन्यही काही नावे आहेत. सिंगभू येथे या देवीचे मंदिर आहे. इथे या देवीची

स्थापना इ. स. १५९० साली रणजितसिंग या नावाच्या कोण्या राजाने केली, असे सांगतात. सिंगभूच्या राजघराण्याशी या देवीचा घनिष्ठ संबंध आहे. ही देवी अशा प्रकारे राजघराण्याची कुलदेवता ठरल्यामुळे हिचे दर्शन पुजारी व राजघराण्यांशी संबंधित लोक, यांच्याशिवाय इतरांना होत नसे. हिची मूर्ती अष्ट धातूंची बनवलेली आहे. तिच्या चार हातांत खड्ग, गदा, मुंड आणि खापर ही चार आयुधे असून, एक सिंह तिच्या बाजूला उभा आहे.

सिंगभू येथे ही देवी एक राजकुलस्वामिनी असली, तरी ती एक लोकदेवताही आहे. बिहारमध्ये तिचे पुष्कळ भक्त आहेत. ऐक्य व संघटना करणारी देवता म्हणून तिची विशेष प्रसिद्धी आहे. भाद्रपद कृष्ण अष्टमीपासून दसऱ्यापर्यंत तिचा पूजोत्सव चालतो. त्या दिवसांत तिच्या मृण्मय मूर्ती बनवून घरोघर त्यांची पूजा करतात. नवीन धान्य पिकले म्हणजे त्याचा नैवेद्य प्रथम पौडीमालाच दाखवतात. दर दहा वर्षांनी या देवीची मोठी यात्रा सिंगभू येथे भरते. तिला दसडी म्हणतात. या यात्रेत देवीला पशुबळी देतात.

या देवीच्या नावाने एक शुभ्र घोडा सोडलेला असतो. रात्रीच्या वेळी पौडीमा या घोड्यावर बसून सिंगभूपासून एका कोसावर असलेल्या झुमकेश्वरी देवीला भेटायला जाते, अशी दंतकथा त्या भागात प्रचलित आहे. [ टें. ली. बि. ]

**पौर** एक प्राचीन राजकीय संस्था. पुर या शब्दाचा अर्थ राजधानी असा आहे. राजधानीत वास्तव्य करणाऱ्या लोकांच्या सभेला पौर असे नाव होते. राजधानीची अंतर्गत व्यवस्था ठेवण्याचे कार्य या सभेकडे असे. म्हणजे ही राजधानीची महानगरपालिका होती, असे म्हटले तरी चालेल. सर्व जातीचे लोक या सभेचे सदस्य असत. एखादा प्रमुख नागरिक साधारणपणे व्यापारी किंवा महाजन, या सभेचा प्रधान किंवा सभापती म्हणजेच महापौर होत असे.

पौरसभेची कामे अशी — (१) राजधानीत शांतता व सुव्यवस्था ठेवणे, (२) मंदिरे व सार्वजनिक स्थाने यांची व्यवस्था ठेवणे, (३) नागरिकांची सांपत्तिक स्थिती सुधारणे. (४) मृत मनुष्याच्या संपत्तीची व्यवस्था करणे, (५) काही प्रकरणांमध्ये न्यायनिवाडा करणे (दिवाणी); या निवाड्याला राजाची मान्यता मिळत असे.

पौर या संस्थेचा उगम आणि विकास नैगम या संस्थेतून झाला असावा, अशी कल्पना आहे. जातक व त्रिपिटक या ग्रंथात नैगम (निगम) या शब्दाचा उपयोग पौर या अर्थी केलेला आढळतो. धर्मशास्त्राच्या टीकाकारांनीही नैगम व पौर हे शब्द समानार्थी मानले आहेत. (निगम पाहा)

पौर या संस्थेची वेगळी नाणी असत आणि ती राजाच्या टांकसाळीत बनवली जात, असे अर्थशास्त्रात सांगितले आहे.

राजधानीतील स्थानिक स्वराज्यसंस्थेच्या कार्याव्यतिरिक्त पौर सभेला जानपदांबरोबर शासनातही भाग घ्यावा लागे. **पाहा**— जानपद. [ हि. ध.; हि. रा. तं. ]

**पौर आत्रेय** एक सूक्तद्रष्टा. ऋग्वेदाच्या पाचव्या मंडलातील ७३ व ७४ ही दोन सूक्ते याच्या नावावर आहेत. अश्वीदेवांची स्तुती हा या सूक्तांचा विषय आहे. चौऱ्याहत्तराव्या सूक्तातल्या चौथ्या ऋचेत याचे नाव आहे व तिथे आपण सोमयागाची दीक्षा घेतल्याचेही त्याने सांगितले आहे. या दीक्षाकालात तो दुष्टांच्या तावडीत सापडला होता; पण अश्वीदेवांनी त्याला सोडविले, असे त्याच्या ऋचांवरून वाटते. त्याच्या सूक्तातली एक ऋचा (५. ७३. ९) अशी—

**सत्यमिद् वा उ अश्विना युवामाहुर्मयोभुवा ।**
**ता यामन् यामहूतमा यामन्ना मृळयत्तमा ॥**

अर्थ—अश्वीहो, (जगताचे) मंगल करणारे म्हणून तुम्हांला म्हणतात ते अगदी खरे आहे. म्हणून यज्ञात (भक्तजन) तुमची अत्याग्रहाने विनवणी करीत असतात, (कारण) यज्ञात धावा केला असता अत्यंत सुख देणारे तुम्हीच आहात.

अश्वीदेवांना तो कविप्रतिपालक म्हणूनही संबोधतो.

**पौरंदर व्रत** एक काम्य व्रत. याचा विधी असा — शुभ दिवशी तिळांचा गोळा घेऊन त्याचा हत्ती करावा. त्यावर तांबडे वस्त्र व सुवर्णाचे अलंकार घालावे. त्याची सोंड तांब्याच्या भांड्यावर टेकवावी. पाठीवर अंकुश घेतलेला माहूत बसवावा. मग तो हत्ती ब्राह्मण दंपतीला दान द्यावा. फल— इंद्रलोकी दीर्घकाल वास्तव्य. [ हि. ध. ]

**पौरुषप्रतिपद्व्रत** एक तिथिव्रत. चैत्र शुद्ध प्रतिपदेपासून या व्रताला प्रारंभ करतात. व्रतावधी एक वर्ष. व्रतकर्त्याने पाण्यात उभे राहून विष्णूचे ध्यान-पूजन व त्यानंतर पुरुषसूक्त पठण करायचे असते. दोन्ही पक्षांतल्या प्रतिपदांना हे व्रत करतात. फल — विष्णुलोकप्राप्ती. [ हि. ध. ]

**पौलोमी** असुरांचा एक गण. मारीच आणि पुलोमा यांची ही संतती होय. बली आणि इंद्र यांच्यामध्ये झालेल्या युद्धात यांनी बलीच्या बाजूने भाग घेतला होता व विश्वेदेवांबरोबर लढाई केली होती, अशी पौराणिक कथा आहे. [ पु. इं. ]

**पौष** चैत्रादी गणनेतील दहावा मास. या महिन्याच्या पौर्णिमेला आगेमागे पुष्य नक्षत्र असते, त्यावरून याला पौष असे नाव मिळाले आहे. याला तैष आणि सहस्य अशीही अन्य नावे आहेत. हेमंत ऋतूतला हा दुसरा मास होय. पौष मासाला भाकडमास असे म्हणण्याची लोकरूढी आहे. कारण मकरसंक्रांतीव्यतिरिक्त या महिन्यात अन्य काही सणसुदिन नाहीत. तरीपण या मासात करायची धर्मकृत्ये निर्णयसिंधूत व अन्य काही ग्रंथांत सांगितली आहेत, ती अशी–



पौष मास– एक सांकेतिक चित्र

(१) पौष पौर्णिमेस माघस्नानाचा प्रारंभ करावा.

(२) पौष शुद्ध अष्टमीला जेव्हा बुधवार असेल, तेव्हा शिवाप्रीत्यर्थ स्नान, जप, होम, तर्पण व ब्राह्मणभोजन करावे.

(३) पौष अमावास्येला अर्धोदय पर्व आले असता स्नानदानादी धर्मकृत्ये करावी.

(४) शिवलिंगावर संपूर्ण महिनाभर तुपाचा अभिषेक करावा व शिवापुढे दीपाराधना करावी.

(५) पौषाच्या दोन्ही पक्षांतील नवमीला उपवास करून दुर्गेची त्रिकाल पूजा करावी. दुर्गेची मूर्ती पिठाची करावी. या व्रतानिमित्त आठ कुमारिकांना भोजन घालावे.

(६) पौष महिन्यात एकभुक्त राहून प्रासाद, नगर, गृह, वस्त्रप्रावरण यांपैकी जे शक्य असेल त्याचे दान करावे. अर्थात, यांतील पहिल्या दोन गोष्टी राजासाठी सांगितल्या आहेत.

पौष मासात जन्मलेला मनुष्य हा अबोल, कृशांग, परोपकारी, स्वकष्टाने द्रव्यार्जन करणारा आणि कायदेपंडित होतो, असे कोष्ठीप्रदीपात सांगितले आहे. [ नि. सिं.; हि. ध.; पु. चिं. ]

**पौष्टिक** (१) एक धार्मिक विधान. दीर्घायुष्यप्राप्तीसाठी, सर्वांच्या कल्याणासाठी किंवा सर्वांगीण अभिवृद्धीसाठी जी धार्मिक कृत्ये करण्यास सांगितली आहेत, त्यांना पौष्टिककर्मे म्हणतात. यांच्या विधींमध्ये होम–हवन आणि तत्सम गोष्टी येतात. [ हि. ध. ]

(२) एक प्राचीन जात. ब्राह्मण पुरुष व निषाद स्त्री यांची ही संतती होय. हल्ली यांना कहार किंवा भोई म्हणतात. पालख्या वाहून नेणे हा या जातीचा प्रमुख व्यवसाय आहे. **पाहा**–कहार.

**प्रउगशस्त्र** सोमयागात म्हटले जाणारे एक शस्त्र. हे शस्त्र होता म्हणतो. 'तस्माद् बव्ह्यो देवताः प्रउगे शस्यन्ते' = प्रउगशस्त्रांत अनेक देवतांची स्तुती असते, असे कौषीतकी ब्राह्मणात म्हटले आहे (१४·५). या शस्त्रात ऋग्वेदातील १·२–३ या सूक्तांचे शंसन करतात.

**प्रकाशदेवता** वज्रयानी पंथाच्या चार देवता प्रकाशदेवता या नावाने प्रसिद्ध आहेत. त्या सर्व नग्नावस्थेत व भेसूर मुद्रेच्या आहेत. त्यांचे वर्णन असे—

(१) **सूर्यहस्ता** — गौरवर्ण, चिन्ह सूर्य.

(२) **दीपा** — वर्ण नीळसर, चिन्ह दीपयष्टी.

(३) **रत्नलोका** — पीतवर्ण, चिन्ह रत्न.

(४) **तडित्करा** — रंग हिरवा, चिन्ह वीज.

त्या प्रत्यालीढ स्थितीत प्रेतावर नाच करीत असतात.

**प्रकाशात्मयती** (इ. स. चे १३ वे शतक) एक शांकरमतानुयायी वेदान्ती आचार्य. रामानुजाचार्यांनी शांकरमताचे खंडन करण्याचा प्रयत्न केला असता प्रकाशात्म यतीने शांकरमताचे समर्थन केले. त्यासाठी त्याने पद्मपादाचार्यकृत पंचपादिकेवर पंचपादिकाविवरण नामक टीका लिहिली. अद्वैत तत्त्वज्ञानाच्या क्षेत्रात हा ग्रंथ अत्यंत महत्त्वाचा मानला जातो. वेदान्त तत्त्वज्ञानात, भामतीप्रस्थानानंतर विवरणप्रस्थान या एका नव्या प्रस्थानाचा उपक्रम प्रकाशात्म यतीने केला. त्यामुळेच या ग्रंथाला महत्त्व प्राप्त झाले. या ग्रंथावरून त्याच्या प्रकांड विद्वत्तेचा परिचय घडतो. या ग्रंथात अद्वैतमताचे, विशेषतः पद्मपादाचार्यांच्या मताचे विशेष विवेचन केलेले आहे. शारीरकभाष्यावरील न्यायसंग्रह आणि

शब्दनिर्णय असे आणखी दोन ग्रंथही प्रकाशात्मयतीने लिहिले आहेत. प्रकाशानुभव या नावानेही हा ओळखला जातो. [ हिंदुत्व; शंकराचार्य; म. च. को. ]

**प्रकाशानंद** (इ. स. चे १५ वे शतक) एक महान दार्शनिक. हा ज्ञानानंदाचा शिष्य होता. वेदान्तसिद्धान्त-मुक्तावली हा याचा प्रमुख पांडित्यपूर्ण ग्रंथ होय. हा वेदान्ताचा प्रमाणभूत ग्रंथ मानला जातो. हा ग्रंथ गद्य-पद्यमय आहे. गद्यात युक्तिवाद असून, पद्यात सिद्धान्तनिरूपण आहे. हा ग्रंथ लिहून आपण कृतकृत्य झालो, असे तो म्हणतो. माया ही अनिर्वचनीय आहे, अज्ञान हे प्रमाणगम्य नाही, आत्मा केवळ आनंदस्वरूप नसून, तो आनंदवान तसाच दुःखवानही असू शकेल, अशा प्रकारची त्याची मते आहेत. प्रस्तुत ग्रंथावर अप्पय्य दीक्षिताने सिद्धान्तदीपिका नावाची वृत्ती लिहिली आहे.

याशिवाय मनोरमातंत्रराजटीका, महालक्ष्मीपद्धती, श्रीविद्यापद्धती इ. अन्यही काही तांत्रिक ग्रंथ प्रकाशानंदाने लिहिले आहेत. त्यावरून तो वेदान्ती होता, तसाच तंत्रवादीही होता, असे दिसून येते. [ शंकराचार्य; हिंदुत्व. ]

**प्रकाशे** एक क्षेत्र. खानदेशातील शहादे तालुक्यातले एक गाव. तापी आणि दोन उपनद्या यांच्या संगमावर हे वसले आहे. गावाच्या पूर्वेस गौतमेश्वर महादेवाचे जुने स्थान आहे. आसपासही बरीच देवळे आहेत. सिंहस्थात इथे मोठी यात्रा भरते.

भारत सरकारतर्फे प्रकाशे या गावी जे उत्खनन झाले, त्यात लोहयुगातील अवशेष सापडले आहेत व ताम्रपाषाणयुगीन संस्कृतीचाही पुरावा मिळाला आहे. इथे जी खापरे सापडली आहेत, ती चाकावर घडवलेली व पक्की भाजलेली असून, त्यांवर नक्षी काढलेली आहे. वाडगे, तोटीची भांडी, माठ, कळश्या यांची ती खापरे आहेत. इथे गारगोटीच्या छिलक्यांची हत्यारेही सापडली आहेत. त्यावरून या भागात प्रथम वस्ती करून राहणारे लोक हे सुसंस्कृत आणि स्थिर जीवन जगणारे होते, असे कळते. [ वि. मुं. रा. प.; म. उ. ]

**प्रकीर्णके** एक जैन ग्रंथसमूह. भिन्न भिन्न विषयांवर रचलेल्या अल्प रचनांचे हे एक संकलन आहे. तीर्थंकरांनी वेळोवेळी केलेल्या उपदेशांच्या आधारावर अनेक श्रमणांनी जी पुस्तके लिहिली, त्यांना प्रकीर्णके म्हणतात. अशी प्रकीर्णके हजारो आहेत; पण ज्यांचा आगमांमध्ये अंतर्भाव झाला आहे, अशी दहाच प्रकीर्णके असून, नावे पुढीलप्रमाणे—

(१) चतुःशरण (२) आतुरप्रत्याख्यान (३) महाप्रत्याख्यान (४) भक्तपरिज्ञा (५) तंदुलवैचारिक (६) संस्तारक (७) गच्छाचार (८) गणिविद्या (९) देवेंद्रस्तव व (१०) मरणसमाधी.

यांतली बहुतेक प्रकीर्णके पद्यात आहेत. कोणत्या लेखकाने कोणत्या वेळी यातला किती भाग लिहिला, हे सांगणे कठीण आहे. मात्र उपांगांच्या नंतर केव्हातरी ही प्रकीर्णके लिहिली गेली, असे विद्वानांचे मत आहे.

मरण, मोक्ष, प्रमादत्याग, पश्चात्ताप, अर्हत, साधू, सिद्धधर्म, गर्भ, देव, इ. विषयांचा ऊहापोह प्रकीर्णकांत केलेला आहे. साधु-श्रमणांनी आपले वर्तन कसे ठेवावे, स्त्रियांशी कसे वागावे, गुरु-शिष्यांचे संबंध कसे असावे, इ. आचारविषयक उपदेशही यात आहे. थोडक्यात सांगायचे, तर मुनींनी अंतकाळी आपले मन धर्मसाधनेकडे लावून शांत चित्ताने आणि व्याकुळ न होता शरीरत्याग कसा करावा हे समजावून सांगणे, हा या प्रकीर्णकांचा प्रमुख उद्देश आहे. [ भा. सं. जै. यो.; प्रा. सा. इ. ]

**प्रकृतिपुरुषव्रत** एक काम्य व्रत. या व्रताचा विधी असा— चैत्र शुद्ध प्रतिपदेला उपवास; द्वितीयेला अग्नीची पुरुषसूक्ताने पूजा; पुरुष व प्रकृती या नावांनी विष्णु-लक्ष्मींची पूजा; सोने, रुपे व चांदी यांचे दान आणि दूध व तूप यांवर निर्वाह. व्रतावधी एक वर्ष. फल— सकल कामनांची पूर्ती व मोक्षप्राप्ती. [ हि. ध. ]

**प्रकृती** (१) सांख्य दर्शनातील एक तत्त्व. हिचे लक्षण असे— 'सत्त्वरजस्तमोगुणानां साम्यावस्था ' = सत्त्व, रज व तम या तीन गुणांची साम्यावस्था म्हणजे प्रकृती होय. प्रकृतीला अव्यक्त व प्रधान अशीही नावे आहेत. सांख्यांच्या मते प्रकृती ही सर्व स्थूल व सूक्ष्म अशा कार्यांची कारण आहे. ती अतिसूक्ष्म असल्यामुळे परोक्ष आहे. प्रकृतीच्या ठिकाणी सत्त्व, रज व तम हे तीन गुण असल्यामुळे जगातील सर्व पदार्थांमध्येही हे तीन गुण दिसतात. प्रकृती ही नित्य, व्यापक, जड व स्वतंत्र आहे. ती सगुण, साकार असून, हरघडी नवी नवी रूपे धारण करते. ती नादांची टांकसाळ व सर्व चमत्कारांचे माहेर आहे, ती अद्‌भुत व मोह पाडणारी अशी शक्ती आहे, असे ज्ञानेश्वरांनी तिचे वर्णन केले आहे. पाहा — सांख्यदर्शन. [ भा. द. ]

(२) मूलभूत याग किंवा होम. दर्शपूर्णमास, पशुबंध व अग्निष्टोम असे तीन याग श्रौतयागांचे प्रकृतिभूत याग मानलेले आहेत. तसेच स्थालीपाक हीदेखील प्रकृती आहे. चातुर्मास्य आणि श्रवणाकर्म या विकृती होत. [ सं. कौ. ]

**प्रगल्भा** एक नायिकाभेद. शृंगारमंजरीत प्रगल्भा नायिकेचे रतिप्रीतिमती व रत्यानंदपरवशा असे दोन भेद सांगितले आहेत. याशिवाय, हिच्या धीरा, अधीरा व धीराधीरा अशा मानावस्था मानलेल्या आहेत, त्या वेगळ्याच. आपला राग वक्रोक्तीने व्यक्त करते ती धीरा, स्पष्टपणे बोलून दाखवते ती अधीरा आणि कधी स्पष्टपणे तर कधी वक्रोक्तीने व्यक्त करते, ती धीराधीरा होय. हिची व्याख्या अशी —

**स्मरान्धा गाढतारुण्या समस्तरतिकोविदा ।**
**भावोन्नता दरव्रीडा प्रगल्भाक्रान्तनायका ।।**

(सा. द. ३·६०)

अर्थ– प्रगल्भा ही मदनाच्या आवेशाने अंध झालेली असते. तिचे यौवन रसरसलेले असते. ती सर्व प्रकारच्या रतिक्रीडेत प्रवीण व उदात्त वृत्तीची असते. तिच्या अंगी लज्जा अल्प असते. आणि नायकावर तिचा वरचष्मा असतो.

प्रगल्भा नायिकेचे उदाहरण पुढीलप्रमाणे (अमरुशतक) –

**आलोलामलकावलीं विलुलितां बिभ्रच्चलत्कुण्डलां**
**किञ्चिन्मृष्टविशेषकं तनुतरैः स्वेदाम्भसः शीकरैः ।**
**तन्व्या यत् सुरतान्ततान्तनयनं वक्त्रं रतिव्यत्यये**
**तत्त्वां पातु चिराय किं हरिहरस्कन्दादिभिर्दैवतैः ।।**

अर्थ– तिचे चंचल कुंतल विखुरले आहेत. तिच्या कानात हालणारी कुंडले आहेत. लहान लहान स्वेदबिंदूमुळे तिच्या भालीचा तिलक किंचित पुसट झाला आहे. रतिक्रीडेनंतर तिचे नेत्र जड झाले आहेत. सुंदरीचे हे मुख तुझे चिरकाल रक्षण करो. त्यासाठी विष्णू, शिव, स्कंद, इ. देवतांचे काही प्रयोजन नाही.

कामशास्त्रातील मंत्रतंत्राच्या सशास्त्र व सप्रयोग अध्ययनाध्यापनाचे प्रगल्भा हे जणू मूर्त रूप आहे. [शृं. ना.; श. क.]

**प्रगाथ काण्व** एक सूक्तद्रष्टा. ऋग्वेदाच्या आठव्या मंडलातील १०, ४८, ५१ व ५४ ही सूक्ते याच्या नावावर आहेत. प्रगाथ नावाच्या मंत्रविशेषाचा हा द्रष्टा असल्याचे मानले आहे. यज्ञात शंसन करताना एका विशिष्ट पद्धतीने दोन ऋचांच्या तीन ऋचा करतात, त्यांना प्रगाथ म्हणतात. या प्रगाथांना त्या मंत्रातील देवतेवरून ब्रह्मणस्पद प्रगाथ, इंद्रनिह्व प्रगाथ, इ. वेगवेगळी नावे आहेत. याने आपल्या सूक्तांतून इंद्र, अश्वी व सोम यांची स्तुती केली आहे. सोमरसाबद्दल त्याने काव्यमय भाषेत लिहिले आहे. सोमपानाने उल्हसित होऊन तो म्हणतो —

**अपाम सोममृता अभूमागन्म ज्योतिरविदाम देवान् ।**
**किं नूनमस्मान् कृणवदरातिः किमु धूर्तिरमृत मर्त्यस्य ।।**

(ऋ. ८·४८·३)

अर्थ – आम्ही दिव्य रसाचे प्राशन केले, आम्ही अमर झालो; दिव्य प्रकाशाला पावलो. आम्ही देवांना ओळखले. आता धर्मविमुख दुष्ट आमचे काय करणार ! हे अमर देवा, माणसांची कावेबाजीतरी आमचे काय वाकडे करणार !

त्यापुढे त्याने स्वत:ला अग्नीसारखे उज्ज्वल करण्याबद्दल व सर्व प्रकारची समृद्धी देण्याबद्दल सोमाची प्रार्थना केली आहे.

**प्रचेता** (१) विष्णू पुराणात प्राचीनबर्ही नामक प्रजापतीच्या दहाही मुलांचा या नावाने उल्लेख आहे. सवर्णा नामक समुद्रकन्येपासून त्याला हे पुत्र झाले. पित्याच्या आज्ञेवरून प्रचेतसांनी समुद्रात दहा सहस्र वर्षे तपश्चर्या करून आपण प्रजापती व्हावे, असा वर मिळवला. कंडूची कन्या मारिशा ही त्यांची पत्नी व दक्ष हा पुत्र होय. [प्रा. च. को.]

(२) एक स्मृतिकार. पराशराने ऋषींच्या यादीत याचे नाव दिले आहे, पण याज्ञवल्क्याने दिले नाही. विज्ञानेश्वर आणि अपरार्क यांनी नित्यकर्मे, श्राद्ध, आशौच व प्रायश्चित्त या विषयांवरचे त्याचे गद्य-पद्य उतारे घेतले आहेत. मिताक्षरेमध्ये (याज्ञ ३·२७ यावरील टीका) प्रचेतसाचा एक श्लोक आहे, तो पुढीलप्रमाणे–

**कारवः शिल्पिनो वैद्या दासी दासास्तथैव च ।**
**राजानो राजभृत्याश्च सद्यःशौचाः प्रकीर्तिताः ।।**

अर्थ – कामगार, कारागीर, वैद्य, दासी, दास, राजे आणि राजांचे अधिकारी यांनी केवळ स्नान केल्याने त्यांना आलेले आशौच दूर होते.

मेधातिथीने मनू, विष्णू, इ. स्मृतिकारांइतकाच प्रचेतस हा प्रमाणभूत मानला आहे. [हिं. ध.; हिं. वि. को.]

**प्रचेता आंगिरस** एक सूक्तद्रष्टा. ऋग्वेदाच्या दहाव्या मंडलातील १६४ वे सूक्त याच्या नावावर आहे. दुःस्वप्ननाश हा या सूक्ताचा विषय आहे. या संबंधीची एक ऋचा (१०·१६४·५) अशी—

**अजैष्माद्यासनाम चाऽभूमानागसो वयम् ।**
**जाग्रत्स्वप्नः सङ्कल्पः पापो यं द्विष्मस्तं**
**स ऋच्छतु यो नो द्वेष्टि तमृच्छतु ।।**

अर्थ – पाहा, आज आम्ही वाणी तर जिंकलीच, शिवाय आमचे उद्दिष्टही साध्य केले. आमचा निरपराधपणाही सिद्ध केला. तथापि जागेपणी किंवा झोपेमध्ये जी काही दुर्वासना आमच्या मनात लपून राहिली असेल, ती पापी वासना आमच्या शत्रूकडे जावो; जे आमचा द्वेष करीत असतील, त्यांच्याकडे जावो (तिचा परिणाम त्यांना भोगावा लागो.)

**प्रजाकामेष्टी** एक इष्टी. प्रजा प्राप्त व्हावी आणि ती वाढावी म्हणून पुत्रिन् अग्नी, इंद्राग्नी, वैश्वानर अग्नी, इ. देवतांसाठी काही हवी तयार करून त्यांचा याग करण्यास सांगितले आहे. प्रजातंतूचा विच्छेद होऊ नये म्हणून तंतुमान अग्नीसाठी अष्टाकपाल पुरोडाशाचा याग करावा, असे बौधायन श्रौतसूत्रात (१३·४३) सांगितले आहे. या इष्टीचे तंत्र दर्शपूर्णमासेष्टीप्रमाणेच असते. [ श्री. विद्याधरशास्त्री भिडे. ]

**प्रजापतिविद्या** एक गूढ विद्या. जो एक आहे त्याला गणितातल्या भाषेत 'एकमेवाद्वितीयम्' अशी संज्ञा आहे हा एक असा आहे, की याला दोन, तीन, चार पाच, इ. खंड किवा संख्या यांचा स्पर्श नाही एक आणि एक मिळून दोन होतात, या प्रकाराप्रमाणे सारी संख्या एकाचेच वेगवेगळे भाव आहेत. परंतु ज्या स्थितीत एक हा केवळ एकच राहतो, तो अद्वितीय सत्ताभाव सगुण–निर्गुणापलिकडचे ब्रह्माचे स्वरूप असतो. एक असो की अनेक, हे सर्व मिळून प्रजापतीचे रूप आहे. जो एक आणि अव्यक्त स्वरूपात असतो, त्याला अनिरुक्त प्रजापती असे म्हणतात. जो अनेक आणि अव्यक्त आहे, त्याला निरुक्त प्रजापती म्हणतात. सृष्टीपूर्वीचे प्रजापतीचे अव्यक्त रूप तूष्णीम् म्हणजेच अनिरुक्त असते, तेच सृष्टीमध्ये निरुक्त किंवा दृश्य-श्राव्य होते.

अनिरुक्त म्हणजेच गर्भप्रजापती होय. त्याला गुहा असे संबोधले जाते. जो पुराणपुरुष तो गुहानिहित असतो व त्यालाच 'गह्वरेष्ठ' असे म्हणतात. त्याच्या गुणातीत रूपाला श्रुतिग्रंथातून क असे म्हटले आहे. बीजगणितात ज्याप्रमाणे काही अज्ञात संकेत असतात, त्याप्रमाणे क हा गुहानिहित, अनिरुक्त, अमूर्त, अव्यक्त अशा प्रजापतीचा संकेत आहे. हे सर्व जाणणे हीच प्रजापतिविद्या होय. [ वेदविद्या. ]

**प्रजापतिव्रत** दैनंदिन पालन करायच्या काही नियमांना शांखायन ब्राह्मणात प्रजापतिव्रत म्हटले आहे (६·६). हे नियम पुरुषार्थ आहेत; ऋत्वर्थ नाहीत. प्रश्नोपनिषदात म्हटले आहे, की दिवस हा प्रजापतीचा प्राण आणि रात्र हे अन्न आहे. जे लोक दिवसा स्त्रीसंभोग करतात, ते प्राणावर आघात करतात आणि जे रात्री संभोग करतात, ते ब्रह्मचर्य पाळतात, असे समजावे. हा एक प्रजापतिव्रताचा भाग आहे. याचे पालन करणाऱ्याला संततीचा लाभ होतो. [ हि. व. ]

**प्रजापती** (१) एक वैदिक देवता. ऋग्वेदात हा शब्द सहा वेळा आला आहे. दहाव्या मंडलातील १२१ वे सूक्त क या देवतेचे असून, तिथे क व प्रजापती हे एकच असल्याचे म्हटले आहे. या सूक्तात प्रजापती हा सृष्टि– स्थितिकर्ता असून, तोच एक देव आहे, अशी कल्पना मांडली आहे. 'भूर्भुवः स्वः' या तीन व्याहृतीच्या योगाने पृथ्वी, अंतरिक्ष व द्यौ या तीन स्थानांचा निर्देश होतो. या तीन्ही व्याहृतींची देवता प्रजापती आहे, असे कात्यायनाने 'समस्तानां प्रजापतिः' या वचनाच्या द्वारे सांगितले आहे. मनूनेही कात्यायनाला दुजोरा दिला आहे (२·७६–७७). यावरून प्रजापती हीच सर्वश्रेष्ठ देवता असून, सर्व देवतांचा अंतर्भाव प्रजापतीतच होतो, असे वैदिक आर्यांचे मत असल्याचे कळते. ऋग्वेदातल्या पुढील मंत्रांत (१०·१२१:१०)हा आशय स्पष्ट झाला आहे—

**प्रजापते न त्वदेतान्यन्यो विश्वा जातानि परि ता बभूव ।**
**यत्कामास्ते जुहुमस्तन्नो अस्तु वयं स्याम पतयो रयीणाम् ।।**

अर्थ – हे प्रजापते, तुझ्यावाचून अन्य कोणी नाही. सर्व उत्पन्न होणाऱ्या पदार्थांना प्रजापती व्यापून उरला आहे. आम्ही ज्या कामना धरून तुला यज्ञात आहुती देतो, त्या आमच्या कामना पूर्ण होवोत. आम्ही सर्व प्रकारच्या संपत्तीचे स्वामी असावे.

वाजसनेयी माध्यंदिन संहितेच्या ३२ व्या अध्यायात प्रजापतीपूर्वी काहीही उत्पन्न झाले नव्हते आणि प्रजापती हाच प्रथम व परब्रह्म आहे असे म्हटले आहे. तै. संहितेत प्रजापतीनेच आपले मुख, बाहू, मध्य व पाय यांच्यापासून अनुक्रमे ब्राह्मण व अग्नी, क्षत्रिय व इंद्र, वैश्य व विश्वेदेव आणि शूद्र निर्माण केले, असे सांगितले आहे. (७·१·१·४–६).

यावरून कळते, की प्रजापती हा विश्वाचाच नव्हे; तर विश्वव्यवस्थेचाही कर्ता असल्याचे वैदिक लोक मानीत. याला एक महत्त्वाचे कारण होते. वैदिकांच्या समाजसंस्थेत महत्त्वाच्या घडामोडी प्रजापतिसंज्ञक लोकपालांकडून घडत असत. त्यांच्या नेतृत्वानेच आर्थिक, कौटुंबिक व युद्धरूप व्यवहार चालत. तोच समाजाचा शास्ता व नियंता असे. त्यावरून वैदिकांना असे वाटले, की विश्वाचा प्रपंचही अशाच कोण्या प्रजापतीने चालवला आहे. म्हणून वैदिकांनी कल्पना केली, की या विश्वाची उत्पत्ती प्रजापतीने कमलपत्रावर बसून केली ( तै. सं. ४·६·४·२ ). पण विचार करण्याची पद्धती सुधारल्यानंतर या श्रद्धेला धक्का बसला. मग वैदिक विचारवंत त्या कथेचा निराळा अर्थ करण्याची खटपट करू लागले. प्रजापतीचे सृष्टिकर्तृत्व हे एक रूपक आहे, असे समजून त्याचे अनेक अर्थ ब्राह्मणग्रंथांत दिले आहेत. अग्नी, सूर्य, चंद्र, संवत्सर, यज्ञ, वाणी, मन, प्राण, अन्न, मनू, अथर्व, आत्मा, सत्य राजा असे प्रजापती शब्दाचे संदर्भानुरोधाने वेगवेगळे अर्थ ब्राह्मणग्रंथांत सांगितले आहेत. एका ठिकाणी तर 'सर्वं वै प्रजापतिः' असे म्हणून सर्व विश्व

प्रजापती असल्याचे सांगितले आहे ( श. ब्रा. १·३·५·१० ).

अनेकविध रूपकांनी त्याचे वर्णन करूनही जेव्हा पूर्ण अर्थ प्राप्त झाल्याचे समाधान होईना, तेव्हा 'अनिरुक्तो वै प्रजापतिः' असे म्हणून प्रजापती हा व्याख्यारहित आहे, असे सांगून टाकले आहे ( तै. ब्रा. १·३·८·५ ).

प्रजापतीचे सगुण रूप बृहदारण्यकात (१·४·३) सांगितले आहे, ते असे–

**स हैतावानास यथा स्त्रीपुमांसौ परिष्वक्तौ ।**

अर्थ – स्त्री-पुरुष मिथुनीभूत असताना त्यांचे जे रूप, तेच प्रजापतीचे रूप होय.

म्हणूनच प्रजापतीला यज्ञात हविर्भाग मिळत असे. सायंप्रातर्होमांतही प्रजापतीला आहुती द्यावी, असे पारस्कर गृह्यसूत्रात सांगितले आहे. वैदिक वाङ्मयात प्रजापतीविषयी अनेक कथा आहेत. त्यांपैकी काही अशा–

प्रजापती प्रथम एकटाच होता. त्याने प्रजोत्पत्तीची इच्छा करून आपल्या मांसाची अग्नीत आहुती दिली. तेव्हा त्या अग्नीतून बिनशिंगांचा बोकड उत्पन्न झाला ( तै. सं. २·१·१ ).

विश्वाच्या कल्याणासाठी देवाने अवतार घेणे, या कल्पनेचा उद्‌गम वैदिक वाङ्मयातच झाला आहे. सांप्रत मत्स्य– कूर्मादी अवतार हे श्रीविष्णूचे मानले जातात; पण वैदिक वाङ्मयात मत्स्य, कूर्म, वराह ही तीन्ही रूपे प्रजापतीनेच घेतली असल्याचे वर्णन आहे.

प्रजापतीने यज्ञ व छंद यांची वाटणी केली. तिच्यात त्याने अनुष्टुप् छंद अच्छावाकीय ऋचेला दिला. अनुष्टुप् त्यामुळे प्रजापतीवर रागावला. तेव्हा प्रजापतीने सोमयाग करून अनुष्टुप् छंदाला आद्यस्थान दिले. तेव्हापासून अनुष्टुप् छंदाचा सर्व सवनांत प्रथम उपयोग होऊ लागला.

मनुष्य असून देवत्व पावलेल्या ऋभूंना प्रजापतीने एकदा तृतीय सवनात सोमपान करविले व आपणही त्यांच्यासह सोमाचे प्राशन केले. ते पाहून देवांनी प्रजापतीची खूप निर्भर्त्सना केली ( ऐ. ब्रा. ३·३० ).

एकदा प्रजापती आपल्या कन्येला पाहून मोहवश झाला व त्याने मृगरूप घेऊन तिच्याशी संभोग केला. देवांना त्याचे हे निंद्य कृत्य दंडनीय वाटले. पण त्यांच्यापैकी कोणीही एकटा त्याला शासन करण्यास समर्थ नव्हता. तेव्हा सर्व देवांनी आपल्या शरीरातील उग्र अंश एकत्र करून त्याचा एक भयंकर पुरुष बनविला. तोच रुद्र होय. रुद्राने प्रजापतीला बाणांनी विद्ध करून त्याला खाली पाडले.

हा रुद्र म्हणजे आकाशातला व्याध होय. रोहिणी ही तारका प्रजापतीची कन्या. रोहिणीच्या मागून मृग पळत आहे व व्याधाने मारलेला त्रिकांड बाण मृगरूपी प्रजापतीच्या पोटात घुसला आहे, असे ते दृश्य गगनमंडलात दिसते. त्या वेळी प्रजापतीचे जे रेत पडले, त्याने निरनिराळ्या प्राण्यांची उत्पत्ती झाली. देवांचा राग शमला व त्यांनी प्रजापतीला अभिषेक केला.

प्रजापतीने आरुणीला संन्यासाचे तत्त्व, इंद्राला प्रणवोपनिषद् व देवा-ब्राह्मणांना शुकरहस्य उपनिषद सांगितले, अशा कथा नव्य उपनिषदांत आढळतात. नृसिंह पूर्वतापिनी व नृसिंह षट्चक्र या उपनिषदांचा कर्ता प्रजापतीच आहे.

पुराणांत प्रजापती अनेक सांगितले आहेत. सात, तेरा, चौदा, एकवीस अशा त्यांच्या निरनिराळ्या संख्या निरनिराळ्या पुराणांत आढळतात. कर्दम, कश्यप, मरीची, अत्री, क्रतु, दक्ष, भृगू, इ. अनेक व्यक्तींना पुराणांनी प्रजापती म्हटले आहे. काही ठिकाणी प्रथम प्रजापतीला मूळ ईश्वर मानले असून, सृष्टिकर्त्या ऋषींना प्रजापती अशी संज्ञा दिली आहे. प्रत्येक कल्पात हे प्रजापती सृष्टी उत्पन्न करतात.

वैदिक वाङ्मयातला हा प्रजापती पुढे पुराणवाङ्मयात ब्रह्मा किंवा ब्रह्मदेव या नावाने आपल्या मूळ कथा-गाथा व सृष्टिकर्माचे सामर्थ्य घेऊन प्रसिद्धीला आला. **पाहा** – ब्रह्मा.

(२) एक स्मृतिकार. याची एक श्राद्धविषयक स्मृती असून, तिच्यात १९८ श्लोक अनेक वृत्तांत आहेत. या स्मृतीत कल्पशास्त्र, स्मृती, धर्मशास्त्र व पुराणे यांचा विचार केला आहे, असे श्री. चित्रावशास्त्री सांगतात. आशौच आणि प्रायश्चित्त यांच्या संबंधी प्रजापतीचे श्लोक याज्ञवल्क्याच्या स्मृतीवरील मिताक्षरा टीकेत दिले आहेत. अपरार्काने परिव्राजक विषयात प्रजापतीचा एक गद्य उतारा दिला आहे. स्मृतिचंद्रिका, पराशरमाधवीय व इतरही काही ग्रंथ, यांत याचे व्यवहारविषयक श्लोक दिले आहेत. निपुत्रिक विधवेचा नवऱ्याच्या संपत्तीवर हक्क असून, तिला त्याचे श्राद्ध करण्याचाही अधिकार आहे, असे प्रजापतीचे मत आहे. [ प्रा. च. को. ]

## प्रजापती परमेष्ठी

एक सूक्तद्रष्टा. ऋग्वेदाच्या दहाव्या मंडलातील १२९ वे सूक्त याने रचले असून, ते नासदीय या नावाने प्रसिद्ध आहे. **पाहा**– नासदीय सूक्त.

## प्रजापती वाच्य

एक सूक्तद्रष्टा. याच्या नावावर ऋग्वेदाच्या तिसऱ्या मंडलातील ३८, ५४, ५५ व ५६ ही सूक्ते आहेत. ९ व्या मंडलातील १०१ व्या सूक्तातल्या १३-१६ ऋचा यांचाही हा द्रष्टा आहे, असे समजतात. प्रजापती हे व्यक्तिनाम व वाच्य हे कुलनाम होय. ही दोन्ही नावे काल्पनिक आहेत. यालाच प्रजापती वैश्वामित्र असेही म्हण-

तात. विश्वामित्राच्या कुळातील एखाद्या व्यक्तीला ही नावे कोणीतरी बहाल केली असावी. श्री. मनकड यांच्या मते प्रजापती वाच्य व प्रजापती वैश्वामित्र या दोन भिन्न व्यक्ती असाव्या. आपल्या सूक्तात त्याने काही विचार व्यक्त केले आहेत, ते असे —

केवढाही मोठा युक्तिबाज, सूज्ञ किंवा सज्जन असो; पुरातन कालापासून अबाधित ठरलेले जे देवांचे नियम आहेत, त्यांना कोणीही बाधा आणू शकत नाही. द्यावा-पृथिवी या सर्व मानवांचे आणि देवांचे धारण करतात. तसे करताना त्या कधीही थकत नाहीत. देवांच्याकडे जाण्याचा मार्ग खरोखर गूढ आहे.

हा ऋषी कविमनाचा आहे. आपली स्तोत्रे ओबड धोबड न ठेवता ती सुंदर व सुशोभित करा, असे तो अन्य द्रष्ट्या कवींना सांगतो. त्याला इहलोकीच्या उत्कृष्ट सुखांचा उपभोग घेण्याची जशी तीव्र आकांक्षा आहे, त्याचप्रमाणे प्रज्ञावंतांच्या दर्शनाची व सहवासाचीही ओढ आहे. अनेक देवतांना उद्देशून त्याने ऋचा रचल्या आहेत आणि त्या त्या देवतेचे सामर्थ्य त्यांतून अभिव्यक्त केले आहे. एका ऋचेत तो परमेश्वराचे वर्णन त्रिकाच्या स्वरूपात करतो, ती ऋचा अशी —

**त्रिपाजस्यो वृषभो विश्वरूप उत त्र्युधा पुरुध प्रजावान् ।**
**त्र्यनीकः पत्यते माहिनावान्त्स रेतोधा वृषभः शश्वतीनाम् ।।**
(ऋ. ३. ५६. ३)

अर्थ — हा जो अनंतरूपे धारण करणारा, मनोरथ पूर्ण करणारा व वीर्यशाली असा परमेश्वर आहे, त्याची ऊर्जस्विता तीन प्रकारची असून, त्याची वक्षस्थलेही तीनच आहेत. त्याची प्रजा तीन लोकांत भरून राहिलेली आहे. त्याची प्रकाशमय रूपेसुद्धा तीन प्रकारची असून तो सर्वश्रेष्ठ देव त्रैलोक्याचा प्रभू आहे.

पुराणकालात जी सत्त्व-रज-तमांना अनुसरून त्रिमूर्तिकल्पना उदयाला आली, विकास पावली आणि मूर्तिकलेतही स्वीकारली गेली, तिचे बीज वरील मंत्रात आहे, असे म्हणता येईल.

**प्रजावान प्राजापत्य** एक सूक्तद्रष्टा. ऋग्वेदाच्या १० व्या मंडलातील १८३ वे सूक्त याच्या नावावर आहे. या सूक्ताला खास देवता अशी नाही. यात ऋषी आपल्या प्रेयसीला पुत्रप्राप्तीसाठी आपल्याजवळ येण्याचा आग्रह करतो. यावरून हे सूक्त संततिदायक मानले गेले आहे. प्रवर्ग्य नामक अनुष्ठानात या सूक्ताचे पठन केले असता संततिलाभ होतो, असे सांगितले आहे.

या ऋषीला त्याच्या आईच्या नावावरून सौपर्णेय असेही म्हणत (तै. आ. १०. ६३). [प्रा. च. कौ.]

**प्रणतिमुद्रा** एक मुद्राप्रकार. दोन्ही हात जोडणे याला प्रणति (नमस्कार) मुद्रा अशी संज्ञा आहे, असे व्यास म्हणतो. काश्यपाच्या मते प्रातःकाळी स्वस्तिकाकार, मध्यान्ही सरळ व सायंकाळी कलिकेसारखे हात करून सूर्यापुढे उभे राहणे याला प्रणतिमुद्रा म्हणावे. [आचारेन्दु]

**प्रणवोपनिषद** एक नव्य उपनिषद. या नावाची गद्य व पद्य अशा प्रकारची दोन उपनिषदे आहेत. प्रणव म्हणजे विष्णुरहस्य होय. विष्णूच्या नाभिकमळात विराजमान झालेल्या ब्रह्मदेवाने प्रणवाच्या साहाय्याने सृष्टिरचना करण्याचे ठरविले. अ, उ, म या त्याच्या तीन अवयवांपैकी अकारातून त्याने पृथ्वी, अग्नी, औषधी, ऋग्वेद, भूः (व्याहृती), गायत्री छंद, त्रिवृत् स्तोम, पूर्व दिशा, वसंत ऋतू, जीभ, रस आणि रुची यांची निर्मिती केली. उकारापासून वारा, यजुर्वेद, भुवः (व्याहृती), त्रिष्टुभ छंद, पंचदश स्तोम, पश्चिम दिशा, ग्रीष्म ऋतू, प्राण आणि नाक निर्माण केले. मकारापासून स्वर्ग, सूर्य, सामवेद, स्वः (व्याहृती), जगती छंद, सप्तदश स्तोम, उत्तर दिशा, वर्षा ऋतू, ज्योती आणि डोळे निर्माण केले. अर्धमात्रेतून श्रुती, इतिहास, पुराणे, वाकोवाक्य, गाथा, उपनिषदे आणि अनुशासन ही निर्मिली.

एकदा असुरांनी इंद्रनगरीला वेढा दिला असता देवांनी प्रणवाला नायक बनविले. विजय मिळाला तर कोणत्याही वेदोच्चारापूर्वी प्रणवाचा उच्चार करण्याचे ठरले. त्याप्रमाणे विजय झाला व प्रणवाने वेदपठणाची सुरुवात होऊ लागली.

प्रणवाच्या साडेतीन मंत्रांचे आणखी एक वर्गीकरण यात दिले आहे, ते असे —

अकार — ब्रह्मा दैवत, लाल रंग व ब्रह्मपदाची प्राप्ती हे ध्यानफल.

उकार — विष्णू दैवत, काळा रंग व वैष्णवपदाची प्राप्ती हे ध्यानफल.

मकार — ईशान दैवत, पिंगट करडा रंग, ऐशानपदाची प्राप्ती हे ध्यानफल.

अर्धमात्रा — सर्वदैवत्य, स्फटिकासारखा स्वच्छ रंग व अनामिकपदाची प्राप्ती हे ध्यानफल. [श्री. सी. ग. देसाई]

**प्रणवोपासना** शास्त्रामध्ये प्रणव म्हणजे ॐ या मंत्राला मंत्रराज अशी संज्ञा आहे. तो प्रत्यगात्म्याचा वाचक किंवा त्याचे प्रतीक मानला गेला आहे. नृसिंहपूर्वतापिनी व उत्तरतापिनी या दोन उपनिषदांत त्याचे सुरेख आणि विशद वर्णन आहे. प्रस्तुत मंत्रराजाचे श्रवण करून जिज्ञासा उत्पन्न

झाल्यावर या प्रणवाचा मार्ग समजून घेण्यासाठी देवांनी प्रजापतीची प्रार्थना केली, त्या वेळी प्रजापतीने त्यांना त्याविषयी सविस्तर व सप्रमाण उपदेश करून म्हटले –

ॐ कार हा सर्व जगताला व्यापून राहिलेला आहे, असे ध्यान करून जगातील यच्चयावत वस्तू ब्रह्मरूप आहेत व प्रत्यगात्माही ब्रह्म आहे, अशी भावना दृढ केल्याने ब्रह्मात्मैक्य सिद्ध होते व निर्गुण ब्रह्माचा 'अहं ब्रह्मास्मि' या रूपाने प्रत्यक्ष साक्षात्कार होतो.

मांडूक्योपनिषदातही प्रणवाचे विवेचन आढळते. तिथे म्हटले आहे, ते असे–

अ, उ व म या तीन मात्रा मिळून ओंकार बनतो. ॐकार हे परब्रह्माचे मुख्य नाव आहे. त्याचे ज्ञान झाले असता परब्रह्माचे ज्ञान होते, म्हणून त्याची उपासना ही परब्रह्माचीच उपासना असते.

'अयमात्मा ब्रह्म' हे उपनिषदांचे महावाक्य असून, हा आत्मा ब्रह्म आहे, असा त्याचा अर्थ आहे. या आत्म्याचे जागृती, स्वप्न, सुषुप्ती आणि तुरीय असे चार पाद सांगितले आहेत. हे पाद अनुक्रमे प्रणवाच्या अ, उ, म व अर्धमात्रा यांचे प्रतीक आहेत. यांना चार मात्रा असेही म्हणतात. जागृती (जागेपण) हे ज्याचे कार्यक्षेत्र आहे, तो वैश्वानर आत्मा ही प्रणवाची पहिली मात्रा समजावी. याची उपासना म्हणजे दृश्य विश्वाची उपासना होय. स्वप्न हे ज्याचे कार्यक्षेत्र आहे, तो तैजस आत्मा म्हणजे प्रणवाची दुसरी मात्रा होय. याची उपासना म्हणजे अदृश्याची किंवा सूक्ष्माची उपासना समजावी. सुषुप्ती हे ज्याचे कार्यक्षेत्र आहे, तो प्राज्ञ आत्मा म्हणजे प्रणवाची तिसरी मात्रा होय. ही लययोगाची उपासना आहे. हिच्यात उपासकाच्या मीपणाचा प्रणवरूप परब्रह्मामध्ये लय होतो. अर्धमात्रा म्हणजे तुरीय आत्मा होय. तो अव्यवहार्य (व्यवहाराच्या कक्षेत न येणारा), प्रपंचाचा उपशम करणारा, शिव आणि अद्वैत असा आहे. याप्रमाणे समग्र ओंकार म्हणजे प्रत्यगात्मा समजावा. जो या दृष्टीने त्याची उपासना करतो, तो स्वतःमध्येच आत्मस्वरूप बनून जातो.

या उपासनेची प्रक्रिया श्री. शांताराम आठवले यांनी पुढील प्रमाणे सांगितली आहे–

ॐ काराच्या उपासनेत जीवाने अकार म्हणजेच आपला स्थूल देह विराटाच्या देहात विरून गेला ही भावना करावी. उकार म्हणजे आपला सूक्ष्म देह विश्वाच्या सूक्ष्म देहात म्हणजे हिरण्यगर्भात विलीन झाला, असे मानावे. मकार म्हणजे आपला कारणदेह ब्रह्मांडाच्या मायादेहात प्रविष्ट झाला, असे कल्पावे. चंद्रबिंदू म्हणजे आपला महाकारणदेह मूल प्रकृतीत सर्वसाक्षी ईश्वरस्वरूपात अंतर्धान पावला, असा निश्चय करावा.

शब्द हा ज्ञानाचा व्यापक वाहक आहे; तरी नित्याच्या जीवनातील पुष्कळ अनुभव पूर्णपणे शब्दांत घालता येत नाहीत. ही गोष्ट मान्य करूनसुद्धा असे म्हणावे लागते, की शब्द म्हणजे अंतरातील अनुभवाची सर्वांत अर्थपूर्ण खूण आहे. आत्मज्ञानी पुरुष समाधी अवस्थेतून बाहेर आल्यावर आपल्या अनुभवाचे वर्णन करण्यास ॐ ही खूण वापरतो, म्हणून ओंकार किंवा प्रणव हेच आत्म्याचे स्वरूप होय, असे म्हणतात.

ब्रह्मस्वरूप अशा या प्रणवाचे मूळ पीठ मानवी शरीरातील मूलाधार चक्र हे आहे. याच ठिकाणी कुंडलिनी सुप्त दशेत असते. तिचे स्वरूपही ॐकाराशी मिळते जुळतेच आहे. या कुंडलिनीचे उत्थापन करून तिला शेवटी उर्ध्वगामी करणे व सुषुम्ना नाडीतून षट्चक्रांचा भेद करून तिला शेवटी सहस्रार चक्रापर्यंत पोचविणे हीच प्रणवाची साधना किंवा उपासना होय. ही उपासना सिद्धिप्रद कशी करावी, याविषयी काही शास्त्रदृष्ट मार्ग व विधी श्री. शांताराम आठवले यांनी दिले आहेत, ते असे–

(१) ॐ कार हा एकाक्षर महामंत्र आहे. त्याचा ऋषी परब्रह्म. देवता साक्षात परमात्मा व छंद देवी गायत्री होय. आस्तिक्य, श्रद्धा व शुद्ध बुद्धी असणाऱ्या साधकाने एकांत स्थली या प्रणवाचा जप करीत जावा. खर्जातील दीर्घ उच्चाराच्या ओंकाराचा जप प्रगत साधकांच्यासाठी उपयुक्त ठरतो. ॐकार हा मुक्तिदाता असल्यामुळे तो संसाराविषयी विरक्ती निर्माण करणारा आहे. म्हणून प्रापंचिकांपेक्षा विरक्त व संन्यासी यांच्यासाठी तो प्रशस्त सांगितला गेला आहे.

(२) ओंकाराच्या जपाने मनोजय साधतो. संसारी लोकांनी त्यासाठी ओंकाराचा ऱ्हस्व उच्चारी किंवा प्लुत म्हणजे उडी मारल्याप्रमाणे होणाऱ्या शीघ्रावर्तनांचा जप करावा.

(३) त्रिरात्र उपोषण करून पूर्वाभिमुख होऊन मौन धरून दर्भासनावर बसून जो ब्राह्मण सहस्र वेळा या अक्षराचे आवर्तन करील, त्याचे सर्व मनोरथ सिद्ध होतील, असे शास्त्र सांगते.

(४) ॐ चा उच्चार पंधरा वेळा केला असता देवादिकांच्या जड मूर्तींच्या ठिकाणी प्राणप्रतिष्ठा होते.

(५) संसारतापाने त्रस्त झालेल्यांना नादानुसंधान हा सोपा उपाय शांतिदायक आहे. नादानुसंधानासाठी एकांत स्थळी बसून आपल्या श्वासोच्छ्वासात होणाऱ्या 'सोऽहम्' ध्वनीवर लक्ष केंद्रित करावे. या नादानुसंधानाने साधतो तसा चित्तलय अन्य कोणत्याही उपायाने साध्य होत नाही. सोऽहम्मध्ये चैतन्य ज्योती आहे. त्यात मन एकरूप होऊन लय पावले म्हणजे जी शून्य, निरालंब अवस्था प्राप्त होते,त्या अवस्थेचा सतत अभ्यास करावा.

(६) वेदोपनिषदातील मंत्रमय ऋचा, गायत्री, मृत्युंजय यासारखे महामंत्र, सर्वसिद्धमंत्र आणि ईश्वरवाचक सर्वनामे ही सर्व ओंकाराचीच विविध रूपे किंवा अवतार आहेत. म्हणून या सर्व रूपांचे भजन, पूजन, मनन, अनुसंधान ही ओंकाराचीच उपासना आहे. याविषयी मनात संशय उरू देऊ नये.

असा हा कल्याणसाधक मंत्रराज आहे. ॐ मध्ये नाही असे या विश्वात काही नाही आणि ज्यात ॐ नाही असे या विश्वात काही नाही. सर्व पाप–तापांचा व चिंता–व्याधींचा नाश करण्याची शक्ती या ओंकारोपासनेत आहे. [उपनिषदर्थव्याख्या; उपनिषदांचा अभ्यास; कल्याण–साधनांक]

**प्रणाली** मूर्तीच्या पीठावर असलेली पन्हळ. हिचे तोंड उत्तरेकडे असते (मत्स्य पु. २६२. ६ व १६). शंकराच्या पिंडीतील पाणी वाहून जाण्यासाठी अशी प्रणाली केलेली असते. प्रणालीचे तोंड चौकोनी किंवा वाटोळे असावे व त्याला शोभा आणण्याकरिता सिंहमुख, कीर्तिमुख किंवा मकरमुख बसवावे, असे सांगितले आहे. [एन्सा. हिं. आ.; शृंगारहाट.]

**प्रतर्दन** एक सूक्तद्रष्टा. ऋग्वेदाच्या ९ व्या मंडलातील ९६ वे सूक्त व १० व्या मंडलातील १७९ व्या सूक्तातील दुसरी ऋचा याच्या नावावर आहे. याने आपल्या सूक्तात पवमान सोमाची प्रशंसा केली आहे. सोमरसाचा प्रभाव वाणीला चालना, मनाला प्रेरणा व स्तवनांना स्फूर्ती देतो; तसेच सोमरस प्राशन करणारे वीर संग्रामात निधड्या छातीने लढतात, असे याने सांगितले आहे. तो सोमाची प्रार्थना करतो, ती ऋचा अशी –

**यथापवथा मनवे वयोधा अमित्रहा वरिवोविद्धविष्मान् ।**
**एवा पवस्व द्रविणं दधान इन्द्रे सं तिष्ठ जनयायुधानि ।**
(ऋ ९.९६.१२)

अर्थ – तारुण्याचा जोम आणणारा, शत्रूंना ठार मारणारा, समाधानी वृत्ती देणारा आणि दिव्य जनांना हविर्भाग पोचविणारा तू जसा पूर्वी मनूसाठी पावन प्रवाहाने वाहत होतास, तसा आताही संपत्ती घेऊन येऊन आपल्या शुद्ध प्रवाहाने वाहा, इंद्राच्या ठिकाणी वास कर आणि युद्धात शस्त्रे प्रगट कर.

**प्रतर्दनविद्या** कौषीतकी उपनिषदातील एक विद्या. इंद्राने ती विद्या दिवोदासाचा पुत्र प्रतर्दन याला सांगितली, म्हणून ती प्रतर्दनविद्या या नावाने प्रसिद्ध आहे. या विद्येचा सारांश असा –

इंद्र म्हणाला, की मी प्रज्ञेचा म्हणजे जागृतीतील चैतन्याचा आत्मा आहे. मला आयुष्य व आनंद समजून तू माझी उपासना कर. कारण आयुष्य हे प्राण व प्राण हे आयुष्यच होय. प्राण हाच अमृत म्हणजे आनंद आहे. जोपर्यंत शरीरात प्राण असतो, तोपर्यंतच आयुष्य असते. म्हणून जो प्राणांची उपासना करतो, त्याला या लोकात पूर्ण आयुष्य मिळते आणि स्वर्गलोकात आत्यंतिक आनंद मिळतो. प्राण म्हणजेच प्रज्ञा होय. झोपेच्या वेळी व जागे होण्याच्या वेळी, तसेच मूर्च्छेच्या वेळी आणि पुन्हा शुद्धीत येण्याच्या वेळी प्राण शिल्लक असतो व त्या प्राणातूनच इंद्रिये व ज्ञान निघते, हे प्रत्यक्ष घडताना दिसते. म्हणजेच 'यो वै प्राणः प्रज्ञा' हे सिद्ध होते. म्हणून प्राणाचीच उपासना केली पाहिजे.

या सर्व विवेचनावरून, प्रतर्दन हा प्राचीन काळचा प्रत्यक्ष-प्रमाणवादी व स्वतंत्रपणे विचार करणारा होता, असे कळते. यज्ञादी बाह्य कर्मफलावर त्याची श्रद्धा नव्हती. म्हणून अंतर्यामी सदैव चालत असलेला अंतर्यज्ञ करावा, असे तो प्रतिपादन करीत असे. त्याची प्रज्ञात्ममीमांसेची कल्पना नवीन असून, त्यात प्राणशास्त्र, मानसशास्त्र व तत्त्वज्ञान या तीनही शास्त्रविषयक कल्पना अंतर्भूत झाल्या आहेत, असे श्री. रा. द. रानडे यांनी म्हटले आहे. [उपनिषदर्थव्याख्या.; उपनिषद्रहस्य श्री. कृ. वें. गजेंद्रगडकर, १९३८]

**प्रतापकुँवरिबाई** (इ. स. चे १९ वे शतक) राजस्थानातील एक कवयित्री. हिचा जन्म देवरिया रावलोत या वंशात झाला. हिचा पिता गोयंददास रावलोत जोधपूरच्या जारवण परगण्यात राहत असे. प्रतापकुँवरीचा विवाह मारवाडचा महाराजा मानसिंह याच्याबरोबर झाला होता. प्रतापकुंवरी ही अत्यंत रूपवती होती व ती तिच्या पतीची तिसरी राणी होती.

बालवयापासूनच तिचा ओढा भक्तिमार्गाकडे होता. तिने भक्तिपर कवितांचेही खूप पाठांतर केले होते. पुढे पूर्णदास या सत्पुरुषाकडून तिने दीक्षा घेतली आणि ती जन्मभर भक्तिमार्गातच राहिली. तिचा पती इ. स. १८४३ त मरण पावला. वैधव्यावस्थेत तर तिला ईश्वर हाच एकमेव आधार वाटला. तिने मग हजारो रुपये परमार्थकृत्यांत खर्च केले. तिने अनेक मंदिरेही बांधली. पुढे पूर्णदास आणि गोसावी दामोदरदास याच्या प्रेरणेने तिने काव्यरचनेला सुरवात केली आणि सुमारे पंधरा काव्यग्रंथ लिहिले. त्यांपैकी रामचंद्रमहिमा, रामगुणसागर, रघुवरस्नेहलीला, रामसुजसपचीसी, रामप्रेमसुखसागर, प्रतापविनय व हरिजसगायन या ग्रंथांत तिने राममहिमा वर्णिला आहे. प्रभू रामचंद्राचे वर्णन करताना ती एका पद्यात लिहिते –

**ऊँचो सिंहासन अति अनूप । ता बीच विराजत ब्रह्म रूप ।।**
**घट घट प्रति व्यापक एक गोत । पट तंतु जयामिलि ओतप्रोत ।।**
**इक आदिपुरुष अणघड़ अलेख । नहिं लहत पार सारदा शेष ।।**
**आधार सरब रह निराधार । नहिं आदि अंत कहिं आरपार ।।**
**पर तीन अवस्था गुणातीत । धर सगुणरूप निज भक्ति प्रीत ।।**
**गौ विप्र साधु पालक कृपालु । देवाधिदेव दाता दयालु ।।**

भावार्थ – अनुपमेय अशा उच्च सिंहासनावर रामाचे ब्रह्म-रूप विराजले आहे. घटाघटात तो भरून राहिला आहे. तो सर्वव्यापी आहे. तंतूतंतूंनी जसे वस्त्र बनते, तसाच हा विश्वपट रामप्रभूच्या तंतूंनीच भरला आहे. सर्व जगताला याचा आधार आहे. याला आदी नाही, अंत नाही; भूत नाही, भविष्य नाही. परंतु आपल्या भक्तांसाठी मात्र तो सगुणरूप धारण करतो. हा देवाधिदेव कृपाळू दाता व गो, ब्राह्मण आणि साधू यांचा पालनकर्ता आहे.

मध्ययुगीन हिंदी कवयित्रींमध्ये प्रतापकुँवरिबाईला बरेच वरचे स्थान प्राप्त झाले आहे. [ म. हिं. क. ]

## प्रताप रुद्रदेव

(इ. स. चे १६ वे शतक) ओडिसामधल्या कटक येथे राज्य करणारा गजपती या राजघराण्यातील एक राजा. हा सुविद्य व गुणिजनांचा भोक्ता होता. त्याने सरस्वतीविलास या नावाचा ग्रंथ रचला आहे. आपल्या राजधानीमध्ये पंडितांची सभा बोलावून व त्यांच्याशी चर्चा करून त्याने हा ग्रंथ तयार केला आहे. यात दिवाणी कायदा व धर्मशास्त्राचे नियम यांचा समन्वय केलेला आहे. पुढे या ग्रंथाला कायद्याचे स्वरूप प्राप्त झाले.

प्रतापमार्तंड हा ग्रंथही या राजाने रचिला असून, त्यात पदार्थनिर्णय, वासरादिनिरूपण, तिथिनिरूपण, प्रतिनिरूपण व विष्णुभक्ती असे पाच विभाग आहेत. [ हि. ध. ]

## प्रतापसिंह

(जन्म इ. स. १७६४) एक भक्तकवी. हा जयपूरचा राजा होता. महाराजा माधौसिंह याचा हा पुत्र. वयाच्या १४ व्या वर्षी हा गादीवर आला. हा स्वतः ज्ञान-विज्ञानाचा आणि ललितकलांचा प्रेमी होता. याच्या दरबारात कवी, विद्वान आणि संगीतज्ञ यांचा सन्मान होत असे. याच्या राजसभेत जगन्नाथभट्ट, आनंदघन, केशवराम, रसराज, इ. कवी होते; तसेच काही चारण आणि मुसलमान शाहीरही होते. त्यांच्याकडून याने ऐने अकबरी, दीवाने हाफीज, इ. फारसी ग्रंथांचा हिंदीत अनुवाद करवून घेतला. प्रतापवीर हजारा आणि प्रतापसिंह हजारा हे ग्रंथही त्याने तयार करविले. कवी पद्माकराने या प्रतापसिंहाचे गुणगान करणारा प्रतापसिंह बिरुदावली हा ग्रंथ रचला आहे.

हा स्वतः उत्तम कवी होता. याचे काव्य मुख्यत्वे व्रजभाषेतच आहे. व्रजनिधी या टोपण नावाने तो आपली काव्ये रची. रोज



प्रतापसिंह

पाच छंद रचायचेच असा याचा नियम होता. वयाच्या १२–१३ व्या वर्षापासूनच याने काव्यरचनेला प्रारंभ केला होता. आमरण त्याने हे व्रत चालविले. याच्या काही कविता ढूंढासी भाषेत व काही खडी बोलीत आहेत. प्रेमप्रकास, फागरंग, प्रीतिलता, सुहागरैनी, व्रजशृंगार, सनेह बहार, रास का रेखता, रमक जमक बत्तीसी, रंगचौपड इत्यादी २३ काव्यग्रंथ याने लिहिले आहेत. याने भर्तृहरीच्या शतकत्रयाचाही अनुवाद केला आहे. संस्कृत, उर्दू व पंजाबी या भाषा तो चांगल्या प्रकारे जाणत असे. फारसीचेही त्याला ज्ञान होते. व्रजनिधी-ग्रंथावली या नावाने त्याचे ग्रंथ प्रकाशित झाले आहेत.

प्रतापसिंह हा कृष्णोपासक कवी होता. श्रीकृष्णाच्या विविध लीलांची प्रत्ययकारी वर्णने याने केली आहेत. मात्र राधेच्या चित्रात याने भक्तिभावापेक्षा कामुक शृंगारी वासनेचाच रंग भरला आहे. त्याचे राधाविषयक एक पद्य असे—

**राधे बैठी अटरियाँ, झाँकति खोलि किवार**
**मनौ मदन-गढ तैं चली; द्वै गोली इकसार ।।**
**राधे घूंघट ओट सौं, चितई नेक निहारी ।**
**मनौ मदनकर तैं चली, गुप्ती की तरवारी ।।**
**नेजा से नैनान सौं, कियौ राधिका वार ।**
**अक बक ह्वै जकि थकि रहै, व्रजनिधी नंदकुमार ।।**

अर्थ—राधा गच्चीवर बसली आहे. दार उघडून डोकावून पाहते आहे. जणू मदनगडावरून दोन गोळ्याच एकदम सुटल्या आहेत. राधा घुंगटाच्या आडून पाहाते आहे. जणू मदनाच्या हातून गुप्तीतल्या तलवारीनेच वार केला आहे. भाल्याप्रमाणे असलेल्या डोळ्यांनी राधिकेने वार केला. त्यामुळे कवी व्रजनिधी म्हणतो, नंदकुमार आश्चर्यचकित होऊन अस्वस्थ झाला.

हा आपले आराध्य दैवत गोविंदजी याला जयपूरचा स्वामी मानून स्वतःला त्याचा दिवाण मानीत असे.

आपल्या इष्टदेवाची स्तुती करताना तो मीरेप्रमाणे भावविवश होत असे. कधी कधी स्त्रीवेष घेऊन आणि पायांत घुंगूर बांधून तो गातनाचत असे. अशा वेळची त्याची पदे भक्तिरसपूर्ण असत. त्यांपैकी एका पद्याचा नमुना असा–

**प्यारो लागे री गोविन्द ।**
**नवघनश्याम मदनमदमरदन दुखमोचक लोचन अरविन्द ।**
**' व्रजनिधी ' छैल छवीले मुखपर वारू कौटि सरपके इन्द ।।**

अर्थ– मेघाप्रमाणे शामलवर्णी, मदनाचाही गर्व हरण करणारा, दुःख दूर करणारा, कमळाप्रमाणे नेत्र असलेला गोविंद मला प्रिय आहे. कवी व्रजनिधी म्हणतो, या सुंदर मुखावरून शरदातील कोटी कोटी चंद्र ओवाळून टाकावे.

याची काही पदे अजूनही लोकप्रिय आहेत. [ रा. भा. सा.; रा. पिं. सा.; अजन्ता, मे १९५७; मरुभारती आक्टो. ६५ ]

## प्रतिकूलदोषशांती

वधू-वरांच्या विवाहाचा वाङ्‌निश्चय झाल्यावर वराच्या किंवा वधूच्या घरी कोणी व्यक्ती मरण पावली असता कार्याला जो दोष उत्पन्न होतो, त्याला प्रतिकूल अशी संज्ञा आहे. अशा वेळी मंगल कार्य केल्यास ते अशुभ फल निर्माण करते, असे शास्त्रवचन आहे. यासाठी जी शांती करतात, तिला प्रतिकूलदोषशांती असे म्हणतात. या शांतीचा विधी असा–

संकल्पपूर्वक कर्मारंभ करावा. धान्याचे पीठ तयार करून त्यावर श्री, विष्णू, उमा, रुद्र आणि मृत्यू या देवतांच्या सुवर्णप्रतिमांची स्थापना करावी. यथाविधि त्यांची पूजा करावी. मग अग्निस्थापना करावी. प्रधान होमाच्या वेळी अग्नी या देवतेसाठी दूर्वा, तिल, आज्य आणि चरू या हविर्द्रव्यांनी एकशे आठ आहुती द्याव्या. त्या वेळी पुढील मंत्र म्हणावा—भूः स्वाहा मृत्युर्नश्यतां स्नुषायै सुखं वर्धतां स्वाहा।

या शांतीचा विशेष असा, की यात पीठावर स्थापिलेल्या देवतांच्यासाठी हवन सांगितले नसून, हवनाची देवता अग्नी ही निराळीच सांगितली आहे. होमसमाप्तीनंतर आचार्याला पीठदान, दोन गोप्रदाने व दक्षिणा द्यावी.

प्रतिकूल घडल्यावर निरनिराळ्या माणसांच्या मृत्यूसाठी निरनिराळे महिने पुरे होईपर्यंत थांबून मग तो विवाह करावा, असे सांगितले आहे. उदा० पित्यासाठी एक वर्ष, मातेसाठी सहा महिने, सपिंडासाठी एक महिना (स्मृतिरत्नावली).

बहुत दिवसांचा रोगी, दूरदेशी राहणारा व संसाराविषयी विरक्त, अशा माणसाचा मृत्यू झाल्यास ते प्रतिकूल समजू नये.

दुष्काळ, राष्ट्रीय आपत्ती, आई-बापांच्या मृत्यूविषयी शंका अशा गोष्टी घडल्या असता, तसेच कन्या वयाने फार वाढली असता, प्रतिकूल दोष विचारात घेऊ नये, असे ज्योतिःसागरात सांगितले आहे. [ संस्कार-कौस्तुभ ]

## प्रतिग्रह

प्रतिग्रह म्हणजे स्वीकार करणे. ब्राह्मणांच्या षट्कर्मांपैकी एक. प्राचीन काळी ब्राह्मणांचा निर्वाह बहुधा दानाच्या प्रतिग्रहानेच होत असे. निरनिराळ्या दानांचा प्रतिग्रह करण्याचा विधी निरनिराळा असे. उदा० भूमीचा प्रतिग्रह तिच्याभोवती प्रदक्षिणा घालून, दासदासींचा त्यांचा हात धरून, हत्तीचा त्याच्यावर आरूढ होऊन, घोड्याचा त्याच्या कानाला धरून, गाईचा तिच्या शेपटीला धरून वृक्षांचा त्यांच्या मुळाशी हात ठेवून, अलंकारांचा अंगावर घालून, गृहांचा त्यात प्रवेश करून, जलस्थानांचा आत उतरून, शय्येचा तिच्यावर बसून किंवा तिला स्पर्श करून व छत्रीचा तिच्या दांड्याला धरून करीत असत.

प्रतिग्रह करायला समर्थ असूनही जो दानाचा स्वीकार करीत नाही, तो दानशीलांच्या लोकात जातो, असे याज्ञवल्क्याने म्हटले आहे. मात्र कुश, भाजीपाला, दूध, मासे, मांस, गंध, पुष्प, दही, भूमी, शय्या, आसन, जल, धान्य या वस्तूंचा स्वीकार केला असता दोष लागत नाही, असे त्याने म्हटले आहे.

कुटुंबाच्या निर्वाहासाठी शूद्राकडेही याचना करून दान घेण्यास हरकत नाही; मात्र स्वतःसाठी किंवा यज्ञयागासाठी कधीही दुसऱ्याकडे काही मागू नये, असे अंगिरस सांगतो.

अयाचित मिळाले असता, त्याचा स्वीकार करण्यात कसलाही दोष नाही. तीर्थांच्या ठिकाणी आणि देवालयांत मात्र कोणतेही दान घेऊ नये. कारण त्यामुळे दान घेणाऱ्याची तीर्थयात्रा निष्फळ होते. राजा, शूद्र व पतित यांच्याकडून दान घेऊ नये,

असे बुध सांगतो. विद्याविहीन ब्राह्मणाने सुवर्ण, भूमी, तिल व गाय याचे दान घेतले असता, तो भस्मीभूत होतो आणि दात्यालाही दानाचे काही फल मिळत नाही, असे बृहत्पाराशर स्मृतीत सांगितले आहे. [ वि. पु. भा.; श. क. ]

**प्रतिनिधी** (१) याची व्याख्या अशी – 'तुल्यरूपतया मुख्यकार्यकारित्वार्थं निधीयमानत्वम्' = आपले धार्मिक किंवा तत्सम काम करण्यासाठी आपल्या वतीने एखाद्या व्यक्तीची योजना केली जाते, तिला प्रतिनिधी असे म्हणतात.

प्रतिनिधीची दुसरी व्याख्या अशी –'शिष्टाभावे सामान्यात् प्रतिनिधिः। अप्रतिषिद्धश्च।' = निर्दिष्ट केलेल्या वस्तूंच्या अभावी तत्सम वस्तूंमधून प्रतिनिधी निवडावा. मात्र तो निषिद्ध नसावा.

**पुत्रं च विनयोपेतं भगिनीं भ्रातरं तथा।**
**एषामभाव एवान्यं ब्राह्मणं विनियोजयेत् ।।**

अर्थ – आज्ञाधारक पुत्र, भगिनी किंवा भाऊ यांच्या अभावी दुसऱ्या ब्राह्मणाची योजना करावी.

पतीचे व्रत पत्नीने व पत्नीचे व्रत पतीने केले असता चालते. पिता, माता, पती, भाऊ, सासू, गुरू व ब्राह्मण यांच्यासाठी एखाद्याने व्रतोपवासादी केले असता त्यांचे फल ते करणाऱ्यालाही मिळते, असे वराह पुराणात म्हटले आहे.

नित्य व नैमित्तिक कर्माच्या उपक्रमासाठी प्रतिनिधी नेमण्यास हरकत नाही; पण काम्य कर्मासाठी तो नेमू नये; तर ती स्वतःच करावी, असे मत कालमाधवीयात व्यक्त केले आहे. यज्ञ करायचा असेल, तर तोही स्वतःच करावा. प्रतिनिधीकडून तो करविला असता, त्याचे संपूर्ण पुण्य मिळत नाही, असे जैमिनीय मीमांसेत म्हटले आहे. श्राद्धाच्या बाबतीत औरस पुत्राने केलेले श्राद्ध व इतर प्रकारच्या पुत्राने केलेले श्राद्ध यांत फलाच्या दृष्टीने महदंतर असते, असे मनूचे मत आहे.

वैदिक कर्मात आवश्यक असणाऱ्या मुख्य द्रव्यांच्या अभावी अन्य द्रव्ये प्रतिनिधी म्हणून घेण्याची पद्धत आहे. षोडशोपचार पूजेत एखादा उपचार उपलब्ध नसता, त्याच्याऐवजी अक्षता वाहण्याची चाल आहे. तसेच, नवग्रहांच्या वेगवेगळ्या समिधा सांगितलेल्या आहेत त्या मिळाल्या नाहीत, तर औदुंबराच्या समिधा घ्याव्या, असे सांगितले आहे. [ श. क.; हिं. ध. ]

( २ ) शुक्रनीतीत राजाच्या आठ मंत्र्यांपैकी एकाचे नाव प्रतिनिधी असे दिले आहे ( २·७१-७२ ).

**प्रतिपदा** शुक्ल व कृष्ण पक्षांतली पहिली तिथी. हिला नंदा असेही नाव आहे. या दिवशी अभ्यंग स्नान वर्ज्य सांगितले आहे. मार्गशीर्ष वद्य प्रतिपदेच्या दिवशी रोहिणी नक्षत्र आल्यास ते एक मोठे पर्व होते. त्या दिवशी गंगास्नान करणे अत्यंत पुण्यप्रद असल्याचे भविष्य पुराणात सांगितले आहे. ही अग्नीची जन्मतिथी असल्याचे वराह पुराणात म्हटले आहे. शुद्ध प्रतिपदेचे चंद्रदर्शन भाग्यवर्धक मानतात. त्या दिवशी संध्याकाळी अस्तगामी चंद्रकोरीचे दर्शन घेऊन 'नवो नवो भवति' या मंत्राने तिला वस्त्राची दशी वाहावी असा विधी आहे. प्रतिपदेची काही तिथिव्रतेही आहेत. प्रतिपदा हा सर्वात मोठा अनध्याय मानला आहे. त्या दिवशी वेदाध्ययन करीत नाहीत.

प्रतिपदेचे मूर्तिध्यान हेमाद्रीने सांगितले आहे, ते असे– द्विभुज, रक्तवर्ण, मेषवाहन आणि एका हातात शक्ती व दुसऱ्या हातात पात्र धारण करणारी. [ श. क. ]

**प्रतिपदादी व्रत** एक तिथिव्रत. प्रतिपदेपासून पौर्णिमेपर्यंत प्रत्येक तिथीला हे व्रत करतात. यात प्रत्येक तिथीला कर्त्याने काय खायचे, ते सांगितले आहे, ते असे– प्रतिपदेला क्षीराशन, द्वितीयेला मधुरप्राशन, तृतीयेला मीठ वर्ज्य, चतुर्थीला तिलभक्षण, पंचमीला क्षीराशन, षष्ठीला फलाशन, सप्तमीला व अष्टमीला शाकाशन, नवमीला पिष्टाशन, दशमीला अग्नीवर न शिजवलेले अन्न, एकादशीला घृताशन, द्वादशीला पायसाहार (खीर), त्रयोदशीला गोमूत्रप्राशन, चतुर्दशीला यवाहार व पौर्णिमेला कुशोदकप्राशन. फल- चौदा मन्वंतरे स्वर्गवास. [ कृ. क. त. ]

**प्रतिप्रभ आत्रेय** एक सूक्तद्रष्टा. ऋग्वेदाच्या पाचव्या मंडलातील ४९ वे सूक्त याच्या नावावर आहे. सवित्याची प्रार्थना हा त्याच्या सूक्ताचा विषय आहे. त्यातली एक ऋचा (५·४९·४) अशी –

**तन्नो अनर्वा सविता वरूथं तत् सिन्धव इषयन्तो अनुग्मन् ।**
**उप यद् वोचे अध्वरस्य होता रायः स्याम पतयो वाजरत्नाः ।।**

अर्थ – ज्याला कसलाही अपाय होऊ शकत नाही, असा सविता हाच आमचे अभेद्य कवच होय. वेगवान नद्या वाहतात त्या आमच्या इच्छा पूर्ण करण्यासाठीच होत आणि म्हणूनच मी अध्वरातील होता अशी प्रार्थना करतो की, आम्ही सत्त्वाढ्य आणि (दिव्य) वैभवाचे अधिपती व्हावे.

**प्रतिप्रस्थाता** एक ऋत्विज. हा अध्वर्युगणामधला दुसरा ऋत्विज आहे. याला अध्वर्यूच्या बरोबरीने काम करावे लागते. अध्वर्यूच्या सतत सान्निध्यात असणारा असा अर्थ

त्याच्या नावावरून दिसतो. उप–अध्वर्यू म्हणून ओळखण्याइतकी याची योग्यता असते. क्वचित अध्वर्यू या शब्दानेही याचा उल्लेख आढळतो. पशुयाग, सोमयाग यांसारख्या मोठ्या यज्ञांमध्ये हा अध्वर्यूंच्या बरोबर असतो; परंतु दर्शपूर्णमासेष्टी किंवा तत्सम याग यात याची जरुरी नसते. [ श्री. विद्याधरशास्त्री भिडे ]

**प्रतिबिंबवाद** भारतीय दर्शनातील एक वाद. ईश्वर आणि जीव यांचे स्वरूप कसे आहे, ते सांगण्यासाठी अनेक वाद निर्माण झाले; त्यांपैकी आभासवाद, प्रतिबिंबवाद, अवच्छेदवाद व जीवैक्यवाद हे विशेष उल्लेखनीय आहेत. या वादांपैकी प्रतिबिंबवादाची भारतीय दर्शनांत विशेष चर्चा केलेली आहे. अद्वैत वेदान्तात तर हा वाद एक मतभेदाचाच विषय झालेला आहे. अद्वैत दर्शनातील विवरणकार, प्रकटार्थकार, विद्यारण्यस्वामी, संक्षेपशारीरकार, इ. आचार्य प्रतिबिंबवादाचे पुरस्कर्ते आहेत. या वादात ईश्वर हे बिंब व जीव हे त्याचे प्रतिबिंब मानतात.

सिद्धान्तबिंदू या ग्रंथात मधुसूदन सरस्वती यांनी या प्रतिबिंबवादाचे विवेचन पुढीलप्रमाणे केले आहे –

**अज्ञानोपहितं बिम्बचैतन्यमीश्वरः । अन्तःकरणतत्संस्कारावच्छिन्नाज्ञानप्रतिबिम्बितं चैतन्यं जीव इति विवरणकाराः । अज्ञानप्रतिबिम्बितं चैतन्यमीश्वरः । बुद्धिप्रतिबिम्बितं चैतन्यं जीवः । अज्ञानानुपहितं बिम्बचैतन्यं शुद्धमिति संक्षेपशारीरकाराः । अन्ययोश्च पक्षयोर्बुद्धिभेदाज्जीवनानात्वम् । प्रतिबिम्बस्य च पारमार्थिकत्वाज्जहदजहल्लक्षणैव तत्त्वमादिपदेषु । इममेव च प्रतिबिम्बवादमाचक्षते ।**

अर्थ – अज्ञानाने उपहित (युक्त) बिंबचैतन्य म्हणजे ईश्वर होय व अंतःकरण आणि त्याचे संस्कार यांनी युक्त असलेल्या अज्ञानात प्रतिबिंबित झालेले चैतन्य म्हणजे जीव होय, असे विवरणकार सांगतात. अज्ञानात प्रतिबिंबित झालेले चैतन्य म्हणजे ईश्वर होय आणि बुद्धीत प्रतिबिंबित झालेले चैतन्य म्हणजे जीव होय. अज्ञानोपाधिरहित बिंबचैतन्य हे शुद्ध असते, असे संक्षेपशारीरकारांचे मत आहे. या दोन्ही पक्षांत बुद्धी म्हणजे अंतःकरणे भिन्न भिन्न असल्यामुळे जीवही अनेक मानलेले आहेत. त्यामुळे ' तत् त्वम् ' इ. पदांत जहदजहल्लक्षणा होते. यालाच प्रतिबिंबवाद असे म्हणतात.

या दार्शनिक सिद्धान्ताबाबत अनेक आचार्यांनी आस्था दर्शविली आहे, तशी अनेकांनी अनास्थाही प्रकट केली आहे. अनास्था दर्शविणाऱ्यांचे म्हणणे असे, की रूपवान पदार्थाचे रूपयुक्त आधारातच प्रतिबिंब दिसू शकते. उदा० चंद्राचे प्रतिबिंब जलातच दिसते. चंद्र जर रूपरहित असता, तर रूपवान जलात त्याचे प्रतिबिंब कधीच दिसले नसते. वास्तविक ब्रह्म हे निर्गुण, निराकार व अनाद्यनंत आहे. त्यामुळे त्याचे प्रतिबिंब पडणेच शक्य नाही. म्हणून रूपहीन अंत:करणातच प्रतिबिंब उत्पन्न करण्याची शक्ती विद्यमान आहे, असे मानले पाहिजे.

पदार्थसंग्रहात सांगितले आहे, की प्रतिबिंब हे बिंबसदृश असते आणि त्याला बिंबापेक्षा निराळे अस्तित्व नसते. प्रतिबिंबाचे नित्य व अनित्य असे दोन भेद आहेत. ब्रह्माशिवाय सर्व चेतन पदार्थ ब्रह्माची प्रतिबिंबे असून ती नित्य आहेत. मुखाचे आरशात जे प्रतिबिंब दिसते, ते अनित्य असते. कारण बिंबरूप मुखाचा, दर्पणरूप उपाधीचा किंवा त्याच्या सान्निध्याचा नाश झाला असता, मुखाच्या प्रतिबिंबाचाही क्षय होतो.

गोरखनाथ, कबीर, रैदास, दादू, धरणीदास, इ. संतकवींनीही प्रतिबिंबवादावर स्फुट रचना केली आहे. [ वै. शां. अ.; संतकाव्य मे प्रतिबिंबवाद – रा. अ. ग्रं.; भा. त. वि. ]

**प्रतिभानकूट** एक बोधिसत्त्व. याच्या मूर्ती भारतात आढळत नाहीत. चाबूक हे त्याचे अभिज्ञानचिन्ह आहे.



प्रतिभानकूट

निष्पन्नयोगावलीत याची तीन भिन्न रूपे वर्णिलेली आहेत. त्यांत त्याचा वर्ण कधी हिरवा तर कधी तांबडा, असे सांगितले आहे. बोधिसत्त्व अवलोकितेश्वर याची एकशे आठ भिन्न रूपे आहेत, त्यांतील एका रूपाचे नावही प्रतिभानकूट असेच आहे. तो एकमुख व चतुर्भुज असून, कमळावर वज्रपर्यंक अवस्थेत बसलेला असतो. त्याच्या उजव्या हातात रत्नपात्र असते. [ इं. बु. इ. ]

**प्रतिभानू आत्रेय** एक सूक्तद्रष्टा. ऋग्वेदाच्या पाचव्या मंडलातील ४८ वे सूक्त याच्या नावावर आहे. सवितृस्तुती हा याच्या सूक्ताचा विषय आहे. त्यातली एक ऋचा (५·४८·५) अशी–

**स जिह्वया चतुरनीक ऋञ्जते चारु वसानो वरुणो यतन्नरिम् ।**

**न तस्य विद्म पुरुषत्वता वयं यतो भगः सविता दाति वार्यम् ॥**

अर्थ– चार प्रकारची स्वरूपे धारण करणारा आणि मनोहर वस्त्रे परिधान करणारा वरुण आपल्या वाणीने भक्तांना उत्तेजन देतो आणि अधार्मिकांना दाबून टाकतो. त्याचे रहस्य आम्हां मानवांना आमच्या स्वाभाविक अल्पज्ञतेमुळे कळत नाही, ते हे की भाग्यदाता भग, किंवा जगत्प्रेरक सविता अभिलषणीय धन आम्हांला देतो. ते त्याच्याच पासून मिळते.

## प्रतिमा

(१) देवतांच्या पूजनीय मूर्तींना प्रतिमा असे म्हणतात. प्राचीन काळी देवपूजा प्रचलित असली, तरी संस्कृतीच्या भिन्न थरांत तिची रूपे भिन्न भिन्न होती. वैदिक आर्यांच्या बहुतेक देवता निसर्गसृष्टीतून उगम पावल्या आहेत. त्यांची वर्णने मानवासारखीच असली, तरी त्या देवता पूर्ण मानवीय गुणांनी युक्त नव्हत्या. त्याच काळातील अन्य मानवगण निरनिराळ्या प्रतीकांच्या रूपाने आपल्या देवतांचे पूजन करीत असे. त्या दोन्ही संस्कृतीचा समवाय घडून आल्यानंतर देवतांच्या मानवी प्रतिमा निर्माण होऊ लागल्या. वेदांतील वर्णनांप्रमाणेच पुराणे, आगम, इ. ग्रंथांत देवतांची स्वरूपवर्णने केलेली आहेत. त्यांच्या मूर्ती बनवण्यासाठी शिल्पशास्त्रात विशिष्ट परिमाणेही सांगितलेली आहेत. व्यक्तिगत पूजेसाठी लहान प्रतिमा आणि मंदिरांत प्रतिष्ठापना करण्यासाठी मोठ्या मूर्ती असे त्यांचे दोन प्रकार असतात.

पुराणे, आगम व तंत्रशास्त्र यांत विष्णू, शिव आणि शक्ती यांचे माहात्म्य व रूपवर्णन आहे. त्यांतील ध्यानरूपांप्रमाणे निरनिराळ्या देवतांच्या असंख्य प्रतिमा कलाकारांनी निर्माण केल्या. प्रारंभी मातीच्या, वाळूच्या किंवा लाकडाच्या प्रतिमा निर्माण केल्या गेल्या असाव्या. पण त्या दीर्घ कालापर्यंत टिकत नसल्यामुळे फार प्राचीन काळातल्या प्रतिमा सांप्रत उपलब्ध नाहीत. कालांतराने पाषाण, धातू, इ. टिकाऊ पदार्थांच्या प्रतिमा निर्माण झाल्यामुळे त्या अजूनही चांगल्या स्थितीत उपलब्ध होतात.

शैव, वैष्णव, शाक्त, बौद्ध, जैन, इ. असंख्य पंथोपपंथांच्या अनुयायांनी आपापल्या उपास्य देवतांच्या विविध प्रकारच्या शेकडो प्रतिमा निर्माण केल्यामुळे प्रतिमाकलेचा विकास अनेक अंगांनी झाला. भारतीय शिल्पकला ही धर्माधिष्ठित असून, पुराणे, आगम, तंत्रग्रंथ, प्रतिष्ठापद्धती, साधनमाला अशा धार्मिक साहित्यात प्रतिमानिर्मितीविषयी विपुल माहिती आढळते. विशेषतः मत्स्य, अग्नी, विष्णुधर्मोत्तर ही पुराणे; बृहत्संहिता, कामिकागम, कर्णागम, सुप्रभेदागम, अंशुमद्भेदागम, रुद्रयामल, हयशीर्ष ही तंत्रे; चतुर्वर्गचिंतामणी व हरिभक्तिविलास हे ग्रंथ त्या दृष्टीने अत्यंत उपयुक्त आहेत. त्या व्यतिरिक्त मयमत, मानसार, विश्वकर्मप्रकाश, समरांगणसूत्रधार, अपराजितपृच्छा,



ध्यानी विष्णू – जोधपूर

इ. अनेक ग्रंथ शिल्पशास्त्रावरच रचलेले आहेत. त्यांत प्रतिमानिर्मितीचे सर्व नियम दिलेले आहेत. कलाकारांना त्या नियमांचे काटेकोर पालन करावे लागत असे. त्याविषयी समरांगणसूत्रधार या ग्रंथात जो सिद्धान्त सांगितला आहे, तो असा–

**प्रमाणे स्थापिता देवाः पूजार्हाश्च भवन्ति हि ।**

अर्थ– (शास्त्रीय) परिमाणांना अनुसरून केलेल्या प्रतिमाच पूजेला योग्य होत. (अन्य प्रकारच्या नव्हेत.)

**वर्गीकरण–** प्रतिमांचे वर्गीकरण विविध प्रकारे करता येते. हिंदू, बौद्ध व जैन हे त्यांतील मुख्य वर्गभेद असून, पौराणिक व तांत्रिक असे त्यांचे पोटभेद आहेत. चल व अचल असेही दोन प्रकार आहेत. चल प्रतिमांचे कौतुकबेर (पूजेची मूर्ती), उत्सवमूर्ती, बलिबेर (नैवेद्य दाखवण्यासाठी) आणि स्नापनमूर्ती (स्नानासाठी) असे चार पोटभेद असून, अचल प्रतिमांचे स्थानक (उभी), आसन (बसलेली) व शयन असे तीन पोटभेद आहेत.

**प्रतिमानिर्मिती–** प्राचीन काळी हा व्यवसाय नव्हे, तर एक धार्मिक कृत्य मानले जात असे. कलाकार केवळ शिल्पज्ञ नसून तो योगी स्थपती असे. त्याचे आचरण नीतिधर्माला अनुसरून

असे. देवतेची प्रतिमा तयार करण्यासाठी त्याला आपले शरीर व मन शुद्ध ठेवणे आवश्यक असे. समरांगणसूत्रधार या ग्रंथात त्याचे वर्णन पुढीलप्रमाणे (७६.४) केले आहे–

**प्रारभेद् विधिना प्राज्ञो ब्रह्मचारी जितेन्द्रियः।**
**हविष्यनियताहारो जपहोमपरायणः ।।**

अर्थ– प्राज्ञ, ब्रह्मचारी, जितेंद्रिय, हविष्यान्नावर निर्वाह करणारा व जपहोमपरायण अशा स्थपतीने विधियुक्त असे प्रतिमानिर्मितीचे कार्य आरंभावे.

त्याने पलंगावर शयन न करता भूमीवर झोपावे, असेही सांगितले आहे. असा चित्तवृत्तिनिरोध केल्यानंतरच देवतेचे दिव्य ध्यान कलाकाराच्या मनश्चक्षूंना दिसते व त्याप्रमाणे तो प्रतिमा निर्माण करू शकतो.

देवतांच्या प्रतिमा मानवरूपीच असतात आणि त्या मानवी देहाच्या उंची, रुंदी, घेर इत्यादींच्या प्रमाणातच बनवायच्या असतात. हंस, शश, रुचक, भद्र व मालव्य असे पाच पुरुषभेद शास्त्रात सांगितलेले आहेत. त्यांची उंची ९६, ९९, १०२, १०५ व १०८ अंगुळे असावी, असे बृहत्संहितेत सांगितले आहे. वराहमिहिराने दिलेली ही परिमाणे महापुरुषांची असून, तीच देवतांच्या प्रतिमांसाठी सुयोग्य होत, असे उत्पलाने आपल्या टीकेत म्हटले आहे.

वैखानसागमात प्रतिमांची सहा परिमाणे सांगितली आहेत. मान (देहाची उंची), प्रमाण (रुंदी), उन्मान (जाडी), परिमाण (घेर), उपमान (पायांतील अंतर) व लंबमान (भिन्न अवयवांची लंबरेषेतील मापे), अशी त्यांची नावे आहेत. आगम, मानसार, इ. द्राविड ग्रंथांत तालमान हे परिमाण विशेष महत्त्वाचे मानलेले आहे. १२ अंगुळे = १ ताल, असे वैखानसागमात सांगितले आहे. मत्स्य पुराणाव्यतिरिक्त इतर पुराणे आणि समरांगणसूत्रधारासारखे नागर शिल्पशास्त्रावरील ग्रंथ यांत तालमानाचा उपयोग केलेला नाही. भोजराजाने समरांगणसूत्रधार या आपल्या ग्रंथात मूर्तींच्या भिन्नभिन्न अवयवांची आणि भागांची मापे दिलेली आहेत.



सरस्वती – जैन देवी

**प्रतिमाद्रव्ये** – शिल्पशास्त्रावरील निरनिराळ्या ग्रंथांत प्रतिमाद्रव्यांचे भिन्न वर्ग पाडलेले आढळतात. माती, लाकूड, पाषाण, धातू, रत्ने, वाळू, पीठ, हस्तिदंत हे पदार्थ प्राचीन काळापासून आजतागायत मुख्यत्वे वापरले जातात. त्यांची परीक्षा कशी करावी, कोणते पदार्थ कोणत्या मूर्तीला योग्य, इ. चर्चा बहुतेक ग्रंथांत केलेली आढळते. भिन्न भिन्न द्रव्यांच्या प्रतिमांमुळे भिन्न भिन्न फले प्राप्त होतात, असेही सांगितले आहे. लाकडी प्रतिमेमुळे ती करवित्याला दीर्घायुष्य, पाषाणमूर्तीमुळे स्थावर संपत्ती व विजय, मातीच्या प्रतिमेमुळे धन, सुवर्णप्रतिमेमुळे भुक्ती व मुक्ती, रौप्यमूर्तीमुळे शक्ती, तांबे व पितळ यांच्या प्रतिमांमुळे पुत्र व कांस्यमूर्तीमुळे दीर्घायुरारोग्य लाभते. लोखंड व शिसे या धातूंच्या मूर्ती मात्र अशुभ मानलेल्या आहेत.

सर्वसामान्य लोक पूजेसाठी तांबे, पितळ, लाकूड यांच्या मूर्ती वापरीत. मंदिरांत ठेवण्यासाठी पाषाण, तांबे, पितळ, कांस्य यांच्या मूर्ती बनवीत. राजेमहाराजे व श्रीमंत लोक सोने, चांदी, हस्तिदंत, रत्ने यांच्या प्रतिमांची पूजा करीत. माती, वाळू व पिष्टपदार्थ यांच्या मूर्ती पूजा झाल्यानंतर लगेच विसर्जन करण्यासाठी बनवल्या जात.

प्रतिमाकला व प्रतिमाशास्त्र यांचा सर्वांगीण विकास मुख्यतः भक्तिपंथामुळे झाला. सामान्य लोकांप्रमाणेच राजे, महाराजे व सरदार या सर्वांनी असंख्य मंदिरे बांधून, त्यांत आपापल्या उपास्य देवतांची स्थापना केली. बौद्ध व जैन पंथांचे लोकही बुद्ध, बोधिसत्त्व, तीर्थंकर, इ. देवतांच्या मूर्ती स्थापून भक्तिभावाने त्यांची उपासना करू लागले. त्यानंतर जे तांत्रिक संप्रदाय उदय पावले, त्यांनीही नाना प्रकारच्या मूर्ती बनवून त्यांची पूजाअर्चा सुरू केली.

**मुद्रा** – देवतामूर्तींच्या भिन्न भिन्न अवस्था, त्यांच्या हातापायांची स्थिती, त्यांच्या मुखावरील भाव, त्यांची वस्त्रे व अलंकार, त्यांची आयुधे, त्यांची आसने व वाहने ही सर्व प्रतीकात्मक असतात. त्यांत पुष्कळ गूढार्थ असतो. देवतेची परंपरा, शक्ती, वृत्ती व कार्य यांचे सूचन मुद्रांच्या साहाय्याने सूक्ष्मपणे केलेले असते. हस्तमुद्रा, मुखमुद्रा, पादमुद्रा व शरीरमुद्रा असे मुद्रांचे चार प्रकार आहेत. देवतेचे आसन, वाहन, आयुध, वस्त्र व अलंकार यांच्या समुच्चयाला रूपसंयोग असे म्हणतात. आसनाचा अर्थ पादमुद्रा व पीठ असा द्विविध आहे. सुप्रभेदागमात पाच प्रकारची पीठे वर्णिली आहेत. त्यांचे आकार भिन्न असून, प्रयोजनही भिन्न असते. प्रत्येक देवतेचे वाहन ठरलेले आहे. उदा० ब्रह्मदेवाचे हंस, विष्णूचे गरुड, शिवाचे नंदी, दुर्गेचे सिंह

इत्यादी. त्याचप्रमाणे निरनिराळ्या देवतांची आयुधेही भिन्न असतात. विष्णूची आयुधे – चक्र, गदा, धनुष्य; शिवाची – त्रिशूळ, धनुष्य, खट्वांग, परशू, अग्नी; गणेशाची – अंकुश व पाश. याशिवाय निरनिराळ्या देवतांच्या हाती खड्ग, मुसल, शक्ती, वज्र, शर, खेट, हल, टंक ही आयुधेही आढळतात. याव्यतिरिक्त पद्म, पुस्तक, अक्षमाला, कमंडलू, कपाल, शंख, दंड, दर्पण, श्रीफल, कुंभ, इ. वस्तूही देवतांच्या हातांत असतात.



क्षितिगर्भ बोधिसत्त्व

देशकालानुसार निरनिराळ्या समाजांतील स्त्री–पुरुषांची जी वेषभूषा व अलंकारपद्धती होती तीच मूर्तिकारांनी देवतांच्या प्रतिमा बनवताना अनुसरली. देवतांच्या बाह्य सौंदर्याइतकेच अंत. सौंदर्याला कलाकारांनी महत्त्व दिले आहे. मूर्तींच्या सौष्ठवाप्रमाणेच त्यांनी रसोत्कर्ष आणि भावव्यक्ती यांच्याकडेही पूर्ण लक्ष दिले आहे. प्रतिमानिर्मितीमध्ये रसास्वाद आणि भावदर्शन यांची नितांत आवश्यकता असते, असे समरांगणसूत्रधार या ग्रंथात भोजराजाने प्रतिपादले आहे.



क्षेत्रपाल

**प्रतिमाप्रतिष्ठा** –कलाकाराने देवतेची प्रतिमा निर्माण केल्यानंतर तिची प्राणप्रतिष्ठा केल्यावाचून ती पूजनीय होत नाही, असे देवप्रतिष्ठातत्त्व या ग्रंथांत सांगितले आहे. मत्स्य, अग्नी, इ. पुराणांत देवप्रतिष्ठाविधीचे विस्तृत वर्णन केलेले आहे. कारण प्रतिमाविधानाइतकेच तिच्य प्रतिष्ठाविधीलाही महत्त्व असते. बृहत्संहिता, समरांगणसूत्रधार, इ. ग्रंथांतही या विधीचे वर्णन आहे. त्या ग्रंथांत देवप्रासाद आणि देवप्रतिमा यांची शास्त्रीय मोजमापेही दिली आहेत. प्रासाद व प्रतिमा यांचा परस्पर संबंध शरीर व प्राण यांच्यासारखाच असतो, असे हयशीर्षपंचरात्र, अग्नी पुराण, शिल्परत्न, इ. ग्रंथांत म्हटले आहे. **पाहा** – ताल, देवमूर्तिप्रतिष्ठा, मूर्तिकला, मूर्तिपूजा. [ भा. वा. शा. प्र. वि.; भा. सं क. ]

(२) जैन आचारधर्मातील एक संज्ञा. श्रावकाचाराचे (गृहस्थाश्रमाचे) अकरा विभाग आहेत, त्यांना प्रतिमा असे म्हणतात. त्यांचे वर्णन असे–

(१) दर्शन प्रतिमा– या अवस्थेत श्रावकाने मद्यपान, मांसभक्षण, शिकार, जुगार, वेश्यागमन, चोरी, परस्त्रीसंग यांचा त्याग करायचा असतो. (२) व्रत प्रतिमा – या अवस्थेत श्रावकाने पाच अणुव्रते, तीन गुणव्रते व चार शिक्षाव्रते पाळायची असतात. (३) सामायिक प्रतिमा – सकाळी, मध्यान्ही व सायंकाळी कायावाचामनांची शुद्धी करून, परिग्रह सोडून जिनेंद्रोपासना करायची असते. (४) प्रोषधोपवास प्रतिमा – प्रत्येक मासाच्या दोन्ही अष्टमी व दोन्ही चतुर्दशी या दिवशी उपोषण करायचे असते. (५) सचित्तत्याग– कंदमूलफले, भाजीपाला, इ. पदार्थ खायचे नसतात. (६) रात्रिभोजनत्याग. (७) ब्रह्मचर्य. (८) आरंभत्याग – असी, मसी, कृषी, वाणिज्य, इ. उद्योगांचा त्याग करणे. (९) परिग्रहत्याग– धनधान्य, वस्त्रपात्र, इ. सांसारिक वस्तू एकटाचापुरत्या निर्लोभवृत्तीने जवळ ठेवून अधिकांविषयी ममता सोडणे. (१०)अनुमतित्याग–सांसारिक गोष्टींना संमती देण्याचेही सोडणे. (११) उद्दिष्टत्याग – वरील दहा अवस्थांतून गेलेल्या श्रावकाने संसार सोडून मुनीकडे जायचे असते व त्याच्याकडून महाव्रते स्वीकारायची असतात. ही श्रावकधर्माची अंतिम अवस्था असून, मुनिधर्माची पूर्वतयारी होय. [ जै. ध. ]

## प्रतिमाव्रत

एक काम्य व्रत. कार्तिक शुद्ध चतुर्दशीला या व्रताचा आरंभ करतात. व्रतावधी एक वर्ष. यात उमा आणि शिव यांच्या तांदुळाच्या पिठाच्या मूर्ती करून त्यांची पूजा करावी, त्यांच्या भोवती शेकडो दिवे लावावे आणि दूध व तूप या हविर्द्रव्यांचे १०८ हवन करावे, असे सांगितले आहे. फल – सामर्थ्य, दीर्घायुष्य व संपत्ती यांची प्राप्ती. [ हि. ध. ]

## प्रतिसंवित

बौद्ध तत्त्वज्ञानातील एक संज्ञा. बौद्ध दर्शनात तर्कशुद्ध पृथक्करणाचे चार प्रकार मानले आहेत, त्यांची नावे अशी– धर्म, अर्थ, निरुक्ती व प्रतिभान. या चारही

प्रकारांना वज्रयानी लोकांनी देवता मानून त्यांना मानवमूर्ति-रूपे दिली आहेत. निष्पन्नयोगावलीत या मूर्तींची वर्णने आली आहेत, ती अशी–(१) धर्मप्रतिसंवित–आरक्त वर्ण, द्विभुज व वज्रांकित पाशांकुशधर. पूर्वद्वार हे तिचे स्थान. (२) अर्थ-प्रतिसंवित–हरित वर्ण, द्विभुज रत्नपाशधर. दक्षिणद्वार हे तिचे स्थान. (३) निरुक्तिप्रतिसंवित–रक्त वर्ण, द्विभुज, शृंखला धारण करणारी. पश्चिमद्वार हे तिचे स्थान. (४) प्रतिभानप्रति-संवित–पाचूवर्ण. त्रिसूचिक वज्रांकित घंटा धारण करणारी. उत्तरद्वार हे तिचे स्थान. [इं. बु. इ.]

**प्रतिसृष्टी** ब्रह्मदेवाने आदिसृष्टी निर्माण केल्यानंतर त्याच्या रुद्र, विराट, मनू, दक्ष, मरीची, इ. मानसपुत्रांनी जी सृष्टी स्वतंत्रपणे उत्पन्न केली, तिला प्रतिसृष्टी असे नाव आहे. मूळच्या विराट पुरुषाने अनेक मनू उत्पन्न केले. त्यांपैकी एका मनूने सात मनू निर्माण केले व पुष्कळ प्रजावृद्धी केली. त्यांच्यांतल्या स्वायंभुव नामक मनूने स्वारोचिष, उत्तम, तामस, रैवत, चाक्षुष, विवस्वान असे सहा पुत्र उत्पन्न केले. नंतर स्वायं-भुव मनूने आपल्या पुत्रांच्या साहाय्याने यक्ष, राक्षस, पिशाच, नाग, गंधर्व, किन्नर, विद्याधर, अप्सरा, सिद्ध, भूतगण, विद्युत, मेघ, वृक्ष, लता, तृण, मत्स्य, पशू, कीटक, इ. सर्व निर्मिती केली. तिला स्वायंभुव मनूची प्रतिसृष्टी असे म्हणतात. इतर सहा मनूंनीही यथाकाल आपली सृष्टी निर्माण केली. वराहाने यज्ञ, त्याची सामग्री, यूप, प्राग्वंश, धर्माधर्म व सर्व गुण यांची उत्पत्ती केली. ही वराहाची प्रतिसृष्टी होय. दक्षाने देवर्षी सदृश अनेक पुत्र, महर्षी व सोमपादी पितृगण निर्माण करून सृष्टीचे प्रवर्तन केले. हिला दक्षाची सृष्टी असे नाव आहे. ब्रह्म्याच्या मुखापासून ब्राह्मण, बाहूंपासून क्षत्रिय, ऊरूंपासून वैश्य, पायां-पासून शूद्र व चार मुखांतून चार वेद निर्माण झाले. हा ब्राह्म सर्ग होय. मरीचीपासून कश्यप आणि कश्यपापासून देव, दैत्य, दानव व सर्व जगत उत्पन्न झाले. ही कश्यपाची सृष्टी होय. अत्रीच्या नेत्रापासून चंद्र व चंद्रापासून त्याचा वंश उत्पन्न झाला आणि त्याने सर्व जग व्यापून टाकले. हा सोमाचा सर्ग म्हणून प्रसिद्ध आहे. आज्यप नावाचे व इतर पुत्र आणि राक्षस या सर्वांना पुलस्त्याची सृष्टी म्हणतात. काद्रवेय, गज, अश्व व बहुविध प्रजा ही सर्व पुलहाची सृष्टी होय. अठ्ठ्याऐंशी हजार वालखिल्य हे क्रतूचे पुत्र होत. अशा प्रकारे दक्ष, मरीची, इ. पुरुषांनी पुष्कळ प्रजा उत्पन्न केली आणि पृथ्वी व स्वर्ग भरून टाकला. त्यांचेच वंशज अद्यापिही त्रिभुवनात नांदत आहेत (कालिका पुराण २६). विश्वामित्र ऋषीनेही एक प्रतिसृष्टी निर्माण केली होती, अशी एक पौराणिक कथा आहे. [श. क.]

**प्रतिहर्ता** सोमयागातील एक ऋत्विज. उद्गात्याच्या गटात याचे तिसरे स्थान आहे. कोणत्याही सामाचा उपसंहार करणे याला प्रतिहार म्हणतात. प्रतिहर्त्याकडे हे काम असते. सामगान करणारे चौघेही जण साम म्हणताना परस्परांना साथ करतात. सोमयागासारख्या मोठ्या यज्ञामध्येच सामगान असते. म्हणून तिथेच या ऋत्विजाची गरज असते.

**प्रतिहारषष्ठी** एक सूर्यव्रत. कार्तिक शुद्ध षष्ठीला हे व्रत करतात. त्या दिवशी सायंकाळी नदीच्या तीरावर जाऊन, सूर्याभिमुख होऊन व्रतसंकल्प करतात आणि नानाविध फळे, दूर्वा, रक्तचंदन व अन्न अशा सर्व वस्तू एका ताम्रपात्रात घेऊन पुढील मंत्राने सूर्याला अर्घ्य देतात–

**नमोऽस्तु सूर्याय सहस्रभानवे नमोऽस्तु वैश्वानर जातवेदसे ।**
**त्वमेव चार्घ्यं प्रतिगृह्य गृह्य देवाधिदेवाय नमो नमस्ते ।।**

मग त्याची पूजा करतात. गीतवाद्यनृत्यादिकांनी ती रात्र जागवतात. सकाळी पुन्हा सूर्याची पूजा करून ब्राह्मणभोजन घालतात. फल– आरोग्यप्राप्ती व मनोरथपूर्ती. [वर्षकृत्यम्]

**प्रतिक्षत्र आत्रेय** एक सूक्तद्रष्टा. ऋग्वेदाच्या पाचव्या मंडलातील ४६ वे सूक्त याच्या नावा-वर आहे. विश्वेदेवांची स्तुती हा या सूक्ताचा विषय आहे. त्यातली एक ऋचा (५.४६.१) अशी –

**हयो न विद्वाँ अयुजि स्वयं धुरि तां वहामि प्रतरणीमवस्युवम् ।**
**नास्या वश्मि विमुचं नावृतं पुनर्विद्वान् पथः पुरएत ऋजु नेषति ।**

अर्थ – सर्वज्ञ (देवाने) सुद्धा जर आपल्या स्वतःला अश्वा-प्रमाणे (यज्ञाच्या) धुरेला जोडून घेतले आहे, तर मीही (मानवांचा) उद्धार करणारी आणि त्यांचे संरक्षण करणारी यज्ञधुरा आपल्या मानेवर घेणार. या जोखडापासून सुटण्याची मी इच्छा करीत नाही आणि पाऊल माघारे घेण्याचाही माझा हेतू नाही. सर्व मार्ग जाणणारा ईश्वर जर माझ्यापुढे चालत आहे, तर तोच नीट सरळपणे मला घेऊन जाईल.

**प्रतीकनाटक** संस्कृत साहित्यातील नाटकाचा एक प्रकार. या नाटकात श्रद्धा, भक्ती यांसारख्या अमूर्त भावांना नाटकीय पात्रांचे रूप दिलेले असते. काही नाटकांमधून केवळ अमूर्त भावच मूर्त केलेले असतात; तर काही नाटकांत मूर्त-अमूर्त कल्पनांच्या मिश्रणाने पात्रे निर्माण केलेली असतात.

अशा नाटकांची निर्मिती नक्की केव्हा सुरू झाली, ते सांगता येत नाही. मध्य आशियात बौद्ध नाटकांचे काही त्रुटित अंश मिळाले आहेत. त्यांत एका प्रतीक–नाट्याचाही काही भाग

आहे. अश्वघोषाचे शारीपुत्रप्रकरण हा प्रतीक-नाटकाचाच प्रकार होय. त्यात बुद्धी, कीर्ती, धृती या अमूर्त कल्पना रूपे घेऊन येतात आणि आपसांत वार्तालाप करतात. प्रतीक–नाटकांची ही परंपरा त्यानंतरच्या काळात खंडित झाली होती. पुढे इ. स. च्या ११ व्या शतकाच्या उत्तरार्धात कृष्णमिश्र याने प्रबोधचंद्रोदय हे नाटक लिहून या खंडित परंपरेचे पुनरुज्जीवन केले. या नाटकातील पात्रे म्हणजे मोह, विवेक, दंभ, ज्ञान, श्रद्धा, बुद्धी, इ. होत. प्रस्तुत नाटकात अध्यात्मविद्येचा उपदेश नाटकीय ढंगाने केलेला असून, वेदान्त व भक्ती यांचा सुंदर समन्वय केला आहे. त्यानंतरच्या कित्येक नाटककारांनी कृष्णमिश्राचे अनुकरण करून अनेक सुंदर नाटके लिहिली.

जैन कवींनीही कृष्णमिश्राच्या या प्रतीकनाटकाचे अनुकरण करून आपल्या धर्माच्या प्रचारासाठी तशी नाटके लिहिली आहेत. कवी यशःपाल याचे मोहराजपराजय हे नाटक जैन साहित्यात प्रसिद्ध आहे. या नाटकात कल्पित आणि वास्तव पात्रांचा परस्पर संयोग करून धर्मचर्चा केलेली आहे. महावीराच्या उत्सवप्रसंगी या नाटकाचा प्रयोग केला गेला.

इ. स. च्या तेराव्या शतकातला विशिष्टाद्वैतमताचा एक आचार्य वेन्दातदेशिक याने संकल्पसूर्योदय नावाचे प्रतीकनाटक लिहिले. त्यात त्याने शांत रस हा सर्वश्रेष्ठ रस असल्याचे सांगून मोहाचा पराजय आणि विवेकाचा उदय कसा होतो, ते दाखवून दिले आहे. सोळाव्या शतकात परमानन्द याने चैतन्यचंद्रोदय नामक नाटक लिहिले. त्याचा प्रतिपाद्य विषय चैतन्य महाप्रभूचे चरित्र हा आहे. या नाटकात भक्ती, विराग, कली, अधर्म, इ. अमूर्त पात्रांच्या जोडीला चैतन्य आणि त्यांचे शिष्य ही मूर्त पात्रेही उभी केलेली आहेत. आनंदराय नामक एका दाक्षिणात्य पंडिताने १८ व्या शतकात विद्यापरिणयन व जीवानन्दन अशी दोन प्रतीक-नाटके लिहिली. विद्यापरिणयन नाटकात शिवभक्तीमुळे मोक्षप्राप्ती कशी होते, ते सांगितले आहे. यात जैनमत, सोमसिद्धान्त, चार्वाक, सौगत, इ. पात्रे आहेत. जीवानन्दन या सात अंकी नाटकात गालगुंड, पांडुरोग, उन्माद, कुष्ठ, गुल्म, कर्णमूळ, इ. रोगांना पात्ररूपाने चित्रित केले आहे. सुदृढ शरीरातच सुदृढ मनाचा वास असतो आणि त्यातूनच आत्मकल्याणाचा मार्ग मिळतो, हे ठसवण्याचा या नाटकाचा उद्देश आहे. हिंदी भाषेतही अशी काही प्रतीक नाटके निर्माण झाली आहेत. [सं. सा. इ.; हिं. ना. उ. वि.]

## प्रतीके

गूढ कल्पना, महान आशय, थोर परंपरा किंवा चिरंतन तत्त्वविचार यांचे सूचन करणाऱ्या दृश्य वस्तूंना प्रतीके असे म्हणतात. प्रतिमा व प्रतीक हे दोन शब्द पुष्कळदा समान अर्थाने वापरले जातात; पण त्यांत मूलभूत अंतर आहे. प्रतिमा म्हणजे प्रतिकृती. प्रतिमेत रूपसादृश्य अभिप्रेत असते, ते प्रतीकात नसते. किंबहुना त्यात सादृश्याला महत्त्वच नसते. प्रतीकाचा संबंध आशयाशी किंवा कल्पनेशी असतो. द्रष्ट्या पुरुषांच्या चिंतनातून प्रकट झालेले आध्यात्मिक तत्त्वसार व मानवी मनातल्या मधुर–मंगल भावना व्यक्त करण्यासाठी काही विशिष्ट चिन्हे निर्माण केली जातात आणि साहित्य, कला व व्यवहार या तीन्ही क्षेत्रांत ती प्रतीके म्हणून मान्यता मिळवतात. मनाच्या मर्यादित शक्तींमुळे ज्याची कल्पना करता येत नाही, जे दिसत नाही किंवा ऐकू येत नाही, अशा नामरूपातीत ब्रह्माची उपासना करणे सुलभ व्हावे म्हणून प्राचीन ऋषींनी ॐ किंवा प्रणव हे त्याचे प्रतीक निर्माण केले. वेदान्तात ब्रह्माला सत्–चित्–आनंद मानले आहे. तो अर्थ या प्रतीकाने व्यक्त होतो. उपनिषदात पक्ष्याला आत्म्याचे प्रतीक मानले आहे.

भारतीय संस्कृतीत कमलाला अनन्यसाधारण स्थान मिळाले आहे. स्त्रीतत्त्व, पावित्र्य, वैभव, शाश्वत जीवन, चिच्छक्ती यांचे ते प्रतीक आहे. कमलमूल = ब्रह्म, देठ = माया व पुष्प = विश्व असे महानिर्वाणतंत्रात म्हटले आहे.

प्रतीकांचे आणखी एक प्रयोजन आहे. सामान्य मनुष्य काल्पनिक, अमूर्त अशा दैवतांची उपासना करू शकत नाही. उपास्य दैवताचे प्रतीक म्हणून एखादी वस्तू समोर ठेवूनच तो तिची पूजा करतो. पाषाण, वृक्ष, प्राणी यांना देव मानून त्यांची पूजा करणे ही संस्कृतीची प्रथमावस्था होय. ग्रामदेवतांची प्रतीके अशा प्रकारची असतात. पाषाणापासून निरनिराळ्या देवतांच्या मानवी रूपांतल्या प्रतिमा घडविणे ही त्यानंतरची अवस्था होय. अशा प्रतिमा म्हणजे त्या देवतांची प्रतीकेच होत; कारण त्या देवतांची मूळ रूपे अज्ञातच असतात. देवतांची वाहने व आयुधे ही त्यांच्या शक्तिसामर्थ्याची प्रतीके असतात. उदा० इंद्राचा ऐरावत, विष्णूचा गरुड, शिवाचा नंदी व यमाचा रेडा हे त्यांचे प्रचंड सामर्थ्य दर्शवतात. काही देवतांच्या प्रतिमा द्विमुख किंवा चतुर्मुख, चतुर्भुज, अष्टभुज किंवा दशभुज बनवतात, त्यातील उद्देशही प्रतीकात्मकच असतो. ब्रह्मदेवाची चार मुखे ही त्याचे चारही वेदांचे ज्ञान दर्शवतात. देवी म्हणजे शक्तिदेवता होय. तिचे सामर्थ्य केवढे प्रचंड आहे, हे सूचित करण्यासाठी तिला आठ, दहा किंवा अठरा भुजा लावतात.

भारतीय संस्कृतीत अशी असंख्य प्रतीके वापरलेली आढळतात. प्रणव, स्वस्तिक, कमल, कलश, धर्मचक्र, नटराज, शिवलिंग, अर्धनारीश्वर, त्रिमूर्ती, गजलक्ष्मी, सरस्वती, दीपज्योत,

योगीश्वर, शेषशायी, बोधिवृक्ष, अश्वत्थ, ध्वज ही त्यांतील प्रमुख प्रतीके होत. तंत्रशास्त्रातील यंत्रे हीदेखील प्रतीकेच होत.

ख्रिस्ती लोकांत प्रारंभी भुयारात प्रेते पुरण्याची चाल होती. त्यांतील थडग्यांवर जी चित्रे काढलेली आढळतात, ती प्रतीकात्मक आहेत. त्यांत तत्कालीन ख्रिस्ती लोकांच्या परलोकविषयक कल्पनांचे दर्शन होते. त्यांतील गुलाब हे स्वर्गाचे प्रतीक होय. कालांतराने पृथ्वीवर पाप व दैन्य वाढले. त्यामुळे जे भयग्रस्त वातावरण निर्माण झाले, त्याची चिन्हे नंतरच्या चित्रांत दिसून येतात. येशूच्या चित्रात रक्षणकर्त्या परमेश्वराचे प्रतीक दिसते. ख्रिस्ती चित्रकलेत त्यांच्या आशावादाचे व मृत्यूनंतर स्वर्गीय जीवन लाभेल, या श्रद्धेचे प्रतीक आढळते.

इ. स. च्या ४ थ्या शतकात कॉन्स्टंटाइन राजाने आपल्या सैनिकांच्या ढालींवर क्रॉस हे चिन्ह बसवले. त्यानंतर क्रॉस हे प्रतीक ठरले. प्रारंभी ते येशूच्या तेजाचे प्रतीक मानले जात होते. पण इ. स. च्या ७ व्या शतकानंतर ते येशूच्या प्राणार्पणाचे प्रतीक बनले.

मानवी जीवनात प्रतीकाला फार महत्त्व असते. प्रतीकाविना मनुष्याचे चालत नाही. वैदिक युगापासून आजमितीपर्यंत मनुष्य प्रतीकाच्या माध्यमातूनच विचार करीत आला आहे. काही प्रतीके सार्वत्रिक आहेत. उदा० सिंह हे शौर्याचे, कोल्हा हे चातुर्याचे व शुभ्र वर्ण हे पावित्र्याचे प्रतीक मानले जाते. गाय हे मातृत्वाचे प्रतीक आहे. प्रत्येक राष्ट्राचा ध्वज हे त्या राष्ट्राचे मानचिन्ह असते. भारतीय साहित्यात सीता व सावित्री यांना पातिव्रत्याचे प्रतीक आणि भीष्माला दृढप्रतिज्ञ व ब्रह्मचर्य यांचे प्रतीक मानले जाते. शेंदूर, कुंकू व बांगड्या ही सौभाग्याची प्रतीके आहेत, तर राखी हे बंधु-भगिनींच्या प्रेमाचे प्रतीक आहे. सूर्य हे ईश्वराचे प्रतीक आहे, तर प्रकाश हे ज्ञानाचे प्रतीक आहे. ही प्रतीके मानवाच्या आध्यात्मिकतेला, मंगल कामनेला व रसिकतेला संजीवन देण्याचे काम करतात. [एन्सा. रि. ए.; प्रतीकशास्त्र; संस्कृतीची प्रतीके; हिं. सा. को.]

## प्रतीहार राजवंश

हा राजवंश गुर्जर-प्रतीहार या नावानेही प्रसिद्ध आहे. राजपुतांच्या चार अग्निकुलांपैकी परिहार या कुलामधून प्रतीहार हा राजवंश उदय पावला, असे काही पंडितांचे मत आहे. पण या वंशातील काही राजांच्या प्रशस्तींमध्ये त्यांना रघुकुलतिलक व रघुवंशमुक्तामणी असे म्हटले आहे. यावरून हे राजे स्वतःला सूर्यवंशी मानीत होते, असे दिसते. त्यांनी प्रारंभी मालव देशावर राज्य केले. अवंती ही त्यांची राजधानी होती. पण कालांतराने त्यांनी कनोज नगर जिंकले व तिथे आपली राजधानी नेली.

बंगालमधील पाल, दक्षिणेतील राष्ट्रकूट आणि कनोजचे प्रतीहार या राजवंशांची साम्राज्यस्पर्धा दीर्घ काल चालू होती. शेवटी त्या स्पर्धेत प्रतीहार राजे विजयी होऊन त्यांनी उत्तर भारतात विशाल साम्राज्य स्थापन केले. **पाहा** – गुर्जर-प्रतीहार.

## प्रत्यंगिरा

एक तांत्रिक देवता. प्रत्यंगिरास्तोत्रात तिचे मूर्तिध्यान वर्णिले आहे, ते असे –

**शवोपरि समासीनां रक्ताम्बरतनुच्छदाम् ।**
**सर्वाभरणसंयुक्तां गुञ्जाहारविभूषिताम् ।।**
**षोडशाब्दां च युवतीं पीनोन्नतपयोधराम् ।**
**कपालकर्तृकाहस्तां परमानन्दरूपिणीम् ।।**
**वामदक्षिणयोगेन ध्यायेन्मन्त्रविदुत्तमाम् ।**

अर्थ–– शवावर अधिष्ठित, रक्त वस्त्र नेसलेली, सर्वाभरणे ल्यालेली, गुंजाहाराने. विभूषित, षोडशवर्षा युवती, पुष्ट व उन्नत उरोज असलेली, कपाल व कात्री धारण करणारी, परमानंदरूप व उत्तम अशा प्रत्यंगिरेचे मंत्रवेत्त्याने वामाचार व दक्षिणाचार या दोहोंच्याही द्वारे ध्यान करावे.



प्रत्यंगिरा

प्रत्यंगिरेचे एक वेगळे ध्यान आहे. त्यात ती कमळावर उभी असून, तिला चार हात आहेत. तिच्या हातात डमरू, अंकुश, पाश व कपाल असून, ती अनेक अलंकारांनी आणि वस्त्रांनी विभूषित आहे. तिच्या मस्तकी भव्य मुकुट आहे. तिचे उरोज पुष्ट व उन्नत आहेत. तिचे मुख कराल आहे.

प्रत्यंगिरेचे अनेक मंत्र निरनिराळ्या उद्दिष्टांसाठी मंत्रमहोदधीत सांगितले आहेत. त्यांपैकी एक मंत्र असा––

**ॐ ऱ्हीं नमः कृष्णवाससे शतसहस्रहिंसिनि सहस्रवदने महाबले अपजयिते प्रत्यङ्गिरे परसैन्यपरकर्मविध्वंसिनि परमन्त्रोत्सादिनि सर्वभूतदमनि सर्वदेवान्बन्ध बन्ध सर्वा विद्याश्छिन्धि छिन्धि क्षोभय क्षोभय परयन्त्राणि स्फोटय स्फोटय सर्वशृंखलास्त्रोटय त्रोटय ज्वल ज्वलानिके करालवदने प्रत्यङ्गिरे नमः ।**

या मंत्राचे यथाविधि पुरश्चरण करून मंत्र सिद्ध केल्यावर दुसऱ्याने आपल्यावर केलेले करणीकर्तुक दूर करता येते.

**प्रत्यधिदेवता** गृहयज्ञादी कर्मात मुख्य देवतेच्या डाव्या बाजूला स्थापन करायची एक देवता. [सं कौ.]

**प्रत्यवरोहण** पलंगावरून खाली उतरणे, असा त्याचा अर्थ आहे. सर्पदंशापासून संरक्षण व्हावे म्हणून श्रावण पौर्णिमेपासून पुढे पलगावर झोपावे आणि मार्गशीर्ष पौर्णिमेला पलगाचा त्याग करावा असे, सांगितले आहे. त्यासंबंधी करायचे विधान त्याच नावाने प्रसिद्ध आहे.

**प्रत्याम्नाय** धर्मशास्त्रातील एक संज्ञा. प्राचीन काळी बहुतेक सर्व पापांसाठी कडक प्रायश्चित्ते सांगितलेली असत. परतु ती नियमाबरहुकूम आचरणात आणणे सर्वानाच शक्य नसल्यामुळे त्याच्याऐवजी जी थोडी सोपी प्रायश्चित्ते सांगितली गेली, त्यांना प्रत्याम्नाय असे म्हणतात. उदा० प्राजापत्य या प्रायश्चित्ताऐवजी दुभती गाय दान देणे किंवा तिची किमत देणे किंवा दहा हजार गायत्री मंत्र जपणे, इत्यादी.

मध्ययुगात महापातकांसाठीसुद्धा अशी सोपी प्रायश्चित्ते सांगितली गेली. ब्राह्मणभोजन व दान-दक्षिणा असे त्या प्रायश्चित्ताचे स्वरूप होते. [ हि. ध. ]

**प्रत्यालीढ** मूर्तिकरणातील एक अवस्था. धनुष्यातून बाण सोडताना मनुष्य या अवस्थेत उभा असतो. या अवस्थेत मनुष्याची एक बाजू दिसत असून, डावा गुडघा पुढे पण पाय जरा मागे ओढून घेतलेला आणि उजवा पाय मागे ताठ केलेला असतो. अनेक मूर्ती प्रत्यालीढ अवस्थेत उभ्या दिसतात. बोधगया येथील एका दगडी कठड्यावर उषा व प्रत्यूषा यांच्या आकृती वरील अवस्थेत आहेत. तन्त्रसार या ग्रंथात तारा देवीचे वर्णन प्रत्यालीढपदा असे केलेले आहे. [ डे. हि. इ. ]

**प्रत्याहार** अष्टांग योगाचे पाचवे अंग. याची व्याख्या अशी- 'स्वविषयाऽसम्प्रयोगे चित्तस्वरूपानुकार इवेन्द्रियाणां प्रत्याहारः ।'=पाच इंद्रियांचे जे पाच विषय त्यांचा त्या इंद्रियांशी संबंध येणे, हा त्या इंद्रियांचा आपापल्या विषयांशी होणारा संप्रयोग होय. असा संप्रयोग होऊ दिला नाही म्हणजे ती इद्रिये चित्ताच्या स्वरूपाचे जणू अनुकरण करणारी होतात. त्यांच्या या स्थितीला प्रत्याहार असे म्हणतात (पातंजल योग, साधनपाद सू. ५४).

शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध हे पाच इंद्रियांचे पाच विषय होत. चित्त नेहमी इंद्रियांच्या द्वारा त्या त्या विषयांचे ग्रहण करीत असते. अशा प्रकारे, चित्ताकडून विषयग्रहण होते, तेव्हा बाह्य विषय, इंद्रिय, विषयांचा इंद्रियांशी संनिकर्ष आणि हा अमुक विषय असा चित्ताकडून होणारा उल्लेख, इतकी सामग्री असावी लागते या सर्व सामग्रीत चित्ताची उपस्थिती ही सर्वात महत्त्वाची बाब होय. कारण विषयाचा इंद्रियांशी सपर्क येऊनही जर तिथे चित्त नसेल, तर विषयग्रहण होत नाही. आपले मन एखाद्या गोष्टीत गढून गेले असता समोरून एखादा हत्ती गेला, तरी त्याचे ज्ञान आपल्याला होत नाही किंवा कोणी आपल्याला हाक मारली, तर तीही आपल्याला ऐकू येत नाही, हा सर्वांचाच अनुभव आहे. त्याचप्रमाणे योगाभ्यासी साधक जेव्हा चित्ताचा निरोध करतो, तेव्हा इंद्रियांचा विषयांशी सयोग घडूनही चित्त तिथे नसल्याने त्यांच्याकडून विषयाचे ग्रहण होत नाही. या अवस्थेला विषयांचा असंप्रयोग असे इथे म्हटले आहे. या अवस्थेत इंद्रियाचा संपर्क येऊनही ती निगृहीत चित्ताचेच जणू अनुकरण करीत असतात म्हणजे इद्रियांचा आपापल्या विषयांशी सस्पर्श घडूनही तिथे विषयसंवेदन होत नाही. विषयसंवेदनच न झाल्याने त्या वेळी इद्रिये जणू काही बाह्य विषय सोडून चित्ताशी तदाकार झाल्यासारखी दिसतात या अवस्थेचा अनुभव येणे, म्हणजेच प्रत्याहाराचे अनुष्ठान होय. प्रत्याहाराचा अभ्यास नीट साधला असेल तर पुढील धारणा, ध्यान आणि समाधी या अंतरंग साधनाचे अनुष्ठान चांगल्या रीतीने घडते. प्रत्याहाराच्या अभ्यासाने इंद्रिये पूर्णतया स्वाधीन होतात. साधकाची इच्छा असेल, तेव्हाच ती विषयाभिमुख होतात; अन्यथा ती विषयांपासून निवृत्तच असतात.

प्रत्याहार साधण्यासाठी षण्मुखी मुद्रा करावी व तिच्यामुळे उत्पन्न होणाऱ्या नादावर चित्त स्थिर करावे किंवा कानात तर्जन्या घालून डोळे मिटावे व येणाऱ्या नादावर चित्त स्थिर करावे, असे सांगितले आहे. [पा. यो. द.; योगविद्या.]

**प्रत्येकबुद्ध** प्राचीन बौद्ध धर्मात मोक्षसाधकांचे तीन प्रकार मुख्यत्वे प्रचलित होते. त्यांना श्रावक, प्रत्येक बुद्ध व सम्यक् संबुद्ध अशी नावे होती. हे तीन उत्तरोत्तर श्रेष्ठ आहेत. श्रावक हा उपायज्ञ असतो व त्याला दुःखनिवृत्तीचा मार्ग परिचित असतो. पण ज्ञानासाठी त्याला बुद्धादी शास्त्यांच्या उपदेशावर अवलंबून राहावे लागते आणि तसा तो उपदेश मिळूनही त्याला निर्वाणाचा लाभ होत नाही. तो केवळ मृत्यूनेच मुक्त होतो.

प्रत्येकबुद्ध हा श्रावकाहून श्रेष्ठ असला तरी त्याच्याही आकांक्षा वैयक्तिक स्वार्थापुरत्याच मर्यादित असतात. केवळ स्वतःचे बुद्धत्व त्याला अपेक्षित असते. त्यासाठी तो प्रतीत्यसमुत्पादाची साधना करून प्रत्येक बुद्ध बनतो. या साधनेच्या द्वारे

त्याला केवळ व्यक्तिगत दुःखच दूर करता येते; इतरांचे नाही.

प्रत्येकबुद्धाला अंतःस्फूर्तीनेच सर्व तत्त्वे प्रस्फुरित होतात. तत्त्वशिक्षेसाठी त्याला गुरूकडे जावे लागत नाही. पण असे असले, तरी तो सम्यक् संबुद्ध किंवा परिपूर्ण बुद्ध होऊ शकत नाही. धर्मचक्राचे प्रवर्तन करणे व पतित समाजाचा उद्धार करणे या गोष्टी त्याला जमत नाहीत. तो केवळ स्वतःच्याच निर्वाणाची इच्छा करतो, स्वतःवरच प्रभुत्व मिळवतो व स्वतः-लाच निर्वाणाकडे घेऊन जातो.

श्रावक आणि प्रत्येकबुद्ध यांना बोधी म्हणजे ज्ञान प्रतीत्य समुत्पादाच्या साधनाने प्राप्त होत असते. त्या दोघांत फरक एवढाच, की पूर्वजन्मीच्या तपःसाधनेमुळे प्रत्येक बुद्धाला बोधी-साठी. आवश्यक असलेले सदतीस गुण गुरूविना आत्मसात करता येतात.

प्रत्येकबुद्धाला निर्वाणापर्यंत जायचे असल्यास त्याला बोधि-सत्त्व बनणे आवश्यक असते. महायान हे यासाठी एकच यान आहे. असे सद्धर्मपुंडरीकात म्हटले आहे. [ म. सा. अ. ]

## प्रथम रजोदर्शन

स्त्रीजीवनातील एक क्रांतिकारक घटना. प्रथम रजोदर्शनानंतर स्त्रीने यौवनात पदार्पण केले व ती पतिसमागमाला योग्य झाली असे समजतात. म्हणूनच हे रजोदर्शन शुभ काली व्हावे व त्या प्रसंगी दिनशुद्धी असावी, अशी अपेक्षा असते. प्रथम रजोदर्शनाविषयी अशुभ योग सांगितले आहेत, ते असे—

अशुभ मास—चैत्र, ज्येष्ठ, आषाढ, भाद्रपद, कार्तिक व पौष.

अशुभ तिथी—प्रतिपदा, चतुर्थी, षष्ठी, अष्टमी, नवमी, द्वादशी, चतुर्दशी, पौर्णिमा व अमावास्या.

अशुभ वार— रविवार, मंगळवार व शनिवार.

अशुभ नक्षत्रे— कृत्तिका, आर्द्रा, आश्लेषा, मघा, पूर्वा, पूर्वाषाढा, पूर्वाभाद्रपदा व विशाखा.

अशुभ योग—विष्कंभ, गंड, अतिगंड, शूल, व्याघात, वज्र, परिघाचा पूर्वार्ध, व्यतिपात व वैधृती.

अशुभ काल— भद्रा, ग्रहण, रात्र, संधिकाल, अपराण्ह व निद्रा.

अशुभ स्थल—परगृह व परग्राम.

शुभाशुभ वस्त्रे—शुभ्र व नवे वस्त्र शुभ होय. जीर्ण, रक्त व नील वस्त्र अशुभ होय

अशुभ योगावर प्रथम रजोदर्शन झाले असता ग्रहयज्ञपूर्वक भुवनेश्वरी शांती रजोदर्शनाच्या चौथ्या किंवा पाचव्या दिवशी करावी असे सांगितले आहे.

प्रथम रजोदर्शनाच्या कालात त्या स्त्रीचे अनेक सोहाळे व सोपस्कार करण्याची पद्धत आहे. **पाहा**– न्हाणवली. [ धर्मसिंधु; निर्णयसिंधु; मुहूर्तचिंतामणी ]

## प्रथमाष्टमी

ओडिसा प्रदेशातील एक लौकिक आचार. मार्गशीर्ष मासातील वद्य अष्टमीला हे नाव आहे. या दिवशी घरातील ज्येष्ठ मुलाला स्नान घालून नवे कपडे लेववतात आणि निरनिराळे दागिने घालतात. नंतर त्याच्या-कडून गणपतीची पूजा करवितात. मुलाला दीर्घायुष्य लाभावे हा त्यातील हेतू असतो. घरातील सर्व वडील माणसे त्या वेळी मुलाला आशीर्वाद देतात. [ स्ट. ओ. फो. ]

## प्रदक्षिणा

षोडशोपचार पूजेतील एक उपचार. 'प्रगतं दक्षिणमति'= पूज्य व्यक्तीला किंवा देवतेला उजवे ठेवून तिच्या भोवती फेरी घालणे याला प्रदक्षिणा असे म्हणतात. कोणत्या देवाला किती प्रदक्षिणा घालाव्या, याविषयी कर्मलोचनात पुढील श्लोक दिला आहे–

**एकं देव्यां रवौ सप्त त्रीणि कुर्याद्विनायके ।**
**चत्वारि केशवे कुर्यात् शिवे चार्धप्रदक्षिणम् ।।**

अर्थ– देवीला एक, सूर्याला सात, गणपतीला तीन व विष्णूला चार प्रदक्षिणा कराव्या व शिवाला अर्धप्रदक्षिणा करावी.

शिवाच्या अर्धप्रदक्षिणेची रीत अशी– शिवाच्या अभिषेकाचे जल गाभाऱ्यातून ज्या नालीने बाहेर सोडले असेल, तिथवर प्रदक्षिणा करावी आणि ती नाली न ओलांडता परत फिरून देवापुढे यावे. हिला सोमसूत्री प्रदक्षिणा असेही म्हणतात.

प्रदक्षिणा कशी करावी, त्याविषयी कालिका पुराणात पुढील श्लोक दिला आहे–

**प्रसार्य दक्षिणं हस्तं स्वयं नम्रशिराः पुनः ।**
**दक्षिणं दर्शयन् पार्श्वं मनसापि च दक्षिणः ।।**

अर्थ– उजवा हात पुढे पसरून व नतमस्तक होऊन आपले दक्षिण अंग देवाला दाखवीत आणि मनानेही दक्षिण म्हणजे ऋजू वृत्तीचे राहून प्रदक्षिणा करावी.

ज्या देवाला प्रदक्षिणा घालता येणे शक्य नसेल, त्याला स्वतःभोवती वर्तुळ भ्रमण करून प्रदक्षिणा घालतात. पण अशा प्रदक्षिणेत देवाला पाठ दाखविली जाते; त्यामुळे अशी प्रदक्षिणा शक्यतो टाळावी, असे सांगितले आहे.

प्रदक्षिणेचे माहात्म्य वराह पुराणात सांगितले आहे, ते असे–

**प्रदक्षिणां ये कुर्वन्ति भक्तियुक्तेन चेतसा ।**
**न ते यमपुरं यान्ति यान्ति पुण्यकृतां गतिम् ।।**

अर्थ–जे भक्तियुक्त अंतःकरणाने देवाला प्रदक्षिणा करतात, त्यांचा यमलोक टळतो व ते पुण्यवंतांच्या गतीला जातात.

काही माणसे पुत्रादिकामना मनात धरून अश्वत्थाला, औदुंबराला, दत्ताला किंवा उपास्य देवतेला नित्य नियमाने प्रदक्षिणा घालतात. [ श. क.; पू मा. प्र.; हि. वि. को. ]

**प्रदीप्तनवमी** एक तिथिव्रत. आश्विन शुद्ध नवमीला या व्रताला प्रारंभ करतात. व्रतावधी एक वर्ष. व्रतविधी असा – व्रतकर्त्याने 'ओम् महाभगवत्यै महिषासुरमर्दिन्यै हुं फट्' या सोळा अक्षरी मंत्राने देवीची पूजा करावी आणि गुग्गुळाचा गोळा अग्नीला अर्पण करावा. शिवाची पूजा करावी. गवताची एक हात लांबीची काडी घेऊन ती पेटवावी. काडी जेवढा वेळ जळेल तेवढ्या वेळात जेवढे अन्न खाता येईल, तेवढेच खावे. फल-शक्ती आणि विजय यांची प्राप्ती. [ हि. ध. ]

**प्रदोष** दिवसातील विशिष्ट काल. 'प्रदोषो रजनीमुखम्'= रात्रीच्या सुरवातीच्या कालाला प्रदोष म्हणावे. प्रत्येक महिन्यातील शुद्ध व वद्य त्रयोदशीला सूर्य मावळण्याच्या पूर्वीचा जो तीन घटकांचा काळ असतो, त्याला प्रदोष अशी संज्ञा आहे. हा काळ शिवपूजनाला प्रशस्त मानतात. प्रदोषकाळी वेदाध्ययन करू नये, असे सांगितले आहे.

**प्रदोषगर्जितशांती** उपनयन झाल्यानंतर बटूला अध्ययन करायचे असते. त्या वेळी सायंकाळी मेघगर्जना झाली, तर ते एक विघ्न समजतात. त्या विघ्नाचा परिहार करण्यासाठी ही शांती सांगितली आहे. सविता ही या कर्माची प्रधान देवता आहे. या शांतीत गायत्रीमंत्राने सूर्याला पायसाच्या १०८ आहुती देतात. अकालवृष्टी किंवा काही उत्पात घडल्यासही हीच शांती करतात. [ ऋ. ब्र. स. ]

**प्रदोषव्रत** एक काम्य व्रत. प्रदोष म्हणजे रात्रीचा प्रारंभ होय. रात्रीच्या प्रारंभ कालात या व्रताचे पूजाविधान करायचे असते म्हणून या व्रताला प्रदोषव्रत असे म्हणतात. प्रत्येक महिन्याच्या शुद्ध आणि वद्य त्रयोदशीला हे व्रत करतात. शिव ही या व्रताची देवता होय. दिवसभर उपवास आणि रात्री शिवपूजेनंतर भोजन हा या व्रताचा मुख्य विधी आहे.

प्रदोष जर शनिवार, सोमवार आणि मंगळवार या दिवशी आला, तर त्याला अनुक्रमे शनिप्रदोष, सोमप्रदोष व भौमप्रदोष असे म्हणतात. कृष्ण पक्षातील प्रदोष जर शनिवारी आला, तर तो विशेष फलदायी मानतात. या व्रताची कथा अशी—

एक ब्राह्मण स्त्री होती. तिचा पती मरण पावला. त्यामुळे तिच्यावर भिक्षा मागण्याचा प्रसंग आला. ती व तिचा लहान मुलगा दिवसभर भिक्षा मागत व रात्री घरी येत. एके दिवशी या ब्राह्मण स्त्रीला रस्त्यात एक मुलगा भेटला. तो विदर्भराजाचा मुलगा होता. त्याचे वडील मरण पावल्यामुळे तो इकडेतिकडे भटकत होता. ब्राह्मण स्त्रीने त्याला घरी आणून आपल्या मुलाप्रमाणे त्याचाही सांभाळ केला. एके दिवशी ती ब्राह्मणी त्या दोन मुलाना बरोबर घेऊन शांडिल्य ऋषीच्या आश्रमात गेली. तिथे गेल्यावर ऋषीने सांगितल्याप्रमाणे ती प्रदोषव्रत करू लागली. दोन्ही मुलांनीही तिचे अनुकरण केले.

पुढे ही दोन्ही मुले एकदा एका अरण्यात गेली. तिथे गंधर्वकन्या क्रीडा करीत होत्या. त्यांना पाहून ब्राह्मण कुमार तिथून परतला; पण राजकुमार तिथेच थांबला. मग एका गंधर्वकन्येने त्याचा परिचय करून घेतला. ती त्याला म्हणाली. 'मी विद्रविक नामक गंधर्वाची कन्या आहे. माझे नाव अंशुमती. मी तुझ्याबरोबर विवाह करू इच्छिते.' हे ऐकून राजकुमार लज्जित झाला. मग अंशुमती निघून गेली. दुसऱ्या दिवशी अंशुमतीचे आई-वडील तिथे उपस्थित झाले व त्याला म्हणाले. 'आम्हाला प्रत्यक्ष शिवाने असा आदेश दिला आहे, की तुझ्याशीच या मुलीचे लग्न लावावे. तू आज जरी दरिद्री असलास, तरी तू धर्मगुप्त नावाचा विदर्भ देशाचा राजपुत्र आहेस.' तेव्हा त्याने अंशुमतीचा स्वीकार केला. नंतर त्या दोघांचा विवाह झाला. पुढे त्याला त्याचे राज्य मिळाले आणि त्याने चांगले राज्य केले. हे प्रदोष व्रताचेच फल होय. [ व्र. चं.; हि. ध. ]

**प्रद्युम्न** श्रीकृष्ण व रुक्मिणी यांचा पुत्र. याला सनत्कुमाराचा अंश व मदनाचा अवतार असे समजतात. शिवाने भस्म केलेला मदनच पुढे रुक्मिणीच्या पोटी जन्माला आला, अशी कथा आहे. प्रद्युम्नाच्या हातून आपला वध होणार हे जेव्हा शंबरासुराला कळले, तेव्हा त्याने प्रद्युम्नाला जन्मापासून सहाव्या दिवशीच सूतिकागृहातून पळवून आणले आणि समुद्रात फेकून दिले. दैवयोगाने त्याला एका माशाने गिळले. त्या माशाच्या पोटात प्रद्युम्न जिवंत राहिला. हा मासा एका कोळ्याच्या गळाला लागला. कोळ्याने तो शंबरासुरालाच भेट म्हणून दिला. शंबराने तो मासा आपल्या मायावती नामक पत्नीकडे दिला. मायावतीने तो मासा चिरताच त्यातून एक सुंदर तेजस्वी बालक निघाले. बालक कोण असावा, अशी शंका तिच्या मनात आली, तोच तिथे नारद प्रकट झाला. त्याने त्याचा इतिहास मायावतीला सांगितला. 'हा पूर्वजन्मीचा मदन असून, तू त्याची पत्नी रती आहेस.' हे ऐकून मायावतीला आनंद झाला. तिने त्या बालकाचे चांगले संगोपन करून त्याला बऱ्याच विद्या-कला शिकवल्या.

कालांतराने शंबराला ही गोष्ट कळली. तेव्हा तो प्रद्युम्नाला मारायला निघाला. मग त्या दोघांचे युद्ध झाले. त्यात शंबरासुर मारला गेला. नंतर प्रद्युम्न आपली पत्नी मायावती हिच्यासह रुक्मिणीच्या भेटीला गेला.

ब्रह्मवैवर्त पुराणात या कथेहून थोडी भिन्न कथा आहे. ती अशी— शंबराने प्रद्युम्नाला सूतिकागृहातून उचलून नेऊन आपली पत्नी मायावती हिला दिले. प्रद्युम्न मोठा झाल्यावर एक दिवस सरस्वती मायावतीकडे आली व तिने तिला प्रद्युम्नाच्या मागील जन्माचा वृत्तांत सांगितला.

याला शतद्युम्न असेही एक अन्य नाव आहे. हा यादव सैन्यातील एक महावीर होता. एकदा शाल्वाने द्वारकेवर स्वारी केली असता, प्रद्युम्नाने मोठ्या शौर्याने त्याचा पराभव केला (भाग. पु. १०.७६. १३). पांडवांच्या अश्वमेधाच्या वेळी हा अश्वरक्षणासाठी अर्जुनाबरोबर गेला होता.

महाभारतीय युद्ध संपल्यानंतर पुढे सर्व यादव मदांध झाले आणि प्रभासतीर्थावर आपसांत मारामारी करून मेले. त्या यादवी युद्धातच प्रद्युम्नाचाही अंत झाला.

याला भगवंताच्या चतुर्व्यूहांपैकी एक व मनाचे प्रतीक मानलेले आहे. विष्णूच्या चोवीस नावांत प्रद्युम्नाचा समावेश आहे. याची मूर्ती अष्टभुज करतात. याच्या चार हातांत शंख, कमल, धनुष्य आणि बाण ही आयुधे असतात व दुसऱ्या चार हातांनी तो रती, प्रीती, शक्ती व भेदशक्ती या चार स्त्रियांना कवटाळीत असतो.

हा मदनाचा अवतार असल्यामुळे त्याची आणखी एक प्रकारे मूर्ती तयार करतात. ही मूर्ती द्विभुज व रतीसह असते. पोपटावर किंवा रथावर बसलेल्या अवस्थेतही याच्या मूर्ती करतात. त्याचे धनुष्य उसाचे असते. अशोक, आम्रमंजरी, नीलकमल, अरविंद आणि नवमालिका या फुलांचे पाच बाण तो धारण करतो. मयमते तापनी, दाहिनी, सर्वमोहिनी, विश्वमर्दिनी आणि मारणी या पाच क्रूर स्त्रियांच्या दातांपासून त्याचे बाण बनवलेले असतात. **पाहा**—चतुर्व्यूह. [ सा. इं. इ. गॉ. गॉ.; प्रा. च. को.; भगवान श्रीकृष्ण.; म. भा. व्या.; म. क. शि. ]

## प्रपत्तिमार्ग

प्र + प्रत् = प्रकर्षाने पडणे, शरणागत होणे, असा प्रपत्ती शब्दाचा अर्थ आहे. हा एक मुक्तीचा मार्ग म्हणून रामानुजाचार्यांनी सांगितला आहे. भक्ती ही मुक्ती मिळवण्याचे एकमेव साधन रामानुज मानतात. भक्तीने भगवान प्रसन्न होतो आणि जीवाच्या सर्व बंधांचा व क्लेशांचा नाश करतो. मग जीवाला ब्रह्मज्ञान प्राप्त होते. भक्तीतही प्रपत्ती किंवा शरणागती ही श्रेष्ठ अवस्था आहे. शरणागतीचा अर्थ ईश्वराला शरण जाणे किंवा ईश्वर हेच गंतव्य किंवा प्राप्तव्य स्थान असे समजणे, असा आहे. शरणापन्न जीवावरच भगवान अनुग्रह करतो, असे रामानुज म्हणतात.

विशिष्टाद्वैत मतात ईश्वरप्राप्तीसाठी कर्मयोग ही पहिली, ज्ञानयोग ही दुसरी व भक्ती ही शेवटची पायरी मानली आहे. वर्णविहित कर्मानुष्ठानामुळे चित्ताची शुद्धी होते व ब्रह्माची जिज्ञासा उत्पन्न होते आणि अशा रीतीने ज्ञान व कर्म हे भक्तीच्या उदयाला सहकारी कारण ठरते.

रामानुजांनी प्रतिपादन केलेल्या भक्तिमार्गाचे वैशिष्टय असे, की त्यात अंतःकरण व बुद्धी यांचा सुंदर संगम झालेला आहे. त्यांपैकी अंतःकरणपक्ष ही आळवारांची देणगी आहे व बुद्धिपक्षात शास्त्रग्रंथांत प्रतिपादन केलेल्या भक्तीचा समावेश आहे. रामानुजांच्या भक्तिविषयक सिद्धान्तावर आळवारांच्या विचारांचा मोठा प्रभाव आहे. आळवारांच्या शरणागतीलाच रामानुजांनी प्रपत्ती हे पारिभाषिक नाव दिले.

रामानुजांनी पहिल्या प्रथम ब्राह्मणांबरोबर शूद्रांनाही वैष्णव धर्मात दीक्षित होण्याचा अधिकार दिला. याचे कारण असे, की आळवारांपैकी अनक जण शूद्र होते आणि तरी लोक त्यांना पूज्य मानीत होते.

रामानुजांची ही शरणागती षड्विध आहे—

**आनुकूल्यस्य सङ्कल्पः प्रातिकूल्यस्य वर्जनम् ।**
**रक्षिष्यतीति विश्वासो गोप्तृत्ववरणं तथा ।**
**आत्मनिक्षेपकार्पण्ये षड्विधा शरणागतिः ।।**

अर्थ — भगवंताला अनुकूल राहण्याचा दृढ संकल्प, भगवंताला प्रतिकूल ते टाळणे, भगवान आपले रक्षण करील असा विश्वास बाळगणे, भगवान हा एकमेव रक्षक समजून केवळ त्याच्याकडूनच रक्षणाची इच्छा करणे, आत्मनिक्षेपद्वारा स्वतःला भगवच्चरणारविंदांच्या ठिकाणी लीन करणे व कार्पण्य-भाव (दीनता) ग्रहण करून स्वतःला अकिंचन मानणे, अशी सहा प्रकारची शरणागती आहे.

इ. स. च्या १४ व्या शतकाच्या सुमारास प्रपत्तिमार्गाच्या अनुषंगाने वैष्णवांमध्ये दोन भेद पडले. त्यांपैकी वेदांतदेशिक व त्यांचे अनुयायी यांनी भक्तीबरोबर कर्मानुष्ठानही मोक्षासाठी आवश्यक मानले. यांना वडकळै असे नाव आहे. आपल्या मतप्रणालीचा अर्थ बरोबर ध्यानात यावा, म्हणून ते कपि-किशोराचा दृष्टांत देतात. आपले रक्षण व्हावे, म्हणून माकडाचे पोर आईच्या पोटाला बिलगून बसते; म्हणजे त्यासाठी त्याला स्वतः काही कर्म करावे लागते. त्याप्रमाणे जो कर्मानुष्ठान करून भगवंताला शरण जातो, त्याच्यावरच भगवान अनुग्रह करतो, असे या लोकांचे मत आहे. या पंथाचे अनुयायी

संस्कृत शास्त्रग्रंथांच्या आधारावर भक्तीचा उपदेश करतात.

श्रीलोकाचार्य व त्यांचे अनुयायी यानी मुक्तीसाठी प्रपत्ती हाच एकमेव मार्ग सागितला व त्यासाठी कर्मानुष्ठानाची आवश्यकता नाही, असे प्रतिपादिले या पथाच्या लोकांना तेन्कळै असे नाव आहे आपल्या मताच्या स्पष्टीकरणासाठी ते मार्जारकिशोराचा दृष्टान्त देतात. मांजराचे पिल्लू असहायभावाने आपल्या आईला शरण जाते, तेव्हा माजरी त्याची मान अलगद आपल्या तोडात पकडून त्याला उचलून इष्टस्थळी घेऊन जाते. भगवंताची आपल्या भक्तावरही अशीच निर्हेतुक कृपा असते. भक्ताची दीन दशा पाहून नारायण त्याच्यावर आपोआप अनुग्रह करतो यावि‌षयी अहिर्बुध्न्य सहितेत (१४ २९) सांगितले आहे, ते असे—

**एवं संसृतिचक्रस्थे भ्राम्यमाणे स्वकर्मभिः ।**
**जीवे दुःखाकुले विष्णोः कृपा काप्युपजायते ।।**

अर्थ – अशा प्रकारे आपल्या कर्मानुसार संसारचक्रात फिरणाऱ्या दुःखी जीवावर विष्णूची (आपोआप) कृपा होते.

तेन्कळै पक्षाच्या अनुयायाची आळवारांच्या दिव्य प्रबंधावर विशेष श्रद्धा आहे आणि त्याला धरूनच ते भक्तीची साधना करतात. हे लोक उदार दृष्टीचे असून, त्यांच्यांत आपसांत उच्चनीच भाव नाही. कनिष्ठ जातीचे लोकही त्यांच्यांत आहेत.

*प्रपत्तीने वश झालेला भगवान जीवाला पूर्णज्ञानाची प्राप्ती* करून देतो आणि त्यामुळे त्याला ईश्वराचा साक्षात्कार व अंती मुक्ती प्राप्त होते, असे वैष्णव दर्शनात सागितले आहे. [भा. द.; त. प्र. हिं कृ ; रा वि. भ. द ]

**प्रपादान** एक पूर्त कर्म. प्रपा म्हणजे पाणपोई होय. प्रपादान म्हणजे पाणपोई घालणे. ज्या रस्त्यावर पाणी नाही किंवा ज्या रस्त्यापासून मनुष्यवस्तीचा गाव जवळ नाही अशा रस्त्यावर पाणपोई घालावी, असे सांगितले आहे. या कर्माचे विधान असे –

महाशिवरात्रीच्या दिवशी अथवा चैत्रातल्या एका शुभ दिनी चवाठ्यावर चारही बाजूंना चार दरवाजे असलेली एक मंडपी उभारावी. त्या ठिकाणी स्वस्तिवाचनपूर्वक एकमुखी किंवा दोनमुखी पाणपोई घालावी तिथे तांब्याचे अथवा मातीचे मोठे घडे पाण्याने भरून ठेवावे. तसेच पथिकांना तांदुळाची किंवा सातूची पेज, इतर मधुर पेये किंवा ताजे ताक व विडा देण्याची सोय ठेवावी. पाऊस पडेपर्यंत पाणपोई चालू ठेवावी. पाऊस सुरू *झाला, की या कर्माचे उद्यापन करावे. त्या वेळी पाणपोई*तील सर्व पात्रे ब्राह्मणाना दान देऊन त्यांना भोजन घालावे.

प्रपादान करणे शक्य नसल्यास उन्हाळ्यात रोज तृषितांना थंडगार पाणी पाजून शेवटी एक जलकुंभ ब्राह्मणाला दान द्यावा. एवढ्यानेही प्रपादानाचे पुण्य मिळते. फल– देव-पितरांचा सतोष व कीर्ती यांचा लाभ. [हि. ध.; पु. चि.; व्रतराज.]

**प्रपौत्रमुखदर्शन** प्रपौत्र म्हणजे मुलाकडून पणतू होय. तो जन्माला आल्यानंतर पणजोबाने त्याचे मुखदर्शन विधिपूर्वक करायचे असते. त्यासाठी कर्त्याने प्रथम संकल्प, पुण्याहवाचन व नांदीश्राद्ध या गोष्टी करून वरुणपूजा करावी. त्यानंतर कांबळे अंथरलेल्या औदुंबरपीठावर बसावे. ब्राह्मणांनी त्याच्यावर वरुणसूक्ताने आणि गगासूक्ताने अभिषेक करावा. अभिषेक झाल्यावर कर्त्याने नूतन वस्त्रे परिधान करून 'इमं मे गगे...' या मंत्राने गंगेची पूजा करावी. नतर काशाच्या पात्रात ठेवलेल्या तुपात स्वतःचे प्रतिबिब पाहावे आणि सुवर्णपात्रात ठेवलेल्या दीपाच्या प्रकाशात प्रपौत्राचे मुख पाहावे. नतर प्रपौत्रावर शंभर किंवा बारा सुवर्णपुष्पे उधळावी. अशा प्रत्येक पुष्पामागे पणजोबाला एकेका यज्ञाचे फळ मिळते, असे सांगितले आहे. नंतर त्याने कलशातील जलाने प्रपौत्रावर अभिषेक करावा आणि ब्राह्मणाला गोप्रदान करावे. मग विष्णुप्रतिमेची पूजा करून ती प्रतिमा व आज्यसहित कांस्यपात्र आचार्याला दान द्यावे. नंतर यथाशक्ति ब्राह्मणसुवासिनीना भोजन घालावे.

**प्रबंधम्** एक तमिळ भक्तिपर पद्यसंग्रह. इ. स. च्या सहाव्या शतकापासून नवव्या शतकापर्यंत तमिळनाडमध्ये बारा वैष्णव भक्तकवी निर्माण झाले. त्यांना आळवार असे म्हणतात. त्यांनी विष्णुभक्तिपर अशी अनेक पद्ये रचली आणि तमिळनाडमध्ये विष्णुभक्तीचा सार्वत्रिक प्रचार केला. इ. स. च्या नवव्या शतकाच्या अंती नाथमुनी नामक एक आचार्य झाला. त्याने मौखिक परंपरेने लोकसमाजात चालत आलेल्या या पद्याचे संकलन केले आणि कर्ता, विषय आणि छंद यांना अनुसरून त्यांना वेगवेगळी नावे दिली. श्रीरंगम येथे राहणारा अमुदन नावाचा श्रीरामानुजाचार्याचा एक शिष्य होता. त्याने आपल्या गुरूच्या प्रशंसेची शंभर पद्ये रचली होती. तीही वरील संग्रहात समाविष्ट करून सुमारे ४,००० पद्यांचा एक बृहत्संग्रह नाथमुनीने तयार केला व नालायिर दिव्य प्रबंधम् (चार हजार पवित्र पद्ये) असे त्याला नाव दिले. पुढे लोक या संग्रहाला संक्षेपाने प्रबंधम् असे म्हणू लागले.

नाथमुनीच्या या कार्याविषयी एक आख्यायिका सांगतात, ती अशी –

एकदा नाथमुनी श्रीरंगमच्या यात्रेला गेला असता त्याने तिथे एका यात्रेकरूकडून आळवाराचे एक पद ऐकले. त्याला ते

आवडले. त्याने यात्रेकरूला दुसरे म्हणायला सांगितले; पण त्याला तेवढे एकच येत होते. यात्रेकरू म्हणाला, की अशी हजारो पदे आहेत. ते ऐकून नाथमुनीला चुटपूट लागून राहिली. त्याने ठरविले, की पडतील तेवढे कष्ट सोसून ही सगळी पद्ये गोळा करायची. त्या दृष्टीने तो प्रयत्नाला लागला; पण विशेषसे काही त्याच्या हाताला लागले नाही. त्यामुळे तो निराश झाला. अशा स्थितीत परांकुशमुनी नावाचा एक वैष्णव संत त्याला भेटला. त्याने नाथमुनीला म्हटले, की 'कण्णिनुळ चिरुतांबू या मधुर कवीने रचलेल्या पद्यांची एक हजार पारायणे कर, म्हणजे तुझा कार्यभाग सिद्धीस जाईल.' नाथमुनीने तसे केले. त्यावर त्याला नम्माळवाराचे दर्शन घडले. त्या वेळी नम्माळवाराने प्रबंधम्मधली सर्वच्या सर्व पद्ये नाथमुनीला ऐकवली. त्यामुळे त्याची इच्छा पूर्ण झाली. मग त्याने त्या सर्व पद्यांचे व्यवस्थित संकलन करून त्यांना ग्रंथबद्ध केले.

प्रबंधम्मध्ये भक्ती हाच ईश्वरप्राप्तीचा सर्वसुलभ असा राजमार्ग असल्याचे घोषित केले आहे. आळवारांच्या या पद्यांत अशी अद्भुत शक्ती होती, की तिने तमिळनाडमधल्या समस्त जनतेला भक्तिमार्गाकडे आकृष्ट केले. तमिळ भाषेत हे जे उच्च कोटीचे *भक्तिसाहित्य निर्माण झाले, त्याने दक्षिणेच्या भाषा*-भगिनीवरही आपला प्रभाव पाडला. आळवारांच्या पश्चात आचार्यांची जी परंपरा निर्माण झाली, तिने मध्ययुगात भक्ति-तत्त्वे देशव्यापी बनविली. त्याचे फल म्हणजे भारताच्या सर्व भाषांत भक्तिसाहित्य विपुल प्रमाणात निर्माण झाले. या सर्व भारतव्यापी भक्तिमार्गी आंदोलनाचे मूळ प्रबंधम् या ग्रंथात आहे. भक्तितत्त्वाचा तोच मूल ग्रंथ ठरतो. डॉ. मलिक मोहंमद यांनी या प्रबंधम्चे सखोल अध्ययन करून त्या ग्रंथाविषयी जी तपशीलवार माहिती दिली आहे, तिचा सारांश असा –

प्रबंधम्मध्ये भक्तीची महत्ता सर्वत्र उद्घोषित केली आहे. पेरियाळवार तर असे सांगतो, की 'जो भक्ती करीत नाही त्याने आईची कूस व्यर्थ शिणवली.' आळवारांच्या मताप्रमाणे भगवंतावर आत्यंतिक अनुराग म्हणजे भक्ती होय. भक्तीने जे सुख मिळते, ते स्वर्गसुखाहूनही श्रेष्ठ आहे. म्हणूनच भक्ती ही केवळ साधन नव्हे, तर साध्यही आहे. आळवारांची श्रद्धा अशी आहे, की भगवंताच्या सहस्र नामांपैकी एखादे नाम हृदयी धरून नित्य स्मरले, तरी मनुष्याच्या समस्त पापांचा क्षय होतो, मनात पवित्र भाव जागृत होतात *आणि श्रद्धेची वृद्धी होते* (पेरिय तिरुमोळी १.१.९). समस्त आळवारांनी नाममहिमा गायिला आहे. नाममाहात्म्यविषयक त्यांनी व्यक्त केलेले विचार असे –

**नंचुतान कंटीर नम्सुटैय विनैक्कु नारायणावेन्नुम् नामम् ।**

(पेरिय तिरुमोळी १.१.१०)

अर्थ – नारायण हे नाम एखाद्या विषाप्रमाणे आमची पापे आणि दोष यांना मारून टाकते.

**इच्चुवै तरवियानपोय इन्द्रिरलोकमाळुम**
**अच्चुवै परिनुम वेंटेन अरंगमानगरुळाने ।**

(तिरुमाळै २)

अर्थ – भगवंताच्या नामस्मरणाने जो आनंद मी अनुभवतो, तो सोडून इंद्रलोकावर शासन करण्याचा अधिकार जरी मला मिळाला, तरी मी त्याचा स्वीकार करणार नाही.

भगवंताचे स्तवन हे आळवारांनी भक्तीचे एक प्रधान अंग मानले आहे. त्यांची समस्त पदे एक प्रकारची स्तुतिगीतेच आहेत. तिकडच्या वैष्णव मंदिरांतून आजही त्या स्तुतिगीतांनी देवाला आळविले जाते. पेरियाळवार म्हणतो, की ज्याची जिव्हा भगवंताचे स्तवन करणार नाही, त्याच्या जिव्हेचा उपयोगच काय ?

प्रबंधम्मध्ये प्रपत्ती किंवा शरणागती हिच्यावर विशेष भर दिलेला आहे. आत्मदोषांविषयी पश्चात्ताप व्यक्त करणे, भगवंतालाच आपला एकमात्र आश्रय समजणे आणि त्याच्याकडेच आपल्या उद्धारासाठी प्रार्थना करीत राहणे, या गोष्टीनाच *प्रपत्ती किंवा शरणागती म्हणतात. तोंडरडी पोडी या आळ*-वाराने आपली शरणागतीची करुण पुकार पुढील पद्याने (तिरुमाळै २९) व्यक्त केली आहे–

**ऊरिल्लेन काणियिल्लै उरवुमट्रोरुवरिल्लै,**
**पारिल निनपादमूलम् पाट्रिलेन परममूर्ति**
**कारोळीवण्णने कण्णने कदरुकिट्रेन,**
**आरुवर ? कळै कैण अम्मा अरंगमानगरुळाने ।**

अर्थ– हे प्रभो, मला स्वत:ला घर नाही, जमीन नाही आणि विचारपूस करणारा कोणी नातेवाईकही नाही. तरीही हे करुणामूर्ते, या पार्थिव जीवनात मी तुझ्या चरणांना दृढ धरले नाही, तुला शरण आलो नाही. हे घनश्यामा, आता मी आक्रंदन करतो आहे. तुझ्याशिवाय मला कोणी आधार देणारा आहे का ? खरोखरच नाही.

प्रबंधम्च्या अनेक पद्यांत गुरूचे माहात्म्यही अनेक ठिकाणी वर्णिलेले आहे. आळवार ईश्वराहूनही गुरूला श्रेष्ठ मानतात व गुरुसेवा हा परमधर्म समजतात. मधुर कवी म्हणतो–

**नण्णित्तेन कुरुकूर नम्बी येन्ट्रकाल**
**अण्णिक्कुम अमुदूरुम एन्नाउक्कै**

(कण्णिनुण चिरुतांबू १)

अर्थ–गुरूचे नाम घेताच माझी जिव्हा जणू अमृताचे आस्वादन केल्या सारखी गोडी अनुभवते.

नम्माळवाराने तर असे स्वच्छ म्हटले आहे, की 'गुरु

चांडाल जातीचा असला, तरी त्याची सेवा केली पाहिजे.' गुरुभक्तीबरोबरच सत्संगाची आवश्यकताही प्रबंधम्मध्ये प्रतिपादली आहे. भक्तीच्या विकासाला सत्संगाचे वातावरण अत्यंत अनुकूल ठरते, असे ते समजतात. सत्संगाविषयी तोंडरडी पोडी आळवाराने म्हटले आहे (तिरुमाळै ४२) ते असे–

**इळि कुलत्तवर्कळेलूम एम्मडियार्कळाकिल**
**तोलुमिन कोडुमिन ऐन्ट्र–**

अर्थ– विशुद्ध भगवद्‌भक्त नीच कुलाचा असला, तरी त्याची पूजा, सेवा आणि संगती करा. कारण तो भगवंता-इतकाच पूज्य आहे.

भक्तिमार्गी पुरुषाला ईश्वरप्राप्तीसाठी संसार आणि विषय यांविषयी वैराग्य आवश्यक असते. आळवार म्हणतात, की पंचेंद्रिये ही मनुष्याला सांसारिक बंधनात जखडून ठेवीत असतात; अतएव जो मनुष्य इंद्रियांवर विजय मिळवतो तोच श्रेष्ठ साधक व श्रेष्ठ भक्त होय. द्रव्यासक्ती हीसुद्धा मनाला ईश्वरपराङ्‌मुख बनवते. द्रव्यलोभात पडून मनुष्य नाना प्रकारचे अनर्थ करून बसतो. म्हणून आळवारांनी जागोजाग धनाचीही निंदा केली आहे. नम्माळवार म्हणतो–

**एणिलेन इरुन्देन एण्णिनेन एण्णि**
**एलैयवर कलविपिन तिरत्तै नाणिनेन**

(तिरुवाय मोळी ४·७·३)

अर्थ– माणसाला हे समजले पाहिजे, की धन नाश पावणारे आहे आणि राजकीय सत्ता ही चंचल आहे.

प्रबंधम्मध्ये विष्णूच्या अवतारांचे न्यूनाधिक वर्णन आहे. या सर्व अवतारांत राम आणि कृष्ण आणि त्यांतही विशेषत्वाने कृष्ण आळवारांना विशेष प्रिय आहे. प्रबंधम्मध्ये गोकुळवासी कृष्णाच्या चरित्रातील कित्येक प्रसंग रसाळ वाणीने वर्णिलेले आढळतात. कृष्णाचे जन्ममंगल, नामकरण, पूतनावध, शकटभंजन, त्याच्या किशोर रूपाचे कमनीय सौंदर्य, त्याची वेषभूषा, गोपींचा तद्विषयक मधुर प्रेमभाव, वेणुमाधुरी, यशोदेचे वात्सल्य इत्यादींचे काव्यमय वर्णन करून आळवारांनी आपल्या भक्तीचा परिपोष केला आहे.

आळवारांच्या या प्रबधम् साहित्याला तमिळ आचार्यांनी वेद पदवीवर नेऊन बसविले आहे. प्रबंधम्ला तमिळवेदच म्हणतात. नाथमुनींने म्हटले आहे की, मी द्रविड वेदसागरापुढे नतमस्तक आहे. त्यामुळे इ. स. च्या १० व्या शतकापासून वैष्णव मंदिरांतून ज्या ज्या वेळी वेदमंत्रांचे पठण होई, त्या त्या वेळी प्रबंधम्‌चेही गायन होऊ लागले. सांप्रत देवाच्या कोणत्याही उत्सवामध्ये प्रबंधम्‌चे गायन आवश्यक ठरले आहे. जेव्हा देवाची पालखी निघते, तेव्हा प्रबंधम् गाणारे पुढे असतात आणि वेदपठण करणारे मागे असतात. मंदिरांतून देवाला स्नान घालताना, पुष्पमाला चढविताना आणि नैवेद्य दाखवताना प्रबंधम्मधली विशिष्ट पदे गायिली जातात. ज्या विष्णुमंदिरात प्रबंधम्‌चे गायन होत नाही आणि आंडाळ व नम्माळवार यांच्या मूर्ती बसविलेल्या नाहीत, त्या मंदिराला वैष्णवजन विष्णुमंदिर मानायलाच तयार नसतात.

जेवढे विष्णुमंदिरात, तेवढेच वैष्णव गृहस्थाच्या घरात आणि संसारातही प्रबंधम्ला स्थान मिळाले आहे. अपत्यजन्म, विवाहमंगल, श्राद्ध, इ. प्रसंगीं गृहस्थाच्या घरात अंशतः किंवा पूर्ण असा प्रबंधम्‌चा पाठ होत असतो. प्रेतयात्रेच्या वेळीही प्रबंधम्मधली विशिष्ट पद्ये गायिली जातात. मरणोन्मुख मनुष्याच्या जवळ नम्माळवारचे विशिष्ट पद म्हटले जाते. वैष्णवांचा विश्वास आहे, की त्या पदाच्या पाठाने मरणाऱ्या माणसाच्या आत्म्याला मोक्ष प्राप्त होतो.

तमिळनाडमधल्या सार्वजनिक आणि सांप्रदायिक जीवनात प्रबंधम्ला एवढे मानाचे स्थान मिळाल्यामुळे त्या पद्यसंग्रहावर अनेक टीका व भाष्ये निर्माण झाली आहेत. त्यांतली काही तमिळ आहेत, तर काही संस्कृत आहेत. प्रबंधम्‌चे पहिले भाष्य नम्माळवारच्या तिरुवाय मोळी या पद्यसंग्रहावर निर्माण झाले. त्या भाष्याचे नाव आराइरप्पडी (सहा हजार परिच्छेदांचे भाष्य) असे आहे. त्यानंतर नंजीयर या वैष्णव आचार्याने ओन्पदाइरप्पडी (नऊ हजार परिच्छेदांचे भाष्य) निर्माण केले. त्याचा शिष्य नंपिळ्ळै नावाचा होता. त्याने त्यावरही कडी केली. त्याच्या भाष्याला मुप्पत्तिआराइरप्पडी (छत्तीस हजार परिच्छेदांचे भाष्य) किंवा ईडू असे म्हणतात. ते मणिप्रवाल शैलीत (संस्कृत-तमिळमिश्र) लिहिलेले आहे. प्रबंधम्‌च्या समस्त भाष्यांत ईडूला सर्वाधिक महत्त्व आहे. याशिवाय इतरही काही भाष्ये आहेत. **पाहा**– आळवार. [ त. प्र.; हिं. कृ. ]

## प्रबोधानंद

(इ. स. चे १६ वे शतक) व्रजभाषेचा एक रससिद्ध कवी. याचे प्रमाणभूत चरित्र उपलब्ध नाही. काही दंतकथांवरून हा श्रीरंगमजवळील बेलमंडी गावाचा मूळ रहिवासी असून, दाक्षिणात्य ब्राह्मण असावा, असे कळते. तो चैतन्यमतानुयायी होता. प्रबोधानंद दोन असून, त्यांपैकी एक चैतन्यमतानुयायी आणि दुसरा राधावल्लभसंप्रदायी होता, असेही काही विद्वानांचे मत आहे.

पुढे हा वृंदावनात कालियादह या ठिकाणी राहू लागला. इथेच त्याचे देहावसान झाले. इथे त्याची समाधीही आहे. याचे अनेक ग्रंथ उपलब्ध आहेत. त्यांपैकी चैतन्यचंद्रामृत, संगीत-माधव व वृंदावनमहिमामृतशतक, हे विशेष प्रसिद्ध आहेत.

याशिवाय आश्चर्यरासप्रबंध, गायत्रीव्याख्या व गीतगोविंदटीका असे त्याचे आणखीही काही टीकाग्रंथ आहेत. [ चै. म. ब्र. सा. ]

**प्रबोधिनी एकादशी** एक व्रत. कार्तिक शुद्ध एकादशीला हे नाव आहे. आषाढ शुद्ध एकादशीला क्षीरसागरात झोपी गेलेला विष्णू या तिथीस जागा होतो, म्हणून तिला प्रबोधिनी किंवा देवोत्थानी असे नाव पडले आहे. या दिवशी उपवास, जागरण आणि अगस्त्याच्या फुलांनी विष्णूची पूजा करावी, असे या व्रताचे विधान आहे. फल–विष्णुलोकप्राप्ती. [ हिं. व्र. त्यो. ]

**प्रबोधोत्सव** श्रीविष्णूला जागे करण्याचा उत्सव. चातुर्मास्याच्या आरंभी श्रीविष्णू क्षीरसमुद्रात झोपी जातो, तो कार्तिक शु. एकादशीला जागा होतो. त्याला या दीर्घ निद्रेतून जागे करण्यासाठी हा उत्सव करतात. पुराणपरत्वे या उत्सवाच्या विधिविधानात फरक आहे. तथापि कार्तिक शु. एकादशीस किंवा द्वादशीस त्याला जागे करणे, त्या समयी नृत्य-गायन, मंगलवाद्यांचा गजर, वेदांतील ऋचांचा पाठ, कथा-पुस्तकांचे वाचन, स्तोत्रपठण, इ. गोष्टींविषयी पुराणांची एकवाक्यता आहे. या प्रसंगी विष्णूला जागे करण्यासाठी पुढील श्लोक म्हणतात—

**ब्रह्मेन्द्ररुद्राग्निकुबेरसूर्यसोमादिभिर्वन्दित वन्दनीय ।**
**बुध्यस्व देवेश जगन्निवास मन्त्रप्रभावेन सुखेन देव ।**
**इयं तु द्वादशी देव प्रबोधार्थं विनिर्मिता ।**
**त्वयैव सर्वलोकानां हितार्थं शेषशायिना ।।**
**उत्तिष्ठोत्तिष्ठ गोविंद त्यज निद्रां जगत्पते ।**
**त्वयि सुप्ते जगन्नाथ जगत्सुप्तं भवेदिदम् ।।**
**उत्थिते चेष्टते सर्वमुत्तिष्ठोत्तिष्ठ माधव ।**
**गता मेघा वियच्चैव निर्मलं निर्मला दिशः ।।**
**शारदानि च पुष्पाणि गृहाण मम केशव ।।**

अर्थ—ब्रह्मा, इंद्र, रुद्र, अग्नी, कुबेर, सूर्य, सोम, इ. देवांनी वंदित, वंदनीय, जगन्निवास, अशा देवेशा, देवा, तू मंत्रप्रभावाने सुखाने जागृत हो. हे शेषशायी देवा, ही द्वादशी तू तुझ्या प्रबोधासाठी व सर्व लोकांच्या हितासाठी तूच निर्माण केली आहेस. हे गोविंदा, ऊठ, ऊठ ! हे जगत्पते, निद्रा सोड. तू झोपून राहिलास तर हे जगन्नाथा, हे सर्व जग सुप्त होईल. तू उठल्याने ते सर्व हालचाल करू लागेल. म्हणून हे माधवा, तू ऊठ. मेघ निघून गेले आहेत. आकाश निर्मळ झाले आहे. दिशा निर्मळ झाल्या आहेत. शरदऋतूत फुललेली फुले (मी आणली आहेत) त्यांचा हे केशवा, स्वीकार कर.

विष्णूला जागे केल्यावर प्रातःकाली त्याला पंचामृतस्नान, मांगल्यस्नान व सर्वौषधिस्नान घालून षोडशोपचारांनी त्याची पूजा करतात.

काही ठिकाणी हा एक लोकोत्सव म्हणूनही साजरा केला जातो. व्रजमंडलातले लोक या दिवशी मथुरा, गरुडगोविंद व वृंदावन यांची परिक्रमा करतात. मथुरा–वृंदावनात या दिवशी मोठा उत्सव होतो. व्रजनारी आपापली घरे सडा-संमार्जन करून स्वच्छ करतात व घरापुढे रांगोळ्या घालतात.

या उत्सवाला जोडूनच तुलसीविवाह करतात. त्यामुळे हे दोन्ही उत्सव एकच मानले जातात. **पाहा**— तुलसीविवाह. [ पूजामार्गप्रदीप; नि. सिं.; व्रतराज.; ब्र. सां. इ. ]

**प्रभाकर** (१७६९– १८४३ इ. स.) पेशवाईतला शेवटचा शाहीर. याचे पूर्ण नाव प्रभाकर जनार्दन दातार. हा जातीने चित्पावन ब्राह्मण होता. रत्नागिरी जिल्ह्यातील मुरूड हे या कुळाचे मूळ गाव होय. याचा जन्म मात्र नाशिकजवळ गंगापूर गावी झाला. वयाच्या पंधरा–सोळाव्या वर्षापासून तो कविता करू लागला. तथापि त्याच्या काव्याला खरा बहर आला तो विशी-पंचविशीत. गंगापुराहून पुण्याला आल्यावर तो सरदार रास्ते यांच्याकडे कारकून म्हणून लागला होता. सवाई माधवराव आणि दुसरा बाजीराव अशा दोन्ही पेशव्यांच्या राजवटी त्याने जवळून पाहिल्या होत्या.

थोड्याच दिवसांत त्याच्या कवित्वाचा गंध सभोवार दरवळला व तमासगीर मंडळींनी त्याच्याकडे कवनांची मागणी सुरू केली. प्रारंभी काहीशा भिडस्तपणाने पण पुढे राजरोसपणे प्रभाकराने तमासगिरांना कवने पुरवली. गंगू हैबतीच्या फडात त्याच्या लावण्या विशेष गाजल्या. त्यामुळे प्रभाकराला कीर्ती व संपत्ती ही दोन्ही लाभली. गंगू हैबती व महादबा सुतार या दोन तमासगिरांशी तर प्रभाकराची घनिष्ठ मैत्री जमली. आपल्याला प्रसिद्धीच्या प्रकाशात आणणाऱ्या या मित्रांविषयी प्रभाकर सदैव कृतज्ञ राहिला. आपल्या प्रत्येक कवनात तो त्यांचा आवर्जून उल्लेख करतो.

पेशवाईच्या अस्तानंतर प्रभाकराला फार वाईट दिवस आले व केवळ उदरभरणासाठी त्याला मुंबई, ठाणे, बडोदे, इ. ठिकाणी भ्रमंती करावी लागली. पारशी व्यापारी किंवा तत्सम श्रीमंत मंडळींसाठी तो कवने करून गाऊ लागला. अखेरच्या काळात तर त्याला हातात डफ घेऊन दारोदार फिरावे लागले. सरदार रास्ते त्याला ८० रुपये वर्षासन देत, तीच काय ती त्याची निश्चित प्राप्ती.

प्रभाकराची कविता, पदे, पोवाडे व लावण्या या तीन

प्रकारांत विभागली आहे. त्याची सर्वच कविता सरसमधुर असून, प्रत्ययकारी वर्णनांनी समृद्ध आहे. प्रभाकराच्या आज उपलब्ध असलेल्या कवितेत देवादिकांची व पौराणिक अशी ३० पदे, राजकीय व्यक्ती व ऐतिहासिक घटनांवरील १३ पोवाडे आणि लौकिक विषयांवरील ११९ लावण्या एवढा सभार समाविष्ट आहे. वीर, शृंगार व करुण असे तीनच रस त्याने प्राधान्याने आळवले आहेत. सवाई माधवरावाचा रंग व दुसऱ्या बाजीरावाचे शेवटचे दिवस हे त्याचे अत्यंत गाजलेले पोवाडे होत. त्याने केलेले खडर्याच्या लढाईचे वर्णन असे––


शाहीर प्रभाकर

**काय पलटणच्या फैरा झडती। पर्जन्यापरि गोळ्या पडती।**
**शिरकमळें कंदुकवत् उडती। छिन्न भिन्न किती होउन रडती।**
**कितीक पाण्याविण तडफडती। कितीक प्रेतामधीच दडती।**
**वीर विराशी निसंग भिडती। सतीसारखे विडे उचलती।**
**पाउल पाउल पुढे सरकती। घाव चुकावुन शूर थडकती।**
**सपुत वाघापरी गुरकती। हत्यार लावुन मागे मुरकती।**
**खुणेने शत्रुवर्म तरकती।**

हिंदी आणि उर्दू याही भाषा प्रभाकराला चांगल्या प्रकारे परिचित असाव्या. त्याची थोडी हिंदी कविताही उपलब्ध आहे. [तं. त. शा.; पे. र.; प्रभाकरकृत कविता पदें, पोवाडे व लावण्या– चित्रशाळा प्रकाशन १९२०]

**प्रभाकरमिश्र** (इ. स. चे ७ वे शतक) मीमांसादर्शनाचा एक आचार्य. हा कुमारिलभट्टाचा शिष्य व मीमांसेतील गुरुमताचा संस्थापक होता, असे अनेक विद्वानांचे मत आहे. याच्या अलौकिक कल्पनाशक्तीवर मोहित होऊन कुमारिलाने याला गुरू अशी उपाधी दिली आणि तेव्हापासून प्रभाकरमिश्राचा उल्लेख गुरू या नावानेच होऊ लागला. आपल्या विषयाच्या निरूपणात हा अत्यंत पटू होता, तसेच विरोधी सिद्धान्ताचे खंडन व आपल्या सिद्धान्तांचे मंडन करण्यातही अत्यंत दक्ष आणि कठीण विषय सोपा करून सांगण्यात मोठा चतुर होता.

भारतीय दर्शनाच्या इतिहासात प्रभाकरमिश्र हे एक देदीप्यमान रत्न होऊन गेले. आपल्या बुद्धिवैभवाने आणि व्याख्यानकौशल्याने त्याने विद्वानांना आश्चर्यचकित केले आहे. आपल्या स्वतंत्र मताची प्रतिष्ठापना करण्यासाठी याने शाबर भाष्यावर बृहती किंवा निबंधन व लघ्वी किंवा विवरण अशा दोन टीका लिहिल्या आहेत. त्यांपैकी बृहती प्रकाशित झालेली असून, लघ्वी अप्रकाशित आहे. त्यातील अमोघ विचारशक्तीने त्याने मीमांसादर्शनाला विचारशास्त्र बनवायला मदत केली आणि त्या दर्शनावर कुमारिलभट्टाचे जे ऐकाधिपत्य होते, ते नष्ट केले

श्री. कुप्पुस्वामी शास्त्री यांनी याचा काल इ. स. ६१० ते ६९० व कुमारिलभट्टाचा काल इ. स. ६०० ते ६६० असा ठरवला आहे. प्रा. कीथ व डॉ. गंगानाथ झा याच्या मते प्रभाकर मिश्र इ. स. ६०० ते ६५० या कालात होऊन गेला व कुमारिल भट्ट त्याच्या मागून काही काळाने झाला. प्रभाकराच्या ग्रंथाच्या अनुशीलनावरून तो कुमारिलापेक्षा प्राचीन वाटतो, असे या विद्वानांचे मत आहे. [मी. द.; भा. द.]

**प्रभाव्रत** षष्ठीव्रतांपैकी एक. या व्रतात महिन्याच्या षष्ठीपासून पुढे पंधरा दिवस उपवास करतात. स्कंद ही या व्रताची देवता आहे. व्रताच्या अंती दोन कपिला गायींचे दान देतात. फल– ब्रह्मलोकप्राप्ती व कल्पांती राजराजेश्वर या पदाची प्राप्ती. [पु. इं.; हि. ध.]

**प्रभास** एक प्राचीन तीर्थक्षेत्र. हे पाशुपत संप्रदायाचे एक प्रमुख केंद्र आहे. याच क्षेत्रात यादवांची आपसांत मारामारी होऊन त्यांचा संहार झाला व या क्षेत्राजवळच श्रीकृष्णाच्या पायाला व्याधाचा बाण लागून त्याचे देहावसान झाले, अशी कथा आहे. सौराष्ट्रातील सोमनाथ या स्थानापासून काही अंतरावर हे क्षेत्र आहे.

**प्रभूवसु आंगिरस** एक सूक्तद्रष्टा. ऋग्वेदाच्या पाचव्या मंडलातील ३५ व ३६ ही दोन सूक्ते आणि नवव्या मंडलातील ३५ व ३६ ही दोन सूक्ते याच्या नावावर आहेत. पहिल्या दोन सूक्तांचा विषय इंद्रस्तुती हा

असून दुसऱ्या दोन सूक्तांत सोमस्तुती आहे. याने इंद्राला अशनिधर, अपारप्रज्ञ, अतुलबल, भक्तांवर कृपा करण्यासाठी अवतीर्ण होणारा, अशी अनेक विशेषणे लावली आहेत. या प्रत्येक विशेषणातून इंद्राच्या चारित्र्याची एकेक बाजू स्पष्ट होते. याची एक ऋचा अशी –

**अस्माकमिन्द्रेहि नो रथमवा पुरन्ध्या।**
**वयं शविष्ठ वीर्यं दिवि श्रवो दधीमहि**
**दिवि स्तोमं मनामहे।**

(ऋ. ५. ३५. ८.)

अर्थ – इंद्रा, कृपा करून आमच्याकडे आगमन कर आणि आपल्या प्रगल्भ बुद्धीने आमच्या (मनो) रथावर तू आपल्या कृपेची पाखर ठेव. हे सामर्थ्यसागरा, आम्ही आपले यश स्वर्गातसुद्धा स्थिर केले असे कर आणि स्वर्गातही तुझ्याच गुणानुवादाचे चिंतन व्हावे, अशी योजना कर.

या ऋषीने एका ऋचेत (ऋ. ५. ३६. ६.) आपल्याला मिळालेल्या एका दानाचे वर्णन केले आहे. तो म्हणतो – न्यायी सामर्थ्याचा चाहता जो श्रुतरथ त्याने दोन अबलख घोडे, त्यावर आरूढ झालेले अश्ववीर आणि त्यांच्या बरोबर तीनशे सैनिक असा संजोग मला अर्पण केला. हे मरुत्प्रभो, त्या तरुण श्रुतरथ राजापुढे त्याच्या सत्तेखाली राहणारे प्रजानन आपले मस्तक लववोत. [प्रा. च. को.; सी. ऋ.]

## प्रमती भार्गव

विष्णूचा एक अवतार. कलियुगाच्या शेवटी विष्णू हा अवतार घेऊन म्लेच्छ व पाखंडी राजांचा पराभव करील आणि कृतयुग सुरू करील, असे पुराणांनी भाकित केले आहे. (पु. इं.; हि. ध.)

## प्रमदामंत्र

एक काम्य मंत्र. या मंत्राचा ऋषी शक्ती, छंद गायत्री व देवता प्रमदा ही आहे. हा मंत्र असा– 'ह्रीं प्रमदे स्वाहा', याचा एकलक्ष जप व दशांशाने हवन केल्याने इष्टसिद्धी होते. [मंत्रमहोदधि]

## प्रमाण

एक दार्शनिक तत्त्व. याची व्याख्या अशी– 'प्रमीयते अनेन इति' = ज्याच्यामुळे यथार्थ अनुभवाची उत्पत्ती होते, त्याला प्रमाण असे म्हणावे. प्रमाणाची दुसरी व्याख्या अशी– 'प्रमाकरणं प्रमाणम्' = यथार्थ ज्ञान करून घेण्याचे सर्वात उपयुक्त साधन म्हणजे प्रमाण होय.

सर्व भारतीय दार्शनिकांनी 'मानाधीना मेयव्यवस्था' = प्रमेयाची व्यवस्था ही प्रमाणाच्या आधीन असते; किंवा 'प्रमेयसिद्धिः प्रमाणाद्धि' = प्रमेयाची सिद्धी ही प्रमाणांच्या आधारे होते, हा सिद्धांत मानलेला आहे. प्रत्येक दार्शनिक आपले तत्त्वविषयक दर्शन प्रमाणांच्या आधारेच प्रस्थापित करतो. तथापि प्रमाणशक्तीचा आश्रय सर्व दार्शनिकांनी घेतलेला असला, तरी तात्त्विक बाबतीत त्यांच्यांत अनेक वेळा मतभेद आढळतात. याचे मुख्य कारण प्रमाणशक्तीचे तारतम्य हे आहे. एखादा दार्शनिक एखादा सिद्धान्त प्रस्थापित करतो, तेव्हा त्याने एखादे प्रमाण हे अंतिम मानलेले असते. पण दुसरा एखादा दार्शनिक त्यापेक्षा अधिक विकसित अशा प्रमाणाचा आधार घेऊन आपला सिद्धान्त प्रस्थापित करतो. अशा प्रकारे स्थूल, सूक्ष्म, सूक्ष्मतम व अगम्य अशा तत्त्वस्वरूपाविषयी दर्शनात जे चिंतन झाले, ते उत्तरोत्तर वृद्धिंगत झालेल्या प्रमाणशक्तीच्या आधारेच झालेले दिसते.

भौतिकवादी चार्वाक इंद्रियांची शक्ती हीच अंतिम आहे, असे मानतात. त्यांच्या मते जे तत्त्व इंद्रियगम्य आहे, तेच सत्य होय. म्हणून ते इंद्रियजन्य ज्ञानाला प्रमाण मानतात व प्रत्यक्ष हे एकच प्रमाण आहे, असे सांगतात.

पण दुसऱ्या दार्शनिकांच्या ध्यानात आले, की इंद्रियांपेक्षा मनाची शक्ती जास्त आहे. प्रत्येक इंद्रिय आपला विशिष्ट विषय ग्रहण करते, तर मन सर्व इंद्रियग्राह्य विषयांचे ज्ञान ग्रहण करते. सूक्ष्मदर्शक यंत्राच्या साहाय्याने ज्याप्रमाणे डोळ्याला अधिक दूरवरचे दिसू शकते, त्याप्रमाणे योग्य संस्कारांनी मनही अतीत व अनागत यांचा अधिक दूरवर विचार करू शकते. या विचारासाठी त्याला वर्तमानकालातील विषयांचे ज्ञान उपयोगी पडते. अशी विशिष्ट प्रकारची मनःशक्ती मानणाऱ्या दार्शनिकांनी अनुमान हे एक स्वतंत्र प्रमाण मानले. चार्वाक सोडून सर्व दार्शनिक अनुमानाचे स्वतंत्र प्रामाण्य स्वीकारतात. अनुमान प्रमाणाच्या द्वारा ते स्थूल भौतिक जगताच्या पुढे जाऊन सूक्ष्म अशा भौतिक तत्त्वाची स्थापना करतात. अनुमानाच्या प्रयोगात ते प्रामुख्याने कार्यकारणभाव व सादृश्य या दोन सिद्धांतांचा स्वीकार करतात. काही जणांनी स्थूल भौतिक जगताचे अव्यक्त किंवा परमाणू हे कारण मानले आहे; तर सुखदुःखादींच्या अनुभवाचे व जीवनातील अन्य गोष्टींचे स्पष्टीकरण भौतिक तत्त्वाच्या आधारावर करता येत नसल्यामुळे, काही जणांनी अभौतिक अशा चेतन तत्त्वाचा स्वीकार केला आहे.

अनुमानाने सिद्ध केलेल्या या सूक्ष्म भौतिक तत्त्वाचे किंवा चेतन तत्त्वाचे प्रत्यक्ष होऊ शकेल का, असा प्रश्न त्यानंतर उपस्थित झाला. आणि योगमार्गाच्या रूपाने त्याचे उत्तर सापडले. योगमार्गी पुरुषांचा असा अनुभव आहे, की वासना दूर झाल्या असता मनाची शक्ती अधिक वाढते. म्हणून त्यांनी

योगानुभावातून सूक्ष्म व अतींद्रिय विषयांचा साक्षात्कार घडवणाऱ्या एका नवीन प्रमाणाचा शोध लावला. हे प्रमाण म्हणजे आर्ष ज्ञान किंवा ऋतंभरा प्रज्ञा हे होय. हेच आगम प्रमाणाचे मूल आहे. अशा प्रकारे प्रत्यक्ष, अनुमान व आगम ही तीन प्रमाणे मानली जाऊ लागली. मुळात योगी ऋतंभरा प्रज्ञेलाच आगम मानीत होते; पण त्यांचे विचार शब्दांत प्रकट झाल्यानंतर ते शब्दही आगम मानले जाऊ लागले.

उपनिषदे, आगम, पिटक, इ. ग्रंथांत भौतिक, अभौतिक किंवा जड व चेतन यांचे जे विवरण आले आहे, ते कोणत्या ना कोणत्या प्रमाणाच्या आधारेच केलेले आहे. पण त्यात प्रमाणशास्त्र असा काही स्वतंत्र विभाग नव्हता. तसा तो सूत्रकालापासून सुरू झाला व उत्तरोत्तर विकसित होत गेला. इतकेच नव्हे; तर वैदिक, जैन, बौद्ध, चार्वाक, इ. सर्व दार्शनिकांना आपापल्या ग्रंथांत स्वाभिमत प्रमाणांची विस्ताराने चर्चा करावी लागली. दार्शनिक विद्वानांनी प्रमेय तत्त्वाप्रमाणे प्रमाण तत्त्वाच्या बाबतीतही सूक्ष्म व खोलवर विचार केला आहे.

प्रमाणविचाराच्या बाबतीत न्यायदर्शन हे अग्रेसर आहे. किंबहुना, न्यायदर्शन हे प्रमाणशास्त्रच आहे. न्यायदर्शनात प्रत्यक्ष, अनुमान, उपमान व शब्द ही चार प्रमाणे मानलेली आहेत. प्रमाण हे साधन व प्रमा हे फल आहे. प्रत्यक्ष प्रमेचे कारण प्रत्यक्ष, अनुमिती प्रमेचे कारण अनुमान, उपमिती प्रमेचे कारण उपमान आणि शाब्द प्रमेचे कारण शब्द हे होय.

इंद्रिय व अर्थ यांच्या संनिकर्षामुळे उत्पन्न झालेल्या ज्ञानाला प्रत्यक्ष असे नाव आहे. डोळ्यांचा घटाशी संबंध आल्यावर घटाचे ज्ञान होते. यालाच प्रत्यक्ष असे म्हणतात. आत्म्याच्या ठिकाणी प्रत्यक्ष ज्ञान उत्पन्न होण्यासाठी तीन संबंधांची आवश्यकता असते– आत्मा आणि मन यांचा संयोग. मन व इंद्रिय यांचा संयोग आणि इंद्रिय व विषय याचा संयोग. कोणत्याही ज्ञानासाठी आत्ममनःसंयोग हा आवश्यक असतो. प्रत्यक्ष प्रमाणाचे लौकिक व अलौकिक असे दोन भेद आहेत. लौकिक प्रत्यक्षही बाह्य व आंतर असे दोन प्रकारचे आहे. बाह्य प्रत्यक्ष हे पंच ज्ञानेंद्रियांच्या द्वारा होत असल्यामुळे चाक्षुष, श्रावण, स्पार्शन, रासन व घ्राणज असे पाच प्रकारचे आहे. आंतर किंवा मानस प्रत्यक्ष हे एकाच प्रकारचे आहे.

अनुमान प्रमाण हे प्रत्यक्षावरच आधारलेले आहे. कोणत्या तरी लिंगाच्या (हेतूच्या) ज्ञानाने, ते लिंग धारण करणाऱ्या वस्तूचे ज्ञान प्राप्त करून घेणे, याला अनुमान असे म्हणतात. उदा० पर्वताच्या शिखरावरून अविच्छिन्नपणे येणारी धूमरेखा पाहून, पर्वतावर अग्नी आहे हे ज्ञान प्राप्त होते, ते अनुमान प्रमाणाच्या द्वारे होते. 'पर्वतो वह्निमान् धूमात्' या अनुमानवाक्यात पर्वत हा पक्ष, वह्नी हा साध्य व धूम हा हेतू आहे. जे सिद्ध करायचे असते त्याला साध्य किंवा व्यापक म्हणतात व ज्याने साध्य करायचे, त्याला हेतू, साधन, लिंग किंवा व्याप्य म्हणतात. अनुमानाचे पूर्ववत्, शेषवत् व सामान्यतो दृष्ट असे तीन प्रकार आहेत. (न्यायदर्शन पाहा)

उपमान हे तिसरे प्रमाण आहे. आधी ज्ञात असलेल्या एखाद्या वस्तूशी सादृश्य असल्यामुळे जेव्हा एखाद्या नव्या गोष्टीचे ज्ञान होते, तेव्हा त्याला उपमान असे म्हणतात. 'गोसदृशो गवयः' गो (बैल) याच्यासारखा गवा. हे वाक्य ऐकल्यानंतर जंगलात जाणाऱ्या एखाद्या पुरुषाला गोसदृश एखादा प्राणी दिसल्यावर हा गवयपदवाच्य आहे, असे जे ज्ञान होते, ते उपमान प्रमाणाने होते. अशा प्रकारे उपमान प्रमाणाला दोन वस्तूंचे सादृश्य ज्ञान हे करण व 'गोसदृशो गवयः' या वाक्याचे स्मरण हे सहकारी कारण आहे.

उपमानाला स्वतंत्र प्रमाण मानण्याबाबत दार्शनिकांत मतभेद आहेत. चार्वाक उपमान हे प्रमाण मानीत नाहीत. दिङ्नागाने ते प्रत्यक्षाच्या अंतर्गत मानले आहे. वैशेषिक त्याचा अंतर्भाव अनुमानात करतात. सांख्य हे उपमानात शब्द व प्रत्यक्ष यांचा अंश आहे, असे समजतात. भासर्वज्ञ हा नैयायिक असूनही त्याने उपमानाला शब्द प्रमाणांतर्गत मानले आहे. जैन दर्शन उपमानाला प्रत्यभिज्ञामात्र मानते. मीमांसा व वेदान्त या दर्शनांनी उपमानाला स्वतंत्र प्रमाण मानले आहे; पण उपमानाविषयीची त्यांची कल्पना न्याय दर्शनापेक्षा भिन्न आहे.

शब्द हे चौथे प्रमाण आहे. 'आप्तोपदेशः शब्दः' आप्तपुरुषाच्या उपदेशाला शब्द असे म्हणतात (न्या. सू. १.१.६). जो वस्तूचे यथार्थ रूप जाणतो व हितोपदेष्टा असल्यामुळे आपण ज्याचे वाक्य प्रमाण मानतो, तो आप्त होय.

शब्दाचे लौकिक व वैदिक असे दोन प्रकार आहेत. लौकिक पुरुषांच्या वाक्याला लौकिक शब्द व श्रुतिवाक्यांना वैदिक शब्द असे म्हणतात. पदांच्या समूहाला वाक्य असे नाव आहे. पद हे शक्तियुक्त असते, नैयायिक अभिधा व लक्षणा अशी दोन प्रकारची शक्ती मानतात. पदशक्तीच्या बाबतीतही मतभेद आहेत. प्राचीन नैयायिक ईश्वरेच्छेला संकेत मानतात. 'अयं शब्दः अमुमर्थं बोधयतु' = हा शब्द या अर्थाचा बोध करो अशा ईश्वरेच्छेवर शब्दाचा संकेत राहतो असे ते म्हणतात. पण नव्य नैयायिक पुरुषाच्या इच्छेलाही संकेताचे कारण मानतात. संकेतग्रहाविषयीही दार्शनिकांत मतभेद आहे. जाती, व्यक्ती व आकृती या तिघांच्या ठिकाणी न्यायदर्शनाने संकेत मानला आहे. वाक्यार्थाचा बोध होण्यासाठी आकांक्षा, योग्यता व संनिधी ही आवश्यक आहेत.

वेदांच्या बाबतीत नैयायिक व मीमांसक यांनी खूप विचार केला आहे. मीमांसक ईश्वर मानीत नसल्यामुळे ते वेद अपौरुषेय व नित्य मानतात; तर नैयायिक पौरुषेय व अनित्य मानतात; पण ही अनित्यता इतर अनित्य पदार्थांपेक्षा निराळी आहे, असे त्यांचे मत आहे.

बौद्ध व जैन हे वेदप्रामाण्य न मानताही शब्दप्रामाण्य मानतात. ब्राह्मण दार्शनिकांना ज्याप्रमाणे वेद प्रमाण आहेत, त्याप्रमाणे बौद्धांना बुद्धवचने व जैनांना जैनागम प्रमाण आहेत. याशिवाय प्राभाकर मीमांसकांनी अर्थापत्ती हे पाचवे, कुमारिलाने अनुपलब्धी हे सहावे, चरकमतात युक्ती हे सातवे व पौराणिकांनी ऐतिह्य हे आठवे, अशी प्रमाणे मानली आहेत.

एखाद्या वस्तूच्या बाबतीत दोन प्रत्यक्षांच्या मधे दिसणारी असंगती मीमांसक अर्थापत्ती या प्रमाणाने दूर करतात. उदा० 'पीनो देवदत्तो दिवा न भुङ्क्ते' = देवदत्त दिवसा काही खात नाही आणि पुष्ट तर दिसतो. ही विसंगती दूर करण्यासाठी अर्थापत्ती या प्रमाणाने ज्ञान करून घेतात, की तो रात्री जेवत असला पाहिजे.

अनुपलब्धी प्रमाणाच्या द्वारा अभावाचे ज्ञान होते, असे मीमांसक मानतात. आकाशात चंद्र नाही, हे चंद्राच्या अभावाचे ज्ञान अनुपलब्धी प्रमाणाने होते, असे त्यांनी मानले आहे. [ भा. त. वि.; भा. द.; प्रा. भा. सा. सां. भू. ]

**प्रयस्वन्त आत्रेय** एक सूक्तद्रष्टा. ऋग्वेदाच्या पाचव्या मंडलातील २० वे सूक्त याने रचले आहे. अग्निस्तुती हा त्या सूक्ताचा विषय आहे. त्या सूक्तातील एक ऋचा (ऋ. ५. २०.२) अशी –

**ये अग्ने नेरयन्ति ते वृद्धा उग्रस्य शवसः ।**
**अप द्वेषो अप ह्वरोऽन्यव्रतस्य सश्चिरे ।।**

अर्थ – हे अग्ने, तू उग्र आणि उत्कट बलाढ्य (आहेस हे माहीत) असूनही जे मोठ्या पदास चढलेले अथवा वयस्क असे लोक तुझे अन्तःकरण (भक्तीने) हलवून सोडीत नाहीत, ते दुसऱ्याच्या सेवेत राबणाऱ्या पुरुषांच्या द्वेषाला आणि तिरस्काराला पात्र झालेच म्हणून समजा.

**प्रयाग** एक महान तीर्थ. या ठिकाणी गंगा, यमुना व सरस्वती या तीन नद्यांचा संगम झाला आहे. गंगा–यमुना दृश्य आहेत; पण सरस्वती अदृश्य आहे. या तीन्ही नद्यांच्या संगमाला त्रिवेणी संगम म्हणतात. या संगमामुळेच येथे प्रयागराज किंवा तीर्थराज अशी पदवी मिळाली आहे. प्र + यज् = मोठा यज्ञ करणे, या धातूवरून या स्थानाची



व्युत्पत्ती सांगतात. प्रजापतीने या ठिकाणी एक महायज्ञ केला होता, अशी कथा आहे. म्हणून याला प्रजापतिक्षेत्र असेही म्हणतात. ब्रह्मदेवाच्या कुरुक्षेत्र, गया, विराज, पुष्कर व प्रयाग या पाच यज्ञवेदींपैकी प्रयाग ही मध्यवेदी आहे.

मत्स्य पुराणानुसार प्रयाग क्षेत्राच्या चतुःसीमा अशा–गंगेच्या पूर्वेस समुद्रकूपापर्यंत, पश्चिमेस कंबलापासून अश्वतर क्षेत्रापर्यंत, दक्षिणेस बहुमूलक क्षेत्रापर्यंत आणि उत्तरेस वासुकी सरोवरापर्यंत. प्रयाग क्षेत्राचा परिधी पाच योजने मानला आहे.

**क्षेत्रमाहात्म्य** – महाप्रलय होऊन सर्व जग बुडाले, तरी प्रयाग बुडणार नाही आणि प्रलयांती श्रीविष्णू इथे वटपत्रावर शिशुरूपाने शयन करील; तसेच सर्व देव, ऋषी व सिद्ध इथे वास्तव्य करून या क्षेत्राचे रक्षण करतील, असे क्षेत्रमाहात्म्यात सांगितले आहे. महाभारताच्या वनपर्वात गंगा–यमुना यांच्या दोआबाला भारताचा कटिप्रदेश म्हटले आहे. प्रयागात स्नान करणे हे तर स्वर्गप्रद आहेच; पण त्याचे नुसते स्मरणही पुनर्जन्माचा क्षय करणारे आहे, असे म्हटले आहे. म्हणूनच भाविक लोक स्नान करताना गंगेचा जसा नामोच्चार करतात तसाच 'प्रयागराज, वेणीमाधव' असाही नामोच्चार करतात. जी व्यक्ती गंगा–यमुनांच्या संगमावर पंचाग्निसाधन करते, तिला सदेह स्वर्गप्राप्ती होते आणि जी व्यक्ती या ठिकाणी पितरांचे श्राद्ध करून कपिला गाईचे दान करते, तिला पुढील जन्मी साम्राज्य मिळते, असे पद्म पुराणात म्हटले आहे. प्रयाग हे तीन्ही लोकांतील सर्वश्रेष्ठ तीर्थ असल्याचे कूर्म पुराणाने म्हटले आहे. ज्याला पुत्रकामना असेल, त्याने प्रयागात स्नान केल्याने त्याचा तो मनोरथ पूर्ण होतो, असे पद्म पुराणाने सांगितले आहे. प्रयागमाहात्म्य सांगताना पद्म पुराणात म्हटले आहे–

**ग्रहाणां च यथा सूर्यो नक्षत्राणां यथा शशी ।**
**तीर्थानामुत्तमं तीर्थं प्रयागाख्यमनुत्तमम् ।।**

अर्थ – ज्याप्रमाणे ग्रहांमध्ये सूर्य, ताऱ्यांमध्ये चंद्रमा, तसाच तीर्थांमध्ये प्रयागराज सर्वोत्तम आहे.

**तीर्थविधी** – प्रयागात त्रिवेणीसंगमाचे पूजन, मुंडन, स्नान, पितृश्राद्ध, सौभाग्यवती स्त्रियांचे वेणीदान व काही देवतांचे दर्शन एवढा आवश्यक विधी असतो. इथे स्त्रियांनी संपूर्ण मुंडन करून त्रिवेणीला आपले वेणीदान करावे, असे पुराणांनी म्हटले आहे. तसे न केल्यास नरकाचे भयही सांगितले आहे. मध्ययुगीन कालात सुवासिनी स्त्रिया या पद्धतीने वेणीदान करीत, पण अलिकडे ही प्रथा बंद झाली आहे. भाविक स्त्रिया आजही इथे वेणीदान करतात; पण ते केवळ वेणीचे अंगुळभर अग्र कापून. प्रयागात ज्या स्थानांची दर्शने आवश्यक सांगितली आहेत, त्यांविषयी एक श्लोक आहे, तो असा–

**त्रिवेणीं माधवं सोमं भरद्वाजं च वासुकिम् ।**
**वन्दे ऽक्षयवटं शेषं प्रयागं तीर्थनायकम् ।।**

**अर्थ** – त्रिवेणी, वेणीमाधव, सोमेश्वर, भरद्वाज, वासुकिनाग, अक्षयवट व शेष ( बलदेव ) आणि तीर्थराज प्रयाग यांना मी वंदन करतो.

( १ ) **त्रिवेणी** – संगमाला त्रिवेणी म्हणतात. कल्पना अशी आहे, की गंगा-यमुना-सरस्वती या तीन नद्यांचे प्रवाह इथे वेणीसारखे एकमेकांत मिसळले आहेत. त्यावरून सुवासिनी स्त्रियांच्या वेणीदानाची कल्पना पुराणांनी रूढ केली असावी.

( २ ) **माधव** – अक्षयवटाच्या उजव्या अंगाला माधवक्षेत्र आहे. त्याला वेणीमाधव म्हणतात. हा प्रमुख माधव होय. या शिवाय शंखमाधव, मनोहरमाधव, इ. बारा माधव या क्षेत्रात आहेत.

( ३ ) **सोम** – यमुनेच्या पार अरैल गावी बिंदुमाधव मंदिराच्या जवळ हे एक छोटेसे शिवमंदिर आहे. किल्ल्यावरून नौकेने या क्षेत्री जाता येते.

( ४ व ५ ) **भरद्वाज व शेष** – शहरातल्या करनलगंजात भरद्वाजाचा आश्रम आहे. तिथल्या शिवलिंगाला भरद्वाजेश्वर असे म्हणतात. या मंदिरात सहस्र फणांची शेषमूर्ती आहे.

( ६ ) **वासुकी** – शहरातल्या बक्षी मोहल्ल्यात गंगेच्या तीरावर वासुकीचे मंदिर आहे.

( ७ ) **अक्षयवट** – हा एका खोडाच्या स्वरूपात प्रयागच्या किल्ल्यात दिसतो. तिथे बऱ्याच प्राचीन जैन मूर्ती असून, ऋषभदेवाने इथे तप केले होते, असे सांगतात. (अक्षयवट पाहा.)

**क्षेत्रपरिक्रमा** – अंतर्वेदी व बहिर्वेदी अशी दोन प्रकारची इथली क्षेत्रपरिक्रमा आहे. पहिली दोन दिवसांत व दुसरी दहा दिवसांत पूर्ण करायची असते. या परिक्रमांमध्ये दुर्वासाश्रम, लाक्षागृह, सीतामढी, ऋषिवन, राजापूर, शृंगवेरपूर, इ. अनेक देवस्थाने लागतात.

**माघमेळा** – प्रयागात दरवर्षी माघ मासी मोठी यात्रा भरते. भाविक माणसे त्या वेळी महिनाभर किंवा यथाशक्य काल संगमावर किंवा गंगा-यमुनांच्या मध्यभागी वास्तव्य करून राहतात. याला कल्पवास असे म्हणतात. मकर संक्रांतीपासून कुंभसंक्रांतीपर्यंत कल्पवास करण्याची रूढी आहे. प्रत्येक बारा वर्षांनी गुरु वृषभ राशीत व सूर्य मकर राशीत आला असता प्रयागात प्रचंड यात्रा भरते. याला कुंभपर्व किंवा कुंभमेळा असे म्हणतात. कुंभमेळ्यानंतर सहा वर्षांनी अर्धकुंभमेळा भरतो, तोही मोठा असतो.

त्रिवेणीत जलसमाधी घेऊन व अक्षयवटावरून देहपात करून आत्मघात करणाऱ्या व्यक्तीला केवळ तेवढ्याच एका गोष्टीवरून मोक्ष मिळतो, असे सांगितले आहे. प्राचीन काळी आपल्या शरीराचे अवयव तोडून पक्ष्यांना खाऊ घालणे, असे प्रकारही काही लोक मोक्षाच्या उद्देशाने इथे करीत. युआन च्वांगने अशी घटना समक्ष पाहिल्याचे लिहून ठेवले आहे. प्रयागात अशा गोष्टींनी अमृतत्व म्हणजे मोक्ष मिळतो. अशा संबंधाची एक ऋचा ऋग्वेदाच्या खिल सूक्तात आहे, ती अशी–

**सितासिते सरिते यत्र सङ्गथे तत्राप्लुतासो दिवमुत्पतन्ति ।**
**ये वै तन्वं विसृजन्ति धीरास्ते जनासो अमृतत्वं भजन्ते ।।**

(ऋ. खिल १०.७५.१)

**अर्थ** – गंगा-यमुना या दोन नद्या एकत्र मिळतात, त्या ठिकाणी स्नान करणाऱ्यांना स्वर्ग मिळतो (आणि) जे धीर पुरुष त्या संगमात तनुत्याग करतात त्यांना मोक्षप्राप्ती होते.

**इतिहास** – वनवासाला जात असता प्रभू रामचंद्र या ठिकाणी गंगापार होऊन भरद्वाजाच्या आश्रमात आला होता, असे रामायणात वर्णन आहे (वा. रा. अयोध्या ५४ ). भारतीय युद्धानंतर गोत्रवधाच्या पापामुळे खिन्न झालेल्या युधिष्ठिराला मार्कंडेय मुनीने प्रयाग क्षेत्राची यात्रा करण्यास सांगितले आणि युधिष्ठिराने ती केली. गौतम बुद्धाने काही काळ इथे वास्तव्य केले होते. सम्राट अशोकाने इ. स. पूर्व २७२ मध्ये इथे एक स्तूप उभारला होता. अशोकानंतर प्रयाग क्षेत्र गुप्तांच्या साम्राज्यात समाविष्ट झाले. इथल्या एका स्तंभावर सम्राट समुद्रगुप्ताची प्रशस्ती खोदलेली आहे. गुप्तांनंतर ते हर्षाच्या साम्राज्यात गेले. सम्राट हर्ष हा त्यागी सम्राट होता. तो दर सहा वर्षांनी भरणाऱ्या कुंभमेळ्यात या ठिकाणी येत असे आणि इथे विविध धर्मांतील पंडितांच्या सभा भरवून धर्मचर्चा करवीत असे. त्या वेळी तो ब्राह्मण, मुनी, श्रमण, भिक्षू, याचक व गोरगरीब यांना रघुराजाप्रमाणे सर्वस्वाचे दान करीत असे. श्रीशंकराचार्य यांनी या ठिकाणी कुमारिलभट्ट या महामीमांसकाबरोबर वैदिक धर्माच्या रक्षणासंबंधी चर्चा केली होती, असेही सांगतात.

इ. स. च्या १२ व्या शतकाच्या अखेरीस प्रयाग मुसलमानांच्या अंमलाखाली गेले. अकबराने या शहराची पुनर्रचना केली व इथल्या संगमाजवळ एक किल्ला बांधला. प्रस्तुत नगराचे अलाहाबाद असे त्याने नवे नामकरणही केले. लोकव्यवहारात सांप्रत तेच नाव रूढ आहे. मुसलमानांनंतर या क्षेत्रावर मराठ्यांचीही सत्ता चालली. त्यांच्या नंतर हे नगर इंग्रजांच्या ताब्यात गेले. इ. स. १८९८ साली लॉर्ड कॅनिंगने इथे मोठा शाही दरबार भरवला आणि त्यात महाराणी व्हिक्टोरियाची एक घोषणा वाचून दाखवली. इंग्रजांच्या काळात प्रयाग ही संयुक्त प्रांताची राजधानी होती. शहरातल्या दर्शनीय ठिकाणांत पं. मोतीलाल नेहरू यांनी बांधलेला विशाल प्रासाद हा

एक आहे. सांप्रत तो आनंदभवन या नावाने ओळखला जातो.

प्रयागला निराळयाही एका दृष्टीने फार महत्त्व आहे. यज्ञप्रधान वैदिक संस्कृती आणि वैदिकेतर अशा महान जनसमुदायाची यात्रासंस्कृती यांचाही इथेच संगम झाला. वैदिक आणि वैदिकेतर अशा धर्म–संप्रदायांचे हे एक परिचयक्षेत्र बनले.

भारतात अशी एकूण १४ प्रयागक्षेत्रे असून, त्यांची नावे पुढीलप्रमाणे आहेत—

( १ ) प्रयागराज—गंगा-यमुना-सरस्वतीसंगम.
( २ ) देवप्रयाग—अलकनंदा-भागीरथीसंगम.
( ३ ) रुद्रप्रयाग—अलकनंदा-मंदाकिनीसंगम.
( ४ ) कर्णप्रयाग—पिंडरगंगा-अलकनंदासंगम.
( ५ ) नन्दप्रयाग—अलकनंदा-नंदासंगम.
( ६ ) विष्णुप्रयाग—विष्णुगंगा-अलकनंदासंगम.
( ७ ) सूर्यप्रयाग—अलसतरंगिणी-मदाकिनीसगम.
( ८ ) इन्द्रप्रयाग—भागीरथी-व्यासगंगासंगम.
( ९ ) सोमप्रयाग—सोमनदी-मंदाकिनीसंगम.
(१०) भास्करप्रयाग—नद्यांची नावे दिलेली नाहीत.
(११) हरिप्रयाग—हरिगगा-भागीरथीसंगम.
(१२) गुप्तप्रयाग—नीलगंगा-भागीरथीसंगम.
(१३) श्यामप्रयाग—श्यामगंगा-भागीरथीसंगम.
(१४) केशवप्रयाग—अलकनंदा-सरस्वतीसंगम.

यांतील पहिली पाच तीर्थे मुख्य आहेत. जे लोक हिमालयातील पाच प्रयाग महत्त्वाचे मानतात, ते पहिल्या पाचांत प्रयागराजाचा अंतर्भाव न करता विष्णुप्रयागाचा करतात. या पाचांत देवप्रयाग सर्वश्रेष्ठ मानतात. **पाहा** – कुंभपर्व. [ कल्याणतीर्थांक; हिं. ध.; प्रयाग–प्रदीप – श्री. शालिग्राम श्रीवास्तव, १९३७; श्री. ज. हृ. दवे – भारती, २३ सप्टेंबर, १९५६ ]

**प्रयाण** एखादा उद्देश मनात धरून बाहेरगावी किंवा दूर देशी जाणे याला प्रयाण असे म्हणतात. विद्यार्जन, धनार्जन, तीर्थयात्रा, विशिष्ट व्यक्तींची भेट किंवा अन्य काही प्रापंचिक कामे यांसाठी प्रवास करणे असा प्रयाण शब्दाचा अर्थ आहे. प्रयाणासाठी निघताना शुभ मुहूर्त पाहावा व अशुभ योग टाळावे, असे सांगितले आहे.

श्रवण, धनिष्ठा, अश्विनी, पुष्य, रेवती, अनुराधा, मृग, हस्त, पुनर्वसू व अभिजित ही नक्षत्रे प्रयाणास शुभ होत. अन्य नक्षत्रे वर्ज्य समजावी. सोम व शनी या वारीं पूर्वेस, गुरुवारी दक्षिणेस, रवी व शुक्र या वारीं पश्चिमेस आणि बुध व मंगळ या वारीं उत्तरेस प्रयाण करू नये; कारण त्या त्या वारी त्या त्या दिशेस वारशूल असतो. बुध हा ग्रह सन्मुख असता तो अशुभ व पृष्ठभागी किंवा वामभागी असल्यास शुभ समजावा.

प्रयाणकालीन लग्नाचेही शुभाशुभ पाहावे. ज्या लग्नी प्रयाण कर्तव्य असेल, त्या लग्नापासून केन्द्र व त्रिकोण या स्थानीं ग्रह असावे. ३, ११, ६ व १० या स्थानीं पापग्रह असू नये. १० वा शनी व ७ वा शुक्र हे अनिष्ट होत. प्रयाण लग्नापासून १, ६, ८, १२ या स्थानी चंद्र व ६, ७, ८ व १२ या स्थानी लग्नाधिपती अशुभ होय.

मृत्यू व चौर ही पंचके प्रयाणकाली वर्ज्य समजावी. प्रयाणास निघताना ब्राह्मण, घोडा, हत्ती, फळ, अन्न, दूध, दही, गाय, कमल, वेश्या, वाद्य, मयूर, पोपट, मुंगूस, ऊस, पूर्ण कलश, छत्र, कुमारी कन्या, रत्न, मदिरा, पांढरा बैल, कडेवर मूल घेतलेली स्त्री, इ. वस्तूंचे दर्शन हा शुभ शकुन समजावा. वंध्या स्त्री, चर्म, अस्थी, मीठ, कोळसा, लाकूड, नपुंसक, विष्ठा, तेल, जटाधारी, संन्यासी, रोगी, इ. वस्तूंचे दर्शन आणि मांजर आडवे जाणे, हे अशुभ शकुन समजतात.

अशुभ शकुन झाले, तरी प्रयाण करणे प्राप्तच असेल, तर ११ किंवा १६ वेळा श्वास घेऊन मग निघावे. मात्र तीनदा अपशकुन झाल्यास प्रयाण स्थगित ठेवावे. प्रयाणदिवसापासून नवव्या दिवशी परत स्वगृही येऊ नये. गृहप्रवेशाच्या वेळी मृदू व ध्रुव ही नक्षत्रे असावी.

प्रयाणास निघताना अग्नी, मित्र, ब्राह्मण व स्त्री यांना तृप्त करून मग निघावे. प्रयाणकाळी क्रोध, श्मश्रुकर्म, तैलाभ्यंग, अश्रुपात, मद्यमांसादींचे सेवन व श्वेतभिन्न वस्त्र ही वर्ज्य करावी. सुमुहूर्तावर प्रयाण करणे अशक्य असेल तर प्रस्थान ठेवावे.

**लौकिक संकेत—** कोणत्याही शुभ कार्यासाठी तिघांनी मिळून जाऊ नये. निघतेवेळी भोजनाचे नाव निघाल्यास अन्नाला डावलून जाऊ नये. बुधवारी प्रयाण करू नये. या बाबतीत ' जाशील बुधी तर येशील कधी ' अशी म्हणच आहे. तिचा अर्थ बुधवारी प्रवासाला निघणाऱ्या माणसाचे परत येणे निश्चित मुदतीत होत नाही, असा आहे. घरातला मुलगा दूर देशी प्रवासाला निघाला, तर त्याची आई किंवा तत्सम मोठी स्त्री त्याच्या हातावर दही घालते. ते दही खाऊन त्याने बाहेर पडायचे असते. प्रवासाला निघताना तुळशीवृंदावनाला उजवे घालून निघण्याची पद्धत आहे. [ मु. मा.; मु. चिं.; ध. सिं. ]

**प्रयोग भार्गव** एक सूक्तद्रष्टा. ऋग्वेदाच्या ८ व्या मंडलातील १०२ वे सूक्त याच्या नावावर आहे. याने विविध नावांनी अग्नीची स्तुती केली आहे. अन्न मिळवण्याच्या प्रयत्नात आपल्याला यश मिळावे, असे तो म्हणतो.

त्याची एक ऋचा अशी (ऋ. ८. १०२.३)–

**त्वया ह स्विद्युजा वयं चोदिष्ठेन यविष्ठ्य ।**
**अभिष्मो वाजसातये**

अर्थ – हे अतितरुण अग्ने, समृद्धीसाठी आम्हांला प्रेरणा देणाऱ्या तुझ्या साहाय्याने आम्ही अन्नप्राप्तीसाठी करायला लागणाऱ्या लढाईत शत्रूचा पराभव करू.

**प्रलय** ' प्रलीयते क्षीयते जगदस्मिन्निति '= ज्यात सर्व जग नष्ट होते, तो प्रलय होय. प्रलयाचे नित्य, नैमित्तिक, प्राकृत व आत्यंतिक असे चार प्रकार आहेत. सर्व प्राणी व पदार्थ यांच्यांत प्रतिक्षणी जो सूक्ष्म बदल होत असतो, त्याला नित्य प्रलय असे म्हणतात. प्रत्येक कल्पान्ती ब्रह्मदेवाची रात्र सुरू होते, तो झोपी जातो व जगाचा प्रलय होतो, तो नैमित्तिक प्रलय होय. ब्रह्मदेवाचे आयुष्य समाप्त होताच सर्व ब्रह्मांड प्रकृतीत विलीन होते. त्या स्थितीला प्राकृत प्रलय किंवा महाप्रलय असे म्हणतात. विविध प्रकारच्या साधनेमुळे सर्व जीवांना मोक्ष मिळतो, तेव्हा त्या स्थितीला आत्यंतिक प्रलय म्हणतात.

भागवत पुराणात आत्यन्तिक प्रलयाचे वर्णन केलेले आहे, ते असे (भाग. पु. १२·४·३६)—

**यदैवमेतेन विवेकहेतिना**
**मायामयाहङ्करणात्मबन्धनम् ।**
**छित्वाऽच्युतात्मानुभवोऽवतिष्ठते**
**तमाहुरात्यन्तिकमङ्ग संप्लवम् ।।**

अर्थ — जेव्हा जीव विवेकरूपी खड्गाने आत्म्याचे मायामय अहंकाररूपी बंधन तोडून टाकतो, तेव्हा त्याला आत्मानुभव होतो. (त्या वेळी त्याच्या दृष्टीने जग नावाची वस्तूच शिल्लक राहत नाही.) तेव्हा त्याला आत्यंतिक प्रलय म्हणतात.

हा प्रलय एका व्यक्तीलाच जाणवण्याजोगा, अतएव त्या व्यक्तीच्या अनुभवापुरताच मर्यादित असतो.

**प्रलयकथा** – प्रलयाची कथा प्रथमतः शतपथ ब्राह्मणात (१·८·१) दिलेली आहे, तिचा सारांश असा —

प्रातःकाळी संध्येच्या समयी मनूला पाण्यात एक लहान देवमासा आढळला. त्या माशाने मनूला जलप्रलयाचे भाकित सांगितले. माशाच्या सूचनेवरून मनूने त्याचे रक्षण केले. तो खूप मोठा झाल्यानंतर मनूने त्याला समुद्रात सोडले व स्वतःसाठी एक नौका बांधून तीत तो बसला. मग महान जलप्रलय झाला, तेव्हा सर्व प्राणी त्यात बुडून गेले; पण मनूची नौका तेवढी तरंगत राहिली. मग तो मासा मनूला वाचवण्यासाठी आला व त्याने ती नौका हिमालय पर्वतावर नेली. तिथे मनूने यज्ञ केला. त्यातून एक स्त्री निर्माण झाली. मग त्या दोघांनी प्रजा निर्माण केली.

महाभारतात ही कथा किंचित भिन्न प्रकारे आली आहे, ती अशी – सागरतीरावर मनू तपश्चर्या करीत असता एक मासा तिथे आला व त्याने प्रचंड रूप धारण केले. त्याच वेळी महाप्रलय सुरू झाला व माशाने मनूची नौका हिमालयाच्या अत्युच्च शिखरावर नेऊन त्याला वाचवले. आपण ब्रह्मदेव असल्याचे त्याने मनूला सांगितले. त्यानंतर मनूने तपश्चर्या करून प्रजा उत्पन्न केली.

बहुतेक पुराणांत शतपथ ब्राह्मणातील कथेचेच अनुकरण केले आहे. मात्र काही पुराणांतली कथा जरा वेगळी आहे. महाप्रलयात पृथ्वी बुडाली असता विष्णू वराहाचे रूप घेतो व पाण्यात बुडी मारून पृथ्वीला वर आणतो, अशी कथा विष्णू पुराणात आहे. भागवत पुराणातील प्रलयकथा अशी – ब्रह्मदेव निद्रिस्त झाला असता महाप्रलय सुरू झाला. ते पाहून हयग्रीव नावाच्या एका बलाढ्य राक्षसाने वेदांचे हरण केले. त्या वेळी सत्यव्रत नामक एक राजर्षी केवळ जलप्राशन करून तप करीत होता. विष्णूने माशाचे रूप घेऊन एक नौका त्या सत्यव्रत राजासमीप आणली. मग तो राजा सप्तर्षींसह त्या नौकेत बसला आणि वेदांचा शोध लागेपर्यंत ईशस्तवन करीत राहिला. शेवटी कल्पान्ती विष्णूने हयग्रीवाचा वध करून वेद परत मिळवले व ते सत्यव्रताला दिले. पुढे सत्यव्रत हा सातवा मनू झाला.

प्रलय म्हणजे दुःसह जीवनाचा अंत आणि नवजीवनाचा उगम होय, हे तत्त्व जगातल्या सर्व समाजांनी मान्य केले आहे. सर्व देशांतील प्रलयकथा सामान्यतः एकाच स्वरूपाच्या आहेत. बायबलाच्या जुन्या करारातील नोहाची कथा अशीच आहे. जगातल्या पापाला विटून परमेश्वराने जलप्रलय निर्माण केला व त्या प्रलयात सर्व प्राणी बुडाले; फक्त नोहा व त्याची बायको आणि त्यांच्या नौकेत बसलेले लोक तेवढे वाचले. कुराणातही जलप्रलयाची कथा आहे. नोहा नावाचा देवदूत ईश्वराचा संदेश घेऊन आला होता; पण पृथ्वीवरील लोकांनी त्याच्यावर विश्वास न ठेवल्यामुळे ईश्वराने प्रलय सुरू केला. नोहाने एक नौका बनवून, त्याच्यावर ज्यांचा विश्वास होता असे काही स्त्रीपुरुष व काही पशुपक्षी त्या नौकेत घेतले, तेवढे त्या प्रलयात वाचले. बाकीचे अश्रद्ध लोक बुडून मेले.

लोकसाहित्यात उत्पत्तिकथांच्या बरोबरीने प्रलयकथांचीही निर्मिती झालेली आहे. जीवनाशी मृत्यूची अभेद्य सांगड आणि मृत्यूला फुटलेले जीवनाचे अंकुर हा सृष्टीचा सनातन व्यापार आहे. जगात पाप वाढल्यामुळे ईश्वराने प्रलय घडवून आणला व प्रत्येक युगाच्या अंती सृष्टीचा प्रलय होतो, या कल्पना बहुतेक सर्व देशांतील प्रलयकथांत आढळतात.

आदिवासी लोकांच्या कथांतही ही कल्पना आहे. मनूच्या कथेतला मासा भिल्लांच्याही कथेत आला आहे. मात्र तिथे

नौकेऐवजी भोपळा आहे. या कथांच्या परिशीलनानंतर असा निष्कर्ष निघतो, की बहुतेक कथा निरनिराळ्या कालखंडांत व भिन्न देशांत होऊन गेलेल्या महापुरांच्या भयानक अनुभवांतून उगम पावल्या असाव्या व काही कथा काल्पनिक असाव्या. प्रादेशिक जलप्रलयाला कथाकारांनी जगप्रलयाचे रूप दिल्यामुळे त्यांच्या कथा लोकसाहित्यात अमर झाल्या. **पाहा** – नित्य प्रलय, नैमित्तिक प्रलय, प्राकृत प्रलय. [ एन्सा. रि. ए.; फ्ल. ली. सं. लि.; पु. त. मी.; लो. सा. रू.; डि. इ. ]

## प्रल्हादबुवा

(इ. स. चे १८ वे शतक) एक मराठी संत-कवी. हे पंढरपुरी राहत. त्यांच्या पित्याचे नाव शिवाजी होते. राघव हे त्यांच्या गुरूचे नाव. प्रल्हादबुवांना बालपणापासूनच परमार्थाची आवड निर्माण झाली. त्यांच्या बालजीवनासंबंधी बऱ्याच आख्यायिका सांगितल्या जातात, त्यांतील एक अशी —

एकदा त्यांच्या आईने त्यांना सांगितले, की 'मी देवाला जाते. अंगणात डाळ वाळत घातली आहे; गाय खाईल तर लक्ष ठेव.' आई देवाला गेली. जरा वेळाने एक गाय तिथे आली व डाळ खाऊ लागली. प्रल्हाद तिथे असूनही त्याने त्या गाईला हाकलले नाही, गाय डाळ खात असतानाच त्यांची आई आली. हा सारा प्रकार पाहून ती फार रागावली व गाईला मारायला धावली. त्याबरोबर प्रल्हादाने आईचा हात धरला आणि तिला सांगितले, की डाळ मोजून बघ; ती कमी झाली असल्यास तिला मार. आईने तसे केले, तर डाळ मूळच्या इतकीच भरली. त्या दिवसापासून आईने प्रल्हादाला बोलायचे सोडून दिले.

पांडुरंग त्यांच्या घरी येत असे व त्यांच्याशी बोलत असे अशी अनेकांची श्रद्धा आहे.

छत्रपती शिवाजीमहाराजांच्या मृत्यू नंतर औरंगजेबाने दक्षिणेत धुमाकूळ घातला होता. पंढरपूरला जाऊन विठ्ठलमूर्तीचा नाश करावा, असे एकदा त्याच्या मनात आले. हे समजताच प्रल्हादबुवांनी पांडुरंगाला आपल्या घरी लपवून ठेवले. औरंगजेबाच्या मृत्यूनंतर पुन्हा त्या मूर्तीची देवळात प्राणप्रतिष्ठा झाली. तीच मूर्ती आजतागायत तिथे आहे, असे म्हणतात.

प्रल्हादबुवांचा संस्कृत भाषेवर मोठा अधिकार होता. त्यांनी अमृतानुभवाचे संस्कृत भाषांतर केले आहे. याशिवाय मराठी भाषेत त्यांनी जी अनेक प्रकरणे लिहिली आहेत, त्यांची नावे अशी – (१) श्रीपांडुरंगमाहात्म्य (२) अहिल्योद्धार (३) सीतास्वयंवर (४) प्रमाणलक्षण (५) भागवतांचा प्रश्न आणि त्यास उत्तर (६) अन्यायावर प्रश्नोत्तरे (७) अनुभवामृततात्पर्य (८) मंत्रोत्तम (९) विठ्ठलापाशी मागणे व (१०) संसारबंध का सुटत नाही. या स्फुट प्रकरणांखेरीज त्यांनी बरीच पदेही रचली आहेत.

प्रल्हादबुवा उत्तम कीर्तने करीत. गोपाळ व सदाशिव हे त्यांचे दोन शिष्य त्यांच्या कीर्तनात साथीला उभे राहत.

भागवताच्या दशम स्कंधाचे पारायण करीत असताना माघ वद्य एकादशीला त्यांना मृत्यू आला. त्यांची समाधी पंढरपुरी विठ्ठलमंदिरातच आहे. [ म. च. को. ]

## प्रवर

गोत्रसंस्थापक ऋषींच्या पूर्वजांना प्रवर असे म्हणतात. धार्मिक कृत्याच्या वेळी प्रवरनामांचा उच्चार करणे आवश्यक असते. प्रवरविहीन व्यक्तीने केलेल्या हवनाचा स्वीकार देवता करीत नाहीत, असे कौषीतकी ब्राह्मणात म्हटले आहे. जर कोणाला आपले प्रवर माहीत नसतील, तर त्याने आपल्या गुरूचे प्रवर घ्यावे, असे आपस्तंबाने सांगितले आहे. बौधायन व आश्वलायन श्रौतसूत्रांत क्षत्रिय व वैश्य यांनी आपल्या पुरोहितांचे प्रवर उच्चारावे, असे म्हटले आहे. त्यावरून सूत्रकाळी क्षत्रिय व वैश्य आपले प्रवर विसरून गेले असावेत, असे वाटते. दर्शपूर्णमास, पशुयाग, सोमयाग इत्यादी श्रौतयागांमध्ये होता, मैत्रावरुण, वगैरे ऋत्विजांचे प्रवरण करायचे असते. प्रथम यजमानाच्या प्रवरांचा निर्देश करून व मम त्या त्या ऋत्विजाचे व्यावहारिक नाव उच्चारून वरण म्हणजे नियोजन करणे, याला प्रवरण असे म्हणतात. सर्व सूत्रकारांनी सप्रवर विवाहाचा निषेध केला आहे. आपस्तंबाच्या मते, सप्रवर स्त्रीशी समागम करणारा पुरुष जातिभ्रष्ट होतो व त्याची संतती चांडाल होते. **पाहा** – गोत्र– प्रवर. [ भा. सा. इ. ]

## प्रवरसेन

(इ. स. चे ५ वे शतक) विदर्भावर राज्य करणाऱ्या वाकाटक वंशातील दामोदरसेन, इ. स. ४२० च्या सुमारास गादीवर बसला. राज्यारोहणप्रसंगी त्याने प्रवरसेन हे नाव धारण केले. त्याने इ. स. ४५० पर्यंत राज्य केले. प्रभावतीगुप्ता ही त्याची माता होय. तो स्वतः शिवभक्त असला, तरी विष्णुभक्त मातेच्या आज्ञेवरून त्याने रामचंद्राच्या कथेवर सेतुबंध हे महाकाव्य रचले. त्याने प्रवरपूर नामक नवीन नगर वसवून तिथे राजधानी नेली व रामाचे मंदिर बांधले.

सेतुबंध हे काव्य महाराष्ट्री प्राकृतात रचलेले असून, ते रावणवहो या नावानेही प्रसिद्ध आहे. त्यात १५ आश्वासक (सर्ग) आहेत. महाकाव्याला उचित अशा विदग्ध शैलीत हे काव्य रचलेले असून, त्यात श्लेष व समास प्राचुर्याने आढळतात. व्यक्तिचित्रण, भावपूर्ण प्रसंग, निसर्गवर्णन, इ. महाकाव्याला

आवश्यक गणलेल्या सर्व गोष्टी त्यात आहेत. त्याची भाषा प्रासादिक आहे. रामकृत सेतुबंधापासून रावणवधापर्यंतचा त्याचा कथाभाग त्यात आला आहे.

हा राजा भारवीचा समकालीन होता. तो काश्मीरचा राजा होता, असे काही पंडितांचे मत आहे. पण राजतरंगिणीत सेतुबंध काव्याचा उल्लेख नाही. शिवाय हे काव्य महाराष्ट्री प्राकृतात आहे. यावरून तो विदर्भाचा राजाच असला पाहिजे, असे श्री. मिराशी म्हणतात. त्यांच्या मते सेतुबंध महाकाव्य रचण्यात त्याला कविकुलगुरू कालिदासाचे साहाय्य झाले असावे.

दंडीने सेतुबंधाचे वर्णन 'सागरः सूक्तिरत्नानाम्' असे केले आहे. हर्षचरिताच्या एका प्रास्ताविक श्लोकात बाणानेही या काव्याची प्रशंसा मुक्तकंठाने केली आहे.

सेतुबंध या काव्याशिवाय प्रवरसेनाने कही प्राकृत गाथाही रचल्या आहेत. आपला प्रियकर दूरदेशी गेल्यावर त्याची पत्नी त्याच्या परत येण्याच्या दिवसाची किती उत्कठेने वाट पाहत आहे, याचे मनोरम चित्र त्याने एका गाथेत काढले आहे. पाहा– सेतुबंध. [सं. सा. इ.; वा. नृ. का.]

**प्रवरा** एक नदी. सर्व नद्यांत ही नदी प्रवर म्हणजे श्रेष्ठ असल्यामुळे तिला प्रवरा नाव प्राप्त झाले, अशी कल्पना केलेली आहे. प्रवरेला अमृतवाहिनी म्हणतात. पुराणात हिची उत्पत्तिकथा दिली आहे, ती अशी–

देव–दानवांनी केलेल्या समुद्रमंथनातून जो अमृतकलश वर आला, तो दैत्यांनी बलात्काराने पळवला. त्या वेळी विष्णूने मोहिनीरूप घेऊन तो अमृतकलश हाती घेतला. मोहिनी देवांना अमृत वाटीत असता राहू देवांच्या पंक्तीत शिरला आहे, असे कळून येताच मोहिनीरूप विष्णूने राहूचे मस्तक छेदले. तेव्हा त्या मस्तकापासून अमृतासह उदकाचा जो प्रवाह उत्पन्न झाला, त्याचीच पुढे प्रवरा नदी बनली.

नगर जिल्ह्यात नेवाशापासून सात मैलांवर टोके गावी प्रवरा व गोदा यांचा संगम झाला आहे. सिंहस्थात गोदा–प्रवरा संगमावर मोठी यात्रा भरते. [हि. ध.; ती. प्र.; वि. मुं. रा. प.]

**प्रवर्ग्य** अग्निष्टोमादी सोमयागातील एक विधी. हा विधी प्रथम स्वतंत्रपणे होत असावा; कारण त्याचे विधान आरण्यक ग्रंथांत आले आहे. हा अरण्यात करीत; परंतु कालांतराने हा विधी सोमयागात समाविष्ट केला गेला व त्यास यज्ञशिर असे संबोधण्यात आले. त्याचा प्रयोग असा–

एकावर एक रचलेल्या तीन भांडयांच्या उतरंडीसारखे महावीर नामक एक मृण्मय पात्र करतात. ते एक वीत उंच असते. त्याला मेखला व छिद्र असते. महावीरासाठी आहवनीय अग्नीच्या पूर्वेस खड्डा खणून त्यातली माती घेतात. तिच्यात रानडुकराने उकरलेली व वारुळाची माती मिसळतात. मग त्यात पूतिका वनस्पती, बोकडाचे केस, कृष्ण मृगाचे केस गवेधुक म्हणजे जलाशयाजवळच्या वनस्पती, शेळीचे दूध व मदंती पात्रातील गरम पाणी घालून ती माती कृष्णाजिनावर ठेवून कालवतात. मग त्या मिश्रणाचा महावीर बनवतात. त्यास मेखला करतात. याशिवाय त्याच मातीचे आणखी दोन महावीर, तसेच पुरोडाश भाजण्यासाठी दोन रौहिण नामक आणि दूध काढण्यासाठी दोन पिन्वन नामक पात्रे करतात. सकाळी व सायंकाळी अनुक्रमे दिवस व रात्र या देवतांना पुरोडाश अर्पण करतात. महावीर खर नामक ओटयावर ठेवून त्याच्या भोवती अग्नी प्रज्वलित करतात. तो तापल्यावर त्यात तूप ओततात. दुसरे दोन महावीर अप्रचरणीय असतात. म्हणजे त्यांच्यावर काही संस्कार करायचे नसतात. मग उकळत्या तुपात गाईचे व शेळीचे दूध मिसळतात. या मिश्रणाला घर्म असे नाव आहे. घर्माला वाजसनेयी संहितेत संभार म्हटलेले असून, सूर्याशी त्याचे एकरूपत्व दाखवले आहे. घर्म यज्ञशिर असून, तापलेले दूध दिव्य जीवन व प्रकाश आहे, अशी त्यामागची समजूत आहे. अश्विनौ, वायू, वसु-रुद्र-आदित्यांसह इंद्र, सविता, बृहस्पती व यम यांना घर्माच्या आहुती देतात. अवशिष्ट घर्म यजमान प्राशन करतो. महावीर ओटयावर ठेवल्यापासून होता मंत्र म्हणतो व प्रस्तोता सामगान करतो. प्रवर्ग्य हा उग्र व गूढ असल्यामुळे स्त्रिया आणि शूद्र यांनी तो पाहायचा नसतो.

या विधीत जी मातीची पात्रे वापरतात, त्यांना प्रवर्ग्य संभार असे म्हणतात.

सोमयागात निदान तीन दिवस रोज दोनदा प्रवर्ग्य करतात. प्रवर्ग्याचे उद्वासन करताना त्याची पात्रे मनुष्याकृती ठेवतात किंवा मंडलाकृती ठेवतात आणि नदीत टाकतात. प्रवर्ग्य करणाऱ्या यजमानाने एक वर्षभर मांस खायचे नसते, शूद्र स्त्रीशी समागम करायचा नसतो आणि मातीच्या भांड्यातून पाणी प्यायचे नसते.

या विधीमुळे यजमानाला दिव्य देह प्राप्त होतो, असे सांगितले आहे. [हि. ध.; म. ज्ञा. को.; श्री. विद्याधरशास्त्री भिडे]

**प्रवाहण जैवली** पांचाल देशाचा क्षत्रिय राजा. आरुणीचा पुत्र श्वेतकेतू हा तत्त्वज्ञानाच्या चर्चेत जैवलीला जिंकण्याकरिता एकदा त्याच्या परिषदेत आला. पण जैवलीने त्याला अध्यात्मविषयक पाच प्रश्न विचारले, त्यांपैकी

एकाचेही उत्तर त्याला देता आले नाही. त्यामुळे श्वेतकेतू खजील होऊन घरी गेला व त्याने तेच पाच प्रश्न आपल्या बापाला विचारले. पण बापालाही त्यांची उत्तरे माहीत नव्हती. म्हणून मग ते दोघे बापलेक प्रवाहण जैवलीकडे शिष्यभावाने प्राप्त झाले. ब्राह्मण असूनही त्यांनी क्षत्रियाचे शिष्यत्व पत्करले व आतापर्यंत क्षत्रियांकडे असलेली आत्मविद्या प्रवाहण जैवलीने प्रथमच ब्राह्मणांना शिकवली. ही विद्या उपनिषदांत पंचाग्निविद्या या नावाने प्रसिद्ध आहे. **पाहा** – पंचाग्निविद्या.

**प्रवाळ** एक रत्न. यालाच पोवळे अथवा विद्रुम असेही म्हणतात. याची उत्पत्ती समुद्रातील प्रवाळ कीटक या प्राण्यापासून होते. समुद्रात पोवळ्याचे मोठमोठे खडक असतात. श्वेत समुद्रात एक वेल उगवते, तिला पोवळ्याची वेल म्हणतात. हे रत्न अन्य ठिकाणीही सापडते, त्याविषयी एक श्लोक असा–

**विंध्यो विदुरशैलो मलयो विंध्योपलक्षणो देशः।**
**स्त्रीराज्यं चेति पुनस्तस्याकरभूमयो विहिताः ।।**

अर्थ – विंध्य, विदूर, मलय, विंध्याजवळचा प्रदेश व स्त्रीराज्य हे प्रवाळ सापडण्याचे प्रदेश होत.

भूमध्य समुद्रात गुलाबी आणि तांबडी पोवळी सापडतात. एका काळी केरळातील प्रवाळ सर्वश्रेष्ठ समजले जाई. पुराणांनुसार रोमक आणि देवक देशात निळ्या रंगाचे प्रवाळ उत्पन्न होत असे. काळ्या व पांढऱ्या रंगाचीही पोवळी मिळतात. रंग, रूप, तेज, भरीवपणा, घट्टपणा व घडणावळ यांवर पोवळ्याची किंमत अवलंबून असते. पिवळ्या रंगात लाल झाक असलेले, तकतकीत व वजनदार पोवळे उत्तम मानतात. रेखा, आवर्त, पटल, ठिपका, फूट, काळेपणा हे पोवळ्याचे दोष समजले जातात. पोवळ्याचे चार प्रकार मानले आहेत, ते असे – (१) सशाच्या रक्तासारखे लाल, मऊ, सहज भोक पडणारे व सुंदर. (२) शेंदरी, डाळिंबाच्या फुलासारखे व भोक न पडणारे (३) पाटलिपुष्पाप्रमाणे मंद रंगाचे. (४) कमळाच्या पाकळीप्रमाणे लाल, कठिण व कच्च्या रंगाचे.

**उपयोग** – प्रवाळाच्या माळा, अंगठ्या, इ. अलंकार बनवितात. औषधासाठी याचे भस्म तयार करतात. मंगळाची पीडा निवारण करण्यासाठी हे रत्न अंगावर धारण करतात. [ हिंदी शिल्पशास्त्र – श्री. कृ. वि. वझे; डॉ. एस. के. कल्याणसुंदरम्– नवनीत, नोव्हेंबर १९५७; लघुरत्नपरीक्षा. ]

**प्रवृत्ति–निवृत्तिधर्म** समाजाच्या अभ्युदयासाठी व ऐहिक *वैभवासाठी प्रयत्नांची पराकाष्ठा* करण्याची वृत्ती म्हणजे प्रवृत्ती होय. प्रपंचनिष्ठा, ऐहिक सुखाची व वैभवाची लालसा, स्वराज्याची व स्वातंत्र्याची आकांक्षा, भौतिक ज्ञानाची आवड, विज्ञान, इतिहास, अर्थशास्त्र यांविषयीची जिज्ञासा, जड विश्वावर विजय मिळवण्याची ईर्षा व त्यासाठी लागणारी साहसी वृत्ती, इतिहासमीमांसेची वास्तववादी दृष्टी व कार्यकारणनिष्ठा हे प्रवृत्तिधर्माचे प्रमुख घटक होत. इहलोकीचे जीवन समृद्ध व संपन्न करण्यासाठी त्या जीवनाच्या प्रत्येक क्षेत्रात अपरिमित प्रयास करावे लागतात. ऐहिक वैभवावर निःसीम निष्ठा असल्यावाचून मनुष्याच्या हातून तसे परिश्रम होणे शक्य नाही. तरुण स्त्रीपुरुषांची परस्परांविषयी आसक्ती; पत्नी, पुत्र, आप्त यांच्याविषयी प्रेम; तसेच धन, बल, बुद्धी यांच्याविषयी आदर हा प्रवृत्तीमय संसाराचा पाया होय.

या प्रवृत्तिधर्माचे प्रतिपादन महाभारतात ठायी ठायी केलेले आढळते. श्रीकृष्ण. व्यास, भीष्म, इ. समाजधुरिणांनी सर्व धर्मांत राजधर्म श्रेष्ठ मानला होता. राष्ट्र समर्थ व आत्मसंरक्षणक्षम असणे व समाजात अराजक नसणे, हे समाजाच्या धार्मिक उन्नतीसाठी अत्यंत आवश्यक असते. त्यासाठी आवश्यक असणाऱ्या बुद्धिबल, बाहुबल व धनबल यांचे महाभारतात अतिशय आदराने वर्णन केलेले असून, त्यावरच सर्व पारलौकिक धर्म व परमार्थही अवलंबून असतो, असे पुनःपुन्हा सांगितले आहे.

वेदकाळापासून हा प्रवृत्तिधर्म भारतीय जनमानसात भिनलेला होता. वैदिक ऋषीमुनींच्या सर्व प्रार्थना ऐहिक सुखोपभोगांसाठी व समृद्धीसाठी केलेल्या होत्या, याविषयी सर्व पंडितांचे एकमत आहे. ऐहिक वैभवासाठी वैदिक आर्यांनी पराकाष्ठेचे सायास केले व ते प्राप्त करून घेतले. त्यानंतरच त्यांचे मन परब्रह्माकडे वळले आणि मग उपनिषदे व दर्शने निर्माण झाली.

प्रारंभी धर्म, अर्थ व काम हे तीनच पुरुषार्थ साधण्याची आकांक्षा भारतीय लोक बाळगीत होते. कालांतराने ते मोक्षप्राप्तीसाठीही साधना करू लागले. तथापि त्यांनी ऐहिक उत्कर्षाकडे पाठ फिरवली नव्हती. प्रवृत्तिधर्माची सर्व लक्षणे इ. स. च्या पहिल्या आठ-नऊ शतकांत भारतीय जनतेत स्पष्ट दिसून येत होती. ज्योतिर्गणित, वैद्यक, रसायन या विज्ञान शाखांत भारतीयांनी विपुल संशोधन करून भर टाकली. नाना प्रकारचे उद्योग, व्यवसाय व व्यापार उत्कृष्टपणे करून त्यांनी वैभव मिळवले, सर्व विद्या-कलांचा विकास केला. त्यांनी भारतात साम्राज्ये स्थापली, एवढेच नव्हे; तर भारताच्या बाहेर जाऊन तिथेही राज्ये स्थापली. पण इ. स. च्या १० व्या *शतकापासून भारतात निवृत्तिधर्माचा प्रसार होऊ लागला* आणि प्रवृत्तिधर्म हतबल झाला. कर्मवाद, गुरुभक्ती, प्रारब्ध व

मोक्ष यांचा विलक्षण प्रभाव सर्व समाजजीवनावर पडला.

गेल्या शतकाच्या शेवटच्या चरणात राजारामशास्त्री भागवत, न्या. रानडे, लो. टिळक, ह. भ. प. पांगारकर, इतिहासाचार्य राजवाडे यांनी संतांच्या कार्याचे समालोचन केले आहे. त्यांतील राजवाडे यांचे प्रतिपादन प्रभावी ठरून बऱ्याच सुशिक्षित लोकांत मान्यता पावले. त्यांच्या मते ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ, तुकाराम, इ. भागवतधर्मी संतांनी समाजाच्या ऐहिक उत्कर्षाची कसलीही चिंता केली नाही. इस्लामी आक्रमणाचे भयानक संकट देशावर कोसळले होते आणि त्यात हिंदू धर्म समूळ नष्ट होण्याचा प्रसंग गुदरला होता, तरी त्या आक्रमणाचा प्रतिकार करण्याचा यत्किंचितही प्रयत्न या संतांनी केला नाही. उलट निवृत्तिधर्माचा प्रसार करून त्यांनी समाजाला हतबल करून टाकले. संसार क्षणभंगुर आहे, त्यात मन घालू नये, विठ्ठलाचा एकच ध्यास घ्यावा, वासना नष्ट करून ऐहिकाविषयी उदासीनता अंगी बाणवली, तरच आपल्याला मोक्ष मिळेल, असे उपदेश सर्व संतांनी केल्यामुळे समाज इहविमुख व निष्क्रिय बनला. पुढे समर्थांनी त्याला प्रपंचाचे महत्त्व पटवून दिले आणि प्रवृत्तिधर्माची दीक्षा दिली. पराक्रम, शत्रूचा पराजय, स्वराज्य, स्वातंत्र्य, यांवाचून मोक्षधर्माला मुळीच अर्थ नाही, असा सुस्पष्ट उपदेश त्यांनी केला. त्यामुळे महाराष्ट्रात स्वराज्याची स्थापना होऊ शकली.

संतांनी एकांतिक निवृत्तिवाद शिकवून समाजाला नेभळे बनवले, हे राजवाड्यांचे मत अन्य काही पंडितांना मात्र मान्य नाही. संसार सोडून व संन्यास घेऊन वनात जावे, असा उपदेश संतांनी कधीही केलो नाही; उलट संसारात राहून, गृहस्थधर्म पाळूनच भक्तिमार्गाने मोक्ष मिळवावा, असे त्यांनी आग्रहाने सांगितले आहे, असा त्या पंडितांचा दावा आहे. पण संतांनी आपल्या साहित्यात संसाराची व इहलोकाची इतकी निंदा केली आहे, की त्याविषयी कोणालाही प्रेम वाटू नये. संसाराची अत्यंत किळसवाणी वर्णने सर्व संतांनी केली असून, त्यात कोणी गुंतू नये, अलिप्तपणे संसार करावा, असा त्यांचा उपदेश आहे. स्त्री-पुत्रांवरील प्रेमामुळे संसारात पराक्रम करण्याची उभारी मनुष्याला येते. त्या प्रेरणेतून त्याची दृष्टी राष्ट्रीय प्रपंचाकडे वळते. पण संतांनी त्या प्रेरणेवरच नेमका कुठाराघात केला.

संतांच्या निवृत्तिपरतेविषयी श्री. म. माटे यांनी जे विवेचन केले आहे, ते असे – परमेश्वराची प्राप्ती करून घेणे हा संतांचा एकच जीवितहेतू होता. त्यासाठी ते भजन, पूजन, मनन, इ. सर्व गोष्टी करीत. विश्वात परमेश्वर किंवा परब्रह्म ही एकच गोष्ट खरी असून, बाकीच्या सर्व गोष्टी मिथ्या आहेत, असे त्यांना वाटत असे. त्या मिथ्या प्रपंचात गुंतून राहिल्याने अत्यंत श्रेष्ठ अशी मोक्षप्राप्ती होणे सर्वथा अशक्य आहे, असे ते मानीत. संसारात पडण्याची व गुंतून राहण्याची वासना स्त्रीमुळे आणि धनामुळे उत्पन्न होते आणि मग परमेश्वरप्राप्तिरूप ध्येयापासून माणसे च्युत होतात, म्हणून कनक व कांता यांचा निषेध त्यांनी ठिकठिकाणी केला आहे.

संतांची ही भूमिका त्यांच्या वाङ्मयावरून स्पष्ट दिसते. त्यात त्यांनी आपले ध्येय इतरांना निवेदिले असून, आपला मार्ग पत्करण्याचा आग्रह केला आहे. परमार्थ हाच खरा अर्थ, संसार हा अनर्थ आहे, असेच त्यांचे मत आहे. संतांनी लोकांना प्रपंच करण्याची शिकवण दिली, असे जे कोणी म्हणतात, ते संतांवर भलताच आळ घेतात.

सारांश संतांनी लोकांना प्रपंचापासून विन्मुख केले, यात काही संशय नाही. यालाच निवृत्तिधर्म असे म्हणतात. वैदिक धर्म प्रवृत्तिलक्षण व निवृत्तिलक्षण, असा दोन प्रकारचा आहे. तोच प्रवृत्ति–निवृत्तिरूप धर्म भगवंतांनी सर्व भूतांवर अनुग्रह करण्याच्या इच्छेने अर्जुनाला सांगितला. गीता ही वेदार्थसाररूप व उपनिषद्साररूप आहे. गीतेत विधिनिषेधात्मक प्रवृत्तिधर्म सांगितला आहे व ज्ञानवैराग्यलक्षण असा निवृत्तिधर्मही सांगितला आहे. निष्काम प्रवृत्ती हे निवृत्तिमार्गाचे साधन असल्यामुळे निष्काम कर्मयोग हा वस्तुतः निवृत्तिमार्गच आहे (मनु. १२.८९). ईश्वरार्पणबुद्धीने केलेल्या कर्मानुष्ठानाचे फल ज्ञाननिष्ठेची योग्यता प्राप्त होणे हे आहे. स्वधर्माला अधर्म मानून त्याचा त्याग करायला आणि परधर्माला स्वधर्म मानून त्याचे अनुष्ठान करायला तयार झालेल्या अर्जुनाला प्रथम स्वधर्मात प्रवृत्त करण्यासाठी आणि आसक्ती व फलाशा सोडून स्वधर्माचे अनुष्ठान केल्याने चित्तशुद्धी झाल्यावर जीवन्मुक्ती देणाऱ्या ज्ञाननिष्ठेत प्रवृत्त करण्यासाठी गीताशास्त्र आहे, असे प्रतिपादन पं. द. वा. जोग यांनी केले आहे.

डॉ. शं. दा. पेंडसे यांच्या मते गीतेच्या अठराव्या अध्यायात प्रथम संन्यास व त्याग यांच्या व्याख्या करून, मग प्रवृत्ती व निवृत्ती यांचा समन्वय केला आहे. शेवटी कर्मयोग व भक्तियोग यांची एकरूपताही वर्णिली आहे (गीता. १८.२).

**काम्यानां कर्मणां न्यासं संन्यासं कवयो विदुः ।**
**सर्वकर्मफलत्यागं प्राहुस्त्यागं विचक्षणाः ।।**

अर्थ –संन्यास म्हणजे (सर्व कर्मांचा त्याग नव्हे, तर केवळ) काम्य कर्मांचा त्याग होय, असे विद्वान म्हणतात. त्याग म्हणजे (सर्व कर्मांचा स्वरूपतः त्याग नव्हे, तर कर्तव्यकर्मे करून त्यांच्या) फलाशेचा त्याग होय, असे बुद्धिमान सांगतात.

कर्म हे मुळातच दोषयुक्त असल्यामुळे त्याज्य होय, असा निवृत्तिपक्ष आहे. पण सर्व कर्मे मुळातच दोषयुक्त आहेत असे

म्हणून ती टाकू नयेत; तर फक्त काम्य कर्मे टाकावी आणि यज्ञदानतपादी कर्तव्य कर्मे फलाशा न धरता करावी, असे भगवंतांनी सांगितले आहे. फलाशा सोडण्यात निवृत्ती व कर्तव्य कर्मे करण्यात प्रवृत्ती असा समन्वय इथे साधला आहे. **पाहा–** धर्म. [ माझे चिंतन – डॉ. पु. ग. सहस्रबुद्धे; संत पंत तंत–श्री. म. माटे, १९५७; वै. शां. अ.; पौ. भा. ध. ]

**प्रव्रज्या** बौद्धांचा एक दीक्षाविधी. धर्मसाधनेसाठी घरातून कायमचे निघणे असा या शब्दाचा अर्थ आहे. भिक्षू होण्याची इच्छा करणाऱ्या मोठ्या पुरुषांना हा संस्कार करावा लागे. या संस्कारानंतर त्या व्यक्तीला संघात अथवा मठात प्रवेशाचा परवाना मिळत असे. यात जातिभेदाचा विचार केला जात नसे. संस्कारसमयी संस्कार्य व्यक्तीचे मुंडन करवून त्याला पिवळी वस्त्रे वापरायला देत. नंतर तो भिक्षूंना नमस्कार करून त्यांना आपले गुरू होण्याची विनंती करी. ती विनंती मान्य झाल्यावर तो गुरूसमोर 'बुद्धं सरणं गच्छामि, संघं सरणं गच्छामि, धम्मं सरणं गच्छामि' या शरणत्रयीचा उच्चार करी. मग त्याला श्रमण ही पदवी मिळे व तो गुरूच्या आधीन होई. यानंतर हत्या, असत्य भाषण, मादक वस्तूंचे सेवन, असमयभोजन, नृत्य, गीत, इ. गोष्टी त्याला वर्ज्य असत.

संसर्गजन्य रोगांनी पछाडलेले, अवयवहीन, दास, अपराधी, राजकर्मचारी, इ. लोकांना हा संस्कार करून घेण्याचा अधिकार नसे. त्याचप्रमाणे ज्यांना आपल्या माता-पित्यांची अनुज्ञा नाही, अशा अल्पवयीन मुलांनाही प्रव्रज्या घेता येत नसे.

पुरुषांप्रमाणे स्त्रियांनाही ही दीक्षा घेता येत असे. त्यांचे मठ व विहार वेगळे असत. [ भा. शि. सं. इ.]

**प्रशस्तपाद** (इ. स. चे २ रे शतक) वैशेषिक दर्शनाचा एक आचार्य. पदार्थसंग्रह हे त्याच्या ग्रंथाचे नाव असून, त्यात वैशेषिकसूत्रांवरील विवेचन आहे. वैशेषिक सिद्धांतांवरील आपले स्वतंत्र विचार त्याने या ग्रंथात मांडले आहेत. परंतु हा ग्रंथ प्रशस्तपादभाष्य या नावानेच सर्वपरिचित आहे. भाष्यग्रंथाची कोणतीही लक्षणे या ग्रंथात दिसून येत नसली, तरी कोणत्याही भाष्यग्रंथाहून याचे मूल्य कमी नाही, असे अनेक पंडितांचे मत आहे. स्वतः प्रशस्तपादानेही या ग्रंथाला भाष्यग्रंथ असे म्हटलेले नाही. वैशेषिकसूत्रांवर जे प्रसिद्ध रावणभाष्य आहे, ते विस्तृत असल्यामुळे प्रशस्तपादाने वैशेषिक सिद्धांतांचे संक्षेपाने संकलन केले, असे उदयनाचार्यांचे मत आहे. त्याच्या ग्रंथावर अनेक विद्वानांनी टीकाग्रंथ लिहिले आहेत. [ भा. द. – पं. बलदेव उपाध्याय, १९५७ ]

**प्रशास्ता** एक ऋत्विज. लहान सहान यज्ञाच्या प्रसंगी याला काम नसते; पण पशुयज्ञात तो होत्याचा एकमेव साहाय्यक असतो. ऋग्वेदात याला उपवक्ता म्हटले आहे. इतर ऋत्विजांना सूचना देण्याचे काम त्याच्याकडे असते, म्हणून त्याला हे नाव मिळाले असावे. याशिवाय मैत्रावरुण असेही त्याचे एक अन्य नाव आहे. होतृगणात याचे दुसरे स्थान आहे. तो मित्र व वरुण यांचे स्तवन करीत असतो, म्हणून त्याला मैत्रावरुण म्हणत असावे. प्रशास्त्याचे काम प्रामुख्याने अग्नीशी संबंधित असते, असे ऋग्वेदात म्हटले आहे (१.९६.६). ऋग्वेदाप्रमाणेच ब्राह्मणवाङ्मयातही याचा उल्लेख आढळतो. **पाहा** – मैत्रावरुण. [ प. का. भा.; वे. इं. ]

**प्रश्नोपनिषद** हे अथर्ववेदाशी संबद्ध आहे. यात सहा शिष्यांनी प्रत्येकी एक याप्रमाणे सहा प्रश्न पिप्पलाद ऋषीला विचारले आहेत व पिप्पलादाने त्यांची समर्पक व मार्मिक उत्तरे दिली आहेत. या प्रश्नांवरूनच याला प्रश्नोपनिषद हे नाव मिळाले आहे. याचा उपक्रम असा–

एकदा सुकेशा भारद्वाज, शैब्य सत्यकाम, सौर्यायणी गार्ग्य, कौशल्य आश्वलायन, भार्गव वैदर्भी व कबंधी कात्यायन हे सहा ब्रह्मनिष्ठ शिष्य पिप्पलादाकडे आले आणि आपणांस ब्रह्मविद्या सांगा, अशी त्यांनी पिप्पलादाची प्रार्थना केली. त्यावर पिप्पलाद म्हणाला, 'तुम्ही एक वर्ष या ठिकाणी तप, ब्रह्मचर्य व श्रद्धा यांचा अभ्यास करीत राहा व नंतर मला प्रश्न विचारा.' तसे ते राहिले. मग एका वर्षानंतर कबंधी कात्यायनाने पिप्पलादाकडे येऊन त्याला विचारले की, 'महाराज, ही प्रजा कुठून उत्पन्न होते?'

त्यावर पिप्पलादाने उत्तर दिले, ते असे–

**प्रजाकामो वै प्रजापतिः स तपोऽतप्यत स तपस्तप्त्वा, स मिथुनमुत्पादयते रयिं च प्राणं चेति एतौ मे बहुधा प्रजाः करिष्यत इति ।।**

अर्थ – प्रजापतीला म्हणजे ब्रह्माला प्रजा असावी अशी इच्छा झाली. त्याने तप केले. त्याने तप करून एक मिथुन म्हणजे स्त्री-पुरुषांची जोडी उत्पन्न केली. त्या मिथुनांची नावे रयी आणि आणि प्राण अशी आहेत. हे दोघे पुष्कळ प्रकारच्या प्रजा उत्पन्न करतील, अशा हेतूने ते मिथुन प्रजापतीने उत्पन्न केले.

या उत्तराचा गर्भितार्थ प्रा. बेलसरे पुढीलप्रमाणे सांगतात–

सृष्टी कशी उत्पन्न झाली व तिचे मूळ कारण काय, हा मानवी मनातला एक चिरंजीव प्रश्न आहे. प्रत्येक दर्शनात, मग ते अध्यात्मवादी असो, वास्तववादी असो किंवा जडवादी असो, या प्रश्नाचा ऊहापोह केलेला आहे. इथे पिप्पलाद ऋषीने सृष्टीची

निर्मिती सांगताना एका पुराणकथेचा आश्रय केला आहे. सृष्टीतील सर्व वस्तू पूर्ण आहेत. वासना असणे किंवा मला अमुक गोष्ट हवी आहे असे वाटणे, हे अपूर्णपणाचे लक्षण होय. म्हणून पूर्णस्वरूप प्रजापतीच्या ( परमात्मा ) ठिकाणी वासना निर्माण झाली पाहिजे. पूर्णाची वासना ही त्याच्या स्वभावानुसार अनंत व अपार अशीच असणार. तदनुसार 'मी एक आहे, तो अनंतरूपाने नटावा 'अशी वासना त्याला झाली. स्वेच्छेने अपूर्णतेचे पांघरूण घेऊन नाचणारा आत्मा पूर्णत्वाच्या दिशेने वाटचाल करू लागला, तेव्हा काल निर्माण झाला. या सृष्टीला हेतू आहे, तिच्या गतीला दिशा आहे व तिच्या रचनेत योजना आहे. हेतू, दिशा आणि योजना या सृष्टीमध्ये सूक्ष्म रूपाने वावरत असून, सर्व दृश्य वस्तूंच्या हालचाली त्यांच्या तंत्राने चालत असतात. म्हणून या दृश्य सृष्टीच्या हालचाली कालाधीन आहेत, असे पिप्पलाद उत्तराच्या पुढील विवेचनात उत्तर देतो. मानवी जीवांचा सर्व व्यवहार कालाधीन असतो, हे तर स्पष्टच दिसते. आपला अनुभव, आपली वासना, आपली वाढ, आपले सुख-दुःख व आपले निर्याण हे कालचक्रातच गुंतलेले असते. पण हे सर्व जरी खरे असले, तरी माणसाला आत्म्याची प्रकट जाणीव असल्याने तो सारखा कालाची मर्यादा ओलांडण्याचा प्रयत्न करीत असतो. जे पुरुष तप, ब्रह्मचर्य, श्रद्धा आणि उपासना यांच्या योगाने आत्म्याचा शोध घेतात, त्यांनाच अमृत व अभय अशी परागती प्राप्त होते, असे पिप्पलाद ऋषीचे शेवटी सांगणे आहे. कालाधीन असलेल्या देहात गुंतल्यामुळे माणसाचे मन कालाच्या सत्तेखाली वागत असते. त्याचे तोंड फिरवून ते कालातीत आत्म्यामध्ये गुंतवल्यास ते कालाच्या पलिकडे जाऊ शकते, हे याचे तात्पर्य होय.

त्यानंतर भार्गवाने पिप्पलादाला दुसरा प्रश्न केला, तो असा– 'हे भगवन, कोणत्या शक्ती या शरीराचे धारण करतात ? त्यांपैकी कोणत्या शक्ती त्याला प्रकाशित करतात आणि सर्वात वरिष्ठ कोण ?'

या प्रश्नाचे उत्तर देताना पिप्पलादाने म्हटले. 'आकाश, वायू, अग्नी, आप, पृथ्वी, वाणी, मन, डोळे व कान या नऊ शक्ती शरीराला धारण करतात. दहावा प्राण हा सर्वांत वरिष्ठ होय.'

**प्राणस्येदं वशे सर्वं त्रिदिवे यत्प्रतिष्ठिम् ।**

अर्थ – त्रैलोक्यामध्ये ज जे स्थित आहे, ते ते सर्व प्राणाच्या अधीन आहे.

प्राण हे विश्वव्यापी तत्त्व आहे. ती चिच्छक्ती आहे. इंद्रिये, मन आणि, बुद्धी यांचे सर्व व्यापार प्राणाच्या शक्तीवर चालतात. प्राणरूप चिच्छक्ती विलक्षण गतिमान असून, जीवाचे जन्म-मरणादी व्यवहार तिच्या तंत्राने होतात, असा या दुसऱ्या प्रश्नाचा गर्भितार्थ आहे.

त्यानंतर कौशल्याने पूर्वसूत्र धरूनच आपला प्रश्न विचारला, तो असा– 'हे भगवन, प्राण कशापासून उत्पन्न होतो ? तो या शरीरात कसा येतो ? तिथे स्वतःला विभागून कसा राहतो ?' इत्यादी.

या प्रनाचे उत्तर देताना पिप्पलाद म्हणतो.

**आत्मन एव प्राणो जायते । यथैषा पुरुषे छायैतस्मिन्नेतदाततं मनाकृतेना ऽऽ याति अस्मिन् शरीरे ।।**

अर्थ – आत्म्यापासून हा प्राण उत्पन्न होतो. ज्याप्रमाणे देहाच्या बरोबर छाया, त्याचप्रमाणे आत्म्याच्या बरोबर हा प्राण असतो. मनाने केलेल्या पूर्व कर्माने तो शरीरात येतो.

या उत्तराचे स्पष्टीकरण प्रा. बेलसरे पुढीलप्रमाणे देतात–

ही सृष्टी अत्यंत गुंतागुंतीची आहे. तिच्या रचनेमध्ये एका टोकाला अत्यंत सूक्ष्म असा आत्मा आहे, तर दुसऱ्या टोकाला अत्यंत जड असे पंचमहाभूतांचे बनलेले जड विश्व आहे. या दोन टोकांमध्ये एक मोठी सूक्ष्म सृष्टी वास करते. वासना हे तिचे मूल द्रव्य असून ती आत्म्याच्या छायेप्रमाणे राहते. वासना शक्तिमय आहे. तिच्या जोरावर सर्व दृश्य विश्व हालचाल करते. ती सर्व ठिकाणी सारख्याच दाटपणे पसरलेली नाही. काही ठिकाणी ती अत्यंत विरळ असून, काही ठिकाणी अत्यंत घट्ट आहे. उपनिषदांमध्ये तसेच ज्ञानी पुरुषांच्या वाङ्मयामध्ये वासनेच्या या थरांना लोक असे नाव दिलेले आढळते. उदा० पुण्यलोकात वासना अत्यंत विरल व शुद्ध असते आणि तिथले सर्व वातावरण भगवंताच्या प्रेमाने भरलेले असते. पापलोकात वासना अत्यंत घट्ट व अशुद्ध असते. तिथले वातावरण पूर्ण स्वार्थाने भरलेले असते.

त्यानंतर गार्ग्याने चौथा प्रश्न विचारला, तो असा – 'हे भगवन, शरीरात कोणती इंद्रिये झोप घेतात ? कोणती जागी राहतात ? कोणता देव स्वप्ने पाहतो ? सुख होते ते कोणाला ?

पिप्पलादाने या प्रश्नाचे उत्तर दिले आहे, ते असे –झोपेच्या वेळी सर्व इंद्रिये आपल्या विषयांसह त्यांच्यापेक्षा श्रेष्ठ व दिव्य अशा मनामध्ये लीन होतात. या अवस्थेला सुषुप्ती म्हणतात. या शरीररूपी नगरीत प्राणादी वायू हे जागृत राहतात. मन हे स्वप्नांचा अनुभव घेत असते. पक्षी ज्याप्रमाणे आपल्या निवासवृक्षावर एकत्र जमतात, त्याप्रमाणे पृथ्वी, आप, तेज, वायू व आकाश, त्यांची तन्मात्रे, त्यांचे विषय, इ. सर्व आत्म्याच्या ठिकाणी लीन होऊन विश्रांती घेतात.

या उत्तराचे स्पष्टीकरण प्रा. बेलसरे पुढीलप्रमाणे देतात – व्यक्त आणि अव्यक्त यांचा व्यवहार चक्रवत आहे. जे अव्यक्त असते, ते व्यक्त होऊन दृश्यात अवतरते व दृश्यात अवतरलेले

व्यक्त, अव्यक्ताकडे धाव घेत असते. वस्तूची मूळ अवस्था अव्यक्त आहे, अतींद्रिय आहे, सूक्ष्म आहे, असे सर्व स्वानुभवी पुरुष सांगतात. काही निमित्ताने व्यक्तदशेला आलेले हे विश्व पुन्हा अव्यक्तात लीन होण्याची धडपड करते. विश्वातील सजीव-निर्जीव वस्तूंना लागू पडणारा हा धर्म मानवी जीवालाही लागू पडतो, हे सांगणे नलगे. सामान्य मनुष्याला मनाच्या तीन अवस्था अनुभवास येतात. जागेपण, स्वप्न आणि गाढ झोप. त्या एकापेक्षा एक अधिक अव्यक्त व सूक्ष्म आहेत. जागेपण स्वप्नात लीन होते व स्वप्न सुषुप्तीत लीन होते; पण आपल्याला त्याच्या पलिकडे जाऊन आत्म्यात लीन होता येत नाही. पिप्पलाद मुनीचे सांगणे असे, की जोपर्यंत जीव सुषुप्ती-पर्यंतच जातो, तोपर्यंत तो दृश्य विश्वाची कक्षा ओलांडीत नाही. म्हणून अव्यक्ताकडून व्यक्तात येणे आणि व्यक्ताकडून पुन्हा अव्यक्तात जाणे हा जो दृश्य विश्वाचा व्यवहार, त्यांच्या मर्यादा जीवाला ओलांडता येत नाहीत. सामान्य माणूस रोज गाढ झोपेत जातो, स्वप्ने पाहतो आणि जागा होतो व त्याच अवस्था पुन्हा उलट क्रमाने अनुभवतो. याच्या पलिकडे जाणे म्हणजे परमार्थ करणे होय.

त्यानंतर सत्यकामाने पाचवा प्रश्न विचारला तो असा – ' भगवन, जो कोणी प्राणांतापर्यंत प्रणवाचे ध्यान करतो, तो त्या ध्यानाने कोणत्या लोकाला जिंकतो ?'

यावर पिप्पलादाचे उत्तर असे – ओंकाररूपी ब्रह्म पर आणि अपर असे उभयविध असते. तो ज्या प्रकारच्या ब्रह्माचे ध्यान करतो, त्याच्याकडे जातो. या ओंकाराचे ध्यान जो तीनही मात्रांनी युक्त असे करतो, तो स्थिरचित्त होऊन ज्ञानी बनतो आणि ब्रह्मलोकाला जातो.

याचे स्पष्टीकरण असे – ओंकाराच्या अ, उ, म अशा तीन मात्रा आहेत. त्या दृश्य विश्व, वासनात्मक विश्व आणि हिरण्य-गर्भ या तिघांचा संकेत करतात. वेगळेपणाने या तिन्हीचे चिंतन करणाऱ्याला शाश्वत समाधान मिळत नाही. त्यांचे एक-रूपाने चिंतन करतो, तो आत्मज्ञानी होऊन ब्रह्मलोकाला जातो.

त्यानंतर शेवटचा प्रश्न सुकेशा याने विचारला, तो असा – ' षोडशकलात्मक पुरुष कुठे राहतो ?'

त्यावर पिप्पलादाचे उत्तर असे – षोडशकलात्मक पुरुष हा मनुष्य – शरीराच्या अंतर्भागी राहतो. त्याच्या सोळा कला त्याच्याकडेच जाणाऱ्या आहेत. त्या पुरुषापर्यंत पोचल्या म्हणजे त्याच्याशी एकरूप होतात, असे ज्ञानी लोक सांगतात.

या प्रश्नाचे स्पष्टीकरण असे – आपल्या जीवनातील सर्व हालचाल घडवून आणणारी शक्ती आणि विश्वाचा व्यवहार चालविणारी शक्ती दोन्ही एकरूपच आहेत, असा साक्षात अनुभव येणे, हे ज्ञानी पुरुषाचे लक्षण आहे. तिचे स्थान आपल्या हृदयात असल्याने आपली वृत्ती अंतर्मुख होऊन हृदयात केंद्रित होण्यास योग्य बनली पाहिजे. [ उपनिषदांचा अभ्यास ]

**प्रसन्नतारा** एक बौद्ध देवता. ही देवता ध्यानी बुद्ध रत्नसंभव याच्या कुळातील असून, सुवर्णकांतीची, त्रिनेत्र, अष्टमुख व षोडशभुज आहे. तिला अमृतमुखी व अमृतलोचना म्हटले आहे. कारण तिची सात मुखे मधुरभावयुक्त आहेत. तिचे आठवे मुख मात्र भयानक दिसते. तिचे केस पिंगट असून, तिची वस्त्रे चित्रविचित्र रंगांची आहेत. तिच्या गळ्यात नर-रुंडमाला आहे. ती प्रत्यालीढ अवस्थेत उभी आहे. ती नवयौवना असून महाबला व जगत्राती आहे. तिच्या हातांत खट्वांग, उत्पल, बाण, वज्र, अंकुश, दंड, कर्तरी, पाश, कपाल, धनुष्य, खट्वांग, वज्र, पाश, ब्रह्मस्तक, रत्नकुंभ या वस्तू असून, तिने अभय व तर्जनी मुद्रा धारण केल्या आहेत. तिचे एक मुख पिवळे,



प्रसन्नतारा

दुसरे निळे, तिसरे हिरवे, चौथे व पाचवे आकाशी, सहावे लाल, सातवे शुभ्र आणि अगदी वरचे आठवे धूम्रवर्णाचे व

भेसूर आहे ती चंद्रावरील कमळावर उभी असून इंद्र, उपेंद्र, रुद्र व ब्रह्मा याना पायाखाली तुडवीत आहे. सर्वावरण–नाशिनी (अज्ञानाची सर्व आवरणे दूर करणारी) असे तिचे वर्णन केलेले आहे [ इ बु इ ]

**प्रसववैकृतशांती** घरातल्या स्त्रीला तोंड, नाक, कान, इ. अवयवाची विकृती असलेले मूल होणे, गोठ्यातल्या गाईने विकृत वासराला जन्म देणे, तसेच शेळी, घोडी इ. पाळीव जनावराना अद्भुत प्रकारची संतती होणे, याला प्रसववैकृत असे म्हणतात. अशी घटना घडली असता शांती करावी, असे सागितले आहे. या शातीचे वेगवेगळे प्रकार आहेत, ते असे–

घरातल्या स्त्रीला व गोठ्यातल्या जनावराला जुळे झाल्यास ब्रह्मशाती करावी आणि तिच्यात ब्रह्मदेवाला उद्देशून चरू, घृत व पळसाच्या समिधा याचे प्रत्येकी १००८ हवन करावे. मस्तक-हीन अथवा दुतोंडी अपत्य जन्माला आले असता सूर्याची शांती करावी. तिच्यात भिजवलेल्या रुईच्या समिधाचे हवन करावे किवा अग्नीत पसाभर तुपाचा होम करावा. बाळगलेली हरिणी जर विकृत सतती प्रसवली, तर बृहस्पतिशांती करावी. तिच्यात दही व घृत यात भिजवलेल्या औदुबराच्या समिधांचे हवन करावे. स्त्रीला सदत अपत्य झाले, तर बुधाची शांती करावी. तिच्यात वस्त्र, गाय, सुवर्ण अशी दाने द्यावी. [ सं. कौ. ]

**प्रसाद** प्रसाद म्हणजे प्रसन्नता. ज्याच्या योगाने ईश्वराची कृपा झाली अशी भावना होते आणि मनाला प्रसन्नता येते, त्याला प्रसाद म्हणायचे. त्यावरून देवाने नैवेद्य म्हणून स्वीकारून उरलेला भाग तो प्रसाद, असा अर्थ लक्षणेने त्याला प्राप्त झाला. देवाची पूजा झाल्यावर त्याला दाखवलेल्या नैवे-द्यातला काही भाग पूजकाने प्रसाद म्हणून भक्षण करायचा असतो. तसे करताना पुढील मत्र म्हणतात –

**नारायणप्रसादं तु गृहीत्वा भक्तिभावतः ।**
**सर्वान्कामानवाप्नोति प्रेत्य सायुज्यमाप्नुयात् ।।**

हा प्रसाद कुटुबियांना व इष्टमित्रांनाही द्यायचा असतो.

प्रसाद हा इष्टदेवतेच्या अनुग्रहाचा द्योतक आहे. काही सप्रदायात गुरूचे उच्छिष्टही प्रसाद म्हणून भक्षण करतात.

**प्रसादाभिषेक** महानुभावांचा एक विधी. चक्रधराने उपास-नेचे साधन म्हणून आपल्या शिष्यांना एक वस्त्र प्रसाद म्हणून दिले होते. महानुभावानी आजवर त्याचे जतन केले आहे. या प्रसादवस्त्राच्या अभिषेकाचा एक विधी ते करीत असतात. खादीने तयार केलेल्या एका आसना ह्या वस्त्राचे तुकडे ठेवून त्याच्याभोवती ते रेशमी जाळी वि तात. ती तुटली, की पुन्हा विणतात. हे विणकाम पूर्ण झाल वर महानुभाव महत त्या प्रसादवस्त्राला अभिषेक करून र्‍ मित्त मोठा उत्सव करतात. [ म. पं. ]

**प्रसाधन** शरीराचे सौदर्य वृद्धिंगत करण्याचा उपचार म्हण प्रसाधन होय. प्रसाधनाची प्रवृत्ती ही मनुष्या जन्मजात प्रवृत्ती आहे. अगदी वीतराग साधूही आपल्या शरी बद्दल थोडीबहुत आस्था दाखवतोच. तो रोज स्नान करर आपल्या जटा स्वच्छ करतो आणि पुन्हा त्या व्यवस्थित बांधर शिकार करून जगणारा प्राचीन मानवही शिकारीत मिळालेल वस्तूनी आपले शरीर सजवीत असे. नागरी जीवनापासून राहणाऱ्या वनकन्या झाडांची पाने, फुले, फळे, इ. वस्तूनी शर सुशोभित करीत असतात. कालिदासाच्या कुमारसंभव काव्य तील पार्वती व अभिज्ञान शाकुंतलातली शकुतला यांचे प्रसाध लतापल्लवानीच होत असे.

प्रसाधनाचे आतरिक व बाह्य असे दोन विभाग होता आंतरिक प्रसाधनात पौष्टिक भोजन व व्यायाम या गोष



प्रसाधिका

येतात. प्राचीन काळी आतरिक प्रसाधनासाठी औषधांचाह उपयोग करीत असत त्यामुळे दीर्घ कालपर्यंत शरीर स्वस

आणि सुंदर राहायला मदत होत असे दात पडू नयेत, केस गळू नयेत, डोळे तेजस्वी राहावेत, त्वचेवर सुरकुत्या पडू नयेत व अंगकांती सतेज राहावी, यासाठी प्राचीन लोकही सतत प्रयत्नशील असत. बाह्य प्रसाधनात दतमजन, विविध प्रकारची उटणी, केसांना लावायची तेले, डोळ्यात घालायचे अंजन, सुगंधी द्रव्ये, ओठ व नखे रंगवायची द्रव्ये, मेंदी, अळिता, इ. द्रव्ये येतात. तसेच विविध वस्त्रे परिधान करणे, पुष्पमाला व अलंकार धारण करणे या गोष्टीही प्रसाधनात अतर्भूत होतात.

वैदिक काली गुरुगृही अध्ययन पूर्ण केल्यावर शिष्याचा समावर्तन संस्कार होत असे त्या वेळी तैलाभ्यंग, उटणे, चंदनादी सुगंधी द्रव्ये यांचा तो प्रथमच उपयोग करीत असे. स्नान करून तो सुगंधी माला, सुंदर वस्त्रे व अलकार धारण करीत असे. नंतर त्याला आरसा दाखविण्यात येत असे.

समावर्तन सस्कारात, सर्व प्रसाधन करून ब्रह्मचारी आचार्यकुलातून जेव्हा घरी येतो, तेव्हा त्याला पाहण्यासाठी पुष्कळ लोक जमतात, असे अथर्ववेदात सागितले आहे (११.५.२६). विवाह संस्कारातही अशा प्रकारचे प्रसाधन करण्याची प्रथा वैदिक कालात होती. वैदिक कालातील जीवन रसपूर्ण होते आणि गृहस्थ बनून जीवनाचा सुखपूर्वक उपभोग घेण्याची शिकवण स्त्रीपुरुषांना देण्यात येत होती. वैदिक साहित्याशिवाय प्राचीन उत्खननातूनही याबद्दल पुरावा सापडतो.

मोहेंजोदडो येथील उत्खननात सापडलेली स्नानगृहे, केसात खोचावयाच्या फण्या, कगवे, आरसा, काजळ घालायची शलाका, केस कापायचे वस्तरे, हिरवा दगड, हस्तिदंत, इत्यादींच्या प्रसाधन पेटचा, तांब्याचे तेलाचे भांडे, इ. वस्तूवरून सिंधुसंस्कृतीतील लोक आपले शरीर स्वच्छ व सुंदर ठेवण्यासाठी आजच्या नागरिकाप्रमाणेच दक्ष होते, हे समजून येते. इथल्या मातीच्या मूर्तीवरून त्या काळी लोक वस्त्रे व अलंकार लेवून शरीर सुशोभित करीत असत, हेही कळते.

रामायणात, अनसूयेने सीतेला अनुलेपन व दिव्य अंगराग दिल्याचा उल्लेख आहे. शाकलातील स्त्रिया सुगधी द्रव्यांचा लेप लावीत, माला धारण करीत, मस्तकावर मनःशिलाचा लेप लावीत व भुवयांना काजळ लावून त्या काळ्या करीत, असे वर्णन महाभारतातील कर्ण पर्वात आले आहे.

पाणिनी, पतंजली, कौटिल्य, इत्यादींच्या ग्रंथातील उल्लेखांवरून त्या काळचे लोक अंजन, तगर, गुग्गुळ, चंदन, अगरु, इ. सुगधी द्रव्याचा प्रसाधनात उपयोग करीत असत, हे कळते. कौटिल्याने अर्थशास्त्रात मन.शिला, हरिताल व कालेयक यांपासून तेल कसे काढायचे ते सांगितले आहे. प्रसाधनासाठी लेप वगैरे कसे बनवीत, ते अश्वघोषाच्या सौंदरनंद काव्यात सांगितले आहे. मुखावरील अंगरागाचे व शरीरावरील पत्ररचनेचे वर्णनही या ग्रंथात सापडते. स्त्रिया आपले पाय, नखे व ओठ रंगवीत, डोळ्यांत काजळ घालीत व अंगावर अलंकार घालीत असत, असेही उल्लेख त्यात आहेत.

बौद्ध कालातील प्रसाधनासंबंधीची माहिती जातके व विनयपिटक या ग्रंथांवरून मिळते. माला, गंध, विलेपन, मंडन, विभूषण, संवाहन या सर्वांचा समावेश प्रसाधनात होई. राजाचे स्नान व प्रसाधन यांसाठी त्या काळी एक मंगलनापित नेमलेला असे. तो राजाचे प्रसाधन करीत असे व त्याच्या शरीरावर सुगंधी लेप लावीत असे. शरीर सुंदर व घाटदार बनावे, यासाठी शरीराचे संवाहन व मर्दन करण्याची प्रथा त्या काळी होती. त्या काळच्या स्त्रिया मुखावर लेप लावीत होत्या, त्यावर चूर्ण चोपडीत होत्या आणि अंगाला अंगराग लावीत होत्या. भिक्षुणींना मात्र हे सर्व प्रसाधन वर्ज्य होते.


प्रसाधिका

स्नान ही तर प्रसाधनातील आवश्यक बाब होती. सर्वसामान्य लोक नदी, तलाव किंवा विहीर या ठिकाणी स्नान करीत. नदीच्या घाटावर अंगाला लावण्यासाठी सुगंधी माती व चूर्ण ठेवलेले असे. गार पाण्याच्या स्नानाशिवाय गरम पाण्याने स्नान करण्यासाठी जन्तकघरे बांधलेली होती. चुल्लवग्गात (५.२.२) या जन्तकघरांची माहिती आहे. त्यात या घरांच्या स्वच्छतेचे नियम, पाणी वाहून जाण्यासाठी पन्हळी बनविणे, स्नानाच्या वेळी गडबड न करणे, इ. उल्लेख आहेत. भिक्षू, भिक्षुणी व सर्वसामान्य लोक यांना त्या जन्तकघरांत स्नान करायला परवानगी होती.

त्या काळातील स्त्रिया गालांवर चित्रकर्म करीत व लाक्षारसाने हातांची नखे व पाय रंगवीत. शिवाय स्त्रियांना सुगंधी द्रव्ये व फुले यांचीही आवड होती. त्या फुलांच्या माळा व गजरे करून माळीत असत.

त्या काळी निरनिराळे सुगंध व अत्तरे तयार होत असत. काशीचंदन हे त्यातले मुख्य द्रव्य असे. गंधी लोक अत्तरे व सुगंधी द्रव्ये विकीत.

मौर्यकाल हा वैभवसंपन्न काल होता. त्या काळात चंदन, अगुरू, गुग्गुळ व सुगंधी द्रव्ये द. भारतातून व समुद्रापलिकडूनही येत असत. या कालात सुगंधी द्रव्यांचा उपयोग विशेष होत असे. राजाचा शयनकक्ष व इतर दालने यांत अगुरू व चंदन जाळून धूर करीत असत.

वात्स्यायनाच्या कामसूत्रांत एक नागरक व त्याची पत्नी यांच्या प्रसाधनाचे वर्णन आले आहे, ते असे –

नागरक सकाळी उठून नित्यकर्म आटोपल्यावर दातवणाने तोंड धूत असे. नंतर शरीरावर चंदनाचा किंवा सुगंधी द्रव्याचा लेप लावीत असे. मग आपल्या वस्त्रांना अगुरूचा धूप देऊन गळ्यात माला धारण करीत असे. अत्तरादी सुगंधी द्रव्ये वापरीत असे. त्याच्याजवळ सुगंधमंजूषाही असे. मग तो डोळ्यांत अंजन घाली. ओठांवर अळिता लावून तो रंग पक्का होण्यासाठी त्यावर मेण चोळी. आरशात आपले मुख न्याहाळी. मुख सुगंधित होण्यासाठी विडा खाई. एवढे करून मग तो कामासाठी बाहेर जाई.

उत्सव व यात्रा या प्रसंगी नागरकपत्नी सुगंधी द्रव्ये लावून पांढरी फुले माळून व योग्य असे अलंकार लेवून त्यात सहभागी होत असे. त्या काळातील स्त्री आपल्या पतीला भेटायला जाताना अत्यंत आकर्षक वेषभूषा करीत असे. ती केसांचा अंबाडा बांधून त्यावर फुलांची वेणी माळीत असे, कानात अलंकार घालीत असे व गळ्यात माला धारण करीत असे. तसेच मस्तकावर व गालांवर वैशेषिक बिंदू लावीत असे.

पुरुषांपेक्षा स्त्रियांची प्रसाधनसामग्री अधिक असे. आपल्या पतीला दीर्घायुष्य लाभावे, अशी इच्छा करणाऱ्या सुवासिनींना हळद, कुंकू, शेंदूर, काजळ, कंचुकी, तांबूल, मांगलिक आभूषणे, केस विंचरणे, मस्तक, हात व कान यांत अलंकार घालणे, हे त्या काळी आवश्यक मानलेले होते. नंतर या वस्तूंना शृंगार असे नाव मिळाले. या शृंगारांची संख्या सोळा मानलेली आहे. त्यांची नावे अशी – उटणे, स्नान, स्वच्छवस्त्रपरिधान, भांग, पायांना अळिता, केशरचना, तिलक, हनुवटीवर तीळ बनवणे, अलंकार, मेंदी, दंतमंजन, अंजन किंवा काजळ, अरगजालेपन, तांबूल, माला व गजरा.

सोळा शृंगारांच्या या नावांत काही बदलही आहेत. वल्लभदासाने आपल्या सुभाषितावलीत चीर, नासामौक्तिक, मेखलारणन व करदर्पण ही शृंगारांची वेगळी नावे दिली आहेत; तर



स्त्रियांचे प्रसाधन

उज्ज्वल नीलमणीने राधाप्रकरणात असितपट, अंगचर्चन, हनुवटीवर कस्तूरीने चित्र काढणे व शरीरावर पत्रभंगरचना करणे यांचा सोळा शृंगारांत अंतर्भाव केला आहे.

मेघदूतावरील टीकेत मल्लिनाथाने कचधार्य, देहधार्य, परिधेय, भूषण व देशानुसार शृंगार, असे पाच प्रकारचे शृंगार सांगितले आहेत. त्यांचे वर्णन असे –

**कचधार्य** – केस स्वच्छ करून त्यांच्या विविध रचना करणे म्हणजे कचधार्य प्रसाधन होय. स्त्रिया केसांना सुगंधी तेल लावीत असत. ते बहुधा आवळ्याचापासून तयार करीत. केस स्वच्छ धुतल्यावर धूपाच्या धुराने सुगंधित करीत. कर्पूरधूम केशशुद्धीसाठी, अगुरुधूम केस वाळवून सुगंधी करण्यासाठी व कस्तूरीधूम केसांचा सुगंध बराच काळ टिकावा यासाठी केसांना देत. नंतर हस्तिदंती फणी व कूर्चं यांनी विंचरून केसांची वेणी किंवा अंबाडा घालीत व त्यावर सुवासिक फुले माळीत.

**देहधार्य** – समग्र शरीराची शोभा वाढविण्यासाठी निरनिराळ्या वस्तूंचा उपयोग करणे. निरनिराळ्या अवयांचे प्रसाधन पुढीलप्रमाणे –

**भ्रूप्रसाधन** – काळ्या आणि कुटिल भुवया सौंदर्यवर्धक

मानलेल्या आहेत. म्हणून डोळ्यांप्रमाणे भुवयांनाही काजळ व अंजन लावून त्या काळ्या करीत.

नेत्रप्रसाधन – डोळ्यातील काळा व पांढरा हे दोन्ही भाग जितके स्पष्ट होतील, तितके डोळ्यांचे सौंदर्य खुलून दिसते. हे काम अंजन किंवा काजळ याने होते. सौवीर अंजन (सुरमा) हे डोळ्यांना हितकर आहे; ते रोज लावावे, असे अत्रिपुत्राने सांगितले आहे. प्राचीन काळापासून लोक अंजनाचा उपयोग करीत आले आहेत. सिंधुसंस्कृतीच्या उत्खननात सुरमादानी व सुरमा डोळ्यात घालायच्या शलाका मिळाल्या आहेत. नेत्रांचे सौंदर्य वाढावे, याबरोबरच सूर्याच्या प्रखर किरणांपासून व सूक्ष्म जंतूपासून डोळ्यांचे रक्षण व्हावे, म्हणून सुरम्याचा उपयोग करीत. अंजन ठवण्यासाठी सोने, चांदी, कासे, शिंग, दगड इत्यादींच्या डब्या असत. त्याचप्रमाणे डोळ्यात सुरमा घालण्यासाठी सोने, चांदी, तांबे व लोह यांच्या शलाका बनवीत असत.

कपोलप्रसाधन– गालांचे प्रसाधनही अनेक प्रकारे करीत. बायका गालांवर श्वेत व रक्त चंदनाचे ठिपके देत. हनुवटीच्या खळीतून दोन रेषा वर गालांवर ओढीत आणि वेलीप्रमाणे तिच्यावर डहाळ्या व पाने काढीत. त्याचप्रमाणे कपाळावरही केशरेखेला लागून पांढरे व लाल ठिपके रंगवीत. हे ठिपके कानांपर्यंत व भुवयांच्या वरही देत. याच ठिपक्यांनी जेव्हा कपाळावर मध्यभागी तिलक करीत, तेव्हा त्याला भक्ती असे म्हणत. कधी पांढऱ्या गोलाकार ठिपक्यांत लाल ठिपका किंवा कुंकू, तर कधी लाल ठिपक्यांच्या मध्ये पांढरा ठिपका देत. या भक्तिचित्रणक्रियेला मकरिका असे म्हणत. ही क्रिया प्रायः तमालपत्रादी पाने किंवा हरताल, मन:शिला, चंदन, कस्तुरी, इ. द्रव्यांनी करीत. लोध्र वृक्षाच्या सालीचे चूर्ण पांढरे असल्याने ते तोंडाला लावीत. अलकापुरीतील स्त्रिया लोध्रपुष्पांतील पराग मुखावर लावून ते गौर वर्णाचे करीत असे, मेघदूतात म्हटले आहे (उ. मेघ. २).

ओष्ठप्रसाधन – पिकलेल्या तोंडल्याप्रमाणे असणारे ओठ हे सौंदर्याचे लक्षण मानले जाई. ओठांना लाली आणण्यासाठी रंग लावीत व तो नीट बसावा म्हणून त्यावर मेण चोळीत. ओठांना लालीसाठी लाक्षारसही (राळ) चोळीत. ओठांना लाक्षारस लावल्यावर त्यावर लोध्रचूर्ण शिंपडीत. त्यामुळे ओठावर एक प्रकारची आरक्त पांडुरता येत असे. ओठ रंगविण्यासाठी विडा खाण्याचीही पद्धत होती.

कर्णप्रसाधन – कानात शिरीषपुष्प, कदंबपुष्प, शैवालमंजरी किंवा अशोकपुष्प लटकावीत असत. हे प्रसाधन साधे असले, तरी मोहक असे.

स्तनप्रसाधन – केशर, कस्तूरी, चंदन, गोरोचन, इ. सुगंधी द्रव्यांचे स्तनांवर अनुलेपन करीत आणि त्यावर मकरिका, पत्रभंग, इ. रचना करीत. स्तनांवर पानांचे कातरकाम चिकटवीत किंवा पान स्तनावर ठेवून उरलेल्या जागी लेप लावीत आणि पानाची जागा नुसतीच सोडीत किंवा दुसऱ्या रंगाने रंगवीत. ऋतुमानानुसार लेपद्रव्यात फरक करीत. ग्रीष्म ऋतूत मृणालवलये (कमलाचा देठ) लेवून चंदनाचा किंवा चंदन व कापूर यांचा लेप लावीत. हेमंत ऋतूत केशर व अगुरू यांचा उष्ण लेप लावीत. लेपाचा थर पातळ देत. अन्यथा त्याने त्वचेवरील रोमछिद्रे बंद होऊन उष्णता निर्माण होत असे.

चरणप्रसाधन – पायांना अळिता लावून ते रंगविण्याची प्रथा होती. अळिता लाक्षारसापासून बनवीत. लाक्षारस थंड व लाल असल्यामुळे सौंदर्यवृद्धीसाठी त्याचा उपयोग करीत. सांप्रत भारताच्या पूर्वभागात, विशेषतः, बंगालमध्ये अळित्याचा व राजस्थानात आणि पश्चिम भारतात मेंदीचा उपयोग करतात. पायाच्या तळव्यांना व वरच्या कडेने पायाच्या सर्व बाजूंना अळिता लावीत.



मोरावरील आरसा

याशिवाय, स्नानाच्या आधी व नंतरही त्वचा मृदू व सुगंधित बनवण्यासाठी लोक निरनिराळे लेप, गंध, तेले यांचा वापर करीत. गुप्तकालात चंदन, कालेयक, कालागरू, इ., द्रव्यांपासून अनुलेपन व अंगराग बनवीत. कस्तुरी, अगुरु, केशर व मलई यांचे मिश्रण करून सुगंधी व कांतिवर्धक अंगराग तयार करीत. घामाची दुर्गंधी कमी करण्यासाठी त्यांना अंगरागाचा उपयोग होत असे.

**परिधेय** – चांगली वस्त्रे परिधान केल्याने शरीराचे सौंदर्य वाढते, हे प्राचीनांना अवगत होते. प्राचीन काळी उत्तरीय व अधोवस्त्र अशी दोनच वस्त्रे वापरण्याची प्रथा होती. पतीजवळ जाताना स्त्रिया पत्युद्गमनीय नामक वस्त्र नेसत असत. कालिदासाने याला अभिषेकयोग्य वस्त्र म्हटले आहे.

प्रसाधन केल्यानंतर स्त्री आपले मुख आरशात पाहत असे.

हातात आरसा धरून प्रसाधन करीत असलेल्या अनेक मूर्ती आढळतात. हातात आरसा घेतलेली व कासवाच्या कुपीवर उभी असलेली एक पितळी मूर्ती राजा केळकर संग्रहालयात आहे. मूर्तीच्या उजव्या हातात वाटीसारखे भांडे आहे. त्यात कुंकू व खालच्या कुपीत काजळ असावे.

तेल, कुंकू, काजळ, अंजन वगैरे प्रसाधनद्रव्ये करंडचांत किंवा धातूच्या कुप्यांत ठेवीत. काही वेळा पोपट, हंस, मोर, कासव, इ. प्राण्यांच्या आकाराच्या कुप्या बनवीत. मोराच्या पिसाऱ्याच्या जागी आरसा बसविलेला असे. केस विंचरण्याच्या फण्यांवरही नक्षीकाम केलेले असे. कधी त्यांवर वेलबुट्टी, पक्षी व मानवी आकृतीही काढीत.


कासवाच्या कुपीवरील प्रसाधिका

कालिदास, बाणभट्ट, इ. संस्कृत कवींच्या ग्रंथांत प्रसाधनकलेचे अनेक उल्लेख आढळतात. प्राचीन काळी प्रसाधनकला जाणणाऱ्या पुरुषांना प्रसाधक व स्त्रियांना प्रसाधिका असे म्हणत. प्रसाधनाची सामग्री ठेवलेल्या पेटीला प्रसाधनपेटिका म्हणत. या पेटीत क्वचित कर्णपूर, कुंडल, ताटंक, मुक्तावली, हार, इ. अलंकारही ठेवीत.

गुप्तकालात प्रसाधनकलेकडे लोकांचे अधिक लक्ष गेले आणि चित्रकला व मूर्तिकला यांतही प्रसाधनाचे चित्रण होऊ लागले. अजंटा येथील चित्रांत प्रसाधक व प्रसाधिका यांची चित्रे आढळतात. गुप्तकालातील काही प्रसाधिकांच्या मूर्तीही सापडल्या आहेत.

मध्ययुगात तर प्रसाधनकार्य करणाऱ्या स्त्री-पुरुषांचे स्वतंत्र वर्गच अस्तित्वात आले आणि विविध प्रसाधने करणारे तज्ज्ञही निर्माण झाले. प्रसाधनांची गणना चौसष्ट कलांमध्ये होऊ लागली. स्नानोपभोग, पादुकाभोग, तांबूलभोग, वस्त्रोपभोग, माल्योपभोग अशा अनेक अंगांत प्रसाधनांचा विस्तार झाला.

प्राचीन काळी भारतातील ग्रामीण भागातील स्त्रिया गालावर व हनुवटीवर तीळ गोंदवून घेत. मध्ययुगात नगरातील स्त्रियांमध्येही त्याचा प्रचार झाला. मुसलमानांचे भारतात आगमन झाल्यानंतर भारतीय प्रसाधनाची सामग्री, उपकरणे व अलंकार यांच्यावर त्यांचा बराच प्रभाव पडला. पूर्वी स्नानासाठी लोक तलाव किंवा नदीकाठचे घाट यांचा उपयोग करीत; तर मोगलकालात त्यासाठी हमामखाने बनविण्यात येऊ लागले. त्यांत स्वेदस्नान, उटणी व तेल लावणे आणि विविध तपमानाच्या पाण्याने स्नान करणे अशा सोयी असत. अशा प्रकारचे उत्तम हमामखाने दिल्लीच्या लाल किल्ल्यात व फत्तेपूर शिक्री या ठिकाणी आहेत. श्रीनगर, लाहोर, आग्रा, विजापूर, इ. ठिकाणीही असे हमामखाने आहेत.


आरसा व फणी

मोगलकालातच हातापायांना मेंदी लावण्याची व पांढरे केस मेंदीने रंगविण्याची प्रथा सुरू झाली. नाकातील अलंकार व जुल्फ ही मुसलमानी प्रथा आहे. मोगल व राजस्थानी चित्रकलेत प्रसाधिकांची अनेक चित्रे आढळतात.

इंग्रज, फ्रेंच, पोर्तुगीज, इ. पाश्चात्य लोक भारतात आल्यावर साबण, स्नो, पावडर, सेंट, लिपस्टिक, नेलपॉलिश, इ. प्रसाधनद्रव्यांचा प्रचार झाला. सांप्रत या प्रसाधनद्रव्यांचा प्रचार इतका वाढला आहे, की मोठमोठ्या शहरांतून उटणी, तेले वगैरे प्राचीन प्रसाधनांचा लोप झाला आहे. विविध केशभूषा करून व प्रसाधने वापरून स्त्रियांना सुंदर बनविण्याची सौंदर्यवर्धक गृहेही जागोजाग निघाली आहेत. अलिकडे मोठमोठ्या घरांतून व बंगल्यांतून स्नानासाठी स्वतंत्र स्नानगृहे बांधलेली असतात. पाश्चात्य लोकांच्या अलंकारांचाही भारतीय आभूषणांच्या आकारावर व सजावटीवर प्रभाव पडला आहे. सांप्रत दागिने हलके बनवतात व त्यावर रत्ने जडवतात.

अशा प्रकारे प्राचीन काळापासून आजपर्यंत भारतीय स्त्री-पुरुषांचे प्रसाधन व अलंकार यांकडे विशेष लक्ष होते, हे कळून येते. [ प्रा. भा. प्र.; हिं. वि. को.; भा. प्रा. सं. ]

**प्रसूती** संस्कृतीच्या प्रारंभिक अवस्थेत स्त्रीच्या प्रसूतीशी संबंधित असलेले उपचार साधे आहेत; पण संस्कृतीचा विकास जसजसा होत गेला, तसतसा प्रसूतीसंबंधीच्या विधिविधानांत थोडा क्लिष्टपणा शिरत गेला.

पूर्वीच्या काळी स्त्रीची प्रसूती तिच्या घरीच एखाद्या खोलीत होत असे. आताच्या सारखी प्रसूतिगृहे त्या काळी नव्हती.

हल्लीसुद्धा खेड्यापाड्यांतून सर्वत्र प्रसूतिगृहे नसल्याने स्त्रियांची प्रसूती घरीच होते.

स्त्रीला प्रसववेदना सुरू झाल्या, की ती एका खोलीत जमिनीवर किंवा बाजेपर जाऊन झोपते. ही बाज अंबाडीच्या दोरीने विणलेली असावी व स्त्रीने पूर्वेकडे किंवा उत्तरेकडे डोके करून झोपावे, असा संकेत आहे. प्रसूतिसमयी तिला भुता-खेतांची बाधा होऊ नये, म्हणून खोलीत काही लोखंडी वस्तू ठेवतात. प्रसूती सुलभ व लवकर व्हावी, म्हणून पूर्वी अथर्ववेदातील सुखप्रसूतिसूक्त म्हणून त्याने पाणी मंत्रीत व ते गरोदर स्त्रीला प्यायला देत. काही वेळा एखाद्या निष्णात मांत्रिकाने लिहून दिलेला मंत्रही स्त्रीच्या पोटाला बांधीत.

प्रसूती लवकर होत नाही, असे आढळून आल्यास, काही जातीत भुता-खेतांची बाधा झाल्याचे मानतात व मांत्रिक बोलावून उपचार करतात. सुलभ प्रसूतीसाठी कुलदेवता, कुलपुरुष, कुलाचा गुरू किंवा सती गेलेली स्त्री यांचा धावा करण्याचीही प्रथा आहे. सती गेलेली स्त्री पतिव्रता असल्यामुळे तिच्या तेजाला भुते घाबरतात अशी समजूत आहे. काही वेळा गर्भवतीच्या सासूचे किंवा पतीचे पादोदकही तिला प्यायला देतात. तिला उखळाला सात प्रदक्षिणा घालायला लावतात.

पूर्वी उच्चवर्णीय स्त्रियांच्या प्रसूतीच्या खोलीत पांढऱ्या शुभ्र फुलांच्या माळा टांगलेल्या असत. पाण्याने भरलेले कलश निरनिराळ्या दिशांना ठेवलेले असत. तसेच शस्त्रे लटकावून व दिवे पेटवून ठेवलेले असत. सूतिकाग्नी ( शेगडी ) हा तर फार महत्त्वाचा मानीत. अजूनही बाळंतिणीच्या खोलीत अहोरात्र शेगडी पेटून ठेवतात. भुता-खेतांना पळवून लावण्यासाठी ही योजना असते.

नूतन बालकाला भुताखेतांची बाधा होऊ नये, म्हणूनही पूर्वी काळजी घेण्यात येत असे. सीतेने लव-कुशांना जन्म दिल्यावर वाल्मीकीने भुते आणि राक्षस यांना हाकलून देण्यासाठी काही उपाय योजले, असे रामायणात सांगितले आहे ( उत्तर ६६). दर्भ हे या बाबतीत प्रभावी असल्यामुळे वाल्मीकीने त्यांचा उपयोग केला, असेही तिथे म्हटले आहे.

काही जातींत मूल जन्मताच त्याला सुपात ठेवतात. मुलगा झाला असेल, तर भुताखेतांना पळवून लावण्यासाठी पितळेची थाळी वाजवतात. मुलीला नैसर्गिक संरक्षण असते, अशा समजुतीने थाळी वाजवीत नाहीत. मुलाची नाळ लोखंडी हत्याराने, कात्रीने किंवा बांबूच्या कांबीने कापतात. नाळ पुरण्यासाठी खड्डा खणण्याची पहार बाळंतिणीच्या पायाखाली आधीच ठेवलेला असते. ती घरात नसल्यास दुसरीकडून मागून आणतात व सठीची पूजा झाल्यावर परत करतात. स्त्रीला प्रसूतिवेदना सुरू झाल्यावर सुइणीला बाहेर जाऊन यायचे असले, तर ती स्त्रीच्या उशीखाली हळूच एक सुई ठेवून जाते. द. भारतातील एका आदिवासी जमातीत बाळतिणीच्या उशीखाली चाकू किंवा एखादी लोखंडी वस्तू ठेवतात. माला जातीच्या स्त्रीला प्रसववेदना सुरू झाल्या म्हणजे तिच्या उशीखाली निंबाची डहाळी व विळा ठेवतात.



मुलाची नाळ बाळतिणीच्या खोलीच्या कोपऱ्यात खड्डा खणून पुरतात व त्या जागेवर चार-पाच दिवस दिवा लावून ठेवतात. तसेच तिच्या खोलीत सतत समईही लावून ठेवतात. गुजरातेतील खोजा मुसलमान लोक नवजात शिशूजवळ चार वातींचा दिवा पेटवून ठेवतात व नातेवाईक त्याच्यावर तांदूळ टाकतात.

चौथ्या किंवा पाचव्या दिवशी मुलाला व बाळंतिणीला कडुनिंबाचा पाला घालून तापवलेल्या पाण्याची आंघोळ घालतात. त्या वेळी भूतबाधा होऊ नये म्हणून सुईण उजव्या हातात पाणी घेऊन सात वेळा दोघांभोवती ओवाळून टाकते. काही जातींत या दिवशी घरातील सर्व मातीची भांडी बाहेर फेकतात व आप्तेष्टांना मेजवानी देतात. दुसऱ्या दिवसापासून सुइणीला रजा देतात व तिची जागा न्हावीण घेते.

काही जातींत दहाव्या दिवशी पुरोहित मुलाची कुंडली घेऊन येतो. मग तिच्यावर दूर्वा, हळद-कुंकू, अक्षता वगैरे वाहतात. कुंडलीवरून पुरोहित मुलासाठी काही नावे सुचवितो. त्यांतील एखादे नाव मुलाचा पिता निवडतो व ते नाव नामकरणसमारंभाच्या दिवशी मुलाला ठेवतात.

काही जातींत दहाव्या दिवशी बाळंतिणीच्या खोलीतला दिवा विझवतात व तो तूप-साखर घालून पुन्हा पेटवतात. लवकरच त्या घरात नवीन मूल जन्माला यावे, अशी त्यामागची आकांक्षा असते.

बहुतेक सर्व जातींत प्रसूतीच्या पाचव्या व सहाव्या दिवशी षष्ठीदेवीची पूजा करण्याची पद्धत असते.

जननाशौच सामान्यपणे दहा दिवस पाळले जाते. पण निरनिराळ्या जातींत हा कालावधी भिन्न भिन्न असतो. [ एन्सा. रि. ए.; से. ला. ए. इं.; सं. कौ. ]

**प्रसूत यावक** एक प्रायश्चित्त. हाताची सर्व बोटे पसरून तळवा किंचित खोलगट करणे याला प्रसृती असे म्हणतात. या प्रसृतीवर मावतील इतकेच तांदूळ किंवा यव घेऊन त्यांची कांजी करणे व ती मंत्रपूर्वक खाणे, याला प्रसृत यावक असे नाव आहे. या प्रायश्चित्ताने महापातकांचेही क्षालन होते, असे धर्मसूत्रांत सांगितले आहे. [ हि. ध. ].

**प्रस्कण्व** एक सूक्तद्रष्टा. ऋग्वेदाच्या पहिल्या मंडलातील ४४ ते ५० ही सूक्ते आणि नवव्या मंडलातील ९५ वे सूक्त याच्या नावावर आहे. हा कण्व कुलातला असून, याला कण्वपुत्र असेही म्हटले आहे. पहिल्या मंडलातील त्याच्या सूक्तांत अग्नी, अश्वी, उषा, सूर्य याची स्तुती असून, नवव्या मंडलातील सूक्तात सोमस्तुती हा विषय आहे. याची एक ऋचा (ऋ. १. ४४. ३) अशी—

**अद्या दूतं वृणीमहे वसुमग्निं पुरुप्रियम् ।**
**धूमकेतुं भाऋजीकं व्युष्टिषु यज्ञानामध्वरश्रियम् ।।**

अर्थ– दिव्य संपत्तीचा निधी, सकलजनाना प्रिय, धूमाच्या ध्वजाने मंडित, तेज:स्वरूप आणि यज्ञाचे जणू वैभवच असा जो अग्नी, त्याला आम्ही उष:कालाचा स्वच्छ प्रकाश पडताच आमचा प्रतिनिधी म्हणून निश्चित करतो.

हृद्रोग आणि कावीळ नष्ट करण्याबद्दल याने सूर्याची प्रार्थना केली आहे (ऋ. १. ५०. ११). [प्रा. च. को.; सी. ऋ.]

**प्रस्तोता** सोमयागातील ऋत्विजांपैकी एक. उद्गातृगणामध्ये याचे दुसरे स्थान आहे. उद्गात्यापेक्षा याचा दर्जा कनिष्ठ असला, तरी त्याच्यावर जबाबदारी मात्र मोठी असते. कारण यज्ञामध्ये सामगान करण्यासंबंधीचे प्रैष यालाच दिले जातात. कोणत्याही सामाचा प्रस्ताव म्हणजे प्रारंभही यालाच करावा लागतो. कित्येक कर्मांमध्ये प्रस्तोत्याला एकट्यालाच सामगान करावे लागते. [वे. इं.]

**प्रस्थानकलश** प्रवासाला निघणाऱ्या माणसाला शुभ शकुन व्हावा, म्हणून आंब्याच्या डहाळ्यांसह एक जलकलश पूर्वी दारात ठेवीत व त्याला प्रस्थानकलश असे म्हणत. कलश हा शुभ वस्तूंपैकी एक मानलेला आहे. प्रवासाला निघताना त्याचे दर्शन झाल्यास प्रवास सुखकर होऊन त्याचे उद्दिष्ट साध्य होते, अशी समजूत आहे.

**प्रस्थान ठेवणे** एक लौकिक शुभ कल्पना. प्रवासाला निघण्यासाठी शुभ मुहूर्त पाहावा, असे धर्मशास्त्रात सांगितलें आहे. ठरलेल्या शुभ मुहूर्तावर प्रयाण करणे अशक्य झाल्यास, त्या मुहूर्ताच्या वेळी सोने, धान्य, वस्त्र, हळकुंड, सुपारी, इ. वस्तूंची पुरचुंडी तुळशीवृंदावनात नेऊन ठेवण्याची चाल आहे. या विधीलाच प्रस्थान ठेवणे, असे म्हणतात. प्रस्थान ठेवल्यानंतर केव्हाही प्रवासाला निघता येते व पाच दिवस घरी राहिले तरी चालते. काही लोक प्रस्थान ठेवल्यावर स्वत:च्या घरी वस्ती न करता शेजारी रात्र घालवतात.

**प्रस्थानत्रयी** उपनिषदे, वेदांतसूत्रे व भगवद्गीता हे तीन भारतीय तत्त्वज्ञानाचे मौलिक ग्रंथ होत. या तिहींच्या समुच्चयाला प्रस्थानत्रयी असे म्हणतात.

यापैकी उपनिषद्ग्रंथांना श्रुतिप्रस्थान असे नाव आहे. या प्रस्थानात ईश, केन, कठ, प्रश्न, मुंडक, माडूक्य, तैत्तिरीय, ऐतरेय, छांदोग्य, बृहदारण्यक, कौषीतकी व श्वेताश्वतर ही बारा प्रधान उपनिषदे येतात यांमध्ये ऐतरेय व कौषीतकी ही ऋग्वेदाची; केन व छांदोग्य ही सामवेदाची, ईश व बृहदारण्यक ही शुक्ल यजुर्वेदाची; कठ, तैत्तिरीय व श्वेताश्वतर ही कृष्ण यजुर्वेदाची आणि प्रश्न, मुंडक व मांडूक्य ही अथर्ववेदाची उपनिषदे होत.

वेदांतसूत्रे या प्रस्थानाला न्यायप्रस्थान म्हणतात. या वेदांतसूत्रांना ब्रह्मसूत्रे, शारीरिक मीमांसा किंवा उत्तर मीमांसा अशीही अन्य नावे आहेत. या सूत्रांचा कर्ता बादरायण किंवा कृष्णद्वैपायन हा आहे. त्याला वेदव्यास असेही म्हणतात. पण वेदव्यास आणि बादरायण हे दोघे एकच किंवा वेगळे याविषयी मतभेद आहेत. वेदांतावर सूत्रे लिहिणारे अनेक आचार्य होऊन गेले, त्यातला बादरायण हा शेवटचा सूत्रकार समजतात. त्याचीच सूत्रे सांप्रत उपलब्ध आहेत.

गीता या प्रस्थानाला स्मृतिप्रस्थान असे म्हणतात. शंकराचार्यांनी गीतेला स्मृती मानले असून, जागोजागी तसे उल्लेख केलेले आहेत.

वरील तीन्ही ग्रंथ हे प्रवृत्तिमार्ग व निवृत्तिमार्ग या दोन्हींसंबंधी तात्त्विक विवेचन करणारे असून, ते वैदिक धर्माचे तीन आधारस्तंभच आहेत. या तीन्ही ग्रंथांचे प्रामाण्य प्राचीन काळापासूनच प्रस्थापित झाले होते. त्यामुळे बहुतेक धार्मिक किंवा तात्त्विक संप्रदायाच्या प्रवर्तकांनी या प्रमाणभूत अशा प्रस्थानत्रयीवर भाष्ये किंवा टीका लिहून आपली मते प्रस्थानत्रयीशी विसंगत नाहीत व आपला संप्रदायच प्रस्थानत्रयीला मान्य असलेला संप्रदाय ठरतो, असे सिद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे. प्रस्थानत्रयीवर जी भाष्ये प्रसिद्ध आहेत, त्यांत शंकराचार्य, रामानुजाचार्य, मध्वाचार्य, वल्लभाचार्य यांची भाष्ये प्रमुख होत.

उपनिषदे शेकडो असून ती विविध काळी रचली गेली आहेत, त्यामुळे त्यांच्यांत विचारविरोधही दिसून येतो. तसे होणे स्वाभाविकही ठरते. उपनिषदांतील हा विचारविरोध काढून टाकून सर्व उपनिषदांचे जीव–शिवांसंबंधी ऐकमत्य आहे, हे दाखवून देण्यासाठी बादरायणाचार्यांनी वेदांतसूत्रे लिहिली. त्यामुळे उपनिषदांइतकीच योग्यता या वेदांतसूत्रांनाही प्राप्त झाली. तथापि या दोन्ही ग्रंथांत, विशेषत: निवृत्तिमार्गावरच भर दिला असल्याकारणाने वैदिक धर्मातील प्रवृत्तिमार्गाचे

विवेचन त्यांत आले नव्हते. ती उणीव भगवद्‌गीतेने भरून काढली. गीता ही खुद्द भगवताच्याच मुखातून निघाली असल्याने उपनिषदे व वेदातसूत्रे याच्याइतकीच तिलाही मान्यता मिळाली. अशा प्रकारे परमार्थविचारांचे सांगोपाग विवेचन करणारे हे तीन मूलभूत ग्रंथ प्रस्थानत्रयी या नावाने महत्पदवीला पोचले. [ म. ज्ञा. को.; हिंदुत्व ]

**प्रस्रवण** (१) पर्वतावरील वाहत्या झऱ्याला प्रस्रवण म्हणतात. त्याला एक तीर्थ मानलेले आहे. प्रस्रवणजलात नित्य स्नान करावे, असे मनू म्हणतो (४.२०३).

(२) दक्षिणेतला एक पर्वत. याला माल्यवान असेही म्हणतात. त्याच्यापासून अनेक नद्या निघाल्या आहेत, असे रामायणात म्हटले आहे (अरण्य. ३०.२१). सुग्रीवाच्या राज्याभिषेकानंतर रामलक्ष्मण या पर्वतावर वास्तव्याला गेले होते.

**प्रहसन** एक नाटचप्रकार. यात हलक्या दर्जाच्या व निंद्य पात्रांची कविकल्पित कथा नाटचरूपाने प्रदर्शित केलेली असते. हास्य हा प्रहसनाचा प्रधान रस असतो. प्रहसनात दंभस्फोट असतो व विक्षिप्त दिसणाऱ्या आचारावर विनोदगर्भ टीका असते. तपस्वी, संन्यासी किंवा ब्राह्मण यांपैकी कोणीतरी त्याचा नायक असतो. भाण या नाटचप्रकाराशी प्रहसनाचे साम्य आहे, असे धनंजयाने म्हटले असून, ते एकांकी असते, असे शारदातनयाने म्हटले आहे.

भरताने प्रहसनाचे शुद्ध व संकीर्ण असे दोन भेद केले आहेत. शुद्ध प्रहसनात विविध जातीचे लोक आपापली भाषा बोलताना व आपापली कार्ये करताना दिसतात; तर संकीर्ण प्रहसनात वेश्या, दास-दासी, वर्षधर, विट, धूर्त, इ. लोक वावरताना दिसतात. साहित्यदर्पणात विकृत नावाचा तिसराही एक प्रकार सांगितला आहे. कंदर्पकेली, लटकमेलक, मत्तविलास, भगवदज्जुकीय, धूर्तसमागम, हास्यार्णव अशी काही प्राचीन प्रहसने प्रसिद्ध आहेत. प्राचीन प्रहसनांत विशुद्ध हास्यनिर्मिती केलेली असते. त्यात अश्लीलता आढळत नाही. मध्ययुगीन प्रहसनांत मात्र अश्लीलता असते. ती तत्कालीन विकृत व विलासी समाजजीवनाची पडछाया होय.

व्याजोक्तिपर, विनोदी व उपहासगर्भ अशा लहानशा नाटकाला सांप्रत प्रहसन असे म्हणतात. [ सं. सा. वि.; सं. ना. सौं.; सं. सा. इ.; हि. सा. को.; श. क. ]

**प्रज्ञप्ती** एक देवता. ही जैनांची विद्यादेवी आहे. ही मोरावर बसते आणि शक्ती धारण करते. [ जै. इ. ]

**प्रज्ञाकर गुप्त** (इ. स. ७०० चा सुमार) एक बौद्ध नयायिक व कवी. धर्मकीर्तींच्या शिष्यपरंपरेत याची गणना करतात. याने प्रमाणवार्तिकातील स्वार्थानुमान हा भाग सोडून अन्य तीन भागांवर विस्तृत भाष्य लिहिले आहे. याचे एकदोन ग्रंथ पद्यात असून, त्यांतील कित्येक पदे शैलीच्या दृष्टीने श्रेष्ठ दर्जाची आहेत. हा नालदा विद्यापीठात आचार्य होता. गद्यपद्यमिश्रित ग्रंथ लिहिण्याची पद्धती याने सुरू केली, असे पंडितांचे अनुमान आहे. उदयनाचार्य, पार्थसारथी मिश्र, इ. पंडितांना याच्या शैलीचा मोह पडावा इतकी ती प्रभावी होती, असे अनेकांचे मत आहे. [ पु. त. नि. ]

**प्रज्ञापारमिता** एक बौद्ध देवता. महायान पंथाचा प्रज्ञापारमिता नावाचा एक ग्रंथही आहे. त्याचे साकार झालेले मानवी रूप म्हणजेच ही देवता होय. या ग्रंथातील गूढ तत्त्वज्ञान बुद्धाच्या काळातील लोकांना समजत नव्हते, म्हणून बुद्धाने हा ग्रंथ नाग लोकाच्या स्वाधीन केला होता आणि नागलोकात तो सुरक्षित राहिला होता. पुढे नागार्जुनाने इ. स. च्या दुसऱ्या शतकात तो ग्रंथ नागलोकातून परत आणला, अशी आख्यायिका बौद्ध साहित्यात आहे.



प्रज्ञापारमिता

ही देवता बौद्ध लोकांना अत्यंत प्रिय होती आणि तिची उपासना केल्यामुळे बुद्धी व ज्ञान यांची प्राप्ती होते, अशी त्यांची श्रद्धा होती. साधनमालेत तिच्या उपासनेविषयी नऊ साधना सांगितलेल्या आहेत. त्यांतील दोन साधनांत तिला अक्षोभ्याच्या कुलातली मानलेली आहे. एका साधनेत तिचे वर्णन पुढीलप्रमाणे केले आहे – शुभ्रवर्ण, द्विभुज, सुंदर, वज्रपर्यंक अवस्थेत श्वेतपद्मावर बसलेली, उजव्या हाती रक्तकमल, डाव्या हातात प्रज्ञापारमिता ग्रंथ, सर्वालंकारविभूषित व मस्तकी अक्षोभ्याची

प्रतिमा धारण करणारी. अशा देवतेचे स्तवन करावे.

दुसऱ्या साधनेत वर्णिलेली देवता पीतवर्ण असून, तिचे हात व्याख्यानमुद्रा दर्शवीत आहेत. तिच्या डाव्या बाजूला एका कमळावर प्रज्ञापारमिता ग्रंथ आहे. इतर बाबतीत तिचे रूप पहिल्या प्रज्ञापारमितेप्रमाणेच आहे.

निष्पन्नयोगावलीत प्रज्ञापारमितेचे जे ध्यान वर्णिले आहे, ते दिव्य प्रज्ञेचे रूप होय. त्यात ती पीतवर्ण व चतुर्भुज असून, कमलावरील पुस्तक हे तिचे अभिज्ञानचिन्ह आहे. दोन हातांनी ती धर्मचक्रमुद्रा दर्शवीत आहे. तिच्या उजव्या हातात चिंतामणिध्वज आहे. तिचे पौराणिक सरस्वतीशी साधर्म्य आहे.

या देवतेच्या मूर्ती तिबेट व चीन या देशांत आढळतात. जावा प्रदेशात सिंगसारी येथे पीत प्रज्ञापारमितेची द्विभुज मूर्ती आहे. ती इ. स. च्या १२ व्या किंवा १३ व्या शतकातील असावी, असे पंडितांचे आहे. ती मूर्ती जगातील सर्वश्रेष्ठ मूर्ती गणली जाते. [ गॉं. नॉं. बु.; इं. बु. इ.; आजकल – वार्षिक अंक, डिसेंबर १९५६ ]

## प्रज्ञोपाय

तांत्रिक बौद्ध साहित्यातील एक कल्पना. तांत्रिक बौद्धांच्या मते प्रज्ञा आणि उपाय यांचा उचित संयोग हा सिद्धी प्राप्त करण्याचा मार्ग आहे. प्रज्ञा म्हणजे शून्यता व उपाय म्हणजे करुणा होय. मोक्षप्राप्तीसाठी या दोन्ही गोष्टी एकदम साधाव्या लागतात. त्या दोन्ही दिसायला भिन्न असल्या, तरी ज्योत व ज्योतीची प्रभा यांच्यासारखीच त्यांची अभेदातील भिन्नता आहे.

अद्वयवज्रसंग्रह या वज्रयानपंथाच्या ग्रंथात प्रज्ञा म्हणजे शक्ती व उपाय म्हणजे शिव असे म्हटले असून, या दोहोंच्या संयोगातून उत्पन्न होणाऱ्या तत्त्वालाच अद्‌भुतसुख असे म्हटले आहे. शैवांचे शिव–शक्ती (अर्धनारीश्वर) म्हणजेच बौद्धांचे प्रज्ञोपाय होत. [ तां. बौ. सा. सा. ]

## प्रांगण

घरापुढील मोकळी जागा. ही जागा दगडगोटे वेचून टाकून व चोपून समतळ करतात. नंतर ती शेणाने सारवतात. रोज सकाळी हे प्रांगण झाडण्याची पद्धत आहे. प्रांगणातच एका बाजूला तुळशीवृंदावन असते. तसेच प्रांगणाच्या काही भागात फुलझाडे लावलेली असतात. कोकणातील घरांपुढची प्रांगणे ही वैशिष्टचपूर्ण असतात. ती अत्यंत स्वच्छ व नितळ असतात. त्यांच्या एका बाजूला केळी, अळू, इ. झाडे लावलेली असतात. दर वर्षी पावसाळा संपल्यावर ही प्रांगणे पुन्हा चोपून नीट करतात. उन्हाळ्यात त्यांच्यावर मांडव घालतात व बसण्यासाठी त्यांचा उपयोग करतात.

## प्राकार

गावाच्या संरक्षणासाठी गावाभोवती बांधलेली मोठी भिंत अथवा तट म्हणजे प्राकार होय. शत्रू पासून गावाचे संरक्षण व्हावे म्हणून प्राचीन काळी गावाभोवती मोठी भिंत बांधीत. या भिंतीची उंची नऊ हातांपासून वीस हातांपर्यंत असे. वीस हातांच्यावर प्राकार उभारू नये, असे सांगितले आहे. प्राकाराभोवती खोल खंदक खणलेला असे. त्याला परिखा म्हणत. परिखा पाण्याने भरलेली असे व तिच्यात कमळे उगवलेली असत. तटांना जाण्यायेण्याकरिता दरवाजे केलेले असत. या दरवाज्याबाहेर आणखी एक शोभिवंत दरवाजा असे, त्याला तोरण किंवा गोपुर म्हणत. जेवढा भाग प्राकाराने व्याप्त असे, तेवढ्याला प्राकारीय देश म्हणत. हे प्राकार तीन प्रकारचे असत–

(१) **पांसुप्राकार** – हा मातीचा बनवीत. महाभारतात व शिल्पशास्त्रात यालाच मृद्‌दुर्ग म्हटले आहे. पुढे याला धूलकोट असे म्हणू लागले.

(२) **ऐष्टकप्राकार** – हा विटांचा बनवीत. या विटा विशिष्ट प्रकारच्या बनवलेल्या असत.

(३) **प्रस्तरप्राकार** – यात मुख्यत्वे दगडांचा उपयोग करीत. पांड्य राजांच्या मदुरा या राजधानीचा प्राकार दगडांचा होता. गाव किंवा राजधानी यांच्या प्रमाणेच मंदिरा भोवतीही प्राकार बांधीत. प्रारंभी हा प्राकार लाकडी अथवा बांबूचा असे. पुढे तो दगडी बांधू लागले. देवस्थानाभोवतीचे असे प्राकार आजही अनेक ठिकाणी दिसतात.

इंद्रप्रस्थ, द्वारका, मथुरा, अवंती, मदुरा व कांची ही सारी नगरे प्राकारवेष्टित असल्याचे उल्लेख मिळतात. पाटलिपुत्राला तीन प्राकारांचा वेढा होता; तर वैशाली नगराभोवती चार प्राकार होते. दोन प्राकारांमध्ये १२ ते २४ हातांचे अंतर ठेवीत. शत्रूला ओलांडता येणार नाहीत इतके ते उंच बांधलेले असत. मधल्या खंदकात मुद्दाम काटेरी झुडपे व वेली वाढवीत. त्यामुळे शत्रूला तो पार करणे कठिण होई. शत्रूवर मारा करण्यासाठी व त्याला परतवून लावण्यासाठी प्राकाराच्या भिंतीवर हल्ल्याची साधने ठेवलेली असत. इंद्रप्रस्थ आणि हस्तिनापूर यांच्या प्राकारावर शतघ्नी (तोफ) सारखी यंत्रे ठेवलेली असत, असे उल्लेख मिळतात. [ प्रा. भा. न. संयुक्त राजस्थान ऑक्टो. नोव्हे १९५७ ]

## प्राकृत भाषा

भारतीय आर्य भाषांचा एक वर्ग. या प्राकृत भाषांच्या तीन अवस्था दिसून येतात. वैदिक युगात वेदांतील साहित्यिक भाषेहून निराळ्या अशा ज्या बोलभाषा आर्य लोक व्यवहारात वापरीत होते, त्या प्राचीन प्राकृत भाषा होत. सनपूर्व ६ व्या शतकानंतर त्या प्राकृत भाषांमध्ये वाङ्मय निर्माण होऊ लागले. इ. स. ६०० पर्यंतच्या

काळातील विपुल प्राकृत साहित्य उपलब्ध आहे. त्या साहित्यिक प्राकृत भाषा, ही दुसरी मध्ययुगीन अवस्था होय. त्यानंतर त्या भाषांचा विकास थांबला. पण त्या भाषांचे अनेक अपभ्रंश निर्माण झाले व त्यातूनच कालांतराने निरनिराळ्या प्रादेशिक भाषा उगम पावल्या. ही प्राकृत भाषांची तिसरी अवस्था होय.

संस्कृत भाषेपासून प्राकृत भाषा उगम पावल्या, अशी कल्पना पूर्वी प्रचलित होती. मध्ययुगीन व्याकरणकारांनी प्राकृताची व्याख्या तशी केली आहे– 'प्रकृतिः संस्कृतम्। तत्र भवं तत आगतं वा प्राकृतम्।' = प्रकृती म्हणजे संस्कृत. तिच्या ठिकाणी उत्पन्न झालेले किंवा तिच्यापासून आलेले ते प्राकृत होय. असे प्राकृत व्याकरणाच्या आरंभीच म्हटले आहे. मार्कंडेय, धनिक, इ. पंडितांनी अशाच प्रकारची व्याख्या दिली आहे. प्राकृतातील तत्सम व तद्भव शब्द संस्कृताप्रमाणे असले, तरी तिच्यात देशज शब्द कुठून आले, या प्रश्नाचा उलगडा वरील व्याख्येवरून होत नाही. त्यामुळे आधुनिक भाषाशास्त्रज्ञांना ती व्याख्या मान्य नाही. साहित्यिक भाषा व्याकरणाच्या नियमांनी बद्ध असते, तशी साधारण लोकांची बोलभाषा नसते. नमिसाधूने सामान्य लोकांच्या बोलभाषांना प्राकृत हे नाव दिले आहे. 'प्रकृत्या स्वभावेन सिद्धं प्राकृतम्' = प्रकृतीने म्हणजे स्वभावाने सिद्ध ते प्राकृत किंवा 'प्रकृतीनां साधारणजनानामिदं प्राकृतम्।' प्रकृती म्हणजे सामान्य जन. त्यांची भाषा ती प्राकृत, या व्याख्या भाषाशास्त्राच्या दृष्टीने योग्य ठरतात. वैदिक भाषेतील काही विशेष पाणिनीय संस्कृतात सापडत नाहीत; पण ते प्राकृत भाषांत सापडतात. त्यावरून प्राकृत भाषांचा प्रवाह वैदिक कालापासून किंवा त्यापूर्वीपासूनही स्वतंत्रपणे चालू असला पाहिजे.

वैदिक भाषेत विपुल साहित्य निर्माण झाले व त्यातूनच पाणिनीय संस्कृत भाषेला निश्चित स्वरूप मिळाले. पण प्राचीन प्राकृत भाषा त्या काळी केवळ बोली या स्वरूपात असल्यामुळे त्यांच्यांत नेहमी परिवर्तन होत राहिले. सनपूर्व ६ व्या शतकात गौतम बुद्धाने मागधी भाषेत व महावीराने अर्धमागधी भाषेत धर्मोपदेश केला आणि त्यांच्या शिष्यांनी तो उपदेश ग्रंथबद्ध केला. त्यातूनच प्राकृत साहित्य निर्माण झाले. मागधी या प्राकृत भाषेलाच कालांतराने पाली हे नाव मिळाले. सम्राट अशोक व सम्राट खारवेल यांचे शिलालेख प्राकृत भाषेतले आहेत. आंध्र–सातवाहन राजांनीही प्राकृत भाषेला आश्रय दिल्यामुळे प्राकृताचा पुष्कळ प्रसार व विकास झाला. हा विकास इ. स. च्या ६ व्या शतकापर्यंत चालू होता.

प्राकृत भाषांचे सुमारे २१ प्रकार होते, असे म्हणतात. त्यांतील महाराष्ट्री, शौरसेनी, मागधी, पैशाची, आवंतिका, प्राच्या, दाक्षिणात्या, बाल्हिका इ. प्रकार मुख्य होत. सर्व प्राकृत भाषांत महाराष्ट्री ही भाषा मुख्य मानली जाते. वररुचीने आपल्या प्राकृतप्रकाशात प्राकृत या नावानेच तिचे विवेचन केले आहे. प्राकृत व्याकरणकारांनी महाराष्ट्रीचेच व्याकरण सांगून, इतर प्राकृतांच्या विशेष खुणा तेवढ्या सांगितल्या आहेत. दंडीने महाराष्ट्रीचे वर्णन केले आहे ते असे –

**महाराष्ट्राश्रयां भाषां प्रकृष्टं प्राकृतं विदुः।**
**सागरः सूक्तिरत्नानां सेतुबन्धादि यन्मयम्॥**

अर्थ – महाराष्ट्रातील भाषेला उत्तम प्राकृत असे म्हणतात. ती सूक्तिरत्नांचा सागर आहे व तिच्यात सेतुबंधादी काव्ये निर्माण झाली आहेत.

भरताच्या नाट्यशास्त्रात भिन्न भिन्न प्राकृत भाषांचा नाटकीय उपयोग सांगितला आहे. अतःपुरातील व्यक्तींची भाषा मागधी; चेट, राजपुत्र व व्यापारी यांची अर्धमागधी; विदूषकांची प्राच्या; राजस्त्रिया व त्यांच्या सख्या यांची शौरसेनी; सैनिक व नागरिक यांची दाक्षिणात्या व खर, शबर, शक, इ. लोकांची बाल्हिका असावी, असे तो सांगतो. याव्यतिरिक्त खुशमस्कऱ्यांची आवंतिकी, कोळसेविक्यांची पैशाची, शकारांची शकारी, गोपालांची आभीरी व मोळीविक्यांची शाबरी या भाषांचाही उपयोग संस्कृत नाटकात केला जात असे. समाजातील भिन्न भिन्न घटक या विविध प्राकृत भाषा बोलत. त्यांतली महाराष्ट्री ही साहित्यिक भाषा होती.

प्राकृत भाषांचा कल सरळपणाकडे दिसतो. संस्कृतमधील ऋ, ॠ, लृ, ऐं, औ हे स्वर प्राकृतांत नाहीत. संस्कृतामधील काही व्यंजनांची रूपेही प्राकृतांत वेगळी झाली आहेत. त्यांत संस्कृतातील मध्यवर्ती क, ग, च, ज, त, द, प, य, व यांचा प्रायः लोप होतो; ख, घ, थ, ध, फ, भ चा ह होतो. प चा ब आणि य चा ज होतो. संस्कृतामधील श, ष, आणि स या तीन वर्णांच्या ऐवजी श किंवा स हा एकच वर्ण प्राकृत भाषांत येतो. संस्कृतामधील संयुक्त व्यंजनांची रूपेही प्राकृतात सोपी होतात. उदा० मर्यादा → मरियादा; क्लेश → किलेश, स्थूल → थूल, स्फटिक → फटिक, इत्यादी.

संस्कृतातील पदरचनाही प्राकृतात सरळ झाली आहे. ही सरलता शब्दरूपे व धातुरूपे या दोन्हींत दिसून येते. संस्कृतात तीन वचने आहेत; पण प्राकृतात एकवचन व बहुवचन ही दोनच वचने आहेत. संस्कृतातील हलंत (व्यजनान्त) शब्द प्राकृतात अजंत (स्वरान्त) झाले आहेत. संस्कृतात आठ विभक्ती आहेत, पण प्राकृतात चतुर्थी नसून, ती षष्ठीत समाविष्ट झाली आहे. संस्कृतात व्यंजनान्त धातू आहेत, पण प्राकृतात सर्व धातू स्वरान्त आहेत.

प्राकृत भाषांमध्ये विपुल साहित्य निर्माण झाल्यानंतर अनेक पंडितांनी प्राकृत व्याकरणग्रंथ तयार केले. त्यामुळे त्या भाषा नियमबद्ध झाल्या आणि सर्वसाधारण लोकांशी त्यांचा संबंध दुरावला. मात्र त्यांचे अपभ्रंश, बोलभाषा म्हणून प्रचलित राहिले. त्या अपभ्रंश बोलभाषांतूनच कालांतराने हिंदी, पंजाबी, राजस्थानी, बंगाली, सिंधी, गुजराती, मराठी इ. देशी भाषांचा उदय झाला.

कालांतराने अपभ्रंश भाषांतही साहित्यनिर्मिती सुरू झाली. अपभ्रंश भाषांचे पुष्कळ प्रकार असले तरी हेमचंद्राने साहित्य-निबद्ध अशी एकच सामान्य अपभ्रंश भाषा मानून, तिचे व्याकरण दिले आहे. ती नागर अपभ्रंश या नावाने प्रसिद्ध आहे.

संस्कृत व प्राकृत या भाषांत सव्यसाचित्वाने काव्यविहार करणाऱ्या राजशेखर नामक कवीने प्राकृत भाषांचा गौरव पुढील-प्रमाणे केला आहे (बालरामायण १.११)—

**गिरः श्रव्या दिव्याः प्रकृतिमधुराः प्राकृतगिरः।**
**सुभव्योऽपभ्रंशः सरसरचनं भूतवचनम् ।।**

अर्थ—गीर्वाणवाणी श्रुतिमनोहर, प्राकृत भाषा स्वभावाने मधुर, अपभ्रंश भाषा भव्य आणि भूतभाषा रसपूर्ण आहे.

अशाच प्रकारे हाल वगैरे कवींनीही प्राकृत भाषांचे गुणगान केले आहे. संस्कृत शब्दांचे लावण्य प्राकृत छायेने अधिक खुलते. नवीन अर्थाची निष्पत्ती व त्याला अनुसरून सुंदर रचना या दोहोंनी युक्त अशी प्रबंधसंपत्ती सृष्टीच्या प्रारंभापासून प्राकृत भाषांमध्ये निर्माण झाली आहे, असे वाक्पतिराज म्हणतो. संस्कृत भाषा कर्कश, तर प्राकृत भाषा सुकुमार असते; तसेच प्राकृत काव्य सुंदर, मधुर व शृंगाररसपूर्ण असल्यामुळे ते युवतिजनांना संस्कृतपेक्षा अधिक प्रिय असते, असेही काही काव्य-समीक्षकांचे म्हणणे आहे. [ म. भा. उ. वि.; हिं. सा. बृ. इ.; भा. भा. स.; प्रा. सा. इ.; हिं. वि. को.; प्रा. भा. व्या. ]

## प्राकृत प्रलय

ब्रह्मदेवाचे दोन परार्ध वर्षांचे आयुष्य समाप्त होताच जो विश्वव्यापी प्रलय होतो, त्याला प्राकृत प्रलय असे म्हणतात. पंचमहाभूतात्मक समग्र ब्रह्मांड या प्रलयाच्या वेळी नाश पावते. सर्व सृष्टी प्रकृतीमध्ये विलीन होते, म्हणून याला प्राकृत प्रलय हे नाव मिळाले आहे (भागवत पुराण १२.४.५).

भागवतात या प्रलयाचे अत्यंत रोमांचकारी वर्णन केलेले आहे, ते असे — प्रलयकाल सुरू झाल्यानंतर शंभर वर्षे मेघ जलवृष्टी करीत नाहीत. त्यामुळे अन्न उपजत नाही आणि सर्व प्राणी, जीवजंतू व वनस्पती नष्ट होतात. मग पातालातून वर उफाळणाऱ्या अग्नीच्या ज्वाला आणि आकाशातून येणारे तप्त किरण यांमुळे पृथ्वी भाजून निघते. अत्यंत वेगवान वायू सारखा घोंघावत असतो आणि आकाश धुराने व धूलिकणांनी भरून जाते. त्यानंतर शेकडो वर्षे भयंकर गर्जना करणाऱ्या मेघांतून प्रचंड जलवृष्टी होते आणि सर्व जगाचा एक महार्णव बनतो. त्या प्रलयात भूमीचे जलात, जलाचे तेजात, तेजाचे वायूत, वायूचे आकाशात, आकाशाचे अहंकारात व अहंकाराचे महत्तत्वात परिवर्तन होते आणि महत्तत्त्व प्रकृतीत लीन होते. त्या वेळी काळाच्या प्रभावाने प्रकृती व पुरुष या दोघांचीही शक्ती क्षीण होते.

काही ग्रंथात या प्रलयालाच महाप्रलय म्हटले आहे. **पाहा**—प्रलय. [ पु. वि.; तां. वा. शा. दृ. ]

## प्रागैतिहासिक युग

लिखित इतिहासाच्या पूर्वीच्या काळाला प्रागैतिहासिक युग म्हणतात. त्या युगातील मानवी जीवनाची व परिस्थितीची माहिती केवळ तत्कालीन अवशेषांवरून अनुमानपूर्वक मिळवावी लागते. अत्यंत प्राचीन काळातील आयुधे, अवजारे, खापरे, इ. वस्तू जमिनीत किंवा नद्यांच्या पात्रांत सापडतात. त्यांवरून प्रागैतिहासिक युगाचे भिन्न कालखंड ठरविण्यात आले आहेत. अगदी रानटी अवस्थेतला मानव ज्या कालात जड दगडी हत्यारे वापरीत होता, त्या काळाला प्राचीन पाषाणयुग म्हणतात. मनुष्य थोडा सुधारल्यानंतर दगडाची लहान, तीक्ष्ण हत्यारे बनवू लागला, ते नव पाषाणयुग होय. त्यानंतर ताम्रयुग, कांस्ययुग व लोहयुग हे कालखंड येतात. भारताच्या विकासक्रमात या सर्व अवस्था क्रमाने होऊन गेल्या आहेत. त्यांत अग्नीचा शोध, शेतीचा आरंभ, पशुपालन, चाकाचा शोध, मातीची भांडी बनवणे, त्यांवर रंगीत चित्र काढणे, अशी प्रगती दिसून येते.

प्रारंभी मनुष्य मृत देह जंगलात तसाच टाकून देत असे. नव पाषाणयुगात मृत देह पुरण्याची चाल सुरू झाली. काही ठिकाणी मातीच्या रांजणात शव ठेवलेले आढळते; तर काही ठिकाणी मोठाले शिलाखंड रचून त्यांत शव ठेवीत, असे दिसून आले आहे. हडप्पा व मोहंजोदडो येथील उत्खननामुळे सिंधुसंस्कृतीचे असंख्य अवशेष सापडले आहेत. त्या काळातील इमारतींचे भग्नावशेष व नाना प्रकारच्या वस्तूही तिथे मिळाल्या आहेत. त्यामुळे त्या काळातील शेती, अन्नधान्य, वस्त्रे, इतर व्यवसाय, धार्मिक आचार, देवता, कला, यांविषयी पुष्कळ माहिती प्रकाशात आली आहे. वेदांतील माहितीशी ती मिळती जुळती आहे.

प्रागैतिहासिक युगात भारतात जे लोक वसले होते, त्यांच्या काही कवट्या निरनिराळ्या ठिकाणी सापडल्या आहेत. त्यांचा अभ्यास करून विद्वानांनी त्या काळातील भिन्न मानववंशां-

संबंधी काही अनुमाने केली आहेत व त्यांच्या बोलभाषांचाही शोध लावला आहे. [ हिन्दू सभ्यता ]

**प्राग्ज्योतिषपूर** कामरूप देशातील मुख्य नगर. हेमचंद्राच्या अभिधानचिंतामणीमध्ये कामरूप देशालाच प्राग्ज्योतिष म्हटले आहे. पूर्वी या नगरात ज्योतिषशास्त्राचे केंद्र होते, म्हणून याला प्राग्ज्योतिषपूर हे नाव मिळाले, असे म्हणतात. शाकद्वीपी ब्राह्मण ज्योतिषाचे चांगले जाणकार होते. ते इथे आले, तेव्हापासून या नगराला प्राग्ज्योतिषपूर हे नाव मिळाले असावे, असेही अनुमान करतात.

महाभारत व रामायण या ग्रंथांत या नगराचा व देशाचा उल्लेख आहे. या देशाच्या सीमेवर किरात व चीन देश होते, असे महाभारतावरून कळते. कामरूपाचा राजा भगदत्त याने भारतीय युद्धात भाग घेतला होता. त्याच्या सैन्यात चिनी व किरात सैनिक होते (सभा. २६.८–९). वराहमिहिराने बृहत्संहितेत प्राग्ज्योतिषाचा उल्लेख पूर्वेकडील देश म्हणून केला आहे. राजशेखराच्या काव्यमीमांसेतही तसाच उल्लेख आढळतो.

प्राग्ज्योतिषपुरालाच कामाख्या असे दुसरे नाव होते, असे कालिका पुराणावरून कळते. ते नगर सुंदर असून, तिथे नरक राजा राज्य करीत होता, असेही त्यात वर्णन आहे. सांप्रतचे गौहाटी शहर त्याच जागी वसले आहे. त्याला प्राग्ज्योतिषपूर हे विकल्पनाम अद्यापही आहे. श्रीकृष्णाने या नगरात नरकासुराचा वध करून त्याच्या बंदिशाळेतील हजारो स्त्रियांना सोडविले, अशी कथा आहे.

डॉ. वासुदेवशरण अग्रवाल यांच्या मते प्राग्ज्योतिष हे नाव प्राग्ज्योतिक या शब्दावरून आले आहे. प्रागज्योतिक् शब्दाचा अर्थ पूर्वेकडील मार्ग किंवा पर्वतावरील मार्ग ( खिंड ) असा आहे. पूर्वी असे दोन मार्ग होते. त्यांपैकी एक वायव्येला होता. त्याला उत्तरज्योतिक असे नाव होते. आणि प्राग्ज्योतिक हा पूर्वेकडचा मार्ग होय. तो पत्कोई डोंगरावरून जात असे. सनपूर्व पाचव्या शतकात प्राग्ज्योतिषाचा एक जनपद असा उल्लेख केलेला आढळतो.

पण प्रा. वि. ब. आठवले यांनी नव्याने संशोधन करून असे प्रतिपादले आहे, की काठियावाडात जामनगरपासून ६० मैलांवर गोप नावाचे एक खेडेगाव आहे, त्याला पूर्वी प्राग्ज्योतिषपूर म्हणत आणि तेच नरकासुराचे नगर होय. भगदत्ताचा पुत्र वज्रदत्त याने तिथून कामरूपात जाऊन त्या प्रदेशाला आपल्या मूळ शहराचे प्राग्ज्योतिष हे नाव दिले. [ नवभारत, फेब्रु. १९४८; प्रा. भा. न. न.; हि. जॉ. ए. इं.; डॉ. वासुदेव शरण अग्रवाल याचे अध्यक्षीय भाषण – ऑ. इं. ओ. कॉ., १९६५ ]

**प्राग्वंश** एक यज्ञीय मंडप. ज्या मंडपाच्या आढयाला पूर्व-पश्चिम असा बांबू लावलेला असतो, त्याला प्राग्वंश असे म्हणतात. या प्राग्वंश मंडपाची पूर्व–पश्चिम लांबी सोळा प्रक्रम असते (१५ अंगुळे = १ पद; ३ पदे = १ प्रक्रम). याची रुंदी बारा प्रक्रम असते. याला चारही बाजूंना मधोमध चौवीस अंगुळे रुंदीची दारे ठेवतात. प्रत्येक दाराच्या दोन्ही बाजूंना एक एक आणि मंडपाच्या चारी कोपऱ्यांत एक एक असे खांब रोवतात. पूर्व बाजूचे खांब थोडे उंच असतात. कारण प्राग्वंश मंडप पूर्वेकडे थोडा उंच व पश्चिमेकडे थोडा उतरता असावा लागतो. ताडपत्र्या टाकून किंवा अन्य काही साधनांनी तो मंडप झाकून टाकतात. मंडपाच्या भोवती कूड घालतात. चारही बाजूंना एक एक एक गवाक्ष ठेवतात. ईशान्येला पाचवा झरोका असतो. यज्ञप्रसंगी यजमानांच्या प्रमुख अग्नीची या मंडपात स्थापना करतात. [ म. ज्ञा. को. खंड २, वेदविद्या ]

**प्राचीनावीती** जानवे उजव्या खांद्यावरून डाव्या खांद्याखाली घेणे, याला प्राचीनावीती किंवा अपसव्य असे म्हणतात. श्राद्धप्रसंगी अपसव्याने पितरांची पूजा करायची असते.

आर्य लोकांतला एक वर्ग उजव्या खांद्यावरून डाव्या खांद्याखाली जानवे घेणारा होता. अशा या लोकांना प्राचीनावीती म्हणत. परंतु लो. टिळकांच्या मते हा शब्द जानव्याला उद्देशून नसून उपरण्याला उद्देशून आहे. तैत्तिरीय संहितेत निवीत, प्राचीनावीत व उपवीत असे तीन शब्द आलेले आहेत. सायणाचार्यांच्या मते हे शब्द जानवे किंवा वस्त्र कोणत्या वेळेला कसे घ्यावे हे सुचवितात. [ सु. वि. को. ]

**प्राजापत्य कालगणना** एक वैदिक कालगणनापद्धती. पूर्वी चंद्राला प्रजापती म्हणत व चांद्र मासातील शुक्ल पक्ष हा प्रजापतीचा अह (दिवस) व कृष्ण पक्ष ही रात्र धरून कालगणना करीत. प्रजापतीचा अह सुमारे चौदा दिवसांचा होता. त्याची बारा वर्षे म्हणजे १६८ दिवस होत. यासाठी तीन दिवसांचे तीन, पंधरा दिवसांचे तीन, सतरा दिवसांचे तीन व एकवीस दिवसांचे तीन, असे यज्ञ केल्याने प्रजापतीच्या बारा वर्षांचे मापन होत असे, असा उल्लेख तांड्य ब्राह्मणात आलेला आहे. ज्या वेळी प्रजापतीच्या सहस्र संवत्सरांचे मापन करायचे असे, त्या वेळी हेच यज्ञ प्रत्येकी २५० वेळा केले जात. कालांतराने ही पद्धती गैरसोयीची वाटू लागल्याने वैदिकांना ती सोडून द्यावी लागली असावी. [ वे. का स. ]

**प्राजापत्य प्रायश्चित्त** एक कृच्छ्र प्रायश्चित्त. हे प्रायश्चित्त बारा दिवसांचे असते. त्यात पहिले तीन दिवस दुपारी एकदाच भोजन करतात, नंतर पुढचे तीन दिवस सायंकाळी जेवतात, त्यापुढचे तीन दिवस अयाचित वृत्तीने राहतात आणि अखेरचे तीन दिवस उपवास करतात.

**प्राजापत्य व्रत** एक काम्य व्रत. यात व्रतधारी व्यक्तीने प्रथम बारा दिवसांचे कृच्छ्र प्रायश्चित्त करायचे असते. हाच या व्रताचा प्रमुख विधी आहे. व्रताच्या उद्यापनाच्या वेळी एक गाय दान देतात व यथाशक्ति ब्राह्मण-भोजन घालतात. फल – शिवलोकप्राप्ती. [ हि. ध.; व्र. प. ]

**प्राण** पिंड – ब्रह्मांडातले एक मूलतत्त्व. प्राणाची व्याख्या अशी – 'शरीरान्तःसञ्चारी वायुः' = शरीराच्या आत संचार करणारा वायू म्हणजे प्राण होय. याची दुसरी व्याख्या अशी – 'मुखनासिकाभ्यां निष्क्रमणप्रवेशनात् प्राणः' = मुख आणि नासिका यांनी बाहेर जाणे व आत येणे या गोष्टी करणारे तत्त्व, ते प्राण होय.

प्राण शब्द ऋग्वेदात आला आहे (१·६६·१); पण तिथे त्याचा अर्थ स्पष्ट नाही. प्राण शब्दाचा खरा अर्थ श्वासोच्छ्वास असा आहे व तो उपनिषदांतून सांगितलेला आहे. पुढे उपनिषदांच्या कालातच प्राण शब्दाच्या अर्थाची व्याप्ती वाढली व तो विश्वाच्या एकात्मतेचे प्रतीक ठरला.

कौषीतकी उपनिषदातल्या इंद्र–प्रतर्दनाच्या संवादात पहिल्या प्रथम प्राण हे जीवनतत्त्व असल्याचे सांगितले आहे. 'प्राणो ब्रह्मेति ह स्माह कौषीतकी' = प्राण हाच ब्रह्म (जीवनतत्त्व) आहे, असे कौषीतकीने सांगितले आहे (२·१). श्वासोच्छ्वास म्हणजे मनुष्याचे जीवनसर्वस्व होय, हे समजल्यावर जीवनतत्त्वाला व त्या अनुरोधाने विश्वातल्या जीवनतत्त्वालाही प्राण ही संज्ञा प्राप्त झाली. व्यक्तीचे किंवा विश्वाचे सामर्थ्य असा अर्थ पुढे त्या शब्दाला आला. छांदोग्योपनिषदात विश्वाचा मूलाधार कोणता असा प्रश्न उषस्ती चाक्रायणाला विचारला असता, त्याने पुढील उत्तर दिले –

**प्राण इति होवाच सर्वाणि ह वा इमानि भूतानि**
**प्राणमेवाभिसंविशन्ति प्राणमभ्युज्जिहते ।**

(छांदो. १.११.५)

अर्थ – प्राण हीच विश्वाधार वस्तू होय. कारण सर्व वस्तू मूलतः प्राणापासून निर्माण होऊन शेवटी प्राणातच लीन होतात.

प्राण हाच सर्वांचा संवर्ग म्हणजे अंत आहे. कारण मनुष्य निजतो तेव्हा त्याची वाचा प्राणात लीन होते; डोळे, कान व मन ही सर्व प्राणमय होतात, असेही छांदोग्यात म्हटले आहे (४·३·३). प्राणाचे श्रेष्ठत्व अशा प्रकारे प्रतीत झाल्यावर सनत्कुमाराने नारदाला म्हटले –

**अथ वा आरा नाभौ समर्पिता एवमस्मिन्प्राणे सर्वं समर्पितम् ।**

(छांदो. ७·१५·१)

अर्थ – चाकाच्या आरा ज्याप्रमाणे मध्यभागी मिळतात, त्याप्रमाणेच या जगातील सर्व वस्तू प्राणात मिळून विलीन होतात.

सर्व गतिमान वस्तू, शक्ती व तेज यांच्या मागे जी त्रिकालाबाधित प्रेरक शक्ती आहे, तिलाच प्राण असे म्हणावे. हे प्राणतत्त्व गुरुत्वाकर्षण, वीज, ग्रह–नक्षत्रांचे परिभ्रमण व सर्व चराचर जीवसृष्टी यांत भरून राहिले आहे. सर्व प्रकारच्या विविध आकारांतून आविष्कृत होणाऱ्या शक्तीचा व तेजाचा प्राण हा आत्माच होय. सर्व जीवनाला आधारभूत होणारे व जीवसृष्टीचे नियमन करणारे ते एक महान तत्त्व आहे. ते हवेत आहे; पण ते म्हणजे हवा नव्हे. आपण जे अन्न ग्रहण करतो, त्यात प्राण आहे; पण अन्नातील जो पौष्टिक अंश तो म्हणजे प्राण नव्हे. पाण्यात ते तत्त्व आहे; पण पाणी ज्या द्रव्यांनी तयार होते, ती द्रव्ये म्हणजे प्राण नव्हे. ते सूर्यप्रकाशात संचरते; पण ते म्हणजे उष्णता किंवा प्रकाशकिरण नव्हे. तर सर्व चराचर सृष्टीतील चिच्छक्ती म्हणजे प्राण होय व चराचर वस्तू या त्या चिच्छक्तीचे केवळ वाहनभूत होणारे साधन होय.

प्राण म्हणजे केवळ श्वासोच्छ्वास नव्हे, हे प्रथम लक्षात बाळगणे महत्त्वाचे आहे. जिच्यामुळे हे श्वासोच्छ्वास सुरू राहिले आहेत, त्या चालक शक्तीला प्राण अशी संज्ञा आहे. या दृश्य अथवा जड श्वासोच्छ्वासातील जे चैतन्य अथवा सूक्ष्म रूप त्याला प्राण असे म्हणतात. आपल्या विविध इंद्रियांस जी विविध प्रकारची शक्ती प्राप्त झाली आहे, तीही प्राणामुळेच होय. डोळ्यांनी पाहणे, कानांनी ऐकणे आणि मनाने विचार करणे या क्रियासुद्धा प्राणशक्तीमुळेच घडून येतात. एकंदरीत प्राण याचा अर्थ शक्ती असा समजावा. असे असले तरी शक्तीचे जे दृश्य अथवा जड रूप ते प्राण नव्हे, हे लक्षात ठेवले पाहिजे. त्या दृश्य अथवा जड रूपाचे जे अदृश्य अथवा सूक्ष्म रूप ते प्राणाचे रूप समजावे. दिसणारी हालचाल अथवा गती म्हणजे प्राण नसून, ज्यामुळे हालचाल अथवा गती उत्पन्न होते, ते कारण म्हणजे प्राण होय.

प्राणाचे श्रेष्ठत्व सिद्ध करण्यासाठी छांदोग्योपनिषदात एक गोष्ट सांगितली आहे, ती अशी –

एकदा सर्व इंद्रियांमध्ये कलह लागून सर्वात श्रेष्ठ कोण हे ठरविण्यासाठी ती प्रजापतीकडे गेली. प्रजापती त्यांना

म्हणाला, की 'ज्याच्यावाचून शरीर सामर्थ्यहीन व अमंगळ होईल ते श्रेष्ठ असे समजा.' तेव्हा त्याचा पडताळा घेण्यासाठी एकेका इंद्रियाने माणसाचे शरीर सोडून जाण्याचे ठरवले. प्रथम वाचा गेली. पुढे डोळे, कान, मन ही सर्व इद्रिये एका-मागून एक गेली. वर्षभर बाहेर राहून परत आल्यावर त्यांना दिसले, की शरीर जिवंत आहे. नंतर प्राण म्हणाला, की 'आता मी जातो.' पण त्याच्या या विचारासरशीच सर्व इंद्रि-यांत गडबड झाली. प्राण शरीर सोडून जाऊ लागताच सर्व इंद्रियेही शरीरापासून तुटून निघाली. शेवटी सर्व इंद्रियांनी एकत्र जमून प्राणाला विनवले, की 'तू आम्हांला सोडून जाऊ नकोस. तू आम्हां सर्वांहून श्रेष्ठ आहेस' (छांदो. ५·१·६–१५).

कौषीतकी उपनिषदात यापुढे जाऊन प्राण व जीव आणि प्राण व प्रज्ञा ही एकच आहेत, असे सांगितले आहे. इतकेच नव्हे; तर प्राण आणि आत्मा हेही एकच आहेत, असा त्या विषयाचा समारोप केला आहे (३·२–९). जीवनशास्त्रदृष्टच्या प्राण म्हणजे आयुष्य, मानसशास्त्रदृष्टच्या प्राण म्हणजे प्रज्ञा व वेदान्तशास्त्रदृष्टच्या प्राण म्हणजे आत्मा होय, असे उपनिष-दांतल्या प्राणविवेचनावरून कळून येईल. प्राण व आत्मा एक-रूप मानल्याने उपनिषदांतली प्राणोपासना ही आत्मोपासना ठरली आहे. तिच्यापासून पुढे दोन नैतिक कल्पना निष्पन्न झाल्या– (१) इंद्रियांची विषयप्रीती पापाला अर्थात मृत्यूला कारणीभूत होते, म्हणून प्राणधारणारूप जीवनव्यापारालाच महत्त्व द्यावे व (२) सर्वांचा प्राण तत्त्वतः एक असल्याने भूतमात्रावर दया करावी.

प्राणाला पाप स्पर्श करीत नाही; कारण तो केवळ पोष-णार्थ अन्न मागतो व इतरांना त्याचे भागीदार बनवतो. प्राण हा साम म्हणजे समतेचे तत्त्व आहे. मुंगी असो वा हत्ती असो; प्राण हा सर्वांशी एकरूप होतो.

अशा प्रकारे प्राण हा आत्मा, परब्रह्म आणि जीवनाचा मूलाधार ठरल्याने भारतीय तत्त्वचिंतकांनी त्याचा खूप अभ्यास केला आहे. योगीजनांनी प्राणाला मुख्य धरून प्राण, अपान, व्यान, उदान व समान असे त्याचे पाच प्रकार कल्पिले आहेत. योगशास्त्रात त्यांची शरीरातली स्थाने सांगितली आहेत.

या पंचप्राणांची कार्ये कोणती याविषयी पुढील श्लोक आहे–

**प्राणात् प्रणीयते प्राणी व्यानाद् व्यायच्छते तथा ।**
**गच्छत्यपानोऽधश्चैव समानो हृद्यवस्थितः ।।**
**उदानादुच्छ्वसिति प्रतिभेदाच्च भाषते ।**
**इत्येवं वायवः पञ्च चेष्टयन्तीह देहिनम् ।।**

अर्थ– प्राणाने प्राणी जिवंत राहतो, व्यानाने ओझे उचलतो, अपानाने मलमूत्रोत्सर्ग करतो, समानाने हृदयाची क्रिया चाल-वतो व उदानाने उच्छ्वास किंवा भाषण करतो. अशा प्रकारे पाच वायू, देहधारी व्यक्तीला विविध कृत्ये करायला लावतात.

या पंचप्राणांव्यतिरिक्त आणखी पाच प्राण मानले गेले आहेत, त्यांची नावे अशी– नाग, कूर्म, कृकल, देवदत्त व धनंजय.

**पाहा–** प्राणायाम. [उपनिषद्‌रहस्य; वै. सं. वि.; योगविद्या; म. भा. उ.; श. क.]

**प्राणनाथ** (१६१८–१६९४ इ. स.) एक उ. भारतीय संत व धामी पंथाचा प्रवर्तक. हा काठियावाडजवळच्या जामनगर नामक गावी जन्मला. याच्या वडिलांचे नाव केशव-दास असून, आईचे नाव धनबाई असे होते. केशवदास जाम-नगरच्या राज्यात मंत्री होते, त्यामुळे प्राणनाथाचे बालपण सुख-समृद्धीत गेले.

प्राणनाथ हे याचे मूळ नाव नव्हे. मेहेरराज हे याचे मूळ नाव व प्राणनाथ हे दीक्षानाम. वयाच्या बाराव्या वर्षी आपल्या एका भावाबरोबर तो देवचंद नामक सत्पुरुषाच्या दर्शनाला गेला. तिथे देवचंदाने त्याला विचारलेल्या प्रश्नांची उत्तरे देताना मेहेरराजाची हुशारी दिसून आली व त्यामुळे प्रसन्न होऊन देवचंदाने त्याला आपल्या पंथाची दीक्षा दिली.

पुढे लवकरच देवचंद स्वर्गवासी झाला. त्याच्या नंतर प्राण-नाथाने स्वतः गुरुगादीचा हव्यास न धरता देवचंदाचा मुलगा बिहारीलाल यालाच गुरुगादी दिली. याच वेळी प्राणनाथाचे वडील निवर्तले व त्यांच्या जागी मंत्री म्हणून प्राणनाथ काम पाहू लागला. मंत्रीपदावर असताना त्याने अनेक लोकोपयोगी कामे करवून घेतली. सरकारी काम करून उरलेल्या वेळात तो आपल्या पत्नीसह गावोगाव हिंडून धर्मप्रचार करी. परंतु त्याच्या विरोधकांनी त्याच्याविरुद्ध एकदा एक कुभांड रचून राजाचे कान फुंकले व त्यामुळे राजाची प्राणनाथावर अवकृपा होऊन त्याला तुरुंगवास घडला. प्राणनाथाला या घटनेचे वाईट वाटले. तथापि त्याला कारावासात आत्मचिंतनाला खूप वाव मिळाला. याच वेळी तो कविताही करू लागला.

कालांतराने राजाला आपली चूक कळून आल्याने त्याने प्राणनाथाला मुक्त केले. परंतु प्राणनाथ आता सर्वस्वी विरक्त झाला होता. त्याने मंत्रिपदाकडे पाठ फिरवून धर्मप्रचाराला वाहून घेतले. त्यासाठी तो दूरदूरची नगरे फिरला. धर्म-प्रचारार्थ तो अरबस्थानातही गेला.

याच वेळी औरंगजेबाने स्वधर्मप्रसारार्थ अन्यधर्मियांची छळ-णूक आरंभिली होती. त्यामुळे प्राणनाथाचे सर्वधर्मसमन्वयाकडे लक्ष वेधले. त्याने औरंगजेबाची भेट घेण्याचा वारंवार प्रयत्न केला; पण तो साधला नाही. उलट त्या प्रकरणात त्याच्या काही

शिष्यांनाच औरंगजेबाने तुरुंगात डांबले. मग प्राणनाथाने तो नाद सोडून दिला व तो एतद्देशीय हिंदू राजे व सरदार याना सर्वधर्मसमन्वयाचे आवाहन करू लागला.

धर्मप्रचाराच्या या मोहिमेत बुंदेलखंडाचा राजा छत्रसाल हा त्याचा पट्टशिष्य बनला.

यानंतर प्राणनाथाने आपली भ्रमंती थांबवली व राजा छत्रसालाच्या विनंतीवरून तो पन्ना नामक गावी राहू लागला. आता त्याचा शिष्यवृंद वाढला होता. उ. भारतात सर्वत्र त्याच्या पंथाच्या गाद्या स्थापन झाल्या होत्या. त्याच्या सर्वधर्मसमन्वयी विचारांचा मोठाच प्रचार झाला होता. अशा कृतकृत्य अवस्थेत तो पन्ना येथे स्वर्गवासी झाला.

प्राणनाथ हा तत्कालीन जगातला एक मोठा विचारवंत व प्रतिभावान कवी होता. त्याला अरबी, फारसी, हिंदी, संस्कृत, गुजराती, इ. अनेक भाषा अवगत होत्या. जगात एकच धर्म असावा व कोणी कोणाचा मत्सर न करता सुखाने जगावे, हे त्याचे ईप्सित होते व त्याच्या पूर्तीसाठीच त्याने आपले सारे जीवन खर्चिले. त्याची सर्व रचना कुलजमस्वरूप या नावाने संकलित झालेली असून, ती आजही हस्तलिखित अवस्थेतच उपलब्ध आहे. **पाहा** – धामी संप्रदाय [ हिं. सा. को. २; हिं. सं. सा.; हिं. सं. सा. बौ. प्र.; उ. भा. सं. प. ]

## प्राणप्रतिष्ठा

ज्या देवमूर्तीची किंवा प्रतीकाची पूजा किंवा उपासना करायची असेल, त्या मूर्ति–प्रतीकाच्या ठिकाणी देवत्व संचरावे, म्हणून जो विधी किंवा संस्कार करतात, त्याला प्राणप्रतिष्ठा असे म्हणतात. मूर्तीला सजीव करणे किंवा तिच्यात प्राणांचा संचार करणे, असा त्या शब्दाचा तात्त्विक अर्थ आहे. प्राणप्रतिष्ठेत आपल्या पुढचा देव हा जड नसून प्राणमय किंवा चैतन्यमय स्वरूपात आहे, तो आपल्या सर्व कर्मांचा साक्षी आहे, मनोभाव जाणणारा आहे आणि आपली अंतर्बाह्य कृत्ये स्वत:च्या शक्तीने चालवणारा आहे, असा पूजकाने अनुभव घ्यायचा असतो.

प्राणप्रतिष्ठेचा हा विधी, काही बीजे व सानुस्वार वर्णमाला यांच्या आधारे करायचा असतो. ब्रह्मा–विष्णु–महेश हे त्याचे ऋषी. ऋग्यजुस्सामाथर्व हे छंद, परा प्राणशक्ती ही देवता आं हे बीज, ऱ्हीं ही शक्ती व क्रों हे कीलक होय.

यात प्रथम आं ऱ्हीं क्रों यांचा क्रमाने उच्चार करावा व नंतर सानुस्वार अं यं रं लं वं शं षं सं हं सः यांचा उच्चार करून पूर्वीची तीन बीजे व्युत्क्रमाने उच्चारावी व देवमूर्तीच्या ठिकाणी एकेका अवयवशक्तीची आणि सरतेशेवटी प्राणांची प्रतिष्ठा करावी. हे करीत असताना देवमूर्तीच्या पायाला किंवा हृदयाला दूर्वा किंवा फूल लावून धरावे. मग 'असुनीते॰' हा मंत्र म्हणून मूर्तीचे गर्भाधानादी १५ संस्कार सिद्ध होण्यासाठी १५ वेळा प्रणवाचा जप करावा. मग प्राणप्रतिष्ठेची देवता जी प्राणशक्ती, तिचे पुढील श्लोकाने ध्यान करावे–

**रक्ताम्भोधिस्थपोतोल्लसदरुणसरोजाधिरूढा कराब्जैः**
**पाशं कोदण्डमिक्षूद्भवमथ गुणमप्यङ्कुशं पञ्च बाणान्।**
**बिभ्राणासृक्कपालं त्रिनयनलसिता पीनवक्षोरुहाढ्या**
**देवी बालार्कवर्णा भवतु सुखकरी प्राणशक्तिः परा नः।।**

अर्थ – रक्तसागरातल्या नावेतून उल्लसणाऱ्या रक्त कमलावर आरूढ झालेली, हातामध्ये पाश, उसाचे धनुष्य, दोरी, अंकुश, पाच बाण व रक्तकपाल धारण करणारी, तीन नेत्रांनी शोभणारी, पुष्ट वक्ष:स्थलांनी शोभणारी व बालसूर्यासारखा वर्ण असलेली परा प्राणशक्ती ही देवी आम्हाला सुखकर होवो.

मग प्रणवाने श्वास रोधून देवाचे ध्यान करावे. 'ध्रुवाद्यौ.॰' या तीन मंत्रांचा जप करावा. देवाच्या कानात गायत्री मंत्र व जो देव असेल त्याचा मंत्र जपावा. पुरुषसूक्ताने उपस्थान करावे व देवाच्या अवयवांना स्पर्श करून 'इहैवैधि॰' या मंत्राचा तीन वार जप करावा. देवाला नैवेद्य दाखवावा व नमस्कार करावा. [ ऋ. ब्र. स.; पूजाविधान. ]

## प्राणाग्निहोत्रोपनिषद

एक नव्य उपनिषद. याचा यजुर्वेदाशी संबंध आहे. या उपनिषदाचे चार खंड आहेत. पहिल्या खंडाच्या प्रारंभी शरीरयज्ञ हे सर्व उपनिषदांचे सार आहे, असे सांगून शरीरयज्ञ केल्यास अग्निहोत्राची आवश्यकता नाही असे सांगितले आहे. पुढे अन्नाची महती वर्णिलेली आहे. द्विपाद–चतुष्पादांना अन्न हे बळ देते. ते शुद्ध करण्यासाठी ईशानाची प्रार्थना करायची असते. शरीरातील प्राण हाच अग्नी होय. या अग्नीला अन्नाची आहुती देण्यापूर्वी जलप्राशन करून सर्व पापे धुवून टाकायची असतात. त्याचप्रमाणे पंचप्राणांना बैठक म्हणून आपोष्णीच्या पाण्याचा उपयोग करायचा असतो.

दुसऱ्या खंडात अग्नीची स्तुती आहे. भोजन करताना मनुष्य अग्निहोत्रच करीत असतो. मनुष्यशरीरात सूर्याग्नी, दर्शनाग्नी, शरीराग्नी आणि कोष्ठाग्नी असे चार अग्नी आहेत. त्यांपैकी कोष्ठाग्नी हा नाभिप्रदेशात असतो. तो गार्हपत्याग्नीचे प्रतीक असून, चतुर्विध अन्न तोच पचवतो.

तिसऱ्या खंडात सदतीस प्रश्न उपस्थित करून चौथ्या खंडात त्यांची उत्तरे दिली आहेत. त्या उत्तरांच्या द्वारे आत्मयज्ञच वर्णिला आहे. आत्मा हा यजमान, वेद हे ऋत्विज, अहंकार हा अध्वर्यू, ओंकार हा यूप, काम हा पशू, त्याग ही दक्षिणा

मरण हे अवभृथस्नान अशा प्रकारची ती उत्तरे आहेत.

प्राणाग्निहोत्राचे हे मर्म ज्याला कळले, तो मुक्त होतो असे शेवटी सांगितले आहे. [श्री. सी. ग. देसाई]

**प्राणायाम** अष्टांग योगातले चौथे अंग. प्राण + आयाम (निरोध) अशी या शब्दाची फोड आहे. पातंजल योगसूत्रांत याचे लक्षण दिले आहे, ते असे —

**तस्मिन्सति श्वासप्रश्वासयोर्गतिविच्छेदः प्राणायामः ।**

अर्थ – आसनजय झाल्यावर श्वास आणि प्रश्वास यांच्या स्वाभाविक गतीचा विच्छेद म्हणजे नियंत्रण करणे, हा प्राणायाम होय.

पातंजल योगसूत्रांत याचे पुढीलप्रमाणे वर्णन केले आहे— तो बाह्यवृत्ती म्हणजे बाहेर सोडला जाणारा प्रश्वासरूप रेचक, आभ्यंतरवृत्ती म्हणजे आत घेतला जाणारा श्वासरूप पूरक आणि स्तंभवृत्ती म्हणजे श्वास किंवा प्रश्वास यांच्या नंतर काही काळ टिकणारी स्तब्धावस्था हा कुंभक, असा तीन प्रकारचा असतो. तो देश, काल आणि संख्या यांच्या योगाने दीर्घ आणि सूक्ष्म असा उपलक्षित होतो. बाह्य किंवा आंतर अशा कोणत्याही देशाची अपेक्षा न ठेवता केवळ स्तंभवृत्तीने होणारा चौथा, केवळ कुंभक होय. प्राणायामापासून चित्तातील प्रकाशस्वरूप सत्त्वगुणावर आवरण घालणाऱ्या रज–तम या दोषांचा क्षय होतो आणि पुढील योगांग जी धारणा, तिचा अभ्यास करण्याची योग्यता मनाच्या ठिकाणी प्राप्त होते.

पूरक, कुंभक व रेचक हे तीन मिळून प्राणायाम होतो. त्यांच्या व्याख्या अशा –

**बाह्यादापूरणं वायोरुदरे पूरको हि सः ।**

अर्थ – बाहेरचा वायू नासापुटाने उदरात भरून घेणे, याला पूरक म्हणतात.

**सम्पूर्णकुम्भवद् वायोर्धारणं कुम्भको भवेत् ।**

अर्थ – भरलेल्या घड्याप्रमाणे पूरकाने आत घेतलेला वायू उदरात धारण करून ठेवणे, याला कुंभक म्हणतात.

**बहिर्यद् रेचनं वायोरुदराद्रेचकः स्मृतः ।**

अर्थ – उदरातील वायूला नासापुटाने बाहेर सोडणे, याला रेचक म्हणतात.

या विषयाचे स्पष्टीकरण प्रा. खानवेलकर यांनी पुढीलप्रमाणे केले आहे–

प्राणायामक्रियेची चर्चा करताना श्वासोच्छ्‌वासाचे नियमन हाच अर्थ गृहीत धरला पाहिजे. श्वासोच्छ्‌वासाची क्रिया चालू असताना घेतलेला विराम हा प्राणायाम होय. ज्या पद्धतीने हा विराम घ्यायचा, त्या पद्धतीप्रमाणे प्राणायामाचे विविध प्रकार होतात. आपली श्वासोच्छ्‌वास क्रिया आपण नीट लक्ष ठेवून पाहिली तर ती पुढील चार अवस्थांत होते– (१) वायू फुप्फुसात घेणे. (२) तो आत घेतल्यावर काही काळ तिथेच धरून ठेवणे. (३) वायू बाहेर सोडणे. (४) वायू बाहेर सोडल्यानंतर क्षणभर तसेच राहणे. या क्रियांना योगशास्त्रात विशिष्ट संज्ञा असून, वरील चार प्रकारांत थोडाबहुत फरक केल्याने प्राणायामाचे अनेक प्रकार संभवतात. उदा० दोन्ही नाकपुड्यांनी श्वास घेऊन तो लगेच सोडला तर एक प्रकार. एका नाकपुडीने घेऊन अल्पविरामाने दुसऱ्या नाकपुडीने सोडला तर दुसरा प्रकार. जीभ ओठाबाहेर काढून तिने वायू खेचून घेणे हा तिसरा प्रकार. तोंडाने वायू आत घेऊन नाकाने बाहेर सोडणे हा चौथा प्रकार. नाकानेच पण वेगाने वायू आत घेऊन तितक्याच वेगाने बाहेर सोडणे हा पाचवा प्रकार. वायू आत घेऊन तिथेच स्थिर करून सावकाश बाहेर सोडणे, हा सहावा प्रकार इत्यादी.

प्राणायाम कसा व केव्हा सुरू करावा याविषयी योगशास्त्रात पुढील श्लोक आहे –

**अथासने दृढे योगी वशी हितमिताशनः ।**
**गुरूपदिष्टमार्गेण प्राणायामान् समभ्यसेत् ।।**

अर्थ – आसनजय मिळाल्यानंतर जितेंद्रिय तसेच हित व मित अन्न सेवन करणारा, अशा योग्याने गुरूने सांगितलेल्या मार्गाला अनुसरून प्राणायामाचा अभ्यास सुरू करावा.

प्राणायाम प्रातःकाळी, माध्याह्नी, सायंकाळी व मध्यरात्री केला तरी चालतो. मात्र तो एकान्तात करावा. नदी किंवा सरोवर यांचे तीर, उद्यान व मनाला प्रसन्नता देणारा निर्मल भूप्रदेश ही प्राणायामाला उपयुक्त स्थळे होत. हवा व उजेड भरपूर असलेली घरातली खोली किंवा देवघराची खोलीही प्रशस्त होय. अशा योग्य ठिकाणी कुशासनावर किंवा चटईवर मृगाजिन, व्याघ्रांबर किंवा पांढरी घोंगडी घालून त्यावर धूत वस्त्राची घडी अंथरावी. हे झाले प्राणायामाचे आसन. मग शुचिर्भूत होऊन पद्मासन, सिद्धासन, स्वस्तिकासन किंवा सहजासन घालून त्या आसनावर पूर्वाभिमुख किंवा उत्तराभिमुख बसावे. हे बसणे, देह, मस्तक व मान समरेषेत ठेवून असावे आणि मग शांत चित्ताने प्राणायामाचा अभ्यास करावा. प्रथम काही वेळा दीर्घ श्वसन करावे व मग प्राणायाम सुरू करावा. प्राणायाम करताना नाकपुड्या बोटांनी दाबाव्या लागतात. त्यासंबंधीची रीत घेरंडसंहितेत पुढीलप्रमाणे सांगितली आहे –

**पूरकान्ते कुम्भकान्तं धार्यं नासापुटद्वयम् ।**
**कनिष्ठिकानामिकाङ्गुष्ठैस्तर्जनीमध्यमां विना ।।**

अर्थ – पूरक संपल्यापासून कुंभक संपेपर्यंत उजवी नाकपुडी हाताच्या अंगठ्याने व डावी नाकपुडी करंगळी व अनामिका

यांनी बंद करावी. मध्यमा व तर्जनी यांचा कुठेही स्पर्श होऊ देऊ नये.

सामान्यपणे प्रथम डाव्या नाकपुडीने सोळा अंक मोजून होईतो वायू आत ओढून घ्यावा म्हणजे पूरक होतो. मग दोन्ही नाकपुड्या बंद करून चौसष्ट अंक मोजीतो वायू आत भरून ठेवावा म्हणजे कुंभक होतो. मग बत्तीस अंक मोजीतो वायू उजव्या नाकपुडीतून सोडावा म्हणजे रेचक होतो. या तीन क्रिया मिळून एक प्राणायाम होतो. निरनिराळ्या योगशास्त्रज्ञांनी आपापल्या पद्धतीने पूरक, रेचक व कुंभक यांची प्रमाणे वेगवेगळी दिली आहेत.

पूरकाच्या वेळी नाभिप्रदेशात लक्ष्मीसहित विष्णूचे, कुंभकाच्या वेळी हृत्कमलात ब्रह्मदेवाचे व रेचकात ललाटभागी शिवाचे ध्यान करावे, असे ध्यानबिन्दूपनिषदात सांगितले आहे. प्राणायाम हळूहळू वाढवीत जावा. त्यात कोणत्याही प्रकारे घाई अथवा उतावळेपणा करू नये.

सगर्भ आणि अगर्भ असे प्राणायामाचे आणखी दोन भेद सांगितले आहेत. मंत्रयुक्त प्राणायाम सगर्भ आणि मंत्ररहित प्राणायाम अगर्भ समजावा. सगर्भ प्राणायामात प्रणवाचा उपयोग सांगितला आहे. त्यात पूरकाच्या वेळी प्रणवाच्या 'उ' या मात्रेचे स्मरण, कुंभकाच्या वेळी म् या मात्रेचे स्मरण व रेचकाच्या वेळी अ या मात्रेचे स्मरण करायचे असते.

प्राणायामाविषयी काही निषेध सांगितले आहेत, ते असे– तहानभूक विशेष असता, पोट भरलेले असता, नाकपुड्या चोंदलेल्या असता, हर्षशोकादिकानी चित्त चचल झाले असता, थकवा आला असता, झोप येत असता व मलविसर्जन नीट झाले नसता प्राणायाम करू नये. योग्य गुरूचे मार्गदर्शन नसेल तरी प्राणायाम करू नये. केवळ स्वतःच्या अल्पज्ञानावर अवलंबून प्राणायाम केल्यास उन्माद, अपस्मार, बधिरता, अवयवशैथिल्य, उचकी, दमा, खोकला, डोकेदुखी, कानदुखी, इ. रोग होण्याची शक्यता असते. प्राणायाम म्हणजे सूक्ष्म अशा ज्ञानतंतूशीच नव्हे, तर शरीरांतर्गत मूल शक्तीशी करायचा खेळ असतो. योग्य ज्ञानाने तो लाभदायक ठरतो, तर अपुऱ्या ज्ञानाने, उतावळेपणाने आणि अधिकारी पुरुषाच्या मार्गदर्शनाविना तो खेळ अत्यंत अपायकारक ठरतो, हे सदैव लक्षात ठेवावे.

प्राणायाम योग्य रीतीने व सावधपणाने झाल्यास काही कालाने त्याचे कसे फल मिळते व त्याच्या उलट कसे अपाय होतात, याविषयी हठयोगप्रदीपिकेत पुढील श्लोक दिला आहे–

**प्राणायामेन युक्तेन सर्वरोगक्षयो भवेत् ।**
**अयुक्ताभ्यासयोगेन सर्वरोगसमुद्भवः ।।**

**अर्थ**–योग्य रीतीने प्राणायाम केल्यास साधकाच्या सर्व रोगांचा नाश होतो व अयोग्य मार्गाने तो केल्यास अनेक रोग उत्पन्न होतात.

प्राणायामाच्या योग्य व प्रदीर्घ अभ्यासाचे फल काय मिळते, याविषयी श्री. कृ. के. कोल्हटकर पुढीलप्रमाणे विवेचन करतात–

प्राणायामाने वृत्तीला स्थिरपणा येतो. ती जसजशी स्थिर होते तसतशी सूक्ष्म होत जाते. मनाची वृत्ती सूक्ष्म व एकाग्र होणे हे प्राणवृत्ती सूक्ष्म होण्यावर अवलंबून असते. म्हणूनच जो प्राणवायूचा स्पन्द तोच चित्ताचा स्पन्द होय, असे योगवासिष्ठात म्हटले आहे. मनाचे चांचल्य मोडून ते स्थिर आणि सूक्ष्म झाल्यावर पुढील प्रत्याहारादी अंगांच्या अभ्यासाची पूर्वसिद्धता होते. सतत अभ्यासाने साधकाच्या चित्तातील प्रकाशावर जे आवरण असते त्याचा क्षय होतो. चित्तात वावरणाऱ्या रजतमोमूलक वासना हेच ते आवरण होय. प्राणायामाच्या योगाने चित्तातील रज-तम कमीकमी होतात व त्या मानाने तन्मूलक वासनाही दुर्बल होत जातात. वासनांचे हे आवरण विरल झाल्याने चित्तातील सत्त्व गुणाचा प्रकाश पसरतो. मग इद्रियांची विषयांकडची ओढ कमी होऊन ती प्रत्याहार या पुढील योगांगाला योग्य होतात.

योग्य मार्गाने व सातत्याने प्राणायाम केल्यास साधकाला विविध प्रकारचे लाभ मिळतात. आरोग्य वृद्धिंगत होणे, नाडीशुद्धी, भूक चांगली लागणे, शरीर सडपातळ, निरोगी व सुंदर होणे, मुखावर प्रसन्नता झळकणे, डोळे स्वच्छ व तेजस्वी होणे अशासारखे हे लाभ असतात. प्राणायामाने आयुष्य वाढविता येते, वार्धक्य दूर ठेवता येते, मनाचे चांचल्य घालविता येते आणि मन, बुद्धी व वाणी यांना तेज प्राप्त होते. प्राणायाम साधल्यास अनेक अतींद्रिय अनुभवही येतात व अनेक सिद्धीही प्राप्त होतात. याविषयी योगी अरविंदांनी आपले अनुभव लिहून ठेवले आहेत. ते म्हणतात, की 'प्राणायामाने माझी स्मरणशक्ती वाढली, जणू माझ्या मेंदूभोवती विद्युद्वलय निर्माण झाले. माझी प्रतिभाही जागृत झाली.' प्राणायाम साधला की तो योगी सृष्टिनियम गुंडाळून ठेवू शकतो. पाण्यावर किंवा हवेत तरंगणे, अधांतरी राहणे, वायुगतीने शेकडो मैल जाणे, इ. गोष्टी योग्याला साध्य होतात, अशी वर्णने अनेक ठिकाणी वाचायला सापडतात.

प्राणायामाचे अशा प्रकारचे आध्यात्मिक महत्त्व ओळखून शास्त्रकारांनी तो प्रत्येक धर्मकृत्यातही रूढ केला आहे. आचमन व केशवादी चौवीस नावांचा उच्चार झाल्यावर प्राणायाम करायचा असतो. या प्राणायामाचा परब्रह्म हा ऋषी, परमात्मा ही देवता व देवी गायत्री हा छंद आहे. या प्राणायामात प्रथम उजव्या हाताच्या अंगठ्याने उजवी नाकपुडी दाबून डाव्या

नाकपुडीने श्वास आत घेतात. मग सर्व बोटांनी दोन्ही नाकपुड्या दाबून कुंभक करतात आणि नतर उजव्या नाकपुडीवरील अगठा काढून रेचक करतात. या प्राणायामाच्या पूर्वी भूर्भुवस्वः इ. सात व्यहृतीचा उच्चार करतात. मग गायत्री मंत्र म्हणतात आणि प्राणायाम पुरा झाल्यावर दोन्ही कानांना स्पर्श करून 'ॐ आपो ज्योती रसोऽमृत ब्रह्म भूर्भुवःस्वरोम्' असे म्हणतात. [पा. यो. द.; योगविद्या; श. क.; ऋ. ब्र. स.]

**प्राणाहुती** भोजनाच्या प्रारंभी आपोष्णी घेतल्यानंतर अन्नाला तूप लावून त्याच्या लहान लहान सहा आहुती पोटात घेतात, त्यांना प्राणाहुती असे म्हणतात. या प्राणाहुती पंचप्राणांना उद्देशून असतात. शेवटची आहुती ब्रह्म्यासाठी असते. मध्यमा व अगुष्ठ यानी प्राणासाठी; मध्यमा, अनामिका व अंगुष्ठ यांनी अपानासाठी, कनिष्ठिका, अनामिका व अंगुष्ठ यांनी व्यानासाठी; कनिष्ठिका, मध्यमा, अनामिका व अंगुष्ठ यांनी उदानासाठी व सर्व बोटांनी उचलून समानासाठी स्वमुखात आहुती घालायची असते. या आहुती दात न लावता गिळायच्या असतात.

प्राणाहुती म्हणजे प्राणाग्निहोत्रच होय. मुखात आहवनीय, हृदयात गार्हपत्य, नाभीत दक्षिणाग्नी व त्याखाली सभ्य व आवसथ हे अग्नी आहेत, असे सांगितले आहे. या अग्निहोत्रात वाणी हा होता, प्राण उद्गाता, चक्षू अध्वर्यू, मन ब्रह्मा व श्रोत्र आग्नीध्र आहे. यात अहंकार हा पशू व प्रणव हे दूध आहे. आत्मा यजमान असून, बुद्धी ही त्याची पत्नी आहे. उरःस्थल ही वेदी, रोम हे दर्भ व दोन हात हे स्रुक आणि स्रुवा आहेत.

अशा प्रकारचे हे प्राणाग्निहोत्र करून जो भोजन करतो, तो ऋणत्रयापासून व जन्ममरणांपासूनही मुक्त होतो, असे सागितले आहे. [आचारेन्दू]

**प्राणोपासना** प्राण हे प्रमुख जीवनतत्त्व असल्यामुळे त्याची उपासना करायला सांगणारी वचने उपनिषदांत बरीच आहेत. संपूर्ण कौषीतकी उपनिषद तर प्राणाची उपासना सांगण्यासाठीच निर्माण झाले आहे. ही प्राणोपासना आयुष्य, अमृत व अत्यानंद मिळवून देते, अशी उपनिषदांची धारणा आहे. बुद्धीच्या साधनाने योग्य विचार व तदनुसार योग्य कर्म करून जो आपले संकल्प पूर्ण करून घेतो, त्याला ब्रह्मलोकी अमृतत्व आणि पूर्णत्व प्राप्त होते, असे छांदोग्यात (८.३) व कठोपनिषदात (६.१४) सांगितले आहे. हा प्राणोपासनेचाच एक भाग समजला पाहिजे.

डॉ. के. ल. दप्तरी हे प्राणोपासना म्हणजे प्रज्ञानमय जीवाचीच उपासना असल्याचे सांगतात. **पाहा** – कौषीतकी उपनिषद.

**प्रातःस्मरण** प्रातःकाली अंथरुणावरून उठल्यानंतर लगेच देवतांचे श्लोकरूपाने स्मरण करणे, याला प्रातःस्मरण म्हणतात. याविषयी एक श्लोक आहे, तो असा –

**ब्राह्मे मुहूर्ते चोथात्य चिन्तयेदात्मनो हितम् ।**
**स्मरणं वासुदेवस्य कुर्यात् कलिमलापहम् ।।**

अर्थ – ब्राह्म मुहूर्ती उठून आत्मकल्याणाचे चिंतन करावे; तसेच कलिदोष दूर करणारे वासुदेवाचे स्मरण करावे.

उठताक्षणीच पहिल्याप्रथम आपल्या दोन्ही हातांचे तळवे पाहावे. याला करदर्शन म्हणतात. याचा श्लोक असा –

**कराग्रे वसते लक्ष्मीः करमध्ये सरस्वती ।**
**करमूले तु गोविन्दः प्रभाते करदर्शनम् ।।**

अर्थ – कराग्राच्या ठिकाणी लक्ष्मी, करमध्याच्या ठिकाणी सरस्वती आणि करमूलाच्या ठिकाणी गोविंद वास करतो. (म्हणून) प्रभातकाळी करदर्शन करावे.

या करदर्शनामागील हेतू उदात्त आहे. मनुष्याचा हात हा एक समर्थ अवयव आहे. पुरुषार्थ साधण्याच्या कामी हातांचा उपयोग होतो. हात हे निर्मितिक्षम आहेत. त्यांच्या योगाने अनेक मोठमोठी कार्ये संपादिता येतात. मनुष्याला जीवनात यश आणि वैभव प्राप्त करून घ्यायचे असेल, तर त्याने आपल्या बुद्धीबरोबरच हातांचाही उपयोग करायला हवा. हातांच्या ठिकाणी देवता वास्तव्य करतात, हे समजल्यावर मनुष्य आत्मविश्वासाने त्यांचा उपयोग करून घेऊ शकेल, हे जाणून शास्त्रकारांनी प्रभातकाली करदर्शनाचा विधी सांगितला असावा.

त्यानंतर प्रातःस्मरण ज्या क्रमाने करायचे, तो क्रम असा –

**आदित्यं गणनाथं च देवीं रुद्रं यथाक्रमम् ।**
**नारायणं विशुद्धाख्यमन्ते च कुलदेवताम् ।।**

अर्थ – सूर्य, गणपती, देवी व विशुद्ध कीर्तीचा नारायण यांचे यथाक्रम स्मरण करून अती कुलदेवतेचे स्मरण करावे.

ऋग्वेदीय ब्रह्मकर्मात, सूर्यस्मरणाचे, गणपतिस्मरणाचे व देवीच्या स्मरणाचे प्रत्येकी तीन, शिवाच्या स्मरणाचे चार व विष्णूच्या स्मरणाचे चार श्लोक दिलेले आहेत.

त्यानंतर नवग्रह, भृग्वादी ऋषी, सनत्कुमारादी देवर्षी, सप्तलोक, सप्तसमुद्र, सप्तकुलपर्वत, सप्तर्षी, पृथू-हैहयादी राजे, बली बिभीषण, इ. भक्त; अश्वत्थामा, व्यास, इ. सप्तचिरंजीव; अहल्या, द्रौपदी, इ. स्त्रीपंचक; पाच पांडव; नल, युधिष्ठिर, इ. पुण्यश्लोक राजे; काशी व तिच्यातली देवस्थाने यांचे स्मरण करायला सागितले आहे. हे प्रातःस्मरण झाल्यावर पुढील

श्लोक म्हणून भूमीची प्रार्थना करायला सांगितली आहे –

**समुद्रवसने देवि पर्वतस्तनमण्डले ।**
**विष्णुपत्नि नमस्तुभ्यं पादस्पर्शं क्षमस्व मे ।।**

अर्थ – समुद्राचे वस्त्र नेसणाऱ्या व पर्वतरूपी स्तनांनी शोभणाऱ्या हे विष्णुपत्नी भूदेवी, तुला नमस्कार असो. माझ्या पायांचा तुला स्पर्श होतो, त्याबद्दल मला क्षमा कर.

ही प्रार्थना झाल्यावर सूर्य, गुरू आणि वाडवडील यांना नमस्कार करून 'प्रातरग्निम्०' (ऋ. ७·४१·१) हे प्रातःसूक्त म्हणावे. **पाहा** – ब्राह्ममुहूर्त. [ ऋ. ब्र. स; आचारेन्दु ]

## प्रातिशाख्ये

या शब्दाचा अर्थ 'प्रति+शाखा' म्हणजे त्या त्या वैदिक शाखेशी सबंध ठेवणारे शास्त्र असा आहे. प्रातिशाख्ये ही वेदांग शिक्षेची प्राचीनतम उदाहरणे होत. यांत पदपाठावरून संहितापाठ कसे तयार करायचे यासंबंधी नियम आहेत व संहिता म्हणण्याच्या पद्धतीचे पूर्ण विवेचन केलेले आहे.

प्रातिशाख्यांचा मुख्य विषय वैदिक मंत्रांचे शुद्ध उच्चारण, पदाध्ययन, संधिनियमन व यथार्थ स्वररक्षण हा आहे. यासंबंधी ऋक्प्रातिशाख्यात म्हटले आहे, ते असे –

**गुरुत्वं लघुता साम्यं ऱ्हस्वदीर्घप्लुतानि च ।**
**लोपागमविकारश्च प्रकृतिर्विक्रमः क्रमः ।।**
**स्वरितोदात्तनीचत्वं श्वासो नादस्तथोभयम् ।**
**एतत्सर्वं च विज्ञेयं छान्दोभाषामधीयता ।।**

अर्थ – गुरू, लघू, साम्य, ऱ्हस्व, दीर्घ, प्लुत, लोप, आगम, विकार, प्रकृती, विक्रम, क्रम, स्वरित, उदात्त, नीच, श्वास व नाद हे सर्व वैदिक भाषेचा अभ्यास करणाऱ्याला माहीत असले पाहिजे.

यावरून प्रातिशाख्ये म्हणजे वेदांची व्याकरणेच होत, हे ध्यानात येईल.

प्राचीन ग्रंथांनुसार प्रातिशाख्यांचे प्रतिपाद्य विषय मुख्यतः पुढीलप्रमाणे आहेत – (१) वर्णसमाम्नाय – स्वर, व्यंजने यांची गणना व त्यांचे उच्चारण इत्यादीसंबंधी नियम. (२) अच्, हल्, विसर्ग आदी संधी. (३) प्रगृह्य – संज्ञा, पदविभागाचे नियम व त्यांचे अपवाद. (४) उदात्त, अनुदात्त शब्दांची गणना, स्वरिताचे भद व आख्यातस्वर. (५) संहितापाठ व पदपाठ यांतील भेद दाखविणारे नियम व सत्व, षत्व, दीर्घ, इ. चे विवरण. (६) (अथर्वप्रातिशाख्यात) संहितापाठ व क्रमपाठ यांचे नियम, (तैत्तिरीय प्रातिशाख्यांत) जटापाठाचे नियम. (७) (सामप्रातिशाख्यात) सामवेदाच्या निरनिराळ्या गीतींमधील प्रश्लेष, विश्लेष वृद्ध, अवृद्ध, गत, अगत, उच्च, नीच, क्रुष्ट, अक्रुष्ट इ. उच्चारणकृत भेदांचे वर्णन व (८) विविध वैदिक छंदांचे विवरण.

प्राचीन काली सर्व वैदिक शाखांची आपापली प्रातिशाख्ये होती. त्यावरून वेदांच्या ११३० शाखांची ११३० प्रातिशाख्ये वास्तविक असायला पाहिजेत; पण वैदिक शाखांप्रमाणेच त्यांची प्रातिशाख्येही बहुधा लुप्त झाली असावी. जी थोडी साप्रत उपलब्ध आहेत, त्याची नावे अशी – (१) ऋक्प्रातिशाख्य (२) वाजसनेयिप्रातिशाख्य (३) तैत्तिरीय प्रातिशाख्य (४) सामवेदाचे पुष्पसूत्र प्रातिशाख्य (५) सामवेदाच्या कौथुम शाखेचे ऋक्तंत्र प्रातिशाख्य (६) अथर्ववेदाचे शौनककृत चतुरध्यायिका नामक प्रातिशाख्य व (७) अथर्ववेदप्रातिशाख्यसूत्र आणि (८) अथर्वप्रातिशाख्य.

या प्रातिशाख्यापैकी ऋक्प्रातिशाख्य हे सर्वात मोठे व वैशिष्टयपूर्ण आहे (ऋक्प्रातिशाख्य पाहा). वाजसनेयिप्रातिशाख्य हे कात्यायनाने रचले असून, ते शुक्ल यजुर्वेदाशी संबंधित आहे (वाजसनेयिप्रातिशाख्य पाहा). तैत्तिरीय प्रातिशाख्य कृष्ण यजुर्वेदाशी संबंधित आहे (तैत्तिरीय प्रातिशाख्य पाहा). सामवेदाची प्रातिशाख्ये बरीच असून, त्यांपैकी पुष्प ऋषीचे पुष्पसूत्र व ऋक्तंत्र ही दोन प्रसिद्ध आहेत. पुष्पसूत्रावर सायणभाष्य आहे. जर्मन अनुवादासह सायमनने पुष्पसूत्र छापले आहे.

अथर्ववेदाची तीन प्रातिशाख्ये प्रकाशित झाली आहेत. त्यांपैकी शौनकीया चतुरध्यायिका डॉ. व्हिटनी याने संपादित करून सानुवाद प्रकाशित केली आहे; दुसरे अथर्ववेदप्रातिशाख्यसूत्र श्री. विश्वबंधू शास्त्री यांनी संपादित केले असून, पंजाब विश्वविद्यालयाच्या ग्रंथमालेत प्रसिद्ध झाले आहे. तिसऱ्या प्रातिशाख्याचे नावही अथर्वप्रातिशाख्य असेच आहे या तीन्ही प्रातिशाख्यांत तिसरा ग्रंथ महत्त्वाचा असून, अथर्ववेदाचा मूल पाठ समजण्याच्या दृष्टीने तो उपयुक्त आहे. डॉ. सूर्यकांत शास्त्री यांनी तो लाहोरहून प्रकाशित केला आहे.

प्रातिशाख्यांची रचना पाणिनीच्या पूर्वी झाली आहे. शिक्षा, व्याकरण व छंद यांच्या ऐतिहासिक विकासाच्या अध्ययनासाठी प्रातिशाख्यांचा फार उपयोग होतो व झालाही आहे. प्रातिशाख्यांपासूनच प्राचीन भारतातील संस्कृत भाषेच्या व्याकरणाचा आरंभ झाला. जरी हे प्रत्यक्ष व्याकरणावरील ग्रंथ नसले, तरी व्याकरणासंबंधीच्या विषयांचे त्यात विवेचन आलेले आहे व प्राचीन कालातील अनेक वैयाकरणांची नावे व मते त्यांत उद्धृत केलेली आहेत. प्रातिशाख्यांमुळेच वैदिक सहितांच्या रचनाकालापासून आजपर्यंत कित्येक सहस्रके त्यांचे स्वरूप व पाठ जसाच्या तसा राहिला आहे. प्रातिशाख्यांचे हे कार्य फार महत्त्वाचे आहे. [ वै. सा.; वै. सा. सं.; म. ज्ञा. को. ]

**प्राप्तिव्रत** एक काम्य व्रत. व्रतावधी एक वर्ष. एक वर्षभर एकभुक्त राहायचे आणि व्रताच्या उद्यापनाच्या वेळी एक सामान्य उदकुंभ दान द्यायचा, असे याचे विधान आहे. फल– शिवलोकप्राप्ती. [ हि. ध. ]

**प्रायश्चित्त** माणसाच्या हातून कळत नकळत जो दोष अथवा जे पातक घडते, त्याच्या निष्कृतीसाठी त्याला शास्त्राने काही देहदंडनात्मक किंवा द्रव्यात्मक असा जो विधी सांगितलेला असतो, त्याला प्रायश्चित्त म्हणतात. हाच आशय याज्ञवल्क्याने पुढील श्लोकात सांगितला आहे –

**विहितस्याननुष्ठानान्निन्दितस्य च सेवनात् ।**
**अनिग्रहाच्चेन्द्रियाणां नरः पतनमृच्छति ।।**
**तस्मात्तेनेह कर्तव्यं प्रायःश्चित्तं विशुद्धये ।**
**एवमस्यान्तरात्मा च लोकश्चापि प्रसीदति ।।**

(याज्ञ. ३.२१९–२०)

अर्थ – विहित कर्म न केल्याने, निंदित कर्म आचरल्याने व इंद्रियाचे दमन न केल्याने मनुष्य पतित होतो. म्हणून त्या पतिताने आपल्या शुद्धीसाठी प्रायश्चित्त करावे. त्यामुळे आत्म्याला प्रसन्नता येते व लोकांनाही बरे वाटते.

चुकणे हा मनुष्यस्वभाव आहे, हे शास्त्रकारांना मान्य आहे. विशिष्ट प्रकारच्या चुकांनाच ते पाप मानतात व त्याबद्दल प्रायश्चित्त सांगतात. वरील श्लोकात इंद्रियांचा निग्रह नसणे आणि त्यामुळे हातून वाईट गोष्टी घडणे, हा एक प्रकार सांगितला आहे. विष्णुस्मृती म्हणते, की काम,क्रोध, लोभ हे माणसाचे घोर शत्रू असून, तेच त्याच्या हातून अनेक पातके घडवतात (३३.१). यामुळे त्याच्या आध्यात्मिक व लौकिक प्रगतीलाही प्रतिबंध होतो. तो होऊ नये म्हणून त्याबद्दल प्रायश्चित्त करावे, असा शास्त्रकारांचा उपदेश आहे. मनोविकारांचा उद्रेक शांत झाल्यावर सामान्य माणसालाही मनोमन आपली चूक पटते आणि मग रुखरुख लागते. ही रुखरुख दूर करण्यासाठीही प्रायश्चित्ताची आवश्यकता असते. आपल्या एखाद्या कृत्याने दुसऱ्या कोणाला तरी त्रास किंवा कोणाचे तरी नुकसान झालेले असते. अशा वेळी त्या त्या इजा पोचलेल्या माणसाच्या मनात कर्त्याविषयी चीड उत्पन्न झालेली असते. ती चीड घालवण्यासाठीही कर्त्याने योग्य प्रायश्चित्त करणे आवश्यक असते. अशा अनेकविध हेतूनी शास्त्रकारांनी प्रायश्चित्ताची योजना केली आहे.

अनभिसंधिकृत (उद्देश नसताना घडलेले) व अभिसंधिकृत (जाणून बुजून केलेले) अशी पापांची ठळक वर्गवारी करून, त्या दोहोंबद्दलही प्रायश्चित्त घेण्यास वसिष्ठ सांगतो.

प्रायश्चित्तात देहदंडनात्मक तप आणि एक प्रकारचा निर्धार या गोष्टींची आवश्यकता असते. त्याना अनुलक्षून अंगिरसान प्रायश्चित्ताचा यौगिक अर्थ सांगितला आहे, तो असा –

**प्रायो नाम तपः प्रोक्तं चित्तं निश्चय उच्यते ।**
**तपोनिश्चयसंयुक्तं प्रायश्चित्तमिति स्मृतम् ।।**

अर्थ – प्रायः म्हणजे तप व चित्त म्हणजे निश्चय होय. तप व निश्चय यांनी युक्त असे जे कर्म, त्याला प्रायश्चित्त म्हणावे.

धर्मशास्त्रग्रंथांत आचार, व्यवहार व प्रायश्चित्त अशी तीन मुख्य प्रकरणे असतात. त्यांपैकी धर्मसूत्रांत प्रायश्चित्त या विषयाने बरीच जागा व्यापली आहे. गौतम धर्मसूत्र व वासिष्ठधर्मसूत्र यांत पापाची संभवनीय उगमस्थाने व प्रायश्चित्त घेण्याची योग्यायोग्यता यांचीही चर्चा केली आहे.

श्रौत कर्मात काही वैगुण्य उत्पन्न झाल्यास त्याचे निराकरण करण्याचा विधी या अर्थाने प्रायश्चित्त व प्रायश्चित्ती असे दोन शब्द तै. संहिता व ब्राह्मणे यांत आढळतात. प्रायश्चित्ताला वरील व्यापक अर्थ स्मृती व पुराणे या वाङमयात प्राप्त झाला.

ज्या पातकांबद्दल स्मार्त धर्मशास्त्रात प्रायश्चित्त सांगितले आहे, त्यांची सूची अशी –

पंचमहापातके, गोहत्या, पशुहत्या, आत्महत्या, श्राद्धान्नभोजन, अभोज्यान्नसेवन, अशुचिअन्नसेवन, चौर्यकर्म, अगम्यागमन, व्यभिचार, पशुगमन, व्रतलोप, परिवेदन (वडील भावाच्या आधी लग्न किंवा अग्निहोत्र करणे), संसर्ग, स्पर्श, प्राणिदंश, व्रात्यत्व, ऋणाचे निराकरण न करणे, अग्निहोत्र न घेणे, निषिद्ध पदार्थाचा विक्रय, अयाज्ययाजन, कन्यादूषण, अग्नित्याग, वृक्षच्छेदन, निषिद्धदान, कौशीलव्य (सोंगे घेणे, गाणे, नाचणे), संकरीकरण, अपात्रीकरण, मलिनीकरण, खोटी साक्ष देणे, खोटा आरोप करणे, नित्यकर्मलोप, इत्यादी.

जातिभ्रष्टता हीही धर्मशास्त्राने प्रायश्चित्तार्ह मानली आहे. जातीने आपापले विहित व्यवसाय सोडून अन्य व्यवसाय केल्याने जातिभ्रष्टता येते, असे धर्मशास्त्रे सांगतात. पतिताशी सहवास, सहभोजन, इ. करणे यांनीही जातिभ्रष्टता येते, असे मत आहे. जातिभ्रष्टतेच्या अपराधात समुद्रपर्यटन, ब्राह्मणाच्या मालमत्तेची चोरी, जमिनीच्या वादात खोटा साक्षीपुरावा देणे, शूद्र स्त्रीच्या ठिकाणी पुत्रोत्पादन करणे व स्वतः शूद्राचा पुत्र होणे, इ. प्रायश्चित्तार्ह गोष्टींचा निर्देश बौधायनाने केला आहे.

ज्या अपराधांना वधाखेरीज इतर कोणतेही प्रायश्चित्त पुरेसे मानले जात नाही, असे काही अपराध पुढीलप्रमाणे आहेत – गुरू, मित्र व शिष्य यांच्या पत्नीशी व सुनेशी व्यभिचार हे पुरुषाच्या बाबतीत व वरिष्ठ जातीच्या स्त्रीने कनिष्ठ जातीच्या पुरुषाशी केलेला व्यभिचार हे स्त्रीच्या बाबतीत वधार्ह पातक मानलेले आहे. मनुष्यवध करणे व त्याला कारणी-

भूत होणे, तसेच संन्यासाश्रमातून परत गृहस्थाश्रमात येणे हीही पातके वधार्ह मानली गेली होती, असे इतिहासावरून समजते. नारायणरावाच्या वधाबद्दल दोषी ठरवून श्री. राघोबादादा पेशवे याला रामशास्त्री प्रभुणे या न्यायाधीशाने देहांत प्रायश्चित्त सांगितले होते व ज्ञानेश्वरांचे वडील विठ्ठलपंत संन्यासाश्रमातून परत गृहस्थाश्रमात आल्याबद्दल आळंदीच्या धर्मशास्त्र्यांनी त्यानाही देहांत प्रायश्चित्त सागितले होते, असे कळते. देहांत प्रायश्चित्ते ही दुसऱ्या कोणी द्यायची नसून, ती स्वतःच स्वेच्छेने आचरायची असतात, असे मनूने म्हटले आहे. विठ्ठलपंतांनी तसेच केले, अशी कथा आहे. मनुष्याला वधात्मक प्रायश्चित्त देण्याचे प्रकार स्मृतिकारांनी पुढीलप्रमाणे सांगितले आहेत – तप्त लोहशय्येवर शयन, लोहाच्या तप्त प्रतिमेला आलिंगन, कुत्र्याकडून खाववणे, तप्त मद्य मुखात ओतणे, गवताच्या आगीत जाळणे, इत्यादी.

हत्या, व्यभिचार, चोरी, इ. अपराधांना प्रायश्चित्ते देण्याचा अधिकार राजाचा असे. राजा आपल्या सेवाकाकरवी अशी प्रायश्चित्ते देत असे. इतर पातकांच्या बाबतीत अपराधाचा निर्णय करण्यासाठी व योग्य प्रायश्चित्त सांगण्यासाठी राजा पर्षत् (पंचसभा) नेमीत असे. पर्षत्चे सभासद वेदवेदांगे व धर्मशास्त्रे जाणणारे आणि अग्निहोत्री असे पाच, चार किंवा तीन असावे असे सांगितले आहे ज्याने सर्व वेदव्रतांचे अनुष्ठान केले आहे, असा एकटा पुरुषही पर्षत् होऊ शकत असे.

पाप केलेला माणूस स्नान करून पर्षत्पुढे येई, सत्याला स्मरून आपल्या पापाचे उच्चारण करी आणि पर्षत्ला प्रायश्चित्त सागण्याबद्दल प्रार्थना करी. मग पर्षत् अपराध्याच्या पातकाचा साधक-बाधक पूर्ण विचार करून त्याला प्रायश्चित्त सांगे.

**प्रायश्चित्तपूर्व कृत्ये** – पातक्याने प्रथम ब्राह्मणांची प्रार्थना करावी. मग अनुवादकाकडून ( अनुवादक = पर्षतने सांगितल्याप्रमाणे प्रायश्चित्ताचा उपदेश करणारा ) प्रायश्चित्त ऐकावे. संकल्प करावा. क्षौर करावे. भस्म, गोमय, मृत्तिका व पंचगव्य यांची स्नाने करून शुद्धोदकाने स्नान करावे. देव-ऋषिपितरांचे तर्पण करावे. विष्णुश्राद्ध करावे. गाय व सुवर्ण यांचे दान करावे. ब्रह्मकूर्च होम करावा. एवढी पूर्वकृत्ये झाल्यावर मग मुख्य प्रायश्चित्त आचरावे. मुख्य प्रायश्चित्ते अशी—

**कृच्छ्र प्रायश्चित्ते** – पहिल्या दिवशी दिवा भोजन, दुसऱ्या दिवशी नक्त भोजन; तिसऱ्या दिवशी अयाचित भोजन व चवथ्या दिवशी उपवास, याला पादकृच्छ्र म्हणतात. पादकृच्छ्राचा कोणताही एक भाग तिप्पट वाढवल्याने प्राजापत्य कृच्छ्र होते. प्राजापत्य विधीत केवळ पाणिपूर ( तळहातावर मावेल तेवढे ) अन्न खाल्ल्याने अतिकृच्छ्र होते. २१ दिवस पाणी पिऊन राहिल्याने कृच्छ्रातिकृच्छ्र होते. एक महिना उपास केल्याने मासोपवासकृच्छ्र होते. गाईच्या शेणातून पडलेले यव खाल्ल्याने यावक कृच्छ्र होते. तीन दिवस ऊन पाणी, तीन दिवस ऊन दूध, तीन दिवस ऊन तूप पिऊन, तीन दिवस वायुभक्षण केल्याने तप्त कृच्छ्र होते. वरील पदार्थ शीत सेवन केल्याने शीत कृच्छ्र होते. पहिल्या दिवशी पंचगव्य प्याल्याने व दुसऱ्या दिवशी उपवास केल्याने सांतपन कृच्छ्र होते. अर्धवट शिजवलेले यव गोमूत्रात मिसळून २१ दिवस खाल्ल्याने वज्रकृच्छ्र होते. तिळांची चटणी, भाताची पेज, ताक, पाणी व सातू या पाचांपैकी प्रत्येक दिवशी क्रमाने एकेक पदार्थ खाऊन सहाव्या दिवशी उपवास केल्याने तुलापुरुष कृच्छ्र होते. या शिवाय कृच्छ्राचे आणखीही कित्येक प्रकार विष्णुस्मृतीमध्ये सांगितले आहेत.

**चांद्रायण प्रायश्चित्ते** – शुक्ल पक्षात प्रतिपदेच्या दिवशी ग्रासमात्र अन्न खाणे व पुढे पौर्णिमेपर्यंत रोज एकेक घास वाढवीत नेणे आणि तसेच कृष्णप्रतिपदेपासून अमावास्येपर्यंत एकेक घास कमी करीत आणणे हा चांद्रयणाचा सामान्य विधी आहे. याचेही यवमध्य, पिपीलिकामध्य, ऋषी, शिशू, इ भेद आहेत.

**रहस्य प्रायश्चित्त** – उघडपणे जे प्रायश्चित्त सांगितले गेले असेल, त्याचा रहस्यात ( गुप्तपणे ) विसावा, तिसावा किंवा साठावा भाग कल्पून तेवढेच प्रायश्चित्त करणे.

संस्कारादींच्या होमकृत्यात काही दोष घडल्यास अग्निमुखाच्या प्रयोगात त्याबद्दल आज्याने व्याहृतिहोम करावा, असे सांगितले आहे.

**विष्णुस्मरण प्रायश्चित्त** – कर्माच्या शेवटी ' विष्णवे नमः ' म्हणून विष्णुस्मरण करणे हे कर्मातील वैगुण्यादी दोष दूर करणारे प्रायश्चित्त पौराण धर्मात सांगितले आहे. या वेळी ' वषट् ते विष्णवासः० ' हा मंत्र म्हणतात.

**प्रत्याम्नाय** – एखादे प्रायश्चित्त विधियुक्त आचरणे अशक्य ठरल्यास तत्प्रतिनिधिभूत असा जो सोपा विधी किंवा सुलभ द्रव्य घेतात त्याला प्रत्याम्नाय म्हटले आहे. प्राजापत्य कृच्छ्राचा प्रत्याम्नाय म्हणून एक गाय दान द्यावी किंवा तिची किमत द्यावी किंवा बारा ब्राह्मणांना भोजन घालावे किंवा दहा हजार गायत्री जपावी किंवा सहस्रतिलहोम करावा किंवा बारा स्नाने करावी किंवा दोनशे वेळा प्राणायाम करावा इ. प्रत्याम्नाय सांगितले आहेत. चांद्रायणाचा प्रत्याम्नाय, प्राजापत्य कृच्छ्राच्या तिप्पट व अतिकृच्छ्राच्या दुप्पट समजावा. अन्य प्रायश्चित्तांसंबंधीही असेच वेगवेगळे प्रत्याम्नाय सांगितले आहेत.

**प्रायश्चित्ताला अपवाद** – ऐंशी वर्षांच्या पुढचा वृद्ध, सोळा वर्षाच्या आतील मुलगा, रोगी व स्त्रिया यांना अर्धे प्रायश्चित्त सांगावे. पाच वर्षापर्यंतच्या मुलाला प्रायश्चित्त नाही.

शूद्राला एक चतुर्थांश, वैश्याला अर्धे, राजाला तीन चतुर्थांश व ब्राह्मणाला सबंध असा प्रायश्चित्तविभाग होता. हा नियम सर्वसाधारण पापांना लागू पडे. पण ब्राह्मणाविरुद्ध तदितर वर्णातील माणसाने अपराध केल्यास त्याला मात्र अधिक प्रायश्चित्त सांगितले होते. पण कालांतराने हाही फरक कमी झाला आणि सर्वांनाच प्रायश्चित्ते समान व कमी प्रमाणात सांगितली गेली. त्रैवर्णिकांना वेदपारायण व गायत्रीजप ही बहुतेक पापांच्या शुद्धीसाठी प्रायश्चित्ते म्हणून सांगितली आहेत. अत्यंत पश्चात्तापपूर्वक ईश्वराचे नामस्मरण केल्यास सर्व पातकांची निष्कृती होते, असे पुराणांनी सांगितले आहे. 'पश्चात्तापेन शुद्ध्यति' हा श्लोकचरण सर्वत्र प्रसिद्धच आहे.

वैदिक आर्य व इराणी आर्य एकत्र होते, तेव्हापासूनच या प्रायश्चित्तकल्पनेचा उगम झाला असावा. पापासाठी प्रायश्चित्त घेण्याची हिंदू धर्मातील पद्धत आणि अवेस्ताच्या वेंदिदाद या विभागात दिलेली इंडो-इराणियन पद्धत यांत बरेच साम्य आढळते. प्रायश्चित्तकल्पना ही केवळ हिंदू धर्मातीलच कल्पना नसून, जगातील बहुतेक सर्व धर्मांत ती आढळून येते.

**पारशी प्रायश्चित्त** – अवेस्ताच्या पाझंद नामक विभागात प्रायश्चित्तार्थ म्हणायच्या प्रार्थना दिल्या आहेत. या प्रार्थना दस्तूर अदर्बद महमद याने इ. स. च्या ४ थ्या शतकात रचलेल्या असून, त्यांत अनेक पातकांचा उल्लेख आहे. रोज रात्री झोपण्यापूर्वी प्रत्येक पारश्याने ते प्रार्थनामंत्र म्हणायचे असतात.

**इस्लामी प्रायश्चित्त** – मुसलमानांना पाच गोष्टी कर्तव्य म्हणून सांगितल्या आहेत. (इस्लाम पाहा.) त्या कर्तव्यात चूक पडल्यास जादा प्रार्थना, अन्य वेळी रोझे राखणे, मागच्या वर्षी करायचा राहिलेला दानधर्म चालू साली करणे व दुसऱ्याकरवी मक्केची यात्रा करणे ही इस्लामी धर्मातील प्रायश्चित्ते होत. कुराणात वेगवेगळ्या गुन्ह्यांना सांगितलेल्या शिक्षा हीसुद्धा प्रायश्चित्तेच आहेत. प्रायश्चित्ताचा खर्च करण्याची ज्यांना ऐपत नसेल, त्यांना उपवास हा प्रत्याम्नाय त्यांच्या शास्त्रात सांगितला आहे.

**ख्रिस्ती प्रायश्चित्ते** – ख्रिस्ती धर्मात प्रायश्चित्ताची कल्पना ख्रिस्ताला क्रुसावर चढवल्यापासूनच चालू होते. येशूने स्वतः क्रुसावर मरण पत्करून मानवजातीच्या पापांचे प्रायश्चित्त केले, अशी कल्पना ख्रिस्ती धर्मवेत्ते मांडतात. धर्मगुरूजवळ स्वकृत पापांचा उच्चार करून क्षमा मागणे, हा ख्रिस्ती प्रायश्चित्ताचा प्रमुख प्रकार आहे. याला ते कन्फेशन असे म्हणतात. स्वमुखाने पापोच्चार, उपवास व धर्मसंस्थांना द्रव्यदान हे ख्रिस्ती प्रायश्चित्ताचे तीन रूढ प्रकार आहेत. **पाहा** – पाप. [ हि. ध.; म. ज्ञा. को.; हिं. अ. मी.; ध. सू. ओ. डे.; ध. शा. वि.; एन्सा. रि. ए. ]



## प्रायश्चित्तधेनुदान

एक दान. याचा विधी असा– सुलक्षणी, दुधाळ, उमदी व गरीब आणि कपिला गाय आणून तिची शिंगे सोन्याने व खूर रुप्याने मढवावे. तिच्या शेपटीला मोत्ये बांधावी; अंगावर वस्त्रालंकार घालावे. नंतर धेनूची व ब्राह्मणाची पूजा करून तिचे दान करावे. [ दा. चं. ]

## प्रायोपवेशन

एक व्रत. याची व्याख्या अशी–' प्रायेण मृत्युनिमित्तकानशनेन उपवेशः स्थितिः ' = मृत्यूला कारणीभूत अशा अनशनाने अर्थात निराहार उपोषणाने मृत्यू घडेपर्यंत राहणे, म्हणजे प्रायोपवेशन होय (श. क.). यात सर्व कर्मसंन्यासपूर्वक आहारत्याग करून मृत्यूला निमंत्रण द्यायचे असते. 'तू सर्पदंशाने सात दिवसांत मरशील,' असा ऋषीचा शाप झाल्यामुळे परीक्षिती राजाने प्रायोपवेशन करून मृत्यू पत्करला, अशी कथा भागवतात आहे (भाग. पु. १·१९).

जैनांमध्ये ही प्रायोपवेशनाची प्रथा अजून चालू आहे. तिला ते सल्लेखना असे म्हणतात. [ श. क.; हिं. वि. को. ]

## प्रारब्ध

जीव जी बरीवाईट कर्मे करतो, त्यांचे फल त्याला भोगावेच लागते. मग ते कर्म या जन्मातले असो किंवा पूर्वजन्मातले असो. मनुष्याचे पूर्वकर्म त्या त्या जीवाच्या नावे संचित होऊन राहते. यालाच लौकिक भाषेत दैव असे म्हणतात. या संचित कर्मापैकी जो भाग फल देण्यास प्रारंभ करतो, त्याला प्रारब्ध म्हणतात. याचे स्वेच्छाप्रारब्ध, परेच्छाप्रारब्ध व अनिच्छाप्रारब्ध असे तीन प्रकार पंचदशीत मानले आहेत.

**स्वेच्छाप्रारब्ध** – आपण कुपथ्य केले असता आपला मृत्यू ओढवेल हे माहीत असूनही मनुष्याने जाणूनबुजून कुपथ्य करणे व मरण ओढवून घेणे, हे स्वेच्छाप्रारब्ध म्हणावे. चंद्राने गुरुस्त्रीशी गमन करणे, हे स्वेच्छाप्रारब्धाचे उदाहरण होय. सामर्थ्यवान पुरुषही मूलभूत अशा स्वेच्छाप्रारब्धाचे निवारण करण्यास समर्थ होत नाही, असे विद्यारण्यस्वामी म्हणतात.

**परेच्छाप्रारब्ध** – दुसऱ्या कोणाच्या तरी सामर्थ्यामुळे जीवाला सुखदुःख भोगावे लागणे, याला परेच्छाप्रारब्ध असे म्हणतात. राजा हरिश्चंद्र हे याचे उत्तम उदाहरण होय. वसिष्ठाच्या अनुग्रहामुळे त्याला सुख प्राप्त झाले व विश्वामित्रांच्या क्रोधामुळे क्लेश भोगावे लागले.

**अनिच्छाप्रारब्ध** – पुष्कळदा मनुष्य स्वतःची इच्छा नसताही दुसऱ्याच्या इच्छेला बळी पडून बरीवाईट कर्मे करतो व त्यांचे फल भोगतो. याला अनिच्छाप्रारब्ध म्हणतात. शिखिध्वज राजाला तत्त्वज्ञान झाल्यानंतर त्याला कोणत्याही प्रकारची भोगेच्छा

उरली नव्हती. असे असता केवळ चूडाला राणीच्या आग्रहामुळे त्याला राज्यभोग भोगावे लागले, ही योगवासिष्ठातली कथा अनिच्छाप्रारब्धाचे उदाहरण होय.

वरील तीन प्रकारची प्रारब्धे तीव्र, मध्य, मंद व सुप्त अशा चार भेदांनी बारा प्रकारची होतात, असे अनुभूतिप्रकाश या ग्रंथात सांगितले आहे. तसेच या प्रत्येकाचे सोदाहरण स्पष्टीकरण अच्युतरायाने आपल्या अद्वैतामृतमंजिरी या ग्रंथात केले आहे.

योग, भक्ती आणि आत्मज्ञान यांच्या योगाने संचित कर्मे क्षीण होतात; पण प्रारब्ध मात्र भोगूनच संपवावे लागते. 'प्रारब्धकर्मणां भोगादेव क्षयः' हे वचन या बाबतीत सुप्रसिद्ध आहे. आत्मज्ञानी पुरुषालाही प्रारब्धभोग चुकत नाहीत. देहाची सुखदु:खे ही प्रारब्धाधीन असतात, असे सर्व संतांचे आणि तत्त्वज्ञान्यांचे सांगणे आहे. [श. क.; भा. सं. सा. २]

**प्रार्थना** प्र + अर्थ् = प्रकर्षाने याचना करणे, या धातूवरून हा शब्द बनला आहे. देवापुढे विनम्र होऊन त्याच्यापाशी आपल्याला इष्ट असेल ते अंतरीच्या तळमळीने मागणे याला प्रार्थना म्हणतात. प्रार्थनेत आदर व विनवणी दोन्ही असतात. पण प्रार्थनेचा अर्थ एवढाच संकुचित नाही. संस्कृतीच्या इतिहासात तिला भौतिक, नैतिक व सामाजिक असे त्रिविध अधिष्ठान प्राप्त झाले आहे.

प्रार्थनेची परपरा अत्यंत प्राचीन आहे. ती थेट विश्वातल्या आदिमानवापर्यंत जाऊन पोचते. जेव्हा माणसाच्या मनात देवकल्पनेचा उदय झाला, तेव्हाच प्रार्थनेचाही उगम झाला. वादळी वारे, उल्कापात, भूकंप, महापूर, अतिवृष्टी, इ. नैसर्गिक उत्पात पाहताना व त्यांचे परिणाम अनुभवताना माणसाला वाटले, की या कोणीतरी प्रचंड देवता असून, त्या सृष्टीत थैमान घालीत आहेत. त्याबरोबरच आपण माणसे अत्यंत अल्पशक्तीची आहो आणि त्यामुळे या अफाट, अद्‌भुत शक्तीशी आपण सामना देऊ शकणार नाही, अशीही त्याची समजूत झाली. म्हणून मग त्याने या अफाट शक्तीच्या देवतांनी आपला, आपल्या पोराबाळांचा आणि आपल्या निर्वाहसाधनांचा नाश करू नये, अशा उद्देशाने त्या देवतांची प्रार्थना सुरू केली. त्याला आपल्या दुबळेपणाच्या जाणिवेतूनच प्रार्थनेची स्फूर्ती झाली. ती भीती आणि दुबळेपणाची जाणीव आजही नष्ट झालेली नाही. त्यामुळे जगातल्या सर्व मानवसमाजांत या ना त्या प्रकारे प्रार्थनेची पद्धत आजही रूढ आहे. प्रार्थना हा जणू माणसाचा स्वभावधर्मच बनला आहे. मनुष्याची ही सहजप्रवृत्ती जाणूनच जगातल्या सर्व धर्मसंस्थापकांनी व संप्रदायप्रवर्तकांनी आपल्या धर्म-संप्रदायांत प्रार्थनेचा एक आवश्यक धर्मांग म्हणून स्वीकार केला आहे. त्या त्या धर्मसप्रदायांचे अनुयायी धर्मविहित पद्धतीने ईश्वराची प्रार्थना करीत असतात.

प्रार्थना ही सकाम व निष्काम अशी उभयविध असू शकते. बाह्य लौकिक वस्तू, धनधान्य, पुत्रपौत्र, निरामय जीवन याच्या प्राप्तीसाठी केलेली प्रार्थना ही सकाम होय. निर्हेतुकपणे कोणतेही मागणे न मागता, देवा तुझी इच्छा असेल तसे कर, असे म्हणून प्रार्थनेच्या द्वारे भगवंताला आत्मसमर्पण करणे, ही निष्काम प्रार्थना होय. पहिल्या प्रार्थनेत माणूस बहिर्मुख असतो, तर दुसऱ्या प्रार्थनेत तो अंतर्मुख होतो. म्हणून पहिली प्रार्थना गौण व दुसरी श्रेष्ठ समजली जाते.

सामान्यपणे इष्ट देवतेची पूजा करून, तिला नैवेद्य दाखवून व आरती करून तिची प्रार्थना करणे, अशी हिंदूची पद्धत आहे. पण जेव्हा हिंदूना पूजा-पद्धती माहीत नव्हती आणि जेव्हा यज्ञ किंवा बलिदान हे ईश्वरी कृपाप्रसादाचे एकमेव साधन मानले जात होते, तेव्हाही आपले वैदिक आर्य विविध देवतांची प्रार्थना करीत होते. ऋग्वेद हा बह्वंशी प्रार्थनामयच आहे.

वैदिकांचा दृष्टिकोन प्रार्थनेच्या बाबतीत पारलौकिक नसून ऐहिक होता. मृत्यूनंतर मिळणाऱ्या स्वर्ग, मोक्ष, इ. गोष्टींच्या प्राप्तीची त्यांना कदरच नव्हती असे जरी नसले, तरी ते केवळ ऐहिक सुखसमृद्धी, गोधनाची वृद्धी, पुत्रपौत्रांचे कल्याण, दीर्घायुष्य, इ. लौकिक आकांक्षांसाठीच प्रार्थना करीत असलेले दिसतात. त्या दृष्टीने ऋग्वेदातील प्रार्थनांची काही उदाहरणे अशी—

**गव्यन्त इन्द्रं सख्याय विप्रा अश्वायन्तो वृषणं वाजयन्तः ।**
**जनीयन्तो जनिदामक्षितोतिं मा च्यावयामोऽवते न कोशम् ।।**
(ऋ. ४. १७. १६)

अर्थ—आम्ही स्तोतृजन गोधनाची, अश्वसंपत्तीची, अन्नाची व स्त्रीसहवासाची इच्छा करीत आहो. त्यासाठी सकलकामवर्षक व वीर असा जो इंद्र त्याच्या चित्ताला आम्ही आपल्याकडे ओढून घेतो. तलावातून बांधून आणलेला उच्छ्वास जसा अखंड चालतो, तसा या इंद्राच्या संरक्षणसामर्थ्याचा प्रवाहही अखंड चालत आहे.

**अश्वावतीर्गोमतीर्न उषासो वीरवतीः सदमुच्छन्तु भद्राः ।**
**घृतं दुहाना विश्वतः प्रपीता यूयं पात स्वस्तिभिः सदा नः ।।**
(ऋ. ७. ४१. ७)

अर्थ— हे उषादेवींनो, तुम्ही आमचे घर, अश्व, गायी आणि वीर पुत्र यांनी युक्त करून त्यामध्ये सुखाचा प्रकाश करा. घृताने परिपूर्ण, सर्व प्रकारे परिपुष्ट व कल्याणकारक होऊन, तुम्ही आमचे रक्षण करा.

**त्वादत्तेभी रुद्र शन्तमेभिः शतं हिमा अशीय भेषजेभिः ।**
**व्यास्मद् द्वेषो वितरं व्यंहो व्यमीवाश्चातयस्वा विषूचीः ॥**

(ऋ. २. ३३. २)

अर्थ—हे रुद्रा, आम्ही तू दिलेल्या सुखकारक औषधींच्या द्वारे शंभर वर्षे जीवित राहण्याची इच्छा करतो. तू आमच्या शत्रूंचा नाश कर, आमचे पाप पूर्णरूपाने दूर कर आणि आमच्या शरीरव्यापी व्याधीही नष्ट कर.

वैदिक आर्य मुखाने देवतांची प्रार्थना करीत आणि हाताने पुरुषार्थ आचरीत. त्यांनी बल, उत्साह आणि संघटन या गोष्टींच्या द्वारे भौतिक समृद्धीही पुष्कळच मिळवली. ऋग्वेदातील दानस्तुतीची सूक्ते वाचल्यावर तत्कालीन आर्य राजांच्या विपुल समृद्धीची कल्पना येते.

पण माणसाचे मन केवळ भौतिक समृद्धीवरच संतुष्ट राहू शकत नाही. सर्व प्रकारची जीवनसौख्ये उपभोगीत असताही त्याला त्याहून वेगळ्या अशा मानसिक सुखाचीही स्वभावसिद्ध आकांक्षा असते. ही आकांक्षा बलवत्तर होणे हे त्याच्या मानसिक संस्कृतीच्या विकासाचे लक्षण होय. वैदिक आर्यांच्या मानसिक संस्कृतीचा विकास हळूहळू त्या कालातच होऊ लागला होता. भौतिकाच्या पलिकडे असलेल्या कोणत्या तरी अज्ञात आणि दिव्य तत्त्वाकडे त्यांचे मन ओढ घेऊ लागले होते. सांसारिक सुख आणि वैभव मिळवीत असता, ते सुख-वैभव दुसऱ्याला लुबाडून नव्हे, तर सन्मार्गानी प्राप्त व्हावे, अशी जाणीव त्यांच्या मनात निर्माण होऊ लागली होती. त्या जाणिवेनेच एक वैदिक ऋषी अग्नीची प्रार्थना करताना म्हणतो—

**अग्ने नय सुपथा राये अस्मान् ।**

(ऋ. १. १८९. १)

अर्थ—हे अग्ने, तू आम्हांला चांगल्या मार्गाने वैभवाकडे ने.

इहलोकी आपण जन्माला येतो, वाढतो, ज्ञान मिळवतो, खातो-पितो आणि जगतो. या सर्व गोष्टींत आपण आई-बाप, गुरू, मित्र-बांधव अशा अनेकांचे ऋण घेत असतो. हे ऋण आपल्याला फेडलेच पाहिजे आणि शक्य तेवढे स्वावलंबी जीवन जगले पाहिजे, ही जाणीव वैदिक आर्यांच्या मनात त्या कालीच निर्माण झाली होती. गृत्समदाची त्या बाबतीतली प्रार्थना अशी—

**पर ऋणा सावीरध मत्कृतानि माहं राजन्नन्यकृतेन भोजम् ।**

(ऋ. २.२८.९)

अर्थ— (हे वरुणा) मी केलेली ऋणे तू फेडून टाक. हे राजन, दुसऱ्याने मिळवलेल्या धनावर मी पोट भरावे असा प्रसंग (मजवर) आणू नकोस.

पुष्कळदा समृद्धी ही माणसाच्या मनात विकृती उत्पन्न व्हायला कारणीभूत होते. जसजशी संपत्ती मिळेल, तसतसा लोभही वाढतो आणि त्याचे लाड पुरवण्याच्या कामी अनेकांचे अहित करूनही आपला स्वार्थ साधावा, ही दुष्ट इच्छा मनात उत्पन्न होते. त्यातून मग अनेक अनर्थ उद्भवतात. हे जाणून शुभ संकल्पाची कामना धरणारा यजुर्वेदातला एक ऋषी प्रार्थना करतो, की अनेक प्रकारच्या शक्ती आणि कला असणारे माझे मन शुभ संकल्प करणारे होवो. (शु. य. ३४.१) वैदिक प्रार्थनेतला हा नैतिक आशय होय.

अवेस्ता या झरथुष्ट्री धर्मग्रंथातल्या प्रार्थनांमध्येही हा नैतिक आशय स्पष्टपणे दिसतो. त्या ग्रंथातली एक सार्वत्रिक प्रार्थना अशी –

**ये मोई अषात् हइयीम हचा वरेषईनी ।**
**जरथुस्त्राय ह्यत वस्ना फेरषोत्तेमेम् ।**
**अह्माई मीझदेम् हनन्ते पराहूम ।**
**मने विस्ताइश् मन् वीस्पाइश गावा ।**
**अजी ताचीत् मोई सांस् त्वेम् मझदा व एदिश्तो ॥**

अर्थ— माझ्याप्रीत्यर्थ तळमळीने पवित्र स्थानी जो कोणी झरतुष्ट्राने आदेशिलेले व त्याला अत्यंत प्रिय असलेले नीतिनियम अंमलात आणील, त्याला हे अखिल विश्व, चिर सौंदर्याचे नवे नवे जग अशा प्रकारे अनुभवता येईल. हे मझदा (जगदीश्वरा), जे जे सर्वोत्तम ते ते तुलाच समजते. या सर्व गोष्टीची व इष्ट वस्तूंची प्राप्ती तुझ्याच कृपेने मला लाभो.

अवेस्त्यातली आणखी एक छोटी पण भावगंभीर प्रार्थना अशी –

**अष वहिश्त, अष स्रएश्त । दरसोम थ्वा**
**पहरि थ्वा जम्याम हमॅम थ्वा हज्म !**

अर्थ— सर्व सद्गुणांची कास धरल्यानेच तुझे (परमेश्वराचे) दर्शन होईल. तुझ्या सन्निध येण्याचे व तुझ्याशी एकरूप होण्याचे भाग्य मला प्राप्त होवो.

वैदिक ऋषींच्या बहुतेक सर्व प्रार्थना समाजासाठी आहेत. ते 'मला दे' असे मागण्याच्या ऐवजी 'आम्हांला दे' असे सर्वांसाठी मागतात. प्रार्थनेच्या अशा सामाजिक आशयातूनच राष्ट्रविषयक प्रार्थनेचा उदय होत असतो. समाज ज्या भूमीवर वसला जातो, ती भूमी त्याच्या वाटचाला मातृभूमी किंवा पवित्र भूमी ठरते. तो समाज पुरुषार्थी व महत्त्वाकांक्षी असेल, तर त्या भूमीच्या अभिमानातूनच तो समाज राष्ट्र या अवस्थेला प्राप्त होतो. व्यक्तीचे वैभव वाढायचे व व्यक्तीला सुखी जीवन लाभायचे, तर राष्ट्र समृद्ध व सुखी झाले पाहिजे, असे समाजातल्या जाणत्या माणसांना वाटू लागते. मग ते व्यक्तिवैभवाच्या कामनेआधी राष्ट्राच्या अभिवृद्धीची कामना करू लागतात. त्यातूनच राष्ट्रीय प्रार्थना उगम पावतात. यजुर्वेदातली

यज्ञप्रसंगी केली जाणारी एक राष्ट्रीय वृत्तीची प्रार्थना अशी—

**आ ब्रह्मन् ब्राह्मणो ब्रह्मवर्चसी जायतामाऽस्मिन् राष्ट्रे राजन्य इषव्यः शूरो महारथो जायतां दोग्ध्री धेनुर्वोढाऽनड्वानाशुः सप्तिः पुरन्धिर्योषा जिष्णू रथेष्ठाः सभेयो युवाऽस्य यजमानस्य वीरो जायतां निकामेनिकामे नः पर्जन्यो वर्षतु फलिन्यो न ओषधयः पच्यन्तां योगक्षेमो नः कल्पताम् ।।**

(तै. सं. ७.५.१८.१)

अर्थ— या राष्ट्रात ब्राह्मणांमध्ये ब्रह्मवर्चस्वी विद्वान जन्माला येवोत. क्षत्रिय हे शूर, धनुर्धर आणि शत्रूला परास्त करणारे होवोत. गाई दुधाळ होवोत. बैल खूप ओझे वाहणारे होवोत. घोडे सतेज होवोत. स्त्रिया ( चांगल्या प्रकारे ) गृहस्थाश्रम चालवणाऱ्या होवोत. या यजमानाला सभेत बसणारा वीर पुत्र होवो. जेव्हा जेव्हा गरज भासेल तेव्हा तेव्हा पर्जन्यवृष्टी होवो. आमची शेती, बागाईत फलवती होवो. आमचा योगक्षेम होवो. (म्हणजे आम्हांला नवे वैभव मिळो व मिळालेले सुरक्षित राहो.)

उपनिषत्कालीन भारतीय ऋषींच्या प्रार्थनांचे स्वरूप याहून बदललेले दिसते. ते भौतिक समृद्धीपेक्षा आत्मकल्याणाला विशेष महत्त्व देऊ लागले. प्रार्थनेने मनाचे बळ वाढते आणि आत्मशक्तीचाही विकास होतो, हे त्यांना कळून आले आणि ते आत्मज्ञान व आत्म्याचे अमरत्व यांच्यासाठी परमेश्वराला प्रार्थू लागले. उपनिषदातली पुढील प्रार्थना याच अर्थाची आहे —

**असतो मा सद् गमय । तमसो मा ज्योतिर्गमय ।**
**मृत्योर्मा अमृतं गमय ।**

(बृहदा. १·३·२८)

अर्थ —(हे परमेश्वरा) मला असताकडून सताकडे ने, अंधाराकडून (आत्म) प्रकाशाकडे ने, मृत्यूकडून आत्मतत्त्वाकडे ने.

पौराणिक प्रार्थना या वैयक्तिक वा सामाजिक अशा उभयविध आढळतात. पुराणांनी अनेक काम्य व्रते आणि पूजाविधाने सांगितली आहेत. त्यांमध्ये ते व्रत करणारे स्त्री–पुरुष ज्या प्रार्थना करतात, त्या केवळ लौकिक व भौतिक असतात. मला धन मिळो, भाग्य मिळो, संतती मिळो आणि सर्व प्रकारचे सांसारिक सुख मिळो, अशाच जातीच्या त्या आहेत. स्त्रियांच्या प्रार्थनांत अखंड सौभाग्य आणि पुत्रपौत्रांची अभिवृद्धी या दोन गोष्टी न चुकता असतात. मरणोत्तर स्वर्ग, शिवलोक किंवा विष्णुलोक मिळावा, असे त्या प्रार्थनेला एक शेपूट जोडलेले असते; पण त्याला तेवढेसे महत्त्व नसते. देवीच्या उपासकांची सप्तशतीतील प्रार्थना पाहिल्यावर तिचे हे ऐहिक स्वरूप स्पष्टपणे कळून येते. ती प्रार्थना अशी —

**रूपं देहि जयं देहि यशो देहि द्विषो जहि ।**
**पुत्रान् देहि धनं देहि सर्वकामांश्च देहि मे ।**

अर्थ — हे देवी, मला रूप दे, जय दे, यश दे आणि माझ्या शत्रूंचा नाश कर. मला पुत्र दे, धन दे आणि माझे सर्व मनोरथ पूर्ण कर.

भारतात भक्तिमार्गाची प्रस्थापना झाल्यानंतर भक्तिमार्गी वैष्णवजनांनी भुक्ती आणि मुक्ती या दोन्ही गोष्टी अवांछनीय समजून केवळ भक्ती हीच प्रार्थनीय मानली. ' न लगे मुक्ति धन संपदा ' असे तुकोबांनी म्हटले आहे, ते भक्तीच्या संदर्भातच. वैष्णवांच्या लेखी भक्ती हे ईश्वरप्राप्तीचे केवळ साधन नसून, ते स्वयमेव साध्यही आहे. म्हणून परमेश्वराकडे मागताना ते ' तू मला प्राप्त हो, ' असे म्हणण्यापेक्षा ' तुझी भक्ती मला लाभो ' असे म्हणणेच अधिक पसंत करतात. प्रल्हादाने तर नृसिंहाकडे ' माझ्या अंतरात तुझ्यावाचून अन्य कोणती कामनाच उत्पन्न होऊ नये ' असा वर देवाकडे मागितला आहे व देवाकडे जो सकाम प्रार्थना करतो, तो भक्त नसून वाणी आहे असे म्हटले आहे (भाग. पु. ७·१०· ४–७).

भक्ती हेच परमसुख व परमसाध्य मानून दुसरा एक भक्त म्हणतो ते असे —

**न धनं न जनं न सुन्दरीं कवितां वा जगदीश कामये ।**
**मम जन्मनि जन्मनीश्वरे भवताद् भक्तिरहैतुकी त्वयि ।।**

अर्थ— हे जगदीश्वरा, मला धनाची, जनाची, सुंदर स्त्रीची, काव्यशक्तीची, कशाचीच कामना नाही. हे प्रभो, माझ्या जन्मजन्मांतरात तुज ईश्वराची निर्हेतुक भक्ती मला प्राप्त व्हावी, एवढीच माझी प्रार्थना आहे.

बहुतेक सर्व साधुसंतांच्या प्रार्थना याच जातीच्या आहेत. प्रार्थना ही जीवनाचे एक अभिन्न अंग बनावी, ती एक सहजप्रवृत्ती व्हावी, अशी भारतीय संतांची धारणा आहे. दिव्य शक्तीशी अनुसंधान जोडण्याचे व परमेश्वराची जवळीक करण्याचे ते एक अमोघ साधन आहे, असे ते समजतात. सर्व धर्मांची व संप्रदायांची धारणाही तशीच आहे.

मनुष्याचा जसजसा नैतिक व आत्मिक विकास होतो, तसतशी त्याच्या प्रार्थनेची उंची वाढते. मला सुख हवे असेल तर आत्मौपम्य बुद्धीने दुसराही सुखी झाला पाहिजे; तसेच समाजात सर्वत्र सुखाची पेठ उघडली गेली पाहिजे, असे त्याला वाटू लागते. ज्या ईश्वराची मी भक्ती करतो तोच सर्व मानवांचा मायबाप आहे आणि सर्व सानथोर, राव–रंक, स्त्री–पुरुष, त्याचीच लेकरे आहेत, अशी भावना भक्ताच्या अंतरात दृढ झाली, दुसऱ्याच्या दुःखाने आणि आपत्तीने त्याचा जीव हळहळला, दारिद्र्यात व अज्ञानात खितपत पडलेली माणसे पाहून त्यांच्या उद्धाराचा त्याला कळवळा आला, की मग त्याच्या प्रार्थनेचे स्वरूप विश्वव्यापक व सर्वसमावेशक होते. पुढील

प्रसिद्ध प्रार्थना याच प्रकारची आहे–

**सर्वेऽत्र सुखिनः सन्तु सर्वे सन्तु निरामयाः।**
**सर्वे भद्राणि पश्यन्तु मा कश्चिद् दुःखमाप्नुयात्।।**

अर्थ– या जगात सगळे सुखी होवोत. सगळे निरोगी होवोत. सगळे शुभदर्शन करोत आणि कोणालाही दु:ख न होवो.

**दुर्जनः सज्जनो भूयात् सज्जनः शान्तिमाप्नुयात्।**
**शान्तो मुच्येत बन्धेभ्यो मुक्तश्चान्यान् विमोचयेत्।।**

अर्थ– जो दुर्जन असेल तो सज्जन होवो. सज्जनाला शांती प्राप्त होवो. शांताला संसारबंधनातून मोक्ष प्राप्त होवो आणि जो मुक्त झाला असेल तो इतरांना मुक्त करो.

ज्ञानेश्वरांनी ज्ञानेश्वरीच्या शेवटी देवाकडे पसायदान मागितले आहे आणि त्यात सर्व प्राणिमात्राच्या कल्याणाचीच प्रार्थना केली आहे. सांप्रदायिक बंधनांतून मुक्त असलेली आणि केवळ विश्वकल्याणासाठी स्फुरलेली अशी ती सर्वोच्च प्रार्थना आहे. तिच्यातील काही ओव्या अशा–

**जे खळांची व्यंकटी सांडो। तया सत्कर्मी रती वाढो।**
**भूतां परस्परें जडो। मैत्र जीवाचें।।**
**दुरिताचें तिमिर जावो। विश्व स्वधर्मसूर्यें पाहो।**
**जो जें वांछील तो तें लाहो। प्राणिजात।।**
**किंबहुना सर्व सुखीं। पूर्ण होऊनि तिहीं लोकीं।**
**भजिजो आदि पुरुषीं। अखंडित।।**

येशू ख्रिस्ताने आपल्या शिष्यांना प्रार्थना शिकवली, तीही मानवमात्राचे नैतिक व आध्यात्मिक कल्याण चिंतणारी आहे–

**आमच्या स्वर्गीय पित्या,**
**तुझे नाव पवित्र मानले जावो, तुझे राज्य येवो,**
**जसे स्वर्गात तसे पृथ्वीवरही तुझ्या इच्छेप्रमाणे होवो.**
**आमचे रोजचे अन्न आज आम्हांस दे**
**आणि जसे आम्ही आमच्या अपराध्यांना क्षमा करतो,**
**तसे तू आमच्या अपराधांची क्षमा कर.**
**आणि आम्हांला मोहात पडू देऊ नकोस;**
**पण वाइटापासून आम्हांला मुक्त कर. तथास्तु!**

ख्रिस्ती लोक प्रार्थना म्हणजे देवाशी संभाषण असे मानतात. नवे जीवन, नवी शक्ती व नवे धैर्य प्राप्त व्हावे यासाठी ख्रिस्ती लोकांची प्रार्थना असते. त्यांच्या प्रार्थनेचे वैयक्तिक व सामुदायिक असे दोन भाग असतात. वैयक्तिक प्रार्थना व्यक्तिगत हितासाठी व सामुदायिक प्रार्थना सर्वांच्या हितासाठी असते. केवळ आप्तेष्टांसाठी नव्हे, तर शत्रूसाठीही प्रार्थना करावी असे येशू ख्रिस्त सांगतो. मनुष्याचे सर्व जीवनच प्रार्थनामय व्हावे, अशी आकांक्षा त्याने व्यक्त केली आहे व सामुदायिक प्रार्थनेवर विशेष भर दिला आहे.

इस्लाम हा एकेश्वरी धर्म आहे. तो एका अल्लावाचून दुसऱ्या कोणालाही मानीत नाही. इस्लामी आचारात नमाज म्हणजे ईश्वरप्रार्थना हे एक महत्त्वाचे नित्य कर्म आहे. प्रत्येक मुसलमानाने दिवसातून पाच वेळा नमाज पढावा, अशी मुहंमद पैगंबराची आज्ञा आहे. इस्लाम धर्मातल्या या प्रार्थना स्वतःच्या उद्धारासाठी असतात, मृतात्म्यांच्या मुक्तीसाठी असतात, मित्राची दुर्दशा संपून त्याला सुखसमृद्धी प्राप्त व्हावी यासाठी असतात, मुहंमद व त्याचे वंशज यांच्यासाठी असतात, स्वतःसाठी दुवा मागणाऱ्या असतात आणि दुसऱ्यासाठी ईश्वरी दयेची याचना करणाऱ्याही असतात. (नमाज पाहा).

म. गांधी हे प्रार्थनेविषयी विशेष आस्था बाळगणारे होते. आपल्या स्वातंत्र्यप्राप्तीच्या प्रयत्नांत त्यांनी प्रार्थना हेही एक साधन मानले आणि सायंकाळच्या वेळी उघड्या जागी नित्य नियमाने सामुदायिक प्रार्थना सुरू केली. आपल्या प्रार्थनेसाठी त्यांनी गीता, उपनिषदे व संतवाङमय यांतून वचने निवडली होती; त्याचप्रमाणे अन्य धर्मातूनही काही महत्त्वाच्या प्रार्थना स्वीकृत केल्या होत्या. त्या निमित्ताने त्यांनी सर्व धर्मांच्या व पथांच्या लोकांना एका बैठकीवर आणले आणि सर्वधर्मियांच्यामध्ये बंधुभाव निर्माण करण्याचा प्रयत्न केला. महात्माजींनी प्रार्थना या साधनाचा खूप सखोल अभ्यास केला होता. ते म्हणतात–

जीवनात स्वातंत्र्य आणि स्वाभिमान यांचे रक्षण करणे, ही गोष्ट महत्त्वाची असते. त्यासाठी स्वार्थत्याग व आत्मसमर्पण या गुणांची अपेक्षा असते. ते गुण प्रार्थनेने प्राप्त होतात. प्रार्थना हे सत्याकडे जाण्याचे श्रेष्ठ साधन आहे. प्रार्थना म्हणजे मागणी नव्हे; तर तो सत्याचा शोध आहे. प्रार्थनेने अंतरात्मा जागृत होतो. प्रार्थनेने दुष्ट विचारांवर विजय मिळवता येतो. प्रार्थना ही अहिंसेची जननी आहे. ती असत्याच्या जागी सत्य आणते. असहिष्णुतेच्या जागी सहिष्णुता आणते. ती जीवमात्रावर प्रेम करायला शिकवते. अहिंसा, प्रेम आणि सहिष्णुता या गुणांनी विश्वशांतीची स्थापना होऊ शकते. प्रार्थना ही विश्वमंगलाचा मूलमंत्रच आहे.

आचार्य विनोबा भावे हेही म. गांधींप्रमाणे प्रार्थनेविषयी श्रद्धा बाळगणारे आहेत. त्यांनी त्या विषयाचा स्वतंत्र प्रज्ञेने विचार केला आहे. तेही प्रथम म. गांधींप्रमाणेच समुदायासह प्रार्थना करीत; पण विचारांती त्यांनी ती पद्धत बदलली. प्रार्थनेसाठी ग्रंथोक्त श्लोक किंवा पद्ये म्हणून वाणीचा वापर करणे यापेक्षा मौन प्रार्थना अधिक श्रेयस्कर ठरेल, असे त्यांच्या प्रत्ययास आले. विशिष्ट कालात सामुदायिक मौन, असे त्यांनी आपल्या प्रार्थनेत परिवर्तन केले. मौनात वाणीचा आधार सुटतो

आणि मन सहजच अंतर्मुख होते. मग त्याच्या ठिकाणी चिंतनाची प्रक्रिया सुरू होते.

ब्रह्मविद्येचा लाभ हे विनोबांच्या प्रार्थनेचे उद्दिष्ट आहे. ब्रह्मविद्येवाचून जगात शांति, प्रेम, सख्य, समाधान निर्माण होणार नाही, अशी त्यांची धारणा आहे. ब्रह्मविद्येसाठी प्रथम मनाच्या पलिकडे बुद्धीपर्यंत जाता आले पाहिजे, बुद्धीच्या ठिकाणी विचार करण्याची शक्ती आली पाहिजे आणि बुद्धी स्थिर झाली पाहिजे. पण ही गोष्ट काम, क्रोध, मद, लोभ, इ. विकार तिच्यातून निघून जातील तेव्हाच शक्य होईल. प्रार्थनेच्या साधनेने या विकारांवर अंकुश ठेवता येणे शक्य आहे. आत्मतत्त्व हे बुद्धीच्याही पलिकडचे तत्त्व होय. प्रार्थनेने बुद्धी स्थिर झाल्यावर तिच्या ठिकाणी आत्मज्ञानाचा अर्थात ब्रह्मविद्येचा प्रकाश पडेल. व्यक्तिगत अथवा सामूहिक प्रार्थनेने हे साध्य सिद्ध करायचे आहे. वाङ्मय प्रार्थनेपेक्षा मौन प्रार्थना ही या कामी अधिक समर्थ ठरेल, असे विनोबांचे मत आहे.

शुचिर्भूतपणे आसनावर बसून प्रार्थनेच्या वेळी मन अन्य विषयांतून काढून आपल्या उपास्य देवतेकडे लावावे. ती मूर्ती अंतरात ठसवावी. प्रार्थना मोठ्याने न करता ती मनोमन करावी. प्रार्थनेच्या वेळी देवाच्या कृपाळूपणावर विश्वास ठेवावा, तसेच स्वत:मधल्या दोषांचेही संशोधन करावे. प्रार्थनेत ईश्वराशी एकतानता साधून आपले मन अधिकाधिक शुद्ध, प्रसन्न व उल्हसित होत आहे, असा अनुभव घेण्याचा प्रयत्न करावा. प्रार्थना शक्य तर एकांतात करावी किंवा झोपण्यापूर्वी निवांत वेळी करावी.

प्रार्थनेत माणसाचे नैतिक व आत्मिक बळ वाढवण्याचे विलक्षण सामर्थ्य आहे, असा साधुसंतांचा अनुभव आहे. बळकट प्रार्थनेच्या प्रभावाने दु:साध्य रोगही नष्ट होतात, असाही अनुभव अनेकांनी घेतला आहे. [ श. क.; पूजातत्त्व; एन्सा. रि. ए. ]

## प्रार्थनाचक्र

तिबेटातल्या व जपानमधल्या बौद्ध मठांत काही धातूंची चक्रे तयार करून टांगलेली किंवा खांबांवर बसवलेली असतात. या चक्रांच्या आतल्या बाजूस 'ॐ मणिपद्मे हुम्' हा मंत्र लिहिलेला किंवा कोरलेला असतो. त्या बौद्ध मठांत यात्रेसाठी किंवा उपासनेसाठी येणारे यात्रेकरू ती चक्रे हाताने फिरवतात व जितक्या वेळा चक्र फिरवले जाईल तितका वरील मंत्राचा जप झाल्याचे समजतात. प्रार्थनाचक्र फिरवणे हा एक बौद्ध उपासनेचाच भाग समजला जातो. **पाहा** – तिबेट. [ एन्सा. रि. ए. ]

## प्रार्थनामुद्रा

पूजोपासनेतील एक हस्तमुद्रा. तंत्रसार या ग्रंथात हिची कृती दिलेली आहे, ती अशी –

**प्रसृताङ्गुलिकौ हस्तौ मिथः श्लिष्टौ च सम्मुखौ ।**
**कुर्यात् स्वे हृदये सेयं मुद्रा प्रार्थनसंज्ञिका ।।**

अर्थ – हातांची बोटे पसरून ते जुळवावे व मुखाकडे अग्रे करून ते हृदयावर ठेवावे म्हणजे प्रार्थनामुद्रा होते.

## प्रार्थनासमाज

हिंदू धर्माची सुधारणा करण्याच्या उद्देशाने सुरू झालेला एक पंथ. बंगालमधील ब्राह्मसमाजाचे एक अध्वर्यू श्री. केशवचंद्र सेन यांच्या प्रेरणेमुळे मुंबईतील काही विचारवंतांनी ३१ मार्च १८६७ रोजी या समाजाची स्थापना केली. डॉ. आत्माराम पांडुरंग तर्खडकर हे या समाजाचे पहिले अध्यक्ष होते. प्रार्थना व सेवा यांच्या द्वाराच ईश्वराची पूजा करावी, अशी प्रस्तुत पंथाची धारणा असल्यामुळे त्याच्या प्रवर्तकांनी पंथाला प्रार्थनासमाज असे नाव ठेवले.

इंग्रजी शिक्षणाचा प्रसार आणि पाश्चात्य विद्यांचा प्रभाव यामुळे काही हिंदूंना आपल्या धर्मातील कर्मकांड, अंधश्रद्धा व दुष्ट रूढी यांचा त्या वेळी उबग आला होता. त्या वेळी ख्रिस्ती मिशनरी आपल्या धर्माचा प्रसार करताना हिंदू धर्मातील आचार-विचारांची खूप निंदा करीत. त्यामुळे कित्येक हिंदू आपला धर्म सोडून ख्रिस्ती धर्माचा स्वीकार करू लागले होते. पण ज्यांना हिंदू धर्माचा व संस्कृतीचा अभिमान होता, त्यांच्या मनात धर्मांतराचा यत्किंचितही विचार न येता, ते धर्मसुधारणेचा विचार करू लागले. अशा काही लोकांनीच इ. स. १८४९ साली परमहंस सभा स्थापन केली होती. पण ती लवकरच बंद पडली. पुढे त्या सभेच्या सभासदांनीच प्रार्थनासमाजाची स्थापना केली. इ. स. १८७० मध्ये न्या. रानडे व डॉ. रा. गो. भांडारकर हे समाजाचे सभासद झाले. त्यानंतर सर्वश्री वामन आबाजी मोडक, नारायण गणेश चंदावरकर, वि. रा. शिंदे, सुखठणकर, इ. अनेक कार्यकर्ते समाजाला लाभले.

प्रार्थनासमाजाला जी समाजसुधारणा अभिप्रेत होती, तिचे स्वरूप चतुर्विध होते. जातिभेदाचा नाश, स्त्रीशिक्षणाचा प्रसार, विधवाविवाह व बालविवाहबंदी ही समाजाने आपली चतु:सूत्री ठरवली होती. तिच्यावरच समाजाचा विशेष भर होता. या संस्थेच्या प्रवर्तकांना मूर्तिपूजा मान्य नव्हती व काम्य कर्मेही पसंत नव्हती. त्यामुळे परात्पर परमेश्वराची अनन्य भक्ती हीच परमार्थसाधना म्हणून त्यांनी स्वीकारली व त्या दृष्टीने प्रार्थनापद्धती सुरू केली. अनेक देवतांची उपासना न करता, एकाच ईश्वराचे प्रेमपूर्वक भजन–पूजन आध्यात्मिक रीतीने म्हणजे प्रतीके व प्रतिमा यांचा आश्रय न करता करावे; अशी प्रार्थनासमाजाची धारणा आहे. कर्मवाद व अवतारवाद यांवर

त्यांचा विश्वास नाही. वेदांना ते अपौरुषेय ग्रंथ मानीत नाहीत.

ब्राह्मसमाजाप्रमाणेच प्रार्थनासमाजानेही उपनिषदे व गीता यातील सिद्धान्त आधारभूत मानले आहेत. प्रार्थनासमाजाची विचारप्रणाली ब्राह्मसमाजासारखीच असली, तरी त्या दोन्ही समाजांत पुष्कळ फरक आहे. ब्राह्मसमाजाने मूर्तिपूजा व जातिभेद यांचा संपूर्ण निषेध केलेला आहे. ब्राह्मसमाजाचे सभासद होताना प्रत्येकाला तो निषेध मान्य करावा लागतो. प्रार्थनासमाजाच्या सभासदांवर तसे बंधन नसते. प्रार्थनासमाजाचे सदस्य हिंदूंच्या सण-समारंभात केवळ सामाजिक दृष्टीने भाग घेतात. ते अशा कार्यक्रमांना धार्मिक महत्त्व मात्र देत नाहीत.

प्रार्थनासमाजाचे विचार हिंदू समाजाच्या सर्व थरांत पसरावे, अशी आकांक्षा न्या. रानडे यांच्या मनात होती. ज्ञानदेव, एकनाथ, तुकाराम, इ. संतांनी त्यांच्या काळी समाजात जो भक्तिभाव जागृत केला, तोच भक्तिभाव समाजात पुन्हा जागृत व्हावा, असे त्यांना वाटे. म्हणूनच त्या संतांचे अभंग व ओव्या यांचा समावेश समाजाच्या प्रार्थनेत करण्यात आला. प्रार्थना हाच समाजाचा आत्मा होय, असे त्यांनी मानले.

धर्म व ईश्वरोपासना याविषयी प्रार्थनासमाजाची धारणा डॉ. रा. गो. भांडारकर यांनी पुढीलप्रमाणे विशद केली आहे– उपनिषदे, गीता आणि अर्वाचीन साधुसंत याचे उपदेश, यांच्या पायावर प्रार्थनासमाजाचा धर्म आधारलेला आहे. हल्ली युरोपात धर्मासंबंधी जी उदार विचारसरणी चालू आहे, तिच्या योगे विकसित झालेली तत्त्वेही आम्ही ग्रहण करतो.

प्रार्थनासमाज सगुणाचीच उपासना करतो. पण भौतिक रूप हा देवाचा गुण नाही, देव केवळ चैतन्यमय आहे, असे समाज मानतो. देवाच्या ठायी पूज्यबुद्धी व परमप्रेम ठेवणे, भक्तीने त्याचे भजन व ध्यान करणे, सत्यास व धर्मास अनुसरून आपली वृत्ती आणि आचरण ठेवून त्याचे सत्यस्वरूप व धर्मस्वरूप आपल्या अंत.करणात विकसित करणे, मनुष्य व इतर प्राणी यांजविषयी प्रेम आपल्या हृदयात स्थिर करून आणि त्यांचे कल्याण करण्याविषयी झटून, देवाचे प्रेमस्वरूप आपल्या अंतःकरणात विकसित करणे, त्याची इच्छा सर्व गोष्टीमध्ये प्रमाण धरून, स्वात्मा त्याला समर्पण करणे, ही त्याची उपासना होय.

समाजाच्या प्रार्थनामंदिरात जी साप्ताहिक उपासना होते, तिचे स्थूलमानाने सहा भाग आहेत, ते असे– (१) उद्‌बोधन– उपासकाने जमलेल्या सर्व मंडळींची वृत्ती उपासनोन्मुख करणे, इतर विचार मनातून काढून टाकून परमेश्वरविषयक विचार मनात आणणे. (२) स्तवन– ईश्वराचे वैभव, पावित्र्य, तेज, सामर्थ्य, प्रेमस्वरूप, इ. गुणांचे गायन. (३) कृतज्ञतादर्शन– ईश्वराविषयी कृतज्ञता व्यक्त करणे. (४) प्रार्थना. (५) निरूपण– उपदेशात्मक भाषण व (६) प्रार्थना व आरती. या उपासनेसाठी समाजाने अनेक प्रार्थनामंदिरे बांधली आहेत.



प्रार्थनामंदिर, मुंबई

प्रार्थनासमाज एकेश्वरी मताचा असून त्याला मूर्तिपूजा मान्य नाही. त्यामुळे सर्व सभासदांनी आपल्या कुटुंबातील धार्मिक विधी व संस्कार मूर्तिपूजेविना करावे, अशी त्यांनी प्रथा सुरू केली. त्यासंबंधी समाजाने काटेकोर नियम केलेले नसले, तरी समाजाने स्वीकारलेल्या तत्त्वांशी जुळतील असेच विधी सभासदांसाठी तयार करण्यात आले आहेत. त्या विधींत देवतापूजन नसते. तथापि सर्व सभासद त्याप्रमाणे वागतातच असे निश्चयाने म्हणता येत नाही. हिंदू समाजात राहूनच कार्य करण्याचे धोरण असल्यामुळे पुष्कळ सभासद जुन्या पद्धतीनेच आपले गृह्य संस्कार करतात.

प्रार्थनासमाजाने शिक्षणक्षेत्रातही विशेष कार्य केले आहे आणि अनाथ स्त्रिया व बालके यांच्यासाठी अनेक आश्रमही चालवले आहेत. त्यांतील आर्य महिला समाज, पुणे; राममोहन आश्रम, मुंबई; अनाथबालकाश्रम, पंढरपूर; राममोहन इंग्लिश स्कूल; डिप्रेस्ड क्लास मिशन, इ. संस्था प्रमुख आहेत.

प्रार्थनासमाजाच्या शाखा महाराष्ट्राप्रमाणे गुजरात, आंध्र, तमिळनाड, इ. प्रदेशांतही आहेत. मात्र या संस्थेचा विशेष विस्तार झाला नाही. [ एन्सा. रि. ए.; प्रा. स. इ.; रा. गो. भां. ले. व्या.; सं. चा. अ.; हि. क. इं. पी.; हिं. वि. को. ]

**प्रावरणषष्ठी** एक काम्य व्रत. मार्ग. शु. षष्ठीला देवांना आणि ब्राह्मणांना थंडीच्या निवारणासाठी लोकरीच्या वस्त्राचे दान करणे, असा याचा विधी आहे. [ हि. ध. ]

**प्राशित्रहरण** एक यज्ञीय पात्र. हवीचा याग झाल्यावर ब्रह्मा या ऋत्विजाला जो शेष भाग देतात, त्याला प्राशित्र असे नाव आहे. हा प्राशित्र भाग ज्या पात्रातून देतात, त्याला प्राशित्रहरण असे म्हणतात. हे पात्र खैराच्या लाकडापासून बनवितात. ते टीचभर लांबीचे असून, त्याचा आकार गाईच्या कानासारखा असतो. [ श्री. विद्याधरशास्त्री भिडे ]

**प्रास** एक आयुध. प्राचीन भारतात याचा उपयोग केला जात असे. हे भाल्याच्याच जातीचे, चार ते सात हात लांबीचे आयुध असून, त्याचे अग्र अथवा फाळ अत्यंत धारदार असे. ऋग्वेदात याचा उल्लेख आहे. कौटिल्यानेही याचा उपयोग सांगितला आहे. [ वे. रा. द. ]

**प्रियतम धर्मसभा** एक सप्रदाय. सिंध प्रांतातील लारखाना या गावी राहणाऱ्या प्रियतम नामक एका ब्राह्मणाने ही सभा इ. स. १८८१ च्या सुमारास स्थापन केली व शिकारपूर हे या सभेचे आद्यपीठ बनवले. नामस्मरण, अध्ययन–अध्यापन, मूर्तिपूजा, वेद-पुराणादिकांचा आदर, सदाचरण, इ. तत्त्वांवर या सभेची उभारणी झालेली आहे. या सभेचे अनुयायी आजही शिकारपूरमध्ये आढळतात.

**प्रियव्रत** स्वायंभुव मनूला शतरूपेपासून झालेला पुत्र. हा अत्यंत पराक्रमी होता. एकदा याने एकचाकी रथात बसून मेरूभोवती वेगाने प्रदक्षिणा सुरू केल्या. सूर्य मेरू पर्वताच्या ज्या बाजूवर प्रकाश पाडी, त्याच्या उलट बाजूने हा नेहमी आपला रथ फिरवी. त्यामुळे सूर्याअभावी अंधकारात असलेली मेरू पर्वताची बाजू याच्या रथप्रकाशाने प्रकाशित राहत असे. त्यामुळे याच्या कारकीर्दीत पृथ्वीवर कधीही अंधार पडला नाही. याच्या रथाच्या चाकांच्या योगाने मेरू पर्वताभोवती ज्या सात चाकोऱ्या पडल्या, त्यांचेच पुढे सात समुद्र झाले. प्रत्येक दोन चाकोऱ्यांमध्ये जी जमीन सापडली ती द्वीप बनली. अशा प्रकारे प्रियव्रताच्या रथाच्या योगाने मेरू पर्वताभोवती सात समुद्र व सात द्वीपे तयार झाली.

याच्या दोन पत्न्यांपासून याला तेरा पुत्र व ऊर्जस्वती नावाची एक कन्या झाली. पहिल्या पत्नीच्या दहा मुलांपैकी तिघे तपश्चर्येला वनात निघून गेल्यामुळे उरलेल्या सात जणांना त्याने वरील सप्तद्वीपे वाटून दिली.

प्रियव्रत अत्यंत धर्मशील होता. नारद हा याचा गुरू होता. अकरा अर्बुद वर्षे राज्य केल्यावर पुत्रांवर राज्य सोपवून हा गुरूपदिष्ट मार्गाने परमार्थसाधनाला लागला. [ प्रा. च. को. ]

**प्रियादास** (१६७३ ते १७४३ इ. स.) एक कवी. हा पाटणा येथील रहिवासी होता. याने लिहिलेल्या ग्रंथांवरून याच्या चरित्राची माहिती मिळते, ती अशी –

याचा जन्म सुरतजवळ रामपुरा या गावात ब्राह्मण कुलात झाला. याचा पिता वामदेव व माता गंगाबाई होती. लहानपणीच वृंदावनात जाऊन त्याने मनोहररायाकडून दीक्षा घेतली. त्यानंतर त्याने तीर्थाटन केले. शेवटी तो जयपूरला पोचला. तिथे ध्यानावस्थेत असता नाभाजीने भक्तमाल या आपल्या ग्रंथावर टीका लिहिण्याची त्याला आज्ञा दिली. तदनुसार त्याने भक्तमालावर भक्तिरसबोधिनी ही टीका लिहिली आणि नाभादासाच्या रचनेतील अर्थकाठिण्य दूर केले.

याचा दीक्षागुरू मनोहरराय हा चैतन्य संप्रदायातील राधारमणी शिष्यपरंपरेतील होता. परंतु भक्तमालेवरील टीकेच्या प्रारंभी त्याने निंबार्काचार्याला नमन केले आहे; त्यावरून तो निंबार्कसंप्रदायी असावा, असे वाटते. भक्तमाल हा ग्रंथ प्रियादासाच्या टीकेसहित अभ्यासला जातो. मूळ ग्रंथात त्याने स्वतःच्या पदरची काही भर घातली आहे. तसे करताना त्याने प्राचीन संस्कृत काव्यांतून विपुल अवतरणेही घेतली आहेत. हा ग्रंथ व्रजभाषेत, असून तो उ. भारतात अत्यंत लोकप्रिय आहे. प्रियादासाच्या टीकेने त्याची शोभा वाढली आहे. याशिवाय प्रियादासाने रसिकमोहिनी, अनन्यमोहिनी, चाहवेली, इ. अन्यही काही ग्रंथ लिहिले आहेत. [ हिं. सा. को.; संत-समागम.; चैं. म. ब्र. सा.; हिं. सा. बि.; हिं. वि. को. ]

**प्रीतमदास** (१७१७ ते १७९८ इ. स.) एक संतकवी. याचा जन्म गुजरातमधील बावला गावी भाट कुळात झाला. याच्या पित्याचे नाव प्रभातसिंह आणि मातेचे नाव जयकुँवरीबाई होते. प्रीतमदास जन्मांध होता, असा समज आहे. बाळवयातच तो घर सोडून संत मंडळींत सामील झाला. काही दिवस संतसहवासात राहून तो नडियाद तालुक्यातील संदेसर गावी गेला.

हा वेदान्ती होता. याच्या काव्यरचनेत त्याच्या वेदान्ताचा व्यासंग दिसून येतो. याच्या पदांत भक्ती आणि वैराग्य यांचे मिश्रण आहे. भक्ती म्हणजे तरवारीची धार होय. वीर पुरुषच तिच्यावरून चालू शकतात, असे सांगून पुढे तो म्हणतो—

**प्रेम नो पंथ छे न्यारो सर्व थी, प्रेम नो पंथ छे न्यारो ।**
**जे जाणशे ते शिर साटे माणशे एमा नथी उधारो ।**
**प्रेम नो अमल आव्यो जेनी, आँख माँ ते ऊतरे नही उतार्यो ।**

भावार्थ—प्रेमाचा मार्ग अनोखा आहे. प्रेमरूपी अंमल एकदा डोळ्यांत चढला, की उतरता उतरत नाही. या मार्गाने जाणा-

त्याला शिर उतरवून द्यावे लागते. इथे उधारी चालत नाही.

म. गांधीच्या आश्रमात प्रार्थनेच्या वेळी याचे पुढील पद म्हटले जात असे--

**हरिनो मारग छे शूरानो। नही कायरनु काम जो ने ।।**

अर्थ-- हरीचा मार्ग हा शूराचा मार्ग आहे, तो भित्र्यांना झेपत नाही.

याशिवाय त्याने गुजराती भाषेत भगवद्गीता, अध्यात्मरामायण आणि श्रीमद्‌भागवताचा एकादश स्कंध यांचा सुबोध सरल अनुवाद केला आहे. ब्रह्मलीला, ज्ञानप्रकाश, इ. अन्यही काही त्याचे ग्रंथ आहेत. [मा. सं. म.; वि. मुं. रा. प.]

**प्रीतिव्रत** एक काम्य व्रत. आषाढापासून चार महिने अभ्यंग वर्ज्य करणे व शेवटी शिधासामग्रीचे दान करणे हा या व्रताचा विधी आहे. फल--विष्णुलोकप्राप्ती. [हि. ध.]

**प्रेत** सामान्यपणे मृत देह किंवा शव या अर्थी हा शब्द वापरला जातो. पण या शब्दाचा खरा अर्थ वेगळा आहे. प्र + इत = फार दूर निघून गेलेला, अशा अर्थी मृतदेहाचा त्याग करून गेलेल्या आत्म्याला प्रेत म्हणतात. मृत्युसमयी आत्म्याला एक सूक्ष्म देह प्राप्त होतो, त्याला अतिवाहिक असे नाव आहे. त्या देहाच्या योगाने आत्मा इहलोकातून बाहेर पडतो. त्यानंतर पहिल्या दहा दिवसांत दिलेल्या पूरक दशपिंडांच्या योगाने त्याला प्रेतशरीर प्राप्त होते. ते अंगुष्ठमात्र असते. तशा स्थितीत आत्म्यासाठी जी श्राद्धे केली जातात, त्यांना प्रेतश्राद्धे म्हणतात. ती अमंत्रक असतात आणि त्यांत पितृ शब्दाच्या उच्चाराऐवजी प्रेत हा शब्द वापरतात.

मृत्यूनंतर एका वर्षाच्या कालावधीत एकूण सोळा एकोद्दिष्ट श्राद्धे केली जातात. शेवटी सपिंडीकरण श्राद्ध होते. तोपर्यंत मृताचा आत्मा प्रेतावस्थेत असतो. सपिंडीकरणानंतर तो प्रेतयोनीतून मुक्त होऊन पितरांमध्ये समाविष्ट होतो. सांप्रत मासिक श्राद्धाची निवृत्ती करून बाराव्या किंवा तेराव्या दिवशीच सपिंडीकरण श्राद्ध उरकून घेण्याची प्रथा आहे.

ही प्रेतकल्पना वेदकाली नव्हती. ती गृह्यसूत्रांच्या काळात उगम पावली आणि पौराणिक काळात तिचा पुष्कळ विकास झाला. प्रेतावस्था नष्ट करण्यासाठी पुराणांत अन्य काही विधीही सांगितले आहेत. त्यांतील वृषोत्सर्ग (प्रेताच्या उद्देशाने एक पाडा व पाडी सोडणे) हा मुख्य होय. वर्षभर रोज प्रेताला अन्नजलदान करणे, याला अंबुघटश्राद्ध म्हणतात. गया क्षेत्रातील प्रेतशिलेवर पिंडदान केल्यामुळे प्रेतत्व नष्ट होऊन आत्मा पितरलोकात जातो, अशीही भाविकांची श्रद्धा आहे.

प्रेतावस्था म्हणजेच भूतयोनी किंवा पिशाचयोनी होय. **पाहा** -- अंत्यक्रिया; नवश्राद्ध; एकोद्दिष्ट; पिंडदान; पितृपूजा; पिशाच. [हि. ध.; श. क.; हि. वि. को.; ओ. डे. ॲ. व.]

**प्रेतचतुर्दशी** कार्तिक वद्य चतुर्दशीला हे नाव आहे. या रात्री एक काम्य व्रत करतात. त्यात प्रेतोपाख्यानाचे श्रवण करायचे असते. शिव ही या व्रताची देवता होय. चतुर्दशीला उपवास करून शिवाची पूजा करावी आणि नंतर शिवभक्तांना भोजन घालावे, असा या व्रताचा प्रमुख विधी आहे. हे व्रत करणाऱ्याने त्या दिवशी विवादचिंतामणीत नमूद केलेल्या चौदा भाज्यांचे सेवन करावे, तसेच स्नान झाल्यावर आघाडयाचे रोपटे स्वतःच्या डोक्यावर फिरवीत यमाच्या चौदा नावांनी त्याचे तर्पण करावे; नतर नदीवर आणि ब्रह्मा, विष्णू व शिव यांच्या देवालयांत आणि चव्हाटयावर दिव्यांच्या रांगा लावाव्या.

कुटुंबातील जी माणसे शस्त्रांनी जखमी होऊन मृत झाली असतील, त्यांच्याकरिता या तिथीला पलिते पाजळावे, असे सांगितले आहे. इतर मृतांसाठी अमावास्येला पलिते पाजळावे. फल -- सर्वपापमुक्ती आणि शिवलोकप्राप्ती. [हि. ध.]

**प्रेतशिला टेकडी** उ. भारतातील एक प्राचीन तीर्थस्थान. ही टेकडी गयेपासून दोन कोसांवर वायव्येस आहे. हे यमाचे स्थान म्हणून प्रसिद्ध आहे. तिथे यमराजाचे एक मंदिरही आहे. या टेकडीवर श्राद्ध करून पिंडदान केल्याने मृत पूर्वजांचा नरकातून उद्धार होतो, अशी कथा आहे. टेकडीच्या पायथ्याला रामकुंड नावाचे कुंड असून, त्या कुंडात रामचंद्राने स्नान केले होते, असे म्हणतात. अनेक लोक या कुंडावर स्नानासाठी येतात. [गया गॅझे.]

**प्रेतसंतर्पित** एक बौद्ध देव. हा अवलोकितेश्वराचा एक प्रकार आहे. हा शुभ्रवर्ण व षड्‌भुज असतो. याच्या हातांत रत्न, पुस्तक, माला आणि त्रिशूळ या वस्तू असतात. एक हात वरद मुद्रेत असतो. [इं. बु. इ.]

**प्रेमनारायण** गोंड व परधान लोकांचा देव. महादेवाने हाताच्या फोडातून रैताल व वारियर असे दोन पुरुष निर्माण केले. हे दोघे भाऊ गोंडांचे आदिपूर्वज समजले जातात. आपण कुणाला पुजावे व आपले संरक्षण कोण करील, ही त्यांना चिंता पडली. म्हणून ते महादेवाकडे गेले. महादेवाने त्यांना कैलास पर्वतावरील प्रेमनारायणाची पूजा

करायला सांगितले. नंतर प्रेमनारायण एका गोंडाच्या शरीरात शिरला आणि म्हणाला. 'माझी पूजा सागाच्या झाडाखाली करा. मला बुढादेव म्हणा. कुटुंबात कुणाचा मृत्यू झाला तर वाद्ये वाजवा आणि मृताला उद्देशून, तुला आता बुढादेव भेटेल व तीन वर्षांनी फिरून तू आमच्यात ये, असे म्हणा.' [श्री. दुर्गा भागवत, नवभारत – जुलै १९५६]

**प्रेमनिधी** (इ. स. चे १८ वे शतक) एक तंत्राचार्य. हा कूर्ग प्रदेशाचा रहिवासी होता व कार्तवीर्याचा भक्त होता. लहान वयातच त्याचे लग्न झाले आणि पत्नीही लगेच निवर्तली. त्यामुळे तो विद्याध्ययनासाठी काशीत येऊन राहिला. तिथे तंत्रशास्त्राचा अभ्यास करून त्याने शिवतांडव-टीका, मल्लादर्श, पृथ्वीचंद्रोदय, शारदातिलकावरील टीका, भक्तितरंगिणी, दीक्षाप्रकाश, इ. ग्रंथ लिहिले. तसेच कार्तवीर्याच्या उपासनेसाठी दीपप्रकाश व प्रयोगरत्नाकर असेही दोन ग्रंथ याने लिहिले.

याने एकूण तीन लग्ने केली होती. त्याची तिसऱ्या लग्नाची पत्नी प्रणयमंजिरी ही साहित्यिक होती, असे सांगतात. [तं. स्ट. रि. लि.; हिं. वि. को.]

**प्रेमसखी** (इ. स. चे १८ वे शतक) बुंदेलखंडातील एक कवयित्री. हिची काव्यरचना दोन प्रकारची आहे– (१) रामसौंदर्याचे नखशिखांत वर्णन करणारे काव्य व (२) स्फुट विषयावर रचलेले कवित्त व सवैये. ही आत्यंतिक रामभक्त होती.

मध्ययुगीन रामकवीमध्ये हिला श्रेष्ठ समजतात. [म. हिं. क.]

**प्रेमाख्याने** एक काव्यप्रकार. तरुण-तरुणींचे परस्पर आकर्षण, सहवासाची ओढ, प्रेमसाफल्यात नातेवाइकांकडून किंवा प्रतिस्पर्ध्याकडून विघ्ने, ती निवारण करण्यासाठी धडपड, भेटीच्या अभावी तळमळ आणि अंती मीलन किंवा कायमचा वियोग, या सर्व गोष्टी किंवा यांपैकी काही गोष्टी ज्या काव्यात वर्णिलेल्या असतात, त्यांना प्रेमाख्याने म्हणतात.

प्रेम ही एक मानवी सहजप्रवृत्ती आहे. मानवसमाजाच्या आदिमकालापासून ती काम करीत राहिली आहे. प्रेम हे मानवी हृदयात सहजपणे उगम पावते आणि प्रिय व्यक्तीविषयी असाधारण आत्मीयता धारण करीत विकास पावते. ते विविध प्रकारे आपल्या अभिव्यक्तीसाठीही धडपडते. त्याची अभिव्यक्ती केवळ प्रेमिकांनाच नव्हे; तर तटस्थ श्रोत्यांनाही एका मधुर रसाचा आस्वाद देते. तशा गोष्टी पुनःपुन्हा ऐकाव्याशा वाटतात व त्यांचे चर्वणही आनंदप्रद होते. म्हणूनच कथागाथात्मक साहित्यात प्रेमात्मक आख्याने अधिक संख्येने आढळतात. प्रेमाख्यानांची विपुलता भारतातच नव्हे; तर सर्व देशांत व सर्व समाजांत आढळून येते.

प्रेमाख्यानांचा प्रमुख विषय स्त्री-पुरुषांचे परस्पर प्रेम हा असतो. प्रेमिक स्त्री-पुरुष एखाद्या भिन्न लिंगी व्यक्तीच्या प्रत्यक्ष दर्शनाने, स्वप्नदर्शनाने, चित्रदर्शनाने किंवा तिच्या रूप-गुणांच्या श्रवणाने तिच्याविषयी आकृष्ट होतात व तिचा ध्यास घेतात. भीष्मक राजाच्या दरबारात आलेल्या ब्राह्मणाकडून रुक्मिणीने श्रीकृष्णाचे गुणविशेष श्रवण केले व त्या श्रवणानेच ती त्याच्यावर आसक्त झाली. नलराजाने हंसाकडून दमयंतीचे सौंदर्य, विनयादी गुण ऐकले आणि तो तिच्या प्राप्तीसाठी प्रयत्नशील झाला. उषेला अनिरुद्धाचे पहिले दर्शन चित्ररूपाने झाले व ती त्याच्यावर भाळली. अशी अनेक कथानके वाङ्मयात आढळतात. प्रेमाख्यानांचा शेवट बहुतकरून प्रेमिकांच्या विवाहमीलनात झालेला दिसतो.

**वैदिक प्रेमाख्याने** – भारतीय प्रेमाख्यांनांची परंपरा अत्यंत प्राचीन आहे. त्यांची काही उदाहरणे अंशरूपाने ऋग्वेदातही आढळतात. ऋग्वेदात पुरूरवा-उर्वशीविषयक एक सूक्त (ऋ. १०·९५) आहे, ते एक अविकसित असे प्रेमाख्यानच आहे. जगातल्या प्रेमाख्यानांतले ते पहिले समजले जाते. पुरूरवा या नावाचा एक राजा उर्वशी या अप्सरेच्या प्रेमबंधात पडतो. त्याला तिची प्राप्ती, तिचा विरह, तिचे पुनर्दर्शन आणि सरतेशेवटी एका रात्रीपुरता सहवास घडणे, असे त्याचे स्थूल स्वरूप आहे. ऋग्वेदातले हे त्रोटक आख्यान शतपथ ब्राह्मणात विस्ताराने पुनरुक्त केलेले आहे. त्यापुढचा त्याचा विकास म्हणजे कालिदासाचे विक्रमोर्वशीय हे नाटक होय.

ऋग्वेदातच (१०·१०) यम-यमीसंवाद नामक एक सूक्त असून, तेही एक प्रेमाख्यानाची कथावस्तू ठरेल. त्यातली यम-यमी ही सहोदर भावंडे आहेत. तरीही यमीला यमाविषयी वैषयिक अभिलाषा उत्पन्न होते आणि ती तिच्या पूर्तीसाठी यमाला आवाहन करते. पण तिथे यमीचा विवेक सुटलेला असला, तरी यमाचा विवेक जागा आहे. सहोदर भावंडांत वैषयिक संबंध निंद्य व अनुचित होय, हे जाणून यम तिला त्या गोष्टीपासून परावृत्त करण्याचा आटोकाट प्रयत्न करतो. बहिणभावंडांचा तो संवाद इथेच संपतो आणि त्यापुढे काय घडले, ते कळत नाही. या अपूर्ण कथेची पूर्ती वैदिक वाङ्मयात पुढे कुठेही झालेली नाही आणि कोणत्याही कवीने आपल्या आख्यानाची त्यावर उभारणी केली नाही.

ऋग्वेदातली तिसरी प्रेमकथा श्यावाश्वाची आहे. पाचव्या मंडलाच्या ६१ व्या सूक्तात ती ओझरती कळते. रथवीती नामक राजाच्या कन्येसाठी उग्र तप करून श्यावाश्वाने ऋषी पदवी प्राप्त करून घेतली आणि त्या राजकन्येचे पाणिग्रहण केले, असे तिचे स्पष्टीकरण सायणाचार्यांनी केले आहे.

**पौराणिक प्रेमाख्याने** – महाभारतातले नलोपाख्यान हे उत्कृष्ट प्रेमकाव्यात गणले जाणारे आख्यान आहे. वनपर्वात ते विस्ताराने वर्णिलेले आहे. नल व दमयंती या उभयतांना परस्परांविषयी प्रेम वाटू लागते. अनेक विघ्ने येऊन आणि ती दूर होऊन अंती त्यांचा विवाह होतो. पुढे नलराजा पुष्कराशी केलेल्या द्यूतात हरतो आणि आपले राज्यही गमावतो. नल-दमयंती दोघे वनवासाला निघतात. वनात दमयंतीचा त्याग करून नल निघून जातो. पुढे त्याला अनेक आपत्ती भोगाव्या लागतात. दमयंतीही अनेक संकटाना तोंड देत माहेरी जाऊन पोचते. मग आपण पुनश्च स्वयंवर करणार अशी हूल उठवून नलाला विदर्भात येण्याला उद्युक्त करते. तो येतो; पण सर्पदंशामुळे त्याचे रूप पालटलेले असते. मग ती अनेक युक्त्या योजून तो नलच असल्याची खात्री करून घेते आणि त्या दोघांचे पुनर्मीलन होते.

महाभारतातील ही कथा सोमदेवाने आपल्या बृहत्कथामंजिरीत थोडयाफार फरकाने घेतली आहे.

पौराणिक साहित्याच्या अंतर्गत आणखी एक प्रसिद्ध प्रेमाख्यान म्हणजे शकुंतलोपाख्यान होय. महाभारताच्या आदिपर्वात, तसेच भागवताच्या नवमस्कंधात ते आले आहे. यातही प्रेम, मीलन, विरहव्यथा, तप व पुनर्मीलन अशा पायऱ्या आहेत. याच आख्यानावर कालिदासाने आपले जगप्रसिद्ध अभिज्ञानशाकुंतल नाटक लिहिले आहे.

उषा–अनिरुद्धांचे आणखी एक प्रेमाख्यान अनेक पुराणांत आले असून, हरिवंशात ते विस्ताराने वर्णिले आहे. उषा ही बाणासुराची कन्या. तिला एके दिवशी श्रीकृष्णाचा नातू अनिरुद्ध याचे दर्शन झाले. त्याच्यावर तिचे मनही जडले. पण तो कोण आणि कोणत्या कुळातला हे तिला समजले नाही. चित्ररेखा नावाची तिची एक सखी होती व नावाप्रमाणेच ती चित्रकर्म करणारी होती. तिने द्वारकेच्या यादवकुलाचा चित्रपट तयार केला असता त्यात उषेला अनिरुद्धाची ओळख पटली. चित्ररेखेने आपल्या मैत्रिणीचे प्रेम लक्षात घेऊन अनिरुद्धाला तो झोपेत असता त्याच्या पलंगासह उचलून आकाशमार्गे उषेच्या महालात आणले. तिथे दोघांचे प्रेममीलन झाले आणि अनिरुद्ध तिच्या महालात गुप्तपणे राहू लागला. थोडयाच दिवसात उषेचे हे रहस्य तिचा बाप बाणासुर याला उमगले. बाणासुराला यादवकुलाशी सोयरिक–संबंध नको होता. म्हणून तो अनिरुद्धाला ठार मारण्याकरता उद्युक्त झाला. हे वर्तमान द्वारकेत श्रीकृष्णाला कळले. तो सैन्य घेऊन बाणासुरावर चालून गेला. उभय पक्षात युद्ध झाले. त्यात बाणासुर मारला गेला आणि शेवटी उषा-अनिरुद्ध यांचे विवाहमंगल झाले.

श्रीकृष्ण व रुक्मिणी, प्रद्युम्न व मायावती, अर्जुन व सुभद्रा, भीम व हिडिंबा ही महाभारत, भागवत आणि पुराणे यांतील आख्यानेही प्रेमाख्यानेच होत.

पौराणिक साहित्यातल्या प्रेमाख्यानांत विरहयातनांचीही अनेक उदाहरणे मिळतात. ही विरहयातना विशेषतः स्त्रियांच्या बाबतीत अधिक दिसून येते. याचे कारण तत्कालीन सामाजिक रूढी आणि मर्यादा यांमध्ये शोधावे लागते. कन्येची इच्छा एक असावी, तिच्या वाडवडिलांची इच्छा दुसरी असावी, अशा कात्रीत सापडून त्या कन्यांना विरहवेदना सोसाव्या लागलेल्या दिसतात. कित्येक वेळा उभय वंशातील श्रेष्ठ–कनिष्ठ भाव हाही त्यांच्या प्रेमपूर्तीत विघ्ने उभी करतो. अशा परिस्थितीत गुप्तपणाने पत्रे लिहिणे, गुप्तपणे दूत पाठविणे, इ. गोष्टी पौराणिक प्रेमाख्यानांत आल्या आहेत.

**बौद्ध-जैन प्रेमाख्याने** – पुराणांनंतर बौद्ध-जैन कथा साहित्याकडे दृष्टी वळवणे भाग आहे. बौद्धांच्या जातककथा प्रसिद्ध आहेत. या कथासंग्रहात कुठे कुठे स्त्री-पुरुष प्रेमाचा आढळ होतो; पण ज्याला प्रेमाख्यान म्हणता येईल, अशा कथा बौद्ध जातकांत व इतरत्रही विरळाच आहेत. बौद्धांनी स्त्री-पुरुषप्रेमाला आणि आकर्षणाला प्रोत्साहन दिले नाही. उलट अशा प्रेमाचा त्यांच्यामध्ये तिरस्कारच दिसून येतो. थेरी गाथेतल्या शुभा नामक थेरीच्या गाथेवरून ही गोष्ट कळून येईल.

शुभा ही तरुण आणि सुंदर स्त्री; पण ऐन तारुण्यातच तिने भिक्षुणीची पिवळी वस्त्रे परिधान केली. एके दिवशी ती एका उद्यानात फिरत असता एक तरुण तिच्या मार्गात आडवा आला. तिने त्याला दूर होण्यास सांगितले. तो त्यावर म्हणाला, की 'तुझी पिवळी वस्त्रे तू आधी फेकून दे. हे वय काय संन्यास घेण्याचे आहे ? तुझे डोळे किती अप्रतिम सुंदर आहेत, हे तुला ठाऊक आहे काय ?' त्यावर शुभा त्याला म्हणाली.' हे युवका, तुझे हे बोलणे मला रुचत नाही. तू माझ्यावर आसक्त होऊ नकोस. तारुण्य आणि सौंदर्य या वस्तू क्षणजीवी आहेत. त्याना भुलून कोणी धर्माला विन्मुख होऊ नये. तुला जर माझे डोळे इतके आवडले असतील, तर हे घे.' असे म्हणून तिने स्वहस्ते आपले डोळे काढून त्या युवकाच्या हातावर ठेवले. त्यामुळे त्या युवकालाही पश्चात्ताप झाला व त्याने शुभाची क्षमा मागितली.

जैन साहित्यात प्रेमात्मक कथा बौद्धांच्या मानाने पुष्कळच

आहेत. त्यांचा शेवट वैराग्य, तप आणि जिनदीक्षा यांतच झालेला दिसतो. उदाहरणादाखल जैन साहित्यातली तरंगवतीची कथा सांगता येईल —

तरंगवती ही एका धनिक श्रेष्ठीची कन्या होती. एके दिवशी सरोवरात रतिक्रीडा करणारे एक हंसमिथुन तिने पाहिले व तिच्या प्रणयभावनांचा उद्रेक होऊन तिला मूर्च्छा आली. मग तिला आपल्या पूर्वजन्माचे स्मरण झाले. पूर्वजन्मात तीही एक हंसी होती आणि तिच्या प्रियकर हंसाला एका पारध्याने मारल्यावर तिने त्याच्यासाठी अग्निप्रवेश केला होता. या स्मृतीनंतर तिने आपल्या पूर्वजन्मीच्या प्रियकराला दुसऱ्या मनुष्यजन्मात शोधून काढले. ती दोघे घरून पळाली; पण वाटेत डाकूंच्या हाती सापडली. ते डाकू त्यांचे बलिदान करणार होते; पण दैवयोगाने त्यांची सुटका झाली व ती दोघे विवाहबद्ध झाली. त्यानंतर थोड्याच दिवसांत एक जैन मुनी तरंगवतीकडे आला. त्याचा उपदेश ऐकून तिला वैराग्य उत्पन्न झाले. मग तिने पती व संसार या दोघांनाही सोडून सुव्रता नावाच्या जैन साध्वीकडून दीक्षा घेतली.

जैन धर्माने प्रभावित अशी अनेक प्रेमाख्याने अपभ्रंश भाषेत सापडतात. त्यांमधले पउमसिरीचे आख्यान महत्त्वाचे आहे. पउमसिरी म्हणजे पद्मश्री होय. ती धनसेन नावाच्या श्रेष्ठीची कन्या होती. यथाक्रम तिचे लग्न झाले. पण दुर्दैवाने तिला थोड्याच कालात वैधव्य आले. मग ती माहेरी राहून कसेबसे दिवस कंठू लागली. एके दिवशी तिची भावजय तिला टाकून बोलली. तो अपमान सहन न होऊन तिने तपस्येच्या मार्गाने देहत्याग केला. दुसऱ्या जन्मात समुद्रदत्त नावाच्या एका तरुणावर ती प्रेम करू लागली. त्या दोहोंचे लग्नही झाले. पण त्यांचा संसार सुखाचा झाला नाही. समुद्रदत्ताने पद्मश्रीचा त्याग करून कांतिमती नावाच्या दुसऱ्या तरुणीशी विवाह केला. पुनरपि पद्मश्रीला तपस्येवाचून दुसरा मार्ग राहिला नाही. दोन्ही जन्मांत तिचे प्रेम सफल झाले नाही; पण तपस्येमुळे तिला मोक्ष मात्र मिळाला.

बौद्ध व जैन साहित्यांत आढळणाऱ्या प्रेमाख्यानांचा एक विशेष आहे. त्यांतली पात्रे राजपरिवारातली किंवा स्वर्गीय प्रदेशात वावरणारी नसतात. मध्यम श्रेणीचा वणिक वर्ग किंवा समाजातल्या निम्न स्तरातल्या व्यक्ती या त्यांच्या नायक–नायिका असतात. त्यांच्या जीवनातील घटनाही सामान्य जीवनाशी सुसंगत असतात. कदाचित त्या प्रेमकथा मुळात लोककथा असाव्या. बौद्ध व जैन लेखकांनी आपले वाङ्मय मुख्यतः पाली, अर्धमागधी, प्राकृत व अपभ्रंश भाषांमध्ये निर्माण केले आहे. या भाषा जाणणारा व त्यांतील रस घेणारा वर्ग सामान्य जनांचाच होता. त्यामुळे त्यांनी समाजातल्या सामान्यांचीच कथानके हाताळली असे दिसते.

**बृहत्कथेतली प्रेमाख्याने** – गुणाढ्याच्या बृहत्कथेचे संस्कृत अनुवाद बृहत्कथामंजिरी व कथासरित्सागर या नावांनी झाले आहेत. कथासरित्सागरात ज्या अनेक कथा आढळतात, त्यांत प्रेमकथाही आहेत. त्यांत पुरुरवा–उर्वशी, इंद्र–अहिल्या, सीता–राम, यांच्या पौराणिक प्रेमकथा व वत्सराज उदयन यांच्यासारख्या ऐतिहासिक प्रेमकथा आल्या आहेत; त्याचप्रमाणे प्रेमविषक काल्पनिक कथाही आल्या आहेत. कथासरित्सागरातील पुढील दोन प्रेमाख्याने काल्पनिक दंतकथांच्या स्वरूपाची आहेत —

(१) प्रसेनजित नावाचा एक राजा होता. त्याला कुरंगी नावाची कन्या होती. एके दिवशी ती उद्यानात गेली असता एक मस्त हत्ती तिच्यावर चालून आला. त्याने आपल्या सोंडेचा विळखा घालून तिला उचलले. आवती-भोवतीचे सर्व लोक घाबरून पळून गेले. एवढ्यात एक चांडाल युवक तिथे आला आणि त्याने राजकन्येला हत्तीच्या तावडीतून सोडविले. कुरंगी सुखरूप राजवाड्यात आली; पण त्या चांडाल युवकाची वीरमूर्ती तिच्या स्मरणातून काही केल्या जाईना. ती त्याच्यावर



कुरंगी व चांडाल युवक

अनुरक्त होऊन त्याच्यासाठी झुरू लागली. इकडे चांडाल युवकाचीही तीच अवस्था झाली. त्यालाही राजकन्येचे वेड

लागले. आपण जातीने चांडाल असल्यामुळे आपल्याला राजकन्येची प्राप्ती होणार नाही, असे कळून आल्यामुळे तो स्वतःला जाळून घ्यायला निघाला. एवढ्यात अग्निदेवाने प्रकट होऊन त्याला रोखले. अग्नी त्याला म्हणाला. 'तू चांडाल योनीत जन्मला असलास, तरी तू माझा पुत्र आहेस.' मग अग्नीने प्रसेनजित राजालाही तसा स्वप्नदृष्टांत दिला. राजाने तो मानला व त्या चांडाल युवकाशी कुरंगीचे लग्न लावून दिले.

(२) एक होता कोळ्याचा मुलगा. तो मलयवती नावाच्या राजकन्येवर आसक्त झाला. तिच्या प्राप्तीसाठी तळमळू लागला. त्याच्या आईला मुलाची ती दशा पाहवेना. तिने मग मलयवतीशी संधान बांधले. ती रोज राजवाड्यात येऊन मलयवतीला एक मासा भेट देऊ लागली. काही दिवसांनी मलयवती त्या त्या कोळिणीवर प्रसन्न झाली व 'तुला काय हवे ते माग' म्हणाली. तिने मग मलयवतीला आपल्या मुलाचा वृत्तांत सांगितला व म्हटले. 'तुला जर त्याच्याशी लग्न करणे शक्य नसले, तर एका रात्री त्याला तू तुझ्या महालात बोलावून घे आणि एकवार त्याला नुसता स्पर्श कर.' मलयवतीने ती गोष्ट मानली. योग्य संधी साधून तिने तसे केले. मलयवतीच्या स्पर्शासरशी त्या कोळी तरुणाला सुखाची झोप लागली. मध्यरात्री त्याला जाग आली. पाहतो तर मलयवती त्याच्या शेजारी नव्हती. त्यासरशी त्याच्या तनमनांत वियोगाची आग भडकली व तो तत्काळ तिथेच मरून पडला. मलयवतीला त्या गोष्टीचे अपार दुःख झाले. आपल्या प्रेमाने घायाळ होऊन एक तरुण मृत झाला, ही घटना तिला सहन झाली नाही. ती त्याच्या शवाबरोबर सती जायला निघाली. कोणाचेही तिने ऐकले नाही. पण ती जळत्या चितेत उडी घेणार इतक्यात आकाशवाणी झाली, की 'तो कोळी तरुण पूर्वजन्मीचा ब्राह्मण आहे.' आकाशवाणीच्या पाठोपाठ तो मृत तरुण जिवंत होऊन उठला. मग राजाचे समाधान झाले आणि त्याने आपल्या कन्येचे त्याच्याशी लग्न लावून दिले.

पाली, मागधी, प्राकृत, अपभ्रंश, इत्यादी भाषांतून सांप्रतच्या देशी भाषा उगम पावल्या व हळूहळू विकसित होऊ लागल्या. त्या भाषांत कवीही निर्माण होऊ लागले. त्यांनी त्या त्या बोली भाषांत मौखिक परंपरेने चालू असलेल्या कथा–गाथांचे सूत्र धरून त्यांवर काव्यरचना सुरू केली. समाजात ज्या प्रेमकथा सांगोवांगी प्रचलित होत्या, त्यांनाच त्यांनी प्रेमाख्यानांचा साज चढविला. तसे करताना रामायण, महाभारत, आणि पुराणे यांतील कथांचे काही भागही आपल्या कथानकात वापरले.

**देशी भाषेतील प्रेमाख्याने**– उत्तर भारतात राजस्थानी भाषा ही लोकगीते व लोककथा यांच्या समृद्धीसाठी प्रसिद्ध आहे. त्या भाषेत ढोला–मारू नावाचे एक प्रेमाख्यान आहे. ढोला हा कछवाहा वंशातल्या नल राजाचा पुत्र होता. मारू ही पूगल राजाची कन्या होती. त्या दोघांचा विवाह झाला. या कथेतली एवढीच घटना ऐतिहासिक आहे. पण त्या दोघांवर जी एक प्रदीर्घ आख्यानाची इमारत उभी केली गेली, तिच्यातील सर्व घटना कल्पित आहेत. प्रेम, विरह, निराशा, कारस्थाने, गैरसमज, इ. अनेक प्रसंगांची जोड देऊन लोककवींनी त्या कथेला परिणामकारक स्वरूप दिले आहे. (ढोला–मारू पाहा.)

हे प्रेमाख्यान इतके प्रभावी व लोकप्रिय ठरले, की थोड्याच कालात प्रांताच्या सीमा ओलांडून ते इतरत्र अनेक ठिकाणी पसरले. गुजराती भाषेत कुशललाभ या जैन कवीने त्या आख्यानाला गुजराती साज चढविला. छत्तीसगढी भाषेत त्याचे काही अंशी रूपही बदलले. व्रजभाषेत त्याच्यात आणखी मानवी–अतिमानवी रंग भरले.

जी स्थिती राजस्थानी ढोला–मारूची, तीच बंगाली लोरिक–चंद्रा या प्रेमाख्यानाची. ही एक लौकिक प्रेमकथा होती. तिच्यावर दौलत काजी नावाच्या बंगाली कवीने एक सुंदर आख्यान रचले. त्या आख्यानाचा सारांश असा–

गोहारी नावाचा एक देश होता. लोर किंवा लोरिक नावाच्या त्या देशाच्या राजपुत्राशी मयनावती नावाच्या एका राजकन्येचा विवाह झाला. पण कालांतराने लोरिकचे मयनावतीवरचे प्रेम कमी होऊन मोहरा देशाच्या चंद्राली (चंदा) नावाच्या राजकन्येवर जडले. ही राजकन्या रूपमती होती आणि तिचा विवाहही झाला होता. बावनवीर हे तिच्या पतीचे नाव; पण दुर्दैवाने तो षंढ होता. त्यामुळे चंदा दुःखीकष्टी होती. योगायोगाने लोरिकची व तिची गाठ पडली व ती दोघे एकमेकांवर अनुरक्त झाली. ही गोष्ट चंदाचा पती बावनवीर याला समजली. त्याने एके दिवशी त्या दोघांना एका वनात पकडले. मग लोरिक व बावनवीर यांच्यांत युद्ध झाले. बावनवीर त्या युद्धात मारला गेला. त्यामुळे त्या दोघांचा प्रेममार्ग निष्कंटक झाला. पुढे चंदाच्या बापाला हा सारा वृत्तांत समजला. त्याने येऊन त्या दोघांना आपल्या राज्यात नेले आणि त्यांचे लग्न लावून दिले. लोरिकला चंदा तर मिळालीच; शिवाय सासऱ्याचे राज्यही मिळाले.

इकडे मयनावती विरहव्याकुल होऊन आपले सौभाग्य आपल्याला लाभावे यासाठी दुर्गेची आराधना करू लागली. शेजारच्या राज्यात छातन नामक एक राजपुत्र होता. मयनावती एके दिवशी त्याच्या दृष्टीस पडली आणि तो तिच्यावर आसक्त

झाला. त्याने खूप प्रयत्न केले; पण मयनावती त्याला वश झाली नाही. मग तिने एका ब्राह्मणाला लोरिककडे पाठवले व आपली कर्मकहाणी त्याला ऐकवली. मग लोरिकला पश्चात्ताप झाला आणि तो पुत्राला राज्य देऊन चंदासह मयनावतीकडे आला.

ही कथा इथेच संपते. पुढे त्याने मयनावतीला जवळ केले असावे आणि त्याचा संसार सुखाचा झाला असावा, अशी कल्पना करावी लागते. हीच कथा छत्तीसगड, बिहार, आंध्र, इ. प्रदेशांत परिवर्तित स्वरूपात प्रचलित आहे.

त्यानंतर जायसीच्या पद्मावत या प्रदीर्घ प्रेमाख्यानाचा उल्लेख करावा लागतो. (पद्मावत पाहा) या आख्यानाचा मूलस्रोत कल्की पुराणात असावा. पद्मावतप्रमाणेच दुसरे प्रसिद्ध प्रेमाख्यान सदयवत्स–सावलिंगा हे आहे. पद्मावताच्याही पूर्वीचे हे प्रेमाख्यान आहे व ते गुजरात, राजस्थान व पंजाब या प्रदेशांत प्रचलित आहे. या आख्यानाचीही प्रदेशपरत्वे रूपपरिवर्तने झाली आहेत. त्यांतले एक रूप असे–

उज्जैनच्या प्रभुवत्स राजाला सदयवत्स नावाचा पुत्र होता. प्रतिष्ठानपुराच्या सालिवाहन राजाची सावलिंगा नावाची कन्या होती. स्वयंवरात तिने सदयवत्साला माळ घातली. काही कालाने काय झाले कोण जाणे; पण बापाने सदयवत्साला राज्यातून घालवून दिले. त्याच्यासंगे सावलिंगाही गेली. वाटेत सावलिंगाला तहान लागली. सदयवत्स तिच्यासाठी पाणी आणायला निघाला. मार्गात त्याला लीलावती नावाची एक तरुणी दिसली. तीही एक राजकन्याच होती व त्या वेळी ती आत्महत्या करायला निघाली होती. सदयवत्साने तिला रोखले आणि कारण विचारले. ती म्हणाली, की मी उज्जैनचा राजपुत्र सदयवत्स याच्यावर अनुरक्त आहे आणि त्याची भेट होत नाही म्हणून प्राणत्यागाला सिद्ध झाले आहे. त्यावर सदयवत्साने तिला आपली ओळख दिली आणि तिच्यासह नगरात जाऊन तिच्याशी लग्न केले. एवढ्यात त्याला एक जैन आचार्य भेटला. त्याच्याकडून सदयवत्साने श्रावक धर्माचा स्वीकार केला. त्याने लीलावतीला माहेरीच ठेवली आणि तो सावलिंगाकडे परत आला. पुनश्च त्या दोघांचे मार्गक्रमण सुरू झाले. सदयवत्साने सावलिंगालाही आपल्या माहेरी आणून सोडले. तिथून बाहेर जाण्यापूर्वी त्याला कामसेना नामक एक गणिका भेटली आणि ती त्याच्यावर मोहित झाली. तिने त्याला आपल्या घरी आणून पाच दिवस ठेवून घेतले. नंतर तो तिच्याकडून निघून पुढच्या मार्गाला लागला. पाठोपाठ कामसेना चोरीच्या अपराधावरून पकडली गेली. राजदूतांनी तिला सुळावर चढविण्यासाठी चालविले आहे, ही वार्ता सदयवत्साला कळली. तो तिला वाचवण्यासाठी धावत परत आला. तिथल्या राजाशी अर्थात आपल्या माणसांशी युद्ध करून त्याने कामसेनेला सोडवले. मग राजाला ओळख पटली, की सदयवत्स हा आपला जावई आहे. त्याने मग आपल्या जावयाला सन्मानपूर्वक राजवाड्यात आणले. तिथे काही दिवस तो राहिला. त्या अवधीत राज्यातल्या एका श्रेष्ठीनेही त्याला आपली मुलगी दिली. मग तो आपल्या भार्यांना बरोबर घेऊन उज्जैनला परत आला. नंतर बापाने त्याला राज्यावर बसविले.

माधवानल–कामकंदला हे असेच आणखी एक लोकप्रिय प्रेमाख्यान होय. या प्रेमकथेवर गुजराती व हिंदीत काही आख्याने लिहिली गेली आहेत. प्रस्तुत कथेचा गाभा असा—

पुष्पावती नगरीत कामसेन राजा राज्य करीत होता. त्याच्या राज्यात माधवानल किंवा माधव नावाचा एक सुंदर ब्राह्मण तरुण राहत होता. राज्यातल्या अनेक स्त्रिया त्याच्या सौंदर्यावर भाळून उच्छृंखल होऊ लागल्या. राजाला हे सहन झाले नाही. त्याने माधवाला राज्यातून घालवून दिले. तो फिरत फिरत अमरावतीला आला. तो संगीतशास्त्रात प्रवीण असल्यामुळे तिथल्या राजाने त्याला आपल्या दरबारात आश्रय दिला. त्या राज्यात कामकंदला नावाची एक राजनर्तकी होती. माधव तिच्या कलागुणांवर लुब्ध झाला. एके दिवशी दरबारात माधवाला मिळालेला मानाचा विडा त्याने कामकंदलेला दिला. राजाला तो अपमान वाटला. त्याने माधवाला दरबारातून हाकून दिले. नंतर तो काही दिवस गुप्तपणे कामकंदलेच्या घरी राहिला. तिथे त्या दोघांचे प्रेम दृढ झाले. पण कामकंदला राजाश्रित नर्तकी असल्यामुळे तिला त्याच्याबरोबर जाणे शक्य नव्हते. म्हणून तो एकटाच निघून गेला. निघून तो उज्जयिनीला आला. तिथे त्याने एका भिंतीवर आपली प्रेमकहाणी लिहून ठेवली. विक्रम राजा फिरायला गेला असता त्याने ती वाचली. त्याला माधवाविषयी उत्सुकता वाटली. त्याने माधवाचा शोध करून त्याला आपल्या दरबारात आणले व त्याचा सर्व वृत्तांत ऐकून घेतला. विक्रमाने प्रथम माधवाच्या कामकंदलाविषयक प्रेमाची कठोर परीक्षा घेतली. शिवाय गुप्तपणे कामसेनाच्या राज्यात जाऊन कामकंदलेचेही प्रेम किती निष्ठावंत आहे ते पारखून घेतले. मग त्याला वाटले, की त्या दोघांचे प्रेममीलन घडवायलाच हवे. म्हणून त्याने कामसेन राजाला कामकंदलेला पाठवून देण्याबद्दल निरोप धाडला. कामकंदला ही त्याच्याही प्रतिष्ठेचा विषय असल्याने त्याने विक्रम राजाची मागणी नाकारली. ते समजताच विक्रमाने सरळ त्याच्या राज्यावर चाल केली आणि कामसेनाचा पराभव करून कामकंदलेला आपल्या राज्यात आणले. पुढे विक्रमाच्या साक्षीने त्या दोघांचे लग्न झाले.

पंजाबी भाषेतही अशी अनेक प्रेमाख्याने आहेत. ती गाणा-

याचा एक वर्गही त्या प्रदेशात आहे. हीर–राझा, सोहणी–महीवाल, ससी–पुन्नू, इत्यादींच्या प्रेमकथा त्यात वर्णित आहेत.



सोहणी–महीवाल

त्या सर्वांत हीर–राझा या प्रेमाख्यानाचे स्थान सर्वोच्च आहे. प्रथम दामोदर व नतर वारिसशाह या कवीनी अनेक अद्‌भुत आणि भावपूर्ण प्रसंग कल्पून ते आख्यान लिहिले आहे. त्याला काही ऐतिहासिक आधार आहे, असेही म्हणतात प्रस्तुत प्रेमाख्यानाची कथा अशी––

सियालाचा सरदार चुचक याच्या घरी हीर नावाची मुलगी जन्मली. ती अप्रतिम लावण्यवती होती. तख्तहजारा येथील एका जाटाला राझा नावाचा एक मुलगा होता. तो आईबापांचा लाडका होता. त्यामुळे वरचे तीन भाऊ त्याच्यावर जळून असत. भावाचा हा विद्वेष रांझाला फार काळ सहन झाला नाही. पित्याच्या मृत्यूनंतर एके दिवशी तो घरातून बाहेर पडला. वाटेत एका मशिदीमध्ये त्याने काही दिवस घालवले. तो बासरी फार छान वाजवी. त्यामुळे जिथे जाई तिथे तो लोकप्रिय होई.

फिरत फिरत तो सियालाच्या राज्यात आला. तिथे योगायोगाने हीरशी त्याची ओळख झाली. त्याचे अप्रतिम रूपसौंदर्य आणि त्याची मुरलीवादनकला या दोन्ही गुणांवर हीर लुब्ध झाली. ती रोज त्याची भेट घेऊ लागली. पुढे तर तिने त्याला आपल्या वाड्यातच आणले व म्हशी चारण्यासाठी गुराखी म्हणून ठेवून घेतले तो म्हशी घेऊन रोज रानात जाई पाठोपाठ कोणत्यातरी बहाण्याने हीरही त्याचा मागोवा घेई असा त्याचा प्रेमव्यवहार बराच काळ चालू राहिला. पुढे रहस्य फुटले. मग हीरच्या पित्याने राझाला आपल्या प्रदेशातून घालवून दिले लगोलग त्याने हीरच्या लग्नाची तयारी केली. खेडियाचा सरदारपुत्र सैदा हा त्याने हीरसाठी वर निश्चित केला. निरुपायाने हीरला त्याच्याशी लग्न करावे लागले. ती लग्न होऊन सासरी गेली; पण राझा तिच्या मनातून गेला नाही. रांझाही हीरसाठी झुरत कुठेतरी भटकत राहिला होता. त्याला एके दिवशी हीरच्या लग्नाची वार्ता कळली. मग तिच्या सासरचा ठावठिकाणा काढीत तो एके दिवशी फकीरवेषाने हीरच्या गावी गेला तिथेही दोघाच्या गुप्तपणे भेटीगाठी सुरू झाल्या हीरचे हे प्रेमप्रकरण तिच्या नणदेला प्रथम कळले. हीरने तिच्याकडे आपले मन मोकळे केले. नणंदेला तिच्याविषयी सहानुभूती वाटली. तिच्या समतीने काही कारस्थान रचून हीर व राझा दोघेही एके दिवशी राज्यातून पळून गेली.

थोड्याच वेळात ही सारी घटना सैदाला कळली. त्याने शिपाई पाठवून दोघाना पकडून आणले राझाला न्यायनिवाड्यासाठी उभे करण्यात आले. त्या दोघानी काझीपुढे आपली कैफियत माडली, की 'या लग्नाच्या आधीच आम्हा उभयताचे मनोमन लग्न झाले आहे नतरचा विवाह हा बळजबरीचा आहे.' पण काझीने त्याचा युक्तिवाद मानला नाही. त्याने हीरला सैदाच्या स्वाधीन केले आणि रांझाला प्रदेशाबाहेर हाकलून दिले. त्या दोघाची प्रेमग्रंथी इथे कायमची तुटली.

**सूफी प्रेमाख्याने**––भारतात मुसलमानाची राज्ये स्थापन झाली आणि त्याबरोबरच सूफी धर्मप्रचारकही या देशात वावरू लागले. या सूफी कवीनीही उर्दू व फारसी भाषेत अनेक प्रेमाख्याने रचली आणि त्यासाठी भारतीय प्रेमकथाचाही स्वीकार केला. मात्र त्यांनी अशा प्रेमाख्यानात प्रामुख्याने रूपकात्मक वर्णनशैलीचा अवलब केला. सूफीच्या मते इष्क मिजाजी (लौकिक प्रेम) व इष्क हकीकी (दिव्य प्रेम) असे प्रेमाचे दोन भेद आहेत. दोहोंत मूलभूत भिन्नता नाही. लौकिक प्रेमच पुढे दिव्य प्रेमात परिणत होऊ शकते ही कल्पना मूलभूत धरून सूफी कवीनी प्रथम फारसीत व नतर प्रादेशिक भाषामध्ये मसनवी (प्रेमाख्याने) लिहिणे सुरू केले. त्यानी आपल्या प्रेमकाव्यात आध्यात्मिक रग भरण्याचाही प्रयत्न केला. अभारतीय कथानकाचा स्वीकार करूनही त्यानी त्या आख्यानाचे वातावरण मात्र भारतीयच ठेवले आपल्या आख्यानाचा प्रारंभ करताना ते प्रथम पैगंबराची स्तुती करतात, आपल्या पीराचा परिचय देतात, तत्कालीन बादशहाचे गुणगान करतात व मग आपल्या आख्यानाला प्रारंभ करतात. पद्मावत, चंदायन, मिरगावती, लैला–मजनू, नल–दमयती, युसुफ–जुलेखा, शिरी–फरहाद, इ प्रेमाख्याने ही सूफीची काव्यनिर्मिती आहे.

**वर्गीकरण**– वेदापासून तो लोकसाहित्यापर्यंत आढळणारा,

प्रेमाख्यानाचे काही अंशी वर्गीकरणही करता येते. सुरुवातीच्या काळात अशी आख्याने रचण्याचा विशिष्ट उद्देश नव्हता. ती प्रसंगवशात साहित्यात आली आहेत. कोणत्यातरी दोन तरुण-तरुणींत प्रेमसंबंध निर्माण झाले, त्यात काही बऱ्यावाईट घटना घडल्या आणि त्याचा परिणाम विशिष्ट प्रकारे झाला, असे त्यांचे स्वरूप असते. अशा प्रेमाख्यानांना इतिवृत्तात्मक असे म्हणता येईल. वैदिक व पौराणिक अशा दोन्ही प्रेमाख्यानांना ही संज्ञा लावता येते.

पण अशी काही प्रेमाख्याने आहेत, की केवळ पात्रपरिचय देणे किंवा घटनांचे तटस्थपणे वर्णन करणे, असा त्यांचा उद्देश नसून, त्यात मनोरंजनाला प्राधान्य असते. आपले आख्यान लोकाभिरुचीला पटावे आणि त्यातल्या बऱ्या-वाईट प्रसंगांनी श्रोत्यांची अंतःकरणे हेलावून जावी, ही दृष्टी डोळ्यांपुढे ठेवून ही आख्याने रचली गेली आहेत. त्यातून काव्यानंदाचीही उपलब्धी होत असते. भिन्न भिन्न भाषांतली लोकगाथात्मक प्रेमाख्याने या वर्गात येतात. त्यांना सहेतुक काव्यात्म प्रेमाख्याने असे म्हणता येईल.

आणखी एक तिसरा वर्गही दाखवता येतो. या वर्गातली प्रेमाख्याने केवळ मनोरंजनासाठी लिहिलेली नसतात; तर त्यांच्या रचनेमागे कोणत्यातरी धार्मिक व सांप्रदायिक सिद्धांतांचा प्रचार करण्याचा उद्देश असतो. याना धार्मिक प्रेमाख्याने असे म्हणता येईल. बौद्ध, जैन व सूफी कवींनी रचलेली आख्याने या वर्गात येतात.

भारतीय प्रेमाख्याने अधिकतर सुखान्त असतात. त्या आख्यानांच्या शेवटी प्रेमिकांचे विवाहमीलन होत असते. अधार्मिक किंवा अनैतिक असे स्त्री-पुरुषांचे मीलन भारतीय प्रेमकवींना मान्य नाही, असे स्पष्ट दिसून येते. पुराणांतली, इतिहासातली व लोकसाहित्यातलीही बहुतेक प्रेमाख्याने प्रेमिकांचे विवाहमीलन घडवूनच परिसमाप्त होतात. सूफी कवींनी रचलेली, विशेषतः अभारतीय कथानकांवर आधारलेली प्रेमाख्याने मात्र बहुंशी दुःखान्त आहेत. हीर-रांझा, सोहणी-महीवाल, शिरी-फरहाद, युसुफ-जुलेखा, इ. प्रेमाख्याने ही याची उदाहरणे होत.

**मूल्यमापन** — भारतीय प्रेमाख्यानातील प्रेमिका ही अधिक भावनाशील आणि त्यागशील दिसून येते. ती जशी प्रेमसाफल्याच्या मार्गात त्यागी, विनयी व निर्धारी दिसते, तशीच ती प्रेमपूर्तीनंतरच्या वैवाहिक जीवनातही त्यागी आणि पतिपरायण राहिलेली आढळून येते. प्रेमभंग झाला, तरीही तिची प्रेमास्पद व्यक्तीवरची निष्ठा ढळत नाही. एकाचे प्रेम मोडून दुसऱ्याच्या प्रेमात पडणारी प्रेमिका भारतीय प्रेमाख्यानात आढळत नाही. प्रेमिक पुरुषाने आपल्या प्रेयसीशी विवाहबंधन स्वीकारल्यावरही अनेक लग्ने केलेली दिसून येतात पण असा दोष या कथांमुळे पहिली स्त्री आपल्या पतीला सोडून गेली, विरोधी बनली किंवा तिची निष्ठा ढळली असे दिसून येत नाही. ढोला-मारू, लोरिक-चंदा, इ. उदाहरणांवरून ही गोष्ट पटू शकेल.

वैदिक युगापासून आधुनिक कालापर्यंत अनेक स्थित्यंतरे झाली असताही भारतीय प्रेमाख्यानामध्ये गृहस्थधर्म आणि सामाजिक नीती या दोन्ही गोष्टींविषयी आदराचा भाव आणि सांस्कृतिक मूल्यांविषयी प्रेम या गोष्टी दिसून येतात. कथानक विस्तृत असेल किंवा छोटे असेल, सरळ असेल किंवा जटिल असेल, एकसुरी असेल किंवा अद्भुत असेल, पण या सर्व प्रकारांत भारतीय संस्कृतीच्या मूल्यांवर कुठे आघात केलेला दिसत नाही. त्यांतल्या नायक-नायिका देव, गंधर्व, यक्ष, किन्नर, राक्षस, मानव, इ. वर्गांतल्या असतात. त्या मानवाच्या विविध वर्गांतल्याही असतात. पण जिथे जिथे सामाजिक व कौटुंबिक संबंधाचा प्रश्न येतो, तिथे तिथे त्या नायक-नायिका सामाजिक व नैतिक मर्यादा ओलांडून पुढे जात नाहीत. सारांश, भारतीय प्रेमाख्याने ही भारतीय संस्कृतीला सर्वथैव पोषक ठरली आहेत. त्यांच्या विकासक्रमाचा अभ्यास केल्याने तत्कालीन सामाजिक व ऐतिहासिक परिस्थितीही कळून येते. [भारतीय प्रेमाख्यान की परंपरा – श्री. परशुराम चतुर्वेदी १९५६.]

**प्रेमानंद** (१६३६–१७३४ इ. स.) एक गुजराती भक्तकवी. हा बडोद्याचा राहणारा होता. याच्या वडिलांचे नाव कृष्णराम. बालपणीच याचे आई-वडील निवर्तल्यामुळे मावशीने त्याचा सांभाळ केला. वयाच्या पंधराव्या वर्षी रामचरण हरिहर नामक एका संन्याशाने याला गुरुपदेश दिला. नंतर प्रेमानंद त्याच्याबरोबर तीर्थाटणाला गेला. गुरूच्या मार्गदर्शनाखाली त्याने रामायण-महाभारतादी महाकाव्यांचे व भागवतादी पुराणांचे सखोल अध्ययन केले. त्यानंतर त्याने गुजराती आख्यानकाव्यांचेही बारकाईने अभ्यासली. मग तो स्वतः काव्य रचू लागला. 'गुजराती भाषेत कसदार व मौल्यवान वाङ्मय निर्माण केल्याशिवाय मी पागोटेच बांधणार नाही,' अशी त्याची प्रतिज्ञा होती व ती त्याने खरी केली. तो उत्तम कीर्तनकार होता. दाणलीला, अभिमन्युआख्यान, रुक्मिणीहरण, भ्रमरपचीशी, रणयज्ञ, ओखाहरण, नरसिंह मेहेतानी हुंडी, इ. त्याचे काव्यग्रंथ गुजराती सारस्वताचे अलंकार होऊन राहिले आहेत. या विविध काव्यांसाठी त्याने रामायण, भारत, भागवत, इ. पुराणांतून पात्रे व प्रसंग निवडले असले, तरी त्यांचे आचारविचार व स्वभावधर्म स्वतःच्या काळातील गुजराती

व्यक्तींचे ठेवले आहेत. त्याची भाषा सरळ, सोपी व शैली रसाळ आहे. [ वि. मुं. रा. प.; गुजरात ]

**प्रेमाबाई** (इ. स.चे १७ वे शतक) महाराष्ट्रातील एक संत कवयित्री. ही गोदावरीच्या काठी एका गावी राहत होती. नित्य गंगास्नान, पुराणश्रवण, हरिकीर्तनश्रवण, साधुसंतांचा सहवास अशा धार्मिक व पारमार्थिक गोष्टींत ती आपला काल घालवी. ती श्रीकृष्णाची आत्यंतिक भक्त होती. पुराणात श्रीकृष्णाचे आख्यान सुरू झाले किंवा अन्य कोणताही भक्तिप्रेमाचा प्रसंग सुरू झाला, की तिच्या डोळ्यांतून अश्रुधारा वाहू लागत. ही तिची प्रेमवृत्ती पाहून साधुसंतांनी तिचे नाव प्रेमाबाई असे ठेविले. तिच्याविषयी एक आख्यायिका सांगतात, ती अशी –

यशोदेने खोडकर कृष्णाला उखळीला बांधून ठेवले, हा पुराणातील कथाभाग ऐकत असताना तिला तो प्रसंग वर्तमानकाली घडत आहे, असे वाटले. तिचा कंठ दाटून आला व डोळ्यांतून अश्रूंच्या धारा सुरू झाल्या. त्या भरातच ती आपल्या पुत्राला म्हणाली. 'बाळा, हा संसाराचा सगळा व्याप मी आता तुजकडे सोपविते आणि सत्वर गोकुळात जाऊन श्रीकृष्णाला बंधमुक्त करिते.' हे शब्द उच्चारले जातात न जातात तोच प्रेमाबाईचा आत्मा नश्वर देहाचा त्याग करून निघून गेला. पाठोपाठ तिच्या प्रेतावर अकस्मात परिमलद्रव्ये आणि तुलसीदले येऊन पडली.

प्रेमाबाईची कविता फार थोडीच उपलब्ध आहे. तिची जी चार-पाच पदे प्रसिद्ध आहेत, त्यांतील एक पद असे –

**गड्यांनो अपुल्या कृष्णाला । अक्रूर नेतो मथुरेला ।। ध्रु. ।।**
**दोघे रथावरी बसती । यशोदा नंद गोप रडती ।**
**अक्रूरासी सर्व नमिती । त्याच्या दया न ये चित्तीं ।**
**म्हणवूनि जाऊं मारुं त्याला । अक्रूर नेतो मथुरेला ।। १ ।।**
**गोपी फारचि तळमळती । करानें वक्ष भाळ पिटिती ।**
**हरिला जाऊं नको म्हणती । अश्रूंनीं सर्वांगें भिजती ।**
**पुढें तो गेला यमुनेला । अक्रूर नेतो मथुरेला ।। २ ।।**
**ऐकूनि सर्व गोप म्याले । धावुनि हरीजवळि आले ।**
**मूर्च्छित रथाजवळि पडिले । हरिनें हृदयीं कवळीले ।**
**देव मग फारचि गहिंवरला । अक्रूर नेतो मथुरेला ।। ३ ।।**
**तुजविण आम्हां नाहिं कोणी । म्हणुनी सर्व जाऊं मरुनी ।**
**परि ये चिंता एक मनीं । कंस तुज नेइल बा धरुनी ।**
**तेथें कुणि नाहीं बा तुजला । अक्रूर नेतो मथुरेला ।। ४ ।।**

त्याचप्रमाणे, 'जाऊनि सांगा श्रीहरिला । एकदा भेट सुदामाला।' हे लोकप्रिय पदही प्रेमाबाईचेच असावे, असे म्हणतात.

[ म. सं. क.– श्री. ज. र. आजगांवकर, १९३९ ]

**प्रोक्त** वैदिक वाङ्मयाचा एक प्रकार. ज्या वाङ्मयाची निर्मिती वैदिक चरणांच्या संस्थापक ऋषींनी केली, त्याला प्रोक्त वाङ्मय म्हणतात. कित्येक वेदशाखा व ब्राह्मण ग्रंथ यांचा अंतर्भाव प्रोक्त वाङ्मयात होतो. उदा० तैत्तिरीय चरणाची तैत्तिरीय शाखा, कठांची व कलापांची त्या त्या नावाची शाखा, या प्रोक्त आहेत. काही ब्राह्मण ग्रंथही प्रोक्त मानलेले आहेत. या वाङ्मयाचा विकास चरणांच्या अंतर्गत झाला असल्याचे 'पुराणप्रोक्तेषु ब्राह्मणकल्पेषु' या पाणिनीच्या सूत्रावरून कळते (अष्टा. ४. ३. १०५). वेगवेगळ्या चरणांमध्ये गुरुशिष्य परंपरेने प्रोक्त ग्रंथ पढले, पढवले जात. 'तित्तिरिणा प्रोक्तं अधीयते तैत्तिरीयाः' = तित्तिरीने प्रोक्त अशा वाङ्मयाचे जे अध्ययन करतात ते तैत्तिरीय होत, अशी त्या शब्दाची फोड आहे (अष्टा. ४.२.६६). प्रोक्त शब्द वेदशाखा व ब्राह्मणे एवढ्यापुरताच प्रथम मर्यादित होता; पण पुढे ब्राह्मण ग्रंथांच्या अंतर्भूत असलेली आरण्यके व उपनिषदे यांनाही तो शब्द लावू लागले.

वेदांगांत अंतर्भूत असलेली काही श्रौतसूत्रे यांनाही प्रोक्त वाङ्मय अशी संज्ञा पुढे मिळाली. वस्तुतः सूत्रे म्हणजे शाखा किंवा ब्राह्मण नव्हेत. पण काश्यप आणि कौशिक हे ऋषी असल्यामुळे तत्प्रणीत सूत्रे प्रोक्त वाङ्मयात घातली गेली. पाराशर्य व कर्मंद यांची भिक्षुसूत्रे आणि शिलाली व कृशाश्व यांची नटसूत्रेही पाणिनीने प्रोक्त वाङ्मयात अंतर्भूत केली आहेत (अष्टा. ४. ३. ११०–१११). [ पा. का. भा.; पा. पा. व्या. सं. ]

**प्रोषितभर्तृका** एक नायिकाभेद. अष्टनायिकांमध्ये हिची गणना करतात. रसमंजरीत हिची व्याख्या आहे, ती अशी––

**देशान्तरगते प्रेयसि सन्तापव्याकुला प्रोषितभर्तृका ।**

अर्थ – प्रियकर परदेशी गेल्यामुळे जी व्याकुळ झालेली आहे, ती प्रोषितभर्तृका होय.

जिचा पती प्रवासाला जाणार आहे किंवा थोड्याच वेळात निघणार आहे, अशा नायिकांचा समावेश प्रोषितभर्तृका या वर्गातच होतो; पण त्या नायिका वरील व्याख्येत बसत नाहीत. म्हणून शृंगारमंजरीत पुढील व्याख्या दिली आहे–

**पतिप्रवासखिन्ना प्रोषितभर्तृका ।**

अर्थ– पतीच्या प्रवासामुळे जी खिन्न झालेली आहे, ती प्रोषितभर्तृका होय.

प्रोषितभर्तृका या नायिकेचे तीन पोट भेद आहेत. (१)

पती नजीकच्या काळात प्रवासाला निघणार असल्यामुळे जी व्याकुळ झालेली आहे, ती (२) जिचा पती प्रवासाला निघत आहे, ती. (३) जिचा पती प्रवासाला गेलेला आहे, ती

प्रोषितभर्तृका ही अवस्था नायिकांच्या स्वीया, मुग्धा, इ. सर्व वर्गांत संभवते. प्रोषितभर्तृकांचेही उत्तमा, मध्यमा इ. भेद आहेत. पती प्रवासाला जाणार, हे नुसते ऐकून जी व्याकूळ होते ती उत्तमा; पती प्रत्यक्षपणे प्रवासाला निघाला म्हणजे जी खिन्न होते, ती मध्यमा आणि पती प्रवासाला गेल्यानंतर जिला विरहवेदना जाणवू लागतात, ती अधमा होय.



प्रोषितभर्तृका

गाथासप्तशतीत अशा एका प्रोषितभर्तृकेचे सासूने पुढील-प्रमाणे सांत्वन केले आहे –

**अज्जं चिअ छणदिअहो मा पुत्ति सएहि पहुइ पिओ त्ति ।**
**सुण्हं आसासंती [illegible] सअइ सासू ॥**

अर्थ– मुली, तुझा पती नक्की परत येईल, आज सणाचा दिवस आहे, रडू नको. असे आश्वासन देऊन सासूने सुनेचे सांत्वन केले आणि नंतर सासू स्वतः च मुख फिरवून रडू लागली.

कोणत्याही तऱ्हेचे खेळ, शरीरशृंगार, समाजोत्सवदर्शन, हास्य, नृत्य, गीत या गोष्टींपासून या नायिकेने अलिप्त राहावे, असे संकेत आहेत त्याचप्रमाणे परगृहप्रवेशही तिला वर्ज्य आहे.

प्रोषितभर्तृका हा प्राचीन व मध्ययुगीन कवींचा मोठा आवडता विषय आहे त्या काळात प्रवासी पुरुषांना अनेक संकटे येत असत. त्यामुळे ते सुखरूप परत येण्याची शाश्वती नसे अशा स्थितीत घरी बसून चिंता करणाऱ्या प्रोषितभर्तृकांची अवस्था दयनीय होणे हे अगदी स्वाभाविक असे. [शृंगार– नायिका.]

**प्रोक्षणी** एक यज्ञीय पात्र. यातील उदकाने अन्य पात्रांचे प्रोक्षण करतात. [सं. को.]

**प्रोक्षणीधानी** एक यज्ञीय पात्र. ही एक स्रुचा असते. प्रणयां-मध्ये लागणाऱ्या पात्रांचे प्रोक्षण करण्या-साठी हिचा उपयोग केला जातो [विद्याधरशास्त्री भिडे]

**प्लक्ष** हा अश्वत्थाच्या जातीचा वृक्ष असून, त्याची पाने मोठी असतात यास वनस्पतींचा अधिपती म्हणतात. त्याला लहान गोलसर फळे येतात त्याचा उल्लेख अथर्ववेद (५.५.५), तै. सं. (७.४.१२.१), ऐ. ब्रा. (७.३२) श. ब्रा. (३.८.३.१०) इ. ठिकाणी आला आहे. पृथुराजाने पृथ्वीचे दोहन मांडले, त्या वेळी वनस्पतींनी प्लक्षाला वत्स करून रसरूप दुग्ध दोहून घेतले, अशी भागवतात कथा आहे (४.१८.२५) या वृक्षाच्या समिधा पवित्र मानल्या जातात कृष्णाष्टमीच्या व्रतविधानात त्याचे हवन सांगितले आहे. यज्ञाचे प्रतीकात्मक उत्खनन प्लक्षाच्या काठीने करतात [पु. ई.]

**प्लक्षद्वीप** सप्तद्वीपांपैकी एक हे जंबुद्वीपाला लागून असून त्याचे उल्लेख पुराणांमधून आहेत काही पुराणांत या द्वीपाचे नाव वगळले असून, त्या जागी गोमेद असे दुसरे नाव दिले आहे प्लक्ष नामक वृक्षावरून या द्वीपाला प्लक्षद्वीप असे नाव मिळाले आहे हा वृक्ष या द्वीपाच्या मध्य-भागी आहे हे जंबुद्वीपाच्या दुप्पट विस्तृत आहे आणि त्याचा परिघ जंबुद्वीपाच्या तिप्पट आहे हे इक्षुरस समुद्राने वेढलेले आहे राजा इध्मजिह्व याने या द्वीपाचे सात भाग करून आपल्या सात पुत्रांना वाटून दिले आणि त्यांच्या नावांवरून त्या त्या विभागांना ती ती नावे प्राप्त झाली. या द्वीपात कित्येक नद्या व पर्वत आहेत. या द्वीपातील लोक सूर्योपासक आहेत तुर्कस्थान व ग्रीस मिळून पौराणिक प्लक्षद्वीप बनते, असे इतिहासवेत्ते म्हणतात प्राचीन काळी त्या भागात येका-जिक नावाचे लोक राहत प्लक्ष हे त्याच शब्दाचे संस्कृतीकरण आहे, असे त्यांचे मत आहे [पा. के. सं.; पु. ई. जॉ. पु.]

**फ** देवनागरी वर्णमालेतील बाविसावे व्यंजन. याच्या चार अवस्था आहेत त्यांपैकी पहिली अशोकाच्या गिरनार

**फ = [illegible] फ**

फच्या रूपाचा विकास

येथील शिलालेखात, दुसरी मंदसोर येथील लेखात (इ. स.

५३२), तिसरी पाली गावाच्या दानपत्रात (इ. स. ४७७–७८) व चौथी मध्य प्रदेशातील ललितपूर गावाजवळ सापडलेल्या सीयडोनी लेखात (इ. स. ९०३) आढळते.

कामधेनू तंत्रांत फकाराचे पुढीलप्रमाणे वर्णन केले आहे —

**फकारं शृणु चार्वङ्गी रक्तविद्युल्लतोपमम् ।**
**चतुर्वर्गप्रदं वर्णं पञ्चदेवमयं सदा ।।**
**पञ्चप्राणमयं वर्णं सदा त्रिगुणसंयुतम् ।**
**आत्मादितत्त्वसंयुक्तं त्रिबिन्दुसहितं सदा ।।**

अर्थ – हे सुंदरी, फ हा रक्तवर्ण विद्युल्लतेसारखा, चतुर्वर्गप्रद, पंचदेवमय, पंचप्राणमय, त्रिगुणयुक्त, आत्मादितत्त्वसंयुक्त व तीन बिंदूनी युक्त आहे.

फकाराचा वर्ण प्रलयकालीन मेघाप्रमाणे आहे. तो चतुर्भुज व नाना अलंकारांनी विभूषित आहे; त्याची जीभ लवलवत असून, तो भक्तांना अभय देणारा आहे, असे त्याचे ध्यान वर्णोद्धारतंत्रात वर्णिले आहे.

हा प वर्गातील दुसरा वर्ण आहे. ओष्ठ हे याचे उच्चारणस्थान आहे. [म. ज्ञा. को.; श. क.]

## फकीर

मुसलमानांतला भिक्षेकरी वर्ग. फकीर हा अरबी शब्द असून, त्याचा अर्थ गरीब असा आहे. कुराणात म्हटले आहे, की 'तुम सब हो फुकरा अल्लाह के; सिर्फ अल्लाह ही गनी है' = तुम्ही सगळे अल्लाचे फकीर आहां. केवळ अल्ला तेवढा श्रीमंत आहे. तसेच मुहंमद पैगंबरान एकदा म्हटले, की 'फक्र (दीनपणा) माझा गौरव आहे.' त्यामुळे मुसलमानी साहित्यात व संस्कृतीत फकीर या शब्दाला महत्त्व प्राप्त झाले. सूफी संत स्वतःला फकीर म्हणवून घेणे गौरवास्पद मानतात. म्हणून मुस्लिम साधू असाही या शब्दाला सामान्य अर्थ प्राप्त झाला आहे.

फकीर हे फिरते भिक्षेकरी असतात. ते काही चमत्कारही करून दाखवतात. त्यांची वस्ती भारतात सर्वत्र आहे. सगळे मुसलमान फकीर आपली परंपरा अबूबक्र अथवा अली याच्यापासून मानतात. बाशर व बेशर असे यांचे मुख्य दोन वर्ग आहेत. बाशर हे इस्लामी नियमांचे पालन करतात व विवाहित असतात. बेशर हे बेछूट व रूढीचे पालन न करणारे असून, त्यांना घरदार अथवा कुटुंब नसते. हे मद्यपान तर करतातच; पण प्रार्थनाही करीत नाहीत. यांचा एक गुरू असतो.

फकिरांचे अनेक पोटभेद आहेत, ते असे –

**मदारी** – हे आपल्याला मदारशाहाचे वंशज मानतात आणि त्याला भजतात. यांच्यांतील काही लोक माकडे आणि अस्वले नाचवणारे असतात; तर काही कोल्हाटी असतात. सर्पदंशावर हे मंत्र घालतात. हे अग्निप्रवेशही करून दाखवतात. यांची वसती मुख्यतः गुजरातेत व राजस्थानात आहे. आपल्या पायावर व पाठीवर कोरडे ओढून किंवा तीक्ष्ण शस्त्राने जखम करून घेऊन हे भीक मागतात. यांच्यांतील काही जण गृहस्थाश्रमी असतात.



राजस्थानी फकीर

**कालंदर** – करबलाच्या युद्धात आपण इमाम हुसेनाचे वार्ताहर होतो, असे हे सांगतात. अजूनही मोहरमच्या महिन्यात सातव्या दिवसापासून दहाव्या दिवसापर्यंत यांच्यांतील एक माणूस हिरवे वस्त्र नेसतो, हातात तरवार घेऊन एका ताजियापासून दुसऱ्या ताजियापर्यंत धावत जातो आणि आपल्या परंपरागत वार्ताहराच्या कर्तव्याची आठवण करून देतो. हे गृहस्थाश्रमी असतात. (कालंदर पाहा.)

**रफई** – (गुरुजवाले) — या फिरस्त्या फकीरांचे वर्तन आततायीपणाचे आणि रगेलपणाचे असते. सय्यद अहमद कबीर याला हे पूज्य मानतात. हे लुंगी नेसतात. यांच्या उजव्या हातात गुरुज असते. भिक्षा मिळायला उशीर झाला, की हे गुरुज आपल्या गालात किंवा डोळ्यात घालतात. पण त्यामुळे त्यांना जखम मात्र होत नाही. कारण त्यात त्यांची हातचलाखी असते. मुहफोडा व मुहमीर या फकीरांच्यांत आणि यांच्यांत बरेच साम्य आहे.

**जलाली** – हे जलालुद्दीनाचे अनुयायी आहेत. हे भिक्षेच्या वेळी स्वतःवर चाबकाचे कोरडे ओढून घेतात. हे भांग पितात व साप–विंचूही खातात. हे डोक्यावरील सर्व केस व भुवयासुद्धा काढतात. या पंथात प्रवेश करणाऱ्याला आपल्या संपूर्ण शरीरावरचे केस काढावे लागतात व वस्त्रे फेकून द्यावी लागतात. नंतर यांच्या उजव्या खांद्यावर डाग देऊन त्यांना पंथाची दीक्षा दिली जाते.

**बेनवा** – हे आपल्या उत्पत्तीचा संबंध ख्वाजा हसन बसरीशी जोडतात. हे खूप उंच टोपी घालतात व स्वभावाने फार चेष्टेखोर असतात.

**मेवाती** – हे मूळ मदारींच्या शाखेचे आहेत. हे स्त्रियांसारखा पोशाख करतात, हातात बांगड्या व कानांत कर्णफुले घालतात

केस लांब वाढवतात व त्याच वेळी दाढीमिशाही राखतात. हे स्वतःला हुसेनची वधू मानतात.

**नक्षबंदिया** – हे [illegible] मीर महंमदाचे चेले होत. हातात मशाल घेऊन हे रात्री भीक मागतात. मुलांनी भिक्षा घातल्यावर त्यांच्या कपाळी हे मशालीची काजळी लावतात. हे वृत्तीने शांत व सद्वर्तनी असतात.



गुजराती फकीर

**दरवेशी** – हे मस्तवृत्तीचे असतात (दरवेशी पाहा).

**हुसेनी ब्राह्मण** – हे मुसलमान नाहीत, परंतु मुसलमानांच्या काही चालीरीती हे पाळतात. हे लोक अथर्ववेदाला मानतात. पैगंबराच्या मुलीचा मुलगा हुसेन याच्या नावावरून त्यांना हुसेनी असे म्हणतात. यांचे मुख्य ठिकाण अजमेर हे असले, तरी अहमदाबाद, बगदाद येथेही त्यांची वस्ती आहे. यांचा समावेश बेशर फकिरांत होतो. हे रमजान पाळतात. गाईशिवाय इतर प्राण्यांचे मांस हे [illegible]. हे मुलांची नावे हिंदूसारखी ठेवतात. हे सुंता करीत नाहीत. यांच्यात प्रेताला बसल्या स्थितीत पुरतात.

**मुसासोहाग** – हे गुजरातेत सर्वत्र आढळतात. हे सौभाग्यवती स्त्रियांसारखा पोशाख करतात, नाकात चमकीही घालतात; पण दाढी ठेवतात. हे मुसा नामक पीराला भजतात. हा पीर इ. स. च्या १५ व्या शतकात होऊन गेला. हा पतिव्रता स्त्रीप्रमाणे अल्लाची सेवा करीत असे, म्हणूनच तो स्त्रीवेषात राही. याने अनेक चमत्कार करून दाखवले असे मानतात. हे फकीर सुन्नी पंथाचे असून अविवाहित असतात. यांचे मुख्य ठिकाण अहमदाबाद असून, त्याच्या उत्तर दरवाज्याजवळ त्यांच्या पीर मुसाची कबर आहे.

**रसूलशाही** – यांना मस्तान असेही म्हणतात. हे संख्येने थोडे असले तरी सर्वत्र पसरले आहेत. हे कमरेला तांबडे वस्त्र गुंडाळतात, पैरण घालतात व भीक मागण्यासाठी लाकडी कटोरा जवळ बाळगतात. हेही सुन्नी असून अविवाहित राहतात.

फकिरांजवळ एक जपमाळ असते. तिला ९९ मणी असतात. हे माळेच्या मण्यांवर ईश्वराची नावे घेऊन त्यांची गिनती ठेवतात. एकांतवासात सतत प्रार्थना करीत राहिल्याने काही फकिरांना आत्मविस्मृती होते, तेव्हा त्यांना मस्त म्हणतात. अशा वेळी त्यांच्या अंगात देवाचा संचार झालेला आहे, असे समजून लोक त्यांचे शब्द खरे मानतात.

फकीर हे मुसलमान असले, तरी हिंदूही त्यांना दानदक्षिणा देण्याची चाल आहे [ गु. आ., बि. मु. रा. प., हि. इ., द्रा. का. सं. प्रां. इ., हि. वि. को. ]

## फगु उत्सव

मुंडा लोकांचा होलिकोत्सव. त्यासाठी मुंडा लोक फाल्गुन पौर्णिमेच्या आदल्या दिवशी पाणवठ्याकडे जाणाऱ्या रस्त्यावर एक एरंडीचे झाड उभे करतात व ते गवताने झाकतात. नंतर त्याला आग लावतात. मग मुंडा तरुण आरोळ्या मारीत तिथे येतात आणि ते जळते झाड कापतात. दुसऱ्या दिवशी ढोल वाजवीत आणि गाणी गात जंगलात जाऊन सेमर झाडाचा एक वृक्ष तोडतात. तो घेऊन गावात येत असता गावसीमेवर तरुण मुले-मुली त्यांना सामोरे जातात. सर्वजण गात-नाचत गावात येतात आणि एरंडीच्या झाडाच्या जागी त्या वृक्षाची फांदी रोवतात. तिलाही गवताने झाकतात. मग गावचा पुरोहित डागर, गाने, नदा, दोने यांच्या देवतांना तांदुळाची भाकरी, मद्य व काळी कोंबडी अर्पण करतो आणि सर्वांना शिकारीत यश मिळावे, अशी प्रार्थना करतो. नंतर त्या सेमर वृक्षाच्या फांदीला आग लावतात आणि कुऱ्हाडीने तिचे तुकडे करतात. ते तुकडे चारही दिशांना फेकतात. नंतर सर्वजण नाचत-गात पुरोहिताच्या घरी जातात. तिथे त्यांना घागरभर मद्य मिळते, ते ते पितात. घरी आल्यावर घरातला मोठा माणूस पितरांच्या आत्म्यांची पूजा करतो. दुसऱ्या दिवशी सगळे लोक शिकारीला जातात. त्या शिकारीचाही उत्सव करतात [ एन्सा. मुंडा ]

## फट्

एक अस्त्रबीज. तांत्रिक गोष्टीत याचा उपयोग करतात. शालिग्रामाचे व अर्घ्यपात्राचे क्षालन, पूजोपकरणांचे प्रोक्षण, विघ्नोत्सारण, अघमर्षण, पापपुरुषताडन, नैवेद्यप्रोक्षण, इ. कृत्यांच्या प्रसंगी फट् असा उच्चार करावा, असे सांगितले आहे. पूजादी कृत्यांच्या प्रारंभी करन्यास करतात, त्यात हातांचे तळवे आणि पृष्ठभाग यांना स्पर्श करून ' अस्त्राय फट् ' असे म्हणतात. अभिचार कर्मात हवन करताना स्वाहा या शब्दाच्या स्थानी फट्चा उच्चार करावा, असे सांगितले आहे.

**फणी** केस विंचरण्यासाठी उपयोगी पडणारे एक साधन. स्त्रिया या साधनाचा वापर वेदकाळापासून करीत, असे दिसते. अथर्ववेदात शंभर दात्यांच्या फणीचा उल्लेख आहे (१४.२.६८). याशिवाय रामायण (अयोध्या. ९१.७६), शिशुपालवध (१५.३३) इ. ठिकाणीही फण्यांचे उल्लेख आलेले आहेत. मोहेंजोदडो, नेवासे, नासिक, इ. ठिकाणी झालेल्या उत्खननात अनेक फण्या मिळाल्या आहेत.

प्राचीन काळी या फण्या प्रामुख्याने हस्तिदंतापासून बनवीत. उत्खननात मिळालेल्या फण्याही हस्तिदंताच्याच आहेत. लाकडाच्या फण्या सामान्यपणे शिसवीच्या बनवीत. फणीच्या दोन्ही बाजूना दाते असतात. त्यांपैकी एका बाजूचे दाते जरा विरळ व जाड असतात आणि दुसऱ्या बाजूचे दाते दाट व बारीक असतात. फण्यांचा आकार सामान्यपणे तळहाताएवढा असतो. लोक आपापल्या हौसेप्रमाणे फण्यांवर चित्रे काढून घेतात. काहीजण फण्यांना चांदीची घुंगरेही लावतात. कित्येक आदिवासी स्त्रिया स्वतःच्या फण्या स्वतःच तयार करतात. त्यांच्या फण्यांवर वेलबुट्टीचा व पशुपक्ष्यांची चित्रे कोरलेली असतात.

मध्य प्रदेशातील आदिवासी लोकांत फणी हे प्रेमाचे प्रतीक समजले जाते. मुरिया आदिवासी तरुण स्वतः फणी तयार करतो व ती आपल्या प्रेयसीला भेटीदाखल देतो. प्रेयसी ती फणी आंबाड्यात खोचते. आदिवासी तरुणी प्रसंगी दोनचार फण्यासुद्धा अंबाड्यात खोचून ठेवते. त्यावरून त्या तरुणीला किती तरुणांची मागणी आहे हे कळून येते. काही आदिवासी लोकांत फणी हे सौभाग्याचे लक्षण समजले जाते. म्हणून त्यांच्यांतल्या सुवासिनी स्त्रिया आपल्या केसांतून फणी केव्हाही काढीत नाहीत. कुकी अदिवासींत मृताची फणी त्याच्या बरोबर पुरण्याचा प्रघात आहे. त्या वेळी मृताचे नातेवाईक आणि मित्रमंडळी स्वतःच्या डोक्यांतील फण्या मोडून फेकून देतात व आशौचकाळात केस विसकटून ठेवतात.

विशिष्ट चित्रांच्या फणीपासून प्रेमात व लढाईत फायदा मिळतो आणि काही चिन्हांच्या फण्या जवळ बाळगल्यास कधीही अशुभ घडत नाही, अशी कित्येक देशांतील समाजांत समजूत आहे.

ऐतिहासिक काळात महाराष्ट्रात पितळी फण्या वापरल्या जात होत्या, असे उल्लेख आढळतात. या फणीला जोडूनच आरसेही असत.

जुन्या काळी काही लोक लहान मुलांचे केस विंचरण्यासाठी साळूच्या काट्यांचा फणीसारखा उपयोग करीत असत.

फणी हे एक सौंदर्यप्रसाधनाचे साधन असल्यामुळे सौभाग्यवायनाच्या वस्तूंत तिचा अंतर्भाव केलेला आहे.

**फतहगढ** शिखांचा एक गुरुद्वारा. हा गुरुद्वारा पंजाब प्रदेशातील सरहिंद या गावी आहे. हे गाव अंबाल्यापासून ११ मैल पश्चिमेस आहे. हा गुरुद्वारा बंदा बैरागी याने गुरू गोविंदसिंघाच्या जोरावरसिंघ व फतहसिंघ या दोन मुलांच्या स्मृतिप्रीत्यर्थ बांधला. या ठिकाणीच या दोन अल्पवयीन मुलांना औरंगजेबाने भिंतीत चिणून मारले होते. प्रतिवर्षी पौष मासात इथे मोठी यात्रा भरते. [सि. इ.; पं. जी. सा.]

**फत्तेपूर सिक्री** एक ऐतिहासिक नगर. आग्र्याच्या पश्चिमेस २७ मैल अंतरावर हे वसले आहे. इ. स. १५७० मध्ये अकबराने आपली राजधानी येथे आणली. या संबंधात एक आख्यायिका सांगतात, ती अशी––

अकबराची बरीच मुले बालवयातच मरण पावली. त्यामुळे तो दुःखित झाला. मग त्याने शेख सलीम चिश्ती या साधूची कृपा मागितली. त्याच्या कृपेने अकबराला मुलगा झाला. गुरूविषयीच्या कृतज्ञ बुद्धीने अकबराने त्याचे नाव सलीम ठेवले आणि शेख सलीमचे वास्तव्य असलेल्या फत्तेपुर सिक्री या गावी आग्र्याहून आपली राजधानी नेली.



बुलंद दरवाजा – फत्तेपूर सिक्री

या ठिकाणी अनेक प्रेक्षणीय इमारती असून, त्यांत शेख सलीम चिस्ती याचा दर्गा, दिवाण-ई-आम, दिवाण-ई-खास हे बादशाही

दिवाणखाने, बुलंद दरवाजा, इ. वास्तूंचा समावेश आहे.

**बुलंद दरवाजा** – हा जामी मशिदीच्या दक्षिणेला आहे. अकबराने गुजरातवर मिळवलेल्या विजयाचे स्मारक म्हणून हा दरवाजा बांधला. स्थापत्यशास्त्राच्या दृष्टीने या दरवाजाच्या शिल्पाइतके भव्य, सुंदर व उत्कृष्ट शिल्प दुसरे नाही.



दिवाण-इ-खास – फत्तेपूर सिक्री

**चिस्तीचा दर्गा** – इ. स. १५७२ साली बांधलेली ही इमारत संगमरवरी असून, तिची रचना हिंदू मंदिरासारखी आहे. त्या काळातील मोगल शिल्पकलेचा तो एक उत्कृष्ट नमुना समजतात. द. भारतातील शिल्पकलेतले काही विशेष प्रकार या इमारतीत दिसतात. तिच्या मोठमोठ्या कमानींना नक्षीदार जाळ्या आहेत. हा दर्गा जामी मशिदीच्या प्रांगणात बांधलेला आहे. याच्या भिंतीवर कुराणातील आयते खोदलेले आहेत.



सलीम चिस्तीची कबर – फत्तेपूर सिक्री

**दिवाण-ई-आम व दिवाण-ई-खास** – या दोन इमारती सभागृह या स्वरूपाच्या आहेत. दिवाण-ई-आममध्ये अकबर न्यायदान करी. दिवाण-ई-खास ही खास मंडळीच्या सभेसाठी असलेली इमारत होय. दिवाण-ई-खासची इमारत दुमजली भासते. या इमारतीच्या खांबांवर उत्तम शिल्पकृती आहेत. या इमारतीला लागूनच राजज्योतिष्यासाठी बांधलेली इमारत आहे. तो राजज्योतिषी इथून प्रतिदिनीचे शुभाशुभ बादशहाला सांगे.

**जोधबाईचा महाल** – जोधबाई ही अकबराची राजपूत राणी होती. तिच्या स्मरणार्थ हा महाल अकबराने बांधला. त्या महालात तुलसीवृंदावन असून, तिथे सर्वत्र हिंदू संस्कृतीची चिन्हे दिसतात.

**पंचमहाल** – ही पाचमजली इमारत असून, प्रत्येक वरचा मजला लहान होत गेला आहे. ही बौद्ध चैत्यासारखी दिसते. ही इमारत नमाजाची बांग देण्यासाठी, टेहळणीसाठी किंवा केवळ हवा खाण्यासाठी असावी असे तर्क आहेत.

इथले बिरबलाचे घरही दुमजली असून, ते शिल्पकलेचे उत्तम उदाहरण आहे.

श्री. पु. ना. ओक हे संशोधक या शहराविषयी काही वेगळीच माहिती सांगतात, ती अशी– या नगराचा इतिहास अकबराच्या पूर्वीचा आहे. पूर्वी हे नगर राजपुतांच्या ताब्यात होते. त्यावर मुसलमानांनी आक्रमण करून विजय मिळविला, म्हणून त्याला फतहपुर नाव पडेल. सीकरी हा शब्द सीकरशी संबद्ध आहे. सीकर हे राजस्थानातील एक नगर असून, फत्तेपूरचा निर्माता हा सीकर येथील राजपूत वंशातील होता. अकबराने जेव्हा या ठिकाणी आपले वास्तव्य करायचे ठरविले, तेव्हा हे स्थान भग्न स्थितीत होते. पंचमहालासमोर एका दगडी चौथऱ्यावर सोंगट्यांचा एक विशाल पट खोदलेला दिसतो. हे निश्चितपणे हिंदू चिन्ह आहे. प्राचीन काळी सोंगट्या खेळण्याची पद्धत फक्त हिंदू लोकांतच होती. [आग्रा अँड फत्तेपूर सिक्री; हि. वि. को.; स. भा. प्र. व.; कादम्बिनी, ऑगस्ट १९६६]

## फदाली

गवई पेशाचा मुस्लीम वर्ग. हे लोक भाजीवाले, कसाई इ. लोकांच्याकडे त्यांच्या काही धर्मकृत्यांत गायनाचे काम करतात. वरील लोकांच्या धार्मिक उत्सवांत हे लाल व हिरव्या रंगांचे झेंडे घेऊन मिरवणूक काढतात. पीर व मीर यांच्या आराधनेसाठी जाताना मुसलमान लोक यांना गाण्यासाठी बोलावतात. अजमीर येथील जत्रेत असे हजारो फदाली जमतात. [परंपरा–लोकगीत एप्रिल, १९५६]

**फफौसा** उ. भारतातील एक जैन क्षेत्र. अलाहाबाद–कानपूर रेल्वेफाटयावर असलेल्या भरवारी स्टेशनापासून सुमारे २५ मैलांवर हे क्षेत्र आहे. या क्षेत्राजवळील प्रभास नावाचा एक डोंगर आहे. या डोंगरावर पद्मप्रभ या तीर्थंकराने तप केले आणि इथेच त्याला ज्ञानप्राप्ती झाली, असे सांगतात.

**फरीदोद्दीन गंज शक्कर** (११७२–१२६५ इ. स.) एक सूफी साधू. याचे घराणे मूळचे अफगाणिस्थानातले होते. पुढे ते भारतात येऊन स्थायिक झाले. फरीदोद्दीनचा जन्मही भारतातच मुलतान जिल्ह्यात झाला. वयाच्या आठव्या वर्षीच त्याने कुतुबुद्दीन नावाच्या सूफी साधूकडून उपदेश घेतला. गुरूच्या सांगण्यावरून याने मध्य आशिया, इराक, इराण, अरबस्तान, इ. देशांतून प्रवास केला आणि शेवटी अजोधन या गावी कायमची वस्ती केली. यालाच आज पाक-पट्टण असे म्हणतात.

फरीदोद्दीन फार निःस्पृह होता. गुलामवंशीय राजा नासीरोद्दीन हा याचा भक्त होता. राजाने त्याला काही गावे जहागीर म्हणून देऊ केली असता याने ती जहागिरीची सनद परत केली. भारतात इस्लामचा प्रसार करताना याने बरेच हिंदू बाटवले. पाक-पट्टणच्या आसपास राहणारे मुस्लिम हे सर्व फरीदोद्दिनच्या काळातच मुसलमान झाले आहेत, असे इतिहासकार सांगतात.

फरीदोद्दिनने जन्मभर जे कार्य केले, त्या साऱ्याचे संकलन त्याचे शिष्य ख्वाजा निजामोद्दीन व हजरत बदर इसाक यांनी अनुक्रमे 'राहतुल कुलूब' (हृदयशांती) आणि 'सैरूल अवलिया' (साधुसंतांची चरित्रे) या नावांनी केले आहे. [ सू. सं. ]

**फरैझी पंथ** बंगालमधील एक पंथ. हाजी शरयतुल्ला हा या पंथाचा संस्थापक होय. तो फरिदपूर इथे एका मुस्लिम कोष्टी कुटुंबात जन्मला. हा मक्केला जाऊन तिथे वीस वर्षे राहिला होता. लाहिर-अलमक्की हा त्याचा तिथला गुरू होता. मक्केहून भारतात परत आल्यावर याने आपल्या मतप्रसाराला सुरुवात केली. गुरूच्या सर्व आज्ञा शिरोधार्य मानण्याच्या प्रथेचा त्याने निषेध केला आहे.

भारतदेश मुस्लीमेतर लोकांच्या सत्तेखाली आहे म्हणून पीर, दर्गा व तत्सम स्थानांची पूजा करण्याचे मुसलमानांनी सोडून द्यावे, असा तो उपदेश करी.

या पंथात गरीब, श्रीमंत असा भेदभाव मानला जात नाही. पंथाचा एखादा अनुयायी संकटात सापडल्यास इतर पंथानुयायी त्याला मदत करतात.

पृथ्वी ही परमेश्वराची आहे, म्हणून कोणीही तिचा वारस किंवा हक्कदार होऊ शकत नाही आणि तिच्यावरचा करही वसूल करण्याचा त्याला अधिकार नाही, असे फरैझीचे मत होते. फरैझीच्या या मतामुळे बऱ्याच लोकांनी त्याला विरोध केला; पण त्या सर्वांना त्याने यशस्वी रीत्या तोंड दिले. याच्या मुलाने वडिलांच्या अनुयायांचे उत्तम प्रकारे संघटन केले. [ मे. मि. इं. ]

**फलकृच्छ्र** एक प्रायश्चित्त. महिनाभर केवळ प्राणरक्षणापुरेशी फळे खाऊन राहणे, याला हे नाव दिलेले आहे. या फळांत बेलफळ, आवळा व कमलबीज यांचा समावेश केलेला आहे. [ हि. ध. ]

**फलज्योतिष** ज्योतिषशास्त्रातील एक स्कंध. यालाच होरास्कंध असे म्हणतात. **पाहा** – ज्योतिषशास्त्र.

**फलटण** महाराष्ट्रातील एक शहर. सातारा जिल्ह्यात बाणगंगेच्या काठी हे शहर वसले आहे. या शहराला महानुभावांची दक्षिणकाशी असे म्हणतात. पूर्वी हे संस्थान होते व निंबाळकर घराणे त्यावर राज्य करीत होते.

महानुभाव पंथाचा संस्थापक चक्रधर याचा आजेगुरू चांगदेव राऊळ किंवा चक्रपाणी याचा जन्म इथे झाला. गावाच्या बाहेर याचे मंदिर असून, त्याला बाबासाहेबाचे मंदिर असे म्हणतात. हे नाव चांगदेवाच्या मावशीने दिले, अशी समजूत आहे. इथल्या कृष्णमंदिराला आबासाहेबाचे मंदिर असे नाव आहे. या मंदिरात कृष्णमूर्ती असून, मंदिराच्या प्रदक्षिणेच्या वाटेवर एक रंगशिला आहे. मंदिराची बांधणी हेमाडपंती आहे.

कृष्णमंदिराजवळच लांडगेमहाराजांचा मठ आहे. या मठात काही महानुभाव सकळ लिपीतील ग्रंथांचे अध्ययन करीत असलेले दिसतात. या मठात महानुभावांच्या बऱ्याच जुन्या पोथ्या चांगल्या स्थितीत आहेत. जवळच पश्चिमेकडे एक कुंड आहे. त्यात स्नान केल्यावर महारोग दूर होतो, अशी समजूत आहे. इथे एक प्राचीन जैन मंदिरही आहे. [ वि. मुं. रा. प.; मनोहर, ऑगस्ट १९६० ]

**फलतृतीया** एक काम्य व्रत. कोणत्याही महिन्याच्या शुद्ध तृतीयेस या व्रताचा प्रारंभ करतात व वर्षभर ते आचरतात. विशेषतः हे स्त्रियांचे व्रत आहे. आहारात फळे वर्ज्य करणे, द्विदल धान्याचे सेवन करणे व नक्त भोजन करणे असा याचा विधी आहे. उद्यापनाच्या वेळी फळे दान करतात. फल – सुख व वैभव यांची प्राप्ती. [ हि. ध. ]

**फलत्यागव्रत** एक काम्य व्रत. याचा आरंभ मार्ग. शुद्ध तृतीया, अष्टमी, द्वादशी किंवा चतुर्दशी या तिथींना करतात. व्रतावधी एक वर्ष. या व्रताची देवता शिव आहे. यात व्रतकर्त्याने सर्व प्रकारची फळे वर्ज्य करायची असतात. शिव, नंदी यांच्या मूर्ती व सोळा प्रकारच्या फळांच्या सुवर्णाच्या आकृती तयार करून त्यांची वर्षभर पूजा करणे व वर्षअखेर उद्यापनाच्या वेळी वरील मूर्ती व फळे ब्राह्मणाला दान करणे, असा याचा विधी आहे. फल - रुद्रलोकी वास्तव्य. [ हि. ध. ]

**फलपिंडिकादान** एक काम्य दान. मकरसंक्रांतीच्या दिवशी सुपारीचा घड किंवा नारळाची पेंड आणून तिची पूजा करायची व ती वस्तू ब्राह्मणाला दान द्यायची असा याचा विधी आहे. फल – अखंड वंशवृद्धी. [ व्रतराज ]

**फलयुग्मदान** एक काम्य दान. मकर संक्रांतीच्या दिवशी नारळाच्या बारा जोड्या आणून त्यांचे निरनिराळ्या ब्राह्मणांना दान करणे, असा याचा विधी आहे. फल – वंशवृद्धी. [ व्रतराज ]

**फलदेवीगौरी** एक काम्य व्रत. द. भारतात याचा विशेष प्रचार आहे. या व्रतात सोळा प्रकारची सोळा फळे एका सुवासिनीला द्यायची असतात. फल – सशक्त संततीची प्राप्ती. [ का. ट्रा. स. इं. ]

**फलवर्धी** एक जैन क्षेत्र. राजस्थानातील सपादलक्ष (सांभर) भागात हे खेडे आहे. या खेड्यात फलवर्धी देवीचे मंदिर होते. एके काळी वैभवशाली असलेले हे मंदिर सांप्रत नष्ट झाले आहे. पार्श्वनाथ या तीर्थंकराशी या क्षेत्राचा संबंध आहे. त्याविषयी एक कथा सांगतात, ती अशी –

धंधल आणि शिवशंकर असे दोघे दानशूर व्यापारी होते. त्यांच्याजवळ बऱ्याच गायी होत्या. धंधलाची एक गाय दूध देत नसे. शोधाअंती आढळले, की ती गाय आपल्या दुधाच्या धारा एका विशिष्ट ठिकाणी सोडते. मग त्या व्यापाऱ्यांनी ती जागा खणली. खणत असता त्यांना पार्श्वनाथाची मूर्ती सापडली. मग तिची या ठिकाणी स्थापना करून ते तिची पूजाअर्चा करू लागले. पुढे त्यांनी तिथे भव्य चैत्य बांधला. कालांतराने सुलतान शिहाबुद्दीन याने ही मूर्ती फोडली. त्यामुळे त्याच्या सैनिकांना रक्ताच्या उलट्या होऊन अंधत्व आले. ते पाहून शिहाबुद्दीन घाबरला. मग त्याने त्या क्षेत्राची नासधूस थांबवली. पार्श्वनाथाची ती खंडित मूर्ती अजूनही तिथे असून, दर पौषात वद्य दशमीला तिथे जत्रा भरते. [ जै. सि. भा. ]

**फलव्रत** एक काम्य व्रत. चातुर्मासात चार महिने हे व्रत करतात. या व्रतात फणस, कोहळा यांसारखी मोठी फळे खायची नसतात. भाद्र. शुद्ध प्रतिपदेला व्रतकर्त्याने मौन पाळावे आणि तीन प्रकारची फळे शिजवून देवा–ब्राह्मणांना द्यावी, असे सांगितले आहे. जी फळे सोडली असतील, ती सोन्याची करून उद्यापनाचे वेळी ब्राह्मणाला देतात. फल – सूर्यलोकी सन्मानप्राप्ती. [ हि. ध. ]

**फलश्रुती** पूजा–व्रतादी कर्मांच्या प्रयोगात शेवटी त्या त्या कृत्याचे फल कर्त्याला कोणते मिळेल, यासंबंधी जे श्लोक लिहिलेले असतात, त्यांना फलश्रुती म्हणतात. कर्त्याने त्या श्लोकांचे श्रवण करायचे असते. कर्मविधानातला फलश्रुती हा भाग श्रेयस्साधक असून, तो केवळ कर्त्याचे मन त्या कृत्याकडे आकृष्ट व्हावे यासाठी असतो, असे सांगितले आहे. निरनिराळ्या व्रत, क्षेत्र इत्यादींच्या माहात्म्यांत फलश्रुतीचा बराच भाग दिलेला असतो. त्यामुळेच भाविकांची त्या कर्माकडे प्रवृत्ती होते, असा अनुभव आल्यामुळे माहात्म्यकर्त्यांनी तो भाग बराच वाढवला व त्यासाठी कथाही निर्माण केल्या.

**फलसंक्रांतिव्रत** एक काम्य व्रत. मकर संक्रांतीच्या दिवशी सूर्याची सुवर्णाची मूर्ती करून तिची पूजा करणे व ब्राह्मणाला साखरेने भरलेले एक पात्र व आठ फळे दान देणे, असा याचा विधी आहे. [ हि. ध. ]

**फलसप्तमी** एक काम्य व्रत. भाद्रपद शु. सप्तमीला उपवास करून याचा आरंभ करतात. अष्टमीला सकाळी सूर्याची पूजा करून ब्राह्मणांना दाने देतात आणि सूर्याची पूजा व प्रार्थना करतात. केवळ फलाहारावर राहतात. प्रत्येक महिन्यात सूर्याच्या निरनिराळ्या नावाने हे व्रत करतात. वर्षाच्या अखेरीस उद्यापन करताना ब्राह्मणदंपतीला वस्त्रे, पात्रे, साखर, सोन्याचे कमळ व फळ देऊन त्यांचा सन्मान करतात. फल – पापमुक्ती व सूर्यलोकी निवास. [ हि. ध. ]

**फलाहार** अगदी प्राचीन कालापासून मानवाला फळांचा परिचय आहे. आदिम मानव जेव्हा गुहेत राहत असे, तेव्हा तो आजूबाजूच्या वृक्षांची फळे आणि कंदमुळे यांवरच आपला निर्वाह करीत असे. पुढे तो शिकार करून प्राण्यांचे मास खाऊ लागला, तरी शिकार ही हमखास मिळणारी गोष्ट

नसल्यामुळे फलाहाराला त्याच्या जीवनात स्थान राहिलेच. नंतर अग्नीचा शोध लागला. निरनिराळी धान्ये निर्माण होऊ लागली. मानव अग्नीवर पाकसिद्धी करू लागला, तरी फळांचे आहारातले महत्त्व कमी झाले नाही. याचे कारण फळे ही मधुर असल्यामुळे बहुतेक सर्वांना आवडतात आणि ती सहज मिळण्यासारखीही असतात.

रामायण–महाभारतकालातील लोकांच्या आहारामध्येही फळांना प्रमुख स्थान होते. वर्षा ऋतूत लोक भुंग्यांप्रमाणे काळी असलेली जांभळे व अनेकरंगी आंबे खात. त्याचप्रमाणे इतर वेळीही ते ऋतुकालोद्भव फळांचे सेवन करीत. वनवासी ऋषि-मुनी तर फळे व कंदमुळ यांवरच निर्वाह करीत. सीतेच्या विरह-कालात रामचंद्र केवळ फळे व भात खाऊनच राहत होता. राम-लक्ष्मणांच्या वनवासकालात लक्ष्मण गिरिशिखरांवर फळांच्या शोधार्थ अनेकदा भटकत असे, असे रामायणात सांगितले आहे. आंबा, केळे, खजूर, जांभूळ, डाळिंब, नारळ, फणस व बोर या फळांचा रामायणात उल्लेख आहे. फळांचा रस काढणे ही गोष्टही तत्कालीन लोकांना माहीत होती.

फळांचे महत्त्व अद्यापही टिकून राहिले आहे. हिंदूंच्या अनेक व्रतांत केवळ फलाहार करून राहावे, असे विधान आहे. फळ ही बहुगुणी असल्यामुळे ती उपवासाला चालतात, असे सांगितले आहे. आधुनिक काळात, अन्नपदार्थांबरोबरच फळांचे सेवन करणे, हे संपन्नतेचे व प्रतिष्ठेचे लक्षण मानले जाते.

पूजाविधानात देवाला फळे अर्पण करावी, असे सांगितले आहे. काही व्रतांत फलदानही सांगितले आहे.

## फलाहारहरिप्रियव्रत

क काम्य व्रत. वसंत ऋतूत सूर्य विपुववृत्तावर येतो, त्या दिवशी या व्रताचा आरंभ करतात. याचा विधी असा – प्रथम तीन दिवस उपवास, तीन महिने नित्य विष्णुपूजा, नंतरचे तीन महिने फलाहार. शरद ऋतूत सूर्य पुन: विपुववृत्तावर येतो, तेव्हापासून तीन महिने उपवास व प्रद्युम्नाची पूजा. त्या पुढील तीन महि-न्यांत यवांच्या पदार्थावर निर्वाह. वर्षअखेर ब्राह्मणांना दाने देऊन व्रतसमाप्ती करतात. हे एक चतुर्मूर्तिव्रत आहे. फल – विष्णुलोकप्राप्ती. [ हि. ध. ]

## फलाहारी

एक देवता. कालीचे एक स्वरूप. मायातंत्रात तिचे पूजाविधान सांगितले आहे, ते असे – ज्येष्ठ पौर्णिमा व अमावास्या या तिथींच्या मध्यरात्री फलाहारीची पूजा करावी व विविध प्रकारची फळे व नाना द्रव्यांचे उपहार तिला समर्पण करावे. [ श. क. ]

## फल्गू

गया क्षेत्रातून उत्तरेकडे वाहणारी एक नदी. हिला गंगेपेक्षाही श्रेष्ठ मानले आहे. कारण, गंगा म्हणजे विष्णूचे पादोदक आहे, तर फल्गू साक्षात् आदिगदाधरच आहे, असे वायुपुराणात म्हटले आहे (१११.१६). फल्गू नदीवर पितरांना पिंडदान केले असता ते अक्षय्य होते असे महाभारतात म्हटले आहे (वन. ८७.१०-१२). हिच्या माहात्म्याविषयी गरुड पुराणात एक श्लोक दिला आहे, तो असा –

**पृथिव्यां यानि तीर्थानि ये समुद्राः सरांसि च ।**
**फल्गुतीर्थं गमिष्यन्ति वारमेकं दिने दिने ।।**

अर्थ – पृथ्वीवर जी तीर्थे, सरोवरे व समुद्र आहेत, ते सर्व एकेका दिवशी फल्गू नदीत येत असतात.

ही नदी नेहमी कोरडी असते. क्वचित वाहिली तर ओहोळा-सारखी वाहते. तिच्या पात्रात खड्डा खणून त्यात पाणी साचले की त्यात यात्रेकरू स्नान करतात. [ हि. ध.; श. क. ]

## फसली सन

मुसलमानी कालगणनेचा एक प्रकार. फसल म्हणजे शेतीचा हंगाम. त्यावर अवलंबून अस-लेल्या कालगणनेला फसली म्हणतात. अकबर बादशहाने इ. स. १५६३ मध्ये ही कालगणना सुरू केली आणि इ. स. १६३६ च्या सुमारास शहाजहानने ती दक्षिणेकडे चालू केली, याविषयी बहुतेक इतिहासकारांचे एकमत आहे. पण श्री. ग. ह. खरे यांना मात्र हे मत मान्य नाही. कारण त्याला कोणताही आधार सापडत नाही, असे ते म्हणतात.

सूर्य मृग नक्षत्रात शिरताच हे वर्ष सुरू होऊन पुन्हा मृग नक्षत्र येईपर्यंत चालू राहते. फसली सनात ५९० किंवा ५९१ मिळविले असता इसवी सन येतो. फसली सनाचा वर्षारंभ पंजाब, बंगाल व उत्तर प्रदेश यांत पूर्णिमांत आश्विन वद्य प्रतिपदेला होतो. महाराष्ट्रात जुन्या पद्धतीने २४ किंवा २५ मेला व नव्या पद्धतीने ४, ५ किंवा ६ जूनला तो होतो. मद्रासकडे पूर्वी याचा प्रारंभ कर्कसंक्रमणावर होई. इ. स. १८०० च्या सुमारास १३ जुलै हा प्रारंभदिन होता आणि इ. स. १८५५ पासून १ जुलै हा याचा प्रारंभ दिन मानला जाऊ लागला.

शेतांतली पिके पावसावर म्हणजे सौर कालगणनेवर अव-लंबून असल्यामुळे धान्यरूपाने करवसुलीचा चांद्र कालगणनेशी मेळ बसेना. म्हणून फसली ही सौर कालगणना मुसलमान राज्यकर्त्यांनी सुरू केली. [ सं. मि.; सु. वि. को. ]

## फानूदरो नृत्य

भिलाला आदिवासींचे एक नृत्य. लग्नप्रसंगी व निरनिराळ्या सणांच्या प्रसंगी हे नृत्य करतात. या नृत्यात स्त्रीपुरुष दोघेही भाग घेतात. ते एक-

मेकांच्या खांद्यांवर हात ठेवून फेर धरतात आणि नाचतात. नाचताना विविध गाणीही गातात. [लोककला त्रैमासिक]

## फारसी भाषा व साहित्य

इराण देशात बोलल्या जाणाऱ्या भाषेला फारसी असे नाव आहे. फारस हा इराणचा एक प्रांत होता व तिथल्या लोकांनी सर्वप्रथम आपली राजकीय उन्नती करून घेतली होती. त्यामुळे परकी लोकांचा इथल्याच लोकांशी प्रथम संबंध आला. त्यांनी त्यांच्या साऱ्या देशालाच पर्सिस असे नाव दिले व त्यांच्या भाषेला ते फारसी असे म्हणू लागले. ती इराणी या नावानेही प्रसिद्ध आहे. इराणी ही हिंद–इराणी या भाषाशाखेची उपशाखा आहे.

इराणी भाषेचे प्राचीन, मध्ययुगीन व आधुनिक असे तीन कालखंड आहेत.

प्राचीन फारसी ही इराणच्या नैर्ऋत्य भागात बोलली जात असे. ही राज्यव्यवहाराचीही भाषा होती. हख्मानी बादशाहांनी कीलाक्षरांत खोदलेल्या अभिलेखांत या भाषेची माहिती मिळते. हिची लिपी अक्कदी लिपीशी संबंधित आहे. या भाषेतला सर्वात जुना अभिलेख अरिय–रम्न राजाचा (सनपूर्व ६१० ते ५८०) आहे. सर्वात महत्त्वाचे अभिलेख बादशहा दाराचे (सनपूर्व ५२० ते ४८६) असून, ते त्याच्या साम्राज्यात सर्वत्र आढळतात. त्यांतही बिहिस्तून येथील त्याचे अभिलेख अत्यंत प्रसिद्ध आहेत. प्राचीन फारसीशिवाय हे लेख एलमी व बाबिलोनी या दोन भाषांतही आहेत.

अवेस्तन ही इराणच्या धर्मग्रंथाची भाषा लाहे. अवेस्ता हा पारशी लोकांचा धर्मग्रंथ आहे. अवेस्तामधील मंत्रही वेदांप्रमाणे मौखिक परंपरेने चालत आलेले होते. पुढे सस्सानी बादशाहांच्या काळी, ते पहलवी लिपीत अक्षरबद्ध करण्यास आले. अवेस्तन ही भाषा फारसीचे धार्मिक रूप म्हणून इराणच्या पूर्व भागात प्रचलित होती.

मध्ययुगीन इराणीचे पश्चिमी व पूर्वी असे दोन भेद आहेत. पश्चिमी इराणीला पहलवी असे नाव आहे. पहलवी शब्दाचा संबंध पहलवीक जातीशी आहे, असे समजतात. पहलवी ही सस्सानी साम्राज्याची (सनपूर्व ६५२ ते २२६) राजभाषा होती. या भाषेत अनेक धार्मिक व इतर ग्रंथही लिहिलेले आहेत. पहलवी भाषेची लिपी अरमीनीपासून निघाली असून, तिच्यावर अरमीनीचा बराच प्रभाव आहे.

मध्य इराणीच्या काही भाषांचे अभिलेख व पुस्तके पन्नास–साठ वर्षांपूर्वी पूर्व तुर्कस्तानात सापडली आहेत. त्या भाषांपैकी पारथी भाषा उल्लेखनीय आहे. मध्यकालीन फारसी भाषाही याच समुदायातील आहे. सस्सानी बादशाहांचे अभिलेख या भाषेत आहेत.

मध्य इराणीच्या पूर्वसमुदायात, पूर्व तुर्कस्तानात सापडलेल्या साहित्याच्या भाषांचा समावेश होतो. त्यांत बुखारा व समरकंद या भागातील प्राचीन भाषा सोग्दी ही येते. मंगोलियापासून तिबेटच्या सरहद्दीपर्यंत ही भाषा प्रचारात होती. या भाषेत बौद्ध व ख्रिस्ती धर्मग्रंथ आणि मनीची ग्रंथ आहेत. सर्वात जुने ग्रंथ इ. स. च्या चौथ्या शतकातले आहेत.

खोतानी ही या समुदायातील दुसरी महत्त्वाची भाषा आहे. इ. स. च्या आठव्या शतकापासून दहाव्या शतकापर्यंतच्या कालातील बरेच धर्मग्रंथ या भाषेत लिहिलेले आहेत. यांतले बरेचसे ग्रंथ बौद्ध धर्मासंबंधी असून, सर्वांची लिपी ब्राह्मी आहे. त्यांत बरेच प्राकृत शब्द योजलेले आढळतात.

आधुनिक इराणीची फारसी ही महत्त्वाची भाषा आहे. ती अरबी लिपीत लिहितात. ती अफगाणिस्तानापासून पश्चिमेच्या बऱ्याच मोठ्या प्रदेशाच्या संस्कृतीची भाषा आहे. इ. स. च्या आठव्या शतकापासून या भाषेत विपुल साहित्य निर्माण झाले आहे.

इ. स. च्या दहाव्या शतकापासून भारताचा फारसी भाषेशी संबंध येऊ लागला. महंमद गझनीच्या काळात पंजाब प्रांत गझनी साम्राज्याला जोडला गेला. त्या निमित्ताने मध्य आशिया आणि अफगाणिस्तान या भागातून हजारो तुर्की, अफगाण व इराणी लोक भारतात वसाहत करण्यासाठी आले. या लोकांच्या बरोबर फारसी भाषाही भारतात आली. पंजाबात प्रथम फारसी साहित्याच्या निर्मितीला सुरुवात झाली.

याच काळात इराणात फारसी वाङ्मयाची नवनिर्मिती होत होती. इस्लामपूर्व इराणची फारसी भाषा अरबांच्या संसर्गाने पार बदलून गेली. त्याचप्रमाणे मूळ लिपीऐवजी सुधारलेली अरबी लिपी फारसी भाषेसाठी वापरण्यात येऊ लागली. तसेच मूळ फारसी भाषेत असंख्य अरबी शब्द मिसळून आधुनिक फारसी भाषा अस्तित्वात आली.

भारतातील फारसी साहित्य हे सर्व अंगांनी परिपूर्ण आहे. धर्मशास्त्र, सूफी पंथ, काव्य, इतिहास, या सर्व शाखांत फारसी साहित्य निर्माण झाले आहे. इराणमध्ये इ. स. च्या पंधराव्या शतकापर्यंत फिरदौसी, सादी, जलालुद्दीन रुमी, फरीदुद्दीन अत्तार, रुबायांचा कर्ता उमरखय्याम, सिकंदरनाम्याचा कर्ता निजामी, सूफी कवी जामी आणि इराणचा सर्वश्रेष्ठ कवी हाफिज हे साहित्यिक होऊन गेले. फिरदौसी या कवीने अनेक वर्षे सतत परिश्रम करून शाहनामा हा महान ग्रंथ लिहिला. या ग्रंथाने लोकांच्या मनावर एवढी मोहिनी घातली, की त्याच्या

धर्तीवर तसे अनेक ग्रंथ निर्माण झाले. फिरदौसीने युसफ-उ-झलीखा हा दुसरा मोठा काव्यग्रंथ लिहिला आहे. भारतात याच काळात अली हुजवेरी, मीर हुसेन संजरी, अमीर खुस्रव, बंदेनवाज, इसामी, शर्फुद्दीन मुनेरी, रुक्नुद्दीन दबीर काशानी, इ. फारसी ग्रंथकार होऊन गेले. सूफी पंथात अली हुजवेरी याचा कशफुल महजूब, मीर हसन संजरीचा फवाय दुल फवाद, बंदेनवाज याचा असमाउल असरार आणि रुक्नुद्दीन दबीर काशानी याचा शमायल अतकिया, हे ग्रंथ फारसी भाषेत महत्त्वाचे गणले जातात. अमीर खुस्रव हा भारतातील सर्वश्रेष्ठ फारसी कवी होय. इसामीने आपल्या महाकाव्यात मुसलमानांचा इतिहास वर्णिला असून, बर्नी व सिराजुद्दीन अफीफ यांनी खिलजी व तुगलुक घराण्यांचे इतिहास लिहिले आहेत.

फारसी ही मोगल राजदरबारची भाषा झाल्यापासून हिंदूंनीही फारसीचा अभ्यास करायला सुरुवात केली. त्यामुळे फारसी जाणणारे आणि फारसी भाषेत ग्रंथरचना करणारे अनेक साहित्यिक भारतात होऊन गेले. दक्षिणेतील बहमनी सुलतान (इ. स. १३४७ ते १५२६) आणि त्यानंतर नांदलेल्या गोवळकोंडा, विजापूर, अहमदनगर, बीदर व वऱ्हाड या पाच शाहचा यांच्या दरबारांतही फारसीत ग्रंथ लिहिणारे अनेक लेखक झाले.

मोगल बादशाहा बाबर याला आपली मातृभाषा तुर्की हिचा अभिमान होता. त्याने आपले आत्मचरित्रही तुर्की भाषेतच लिहिले आहे. त्याच्या काळात मोगल दरबारात फारसी भाषेच्या बरोबरीने तुर्कीला मान होता. पण हुमायूनच्या काळात मोगलांनी तुर्की भाषेचा वापर खासगी व्यवहारापुरता मर्यादित केला आणि साहित्य व राजकारण यांसाठी फारसीचा उपयोग सुरू केला.

अकबराचा काळ हा भारतातील फारसी साहित्याचे सुवर्णयुग मानला जातो. त्याच्या दरबारातील फैजी हा खुस्रवच्या खालोखाल भारतातील श्रेष्ठ फारसी कवी होय. त्याने नलदमयंतीच्या कथेवर फारसी भाषेत एक महाकाव्य रचले आहे. याशिवाय गजल, मस्नवी, रुबाई, इ. विविध काव्यप्रकारही त्याने हाताळले आहेत. फैजीचा धाकटा भाऊ अबुल फजल हा तर फारसी भाषेचा महापंडितच होता. अकबरनामा आणि आइने अकबरी हे त्याचे प्रमुख ग्रंथ फारसी भाषेत अमर झाले आहेत.

अकबर ते औरंगजेब यांच्या काळात इराणमधील अनेक नामांकित साहित्यिक भारतात आले. त्यांपैकी उर्फी, जहरी आणि नजीरी हे अकबराच्या कारकीर्दीत इराणातून आले. अकबराने उर्फीला आश्रय दिला होता. जहरी व नजीरी हे दक्षिणेत राहून उत्कर्षाला चढले.

या काळात अनेक भारतीय ग्रंथांचे फारसी भाषेत अनुवाद झाले. या कामी अकबराने पुढाकार घेतला होता. त्यासाठी त्याने फारसी व संस्कृत पंडितांची एक समितीच नेमली होती. या समितीत अबुल फजल, फैजी, अब्दुल कादर बदायूनी, नकीबखान, मुल्ला शीरी, हाजी सुलतान, खाजा हुसेन मखी व मुल्ला इब्राहीम हे फारसी पंडित होते. त्यांनी अथर्ववेद, महाभारत, पंचतंत्र, लीलावती, रामायण, सिंहासनबत्तिशी, भगवद्‌गीता, योगवासिष्ठ, हरिवंश, राजतरंगिणी, इ. ग्रंथांचे फारसीत अनुवाद केले. जहांगिराच्या काळात मुल्ला मसीहने रामायणावर फारसी भाषेत महाकाव्य रचले. त्या वेळची प्रचलित रामायणे वाचून किंवा ऐकून त्याने आपल्या पद्धतीने स्वतंत्र रामकथा रचली आहे. याशिवाय अब्दुल कादर बदायूनी याने रामायणाचा फारसी अनुवाद गद्यात केला आहे. काही हिंदू लेखकांनीही रामायणावर फारसीत ग्रंथ लिहिले आहेत. शहाजहानचा पुत्र दारा शिकोह हा भारतीय तत्त्वज्ञानाचा गाढा व्यासंगी होता. त्याने गीतेचे फारसी भाषांतर केले आहे. त्याच्याच प्रोत्साहनाने पासष्ट उपनिषदांचे व योगवासिष्ठाचे फारसी अनुवाद करण्यात आले. भारतीय आणि इस्लामी तत्त्वज्ञानाचा समन्वय करणारा दाराचा ग्रंथ मज्मुअल बहरैन (समुद्रसंगम) हा फारसी वाङ्मयातील महत्त्वाचा ग्रंथ आहे.

इतिहासाच्या क्षेत्रातही फारसी लेखकांनी महत्त्वाची कामगिरी बजावली आहे. भारताचा इतिहास समजण्याच्या कामी उपयुक्त असे शेकडो फारसी ग्रंथ या काळात निर्माण झाले. उदा०—हुमायूनची बहीण गुल्बदन बेगम हिने त्याचे चरित्र लिहिले आहे. हुमायुनाच्या जौहार या शागीर्दानेही आपल्या धन्याचे चरित्र शब्दबद्ध केले आहे. तुजके जहांगीरी हे जहांगीरचे आत्मचरित्र प्रसिद्ध आहे. शेरशहाच्या कारकीर्दीचा इतिहास अब्बासने तारीखे शेरशाही या नावाने लिहिला आहे. अब्दुल हमीद लाहोरी याचा बादशहानामा हा ग्रंथ म्हणजे शहाजहानाच्या कारकीर्दीचा अधिकृत इतिहासच आहे.

औरंगजेबानेही सरकारी इतिहासलेखक म्हणून मुहंमद काजिम याची नेमणूक केली होती. त्याने लिहिलेल्या आलमगीरनामा या ग्रंथात इ. स. १६५८ पर्यंतचा इतिहास आहे.

या कालात दक्षिणेकडे रफीउद्दीन शीराजी, तबातबाई आणि फिरिश्ता हे महत्त्वाचे इतिहासकार होऊन गेले. तजाकिर तुल्मुलुक, बुऱ्हाणे मासिर व गुल्शने इब्राहीमी हे त्यांचे ग्रंथ होत. फिरिश्ता हा भारतातील सर्वश्रेष्ठ इतिहासकार समजला जातो.

उत्तरेतील इतिहासकारांत अब्दुल कादर बदायूनी, बख्शी निजामुद्दीन, नेमतुल्ला, अबदुल्ला, मुहंमद सादिक हे प्रमुख

आहेत. बदायूनीचा मुंतखबुतवारीख आणि निजामुद्दीनचा तबकाते अकबरी हे ग्रंथ प्रमाणभूत आहेत. मराठ्यांच्या इतिहासाच्या दृष्टीने मुस्तैदखानाचा मासिरे आलमगीरी हा ग्रंथ महत्त्वाचा आहे. औरंगजेबाच्या कारकीर्दीत अबुल फैजल नामक एक इतिहासकार होऊन गेला. याच्याच ग्रंथाचा उपयोग करून खाफीखानाने मुंतखबुल्लबाब हा प्रसिद्ध ग्रंथ लिहिला.

मोगलांचे सरकारी कागदपत्र, इतिवृत्ते, दैनंदिन्या, अखबार, आज्ञापत्रे, फर्माने, पत्रे, इ. साहित्य विपुल प्रमाणात उपलब्ध झाले आहे. अबुल फजल, फैजी, औरंगजेब, इत्यादींचा पत्रव्यवहार हे तर इतिहासाचे अमूल्य साधन ठरले आहे. या काळात निरनिराळ्या प्रांताचेही फारसी इतिहास लिहिले गेले. दक्षिण प्रातावर, इ. स. च्या अठराव्या शतकात पंचवीसापेक्षा जास्त इतिहासकारांनी लिहिले आहे. त्यांपैकी यूसुफ महंमद, महंमद अली, गुलाम अली, आझाद बिलग्रामी, तजल्ली शहा, शहानवाजखान, मन्साराम, लक्ष्मीनारायण हे प्रमुख होत. मराठ्यांच्या इतिहासावर या ग्रंथांनी पुष्कळ प्रकाश टाकला आहे.

या काळातील हिंदू इतिहासकारांत बिंद्राबन, खुशहालचंद, ईश्वरास, भीमसेन, चंद्रभान, केवलराम ही नावे महत्त्वाची आहेत. काशीराज हा एकच फारसी लेखक महाराष्ट्रीय आहे. पानिपतच्या युद्धाच्या वेळी तो तिथे हजर होता. त्या युद्धावर त्याने महत्त्वपूर्ण ग्रंथ लिहिला आहे.

इ. स. च्या सतराव्या शतकात सायब आणि अठराव्या शतकात बेदिल हे प्रमुख फारसी कवी होऊन गेले. इ. स. च्या एकोणिसाव्या शतकात फारसी भाषा मागे पडली आणि तिच्या जागी उर्दू पुढे आली. या शतकात गालिब हा सर्वश्रेष्ठ फारसी कवी होऊन गेला. (गालिब पाहा). या शतकात तुराब अली, गुलाम हुसेन, इब्राहिम जुबेरी शुस्त्री, इ. इतिहासकार होऊन गेले. भारतातील आंतरराष्ट्रीय कीर्तीचा शेवटचा फारसी कवी म्हणजे महंमद इक्बाल (इ. स. १८७३–१९३८) हा होय. अस्मितेचा (खुदी) आविष्कार आणि त्यातून इस्लामचे पुनरुज्जीवन हे त्याचे ध्येय होते. भारताच्या बाहेरही आपला संदेश पोचावा म्हणून त्याने आपली महत्त्वाची काव्यरचना फारसीत केली. असरारे खुदी व रमूजे बेखुदी ही त्याची प्रमुख फारसी काव्ये आहेत.

साप्रत भारतात फारसीला भवितव्य उरले नाही; पण सुमारे आठशे वर्षे फारसी ही भारतातील सत्ताधाऱ्यांची भाषा असल्यामुळे तिचा परिणाम इतर भारतीय भाषांवर झाला आहे, तो कायम आहे. दिल्लीच्या परिसरातील हिंदी आणि फारसी यांच्या मिश्रणातूनच उर्दू भाषेचा जन्म झाला आहे. फारसीचा भारतावर झालेला हा सर्वात महत्त्वाचा परिणाम होय. इ. स. च्या चौदाव्या शतकात महाराष्ट्राचा फारसी भाषेशी परिचय झाला. बहमनी राज्य व त्याच्या अस्तानंतर निर्माण झालेल्या पाच मुसलमानी शाह्या आणि मोगल यांच्या नोकरीत असलेल्या वरिष्ठ मराठी अधिकाऱ्यांना फारसीचे थोडेबहुत ज्ञान असणे आवश्यक होते. त्यांच्या राज्यकारभाराच्या निमित्ताने जमीन, जुमला, कज्जा, नुकसान, नफा, महसूल, जिराईत, बागाईत, तक्रार, तगादा, तारीफ, मोहीम, तहकुबी, माफी, बंदोबस्त, जकात, तसदी, इ. अनेक फारसी शब्द लोकांच्या तोंडी बसले व खेड्यापाड्यातही त्यांचा प्रचार झाला. पुढे मराठ्यांनी भारताचा बराचसा भाग व्यापल्यावर फारसीतून पत्रव्यवहार करणाऱ्या दरबाराशी त्यांचा अधिक संबंध आला.

पेशवाईतील राजकीय पत्रव्यवहारही फारसीप्रचुर बनला. वाक्यातील क्रियापदे व सर्वनामे मराठी आणि बाकी सर्व फारसी, असे पेशवे दप्तरातल्या मराठीचे स्वरूप आहे. पेशवाईच्या नंतरच्या काळातही अनेक फारसी शब्द मराठी भाषेत राहिले. पुढे भाषाशुद्धीच्या चळवळीने मराठी भाषेतील थोडेबहुत फारसी शब्द कमी झाले हे खरे; पण तरीही मराठी भाषेत इतके फारसी शब्द आहेत, की ते फारसी आहेत, हे लक्षातही येत नाही. ते सर्व मराठीशी एकजीव होऊन गेले आहेत. तसदी, दगदग, शिताफी, छानछोकी, नजीक, मोफत, कानू, कज्जा, ताबा, मोघम, मुबलक, इमारत, मिजास, मजूर, बेकार,वकूब, खुलासा, इ. काही त्यांची उदाहरणे होत.

भारतात निर्माण झालेल्या आणि प्रकाशित झालेल्या फारसी ग्रंथांची संख्या पाच हजारांच्या वर आणि हस्तलिखितांची संख्या तीस हजारांवर भरेल. हैदराबाद, रामपूर, लखनौ, हबीबगंज, बाकीपूर, कलकत्ता, दिल्ली, इ. ठिकाणी फारसी पुस्तकांची व हस्तलिखितांची ग्रंथालये आहेत. याशिवाय, काही विद्यापीठांतही फारसी ग्रंथालये आहेत. [हि. वि. को.; म. ज्ञा. को.; भा. भा. स.; मणिकांचन]

**फाल्गुन** चैत्रादी गणनेतला बारावा मास. या मासाच्या पौर्णिमेला आगेमागे फल्गुनी नक्षत्र (पूर्वा) असते, त्यावरून याला हे नाव मिळाले आहे. तपस्य हे याचे दुसरे नाव होय. शिशिर ऋतूचा हा दुसरा मास आहे. या मासातले होळीपौर्णिमा, धूलिवंदन (वद्य प्रतिपदा) व रंगपंचमी (वद्य पंचमी) हे सण प्रसिद्ध आहेत. या मासाच्या पौर्णिमा व अमावास्या या दोन तिथी मन्वादी आहेत.

या मासात विष्णूला संतुष्ट करण्यासाठी तांदूळ, गाय व कृष्णाजिनासह वस्त्र यांचे दान करावे, असे वामन पुराणात

सांगितले आहे. या मासात एकभुक्त राहणारा पुरुष स्त्रियांना आवडता होतो, असे स्कंद पुराणात सांगितले आहे. फाल्गुन



फाल्गुन मासाचे सांकेतिक चित्र

शुद्ध अष्टमीला लक्ष्मीची व सीतेची पूजा करावी. पौर्णिमेला फल्गुनी नक्षत्र असेल, तर त्या दिवशी शय्येसह मंचकाचे दान करावे. त्याच दिवशी रात्री चंद्रोदय झाल्यानंतर सूर्य-चंद्रांची पूजा करून ती रात्र गायन, वादन व नर्तन यांत घालवावी.

द. भारतातल्या देवस्थानांतले लहान–मोठे उत्सव विशेषेकरून फाल्गुन मासातच होतात. [पु. चि.; ध. सिं.; हि. ध.]

**फाल्गुनी** एक याग. फाल्गुन महिन्यातील पौर्णिमेला हा याग करतात. मानवगृह्यसूत्रांत या यागाचे विधान सांगितले आहे, त असे––

फाल्गुनी पौर्णिमेला भग व अर्यमा या देवतांना प्रथम लाह्यांच्या आणि अपूपांच्या आहुती द्याव्या. नंतर इंद्राणीला प्रिय असलेल्या यज्ञीय धान्याचे पीठ करून यजमानाने त्या पिठाचे प्रोक्षण करावे. मग आपल्या मालकीची जितक्या जातीची जनावरे असतील, तितक्या जनावरांची प्रत्येकी दोन याप्रमाणे त्या पिठाची चित्रे करावी. मग ती चित्रे शिजवून आज्यपात्रात बुडवावी. नंतर त्या चित्रांचे त्या आज्यपात्रासह रुद्र देवतेसाठी हवन करावे. संध्याकाळी इंद्र व अग्नी यांच्यासाठी दोन अपूप करावे. त्यापैकी अग्नीचा अपूप मध्यभागी थोडा फुगीर करावा. तो घरातल्या स्त्रियांनी खाऊ नये. इंद्राचा अपूप मात्र घरातील सर्वांनी प्रसाद म्हणून खावा. त्या दिवशी किंवा दुसऱ्या दिवशी इंद्राणीसाठी स्थालीपाक करावा.

तेल घालून तयार केलेला एक अपूप अर्यमा देवतेला अर्पण करावा, मध्यभागी फुगीर बनवलेल्या अपूपाची आहुती इंद्राला द्यावी व सातूच्या आणि तांदुळाच्या पिठाचे गोळे करून त्यांच्या आहुती रुद्राला द्याव्या, असे काठकगृह्यसूत्रात सांगितले आहे. तसेच भात व भाज्या एकत्रित करून त्याच्या आहुती अदितीला व तिळा-तांदुळापासून तयार केलेल्या चरूच्या आहुती इंद्राणीला द्याव्या, असेही म्हटले आहे. [इं. वे. क. सू.]

**फाहियान** एक चिनी बौद्ध यात्रिक. हा इ. स. ३९९ साली चीनमधून निघाला व भारतासह अनेक देशांचा प्रवास करून इ. स. ४१४ साली मायदेशी परत गेला. फाहियानची ही यात्रा बौद्ध विनय ग्रंथांच्या शोधासाठी व प्राप्तीसाठी होती. त्याच्या काळी चीनमध्ये बौद्ध धर्मच प्रचलित होता. पण विनयाविषयी (धर्मशिक्षण) अत्यंत दुरवस्था होती. भारतात जे बौद्ध धर्माचे ग्रंथ आहेत व जे बुद्धाचे उपदेश परंपरेने चालत आले आहेत, त्यांचा अभ्यास करून तदनुसार चीनमधल्या बौद्ध धर्माला वळण लावल्यावाचून तिथल्या बौद्धांचा तरणोपाय नाही, असे त्याला वाटले व त्याने आपल्या काही मित्रांसह चंगन या शहरातून भारतयात्रेचे प्रस्थान ठेवले.

तो प्रथम तनहुआंग या राज्यात आला. तिथून त्याचा मार्ग गोबीच्या वाळवंटातून जात होता. तो पार करण्याच्या कामी तनहुआंगच्या राज्यपालाने त्याला आवश्यक ते साहाय्य दिले. त्या प्रवासाच्या संबंधात तो लिहितो – या वाळवंटातील हवा अतिशय गरम होती; शिवाय अनेक दुष्ट आत्मे तिथे वावरत होते. कुठेही पाहिले तरी आकाशात पाखरू दिसत नसे आणि जमिनीवर पशू दिसत नसे. दिसत असे ते वाळवंटात फसून मृत्युमुखी पडलेल्या माणसांचे जळते अस्थिपंजर.

फाहियानने मध्य आशियातल्या ज्या ज्या राज्यांची यात्रा केली, तिथे तिथे त्याला भारतीय संस्कृतीचा प्रसार दिसून आला. ही भारतीय संस्कृती तिकडे बौद्ध धर्माच्या आधारे प्रसार पावली होती. शान-शान प्रदेशात त्याला चार हजार भिक्षू दिसले. कडा शहरातही तितकेच आढळले. खोतान हे त्याच्या काळी बौद्धांच्या महायान संप्रदायाचे प्रमुख केंद्र होते. ते सुखी आणि समृद्ध होते. तिथेही हजारो भिक्षू राहत असत. तिथल्या गोमती विहारात तो काही दिवस राहिला. खोतानमध्ये त्याने बुद्धाची मोठी रथयात्रा पाहिली. त्या रथयात्रेत राजा, राणी व सर्व राजपरिवार सामील झाला होता.

तिथून पुढे तो काशगर येथे पोचला. तिथे त्याने राजाने

बोलावलेली पंचपरिषद नावाची विद्वत्सभा पाहिली. त्या ठिकाणी त्याला बुद्धाची एक दगडी पीकदाणी पाहायला मिळाली. तिथे बुद्धाचा एक दातही होता व तिथल्या लोकांनी त्यावर एक मोठा स्तूप बांधला होता. काशगरमध्ये बौद्धांचा हीनयान संप्रदाय प्रचलित होता.

काशगर येथे काही दिवस राहिल्यावर तो सिंधू नदी पार करून उद्यान या नावाच्या नगरात आला. तिथून दक्षिणेकडे वळून तो गंधार देशात म्हणजे अफगाणिस्तानात आला. तिथे त्याला बौद्धांचे हीनयान आणि महायान हे दोन्ही संप्रदाय प्रचलित असलेले दिसले. तिथून तो पंजाबात उतरला. तिथेही बौद्ध भिक्षू फार मोठ्या प्रमाणात वावरत होते.

पुढे तो मथुरेला आला. मथुरा हे हिंदू धर्माचे एक मोठे केंद्र असले, तरी तिथेही वीस बौद्ध विहार होते. तिथून तो मध्य देशात पोचला. या देशाचे तत्कालीन वर्णन त्याने लिहून ठेवले आहे, ते असे – साऱ्या देशात कोणी मद्य पीत नाही आणि कोणी जीवहिंसाही करीत नाही. या देशात कोंबड्या व डुकरे पाळली जात नाहीत आणि त्यांच्या मांसाचा क्रय–विक्रयही होत नाही.

मगध देशाची तर त्याने याहूनही प्रशंसा केली आहे. तो म्हणतो, की भारताच्या मध्यमंडलातल्या सर्व देशांत मगध देशच अधिक विशाल व समृद्ध आहे. या देशातले लोक शेजारधर्म उत्तम प्रकारे पाळतात.

फाहियानने पुढे नालंदा, राजगृह, गया, वाराणसी, मृगदाव, कौशांबी, इ. बौद्ध क्षेत्रांच्या यात्रा केल्या. भारतातली प्रमुख प्रमुख सर्व बौद्ध क्षेत्रे त्याने पाहिली.

फाहियानला हवे असलेले विनयग्रंथ त्याला पाटलिपुत्र नगरात व श्रावस्तीच्या एका संघारामात मिळाले. तो तिथे राहून संस्कृत व पाली या दोन्ही भाषा शिकला. मग त्याने अनेक विनयग्रंथांच्या नकला करून घेतल्या. त्याचे अभीप्सित कार्य पुरे झाले. भारतात तो सहा वर्षे राहिला.

मग तो परतीच्या मार्गाला लागला. वाटेत ताम्रलिप्ती येथे राहून त्याने बौद्ध सूत्रे चिनी लिपीत लिहून घेतली व कित्येक बौद्ध मूर्तींची चित्रे काढून घेतली. ताम्रलिप्तीहून तो एका व्यापारी जहाजातून चौदा दिवसांनी लंकेला पोचला. तिथे दोन वर्षे राहून कित्येक संस्कृत ग्रंथ त्याने नकलून घेतले. तिथून दुसऱ्या एका जहाजातून तो चीनला जायला निघाला. त्या जलमार्गात दोन वेळा भयानक वादळ झाले; पण त्यातून तो बचावला आणि त्याचे ग्रंथही सुरक्षित राहिले. अशा अनेक आपत्तींना व उत्पातांना तोंड देत देत अखेर तो मायदेशी सुखरूपपणे पोचला. भारतातून त्याने जे बौद्ध ग्रंथ नेले होते, ते तिथल्या धर्मगुरूंच्या हवाली करून तो मोकळा झाला. मग त्याने आपले प्रवासवृत्त बांबूच्या कामटचांवर व रेशमी वस्त्रावर लिहून काढले. तत्कालीन भारतीय इतिहासाच्या माहितीसाठी त्याचे यात्रावर्णन अत्यंत उपयुक्त ठरले आहे. [भा. या.; बौ. ध. २५०० वर्ष–आजकल वार्षिक अंक, १९५६; प्रा. भा.]

**फिंड गचा** एक खेळ. हा खेळ पंजाबात प्रचलित आहे. त्यासाठी जमिनीत एक खड्डा खणतात. या खड्डयाभोवती मुले वर्तुळे आखतात. मुलांच्या संख्येपेक्षा वर्तुळांची संख्या एकाने कमी असते. मुलांच्या हातांत दांडू असतात. एका मुलाच्या हातांत फिंड म्हणजे लाकडाचा लहान तुकडा असतो. हा तुकडा खड्डयात टाकण्याचा प्रयत्न तो मुलगा करीत असतो आणि बाकीचे खेळाडू आपल्या दंडयांनी तो खड्डयात पडू नये असा प्रयत्न करतात. जर फिंड खड्डयात पडला तर तो मुलगा कोणतेही वर्तुळ पकडायचा प्रयत्न करतो. जर त्याला वर्तुळ मिळाले तर ती जागा ज्याने गमावली असेल तो खेळाडू फिंड फेकण्याचे काम करतो. असा हा खेळ चालू राहतो. [पं. जी. सा.]

**फिट्सूत्रे** फिट् म्हणजे प्रातिपदिक होय. प्रातिपदिक म्हणजे अर्थवान पण अधातू आणि अप्रत्यय असलेला वर्णसमूह. या प्रातिपदिकाचे स्वाभाविक असणारे उदात्त, अनुदात्त व स्वरित हे स्वर सांगण्यासाठी ही सूत्रे रचली आहेत. यांची संख्या फक्त ८७ असून ती अंतोदात्त, आद्युदात्त, द्वितीयोदात्त आणि पर्यायोदात्त अशा चार पादांत विभागलेली आहेत. या सूत्रांचा कर्ता कोणी शंतनू नावाचा आहे. पतंजलीने आपल्या महाभाष्यात या सूत्रांचा आधार घेतला आहे. त्यावरून शंतनूचा काल सनपूर्व दुसऱ्या शतकाहून प्राचीन ठरतो. ही सूत्रे पाणिनीच्याही पूर्वीची असावी, असे मत सिद्धांत कौमुदीमधल्या वैदिक प्रकरणावर सुबोधिनी टीका लिहिणाऱ्याने नमूद केले आहे. मात्र या सूत्रकाराची परंपरा पाणिनीहून वेगळी दिसते.

उदात्तादी स्वर वेदांत असतात, पण लौकिक भाषेत नसतात, अशी आपली समजूत आहे. पण ही गोष्ट फिट्सूत्रकाराला मान्य नाही. तो लौकिक भाषेतही प्रत्येक शब्दाला स्वर असल्याचे सांगतो. अर्थभेदाने स्वरभेद होणारे काही शब्द शंतनूने दिले आहेत. उदा० अर्जुन शब्दाचा गवत असाही एक अर्थ आहे. त्या अर्थी तो अंतोदात्त आणि वृक्षादी अर्थी आद्युदात्त होतो. कृष्ण शब्द मृगवाचक असेल, तेव्हा तो अंतोदात्त व विशेषनाम असेल तेव्हा विकल्पाने अंतोदात्त म्हणजे एकदा आद्युदात्तही होतो. अशा अनेक शब्दांची स्वरविषयक चर्चा फिट्सूत्रात आली आहे. [श्री. सिद्धेश्वरशास्त्री चित्राव–ऐ. सं. नि., खं. ६ वा]

**फिरंगाई** एक देवी महाराष्ट्रात पुणे-सोलापूर रस्त्यावर पुण्यापासून ४६ मैल अतरावर कुरकुभ येथे या देवीचे स्थान आहे सासवडजवळ हिवरे येथे आणि देहूच्या लष्करी छावणीपलिकडे नानोली येथील बौद्ध गुफेतही या देवीच्या प्रतिमा आहेत. तुळजापुरची तुकाई, राशिनची अबाबाई आणि कुरकुभची फिरगाई या तिघी बहिणी समजल्या जातात.

फिरगाई देवी प्रथम तुळजापुरीच होती ती एका नापित भक्ताबरोबर तुळजापुरहून कुरकुभ गावाच्या मागील डोगर पठारावर आली त्या भक्ताने पुढे स्वत चे शिरकमल िला अर्पण केले त्या जागी देवीची काळचा पाषाणाची स्वयभू मूर्ती आहे. कालातराने तिचे गावात मदिर बाधले गेले. या मदिरातली मूर्ती चतुर्भुज व आयुधधारिणी आहे. शिवकालात या देवीच्या मदिराचा जीर्णोद्धार झाल्याचा शिलालेख आहे शिवाजीच्या काळात अनेक सरदार फिरगाईचे भक्त होते परपरेने त्या घराण्यातील मडळी अजूनही या देवीच्या उत्सवाला जातात. नवरात्रात हिचा उत्सव होतो. सातव्या दिवशी मोठी यात्रा भरते. अष्टमीस नवचडीयज्ञ होतो यज्ञात पशुबळी देण्याची प्रथा होती; ती हल्ली बद आहे याच दिवशी रात्री देवीची पालखी निघते पालखीच्या मिरवणुकीत भगत, न्हावी, पाटील व गुरव हे मानकरी असतात. कलावतिणीनाही पालखीबरोबर राहण्याचा मान असतो [ मिथस् ॲड रिॲलिटी, श्री. हृ. वि. खोले–पुरुषार्थ जून १९६३ ]

**फिरिस्ता** इस्लाम धर्मात सागितलेले देवदूत त्या धर्मात प्रकाशापासून त्याची उत्पत्ती मानली आहे. त्याना जीव, वाणी व बुद्धी असते, मात्र कामक्रोधादी विकारापासून ते मुक्त असतात. ते नेहमी ईश्वराच्या आदेशाप्रमाणे वागतात. ईश्वराच्या वैभवाचे वर्णन हेच त्याचे अन्न, त्याच्या पावित्र्याचे गान हेच त्याचे पेय, त्याचे स्मरण हेच त्याचे भाषण व त्याचे भजन हाच त्याचा आनद असतो त्याची रूपे व सामर्थ्य ही विविध प्रकारची असतात ते नेहमी ईश्वराचे स्तवन करतात व भूतलावरील क्षुद्र प्राण्याच्या वतीने अल्लाकडे क्षमायाचना करतात. यापैकी आठ देवदूत हे परमेश्वराच्या सिहासनाचे आधारस्तभ असून, नरकावर लक्ष ठेवण्यासाठी एकोणीस देवदूत नेमलेले आहेत [ डि इ ]

**फिल्लौरी श्रद्धाराम** ( १८३७ – १८८१ इ स ) एक साहित्यिक व समाजसुधारक पजाबात जालधरपासून नऊ मैल अतरावर सतलुज नदीच्या किनारी फिल्लौर गावी याचा जन्म झाला. त्याने अल्पावकाशातच सस्कृत, हिंदी, अरबी व फारसी या भाषावर, तसेच ज्योतिष, वैद्यक व सगीत या शास्त्रावर प्रभुत्व मिळवले राहोवाले बाबाजी नावाचे एक महत त्याचे आध्यात्मिक गुरू होते एक उपदेशक, साहित्यिक आणि हिंदी भाषेचा पुरस्कर्ता म्हणून साऱ्या पजाबात



फिल्लौरी

त्याची ख्याती आहे. नित्य प्रार्थना, आत्मचिकित्सा (संस्कृत), असूले मजहब (फारसी), सिखा दे राज दी बिथिआ, बातचीत (पजाबी), धर्मकसौटी, दुर्जनमुखचपेटिका (उर्दू), तत्त्वदीपक, शतोपदेश, भाग्यवती, सत्यामृतप्रवाह (हिंदी), इ गद्य-पद्य ग्रथ श्रद्धारामाने रचले आहेत

श्रद्धारामाला समाजसुधारणेविषयी फार तळमळ होती ज्या काळी विधवाविवाह हा शब्द उच्चारणेसुद्धा अशक्य मानले जात होते, अशा काळात त्याने भाग्यवती नावाची कादबरी लिहून विधवाविवाहाचा पुरस्कार केली कवी म्हणूनही त्याला कीर्ती लाभली होती "जय जगदीश हरे" हे प्रसिद्ध प्रार्थनागीत त्याचेच आहे प्रभावशाली वक्ता म्हणूनही त्याची कीर्ती होती. [ श्री मोहन मैत्रेय – धर्मयुग, ११ एप्रिल १९६५ ]

**फुगडी** महाराष्ट्रातील स्त्रियांचे नृत्य. हे बरेच लोकप्रिय आहे. या नृत्यात दोन स्त्रिया समोरासमोर उभ्या राहून व हातांचा तिढा घालून एकमेकीचे तळहात पकडतात.



फुगडी

तसे केल्याने दोघीचे हात लांब होतात. मग दोन्ही पाय जुळवून एकमेकींपासून ओढ घेऊन दोघीही आपल्या शरीराचा तोल मागच्या अंगास टाकतात. मग उजव्या बाजूने गोल फिरताना उजवा पाय नाचवतात. जागा मोकळी असेल तर एकाच वेळी मुलींच्या अनेक जोडया अशा फुगडया खेळतात. फुगडी खेळताना उखाणे घालण्याची पद्धत आहे. त्यात पहिली उखाणा घालते, तर दुसरी त्याला उत्तर देते. उदा०

**ऊस बाई ऊस, रानोमाळी ऊस ।**
**माझ्याशी फुगडी खेळते बिळातली घूस ।।**
**ओवा बाई ओवा रानोमाळी ओवा ।**
**माझ्याशी फुगडी खेळतो गणपती बोवा ।।**

असे उखाणे घालून झाले की त्या तोंडाने फू, फू अथवा पक् पक् असा आवाज करतात. या आवाजाला पकवा म्हणतात. फू, फू या आवाजावरून या खेळाला फुगडी हे नाव मिळाले आहे. उखाण्यांतले काही उखाणे प्रेमळ व कौटुंबिक संबंधाचेही असतात. उदा०–

**आपण दोघी मैत्रिणी जोडीच्या ।**
**हातांत पाटल्या तोडीच्या ।।**

नागपंचमी, मंगळागौर, हरतालिका यांसारख्या सणासुदीला फुगड्या खेळण्याची प्रथा आहे. फुगड्यांचे विविध प्रकार आहेत, त्यांपैकी काही प्रकार विशेष लोकप्रिय आहेत, ते असे –

**दंड फुगडी–** एकमेकींच्या दंडांवर एकमेकींनी हात ठेवायचे व फुगडी खेळायची. या वेळी उखाणा घालतात, तो असा –

**दंड फुगडी दंडाची बाई माझ्या लाडाची**
**लाडावरन जाईन ग पाच पानं खाईन ग**
**दिवाळीला बोली केली दसऱ्याला येईन ग ।।**

**एका हाताची फुगडी –** एक हात दुसरीच्या हातात गुंफून व दुसरा हात कमरेवर ठेवून फुगडी घालतात, तिला हे नाव आहे. याचा उखाणा असा –

**एका हाताची फुगडी, मामा घेतो लुगडी ।**
**मामा माझा गोरा, मामी माझी काळी ।**
**शेवंतीची जाळी, मामा घ्या हो लुगडी ।**
**बायलीला मोठा तोरा, मामा माझा गोरा गोरा ।**
**मामी माझी काळी शेवंतीची जाळी ।**

**बस फुगडी –** दोघी जणी बसून एकदा उजवा व एकदा डावा पाय लांबवर घसरवीत फुगडी खेळतात, त्याला हे नाव आहे. हिचा उखाणा असा –

**बस फुगडी बसूंगा । चतुरसिंगी लालुंगा ।**
**एक पाय खोलीचा । सिताराम डोलीचा ।।**

**जाते –** फुगडी रंगात येऊन तिला गती आली की दोघींपैकी एक उजवा पाय डाव्या पायावर आडवा घेऊन एकाच पायावर



दंडफुगडी

गरगर फिरत ही फुगडी खेळते. या प्रकाराला जाते म्हणतात.

**नखुल्या –** दोघीजणी हातांचे पंजे नखांच्या खोबणीत

अडकवतात व एकदा उजवा आणि एकदा डावा असे क्रमाक्रमाने हात मागेपुढे करीत ही फुगडी नाचतात. हिचा उखाणा असा –

**नखुल्या बाई नखुल्या, चंदनाच्या टिकुल्या,**
**एक टिकली उडाली, गंगेत जाऊन बुडाली।**
**गंगेला आला लोंढा, भिजला माझा गोंडा।**

**भुई फुगडी** – दोघी मुली एकमेकीच्या समोर बसतात. बसल्या बसल्याच सरकत गोल फिरतात अथवा पुढे मागे होतात. या वेळी उखाणा घालतात, तो असा –

**एक भुई सारवू सारवू, पाच खडे मांडू मांडू ॥**
**एक खडा मोठा मोठा, सई आली पोटा पोटा।**
**सईच्या कानी बुगडया बुगडया,**
**आम्ही घालू फुगडया फुगडया ॥**

याशिवाय कासव फुगडी, लोळण फुगडी असेही फुगडयांचे आणखी काही प्रकार आहेत. [ व्या. ज्ञा. को.; म. स्त्री. ध. ]

## फुदगी

एक जात. यांची वस्ती महाराष्ट्राच्या वसई व ठाणे जिल्ह्यांत आहे. पूर्वी ही भटकी जमात होती आणि चोऱ्यामाऱ्या करून स्वतःचे पोट भरीत होती. आता स्थिर झाल्यामुळे त्यांच्या उपजीविकेच्या साधनांनाही स्थैर्य आले आहे. यांचे शिनवार फुदगी व किरपाल फुदगी असे दोन पोटभेद आहेत. शिनवार फुदगी हे मूळचे फुदगी समजले जातात. हे मारुतीचे भक्त असून, शनिवार हा दिवस पवित्र मानतात. त्यावरूनच त्यांना हे नाव पडले असावे. किरपाल फुदगी हे पोर्तुगीज लोकांनी जबरदस्तीने बाटवून ख्रिश्चन केलेल्या फुदगीजमातीचे वंशज होत. मराठ्यांनी वसई, माहीम हा भाग पोर्तुगीजांकडून जिंकून घेतल्यावर हे पुन्हा हिंदू धर्मात आले.

**व्यवसाय** – पूर्वी हे कोणाच्याही बागेतील फळे, फुले तोडून आणीत. आपण हनुमानाचे वंशज असल्याने आपला तो हक्कच आहे, असा त्यांचा दावा होता. अलिकडे मात्र ते गुराखी, शेतकरी, शेतमजूर व घरगडी बनले आहेत.

**देवधर्म** – हनुमान, छेडा आणि वीरा ही यांची उपास्य दैवते आहेत. पळशीकर ब्राह्मण हे त्यांचे पौरोहित्य करतात. यांच्या बऱ्याचशा रीतिभाती कुणब्यांप्रमाणे आहेत.

**विवाहप्रथा** – यांच्यांत लग्ने प्रौढपणी होतात. लग्न ठरल्यावर मुलाचा बाप मुलीच्या बापाला पाच रुपये देज देतो. लग्नमंडपाला आंबा, वड, पिंपळ, जांभूळ व बेल या पाच झाडांची पाने बांधतात. लग्ने गोरज मुहूर्तावर होतात. लग्नातला मुख्य विधी म्हणजे एक प्रौढ स्त्री वधूच्या गळचात मण्यांची माळ घालते आणि ब्राह्मण वधू-वरांवर कुंकुमाक्षता टाकतात. नंतर दोन्ही पक्षांची मंडळी नृत्य करतात. नृत्य करताना वधू-वरांना खांद्यावर घेतात. या वेळी मद्यपानही होते.

**मृतिकप्रथा** – हे लोक मृतांना जाळतात. परिस्थित्यनुरूप जाळणे शक्य नसेल तर पुरतात. तिसऱ्या दिवशी मृतात्म्यासाठी सरणावर अन्न, कोंबडी व दारू ठेवतात. बाराव्या दिवशी ज्ञातिभोजन घालतात. [ मु. इ. जा.; ट्रा. का. बॉ. ]

## फुम्मनी

काश्मीरमधील एक धार्मिक लोकनृत्य. जम्मू जवळील कंडी या गावी हे विशेष प्रचलित आहे. ज्या घरी नागराजाच्या कृपेने पुत्रजन्म होतो, त्या घरी देवाची पूजाअर्चा झाल्यावर नर्तक एकत्र जमून हे नृत्य करतात. यात प्रत्येक नर्तक आपल्या हावभावांनी नवजात शिशूला आशीर्वाद देतो. नृत्य करताना नर्तक मधूनमधून ‘सी सी, हा हा’ असा आवाज करतात. नृत्याचा उत्तरार्ध टिपरी नृत्याने होतो. ज्येष्ठ महिन्यात स्वतंत्रपणेही हे नृत्य करतात व त्यांत स्त्री-पुरुष दोघेही सामील होतात. [ भा. लो. नृ. ]

## फुर्बू

बौद्ध तंत्रविद्येतले एक साधन. हे त्रिकोणी खंजिरासारखे असून, भूतप्रेतांच्या बाधेपासून माणसांचे रक्षण करते, अशी समजूत आहे. बहुधा याच्या टोकावर हयग्रीवाचे मस्तक असते. [ गॉ. नॉ. बु. ]

## फुलडोल

उ. प्रदेशातील एक उत्सव. हा उत्सव विशेषतः मथुरा-वृंदावन या भागातील मंदिरांतून होतो. चैत्र महिन्याच्या शुक्ल पक्षात याचा प्रारंभ होतो. या वेळी देवांच्या मूर्ती व मंदिरे फुलांनी शृंगारतात. मंदिरांतून फुलांची विविध प्रकारची घरेही करतात. उत्सवात गायन-वादनाचे कार्यक्रम होतात. या उत्सवात लोक निरनिराळ्या बागा व आखाडे यांची साफसफाई करतात व त्यांना रंग देतात. आखाड्यांतून किंवा बागांतून दुर्मिळ चित्रांची प्रदर्शने भरवतात. या उत्सवाला धार्मिक महत्त्व आल्यामुळे त्या भागात पुष्पशृंगारकला विकसित होण्यास बरीच मदत झाली आहे. [ ब्र. सां. इ. ]

## फुले म. जोतीराव

(१८२७ – १८८९ इ. स.) महाराष्ट्रातील एक प्रमुख समाजसुधारक. यांचे घराणे मूळचे सातारा जिल्ह्यातील कटगुणे या गावचे. आडनाव गोऱ्हे. जात माळी. यांचे पूर्वज तिथले वतनदार चौगुले होते. पण गावच्या कुलकर्ण्याशी वैर पडल्यामुळे जोतीरावांचे पणजे आपले मूळ गाव सोडून पुरंदर तालुक्यात खानवडीस येऊन राहिले. त्यांच्या मुलाचे नाव शेटीबा. घरच्या गरिबीमुळ

शेटीबाला खानवडी सोडून उदरनिर्वाहासाठी पुण्यास यावे लागले. त्यांना तीन मुलगे होते. त्या तिघांनाही त्यांनी शेळ्या राखण्याच्या कामी ठेवले. पण त्यांच्या धन्याने त्यांची हुषारी व कष्ट करण्याची प्रवृत्ती पाहून त्यांना फुलमाळचाचे काम शिकविले. या व्यवसायात त्यांनी काही पैसा व बराच नावलौकिक मिळविला. त्यामुळे त्यांचे आधीचे आडनाव गोऱ्हे मागे पडून लोक त्यांना फुले या आडनावाने ओळखू लागले. शेटीबांचा धाकट मुलगा गोविंदराव नावाचा होता. हे जोतीरावाचे वडील होता.



जोतीराव फुले याचे घर – पुणे

जोतीरावांचा जन्म पुण्यात झाला. त्याच्या आईचे नाव चिमणाबाई असे होते. जोतीरावासारख्या कुलदीपक पुत्राला जन्म देऊन ती अवघ्या एका वर्षाच्या आतच दिवंगत झाली. त्यामुळे जोतीरावांचे संगोपन करण्याची जबाबदारी गोविंदरावांवर येऊन पडली आणि त्यांनी ती उत्तम प्रकारे पार पाडली.

वयाच्या सातव्या वर्षी जोतीराव एका गावठी शाळेत जाऊ लागले. पण त्यांच्या भोवताली विद्यार्जनाचे वातावरण नसल्यामुळे दोनतीन वर्षातच गोविंदरावांनी त्यांना शाळेतून काढले व बागकामात लावून घेतले. गोविंदरावांच्या मनात आपल्या मुलाने स्वकष्टार्जित चार पैसे मिळवून सुखाचा संसार करावा असे होते. पण दैवी सकेत काही निराळाच होता. महाराष्ट्रातल्या लक्षावधी दीन-दलितांच्या मूक भावनांना वाचा फोडण्याचे पवित्र कार्य जोतीरावांच्या हातून व्हावयाचे होते. त्यामुळेच त्यांचे खंडित झालेले शिक्षण पुनश्च सुरू होण्याचा योग आला. काही सद्‌गृहस्थांच्या उपदेशाने जोतीरावांना शिक्षणाचे महत्व पटले व १८४२ च्या सुमारास ते इंग्रजी शाळेत जाऊ लागले.

पण जोतीरावांना पाच सहा वर्षेच इंग्रजी शिक्षणाचा लाभ घडला. त्यांना लहानपणापासूनच गुलामगिरीची अत्यंत चीड होती. त्यामुळे विद्यार्थिदशेतच त्यांनी इंग्रजी राज्य उलथवून पाडण्याच्या हेतूने लहुजीबुवा नावाच्या एका मांग पैलवानापाशी नेमबाजी, दांडपट्टा, इ. गोष्टीचे शिक्षण घेतले. पण लवकरच त्यांना कळून चुकले, की पाचपंचवीस तरुणांच्या आततायी कृतीने कोलमडून पडण्याइतकी ब्रिटिश राजसत्ता लेचीपेची नाही. त्यानंतर त्यांची दृष्टी देशाच्या सामाजिक सुधारणेकडे वळली.

जोतीरावांनी स्वतः ज्या प्रतिकूल परिस्थितीत शिक्षण घेतले होते, त्या परिस्थितीचे संस्कार त्यांच्या मनावर खोल उमटले होते. शिक्षणाशिवाय अंधारात चाचपडणारा, धडपडणारा बहुजन समाज त्यांच्या आवती भोवती होता. शूद्र, अतिशूद्र हे सारे ज्ञानाला वंचित होते आणि त्यामुळे त्यांच्यांत मानसिक गुलामगिरी निर्माण झाली होती. तिच्या कारणांचा विचार करता करता त्यांच्या मनाने घेतले, की शूद्रातिशूद्रांच्या या दुरवस्थेला ब्राह्मणसमाज जबाबदार आहे. ब्राह्मणानीच स्वतःच्या मोठेपणासाठी नको त्या धार्मिक कटकटी व रूढी शूद्रातिशूद्रांच्या मागे लावल्या व सर्व बाजूनी त्यांची कोंडी केली आहे. या ब्राह्मणवर्गाच्या जुलमातून शूद्रातिशूद्रांना मुक्त करणे हे कार्य व त्यासाठी त्याना शिक्षण देऊन शहाणे करणे हे साधन, असे निश्चित करून त्यांनी त्यासाठी आपली सबंध हयात खर्च केली.

त्या काळी राज्यात शिक्षणाचा प्रसार व्हावा म्हणून ब्रिटिश सरकार प्रयत्नाला लागले होते. पण ब्रिटिश सरकार व तत्कालीन काही विद्वान मंडळी यांनी सुरू केलेल्या शैक्षणिक कार्याची व्याप्ती फार मर्यादित होती. समाजाच्या मूलभूत रोगावर शिक्षण हा रामबाण उपाय खरा. पण समाज कोणत्या स्थितीत आहे, त्याला शिक्षण कसे द्यावे, तसेच समाजाचा मूलभूत रोग कोणता व त्यावर उपाययोजना कोणती करावी, इ. गोष्टींचा विचार मात्र राज्यकर्त्यांनीही केला नाही व त्यांना शैक्षणिक कार्यात मदत करणाऱ्या विद्वानांनीही केला नाही. सामाजिक विषमता या समाजाच्या मूलभूत रोगाकडे आणि अज्ञानजन्य मानसिक गुलामगिरीकडे कोणीच लक्ष दिले नाही. पण इतरांना जे सुचले नाही ते जोतीरावांना सुचले, हीच त्यांची स्वतंत्र प्रज्ञा आणि हेच त्याचे मोठेपण होय.

समाजाच्या या गुलामगिरीचे व दैन्य-दुःखाचे मूळ ब्राह्मणांच्या भटशाहीत आहे, हे जोतीरावांचे निदान जसजसे त्यांच्या चित्तात दृढमूल होऊ लागले, तसतसे ते ब्राह्मण आणि ब्राह्मणी धर्म यांचे प्रखर विरोधक बनू लागले. जागोजाग व्याख्याने देऊन, लेख लिहून व ग्रंथ रचून त्यांनी आपल्या अंतरातली चीड जळजळीत भाषेत अभिव्यक्त केली. ब्राह्मणी धर्मावर हल्ले चढवताना त्यांनी देवादिकांची आणि ज्ञानेश्वरादी संतमंडळींची अवहेलना करायलाही कमी केले नाही.

मात्र ब्राह्मण जातीविरुद्ध त्यांनी बंडाचे निशाण उभारले

असे म्हणण्यापेक्षा ब्राह्मणी धर्माविरुद्ध त्यांनी दंड थोपटले, असे म्हटले पाहिजे. केवळ ब्राह्मण म्हणून त्यांनी कोणाचा द्वेष केला नाही. त्यांचे अनेक मित्र ब्राह्मणच होते. सर रामकृष्ण भांडारकर हे त्यांचे वर्गबंधू होते. शेवटपर्यंत त्या दोघांचे संबंध चांगले राहिले. न्या. रानडे जोतीरावांची प्रशंसा करीत व जोतीरावांनाही त्यांच्याबद्दल आदर वाटे. अव्वल इंग्रजीत शूद्रांच्याच नव्हे; तर ब्राह्मणांच्या मुलींच्या शिक्षणाचीही काही सोय नव्हती. मुलींना शिक्षण देणे हे धर्मबाह्य आहे, अशी तत्कालीन सनातनी विचारांच्या विद्वानांची समजूत होती. ब्रिटिश सरकारनेही त्या कामी फारशी आस्था दाखविली नाही. पुण्याच्या मंगळवार पेठेत ख्रिस्ती मिशनऱ्यांनी काढलेली एक मुलींची शाळा चालत होती. पण उच्चवर्णियांच्या मुली त्या बाजूला फिरकतही नव्हत्या. म्हणून जोतीरावांनी इ. स. १८५१ साली जेव्हा मुलींसाठी शाळा स्थापन करण्याचा विचार केला, तेव्हा त्या शाळेसाठी लागणारी जागा भिडे नामक त्यांच्या एका ब्राह्मण मित्रानेच त्यांना दिली. इतकेच नव्हे; तर जोतीरावांनी काढलेल्या त्या शाळेत शिक्षणाचे कामही ब्राह्मणच करीत. सुप्रसिद्ध सार्वजनिक काका यांचे जोतीरावांना बरेच साहाय्य होत असे. जोतीरावांनी शाळा चालवण्यासाठी जे एक कार्यकारी मंडळ नेमले होते, त्यात त्यांच्या व्यतिरिक्त इतर सर्व सभासद ब्राह्मणच होते. जोतीरावांनी एकदा शूद्र, अतिशूद्र स्त्रियांना एकत्र बोलावून सार्वजनिक हळदीकुंकू केले. त्यात या सर्व शूद्रातिशूद्र स्त्रियांच्या ओटचा भरण्याचे काम सार्वजनिक काकांच्या मातोश्रींनीच केले. जोतीरावांनी न्या. रानडे, कृष्णशास्त्री चिपळूणकर यांच्या विरुद्धही प्रसंगी टीकेची झोड उठवली; पण ती टीका त्या व्यक्तीविरुद्ध नसून, ते ज्या समाजाचे पुढारीपण करीत होते, त्या समाजावर ती टीका होती.

अस्पृश्यांबद्दल जोतीरावांच्या मनात लहानपणापासूनच सहानुभूती होती. त्यांना शिक्षणाचा लाभ झाल्याशिवाय त्यांची दुरवस्था नष्ट होणार नाही, असे त्यांनी मनात घेतले व त्या कामाकडे लक्ष पुरविले. इ. स. १८५२ च्या मे महिन्यात त्यांनी वेताळ पेठेत स्वखर्चाने महार, मांग, इ. अस्पृश्य जातींच्या मुलांसाठी दोन शाळा चालू केल्या. त्या शाळा नीट चालाव्या म्हणून त्यांनी आपल्या मित्रांच्या साहाय्याने एक मंडळीही स्थापन केली.

जोतीरावांच्या पत्नीचे नाव सावित्रीबाई असे होते. ही बाई अत्यंत साध्वी, प्रेमळ, सहनशील व पतिपरायण होती. जोतीरावांच्या स्त्रीशिक्षणविषयक कार्यात तिनेही मनापासून भाग घेतला. जोतीरावांना तिची खूप मदत झाली.

अशा प्रकारे शैक्षणिक कार्य काही अंशी लागी लागल्यावर त्यांनी विधवाविवाह, केशवपननिषेध, बालहत्याप्रतिबंध, द्विभार्याप्रतिबंध, अस्पृश्योद्धार, इ. समाजसुधारणात्मक चळवळी



म. फुले यांनी हरिजनांसाठी खुला केलेला हौद

हाती घेतल्या. अस्पृश्यांना पिण्याच्या पाण्याची सोय उपलब्ध व्हावी, म्हणून त्यांनी स्वतःच्या वाड्यातला पाण्याचा हौद अस्पृश्यांसाठी खुला केला.

जोतीरावांना एकंदरीत हिंदू धर्माबद्दलच अत्यंत तिटकारा होता. शिवाजीमहाराजांनी हिंदुपदपादशाही स्थापन केली, हेही त्यांना पसंत नव्हते. त्यांनी या बाबतीत म्हटले आहे, की मुसलमानी राज्य काही वाईट नव्हते. १८५७ चा स्वातंत्र्य-संग्राम अपेशी ठरला, याबद्दल राष्ट्रीय वृत्तीचा प्रत्येक मनुष्य खंत करतो. पण जोतीरावांना मात्र त्या पराजयाचा आनंदच वाटला. या बाबतीत त्यांचे म्हणणे होते, की त्या बंडात इंग्रजी राज्य गेले असते, तर इतिहासाची पुनरावृत्ती घडली असती; ब्राह्मण पेशव्यांच्या राज्याचा पुनः अवतार झाला असता; श्रुतिस्मृतिपुराणांतील हिंदू संस्कृतीला पुन्हा जोर चढून शूद्र व अतिशूद्र असलेल्या बहुसंख्य जनतेच्या उद्धाराची आशा जी इंग्रजी अंमलामुळे अंकुरित झाली आहे, ती पार ठार झाली असती.

गुलामगिरी हे आपले पुस्तक त्यांनी प्रश्नोत्तररूपाने लिहिले आहे. धोंडिबा नावाचा कोणी एक शिष्य जोतीरावांना प्रश्न करतो व जोतीराव त्यांची उत्तरे देतात, असे त्या पुस्तकाचे संवादात्मक स्वरूप आहे. या पुस्तकात प्रथम त्यांनी प्रामुख्याने हिंदू समाजावर ब्राह्मण जातीचे, ब्राह्मणी संस्थांचे आणि ब्राह्मणी विचारांचे वर्चस्व कसे स्थापन झाले, याचा शोध

घेण्याचा प्रयत्न केला आहे. ब्राह्मणांनी भोंदूगिरीचे, थापेबाजीचे व अद्‌भुत चमत्कारांचे भ्रमजाल उत्पन्न करून हिंदू समाजाला जखडून टाकले, असे त्यांचे ठाम मत होते. त्यांच्या मते हिंदू जीवनावरील सामाजिक बंधने निर्माण करणाऱ्या अज्ञान व अंधश्रद्धा या गोष्टी ब्राह्मणनिर्मित आहेत व ब्राह्मणवर्गाने या समाजावर केव्हा व कसे आक्रमण करून आपले आधिपत्य स्थापन केले, याचा इतिहास शोधणे हे समाजसुधारणेचे महत्त्वाचे अंग आहे. हा इतिहास अधिकृत स्वरूपात उपलब्ध होत नसला, तरी श्रुतिस्मृतिपुराणांतल्या कथांवरून त्याचे काही अंशी अनुमान करता येते. म्हणून त्यांनी त्या कथांचा ऐतिहासिक अर्थ लावण्याचा प्रयत्न केला आणि दशावतारांपैकी परशुराम अवतारापर्यंतच्या कथांत ब्राह्मणी आक्रमण व ब्राह्मणांचा विजय यांचाच इतिहास आहे, असा निष्कर्ष काढला.

अशा या हिंदू धर्माविषयी त्यांनी जेवढा तिटकारा दाखवला तेवढेच ख्रिस्ती धर्माबद्दल आणि ख्रिस्ती मिशनऱ्यांच्या कार्याबद्दल प्रेम दाखविले. ब्राह्मणांपेक्षा त्यांना ख्रिस्ती मिशनरी व मुसलमान जवळचे वाटत. ख्रिस्ती लोकांचे गोड बोलणे व त्यांचे सर्वांशी मिळून मिसळून वागणे त्यांना आवडत असे. त्यांचे आचारसुद्धा त्यांना सामाजिक समतेचे वाटत. मुसलमान धर्मातील समताही त्यांना कौतुकास्पद वाटे. असे जरी असले तरी त्यांनी ख्रिस्ती धर्म मात्र स्वीकारला नाही, ही गोष्ट लक्षात ठेवण्याजोगी आहे. कारण कोणत्याही सांप्रदायिक धर्मावर त्यांचा विश्वासच नव्हता.

ख्रिस्ती धर्मोपदेशकांनी मात्र जोतीरावांचा खूप फायदा करून घेतला. त्या काळी जनतेचे पुढारीपण ब्राह्मण जातीकडे होते. तेव्हा ब्राह्मणांवर होणारे जोतीरावांचे जोरदार आणि कडवट हल्ले पाहून ख्रिस्ती मिशनऱ्यांना मनातून आनंदाच्या गुदगुल्या होत. ब्राह्मण जातीचे पुढारीपण नष्ट झाल्यास आपले धर्मप्रसाराचे आणि सारा हिंदुस्थान ख्रिस्ती करण्याचे स्वप्न प्रत्यक्षात उतरेल, अशी त्यांची कल्पना होती आणि म्हणूनच जोतीरावांच्या ब्राह्मणविरोधी प्रचाराला इंधन पुरविण्याचे काम या ख्रिस्ती मिशनऱ्यांनी मनोभावे केले. त्यांनीच खटपट करून मुंबईच्या गव्हर्नरांच्या अध्यक्षतेखाली पुण्याच्या विश्रामबागवाड्यात जोतीरावांच्या षष्टचब्दपूर्तीच्या निमित्ताने त्यांचा जाहीर सत्कार घडवून आणला. त्या वेळी त्यांना शालजोडी आणि महात्मा ही पदवी अर्पण करण्यात आली. जोतीराव आणि त्यांचा सत्यशोधक समाज यांचा उपयोग समाजात फूट पाडण्याच्या उद्देशाने इंग्रज सरकारनेही करून घेतला.

जोतीराव यांच्या चळवळीचा किंवा त्यांच्या कार्याचा शिक्षणप्रसाराइतकाच महत्त्वाचा दुसरा भाग म्हणजे सत्यशोधक समाजाची स्थापना हा होय. ब्राह्मणी धर्माचे खंडन आणि सत्यधर्माचे मंडन या उभयविध उद्देशाने त्यांनी सत्यशोधक समाजाची स्थापना केली. या समाजाच्या त्रैवार्षिक प्रतिवृत्तातील पुढील उताऱ्यावरून जोतीरावांचा तद्विषयक उद्देश व धोरण यांविषयी स्पष्ट कल्पना येईल.

"ब्राह्मण, भट, जोशी, उपाध्ये इत्यादिक लोकांच्या दास्यत्वापासून शूद्र लोकांना मुक्त करण्याकरिता व आपल्या मतलबी ग्रंथांच्या आधारे आज हजारो वर्षे ते शूद्र लोकांस नीच मानून गफलतीने लुटीत आले आहेत, यास्तव सदुपदेश व विद्याद्वारे यांस त्यांचे वास्तविक अधिकार समजून देण्याकरिता म्हणजे धर्म व व्यवहारासंबंधी ब्राह्मणांचे बनावट व कार्यसाधक ग्रंथांपासून त्यांस मुक्त करण्याकरिता काही सूज्ञ शूद्र मंडळीनी हा समाज ता. २४ सप्टेंबर सन १८७३ इसवी रोजी स्थापन केला. या समाजात राजकीय विषयांवर बोलणे अजी वर्ज्य आहे."

या सत्यशोधक समाजाची त्यांनी जी चार तत्त्वे ठरविली, ती अशी – (१) ईश्वर सर्वव्यापी असून, सर्व मनुष्यप्राणी त्याची प्रिय लेकरे आहेत. (२) ईश्वराची भक्ती करण्याचा सर्वांस अधिकार असून, मनुष्य जातीने श्रेष्ठ नसून तो गुणाने श्रेष्ठ ठरतो. (३) कोणताही ग्रंथ सर्वांशी प्रमाण व ईश्वरप्रणीत नाही. (४) पुनर्जन्म, कर्मकांड, जपतप या गोष्टी अज्ञानमूलक आहेत.

जोतीरावांच्या या सत्यशोधक समाजाच्या स्थापनेमागची त्यांची मनोभूमिका तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांनी पुढील परिच्छेदात मांडली आहे.

"फुले यांनी सत्यशोधक समाज स्थापन करून ब्राह्मण धर्माविरुद्ध मोहीम सुरू केली. ब्राह्मणांनी स्थापित केलेल्या हिंदू धर्मापेक्षा श्रेष्ठ किंबहुना जगातील प्रचलित कोणत्याही धर्मापेक्षा उच्चतर व श्रेयस्कर तत्त्वांच्या आधारावरच ब्राह्मणप्रणीत हिंदू धर्माविरुद्ध चळवळ करणे हे सफल होऊ शकेल अशी कल्पना त्यांना पूर्णपणे होती. त्यांनी जाहीर केले की जगातील प्रत्येक प्रस्थापित व प्रचलित धर्म हा मनुष्यावर होणाऱ्या काही अन्यायांवर तरी आच्छादन घालतो व सत्याचा काही अंश तरी लपवू इच्छितो. सर्व मनुष्यजातीचे बंधुत्व व शुद्ध सहकार्य याच्याआड आजच्या जगातील धर्मभेद येत आहेत व विशिष्ट धर्माच्या अभिमानाने मनुष्यजातीचे तुकडे पडले असून वैराचे बीज कायमचे रोवले गेले आहे. धर्माभिमानाने मनुष्यजातीचे रक्त अनेक वेळा वाहिले आहे. सर्व मानवांचे ऐक्य हे एक श्रेष्ठ सत्य आहे. आणि सत्याचा मिलाप व नाश धर्माभिमान करतो. धर्माभिमानाने मनुष्यजातीची प्रगती करावयाचे ऐवजी आणि तिची आत्मशुद्धी व आत्मोद्धार करावयाचे ऐवजी

तिचा महान अधःपात केला. म्हणून प्रचलित सगळे ऐतिहासिक धर्म मनुष्यजातीत सत्याची संपूर्ण स्थापना करू शकत नाहीत. जी धर्माभिमानाची गोष्ट तीच राष्ट्रवादाची किंवा देशाभिमाची गोष्ट होय. देशाभिमान हा अत्यंत अपवित्र आहे. देशाभिमानाने किंवा राष्ट्रवादाने एक मानवसंघ दुसऱ्या मानवसंघावर आक्रमणास नेहमी सज्ज राहतो. त्यामुळे युद्धे होतात आणि मनुष्याचे कर्तृत्व वाया जाते; लढाईकरिता राष्ट्रांना सज्ज राहावे लागते व त्यामुळे प्रचंड लष्करी खर्च करावा लागतो. त्यामुळे देशातील लोकांवर, विशेषतः शेतकऱ्यांवर, कराचा फाजील बोजा पडतो. मनुष्यजातींतील युद्धे आणि आक्रमणे बंद पडली पाहिजेत व त्याकरिता धर्माभिमान, राष्ट्राभिमान या विकृत व हीन मनोगंडरूपी भावना नष्ट केल्या पाहिजेत."

तत्कालीन विचारवंतांपैकी अनेकांना या विचारसरणीविषयी आस्था व आदरही वाटे. विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनी गुलामगिरी या त्यांच्या ग्रंथावर टीकात्मक निबंध लिहिताना बरेचसे कडवट व उपहासास्पद लिहिले असले, तरी स्वतःच्या जातीचे दोष कबूल केले आहेत व जोतीरावांना सहकार्य देण्याची इच्छाही व्यक्त केली आहे. त्या लेखातला एक परिच्छेद असा—

"आतां हें खरें आहे कीं, ब्राह्मण म्हणजे सर्वच अत्यंत सुजन आहेत व त्यांत दोष म्हणून सांपडावयाचा नाही, असें आमचें मुळींच म्हणणें नाहीं. आमच्या ज्ञातीचे जे काही वास्तविक दोष असतील ते सर्व आम्हांला कबूल आहेत. त्यांना पांघरूण घालण्याची किंवा ते नाहीत असें म्हणण्याची आमची बिलकूल इच्छा नाहीं. त्याचप्रमाणें आमच्या शूद्र देशबंधूंवर जातिभेदाच्या संबंधानें वगैरे जीं दुःखें खरोखर येत असतील ती हलकीं करणें किंवा होतील तितकी नाहींशी करणें हें प्रत्येक देशहितेच्छूचें कर्तव्य होय, हेंहि आम्हांस मान्य आहे; व आमची पक्की खात्री झाली आहे कीं, या कामास आमच्या ज्ञातिबांधवांची विन्मुखता दृष्टीस पडणार नाही. इतकेंच नव्हे; तर पुष्कळ मोठ्या उत्साहानें त्यास साहाय्यहि करतील. तर असे कांहीं सुविचार मनांत आणून आमचे सत्यसमाजवाले देशबंधु त्याप्रमाणें जर चालतील, व या आर्यभूमीचा आजपर्यंत साऱ्या जातींनीं जसा अभिमान बाळगला तसाच पुढेहि बाळगून आपसांत वितुष्ट वाढूं न देण्याविषयीं जर तजवीज करतील तर अजूनहि आमची स्थिती सुधारेल व हल्लींच्या राज्यापासून होणारे जे विद्यादिक अमूल्य लाभ ते सर्वांस होऊन सर्वांचें कल्याण होईल यांत शंका नाहीं."

पण जोतीरावांनी आपल्या सत्यशोधनाच्या कार्यात ब्राह्मणांचे सहकार्य घेतलेले दिसत नाही. सत्यशोधक समाजाच्या अनुयायांनीही विधायक कार्यापेक्षा विध्वंसक कार्यच अधिक केले. ब्राह्मणांची व ब्राह्मणधर्माची निंदा, टवाळी करून खेडोपाडी जातीयवाद निर्माण करण्यापलिकडे सत्यशोधक समाजाच्या अनुयायांनी काही केले नाही. जोतीरावांचा सत्यधर्म तर



म. जोतीराव फुले

कोणालाच कळला नाही असे म्हटले तरी चालेल. याविषयी 'जोतीराव फुले समग्र ग्रंथ' या पुस्तकाचे संपादन करणारे श्री. गो. गो. अधिकारी म्हणतात—

"या सत्यशोधक समाजापासून बहुतेक 'मराठे' हे दूर होते. आणि विशेष हे की कुळंबी, माळी, महार वगैरेंपेक्षा जैन आणि लिंगायत यांनीच पुढाकार घेऊन ब्राह्मणद्वेषाचे रान उठवून महाराष्ट्रात कहर उठवून दिला. वस्तुतः सार्वजनिक सत्यधर्माचा प्रामुख्याने प्रचार करण्याची कामगिरी सत्यशोधकांनी तळमळीने करायला हवी होती, पण ती मुळीच केली नाही. आणि याचे कारण सार्वजनिक सत्यधर्मात जोतीरावांनी जे सांगितले आहे ते सत्यशोधकांना आचरणात आणणे पसंतच नव्हते आणि आचरणात आणणे त्याहून त्यांना कठीण होते. फक्त ब्राह्मणांना शिव्या देणे एवढेच कार्य त्यांस दिसे, ते त्यांनी चोखपणे केले. जोतीबांचा सत्यधर्म मात्र लुप्त झाला."

जोतीरावांनी आपल्या तत्त्वांचा प्रचार करण्यासाठी ब्राह्मणाचे कसब, गुलामगिरी, इशारा, सार्वजनिक सत्यधर्म, शिवाजीचा पवाडा, शेतकऱ्याचा आसूड, जातिभेद, विवेकसार व अस्पृश्यांची कैफियत अशी लहान मोठी गद्य-पद्यात्मक पुस्तके लिहिली. त्यांतील बारीकसारीक तपशीलाबद्दल दुमत होण्याचा संभव आहे, परंतु त्यानी बेडरपणे वेशीवर टांगलेली शूद्रातिशूद्रांची गाऱ्हाणी मात्र रास्तच होती, असे म्हणावे लागेल.

जोतीराव फुले हे ईश्वराची कल्पना सोडल्यास इतर सर्व बाबतींत पूर्ण बुद्धिवादी होते. विवेकबुद्धीवर त्यांच्या सत्यधर्माचे अधिष्ठान होते. शुद्ध सत्य जर धर्मग्रंथांत नाही, ऋषी, गुरू, अवतार व प्रेषित यांच्या ठिकाणी जर सापडत नाही; तर ते सापडायचे कुठे ? जोतीराव म्हणतात, ते मनुष्याच्या विवेकबुद्धीत सापडेल. निसर्गातील सत्य व नैतिक सत्य ही दोन्ही प्राप्त करून देणारी बुद्धी मनुष्यात स्वाभाविकपणे वसत आहे. सृष्टिकर्त्याने मनुष्याला एकदाच एकुलता एक दिव्य ठेवा दिला आहे, तो म्हणजे बुद्धी हा होय.

महाराष्ट्रात ब्राह्मणेतर चळवळीचा पाया जोतीरावांनी घातला. ती चळवळ १९३५ सालपर्यंत टिकून होती; पण सांप्रत ती ओसरली आहे. त्या चळवळीचे सामाजिक कार्य जरी संपले असले, तरी त्यांनी ज्या व्यापक उद्देशाने त्या चळवळीला प्रारंभ केला, त्या उद्देशाचे साफल्य मात्र अजूनही झालेले नाही. सरकारामधील आणि समाजातल्या उच्च व्यवसायांतील ब्राह्मण जातीचे वर्चस्व नष्ट करणे हाच या चळवळीचा उद्देश होता, असे जर म्हटले तर तो उद्देश सांप्रत बऱ्हंशी सफल झाला आहे. पण समाजात बुद्धिवादाच्या आधारे नवयुगाचे प्रवर्तन करून जनतेच्या सामाजिक, सांस्कृतिक आणि आर्थिक गुलामगिरीचा अंत करणे हा त्या चळवळीचा उद्देश होता असे जर म्हटले तर तो उद्देश मात्र अद्यापि सफल झालेला नाही.

जोतीरावांच्या जीवनाचे सार त्यांच्याच शब्दात सांगायचे तर ते पुढीलप्रमाणे सांगता येईल—

**सार्वभौम सत्य स्वतः आचरावे । सुखे वागवावे पंगू लोका ।**
**अशा वर्तनाने सर्वा सुख द्याल । स्वतः सुखी व्हाल जोती म्हणे ।।**

आधुनिक महाराष्ट्राच्या सामाजिक जीवनात क्रांती घडवून आणण्याचे आजवर जे प्रयत्न झाले, त्यांचा विवेचक इतिहास जेव्हा लिहिला जाईल, तेव्हा आधुनिक महाराष्ट्राच्या शिल्पकारांत जोतीरावांना श्रेष्ठ प्रतीचे स्थान मिळेल यात शंका नाही. [ जोतीराव फुले समग्र ग्रंथ, अधिकारी प्रकाशन, १९६३; महाराष्ट्र साहित्य पत्रिका, संपा. – के. नारायण काळे, जाने. १९४१; महात्मा फुले – श्री. ए. के. घोरपडे, १९५९; जोतिबा फुले; व्यक्ति आणि कर्तृत्व – प्रा. दयाराम पाटील.]

**फुलेरी** गढवाली लोकांचा एक सण. चैत्र महिन्यातल्या मेष संक्रांतीला हा सण सुरू होतो आणि वैशाखातल्या वृषभ संक्रांतीला समाप्त होतो. या कालावधीत गढवाली मुले सकाळी लवकर उठतात; स्नान करतात आणि विविध रंगांची फुले गोळा करतात. नंतर गावातील निरनिराळ्या लोकांच्या घरांचे उंबरठे व दरवाजे फुलांनी सजवतात. हा क्रम सतत एक महिनाभर चालतो. त्यानंतर या उंबरठे सजविणाऱ्या मुलांना त्या त्या घरी बोलावून मेवामिठाई वाटतात. या सणाचा संबंध फुलांशी आहे, म्हणून याला फुलेरी असे नाव मिळाले आहे.

**फुस्स** पद्मोत्तर बुद्धानंतर झालेला हा आठवा बुद्ध होय. याच्या वडिलांचे नाव जयसेन आणि आईचे श्रीमती असून, तो काशीनगरात राहत होता. याचे तीन श्रावकसमूह होते. त्यांत सुरक्षित व धर्मसेन हे अग्रश्रावक, सभ्य हा उपस्थायक आणि चाला व उपचला या अग्रश्राविका होत्या. याला आमलक म्हणजे आवळीच्या वृक्षाखाली बुद्धत्व मिळाले, असे म्हणतात. [ पा. वा. ते. भि. र. ]

**फूलपाती** एक लोकनृत्य. चैत्र मासात मध्य प्रदेशातील स्त्रिया हे नृत्य करतात. त्यासाठी गावातल्या बायका एकत्र जमून नदीकाठी किंवा तलावावर जातात. तिथे त्या आपली पितळेची भांडी फुलांनी सजवितात. नंतर त्या एकमेकींच्या कपाळी गुलाल लावतात. मग त्या तिथेच नृत्य सुरू करतात. याला गाण्याची साथही असते. हे नृत्य पूर्वी ज्यष्ठ व आषाढ महिन्यांत पेरणीच्या हंगामाच्या वेळी करण्याची प्रथा होती; पण सांप्रत ती बंद आहे. [ भा. लो. नृ. ]

**बंकटस्वामी** ( १८७७–१९४४ इ. स. ) वारकरी संप्रदायाचे एक प्रचारक. यांचा जन्म बीड जिल्ह्यातील निनगूर गावी एका राजपूत कुळात झाला. यांचे घराणे मूळचे बुंदेलखंडातले. स्वामींचे पणजोबा हे बुंदेलखंडातून इकडे व्यापारासाठी आले आणि इकडचे स्थायिक झाले. स्वामींच्या वडिलांचे नाव न्यहालसिंग व आईचे रत्नादेवी होते. व्यंकटेश हे या घराण्याचे कुलदैवत आहे. व्यंकटेशाच्या कृपेने महाराजांचा जन्म झाला म्हणून त्यांचे नाव व्यंकटसिंग असे ठेवण्यात आले. व्यंकट शब्दाचेच पुढे बंकट झाले. महाराज जन्मतःच पांगळे होते. काही उपाय केल्यानंतर वयाच्या सहाव्या वर्षी त्यांना चालता येऊ लागले. मग ते शाळेत जाऊ लागले. पण पुढे लवकरच त्यांनी शाळा सोडली. घरची गरिबी असल्यामुळे शाळा सोडल्यावर त्यांनी अनेक ठिकाणी घरगडी, गुराखी, अशा नोकऱ्या

केल्या. जान महंमद याच्या घरी गुरे सांभाळण्याचे काम करीत असताना एकदा त्यांचे गुरांकडे दुर्लक्ष झाले. त्यामुळे जान महंमद त्यांना खूप बोलला. त्याचा परिणाम म्हणून महाराजांनी आत्मघात करण्याचे ठरविले होते; पण काही कारणांनी त्यांनी तो बेत रद्द केला. याच काळात त्यांनी पखवाज व वीणा यांचा चांगला अभ्यास केला.

वयाच्या पंधराव्या वर्षी महाराजांनी निनगूर सोडले आणि ते नासिक जिल्ह्यातील इगतपुरी तालुक्यातल्या घोटी या गावी आले. तिथे त्यांनी तांदुळाचा व्यापार सुरू केला. पुढे थोड्याच दिवसांत ते इगतपुरीला आले. इथेच त्यांच्या पारमार्थिक जीवनाला सुरुवात झाली. त्यांना गुरुलाभही इथेच झाला. विष्णुबुवा जोग हे त्यांचे गुरू होत.



बंकटस्वामी

पुढे गुरूंच्या आज्ञेने त्यांनी इगतपुरी सोडली व भंडारा डोंगरावर तीन वर्षे अनुष्ठान केले. गावात मधुकरी मागायची आणि गीता, ज्ञानेश्वरी व अमृतानुभव या ग्रंथांचा अभ्यास करायचा, हा त्यांचा नित्य क्रम होता. त्यानंतर त्यांनी भंडारा डोंगराजवळच्याच भामचंद्र नावाच्या डोंगरावर आणखी सहा महिने अनुष्ठान केले. नंतर ते पुण्याला आले. पुण्याला आल्यावर जोगमहाराज स्वतःच त्यांना निरनिराळ्या ग्रंथांचे अर्थ विशदपणे सांगू लागले. काही दिवसांनी जोगांनी त्यांना कीर्तने करण्याची परवानगी दिली.

कीर्तनांचा कार्यक्रम चालू असतानाच गुर्वाज्ञेने महाराजांनी आळंदीला अजानवृक्षाखाली ज्ञानेश्वरीची शंभर दिवसांत शंभर पारायणे केली. ही पारायणे पुरी झाल्यावर त्यांनी पुन्हा तिथेच केवळ अजानवृक्षाची पाने खाऊन ज्ञानेश्वरीची आठ दिवसांत पारायणे केली. या पारायणांनंतर महाराज लोणावळ्याला आले. भागवत धर्माच्या प्रचारासाठी वृत्तिप्रभाकर या ग्रंथाचा अभ्यास आवश्यक आहे, असे वाटल्यावरून ते पुढे देहरादून या गावी गेले. तिथे त्यांनी हरिप्रसाद स्वामी यांच्याकडून वृत्तिप्रभाकराचे पाठ घेतले.

देहरादूनहून परत आल्यावर त्यांची पंढरीची वारी सुरू झाली. नंतर स्वामींनी महाराष्ट्रातील तीर्थक्षेत्रांची यात्रा केली. यात्रेनंतर काही दिवस त्यांनी अज्ञातवासात काढले. या अज्ञातवासानंतर त्यांच्या भागवत धर्माच्या प्रचारकार्याला खरी सुरुवात झाली. ठिकठिकाणी कीर्तने करावी, नामस्मरणाचा महिमा सांगावा, लोकांना दुराचारापासून परावृत्त करावे व पंढरीचे वारकरी बनवावे, असे त्यांच्या प्रचाराचे स्वरूप होते. त्यांची कीर्तने फार रसाळ होत असत. हजारो लोक त्यांच्या कीर्तनाला जमत. कीर्तनाबरोबर त्यांनी अनेक अधिकमास – महोत्सवही केले.

मध्यंतरीच्या काळात त्यांचे गुरू निवर्तले. त्यामुळे आळंदीच्या वारकरी संस्थेची धुरा त्यांच्याकडे आली. १९२४ साली पुन्हा त्यांच्या मनात अनुष्ठान करावे, असे आले. त्यानुसार त्यांनी पंढरपूरच्या विठ्ठलमंदिरात बोधलेबुवांच्या ओवरीत एकवीस दिवसांचे अनुष्ठान केले. त्याबरोबरच त्यांनी जोगमहाराजांनी संपादिलेल्या ज्ञानेश्वरीची संशोधक आवृत्ती काढली. वारकऱ्यांना उतरण्यासाठी त्यांनी पंढरपूरला एक मोठा मठही बांधला.

उतार वयात बंकटस्वामी पंढरपुरीच राहत असत. या वेळी त्यांच्या बालपणच्या पक्षाघात रोगाने उचल खाल्ली आणि त्यातच त्यांचा निनगूर या गावी मृत्यू झाला. निनगूर इथे त्यांची समाधी आहे. [ बंकटस्वामी महाराज यांचे चरित्र – श्री. मोरेश्वर त्र्यंबक जोशी, १९६१ ]

**बंगरम्म** द. भारतातील एक ग्रामदेवता. ही सात बहिणींपैकी एक आहे. त्यामुळे हिला स्वतंत्र महत्त्व नाही. हिची मूर्ती पोलेरम्माच्या शेजारीच ठेवतात. बंगरम्म ही तिच्या नावावरून सुवर्णदेवता म्हणजे सौम्य देवता आहे. पण लोकांनी तिचे हे स्वरूप लक्षात न घेता तिलाही रेडा बळी देण्याची प्रथा सुरू केली आहे. [ द्र. गॉ. मॉ. हिं. ]

**बंगलक्ष्मी** बंगालमधील एक आधुनिक स्त्रीव्रत. वंगभंगाविरुद्ध बंगालमधील स्त्रिया व पुरुष यांच्यामध्ये राजकीय जागृती निर्माण व्हावी, या उद्देशाने श्री. रामेंद्र सुंदर त्रिवेदी यांनी हे व्रत प्रचलित केले. त्यांनी राजकीय हेतूला या व्रतात धार्मिक साज चढवलेला आहे. स्त्रियांमध्ये एखाद्या गोष्टीबद्दल जागृती निर्माण झाली, की पुरुषांमध्येही आपोआप ती होते, हे ध्यानात घेऊन श्री. रामेंद्र सुंदर त्रिवेदींनी स्त्रियांना

हे व्रत करायल सांगितले. त्याला कारण घडले, ते असे –

लॉर्ड कर्झनने १६ आक्टोबर १९०५ मध्ये बंगालची फाळणी केली व मुसलमानांसाठी पूर्व बंगाल हा नवा प्रांत बनविला. अशा रीतीने त्याने बंगालमधील हिंदू व मुसलमान यांच्यामध्ये फूट पाडून त्यांच्यांत जातीय वैमनस्याचे बीज पेरले. त्या फाळणीविरुद्ध प्रतिक्रिया म्हणून श्री. त्रिवेदी यांनी हे व्रत निर्मिले. फाळणी झाली तो दिवस १६ आक्टोबर १९०५ हा होता. हिंदू पंचांगाप्रमाणे त्या दिवशी आश्विन शुद्ध त्रयोदशी होती, म्हणून तीच तिथी या व्रतासाठी निश्चित करण्यात आली.

या दिवशी बंगलक्ष्मीचे प्रतीक म्हणून प्रत्येक घरात एका मातीच्या घटाची स्थापना करतात. या दिवशी लहान मुले, रुग्ण व देवाचा नैवेद्य यांच्यापुरतेच अन्न घरात शिजवतात. बाकीच्यांनी फलाहार करून किंवा पोहे खाऊन राहायचे असते. घरातील सर्व स्त्रिया या दिवशी घटाभोवती बसतात. या वेळी विधवा स्त्रियांनी कपाळावर चंदनाचा टिळा लावला पाहिजे व सुवासिनींनी भांगात शेंदूर भरला पाहिजे, असा नियम आहे. लक्ष्मीची पूजा झाल्यावर घरातील सर्वजण, मुले व पुरुषही हातात सुपारी घेऊन बंगलक्ष्मीची कथा ऐकतात. ती ऐकून झाल्यावर सर्वजण देवीला नमस्कार करतात. त्या वेळी मुले शंख वाजवतात. नंतर सर्वजण स्वदेशी पिवळ्या दोऱ्याची राखी एकमेकांच्या हातात बांधतात. मग सर्वांना प्रसाद वाटतात. समारंभ संपल्यावर सर्वजण 'आम्ही सर्व भाऊ भाऊ असून गुण्यागोविंदाने नांदू' असा घोष करतात आणि 'परदेशी वस्तूंवर बहिष्कार टाकून स्वदेशी वस्तू वापरू' अशी प्रतिज्ञा करतात.

या व्रताची कथा अशी –

बंगाल नावाचा एक देश होता. गंगेने आपल्या जलाने हा प्रदेश सुपीक बनवला होता. लक्ष्मी देवी या प्रदेशात राहू लागली होती आणि त्यामुळे सर्वत्र शांती व सुख नांदत होते. कालांतराने कलियुग अवतरले आणि लोक अश्रद्ध व दुराचारी बनले. तेव्हा लक्ष्मीने तो देश सोडून जाण्याचा विचार केला. त्या वेळी बंगामध्ये आदिसुर नामक राजा राज्य करीत होता. देवी लक्ष्मी त्याच्या स्वप्नात आली आणि तिने देश सोडून जाण्याचा आपला विचार त्याला सांगितला. राजाने तिला तसे न करण्याबद्दल प्रार्थिले. 'लोक पुन्हा नीट वागू लागतील असे मी करीन,' असे तिला आश्वासनही दिले. नंतर त्याने कनौजहून पाच विद्वान ब्राह्मण व पाच प्रामाणिक कायस्थ पुरुष बंगालमध्ये आणवले आणि त्यांना त्या भूमीवर वसते केले. त्यांनी तिथे वैदिक धर्म प्रतिष्ठित केला. पुन्हा तिथे सुखशांती नांदू लागली.

पुढे बंगालवर लक्ष्मण सेन राज्य करीत असता मुसलमानांनी त्याच्यावर स्वारी केली आणि त्याचा पराभव करून राज्य बळकावले. मुसलमानांनी हिंदूना बळजबरीने बाटवायला व त्यांची मंदिरे फोडायला सुरवात केली. मग हिंदू व मुसलमान यांच्यांत सारखी भांडणे होऊ लागली. तेव्हाही लक्ष्मीने पुन्हा हा देश सोडायचा विचार केला आणि तसे त्या वेळचा राजा हुसेनशाह याच्या स्वप्नात जाऊन सांगितले. तेव्हा राजाने तिला न जाण्याबद्दल विनविले आणि हिंदू व मुसलमान यांना समानतेने वागवण्याचे आश्वासन दिले.

त्यानंतर राजाने एका ब्राह्मणाला आपला प्रधान नेमले आणि तो त्यांना चांगल्या रीतीने वागवू लागला. हिंदूही मुसलमानांच्या पीरांना भजू लागले. अशा रीतीने हिंदू व मुसलमान दोघेही गुण्यागोविंदाने नांदू लागले.

पुढे बंगालमध्ये इंग्रजांचे राज्य आले. त्यांनी बंगालमधील सर्व संपत्ती धुवून न्यायला सुरवात केली. आपल्या देशातून खेळणी, काच, खडे व इतर आकर्षक वस्तू त्यांनी बंगालमध्ये आणल्या व त्यांच्या बदली इथले सोने लुटून नेले. लोकांनाही त्यांनी आपल्या कच्छपी लावले. लोकांची ही भ्रष्ट बुद्धी पाहून लक्ष्मी त्यांना सोडून गेली. तेव्हा लोकांना फार वाईट वाटले. ते इंग्रजी राजवटीला दोष देऊ लागले. त्या वेळी बंगालमध्ये एक व्हाइसरॉय नेमलेला होता. त्याला वाटले, की हे बंगाली लोक फारच त्रास देऊ लागले आहेत. तेव्हा आपण त्यांच्यांत फूट पाडावी. त्यासाठी त्याने बंगालच्या फाळणीची योजना आखली. ज्या दिवशी फाळणी होणार होती, त्या दिवशी पाच कोटी हिंदू व मुसलमान बंगाली लोकांनी लक्ष्मीची प्रार्थना केली आणि आपण न भांडता एक दिलाने एकत्र राहू, असे तिला सांगितले.

लोकांची दया येऊन लक्ष्मीने कालीचे रूप घेतले व ती कालीघाटावर राहिली. लोकांनी प्रार्थना केल्यावर तिने त्यांना संघटितपणे राहायला सांगितले व मनात एकराष्ट्रीयतेची भावना ठेवण्याचा आदेश दिला.

फाळणीच्या नियोजित दिवशी बंगालमधील स्त्रियांनी बंगलक्ष्मीचे व्रत केले. हिंदू व मुसलमान यांनी एकमेकांना बंधुभावाचे प्रतीक म्हणून राख्या बांधल्या.

फाळणीच्या दिवशी दुपारी श्री. रामेंद्र सुंदर यांच्या मूळच्या जमो-कंडी या गावी विष्णुमंदिराच्या प्राकारात पन्नास स्त्रिया जमल्या आणि त्यांनी बंगलक्ष्मीचे व्रत केले. रामेंद्र सुंदरांची कन्या गिरिजादेवी हिने जमलेल्या लोकांना व्रताची कथा सांगितली. तेव्हापासून दर वर्षी स्त्रिया हे व्रत करू लागल्या. [ श्री. पी. के. मैती – फोकलोअर, मार्च १९६५. ]

**बंगाल** भारतीय संघराज्यातील एक राज्य. संपूर्ण बंगाल प्रदेश सांप्रत भारतात राहिलेला नाही. १९४७ साली त्याचे पश्चिम बंगाल व पूर्व बंगाल असे दोन वेगळे भाग करण्यात आले. त्यांतील पूर्व बंगाल पाकिस्तानात गेला व पश्चिम बंगाल तेवढा भारतात राहिला. पूर्व बंगालमध्ये चितागांग, नोआखली, टिपेरा, डाक्का, फरीदपूर, बाकेरगंज, मैमनसिंग, जेसोर, खुलना, राजशाही, रंगपूर, पवना, बोग्रा व दिनाजपूर हे जिल्हे आहेत. पश्चिम बंगालमध्ये कलकत्ता, कुचबिहार, चौवीस परगणा, जलपैगुरी, दार्जिलिंग, नडिया, प. दिनाजपूर, बरद्वान, वीरभूम, पुरुलिया, बांकुडा, माल्दह, मुर्शिदाबाद, मेदिनीपूर, हावडा व हुगळी हे जिल्हे आहेत. पूर्व बंगालचे क्षेत्रफळ सुमारे ५५००० चौ. मैल व लोकसंख्या पाच कोटींहून अधिक असून, प. बंगालचे क्षेत्रफळ सुमारे ३४००० चौ. मैल व लोकसंख्या साडेतीन कोटी आहे.

उत्तरेला सिक्कीम, भूतान व आसाम, पूर्वेला आसाम व त्रिपुरा, पश्चिमेला बिहार व ओडिसा आणि दक्षिणेला बंगालचा उपसागर अशा संपूर्ण बंगालच्या चतुःसीमा आहेत.

**भौगोलिक विभाग** – बंगालमध्ये गंगा व ब्रह्मपुत्रा या नद्यांच्या काठच्या सखल प्रदेशाचा समावेश होतो. प. बगालमधील दार्जिलिंग व जलपैगुरी आणि पूर्व बंगालमधले चितागांग हे भाग तेवढे उंच व डोंगराळ आहेत. बाकीचा सर्व प्रदेश सपाट व नदीनाल्यांनी व्याप्त आहे. गंगा व ब्रह्मपुत्रा यांच्या अनेक उपनद्या या प्रदेशातून वाहतात. हुगळी, दामोदर, रूपनारायण, मयूराक्षी, कंसाई या त्यांतील प्रमुख होत. या नद्यांनी वाहून आणलेल्या गाळामुळे सर्व प्रदेश अत्यंत सुपीक व अरण्यमय बनला आहे. गंगा व ब्रह्मपुत्रा यांचा संगम झाल्यानंतर त्यांचे पात्र कित्येक मैल रुंद होते आणि पुन्हा ते अनेक शाखांत विभागले जाऊन सागराला मिळते. हुगळी ही गंगेची शाखा असून, दामोदर व रूपनारायण या नद्या हुगळीलाच मिळतात. बंगालमधील बहुतेक नद्यांचे मार्ग वेळोवेळी बदललेले आहेत.

गंगेच्या सर्व शाखा जिथे सागराला मिळतात, तिथे अनेक बेटे निर्माण झाली आहेत. तो सर्व दलदलीचा व दाट जंगलाचा प्रदेश सुंदरबन या नावाने ओळखला जातो.

बंगालचे हवामान उष्ण असून, या प्रदेशात पाऊस भरपूर पडतो. दार्जिलिंग व जलपैगुरी हे भाग मात्र थंड हवेसाठी प्रसिद्ध आहेत. बंगाल प्रदेश कृषिप्रधान असून, त्यात सर्व प्रकारची पिके होतात. भात व ताग ही इथली मुख्य पिके होत. चहा, चणे व तंबाखू ही पिकेही पुष्कळ येतात. जंगलात विविध प्रकारचे लाकूड उत्पन्न होते. तिथे वाघ, चित्ते व हत्ती हे पशू पुष्कळ आहेत. प. बंगालमधील राणीगंज भागात कोळसा विपुल प्रमाणात सापडतो. काही ठिकाणी तांब्याच्या खाणीही सापडल्या आहेत.

**प्राचीन काळ** – बंगालमध्ये अनेक जागी पाषाणयुगातील हत्यारे सापडली आहेत. त्याचप्रमाणे नवपाषाणयुगातील मानवाने उभारलेली प्रचंड शिलास्मारकेही या प्रदेशात आहेत. ताम्रयुगातही बंगालमध्ये मानवाची वसाहत असावी. ताम्रयुगीन संस्कृतीचा उगमच या प्रदेशात झाला असण्याची शक्यता आहे. अलिकडच्या संशोधनामुळे सिंधू संस्कृतीच्या अवशेषांतील काही वस्तूंशी साम्य असलेल्या वस्तू बंगालमध्ये सापडल्या आहेत. त्यांवरून सिंधू संस्कृतीचा प्रसार हुगळी नदीपर्यंत झाला असावा, असे अनुमान केले जाते.

वैदिक आर्यांच्याही आधी भारतात आलेले ऑस्ट्रिक व द्रविड लोक हे बंगालमध्ये वसती करून राहिले होते. ऋग्वेदाच्या काळातील आर्यांना त्यांच्याविषयी काही माहिती नसावी. अथर्ववेदात व शतपथ ब्राह्मणात मात्र त्यांचा प्राच्य लोक म्हणून उल्लेख केलेला आहे. त्यांनाच व्रात्य असेही नाव होते. व्रात्य म्हणजे यज्ञ न करणारे लोक होत. पाणिनीने पंचाल, विदेह, अंग आणि वंग यांचा प्राच्य जनपदे म्हणून उल्लेख केला आहे. अंग आणि वंग या प्रदेशांत जाणाऱ्या आर्य लोकांनी परत आल्यानंतर शुद्धीसाठी प्रायश्चित्त करावे, असे बौधायन धर्मसूत्रांत सांगितले आहे. कारण ते प्रदेश आर्यावर्ताच्या बाहेरचे मानले जात होते. महाभारताच्या काळात मात्र वंग देशात वैदिक संस्कृतीचा प्रसार सुरू झाला होता. सांख्य दर्शनाचा कर्ता कपिलमुनी सुंदरबनाचा रहिवासी होता व त्याच्या आदेशावरून भगीरथाने स्वर्गातून गंगा नदी पृथ्वीवर आणून सागरापर्यंत नेली, अशी आख्यायिका आहे.

**नामकरण** – प्राचीन साहित्यात अंग आणि वंग या देशांचा उल्लेख आढळतो. त्यांतील वंग म्हणजे पूर्व बंगाल असे स्थूलमानाने म्हणता येईल. पूर्वी वंग देशाच्या दक्षिण भागात पूरप्रतिबंधासाठी उंच टेकड्या तयार करीत, त्यांना आल असे म्हणत. त्यावरून वंग + आल = वंगाल हे नाव त्या भागाला पडले, असे अबुल फजलने म्हटले आहे. त्याचेच पुढे बंगाल झाले. राजेंद्र चोळ याच्या इ. स. १०२४ मधील तिरुमलै येथील शिलालेखात बंगाल देशाचा उल्लेख आहे. पूर्व बंगालमधील चंद्रवंशाच्या शिलालेखात त्यालाच चंद्रद्वीप असे म्हटले आहे.

प. बंगालमधे मुसलमानी सत्ता सुरू झाल्यानंतर मुस्लिम इतिहासकारांनी त्या प्रदेशाला लखनौती किंवा गौड हे नाव दिले. प्रारंभी पूर्व बंगाल मुसलमानी अमलाखाली नव्हता. त्या भागाला वंग, बंगाल किंवा सोनारगाव असे म्हणत. कधीकधी संपूर्ण बंगाल प्रदेशाला गौड-बंगाल असे नाव दिलेजाई. गिया-

सुद्दीन तुगलुकच्या काळातील मुस्लिम ग्रंथकारानी बंगालमध्ये लखनौती, सोनारगाव आणि सातगाव या सर्व भागांचा समावेश केला आहे. पुढे औरगजेबाच्या वेळी चितागाग हा प्रदेश मोगलांच्या सत्तेखाली आला.

मगधात मौर्यांचे साम्राज्य प्रस्थापित झाले; पण बंगालमधील जनपदे मात्र त्यांत सामील न होता स्वतंत्र राहिली. शिकंदराने पंजाबवर आक्रमण केले, त्या वेळी पूर्वेकडील मगध व राध या दोन प्रबळ राज्यांची कीर्ती त्याच्या कानावर गेली होती. राध




बंगालचा नकाशा

**राजकीय इतिहास –** बौद्ध व जैन साहित्यात सनपूर्व ६ व्या शतकातील महाजनपदांची नावे दिलेली आहेत, त्यात अंग, वंग, राध, सुमोत्र ही बंगालमधील महाजनपदे होती. त्यानंतर

हा प. बंगालचा एक भाग होता. ग्रीक लोक बंगाली लोकांना गंगरिदै असे म्हणत. बंगालमधील जनपदांच्या राजाजवळ त्या वेळी प्रचंड सेना होती आणि ते राज्य अत्यंत सामर्थ्यवान होते,

असे प्लीनीने म्हटले आहे. पण लवकरच चंद्रगुप्त मौर्य याने बंगालवर आपले वर्चस्व स्थापन केले. पुढे सम्राट अशोकाच्या अंतापर्यंत बंगाल हा मौर्य साम्राज्याचा भाग म्हणून राहिला. त्यानंतर बंगालवर कुशाण वंशाची सत्ता स्थापन झाली असे अनुमान, त्या प्रदेशात सापडलेल्या शिलालेख व नाणी यांवरून केले जाते.

त्यानंतरच्या काही शतकांतील बंगालचा इतिहास अज्ञात आहे. इ. स. च्या ४ थ्या शतकात मगधावर गुप्तांचे राज्य सुरू झाले आणि समुद्रगुप्ताच्या वेळी प. बंगाल गुप्त साम्राज्यात समाविष्ट झाला. कुमारगुप्त (पहिला) याच्या वेळी उत्तर बंगालवरही गुप्तांची सत्ता प्रस्थापित झाली. इ. स. च्या ६ व्या शतकात माळव्याचा यशोधर्मा याने गुप्तसाम्राज्य नष्ट केले आणि ब्रह्मपुत्रा नदीपर्यंतचा प्रदेश पादाक्रांत केला. पण त्याची सत्ता तिथे फार काळ टिकली नाही. लवकरच उ. बंगालमध्ये महाराज राजपुत्र देवभट्टारक याचे राज्य सुरू झाले. पुंड्रवर्धन भुक्ती येथील दत्त घराणे गुप्तांचे मांडलिक होते. देवभट्टारक हा त्याच घराण्यातला असावा.

त्या काळात बंगालच्या भिन्न भिन्न भागांत निरनिराळी स्वतंत्र राज्ये सुरू झाली. त्यांतील प. बंगालमधील गौड राजे विशेष प्रसिद्ध आहेत; कारण गुप्त सम्राटांशी त्यांचा संघर्ष दीर्घ कालपर्यंत चालू होता. पुढे गुप्त–मौखरी संघर्षात गौड हे गुप्तांचे मित्र झाले व त्यांनी गुप्तांना साहाय्य केले.

इ. स. च्या ७ व्या शतकात शशांक नामक राजा बंगालमध्ये उदयाला आला. बाणाच्या हर्षचरितात त्याला गौडाधिपती म्हटले आहे. तो अत्यंत पराक्रमी होता. कर्णसुवर्ण ही त्याची राजधानी होती. त्याने कामरूपाचा राजा भास्करवर्मा याचा पराजय केला. हर्षवर्धनाचा भाऊ राज्यवर्धन याचा शशांकाने कपटाने वध केला, असे म्हणतात. त्यामुळे संतापून हर्षाने गौड देशावर स्वारी केली. भास्करवर्मा याने हर्षाला मदत केली आणि त्या युद्धात शशांकाचा मोठा पराभव झाला. पण एवढे होऊनही हर्षाने गौड देश आपल्या साम्राज्याला जोडला नाही.

शशांकाच्या मृत्यूनंतर इ. स. च्या ८ व्या शतकाच्या मध्यापर्यंत बंगालमध्ये अराजक माजले होते. अनेक लहान लहान राज्ये तिथे नांदत होती, पण ती सर्व दुर्बळ होती. युआन च्वांग याने कजंगल, पुंड्रवर्धन, कर्णसुवर्ण, ताम्रलिप्ती व समतट या पाच राज्यांचा उल्लेख केला आहे. कनौजचा राजा यशोवर्मा याने मगध व वंग हे देश पादाक्रांत केले होते. पुढे काश्मीरचा राजा ललितादित्य याने यशोवर्म्याचा पराभव करून बंगालपर्यंत आक्रमण केले. त्यानंतर काही वर्षे बंगालवर कामरूपाच्या राजाची सत्ता होती. पण लवकरच काश्मीरचा राजा जयापीड याने पुन्हा बंगालवर वर्चस्व स्थापले. मंजुश्रीमूलकल्प या ग्रंथात आणि तारानाथांच्या बौद्ध धर्माचा इतिहास या ग्रंथात त्या काळातील बंगालच्या दुर्दशेचे चांगले वर्णन केलेले आहे. अशा परिस्थितीत बंगालमध्ये पाल राजवंशाचा उदय झाला आणि पाल राजांनी त्या प्रदेशात शांतता व सुव्यवस्था प्रस्थापित करून, वैभवशाली साम्राज्य निर्माण केले (पाल राजवंश पाहा).

इ. स. च्या १० व्या शतकात पूर्व बंगालमध्ये चंद्र वंशाचे स्वतंत्र राज्य उदयाला आले. त्या राज्याचे नाव हरिकेल असे होते. चंद्रद्वीप हा त्या राज्याचा एक भाग होता. त्रैलोक्यचंद्र नावाच्या पुरुषाने ते राज्य स्थापन केले. त्याच्या पुत्राचे नाव श्रीचंद्र. त्याची राजधानी विक्रमपूर येथे होती. गोविंदचंद्र हा बंगालचा राजा असताना राजेंद्र चोळ याने बंगालवर स्वारी करून त्याचा पराजय केला. गोविंदचंद्रानंतर इ. स. च्या ११ व्या शतकाच्या पूर्वार्धात पूर्व बंगालमध्ये यादव वंशातील वर्मा कुळाचे राज्य सुरू झाले. ते राज्य इ. स. च्या १२ व्या शतकात सेन वंशातील विजयसेन याने जिंकून घेतले.

पालांची सत्ता दुर्बळ झाल्यानंतर विजयसेन याने सर्व बंगालवर आपली सत्ता प्रस्थापित केली. इ. स. १२०० च्या सुमारास बख्त्यार खिलजीने गौड देशावर स्वारी करून तो देश जिंकला. तथापि पूर्व बंगालमध्ये सेन वंशाचे राज्य सुमारे १२५० पर्यंत चालू होते. त्यानंतर तिथे काही वर्षे देव वंशाचे राज्य झाले. या देव वंशाचे लहानसे राज्य प्रथम पट्टिकेरा भागात असावे. त्या वंशातील दनुजमाधव दशरथ याने सेनांकडून वंग देशाचे राज्य घेतले. पण लवकरच तो प्रदेश मुसलमान सुभेदारांच्या अमलाखाली गेला. बख्त्यार खिलजी मरण पावल्यावर निरनिराळ्या मुसलमान सरदार–अमीरांची बंगालसाठी सत्तास्पर्धा सुरू झाली. दिल्लीचा सुलतान कुतुबुद्दीन याने इ. स. १२०८ साली अलीमर्दानखान याला बंगालचा सुभेदार नेमले; पण लवकरच तो तिथे स्वतंत्रपणे राज्य करू लागला. इ. स. १२११ मध्ये खलजी अमीरांनी त्याला ठार मारून हिसामुद्दीन याला सुभेदारपदी नेमले. त्याने गियासुद्दीन हे नाव धारण केले होते. संपूर्ण गौड प्रदेशावर त्याची सत्ता प्रस्थापित झाली होती. इ. स. १२२६ पर्यंत त्याने चांगला कारभार केला. त्यानंतर गौड देश दिल्लीच्या सुलतानांच्या सत्तेखाली गेला. दिल्लीचे सुलतान दुर्बळ झाल्यामुळे बंगालचे बहुतेक सुभेदार स्वतंत्रपणे कारभार करीत. इ. स. १२८२ मध्ये दिल्लीचा सुलतान गियासुद्दीन बल्बन याने आपला मुलगा नासिरुद्दीन बग्राखान याला बंगालची सुभेदारी दिली. त्याने इ. स. १२९१ पर्यंत स्वतंत्रपणे राज्य केले. त्याच्या नंतर इ. स. १३३० पर्यंत त्या घराण्याची

सत्ता तिथे चालू होती. त्या कालखंडात पूर्व व दक्षिण बंगालवरही मुसलमानी सत्ता प्रस्थापित झाली. त्रिपुरा व चितागांग हे प्रदेशही त्यांच्या ताब्यात गेले. त्यानंतर १० वर्षे कद्रखान, बहरामखान व इझुद्दीन हे बंगालच्या तीन प्रांतांचे सुभेदार होते. इ. स. १३४५ पासून १३५६ पर्यंत तिथे इलियासशहाने राज्य केले. त्याच्या नंतर त्याचा मुलगा शिकंदरशहा याने इ. स. १३८९ पर्यंत सत्ता गाजवली. त्यापुढेही इ. स. १४१६ पर्यंत त्याच्या घराण्याकडेच बंगालचे राज्य होते.

त्यानंतर उ. बंगालमधील भतुरियाचा जमीनदार गणेश याने बंगालवर आपली सत्ता स्थापली. इ. स. १४१८ मध्ये त्याचा पुत्र जदू हा बंगालचा राजा झाला. पण त्याने इस्लामचा स्वीकार करून जलालुद्दीन या नावाने इ. स. १४३१ पर्यंत सबंध बंगालवर राज्य केले. इ. स. १४३७ पर्यंत त्याच्या घराण्याचे राज्य चालू होते. त्यानंतर बंगालचे राज्य इलियासच्या वंशजांकडे गेले व इ. स. १४८७ पर्यंत टिकले. पुढे निरनिराळ्या सुभेदारांनी बंगालवर राज्य केले. त्यांतील अलाउद्दीन हुसेनशाह याच्या कारकीर्दीत ( इ. स. १४९३ ते १५१९ ) बंगालमध्ये बरीच शांतता व समृद्धी होती. इ. स. १५३८ मध्ये शेरशहाने बंगाल जिंकला. पुढे तो दिल्लीचा बादशहा झाला, तेव्हा त्याची सत्ता बंगालपासून पंजाबपर्यंत पसरली होती.

दिल्लीवर मोगल वंशाची सत्ता पुन्हा प्रस्थापित झाल्यानंतर काही वर्षे बंगालचे सुभेदार पुन्हा स्वतंत्रपणे राज्य करू लागले होते. पण अकबराने इ. स. १५७४ मध्ये स्वतः बंगालवर स्वारी करून तो प्रदेश जिंकला व तिथे आपला सुभेदार नेमला. तेव्हापासून बंगाल हा मोगल साम्राज्याचा एक भाग बनला. इ. स. १५८७ ते १६०५ पर्यंत राजा मानसिंग हा बंगालचा सुभेदार होता.

त्या सुमारास पोर्तुगीजांनी आराकान व चितागांग या प्रदेशात शिरकाव करून घेतला होता. लवकरच त्यांनी हुगळी येथे आपले एक ठाणे वसवले. अझिमखान बंगालचा सुभेदार असताना ( १६३२–१६३७ ) इंग्रजांनी मोगल बादशहाकडून बंगालमध्ये व्यापार करण्याचा परवाना मिळवला.

इ. स. १६३९ पासून १६४९ पर्यंत शहाजहान बादशहाचा मुलगा सुजा हा बंगालचा सुभेदार होता. तिथे त्याने चांगला कारभार केला; पण औरंगजेबाने दिल्लीचे तख्त काबीज केल्यानंतर तो आराकानमध्ये पळून गेला व तिथेच त्याचा अंत झाला. त्याच्या जागी मीर जुमला हा बंगालचा सुभेदार झाला. त्याने डाक्का हे प्रांताचे मुख्य ठिकाण बनवले. तो इ. स. १६६४ मध्ये मरण पावल्यावर त्याच्या जागी शाइस्तखानाची नेमणूक झाली. त्याच्या कारकिर्दीत (इ. स. १६६५–१६७७) इंग्रजांचा व्यापार खूपच वाढला आणि त्यांनी बंगालमध्ये अनेक वखारी स्थापल्या. फ्रेंच व डच लोकांनीही बंगालमध्ये वसाहती केल्या. इ. स. १६८० मध्ये शाइस्तखान पुन्हा बंगालचा सुभेदार झाला. त्याने तिथे १६८८ पर्यंत कारभार केला. त्या काळात मोगलांचे ईस्ट इंडिया कंपनीशी मोठे युद्ध झाले. त्यात इंग्रजांचा पराभव झाला, तरी खानाने त्यांना हुगळी येथे व्यापार करायला व उलबेरिया येथे किल्ला बांधायला परवानगी दिली.

इ. स. १६८९ मध्ये इब्राहिमखान हा बंगालचा सुभेदार झाला. तो शांततेचा भोक्ता होता. पण बंगालमध्ये त्याच्या कारकिर्दीत खूप बंडाळी झाली. त्या वेळी इंग्रजांनी स्वरक्षणासाठी कलकत्ता, चंद्रनगर व चिनसुरा येथे किल्ले बांधले. इ. स. १६९० मध्ये इंग्रजांना बंगालमध्ये मुक्त व्यापार करायला परवाना मिळाला इ. स. १७०० च्या सुमारास अझिम–उस्उशान हा सुभेदार असताना त्यांनी सुटानाटी, गोविंदपूर व कळिकाता ही खेडी विकत घेऊन तिथे फोर्ट विल्यम हा किल्ला बांधला. या कळिकाता (चुना व काथ्या तयार करणारे गाव) चाच पुढे कलकत्ता असा अपभ्रंश रूढ झाला.

इ. स. १७०७ मध्ये औरंगजेब मरण पावल्यानंतर बहादुरशाहा दिल्लीचा बादशहा झाला आणि त्याने मुर्शिदकुलीखान याला बंगालचा सुभेदार नेमले. त्यापूर्वी तो तिथला दिवाण होता व त्याने बंगालचा जमीनमहसूल खूप वाढवला होता. त्याच्या कारकिर्दीत बंगालमध्ये पुष्कळ सुव्यवस्था प्रस्थापित झाली. पुढे अलिवर्दिखान बंगालचा सुभेदार असताना वऱ्हाडनागपूरचा सरदार रघूजी भोसले याने बंगालमधून चौथाई वसूल करण्यासाठी आपली सेना बंगालवर पाठवली. मराठा सैन्याने दहा वर्षे बंगालमध्ये खूप लूटमार व जाळपोळ करून दहशत बसवली. शेवटी अलिवर्दिखानाने १२ लाख रुपये चौथाई दरवर्षी देण्याचे मान्य करून भोसल्यांच्या स्वाऱ्या थांबवल्या.

इ. स. १७५६ साली अलिवर्दिखान मरण पावल्यावर त्याच्या मुलीचा मुलगा मिर्झा मुहंमद ( सिराज–उद्दौला ) बंगालचा सुभेदार झाला. तो अत्यंत विलासी व क्रूर होता. त्याच्या कारकीर्दीत प्लासीची लढाई (इ. स. १७५७) झाली आणि तीत इंग्रजांचा जय होऊन बंगालवर त्यांची सत्ता प्रस्थापित झाली. पुढे आपल्या पसंतीचा नबाब नेमून इंग्रजच बंगालचा सर्व कारभार पाहू लागले. कंपनीसाठी खूप पैसा जमवण्याच्या हेतूने इंग्रजांनी अनेक उपाय योजले. नबाबाचे अधिकारीही लोकांकडून द्रव्य लुटीत राहिले. त्यामुळे त्या दुहेरी कारभारात बंगाली लोकांची दुर्दशा झाली, असे रिचर्ड बेचर

नामक अधिकाऱ्याने कंपनीच्या डायरेक्टरांना लिहिलेल्या पत्रा-वरून कळते.

इ. स. १७७२ मध्ये वॉरन हेस्टिंग्ज बंगालचा गव्हर्नर म्हणून आला. बंगालची स्थिती सुधारण्यासाठी त्याची नेमणूक झाली होती. इ. स. १७७३ मध्ये ब्रिटिश सरकारने ईस्ट इंडिया कंपनीच्या कारभारावर नियंत्रण ठेवणारा कायदा केला आणि बंगालवर गव्हर्नर जनरलची नेमणूक केली. हेस्टिंग्ज हाच पहिला ग. जनरल झाला. त्याने बंगालच्या शासनव्यवस्थेत आमूलाग्र बदल घडवून आणला आणि सुव्यवस्था निर्माण केली. पण त्याच्यावर भ्रष्टाचाराचे अनेक आरोप करण्यात आले. तेव्हा तो इ. स. १७८५ मध्ये परत गेला. तिकडे त्याची चौकशी होऊन शेवटी तो निर्दोष ठरला. त्याच्या नंतर आलेल्या मॅक्फरसनचा कारभार फारच वाईट झाला. मग त्या जागी लॉर्ड कॉर्नवालिस आला. इ. स. १७८६ ते १७९३ या आपल्या कारकिर्दीत त्याने कारभारात पुष्कळ सुधारणा करून भ्रष्टाचाराला आळा घातला, न्यायदानखाते वेगळे केले आणि जमीनमहसुलाची कायम धाऱ्याची पद्धत सुरू केली. त्याच्या कारकिर्दीतील आणखी एक महत्वाची घटना म्हणजे एशिआटिक सोसायटी ऑफ बेंगॉल या संस्थेची स्थापना, ही होय. ( पुराणवस्तुसंशोधन पाहा. )

इ. स. १७९७ साली लॉर्ड वेलस्ली गव्हर्नर जनरल झाला. हिंदुस्थानात ब्रिटिशांची सार्वभौम सत्ता प्रस्थापित करणे हे त्याचे धोरण होते. त्याने निरनिराळ्या राजांना व सरदारांना वेगवेगळे गाठून त्यांचा पराभव केला आणि त्यांच्याकडे आपली तैनाती फौज ठेवून सर्वत्र आपली सत्ता पक्की केली.

त्यानंतर लॉर्ड मिंटोच्या कारकिर्दीत ( १८०७–१३ ) पेंढारी, दरोडेखोर व चांचे लोकांचा बंदोबस्त करण्यात आला. त्याने बंगालमधील शेती व आर्थिक स्थिती यांचे सर्वेक्षण कर-वले. त्याच्या अहवालावरून १९ व्या शतकाच्या आरंभी बंगालच्या ग्रामीण भागाची स्थिती किती हलाखीची होती ते समजते.

इ. स. १८३३ च्या कायद्याने एकाच व्यक्तीकडे गव्हर्नर जनरल व बंगालचा गव्हर्नर ही दोन्ही अधिकारपदे देण्यात आली. त्या वेळी बंगाल, बिहार, ओडिसा, आराकान व तेन्नासिरिम हे सर्व प्रदेश एकाच प्रांतात समाविष्ट करण्यात आले होते. पुढ तेन्नासिरिम, आराकान व आसाम हे वेगवेगळे करण्यात आले. इ. स. १८५७ मध्ये कलकत्ता युनिव्हर्सिटीची स्थापना झाली. १८६२ साली कलकत्त्याचे हायकोर्ट सुरू झाले आणि त्याच वर्षी बंगालचे पहिले लेजिस्लेटिव्ह कौन्सिल अस्तित्वात आले. इ. स. १८५८ साली ब्रिटिश सरकारने हिंदुस्थानातील कंपनी – सरकारच्या ताब्यातील सर्व प्रदेशाचा राज्यकारभार प्रत्यक्ष आपल्या हाती घेतला.

प्लासीच्या विजयामुळे ब्रिटिश साम्राज्याचा पाया घातला असला, तरी बंगाली लोकांना मात्र त्याची जाणीव व्हायला पुष्कळ वर्षे लागली. बंगालमधील हिंदूंच्या दृष्टीने मुसलमानी सत्तेच्या जागी ब्रिटिश सत्ता आली, यात दुःख वाटण्याजोगे काहीच नव्हते. कारण अनेक शतके तिथे मुसलमानांची जुलमी राजवट चालू होती, तिला ते विटले होते. त्यांना मुसलमानी राज्यही परकेच होते आणि त्यातही सदैव अंदाधुंदीच माजलेली असे. त्यामुळे हिंदू जनतेने इंग्रजांना प्रतिकार न करता त्यांचे स्वागतच केले. राजा राममोहन राय यांना तर ब्रिटिश राज्य म्हणजे ईश्वराची कृपा असेच वाटले. मुसलमान लोकांना ब्रिटिश सत्तेविषयी द्वेष वाटत असला, तरी तेही अराजकला कंटाळले होते आणि ब्रिटिशांना विरोध करण्याचे सामर्थ्यही त्यांच्यांत उरले नव्हते.

बंगालमध्ये ब्रिटिश राज्य प्रथम सुरू झाल्यामुळे त्या प्रदे-शात इंग्रजी शिक्षणाचा व पाश्चात्य विद्यांचा प्रसार लवकर सुरू झाला. त्यामुळे तत्कालीन सुशिक्षित लोकांच्या मनात आपले धार्मिक आचार, सामाजिक रूढी व अंधश्रद्धा यांसंबंधी विचार करण्याची वृत्ती निर्माण झाली. तिला अनुसरून राजा राम-मोहन राय प्रभृती विचारवंतांनी हिंदू धर्माचे विकृत स्वरूप सुधारण्यासाठी ब्राह्म समाजाची स्थापना केली. मूर्तिपूजा, सतीची चाल, जातिभेद यांचा त्यांनी निषेध केला. आणि विधवा-विवाह, समुद्रपर्यटण, इ. सुधारणांचा पुरस्कार केला. ईश्वरचंद्र विद्यासागर, बंकिमचंद्र चटर्जी आणि स्वामी विवेकानंद यांनी हिंदू धर्माचे तेजस्वी तत्त्वज्ञान समाजाला सांगून समाजात नवचैतन्य आणले.

सामाजिक व धार्मिक जागृतीप्रमाणेच बंगालमध्ये राजकीय जागृतीही लवकरच सुरू झाली. ब्रिटिश राज्य सुरू झाल्यानंतर देशात शांतता व सुव्यवस्था निर्माण झाल्यामुळे लोकांनी प्रारंभी त्याचे स्वागत केले. पण कालांतराने ब्रिटिश राज्यकर्ते व व्यापारी आपल्या देशातील धन लुटून नेत आहेत व आपली पिळवणूक होत आहे, हे लोकांच्या ध्यानात येऊ लागल्यामुळे त्यांच्यांत असंतोष धुमसू लागला. त्याचप्रमाणे अनेक शतकांच्या पार-तंत्र्याच्या काळात लोकांची राष्ट्रीय वृत्ती नष्ट झाली होती, ती पुन्हा जिवंत झाली. या जागृतीचे बरेच श्रेय बंकिमचंद्र यांना दिले पाहिजे. पाश्चात्य संस्कृतीचे अंधानुकरण म्हणजे मानसिक गुलामगिरी असे त्यांनी म्हटले व राष्ट्रीय वृत्तीची वाढ होण्यासाठी जनतेला मातृभूमीची भक्ती करण्याचे आवा-हन केले. पुढे श्री. अरविंद घोष यांनीही तत्कालीन राष्ट्रीय सभेच्या नेत्यांच्या याचक वृत्तीवर जळजळीत टीका करणारी

लेखमाला लिहून तिच्यातून आपली तेजस्वी वृत्ती प्रकट केली. त्यामुळे वंगाली लोकांत जहाल विचारांचे बीजारोपण झाले.

इ.स.१९०५ साली व्हाइसरॉय लॉर्ड कर्झन याने जी बंगालच्या फाळणीची घोषणा केली, ती या कामी अत्यंत स्फोटक अशी घटना ठरली. त्याने बिहार, ओडिसा व प. बंगाल मिळून एक प्रांत आणि आसाम व पूर्व बंगाल मिळून दुसरा प्रांत अशी विभागणी करण्याचे ठरवले. राष्ट्रीय चळवळीचे केंद्र असलेल्या बंगालच्या एकात्मतेचा भंग करणे हाच त्याचा अंतस्थ उद्देश होता. म्हणून बंगालच्या नेत्यांनी त्या योजनेला कसून विरोध केला. वंगभंगाच्या या संकटामुळे स्वदेशीची व बहिष्काराची देशव्यापी चळवळ सुरू झाली. लो. टिळक यांनी त्या चळवळीला उचलून धरले व देशातले वातावरण तापवून सोडले. कर्झनने मग दडपशाही सुरू केली. पण लोक तिलाही पुरून उरले. बंकिमचंद्रांच्या आनंदमठ कादंबरीतले ‘वंदे मातरम्’ हे गीत ते राष्ट्रगीत म्हणून गाऊ लागले व त्याबद्दल फटक्यांची शिक्षाही भोगू लागले.

काँग्रेसचे नेते वृत्तीने नेमस्त होते. सुरेंद्रनाथ बानर्जी, भूपेंद्रनाथ बसू प्रभृतींना लो. टिळकांची जहाल मते पसंत नव्हती. त्यांनी काँग्रेसचे बाविसावे अधिवेशन कलकत्ता येथे भरवताना दादाभाई नौरोजींना अध्यक्ष केले. पण त्यांनीच आपल्या अध्यक्षीय भाषणात स्वराज्याची मागणी केली. त्यांनी कर्झनच्या अरेरावीवरही कडक टीका केली. १९०६ साली बारिसाल येथे भरलेली परिषद सरकारच्या जुलमामुळे खूप गाजली. त्याच साली वंदेमातरम व युगांतर ही पत्रे निघाली आणि श्री. अरविंद व बारीन्द्रकुमार घोष या बंधूंनी त्यांतून क्रांतिकारक विचारप्रणालीचा उदोकार केला. त्यांच्या नेतृत्वाखाली बंगाली क्रांतिकारकांचा एक पक्षच संघटित झाला आणि त्याने सशस्त्र क्रांतीची तयारी सुरू केली. त्या सत्रात बारींद्रकुमार, खुदिराम बोस, प्रफुल्लचंद्र चाकी, उल्हासकर दत्त, इ. तरुणांनी इंग्रजांविरुद्ध शस्त्राचार सुरू केला. त्यांतील खुदिराम हा फाशी गेला, चाकीने आत्महत्या केली व बाकीचे काळ्या पाण्याची शिक्षा भोगायला अंदमानात गेले.

देशात असा भयानक उद्रेक सुरू झाल्याचे पाहून सरकारने १९११ साली फाळणी रद्द केली. तरीही ते अग्निकुंड धगधगतच राहिले. मात्र योग्य नेतृत्वाच्या अभावी त्याला क्रांतियुद्धाचे स्वरूप न मिळता केवळ दहशतवादाचे स्वरूप मिळाले. या क्रांतिकारकांचे एक पुढारी राशबिहारी बोस यांनी सशस्त्र उठावाचे अनेक प्रयत्न केले; पण त्यांना त्यांत फारसे यश लाभले नाही. शेवटी १९१५ साली ते जपानला गेले व तिथून त्यांनी भारताच्या स्वातंत्र्यासाठी खटाटोप सुरू केला.

वंगभंगाच्या चळवळीत श्री. अरविंद घोष यांचा खटला चालवणारे चित्तरंजन दास पुढे काँग्रेसमध्ये शिरून देशाचे राजकारण करू लागले. बंगाली तरुणांना योग्य मार्ग दाखवण्याच्या कामी त्यांनी आटोकाट प्रयत्न केले. पुढे आपली वकिली सोडून ते म. गांधींनी सुरू केलेल्या असहकाराच्या चळवळीत सामील झाले. त्यांचे नेतृत्व लाभल्यामुळे हजारो बंगाली तरुणांनी त्या चळवळीत भाग घेतला. पुढे दासबाबूंना ही असहकारिता फलद्रूप होईल असे वाटेनासे झाले; म्हणून त्यांनी स्वतंत्र स्वराज्यपक्ष काढून, विधिमंडळात जाऊन सरकारशी झगडण्याचा उपक्रम सुरू केला.

देशबंधू दास यांच्याप्रमाणेच बिपिनचंद्र पाल यांनीही वंगभंग, स्वदेशी व बहिष्कार या आंदोलनात भाग घेऊन आपल्या अमोघ वक्तृत्वाने सारा बंगाल भारून टाकला.

बंगाली देशभक्तांच्या मालिकेतले मेरुमणी म्हणजे नेताजी सुभाषचंद्र बोस हे होत. सरकारी नोकरीचा मोह सोडून त्यांनी १९२० च्या सत्याग्रहाच्या आंदोलनात उडी घेतली. दासबाबूंच्या मृत्यूनंतर बंगालचे नेतृत्व सुभाषचंद्रांकडेच गेले. त्यांनी सनदशीर व क्रांतिकारक अशा दोन्ही प्रकारच्या संघटना निर्माण केल्या. जवाहरलाल नेहरूंचे ते उजवा हात ठरले. दोघांनी मिळून देशातील तरुणांना जागृत व संघटित केले आणि संपूर्ण स्वातंत्र्याची घोषणा केली. १९३८ साली सुभाषबाबू काँग्रेसचे अध्यक्ष झाले. पुढे दुसऱ्या महायुद्धाच्या काळात ते स्थानबद्ध असताना तिथून निसटले व मलायात जाऊन त्यांनी आझाद हिंद सेना उभारली. नंतर जपानच्या मदतीने भारताला मुक्त करण्यासाठी ते दिल्लीकडे निघाले. पण तेवढ्यात जपानचाच पराभव झाल्यामुळे त्यांचे सर्व प्रयत्न निष्फळ ठरले. मात्र भारताला स्वातंत्र्य मिळवून देण्यात सुभाषचंद्रांच्या व त्यांच्या आझाद हिंद सेनेच्या आक्रमक चळवळीला बरेच मोठे श्रेय दिले पाहिजे, यात शंका नाही.

**धार्मिक इतिहास** – बंगालमधील आदिवासी लोकांचा धर्म वैदिक धर्मापेक्षा वेगळा होता. त्यात पितर, मातृदेवता, ग्रामदेवता, वृक्ष, नद्या, डोंगर, भुतेखेते यांच्या पूजेला प्राधान्य होते. त्यातील बहुतेक सर्व पूजाप्रकार कालांतराने हिंदू धर्मात समाविष्ट झाले. धर्मठाकूर, मनसा, शीतळा, जंगुली, पर्णसवरी, इ. देवतांची पूजा हिंदूंनी त्या आदिवासी लोकांकडून स्वीकारली व आपले पूजोपासनेचे विधी त्या देवतांना लावले.

वैदिक धर्माचा प्रसार बंगालमध्ये होण्यापूर्वीच जैन व बौद्ध हे धर्म तिथे बरेच प्रचलित झाले होते. मात्र राध प्रदेशात जैन धर्माचा प्रसार करताना महावीराला पुष्कळ हालअपेष्टा सोसाव्या लागल्या, असे आयारंग सुत्तावरून कळते. पण त्या-

नंतर मात्र जैन धर्माचा प्रसार बंगालमध्ये सुकर झाला. इ. स. च्या ७ व्या शतकापर्यंत जैन धर्म तिथे चालू होता, असे युआन च्वांगच्या लेखांवरून समजते. त्या काळी पुंड्रवर्धन हे जैन धर्माचे मोठे केंद्र होते, असे त्याने लिहून ठेवले आहे. त्यानंतर मात्र तो धर्म बंगालमधून हळूहळू ऱ्हास पावू लागला.

बंगालमध्ये बौद्ध धर्माचा प्रवेश बुद्धाच्या काळीच झाला होता. गौतम बुद्ध स्वतःच त्या प्रदेशात जाऊन पुंड्रवर्धन, समतट, कर्णसुवर्ण, इ. जागी काही दिवस राहिला होता, असे कळते. अशोकाने बांधलेले अनेक स्तूप युआन च्वांगने बंगालमध्ये पुंड्रवर्धन, समतट, ताम्रलिप्ती व कर्णसुवर्ण येथे पाहिले होते. नागार्जुनाने बंगालमध्ये काही विहारही निर्माण केले होते. बौद्धांच्या सोळा महास्थविरांपैकी कालिक भिक्षू हा ताम्रलिप्तीचा रहिवासी होता. फाहियान याला इ. स. च्या ५ व्या शतकात ताम्रलिप्ती येथे २२ बौद्ध विहार आढळले. तिथे दोन वर्षे राहून त्याने अनेक बौद्ध ग्रंथांच्या व चित्रांच्या प्रती केल्या. इ. स. च्या ८ व्या शतकात पाल वंशाचे राज्य बंगालमध्ये सुरू झाले, तेव्हा बौद्ध धर्माचा ऱ्हास सुरू झाला होता, असे तारानाथांच्या इतिहासावरून कळते. परंतु पाल राजांनी बौद्ध धर्माला राजाश्रय दिल्यामुळे त्याचा पुन्हा उत्कर्ष झाला व अनेक बौद्ध पंडित तिथून तिबेटात धर्मप्रचारासाठी गेले. त्यांतील दीपंकर श्रीज्ञान हा प्रमुख होय. पाल राजवटीत शेकडो विहार व बौद्ध देवतांच्या मूर्ती बंगालमध्ये निर्माण झाल्या आणि तिथे हजारो भिक्षूंनी ज्ञानसाधना करून नवे ग्रंथ रचले. वज्रयान हा बौद्धांचा तांत्रिक पंथही त्याच कालात उत्कर्ष पावला.



दुर्गापूजोत्सवातील मूर्ती

इ. स. च्या ५ व्या शतकापासून बंगालमध्ये वैदिक धर्माचा प्रसार विशेष जोमाने सुरू झाला. गुप्त सम्राटांच्या साहाय्याने हजारो ब्राह्मण बंगालमध्ये जाऊन स्थायिक झाले व त्यांनी आपला वैदिक धर्म तिथे प्रस्थापित केला. मात्र त्यांचा वैदिक

धर्म शुद्ध स्वरूपात तिथे दीर्घकाल चालला नाही. बंगालमधील मूळ धर्म व बौद्ध धर्म यांचा त्याच्यावर खूप प्रभाव पडला. गुप्त व सेन राजे वैदिक धर्माचे पुरस्कर्ते असल्यामुळे त्यांच्या काळात त्या धर्माचा खूपच उत्कर्ष झाला. पाल राजांनीही बौद्ध धर्माबरोबर वैदिक धर्माचा पुरस्कार केला. त्या काळात तिथे अनेक शैव व वैष्णव मंदिरे निर्माण झाली आणि शिवाच्या व विष्णूच्या विविध प्रकारच्या मूर्तीही निर्माण झाल्या. त्या पाषाणाच्या असोत किंवा धातूच्या असोत, त्यांची घडण अत्यंत सुबक व कलात्मक आहे.

बंगालमध्ये वरील सर्व पंथांपेक्षा तंत्र संप्रदायांचा प्रसार जास्त झाला. तिथल्या मूळ रहिवाशांचे तांत्रिक आचार हिंदू व बौद्ध लोकांनी आत्मसात केले आणि त्यांना स्वतःच्या धार्मिक तत्त्वज्ञानाचे अधिष्ठान दिले. त्यामुळे या नवीन संप्रदायाचा विकास वेगाने झाला. त्या संप्रदायात शक्तिपूजेला मुख्य स्थान आहे. दुर्गा, काली, चंडी, पद्मा, गौरी, इ. अनेक नावांनी तिची पूजा बंगालमध्ये केली जाते. मनसा, बासुली, शीतळा, षष्ठी, मंगला याही मातृदेवता मानून पूजल्या जातात.

बंगाली लोकांच्या जीवनात दुर्गापूजेला फार महत्त्वाचे स्थान आहे. आश्विन शुद्ध प्रतिपदेपासून विजयादशमीपर्यंत दुर्गापूजा उत्सव बंगाली लोक अत्यंत थाटाने व श्रद्धेने साजरा करतात.

बंगालमध्ये नाथपंथाचाही बराच प्रसार झाला होता. नाथपंथी साधू शिव व शक्ती यांची उपासना करतात. बंगालमधले नाथपंथी लोक सांप्रत धर्मठाकुराला भजतात.

हिंदू धर्मातील कर्मकांड व तांत्रिक पंथाचे विकृत आचार यांचा बंगाली समाजावर जबरदस्त पगडा बसल्यामुळे त्या समाजाची अधोगती झाली होती. पुढे चैतन्य महाप्रभूंचा उदय झाल्यावर त्याने लोकांना त्या तांत्रिक कर्मकांडातून बाहेर काढण्यासाठी भक्तिमार्गाचा पुरस्कार केला.

इ. स. १२०० पासून इ. स. १७५७ पर्यंत म्हणजे सुमारे साडेपाच शतके बंगालवर मुसलमानी राज्य चालू होते. त्यामुळे तिथे इस्लामचा पुष्कळच प्रसार झाला. मुसलमानांनी असंख्य हिंदू मंदिरे व बौद्ध विहार यांची मोडतोड करून पुष्कळ लोकांना मुसलमान केले. त्यामुळेच बंगालमध्ये मुसलमानांची संख्या हिंदूंपेक्षा जास्त आढळते. त्यांनी बंगालमध्ये अनेक मशिदी, कबरी व मिनार यांची निर्मिती केली. त्यातील पंडुआ येथील अदिना मशिद सर्वांत भव्य व प्रेक्षणीय आहे. ती इ. स. च्या १४ व्या शतकात बांधलेली आहे. मुस्लिम शिल्पकामात पूर्वीची मंदिरे व विहार यांच्या भग्नावशेषांचा उपयोग विपुल प्रमाणात केलेला आढळतो.

इ. स. च्या १७ व्या शतकाच्या प्रारंभी पोर्तुगीज व इंग्रज लोकांनी बंगालमध्य व्यापारासाठी प्रवेश केला आणि हळूहळू तिथे आपली ठाणी वसवली. त्याच शतकात ख्रिस्ती मिशनऱ्यांनी बंगालमध्ये ख्रिस्ती धर्माच्या प्रसाराला प्रारंभ केला. पण १९ व्या शतकापर्यंत त्यांनी फारशी प्रगती केली नव्हती. १९ व्या शतकात मात्र ख्रिस्ती धर्माचा प्रसार पुष्कळ झाला व अनेक चर्चेस उभारली गेली. (अपूर्ण)

• • •



ஈ-விலக்ஷணமான திருமேனியில் j₂நிறத்தையுடையவன்; kவிலக்ஷணமான திருமேனியில் கறுத்து நெய்த்த j₂ நிறத்தையுடையவன்; l அவர்களை ஸதா₃நுப₄வம் பண்ணிவைக்கும் போது m படிவிடும்படி. (n செந்தாமரைக் கண்ணன்) o அகவாயில் கு₃ணங்களுக்கு ப்ரகாஶகங்களான திருக்கண்களையுடையவன். (p பொருசிறைப் புள் q உவந்தேறும்) r ஸர்வேஶ்வரன் பெரியதிருவடியை r₂ மேற்கொள்ளுவதாக நினைத்து "வா" என்று அழைத்தால், அவனுடைய அங்கீ₃காரத்தாலுண்டான ஹர்ஷத்தாலே பெருக்காறு சுழித்தாற்போலே சுழித்துத் தன்னில்தான் பொராநின்றுள்ள சிறகையுடையனுய்க் கொண்டாயிற்றுத் தோற்றுவது. s அவனும் "நாம் இவனை மேற்கொள்ளப்பெற்றேமே" என்று திருவுள்ளத்தில் ப்ரீதியோடேயாயிற்று மேற்கொள்ளுவது. (பூமகளார் தனிக் கேள்வன்) t புஷ்பத்தில் பரிமளம் வடிவுகொண்டாற்போலே இருப்பாளாய், போ₄க்₃ய தைகவேஷையான பெரியபிராட்டியார்க்கு வல்லப₄ன் என்றால், இப்படிப்பட்ட ஐஶ்வர்யத்துக்கு இரண்டாம் விரலுக்கு ஆளில்லாதபடி இருக்கிறவன்.

---

அ—i நெய்த்து ஸ்நிக்₃த₄மாய். j (பேச்சுக்கு அவிஷயமாம்படி விலக்ஷணமான) என்றது-வைலக்ஷண்யாதிஶயத்தாலே, "இன்னபடி" என்று சொல்லவொண்ணாது என்றபடி. g₂,k "நல்" என்றது-மேனிக்கு விஶேஷணமாக்கி அருளிச்செய்கிறார் (விலக்ஷணமான இத்யாதி₃) g...j₂ ப்ரத₂மவாக்யம் மூன்றையும் வர்ணவிஶேஷணமாக யோஜிக்கிறது; g,g₂,k,j₂ த்₃விதீயவாக்யம், இரண்டை - வர்ண விஶேஷணமாகவும், சரமத்தை மேனிவிஶேஷணமாகவும் யோஜிக்கிறது. j₂ வண்ணம் - நிறம். l "அமரர்கள் ஆதி முதல்வன் கருகிய நீல நன்மேனிவண்ணன்" இதி பத₃ஸங்க₃தி ஸித்₃த₄ மர்த்த₂மாஹ (அவர்களை இதி) m படி-ஜீவநம். g,g₂,n,o "கருகிய நீல நன்மேனி வண்ணன் செந் தாமரைக்கண்ணன்" இதி பத₃ஸங்க₃திம் ஹ்ருதி₃ நித₄ாய, "கருகிய நீலநன் மேனி வண்ணன்" இத்யநேந விக்₃ரஹகு₃ண உக்தா:; அநேந ஸ்வரூபகு₃ண உச்யந்த இத்யபி₄ப்ராயேணாஹ (அகவாயில் இதி) இது கண்ணில் சிவப்புச் சொல்லுகிறதுக்குத் தாத்பர்யம். p,r "பொருசிறை" என்கையாலே திருவடியுடைய ப்ரீதி சொல்லுகிறது. q,s "உவந்து ஏறும்" என்கையாலே-ஈஶ்வரனுடைய உகப்புச்சொல்லுகிறது. r₂ மேற்கொள்ளுவதாக-ஆரோஹணார்த்த₂மாக. t நாமாந் தராண்யநபி₄த₄ாய "பூமகளார்" இதி வக்துர் ப₄ாவமாஹ (புஷ்பத்தில் இதி) காரணகு₃ண: கார்யேऽப்யநுவர்த்தந்த இதி ப₄ாவ:.

---

ஜீ—i நெய்த்து-ஸ்நிக்₃த₄மாய். g₂ நல்-விலக்ஷணமான. j (பேச்சுக்கு அவிஷயமாம்படி விலக்ஷண மான) என்றது - வைலக்ஷண்யாதிஶயத்தாலே, "இன்னபடி" என்று சொல்லவொண்ணாது என்றபடி. g₂,k "நல்" என்றத்தை மேனிக்கு விஶேஷணமாக்கி அருளிச்செய்கிறார் (விலக்ஷணமான இத்யாதி₃) j₂ வண்ணம்-நிறம். l "அமரர்கள் ஆதி முதல்வன் கருகிய நீல நன்மேனி வண்ணன்" என்று கூட்டி ப₄ாவம் (அவர்களை இத்யாதி₃) m படி-ஜீவநமும், திருமேனியும். p,q,r,s "பொரு சிறை, உவந்து ஏறும்" என்ற பத₃ங்களுக்கு ப₄ாவம் (ஸர்வேஶ்வரன் இத்யாதி₃ வாக்யத்₃வயமும்) p,r "பொருசிறை" என்கையாலே - திருவடியுடைய ப்ரீதி சொல்லுகிறது. q,s "உவந்து ஏறும்" என்கையாலே-ஈஶ்வரனுடைய உகப்புச் சொல்லுகிறது. r₂ மேற்கொள்ளுவதாக-ஆரோஹணார்த்த₂ மாக. t நாமாந்தரங்களைச் சொல்லாமல் "பூமகளார்" என்றவர்க்கு ப₄ாவம் (புஷ்பத்தில் இத்யாதி₃).

4. உடனமர் காதல் மகளிர் திருமகள் மண்மக ளாயர்
மடமகள் என்றிவர் மூவ ராளு முலகமும் மூன்றே.
உடனவை யொக்க விழுங்கி யாலிலைச் சேர்ந்தவ னெம்மான்.
கடல்மலி மாயப் பெருமான் கண்ணனென் னொக்கலை யானே.

ஆ— 4. உடனமர் (உடன் அமர்) இனிமேல் அவன் கலந்தருளின க்ரமத்தைச் சொல்லுகிறார்.

பெரிய பிராட்டியாரும், ஸ்ரீபூமிப்பிராட்டியும், நப்பின்னைப் பிராட்டியும் அவனுக்கு திவ்யமஹிஷிகள்; ப்ருதிவ்யந்தரிக்ஷாதி ஸர்வலோகங்களும் அவனுக்கு விபூதிகளாம்; இந்த லோகங்களினுடைய ஸ்ருஷ்டி ஸ்திதி ஸம்ஹாராதிகள் அவனுக்கு லீலை; இன்னம் [illegible], ஆச்சர்யமான கல்யாண குணங்களை உடைய [illegible], யசோதைப் பிராட்டி ஒக்கலையிலேயிருந்தருளுமாபோலே என்னுடைய ஒக்கலையிலே எழுந்தருளினான் என்கிறார் 4.

([illegible]) v அவர்களோடு பரிமாறுமாபோலே ஒருவழியால் வந்த [illegible] என்னளவில்; நித்யஸூரிகள் எல்லார் பக்கலிலும் பண்ணும் [illegible] என்பக்கலிலே பண்ணாநின்றான். (w உடனே) x "இவன் ஒரு விபூதிமான், அந்யபரன்" என்று தோற்ற இருக்கிறிலன்; y நித்யவிபூதியில் கேள்வியும் இவனேயிருந்தேயாமித்தனை. zA "தண்டாமம் செய்து" என்று-நித்யவிபூதியில் பண்ணும் விருப்பத்தைப் பண்ணினான் என்றார் கீழில் திருவாய்மொழியில்; இதில், அவ்விபூதியிலுள்ளாரோடு பரிமாறும் படியை என்னொருவனோடு பரிமாறினான் என்கிறார். 3.

u, v "அமரர்கள் ஆதிமுதல்வன் பொருசிறைப் புள்ளுவந்தேறும் பூமகளார் தனிக்கேள்வன் என்னோடுடனே வந்திருந்து ஒருகதியின் சுவை தந்திட்டு ஒழிவிலன்" இத்யந்வயம் ஹ்ருதிநிதாயாஹ (அவர்களோடு இத்யாதி) u கதி-வழி; சுவை - ரஸம். w "உடனே" இத்யநேந "அருகலிலான்" இத்யதஸ் ஸஹிதத்வமுச்யதே. x அவதாரணார்த்தமாஹ (இவன் ஒரு விபூதிமானிதி) y அவதாரணார்த்தஸ்ய சரமகாஷ்டாமாஹ (நித்யவிபூதியில் இதி) z பௌநருக்த்யம் பரிஹரதி வா. பாட்டுக்கெல்லாம் தாத்பர்யம் வா (தண்டாமம் இத்யாதி) "அருகலிலாய பெருஞ்சீர் அமரர்கள் ஆதிமுதல்வன, மேனியில் கருகிய நீலநல் வண்ணன், நன்மேனியில் கருகிய நீலவண்ணன் என்னவுமாம், செந்தாமரைக்கண்ணன் பொருசிறைப் புள்ளுவந்தேறும் பூமகளார் தனிக்கேள்வன், என்னோடு ஒரு கதியின் சுவை தந்திட்டு ஒழிவிலன், உடனே" இத்யந்வய:. "அருகலிலாய என்று தொடங்கி, பூமகளார் தனிக்கேள்வன் என்னோடுடன் ஒரு கதியின் சுவை தந்திட்டு ஒழிவிலன்" என்று உரை அந்வயம். 3.

u, v "அமரர்கள் ஆதிமுதல்வன், பொருசிறை" இத்யாதிகளைக்கூட்டி பாவம் (அவர்களோடு இத்யாதி) u கதி-வழி; சுவை-ரஸம். x அவதாரணார்த்தம் (இவன் ஒரு இத்யாதி) y அவதாரணார்த்த சரமகாஷ்டாமாஹ (நித்யவிபூதியில் இத்யாதி) z பாட்டுக்கெல்லாம் தாத்பர்யம் (தண்டாமம் இத்யாதி) "அருகலிலாய இத்யாரப்ய. தனிக்கேள்வன் என்னோடுடன் ஒருகதியின் சுவை தந்திட்டு ஒழிவிலன்" இத்யந்வய:. 3.

ப—117 A 1.7.7.